# मराठी शब्दकोश

## दुसरा खंड

(क ते ङ)

प्रथम संपादन

य. शं. कानिटकर

*एम. एम*

•

पुन:संपादन

प्राचार्य रामदास डांगे

•

संपादन सहयोगी

- पूर्णिमा लिखिते *एम. ए.*
- सुप्रिया महाजन *एम.ए. (संस्कृत)*
- अरुण प्रभुणे ( पुणे ) *एम. ए. बी. एड. पीएच. डी.*
- रूपाली अवचरे *एम.ए., एम. फिल.*




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ -मुंबई

◆ 'मराठी शब्दकोश'(दुसरा खंड)

❧

◆ प्रथम आवृत्ती
मार्च २०१०

❧

◆ प्रकाशक
सचिव
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ
रवीन्द्र नाट्य मंदिर, दुसरा मजला
पु. ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी आवार
सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई - ४०००२५.

❧



❧

◆ अक्षर जुळणी
सौ. चेतना विकास वडके
शब्दमाधुरी, पुणे.
भ्रमणभाष : ९८९०९८४९२७

❧

◆ मुद्रक
व्यवस्थापक
शासकीय फोटोझिंको मुद्रणालय
पुणे ४११००१.

❧

◆ किंमत : तीनशे रुपये फक्त

# निवेदन

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाची स्थापना झाल्यानंतर जे काही महत्त्वाचे वाङ्मयीन प्रकल्प हाती घेण्यात आले त्यामध्ये मराठी शब्दकोशाचे प्रकाशन ही एक महत्त्वाची योजना होती. तद्नुसार महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने मराठी भाषेचा एक अद्यावत महाकोश किंवा बृहत्कोश नव्याने सिद्ध करावा, असा निर्णय घेतला व १९७० साली त्या निर्णयाला शासनाची मंजुरी मिळून या प्रकल्पाचे काम सुरू करण्यात आले. या संकल्पित शब्दकोशाचे संपादक म्हणून प्रारंभी डॉ. ना. गो. कालेलकर यांची नियुक्ती करण्यात आली होती. हे काम डेक्कन कॉलेज, पुणे येथे करावे असे ठरले व डेक्कन कॉलेजच्या भाषाशास्त्र विभागात ते १९७० ते १९७२ पर्यंत चालू होते. त्यानंतर या प्रकल्पाचे काम मुंबई साहित्य संघाकडे सोपविण्यात आले. त्या वेळी डॉ. वि. रा. करंदीकर यांचे सहकार्य या कोशाच्या सिद्धतेसाठी घेण्यात आले. त्यानंतर मात्र शब्दकोश रचनेचे काम बराच काळ रेंगाळत राहिले व त्याच्या व्यवस्थेमध्ये काही प्रमाणात शैथिल्य आले. त्यामुळे याबाबत मंडळाने नवीन व्यवस्था करण्याचे ठरवून शब्दकोश प्रकल्पाचे काम टिळक स्मारक ट्रस्ट, पुणे या संस्थेद्वारा करून घेण्याचे ठरविले व श्री. यशवंत कानिटकर यांना शब्दकोशाचे संपादक म्हणून नियुक्त करण्यात आले. त्यांच्या कारकिर्दीपर्यंत प्रस्तुत शब्दकोशाचे तीन पूर्ण खंड व चौथा अपूर्ण खंड तयार झाले; परंतु नंतर शब्दकोशाशी संबंधित तज्ज्ञांमध्ये मतभेद होऊन शब्दकोश प्रकल्पाचे काम खंडित झाले. दरम्यान श्री. कानिटकर हेही निवृत्त झाले व या शब्दकोश प्रकल्पाचे कार्य होते त्याच अवस्थेत राहिले.

मंडळाच्या उद्दिष्टांमध्ये शब्दकोश प्रकल्पाला महत्त्व देण्यात आलेले होते व मंडळाचे ते एक मोठे अंगीकृत कार्य होते. ते कार्यच खंडित झाल्यामुळे एका महत्त्वाच्या वाङ्मय प्रकल्पाला महाराष्ट्र वंचित झाला होता. २००६ साली मंडळाचे अध्यक्षपद माझ्याकडे आले व मंडळाचे हे खंडित राहिलेले महत्त्वाचे कार्य पुनरुज्जीवित करण्याचा मी निर्णय घेतला. पुनर्रचित मंडळाने त्याला मान्यता दिली. शासनाचीही त्याप्रमाणे मान्यता घेण्यात आली आणि अर्धवट राहिलेल्या शब्दकोश प्रकल्पाचे काम पुढे नेण्याची जबाबदारी प्राचार्य रामदास डांगे (मंडळाचे सदस्य) यांजकडे सर्वानुमते सोपविण्यात आली. प्राचार्य रामदास डांगे हे शब्दकोश विषयक कामाचे माहितगार असून, त्यांनी या प्रकल्पाच्या शिवधनुष्याची जबाबदारी स्वीकारण्याचे ठरविले. याचा मंडळाला विशेष आनंद झाला. त्यांच्या अपेक्षेप्रमाणे मंडळाने त्यांना पुणे येथे स्वतंत्र कार्यालयीन जागा, त्या कामासाठी लागणारे तज्ज्ञ मदतनीस व आवश्यक तो निधी हे सारे उपलब्ध केले व जुलै २००७ पासून शब्दकोश निर्मितीचे कार्य रीतसर सुरू झाले. प्राचार्य डांगे यांनी पूर्वसूरींनी केलेल्या कार्याचे परिशीलन करून, तसेच त्यामध्ये आवश्यक ते बदल व सुधारणा करून शब्दकोशाचा पहिला खंड पूर्ण केलेला आहे व त्या सोबतच पुढील खंडांची पूर्व तयारी केलेली आहे. शब्दकोशाचे एकूण दहा खंड विचाराधीन आहेत. प्रत्येक खंडामध्ये सुमारे पंधरा हजार शब्दांचा समावेश असेल. या पहिल्या खंडामध्ये सुमारे वीस हजार शब्दांचा समावेश आहे. जवळजवळ दीड लक्ष मराठी शब्दांचे भांडार या कोशातून उपलब्ध होईल.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने हाती घेतलेल्या मराठी शब्दकोश खंड – २ चे प्रकाशन करताना मला विशेष आनंद होत आहे. कोशप्रकल्पाचे मुळात खंडित झालेले कार्य नव्याने सुरू करून ठरवलेल्या मुदतीत शब्दकोशाचा पहिला खंड वाचकांच्या हाती देण्याची प्राथमिकता मंडळाने स्थापन केलेल्या प्राचार्य रामदास डांगे व त्यांचे सहकारी यांच्या संपादकत्वाखाली कार्यालयाने पूर्ण केली. नंतरच्या अवघ्या वर्षभराच्या काळात शब्दकोशाचा हा दुसरा खंडही शब्दकोश कार्यालयाने पूर्ण केला. या तत्परतेबद्दल शब्दकोश प्रकल्प कार्यालय आणि त्याचे प्रमुख प्राचार्य रामदास डांगे यांना मी धन्यवाद देतो.

शब्दकोश निर्मितीचे काम हे जिकिरीचे व परिश्रमपूर्वक करावयाचे असते. पूर्वसुरींनी केलेल्या कामाच्या पार्श्वभूमीवर नवीन कोश सिद्ध करताना तो अधिकाधिक प्रमाण, प्रचलित भाषेतील शब्दसंपत्तीचा यथार्थ समावेश असलेला, शक्य तेवढा अद्यावत व परिपूर्ण होण्यावर कोशकर्त्याचा भर असावा लागतो. मराठीचे शब्दभांडार विपुल आहे. प्रत्यही त्यामध्ये प्रचलित मराठी भाषेतील, बोलीभाषांतील, ग्रामीण शब्दांची भर पडत असते. कालौघात जुने-प्राचीन शब्द प्रचारांतून बाहेर पडलेले असतात. या साऱ्याचा सारासार विवेक करून आजची व उद्याची मराठी भाषा शब्दसामर्थ्याने, शब्दकलेने व अर्थवैविध्याने कशी सुंदर व संपन्न होईल, याची कोश निर्मात्यावर जबाबदारी असते. प्रा. रामदास डांगे व त्यांना या कार्यात सहयोग देणारे त्यांचे संपादकीय सहकारी हे काम निष्ठापूर्वक व जाणकारीने पार पाडत आहेत याचा आदरेखून उल्लेख केला पाहिजे.

मंडळातर्फे हा शब्दकोश प्रकल्प लवकरात लवकर पूर्ण करून संकल्पितलेले उर्वरित खंड मराठी भाषेला अर्पण करता येतील, अशी मला उमेद वाटते.

**मधु मंगेश कर्णिक,**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

स्थळ : मुंबई
दिनांक : १२ मार्च २०१०

मराठी शब्दकोश
दुसरा खंड

## प्रास्ताविक

मराठी शब्दकोशाचा पहिला खंड मार्च २००९ मध्ये प्रकाशित झाला. प्रस्तुत खंडाच्या प्रास्तविकात संकल्पित मराठी शब्दकोशासंबंधी सविस्तर माहिती दिली आहे. तेथे 'दुसऱ्या व तिसऱ्या खंडांचे काम लवकरच पूर्ण करण्याचा आमचा प्रयत्न आहे', असे म्हटले आहे. आनंदाची बाब म्हणजे या खंडांचे काम पूर्ण झाले असून 'क' वर्गांकित दुसरा खंड अभ्यासकांसाठी उपलब्ध होत आहे. तिसरा खंडही प्रकाशनाच्या वाटेवर आहे, एवढेच येथे नमूद करतो.

पहिल्या खंडात 'अ–औ', दुसऱ्या खंडात 'क–ङ' आणि तिसऱ्या खंडात 'च–ण' (च आणि ट वर्गांतील) या वर्णांचा समावेश आहे. (पूर्वीच्या योजनेत ट वर्ग स्वतंत्र खंडाचा विषय होता). डिसेंबर २०१० पूर्वी हा खंडही प्रकाशित करण्याचा आमचा प्रयत्न आहे. तसे झाल्यास 'त–न' वर्णांकित चौथा खंड मार्च २०११ पर्यंत पूर्ण व्हावा. विशेष म्हणजे 'प' वर्गाच्या कामाचाही प्रारंभ १ एप्रिल २०१० पासून करण्याचे योजिले आहे.

मागील खंडाच्या प्रास्तविकातील नियोजनानुसार पुरवणी खंडात समाविष्ट केल्या जाणाऱ्या शब्दांच्या नोंदी करण्याचे काम ही हाती घेतले आहे. उपलब्ध कोशांशिवाय इतर माध्यमांद्वारे उपलब्ध होणाऱ्या शब्दांचा संग्रह करण्याचे काम ही सुरू आहे. प्रादेशिक बोलींतून प्रकाशित होणाऱ्या वाङमयाचा अभ्यास करून त्यातील शब्दसंग्रहाच्या संपादनाचे काम प्रगतीपथावर आहे. अशा कामासाठी अनेक तज्ज्ञ व्यक्तींचे सहकार्य घेत आहोत. तथापि या कामास अपेक्षित गती प्राप्त होऊ शकली नाही. शब्दकोशासारख्या कामात रुची असणाऱ्या अभ्यासू व्यक्तींनी सहकार्य केल्यास ह्या शब्दसंग्रहाची व्यापकता वाढण्यास मदत होईल.

आवश्यकता वाटल्यास काही बाबींचे स्पष्टीकरण तिसऱ्या किंवा त्यानंतरच्या खंडात करण्याचे ठरविले आहे. तेथेच ग्रंथ संक्षेप सूची देण्याचे ठरविले आहे. विविध बोलींतील शब्द नोंदींना नेटकेपण यावे यासाठी तज्ज्ञांचे सहकार्य मिळविण्याच्या बाबतीत आम्ही प्रयत्नशील आहोत; अशाच प्रयत्नातून औरंगाबाद जिल्ह्यातील कन्नड येथील शिवाजी महाविद्यालयात कार्यरत असलेले प्रा. डॉ. रमेश सूर्यवंशी, एम. ए. पीएच. डी. (भाषाविज्ञान), कृषिविषयक शब्दसंग्राहक डॉ. नारायण बोरुळकर आणि सीमावर्ती प्रदेशातील मराठी भाषेतील लेखक श्री. माधवराव कदम होळसमुद्रकर (जि. बिदर) यांच्या सहकार्याचा लाभ घडत आहे. तसेच शब्दकोशाच्या आनुषंगिक कार्यात सौ. सुषमा माने, बी. ए. आणि श्री. अरविंद कुलकर्णी, एम. ए. हे सहकारी कार्यरत आहेत.

शब्दकोशाचा उपयोग केवळ कठीण, अपरिचित शब्दांचा अर्थ पाहाण्यापुरताच मर्यादित नाही. भाषेला ज्ञानपातळीवर पोहचविण्याचे महत्कार्य कोशाच्या माध्यमातूनच होऊ शकते. या संदर्भात मराठी भाषा फारशी समृद्ध नाही, हे काही अंशी खरे आहे. या दृष्टीने काही नव्या परिशिष्टांची भर टाकण्याचा आमचा विचार आहे. मराठी विचारविश्व आणि भावजीवन पुष्ट होण्याच्या दृष्टीने या परिशिष्टांचा उपयोग होईल, अशी आशा बाळगणे अनाठायी ठरू नये. त्या दृष्टीने–

१. मराठी भाषा : इतिहास संस्कृती व्याकरण, व्यवहार, प्रमाणलेखन इ.
२. परिभाषा आणि संज्ञा – विविध शास्त्रे (ज्ञान विज्ञान).
३. प्राचीन हस्तलिखित कोशांचा अभ्यास.
४. जुन्या अर्थवाही शब्दांचे पुन:प्रस्थापन.
५. कोशांचे प्रकार आणि मराठीतील कोशवाङमय इ.

प्रस्तुत कोशाच्या उभारणीत पूर्वसुरींच्या अनेक जुन्या नव्या कोशांचा आधार घेतला आहे. काही कोशांचा निर्देश आणि उपयोग राहून गेला असल्यास वाचनसंस्कृतीच्या उपासकांनी प्रोत्साहक ठरणारी भर घालून, मराठी भाषेच्या या सेवाकार्यात सहभागी व्हावे, ही विनंती.

शब्दकोशाच्या या अवघड कार्यात, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे अध्यक्ष पद्मश्री श्री. मधू मंगेश कर्णिक यांची प्रेरक पाठराखण 'नित्य नवा दीस जागृतीचा' अशा स्वरूपाची आहे, हे नमूद केलेच पाहिजे. मंडळाच्या सचिवपदी नव्याने रुजू झालेल्या श्रीमती मीनाक्षी पाटील आणि त्यांचे सहकारी यांच्या सहकार्याची नोंद घेणे उचित ठरेल.

– संपादक



**क** देवनागरी लिपीतील १६ वे अक्षर. मराठी वर्णमालेतील पहिले व्यंजन. मराठीत साधारणत: प्रश्नवाचक शब्दातला प्रारंभिक नित्य घटक. जसे:- की, काय, कोण, कुठे, कधी, कसा, केव्हा, केवढा, किती इ.

**क** प्र. १. पुष्कळ नामांना ती दुसऱ्या शब्दाशी संयुक्त होताना (समासात) हा स्वार्थी प्रत्यय लागतो. उदा. आत्म-आत्मक, पंचभूतात्मक, निंदात्मक; बालक, पुत्रक, दंडक इ.२. मूल-मूलक : ज्यापासून उत्पन्न होतो तो या अर्थी : पुष्पमूलक सुख, स्त्रीमूलक कलह इ. ३. पुरस्सर, अनुसरून, मुद्दाम या अर्थी. उदा. बुद्धिपूर्वक, हेतुपूर्वक, आदरपूर्वक, शपथपूर्वक. ४. अल्पार्थी प्रत्यय.

**क** १. यम; विष्णू; अग्नी इ. देवता. २. मन, अंत:करण, आत्मा. ३. पक्षिविशेष; पक्षी; पक्ष्यांचा राजा. ४. पाणी; पिण्याचा पातळ पदार्थ.

**क** एक जीवनसत्त्व.

**[कइ -ई व कउ-ऊ पासून सुरू होणारे शब्द येथे न आढळल्यास कै व कौ मध्ये पहा.]**

**कई** पु. कही; सैन्यासाठी लागणाऱ्या धान्यवैरणीची व लाकडांची आसपासच्या खेड्यांतून लूट करून आणणारी टोळी : 'पेंढारी व लुटारू कईने स्वारांचें न ऐकतां गांव अगदी लुटलें.' - ऐलेसं ४०८१.

**कई, कई कईई** क्रिवि. १. केव्हा; कधी :'जळों आतां संसारू वो कई शेवट पुरे।' - तुगा १२०. २. कोठे :'एथेंही सलगी करूं बिहो। तरी निवो कई पां।' - ज्ञा ९.५ ३. किती.

**कउल** पु. कोळी :'पंढरीचा हाट कउलांची पेठ।' - चोखा २८.

**कऊबऊ** वि. ओंगळ; तिरस्कार वाटण्याजोगी; कुरूप (वस्तू).

**ककरी** स्त्री. पहा : **कंकर;** बारीक खडे; दगडाच्या बारीक चिपा.

**ककार** स्त्री. १. 'क' सारखा आकार असलेली वस्तू. २. (ल.) सुषुम्ना नाडी. पहा : **काकीमुख** ३. 'क' हा ध्वनी, अक्षर. ३. ब्रम्हा.
वि. क हे अक्षर ज्याच्या शेवटी आहे असे. उदा. मस्तक. [सं.]

**ककास** शोक; विलाप.

**ककुद** पु. मधला, फुगीर, उचललेला भाग; गाठ; वाढ; टेंगूळ; बैलाच्या मानेजवळ पाठीच्या कण्याचा उंचावलेला भाग; वशिंड. [सं.]

**ककुदमान** वि. ज्याच्या मानेवर वशिंड आहे असा (बैल).

**ककू** स्त्री. गळ्यातील घाटी; मानेचा पुढील भाग :'भविष्योत्तरें शोभे कंठ। बृहन्नारदीयें ककु बरवंट। ब्रह्मांड पुराणें ग्रीवा सुघंट। मनोहर शोभली ॥' - स्वानु ७.३.८९. [सं. ककुद् = उंचवटा]

**कक्रा** पु. (सराफी) हिरकणीच्या जातीचा रेतीचा दगड.

**कखाइ, कखाइया** पु. वि. परदोष पाहणारा :'अपक्व कखाइया (पुरुष धर्मापासौनि) जाए।' - लीचउ ३८६.

**कखाय** पु. दुर्वर्तन : 'तो कखाओ करी।' -श्रीकृच ३.
वि. दुर्वर्तनी; हीन आचरण करणारा :'कखायाचीये होमकुंडी: जीवजात पडले ब्रह्मांडी' - मुप्र १३८१.

**कच** स्त्री. १. चोहोकडून आलेली अडचणीची स्थिती; घोटाळा; संकट. २. चेप; दाब; अटकाव; कोंडमारा. ३. रेव; रेतीचे बारीक कण; खड्याचा अंश (भाकरी, पीठ इत्यादीतील). ४. (गवंडी) बारीक अर्धा इंची खडी. ५. माघार घेणे; भीतीने शरण जाणे; पाय मागे काढणे. (क्रि. खाणे, खादणे) :'इंग्रजी सैन्यानें कच खाल्ली.' - इंप १३९. ६. भांडाभांडी; तंटा; मारामारी. [ध्व.] [सं.कृत्या]

**कच** पु. केस : 'दु:शासनानें धरिले कच। - एभा १.२१०. [सं.]

**कच** स्त्री. कचाट; ओझे; जबाबदारी : 'सारी कच आपल्या अंगावर येऊन पडल्यावर मग आटपावयाचे कठीण पडेल.' - ऐलेसं ३४१२.

**कच** पु. ठोकर; पोचा; खोक; खळगा; करकोचा; खाच; छिद्र. (क्रि. पाहणे.) : 'झाडास कच पाडल्याने ... तेलकट राळेसारखा रस वाहतो.' - सेंपु १.९७. [क. कच्चा = खाच]

**कचक** स्त्री. सुताराचे एक हत्यार. (झाडी)

**कचक** स्त्री. १. हाणाहाणी; मारामारी; चकमक; तंटा (काठ्या, तरवारी इत्यादींनी - यात कचकच असा ध्वनी निघतो यावरून). (क्रि उडणे, झडणे.) २. (रोगाची) शिणक; शिळक; चमक; उसण. (क्रि. भरणे.) ३. आकस्मिक धक्का. ४. भीती; दहशत. (व.) पहा : **कच** (क्रि. खाणे.)
वि. अवाढव्य; जंगी; अजस्र; प्रचंड (इमारत); मोठे; भरभक्कम (ओझे); सपाटून; यथास्थित (जेवण).

**कचक** स्त्री. लगाम, कंबरपट्टा वगैरेंना तरवार वगैरे लावायची कडी :'सोन्याचा कड्या ३ व कचक येक केली.' - दुबारो ११.

**कचकच** स्त्री. १. पिंगळा, करकोचा यांचे ओरडणे. २. रेव किंवा रेवाळ पदार्थ दातांखाली सापडल्याने होणारा आवाज. ३. अशी रेव, रेती, खडे, कण. ४. (ल.) कटकट; वाद; तंटा; भांडण; त्रास; पिरपीर : 'वृथा कचकच वाढविली।' - एभा २८.५८३. ५. बडबड; जल्पना; गप्पा : 'शब्द कचकच वाढविती।' - एभा ९.४०८. ६. अस्ताव्यस्तपणा; गर्दी. (गो.) [सं.कच्, द्विरुक्ति]

**कचकच-चा** क्रिवि. कचकच आवाज करीत (खाणे, चावणे); मोठ्याने आरडाओरड करून (भांडणे). [ध्व.]

**कचकचणी** स्त्री. कचकच लागेल, होईल अशी स्थिती; अर्धकच्चेपणा. (गो.)

**कचकचणे** अक्रि. १. कचकच आवाज करणे; २. दात चावणे, खाणे, वाजणे. ३. कटकट करणे; त्रास होईल अशाप्रकारे बडबडत राहणे. [सं. कच्]

**कचकचा-चो** क्रिवि. गपागप खाणे. (झाडी) [क. कुच्]

**कचकचाट** पु. १. अतिशय कचकच; मोठा व संयुक्त आवाज; हलकल्लोळ (पिंगळ्याचे ओरडणे, भांडणातील आरडाओरड, तरवारीचा खणखणाट वगैरे). २. भांडाभांडी; तंटाबखेडा. [ध्व.]

**कचकचीत** वि. १. टणक; अपक्व (भात); कच्चा, हिरवा. २. बद्द वाजणारे; फुटक्या आवाजाचे (मडके इ.). ३. मोठा आणि ठळक; स्पष्ट दिसणारा (दागिना, अलंकार). ४. जिच्यात कचकच लागते अशी; रेवाळ (भाकरी वगैरे); रेताड; भरड. ५. पुष्कळ; विपुल.
क्रिवि. १. रोख वाजवून; खणखणा (दिलेला दाम, पैका). २. पुरेपूर;

सपाटून (मौज करणे, उपभोग घेणे). केवळ जोर दर्शविण्याकरिता हा शब्द योजतात.

**कचकचून** क्रिवि. करकचून; अतिशय जोराने :'वातावरणानं त्याला कचकचून दाबून धरलं होतं.' - बाविबु १४४.

**कचकट** स्त्री. पटकन मोडता येण्याजोगा, ठिसूळ असा बोरू, काठी, वासा तरवार इ.

वि. भिकार, मोडका; टाकाऊ.

**कचकट** वि. कच असलेले (धान्य, पदार्थ); रेव असलेली (भाकरी, पोळी, उसळ इ.)

**कचकडा** पु. १. कासवाची पाठ, हाड; कासवाचा खवला. २. गव्याचे शिंग वगैरे. त्यापासून फण्या वगैरे करतात. ३. कापूर व एक प्रकारची प्रक्रिया केलेला कापूस यांच्या मिश्रणाने बनलेला आणि कंगवे, बिलिअर्डचे चेंडू इ. बनविण्यासाठी वापरण्यात येणारा एक ज्वालाग्राही पदार्थ. [सं. कच्छ+ कृत्ति]

**कचकड्याचा** वि. (ल.) ज्यात फारसे सामर्थ्य नाही असा; दिखाऊ; सहज मोडला जाणारा.

**कचकणे** अक्रि. १. कच खाणे; मागे परतणे; माघार घेणे (भीतीने); किंचित हार खाणे. २. मारामुळे दबणे; एका बाजूला निसटणे; ठिकाणापासून किंचित बाजूला होणे. ३. ताण पडून किंचित मोडणे (हाड, काठी, तुळई इ.) : 'गाडीचं जू कचकलं तर कुणाच्या दारी जाशील.' - व्यंमाक १०४. ४. निराशा होणे; शरण जाणे; धैर्य गळणे. उक्रि. जोराने ओढणे; हिसका देणे; धक्का मारणे. ५. आश्चर्यचकित होणे. [ध्व.]

**कचकन-कर-दिशी** क्रिवि. काच, मडके इ. फुटताना होणाऱ्या आवाजाचा अनुनादक; ताडकन; खाड्दिशी; जोराने, एकदम (पोटात शस्त्र खुपसणे, हाताखाली खडा सापडणे). (क्रि. फुटणे ) [ध्व.] [क.कचु, कच्चणे]

**कचकय** पु. आंबाडे शिजवून केलेला पदार्थ.(गो.) पहा : **कोचकई**

**कचकरणे** पहा : **कचकणे**

**कचकल- कुल -कोल** पु. न. १. फुटक्या मडक्याचा खालचा अर्धा भाग. २. रास; ढीग (काचेच्या तुकड्यांचा, बांगड्यांचा किंवा इतर वस्तूंचा). अनेक पदार्थांच्या तुकड्यांचा समुदाय; काचेचे तुकडे. (राजा.)

**कचकल** काही कच्च्या फळांचा कठीण गर; बीजगर्भ; गाभा.

**कचका** पु. १. तलवार किंवा काठी यांचा जोराचा वार, मार, घाव, टोला: 'दोहो हातांनी कचका दिला। बेंबीपावता चिरित नेला।' - ऐपो ६०. २. एकदम व जोराचा हिसका; ओढ. ३. जोर; बळ; आवेश; कामाचा धबडगा, सपाटा, झपाटा : 'तिला शेतीच्या कचक्यात घातले.' - आआशे ३३. ४. निष्काळजीपणाने, धसमुसळेपणाने वापर, वागवणी; अतिशय ताण. ५. रोखठोकपणा; ताण; कडकपणा; तडफ; तापटपणा. ६. भीतीमुळे एकाएकी बसणारा धक्का; मनावर होणारा परिणाम. (क्रि. खाणे, बसणे.) [ सं.कच्]

**कचकाडी** स्त्री. (बायकी) लपंडाव, छापो इ. खेळांत तीन मुली चकायला लागल्यावर सर्वांचे हात पालथे अगर उताणे पडले तर कचकाडी म्हणून पुन्हा चकावे लागते त्याला म्हणतात.

**कचकाव(वि)णे** अक्रि. १. जोराने बांधणे; खेचणे (ओझे, गाठोडे, भारा इ.). २. मारणे; ठोकणे; खरडपट्टी काढणे; (जोराजोराने व मोठ्याने) शिव्या देणे. ३. सपाट्याने लागणे; उरकण्याच्या पाठीला लागणे (काम, धंदा, व्यापार इ.) ४. एकदम जोराने हिसका मारणे; हसडणे; कचकणे. ५. ठासणे; चोंदणे; ठाकूनठोकून दडपणे. [सं.कच्,क.कच + कन्ने]

**कचकावून, कचकून** क्रिवि. प्रत्येक क्रियापदाशी - विशेषत: जेथे शक्ती, उत्साह, चापल्य, जोर दाखवायचा असतो तेथे जोडतात; सर्व शक्ती खर्च करून; जिवापाड मेहनत करून; खूप; अतिशय. (क्रि. बांधणे; खाणे; मारणे इ.) [सं.कच्,का.कच + कन्ने]

**कचकोडा** पु. अगदीच कच्चे फळ; दोडा; कोवळे फळ. (ना.)

**कचक्या** वि. १. खुमखुमी जिरविणारा; जोरदार; हिंमतदार; धीट; साहसी; अधिक बलवान; वरचढ; शक्तिमान; अतिशय ताकदवान; दुसऱ्याला दाबात ठेवण्यासाठी तीव्र उपाय योजण्यास मागेपुढे न पाहणारा; खमक्या. २. सपाट्याने काम करणारा; तडफदार; चटचट कामे उरकणारा; चलाख.

**कचखडी** स्त्री. (इमारतकाम) सामान्य खडीपेक्षाही बारीक खडी; अर्धा इंच जाडीची खडी.

**कचखाऊ** वि. माघार घेणारा; भित्रा :'वक्त्याने कचखाऊ वृत्तीने वागू नये.' - वक्तृत्व १३१.

**कचडे** न. (ज्याच्या वरील भाग फुटला आहे असा) भांड्याचा वा घागरीचा खालचा भाग; बिनतोंडी भांडे. पहा : **कचकल**

**कचणी** स्त्री. १. गिरमीट फिरविण्याची धनुकली. (कु.) २. आवळून बांधलेली दोरी :'त्या झाडाचा बुंधा कचण्यांनी भरून गेला.' - बारी १०७. ३. पहा : **कसणी**. ४. घाव मारल्याने पडणारी भेग.

**कचणे** अक्रि. खेळासाठी तयार होणे. [सं.कच्]

**कचणे** अक्रि. कचरणे. पहा : **कचकणे** [ध्व.]

**कचणे** क्रि. विटा तयार करणे. (झाडी) [सं.]

**कचदिल** वि. १. कुटिल. २. कच्च्या मनाचा; भित्रा; संशयी; कमकुवत; कचखाऊ; दुबळा; अशक्त; भेकड :'मराठे इतके पळपुटे व कचदिल होते.' - मागोवा १९२. [का. कचू+दिल]

**कचनार** स्त्री. एक सुगंधी वनस्पती. याच्या फुलांची भाजी सुंदर होते:'पाच दवणा मरवा कचनार।' - अफला ४९. [सं. कांचनार]

**कचनारी** क्रिवि. कंचकन (चावणे). (झाडी)

**कचपाश** पु. १. डोक्यावरचे केस; कच. २. केसांचा पाश, फास. (क्रि. घालणे.) [सं.] (वा.) ०**घालणे** - केसाने गळा कापणे; विश्वासघात करणे.

**कचमच-चा** क्रिवि. कचकच असताना (रेव लागल्यामुळे येणारी चव, आवाज). [ध्व.]

**कचमा** पु. १. गढूळपणा (पाण्याचा, दारूचा); रेंदाळपणा. २. सबगोलंकार; गोंधळ; घोटाळा; अव्यवस्थितपणा; गर्दी (अन्न,

कामधंदा, माणसे, गुरे इत्यादींची). ३. घाण; केरकचरा; गवतकाडी.

**कचमोडा** वि. धैर्य नसणारा; कच खाणारा; भित्रा; भेकड; कच्च्या दिलाचा; अवसानघातकी (माणूस).

**कचमोहरे** वि. कच खाल्लेले; बिनहिमतीचे (माणूस) : 'मार दिला त्यामुळे लोक कचमोहरे जाले.' - पया ४३१.

**कचर** स्त्री. तळ्यात लव्हाळ्याच्या मुळाशी उगवणारा एक सुपारीएवढा कंद. हा उपासाला खातात. हा चिकट व गोड असतो; फुरडी.(को.व.) [सं. कसेरु]

**कचर** स्त्री. खिळे ठोकण्यासाठी भिंतीत बसविलेले लाकूड, ठोकळा, फळी. (गो.)

**कचर** न. वाढ खुंटलेले विड्याचे पान. (गो.)

**कचर** स्त्री. कच; माघार : 'आपली मंडळी इतकी असून अशा कचाटीच्या जागेतसुद्धा त्याने पडेपर्यंत कचर खाल्ली नाही.' - केस्व.

**कचर कचर** क्रिवि. कचकच. (झाडी) [का. कचु]

**कचरट** वि. १ लवकर तुकडा पडणारा; ठिसूळ (पदार्थ). २. (ल.) अशक्त; कुचकामाचे; हलकट (माणूस, पशू, वस्त्र इ.) : 'हिरवटासी दुरी धरावें। कचरटासीं न बोलावें ॥' - दास ११.५.२१. [सं. कच्चर = दुष्ट, कुत्सित]

**कचरट** पहा: **कचखाऊ**

**कचरट** न. कचरा; घाण.
वि. घाणीचे. [सं. कच्चर = वाईट, घाण]

**कचरणे** अक्रि. कच खाणे. पहा : **कचकणे :** 'त्यांनी असे सांगितल्यावर माझे मन जरा कचरले.' - पलको ३७४.
अकर्तृक क्रि. (उचकी वगैरेमुळे) घशाशी येणे (अन्न वगैरे).

**कचरपट्टी** स्त्री. बांगड्या तयार करणारावर बसविलेली पट्टी.

**कचरपट्टी** स्त्री. जेथे आजूबाजूच्या घरातला, गावातला कचरा टाकतात अशी जागा; गलिच्छ, घाणेरडी जागा, वस्ती : 'ते बापडे बायकापोरांना घेऊन धारावीच्या कचरपट्टीत शिरले.' - माखा १७.

**कचरा** पु. जुन्या काळी मुंबई बाजारात पाऊसकाळात तांदळाचा पुरवठा करण्यासाठी नेमण्यात येणारा ठेकेदार.

**कचरा** पु. १. घाण; केर; लाकूड वगैरेचे बारीक तुकडे; गाळसाळ. २. उकिरडा; उकिरड्यावरील घाण; (सामा.) टाकाऊ गोष्ट; निरुपयोगी वस्तू. ३. (ल.) बिनलढाऊ लोक : 'सैन्याबरोबरचा बाजार, उदमी लोक वगैरे कचरा.' - ऐपो २३२ वरील टीप. [सं. कच्चर = मलिन त. शक्रू] (वा.) **कचरापिचका होणे** - भंबेरी उडणे.

**कचरा** पु. एक गोड कंद. (झाडी) [सं. कर्चूर]

**कचरा** वि. तांदळाची एक जात.

**कचरा-री** पु. स्त्री. १. हे एक सुगंधी झाड असून याचे कंद अंगाला लावतात. २. काळी हळद. पहा : **कचोरा** [सं. कर्चूर]

**क(ख)चरा** पु. खाच किंवा खोबण पाडण्याचे सुताराचे एक हत्यार.

**कचराभट्टी** स्त्री. कचरा जाळून टाकण्यासाठी तयार केलेली जागा, भट्टी.

**क(का)चरी** स्त्री. फळाचे किंवा भाजीचे काप, फोडी.

**कचरी सुपारी, काचरी सुपारी** पहा : **खांडकापी सुपारी**

**कचऱ्याल** न. फडताळ. (कु.)

**कचलपट** वि. कच खाणारा; कच्च्या दिलाचा; भित्रा; भेकड.

**कचला** पहा : **कचोरा**

**कचली** पु. कोरीव काम करणारा; दगडात अक्षरे खोदणारा.

**कचवचणे** पहा : **कचरणे** : 'ती असा अंगुपती कारभार करायला कचवचायची.' - रैत १४३.

**कचवा** पु. एक वाद्य : 'सतार, कचवा, सरोद आणि सार मंडळ वाजविणारे.' - (बडोदे) कलावंत खाते ४९. पहा : **कछवा**

**कचवा** पु. जहाज : 'आर्य लोकांची एक मोठी टोळी कचव्यातून बंदरावर येऊन उतरली.' - जोफु ६६. कची हा गलबताचा एक प्रकार आहे.

**कचंबणे, कचमळणे** उक्रि. १. ढवळणे; गढूळ करणे; रेंदाळणे (हात, पाय इत्यादिकांचा स्पर्श करून पाणी वगैरे). २. हाताळणे; चिवडणे; राड करणे (अन्न). [सं.कश्मल]

**कचंबणे, कचमणे** अक्रि. (पोटात) खळाळणे; कालवणे; पोट बिघडणे.

**कचा** काचेची गोटी; बैदूल. (ना.)

**कचाई** स्त्री. विटा बनविण्याची मजुरी. (झाडी). [हिं.]

**कचाकच-चा** क्रिवि. १. जोराने मारण्याचा आवाज होऊन; सपासप; चटाचट (मारणे, तोडणे, मोडणे). २. दातांखाली खडे सापडल्याने, लागल्याने आवाज होऊन. [ ध्व.]

**कचाकच-चा** क्रिवि. खचाखच (भरणे). (झाडी)

**कचाकच-ची** स्त्री. १. भांडण; चकमक; कज्जा; बाचाबाच. २. केशाकेशी; गुद्दागुद्दी; तरवारी, काठ्या इत्यादींची हातघाईची लढाई; हाणमार; तोडातोड. [ध्व.]

**कचाच** पु. १. अनेक करकोच्यांचा एकदम झालेला ओरडा, शब्द. २. गोंगाट; गलबला; कलकलाट (पक्षी, माकडे, माणसे यांचा). [ध्व.]

**कचाचणे** अक्रि. कचकचणे; कचाच करणे (पिंगळ्यांनी); ओरडणे; कलकलाट करणे; गोंगाट करणे; रागाने आरडाओरडा करणे (माणसे, पक्षी, माकडे इत्यादींनी). [ध्व.]

**कचाचा** चटाचट, सपासप : 'हात लावायला गेलं तर काटं कचाचा टोचायचं.' - खळाळ १४३.

**कचाट** पु. न. १. युक्ती; बेत; धाडस; यत्न; कारस्थान : 'पर्वे करावीं अचाटें। चालवावीं भक्ताची थाटें। नाना वैभवें कचाटें। उपासनामार्ग ।' - दास २.९.१७. २. त्रासाचे, अवघड काम. ३. घोटाळा; संकट; अडचण; भानगड; लचांड : 'ऐसे सांगता अचाट। तुज वाटेल हें कचाट।' - एभा ७.३४५. ४. तोहमत; कुभांड; दुसऱ्याचे नुकसान करण्यासाठी योजलेली गुप्त युक्ती; व्यूह. [सं.कृच्छ्र + पान] [ क.कच्चाट ]

**कचाट** न. शाब्दिक मार्गदर्शन; सूचना.

**कचाट** पु. १. कचरा. २. कोंडी. (झाडी.) [सं. कच्चर]

**कचाटी** स्त्री. १. संकटमय स्थिती; त्रास; अडचण; गोंधळून जाण्यासारखी मन:स्थिती. (क्रि. सापडणे, धरणे - बहुधा सप्तम्यंत; 'तावडीत सापडणे' याप्रमाणे प्रयोग) : 'न पडता कचाटी धरा भाव।' - दावि

४७३. २. लचांड; भानगड; त्रास. ३. (ल.) संसार : 'गुंतले कचाटी क्षमा करा।' - दावि ७६५.

**कचाटी-ट्या** वि. १. कचाटे करणारा; उपद्व्यापी; भानगड्या; लटपट्या; कुभांडखोर. २.उद्योगी; कारस्थानी; मोठा योजक; मसलत्या.

**कचाडे** न. कचकल, कचडे.

**कचार-री** पु. काचकाम किंवा बांगड्या करणारा; कासार; बांगडी कासार. [ सं. काचकार]

**कचार जमीन** नदीकडेची खोलगट जमीन. ही अर्थातच उत्तम प्रकारे गाळाने खतावलेली असते.

**कचाला** पु. चुरा; तुकडे : 'निष्ठुर पाषाणी धन्याने सर्व मातीची भांडी फोडून केलेला कचाला चुलीकडेच पडला होता.' - महाशा सप्टें १९३६.

**कचावणे** अक्रि. कचणे; कचकणे.

**कचावणे** अक्रि. कच खाणे; घाबरणे : 'किल्ल्यांतील मनुष्यमात्र (झाडून सारे माणूस) कचावलें आहे.' - ऐलेसं ४४३७.

**कचाळ** वि. दुष्ट : 'पृथ्वीपाळ कचाळ :भूतलक्षणी तेवीस अक्षोहिणी' - गरा ६१.

**कची** वि. चीर पडलेला; बद्द आवाजाचा, न चालणारा (रुपया इ.); व्यंग असलेला. [ध्व.]

**कची** स्त्री. एक प्रकारचे गलबत (बहुधा कच्छी). [सं. कच्छ]

**कची** स्त्री. बांधणी; रचना; मांडणी : 'त्यांची विचारांची कची आचार्यांच्या सारखीच आहे.' - उअं १६३.

**कची** स्त्री. फुगलेले पोट. (गो.)

**कची पहा : कैची ६**

**कचीकाई** स्त्री. ईडनिंबू. (कर्ना.)

**कचीढेली-कचीढेलीचा** वि. बद्द; ठोका पडलेला; छाप पुसलेला (रुपया इ.) : 'पोतदार उगेच कचीढेली काढील तर ससुमारामध्ये घ्यावी.'-पेद.

**कचेपके होणे** कच्चे पक्के होणे; डावाडोल होणे; कच खाणे : 'फार दाटी जाली तेव्हां लोक कचेपके होऊं लागले तेव्हां बेजरब घोडा चालविला.' - पेद २८.१३२.

**कचेमांडूक** न. शेपटी असलेली बेडकाची जात; लहान बेडूक. (कु.)

**कचेरी** स्त्री. १. काम, कारभार करण्याची (खाजगी, संस्थानी, सरकारी) जागा; कार्यालय; न्यायालय; कोर्ट; चावडी. २. कचेरीत काम करणारी मंडळी. ३. त्यांचे काम, कारभार. [ फा.]

**कचेरी** स्त्री. समारंभ : 'मंगळवारी ग्रांट वैद्यपाठ्यशाळेमध्ये मोठी कचेरी झाली.' - हिंदोद ७८.

**कचेरी** स्त्री. (नाटकातला) प्रवेश : 'निरनिराळे प्रवेश अथवा कचेऱ्या निश्चित करणे ....' - मवाइ २९३.

**कचेल** न. कपाट, फडताळ.

**कचोरा** पु. (नाविक) नावेचा कणा.

**कचोरा - री - ला** पु. स्त्री. हळदीच्या झाडासारखे एक झाड. याचे कंद जमिनीत सापडतात. कंदाच्या काचऱ्या उकडून लोणच्यात घालतात. कचोरा सुगंधी असल्यामुळें अंगाला लावण्याच्या मसाल्यात घालतात. कापूरकाचरी म्हणून याची एक दुसरी जात आहे. [सं. कर्चूर]

**कचोरी** स्त्री. १. तिखट मसाल्याचे पुरण भरलेली पुरी. यात बटाटे व डाळीचे पुरणही घालतात. (गु.) : 'पोळी भात सीरा कचोर।' - नव ९.११६. २. कणिक व उडदाची डाळ यांची तळलेली पुरी. ३. बिरईपुरी; शिंगाडेपुरीचा (मांसयुक्त) एक प्रकार. [ हिं. कचौरी]

**कचोळ-ळा-ळे, कंचोळे** न. पु. १. एकाला एक लागून तीन घरे व वर पेला असलेले एक लहान पूजेचे उपकरण (पंचामृत ठेवण्याकरिता); गंधाक्षतपात्र; एक पूजापात्र :'उगेंचे हातीं मिरवी कचोळें' - सारुह ७.९०. २. वर्तुळाकृती बसलेले लोक; कोचाळे. ३. चौफुला. ४. फुलांचे आच्छादन :'कनक कमळांचा कचोळा। कीजे परागाचा उधळा। - शिव ७८१. [सं.कच्छ+ आलय]

**कचोळी** स्त्री. सोने इत्यादी धातूंची देवाची मूर्ती. (गो.)

**कचॉ, कचो** पु. १. ठिपकेदार लहान मासा; लहान ढोमेले मासा. २. (सामा.) लहान पोर, मूल (मनुष्य जनावर, पक्षी इत्यादींचे). (गो.) वि. लहान; काचा.

**कच्च** पु. खाच; लहान खळगा (लाकूड वगैरेवर चाकू, रंधा वगैरेंनी पडणारा). [का. कच्चु = काच, वण]

**कच्चा** वि. १. न पिकलेला; हिरवा; कोवळा (फळ, गळू, पान इ.). २. साफसूफ न केलेला; ओबडधोबड (दगड, चित्र इ.). ३. न शिजलेला (भात, भाकरी, रसायन इ.). ४. अपुरा वा पक्का न केलेला; सरासरीचा, ठोकळ (जमाखर्च, काम इ.). ५. अपूर्ण; अपक्व; अप्रौढ (कट, मसलत इ.). ६. अपुरे समजलेले किंवा मिळवलेले (शास्त्र, कला). ७. अपुऱ्या ज्ञानाचा; अर्धवट शिकलेला (माणूस). ८. वाकबगार नसलेला; अडाणी; संस्कारहीन; यथातथा ज्ञान असलेला. ९. कोता; संकुचित (विचार, बुद्धी). १०. गौण; लहान; कमी (वजन, माप इ.). ११. न टिकणारा; लवकर नाहीसा होणारा (रंग इ.). १२. सविस्तर; सर्व पोटभेद ज्यामध्ये घेतले आहेत असा (हिशेब). १३. बळकट नसलेला (बांधकाम इ.). १४. अपेक्षित प्रमाणापेक्षा कमी; अंदाजे. १५. उकळून फार घट्ट न केलेला (साखरेचा पाक इ.). १६. (ग.) त्रैराशिकांतील दुसरे व तिसरे या दोन पदांचा गुणाकार करून येणाऱ्या रकमेला कच्चे म्हणतात. नंतर त्याला प्रथम पदाने भागून आलेल्या भागाकाराला पक्के किंवा पक्का म्हणतात. (ज्याच्यामध्ये भारी परिमाणाच्या किमतीवरून हलक्या परिमाणाची किंमत काढायची असते अशा हिशोबात उपयोग). १७. कामामध्ये तोटा - नफा होईल तो मूळ धन्याचा अशा बोलीने केलेली (नोकरी, मामलत इ.) ; पगारी (मक्ता न देता नोकराकडून प्रत्यक्षपणे सारा वगैरे वसूल करण्याच्या पद्धतीला हा शब्द लावतात.). १८. कच्चा हा शब्द अपुरा, ओबडधोबड, अप्रौढ, उणा या अर्थाने शब्दश: व लाक्षणिकरीत्या अनेकप्रकारे योजतात. जसे : - कच्चा मजकूर - कच्चे लिहिणे - कच्चे वर्तमान - कच्ची बातमी - कच्ची हकीगत - कच्ची कैफियत = वरवरचे; पक्के नव्हे ते, कसेतरी तयार केलेले; अंदाजी. कच्चाताळा - ताळेबंद - कीर्द - जमाबंदी -

घाव - हिशेब - बेरीज इ. = अपुरा, बंद न केलेला, अपूर्ण. [सं. कथ्य = खोटे] [त. पच्चै ] [ध्व.] (वा.) ० **खाणे** - निकाल लावणे; वाटोळे करणे :'नवीन नटी आली. तिने त्याला कच्चा खाल्ला.' - लव्हाळी १५८.

**कच्चा असामी** हंगामी, उपरी शेतकरी - मालक; ज्याचा कब्जा कायमचा नाही असा इसम.

**कच्चा अंमल** पगार घेऊन केलेली सरकारी (जिल्ह्याची, तालुक्याची) नोकरी, काम. पहा : **कच्चा मोकद्दमा, कच्चा १७**

**कच्चा आकार** ठोकळ हिशेब, अंदाज; साधारण आढावा.

**कच्चा करवड** माशाचा एक प्रकार, याचा रस्सा करतात.

**कच्चा कागद** खळ न लावलेला कागद.

**कच्चा खर्डा** १. अंदाजपत्रक; बजेट (हिशेबाचे); पक्का करण्यापूर्वीचा पहिला खर्डा. २. कुलकर्ण्याने शेतकऱ्यांकडून आलेल्या रकमांचा ठेवलेला हिशेब.

**कच्चा खाना** पोळ्या, डाळभात, खिचडी इ. न तळलेले जिन्नस.

**कच्चा डाग** शिसे, जस्त किंवा कथील यांनी दिलेला डाग (चांदीचा नव्हे); तात्पुरता जोड; कस्तर करणे.

**कच्चा तोळा** ९२ गुंजांचा तोळा. पक्का तोळा ९६ गुंजांचा असतो.(कर.)

**कच्चा दगड** (पुरा.) मऊ, पांढरा चुनखडीचा दगड. हा आतील कोरीव कामासाठी वापरतात.

**कच्चा पक्का** वि. अंदाजी, ठोकळ आणि त्यावरून केलेला पक्का हे दोन्ही ज्यात आहेत असा (जमाखर्च, वही, खतावणी इ.).

**कच्चा पाढा** ठोकळ, तोंडी, त्रोटक, ठाकठीक न केलेली, कच्ची हकीगत, वर्तमान, साधन. (क्रि. वाचणे.)

**कच्चा बटवडा** इसमवार पगारवाटणी (सरकारी नोकर किंवा मजूर यांना); दरडोईपगार.

**कच्चा भरणा** रयतेने भरलेला सारा, वसूल (ऐन किंवा नक्त.).

**कच्चा मामला, कच्ची मामलत** पहा : **कच्चा अंमल**

**कच्चा मोकद्दमा** कामामध्ये नफातोटा होईल तो धन्याच्या वाट्याला अशा बोलीने केलेले काम, गुमास्तेगिरी; कच्चा अंमल.

**कच्चा रंग** तिफाशी सोंगट्याच्या खेळात काळा अथवा हिरवा रंग.

**कच्चा वसूल** रयतेकडून आलेला परंतु ज्याची वर्गवारी काढलेली नाही असा सारा, खंड.

**कच्चा शेर** प्रमाणभूत (पक्क्या) शेरापेक्षा कमी असणारा शेर; १५ रुपये भारांचा शेर. उलट पक्का ८० भारांचा शेर. (कर.)

**कच्ची** स्त्री. (तिफाशी सोंगट्यांत). १. मेलेली पण नुकतीच जिवंत केलेली, नुकतीच बसविलेली सोंगटी; पट फिरून न आलेली सोंगटी. २. हिरवी किंवा काळी सोंगटी. तिफाशी सोंगट्यात तांबडा व पिवळा यांना पक्का आणि हिरवा व काळा यांना कच्चा रंग अशा संज्ञा आहेत. ३. (ल.) फजिती; मानहानी; अपकीर्ती.

**कच्ची** पु. कच्छवासी दुकानदार. (झाडी)

**कच्ची असामी** दिवाळे वाजलेला किंवा अपुरी साधने असलेला, नालायक सावकार, कंत्राटदार, कूळ, अर्जदार, खंडकरी इ.

**कच्ची कमाविशी-वीस** तैनात घेऊन सारावसुलीचे काम; नफातोटा धन्याचा अशा बोलीने मामलत वगैरे करायचा प्रकार; कच्चा अंमल.

**कच्चीकारी** स्त्री. नक्षी : 'घुमटांत कच्चीकारी केली आहे.' - ज्ञाको २०.१९१.

**कच्ची कुंदी** १. कपडा भट्टीत न घालता नुसता धुऊन केलेली थंडी इस्त्री. २. धुतलेल्या कपड्यांना खळ न लावता केलेली इस्त्री.

**कच्ची कैद** १. चौकशीपूर्वीची किंवा अपराध शाबीत होण्यापूर्वीची कैद. २. नजरकैद; साधी कैद.

**कच्चीखोर** पु. सदोदित फजिती किंवा पच्ची होणारा; फजितखोर.

**कच्ची जप्ती** (कायदा) दाव्याचा निकाल लागण्यापूर्वी केलेली जप्ती.

**कच्ची जमाबंदी** (खर्च वेगळा काढून तो वजा न घालता) एकूण आलेली गावची जमा.

**कच्चीबच्ची** न. अव. अगदी लहान मुले; लेकरेबाळे; चिल्लीपिल्ली.

**कच्ची बाजू** (सोंगट्यांचा खेळ) तिफाशी डावात काळ्या व हिरव्या सोंगट्या.

**कच्ची बुटी** सोनेरी किंवा रुपेरी रंगाने कापडावर काढतात ती बूट, फुले, खडी. वि. अशा कापडाचे (पागोटे, अंगरखा इ.); खडीदार.

**कच्ची माती** कोरडी, चिकटपणा नसणारी माती.

**कच्ची मिती** मारवाडी, सावकार यांनी कर्जाऊ दिलेल्या रकमेच्या वर घातलेली आदल्या दिवशीची तारीख. कुळाकडून आलेल्या रकमेची तारीख मात्र दुसऱ्या दिवशीची घालतात.

**कच्ची मुदत** १. (सावकारी) हुंडी हातात पडल्यानंतर अमुक दिवसांत ती वटविली पाहिजे अशा प्रकारची दिलेली मुदत. २. हुंडीची ठरावीक मुदत भरण्यापूर्वीचा काल; अद्याप संपायच्या मुदतीचा काळ.

**कच्ची लढाई** पुरा निकाल न होता झालेले युद्ध; दोन्ही पक्षांनी सोडून दिलेली लढाई; अनिर्णित लढाई.

**कच्ची वहिवाट** कुलकर्ण्याने लिहून पाटलाची सही घेतलेली जमाखर्चाची पावती; कच्ची पावती.

**कच्ची वीट** भट्टीत न भाजता उन्हात वाळवलेली मातीची वीट.

**कच्ची शाई** लाख न मिसळलेली, पाण्याने निघून जाण्यासारखी शाई.

**कच्ची सुपारी** न शिजवलेली सुपारी; पोफळ; रोठा.

**कच्ची हुंडी** अद्याप न पटलेली किंवा न स्वीकारलेली हुंडी.

**कच्चे अक्षर** खराब व बिनकित्त्याचे अक्षर; वळण नसलेले अक्षर.

**कच्चे अंडे** नवीन घातलेले अंडे; ताजे अंडे; न उकडलेले अंडे.

**कच्चे इरसाल** जिल्ह्यातून सरकारी खजिन्यात पाठविलेला शेतसाऱ्याचा भरणा.

**कच्चे दूध** १. न तापवलेले, निरसे दूध. २. नवीन व्यालेल्या जनावराचे पहिल्या बारा दिवसांतील दूध; कोवळे दूध.

**कच्चे नाणे** चलनी नाण्यांत आलेला सरकारी वसूल. यांत निरनिराळी नाणी सरभेसळ आलेली असतात.

**कच्चेपक्के होणे** डावाडोल होणे; दोलायमान होणे; घाबरे होणे: 'कच्चेपक्क्याचा सुमार दिसतो.' - ऐलेसं १७०५.

**कच्चे पान** पानवेलीचे, विड्याचे हिरवे पान.

**कच्चे पोते** सरकारी चावडीत भरलेला शेतसारा; सरकारी खजिन्यात ज्या स्थितीत येतो त्या स्थितीतील वसुली पैसा.

**कच्चेबच्चे** न. मूलबाळ; पोरबाळ; लहान मूल : 'येक म्हणे गा पळोन जावे। तरी कच्चेबच्चे काय करावे।'- दावि २३२.

**कच्चे बारा** पु. (तिफाशी सोंगट्यांत) फाशावरील एक दान; (एकावर पाच, एकावर सहा व एकावर एक अशा) बारा ठिपक्यांचे दान.

**कच्चे मडके** न. १. न भाजलेले मडके. २. (ल.) अज्ञानी माणूस (मडके = डोके, बुद्धी) : 'हे अजून कच्चे मडके आहे.' - नाम ४.

**कच्चेरा** पहा : कचरा

**कच्चे रेशीम** पाण्यात न उकळलेले रेशीम.

**कच्चे लोणी** कोऱ्या दुधापासून घुसळून काढलेले लोणी (दह्याचे नव्हे).

**कच्छ** पु. कासोटा; नेसलेल्या वस्त्राचे मागे खोवतात ते टोक. (क्रि. घालणे, सोडणे.) [सं.]

**कच्छ** पु. १. नदीच्या किंवा समुद्राच्या काठचा प्रदेश. कच्छ प्रांताला यावरून नाव पडले आहे. २. दलदल; पाणथळ जमीन : 'भीतो बहु दुरूनिहि पद ठेवाया जसा करी कच्छीं।'- मोमंभा २. ४८. [सं.]

**कच्छ,कच्छप** पु. १. कासव व त्याची पाठ. २. विष्णूच्या दशावतारांपैकी दुसरा; कच्छावतार : 'पृथ्वीलागुनि कच्छप।'- दावि १६८.

**कच्छ,कच्छप** पु. नांदुरकीचे झाड. [सं.]

**कच्छ** पु. नावेची नाळ. [सं.]

**कच्छप** पु. कासोटा. पहा: **कच्छ** [सं.] (वा.) **कच्छपी लागणे, राहणे**- १. आश्रय करणे; एखाद्याच्या मागे मागे करणे; तंत्राने चालणे; नादी लागणे; (आपले काम करून घेण्यासाठी) एखाद्या माणसाच्या मागे लागणे; एखाद्यावर अवलंबून असणे. (कार्य, पदार्थ). (सोमयज्ञामध्ये बहिष्पवमानाच्या वेळी एक ऋत्विज दुसऱ्याच्या कासोट्याला धरून आहवनीयाकडे जातो त्यावरून) :' ब्रिटिश सरकारच्या कच्छपी लागलेल्या ब्राह्मणेतर पक्षाला... ' व्यक्ति २५७. २. पाठ न सोडणे; पाठ पुरवणे; त्रास देणे.

**कच्छपी** स्त्री. सरस्वतीची वीणा. [सं. कच्छ]

**कच्छमच्छ** न. (बायकी) चातुर्मासात पहिले दोन महिने दूध व शेवटचे दोन महिने दही न खाणे हे व्रत (विष्णूच्या पहिल्या दोन अवतारांच्या जोडीप्रमाणे दूध, दही हे शब्द जोडीने येतात यावरून).

**कच्छसर** न. समुद्राचे पाणी आत येऊन अडल्यामुळे तयार झालेले तळे [सं.]

**कच्छार** न. पाणथळ जमीन; दलदल : 'जाटाची फौज दरोबस्त माहाव्याचे कच्छारावर पडली आहे.' - पेद २. ८६. [सं. कच्छ]

**कच्छी** वि. कच्छ प्रांतातील (घोडा, माणूस इ.).

**कच्छी** स्त्री.मेणा. (गो.)

**कच्छी** स्त्री. कच्छकडील लहान गलबत : 'फेम नावाच्या कच्छीशिवाय दोन बॉम्बकच्छा आणि खेरीज ४८ गलबते असा सरंजाम होता.' - ऐपो २.५१.

**कच्छेलक** पु. खड्गाचा, तलवारीचा एक प्रकार.

**कछकोरी** रुपयाचा एक प्रकार.

**कछवा** स्त्री. रजपुतातील एक जात. ही जात रामाचा पुत्र कुश याच्यापासून उत्पन्न झाली असे समजतात. जयपूरचे प्रसिद्ध राजघराणे याच जातीचे आहे.

**कछवा** स्त्री. (संगीत) सतारीचा एक प्रकार. यातील भोपळा कासवाच्या पाठीसारखा असून क्वचित लाकडी असतो. तारांची संख्या, तारा मिळवण्याची पद्धती वगैरे सर्व बाबी सतारीसारख्याच असतात. [सं. कच्छ]

**कजक** स्त्री. अटकावासाठी असणारी कडी - (तंजा.)

**कजबी** स्त्री. चहाडी : 'याला कजब्या सांगती।'- एहोरा ३.३६.[फा.]

**कजनाल, हस्तनाल** स्त्री. हस्तीवर चढवून मारा करायच्या तोफा.

**कजरी** स्त्री. गाण्यातील एक प्रकार : 'होरी, कजरी... इत्यादिकांचा स्वतंत्र विचार येथे केलेला नाही.'- संसौ १११.

**कज(जे)लणे** अक्रि. (दुफाशी सोंगट्यांत) सोंगट्या जुगल्यानंतर बारा, बेती, दुढ्ढी इत्यादी जुगदान खेळणे. पहा : **कदलणे**

**कजलबाश** पु. बंदुकवाला, लाल टोपीचा इराणी शिपाई.[फा. किझीलबाशा]

**कजली** पहा: **कदली**

**कजळ** पु. लहान मासा : 'मुक्तेळंकार वाळू, करागुळी कजळू, केश सेवाळुवाचे।'- गरा ५१.

**कजा** स्त्री. १. मृत्यु. २. हुकूम; आज्ञा. [फा.]

**कजाख-ग** वि. १. क्रूर; दुष्ट; राक्षसी; रानटी (रशियन सैन्यातील कोसॅक नावाचे शूर व धाडसी घोडेस्वार, यावरून). २. भांडखोर; तंटेखोर; खाष्ट; हट्टी : 'वडील.... एकमार्गी पण कजाग स्वभावाचे होते.' - माजी ५०. [फा. कजाक]

**कजाखी-गी** स्त्री. १. रानटीपणा; क्रूरपणा; राक्षसीपणा; कजागपणा. २. गनिमी काव्याची जोराची लढाई : 'ते फौज कजाखीस व आमची फौज सन्मुख झुंजास कामास येईल.'- दिमरा १.२२. ३. कष्ट. ४. ताकद; सैन्यबळ. ५. पुंडाई; चोरी; लूटफाट : 'इस्माइलबेग कोठील कोण ऐसें असतां ५००० फौज बाळगून कजागी करितो.'- मइसा १०.२०१. [फा.]

**कजाखी-गी** स्त्री. युक्ती; हुन्नर : 'चौकशी पडली असता कजाखी करून नावें न सांगतां सुटून येऊन....'- मराचिथोशा ३९.

**कजान** पु. नारळाच्या झावळ्या.

**कजा(फा)वत** स्त्री. कज्जा; भांडण: 'त्याची व आमची कजावत जाहली.'- पेद ३३. ३६७.

**कजावा** पु. १. उंटाचे खोगीर. २. उंटाच्या पाठीवरील हौदा. यात बायका बसून जातात. [फा.]

**कजिम** चिलखत. [फा.]

**कजिया, कज्या** पहा : **कज्जा** : 'तेधवां कजिया येकमेकात पडला.'- महिका ५१. [अर. कझिया]

**कजियाकडा** स्त्री. भांडण; द्वैत : 'पैकेवालेसहि कजियाकडा पडो त्याजकडून काही तकसीर घडो यैसे ईश्वरापासी मागावे.'- इएमपी १५३.

**कजियाखोकला** पु. भांडणतंटा : 'मौजे मजकूरची खंड गुन्हेगारी, खटनट

कजीया खोकला याची कमावीसवाब होईल ती रुपये आचार्य बाबांनी घ्यावे.'- ऐसंसाखं ५.६९.

**कजियाराडा** पु. दंगा, मारामारी; कलह : 'बाहेर कुमकेमुळं कजियाराडा होईल तर हो' - इएमपी १००.

**कजियेरजिये** पु. अव. भांडणतंटे; कलह : 'धरणीपारणी कजियेरजिये जितके करावयाचे तितके सोलाहि संस्कार जाले.'- पेद २०. १२५.

**कजीया खटखट** भांडण; अडथळा; तक्रार : 'कजीया खटखट कराल तर आम्ही पेशवे यांचे शरीक (स्नेही) असो.'- ऐलेसं१२३७.

**कजेल** फाशाच्या खेळातील एक संज्ञा.

**कजेली** स्त्री. भांडण; मारामारी; आरडाओरड : 'हे आले आता कजेलीला, आता केलाच पाहिजे पोबारा'- सं. संशयकल्लोळ.

**कज्जल** पु. न. दिव्यावर धरलेले काजळ; काजळासारखे औषध; शोभेसाठी किंवा औषधासाठी याचा उपयोग करतात; सुरमा. [सं.]

**कज्जलपात्र** न. १. तलवारीचा एक प्रकार.२. काजळाचे भांडे. [सं.]

**कज्जला** वि. भांडखोर; कजाग. (व.)

**कज्जली** स्त्री. १. (वैद्यक) पारा व गंधक एकत्र खलून केलेले रसायन; काजळी. २. काजळासारखे औषध.

**कज्जा-ज्या** पु. १. भांडण; तंटा; वैर; वितुष्ट; शिवीगाळ. २. (कायदा) वाद; प्रकरण; खटला (विशेषत: फौजदारी वाद). ३. लढाई : 'कज्जा मोठा घोरंधर जाला.'- राज ३.१८४.(वा.) ० **काढणे** - बळेच भांडण सुरू करणे, वर्दळीवर येणे, आणणे. [फा. कजाया= कजियाभांडण]

**कज्जाकटकट - कफावत- कज्जाखोकला- भांडण** पु. स्त्री. न. लहान मोठे भांडण तंटे; वादविवाद; वितुष्ट; विरोध. (क्रि. करणे, काढणे, आणणे.)

**कज्जेखोर, कज्जे दलाल** वि. भांडखोर; तंटेखोर; कळीचा नारद; भांडणे लावणारा, उपस्थित करणारा : 'आम्हां भांडखोर व कज्जेदलाल शास्त्र्यांची अर्शी लग्नें लावण्यांत आल्यामुळें नानासाहेबांच्या वारसांप्रमाणें आम्हालाही भाऊबंदकी साधण्याचा हक्क सांप्रत प्राप्त झाला आहे.'- भाऊ अं. २. प्र. १

**कज्जेदलाली** स्त्री. उपस्थित केलेली भांडणे; भांडणे लावण्याची वृत्ती; त्याबद्दल मिळणारा पैसा :'शांततेच्या प्रसंगी कज्जेदलालीच्या तंट्याबखेड्यामध्यें रूपमाया सेनापतिसाहेबांनीं वादीप्रतिवादीचें काम आपल्याकडे घेणें म्हणजे परमेश्वरी संकेताविरुद्ध वागण्यासारखे आहे.'- बाय २.२. [फा. कजियादलाल]

**कट, कट्सीन** पु. (नाटक) महालाचे नुसते खांब; जंगलाची नुसती झाडे, पाण्याचे नुसते प्रवाह, पर्वताचे चढउतार इ. दाखविणारे पडदे किंवा पडद्याचे तुकडे. हे त्या त्या आकाराच्या चौकटी करून व त्यावर कापड ठोकून रंगवतात. जसे : - 'जंगलकट, महालकट इ.' [इं.]

**कट** पु. १. कड; शेवट; बाजूचा गोट. (कुण.) [क. कट = शेवट]

**कट** अरेरे ! कष्ट, यातना दर्शक उद्‌गार : 'कट रे मूर्खी केवडें। जोडिले निरय।'- राज्ञा १६.४१८. [सं. कष्ट]

**कट** पु. जूट; टोळी; संघ; ऐकमत्य : 'अलीकडे अशा प्रकारच्या हजारो जुटी किंवा कट युरोपात होऊ लागले आहेत.'- आगर ३.६७. [का. कट्टे = रचना बांधणी]

**कट** पु. बंदुकीच्या दस्त्यात नळी घट्ट बसविण्यासाठी असलेले वेढे, कडी; हत्तींच्या दातांना घातलेले कडे; (सामा.) वेढे; शेंबी : 'बंदुकीच्या कट पट्यास नक्षी.' - प्रला ४७. [सं. कट्]

**कट** पु. अंगावर किंवा कपड्यावर बसलेले मळाचे पूट, लेप. [सं. कट्]

**कट** पु. सोंगट्यांच्या पटात x अशी खूण केलेले घर.(ह्या घरामध्ये सोंगटी बसली असता ती मरत नाही, तिला कटावर बसली असे म्हणतात): 'हिरवी मागे पिवळी लागे लाल बैसली कटीं। घरात राहे पडून काळी तिची खुंटली गति।' - विक ८६; ओकीबोकीच्या वगैरे खेळात एका रंगाच्या चार सोंगट्या. [क. कट्टि = बांधणे][सं. कट्]

**कट** पु. तंबूच्या किंवा कनातीच्या काठ्यांची टोके बसविण्यासाठी आणि तंबूचे दोर ज्या जागी बांधतात ती जागा सुरक्षित राहण्यासाठी तंबूच्या कनातीला लावलेली कातडी टोपी; खोबण; (सामा.) चामड्यांचा काठ; कड; पदार्थांची कड खराब होऊ नये म्हणून तिला घातलेला कातडी गोट. [सं. कट्]

**कट** पु. गंडस्थल : 'प्रेरियलें भेदाया पतिधैर्यद्विरदकट कटाक्ष तिनें '- मोसभा ५.१६. [सं. कट्]

**कट** पु. (अमुक एका परिमाणाची) कडब्याची पेंढी बांधण्याची (साडेतीन हात लांबीची) दोरी; पेंढीः 'फाल्गुनमासपासोन साडेचारशे पावणेपाचशे कट कडबा लागणार.'- पेद.

**कट** पु. आग्रह. [सं. कट्]

**कट** पु. १. सतारीचा पडदा. २. सतारीच्या तारा ओवून खुंटीला बांधण्यासाठी केलेल्या, भोके असलेल्या हस्तिदंती पट्ट्या.

**कट** पु. हिरडे व लोखंडाचा कीस यांचे मिश्रण.

**कट** पु. बिझिक खेळातील एक्के, चार राजे इत्यादी चिन्हांचे संच.

**कट** पु. आड; अडथळा; हट्ट : '...परंतु इंदापुरासाठी कट पडला.'- ऐलेसं ११६८.

**कट** पु. देवळाची पायरी किंवा उंबरठा. (वा.) **कटास हात लावणे** - (एखादे कार्य किंवा गुप्त मंडळ यात काम करताना) देवळाची पायरी किंवा उंबरठ्याला हात लावून विश्वासू राहण्याबद्दल शपथ घेणे; बेलभंडार उचलणे.

**कट** पु. कष्ट; त्रास; दुःख; यातना; वेदना (अव.) (क्रि. खाणे, भोगणे.)[सं. कष्ट] (वा.) ० **काढणे**- दम धरणे, सहन करणे : 'त्या बाळ्याला कुनी इच्चारू नका, बगू दे मला किती कट काढतो ते.' - बनगर ८५.

**कट** पु. १. गुप्त मसलत; व्यूह; कारस्थानः 'आमच्याविरुद्ध पुण्यांत कट झालेला आहे कीं नाहीं बोल? '- इंप ३७. २. सैन्याचा एक गट, व्यूह, विशिष्ट रचना. [क. कट्टे = रचना, बांधणी]

**कट** पु. १. पुरण शिजवून आमटीसाठी काढलेले पाणी; काढा; कषाय; २. घाणेरडे पाणी (कपडे धुतल्याने झालेले).[क.कट्टु = डाळीचा, कडधान्याचा रस]

**कट** स्त्री. कटी; कंबर : 'सुंदर ते ध्यान उभे विटेवरी। कर कटावरी

ठेवूनिया।'- तुगा १. [सं.]

**कट** पु. कूट गाणे : 'कटावरि कटबंदावरि प्रबंद।'- दावि १६३. [क. कट्ट + रचणे]

**कट** पु. मनाई; थांबविण्याचा हुकूम : 'ते जाणोनियां एम्पेर दोरू। लोकासि कटु केला थोरु। म्हणे न करा युदेअनचा संसारू। ऐसा डांगोरा पिटिला।'- ख्रिपु २.४२.१३७. [क. कट्ट + प्रतिबंध करणे]

**कट** पु. १. घाव; वार; फटका. २. (क्रिकेट) गोलंदाजाने टाकलेला चेंडू अडविणे (डाव्या बाजूला न मारता); दिशा बदलणे (चेंडूची). [इं.]

**कट** पु. कत्तल : 'फौज येऊन गावचा कट करून मालीयत अनाज दाणा घेऊन गेले' - मदना २.१२२.

**कट** न. गवत; तृण. पहा : **कटाग्नि** [सं.]

**कट** पु. (मुद्रण) ठसा; ब्लॉक.

**कटई** पु. चांभारातील एक पोटजात.

**कटक** न. १. सैन्य : 'एकीं पाषाणीं वाऊनि उतरलीं। समुद्रीं कटकें ॥'- ज्ञा १०.३६. २. छावणी. [सं.] (वा.) ० **उलगणे**- कार्य पार पडणे.(कर.) **कटकाई करणे**- सैन्य जमविणे : 'तेव्हा केशवदेवाने कटकाई केली व म्हशियागड वेढला.'- बिंब ९.

**कटक** न. हातातील कंकण; कडे : 'परंतु मुगुट नव्हे कटक। कडें मुगुट होईचना ॥'- यथादी १५५७. [सं.]

**कटक** न. राजधानी. [सं.]

**कटक** न. (भूशा.) लांब चिंचोळे शिखर; पर्वताची रांग. [सं.]

**कटक** पु. (वै.) अस्थिमज्जा व अनुसेतू या दोन उंचवट्यांना जोडणारा अनुप्रस्थ चेतातंतूंचा पूल. [सं.]

**कटक** न. अरण्य: 'वैराग्य महापावकें जाळूनि विषयांची कटके.'- राज्ञा १२.४६.

**कटक** पु. नारळाचा एक प्रकार. (गो.)

**कटकई** स्त्री. सैन्याचा तळ : 'उपरी श्रीरामचंद्रकि कटकई।'- वैद्यकबाड ८०. [सं. कटक]

**कटकट** स्त्री. पु. १. भांडण; कज्जा; तंटा. २. किरकिर; बडबड; गडबड; गलबला; गोंगाट. ३. युद्ध : 'दळी केला कटकट।'- दावि ४९६. ४. त्रास; पीडा; भुणभुण : 'नेणती वैकुंठनायका। वृथा कटकट करिताती।' - हरि १६.६४.५. घासाघीस, तक्रार. (क्रि. करणे.) ६. (घड्याळाचा) आवाज; किटकिट. ७. काही त्रासाचा, रागाचा. शब्द. ८. दुःखोद्गार; अरेरे; हायहाय : 'अहा कटकट। ते काळीं.'- एभा १०.४२५. पहा : **आहाकटा** [क. कटकटियु][सं. कष्ट]

**कटकटणे** अक्रि. १. चुटचुटणे; हळहळणे. २. स्वत:विषयी त्रासणे; स्वत:वर रागावणे; वैतागणे. ३. कलकल करणे. ४. कटकट करणे; त्रासाचा, रागाचा आवाज करणे. (को. कु.)

**कटकटा** उद्गा. दु:ख, त्रास, असंतोष याचा उद्गार; हायहाय ! हा नशीबा; प्रारब्धा : 'एथ अर्जुन म्हणे कटकटां।'-ज्ञा ११.४५२. [सं. कट]

**कटकटीने** क्रिवि. जेमतेम; ओढूनताणून; सरासरी.

**कटकट्या-टिया** वि. कटकट करणारा; किरकिऱ्या; तुसडा, चिडका; भांडखोर.

**कटकणा-णी** पु. स्त्री. डाव; कपट; लुच्चो गिरी अंतस्थ हेतू :'... आणि मसलत मारावी हाहि कटकणा आहे.' -राखं १२.८६.

**कटकन-कर-दिशी** क्रिवि. घट्ट दोरी वा काठी इत्यादींचा पट्दिशी मोडण्याचा आवाज होऊन; कट् असा आवाज करून. [ध्व.]

**कटकबंद** वि. सैन्यासहित; सैन्याने सिद्ध : 'खान कटकबंद केला'-ऐपो ११.

**कटकबंध** पु. सैन्यरचना; व्यूह : 'वातें घनसा द्रोणें धर्माचा भेदिला कटकबंध।'-मोद्रोण १०.४.

**कटकयुक्त** वि. (वन.) उठावदार उभी व जाड मध्यशीर किंवा मध्ये साखळीसारखी रेषा असलेला (भाग). उदा. संदल, तुष इ.

**कटकरणे** अक्रि. १. तुटणे (दोर, काठी इ). (बे.) २. हूं की चूं करणे. (व.)३. निषेध करणे; तक्रार करणे.

**कटकंजन** पहा : **कटंजन**

**कटका** पु. तुकडा; कुटका (भाकरीचा). [हिं.]

**कटकी** स्त्री. दालचिनीच्या पानासारखे पान असलेले, १२/१५ फूट उंचीचे चिवट झाड. याचे फळ लहान असून मुले त्याचा नळीत घालून बंदुकीप्रमाणे आवाज करतात.

**कटकी** स्त्री. हल्ला: 'कटकी केली : जीवें मारिला :'- पंचो ३९.२३.

**कटकी खण** अपुरा, (तीन सळी किंवा घडी) कर्नाटकी खण. [क. कटकी=कर्नाटकी खण ]

**कटकीची चोळी** स्तन उन्नत दिसतील अशा रीतीने कापड कापून शिवलेली चोळी; पूर्ण खण न घेता कटकीखण (पाऊण खण) घेऊन शिवलेली चोळी.

**कटकै** स्त्री. १. हल्ला; लढाई : 'ए वेळेची कटकै परते कां तरि'-लीच १.३८. २. अनेकांनी मिळून केलेली भ्रमंती : 'तें नासावया कारणे अवचीती कटकै केली'-गोप्र ७६.३. सेनाप्रयाण; सैन्याचे कूच; स्वारीचे नाटक : 'की कटकै मांडिले.'- नरुस्व १९.५. [सं. कटक = सैन्य]

**कटकोल** पु. खुशामतखोर.

**कटकोल** पु. पिकदाणी. [सं.]

**कटग(घ)र** न. १. लाकडी कठडा; कटारा; कुंपण; कुडण. (व.) २. (पशु.) मेंढ्या, कोंबड्या, डुकरे इत्यादी ठेवण्याकरिता केलेली लहान जागा. [सं. काष्ठगृह]

**कटण** न. धान्य कढवून घेतलेले त्याचे पाणी: 'मूग : ससूर कटण तो यूष म्हणीजे।'-वैवस.

**कटणे** अक्रि. १. लढाईत ठार होणे; जायबंदी होणे; एखादा अवयव तुटणे, कापला जाणे. २. कापले जाणे; कापणी होणे (शेताची). ३. कमी होणे (खर्च, पगार, मजुरी इ.); काट मारली जाणे. ४. कष्टाने जाणे; कसातरी निघून जाणे (दिवस इ.) : 'असें नसतें तर महेंद्राच्या घरामध्यें ती रात्र कटतीना!'- पपप्रे १८०. ५. (ल.) खजील होणे; शरमिंधे होणे. (व.) ६. तुटणे; छाटले जाणे. ७. दु:खी, कष्टी होणे : 'कटले संसारसीणें। जे देवों एंति गाऱ्हाणें।'- राज्ञा १७.३२८.[हिं. कटना=कापले जाणे] [सं. कृत](वा.) **कटून करणे** - झटून काम करणे. **कटून मरणे**- अखेरपर्यंत लढाई करून मरणे; हात, पाय इ. अवयव तुटून जाणे; लढाईत कापले जाणे : 'कटून मरावें खरे असा धर्म क्षत्रियाचा। कसें रहा म्हणतीस घरीं

डाग लागेल जन्माचा।'- होला १६७. **कटून लढणे**- पुष्कळांना मारीत मारीत लढणे; मोठ्या शौर्याने लढणे.

**कटणे** अक्रि. अतिशय मेहनत करणे; जिवापाड श्रम करणे. [सं. कष्ट]

**कटणे** अक्रि. १. अतिशय मळणे (शरीर, वस्त्र इ.); मळ बसणे; किटणे. २. विटणे; नकोसे होणे.

**कटणे** अक्रि. एखाद्या गोष्टीत निपुण, तरबेज, तयार होणे.

**कटतर** (विणकाम) पहा : **खाटसरी**

**कटता** पु. स्त्री. मालाच्या पोत्यात ज्या प्रमाणात भोंगा (पोकळपणा) किंवा खोका असेल त्या प्रमाणात त्या गोणीची किंमत कमी करणे; नुकसानभरपाई (पल्ल्याच्या भावाने).

**कटते व्याज** तुटक मुदतीचे व्याज; कटमितीचे म्हणजे (मुदतीच्या आतसुद्धा) ज्या मितीस परतफेड होईल तेथपर्यंतचेच फक्त आकारलेले व्याज.

**कटदोरा** पु. कमरेभोवती बांधायचा चांदीचा, सोन्याचा, रेशमाचा अगर साधा दोरा; गोफ; साखळी; करगोटा; करदोडा; कटिसूत्र. [सं. कटिदोरकः]

**कटनी** स्त्री. वजावट. (झाडी) [हिं.]

**कटपट** पु. कमरेचे वस्त्र. (धोतर, लुगडे) :'कटप्रदेशीं कटपटा'- वेसी ९.१६. [सं. कटि + पट]

**कटपट्टा** पु. नळी घट्ट राहावी म्हणून बंदुकीभोवती असणारे वेढे, कडी : 'बंदुकीला कटपट्यास नक्षी।'- ऐपो २१७.

**कटपट्टी** स्त्री. गाड्याच्या चाकास दाबलेली पट्टी. (झाडी) [का. कट्टु]

**कटबन** खात्रीलायक; पक्का. (अहि.)

**कटबंद** पु. गाडीच्या चाकाच्या तुंब्यावरील आतील बाजूची कडी, पट्टी. बाहेरील बाजूच्या कडीला तोडबंद म्हणतात.

**कटबंद** पु. कडदोरा; कटिबंध : 'कटबंध कौपीन अंगवसन.'- दावि २५३. [सं. कटि + बंध]

**कटबंद** पु. श्लोक. पहा : **कटिबंध** : 'कटबंध वदले दासावरी'- दावि ७८७. [क. कट्टु + रचणे]

**कटमस्त-स्ता, कटमस्तान** वि. १. धिप्पाड; गलेलठ्ठ; गबदुल; धटिंगण; बेडर. २. चढेल; मस्त; आडदांड. ३. हाडापेरांनी मजबूत; सशक्त; बळकट. (व.ना.) [ हिं.]

**कटमिती, कटमुदत** स्त्री. व्याजाच्या हिशेबाचा एक प्रकार (त्यात कर्जाची रक्कम व्याजासह जसजशी फेडली जाते तसतसे मुद्दल कमी कमी होत जाते); तूटमिती; तूटमुदत. (तृतीयांत, षष्ठ्यंत प्रयोग-कटमितीने, कटमितीचा).

**कटर** वि. १. कापण्याचे यंत्र. २. कपडे कापून बेतणारा (शिंपी). [इं.]

**कटर** होडीचा एक प्रकार; जमदाड.

**कटरकटर** क्रिवि. खाताना, चावताना होणारा एक आवाज : 'एक चिपोरा तोंडात टाकला कटरकटर चावू लागली.'- वानगी १४५. [ध्व.]

**कटरा** पु. चौक (शहरातील); बाजार; किल्ल्याची बाजारपेठ. [हिं.]

**कटरी** वि. ठेंगणा; लहान. (ना.)

**कटर्नी** स्त्री. चांभाराची शिवण्याची सुई. (झाडी)

**कटलरी** स्त्री. चाकू, सुऱ्या इ. लोखंडी हत्यारे व ती करण्याचा धंदा, कारखाना. [इं.]

**कटला** पु. गोड्या पाण्यात वाढणाऱ्या माशांचा एक प्रकार.

**कटला** वि. उन, गरम. पहा : **कडता**

**कटवट** स्त्री. कमरेची किंवा मांडीची बाजू. [सं. कटि + वर्ती]

**कटवणी** स्त्री. पाथरवटाचे हत्यार; दगडफोड्याची पहार. [क. कटि = टाकीने दगड फोडणे]

**कटवणी** न. १. शिजविलेल्या पुरणातील आमटीकरिता काढलेले पाणी; कोणत्याही शिजविलेल्या उसळीचे पाणी काढून त्यात ताक घालून केलेले मिश्रण; कढ. २. गढूळ, खराब, मलिन पाणी (कपडे वगैरे धुतल्यामुळे झालेले).

**कटवणे** सक्रि. १. खर्च करणे : 'तिला पाहता येईल या आशेनं सोन्या पावली कटवायला तयार झाला होता.'- चक्र ९३. २. (पतंग) कापणे; काटणे. ३. निरुत्तर करणे; गप्प बसवणे. ४. घालवून लावणे; न भेटता वाटेला लावणे; टाळणे : 'कुणाला कटवायचं असलं तर तुम्ही मला सांगायला लावता, 'बाबा घरी नाहीत.'- वावारू ६४.

**कटव(वि)णे** अक्रि.खजील करणे. (व.) उक्रि. १. कमी करणे; कापणे : 'घ्या हिशोब व्याज कटवा जी.'- होला १४३. २. तोडणे; छाटणे.

**कटवंजन** पहा : **कटंजन** : लोखंडी तारांचे जे कटवंजन (कठडा) असते.'- स्मरण १०१.

**कटवा** पु. वेहकळीच्या लाकडाची मोठी टिपरी. हिने मुले खेळतात. (व.)

**कटवा** पु. गडवा; तांब्या. (राजा.)

**कटवे** न. कारले.

**कटसोल** गौरीफळ.

**कटंकटीएमान** वि. देहशेष मात्र असलेला; अत्यंत क्षीण : 'महात्मेनि कटंकटीएमान होउनि असावे।' - लीच ३०५.

**कटंग** पु. बांबूची जात. (झाडी) [सं. कंटकिल]

**कटं(टां-टिं-ठां)जन** न. १. (नक्षीदार) कठडा; (दार, खिडकी, गाडी, पलंग इत्यादिकांचा) गराद; (झाडाभोवतालचे) कंपाउंड; कामट्यांची उभी-आडवी जाळी; जाळीदार काम. २. अर्धी जाळी किंवा भिंत घातलेला ओटा. ३. पिंपळ, औदुंबर यांच्या भोवतालचा पार. (माण.) ४. देवळाभोवतालची प्रदक्षिणेची वाट. [सं. काष्ठ + जनित]

**कटा** उद्गा. हाय-हाय; कटकटा : 'कटा रे मियां चाटिला। कुचस्वेदु ॥'- ज्ञा १३.५४०.

**कटा** पु. १. वध; हत्या; कत्तल; कापाकापी; ठार मारणे : 'संपूर्ण कटा जाला.'- शिदि २९. २. रजपुतांचा जोहार. [ सं. कटाह]

**कटाई** स्त्री. १. पिकाची कापणी. (व.) २. कापणीकरिता दिलेली मजुरी. [ हिं.]

**कटाकटा** पहा : **कटकटा** : 'म्हणती नाडलों कटाकटा।'-रास २.२९.

**कटाकटी** स्त्री. १. कापाकापी : 'दोन्ही फौजा समोरासमोर उभ्या आहेत. कटाकटीला केव्हा तोंड लागेल सांगता येत नाही.'- यहो. २. पतंगाची कापाकापी. (झाडी) [ हिं.]

**कटाकटी** क्रिवि. जेमतेम; कसेबसे.
**कटाकटी** स्त्री. १. सर्वसाधारण छाटाछाट; कपात (विविध बाबी, वेतन इत्यादींची). २. भांडण; कटकट. (गु.ना.) [कटणेचे द्वि.]
**कटाकटो** क्रिवि. कचकन. (चावणे.) (झाडी)
**कटाकय, कीटाकोय** पु. कोकिळ पक्षी. (गो.) [हिं. कोयल]
**कटाग्नि-ग्नी** पु. अपराध्याच्या अंगाला गवत बांधून त्याला आग लावून जाळण्याची शिक्षा. [सं.]
**कटाघशी** वटवट.
**कटाचूर** वि. १. पूर्ण; पुरेपूर. (व.) २. दोन देणारा दोन घेणारा. (माळवी)
**कटाडी** स्त्री. १. काठ. (झाडी) २. कठडा. दाकोपु. [सं. कट]
**कटान** पु. कठाण. (झाडी) [सं. काष्ठधान्य]
**कटाप** पु. उपाय; इलाज. (गो.)
**कटाप** वि. १. (पत्त्याचा खेळ) खलास; नास्तिरूप; अभावरूप; जवळ नसलेला. (क्रि. करणे.) २. बाद; निरुत्तर; काही करू न शकणारा. ३. काढून टाकणे; थांबवणे; वगळणे : 'त्या टाइमापासून मात्र दूधवाल्यानं आमची भट्टी एकदम कटापच केली होती.'- हातभट्टी १४८.
**कटाब** स्त्री. पत्त्यातील हुकुमाचे पान. (झाडी)
**कटायी** मोठी कढई. पहा : **कटाह**
**कटार** वि. प्रौढ; जून. (झाडी)
**कटार-री** स्त्री. डोंगर, बाजू, डोंगरकाठ डोंगरकपारी. :'डोंगरकटारीला हिरव्या शालूची कोन येती।'-लोसा शब्द ४६.(ना.)
**कटा(ट्या) र** स्त्री. १. सरळ व एक हात लांबीचे दोन्ही बाजूंना धार व पुढे चिंचोळे टोक असलेले, पोटात खुपसण्याचे एक हत्यार. हे कमरेला खोवतात : 'तरी वायांचि कां बांधावीं कटारें:'- ज्ञान ४.२३३. २. कापडावर कट्यारीसारखी काढलेली वेलबुट्टी. ३. (ल.) दहशत; भीती; धास्ती; अंतर्यामी होणारे दुःख; मानसिक यातना; मनाला सतत बोचणारे दुःख, काळजी (क्रि. राहणे) : 'इंग्रजांचे उरावर कट्यार राहील.'- पया २५६.४. अधिकाराचे एक चिन्ह. स्वराज्यात (मराठेशाही) मोठ्या अधिकाराची वस्त्रे देताना शिक्केकट्यार सरकारकडून मिळत असे. [सं. कट्टार] (वा.) **०जिवाला असणे, लागणे-** अतिशय दुःख काढणे; मनाला अतिशय काळजी लागणे. कट्यारीप्रमाणे दुःख चिंता बोचत राहणे. **० उरावर टाकणे-**(कर्ज, अपरिहार्य कर्तव्य, वाईटाची भीती, जबाबदारी इत्यादींच्या) कचाट्यात सापडणे; नेहमी आगामी संकटाच्या काळजीत असणे : 'इंग्रजांचे उरावर कट्ट्यार राहील'- पया २५६.० **लावणे-** टोचून बोलणे, निंदा करणे.
**कटा(ट्या)रकाठ** पु. (कापडाचा) कट्यारीप्रमाणे काढलेला काठ.
**कटा(ट्या)रवाह-हा** वि. कट्यारधारी; कट्यार बाळगणारा (शिपाई): 'वाहाणी लाविती कटारवाहें.'- उषा १११०.
**कटारा** पु. १ कठडा; गरादा. २. बांबूच्या काड्यांचा पिंजरा. ३. गलबताचा सांगाडा; माल काढून घेतलेले गलबत; खटारा : 'तुम्ही लिहिले की, गलबताचा जिन्नस घेऊन कटारा सोडून दिला.'-पेद २४.१८४. [सं. काष्ठ + हारक]
**कटारी, कटारीदार** वि. १. कट्यारीसारखे पट्टे, वेलबुट्टी, शिवण असलेले (कापड, चीट इ.) : 'चोळी अंजिरी जरिकांठाची रंग कटारी नवा।'- पत्ता ४.२१. २. कट्यारीप्रमाणे वीण असणारा (गोफ, दागिना, शिवण इ.).
**कटारी, कटारीदार** स्त्री. डोंगरकाठ; कपार; बाजू : 'डोंगरकटारीचे किल्ले.' - शिदि २८५.
**कटा(ट्या)री** स्त्री. १. (चर्म.) काट्याची आरी. हिने सुईशिवाय खालीवर दोरा आणता येतो. २. लहान कट्यार.
**कटारेकार** पु. कट्यारधारी : 'उत्पसिती कटारेकार : तेणे सोडले पारकेयाचे मोगर।' -रुस्व २३२८.
**कटाव** पु. १. व्यवस्थित बांधणी; डौलदार रचना; थाट; मेळ; देखावा (सैन्य, परिवार इत्यादीचा). २. (ल.) आटोपशीरपणा; भारदस्तपणा; प्रौढपणा (भाषण, निबंध इत्यादींचा). ३. व्यवस्थितपणा; तरतरीतपणा; भपका (पोशाख, चेहरा, चाल, रुबाब इत्यादींचा). ४. संघ; कट; बनाव; कारस्थान; जूट : 'आनंद घटाव ब्रह्म कटाव। थोर धिटाव हे गुरु कृपा।'- दावि ३१३. ५. एक प्रकारचा कवितेचा छंद; कटावाची कविता. ही एक धावती रचना असून यातील गटांच्या पंक्तींची संख्या निश्चित नसते. अमृतराय कवीने या छंदात बरीच पदे केली आहेत. पहा : **कटिबंध** ६. कत्तल; लढाईतील जोराचा हल्ला : 'कटाव करीत चालले जेव्हा तिराचे मार बसविली ॥'-ऐपो २७८. [का.कट्टे = रचना] [सं.कृत्]
**कटावगरी** स्त्री. घालूनपाडून बोलणे : 'बोलिला कटावगरीनें'- दावि १८४.
**कटावणी** स्त्री. १. कटावाची कविता. पहा : **कटिबंध.** २. पहार.
**कटावणी** स्त्री. (स्था.) बांधकामातील लाकूडकामात वापरले जाणारे पहारीसारखे एक हत्यार, याचे टोक डावासारखे वाकवलेले असते. लाकूडकाम उचकटण्यासाठी याचा वापर होतो.
**कटास** पु. कष्ट; त्रास; संकट (अन्न, वस्त्र, घरदार इत्यादींच्या अभावामुळे); कुतेघाशी; अंगमोड (आजारी, त्रासिक, असंतोषी माणसाच्या शुश्रूषेमुळे होणारी). (क्रि. काढणे, सोसणे, निघणे.)
**कटासणी** पहा : **कडासणी-णे**
**कटासणे** अक्रि. १. त्रास, संकट सहन करणे; हाल सोसणे. २. दमणे; थकणे; भागणे. २. घट्ट आवळणे. [सं. कष्ट]
**कटा(डा)सन** न. दर्भ, मोळ किंवा गवत यांची लहानशी एका माणसापुरती चटई; तृणासन; दर्भासन. [सं.] (वा.) **०घालून बसणे-** १. तपश्चर्या करणे. २. (ल.) तपश्चर्येचे ढोंग करणे.
**कटाह** पु. मोठी कढई, कटायी (कढई उलटी केली असताना तिचा आकार आतून आकाशासारखा दिसतो. वेदान्तात ब्रह्मकटाह, अंडकटाह अशी आकाशाला उपमा दिलेली असते) : 'तेथें ब्रम्हकटाह शतकूट। हों पाहत असे॥' - राज्ञा १.१४७. [सं.]
**कटाळणे** पु.अक्रि. दमून जाणे; कंटाळणे; थकणे. [सं. कष्टाळू]
**कटाळी** पु. कठडा : 'जिकडे तिकडे कटाळी खिडक्या जाळ्यावरी'- ऐपो २.१५१. [सं. कांटे]
**कटाक्ष** पु. १. डोळ्यांच्या कोपऱ्यातून पाहणे (साभिप्रायाने); अपांगदर्शन; अपांगदृष्टी; डोळा घालणे, मारणे; वाकडी दृष्टी : 'काय

चंचळु मासा। कामिनीकटाक्षु जैसा।' -ज्ञा १४.१७०. २. (ल.) व्यंग्यार्थाचे भाषण; छद्मीपणा; उपरोधिक भाषणाचा रोख. ३. क्रोधदृष्टी; गैरमर्जी; राग; वैर; कलह.४.मुद्दा; रोख; कल; प्रवृत्ति. (वा.) ० **वाढणे-** वैर निर्माण होणे: 'राजेश्री मुरारराव याचे व मुसाफरखानाचे कटाक्ष वाढले.'- पेद २८. १७९. ० **मिटणे-** भांडण संपणे: 'लक्ष्मीबाई शिंदे व अलिजाबहादर यांचे कटाक्ष मिटत नाही.'- ऐलेसं ५७५६. ० **लागणे-** भांडण लागणे : 'जाबतेखान शुक्रतालास आहेत.... त्याचा कटाक्ष लागला आहे.' -पेदभा २९.८९. ५. मुद्दा; जोर; रोख; कल; प्रवृत्ती : 'गीतेचा सर्व कटाक्ष याच तत्त्वावर आहे.'- लोटिकेले ४.५२३. [सं.]

**कटाक्ष** वि. काटक; सहनशील (शरीर, माणूस) : 'मेंढरापेक्षा बकरें कटाक्ष असते.'- मराठी ३ रे पु. (१८७३)- ११८.

पु. १. कणखरपणा; सोशिकपणा; (श्रम करण्याचा) काटकपणा. २. ताकद; जोर; सामर्थ्य : 'देशी येऊन फिरून महायात्रा होण्यास शरीरकटाक्ष व द्रव्य दोन्ही मजपाशी नाहीत....'- मर्शियांका ६३१. [सं. काष्ठ+अक्ष]

**कटाक्षणे** क्रि. दृष्टी रोखणे: 'कटाक्षूनि डोळां रीगे : सळे आंगुळी सूनि वेगे : की देखना मिरवे सोगे : तयांचेनि।'-सव ७०.

**कटांजन** पहा: **कटंजन**

**कटांदर** न. ऊदमांजर; कांडेचोर. पहा : **कलं(लिं)दर**

**कटि-टी** स्त्री. कंबर, देहाचा मध्यभाग. [सं.]

**कटिकांची** स्त्री. कंबरपट्टा : 'कटिकांची वरी हिरे थोर। जैसे दिनकर जडियेले॥'- रावि ८.४९.

**कटिछिन्न** न. (नृत्य.) दोन्ही हात दोन्ही बाजूंना वर उचलून पताकाहस्त करून मनगटात सैल करून कंबर पुढे मागे हलविणे. [सं.]

**कटितट** पु. कंबर; नितंब; कनवट : 'वंशी नादनदी तिला कटितटीं खोवोनि पोटीं पटीं।' - वामन, वनसुधा १८.

**कटिता-टा, कटेटा** पु. जिम्मा; मक्ता; कंत्राट; करार. (व.)

**कटिबद्ध** वि. १. कंबर कसलेला. २. तयार. (क्रि. होणे, असणे).

**कटिबंद** वि. १. पहा : **कटबंद**. २. संयमी; ज्याने कामविकार आटोक्यात ठेवला आहे असा (पुरुष, स्त्री).

**कटिबंध** पु. १. कटिबंद; कटबंद. २. कटावाची कविता. यात प्रास, अनुप्रास, यमके यांची रेलचेल असते. पहा : **कटाव**. उदा. 'तरीच एथें जन्मा यावें, तरुणी कुचद्वय पेटे घ्यावे, मन्मथसरिता तरुनी जावे, तरुणीसंगें निसंग व्हावे, व्यर्थचि कां तारुण्य हरावे ? तृणासनाला काय करावें ? सुखमंचकीं मंदिरी भरावे, गाढालिंगनीं शयन करावें.' - इ. अमृत २५. [का.कट्टे=रचना]

**कटिबंध** पु. १. कंबरपट्टा; कटिबंद; मेखला; कांची. २. भूमेखला, भूवलय; पृथ्वीच्या गोलावरील वातावरणाचा कल्पिलेला पट्टा, प्रांत; अयनवृत्ते आणि ध्रुववृत्ते यांच्यामुळे झालेले भूपृष्ठाचे भाग. याचे उष्ण, समशीतोष्ण, शीत कटिबंध असे प्रकार आहेत. [सं.]

**कटिबंध** पु. (मल्लखांब) वेताच्या मल्लखांबाची अढी कमरेभोवती बसवून मारण्याची उडी. [सं.]

**कटिबंधन** न.कंबरपट्टा; करदोडा; मेखला; कांची. पहा : **कटिबंध** [सं.]

**कटिभ्रांत** न. (नृत्य) उजवा पाय सूची करून मग अपविद्ध करणाप्रमाणे करून कटिरेचित करणे.

**कटिरव** पु. सिंह. [प्रा.]

**कटिवात** पु. कंबरेत शिरणारा वात; कंबर धरणे. [सं.]

**कटिशूल** पु. १. कंबरदुखी. २. (ल.) अतिशय कामवासना; विषयलंपटता (पुरुषाबद्दल वापरतात). [सं.]

**कटिशूलाची व्यथा** बाहेरख्यालीपणाचा छंद.

**कटिसमकरण** (नृत्य) पायांचे स्वस्तिक करून पाय काढून घेणे व दोन्ही हात कटीवर ठेवून कमरेची एक बाजू थोडी वर करणे. [सं.कटि]

**कटिसर** पु. (स्था.) तळसरी; भिंतीच्या खालील भागांभोवती निराळ्या रंगाची किंवा लाकडाची बसवलेली पट्टी.

**कटिसूत्र** न. करगोटा; करदोडा; कंबरपट्टा; कटिबंद. [सं.]

**कटिस्नान** न. पायापासून कमरेपर्यंतचे अंग धुणे; स्नानाचा एक प्रकार.

**कटिंग** न. १. (शिवणकाम) बेतलेले कपडे कापणे; शिवण्यासाठी कापणे. २. केस कापणे; केस राखणे. [इं. कट = कापणे]

**कटिंदर** पु. कलिंदर; कांडेचोर; ऊद; काळमांजर. हे झाडाच्या ढोलीत राहते. (कु.)

**कटीची जागा** (सोंगट्यांच्या खेळात) कट-फुली असलेले घर. ही महत्त्वाची जागा असते. (कारण त्या जागी असलेली सोंगटी मरत नाही यावरून). नाके; महत्त्वाची जागा; मोक्याची जागा : 'संख्येनें थोडें असलें तरी हिंदी लोक हेच ब्रम्हदेशांतील आर्थिक जीवनांतील कटीच्या जागा व्यापून बसले आहेत.'- के ९.९.३८.

**कटीतटी** न. पैलतीर.

**कटीर** मूत्रश्रोणी; वृक्कद्रोणी.

**कटु-टू** वि. १. तिखट (मूळ अर्थ तिखट असा असून पुढे कडू असा झाला) : 'संस्कृतांत कटु म्हणजे तिखट आणि तिक्त म्हणजे कडू असा अर्थ असून... '- गौर ८२१. तिक्त याचाही मूळ अर्थ कडू असा असून पुढे तिखट असा झाला. २. कडू : 'कटवम्ल लवण मेलें। गर्भवतीचे पुरती डोहाळे।' - एभा १०.४३०. ३. तीव्र; उग्र; भयंकर. ४. अप्रिय; वाईट; दुःखदायक; मर्मभेदी (भाषण.) ५. आवेशपूर्ण; जळजळीत; जहाल; तापट. [सं.]

**कटुक** पहा : **कटुकी** : 'कटुक, तान्या, अंजन, कुंबा, हेळ वगैरे इमारतीचे उपयोगी आहे. ठिकठिकाणीं आहेत.'- खेया.

**कटुकरंज** पु.करंजाचे झाड व फळ. हे कडू व ज्वरनाशक असते; सागरगोटी.

**कटुक रोहिणी** काळी कुटकी; कटुकी.

**कटु कर्तव्य** सकृत्‌दर्शनी अप्रिय वाटणारी पण शेवटी हिताची ठरणारी अशी करावी लागणारी गोष्ट.

**कटुकी** स्त्री. कुटकी; एक औषधी झाड.

**कटुता** स्त्री. १. कडवटपणा; तीव्रता. २. तिखटपणा; तीक्ष्णता : 'अंतर्मलिन द्रवतें चक्षु जसें पाहतांचि कटुतेला।'- मोआदि २४.२८. ३. अप्रियता. [सं.]

**कटुफल** न. १. कारली. २. कडू पडवळ; कंकोळ.

**कटुवण** न. वाडवडिलांचे ठिकाण. (कर.)

**कटुवाण** न. १. नापीक जमिनीची कायमधारा पद्धतीने वंशपरंपरागत दिलेली देणगी.(रत्ना.) २. अशी देणगी दिलेली जमीन.

**कटुसत्य** न. अप्रिय वाटणारे पण वस्तुस्थितिनिदर्शक तथ्य; न रुचणारी पण खरी गोष्ट, वस्तुस्थिती.

**कटुस** वि. कडवट. (झाडी) [सं. कटु]

**कटु(टो)ळते** न. सराफाचा किंवा सोनाराचा गोल झोळणा; बटवा (दागिने, वजने, तराजू इ. ठेवण्याचा); बोरी. [क. कट्ले]

**कटे** स्त्री. स्वारी; आक्रमण : 'तयावरी कटे न करावी।'- पंचो ९४.५.

**कटेल** न. फळभाजी, करगेले : 'खाली उतीली पाटी म्हणे कटेलं लेयजा' - बगा ११७.

**कटोकटी** क्रिवि. सरासरी; कसेबसे; जेमतेम; मोठ्या मुष्किलीने (एखादी गोष्ट होणे, माप भरणे इ.).

**कटोत्रा** पहा : **कटमिती** : 'कटोत्र्याचे दोन आणे याजपासून घेऊं नये.'- विक्षिप्त २.५८.

**कटोरा** पु. १. मोठी वाटी; मोठ्या तोंडाची पसरट वाटी; वाडगा; द्रोण. २. कडू भोपळा; जव्हेरी नारळ, लाकूड इत्यादींचे केलेले भांडे, द्रोण : 'कटोऱ्यात दुग्ध श्वानीचें काढून।'- रामदासी २.७३. ३. (भरतकाम) वाटीप्रमाणे खोलगट जरीची टिकली. [सं.]

वि. (ल.) लहान; सुंदर (स्त्री, मूल, गाय इ.).

**कटोरी** स्त्री. काचोळीचा (स्तनावरील) भाग : 'परंतु तिच्या कटोऱ्या आणखी कांठ हे जरीचे होते.' - धर्मा १५७.

**कटोरी** स्त्री. लहान कटोरा.

वि. १. लहान जातीची (जनावरे). २. ठुसका; ठेंगणा (माणूस, जनावर इ.). (माण.)

**कटोरे** न. कान असलेला वाडगा.

**कटोल** न. कर्टुले (भाजी); करटोली; काटले. (व.)

**कट्ट** न. कवच; करवंटी. (गो.)

**कट्ट** पु. न. एक प्रकारचा आवाज (विशेषत: तार देण्याच्या यंत्रावर होणारा); खट्ट, खुट्ट आवाज.

**कट्ट** स्त्री. कंबर : 'लवथवित मलपे दोंद। वेष्टित कट्टनागबंद।' - दासि १.२.१६. [सं. कटि]

**कट्ट** न. १. वेढे; अंगठी; कडे : 'रत्नजडित कट्ट झळके येकदंत.'- दावि ३७.४०४. २. एकोपा; जूट: 'कट्ट घालून राजकारणा। लोक लावी॥'- दास १५.२.२५. [क. कट्टु =बंधन, बांधणे]

**कट्टकन, कट्टकर, कट्टदिशी** पहा : **कटकन, कटकर, कटदिशी.**

**कट्टबंद** न. जूट; एकत्रितपणा.

**कट्टर** वि. १. कट्टेर; जुनेपुराणे; जीर्ण; फाटके; नष्टप्राय. (गो.) २. पुराणमतवादी; सनातनी. कडवा. ३. हट्टी; दुराग्रही; निर्दय. ४. कट्टा; जाज्वल्य; पक्का; पूर्ण; अट्टल; बिलंदर. एकाच मताला किंवा पंथाला चिकटून राहणारा; भिन्न मते किंवा पंथ यांना विरोध करणारा.[हिं.]

**कट्टा** पु. कापाकाप; कत्तल; नाश. (वा.) **कट्टा-ट्टी घालणे** -पतंगाची काटाकाट करणे. (कर.) [सं. कृत्=कापणे]

**कट्टा** वि. १. बळकट; धिप्पाड; काटक. २. हुशार; चतुर; निपुण; तज्ज्ञ; चपळ (लेखक, वक्ता, योद्धा, स्वार इ.) : 'तुझ्या विजयसिंहासारखे जर सगळे कट्टे असते तर आणखी काय पाहिजे होते?' -रुरा ४७. ३. वीरश्रीयुक्त; शूर; उत्साहपूर्ण; तल्लख; धाडसी (माणूस, मसलत, युक्ती). ४. घनघोर; भयंकर; कडाक्याची; आवेशाची; कटाकटीची; जोराची (लढाई, कज्जा, भाषण, मेहनत). ५. थोर; अफाट; मजबूत; साहसी; बळकट (सैन्य, व्यूह). ६. अंत:करणापासूनचा; निग्रही; पक्का. ७. पूर्ण; पुरा; कट्टर, जाज्वल्य. उदा. कट्टा सुधारक; कट्टा अभिमानी : 'ते कोणत्या देवधर्माचे कट्टे भक्त राहणे शक्य नव्हते.'- रालेख १३७. [सं. धट्टा < धृष्ट; कट=अति]

**कट्टा** पु. १. ओटा : '(ती) वृंदावनाच्या कट्ट्याला टेकून खाली बसली.'- रथ २७७. २. ओझेकऱ्यांनी ओझे ठेवण्यासाठी मोठ्या रस्त्याच्या बाजूला खांद्याइतका उंच बांधलेला ओटा; धर्मधक्का. (कर.) ३. जूट; एकी. ४. दुकानांची रांग. जसे :- सराफकट्टा. [का. कट्टु=बांधणे; कट्टे= ओटा त.कट्टै]

**कट्टाकटी** पहा: **कटोकटी** : 'बनारसहून निघालों त्यावेळी कट्टाकट्टी झांशीपर्यंत भाड्यापुरते पैसे माझ्याजवळ शिल्लक होते.'- मामू ९०.

**कट्टाड** वि. डौलदार.

**कट्टिमणी** पु. कट्टीमनी. १. भामट्यांचा नाईक; तालमड; तालदरु. (भामटी बोली) २. महारांवरील एक अधिकारी. (विजापूर.) [क.]

**कट्टी** स्त्री. सोंगट्यांच्या पटातील कट. [क.] (वा.) ० **धरणे, गाठणे, बसणे** - निर्भय ठिकाणावर असणे. (कर.) [सं. कटि]

**कट्टी-ट्टे** स्त्री. न. करवंटी (नारळाची). हिचा उपयोग भांड्याप्रमाणे करतात : 'लेकांनो एक एक कट्टी फेणी तर अगाऊच वसूल केली आहांत.'- सह्याद्री २०१. (गो.) [सं. कवच]

**कट्टी** स्त्री. नाश; कट्टा. (वा.) ०**मारणे**- कापाकाप करणे. [सं. कर्त]

**कट्टी** स्त्री. अबोला : 'त्यांची कमी माझ्याशी नेहमीच कट्टी घेते.'- वावारू ६५.(क्रि करणे, घेणे)

**कट्टी-ट्टे खायरो** दरिद्री; भिकारी; दैवहीन. (गो.)

**कट्टे** पहा: **कट्टर**

**कट्टेल** न. करवंटीचे तेल. (गो.)

**कट्टो** न.फुटके भांडे. (गो.)

**कट्यार** स्त्री. सरळ, एक हात लांबीचे, दुहेरी धारेचे, निमुळत्या टोकाचे, पोटात खुपसण्याचे हत्यार.(वा). ० **उरावर राहणे**- कायमची दहशत किंवा धाक असणे. ० **काळजात घुसणे**- मनाला एकदम अतिशय वेदना होणे; अनपेक्षितपणे अत्यंत अप्रिय अशी गोष्ट घडणे. [सं. कर्त्री]

**कट्याळ** न. अरिष्ट. पहा : **कवंटल**

**कट्व** वि. कटु; कडू : 'कटव तिक्षणें सर्वांग पोळे।'- दास ३.१.२१. [सं. कटु]

**कठ** न. १. यजुर्वेदाची एक शाखा. कठ ऋषीने ही रचली. २. कठवल्ली नामक कृष्णयजुर्वेदाचे उपनिषद. [सं.]

**कठडा, कठरडा** पु. १. गरादा; रेजे बसवलेली चौकट; गजाचे काम (पलंग, गाडी, दार, खिडकी इत्यादींचे); कटारा. २. खोगिराचे खोड; खोगिराच्या बाजू. ३. (बुरुडी) कुंडीच्या तोंडाला पेल्याच्या तोंडासारखा सभोवार केलेला कामट्यांचा काठ. ४. कामट्यांचा पिंजरा (आत जनावर ठेवण्याचा) : 'चित्यास बसण्यासाठीं एक कठडा केलेला असतो, तो घोड्यावर ठेवितात.'- चिमा ३४. ५. गॅलरी; सज्जा.

**कठड्याचे खोगीर** न. कठाणी खोगीर; चौकटीचे खोगिर; भोवती कठडा किंवा गाद्या, गिर्द्या असलेले खोगीर; खोड.

**कठण** पहा : **कटवणी**

**कठपुतळी** स्त्री. १. हाताला बांधलेल्या दोऱ्यांनी नाचवता येणारी बाहुली. २. एखाद्याच्या पूर्ण ताब्यात असणारी त्याच्या इशाऱ्यावर नाचणारी व्यक्ती.

**कठाण-न, कठाणमठाण** न. १. मूग, उडीद, तूर वगैरे कडधान्य; कडदण. पहा: **काठण** २. रब्बीचे पीक. (व.) (वा.) **कठाणी ठेवणे**- १. कडधान्यासाठी, रब्बीसाठी जमीन राखून ठेवणे. २. उपाशी ठेवणे.

**कठाणी** स्त्री. वावर; शेत.

**कठाळू** पु. सांड; पोळ. (व .ना.)

**कठांजन** पहा: **कटंजन**

**कठि(ठी)ण-न** वि. १. अवघड; अशक्यप्राय; दुष्कर. २. संकटपूर्ण; आपद्ग्रस्त; कष्टप्रद (गोष्ट, बनाव, प्रसंग) : 'कठिण समय येतां कोण कामास येतो.'- र १०. ३. घट्ट; बळकट; टणक; नरम नव्हे असे; जे तोडण्यास बळ लागते असे : 'मृदु आणि कठिन। हे स्पर्शाचे दोन्ही गुण।'- राज्ञा २.११५. ४. करण्यास वाईट. ५. दुःखप्रद; सोसण्यास अवघड; जिवावरचे; मरणप्राय (आजार, रोग, स्थिती). ६. क्रूर; कठोर; दयाशून्य (माणूस, कृत्य). ७. मनाला लागेल असे; कडक; कठोर (शब्द, भाषण) : 'आपले झांकी अवगुण। पुढिलास बोले कठिण।'- दास ५.३.९२. ८. समजण्यास अवघड (ग्रंथ, अभ्यास, व्यवहार). (वा.) ० **वाटणे**- अवघड वाटणे; दुःख होणे. [सं. कठिन]

**कठिणीभवन** न. (वै.) (शरीरावयव) कठीण होत जाणे.

**कठिणीमय** वि. (भूशा.) पृथ्वीच्या चार कालखंडांपैकी सरपटणारे प्राणी ज्या कालखंडात अस्तित्वात होते तो (दुसरा कालखंड).

**कठिनी** हार्ड डिस्क.इ संगणकातील माहिती साठवण्याचे मुख्य केंद्र.

**कठिनोत्तर** न. दुर्भाषण; शिवीगाळ; निर्भर्त्सना. [सं.]

**कठीण** पहा : **कठिण**

**कठीण कोळसा** पहा : **दगडी कोळसा**

**कठीण तालू** (वै.) वरच्या जबड्याच्या आतील कठीण भाग.

**कठीण पाणी** (रसा.) काही विद्राव्य रसायनांच्या अस्तित्वामुळे ज्यामध्ये साबणाचा फेस सहजगत्या होत नाही असे पाणी.

**कठीण मर्जी** गैरमर्जी ; इतराजी.

**कठीण वर्ण** ट वर्ग आणि जोडाक्षरे.

**कठीया** पु. पुजारी; गुरव : 'कठिया...' -दृपा ९४.

**कठीये** स्त्री. पुजारीण : 'तीए तेथिंची कठीयें।' - लीचपू ५००.

**कठे, कथे** क्रिवि. कोठे. (खा.) [सं. कुत्र]

**कठोर** वि. १. टणक; कठीण (दगड, लाकूड इ.) : 'विस्तीर्ण वर्तुळ उदग्र कठोर भारी। वर्धिष्णु ते स्तन तिचे कनकानुकारी।' - र १५. २. निर्दय; दयाशून्य (अंत:करण, मन). ३. तीक्ष्ण, बोचणारे, मर्मभेदी (भाषण). ४. कर्कश, भसाडा, (आवाज). ५. सक्तीची, कडक, निष्ठुर (शिक्षा, वागणूक). ६. अवघड : 'क्रिया कठोर तऱ्हीं तेणे' - राज्ञा १८. ९२७. ७. मोठे; प्रचंड. [सं.]

**कठोरभाषी** वि. दुसऱ्याला लागेल, झोंबेल असे बोलणारा.

**कठोर वर्ण** (ध्वनिविचारात) ज्याच्या उच्चारात स्वरनलिकांचा कंप होत नाही असा वर्ण; अघोष - जसे मराठीतील क, ख, च, छ, ट, ठ, त, थ, प, फ, श, ष, स ही व्यंजने कठोर आहेत.

**कठोरी** वि. कठोर; कडक : 'कुटिल कुबुद्धि कुपात्र कठोरी।'-नाम ७४८.

**कड** पु. स्त्री. १. बाजू; पक्ष : 'त्याचा कड घेऊन ती बोलू लागली.' - रथ १९०. २. बाजू; टोक; काठ; शेवट; मर्यादा (शेत, तळे इत्यादींची). ३. दिशा; प्रदेश; विभाग (चतुर्थ्यंत, षष्ठ्यंत प्रयोग- ह्याकडेस, त्याकडेस, इकडचा, तिकडून इ.). : 'नये मंत्रादिक तयाकड।' - ज्ञा १७.१८२. ४. बरगड्यांची एक बाजू, कूस. (व.) ५. सीमा; पराकाष्ठा : 'तंव देओ भणती साचची। परि कड केलें आम्हीची।'-शिव २००. ६. निकाल; शेवट (आरंभिलेल्या कार्याचा). [क. कट= शेवट] (वा.).० **ओढणे, घेणे, धरणे**- एखाद्याची (माणूस, कार्य) बाजू धरणे; पक्ष स्वीकारणे. ० **करणे**- टिकाव धरणे. (व.) ० **काढणे, धरणे**- एका सपाट्यात, दमात शेवटाला नेणे; आरंभून संपविणे (काम इ.) : '... आणि वाडी तो किती कड काढतो याची वाट पहात राहिली.'- बनगर ८५. ० **घालणे**- सार्थक करणे. ० **पडणे, फेरणे** - कूस बदलणे : 'तिने झोपेत कड फेरली.'- माणूस १५९. ० **लागणे**-१. परिणाम होणे: 'बाहेरच्या माणसांच्या लुडबुडीची कड लागायची नाहीं.' - स्वामी ७१. २. निकाल लागणे, काम नीट होणे: 'मी जातीनं गेल्याशिवाय कड लागायची नाही.' -भुताचा १२३. ० **लावणे**- तडीला लावणे, शेवटाला नेणे : 'कडे लावूं आपुला काळ। सोडोनि तळमळ चित्ताची।' - भवि ५०.१४०. **कडावर ठेवणे**- उपाशी ठेवणे, दुर्लक्ष करणे, उपेक्षा करणे. (ना.) **कडा धरणे**- अंकुरणे: 'तीन दिवसांनी बटाट्याच्या फोडी कडा धरू लागतात.' - गार २२.

**कड** स्त्री. कंबर.(वा.) **कडे वेंघविणे**- कमर ढिली करणे, कमरेचा काटा मोडणे : 'दोन तीनशे राऊत आणिले होते ते दोन तीन मजलीवर आले आहेत. मारून कडे वेंघवितो.' - पेद ६८५. [सं. कट, कटि]

**कड** पु. कड् कड् असा आवाज, ध्वनी (तारायंत्राचा इ.). [ध्व.]

**कड** पु. कढ; उकळी; उसळी (तापलेले पाणी, राग वगैरेंची); आच; उष्णता. पहा : **कढ** (राजा.)(वा.) ०**काढून रडणे**- ओक्साबोक्शी रडणे. (राजा.)

**कड** पु. एक प्रकारचा रेतीचा दगड. [क. कडु-कडल = दगड]

**कड** पु. जुव्यातील दानाचा एक प्रकार : 'चौदानी जुं पडत असे: कडु : जागरु : नादु त्रेतीया' - लीचपू २८.

**कड** अव्यय धातू. शब्दयोगी अव्ययासारखा वापरला जाणारा 'बाजू' या अर्थाचा अव्यय धातू. त्याला १. समीपतादर्शक इ-, दूरत्वदर्शक ति, संबंधदर्शक जि- आणि प्रश्नदर्शक कुणी- हे उपसर्ग लागून स्थलवाचक अव्यये बनतात. २. चा, ला, ईल, ऊन आणि ए हे प्रत्यय लागून शब्दयोगी अव्यये बनतात. जसे :- तिकडचा, तिकडला, तिकडील, तिकडून, तिकडे इ. आणि गावाकडचा, घराकडला, शहराकडील, पूर्वेकडून इ. [काते. कडे]

**कडई रांद्या** पु. उकळत्या ऊसपाकावर देखरेख ठेवणारा. (झाडी).

**कडक** वि. (मारताना कड असा होणारा आवाज, यावरून). १. टणक (लाकूड, माती); कमी चिकण. २. महाग (भाव, दर) : 'विलायती हुंडीचा भाव घसरल्यामुळे सरकार कृत्रिम उपायांनीं नाणेंबाजार कडक राखून ठेवतें.' - के १०.६.३०. ३. शिस्तीचा, तापट : 'आपले वडील मोठे कडक आहेत.' -विवि १०.५. ४. मोडता न येण्यासारखा, पाळलाच पाहिजे असा (नियम, शिस्त इ.). ५. (ल.) कठोर, उग्र, रागीट : 'त्यांची मुद्रा बरीच कडक दिसत आहे.'- विवि ८.१.५. ६. जलाल; प्रखर (भाषण, लेख, ऊन इ.) : 'उष्णकटिबंधात एखादे वेळेस उन्हाळा कडक होऊन सर्व पदार्थांचा सत्यानाश होऊन जातो.'- पाव्ह ५५. ७. तेजस्वी, पाणीदार : 'कृष्ण पुरःसर पांडव आले हांकीत ह्या कडक डोहा।'- मोगदा १.१९. ८. वाळलेले, आर्द्रता नाहीशी झालेले (धान्य, भाकरी). ९. सणसणीत, जोराचा. १०. टणक पण ठिसूळ (लोखंड, सोने किंवा शिसे यांच्याशी तुलना करताना). ११. जहाल; झोंबणारे, उष्ण (तिखट); सहन न होणारे.१२. कच्चेपणामुळे दडस ( फळ, भाजी).१३. दणकट, निकोप (माणूस, जनावर). १४. (ल.) कडू, तीव्र (औषध, तपकीर, विडी). १५. तीक्ष्ण, बोचणारे (थंडी). १६. कर्कश, कानठळ्या बसणारा (आवाज, संभाषण). १७. खळ घालून इस्त्री केलेला : 'कुणी लोकल मुलगा कडक पॅन्टीत आला.' - कोसला ४०.(वा.) ० **विझणे** - मोठा आवाज शांत होणे.

क्रिवि. झपाट्याने, चटदिशी, चटकन, मोकळेपणाने (उद्योग इ. होणे, करणे, माणसे इत्यादींनी धावणे, चालणे.). [ध्व.] [सं.कटक]

**कडक** पु. १. (जंबिया, बाक)आपल्या हातातील जंबियाने जोडीदाराच्या उजव्या पायाच्या बाहेरील घोट्यावर मारणे. २.(लाठी) गुडघ्यावरील मार. ३. फरिगदगा यामधील गुडघ्यावरील वार. [हिं.]

**कडक** पु. समुदाय; गर्दी; गोंगाट : 'पायदळ निशाण कडक पुढें उडाला।'- ऐपो ११०. [सं. कटक]

**कडक-का,कडाका** पु. हिंदी भाषेतील एक वृत्त, छंद. त्या वृत्तात भाटाचे गाणे असते. याला 'वीर' असेही दुसरे नाव आहे. अमृतरायाच्या काही कविता या छंदात आहेत. उदा. 'ध्रुवागमन ऐकतांचि भूप हर्ष मानितसे, तट तट तुटति कसे, पूर्व दिशे पूर्ण चंद्र समुद्रासि जसा दिसे, उचंबळूनि गर्जतसे।' - अमृत ११; 'नाना पदें नाना श्लोक। नाना वीर नाना कडक।'- दास २. ५. ५. [हिं]

**कडक झोप** गाढ झोप; शांत झोप; तब्बल झोप. (क्रि. घेणे.)

**कडकट्ट** पु. तार पाठविणाऱ्या यंत्राचा आवाज.

**कडकड** पु. १. नगारा, ताशा, टाळ, ढोल इ.चा आवाज, वाद्यांचा ध्वनी, गोंगाट, कडकडाट; धनुष्य मोडल्याचा आवाज. २. त्रास. [ध्व.](वा.) ० **बाहो करणे** - खूप कष्ट करणे. ० **वाहणे** - त्रास सहन करणे.

**कडकड** पु. हुडहुडी, थंडीचा काकडा. (गो.)

**कडकडणे** अक्रि. (नैसर्गिक विधी करण्याची) घाई होणे; जोराने लागणे: 'मला हे सगळे बघून मुतायला कडकडले होते.'- गणूराया ८५.

**कडकडणे** अक्रि. १. कडकड आवाज होणे (वीज इ. चा) : 'कडकडिला भडभडिला' - दावि २७८. २. अतिशय उकळणे, तापले जाणे (पाणी, तेल, रागात असलेले माणूस) : 'बहु कडकडे परशरें, जैसा अति तैलपाक थेंबानें।' - मोभीष्म ११.५६. ३. वादळ होणे; प्रलयकाळाप्रमाणे स्थिती होणे : 'बारा सूर्य कडकडिले।' - दास १३.४.७. ४. जोराने रागावणे; तणतणणे; खवळणे : 'धिक्कारिति किति कीं या बाहिर सोडूनि भय कडकडो हा.' - मोगदा १.१९. ५. मोडणे; तुटणे; आदळणे; आपटणे. ६. रागावून मोठ्याने बोलणे, शिवीगाळ करणे. [सं.कड्ड] न. भांडण; कज्जा; कलह.

**कडकडा** क्रिवि. नगारा, ताशा इ. वाद्ये वाजणे, वाळलेला पदार्थ मोडणे, संतापून शिव्या देणे, झाड मोडणे वगैरेच्या आवाजांप्रमाणे किंवा उकळणाऱ्या तेलाच्या कडकड आवाजाप्रमाणे; कडकन (क्रि. वाजणे, फुटणे) : 'कडकडां जांभया येती।' - दास १८.६.३.[ध्व. कडचे द्वि.]

**कडकडाट** पु. १. कडकड असा मोठा शब्द; कडाका; दणका; गर्जना. पहा : **कडकड** २. (ल.) निष्ठुरपणा; कडक स्वभाव; तापटपणा. ३. (ल.) आक्रोश; धडपड (नाखुषीमुळे): 'सात्त्विक त्याग करी विवेकनिष्ठें। तामस त्याग करी कडकडाटें।'- एभा १३.१५२.

**कडकडाटणे** अक्रि. कडकड असा आवाज होणे; मोठ्याने शब्द होणे (धनुष्याच्या दोरीचा, मोडण्याचा, तुटण्याचा इ.).

**कडकडा वाल** भाजल्यामुळे कडकड वाजणारा, कडवा वाल. (को.)

**कडकडी** स्त्री. १. कडकडीतपणा; ताठरपणा. २. जास्त वाळल्याने होणारा (कापड, पाने, कागद इ. चा) कडकड आवाज; फडफडी. ३. तापाने अंगात येणारी कचकच; काटा; हीव; कापरे; कंप; हुडहुडी.

**कडकडी** स्त्री. अव. डोक्यात घालण्याची सोन्याची लहान फुले. (गो.)

**कडकडीत** वि. १. दाताखाली फोडताना आवाज देणारा; कुडकुडीत; कुडुमुकुडुम् वाजणारे (तळलेले वाटाणे वगैरे). २. अतिशय उष्ण, कढत(ऊन, पाणी इ.); अति प्रखर, ऐन(दुपार), भडकलेल्या (ज्वाळा) : 'कडकडित दुपारीं चेतला अग्निभारी।' - मुंव १२६. ३. ताजी; तयार; पक्की; चांगली अवगत (विद्या, ज्ञान); त्या विद्येने भूषित (माणूस). ४. भीडभाड न ठेवता केलेले; स्पष्ट;, मोकळे; खुले (भाषण, व्यवहार); अशा स्वभावाचा; स्पष्टवक्ता; तापट (मनुष्य). ५. शास्त्रोक्त आचारविचार अक्षरशः पाळणारा; फार सोवळा; अत्यंत शुद्ध; पवित्र; कट्टा (माणूस, सोवळे) : 'रामायणाचें वैशिष्ट्य स्थापन करणाऱ्या अनेक गोष्टींपैकीं

कडकडीत चातुर्वर्ण्य ही एक गोष्ट असल्यामुळें आम्ही या गोष्टीस फार महत्त्व दिलें आहें.' - मसाप २.२.११. ६. वाळलेले आणि कडकड आवाज करणारे; शुष्क (कापड). ७. नैष्ठिक; अत्यंत नियमित; न चुकता पाळलेले; अतिशय कठीण (व्रत, ब्रह्मचर्य, तपश्चर्या, वैराग्य इ.). ८. खरेखुरे; जागृत (पिशाच्च, वारे संचार). ९. खडबडीत; रखरखीत : 'तंव वल्कलें कडकडीत कठिन। नेसतां नये सीतेलागुना'- रावि १०.१४९. [सं.कड्]

**कडकडून** क्रिवि. १. जोराने आवळून; गच्च; दृढपणे (बांधणे, आवळणे, मिठी मारणे.). २. भिऊन, थोपटून. (गो.) ३. आवेशाने; जोराने; रागाने; त्वेषाने; चवताळून (अंगावर जाणे.); जोराची भूक. (वा.) ० **चावणे**- रागाने, धावून, जाऊन जोराने चावणे: 'पुच्छ रगडितां नागें धावावें कडकडोनि चावावें।' - मोकर्ण १४.३.[का.कडि = चावणे]

**कडकणा-णी-णे** पु.स्त्री.न. १. नवरात्रात (अगर इतर वेळी) देवीच्या वरील मंडपीला टांगलेले कागदाचे नक्षीदार वाटोळे तुकडे. २. वरील आकाराच्या तळलेल्या पुऱ्या; तेलच्या; फुलोरा: 'कृष्णालागीं तेलवणें। आणलीं कडकडीत कडकणें।' - एरुस्व १५.९०. [सं.कड्]

**कडकणी** स्त्री. क्षयासारखा एक रोग; झडी; हाडीज्वर. (क्रि. बसणे.)

**कडकणे** अक्रि. १. वाळणे; सुकणे; कडकडीत होणे( कापड, भाकर इ.). २. अतिशय सुकल्याने तडकणे; उलणे. ३. शुष्क होणे; आक्रसणे; करपणे (थंडीने, उष्णतेने उभे पीक इ.). ४. पक्के होणे; वाळणे; कापणीला तयार असणे (गवत, धान्य इ.). ५. अशक्त, दुबळे होणे (माणूस, जनावर). ६. कडकड वाजणे (चावताना भाकरी, कापताना गवत, जळताना काटे, वाळलेले कपडे, कागद इ.) : 'बहु वाद्यें मेळा कडकत भरें व्योम भरलें।'- दावि २२.३. ७. भडकणे; तापणे; खूप रागावून मोठ्याने भांडण करणे; ताशेरा झाडणे : 'गोदूबाई पुन्हां कडकल्या.'- हांकाध ९९. ८. गडगडाट होणे (मेघ, वारा, वीज यांचा) : 'तया तेजापेक्षां कडकत बळें वात सुटला।' - दावि २५५. ९. महाग होणे; जास्त वाढणे (बाजारभाव) : 'लाकडाचे भाव एकदम कडकले आहेत.' - गंगा १२२. [सं.कड्]

**कडकतवाला** वि. कडका गाणारा (भाट) : 'गवई, गाणारणी, कडकत-वाले भाट, धाडी, नाटकवाले व भांडांचे तमाशे वगैरे जास्त नोकरींत ठेवण्यांत आले.'-ऐरा ६९.

**कडक बिजली** १. कडकडणारी वीज. २. (ल.) चलाख; चपळ; तडफदार; तापट (घोडा, घोडी, स्त्री). ३. (ल.) त्वरेने मारा करणारी तोफ.

**कडक(का)भार, कडाकाभार** पु. कडका गाणाऱ्या भाटांचा समुदाय : 'कडकभार निघाले।'- वेसीस्व ६.५६.

**कडकरविणे** क्रि. त्रास देणे.

**कडकलक्ष्मी** स्त्री. लक्ष्मीच्या (देवीच्या) उग्र स्वरूपाचे सोंग घेऊन भिक्षा मागणारा; आसूडवाला भिक्षेकरी. (हा आसुडाने कडक असा आवाज काढतो म्हणून.)

**कडक वीज** (ल.) कडक; तापट; चपळ (मनुष्य, जनावर).

**कडक सावित्री** कडक, तापट,स्त्री; तडफदार, चलाख स्त्री.

**कडका** पु. चाहूल; सूचना : 'बहुतेक पट्टीत जाग आहे याचा त्या आकृतीला कडका मिळाला असावा.' - आआशे ३३९.

**कडका** पु. १. अतिशयपणा; तीक्ष्णपणा; भर; तीव्रता (उन्ह, थंडी इ. चा). २. एकाएकी झालेली तीव्र वेदना (अंग भाजले, प्लॅस्टर घातले असताना होते तशी.). ३. कडकडाट; गर्जना (मेघांची); दणदणाट; खडखडाट; घोष; गजर (अनेक वाद्यांचा) : 'टाळी भजनाचा करवूनि कडका।' - दावि २६८. ४. जोराचे भांडण; रागाचा आवेश : 'आला क्रोधाचा कडका।'- दावि ३१४. ५. ओरडा; रड (अतिवृष्टी, अनावृष्टी, दुष्काळ, साथ, परचक्र वगैरेबद्दल). पहा : **कडाखा व तडाखा** ६. त्रास; उपसर्ग : 'त्याचा कडका त्यांनी कुणाला लावू दिला नाही.'- आआशे १८२.

क्रिवि.१. सपाट्याने; तडाख्याने ; त्वरेने; तत्परतेने (काम, माणसाचे बोलणे किंवा क्रिया चालणे.) २. प्रलय : 'विजु गर्जे ऐसा कडका वाजिन्हला।'- श्रीकृष्ण ३१. [सं.कड्.]

वि. (ल.) आर्थिकदृष्ट्या कफल्लक.

**कडका** पु. थाट; मौज : 'आरंभला उत्छाह कडका'- दावि २४८.

**कडका** पु. ज्वारीवरचा रोग. याने पीक वाळते.(क्रि. पडणे.)

**कडका** पु. आवाज; चाहूल : 'रथांचा कडका लागतांच राजाच्या मुलाने धावत जाऊन देवाचा रथ धरला.'- मसाप १. ३. ३१. (कातकरी)

**कडका** पु. १. लढाईत वापरण्याचे एक प्रकारचे चर्मवाद्य. २.हिंदी पदाचा एक वीररसप्रधान, उत्तेजनपर प्रकार; पोवाडा; वीरश्रीचे कवन; एक छंद :'भाट बोलती कडका। धडाधडी होतसे।' - दावि ४९६. पहा : **कडक** [हिं.]

**कडकावणी** स्त्री. फटका; तडाखा.

**कडकाव(वि)णे** अक्रि. १. चापणे; हजेरी घेणे; रागावून बोलणे; खरडपट्टी काढणे (रागे भरणे, निषेध करणे, ताकीद देणे अशा वेळी). २. आवेशाने बोलणे; गर्जना करणे :'तो जेव्हां कडकावला, धनुवरी ठेला उभा भूतसा।' - आसी ३५.

उक्रि. १. (थप्पड) मारणे; (चाबूक) लगावणे; सडकून काढणे; चोपणे; फटका मारणे :'अंगावर येणाऱ्या ममाला (सिंहिणीला) ते चाबूक कडकावून जागच्या जागी थांबवतात.' - वाघसिंह ४. २. निर्भयतेने, स्पष्ट बोलणे; सांगणे; झोकून देणे; म्हणून दाखविणे (उत्तर, आधार वाक्य इ.).

**कडकावून, कडकून** क्रिवि. १. त्वरेने; लागलीच; झपाट्याने. २. धमकावून; धडकून; न भिता. पहा : **कडकडून**

**कडकांगी** वि. सडपातळ; किडकिडीत; किरकोळ.

**कडकिंद** पु. आकाराने व चवीने शिंगाड्यासारखा पांढरा कंद. याचे काप उकडून खातात; डांग.

**कडकी** स्त्री. १. अंगात भिनलेली अतिशय उष्णता (उपदंश, उग्र औषध, विष, ताप इ.ची); मुरलेला, भिनलेला ताप; हाडीज्वर. (क्रि. बसणे.) २. आग; दाह; ताप. ३. क्षयरोग. (कु.)(वा.) ० **बसणे** - त्रास होणे; अडचण होणे :'तिथे त्याला चांगली कडकी बसली असती तर...' - बाविबु २९. [सं.कड्.]

**कडकी** स्त्री. (आर्थिक) अडचण; टंचाई; बेकारी :'त्या वेळी त्याची

अवस्था इतकी कडकीची होती की ...' - अक्षर १००.

**कडकुसर** स्त्री. काटकसर; कसोशी. (व.)

**कडक्या** पु. ज्वारीवरील एक रोग. पहा : **कडक**

**कडखांब** पु. धनुष्य खाली ठेवण्याची बैठक : 'श्रीकृष्ण चक्रवर्ती धनुष्याचे कडखांब बळिभद्र देवासि दिन्हले।' - श्रीकृच ३१.

**कडगंची** वि. अस्सल : 'सायंदेवाच्या घराण्यांतील कडगंची प्रतीत जे १७५ श्लोक आढळले तेवढीच गुरुगीता प्रमाणभूत मानली.' - के १.३.३८.

**कडगुला-ले** पु. न. **१.** कडे; काकण; बांगडी. (राजा). **२.** आधेल्याच्या (सापाच्या) अंगावरील काळे वर्तुळ, रेषा.

**कडगे** न. कडे; वाकी; एक अलंकार; दागिना : 'वांकि साखळें अनंत। हस्तकडगें।' - ऋ १३८. [सं. कटक]

**कडचा** वि. **१.** कडेला असणारा; काठचा; कडेचा; बाजूचा. **२.** कडील. **३.** पक्षाचा : 'दर्याबाई आपल्याकडची फार दिवस राहील असें सांबाजीस वाटलें नाहीं.' - विवि ८.६.१११. [क. कडे]

**कडचा** पु. सराटा; कलथा; उलथणे. (व.)

**कडचा** पु. पातडे; टिपणी; दैनंदिनी : 'प्रभुची जशी दशा होत होती ती सर्व स्वरूप दामोदर आपले कडचामध्ये लिहीत असत.' - गौरांग ५५५.

**कडचा** वि. शेवटचा; काठावरचा; कडेचा.

**कडचा आदितवार, कडचा रविवार** (कधीच न येणारा); जी गोष्ट कधीच करायची नसते ती करायची असे वरवर दाखविण्यासाठी ठरविलेला दिवस.

**कडचा पोहणारा १.** नदीच्या तीराजवळच्या उथळ पाण्यात पोहणारा. २. (ल.) फाजील सावधगिरी बाळगणारा (माणूस, व्यापारी, सट्टेबाज, घोडेस्वार इ.) **३.** लांबून, दुरून मदत करणारा; प्रत्यक्ष संकटात उडी न टाकणारा.

**कडची, करछी** स्त्री. १.लहान कढई. २.पळी (आमटी वाढण्याची). (खा. व.) [गु. कडछी, हिं. करछी, सं.कडत]

**कडझील** पहा : **चिकारी**

**कडडड** उद्गा. (झाड, वीज वगैरे पडताना होणारा) धडाडाडा आवाज; व गडगडाट.

क्रिवि. धाडदिशी; धप्पकन; काडकन. [ध्व.]

**कडण** स्त्री. **१.** नदीचा किंवा पर्वताचा कडा; दरड; टोक; कड. (राजा.) २. शरीराची एक बाजू; कनवट; सैन्याची एक बगल; बरगड्यांची बाजू किंवा कडसणी या अर्थी कडणपेक्षा कडणी (अव.) असा प्रयोग राजापुराकडे आढळतो. कोकणात काही ठिकाणी हाच शब्द एकवचनीही आढळतो. **३.** नेसलेल्या वस्त्राच्या घासण्याने कुशींना होणारी खरूज.

**कडण, कढण- न** न. मूगडाळ व गूळ एकत्र शिजवून केलेली आमटी; कढण. (गो.)

**कडण-णे** स्त्री. न. चटईप्रमाणे विणलेला नारळीचा झाप; झावळी; साऊळ. (को. चि.)

**कडणी** स्त्री. **१.** ओमणाच्याखाली आधार म्हणून थरावर घालायची बांबूची काठी. (कु.) **२.** पहा : **कडण**

**कडत** स्त्री. (सोंगटी) उडतपगड्याच्या डावात एका पक्षाने दुसऱ्या पक्षाची सोंगटी प्रथम मारणे. [क.]

**कडतर** न. **१.** जुनी मोडकी टोपली, शिप्तर, चटई, चाळण इ. **२.** जुने, रद्दी, चिंध्या झालेले वस्त्र : 'जैसें जीर्ण कडतर। परी म्हणाया वैभवी थोर छत्र।' - नव १७.१३३. **३.** नारळाचा जुना झाप; खडतर. ४. पोथीचा दुंडा; फाटकी पोथी. [सं. कट + तर]

**कडतर** पहा : **खडतर**

**कडतरणे** अक्रि. **१.** अंगी भिनणे; बोचणे. पहा : **खडतरणे २.** बाजूला पडणे : 'जीव्हार भेदलें कडतरला।' - उषा १४०६. ३. भेदणे, भेदून जाणे : 'कुसी कडतरतांती भाले.' - शिव ९७०.

**कडतरी** स्त्री. शेताचा लहानसा तुकडा; लागवडीला योग्य असे लहान शेत.

**कडतरून** क्रिवि. अंतर्बाह्य; झटकन स्पर्शून.

**कडता** वि. गरम; कडकडीत तापलेले; आधण आलेले. (ना.) पहा : **कढत**

**कडता** पु. (चाळीस शेरांच्या) वजनी एक मण जिन्नस विकला असताना त्याच्यावर द्यावयाचा वर्ताळा (उदा. तूप, गूळ, तेल यांच्या दरमणामागे १॥ शेर). [क. कडत = छाट]

**कडता, कर्ता** पु. वचपा : 'जितके दिवस बायकोशी मनमोकळेपणाने गप्पाविनोद करतां आला नाहीं त्याचा कडता काढावयाचा.' - सह्या सप्टें १९३८.

**कडताकडता** क्रिवि. गरमागरम; कढतकढत; ऊनऊन.

**कडता काटा** अडत्याला अर्ध्या पल्ल्यावर किंवा एका आख्यावर जो वर्ताळा मिळतो तो. [क. कडत = छाट]

**कडती** स्त्री. धूळपाटी : 'एथौनि देवताचक्र निरोपितां पृथ्वीएसणी कडती आणि मेरूएसणी खडी न पुरे।' - लीचपू १४५.

**कडतेल** न. (नाविक) तेलात थोडीशी राळ कढवून तयार केलेले तेल. हे गलबताचा जो भाग पाण्याच्या वर असतो त्याला लावतात. (को.)

**कडथोवेकार** पु. प्रमुख नायक; पुढारी : 'ऐसीं वाद्यंत्रें लागलीं राजद्वारीं : कडथोवेकारें बरवतातिं हाटा माझारीं :' - रुस्व १३९१.

**कडद(दा)ण, कडधण-न, कडधान्य** न. द्विदल जातीय, डाळी करण्याचे धान्य. (मूग, मठ, उडीद, तूर, मसूर, हरभरा, पावटा, वाटाणा इ.) : 'दीड विद्या अडीच पांड जमिन गिलाबस (गिमवस) कडधन ...' - समोरा ४.६०. [सं. काष्ठ + धान्य]

**कडदरणे** सक्रि. रागावणे; चिडणे : 'जावई असा रागावून गेला म्हणून म्हातारी पोरावर कावली कडदरली.' - गागो १८.

**कडदंबा** पु. शस्त्र खुपसून ठेवण्याचा कमरपट्टा : 'राणाराउतांचे हात कडदंबेयावरि पडिले।' - लीचपू २१०.

**कडदोडा** पहा : **कडदोरा** : 'रामाच्या बानाचा आंकोसाला कडदोडा।' - जसा २०३.

**कडदोर** पु. वाघुर (एक प्रकारचे जाळे) वरच्या व खालच्या बाजूने ज्या दोऱ्यातून ओवून घेतलेले असते त्या दोऱ्या. कडेचे दोर; मणदोर. (जुन्नरी.)

**कडदोरा** पहा : **कटदोरा**

**कडदोरी** स्त्री. चऱ्हाटे वळण्याचा कारखाना.
**कडधान्य** न. पावटा, वाटाणा, मूग वगैरे. [सं. काष्ठधान्यम्]
**कडनड** स्त्री. अडचण; कमतरता : 'कडनडीला बाबांनो कर्ज द्या म्हटलं.' - आभाळ ९७.
**कडना** क्रि. कढणे; उकळणे. (झाडी) [सं. क्वथ्]
**कडनाळ** न. तांब्याचे भांडे. (बे.)
**कडनिकड** स्त्री. १. हल्ला; निकराचा हल्ला; कस्त : '... तशातहि शिवराव घोरपडे यांणीं तोंड लावून कडनिकडी बऱ्या केल्या.' - ऐलेसं २७८८. २. निकडीचा प्रयत्न : 'ते कड-निकड करून कच्चे चाळीस कोस भुई चालून चार घटका रात्र आहेतों लष्करापासोन दोन कोसांवर दाखल जाहले.' - भाब १३१. ३. शेवट; तड : 'कडनिकडीला निर्वाणीला।' - संग्राम ८८.
**कडप** न. १. हरभऱ्याची, तुरीची वगैरे झाडे काढल्यानंतर ती वाळण्यासाठी त्यांची घातलेली लहान रास (पेंढ्या बांधण्यापूर्वी); शेत कापतेवेळी शेतातच बांधल्यावाचून जे कवळे ठेवीत जातात ते : 'जलदी करून त्यांनी कापलेल्या भाताची कडपे गोळा केली.' - आआशे २३५. (प्र. कडपी - कडपे). २. (काही ठिकाणी) धान्याची कापणी. [सं. कडम्ब.(?)] ० **वळणे, बसणे, होणे** - अशक्त होणे; रोड होणे; वाळणे.
**कडप** स्त्री. गुळाने भरलेली काहील. (गो.)
**कडप** न. छावणी : 'पायदळाने, अश्वदळाने, आपली कडपे स्वच्छ केली होती.' - श्रीयो २.१७०.
**कडप** न. हिणकस सोने; तांबेमिश्रित सोने.
**कडपल** द्विदल जातीचे, डाळी करण्याचे धान्य. (बे.) पहा : **कडदण**
**कडपा** पु. कापलेल्या लाकडाचा निरुपयोगी भाग. (झाडी) [सं. कदम्ब]
**कडपा, कडपा पाग** एक प्रकारचे जाळे. (को.)
**कडपाळे** न. लगाम : 'अंकुश कडपाळें लेखणी। इतुके वोपी माझ्या पाणीं ॥' - मुक्ते नव ८९.
**कडपी-पे** स्त्री. न. पीक कापून जमिनीवर टाकलेल्या जुड्या. पहा : **कडप**
**कडप्या** स्त्री. अव. सूर्य चित्रा नक्षत्राजवळ असताना पडणारा पाऊस (हा पाऊस पडतो तेव्हा शेतामध्ये बाजरीच्या कडप्या वाळत टाकलेल्या असतात).
**कडबड** स्त्री. गुराने काही खाऊन व तुडवून टाकलेला कडबा.
**कडबडीत** वि. कडकड, सळसळ असा वाळलेल्या पदार्थासारखा आवाज करणारा. पहा : **कडकडीत ६** [ध्व.]
**कडबंची** पहा : **कडवंची**
**कडबा** पु. १. कणसे कापून घेऊन उरलेली जोंधळ्याची वाळलेली ताटे (गुरांना खाण्यासाठी); वैरण; कडबाड; कडबी. २. (ल.) निरुपयोगी पदार्थ; गाळ; गदळ. [का. कडगर, त. करूवै ] [सं. काष्ठ+वृध्]
**कडबाड** न. १. धान्याचे ताट; कडबा : 'हिरवीं कडबाडें। तेंचि तोडीतु आळें चहूंकडे।' - शिव ९६५. २. (ल.) देह; शरीर : 'देशाचा शेवटी कडबाड पाडावे.' - प्रमेय.
**कडबानायकीण** स्त्री. (कडब्याप्रमाणे क्षुद्र किंवा कडबा वाहणारी) स्वस्त रांडरू; म्हातारी - जख्खड कुंटीण.
**कडबी** स्त्री. जोंधळा कापल्यानंतर त्याच्या ताटाला पुन्हा येणारी फूट (ही उन्हाळ्यात गुरांना खायला घालतात). २. (चुकीने) कडबा.
**कडबू** पु. १. कणकीच्या आवरणात पुरण घालून केलेली करंजी २. (ल.) यःकश्चित माणूस; फालतू मनुष्य. [क. कडबु, कडुबु]
**कडबोळे, कोडबु(बो)ळे** न. १. भाजणीच्या पिठाचा तेलात तळून केलेला एक पदार्थ, हा वाटोळा, अर्धवाटोळा असतो. २. कडबोळ्याच्या आकाराचा पदार्थ. ३. शोभेच्या दारूचा केलेला कडबोळ्याच्या आकृतीचा एक प्रकार. (वा.) **अठरा धान्याचे कडबोळे** - पहा : **अठरा** [सं. कट + वलय]
**कडभोग** पु. प्रसाद.
**कडमड-डी, कडमोड-डा** स्त्री. पु. १. तापापूर्वी किंवा त्यानंतर येणारी कणकण (क्रि. येणे, भरणे). पहा : **कडंगी, कडांगी** : 'आंगास तीच्या कडमोड आला।' - सारुह २.६९.२. दुखणे गेल्यानंतर वाटणारा हल्लकपणा; रोगाच्या झटक्यानंतर येणारी ग्लानी. (क्रि. राहणे, येणे, होणे.) ३. गळू पाय, डोळे, दात यांची होणारी आग; ठसठस; अतिशय परिश्रम केल्यानंतर अस्वस्थता वाटणे इ.
**कडमडणे** अक्रि. १. ताप येण्याची पूर्वचिन्हे होणे; अंग रसरसणे; शिरशिरी येणे; अंग कुसमुसणे. (वा.) **कडमडत निजणे, पडणे, कडमडून येणे** - १. अंग मोडून येणे. २. आग होणे; दुखणे; ठसठसणे (गळू, पाय, दात इ.) पहा : **कडमड ३**
**कडमडणे** अक्रि. कोसळणे; मोडून पडणे : 'शुक्ल आतून पार कडमडले.' - अजून १६.
**कडमडणे** अक्रि. नको तेथे धडपडणे; उंडारणे; भटकणे : 'उन्हाचा रे कुठे गेला होतास कडमडायला?' - व्यव १६.
**कडमणी** पु. (सोनारी) जाळीच्या मण्यांशेजारी (दोन्ही बाजूंना) असणारा सोन्याचा अष्टपैलू मणी; करमरा मणी.
**कडय** न. हातातील कडे; वलय. (तंजा.) पहा : **कडे १**
**कडलग-गी** न. कडे. लोखंडाचे वळे : 'कंठीं कडलग सोनसळें।' - मुसभा १५.२१३. [सं. कटक]
पु. सोपान; शिडी : 'प्रेमाचा कडलग। टाको कैवल्यदुर्ग।' - उगी १९.१६५. (वा.) **कडलगपण होणे**- दरवाजावर असणाऱ्या कड्यालग्यावर चढून जाणे : 'बाकी दहापांच माणूस दरवाजियास जाऊन कडलगपण होऊन आत उड्या टाकाव्या' - पेद. [सं. कटि + लग]
**कडला** पु. मोठे कुटुंब; गोतावळा; समुदाय : 'हरणी गेली कडल्यांतून। ज्याची होती त्यानं नेली।' - लोसा शब्द ४६. (ना.)
**कडलेख** वि. शिल्लक असलेले.
**कडलेखा** पु. आजूबाजूचा प्रदेश : 'तऱ्हीं अवस्थेचेनि कडलेखें। वरील दी लोटावे।' - उगी २०.१७२.
**कडव** पु. दारावरची देवडी : 'मेळविले थोबे - कारीं। कडवांपाशीं ॥' - शिव ५०२.

**कडव** वि. कडू :'पोत मनोहर वृंदावन। वरी चांगलें आंत कडव पूर्ण।' - जै ५३.११६. [सं. कटु]

**कडवई, कडवी** स्त्री. १. उडदाचा डहाळा; कडव्या वालाचा वेल. २. कडूपणाची अवस्था; कडवटपणा. ३. एक वनस्पती :'कडवईची पानें म्हणजे गुरूं अगर कोणी खातें तर तत्काल मृत्यू प्राप्त होतो.' - ब्रच २५९. [सं. कटु]

**कडवके** न. कडकपणा.

**कडवट** वि. १. कडसर; किंचित् कडू. २. (ल.) नाखुषी दाखवणारा; अप्रिय. जसे. :- कडवट चेहरा, कडवट स्मृती इ. [सं. कटुवत्]

**कडवणी** स्त्री. कडू पाणी.

**कडवर** क्रिवि. कडेपर्यंत; शेवटपर्यंत; समाप्तीपर्यंत.

**कडवल** गवताची झोपडी :'ते (दुहुवा) वाडीचां वाडी कडवली असे।' - लीचउ ६५.५९९.

**कडवली** स्त्री. एक प्रकारचे मातीचे भांडे. (कु.)

**कडवस** पु. कोपरा :'सीक्षाचेया ठाया जाति। कडवसां राहाति।' - लीच १.३४.
क्रिवि. कडेला लागून; आधाराने असणारे : 'कडवसां राहिले ॥' - ज्ञा ११.३६४.

**कडवसा** पु. न. अंधार; आडबाजू; थोडासा उजेड; अंधुक प्रकाश :'आणि ललाटपटाचिये खोळे। कैसें भयातें भेडविताती डोळे। हो कां जे महामृत्यूचे उमाळे। कडवसां राहिले ॥' - ज्ञा ११.३६४.[सं. कुदिवस]

**कडवसा** पु. प्रतिबिंब. पहा : **कवडसा** :'जो अमूर्ताचा कडवसा।' - ज्ञा. ४.१७३.

**कडवसी** स्त्री. १. कडोसरी :'देशोदेशींची पाटौळी भरिया फोडलिया कडवसी।' - धवळे ४०. २. कपड्यांची पेटी :'फोडीली कडवसी काढीलीया घडीया।' - धवळे ३.४१.

**कडवळ** न. १. उन्हाळ्यात पाणथळ जमिनीत गुरांना घालण्यासाठी केलेला ओला चारा (बाजरी, ज्वारी, मका यांचा); चाऱ्यासाठी पेरलेले शेत:'तैसें कडवळ फोकिलें नोव्हे। सोंपटचि राहे वाढोनियां ॥' - निगा १९७. २. मक्याची ताटे. [सं. कष्ठ + वलय]

**कडवळ** न. १. कोठा व आतडे यांचा अंतर्भाग. २. कंबर; कूस (शरीराची) :'तुझेया कडवळाची संधी। जी अमृताची निधी। ती सबळ करें अगाधें। दुखंडी केली ॥' - ख्रिपु २.५४.१९.(गो.) [सं. कटि+वलय]

**कडवळिया** पु.१.कैवारी.२. (कडेवर बसणारा) मुलगा, पुत्र :'ना तो श्रृंगाराचा कडवळिया, कीं मदनाचा जावळिया।' - शिव २६४.

**कडवंची** स्त्री. जोधळ्यांच्या शेतात उगवणारा एक वेल. याच्या मुळाशी कांदा असतो. याची फळे सुकलेल्या मनुकासारखी बारीक व हिरव्या रंगाची असतात. त्यांना कडवंच्या म्हणतात. त्याची भाजी करतात : 'शेंदण्या कडू इंद्रावणे, कडवंची यांचे वेल फुटू लागत.' - व्यंमाक १३८.

**कडवा** वि. १. कडू. भाजीपाला वगैरे शब्दास लावतात. २. कट्टर; जहाल; रागीट; तापट. ३. ज्याच्या अंगी भांग, अफू इ. कैफ जिरून गेले आहेत असा; दुखणे, रोग इ. ज्याच्या सरावाचे झाले आहेत असा; नाजूक, कोमल राहिला नाही असा. ४. उपदंशादी विकार न बाधणारे ज्याचे शरीर आहे असा. ५. शूर; निर्भय; धाडसी (खून, मारामारी, लढाई इ. मध्ये); घनचक्कर; घोर (लढाई, तंटा). ६. रानटी; आडमुठा; व्यवहार करण्यास कठीण. ७. क्रूर; निर्दय; पाषाणहृदयी; कठोर. ८. खणखणीत, तीव्र, जोराचा (प्रतिकार). [सं. कटुक]

**कडवा** पु. १. वालाची एक जात. २. बदामातील कडू जात. ३. खाजरा सुरण. ४. अनौरस, विवाहबाह्य संतती; कडू जात. [सं. कटु]

**कडवा** पु. कडदोरा.

**कडवा** क्रिवि. कडेवर :'ऐसें म्हणुनि दासिचिया कडवा। पुत्र बैसविला बरवा।' - कथा १.१०.१४७. [सं. कटि]

**कडवा** प्र. कळकांचा केलेला कूड.

**कडवाडी** स्त्री. एक पांढरी मासोळी. (झाडी)

**कडवाय** वि. कडवट. (गो.)

**कडविखा** स्त्री. कडवटपणा.

**कडविड** स्त्री. किडुकमिडुक; (सोन्याचा) चाराचुरा :'करूनि कडविड जमा। घडली लगड।' - तुगा ३४८४. [सं. कृत्]

**कडवी** स्त्री. १. कडव्या वालाची वेल; कडवा. २. (ल.) अफू; अफीण.

**कडवी जात** १. कडू जात; जारज वंश. २. क्रूर, रांगडी, अडाणी जात.

**कडवे** न. आंकण कडव्याने किंवा पालुपदाने जेथे गाण्याचा एक भाग संपतो तो भाग; पद्याचा किंवा कवितेचा एक भाग. [सं. कट]

**कडवे** न. १. पात, पान. २. टोक. ३. फाळ.

**कडवेडा** पु. ह्या कडेपासून त्या कडेपर्यंत वेढा पडेल एवढी लांबी :'सगळ्या शिवाराचा त्याला कडवेडा आणायचा होता.' - गागो ७८.

**कडवॉ-वो** पु. कांबीची वई; कूड; बांबू, कांबी इ.चा पडदा.(गो.)

**कडस** क्रिवि. जोराने; गच्च; खेचून. (क्रि. बांधणे.)

**कड(डू)स** न. पाडस; लहान गुरूं :'वेउलीं त्रशिर्ले वच्छ। कीं पाशमुक्त कडस।' - ऋ ६१. [क. कडसु = लहान गाय]

**कडसणी-नी** स्त्री. १. चौकशी; विचार; वाटाघाट; परीक्षा; शोध; निवड :'ये युक्तीची कडसणी। नाहीं जयाच्या अंत:करणीं।' - ज्ञा २.३४२. २. मंथन; घुसळणे :'करितां दधिकडसणी। मग नवनीत निर्वाणीं। दिसे जैसें ॥' - ज्ञा २.१२९. ३. (ल.) विचार; भेद; भेदभाव:'देव भक्त हे कडसणी। विसरोनि गेली ॥' - दास ८.८.१८. [सं. कर्षणी] (वा.) ० **घालणे, कडसाणीत धरणे** - अडचणीत घालणे; पेचात आणणे; घोटाळ्यात पाडणे. ० **लागणे** - उतरती कळा लागणे.

**कडसणी-नी** स्त्री. नाडा; दोरी (बटव्याची, गाडीवरील बोजा आवळण्याची पडद्याची, तंबूच्या कनातीच्या वरच्या भागाची इ.) :'ऐसा सद्गुरू पूर्णपणी। तुटे भेदाची कडसणी ॥' - दास ७.१.१८. [सं. कृष्] ० **देणे**- पखवाज किंवा तबला आवळून बांधणे. (व.)

**कडसणी-नी** स्त्री. धाकदपटशा; तंबी; दटावणी; काच :'तेथें द्वैतबुद्धीची कडसणी।' - परमा २.१९. (ना.) [सं. कृष्]

**कडसणी-नी** स्त्री. चातुर्याची रचना (बोलण्या, लिहिण्याची).[सं. कृष्]
**कडसणी** स्त्री. १. बाजू; बरगड्या; कूस. (को.) २. कनवट; कडोसरी; कमरेजवळचा नेसलेल्या वस्त्राचा भाग (हिच्यात लहानशी वस्तू खोचून ठेवतात). (क्रि. खोचणे, खुपसणे.) [सं. कटि]
**कडसणी** स्त्री. पेचपाच; कवाईत :'उभयेता सरदाराच्या कामकाजाच्या व बोलण्याचालण्याच्या कडसण्या सर्व श्रीमंतांच्या ध्यानांत आहेत.' - पेदभा २९.१८६.
**कडसणी** १. भेद. २. विचार; परीक्षा; छाननी :'शास्त्रेचि जाली ज्ञानी। अंगा लागता कडसणी।' - ज्ञागा ४४२. [सं. कर्षणी]
**कडसणे** उक्रि. १. जोराने बांधणे, आवळणे (गाठोडे, पखवाज, तबला इ.). २. घट्ट बांधणे; मारणे; चोप देणे. (ना.)
अक्रि. क्षीण, अशक्त होणे. [सं. कृष्]
**कडसणे** उक्रि. १. कस लावणे; तावून सुलाखून घेणे. निक्षून करणे :'श्रीगुरू कडसूनि गोष्टी पुसतां ऐसी। शिष्य अंतरीं चमकलां ॥' - स्वानु ११.३.२६. २. घुसळणे.
**कडसणे** उक्रि. १. विचार करणे; कसाला लावणे; परीक्षा घेणे :'आतां दया ते ऐसी। पूर्ण चंद्रिका जैसी। निववितां न कडसी। सानें थोर ॥' - ज्ञा १६.१५४.२. (ल.) भेद करणे; वेगळे करणे; निवड करणे :'परि तें असो आतां आघवें। नलगे श्रोतयातें कडसावें।' - ज्ञा ६.२७.
**कडसणे** उक्रि. १. कढविणे; अग्निशोधन करणे :'मग ज्ञानाग्निसंपर्कें। कडसिलेंनि विवेकें।' - ज्ञा १.५२. २. (ल.) निवडणे; शुद्ध करणे : 'ज्ञानाग्निहुताशीं कडशिलें वोजा। आतमसिद्धी काजा लागुनियां।' - तुगा ३९५८. [सं. क्वथ्]
**कडसणे** क्रि. चटक लागणे. (झाडी) [सं.]
**कडसर** वि. कडवट; किंचित कडू. [सं. कटु + सदृश]
**कडसर** स्त्री. टेकडीची उतरती बाजू; उतार.
**कडसर** पु. एक प्रकारचे झाड. घोड्यास होणाऱ्या कृमिरोगावर याच्या बियांचे चूर्ण दुसऱ्या काही औषधांच्या चूर्णाबरोबर देतात. - अश्वप २.४६.
**कडसरणे** अक्रि. १. एका बाजूला जाणे; एकीकडे होणे. २. (ल.) अंग काढून घेणे; मागे हटणे.
**कडसरा** पु. (धान्याच्या) मुढ्याभोवती बांधायचा दुहेरी दोर.
**कडसरी** स्त्री. १. पाटीच्या, दुरडीच्या काठाचा वरचा घट्ट विणलेला भाग; कड; काठ. २. पाटीच्या मध्ये मजबुतीसाठी अधिक सरी घालून घट्ट करतात ती वीण. ३. पर्वताच्या कड्यांचा प्रदेश. ४. घराच्या ओट्यावरचे (काठाचे) आडवे लाकूड. (हेट.) (वा.) **कडसरीस येणे** - अवघड कार्ये करीत असताना मेटाकुटीला येणे. [सं. कृष्]
**कडसरी** स्त्री. बांबूच्या बारीक काठ्या व दोरा यांनी विणून केलेले जाळे. (गो.)
**कडसरी** पहा : **कडोसरी**
**कडसवना** स्त्री. चटक किंवा सवय लावणे. (झाडी.)
**कडसाण-र** वि. कडवट. (गो.) पहा : **कडसर**
**कडसी** स्त्री. पकड. (झाडी)
**कडसुता** स्त्री. मेखला; कंबरपट्टा :'अंचलु गाढिला कडसुता:' - उह ४१०.
**कडसूत** न. करगोटा :'म्हणून पुच्छ वज्राचे केलें कडसूत रामदासा।' - पला ३८.
**कडसूर** न. भात कापल्यावर त्याचे जमिनीत राहिलेले खुंट.
**कडसोरी** पहा : **कडोसरी** :'मग मला ते खाली उतरीत आणि उगीचच कडसोरी धुंडाळीत.' - व्यंमाक १५०.
**कडस्थान** न.खोगीर :'येडं कडस्थान अन् पक्कं देवस्थान.'-एहोरा ६.१०.
**कडळ** पहा : **कडवळ**
**कडळ** एकदाच भरडून काढलेले किंवा एकदाच घाव घातलेले भात; भरड, असडी तांदूळ.(वा.) ० **काढणे** - हळूहळू पद्धतशीर रीतीने न करता कसेतरी काम उरकून टाकणे. पहा : **करड**
**कडंग** वि. १. वाळलेले; कडकडीत (अनावृष्टीमुळे अगर अतिपक्वतेमुळे बनलेला तांदूळ इ.) :'ऊस चांगला कडंग झाला होता.' - भुज ६५. २. फार भाजल्यामुळे, चावताना किंवा दळताना कडकड वाजणारे; कठीण; खट्टर (धान्य, भाकरी). ३. खरपूस; पक्के.
पु. धान्यातील टणक दाणा; गणंग. [ध्व.]
**कडं(डां)ग-गी** स्त्री. थोडासा ताप; अंग कोंबट होणे; कणकण.
**कडंगणे** अक्रि. १. वाळून कडकडीत, वाकडातिकडा होणे; कडंग होणे (भात, पोळ्या वगैरे) :'आणि उन्हाने कडंगलेली भाकरी तिच्याबरोबर खातो.' - व्यंमाक २८. २. अतिशय तापल्यामुळे किंवा कांडण्यामुळे कणी होणे, चुरा होणे.
**कडा** पु. डोंगराचा सुळका; खडपा; डोंगराची तुटलेली बाजू; कड; पर्वताच्या धारेखालचा नीट उभा प्रदेश. (क्रि. तुटणे) :'आणि शोकाचा कडा उपडता।' - ज्ञा ७.८७.[का.कडदु=तुटलेला भाग] [सं. कट = आवरणे] ० **उडणे** - कड्यावरून उडी मारणे; कडा उतरून जाणे :'कांहीं कडा उडाले त्याचा शोध केला नाहीं.' - पेदभा १७.९५.
**कडा** स्त्री. १. काठ; कड; किनारा. २. शेवट; अखेर; तीर. ३. पदर. (वा.) **कडे वेंघविणे** - कमर ढिली करणे; कमरेचा काटा मोडणे : 'राऊत आणिले होते ते दोन तीन मजलीवर आले आहेत. मारून कडे वेंघवितो' - पेद ६.८५. ४. सीमा; क्षितिज. ५. पक्ष; बाजू.
**कडा** पु. तुराट्यांचा किंवा वेळूचा तट्ट्या - नाटी, कूड. (व.)[सं. कट]
**कडा** पु.हातातील दागिना. [सं. कटक]
**कडाई** वि. कडक; बारीक :'राजांच्याकडे जाणाऱ्यांवर कडाई नजर ठेवली जात होती.' - श्रीयो १.४८३.
**कडाऊ** वि. विटेचा एक प्रकार.
**कडाकड-डा** क्रिवि. (फोडण्याचा, मोडण्याचा, मारण्याचा) आवाज करून, होऊन. पहा : **कडकड** (वा.) ० **करणे** - कडमडणे; धडपडणे. (कर.) [ध्व.]
**कडाकडी** स्त्री. १. जोराचा वाद; भांडण :'ह्या त्याच्या प्रश्नाने ... चांगलीच कडाकडी सुरू झाली.' - पलको ४१७. २. मोडण्याचा, तोडण्याचा, फुटण्याचा इ. मोठा आवाज. ३. भांडण, लढाई यांतील गर्जना. पहा : **कडकड** : 'भाऊ नानाचं दु:ख ऐकतां हृदय फुटलं

कडाकडी।' - ऐपो १३२.

**कडाकडीचा** वि. जोराचा; मोठा :'आणखी एखादे वेळ कडाकडीचे भांडणहि पहायला सापडे.' - पलको ४५५.

**कडाकणी** पहा : **कडकणा, कडेकणी, कडकणे** :'गुदस्ता दसऱ्याला किती एक अडिशेराची कडाकणी केली होती काय?' - ऊन १५४.

**कडाकणे** अक्रि. कड्कन आवाज होणे :'तिच्यात नांगूर अडकून कडाकल्यावर सित्याच्या डोसक्यात उजेड पडला.' - गोता १०.

**कडाका** पु. १. मोठा आवाज, कडकडाट. पहा : **कडाखा**:'सुटती तोफा एक कडाका गणति नाहीं वाद्याला।' - ऐपो १७७. २. आरडाओरडा; मोठ्याने कडक बोलणे :'डॉक्टर साहेबांचा हा कडाका ऐकून ....' - व्यक्तिरे ३०२. ३. आसुडाचा फटका; जोर; पराक्रम, जरब, धास्ती. (ना.) : 'भवानी तुझे सांगताती कडाके। महा चंडमुंडा दिले त्वा धडाके।' - लोका शब्द ४६.

**कडाका** पु. एक छंद. पहा : **कडक, कडका**

**कडाकातन दाबयंत्र** (यंत्र.) एखादी वस्तू तयार करताना आलेल्या कडा काढण्याचे दाबयंत्र.

**कडाकूट** पु. स्त्री. १. एखादी गोष्ट सिद्ध करण्याविषयी करायचा जोराचा प्रयत्न, मेहनत, दगदग. २. बारीक शोध; काथ्याकूट. ३. अतिशयपणा; रेलचेल; चंगळ; लयलूट; समृद्धी; कडेलोट. ४. मनस्वी आवेश; जोर. क्रिवि. अतिशय; फार; गडद; धो धो; जोराने; तडाख्याने (पडणारा पाऊस, जमणारे ढग, वाहणारा वारा, वादळ, अंधार इ.) झाडून सर्व जोर, पूर्णत्व इ. दाखविण्याकरिता हा शब्द योजतात.

**कडाकेदार** वि. कठीण.

**कडा(डे)कोट** पु. १. कडे तुटलेली अथवा तट घातलेली अशी कोंडून ठेवण्याची जागा. २. कड्या-कुलुपे लावून उत्तम बंदोबस्त करणे. ३. एखादी जागा बंदोबस्ताच्या साधनांनी सुरक्षित करणे; नाकेबंदी करणे; कडेकोट बंदोबस्त जसे :- फौजेचा कडाकोट, निवडुंगाचा - शेराचा कडाकोट :'तो कडाकोट जमून गोलच्या गोल उभा राहिला.' - ऐलेसं १५५८. ४. व्यापणे; झाकणे; आच्छादन; आवरण. जसे :- मेघाचा, पावसाचा,आभाळाचा कडाकोट. यावरून सर्वत्र पसरण्याची क्रिया; अतिशयपणा; धुमाकूळ (जुलमांचा, कृत्यांचा, उत्पादनांचा, जिन्नसांचा.) उदा. लढाईचा, मारामारीचा, तोफांचा, वाद्यांचा, अध्ययनाचा, गाण्याचा, बोलण्याचा, मंडळींचा, समारंभाचा, धान्याचा, पिकाचा, पैक्याचा कडेकोट. केव्हा केव्हा कडाकूट या अर्थीही चुकीने उपयोग करतात.

वि. (समासात) भक्कम; भारी; मोठा. [सं. कड् = रक्षण करणे]

**कडाखा** पु. १. (ध्वनी) मारण्याचा, मोडण्याचा मोठा आवाज; कडकडाट. २. तडाखा (ठोसा, बुक्का, गुद्दा, इ.चा); फटका; फटकारा. इतर अर्थी पहा : **तडाखा** :'मोठा कडाखा जाला, धुराची व धुळीची धुंदी जाली.' - भाव १२. ३. (ल.) तीक्ष्णता; जोर; आधिक्य; तीव्रता; भर; झपाटा (गुणांचा, कृत्यांचा वाचक). जसे :- थंडीचा, उन्हाचा, रागाचा कडाखा. ४. उणीव; दुर्मिळता; महर्गता. ५. (ल.) डौल; थाट. पहा : **धडाका.** ६. वेग; आवेश; पराक्रम (पेंढारी, परचक्र, सेनापती इ.) :'विजयाधिक भीष्माचा परिहरतां सायकां कडाखा तो।' - मोभीष्म ५.६. ७. भयंकर हल्ला; उपद्रव; नासधूस. [ध्व.]

**कडाखा** पु. उसावरचा एक रोग.

**कडागी** स्त्री. कणकण; कसर; बारीक ताप :'मुनसीजीस बोलिले जे माझ्या अंगांत कडागी आली.' - नाग २.१४८.

**कडाचूर** पु. १. चक्काचूर; तुकडे तुकडे; मोडतोड; फोडमोड. २. (ल.) खाऊन फस्त करणे; ताट धुऊन ठेवणे; फन्ना. [ध्व.]

**कडाड** पु. दुष्काळ; महागाई :'तांदूळ अधोलीप्रमाणे परंतु तेही मिळत नाहीत. मोठा कडाड आहे.' - ऐलेसं ११७४.

**कडाड** पु. १. कडड. पहा : **कडकड.** २. धक्का; तडाखा. ३. (ल.) कठीण प्रसंग; दुष्काळ. ४. जोर :'मन निजकल्पना कडाडी। नाचवी धांदडी त्रैलोक्या।' - एभा २३.६७८.

क्रिवि. कडकड आवाज करून :'उलथला वृक्ष तुटोनी कडाड.' - दावि २१८. [ध्व.]

**कडाड** वि. (ल.) जाणता; ज्ञानी; पढिक :'म्हणोनि विश्वरूप तूं सहसा। दाविसी हा कीर भरंवसा। कां जे कडाडा आणि गहिंसा । माजीं नित्य नवा तूं कीं ॥' - ज्ञा ११.९७. [क.कडे=मंथन विवेचन]

**कडाड** पु. पर्वताचा कडा; कडाडी :'तरीं कडाडीं लोटला गाडा। तो आपणपें न मनीं अवघडा।' - ज्ञा १८.६४६.

**कडाडगहीस** वि. पढतमूर्ख; अविचारी.

**कडाडणे** अक्रि. १. कडकड असा मोठा आवाज होणे (मारण्याचा, मोडण्याचा इ.); कडकणे :'शशीसूर्य नक्षत्र माळा कडाडी।' - राक ८८. २. काडकन मोडणे, कोसळणे :'कडाडतां चाप भयानका ही। करीं असा उग्र जनास कांहीं ॥' - वामन सीतास्वयंवर ४९. ३. गर्जना करणे; ओरडणे :'कपी वीर तो थोर कोपें कडाडी.' - राक ७२. ४. (ल.) खडसावून बोलणे (रागाने); अविचाराने बोलणे; ओरडणे:'ती कडाडली - माझ्या प्रियकराच्या नालस्त्या करितोस... चल नीघ मेल्या!' - दरोडेखोर (तीन आणे माला). [सं. कटकटा][ध्व.]

**कडाडा-डी, कडाडून** क्रि. कडाकडा; काडदिशी; झपाट्याने; जोराने:'अभ्यासाच्या गडाडीं। प्राण खवळल्या कडाडी।' - एभा १४.४३०.

वि. कडकडून :' भेटाया कडाडी उभा असे।' - नाम ३६३. [ध्व.]

**कडाडी** स्त्री. १. तीव्रता; झपाटा :मज नाहीं वैराग्य कडाडी।' - एरुस्व ५.५२. २. आघात; टोला.

वि. कडक; कडकडीतपणाचे.

**कडाडी** स्त्री. (ल.) धार; प्रवाह; जोर; कडाड :'मोह नदीची कडाडी। माजीं समळ जळ प्रबळ वोढी।' - एभा १२.५७७.

**कडाडोंगर** पु. १. कडपा; सुळका; डोंगराची चढण. २. चढणीचे श्रम.

**कडाण** न. १. चटईप्रमाणे वळलेला नारळाचा झाप; वळलेले चुडत.(कु.) २. पहा : **कडधान्य** (गो.)

**कडाणी** स्त्री. १. छिनीचा एक प्रकार. (बे.) २.(चाक कण्यातून निसटू नये म्हणून त्याला घालतात ती) चाकाची कुणी. :'कुणाची तरी बैलगाडी कडाण्यांचा आवाज करीत...' - रैत २२. (कर.)

**कडाणी** स्त्री. पहा : **कडण.** दरड; कडा; कपारी; घळ : 'गायकवाडांचे बुणगे गडाच्या कडाणीस गेले.' - मइसा ६.६४.

**कडाफोड-डी** स्त्री. आदळआपट : 'कडाफोडि होतांच येतांचि झोडी.' - राक ३०.

**कडाबी(मी)न** स्त्री. रुंद तोंडाची आखूड बंदूक; दामा : 'त्यांना पुण्यास कडाबिनीचे पहाऱ्यांत ठेविलें.' - विक्षिप्त ३.१७७. : 'विलायतेहून उत्तम कडामीनीच्या बंदुका आणविल्या.' - माप्र. ५५. [तु. कराबीन]

**कडा मजगी** (कृषि.) डोंगराळ जमिनीची धूप न होण्यासाठी केलेले बांध.

**कडामोड** स्त्री. (ताप येण्यापूर्वीचे) आळेपिळे; शिरशिरी. त्यापूर्वी वा नंतर येणारी कणकण. पहा : **कडमड** (गो.)

**कडालिंगी** पु. भटक्या हिंदू बैराग्यांचा एक पंथ; सेवर (शबर) पंथ. (हे लोक स्वतःचे जननेंद्रिय कडीत अडकवून ठेवतात). [सं. कटक = कडे]

**कडालोट -टी** पहा : **कडेलोट** : 'कडालोट करिता सिंधूंत बुडवितां।' - दावि २७७.

**कडावळ** स्त्री. चांदी कडीरूपात. (इंदुरी) पहा : **कडीवळ**

**कडाश(स)न** चर्म; चर्मासन.

**कडाशी-स** स्त्री. भिंतीवरील छपराच्या खालचा पोकळ भाग; पागोळी; सरीवरील छपराचा भाग; छपराखालचे अखेरचे बहाल. (कु. गो.)

**कडासणी-नी** पहा : **कडसणी**

**कडासणे** उक्रि. कडासून बांधणे; आवळणे. पहा : **कडसणे**

**कडासन** न. गवताचे अगर जनावराच्या कातडयाचे बसायचे आसन : 'कडासन मृगासन तृणमयी शेजा।' - वसा ५[सं. कट = गवत]

**कडाळ (स)णे** सक्रि. दूर करणे, सारणे. (गो.)

**कडाळी** पु. इमारती लाकडाचे झाड; तमन कडाळी.

**कडाळू** पु. ज्वारी बाजरीचा चारा. (व.) पहा : **कडवळ**

**कडांगी** स्त्री. पहा : **कडंगी**

**कडितरणे** क्रि. भेदणे, भेदून जाणे : 'तयातें पाहतां नयेणी। देह कडतरलें मदनबाणीं।' - उह ३५६.

**कडिदोरा** पु. करगोटा. : 'एकु कौपीनुः एक कडिदोरा :' - लीचपू ७८.

**कडिबंद** पहा : **कटिबंध**

**कडिया** वि. कडवा; शूर; काटक : 'पठाण कडियें फौजेमधी नित्य झडती.' -ऐपो ३५८.

**कडिया** पु. गवंडी : 'खानगींतील कडिये नसल्यास ....' - स्वारीनियम (बडोदे) ७४. [गु.]

**कडियाल-ळ-ळी-ळे** न. स्त्री. १. साखळी; गोल कडे; कडी : 'जैसे लोहाचें कडियाळें।' - हरि १७.१८४. २. कटिलगाम (घोड्याचा) : 'तुझे तोंडी मी कडियाळें घालुनि।' - पंच ४.६. ३. (ल.) वेढा; वेष्टण : 'जाहली चवदाही भुवनासि कडियाळीं।' - ज्ञा ११.३१७. ४. माळ; हार; जाळी; जाळीचा अंगरखा : 'लेइली मोतियांचीं कडियाळीं।' - ज्ञा ९.५२९. [सं. कटक+वलयम्]

**कडिलग** पु. लोखंडी दोर : 'प्रेमाचा कडिलगीं : टाकुनि कैवल्यदुर्गं :' - उगी १६५.

**कडिलु** क्रिवि. कडेला; बाजूला : 'ऐलिची कडिलु' - मुरा ६१.७९.

**कडिलेख** आयुष्यातील उर्वरित भाग : 'आयुष्याचे कडिलेख उरलेः तें तन्ही इश्वरा देओ।' - उगी ४०७.

**कडिवळ** पु. सेवक : 'जयाचा कडिवळु मदनदेवो।' - रुस्व २९७.

**कडिवळ** वि. हिणकस. 'कीं साडे पन्हरे जालें कडिवळें।' - ऋव ५८६.

**कडिवळपण** न. सेवा; दास्य.

**कडिवळपण** न. आंबट, कडू तोंड : 'जेयाचें देखौनि बरवेपण। उच्चैश्रवा करी कडिवळपण।' - शिव ५०६. [सं. कटु]

**कडिवळिया** पु. मुलगा, बालक : 'कीं तो अनंगार कडिवळिया निगाला।' - रुस्व १३८६.

**कडिवळे** न. हातातली कडे : 'सोने परिणामलें सांखळें। कीं साडेपन्हरें जालें कडिवळें.' - ऋ ९३.

**कडिवाळा** पु. मोलकरी : 'कडिवाळा तो पुढां गेला असे :'- लीचपू ४३६.

**कडिवे** न. पदाचा एक भाग; कडवे : 'नीरूता लागला जीवीं - हे कडिवें गाइले।' - गोप्र २२४.

**कडिसरा, कडिसा** पु. (गावाचा) शेवटचा भाग : 'दीमीळणी गांवाचां कडिसां टेकावे।' - लीचउ ५४.

**कडी** स्त्री **१.** धातूची लंबवर्तुळाकृती साखळी (दाराला लावायची); कडीचा दुवा; हंड्या वगैरेची हूक ज्यांत अडकवतात ते वेढे. [सं.कट्ट,कटक] २. (विणकाम) कापसाच्या बारीक दोऱ्याची गुंडाळी किंवा वेढे, लड (ही १० -१२ हात लांबीची व खुंट्याभोवती गुंडाळलेल्या १०० ते २०० वेढ्यांची असून चार पुंजाबरोबर असते. असल्या आठ दोऱ्यांच्या गुंडीला चिवट म्हणतात); कडिये.[क.] [त. कडिगै] (वा.) **० कुलूप करणे** - कुलूप लावून पक्का बंदोबस्त करणे; अगदी सुरक्षित, बंदिस्त ठेवणे : 'तींत (अंधार कोठडीत) शुद्ध मेंढराप्रमाणे कोंडून भरिलें आणि दरवाजा लावून-घेऊन कडीकुलूप केलें.' - हिंक १४०.

**कडी** स्त्री. लाकडी अरुंद व लहान चौरस किंवा गोल बहाल, तुळवट (पाटणीच्या खाली घालण्याचे). [हिं. कडी]

**कडी** स्त्री. **१.** वळण; चाल; रीत; कृत्य; तऱ्हा (कृत्याची) : 'दिव्य लावणीची कडी लीहून घ्या अभय पत्रावरी.' - होला ११५.२. (गवंडी काम) कमानीची कडी. [सं. कटक]

**कडी** स्त्री. कंबर : 'यशोदा बळभद्रदेवातें कडीये घेऊनि आपुलेया घरा गेली।' - श्रीकृष्ण १२.

**कडी** स्त्री. **१.** छाप; वरचष्मा; जरब : 'येकाद किला देतील तर न कले कडी बसेल तेहि सर्व तप कोण्ही वेंचील तर घडेल की न घडेल.' - पेद ३३.३०९. **२.** मात; तोड; वरचढपणा; अधिक हुशारी; ताण. [क. कड्डु] (वा.) **० करणे** - अधिक हुशारी दाखविणे; वरचढ होणे : 'त्यांच्यावर कडी करून दाखवलीस तर तुला पाच रुपये बक्षीस.' -

रथ २२८. ० **चढती असणे** - उत्कर्ष होणे : 'त्यांची उद्योगाची कडी चढत होती.' - माजी १४५.० **बसणे** - जम बसणे; काम होणे : 'यास खर्चाचे आनकूल असल्यावर कडी बसेल कारण येथे द्रव्याचा कारभार आहे.' - पेद ३३.२८४.

**कडी आधार** (स्था.) घराला असलेला कडीपाटाचा आधार.

**कडीकोट** पु. (कड्यांचा कोट, किल्ला) बंदिस्तपणा; सुरक्षितता; कड्याकुलुपे लावून केलेला बंदोबस्त. पहा : **कडाकोट**
वि. १. गर्द; धोधो; भरपूर; खूप. उदा. कडिकोट-पाऊस-आभाळ-फौज-सभा-मारामारी-पीक इ. : 'तो (महमद कासिम) मोठ्या कडीकोट तयारीने देवल शहराजवळ येऊन उतरला.' - हिंक २०. २. तयार; सज्ज; साधनयुक्त; सिद्ध (विशेषत: बंदोबस्त शब्दाबरोबर योजतात).
क्रिवि. गर्दीने; पूर्णपणे; मनस्वी.

**कडीज पायरी** कडेपठार; खंडोबाचे जेजुरी जवळचे मुख्य ठिकाण : 'जाऊन ठेपला ठेपला कडीजपायरी।' - लोसा. शब्द ४६.

**कडीत** न. कड्यांचे भांडे; घंघाळ : 'कडित आणि ना म्हणे:' - गोप्र ५९.

**कडीत** स्त्री. धूळपाटी : 'पृथ्वी एसनी कडीत आन मेरु एसनी खडी।' - सूत्रपाठ २७२.[क. कडत = कोळशाने रंगविलेले कापडाचे पुस्तक. यावर हिशेब लिहीत असत.]

**कडीति** स्त्री. भोवर - राव्य ५.८.

**कडीपट्टा** पु. (यंत्र.) एकमेकांत अडकणाऱ्या तुकड्यांचा केलेला पट्टा. याची लांबी कमी जास्त करता येते.

**कडीपाट** पु. लाकडी फळ्यांचे छत; तक्तपोशी; पटई; पाटणी; कडेपाट.

**कडीबंद** वि. कडीपाट केलेले (छत).

**कडीबंद** वि. कडी लावून बंद केलेला: 'कडीबंद घरात मी पोरांना कोंडून घातले आहे.' - तोरण २०८.

**कडीभोवरा, भौरा** पु. जंगीभोवरा. त्याच्या डोक्यावर कडी असते. ह्या कडीच्या भोकात भोवऱ्याच्या डोक्याचा खिळा फिरतो.

**कडील** वि. कडचा; बाजूचा (स्थळ किंवा दिशा या संबंधी). उदा. इकडील, तिकडील. गावाकडील, घराकडील इ.

**कडील** भारी रेशमी साडी : 'भावाला भाऊबीज भावासंगट वडिलाला। पैका मोजतो कडीलाला।' - लोसा शब्द ४६.

**कडीवळ** पु. सहायक; मदतनीस; कडवळ : 'बाईः जाडि वाहावेनाः तरि एकूं कडिवळ कां खडाना:' - लीच ३.७०.

**कडु** पु. कड; बाजू : 'दक्षिणे श्रीमुकुटाचा कडु केला.' -ऋ १३५.

**कडुबा** पु. ज्वारीचा कडबा : 'कडुबेआ गवता पेंडी.' -अंबे. शिला २.४

**कडुवळपण** सेवा; सेवकत्व : 'जयाचे देखौनि बरवेपणाःउचैश्रवा करी कडुवळपण।' - शिव ५०५.

**कडुवा** वि. १. कडवट. २. दुःखकारक.३. हीन प्रतीचे; पहा : **कडवा** : 'कडुवा संसार दुःकाळू। दारें नीगतु दिसें ॥' - शिव ५८७. [सं. कटुवत्]

**कडुवाळ** न. पिल्लू : 'वनकडुवाळें वेधीलीं देवें। श्रीचक्रमाणि।' - सव ३१३.

**कडुवाळ, कोडवाळ** पु. कडू; कडू मासळी. (गो.)[सं. कटु+व्याल]

**कडुवाळेपण** न. कडूपणा : 'व्याधित्यागें कडुवाळें। पण मुखाचें ॥' - ज्ञा १८.१३८४.

**कडुविख** वि. कडूजहर; विषाप्रमाणे कडू.

**कडुवें** दाराजवळची देवडी : 'मेळविले वीर थोवेकारी : कडुवापासि।' - शिव ५०१.

**कडुसा** पु. संधिप्रकाश. (माण.)

**कडुसे** न. सूर्यास्तानंतरचा वाढत जाणारा काळोख; अंधूक प्रकाश : 'सूर्य मावळतो, कडुसे पडते तसतसे हे आवाज खाली बसतात.' - घरदार ६७.

**कडू** वि. १. कडवा . २. बेचव; पित्तविकारामुळे बदलणारी (जिभेची चव). ३. न रुचणारे; अप्रिय; कठोर (वाक्य, भाषण इ.) ४. कीड न लागणारा, कीड जे खात नाही असे (विशिष्ट झाड, वनस्पती). ५. जारज संतती; कमअस्सल संतती. ६. गोड नसणारे; अशुद्ध (विशिष्ट तेल). ७. झोंबणारी; कडक; तिखट (विशिष्ट भाजी). [सं. कटु]

**कडू** वि. १. कठीण, गाठ्याळ (बाभळीच्या लाकडाचा आतील भाग); नार; वरचा भाग ठिसूळ, नरम किंवा गोड असतो. २. निर्दय; कडक; ताठर (माणूस, स्वभाव). ३. नापीक; लागवडीला प्रतिकूल (जमीन).

**कडू** न. १. (ल.) अफू. २. कात (रात्रीच्या वेळी काताचे नाव घ्यावयाचे नाही म्हणून त्याबद्दल म्हणतात).

**कडू** न. मृताशौच; सुतक; कडू विटाळ या शब्दाचा संक्षेप.

**कडू** स्त्री. डोळ्याचे दुखणे (डोळ्यांत माती गेल्याने, जाग्रण केल्याने येणारे). (क्रि. येणे. उदा. डोळ्याला कडू येणे.)

**कडू** वि. १. दासीपासून झालेली (संतती); अनौरस, जारज (संतती); लेकवळा: 'त्याच्या राज्यांत मल्हारराव नामक त्याच्या एका कडू सापत्न भावाने जे बंड माजविलें होतें '- हिंक ८४. २. पाटाची (संतती). [सं. कटु]

**कडू** पु. एका जातीचा साप : 'सर्वात कमी लांबीचा सर्प कडू नावाचा.' - भासर्प २७.

**कडू इंद्राव(य)ण** १. कुंपणावरील एक वेल. ह्यांची फळे तांबडी, विषारी व रुचीला कडू असतात; कवंडल; इंद्रावण; इंद्रवारुण; कडूवृंदावन. २. (ल.) तुसडा, माणूसघाण्या, एकलकोंडा माणूस.

**कडूक** पु. चाबूक : 'हातातील आसुडाचा - कडूकाचा - मोठमोठ्याने फटकारा मारीत असतो.' - एहोरा १.४८.

**कडू करांदा** तपकिरी रंगाचा एक कडवट कंद.

**कडूकवाला** पु. पोतराज.

**कडूकाजरा** वि. अतिशय कडू.

**कडू कारले** न. १. कारले. २. (ल.) वाईट स्वभावाचा व न सुधारणारा माणूस.

**कडू कारळी-ळे** तिळासारखे औषधी बी; कडू जिरे; काळे जिरे. यांचे झाड दोनतीन हात उंच असून ह्याला बोंडे येतात व त्यात बी असते.

**कडू काळ** वाईट दिवस; अडचणीची स्थिती; रोगाची साथ; दुष्काळ;

दुर्गती.(क्रि.येणे,असणे, चालणे,वाहणे,जाणे,टळणे,चुकणे, चुकविणे.)

**कडूघाटा** पु. मरणोत्तर एक विधी. (झाडी)

**कडू घोसाळी** (वन.) घोसाळ्यासारखी पण कडू फळे येणारी एक वेल.

**कडूजहर, कडूजार** वि. अतिशय कडू; विषासारखे कडू.

**कडू जिरे** पहा : **कडू कारळी**

**कडू झोप** अपुरी झोप; झोपमोड; झोपेचे खोबरे. (क्रि. करणे.)

**कडू तेल** १. करंजेल; करंजाच्या बियांचे तेल. २. उंडिणीचे तेल; पुन्नागफळाचे तेल.(हेट.) ३. (सामा.) खाण्याकरिता वापरले न जाणारे तेल.

**कडूबुंदी** पु. कडू भोपळा. (झाडी)

**कडू दोडका** १. कडवट दोडका. २. (ल.) दासीपुत्र; लेकवळा. ३. (ल.) पंक्तिबाह्य, जातिबहिष्कृत माणूस. पहा : **कडू भोपळा**

**कडू दोडकी** भाद्रपद महिन्यात फुलणारी एक वेल; दिवाळी. हिची पाने औषधी असून फळाला दिवाळे म्हणतात.

**कडून** शअ. १. पासून. २. दिशेने; बाजूने. ३. करून; ने; वारी (साधन दाखविणारे अव्यय). ४. करवी; द्वारा; परत्वे; मार्गाने; मुळे; साहाय्याने; मदतीने; च्या योगाने (प्रयोज्य कारण दाखविणारे).[क. कड, कडे]

**कडूनिंब** पु. बाळनिंब; बाळंतनिंब. हा वृक्ष फार मोठा असून सर्वत्र होतो. याची पाने गुढीपाडव्याला खातात. हा अनेक व्याधींवर उपयोगी आहे. याचे लाकूड इमारतीच्या उपयोगी आहे. आर्यवैद्यकात याला रसायन म्हटले आहे. [त. वेंबु]

**कडू पडवळी** (वन.) पावसाळ्यात या वेली उगवतात. याची फळे तोंडल्यासारखी दिसतात. ही फळे आणि याचा पाला फार कडू असतो.

**कडू पाणी** १. पाण्यात कडुनिंबाचे किंवा निरगुडीचे डहाळे घालून उकळलेले पाणी. (याने आजाऱ्यास, बाळंतिणीस वगैरे स्नान घालतात). २. विटाळ संपल्यानंतर बायका ज्या पाण्याने डोक्यावरून स्नान करतात ते पाणी. (क्रि. घेणे.) ३. सुतक किंवा कडू विटाळ संपल्यानंतर माणसाने स्नानासाठी घ्यायचे पाणी. (येथे कडू म्हणजे दु:खदायक प्रसंगाशी आलेला संबंध). (क्रि. घेणे.) ४. भाजीपाला शिजवलेले पाणी. (वा.) ० **काढणे** (बायकी वाक्प्रचार) - वरील विटाळ फिटल्याचे स्नान झाल्यानंतर ते स्नान नाहीसे करण्यासाठी पुन्हा दुसऱ्या साध्या पाण्याने स्नान करणे किंवा पाणी अंगावर घेणे.

**कडूपानी** पु. नरक चतुर्दशी. (झाडी)

**कडू पाला** कडू पाण्यात घालायची करंज, लिंब, निर्गुंडी इत्यादीची पाने.

**कडू भोपळा** १. कडवट रुचीचा भोपळा; दुध्या भोपळ्याची एक जात. याचा उपयोग सतार, वीणा वगैरे वाद्यांच्या व सांगड, तुंबडी इत्यादीच्या कामी करतात. २. (ल.) दासीपुत्र. ३. (ल.) पंक्तिबाह्य, हलक्या जातीचा, बहिष्कृत माणूस.

**कडू भोपळी** (वन.) दुध्याभोपळ्यासारखेच कडू भोपळे येणारी एक वेल. या भोपळ्यांचा सांगडी करण्यासाठी फार उपयोग होतो. ह्याचा गीर कांविळीत देतात. जून भोपळ्यात दारू करून ती दम्याच्या विकारात वापरतात. त्यामुळे कफ पडून शौचास होते.

**कडू वाघांटी** कडवट फळे येणारी एक वनस्पती. आषाढी द्वादशीला हिच्या फळांची भाजी करतात.

**कडू वृंदावन** पहा : **कडू इंद्रायण** : 'कडू वृंदावन। साखरेचे आळें।' - तुगा

**कडू सरोवर** (भूशा.) सोडियम सल्फेटचे मोठ्या प्रमाणात साठे असलेले सरोवर.

**कडूसावणे** सक्रि. कडसणे; घट्ट बांधणे : 'इठ्ठल माजा पिता कडूसावी वरी सोगा.' - जसा ४४१.

**कडूसे** न. संधिप्रकाश (कर.) पहा : **कडुसा**

**कडे** न. १. हातात, पायात किंवा दंडात घालायचा एक वाटोळा कंकणाकृती अलंकार. २. (ल.) वेढा; घेर; भोवतालून घेर; सभोवताली वर्तुळाकार रांग (सैन्य, डोंगर, इत्यादीची): 'भोवतें आवर्णोदका कडे।' - दास १६.३.१०. ३. विहिरीच्या तळचा लाकडाचा गोल थर (ज्यावेळी खाली थर लागत नाही त्या वेळी कडे घालून त्यावर बांधकाम करतात.). ४. पोवाडे गाणाऱ्यांचे एक चर्मवाद्य; डफ. हे लाकडी एक - सव्वा हात व्यासाचे कडे घेऊन त्यावर चिकण मातीने कातडे चिकटवून वर चौफेर कागदपट्टी लावतात : 'राम जोशी यांनी आपल्या वयाची वीस वर्षे तमाशा पाहण्यात व कडें वाजविण्यात घालविलीं.'- राला २. ५. (ल.) बेडी पायात अडकवण्यासाठी तिला लावलेली वलये; (सामा.) बेडी :'माझे भक्तीचिया आवडी। अहं सोहं दोनी कडी। तुटली अभिमानाची बिडी। विषय गोडी निमाली।' - एभा १४.३.११ ६. वर्तुळाकार काठ, सीमा, कड (तंबोरा, चाळण इत्यादीची). ७. खळ्यातील धान्य बाहेर जाऊ नये म्हणून त्याभोवती वेलीचे किंवा गवताचे घातलेले वेटोळे. ८. मोट ज्याला बांधतात ते लोखंडी गोल वळे. [सं. कटक][का.कडू=मनगटावरील दागिना ]

**कडे** शअ. १. बाजूला; दिशेला :'हातीं धरूनि तियेसी। कडे काढी व्योमकेशी।' - गुच ३३.११०. २. पाशी; जवळ; ताब्यात; हातात; हाताखाली; दिमतीत; व्यवस्थेत. ३. आत; खाली; संबंधी; निसबत. ४. हवाली; स्वाधीन. (क्रि. करणे, देणे.) ५. पक्षाला; वाट्याला. ६. हातात; पाशी; जवळ. ७. (ल.) पलीकडे; पार :'स्वामी तारका गुरुनाथा। संसारसागराकडे लावी ॥' - गुच ४५.१०६. ८. जबाबदारी; पत्कर. ९. काळ, वेळ यासंबंधी निरर्थक अव्यय; स; ला. (कुण.)[क. कडे ] (वा.) **कडेला नेणे** - पूर्ण करणे; शेवटाला नेणे :'काम करून कडेला न्यायचच असं त्यांनी ठरवून टाकलं.' - भुताचा ६२.० **पडणे** सार्थक होणे :'तीएचे जन्म कडे पडे ॥' - दृपा ४९.

**कडे** क्रिवि. कडेवर; कमरेवर :'विवाहहोमालागीं श्रीहरी। वेगें चला बोहल्यावरी। कडे घ्यावी नोवरी।' - एरुस्व १६.१९. [सं. कटि]

**कडे** न. ज्या घरात बसली असता सोंगटी मरत नाही असे सोंगटी पटावरील घर.

**कडेकपाट - र** न. स्त्री. १. दरड व गुहा; दरीखोरे; गिरिगव्हर; डोंगरातील खबदाड; खोरे; दरीकंदर; भुयार. प्रथमेत क्वचित प्रयोग, बहुतेक कडेकपारात, कडेकपाटी असेच प्रयोग आढळतात :'कडेकपाटीं धावती जनें।' - सप्र ३.३४. २. (ल.) दुर्गम, अवघड ठिकाण.

**कडेकरी** पु. दगड वाहणारा, नेणारा.

**कडेकाठ** पु. १. शेवट; टोकाची बाजू. २. लांब; दूरवर. (सामा.) कडेकाठास, कडेकाठेस असेही प्रयोग आढळतात.

**कडेकोट** पहा : **कडाकोट**

**कडेपाट** पहा : **कडीपाट** :'क्वचित एखाद्या गबर महाराची कडेपाट इमारत ....' - व्यंमाक १३.

**कडेमाळ** स्त्री. मनगटावर बांधायचा गजरा.

**कडेल** न. रेशमी लुगडे. [सं. कटि]

**कडेलग** क्रिवि. अगदी शेवटाजवळ :'जेथ हटिये सांडिति होडा। कडेलग ॥' - ज्ञा ६.५६.

**कडेलोट** पु. १. कडेपात; मुक्ती मिळविण्यासाठी योग्याने कड्यावरून घेतलेली उडी; अपराध्यांना कड्यावरून लोटून देणे; अशी दिलेली शिक्षा. (क्रि करणे.) : 'ही कडेलोटाची जागा म्हणून राखली आहे.' - श्रीयो २.६८. २. (ल.) परमावधी; शिकस्त; अतिरेक; कमाल (पाऊस, पीक, संपत्ती, कृती इत्यादीची). (क्रि. होणे.) :'ही (जॉनसनची) भ्रमावस्था स्थाईक होऊन मुळीच आपला बुद्धिभ्रंश होईल की काय याची त्यास अतिशयित भीती वाटे .... पण या कडेलोटावर गोष्ट येऊन ठेपली नाहीं.' - नि ७०२. ३. (ल.) ऱ्हास; अधःपात; उतरती कळा. ४. पराकाष्ठेच्या तिरस्काराने वागवणे. ५. घालवून देणे; काढून टाकणे (जागा, अधिकार इत्यादीवरून). ६. शेवट करणे.

वि. १. खालच्या प्रतीचा, दर्जाचा; हलका (माणूस, वस्तू). २. अफाट; प्रचंड : 'कडेलोट श्रीमंती होती तर कडलोट दारिद्र्यहि अगदी खांद्याला खांदा लावून नांदत होते.' - रूरा ११६.

**कडेवाला** वि. कडे (वाद्य) वाजवणारा; तमासगीर; डफवाला.

**कडेशेवटचा** वि. १. अगदी अखेरचा; अंतिम; कमालीचा; अगदी कडेचा; सीमेचा. २. पराकाष्ठेचा (मूर्ख, वृद्ध, दुर्दैवी इ.). ३. अगदी शक्य तो कमी (किंमत, खर्च, नफा इ.) जसे :- कडेशेवटचा उपाय-उपचार-मसलत- योजना- तोड- मनसुबा इ.

**कडेस-सी** शअ. कडेला; बाजूला; पाशी; जवळ : 'बापाच्या उजव्याकडेस बसली म्यां पाहिली नोवरी।' - र ६.

**कडो** पु. काढा. (गो.)

**क(को)डो** पु. भात ठेवण्यासाठी तक्ट्या इ. लावून केलेली जागा; कणगा.

**कडोकडी** क्रिवि. १. जोराने; नेटाने; झपाट्याने. पहा : **कडोविडी** :'आले अवघे नवलक्ष गडी। बळकाविली यमुनाथडी। हमामा घालिती कडोकडीं।' - ह १०.९५.

**कडोकडो** क्रिवि. कडकडून भेटणे. (झाडी) [सं. कटकटा]

**कडोची** स्त्री. एक वेल; कडवंची.

**कडोजी** स्त्री. पावसाळ्यात उगवणारी वनस्पती; कुत्र्याचे मूत; कुत्र्याची छत्री.

**कडोनिकड** वि. जोरदार; त्वेषपूर्ण :'झाशीच्या राणीस इंग्रजासारख्या अहिंदूंच्या कडोनिकड पाठलागातील बंदुकांच्या आगीतून काल्पीपर्यंत पोचून ....' - ससावर ३.४८.

**कडौल** वि. नीटनेटके, व्यवस्थित. 'त्रेतीं सीतेचें ठाण कडौल: मडौल: साकार' - अली ७३.

**कडोविकड- डी** स्त्री. (कड्यात कड्या; त्यापासून झालेली गुंतागुंत) १. भाषणातील डावपेच ( मुद्याचा पत्ता न लागणारे); अनिश्चितपणे व खाचाखोचीने भाषण; दुटप्पी बोलणे; (कडोविकडीचा असा षष्ठ्यत प्रयोग रूढ आहे). २. (कुस्ती) पेच; कौशल्य :'मल्लविद्येच्या कडोविकडी। जीमूती दावितां पडेपाडीं।' - मुविराट २.६८. ३. युक्त्या; खुब्या; मसलती :'तेवीं उत्तमोत्तम ज्ञाननिर्वडी। उद्धव कडोविकडीं शृंगारिला ॥' - एभा २८.६९८.

वि. उत्तम; व्यवस्थित; बंदोबस्तीचे :'राखण ठेवी कडोविकडी।' - कथा १.२.१७८.

क्रिवि. १. अति जोराने; झपाट्याने; निश्चयपूर्वक; अटीतटीने; त्वेषाने : निकराने; नेटाने, करकचून :'शस्त्रें सुटतील गाढीं। वीर भिडतील कडोविकडी।' - एरुस्व ७.७४. २. नाना प्रकारांनी, रीतींनी : 'पुच्छ नाचवी कडोविकडी.' - रावि २०.४९. ३. दुटप्पी, खुबीदार भाषणे करून; मोठ्या युक्तीच्या बोलण्याने.४. नखशिखांत.[कडीचे द्वित्व]

**कडोविकडीचा** वि. १. कडोविकडीने भरलेले, केलेले (भाषण, अर्थ, कल्पना, लिहिणे, गाणे, नाचणे, वाजविणे इ.); अन्योक्ती, व्याजोक्ती, व्यंग्योक्तीचा; उपरोधिक; औपरोधिक :'कडोविकडीचे विचार सुचले।' - ऐपो २१४. २. युक्त्या; मसलती; डावपेच यांनी युक्त (क्रिया, हावभाव, वागणूक इ.); शिताफी इत्यादीने भरलेले :'कडोविकडीचीं विवरावीं। अंतःकर्णे ॥' - दास १९.१०.१०. ३. खुबीदार; कुशल; चतुराईने अलंकृत; झील, कंप, आघात, छाया, उडणी, झोक यांनी भरलेले (गाणे, नाचणे, वाजविणे) :'ठेवी कडोविकडीची ठिवण हो। अक्षरीं मोत्यांची ववण। लय लाऊन करती श्रवण हो।' - प्रला १२२.

**कडोविकडीचा** वि. १. कडेचे; शेवटचे; पराकाष्ठेचे; निर्वाणीचे; परमावधीचे (भांडण, लढाई, वाद इ.) :'कडोविकडीच्या वीररसाने भरलेले ....' - भास्मृ २८. २. कडक; रागीट; उग्र; जहाल (भाषण, निंदा इ.). ३. सक्त; भारी; निश्चयाची (मागणी, बोलावणे इ.).

**कडोशे** स्त्री. 'पाण्याने डोंगर कापून पाडिल्या वाव्हा' (पाणी वाहण्याचे ओहळ). - (तंजा.)

**कडोसरी-स्त्री-सी** स्त्री. १. कमरेला बांधलेल्या (लुगडे, धोतर इ.) वस्त्राचा कमरेजवळ खोवण्यात येणारा भाग. (यात पैसा, सुपारी इ. जिन्नस ठेवतात) :'कडोसरी नसला तरी कनवटीला खास आहे.' - तोबं १४. २. शरीराची (उजवी, डावी) जागा; कमरेचा भाग. ३. वस्त्राच्या आवळ्याने काळवंडलेली, वाईट झालेली कमरेची जागा. (सामान्यतः चतुर्थ्यंत व षष्ठ्यंत स, चा इ. प्रयत्य लागून प्रयोग). जसे : कडोसरीला खोवणे, खुपसणे; कडोसरीचा पैसा. [सं. कटि] (वा.)

० **येणे, कडोसरीस येणे** - अगदी जेरीला येणे.

**कडोसा** पु. १. संधिप्रकाश. २. खिडकी व दरवाज्याच्या फटीतून आलेले प्रकाश किरण. पहा : **कवडसा** :'मेरूभोंवते कडे कापले। असंभाव्य कडोसें पडिलें।' - दास १६.३.१७.

**कडोळ** पहा : **कडवळ** :'न राहे खोंड्या मका कडोळ।'-अफला ६६.

**कडोळ-ळी-ळे** न. स्त्री. १. वेढे; अंगठी. २. स्त्रियांच्या पायातील चांदीचे कडे. (व.)

**कडोळी-ळ्या लगाम** पु. प्रत्येक टोकाला दोन दोन कड्या असलेला लगाम. पहा : **लगाम**

**कडौंचे** उक्रि. शिजविणे; कड आणणे, खूप तापविणे. (गो.) पहा : **कढविणे**

**कड्डा** वि. खूप तापलेला. (झाडी) [ते. करडु]

**कड्डावंचे** अक्रि. घरावर बांबूचे ओंबण करणे. (गो.)

**कड्डुंचे** सक्रि. दगडाने वाटून बारीक पूड करणे. (गो.)

**कड्डू** स्त्री. १. कानाच्या कवळीची बाळी. २. एक पालेभाजी. (झाडी)

**कड्या** पु. झाळण्याचे लोखंडी हातोडीसारखे हत्यार; खड्या.

**कड्या** पु. कंबर. (झाडी) [सं. कटी]

**कड्या** पु. पिवळे फूल येणारे एक झुडूप अथवा त्याची बी.

**कड्याखार** पु. टाकणखार, याचे दोन प्रकार :- कड्या टाकणखार व तेल्या टाकणखार (चौक्याचा टाकणखार).

**कड्या(ड्यो)नाग** पु. बिरंबोळ्यासारखी एक वेल व तिचा विषारी कंद. हा बिरंबोळ्यासारखाच पण त्यापेक्षा वाटोळा असतो.

**कड्यारोग** पु. जनावराला होणारा एक रोग; फोफसा.

**कड्याविकड्या** क्रिवि. कडोविकडीच्या; वेड्यावाकड्या; अनर्गल : 'त्यार्णी काशिराव होळकर यांच्या कड्याविकड्या आचारविचाराच्या गोष्टी सांगितल्या.' - होकै १५२.

**कड्याळ** न. १. जनावरांचा चारा (जोंधळा किंवा बाजरी). पहा : **कडवळ**. २. (ल.) उंच व राकट स्त्री. (वा.) ० **दाती धरणे** - १. आश्रयाला जाणे; शरण जाणे; दाती तृण धरणे. २. दैन्य प्रदर्शित करणे; नादार होणे.

**कड्याळ** न. संकट; आरोप; किटाळ; आळ; कुभांड; कारस्थान; लचांड : 'आपल्या बँकेवर काहीतरी कड्याळ येणार आहे.' - भादि ३९२.

**कड्याळे** न. १. मोठा नफा, प्राप्ती, लाभ (व्यापारात). २. एकदम, एकाएकी दैव उघडणे; घबाड सापडणे. (क्रि. लागणे.)

**कड्याळे** पहा : **कडोळ्या लगाम**

**कड्ये** स्त्री. कंबर; कटी (फक्त चतुर्थ्यंत प्रयोग). (को.)
क्रिवि. कडेवर, कमरेवर. पहा : **कडिये** [सं. कटि]

**कढ** पु. १. उष्णतेमुळे पाणी इत्यादींना येणारी उकळी; आधण; फार तापल्यामुळे बुडबुडे येतात ती अवस्था. (क्रि. येणे.) २. (ल.) डोक्यावर फार वेळ ओझे घेतल्यामुळे डोक्याला येणारा ताण, शीण, रग. ३.(ल.) उमाळा; गहिवर (प्रेम, दु:ख इत्यादिकांचा); स्फुरण; शिरशिरी (भांडण, वादविवाद, शिवीगाळ इत्यादीची). [सं. क्वथ्] (वा.) ० **ओढून घेणे** - परस्पर चाललेल्या भांडणाचा संबंध आपणाकडे घेणे; दुसऱ्यावरचा राग आपणावर ओढून घेणे. ० **जिरवणे** - एखाद्याचा राग, ताशेरा शमविणे, शांत करणे. ० **सोसणे, काढणे** - दम धरणे; धीर धरणे; गैरसोय किंवा त्रास सोसणे : 'चार महिने माझेसाठीं तुम्ही कढ सोसा.' - ऐलेसं ६९५५. [सं. क्वथ्]

**कढई** स्त्री. १. पदार्थ तळण्यासाठी किंवा कढविण्यासाठी वापरण्यात येणारे अर्धवट पसरट व दोन कान असलेले धातूचे भांडे; काईल (दूध, उसाचा रस वगैरे कढविण्यासाठी). २. (नाशिक) नदीला मोठा पूर आला असताना पाण्यात होणारा जंगी भोवरा. [क. कडायी][सं. कटाह]

**कढई** स्त्री. स्वयंपाक; रसोई (कढईमध्ये स्वयंपाक करतात यावरून लक्षणेने) : 'नर्मदा प्रदक्षिणावासी मंदिरासमोर असलेल्या पटांगणावर उतरतात तेथे नर्मदेची कढई करितात.' - ६.७.३७.

**कढक-ण** न. १. (सामा.) काढा; कढविलेले पाणी; ज्यात काही पदार्थ उकळला आहे असे पाणी; पिठले : 'कढण काला कालविलें ताका' - निगा १००. २. तूर, मूग वगैरे कडधान्य ज्यात शिजविले आहे असे पाणी; कट; कढू. ३. मांसाचे कालवण; मांस शिजविल्यानंतर त्यात आलेला तवंग, मांदे. (वा.) ० **निघणे** - रंजीस येणे; मेटाकुटीला येणे. (ना.)

**कढणी** स्त्री. पदार्थ कढण्याची किंवा कढविण्याची क्रिया.

**कढणे** अक्रि. १. कढण्याच्या अवस्थेला येणे; आधण येणे; उकळणे; शिजणे (दूध, तेल, लोणी इ) : 'बोले जें तच्छवणें माझेचि कढोत न तुमचे कर्ण.' - मोकर्ण ४०.९. २. उष्णतेमुळे तापून रस होणे (धातू इत्यादीचा). ३. (ल.) रागावणे; मनातल्या मनात रडणे; संतापणे; तापणे : 'अश्वत्थामा कोपें अस्त्र न कथिल म्हणोनियां कढला।' - मोऐषिक १.३९. [सं. क्वथ्]

**कढणे** अक्रि. कण्हणे; विवळणे : 'येक डोई खाजविती। येक कढों लागती। सावकास ॥' - दास १८.९.१५.

**कढत** वि. भाजल्यासारखे गरम; ऊन; कडकडीत तापलेले; आधण आलेले (दूध, पाणी, पदार्थ, धातू इ.).

**कढतरून** क्रिवि. अंतर्बाह्य; झटकन; स्पर्शून : 'स्वरूप कढतरुनि व्यापिले.' - प्रमेय.

**कढता** पहा : **कडता**

**कढय, कढाये, कढे** स्त्री. न. पहा : **कढई**
वि. अति तापलेले; कढलेले; कढत (दूध, पाणी वगैरे). (गो.)

**कढशीळ** वि. फार तापलेले; कढत; उतू जाण्यापर्यंत आलेले (दूध, तूप, लोणी इ.).

**कढंक** क्रिवि. कढ येईपर्यंत : 'धडधडा ज्वाळा जळती कढंक। त्यासी कुंभपाक बोलिजे।' - स्वानु २.४.११.

**कढा** पु. काढा. (गो.)

**कढिवा-वे** स्त्री. ढुंगण; कटी; नितंब : 'उदरीं त्रिवळीचे लक्षण। कवण माजाचें मोटकेपण। घणवट कढिवा करिताए माजवण। मदन सुखासी ॥' - नरुस्व ३२२. [सं. कटि]

**कढी** स्त्री. १. ताकाला हरभऱ्याचे पीठ लावून फोडणी वगैरे देऊन कढवून केलेले कालवण. कोकणात आमसुलाचीही कढी करतात : 'भाजी होती वांग्याची। वालाचे गोळ्याची कढी।' - स्त्रीगीत ६६. २. एक औषधी काढा; निरगुडीची पाने, ओवा, चित्रकमूळ, हळद व सुंठ यांचे चूर्ण व कांजी ताकात मिसळून केलेली कढी. ही वातहारक व

अग्निवर्धक आहे.[सं. क्वथिका] (वा.) ० **पातळ होणे** - (ल.) **१.** आजारामुळे अशक्त, फिकट, निस्तेज होणे. **२.** भीतीने घाबरणे, गांगरणे, जर्जर होणे. **शिळ्या कढीला ऊत आणणे - १.** (शिळी कढी कढविणे); प्रसंग संपल्यानंतर एखाद्या गोष्टीचे अकारण चर्वितचर्वण करणे. **२.** स्मरणातून गेलेल्या जुन्यापुराण्या वादाला पुन्हा तोंड पाडणे.

**कढीखाऊ, कढीचट** वि. कढीभुरक्या; कढीखाऊ (ब्राह्मण). (ना.) वि. **१.** कढीची आवड असलेला. (ब्राह्मणास उपहासाने म्हणतात). **२.** (ल.) शेळपट; भ्याड; नामर्द.

**कढीगवत** न. स्त्री. गवती चहा किंवा पाती चहा; कढीपत्ता.

**कढीनिंब** पु. बारीक काटे असलेले एक झाड. याच्या पाल्याला एक प्रकारचा सुवास येतो. तो कढीत, मसाल्यात घालतात व त्याची चटणीही करतात. याला गोड निंब, मढुनिंब, झिरग असेही म्हणतात. [त. करिवेंबु]

**कढीभात** पु. लग्न विधीतील एक सोहळा; सीमांत पूजनात वधूपक्षाने वरपक्षाकडील मंडळींना कढीभाताचे जेवण घालणे व कढीचे आणि भाताचे भांडे आंदण देणे.

**कढ्या** पु. एक झाड व त्याचे फळ; कड्या.

**कण** पु. **१.** रज; रेणू; परमाणू; एखाद्या पदार्थाचा सूक्ष्म अंश; (शाप.) अणू. **२.** रत्नांचा पैलू; चमक; हिरकणी; हिऱ्याची बारीक चुणी. **३.** कणी; धान्याच्या दाण्याचा अंश :'एऱ्हवीं कणा आणि भूसा।' - ज्ञा १८.९३९. **४.** संबंध दाणा :'आतां कक्षेंत झोळी घालून। मागे कण घरोघरीं.' - नव १७.१२४. **५.** धान्य :'कणु एकु साठविती।' - ऋ ८८. **६.** ठिणगी; स्फुल्लिंग (अग्नीचा) :'जळति अग्निकणेंचि तृणे जरी।' - वामन, नामसुधा ५८. **७.** थेंब (पाणी वगैरे पातळ पदार्थाचा).

**कण** पु. बळ; कस.

**कण** पु. रताळ्यासारखा कंद; कणक; कणगर. (को. कुलाबा)[सं.]

**कण** पु. (संगीत) पुढचा स्वर येण्यापूर्वी ज्या स्वराला किंचित स्पर्श करून पुढे जायचे त्या स्वराला 'कणरूपी स्वर' अथवा नुसते 'कण' म्हणतात.

**कण** पु. (सोनारी) कारल्यासारखे परंतु मूठ नसलेले, वीतभर लांबीचे (अंगठी वगैरेला गोल आकार देण्याचे) एक उपकरण.

**कण** स्त्री. एक प्रकारची उसण; तिडीक; कळ (पाठ, मान, कंबर वगैरेत येणारी). (क्रि. भरणे.) पहा : **धमक**

**कण** पु. वावडी समतोल राहण्याकरिता तिला बांधायचा कापडाचा तुकडा, शेपटी, चिंधी. (क्रि. लावणे, मारणे.) [क. कण = चोळीचे वस्त्र]

**कणऊब** स्त्री. दाणेऊब; धान्य पिकून तयार होण्याच्या हंगामातील उष्णता (भाद्रपद, अश्विन महिन्यातील). (को.)

**कणक** न. रताळ्यासारखा एक कंद, मूळ; कणगर.

**कणक** स्त्री. कळ; तिडीक (ताण बसल्यामुळे किंवा संधिवातामुळे पोटात, कमरेत, पाठीत, डोक्यात वगैरे उत्पन्न होणारी); उसणीहून भिन्न. (क्रि. चालणे, निघणे, भरणे.) पहा : **चमक**

**कण(णं)क** न. कळक; बांबूची एक जात :'उंच उंच एखाद्या कणकासारखा लपलपता.' - किरिस्तांव ११.(कु.)

**कणकण-णी** स्त्री. १. हुडहुडी; शिरशिरी; अंग मोडून येणे; ज्वर भरण्याच्या वेळी थंडीचे शहारे येणे. (क्रि. येणे, भरणे.) २. ताप निघाल्यावर अंगात राहणारी कडकी; मुरलेला ज्वर. (क्रि. राहणे, येणे, होणे.) ३. दुःख. (गो.) [ध्व. सं. क्वण = शब्द करणे]

**कणकणणे** अक्रि. अंग मोडून येणे; कणकण वाटणे; डोके दुखणे; थंडीचे शहारे येणे (ज्वर वगैरे येण्याचे वेळी).

**कणकणी** क्रिवि. घडीघडी; पावलोपावली; वेळोवेळी. (गो.)

**कणकणीत** वि. खणखणीत; कणखर : 'शरीरयष्टी चिवारीच्या काठीसारखी कणकणीत होती.' - सीपो १.

**कणकणे** अक्रि. १. कळकणे; आंबट पदार्थाला हिरवटपणा व विकारीधर्म उत्पन्न होणे (निकल्हईच्या भांड्यात ठेवल्यामुळे). २. कळंक लागणे; कळकले जाणे (भांडे). [सं. कलंक]

**कणका** पहा : **कनका.** दणका, ठोसा, बुक्का, धक्का :'गोऱ्ह्याच्या पाठीत कणका घालीत कोंडी आंत आला.' - पधों १२.

**कणकील** न. (शेती) जोखडाला बैलाच्या मानेजवळ, आतील बाजूला असणारी खीळ. [क.]

**कणक्या** वि. १. दणकट; दांडगा; बळकट; खमक्या; पड न घेणारा (गव्हाची कणीक म्हणजे दाठर व इतर धान्याचे पीठ मऊ, दबेल असते यावरून); भरपूर; मोठा (बाजार इ.). २. कठोरपणे नोकराकडून काम करून घेणारा.

**कणखर** वि. कठीण; बळकट; मजबूत; घट्ट (दगड, लाकूड इ.); टिकाऊ; दणकट (कापड वगैरे); धट्टाकट्टा; धडधाकट; काटक (शरीर, मनुष्य); प्रखर; धगधगीत (काही लाकडांचा जाळ).[का.कण= बांबूची काडी - खट = कणगी.]

**कणखाविणे** उक्रि. (विरू.) खणकावणे; खडसावणे; रागे भरणे; भोसडणे; तासडपट्टी काढणे; चापणे.

**कणग-ण-गी** न.स्त्री. **१.** कणगर नावाचे कंद (गो.) पहा : **कण, कणक.** **२.** रताळे.

**कणगर- रे, कनगर** न.**१.** बटाट्यासारख्या एका कंदाचा वेल : 'हे तर टोपलीत ठेवलेल्या कनगराचे कंद.' - शेलूक ११४. २. मूळ; कंद. याला 'गोवें बटाटा' म्हणतात. हा कंद शिजवून किंवा भाजून खातात. याला कण, कणक, काटेकणगर व कनककंद अशीही नावे आहेत. हा रताळ्यापेक्षा जाड असतो. उपासाला खातात. याला जमिनीत बटाट्यासारखे लांबट कंद लागतात.

पु. स्त्री. एक झाड; कुडका काकणा.

**कणगा** पु. **१.** मोठी कणंग. २. धान्य साठविण्यासाठी जमिनीवर वर्तुळाकार बांबूचा तट्ट्या उभा करून बाहेरील बाजूने कळक पुरून त्यासह तट्ट्या बांधून केलेले साधन; पालटे; पाले; कोथळा; कणगोली; कोठार.

**कणगी, कणगुला, कणगुले** स्त्री. पु. न. लहान कणंग :'कणगीची काढितील लिंपण। गूळ शर्करा खातील संपूर्ण।' - जै ६.४९.

**कणगुली-गूल-गोल** स्त्री. न. कणग्याप्रमाणे बांबूच्या कामट्यांचा विणलेला वाटोळा कोथळा; लहान कणगी; कणगुळा : 'फक्त बांबूच्या

कणगुल्या, टोपल्या ....' - मापु १९.

**कणडुली-लो,कणडो** स्त्री. पु. करंडी (बांबूची, वेताची). (गो.) पहा: **कणगुली**

**कणणे** अक्रि. १. कण्हणे; कुंथणे; विवळणे; हायहुय करणे (आजार, वेदना यांच्या अतिरेकामुळे). २. कण किंवा उसण भरून दु:खित होणे; स्नायू ताठणे. [सं. कण् = शब्द करणे]

**कणदार** वि. १. कणीदार; कण्या असलेले (तूप वगैरे). २. भरपूर कणसे आलेले (पीक); दाण्यांनी गच्च भरलेले (कणीस). ३. सकस; कसदार; ज्यात अधिक सार, सत्त्व आहे असा (कडबा, गवत, धान्य, तूप इ.).

**कणपट्टी** स्त्री. (शेती.) मोटेचा कणा बसवायला आधार अशा खाच असलेल्या दोन पट्ट्यांपैकी प्रत्येक. (माण.)

**कणबाबुळी** स्त्री. शेवाळ : 'तवं पाणियांवरि थोर कणबाबुळी आली असे.' - दृपा ५१.

**कणबार** पु. (वै.) (शेती) रेड्यांच्या चामड्यांची पट्टी; मोट व तिच्यावरील कडे यांना जोडणारे चामड्याचे पट्टे. [क. कोण = रेडा]

**कणबी** पहा : **कुणबी** [गुज.]

**कणभ** पु. एक प्रकारची विषारी माशी. ही चावली असता सूज, ज्वर, वांती इ. लक्षणे होतात. दंशाची जागा कुजते. [सं.]

**कणलक्षांश** पु. कणाचा एक लक्षावा भाग; अणुहून लहान; अतिसूक्ष्म अणू; परमाणू; कणाचा अत्यंत सूक्ष्म अंश (ज्याचे आणखी भाग पडणार नाहीत असा). [सं.]

**कणलोणी** न. कसदार लोणी; सरकीचा रतीब असलेल्या जनावराच्या दुधापासून केलेले लोणी.

**कण(न)व-वा** स्त्री. पु. करुणा; दया; कळवळा; कृपा : 'कीं कणवा घालुनि उडी। पावविला संत थडी।' - ऋ १०२; 'जया सर्वभूती कणव। तया नमस्कारिती सकळ देव।' - मुआदि १९.१७२. [सं. कण्]

**कणवट-टी** पहा : **कडोसरी**

**कणवट** न. अन्न; कणीस; धान्य : 'जैसें भाजलें कणवटें।' - विउ ७.९४.

**कणवण** स्त्री. कण्ह; विवळणी; किरकिर (विशेषत: लहान मुलांची). [सं. कण्]

**कणवणणे** अक्रि. कण्हणे; विवळणे; किरकिर करणे.

**कणवळणे, कणवळा** पहा : **कन्हवळणे, कन्हवळा**

**कणवाळ-ळा-ळू** वि. कृपाळू; दयाळू : 'भक्तांचा कनवाळ भीम म्हणे।' - रामदासी २.१२४.

**कणवृत्ति-त्ती** स्त्री. कोरान्न भिक्षा : 'ब्राह्मणु एकु प्रतिदिनीं कणवृत्तीसि।' - लीचपू २९.

**कणश:** क्रिवि. १. कणाकणाने. २. थोडेथोडे; हळूहळू. [सं.]

**कणशा** वि. १. कणीस चोळणारा. २. (ल.) अडाणी; मूर्ख; गावंढळ; रानवट; रिठोळ. [सं. कणिश:]

**कणशी** स्त्री. भाताची ओंबी, लोंबी, लोंगर, कणीस. (को. गु. गो.)

**कणस** न. बीज.

**कणसर** स्त्री. ढीग.

**कणसावणे** अक्रि. झोपेत विवळणे; कण्हणे : 'थोड्या वेळाने अप्पा कणसावला.' - आआशे १८१.

**कणसाळे** न. मळणीच्या आधी व्यवस्थित उडव्यासारखी रचून ठेवलेली धान्याची कणसे. त्याला 'कणसाळ' म्हणतात. : 'गावच्या रानातील खळीं कणसाळे कडबे. लुटून नेले.' - ऐलेसं ३८४८.

**कणसिद्धांत** पु. (भौ.) हा न्यूटनचा प्रकाशासंबंधी मांडलेला सिद्धांत आहे. या सिद्धांतानुसार प्रकाश हा सूक्ष्म, कणरूप असून त्याला द्रव्यमान नाही. त्याचा वेग दर सेकंदाला ३×१० सेंटिमीटर आहे. त्या कणांचे परावर्तन व अपवर्तन होते. [सं.]

**कणसुकाळ** पु. धान्याची सुबत्ता : 'तोपर्यंत जेथला दाणा तेथेच राहून कणसुकाळ होता.' - गांगा १४०.

**कणसुरेपणा** पु. बेसूरपणा : 'कणसुरेपणा म्हणजे अभिप्रेत नसलेल्या सूरकक्षेचे सारखे सूचन करीत राहणे.' - संसौ २९.

**कणसूर** वि. बेसूर : 'यांच्या गळ्यातून निघणारा कोणताही स्वर कच्चा व कणसूर लागला आहे असं कधी झालं नाही.' - बागं १६०.

**कणस्वर** पहा : **कण**

**कणहिम** न. (भूशा.) हिमाचे छोटे छोटे कण एकत्र आले म्हणजे बर्फ घट्ट होऊ लागतो. त्यातील हवा संपूर्णपणे निघून गेली म्हणजे त्याला कणहिम म्हणतात.

**कणंग** स्त्री. धान्य साठविण्यासाठी बांबूचे किंवा फोकाट्याचे केलेले पात्र; लहान खोली; पेव; कणगा; ठिकी; कणिंग : 'कोपऱ्यात नाचणीची बारिकशी कणंग होती.' - सराई २४.

**कणंग** पु. चवळ्या सालासकट दळून त्यात मैदा, मऊ भात व साखर घालून त्याचे गोळे करून उकडतात ते पक्वान्न.

**कणा** पु. १. पृष्ठवंश; मानेपासून माकडहाडापर्यंत पाठीचा दांडा; मणक्यांची रांग. २. (ल.) पर्वताची लांबट ओळ; ३. दोन्ही बाजूंना उतार असलेल्या डोंगराच्या रांगेवरील उंच रस्ता; दंड; डोंगरपर्वतावर चढण्याउतरण्याची पाऊलवाट. पहा : **रांग** ४. आधार; ज्यामुळे एखादी गोष्ट टिकते, सावरली जाते असे तत्त्व. ५. मोटेचा सोंडू ज्यावरून ओढला जातो ते लांबट चाक. ६. हातरहाटाचे मधले लाकूड : 'उलट रहाटाच्या कण्याप्रमाणे जागच्या जागी फिरून फिरून त्याची बुद्धी निरुपयोगी होते.' - व्रवि १६. ७. गाडीच्या चाकाचा आस. ८. जहाजाचा खालचा भाग. हा निमुळता व पाठीच्या कण्यासारखा असतो : 'जहाजाचा कणा दगडात कच्च बसला.' - मदमं १८९. [सं. कर्णक = दांडा] (वा.) ० **नसणे** - नेभळट असणे : 'त्या माणसाला काही कणाच नाही. अगदी बुळा आहे बिचारा!' - वैष्णव १०.

**कणा** पु. १. रांगोळीने किंवा पिठाने जमिनीवर, भिंतीवर काढलेल्या रेषा व आकृती; गंध, हळदीकुंकू, यांनी भिंतीवर काढलेली आकृती : 'कणा, रांगोळी, फुलवरा आरतीचा थाट ..' - माजी १५. २. रांगोळीची भुकी, पूड. ३. धान्याची घातलेली लांबट रास, ओळ, रांग.

**कणा** पु. लुगडे नेसताना स्त्रिया प्रथम लुगड्याचा घेतात तो वेढा. [क. कणय = कमरेभोवती वस्त्राची गाठ]

**कणा** पु. पिंपळी नावाची वनस्पती. [सं.]

**कणा** पु. (सोनारी) अंगठी वगैरेंना वाटोळा आकार द्यावयाचे एक हत्यार; कण. [क.]

**कणाक** न. कळक; बांबू.(कु.) [क. कण]

**कणाणी** स्त्री. कणकणी; धडकी; दहशत :'कीं भयाची बैसली कणाणी। वदनीं खिळी पडियेली।' -कृमुरा १४.२४.[सं. कण् = शब्द करणे; वेदना]

**कणावणे** सक्रि. घोटणे. (गो.रूप) कणावचे.

**कणावेढा** पु. पिंपळी नावाची वनस्पती.

**कणाश्म** पु. (पुरा.) इमारती बांधण्याचा दगड. यातील घटक पदार्थांचे कण वेगळाले दिसतात.

**कणाळी** स्त्री. १. (पोत्याला भोक पडले असता त्यातून गळणारी) धान्याची धार; ओळ. २. (पाटातून वाहणारा) पाण्याचा प्रवाह. (क्रि. लागणे, पडणे.) [सं. कण+आवली]

**कणिकनीती** स्त्री. कणिक ऋषीने धृतराष्ट्राला सांगितलेली कुटिल राजनीती.

**कणिका** स्त्री. एक विशिष्ट विचार, कल्पना किंवा भावना व्यक्त करणारा सामान्यत: पाच ओळींचा, एक जपानी काव्यप्रकार.(पहिल्या दोन व शेवटच्या दोन ओळी सयमक आणि मधली निर्यमक. उदा. 'तरुवरुनी पडले पिकले फळ खालती। तो गमे शोधनीं शास्त्रज्ञाची मती । परि सहृदय कोणी म्हणे व्यथित होउनी। येईल का हे फळ फिरूनी डकविता। तुटलेली प्रीती येइल का सांधता?' - गोपीनाथ तळवलकर.)

**कणिका** स्त्री. १. अतिसूक्ष्म कण, अंश (धान्य, तूप वगैरेचा) :'बीजकणिका तरी घनवट।' - ज्ञा ७.५५. २. (सामा.) तूप, साखर इत्यादीची कणी; कण. (सामा. अनेकवचनी प्रयोग) :'जैशा घृताचिया कणिका।'- एभा २.६४२. [सं.]

**कणिकायन** न. बारीक, रवाळ होण्याची क्रिया; घनपदार्थांचे छोट्या छोट्या कणांमध्ये रूपांतर होण्याची क्रिया; अंकुरोद्भवन.

**कणिका सिद्धांत** (भौ.) प्रकाश हा कणांचा प्रवाह असतो हा सिद्धांत.

**कणिकि-की** स्त्री. कणीक; गव्हाचे पीठ.

**कणि-णी कोंडा** पु. कणिकूट; तांदूळ, डाळ वगैरे कांडून पाखडून राहतो तो गाळ; चुरी; कण्या व कोंडा.

**कणिया** पहा : **कणा**

**कणियारे** वि. कणीदार, कणदार.

**कणिश** पु. (वन.) १. लांबट अक्षावर बिनदेठाची फुले असलेला अकुंठित फुलोरा. उदा. आघाडा. २. फांदीच्या टोकाशी असलेला बिजुकपर्णांचा झुबका.

**कणिंग-ज** स्त्री. १. कणगी :'बीजें कणिंग असे भरली।' - एभा १०.११०. २. कणगर. पहा : **कणंग**

**कणी** स्त्री. १. फुटका अंश; भाग (धान्य वगैरेचा). पहा: **कण.** २. भात शिजल्यावर त्यात राहिलेला कच्चा तांदळाचा अंश; शिजलेल्या अन्नातील कच्चा अंश. ३. पातळ भाजी इत्यादीला लावतात ते पीठ. (राजा.) ४. (अनेकवचनी प्रयोग) तूप, मध, साखर इत्यादिकांचा सूक्ष्म अंश. ५. (अव.) शिजलेल्या धान्याचा अंश. ६. रत्नाचा बारीक तुकडा, अंश, कण.[सं. कणिका,गु.] (वा.) **कण्या कण्या करणे** - १. हीनपणा स्वीकारून भीक मागणे. २. लाचारपणे क्षमेची याचना करणे. **कण्या खाऊन मिशीला तूप लावणे** - पोटाला खायला मिळाले नाही तरी बाह्यात: डौल मिरविणे; नसता दिमाख दाखविणे. **कण्या टाकून कोंबडी झुंजविणे** - आपला पैसा वगैरे खर्च करून दुसऱ्या दोघांत कलागत उत्पन्न करून देऊन त्यांच्या भांडणाची मजा पाहणे. **दातांच्या कण्या करणे** - ऐकत नसता एखाद्याला अनेक वेळा उपदेश करणे, सांगणे, पढविणे.

**कणी** स्त्री. डोळ्यातील बाहुली. [सं. कनीनिका]

**कणी** स्त्री. मोहर गळल्यानंतर राहणारी आंब्याच्या फळाची अगदी सुरुवातीची अवस्था.

**कणी** स्त्री. गव्हावर पडणारा एक रोग :'गहू या पिकास तांबेरा, कणी, मर असे रोग होतात.' - सहभाडळी ११८.

**कणीक** स्त्री. गव्हाचे पीठ; आटा. [सं. कणिक = सूक्ष्म कण, गव्हाचे पीठ] (वा.) ० **तिंबणे, कणकीसारखा तिंबणे,** ० **मऊ करणे, नरम करणे** - एखाद्याला खूप मारणे, ठोकणे, झोडपणे, चेंदामेंदा करणे (पोळी वगैरे करण्यासाठी कणीक खूप मळून मऊ करावी लागते त्यावरून) :'अशा रितीने विश्वामित्राची चांगली कणीक तिंबली....' - नाकु ३.६१. **कणकेत मीठ** - (कणीक भिजवताना) त्यात थोडे मीठ घातले असता अधिकच चव येते यावरून) ओळखू न येईल इतका दुसऱ्याच्या संपत्तीचा अपहार.

**कणी कापणे** पसार होणे :'म्हातारीने सुममध्ये मागच्या दारामधून कधी कणी कापली हे मला समजलंच नाही.' - वासू ५८.

**कणीकूट - कोंडा** न. पु. भात कांडून झाल्यावर तांदळाखेरीज राहिलेल्या कण्या व तूस; धान्यांश :'घरात असेल तोच कणीकोंडा घालून वेळच्या वेळी मुखात पडेल याची काळजी ती नेहमी घेते.' - व्यंमाक

**कणीदार** वि. १. कण्या असलेले. २. रवाळ; स्पष्ट दिसणारा पहा : **कणदार**

**कणीय** वि. अतिसूक्ष्म कणांमध्ये अस्तित्वात असणारे.

**कणीय पोत** (भूशा.) (खडकांची, जमिनीची) रवाळ बनावट; ज्या खडकामधील सर्व खनिजकणांचे आकारमान साधारणत: (सापेक्षत:) समान असते असा खडक.

**कणीस** न. गाडीच्या चाकात शिरलेला कण्याचा भाग.

**कणीस** न. १. (ज्वारी, बाजरी, मका इ.चा) दाणे, धान्य भरलेला, धान्याचा तुरा; गुच्छ; भुट्टा.( क्रि. निसवणे, पसवणे.) २. केतकीच्या झाडाला येणारा तुरा, पुष्प, केवड्याचा गुच्छ. ३. (जिला पुढे नारळ धरतात ती) नारळाची पोय; शेरणी. ४. उसाचे वाढे, तुरा :'ऊस सांडूनि मागती। कणीस त्याचें।' - एभा २१.३३९. [सं. कणिश]

**कणीस** न. कुरड्या करण्याकरिता शिजवलेले व मळलेले तांदळाचे पीठ. हे सोऱ्यात दाबून त्याच्या कुरड्या पाडतात.

**कणीस पागोरा** (व्यापक) जोंधळा, बाजरी वगैरेचे कणीस. (क्रि. येणे, तोडणे, मोडणे.)

**कणुरली** स्त्री. एक पक्षी : 'कणुरली गात होती.' - आआशे ३४१.

**कणुरा** पु. कणी; बारीक कण; सूक्ष्म अंश : 'हिम कणुऱ्यापाठीं। लागतु दीसती।' - शिव ६४१. [सं. कण]

**कणू** न. कण; अंश. [सं. कण]

**कणेकड** न. रहाटगाडग्याच्या चाकाचा कणा. रूख व तोरण यांवर कणेकड फिरत असते. (को.) (वा.) **कणेकडाचे खापेकड करणे** - (एखाद्या मोठ्या लाकडाचे कणेकड करावे म्हणून ते ताशीत असताना त्याचे खापेकडाच्या आकाराचे तुकडे करणे.) एखादी मोठी गोष्ट सुधारायचा प्रयत्न करीत असता उलट ती अधिक बिघडविणे.

**कणेची बाहुली** रहाटाचा किंवा मोटेचा कणा ज्या खांबांवर टेकलेला असतो आणि फिरतो ते दोन खांब.

**कणे(ण्हे)र-री, कणैरी** पु. स्त्री. तांबडी किंवा पांढरी फुले येणारे एक झाड. याची फुले एकेरी, दुहेरी, तिहेरी पाकळीची असतात. पिवळी फुले असणाराही एक कण्हेर आहे. याची फुले घंटेच्या आकाराची असतात. न. कणेर; कण्हेरीचे फूल. [सं. कणेर, कर्णिकार]

**कणेर** पु. कंडेसर पक्षी. (को.)

**कणे(ण्हे)रा** वि. १. कण्या फार असलेला (सडलेला तांदूळ). २. कण्यांचा (भात).

**कणेरा** वि. लाल किंवा काळे अंग असून त्यावर पांढरे पट्टे असलेले (कापड); लुगड्याची एक तऱ्हा. पहा : **कणेरी लुगडे**

**कणे(ण्हे)रा-री** पु. स्त्री. १. कण्या शिजवून पातळ पिण्याजोगे केलेले पेय. २. तांदूळ धुऊन, भाजून, वाटून ते पीठ पाण्याला लावून पातळ, पिण्याजोगी केलेली लापशी, मंड. ही आजारी माणसाला देतात. पेज; कांजी. [सं. कण]

**कणेरान** न. (खाटिक) कंबर व त्या भागातील मांस.

**कणेरी केळ** एका जातीची केळ. पहा : **कण्हेरपात**

**कणेवाल** स्त्री. एक वनस्पती. (गो.)

**कणो** पु. गव्हाचा जाड रवा; गरा. (गो.) [सं. कण]

**कणोठा** पु. कणा : 'त्याचा कणोठाच मोडला होता.' - श्रीयो १.६८.

**कणोर, कणवर** पु. डाळीची चुरी, कण, कळणा. [सं. कण]

**कण्ण** न. मुगाची किंवा मुगाच्या डाळीची केलेली गोड कांजी. (गो.) [सं. कण]

**कण्णी** स्त्री. लहान करंडा : 'मंगेशाचे देवठाण सोन्याची कण्णी।' - लोक शब्द ४७.

**कण्णेवचे** अक्रि. निरुपयोगी गवत काढून टाकणे. (गो.)

**कण्या** स्त्री. अव. तांदूळ, जोंधळा, बाजरी वगैरे धान्य भरड दळून ते शिजवून केलेले पक्वान्न; कण्यांचे अन्न : 'कण्या विदुरमंदिरीं म्हणति साधु आस्वादिल्या।' - केका ३८.

**कण्ह** पु. विव्हळणे : 'त्या किंकाळ्या, तो पळ, तो कण्ह ....' -सख ६०२.

**कण्हणे** अक्रि. वेदनेने विव्हळल्यासारखा आवाज काढणे; विवळणे : 'एक कुथितु पडवंतु। एक सेकसीतु कंण्हतु।' - शिव १०५७. पहा : **कणणे** [सं.कण]

**कण्हा** पहा : **कण्ह** : 'साप बेडकांना गिळीत होते आणि त्यांचा शेवटचा कण्हा अंधार कापीत येत होता.' - आआशे ३७७.

**कण्हाणे** क्रि. कण्हणे : 'कुंठत करूआत : एक कसकसीत कण्हात :' - शिव १०५६.

**कण्ही** स्त्री. (शेती) उसावरील एक रोग.

**कण्हेरपात** स्त्री. केळीची एक जात. हिचे केळे मधुर असून त्याचा गीर ऊन भाकरीवर वितळतो.

**कण्हेरी गाणे** अक्रि. रडणे; केकाटणे; किरकिरणे; बारीक आवाजात रडणे.

**कतक** न. एक दागिना; पदक.

**कतक** पु. एक झाड; निवळी; कासविंदा : 'अतिसहवासि वच मना कतक कलुषिता वना निवळवील।' - मोविराट ३.१६. [सं.]

**कतकपिठी** स्त्री. निवळीच्या बियांचे चूर्ण. याने गढूळ पाणी स्वच्छ होते : 'उदकीं न घालितां कतकपिठी।' - रंयो १०.६८३.

**कतगुता-गूत्ता** पु. ठरावीक वसुलीच्या बोलीने दिलेली जमिनीची मालकी. यात वसुलीचा दर नेहमीपेक्षा कमी असतो. [त.कत्तु गुत्तागई]

**कतण** न. देऊळ.

**कतबा, कताबत-ती** पु. स्त्री. १. करारपत्र; पंचायतीपुढे दिलेली कैफियत, लेख. आमचे म्हणणे खोटे ठरले तर आम्ही अपराधी होऊ असे वादी - प्रतिवादी या जबानीत प्रतिज्ञापूर्वक लिहून देतात. २. ऋणपत्र; कर्जरोखा. ३. लेख; करारनामा; कबुलायत : 'तुमच्या चाकरापासून कतबे घेतले आहेत की तुम्हांकडे चाकरीस जाऊं नये; त्यास ते कतबे तुमचे तुम्हांस देऊं.' - मइसा ८.१७८. [फा. किताब, किताबत]

**कतबाड** लहान मुले. (अहि.)

**कतरण** स्त्री. १. कातरलेले तुकडे; कात्रण; सडका भाग कापून काढलेले विड्यांच्या पानांचे तुकडे. २. पुस्तक-बांधणीत कडा कापून टाकताना निघालेला कागदाचा चुरा. [सं. कृत्, कर्तित]

**कतरणी** स्त्री. कातरी. (माळवी) [सं. कृत्]

**कतरणी** स्त्री. १. कातरा; चुरा : 'डेक्कन साबणाच्या कतरणी पिशव्या.' - त्रिकाळ १५.१०.३२. २. कापणी; कातरण्याची क्रिया. [सं. कर्तन]

**कतरणे** अक्रि. निघून जाणे; उठून जाणे; कटणे; नाहीसे होणे. [सं. कृत्]

**कतरणे** अक्रि. त्रासणे; कावणे : 'मास्तर कतरून ओरडले.' - वळीव ११.

**कतरणे** सक्रि. कातरणे; चुरा करणे. [सं. कर्तरी]

**कतरबेत** पु. १. काटकसर; मितव्यय; छाटाछाट. २. उचलेगिरी; खिसेकातरूपणा. ३. ठाकठिकी; टापटीप; सुव्यवस्था.

**कतरबेती** वि. १. काटकसरी; मितव्ययी. २. उचलेपणा करणारा; खिसेकापू. ३. नीटनेटका; ठाकठिकीचा.

**कतरभेद** पु. अव. १. शक्कल; क्लृप्त्या; डावपेच; युक्त्या; लबाड्या. २. लष्करी डावपेच; गनिमी कावे; सेनापतीने सैन्यामार्फत दाखविलेल्या हुलकावण्या.

**कतरा** पु. केरकचरा; अडगळ. (बे.) पहा : **कतरण**

**कतरून** क्रिवि. दाबून : 'चार डाव कतरून जेवलं की, तापबीप सगळं पळत्यात.' - भेटीगाठी ३३.

**कतर्वी** पु. प्रभु, धनी.

**कतल** पहा : **कत्तल** [अर.]

**कतलाम** स्त्री. सर्रास कत्तल; काटाकाट; कापाकापी; बिजन : 'त्यास दीडप्रहर लूट व कतलाम जाली.' - मइसा १.१११.[फा. कतल् - इ- आम]

**कतली** स्त्री. 'असट गरगटल्या पालाभाजीचा रबडा.'-(तंजा.)

**कतव(वा)र** न. १. सैन्यातील बाजारबुणगे, सामानसुमान वगैरे लेंढार. २. कातवार लमाणासारखी लष्कराला धान्य पुरविणारी, बैलांचे तांडे पाळणारी एक जात; बिनलढाऊ लोक : 'किल्ल्यात कतवार असेल ते दूर करावे.' - पेदभा २९.१५१. ३. (ल.) जनसमुदाय; मेळा; थवा (उडाण टप्पू, तमासगीर, रिकामटेकडे, गप्पा मारणारे वगैरे लोकांचा). ४. केरकचरा; गदळमाती; गवत. ५. अडगळ; निरुपयोगी वस्तू. [हिं. कत्वार]

**क(कं)तान** न. तागाचे कापड; कॅन्व्हसचे कापड. [फा. कत्तान]

**कतार - रा** स्त्री. पु. १. रांग; ओळ (विशेषत: उंटांची) : 'बारा हजार बाणांची कतार.' - ऐपो १०६. २. रांग; ओळ; श्रेणी (डोंगरांची). [फा. कतार] (वा.) ० **बनो** (संघव्यायाम) कवाईत करणाऱ्यांना लहान लहान टोळ्या करण्याबद्दलचा हुकूम.

**कति** स्त्री. वतनी किंवा इनामाची जमीन.

**कतिपय** वि. कित्येक; अनेक : 'साड्याहि नौपटीच्या कतिपय लुगडीं जै नवे पांजणीचीं।' - सारुह ३.४१. [सं.]

**कती** स्त्री. कट्यार : 'धगधगीत कतीया लोमावळी थरारिती।' - उह १३९४.

**कतेरा** पु. झाडापासून निघणारा एक प्रकारचा गोंद, डिंक.[हिं. कतीरा]

**कत्तर (खाणे, देणे)** भोवऱ्याच्या खेळात भोवरा उभा सरळ न फिरता त्याचे तिरप्या कडेवर फिरत राहणे. [सं. कर्तरी]

**कत्तल, कत्ल** स्त्री. १. हिंसा; लढाईत होणारी माणसांची कापाकापी; छाटाछाटी; बिजन. (क्रि. करणे, उडविणे): '-कतलेमध्ये तीनचार लक्ष माणसे कत्तल झाली. - मइसा ६.२४७. २. सरसकट नाश; विध्वंस; एकजात मोडतोड (झाडे, इमारती इत्यादिकांची).३. मोहरमच्या दहाव्या दिवशी मुसलमान फकीर आचरतात ते विधी. [फा. कत्ल]

**कत्तलखाना** पु. जेथे बकरी इ. जनावरे मारून त्यांचे मांस विकले जाते ती जागा; खाटीकखाना : 'कत्तलखाने गांवाबाहेर नेणे हें आरोग्याच्या दृष्टीनें आवश्यक आहे.' - के २४.६.३०.

**कत्तलची रात्र** १. मोहरमच्या दहाव्या तारखेची रात्र (या रात्री अलीचे मुलगे मेले यावरून). २. आणीबाणीची वेळ; एखाद्या महत्त्वाच्या गोष्टीचा निकाल लागण्याचा दिवस; ऐन घाईची, गर्दीची वेळ; लग्नघाई. ३. (ल.) काटाकाटी; कापाकापी.

**कत्तलबाज** वि. हिंसाप्रिय; रुधिरप्रिय; कत्तल करणारा.[फा. कत्लबाज]

**कत्ती** स्त्री. कोयता; तरवार. [सं. कृत्] [क. कत्ति]

**कत्थक** पु. भारतातील चार शास्त्रीय नृत्यसंप्रदायातील एक. एखादी कथा सांगणारा नृत्यप्रकार. [सं. कत्थ् = वाखाणणे]

**कत्थन** न. बडबड; वृथा बोल : 'कर्णा! उगा, उगा रे! किती कत्थन? हें न ऐकवें कानें।' - मोकर्ण २५.१७. [सं. कत्थन = बढाई]

**क(कं)त्रेल** न. भिंतीतील फडताळ; दुलाब. (कु. गो.) [पोर्तु. कांतारीरा]

**कत्ला** पु. मासोळीची एक जात. (झाडी)

**कत्ली** स्त्री. १. बोरकढी. २ टकळी. ३. जर्मनी भांडे. (झाडी)

**कत्ल्या** पु. जनावरांना होणारा एक रोग. (झाडी) [सं. कस्तीर]

**कत्वार** न. मेळा; थवा; लेंढार. (व.) पहा : **कतवर** [हिं.]

**कथ** क्रिवि. कोठे.(खा.) [सं. कुत्र]

**कथ** पु. कद; ऐपत; हिंमत.

**कथक** पु. १. पुराणिक; कथेकरी; गोष्टी सांगणारा. २. कथन करणारा; सांगणारा. [सं. कथ्]

**कथज्या** क्रिवि. कोठे. (बागलाणी) पहा : **कथ**

**कथड्या** वि. (निंदाव्यं.) कथा करणारा (हरदास, संत इ.).[सं. कथा]

**कथणे** उक्रि. १. सांगणे; निवेदन करणे; वर्णन करणे; तपशीलवार गोष्ट सांगणे : 'तैसेचि मातें विश्वीं कथित। कथितेनि तोषें कथूं विसरत॥' - ज्ञा १०.१२८. २. पद्यरूपात सांगणे; गाणे.[सं. कथ्] (वा.) **कथून ठेवणे, कथणे** - भविष्य सांगणे; गोष्ट घडण्यापूर्वीच सांगून ठेवणे.

**कथन** न. १. सांगणे; निवेदन करणे; निरूपण करणे. (क्रि. करणे.) : 'ते झडकरी कथन करी। मजप्रती॥' - ज्ञा १.८७. २. आख्यान; गोष्ट; हकीगत; वृत्तांत. [सं.]

**कंथना** स्त्री. गप्पा; थापा; बाता : 'बहिणी म्हणे मज दिसती कथना। जोवरी न मना अनुताप।' - ब ५१३. [सं. कत्थना]

**कथनात्मक** वि. १. सांगण्यासारखे (कथा, गोष्ट, हकीगत). २. वर्णनात्मक; ज्यात नुसते वर्णन, हकीगत लिहायची असते असा (निबंध). [सं.]

**कथमपी** क्रिवि.कदाचित : 'जरी कथमपी मागीले कडौनि धावणे येइल : तरि वोखटें की।' - पंचो १३८.१४.

**कथरी** स्त्री. एक प्रकारची ढाल. (गो.)

**कथला-ळा** पु. भांडण; तंटा; हरकत; कटकट; भानगड : 'तुवा पुरंधऱ्यासी उगाच कथला करून उपद्रव देतोस' - पुरंदभा १.५. [क. कोटले = त्रास, दुःख]

**कथला-ली** पु. गुरांना होणारी खरूज, खवडे.

**कथलाकुसूर** स्त्री. किल्ला हरकत; भांडणतंटा : 'जो कोणी कथलाकुसूर करील त्यास गोहत्येचे दोष असत.' - पुरंदभा १.६२.

**कथली** स्त्री. एक प्रकारचा डिंक.

**कथली-ले** स्त्री. न. १. कथलाचे भांडे. २. कथलाच्या तपेल्याच्या आकाराचे पात्र.

वि. कथिलासंबंधी; कथलाचे (भांडे वगैरे).

**क(का)थली** स्त्री. महालक्ष्मीच्या सणाच्या दिवशी पडवळ घालून केलेली कढी. हा शब्द याच दिवशी उपयोगात आणला जातो. (ना.) [सं. क्वथ् = कढणे]

**कथली खरूज** १. जिच्यातून पू वाहत आहे अशी ओली असलेली खरूज. २. (ल.) अति द्वाड, खोडकर मनुष्य २. काळजाला जाऊन झोंबणारे दुःख, पीडा, त्रासदायक गोष्ट.

**कथला-ल्या देवी** स्त्री. मोठ्या फोडाच्या,चिघळणाऱ्या देवी.

**कथली व्याध-व्याधी-पीडा** १. वाहत असलेली गर्मी, उपदंश, बद. २. (ल.) खोडकर, त्रासदायक मनुष्य; मरी, प्लेग, वाखा वगैरे आजार; साथ; व्याधी; पीडा.

**कथले** न. कथलाचे मोठे भांडे; मोठी कथली.

**कथले दु:ख, कथल्या रोग, कथले परमे** उपदंशाचा एक प्रकार. पहा : **कथली व्याध १**

**कथंचित** क्रिवि. १. कसातरी; कोणत्या तरी रीतीने; मोठ्या कष्टाने; प्रयत्नाने. २. कदाचित. पहा : **यथाकथंचित** [सं.]

**कथंबा** केळीचे रोप.(को.)

**कथा** स्त्री. १. गोष्ट; रचलेली गोष्ट; कल्पित गोष्ट; कहाणी : 'कथा बोलूं हे मधुर सुधा धारा।' - र १. २. हकीगत; वर्णन : 'स्मरला स्मरहर भरला कंठ न वदवेचि ते कथा राहो।' - मोसभा १.३३. ३. टाळ, मृदंग, वीणा इ. साधनांनी सांगतात ती देवादिकांचे गुणवर्णन करणारी गोष्ट; कीर्तन; हा एक सार्वजनिक करमणुकीचा, परमार्थ साधनाचा प्रकार आहे. (वा.) ०**बांधणे, रचणे, लिहिणे** - पद्यमय रचनेत चरित्र लिहिणे : 'तथापि बांधेन कथा विचित्रा.' - सारुह १.३०. ० **होणे**- केवळ कथेत राहणे, स्मृतिरूपाने राहणे. ४. केलेले कृत्य; काम ; (पराक्रमाचा) प्रसंग; पराक्रम. ५. (ल.) महत्त्व, वजन, पर्वा, मातब्बरी(मनुष्य, वस्तू वगैरेची), पहा :**किंमत** : 'ती दुसरा ब्रम्हा करील उत्पन्न। मग ऐसियाची कथा कोण।' - नव १६.६८. ६. भाषण; म्हणणे; सांगणे. ७. हकीगत; ग्रंथार्थ; विषय : 'तूं संतस्तवर्नी रतसी। तरी कथेचि से न करिसी।' - ज्ञा ५.१४१. [सं.]

**कथाइती** स्त्री. कथा; आख्यान : 'पढतां श्रीभागवती कथाइती:सभे संचरली वेधवंती' - ऋम ८७.

**कथाईन** क्रिवि. कोठून; कोणीकडून. (खा.) [सं. कुतः +कन]

**कथाकथन** न. १. कीर्तनाच्या प्रारंभीचे कथन. २. आपली किंवा इतर लेखकाची कथा अनेक लोकांसमोर रसभरितपणे सांगणे.

**कथाकली** पु. मुळात केरळातून आलेला एक भारतीय नृत्यप्रकार. कथाकली याचा अर्थ 'नृत्यनाट्य' असा आहे. यात नृत्याच्या द्वारे एखादी कथा सांगितली जाते.

**कथाकार** पु. १. कथालेखक; गोष्टी लिहिणारा. २. कीर्तनकार.

**कथाड्या** वि. (तुच्छतादर्शक) थापाड्या; खोट्या गोष्टी सांगणारा : 'कित्येक भटभिक्षुक, कथाडे ब्राम्हण...' - जोफु २०१.

**कथान, कथानक** न. १. गोष्ट; वृत्तांत; हकीगत; वर्णन. २. नाटक, कादंबरी वगैरेचे संविधानक, विषय : 'धर्मे केला अश्वमेध पूर्ण। तें मज कथान सांगावें॥' - जै १.३७. [सं.]

**कथानुसंधान** न. वृत्तवर्णनाचा संदर्भ, संबंध; गोष्टीची, वृत्ताची संगती. [सं.]

**कथापट** पु.(चित्रपट) पटकथेच्या आधाराने केलेला दृकश्राव्यात्मक आविष्कार.

**कथाप्रसंग** पु. १. गोष्टीचा, संभाषणाचा ओघ. २. गोष्टीतील, वर्णनातील प्रसंग.

**कथाभाग** पु. १. पुराण किंवा इतर ग्रंथातील राजे वगैरेंचे पराक्रम, गोष्टी, चरित्र इ.चे वर्णन ज्यात आहे असा भाग. २. कीर्तनातील आख्यान; कीर्तनाचा विषय. ३. विशिष्ट प्रसंगाचे वर्णन, हकीगत. [सं.]

**कथामृत** न. अमृताप्रमाणे गोड, चित्तरंजन करणारी गोष्ट. पहा : **कथारस** : 'कालिंदिचे जीवन शुद्ध केलें। कथामृताला जग हे भुकेलें।' - वामन-हरिविलास १.२४. [सं.]

**कथारस** पु. १.कथेतील गोडी; कथा सांगण्याची हातोटी; उत्तमप्रकारे अलंकारादिकांनी कथाभाग सजविणे; कथाश्रृंगार. २. साधे भगवद्गुणानुवाद, कीर्तन, कथा (अलंकार इ. सजावटीविरहित).[सं.]

**कथाल** न. कथली; कथलाचे भांडे. (कु.)

**कथालाग** पु. निरूपणाचे सूत्र; धागा : 'हा असो अतिप्रसंगु। न संडी पां कथालागु।' - ज्ञा ५.६६.

**कथालाप** पु. वर्णन; कथा सांगणे ; गप्पा गोष्टी करणे : 'व्यापारांतर टाकुनी तव कथालापासि जे आदरी.' - र ६.

**कथाव** न. गाऱ्हाणे; निंदा. अव. प्रयोग. जसे :- कथावे करणे = गाऱ्हाणी सांगणे, निंदा करणे. (ना.) [सं. कथा]

**कथावस्तु-स्तू** स्त्री. कथानक; गोष्टीतील महत्त्वाच्या अर्थपूर्ण घटना.[सं.]

**कथावार्ता** स्त्री. गप्पा; गोष्टी : 'त्या दोघी महालात बसून परस्पर कथावार्ता करीत होत्या.' - राणी चंद्रावती १६४.

**कथाशेष** वि. कथारूपाने उरलेला; स्मृतिरूपाने अवशिष्ट राहिलेला; सत्कार्याच्या रूपाने ज्याची कथा मात्र राहिली आहे असा; कथेवरूनच ज्याची माहिती मिळते असा (मृत, गत मनुष्य) : 'दुराग्रही प्रवर्तोन योग्यायोग्य कार्य न विचारतां स्वांगे संपादित होत्साता स्थळोस्थळें अपमान पावोन कथाशेष जाहला.' - मराआ ५.

**कथासंदर्भ** पु. भाषणातील पूर्वापार संबंध; वृत्तवर्णनातील संगती. [सं.]

**कथांबा** पु. अंकुर; रोप : 'केळीच्या कथांब्यावर एखादी निष्काळजी लेकुरवाळीण शेणाचे थापे टाकते तशी.' - रात्र काळी ६१.

**कथिका** स्त्री. कढी : 'कथिका वाढिती सुवास।' - वेसीस्व १२.२०१. [सं. क्वथ्]

**कथिका** स्त्री. पुराणकथा; कल्पित वस्तू किंवा व्यक्ती. उदा. गंधर्व, किन्नर, खपुष्प.

**कथित** वि. सांगितलेले; वर्णिलेले (वृत्त, हकीगत वगैरे). [सं.]

**कथि(थी)ल** न. १. (रसा.) एक पांढरे चकचकीत धातुरूप मूलद्रव्य. तांब्या पितळेच्या भांड्यातील आंबट-खारट पदार्थामुळे पदार्थ वा भांडे कळकू नये म्हणून ज्याच्या साहाय्याने कल्हई केली जाते असा मऊ, ठिसूळ व वितळला जाणारा धातू. भांड्यास डाग देण्यासाठीही याचा उपयोग केला जातो : 'का कथलाचे कीजे रूपे। रसभावनी॥' - ज्ञा १८.७७. याचे खुरक व मिश्रक असे भेद आहेत.[सं.कस्तीर] (वा.) ० **कुटणे** - काथ्याकूट करणे; व्यर्थ बडबडणे.

**कथीलकुट्या** १. कथलाचे काम करणारा. २. (ल.) वृथा बडबड करणारा; कथ्याकुट्या. ३.(निंदाव्यं.) सोनार.

**कथीलकूट** न. (ल.) काथ्याकूट; गप्पाष्टक; रिकाम्या गप्पा.

**कथुली** स्त्री. लहान गोष्ट.

**कथेकरी, कथी** पु. १. कथा करणारा; हरदास; कीर्तन करणारा. २. गोष्टी सांगणारा.
**कथेलागी** वि.१. कीर्तनाचा शौकी. २. कीर्तनाला उपयुक्त. (वाद्य, गवई इ.)
**कथ्थक** पहा : **कत्थक** : '१९१५ - १६ सालापासून गवई, तंतुवाद्यकार व कथ्थक यांच्या परीक्षा चालू राहिल्या आहेत!' - कला (बडोदे) ९.
**कथ्य** वि. कथनीय; सांगण्याला, बोलण्याला,निवेदन करण्याला योग्य (गोष्ट, हकीगत इ.). [सं.]
**कद** पु. सोवळ्यात नेसायचे रेशमी वस्त्र; रेशमी मुकटा; जरीकाठी, रुईफुलकाठी, बिनकाठी व साधा असे कदाचे प्रकार आहेत. कद स्त्रिया व पुरुष यांसाठी असा दोन्ही प्रकारचा असतो.[सं.कदक]
**कद** स्त्री. १. किंमत; लायकी; महत्त्व; वजन : 'कार्कुनाची कद किती?' - होकै ४४. २. बांधणी; उंची; उभार; आकार; ठेवण; अंगलट : 'औलादीची कद मादीचे कदीप्रमाणें बहुत करून होते.' - अश्वप १.१४२. ३.जाडी; भरीवपणा; घनता. (क्रि. धरणे, सोडणे.) [फा. कद = ठेवण, बांधा] (वा.) ० **जिरविणे, मोडणे** - (एखाद्याचा) ताठा, अहंता, मीपणा झाडणे, उतरविणे. ० **पाहणे** - कस पाहणे; किंमत करणे; पाणी जोखणे; योग्यता ठरविणे.
**कद** स्त्री. गोणीचे दोन भाग जोडणारा पट्टा किंवा दोन भाग जोडणारी शिवण. [फा. कद = ठेवण, बांधा]
**क(कं)दन** न. १. नाश; कत्तल; संहार; हत्या; वध : 'जुंझती त्यांचे करूनि कंदन।' - मु ३३; 'एकचि झाला हाहाकार। कदन करितां लोटला पूर।' - नव १७.८८ २. युद्ध; लढाई : 'पृथ्वी तेचि उखळ जाण। नांगरें वीर घाली वैरण। मुसळघायें करी चूर्ण। रणकंदन मांडिलें॥' - एरुस्व १०.६०. [सं. कद्, कंद्]
**कदन-न्न** न. १. वाईट, जाडेभरडे, हलके अन्न; निःसत्त्व अन्न : 'कदन्नासि देखतां नयनी। कुसुमुसुनी खातसे॥' - सवि ८.३३. २. दानासाठी किंवा हवनासाठी अयोग्य अन्न (घृतादिरहित हरीक, राळा इ.). [सं. कद् = कुत्सित + अन्न]
**कदपत्य** न. वाईट मूल.
**कदपस** पु. घोड्याला होणारा एक रोग. यामुळे पावसाळ्यात घोड्याच्या गुडघ्यावर फोड येतात. यावर एरंडीचे बी गाईच्या जुन्या तुपात वाटून लावतात. - अश्वप २.२९०.
**कदम** पहा : **कदंब**
**कदम** पु. १. पाय; पाऊल : 'आमचे दिलात रावसाहेबांचे कदम पाहवयाची उमेद बहुत आहे.' - मइसा १.६४. २. चालताना दोन पावलात राहणारे अंतर (सुमारे अडीच फूट). ३. मोजणीचे एक माप. ४. (ल.) शिरकाव; प्रवेश : 'पातशाहीत त्याचा कदम न शिरावा हें आहेच.' - दिमरा १.३६. ५. चालरीत; वागणूक; वर्तणूक. [फा.]
**कदम कसती** पायी चालणे : 'उभयतां कदम कसतीनी जागा चालून उभयतां बंधूच्या भेटी झाल्यानंतर खंड्या कुत्र्याच्या पालखीपुढें जिलीब शाहजणें नगारे निशाणें चाललीं.' - शाहूब भारतवर्ष ५४. [फा.]
**कदम चस्पी** पादस्पर्श. [फा.]
**कदमबोस** वि. पायाचे चुंबन घेणारा; अत्यंत नम्र : 'प्रथमदर्शनी मोगलअल्ली नबाबापाशी येतांच कदमबोस झाले.' - मइसा ५.१९१. [फा.]
**कदमबोसी** स्त्री. पादस्पर्श; पायांचे चुंबन; नमस्कार; प्रणाम; वंदन.[फा.]
**कदममुलाजा** पु. पाय धरणे; नमस्कार करणे.
**कदमी** स्त्री. मध्यस्थी; कोणत्याही कामात पाऊल टाकण्याबद्दलची बिदागी; भलाई करण्याबद्दल शुल्क : 'पेशव्यांनी निमे रूपये कदमी घेतली आहे.' - मइसा ६.२३.
**कदर** स्त्री. १. किंमत; शक्ती; प्रभाव; पर्वा; हिंमत; फिकीर. २. तब्येत; प्रकृती; स्वभाव (विशेषतः कडक, वाईट, अहितकारक, निष्ठुर इ.) : 'आदरेंकरून विनवितां कदर कां कठीण करिता तुम्ही।' - प्रला १२१. ३. ठराव; करार; अधिकार : 'आपणांकडे फौजेचे बेगमीस सरंजाम कदर करून दिला.' - समारो १.१५५. ४. धनीपणाचा डौल; अम्मल चालविण्याचा स्वभाव; वचक; हुकमत; धाक; जरब; शिस्त; दरारा : 'नानाची कदर (मुत्सद्दी म्हणून) मोठी होती.' - नि १००९. ५. गुणांची पारख; आवड; बूज : 'त्याचा उद्देश लायकीची कदर करून चांगल्या गोष्टीला उत्तेजन देणे हाच होय.' - सगामा २.[फा. कद्र = किंमत, महत्त्व] (वा.) ० **करणे** - चीज करणे; महत्त्व समजून वागणे. ० **काढणे, सोसणे** - त्रास सहन करणे; मर्जी, तब्येत सांभाळणे (रागीट किंवा आजारी मनुष्य, धनी, मूल वगैरेंची). ० **खाणे** - जरब खाणे; भीती वाटणे.
**कदर** पु. कंटाळा : 'म्हणे थोर अवघड नीउन: कदरू नेघे मन' - ज्ञाप्र ८७७.
**कदरणे** अक्रि. १. त्रासणे; दमणे; थकणे; वैतागणे : 'तुम्ही कितीही कावला, कदरला, हताश झाला तरी ...' - दिवाकरदृष्टि २७. २. कंटाळा करणे; निरुत्साहित होणे : 'परि हे आइकौनि झने। कदरसी हो मनें।' - ज्ञा १६.२६५.
**कदरदान** वि. योग्यता जाणणारा; गुणग्राही; पारख करणारा; चाहता : 'कैलासवासी महाराज हे मनुष्याचे कदरदान होते.' - विक्षिप्त २.५०. [फा. कद्र+दान]
**कदरदानी** स्त्री. गुणग्राहकता; पारख : 'जें त्यांचे खावंदगिरीस व कदरदानीस उचित तेंच करितील.' - मइसा ३.१२०. [फा. कद्र+दानी]
**कदरबंदी** स्त्री. निष्ठा; शिस्त : 'सर्व प्रकारें नफा किफायत सरकारची व्हावी अशी ज्याची कदरबंदी त्याचें करणे त्याच धोरणावर अनुक्रमें चालत असते.' - मशियांका ४८९.
**कदर्थणे** अक्रि. १. कष्टी करणे; गांजणे; संकटात घालणे : 'आतां पराजयें राजा। जैसा कदर्थिजे लाजा।' - ज्ञा १६.१७५. २. कासावीस होणे; कष्टी होणे : 'इये हिंसेचे भेण। तेथ कदर्थिलें प्राण।' - ज्ञा १३.२३६. [सं. कदर्थन = पीडा, हाल करणे]
**कदर्य** न. कदान्न; आंबलेले, विटलेले अन्न : 'कदर्यावर बैसली माशी। ते उडवितांही न उडे जैसी। गुंतोनी राहे तियें रशीं। रुचीचिया चाढा॥' - ज्ञाप्र ७१०. [सं. कदर्य = क्षुद्र, अप्रिय]
**कदर्य-र्यू** वि. कृपण; कंजूष; चिक्कू : 'समर्यी सारथ्यगुणा नुघडूनि कदर्युचा न डेरा हो।' - मोविराट ३.१९. [सं. कदर्य = कृपण]
**कदल** न. केळे; केळीचे, कदलीचे फळ. [सं.]

**कदलणे** अक्रि. (दुफाशी सोंगट्यांच्या खेळात) सोंगट्या जुगल्यानंतर बेती, बारा वगैरे जुगदान खेळणे. पहा : **कदली**

**कदलणे** अक्रि. खर्चणे; घालविणे; गमाविणे (वेळ).[क. कडयिसु, कदालिसु = घालविणे, हालविणे]

**कदलबाश** पु. कझरबाश; एक प्रकारची लाल टोपी घालणारे इराणी सैन्यातील कडवे शिपाई : "... पाचसात हजार कदलबाश वगैरे खंडेरायाबराबर देऊन ..' - हिंगणे दभा २.९.

**कदली** स्त्री. (दुफाशी खेळातील) बारा, बेती, दुक्की, आठ वगैरे जुगदान.

**कद(दे)ली** स्त्री. केळ; केळीचे झाड. [सं.]

**कदलीरूप** वि. (वन.) ओषधीय (नरम), हिरवे, मोठे खोड व ज्याला अनेक पानांचे आवरण आहे असे आवरक तळ - या प्रकारची रचना असलेले (झाड); केळीच्या झाडाप्रमाणे स्वरूप असलेले (झाड).

**कदलीवन** केळीचे पान : 'एकी घातली कदलीवने: एकी पोमिणीची पाने' - उह २१२.

**कदवा** पु. करारनामा. पहा : **कतबा**

**कदळी** स्त्री. केळीचे झाड : 'ना तरी कदळीचा गाभा। बूथि सांड्रनु उभा।' - ज्ञा ६.२९५.

**कदळीदंड** पु. केळीचा खांब : 'सुंदर्येवनीचे कदळीदंड :तैसे सैंग पाय सपिंड' - ज्ञाप्र ४२७.

**कदंड** पु. घोर, कठोर, शिक्षा : 'दंडु करितां कदंडीं। आंग देईन॥' - गीता १.७०. [सं. कु+दंड]

**कदंब** पु. ओघळ : 'पिळिलेयां चंद्रबिंब। सुटति अमृतधारांचे कदंब।' - उगी ३.३०. [सं.]

**कदंब** पु. १. नारिंगी रंगाची पालवी येणारा एक वृक्ष; कळंब : 'तूंचि मूळ प्राणारंभा। विश्वकदंबा जीवन तूं॥' - एरुस्व ६.९४. २. मोहरीचे झाड; मोहरीचा दाणा. [सं.]

**कदंब** पु. समुदाय : 'जेथ तो श्रीवल्लभु। जेथ भक्तकदंबु।' - ज्ञा १८.१६५८. [सं.]

**कदंब** पु. पृथ्वीचे ध्रुव ज्या बिंदूभोवती फिरतात तो बिंदू. [सं.]

**कदंबक** पु. घोड्याच्या पायाला होणारा एक रोग. - अश्वप २.३८.

**कदंबभ्रमवृत्त** न. ध्रुववृत्त. पहा : **कदंब**

**कदंबसूत्रीय भोग** नक्षत्रांचे एका विशिष्ट स्थिर बिंदूपासून अंशात्मक अंतर; नक्षत्रांचे अंश.

**कदंबिनी** स्त्री. १. स्त्री; सखी. २. कदंबाचे फूल : 'कदंबिनी घालिती मुकुटीं।' - शिव ७८४. [सं.]

**कदा** क्रिवि. १. केव्हा; कोणत्या वेळी : 'कदा नेणो वोढी शरधिंतुनि काढी शर कदा।' - र ३. २. केव्हाही : 'मायानिवर्तक ब्रम्हज्ञान । तयांसही जाण कदा नुपजे॥' - एभा २.४६२. [सं.]

**कदाक** क्रिवि. कदाचित : 'कदाक भेटीची अपेक्षा असली तरी धर्मपुरीस घडेल.' - धापइसा ३.२५३.

**कदाकाळा(ळी)चा** वि. अतिशय जुन्या काळातील; प्राचीन; पुरातन; ज्याचा काळ नक्की माहीत नाही असा.

**कदाकाळी, कदानकाळी** क्रिवि. प्राचीन काळी; पूर्वी; मागे; केव्हातरी; क्वचित्प्रसंगी.

**कदाच** पहा : **कदाचित** : '.... कदाच गेले तर स्वारीत घोडी बसावयायोगें नाहीं.' - ऐलेपांम्युप्र १०.

**कदाचार** पु. वाईट वर्तणूक; अपराध; दोष.

**कदाचित, कदांचित, कदाश्चित, कदाचित्पक्षी, कदान** उअ. न जाणो; सहजगत्या; एखादे वेळी; चुकून.
क्रिवि. केव्हातरी; कधीतरी; क्वचित. [सं. कदा+चित्]

**कदान्न** न. नीरस अन्न. पहा : **कदन्न** : 'भावें हें कदान्न खासी त्याचें घरीं।' - तुगा ९३४. [ सं.कद् = वाईट + अन्न]

**कदापर्णी वृक्ष** (वन.) विशिष्ट ऋतूंत किंवा विशिष्ट वेळी ज्याची पाने आपोआप गळून जातात असे झाड; पानझडी वृक्ष.

**कदापि** क्रिवि. १. केव्हाही; कधीही; मुळीच; कोणत्याही वेळी (नाही - निषेधार्थी उपयोग). २. कधी कधी; केव्हा केव्हा : 'कदापि त्या होवोनि अप्सरा। जळद्वारे नेती विवरां। मग भोगिती पुरुषमात्रा। मानवांसी॥' - कथा ६.४.८९. [ सं.]

**कदा पुरणे** अक्रि. कंबक्ती निघणे; दुर्दैव ओढवणे.(व.)

**कदाफुली** शतवार्षिकी लता; एक प्रकारची वेल.

**कदामत** स्त्री. पूर्वापार वहिवाट : 'कामाची कदामत सरकार कैलासवासी होत पावेतो निभली.' -तेप ४२९.

**कदिमी, कदिमाई** स्त्री. जुनेपणा; जुना लौकिक, परंपरा, घरोबा, स्नेह : 'सर्काराचे काम होऊन येईल परंतु तुमचे कदिमीस व निष्ठेस एक प्रकारें दिसेल.' - मइसा १.३३५; 'आपल्या कदिमाईस बोल न लागे तो विचार करणे.' - मइसा ८.११९. [फा. कदीम]

**कदियान** पु. मुसलमान धर्मातील एक पंथ.

**कदीम** पहा : **कदम** : 'जावजी दाभाडे याही त्या प्रांतात कदीम घातला.' - इएमपी ३५.

**कदीम-मी** वि. प्राचीन; पुरातन; जुनापुराणा; फार दिवसांचा (चाकर, वतन, धर्म, वहिवाट इ.) : 'खेंचून वाड्याबाहेर काढले कदीम शिपायाला।' - ऐपो ३९८. [फा. कदीम]

**कदीमल्** अय्याम पुरातन काळापासून : 'कदीमल्अय्याम सेवणी मजकूर याचे पिडी दर पिडी भोगवटा चालिला आहे.' - गोइसा १२. [ फा. कदीमुल्अय्याम]

**कदे** न.पाणी ठेवण्याचे पसरट तोंडाचे मातीचे भांडे. (कु.गो) [फा. कदह् = पेला]

**कदेल** न. खुर्ची. (गो.) [ पोर्तु. कादेरा]

**कदेल-ली, कदेलडाव-दान, कदेलणे** (दुफाशी खेळ) पहा: कदली

**कदेला** पु. जाड गादी.

**कज(जे)लणे**

**कद्दू** पु. दुध्या भोपळा.[ हिं.] (वा.) ० दाखविणे - निराश करणे; अंगठा दाखविणे; वाटाण्याच्या अक्षता लावणे. (ना.)

**कद्दू** स्त्री. एक पालेभाजी. (झाडी)

**कद्धी** क्रिवि. (बायकी) कधीही; केव्हाही; कोणत्याही वेळी; कदापि (नकारार्थी व निश्चयात्मक). जोराने ठासून सांगताना योजतात.

**कद्धी-त्थी** क्रिवि. केव्हा केव्हा :'कद्धीं ते उपवास निर्जळ करी कद्धीं करी पारणा।' - निमा सुभद्राचंपु ३.८४.

**कद्र** पहा : **कदर**

**कद्रू** वि. कृपण; कंजूष; चिक्कू; कदर्यू. [सं. कदर्य]

**कधी** क्रिवि. १. कोणत्या दिवशी; केव्हा : 'येशिल कधि परतून, पाखरा.' - रे. ना.वा. टिळक. पहा : **केव्हा.** २. कोणत्याही वेळी; केव्हाही; नेहमी. [सं. कदा]

**कधीकधी-मधी** क्रिवि. केव्हाकेव्हा; मधूनमधून; एखाद्या वेळी. [सं. कदाचे द्वि.]

**कधी काळी** क्रिवि.कदा काळी; केव्हातरी; कोणत्यातरी वेळी; कितीतरी दिवसांमागे; फार दिवसांनी; क्वचित् प्रसंगी.

**कधीच** क्रिवि. १. पुष्कळ दिवसांपूर्वी; पुष्कळ काळापूर्वी; फार मागे. २. केव्हाही; कद्धी (नकारार्थी प्रयोग).

**कधीचा** वि.१. पूर्वीच्या काळचा; प्राचीन काळचा; फार मागचा. २. केव्हाचा; कोणत्या वेळचा, दिवसाचा. ३. केव्हापासून, फार वेळेपासून.

**कधीतरी** क्रिवि. कोणत्या तरी, या नाही त्या वेळी; केव्हातरी.

**कधी नव(व्ह)त** पूर्वी कधी घडले नसताना; फार क्वचित्प्रसंगी; क्वचित; अपवादात्मक; कधी काळी.

**कधीबधी-मधी, कधीना कधी, कधी नाही कधी** क्रिवि. १. केव्हा केव्हा; प्रसंगोपात्त; अधूनमधून; अनियमितपणे. २. विरळा; क्वचित. [कधीचे द्वि.]

**कधीशीक** क्रिवि. केव्हासा; कोणत्या बरे वेळी (प्रश्नार्थक व नकारार्थी). (कु.)

**कन, कन्** अ. ध्वनिधातूंना लागणारा रीतिदर्शक प्रत्यय; सर्व अनुकरणवाचक शब्दांना लागणारे अव्यय. जसे :- झटकन, पटकन, चटकन. [सं. क्वण][क.कंन्ने]

**कन** शअ. १. कडून; पासून; मुळे (तृतीया विभक्तीचा प्रत्यय). २. जवळ; समीप; निकट. (खा.) [हिं. कने = जवळ, समीप]

**कनई** स्त्री. लहान वटवाघूळ. (झाडी)

**कनक** पु. (वन.) एक प्रकारचा कंद आणि त्याचा वेल. लहान असणाऱ्या या वेलाची पाने लहानशा विड्याच्या पानाएवढी वाटोळी असतात. याच्या कंदास 'कणगर' असेही म्हणतात. हे उपवासाला चालतात. चवीला गोड व पौष्टिक असतात. पहा : कणगर

**कन(न्न)क** वि. कणखर; टणक; कठीण.(व.) [ध्व.]

**कनक** पु. धोतरा नावाची वनस्पती : 'कनकाचिया फळा। आंतु माज बाहेरी मौळा।' - ज्ञा १८.६५८. [सं.]

**कनक** न. १. सोने; एक मौल्यवान धातू. याचे दागिने करतात : 'लोहाचे कनक होये।' - ज्ञा १.७७. २. संपत्ती; वैभव. [सं.]

**कनक** वि. पिवळे; पिवळ्या रंगाचे; जरतारी (वस्त्र वगैरे) : 'स्ववदनें वदिजे कनकांबरें।' - वामन, हरिविलास ६.१९. [सं.]

**कनककीट** पु. काजवा : 'कनककीट तो सर्व मी रवी। म्हणुनियां तमीं गर्व मीरवी।' - वामन विराट ७.१३७. [सं.]

**कनकचंपक** पु. सोनचाफा : 'तो कनकचंपकाचा कळा।' - ज्ञा ६.२५७. [सं.]

**कनक(का)ट-ड** न.चढण्याकरिता उपयोगात आणायचा बांबू; कळक. (कु.)

**कनकदंडा** पु. सोनेरी मुठीची चवरी : 'कनकदंडे लक्षवरी ढळती।' - मधूप १७.

**कनकधार** स्त्री. सुवर्णपात्र.

**कनकधार-रा** स्त्री. पिचकारीतून बाहेर पडणारी चिरकांडी.

**कनक नारायण** अतिशय श्रीमंत माणूस.

**कनकनिती** वि. शीतळ: 'ते घडूनि अरूवार : कनकनिती उभिलें सेजार' - शिव ७९७.

**कनकनीत** वि. कणकणीत; कणयुक्त; कणांचे : 'ते घडौनि अरूवारू। कनकनीतु उभिलें सेजारूं। तेथ विरहोज्वरां उपच्यारू। मानिती ना।।' - शिव ७९८.

**कनकपर्येळ** सोनेरी ताट : 'तेव्हेळीं कनकपर्येळ घेउनी। वोवाळीतसे रुक्मिणी।' - उह २२५२.

**कनकपाट** पु. सोनेरी वस्त्र : 'आचार्या भीतरीं आला : तेणें कनकपाट पासोडिला' - उह २२५०.

**कनक-खा** पु. १. तापट स्वभाव; कडकपणा; जलालपणा (प्रकृतीचा). २. कडका; कडाका; जोर; (थंडी, वारा, पाऊस वगैरेचा). (क्रि. पडणे, सुटणे, चालणे.) ३. दणका; धक्का; ठोसा; बुक्का. (व.)[ध्व.]

**कनकाग्रा** वि. फाजील उंच व हडकुळा.

**कनकाचल, कनकाद्रि-द्री** पु. सोन्याचा पर्वत; सुमेरू; हेमाद्री : 'कनकाद्रीचा चेंडू करून।' - रावि १.६१. [सं.]

**कनकाड्या** वि. उंचाड; अति उंच व काटकुळा; लांबटांग्या (मनुष्य). (राजा.)

**कनकावळा** पु. शेतातील बुजगावणे. पहा : **बुजकणे**

**कनकावळा** पु. १. (कावळ्यासारखा किंवा पक्ष्यासारखा उडणारा) पतंगाचा, वावडीचा एक प्रकार. २. कागदाच्या नळकांडीत दारू भरून केलेला दारूचा बाण. ३. लगोऱ्यांच्या उतरंडीवरील शेवटची कोचदार लगोरी. [हिं.कन-कौवा=पतंगाचा एक प्रकार]

**कनकांबर** न. पु. पीतांबर; पिवळे वस्त्र; सोनेरी जरीचे वस्त्र : 'गौळणी नेसल्या कनकांबरे।' - हरि ४.३२. [सं.]

**कनगरे** न. धान्य साठविण्याचा तुराट्यांचा केलेला कणगा, जैते. (व.)

**कनत** स्त्री. कळ; अडचण; कष्टदशा : 'घडीभर कनत काढ.' - श्रुना १०१.

**कनथोडा** पु. घर फोडण्याचा भिल्लांचा मोठा लोखंडी खिळा.(भि.)[क. कन्न]

**कनपट, कानशील** पहा : **कानपट** : 'बाळआंबा तोडून त्याचा चीक कनपटीवर लावल्याने मोतीबिंदूची वाढ थांबते.' - फचि ३५.(क्रि. मारणे, देणे.) [सं. कर्ण + पट]

**कनपटणे** अक्रि. आजारी होणे, पडणे; बीमार पडणे. (व.)

**क(का)नपट्टी** स्त्री. (मल्लविद्या) जोडीदाराच्या हाताचा पंजा धरून तो झटक्याने ढकलून देऊन आपल्या हाताच्या तळव्याला किंचित खड्डा

करून जोडीदाराच्या कानाच्या भोकावर मारतात तो डाव.

**कनभानिन** न. (शाप.) एक रासायनिक द्रव्य; उदिल अमिदिनाचे स्फटिक उष्ण केले म्हणजे ते पृथक् होऊन अग्न व कनभानिन तयार होतात.

**कनला** क्रिवि. कशाला. (बा.)

**कनवट** स्त्री.१.कणवट. पहा : **कडोसरी, कणवट** :'कडोसरीला नसला तरी कनवटीला खास आहे.' - तोबं १४. २. कनवटीला होणारा खरजेसारखा रोग.[क.कणय = कमरेभोवतालच्या वस्त्राची गाठ]

**कनवळ-वळा-वाळा-वाळु** पहा : **कन्हवळा, कन्हवाळु** : 'बहु कासावीस होतो माझा जीव। कनवाळ्याची कीव येऊं द्यावी।'- ज्ञा १६८.

**कनवृत्ती** स्त्री. कण कण वेचून उदरनिर्वाह करणे :'ब्राम्हणु एकु कनवृतिसिए.' - लीच १.११.

**कनसरी** स्त्री. धान्याची देवता :'कनसरी मनुयेर। काई माझा मनुयेर।' - एहोरा २३.

**कनहसली** पु. घोड्याच्या अंगावरील एक भोवरा. हा कानापासून निघून मानेवर गेला असला तर चांगला व मानेपासून कानाकडे गेला असला तर वाईट. - अश्वप १.१०२.

**कनहाई** स्त्री. आणेवारी.

**कना** पु. पाय असलेली सापाची एक जात.(व.) [हिं. कन्ना ]

**कना** पु. डेळीच्या (दुबेळक्याच्या) दोन टोकांपैकी एक.(व.)[हिं. कन्ना]

**कनागरा** पु. (बैलगाडी) तीन दाबखुंट्यांपैकी कडेचे दोन खिळे. (व.)

**कनाटा** पु. पाठीचा कणा :'कनाट्यावर गोळी लागली तर जागच्या जागीं वाघ जायबंदी होतो पण मरत नाही.' - किर्लो नोव्हें १९३५.

**कनात** स्त्री. १. खस्ता; त्रास; कष्ट (द्वाड मनुष्याच्या चाकरीतील). २. (आजारी किंवा छांदिष्ट मनुष्याचा) तुसडेपणा किंवा वाईट वागणूक सहन करणे.(क्रि. काढणे, सोसणे.) [फा. कनाअत]

**कनात -थ** स्त्री. तंबू, डेरा यांची कापडी भिंत किंवा त्यांच्या भोवतालचा कापडी पडदा :'शिबिर कनाथ पडप थोर।' - नव १६.२४. [फा. कनात्]

**कनानी** स्त्री. तापाची कसर; शिरशिरी; अंग मोडून येणे. (व.)

**कनार** स्त्री. अणकुचीदार लोखंडी त्रिशूळ (हत्तीच्या कानामागे टोचण्यासाठी); अंकुश.

**कनारो** पु. एक कंद व फळ. पहा : **करांदा**

**कनाळ** न. शेतातील पिकाच्या तासातील प्रत्येक झाडामधील अंतर. (व.)

**कनाळ** स्त्री. डोंगरमाथ्यावरील दाट झाडीची जागा : 'गाया येंघली कनाळ।' - मसाप ६.१११.

**कनांदणे** अक्रि. व्याकूळ होणे; हाल होणे; मढ्यास येणे; पेचात सापडणे (दारिद्र्य, देणे वगैरेमुळे).(राजा.) [सं. कु + नंद]

**कनिद** न. (रसा.) नत्र आणि कर्ब यांपासून तयार झालेले जे सायनोजन द्रव्य त्यापासून हे रासायनिक मिश्रण बनले आहे.

**कनिष्ठ** वि. १. सर्वात धाकटा, लहान; वयाने कमी. २. कमी योग्यतेचा; कमी प्रतीचा; हलक्या प्रतीचा (गुणाने) :'विरक्तें न व्हावें कनिष्ठ। पराधेनपणे॥' - दास २.९.२७. ३. अगदी खालचा; कमी; तिसऱ्या प्रतीचा; शेवटचा (उत्तम, मध्यम, कनिष्ठ या तीन प्रतींपैकी) :'येती तुझिया भजना आड। दाविती प्रपंचाचे कोड। कनिष्ठीं रुचि ठेवूनी गोड।' - तुगा ७३४. ४. अल्प; थोडा; लहान. [सं.]

**कनिष्ठ** पु.(संगीत) पहा : **द्रुतलय**

**कनिष्ठ पक्ष** उत्तम, मध्यम याच्या खालचा पक्ष; कमीत कमी प्रमाण, स्थिती, अनुक्रम.

क्रिवि. कमीत कमी; किमान पक्षी; नाही म्हटले तरी.

**कनिष्ठ महाविद्यालय** अकरावीचे आणि बारावीचे वर्ग चालविणारे महाविद्यालय.

**कनिष्ठिका** स्त्री. करंगळी; हाताचे किंवा पायाचे लहान बोट. [सं.]

**कनी, किनी, किनई** उद्गा. (बायकी) (लडिवाळपणे बोलताना वाक्यात केवळ अर्थपूरणार्थ) 'की नाही' चा (संक्षेप) :'तिला किनी आणणा, तो नवराच पसंत नाही म्हणे!' - झांमू.

**कनी खाणे** कच खाणे; हिंमत सोडणे; धीर सुटणे.(व.)

**कनीनिका** स्त्री. डोळ्यातील बाहुली. [सं.]

**कनीयस** वि. कनिष्ठ :'कनियसा धर्मातंव अधोनिकप्राप्ति फळ.' - सुयु २३.

**कनीस** न. १. कणीस. २. (ल.) देह; शरीर :'हे जे करीत होता तेणे यांचे कनीयेसु जाले.' - उच २९.

**कनुटा** पहा : **कनाटा**

**कनुधार** स्त्री. पहा : **कनकधार** [सं. कण+धारा]

**कनेकड** न. रहाटाचा आस. पहा : **कणेकड**

**कनेर** पहा : **कण्हेर** :'तीये वाहाळेसि आपार कनेर.' - लीचउ १२१.

**कनो(न्हो)जा** पु. उत्तरप्रदेशाच्या कनोज भागातील ब्राह्मण; कनोजी ब्राह्मणाची जात. कनौजिया :'वऱ्हाडास येती कनोजे विदेशी।' - सारुह ६.४१. [हिं. सं. कान्यकुब्ज]

**कनोजी** वि. कनोजसंबंधी; कनोजचे (अत्तर इ.).

**कनोडा पु**. दाब; दमदाटी; दहशत; आक्षेप :'आपले प्रतापेकडून माजीवर (माझ्यावर) कोणाचा कनोडा नाही.' - हिंगणेदभा २.७७.

**कनोशी** पु. एका जातीचा मासा.

**कन्नडिग** पु. कानडी भाषा बोलणारे लोक. [क.]

**कन्ना-न्नी** पु. पतंग समतोल उडण्याकरिता पतंगाच्या कमानदार कामटीत खोचलेली लहान चिंधी. (ना. ) पहा **: कण** [हिं. कन्ना = जेथे दोरा बांधतात तो पतंगाचा भाग] (वा.) ० **काटणे** - प्रसंग निभावून नेणे, टाळणे. **कन्नाकन्नी उठणे**- अफवा उठणे.

**कन्ना, कन्नाकाळ** क्रिवि. केव्हा; केव्हाशा. (गो.)

**कन्मारे, कान्मात्रे** वि. ऐकले न ऐकले करणारे; दुर्लक्ष करणारे. (गो.)

**कन्यका** स्त्री. कन्या; मुलगी; कुमारी. [सं.]

**कन्या** स्त्री. १. कन्यका; कुमारी; आठ वर्षांची मुलगी; (सामा.) पुत्री; मुलगी :'कन्या सासुरासी जाये। मागे परतोनि पाहे।' - तुगा ८४३. २. (ज्यो.) बारा राशींपैकी एक सहावी रास; कन्या रास. ३. (रामदासी) शिष्यीण; शिष्या :'इतरां कन्येसी सभेसी कीर्तन आज्ञा नाहीं।' - सप्र २०.३१. [सं.]

**कन्या इत्यर्थ** वधूनिश्चिती; मुलगी ठरविणे : 'कन्या इत्यर्थु करऊन संभ्रमें।' - दावि ३३.

**कन्यागत** पु. कन्या राशीला गुरू येतो तो काळ. सिंहस्थानंतर येणारा शुभ मानला जाणारा हा काळ सुमारे तेरा महिने असतो. सिंहस्थात राहिलेली विवाहादि कार्ये या काळात करतात. या काळात भागीरथी नदी कृष्णा नदीला भेटायला येते अशी समजूत आहे. कृष्णातीरावरील क्षेत्रांतून (वाई इ.) कन्यागताचे माहात्म्य पाळण्यात येते.

न. हुंडा.

**कन्याग्रहण** न. विवाहातील कन्येचे पाणिग्रहण. [सं.]

**कन्यादान-प्रदान** न. वधूच्या मातापितरांनी वराला करायचे कन्येचे विधियुक्त समर्पण; विवाह संस्कारातील एक विधी. सर्व दानांमध्ये हे श्रेष्ठ मानतात : 'कन्यादान करी अश्वपति।' - वसा ५०.

**कन्यादूषण** न. कौमार्यभंग; कुमारिकेवर हात टाकणे; बलात्कार करणे. [सं.]

**कन्यादोष** पु. कुमारिकेच्या अंगी असलेला उणेपणा, एखादे व्यंग किंवा रोग. [सं.]

**कन्याधन** न. उलट हुंडा; वधूच्या बापाने विवाहप्रसंगी वराकडून घेतलेले द्रव्य, शुल्क, आंदण. [सं.]

**कन्याप्रजयोग** पु. (ज्यो.) स्त्रीसंततीचे आधिक्य किंवा केवळ स्त्रीसंततीच होते हे दर्शविणारा पत्रिकेतील योग.

**कन्याभाव** पु. कुवारपण; कौमार्य : 'प्रसवें कन्याभाव न मळला पळ लागलें न सुटकेला।' - मोआदि ८.४१. [सं.]

**कन्यारत्न** न. (गौरवार्थी) कन्या; पुत्री : 'कन्यारत्नं प्रासूत' असे मुलीच्या कुंडलीत लिहितात.

**कन्यारास** वि. १.(मुलीतील) षंढ; नपुंसक (मनुष्य). २. (बायकी) दुर्बल; भागूबाई.

**कन्यारासी** वि. अपशकुनी. (झाडी)

**कन्याळ-ळे** स्त्री. केळीची एक जात. पहा : **कण्हेरपात**

**कन्युरह** पु. कंगोरा. [फा.]

**कन्हव(वा)ळा कनोळा** पु. कळवळा; अनुकंपा, दयेचा उमाळा; पाझर. (क्रि. येणे)

**कन्हाटणे** अक्रि. अत्यंत मलिन होणे; खराब होणे. (व.)

**कन्हारणे** उक्रि. १. लचकणे; अवघडणे (अंग, शरीरावयव). २. तिडीक निघणे; शिणका येणे; काटा येणे (दुखणे आल्याने, दाताखाली खडा सापडून किंवा शरीरावर ताण पडून वगैरे.). ३. दुखविणे; कष्टविणे; त्रास देणे; जर्जर करणे (दाबामुळे, संकोचल्यामुळे अंग, अवयव) : 'फुलांचेनि भारें ए मृणाळेचे आंगु कन्हारें।' - शिव ६८८. [सं. कण् = शब्द करणे]

**कन्हा(न्हे)री** स्त्री. कण्ह; विवळ; कण्हण्याची क्रिया; किरकिर (हा शब्द बहुधा अनेकवचनी कन्हाऱ्या, कन्हेऱ्या या रूपात येतो.). (क्रि. करणे.)

**कन्हावणे** अक्रि. कण्हणे; कुंथणे; विवळणे. (व.)

**कन्हाळ** न. (चर्म.) जुनी मोट सोंडेला फाटल्यावर तिच्या दोन्ही बाजूंना शिवलेले नवीन कातडे. [सं. कर्ण+आलि]

**कप** पु. १. पेला; चहा पिण्याचे पात्र : 'सुशीलेने चहाची केटली आणली होती ती हातात घेऊन कपात चहा ओतण्यापूर्वी त्याच्याकडे पाहून विचारलें....' - सुदे ११०. २. (ल.) पेलाभर पातळ पदार्थ (दूध, चहा इ.). [इं.]

**कप** स्त्री. (यंत्र.) टोपी; झाकण; सायकलच्या चाकातील ट्यूबमध्ये हवा भरायच्या नळीवरील टोपण किंवा ॲक्सल वगैरेवरील झाकण; सायकल, मोटार, टांगा वगैरेच्या चाकाच्या तुंब्यावरील टोपण. [इं. कॅप]

**कप** स्त्री. नदीचा किंवा विहिरीच्या आत गेलेला भाग; कपी; दरड. पहा : **कपार** [क.कप्पु = जमिनीतील खळगा][सं. कल्प]

**कप** पु. १. सुरमाड किंवा भेरला नावाच्या नारळीसारख्या झाडाच्या अंगास येणारा कापसासारखा बुरा; झाडांच्या सोपात असणारी मऊ लोकर. याचा उपयोग रक्तस्राव बंद करण्यासाठी व विस्तव पेटविण्यासाठी करतात. २. कापूस. कर्नाटकात चिलीम पेटविण्यासाठी याचा उपयोग करतात : 'कपाचें नळकांडे बाहेर काढलें आणि ठिणगी काढण्यासाठीं पोलाद आणि गार काढली.' - कोरकि २९५. (वा.) ० **तयार करणे** - चकमकीने विस्तव पाहण्यासाठी सुरमाडाचा, पाणसराच्या कणसाचा किंवा शेवरीचा कापूस तयार करणे. (माण.) [सं. कार्पास]

**कपकलस** पु. टोपण व कळस : 'आल्फागिरीची दांडी व बसनातील कपकलस व चिपली ऐसे कोणी येईल त्याब ॥ पाठविणे. ' - पुरंदभा १.७७.

**कपचा - ची** पु. स्त्री. १. कपरी; दगडाचा निघालेला, उडालेला तुकडा; भिंगाचा तुकडा; (सामा.) पदार्थाच्या अंगचा निघालेला तुकडा; चीप. २. फरशी : 'दगडाच्या पोकळ जागेत चुना घालून त्यात कपचा ठोकून बसवाव्या.' - मॅरट ३०.३. खपली ; कवची; बाहेरचे आवरण (खरूज, फोड वगैरेवरील). [सं. कवच]

**कपची झड** (मूर्ती- शिल्प) मूर्ती घडताना वाया गेलेला दगड.

**कपट** न. १. छद्म; लबाडी; लुच्चेगिरी; ढोंग; कावा : 'वेष धरला कपटाचा' - नाम ५७ २. खोटेपणा; असत्यता. ३. मत्सर; हेवा; कृत्रिम भाव; द्वेषबुद्धी. ४. (कायदा) फसवणूक; भूलथाप; फसविण्याच्या इराद्याने केलेले कृत्य.

**कपट** न. केळीचे सोपट.

**कपट नाटक** कपटी व्यूह, योजना; कपटीपणाचा खेळ : 'कलह-नाटक कपट-नाटकापेक्षा पुष्कळ बरं !' - कृयु ११.

**कपटनिंदा** स्त्री. व्याजनिंदा; गर्भित स्तुती; बाहेरून निंदा पण खरी स्तुती.

**कपटपाश-फासा** पु. १. इच्छित दान पडावे म्हणून मंत्रादी विद्येने बनविलेला खेळाचा फासा; लबाडीचे फासे : 'तरी पांडव जिंकायला बळ। एकयुक्ति आहे सबळ। तरी कपटपाश केवळ। वश मज असती॥' - पांप्र २०.६१. २. फसविण्याकरिता केलेली घटना; कट; गुप्त मसलत.

**कपटबाब** स्त्री. (कायदा) मत्सराने किंवा दुष्टपणाने उत्पन्न केलेला निराधार खटला; खोटा खटला.

**कपटमूर्ति-र्ती** वि. अतिशय लुच्चा, लबाड मनुष्य; कपटाचा मूर्तिमंत पुतळा. [सं.]

**कपटराव** पु. गालगूट. (गो.)

**कपटविद्या** स्त्री. लुच्चेगिरीचे डावपेच; ठकबाजी; कावा; खोटी कृत्ये.

**कपटसिंधु -धू** पु. १. (ग.) गुणाकाराची एक पद्धत; गुणकाच्या पहिल्या आकड्याने गुण्याला गुणून आलेल्या गुणाकारात गुणकाच्या राहिलेल्या आकड्याचा गुणाकार मनातल्या मनातच मिळवून एकदम गुणाकार मांडणे. पहा : **गुणाकार.** २. फार कपटी मनुष्य; अतिशय लबाड, खोटा, घातकी मनुष्य. [सं.]

**कपटस्तुति-ती** स्त्री. व्याजस्तुती; बाह्यतः स्तुती पण आतून निंदा.[सं.]

**कपटा** पु. तुकडा (केळीचे पान, कागद, दगड, लाकूड वगैरेचा).[सं. कृप्]

**कपटाई** स्त्री. १. लुच्चेगिरी; ठकबाजी; लबाडी; कपटीपणा. २. मत्सर; द्वेष; हेकेखोरपणा :'तुमचे मनीं कपटाई म्हणोन तीनदां मजवर रुसता, जाऊन घरीं बसता।'- होला १२४.

**कपटी, कपटीया** वि. १. ढोंगी; खोटा; लुच्चा; कारस्थानी; गळेकापू. २. हेकेखोर; मत्सरी; कपटाने वागणारा.

**कपटी कुमाव** संशयखोर.

**कपट्या** पु. हुतूतूचा खेळ. हा खेळ खेळताना तोंडाने म्हणायच्या कपट्टी, कबड्डी वगैरे शब्दांवरून.(हेट.) [ध्व.]

**कपडछान** वि. वस्त्रगाळ. (क्रि. करणे.) [हिं.]

**कपडलेप** पु. औषधाची भट्टी लावण्यासाठी ते भांडे व त्यावरील झाकण याच्याभोवती मातीने भरलेल्या ओल्या कापडाचा द्यायचा लपेट, लेप.

**कपडा** पु. कापड; वस्त्र; चिरगूट; प्रावरण. [सं. कर्पट] (वा.) **कपडे करणे** - १. कपडे अंगात घालणे; पोषाख करणे :'चंद्रशेखराने कपडे केले.' - निचं ५३. २. नवे कपडे शिवणे, शिवायला देणे.

**कपडालत्ता** पु. कापडचोपड; वस्त्रप्रावरण; पोषाखाचे सर्व प्रकारचे कपडे.

**कपडेपट** पु. नटांच्या वेगवेगळ्या भूमिकांसाठी तयार केलेले पोषाख ठेवण्याची जागा; वेषभूषा करण्याचे ठिकाण :'मी तिथून उठून माझ्या कपडेपटाच्या राहुटीत गेलो.' - वाघसिंह १३०.

**कपदरी** स्त्री. खपदडी; वेडेवाकडे बीळ; खोल व पोकळ जागा; दरी; गुहा; विवर; कपार; खोल, एकांताची जागा. (कों.)

**कपर-रा-री** स्त्री. न. कपरी; दगडाचा फोडलेला लहान तुकडा; कपचा. चीप; दगडाचा तुकडा. पहा : **कपचा,** कपरी (लहान कपरा). हे कपऱ्याचे लघुत्वदर्शक रूप आहे :'तासलेल्या लाकडांच्या ढलप्या दगडांच्या कपऱ्या यांचे गावात, जागजागी ढीग पडले.' - गागो ९. (क्रि. निघणे, जाणे, उडणे.) (को.) [सं.कृप्]

**कपरथूल-ळ** पु. जाळीदार व मलमलीसारखे पातळ कापड. [हिं.]

**कपरी** वि. तुकडे केलेली :'त्याच्या हातात भुईमुगाच्या कपऱ्या पेंडीची पुरचुंडी होती.' - मक १९६१.

**कपरेदार दगड** बारीक मातीच्या गाळाचे थर एकावर एक बसून झालेला दगड.

**कपर्द(र्दी)क-** पु. स्त्री. कवडी. हिचा नाण्याप्रमाणे उपयोग होत असे :'कपर्दीक हो प्राप्त होतां न दीसे। बहु आपुल्या प्राक्तनालागि रूसे।' - कचेसुच १५. [सं.]

**कपला** पु. तुकडा.

**कपळ** न. कपाळ. (वा.) **कपळाच्यों किडो** - मद; भ्रम. (गो.)

**कपळा** पु. मोठा कपचा; कपरा; कपरी; दगडाचा, लाकडाचा किंवा गिलाव्याचा सुटून पडलेला मोठा तुकडा. पहा: **भेतळ-ळा**

**कपळी** स्त्री. खपली; बारीकसा तुकडा. [सं. कर्पर]

**कपा** पु. १. बटवा किंवा पिशवी हिचे पुड. २. पेटीचा खण-घर. [क. कप्पु]

**कपा** पु. १. कपरा; तुकडा (कोणत्याही पदार्थाचा) २. ठिगळ.

**कपा** पु. १. कप्पा; मणी; मणका; पुली (इ.). २. (नाविक) मोठी कप्पी, पुली. याला पाचसहा गाळे असतात. (को.) पहा : **कपी**

**कपाट** न. फडताळ; खणांची उभी पेटी. [सं.]

**कपाट** न. १. कवाड; दार; दरवाजा; दरवाजाची फळी; खिडकीची झडप: 'येथें आड मज न सहावे वारा। देऊनि कपाट आलें ते दुसरें वारा वो।' - तुगा १२६. २. गुहा; दरी :'कीं धर्मगिरीचे कपाटा। विवेक सिंहाचा दरकुटा।' - ऋ ३६३[सं.] (वा.) ० **देणे** - दार लावणे :'आलें लंघुनी ब्रम्हगिरी कपाटें। तो पार्वतीने दीधलीं कपाटें।' - उमाविलास ९.

**कपाटवक्ष** वि. ज्याची छाती दरवाजाप्रमाणे रुंद व भक्कम आहे असा :'वृषस्कंध व कपाटवक्ष असेही वर्णन नेहमी येते.' - व्याज्ञा १.४५. [सं.]

**कपात** स्त्री. काट-छाट; कमी करणे; बाद करणे; काढून टाकणे :'साडेसात टक्के कपात केल्यांवाचून निभाव लागणार नाही.' - के २.१०.२८.

**कपात, कप्पा** न. पु. खजूर ठेवण्याकरिता शिंदीच्या पातींचा केलेला करंडा :'खारकेचा भाव काय आहे म्हणून दुकानदारास विचारले तर तुम्ही किती कप्पे घ्याल असे विचारतात.' - मुंव्या ५. [अर. कफआत]

**कपार** स्त्री. खबदड; दरड; विवर (खडक किंवा डोंगर यामधील); नदीच्या किंवा तळ्याच्या काठाला असणारी जमिनीखालची पोकळ जागा :'ती दाट झाडीतील गुहेसारखी कपारीची जागा होती.'-स्वप १८४. [सं. कृप्]

**कपारत-लत** पहा : **कफारत-वत**

**कपाल-ळ** न. १. डोक्याची कवटी; डोक्याचे हाड; करटी. २. मडक्याचा अर्धा भाग; खापर; खापराचा तुकडा; श्रौतकर्मात पुरोडाश भाजण्यासाठीचे वापरायचे खापराचे तुकडे. हे ८, ११, १२, १३ असून त्यांचा एक गट असतो. ३. भिवया आणि डोक्याचे केस यामधील भाग; ललाट; भाल. ४. नशीब; प्रारब्ध; ब्रह्मलिखित (ब्रह्मदेव मनुष्याच्या कपाळावर त्याचे भविष्य लिहून ठेवतो या समजुतीवरून) : 'कीं एकदांचि फुटले त्वत्पतिपंचककपाळ पापाने।' - मोसभा ६.४.५. (कपाल) चपटे, पातळ हाड; खांद्याचा किंवा मांडीचा फरा. ६. भिक्षापात्र : 'कपाळ झोळी एका स्मशानींचा वास। एक जगन्निवास विश्वंभर।' - तुगा २०५०. ७. (भू.) कोणत्याही याम्योत्तर वृत्ताच्या पूर्वेकडील किंवा पश्चिमेकडील अर्धे गोलार्ध. [सं.](वा.)० **आपटून घेणे** - दुःखाने, रागाने डोके आपटणे स्वतःला अपाय करून घेणे ० **उगवणे** - भाग्योदय होणे, ० **उठणे, चढणे** - डोके दुखणे; त्रास, कटकट होणे; पीडा होणे : 'उगा करिती कोल्हाळ। माझें उठते कपाळ।' - रामदास. ० **उणे असणे** - दुर्दैवी, कमनशिबी असणे. ० **काढणे** - वैभवाला चढणे; नशीब

काढणे. ० **खुलणे** - दैव उदयाला येणे.[हिं.] ० **जाणे** - दुर्दैवाच्या फेऱ्यात सापडणे; भाग्य नाहीसे होणे. ० **टेकणे** - एखाद्यावर भरवसा ठेवून, अवलंबून असणे. ० **ठरणे** - नशिबात लिहिल्यासारखी एखादी गोष्ट घडून येणे; दैवात असणे :'पुढें मागें ... याही गोष्टीत सुधारकांचा वरचष्मा होऊन या हताश, विचारशून्य, मत्सरी ... लोकांस ... मूळूमुळू रडत बसावे लागेल हें याचे कपाळ ठरलेलेंच.' -आगर. ० **धुऊन घेणे**- एखाद्याचे भाग्य हिरावून घेणे; नशिबात असेल ते घेणे. ० **पाहणे, वाचणे** - नशिबी काय आहे ते पाहणे; नशीब पाहणे. ० **निवडणे** - दैवात असेल ते उभे राहणे :'परंतु त्याचे कपाल काय निवडेल ते न कले.' - पेद ३४.४. ० **पिटणे** - दु:खातिशयामुळे डोके जमिनीवर आपटणे :'एक अवनीं कपाळ आपटिती।' - हरि १८.९६. **कपाळपिटी करणे** - व्यर्थ बडबड करणे ० **फुटणे** - १. दुर्दैव ओढवणे ; दैव प्रतिकूल होणे; सर्वस्वाचा नाश होणे; आपत्ती कोसळणे. २. वैधव्य येणे :'मी गरीब कितीही असलें। जरि कपाळ माझें फुटलें।' - (राजहंस) गोविंदाग्रज. ० **फोडणे** - फार शोक, दु:ख करणे :'कुंतल तोंडी, कपाळ फोडी, करी थोर आकांत।' - विक ५३. ० **बडविणे** - दु:खातिशयामुळे किंवा क्रोधाच्या आवेगाने कपाळ पिटणे; कपाळावर हाताने मारून घेणे :'कळतां वृत्त क्रोधें घे बहु बडवूनि तो कपाळाला।'- मोवन ४.८३. ० **मोक्ष करणे** - १. एखाद्याचा सर्वस्वी नाश करणे. २. खूप झोडपणे; ठार मारणे. पहा : **कपाळमोक्ष. कपाळाची रेघ उमटणे, रेषा उपटणे, उघडणे**- आकस्मिक रीतीने सुदैव प्राप्त होणे; एकदम मोठेपणा, श्रीमंती मिळणे. **कपाळाचे कातडे नेणे** - विपत्तीत लोटणे; भाग्यहीन करणे; नुकसान करणे. **कपाळात तिडीक उठणे** - १. डोके दुखणे. २ (ल.) त्रासणे; अतिशय चीड येणे; रागावणे :'आडमुठ्यांच्या घराचे नाव काढले कीं यशवंतरावाच्या कपाळास तिडीख उठे.' - यशवंतराव खरे. **कपाळातले तीन फातर** - दुर्दैवाचे फेरे (ढोमले, थोड्यारे-थोड्यारे म्हणून एक प्रकारची मासळी आहे. तिच्या डोक्यात तीन पांढरे दगड असतात यावरून) (गो.). **कपाळाला अपकीर्ती, अपयश, दारिद्र्य, आपत्ती येणे** - अपमान, गरिबी, दुर्लौकिक इत्यादी प्राप्त होणे; नाव बद्दू होणे. **कपाळाला आठ्या घालणे, चढणे, पडणे** - त्रासणे; अति त्रास होणे; नापसंती दाखविणे; मनाविरुद्ध गोष्ट घडणे (त्रास झाला असताना कपाळाला आठ्या पडतात त्यावरून) :'उलट कपाळाला आठ्या घालून म्हटलें - तुला काय त्याची चौकशी?' - उष:काल. **कपाळाला किंवा कपाळावर केस उगवणे** - अशक्य गोष्ट घडणे (पुढे घडेल असे वाटणाऱ्या एखाद्या गोष्टीशी असंभाव्यता दर्शविताना हा प्रयोग योजतात. तळ हाताला केस येणे याप्रमाणे). **कपाळाला येणे, कपाळी येणे** - नशिबी येणे :'जरि आलें पतन या कपाळाला।' - मोआदि १०.८२. **कपाळाला लावणे** - कुंकू लावणे. **कपाळावर, कपाळाला कपाळा किंवा कपाळी हात मारणे, लावणे** - १. नशिबाला दोष देणे. २. आश्चर्य, दु:ख, काळजी प्रदर्शित करणे :'अशींच तुम्ही दोघंही सदोदित कपाळाला हात लावून रडत बसत असतां.' - हामुबा ८२. **कपाळाशी कपाळ घासणे** - १. आपल्याला लाभ होईल या आशेने एखाद्या भाग्यवानाशी सहवास करणे; संगतीत राहणे; लगट करणे. २. कच्छपी लागणे; मागे मागे असणे; गुलाम वृत्तीने अनुकरण करणे. **कपाळास काठी घेणे, टेकणे** - वैतागणे :'... आम्ही कपाळास काठी घेऊन वरघाटें आलों.' - ब्रच २६४; 'कपाळास काठी टेकून वैतागोन ज्यात होतों.' - ब्रच ३३५. **कपाळी डाग लागणे** - बेअब्रू होणे; फजिती होणे; कलंक लागणे. **कपाळी काठी घेऊन जाणे** - निघून जाणे; चालते होणे; काळे करणे. **कपाळी भद्रा असणे** - नेहमी दुर्दैवी असणे; प्रतिकूल ग्रह असल्यामुळे दारिद्र्य येणे. **कपाळी लिहिलेले असणे** - नशिबी असणे; प्राक्तनात असणे; योग येणे :'माझ्या कपाळीं आपली सेवा एवढीच लिहिली होती.' - एक १२२.

उद्गा. १. नाही, खोटे, अशक्य हा अर्थ पटविण्यासाठी :'माझे कपाळ! तुझे कपाळ !' इ. उद्गार काढतात : 'असे ऐकतां हासले द्वारपाळ। वदों लागले कृष्णजीचे कपाळ!' - कचसु ६. २. दु:खदर्शक उद्गार.

**कपाल** न. (संगीत) शुद्ध जातीच्या स्वरांपैकी ज्या एका विशिष्ट स्वरसमूहापासून रागोत्पत्ती संभवते तो स्वर. [ सं.]

**कपालभाती** प्राणायामाचा एक प्रकार.

**कपाल शल्यकर्म** (पुरा.) डोक्याचे हाड खरवडून त्याचा वाटोळा तुकडा काढण्याची शस्त्रक्रिया.

**कपालिका** स्त्री. (वन.) पक्वावस्थेत फुटणाऱ्या फळातील शुष्क एकबीजी भाग. उदा. तुलसी कुलातील एकबीजी फळ किंवा फळांचा भाग.

**कपाली** वि. दोन्ही खुरांवर नवाच्या आकड्याप्रमाणे आणि कमळाकृती भोवरे असणारा (घोडा) - अश्वप ९०.

**कपाशी** स्त्री. (सरकी असलेला) कापूस. (खा.) [ सं. कार्पास]

**कपास** पु. १. कापूस; कापसाचे झाड. २. कापसाचा ढिगारा. ३. वाऱ्याने उडण्यासारखा एखाद्या हलक्या पदार्थाचा कीट; पोल; म्हातारी. ४. भेरली-सुरमाडाचा कापूस; कप. [ सं. कार्पास]

**कपास करप** सक्रि. जनावरातील नराचे वृषण बडवणे, अंड काढणे; खच्ची करणे. (गो.)

**कपाळ अढी** (मल्लखांब) मल्लखांबापासून थोडे दूर उभे राहून मल्लखांबावर कपाळ टेकून मारलेली उडी.

**कपाळ कटकट** तोच तोच विषय पुन्हा पुन्हा सांगत बसणे; कर्म कटकट :'आतां मी जातें आणि त्या पोरीजवळ कपाळ कटकट करीत बसतें.' - पिंगला नाटक. (क्रि. करणे.)

**कपाळकर(रं)टा** वि. दुर्दैवी; अभागी; दैवहीन. जनावराच्या कपाळावर अंगठ्याने झाकण्याइतपत पांढरा टिकला असला तर ते अशुभ, कपाळकरंटे समजतात :'काळें तोंड करी कपाळकरटे जा, खेप आणि दुजी।' - आठल्ये.

**कपाळकष्टी** स्त्री. १. अति त्रास; अतिशय श्रम (मूर्ख किंवा हेकेखोर

मनुष्याची समजूत घालण्यासाठी पडणारे); डोकेफोड; उरस्फोड. २. एकाच गोष्टीचा नाद, हट्ट; एकसारखी बडबड, वटवट; खिसखिस; धरणे धरून केलेली मागणी. पहा : **कपाळकूट, कपाळखटखट**

वि. थकवा आणणारे, त्रास देणारे (काम); असे काम करणारा.

**कपाळकाठी** स्त्री. (वस्त्रो.) वही (ओवी) किंवा चाळा ज्याच्याशी पक्का केला आहे किंवा बांधला आहे असे आडवे लाकूड किंवा दांडा. हे मागाच्या वर असते.

**कपाळकूट** स्त्री. न. १. माथेफोड; शिकविण्याचे फुकट श्रम. पहा : **कपाळकष्टी**: 'कपाळकुट जाहालें लोकीं बोभाट ऐकिला। सांवळे।' - भज ८. २. वटवट; बडबड; एकसारखी विनवणी, याचना : 'एकदां तिनें दाराची कडी लावली कीं कोणी कितीही कपाळकूट करो, इला कडी काढील तर शपथ!' - इलासुंदरी १५.

**कपाळक्रिया** स्त्री. यती, संन्यासी वगैरे मृत झाल्यावर समाधी देण्यापूर्वी मस्तकावर शंख आपटून मस्तक फोडण्याची क्रिया; कपाळमोक्ष.

**कपाळखटखट** स्त्री. त्रास; उद्वेग. पहा : **कपाळकूट**

**कपाळटेक, कपाळटे(ढो)कणी** स्त्री. (कपाळ टेकणे). (ल.) एखाद्यावर भार, भरवसा टाकणे; अवलंबून राहणे; स्वतःच्या आकांक्षा, इच्छापूर्ती दुसऱ्यावर सोपवणे.

**कपाळदुखी** स्त्री. १. सतत डोके दुखत राहते असा रोग; डोकेदुखी; कपाळशूळ. २. डोक्याशी होणारी कटकट; नेहमीचा त्रास.

**कपाळपट्टा** पु. १. घोड्याची म्होरकी किंवा सरोसरी हिचा एक भाग; कपाळावरचा पट्टा. हा मुखपट्ट्याहून निराळा असतो.

**कपाळपट्टी** स्त्री. १. कपाळ; कपाळाचा भाग; ललाटपटल : 'विधात्यानं प्राणिमात्राचं अदृष्ट डोळ्यांला न दिसणाऱ्या कपाळपट्टीवर लिहून ठेवलं आहे.' - एक ४१. २.कुंचडे; कानटोपी, टोपी इत्यादीचा कपाळावरील भाग; पट्टी; टोपीचा कपाळावरील भाग. ३. दरवाजाच्या चौकटीचे वरचे आडवे लाकूड; गणेश पट्टी. ४. मोटेच्या विहिरीच्या धावेवरील खांबावर असलेले आडवे लाकूड. ५. कोणत्याही यंत्ररचनेतील आडवे बहाल. ६. ब्रह्मलिखित; ब्रह्मदेवाने कपाळी लिहिलेले; नशिबी असलेले.

**कपाळपाचशेरी-पासरी** स्त्री. न टळणारी दैवगती; अटळ नशीब.

**कपाळपाटी** पहा : **कपाळपट्टी** १. 'तीची असे सज्ज कपाळपाटी।' - सारुह ५.११०.

**कपाळपाटी** स्त्री. आट्यापाट्यांच्या खेळातील अगदी पहिली पाटी; चांभारपाटी. [सं. कपाल+पट]

**कपाळफुटका** वि. कपाळकरंटा; दैवहीन; कमनशिबी; अभागी.

**कपाळफोडा** पु. कपाळफोडीचे फळ.

**कपाळफोडी** स्त्री. एक वनस्पती. चिरबोटी; फोपेटी. याचे फळ (कपाळफोडा) वाऱ्याने फुगविता येते. लहान मुले हे फळ कपाळावर आपटून वाजवितात. कपाळावर फोडणे - म्हणून कपाळफोडी हे नाव.

**कपाळफोड्या** पु. डोईफोड्या; मनाजोगे झाले नाही म्हणजे कपाळ फोडून घेणारा; इष्ट वस्तू मिळेपर्यंत हट्ट धरून बसणारा (भिकारी); आततायी. वि. कपाळकूट करणारा; हट्टी; दुराग्रही; आक्रस्ताळ्या; आकांडतांडव करणारा.

**कपाळमाळा** उद्गा. आश्चर्य किंवा दुःखदर्शक उद्गार.

स्त्री. रुंडमाळा; शंकराच्या गळ्यातील नरमुंडांची माळा : 'जटा विभूती उटि चंदनाची। कपाळमाळा प्रित गौतमीची। - शिवस्तुति.

**कपाळमोचन** न. कवटी फुटणे : 'तयातें गोसावी समसांनवरि बोळवीत जाति : कपाळमोचन होय तवं राहाति :' - गोप्र १४.

**कपाळमोक्ष** पु. १. प्रेत जळत असताना कपाळाची कवटी फुटण्याची क्रिया. २. मृत संन्याशाच्या डोक्यावर शंख आपटून मस्तक फोडण्याची क्रिया. ३. डोक्याला आकस्मिक होणारा एखाद्या वस्तूचा आघात; डोके फुटणे. ४. काशीक्षेत्रातील पाच मुख्यतीर्थांपैकी एक तीर्थ. (वा.) ० **करणे** - डोके फोडणे; ठार मारणे : 'मनोहरला स्वर्गी पाठवावें म्हणून त्याचा कपाळमोक्ष करण्याचा मी प्रयत्न केला.' - मतिविकार. ० **होणे** - डोके फुटून मरणे; अंत होणे : 'खरी वेळ आली म्हणजे या भीमाच्याच लत्ताप्रहाराने त्या धर्मभ्रष्टाचा कपाळमोक्ष होणार हें मला पक्कें दिसत आहे.' - कीच.

**कपाळरेखा-रेषा-लेख** स्त्री. पु. नशीब; दैव; विधिलिखित (विधीने कपाळावर लिहून ठेवलेले).

**कपाळशूल-ळ** पहा: **कपाळदुखी** (वा.) ० **उठणे** - १. डोके अतिशय ठणकणे. २. दुसऱ्याचे बरे झालेले सहन न होणे : '... म्हणून तुझा कपाळशूळ उठला कां?' - लव्हाळी २९५.

**कपाळाचा डाग** कपाळावरील काळा डाग; दुर्लौकिक; अपकीर्ती; कलंक. (क्रि. लागणे, चुकणे, लागू होणे.)

**कपि-पी** पु. १. माकड; वानर. २. हनुमान. ३. (ल.) मंडळीतील सर्वात वृद्ध व अनुभवी माणूस. ४. एखाद्या व्यवसायातील अनुभवी व्यक्ती. ५. इंग्रज लोक. [सं.फा.]

**कपिच्छ** न. पंख.

**कपिता** स्त्री. माकडचेष्टा; कुचाळी; लबाडी : 'सहदेव ग्लह माझा स्वप्नींहि न यन्मना शिवे कपिता॥' - मोसभा ४.५७.

**कपितान-व** पु. कप्तान; फौजेतील एक अधिकारी. [इं. कॅप्टन]

**कपित्थ** पु. कवठीचे झाड व त्याचें फळ; कवठ. [सं.]

**कपित्थ हस्त** (नृत्य) अंगठा व तर्जनी याशिवाय बाकीची तीन बोटे मिटून तळहाताला चिकटून ठेवणे; अंगठा उभा ठेवून त्याच्या मागील बाजूने तर्जनीने त्याला विळखा घालणे.

**कपिमानव** पु. (पुरा.) उत्क्रांतिकालातील, माकडासारखा दिसणारा परंतु माणसाची बुद्धिमत्ता असलेला प्राणी ही अवस्था.

**कपिमुख** वि. १. वानरासारखे तोंड असणारा (घोडा). ज्याचा वरचा ओठ लहान व खालचा ओठ मोठा आहे असा. हे घोड्याचे अशुभ लक्षण होय. [सं.]

**कपिल-ला** वि. पिंगट; तपकिरी किंवा जर्दा (रंग) : 'एकें तातलें साडेपंधरें। तैसीं कपिलवर्णे अपारें।' - ज्ञा ११.१३२. [सं.]

**कपिलभस्मा** स्त्री. एक वनस्पती; कर्कश; कापित्य.

**कपिलस्नान** ओल्या वस्त्राने केवळ अंग पुसून केलेले स्नान.

**कपिला** स्त्री. १. कामधेनू; स्वर्धेनू : 'कपिलेचे म्हणावे क्षीर। मा इतरांचे काय नीर।' - एभा १.१२४. २. एक रंग असलेली, कोणत्या तरी एकाच रंगाची (गाय) : 'कांहीं सफेत कपिला व्याघ्रांबर खाणीच्या।' - ऐपो ३०९. ३. (सामा.) गाय. [सं.]

**कपिला** स्त्री. १. रंगाकरिता कित्येक जातीच्या फुलांची वाळवून केलेली भुकटी. हिचे कपिला व कपिली असे दोन प्रकार असून कपिली सरस आहे. २. काव.

**कपिलाषष्ठी-सठ** स्त्री. भाद्रपद वद्य षष्ठीच्या दिवशी मंगळवार, रोहिणी नक्षत्र, व्यतिपात योग, सूर्यनक्षत्र हस्त यांचा योग झाला तर तिला कपिलाषष्ठी म्हणतात. हा एक अपूर्व व पुण्यकारक योग मानतात. बहुधा साठ वर्षांनी असा योग साधतो : 'चंद्रसूर्यग्रहणांसी। वोंवाळुनि सांडी ते दिवशी। कपिलाषष्ठी तिची दासी। मा अर्धोदयासी कोण पुसे।' - एभा ११.१२६९. [सं.]

**कपिलाषष्ठीचा योग** १. ज्या गोष्टी एकत्र होणे - जमणे अशक्य त्या आकस्मिक रीतीने एकत्र जमल्यास त्याला म्हणतात; दुर्मिळ सुयोग, संधी, दुर्लभ घटना. २. (उपरो.) अशक्य; असंभाव्य; क्वचित घडणारी गोष्ट.

**कपिश** पु. कवड्या ऊद; धूप.
वि. पिंगट रंग. [सं.]

**कपिंजल** पु. कवडा; तित्तीर, चातक पक्षी. [सं.]

**कपी** स्त्री. १. पुस्ती; जोड (फुटलेल्या लाकडाला दिलेला) : 'दोनतीन गलबतें कपीस आली होती, त्यास सुतार देऊन कपीया पुरवून करून दिल्या.' - पेद ३४.९३. (को.) २. कलिंगड, भोपळा वगैरेचा नमुना पाहण्यासाठी कापून काढलेली फोड. ३. ठिगळ. (गो.)

**कपी** स्त्री. कप्पी; मणका; पुली; खरडी; ओझे वगैरे उचलण्याचे साधन. लाकडाच्या भरीव तुकड्याला भोक पाडून त्यात चाक बसवतात व त्या चाकावरून दोरी सोडतात. त्या दोरीला सामान बांधून यारीसारखा उचलण्यासाठी उपयोग करतात. पहा : **कपा** [ते. कप्पी = चाक]

**कपीत** पु. कप्तान (लष्कर वा आरमारातील).(गो.)[पोर्तु. कापिताव]

**कपुतपण** न. कुपुत्रता: 'सर्व राज्यांत कनिष्ठास विभाग देऊन आपल्या अंगी कपुतपण व नामर्दी कशी घेवते....' - पेद २.११.[सं. कु+पुत्र]

**कपुरकाय - कपुरी** स्त्री. विड्यांच्या पानाची एक जात. ही जात बंगालमध्ये होते. या पानाला कापरासारखा वास येतो.[हिं. सं. कर्पूर]

**कपुरीमधुरी** स्त्री. (वन.) ही वनस्पती सुमारे एक हात उंच वाढते. हिची पाने तुळशीच्या पानाप्रमाणे असून ती पांढुरकी असतात. या वनस्पतीस तुळशीप्रमाणे तुरे येतात.

**कपुरी मेणबत्ती** स्त्री. अत्यंत शुभ्र अशा मेणाची बनविलेली उंची मेणबत्ती : '४२०॥। येन खरीदी मोमबत्त्या कपूरी, पेट्या सुमारी ६....' - पेद.

**कपूत** पु. दुर्गुणी, उनाड पुत्र; अवज्ञा करणारा मुलगा. [सं. कुपुत्र]

**कपूयचरण** न.पापाचरण; दुर्वर्तन : 'कपूयचरण म्हणजे पापाचे आचरण.' - गीर २९५. [सं.]

**कपूरीकचरी** पहा : **कापूर कचरा**

**कपेरी** स्त्री. दगडाची कपरी, तुकडा. (कु.)

**कपेळफोडणी** स्त्री. कपाळफोड; डोकेफोड. (गो.)

**कपॅसिटर** विद्युतप्रभार साठविता येणारे साधन. कन्डेन्सर.

**कपो** पु. १. पापुद्रा, ठिगळ इ. पहा : **कपा**. २. मासळीचा तुकडा.

**कपोई** स्त्री. घोड्याची मल्लमार्जनी; घोड्याला मालीश करण्याचे किंवा अंग रगडण्याचे एक साधन.

**कपोक** पु. पांढरी सावरी. याचा कापूस फार मऊ असून त्याची गिर्दी, उशी करण्यासाठी उपयोग करतात. पहा : **कप**

**कपोट** स्त्री. ताडाच्या पानांची केलेली पेटी. (को.) पहा : **कपात**

**कपोत-ता-ते** पु. कवडा; पारवा; कबूतर. या पक्ष्याच्या मानेवर ठिपके असतात.
स्त्री. कपोती. (वा.) ० **वळणे** - वाळणे, खंगणे, क्षीण होणे, अशक्त होणे. [सं.]

**कपोतक संयुतहस्त** (नृत्य) दोन्ही हात एकमेकांजवळ आणून तळहाताकडील बाजूंनी एकमेकांना चिकटवून एकावर दुसरा झाकला जाईल अशाप्रकारे ठेवणे. [सं.]

**कपोतशीर्ष** (पुरा.) प्राचीन वास्तुशास्त्रातील पारिभाषिक संज्ञा.

**कपोल-ळ** पु. १. गाल : 'अधिष्ठानविशाल भाळीं। तैसी शोभा कृष्ण कपोळीं।' - एरुस्व १.६१. २. (चुकीने) कपाळ; गंडस्थळ : 'कपोलचि वर्तुळपण। भणों ज्ञान प्रेमाचें दर्पण॥' - ऋ ९५. [सं.]

**कपोलक** न. खड्गाचा एक प्रकार. [सं.]

**कपोलकल्पित** वि. स्वत:च्या कल्पनेने रचलेला; काल्पनिक. [सं.]

**कपॉ** पु. मासळीचा तुकडा.(गो.) [क. कप्पु = मांस]

**कप्तान** न. बैलगाडीत असलेल्या मालाला पाऊस वगैरे लागू नये म्हणून केलेला आडोसा, आच्छादन. हा बहुधा तट्ट्यांचा असतो.[फा. कफआत - कपात = (खजुराची) शिंदीच्या चटाईची पेटी]

**कप्पडसाथ** स्त्री. कापडबाजार : 'तिथली कप्पडसाथ आबाला परिचित असेल.' - वानगी ४४.

**कप्पा** वि. १. पक्का. २. बळकट. (झाडी)

**कप्पा** पहा : **कपा** : 'दोन कप्प्यांची बनलेली थैली म्हणजे हृदय होय.' - आरोशा १.१४.

**कप्पा** पु. पहा : **कपात**

**कप्पाचु** वि. अस्वस्थ. (झाडी)

**कप्पी** स्त्री. पुली. पहा : **कपी** : 'शिडाला कप्पी बांधा आणि त्या दुष्ट मनुष्याचे पाय बांधून त्याला उलटा डोलकाठीवर टांगा!' - स्वप २९६.

**कप्पी** स्त्री. लहान कप्पा; खण.

**कप्रत** स्त्री. तंटाबखेडा. पहा : **कफारत** : 'सालसी प्रान्तावर कप्रत घालून बदनक्षा करून आपण जिवानसी गेला.' - पेद ३६.३१३.[फा. कुफ्रात]

**कफ** पु. कप्पीचे घर, साचा (कप्पीसह किंवा कप्पीशिवाय). (को.)

**कफ** पु. सुरमाडाचा कापूस; भूस; रुई वगैरेच्या फळातील म्हातारी इ. पहा : **कप** : 'लोह कफ गारा अग्निचिया काजें। येन्हवीं तें ओझें कोण

वाहे.' - तुगा २१७४. [सं. कार्पास]

**कफ** पु. शर्टच्या बाहीच्या शेवटाला असलेली पट्टी. [इं.]

**कफ** पु. १. शरीरातील त्रिदोषांपैकी एक. कफामुळे तोंड गुळमट चिकट होणे, तोंडास पाणी सुटणे, झोप फार येणे, घसा घुरघुरणे, तिखट पदार्थ खाण्याची इच्छा होणे, उष्णोपचारांची इच्छा होणे, अग्निमांद्य, मलमूत्रांचे आधिक्य इ. लक्षणे होतात. २. खाकरल्यास घशातून बाहेर येणारा पातळ बुळबुळीत पदार्थ; श्लेष्मा; खाकरा; बेडका. ३. फेस; फेन. [सं.]

**कफकेत** पु. कफाची जुनाट व्यथा.

**कफघ्न, कफनि:सारक, कफभेदक-सारक-कफहर-हारक** वि. कफ नाहीसा करणारे (औषध वगैरे).

**कफण-न** न. मुसलमानाच्या प्रेतावरील वस्त्र - आच्छादन : 'त्याची कफन आणून त्यास माती दिल्ही.' - मइसा ६.११२. [फा. कफन्]

**कफण(न)खायरा-रो** वि. १. कफनाचा तुकडासुद्धा विकून खाणारा. २. (ल.) अतिनीच (मनुष्य).

**कफणी-नी** स्त्री. १. कोपरापासून पुढील हात व डोके या शिवाय सर्व शरीर झाकेल असा अंगरखा; पायघोळ सदरा; बिनबाह्यांचा अंगरखा. हा फकीर, साधू वगैरे वापरतात. २. जाकीट. (व.) [फा. कफनी] (वा.) **गळ्यात कफनी घालणे** - १. संसारपाश तोडून विरक्त होणे; संसारत्याग करणे. २. भिक्षापात्र हाती घेणे, भीक मागणे.

**कफप्रकृति-ती** स्त्री. कफ किंवा कफजन्य दोष जिच्यात अधिक आहेत अशी प्रकृती. [सं.]

**कफरक्त** पु. कफाबरोबर रक्त पडणे; एक रोग : 'आम्लपित्त रक्तपित्त। वातरक्त कफरक्त। खोकलें खरूज अत्यंत। विसर्प एकां॥' - गीता १३.२४९७. [सं.]

**कफल्ल, कफल्लक** वि. अतिशय गरीब; ज्याच्यापाशी कवडीदेखील नाही असा भिकारी, भिकाऱ्यांचा राजा. (सामा.) कंगाल; दरिद्री; निष्कांचन: 'दोघेही सारखेच कफल्लक.' - नि ६६८.

**कफल्ल, कफल्लक** पु. १. कफल्ल हे जगातील आदिचोराचे नाव आहे. चोरांनी चोरी करू नये म्हणून लोक निजतेवेळी 'अस्तिक अस्तिक काळभैरव कफल्लक' असे म्हणून त्याच्या नावाचे स्मरण करतात. याला ब्रह्मदेवाने वर दिला आहे की तुझे जो स्मरण करील त्याला चोरापासून भय नाही. २. ज्याच्याजवळ अजिबात द्रव्य, पैसा नाही असा. [सं. कफल्ल]

**कफश** बूट.

**कफशदोज, कफषदोज, कफशगर** पु. जोडे, पायतणे शिवणारा; चांभार. [फा. कफश = जोडा]

**कफस** पिंजरा.

**कफा** पु. अशुद्ध अफूचा पातळ रस एका मडक्याच्या तोंडावर फडके ठेवून गाळतात व ते फडके वाळवतात, त्याला कफा म्हणतात. अफूच्या बोंडाच्या रसात भिजवलेले फडके. असे कापडाचे तुकडे इतर कापडगठ्ठ्यात घालून अफूचा चोरटा व्यापार होत असे.

**कफार(ल)त** स्त्री. पु. १. तंटा, तेढ, कब्जा. कब्जा शब्दाबरोबर कब्जा कफालत - कफावत हा विशेषत: आढळतो : 'तुम्हांजवळ आम्हाविषयी हरएक बाबेविशीं कफारत पडते, ह्या गोष्टींवर न जावे.' - पाव ९. २. आळ; तोहमत; आरोप. (क्रि. घेणे, आणणे.) : 'ही रति कफालत सरती त्याचि मज वरतीच संगत पडेल.' - राला ५७. ३. अडचण; त्रास; संकट; पेच; क्लेश; अरिष्ट. (क्रि. येणे, गळ्यात पडणे, उभा राहणे, उपस्थित होणे.) : 'वर्षापूर्वी कफारत राईला गेली, तेव्हा सगळ्यांना हायसं वाटलं.' - आआशे ४०. ४. लचांड; झट; झेंगट; पीडा. (क्रि. येणे.) [फा. कुफ्रात् = कृतघ्नता; अविश्वास]

**कफालत** स्त्री. जामीनकी; हमी : 'हे दफा कफालतीचे अहदनाम्यातील नाहीं.' - मइसा ७.९४. [फा.]

**कफावत** स्त्री. १. उघडकीला आणलेली, उमगून काढलेली चूक, दोष, गुन्हा. (क्रि. काढणे, घेणे, जाणणे.) २.भांडणतंटा; कब्जा; कलह; बखेडा. [फा. कफालत]

**कफोदर** न. कफाच्या जोरामुळे होणारा एक रोग; जलोदराचा एक प्रकार. [सं.]

**कफू** कंपनी : 'बरोबर कफू लोक येकूण चार हजार पावेतो पाठविले' - आअं ८८.

**कबई-बाई-बायी** स्त्री. एक प्रकारचा अंगरखा, झगा. [फा. कबा ]

**कबकबीत** वि. पचपचीत; पाणचट (ऊस, कलिंगड, खरबूज इ.); बेचव.

**कबगीर** पु. मोठा चमचा; पळी : 'यखनी उकळूं लागताच तिला वारंवार कबगीराने हालवीत जावी.' - गृशि २.१३. [अर. कब्ब् = उलथणे, परतणे+गीर]

**कबचाड** न. कवच. (व.) [सं. कवच]

**कबज** न. १. लेखी पावती; पोच : 'ऐवज पावोन दीक्षितांची कबजें घेतलीं आहेत.' - मइसा १.२९४. २. लेखी पावती किंवा करारनामा लिहून दिल्यामुळे उत्पन्न होणारे बंधन; आळा; वचनबद्धता; लेखामुळे, वचनामुळे गुंता. ३. पाटील पटवारी याने साऱ्याच्या पोटी शेतकऱ्याला दिलेली पावती. [फा. कब्ज्]

**कबज** न. १. धनकोला देण्याकरिता जप्त केलेला माल; काहीही माल किंवा जिंदगी यांची जप्ती. अशा रीतीने जप्त केलेला माल; जिंदगी; मिळकत. २. धरणे; पकडणे; (बोलण्याचा) आधार घेणे (विशेषत: एखाद्या मनुष्याला त्याच्या भाषणात). (क्रि. धरणे, पाडणे.) ३. ताबा. (क्रि. करणे.) पहा : **कबजा** : 'एकमूठ असते तर आपले हाती कबज राहता.' - मइसा ६.६००.
वि. स्वाधीन : 'सालगुदस्त किल्ले रायगड मोगलास कबज जाला.' - मइसा १७.३८. [फा. कब्ज]

**कबज** न. मलावरोध; साखळा; अवष्टंभ. [फा. कब्ज]

**कबज** कबूल; मान्य. (नागपूरकर भोसल्यांची विस्तृत बखर)

**कबजगिरी** स्त्री. ताबा; अंमल : 'अलीकडे या राज्यात कबजगिरी आधी जाली....' - राखं १५.७८.

**कबजदस्त, कबदस्त** वि. हस्तगत; स्वाधीन : 'मुलूख कबजदस्त केला.' - मब १०३.

**कबजपत्र** न. मालकी हक्क किंवा कबजा एकाने दुसऱ्याच्या ताब्यात दिल्याबद्दलचा करारनामा.

**कबजा, कब्जा, कबजस्ती** पु. स्त्री. ताबा; अम्मल; मूठ; पकड; भोगवटा : 'दारूच्या कबजात गळ्यापर्यंत बुडाल्यावर ....' - सामा १००.[फा.] (वा.) **कबजे आकारणे** - पगाराची पावती पत्रके तयार करणे किंवा त्या पत्रकानुरूप पगार देणे.

**कब(प)जा** पु. जाकीट; अस्तन्या नसलेली बंडी : 'तिने डोक्यावरून घेतलेल्या किरमिजी रंगाच्या ओढणीतून तिने घातलेला भरजरी किनखापी कबजा स्पष्ट दिसत होता.' - स्वप २४५. [फा. कबाचा]

**कबजा** पु. तेनाळ; तलवारीच्या म्यानाच्या तोंडाशी बसवलेला धातूचा नक्षीदार तुकडा; तलवारीची मूठ. [फा. कब्ज]

**कबजा** पु. बिजागिरी. (ना.)

**कबजी** पु. संभाजीच्या दरबारातील कलुशा नावाच्या कनोजी ब्राह्मणाचे टोपण नाव, कबिजी. [सं. कबि]

**कबजी** वि. कबजात, ताब्यात असलेला; हस्तगत केलेला (सरंजाम, प्रांत) : 'सरंजाम गैर कबजी ...' - खरे ९४२.[फा. कब्ज] (वा.) ० **धरणे** - पेचात धरणे; पकडणे; गोवणे.

**कबजेगहाण** न. (कायदा) ताबेगहाण; कर्जफेडीबद्दल धनकोने रिणकोची मिळकत तिच्या उत्पन्नातून व्याज व मुद्दल फेडून घेतल्यानंतर त्याचा हिशेब ठेवून परत करण्याच्या कराराने, ताब्यात घेणे.

**कबज्गिरी** स्त्री. ताबा; अम्मल : 'अलीकडे या राज्यात कबज्गिरी आधीं जाली ते गांवीं ठाणें बैसवून तर्फा केलिया आहेत.' - मइसा १५.७८. [फा. कब्जा]

**कबड्डी** स्त्री. हुतूतूचा खेळ. पहा : **कवड्डी** [हिं.]

**कबर** स्त्री. मुसलमानाचे थडगे, पीर : 'शेवटी त्या प्रांतींच कबर होऊन राहिले.' - थोशा ६. [अर. कब्र]

**कबर-री** स्त्री. वेणी; बुचडा; खोपा : 'मस्तकीं कुटिलालकभार। सुमनीं कबर शोभतीं।' - एभा १४.४९४; 'तवकें उठोनि धाउनि पळत। कवळुनि नीच कबरीतें।' - मोविराट १.६६. [सं. कबरी]

**कबरा** वि. १. चित्रविचित्र, ठिपक्या ठिपक्यांचा (वस्त्र, पशू वगैरेवर असणारा रंग). २. करड्या रंगाचा (वस्त्र, पशू वगैरे).[सं. कर्बुर]

**कबराबांडा** वि. चित्रविचित्र रंगाचा; अनेक रंगी, मळकट पांढऱ्या रंगाचा (घोडा वगैरे). पहा : **बांडा १**

**कबरांबर** न. वेणीवरचा पदर : 'परतता कबरांवर नावरे। पदरीही ह्रदयावरि वावरे।' - नृसिंह नव १३०. [सं. कबरी = वेणी+अंबरी=वस्त्र]

**कबला** पु. नारिंग.

**कबहात** स्त्री. दोष; गुन्हा; कुभांड; तंटा : 'शपथ न दिली तर कबहाती फार आहेत तेव्हां करणें प्राप्त.' - मशियांका ६१. [फा. कबाहत = दोष]

**कबळ** पु. केस; कबरी : 'बाळाच्या कवळानिमित्त कबळा विस्तारूनियां बळा।' - आसु ४. [सं. कबरी]

**कबंध** पु. न. १. मस्तक विरहित शरीर; धड : 'सुता, संशय न धरीं मद्वीर कबंध-तुल्य अवशिष्ट।' -मोकर्ण ५.४. २. मस्तक तुटून गेले असतानाही चलनवलन करणारे धड : 'जाणो सन्मरण महा लाभें बहु नाचले भटकबंध।' - मोभीष्म ७.३९.[सं.] (वा.) ० **नाचणे** - लढाईत अतिशय कत्तल उडणे; रक्तपात होणे. एक लाख सैनिक युद्धात मेले म्हणजे एक कबंध उठून नाचू लागते असे पुराणात वर्णन आढळते.

**कबाइल** वि. काबिल; योग्य.

**कबाड** न. एक घोडा किंवा उंट नेऊ शकेल इतके ओझे (लाकडे, गवत, वैरण वगैरेचे); वैरण, कडबा, गवत यांचे ओझे; गुरांनी वाहून आणलेले जळण. (क्रि. बांधणे.) हा शब्द कोठे कोठे आखे (अर्धे ओझे) या अर्थी चुकीने वापरतात : 'कही कबाड या लष्कराचे केल्यावर....' - खरे १७०७. [हिं. कबाड = मोडके सामान]

**कबाड** पु. भाताचे काप. (झाडी)

**कबाडकष्ट-काम** न. कष्टाचे, मेहनतीचे, श्रमाचे काम; हलक्या दर्जाचे काम.

**कबाडखोत** पु. १. जंगलातील जळाऊ लाकडे तोडण्याचा मक्ता ज्याच्याकडे आहे असा खोत, अधिकारी. (को.) २. कबाड, सर्पण किंवा कडबा, धान्य वगैरे (बैलावरून वाहून) पुरविण्याचा मक्ता घेतलेला ठेकेदार.

**कबाडखोती** स्त्री. कबाडखोताचे काम, अधिकार.

**कबाडवान** पु. वाण्याच्या दुकानात मिळणाऱ्या चिल्लर औषधी व वाळलेल्या वनस्पती.

**कबाडा** पु. नुकसान. (झाडी) [हिं.]

**कबाडी-ड्या** वि. १. ओझे वाहणारा, नेणारा (मनुष्य, बैल, घोडा वगैरे). २. श्रमाची, कष्टाची, दगदगीची कामे करणारा; काबाडकष्ट करणारा; काही सुख नसताना केवळ संसाराची खटपट करणारा. ३. ओबडधोबड कामगिरीचे काम करणारा (मनुष्य). ४. क्षुद्र, हलका, कमी योग्यतेचा मनुष्य.

**कबाडी गलबत** व्यापारी मालाची वाहतूक करणारे जहाज; माल गलबत. पु. (ल.) व्यापारी.

**कबादा** पु. 'अभ्यास करणेचा कमटा.'- (तंजा.); सराव करण्याचे धनुष्य.

**कबाब** पु. सळईत घालून विस्तवावर भाजलेला किंवा कढईत तळलेला मांसाचा पदार्थ : 'काय हो कबाबाचा घमघमाट सुटला आहे.' - विवि १०-१०-२३०. [फा. कबाब = भाजलेले मांस] वि. शुष्क झालेला; वाळलेला; रोडावलेला (मनुष्य). (व.)

**कबाब** स्त्री. १. दुधी भोपळा व मुळा यांचे किसून केलेली गोळाभाजी. २. कोरड्या मसाल्याने तयार केलेली भाजी : 'पाकशास्त्रात कबाब या नावाखाली जे पदार्थ येतात ते सर्व मसाले लावून कोरडे तयार केलेले असतात.' - गृशि २.१११.

**कबाबचिनी** स्त्री. कंकोळ; एक औषधी (कोणी चुकून नागकेशरासही म्हणतात); कबाब नावाच्या झाडाचे वाळलेले फळ; रानलवंगा.[फा.]

**कबालत, कबाला** स्त्री. पु. (प्रचारात कबाला असा शब्द येतो.) १. सनदशीर विक्री; खरेदीखत; मालकी हक्कांचा कागद : 'देशमुखी आपली आपण खुश - रजाबंदीने कबालतीने फरोख्त करून दिल्ही.' - मइसा १७.१. २. कबुलायत; करार; कबूलनामा; कंत्राटदाराने केलेला करार : 'जिनसा अगर माल पुरविण्याची कबाल्यात शर्त

नसेल, त्या वेळी तशा जिनसा व माल ह्याविषयी स्थानिक अंमलदारामार्फत रीतसर हरराजी करून कबाले करावे.' - स्वारीनियम २९.( बडोदे) [फा. कबाला]

**कबालदार** पु. कबाला, करार करून देणारा; कंत्राटदार : 'कबालदारास एकादा शामियाना लावून देण्याची कबाल्याप्रमाणे शर्त असल्यास अथवा ती नसताही, स्वारी कामदार यांनी हुकूम केल्यास गोटापासून दूर एक शामियाना लावून देऊन पाहरा लाविणे.' - डुकराची शिकार १०. [फा.]

**कबाल(ले)पत्र** न. सनद; कबुलायतनामा; करारपत्र; दस्तऐवज : 'दिल्हे कबालपत्र ऐसे जे ....' - मइसा १२.१८०.

**कबाहत** स्त्री. १. दोष; गुन्हा; कुभांड : 'खरें बोलावयासी जावें तर कबाहत उठेल. ती आटोपणे मुषकील.' - मइसा ५.१६७. २. कलह; भांडण; तंटा : 'आप आपल्यांत कबाहत लागल्याने शत्रूस राजकारणे करावयास जागा होती.' - मइसा १९.३५. (क्रि. उठणे.) [फा. कबाहत]

**कबित्त, कबीत** न. १. कवित्व; काव्य. कविता. २. हिंदीतील काव्याचा एक भेद; भाट लोक म्हणतात त्या प्रकारच्या कविता. ३. कवितेचा एक प्रकार; पोवाडा, कटाव यांसारखी सामान्यतः घनाक्षरी वृत्तासारखी रचना. [हिं. सं. कविता]

**कबिरा** पु. उसाची एक जात. [क. कब्बु = ऊस]

**कबिला** पु. १. कुटुंब; बायकामुले; परिवार; जनाना. २. (विशेषत:) लग्नाची स्त्री; घरधनीण; मालकीण. [फा.]

**कबिला** पु. (नाविक) बाक व पठाण यांना जोडण्याकरिता केलेला लोखंडी जाड गजासारखा खिळा. हे खिळे बाहेरून ठोकतात.

**कबिलेदार, कबीलदार** वि. कुटुंबवत्सल; बायकोमुले असलेला; प्रापंचिक. [फा.]

**कबिलेमाही** क्रिवि. महिन्यापूर्वी : 'त्यास कबिलेमाही दादासाहेबाबाबे व चिखली वगैरे फत्तेसिंगराव गायकवाड यांचे मुलखाबाबद मजकूर मरकूम केला आहे.' - मइसा १०.१६४. [फा. कब्लि+माह]

**कबि(बे)शी** (नाविक) स्त्री. दोन्ही टोके अणकुचीदार असलेला लोखंडी खिळा; सुरखा (दोन फळ्या जोडण्याच्या कामी उपयोगी).

**कबीर** पु. मोठा.

**कबीरपंथ** पु. कबीर संप्रदाय; कबीर (१५ वे शतक) नावाच्या रामभक्त साधूने स्थापन केलेला एक भक्तिसंप्रदाय.

**कबु(बू)तर** न. माणसाळणारा व संदेश घेऊन जाणारा एक पक्षी; कबूतर; कपोत. याच्या रंगपरत्वे पांढरा, काळा, शिराजी वगैरे जाती. [फा.]

**कबुतरखाना** पु. १. कबुतरे ठेवण्याची जागा; कबुतरे पाळण्याची, वाढविण्याची जागा. २. खुराडे; ढावळ. [फा.]

**कबुतरबाज** वि. कबुतरे पाळणारा; कबुतरे खेळविणारा. [फा.]

**कबुलात, कबुलायत, कबुलायतनामा** स्त्री. १. (कायदा) कबूलनामा; करारनामा; लेखी अथवा तोंडी केलेला करार; संमतिपत्र : 'ते त्याच्या हाती देण्यापूर्वी थट्टा करणार नाही ..... अशा कबुलायती घेऊन ...' - पलको ३०९. २. (महसुली) वसूल, खंड किंवा सारा देणाऱ्याचा साऱ्याच्या रकमेच्या कबुलीबद्दलचा करार. [फा. कबूलियत्]

**कबुली** स्त्री. १. संमती; मान्यता; स्वीकार; होकार. २. (कायदा) आरोपीने गुन्हा केला आहे अशाबद्दल अनुमान निघेल अशी कळविलेली तोंडी किंवा लेखी हकीगत. [फा. कबूल्]

**कबुलीजबाब** पु. १. (कायदा) वादीचे म्हणणे मान्य आहे असा प्रतिवादीने न्यायसभेत दिलेला लेख. २. आरोपीने आरोप कबूल असल्याबद्दल दिलेली जबानी. [फा.]

**कबू** पु. उसाची एक जात. हा जाड असून पेऱ्यावर उभ्या लाल रेषा असतात. (गो.) [क. कब्बु= ऊस]

**कबूतर** न. १. लहान मुलांच्या 'दस्ता पिंजर' या खेळातील संज्ञा. २. चार ही संख्या.

**कबूतांदूळ** पु. एक उत्तम प्रतीचा तांदूळ.

**कबूल** वि. १. मान्य; पसंत; संमत; राजी (गोष्ट, वस्तू वगैरे). २. मान्यता देणारा; संमती देणारा (मनुष्य); अनुकूल. ३. मान्य केलेले, पसंत केलेले (कार्य, वचन). (क्रि. असणे, करणे.) [फा.]

**कबूल कतबा-पा, कदबा, कागद** १. वादाचा निकाल लागण्यापूर्वी पंचांनी दिलेला निकाल आम्हांला मान्य आहे असा पंचापुढे वादीप्रतिवादीने दिलेला लेख, मान्यतापत्र. २. (महसुली) पाटलाने घेतलेल्या साऱ्याला कबुली देणारा रयतेचा कबूलनामा, संमतिपत्र. ३. कबुलीलेख : 'हा कबूल कागद लिहून दिल्हा.' - मइसा ६.१८०.

**कबूस** पु. गलबतावरील भटारखाना - स्वयंपाकघर. [इं.]

**कब्ज** पहा: **कबज**

**कब्जी** पहा : **कबजी** : 'लष्कर पावसाळे दिवसात छावणीस आपले कब्जी देशात यावें.' - चित्रगुप्त ३६.

**कब्जेदार** पु. हक्कदार.

**कब्बू** वि. १. घेतलेले ऋण परत करण्याच्या कामी चिकट (ऋणको); खमक्या; धक्काबुक्कीला तयार. २. जड हाताचा; चिक्कू; चिकट (माणूस). (प्रां.)

**कब्रस्तान-स्थान** न. मुसलमान लोकांची मसणवट, स्मशान. [फा.]

**कम** पु. (परीट) भट्टीचे पाणी, खारे पाणी.

**कम** वि. १. अल्प; थोडे : 'आपल्यास शिबंदी कम पडे म्हणोन लिहिलें ते कळलें ..' - मइसा ६.२२९. २. उणा; कमी; उणीव असलेले. उदा. आण्याकम रूपया; शेर कम मण.[फा.] (वा.) ० **लावणे** - १. आगरात दरबिघा माड, पोकळी अमुक इतक्या असाव्या असा शिरस्ता. त्याहून कमी लागण करणे. २. कमी लागणीमुळे कमी केलेला सारा. (कों.) वि. अल्पबुद्धीचा; कमी समजुतीचा; मंदमती. [फा.]

**कमअस(स्स)ल** वि. १. हलका; कमी योग्यतेचा. २. अनौरस; दासीपुत्र; अकुलीन. : 'मी कमअस्सल नाही.' - चंद्रग्र ८. [फा.]

**कमइज्जत** स्त्री. बेअब्रू; अप्रतिष्ठा : 'अमा गैरहिसाबी जाजती सोसून कमइजतीनें व गैरमेहेरबानीनें पेशजी ही खिद्‌मत केली नाहीं व पुढेंही न करूं.' - इम ६७. [फा.]

**कमकदमी** स्त्री. पिछेहाट; पराभव :'सिंद्याकडील प्रकार दिवसेंदिवस कमकदमीचे वर्तमान येतात....' - नाग २.९५.

**कमकमचे** अक्रि. थक्क होणे; आश्चर्यचकित होणे. (गो.)

**कमकस** वि. कमी कसदार; कमी दर्जाची (जमीन.) (क्रि. होणे.) :'ती (हत्यारे) एकसारखी कमकस होत गेली.' - गांगा १४७.

**कमकसर** वि. जवळपास; सुमारे; थोडे कमी असलेले; कमीत कमी :'मशारनिलेस जाऊन कमकसर एक साल गुजरलें.' - मइसा १०.१६४. [फा.]

**कमका** पु. रद्दा :'सित्यानं त्येच्या पाठीत खोपरानं कमका घाटला.' - गोता ८५.

**कमकुवत** वि. दुबळा; अशक्त; हलका; कमजोर; निर्बळ; अधू.[फा.]

**कमचा-ची** स्त्री. १. फोक; फोकाटी; बारीक छडी, शिपटी; शिरटी. [हिं.] २. बांबूची बारीक कांबीट; कामटी :'गोसावी नंग पिऊन भांग हाती घेऊन समशेर कमची खबर आम्ही घेतों फिरंग्याची।' - ऐपो २९२. ३.वेताची छडी, काठी; चमकी :'म्हणे गंगु हैबती हो अशी कशी प्रीती तुमची महादेव। ख्याल करती विलायती थेट कमची।' - प्रला १४३.

**कमजवाद** पु. कमीपणा किंवा आधिक्य; उणाई किंवा फाजीलपणा; उणीव किंवा चढ.
वि. कमजास्त; कमीअधिक :'अर्शी पत्रे येतात, त्यापक्षीं २ दिवस कमजवाद, परंतु मसलत होते.' - ऐलेसं ६६४४.[फा. कम+जियादा]

**कमजोर** वि. दुर्बल; अशक्त. पहा : **कमकुवत**

**कमट-ठ** न. कासव; कच्छ; कूर्म :'रूपे कमट तुझा पती तीव्र पृष्टी आकृती।' - होला ३०. [सं. कमठ]

**कमटा-ठा** पु. धनुष्य (विशेषत: कळकाचे किंवा शिंगाचे). तीरकमटा असा संयुक्त शब्द बहुधा येतो :'गोसाव्यानें लगट करून मार बसवी तिरकमट्यांचा।' - ऐपो ३९२. [सं. कमठ = बांबू]

**कमडी** स्त्री. १. वेळूचे कांबीट; बांबूची कामटी :'तिनशे साठ कमड्या जळविल्या पिंजऱ्याकारण.' - एहोरा ८.३९. (ना.) २. कोपरापासून मनगटापर्यंतचे हाड. पहा : **कंबडी**

**कमत,कमतकाठी** न. घराऊ शेती; स्वत: कसलेली शेती; घरवडा शेती; कुळंबावा :'डोंगराच्या पायथ्याशी असलेल्या कमतात....' - इन्साफ ४२. कामत (उपरी माणसाची शेती) हा शब्द यावरूनच पडला आहे. [कर्ना.]

**कमतणूक** स्त्री. पहा : **कमतरता**

**कमतनूक** वि. १. सडपातळ; कृश; बारीक; किडकिडीत; रोड (मनुष्य किंवा जनावर). २. कमकुवत; बारीक; लेचापेचा (खांब, वासा, इमारत वगैरे).

**कमतर** स्त्री. कर्तव्य करायला चुकणे; कर्तव्य टाळणे; साधारण चूक, दोष. (क्रि. होणे, घडणे.)
वि. १. उणे; कमी असलेले; अल्पतर. २. क्षुद्र; नि:सत्त्व :'पातशाही कमतर पडली असे समजून रांजियाने विजापूरचे किल्ले तळकोकणात होते ते सर्व घेरले.' - सभासद २०.२१. [फा.]

**कमतरता** स्त्री. उणीव; टंचाई; न्यूनता; तूट :'पूजेत कमतरता राहू नये.' - श्रीयो १.३८३. पहा : **कमतणूक**

**कमतरीन** वि. १. (लेखन - पत्रव्यवहारात रूढ) कमी योग्यतेचा; कमी प्रतीचा; हलक्या दर्जाचा; अतिक्षुल्लक; लेखक हा शब्द सौजन्याने योजतो :'बंदे कमतरीन.' - मइसा १५.९९. २. कमीत कमी :'सिबंदीचे कमतरीन पन्नास साठ लक्ष देणे आहे.' - मइसा १२.८७. [फा.]

**कमता** वि. कमी; उणे; अल्प; पाहिजे त्यापेक्षा थोडे.

**कमताई** स्त्री. उणीव; वाण; न्यूनता; कमतरता. [फा. कम्]

**कमतावणे** अक्रि. हलके होणे; उतरणे; हळूहळू कमी होत जाणे.

**कमतावा** पु. बट्टा; कसर; चलनमूल्य कमीजास्त झाल्याने पडणारा फरक :'रुपयाची किंमत वाढल्यास शेतकऱ्यांच्या साऱ्याच्या रुपयांची संख्या त्या प्रमाणाने कमी करून त्यास कमताव्याचा फायदा द्यावयास नको होता काय?' - लोटिकेले २.४०२. [फा. कम्]

**कमती** स्त्री. तूट; वाण; कमीपणा.
वि. १. थोडे; अल्प; कमी :'त्याला प्रसंग फार कमती असत.'- मपु ६.१९८. २. उणे; उणीव; वाण; कमीपणा. [फा. कम्]

**कमती बढती** कमीपणा व सरशी; उतार चढ; क्षयवृद्धी; सरशीनिरशी :'बाजारी अफवा (कीं) बाळोबा तात्यांच्या कारभाराची कमती, घाडगे यांची बढती आहे.' - ऐलेसं ६३६४.

**कमतीर** हलक्या वजनाची तोफ; लहान आकाराचा तोफखाना.

**कमतोल** वि. १. वजनात कमी असलेला. २. (ल.) कमी दर्जाचा; हलका; कमी योग्यतेचा.

**कमदर** पु. कमी झालेला भाव किंवा दर (विशेषत: साऱ्याचा).

**कमदस्त** पु. कमी कर किंवा सारा. [फा.]

**कमदस्ती** वि. जिच्यावरील कर कमी झाला आहे अशी (जमीन वगैरे).

**कमन** वि. सुंदर; प्रियकर; रमणीय; कमनीय :'हृदयीं बाहूनि कमना। प्रेमें लाविला स्तना।' - आपू ९. [सं. कम् = प्रेम करणे]

**कमनशिबी** वि. दुर्दैवी; दैवहीन.

**कमनशीब** न. दुर्दैव. [फा.]

**कमनाईत, कमानाईत** पु. धनुष्याने तीरंदाजी करणारा.

**कमनीय** वि. सुंदर; पसंत; मनोहर; तोषद; इष्ट :'गणाधीशा ईशा परम रमणीया कमनिया।' - दावि २२२.[सं. कम् = आवडणे, प्रेम करणे]

**कमपे(बे)श** वि. जवळजवळ; कमीअधिक :'कमलबंदीच्या यादी कमपेश केल्या असतील त्या रद्द असोत.' - थोमारो ९.२२३; 'याजवेगळे मऱ्हाटे तो कमबेश लाख फौज आहे.' - पेद १.४. पहा: **कंपेश**

**कमबख्त, कंबक्त-ख्त** वि. १. दुर्दैवी; कमी नशिबाचा; दैवहीन. २. लुच्चा; लबाड; दुष्ट :'या कमबख्त मनुष्यास माझ्या डोळ्यासमोरून दूर करा.' - गुलबकावली. [फा.]

**कमबख्खती** स्त्री. १. दुर्दैव. २. संकट; आपत्ती; मार खाण्याचा प्रसंग; शिक्षा घडण्याची शक्यता. (क्रि. येणे, भरणे.) पहा : **कंबक्ती**.[फा.]

**कमबाजी पडणे** कमी होणे; उणा पक्ष होणे :'सारे रांगडे गैरसमय पाहून व कमबाजी पडली (असे) देखोन आपले जागा गर्वारूढ जाले आहेत.' - हिंदखं १.११९.

**कमर** स्त्री. १. कंबर; कटी; मध्य; माज. २. (जंबियाचा एक डाव)

आपल्या हातातील जंबियाने जोडीदाराच्या उजव्या बाजूच्या कमरेवर कनवटीजवळ मारणे.[फा.] (वा.) ० **कसणे** - सिद्ध होणे; तयार होणे; कंबर बांधणे :'संभाजी महाराजांचा पुतळा उभारण्यास या उभयतां महाराजांच्या विद्यमान वंशजांनी कंबर कसली पाहिजे.' - सासं २.१८०. ० **खचणे** - १. अशक्त होणे; कमरेत जोर नसणे; कमर निर्जीव होणे. २. (ल.) उत्साह, आशा, धैर्य खुंटणे; हिंमत, धमक नाहीशी होणे. ० **ताठणे** - आजारामुळे किंवा अशक्तपणामुळे कमर हलविण्याची शक्ती न राहणे; एकसारखे बसून किंवा उभे राहिल्याने कमरेस ताठरपणा येणे. ० **धरणे** - कमर दुखणे किंवा ताठणे; कमरेत उसण भरणे. ० **बसणे** - कमर खचणे; धैर्यहीन होणे; घाबरणे. ० **बांधणे** - सिद्ध होणे; तयार राहणे; उत्साह बाळगणे (एखाद्या कामासाठी) :'पुढें वंशवृद्धी करण्यास्तव कंबर बांधा।'-प्रला १३१. ० **भरणे** - १. पहा : **कंबर धरणे**. २. (चर्म.) टाच व टाळा यामधील भागात भर टाकणे. ० **मोडणे** - १. पहा : **कमर खचणे**. २. ठुमकत-मुरडत चालणे :'चालता कमर ठुमकत चमकत मोडिलें।' - प्रला १५७. ० **वाकणे** - १. कुबड निघणे; वातादिविकारामुळे शरीराची कमान होणे. २. क्षीण होणे; अशक्त, दुर्बल होणे; पोक येणे. ० **सोडणे** - १. कमरेचा बंद ढिला करणे; काढून टाकणे. २. पोषाख उतरणे. ३. (ल.) विश्रांती घेणे; जामानिमा उतरणे :'सोडीना कमर कधी काढीना पायजमा।' - प्रला ६४. **कमरेचे टाके ढिले होणे** - अति श्रम होणे; फार कष्ट होणे; दमणे :'यामुळे साऱ्या नोकरांच्या कमरेचे टाके (पाच सहा तासांत अगदी) ढिले होऊन जातात.' - आगर ३.४५.

**कमर** पु. तेलकट पदार्थ विस्तवात जळला असताना येणारी घाण. (बे.) [क. कमरू = जळकट]

**कमरक-ख** न. एक झाड व त्याचे आंबट फळ; कर्मर; कंब्रक; कम्रक. हे झाड फार मोठे होत नाही. पाने पातळ, रंग हिरवा, छाया थंड असते. याच्या फळांचे लोणचे करतात : 'सप्ताळें, ऊस, पुंडे, कविठ, कमरखे, वाळकें सूक्ष्म, थोरें।' - सारुह ३.४९. [सं. कर्मरंग]

**कमरकस** पु. पळसाचा डिंक. हा औषधोपयोगी असून बाळंतिणीला देतात. हा शक्तिवर्धक आहे. [फा. कमर् + कश]

**कमरका, कंबरगा, कंबर्का** पु. १. पर्वताच्या मध्यमागचा भोवताली पुढे आलेला विभाग :'भेटी घेऊन श्रीमंतांस खालीं किल्ल्याच्या कमर्ग्यात चौक्या आहेत तेथे घेऊन आले.' - ऐलेसं ६.३१९३. २. सैन्याची बगल, बाजू, मध्यभाग :'सीतर पहाड पहा जीवबादादा कंबरक्यात सोडी बार।' - ऐपो २५८. (क्रि. मारणे). ३. एखाद्या भांड्याचा पुढे आलेला (फुगीर) किंवा (बसकट) आत गेलेला भाग; आवळ किंवा वाढलेला भांड्याचा भाग. ४. (क्व.) कंबर; मध्यभाग. ५. (मल्लविद्या) कंबरपकड, कमरेत धरणे (कुस्तीतील एक डाव).[फा. कमर्+गाह = जागा] (वा.) **कमरका मारणे** - शत्रूवर बाजूने हल्ला करणे.

**कमरकी भांडी** (पुरा.) कमरक फळाच्या आकाराची फाकेदार भांडी.

**कमरकोट, कंबरकोट** कंबरेपर्यंत लांब असलेला व अंगाला घट्ट होणारा कोट, अंगरखा. (ना.)

**कमरखवाट-टा** न. पु. कुल्ल्याचा भाग; मांडीचा सांधा; ढुंगण.

**कमरखंजर** पु. तलवार अडकविण्याचा पट्टा.

**कमरखुलाई, कमरछोडी** स्त्री. एखाद्याला सक्तीने पुढे घालून आणण्यासाठी जो सरकारी शिपाई बेलिफासारखा पाठवला जातो, त्याने थोडी गय करावी, कंबर सोडून जरा अवधी द्यावा यासाठी त्याला दिलेली लाच :'मसाल्याचे राऊत ५ असामी यांनी कमरखुलाई म्हणून घेतले ...' - ऐलेसं २८६८. [हिं.]

**कमरखोडा** पु. (मल्लविद्या) कुस्तीतील एक पेच. आपला एक पाय जोडीदाराच्या पोटाखाली घालून त्या पायाचा आपला पंजा आपल्या दुसऱ्या पायाच्या गुडघ्याच्या लवणीत धरून जोडीदाराला आवळून घुसमटून चीत करणे; कमरस्वारी; प्रतिस्पर्ध्याच्या कमरेला घातलेला विळखा.

**कमरगा** पु. लढाईच्या वेळी सैन्याचा मध्यभाग; किल्ल्यातील संरक्षित तटबंद.

**कमरछोडी** पहा : **कमरखुलाई** :'..... स्वार येऊन तूर्त मसाला व कमरछोडी द्यावयास पाहिजे.' - ऐलेसं ६६५२.

**कमरजोर** पु. शारीरिक बळ (पैसा, मित्र, बुद्धी यांच्या बलाहून भिन्न).

**कमरठाव** वि. कमरेपर्यंत; कमर बुडेल इतके (पाणी वगैरे); कंबरभर. पु. कमरेइतकी पाण्याची खोली.

**कमरताऱ्यो** पु. मुलांचा एक मैदानी खेळ. (ना.)

**कमरपट्टा-ट्टी** पु. स्त्री. १. कमरेभोवती घालायचा सोन्याचा किंवा चांदीचा पट्टा; स्त्रियांचा एक दागिना. २. कमरबंद.

**कमरपाईक** पु. शूद्रांपैकी एक जात. (गो.)

**कमरबस्ता-स्ती** स्त्री. १. सिद्धता; तयारी; सज्जता. पहा: **कमरबंदी** (क्रि. करणे, बांधणे.) :'कांस कासलीवरून ज्याने कमरबस्ता केली.' - ऐपो ७०. २. कमरपट्टा; काचा; कंबर बांधायचे वस्त्र. [फा.]

**कमरबस्तो** वि. निगरगट्ट; निर्लज्ज (मनुष्य). (गो.)[फा. कमर्बस्ता = तयार, सिद्ध]

**कमरबंद** पु. १. करगोटा. २. काचा; कमरेला बांधायची वस्तू. ३. तरवार लटकविण्यासाठी कमरेला बांधायचा पट्टा; दाली. ४. अंगरख्याला असणारा कमरेजवळ बांधायचा बंद. ५. पहा : **कमरपट्टा**
वि. सिद्ध; तयार; कटिबद्ध (एखादे काम करण्यासाठी) :'आणि कमरबंद होवोनि' - मसंगी ५०. [फा.]

**कमरबंदगी, कमरबंदी-बाही** स्त्री. १. सिद्धता; तयारी; मुस्तेदी (युद्धाची, ग्रामांतराची वगैरे); जोर; अवसान :'तमाम खुषकीतील सरदारांनी एकदिल होऊन इंग्रजांचे तंबीवरी कमरबंदी केली.' - मइसा १०.१९९. २. तयार होणे; सिद्ध होणे; काचा बांधणे (गावाला जाणे, युद्धाला जाणे वगैरेसाठी).

**कमरमोड** स्त्री. (स्वत:ची) कंबर मोडणे.
वि. १. (ल.) अतिमेहनतीचे; दगदगीचे. २. कमरमोड होण्यासारखे.

**कमरमोडी इरले** ज्याचा खालचा भाग थोडा आतील बाजूला वळवला आहे (इरले घेतलेला मनुष्य खाली वाकल्यास जो वळलेला भाग

पाठीच्या खाली येईल) असे इरले.

**कमरसरी** स्त्री. घराचे वासे वाकू नये म्हणून मध्ये आडवे घालतात ते लाकूड; भिंतीवरील सर. (गो.)

**कमरसाल** पहा : **कमरखंजर**

**कमरसांधा** पु. कमरेचा खवाटा; कुल्ल्याचा भाग; ढुंगण.

**कमरंद** न. एक झाड. पत्रीरोप. पहा : **कमरक**

**कमरा** पु. १.कोठडी; खोली; पुढची बाजू उघडी असलेली खोली, दालन, मनोरा.

**कमरी** वि. कमर दुखावलेला; कमरेला ताण बसलेला; कमरमोडका; अशक्त. स्त्री. घोड्याचा एक रोग. घोडा वरून किंवा पाय घसरून पडल्याने, उंच जागेवरून पडल्याने अथवा हवेमुळे त्याची कंबर तुटते म्हणजे लब खाते व मानेच्या शिरा तुटतात. त्यामुळे त्याला जमिनीवरून उठता येत नाही. - अश्वप २.१०९.

**कमरी, कुमरी** स्त्री. कबुतराची एक जात.

**कमरेचा काटा** पाठीच्या कण्याचा अगदी शेवटचा मणका. (वा.) ० ढिला होणे- अगदी गळून, त्रासून जाणे.

**कमरेची कमान** कुबड; वाकलेले शरीर.

**कमल-ळ** न. (वन.) १. तळ्यात, सरोवरात उत्पन्न होणारे फूल. यांचे कांदे असून त्याला लांबट देठ येतो व देठाला फूल येते. याच्या तांबडे, पांढरे गुलाबी, निळे अशा रंगपरत्वे जाती आहेत. २. पूजेचे देव ठेवायचे कमळाच्या आकाराचे एक पात्र; देवाचे आसन, बैठक. ३. गर्भ :'कमळ लागलें फिरूं पोटामधें। करी कांति बळबळा।' - पला १००. ४. केळफूल :'जैसे केळीचे कमळ। तैसे हृदयीं अष्टदळ।' - एभा १४.४६५. ५. चिलखताचा एक प्रकार. [सं.]

**कमलकला-ळा** स्त्री. १. कमलाची कांती, सौंदर्य २. (ल.) तेज; सौंदर्य; शोभा; कांती (चेहऱ्याची इ.).

**कमलगट्ट** पु. कमळाचे बी ज्यात असते तो गाभा.

**कमलबीज** न. कमळाचे बी, अठरा उपधान्यांत याची गणना होते. याचे मणी करतात. पहा : **कमलाक्ष**

**कमलयोग** पु. (ज्यो.) कुंडलीतील चारही केंद्रस्थानांत म्हणजे १।३।७।१० या स्थानांत शुभ व पापग्रह मिश्र असतील तर हा योग होतो. दोन्ही प्रकारच्या ग्रहांच्या सान्निध्यामुळे सुखसंपत्ती सहजासहजी मिळत नाही पण संकटातून मार्ग काढण्याची व संकटावर मात करण्याची क्षमता असते.

**कमला-ळा** स्त्री. १. लक्ष्मी; पद्मा :'शिणली कमळा जेथ वावटे।' - ज्ञा ११.२१९. २. (ल.) सुंदर स्त्री. ३. भ्रमरी. [सं.]

**कमलाकर** न. कमळाचे तळे; सरोवर :'कमलाकर मधुपतिं जेंविं प्रेषूनी वायुसह वास।' - मोसभा १.९. [सं.]

**कमलाक्ष** पु. १. कमळाचे बी. यापासून माळेचे मणी करतात; कमळकाकडी. पहा : **कमलबीज**. २. कमलासारख्या डोळ्यांचा परमेश्वर; देव :'तुमचे छायेसी बैसला कमलाक्ष।' - हरि १८.५९. (नवनीत पृ.२२३).

स्त्री. एक फूलझाड.

न. त्याचे फूल.

वि. कमळासारखे सुंदर डोळे असलेला; कमलनयन.[सं. कमल+अक्षि]

**कमलिनी-ळ(ळी)ण** स्त्री. १. कमळाची वेल. २. सूर्योदयानंतर उमलणारे कमल; कमलपुष्प :'मुक्तता होऊं पाहे, कमळिणीपासुनि भ्रमरा।' - होला १६. [सं.]

**कमलिनीवरचा बिंदू** १. कमळाच्या पानावरील पाण्याचा थेंब. २.(ल.) कमलाच्या पानावर पाण्याचा थेंब पडला असताना पानाच्या गुळगुळीतपणामुळे तो वाटोळा होऊन गडगडत पडून जातो. यावरून आयुष्य, संपत्ती, वैभव, ऐश्वर्य वगैरेची क्षणभंगुरता व अनिश्चितता दाखवण्यासाठी काव्यातील उपमा. ३. मन, हेतू, वचन यांचे चंचलत्व, असत्यता व बेभरवसा दाखविण्यासाठीही योजतात. पहा : **पाण्यावरचा बुडबुडा, अळवावरचे पाणी**

**कमवता** वि. मिळविणारा; पैसे मिळवून घर चालवणारा. कर्ता पुरुष.

**कमविणे** अक्रि. कमावणे; मिळविणे; प्राप्त करून घेणे; कमाई करणे. [सं. कम् = इच्छा करणे][हिं.कमाना]

**कमविणे** अक्रि. १. कातडे वगैरेवर संस्कार करणे; नरम करणे. २. मेहनतीने, व्यायामाने शरीर तयार करणे. ३. शेताला खत घालून, नांगरून त्याची मशागत करणे; लागवडीला उपयुक्त करणे.[सं. कम् कान्तौ]

**कमशकुनी** वि. नाजूक; फारसे श्रम सहन न करणारा, होणारा. (व.)

**कमसखुनी** वि. मितभाषी; थोडे बोलणारा; संकोची :'बरे मर्द आणि कमसखुनी भले माणूस नेकजाद दाऊदखानाचा वाफा जालियावरी तवाई खाली आले.' - पेद १७.१७०.[फा. कम = थोडे+सखून = उक्ती]

**कमसल** वि. १. पहा : **कमअस्सल** [फा. कम्+अस्सल]

**कमसिन** वि. वयाने लहान; अनुभव नसलेला :'अद्याप आपण कमसिन आहात. माझी सारी उमर याच खेळात गेली.' - श्रीयो १.४१९.[फा.]

**कमसेरा** वि. स्वस्त; कमी रोजाचा; कमी मजुरीचा :'कमसेरा परंतु चांगले गाडदी मिळाले तर ठेवून त्यास पाठवून तेथे आहेत ते तुम्ही आपलेजवळ आणावे.' - पेद २८.१९९.

**कमळकाकडी** स्त्री.१. कमळातील बी. २.एक वनस्पती. पहा : **कमलाक्ष**

**कमळदाँका** पु. एक पक्षी. (गो.)

**कमळपिंडी** स्त्री. (नृत्य) कमळाच्या आकारात उभे राहून नृत्य करणे.

**कमळपुट** न. कमळाचा ठसा :'लागति सथाउं धोटे :आंगी उमटति कमळपुटें॥' - शिव ७१२.

**कमलाक्ष** स्त्री. कमलाच्या मण्यांची माळ.

**कमंडलु-लू** पु. न. माती, लाकूड, कडू भोपळा किंवा धातू यांचे केलेले पाण्याचे भांडे; तुंबा. विशेषतः संन्यासी किंवा ब्रह्मचारी वापरतात.:'करिं कमंडलु दंड मृगजिन।' - नवनीत १०९. [सं.]

**कमंद** स्त्री. जाळे, दोराची शिडी. [फा.]

**कमंद अंदाज** जाळे टाकणारा शिकारी. [फा.]

**कमा** पु. घोड्याच्या पायाला होणारा एक रोग. - अश्वप २.२८२.

**कमाई** स्त्री. १. मिळकत, प्राप्ती; नफा; फायदा :'जो दुवा देशील पांथा तेवढी माझी कमाई।' - यशोधन. [हिं.] २. (ल.) पुण्याई; भाग्य; पूर्वसंचित :'घटकेत बुडाला सरली ज्याची कमाई।' - ऐपो ४०५. [सं. कम्]

**कमाई** स्त्री. १. मशागत, मेहनत (शेताची-नांगरून, खत घालून, पाणी देऊन वगैरे). २. पीठ मळणे (भाकरीकरिता); तिंबणे (कणीक वगैरे); चेचणे. ३. तुडविणे, मळणे (चुना वगैरे); एखादी वस्तू तयार करण्यासाठी मळणे, मिसळणे वगैरेसाठी करावी लागणारी खटपट. ४. वठणीला आणणे; शिकवून तयार करणे (घोडा वगैरे). ५. कातडी कमावण्याची क्रिया व त्याबद्दलची मजुरी. [सं. कृ-कर्म]

**कमाईपूत** वि. कर्ता; मिळवता; कमाई करणारा (पुरुष).(ना.)

**कमाऊ** वि. मिळविणारा; कर्ता, जोडता (पुरुष).

**कमाऊ** वि. चांगला तयार केलेला, मळलेला, चिकट केलेला, कमावलेला (चुना, रंग, माती वगैरे).

**कमाऊ** वि. विकत घेतलेले; (भावार्थाने) सर्वस्व वाहिलेले; एकनिष्ठ; धन्याचा फायदा करून देणारे :'आम्ही चाकर स्वामीचे कमाऊ आहोत...' - मइसा ३.१२३.

**कमाऊपूत** पु. कुटुंबातील कर्ता पुरुष; पोशिंदा; कुटुंबातील मिळवता मनुष्य. (सामा.) जोडता पूत.

**कमाकम** क्रिवि. जोराजोराने; फटाफट : 'रेड्याच्या फुडच्या सांध्याजवळ कमाकम कमकं घाटलं.' - गोता ६१.

**कमाच** न. एक तंतुवाद्य :'वीणा चिपोळ्या कमाच चिरका' - दावि १७५. [फा. कमान्चा = एक तंतुवाद्य]

**कमाण-न** स्त्री. १. अर्धवर्तुळ; महिरप (इमारतीच्या बांधकामातील); बांधकामाचे वजन सारखे वाटले जावे म्हणून दरवाजे, खिडक्या वगैरेवर गोल, निमगोल इ. प्रकारचे जे बांधकाम करतात ते. २. धनुष्य; कमठा; मुलतानी कमान (धनुष्य) फार प्रसिद्ध असून तिची उपमा नेहमी देण्यात येते :'आली वीरश्री हात कमान घातला।' - ऐपो ८८; 'मुलतानी भुवया कशा कमाणा जशा बाहार मधी कुंकाचे टिकलीचा।' - होला; शिंगापासून केलेले धनुष्य. १०४. ३. घड्याळ, कुलूप, उंदराचा सापळा वगैरेमधील दाब उत्पन्न करणारी पोलादी कंसाकृती अगर वर्तुळाकृती तार किंवा पातळ पट्टीची रचना; आडवी पट्टी :'घड्याळातील कमानीचा धर्म सुटण्याचा आहे. ती सारखी सुटण्याचा प्रयत्न करीत असते.' - सृष्टी २८. ४. (पिंजारी धंदा) पिंजारी लोकांचे कापूस पिंजण्याचे हत्यार (धनुकली). याला तात लावलेली असते. ५. (सुतारी, कासारी) सामला फिरविण्यासाठी हात दीड हात लांब काठीच्या टोकाला सुतळी बांधून तयार केलेले हत्यार, धनुकली. ६.(ल.) इंद्रधनुष्य : 'विलसती गगनात कमाना।' - दावि ३७९. ७. (जरतारी धंदा) तराकातील फिरकी दाबून धरणारे साधन; कुत्रे. ८. शरीराची विशिष्ट रचना; हात व पाय जमिनीवर टेकून तोंड वर करून पोटाचा भाग उंच उचलणे. ९. बैलगाडीला (ऊन, पाऊस लागू नये म्हणून) तट्टया घालण्यासाठी आतून कळक किंवा वेत याच्या कांबी बांधतात त्या. [फा. कमान = धनुष्य] (वा.) ० **चढणे** - उत्कर्ष होणे; सरशी होणे.

**कमाण** स्त्री. कामगिरी; चाकरी.

**कमाण-न काढणी** घोड्याचा दागिना.

**कमाण(न)गार** पु. १. धनुष्यबाण तयार करणारा. २. हाडवैद्य :'खाले माकणीवर पडोन मांडी जाया जाली, मग कमानगार आणोन बांधली.' - मइसा ३.११२. [फा.]

**कमाण(न)दार** वि. १. महिरप, कमान असलेला (अंगरखा, भिंत वगैरे). २. ज्याच्याजवळ धनुष्यबाण आहे असा; धनुर्धारी :'मालजेठी कमानदार।' - दावि ६९. [फा.]

**कमाण(न)मारी** वि. धनुर्धारी; धनुष्यबाण धारण करणारा; तिरंदाज.

**कमान** स्त्री. पहा: **कमाण**

**कमान** स्त्री. पतंगाला लावलेली कंसाकार कांबटी. [फा.]

**कमानचक्र** न. चक्राप्रमाणे एकसारख्या कमानी टाकण्याची कसरत.

**कमानदार** पु. १. जखमा शिवणारा; शल्यतंत्री :'सरकारचे कमानदार वगैरे जखमा शिवणारे श्रीमंतानी पाठवून दिले.' - हरिवंब १०. २. पिंजारी.

**कमानदार** पु. धनुष्य हे राजचिन्ह धरणारा, एक दरबारी सेवक.

**कमानिक** पहा : **कमान** ५

**कमानीन** पु. सैन्यातील श्रेष्ठ अधिकारी; सेनापती. [इं.कमांडर]

**कमाल** स्त्री. १. आत्यंतिकता; पूर्णता; पराकाष्ठा; सर्वांत उच्च मर्यादा. २. (एखाद्या खेड्याचा किंवा प्रदेशाचा) जास्तीत जास्त सरकारी वसूल. हा लागवडीच्या जमिनीवर आकारलेला नसून एकूण एक जमीन जमा धरून ती पेरली असताना तिच्यात येणाऱ्या अति उत्कृष्ट पिकाचा अंदाज करून त्या प्रमाणात बसविलेला असतो; कुलजमा; वसूल :'साऱ्या प्रांतात कमाल जमेवर रयत निस्बत दर सद्दे दहा रुपये.' - ऐलेसं ५.२४७१.

वि. आत्यंतिक मर्यादेचा; पराकाष्ठेचा; पूर्ण; अतिशय :'त्याजवरि दिवसेंदिवस कमाल मेहेरबानगी.' - चित्रगुप्त १११.[फा.] (वा.) ० **करणे** - कल्पनातीत वागणे, पराकोटीला जाणे; अतिशय हुशारी दाखविणे; (ल.) विचित्रपणे वागणे :'जेथे शूरपणा अनंत समरीं शत्रुप्रती दीपवी। तेथे भीरुपणा कमाल करुनी देशास त्या लाजवी।' - भांडाअ ३०३. ० **होणे** - कळस होणे; अतिरेक, हद्द होणे; पराकाष्ठेप्रत पोचणे :'आतां मात्र कमाल झाली म्हणायची?' - (फाटक) नाट्यछटा १.

**कमाल** पु. कमाल या शब्दाचा मूळ अरबी अर्थ पूर्णता, संपूर्णता. हा जमाबंदीच्या कामात अनेक सामासिक शब्दांत येतो. जसे :- कमालपत्रक, कमालझाडा इ. पूर्वीची एकंदर सर्व इनामे, मूळचा किंवा एकंदर सारा, मोजणी, वसूल इ. या समासात कमाल या शब्दाचे जागी कमाली असाही शब्द योजतात. मुसलमानांशी संघटन असलेल्या लोकांच्या तोंडी कमाल शब्द पूर्णत्व किंवा अतिशय या अर्थानेच परंतु अनिर्बंध रीतीने येतो. जसे :- कमाल दौलत - नशीब

इ. वगैरे. शिवाय स्वतंत्र रीतीनेही जसे :- जरीमरीचे कमाल, दारिद्र्याचे कमाल इ.

**कमालखानी सवाल** निरुत्तर करणारा प्रश्न; बिनतोड प्रश्न :'रसिक टीकाकारांनी, मुस्कटदाबी करणारा बिनतोड कमालखानी सवाल करणाऱ्या केशवसुतांकडे ....' - सह्याद्री सप्टेंबर १९४०.७४५. (कमालखान या नावावरून बनवलेला शब्द).

**कमालखानी हार** गुडघ्यापर्यंत लांबीचा व दोन ते आठपर्यंत पदर असलेला फुलांचा मोठा हार; कंठा :'कमालखानी हार अमोलिक तुरे तसेच राहिले।' - प्रला १००. (वा.) ० **व पंचवीस लडे तुरा** - एक मोठा हार व मोठा तुरा. २. (ल.) अंग अत्यंत सुशोभित करणे (दागिने, कपडे वगैरे घालून).

**कमाल तनखा** कुलजमा; कुलवसूल. पहा : **कमाल २**

**कमाल धारा** अधिकतम; जास्तीत जास्त येणे शक्य असलेला सारा. हा इ.स. १७६९ त ठरला गेला.

**कमालपत्रक, कमालझाडा** न.पु. तनखा, रगबा, कूळ, इनाम, मोजणी, वसूल, दर वगैरेंच्या एकुणात रकमांच्या तपशिलाचा पट.

**कमाल रगबा** तालुका किंवा खेडेगाव यातील एकंदर जमीन.

**कमालीचा** वि. अतिशय विलक्षण.

**कमावणी** स्त्री. जमिनीची मशागत; जमीन कमावणे.

**कमावता** पहा : **कमवता**

**कमावशी** स्त्री. मेहनत. (कु.)

**कमाविशी-वसी-वीस** स्त्री. १. (सरकारी) वसुली. २. वसूल जमा करणे; वसुली काम; जिल्ह्याधिकाऱ्याचे काम; अमीनी :'मक्त्याच्या कमाविशी करून गोविंदपंताने सरकारचा फायदा करून दाखविला.' - मइसा १.६६. ३. कारभाराची व्यवस्था; कारभार; देखरेख (खाजगी, जहागिरी किंवा सरकारी). ४. हाती घेतलेल्या एखाद्या कामातील नफा, कमाई, प्राप्ती, फायदा, लाभ. ५. दंड, जप्ती किंवा इतर बाबींपासून झालेली वसुली. ६. कमाविसदाराने कमाल बेरजेच्या बाहेर केलेला वसूल. ७. मिळकत.

**कमाविसदारी** स्त्री. कमाविसदाराचे काम किंवा त्याचा हुद्दा.

**कमावीसदार** पु. १. वसुली कामावरील मुख्य अधिकारी. २. मक्त्याने वसुलीचे काम करणारा (ही पद्धत पूर्वी संस्थानात होती):'कमाविसदार म्हणजे संस्थानच्या वसुलाचा मक्तेदार होय.' - बडोदे राज्यकर्ते ३५५.

**कमिटी** स्त्री. १. पोटमंडळ; समिती; विशेष प्रश्नाचा विचार करून निर्णय करण्याकरिता नेमलेला एखाद्या संस्थेच्या सभासदांचा अगर काही गृहस्थांचा लहान गट; चौकशीमंडळ. २. व्यवस्थापकमंडळ : 'स्त्रियांमध्ये संक्षोभन करून शेवटी एक प्रचंड कमिटी (व्यवस्थापक मंडळी) उत्पन्न केली आहे.' - लोटिकेले ४.९०. ३. पंचायत. [इं.]

**कमिनावाना** वि. नालायक.

**कमियणे** क्रि. कोमेजणे; मलूल होणे :'नारळीची डाबी गडच्या कशाला कमियेली।' - लोक शब्द ४९.

**कमी** वि. १. न्यून; उणा; वाण असलेला. २. आखूड; त्रुटित; तुटका. [फा. कम] (वा.) ० **करणे** - १. काढून टाकणे. २. अंगचुकारपणा करणे :'कान्हेररायांनीं ते समयीं कमी केली असे लहानथोर म्हणतात.' - ऐलेसं २३४०. ० **नसणे** - तसाच किंवा तितकाच असणे. ० **लेखणे** - १. कमी किंमत देणे. २. खालच्या पायरीवरचा समजणे; वाजवीपेक्षा कमी समजणे.

**कमीज** पु. खमीस; शर्ट; एक प्रकारचा सदरा, कुडते. [फा.]

**कमीन** वि. १. हलका, कमी दर्जाचा; क्षुद्र; उपकार न स्मरणारा; बदनियत; नीच :'कमीनाचे बाईल व मूल बनाम कमली व राम ऐसे दस्तगीर होऊन ....' - भाद्वीसंवृ ५०. २. स्वतः आपण (पत्रव्यवहारात सौजन्यदर्शन). ३. चाकर; नोकर; बंदा. [फा. कमीन]

**कमीपण-पणा** न. पु. १. उणीव; कमतरता. २. हलकेपणा; क्षुद्रपणा; मानहानी. [फा. कम] (वा.) ० **आणणे** - बेअब्रू करून घेणे. ० **घेणे** - स्वतःचा हीनपणा, चूक, दोष, अपूर्णता कबूल करणे; आपल्याकडे दोष पत्करणे. ० **येणे** - बेअब्रू होणे.

**कमीपेशी** वि. कमीजास्त; चूकभूल. पहाः **कंपेश.** [फा. कम्+बेश]

**कमील** पहा : **कमीन** :'..... सकल भार कमीलचे असता (या कमीलचा सकल भार आपणावरच असतां) पत्रीं विशेष उपचार लिहिणे काय असे?' - ऐसेसाखं ११.२३.

**कमुनीदाद** स्त्री. ग्रामसंस्था. (गो.) [पोर्तु. कम्युनिदाद]

**कमोद** पु. तांदळाचा एक प्रकार. या तांदळाला उत्तम वास येतो.

**कमोद** पु. (संगीत) गायनातील एक राग. पहाः **कामोद**

**कमोद** न. एक प्रकारचे कमळ; चंद्रविकासी कमळ.[सं. कुमुद = पांढरे कमळ]

**कम्तरीन** वि. नीचतम. [फा.]

**कम्हा** पु. मोठा खंजीर.

**कय** १. पंचमी विभक्तीचा प्रत्यय. पेक्षा; ऊन; हून. जसे :- मज्जाकय. (गो.) २. द्वितीया किंवा चतुर्थीचा प्रत्यय :'पोटाकय् पण नाय्.' - मसाप २.४.३६८. (कुण. को.) [सं.कृते]

**कय** न. पोरेबाळे. (गो.)

**कय** क्रिवि. १. कधी; केव्हा. (चि. गो.) २. कोठे; खय, खे. (को.). [सं. क्व]

**कय** स्त्री. जहाजे लावण्याची सोईची जागा. (कु.) [इं. की = धक्का]

**कय(र)पंजी** स्त्री. हातात वागवायची पणती, दिवा. (गो.)

**कयरवपांडव** पु. कृष्णकमळ. (झाडी).

**कयसान** वि. कळकलेले. (खा.) [सं. कलंक+सम ; फा. कय = कडवट]

**कया** स्त्री. १. तजेला; टवटवी; आरोग्य; निरोगीपणा (चेहऱ्याचा, शरीराचा). २. शरीर. (झाडी) ३. कळा; अवकळा :'मना मोहरले, उनी मसाननी कया।' - लोसा शब्द ४९. [सं. कला]

**कयाखाऊ** वि. १. तेज नाहीसे करणारे; कळाहीन. २. बदनाम, दुर्लौकिक करणारे.

**कयाज** पु. विचार; सल्ला :'.... तुमचे कयाज आम्ही मुजरेस येत नाहीं.'

- ऐलेसं ५२०५. पहा : **कयास**

**कयामत** स्त्री. १. प्रलय; जगाचा अंत; सर्वनाश : 'यजमानाचें विपरीत वर्तमान आम्हांस कयामतशी भासली, अत्यंत फिकरीत होतो.' - मइसा ३.३७२. २. ख्रिस्ती किंवा मुसलमान धर्मश्रद्धेप्रमाणे जगाच्या अंतानंतर परमेश्वराकडून होणारा न्याय : 'दुसऱ्या दिवशी कयामतीचा (म्हणजे कल्पांतीच्या न्यायाचा) दिवस उजाडला.' - सीपो ९२.[फा. कियामत]

**कयार** वि. लुब्ध; लंपट : 'जीव अस्त्रीयाचे कयार' - उषा ५४६.

**कयारी** स्त्री. वाफा; तक्ता : '... हाराळी लावून तुळसीच्या कयाऱ्या करणार.' - भाग १.३७५.

**कयावान** वि. निकोप, निरोगी, टवटवीत चेहऱ्याचा.

**कयाशी** स्त्री. यंत्र. (व.)

**कयास** पु. १. तर्क; अनुमान; अंदाज : 'कयास पुरता करून आम्हांकडे किमपि अंतर नाहीं ऐसे समजोन....' - ऐलेसं ६.३१७२. २. मत; न्यायाधीशाने दिलेला निवाडा, निकाल. ३. विचार : 'कयास मज हा लया रुद्र करि दया दृष्टि झांकली।' - ऐपो ३६८ (क्रि. ठरवणे, काढणे, ठरणे, बांधणे, निघणे, करणे.) ४. निश्चय; सिद्धांत : 'त्यांनी पट व मठाधिकार अनुभवावा ऐसा कयास करून देशमुख व देशपांडे व समस्त पंचाईत यांनी सविस्तर मजकूर निवेदन केला.' - ऐलेसं ३४९१. [फा. कियास]

**कयास** पु. मुक्काम, निवास.

**कयासनामा** पु. निकालपत्र; हुकूमनामा; निकालाची नक्कल. [फा.]

**कयाहीन** वि. १. मंद; सुस्त; आळशी. २. निस्तेज; रोगट.

**कयाळनिशी** स्त्री. मापाऱ्याची कारकुनी : 'बेदरी पातशाहा होते, तेथे निळोपंत कयाळनिशी करीत होते.' - मइसा ८.३२.

**कयेला** वि. सडका. (झाडी)

**कर** वि. (एखाद्या) गावात राहणारा, गावचा, असे दाखविणारा प्रत्यय. जसे :- काशीकर, पुणेकर, होळकर इ.

**कर** पु. १. हात; हस्त : 'सुंदर तें ध्यान उभे विटवरीं। कर कटावरी ठेवूनिया॥' - तुगा १. २. सोंड (हत्तीची) : 'गजेंद्राचे बंधू कवळुनि गजेंद्रा निजकरीं।' - र ५७. ३. किरण; अंशू : 'शिवतला चंद्रकरीं।' - ज्ञा ११.२४८. (वा.) **० जोडणे, जोडून उभे राहणे**- अभिवादन करणे; विनम्र होणे, सेवक म्हणून सज्ज राहणे : 'भूत भविष्य वर्तमान ज्ञान । हें ज्यापुढे उभे कर जोडून।' - हरि ३१.१० **करास कर मिळविणे** - हातावर हात देणे : 'मेळऊनी करास कर।'- नव १३.१४ [सं.]

**कर** पु. १. सरकारी कारभाराबद्दल मोबदला; मजुरी देणे; जमिनीवरील सारा; पट्टी; मालावरील जकात; खंड; खंडणी : 'त्यांनीं आपल्या इच्छेप्रमाणे स्वतंत्र सेस म्हणजे कर बसवून शिक्षण वाढवावें.' - केले १.११८. २. गावकामगार व बलुतेदार (जोशी, कुलकर्णी, पाटील इ.) यांना सरकारकडून दिला जाणारा ठराविक मुशाहिरा. ३. नाव, तर, रस्त्यावरील वाहतुकीचे वाहन यांच्याकडून घेतली जाणारी दस्तुरी, रस्तापट्टी, नाकेपट्टी. ४. विशिष्ट तीर्थ व देवता यांच्या दर्शनाला जाणाऱ्यांकडून घेतले जाणारे शुल्क. ५. नियमाने ठरवून दिलेले शुल्क. (सामा.) ६. सेवाकार्यासाठी बसविलेला आकार. उदा. घर-नळपट्टी, वीज-वाहनशुल्क इ. ७. मिळकतीवर शासनाने बसविलेला आकार, वेगवेगळ्या वस्तूंच्या विक्रीवर बसविलेला आकार. . [सं.]

**कर** पु. कृती; संबंध; संपर्क; हात (कामधामात). उदा. ज्याला कर नाही त्याला डर नाही = ज्याच्या हातून पाप इ. काही घडले नाही त्याला भीती बाळगण्याचे कारण नाही.

**कर** स्त्री. १. ग्रहण, अयन संक्रांती व होळी आणि ज्या दिवशी गावात कोणी मनुष्य गेला असेल अशा दिवसांच्या पुढे येणारा दिवस. हा दिवस अशुभ मानतात. त्या दिवशी कोणतेही शुभकृत्य किंवा गमन करू नये. जसे :- संक्रांतीची कर. [त. करिनाळ्] [ सं. करिदिन]

**कर** स्त्री. दिव्याचा एक प्रकार. धर्मग्रंथावर तुळस व भांड्यात गंगेचे पाणी ठेवून ते आरोपीने डोक्यावर घेणे. ठरावीक मुदतीत त्यावर काही आपत्ती न आल्यास त्याचा निर्दोषीपणा सिद्ध होत असे.

**कर** वि. १. कर्तृत्वदर्शक समासातील शेवटचा शब्द; करणारा. जसे :- प्रकाशकर, शीतकर, सुखकर. २. विशिष्ट कामधंदा करणारा. काठकर, पोयकर इ. क्रिवि. ध्वन्यनुकारी अव्ययापुढे येणारा शब्द. जसे : झटकर, पटकर. [सं. कृ = करणे]

**कर** वि. करपलेले; जास्त भाजल्यामुळे काळे झालेले. [क. करि = भाजणे, करपणे; करकु = करपलेले]

**करएक** वि. कर्तबगार; उमेद बाळगणारा : 'ते बहुत शहाणे, मोठे कामाचे करएक जाणोन पेशव्यानी स्वतःकडे मागोन घेऊन ' - दसकैया १०३.

**करक** पु. दिंडा नावाच्या तांबड्या झाडाचा फोक. शिमग्यात हे फोक मुले फुफाट्यात भाजून, जमिनीवर आपटतात तेव्हा आवाज होतो. [सं. करीर]

**करक** स्त्री. आखडल्यामुळे, ताण बसल्यामुळे किंवा वातविकाराने मानेत, पाठीत भरणारी लचक, उसण किंवा निघणारी कळ : 'पाठीमध्ये करक भरली।' - दास १८.१०.२४. [हिं. करक = दुखणे]

**करक** पु. १ कमंडलू; नारळाच्या करवंटीचे बेले (संन्यासी, ब्रह्मचारी पाणी पिण्यासाठी उपयोगात आणतात). २. झालीतील दिवा. [सं. करक]

**करक** पु. स्त्री. पावसातील गार : 'मग अमृतघनाच्याही जीची हांसेल धूलि करकेला॥' - मोआदि २.१२०. [सं.]

**करकच(ट-स)णे-करक चावणे** उक्रि. १. जोराने घट्ट आवळून बांधणे (पुडके, ओझे वगैरे). २. पक्के, गच्च धरणे (बांधणे, आवळणे, ओढणे, धरणे या क्रियापदांना जोडून हा शब्द येतो. जसे :- करकचून बांध, धर). [ सं.क्रकच]

**करकचा** पु. १. करकोचा; शरीर किंवा वस्तू यांना दोरीने आवळून बांधल्यामुळे उमटणारी खूण. (राजा.) २. एखाद्या वस्तूला दोरी बांधण्यासाठी पाडलेली खाच. ३. ओरखडा.

**करकटणे** अक्रि. १. भाकरी वगैरे करताना हाताला पीठ लागून हात करवडणे; स्वयंपाकाची भांडी खरकट्याने करवडणे, बरबटणे, भरणे. २. भांड्याला चिकटणे, लागणे (भात, पीठ इ.). [क. करकु = कीट]

**करकदन** पु. गेंडा.

**करकभिंग** स्त्री. कर्क संक्रांत. (व.) [सं. कर्क]

**करकमळिका** स्त्री. तंबोरी :'शीर कापून आपुलें देखा। यंत्र केले करकमळिका।' - गुच ६.७१. [सं. करकमल]

**करकर-रा** स्त्री. १. कर्कश; कानाला अस्वस्थता उत्पन्न करणारा; कानठळ्या बसविणारा आवाज (कावळ्याच्या ओरडण्याचा, लोखंडी वस्तूवर कानस घासताना, दात खाताना, दार वगैरेचा होणारा) :'कावळ्याने भयंकर करकर चालविली होती.' - झांमू १०. २. कटकट; त्रास; आरडाओरड (भिक्षेची, रागाची इ.) :'सदा करकर संतांसवें।' - ब ५४३.५. ३. भांडणतंटा, कचकच; कुरकुर :'तेथेंही झाले कुमर। त्यांसी वाढला मत्सर। त्या दोघांची करकर। वृद्धापकाळीं सोसावी॥' - जै ८९.४०. ४. हट्ट; तक्रार; त्रास; कुरकुर. पहा : **कटकट** [ध्व.] (वा.) ० **करणे** - तंटा करणे; कटकट करणे.

**करकरणे** अक्रि. १. (कावळ्याने) 'काव ! काव !'शब्द करणे. २. करकर आवाज करणे (दार, पायातील जोडा, दोरी, लाकूड वगैरेंनी) :'तंव तो पर्वत समग्र। एकाएकीं करकरिला।' - हरि १२.७३. ३. कर्कश, कर्णकटू शब्द उच्चारणे.

उक्रि. निंदागर्भित बोलणे; कर्णकटू बोलणे. [ध्व.]

**करकरा** पु. भांडण.

**करकराट** पु. एकत्र कर्कश आवाज; हलकल्लोळ; मोठ्याने करकर शब्द होणे :'दात खाऊनि करकराटी।' - मुसभा ७.२४. [ध्व.]

**करकरीत** वि. १. अगदी नवा; कोरा; ऐन नवा; नवेपणामुळे कडकड, खडखड, सळसळ आवाज करणारा (नवा जोडा, कापड वगैरे, केव्हा केव्हा घर, भांडे, दागिने यांनाही लावतात) :'क्वीन्सरोडनं धावणारी एक करकरीत गाडी.....' - कॉंग १५५. २. सामान्यत: करकरीत हा शब्द नवा, ताजा, कोरा या शब्दापुढे आधिक्य, जोर दाखविण्यासाठी लावतात. जसे :- नवा करकरीत, कोरा करकरीत. ३. कुरकुरीत; खाताना ज्याचा करकर आवाज निघतो असा (पदार्थ, काकडी, आंब्याचे नवे लोणचे). [ध्व.]

**करकरीत** वि. कच्चा; हिरवा :'एके हिरवीं करकरितें। येकें बहुबीजें बुचबुचितें।' - भाराकिकां १५.९१. [ध्व.]

**करकरीत तिन्हीसांजा** स्त्री. फुटकी सांज; ऐन संध्याकाळ; सूर्य मावळल्यानंतरचा संधिप्रकाश (ही वेळ अशुभ मानतात) :'वेळ करकरीत तिन्हिसांजाची होती.' - अभा ६३.

**करकरून** कचकावून; कचकून; रगडून; खंचाटून; घट्ट, जोराने, न सुटेल असे आवळून. (क्रि. बांधणे, धरणे, खेचणे, ओढणे.) :'भस्म ललाटीं धरितो कीं करितों प्रथम बद्ध करकरूनि।' - मोसभा ५.४३.

**करकऱ्या** वि. १. किरकिऱ्या; करकर आवाज करणारा (नवा जोडा, दार, लाकूड इ.) २. अशक्त; रोगट; रडवे; कटकट लावणारे (मूल).[ध्व.]

**करकसा** पु. वाद; भांडण.

**करकंडा** पु. तुकडा :'एकदम करकंडा पाडला की ....' - हगो १०६.

**करकाठी** स्त्री. एक हत्यार :'करकाठिया खोचणें प्राण। तें गौडयुद्ध जाणावें।' - मोआदि ३१.५२.

**करकांड** न. दंड; खांदा व कोपर यांच्यामधील भाग :'हाणिती करकांडी गदा। मांसाचा करिती चेंदा।' - कथा ३.१०.१४०. [सं.]

**करकी** स्त्री. डोण्यात गूळ ओतल्यानंतर काहिलीला लागून राहणारा गूळ; गुळाची खरवड. (बे.)[क. करकु = भांडे जळल्यामुळे त्याच्या बुडाशी बनणारी कीट]

**करकी** स्त्री. हरळी; दूर्वा.

**करकेतन, कर्केतन** न. एक रत्न. याचा रंग रक्त किंवा मधासारखा असतो. हे राजेलोक वापरीत असत. पूर्वी हे फार प्रसिद्ध होते पण हल्ली दुर्मिळ आहे. [सं. कर्केतन]

**करकोचा-ची** पु. स्त्री. १. मऊ पदार्थावर दोरी वगैरे आवळल्यामुळे उठणारा वण, खूण. (क्रि. पडणे.) २. लाकूड, काठी वगैरेला दोरी बांधण्यासाठी पाडलेली खाच; अवटी. पहा : **करकचणे**

**करकोचा** पु. एक पक्षी; भारडी; लांब पाय, मान व चोच असणारा पाण्याजवळ राहणारा मासे खाणारा पक्षी. [क. कोरकंचे][सं. क्रौंच]

**करग** वि. हस्तगत; करगत; स्वाधीन :'पुण्याविणें जयश्री होईल कशी मुनीश्वरा करगा।' - मोवन ३.८०. [सं.]

**करगणे** क्रि. करपणे.(बे.) [क. करकु = जळत्या भांड्याच्या बुडाचे कीट, मस]

**करगती** वि. करवती; करवतकाठी :'घेतला करगती शेला। चवथ्या पाचव्या वनाला।' - लोसाशब्द ४९.

**करगोटा** पु. १. कमरेला बांधायचा दोरा, गोफ (रेशमी किंवा चांदी-सोन्याचा). सोन्याचांदीच्या करगोट्याला घागऱ्या असतात व मध्ये पान (शिश्नाच्छादन) असते. करगोटा सर्व हिंदू लोक घालीत असत. बडोद्यास श्रावणीच्या दिवशी मराठी मंडळीत राखी व करगोटे बांधण्याची चाल आहे :'खासी व्यक्ती स्त्री असल्यास फक्त राखी व पुरुष असल्यास राखीबरोबर करगोटा याप्रमाणे ज्या त्या खाशाकडे तिकडील जबाबदार इसमाच्या नावावर एखादा दिवस आगाऊ पाठवून वाटणीच्या यादीवर पावत्या घेणें.' - ऐरापुप्रं १४.६६९. २. रहाटगाड्याच्या रहाटाच्या चक्रावर बरोबर मध्यावर बांधलेली दोरी. ही सुंभाची असते. (को.) [सं. कटि+दोरक] (वा.) ० **बांधणे, वाटणे** - (बायकी) मुलगा पाच महिन्यांचा झाल्यावर त्याला प्रथम करगोटा बांधते वेळी त्याच्या समवयस्क अशा चार मुलांना एक एक चांदीचा अथवा रेशमी करगोटा साखर भरलेल्या (चांदी-पितळेच्या अगर खोबऱ्याच्या) वाटीसह देण्याची चाल आहे.

**करग्रहण** न. पाणिग्रहण; लग्न; विवाह :'स्वकरग्रहणोद्युक्ता त्या दोघांलाहि केशिनी कन्या।' - मोसभा ५.९५. (क्रि. करणे.) [सं.]

**करघूष** पु. ससाणा.

**करचणी** स्त्री. द्राक्षाची एक जात.

**करचकर, करजकर-गार** पु. हत्यारे करणारा; शस्त्रकार; शिकलगार. [सं. क्रकचकार]

**करंच(ची)ली** स्त्री. एक प्रकारची सरळ व लहान तरवार. [हिं.]

**करछा-छी** पु. स्त्री. उलथणे; हलवाई लोकांचे, दूध वगैरे आटविताना ढवळण्याचे, पदार्थ खाली वर करण्याचे साधन. [सं. करस्थ]

**कर(ं)ज** पु. एक झाड, मुद्रांचे झाड. याच्या बियांचे तेल जाळण्यासाठी उपयोगी व औषधी आहे. हे तेल कडू असते. पहा : **करंडी** [सं.]

**करज** न. (हातापासून उत्पन्न झालेले) हाताच्या बोटाचे नख : 'श्रीरमाकुचयुगीं करजांचे, बालचंद्र करिती कर ज्याचे।' - पार्थभाग्य (वामन) १०. [सं.]

**कर(झ)तकाळ** पु. कठोर, अतिभयंकर मनुष्य, प्राणी, वस्तू, कर्दनकाळ. [सं. कृतांत+काल]

**करजल(ळ)पुतळी** स्त्री. दिवा व काजळ लावलेले भांडे घेऊन शकुन पाहण्याची तऱ्हा. पहा : **करपुतळी** : 'करजळ पुतळ्याते नित्य चोरून पाहे।' - सारुह ७.७६.

**कर(ं)जी** स्त्री. १. करंज झाडाची शेंग, बी. २. एक झाड. ३. (करंजीच्या शेंगेच्या आकाराचे) एक पक्वान्न. रव्याच्या पापडीत खसखस-खोबऱ्याचे पुरण भरून व तुपात तळून हे तयार करतात.

**करजुचे** अक्रि. फार वेळ पाण्यात राहिल्याने सर्व अंगाला सुरकुत्या पडून आखडणे. (गो.)

**कर(ं)जेल** न. करंजाच्या बियांचे तेल. [सं. करंज+तेल]

**करट** पु. न. काकडीच्या जातीचे एक अतिशय कडू फळ. याच्या आतील मगज काढून टाकून सालीचा पणतीसारखा दिवा लावण्यासाठी उपयोग करतात; कडू कारंटे. पहा : **करवट** [सं.]

**कर(ं)ट** न. अतिशय आग होणारे गळू; उठाणू; उबाळू : 'स्तनमान काय पावे जरिहि उरीं वृद्धि पावलें करट।' - मोकर्ण २८.३३. [सं.]

**करट** पु. १. मृताच्या अकराव्या दिवशी करायचे श्राद्ध. २. कावळा; काक : 'परि तूं वरटेसि करट नीच। कसा मान्य काय होशील।' - मोविराट १.१३२. [सं.]

**करट** वि. (पोळी-भाकरीचा) काठ; बाजूचा कडक भाग : 'रोटियाची करटे आणि केळाचिया साली।' - लीचपू १९.

**करटा, करंट-टा** वि. १. दैवहीन; दुर्दैवी; कमनशिबी; हतभागी : 'नव्हेसी वीरवृत्तिलाठा। अति करंटा नपुंसका' - एरुस्व ६.४२; 'पालथा घट करटा जन।' - यथा २.७५५. २. कंगाल; दरिद्री; कृपण : 'त्या सुखास लात मारून। जात आहे करंटा॥' - नव २१.११८. ३. (व्यापक) भिकार; ओसाड; नापीक; धनहीन (गाव, देश). ४. निष्फळ; वांझोटा; बेकायदेशीर (मनातील विचार, बेत, कल्पना, शक्कल इ.). ५. नास्तिक; उदासीन : 'धर्माविषयीं फार करंटा।' - अमृतराय ५२. ६. फसणारा; निष्फळ होणारा (उपाय इ.). [सं. करट]

**कर(ं)टा बांगडा** समुद्रातील बांगडा या नावाचा एक मासा.

**कर(ं)टी** स्त्री. लहानसे करट, गळू, पुटकुळी (पुवाने भरलेले क्षत) : 'त्या दुर्गंधीला तोंड पडून करट्याच्या रूपाने म्हणा ... पापी म्हणून बोट दाखविता येत नाही.' - भाऊ अं. २, प्र १.[करट-करंट शब्दाचे लघुत्वदर्शक रूप]

**करटी** पु. हत्ती : 'कीं काल व्याल करटि-घोटक-भट-भेक खावया सुटले।' - मोभीष्म ३.५९.[सं. करट = हत्तीचे गंडस्थळ; करटी = हत्ती]

**कर(ं)टी, करव(ं)टी, करोटी** स्त्री. १. डोक्याची कवटी. २. नारळाची कवची, सबंध, अर्धी किंवा तुकडा; कवचीचे केलेले पात्र; नरटी; नरोटी. करवंटीची बटणे करतात. हिचे तेल गजकर्ण, नायटे यांना लावतात.[सं. करोटी] (वा.) **करोटी हातात येणे** - भिकेला लागणे.

**करटुलग्या** दारू. (कु.)

**करटुली-ले-करंटोली-ले** न. स्त्री. एक वेल व तिचे फळ. ही वेल ५-६ हात पसरते. हिला आषाढात फळे येतात. फळांचा रंग हिरवा असून वर काटे असतात. हिच्या फळांची भाजी करतात. यास कांटली, कंटोली, रानकारले म्हणतात. [सं. कर्कोटकी]

**करटे** न. कवच; आवरण; पाठ : 'चालतेयां दळाचेनी भारें। कूर्माचे करटे कुसकरें।' - शिव ५४०. [सं. करोटी]

**करटे** न. वाईट अन्न; कदन्न; भाजीभाकरी. (क्रि. खाणे) [सं. करट]

**करड** स्त्री. एकदाच घरटीतून भरडून काढलेले किंवा एकदाच घाव घातलेले भात; वरील टरफल निघालेला तांदूळ; भरड, असडी तांदूळ : 'कच्ची करडही (न सडलेले तांदूळ) भिजवून खोबऱ्यांबरोबर खात असू.' - माजी २३३.[क. करडु = भरड] (वा.) ० **काढणे** - भराभर कसेतरी उरकणे; अव्यवस्थितपणे पण सपाट्याने काम करणे. ० **खाऊ लागणे** - (हत्ती) मस्तीला येणे.

**करड** स्त्री. न. तांबूस रंगाचे, वाईट वास असलेले, खरखरीत डोंगरी गवत; कुसळी गवत : 'मी आणि गोपाळ उंच वाढलेल्या करडातून भटकायचे.' - शेलूक ५९. (को.)

वि. शुष्क (तुळतुळीत नसलेले); रुक्ष; खरखरीत; राठ; ताठर (केस). [क. करड = वाळलेला चारा, गवत]

**करड** वि. कडक; कठोर : 'नाना शब्द करडे होडे ध्वनी फूटती।' - गरा १०३.

**करड** स्त्री. केसाचा राठपणा, खरखरीतपणा (करड गवतासारखा) : 'दाढीमिशीला करड आली होती.' - रानगंगा.

**करड** पु. उंदराने खाल्लेला कापूस. (व.)

**करड** अडुळसा. एक औषधी वनस्पती.

**करडई** स्त्री. १. एक पालेभाजी. हे झाड ढोपराइतके वाढते. पाने लांबट असून त्यांची भाजी करतात. फुलांपासून कुसुंबा रंग काढतात. याच्या बियांचे तेल काढतात व पेंड गुरांना घालतात. तेलाचा जाळण्यासाठी व खाण्यासाठी उपयोग करतात. २. एक उपधान्य; करडईचे बी. ३. धोत्रा. [क.करडकाई]

**करडकांगोणी** स्त्री. कांगोणीचा एक प्रकार.

**करडकूट-गूळ** न. करडईचे कांड किंवा भूस (करडई बडवून बी काढून घेतल्यानंतर राहिलेले).

**करडणे** अक्रि. पांढुरके, भुरकट, करड्या रंगाचे होणे : 'तेव्हां करडैजे कांति। डोळे कोंदनी जाती। सुढाळपणाचे भाव काढती। जाउनी टवकेपणे।' - ज्ञाप्र ८२३.

**कर(ं)डणे** उक्रि. कुरतडणे; (उंदीर, घोडे वगैरे प्राण्यांनी कपडे) दातांनी चावून फाडणे, भोक पाडणे : 'दांत लाउनि बळें करडावें।' - किंगवि २९; 'उंदराने करंडलेले टोपले.' - स्मृतिचित्रे २.

**करड भाजणी** जाचणूक; छळणूक. (व.)

**करडा** पु. (पाक.) नारळाच्या खवलेल्या चवापासून तयार केलेली पोळी. हिला 'सोयची पायडिश' असेही म्हणतात.

**करडा** वि. १. भुरकट; काळा व पांढरा मिश्र असा एक रंग. २. भुरकट रंगाचा; पांढऱ्या रंगावर काळे व तांबडे ठिपके असलेला (घोडा). ३. अर्धवट पिकलेले, कांळे पांढरे (केस). ४. तेल न लावल्याने रुक्ष, राठ झालेले (शरीर, केस). [क. करड]

**करडा** अर्धवट सडलेला; करड (तांदूळ). [क. करडु]

**करडा** वि. १. कडक; निष्ठुर; कठोर; रानटी; पक्का (मनुष्य, जनावर). २. सख्त; जाज्वल्य; कठीण (अंमल, कारभार इ.). ३. भेसळ केल्यामुळे कठीण, टणक झालेले (लोखंड, चांदी वगैरे).[क. करडु]

**करडा** पु. १. (सोनारी धंदा) ठसे उठविण्याचे किंवा खाचा (रुपयाच्या कडेला असलेले चरे, रेघा) पाडण्याचे पट्टीसारखे एक हत्यार. २. सोन्याच्या तारेवर रेघा वगैरेसारखी उठविण्याची नक्षी, तरवारीच्या मुठीवर व पट्ट्यावर किंवा बुगड्यांवर अशा प्रकारची नक्षी असते. अवटीवर तार दाबून ही नक्षी वठवितात. कोंदणकामासाठी करड्याच्या नक्षी - खाच्यात तार किंवा पट्टी बेटतात.

**करडा** पहा : **खर्डा**

**करडा** पु. करडईचा दाणा : 'बयत्याचे करडे हातघाण्यावर रगडले म्हणजे तेल मिळत होते.' - काळी आई ३.

**करडा अम्मल** १. कडक सत्ता; कठोर, निष्ठुर कारभार. २. धुंदी; अंधता; सामर्थ्य; उन्माद (एखाद्या कैफकारक वस्तूचा).

**करडा इन्साफ** खोटा, अन्याय्य निकाल.

**करडाची आवटी** (सोनारी) करडा तयार करायचा ठसा. याला खाचा किंवा भोके असतात.

**करडापट्टी** स्त्री. १. (सोनारी धंदा) सोने, चांदी वगैरे धातूच्या लडीचे तुकडे पाडण्याचे हत्यार. (गो.) २. (नाविक) गलबताच्या बाजूच्या भोवती असणारा फळ्यांचा किंवा कळकाच्या कांबीचा (पावसाच्या झडीच्या निवारणार्थ) लावलेला पडदा.

**करडा हात** पराक्रम; जोराची कृती; त्वेषयुक्त क्रिया : 'ल्हान पराई होउनि शूरानें करडा हात केला.' - ऐपो ८९.

**करडी** स्त्री.मेंढी. [सं. कररी]

**करडी** पहा : **करडई** : 'कुणास न मिळे भाजी, कुणी राजी, करडी मिळो आंबाडी जुनी।' - ऐपो ३७०.

**करडी** वि. १. कठोर; निष्ठुर. पहा : **करडा.** २. पक्की; आवळ. (माळवी)

**करडी** स्त्री. एक प्रकारचे पांढुरके, आखूड बारीक व निपाती गवत.

**करडी कमान** १. भुवयांचे आकुंचन (कपाळास आठी पडताना होणारे). २. वक्रदृष्टी; क्रूरता. (वा.) **० धरणे** - दात धरणे : 'त्यांनी शिंगावर करडी कमान धरली.' - फकिरा ६०.

**कर(रं)डी ढोल** एक प्रकारचे चामड्याचे रणवाद्य; मोठा ढोल; करंढोल. [क. करडे= पखवाज; दोन्हीकडून वाजणारा ढोल]

**करडी नजर** वक्रदृष्टी; निष्ठुरता; कडक पहारा; सक्त देखरेख; गैरमेहेरबानी; अवकृपा; क्रूरता.

**करडी मर्जी** १. खप्पा तबियत; इतराजी; राग. २. मनोवृत्तीचा कडकपणा; करडेपणा; निष्ठुरता.

**करडू-डे** न. शेळीचे, बकरीचे लहान पिल्लू, कोकरू. शेळीच्या सुमारे तीन महिन्यापर्यंतच्या पिलाला म्हणतात.

**करढोक-ढोकी-डोक, कडेढोक** पु. एक पक्षी; करकोचा.

**करण** पु. (भूमिती) काटकोन त्रिकोणातील काटकोनासमोरील बाजू किंवा चतुष्कोनातील समोरासमोरचे तिरपे कोनबिंदू जोडणारी रेषा; कर्ण. [सं. कर्ण]

**करण** न. १. कोणतेही कृत्य करण्याचे साधन; साधनीभूत वस्तू; साहित्य : 'म्हणौनि इंद्रियातें आम्हीं। करणें म्हणों॥' - ज्ञा १८.५०६. २. कान; शरीरावयव; इंद्रिय : 'जाणिजे तेवीं करणें। सांगती ज्ञान॥' - ज्ञा १३.१७९. ३. करणे; कृती; कार्य : 'कैसें वो तुमचे करण। जे पुढिला एओ पाहे मरण।' - शिव ८२०. ४. (समासात) करणे; करण्याचा व्यापार. जसे :- एकीकरण, शुद्धीकरण इ.[सं. कृ = करणे]

**करण** न. (व्या.) तृतीया विभक्ती व तिचा अर्थ. [सं. कृ = करणे]

**करण** न. योगमुद्रा : 'पांचही करणें प्रकटलीं।' - लीचपू ५८४.

**करण** न. १. (नृत्य) हस्तपादांची संयुक्त क्रिया. ही करणे १०८ आहेत. २. (नृत्य) दोन चारींचा समूह. [सं. कृ =करणे]

**करण** रतिक्रीडेतील आसन : 'करणचातुर्य न पढे सुंदरी।' - उगी ५३२.

**करण** पु. दागिन्यात उभा लटकता बांधायचा, लंबोळ्या आकृतीचा लोलक वगैरेसारखा भाग. (बडोदे)

**करण** मंत्रिमंडळ : 'अमात्य रुद्रपैयेत्यादि श्रीकरणं।' - विहार शिला १.

**करण** वि. उंच. (व.)

**करण** न. १. (ज्यो.) चंद्र व सूर्य यांमधील अंतराच्या ६° भागास करण ही संज्ञा आहे. प्रत्येक तिथीत पूर्वार्धात एक व उत्तरार्धात एक अशी दोन करणे असतात. एकूण करणे ११ आहेत. २. इष्टशकापासून ग्रहादी गणित साधन.

**करण-णो** पु. करंडा (कुंकवाचा). (गो.) [सं. करंड]

**करणकुवारी** स्त्री. कोरफड; कुवारकांडे; कवारपाठा. (व.)

**करणकुसूं** न. (सांधकाम) दोन लाकडे एकमेकांत बसविण्याची पद्धत, तऱ्हा (कानाच्या आकाराचे कुसू करून).

**करणग्रंथ** ग्रहपंचांग.

**करणग्राम** पु. १. इंद्रिय समूह. २. देह; शरीर : 'कासया हा करणग्रामु। वोसु पाडावा।' - गीता १.२३४२. [सं. करण +ग्राम]

**करण, करणाची चौकट** स्त्री. करणकुसवाने सांधलेली चौकट.

**करणता** स्त्री. साधनात्मकता; साधनीमूलतत्त्व : 'आणि आपण होऊनी कर्ता। ज्ञाना आणी करणता।' - ज्ञा १८.४९४.

**करणपुतळी** पहा : **करपुतळी**

**करणफल** न. (ज्यो.) करणाच्या स्वामीनुसार शुभ किंवा अशुभ फल.

**करणरूप** न. (व्या.) कोणत्याही धातूचे विधिरूप, अस्तिवाचक रूप (आहे या अर्थी). जसे :- मी आहे, तो आहे.

**करणवाच्य** न. (व्या.) तृतीयांत नाम. [सं.]

**करणसार** वि. काम करायला समर्थ :'मला कशाला श्रेय तुमची विहीण करणसार असताना?' - आआशे ५६.

**करणा** पु. कर्णा; आरंभी लहान व शेवटी मोठे होत गेलेले पितळेचे तुतारीसारखे एक वाद्य. चौघड्याच्या शेवटी कर्णा वाजवतात.[फा. कर्णा] (वा.) ० **फुंकणे** - गावातील सर्व लोकांना जेवायला बोलाविणे; जेवणाचे जाहीर आमंत्रण देणे. (कर.)

**करणाबिदरी** स्त्री. एक प्रकारचे नक्षीकाम.

**करणालची** पहा : **करणेकरी** :'महबुदल्लाखान रोहिले आणि करणालचीस गोळी लागली.' - ऐलेसं ३५०९.

**करणावळ** स्त्री. एखादे काम केल्याबद्दलची मजुरी.

**करणिक** पु. १. कर्णिक; लिहिणारा; कुलकर्णी. २. श्रीकरणाधिपतीच्या कचेरीतील कारकून. हे आडनाव कायस्थप्रभूंमध्ये रूढ आहे :'मलि मालो दत्त येकू। करणिक।' - चौऱ्याशीचा लेख (पंढरपूर, शके ११९५). [सं. करणि = लिहिणे, लेखन]

**करणी** स्त्री. हत्तीण :'तो जुझारां गडे: पांहूं भारशांखळ काढे : तोहि करणीये पडे :धाओ न धरी।' - उगी ३५९.

**करणी** स्त्री. (गवंडी काम) गिलावा वगैरेचा चुना, चिखल, सिमेंट इ. साफ करण्याचे हत्यार; थापी :'त्याच्या हातातली करणी ओघळती होऊन थरथरत होती.' - उअं ५६.

**करणी** पु. लेखक; लेखनाधिकारी.

**करणी** स्त्री. एक झाड.

**करणी** स्त्री. १. कृती; क्रिया; कार्य करणे; करण्याची पद्धत; वागणूक; आचरण :'वीर उदंड असति परि त्याला पार्था तुझी नये करणी।' - मोकर्ण ४५.५१. २. लीला; अलौकिक गोष्ट. याचा प्रयोग विस्मयकारक किंवा लोकोत्तर कृत्यासंबंधी करतात :'न कळे देवाची करणी।' - ऐपो ३५५. ३. लग्नात हुंड्याशिवाय वर व तत्पक्षीय मंडळींचा करायचा मानपान, सत्कार, देणगी (वस्त्रे, दागदागिने वगैरे देऊन). (क्रि. करणे.) ४. एखाद्याला उद्देशून केलेले चेटूक, जारणमारण, मंत्रतंत्र इ. प्रकार; कवटाळ :'ते पतिवंचका निर्धारी। सर्व काळ करणी करी।' - कथा ५.२.४८. ५. अचाट कृत्य; पराक्रम :'कळे राजेंद्राची त्वरित शरसंधान करणी॥' - र २. [सं. कृ -करणे]

**करणी खुसपट** १. अडचण; अडथळा. २. कारस्थान :'करण्या खुसपटे चित्तास येईल ती करून त्याचे केले धूलीस मेलवणे.' - पुदभा १.२४६.

**करणी-गत** वि. (ग.) वर्गमूळ पूर्णांकात येत नाही अशी (राशी).[सं.]

**करणीचा** वि. कृत्रिम; कृतीचा तयार केलेला; बनवलेला. (राघू, घोडा, मनुष्य वगैरे मातीची चित्रे) :'करणीचे कांहीं न मनें सज्जना। यावें लागे मना वृद्धांचिया।' - तुगा २८६३.

**करणीचा आंबा** कलमी आंब्याचे झाड व फळ.

**करणीचा रोग** मंत्र, तंत्र, जादूटोणा वगैरेंनी उत्पन्न केलेली बाधा.

**करणी चिन्ह** (ग.) घातांक दाखवणारे चिन्ह. उदा. क्ष.

**करणीची बाधा** पहा : **करणीचा रोग**

**करणीचे पागोटे** पगडबंदाने ठोकळ्यावर बांधून तयार केलेले पागोटे (डोक्यावर बांधलेले नव्हे).

**करणीय** वि. करायला योग्य, उचित (असे कर्म, धर्मकृत्य) :'परी करणीया अकरणीया न देखा। अर्पेपरू नोळखा।' - ऋ ४५. [सं.]

**करणीराशी** स्त्री. (ग.) घातांकचिन्हाखाली येणारी संख्याराशी.

**करणीसार** क्रिवि. कृतीप्रमाणे; कर्मासारखे.

**करणे** उक्रि. १. उरकणे; उलगडणे; तडीला नेणे; बनविणे; जमविणे; रचणे. २. होणे; घडून येणे; बनणे (अकर्मक प्रयोग.) जसे :- मला मळमळ करते. ३. एखाद्या पद्धतीने वागणे; एखाद्या पद्धतीला अनुसरणे. [सं. कृ = कर्] (वा.) **करून घेणे** - एखाद्याकडून, द्वारे काम उरकून घेणे, एखाद्याच्या मार्गाने तडीस नेणे, मिळविणे, संपादणे. **करून चुकणे, टाकणे** - (एखादे काम) पुरे करणे, संपविणे :'ती तर अस्मादिकांना पसंत करून केव्हाच चुकली.' - माझी पण तीच गत (उषाग्रंथमालिका) ६.

**करणे** न. कृती; कर्म; काम.

**करणे** शअ. कालवाचक शब्दांना लागणारा मर्यादादर्शक शब्द; पर्यंत; पावेतो; बरोबर; च्या वेळी; त्यापेक्षा उशिरा नाही (वेळ दाखविणारे अव्यय, मोल्स्वर्थ).

**करणे** सक्रि. अनेक नामांना जोडून येणारा व त्या संबंधीचा क्रिया दर्शविणारा धातू. जसे : - तो अभ्यास करतो, ती स्वयंपाक करते, तो काम करतो, गारुडी सापाचा खेळ करतो - अशा वाक्यात नाम (कर्ता) + नाम (कर्म) + करणे अशी रचना असते. नामाच्या अर्थानुसार करणे याच्या अर्थालाही विविध छटा प्राप्त होतात. उदा. मूर्तिकार मूर्ती करतो. (घडवतो, बनवतो), राजा युद्ध करतो (लढतो), तो अन्न भक्षण करतो (खातो, जेवतो). अनेक इंग्रजी नामांना किंवा धातूंना हा धातू लावून बोलण्याची पद्धत आहे. असा धातू अकर्मक असल्यास त्याला होणे या धातूची रूपे लागतात. जसे :- मालकांनी त्याला डिसमिस केलं, पंचांनी त्याला डिस्क्वालिफाय केलं, हे रिराइट करून द्या.

**करणेकरी** वि. कर्णा वाजविणारा.

**करणेर** न. वराला द्यायची देणगी; मानपान. पहा : **करणी** २ :'समर्थे दुबळ्यांचे करणेर साजिरें केलें।' - सप्र १४.३९.

**करतड** वि. खरतड; कमनशिबाचा; दुर्दैवी. (व. घाटी) पहा : **खडतर**

**करतल** पु. तळहात; हाताचा तळवा :'प्रत्यक्बुद्धी करतळें। हातवसावें॥' - ज्ञा १५.२५८. [सं.]

**करतलभाष** स्त्री. हातावर हात मारणे; वचन देणे :'असें वदून करतलभाष। देऊन तुष्ट केलें त्यास।' - नव १५.१७७.

**करतलभिक्षा** स्त्री. १. घरोघर जाऊन जे अन्न कोणी घालील ते तळहातावर घेऊन तिथल्या तेथेच उभ्या उभ्या खाणे; अशाप्रकारचे व्रत किंवा भिक्षा. २. (ल.) घरदार नसणे, फटिंग असणे; भिक्षावृत्ती. [सं.]

**करतलामल-मलक-मलकवत** वि. क्रिवि. (हातात प्रत्यक्ष असलेला आवळा जसा सर्व बाजूंनी पाहता येतो त्याप्रमाणे). १. सिद्ध; स्पष्ट;

उघड; ज्याचे सर्व बाजूंनी ज्ञान झाले आहे असे; ज्याला दुसऱ्या प्रमाणाची गरज नाही असे; संशयातीत : 'वेदशास्त्राचा मथितार्थ। झाला करतलामलकवत्।' - एभा ११.१०४९. २.(ल.) अवगत झालेली; हातचा मळ बनलेली; अत्यंत सुलभ; साध्य (विद्या, कला, शास्त्र वगैरे) : 'महाराष्ट्र व संस्कृत या दोन्ही भाषा मोरोपंताला करतलामल होत्या.' - नि ७६५. ३. स्वाधीन; सुगम : 'सारा भूगोल ज्यास करतलामलकवत् आहे त्यास एखाद्या रानांत नेऊन सोडला किंवा त्याच्या हाती जहाजाचें सुकाणूं दिलें तर काय मौज होईल बरें।' - नि [सं. कर+तल+आमलक]

**करतव्य** न. हकीकत; वर्तमान : 'याप्रमाणे सन तिसासमासेन साली करतव्य जाले' - ऐकोपुर.

**करतळ** न. एक वाद्य २. हाताची टाळी.

**करताल-ली-करतालिका** न. पु. स्त्री. १. (वाद्य) बाहेरच्या बाजूने निमगोल व आतून सपाट असे काशाचे टीचभर लांब व तीन बोटे रुंद व दोन्ही कडांना निमुळते असे दोन दोन तुकड्यांचे वाद्य. हे अंगठा व बोटे यांमध्ये धरून चिपळ्यासारखे वाजवतात. ताल धरण्यासाठी याचा उपयोग करतात. केव्हा केव्हा मृदंगाच्या साथीत वाजवतात. (सामा.) चिपळ्या; झांज : 'नृत्यकृत्य तत्कारतान करताल झुंमकझ्या अंतरी।' - राला ३१. २. टाळी; दोन्ही तळहात एकमेकांवर आपटून काढलेला आवाज (क्रि. वाजविणे, देणे, पिटणे) : 'अद्वय भजनें अखंड स्मरणें वाजवि करताळी।' - एकनाथ पदें (नवनीत) ४४९; 'कथा अन्वय लापणिका। नाम घोष करतालिका।' - दास ४.२.१०. ३. चुटकी; चिटकी (क्रि. वाजविणे.) [सं. कर+तल,ताल] (वा.) ० **धरणे** - हातांनी ताल धरणे; साथ करणे.

**करतुकीचा कांदा** कर्तृत्ववान : 'गाडे घोडे गाई म्हशी बैल आदणचुरी। करतुकीचा कांदा तीनदा येतो आंगावरी।' - पला ८१.[सं. कर्तृत्व]

**करतुत** स्त्री. मोठेपणा; कर्तबगारी; पराक्रम; कर्तेपणा : 'त्यानं अगदी सहजपणानंच भटमामांची करतूत पाहिली.' - काशभट ६.

**करद** वि. कर देणारा; मांडलिक : 'पांचाळ, कुलिंद, ऋषिक केले जिंकूनि करद सस्नेह।' - मोकर्ण ६.९. [सं.]

**करदनकाळ** वि. अतिक्रूर. पहा : **करजतकाळ.** [सं. कदन+काळ]

**करदर्शन** न. सकाळी उठल्यावर अन्य कोणतीही वस्तू पाहण्याआधी आपल्या हाताचे दोन्ही तळवे डोळ्यांसमोर धरून त्यांच्याकडे पाहणे.

**करदळ-ळी** स्त्री. १. एक फुलझाड; कापूरकेळ. २. केळीचे झाड. [सं. कदली]

**करदा** पु. शेतकरी; जमीन करणारा, कसणारा; स्वत: शेतीचा धंदा करणारा (मालक किंवा कूळ). हा शब्द अनेकवचनीही उपयोगात आणतात. जसे :- करदे पाटील. [सं.]

**करदा** पु. क्रोध; राग : 'लक्ष्मण दीर करदा आला। घेतिला रंग्या बापू रे।' - लोसा शब्द ५०. (को.).

**करदान बस्तान** पहा : **कर्दन बस्तन**

**करदाय, करंदे** स्त्री. १. कटकट; मोठा आवाज. (गो.) २. कठोर शब्दांनी ताडन; दु:शब्द; ध्वनी. [ध्व.]

**करदावले** न. एक प्रकारचे गवत. याची फुले पिवळी असतात. पहा : **करंदोळ**

**करदोटा-दोडा-दोरा-धोटा-धोडा** पु. पहा :१. **कडदोरा, करगोटा**.२. कमरपट्टा : 'कटीं ल्यालिसे करदोरा।' - देवीदास भामावर्णन ८.

**करदोडा-डी** पु. बांधीव विहिरीत उतरण्यासाठी बांधकामास धरून राखलेला कंगोरा. हा विहिरीच्या तळापर्यंत असून सुमारे दीड हात अंतराने ठेवतात.

**करदोडी-री** स्त्री. मोठाले दोर वळण्यासाठी तयार केलेला तात्पुरता सोपा; दोरशाळा.

**करदोंडी** स्त्री. एक प्रकारचे झाड.

**करन** पु. पोपटाची एक जात. (झाडी)

**कर न कर-री, कर ना करी-ऱ्या** १. जे करायला पाहिजे ते न करणारा व जे करायला नको ते करणारा (मनुष्य). २. हट्टी; कशानेही समाधान न होणारा; तेढा; तंडेल; वितंडवाद घालणारा; अकरनकर : 'हा तुझा करनकरी स्वभाव तुझ्या मावशीला आवडला नाही.' - बाळ २.७७. ३. दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न होणारा.

**करनकुवारा** पु. कोरफड; केतकी. (झाडी)

**करनफुल** न. लवंग.

**करन्यास** पु. अंगुष्ठ, तर्जनी, मध्यमा, अनामिका, कनिष्ठिका व करतल यांना अनुक्रमे समंत्रक स्पर्श करणे. देवता आपल्या बोटांच्या ठिकाणी कल्पणे. [सं.]

**करप-पी** पु. स्त्री. १. शिजवताना करपलेले, काळे होऊन भांड्याला चिकटलेले अन्नपदार्थ. २. अति उष्णतेने जळलेले किंवा वाळलेले पीक. [का.करकु]

**करप** न. कठीण पदार्थाचा धार असलेला तुकडा (काच, शिंप, दगड, खापर, कालवे वगैरेचा); कपरी. [सं. कूर्प= दगड, खडा]

**करपचंद** पु. (सोनारी)घड्याळाची साखळी; छडा.(गो.)

**करपट** वि. १. करपलेले; अर्धवट जळलेले (अन्न, भात, भाकरी). २. जळका, जळकट (वास). ३. अजीर्णामुळे घशाशी येणारे दुर्गंधयुक्त आंबट (ढेकर). [क. करि = भाजणे, करपणे]

**करपट** न. वस्त्राचा फाटका तुकडा; फडके : 'जैविं करपटशतें कृशान। विकसिजे जैसा।'- कथा ३.१६.१. [सं. कर्पट]

**करपट** पु. आकस्मिक येणारा तुफानासारखा वारा व पाऊस.

**करपटसड्या , करपटड्या** वि. पौष्टिक अन्न अथवा पदार्थ सेवन केले असतानाही पुष्ट होत नाही असा (मनुष्य).

**करपटाण, कपटाणि** स्त्री. करपलेल्या अन्नाचा वाईट वास, घाण.

**करपणे** अक्रि. १. भाजणे; जळणे; होरपळणे; भाजून निरुपयोगी होणे (अन्न वगैरे): 'का निपट करपोनि गेलें।'- ज्ञा १७.१५६. २. कडक थंडी किंवा ऊन यामुळे नष्ट होणे; नासणे (शेतातील पीक, झाडे): 'फळतीं झाडें करपती।'-दास ३.३.४६. ३. म्लान; निस्तेज, दुर्बळ

होणे; (भय, शोक इ. मुळे) वाळणे, झडणे, निस्तेज होणे : 'स्वास्थ्य पावे करपलिही सती ।' - मोरा १९. ४. खंगणे; दुःखाने, विकाराने शरीर क्षीण होणे; काळपटणे : 'स्पर्श जालेआं कमळांचा । तनु करपतुसे ।'- शिव ८३३. ५. कष्टी होणे; दुःख पावणे : 'तैसे तत्सौंदर्यें रतिमदन चित्तीं करपती ।'- विवि ८.१.२०. [क. करकु, करपु]

**करपणे** सक्रि. चिडणे; भडकणे : 'आम्ही पब्लिकला सतावतो म्हणून तो आमच्यावर जाम करपत असे.' - वासू १६.

**करपत्र** न. १. करवत: 'किति दिस करपत्रीं आपला जीव घालूं ।'- सारुह ३.७३. २. करवतीच्या पात्यासारखी पाने असणारी नेच्याची एक जात. [सं.]

**करपल्लव** पु. १. हाताचा पंजा; हात : 'पहात करपल्लवां जंव सरळा ।'- ज्ञा ११.२१४. २. हाताने खूण करणे; पालवणे. (क्रि. करणे.) [सं.]

**करपल्लवा, करपल्लवी भाषा, करपालवी** स्त्री. अकारादि वर्ण हाताच्या बोटांवर बसवून त्या संकेताने भाषा बोलणे; खुणांनी बोलणे; गुप्त गूढ भाषा. (क्रि. करणे.) : 'नेत्रपालवी नाटकळा । करपालवी भेदकळा ।'-दास ५.५. २७.

**करपल्लवी विद्या** स्त्री. बोटांनी केलेल्या खुणांतून विचार सांगण्याची क्रिया; मूकबधीर लोकांसाठी असलेली बोटांच्या खुणावर बसवलेली अक्षरमाला.

**करपक्ष्म** पंख हेच ज्यांचे हात आहेत असे प्राणी. (वाघूळ, पाकोळी वगैरे). [सं.]

**कर(य)पंजी** स्त्री. हातात धरायची मोठी पणती.

**करपा** पु. करपट; जळका; वाळलेला तुकडा, भाग; करपलेला भाग : 'सावळ्याने रेड्यापुढे करपी कोवळी पेंडी सोडून टाकली.'- बाब ६४.

**करपा** पु. चपटा, सपाट व पातळ शिंपला. (गो. को.) पहा : **करप**

**करपा** पु. काळ्या रंगाचे फूल येणारे एक झाड.

**करपात्री** वि. कर (हात) हेच ज्याचे (भोजनाचे) पात्र आहे असा (परमहंस); करतल भिक्षेचे व्रत घेतलेला; जोग्यांचा वर्ग: 'परमहंस करपात्री ।'- वैसीस्व १२.६१. [सं.]

**करपी** स्त्री. १. जळणे; नासणे; सुकणे; वाळणे (पावसाच्या अभावामुळे पिके इ.). (क्रि. पडणे.) २. ताप, भूक वगैरेमुळे पोटात पडणारी आग. (क्रि. पडणे.) ३. भांड्याच्या बुडाला लागलेली जळ, मस, काळेपणा. ४. करपलेले अन्न.

**करपी** वि. दोन्ही गालांवर पांढरा रंग असलेली मेंढी. (जुन्नरी)

**करपीडन** न. १. एकमेकांचा हात धरून हलविणे; हस्तांदोलनढ : 'बाकीच्यांनी सुदैवाने करपीडनावरच भागविले.'- परिपूर्ति ८. २. करग्रहण. [सं.]

**करपुतळी** स्त्री. काश्याच्या थाळ्याला लेप लावून त्यावर दिव्याच्या प्रकाशात शकुन किंवा भविष्य पाहण्याची एक रीत. कोणी हाताच्या अंगठ्याच्या नखाला काजळ लावून त्यावरही पाहतात; कज्जळपुतळी.

**करपुष्कर** न. (करकमल) १. हाताचे अग्र; बोटे. २. हत्तीच्या सोंडेचे टोक :'घे इक्षु वारण जसा करपुष्करानें । श्रीराम चाप उचली करपुष्कराने'- वामन, सीतास्वयंवर ३२. [सं. कर=हात+पुष्कर= कमल, पुष्प]

**करपृष्ठ** न. तळहाताचा मागचा, खालचा भाग; पंजाची पाठ. [सं.]

**करपेल** न. मऊ व चांगले, गुरांनी खाण्याजोगे एक प्रकारचे गवत.

**करप्रनियम** (अर्थ.) करतत्त्व; करांची रक्कम ठरविण्याचे तत्त्व.

**करपण** स्त्री. (सोनारी)अंगठ्या वगैरेंच्या ठशांची पट्टी. (खा)

**करफष** पु. सरडा : 'चार करफष व जवखाईचे मूळ बारीक करून करडई तेलात भाजून मिळवून केस गेले असतील तेथे लावावे.'- अश्वप २.३०४. [फा.]

**करब(बा)ड** स्त्री. गुरांनी खाऊन उरलेला व तुडविलेला कडब्याचा गाळ. पहा : **कडबड** : 'जावयासवें आलें घोडें। दाला देती करवाडें।'- भावार्थ रामायण ११.१०.

**करबडणे** अक्रि. खडबडीत होणे. पहा : **करवडणे**

**करबडी** आडताचा एक प्रकार.

**करबपाग** न. मासे धरण्याचे एक प्रकारचे जाळे. (को.)

**करबल** न. १. मुसलमानांच्या मोहरमात हिंदूंनी काढलेले मेळे. २. लेझिमीचा खेळ. [करबला = हुसेनचे मृत्युस्थान]

**करबला** पु. मोहरमच्या वेळी मुसलमान लोक ज्या ठिकाणी ताबुतांचे विसर्जन किंवा दफन करतात ती जागा. (बे.)

**करबंदी** स्त्री. कर देण्याचे बंद करणे; सरकारी कर (शेती व प्राप्तीवरील) न देण्याबद्दलची चळवळ :'अलाहाबाद कॉंग्रेसमध्यें करबंदी, जंगलसत्याग्रह वगैरे ठराव पास झाले.' - के ३१.४.१९३०.

**करबील** पु. एक झाड. याची पाने फोडणीसाठी उपयोगी पडतात. (गो.) पहा : **करवील**

**करभ** पु. मनगटापासून बोटाच्या मुळापर्यंतचा तळहाताचा भाग. [सं.]

**करभ** पु. हत्ती, उंट किंवा इतर पशूंचे लहान पिलू; छावा. [सं.]

**करभार-ग** पु. मांडलिक राजाने सार्वभौम राजास द्यायची खंडणी; कर. (सामा.) खंडणी; कर. (क्रि. घेणे, देणे, बसविणे.) :'श्रीमंतांस करभार देऊन आले शरण रिपू पृथ्वीवरले।' - ऐपो १९८. [सं.]

**करभूषण** न. हातात घालायचे रत्नजडित कडे : 'पिवळे पदक, करभूषण।'- - रामाची भूपाळी. [सं.]

**करम** न. नशीब; दैव. [सं. कर्म]

**करम** स्त्री. कृपा; औदार्य. [फा.]

**करम-कंद-कल्ला- गड्ढा-भाजी, करमाचा कांदा, करमड** न. पु. स्त्री. कोबी; पानकोबी. [फा.]

**करमगुस्तर** वि. दयाळू; कृपाळू; मेहरबान.

**करमटणा-णे** न. १. चटणी. २. आंबट फळे (पदार्थ) मिठाच्या खारात ठेवून खारवून केलेले तोंडी लावणे. पहा : **करंबट**

**करमणूक, कईमत** स्त्री. आनंदाने, सुखाने काळ घालविणे; मनोरंजन; करमणूक. २. खेळ; मौज; आवडता उद्योग; क्रीडा. (क्रि.होणे)

**करमणे** उक्रि. १. आनंदात, सुखात, मौजेत, चैनीत काळ घालविणे, जाणे. २. (दुःखात काळ) कंठणे. [सं. क्रमण]

**करमणे** अक्रि. एखाद्या क्षारात फळ वगैरे राहिल्याने फळाला किंवा फार वेळ पाण्यात राहिल्याने हात, पाय वगैरेंना सुरकुत्या पडणे; आक्रसणे;

चिरमुटणे; चिरम्या पडणे.

**करमफूल** न. कर्णफूल; कुड्या.

**करमबक्षी** स्त्री. कृपा :'.... तेव्हा गौरनरसाहेब बहादुर यांणीं आम्हावर करमबक्षी करून नबाब व बहादुरीचा मरातब दिल्हा.' - दसकैया २३३.

**करमर** स्त्री. एक झाड व त्याला येणारे फळ; करंबळ; करमख. याचे पान आवळ्याच्या पानासारखे परंतु थोडे लहान असते. फळ लांबट असून त्याच्या पाकळ्या थोड्या वर आलेल्या असतात. फळांचे लोणचे करतात. [सं. कर्मरंग]

**करमरा** वि. आकाराने करमराच्या फळासारखा (काचेचा, सोन्याचा वगैरे मणी); बाहेरून फुगीर करवे असलेला (मणी); जव्याचा (मणी).

**करमरे** न. हरपरेवडीच्या (लहान, रायआवळ्याच्या) पाकळीसारखी आकृती.

**करमल-ळ** न. १. करमक; करमर; आंबट फळे येणारे एक झाड व त्याचे फळ. २. करबेला; एक मोठे झाड. याची पाने मोठी व लांबट असतात.

**करमलवाल** स्त्री. भाजीच्या उपयोगी पडणारी एक वेल. (गो.)

**करमाती** स्त्री. कोरफड.

**करमाला** स्त्री. माळेप्रमाणे बोटांचा उपयोग करणे; जपसंख्या मोजण्यासाठी उपयोगात आणलेली उजव्या हाताची बोटे (त्यांची पेरे). करांगुलीची तीन पेरे, तर्जनीची तीन पेरे व मधील दोन बोटांची मधल्याशिवाय दोन पेरे यांप्रमाणे दहा पेरांची ही माला होते. [सं.]

**करमीन** पु. एक प्रकारचा मासा (हा शब्द चुकीनेही तयार झाला असेल. कारण याचे निरनिराळे पाठभेद आढळतात) :'शुशुमार घडियाळ मत्स्य मगर। कूर्म करमीन जळविखार।' - मुआदि २९.७७.

**करमुर** पु. कळा :'सलगी धरी पयोधर। साहाती सवे ।' -ऋ.

**करमुंचे** अक्रि. मिठाच्या पाण्यात भिजणे. पहा : **करमणे**

**करमोड** पु. तापाची कसर; अंग मोडून येणे. (व.)

**करयात** स्त्री. काही खेड्यांचा महाल (तालुक्याचा पोटभाग):' मीठ बंदर पेठ शिवापूर कर्यात नेवरें सुभा प्रांत राजापूर' - बाबारो २.६३. पहा : **करियात, कर्यात** [फा.]

**करर** अ. बाण सोडल्याचा आवाज. [ध्व.]

**करल** न. चुनखडी : 'धारावीचें ठाणें बांधण्याकरिता चुन्याच्या भट्ट्यां लावून उरनचा करल घेऊन काम सुरू केलें.' - वसमो. पहा: **करळ**

**करल** स्त्री. तांदूळ, सावे, नाचणी, राळा, वरी यांच्यावरील टरफल; (विशेषत:) बारीक तूस. (चि.) [सं.]

**करल** वि. रोड; अशक्त; कमी दूध देणारी (म्हैस). (कु.)

**करल** वि. बरड; मुरबाड (जमीन).

**करलावणी-णे** स्त्री. चिंचेपासून चिंचोके वेगळे करण्याची (काढण्याची) कृती; काटलणी. (कु.)

**करली** स्त्री. पांढऱ्या रंगाचा मासा. याच्या अंगावर काटे असतात. लांबी सुमारे दीड हात असते. (को.)

**करली** वि. आखूड.

**करली-ले** स्त्री. न. पाणी उपसण्याचे लाकडी साधन. नारळी, केळी, पोफळीच्या बागांना पाणी शिंपण्याचे साधन. शेलणे हे पन्हाळासारखे कमानदार असते. यास हातकरले म्हणतात. (कु. को.)

**करवट** न. एक कडू फळ व त्याचे बी. पहा: **करट** [सं. करट]

**करवट** स्त्री. एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर वळणे.(ना.) [हिं.]

**करव(वं)टी, करोटी** स्त्री. नारळावरील कठीण कवच; नरटी; नरोटी. (वा.) **हाती करवंटी देणे** - भिकेला लावणे. [सं. करोटी]

**करवड** स्त्री. १. खरवड; दूध वगैरे पदार्थ तापविले असताना भांड्याच्या तळाशी बसणारा खरडवून काढण्यासारखा भाग. २. (ल.) खोडसाळ माणूस.

**करवड** स्त्री. समूह.

**करवडणे** स्त्री.बरबरटणे, भरणे; (अन्नाची भांडी बरबरटणे)

**करवडी** पु. जकात अधिकारी : 'नायबसेख अहमद करवडी व तहवल बालाजी बाजी परगणे मजकूर हूजूर...' -पुनसंवृखं२.

**करव(वं)डी** स्त्री. समूह; रांगा; जमाव; थवा : 'नदी वाहता दुथडी। झाल्या प्रेतांच्या दरडी। धोडणें कमठें पृष्ठी गाढी। गज करवडी महाग्राह।' - एरुस्व १०.६०; 'हस्तीपां सहित गज करवंडी, असंख्यात पाडिल्या।' - मुआदि ४४.१०३.

**करव(वं)डी** स्त्री. पोटाची खाच; पोटाची खळगी; पोट: 'बाप करी जोडी लेकरांचे खोडी। आपली करवंडी वाळवूनि।'- तुगा १५८३. [सं. करंड ]

**करवडे** न. अव. हत्तीची पिले: ' मारोनि गज करवडे ऋषी आश्रमी टाकी मडें।- भाराकिकां १०.१३६. [सं. करभ]

**करवण** स्त्री. १. फळाची लहान खाप, फोड, फाक. (गो.) २. फळांचा घड.

**करवणे** शअ. करवी; मार्फत : 'त्यासही चार गोष्टी वकीलकरवणे सांगितल्या आहेत.' - ऐलेसं ३७८८.

**करवत** पु. स्त्री. १. (सुतारी) लाकूड कापण्याचे हत्यार; दंतुरी पाते; अरकस. २. सोनारी हत्यार. [ सं. करपत्र]

वि. (ल.) अतिशय गार, थंड. बोट बुडविल्याबरोबर करवतीने कापल्यासारखे वाटण्याइतके थंड. (व.) पहा. **करवंद** [सं. करपत्र] [क. करकस] (वा.) **करवतीखाली धरणे, करवती घालणे** - अतिशय गांजणे, जाचणे, जुलूम करणे. **आडवा करवत घालणे** - एखाद्याच्या कार्यात अडथळा करणे, प्रतिबंध करणे, हरकत करणे. **जिवाला करवत लागणे** - अतिशय काळजी लागणे.

**करवत(ती)काठ** पु. (विणकाम) काठात करवतीच्या आकाराची नक्षी असणारे धोतर, लुगडे इ.

**करवतणे** उक्रि. करवतीने कापणे (लाकूड वगैरे); अरकसणे: 'याच्या पाळीजवळ लाकडाची फळी धरली तर तो तिला करवतून टाकील.'- स्मरण २८४.

**करवता** पु. नरोटी; पाण्याची करवंटी : 'तयां सीळामध्ये सीळाडीया वरीली सेवटीं करवतां होता:' -गोप्र १०१.

**करवती** स्त्री. पाणी पिण्याचे लाकडी भांडे : 'एके वेळा जेवतांना नागदेवाचार्यांची करवती ठेवण्यात आली नव्हती.'-मसंत ७४.

**करवती** स्त्री. १.लहान करवत. २. एक झाड; ३. काळा उंबर.

**करवती मगरी** तलवारीचा एक प्रकार.

**करवती लगाम** काटेरी लगाम.

**करवल-ळ** पु. करोल. बंदूकवाला घोडेस्वार :'चाळीस हत्यार करवल जमले.'- ऐपो १७५. [हिं. करोल]

**करवल** न. मोगल बादशहांच्या सैन्यातील एका विशिष्ट पथकाचे नाव. या पथकातील शिपाई शांततेच्या काळी बादशहाच्या शिकारीच्या वेळी रान वेढण्यासाठी व उठविण्यासाठी उपयोगी पडत. [तु. करावुल]

**करवलबेगी** करवल शिपाई पथकाचा नाईक.

**करवला-ली** पु. स्त्री. नवऱ्या मुलीच्या किंवा नवऱ्या मुलाच्या भावाला व बहिणीला लग्नात म्हणतात. विवाहप्रसंगी करवली वधू व वर यांच्या पाठीमागे कऱ्हा (कलश) घेऊन उभी राहत असते. (सामा.) मानकरी, मानकरीण : 'करवली सुभद्रा वेल्हाळ। चाले सुढाळा उन्मनी।' -एरुस्व १६.४२. [सं. करक (कलक)+वान, वती]

**करवली** स्त्री. १. गोळागोळी; बंदूकस्वारांची गोळागोळी; आघाडीच्या टोळ्यांच्या चकमकी : '... लोक जमा करून लढाई होणार. सांप्रत करवली होत असती.'-हिंगणे दभा २.५०. २. बंदूकवाल्या घोडेस्वारांचे युद्धातील कौशल्य किंवा कामगिरी. (वा.) ० **करणे** - बंदुकीची नेमबाजी करणे.

**करवळ-वाळ** न. पोट.

**करवळणे** क्रि. कळवळणे; हळहळणे; द्रव येणे.(व.)

**करवंजी** म. पाण्याचा फवारा; कारंजे.

**करवंद-दी** स्त्री. एक झाड. [सं. करमर्द]

**करवंद** न. १. करवंदीचे फळ. २. (ल.) (करवंदाचे फळ फार आंबट असते यावरून) अतिशय गार, शहारे आणणारे. गारपणाचे आधिक्य दाखविण्यासाठी गार या शब्दापुढे हा शब्द योजतात. जसे :- गार गार करवंद (हवा, दारू इ.). [त. कळंबळम्]

**करवंदणे** अक्रि. १. झोंबण्यासारखे, शहारण्यासारखे गार असणे; अतिशय थंडगार होणे (पाणी, ताक, हवा, हात वगैरे).

**करवा** पु. सोललेल्या उसाचा तुकडा; गंडेरी. [क. कर्बु, कब्बु=ऊस]

**करवा** पु. १. करकोचा; दोरी वगैरे बांधल्यामुळे पडलेला वण. २. लाकूड वगैरेला दोरी बांधण्याकरिता पाडलेली वाटोळी खाच; अवटी.(वा.) ० **पडणे** - शरीराचा एखादा अवयव मोडणे; तुकडा मोडणे; अतिशय दुखावणे; दमणे; थकणे (कंबर, हात वगैरे).

**करवा** पु. गडवा; तांब्या. पहा : **कटवा**

**करवा** पु. मोत्याला मध्ये खोलगटपणा असणे; मोत्याला मध्यभागी व सभोवती पडलेला करकोचा, रेघ. मोत्यात हा दोष समजतात. मोती डोळ्यासमोर धरले असताना आतील बाजूला चिरल्यासारखी रेष दिसते तिला नर म्हणतात. अशा मोत्याला थोडा खोलगटपणा असल्यास त्याला करवा म्हणतात.

**करवा** पु. नृत्यातील एक प्रकार; कारवा, केरवा नाच. यात वेषपरिवर्तन केलेले असते : 'त्या दिवशीं गाणें व करवा नाच पाहून दरबार फार खुष झालें.' - धर्माजी ९०. [सं. केरव]

**करवा चौथ** कार्तिक वद्य चतुर्थीला स्त्रियांनी करावयाचे व्रत. [हिं.]

**करवाड-डे** पहा : **करवड** : 'वोंलिं जोंधळियार्ची करवाडें । खातां अत्यंत लागती गोडें।' -एभा २१. २६७.

**करवाद** पु. त्रास; कष्ट; श्रम. (को.)

**करवादणे** अक्रि. त्रासणे; श्रमणे; कष्टी होणे; कंटाळा आल्यामुळे रागाने कुरकुरणे, पिरपिरणे : 'अरे, पण झाले काय तुला इतके करवादायला ?'-रत्न ५.४ (कु.)

**करवाल** स्त्री. तरवार :'फोडितु करवाळें। काढिती आंतांचे पेटोळे।'- शिव १०४८. [सं.]

**करवाळ** न. साप वगैरे प्राण्याच्या शरीराचा मधला भाग. (कु.)

**करवाळे** न. खड्ग.

**करवी-वे** शअ. (एखाद्या) कडून; द्वारे; मध्यस्थी दाखविणारे. प्रयोज्य कर्त्यापुढे कर्तृत्वबोधक म्हणून हे अव्यय लागते : 'दुफोंडी करविलीं करतळें। भीमसेना करवी॥'- शिव ८५३. [सं. कृ - कारक]

**करवी** पु. कण्हेर वृक्ष: 'ज्या जमिनीत करीर (करवी=कण्हेर) वृक्ष असेल...'-सहभा १०१.

**करवी** स्त्री. करा; चरवी : 'एका श्रीकरीं मद्याची करवी!' - लीचउ ४५५.

**करवीर** पु. १. कण्हेरीचे झाड व फूल. २. कोल्हापूरचे पर्यायी नाव. [सं.]

**करवील** स्त्री. एक वनस्पती. हिची पाने सुवासिक असून ती कढीत किंवा आमटीत घालतात. (गो.)

**करवील** पु. बमळा.

**करवेण** न. १. लहान खाप, तुकडा २. फळांचा घड. (गो.)

**करवेल** न. (मायदेशी) हरळीसारखे मऊ गुरांना खाण्याजोगे गवत.

**करवेली** स्त्री. गाडीच्या पुढचे व मागचे आडवे लाकूड. (को. कुलाबा)

**करव्ह** न. नांगर धरण्यासाठी मागील बाजूला लावलेले मुठीचे लाकूड; रुमणे. [सं. कर+वह]

**करशींग** पु. गोमंतक प्रांतातील एक झाड. (गो.)

**करशुद्धि-द्धी** स्त्री. हातावर पाणी घालणे; हात धुणे. विशेषत: श्राद्धाला ब्राह्मण जेवायला बसताना त्यांच्या हातावर घालतात : 'खाद्य नैवेद्य समर्थ भक्षिती। करशुद्धि देतसे भूपती।'-संवि ७.२२१. [सं.]

**करसंपुट** न. एकाला एक जोडलेले असे दोन्ही तळहात; हस्तांजुली :'तंव करसंपुट आपैसें । वामचरणीं बैसे।'-ज्ञा ६.२०१. (वा.) **करास कर मिळविणे-** हातावर हात देणे; वचन देणे : 'मेळउनी करास कर।'- नव १३.१४. ० **जोडणे, जोडून उभे राहणे** - अभिवादन करणे; विनम्र होणे; सेवक म्हणून सज्ज राहणे : 'भूत भविष्य वर्तमान ज्ञान। हें ज्यापुढे उभे कर जोडून।'-हरि ३१.१०.

**करसानी** रुपयाचा एक प्रकार.

**करसांबळ-ळी** एक वेल, आबई, कोयते वाल.

**करसांडगे** पु. अव.भाजलेले व करपलेले सांडगे.

**करस्थापन** न. कर बसविणे, लादणे. [सं.]

**करहाट देश** कऱ्हातट; कऱ्हा नदीच्या काठचा प्रदेश; कऱ्हाड व त्याच्या आसपासचा प्रदेश. [सं.]

**करळ** पु. वाळूमिश्रित ठिसूळ दगड; बरड, कड.[सं. करक] (वा.) ० **लागणे-** पाभरीच्या फणाने जमीन जास्त खोल उकरली जाणे.

**करळ** न. स्त्री. तांदूळ व इतर धान्याचे तूस, भुसा, टरफल. पहा : **करत**

**करळ** स्त्री. छिद्र; (विरळ विणलेल्या रोवळी, सूप, पाटी यांच्या मधील) फट; चीर. [सं. करल = वेळू; किंवा कराल= रुंद, उघडे]

**करळ** पु. (सोनारी) फुलांचा ठसा.

**करळ** वि. उतरते; कलते. (वा.) ० **करणे** - पीळ देणे : 'शेवंतीनं संतूच्या धोतराचा करळा करीत संतूला हिणवलं.' - पडरे ६२. ० **चालणे** - आडवे जाणे, आडवे निघणे. ० **जाणे, होणे** - एका अंगाला कलणे, जाणे (जू, धुरी, नांगर, गाडा, तराजू, तराजूची दांडी यासंबंधी योजतात). ० **लागनं** - जीवाला लागणे.

**करळ धरणे** सक्रि. (नांगर) आडवा धरणे.

**करळ** स्त्री. काळ्या जमिनीचा एक प्रकार. हिच्यातून पाणी झिरपून जात नाही. पाणी पडले असताना हिच्यावर मिठासारखा पांढरा क्षार येतो. काळा करळ व पांढरा करळ असे हिचे दोन प्रकार आहेत. [क. करल = खारटपणा; क्षारता]

**करळ** वि. महाग; कडक; वाजवीपेक्षा जास्त (किंमत). (व.)

**करळ-ळा** पु. १. कुंभाराच्या भट्टीतील कौले, विटा वगैरेच्या खाली घातलेले, अर्धवट जळलेले गवत. २. अशा गवताची एक काडी.

**करळणे** क्रि. कडाडणे; मोडणे.

**करळा** पु. छिटाचे लुगडे. - (तंजा.)

**करळी** स्त्री. मोडशी झाल्यामुळे पायातून येणारे पेटके.

**करळी** स्त्री. १. गाडीच्या साटीच्या चौकटीचे पुढचे व मागचे लाकूड. पहा : **करवेली**. २. उभे खुंट ज्यात बसवितात त्या दोन लाकडांपैकी वरच्या लाकडास करळी म्हणतात; पिढ्यावरील आडवे लाकूड, करळी, दोन आडवी लाकडे (तरशे). दोन लांब तुकडे (घोडी किंवा घोडकी) असे सर्व मिळून गाडीची साटी तयार होते. (को.)३. बावकड्या व घोडबाह्या यांच्यामध्ये बसविलेल्या एक हात उंचीच्या व चार बोटे रुंदीच्या फळ्या. (माण.) ४. कपाटाच्या माथ्याची फळी (सुतारी) ५. गाडीच्या पेटीवरील भाग.

**करळी** स्त्री. कुरळी; जाळ्याचा न विणलेला भाग, धागा, तंतू. २. धोतर, लुगडे वगैरेचा भाग; दशी. [क. करि = दशी]

**करळी** वि. करळ दगडांनी बांधलेली; करळ दगडाची (इमारत, वास्तू).

**करक्षालन** न. हात धुणे; आंचवणे : 'देऊनि कृष्णासि आचमन। सवेचि केले करक्षालन।'- एरुस्व १५.१५६. [सं.]

**करंग(गु)ळी, करांगळी** स्त्री. १. हाताचे किंवा पायाचे शेवटचे लहान बोट. २.पायाच्या करंगळीत घालायचे चांदीचे वेढणे. [सं. किन+अंगुली] [क. किरिबेरळु]

**करंगुट** स्त्री. एक प्रकारचे भात, साळी. (गो.)

**कर(रां)चली** स्त्री. एक प्रकारची सरळ व लहान तरवार. [हिं.]

**करंज** पु. एक रानझाड. याची सावली अतिशय दाट व गार असते. याच्या बियांचे तेल निघते. ते जाळावयास उपयोग पडते. हे तेल त्वचारोगात चांगले काम करते. पानाचा शेक वात विकारावर घेतात. [सं.]

**करंज(द)णे** अक्रि. कंटाळणे, त्रासणे; वैतागणे; थकणे; हताश होणे; मेटाकुटीला येणे (गरिबी, दगदग यामुळे).

**करंजाड** न. कळंजाची जाळी : 'उगं झऱ्यावर तरण्या बायका बघून करंजाडात दंड ठोकायचं ते काम न्हाय.'- आडगाव ४६.

**करंजायन** दाट सावलीचे व तेलबियांचे रानझाड : 'झाड हरजिनसी करंजायन।'- (मोहनबटाव) मलो तमाशा १३४.

**करंजी, करवंजी** स्त्री. कणीक, रवा, मैदा इ.च्या पुऱ्या लाटून त्यात (खोबरे, खसखस, साखर इ.चे.) सारण भरून, तळून तयार केलेले अर्धचंद्राकृती खाद्य. [सं. करंज]

**करंजेळी** स्त्री. केळीची एक जात.

**करंज्यावाघ** पु. वाघाची लहान जात.

**करंट** वि. वाईट; दुष्ट. [सं. करट]

**करंट उकळणे** वासना उफाळणे : 'त्याची नजर मानाकडे लागली आणि त्याचा करंट उकळला.'- वासू १२२.

**करंट पक्ष** क्रिवि. कमीत कमी; किमान पक्षी. [सं. करट+पक्ष]

**करंट-टे लक्षण** दुर्दैव किंवा अनिष्टसूचक चिन्ह, खूण, गुण; अभाग्य लक्षण : 'सुचित करूनी अंत:कर्ण। ऐका करंट लक्षण।' - दास २९.३.१.

वि. दुर्दैवी; अनिष्टसूचक चिन्ह दाखविणारा. [सं.]

**करंटवली-ले** पहा: **करटुली**

**करंटा पोपट** बोलक्या पोपटाचे गुण नसलेला, रान पोपट; कुलक्षणी पोपट.

**करंट्या कपाळाचा, हाडाचा** दुर्दैवी; भाग्यहीन; कमनशिबी.

**करंड-डा** पु. १. करंडी; परडी; बुरुडी; विणलेले, झाकण नसलेले किंवा असलेले एक पात्र (फळे, भाजी वगैरे ठेवण्यासाठी) : 'सफाईची माझी योजना - कचऱ्यासाठी करंड मांडण्याची-त्यांच्यापुढे मांडली.' - माजी २८५. २. करंडा; डबा; कुंकू, दागिने, खाद्यपदार्थ, पानसुपारी वगैरे ठेवण्याचे धातूचे, लाकडी किंवा हस्तिदंती झाकणासहित पात्र. करण. (गो.) [सं.]

**करंडक** पु. क्रीडा-कला इत्यादी क्षेत्रातील नैपुण्याबद्दल बक्षिसादाखल देण्यात येणारा पेला. जसे :- रणजी करंडक, पुरुषोत्तम करंडक.

**करंडा** पु. (सोनारी) सोन्याच्या मण्याला पाडलेले करवे, खोलगट रेघा, कच. (कु.) पहा : **करडा**

**करंडा** पु. १. झाडाच्या खोडाचा कापून काढलेला ओंडका, तुकडा. केळीचा खुंट किंवा लाकडाचा ओंडका. (को.) ३. ज्यामध्ये पाहिजे तेव्हा दुसरा दांडा घालता येतो असा पातीचा तयार केलेल्या छत्रीचा पोकळ दांडा. (राजा.)

**करंडी** स्त्री. वेळूची उभी टोपली. हिच्यात माणसाला बसवून पाठीवर घेतात. [त.करडिगै]

**करंडी** स्त्री. एक प्रकारचे पांढुरके, आखूड, बारीक व बिनपाती गवत.

**करंडी, करंडूल** स्त्री. १. लहान करंडा; करंडक पहा : **करंड** : 'दिव्य परिमळाचेनि पवनें। विश्व केलें करंडी।'- मुआदि २७.२०६. २. देव ठेवण्याची संबळी, वेताचा किंवा बांबूचा झाकणासह लहान डबा : 'जे परमात्मया शिवाची करंडी।'- ज्ञा ६.२७३.

**करंडी** स्त्री. एक झाड. याचे फळ मुद्रेसारखे असते म्हणून त्याला मुद्रा म्हणतात. गोपीचंदनाच्या गंधात हे फळ बुडवून कपाळावर वगैरे गंधाच्या मुद्रा लावतात. [सं. करंड]

**करंडी** स्त्री. एक प्रकारचे चामड्याचे वाद्य : 'वरातीपुढे शिंगे, हलग्या...करंड्या वगैरे आपापले कौशल्य दाखवत होती.'- माआ ५०. [सं. करट, करडी =वाद्य][क. करडे = पखवाज]

**करंढोल** पु. एक चर्मवाद्य; मोठा ढोल. हे वाद्य दोन्हीकडून वाजवतात.

**करं(रां)तणे** कंटाळणे, त्रासणे; थकणे; वैतागणे. (कु.)

**करंद-दा-दी, कारंदा** करवंद; करवंदाचे झाड.(कु. राजा.) [सं. करमई]

**करंदी चौकट** जोड चौकट; दुहेरी चौकट.

**करंदोळ** न. वि. एक प्रकारचे गवत. पहा : **करदावले** [क. करंडे]

**करंबकशी** स्त्री. कृपा : '...सेवकानें जाब दिला की हजरतीचे करंबकशीकरून खुशहाल आहेत.' - पेद २५.१०.

**करंबट** स्त्री. १. एक प्रकारची चटणी; आले धुऊन त्यात मीठ, हिंग घालून वाटून दह्यात केलेली चटणी. २. आवळकाठी, केळफूल वगैरे पदार्थात हिंग, जिरे, मिरे, आमसूल, मीठ घालून वाटून केलेली चटणी. ३. आंबा, काजू यांच्या फोडींना मीठ, मसाला लावून केलेले लोणचे. (कु.) [सं. करंभ = मिश्रण, दध्योदनमिश्र पदार्थ, खाद्य]

**करंबल-ळ** न. स्त्री. (वन.) कोकणात विपुल प्रमाणात आढळणाऱ्या या झाडांची पाने सव्वाहात लांब असतात. याच्या पानाच्या पत्रावळी करतात. फळाचा रस साखरपाण्यात घोटून ज्वरात व खोकल्यात देतात. पहा : करमल : 'न पाहाता सवेले। मानस सरोवरीची कमळे। आणिजेती करंबाळे। गुंडालौनिया।'- शिव ७८६.

**करंबुटी** स्त्री.१. लहान, हिरवा, कच्चा, न पिकलेला आंबा; आंब्याच्या कैरी. (को.) २. खारात मुरलेल्या कोवळ्या कैऱ्या : 'आणि करंबुट्या रायतीं।'- मसाप २.२४. ३. चटणी. पहा : **करंबट**

**करंबे, करमणे** न. १. भाजलेल्या आंब्याच्या गरात गूळ व मसाला घालून केलेले तोंडी लावणे; चिंचेत गूळ, मसाला घालून केलेले तोंडी लावणे. २. रुचकर पदार्थ घालून भाजलेले किंवा उकडलेले फळ किंवा बाठ धरलेला आंबा.

**करंबेळ** पु. न. एक झाड व त्याचे फळ. हे झाड सह्याद्रीच्या उतारावर होते. याचे लाकूड इमारतीच्या कामासाठी उपयोगी असते.

**करंबेळे** न. लोणच्याचा एक पदार्थ. पहा : **करंबे**

**करंब्बजी-जे** स्त्री. न. एक औषधी वनस्पती.

**करा** पु. मणी : 'बारिक करे...' - बाबारो २.१६९.

**करा, करादिवा, करादिव्याचा मान** पहा : **कऱ्हा**

**करा** पु. १. पाण्यावर आलेला तवंग, साय. २. जोंधळा, बाजरी वगैरेच्या कणसावर पाऊस पडून दाण्याला येणारा मोड, अंकुर.

**करा** पु. पावसात पडणारी गार. (गो.) [सं. करक = गार]

**कराकर-रा** क्रिवि. दात खाणे, ऊस चावणे, काकडी खाणे या वेळी होणाऱ्या आवाजाने युक्त. पहा : **कराकरा** [ध्व.]

**कराज** न. कर्ज; ऋण. (कु.) [फा.]

**कराटे** पु. हात व पायांचा शस्त्रासारखा वापर करून लढाई करण्याचा एक जपानी प्रकार.

**कराड** पु. १. झटका; आवेश; लहर (ताप वगैरे विकृतीने येणारी). २. मनोविकाराचा क्षोभ; जोराची लहर; चीड (क्रि. येणे).

**कराड** न. सुकलेले रान, गवत. (कु.)[क.करड = वाळलेला घास.]

**कराड-डी** स्त्री. पर्वताची किंवा नदीची दरड; कडा : 'मोहनदीची थोर कराडी ।'- एभा १३.५८१.(खा.व.) [गु.]

**कराड** स्त्री. (पाण्याची) धार.

**कराडा** पु. अंगावर फोड अथवा गळू झाले असताना येणारा ताप; कणकण. (क्रि. येणे.) (व.)

**कराडी** स्त्री. १. अवघड जागा. २. कष्ट.

**कराणी** पु. मुखत्यार; एजंट. (गो.)

**कराधानाचे सिद्धांत** (अर्थ.) करांची आकारणी करण्यासंबंधीची, कर बसवण्यासंबंधीची सर्वसाधारण तत्त्वे, नियम.

**कराप** न. १. लोहाराच्या भट्टीतील जळकट बिडासारखा अशुद्ध धातू; कीट. (कु.) २. सुकलेला पदार्थ. पहा : **करप**

**कराब** न. आठ पाकळी कमळाच्या आकाराचे व एका पाकळीला मोत्यांचे घोस असलेले कर्णभूषण; कराबफूल. (कु.)[सं. कुरबक = लाल कोरांटी]

**कराबीन** स्त्री. रुंद तोंडाची आखूड बंदूक : 'कराबीन बकमार याची खूण.' - ऐपो १०२. [सं.]

**करामत** स्त्री. १. चमत्कार; अद्भुत गोष्ट; नवल : 'म्हणे येथें करामत दिसे बहुत। मग औरंगजेबासी जाणविली मात।'- संवि २५.२६. २. कर्तृत्व; कौशल्य; खुबी; चातुर्य; चमत्कार करण्याचे सामर्थ्य : 'आपली करामत कोरणाराने त्या पुतळ्यात खर्च केली होती.'-विवि ८.२.२९. ३. गुंतागुंतीची, कौशल्याची रचना; यंत्र; विविध साधनांची जुळवाजुळव. [फा. करामत्]

**करामात** स्त्री. महत्कृपा : 'जे ये समयीं आपले येणे गोया (= म्हणजे) करामात जाली.' - मइसा १.१८८.[फा. करामात्; करामत्चे अव.]

**करार** पु. १. ठराव; वचन; बोली; कबुली : 'जमीनच देवास करार करून दिल्ही पाहिजे.' - मसाप २.२९५. २. निश्चय; शाश्वती; ठाम मत : 'तुका म्हणे एका क्षणाचा करार। पाईक अपार सुख भोगी।'- तुगा ३७३. ३. (कायदा) कायद्याने अंमलबजावणी करता येईल अशी कबुलायत. : 'दोन इसमांमध्ये एकमेकांस वचन देऊन जेव्हा एखादी गोष्ट ठरते तेव्हा अशा वचनाला संगनमत म्हणतात व ते संगनमत कायद्याने अंमलात आणता येण्यासारखे असेल, तर त्यास करार म्हणतात.'-घका ९२. ४. पसंती. [अर. इकरार][फा.]

**करार** पु. (ख्रि.) देवाची मनुष्यजातीसंबंधी केलेली योजना (हिब्रू भाषेत करार या शब्दाचा अर्थवाचक जो शब्द आहे त्याचा अर्थ कापणे अथवा बंधन असा आहे) : 'मी मेघांत धनुष्य ठेविले आहे ते तुमच्या माझ्यामधल्या कराराचे चिन्ह समजावे.' -उत्प ९.१३. ख्रिस्ती करार दोन आहेत. १. जुना करार (इस्राईल). ओल्ड टेस्टामेंट या इंग्रजी

शब्दाचा पर्याय; परमेश्वराने इस्रायल लोकांशी मोशे याच्यातर्फे जो करार केला होता तो. त्यात नेमशास्त्रासंबंधी बाह्यविधी व नियम लावले होते : 'कारण जुना करार वाचितात तेव्हा तेच आच्छादन तसेच न काढिलेले राहते.' - करिंथ ३.१४. २. ख्रिस्ती पवित्रशास्त्र या ग्रंथाचा पूर्वार्ध. नवा करार - (क्रि.) १. न्यू टेस्टामेंट या इंग्रजी शब्दाचा पर्याय; भविष्यवादामध्ये ईश्वर व मानवजाती यांमधील ज्या नैतिकसंबंधाविषयी भविष्य वर्तविले आहे तो संबंध : 'मी इस्त्राएलाच्या घराण्याशी.... नवा करार करीन.' - इब्री ८.८. २. येशू ख्रिस्ताने मनुष्याशी केलेला करार. त्याने क्रुसावर आपले रक्त सांडून त्यावर आपला छाप मारला. त्या योगे ख्रिस्तावर भाव ठेवणाऱ्याला आधार मिळतो. ३. पवित्रशास्त्र या ग्रंथाचा उत्तरार्ध.

**करार** वि. मुक्रर; कायम; निश्चित. [फा. करार]

**करार** पु. हट्टी मनुष्य : 'माझा लागताचि कर । सिंतोडा घेतातिं करार ॥' - चोखा १२९.

**करारजाब** पु. निश्चयात्मक उत्तर : 'आपणांकडून करारजाब आला, दोघांस पाठविण्याची आज्ञा जाली तर पाठवू.' - पेद २६.१६८.

**करारणे** सक्रि.करकचून बांधणे.

**करारती** स्त्री. करद्रव्य.

**करारदाद** पु. ठराव; करारनामा; लेखी वचन; करारमदार : 'करारदाद तहनामा करावा म्हणोन इंग्रजांचे विचारें दरम्यान बोलीस कपितान होता.' - पेद [फा. करार्वाद]

**करारनामा** पु. ठरावपत्र; कराराचा कागद; करार लेख. [फा. करार+ नामह्]

**करारमदार** पु. १. वचन; बोली; कागद लिहून देणे; अनुमती वगैरेबद्दल व्यापक संज्ञा : 'दरम्यान झालेले सर्व काररमदार रद्द केले असे धरून...' - कजा २८०. २. (मदारवर जोर देऊन योजतात) खात्रीचे अभिवचन; आणभाक; बेलभंडारा. [फा.]

**करारवाकई, करार वाके, वाकै** १. घडल्याप्रमाणे; बरोबर; अचूकपणे : 'करारवाकई हकीकत.' - मइसा १८.५१; 'त्यासी माली -मामलतीचा इतला करारवाकै देऊं.'- मइसा ६.६१२. २. पक्के, पक्का : 'यैसी बोली आम्हांसी करारवाकै करून सिरपाव देऊन आज्ञा दिली. - पेद १०.३२. [फा. करारवाकइ]

**कराराचा** वि. १. केलेल्या ठरावाला जो कधी टाळत नाही तो; ठरल्याप्रमाणे वागणारा; विश्वासू; प्रतिज्ञा पाळणारा : 'निवडक चाळीस सहस्त्र बरोबर फौज कराराची।' - ऐपो २४५. २. निश्चयी; एकवचनी. [फा. करार]

**करारी** स्त्री. १. बळ; जोर; जोम. (क्रि. धरणे, येणे.) पहा : **कराडी** २. वचन; बोली. (राजा.)

**करारी** पु. शाक्त पंथाचा एक भेद. हे स्वत: देहदंड करून घेतात व काली, चामुंडा इ. दैवते भजतात. [सं. कराल = भयंकर]

**करारी** वि. १. कराराचा. २. निश्चयी; बाणेदार; विश्वासू; ३. पक्का; स्थिर मनाचा; दृढप्रतिज्ञ. ४. टिकाऊ; तग धरणारा (वस्तू, रंग इ.). ५. पक्का; भरपूर; खंबीर. (वा.) **करारीची बातमी** - पक्के, विश्वसनीय वृत्त : '... याजबराबर हटकरी दिल्हा की, करारीची बातमी घेऊन या.'- राजवाडे खंड १.२.

**करारी** ध्व. करकर आवाज.

**करारीपणा** पु. बाणेदारपणा; तडफदारपणा : 'पण जी विद्यापीठे सरकारच्या लायसेन्सप्रमाणें चालावयाचीं तेथें... करारीपणा कोठून नजरेस पडणार ?.'- लोटिकेले २.५१७.

**करात** न. कोंडा; तूस; टरफल.

**कराल-ळ** न. खडक : 'यन्हवि फोडी कराळें। पाणी जैसें॥'- ज्ञा १६.११६.

**कराल-ळ** वि. भीतिप्रद; भयंकर; भीषण : 'खवळत रिपुकाळें काळकाळें कराळें।' - दावि २७८. [सं.]

**करालता** स्त्री. (संगीत)तोंड वासून गाणे. [सं. कराल]

**कराल वदन** वरील दात लांब व खालील आखूड असणारा (घोडा). [सं.]

**कराली-ळी** स्त्री. पेटका; वांब; वळ. पहा : **कराडी** (क्रि. चढणे, उतरणे, बांधणे.)

**कराष्टमी** स्त्री. आश्विन वद्य अष्टमी. या दिवशी कुमारिका गंगोदकाने भरलेला करा (मडके) हातात घेऊन देवीची पूजा करतात. काहींच्या मताने आषाढ व कार्तिक अष्टमीला हे व्रत करावे. परंतु आश्विन वद्य अष्टमीच अधिक रूढ आहे. [सं.करक+अष्टमी]

**कराहा** पु. घोड्याला होणारा एक रोग; ढास; आतड्यातील रोगांपैकी एक रोग. - अश्वप २.१९१. [फा. कऱ्हा]

**करांगळा** पु. खाचरा (गाडी)चा सांगाडा व आंख यांना जोडणारे दोन बाजूचे खुंट. (व.)

**करांगळी-गुलि-गुली-गुळी** स्त्री. हाताचे किंवा पायाचे लहान बोट; कनिष्ठिका. पहा : **करंगळी** [सं. कर +अंगुलि]

**करांचली** स्त्री. एक प्रकारची आखूड तलवार : 'दहापाच माणसांनी करांचलीनीं हटले.' - ऐलेसं ८६०. पहा : **करंचली** [फा.] (वा.)

**०मारणे, ० करणे** - पराक्रम करणे; तलवार मारणे : 'हरबा अण्णानें चांगली करांचली मारली.'- ऐलेसं १७७७.

**करांडणे** सक्रि. कुरतडणे. पहा : **करडणे.** : 'मूषकें करांडोनि दशनीं । पादहीन करावा ।'- मुआदि ३४.४.

**करांडणे** अक्रि. जून होणे. (कु.) [क. करडु=कठीण, रुक्ष]

**करांडा** पु. १. ओंडा; ठोकळा. (को.) पहा : **करांडा.** २. करांडो; नारळाच्या किंवा केळीच्या झाडाचे खोड, खुंट. (कु.)

**करांतल्यो** स्त्री. गमजा; चेष्टा. (गो.)

**करांती** स्त्री. एक प्रकारची उघडी गाडी.

**करांदा-दे** पु. न. करंद; करवंद. पहा : **करवंदी** [सं. करमर्द]

**करांदा** पु. करंदा ; एक प्रकारची वेल. जमिनीत येणारा. कंद व वर येणारे फळ या दोहोंनाही म्हणतात. गोड करांडा व कडू करांडा असे याचे दोन भेद आहेत. : 'करांदे नि तसलेच खाऊन.'- तोरण २९७. (को.)

**करि-री** पु. हत्ती : 'करितुरंगसमाजें । सेना नाम निफजे ।' - ज्ञा १३. १५२ [सं.]

**करिणा-ना** पु. १. (वादीप्रतिवादींनी) पंचायतीपुढे दिलेली स्वत:ची

लेखी जबानी, कैफियत. २. वर्तमान; घटना; गोष्ट; हकीगत : 'करिणा कांहीं पातशहास समजत नाहीं.' - सभासद ३९. ३. योग्यायोग्य विचार : 'कांहीं करिणा जाहला.' - सभासद ३८. ४. अनर्थ. ५. प्रकार. [फा. करीना]

**करिणा** पु. संदर्भ; संबंध: ' आम्ही लोक कोणे करिणेयाचे व मोगल लोक कोणे करिणेयाचे हे रावसाहेब बेहत्तर जाणत असतील.'- मइसा १.५२.

**करिणी** स्त्री. हत्तीण : 'अगे गेहारण्यीं भ्रमसिल कसी मत्त करिणे ।'- मंराधा ३०. [सं.]

**करितां, करतां** शअ. १. कारणे; साठी; स्तव; मुळे; प्रीत्यर्थ : 'जेणे करिता खुण। सर्वज्ञपणाची।'- दास २.२.१. २. पेक्षा; हून : 'तेथ वसंता करतां चढावन ग्रिष्मिॲ केली रीगवणी ।'- शिव ६२१. [सं. कृते]

**करियात-द** स्त्री. तालुका, दहापंधरा गावांचा पेटा. [अर. कर्यात = गाव]

**करियात-द** स्त्री. दहाबारा खेड्यांचा लहान महाल. यात काही या महालातील व काही त्या महालातील खेड्यांचा समावेश होतो. पहा : **कर्यात** [सं.]

**करियाद, कर्याद** स्त्री. दाट जंगल व उंच असा पर्वत. (गो.)

**करिहस्त, संयुक्तहस्त** (नृत्य.) उजवा हात लताख्य करून ह्या बाजूकडून त्या बाजूकडे झुलत ठेवणे, तसेच डावा हात त्रिपताक करून डाव्या कानावर ठेवणे. [सं.]

**करिहस्तक करण** (नृत्य) पाय अंचित करून डावा हात वक्षस्थळावर ठेवणे. उजव्या होताचा तळहात तर्जनीच्या बाजूने आरंभ करून बाहेरून आतल्या बाजूला फिरवणे.

**करिहारी** स्त्री. काकलावी; लांगातिकी; अग्निशिखा; एक वनस्पती.

**करिंदा** पहा : **करांदा**

**करी** अ. पहा : **कर.** पुढील अर्थी नामांचा हा प्रत्यय लागतो. १. मालक, धनी, जवळ बाळगणारा, उदा. पैकेकरी=पैसा जवळ बाळगणारा, घरकरी = घराचा मालक, मानकरी= मानाचा अधिकारी. २ एखाद्या गावचा रहिवासी; - चा माणूस. उदा. गावकरी. ३. एखादा धंदा करणारा; काम करणारा; एखाद्या धंद्यावर उपजीविका करणारा. उदा. भिक्षेकरी, शेतकरी, भाडेकरी. ४. वाहणारा; बरोबर घेणारा. उदा. इटेकरी (राज शस्त्रधर, इटा नावाचे राजाने वापरायचे शस्त्र बरोबर बाळगणारा, खेळणारा) पट्टेकरी. ५. नुसते कार्य करणारा किंवा उरकणारा. उदा. यात्रेकरी; मारेकरी. करी याचे अनेक अर्थ असून ज्या शब्दांना तो लागतो तेथे तेथे त्याचे अर्थ दिले आहेत. करी हा प्रत्यय वाला या प्रत्ययाप्रमाणे वाटेल तेव्हा उपयोगात आणीत नाहीत. [सं. कृ = करणे]

**करी** वि. कर (शहरांच्या नावांना लागणारा प्रत्यय) चे विशेषणात्मक रूप; संबंधदर्शक; उदा. पुणेकरी- पुण्याचा किंवा पुण्याच्या लोकांसारखा.

**करी** स्त्री. १. कळी. २. लसणाचा तुकडा. (झाडी) [सं. कालि]

**करी** शअ. ने; मुळे; योगाने; करिता (तृतीयेचा प्रत्यय) : 'ज्याचिया नामकरणाकरीं । सकळ पातकांतें हरि हरी ।'- एभा ३.५८८.[सं. कृत्वा]

**करीणा** हकीकत, वर्तमान. पहा : **करिणा-ना** : 'ज्याचा मला हा कळला करीणा ।' - शाख ३.८.

**करीणा** पु. १. कर्तबगारी; पराक्रम. (ना.) २. वृत्तांत; हकीकत. [अर.करीना]

**करीणारोखा** पु. करारनामा; अर्ज.

**करीन** शअ. जवळ; युक्त. [फा.]

**करीन सलाहा** वाजवी; न्यायाचे; योग्य तेच : 'तिकडील लिहिल्यावर लक्ष देऊन करीन सलाहा तेच अमलांत येईल.'- नाग २.१५८.

**करीब** शअ. जवळ, समीप.

**करीबल** न. सैन्यातील गजदळ; हत्तीचे पथक. [स. करि+बल]

**करीबी** स्त्री. सामीप्य; जवळीक : 'गोविंदराव फार तरार (लुच्चा) आहे. आपण हजरतकरीबी करून बोलेल.'- पुणे अखबार भाग १.

**करीर** पु. न. नेपती (ते) नावाचे काटेरी झुडूप व त्याचे फळ : 'करीर पुष्प शुष्कही रसार्थ चाखितो तरी।' - केक ७८. [सं.]

**करीर** पु. कण्हेर वृक्ष : 'ज्या जमिनीत करीर (करवी = कण्हेर) वृक्ष असेल...' - सहभा १०१.

**करील** पु. बंदूकधारी सैनिक.

**करीव** शअ. कडून. पहा : **करवी, करवे** (राजा.)

**करुआणे** अक्रि. आळोखेपिळोखे देणे : 'एक कुंठत करुआत : एक कसकसीत कण्हात' - शिव १०.

**करुआ(वा)ळा** पु. कुरवाळणे; गोंजारणे : 'मृग व्याघ्रासि करुवाळा करित'- वह १.

**करुण** वि. १. दया उत्पन्न करणारा, पाझर आणणारा (प्रसंग). २. दयाळू; कृपावंत; दीन. [सं.]

**करुण-णा** पु. दया; कृपा; माया; द्रव येणे; कीव.

**करुण दृष्टी** (नृत्य.) दुःख झाले असताना डोळे अर्धवट मिटतात व बाहुल्या अश्रुपूर्ण होतात व नासाग्री नजर लागते तशी (दृष्टी). हा अभिनय करुण रसाचा आहे.

**करुणरस** पु. (सास.) नवरसांपैकी एक; करुणरसाचा स्थायीभाव शोक आहे. ज्या कलाकृतीतून हा निर्माण होतो व आस्वादकाला त्याचा प्रत्यय येऊन त्याच्या मनामध्ये दुःख आणि शोक उत्पन्न होतो. हा करुणरस होय. [सं.]

**करुणा** स्त्री. १. दया, कृपा, माया, कीव : 'मग जी जलदश्यामा करुणा बसली नवासनावर ती।' - मोउद्योग ७.९५ २. शोक; आक्रोश; अजीजी :'... येथे येऊन करुणा करिते तें ऐकवत नाही.'- पेद २.२५. (वा.) ० **भाकणे** - दुसऱ्याला करुणा येईल असे दीनवाणे भाषण करणे; दयेची याचना करणे; काकुळत करणे; गयावया करणे : 'देखोनिया अंतसमया। करुणा भाकिती भोगीतनया।'- हरि ११.१४१.

**करुणाष्टक** न. देवाला आळविण्यासाठी करुण रसात रचलेला आठ श्लोकांचा गट.

**करुणाळ-ळा** वि. दया, करुणा करणारा; कृपाळू : 'जरि तूं करुणाळा गोसावी। भणौनि विटसी ना।'-ऋ ५२. [सं. करुणा+आलुच्]

**करुणांग** वि. नम्र : 'नमन केलें साष्टांगीं। उभा राहिला करुणांगी।'- गुच २५.२१. [सं.]

**करुवाळ** न. एक प्रकारचे सुगंधी रोप : 'मानसरोवरिचि कमळे : आतिजाति करुवाळे '- शिव ७८५.

**करू** वि. करणारा. जसे : - यात्रेकरू, बिऱ्हाडकरू, होतकरू : 'पूर्ते हे शुभलक्षणी रत सदा धर्मेकरू रक्षणीं।'- आसीस्व १८. [सं.कृ]

**करून** शअ. १. कडून; करवी; मुळे; योगाने (साधन, मार्गदर्शक, कारणीभूत या अर्थी) : 'क्षेमें यावा द्वारकानाथ। याच स्वार्थे करुनियां।' - ह २५.६०. २. होऊन (स्वतःच्या मर्जीने, विचाराने)बद्दल योजतात. परंतु हा तितका शुद्ध नाही. पहा : **होऊन**

**करूब** पु. (ख्रि.) हे एक प्रकारचे देवदूत असून ते देवाच्या समक्षतेचे दर्शक होते असे जुन्या करारावरून दिसते : 'एदेन भागाच्या पूर्वभागी करूब व गरगर फिरणारी ज्वालारूप तरवार ठेवली.' - उत्प २.२४. [हिब्रु. क्रुव. (अव.)]

**करे** न. मडके; करा. [सं. करक]

**करे-ऱ्हे** न. उंट : 'अशोकाचे अंगवसे। चघळिले कऱ्हेनि जैसे।'- ज्ञा ११.४१४. [सं. करभ = उंटाचे पिलू]

**करे** वि. कृश; अशक्त. (गो.)

**करेड** न. १. एक प्रकारचे गवत, तण. (गो.) पहा : **करड.** २. तबल्याच्या चामड्यावर डकवायची शाई, पुडी. [क. करिडु = काळा पदार्थ, काळेपणा]

**करेणु-णू** स्त्री. हत्ती; हत्तीण; हत्तीचे पिलू : 'करेणुसह चालतां दिसतीं पंकजाचे परी।'- गंरन १४३. [सं.करिन्]

**करेत** न. घोड्याची गाडी; बगी. (गो.) [पोर्तु. करित]

**करेप-य** स्त्री. १. पु. स्त्री. तंबाखू जाळून केलेली पूड; मशेरी (दातवणे). (गो.) २. पहा : **करप**

**करेपाक** पु. कढीलिंब. - (तंजा.)

**करेबु** पु. स्त्री. गंडिनी; कलंबी; एक वनस्पती.

**करेम, करेमेट** स्त्री. कोणत्याही फळाची कोशिंबीर. (गो.) पहा : **करंबे, करमणे**

**करेमती** स्त्री. एक प्रकारचा भात, साळी. (बे.)

**करेल, करेल आंबा** पु. कलमी आंब्याची एक जात. (गो.)[पोर्तु. कॅरेरा]

**करेला** पु. (व्यायाम) कारले; दोन हातांनी फिरवण्याचा मोठा मुद्गल : 'मल्लखांबाखेरीज करेला, जोर, बैठका इ. पहिलवानी व्यायामही मी करीत असे.'- माजी ६५. [हिं. करेल]

**करेंज** पु. भूगर्भात असलेला पाण्याचा प्रवाह.

**करो** पहा : **कर, करा**

**करोट** पु. शेताच्या लागवणीबद्दल येणारे धान्य; खंड. (व.)

**करोटि** स्त्री. कवटी.

**करोटी-टा** स्त्री.पु. करवंटी; नरोटी. (वा.) ० **हातात घेणे** - भीक मागणे; विपन्नावस्थेला पोचणे. [सं.]

**करोड** वि. १.कोटी (संख्या). २. (ल.) असंख्य. [सं. कोटि, हिं.]

**करोडगिरी** स्त्री. १. करोडा (जकातदार) याचे काम व कचेरी. २. मालावरील जकात; कर.

**करोड रज्जू** पृष्ठवंश रज्जू; पाठीचा कणा : 'मल्लखांबाचे मेहनतीने पाठीच्या करोड रज्जूस उत्तमप्रकारे व्यायाम होतो.'- व्याज्ञा २.३९.

**करोडा** पु. १. आयुक्त किंवा सर मामलेदाराच्या दर्जाचा अधिकारी; सुभा. २. (मोगलाईत) मालावरील जकात वसूल करणारा कामगार; जकातदार; नाकेवाला. [हिं. करोडा]

**करोरी** पु. एक कोटी उत्पन्नाच्या प्रांतावरील अधिकारी.

**करोल** वि. १. धिप्पाड; दांडगा : 'शेसवाशे करोल रामोशी बेधडक बाजारांत शिरला.' - उअं २१. २. भक्कम; दृढ; अढळ : 'अधिवेशन भरविण्याचा करोल निश्चय पाहून त्यांना अटक केली.'- के २६.१२.४१.

**करोल-ळ** पु. बंदूकवाला घोडेस्वार. पहा : **करवल, करवळ** : 'यांखेरीज थोर थोर गाड्यांवरील भांडी व करोळ असा चालता तोफखाना सज्जिला.' - मराआ ६. [तु.कराउल][फा. करायवल]

**करोल** स्त्री. तोड्याची बंदूक.

**करोल बरकंदाज** बंदुकीने लढणारा : '...करोल बरकंदाज वैसे राजपुरीस रवाना करून तुम्ही उभयेता हुजूर येणे.'-पेद २.५.

**करोली-ळी** स्त्री. १. करोल्याचे काम, कसब. २. घोडदळातील सैनिक; (घोड्यांवरील स्वारांनी केलेला) बंदुकीचा मारा, फैर : 'श्रीमंतांकडील बार्गीर झाडून जमा होऊन करोळी सुरू झाली.'- पया ४५.

**करोळा** पु. कुंभाराच्या आव्यातील जळके गवत. पहा : **करळ, करळा**

**करोळी** स्त्री. ज्या लाकडात गाडीचे धुरे घालतात ते लाकूड. (व.) पहा : **करळी**

**करोळे** न. गाडीच्या साटीचे आडवे लाकूड. पहा : **करळी**

**करों(रौं)डी** पहा : **कुरवंडी**

**कर्क** पु. १. खेकडा; कुरली, वेलकडे, किरवे. २. (वै.) खोलवर जाणारी बरी न होणारी जखम. शरीरात एखाद्या ठिकाणी विकारग्रस्त पेशींची अनावर वाढ होऊन बनणारी गाठ. ही वाढत जाऊन आसपासच्या भागावर आक्रमण करते. हा रोग काही मर्यादेपर्यंत असाध्य समजला जातो. ३. हाताच्या बोटाचे गळू. ४. (ज्यो.) बारा राशींपैकी चौथी रास. [ सं.]

**कर्क** पु. करक, वरातीच्या झालीतील, ऐरणीतील दिवा : 'वंश विस्तारितां सुख। सोळा कळांचे सोळा कर्क।'- एरुस्व १६.१५९.[सं. करक]

**कर्कची** पु. मोगल बादशहाच्या खाशा हत्तीभोवती चालणारे संरक्षक शिपाई.

**कर्कट, कर्कटले** वि. कळकट; घाणेरडे; ओंगळ.

**कर्कट, कर्क(र्का-र्को)टक** पु. न. १. (ग.) त्रिज्या. २. वर्तुळ काढण्याचे साधन; कंपास.

**कर्कटशृंगी** स्त्री. मेढशिंगी; एक झाड. पहा : **काकडशिंगी** [सं.]

**कर्कटा** स्त्री. चित्रा; गवाक्षा; गोडंबा; एक वनस्पती.

**कर्कटीफल** स्त्री. (वन.) अधःस्थ किंजपुटापासून बनलेले अनेकबीजी, एक कप्प्याचे, सालांजवळ बिया असणारे मऊ फळ. उदा. काकडी, भोपळा इ.

**कर्कणे** अक्रि. कण्र्याचा कर्कश आवाज काढणे; कठोर बोलणे : 'कर्णे किती एक रणबहिरि कर्कती।'- ऐपो ११९. [ध्व.]

**कर्कर** पु. (एखाद्या रत्नाच्या आत दिसणारे) रेतीचे कण; कच. [ध्व.]

**कर्कर** पु. (योग.) शरीरातील दहा वायूंपैकी एक : 'कर्करु प्राणु मुखी अनळु'-विद ४. [सं.]

**कर्करी** स्त्री. कुरकूर; कटकट.

**कर्करी** स्त्री. एक रानटी फूल-झाड. (झाडी)

**कर्करेषा** स्त्री. सूर्याच्या उत्तरेकडे जाण्याच्या मर्यादेवरील कल्पित रेषा. [सं.]

**कर्कवृत्त** न. उत्तर ध्रुव सूर्याकडे पूर्णपणे कलला म्हणजे २३॥ उत्तर अक्षांशापर्यंत सूर्यकिरण लंबरूप पडतात. या अंतरावरून जाणारे अक्षवृत्त. [सं.]

**कर्कश** वि. १. कर्णकठोर; कर्णकटू; शिरशिरी भरवणारा; झोंबणारा (आवाज). 'वाजों नको कर्कशरे समीरा।' - दावि १६६. २. (ल.) बोचणारे; अंतःकरणाला घरे पाडणारे (भाषण, वाचन) : 'कर्कश वचनें कर्कश मार।'- दास ८.२७. ३. तुसडा; तिरसट; रानटी; वाईट स्वभावाचा. ४. किर्र; अतिदाट : 'तों रान कर्कश अचाट। गगनचुंबित तरु अचाट।'- नव २३.९. ५. क्रूर; कठोर; निर्दय; भयंकर : 'कर्कश वेश उभा रणरंगी राघव तैसा।'- दावि २३४. [सं.]

**कर्कशा** स्त्री. १. त्राटिका; कैदाशीण; कृत्या; कजाग; भांडकुदळ स्त्री. : 'देवाजीच्या मनात पाठी कर्कशा लावावी.'- मला २२१. २. कर्कश, कठोर आवाज असणारी स्त्री. [सं. कर्कश]

**कर्कशा** पु. भांडण : 'ते समयीं याणीं भाऊपणियाचा कर्कशा केला नाहीं.'- मइसा १६.१५. [फा.]

**कर्कष्टक संयुक्तहस्त** (नृत्य.) दोन्ही हातांची बोटे एकमेकांच्या बेचक्यात घालून अडकवून ठेवणे. [सं.]

**कर्कस** वि. खडतर; घोर : 'ऐसेयांचां हिं घरिं कर्कसें।'- राज्ञा १७.४२३.

**कर्काचा गाडा** संथ, गोष्टीचे वेल्हाळ.

**कर्की** स्त्री. धडकी; भीती; वचक : 'समोर गातां कोणी दिसेना। मनामधीं बसली कर्की।' - होला १८.

**कर्कोट, कर्कोटक** पु. १. (पुराण) कद्रूचा मुलगा; एक नाग; सर्पराज. याला नऊ हजार हत्तींचे बळ होते. नल राजाला वनवासात याने दंश केला होता. कलिदोष नाशाकरिता याचे स्मरण करतात. २. (उप.) कऱ्हाडे जातीच्या ब्राह्मणांना म्हणतात. ३. सूड घेणारा; दीर्घद्वेषी मनुष्य. [सं.]

**कर्कोटकी, कर्कोटी** पहा : **करटुली**

**कर्कोद** पु. लसण्या; एक उपरत्न. [सं.कर्केतन=रत्नविशेष]

**कर्गटावचो** सक्रि. नारळाचा कीस पाट्यावर घालून किंचित बारीक करणे; खरंगटणे.(गो.) [ध्व.]

**कर्चा** पु. हिऱ्याचा लहान तुकडा, कण; रज.

**कर्चुला** पु. रानकुत्रा. (झाडी)

**कर्चूर** पु. कचरा; कापुरकाचरी; कचोरा; एक सुगंधी व औषधी द्रव्य; हा रुच्य, उद्दीपक, कटू असून गुल्मवात, कफ, कृमी यांचा नाश करतो.

**कर्ज** न. ऋण; दुसऱ्यापासून उसने घेतलेले व्याजी अथवा बिनव्याजी द्रव्य; खर्चासाठी परत देण्याच्या बोलीने काढलेली रक्कम; कर्जाचे रिणकोसंबंधी पाच व धनकोसंबंधी दोन असे सात प्रकार आहेत.[फा.] (वा.) १. ० **ओढणे**- कर्जावर कर्ज काढणे. (डोईवरून पाणी जाईल इतके) कर्ज असणे; अतिशय कर्ज असणे; कर्जात बुडून राहणे. २. ० **फारीक करणे**- कर्ज फेडणे : 'तेथून घेऊन तुमचे कर्ज फारीक करीन.'- हिंदसं १.२०. ० **फेरणे** - कर्ज फेडणे : 'माणसिंग याचे कर्ज ज्योतिबाबाबत होते. ते आम्ही फेरले.'-पेद १०.१४.३. ४.० **लागणे** - ऋणकरी होणे.५. ० **सेकणे** - कर्ज करणे किंवा वाढणे : 'तेणेकरितां हैराणगती जाहाली. कर्ज सेकलें.'- ऐसंसाखं १.१०७.

**कर्ज अमदान** परत किंवा वसूल आलेल्या कर्जाची जमाखर्चाच्या वहीतील बाजू; कर्जफेडीसाठी आलेली रक्कम जेथे जमा केलेली असते ती हिशेबाची बाजू. पहा : **कर्जदादन** [ फा. कर्ज+आमदनि]

**कर्जकरी** पु. १. ऋणकरी; ऋणको. २. धनको; कर्जाऊ रक्कम देणारा. ३. कर्जदारांना तगादा लावणारा नोकर, माणूस, शिपाई, अधिकारी.

**कर्जखत** न. कर्ज घेतल्याबद्दल ऋणकोने धनकोला लिहून द्यायचा कागद; कर्जरोखा; ऋणपत्र.

**कर्जदाई-यी** स्त्री. कर्ज काढणे; कर्जबाजारीपण : '...कर्जदाई करून पोट भरितातीती तरी...'-शिचसाखं ४.५.

**कर्जदादन** न. परतफेड म्हणून वसूल आलेल्या कर्जाची जमाखर्चाच्या वहीतील बाजू; कर्जफेडीसाठी दिलेली रक्कम जेथे मांडली जाते ती जमाखर्चाची बाजू. पहा : **कर्ज अमदान** [फा.]

**कर्जदार** वि. १. कर्जकरी; ऋणकरी; ऋणको : 'सबब नादारीस आलो आणि लोकांचे कर्जदारी जाहलो.'- मइसा १३.९१. २. धनको : 'तर्फ मजकूरची रयत कर्जदार (ऋणको) जाली आहे त्यास कर्जदाराची (धनकोची) निकड होते आणि द्यावयासी अवसर नाही.'- वाडसमा २.२२५. [फा.]

**कर्जदारी** स्त्री. ऋणकोपणा; कर्जबाजारीपणा.

**कर्जपाणी** न. कर्जवाम; कर्ज या शब्दाला व्यापक संज्ञा.

**कर्जबंदी** वि. ऋणको; कर्जदार : 'खायावाचून बैल मेले, कर्जबंदी झाला.' - पला ८६.

**कर्जबाजारी** वि. ज्याला अनेकांचे कर्ज आहे असा; देणेदार; ज्याला फार कर्ज आहे असा (माणूस). [फा.]

**कर्जबातरीक** क्रिवि. कर्ज म्हणून; कर्जासारखे; ऋणरूपी; ऋणमिषाने : 'चार लक्ष आज पाहिजेत, नाहीतर परिछिन्न जीव वाचत नाही. कर्जबातरिक घ्यावे.'-पेद २०.१८९. [फा.]

**कर्जभरी-रू** वि. कर्जबाजारी; देणेदार : 'आपण कर्जभरू होतात.'- बाळ २.१२९. (क्रि.होणे.)

**कर्जरोखा** १. पहा : **कर्जखत** : 'सुवर्णाचा साठा जनतेने कर्जरोख्यांच्या मोबदल्यात सरकारच्या हवाली केला तरच...'-आविप्र ३२. (क्रि. लिहून देणे, घेणे.) २. कंपनीचे विकत घेतलेले भाग.

**कर्जरोखेनिधी** पु. (अर्थ.) कंपनीचे कर्जरोखे विकून निर्माण केलेले (भाग)

भांडवल; विकत घेतलेले सार्वजनिक रोखे.

**कर्जवाम** न. ऋण; देणे : 'साहुकाराच्या योगाने राज्य आबादान होते... पडले संकट प्रसंगी कर्जवाम पाहिजे तें मिळतें.'- मराआ २०. [फा.]

**कर्जहसना** स्त्री. ऋणग्रहण; बिनव्याजी कर्ज; इच्छेला येईल तेव्हा परत करायचे कर्ज. [फा.]

**कर्जाऊ** वि. व्याजाच्या बोलीने घेतलेले किंवा दिलेले (द्रव्य); कर्ज म्हणून घेतलेले.

**कर्जी** क्रिवि. व्याजू; व्याजाने; व्याजाच्या बोलीने दिलेल्या किंवा घेतलेल्या संबंधाने.

**कर्डा-र्डी** पहा : **करडा** : 'गंगथडीहुन आली पुण्याला कर्डिफौज बांकी स्वारी.'-ऐपो ३२३.

**कर्डाकाकडा** वि. कडक; कडवा; कठोर.

**कर्डी** पहा : **करडई**

**कर्ण** वि. सबजा (रंग).- अश्वप १.२७.

**कर्ण** पु. कान; ध्वनिग्राहक इंद्रिय; श्रवणावयव : 'परि दूतांच्या मुखें हे वार्ता। सत्यभामेच्या कर्णी तत्त्वता। प्रवेशली आद्यंत।'- हरि २६.१०२. [सं.] (वा.) ० **ओढणे, ओढविणे** - लक्षपूर्वक कान देणे किंवा द्यायला लावणे.

**कर्ण** पु. १. अंगदेशाचा राजा. हा फार उदार होता. सूर्यापासून झालेला कुंतीचा पुत्र : 'रिपुगज पंचाननु। कर्णवीरु॥'-ज्ञा १.१०५. २. (कर्ण उदार होता त्यावरून लक्षणेने) मोठा दाता; उदार पुरुष; (उप.) कृपण मनुष्यासाठी म्हणतात. उदा. कर्णाचा अवतार. [सं.]

**कर्ण** पु. (भूमिती) भुजाच्या अंतरापासून कोटीच्या मुळापर्यंतचे सूत्र; काटकोन त्रिकोणात काटकोनासमोरील बाजू; काटकोन चौकोनाच्या समोरील दोन कोन जोडणारी रेषा. [सं.]

**कर्ण** पु. (नाविक)नावेचे सुकाणू : 'त्या नावाड्यांनी बाजीला शेकून जहाजाच्या कर्ण्यावर निजविले.'- स्वप ३३०. [सं.]

**कर्णकटु-टू** वि. १. कानाला त्रास देणारे; कठोर; कर्कश. २.(ल.) अप्रिय (भाषण, शब्द, गाणे). [सं.]

**कर्णकुमारी** स्त्री. मिश्रणजातीतील मुलगी.

**कर्णकूट** न. (पुरा.) कोन असलेला मनोरा; बुरूज.

**कर्णखोर** वि. कर न कऱ्या; कर म्हणून सांगितलेले न करता जे करू नको म्हणून सांगितले ते मुद्दाम करणारा. (ना.)

**कर्णगत, कर्णघृष्ट** वि. कानावर आलेले; एकवार ऐकलेले; कानावरून गेलेले; उडत उडत ऐकलेले (वाक्य वगैरे).

**कर्णचिकित्साशास्त्र** न. कानाची रचना, कार्य आणि विकृती या सर्वांचा विचार करणारे शास्त्र.

**कर्णछेद** पु. १. कान कापण्याची शिक्षा (चोरांना दिलेली). २. कानाच्या पाळीला भोक पाडणे; कर्णवेध. [सं.]

**कर्णजप** पु. १. कानात सांगितलेला मंत्र; उपदेश; उपनयनाच्या वेळी गुरू शिष्याला सांगतो तो : 'गीत भाटींव तो श्रवर्णी। कर्णजपु॥' - ज्ञा १७.२९७. २. कानात गुप्त गोष्ट सांगणे. ३. कानाशी केलेली पुटपुट; चहाडी; चुगली; चुगलखोरी. पहा : **कर्णेजप** [सं.]

**कर्णताटंक** न. तानवडे; कर्णभूषणे : 'भुलविल्या कृष्णवेधकें; पायीं घातलीं कर्णताटंकें। '- हरि १९.६६. [सं.]

**कर्णताळा** पु. कानाचे झडपणे; कानाची हालचाल; ताडपत्रासारखा कान : 'पाठीं निवृत्तिकर्णताळें ।'- ज्ञा १७.७.

**कर्णदर्शी** पु. (वै.) कान तपासण्याचे यंत्र, कर्णवीक्षण यंत्र. [सं.]

**कर्णद्वार** न. कान; श्रवणमार्ग : 'जे इये गीतेचीं अक्षरें। जेतुलीं का कर्णद्वारें।' - ज्ञा १८.१५३५.

**कर्णधार** पु. १. नावाडी; सुकाणू धरणारा; सुकाण्या. २. (ल.) पुढारी; नेता : 'कळों आलें बरें उघडले डोळे। कर्णधार मिळे तरी बरें।'- तुगा ८८७. ३. क्रिकेट इ. खेळांतील संघनायक. [सं.]

**कर्णनाद** पु. कानात एकसारखा होणारा आवाज. [सं.]

**कर्णप(पं)थ** पु. कानाचा मार्ग; ज्या मार्गाने कानात ध्वनी शिरतो तो मार्ग. [सं.]

**कर्णकरी** वि. कर्णा वाजवणारा.

**कर्णपात्र** न. कर्णा; एक वाद्य.

**कर्णपाली** स्त्री. कानाची पाळ, खालचे टोक. [सं.]

**कर्णपिशाच** पु. न. १. एक मंत्रसाध्य पिशाच. हे उपासकाला भूत, भविष्य, वर्तमान वृत्त सांगते असा समज आहे : 'कर्णपिशाच भगलिनी। उच्छिष्टचांडाळी रानसटवी जखणी।'- हरि १३.६. २. भविष्यकथन; भाग्यकथन. ३. गुप्त गोष्टी सांगणारा. [सं.]

**कर्णपिशाची** पु. भविष्य सांगणारा; ज्योतिषी.

**कर्णपिशी** स्त्री. कर्णपिशाच.

**कर्णपीडनासन** न. (व्यायाम) उताणे निजून दोन्ही हातपाय मागे नेतात व पाय गुडघ्यांत वाकवून कानाला लावतात ते आसन. [सं.]

**कर्णपुट** न. कानाच्या बाहेरचा भाग; कान : 'या बोलाची डांगुरटी। तियें प्रसिद्धी आली किरीटी। म्हणौनि तुझ्या हन कर्णपुटीं। वसों हें काज॥'- ज्ञा १८.२८१. [सं.]

**कर्णपुष्प, फूल, भूषण** न. १. कानातील एक दागिना : 'करीन संतांसी कर्णभूषणें।'- ज्ञा १४.१८. २. घोड्याच्या कानातील दागिना.

**कर्णफुले** न.अव. शिक्षा म्हणून कानाला लावायचे चाप. [सं.]

**कर्णफोड** पु. कानात होणारा फोड. याला गोसावी असे म्हणतात.

**कर्णम्, करणम्** पु. कुलकर्णी; लखदीव बेटात करणी नावाचे कारकून, शानभोग आहेत. - (तंजा.)

**कर्णमल** पु. बाह्यकर्णभागातून येणारा पिवळा मेणासारखा पदार्थ.

**कर्णमात्रा** स्त्री. कर्णभूषण; कानातील दागिना : 'हस्तमात्रा कर्णमात्रा। कृष्णासी वोपिल्या विचित्रा।'- एरुस्व १५.१४९.

**कर्णमूळ** न. १. कानाचे मूळ; कानशील : 'जरा कर्णमुळी सांगों आली गोष्टी॥'- तुगा ३३४७. २. कानाच्या खाली होणारे दु:ख, रोग, कर्णवळ. ३. कानाच्या मागे,भोवरा असणे, घोड्याचे एक लक्षण.- अश्वप ९८.

**कर्णमैथुन** न. कानाशी लागणे; चुगली; चहाडी, कानगोष्टी, कानमंत्र

करणे (वाईट अर्थाने योजितात). [सं.]

**कर्णयुगळ** न. कान : 'इये कर्णयुगळीं धरिलें'-लीचउ १७.

**कर्णरिषा** पहा : **कर्ण** (नाविक.)

**कर्णरोग** पु. कानाला होणारे रोग. हे कर्णशूळ, कर्णनाद, बाधीर्य, कर्णक्ष्वेड, कर्णस्राव, कर्णकंडू इ. २८. आहेत. [सं.]

**कर्णवेध** पु. लहान मुलाचा कान टोचण्याचा (कानाच्या पाळीला भोक पाडण्याचा) एक विधी. मुलाचे नाव ठेवण्याच्या दिवशी हा विधी करतात. [सं.]

**कर्णव्रण** पु. ज्याच्यातून पू वगैरे वाहत आहे असे कानाच्या आत पडलेले क्षत. [सं.]

**कर्णशूळ** पु. कानामध्ये काही विकृतीमुळे उत्पन्न होणारा ठणका. [सं.]

**कर्णशोथ** पु. (वै.) कानाला आतून बाहेरून येणारी सूज. [सं.]

**कर्णश्रुत** वि. कानांनी ऐकलेले; ऐकीव. [सं.]

**कर्णसंपुष्ट** न. कानाच्या तीन भागांपैकी एक भाग; पाळ व चाफा यांशिवाय जो खोलगट भाग असतो तो. [सं. कर्ण+संपुट]

**कर्णस्वर** पु. श्रवणयंत्रणेतून निर्माण होणारा स्वर.

**कर्णा** पु. १. तोंडाने वाजवायचे, मोठ्या आवाजाचे, पसरट तोंडाचे पितळेचे एक वाद्य. पहा : **करणा** : 'वाजंत्रें वाजती, कर्णे वाजंत्रें वाजती.'-दत्तपदे ५. २. मोटारीचा भोंगा. (क्रि. करणे.) [फा. कर्ना]

**कर्णाचा अवतार** १. मोठा दानशूर, उदार पुरुष. २. (उप.) कृपण मनुष्य.

**कर्णाचा पहारा** पु. सूर्योदयापासून पहिल्या तीन तासांचा पहारा; पहिला पहारा; अति पवित्र वेळ; रामपहारा.

**कर्णाधार** पु. नावेचा सुकाण्या; सुकाणू धरणारा, नावाडी : 'की दुस्तर भवसागरु : तारीते कर्णाधार' - ज्ञाप्र ८८६.

**कर्णारूढ** वि. कानावर आलेले; कानावरून गेलेले; ऐकलेले (ऐकीव शब्द, वाक्य इ.). [सं.]

**कर्णार्श** पु. कान फुटणे; कान वाहणे; कानाचा एक रोग. [सं.]

**कर्णावतंस** पु. कानातील अलंकार; कर्णभूषण. [सं.]

**कर्णावळ-ळी** स्त्री. एक फुलझाड. [सं. कर्ण+आवलि]

**कर्णाश्मरी** स्त्री. (वै.) कानाच्या आतील बाजूला कॅलशियमयुक्त मळाचा तयार झालेला खडा. [सं.]

**कर्णास्थिकाठिण्य** न. (वै.) मध्यकर्णातील अस्थी टणक झाल्यामुळे निर्माण होणारा कानाचा आजार.

**कर्णांतबिंदू** पु. (भूमिती) कर्णाच्या दोन्ही टोकांचे एकमेकांपासून विरुद्ध दिशेला असणारे बिंदू.

**कर्णिक** पु. बाणाचा एक प्रकार. [सं.]

**कर्णिक** पहा : **करणिक**

**कर्णि(र्णी)कर** पु. कण्हेरीचे फूल : 'कर्णिकराचा झेला : पातां वानु होय सोनसळा'- उगी ५५०.

**कर्णिका** स्त्री. १. कमळ वगैरे पुष्पांचा कोश : 'येरी म्हणती योगद्रुमा। श्रेष्ठ कर्णिका राजउगमा।'- नव २२.७१. २. कमळाची कळी : 'यंत्र उभवणि उपासकां। त्याची आंगोळियां मुद्रिका। त्रिकोण षट्कोन कर्णिका। जडित माणिका आगमोक्त '- एरुस्व १.५१. ३. कमळाची पाकळी : 'माझें हृदय दिव्य कमळ। जें तेजोमय परम निर्मळ। अष्ट कर्णिका अति कोमळ। मध्यें घननीळ विराजे।'- हरि ३५.१. ४. तानवडे. [सं.]

**कर्णिका** स्त्री. हाताचे मधले बोट. [सं.]

**कर्णिका** स्त्री. कर्णभूषण (तानवडे, ताटंक इ.). [सं.]

**कर्णिका** स्त्री. (वै.) हृदयाचा वरील भाग.

**कर्णिकार** पु. १. एक मोठा सुंदर वृक्ष : 'कर्णिकाराच्या मोठ्या खोडापासून इमारती लाकूड मिळते.'- वनश्री २४४. २. कण्हेरीचे झाड : 'चीकभरी मदनाचे हातियेर : तैसे फुलीं तळपती कर्णिकार' - रुस्व ८११.

**कर्णी** स्त्री. गवंड्याची थापी. पहा : **करणी**

**कर्णेजप** वि. निंदाव्यंजक बोलणारा; प्रच्छन्न निंदक. पहा : **कर्णजप** [सं. कर्ण सप्तमी+ जप]

**कर्णोपकर्णी** क्रिवि. या कानापासून त्या कानापर्यंत; एकाने दुसऱ्याला, त्याने तिसऱ्याला, त्याने चौथ्याला अशा रीतीने; उडत उडत (ऐकलेली गोष्ट, हकीगत) : 'सर्व बातम्या कर्णोपकर्णी आल्या तशा दिल्या.'- के १७.५.३०. [सं. कर्ण+उपकर्ण]

**कर्तक** वि. १. कापणारा; छेदणारा. २. कपडे बेतणारा (शिंपी) : 'कर्तकानें काळजीपूर्वक कर्तकाचे काम केले पाहिजे.'-काप्र. [सं. कृत्]

**कर्तन** न. १. छेदन; कापणे; कातरणे; कातरकाम. २. (वस्त्रो.) सूत कातणे; सूत काढणे. ३. (शिंपी) कापडाचे कातरकाम; बेतण्याचे काम. [सं. कर्त्, कृत्]

**कर्तनक्षी तंत्र** (स्था.) तीक्ष्ण हत्याराने कोरीव खोदकाम करून नक्षी काढण्याची कला, तंत्र.

**कर्तनीय** वि. कापण्याला, कातरण्याला, छाटण्याला योग्य. [सं.]

**कर्तब** न. १. चातुर्य; कसब; कर्तृत्व; शिताफी. २.गायनातील कौशल्य, आलाप, ताना वगैरे. [हिं.] [सं. कर्तव्य]

**कर्तबगार** वि. एखादे काम करण्यात हुशार; कर्तृत्ववान : 'या कर्तबगार स्त्रीच्या निधनाची बातमीसुद्धा मराठी वर्तमानपत्रात आली नाही.'- व्यक्ती.

**कर्तबगा(दा)री** स्त्री. १. कर्तृत्व; कौशल्य; करामत; हुशारी. २. गानकौशल्य.

**कर्तर** पु. कर्ता; कारभारी; सर्वाधिकारी : 'म्हणाले जे सकाल तुम्हांस बोलाऊं पाठवून कर्तराची भेट करतो.'- पेद ४०.११६. [सं. कर्ता]

**कर्तरि-री** वि. (व्या.) कर्तृ शब्दाची सप्तमी; कर्त्याला अनुसरून ते. याच्या उलट कर्मणी. धातूंना व शब्दांना लागून ज्यांच्या योगे अनेक प्रकारची धातुसाधिते होतात असे प्रत्ययाचे प्रकार. [सं. कर्तृ]

**कर्तरी** स्त्री. कातरी, कैची. [सं.]

**कर्तरी प्रयोग** पु. (व्या.) कर्त्यावरून क्रियापद फिरते म्हणजे कर्त्याच्या लिंगवचनाला अनुसरून क्रियापदाचे रूप असते. तेथे कर्तरी प्रयोग होतो. याचे दोन भेद आहेत. सकर्मकर्तरी व अकर्मकर्तरी.

**कर्तरीमुख हस्त** (नृत्य.) तर्जनी व मधले बोट मागच्या बाजूला वळवून

उभे ठेवणे. करंगळी उभी सरळ ठेवणे. अनामिका व अंगठा तळहाताच्या बाजूला वळलेला ठेवणे. [सं.]

**कर्तवी, कर्तृत्वी** पु. (कर्ता याचे अप. रूप) कर्ता; करणारा; बनवणारा. [सं.कृ]

**कर्तव्य** वि. मनात योजलेले; करणे आवश्यक असे उद्दिष्ट (कार्य); करायला योग्य असे : 'हा गा शरीर जरी जाहले। तरी कर्तव्य वोघें आलें।'- ज्ञा २.१४४.

न. १. अवश्य कर्म, कृत्य, कार्य. २. कार्य करण्यात कुशलता.[सं.]

**कर्तव्यतत्पर** वि. आपल्या कर्तव्याकडे नीट लक्ष असणारा; कर्तव्यानुरूप वागणारा. [सं.]

**कर्तव्यता** स्त्री. पहा : **कर्तव्य** : 'स्फूर्ति ये चढण्यास दुर्घट तरी कर्तव्यतेचा कडा।'- मनोहरमाला वर्ष १ अं. १.

**कर्तव्यदक्ष** वि. कर्तव्य करण्यात चोख. [सं.]

**कर्तव्यनिष्ठ** वि. निष्ठेने कर्तव्यकर्म करणारा.

**कर्तव्यभूमिती** स्त्री. भूमितीचा एक प्रकार. यात निरनिराळ्या आकृती काढण्याच्या कृती सांगितलेल्या असतात.

**कर्तव्यशून्य** वि. आवश्यक कर्म न करणारा; कर्तृत्वहीन; बेजबाबदार.

**कर्तव्यक्षेत्र** न. कामाचा आटोका; काम करण्याचे क्षेत्र, जागा.

**कर्ता** पु. १. करणारा; उरकणारा; कारण होणारा; बनविणारा; रचणारा; जुळवणारा : 'कर्ता न दिसे नयनीं'।'- दावि ३८५. २. (व्या.) प्रथमा विभक्ती किंवा क्रियापदाचे उद्देश्य; एक कारक; उद्देश्य. ३. कर्तबगार माणूस; कर्तृत्ववान : 'समशेर बहाद्दर रणीं थकले कर्त्याची गत आहे न्यारी.'-ऐपो १३५. ४. स्वकष्टाने, श्रम करून मिळविणारा मनुष्य; कारभार, प्रपंच, घर इ. सांभाळणारा. ५. (कायदा) हिंदू एकत्र कुटुंबाची व्यवस्था पाहणारा मुख्य इसम; कुटुंबप्रमुख. [सं. कर्तृ]

**कर्ताकरवता** पु. स्वत: करणारा आणि दुसऱ्याकडून करवून घेणारा.

**कर्तासवरता** वि. पोटापाण्याचा धंदा करू शकेल असा; स्वत:च्या जबाबदारीवर काम करू शकेल असा; व्यवहार सांभाळण्यास समर्थ.

**कर्ताहर्ता, कर्ताहर्तापालिता** वि. निर्माण करणारा व नाश करणारा; जडविणारा व भंगणारा; जोडणारा व तोडणारा; परमेश्वराचे गुणदर्शक नाव. [सं.]

**कर्तुक** स्त्री. १. पराक्रम. (ना.)(व.) पहा : **कर्तृक, कर्तृत्व**. २. करणी अगर जादूटोणा. कर्तृत्व; कर्तुक; कर्तबगारी : 'ते एवढेसे खेडे देव्या महाराच्या अचाट कर्तुकीने ढवळून निघाले होते.' - व्यंमाक २०. [सं. कर्तृत्व]

**कर्तुतंत्र** न. कर्ताच्या स्वाधीन असणारी गोष्ट उदा. कर्म, ध्यान इ.

**कर्तुत्व** न. १. काम; कार्य : 'रजोगुणांचे कर्तुत्व। दाखऊं आता।'- दास २.५.६. २. कुशलता; काम करण्यात चतुराई. ३. पराक्रम; कर्तबगारी. पहा : **कर्तृत्व** : 'कर्तुत्व याचेंन स्वभावें।'- दास १८.४.२३. [सं. कर्तृत्व]

**कर्तुप** स्त्री. कर्तबगारी. (व.)

**कर्तु(र्त)मकर्ता** वि. सर्वशक्तिमान; सर्वसमर्थ; कुशल; दक्ष; निपुण; शिताफीने काम चालविणारा, आवरणारा.

पु. सर्वशक्तिमान पुरुष, ऋषी, देव इ.; हुशार, कार्यक्षम चालक. [सं.]

**कर्तूक** पु. जादूटोणा. (झाडी) [सं. कर्तृत्व फा.]

**कर्तूज** न. कसब; कौशल्य. (कु.) [सं. कर्तृत्व]

**कर्तृक** वि. (समासात) जो करतो, उरकतो, बनवितो त्याचे विशेषण; -ने केलेले. जसे : - ईश्वरकर्तृक. [सं.]

**कर्तृत्व** न. १. कर्तेपणा; सामर्थ्य; नैपुण्य; कर्तबगारी; वाकबगारी; कार्य करण्याची शक्ती : 'देखैं प्राप्तार्थ जाले। जे निष्कामाला पातले। तेयां ही कर्तृत्व असे उरलें। लोकांलागि॥'- ज्ञा २.१५४. २. कृती; काम; कार्य : 'कर्तृत्व कुमारीचें कळलें। ऋषीनें शापिलें ते वेळे।'- रावि २.१०१.

**कर्तृत्वशक्ती** स्त्री. उत्कृष्टपणे काम पार पाडण्याचे सामर्थ्य, उरक; कार्यक्षमता. [सं.]

**कर्तृत्वशून्य** वि. पूर्णपणे नालायक; काहीही चांगले किंवा उपयुक्त करू न शकणारा. [सं.]

**कर्तृत्वसिद्धि-द्धी** स्त्री. विशेष हुशारीने, कर्तबगारीने मिळवलेली, साध्य केलेली गोष्ट. [सं.]

**कर्तृभूत** वि. (व्या.) कर्ता म्हणून असणारा; क्रियापदाचा कर्ता; क्रियेचा प्रवर्तक. [सं.]

**कर्तृवाचक** पु. (व्या.) धातुसाधित विशेषण. हे मूळ धातूला प्रत्यय लागून होते. जसे :- करणार, हसणार, करणारा, जाणारा इ. [सं.]

**कर्तृवाच्य** पु. (व्या.) १. कर्तरिप्रयोग. २. कर्तृदर्शक नाम; कर्तरी धातूचे विशेषण वगैरे. [सं.]

**कर्द** खाटकाच्या सुऱ्यासारखा सुऱ्याचा एक प्रकार.

**कर्द** पु. कार्य; कृती.

**कर्दग(गा)र** पु. शस्त्रे तयार करणारा. [फा. कारदगर]

**कर्दनकाळ** वि. क्रूर; तापट; कडक; भयंकर शिक्षा करणारा. पहा : **करदनकाळ, करवतकाळ** : 'मराठे म्हटले म्हणजे मोगल, रोहिले, पठाण, रजपूत वगैरेंना कर्दनकाळासारखे वाटतात.'- लोकहितवादी.

**कर्दनबस्तन** न. १. जडविणे व वितळविणे; एक दागिना मोडून त्या धातूचा दुसरा दागिना करणे. २. (जमाखर्च) ठोक मालापैकी वस्तू नावे लिहून त्याचे तयार झालेले जिन्नस जमेकडे लिहिणे. उदा. धान्य नावे लिहून त्याचे दळून आणलेले पीठ जमा लिहिणे; कापड नावे लिहून तंबू, वस्त्रे इ. जमा करणे; हिशेब : 'कर्दन बस्तन, गुणाकार भागाकार करावयाचा सराव बहुत असावा.' - पया ४५९. ३. ठोक नाण्याचा खुर्दा करणे व खुर्द्याचे नाणे करणे; बंदे करणे व मोड करणे. [फा. कर्दन्=करणे+बस्तन=बांधणे]

**कर्दम** पु. १. चिखल; रेंदा; गाळ : 'जैसा कर्दमी रुपला। राजहंस॥' - ज्ञा २.४ २.(ल.) जाळे; जुंबाड; अव्यवस्थित रास किंवा समूह; उकिरडा. ३. (ल.) वर्णसंकर; जातीजातींचा गोंधळ; शुद्ध-अशुद्ध यांचा अगर सोवळेओवळे यांचा एकंकार : 'केवढी ये रांडेची अंगवण। भ्रमविले अवघे जन। याती अठरा चाऱ्ही वर्ण। कर्दम करूनि विटाळिले॥' -तुगा ४१४९. [सं.]

**कर्दमवायु-यू** पु. (शाप.) एक विषारी वायू; अनूपवायू. [सं.]
**कर्दळ** स्त्री. १. केळ; कापूर केळ. पहा : **करदळ** : 'ना तरी कर्दळीचा गाभा। बुंथी सांडोनि उभा।'- ज्ञा ६.२९५. २. एक केळीसारखे लहान फुलझाड. [सं. कदली]
**कर्दळणे** अक्रि. १. करुणा येणे. (व.) २. (पदार्थ) घशातून आग करीत खाली जाणे.
**कर्दळीसुत** पु. कापूर.
**कर्दा** पहा : **करदा** : 'नवीन कर्दीकुळें उभीं करणें.'- गांगा २२.[फा. कर्द]
**कर्दावा, कर्दी** पु. स्त्री. लागवडीखालची जमीन; शेतजमीन.
**कर्दोडा** पु. १. गाड्याचा पट्टा. २. करगोटा.
स्त्री. खाटेची आडवी दोरी. (झाडी)
**कर्नडा** पु. १. बांबूची पेटी. २. डबा. (झाडी)
**कर्नडी** पु. बुरूड. (झाडी)
स्त्री. फुलांची टोपली (करंडी). (झाडी)
**कर्नाटक** पु. भारतातील एक घटक राज्य. [सं. कर्णाटक] (वा.)० **ओस पडणे** - बहिरे होणे; बधिरत्व येणे.
**कर्नाटक कलह** अल्प कारणावरून भांडण तंटा; झोंबाझोंबी; क्षुल्लक कारणावरून होणारा कलह.
**कर्नाटकी संगीत** पहा : **दक्षिणी संगीत पद्धती**
**कर्नाटकी** वि. १. कर्नाटक देशातील; कानडी; कन्नड (भाषा, मनुष्य, वस्तू इ.). २. करणी किंवा जादूटोणा जाणणारा (पुरुष, स्त्री).(व.)
**कर्नात** स्त्री. वज्रमुष्टीचा व्यायाम. उभे राहून बैठक घ्यायची व उठून एक एक पाय क्रमाने गुडघ्यात मोडून वर घ्यायचा व फिरकी मारायची.
**कर्न्याची भाकर** मिश्र पिठाची भाकरी, कळण्याची भाकरी. (झाडी)
**कर्पट** न. अजीर्ण; अपचन.
**कर्पटाण** स्त्री. कर्पटघाण पहा : **करपटाण** : 'दग्ध होता सुटली कर्पटाणी।'- कृमु ४१.५६.
**कर्पडा** पु. भातावरील एक रोग. (झाडी)
**कर्पर घुमट** (वै.) कवटीचा गोल; करोटीचा घुमट.
**कर्परिकी** स्त्री. (वै.) मस्तकविज्ञान; मस्तकासंबंधी विचार करण्याचे शास्त्र; करोटिविज्ञान.
**कर्प(र्पु)साण** स्त्री. करपट घाण; करपटाण.(गो.)
**कर्पी** स्त्री. अंगातील बंडी. (कातकरी)
**कर्पी(र्पू)ल** पु. एका जातीचे गवत : 'तेथील कोवळा कर्पील ते (बैल) कुरतडत होते.'- तोरण १११. पहा : **करपेल** (कु.)
**कर्पूचे** (गो.) पहा : **करपणे**
**कर्पूर** पु. १. कापूर; एक ज्वलनशील सुगंधी द्रव्य. हे पूजेच्या साहित्यात वापरतात. याचे चंद्रसेनी, भीमसेनी व रंभा असे तीन भेद आहेत : 'जैसा कर्पूराचा राशी कीजे।'- ज्ञा २.२५१. २. (होमिओपथी) कँफर. हे महामारी (कॉलरा) वर रामबाण औषध आहे. [सं.]
**कर्पूरकर्दळी, कपूर केळी-ळे** स्त्री. कर्दळी : 'कर्पूरकर्दळी डोलती।'- हरि १०.१६०; 'कर्पूरकेळींचीं गर्भपुटें। उकलतां कापुराचेनि कोंदाटे।'- ज्ञा ११.२५०; 'कर्पुरकेळें सोनकेळें।'- सप्र १५.२४.
**कर्पूरगौर** पु. शंकर : 'कर्पूरगौरा भोळा नयनीं विशाळा।'- शंकराची आरती. वि. कापरासारखा गोरा : 'अथवा धवळधाम गोक्षीर। कर्पूरगौर पंचवक्त्र।' - एभा १३.९५. [सं.]
**कर्पूरण** न. स्थायु पदार्थाचे एकदम वायुरूपात होणारे अवस्थांतर, संप्लवन.
**कर्पूररंभा** स्त्री. कापूरकेळ. पहा : **कर्पूरकर्दळी** : 'दिसत मृदू जिचें ऊरु। कर्पूररंभा।'- आप १४.
**कर्पूराम्ल** न. (रसा.) कापराचे आम्ल. [सं.]
**कर्पूरिका** स्त्री. कापूर देणारी दासी : 'सर्वे कर्पूरिका हडपिणी' - रुस्व १०२.
**कर्पूस** पु. लहान मुलांची कानटोपी.(गो.)
**कर्ब** पु. (रसा.) एक अधातुरूप मूलद्रव्य (परमाणुभारांक १२). हे हिरा, ग्रॅफाईट, कोळसा, संगमरवरी दगड वगैरेत आढळते. कार्बन. [इं.]
**कर्बसंस्थापन** न. कर्ब स्थिर (पक्का) करणे.
**कर्बाड** न. कडबा. पहा : **करबड**
**कर्बाम्लवायू** पु. (शाप.) कॅर्बानिक ॲसिड वायू. हा कर्ब आणि प्राणवायू यांच्या संयोगापासून बनतो. हा ज्वलनाला मदत करत नाही. कर्ब तेजाबाचा वायू.
**कर्बाश्म** पु. (भूशा.) ज्वलनशील, जीवजन्य अवसादी खडक.
**कर्बुरित** वि. रंगीबेरंगी ठिपके असलेला. [सं.]
**कर्बूर** वि. १. करडा; कबरा; काळसर पांढरा (घोडा इ.). २. चित्रविचित्र; निरनिराळ्या रंगांच्या छटा असलेला (घोडा इ.). [सं. कर्बुर]
**कर्बोदक** न. कर्ब, उज व प्राणवायू मिळून तयार झालेले कार्बनी संयुग.
**कर्म** न. १. एखादे काम, कृत्य : 'हें कर्म झालें समरांत जेव्हां। होतास कोठें रणभीरू तेव्हां।'- वेणीसंहार ३. २. स्नानसंध्या, यज्ञयागादी धार्मिक विधी. याचे नित्य, नैमित्तिक व काम्य असे तीन भेद आहेत. ३. सांप्रतच्या आयुष्यातील कृती, चाल, आचार, वर्तणूक यावरून दैव किंवा नशीब अशा अर्थाने योजतात. ४. विशिष्ट काम; नैतिक कर्तव्य; जाती, धंदा वगैरेंनी मानलेले आवश्यक कृत्य. ५. (व्या.) कर्त्याने अमुक क्रिया केली हे दाखविणारा शब्द; कर्तृविषयक व्यापाराचे कारक; कर्माची विभक्ती प्रायः द्वितीया असते. जसे :- 'राम गाय बांधतो' यात गाय हे कर्म. ६. उद्योग; कामधंदा; नेमलेले, विशिष्ट प्रकारचे काम. ७. सुरतक्रीडा; मैथुन; रतिसुख; संभोग. ८. सामान्य क्रिया; ऐहिक व्यापार; मायिक क्रिया : 'माया हा सामान्य शब्द असून तिच्याच देखाव्याला नामरूपे व व्यापाराला कर्म ही विशिष्टार्थक नामे आहेत.'-गीर २६०. [सं.] (वा.) ० **दोन पावले पुढे** - नशीब नेहमी आपल्यापुढे धावत असते. ० **आड ठाकणे**- कर्म आडवे येणे; आपत्ती ओढवणे : 'अन्न घेवोनि जो निघाली। तो कर्म आड ठाकलें।' - हरि १६.१३०. ० **फुटणे**- दुर्दैव ओढवणे; गोत्यात येणे; नुकसान होणे. **कर्माने ओढणे, ओढवणे**- दैवाचा पाश येऊन पडणे; दैवाधीन होणे. **कर्माने जागे होणे**- दैव अनुकूल होणे. **कर्माने धाव घेणे**- दैव पुढे येणे; दैवाकडून प्रतिबंध, अडथळा होणे. **कर्माने पाठ पुरविणे, उभे राहणे**- दैवाने मोडता,

अडथळा घालणे; कर्म ओढवणे. **कर्माने मागे घेणे, सरणे**- दैवाने साहाय्य न करणे.

**कर्मकटकट-खटखट** स्त्री. न. १. प्रारब्धामुळे मागे लागलेले दुर्दैव, संकट, विपन्नावस्था; कर्मकटकट; पूर्व जन्मीचे पाप, भोग :'प्राणी कष्टकष्टेंचि मेले। कर्मकचाटें।'- दास ८.८.२०. २ भांडण, वाद.

**कर्मकटकट-खटखट** स्त्री. १. प्रारब्धयोगाने वाट्याला आलेले किंवा गळ्यात पडलेले व कंटाळा येण्याजोगे कोणतेही काम; वरचेवर त्रास, खटखट देणारे, डोके उठविणारे, अडथळा आणणारे काम किंवा व्यक्ती; कोणतीही नशिबी आलेली पीडा, त्रास, छळ, जाच वगैरे. २. (ल.) जिकिरीचे, नावडते काम, ब्याद : 'आतां त्यांची कर्मकटकट आपणांस कशाला हवी ?'- नि ६७. ३.(ल.) भांडण; तंटा; कटकट : 'तुम्हां दोघांत नेहमीं इतकी कर्मकटकट चालत असते.'- भा ३७ [सं.]

**कर्मकट्टो** वि. हतभागी; कर्मकरंटा. (गो.)

**कर्मकठिण** वि. देवतेला प्रसन्न करण्यासाठी कठोर व्रते आचरणारा : 'यक कर्मकठिण कोरडे : कर्मजड'- ज्ञाप्र २५२.

**कर्मकथन-नी** न. स्त्री. १. कर्मकथा; कर्माची कहाणी. २. (ल.) दुर्दैवी प्रसंगकथन; दुःखकथा. पहा : **कर्मकथा** : 'ऐसी आमुची कर्मकथनी। तें अनायासे आलें सर्व घडोनी।'- मक २६.१८५. [सं.]

**कर्मकथा, कर्मकहाणी** स्त्री. १. प्रारब्धामुळे भोगलेल्या दुःख, त्रास, दगदग वगैरेची दुसऱ्याजवळ सांगितलेली गोष्ट, वृत्तांत, कहाणी. २. आत्मश्लाघेचे किंवा रिकामटेकडे भाषण, बाता. ३. एखाद्या प्रसंगाची किंवा कृत्याची खरी व इत्थंभूत हकीगत. ४. कंटाळवाणे, निरर्थक भाषण, बडबड. [सं.]

**कर्मकार** वि. १. कर्मनिष्ठ. (गो.) २. शिल्पी; लोहार. [सं.]

**कर्मकाल-ळ** पु. धर्मकार्ये करण्यासाठी उचित असलेला काळ. [सं.]

**कर्मकांड** न. १. त्रिकांड वेदातील यज्ञासंबंधीचा कर्ममार्गदर्शक व आचारनिदर्शक भाग. मंत्र व ब्राह्मण्ये मिळून जो वेदभाग त्याला कर्मकांड म्हणतात : 'कर्मकांड तरी जाणें। मुखोद्गत पुराणें।'- ज्ञा १३.८२९. २. धर्मकर्मे, आचारविचार, संस्कार वगैरेंना व्यापक अर्थाने हा शब्द लावतात. (सामा.) आन्हिक; नित्यनैमित्तिक आचार : 'आता आपलें कर्मकांड अगदी एका बाजूस ठेवावें.'- चंद्रगुप्त ३५. ३. कंटाळवाणी, निरर्थक बडबड, कर्मकथा. (क्रि. गाणे, सांगणे, बोलणे.) [सं.]

**कर्मकांडवाद** पु. (तत्त्व.) आचारधर्माला प्राधान्य देणारे मत; व्रतवैकल्ये, नेमधर्म या बाह्य गोष्टींना महत्त्व देणे. [सं.]

**कर्मकुळाचार** पु. कुळाचा आचारधर्म.

**कर्मगति-ती** स्त्री. दैव; प्रारब्ध; नशीब. पहा : **दैवगति-ती** [सं.]

**कर्मचं(चां)डाळ** पु. १. अतिक्रूर, पाषाणहृदयी माणूस. २. स्वैरवर्तनी; धर्मलंड; दुरात्मा. [सं.]

**कर्मचारी** पु. सरकारी कार्यालय, संस्था इ. ठिकाणी पगार घेऊन काम करणारा; सेवक. [सं. कर्मन्+चारिन्]

**कर्मचारी व्यवस्थापन** (शाव्यं.) उपलब्ध माणूसबळाचा उत्पादन, प्रशासन वगैरे कामासाठी जास्तीत जास्त उपयोग कसा करून घेता येईल याचा विचार करणारे शास्त्र.

**कर्मचोदना** स्त्री. कर्म करण्याची प्रेरणा : 'कर्मचोदना व कर्मसंग्रह हे शब्द पारिभाषिक आहेत.'- गीर ८३५. [सं.]

**कर्मज** वि. कर्मापासून उत्पन्न झालेले : 'सकळ यज्ञ कर्मज।'- ज्ञा ८.४६.[सं.]

**कर्मजड** पु. कर्मठ लोक : 'तिन्ही लोकांचा शास्ता। ईश्वर तो मी नियंता। येणे कर्मजडांची वार्ता। अनीश्वरता छेदिली।' - एभा १०.६२१. वि. देवताप्रीत्यर्थ बाह्यकर्मात आसक्त असणारा (जीव) : 'कर्मजडाचां ठाइं। किंबहुना होये देहीं।'- ज्ञा १४.२४०.

**कर्मजात** न. सर्व प्रकारचे कर्म. सर्व तऱ्हेचे व्यापार : 'मग सख्य फलपाकांत। तैसें निमालिया कर्मजात। आत्मज्ञान गिंवसित। अपैसे ये॥'- ज्ञा १८.१२९. [सं.]

**कर्मजीव** वि. बारीक, लहान प्राणी. (गो.) [सं.]

**कर्मठ** वि. १. शास्त्रविहित स्नानसंध्या इत्यादी कर्माविषयी निष्ठावंत; धर्मासंबंधीच्या बारीकसारीक गोष्टी श्रद्धेने किंवा आग्रहाने पाळणारा; सनातनी; धर्मनिष्ठ : 'आतां कर्मठां कैवारी। मोक्षाची हे॥'- ज्ञा १८.६८. २. कर्ममार्गी; कर्मावर भिस्त ठेवणारा.

**कर्मठपण** न. निष्ठापूर्वक धर्माचरण : 'वृथा गेले त्यांचे हवन। कर्मठपण कर्माचे।'- एरुस्व ३.३१. [सं.कर्म+स्थ]

**कर्मठा** पु. कामठा; कामाचे स्थान : 'अरे मन तू वांजटा। सदा हिंडसी कर्मठां'-ज्ञागा ८६२.

**कर्मणा** स्त्री. करमणूक; फुकट कालक्रमणा : 'जेथें नाहीं आत्मज्ञान। तया नाव कर्मणा।'- दास ७.९.५७. [सं. क्रमण]

**कर्मणिप्रयोग** पु. (व्या.) जेथे वाक्यात कर्माप्रमाणे क्रियापदाचे लिंगवचन बदलते तो प्रयोग. [सं.]

**कर्मणिवाच्य** पु. (व्या.) १. कर्मकर्तरी प्रयोग. २. कर्मणीकृदंत; कर्मणी धातुसाधित. [सं.]

**कर्मणे** अक्रि. क्रमणे; जाणे; पार पडणे : 'यैसे बहुत दिवस कर्मले।'-पंच ३.१०.

सक्रि. १. घालविणे; पार पाडणे. २. आक्रमण करणे; ओलांडणे : 'तारामंडळ कर्मोणि। जवळी आले भानुलोका'- उह १३९.

**कर्मण्य** न. करणी; चेटूक; अभिचार : 'बडोद्याचे लोकांनीं धाकजीस कर्मण्य केलें...' - शादवे १८६.

**कर्मदक्ष** वि. धर्माचार व विधी यांत निपुण; कर्मशील. कर्मनिष्ठ, कर्मिष्ठ यांसारखा उपयोग. [सं.]

**कर्मधर्म** न. पु. (या समासातील धर्म शब्द जरी पुल्लिंगी असला तरी बहुतेक सर्व समास नपुसकलिंगीच आहेत. कारण यातील प्रधानार्थ कर्म शब्दापासूनच निघालेला असून धर्म शब्द केवळ जोडशब्द आहे.) वर्तन; वर्तनक्रम; कृत्य; आचरण. [सं.]

**कर्मधर्मगुण** पु. कर्मधर्माचा प्रभाव, शक्ती. पहा : **कर्मधर्मसंयोग**[सं.]

**कर्मधर्मयोग, संयोग** पु. १. स्वत:चे दैव आणि सत्कर्म यांचा संयोग;

भाग्य व सदाचार यांचे ऐक्य (पूर्वजन्मार्जित आणि इहजन्मार्जित सत्कृत्यांचे फळ मिळून). २. अकल्पित मेळ; यदृच्छा; प्रारब्धयोग.

**कर्मधर्मसंयोगाने** क्रिवि. अचानक; चमत्कारिक किंवा अकल्पित मेळ मिळून येऊन; प्रसंगोपात्त; प्रारब्ध योगाने : 'कर्मधर्मसंयोगाने मी अगदी सहज बाहेर गेलो तो माझी नजर तिच्याकडे गेली.' - मायेचा बाजार.

**कर्मधारय समास** पु. (व्या.) वक्त्याच्या मनात उभय शब्दांचा भाव ज्यात समान असतो किंवा उभय शब्दांचा परस्पर उपमानोपमेय भावसंबंध ज्यात असतो तो; विशेष्यविशेषणांचे सान्निध्य असून त्यांचा जो समास घडतो तो : 'भक्तिमार्ग = भक्ती तोच मार्ग किंवा भक्तिरूप जो मार्ग तो; भवसागर; संसाराटवी; काळपुरुष.' - मराठी भाषेचे व्या. २७५. तत्पुरुष-समासाचा एक भेद. [सं.]

**कर्मनिष्ठ** पहा : **कर्मठ** : 'जया लाभाचिया आशा। करूनि धैर्यबाहूंचा भरवसा। घालीत षट्कर्मांचा धारसां। कर्मनिष्ठ॥' - ज्ञा ६.४७४. [सं.]

**कर्मनिष्ठा** स्त्री. १. कर्मावर निष्ठा. २. कर्मयोग : 'वैदिक धर्मात दोन मार्ग आहेत, पैकी एका मार्गास ज्ञाननिष्ठा व दुसऱ्यास कर्मयोग किंवा संक्षेपाने नुसता योग अगर कर्मनिष्ठा असे म्हणतात.' - गीर ३०१. [सं.]

**कर्मन्यास** पु. १. कर्म किंवा कृत्ये यांचा त्याग (पुढील जन्मी हित व्हावे किंवा फळ मिळावे म्हणून). २. फलन्यास; कर्मापासून मिळणाऱ्या फळाविषयीच्या इच्छेचा किंवा आशेचा त्याग; निष्कामकर्म. [सं.]

**कर्मपत्र** न. यंत्रशाळेत होत असलेल्या एखाद्या विशिष्ट कार्याचा तपशील असलेले पत्र.

**कर्मफल** न. प्रारब्धापासून मिळणारे फळ; पूर्वजन्मी केलेल्या पापपुण्याचे चांगले अगर वाईट असे या जन्मी भोगावे लागणारे फळ : 'सांडूनि दुधाची टकळी। गोवारी गांवधेनू वेटाळी। किंबहुना कर्मफळीं। तैसें कीजें॥' - ज्ञा १८.१७४. [सं.]

**कर्मफुटका** वि. भाग्यहीन; दुर्दैवी; कमनशिबाचा; अभागी.

**कर्मबंध** पु. फलाशेने केलेल्या कर्मामुळे प्राप्त झालेले बंधन; प्रारब्धप्राप्त स्थिती; मायिक पसारा; ऐहिक मायापाश; प्रपंच; संसार. [सं.]

**कर्मभाव** पु. कर्माची निष्पत्ती : 'भणों तरंगवत जीव। चांचले तेचि कर्मभाव' - ज्ञाप्र ६०३.

**कर्मभूमि-मी, कर्मभूमिका** स्त्री. १. इहलोक; मृत्युलोक; यज्ञादी धार्मिक कृत्ये जेथे करता येतात ती जागा; कर्म करायचे क्षेत्र; रंगभूमी (मर्त्यांची) : 'जेथे मनाचा प्रवेशु नाहीं। त्यांची पायवाट तें ठायीं। ऐसें स्वइच्छा विचारितां महीं। आले ते पाही कर्मभूमीसी।' - एभा २.१८४. २. प्राधान्याने भारतवर्ष. ३. देवताचक्रामधील एक स्थान : 'कर्मभूमीचिया देवता होतिः परि परमेश्वरू नव्हेति' - लीचपू ४५४.

**कर्मभोग** पु. भवितव्यतेच्या नियमानुरूप मिळणारी सुखदुःखे सोसणे; दैवाची भरपाई; पूर्वसंचितानुरूप या जन्मी प्राप्त होणारी स्थिती. [सं.]

**कर्मभ्रष्ट** वि. धर्मशास्त्रविहित नित्यनैमित्तिक कर्माचे आचरण न करणारा; धर्माज्ञा व धर्मकर्म परिपालनाविषयी उदासीन; कर्तव्यच्युत; कर्तव्यपराङ्मुख. [सं.]

**कर्ममार्ग** पु. १. स्नानसंध्या इ. कर्मे करण्याची रीत; यज्ञयागादी कर्मरूप ईश्वरप्राप्तीचा किंवा मोक्षाचा साधनीभूत मार्ग; सत्कृत्ये केल्याने व धर्माचरणाने मोक्षाला जाण्याचा मार्ग. २. धर्मकृत्ये करण्याचा खरा मार्ग. ३. श्रौत म्हणजे यज्ञयागादी कर्माचा मार्ग : 'भारतीय तत्त्वज्ञानात मोक्षाचे कर्ममार्ग, ज्ञानमार्ग व भक्तिमार्ग असे तीन मार्ग सांगितले आहेत.' - ज्ञाकोक १३२. ४. देवतांच्या उपासनेचा मार्ग.

**कर्ममार्गी** वि. कर्ममार्गाने जाणारा; निष्ठापूर्वक धर्माचरण करून परमेश्वरप्राप्तीविषयी झटणारा. [सं.]

**कर्ममुक्ति-क्ती, वृत्ती** स्त्री. स्नानसंध्यादी नित्य नैमित्तिक कर्मे करण्याची आवश्यकता ज्या स्थितीत उरत नाही अशी अवस्था. [सं.]

**कर्ममोचक** वि. कर्ममार्गापासून मुक्त करणारे; ऐहिक सुखदुःखापासून सोडविणारे. [सं.]

**कर्ममोचन** न. कर्ममार्गापासून मुक्तता. [सं.]

**कर्मयाग** पु. कर्ममार्गातील क्रिया; बाह्यकर्म :'कर्मयोगाचेनि यजने : ईश्वरतत्त्वाचे जाणणे :' - वह १९४. [सं.]

**कर्मयोग** पु. १. प्रारब्ध; दैव, यदृच्छा; योगायोग. २. दैवगतीने घडणारी गोष्ट. ३. व्यापार; चळवळ किंवा कार्य करण्याचे तत्त्व. ४. फलाशा न धरता कर्म करत राहणे; ज्ञान हेच जरी मोक्षसाधन असले तरी कर्मशून्य राहणे कधीच शक्य नसल्यामुळे त्यांचे बंधकत्व नाहीसे होण्यासाठी कर्मे कधीही न सोडता शेवटपर्यंत तीच कर्मे निष्कामबुद्धीने करीत राहण्याचा योग. त्याला कर्मयोग म्हणतात व ते आचरणारा तो कर्मयोगी :'बलवंत (टिळक) कर्मयोगी' - सन्मित्रसमाज मेळा पद्यावली १९२९, पद १. [सं.]

**कर्मर** न. एक प्रकारचे शस्त्र : 'काय देह घालूं करवती कर्मरी। टाकूं या भीतरीं अग्नीमाजीं।' - तुगा १११८.

**कर्मराहाटी** स्त्री. ईश्वराव्यतिरिक्त जीवदेवता प्रपंचविषयक कर्माचा आचार : 'ऐसिया कर्मराहाटी : अनंत जन्में गेली संकष्टी' - ऋम ५७९.

**कर्मरेखा** स्त्री. विहितकर्म.

**कर्मरेणू** पु. अनेक कर्मे.

**कर्मऱ्हाट-टी** स्त्री. कार्मिकवर्ग; प्रवृत्तिमार्ग.

**कर्मल-ली** कुळागरात होणारे एक रानझाड व त्यांचे फळ. (गो.)

**कर्मलंड** वि. धर्मशास्त्रविहित नित्यनैमित्तिक विधींचे पालन न करणारा; धर्मभ्रष्ट; धर्मविधी व धर्माज्ञेचा धिक्कार करणारा, उपहास करणारा. [सं.]

**कर्मलेप** पु. जीवस्वरूपावर लागलेला त्याच्या बऱ्यावाईट कर्माचा लेप : 'देवतेसि कर्मलेपाचे ज्ञान'-लीचउ ६४३. [सं.]

**कर्मलोप** पु. नित्य धार्मिक कर्मातील एखादे कर्म सोडणे, न करणे; दीर्घकाळपर्यंत नित्य अगर नैमित्तिक कर्मविधी न करणे. [सं.]

**कर्मवर्म** न. छिद्र; दोष; उणेपणा : 'मोर्चेबंदी करणें तेव्हा गोवलकोटची कर्मेवर्मे मनास आणून मोर्चे घालावे लागतात.' - पेद ३.११६.

**कर्मवाचक धातुसाधित** मूळ धातूला 'ला' किंवा 'लेला' हे प्रत्यक्ष लावले असताना होणारे धातुसाधित. जसे : - केलेला, दिलेला. परंतु यात 'पढ' धातूचा गण वर्ज्य करून हे प्रत्यय लावताना सकर्मक धातूला

'इ' आगम होतो. उदा. ठेविला, आकर्षिलेला. [सं.]

**कर्मवाद** पु. १. धर्मविहित कर्मांनीच मोक्षप्राप्ती होते असे मत. २. मनुष्याला विशिष्ट जन्मात जे सुखदु:ख मिळते ते त्याच्या पूर्व जन्मातील कृत्याचे फल होय असा युक्तिवाद; कर्माचे फळ भोगणे ही कल्पना आणि कर्मवादावरच भिस्त ठेवून त्याचे समर्थन करणारा तो कर्मवादी.

**कर्मवासना** स्त्री. नित्याच्या धर्मकृत्यांबद्दलची इच्छा, आवड. [सं.]

**कर्मविधी** पु. (अनेकवचनीही प्रयोग होतो) धर्मासंबंधी कृत्ये वगैरेचे नियम, पद्धती, रीती, मार्ग; कोणत्याही विशिष्ट प्रकारच्या धर्मकृत्याचे सूत्र किंवा विधान. [सं.]

**कर्मविपर्यास** पु. व्याजोक्ति, उपरोध.

**कर्मविपाक** पु. १. पूर्वजन्मी केलेल्या पुण्य, पाप वगैरे कृत्यांचे फल पुढील जन्मी हटकून मिळायचे हा सिद्धांत. २. कर्माची फलनिष्पत्ती, परिणाम. ३. आयुष्याचे, जीवनाचे तर्कशास्त्र. [सं.]

**कर्मवीर** पु. कार्यकर्ता; पराक्रमी मनुष्य. [सं.]

**कर्मवेग** पु. १. दैवाचा किंवा प्रारब्धाचा जोर, झपाटा, सामर्थ्य, धक्का; पूर्वसंचिताचा प्रभाव. २. अनेकवार केलेल्या कृत्यांचा जोर; सामर्थ्य; प्रचोदन; सवयीचा जोर; स्वाभाविक प्रेरणा.

**कर्मशील** वि. कर्मासक्त; धर्मानें वागणारा; शास्त्राने सांगितलेली सर्व धर्मकर्मे जो मनापासून, काळजीपूर्वक करतो तो. [सं.]

**कर्मसवा** वि. कर्मापासून होणारा : 'अनुसरलेयासि कर्मसवा भोगु नाही।'- चसि.

**कर्मसंगी** वि. कामात, धर्मानुष्ठानात, व्रतनियमनात सतत गढलेला.

**कर्मसंग्रह** पु. निरनिराळे व्यवसाय, व्यापार; आपण ज्या क्रिया करतो त्या; मानसिक क्रियेच्या तोडीची बाह्य, प्रत्यक्ष क्रिया : 'कर्मसंग्रह या शब्दाने त्याच मानसिक क्रियेच्या तोडीच्या बाह्य क्रिया दाखविल्या जातात.-' गीर ८३६. [सं.]

**कर्मसंचय** पु. कर्मसंग्रह; मनुष्याचे अनेकविध व्यापार, क्रिया, चलनवलनादी कृत्य : 'तैसेचि कर्ता करण कार्य। हा कर्मसंचयो॥'- ज्ञा १८.५१२. [सं.]

**कर्मसंन्यास** पु. १. कर्माचा त्याग; नित्यनैमित्तिकादी कर्मे करण्याचे सोडून देणे. २. शारीरिक सोडून इतर सर्व कर्मांचा त्याग (शांकरमत) : 'शंकराचार्यांच्या ग्रंथात कर्मसंन्यासच प्रतिपाद्य आहे.' - टिसू ५.[सं.]

**कर्मसिद्धांत** पु. कर्मविपाक; मृत्यूनंतर शरीरनाश पावले तरी कर्म (कर्मफल) शिल्लक उरते आणि पुढील जन्मास व त्यात मिळावयाच्या भोगास कारणीभूत होते - हा सिद्धांत. [सं.]

**कर्मसूत्र** न. नित्य धर्मकर्माची व त्या संबंधी नियमांची मालिका; कर्तव्यकर्म परंपरा. [सं.]

**कर्मस्थान** पु. (ज्यो.) कुंडलीतील १०वे स्थान. बलवान केंद्रस्थान. व्यवसाय, प्रतिष्ठा, ज्ञान, परदेशप्रवास आदी गोष्टींचा यावरून विचार होतो.

**कर्महीन** वि. धार्मिक विधी, नियम न पाळणारा; धार्मिक नियमाबद्दल काळजी न करणारा. [सं.]

**कर्माकर्मविचार** पु. योग्य किंवा अयोग्य करायच्या किंवा टाकायच्या गोष्टी या विषयीचा विचार; विवक्षित कृत्य नैतिकदृष्ट्या योग्य अथवा अयोग्य यासंबंधी विचार; व्यावहारिक नीती. [सं.]

**कर्माकार** पु. कर्म; नाना प्रकारच्या क्रिया, व्यापार, हालचाली : 'पैं प्राचीन संस्कारशेषें। पांचही कारणें सहेतुकें। कामवीजती गा अनेकें। कर्माकारें॥'- ज्ञा १८.४३१. [सं.]

**कर्माचं गोट** दुर्दैव. (झाडी)

**कर्माचा दोरा** दैवाची गती; प्रारब्धप्राप्त आयुष्यक्रम; स्थिती.

**कर्माचे कातडे** नशीब; प्रारब्ध.

**कर्मातीत** वि. धार्मिक आचारविचार पालन करण्याची आवश्यकता ज्याला उरली नाही असा; ज्याला कर्मबंधन नाही असा; मुक्त; योगी; परमेश्वर : 'जे आत्मा मी कर्मातीतु। सर्वकर्मसाक्षिभूतु। हे आपली कहीं मातु। नायकेचि कार्नी।'- ज्ञा १८.३८४. [सं.]

**कर्माध्यक्ष** पु. प्रत्येक कार्याचा न्यायान्याय पाहणारा; मनुष्याची कृत्ये व व्यवहार यांचे यथार्थ परीक्षण करणारा; ईश्वराचे एक नाव : 'जो भूतांतरात्मा कर्माध्यक्ष।'- हरि १८.५९९. [सं.]

**कर्मार्पण** न. स्वत:ची धार्मिक कृत्ये किंवा अनुष्ठाने परमेश्वराला किंवा इष्ट देवतेला अर्पण करणे.

**कर्माभिमानी** पु. कर्म मी करतो असा अहंकार बाळगणारा : 'आतां ययाचि कर्मा भजतां। कर्माभिमानिया कर्ता तो जीवु हि त्रिविधता। पातला असे॥' - ज्ञा १८.६२८. [सं.]

**कर्माशय** पु. मनुष्याच्या हातून घडणाऱ्या पापपुण्याचे त्याच्या मनावर होणारे संस्कार.

**कर्मांग** न. कर्मांचा किंवा धार्मिक आचारांचा भाग, परिशिष्टरूप क्रिया.

**कर्मांगदेवता** स्त्री. (कर्मांगभूत देवता या शब्दाचा संक्षेप) कोणताही धार्मिक विधी अगर कर्म ज्या देवतेला उद्देशून केले असेल ती देवता; मुख्य देवता. [सं.]

**कर्मांतर** न. और्ध्वदेहिक क्रिया; उत्तरक्रिया. क्रिया शब्दाशी जोडून वापरतात. जसे :- क्रियाकर्मांतर. [सं.]

**कर्मांतऱ्या** पु. और्ध्वदेहिक धर्मकर्म सांगणाऱ्या ब्राह्मणाला तुच्छतेने, हलक्या अर्थाने लावण्यात येणारा शब्द; कारटा. [सं.]

**कर्मिष्ठ, कर्मी** पहा : **कर्मठ** : 'मी जुन्या श्रीमंत व कर्मिष्ठ घराण्यातला मुलगा.' -भदि २३; 'आणि तयाही केलियाचें। तोंडी लावी दौंडीचे। कर्मी या नांव पाटाचें। वार्णे सारी॥'-ज्ञा १८.६०३.

**कर्मीभूत** वि. (व्या.) कर्मविभक्तियुक्त, द्वितीया विभक्तीचा; कर्माच्या स्थानी असलेला; क्रिया घडलेला. [सं.]

**कर्मेवर्मे** न.अव. १. वाईट कृत्ये; दोष; उणिवा; छिद्रे (क्रि. काढणे.) २. लागभाग; मान्याच्या जागा. पहा : **कर्मवर्म** [सं.]

**कर्मेंद्रिय** न. १. ज्याच्या योगाने कोणते तरी काम होते व पदार्थाचे ग्रहण, गमन इ. कर्म करता येते ते शरीराचे इंद्रिय. कर्मेंद्रिय पाच आहेत : - हात, पाय, वाणी, जननेंद्रिय व गुद : 'परी कर्मेंद्रिय प्रवृत्ती। निरोधुनी॥'- ज्ञा ३.६४. २. शिश्न; जननेंद्रिय : 'शिनळ पुरुषाचे डोळे काढून त्याचें कर्मेंद्रिय छेदित.'-व्यभिचार निषेधक बोध ८.[सं.]

**कऱ्या** वि. कडक; कठीण; भयंकर : 'काय दुकाळ पडला कऱ्या।' - अमृत ११७. [अर. करह् = काळा]

**कर्यात-द** पहा : **करियात**

**कर्‍य** वि. कठोर : 'जसा बोल्याले कर्‍य तसा कामाले करारी' - बगा १९३.

**कर्रा** पु. खरखरीत मोजा.

**कर्ल** न. फळावरचे सालपट; साल.

**कर्ला** पु. माडाला पाणी शिंपण्याचे एक साधन. (को.) पहा : **करला, करले**

**कर्ली,कल्ली** स्त्री. १. एका जातीचा अरुंद व लांब मासा.(कु.) २. एक प्रकारचे गवत. (गो.) पहा : **करवेल**

**कर्वती** स्त्री. पाणी ठेवण्याची झारी. पहा : **कऱ्हा**

**कर्वत** पहा : **करवत** : 'तो पुत्रे कर्वता आणविले।'- जै ४७.८ (वा.) कर्वती घालणे - स्वतःच्या शरीरावर शस्त्र चालवणे.

**कर्वल-ळ** १. पहा : **करोल** २. बंदूकधारी घोडेस्वार : 'नामी कर्वल आहे हुजुरांत.'-पया ५४.

**कर्वळ-ळी** स्त्री. टाळी : 'कर्वळ पिटती आनंदती पोरे। अजापुत्र भक्षावया।'- योसं [सं. करवलय, करतल]

**कर्वळी** स्त्री. केसात घालण्याचा बायकांचा एक दागिना.(गो.)

**कर्वा** पु. १. पहा : **करवा**. २. माड अथवा कसल्याही झाडाचा तुकडा; ओंडका; करंडा.

**कर्वा** पु. १. नांगराचे रुमणे. २. झाडाचे आळे. ३. गंडेरी. (झाडी)

**कर्वाद** स्त्री. १. कटकट; दगदग; त्रास; पिरपिर. २. चरफड; त्रागा.

**कर्वादणे** अक्रि. १. चरफडणे (रागाने). २. गांजले जाणे (कर्ज, भूक, दारिद्र्य इ.नी).

**कर्शण** न. कृश होणे; रोड होणे, करणे ; वैद्यकातील एक प्रकार; मेद नाहीसा करण्याची प्रक्रिया. [सं.कृश्-कर्श्]

**कर्शणे** क्रि. कर्कश आवाजात ओरडणे.

**कर्ष** सोने, चांदी मोजावयाचे सोळा माशांचे एक परिमाण. प्राचीन काळातील परिमाणानुसार ५ गुंजा = १ मासा आणि ८० गुंजा = १७६ ट्रायग्रेनचा कर्ष होई. मात्र हल्ली ८ गुंजा = १ मासा आणि १२८ गुंजा = २८० ट्रायग्रेनभार कर्ष होय. [सं. कृष]

**कर्षक** वि. १. ओढणारा; खेचणारा. २. शेतकरी; नांगरणारा. [सं.]

**कर्षक प्रेरक** पु. (उयंशा.) खेचणारी शक्ती किंवा जोर.

**कर्षक क्षेत्रमापक** चुंबकीय प्रभावाचे मोजमाप करणारे साधन.

**कर्षणयारी** स्त्री. (यंत्र.) अवजड माल, वस्तू उचलण्याचे यंत्र, क्रेन.

**कर्षणे** सक्रि १. ओढणे; खेचणे. २. शेत नांगरणे, कसणे. [सं. कृष्]

**कर्षसेतु** पु. (स्था.) काढता घालता येण्याजोगा पूल, हालता पूल, सरक पूल. [सं.]

**कर्षित** वि. १. खेचलेले; ओढलेले. २. नांगरलेले. [सं.]

**कर्षित्र फावडे** (यंत्र.) जमीन नांगरण्यासाठी कर्षित्राला लावलेला फाळ.

**कर्सा** पु. अक्षयतृतीयेला पूजायचे मातीचे लाल मडके. (झाडी) [सं. कलश]

**कऱ्हड** न. पिवळे सुकलेले गवत.

**कऱ्हवळु-वेळ-वेळू** न. एक प्रकारचे गवत. पहा : **करवेल** : 'कऱ्हवेळु मारवेळु गोडाळे।'- गीता २.५२८६.

**कऱ्हा-ऱ्हे** पु. न. १. मडके; मातीचा लहान घडा; ज्या मडक्याला तोटीसारखे टोक असते असे मडके; रहाटगाडग्याच्या माळेतील मडके: 'सोन्याचा कऱ्हा मोत्यांनी भरा.' - वेड्यांचा बाजार. २. लग्नात पाणी भरलेल्या तांब्यात अथवा पंचपात्रीत आंब्याच्या डहाळ्या, पाने टाकून त्यावर शेंडी वर केलेला नारळ ठेवतात. या भांड्याला कऱ्हा म्हणतात. विवाहप्रसंगी वधु-वरांच्या पाठीमागे उभे राहणाऱ्या बहिणींच्या हातातील घडा. (क्रि. घेणे.) ३. (सामान्यतः) कलश; तांब्या. ४. (बायकी) मंगळागौरीची पंचामृती पूजा झाल्याबरोबर ते तीर्थ एका भांड्यात भरून त्याचे तोंड चोळीने बांधून त्यावर गोड्या तेलाचा दिवा ठेवतात तो ( हा प्रकार बहुधा कोकणस्थांत आढळतो). ५. एखाद्या मंगल संस्काराच्या वेळी ओवाळण्यासाठी अगर मागे धरायला जो दिवा घेतात तो : 'मार्गे मी मुहूर्ताचा कऱ्हा घेऊन उभी होतें.'- वेड्यांचा बाजार. [सं. करक]

**कऱ्हा-ऱ्हे** पु. उंट; उंटाचे पिलू : 'अशोकाचे अंगवसे। चघळिले कऱ्हेनि जैसें।'- ज्ञा ११.४१४. [सं. करभ]

**कऱ्हाट** पु. कडवट रानकाकडी; कडू कारिंट. [सं. करट]

**कऱ्हाडकांगु(गो)णी** स्त्री. कांगुणीची एक जात.

**कऱ्हादिवा** पु. पहा : **कऱ्हा** ५. ओलाण दिवा; लामण दिवा. (क्रि. घेणे.) [सं. करक+दीप]

**कऱ्हादिव्याचा मान** कऱ्हा दिवा धरणाऱ्या स्त्रीला वस्त्रे वगैरे देऊन तिचा केलेला सन्मान व ती द्यायची सन्मानाची वस्त्रे - पोषाख.

**कऱ्हान** न. गाडीला जोडण्यापूर्वी बैलाला शिकवण्यासाठी एका बिनचाकी वाहनाला जोडतात ते वाहन; खटारा. [ध्व.]

**कऱ्हेर** न. १. (पाणी इ. ठेवण्याचे) भांडे : 'जे कथा साहित्याचे हिरार। नवा रसाचे कऱ्हेर।'- नरुस्व ५०. २. पाणपोई. [सं.]

**कऱ्हेरिणी** स्त्री. पाणी देणारी दासी : 'गुळला करविला हंसोदकें। कऱ्हेरिणी।'- नरुस्व २९५. [सं.]

**कऱ्हेरिनी** स्त्री. चवरी धरणारी दासी :-'छत्र सुकासिनी। चामर कऱ्हेरिनी।'- रुअंभ ११५.

**कऱ्हेरी** पु. १. चवरी धरणारा : 'मीचि बारी मी कऱ्हेरी।'- एभा १२.५६१. २. पाणी देणारा नोकर : 'जवळि सरोवर कऱ्हेरी।' -नरुस्व ७४४. [सं.]

**कऱ्होड** स्त्री. कालवड. (व. घाटी)

**कऱ्होडा** पु. मुगाच्या डाळीचा वडा. (खा.)

**कऱ्ह्या** पु. वाळूच्या दगडाची एक नरम जात. [क. करे=काळा](वा.)
० **बसणे**- नेट लागणे; जिवावर येणे.

**कल** पु. कच; मनात उत्पन्न झालेली भीती किंवा चंचलता : 'पुढे लस्कराने कल खादला असे.' - पेद ३.५४.

**कल** पु. १. ओघ; ओढा; प्रवृत्ती; झोक. २. (ल.) मनाचा किंवा इच्छेचा ओढा; बुद्धीची किंवा स्वभावाची प्रवृत्ती; चित्तवृत्तीचा ओघ; रोख : 'असत्कार्यी कल नसो मानसाचा।' -भजनतरंगिणी ८३. ३. ऱ्हास,

ओसरा, उतार यांचा आरंभ (दिवस, विकार, लहर, पूर, अतिरेक यांचा) (क्रि खाणे, पडणे.) : 'कांहीं कालापूर्वी सुधारणा ऐन शिखरास जाऊन पोंचल्याचें जें मान दिसत होतें त्यास आता कल पडून लोकांच्या मनानें उलट खाल्याची चिन्हें दृष्टीस पडूं लागलीं आहेत' - निमा ४९०. ४. पातळीचा तिरपेपणा, तिरकसपणा : 'क्षितिज पातळीशीं उतरणीची सपाटी जो कोन करते त्यास उतरणीचा कल म्हणतात.' - यंस्थि ९६. ५. मळसूत्राचा तिरपेपणा, चढ, वळण. ६. वळण; रोख; झोक. (क्रि. धरणे = गाडीचे एक चाक खाली व एक चाक उंच झाले असताना उंच झालेल्या चाकाला हात देणे, तोल सांभाळणे) [सं. कल्=प्रवृत्त करणे.] (वा.) ० **पाहून वागणे** - १. एखाद्याच्या तब्येतीप्रमाणे, मर्जीप्रमाणे, हलकेपणा स्वीकारून वागणे; वारा वाहील तशी पाठ देणे. २. प्रसंगी धोरण किंवा योग्यायोग्य विचार पाहून त्याप्रमाणे वागणे. ० **बसणे** - धोका, धक्का बसणे.

**कल** वि. मंजूळ; मृदू; हळू (आवाज) : 'ते जय जय घोष कलरवें। स्वर्ग गाजविताती आघवे।' - ज्ञा ११.३३६. [ध्व.सं.]

**कलई** स्त्री. कोपर व मनगट यांमधील भाग : 'दंड कलईपेक्षा वीस टक्के मोठा असावा.' - के २६.१.१९३७. [फा.]

**कलक** वि. काळा.

**कलकत** पु. थवा; जमाव.

**कलकत्तिया** पु. विलायती तंबाखू.

**कलकन-कर-दिशी** क्रिवि. एकदम फुटल्याने, तुटल्याने जो आवाज होतो तसा होऊन, करून; त्या आवाजाने युक्त : 'काय सुख वाणूं सख्याचें जणूं कलकन छाती फाटेल।' - पला ४.१. [ध्व.]

**कलकल, कल्कल** पु. एकमेकांत मिसळलेला ध्वनी, आवाज, शब्द, गोंगाट, वटवट, कटकट (माणसांची); किलकिलाट; कल्ला (पक्ष्यांचा). (क्रि. करणे=विवळणे.) : 'कलकल कलहंसे फार केला सुटाया।' - र • ४३. [सं. कतल्ल=अव्यक्त शब्द करणे]

**कलकलणे** अक्रि. १. अस्वस्थ होणे; त्रासणे (माणसांच्या भांडणाने किंवा पक्ष्यांच्या किलकिलाटाने) : 'त्यांचे अश्रू पाहून आमचा जीव कलकलला.' - श्रीयो ४६५. २. उन्हाने, पित्तक्षोभाने मस्तक दुखू लागणे. ३. घाबरणे; काळीज धडधडणे. ४. गडबड, गोंगाट, कोलाहल करणे. ५. भुकेने व्याकूळ होणे.

**कलकलाट** पु. १. भांडणाऱ्या माणसांचा किंवा चिडलेल्या पक्ष्यांच्या आवाजाचा शब्द. २. कोलाहल; कल्ला; आरडाओरड; गोंगाट. ३. अशा आवाजापासून उत्पन्न झालेला अस्वस्थपणा. ४. अतिशय उष्णतेची कंपोत्पादक अवस्था. [सं. कल्ल=अव्यक्त शब्द करणे]

**कलकलीत** वि. गोंधळून गेलेला.

**कलकल्या** पु. साळुंकीहून लहान, पांढऱ्या रंगाचा व अंगावर काळे ठिपके असलेला, लांबट चोचीचा एक पक्षी; खंड्या; विठ्या. हा मरळ माशांची पिले खातो.

**कलकारस** पु. अशरक; मरुमंगला; पिशूना; एक वनस्पती. [सं.]

**कलखापरी** स्त्री. एक औषधी. ही गोमूत्रात दोलायंत्राने शिजविली म्हणजे शुद्ध होते. अशुद्ध झिंक कार्बोनेट.

**कलगी** स्त्री. १. पागोट्यावर खोचण्याचे एक रत्नखचित शिरोभूषण; शोभादायक पिसे किंवा तुरा. २. घोड्याच्या डोक्यावर बांधायचा पिसांचा तुरा, तसेच म्होरकीला दोन्ही बाजूंना लावण्याच्या झुरमुळ्या. ३. शृंगारिक लावणीचा एक प्रकार. यात प्रकृती ही पुरुषापेक्षा श्रेष्ठ मानतात व ती पुरुषाचे आर्जव करते असे वर्णन असते. या संप्रदायाचे डफावर लावण्याचे दर्शकचिन्ह. ४. पुष्पगुच्छ : 'श्रीमंतांस प्रथम कलगी समर्पण करून त्यावरच अत्तर, गुलाब देतात.' - ऐरा प्रपु ९.४२३. ५. कोंबड्याच्या डोकीवरील तुरा. ६. एक फुलझाड व त्याचे फूल. [फा.]

**कलगीतुरा** पु. कलगी हा एक पक्ष व तुरा हा त्याचा प्रतिपक्ष यांमधील चढाओढ; लावणीचा एक प्रकार. ही लावणी प्रश्नोत्तररूपी असते. कलगीवाल्यांना नागेश व तुरेवाल्यांना हरिदास असेही म्हणतात.

**कलगीवाला** वि. शिवापेक्षा शक्ती किंवा पुरुषापेक्षा प्रकृती श्रेष्ठ मानून कलगी संप्रदायाच्या लावण्या म्हणणारा. [हिं]

**कलच** पु. कीट (अंगावर घट्ट बसलेले); घाण; किटण; मळ.

**कलटणे** क्रि. बदलणे.

**कलचुडी** स्त्री. सोने साफ करण्याची रानडुकरांच्या केसांची सोनारी कुंचली. (गो.)

**कलछा** पु. उलथणे. पहा : **करछा**

**कलणे** अक्रि. १. बाजूवर पडणे. एका अंगावर तोल जाणे. कलंडणे; एकारणे; किंचित झोक जाणे; झुकणे; टेकणे. २. (ल.) कमी व्हायला लागणे; उतरणे; मध्यरात्र, मध्यान्हादी जे काल ते काहीसे अतिक्रांत होणे; ऱ्हास होऊ लागणे. ३. (ल.) एखाद्याकडे कल, ओढा, प्रवृत्ती असणे (मन, मर्जी, स्वभाव यांची). ४. कवळणे, गिळणे : 'जैसा काल कलुं आला : महाकालाते' - विसिं ९२.२. [सं. कल्=प्रवृत्त करणे]

**कलणे** सक्रि. जाणणे. [सं. कल्= गणणे, मोजणे]

**कलणे** सक्रि. कळणे; समजणे; पटणे; वाटणे : 'जें मा गीतार्थु कलू पाहें।' - रामा १.६६.

**कलतर** न. पिकाचा अंदाज करून बसविलेला धारा.

**क(का)लतरे** न. १. कर्ज. २. व्याज : 'चौरीतरा दरमहा दरशेकडा ४ प्रमाणें कालतरे काढून पैके दिल्हे.' - शिचसाखं ४.७५.

**कलता** वि. १. एका बाजूवर झुकलेला, तोललेला; वळलेला; लवलेला; कलंडलेला; तिरकस; उतरता : 'जरि कांटा कलताए दैवांचा। जेउता राजमठु।' - ऋ ३९. २. ज्याचा ऱ्हास होतो आहे असा. ३. खाली जाणे; संपत येणे : 'दीस कलतीला लागल्यावर मालक आला.' - गोतावळा १.

**कलतान** न. तागाचे जाड विणेलेले कापड; कंतान; बारदान : 'भुसार मालाचे बारदान मोठें कलतानी असल्यास २॥। रत्तल वजन धरतात.' - मुंव्या ६६. (व.) पहा : **कंतान**

**कलत्र** न. लग्नाची स्त्री; भार्या; बायको : 'पहिलें संवचोराचें मैत्र। हाटभेटीचें कलत्र।' - ज्ञा १८.७९७. [सं.]

**कलथणे** उक्रि. १. उलथणे; पालथे होणे; एका बाजूवर किंवा विरुद्ध दिशेला फिरविणे; तोल जाणे; उलटविणे; उलथे पालथे करणे : 'अगे पृथ्वी माते दशवदन पार्डी कलथुनि।' - अनंत सीतास्वयंवर ७०. २. सभोवार वळविणे; फिरविणे; वळणे; फिरणे (जड किंवा कोणत्या तरी एका बाजूला घट्ट बसविलेली वस्तू). [सं. क्लथ्]

**कलथनी** स्त्री. उलटणी; अकस्मात उलटून चढविलेला हल्ला : 'दोनदोनदा कलथन्या केल्या असें सांगतात.' - ऐलेसं १७६५.

**कलथा** वि. एका बाजूला तोल गेलेला. पहा : **कलता**

स्त्री. धक्का; ठोसा; गुद्दा.

पु. पसरट तोंडाचे व मागे दांडा असलेले उपकरण; तव्यावरील पोळ्या, भाकरी इत्यादी परतण्यासाठी, तळलेला पदार्थ कढईतून बाहेर काढण्याकरिता तसेच निखारे चुलीतून बाहेर काढण्यासाठी उपयोगात आणण्याचे व तापत असलेले दूध वगैरे ढवळण्याचे साधन; उलथणे; काविलथा; सराटा : 'रुप्याचा कलथा, सोन्याचा तवा.' - मदनमं ९६. [सं. कल]

**कलथा** पु. बोथट सुरी; जीभ खाली किंवा बाजूला दाबून धरण्याचे हत्यार.

**कलथी** स्त्री. उलथणी. पहा : **कलंडी**

वि. कललेली; वळलेली : 'मानेवर मस्तकाची कलथी बैठक पाहून कुणाचे डोके ठिकाणावर राहील ?'- भावबंधन २४.

**कलदार** वि. इंग्रजी चालू शिक्क्याचे (नाणे); ज्या नाण्यावर मुखवटा आहे असे नाणे; सुरती :'पंचवीसशें रुपये कलदार घेऊन...'-विक्षिप्त २.१६. [हिं. फा. कल्ह=डोके]

**कलद्री** स्त्री. तंबूचा एक प्रकार : 'भोजन होऊन, विडे कलद्रीचे डेऱ्यांत घ्यावया बसले.'-ऐलेसं ४८३९. [कलंदरीचा अप.]

**कलन, कलनशास्त्र** न. (ग.) गणिताची एक उच्च शाखा, पद्धती. गणित शास्त्रातील एक विभाग.

**कलनतीर** भारी वजनाची किंवा आकाराची तोफ; अशा तोफांचा तोफखाना.

**कलना** स्त्री.जिवाच्या अंगी अंतःकरणासंबंधाने उत्पन्न होणारा सामर्थ्य विशेष; ज्यामुळे विषयानुभव मिळतो ती संवेदना; पदार्थांचे गुण किंवा परिणाम जाणण्याचे मानसिक सामर्थ्य, चेतना; जाणण्याचे सामर्थ्य; ज्ञान : 'सृष्ट पदार्थांपैकी ज्यास जीवन आहे पण चैतन्य व कलना नाहीं' - मपु ६. [सं. कल्=गणणे]

**कलनाकलना** स्त्री. आयुष्याचा शेवट जाणणे.

**कलप** पु. संशय; अंदेशा; विकल्प; दुष्ट विचार. [सं. कल्प]

**कलप-फ** पु. १. परीट लोक कपड्यांना लावतात ती खळ. २. पांढरे केस रंगीत दिसावेत म्हणून लावतात तो रंग. [अर. कलफ][सं. कल्क]

**कलपणे** अक्रि. अतिशय दुःख, क्लेश होणे; धडपडणे; धापा टाकणे; तडफडणे (वेदनांमुळे). [सं. क्लृप्]

**कलपणे** उक्रि. १. (कल्पिणे अप.) मानणे; कल्पना करणे. २. दुसऱ्याचे अनिष्ट चिंतणे; जळफळणे. [सं. क्लृप्]

**कलपरटे** न. दगडी भांडे. (बे.) [का. कल्ल = दगड+परटी = नरोटी]

**कलफगार** पु. कपडा साफ व घट्ट करणारा.

**कलबल** स्त्री. बेचैनी.

**कलबलणे** अक्रि. गडबडणे; गोंधळून जाणे : 'संकटाच्या नुसत्या कल्पनेनं त्यांचा जीव इतका कलबलून गेला होता...' - दुर्दम्य २५७. (वा.)

**कलबलून येणे** - दुःखी होणे; बेचैन होणे : 'त्यामुळे माझ्याही मनात कलबलून आलं.'- बॅअधो २१.

**कल(लं-कं)बी** स्त्री. (नाविक) अगदी पाठीमागचे शीड.

**कलबुरगी** वि. कलबुर्गा गावासंबंधी (लुगडे वगैरे) : 'कलबुर्गा, हलबुर्ग लुगडें।'- अमृत ४९.

**कलबूत-बूद-भूत-भूद** पु. १. सांगाडा; ठोकळा किंवा चौकट (ज्यावर कोणतीही वस्तू तयार करतात अशी); मुलाची पगडी तयार करायचा ठोकळा; जोड्याचा लाकडी साचा. २. (गवंडी काम) कमानीखाली दगडमातीच्या आधाराकरिता ठेवावयाची लाकडाची वाटोळी मांडणी : 'सर्व कमानी कलबुदावर बांधाव्या.' - मॅरट १२; छत्रीचा करंडा, पशूचा सांगाडा. ३. ठेंगणा पण मजबूत मनुष्य, घोडा; भरीव व मजबूत नग, भांडे, पदार्थ. ४. कातड्यात पेंढा किंवा भुसा भरून ठेवलेली जनावर इत्यादिकाची आकृती : 'वाघाचा कलभूत दिसे वाचा ऐसा। परी नाहीं दशा साच अंगीं।'- तुगा २८६१. [फा.कालबुद =आकृती]

**कलभ** न. हत्तीचे पिल्लू, छावा : 'कलभमथन हरिसि तसें त्याला तें कर्म वाटलें सोपें।'- मोद्रोण ३.४०. [सं. करभ]

**कल(ळ)भंट-ड-त** वि. कलहशूर; भांडण-तंटा करण्यात पटाईत, तत्पर; भांडकुदळ : 'पाटील, कुळकर्णी बरेच कलभंड असले तर'- गागां ८५; 'निशंक निलाजिरा कळभंट। टौणपा लौंद धट उद्धट।'- दास २.३.३२. [सं. कलह + भंड]

**कल(ळ)भा** पु. भांडण, तंटा; झगडा; कलागती : 'बोले इंद्रियां लागे कलभा। येकमेकां'- ज्ञा ६.१६.

**कलभांड** वि. पहा : **कलभंड** : 'मोगल कलभांडू, मारिला कोंडू कोंडू झाले श्रीमंतासी बळ।'-ऐपो २४५.

न. गोसाव्यांचा एक पंथ व त्यातील व्यक्ती.

**कलम** पु. लेख; लिखित; लिहिलेला कागद; हुकूम; आज्ञा : 'बायकोनें बदअमल केला. तुम्ही अर्ज केला. आम्हास कलम द्यावे.' - आंग्रे ३१८. [फा. कलम = लेखणी]

**कलम** न. (इमारतीचा) खण : 'येकूण लांबी सवाचौतीस तीन तसू, रुंदी...व कलमें नऊ येणेप्रमाणे जागा...'- पुनसंवृखं २.१०२.

**कलम** स्त्री. मूर्च्छा; बेशुद्धी : 'जनकोजी सिंदे, यास कलम येऊन घोड्याखाली आले.'- भाब ७१.(क्रि. येणे.)(गो.) [फा. कलीम]

**कलम** पु. तेलामुळे भांड्याला आलेला हिरवेपणा; कळंक.(गो.)[सं. कल्मष]

**कलम** न. १. लेखातील विशेष मुद्द्यांबद्दल किंवा गोष्टींबद्दल लिहिलेला तेवढाच भाग; स्वतंत्र सदर, भाग, मुद्दा; परिच्छेद : 'पुस्तकगृह हें एक सुधारणुकीचे मोठे कलम आहे...' - निमा १५. २. रकाना. ३. कायद्याच्या पुस्तकातील प्रत्येक नियम, कानू, परिच्छेद : 'पिनल कोड

कलम ४३५ प्रमाणे अपक्रियेचा अपराध वामनरावांचे माथी बसतो.' - विक्षिप्त १४३. ४. दुकानदारांच्या परस्पर उधार देवघेवीच्या हिशेबातील मुदत. ही १ महिना १० दिवस किंवा १॥ महिना असते. त्यानंतर उधार रकमेवर व्याज आकारतात. त्याला मुदत संपल्यानंतर कलम पिकले असे म्हणतात. ५. तुकडी; पथक : 'चाललें कलम फौजेंचें। राऊत पायदळाचे।'- ऐपो २३०. ६. (ल.) पत्र. (वा.)० **धरणे** - सैन्यभरती सुरू करणे : '... भाद्रपदमासीं कलम धरावे २० हजार मोगल चाकर ठेवावे.' - पेद १०.३१.

**कलम** न. १. एका झाडाची फांदी - डहाळी दुसऱ्या झाडाच्या फांदीवर लावून काही कृतिविशेषाने त्या दोहोंचाही एकजीव करणे. याचे जिभली, पाचरी, दाब, खुंटी, गुरी, भेट इ. प्रकार असतात. २. चित्रकाराचा कुंचला किंवा पेन्सिल : 'इतके नाजूक कलम कोणत्या चिताऱ्याजवळ असेल ?' - इंप ४४. ३. बोरूची लेखणी; टाक : 'हाती कलम घेऊन पडला.'- ऐपो ३९१. ४. कापाकाप; तोडातोड (हात, पाय वगैरेची); झाडांची खच्ची किंवा छाटाछाटी : 'हे ज्योतिषी व त्यांचे पुरस्कर्ते यांचे आमच्या कर्मठ राजांचे कारकीर्दीत खचित हात कलम केले असते.' - विवि.(क्रि. करणे.) ५. (सोनारी धंदा) पच्ची करण्याचे एक हत्यार.(कु.) [फा.]

**कलमकसाई** पु. १.हिशेबनीस; हिशेब तपासनीस; पगाराचा बटवडा करणे वगैरे कामाचा कारकून; खर्चात छाटाछाट करून लोकांचे (लेखणीने) नुकसान करणारा इसम : 'हे जात कलमकसाई अज्ञानी शूद्रात कोणत्या प्रकारचे तंटे उपस्थित करीत असतील?' - जोफु १०२. २. जो आपल्या लेखणीने (लेखाने) लोकांना बुडवतो तो. ३. कारकुनी डावपेचात दुसऱ्याचा गळा अडकविणारा. [फा.]

**कलमकार** पु. चित्रकार.

**कलम कुचराई** लुच्चेगिरीने हिशेबात एखादी बाब गोवणे किंवा गाळणे; गबाळेपणाने किंवा घाईने लेखामध्ये अक्षरे खाणे-गाळणे.

**कलमगार** पु. बातमीपत्र पाठवणारा कारकून.

**कलमजारी** स्त्री. १. पत्रे लिहून सैन्याची केलेली जमवाजमव, नावनिशी. (क्रि. करणे, चालणे.) : 'कलम ज्यारीचे घटाव मचले।'- ऐपो २१४. २. विज्ञप्ती; पत्रलेखन : 'ते कलम जारी करून फौज ठेवूं लागले.'- मराचिथोशा ९. [फा.]

**कलमतराश-स** पु. हुशार, चलाख, फर्डा, लेखणी बहाद्दर. [फा.]

**कलमदान-नी** न. स्त्री. १. लेखणी व दौत ठेवण्याचे लाकडी घर, ठोकळा, खोबळा; लांबट पेटी. २. ज्या दिवाणखान्याची मधली तख्तपोशी तबकासारखी सपाट असून दोन्ही बाजूंची (डाव्या व उजव्या हाताकडील) तख्तपोशी छपराप्रमाणे उतरती असते असा दिवाणखाना. ३.फटाक्यांची एक जात, प्रकार : 'कलमदानी एका पेटींत ५०० पुढे असतात.' - मुंव्या ११८. ४. (इमारत) हवा आत खेळण्यासाठी भिंतीत केलेली खिडकीवजा योजना. ५. दरवाजाच्या झडपेमध्ये फळीची चौकट करून आत नक्षी अगर एखादी आकृती काढून पातळ फळी भरून तयार करतात तो प्रकार. [फा.]

**कलमफांदी** स्त्री. (वन.) एखाद्या खुंटावर कलम स्वरूपात बांधून वाढवण्याकरिता आणलेली दुसरी कोवळी फांदी.

**कलमबहाद्दर** वि. लेखणीशूर; हुशार लेखक; तरबेज कारकून : '(त्यांच्याइतका) फर्डे इंग्रजी लिहिणारा कलमबहाद्दर महाराष्ट्रात दुसरा झाला नाही.' -व्यक्ती १६६. [फा.]

**कलमबंद** वि. पत्री नमूद; लेखनिविष्ट; लिखित : 'तेच मजकूर येक जरा तफावत न करितां कलमबंद केले.'- मइसा १.४४. [फा.]

**कलमबंदी** स्त्री. अनेक प्रकारची अनेक कलमे निर्णयपूर्वक ज्यात बांधून दिली आहेत तो लेख; निरनिराळी खाती, सदरे व बाबी निरनिराळ्या कलमांखाली लिहिलेली यादी (यात हुकमाची, कबुलायतीच्या किंवा कराराच्या कलमांची नोंद असते); विषयवार नोंदणी; सर्व तपशिलांच्या बाबींची एका खाली एक अशा क्रमाने केलेली नोंद. पहा : **कलमजारी**

**कलमबाज** वि. १. कलम चालविणारा; फर्डा. २. सर्व कलमे अथवा बाबी, नियम यांत निष्णात : 'कायद्याच्या कलमबाज शब्दार्थाने....' - अभ्युदय ३०-११-२८. [फा.]

**कलमरी, कलमरून** क्रिवि. पूर्वापार पद्धतीने.

**कलमल, कलमलणे** पहा : **कळमळ, कळमळणे**

**कलमवार** क्रिवि. ज्यात एका मागून एक सर्व अटी, बाबी लिहिल्या किंवा सांगितल्या आहेत अशा तऱ्हेने; बाबीमागून बाब याप्रमाणे सूक्ष्मपणे व विशेषपणे; तपशीलवार; विषयवार.

**कलमसफाई** स्त्री. वळणदार लिहिणे; सुंदर अक्षर; कारकुनी हात.

**कलमसूत्रा** वि. लेखनकुशल; लेखननिपुण.

**कलमा-म्हा** पु. 'ला इलाह इल्लला मुहम्मदुर्रसूलल्ला' = अल्लाशिवाय दुसरा देव नाही, मुहम्मद अल्लाचा प्रेषित आहे. हे इस्लामी धर्मसूत्र आहे. या शब्दाच्या उच्च व तल्लख उच्चारामुळे याचा अर्थ पुढीलप्रमाणे रूढ झाला आहे : - भांडणतंटा, कलागत, मोठमोठ्याने ओरडणे. (क्रि. करणे, लावणे, भांडणे, माजवणे, उठवणे, चालवणे. अक्रि. होणे, लागणे, माजणे.) : 'झाला लष्कराचा बोभाट कलमा दाट तीनशेंसाठ बिगारी धरले।' - मशिपो ४३५. [फा. कलिमा]

**कलमाकाप** न. एक वन्य औषधी. (गो.)

**कलमापी** पु. (भूशास्त्र) जमिनीचा उतार मोजण्याचे यंत्र; कलमापक.

**कलमी** वि. १. लेखी; लिहिलेले, लेखनिविष्ट; सप्रमाण. (क्रि. करणे, लिहिणे.) : 'जबानी बातमीस व कलमी बातमीस थोडेंबहुत अंतर पडतच आहे.'- ऐलेसं ४.१४७०. २. पगारी : 'या स्वारीस कलमी फौज ठेवावी असा इरादा.' - होकै ५. ३. लिहिणारा. (गो.) [फा. कलम = बोरू, लेखणी]

**कलमी** वि. उंची व तिखट (दालचिनी).(व. घाटी.)

**कलमी** वि. कलम केलेले (झाड). या झाडाचे (फळ, आंबा इ.).

**कलमी** वि. डोलाच्या मागची काठी किंवा मागचे म्हणजे दुसरे शीड. ही काठी डोलकाठीपेक्षा एक हात कमी असते. (हेट.) पहा : **कलबी**

**कलमी** वि. रेघांचे : 'तिवट कलमी हिरवे, दुपटा कलमी हिरवा.'- समारो १.२०६. [फा. कलम]

**कलमी माळा** तलवारीवरील तिरपी रेघ.

**कलमी लता** लवंगी वासाची वेल.

**कलमी सोरा** उत्तम जातीचा सोरा. हा पांढरा असून याचे लांबट खडे असतात.

**कलयुग** न. कलियुग - चौथे युग. या युगात कलह, भांडण इ.चा अम्मल जास्त होतो. [सं.]

**कलरव** पु. मंजूळ, मधुर असा पक्ष्यांचा आवाज; किलबिल : 'वरि सुहावे कलरव। पक्षियांचे।'-ऋ १५. [सं.]

**कलव-ब** १. सैन्याच्या व्यूहातील मध्यभाग, २. काळीज. ३. खोटे नाणे.

**कलवड, कलेड** स्त्री. कुडाची झोपडी. [सं.कुटिर]

**कलवड** पु. शेण, माती वगैरेंनी झाकलेला वाळलेल्या गोवऱ्यांचा ढीग. पहा : **कलोड** [सं. कल् = एकत्र करणे]

**कलवडा** पु. **१.** तुरकाठ्यांचा गोलाकार उभा कोठा; कुडाची झोपडी. **२.** वरून शेणाने, चिखलाने थापलेला गोवऱ्यांचा कणगा.

**कलवडू** पु. शेणामातीने लिंपलेले मडके.

**कलव(वि)णे** सक्रि. १.मागे किंवा बाजूला करणे, वळविणे; कलते करणे. (ना.) २.बंद करणे : 'दुकानदारानू तुमी दुकान कलवा.' - जसा ४४३.

**कलवते** न. करंगळीच्या नखाइतके रुंद अतिशय चपळ व सुंदर मासे. हे कळप करून पाण्यात हिंडतात. (कु.)

**कलव(वा)र** पु. कलाल; दारुविक्या. पहा : **कलाल** [हिं.]

**कल(ळ)वल-ळ** स्त्री. चाकरी; कामगिरी; मोहीम : 'राज्याचे कळवळीस आपले सरंजामानिशीं सामील असावें.'- पेदभा २० पत्र १९८.

**कलवल** पु. **१.** प्रसंग; संकट; जरुरी. **२.** झगडा; भांडण :'...पुढे थोरले यजमानास कलवल पडे ते समई मुधोजी व ते तिकडे गेल्यास आश्रय मातबर त्यास जाहला।'- पेठेदभा २.१४.

**कलवंडणे** सक्रि. भांडणे; तंडणे. पहा : **कळवंडणे**

**कलवंत** न. कलावंतीण. (गो.)

**कलविकल** पु. संकटप्रसंग.

**कलश** पु. **१.** तांब्या; गड्या; धातूचे किंवा मातीचे भांडे; कळशी; घागर (पाण्यासाठी) : 'येर कलशीचें येरीं। रिचविजे जयापरी।' - ज्ञा १३.११४५. **२.** कळस; घुमट; कलशाकार शिखर : 'दारवंटा सदा उघडा। वरी कलशु चोखडा।' -ज्ञा १८.१५०८. [सं.]

**कलशारोपण** न. **१.** कळस चढविणे. **२.** (ल.) समाप्ती; अखेरी : 'येवढे महद्यश संपादिले त्याचे कलशारोपण आपणच करावे.'-पेद ३.४३. **३.** सर्वोच्च ध्येय; ईप्सित; फळ :'त्याचे कलशारोपण हेच की समूळ शामल उखडून टाकावा.' - पेद ३.५५. [सं.]

**कलसणे, कलसवलस करणे** सक्रि. परतणे; ढवळणे. (व.ना.)

**कलसपाकी** वि. काठामध्ये कळसाची नक्षी काढली आहे असे (धोतर, लुगडी, पागोटी). पहा : **कळसपाक**

**कलसपाकी बुगडी** ज्याच्या काठामध्ये तीन गोमा व एक कळसासारखी बुगडी असते असे वस्त्र.

**कल(ला)सी, कलेस** धान्य मोजण्याचे कर्नाटकातील एक परिमाण : '...त्रिचनापलीचे किल्लेस जकिरा ४० हजार कलेस, ५ हजार गोण्या साली, नगद पंधरा हजार रुपये पाठवितो म्हणून करार केला आहे.'- ईएमपी १२४. [क. कलश]

**कलह** पु. आपापसातील तंटा; भांडण; कज्जा; शिवीगाळ; दुही : 'लावाल कलहो नव्हतें।' - शिव १२४. (वा.) ०**उकरून काढणे** - भांडण उपस्थित होईल असे पूर्वीचे एखादे कारण शोधून काढून त्याचा उल्लेख करणे : 'द्यूतीं द्रुपदसुतेतें मांडीवरि बैस ये म्हणे खल हा। खिजवुनि सभेंत काढित होता उकरुनि पुनः पुन्हा कलहा।' - मोगदा ५.१०.

**कलहमा** पु. गोंगाट. (व.) पहा : **कलमा**

**कलहंस** पु. **१.** राजहंस; मराल (कित्येकांच्या मते पाणकोंबडा); बगळा : 'त्यांतील एक कलहंस तटीं निजेला।'- र ९. **२.** ब्रह्मदेवाचे नाव.[सं.]

**कलहांतरिता** स्त्री. **१.** संस्कृत साहित्यातील नायिकांच्या सहा प्रकारांपैकी एक प्रकार. **२.** जिचे भांडण संपले आहे अथवा प्रच्छन्न आहे, जिची समजूत झाली आहे किंवा सांत्वन केले आहे अशी पत्नी. परंतु काही ग्रंथकारांनी जी भांडणामुळे आपल्या नवऱ्यापासून विभक्त झाली आहे अशी स्त्री असा अर्थ केला आहे. भांडखोर; कर्कशा; कैदाशीण. [सं.]

**कलंक** पु. **१.** तांब्याच्या किंवा पितळेच्या भांड्यांना आंबट पदार्थांचा संपर्क झाला असताना जो हिरवट विषारी पदार्थ उत्पन्न होतो तो; जंग; रुप्याच्या हीणाला व लोखंडाच्या कीटालाही म्हणतात. **२.** डाग; ठिपका (विशेषत: चंद्रावरील दिसणारा काळा डाग) : 'ग्रह आला चंद्रासी। स्पर्श केला गुरुपत्नीसी। कलंक लागला चंद्रासी। ऐसें झालें जाण पां।'- शनिमाहात्म्य ३३९. **३.** (ल.) दोष; काळिमा; दुष्कर्मामुळे प्राप्त होणारा, अपकीर्तिरूप दोष; बट्टा; कमीपणा. (क्रि. लागणे.) [सं.]

**कलंकित, कलंकी** वि. **१.** कलंकयुक्त झालेला किंवा कलंकाचे गुण ज्यात आले आहेत असा; कळकट. २. (ल.) दूषित; डाग लागलेला; अपवित्र झालेला. ३. बेअब्रू, बदनाम झालेला. [सं.]

**कलंकी** पु. **१.** दुष्टांचा संहार करणारा, भावी, दहावा, विष्णूचा अवतार. २. (ल.) भांडण; तंटा; कलह : 'तेथुनि माजला कलंकी ऐका आश्चर्याची मात।'- ऐपो ३८३. ३. दशावतारी गंजिफातील शेवटचा रंग. [सं. कल्की]

**कलंगडा** पु. (संगीत) गाण्यातील एक राग. पहा : **राग**

**कलंगडी-डे** पहा : **कलिंगड**

**कलंजतुकते** वि. सुढाळ व औटभार वजनाचे : 'गावाराचां हार्ती। दीजे कलंजतुकतें मोतीं।'- उगी १०५.

**कलंडणे** अक्रि. एका बाजूला तोल जाणे, भार जाणे; पडणे; लवंडणे. उक्रि. विरुद्ध किंवा दुसऱ्या बाजूला ढकलणे, पालथे होणे : 'त्याप्रमाणे ती नाव चालवीत असता एक दोन वेळा तर ती कलंडून...'-वज्रा ३.

**कलंडणे** अक्रि. (विश्रांतीसाठी) आडवे होणे : 'झापात आप्पा कलंडला होता.' - पंवा २१.

**कलंडा** वि. एका बाजूवर आधार किंवा टेकू असलेला; कलथा; बाजूवर पडलेला.

**कलंडी** स्त्री. १. बाजूवर तोल जाणे, उलटणे. (क्रि. देणे.) २. उलथापालथ. ३. वस्तू एका बाजूला वळविण्यासाठी दिलेला नेट, धक्का.

**कलंदर** पु. कलिंदर; ऊद; कांडेचोर.

**कलंदर** पु. १. एक सुती रेशमी वस्त्र; गभीरेशमी वस्त्र; लुगड्याची एक जात : 'चंदा-चंदी ओर कलंदर।'- अमृत ४९. २. दुहेरी आच्छादन असलेला तंबू. ३. अशा आच्छादनांपैकी वरचे आच्छादन. [फा. कलंदरा]

**कलं(ध)दर** पु. १. मुसलमान फकीर; फकिरांचा एक पंथ. हे लोक मुंडन करतात व नेहमी फिरत असतात : 'मलंग भडंग कलंदर।'- दावि ४७४. २. दरवेशांचा एक पंथ. ३. लावणीमध्ये हा शब्द नेहमी अनिर्बंध वागणारा, दुर्व्यसनी, निसवलेला, फंदी, इष्कबाज, गबाळ, भटक्या, उनाडटप्पू, दारुड्या, व्यसनी, लोकांतून उठलेला, पिसाट, छांदिष्ट या अर्थी वापरतात. ४. मिश्र उत्पत्तीचा मनुष्य; संकरज. [फा. कलंदर = फकीर]

**कलंद्री** स्त्री. १. मध्य मंडप. २. तंबूचा एक प्रकार. पहा : **कलिंदरा**

**कलंबो-बी** पु.१.कलमी आंबा. (गो.)२.अगदी पाठीमागचे शीड.

**कलं(ल-ळं-ळ)भा, कल(ळ)व्हा** पु. भांडण-तंटा; झगडा; कलागती. (क्रि. लावणे, मांडणे, करणे, माजणे, लागणे.) : 'इंद्रियां लागे कळंभा। एकमेकां॥'- ज्ञा ६.१६. [सं. कलह + भंड]

**कला-ळा** स्त्री. १. सौंदर्यपूर्ण व वैशिष्ट्यपूर्ण कृतींची निर्मिती. जसे :- नृत्य, नाट्य, शिल्प, चित्र, काव्य इ. २. लिहिणे, वाचणे, गाणे, घोड्यावर बसणे, चित्रे काढणे इ. कौशल्याची कामे. एकूण कला चौसष्ट प्रकारच्या आहेत असे मानतात. ३. चतुराईची यांत्रिक योजना; अशा रचनेचे ज्ञान; चालविण्याची युक्ती; त्यापासून विवक्षित फल उत्पन्न करण्याचे चातुर्य; त्याची गुप्त खुबी, किल्ली, मख्खी; कोणतीही कृती परिणामकारकपणे किंवा आकर्षकपणे करण्याचा गुण, पद्धत. ४. चतुराई; बुद्धिकौशल्य; शोधक बुद्धी; कसब; युक्ती; लीला : 'तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा। वागवी पांगुळा पायावीण।'- तुगा ३६७७. ५. (ताल) मात्रा; नियमानुसार तालाचे झालेले ध्रुवका, सर्पिणी, कृष्णा, पद्मिनी, विसर्जिता, विक्षिप्ता, पताका व पतिता. हे आठ भाग. ६. (ताल) खाली; टाळी न वाजविणे. ७. शास्त्राचा व्यावहारिक उपयोग; कोणत्याही उद्दिष्ट विषयाला उद्दिष्ट प्रसंगी शास्त्रीय सिद्धांत लागू करणे. [सं.]

**कला-ळा** स्त्री. १. चंद्राच्या बिंबाचा सोळावा भाग; प्रत्येक दिवशी वाढणारी किंवा कमी होणारी चंद्राची कोर : 'चंद्रासि लागती कळा। उपराग येतो' - र २. २. वेळाचे एक परिमाण. सुमारे ८ सेकंद, ३० काष्ठा म्हणजे एक कला. ३. एक अंशाचा (वर्तुळाच्या ३६०व्या भागाचा) एक साठांशावा भाग. ४. पदार्थमात्राचा (सोळावा किंवा लहानसा) अंश; लेश; लव; तीळ; रज; कण. [सं.]

**कला-ळा** स्त्री. १. कांती; टवटवीतपणा; स्वच्छपणा; नितळपणा; सौंदर्य; तेज; चमक (माणसाच्या चेहऱ्यावरील) : 'राजससुकुमार मदनाचा पुतळा। रविशशि कळा लोपलिया।' - तुगा २. २. सूर्य, पृथ्वी व परप्रकाशित खस्थ पदार्थ यामध्ये कोन झाल्यामुळे पृथ्वीवरून त्या पदार्थांची काही प्रकाशित व अप्रकाशित दिसणारी आकृती; ग्रहाच्या प्रकाशित भागाचा वाढताना किंवा कमी होताना दिसणारा अंश. [सं.]

**कला-ळा** स्त्री. १. (प्राणिशास्त्र) शरीरातील नाजूक त्वचेसारखा पडदा. २. (अश्व.) कुच आणि कुष्किका - घोड्याचे अवयव. - अश्वप ६४. [सं. कला]

**कला** स्त्री. १. आशा : 'ते पंचाईतानीं मिळकतीचे कलेनेच पंचाईतीत बसावे, असा शिरस्ता नाही.'- पेद ४५.१२८. २. सबुरी; सहन करणे.

**कला** स्त्री. चमत्कार; विचित्र प्रकार : '...त्याने यैसी कला केली की बाळांतीणच गेली.'- हिंगणे दभा २.३९.

**कला** पु. फुलाची कळी, कळा.

**कलाक** पु. तास; साठ मिनिटांचा काल : 'गाडीला अजून दोन कलाक अवकाश आहे.' - भावबंधन ५२.

**कलाकल** क्रिवि. एकामागून एक कडकड होणारा आवाज (टाके तुटणे, गाठी तोडणे, फाडणे, तडकणे वगैरेचा). [ध्व.]

**कलाकंद** पु. माव्याची, खव्याची बर्फी; मिठाई. [हिं.]

**कलाकार** पु. एखादी कला येणारी, अंगी असणारी व्यक्ती; कलावंत.

**कलाकुसर** स्त्री. १. सुंदर वस्तू तयार करायला लागणारी हुशारी. २. नाजूक, कोरीव नक्षीकाम.

**कलाकृति-ती** स्त्री. कलाकाराने निर्माण केलेली वस्तू, कृती. [सं.]

**कलाकोविद** वि. एखाद्या कलेतील तज्ज्ञ.

**कलाकौशल्य** न. शास्त्र व त्यातील कुशलपणा, चातुर्य; युक्ती; बुद्धी. पहा : **कळाकुशलता** [सं.]

**कलागत** स्त्री. १. सपाट्याचे भांडण, तंटा; रागाची शिवीगाळ; खटखट; कळ; लावालावी. (क्रि. करणे, लावणे = कोलीत लावणे.) : 'करूं कलागती। तुज भांडणें भोवतीं।' - तुगा ५७३.२. युक्ती; कुलंगडे; क्लृप्ती. [सं. कलह + गति]

**कलागती-त्या** वि. भांडखोर; कटकट्या; कज्जेदलाल; भांडणे लावून गंमत पाहणारा. (क्रि. लावून देणे, लावणे). : 'श्रीआचार्यांनी निदान या रिकामटेकड्या कलागतीखोर पुणेकरांच्या नादास मुळीच लागू नये.' - आगर ३.१४५. [सं. कलह + गति]

**कलाजंग** पु. (कुस्ती) (कोपरापासून मनगटापर्यंतच्या भागाला कलाई म्हणतात) मनगटापासून कोपरापर्यंत हात बांधून फिरून पाठीवरून ओझे टाकतात त्याप्रमाणे टाकणे.

**कलाझंगडी** वि. भांडखोर. (माण.)

**कलाटणी** स्त्री. १. कोलांटी; उलटी; एकदम विरुद्ध दिशेला जाण्याची किंवा मार्ग बदलण्याची क्रिया. (कर.) २. परावर्तन; स्थित्यंतर. ३. थाप; बात; उडवाउडवी. (माण.)

**कलाटा** पु. पसारा, गोंगाट. (झाडी)

**कलातीत** वि. अत्यंत सूक्ष्म; अंशाच्या विभागाच्या पलीकडला; मायेच्या

पलीकडला : 'कलितकाळकौतूहल। कलातीत॥' - ज्ञा १८.३.[सं.]
**कलात्मक दृष्टी** कुठल्याही कलाकृतीतून आशय व आविष्कार यांतील कलात्मकता शोधण्याची दृष्टी.
**कलान** वि. मोठा. [फा.]
**कलानिधी-धी** पु. चंद्र : 'आल्हादकारक कलानिधी परंतु न्यून क्षयासहित।'- सीता स्वयंवर. [सं.]
**कलाप** पु. १. समुदाय; समूह; जमाव. (सामा. शब्द) केशकलाप, मुद्राकलाप, क्रियाकलाप, पल्लवकलाप, तंतुकलाप : 'परी क्रियाकलापु आघवा।' - ज्ञा ४.९५. २. मोरपिसांचा गुच्छ. [सं.]
**कलाप** पु. कटाक्ष; नेट : 'थोरले मातुश्रींचा कलाप विशेष आहे. तुमचे येणे सत्वर झाले तर उत्तम...' - पेद १८.८८.
**कलापक** पु. (नृत्य.) तीन करणांचा समुदाय. [सं. कलाप]
**कलापथक** न. गाणी, पोवाडे, लोकनाट्य इ. माध्यमांतून विशेषत: ग्रामीण भागात करमणूक व सुधारणा करणाऱ्या कलावंतांचा गट.
**कलापीठ** न. (टंकयंत्र) सूत्रनिबद्ध चिन्हांची कळ - त्याचे पीठ; कळफलक. (चिन्हाची कळ दाबताना कागदावर ते चिन्ह मुद्रित होते.)
**कलाफ** पु. संशय; अंदेशा; अनिश्चिती; शंका; भीती; धरसोड. [फा. कलफ = लक्ष, चेहऱ्यावरील सुरकुती]
**कलाफती** वि. भांडखोर; कज्जेखोर : '...दरबारी प्रसिद्ध आहे ते कलाफती लोक!' - वै ४ स १७४३.२९.
**कलाबतु** पु. चांदीचा अथवा सोन्याचा जर (तार) चढवून पीळ दिलेला रेशमाचा दोरा. [फा. कलाब + सुताची गुंडी, रीळ]
**कलाभिज्ञ** पु. कलाकृतीचे रसग्रहण करणारा रसिक; कलेची जाण असणारी व्यक्ती.
**कलाभुवन** न. निरनिराळी कलाकौशल्य शिकण्याचे स्थळ, संस्था.
**कलाम** पु. व्याख्यान; वचन. [फा. कलिमह अव.]
**कलामहाविद्यालय** न. १. ज्या ठिकाणी शालांत परीक्षेनंतरचे भाषा व अन्य सामाजिक शास्त्रे यांचे शिक्षण दिले जाते अशी संस्था. २. ज्या ठिकाणी चित्र, शिल्प इ. कलांचे उच्च शिक्षण दिले जाते अशी संस्था.
**कलामीमांसा** स्त्री. (तत्त्व.) सौंदर्य, अभिरुची इ. संकल्पनांचा अभ्यास करणारी तत्त्वज्ञानाची एक शाखा; सौंदर्यशास्त्र; सौंदर्यमीमांसा. [सं.]
**कलामुला** पु. ईश्वरी वचन : 'कलमे शरीफ म्हणजे उत्कृष्ट वचन व कलामुला म्हणजे ईश्वरी वचन.'- घाको १०५. [फा. कलाम = वचन, प्रवचन]
**कलाय** पु. वाटाणा (विशेषत: करड्या रंगाचा). [सं.]
**कलाल** पु. दारू वगैरे अमली पेये गाळणारा व विकणारा. [सं. कल्यपाल]
**कलालभट्टी** स्त्री. १. दारू गाळण्याची भट्टी; मद्य तयार करण्याचे ठिकाण. २. मद्यावरील कर : 'पूर्वी या राज्यांत कलालभट्टींचे म्हणून एक उत्पन्न असून ते जामदारखान्यांत जमा करण्यात येत असे.'-ऐरा (बडोदे) ७१.
**कलाली** स्त्री. १. कलालाचे काम, धंदा. २. दारू गाळण्याच्या भट्टीवरील व दारू विकणाऱ्या दुकानावरील सरकारी कर.
**कलाली** वि. कपटी; मतलबी : 'आणि मन जयाचें कलालि।'- राज्ञा १८.६६९. [सं. कराल]
**कलाली** वि. भयंकर; क्रूर : 'बहू सावजे व्याघ्रसिंहे कलाली।' - विवि २९.२१७. [सं. कराल]
**कलाली** स्त्री. पक्ष्याची किलबिल, आवाज, ओरडणे, कलकलाट : 'सिंक पिंगला आणी पाली। वोखटें होला काक कलाली।' - दास ३.७.५८. [सं. कल् = शब्द करणे]
**कलाव** पु. गोळा. [सं. कल् = संकलन करणे]
**कलावणे** सक्रि. फिरविणे; कलविणे; कलते करणे. पहा : **कलणे**
**कलावत** पु. एक प्रकारचे गाणे, गीत. [हिं.]
**कलावत** पु. कलांनी युक्त (चंद्र) : 'तो (चंद्रु) ही गुणें एकें निरांजन : मानी कलावतु'- वह २३.
**कलावती** स्त्री. १. कलेत निपुण असलेली स्त्री. २. नर्तकी. ३. नायकीण; वेश्या. [सं.]
**कलावती** पु. (संगीत) कल्याण थाटातील राग. याचा प्रचार अलीकडे झाला आहे. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर.
**कलावनी** स्त्री. औत वळविण्याची जागा.(व.)
**कलावंत** पु. सौंदर्यपूर्ण कलाकृती निर्माण करणारी व्यक्ती; चित्र, शिल्प, संगीत यांसारख्या कलेत पारंगत असलेली व्यक्ती. [सं.]
वि. १. काहीतरी कला जाणणारा; कलाभिज्ञ. विशेषत: गाणारे, नाचणारे, वाजविणारे आणि त्यातही कलावंतिणीचे साजिंदे, पखवाज व सारंगी वाजवणारे यांना लावतात. पहा : **कला**. २. (संगीत - प्रबंध) ध्रुपद गाणारा. ३. नाचणारी (स्त्री); गाण्याचा धंदा करणारी (स्त्री). (गो.)
**कलावंतीण** स्त्री. १. कळवंतीण; गायिका; नर्तकी. २.वेश्या; नायकीण. ह्या स्त्रिया उत्सवात, यात्रेत, बैठकीत गाणे करतात : 'स्वर्गातील जी प्रमुख कलावंतीण मेनका तिची मुलगी शकुंतला...' - नाकु ३.२. पहा : **कलावती** [सं. कलावती]
**कलावा** पु. १. हत्तीवरील माहूत ज्या रिकिबीत पाय ठेवतो त्या रिकिबीची दोरी. ही हत्तीच्या गळ्याभोवती असते. २. एका बाजूला किंवा वर वळविणे किंवा तोलता करणे; (डाव्या किंवा उजव्या अंगावर) तोलून ठेवणे; (घोडा) परत फिरवणे; एक दोन फेऱ्या, खेपा किंवा वळणे घेणे; फेरफटका करणे. ३. जनावरास चरायला सोडले असताना ते फार दूर जाऊ नये म्हणून त्याच्या पायास बांधून ठेवतात ती दोरी मानपखोडा; दुपकी; मानखुंट. पहा : **कळवा**
**कलाशाळा** स्त्री.संगीत, नृत्य, चित्र इत्यादी कला शिकण्यासाठी किंवा शिकवण्यासाठी स्थापलेली संस्था, शाळा.
**कलास** पु. कौशल्य; नैपुण्य : 'तो तांडव मीषें कलासु। दावीसी तू॥' - राज्ञा १७.८.
**कलांट** पु. भांडखोर, त्रासदायक, अतिशय द्वाड मनुष्य. (रत्ना.)
**कलं(ळां)तर** न. पैशावरील व्याज, लाभ : 'म्हणे कलांतर घेऊन अगोदरी। होन चार सत्वरी मज द्यावे।' - भवि ५३.१८६. [सं.]
**कलि-ली** पु. १. कृतत्रेताद्वापारादी चार युगांतील शेवटचे, चालू युग;

कलहाचा किंवा दुर्बुद्धीचा काळ. २. भांडण; तंटा; कलह : 'नर्मीच कलि प्रगटे।'- मोमंभा ३.२३. ३. कलियुगाची देवता : 'सांभाळा जी ब्रीदावळी। तुम्ही कां कलिसारिखे।'- तुगा १४५८. ४. दशावतारी गंजिफातील शेवटचा रंग. ५. पाप : 'गर्तिच्या बाटविल्या त्वां मुली। काय वाढविसिल हा कली।'- राला ४०. ६. युद्ध : 'करिति महागजसमान गाढ कली।'- मोआदि २८.३६. ७. मत्सर : 'तच्चित्ती शिरला अनर्थ मूलक कली।'- विक ३१. वाईट विचार. [सं.] (वा.)

**० संचरणे** - मनुष्य भांडणाच्या बेताला आला म्हणजे त्याच्या संबंधाने म्हणतात.

**कलि-ली** पु. बिब्बा; भिलावा. [सं.]

**कलिका, कली** स्त्री. कळी; न उमललेले फूल; मुकुल; कुड्मल. [सं.]

**कलिकाल-ळ** पु. कलियुगातील दिवस; अज्ञानमय, त्रासदायक, संकटकारक काल. पहा : **कळिकाळ** [सं.]

**कलिजा** पु. १. काळीज. २. मटनातील यकृत (लिव्हर). ३. (ल.) प्राणप्रिय माणूस. [हिं.]

**कलितसार** न. (ग्रंथ.) एखाद्या विशिष्ट भूमिकेकडे कल असणारे लेखाचे सार.

**कलिदा** पु. अत्यंत प्रिय मनुष्य; प्राणप्रिय माणूस. [हिं. कलिजा]

**कलिद्रुम** पु. १. बेहडा, त्याचे झाड व फळ. २. बिब्ब्याचे झाड व त्याचे फळ. [सं.]

**कलिपुरुष** पु. १. वाईट, भांडखोर मनुष्य; दुष्ट मनुष्य. २.नाटकातील नायकाचा प्रतिस्पर्धी; खलपुरुष; दुष्ट पात्र : 'आपल्या नित्याच्या ओळखीचा जो कलिपुरुष'- विचारविलास ४१. [सं.]

**कलिबार** वि.जिवलग; कंठमणी (मित्र, वस्तू).

**कलिबार** पु. होडीच्या समोरासमोरील बाजू तोलणारी आडवी दांडी.

**कलिमल** पु. कलियुगातील पापवासना; दुष्ट वासना; दुर्बुद्धी; दोष; पातके : 'एका जनार्दनी रसाळ। कथा कलिमल नाशिनी।'- एरुस्व ९.६६. [सं.]

**कलिम(मा)हात्म्य** न. कलियुगापासून उद्भवणारे परिणाम, संकटे इ. कलियुगाचे वर्चस्व; अंमल, प्रभाव. [सं.]

**कलिया** पु. तळलेले, भाजलेले मांस. [फा.]

**कलियाद, कल्याद** न. कुलूप; टाळे. (गो.) [पो. कादि आदो]

**कलियुग** न. चार युगांपैकी चौथे चालू युग. पहा : **कलि-ली** [सं.] (वा.) ० **संचरणे** - भांडणाची सुरसुरी येणे.

**कलियुगवर्ष** न. शालिवाहन शकापूर्वी ३१७९ या वर्षी (ख्रि.पू. ३१०२ ता. १८ फेब्रुवारी) भारतीय युद्ध झाले. त्यानंतर थोड्याच दिवसांनी कलियुग सुरू झाले.

**कलियुगाचा ब्रह्मा** कल्पक व चतुर पुरुष; बुद्धिवान मनुष्य.

**कलिल** पु. (शाप.) डिंकासारखा चिकट पदार्थ. हा पूर्णपणे पाण्यात विरघळणारा नसून याचे सूक्ष्म कण पाण्यात तरंगत राहतात. सर्व सजीवांतील जीवनरस याच स्वरूपात असतो.

**कलिवर** पहा : **कलेवर**

**कलिवर्ज-र्ज्य** वि. जे करायला कलियुगात मनाई आहे असे : 'नियोग कलिवर्ज असला तरी...'- केतका ८७.

**कलिशता** स्त्री. किल्मिष; खलष; किंतू : 'माझे मनात आता कलिशता नाही.'-मइसा ५.८. [फा. खलिश]

**कलिंग** पु. १. हिंदुस्थानातील एका प्रांताचे प्राचीन नाव; आजचा ओरिसा. २. एक पक्षी. [सं.]

**कलिंगड-डी-डे-ण** स्त्री. न. कलिंगडाची वेल व तिचे फळ; टरबूज. [क. कलिंगडीहण्णु][सं.कलिंगी]

**कलिं(ली)दर** पु. ऊद, कांडेचार; काळमांजर; कानेदर : 'सांबरे, ससे,कलिंदरे, सायाळ इत्यादी जनावरांचा सर्वदा त्रास.'-खेया ३३.

**कलिंदर** पहा : **कलंदर**

**कलिंदरा** वि. कलंदराच्या गुणावगुणांनी युक्त; विषयासक्त; बदफैली. [फा. कलंदर]

**कलिंदरा, कलिंद्रा** पु. १. एक प्रकारचे सुती किंवा रेशमी कापड, कलंदर. २. दुहेरी आच्छादनाच्या तंबूचे बाहेरील आच्छादन. [फा. कलंदर]

**कलिंदरी** स्त्री. कलंदराची वृत्ती अथवा अवस्था.

**कलीच** न. काळीज : 'नाहीतर आता कलीच दाखवून इंग्रज पुढे ग्रास करतील...'- राजवाडे खं. १२.२७. (वा.)० **दाखविणे** - १. काळीज दाखविणे. २. अंत:करणापासून मैत्री दाखविणे.

**कलीचा पहारा** राक्षसी निर्दयता; दुष्टपणा किंवा बेबंदी घडून आली असताना उच्चारायचा शब्द.

**कलील** वि. थोडा. [फा.]

**कलील** पु. १. गोळा; मिश्र रास; काला. २. दाट आवरण (प्रामको) : 'जन्म संख्यावेन्ही। योनि गर्भ कलील पांथरी। उकडीजती जठरीं। पूयपंकी।' -ज्ञाप्र १८९. [सं. कलिल = गोळा]

**कलु(लो)ली** स्त्री. घोडा (घोडीसाठी) किंवा घोडी (घोड्यासाठी) माजावर येणे; भोगेच्छा; तलफ; मस्ती येऊन मारलेल्या उड्या : 'राजेश्री नानास घोडा पाठविला होता, तो कलोली करितो याकरिता पसंत जाला नाही.'- मदरु ३.१५५. पहा : **कुलुली** [सं.कल्लोळ]

**कलुप** न. १. पाप; पातक; दोष : 'जन्ममृत्युजरादु:खे। व्याधिवार्धक्यकलुषे।'- ज्ञा १३.५३६. २. दु:ख; चेष्टित; ढोंग किंवा ढंग : 'आता हे कलुष सर्व पोटाचे (पोटासाठी) आहे.'-होकै १७२. वि. (ल.) गढूळ; मातट; घाणेरडे; खराब; अस्थिर; दूषित; प्रतिकूल; संशयग्रस्त : 'चित्तवृत्ति कलुष झाली असता श्लेषाची स्फूर्ती कोठून होणार ?'- निमा ८७७.

**कलुषित** वि. गढूळ झालेले; मलिन असलेले; खराब केलेले; संशयग्रस्त; दूषित : 'माझं मन कलुषित करू नकोस.'- पुत्र ११०. [सं.]

**कलून** क्रिवि. परत; माघारा. (झाडी)

**कलेट** न. नवीन काच तयार करण्यासाठी वितळवून वापरल्या जाणाऱ्या फुटक्या काचा.

**कलेतर** न. कलांतर; व्याज : 'स्वामींचे कर्ज कलेतर सहित वाढवून देऊ.'- वै ४ स १७४६.७.

**कलेप** पहा : **कलप- फ**

**कलेबाजी** स्त्री. खोड्या; दंगा; दांडगाई : 'मतवाली (घोडीचे नाव) लहान व येकादवेल कलेबाजी करते.'- पुरंदभा १.८९.

**कलेवर** न. १. मनुष्याचे अथवा पशूचे शरीर (आत्म्याहून निराळे दाखवण्यासाठी योजतात) २. निर्जीव, अचेतन शरीर; प्रेत; शव : 'अझुनी वैरियांचिया कलेवरा। विसंबसीना॥'- ज्ञा ११.१०५. ३. (ल.) कृश मनुष्य. (गो.) [सं.]

**कलो** पु. कलह; भांडण : 'तेव्हां बापूभट यांनी कलो आरंभिला.'- ऐसंसाखं ४.६७.

**कलोक** क्रिवि. कोठपर्यंत; किती वेळपर्यंत; कुठवर. (ना.)

**कलोड, कलवड-ड** पु. १. शेण, माती इत्यादी लिंपणाने आच्छादित असलेला सुकलेल्या गोवऱ्यांचा ढीग, गंज; हा ढीग पावसात भिजू नये म्हणून त्यावर घातलेले खोपटासारखे छप्पर. २. काही भागांत लाकूडफाटा, डबा, गोवऱ्या वगैरेंच्या गंजीला म्हणतात. हा ढीग शेणामातीच्या लिंपणाने आच्छादिलेला असतो किंवा नसतो : 'तमाम शिरांची नाके कापून डेरियापुढे कलवडाप्रमाणे चौत्रा घातला.'- भाब ७१. ३. शेणामातीने लिंपलेला डेरा अगर मडके. (क्रि. बसणे = म्हातारपणामुळे शक्तिहीन होणे, परस्वाधीन होणे.) : 'माझे हातीचा कलवडु। मजवाचूनि नको फोडू।'- तुगा २९६३. [सं. कल् ]

**कलोत्तर** पहा : **कलांतर**

**कलोंची** स्त्री. पानापासून प्रजनन होणारी एक वनस्पती.

**कलौजी** न. जिन्याचा एक प्रकार. हे त्रिकोणी काळे असून चोळल्यावर लिंबासारखा सुगंध येतो. हे बाळंतपणात देतात. त्यामुळे भूक लागून अन्न पचते. पोटात वारा धरत नाही. ह्याने गोल जंत पडतात. (व.गु.)

**कल्क** पु. १. गाभा; फळातील गर. २. प्राण्यातील नरम व मांसल भाग. ३. पाट्यावर बारीक वाटलेले द्रव्य; वाळले असल्यास पाणी घालून गंधाप्रमाणे बारीक वाटलेले औषध; वाटून, ठेचून, चेचून, शिजवून, खलून गलगलित दळयुक्त चूर्ण केलेले औषध; ठेचा : 'त्यात चिंचेचा कल्क टाकावा.'-गृशि २.४४. [सं.]

**कल्की** पहा : **कलंकी**

**कल्चर्ड मोती** कृत्रिम मोती. जपानी लोकांनी नैसर्गिक मोत्याप्रमाणे मौक्तिकजंतूंकडून कृत्रिम मोती तयार करण्याचे काम प्रथम सुरू केले.

**कल्ड** न. पायातील किंवा हातातील कडे. (खा.) [सं. कटक]

**कल्तवरात** स्त्री. परतीची वरात. (झाडी)

**कल्दार** वि. बंदा (रुपया). (झाडी)

**कल्प** पु. कळप, समूह : 'तवं थोवेकारी म्हणितले : आरे कल्पी कल्पी करा वेगली'- वह ७५.

**कल्प** पु.चार अब्ज, बत्तीस कोटी मानुष किंवा सौर वर्षे; ब्रह्मदेवाचा एक अहोरात्र, दिवस; जगाच्या उत्पत्तिलयामधील काळ; चार युगांची एक चौकडी अशा हजार चौकड्या : 'मना कल्पना कल्पिंता कल्प कोटी। नव्हे रे नव्हे सर्वथा राम भेटी।'- राम ५९. [सं.]

**कल्प** पु. धार्मिक विधी, आचार यांचे वर्णन ज्यात केले आहे असे. सहा वेदांगांपैकी एक. यात श्रौत व गृह्यसूत्रे येतात. [सं.]

**कल्प** पु. १. विशेष प्रचारात विकल्प; कपट; कावा : 'काय राजाच्या पोटी कल्प हुता नाही कळला.'- ऐपो १४३. २. संशय; अंदेशा; शंका : 'मी सर्वस्वें दासी मर्नी नको कल्प आणूं दुसरा।'- होला ९९. ३. निश्चय किंवा उद्देश. ४. एखाद्या वस्तूविषयी असलेले एक मुख्य व एक गौण असे दोन पक्ष. [सं.]

**कल्प** वि. १. च्या योग्यतेचा; समर्थ. २. (समासात) सारखा, सदृश. जसे :- तृणकल्प, पर्वतकल्प. [सं. क्लृप् = कल्पना करणे]

**कल्पक** वि. योजक; नवीन युक्ती, कल्पना, शोध काढण्यात हुषार, चतुर; शोधक. [सं.]

**कल्पकता** स्त्री. एखादी गोष्ट कशी करावी याची युक्ती; हुन्नरबाजी; कल्पनाशक्ती.

**कल्पकल्पिणे** क्रि. पुन्हा पुन्हा विचार करणे.

**कल्पणे** सक्रि. मंत्र म्हणणे : 'तव ब्राह्मणीं कल्पीले मग गोसावियांसि वाढिले.'-गोप्र १०. [सं.क्लृप]

**कल्पणे** पहा: **कल्पिणे** : 'हे चि कल्पवे तरि जाणिजे : '- राज्ञा ६.२७७. मंदार; पारिजातक; संतान; कल्पवृक्ष; हरिचंदन. [सं.क्लृप]

**कल्पतरु-रू-द्रुम** पु. १. इंद्र लोकातील पाच देवतरूंपैकी एक; एक काल्पनिक वृक्ष. आपण कल्पिलेली कोणतीही वस्तू याच्यापासून प्राप्त होते अशी समजूत आहे : 'जयजय देव श्रीगुरो। अकल्पनाख्यकल्पतरो।' - ज्ञा १८१०. २. पुष्कळ फळे देणारे व बहुपयोगी असे पृथ्वीवरही काही वृक्ष आहेत त्यांना म्हणतात. ३. फायदेशीर धंदा. ४. उदार, सर्वांचे सर्वप्रकारे चालवणारा यजमान. ५. माड. [सं.]

**कल्पन** न. कल्पना करणे : 'सुषुप्तिकाळी कल्पन : अज्ञानी होये लीन' - विसिं २.७५

**कल्पना** स्त्री. १. मन:पटावर उमटलेले चित्र किंवा तत्संबंधी विचार; (तत्त्ववेत्त्यांनी या शब्दाचा पुष्कळप्रकारे अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे.) एखादी गोष्ट करावी किंवा न करावी याबद्दल अंत:करणात जी विशेष वृत्ती उठते ती, विचार : 'मना कल्पना ते नको वीषयाची।'- राम ५. २. योजना; युक्ती; शक्कल; तोड : 'त्या गुप्त कल्पना कोणास कळाव्या। कोणे येऊन आटोपाव्या।'- दास १९.८.१८. ३. विवक्षित कार्यसिद्धीसाठी बुद्धीने योजलेला उपाय. ४. भावना; मनोवृत्ती; समज; ग्रह; कल्पित गोष्ट; मानसिक सृष्टी. ५. तर्क; अनुमान; भास. ६. उद्देश; बेत; हेतू. ७. संशय; शंका; अंदेशा; भय : 'कल्पनेची बाधा न हो कोणे काळी। ही संत मंडळी सुखी असो।' -नामदेव. ८. गृहीत धरणे; मानणे; आधारभूत धरणे. ९. शब्द किंवा वाक्य जुळवण्यासाठी मांडणी, करामत; गोष्टीची रचना. १०. कला; युक्ती; रहस्य (कल्पक योजनेचे) जुळवण्याची किंवा करण्याची योजना. ११. मनात उठलेले तरंग; विचारलहरी. [सं. क्लृप्]

**कल्पनापूरित** वि. कल्पनेचा भरपूर विलास असलेले : 'पाखरास व हालत्या पिंपळपानास या कविता कल्पनापूरित आहेत.'- गोविंदाग्रज (हर्षेकृत).

**कल्पनाबाज** वि. तर्क, अनुमान करण्यात हुशार, वस्ताद; नवीन नवीन युक्त्या काढणारा; तर्कबाज; सुपीक डोक्याचा.

**कल्पनारूप** वि. कल्पित; मानीव; कल्पनामात्र; अवास्तविक; ज्यात खरे असे काहीच नाही असे (प्रपंच, संसार, सुखदुःख, देह, संपत्ती, सृष्टी याविषयी योजतात.).

**कल्पनालाघवतत्त्व** न. (तत्त्व.) अनावश्यक संकल्पनांचा स्वीकार न करण्याचा आग्रह धरणारे तत्त्व. [सं.]

**कल्पालेख** पु. (पुरा.) एखाद्या गोष्टीचे किंवा कल्पनेचे प्रतीक असे चिन्ह घेऊन त्या चिन्हांनी केलेले लिखाण. उदा. चिनी लिपी.

**कल्पनावाद** पु. नवीन कल्पना, युक्त्या, सारणी, तर्क, तोड काढण्याची किंवा बांधण्याची शक्ती; कल्पना करण्याचे मनाचे सामर्थ्य; बुद्धिसामर्थ्य.

**कल्पनाशक्ति-क्ती** स्त्री. १. शोधकबुद्धी; तर्कशक्ती; कल्पनेने जाणण्याचे सामर्थ्य. २. नवनिर्माण करण्याची शक्ती; प्रतिभा.

**कल्पनासाहचर्य** न. (मानस.) एखाद्या वस्तूचे प्रत्यक्ष ज्ञान झाले असताना त्यामुळे मागील अनुभवाचे स्मरण होते ती क्रिया. हे साहचर्य तीन प्रकारचे आहे - सान्निध्य, साम्य, विरोध. [सं.]

**कल्पनासृष्टि-ष्टी** स्त्री. कल्पनेने रेखाटलेले चित्र, वस्तू; प्रत्यक्षात नसतानाही मनाने अनेक कल्पना करून रचलेला प्रपंच; कविकल्पित, चमत्कृतिपूर्ण अद्भुत गोष्टी. [सं.]

**कल्पनीय** वि. मनात आणण्यास, तर्क करण्यास, शोधून काढण्यास, गृहीत धरण्यास योग्य किंवा शक्य. [सं.]

**कल्परुख** पु. कल्पवृक्ष. (गो.) पहा : **कल्पतरू**

**कल्पलता** पहा : **कल्पतरू** : 'परि ते वाचाचि केली कल्पलता। विवेकाची॥' - ज्ञा १०.२०.

**कल्पलोक** पु. आदर्श राजकीय व सामाजिक परिस्थिती असलेले एक काल्पनिक राज्य, ठिकाण.

**कल्पवर** क्रिवि. कल्पाच्या अंतापर्यंत; कल्पांती; सृष्टीच्या अंतापर्यंत; महाप्रलय होऊन सर्व सृष्टीचा नाश होईपर्यंत; सृष्टी अस्तित्वात आहे तोपर्यंत.

**कल्पवास** पु. दीर्घकाल वास्तव्य : 'आपल्याला महिन्याभराचा कल्पवास करता येत नसला तरी त्याच्या विशेष दिवशी तरी मौज व आनंद लुटता येतो.' - ज्ञाप्र २८.१.२४.

**कल्पविणे** क्रि. कल्पना करणे.

**कल्पवृक्ष** पु. पहा : **कल्पतरू** : 'तिया झाडा जेउते पाहती। ते कल्पवृक्ष॥' - ज्ञा ९.३७५.

**कल्पक्षय** पु. युगांत : 'तैसें प्राकृत प्रकृतीं मिळे। कल्पक्षयीं' - ज्ञा ९.१०३.

**कल्पादि-दी** पु. कल्पारंभ; कल्पास ज्या दिवशी आरंभ झाला तो दिवस; ब्रह्मदेवाच्या दिवसाचा प्रारंभ : 'तैंहें ज्ञान कल्पादी। चतुःश्लोक पदबंधीं।' - एभा १.१४५.

**कल्पांत** पु. १. कल्पाचा शेवट. जगाचा अंत ज्या वेळी होतो त्याला कल्पांत प्रलय असे म्हणतात. तोही एक कल्पापर्यंत राहतो. ब्रह्मदेवाच्या अहोरात्राचा शेवट : 'कुपितें कर्णें केली कल्पांतीं जेंवि घाबरी सृष्टि।' - मोकर्ण ४७.१२. २. भयंकर संकट, पहा : **अनर्थ १, २.** ३. (ल.) परमावधीचे दुःख; आकांत; कल्लोळ (भूक, तहान, ऊन, रोग, दुःख, विरह इत्यादीचा). [सं.]

**कल्पांतरी, कल्पांतवरी, कल्पांती** क्रिवि. १. अकरणात्मक नास्तिपक्षी रचनेत) केव्हाही नव्हे; कालत्रयी नव्हे; जगाचा नाश होईपर्यंतही नव्हे. २. नास्तिपक्षी रचना नसतानाही, नेहमी; सदोदित; सृष्टीचे अस्तित्व आहे तोपर्यंत; जगाच्या अंतापर्यंत.

**कल्पिणे** उक्रि. १. विचार करणे; कल्पना करणे; वाटणे; अनुमान करणे. २. योजणे; मनात आणणे (बेत, युक्ती, शक्कल). ३. मनन करून रचणे; जुळवणे; बनवणे; मनोमन तयार करणे; शोध लावणे. ४. कल्पना करणे; तर्क करणे; अनुमान, अजमास बांधणे : 'हा जीतु ना नोहे। लोक कल्पी येणे भावे।' - ज्ञा १३.१९६. ५. मनन, चिंतन, विचार करणे. ६. गृहीत धरणे; मानणे. [सं. क्लृप्]

**कल्पित** वि. मानलेले; वाटलेले; कल्पिलेले; योजलेले; रचलेले; युक्तीने बसवलेले; नवीन शोधून काढलेले; जुळवलेले; खरे नव्हे ते.

**कल्पित** वि. कल्पना करणारे (मन) : 'हेचि कल्पावे तरी जाणिजे। परी कल्पितें कैचें आणिजे।' - ज्ञा ६.२७७.

**कल्पे झाडणे** सक्रि. मारणे. (व.)

**कल्बी** वि. मध्ये असलेला. (कल्बी काठीमधली डोलकाठी.) [फा. कल्ब् = मध्य; अंतरंग]

**कल्मश-ष-क्ष** न. १. चिखल; राड; रेंदा; कोणताही मळ; घाण. २. पाप; अंतःकरणातील दुष्ट विचार : 'या कल्मषाची थोरी। सांगेन तुज॥' - ज्ञा १.२४२. [सं.]

**कल्या** स्त्री. नदी. घृतकल्या मधुकल्या या समासात योजतात. [सं. कुल्या]

**कल्याण** न. १. क्षेम; कुशल; मंगल; सुख; शुभ; चांगले; बरे; हित; फायद्याची गोष्ट. २. लग्न : 'येणे रीती नांद्यारंभ करून लक्ष्मीनारायणकल्याण नाटक निर्विघ्नसिद्धि सर्व जनास संतोष देवो.' - ग्रंथमाला. (द्राविड) [सं.]

**कल्याण** न. पट्टशिष्य; श्रीसमर्थ रामदास स्वामींचा पट्टशिष्य. याचे मूळ नाव अंबाजी, गाव डोमगाव. हा ब्रह्मचारी होता. समर्थांनी सांगितलेला दासबोध कल्याणस्वामींनी लिहिला. (यावरून लक्षणेने) पट्टशिष्य : 'केसरीकारांस रावबहादुरांचा मत्सर झाला आहे इत्यादी काही कुत्सित कल्पना रा. ब.च्या कल्याण शिष्याने काढल्या.' - लोटिकेले ४.४.

**कल्याण** न. कलीचे राज्य; कलियुग : 'कालांतराने सत्ययुग संपून जिकडेतिकडे कल्याण झाले.' - भूभ्र ३१७. [सं.]

**कल्याणकारी जादू** पिशाचाचे, दुष्ट शक्तीचे साहाय्य न घेता केलेली जादू.

**कल्याणकारी राज्य** सर्व नागरिकांच्या मूलभूत गरजा भागविण्यास व त्यांना जास्तीत जास्त सुखसोयी उपलब्ध करून देण्यास वचनबद्ध असलेले राज्य.

**कल्याणछु** उद्गा. (मुलांच्या खेळातील) डाव बुडाला नाही असे दर्शवणारा एक सावधगिरीचा शब्द.

**कल्याणी** स्त्री. (ज्यो.) भद्रा नावाचा एक अशुभ योग. याचा काल अर्धी तिथी अथवा एक करणाइतका असतो व दर साडेतीन तिथी अथवा सात करणानंतर तो पुन्हा येतो म्हणजे प्रत्येक सातव्या करणास भद्रा असतात : 'व्यतिपात वैधृत कल्याणी हे तव कुयोग असे।' - होला ४९.७. [सं.]

**कल्याणी** स्त्री. एक रागिणी. [सं.]

**कल्याद** (गो.) पहा : **कुलूप**

**कल्ल** पु. गोंगाट; गलबला.

**कल्ल** वि. पोकळ. (गो.)
न. साल; टरफल (गो.)

**कल्ला** बारा.

**कल्ला** पु. १. गलमिशा; गालावरील केसांचा झुपका, काप : 'त्यात आणखी त्याने भले थोरलाले कल्ले ठेवले होते.' - भदि ११. २. कोंबड्याचा तुरा; पक्ष्याच्या डोक्यावरील लाल मांसल भाग. [फा. कल्ल = गाल]

**कल्ला** जलचरांच्या शरीरावरील श्वासोच्छ्वास करणारा अवयव.

**कल्ला** पु. गलबला; ओरड; गोंगाट; गोंधळ; कल्लोळ : 'जिजा कल्ला करीत निघाली.'- आआशे २०९. [ ध्व. सं. कल्]

**कल्ला** वि. कढत, गरम (पाणी). (झाडी) [ते. करडु]

**कल्ला** पु. घोड्याचा एक रंग. सर्व शरीर लाल परंतु त्यात जर्दा रंग मिश्र असून आयाळ व शेपटी काळी आणि पाठीवर सैली अशा रंगाला म्हणतात. - अश्वप १.२९.

**कल्ला चाप** (वै.) हनुवटीखालचा मांसल वक्राकार भाग.

**कल्लाळणे** क्रि. ओघ वाहणे.

**कल्लांवचे** सक्रि. सोलणे. [गो. कल्ल = सालपट]

**कल्ली** स्त्री. एक खेळ. (झाडी) [सं. कलन]

**कल्ली** स्त्री. न. बाग शिंपण्याचे साधन. (गो.) पहा : **करली**

**कल्लें** न. स्त्री. कुळागाराला पाणी देण्यासाठी केलेले लाकडाचे लांबट पन्हळासारखे पात्र.(गो.) पहा : **करली**

**कल्लोल-ळ, कल्होळ** पु. १. पाण्याची लाट, लहर; मोठी लाट : 'तें आणिकें म्हणती वेगळें। कल्लोळ हे॥'- ज्ञा ५.१००. २. आगीचा डोंब, लोळ, झोत; जोराचा झोक. ३. दंग्याचा गलबला, कलकलाट; आरडाओरड; गर्जना : 'गवेषण राजा रणकल्लोळीं। घेईल समफळी यादवांसी।' - एरुस्व. ४. (ल.) आधिक्य; अतिशयितता; अवाढव्यता : 'होती दु:खाचे कल्लोळ।' - रामदास (नवनीत) पृ. १४८. ५. आक्रोश कोलाहल. ६. मनातील तरंग. [सं.]

**कल्लोळणी** स्त्री. नदी : 'करुणाकल्लोळणी अमृताची खोटी। भरलीसे सृष्टी हरिच्या नामे'- निगा ३३४.

**कल्वट** वि. कलता; तिरका. [सं. कल]

**कल्हई** (काहील किंवा काईल अप.) कढई; उसाचा रस कढविण्याचे पात्र. [सं. कटाह]

**कल्हई, कल्हे, कल्हा** स्त्री. १. कथील व नवसागर यांचे मिश्रण करून स्वयंपाकाच्या तांब्यापितळेच्या भांड्यांना चढवितात ती झिलई व ती देण्याची क्रिया. २. मुलामा; पातळ थर; सोन्याची अथवा रुप्याची कल्हई = दागिन्यावरचा सोन्याचा अथवा रुप्याचा मुलामा; आरशाच्या मागील पाऱ्याचा मुलामा : 'आरसे आहेत, ज्यांची कल्हई उडाली असेल व पालखीस लागू होत असे असतील ते हुजूर पाठवावे.'- मइसा १२.१४२. [फा. कसई = कथील] [सं.कलधौत] (वा.) ० **करणे** - १. (ल.) सारवासारव करणे; वाईट बाजूवर पांघरूण घालून चांगली बाजू पुढे मांडणे; एखाद्या गोष्टीला वरवर चांगले स्वरूप देणे. २. उगीच उपद्व्याप करणे; उद्योग, स्तोम माजवणे, फुगवणे (साधारण दुखापत वगैरेचे). ३. (विनोदाने) पुरणपोळीत पुरण वगैरे थोडे भरणे.

**कल्हई** स्त्री. तंटा; अनमान; कलह, विरोध, प्रतिबंध (क्रि.) करणे : 'शंकराजी केशव यांनी सरकारचे उगवणी पथक दिले होते त्याजवर कृष्णशहाने कल्हई केली ते समयी त्याचा मुलुख सरकारांत जप्त केला.' - बाबारा ३.१५९. [सं. कलह]

**कल्हईक(ग-गा)र** पु. भांड्यांना कल्हई लावणारा.

**कल्हईचा** वि. १. ज्याला कल्हई केली आहे असा. २. (ल.) वरवर धुतलेला; किंचित उजळ केलेला; चकचकीत केलेला.

**कल्ह(ल्हा)णे, कल्हातणे** अक्रि. कलणे; तोल जाणे; लवंडणे : 'कां वाटे जातां वोर्धे। कल्हातांही डोळा लागे।'- ज्ञा १४.१८८.

**कल्हमा** पु. गोंगाट; आरडाओरड.(व.) [फा. कलिमा]

**कल्हा** पु. कलह; तंटा; भांडण : 'हे न करितां कल्हा करितील तर त्याही गोष्टीस आम्ही सिद्धच आहो.' - मइसा ३.५. [सं. कलह]

**कल्हार** पु.न. १ पांढरे कमळ, याचे बी खातात. २.(ल.) हृदयकमल : 'सवर्म हृदयकल्हारीं। तेथ कारुण्यवेळेच्या भरीं।'- ज्ञा २७१.[सं.]

**कल्हे, कल्हेग(गा)र** पु. मुलामा. पहा : **कल्हई** : 'लावू जाणे विल्हे तुकासाच आणि कल्हे:'- तुगा ६२५.

**कल्हेदार** पु. भांड्यांना कल्ईई लावणारा.

**कल्होड** पु. कालवड.

**कल्होळणे** उचंबळणे; ओरडणे; दु:खाने रडणे; विव्हळणे.[सं. कल्लोळ]

**कव** स्त्री. १. मिठी; वेंघ; विळखा; वेढा; खेव; हाताची बोटे एकत्र मिळवून मध्ये होणारी पोकळी : 'महाकल्पांपरीती कव घालूनि अवचितीं।'- ज्ञा १३.६१. २. मासे धरण्याची जाळी समुद्रात ज्या डांबांना बांधतात त्या डांबांनी व्यापली जाणारी जागा. ३. (ल.) झडप; उडी : 'करितां आठव। धावोनिया घाली कव।'- तुगा २५२१. ४. आक्रम; आकलन (उघडून विस्तृत केलेले तोंड, कात्रीची दोन पाती, मन, बुद्धी वगैरेचे क्षेत्र.). ५. (संसाराला किंवा कामाला) आवडीने हौसेने मनात जागा देणे, आस धरणे; दृढ इच्छा धरणे. [सं. क्षेम] (वा.) ० **देणे** - आलिंगन देणे : 'आपण कोणास कव देणे नाही.'- मब ४६. **कवेत घेणे** - वळसा, विळखा घालणे : 'धोलपूर जिल्ह्याला कवेत घेऊन चंबळेला समांतर जाताना ' - चंद १.

**कव** स्त्री. फार मोठी झीट; बेशुद्धी. (चि.)

**कवइता** पु. कवन करणारा; कवी.

**कवक** न. अळंबी; बुरशी; फुंगी.

**कवकजाल** न. (शाप.) डोळ्यांना न दिसणारे बुरशीतील तंतुमय जाळे. [सं.]

**कवकत(वि)ज्ज्ञ** पु. कवकवनस्पतींसंबंधी ज्ञान असलेला व त्यात संशोधन करणारा शास्त्रज्ञ; बुरशी, अळंबे यांचे शास्त्र जाणणारा तज्ज्ञ.

**कवक तूलीर** (वन.) कवक वनस्पतींच्या कोशिकावरणातील कार्बनी पदार्थ. हा कापशीसारखा दिसतो.

**कवककवणे** अक्रि. कुरकुरणे : 'रूकाची बायको सारखी कवककवत होती.'- चक्र ३८.

**कवककवा** पु. ऐंद्रलुप्तक, एक वनस्पती.

**कवककवाड** पु. कचकच.

**कवककवीत** वि. १. पाणचट; बेचव; पचपचीत. २. टवटवीत. (गो.)

**कवकी कर्करोग** (वन.) बुरशीसारखा भराभर पसरणारा कर्करोग.

**कवच-क** पु. न. **१**. कठीण आवरण; बाह्य आच्छादन; खोळ; फळाची जाड साल; कठीण त्वचा; सापाची कात. २. चिलखत; अंगत्राण; शरीराचे संरक्षण करणारे एक प्रकारचे पोलादी किंवा चामड्याचे वगैरे साधन : 'जैसें वज्रकवच लेइजे। मग शस्त्रांचा वर्षावो साहिजे।'- ज्ञा २.२३२. **३**. (ल.) कोणतेही आच्छादन; प्रावरण; रक्षणसाधन: 'अग्नि ऐसें आहाच। तेज नामाचे आहे कवच।'- ज्ञा ७.३६. **४**. (वै.) मज्जारज्जूभोवती असणारे दृढ आवरण. **५**. झाडाच्या सालीवर अगर कागदावर मंत्र किंवा तोडगा लिहून हातात अगर अंगावर धारण करतात तो. **६**. मंत्रातील ऱ्हां, ऱ्हीं इत्यादी बीज अक्षर. विनाशक शक्तींपासून रक्षण करणारे मंत्रसामर्थ्याचे आवरण. **७**. मारुती अगर देवी यांच्या मूर्तींवरील शेंदराचा थर. हा काही दिवसांनी सुटून पडल्यास देवाने कवच टाकले असे म्हणतात. सापाची कात. ८. (स्था.) वाडे किंवा किल्ले यांच्याभोवतीची संरक्षक भिंत.[सं.] (वा.) **० टाकणे** - १. कात टाकणे (सापाने) : 'नातरी सर्पे कवच सांडिलें ।'- ज्ञा ८.६६. २. (ल.) पुनरुज्जीवन होणे; नवा उत्साह येणे; दुखण्यातून उठणे. ३. मूर्तीवरील शेंदराचा लेप, थर पडणे; खीळ पडणे.

**कवचकुइ(हि)री-ली** स्त्री. काचकुईली; खाजकुईली; खाजकुइरी.

**कवचधर** पु. गोगलगाय, खेकडा, शेवडे, झिंगे, कासव या वर्गांतील प्राणी; संधिपाद प्राणी. ह्यातील बहुतेकांना शिंगासारखे चार अवयव व दहा पाय असतात. छाती व डोके मिळून एकच भाग असून मागे पोट असते. पाठीवर कवचासारखी कठीण कातडी असते.

**कवचबीज** न. खाजकुइरीचे बी. हे औषधी आहे.

**कवचा** पु. १. गवंड्याची करणी; थापी; मोठा चमचा. (व.ना.) २. कलथा; उलथणे.

**कवचाट** न. १. मोठा आरोप; आळ; कुभांड; हानिकारक गोष्ट. २. भुताटकी उठवणे; जादूटोणा. ३. गोत्यात आणण्यासारखा व्यूह; लचांड; कड्याळ.

**कवचाल** न. वर्तुळाकार बसलेल्या माणसांचा घेर, वर्तुळ; घेरा. (क्रि. घालणे, बसणे, जमणे.)

**कवची** वि. (वन.) ताठर व ठिसूळ (पाने); दगडास किंवा झाडाच्या सालीस चिकटून सपाट कवचासारखे वाढलेले. उदा. धोंडफूल, दगडफूल इ. वनस्पती.

**कवची** स्त्री. **१**. उडलेला किंवा फुटलेला लहान तुकडा; कपची. (को.) **२**. अंड्यावरील कठीण पापुद्रा, आच्छादन, विशेषत: अर्धा भाग किंवा तुकडा. **३**. डोक्याची कवटी; नरटी. **४**. कपाळ. **५**. नारळाची अर्धी करवंटी, भाग. **६**. काचेचा तुकडा. (गो.)

**कवट-टा** स्त्री. वेंग. पहा : **कव** (को. ना.)

**कवट-ठ** न. कोंबडीचे अंडे : 'बखखळ कवट दे.' - डाली ९९. (को.) (वा.) **० गाळणे** -धीर सोडणे; भयाने गांगरणे, घाबरणे. **कवटात असणे** - अंड्यातून बाहेर न पडणे; वयात न येणे : 'अजून तो कवटात आहे.'- वासू ३१.

**कवटल, कवटाल-ळ** न. १. कोयड; यंत्र. २. डावपेच. [सं.कूट]

**कवट भावले** न. पिशाचबाधा काढून टाकण्याकरिता बाधा झालेल्या व्यक्तीच्या अंगावरून ओवाळून बाहेर नेऊन टाकतात ते पिठाचे बाहुले.

**कवटाली-ल्या-ळी-ळ्या** वि. १. कवटाल करणारा; चेटक्या : 'केवढे गे त्या कवटाळीचे अघोर कृत्य हे!' - मंजु८४. २. कुभांडी; तुफानखोर; डावपेच करणारा.

**कवटाळ** पहा : **कवंटल, कवंडाळ**

**कवटाळणे** उक्रि. **१**. मिठी मारणे; आलिंगन देणे; कवेत धरणे : 'अग्निस्तंभ बाही कवटाळविती।' - तुगा ७०२. **२**. घेरणे; आश्रय घेणे; भोवती धरणे; वेष्टणे (वेलींनी झाडादिकांना). **३**. आत घेणे; स्वीकारणे; मित्रभावाने सामावून घेणे. ४. कबजात घेणे (देश वगैरे). ५. (ल.) आत येणे, जाणे, असणे. ६. समजणे; बुद्धीने आकलन करणे (एखादा विषय). [क.कट्टाडिसु]

**कवटाळी** स्त्री. मिठी.

**कवटाळीण** स्त्री. चेटकीण; जादुगारीण; दुष्ट : 'अग, उज्जयनीच्या बायका म्हणे मोठ्या कवटाळणी असतात.'- सपिं १५.

**कवटी** स्त्री. मिठी. (को.) पहा : **कव**

**कवटी** स्त्री. अंड्याचे कवच; नारळाची नरोटी; मेंदूवरील हाडांचे आवरण.

**कवटील-ळ, कवटिल्य, कवटील मंत्र** पहा : **कवंटल**

**कवटे** न. अंड्याचे कवच.

**कवठ** स्त्री. १. एक फळ व त्याचे झाड. हे दमट प्रदेशात होते. २. कवठासारखेच पण कडू फळे येणारे झाड.
न. १. (कोंबडीचे) अंडे. २. कवठाचे फळ. [सं. कपित्थ ]

**कवठार** वि. कुशल; कवसाली; कारस्थानी, जादूटोणा करणारी.

**कवठी** स्त्री. कवठाचे झाड.

**कवठेल, कवठ्याल** न. कडू कवठाचे तेल.

**कवड** स्त्री. १. फोडलेल्या नारळाचा अर्धा भाग; भकल; अर्दुक : 'शुद्ध सत्वाचा कवड मोठा। बोध बिरडें बांधली गाठा।' - तुगा ४४४६. [सं. कराटी ]

**कवडपट्टा** पु. कवड्यांची गुंफलेली माळ. (व.)

**कवडल-ळ** स्त्री. न. १. कडू वृंदावनाचा वेल व फळ. याचे पान खरखरीत, सुरकुत्या असलेले व त्रिदळी असते. फळाचा रंग पहिल्याने हिरवा व पिकल्यावर तांबडा होतो. हे फळ कडू असते. २. (ल.) (हे फळ वरून सुंदर दिसते पण अंतर्भाग काळा असून कडू असतो. म्हणून वर चांगल्या परंतु अंत:करणाच्या दुष्ट मनुष्याला याची नेहमी उपमा देतात) मत्सरी, दुष्ट, नीच, द्वेषी माणूस. ३. नारळाचे बेले. (को.) [सं. कमंडलु]

**कवडसा, कडोसा** पु. १. खिडकीतून, दरवाज्यातून, छपरातून, झाडातून अथवा एखाद्या फटीतून पडलेले प्रकाशाचे किरण अथवा परावर्तित प्रकाश : 'झाडांच्या सावलीत लांब लांब उन्हाचे कवडसे पडले म्हणजे लांबच लांब प्रकाशस्तंभ दिसत.'- पाव्ह ४९. २. रात्रीच्या वेळी पलंग, मनुष्य, दिवा अथवा एखादा पदार्थ यांची त्याच्या जवळ पडणारी छायाकृती.

**कवडा** पु. एक पक्षी; कपोत; होला; होलगा. हा अनिष्टसूचक समजतात. हा घरात शिरला असताना कपोतशांती करतात : 'हा न भला बुडवाया शिरला या राजमंदिरीं कवडा।'- मोसभा ४.२७. [सं. कपोत]

**कवडा** पु. १. मोठी कवडी; पैसा : 'जैसा वेश्याभोगी कवडा वेंचे। मग दारही चेपूं नये तियेचें।'- ज्ञा ९.३२९. २. (ल.) डोळ्यावर येणारा सारा; डोळ्यातील फूल; कवडी. ३. विखुरलेले, विस्कळीत मेघ, ढग. ४. (चांभारधंदा) गिरणीतील साच्याला लागणारे कातडे. ५. दह्याचा किंवा नासलेल्या दुधाचा घट्ट व कापता येणारा गोळा; गाठ; गठळी : 'दुर्धी कांजीचा थेंबू पडे। तेणे दुग्धाचे होती कवडे।'- भारा १०.६७. ६. (उपहासाने) कवी.[सं. कपर्दिक] (वा.) **०मिरवणे** - सक्रि. निशाणी, चिन्ह, लक्षण दाखवणे, खेळणे (देवीचा भुत्या किंवा आराधी देवीचा अलंकार म्हणून आपल्या गळ्यात कवड्यांची माळ घालतो यावरून); कोणत्याही गोष्टीचे वैभव मिरविणे.

**कवडा-ड्या गहू** एक प्रकारचा गहू. पहा : **खपल्या गहू**

**कवडी** स्त्री. १. कपर्दिका; समुद्रातील एका जलजंतूच्या शरीरावरील कवच. याचा चलनासाठी उपयोग होत असे. एका पैशाला ६४ किंवा ८० कवड्या मिळत असत. तीन प्रकारच्या कवड्या असतात - दही, सगुणी व भवानी : 'शंख सिंपी धुला कवडे। आधी त्यांचे घर घडे।' - दास ९.७.५. २. हाताच्या पायाच्या नखावर जो पांढरा ठिपका असतो तो. ३. विटीदांडूच्या खेळातील एक शब्द. ४. पहा : **कवडा** ५.५. रेशीमकाठी वस्त्राच्या काठाची विणकर विरळ झाली असता त्यात उभ्या ताण्याचे दिसणारे पांढरे ठिपके, अंश. ६. डोळ्यातील फूल, वडस. ७. चलनाचा अत्यंत अल्प अंश. ८. सर्पाच्या अंगावरील पांढरे ठिपके. ९. (उप.) दात; कवळी. १०. बुबुळाशिवाय डोळ्याचा पांढरा भाग. ११. कवडीचे झाड. हे लहान असून याला पांढरी फुले येतात. याचा तापावर उपयोग होतो. १२. झोडपलेल्या गव्हाच्या ताटातील कणीस. १३. मुसलमान लोक दाढीचा जो भाग कधीही काढत नाहीत तो; अल्लाचा नूर. १४. दह्याचा घट्ट गोळा; गाठ, गठळी. १५. चिन्नी मातीच्या रंगीबेरंगी तुकड्यांचा उपयोग करून केलेली जमीन. [सं. कपर्दिका] [त. कव(वु)डि] (वा.) ० **साठवणे**- चिक्कूपणाने पैशांचा साठा करणे. ० **उलटी पडणे** - फासा किंवा डाव उलटा पडणे; गोष्ट अंगावर येणे. **कवडी किंमतीचा असणे** - निरुपयोगी, कुचकामाचा, टाकाऊ असणे.

**कवडी** स्त्री. काटक्यांचे कवाड; कवाडी. [सं. कपाट = कवाड]

**कवडी** पहा : **करपा**

**कवडी कहान** एक नाणे.

**कवडीकाम** न. (स्था.) पांढऱ्या व गारगोटीसारख्या दगडाच्या तुकड्यांचे भिंतीवर किंवा फरशीवर केलेले काम.

**कवडीचा** वि. थोडासुद्धा.

**कव(वा)डीचा खेळ** विटीदांडूच्या खेळातील एक प्रकार.

**कवडीचुंबक** वि. अतिशय चिक्कू; कंजूष : 'दोघेही गुलाम कवडीचुंबक!' - विवि ८ - ११.२०७.

**कवडीटंक-पूत** वि. चिक्कू, कृपण, कंजूष (मनुष्य).

**कवडीबाज** वि. चांगल्याप्रकारे कवड्या खेळणारा.

**कवडीमोल** वि. अगदी कमी किमतीचा; क्षुद्र; क्षुल्लक दर्जाचा : 'एका मार्गातील कुशल वाटाडेही दुसऱ्या मार्गात कवडीमोल ठरतात.'- लोटिकेले ४.१२२.

**कवडेफोक** पु. एक प्रकारचे गवत; एक पालेभाजी. हिची फुले बारीक, पांढरी व पोह्यासारखी असतात. (को.)

**कवडेलोभाण** पु. कवड्या ऊद; जाळण्याचा एक प्रकारचा धूप.

**कवडेसाळेर** पु. एका जातीचा पक्षी. (गो.)

**कवड्डी** पु. हुतुतूचा खेळ. यात हुतुतू असे न म्हणता कवड्डी, कवड्डी असे म्हणतात. (माळवी)

**कवड्या ऊद** धुपाची पांढरी जात; कवडेलोभाण.

**कवड्या घणस, घोणस;** अंगावर ठिपके असलेली सापाची एक जात.

**कवड्या लिंब** लिंबाची एक जात.

**कवड्या साप, सर्प** अंगावर कवडीसारखे ठिपके असणारा साप.

**कवण** प्रसना. कोण; काय; कोणता; कोणीही : 'जैसें उसळलें कालकूट। धरी कवण॥'- ज्ञा १.८९.

वि. १. कोणता; केवढा : 'कवण श्रीमुखाचे बरवेपण।'- वह २३५. [सं. क; पुनः]

**कवणगुणे** क्रिवि. का; कशामुळे; कोणत्या कारणासाठी.

**कवणी** स्त्री. सुतार नावाचा पक्षी.

**कवणी** स्त्री. गोफण. [क.]

**कवणे** उक्रि. १. (ओळी, श्लोक, भाषण, ग्रंथ, कविता) जुळवणे, रचणे कवन करणे : 'सुवर्णी जो वर्णी वद कवण वर्णी कवयिता।'- र ९१. २. गोळा करणे. (गो.)

**कवणे** सक्रि. आलिंगणे; कवेत घेणे. (गो.) पहा : **कव** [सं. कवल]

**कवति(ती-तु)क** न. कौतुक; नवल; कुतूहल; आश्चर्य; लीला :

'अर्जुना आणिकही एक। सांगेन ऐकें कवतिका'- ज्ञा २.३०३; 'रामकृष्णें केलें कवतुक गोकुळीं। गोपाळांचे मेळी गाई चारी।'- तुगा १६. [सं. कौतुक]

**कवतिकणे** अक्रि. कौतुक वाटणे : 'ते श्रीमूर्तिवर्णनी : रसना कवतीकैली'- सव ९.

**कवतिकीण** स्त्री. आश्चर्य करायला लावणारी.

**कवतुळरता, कवतुळी** वि. कवतुकी; मनोरंजन करणारा; मनोरंजक : 'पादांत कवतुळरता निश्चिता वेधमूर्ती।'- गस्तो १४१. 'कवतुळी नरलोका ताळिका वातु हाते' - गस्तो २४५. [सं. कौतुक]

**कवदर-री** स्त्री. चवेणी व तिचे पान. पहा : **रानकेळ**

**कवदो** पु. टेंभा. (गो.)

**कवन** न. १. कविता; काव्य; पद्य; गाणे, त्याची जुळणी : 'स्तवन करी रघुनाथ तयाचें। कवन स्वीकारावे॥' - र ४२. २. कल्पित गोष्ट. (कु.)

**कवयिता** पु. कवी; काव्यकर्ता : 'सुवर्णी जो वर्णी वद कवण वर्णी कवयिता।'- र ९२.

**कवयित्री** स्त्री. कविता करणारी स्त्री. [सं.]

**कवयेद** स्त्री. कवाईत; शिस्त : 'उदचेरीच वर्तमान (कीं) येक जहाज आलें. त्याजमध्यें ५०० फिरंगी उतरले. त्या लोकांस कवयेद सिकवताती.'- ईएमपी १५१.

**कवर** क्रिवि. कुठपर्यंत.

**कवल-ळ** न. भातशेतीची जमीन भाजण्यासाठी ऐन, किंजळ, साग, बेहडा इत्यादी झाडांचे तोडून ठेवतात ते टाळे, राब. (क्रि. तोडणे, लावणे, भाजणे, जाळणे.) : 'कवळ तोडावयासी मजुरी असामी वीस एकून आकार पोटासुद्धा दर आणेप्रमाणे'- मसाप २.२.६५. (को.)

**कवल-ळ** पु. १. तोंडातील घास : 'न बळ प्रेंक्षी परि यतिहर्स्तीचा पाहता गळे कवळ।'- मोकृष्णविजय ८६.१२. २. तुकडा (धातूचा वगैरे) : 'लोहाचा कवळु लागला परिसातें'- नाम ८६४. ३. मृदुंगाचा आवाज येण्यासाठी वापरलेला कणकेचा गोळा.

**कवल-ळ** स्त्री. मिठी; आलिंगन : 'घालुं दे कवळ बैस ये जवळ तुला मैतरणी।'- प्रला २०८. [सं.] पु. स्पर्श.

**कवला** पु. (वन.) वीतभर उंचीची पावसाळ्यात उगवणारी एक वनस्पती. याची भाजी करतात.

**कवलार-रू, कवलावण, कवली-लू** इ. पहा : **कौ मध्ये**

**कवला-लो** पु. एक प्रकारची वनस्पती. ही बहुधा आखूड असते व जमिनीत अति दाट रुजते.

**कवलिता** वि. रक्षणकर्ता; रक्षक. [सं. कवल]

**कवस** स्त्री. मच्छगरुड पक्षी. (झाडी)

**कवसकुइ(हि)री** पहा : **कवचकुइरी** : 'भुईकोहळे पाच शेर आणि कवसकुहिरीचे बी पाच शेर एकत्र करून त्यांचें चूर्ण करावें.'- अश्वप १.१३३९. [सं. कच्छ्र]

**कवसाल** न. कुभांड; कपट; कवटाळ; किटाळ; बदनामी करणारे कपटजाल; जादू; युक्ती : 'कृष्णे कवसाल केले।' - रास २.६४५. [सं. कौशल्य]

**कवसाली** वि. कवसाल करणारा; चेटका; कपटी; कारस्थानी ; कुभांडखोर : 'कैकई कवसाली, ढाल घेतला सीतेवरी.'- जसा २७५.

**कवळ** स्त्री. नांगराच्या रुमणीची खीळ; पाचर.

**कवळ** पु. १. घास. पहा : **कवल-ळ** २: 'मुखींचा कवळ मुखींजाण। माझे ध्यान लागलें।'- एभा १२.११२. २. (मुठीत घेतलेली) वस्तू; (हातात मावणारा) पदार्थ (गवत, लाकूड); मूठभर जिन्नस : 'कामधेनूसी शुष्क तृणकवळ।'- रावि १.२२. ३. मध्यभाग; गाभा : 'त्या मुसळाचा मध्यकवळ। चूर्ण नव्हेच अतिप्रबळ। उरला वज्रपाय केवळ। तो समुद्री तत्काळ झुगारिला।'- एभा १.३८१. ४. गोळा. (गो.)

**कवळ** पु. टाच; (टाचेच्या) खालचा भाग; तळ : 'बालसूर्याचेनि उजाळें। तैसीं कवळें टाचाचीं।' - एरुस्व १.२१.

**कवळ** पु. औषधी झाडाच्या पाल्याचा वाटून डोक्यावर घालतात तो लेप, थर, पेंड. (कु.)

**कवळ** पु. (चर्म.) (मोटेच्या) डेऱ्याला सोंड जोडण्याचा सांधा. (क्रि. काढणे = सोंडेचे व डेऱ्याचे मेज बरोबर बसण्यासाठी केलेली कापाकाप.)

**कवळ** पु. डोळ्यावरचा पडदा.

**कवळ** स्त्री. कावीळ; कामीण (पित्तप्रकोपामुळे उत्पन्न होणारी) : 'कवळे अध्यासिला डोळा। तों चंद्रमा देखे पिवळा।'- एभा. १०.६३३. [सं. कामला]

**कवळ** न. कमळाचे फूल : 'हाती तुझ्या कवळ, शोभे पीतांबर' - नाम १०७.

**कवळकाठी** स्त्री. १. राब. २. झाडपाला. ३. हलक्या काट्या, काड्या; शिरी, शिरकाठी वगैरे. पहा : **कवल-ळ** १

**कवळचे** सक्रि. कवळणे; मिठी मारणे. (गो.)

**कवळटे** न. कवळासाठी राखलेला बिनलागवडीचा डोंगराळ भाग. (को.)

**कवळठा** पु. राब. पहा : **कवल-ळ** १ : 'गरीब रयतेस गुरे चारण्यास व कवळठा नेण्यासही मोकळीक देण्याची मारामार पडते.'- लोटिकेले १.२०१.

**कवळणी** स्त्री. गोळा करणे; कवळणे. (को.)

**कवळणे** उक्रि. १. पकडणे; गच्च धरणे; कवटाळणे : 'शीघ्र रथावरुनि उडी टाकी कवळूनि शक्ति सुखनि गदा।'- मोभीष्म ९.५४. २. एकत्र करणे; रास करणे (विस्कटलेल्या वस्तूंची); गोळा करणे. (राजा.) ३. तोंडाने धरणे; दाढेत पकडणे; गिळणे. ४. व्यापणे : 'हे तिन्ही एकवटले। तेथ शब्दब्रह्म कवळले।'- ज्ञा १.२०. ५. आकलन करणे; समजणे : 'परी अपराधु तो आणिक आहे। जे मी गीतार्थु कवळूं पाहें।'- ज्ञा १.६६. ६. गुंडाळणे : 'खाटेवरचा बिछाना कवळून ठेवलेला होता.'- सनई ७. [सं. कवल]

**कवळणे** सक्रि. आलिंगन देणे; मिठी मारणे : 'सुजें तो विश्वपाळ कवळावा।'- मोउद्योग ७.९. [सं. कवल]

**कवळदान** न. आवडीचे पदार्थ; तोंडातील घास.

**कवळपट्टी** स्त्री. (ढोर) मोटेच्या सोंडेची मोठी पट्टी.

**कवळसणे** सक्रि. १. आवळणे; मिठी मारणे : 'तिनं त्याला जवळ ओढलं आणि कवळसलं' - रथ ७६. २. चिकटणे : 'भिजलेलं पोलकं अंगाला कवळसून बसलं होतं.'-कलंदर २१७.

**कवळा** पु. हाताला हात मिळवून होणारी पोकळी; मिठीचे परिमाण; हाताच्या कवेचे किंवा वेंगेचे परिमाण. [सं. कवल]

**कवळा** वि. कोवळा.

पु. माडाच्या, ताडाच्या झाडाचा शेंडा (जेथे नारळ धरतात व जेथून झापे सुटतात तो). [सं. कोमल]

**कवळा** पु. १. अन्नाचा घास. पहा : **कवल-ळ** २. राब. पहा : **कवळ** ३. ३. वळकटी. (गो.) [सं. कवल]

**कवळा** पु. १. भारा; गठ्ठा; वळकटी : 'कोट, उपरणं यांचा कवळा घेऊन...' - रानगंगा ६०. २. मिठीत मावेल एवढा भार : 'मी कवळाभर भुइमुगाचे वेल उपटून खातो.' - व्यंमाक १४०.

**कवळा लसलशीत** अतिशय मऊ, मुलायम.

**कवळाचे सळ** (ढोर) मोटेची सोंड व ढेरा एकत्र करण्यासाठी लागणारे सळ; चामड्याची वादी; दोर.

**कवळालूस** वि. अतिशय कोवळा; लुसलुशीत : 'कवळालूस उंबराचा पाला आकडीनं खसाऽसा कापला.' - गोतावळा ४८.

**कवळास** पु. दसऱ्यानंतर उत्सवसमाप्तीच्या वेळी देवाच्या अवसराकडून विडा इत्यादी प्रसाद कल्याणार्थ घेणे. (गो.)

**कवळासणे** उक्रि. १. उत्सवसमारंभ आटोपल्यानंतर गणपती अथवा गौरी यांच्या मूर्तीचे तळ्यात अथवा नदीत विसर्जन करणे. २. (बायकी) मंगळागौरीची पूजा झाल्यावर दुसऱ्या दिवशी ती बोळवायच्या पूर्वी तिची मूर्ती उठवण्यासाठी हलवणे, विसर्जन करणे; पूजापत्री वगैरे एकत्र काढून देवी वेगळी काढणे. [सं. कवल]

**कवळिआ** घट्ट जमीन.

**कवळी** स्त्री. १. कवळ याचे लघुत्वदर्शक रूप; वेंघेत मावणारा गवत, लाकूड इ. पदार्थ. २. मिठी; वेंग; इडप : 'महाकाळेशी कवळी । देओ पातांती ।' - शिशु ८७९. ३. दातांची पंक्ती, रांग; तोंडात बसविण्याचे कृत्रिम दात. ४. पाचशे अथवा साडेपाचशे (विड्यांच्या) पानांचा पुडा : 'तर मग बहुधा रामटेकच्या पानांची कवळी आली असेल.' - तोबं ६९. ५. पानांचा लहानसा पुडा, गुंडाळी. ६. घास. ७. कानातील एक दागिना. ८. नांगरांच्या रूमणीची खुंटी; नांगराच्या रूमणीची खिळ. (कु.) ९. घट्ट जमीन. (गो.) [सं. कवल]

**कवळी** स्त्री. माशांची एक जात. हे ऑक्टोबर, नोव्हेंबरात पकडतात. (को.)

**कवळी** स्त्री. पोटातील रोग; कावीळ. [सं. कामला]

**कवळी** वि. कोवळी : 'बारे तनू असतां कवळी । परी शयनाहूनि उठसी उषःकाळीं ।' - नव २२.१६३. [सं. कोमल]

**कवळी घास** रवंथ.

**कवळू** पु. स्पर्श.

**कवळो** पु. अंथरुणांची गुंडाळी, वळकटी.

**कवळ्या** वि. (गुऱ्हाळ) उसाची कांडी अथवा पेरे गोळा करून कांडेकरापाशी (चरकात लावण्यासाठी) नेऊन देणारा. [ सं. कवत]

**कवंटल, कवंटळ, कवंटल्य, कवंटाल, कवंटाळ** न. १. जारणमारणादी प्रयोग; कुयेडे; चेटूक : 'केलीं नाना कवटाले। पुत्रलोभे केलीं ढाले।' - वा ३.३.४५. २. कुभांड; डावपेच; खोटेनाटे करणे; कृत्रिम; लचांड; तुफान; कारस्थान : 'राणीचा एवढें कवटाळ रचण्यातला जो उद्देश.... ते मात्र बिलकूल झालें नाहीं. ' - नि. ५२९. [सं. कूट = वाकडा; कौटल्य = कपट]

**कवंडाळ** न. कवटाळ; कपट पहा : **चेटूक** : 'कांहीं तरी कवंडाल करते' - नामना ८४.

**कवंढी** स्त्री. कवटाचे झाड.

**कवंद-दी** स्त्री. १. खपली; सालपट; पापुद्रा (जमिनीचा, गिलाव्याचा, फोडावरचा); वाळलेला फोड, पुळी . (राजा.) २. (बे.) वाकळ; गोधडी. [क. कवंदी = वाकळ]

**कवा** पु. १. कॉफी किंवा बुंद शिजवून तयार केलेला अर्क; एक पेय. २. इराणी पोपट. [फा. कहवा]

**कवाइती-दी, कवाइतदार-ददार** वि. लष्करी डावपेचात निष्णात, तरबेज, खोल बुद्धीचा, युक्तिबाज, कारस्थानी अशा माणसाबद्दलही पुष्कळ वेळा योजतात. [ फा. कवाईद]

**कवाई(य)त** स्त्री. १. शिस्त; लष्करी हालचाली, रचना; युद्धकलेचे, शिस्तीचे शिक्षण. २. (ल.) शक्कल; युक्ती; हिकमत; डाव; कौशल्य : 'हें पाहून सुभेदारांनी ही कवाईत केली.' - होकै ३८. ३. कारभार; वर्तणूक; नियमावली; जाबता; हक्क; वहिवाट. 'लढाईचे समयीं कवायतीनें घालावे.' - मइसा १०.६५. [अर. कवाइद]

**कवाईतीत, कवायत-ती** वि. १. कवाईत शिकलेला : 'काळे कवाइतीत नित्य दहापांच येतात.' - मइसा १०.१९२. २. कावेबाज; कारस्थानी. (गो.) ३. कारभार, वर्तणूक, नियमावली, हक्क.

**कवाटी** स्त्री. आलिंगन. (कों.)

**कवाठाव** क्रिवि. केव्हापासून. (माण.)

**कवाड** न. दार; दरवाजा : 'नेत्रद्वारींचीं कवाडें । लागूं पाहती ॥' - ज्ञा ६.२०२. २. (व.) दरवाजाच्या फळ्या; कावड; (माळवी) किवाड. (क्रि. घालणे, लावणे). [सं. कपाट] (वा.) ० **घालणे**- दार बंद करणे : 'तेहीं देखेते : आणि कवाड घातलें :' - गोप्र. ४. **कवाडे अडकावून बसणे** - दारकोंड करून बसणे; दार ढकलून बसणे : 'आता देशत्यागास जावें किंवा घरीं कवाडे अडकावून बसावे...' - ब्रच १३५.

**कवाडी** स्त्री. लहानसे दार; कामट्यांची किंवा गवताची केलेली ताटी; शेताचे फाटक; परसाचा झापा : 'अक्का कवाडीपर्यंतसुद्धा आली नाही' - गाबा २४२. [सं. कपाट]

**कवाणी** स्त्री. सुतार पक्षी.

**कवात** स्त्री. कविता : 'मानपुऱ्यांन कवात सांगितली' - जसा ८१६.

**कवाता-था-ठी** पु. १. माडाचे लहान झाड; रोपटे; नारळ लागण्यापूर्वीचे अडीच हात उंचीचे झाड : 'पाटाचे पाणी नव्या कवात्यांना आधी परतून घ्यायला हवे.' - शेलूक ९०. (को. कु.) २. नारळाच्या झाडाचा कोंब. (गो.) ३. पोफळीचे रोप. (को.)४. नारळाच्या रोपाला नवीन फुटलेली पहिली तीन पाने.

**कवाधरनं** क्रिवि. केव्हापासून; फार वेळापासून.

**कवापून, कव्हापून** क्रिवि. केव्हापासून.

**कवारी** स्त्री. कापलेल्या लाकडाची भेग मोठी होण्यासाठी आत ठोकलेली मोठी पाचर. खुंटी. (गो.)

**कवा(व्वा)ल** पु. कौल; अभय दिलेला मुलूख : 'आम्हांकडील मुलुख कवाल वगैरे तिकडे जाऊन मुलकाची खराबी केली आहे.' - पेद २०.४.

**कवाल** पु. १. ख्याल गाणारा गवई : 'कवालाचें गायन ऐकून... बर्खा जाले.' - मइसा ७.५०७. २.ख्याल गायकीचे मुसलमानी गाणे. [फा. कव्वाल]

**कवाल-ली** पु. स्त्री. १. इस्लामी भक्तिगीत. २. अमीर खुस्त्रो याची इस्लामी भजने.

**कवालबानी** स्त्री. (संगीत) कवालीच्या ढंगावर रचलेले ख्याल.

**कवाला** पु. जमीन, घर वगैरे स्थावराचे क्रयपत्र; खरेदीखत; सौदापत्र; दस्तऐवज; कबालत; कबाला. [फा. कबाला]

**कवाली, कवाली ख्याल,** कवा(व्वा)ली स्त्री. कवाल-गवई जे गाणे गातो ते; ख्याल; उर्दू काव्यगायनाचा प्रकार. (क्रि. गाणे.)[फा. कव्वाल]

**कवासो** पु. केवडा; केतकी. (गो.)

**कवाळ** न. १. राब; कवळ. पहा : **कवल-ळ १.** (कु.) २. वाळलेल्या काटक्यांचे ओझे. (कर.)

**कवाळा** (कु.) पहा : **कवळा २**

**कवाळु** पु. नारळाचे चोड सोलून काढल्यावर त्यातून निघणारा कोवळा नारळ. (को.)

**कवाळी** स्त्री. नीलपुष्पी.

**कवांकी** स्त्री. एका जातीचा पक्षी. (कु.)

**कवि-वी** पु. १. आपल्या जीवनानुभूतीचा लयबद्ध रचनेत आविष्कार करणारा कलावंत; रसालंकारविशिष्ट रचना करणारा काव्यकर्ता; शाहीर. २.(ल.) पंडित; जाणता; ज्ञानी;सर्वज्ञ; द्रष्टा : 'स्वपरांच्या भूषणासि कवि टाळी।'-मोआदि ८.३५. ३. शुक्राचार्य; दैत्यगुरू : 'झाला ययाति कविचा जामाता तीच सत्कथा परिसा।'-मोआदि ९.६. ४. (ल.) विदुर: 'नमुनि कवि म्हणे राया न द्यूत-विचार हा मला रुचला।'- मोसभा ३.४९. [सं.]

**कविकल्पना** स्त्री. केवळ कवीच्या मनात असलेली, सत्यसृष्टीत नसलेली गोष्ट, वस्तू, घटना इ.

**कविजा** पु. कलथा; उलथण्याचे साधन. [फा. कब्ब = उलथणे, परतणे]

**कविठ** न. कवठ : 'आंडोरी कविठे आणिली'-गोप्र २१.

**कवित-ता-त्र, कवीत** न. स्त्री. १. कवन; काव्य; पद्य; आल्हाददायक पद्यरचना; रसयुक्त वाक्यरचना. २. प्रतिभासंपन्न (गद्य, पद्य) रचना : 'जेणें अनुताप उपजे। जेणें लौकिक लाजे। जेणें ज्ञान उमजे। या नाव कवित्व।'- दास १४.३.४८. [सं.]

**कविताशक्ति-क्ती** स्त्री. प्रतिभा; काव्यरचनेचे सामर्थ्य; स्फूर्ती.[सं.]

**कवित्रा** पु. उलथणे; झारा.

**कवित्व** पहा : **कवित**

**कवित्वकरणी** स्त्री. काव्यरचनेतील चतुराई.

**कवित्वकला** स्त्री. १. कवितेची कला; कवितेतील सरस पद्यरचना, खुबीदार अर्थबोध, मनावर ठसण्यासाठी वर्णनपद्धती वगैरे गुण; काव्यरचनेतील कौशल्य, सौंदर्य. २. कवितेतील रसपरिपोष. ३. काव्यशक्तीपासून स्वाभाविकपणे उद्भवणारी (कवीच्या मुखावरील) शोभा, तेज, चमक, दीप्ती. [सं.]

**कविपद** वि. ज्ञाता.

**कविपोषक** वि. पु. कवींना स्फूर्ती देणारा : 'भीसी कां वायां हे। कविपोषका'-ज्ञा १३.८५१.

**कविसंमेलन** न. अनेक कवींनी एकत्र जमून आपापल्या कविता वाचून-गाऊन दाखविण्याचा कार्यक्रम. अशा संमेलनात काव्यविषयक चर्चा, भाषण, ठराव इ. होतात.

**कविळासपुरी** स्त्री. एक तंतुवाद्य : 'सिंगी पोवी कविळासपुरी'- उह १३२३.

**कवी** न. कोहळा.

**कवीठ** न. १. पहा : **कवठ** : 'जैसे कां कवींठ घातलें। वडवानलीं॥'- ज्ञा ११. ४३३. २. लहान खरबूज. (खा.)

**कवीदील** वि. निर्भय; धीट; शूर. [फा.]

**कवीशा** वि. कैदाशीण.(व.) [सं. कर्कशा]

**कवीहाल** वि. बेशक; नि:शंक; धीट : 'तुम्हीं कवीहाल होऊन आपल्या वतनावरी येणें।'- मइसा १७.३४. [फा.]

**कवेड** न. झोपडीचे दार. (गो.) पहा : **कवाड**

**कवेलू निचरा** (कृषी.) शेतातील अर्धवर्तुळाकार कौलामुळे होणारा पाण्याचा निचरा, पाणी वाहून जाणे.

**कवेश** पु. (कवीश अप.) पती; नवरा : 'व्यर्थ दिवस जातात खबर सांगा माझ्या कवेशा।'-होला १११.

**कवेळ** न. लेप; थर; पेंड. (गो.) पहा : **कवळ**

**कव्य** न. पितरांना अर्पण करायचे अन्न.

**कव्ययज्ञ** पु. श्राद्ध.

**कव्वर** क्रिवि. कोठवर; कोठपर्यंत; किती लांब (स्थळ व अवकाश यासंबंधी). (कु.) [सं. कुत्र]

**कव्वा** वि. कावेबाज; धूर्त. (ना.), [हिं.]

**कव्व्य** न. पितरांना अर्पण करायची वस्तू, अन्न वगैरे. [सं.]

**कव्ह** न. निर्मळीचे बी. (व.) पहा : **कवणा**

**कव्ह-व्हा, कव्हळ** न. वेढा; गवसणी : 'आकाशासि कव्हळ। पडोनि

ठेले॥'- ज्ञा ११.३५९.

**कव्हण-णा-णी** सना. कोण; कोणा; कोणी : 'कव्हणांहि न चिंती वीरू।'- शिव ८६८.

**कव्हणी** क्रिवि. १. कोठेही : 'कव्हणी सुक्षेत्र नाहीं ऐसें। जेथ फीटे भवपाशें।'- ऋ १९. २. कोणत्या; कोण्या : 'कव्हणी एकी वेळीं।'-शिव ३८.

**कव्हणे** क्रिवि. कोणते, कोणत्या : 'तरी आलेति कव्हणे कांजे।'- शिव ११८.

**कव्हळ** न. कोहळा. (वा.)० **सुतवून घेणे**- १. (शब्दशः) कोहळ्याला सूत गुंडाळणे. २. (ल.) मुलीला पदरात घेणे; उजवणे.

**कव्हा** पु. बुंद; कॉफी. पहा : **कवा १** : 'शहाजादे यासही कव्हा द्यावा'- मइसा ५.२२. [फा. कह्वा]

**कव्हारी** स्त्री. मिठी, आलिंगन : 'भवभंजनाची लहरी : वैराग्यावरी झोंबतील कव्हारी'- नरुस्व १८२१.

**कव्हावत, कव्हावतमी** स्त्री. कज्जा, कटकट; भांडण.

**कव्हाळ** न. भगदाड : 'ना तरी आकाशासि कव्हाळ। पडौनि ठेले'- ज्ञा ११.३५४.

वि. पोकळ : 'पृथ्वी हे ढिसाळ, आकाश कव्हाळ'- निगा १४६.

**कव्हेरी** स्त्री. किती वेळपर्यंत; कोठपर्यंत. (ना.) पहा : **कव्वर**

**कशमकस** स्त्री. खेचाखेची; ताणातणी.

**कशा** सना. काय या प्रश्नार्थक सर्वनामाचे सामान्यरूप.

**कशा** पु. १. चाबूक; कोरडा : 'चाल उगीच प्रभुशीं हट करिता पाठिशीं कशा लागें।'- मोसभा ५.८ २. कमरपट्टा. [सं.]

**कशा** विजार इ. वस्त्र कमरेला बांधण्याची नाडी; बंदप.

**कशाचा** वि. कोणत्या वस्तूचा, गोष्टीचा, प्रकारचा, तऱ्हेचा. [सं. कस्य]

**कशाड** न. एक प्रकारचे गवत : 'खताडीतून कशाड रान धरून गर्दी करीत होते.'- आआशे.

**कशाभिका** स्त्री. शेवाळासारख्या वनस्पतीमध्ये अलैंगिक प्रजननाच्या पद्धतीने दुसरी वनस्पती तयार होते. शेवाळाच्या तंतुपेशींवरच चलबीजाणू (नवीन वनस्पतीचे बीज) तयार झाल्यावर जो एका लांब तंतूच्या साहाय्याने पाण्यावर तरंगत राहणारा तंतू.

**कशा(सा)य** पु. काढा. [सं. कषाय]

**कशाला** क्रिवि. कोणत्या गोष्टीसाठी; का; काय म्हणून.

**कशास** क्रिवि. कशाकरिता : 'जया बहु तयास द्या मज कशास मी हांवरा।'- केका १४.

**कशांग** वि. सुंदर.

**कशि(शी)दा** पु. वेलबुट्टीचे काम; वस्त्रावरील दोऱ्याने, रेशमाने किंवा जरीने केलेले नक्षीकाम; भरतकाम; खडीचे काम. [फा. कशिदह]

**कशिला** पु. वरण शिजवण्याचे भांडे : 'बुडी जळालेल्या कशिल्यात ..... वामननं टाकून ठेवलेलं पाणी...'-बाविबु ४७.

**क(को)शिश** स्त्री. १. चौकशी; शोध. २.धडपड. जिद; प्रयत्न : 'कशिश कोशिश व कारभारी यास निकडी बऱ्याच होतात.'- ऐलेपाम्युप्र ९७.

**कशी** स्त्री. १. नाचणी वगैरेचे झोडपून, दाणे काढून घेतलेले कणीस, पिशी. २. काचणी; जाच; जिकीर. (राजा. कु.) [सं. कम्]

**कशीदह** पु. प्रकरण; काव्य. [फा.]

**कशील** पु. मक्यासारखे एक झाड. याचे फळ हरभऱ्याएवढे असते. (ठा.)

**कशीश** स्त्री. आकर्षण; ओढ : 'नबाबाचे प्रकृतींत कशीश फार आहे.'- मइसा ५.१७१. [फा. कशिश् = आकर्षण]

**कशेट-ड-रू** न. नागरमोथ्यासारखे एक गवत. [सं. कशेरु]

**कशेय** क्रिवि. कसाही; काही तरी करून. (गो.)

**कशेरु-रू** पु. १.(शाप.) पाठीचा कणा; पृष्ठवंश. [सं.]

**कशेरू** न. (वै.) पृष्ठमणी; मणका.

**कशेला** पु. वाटोळा गडवा; लहान लोटा; वाटोळ्या बुडाचा घडीव तांब्या (ना.व.)

**कशो** स्त्री. कस. (ना.)

**कश्चन, कश्चित** सना. कोणी एक; कोणीतरी एक; अमुक. [सं.]

**कश्मल-ळ** न. १. घाण; कचरा; दूषित वस्तू : 'जैसा गांवींचिया कश्मळा। उकरडा होय येकवळा॥'-ज्ञा १८.६५०. २. पाप; मल; दोष.

वि. १. आक्षिप्त; खराब झालेले : 'ते कश्मळ आठवी। आचरण जे॥'- ज्ञा १८.६२०. २. पापी; दूषित; अमंगल : 'कवण वधु वरीते, कश्मला कोणपा या?'-आसि ३८. [सं.]

**कश्यप** पहा : **कच्छप** (वा.) ० **धरणे, कश्यपी लागणे**- आश्रय घेणे; मागे लागणे. पहा : **कच्छपी लागणे** : 'भाऊंचे म्हणणे तसे पडले त्याअर्थी त्यांचाच कश्यप धरून वागणे प्राप्त झाले.'- ऐजुलेचिच संभा १४.

**कश्याक** क्रिवि. कशाला. (हेट.)

**कषपाषाण** पु. सोने वगैरे ज्या दगडावर घासून त्याच्या शुद्धतेची परीक्षा करतात तो दगड. [सं. कष् = घासणे+पाषाण]

**कषमक** स्त्री. कज्जा; भांडण : 'पूर्वीपासून ते आपणासी कजीया कषमकी करितात त्यासं आजवर आम्हीं ठासून ठेविले.'-पेद १५.७७.

**कषा** पु. काढा.(व.) [सं. कषाय]

**कषाय** पु. १. औषधी वनस्पतींचा काढा; अर्क. २. गेरूचा रंग. [सं.]

**कषाय** वि. १. तिखट (चुकीने कडवट). २. (काषाय अप.) गेरू अथवा कावेच्या रंगाचे. ३. कलुषित; बेरंग; विचलित (चित्तवृत्ती, तादात्म्य).

**कष्ट** पु. १. शारीरिक श्रम; त्रास; आयास; प्रयत्न; मेहनत; परिश्रम चलनवलन : 'कष्टेंविण फळ नाहीं। कष्टेंविण राज्य नाहीं।'- दास १८.७.३. २. थकवा; शीण; श्रम (शारीरिक, मानसिक); दुःख; अस्वस्थता (सामान्यतः अव. प्रयोग). ३. दुःख; व्याधी; संकट.[सं.]

**कष्टकरी** पु. मजूर; अंगमेहनतीचे, दगदगीचे, हलक्या दर्जाचे काम करणारा; कामकरी; श्रमजीवी : '१८४८ साली जगामधील सर्व कष्टकऱ्यांना एक होण्याची साद कम्युनिस्ट जाहीरनाम्याने घातली.' -आआआ १३.

**कष्टकल्पना** स्त्री. दुष्ट कल्पना, विचार.

**कष्टणे** अक्रि. १. फार अंगमेहनतीमुळे, काबाडकष्टामुळे थकणे; दमणे; प्राण कासावीस होणे. २. (मनात) दुःखी होणे; अतिशय क्लेश, त्रास होणे : 'बहु कष्टली शब्द कारुण्य बोले।'- दावि ४९६. ३. श्रम, आयास करणे; हाडाची काडे करणे; रक्ताचे पाणी करणे (अंगमेहनत करून). [सं. कष्ट]

**कष्टसाध्य** वि. अतिश्रम किंवा मेहनत केल्यावाचून सिद्धीस न जाणारा; मेहनतीचा; त्रासदायक. [सं.]

**कष्टाची धण** श्रमाची, मेहनतीची वाढ होईल असे काम; जिच्यापासून काही फलप्राप्ती नाही पण केवळ मेहनत पडली अशी गोष्ट; विफल श्रम.

**कष्टार्जित** वि. श्रम करून मिळवलेले. [सं.]

**कष्टाळू** वि. मेहनती; उद्योगी; परिश्रम करणारा. [सं. कष्ट+आलुच्]

**कष्टिका** स्त्री. काठी.

**कष्टिनी** वि.स्त्री. समाधिस्थ; समाधी लागलेली : 'कौंडल्या ते कष्टिनीः जळवे ना'- लीचपू ५४३.

**कष्टी** वि. १. कष्टाळू. २. त्रासदायक; मेहनतीचे. ३. शिणलेला; थकलेला; खिन्न; व्याकूळ; दुःखी : 'म्हणउनि होतो क्षणोक्षणे कष्टी।'-मोकर्ण १.१५. पु. मजूर; माडाची सूर काढणारा नोकर. (गो.) [सं. कष्ट]

**कष्टीक** वि. कष्टाळू; मेहनती.(व.)

**कस** पु. १. सामर्थ्य; तकवा; जोर; जोम; हशील; अर्थ; चांगुलपणा; (अंगातील) पाणी, बल, शक्ती : 'नामापुढें उरावयालागीं। कस त्याचे अंगीं असेना।'- एभा २८.३९१; (एखाद्या वस्तूचे) सत्त्व; जोमदारपणा उत्पन्न करणारा तत्त्वांश; सत्त्व (जमिनीत धान्योत्पादक अंश, धान्यात अन्नांश, दुधात स्निग्धांश इत्यादीप्रमाणे): 'कां अभ्यासाही लागीं। कसु नाहीं तुझिया अंगी।' - ज्ञा १२.१४. २. फलदायकता; व्यापारधंद्यापासून योग्य प्राप्ती : 'धंदापाणी होय? काही कस नाही मुंबयवाल्यानो.'- इंधन १३. [सं. कषाय]

**कस** पु. १. कसोटीवर लावून सोन्याची किंवा रुप्याची ठरवलेली योग्यता, गुण; शुद्धतेचे प्रमाण व ही शुद्धता ठरविण्यासाठी त्या दगडावर मारलेली रेघ, घासलेला भाग : 'या महातेजाचेनि कसें। जरी चोखाळु प्रतिबिंब दिसे।'- ज्ञा ४.१७९. (क्रि. लावणे, उतरणे, लागणे.) २. परीक्षा : 'जरी उतरेल माझ्या कसीं।'- मुवन (नवनीत पृ. १८४). [सं. कष=घासणे] (वा.) ० **लावणे**- एखाद्या पदार्थाची शुद्धता पारखणे (विशेषतः सोने).

**कस** स्त्री. कचक; लचक; उसण. (क्रि. भरणे.)

**कस** स्त्री. रेती. (गो.)

**कस** पु. अवशेष; कसर. (चि.)

**कस** पु. व्यक्ती; माणूस; असामी. [फा. कस्]

**कस** पु. (कुस्ती) एक पेच. प्रतिपक्षाच्या बगलेतून हात घालून मानेवर हात ठेवून त्याचा हात डोक्याकडे दाबणे.

**कस** पु. विडीचा झुरका. (झाडी) [फा. कश]

**कस** पु. सुरकुती; घडी : 'ज्या सणंगाला वाटेल तेथे वाटतील तसे कस पाडले आहेत त्याची घडी कोण घालू शकणार?'-सासं २२

**कस** पु. नांगरट, कष्ट : 'मला असाच ठेवला पाहिजे, तर ती कसाची कामं हुतील.'- गोता २४.

**कसई** स्त्री. कासई; कसाड; एक प्रकारचे जाड गवत. याचा उपयोग कूड घालण्यासाठी करतात. पहा : **कशेट** [सं. कशेरु]

**कसक** स्त्री. उसण; लचक : 'निंबाचा पाला गोळा करता करता कसक भरते.'- घरदार ६९.

**कसकरणे** सक्रि. टोचणे; बोचणे : 'पाइं खडा कसकरला'-लीचउ १०३.

**कसकरी** क्रिवि. कचकन : 'गोसावी चवरीचेनि दांडेनि करुनि कसकरी डोइयेवरि हाणतिलें :'- लीचउ ८४.

**कसकस** स्त्री.टीका; वादावादी : 'तिये भलतीये क्रिये थोरि कसकस करीति'- स्मृस्थ २४१.

**कसकस** स्त्री. १. ताप येण्याच्या पूर्वी अंग मोडून येणे व दुखणे; सामान्यतः शरीर, अवयव दुखणे. (क्रि. येणे, भरणे.) २. शिरशिरी; हुडहुडी (भयंकर गोष्ट पाहिल्याने किंवा ऐकल्याने येणारी). (क्रि. येणे, वाटणे, भरणे.) ३. भय; काळजी; दुःख; हुरहूर. (क्रि. लागणे.) [ध्व.] क्रिवि. खसखस असा आवाज करीत : 'कृतांता भूतमोडी कसकस रगडी मागधा शिर झोडी'- गरा ४९.

**कसकस, कशाकश** स्त्री. खेचाखेच; संघर्ष.

**कसकसचा-ला** वि. कोणत्या प्रकारचा, पद्धतीचा, रीतीचा; कशासारखा; कसा.

**कसकसणे** अक्रि. १. शरीर किंवा अंग दुखणे, मोडून येणे (दुखापतीने, पक्षाघाताने, दगदगीने, अतिश्रमाने). २. ताप येण्यापूर्वी शिरशिरी, हुडहुडी भरणे. ३. शहारे येणे, भरणे; शिवशिवणे : 'सकाळपासून त्यांना कसकसत होतं.'- वैष्णव ६९. ४. कुरकुर करणे : 'भटोबासी म्हणीतले : 'विचारा : मग कसकसाल'- अस्मृ १७९. [सं.कषति]

**कसकसा** पहा : **कसकसचा**

**कसकसा** क्रिवि. कसा; कोणत्या अर्थाने.
वि. कोणत्या प्रकारचा, रीतीचा, जातीचा, कशासारखे. [कसाचे द्वित्व]

**कसकसी** स्त्री. कसोकशी; जादा चौकसी; जाच.

**कसचा** वि. (कधी कधी 'काय' किंवा कधी कधी 'कसा' याचे विभक्ती -रूप.) कशाचा; कोणत्या गोष्टीचा, वस्तूचा; कोणत्या प्रकारचा, जातीचा, तऱ्हेचा.

**कसचा** क्रिवि. प्रश्नार्थक विधानात नकारवाचक तर्क, निराशा इ. व्यक्त करणारा शब्द. उदा. 'तो कसचा येतो?'

**कसण** न. कणा; आधार : 'आता मनाचे कसण मोडेल'- तसा ६७१.

**कसण** न. कारस्थान : 'मोडूनिया दत्ताची करूणा। सेवकपण राखिली ॥' - अफला २३.

**कसणी** स्त्री. (कसणे या उक्रि.चे धातुसाधित नाम) कसोटी; पारख; परीक्षा : 'रोज लष्कराची तपासणी व कसणी करीत.' - मदमं २७२. [सं. कष् = घासणे]

**कसणी** स्त्री. शेतीची मशागत; जमीन नांगरणे, वाहणे इ. [सं. कृष्]

**कसणी-नी** स्त्री. १. बांधण्याची दोरी (एखाद्या ओझ्याची, गोणीची, गठ्ठ्याची, चोळीची); बंधन; पाश; बंद : 'साठविलें तें सांडेल झणी। यालागीं कंचुकी गोणी। मार्जी दाटोनि कसणी। विरडें कशी सुबद्ध। - मुरंशु ४८. २.कसा; लांबट व अरुंद अशी पैसे ठेवण्याची पिशवी. ३. सामता ओढण्यासाठी काठीला दोरी बांधून केलेली सुताराची धनुकली. ४.काढणी; दोरी. [सं. कर्ष्]

**कसणीची चोळी** काचोळी : 'साड्या साउलीं पातळें गोंडे कसणियाच्या चोळ्या। बुंथी घेऊनी सकळां कळंबावरी पळे।'- तुगा १३३.

**कसणु(नु)सा, कसनसू** वि. १. ज्याच्या स्वरूपाचे नीट आकलन होत नाही असा; रूपकळाहीन. २. वाईट; उतरलेला (चेहरा). पहा : **कसाचसा**

**कसणूक** स्त्री. मशागत; नांगरण्याचे काम : 'जी कुळे सतत कसणूक करीत आहेत त्यांना कायम कुळाचा हक्क मिळावा.'-माजी ४१७.

**कसणे** अक्रि. जमिनीची मशागत करणे; नांगरणे : 'ते (आप्पा) ही काळी आई कशीत आले होते.'-व्यंमाक. [सं. कृष्]

**कसणे** उक्रि. १. घट्ट बांधणे; दोराने अथवा दोरीने घट्ट आवळणे; करकचणे; जोराने ओढणे; धरणे : 'गुलालाचे हौद भरूनिया खूप कसले हस्तीवरी।'- ऐपो २०३. २. घट्ट बांधणे; नेसणे : 'कांसे कशिला सोनसला।'- एभा ३.५७१. [सं. कच्,कष्]

**कसणे** उक्रि. १. (सोने वगैरे) कसोटीवर घासून पाहणे; परीक्षा करणे : 'सोनेपण सोनें कशी।'- अमृ ६.८५. २. कसून परीक्षा घेणे; कडकपणे तपासणे; नाना प्रकारांनी चाळणे, छानणे; उलटसुलट प्रश्न विचारणे; सामान्यतः परीक्षणे, तपासणे. ३. झटून मिळवणे : 'मग शरण रिघून त्यातें। योगालागीं कशीन कीं।' - नव १४.१०३. [सं. कष्] अक्रि. १. काटक, सहिष्णू, मजबूत होणे (श्रमामुळे, व्यायामामुळे शरीर); चांगला सराव किंवा तरबेजपणा असणे व त्यामुळे निपुणत्व अंगी येणे २. कसकसणे; दुखणे; ठणकणे (शरीर अथवा अवयव). [सं. कष् = घासणे]

**कसण्या** स्त्री.अव. (वस्त्रोद्योग) हत्येच्या खिळ्या (बाजूच्या खुंट्या), गुड व पान (हत्येची वरील पेटी) यास बांधण्याच्या दोऱ्या.

**कसता** वि. निसटता : 'तिला वार कसता लागला होता.'- जाण ३२८.

**कसद** पु. हेतु; विचार; निश्चय : 'दुसरे रोजी ... ठाणे खाली देखोन कसद ठाणी घेण्याचा केला.'- मइसा १५.२०.[फा. कस्द=हेतू, इच्छा]

**कसदरणे** अक्रि. चिरडले जाणे : 'चालतेया दळाचेनिं : कूर्माचे करटे कसदरे'-शिव ५३९.

**कसदार** वि. ज्यात सार, सत्त्व, बळ, जोम, चांगुलपणा आहे असे; सत्त्वयुक्त; सरस; बलिष्ठ; भरीव; सकस; दर्जेदार.

**कसना** क्रिवि. कोठला; कसला : 'शिपाई सांगह तूं कसना।'- मसाप २.१.३२. (कातकरी)

**कसनी** स्त्री. तणावाची दोरी : 'चहुंकडे चारी कसनीया लाविलिया'- गोप्र २५७.

**कसनुसणे** अक्रि. अनिच्छा दाखवणे; आढेवेढे घेणे : 'वामन तिला जवळ बसायला सांगू लागला. ती कसनुसू लागली.'-बाविबु ३४८.

**कसनुसा** वि. अस्वस्थ; कसातरी; बेचैन : 'दिगूअण्णाने चेहरा कसनुसा केला.'- मिरास २१६. (वा.) **कसनुसे वाटणे**- वाईट वाटणे; बेचैन होणे : 'जेव्हा मला बघितले तेव्हा गुणाआईला कसनुसे वाटले.'- काआ ६९. **कसनुसे हसणे**- वरवरचे हसणे; मनात नसताना हसल्यासारखे दाखवणे : 'म्हातारा रामूकडे बघत कसनुसं हसला.'- ऊन १६१.

**कसपट** न. (लाकूड वगैरेचा) लहान कण; सालपट; केर; गवताचा तुकडा; धान्याचे कण; तूस. [सं.] (वा.) **कसपटाप्रमाणे लेखणे, गणणे, धरणे** - तुच्छ मानणे; क्षुद्रवत् लेखणे.

**कसपत** न. (वन.) निश्चल पाण्यावर तरंगणाऱ्या, खोड नसलेल्या वनस्पती.

**कसब** न. धंदा; व्यापार; काम; उद्योग; कला : 'कसबे व व्यापार होई.'- शालोपयोगी नीति ११८. [फा. कसब]

**कसब** न. १. चातुर्य; हुषारी; कोणत्याही कलेत नैपुण्य; करामत हातोटी (लिहिणे, घोड्यावर बसणे, पोहणे यामधील) : 'शिपाईगिरीचें कसब जेथें, तेथें लिहिण्याचें कसब मनसब्याचें उणे असते' -ऐलेसं खरे ६.२६५६. २. हिकमत; कावा; शकल (लबाडीची). [फा. कस्ब]

**कसब** न. वेश्येचा धंदा; शरीरविक्रय. [फा. कस्ब]

**कसब** न. रुप्याची बारीक तार; (सोनेरी, रुपेरी) कलाबूत.

**कसबचिठ्ठी** स्त्री. वेश्येला आपला धंदा चालवण्याबद्दल दिलेला परवाना, पत्र.

**कसबचोर** पु. अप्रामाणिकपणाने काम करणारा; चुकारतट्टू; आपले कौशल्य पुरते खर्च न करणारा; सुमार काम करणारा.

**कसबचोरी** स्त्री. १. कसबाची चोरी; फसवाफसवी; लबाडी; कपटाने किंवा लुच्चेगिरीने पूर्ण कौशल्य न दाखवणे. २. सोनार, कुलकर्णी, वाणी वगैरे लोक आपल्या धंद्यातील कौशल्याने दुसऱ्याशी करतात ती लबाडी.

**कसबती** पहा : **कसबाती २**

**कसबती** पु. गावकसब्यातील लोक किंवा अधिकारी : '१ रमजानी कसबियासी आलो. गावकसबती भेटला.' - पेद १४.५.

**कसबा-बे** पु. परगणा किंवा महालाचे मुख्य ठाणे; शहरातील जुनी वसाहत, वस्ती; नव्या वस्तीहून भिन्न; जुने गाव : 'कसब्याचें गांव मौजे गांवापेक्षां अधिक विस्तृत.... असतें.'-गांगा २. [फा.]

**कसबाती** वि. १. धूर्त; कावेबाज; लुच्चा; हिकमती (कला व कपट यात). २. कसबी; हुशार; चलाख; कुशल (कारागीर) : 'कसबाती लोक...'- समारो ५.७ [फा. कसब]

**कसबी** वि. चतुर; हुशार; तरबेज (कला-कामात); गुणी; कारागीर; हुन्नरी : 'गलबतें बांधणारे मोठे कसबी व खलाशी फारच हुशार असतात.'- पाव्ह १०२. [फा. कस्ब]

**कसबीण** स्त्री. नाचणारी स्त्री; वेश्या; शरीरविक्रय करून त्या पैशावर चरितार्थ चालवणारी स्त्री. पहा : **कलावंतीण** [फा. कस्ब]

**कसम** स्त्री. शपथ; प्रतिज्ञा. (क्रि. खाणे.) : 'यांहीं कसम खाऊन सांगून पाठविलें कीं...'- मइसा १.४६. [फा.]

**कसमअकसाम** स्त्री. शपथप्रमाण : 'त्यास छ २४ मजकुरीच बालाजीपंत व सिंदेबहादुर याची कसमअकसाम जाली.'- पुणे अखबार ३.१८६.

**कसमस-सा, कसमसाट** स्त्री. १. रग; जोर : 'विषयांचा विसर पडे। इंद्रियांची कसमस मोडे।'- ज्ञा ६.१८८. २. चांचल्य. ३. दाटी : 'आंगिचेनि कसमसाटें ।'- शिव ७११. ४. (ल.) झळाळ; चकचकीतपणा; झगमगाट : 'कांतिचिया कसमसा। सुधाकरेसि सरि करि आरिसा।' - भाए ६४६.

**कसमसा** वि. क्षुद्र : 'हा लोक हा कसमसा करितो बकाद्या।'- अहमु २५.

**कसमळ** स्त्री. मळ; घाण : 'अवघाच माल खळ्यांत आणून कसमळ काढून स्वानंदाची रास करणें।'- भज १२३.
वि. ओंगळ; पापी; दुराचारी : 'नये राहों उभें कसमळापाशीं।'- तुगा २६९. [सं. कश्मल]

**कसय** स्त्री. गाळ. (गो.)

**कसर** स्त्री. १. न्यूनता; उणीव; कच्चेपणा; अपुरेपणा; चूक (मापात, वजनात, काम पुरे करण्यात, हिशेबात इ.) : 'औषधोपचारात अर्थातच आम्ही कांहीं कसर राहू दिली नाहीं.' - गाणे ३३. (क्रि. राहणे, येणे, निघणे.) २. अंश; लेश; किंचित भाग; थोडीशी बाकी. ३. आधिक्य; नफा; फायदा. ४. (हिशेबात) दोन्ही बाजूंच्या बेरजा बरोबर होण्याकरिता कोणत्या तरी बाजूतून काढलेली किंवा मिळवलेली रक्कम : 'जमेंत कसर होऊन'-मइसा १०.३४१. ५. चिक्कूपणाची काटाकाट; छाटाछाट; काट; कपात. ६. अप्रामाणिक, अयोग्य मार्गाने मिळवलेला पैसा; उपटलेली रक्कम; मधल्यामधे खाल्लेला पैसा; लाच; गैरवाजवी फायदा. ७. कटमितीचे व्याज; जसजसे मुद्दल जमा होईल तसतसे त्यावरील व्याज बंद करण्याचा प्रकार. ८. कमी करणे; सूट देणे, मिळणे. ९. कामामध्ये कुचराई, चालढकल : 'आपला निरपेक्ष उत्तम सल्ला देण्यास कसर केली नाहीं.' - नि ९९७.[फा. कस्र] (वा.) ० **करणे** - काटकसर करणे. ० **काढणे**- कमीपणा भरून काढणे; एखाद्या धंद्यात किंवा गोष्टीत आलेला किंचितसा तोटा किंवा उणीव दुसऱ्या धंद्यात भरून काढणे. ० **होणे**- कमी पडणे; दुर्लक्ष होणे : 'त्यात कधी कसर व्हायची नाही.'- माबा २५०.

**कसर** स्त्री. तापाची कणकण; कडकी (ताप येण्यापूर्वीची किंवा ताप गेल्यानंतरची). (वा.).० **करणे, येणे**- अंगावर काटा उभा राहणे; बारीक ताप येणे.

**कसर** स्त्री. कागद किंवा कापड खाणारी एक कीड : 'कपड्यास, कागदास, भातास, पिठास, तांदुळास वगैरेस खाणाऱ्या कसरीच्या आळ्या भिन्न भिन्न जातींच्या असतात.'- प्राणिमो ११४. [दे.प्रा.](वा.) ० **लागणे** - कसरीच्या किड्याने पदार्थ खाणे.

**कसर** उळीव, उधळी. (अहि.)

**कसर** स्त्री. विरळ (कापूस पिंजल्यासारखे) ढग; मळभ; अभ्रे.

**कसर** पु. पाण्यात उत्पन्न होणारा खाद्योपयोगी एक प्रकारचा कंद.

**कसरकम** वि. कमीअधिक : 'हरिपंताजवळ फौज दोन तीन हजार कसरकम आहे.'- पुणे अखबार ३.२३.

**कसरकुसर, कसरकुसरात** स्त्री. उणीव; न्यूनता. पहा : **कसर १** [कसरचे द्वि.]

**कसरजाद** वि. कमीतकमी; कमी अधिक : 'पागेचा खर्चाचा मजकूर... कसरजाद.... पावणालाख,' - पेद २५.३००.

**कसरणे** अक्रि. १. एका बाजूला घसरणे; निसरणे; जागेवरून थोडेसे बाहेर जाणे : 'भ्रमांतुनि कसराल, आदि पुरुषाला अनुसराल हो।'- सोहिरोबा (नवनीत पृ. ४४९). २. (ल.) कमी होणे; उतार पडणे (ताप, पाऊस, दुष्काळ यास); कमी होणे; उतरणे (दिवस).

**कसरत** स्त्री. १. सवय; सराव; राबता; नेहमी गुंग असणे; (कला, तालीम इत्यादींमध्ये); सरावामुळे प्राप्त होणारा तरबेजपणा; हुशारी; चतुराई. २. मर्दानी खेळ. ३. मेहनत करणे; कष्ट करणे; मोठे काम करणे. ४. (ल.) नुसता देखावा. [फा. कस्रत]

**कसरतखाना** पु. व्यायामशाळा : 'जोत्याजीबरोबर कसरतखान्यांत गेले आहेत.'- स्वप २४५.

**कसरता** क्रिवि. सरळ रेषेपासून थोडासा कललेला, सरकलेला; एका बाजूवर गेलेला. (वा.) **कसरते घेणे** - लुच्चेगिरीने युद्धातून हळूहळू माघार घेणे; निसटणे; एका बाजूला होणे.

**कसरती** वि. १. व्यायाम केलेला; तालीमबाज. २. राबलेला; वहिवाटलेला. ३. वाकडा झालेला. [फा. कस्रत]

**कसरदिढी** स्त्री. ऐनजिनसी सारा भरणाऱ्या रयतेवर त्या धान्याचा बसवलेला अधिक कर.

**कसरपट्टी** स्त्री. १. जादा कर (प्रत्येक कुळावरील). २. तोटा भरून काढण्यासाठी बसवलेला कर.

**कसरवर्ताळा** पु. ऐनजिनसी वसुलात जे कमीजास्त होईल त्याच्याबद्दलची सूट.

**कसरा** वि. १. करडा; पांढुरक्या रंगाचा; कबरा. २. निरनिराळ्या रंगांचा, तऱ्हेचा; बहुरंगी.

**कसरी** वि. १. कसरीसंबंधाचा; मितव्ययी; काटकसरी. विशेषतः कद्रू, कृपण माणसाला म्हणतात. २. काटकसरीने, थोड्या खर्चात घेतलेला (माल वगैरे).

**कसरी** वि. अंगावर काळ्या पांढऱ्या रंगाची लोकरअसलेली. (मेंढी) (माण.)

**कसरूड** न. सुरवंट; घुला.

**कसरेकम** क्रिवि. कमकसर; कमीतकमी; सुमारे : 'कसरेकम हजार फिरंगी उतरले आहेत.'- चिनापट्टण राजकारणे १.

**कसलत-ती** पहा : **कसालत-ती**

**कसला** वि. १. प्रश्नवाचक, गुण विचारणारा शब्द. २. कोणत्या प्रकारचा, जातीचा, तऱ्हेचा; कशासारखा; कोणासारखा.

**कसलाबसला** वि. कोणत्याही प्रकारचा; वाटेल तसला : 'गरिबांच्या बायका श्रीमंतांच्या बायकांप्रमाणे कसलेबसले सारे दागिने वापरू लागल्या आहेत.'-आले २९२.

**कसलिक** स्त्री. कसणूक; मशागत : 'सेताचे कसलीकेस दिगरमहालची कुलें आणाल ती कुले गावचे सिवारांत राहतील.'- ऐसंसाखं ५.३६.

**कसल्मंद** वि. अस्वस्थ; आजारी : 'मीर आलम याची तबियत कसल्मंद येण्याची ताकद.'- मइसा ५.१४३.

**कसवट** स्त्री. १. कस लावण्याचा दगड; कसोटी : 'लाऊनिया कसवटी उत्तम सुवर्णाची खोटी।'- एभा ११.१४६४. २. करामत. ३. परीक्षा; एखादी गोष्ट, व्यक्ती हिचा खरेपणा किंवा लबाडी ठरवण्यासाठी युक्तीने कसून परीक्षा करणे. (क्रि. घेणे, पाहणे, उतरणे.) : 'स्वयद वोपाया लाविती कसवटी।'- दावि २१७. ४. (ल.) कसास लावणारा; परीक्षा पाहणारा; परीक्षक : 'देखपां गा किरिटी। आश्रमधर्माचिया राहाटी। विधिमार्गा कसवटी। जे आपणचि होती॥'- ज्ञा ९.३०७. [सं. कषपट्टिका]

**कसवट- टी** स्त्री. (कृषी); कसण्याचा व्यापार; शेतीची मशागत : 'तेथ विधीमार्ग राहिला नीट। मग अवघा अव्हांट बसवट। तेथ कर्माचा कसवट। लागती करूं ॥'- सिसं ४४. पहा : **कसवटी** [सं. कृष्]

**कसवटणी** स्त्री. कसोटी; परीक्षा : 'साडेपंधरे या आणि कसवटणी ।' - ज्ञा १०.१५.

**कसवणूक** स्त्री. शेत नांगरून घेण्याची क्रिया : 'कसवणुकीखालची जमीन खाजगी मालकीची...' - बाभा ११३.

**कसवंटी** स्त्री. एक प्रकारचे लोणचे. पहा : **कसुंदी**

**कसवा** पु. नदीतील किंवा ओढ्यातील बारीक वाळुमिश्रित माती : 'दौंड व भांबुर्डी येथील विटात कसवा फार मिसळतात.'- सुवाशा ५.

**कसा** (वि.) कोणत्या जातीचा, प्रकारचा, धर्तीचा, रीतीचा, देखाव्याचा. क्रिवि. १. कोणत्या प्रकारचे रूप, गुण आहेत हे विचारणारे प्रश्नार्थक विशेषण; कोणत्या प्रकाराने अथवा रीतीने; कशासाठी; कोणत्या कारणाने. हा शब्द अपूर्वता किंवा लोकोत्तरपणा दाखविण्यासाठी निरनिराळ्या क्रियापदांबरोबर पुष्कळ वेळा योजतात. जसे :- हा धावतो कसा, जेवतो कसा, इ. २. सामान्य अर्थानेही योजतात. जसे : - जा कसा, बोल कसा = कोणत्या तरी प्रकाराने, कसेही करून जा, ये, बोल इ. ३. निश्चितार्थाने किंवा निःसंदेहार्थाने. जसे : तू जा कसा = निश्चित जा : 'भीष्म पतन पावे तो आम्हाला हो सहाय चाल कसा।'- मोभीच्या १.१०२. [सं. कीदृश]

**कसा** पु. १. अंगरखा किंवा टोपडे इत्यादिकांचा बंद : 'आंगडियाचा कसा सोडितां। म्हणे नखे दुखती माझीं आतां।'- हरि ७.२४४. २. पैसे ठेवण्याकरता हात-दीड हात लांब व अरुंद असलेली कमरेला बांधायची पिशवी : 'कमरेला पैशाचा कसा बांधून सुदामदाजी आप्पांच्या घरापुढे आले.'- व्यंमाक १०७. ३. (बायकांचा) झोळणा, बटवा वगैरेची दोरी, नाडी. ४. मंतरलेला दोरा : 'ब्रह्मसाक्षात्काराचा कसा : बांधे सरिखा'- उगी ७७८. [सं. कस्, कष]

**कसा** पु. लहान बोरू. याची लेखणी करतात. (आगरी) [सं. कशेरू]

**कसाई** पु. १. खाटिक; गुरे मारून त्यांच्या मांसाच्या विक्रीवर पोट भरणारा. २. (ल.) अत्यंत निष्ठुर हृदयाचा माणूस; कसाब. [अर. कसा] [फा. कशिदन=काढून घेणे.]

**कसाई** स्त्री. खेचून बांधणी : 'वाहनाचे कसाईची जबाबदारी ज्या त्या माव्हतावर आहे.'- स्वारीनियम (बडोदे) ८९. [सं. कर्ष्]

**कसाई** स्त्री. एक प्रकारची रेशमी साडी; काळ्या रंगाचे पातळ; सीमांत पूजनाच्या वेळी स्त्रियांना द्यावयाची मानाची लुगडी.

**कसाईखाना** पु. कत्तलखाना; पशुवध करण्याची जागा. [फा.]

**कसाकाय** पहा : **कसकसा**

**कसाकु(क)शा** स्त्री. १. घासाघीस; खाराखुरी. २. तडफड. ३. कांकू; टंगळमंगळ; नानू. [ध्व.]

**कसाचसा** वि. ज्याचे स्वरूप सांगता येत नाही असा कुणासारखा तरी; कधी न दिसलेला, न ऐकलेला असा काही विलक्षण प्रकारचा (चमत्कारिक व आश्चर्यकारक वस्तू किंवा प्रसंग याबद्दल योजतात).

**कसाट-ड** न. एक प्रकारचे गवत. पहा : **कशेट** [सं. कशेरू]

**कसाटी** स्त्री. बैलांच्या गळ्यात बांधायची घंटा. (व.)

**कसा तरी** क्रिवि. कोणत्या तरी प्रकाराने : 'प्रसादचतुरा कसा तरि करा बरा हा जन।'- केका ६३.

**कसाब** पु. खाटीक. पहा : **कसाई** : 'कसाबाचे आळी मांडिलें प्रमाण। बस्वण्णाची आण तया काई।'- तुगा ३०६८. [फा. कस्साब]

**कसाबकरणी** स्त्री. कसाबासारखी निष्ठुर वृत्ती; क्रूरपणाचे कृत्य.

**कसाबसा** क्रिवि. मोठ्या कष्टाने, प्रयासाने.

**कसाबी** स्त्री. १. खाटकाचा धंदा. २. (ल.) क्रौर्य.
वि. क्रूर. [फा. कस्सावी]

**कसाय** पु. औषधांचा काढा. (गो.) [सं. कषाय]

**कसारा** पु. तोफेचा एक प्रकार.

**कसारी** वि. मिरचीची एक जात.

**कसालत** स्त्री. १. पीडा; दुःख; संकट. २. कठीण काम; मेहनतीचे काम. (क्रि. काढणे, सोसणे.) २. अतिशय श्रम, आयास. (क्रि. येणे, करणे.) पहा : **खसालत** [फा. कसालत् = दुःख]

**कसालती** वि. १. फार श्रम करणारा; मेहनती. २. अतिशय दगदगीचे, त्रासाचे, मेहनतीचे (काम). [फा. कसाला]

**कसाला** पु. १. श्रम; आयास. पहा : **कसालत** : 'राजश्री गोविंदपंत मामा वृद्ध, त्यांनीं कसाला किती करावा?' - खरे ९.४६८४. २. कडक रीतीने वागवणे; छळणे; पिळून काढणे; बेजार करणे (क्रि. करणे, लावणे.). ३. अतिशय कष्टाची परिस्थिती; जुलमाची अमदानी (क्रि. होणे, लागणे, गुजरणे.). ४. पीडा; संकट : 'स्वामींनीं हा नूतन संपादिलेला देश यावर कसाला पडतो ही विचाराची वाट नव्हे.'- मराआ ७.५. जबाबदारी : 'मातुश्रीसाहेबांवरी संपूर्ण राज्याचा कसाला पडिला.'- निसं ३. [फा. कसाला = दुःख]

**कसालाअसाला** पु. कष्ट; तसदी : 'पांढरीचे कसाले - असाले सोसून

पांढरीमुळें नागवणा पडल्या त्याहि दिल्या.' - ऐसंसाखं ४.७९.

**कसासा** वि. खसखशीत, जाडाभरडा होईल असा : 'कसासां ज्ञानाचा करिती रगडा।' - राज्ञा ९.१८२.

क्रिवि. खसखसून.

**कसासाच** क्रिवि. विचित्र.

**कसाळी** स्त्री. बडबड; वटवट.

**कसां** क्रिवि. कसे. (राजा.)

**कसांडी** स्त्री. दुधाची चरवी; कासंडी. (व.)

**कसांडी** स्त्री. मिरच्यांची पूड; तिखट. पहा : **कसुंदी**

**कसिस** स्त्री. १. घासाघीस. २. कोशिस.३. ओढून धरणे : 'दहापांच दिवस ज्वाबसालात कसीस व वोढ धरावी.' - पुणे अखबार १.२६४. [हिं.]

**कसीद, कसीदगी** स्त्री. कमी करणे : 'जरूर एक वक्त बादशाही कामाबद्दल कांहीं कसीदगी केले तरी अवल-सवाईनें मुबादला देऊन बाजद कसीद करावें.' -इम ६७.[फा. कशीदन् = कमी करणे, काढून घेणे; कशीदगी = गैरमर्जी]

**कसीदह** पु. प्रकरण; काव्य. [फा.]

**कसीदा** पु. स्तुतिगीत : 'गालिबच्या काळी 'कसीदा' हा एक वैशिष्ट्यपूर्ण काव्यप्रकार मानला जात असे.' - शाआगा ९१. [फा.]

**कसीस** पु. तलवारीत जव्हेर, विष किती आहे हे पाहण्याची कृती.

**कसुदा** पहा : **काशिदा**

**कसुंदी** स्त्री. १. मिरच्यांची भुकटी; तिखट : 'कृष्णाला देते जेऊ भाकर कसुंदी.' - जसा ३७५. (ना.) २. आंब्याच्या किसाचे लोणचे.(व.) [हिं. कसौंदी]

**कसू** न. शेताची हद्द दाखवणारी घातलेली दगडाची बांधवरळी; गडगा. (को.)

**कसू** न. पहा : **कूस**. १. कुसळ. २. दाराच्या फळीचे खोबणीत अडकविण्याचे टोक.

**कसून** क्रिवि. कडकपणे; सूक्ष्मपणे; बारकाईने.

**कसूर** स्त्री.१. कमीपणा; न्यूनता. २. चूक; अपराध; दोष. ३. हयगय; अळंटळं; आळस : 'आपली मतें स्पष्टपणें बोलून दाखविण्यास कधींहि कसूर केली नाहीं.' - लोटिकेले ४.३४३.[फा. कुसूर = दोष, न्यूनता]

**कसूर** पु. आकस; दंश; कुसुर : 'तो कसूर धरून जाणोजी निंबाळकर याची आगाडीची कटक होती...' - सब २८. (क्रि. काढणे.)

**कसूरकोताई** स्त्री. चूक; न्यून; अंगचुकारपणा : 'स्वामी सेवेचे ठायीं आम्हांपासून कसूरकोताई हा कालपर्यंत जाली नाहीं व पुढेंहि होणार नाहीं.' - पया ६८.

**कसूरदार** वि. दोषी; अपराधी : 'पोषाख ठरविलेले मुदतीचे आत खराब केल्यास नवीन करण्याकरितां कसूरदारांचे पगारातून खर्च कापून घेतला जाईल.' - खानोनियम (बडोदें) प्रस्तावना ३.

**कसे** क्रिवि. कोणत्या रीतीने; कशाप्रकारे. [सं. कथम्]

**कसेई-ही** पु.न. स्त्री. तृणविशेष; एक औषधी वनस्पती.

**कसेपरी** क्रिवि. कसेही करून; कशाही रीतीने : 'म्हणुनिया मथितार्थ कसेपरी। पतितपावन यो वदनीं हरी।' - वामन नामसुधा १७.

**कसेबसे** क्रिवि. मोठ्या कष्टाने; अतिश्रमाने; कसेतरी; काही तरी करून; जेमतेम : 'करूनियां चित्त स्थिर कसेंबसें।' - लेलेशास्त्री.

**कसेरू** पु. एक गवत; कचरा; फुरडे. पहा : **कशेट** [सं. कशेरू]

**कसेला** वि कशासारखा; कोणासारखा; कोणत्या जातीचा, तऱ्हेचा, पद्धतीचा.

**कसेला** पु. वाटोळा तांब्या. (झाडी) [सं. कलश]

**कसेसे, कसेसेच** क्रिवि. काही तरी चमत्कारिक; न सांगता येण्यासारखे. पहा : **कसाचया** (वा.) **०होणे, वाटणे** - १. (बायकी) चमत्कारिक वाटणे; नेहमीपेक्षा निराळ्याच भावना होणे : 'तुला कां बरें आज कसेंसेंच वाटतें ?' - खरा रजपूत वीर. २. चैन किंवा स्वस्थता नसणे. [कसेचे द्वि.]

**कसै** स्त्री. लहान गोरगोटी : 'नातरी निंबोळीया मोतीया : ... सघना पांढरीया कसैया : भणौनि त्यजी' - ज्ञाप्र १०८७.

**कसो** पु. बंद (झग्याचा वगैरे). (गो.) पहा : **कसा**

**कसोकसी-शी** स्त्री. कसोशी; कसून चौकशी : 'मशारनिलेनी कसोकसी करून मख्ना साधून काम उरकलें.' - पेद.

**कसोटा** पु. १. कस लावण्याचा दगड. २. परीक्षा. पहा : **कसोटी**

**कसोटा** पु. १. कुस्तीचा एक पेच. आपल्या पंजाने जोडीदाराचा एक पंजा धरून एकदम जोडीदाराचा हात बाहेर ढकलून त्याच्या कानाच्या खाली मानेवर आपल्या अंगठ्याकडील बाजूच्या हाताने मारणे. २. जोडीदाराचे दोन्ही हात आपल्या हातात धरायचे आणि जोडीदाराचा एक हात झिडकारून देऊन आपल्या हाताच्या मुठीच्या हाडाने त्याच्या कानशिलावर मारायचा.

**कसोटी** स्त्री. १. पहा : **कसवट-टी** (क्रि. घेणे, पाहणे.) २. परीक्षा : 'व्यवहाराची एकच कसोटी आपणांस पुरे होईल.' - लोटिकेले. ४.११९.३. एखाद्या गोष्टीचा गुणवत्ता मापक निकष. [सं. कष + पट्ट] (वा.) **० कसणे** -१. परीक्षा करणे. २. पेच घालणे. ३. (ल.) सुरतक्रीडेतील डाव खेळणे : 'शांत होईल जीव जरा फिरून मग मला कसौटी कसा। नव्या नवतीचा बहर नूतन जी बोली आली रसा।' - होला ८४. **कसोटीला उतरणे** अक्रि. परीक्षेत उत्तीर्ण होणे; उत्कृष्ट निघणे : 'माझी पद्धति त्यांच्या कसोटीला उतरली.' - माजी ४८२.

**कसोटीवीर** पु. क्रिकेटच्या कसोटी सामन्यात खेळणारा खेळाडू; क्रिकेटपटू.

**कसोटी सामना** दोन बलाढ्य देशांच्या संघांमध्ये होणारा स्पर्धात्मक खेळ.

**कसोशी** स्त्री. १. सूक्ष्म, बारीक, छेडून छेडून घेतलेली परीक्षा; तपासणी; चौकशी; पारख. २. काळजी; श्रम; दक्षता. (क्रि. खाणे, भोगणे.) ३. त्रास; दगदग; खस्ता; नेहमीची कटकट. (क्रि. खाणे, सोसणे.) ४. झोंबणारे व त्रासदायक दुःख, यातना, ठणका. (क्रि. सोसणे.) ५. आटोकाट प्रयत्न; शिकस्त. (क्रि. करणे.) [फा. कोशिश् = प्रयत्न] (वा.) **कसोशीत-स आणणे** -कष्टसाध्य करणे;

जेरदस्तीत आणणे; जरबेत, दाबात आणणे : 'ते तुम्ही कसोशींत आणून दिल्लीपर्यंत बादशाहीचा व सुरळीतपणाचा जवा बसवून देऊं.' - पाणि बख १९.

**कसोशीने** क्रिवि. सूक्ष्मपणे; अतिशय मेहनत व काळजी घेऊन, कसून : 'अगदी कसोशीनं शोध चालवला आहे.' - स्वप १८९.

**कसोंदी** स्त्री. मिरचीची पूड. [हिं.]

**कस्करणे** उक्रि. दात करकर खाणे : 'दांत कस्करे आणि हरळे। या नाव आदिभूतिक।' - दास ३.७.२३. [ध्व.]

**कस्कसा** पु. कचकच; शहारे : 'नेत्रासि फीरवि कसा आणि कस्कसा ये।'- अगंर ११६. [ध्व.]

**कस्काराने** क्रिवि. कच खाऊन :'तेव्हा कस्कारानें माघारे तोफखान्यांत येऊन उभे राहिले.'- भाब ११५.

**कस्त** स्त्री. **१**. खराबी; नुकसान; झीज; तोटा. [क्रि. सोसणे, खाणे.] २. (ल.) उणेपणा; न्यूनता; कमताई; वाण. (क्रि. खाणे.) **३**. तसदी; परिश्रम; दगदग; त्रास. (क्रि. खाणे.); शुश्रूषा; मेहनत; खस्ता : 'नाना जलदीनें रवानगी होण्याची कस्त करीत आहेत.' - ऐलेसं ११.६१५४. (वा.) ० **होणे** - खस्त होणे; ठार होणे : 'गणोजी जाधव स्वामीकार्यावरी कस्त जाहले याकरितां याच्या पुत्राचें चालविणें स्वामीस आवश्यक.' - ऐसंसाखं ६.४०. [फा.कशिदन, हिं.कस्त]

**कस्त** पु.स्त्री.हेतू; विचार; निश्चय : 'पुण्यास यावे ही इंग्रजाची मोठी कस्त आहे.' - ऐलेसं ७.३५८५. [फा. कस्द् = इच्छा, हेतू]

**कस्तगिरी** स्त्री. मेहनत; पराक्रम : 'छावणी मुख्यासहवर्तमान बंदोबस्तें करून कस्तगिरी केली तरी फिरंगाण फत्ते होईल.'- पेद ३४.९८.

**कस्त(स्ता) न** न.१. वाळलेला पाचोळा; केरकचरा. २. गवती छपरातील काड्या, गवत वगैरे : 'दाजिबाने पाणी दिले त्यात चुलीत जाळावयाच्या कस्तानाचा पाचोळा पडला होता.' - मस्थि ६३. (को.) ३. कसण्याचा दोरखंड, गाडीचा दोर. [सं. कु + तृण क.]

**कस्तर** पु. कास्यकार; कासार : 'कुंभकोणी तांब्या कस्तरापाशी करावयासी दिल्हा असे..' - पुआंढ ४३३.

**कस्तर** पु. न. १. डाक; भांडे सांधण्याकरिता किंवा फुटलेले नीट करण्याकरिता जो कथलाचा लेप बसवतात तो : 'कथलाचें काम करणारे व शिशाचें काम करणारे कासार ह्या मिश्र धातूंचें कस्तर करितात.' - मपु ६.१६९. २. जडण; डाक लावण्याची क्रिया. (क्रि. करणे, होणे, लादणे, बसणे, जाणे.) [सं. कस्तीर = कथील, कल्हई]

**कस्तर** पहा : **कस्तन**

**कस्तरणे** उक्रि. कस्तर करणे; झाळणे; डाक बसवणे.

**कस्ता** पु. त्रास; खस्ता.(माण.) [सं. कष्ट]

**कस्ता** वि. **१**. कसरता; ढळलेला; कललेला; सरकलेला; झुकलेला (खांब, भिंत, तराजूची दांडी, माप इ.). २. (ल.) हलका; कमी (मापात किंवा वजनात). **३**. कमी मापलेली किंवा वजन केलेली (वस्तू, माप). ४. (ल.) हलका; खोटा; वाईट; अप्रामाणिक (धंदा, भाषण इ.). ५. एका बाजूला वळलेले; मार्गापासून ढळलेले; सरकलेले; मार्गच्युत.[सं. कस् = हलणे; जाणे] (वा.) **कस्ते घेणे** - १. एका बाजूला होणे; २. माघारी घेणे; अंग काढून घेणे. क्रिवि. १. जवळून. २. झुकता.

**कस्तान** न. हलका, वाळलेला पाचोळा; इंधन. [क.कस]

**कस्ताना** पु. बलूत वृक्ष.

**कस्तानी** वि. काळसर तांबूस रंगाचा; तेल्या कुमाईत (घोडा).

**कस्ती** वि. फार श्रम करणारा; उद्योगी; मेहनती; कष्टाळू. स्त्री. श्रम; कष्ट; मेहनत. [सं. कष्ट]

**कस्तुर मोगरा** पु. एक वेली; कुसर.

**कस्तुरि-री** वि. विशिष्ट प्रकारचे गद्याणक; एक सुवर्णाचे नाणे : 'कस्तुरि ग. ५'- पांढर शि. १.३७.

**कस्तुरि, कस्तूरी, कस्तुरिका** स्त्री. १. एक अतिसुगंधी द्रव्य. याचा रंग काळा असून हे विशिष्ट मृगाच्या नाभीत सापडते. नेपाळ, तिबेट इत्यादी हिमालयाच्या प्रदेशात कस्तुरीमृग आढळतात : २. कपाळाला लावायच्या तांबड्या गंधाच्या मधोमध लावतात तो काळा ठिपका. 'कस्तुरी चोरिली चोरें। परी परिमळें हाट भरे।' - हरि ३.१७९. [सं. कस्तुरिका]

**कस्तुरीएण-मृग** पु.ज्या हरणाच्या बेंबीतल्या गाठीत कस्तुरी सापडते तो हरिण. एका मृगापासून सरासरी एक औंस कस्तुरी मिळते : 'सिंह जसे प्रतिपर्वति नाहित कस्तुरी एण वनोवनिं कैचे।' - वामनीग्रंथ ४; बोधपर सवाया ८.

**कस्तुरी** झाळ; डाक.

**कस्तुरी भेंडी** एक झाड.

**कस्तुरी मोगरा** दुर्गंधी सोडणारा एक किडा. (गो.)

**कस्तूर** पु. न. डाक लावणे. पहा : **कस्तर** १. (क्रि. करणे, होणे.) : 'वाहकांच्या तुकड्यांची टोकें स्वच्छ करून त्यांस तिरपा पालवसांधा करून सांध्यास कस्तूर करावा.'- मॅरट ८९.

**कस्तूर** पु. एक पक्षी. (झाडी)

**कस्तूरगोल** पु. डाक लावण्याचे हत्यार.

**कस्तूरी** स्त्री. शेतातील काळी माती. (खा.)

**कस्नी** स्त्री. १. रंध्याची दोरी. २. पेरणीच्या हरीचा दोर. (झाडी) [सं. कष]

**कस्पट** न. पहा : **कसपट** : 'धनगराच्या मेंढरांनी बारीकसारीक कस्पटसुद्धा टिपले होते.' - व्यंमाक १९.

**कस्बह** पहा : **कसबा**

**कस्बी** न. सोन्याच्या धाग्यांनी युक्त असलेले वस्त्र.

**कस्मळ** वि. दुराचरण; पाप.

**कस्या** पु. काढा. [सं. कषाय]

**कस्रत** स्त्री. १.समृद्धी; रेलचेल. २. फाजीलपणा. [फा.]

**कस्रत-ती** पहा : **कसरत-ती**

**कस्रेकम** क्रिवि. कमीत कमी : कस्रेकम हजार फिरंगी उतरले आहेत.'- चिरा १. (गो.) [फा. कस्र; कसर]

**कस्स** न. कळ; कसर. (गो.)

**कहड** पु. कढ; त्रास : 'तेत्तिस कोटी सुरगण मुनिजन जोडिति ज्याला पाणी। कळिकाळाचा कहड जडेना सदा फिकिर निर्वाणी।' - दत्तपदे पृ. ४९.

**कहणे** सक्रि. सांगणे : 'नागार्जुन कहंति ते तरले भवसागर' - चौ ४.

**क(का)हत** पु. दुष्काळ : 'तरी येथील विचार पहातां चार सालापासून कहत पडला व रयत व ढोरं मरून गेलीं.' - पेद १७.७६.

**कहतकदीम** क्रिवि. पूर्वीपासून : 'जो काही सालाबाद कहतकदीम पिढी दरपिढी देवकप्रतिष्ठा तागाईत सोलीपावेतो चालिली असेल...' - शिचसाखं २.२९८.

**कहर** पु. १. निकर; अतिरेक; पराकाष्ठा; जोर; अमर्यादपणा; उच्छाद; आवेश : 'तोफेचा एकच वर्षला कहरा।' - पया ५५. २. ईश्वरकोप; अनर्थ; क्षोभ. ३. जुलूम; गहजब. ४. बिकट प्रसंग. (वा.) **०उडणे** - भयंकर संकट येणे; अतिशय दुःख होणे. [अर.कहर]
वि. १. अतिशय दुःखदायक; पराकाष्ठेचे भयंकर. २. रानटी; अद्वातद्वा.

**कहरदर्याव, कहरदर्या** पु. अफाट, अमर्याद समुद्र; महासागर (महासागराच्या विशालतेसंबंधी योजतात).

**कहरवा-वी** पहा : **कारवा**

**कहरी-ऱ्या, कहारी** वि. १. भयंकर; क्रूर; अतिशय कडक; निष्ठुर : 'पारिपत्यहि कहरी होत असतें.' - ऐलेसं ८.४३३९४. २. अतिशय विषारी; जालीम; जलाल (साप, विंचू वगैरे). ३. प्रखर; फणफणणारा; पोळणारा (ताप, कपाळ दुखणे, आजार, ऊन). ४. (व्यापक) पराकाष्ठेचे; बेसुमार; अतिशय दुःखद; भयंकर; प्रचंड (ओझे, मजल, कोस, पर्वत, अरण्य इ.). ५. आवेशाचे; रानटी; अद्वातद्वा (रडणे, खरडपट्टी काढणे वगैरे). ६. प्राणहारक; मर्मभेदी: 'जखमा शस्त्रांच्या कहरी लागून मृत्यु पावले.' - चित्रगुप्त ७०. [फा. कहर]

**कहा** पु. १. वर्चस्व; ताबा; अधिकार; सत्ता. २. स्वकथित; स्वतःचे म्हणणे : 'परंतु ते गोष्ट न ऐकतां आपलाच कहा करून किल्ला बांधतात.' - पेशव्यांचा जुना वाडा, भारतवर्ष ३६. [कह्यात- सप्तमी एकवचन]

**कहाकर** पु. जमिनीचा विशिष्ट तुकडा. (व.)

**कहाड** वि. डौलदार; भपकेदार.

**कहाडणी-णे** पहा : **काढणी-णे**

**कहाडी** स्त्री. कावड : 'वेळुवामध्यें काडोकाड : दूधतूप भरिलें : मग कहाडी जुंपिलिया' - श्रीकृच ३०.

**कहाणी, काहाणी** स्त्री. १. गोष्ट; वृत्तवर्णन; कथा; आख्यायिका : 'म्हणोनि मृत्युलोकीं सुखाची कहाणी। ऐकिजेल कवणाचिये श्रवणीं।' - ज्ञा ९.५०१.; 'कृष्णाची आणीक काहाणी। तो स्त्री जाहला मोहिनी।' - एरुस्व २.१९. २. दुःखदायक आत्मकथन; स्वतःचे कष्ट, हालअपेष्टा यांची हकीकत. (क्रि. सांगणे, गाणे.) ३. शिकवण; उपदेश; कानउघाडणी. ४. एखादे व्रत स्वीकारलेल्या व्रतस्थीने त्या व्रतासंबंधी व्रतदिनी सांगितलेली कथा. [सं. कथनिका.]

**कहाणी** स्त्री. ज्वारीवर अवचित पडणारा एक रोग; काजळी. याने ज्वारीचे दाणे काळे होऊन जळून जातात. पहा : **काणी**

**कहा(ह)त** स्त्री. १. दरोडा; लूट; धाड (चोरांची, दरोडेखोरांची). २. एखाद्या वस्तूवर पडणारी धाड, उडी (खादाड मुलांची). ३. शेतावर पडणारी धाड, (गुरांची, टोळांची). ४. चढाई; चाल. ५. दुष्काळ. [अर्. कहत् = दुष्काळ.]

**कहात(ते)ला** वि. आधाशी; हावरा; वखवखलेला. (व.ना.)[फा. कहत्]

**कहाता** वि. क्रिवि. कललेला; कस्तर; तिरपा; एका तोलावरचा; कसरता.

**कहाती, कहती** वि. १. निर्भय; धीट; साहसी. २. तुफान; क्षुब्ध; विचारशून्य. ३. धाडसी; अविचारी; बेछूट; वेडगळ (कृत्य). ४. (व्यापक) अतिशय मोठा; बेसुमार मोठा (वजन, पर्वताची चढण, प्रवासाची मजल, ऊन, पाऊस, वारा इ.). (वा.) **कहातीस येणे** - विकारवश होणे; कुलुलीस येणे; क्रोधाविष्ट होणे; भान सुटणे.

**कहामहा** क्रिवि. केव्हातरी; कधीमधी. (खा.)

**कहार** पहा : **कहर** (वा.)० **मांडणे** - (बायकी) अतिशय त्रास देणे; उच्छेद मांडणे.

**कहार** पु. १. भोयांची एक जात. २. गडी; नोकर (हा बहुधा कहार जातीचा असतो यावरून). [सं. स्कंधकार]

**कहार** पु. जोंधळ्याची एक जात.

**कहा(हि)रवा** पहा : **कारवा**

**कहारी** वि. कजाग; त्रास देणारा : 'जिजा कर्कशा होती. कहारी होती.' - आआशे १.

**कहाली** स्त्री.आग; उष्मा; उकाडा. पहा : **काहिली** : 'विषय कहालिनें अति पोळतें। जेव्हां लहर मनीं येते तेव्हां करीं कुच आपुले चोळतें।' - प्रला १०२. [सं. क्वथ]
वि. बिघडलेली; अत्यवस्थ : 'नबाब नजीब दवळे यांची तबियेत कहाली आहे.' - हिंगणेदख २.१०४.

**कहाल्या** स्त्री. अव. जमिनीचे लहान लहान वहित भाग. (व.)

**कहावणे** अक्रि. १. अतिशय भेदरणे; भयाने गांगरून जाणे. [को.] २. रागावणे. पहा : **कावणे**

**कहाळणे** क्रि. काढणे; कसणे.

**कहाळा** स्त्री. सनई.

**कहाळे** न. वाजवायचे शिंग : 'शंखभेरी मृदंग कहाळी।' - मुआदि ३२.३०. [सं. काहल]

**कहाळेकांड** न. सनईची नळी : 'हरिपाय पडेना कहाळेकांड पडिले।' - स्मृति.

**कहि-ही** क्रिवि. १. कधी; केव्हा. : 'कहिं येकाधेन वैकुंठा जावे।' - राज्ञा ९.२०२. २. कोठे; कोठेही : 'संशयात्मिचासी कहीं नाही सुख।- दावि ६३. [सं. कर्हि]

**कहि(ही) ब(व)ही** क्रिवि. कधीमधी; कधीतरी : 'विक्षेपू झाल्या कहिबही। अभ्यास तिहीं करावा।' - एभा १३.२४८. [सं. कर्हि]

**कहिरा** वि. तिरळा : 'मदनपुतळा काणा कहिरा।' - अमृत ४२.

**कही** स्त्री. **१**. लष्करासाठी गवत, लाकूडफाटा इत्यादी लुटून किंवा अन्य रीतीने आणणारी सैन्याची टोळी. २. अशी सामग्री आणण्याची क्रिया; सैन्याला दाणावैरण मिळवणे : 'मशारनिल्हेचे खेड्यांची कही शेतें कापून नेली.'- ऐलेसं ५.२३१२.[ फा. कही]

**कही** अ. कोठे; केव्हा; कधी. [ सं. कर्हि]

**कहीकबाड** न. चारा, गवत व लाकूडफाटा; सरपण; सैनिकांना लागणारे जळण. लाकूडफाटा वगैरे गोळा करण्यासाठी सैन्याबरोबर एक टोळी असे. ती रोज आसपासच्या प्रदेशातील धान्य लुटून व घरे मोडून लाकूडफाटा आणी.

**कहीवाला** पु. **१**. कहीतील माणूस. **२**. (ल.) तेजोहीन, मलिन, वस्त्रहीन माणूस.

**कहेत** पहा : **कह्यात** : 'परंतु गाडदी कहेंत न राहतां, पाय धरून ओढून कचाकच वार केले.'- ऐलेसं २०४४.

**कह्या** पु. आज्ञा; हुकूम म्हणणे, सांगणे. (हिं.) [सं. कर्थ] (वा.) **कह्यात जाणे**- ताब्यात जाणे : 'हा समृद्ध प्रांत इंग्रजांच्या कह्यात गेला.' - मागोवा १८२. **कह्यात ठेवणे** - ताब्यात ठेवणे, वर्चस्वाखाली ठेवणे, **कह्यात नसणे** - हुकुमात, ऐकण्यात नसणे.

**कळ** स्त्री. माया; सहानुभूती : 'शिवाजीचे आपण वंशज म्हणून आपली कळ वाटून ते इंग्रज आपणांस सिंहासनावर शुद्ध मनाने.... बसवीत आहेत असें प्रतापसिंहास या वेळीं वाटले.' - मदरू २. [सं. कला]

**कळ** स्त्री. तीक्ष्ण व एकदम उद्भवणारे दुःख, वेदना; तिडीक; रग (डोके, शरीर, पोट यात). पहा : **चमक** (क्रि. उठणे, होणे.) : 'सराटे जेविं महागजातें। कळ लाउनि उभे करिती।'- श्रीधर (नवनीत पृ. २२२)(वा.) ० **पडणे** - १. चैन पडणे; विश्रांती मिळणे २. दम निघणे. 'सुजना जेंवि खळ, कळ क्षणहि पडों दे नरा न देवा त्या ।'- मोकर्ण ११.५४. (वा.) ० **येणे** - वेदना होणे. ० **सोसणे** - धीर धरणे; अडचण सहन करणे: 'ही जागा शेवटी गप्पा गडप करणार, त्यापेक्षा थोडी कळ सोस.' - लव्हाळी २०७. [ध्व.]

**कळ** स्त्री. **१**. युक्ती (उघडण्या-झाकण्याची, बंद करण्याची, खुले करण्याची); चावी; किल्ली; साधन; मर्म : 'तुका म्हणे कळ। पाय धरिल्या न चले बळ।'- तुगा ४४३. **२**. कला; खुबी; रचना; रहस्य; किल्ली (यंत्राची किंवा युक्तीची, रचनेची). या अर्थासाठी पहा : **कला. ३**. तराजूच्या दांडीचा मधला काटा : 'घाय हाणितां कळे जवळीं। पारडें उचलेल अंतराळीं।'- हरि ३०.८६.[सं. कला] (वा.) ० **दाबणे- १**. कमान दाबणे; मूलस्थान दाबणे; ठिकाण, किल्ली यांना हात घालणे. २. (ल.) मर्मस्थानी स्पर्शणे; वश होईल असे करणे; ज्यामुळे आपले काम होईल अशी युक्ती करणे. ० **फिरवणे**- एखादी गोष्ट साधण्यासाठी गुप्तपणाने योजना आखणे : 'तोच कळ फिरवणारा होता.'- कलंदर ३५१.

**कळ** स्त्री. **१**. भांडण; कलागत तंटा; खोडी [ क्रि. काढणे, लावणे.] : 'ऐसें गोत्रचि दोहीं दळीं। उदित जालें असे कळीं।'- ज्ञा १.१८४. **२**. कुरापत; भांडणाचे कारण (क्रि. काढणे.) : 'आम्हासि ग्रह नाहीं अनुकूळ। नसती उत्पन्न होते कळ।' - शनि १८२. [सं. कलि]

**कळ(ळं)क** पु. १ मोठ्या जातीचा भरीव किंवा पोकळ बांबू, टोकर, वेळू. २. एक मोठा कळक घेऊन त्याला प्रत्येक पेरावर फुटलेल्या फांदीचे टोक पाय ठेवण्यापुरते वीतभर राखून ठेवून तोडतात आणि त्या लाकडाचा उपयोग उंच झाडावर चढण्यासाठी शिडीसारखा करतात असे लाकूड. (को.)

स्त्री. (कळंक) बांबूचे बेट; जाळी.

**कळकट** न. १. कलंक; मळ; गंज; तांब्या वगैरे तांब्याच्या भांड्यावर आंबटाचा स्पर्श झाला असताना उत्पन्न होणारा हिरवट विषारी पदार्थ. २. घाण (कपडे, भांडी यांवरील). [त. कळंगम][सं. कलंक]

वि. खराब; दूषित; मलीन .

**कळकट** स्त्री. कुळकट; वंशावळ; वंशवृक्ष : 'या हरदूजणांची कळकट पाहिली हर नाईक देश (देसाई) साळुंख्या रायापैकी'- पाक्षज्ञाइखं १.२६.

**कळकटा** वि. भांडखोर; कलह करणारा : 'ज्यासी त्यासी कळकटा। स्वयें सदाचा चोरटा।'- दास १९.३.९. [कळ = भांडण]

**कळ(ळं)कणे** अक्रि विषार लागणे; हिरवे होणे; विटणे; बिघडणे; गंज चढणे; मलिन होणे; होणे (भांडे, आंबट पदार्थ).[सं. कलंक]

**कळकर** क्रिवि. (काच किंवा कोणताही ठिसूळ पदार्थ) फुटण्याचा आवाज होऊन. [ध्व. कल् = आवाज करणे]

**कळकळ-ळा** स्त्री. पु. १. मनापासून काळजी, वेध; आस्था; उत्सुकता. २. मनाला येणारा द्रव; कळवळा; दया (क्रि. वाटणे, असणे) [सं. कल् = जोडणे] [क. कळकळिके] (वा.)० **करणे** - बोंब मारणे.

**कळकळ** स्त्री. भांडणातील आवेशाचे व ओरडून केलेले भाषण; गोंगाट. पहा : **कलकल** [ ध्व. सं. कल् = आवाज करणे]

**कळकळणे** अक्रि. १. तापणे; संतप्त होणे (उन्हाने, सूर्याच्या उष्णतेने); उकाडा होणे; धगधगणे. २. फिरणे; हलणे; तळमळणे (उन्हाने); उकळी फुटणे; बुडबुडे येणे (उकळत्या पाण्याला); सळसळणे. ३. अतिशय दुःख होऊन क्षुब्ध होणे; तळमळणे; व्याकूळ होणे; त्रासणे (आत्मा, जीव); पोटात कालवणे (दया, कीव येऊन); द्रव येणे; हळहळणे : 'हितरत गुरू मन पाहुनि गत सद्वृत्ता मुलास कळकळतें।'- मोभीष्म १२.४३. ४. ढवळणे; उमळणे (अकर्तृक प्रयोगी उपयोग). ५. अतिशय भूक लागणे; खाखा सुटणे, करणे. ६. गरजणे; ओरडणे; मोठ्याने, उंच सुरात बोलणे (भांडणात). [ध्व. सं. कल्]

**कळकळवणी** न. निवळ पाणी; पुळपुळवणी. पाणी मिसळलेल्या दुधाला, ताकाला म्हणतात. (को.)

**कळकळी, कळकळीत** पहा : **किळकिळी, किळकिळीत**

**कळकळीत** वि. १. कळवळा आलेला. २. भडकलेला.

**कळकळ्या** वि. १. रागाने, ओरडून मोठ्याने बोलणारा; तणतणणारा. २. कळवळ्याने बोलणारा.

स्त्री. अव. पहा : **किळकिळ्या** [ सं. कल् = आवाज करणे]

**कळकी** वि. कळकाचे, बांबूचे केलेले (टोपली, दुरडी वगैरे जिन्नस).
**कळकी कागद** पु.कळकापासून तयार केलेला पांढरा शुभ्र व उत्तम प्रकारचा दौलताबादी कागद.
**कळकी नारायण** पु. अतिशय उंच मनुष्य; ताडासारखा उंच, मनुष्य.
**कळकी बाण** पु. बांबूच्या नळकांड्यात दारू ठासून केलेला बाण.
**कळकुटा** वि. कळ लावणारा; भांडण जुंपवणारा : 'यशोदाबाई कृष्ण तुझा कळकुटा.'- जसा २१४. पहा : **कळकटा**
**कळकुंबा** वि. दांडगा; मजबूत.
**कळ(ळं)कूट** न. बांबूचा लहान तुकडा.
**कळक्या ऊस** एक प्रकारचा ऊस. हा फार टणक असून यात रस थोडा पण फार गोड असतो.
**कळखंड** पु. अतिशय लहान तुकडा; सूक्ष्म भाग : 'भिवई जाणो कामकोदंड। नयन बाणले कापखंड। पातीं पातरिले कळखंड। अंजनाचे॥' - कथा ५.१६.१८०. [सं.कला+खंड]
**कळगज** स्त्री. धुवणी (तांदूळ धुतलेले पाणी). (तंजा.)
**कळगा** पु. १. काच; बांगडीचा लहान तुकडा : 'हे व्यर्थ कांकणाचे दावितिल न समरसिंधुतट कळगे।' - मोसभा ७.९. २. मोडतोड झालेले सामान. (व.) [सं.कल्=आवाज करणे]
**कळगा** वि. भांडखोर; कळलाव्या.
**कळगा** पु. (बेने इस्रायल) अंगी; अंगवस्त्र : '(महाराणीस) आपल्या मुलीचा कळगा बक्षीस देऊन तिची पीडा टाळणे.'- बेने १७.
**कळगोटा-चेट्या-तव्या** वि. कळलाव्या; आगलाव्या; कज्जेदलाल : 'कळचेट्या नारदमुनींच्या...' - जोफु ४०८.
**कळघोडा** पु. कळ असलेला लाकडाचा घोडा; यांत्रिक रचनेचा घोडा.
**कळघोडा** वि. हट्टी; दुराग्रही. (कु.)
**कळजी** न. (जनावराच्या) हृदयातील मांस.
**कळजे** न. वक्षस्थळ : 'कळजे फोडीत एक नखा' - गरा ७५.
**कळण** न. कडधान्याचा कट; कडधान्य शिजवल्यानंतर काढलेले पाणी; कढण : 'कुळथाचे पातळसे कळण'-स्वस्था १०२.(को.)
**कळणी** स्त्री. डाळीची बारीक कणी.
**कळण-णा** नपु. भरडलेल्या डाळीचा चुरा, चुरी : 'आणि सुरस उडिदांची घेती। कळणा विरस टाकिती।' - यथा १७.१३४.[सं. कला = अंश]
**कळणाकोंडा** पु. १. धान्याचा चूर व टरफल : 'देवा कळणा अथवा कोंडा आम्हां देई भुकेच्या तोंडा।' - तुकाराम पदें (नवनीत पृ. ४४८). २. गरिबांचे अन्न जसे कळणकोंड्यांची भाकरी आणि केण्याकुरडूची भाजी (दळणकांडण करताना निघणारी कणी, चुरा, कोंडा वगैरे यावरून) : 'जनाबाईंची कळण्याकोंड्याची भाकरी.' - जसा ५७९. ३. (ल.) दळणकांडणाचा धंदा.
**कळणे** अक्रि. १. समजणे; उमजणे; जाणणे : 'कळे साधूसी दुर्जनाची बुद्धि' - ज्ञा ७.९२. २. मनात भरणे, ठसणे. ३. झणझणणे; थरथरणे; चेतनायुक्त असणे; अनुभव, आठवण (विशेषतः दुःखाची) राहणे (शरीरावयव, इंद्रिय). [सं. कलन]
**कळणे** अक्रि. (ल.) ओढणे; वेटाळणे : 'वाखाणिती वेदपुराण लीला। जिणे तुझा दास बळें कळीला।'- निमा १.६१. [सं. कस्]
**कळ(य)णे** न. कडधान्याचा कट. (गो.) पहा : **कळण**
**कळत** क्रिवि. कळून; समजून; उमजून; ठाऊक असून; मुद्दाम.
**कळतनकळत** क्रिवि. १. अगदी थोडा; हळू; न समजेल अशा रीतीने; पक्के होय की नाही हे न सांगता येण्याजोगे. २. गफलतीने; चुकून; दुर्लक्षामुळे; प्रमादाने; अजाणता.३.न समजून; ठाऊक नसताना.
**कळतमूर्ख** वि. १. पढतमूर्ख; कळत असून मूर्ख २. लुच्चेगिरीने समजत नाही असे दाखवणारा.
**कळता-ती** वि. सज्ञान; वयात आलेले : 'दिसामासाने गुणाही वाढू लागली. पोरपण जाऊन कळती दिसू लागली.'- काआ ५९.
**कळत्र** न. स्त्री. पत्नी. पहा : **कलत्र**
**कळथी** स्त्री. कुळीथ; हुलगा. [गु.][सं. कुलित्थ]
**कळदिवा** पु. लामणदिवा; कळीचा दिवा : 'तो अधिकार्या कळदीवा लावुनी तेथ आला.' - लीच १.३८.
**कळदीवी** स्त्री. दिवटी; मशाल : 'तो घोडेयावरि बैसोनि कळदिवीयांसी आला'- लीचपू ५७.
**कळनेपुर** पु. मंजूळ ध्वनी काढणारे पैंजण :'रणभयासुरें तुरें सुडावी कळनेपुरांची '-उगी ४४४.
**कळप** पु. १. समुदाय; जमाव; समूह (पशु, पक्षी इत्यादींचा); झुंड; थवा. २. (ल.) पंथ; धर्म. ख्रिस्ती धर्मात चर्चच्या कक्षेतील लोकसमूहाला 'फ्लॉक' (कळप) म्हणतात यावरून : 'येशूच्या कळपांत तो गेला.' - हिंदु ११.२.३०. [सं. कला]
**कळपट, कळपटिया** वि. अस्वच्छ; घाणेरडा : 'माझ्या शेजारी एक कळपट माणूस बसला होता.'- कोसला २४०.
**कळपशुद्ध** वि. कळपामध्ये राहणारा; कळप सोडून न जाणारा.
**कळपा, कळपणे** पु.न. १. शरीरावरील सालपट; खपली; कवची; तुकडा; साल (भाजण्याने किंवा ऊन लागण्याने निघणारी). २. निघालेला तुकडा; खवला (गंजलेल्या लोखंडाचा); पोपडा; पापुद्रा : 'काळोखाचे कळपे निखळत असल्यासारखे' - डोह १६९. ३. दगडाची निघालेली कपरी; लाकडाची ढलपी, झिलपी.
**कळपातले गुरू** (ल.) दांडगा; उद्धट; अतिशय झोंड, खेडवळ असा माणूस; असंस्कृत माणूस.
**कळपुटी** स्त्री. मासळीच्या डोक्याचा केलेला एक खाद्यपदार्थ. (गो.)
**कळफलक** पु. टंकलेखन यंत्रावरील अक्षरवटिका असलेला फलक.
**कळभांड** पहा : **कळंभट**
**कळम** पु. कळंक; गंज. (गो.)
**कळमळ-ळी** स्त्री. वांती होण्यापूर्वी पोटात होणारी विकृती; मळमळ; उबळ; पोटात कालवणे; ढवळणे. [सं. कलमल]
**कळमळणे** अक्रि. पोटात ढवळून येणे; उमळणे. २. दयेने, मनाच्या कोमलपणाने कळकळणे; पोटात तुटणे.
**कळयारा** वि. हट्टी; दुराग्रही. (कु.)

**कळलावी** स्त्री. १. एक औषधी फूलवेल. हिला खड्यानाग. (को.) कलई, कळवी अशी नावे आहेत : '(कळलावीच्या) कांद्यात गर्भाशियास वेणा आणणारे द्रव्य असते.'- वनश्री ४७२. २. एक वनस्पती कंद. [सं. कलिहारि]

**कळलाव्या** वि. तंटे लावणारा; आगलाव्या; कळीचा नारद; कज्जेदलाल: 'असो नारद तेथूनि निघाला। बाणासुराचे दळीं पातला। वीर कांपले ते वेळां। म्हणती कळलाव्या आलारे।'- जै ८३.८४.

**कळव, कोळोव** पु. माडाचा कुंचा. (गो.)

**कळवण** स्त्री. मोठी झुंज : 'नराची दुसऱ्या एका नराशी लागलेली कळवण.'- डोह १४७.

**कळवणे** सक्रि. दोरीने बांधणे : 'तो (घोडा) कळविला ऐसा होए'- लीचपू ३१.

**कळवणे** क्रि. बातमी देणे; माहीत करून देणे; सांगणे.

**कळवळ-ळा-ळी** स्त्री. पु. स्त्री. १. कीव; द्रव; पोटात होणारी कालवाकालव; दयेचा उमाळा. २. खळखळ : 'योगिया अंतरीं अति निश्चल। नाहीं कळवळ कल्पना।'- एभा ८.५६. ३. आस्था; माया.

**कळवळणे** अक्रि. १. दयार्द्र होणे; कीव येणे; द्रवणे : 'रडे शिशु तयास घे कळवळोनि माता कडे।'- केका १२१. २. व्यथित होणे; दुःखाने कासावीस होणे; व्याकूळ होणे (विंचू चावणे, तिडिक उठणे इत्यादींमुळे). २. आपटणे, पडणे इत्यादींमुळे वेदना होणे; विव्हळणे. [सं.क्लव,क्लमथु]

**कळवंड-डा-डी** स्त्री. पु. स्त्री.१. गमतीची कुस्ती; झोंबाझोंबी; अंगचटीला जाणे (कुत्र्या - मांजराचे) : 'वाघाची कळवंड चाललिया.' - वामा ४७. २. भांडण; कलह : 'शिंदे-होळकर आले कळवंडी। मरणाची हुंडी।' - राला १०४. (वा.)० **पडणे** - कलह लागणे : 'सारांश पुढे (श्रीमंत-शिंद्यांत) कळवंडी पडाव्या ऐसा रंग दिसतो.'- ऐलेसं ६७१८.

**कळवंडणे** अक्रि. १. मोठमोठ्या आवाजात भांडणे; तंटा करणे; कज्जा करणे : 'लेको, रोज उठून कळवंडता का कैकाड्यासारखे ?' - फपा ३२. २. भांडणात किंवा आरडाओरडीत दुसऱ्याच्या अंगावरून पलीकडे उड्या मारणे; खेळात भांडणे (कुत्री, मांजरे इ. नी).[सं.कलह + हुंड]

**कळवंडाकळवंड** स्त्री. परस्पर भांडण, तंडण; साधारण भांडणतंटा. पहा : **कळवंड**

**कळवंतीण** स्त्री. नाचणारी व गाणारी स्त्री; नायकीण; कंचनी. कळवंतीण व कसबीण यात भेद आहे. कळवंतीण उभी राहून किंवा नाचत गाते पण कसबीण बसूनच गाते. तसेच कळवंतीण गीत, नृत्य इत्यादी कलांवर आपली उपजीविका करते, पण कसबीण उपजीविकेसाठी देहविक्रय करते. [सं. कलावंतिनी]

**कळवंतीण** स्त्री. बाजरीच्या पिकावरील एक किडा; पाखरू; फुलपाखरू; पतंग.

**कळवा** पु. विसवण नावाच्या मासळीचे पोर. (गो.)

**कळ(ळा)वा** पु. १. (घोडा वगैरे जनावराच्या) पुढच्या व मागच्या एकेका पायाला बांधलेली दोरी, वादी (जनावर कुरणात चरत असता दूर जाऊ नये म्हणून ही दोरी बांधतात). (क्रि. घालणे.) : 'पाठीवरि मोळी। तोचि कळवा पायीं तळीं।'- तुगा १५४२. २. कळव्याने जनावर बांधणे; जखडणे; खोडा घालणे. ३. (ल.). बांध : 'महनतबी न्हाईस आन मनाला कळवाबी घालीत न्हाईस.'- मळणी १२. [क. कळिवु = अडकवणे]

**कळवाकळव** स्त्री. १. सर्वत्र सांगणे; चोहोकडे कळवणे. २. याने त्याला, त्याने याला अशा रीतीने सांगणे; परस्पर कळवणे. [कळविणेचे द्वि.]

**कळवांतिणीचे दुःख** गर्मी; वेश्यासंगामुळे जडलेला रोग : 'तेथे तिकडील कळवांतिणीचं दुःख भरलं.'- सब ३५.(का.)

**कळवी** स्त्री. धान्य मोजण्याचे माप; सोळा मण; मुख्य सरकारी खजिन्यातून खोटे किंवा बदनाणे म्हणून परगण्याच्या खजिन्यात परत आलेली रक्कम, पैसा; खोटे नाणे.

**कळशी-सी** स्त्री. १. लहान घागर; केळी. २. भिंतीवर किंवा इमारतीवर गोळा, काठी इत्यादींवर कळसाप्रमाणे असणारी नक्षी. ३. तबला. (गो.) [सं. कलश]

**कळशी** स्त्री. धान्य मोजण्याचे परिमाण. सोळा मण म्हणजे एक कळशी. 'सोळा मण धान्याला कळशी म्हणत.'- सांज २१.

**कळस** पु. १. देऊळ, अंबारी, देव्हारा, तंबूचा खांब, छपरांची टोके इत्यादिकांवर लावलेला सुशोभित किंवा रंगीत असा लाकडाचा, दगडाचा, बांधकामाचा वगैरे नक्षीदार कलशाकार भाग. २. घुमटी; शिखर. ३. (ल.) उत्तरोत्तर होणाऱ्या वृद्धीचा (मोठेपणाचा, चांगल्या किंवा वाईट कृत्याचा) अतिरेक; पराकाष्ठा; शिरोबिंदू; शिखर. ४. एखाद्या कामाचा शेवट, अंत; पलटीचा प्रारंभ; 'झाला भक्तीचा कळस। आले वसतीस दोष।'- तुगा ४९२. ५. मानेचा कळस, शिखर; मस्तक; डोके. ६. कलश; लहान घागर (मातीची किंवा धातूची). (वा.) **(मानेचा) कळस ढळणे** - मरणोन्मुख होणे. ० **होणे** - देऊळ वगैरे इमारतीवर कळस ठेवला म्हणजे बांधकामाची पूर्णता झाली असे होते. त्यावरून पूर्ण वैभवाला चढणे; जोर, तीव्रता, अतिरेक होणे; विस्तार वगैरेची पूर्ण वाढ होणे (हा शब्दप्रयोग चांगल्या व वाईट अशा दोन्ही अर्थी वापरतात). जसे : - वैभवाचा - दुःखाचा कळस झाला. **कळसास पोचणे** - पराकोटीला जाणे; अतिरेक होणे: 'मुलांच्या सुंदर नावांचे उद्धट अपभ्रंश करण्याची कला आमच्या कोकणात कळसास पोचलेली आहे.'- एल्गार ३७. **कळसा येणे** - यशस्वी होणे. **कळसास येणे** - संपणे : 'कळसा आलें निरूपण। प्रेम सज्जन जाणती।' - एरुस्व १८.६०.

**कळसणे** उक्रि. गुप्तपणे पाहणे; हेरणे; बारीकपणे व जिज्ञासूपणे पाहणे; जिज्ञासापूर्वक व चौकसपणाने तपासणे; सूक्ष्म रीतीने व लक्षपूर्वक पाहणे; कळाशीने पाहणे. [सं. कला+ईक्ष]

**कळसपट्टी** स्त्री. (स्था.) कळसांची नक्षी असलेली पट्टी, पान : 'माडीला कळसपट्टी सोनियाची।' - लोक २.६८.

**कळसपाक** पु. पांढऱ्या वस्त्रावरील एक प्रकारचे रंगीत वेलपत्ती (ओजीच्या आकाराची, उलटसुलट कळस असलेली) : 'नाना मछलीबंदरें। कळसपाखें दर्शनासी आलीं।' - सप्र ९.२८.

**कळसपाकी** वि. कळसपाक काढलेले (कापड, पागोटे); विशिष्ट नागमोडी रंगीत वेलपत्तीचे (वस्त्र, बायकांचे पातळ); कळसपाक या गावी तयार होणारे कापड : 'वस्त्रे मंदील दुपट्टा, झगा तिवट कलसपाकी बांधावयाचे पदक' - पेद ३३.३४०.

**कळसवणी** न. १. (लग्नात) वधूवर न्हातेवेळी नवऱ्यामुलाच्या अंगावरील जे पाणी मुलीच्या अंगावर पडते त्याला म्हणतात : 'नंतर न्हाताना कळसवणी वगैरे घातले' - पलको १६६. (सामा.) नवऱ्याचे उष्टे पाणी; एक ग्रामाचार. (वा.) ० **मानवणे** - लग्न अंगी लागणे; लग्नानंतर बाह्यरंगात लक्षणीय असा बदल होणे. २. (ल.) नवेपणाचे तेज, ऐट : 'दादर त्यावेळी नुकतेच शहरीपणाचे कळसवणी चढवीत होते.' - माजी १९१०. [सं. कलश + वन = पाणी]

**कळसा** पु. १. तोटीची, मातीची मोठी घागर, घडा. कोकणात नारळी वगैरे झाडांना पाणी घालण्यासाठी कळसा वापरतात : 'कुंभाराकडून कळसे व केळी आणून' - गार १५५. २. धातूची घागर. (राजा.) ३. (कुंभारी) ज्यापासून मडकी वगैरे करतात त्या मळलेल्या मातीचा ढीग. ४. अक्षयतृतीयेच्या दिवशी ब्राह्मणाला दान देण्याचा मातीचा कलश. (ना., व.) ५. शुभकार्याच्या प्रसंगी वापरण्यात येणारी मातीची लहान घागर; कलश. (व.) [ सं. कलश]

**कळसाध्याय** पु. अखेरचा अध्याय.

**कळसुंचे** सक्रि. १. मिसळ; कालवणे; ढवळणे. २. नारळाचा कीस तव्यावर परतणे.

**कळसूत्र** नं. १. बाहुली नाचवण्याची दोरी, साधन. पहा : **कळसूत्री बाहुले**. २. (ल.) मुख्य भाग; मध्यवर्ती कल्पना; मुख्य आधार; ज्यावर सर्व हालचाली अवलंबून असतात असा भाग : 'जी साऱ्या नाटकाचे जणों काय कळसूत्रच आहे.' -नि ५३७. ३. खरा चालक अदृश्य राहून निर्जीव वस्तू स्वयंप्रेरणेने चलनवलन करतात असे भासवण्याची युक्ती. [ सै.]

**कळसूत्र** न. सुरुंगाची दोरी.

**कळसूत्री** वि. कळसूत्राची; कळसूत्रासंबंधी.

स्त्री. (ल) क्रांती; गुप्त हालचाल; अचानक झालेली उलथापालथ : 'कशी एकाएकी झाली धन्य कळसूत्री।' - ऐपो ४०४.

**कळ(ळा)सूत्री बाहुले** १. बाहुल्यांचे अवयव जसे पाहिजेत तसे फिरावेत म्हणून युक्तीने त्यांच्या अंगातून दोरे काढून त्या दोऱ्याच्या योगाने वाचविल्या जाणाऱ्या बाहुल्या. प्राचीन काळी कळसूत्री बाहुल्यांच्या खेळाचा प्रचार सर्वत्र असे. 'सूत्रधार' हा शब्दही त्यावरून आला. २. (ल.) स्वत:ला काही ठाम मत नसून दुसऱ्याच्या मताने वागणारा माणूस; कोणाच्या तरी कह्यात राहणारा, परावलंबी माणूस : 'बाजीरावाचें कळसूत्री बाहुलें आपले हातीं बरें सांपडलें असें बाळोबास वाटलें.' - अस्तंभा १९.

**कळसो** पु. मोठी घागर. (कु.)

**कळहणे** अक्रि. भांडणे : 'ऐसे दोघे कळहाउ लागले' - पंचो १५९.९

**कळहंस** पु. एक प्रकारचा हंस : 'आपुला कळखी : कविता कळहंसाते पढवी -' उगी २३.

**कळहारी** स्त्री. अंत:करण : 'उगती कटाक्षसवाँचिया पुटी : कळहारीये जीवाचिये' - उगी ४५३.

**कळज्ञ** वि. १. सूज्ञ; जाणता : 'श्लाघ्य हा तुज नसें कळज्ञा।' - अकळ हरिराज मुग्दचार्यांचे भाषांतर. २. कलावान. [सं. कला + ज्ञ]

**कळंक** पु. कलंक; डाग; बट्टा; काळिमा; कीट; गंज. पहा : **कलंक** 'तयाचिये दिठीचा झणें कळंकु। लागेल तुझिया प्रेमा॥' - ज्ञा ६.११५. पहा : **कळकट** [सं. कलंक]

**कळं(ळ)कट** वि. १. गंजाने कळकलेले; विषार लागलेले; मलिन; खराब; अस्वच्छ : 'गिरण्यांच्या हवेनं काळवंडलेला कळकट चेहरा.....' - धाधो २७. २. घाणेरडे; वाईट गुण ज्यात आहेत असे; दूषित; पापी (माणूस, चाल, वर्तन). [सं. कलंकित]

**कळं(ळ)कटणे** अक्रि. १. किंचित कळकणे; हिरवे होणे; गंजणे. २. घाणेरडे होणे; नासणे : 'कळकटेना हें नामपियुख।' - दाव ७८१.

**कळंकी** स्त्री. बाबूंची एक जात; कणक. (गो.)

**कळंकी** पु. वि. पातकी. पहा : **कलंकी** : 'गेला तरी जावो सुखें नरकासी। कळंकी याविशीं शिवो नये।' - तुगा ३७४४.

**कळंकी नारद** भांडखोर, कळलाव्या, भांडण लावणारा माणूस.

**कळंकी नारायण** लंबाट्या; शेलाट्या; ढंगाळ्या.

**कळंग** पु. भिल्ल स्त्रियांच्या कानातील एक दागिना: 'कर्णी कळंगु लेइली सुंदरी। केतकीदलें शोभती शिरीं।' - कथा २.१५.१३७.

**कळंजणे** अक्रि. १. अतिशय भुकेमुळे किंवा रडण्यामुळे थकून जाऊन व्याकूळ होणे (मूल इ.); मूर्च्छित होणे. (कों.) २. खिन्न होणे; काळवंडणे : 'तिचे मन एकाबाजूने जसे मोहरून गेले होते तसे दुसऱ्या बाजूने कळंजून गेले होते.' - पाषाण २४४. [सं. कलंज]

**कळंजणे** सक्रि. घरे पाडणे; व्यथित करणे; टोचणे : 'पण त्या वाळत चाललेल्या धिप्पाड माणसाची मनाला कळंजून टाकणारी छाया माझ्याबरोबर सारखी येत होती.' - उअं ६८.

**कळंजतूक** वि. अतिशय सुढाल व वजनात भारी असे; औटभार वजनाचे (मोती वगैरे) : 'गवारा हातीं दीजे कळंजतूक मोतीं।' - भाए ६७४. [सं. कलंज = परिमाणविशेष]

**कळंजे** न. अपयश. (गो.)

**कळंब** पु. कदंब. आकाराने मोठे रुंद पानाचे झाड. यास गोंद येतो. [सं. कदंब]

**कळंब** पु. उमाळा; उकळी; पूर : 'रघोजी रुस्तुमराव जखमी तेथेच होता. त्यालाही दु:खाचा कळंब आला.' - ऐपो १५.

**कळंबी** स्त्री. मागची डोलकाठी. पहा : **कलबी, कलंबी**

**कळंबी** स्त्री. वाळवी : 'कळंबी लागे हिरवती तस्करा घालोनि खान।' - क्रिपु २८.७.

**कळंबे** न. कुत्र्याची छत्री; कुत्र्याचे मूत. पहा : **अळंबे**

**कळंभट** वि. भांडकुदळ : 'निशंक निलाजिरा कळंभट। जगभांड विकारी।' - दास २.३.३२.

**कळंभा** पु. भांडण; तंटा : 'बोलें इंद्रिया लागे कळंभा।' - ज्ञा ६.१६. [सं. कलह+भंड]

**कळा** पु. १. फुलाची मोठी कळी; कोरक; कळीचे मोठे स्वरूप : 'तो कनकचंपकाचा कळा।' - ज्ञा ६.२५७. २. केळफूल : 'पाहतां जैसा केळीचा कळा। स्वयें विकासे फलांदळां।' - एभा २.५७७. ३. चौफुला वगैरेत शोभेसाठी कळीच्या आकाराचे हातात धरण्यासाठी जे बोंड बसवतात ते. ४. बुगडीचा वरचा कळीसारखा भाग. [सं. कलिका]

**कळा** पु. कलह.

**कळा** पु. कौल; प्रसाद : 'अंबा आज अगदी आनंदात दिसली व मला उजवा कळा दिला.' - मस्थि १८३.

**कळा** पु. १. ज्यातून ज्योत बाहेर पडते तो स्टोव्हचा भाग : 'स्टोव्हचा कळा (बर्नर) वरचेवर बिघडत नाहीं.' - पाक ४२. २. ज्यातून दाढ किंवा सुळा बाहेर पडतो असा फुगीर भाग : 'सुळ्यांच्या मुळाशी नंतर येणाऱ्या नव्या सुळ्यांचे कळे असतात.' - भास ३०.

**कळा** स्त्री. १. किरण; प्रकाश : 'जैसें शारदीयेचे चंद्रकळे। माजीं अमृतकण कोंवळे।' - ज्ञा १.५६. २. तेज : 'कांती तैसें पिंडाचेनि आकारें। तें कळाचि कां अवतरें।' - ज्ञा ६.२५०. ३. चंद्राचा सोळावा अंश, त्यावरून १६ ही संख्या : 'चंद्रमा कळीं धाला। न दिसे कोणें आंगीं वोसावला।' - ज्ञा १५.३०३. [सं. कला] (वा.) ० **खाणे** - अब्रू घालवणे; लाज उत्पन्न करणे : 'या नाईकिणींना बलावले म्हणजे त्या प्रवीण नसतात व कचेरीची कळा खातात' - ऐकोपुर. ० **जाणे, लोपणे** - रया जाणे; अवनती होणे; दुर्मुखलेले दिसणे; निस्तेज होणे : 'त्याच्या अठरा कारखान्याच्या गेल्या कळा।' - ऐपो १४२.

**कळा** स्त्री. १. हालचाल; चलनवलन : 'शरिरांतुनिया प्राण गळाल्या लोपति सर्व कळा।' - रत्न ४.३. २. प्रकार : 'बालक नाचे नाना कळा।' - एभा ३.५९९. ३. क्रीडा. [सं. कला]

**कळा** स्त्री. १. स्थिती : 'काय भाव एक निवडूं निराळा। जाणसी तूं कळा अंतरींची।' - तुगा १६१३. २. देखावा; सोंग; दशा : 'दाउनि वैराग्याची कळा। भोगी विषयांचा सोहळा।' - तुगा २८३५.

**कळा** स्त्री. १. युक्ती : 'कळा तुजपाशीं आमुचे जिवन। उचित करून देई आम्हां।' - तुगा ९. २. चातुर्य; करणी : 'पाव्यामाजीं रागज्ञान। केल्या अति मधुर गायन। तो पाव्याचा नव्हे गुण। कळा जाण गात्याची।' - एभा १०.२६७. ३. ज्ञान : 'कस्तुरीचा वास घेईल काऊळा। तरिच ती कळा कळे तया।' - ब ९८.

**कळाईत** वि. कुशल; कलावान (मनुष्य).

**कळाकळा करणे** सक्रि. त्रासदायक व डोके उठविणाऱ्या हेकेखोरपणाने भाषण करणे; भीक मागणे; कंटाळा येईल अशा रीतीने पुनःपुन्हा सांगणे. [ध्व.]

**कळाकळी** स्त्री. १. मर्म; कौशल्य. २. लढत : 'तेजी जुंझाची कळाकळी। ते देशांचि वेगळी।' - शिव ८७९.

**कळाकांती** स्त्री. (शरीरावरील, चेहऱ्यावरील) चमक; सतेजता; तेज; टवटवी.

**कळाकुशलता, कळाकौशल्य,** स्त्री. न. कसब व चातुर्य; नैपुण्य व करामत; शहाणपणा व बुद्धी.

**कळाकुसरी** स्त्री. अव. १. (कुसरी हा शब्द लुप्त झाला असून बहुधा कळा शब्दाबरोबर अधिक जोर येण्याकरिता योजतात.) चातुर्याची कल्पना; युक्ती; करामत; कुशलतेची रचना; शहाणपणाची योजना. २. कौशल्य; कसब; कारागिरी (गाणे, चित्रकला इत्यादीतील) : 'पतिच्या संगावांचूनि सर्व स्त्रीच्या वृथा कळाकुसरी।' - मो ३. बारीक नक्षीकाम (जीगचे काम, भरतकाम इ.).

**कळाकुसळ** नि. कलांत कुशल : 'कैसा रूपें गुणें तुम्ही सांगा वो गोपाळा : तुम्ही कळाकुसळ सकळा' - हपा ६०.

**कळाखाऊ** वि. १. एखाद्याच्या मोठेपणाला, अब्रूला कालिमा आणणारा. २. जो दुसऱ्याला मूर्ख बनवतो, घोटाळ्यात, गोत्यात आणतो तो : 'घरी कळाखाऊ अबला नसावी अशी। अवघा वेळ रागामधी नागीण घुसघुशी।' - पला ८०. ३. (व्यापक) शोभा येण्यासाठी, सौंदर्यासाठी कोणतीही गोष्ट केली असता तिचा ज्यावर परिणाम होत नाही अशी व्यक्ती (विशेषतः स्त्रिया व मुले); घाणेरडा; कळाहीन; मळकट.

**कळातीत** वि. निर्गुण (परब्रह्म). [सं. कला + अतीत]

**कळातीन** स्त्री. कलावंतीण. (व.)

**कळातुटी** स्त्री. चंद्राच्या कलांचा क्षय : 'तया (चंद्रा) आति कळातुटी : अस्ता जाए सेवटी' - सव ३६.२.
वि. ज्याची कळा क्षीण होत जाते असा : 'परि तो (चंद्रु) कळातुटी पाहावा : कृष्णपक्षी' - ऋम ७२१.

**कळाधर** वि. कलावान; पंडित; विद्वान : 'जितुके कळाधर पृथ्वीवरी। जे जे आले शाहू नगरीं।' - निमा (आत्मचरित्र) १. १०६.

**कळानष्ट** वि. घाणेरडी : 'तिची राहणी कळानष्ट.' - पासंग १२०.

**कळानिधी** पु. १. चंद्र. २. ज्याच्यापाशी पुष्कळ कला आहेत अशी व्यक्ती.

**कळान्यास** वि. पुष्कळ कलाकौशल्याने बनवलेले; नक्षीदार : 'पांचा आंगोळियां विन्यास। कळान्यास मुद्रिका।' -एरुस्व १५.५३.

**कळापात्र** वि. कळावान; कलावंत : 'विद्यापात्रें कळापात्रें। विशेष गुणांचीं सत्पात्रें।' - दास १.८.२३.
न. कलावंतीण : 'तों सभेसी आलीं कळापात्रें। श्रीची लीला वर्णिती विचित्रें। - हरि २९.१५१.

**कळाफूल** न. १. औषधासाठी वाळवलेली फुलाची एक कळी. २. कोणतेही कळीच्या आकाराचे फूल.

**कळामोगरा** पु. (सोनारी) मोगऱ्याच्या फुलाच्या कळीसारखा आकार दिलेला कोणत्याही दागिन्याचा भाग. पहा : **कळी**

**कळाव** पु. उशीर; वेळ. (गो.) [सं. कालव्यय]

**कळावती** स्त्री. कलागत; भांडण : '..... त्यामध्ये व पंडित मशारइलेमध्यें कळावती जाली.' - ऐसंसाखं १.११९.

**कळावा** पु. पायबंद. पहा : **कळवा** : 'भीम कसा विक्रमगति सेवक झाला ह्या कळावासा।' - मोद्रोण १२.२६. [क.]

**कळाविद** वि. कलेचे ज्ञान असणारा, ज्ञानी कलावान; कुशल : 'ते कळाविदीं आइकावी। अवधान देओनी।' - शिव ६५१. [सं]

**कळावी, कळाविया** स्त्री. १. स्त्रियांच्या हातातील कळेदार दागिना : 'करीं कळाविया चुडे कंकणें। मुद्रिका रत्नें सुलक्षणें।' - कथा ५.१६.१८३. २. हत्तीच्या दातांना बसवलेल्या सोन्याच्या सुळी, शेंबी, टोपण : 'पृष्ठी मिरविलीं गुढारीं। दंतीं खोविल्या कळाविया सुरी।' - कथा ४.९.४६. ३. कोपरापासून मनगटापर्यंतचा भाग : 'आंगी रत्नांची अळंकरणें; कळावीयांसी माल्हाडी वाति कांकणे' - नरुस्व ८४.

**कळावो** पु. मिठागरातील माती. (गो.)

**कळाशास्त्र** न. शिल्पकला : 'की बहुबाळाणा घडली भांब; कळाशास्त्राची' - नरुस्व ४१८.

**कळाशी** स्त्री. मुख, हात, पाय आणि वाद्यघोष यांसह नृत्य : 'मोटका कळाशी करी।' - भाए ४५९. [सं. कला किंवा कलशिका]

**कळाशी-सी** स्त्री. १. दोन लाकडे किंवा दगड यांचा एकाशी एक घट्ट व नीट बसवलेला सांधा, संधी. २. सांध्याचा बेमालूम जोड; एकसंधीपणा. ३. असा सांधा करण्याकरिता दोन्ही बाजूंचा जोडाशी येणारा सफाईदार केलेला पृष्ठभाग : 'सांध्यांत दर्शनी बाजूपासून निदान तीन इंच कळाशी असावी.' -मॅरट ३४. ४. कळाशी करण्याचे हत्यार; फावडी; आखणी; खतावणी. ५. (सुतारी) खिळा असलेली बारीक पट्टी. हिने लाकडावर खोल रेघा काढतात. (गो.) ६. नांगराच्या दातांना फाळ पक्का बसवण्याकरिता घालायची लोखंडी कडी. (व.) ७. कायमपणा; बेमालूमपणा : 'अझुणिहि न वचे हा चंद्र अस्ताचलासी। यदुपतिविरहाची बैसवीली कळासी॥' - सारुह ३.११०. [सं. कलायस]

**कळाशी-सी** स्त्री. कौशल्य; हुशारी. पहा : **कळास** : 'युक्तीने, कळाशीने मोर्चेबंदी केली.' - भाब १५.

**कळाशीदार** वि. गुळगुळीत.

**कळास-सू** वि. घाटदार; डौलदार : 'मध्य कळासू नेटका। क्षुद्र घंटिका मेखळे।' - एभा ११.१४८१.
पु. कौशल्य : 'तों तांडवमिसें कळासु। दाविसी तूं॥' - ज्ञा १७.८.

**कळास काम** कळाशीचे काम; किंचितही फट राहू न देता जोडणी केलेले पक्के बंद काम; कौशल्ययुक्त काम; सुंदर घडकाम. [सं. कौशल्यकर्म]

**कळासणे** सक्रि. १. सांधा जोडणे; एकत्र करणे. २. (ल.) जखडणे; घट्ट करणे, बांधणे : 'कर्माच्या वज्रगांठी। कळासे तो॥' - ज्ञा १८.३९२. ३. फट न ठेवता बांधकाम करणे; घट्ट, मजबूत जोडणी करणे; पक्के बंद करणे : 'सर्व द्वारीं कवाडें। कळासती।' - ज्ञा १८.११२. ४. निग्रह, निरोधन करणे : 'बाहेरी धीट जैसी। दाटुगा पति कळासी।' - ज्ञा १३.५०६. ५. कोंडणे, बंद करणे : 'जरि संयमाचीं अखंडें। सर्वद्वारीं कवाडें। कळासति' - ज्ञा ८.११०.

**कळासा** पु. शिखर : 'वरि कमळकळिकांचे कळासे : माजि सोने केतकीचीं हंसे' - नरुस्व ४३३.

**कळासूत्र** पहा : **कळसूत्र**

**कळास्य** पु. कळाशीने केलेली घडण; बेमालूम रचना, बांधणी; कळाशी : 'पाहतां मंडपाचा कळास्य। तेणें हर्षे परम हास्य।' - स्वानु ८.५.४९.

**कळाहीन** वि. घाणेरडे; निस्तेज.

**कळाळहाट** पु. मद्याचे दुकान : 'आवडा एका खाटिकहाट : तेथचि कळाळहाटु' - स्थापो ८१.

**कळाळी** स्त्री. भडका.

**कळांतर** न. व्याज. पहा : **कलांतर** : 'पै कळांतर गांठी बांधिजे।' - ज्ञा १७.२८७.

**कळिक(का)टा** पु. भांडण; कलह : 'विधि निषेधांचिया वाटा। दाविता हाचि दिवटा। बंधमोक्ष कळिकाटा। शिष्ट हाचि॥' - अमृ ६.५.
वि. भांडखोर; कलह लावणारा. [सं.]

**कळिका** १. पहा : **कलिका** : 'परि कळिकेमाजी सांपडे। कोंवळिये॥' - ज्ञा १.२०१. २. (ल.) ज्योत (दिव्याची) : 'जैसी दीपकळिका धाकुटी। परी बहु तेजातें प्रकटी।' - ज्ञा २.२३८.

**कळिकाळ** पु. १. कलियुग; कलियुगातील काळ. २. (ल.) अनिष्ट, संकटमय वेळ; विपत्तीचा समय : 'त्यासी कळिकाळाचें नाहीं भय।' - हरि १८.८. ३. यम.

**कळिकोळिगा** पु. फुलाच्या कळीत गुंतलेला भुंगा : 'उदैजत पराबिंबी : कळिकोळिगा राहिला कोंभीं' - ऋव ५६९.

**कळित** वि. ग्रासलेला; पीडलेला. [सं]

**कळिता** वि. १. ग्रास करणारा; खाणारा : 'पैं कळितयांमाजीं महाकाळ।' - ज्ञा १०.२४८. २. कळ चालवणारा, फिरवणारा; नियामक : 'जो जगाचा नियंता। त्या काळाचा कृष्ण कळिता।' -एभा ६.३२६.

**कळिमळ** पु. कलियुगातील पाप : 'तंव तुमचेनि दर्शनें तत्काळ। नासती सकळ कळिमळ।' - एभा २.२४३.

**कळियोग** न. कलियुग : 'जैसा कळियोगाचां रोगावां : रुषेश्वरीं काढिल काढावा' - ज्ञाप्र १०४४.

**कळिरव** पु. पक्ष्यांचे कूजन : 'वरि सुहावे कळिरव : पक्षियांचे' - ऋव ७२.

**कळिलाउ-वा** वि. कळलाव्या; आगलाव्या; भांडणतंटा उपस्थित करणारा : 'तंवं भणती हा कळिलावा आला।' -शिव १३१.

**कळि(ळी)वर** न. मृतदेह : 'आतांचि पडो अथवा राहो। मिथ्या कळीवर।' - दास ७.१०.९०. पहा : **कलेवर** [सं. कलेवर]

**कळिसी** स्त्री. लहान घागर : 'मंद सुयोधनदुर्मतिविषयवल्ली सेकमूळ तूं कळिसी।' - मोकर्ण ३०.८४. [सं. कलश]

**कळिंद्री** वि. दरिद्री; दळभद्र्या. पहा : **कलंदर** (गो.) [फा. कलंदर]

**कळी** स्त्री. १. भांडण; तंटा; कज्जा; कलागत : 'विकत कळी जयानें घेतली आजि मोलें।' - सारुह ३.७८. २. कलियुग; चालू युग : 'ऐसें युगीं परी कळीं। आणि महाराष्ट्र मंडळी।' - ज्ञा १८.१८०३. ३. युद्ध :

'ऐसें गोत्रचि दोहीं दळीं। उदित जालें असे कळी।' - ज्ञा १. १८४. [सं. कलि] (वा.) **कळीला येणे** - भांडायला लागणे : 'पण तो कळीला आला.' - ययाती २९८. **कळीवाचून काटा निघणे** - भांडणतंटा किंवा त्रासावाचून अनिष्ट गोष्ट नाहीशी होणे : 'कॉलेजात विद्यार्थ्यांची मनस्वी गर्दी होत असते व ती कमी व्हावी यासाठी कॉलेजची फी १५ रूपये करावी म्हणजे आपोआपच कळीवांचून काटा निघेल अशी कल्पना आहे.' - मनोरंजन पु. ७. भाग ८.

**कळी** स्त्री. (वस्त्रोद्योग) सात चटके एकत्र असणारी सुताची लड. [सं. कलिका]

**कळी** स्त्री. १. कलिका; फूल उमलण्यापूर्वी पाकळ्यांची परस्परात संकोच झालेली स्थिती; मुकुल; कोरक. २. कमळाच्या कळीच्या आकाराचे एका जातीचे हस्तिदंती किंवा लाकडी भांडे (यात केशर इत्यादी ठेवतात.). ३. बुंदीच्या लाडवातील दाणा. ४. लहान खडा. (भाजलेल्या चुनखडीचा, मिठाचा इ.) जसे :- चुनकळी : 'तुका म्हणे लवणकळी। पडतां जळीं तें होय।' - तुगा २७१९. ५. कळीच्या आकृतीचा खायचा विडा - पट्टी; कळीदार पट्टी. ६. अंगरख्याच्या घोळाच्या दोन त्रिकोणी भागांपैकी मागील भाग (हे दोन्ही भाग व आगा मिळून घोळाची बाजू होते.); अंगरख्याच्या कापडाचे त्रिकोणाकार असलेले तुकडे. ७. सदऱ्याच्या बगलेत किंवा चोळीच्या बगलेत लावलेले अनुक्रमे चौकोनी व त्रिकोणी तुकडे; बगल झाकणारा कपडा. ८. मराठेशाही पागोट्याच्या पुढील भागी असलेला कळीच्या आकृतीचा पीळ. ९. एखाद्या काटकी भोवताली गुंडाळलेले सुमारे तीन मासे वजनाचे रेशीम, रेशीम दोरा. १०. लहानशा काटकीला माती लावून भोवती बेगड गुंडाळून तयार केलेला तुकडा; बेगड लावलेली मातीची, कळीच्या आकाराची गोळी बसवलेली असते तो कळस. ११. चौपाखी छपराची तिकोनी बाजू. (सं) (वा.) **० उमलणे, खुलणे** - १. फूल विकसणे, फुलणे, उघडणे. २. (ल.) (आतल्या गाठीच्या व घुम्या माणसाने) मौन सोडून मोकळेपणाने बोलायला लागणे. ३. एखाद्याचा रुसवा, औदासीन्य जाऊन चेहरा प्रफुल्लीत होणे. ४. स्पर्धेने किंवा मत्सराने जळणे; चढाओढीच्या भरीस पडणे. **० उसळणे** - जोराची लैंगिक वासना होणे : 'जेव्हा त्याची कळी उसळे तेव्हा तो ककीला हैराण केल्याशिवाय रहात नसे.' - वासू ५४.

**कळीचा काटा** खेळ्या; कारस्थानी; आगलाव्या.

**कळीचा चुना** भाजलेली चुनखडी; चुन्याच्या कळ्यापासून तयार केलेला खाण्याचा रवाळ चुना.

**कळीचा दरवाजा** (स्था.) चोरदरवाजा; दरवाजा उघडण्यासाठी व बंद करण्यासाठी विशिष्ट कळ असलेला दरवाजा.

**कळीचा नारद** कळलाव्या; भांडण लावून देणारा; कज्जेदलाल; आगलाव्या; चुगल्या; लावालावी करून तंटे उपस्थित करणारा (पुराणात नारद हा नेहमी तिन्ही लोकात भांडणे उपस्थित करतो अशा कथा आढळतात त्यावरून).

**कळीचे काम** दगडांची बिनथरी ओबडधोबड रचाई, रचना.

**कळीचे पान, कळीदार पान** आकड्याचे विड्याचे पान; कळीसारखा लांबड आकार असणारे टोकदार पान.

**कळीत** न. उभ्या पिकांचा किंवा फळांचा अंदाज, अभावणी, आणेवारी.

**कळीदार बांधकाम** (स्था.) अनेक कोन किंवा बाजू असलेले बांधकाम.

**कळून सरणे** अक्रि. समजणे; माहीत होणे; पूर्णपणे आधीच ज्ञात होणे : 'हनुमंताची तीव्र व्यथा कळों सरली श्री रघुनाथा।' - भारा १२.१६.

**कळेकाम** न. कळ्यांची रचना : 'मुखश्रयाची खुटुनी पालवी। विंजणें केलें सपल्लवीं। बरीवानि ठेविली नवी। कळे कामाची।' - नरुस्व ५५२. [सं. कलिका + कर्म]

**कळो** पु. कलह; भांडण : 'मग ते कळो वाढविती। परस्परें कष्टती।' - दास १२.२.९. [सं. कलह]

**कळो** पु. कळ्या. सोनार जातीला उपहासाने म्हणतात. (गो.)

**कळोकळो** क्रिवि. तीव्रपणे : 'लहान मुली कळोकळो भुकेने व्याकुळ झाल्या.' - स्मृति ४.२७.

**कळोकळो** बायकांची बजबज; कलकलाट. (गो)

**कळोतर, कळोत्र** न. वस्त्र; उपवस्त्र : 'धोत्रें कळोत्रें नेसला। यज्ञोपवीत रुळे गळां।' - हरि ४. ११२. [सं. कलत्र = कटि+उत्तरीय]

**कळ्यांची पटी** चाफेकळ्यांची तयार केलेली वेणी. (कु.)

**कळ्हणा** पु. कळण; डाळीचा चुरा. (को.) पहा : **कळणा**

**कळ्हांटणे** उक्रि. धान्य आणि माती एकत्र मिसळली असताना हाताने चाळवून चाळवून निवडणे. (राजा.) [सं. कल् = गोळा करणे]

**कळ्हो** पु. कलह; दंगा; भांडण; तंटा. पहा : **कळी** : 'जाणता पुरुष असले जेथें। कळ्हो कैचा उठेल तेथें।' - दास १९.४.१६. (क्रि. करणे, माजवणे.) [सं. कलह]

**कळ्ळ** वि. चोरटा. [क.]

**कक्ष-क्षा** पु. स्त्री. १. खाक; खांद्या खालची बाजू. २. एक बाजू; बगल : 'शैल कक्षांची कुहरें। जळाशय परिसरें।' - ज्ञा १३.६१३. [सं.]

**कक्ष** पु. १. खोली. २. आगगाडीच्या मोठ्या डब्याचा बंद लहान भाग.

**कक्षखंड** पु. (स्था.) मोठी कमान; मोठा कोनाडा. [सं.]

**कक्षबंध** पु. जोडून असलेल्या दोन खोल्या.

**कक्षबांध** पु. (स्था.) पाण्यात बांधकाम करताना पाणी आत येऊ नये म्हणून तेवढ्या कामाभोवती बसवलेली उभ्या फळ्यांची पेटी.

**कक्षा** स्त्री. १. खण; खोली, दालन. २. ग्रहांचा व ताऱ्यांचा संचारमार्ग; चंद्र, सूर्य, नक्षत्रे इत्यादी कोणतीही आकाशस्थ वस्तू दुसऱ्या कोणत्याही आकाशस्थ वस्तूंभोवती ज्या मार्गाने फिरते तो मार्ग. ग्रह व उपग्रह यांच्या कक्षा दीर्घवर्तुळाकृती असतात. ३. (ल.) सीमा; आटोका; क्षेत्र : 'यांची चौकशी कमेटीच्या कक्षेबाहेरची आहे.' - के १२.७.३०.

**कक्षा** स्त्री. खुसपट; संशय : 'नसती कक्षा काढून परस्पर सौख्य चालत आहे त्याजमध्ये कलुषता वाढवावी....' - पेद ३.४९.

**कक्षा** स्त्री. १. वादविवादातील वादीप्रतिवादींचा कोटिक्रम, आक्षेप, उत्तरप्रत्युत्तर. २. वाक्यातील गर्भित सूचना : 'काकु : कक्षा : भावार्थ प्रकरण : जाणावे' - लीचपू १५२.(क्रि. घेणे.)

**कक्षाकेतु-तू** पु. ध्वजाचे टोक, पदर : 'रणदक्षा स्वविपक्षा करि कक्षाकेतू खंडुनी त्वरित।' - मोकर्ण नव ३४५. [सं.]

**कक्षाचिन्ह** न. (ग्रंथ) संग्रहचिन्ह; ग्रंथालयातील विशिष्ट विषयावरील ग्रंथ, वाचनसाहित्य वेगळे ठेवण्यासाठी वापरायचे त्या संग्रहासाठी ठरविलेले चिन्ह.

**कक्षापती-धीश** पु. १. (लक्षापती किंवा लक्षाधीश या शब्दांशी जुळवण्याकरता बनवलेले रूप) आपल्यापाशी फुटकी कवडीही नाही हे दाखवण्यासाठी खाका वर करून दाखविणारा. २. (ल.) अत्यंत दरिद्री माणूस.

**कक्षापात** पु. (ज्यो.) एका ग्रहाची कक्षा दुसऱ्याच्या कक्षेच्या सरळ पातळीला जिथे छेदून जाते तो बिंदू.

**कक्षापात रेषा** पृथ्वीच्या मध्यबिंदूतून जाऊन कक्षापाताला जोडणारी सरळ रेषा.

**कक्षावर्त** पु. पवित्र्याचा एक प्रकार. [सं.]

**कंक** पु. १. बगळा; करकोचा; क्रौंच. बाणाच्या शेवटी याची पिसे लावीत असत : 'कंक गोमायु मांसभक्षक।' - मोआदि. २. अज्ञातवासात धर्मराजाने (पांडव) धारण केलेले नाव. ३. क्षत्रिय. यावरून मराठ्यातील एक आडनाव. उदा. येसाजी कंक. [सं.]

वि. खंक; फटिंग.

**कंकण** पु. न. १. बांगडी; चुडा : 'पुरुषाहातीं कंकणचुडा। नवल दोडा वृत्ति या॥' - तुगा ९७७. २. बायकांच्या हातातील सोन्याचा बांगडीसारखा पण रुंद असा दागिना; बांगडी : 'नाग मुदी कंकण।' - अमृ ९.१२. ३. यज्ञदीक्षा घेतेवेळी यजमान आपल्या हातात पिवळा दोरा बांधतो तो : 'तें यज्ञकंकणकरांबुजिं राघवातें।' -कुशलवाख्यान. ४. लग्नविधीत हळदीने पिवळा करून वधुवराच्या हातात बांधलेला अनेक पदरी दोरा. त्यात दूर्वा व हळकुंड बांधलेले असते. हा दोरा लग्नात मंत्रून वधूवर परस्परांच्या (वधूच्या डाव्या व वराच्या उजव्या) मनगटात बांधतात. ५. (सामा.) हातातील कडे : 'मग सावळा कंकणु। बाहु पसरोनि दक्षिणु।' - दास १८.१४१८. [सं.] (वा.) ० **(हातात) बांधणे** - १. (स्वीकारलेल्या गोष्टीचा) अभिमान बाळगणे; व्रत स्वीकारणे. २. (एखादे काम पार पाडण्याची) प्रतिज्ञा करणे; मेहनत करीत राहणे.

**कंकणकाडी** स्त्री. एक गवत; सनकाडी. (बे.)

**कंकणघटित** वि. परस्पर समान अशी लहान लहान कंकणे किंवा वलये एकाला एक जोडून ज्या प्राण्यांची शरीरे बनतात तो.

**कंकणबाळ्या, कंकणीबाळ्या** पहा : **कंगणबाळ्या**

**कंकणबंध** पु. १. गोलाकार बत्तीस अक्षरी श्लोकरचना. यात कोणत्याही अक्षरापासून म्हणायला आरंभ केला तरी काहीतरी सुंदर अर्थनिष्पत्ती होते. २. लग्नातील कंकण बांधण्याचा विधी. [सं.]

**कंकणाकृति-ती** वि. काकणाच्या (वाटोळ्या) आकाराचे.

स्त्री. कंकणासारखी आकृती.

**कंकणाकृती ग्रहण** या सूर्यग्रहणामध्ये सूर्याचा मध्यभाग खग्रास होऊन सभोवतालचा बाहेरील वलयाकार भाग दृश्य असतो असे ग्रहण; वलयाकार ग्रहण.

**कंकणाश्व** पु. मानेवर तीन भोवरे असलेला घोडा. हा शुभदायक व कल्याणप्रद असतो. - अश्वप ९२. [सं.]

**कंकणी** स्त्री. बांगडी; कंकण.

**कंकणीप्रेम** न. जबरदस्तीचे प्रेम; अघोरी प्रेम : 'जपान चीनवर करीत असलेले कंकणी स्वरूपाचे प्रेम फार उत्तम म्हणावयाचे!' - जका.

**कंकतांग** (वै.) कंगव्यासारखा दंतुर आकार असणारा प्राण्याच्या शरीरातील भाग. [सं.]

**कंकतित मृद्‌भांडी** (पुरा.) कंगव्याने विंचरल्यासारखी नक्षी असलेली मातीची भांडी.

**कंकपत्री-पिच्छ** पु. बाण : 'ते वज्रापरीस कठोर। कंकपत्री सरळे॥' - कृमुरा ५०.९२.

**कंकर-रा** पु. १. रेव; वाळू; रेती; लहान लहान खडे; गारगोट्यांचा चुरा. पुळणीच्या जमिनीत चुनखडीप्रमाणे या मातीचे थर पुष्कळ ठिकाणी आढळतात : 'तेथील लाधल्या कंकर। नीच ते थोर वेव्हार होती।' - एभा १७. ५. २. लहान खडा; गारगोटी; कण : 'हिरा कंकरा म्हणोनि।' - दावि २०१.

वि. (ल.) दगडासारखे; कठोर : 'वचन कंकर ते उतराया।' - दावि ३८०. [सं. कङ्कर]

**कंकर-रा** पु. काकर, ढोल, मृदुंग इ. ची ओढदोरी; वादी; सामान्यत: चामडे : 'कोणी वाणवशावाचून असेल त्याच्या पाठीचा तीन बोटें कंकर काढा.' - गोपद्याची कहाणी १६.

**कंकर-री** स्त्री. देवबाभळ : 'कंकराच्या फुलांचा' - किरिस्ताव १८.

**कंकरसोथ** पु. (पुरम) जाड वाळूच्या घराने बनलेले स्तरयुक्त टेकाड.

**कंकरी** स्त्री. १. पीळ भरलेल्या रेशमाची लड; काकरी (नगच्या उलट). २. खणावरील काठाला लागून काढलेला खडी.

**कंकही** स्त्री. ऱ्हस्व चिकणी; नागबला. [सं.]

**कंकातणे** अक्रि. त्रासणे; भुकेने व्याकूळ होणे; दमणे.

उक्रि. बेजार करणे; त्रास देणे; छळणे.

**कंकाल-ळ** पु. अस्थिपंजर; पिशाच्च; प्रेत; सांगाडा; हाडांचा सापळा. : 'नग्नभैरव वेताळ। झोटिंग पिशाच कंकाळ।' - एभा १०.५८०. 'झोटिंग वेताळ कंकाळ बंड।' - दावि ४४६.

**कंकाल रचना** प्राण्यांच्या शरीरातील हाडांची ठेवण, मांडणी. [सं.]

**कंकाल संस्था** (वै.) सांगाड्याची रचनापद्धती. [सं.]

**कंकावणे** सक्रि. छळणे; गांजणे.

**कंकास** पु. त्रास; जंजाळ; भांडणतंटा. [गु.]

**कंकाळा-ळी** वि. क्रूर; रानटी; राक्षसी.

स्त्री. राक्षसी; पिशाची; एक क्षुद्र देवी : 'येक म्हणती काळी कंकाळी। येक म्हणती भद्रकाळी।' - दास ८.१०.३५.

**कंकाळा-ळी मंत्र** पु. कंकाळी देवतेचा मंत्र: 'बाळा मंत्र बगुळा मंत्र। काळी मंत्र कंकाळि मंत्र।' - दास ५.४.७.

**कंकाळी** स्त्री. डाकिनी; शाकिनी; क्षुद्रदेवता : 'राक्षस रुधिराच्या कल्लोळीं। तृप्ती कंकाळी करूं आजी।' - भावार्थ रामा. बाल ५.

**कंकोत्री** स्त्री. कुंकुमपत्रिका; लग्नचिठ्ठी. [गु.] [सं. कुंकुमपत्रिका]

**कंकोल-ळ** पु. कापुरचिनी, कबाबचिनी. याचा वेल असतो, फळ मिऱ्याएवढे व काळे असून थंड असते. सुगंधी पदार्थात व औषधात याचा उपयोग करतात व विड्यात घालूनही खातात: 'कंकोळाचे आंबट गोड तुरे.' - शेलूक ६०. [ते. तक्कोलमु] [सं. कंकोलक]

**कंक्रांतणे** पहा : **कंकातणे** (वा.) **कक्रो म्हणून असणे** - (विचित्र प्रयोग) खा खा होणे; खाखावणे; भुकेने व्याकूळ होणे.

**कंगट्टी** पु. अठरा इंच लांब व दीड इंच व्यासाचा एका टोकाला चपटा होत गेलेला लोखंडी बत्ता (याने बेरड लोक घर फोडतात.). (बेरडी)

**कंगण-णी-न** पु. न. स्त्री. १. बांगडी; काकण; स्त्रियांच्या हातातील एक दागिना; हा पाटल्यांच्या शेजारी, विशेषतः नव वधूच्या हातात घालतात : 'चंद्रहार पुतळ्यांची माळ आली घसरून पाठीखालती। या मजला वेदना लागती कंगण्या तुमच्या पाठीप्रती॥' - होला ९६. २. कपाळावरील बिनीवरचा उंच व वळ्या असलेला कंगव्याच्या आकाराचा पागोट्याचा भाग, पेच, पीळ : 'पगडीच्या कंगण्या सुटल्या.' - संग्राम ७४. ३. कंगोरा; किनारा; छपेली; कंकणाकृती उंचवटा, कोर (भिंत, खांब इ. सुशोभित करण्यासाठी केलेला); साधारणपणे दहाबारा फुटांवर बांधकाम गेल्यावर एकेरी अगर दुहेरी विटांचा थर बांधकाम सोडून पुढे दाखवतात ती भिंत : 'छप्पर जेथे भिंतीस मिळते. तेथें कंगणी असावी.' - मॅरट ११६. ४. घोड्याची कलगी, कंगर; कपाळावरची पट्टी : 'घोडिया बाणली मोहाळी। कंगण टोप रागावळी।' - एरुस्व ८.१५. ५. केस विंचरण्याचा अर्धचंद्राकृती कंगवा. [सं. कंकण]

**कंगण(णी)दार** १. कंगणीच्या पुढे पीळ असलेले (पागोटे, पगडी) : 'कंगणिदार भरजरी पिळाची पगडि शिरावर।' - मृ १८. २. नक्षीदार; सुरेख; चटकदार : 'अशी फक्कड कंगणीदार लावणी काढ्तस कीं ज्याचं नाव त्ये.' - तोबं ९८.

**कंगण(णी)बाळ्या** स्त्री. अव. कानातील कंगव्याच्या आकाराच्या बाळ्या; बाळ्यांचा एक प्रकार; एक दागिना : 'हिरी बाळ्या कंगण बाळ्या मनोहर।' - अफला ५५.

**कंगणी** स्त्री. १. तलवारीच्या मुठीची मोगऱ्याखालची वाटोळी खोबण. २. तोफेच्या विशिष्ट भागाचे नाव : 'स्वामीची आज्ञा दलसमेत कंगणी तीन बोटे याप्रे॥ करावी.' - पेद. [सं. कंकण]

**कंगणी लाट** (पुरा.) प्राचीन वास्तुशास्त्रातील पारिभाषिक संज्ञा.

**कंगर-ळ** पहा : **कंगण, कंगणी ४**

**कंगरपिस्स** वि. कौशल्यपूर्ण; नक्षीदार; छानदार. (गो.)

**कंगरा-रो** पु. १. कौशल्य. २. कंगोरा; काठ. [फा. कंगुरा]

**कं(कां)गरी** स्त्री. शेगडी.

**कंगवा** पु. केस विंचरायचे फणीसारखे परंतु बहुधा एका बाजूस दाते असलेले साधन. [सं. कंकत] [त. कंगम]

**कंगाल** वि. १. भिकार; कफल्लक; दरिद्री : 'नातरी गुरू मम मातेने। योजिला होता कंगाल हीन।' - नव १६.१२७. २. गरीब; क्षुद्र; नापीक; दुर्भिक्ष असलेला (प्रदेश, जमीन इ.). ३. लुटारू. [सं. कंकाल = हाडाचा सापळा]

**कंगाल पोते** १. भिक्षेची झोळी. २. अतिशय सैल अंगरखा, चोळी, विजार वगैरे पोतेवजा कपडा (निंदाव्यंजक प्रयोग).

**कंगालवंत** वि. अतिशय दरिद्री: 'जेवीं अर्कापुढें खद्योत। हीन दीन अति दीसत। तेवी मज कंगालवंतातें। ओळखील कोण तेथें।' - नव १९.९.

**कंगाली** स्त्री. १. कंगालपणा; दारिद्र्य; दुर्भिक्ष; हीनता. २. गरिबी.

**कंगी** स्त्री. एक वनस्पतीरोग.

**कंगुमंगू, कंगमंग** स्त्री. १. टंगळमंगळ; टाळाटाळी; कांकूं; घुटमळणे; मागे मागे घेणे. २. मोघम, दुटप्पी भाषण. ३. चोखंदळपणा (जेवणातील), जेवताना पदार्थ चाखतमाखत खाणे.
वि. कां कूं करणारा; गुळगुळीत (माणूस, भाषण, वर्तन इ.). २. द्व्यर्थी; मोघम; निरर्थक (भाषण). ३. अशक्त; दुबळा; लुळा (प्राणी.).

**कंगूर-रा, कंगोरा** पु. १. कड; काठ; किनार; कोर : 'ती खडकाच्या कंगोऱ्यावर शेळ्या चरावयास सोडून....' - पाव्ह ४२. २. पहा : **कंगणी ३**. ३. खांब, कोनाडा, भिंत इ. च्या कडांवरची कोरलेली नागमोडी रेघ. ४. कठडा; कोट. (देऊळ किंवा विहीर याचा.) ५. कोनाकार वस्तूच्या शिरा, कोपरा. [का.]

**कंगोरण** न. चुराडा करणे; दळणे.

**कंगोरी** स्त्री. एक फुलझाड व त्याचे फूल.

**कंघी** स्त्री. फणी; कंगवा. [हिं.]

**कंच** न. पितळी तपेले; गोल आकारांचे, ओतीव, काशाचे किंवा पितळेचे भांडे; गुंडा.-(तंजा.) [क. कंचु]

**कंचक** संशय; शंका. (अहिराणी)

**कंचन** स्त्री. पंजाबातील दोर करणारी व साप पकडणारी आणि खाणारी जिप्सीसारखी कंजर जात. पहा : **कंजर**

**कं(कां)चन** पु. १. आपट्याच्या पानासारख्या पातळ व लहान पानांचा रंगीत फुलांचा एक वृक्ष. पहा : **कांचन** २. डोंगरी टेंबुरणी. ३. सोने : 'काहे परिस कंचन करे धातु। नहि मोल तुटत पावत धातु॥' - तुगा ४३९. [सं. कांचन]

**कंचनी** स्त्री. नाचणारी बाई; कसबीण; वेश्या; कलावंतीण; नर्तकी: 'त्या कंचनीविषयी तुम्हास कसे काय वाटते ?' - विवि १०.५ - ७.१२२.

**कंचर-री** काचर.

**कंचरपट्टी** स्त्री. बांगड्या तयार करणाऱ्यावर बसविलेली पट्टी.

**कंचा-ची-चे** सना. कोणता, कोणती, कोणते; प्रश्नार्थक : 'ह्यातून कंचा मागून घ्यावा.' - ऐपो २२.

**कंचा** पु. काचेची गोळी.

**कंचुक** पु. १. पेटी; बंडी; अंगरखा; झगा; आच्छादन; पांघरूण; चोळणा; लांडी विजार इ. : 'समर्थ कटीचा आपाद कंचुक।' - सप्र ७. ३१. २. कवच; चिलखत. ३. सापाची कात. ४. साल; कोंडा; कवटी; कवच; बाह्यांग (दाणा, फळ इ. चे). [सं.]

**कंचुक** पु. एक पक्षी. (माडगावकरांचे अंक वाङ्मय खं २.१३.)

**कंचुकी** स्त्री. काचोळी; चोळी : 'अंतर्वसन बाह्यवसन। कंचुकीवरून प्रावरण। - ह ६४.१६६. [सं. कञ्चुलिका]

**कंचुकी** पु. साप.

**कंचुकी** स्त्री. १. एक वनस्पती; आसंध. २. फुलाचे कचोळे, वाटी, गोंड; देठाजवळ असलेले फुलाचे आवरण. [सं.]

**कंचुकी** पु. अंत:पुराचा वृद्ध द्वारपाळ, पहारेकरी; खोजा; चोपदार; राजमहालातील राजाचा विश्वासू नोकर. [सं.]

**कंचुकी विधान** चोळी उतरून टाकणे; घट कंचुकीचा प्रकार: 'कुंभपूजा कंचुकीविधान। अघोर क्रिया मद्यपान आणि त्रिपुरसुंदरीपूजन। कामाक्षी विधी॥'- स्वानु ७.२.४३.

**कंज** न. कमळ : 'सर्वस्व परित्यागुनि ज्याचें स्मरतात पाद् - कंज यमी।' - मोवन १.२८. [सं.]

**कंजर** स्त्री. दोऱ्या वळून, त्यांच्या अनेक वस्तू तयार करणाऱ्या लोकांची भटकी जात. ही अस्पृश्य समजली जाते. पहा : **कंचर**

**कंजरीट** पु. खंजरीट; ताजवापक्षी; याच्या डोळ्यांची उपमा बायकांच्या डोळ्यांना देतात : 'बोलली भुपास काय कंजरीट लोचनी।' - रामद्रौव ११४. [सं. खंजरोट]

**कंजार-री, कंजारभाट** : पु. भटक्या, विमुक्त जातींपैकी एक जात. पहा : **कंजर**

**कंजारी, कंजारी-ण** स्त्री. १. कंजार जातीची स्त्री. या स्त्रिया टाळ्या पिटून व अश्लील गाणी गाऊन भिक्षा मागतात. २. (ल.) केस पिंजारलेली स्त्री : 'कशी कंजारीण आयत्यावेळीं पुढें झाली.' - कीच भाब ११८. [हिं.]

**कंजाळ** न. गवत.

**कंजिया** वि. घाऱ्या डोळ्यांचा.

**कंजूत** वि. शिवळा बेरड्या; बैलाच्या गळ्यातील जोते जुंपणी; जोताची बैलाच्या मानेजवळील खुंटी.

**कंजूश-ष-स** वि. कद्रू; कवडीचुंबक; कृपण; चिक्कू. [सं. कर्ण + जुष्]

**कंज्याळ** न. पाण्यात उगवणारी एक वनस्पती. (माण.)

**कंझ्या** पु. सांझ्या; कटकट; वाद : 'वाणी व सराफ वगैरे उदमी यांकडे तिकडील कंझ्या कांहीं नसल्यास त्यानीं सुखरूप इकडे येऊन रहावे.' - ऐलेसं ५०९०.

**कंटक** पु. (ज्यो.) केंद्र; कोणत्याही घरापासून ४, ७, १० ही स्थाने.

**कंटक** पु. १. काटा : 'कंटकशल्ये बोथटली। मखमालीची लव वठली।' - केक १. २. माशाच्या शरीरातील हाडांचा सापळा. ३. (ल.) व्याधी; पीडा; दुर्जन; दुष्ट माणूस : 'भाविकां कंटक करिताती पीडा।' - तुगा १२८९. ४. (ल.) क्रूर; रानटी; दुष्ट माणूस. ५. चिक्कू; कृपण. ६. शत्रू; वैरी: 'आजि अकंटक केले नृपनयनिपुणे सुयोधने राज्य।' - मोसभा ७.३. ७. (शाप) अग्र, टोक. ८. अडथळा; अडचण. [सं.]

**कंटक** वि. १. सोशीक. पहा : **काटक** २. कष्टाळू; कणखर; अंगमेहनती : 'जपानचे लोक आम्हापेक्षा अधिक बुद्धिमान अगर कंटक नाहीत.' - लोटिलेसं ८४.

**कंटकत्वक** पु. (प्राणि.) ताराकृती प्राणी. या वर्गातील प्राण्याच्या कातडीवर काट्यासारखे केस असतात. [सं.]

**कंटकशोधक** पु. गुप्तचरविभाग. (पुरुषार्थ, मार्च १९३२)

**कंटकारी** स्त्री. १. रिंगणी. २. सावरी. ३. बेहकळीचे झाड. [सं.]

**कंटकी** स्त्री. एक झाडः 'खदिर, कंटकी, हिवर, सोदोड।'-मुआदि १५.५३.

**कंटकी वन** काटेरी रान : 'वाढविलें कंट की वन।' - राविं नव २१८. [सं. कंटक = काटा + वन]

**कंटापार** क्रिवि. काट्याबाहेर; काट्यापार - पलीकडे : 'परि बद्रिकाश्रमी बद्रीतरू। त्यातें वर्णितां नसे पारु। कीं वाट दावी कंटापारू। तयामार्जी रिघाल्या॥' - नव १२.१७७.

**कंटाळ-ळा** पु. १. शीण; थकवा. २. वीट; शिसारी; तिरस्कार.

**कंटाळखोर** वि. आळशी; कंटाळा, टिवल्याबावल्या करणारा; सुस्त.

**कंटाळणे** अक्रि १. त्रासणे; दमणे. २. आळसणे. ३. शिसारी येणे; विटणे.

**कंटाळवाणा-णी** वि. कंटाळा आणणारा; त्रासदायक.

**कं(क)टाळा** पु. १. अरुची; वीट; किळस; खंती; शिसारी (क्रि येणे.): 'पापा जयाचा कंटाळा।' - ज्ञा १६.४१९. २. आळस. ३. भय; त्रास. पहा : **कांटाळा.** ४. कट्टा; कत्तल; मारा : 'त्यांचे दायादयांनी दावा करून अमात्य यांचे पूर्वजांचा कांटाळा केला'- ऐकोपुर. (वा.) **० घेणे** - दहशत खाणे; भीती खाणे : 'क्षत्री राजे यांही कंटाळा घेतला जर (की) याचे हातें (दिल्लीच्या बादशहाच्या हाते) मृत्यू होई तो अध:पातास जाईल.' - बिंब १५.

**कंटाळेखोर** वि. चेंगट, सुस्त : 'आमचे तीर्थरूप यांचा कारभार कंटाळेखोर होता.' - ऐजुलेचिप्रसंमा ४.

**कंटाळ्या** वि. लवकर त्रासणारा; कंटाळणारा (काम, करमणूक, धंदा इ. ला.).

**कंटि, कांटी** स्त्री. काटेरी कुंपण.

**कंटिका** स्त्री. (भूशा.) काही विशिष्ट जातीच्या (स्पाँज) प्राण्यांची कवचे एकसंध नसतात तर सुयांप्रमाणे असणारी अनेक एकके एकत्र येऊन बनतात. त्यापैकी प्रत्येक.

**कंटु(टो)ली, कंटूल** स्त्री. न. करटोली; काटले, करंटुली; कर्टुले (भाजी); रानकारले.

**कंटोल** पु. उणीव; चणचण. (झाडी)

**कंठ** पु. १. गळा (हनुवटीच्या खालील व खांद्यावरील शरीराचा भाग) : 'कंठीं झळके माळ मुक्ताफळांची।' - गणपतीची आरती. २. (गायन) गळ्यातून निघणारा ध्वनी; आवाज. ३. (पोपट, कबुतर, चिमणा इ.) पक्ष्यातील नराला (तारुण्यावस्था प्राप्त झाली असता) गळ्याभोवती उमटली जाणारी रेषा. (क्रि. फुटणे.) ४. भांडे वगैरेंच्या तोंडासारखा आवळ भाग; काठ. ५. श्वासनलिकेचे वरचे तोंड, नरडे; घसा. [सं] (वा.) **० दाटणे, भरून येणे, सद्गदित होणे** - दु:ख किंवा आनंद यांच्या उमाळ्याने घसा दाटणे, त्यामुळे तोंडातून शब्द न निघणे; आवेग येणे; सद्गदित होणे: 'दासाकडे हनुमंत पाहे। तों गहिवरे कंठ दाटलाहे।'

- संवि २.८५; 'सांगू जातां मुखाने। तों कंठ आला भरून।' - नल २२.४५. ० **फुटणे, बोटणे** - (गायन) १. चिरका आवाज होणे; वयात आल्यावर आवाजाचा पोत बदलणे. २. कंठ (अर्थ ल ३) येणे (पोपट इ. पक्षाला). ३. खणखणीत शब्द निघणे. ४. वयात येणे; प्रौढदशा प्राप्त होणे. ५. (ल.) अनुकूल परिस्थितीत स्पष्टपणे, मोकळ्या मनाने बोलणे. ० **बसणे** - घसा बसणे; आवाज (गाण्यात, भाषणात), स्पष्ट न निघणे: 'उष्ण काळीं तेल तिखट खातां। तेणें बद्धक झालें बहुतां। म्हणती कंठ बसले आतां। नये गातां कीर्तनीं॥' - संवि १२.१२२ ० **शोषणे** - (दुःखाने) घसा कोरडा पडणे. ० **मोकळा करून रडणे** - मोठ्याने रडणे, मनमुराद रडणे, ओक्साबोक्शी रडणे; भोकाड पसरणे: 'मोकळा करूनि कंठ तेधवां। आठवूनि मनिं जानकीधवा।' - (वामन) भरतभाव १४. **कंठास, कंठी प्राण येणे** - १. (भीतीने, दुःखाने) अर्धमेले होणे: 'प्रतिवचन प्रसंगी प्राण कंठास आला।' - सारुह २.१०३. २. दुःखाने किंवा भुकेने व्याकूळ होणे. **कंठास लावणे** - मिठी मारणे; आलिंगन देणे: 'कंठास त्यास लावून।' - संग्राम १५. **कंठी प्राण उरणे** - आसन्नमरण होणे; धुगधुगी राहणे. **कंठी प्राण ठेवणे, धरणे, राहणे** - एखादी इच्छा किंवा आशा सफळ झाल्यावर मरू अशा इराद्याने जीव धरून राहणे: 'अस्थि शिरा दिसती नयनीं। प्राण कंठी धरिले त्यानीं।' - संवि २७.७७; 'तुम्हाविण कंठी प्राण राहिला असे॥' - रत्ना ४०३. **कंठी धारण करणे** - १. गळ्यात घालणे (माळ, अलंकार इ.). २. जपणे; स्मरण करणे; अतिप्रिय असणे.

**कंठ** पु. कष्ट.

**कंठक** वि. १. काटक; कंटक; सोशीक. २. धाडशी.

**कंठकोकिला-ळा** स्त्री. (ल.) मधुर, कोकिळेसारख्या आवाजाची स्त्री.

**कंठगत** वि. १. गळ्यातील (दागिना वस्तू इ.). २. नेहमी तोंडपाठ असलेला (अभ्यास, वचन इ.); मुखोद्गत. ३. गळ्याशी आलेला. [सं.]

**कंठगतप्राण** वि. धुगधुगी असलेला; ज्याचा प्राण गळ्याशी आला आहे असा.

**कंठगति** स्त्री. प्राणान्त : 'प्राज्ञा जो तो आभक्ष भक्षीं न ये : जर्‍ही प्राण कंठगतीतें पाव (ला)' - पंचो ४४.१३.

**कंठग्रंथि** स्त्री. कंठातील गाठ. [सं.]

**कंठचामीकर न्याय** गळ्यात सोन्याचा दागिना असून तो हरवला अशा समजुतीने घरभर हिंडणे. समानार्थक : - काखेत कळसा, गावाला वळसा; गांडीखाली आरी, चांभार पोर मारी.

**कंठच्छद** पु. (वै.) १. स्वरयंत्रावरण. हे जिभेच्या मागील बाजूस असते. श्वासमार्ग उघडा ठेवणे किंवा बंद ठेवणे ह्याचे कार्य करते. अन्न खाताना किंवा पाणी पिताना श्वासमार्ग बंद असणे आवश्यक असते. यासाठी याचा उपयोग होतो. २. अधिजिव्हा; पडजीभ.

**कंठच्छेदी** वि. तीव्र; विनाशक (स्पर्धा).

**कंठणे** उक्रि. १. सहन करणे; सोसणे (आजार, दुःख) : 'कैसा कंठूनिया राहों संवसार।' - तुगा ५६५. २. कष्टाने घालविणे, संपविणे; कसातरी काढणे (दिवस, काळ) : 'रामदास हनुमंतासि म्हणे। मज सर्वथा न कंठे रामाविर्णे।' - संवि २.८६. ३. गतीने मार्ग अतिक्रांत करणे, तोडणे, चालणे (अंतर, रस्ता, प्रवास.) : 'तै मार्ग न कंठे तेणे। परी कष्टणे अनिवार।' - एभा २१.२७. ४. क्षीण होणे; जीव कंठापर्यंत येणे : 'श्रीमंत मातोश्री पार्वतीबाई फारच कंठली आहेत.' - ऐलेसं २३५७. [सं. कठ्, कंठ किंवा कष्ट]

**कंठद्वार** न. (वै.) १. श्वासमार्ग; श्वासनलिका, स्वरनलिका, आणि कंठिकास्थी यामधील पोकळी. २. श्वासनलिकेचे घशाच्या पोकळीत उघडलेले तोंड. ३. तोंडाच्या मागचा व फुफ्फुसाच्या वरचा, गळ्याच्या पोकळीचा भाग. यामध्ये श्वासनलिका व अन्ननलिका असतात. [सं.]

**कंठन** न. (यंत्र.) एखाद्या वस्तूची कड उंचावून घेणे. उदा. डब्याच्या झाकणाच्या सभोवती आणलेला गोलाकार.

**कंठनाळ** पु. गळ्याची नळी; मान : 'मग कंठनाळ आटे।' - ज्ञा ६.२०७. [सं.] (वा.) ० **चिरणे** - गळा कापणे; ठार करणे.

**कंठपाठ** वि. तोंडपाठ; मुखोद्गत : 'धौम्य म्हणे तुज यावें शास्त्रासह कंठपाठ वेदानीं।' - मोआदि २.५१.

**कंठमणी** पु. १. गळ्यातील हारामधील मुख्य मणी; गळ्यातले रत्न. २. (वै.) गळ्याचा मणका, घाटी. ३. (ल.) अतिशय लाडका; गळ्यातील ताईत (माणूस, वस्तू): 'आवडते कंठमणी ही.' - संग्राम २९.

**कंठमाळ** स्त्री. गंडमाळा. (गो.)

**कंठरव** पु. आवाज. [सं.]

**कंठरवाने, कंठरवेकरून** क्रिवि. १. मुद्दाम; निश्चयाने; स्पष्टोक्तीने. २. मोठमोठ्याने ओरडून; घसा फोडून कंठशोष करून.

**कंठरवोक्त** वि. निश्चयाने सांगितलेले. (भाषण इ.)

**कंठरा प्रतिक्षेप** (वै.) स्नायूला जोडलेल्या अस्थीवर आघात केल्याने निर्माण होणारा प्रतिक्षेप.

**कंठलंगोट** पु. गळबंद, गळेबंद. [इं. नेकटाय]

**कंठवर्त** पु. (युद्ध) पवित्र्याचा एक प्रकार. [सं.]

**कंठशोथ** पु. (वै.) काही संसर्गामुळे घशाचा आतील भाग सुजणे, स्वरयंत्रशोथ.

**कंठशोभा** स्त्री. घोड्याच्या मानेवर घालावयाचे अलंकारवजा उंची आवरण.

**कंठशोष** पु. १. (तहानेने) घशाला पडणारी कोरड. २. (ल.) ओरड; उगीच घसा कोरडा करणे; घसाफोड; व्यर्थ समजूत (काढणे). (क्रि. करणे.) : 'वादी-प्रतिवादीकडून अतोनात कंठशोष होत असतांहि' - लोटिकेले ४.१३१. [सं.]

**कंठसूत्र** न. १. जानवे. २. मंगळसूत्र. [सं.]

**कंठस्थ** वि. १. घशात अडकलेले (बेडका, प्राण). २. गळ्यातील (दागिना इ.) ३. (ल.) जिव्हाग्री; पाठ असलेला (अभ्यास, पाठ इ.). ४. कंठस्थ वर्ण (गळ्यातून ज्याचा उच्चार होतो ते: - अ, आ, क्, ख्, ग्, घ्, ह.) [सं.]

**कंठस्थान** न. गळा.

**कंठस्नान** न. १. गळ्याखालचे स्नान (विशेषत: बायकांचे). (क्रि करणे.) २.(ल.)मान छाटणे; शिरच्छेद करणे (शीर छाटल्याने आतून वाहणाऱ्या रक्ताने होणारे स्नान); नागवणे; लुटणे. (क्रि. घालणे.) [सं.]

**कंठहार** पु. गळ्यात घालायचा एक दागिना.

**कंठा** पु. १. सोन्याच्या मण्यांचा, मोत्यांचा, हिऱ्यांचा किंवा इतर रत्नांचा गळ्यात घालायचा हार; माळ; कंठभूषण. २. फुलांचा गजरा; एक प्रकारचा तुरा. पहा : **तुरा** [सं. कंठ]

**कंठाग्र** न. घसा; ध्वनिइंद्रिय. पहा : **कंठ** ५ (सामान्यत: सप्तम्यंत प्रयोग).

**कंठाभरण** न. १. गळ्यातील एक अलंकार: 'सौभाग्यद्रव्यें कंठाभरणें।' - एरुस्व ६.८७. २. घोड्याच्या मानेखाली असलेला शुभदायक भोवरा. ३. गळ्यातील ताईत; प्रिय.

**कंठावरोध** पु. घसा दाटून येणे; घसा धरणे, बसणे. [सं.]

**कंठाळा-ळी-ळे** स्त्री. १. जनावराच्या पाठीवर दोन्ही बाजूस सारखी बसेल अशी गोणी, पडशी; पिशवी. २. (ल.) पुष्कळ विषयांच्या समावेशाचा ठराव; गोधडी; कंथा; खिचडी. [का. कष्टले] वि. पाल्हाळिक (भाषण).

**कंठाळी** स्त्री. ओरड; गलबला; गडबड. [सं. कंठ]

**कंठाळू** पु. अळवाची एक जात.

**कंठिका** स्त्री. जिभेच्या मुळाकडे असलेले हाड; कंठिकास्थी. [सं.]

**कंठी** स्त्री. १. पुरुषाच्या गळ्यातील सोन्याचा किंवा मोत्याचा तीन किंवा चार पदरी माळेसारखा एक अलंकार, माळ; विशिष्ट पद्धतीने केलेली फुलांची माळ. पहा : **कंठा** : 'तैशीं घेतां कंठी मजसि, तव कंठी धरियली।' - विविध ८.१.२०. २. तुळशीच्या मण्यांची केलेली माळ (विशेषत: पंढरीच्या वारकऱ्यांच्या गळ्यातील.). ३. सतारीच्या किंवा वीणेचा भोपळा व दांडी यांच्या सांध्यावरील वर्तुळाकार हस्तिदंती काम. ४. अंगरख्याला गळ्याच्या ठिकाणी शिवून हारासारखी केली जाणारी नक्षी. [क. कंटि] [सं. कंठिका, कंठी]

**कंठी** स्त्री. १. तलवारीच्या मुठीचा हातात धरण्याच्या जागेचा कंगोऱ्यासारखा खोल भाग (कटोरी व जनेऊ यांच्यामधील). २. पोपटाच्या गळ्याभोवती दिसणारी रंगीत रेष; कंठवलय.[सं. कंठ]

**कंठी** स्त्री. भाताचे लोंगर, कणीस.

**कंठीदार** वि. धष्टपुष्ट; रुंद पुठ्ठ्याचा: 'म्हशी दोन सहस्र कंठिदार वाणीच्या.' - ऐको २०९.

**कंठीदार** वि. कंठी असलेला (अंगरखा); अंगरख्याचा एक प्रकार : 'कंठीदार अंगरखा दुपेटावर नक्षी भरजरी' - होला १२१.

**कंठीरव** पु. सिंह : 'वृद्ध म्हणे पांच पांडव। द्वैतकाननीचे कंठीरव।' - पांप्र ३१.२१. [सं.]

**कंठेर** पु. सुंदर तांबड्या कंठाचा पोपट. (गो.) [सं. कंठ]

**कंठ्य** वि. १. गळ्यासंबंधी; कंठातून बाहेर पडणारा (उच्चार). २. कंठवर्गीय, कंठस्थानाचे (वर्ण). [सं.]

**कंठ्यवर्ण** पु. संस्कृत व्याकरणाप्रमाणे ज्याचे निर्मितिस्थान कंठ हे आहे असा ध्वनी जसे : - 'अ, आ' हे स्वर, 'क' वर्गीय व्यंजने आणि 'ह' हे कंठ्यवर्ण आहेत. ध्वनिविचाराप्रमाणे जिभेच्या मागच्या भागाचा मृदुतालुला स्पर्श होऊन निर्माण होणारा मृदुतालव्य वर्ण.

**कंठ्यस्वर** पु. अ आणि आ हे स्वर.

**कंड** स्त्री. १. खाज. २. खरूज. ३. (ल.) तीव्र इच्छा; स्फुरण; सुरसुरी; चेव (लढाई, भांडण वगैरेची). [सं.कंडू]

**कंड** न. बांबूची कांब. (गो.) [सं. कांड]

**कंडका** पु. खांड; तुकडा; ओंडका (लाकडाचा) : 'कात्रून एकदम कंडकाबी पाडायचा न्हाई.' - रैत १४६. (बे.) [क. कडिकु] (वा.) ० **पाडणे** - तोडून टाकणे; भानगड मिटविणे; सौदा ठरविणे: 'अखेर तिनशे रुपयावर कंडका पाडला.' - फगो ९९. (कर.)

**कंडकी** स्त्री. (नाभिक) हजामतीच्या वेळी मांडीवर, अंगावर घालण्याचा कापडाचा तुकडा. (कर.) [सं. खंडक]

**कंडक्टर** पु. १. वाहनामध्ये प्रवाशांना तिकिट देण्यासाठी नेमलेला सेवक; वाहक; आगगाडीत प्रवाशांना मार्गदर्शन करणारा कर्मचारी: 'या साऱ्या रणधुमाळीत कंडक्टरचा पैशाचा हिशेब न चुकता तरच आश्चर्य होते.' - गोळा १३. २. वीज वाहून नेणारी धातूची तार; वीजवाहक. [इं.]

**कंडण-न** न. कांडणे, मार. पहा : **कांडण** [सं. कंडन]

**कंडणी-नी** स्त्री. मुसळ. [सं. कंडन]

**कंडपास** पु. काढणीचा फास. (गो.)

**कंडम** वि. निरुपयोगी; क्षुद्र : 'आम्हांला इमारतीच्या कंडमपणाची आठवणही असत नाही.' - वावा १०७.

**कंडरा** पु. १. स्नायुपुच्छ; शीर; मोठे स्नायू, हाड व स्नायूंना जोडणारी संयोजी उती, स्नायुबंध. २. गळ्याचा दोर; काढणी.

**कंडा** पु. विणलेल्या चुडताचे इरले. (गो.) [सं. कट]

**कंडा** पु. खोट्या अभिमानाने ताठणे, फुगणे; स्वत:च्या मोठेपणाचा देखावा, दिमाख; डौल. [सं. कंडु]

**कंडा** पु. वरून सकलाद किंवा चांदीचा पत्रा मढविलेला दोराचा तुकडा; (घोड्याच्या किंवा बैलाच्या गळ्यातील) शोभेचे चऱ्हाट ; कंठभूषण; 'सर्जे तोडर पाखरा राजहुमे कंडे पटे चांगले।'-सारुह ३.४५. [सं.कंठ]

**कंडा** पु. (मुलांच्या खेळातील विजयसूचक शब्द) मात; कडी. (क्रि. लागणे, लावणे.): 'आज आमचा तुमच्यावरदेखील कंडा झाला की नाहीं सांगा?' - खरादे १०.

**कंडा** पु. गोवरी.(माळवी) [हिं.]

**कंडा** वि. फाकडू; मस्त : 'काय कंडा दिसतेस ग!' - वासू ३१.

**कंडापट्टा** पु. घोड्याच्या गळ्यातील व डोक्यावरील अलंकार : 'सभोवती कंडेपटे साज घोडे उभे केले।' - सप्र १८.२२.

**कंडार** न. शिलालेख खोदविण्याचा खर्च: 'तेहाच पुत्र नाऐक्य कंडार दीधले।' - अंबे शिला १.४६.

**कंडारणा** वि. मोठा आणि सुरेख; जाडजूड आणि सशक्त; भरीव आणि दिखाऊ (माणूस, जनावर, दोर, खांब इ.). [सं.कांड]

**कंडारणे** अक्रि. १. लठ्ठ होणे; भरणे (ऊस, धान्याचे कणीस, माणूस,

जनावर इ.) २. (ल.) मोठा व धट्टा - कट्टा होणे (माणूस, जनावर, झाड इ.) [सं. कांड]

**कंडारणे** अक्रि १. करांडणे; कुरतडणे; तोडणे (उंदराने वस्त्र, कागद इ.) २. कोरणे; खोदणे : 'भुर्जुउखिया विताणि यदा आमुलार्थे सेवटि कंडारिली।' - अंबे शिला १. ४७. [सं. कंड]

**कंडारणे** न. १. शेतकऱ्याच्या आसुडाचे दांडके, मूठ. २. दाव्याचा मधला जाडा भाग. ३. दांडके; सोडगा. ४. एक अलंकार; जाड, ओबडधोबड वेढे, कडी, सरी इ. ५. सोन्याचांदीच्या पत्र्याला ठोकून आकार आणण्याचे सोनाराचे एक हत्यार. ६. कागदाच्या जाळ्या करण्यासाठी कात्रे पाडलेले एक हत्यार. ७. न्हाव्याची नराणी, नखोरे. [सं. कांड]

**कंडाळी** स्त्री. हूल; खोटी बातमी; बाजार अफवा; अवई; वदंता; कुभांड; थोतांड. (क्रि. उठणे, पिकणे, उडणे.) पहा : **कंडी ४**

**कंडिका** स्त्री. छेदक. (परिच्छेद)

**कंडी** स्त्री. गोजरी. (माळवी)

**कंडी** स्त्री. करंडी; वेळूची उंच टोपली. हिच्यात माणूस बसतो व ही मजूर आपल्या पाठीवर बांधून घेऊन डोंगरावर चढतात: 'बरोबरील मंडळीस बसण्याकरता कंड्या.... घेतल्या.' - तीप्र १३. [सं. करंडी]

**कंडी** पडा : **कंडू**

**कंडी** स्त्री. १. गप्प; हूल; खोटी बातमी; भुमका; अवई; वदंता : 'आणखी मोठें मोंगलसैन्य आपला पाठलाग करण्यासाठी येते आहे. अशीही कंडी कानी आल्याकारणाने' - केस्व २८४. २. कुभांड; थाप; थोतांड : 'जड झाले पातळ कुसुंबी नाहीं सांगत कंडी।' - प्रला १८८. [सं.]

**कंडीखोर** वि. गप्पिष्ट; हूल उठविणारा : 'सुधारक थोड्या महिन्यांनी अजिबात बंद होणार... म्हणून जी कंठी उठली होती व कंडीखोरांच्या कृपेने जी कंडी पुन्हाही उठण्याचा संभव आहे' - आगर.

**कंडू** पु. १. खाज सुटण्याचा एक रोग. २. खाल्ल्यावर किंवा स्पर्श केल्यावर खाज उत्पन्न करण्याचा धर्म (वनस्पती, भाजीपाला यांचा.) ३. (ल.) शिरशिरी; खुमखुम; उत्कंठा; आवेश; ईर (लढाई, भांडण इ.ची): 'जेसु तुंवां उत्तमु प्रेतु केला। महापवित्रु बापतिस्मु रचिला। तेणें पापाचा कंडुं फेडिला।' - ख्रिपु १.१.३८. ४. मस्ती; माज; कामवासना; चळ. ५. कोरडी खरूज. [सं.]

**कंडूयन प्रतिक्षेप** प्राण्याच्या पाठीवर थोडा विद्युताघात केल्याने मागच्या पायांची होणारी हालचाल.

**कंडोरा** पु. उसाचा करवा; गंडेरी. (को.) [सं. कांड]

**कंडोलीन** लग्नात वधूसमवेत आरती घेऊन असणारी मानकरीण. (अहि.)

**कंडोळ** न. एक फळझाड; (याचे फळ लिंबाएवढे असते.) कवंडल; कडू वृंदावन.

**कंड्ड** पु. फोडलेला अर्धा बांबू. (गो.) [सं. कांड]

**कंत** पु. (प्र.) कांत; पती; नवरा. [सं. कांत]

**कंत** पु. (सरकारला) सारा, कर देण्याचा हंगाम. (गो.)

**कंतणे** अक्रि. चळणे; ढळणे; हलणे; जागा सोडणे. (कर.) [सं. क्रम् - क्रांत]

**कंतान** न. तरट.

**कंतोस** पु. झुरणी; काळजी.

**कंत्र(त्रा)ण** न. मसलत; कट; शकल; तोड; गुप्त बेत; (चातुर्याने बांधलेले) संधान.

**कंत्राट-ड** न. १. ठेका; मक्ता. २. (ल.) भानगड; कुलंगडे; लचांड; किटाळ. (क्रि घेणे, देणे.)

**कंत्राट(ड)दार** वि. कंत्राटे (ठेके) घेणारा; ठेकेदार; मक्तेदार; कबालदार; एखादे काम अंगावर घेऊन पुरे करून देणारा.

**कंत्राण** न. फंद; कारस्थान; कचाट.

**कंत्राणी-ण्या** वि. गुप्त मसलत करणारा; तोड काढणारा; हिकमती; मसलत्या; खलबत्या (अपायकारक बुद्धीने करणारा.) पहा : **कंत्राटदार**

**कंथ** पु. पती; नवरा: 'कंथा सामोरी आला।' - वसा ५६. [सं. कांत]

**कंथा** स्त्री. १. गोधडी; अनेक चिंध्या एकत्र शिवून व ठिगळे देऊन केलेले जाड वस्त्र: 'कंथा हो कां मृदु आस्तरण।' - एभा १८.२५०. २. जोगी वापरीत असलेले एक उत्तरीय वस्त्र. याचा झोळीसारखाही उपयोग होतो: 'कंथा कमंडलू देह उपचार। जाणवितो वारा अवसरु।' - तुगा २१४०. [सं.]

**कंथा** (गो.) पहा : **कथा**

**कंथाधारी** पु. १. कंथा पांघरणारा, घेणारा, वापरणारा. २. (ल.) जोगी; गोसावी : 'कंथाधारी बहुत केले।' - सप्र १२.३८.

**कंद** पु. १. कांदा; गड्डा; मगज, गीर असलेले मूळ (सुरण, अळू वगैरेचे): 'जन्मरणाचा बाध। समुळूनि तुटो कंद।' - तुगा १३४२. २. रताळे इ. जमिनीत असलेला गोल बुंधा (खा. ना.) ३. (ल.) (समासात) मूळ; साठा; उगम; उत्पत्तिस्थान. जसे:- आनंदकंद, विलासकंद : 'जैसे महूर कां म्हणिजे। विषकंदाते॥' - ज्ञा ५.११५. ४. (योग) नाभिस्थानाखालील मणिपूरचक्र; नाभिकमळ; मूलाधाराचा उर्ध्वभाग; (सामा.) नाभिस्थान; नाभिस्कंद : 'कंदावरी शक्ती। उठली दिसे॥' - ज्ञा ६.२२७.

**कंद** स्त्री. कांडलेली ज्वारी. (व.)

**कंदडी** स्त्री. धारेवर मासे पकडण्याचे साधन. (झाडी)

**कंद(दि)णे** सक्रि. नाश करणे.

**कंदन** न. युद्ध; लढाई; मारामारी; नाश. [सं. कंद]

**कंदपद** पु. (स्था.) खांबाचा एक प्रकार.

**कंदमूळ** न. खाण्याच्या उपयोगी असे कंद व मुळे (रताळी, मुळे, गाजर इ.)

**कंदर-रा** न. स्त्री. १. गुहा; दरी : 'दुमदुमिताती गिरिकंदरे।' - ज्ञा १.१३०. २. डोंगरातील कोरीव लेणे. ३. (ल.) अंत:करण; हृदय : 'बोले तों गृहि कृष्ण ये झटकरी आनंदली कंदरीं।' - नदा ३१. [सं.]

**कंदर** वि. भीषण: 'रात्रीच्या कंदर प्रसंगाचे' - वज्रा २६०.

**कंदराकंदल** न. गवताची एक जात.

**कंदरावणे** अक्रि. चिडणे; चिडून आवाज करणे : 'मधमाशा कंदरावून निघून जात.' - जैत रे ९६.

**कंदर्प** पु. १. मदन; कामदेव : 'ऐसा नियुत कां कंदर्पु।' - ज्ञा ७.५१. २.

(ल.) कांदा. [सं.]

**कंदर्पकेली** पु. शृंगार; मदनक्रीडा; सुरतक्रीडा; स्त्रीसंभोग : 'तेथ कंदर्पकेळी खेळतीं युगळें। राजहंसांचीं॥' - शिव ६४९. [सं.]

**कंदर्पाचे घर** योनी; स्त्रीजननेंद्रिय: 'कुश्चित कंदर्पाचे घर। म्याचि साचार सेविलें।' - एभा २६.११२.

**कंदाकार पृष्ठभाग** (पुरा.) दगडाचे हत्यार बनविताना काढलेल्या छिलक्यावरील फुगीर भाग.

**कंदार** वि. हट्ट; वर्दळ; निकर. (क्रि. येणे, पेटणे) : 'कंदार आयलॉ-पेटलॉ = निकरावर, वर्दळीवर आला.

**कंदार** वि. दाणेदार. [सं. कण]

**कंदारा** पु. एक वनस्पती : 'हे तर कंदाऱ्याचे तणावे.' - शेलूक ११४.

**कंदाल** स्त्री. त्रास; कटकट; भांडण. (को. कुण.) पहा : **कंदाळी**

**कंदाळी** स्त्री. परचक्रापासून होणारा उपद्रव; हानी; त्रास; भांडण (शत्रुसैन्य, लुटारू इ. चा). [सं. कंड्, कंदल = युद्ध, तंटा]

**कंदाळू, कंदिल** न. खुर्चीसारखे आसन; कोच: 'कंदिलें आणली आहेत त्यावर इंग्रज वकील बसत असतात.' - ऐलेसं २४८३.

**कंदाळू** न. महाबळेश्वराकडे होणारे भुईकमळ; महादकांदा. याचा कांदा फार मोठा असतो म्हणून याला हे नाव पडले.

**कंदिका** स्त्री. (वन.) लहान कंद; पानांच्या बगलेत किंवा कडेवर वाढलेली लहान गाठीसारखी किंवा सूक्ष्म मांसल पानांच्या झुबक्यासारखी प्रोरोहरूप संरचना. अशा कंदिका मूळ वनस्पतीपासून तुटून पडतात व नवीन वनस्पती निर्माण करतात. उदा. घायपात.

**कंदी** वि. कंदाच्या (मुळाच्या) रंगासारखा; धुळीच्या रंगाचा; भुरकट; पिंगट रंगाचे; उदी (वस्त्र, पागोटे). [सं. कंद]

**कंदी** स्त्री. खाण; स्थान; साठा: 'जे ज्ञानाचे कंदी' - परमा ११.५. [सं. कंधि = महासागर]

**कंदी** क्रिवि. कधी; केव्हा. (कुण. माण. को.) [सं. कदा]

**कंदी पेढा** पक्या भाजलेल्या शर्करामिश्रित खव्याचे पेढे (साताऱ्याकडे रूढ).

**कंदीमंदी** क्रिवि. कधीमधी; केव्हा केव्हा. (कुण. माण. को.)

**कंदी रुपाया** रुपयाचा एक प्रकार : 'श्रीचे ऐवज कंदी रुपये, मोहरा, पुतळ्या जें असेल तें रवाना करणें म्हणोन आज्ञा.' - राखं ३.३८.

**कंदीय सुषी** (वै.) अस्थिमज्जेला होणारा व्रण, येणारी सूज.

**कंदील** पु. १. वारा, पाऊस यांपासून संरक्षणासाठी काच असलेला, हातात धरण्यासाठी धनुष्याकृती कडी असलेला व सहजपणे कोठेही नेता येण्यासारखा दिवा; फाणस. २. पितळेचा लामणदिवा; टांगता दिवा. (पूर्वी वाणी लोकांच्या दुकानात लावत असत.) [अर.]

**कंदी हिमनग** ज्यावर बरेच उंचवटे आहेत असा बर्फाचा ढिगारा.

**कंदुक** पु. चेंडू: 'नातरी उदकाचिये भूमिके। आफळिलेनि कंदुके।' - ज्ञा १७.२८०. [सं.]

**कंदुक क्रीडा** क्रिकेट - व्यायाम जा १९२०.

**कंदुक झडप** (स्था.) चेंडूच्या आकाराची - विशेषत: टाकीचे पाणी कमीजास्त होताना उपयोगी पडणारी झडप.

**कंदु(दो)री** स्त्री. १. गलबतासाठी व इतर कामासाठी मोठे दोर तयार करण्याकरिता बांधलेला लांबट सोपा - घर. (को.) २. गळ्यात बांधायचा मंतरलेला दोरा. ३: करगोटा; कडदोरा. [क. कण्णी]

**कंदु(दो)री** स्त्री. १. पैगंबर महंमद याची मुलगी फातिमा हिच्या सन्मानार्थ मुसलमान लोक करतात तो भोजन समारंभ. २. (ल.) उत्सवाचे जेवण; भंडारा; समाराधना: 'कंदुरी सोहळा स्वानंदाचा।' - दावि २५३. ३. बकऱ्याचे मांस; सागुती; मांसाचा नैवेद्य: 'त्या कंदुरीचीं पुण्यें जातीं ते करामत देखोन।' - मब १०३. (वा.) ० **करणे** - जत्रेत बकरे वगैरे बळी देणे : 'ते गांवचे पिराला बकऱ्याची कंदुरी करतात.' - गुआ ३१. [फा. कंदूरी]

**कंदुरी** स्त्री. जेवणाच्या मेजावर अंथरावयाची चादर. (टेबलक्लॉथ) [फा.]

**कंदुल** पु. कांचनाचे फूल; फुलाची एक जात; कंदल : 'कंदुलाचे हार तुटले। अशोकाचें झळबुके गळाले।' - शिव ७१७. [सं. कंदल]

**कंदोरी** पु. १. कंजारी लोकांची जात. हे दोऱ्या करतात. २. पहा : **कंदुरी**

**कंद्या-ध्या** पु. कंदील; फाणस. (को.)

**कंधर-रा** पु. स्त्री. मस्तक; शीर; कंठ; मान; गळा: 'कंधरी घातली ज्याने त्याने।' - वामन उपदेश माला १.६२. [सं.]

**कंधूर** न. हरळीसारखे एक गवत; कुंदा. (माण.) [सं. कंदल = नवा अंकुर]

**कंप** पु. १. थरकाप; कापरे; हलणे; थरथरणे; वात, भय यामुळे शरीर, वृक्ष आदींना जे चलन मिळते ते : 'मस्तक आदरी शिरो। भागी कंप॥' - ज्ञा १३.७५७. २. (ल.) धाक; दहशत; भीती: 'आणि जयाचा अहा कंपु। तापसांसी॥' - ज्ञा १८.१०५७. ३. (संगीत) गाताना कंठातून निघणारा कापरा आवाज. तान; स्वरनलिकांचे थरथरणे; भाषिक ध्वनीला घोष हा गुण देणारी शारीरिक क्रिया. (क्रि. कंपणे.) [सं.]

**कंपक** पु. जिभेचे टोक, पडजीभ किंवा ओठ यांच्या कंपनाने निर्माण होणारी ध्वनी. उदा. र हा ध्वनी कंपक आहे.

**कंपण, कंपणकाटा** पु. १. (सोने, मोती वगैरे) सूक्ष्म व मौल्यवान पदार्थाचे तंतोतंत वजन दाखविणारा ताजवा. २. (सोनारी) पेटीच्या मध्यावर उभा लोखंडी दांडा बसवून त्यावर लावलेला (भारधडीच्या कामाचा) मोठा ताजवा.

**कंपणे** (प्र.) कापणे; थरथरणे; लटलटणे (भीती वगैरेमुळे). पहा : **कापणे**

**कंपन** न. १. (शाप). आंदोलन; आघातामुळे वस्तूंच्या कणात होणारी हालचाल; शरीरात अथवा शरीरावयवात जागजागी होणारी हालचाल, कापरे. २. कापरे; कापणे; थरथरणे; लटलटणे; हालणे (भीतीने, क्रोधातिशयाने). ३. (संगीत) एकच स्वर आवाजाला कंप देऊन दुसऱ्या कोणत्याही स्वराला स्पर्श न करता लांबवणे. [सं. कंप, कंपन]

**कंपन अधर** (नृत्य) ओठ कापविणे. हा अभिनय रागावणे, थंडी वाजणे, रोगग्रस्तता दाखवणे, भीती वाटणे व जयप्राप्ती इत्यादिकांचा द्योतक असतो.

**कंपन ऊरू** (नृत्य) पाय वारंवार उद्घटित करून मांडीला कंप उत्पन्न करणे; चालण्याची क्रिया दाखवणे झाल्यास हा अभिनय करतात.

**कंपनरोधक** पु. (यंत्र.) कंपने शोषून घेणारे साधन. उदा. वाहनांमध्ये वापरले जाणारे कंपनरोधक.

**कंपनानुवर्तन** मु. (वन.) कंपनांच्या चेतनेनुसार अधिक स्थानिक वाढ होऊन अवयवात वक्रता येणे; स्पर्शाच्या चेतनेमुळे उलट बाजूला वाढ अधिक होऊन वक्रता येण्याची प्रक्रिया. उदा. वेलीचे टोक; स्पर्शानुवर्तन.

**कंपनालेखक** पु. (स्था.) कंपनांची नोंद करण्याचे यंत्र; भूगर्भातील हालचालींमुळे होणारी कंपने मोजण्याचे साधन.

**कंपनी** स्त्री. १. मंडळी; टोळी; मंडळ. २. (१०० ते २०० पर्यंत) लष्करी शिपायांची एक तुकडी. ३. व्यापारधंदा करण्यासाठी कायद्याने एकत्रित झालेली मंडळी. ४. सहवास; सहवासातले लोक. [इं.]

**कंपमान, कंपायमान** वि. थरथरणारा; लटलटणारा; हालणारा. [इं.]

**कंपरोधी** पु. (यंत्र.) धक्का शोषणारे संयत्र.

**कंपवात** पु. कंपवायू; ज्याच्यामुळे अंग कापते असा वात; एक रोग; खंज वायू. [सं.]

**कंपवेळ** स्त्री. घाबरण्याची वेळ; कातरवेल.

**कंपश** क्रिवि. कमी अधिक; सुमारे; अदमासे: 'कंपश कोसभर आहे.' - नाग ३.७५.

**कंपाउंडर** पु. औषध तयार करून देणारा; डॉक्टरांचा मदतनीस. [इं.]

**कंपारी** स्त्री. थरकाप; थरथराट: 'आपण राग मानाल अशी माझी मनोदेवता मला सांगून लागली म्हणजे माझ्या शरीराची कंपारी होते.' - विक्षिप्त ३.८७. [सं. कंप]

**कंपार्टमेंट** पु. आगगाडीच्या डब्यातील किंवा एखाद्या मोठ्या दालनातील बंद केलेला खण, भाग किंवा लहान डबा. [इं.]

**कंपास** पु. १. वर्तुळाकृती काढण्याचे, दोन बाहु असलेले साधन; कुशलकामगार व विद्यार्थी यांच्या वापरातील साधन: 'कोशकारांनी आपला स्वैरक्रम सोडून मर्यादेने वागण्यास सांगणे म्हणजे नदीच्या ओघांवर व पर्वतांच्या रांगावर रूळ व कंपास चालविणे होय.' - नि. ४९७. २. होकायंत्र: 'तसेच कितीएक देशातील लोक ह्या यंत्रास (होकायंत्रास) कंपास असे म्हणतात.' - मपु ८०. [इं. कंपास]

**कंपित** वि. हालत असलेले, कापत असलेले, थरथरणारे (शरीर वगैरे). [सं. कंप]

**कंपित कटी** (नृत्य) चालताना एका पायावरचा भार दुसऱ्या पायावर पडत असता कंबर एकदा एका बाजूला व एकदा दुसऱ्या बाजूला वाकली जाईल असा अभिनय करणे.

**कंपित कपोल** (नृत्य) हसताना गाल स्फुरण पावल्याचा अभिनय दाखविणे.

**कंपित शीर्ष** (नृत्य) भराभर डोके खाली वर करणे, प्रश्न विचारणे, राग आला असे दाखविणे, विचारात गढलेले दाखविणे वगैरे गोष्टी करण्यासाठी हा अभिनय करतात.

**कंपित्र** न. सतत कंपने निर्माण करणारे यंत्र.

**कंपित्र** न. (ध्वनि.) कंपनसंख्या विभाग; कंपने मोजण्याचे उपकरण.

**कंपू** पु. १. तंबू घालून, तळ देऊन राहिलेले सैन्य. २. सैन्याचा एक विभाग, तुकडी, कंपनी (११ पलटणी): 'एका परीस एक शिपाई रांगडा हिंदुस्थानी। दोन कंपू फिरंगाणी।' - ऐपो २७८. ३. विशेषतः युरोपियन लष्करी पद्धतीने तयार झालेले देशी राजाजवळचे सैन्य; कवायती पलटण : 'तवां कंपूनें कटाव केला मोरचे आले म्होरे म्होरे।' - ऐपो ३५०. ४. विशिष्ट मताची किंवा विचाराची मंडळी; गट; समुदाय; टोळके; मंडळ: 'आम्ही हॅरिसन आदिकरून मंडळीच्या कंपूत जाऊन मिळालो.' - लोटिकेले १६०. [इं. कँप]

**कंपूशाही** स्त्री. काही विशिष्ट हेतूने एकत्र येणे .तेवढ्याच गटाचे हितसंबंध जपणे ही प्रवृत्ती.

**कंपेश** पु. फरक; कमी अधिक प्रमाण: 'बाजीराव कबूल होतांच त्याशी पूर्ववत् प्रमाणे कांही एक कंपेश न करतां दोस्ती सरकारने कायम ठेविली.' - इनाम २४०. [फा.]

**कंपेश** स्त्री. कंबेशी; न्यूनाधिक्य; घोटाळा; गोंधळ.
वि. १. कमी अधिक, थोडे जास्त किंवा थोडे कमी; जवळ जवळ: 'कंपेश चाळीस हजार फौज.....' - ऐलेसं ७.३२८८. २. तंतोतंत: 'सला झाल्याप्रमाणे वर्तणूक कंपेश न केल्यास पारिपत्य होईल.' - ऐलेसं ५.२६०७. ३. सहज; विनायास : 'असेच करणे असते कर कंपेश वरखाचा आरसा होता.' - इसंहोकै ६.

**कंफ** पहा : **कंप** [सं. कंप]

**कंबखत-ती, कंबक्ती-ख्ती** मार खाण्याचा प्रसंग; आणीबाणीची वेळ: 'कंबखती आली आता पण डरून काय उपयोग?' - त्राटिका. [फा. कम्+बख्त् = वाईट वेळ]

**कंबडी** स्त्री. कळकाची कांबीट; कामटी; फीट; भेतूक. [सं. कमठ = वेळू]

**कंबणे** अक्रि. वाकणे. (बे.)

**कंबर** कटी; शरीराचा मध्यभाग; कमर.

**कंबरडे** न. कंबर. (वा.) ० **मोडणे** - १. अतिशय थकून जाणे. २. बंद पडणे; अयशस्वी करणे; अशक्य करणे : 'पोलिसांकडून गोळीबार करवून संपाचे कंबरडे मोडता येते.' - धाधो ७.

**कंबरबार** पु. करवसुली कारकून.

**कंबल** न. (संगीत) एक प्रकारची स्वररचना. [सं.]

**कं(क)बल,** न. पु. अर्धा किंवा अर्ध्याहून अधिक भाग (फळ, दगड, वगैरेचा फुटून निघालेला). (राजा.) [सं. कवल]

**कंबळ** पु. कांबळी; घोंगडी; लोकरीचे वस्त्र; धाबळी : 'मोक्षादि सर्वसिद्धिची श्रेणी। श्वेतकंबलासनीं साधकां।' - एभा १४.४०५. [सं. कंबल]

**कंबळ** पु. (पगडबंद) पागोट्याचा किंवा पगडीचा डोक्याभोवतालचा भाग. हा डिंकाने कागद चिकटवून तयार करतात व त्यावर कापडी पट्टी शिवतात. [सं. कपाल]

**कंबळ** स्त्री. भोवरसाल; एक झाड.

**कंबळी** स्त्री. कांबळे; जुनी घोंगडी, पटकूर: 'काळी कंबळी गुंतून बुंथी।'

- नव १३.१२३. [सं. कंबल]

**कंबुकंठ** पु. शंखासारखा गळा (हे सौंदर्याचे लक्षण समजतात.) : 'ओंकार मातृकांसकट। तोचि जाणावा कंबुकंठ।' - एरुस्व १.४२.

**कंबु-बू** पु. शंख : 'श्रीद त्यजिले वरिला अदक्षिणावर्त तुच्छ कंबु कसा।' - मोसभा ४.१४. [सं.]

**कंबेश** फरक, कमी अधिक, कंपेश.

**कंबेशी** स्त्री. १. कंपेशी; कमी करणे; कुचराई : 'तेव्हा चाकरीच्या कंबेसीचे इलाजमास चिंता नाही.' - होकै ४०.२. न्यूनाधिक्य; कमीअधिकपणा.

**करंच(ज)कर, करच(ज)कर, करजगार** पु. हत्यारे करणारा; शस्त्रकार; शिकलगार. [सं. क्रकचकार]

**कंवठाळी** वि. कारस्थानी. (गो.)

**कंवसाल** न. कपट; किटाळ; युक्ती.

**कंवसाली-ल्या** कपटी; कुभांडी; चेटूक करणारा.

**कंशा** पु. पक्षपाती काम पत्करणारा; सूड घेणारा किंवा रक्षण करणारा; विशेषत: भांडणतंट्याला फूस देणारा.

**कंस** पु. १. वर्तुळाच्या, परिघाचा भाग, अंश, तुकडा; वर्तुळाची ज्या. २. ( ), [ ], { } यांपैकी कोणतेही चिन्ह. ३. कुंडली. [सं.]

**कंसिया** स्त्री. हिरवी गारगोटी; एक रत्न.

**कंक्षा** स्त्री. मर्यादा; भीड; मुर्वत. (गो.) [सं. कांक्षा]

**क:पदार्थ** उद्गा. (तिरस्कारार्थी) तुच्छतादर्शक प्रयोग. (क्रि. मानणे.) वि. तुच्छ; क्षुद्र. [सं.]

**का, कां** क्रिवि. १. प्रश्नार्थक वाक्याच्या शेवटी तोच अर्थ दर्शविण्याकरता हे अव्यय योजतात. त्यामुळे वाक्यार्थ पूर्ण होतो. जसे :-'तू मग तिकडे जातोस कां?' २. वाक्यातील क्रियापदानंतर येणारा प्रश्नवाचक शब्द. याचे उत्तर सामान्यत: हो किंवा नाही असे असू शकते जसे :- 'तुझी परिक्षा संपली कां?' ३. कारण विचारणारे प्रश्नार्थक अव्यय; कशासाठी; कोणत्या कारणाने; काय म्हणून: 'मी पायां लागे कां। काइंसेया लागीं।' - शिव २२४.
उअ. अथवा; किंवा; की: 'कां नुदेलिया सुधाकर। आपणपें भरे सागर।' - अमृ ७. १५२.

**का, कॉ** उद्गा. काव्, काव् असा कावळ्याचा ध्वनी : 'का का शब्द करूनी भ्रमती त्यांच्या कुळात मी झालों।' - मोकर्ण २८.५९.

**काइ** वि. कच्चा. - (तंजा.)
न. कच्चेफळ. [द्रा. क. काई = कच्चे फळ.]

**काहणी** स्त्री. (प्र.) १. कहाणी. २. ज्यामुळे लोंबी काळी पडते असा जोंधळ्यावरील, ज्वारीवरील रोग. पहा : **कावी**

**काइमी** स्त्री. कायमपणा; स्थिरपणा; पक्केपणा; शाश्वती; अढळपणाची स्थिती; ठरलेली परिस्थिती. [फा. काईम]

**काइर** न. १. खाणारा. २. हाडवैर: 'म्हणुनु समर्थेसि वैर। जेया पडे हाडकाइर।' - राज्ञा १३.५४९.

**काइरे मुबारक** दीनाला रक्षण द्यावे अशा हेतूने : 'किल्ले व मुलूख दौलत कइरे मुबारक दाखल जाला.' - पेद ३१.४३.

**काई** स्त्री. शेवाळ. (झाडी) [हिं.]

**काईट** पु. काळ्यापाठीचा हरिण.

**काईत** कायस्थजात; त्या जातीतील व्यक्ती; कारकून: 'हल्ली सवाईजीकडून एक काईत व आमचे तरफेने मोरोपंत सैदाकडे रवाना झाले.' - पेद ११.१०; कायत. [सं. कायस्थ]

**काईम** वि. १. कायम; उभा. २. स्थिर; मजबूत ठोकलेला; पक्का. ३. काबीज: 'परंतु आठपंधरा दिवसात सारी स्थळे इंग्रजांनी काईम करितात.' - ऐलेसं ११.६०७. ४. नित्य.[फा. काईम् = उभा, स्थिर]

**काईमदाईम, काएमदाएम** वि. निरंतरचा; कायमचा; फार पूर्वीपासूनचा; सतत चालणारा. [फा.]

**काईल** स्त्री. काहिली; उसाचा रस कढवण्याचे पसरट तोंडाचे भांडे; मोठी कढई. (वा.) **काईलीतला खडा** - तावून सुलाखून निघालेला, कसोटीला उतरलेला (माणूस.). [सं. काइल = विस्तृत]

**काई(य)ल, कायर** वि. १. दंडित; जित; पराजित केलेला: 'दोहींकडून तुम्ही काईल व्हाल तेव्हा आम्हांवर शब्द' - मइसा १. २२६. २. कुंठित; हैराण; निरुत्तर: 'पत्र कोठें आहे तें काढावें म्हणजे आम्हीं त्यांस काईल करूं.' - ऐलेसं ५.२४७३. [फा. काइल = जित]

**काईस** अनमान.

**काउ-ऊ** पु. (बालभाषा) कावळा.

**काउरे** न. वेड; भ्रम; पहा : **काविरे**

**काउस** न. एक प्रकारचे गवत. याच्या मुळ्या दहाबारा फूट खोल जातात. या मुळ्या पिकांना त्रासदायक असतात. [सं. काश]

**काउळकाठी** स्त्री. काटक्या; राबासाठी झाडाच्या तोडलेल्या फांद्या; पहा : **कवळकाठी**

**काऊ** स्त्री. गेरू; काव. (को.)

**काऊचिऊची भाषा** १. बालबोध, सहज समजेल अशी भाषा; मोठ्यांनी वापरलेली मुलांची भाषा. २. नम्रपणाची भाषा; दुबळेपणाचे बोलणे: 'मुजोरीला काऊचिऊची भाषा का वापरली जावी माझ्या अल्पमतीला कधी कळलं नाही.' - एल्गार ९९.

**काऊन, काहून** क्रिवि. का म्हणून. (ना.)

**काऊर** वि. जबर काम करणारा; मेहनती. (व.) [सं.कार्यकर]

**काऊर** स्त्री. कावीळ. (झाडी) [सं. कामला]

**काऊल** न. कुरण. (बे.) [क. कावल-ली]

**काऊस** पु. १. उसाच्या शेंड्यांचा नीरस भाग; वाढे. (व.) २. (ल.) कुचकामाचा माणूस; निरुपयोगी माणूस: 'उसाच्या पोटी काऊस जल्मून त्याचा फायदा काय?' - धग ९५. [सं. दक्षु]

**काऊळकाठी** १. राब. २. झाडपाला; हलक्या काठ्या; शिरकाठी (कवळकाठी). (गो.)

**काक** पु. कावळा; काऊ: 'जे मृत्यूकाकासीं कुरोंडी। सांडिली आहे॥' - ज्ञा ८.१४०. [सं.]

**काक** पु. फांदी फुटण्याचा सांधा; काख. (माण.) [सं. कक्षा]

**काककव्वा** पु. काकाकुवा.

**काकजंघा** स्त्री. एक वनस्पती; कांग. [सं.]

**काकट-ड** वि. अढळ; स्थिर; भक्कम, मजबूत बांध्याचे.

**काकट(ड)णी** स्त्री. तिरपीट; अडळखण्याची स्थिती. (गो.)

**काकटी** स्त्री. पवित्र्याचा एक प्रकार. [सं.]

**काकड** स्त्री. थंडीने भरणारी हुडहुडी. (क्रि. भरणे.)

**काकड** न. एक फळ; त्याचे लोणचे करतात.

**काकड** पु. सरहद्द: 'आमचे काकडावर फौज आलियावर .... या पत्राप्रमाणे व्हावे.' - धापइसा ३.२३२.

**काकड** पु. हरिणाची जात. (झाडी) [सं. कर्कर]

**काकड** पु. खडकाळ भाग; खडबडीत, अडचणीची वाट; खोरें: 'जैपूरचा व बुंदीचा काकड आहे त्या मार्गातून इन्द्रगडावरून चमेलचा घाट दहा कोस आहे तिकडे चालावे' - भारतवर्ष ७२.

**काकडआरती** स्त्री. पहाटेच्या वेळी काकडा पेटवून त्याने देवाला करायची आरती: 'काकडआरती परमात्म्या श्री रघुपती।' - पावि २६०.

**काकडकुडा** वि. थंडीने काकडलेला, कुडकुडलेला, ताठरलेला; हुडहुडी भरलेला.

**काकडकुंभायी** पहा : **कुकुटकुंभा**

**काकडखार** पु. भाताची एक जात. (झाडी)

**काकडणे** अक्रि. थंडीने गारठणे; कळा येऊन अवठरणे (हात, पाय इ.) : 'काकडले बैसली दातखिळी।' - दावि ६६. [ध्व. कड] [सं.]

**काकडशिंगी** स्त्री. एक औषधी वनस्पती. हिरड्याच्या पानांच्या देठाशी रस जमून तिथे फोडासारखी ग्रंथी बनते ती शेंग. हिचा रंग काळसर असून आकार खेकड्याच्या आकड्याप्रमाणे किंवा बोकडाच्या शिंगाप्रमाणे असतो. म्हणून या वनस्पतीला हे नाव पडले. बाळंतपणात किंवा लहान मुलांच्या रोगावर ही औषधी आहे. [सं. कर्कटशृंगी]

**काकडा** पु. १. कापडाच्या चिंधीची वळलेली वात: 'त्रिगुण काकडा द्वैतघृते तिंबिला।' - दावि २६०. २. दिव्याची वात. ३. काठीला चिरगूट गुंडाळून त्यावर तेल ओतून पेटवलेली मशाल : 'सूक्ष्माहि रविकिराहूनि बहुत तमा काय काकडा खातो।' - मोभीष्म ५.६. ४. कापडाची बारीक गुंडाळी, दोरी. ५. (ल.) चामड्याच्या चाबकाचे टोक; चाबकाची वादी. ६. वादीने मारलेला फटकारा, तडाखा: 'बैलांच्या पाठीवर काकड्यांचा सडासड आवाज उठत होता.' - वैष्णव २९. ७. (ल.) लांब आकडा (चिंच वगैरेचा). ८. (ल.) विंचवाची वळलेली नांगी. (खा.)

**काकडा** पु. पुरते तयार न झालेले भातपीक वगैरे; कोवळे, कच्चे (पेरू इत्यादी) (को.); काकाडो. (गो.)

वि. लहान व रसभरीत, हिरवा व रसाळ.

**काकडा-डी** पु. स्त्री. अतिशय थंड हवा; अंग गारठवणारी थंडी. (क्रि. भरणे.)

**काकडी** स्त्री. १. एक प्रकारचा वेल व त्याला येणारे फळ; खिरा, काकडी, वाळूक, तवसे इ. फळे एकाच जातीची आहेत. स्त्री. २. (ल.) क्षुद्र वस्तू. [त. कक्करि] [सं. कंक = श्येन]

**काकडोळा** पु. स्त्रीयांच्या केसातील एक अलंकार.

**काकण** पु. गरुड पक्षी. (कु.)

**काकण-णी** न. स्त्री. कंकण; बांगडी; पाटली; बायकांच्या हातातील सोन्याचा एक दागिना; कंकणी; मनगटाचे भूषण; अलंकार: 'कां नाटितां कांकण। सोनेंचि तें॥' - ज्ञा १४.३७८. [सं. कंकण] (वा.) ० **घालणे, भरणे** - १. हातात बांगड्या भरणे. २. (ल.) बायको, भागूबाई, भ्याड पुरुषाला लावतात: 'कांकणे आम्हासम हातीं। भरलेली कां हो होतीं।' - संग्रामगीते ४२. ० **फुटणे** - १. वैधव्य येणे; बांगड्या फुटणे. २. कडक शिक्षा करणे. ० **वाढणे, वाढवणे** - (बायकी) बांगड्या पिचणे, फुटणे (कांकण हा सौभाग्यालंकार असल्याने त्याला फुटणे न म्हणता उलट वाढणे, वाढवणे असा प्रयोग करतात. जसे :- कंकू वाढवणे, वाढणे इ.)

**काकणकार** पु. बांगडी कासार; बांगडीवाला. (गो.)

**काकणकोर न.** बांगडीचा तुकडा. (ना.)

**काकणघोण** स्त्री. गोम; घोण. (गो.)

**काकणता, काकणा** पु. १. (सोनारी) गोठ, पाटली, अंगठी, वाकी किंवा यासारख्या दागिन्यांना गोल आकार देण्यासाठी केलेला खुंटा, निमुळता ठोकळा; देशमुख; वरताणा; काकता. २. चौंगा; पाच अंगुळे रुंदी; हाताची रुंदी. (दे.) [सं. कंकण]

**काकणभर** वि. १. थोडे अधिक; किंचित जास्त. दोन वस्तूंची तुलना करताना एकीचे दुसरीवर किंचित आधिक्य दाखविण्यासाठी योजतात: 'पुरुषाइतकीच किंवा कांकणभर जास्तच बुद्धिमत्ता असून कित्येक शतके आम्ही विचार करावयाचे सोडून दिले.' - विविधवृत्त (खास अंक १९२८). २. (सामा.) अल्पप्रमाण, काकणभराने, काकणभऱ्याने अशीही रूपे आढळतात.

**काकणी** स्त्री. अर्धे कणीस. (गो.)

**काकणी पाग** मासे पकडण्याचे एक प्रकारचे जाळे. (को.)

**काकणेज** न. रेणुका; रेणुकाबीज; एक सुगंधी औषधी द्रव्य.

**काकता** पहा : **काकणता**

**काकतालीय** यदृच्छा; आकस्मिकता; दैवघटना; योगायोग.

वि. यदृच्छापूर्वक; एकसमयावच्छेदे; सहजासहजी घडणारी; आगंतुक; दैवागत. [सं. काक+ताल = ताड]

**काकतालीयन्याय** पु. कावळा बसल्यावर फांदी तुटली तर त्यात कार्यकारण भाव मुळीच नसतो यावरून यदृच्छेने, दैवगतीने वा कर्मधर्मसंयोगाने वास्तविक कार्यकारणाभाव नसताना जोडलेला संबंध. जसे :- कावळा बसणे, फांदी तुटणे.

**काकताळ** आकस्मितता; दैवघटना: 'अमृतसिद्धी योग फावला। अकल्पित काकताळें।' - निमा (आत्मचरित्र) १.१०४.

**काकदंतपरीक्षा** स्त्री. ज्यात काही अर्थ नाही अशा विषयाची खोल चिकित्सा (वास्तविक कावळ्याला दात नसतात यावरून).

**काकदृष्टि-ष्टी** वि. १. तीक्ष्ण दृष्टीचा; सूक्ष्म दृष्टीचा; बारीक व चलाख नजरेचा. २. छिद्रान्वेषी; वाईट तेवढ्याच गोष्टी पाहणारा.

स्त्री. (कावळ्यासारखी) तीक्ष्ण नजर; सूक्ष्म नजर; दृष्टी : 'बाजारांतून

जर सोदे काकदृष्टीने फिरले तर संध्याकाळी येथे वेळ मोडून राहण्याचा मोबदला मिळेल.' - विवि ८.८.१५५. [सं.]

**काकपद** न. १. लिहिताना गळालेल्या अक्षराच्या दुरुस्तीच्या वेळी जेथे ते अक्षर घालायचे असेल तेथे करायची. (कावळ्याच्या पायासारखी) ^ अशी खूण. २. हिरा या रत्नात, तीन मोठे काळे छाटे असल्यास त्या दोषास म्हणतात. ३. शरायती. [सं.]

**काकपक्ष** पु. कानांवरील झुलपे; लहान मुलाच्या पहिल्या हजामतीच्या वेळी दोन्ही कानांवर ठेवलेली जाणारी झुलपे. मोठेपणी काढून टाकतात. [सं.]

**काकफळ-ळी** स्त्री. एक वनस्पती: 'बेल, काकफळी, वेल निर्गुळी आणि कंदमुळी.' - मोहना.

**काकबली-ळ-ळी** पु. स्त्री. न. वैश्वदेव व बलिहरण होऊन उरलेला भात घराबाहेर कावळ्याला टाकतात तो; कागवळ. (को. गो.)

**काकबाळ** न. कडेवरचे मूल; कुकुबाळ. (कु.)

**काकम, काके** स्त्री. काकवी. (गो.)

**काकमारी** पहा : **काकफळ**

**काकमुखी** वि. सगळा एकरंगी पण तोंड काळसर असलेला घोडा.

**काकमैथुन** न. कावळी कावळा यांचा रतिप्रसंग, मैथुन. हे पाहिले तर लवकर मरण येते अशी समजूत असल्यामुळे ते पाहणारा आपल्या मृत्यूची खोटीच बातमी पाठवतो.

**काकय** स्त्री. कावीळ. (गो.)

**काकयव** पु. १. ज्यामध्ये पीठ किंवा सत्त्वांश नसतो असा पोचट यव; फोलकट; धान्याचे वांझ कणीस. २. तृणधान्य: 'षंढतिळ घर्ममयमृग काकयव जसे तसेचि फटकळ गे।' - मोसभा ७.९. [सं. काकयव]

**काकर** पु. १. कातड्याची वादी; ढोल, तबला यांची वादी; ओढण; पहा : **कंकर**. २. शरीरावर नखाने बोचकरल्यामुळे उठणारा ओरखडा; ओरबाडा; खरचटल्याची खूण. (राजा.) ३. छातीच्या बरगड्या जुळलेल्या असतात तो कण्यासह पाठीचा भाग: 'बरगड्या, मान, काकर वगैरे भागातले मास व हाडे यखनीच्या चांगलीं उपयोगी पडतात.' - गृशि २.१२.

**काकर** पु. (पिंजारी) कापूस पिंजण्याच्या कमानीला असलेल्या पंख्याच्या कडेवरील पट्टी.

**काकर** स्त्री. १. (भाकरीचा खेळ) नदीतील, तलावातील पाण्याच्या पृष्ठभागावर खापरी अथवा चपटा दगड जोराने पाण्याला सरपट मारला असताना होणाऱ्या उशा प्रत्येकी. २. भोवरा जमिनीवर टाकला असताना त्याचे होणारे पहिले एक दोन फेरे (हे हळू होतात.).

**काकर** पु. १. ऊस लावायचा लहान उंचवटा. (झाडी) २. पहा **काकरी** १

**काकर** १. अश्रू. २. हरभऱ्याचे न फुगलेले दाणे. (अहि.)

**काकरडोंगर** पु. दरीखोरे. (अहि.)

**काकरणे** अक्रि. चाचरणे; कां कू करणे; हो ना करणे; दिरंगाई करणे.

**काकरणे** अक्रि. मिटणे; लागणे. (व.)

**काकरता** वि. क्रिवि. तिरकस; कसरता; वळलेला; तिरपा; बाजूवर कललेला. (वा.) ० **घेणे** - माघार घेणे; पाय मागे काढणे; पाय काढता घेणे, निसटणे.

**काकरती** क्रिवि. निसटती : 'पागेचे लिंगोजी जाधव यांस गोळी काकरती दंडावर लागली.' - ऐलेसं ८९३.

**काकरव** पु. १. कावळ्याचे ओरडणे; कावकाव. २. (ल.) निंदकांची व्यर्थ निंदा: 'ज्यास आपली योग्यता यथार्थ भासत असेल त्याने ... कर्णकटु काकरवाची अगदी पर्वा करूं नये.' - नि [सं.]

**काकरी** स्त्री. नांगराची एक फेरी, वळसा (क्रि. घेणे.); पेरणीच्या वेळी तिफणीने पडलेल्या रेषा; पेरण्यामागे ओढायची काट्याची फांदी.

**काकरी** स्त्री. कातलेले रेशीम, त्याचे गुंडे, गुंडाळे, लड, कुकडे; कंकरी.

**काकरी** स्त्री. बारीक खडी; दगडाच्या बारीक चिपा: 'रेती अथवा काकरी टाकून जागा साफ करावी.' - स्वारी नियम (बडोदे.) ११५. [गु.]

**काकरोळ** पु. एक पक्षी: 'बोक, कबुतर, सुरखाव, काकरोळ हे जसे जमीनीवरचे पक्षी' - गृशि २.१०.

**काकलक** न. कंठमणी; नरडे; कंठनाळाचा पुढे आलेला मुख्य भाग. [सं.]

**काकला-लो** पु. मावशीचा नवरा; मावसा.

**काकलावी** स्त्री. करिहारी; लांगलिकी; अग्निशिखा; एक वनस्पती. [सं.]

**काकलीनिषाद** पु. (संगीत) प्राचीन भारतीय संगतीतील दोन विकृत स्वरांपैकी एक.

**काकवंध्या** स्त्री. एकदा प्रसूत होऊन पुन्हा प्रसूत होत नाही अशी स्त्री, मादी.

**काकवी** स्त्री. १. उसाच्या रसाचा कच्च्या कढाचा पातळ राधा. २. आटवून थोडासा घट्ट झालेला उसाचा रस मडक्यात भरून ती मडकी घडवंचीवर पालथी ठेवल्यावर त्यातून गळून पडणारा रस : 'भिऊनि म्हणतील कां जशि सुधा तशी काकवी।' - केका १०९. ३. गुळाचा राब.

**काकशंका** स्त्री. कावळा ज्याप्रमाणे साशंकपणे बसतो तसा साशंकपणा; भीती : 'संकोचें अंग खाणें असुखद बसणें का कशंकाप्रमाणें।' - किंसु ८३.

**काकसावणे** अक्रि. शंका घेणे; अंदेशा, आशंक धरणे. (कु.) < [सं. कांक्षा]

**काकसावळा** वि. काळा; काळ्यासावळ्या रंगाचा.

**काकसासरा** पु. नवऱ्याच्या आत्याचा नवरा. - (तंजा.)

**काकसासू** स्त्री. नवऱ्याची आत्या. - (तंजा.)

**काकस्नान** न. कावळ्याप्रमाणे घाईघाईने, अर्धवट केलेले स्नान; अंघोळ. पहा : **मुसळस्नान**

**काकस्पर्श** पु. मृताच्या दहाव्या दिवशी मृताला द्यायच्या पिंडाला कावळ्याने शिवणे. या पिंडाला कावळा शिवला नाही तर मृताच्या आप्तांपैकी कोणी तरी त्या वेळी मृताच्या इच्छा पूर्ण करण्याचे वचन देतो व त्यानंतर पिंडाला कावळा स्पर्श करतो. [सं.]

**काकस्वर** पु. १. कावळ्याची ओरड; कावकाव. २. (ल.) कर्णकठोर स्वर.

**काकळ** वि. नाजूक : 'कोंबड्याची जात काकळ.' - गागो ७४.

**काकळी** स्त्री. काकडी. (व.)

**काकळूत, काकळूतमामळूत** स्त्री. १. दया करण्याबद्दल परोपरीची विनवणी; कळावळा उत्पन्न करण्यासाठी गयावया करून प्रार्थना, विनंती करणे; करुणा भाकणे (क्रि. करणे.) २. करुणा; दया; अनुकंपा; कळवळा. (क्रि. येणे, करणे.): 'या गड्यानो तुमची मला काकळूत वाटत्ये.' - बाळ १.७०.८०. ३. दयेमुळे अपराधाची उपेक्षा करण्याची बुद्धी. [सं. काकलि = मंजूळ, बारीक, मृदू]

**काकळूतवाणा** वि. दीनवाणा; रडवा (स्वर, ध्वनी, वाणी.).

**काकंबी** स्त्री. काकवी; चिकी; राब. [दे. कक्कब]

**का का** उद्गा. कावळ्याची कावकाव. पहा : **काव** : 'स्वज्ञाति श्रेष्ठांचें गतितांडव पाहतांचि काकांनीं। हर्षभरें नभ भरिलें का का का का अशा स्वहाकांनीं।' - मोकर्ण २८.४१. [ध्व.]

**काका** पु. १. चुलता; बापाचा भाऊ. २. आपल्याहून वयाने मोठ्या पुरुषालाही म्हणतात. [तु. काका = थोरला भाऊ]

**काका** पु. नारळाच्या सावळीचा (झावळीचा) अग्रभाग; माडावर ज्या दांड्याला फुले व फळे (नारळ) येतात तो दांडा; पोय - याला अनेक फाटे फुटलेले असतात. (को.)

**काका** स्त्री. आत; आत्याबाई; काकी. (कु.)

**काकाकव्वा, काकाकुवा, काकातू** पु. एक प्रकारचा पोपट. [हिं. काकातुआ]

**काकांडो** पु. लहान व कच्चे फळ; काकडा. (गो.)

**काकामामा** पु. कोणीतरी नातेवाईक; आप्त; संबंधी (वा.) ० **करणे** - मनधरणी करणे.

**काकारडा-डो** वि. अपक्व; कच्चा; हिरवा; काकडो; काकिर्डा. विशेषत: काजूला म्हणतात. (कु.)

**काकाक्षिगोलकन्याय** पु. एकच शब्द अनेक अर्थांनी योजणे. एका शब्दाचे दोन किंवा अनेक अर्थ संभवत असल्यास किंवा एकाच वस्तूचा दोन किंवा अनेक कामी उपयोग होत असल्यास त्याच्या स्पष्टीकरणार्थ हा न्याय लावतात. (कावळ्याच्या दोन डोळ्यात एकच बुबुळ असून ते तो प्रसंगाप्रमाणे एकातून दुसऱ्यात फिरवितो अशी लोकसमजूत आहे. त्यावरून हा न्याय.)

**काकिणी** स्त्री. १. वीस कवड्यांचे वजन; एक दमडी: 'काकिणी म्हणजे वीस कवडी।' - एभा २२.३५४. २. एक कवडी. ३. एका दंडाचा (काठीचा) चौथा भाग; एक हात (कोपरापासून मधल्या बोटाच्या टोकापर्यंत). [सं. काकिणी, काकिकणिका]

**काकिता** स्त्री. (संगीत) गाताना कावळ्यासारखा निघणारा आवाज.

**का की** उअ. मागील विधानातील गोष्टीचे कारण स्पष्ट करणारे कारणदर्शक उपवाक्यापूर्वी येणारे उभयान्वयवी अव्यय. जसे :- दारू पिऊ नये, का की त्यामुळे शरीरस्वास्थ्य बिघडते.

**काकी** स्त्री. रानातील एक प्रकारची पालेभाजी.

**काकी** पहा : **काकवी**

**काकी-कू** स्त्री. चुलती. [क. कक्कि]

**काकीमुख** न. (हठयोगी) सुषुम्ना. नाडीचे मेंदूकडील टोक; ब्रह्मरंध्र: 'जिणोनि काकीमुखाची वाट। सवेगें त्रिकूट घेतलें।' - एभा १४.४४६.

**काकीस** स्त्री. आत्या; आपल्याहून वडील अशा स्त्रीला सन्मानार्थी म्हणतात. (को. कुण.)

**काकु** स्त्री. कला; कौशल्य: 'भटोबासी तेयाची काकु जाणीतली.' - लीचउ २११.

**काकुण्डप** पु. बाणाचा एक प्रकार. [सं.]

**काकुलता-तो, काकुळत-ती, काकुलपण** स्त्री. याचना, कीव, दया इ. पहा : **काकळूत** : 'अहो देहो पार्थिव कीर जाये। ययाची काकुळती कवणा आहे।' - ज्ञा ११.३६७; 'आठवण तुम्हीं द्यावी पांडुरंगा। कीव माझी सांगा। काकुलती।' - तुगा २२०७. [क. ककलाते] (वा.) **काकुळतीला येणे, करणे** - करुणा भाकणे. **काकुळती करणे, येणे** - १. अंत:करणाला पाझर फुटावा अशा रीतीने गयावया करणे. अति दीनवाण्या रीतीने, पदर पसरून, कळवळ्याने मागणे. २. दया येणे. विनवणीने हृदय द्रवणे. काही ठिकाणी विशेषणार्थी ही वापरतात.

**काकुलपणे** क्रिवि. वडीलपणे : 'तरी त्यास काकुलपणे सांगून पहावे आणि तुम्ही न जावे.' - भाब १०५. पहा : **काकला**

**काकुलवंत** वि. दयार्द्र स्वभावाचा. (गो.)

**काकुला** पु. मुलाची डोई करताना टाळूवर ठेवतात ते केस; चौल. (क्रि. ठेवणे.) [सं. काक+कल्ला]

**काकु-कू** स्त्री. एका प्रकारचा भाषालंकार. यात प्रश्नार्थक किंवा दुसऱ्या स्वराने शब्दार्थाच्या अर्थाहून उलट अर्थ ध्वनित होतो. स्वरभेदेकरून विरुद्धार्थ कल्पनाबोधक वाक्याचा होणारा डौल.

**काकुछ** न. कासव.

**काकू** स्त्री. चुलती; काकी.

**काकुसखाना** पु. शौचकूप.

**काकेर** बेहकळ.

**काकोली** स्त्री. ज्वरनाशक व कफनाशक एक वनस्पती; क्षोलिका; वायसाली. [सं.]

**काकोळ** पु. १. डोंबकावळा. २. एका प्रकारचे विष. ३. कावळा (गो.) ४. काकबळी. (गो.) [सं. काकोल]

**काक्मा** पु. उंटाच्या नरम चामड्यापासून केलेले वस्त्र. [पुश्तु]

**काक्वर्थ** पु. पहा : **काकु**

**काख** स्त्री. खांद्याखालील हात व बरगडी यामधील खोलगट जागा; बगल; खाक : 'काखेसी मेरू घेऊनि देखा। कैसें नृत्य करील पिपीलिका।' - रावि १.२२. [सं. कक्षा, त. कक्कम्] (वा.) ० **वर करणे** - बगलेत काही नाही हे दाखवण्यासाठी दोन्ही हात वर करणे; दिवाळखोरी जाहीर करणे; आपण खंक बनलो असे सांगणे; नंगा बनणे; एखाद्या प्रकरणातील आपली जबाबदारी झटकून टाकणे. ० **वाजवणे** - आनंद प्रदर्शक चेष्टा करणे; आनंदाच्या भरात दंड बगलेवर मारणे; टिऱ्या पिटणे. **काखेतला काढून बाजारात मांडणे** - स्वत:च एखादी कथा रचून खरीच आहे म्हणून भर चारचौघांपुढे मांडणे, सांगणे. **काखेत मारणे** -

१. एखाद्याला आश्रय देणे, आपलासा म्हणणे, कह्यात घेणे. २. काही पदार्थ घेऊन पळ काढणे किंवा एखादी वस्तू उपटून पोबारा करणे. ३. कडेवर घेणे. **काखेतून काढणे** - १. (एखादी गोष्ट) बनवून सांगणे; थाप मारणे. २. तंतू; ताणा; पागोरा फुटणे (कारण हा देठाच्या काखेतून फुटतो म्हणून).

**काखबि(भि)लाई, काखमांजरी** स्त्री. काखेतील गळू; बगलेतील फुटकुळी; बाहू, बरगड्या, खांदे व काखा या ठिकाणी पित्तप्रकोपामुळे वेदनायुक्त व काळ्या फोडांनी व्यापलेली अशी होणारी एक गाठ . हिला लोणी लावून ते मांजराकडून चाटवले म्हणजे ही बरी होते अशी समजूत आहे.

**काखभोंवरा** पु. घोड्यांच्या पुढील दोन पायांपैकी कोणत्याही एका पायाच्या जांघेत असणारा केसाचा भोवरा. हा अशुभकारक समजतात.

**काखर** पु. ओरखडा; बोचकारा. (राजा.)

**काखवाळ** स्त्री. चोळीला काखेत लावण्याची पट्टी; लाग. (कु.)

**काखसावला** वि. (वाटेने जाणाऱ्या किंवा जायला निघालेल्या प्रवाशाप्रमाणे काखेत सावले म्हणजे चिरगुट घेतलेला) आळशी; उदासीन; (चालू कामधंद्याविषयी) काळजी, आस्था किंवा संबंध न दाखविणारा; निष्काळजी चाकर, मुलगा किंवा एखाद्या संस्थेच्या सभासदाला हा शब्द निंदाव्यंजकतेने लावतात.

**काखा** पु. ताणा; तंतू; पागोरा. पहा : **काख** २

**काखाटणे** पहा : **काखा वर करणे**

**काखाट(ळ)णे** पहा : **काखेस मारणे**

**काखा(खो)टी** स्त्री. (व्याप.) काख; बगल; बगलेत एखादी वस्तू घेतली किंवा घेऊन पळवली तर हे शब्द वापरतात. (क्रि. मारणे.)

**काखावर्त** पहा : **काखभोवरा**

**काखाळा-ळ्या** वि. एखादी वस्तू उपटून पळवण्यास टपून बसलेला; उचल्या; लोभी; आपल्या पोळीवर तूप ओढणारा; ओढाळ जनावरालाही म्हणतात. (प्रा.)

**काखाळी** स्त्री. विनाकारण अतिशय कांगावा करणारी स्त्री.

**काखां** पु. १. झाडाचे वाळलेले खोड किंवा धान्याचे ताट; खुंट. (को.) २. (ल.) किडकिडीत माणूस.

**काखी** वि. काळा-तांबूस असा रंग. पहा : **खाकी**

**काग** पु. कावळा : 'बाह्य मिरविती आचार। जेवीं कागांचा शौचाचार। विष्ठातत्पर मानसीं।' - एभा ९.३५६. [सं. काक]

**कागड** न. एक प्रकारचे गवत : 'हयेला कागड म्हनत्यात पाटील.' - वामा ६६.

**कागडा** पु. एक फुलझाड.

**कागडा** पु. कावळा (निंदाव्यंजक).

वि. कावळ्याच्या दृष्टीसारखी चंचल दृष्टी असलेला; धूर्त; दक्ष; कावेबाज; हुशार. [हिं.]

**कागडा** वि. पटाईत; जहांबाज; धुरंधर.

**कागडा खाऊ** पु. (उप.) पारशी लोक.

**कागडे** पु. नैर्ऋत्य दिशेचा अधिपती. निर्ऋति ही मृत्युदेवता आहे व कागडा (कावळा) मृत्युसूचक पक्षी आहे. तेव्हा कागडा व नैर्ऋत्य यांचा असा संबंध असावा.

**कागद** पु. १. कापूस, चिंध्या, ताग वगैरेपासून रांधा तयार करून त्यापासून लिहिण्यासाठी केलेले साधन, वस्तू. हिंदुस्थानात भबर, मुंज वगैरे गवतापासून कागद करतात. २. पत्र; चिठ्ठी; ज्यावर काही लिहिले आहे असा कोणताही कागद, खर्डा. ३. दस्तऐवज; रजिस्टर पत्र; खत. ४. वचनचिठ्ठी. [फा. कागज] (वा.) ० **करणे** - एखादी गोष्ट लेखी करणे. **कागदावर बसणे** - धूळपाटीवरचे लिहिणे संपून कागदावर खर्डे लिहिण्यास सुरूवात करणे; मुळाक्षरापुढे प्रगती होणे. **कागदावर बसवणे, घालणे** - १. खर्डे लिहिण्यास प्रारंभ करवणे; खर्डे लिहिण्यास शिकवणे. २. जमाखर्च, पत्र लिहिणे; हिशेब इ. अभ्यास करून घेणे: 'शहराबाहेर मुक्काम करुनि कागद भेटविला। गोष्ट लाविता तिर्शी पतीचा हुकूम आठविला।' - पसा ८८.

**कागद** पु. वर्तमानपत्राचा अंक - दर्पण १७/२/१८३२.

**कागद कुटारी, कुट्या** पु. कागद करणारा; चिंध्या किंवा रद्दी कागद कुटून त्यांचे कागद तयार करणारी एक जात.

**कागदगडी** पु. पत्र लिहिणारा गडी : 'मोगल या प्रांतीं येतो तंवर घाट चढल्यावर आणखी कागदगडी पाठवितो.' - पेद १०.१४.

**कागदपत्र** न. (व्यापक) कागदपत्रे; चिठ्ठ्याचपाट्या; सनद; रोखा; पत्रव्यवहार.

**कागदबडा** पु. सरकारी कामासाठी होणारा कागदाचा खर्च. [फा.]

**कागदाचा घोडा** कबुलीपत्र (कर्ज इत्यादीचे); कर्जरोखा; दस्त. (क्रि. करून देणे.) (वा.) **कागदाचे घोडे नाचवणे** - पहा : **कागदी घोडे नाचवणे**: 'कागदाचे घोडे नाचवून जेथे राज्य करण्याची मुख्यत्वेकरून पद्धत आहे.' - लोटिकेले १.२९.१.

**कागदी** वि. १. कागदाचा; कागदासंबंधी; कागदापासून तयार केलेला (जाळी, मखर, डबा इ.) २. (ल.) तकलादी; नकली; नाजूक; फार न टिकणारा; निर्जीव; निर्बळ; किरकोळ बांध्याचा, हाडाचा. ३. (ल.) पातळ व नाजूक सालीचा (आंबा, लिंबू, वगैरे फळ, बांबू). ४. पत्रे नेणारा, पोहचवणारा; जासूद; दूत; काशीद; हलकारा.

पु. १. कागद तयार करणारा माणूस; त्याची जात. २. कागदाचा व्यापारी; स्टेशनरी लेखनसाहित्याच्या सामानाचा दुकानदार. [गु. फा. कागद] (वा.) ० **घोडे नाचवणे** - १. कागदोपत्री व्यवहार करण्यात वेळ खर्च करणे; फक्त कलमबहादुरी दाखवणे. २. (ल.) प्रत्यक्ष अंग मोडून काम न करता, कृती न करता, केवळ पत्रोपत्री व्यवहार करणे (दिवाळीत मुले जनावरांची कागदी चित्रे करून ती दिव्याभोवती फिरतील अशी बसवतात, त्यावरून) : 'कोणतीही नवीन घटना करावयाची जबाबदारी व अधिकार सर्व इंग्रज मंत्रिमंडळाकडेच असल्याने आयरिश लोकांना संघटनेचे कागदी घोडे नाचवून तरी काय उपयोग?' - आयर्लंडचा इतिहास.

**कागदी** पु. १. पत्रे घेऊन जाणारा जासूद किंवा कासिद. २. कागद तयार

करणारा : 'कागदी जाऊन जाबसाल यावयास दिवसगत वाटेल' - पेद २५.५३.

**कागदी खबुतर** दुधासारख्या पांढऱ्या रंगाचा पारवा.

**कागदी गोळीबार** लेखी विरोध; लेखी मारामारीची उत्तरे - प्रत्युत्तरे; कागदावर कोरडी वाटाघाट करणे : 'बुक कमिटी क्रमिक पुस्तकात ढवळाढवळ करू लागताच डॉक्टर भालचंद्र यांचे दवाखान्यात कांही शहाण्यांनी जमून नुसता कागदी गोळीबार सुरू करावा.' - लोटिकेले ४.४१९.

**कागदी चिवा** बांबूतील स्त्री जात; पोकळ वेळू.

**कागदी जवान, ज्वान** अशक्त, किडकिडीत काठीचा मनुष्य; काडी पहिलवान; लेचापेचा माणूस.

**कागदी जोडी** पत्र नेणारी जासूदजोडी: 'स्वामींकडे २-४ जोड्या कागदी गेल्या.' - ऐलेसं १७४६.

**कागदी वेळू** पहा : **कागदी चिवा**

**कागदोपत्री** क्रिवि १. पत्ररूपाने; पत्रव्यवहाराने; लेखद्वारा. २. पत्रात; चिठ्ठीत; पत्रोपत्री; लिहिण्यात.

**कागळ** पु. कागद; पत्र.

**कागाबाशी** न. एका जातीचे काळे मोती.
वि. कागाबाशी रंगाचा.

**कागाळ(ळी) खोर** वि. कागाळी करणारा.

**कागाळी** स्त्री. १. गाऱ्हाणे; तक्रार; ओरड (एखाद्याबद्दल). २. विरुद्ध सांगणे, कळवणे; चुगली; चहाडी. (क्रि. करणे.) [सं. काकलि]

**कागिनी** स्त्री. एका रागिणीचे नाव. पहा : **राग**

**कागोरी** स्त्री. श्राद्धाचा पिंड. (झाडी)

**काघोरी** काकबली. (पूर्व विदर्भातील विवाह)

**काच** वि. कच्चा; भित्रा : 'ऐसे मन करिसी हो काचें।' - राज्ञा ११.६२०.

**काच** पु. १. जाच; त्रास; छळ : 'चांगल्या गोष्टी मनुष्यास हव्या खऱ्या पण ... त्यांचेपासून त्यास कांच बसावा अशासाठीं त्या नकोत.' - अमृताचा घुटका (उषा ग्रंथमालिका)९. २. दुःख; वेदना : 'पाणी मीच पाही तृण घाली मीच। भजवीण काच मनीं वाहे।' - ब १४. [सं. कच् = बांधणे]

**काच** पु. सदरा वगैरेचे बटण अडकविण्याचे भोक.

**काच** पु. स्त्री. १. एक कठीण, ठिसूळ व पारदर्शक असा पदार्थ; भिंग. वाळू, सोडा, पोटॅश, चुना, अल्युमिना, शिशाचा ऑक्साइड वगैरेपासून काच तयार करतात. हिचे अनेक प्रकार असून प्रत्येकीचे गुणधर्म निरनिराळे आहेत. २. स्फटिक; गार (रत्नासारखा उपयोग होणारी). ३. पोटॅशचा कोणताही स्फटिकावस्थेतील क्षार. ४. डोळ्यातला काचबिंदू. ५. आरसा. (माळवी) [सं. काच] (वा.) ० **मारणे** - (चर्म.) काचेने घासणे. ० **खुलणे, खुंटणे** - उणापक्ष होणे; बेअब्रू होणे; तडा पडणे: 'पातशाहातची छडी आपल्या हातीं राहिल्यास विलायतवाले यांची कांच खुलून जाते.' - हिंदखं १.४५.

**काचकमळ** न. कमळासारखी एक आकृती. एका वर्तुळाच्या परिघामध्ये ज्याचे मध्यबिंदू आहेत अशी वर्तुळे यात असतात.

**काचकर्तक** पु. काच कापण्याची हिरकणी.

**काचकवडी** स्त्री. बांगडीच्या काचांच्या तुकड्यांनी खेळायचा मुलींचा एक खेळ : 'भुईला खडूनं आखून काचकवड्यांनी खेळणाऱ्या पोरी.' - वळीव ११.

**काचकळणे** अक्रि. १. भयाने किंवा व्यग्रतेने अडखळत बोलणे; अर्धवट, घोटाळ्याचे भाषण करणे. (को.) २. गोंधळल्याप्रमाणे अनिश्चितपणे कोणतेही काम करणे.

**काचकसूर** स्त्री. काटकसर; खाराखोशी : 'मोठी काचकसूर केली तर पाचसहाशे रूपये मिळतील.' - नाग २.४९.

**काचका** पु. सागरगोटा; मुली खेळण्यासाठी वापरतात ते लाखी रंगाचे खडे. पहा : **गजगा** [सं. कंटकगंज]

**काचकागद** पु. सामान्यतः लाकूड वगैरे घासून गुळगुळीत करण्यासाठी, यंत्रावर किंवा भांड्यावर चढलेला गंज काढण्यासाठी वापरण्यात येणारा काचेचा, वाळूचा, कुरुंदाचा कागद; पॉलिश कागद, खरकागद. चांदीसोन्याच्या भांड्यांना जिल्हई देण्याकरिता हा वापरतात. कागदावर सरस पसरून त्यावर काचेची पूड, वाळू, कुरंदाची पूड वगैरे बसवून हा तयार करतात.

**काचकिरडा** वि. १. (बायकी) दडस; कचकचीत; भरडव कणी लागणारा असा (भात, भाजी.) (को.) २. पुरता न शिजलेला; कच्चा.

**काचकिरडा** पु. मुलींचा एक खेळ.

**काचकुइ(य,हि)री, काचकुरी** स्त्री. खाज उत्पन्न करणारी एक वनस्पती. पहा : **कुहरी** : 'बागेत वाढणाऱ्या .... काचकुइरीचा मुलाजा करण्यात काही हंशील आहे काय?' - नि १०८३.

**काच कुंतल** (शाप.) काचेपासून बनवलेले लोकरीसारखे दिसणारे धागे. उष्णता निरोधक म्हणून उपयोग.

**काचकूच** स्त्री. अळंटळं; टंगळमंगळ; कबूल करायला तयार नसणे; मागेपुढे करणे: 'मिंटोची या बाबतीतली काचकूच लक्षात येण्याला हरकत नाही.' - आमासे ३७१.

**काचकोन काढणे** प्रमाणात कापणे.

**काचगृह** न. थंडप्रदेशात, उष्णकटिबंधातील फळझाडे, फुलझाडे वा पिकांसारख्या वनस्पतींचे उत्पादन घेण्यासाठी तयार करण्यात येणारे काचेचे घर.

**काचघर** न. १. काचेच्या वस्तू ठेवण्याचे ठिकाण : 'हंड्याझुंबरानी काचघर भरले जात होते.' - श्रीयो १. ३७. २. भिंतींना आणि छताला काचा बसवून तयार केलेली वास्तु, कक्ष.

**काचचित्र** स्त्री. रंगीबेरंगी काचेचे बारीक तुकडे जुळवून केलेली चित्रे, आकृती.

**काचणी** स्त्री. १. घर्षण: 'दैवें वायूच्या कल्लोळीं। परस्परें वेळूजाळीं। स्वजातिकांचणीं इंगळी। पेंटली ते होळी वनाची करी।' - एभा १३.१८९. २. घर्षणाने पडलेली खाच, वळ, ओरखडा : 'दोरे चिरा कापे पडिला कांचणीं।' - तुगा ३३९४. ३. रेडे वगैरेंची शिंगे

कापण्याकरता तयार केलेली दोरी. ४. काळजी; हुरहुर; चिंता: 'ऐसा पडिलो कांचणी। करी धावा म्हणउनि।' - तुगा १५०८. ५. गांजणी; जाचणी; छळणूक. ६. नाश; काटणे; छाटणे: 'बुंद नोहे ते चिंतामणी। हरुषे केली भवकांचणी।' - नव १४.२६. [सं. काचन = बंधन]

**काचणी** स्त्री. एक प्रकारची चोळी, काचोळी. [गु.][सं. काचन=बंधन]

**काचणे** अक्रि. १. घर्षणाने कमी होणे , झिजणे : 'तुज जवळि भल्यांचा काय सन्मान काचे।' - सारुह ६.१०५. २. (ल.) कृश होणे; वाळणे (भूक, काळजी, दु:ख, आजार यांमुळे.). ३. भिणे; धाकणे : 'परि झाले हरिवरि करि वर जातां जेविं तेविं भट काचे।' - मोकर्ण ४३.६६. उक्रि. गांजणे; छळणे; शरीराला घासून किंवा आवळल्याने वेदना होणे : 'ते दोर आता खांद्याला काचेनासे झाले.' - एको २. [सं. कच्]

**काच तंतू** काचेपासून बनवलेले धागे. प्रबलक म्हणून उपयोग.

**काचनद्रव्य** न. (रसा.) वस्तूंना चकाकी चढवण्यासाठी काचेपासून तयार करण्यात येणारे द्रव्य.

**काचपट-ट्टी** स्त्री. (शाप.) सूक्ष्मदर्शकातून निरीक्षण करण्याकरिता वापरली जाणारी काचेची आयताकार पट्टी.

**काचफुगारी** पु. काचेला फुंकून आकार देणारी व्यक्ती.

**काचफोड** पु. एक प्रकारचा मोठा फोड. यात पाणी असते. (अप.) कासेफोड.

**काचबंदी** स्त्री. काचेचे तुकडे बसवलेली जमीन; आरसे लावलेला महाल. : 'काचबंदि आणी जळ। सारिखेंचि वाटे सकळ।' - दास ८५.४३.

**काचबिंदू-ब** पु. न. एक नेत्ररोग; मोतीबिंदू. डोळ्यातील बुबुळांत काचेप्रमाणे एक बिंदू येतो व त्यामुळे दिसेनासे होते.

**काचमणी** पु. काचेचा मणी; स्फटिक; एक प्रकारचे रत्न.

**काचमिना** पु. काचेच्या रसाने एखादे पात्र मढविणे, चित्र काढणे. हे द्रव्य सिलिका, मिनियम् व पोटॅश यांच्या मिश्रणापासून तयार करतात.

**काचय** वि. भित्रा; अधीर. पहा: **काचा** २

**काचरणे** कमी होणे, झिजणे : 'तिच्या आयुष्याच्या दोरीचा अर्धवट कांचरलेला एकेरी पदर तुटला नव्हता.' - झामू ६७.

**काचरी** स्त्री. १. फळे, फळभाज्या यांचे वाळविलेले काप, फोडी, उसरी : 'ते पाहे होईल काचरी। वाळली जैसी॥' - ज्ञा १३.१५६. २. (ल.) म्हाताऱ्या स्त्रीचे सुरकुतलेले स्तन. ३. (ल.) सुरकुती. [सं. कातरा]

**काचरी** एक सुगंधी झाड; अंगाला लावण्यासाठी उपयोगात आणली जाते. काळी हळद.

**काचरी** कचरा : 'ते पाहे होईल काचरी। सिजली जैसी।' - राज्ञा१३.५५४

**काचलवण** न. कृत्रिम मीठ. [हिं.]

**काचला-वा** पु. बंडी, बिनबाह्याचा अंगरखा, जाकीट. [सं. काच् = बांधणे]

**काचवटी** स्त्री. काचेचा तुकडा; भिंग: 'ज्याचे गांठीं नाहीं काचवटी। परी संतुष्टता नित्य पोटीं।' - एभा १९.५५९. [सं.]

**काचवणे** अक्रि. काचेचा मिना चढवणे.

**काचवा, काचा** पु. बंडी.

**काचवाळू** स्त्री. (भूशा.) ज्या वाळूपासून काच तयार करतात ती वाळू.

**काचळ** स्त्री. १. पातळ तुकडा; चीप २. कातळ; दगडाचा लांबट तुकडा, कपरी: 'दगडांच्या तळाशी काचळा असू नयेत.' - मॅरट ३४. वि. दगडाचे तुकडे, चिपा असलेली (जमीन इ.).

**काचळली** स्त्री. (बायकी) गुदगुली; कुचकुली (क्रिया व भावना). (क्रि. करणे, होणे.) (राजा.)

**काचळी** स्त्री. सुरकुती; अस्थिपंजर.

**काचा** वि. १. कच्चा; अपक्व; न शिजलेला; हिरवा: 'विचार हा काचा कवा नव्हे।' - वावि ७४. २. (ल.) भित्रा; अधीर; घाबरा : 'तेथ भेडांची कवण मातु। कांचया केर फिटतु।' - ज्ञा १. १३४. ३. तज्ज्ञ नसलेला; अर्धवट ज्ञानी : 'ऐसा मार्ग विवेकाचा। प्राणी जो स्वयें कांचा। त्यास हें कळेना।' - दास ११.८.२४. ४. बळहीन. [हिं.]

**काचा** पु. करकोचा; घट्टा. (व.)

**काचा-च्या** पु. १. वीत - सव्वावीत रुंदीचा व तीन-साडेतीन हात लांब असा कमरेला बांधायचा पट्टा; वस्त्र. २. नेसलेल्या धोतराचा, लुगड्याचा जो पुढचा ओचा मागे खोवतात तो. (क्रि. घालणे, खोचणे, मारणे.) ३. लंगोटीसारखी कुस्तीच्या वेळेला नेसायची नवारीसारखी घट्ट पट्टी, चड्डी: 'पहिलवानाने आंत लंगोट घातलेली असून त्यावर काचा घातलेला आहे' - पहिलवान व कुस्ती (बडोदे १९). [सं. कच्, कच्छ, क.कच्चै] (वा.) ० **घालणे, भिडणे** – पुढला सोगा मागे खोवणे. ० **भिडवणे** – काचा घट्ट आवळणे : 'त्यांमागें मांडचोळणा घालून काचा भिडवलेले... तीन चारशे मावळे हेटकरी लोक चालले आहेत.' - मोचनगड.

**काचाकुची** स्त्री. संकोच. पहा : **काचकूच**

**काचापाणी** न. मुलींचा एक खेळ. या खेळात काचेचे बारीक बारीक तुकडे करून त्यांची एक रास करतात व तिच्यावर फुंकर मारून वेगळे होणारे तुकडे एक दुसऱ्याला स्पर्श न करता काढून घेतात. दुसऱ्या तुकड्याला स्पर्श झाला तर डाव जातो. त्याप्रमाणे सर्व तुकडे संपेपर्यंत खेळ चालतो.

**काचाबु(भू)ल** वि. कावराबावरा. (गो.)

**काचाबुलचे** कावराबावरा होणे. (गो.)

**काचार-री** पु. काचकाम करणारा किंवा बांगड्या बनवणारा, भरणारा कासार. [सं. काच]

**काचावणे** अक्रि. १. आजारामुळे खंगणे; क्षीण होणे; काळजीने किंवा दु:खाने नि:शक्त होणे. २. भीतीने माघार घेणे; कचणे; कच खाणे; अडखळणे; कापणे; धैर्य सुटणे : 'काचावला वीर पुढे धसेना।' - वामन, भीष्मप्रतिज्ञा १२.

**काचाळा, काचोळ** पु. गोणपाटाची, कांबळ्याची हात नसलेली बंडी. (कु.) पहा: **काचवा**

**काचियल** स्त्री. खेळण्याची काचेची गोटी.

**काची** पु. फळभाजी, फळफळावळ विकणारा; कच्छी; काछी; काचिया : 'नंतर जानूने काचीला विचारलें कीं, सिताफळें महाग झाल्याचें कारण

काय ?' - मराठी ६ वे पुस्तक (१८७५) १८८. [हिं.]

**काची-चे** वि. १. काचा; कच्चा: 'अमृतादिक मधुरहि तीं मानुनि एका तुझेंनि मन कार्ची।' - मोकर्ण १.८. २. (ल.) अधीर अज्ञ : 'एथ मन करूनिया काचें।' - ज्ञा ११.६३०.

**काचीकुची** स्त्री. संकोच; काचाकुची : 'नव्हों आम्हीं आजिकाळीर्ची। कांचीकुची चाळवणी।' - तुगा १३९८.

**काचीबंद, काचुबंदी** काचेचे तुकडे बसविलेली जमीन : 'सुंदर श्रीधर नागर रूपडे काचीबंद आंगणी।' - नामदेव.

**काचुक** न. (विटीदांडू) अंतराळी विटी झेलणे. (कर.)

**काचेचे भांडे** १. (ल.) समुद्राचे खारे पाणी खारीत येऊ नये यासाठी खारीवर नेहमी राखण ठेवावी लागते. समुद्राचे पाणी आत आल्यास खारीची जमीन निरुपयोगी होते. म्हणून या जमिनीला हे नाव आहे. अशी शेत जमीन. २. (ल.) नाजूक व ठिसूळ असा पदार्थ किंवा प्राणी (स्त्री, घोडा, अब्रू इ.).

**काचोटी** स्त्री. काचेचा मणी (अलंकार म्हणून मानलेला) : 'काचोटी आणि महामणी। मेरू मशकसम नव्हे।' - हरि १.८४. [सं. काच]

**काचोरी** स्त्री. वांग्याचा देठ. (झाडी) [सं. कर्चूर]

**काचोळणे** अक्रि. (आंब्यात) बाठ, कोय धरणे, बनणे.

**काचोळा** पु. १. धान्य वगैरेंचा कोंडा, कीस; भूस. २. बारीक कोंडा.

**काचोळा** स्त्री. पातळ तुकडा; चीप; दगडाची कपरी; काचळ.

**काचोळी** स्त्री. नुकतीच तयार झालेली आंब्याची कोय.

**काचोळी** न. हळद, कुंकू, अक्षता, गंध इ. ५ वस्तू ठेवण्याचे गोल आकाराचे धातूचे भांडे : 'अंजीने देवीच्या काचोळीची शपथ घेऊन शेकूला दगा देण्याबद्दल शपथ घेतली.' - बनगर ११२.

**काचोळी** स्त्री. १. मिरचीचा देठ. (व.) २. वांग्याचा देठ.-(तंजा.)

**काचोळी** स्त्री. १. जिचे बंद पाठीवर बांधतात अशी चोळी. हिला गाठ किंवा बिरडे नसते. ही तुकड्या तुकड्याची करतात. लहान मुली, मारवाडी व गुजराथी स्त्रिया बहुधा अशी चोळी वापरतात. : 'आंगींची उलटली कांचोळी।' - एरुस्व ५.८८. २. (लग्नात नवरीला घालतात ती) पांढऱ्या रंगाची अखंड चोळी. ३. हिरव्या ताप्त्याची किंवा हिरव्या रंगाची रेशमी, चोळी. [सं. कंचुलिका, कंचुली]

**काचोळी पंथ** हा पंथ गुजराथेत आहे. या पंथातील लोक (स्त्री, पुरुष) रात्री एके ठिकाणी जमून जेवतात व नंतर जमलेल्या स्त्रियांच्या काचोळ्या एका घागरीत घालतात. या पंथाचा गुरु त्यातील एक एक काचोळी काढून जमलेल्या एक एक पुरुषाला देतो. जिची काचोळी ज्या पुरुषाला मिळेल त्या स्त्रीशी तो पुरुष रात्रभर रममाण होतो. घटकंचुकी पंथ.

**काचोळी** न. १. फळे, फुले यांच्या देठाला आच्छादित करणारा भाग, वाटी. २. धान्याचे टरफल, कवच.

**काच्चिकारी चिनीकाम** (स्था.) लहान लहान रंगीत तुकड्यांनी बनवलेले चित्र किंवा नक्षीकाम.

**काच्या** पु. तालीम करताना कमरेस बांधायचे कापड.

**काच्छी-छी** पु. कच्छ प्रांतातील माणूस; फळे विकणारा; उत्तर हिंदुस्थानात हे लोक माळ्याचा धंदा करतात. [सं. कच्छ = प्रांत]

**काच्छीण** स्त्री. कच्छी स्त्री.

**काज** स्त्री. १. काजूचे झाड व फळ : 'रस्त्याच्या बाजूला तांबड्या, पिवळ्या, फळांच्या भाराने लवलेल्या हिरव्यागार काजींची रांग लागली होती.' - सह्यादि ८८. (को. गो.) २. काजूच्या फळातील अथवा बोंडातील चीक. काजू खाल्ला असताना हा घशात खवखवतो व खाजतो.

**काज** न. रक्षण : 'भक्ताचिये काजा।' - नागा ९६.

**काज** न. १. काम; धंदा; कृत्य : 'आमुचिया काजाचेनि पाडें।' - ज्ञा १.११२. २. कारण; उपयोग; प्रयोजन. ३. (ल.) हेतु; मनोरथ : 'त्र्यंबक हा तीर्थराज। पुरवी अंतरीचे काज।'- भूपाळी ११. [सं. कार्य]

**काज** स्त्री. १. काच; भिंगा. २. काचेसारखे लकाकणारे तेल; रोगण. [सं. काच]

**काज** न. गुंडी अडकवण्याचे भोक (सदरा, अंगरखा इत्यादीचे.). [हिं. काज]

**काज** न. लग्नकार्य इ.: 'रामदेवांचा घरी कांहीं काज मांडले.'-स्मृस्थ ६४.

**काजकार** पु. काजूची दारू करून विकणारी ख्रिस्ती जात. (गो.)

**काजकीर्द** स्त्री. अमदानी; अम्मल; कारभार (राजाचा.).

**काजकैवारी** पु. वेळ प्रसंगी धावून येणारा : 'आनि भलतयासि पावे। अडल्यांचा काजकैवारी।' - उह ११५०.

**काजगी, काजा** स्त्री. तोंडामधून घेऊन (ओठाळी) पाठीवरून शेपटाखालून गेलेली घोड्याच्या लगामाची दोरी; ओठाळी व दांडी ज्या दोरीने बांधतात ती दोरी; लगाम; काटेरी मुंगा. [फा. काइजी]

**काजगे** न. (ढोरधंदा) अधोड उलटी करताना तंगडीला भोक पाडून तिच्यात ओवायची दोरी.

**काजणी** स्त्री. १. दोन माणसात दाटीने घुसून बसणे. २. मुंढे, दाभण; बायकांची आंबाड्यात खोचण्याची जाड सुई/काटा; नाडी ओढण्याची सळई. ३. जुळलेल्या मुद्राक्षरातून अक्षर/शब्द वर उचलण्याची जाड मुठीची सळई.

**काजणे** अक्रि. काजूचे बोंड खाल्ल्यावर घसा खवखवणे; घसा खाजणे.

**काजभोज** न. कार्य प्रसंगीची जेवणावळ : 'तयातें काजभोज होए : तै तयासि तेयाची पांति नाहीं :' - लीचउ १६१.

**काजबारणे** अक्रि. घाबरणे : 'लोक काजबारले होते.' - फकिरा ११९.

**काजर** न. काजऱ्याच्या फळाचे विष.

**काजर बिलाई** वि. काळीकुट्ट. (झाडी)

**काजरवेल** स्त्री. एका जातीची औषधी वेल.

**काजरा** पु. कुचला. एक विषारी वृक्ष.

**काजवा** पु. १. रात्रीच्या वेळी पृष्ठभागाजवळ प्रकाश दिसणारा किडा : 'करूनि काय जिंकील रविवा काजवा रण।' - मोअंबरीषाख्यान ४२. (नवनीत पृ. ३३५). २. पित्तविकाराने किंवा जबर मार बसल्यामुळे डोळ्यांपुढे जे सूक्ष्म प्रकाशाचे अणू दिसतात ते. यांना 'काजवे लखलखतात' असे म्हणतात. [सं. खज्योति, खद्योत] (वा.) **(डोळ्यांपुढे) काजवे चमकणे** - अंधारी येणे. **काजव्याचा उजेड**

– क्षणभंगुरता; अशाश्वतता; कमताई; महागाई; पाण्यावरचा बुडबुडा.

**काजवा** पु. नदी ओलांडण्यासाठी केलेला लहान तात्पुरता रस्ता. [फा.]

**काजवे(या)ल** न. काजूची दारू, तेल. (कु.)

**काजळ** न. तेलाच्या किंवा तुपाच्या दिव्यापासून मिळणारा पदार्थ. तुपाच्या, तेलाच्या वातीचा किंवा कापराचा धूर भांड्यावर वगैरे जमवून ती काजळी तुपात खलून केलेला डोळ्यात घालायचा एक पदार्थ. हे अंजन म्हणून औषधासाठी अगर शोभेसाठी डोळ्यात घालतात. [सं. कज्जल]

**काजळकाठ** पु. (ल.) डोळ्याची पापणी : 'आता का बर काजळकांठ भिजवतोस असा ?' - एप्या ८६.

**काजळकुंकू** न. १. स्त्रियांची वेणीफणी, नट्टापट्टा वगैरेंना व्यापक संज्ञा: 'तिला न्हाऊं धुवू घालून काजळ कुंकू करून अंगावर वस्त्रे घालून संतोषित केलें.' - कमं २.५७ (क्रि. करणे.). २. एका रानटी झाडाच्या फुलाला (व्यंग्योक्तीने) म्हणतात.

**काजळणे** अक्रि. १. काळे होणे : 'ते अद्यापि काजळलेसे दिसतुसें।' - शिव ७४०. २. (ल.) अतिशय शरम वाटणे: 'केशवदाजी आतल्या आत काजळून गेला.' - त्रिशंकू ५१.

**काजळतीज** हरतालिकेचा दिवस. (व.)

**काजळाचा डोंगर** १. दिव्यावर जमणारा काजळाचा उलटा निमुळता गड्डा. २. (ल.) अतिशय काळा मनुष्य.

**काजळाची कोठडी** (ल.) सरकारी खजिना किंवा पैशाच्या देवघेवीची मोठी पेढी.

**काजळी** स्त्री. १. वात किंवा काकडा वगैरेचा जळून काळा झालेला भाग; कोळी; कोजळी: 'मग आगी लागलिया कापुरा। ना काजळी ना वैश्वानरा।' - ज्ञा १५.४३९. २. धान्यावर, विशेषत: जोंधळ्यावर पडणारा एक रोग. यामुळे कणसात धान्याऐवजी काळा पदार्थ निघतो. कोळशी; काजळ्या; काणी. ३. दिव्याच्या धुराने जमलेला काळ्या पदार्थाचा थर. ४. दागिन्याच्या अरुंद व खोलगट भोकातील लाख जाळून बाहेर काढली म्हणजे आत जो लाखेचा थोडासा जळका भाग राहतो तो. ५. पित्तविकाराने डोळ्यांपुढे येणारी अंधारी. ६. काजळ धरण्याकरिता दिव्यावर धरतात ते भांडे. ७. काजळाइतपत अतिशय बारीक वाटलेले औषध वगैरे. ८. काजळ किंवा काजळा नावाचे झाड. ९. अंबर, राळ, टर्पेंटाईन वगैरे पदार्थ जाळले असताना शिल्लक राहणारा काळा पदार्थ. १०. (ल.) दुःख, काळजी : 'नाना चिंतेची काजळी। नाना दुःखे चित्त पोळी।' - दास ३.६.५२.

वि. काजळाचे केलेले (शाई, पागोट्यासाठी केलेला रंग, अशा रंगाने रंगवलेले कापड.) (वा.) ० **पडणे** – दुःखाने विस्मरण होणे. (काजळी पडल्याने दिवा मालवतो त्याप्रमाणे.) [सं. कज्जल]

**काजळी कागद** ज्याच्या पाठीवर लिहिले असताना खाली ठेवलेल्या कागदावर अक्षरे उमटवणारा काळ्या लेपाचा कागद. [इं. कार्बनपेपर]

**काजळ्या** पु. गव्हावरील रोग. पहा : **काजळी**

**काजा** घोड्याच्या लगामाची दोरी; पट्टा. पहा : **काजगी**

**काजाऊ** वि. कामी येणारा; कामाला उपयोगी पडणारा; उपयुक्त.

**काजाण-णू** न. १. इमारतीचे लहान - मोठे लाकूड; सर्व लाकडी सामान. २. जुने मोडकळीला आलेले लाकडी घर; खोपट; झोपडे : 'तुम्हास कौल सादर केला आहे. भूम ठाव देखील झाडे व परसु व तुम्ही आपली कमाविस करणे जुने काजाणू आहे ते रामभटास देणे.' -मइसा २१.४.

**काजार** न. लग्न : 'त्याचं काजार ! लग्न ! तोही विषय त्याला वर्ज्य होता.' - किरिस्ताव ८१. (गो.) [पो. काजारी = लग्न झालेला]

**काजारी** पु. काचेच्या बांगड्या करणारा व विकणारा कासार व त्याची जात; काचारी.

**काजी** काजूचे झाड.

**काजी-झी** पु. मुसलमानी धर्मशास्त्राप्रमाणे निकाल देणारा न्यायाधीश; मुसलमान पंडित; न्यायदान करणारा.[फा. काझी] (वा.) ० **कोतवाली करणे** – अधिकाराचा दबाव दाखवणे : 'याजमुळे काजी कोतवाली करून कार्य संपादिले पाहिजे.' - ऐलेसं ६४०९.

**काजीफॉड** पु. मसणवट. (गो.)

**काजीशरा** स्त्री. धर्मशास्त्र. [फा. काझी+शर्अ = धर्मशास्त्र]

**काजुरा गौरी** आंबे हळद.

**काजुला** पु. १. समई मालवल्यानंतर (शांत झाल्यानंतर) लुकलुकणारे वातीचे टोक; काजळी; गूल. (कु.) २. कानातील मळ.[सं. कज्जल]

**काजुली** स्त्री. गोकर्णाचे झाड, वेल. (गो.)

**काजुले** न. कानकोरणे. (गो.)

**काजुलो** पु. १. काजवा. (कु.) २. वातीचे गूल; कोळी; कोजळी. (गो.) ३. काजूची दारू. (गो.)

**काजू** पु. काजूचे जांभीचे झाड व फळाचे बी. हे झाड रानात, डोंगरात - विशेषत: मलबार, गोमंतक, मालवण या भागात होते.

**काजे** वि. खुरटे झालेले, वाढ खुंटलेले (फळ.). (गो.)

**का जे** उअ. कारण; की : 'कां जे विद्येने मोठा। म्हणोनिया।' - वास ९.४.९.

**काजे(ज्या-ज्ये)ल** न. १. काजूचे तेल. २. काजूची दारू. ३. काजूचा डामरासारखा चीक. हा गाडीच्या वंगणाला उपयोगी पडतो. (कु. गो.)

**काझ** स्त्री. काचेसारखे तकतकणारे तेल. (गो.)

**काट** पु. १. राबासाठी शेतात टाकलेले कवळ, शिराटी इत्यादी. (को.) २. (विड्याच्या पानाची) लहानशी रास; कुजकी पाने कापून शिल्लक राहिलेली कत्रण. ३. गंजिफा अगर पत्ते पिसून झाल्यावर वाटण्याच्या आधी वाटणाऱ्याच्या डाव्या हातच्या माणसाकडून भाग काढून ठेवण्याची क्रिया. ४. राज्यकारभार, घरखर्च वगैरेमधील काटछाट, काटकसर, कपात : 'लँकेशायरच्या गिरणीवाल्यांनी मजुरीत काट करण्याचे ठरविले आहे.' - के १४.५.३०. ५. रेघ; फुली; खोडणे. (वा.) ० **देणे** – १. न करणे; कपात करणे. २. अपमान करणे. ० **बसणे** – नुकसान होणे. ० **मारणे** – कपात करणे; रद्द करणे. एखादा शब्द, ओळ किंवा मजकूर रद्द केला आहे हे दाखविण्यासाठी त्यावर रेष मारणे.

**काट** पु. १. गुप्त कट; खोल मसलत : 'असा काट मजीबखान याने

केला.' - भाब ५८. २. यत्न; युक्ती; चातुर्य; कर्तृत्व : 'शत्रूच्या मारापुढे काट पुरेनासे पाहून आमच्या फौजा तमाम निघाल्या.' - ऐलेसं ८०६. [सं. कूट]

**काट** पु. १. घट्ट राड; राप; किटण; डाग; मळ : 'अनेक दोषांचे कांट। जे जे गादलें निघोट। होती हरिनामें चोखट। क्षण एक न लागतो।' - तुगा २४९८. २. कपड्यावरील बेलबुट्टीचे (लाख, चीक, वगैरेचे) लुंकण, खडीचा रंग; कापडावरील डाग : 'कषायाचे काट। फेडूनि कीजे धुवट।' - भार २८३.३. बाभळीच्या शेंगा किंवा आवळ्याचा आळवून घट्ट केलेला रस. [सं.]

**काट** न. मसण.[सं. कट = स्मशान] (वा.) **काटात जाणे** - १. मसणात जाणे. २. (ल.) ज्याची आपल्याला माहिति किंवा काळजी नाही त्यांच्या हजर असण्याबद्दल अगर जाण्याबद्दल बेफिकीरवृत्तीने बोलणे.

**काट-टे** न. पावसाळ्यात उत्पन्न होणारा जळूसारखा एक किडा; काणट.

**काट** न. कुंपण, वई घालण्यासाठी (बाभळ, बोर वगैरेच्या) भाऱ्यातील एक फाटा, खुंट. [ सं. कंटक]

**काट** न. ऑक्टोबर - नोव्हेंबरमध्ये सापडणारा समुद्रातील एक मासा.

**काट** न. १. शाई बनवण्यासाठी नाचणी, बाजरी इत्यादी जाळून त्यात पाणी ओतून केलेले शिरे. २. कुळीथ, हरभरा इत्यादी कडधान्याचे शिजवून काढलेले पाणी, कढण; कट; सुपाऱ्या, रंगीत पदार्थ किंवा कडधान्य शिजवलेले पाणी. (मांस शिजवून केलेले पाणी) ३. आमसुले तयार करण्यासाठी, त्यांना पूट देण्यासाठी काढलेला रातांब्याच्या फळांचा रस. [सं. क्वथ् = कढविणे]

**काट** स्त्री. १. तोटा. २. (शिंपी धंदा) कापलेला नमुना. ३. पत्रावळी किंवा द्रोण यांना बांधायचा बंद. (गो.)

पु. आघात, प्रहार, काप, वार : 'केला षड्वैऱ्यावर काट.' - दे कटिबंधसंग्रह. [सं. कृंत-कापणे]

**काट** पु. वरपगडा; वरचष्मा : 'इंग्रजांच्या कवायतीकंपूवर मराठेस्वारीचा काट चालेनासा झाला.' - भृभ्र २९.

**काटक** वि. १. कर्नाटकातील एक रानटी व क्रूर रामोशी, बेरड यांसारखी जात. यावरून दरोडेखोर, बंडखोर, दंगेखोर. गळेकापू लोकांना हा शब्द लावत असत : 'येथील काटकांवर भरवसा नाहीं.' - ऐलेसं ३२९१. २. कष्टाळू; कणखर; अति मेहनती (शरीर, माणूस); चिवट. [क.] [सं. कंटक]

**काटकढी** स्त्री. कडदण शिजवून त्याच्या पाण्याची - काटाची केलेली कढी.

**काटकर** पु. काठीकर; काठीने मोजणारा : 'पाहणी करावयास काटकर काटी होनाजी बळकवडे यांजकडून देविले.'- बाबा ३.२०४. [सं. काष्ठ]

**काटकवळ** न. राबाचे कवळ. (को.)

**काटकसर** स्त्री. १.कमीतकमी खर्च करणे, काटछाट, मितव्यय. (क्रि. करणे, काढणे, पाहणे) : 'दुष्काळामुळे काटकसरीची पहिली कात्री युनिव्हर्सिटीस सरकारांतून जी पांच हजार रूपयांची मदत होती तिजवर पडली.' - लोटिकेले २.१५२. २. अशा रीतीने शिल्लक टाकलेला पैसा, रक्कम.

**काटकसरी-ऱ्या** वि. बेताने खर्च करणारा; मितव्ययी.

**काटकाई** स्त्री. १. काटक, रामोशी, बेरड, भिल्ल वगैरे लोकांनी केलेली पुंडाई, दंगा, नासधूस, अनर्थ : 'वाटेस काटकाई फार यास्तव माणसे येत नाहीत.' - ऐलेसं ११६०. २. क्रूरता, विध्वंस, रानटीपणा.

**काटकी, काटकु(को)ळी** स्त्री. लाकडाची ढलपी, तुकडा, शिरपुटी. (अव.) काट्याकुटक्या; काटक्या; काटकुटी; काट्याकूट.

**काटकी** वि. जिवावर उदार; शूर : 'मोठा काटकी लोकं सोजीर भिईना मरणाला।' - ऐपो २११.

**काटकुटा-ळा, काटकोळ-ळा** वि. रोडका; किडकिडीत; क्षीण; खंगलेला; कृश; सडपातळ : 'अशीच ही जाडकुट्याची नि काटकुट्याची जोडी ठेवली.' - गाता ९६.

**काटकुटी-कूट** स्त्री. १. काटकी (अव.). २. लहान काटकी. ३. काथ्याकूट, वादविवाद, ऊहापोह, चर्चा.

**काटकूट** स्त्री. काटकसर : 'त्यातच काटकूट करून दोन महिने भागवायचे होते.' - कोसला ११५.

**काटकोन चौकोन** ज्या चौकोनाचे सर्व कोन काटकोन असतात तो चौकोन.

**काटकोन त्रिकोण** ज्या त्रिकोणाचा एक कोन काटकोन असतो तो त्रिकोण.

**काटकोना-न्या** पु. गुण्या; गवंड्याचे एक हत्यार.

**काटकोरणे** न. काटा काढण्याचे अणकुचीदार हत्यार : 'इतक्यात तिचा गुराखी मुलगा आपले काटकोरणे घेऊन आला.' - जीवनकलह.

**काटगिरी** स्त्री. शहाणपणाची व धूर्तपणाची मसलत; योजना किंवा बेत करण्यातील चातुर्य; धूर्तता; कावेबाजपणा (विशेषत: अपकार करण्यामध्ये.); शह; वरचष्मा; जोरा. (वा.) ० **चालणे** - हात चालणे; कार्य करून दाखविणे : 'परंतु कांहीं काटगिरी चालावयाची नाहीं.' - ऐलेसं ४१४२.

**काटगोट** पु. संकटे. (झाडी.)

**काटगोल** पु. वाटोळा वासा, सोट इत्यादी.

**काटछाट** स्त्री. पट्ट्याने कापण्याची क्रिया.

**काटछेद** पु. १. (भूमिति) अक्षाच्या उजव्या बाजूच्या कोनातून कापलेला भाग. २. (स्थाप.) एखाद्या वस्तूचा निरीक्षणासाठी लांबीच्या काटकोनात घेतलेला छेद.

**काटणी** स्त्री. १. जोंधळा, सजगुरा इत्यादी पिकांच्या कणसांची कापणी. २. गंजिफा, पत्ते वाटण्यापूर्वी त्यातील काही पाने उचलून काढून ठेवण्याची क्रिया. पहा : **काट** २. ३. विड्याच्या पानातील नासक्या पानांची छाटणी. ४. जंगलाची, रानाची कापणी, छाटणी. ५. सैन्याची कत्तल, कापाकाप. [सं. कृत्]

**काटणीवाटणी** स्त्री. पत्ते किंवा गंजिफा काटून वाटण्याची क्रिया. [सं. कृत्]

**काटणे** अक्रि. मळणे, मलिन होणे; राप चढणे; लेप चढणे: 'तैसिया वदनीं प्रळयरूधिरें: काटलिया दाढा।' - ज्ञा ११.३४५.

**काटणे** उक्रि. १. छाटणे; कापणे (परंतु विवक्षित प्रसंगीच या अर्थी

उपयोग करतात.). गंजिफा, पत्ते इत्यादिकांतून काही भाग उचलणे, कमी करणे; छाटणे (शरीराचा एक भाग) : 'कोरा काटलिया मुखीं कटकट ढोरांचियां शोषिते।' - आता १३. २. दु:खात, अडचणीत, त्रासात वेळ घालवणे, खर्चणे : 'हुजूर चाकरी राजापाशीं कांहीं दिवस काटले।' - पला ८८. [सं. कृत्]

**काटदार** वि. कावेबाज, धूर्त; कल्पक; मतलबी; कारस्थानी.

**काटफेरा** पु. गलबताचा एक प्रकार : 'त्यांचे कारकुनाजवळीं तुम्हास पत्र लेहून की काटफेरा मात्र देणे.' - पेद ३४.९३.

**काटबोहोरी** स्त्री. १. एक गवत. २. केरसुणीचा एक प्रकार. (झाडी)

**काटभ्रंश** पु. (भूशा.) घड्या पडलेल्या खडकांच्या थरामध्ये मुख्य कमानीच्या काटकोनात होणाऱ्या स्तरभ्रंशाच्या समूहांपैकी एक. कमानीच्या लांबीस समांतर असे ताण निर्माण झाल्यामुळे असे भ्रंश निर्माण होऊ शकतात.

**काटमाल** पु. पडलेल्या इमारतीचे सामान : 'बंगला पडण्यास आला म्हणून त्याचा काटमाल त्यांनी विकला.' - लशि आत्म ४२२.

**काटमूय** स्त्री. काडमुंगी; वाघमुंगी. ही मोठी, काळी असून चावते. दंशाचा वेग फार तीव्र असून गांधी-दादी उठतात. (गो.)

**काटमोगरा** पु. मोगऱ्याची एक जात.

**का(क)टला** वजनी एक मण जिन्नस विकला असता त्यावर द्यावयाचा वर्ताळा.

**काटला-ली, काटवेल** पु. स्त्री. फळ न येणारा करटोळीचा वेल; रानकारले.

**काटले** न. १. करटुलीचे फळ. (को.) २. काटेरी रान.

**काटवट** स्त्री. १. भाकरीचे पीठ मळण्याची लाकडी, कान असलेली परात; काथोट. २. (बिडकाम) चरकाची खालची बैठक; बूड. [सं. काष्ठ+वृत्]

**काटवण-न** न. काटेरान; काटेरी वन : 'कांटवण अटव्यक्षिति। आंधळे सांडोनि जाये सांगाती।' - एभा ६.२४३. [सं. कंटक+वन]

**काटवणी** न. १. कडधान्य शिजवलेले पाणी; रंग उकळलेले पाणी. २. अतिशय गढूळ पाणी. (फोड, गळू इत्यादीतून वाहणाऱ्या पाण्याला ही संज्ञा वापरतात.) : 'निळा म्हणे काटवणी। घालिती घालणी जाणिवेच्या।' - निगा २४१. [सं. क्वथ्+वन]

**काटवल** न. १. करटोली; काटली. (व.) २. गुराला घालण्याचे किंवा छपरावर घालण्याचे गवत (ह्याच्याहून भात्याण निराळे). ३. तोडलेले झुडूप; काटेरी झाडाच्या बारीक फांद्या. (को.)

**काटवळ** स्त्री. डोंगर व पडजमीन यात होणारे गवत. [सं. कंटक+वलय] न. काटेरी झाडांच्या बारीक फांद्या.

**काटवाडा** पु. पावसाळ्याशिवाय इतर ऋतूंत तात्पुरता बांधलेला गोठा, भोवती काट्यांची सळदी लावून केलेली, रात्री गुरे कोंडण्याची जागा. (को.)

**काटविकरा, काटविका** पु. अतिशय दुर्मिळता; महागाई; टंचाई; कमतरता. (राजा.)

**काट(ढ)शह - हा** पु. (बुद्धिबळ) काटून शह; बुद्धिबळाच्या खेळात एखाद्या मोहऱ्याच्या पगात असलेले आपलेच दुसरे मोहरे बाजूने खेळून प्रतिपक्षीय राजावर मोहऱ्याचा मारा लागू करणे; (सामान्यत:) जरब काढणे.

**काटस** वि. काट्यांचा; काटेरी : 'जैसा कमळबनीं फांसु। काढिलिया कांटसु।' - ज्ञा १८.६१७. [सं. कंटक]

**काटसरी** स्त्री. १. (ढोरधंदा) कातड्याच्या कडेचा भाग; कडेची पट्टी. २. (विणकाम) टोकाला टाचणी बसवलेल्या दोन काठ्या; लुगडे विणताना काठाला ताण करण्याकरिता लावतात त्या काठ्या; मट्टी. पहा : **काटोस्री**

**काट संस्तरण** (भूशा.) गाळाच्या थरात मुख्य प्रतलाशी कोन करून रचले गेलेले थर.

**काटळणे** उक्रि. चिंचेच्या आकड्यातून चिंचोके काढणे : 'आकडीने चिंचा पाडी. ठेल्यात भरी. घरी आणी. काटळी.' - गाबा १७.

**काटळी** स्त्री. एक प्रकारचे हलके धान्य.

**काटा** पु. काठ, काठा; किनाऱ्याकाठचा प्रदेश : 'चेऊल प्रांतचा काटा राखावयास जमाव जागजागा आम्ही ठेविलेच आहे.' - पेद ३३.५८.

**काटा** पु. १. अणकुचीदार, तीक्ष्ण टोक असलेली, जी बोचली असताना रक्त काढते अशी काडी; बाभळीचा, बोरीचा दाभणासारखा टोचणारा अवयव : 'सर्प कपाळीं कांटा नेहटे। कां सापसुरळीचे पुच्छ तुटे।' - भारा बाल ८.३५. २. सुई: 'काटा आणिला। मेग सींउ बैसले।' - लीचउ २९. ३. (भयाने, थंडीने वगैरे) अंगावर उभे राहणारे शहारे; रोमांच. ४. (अव.) तापानंतर अंगावर येणारा खरखरीतपणा अथवा उठणाऱ्या बारीक पुटकुळ्या; पुरळ. ५. (अव.) तापाच्या पूर्वी अंगावर येणारी शिरशिरी; रोमांच; कसर. ६. विंचवाच्या नांगीचे पुढचे तीक्ष्ण टोक. ७. जो कुलुपाच्या दांडीत असतो व मागे सरतो तो कुलपादिकाचा खिळा. ८. वेळू, बांबू वगैरेंना येणारा तुरा, मोहोर, फुलोरा. ९. कंबर, मान, पाठ, यांच्या आतील बाजूला आधारभूत असलेला अस्थिविशेष. १०. गुणाकार, भागाकार यांचा ताळा पाहण्यासाठी अंक मांडण्याकरिता घातलेली चौफुली (ल.). ११. वजनाने विकलेल्या वस्तूंवर जे काही वजन कटते देतात ते. पहा : **कडता**. १२. काट्यासारखी शरीराला बोचणारी कोणतीही वस्तू (माशाचे हाड, चक्राचा दाता, घड्याळाचा हातकाटा, खडबडीत लगामाचे टोक, करवतीचा दाता, जेवणातील वापरायचे दाताळे - काटा, जनावरे किंवा भाजीपाला यावरील खरखरीत केस व लव इ.) : 'काटा बराबर एकांवर एक आला.' - रासक्रिडा ७. १३. हलवा, इतर मिठाई यावरील टोके, रवा. (क्रि. येणे, उमटणे, वठणे, उठणे.) १४. (वस्त्रोद्योग) वशारन करताना इकडून तिकडे (वशारन पुढे सरकण्यासाठी) फिरवायचे लाकूड. १५. सुताराचे एक हत्यार. (कु.) १६. (ल.) त्रास देणारा माणूस, व्याधी, शल्य, पीडा, शत्रू. १७. तराजूच्या दांडीमधील उभा खिळा : 'जरि कांटा कलताए देवांचा। जेउता राजमठु।' - ऋ ३९. १८. काटा असलेला तराजू (विशेषत: सोनाराचा, सराफाचा) : 'मेरूचिया वजनास पाहीं। कांटिया घातली जैसी राई।' - हरि ६०.१६१.[सं. कंटक] (वा.) ० **उपटणे**

- १. त्रासदायक प्राणी, शत्रू, गोष्ट नाहीशी करणे. (कर.व.) २. समूळ नाहीसा करणे, काढून टाकणे. ० **काढणे** - आपल्या मार्गात असलेल्या, आपल्याला पदोपदी नडवणाऱ्या शत्रूला दूर करणे : 'वसुदानाच्या पुत्रें जो अभिमुख काशिराज तो वधिला। कांटाचि काढिला तो जाणो तव सूनुच्या मनामधिला।' - मोकर्ण ४.१५. ० **मारणे** - १. काट्याने सिद्ध करणे. २. अंगात (तापाची) कसर येणे. ३. काटेकोरपणे बरोबर आहे असे दाखविणे; चुकीचा तराजू वापरून वजनात खोट आणणे. ० **मोडणे** - १. विंचू चावणे. (व.) २. पाणी किंचित उष्ण होणे. ३. पायात काटा घुसणे. **काट्याचा नायटा होणे** - काटा मोडल्यावर लगेच तो काढला नाही तर त्या ठिकाणी नायटा होतो, म्हणजे आरंभी क्षुल्लक वाटणाऱ्या वाईट गोष्टीचे पुढे मोठे हानिकारक परिणाम कधी कधी होतात. **काट्याने काटा काढणे** - एका दुष्टाच्या हातून परभारे दुसऱ्या दुष्टास शासन होईल असे करणे. **काट्याप्रमाणे सलणे** - सतत त्रासदायक होणे; दुख:कारक होणे; मत्सर, हेवा, द्वेष वाटणे. **काट्यावर ओढणे, घालणे** - वस्त्र काट्यावर ओढले असताना फाटते त्यावरून दुःखात घालणे; दुःखात लोटणे : 'त्यांत (कौरव सैन्यात) मरेनचि शिरतां काट्यावरी घालितां चिरे पट कीं।' - मोविराट २.४१. **काट्यावर येणे** - १. (बैलगाडी) आसाच्या दोन्ही बाजूला समतोल वजन होणे. २. (ल.) (मूल) खळीला येणे; रडायचे न थांबणे. ३. सहनशक्तीची परिसीमा होणे.

**काटा** पु. राघू, मैना इत्यादिकांच्या गळ्यात होणारा एक रोग.

**काटा** पु. नदी किंवा समुद्रातील पाण्याखाली झाकलेला खडक.

**काटा** पु. थेंब: 'घरात तेलाचा एक काटा नाही.'-वशाप ५१.१२.४८. (व.)

**काटा कणगी** कणगर; एक कंद. (गो.)

**काटाकाट-टी, काटाकूट** स्त्री. १. काटकसर. २. सरसहा कापाकापी; तोडातोडी; कत्तल (लढाईतील) : 'त्या काटाकाटीतून तो वांचला.' - अस्तंमा ४१.

**काटागिरी** पहा : **काटगिरी**

**काटाण** न. कापलेले लाकूड; सर्पण : 'दोन मण काटाण मैसेल्यास रवाना.' - आंपव्य ४३.

**काटादाट** वि. मारूनमुटकून बनविलेला.

**काटादाटा** पु. कावादावा : 'तूर्त तो काट्यादाट्याने धोवभाव दाखवून त्यास (आपण) भारी ऐसा विचार त्याणे दाखविला आहे.'-ऐलेसं ८४०.

**काटा धारवाडी** अगदी बरोबर तोल दाखवणारा काटा.

**काटाभर** क्रिवि. (बायकी) थोडे.

**काटारा** पहा : **उटकटार, उटकटारी**

**काटारोखण** स्त्री. लाकडात खाच, रेघ पाडण्याच्या उपयोगी सुताराचे एक हत्यार; खतावणी; फावडी. (कु.)

**काटाले** न. १. तराजू. २. रोमांच; शहारे.

**काटावळ** स्त्री. रोमांच : 'त्यांच्या अंगावर कटाकळ थरथरून येई.' - जैत १२७.

**काटाळा** पु. कणसांचा भारा : 'हुरडेयाचे काटाळे गोसावीयांसि दरिसन केले:' - लीचपू ५९१.

**काटाळी** स्त्री. धिंड. (गो.)

**काटां(टिं)जन** न. कठडा. पहा : **कटंजन**

**काटांदो(दू)र, कांटुदूर** पु. झाडावर राहणारा मुंगीसारखा एक प्राणी; कांडेचोर; ऊद. (गो.)

**काटाळू** वि. काटे असणारे (बाभळ, बोर इ. झाड).

**का(कां)टाळे** न. ताजवा; तराजू: 'जें नित्यानंदाचेनि मानें। उपमेचां काटाळां न दिसे सानें।' - ज्ञा ८.२६२.

**का(कां)टी** वि. वीस ही संख्या : 'उधानु काटीवरी चोपडूची आस। नवराराजस मिरवतसे।' - तुगा ४४५९. (नंदभाषा)

**काटी** स्त्री. कावळी वल्ली; वायसोळी; स्वादुरस; वयस्था; एक वनस्पती.

**काटी** स्त्री. मोजण्याची काठी.(वा.) **काटी-ठी आड करणे** - दरवाजे लावणे; पराङ्मुख होणे : 'परंतु प्राणासी गांठ आली तेव्हा गाव सोडून दिल्हा. काठी आड केली.' - पेद. ० **काढणे** -१. अडथळा दूर करणे. २. नाहीसे करणे. [सं. काष्ठ]

**काटीकुपाट** न. रोपट्यांना घालतात ते काट्यांचे कुंपण.

**का(कां)टीमुळू** पंचवीस ही संख्या. (नंदभाषा)

**काटूक** न. १. लाकडाची झिलपी; बारीक काटकी; काडी. २. लहान काठी: 'धांवली मारू काटुक घेऊनि।' - दावि १९.

**काटून** जवळून. (झाडी)

**काटूंबर** पु. काठ (घागरीचा).

**काटे** पु. काठेवाडातील लोक; भिल्ल - कोळ्यासारखी काठेवाडातील एक लुटारू जात : 'चोरांचा व काट्यांचा उपद्रव लष्करात फार.' - ऐलेसं २३०५.

**काटे** न. जोंधळा, तूर पिकविणारी काळी जमीन; जोंधळ्यांची एक जात : 'काटी नांगरायची तशीच पडल्यात.' - बारी ११६.

**काटेआसण** पु. एका जातीचे काटेरी झाड.

**काटे कणंग** न. कणगर फळ.

**काटेकरंजी** स्त्री. पुतिका कलिमारक; एक वनस्पती.

**काटेकाळजी** स्त्री. चिंता : 'नवीन गव्हर्नर हे काटेकाळजीने व निःपक्षपात बुद्धीने आपलें काम करतील.' - लोटिकेले १४२२.

**काटेकुट्याचा, काटेसराट्याचा** वि. काटेरी (झाडझुडप); काटे असलेला.

**काटेकुयरी** स्त्री. कुयरीची एक जात.

**काटेकुव(वा)र-री, काटेकोरफड** कोरफड; कुवारकांडे. [सं. कंटक + कुमारी]

**काटेकुवळा** पु. एक झाड.

**काटेकेकत-ती** पु. स्त्री. रानकेवडा; घायपात.

**काटेकोर** वि. १. कडक; तडीस नेण्यात, अमलात आणण्यात शिस्तवार; निष्ठुर. २. रेखलेला; नेमका; बरोबर; बिनचूक; रीतसर; रतिभरही चूक नाही असा; मेहनतीने केलेला. ३. बारीक, सूक्ष्म, नाजूक, जेथे तिळाएवढीही चूक खपायची नाही असे (काम) : 'उमेदवारांच्या

निवडीबाबत आजच्या इतके काटेकोर नियम बनवले नव्हते.' - माजी ४४१.

क्रिवि. बरोबर, ठाकठिकीने; योग्य प्रमाणात (करणे, वर्तणे).

**काटेकोहळ** न. कोहळा. (व.)

**काटेखतान** ज्याला कापूस येतो असे उंच वाढणारे झाड.

**काटेगहू** पु. गव्हाचा एक प्रकार. (अकोला, खामगाव या भागातील)(व.)

**काटेगारी** स्त्री. छाटाछाटी; कापाकापी; हातघाई : 'रावसाहेबांकडील लोकांनीं उलफती कांटेगारीस उठले.' - ऐलेसं ८०५.

**काटेघर** न. ज्याच्या अंगावरील कवच, काट्यांनी व्यापले आहे असा किडा : 'कोसले अथवा काटेघरें। नाना पृष्ठिभागीं चालती घरें।' - दास ९.७४.

**काटेचिर्णी** स्त्री. कुळकर्ण्याचा भत्ता. (गो.)

**काटेचुंबक** पु. न. विलायती किंवा पांढरा धोत्रा. हा उंटांना फार आवडतो.

**काटेडोळे** पु. अव. अतिशय खुपतात अशा प्रकारे डोळे येणे.

**काटेतोल** वि. १. अगदी बरोबर वजन असलेला, काट्याने तोललेला; बिनचूक; बरोबर; नेमका : 'त्याचा काटेतोल न्याव। जसा गावामधी राजा।' - बगा ५. २. फार नाजूक.

**काटेधुवा** पु. एक काटेरी वनस्पती. (झाडी)

**काटेधोत्रा** पु. पिवळा धोत्रा, विलायती धोत्रा. हे झाड दोन हात उंचीचे असून त्यावर सर्वत्र काटे असतात. बी बंदुकीच्या दारूप्रमाणे काळे असते.

**काटेबुरड** स्त्री. पुष्कळ काटे असलेली मासळी. (गो.)

**काटेभाजी** स्त्री. एक पालेभाजी; काटेमाठ.

**काटे भोवरी** स्त्री. एक काटेरी झाड. याचे फळ भोवऱ्याप्रमाणे असून त्याला फाटे असतात.

**काटेमाठ** पु. एक प्रकारची पालेभाजी. आयुर्वेदोक्त पंचशाकांपैकी चवथी शाक, मेघनाद या नावाची आहे.

**काटेमारकांती** स्त्री. अनुपम सौंदर्य.

**काटेमां(मो)डणावळ** स्त्री. १. शेताच्या जमिनीची पाहणी करत असताना मामलेदाराच्या पायात काटा मोडल्यामुळे घरटी जो दंड वसूल करण्यात येत असे तो. २. काटेरी झाडेझुडपे तोडून टाकण्याकरिता त्यावर बसवलेला सरकारी कर.

**काटेमुकुट** न. एक काटेरी झुडूप.

**काटेरा-री** वि. काट्यांनी भरलेला; काटे असलेला.

पु. एक लहान काटेरी झाड. याला पांढरी सुंदर फुले येतात.

**काटेरिंगणी** स्त्री. काटेरी, जमिनीसरपट वाढणारे एक झुडुप. याला वांग्यासारखे फळ येते. ते औषधी असते.

**काटेरी** न. काटेरी करवंदीचे वगैरे शिरे, फांदी. (राजा.)

**काटेल** स्त्री. एक मधमाशी. ही उघड्या हवेत राहते व कमी मध गोळा करते.

**काटे वाळूक** न. काटे असलेले वाळूक. (कर.)

**काटेशेवंती** स्त्री. हिमालयात येणारी शेवंती नावाच्या फुलझाडाची एक जात. पांढरी शेवंती, गुलाबी शेवंती अगर शेवंतीगुलाब. गुलाबाप्रमाणे हिच्या झाडाला काटे असतात.

**काटेळे** न. झाडावर लागणारे मोहोळ; मधाचे पोळे. (को.)

**काटोमोटो** पु. मीठभाकर. (गो.)

**काटोस्त्री** स्त्री. (वस्त्रोद्योग) कोष्ट्याचे एक उपकरण; लहान खिळे मारलेली एक पट्टी, काठी. मागावरील ताण ताठ राहण्याकरिता त्याच्या दोन्ही बाजूंना ही लावतात; काटसरी.

**काट्टा-ट्टी** पु. स्त्री. कार्टा, कार्टी. (व.)

**काट्याकुट्या** स्त्री. अव. काटेरी झाडेझुडपे. (वा.) **काट्याकुट्याशी काट्या घासणे** - फजिती करणे; बेजार करणे; छळ करणे; त्रास देणे; गांजणे. **काट्यावरून ओढणे** - अतिशय त्रास देणे, छळणे, गांजणे. (व.) **काट्यादाट्याने जेर करणे** - युक्तिप्रयुक्तीने किंवा धाकदपटशाने जेर करणे.

**काट्याळे** न. पाकोळी. (गो.)

**काठ** पु. १. कडा; बाजू; मर्यादा; टोक; किनारी (ताट, पागोटे, मडके इ. च्या भोवतालचा भाग); कोर (भांडी वगैरेची); कंगोरा. २. किनारा (समुद्राचा); जवळची भूमी; थड, थडी, (समुद्र, नदी यांचा). ३. पदर; किनारी (वस्त्राची बेलबुट्टीची किंवा साधी). [सं. कंठ = गळा, काष्ठा = सीमा] (वा.) **काठकोणा मोजणे** - सूक्ष्मपणे परीक्षणे, बारकाईने तपासणे. **काठावर बसणे** - १. (पखवाजाच्या काठावर थाप मारली म्हणजे बद्द आवाज होतो त्यावरून) सोडणे, कमी होणे, (धंदा, गोष्ट); नासणे (काम). अकर्तृक योजतात. २. नुसती गंमत पाहणे; जबाबदारी टाकणे; सहभागी न होणे. ३. (ग्राम्य) ढुंगणावर बसणे. **काठावर मारणे** - बिघडणे; नासणे, मारणे. **काठावर येणे** - जिवावर येणे.

**काठकर** पु. देवादिकांच्या उत्सव समारंभात पागोटे बांधलेली काठी किंवा निशाण घेऊन चालणारा माणूस.

**काठकाई** स्त्री. मारामारी; दंगा: 'विजापूरकडे किरकोळ काठकाई झाली आहे.' - बागोप २१२.

**काठकिनारा** पु. बाजूची पट्टी, कडा, काठ.

**काठकोपरा** पु. बाजू, कड; कोपरा, कोन.

**काठ(ठा)ण** न. कडदण; कडधान्य. काहींच्या मते हरभरा, वाटाणा, मसूर, लाख इत्यादी रब्बीच्या पिकांना हा शब्द लागत नाही. बाकीच्या खरीपातील द्विदल धान्याला लावतात: 'काठाणी, तीळ, उडीद, तुरी वगैरे पावसाळी.' - मसाप २.२.६९. [सं. काष्ठ+अन्न]

**काठणे** उक्रि. कंठणे; सोसणे.

**काठदरी** स्त्री. नदीच्या काठावरील दरडी; कडेची, डोंगरकठडी : 'खाडीच्या पलीकडील काठदरीत बरकंदाज लोक मारीत आले.' - पेद ३.३४.

**काठदोरा** पु. कापडाच्या गाठीला - काठाला घातलेला जाड दोरा; पदराला घातलेली दोऱ्याची शिवण.

**काठ(ठा)परा, काठ(ठा)प्रा, काठापुरा, काठफरा** पु. १. फुटलेल्या मातीच्या मडक्याचा वरचा भाग; अर्धा भाग; गळा; काठ : 'जें कां

काठफरा उलले। देखसी ज्याचें बुडे गेलें। तें न पाहिजे हालविलें। असो संचरले निजआळा।' - एरुस्व १८.४५. (को.) २. बोडके गलबत (शीड, काठी, वगैरे काही नसलेले); गलबताचा सांगाडा; खटारा. ३. सांगाडा; आच्छादनविरहित उघडे घर वगैरे (कौलाशिवाय घर, कापडाशिवाय छत्री, पानाशिवाय झरले इ.). ४. मांसविरहित शरीर.

**काठफे(मा)रा** पु. खटारा; सांगाडा; गलबताचे शीड; डोलकाठी व वर माल नसलेला खोका. पहा : **कटारा** : 'जर त्याणी काठमाराच नाथाला सोडिला तरी आम्ही तसाच देऊन' - पेद ३४. १०६; 'तुम्हास पत्र दिल्हे की काठफेरा मात्र देणें.' - पेद ३४.२१२.

**काठभोवरी** स्त्री. पहा : **काटे भोवरी**

**काठमोरा** पु. १. पहा : **काठ** : 'जेवीं नीचाचा कांठमोरा। गळा अडकल्या मांजरा। ते रिघोनि शुचीचिया घरा। नाना रसपात्रां विटाळी।' - एभा २६.२०६. २. पोळी, भाकरीचा कडेचा तुकडा. (क्रि. घेणे, तोडणे.) (वा.) ० **गळ्यात अडकणे, येणे** - एखाद्या धंद्यातील, कामातील लभ्यांश हाती न लागता व्यर्थ शीण पडणे. (ज्याला मडक्यातील वस्तू खायला मिळाली नाही पण मडक्याचा काठ गळ्यात अडकला त्या कुत्र्याप्रमाणे.)

**काठरे** न. कापडाची किनार, धार.

**काठवट-टा** स्त्री. पु. (गुऱ्हाळ) नवरानवरीच्या (उसाच्या चरकातील नर-मादी अशा दोन लाटा) खालचा आस फिरणारे आडवे लाकूड; चरकाची बैठक.

**काठवटी - ड** स्त्री. लाकडी ताट किंवा थाळी: 'काठवटीसी घाटा निवटु होता.' - गोप्र २३९.

**काठवण** न. पहा : **काटवण**; झाडी, काटेरी रान : 'सातपुडी डोंगर साजणी झाडी काठवण भिल्लांचें।' - मसाप १.१.२.[सं. कंटक+वन]

**काठवा** पु. काठ; किनारा; थडी : 'या सर्पाचा रंग लाल राखाडी असतो, ठिपक्यांना लाल काठवा असतो.' - भास १०९. (ना.)

**काठवाड** न. घोडे विकणाऱ्या काठेवाडी लोकांचा तळ किंवा समुदाय.

**काठसर** क्रिवि. तुडुंब; काठोकाठ; ओतप्रोत.

**काठळी** स्त्री. काठाळी; वस्त्राचा काठ; किनार.

**काठळी** स्त्री. हलके धान्य.

**काठंगा-ग्या** वि. काठीसारखा; बारीक; सडपातळ; किरकोळ; काटकोळा. (को.)

**काठा** पु. बोरू. (व.) [सं. काष्ठ]

**काठा** पु. काठ; किनारा; थडी. (को.) (वा.) ० **बांधणे** - भांड्यात शिजणाऱ्या पदार्थाची वाफ बाहेर जाऊ नये म्हणून भांड्यावर ठेवलेले झाकण सर्व बाजूंनी ओल्या कणकीने बंद करणे.

**काठा** पु. १. वर जमिनीचा थर असलेला कातळ; खडकाळ जमीन. २. पर्वताची कटारी. [सं. काष्ठा]

**काठाड** न. चेहऱ्याची एक बाजू; गाल; थोबाड. पहा : **कानठाळ**

**काठाडी** पु. काठीवाला; रखवालदार.

**काठार-रा** न. पु. विहिरीचा, नदीचा किंवा समुद्राचा काठ, किनारा.

**काठारा** पु. १. फक्त काठ राहिलेले भांडे. २. गलबताचा खटारा, सांगाडा.

**काठाळी** स्त्री. कापडाचा काठ, पदर.

**काठिण्य** न. कठीणपणा; घट्टपणा; मजबुती; कडकपणा; दृढता; चरा पडायला कठीण असा पृष्ठभाग : 'विसंबू न सके धोंडीं। काठिण्य जैसें॥' - ज्ञा १८. ७५४. [सं.]

**काठिण्यमापी** पु. धातू आणि रबर यांचे काठिण्य अजमावणारे यंत्र.

**काठिया** पु. एक प्रकारचा साप : 'पनकयातिचे फणिधर। काठिये संकपाळ विखाहार।' - क्रिपु ३८.२७.

**काठिळी** स्त्री. एक हलके धान्य.

**काठी** स्त्री. १. लहान झाडाचा सोट; खोड. २. दांडके; छडी; (सामान्यतः) वेळू, बांबू इत्यादिकांचा चारपाच हात लांबीचा सोटा, दांडका, लाठी (टोकाला गोळे नसलेली.). ३. निशाण; दिंडी : 'महादेवास काठी नेतात.' - मसाप २.२.२६. ४. जहाजाची डोलकाठी; ज्यावर शीड बांधतात तो सोट : 'सोडिले मचवे लोक चढती काठीवर।' - विवि ८.२.५४. ५. काठीचा फटकारा. (क्रि. मारणे.) : 'आम्हां लागलिसे पाठी। बालत्व तारुण्य काठी।' - तुगा १३४७. ६. जमीन मापनाचे एक माप, साधन. ही काठी पाच हात पाच मुठी लांबीची असते. एक विसांश पांड किंवा एकचारशे अंश बिघा. ७. या काठीने मोजलेले क्षेत्रफळ. ८. शरीर, शरीराची काठी; अंगकाठी; चण; बांधा; ठेवण : 'सूर्याचेनी दीपें। वसीस्टाची काठी तपें।' - उषा ८००. ९. जननेंद्रिय (पुरुषाचे). १०. उसाची एक जात. ११. (ल.) आडकाठी. १२. महाराच्या हातातील सरकारी काठी : 'महाराच्या कामाची पाळी आली व संपली म्हणजे काठी आली व काठी पडली असे म्हणतात.' - गांगां ५९. १३. (जळाऊ) लाकडे, सरपण. (कु.) १४. (छाप.) जुळवलेले खिळे (टाईप) छापण्यासाठी लोखंडी चौकटीत (बेसमध्ये) आवळण्यासाठी सभोवार टाकायची एका बाजूला सरळ व एका बाजूला निमुळती होत गेलेली विवक्षित मापाची लाकडी पट्टी. १५. आधार. [सं. काष्ठ] [क. कट्टिगे] (वा.) ० **टाकणे** - सरकारी चाकरीच्या महाराने आपली पाळी दुसऱ्याला देणे. ० **बसणे** - सर्वनाश होणे. ० **भवंडणे** - झेंडा फिरविणे. ० **येणे** - एका महाराची पाळी संपून दुसऱ्याची येणे. ० **वाजणे** - डोलकाठी मोडून पडणे. ० **शिखरास लागणे** - १. (जत्रेमध्ये निरनिराळे मानकरी लोक आपल्या निशाणाची काठी देवळाच्या शिखराला लावतात त्यावरून) आपल्या जन्माचे सार्थक करणे; ध्येय साध्य करणे; उद्दिष्ट साधणे; इष्टार्थ साधणे : 'माझ्या काठ्या लागल्या शिखराला.' - मसाप १.१.६. २.मरणोन्मुख होणे; मरावयास टेकणे. **काठीने पाणी शिंपणे** - स्वतः श्रम न करता दुसऱ्याकडून काम करून घेणे. कुचराईने, निष्काळजीपणाने काम करणे. **काठीने पाणी हाटले तरी दोन ठिकाणी होत नाही** - पक्की जिवलग मैत्री, दाट मैत्री, पक्का स्नेह. **काठीने हाकणे** - भेदाभेद न करता सर्वांना एका ओळीत गोवणे; सब घोडे बारा टक्के अशा न्यायाने वागवणे. **काठीला सोने बांधून चालावे** - चांगल्या बंदोबस्ताचे

राज्याचे निदर्शक. **काठीवर कांबळा घेणे, घालणे** - भांडणतंट्यासाठी तयार होणे, राहणे, सज्ज असणे, कंबर कसणे, सिद्ध होणे. **काठीस लागणे** - गलबत फुटल्यानंतर त्यातील व्यक्ती किनाऱ्यास लागणे : 'पवार मजकूर यांची बायको काठीस लागली ती तुम्हांस बक्षीस दिली.' - असे ३१७. **काठीसारखे पडणे** - साष्टांग नमस्कार घालणे : 'लिंग कां प्रतिमा दिठीं। देखतखेंवों अंगेष्टी। लोटि जे कां काठी। एडली जैसी॥' - ज्ञा १७.२०४. **काठ्या लावणे** - चिडवणे, नाहक त्रास होणे. (ना.)

**काठी** स्त्री. वीस ही संख्या : 'केवला काठी पवित्रु त्यासी। सांगोनिया दीधलें।' - भवि ४२.४५. (नंदभाषा)

**काठी** पु. रजपुतांची एक जात. त्यांच्यावरून काठेवाड हे नाव पडले.

**काठीकर-रु, काठीकार** पु. हातात सोन्याचांदीची काठी घेतलेला देवाचा, राजाचा द्वारपाल; चोपदार; दंडधारी : 'नंदिकेश्वर महानीळ। काठीकर दोघे प्रबळ।' - गुच २९.११९; 'का पुढां सूनि काठीकारा। अक्षमु चाले।' - ज्ञा १७.४२.

**काठीकांबळा** पु. श्रीकृष्णाची गोकुळातील वेषाची नक्कल करण्यासाठी गुराख्यांची पोरे हातात काठी व खांद्यावर कांबळा घेतात त्याला समुच्चयाने म्हणतात.

**काठीखेच** स्त्री. मुलांचा स्काऊटचा एक खेळ.

**काठीवाला** पु. सरकारी पाळीचा महार.

**काठे** न. डोंगराच्या वरती पुष्कळ माती असलेली सपाट जमीन. ही वरकस पिकाची असते. (राजा.)

**काठे** न. मान; कंठ; गळा. (को.)

**काठे** पु. अव. काठेवाडातील लोक : 'यामुळें काठेवाडचे जमीदार यास जी सुकडी मिलत होती व काठे लोकापासून किती येक गाव खरेदी केले' - पेद ३१.१६६.

**काठेउस** पु. उसाचा एक प्रकार.

**काठे(ठ्ये) डोळे** पहा : **काटेडोळे**

**काठेमोडा** वि. कुटील वृत्तीचा. (कु.)

**काठे(ठ्या) वाड-डी** वि. १. काठेवाड संबंधीचा. २. काटकुळा; कृश; बारीक (माणूस, घोडा.).

**काठे(ठ्या)वाडी भिकार** किरकोळ, काटकुळ्या, रोडक्या, माणसाला तुच्छतेने म्हणतात.

**काठोकाठ** क्रिवि. काठापर्यंत; शिगोशिग; भरपूर : 'काठोकाठ भरू द्या पेला, फेस भराभर उसळू द्या.' - केशवसुत.

**काठोट-ठ-ड** स्त्री. काथोट; काटवट. (व.खा.)

**काठोट्या** पु. कुचकामाचा माणूस. (व.)

**काठोडा** पु. जोम. (व.) पहा : **काठी** (क्रि. मोडणे = जोम नाहीसा होणे, करणे.)

**काठ्या** वि. गव्हाचा एक प्रकार; काटे गहू.

**काठ्याला** वि. काटकुळा; सडपातळ; किरकोळ.

**काठ्याळे** न. लहानसे मधमाशांचे पोळे (लहान फांदीला अथवा काठीला लागलेले). (को.)

**काठ्याळे** न. ब्राह्मणांना घालायचे वड्यांचे जेवण.

**काड** पु. एक प्रकारचा मासा. हा कोचीनच्या समुद्रकिनाऱ्यावर सापडतो. याचे तेल (यकृतातून काढलेले) औषधोपयोगी आहे. हे संधिवातविकार, डबा व कफक्षय ह्या रोगांवर फार उपयोगी पडते. [इं. कॉड]

**काड** स्त्री. १. कडधान्य काढून घेतल्यावर राहिलेले भूस. २. गहू, नाचणी, उडीद वगैरे धान्य काढल्यानंतर राहणारे ताट. ३. भात कापून घेऊन पेंढ्याचे माचोडे बांधतात ते झाडल्याने आतून जो बारीक पेंढा पडतो तो. (को.) ४. आवण उपटल्यावर जे काही शिल्लक राहते ते. (को.) ५. अंबाडी, ताग इत्यादींच्या सोललेल्या काड्या, जोख्या, सणकाड्या. ६. (सामान्यत:) द्विदल धान्याचे भूस. ७. नाचणी कापल्यानंतर उरणारे ताट. (बे.) [सं. काष्ठ]

**काड** स्त्री. न. मातीच्या भिंतीचा एक हात उंचीचा थर. पहा : **कांड**

**काडकन-र, काडदिनी-शी** चाबकाच्या किंवा छडीच्या आवाजासारखा आवाज करून; अशा आवाजासहित.

**काडकुसुंबा** पु. एक प्रकारची रानभाजी.

**काडणा** पु. विहिरीतून पाणी काढण्याचे साधन; घागर; कळशी; काढणे. (कु.)

**काडणी** पहा : **काढणी**

**काडतूस पितळ** (यंत्र) तांबे ७०% व जस्त ३०% यांचा मिश्रधातू; चिवट पितळ.

**काडदान** न. जेवल्यानंतर दात कोरण्याकरिता ज्या काड्या लागतात ते ठेवण्याचे एक भांडे किंवा भिंतीतील एक कोनाडा.

**काडबा** पु. वाहत्या पाण्यात सापडणारा मासा. (को.)

**काड भिकारी** अत्यंत कवडीचुंबक, काडीसुद्धा फुकट न घालवणारा माणूस.

**काडमुंगी** स्त्री. एक मोठी काळी विषारी मुंगी. ही चावली असताना वेग येतात : 'हिरांचा मार जेथे पडेल तेथे काडमुंगी डसल्यासारख्या वेदना होतात.' - शंशि ६१.

**काडवात** स्त्री. तुळशी वगैरेच्या काडीला कापूस लावून - गुंडाळून देवापुढे लावण्यासाठी जो काकडा करतात तो : 'रात्रीं उजळोन काडवाती। अर्चनीं ओवाळिजे गभस्ती।' - मोल्स्वर्थ.

**काडवाळा** पु. लहान मुलांच्या पायातील रुप्याचा बारीक भरीव वाळा, कांडोळे.

**काडवेल** न. कडवळ; चाऱ्याचे पीक : 'त्याशिवाय भूस, काडवेल पिके व झार्डे उत्पन्न होतात.' - के ५.४.३७.

**काडशीर** न. वालाचे अगर बाजरीचे पानांसह उपटलेले रोपटे.

**काडसर-री** न. पुस्ती (वस्त्रोद्योग) पहा : **काटसरी**

**काडा-डी** काडेहुरा; शेर; चिकाडा. (को. गो.)

**काडा** पु. धान्यरूपी कर्ज. (बे.) पहा : **काढा २**

**काडा-ढा काढणे** - निपटून काढणे; संपूर्ण छडा लावणे : 'त्याचे-

लोक असतील त्यांचा काडा काढून बेमुर्वत पारिपत्य करणें.' - ऐलेसं २६७१.

**काडाकूट** स्त्री. काथ्याकूट; कष्टसाध्य गोष्ट : 'चाळीस ग्रंथ छापून प्रसिद्ध करणे ही केवढी काडाकूट आह बरें!' - तुफान - प्रस्तावना ३०.

**काडासेक** स्त्री. चमचे, पळ्या इ. अडकवण्यासाठी भोक पाडून केलेली लाकडाची अथवा लोखंडाची पट्टी. (गो.)

**काडी** स्त्री. १. गवत वगैरेचा तुकडा - दांडा : 'तृणाचि काडी न मिळे। उष्णें झाडोरे करपले।' - भाराबाल १.७९. २. लाकडाची काटकी; शिरपूट; धातूचा बारीक लांबट तुकडा; आगकाडी इ. ३. (ल.) काडीच्या मोलाची अथवा आकाराची वस्तू : 'जीवनें शिंपिला तिडपिडी; विजिला प्राण सांडी। लागला तरी काडी। उरों नेदी॥' - ज्ञा १३.७२१. [सं. काष्ठ] (वा.) ० **मोडणे, मोडून देणे** - पदर फाडून देणे; पालव कापून देणे. विवाह संबंध तोडून टाकणे, रद्द करणे.

**काडी** स्त्री. १. (जरीची किंवा रेशमाची या शब्दाच्या पुढे काडी शब्द आला असता) जरी रेशमी - काठ (वस्त्राचा) किंवा वस्त्रावरची पट्टी, वीण असा अर्थ होतो. २. (बुरूड काम) बांबूची बारीक कांब. ३. हातातील टेकायची काठी. (व. ना.) ४. सरपण (अव.) काड्या. (व.ना.) ५. गुरांचा चारा : 'जनावरांना वैरण - काडी देण्याचा हुकूम सोडला.' - कोकि ७३६. [क.कड्डि] (वा.) **(आडवी उभी) ० ओढणे** - (ल.) (नकारार्थी) आडव्या उभ्या रेषा काढायला समर्थ नसणे, म्हणजे काहीही अक्षर लिहिता न येणे; अक्षर शत्रू. ० **ची आग माडीस लागणे** - श्रेष्ठ माणसाला कनिष्ठ माणसापासून किंवा एखाद्या क्षुल्लक कारणापासून अगर व्यक्तीकडून उपद्रव होणे. ० **ने औषध लावणे** - दुसऱ्याच्या जखमेला दुरून, बोट न लावता काडीने औषध लावणे. यावरून अंग राखून काम करणे. ० **लागणे** - जळणे; राख होणे; नाश पावणे; नाहीसा होणे : 'नमुताईच्या संसारास काडी लागली.' - हाच का धर्म - नाशिककर २५. ० **कुडुल्यो करणे** - (बायकी) छप्पापाणी खेळताना जर मुली बसल्या तर एका मुलीने सर्व गड्यांना सावध करून तोंडाने 'काडी कुडुल्यो' म्हणून सर्वांनी उठणे. **काड्या करणे** - पहा : **काड्या घालणे** - 'मला वाटते, कुणी तरी काड्या केल्या पंत.' - बाविबु २२७. **काड्या घालणे** - दोन व्यक्तीत खोटेनाटे सांगून भांडण लावून देणे; एखाद्या होणाऱ्या कामात अडथळा आणणे.

**काडी** स्त्री. अंगावर काटे आणणारा सापासारखा दिसणारा मासा.

**काडी** स्त्री. (गंजिफा) डाव जिंकणे. एका खेळाडूला सर्व पाने देण्याची पाळी येणे. (क्रि. लागणे.)

**काडी** स्त्री. दिव्याची (पणतीची) ज्योत. (खा.)

**काडी** स्त्री.१. बायकांच्या नाकातील चमकी. (गो.) २. मुसलमान स्त्रियांच्या मनगटावर घालण्याचा दागिना.

**काडी कसपट** गदळ; घाण; केरकचरा: 'म्यां म्हटलें हा मार्ग चांगला काडीकसपट नसे।' - अफला ७५.

**काडी(डे)खार** पु. पापडखार (सोनार वापरतात.).

**काडीखेच** स्त्री. चकण्याचा प्रकार. 'एकाने एका काडीचे टोक हातात धरून दुसरे बाहेर ठेवावे. खेळणारांनी हे बाहेरचे टोक क्रमाक्रमाने अधिकाधिक बाहेर ओढावे. ज्याच्या हातून काडी बाहेर पडेल तो चोर. राज्य घेण्याच्या या पद्धतीला काडीखेच म्हणतात.' - व्याज्ञा १.१३१.

**काडीचा** वि. नकारवाचक व प्रश्नवाचक विधानात वापरला जाणारा शब्द; यत्किंचितही; थोडा; अल्प : 'नाटकवाल्यांत काडीचादेखील गुण नसतो.' - विकार.

**काडीपेटी** स्त्री. आगपेटी.

**काडीपेहेलवान** पु. अतिशय किडकिडीत व अशक्त माणूस.

**काडीपेंडी** पहा : **पेंढी काढी**; पेंढ्या.

**काडीभर** वि. फार थोडा; यत्किंचितही : 'तुम्हांला कोणी काडीभरही उपद्रव करणार नाही.' - विवि ८.३.५३.

**काडीमहाल** पु. कोल्हाटी - डोंबारी - घिसाडी इ. भटक्या लोकांच्या गवती झोपड्यांना तुच्छतेने म्हणतात.

**काडीमात्र** वि. तिळमात्र; किंचितही; काडीभर : 'खेड्याच्या व्यवहारात काडीमात्र फरक पडलेला नाही.' - माप्र २४५.

**काडीमाया** वि. अगदी रोड. (व.)

**काडीमोड** स्त्री. १. फारकत; घटस्फोट; नवरा व बायको यांनी आपला विवाहसंबंध तोडून टाकणे. या समयी गवताची काडी चार मंडळी समक्ष मोडतात. काही जमातीत ही पद्धत प्रचलित आहे. २. (ल.) संबंध तोडणे : 'घाबरियांच्या मोडा काड्या। धाडा भ्याडा वळतियां।' - तुगा २२७.

**काडीमोलाचा** वि. निरुपयोगी; काहीही किंमत नसलेला.

**काडुक** न. काटुक, लहान काडी. (व.) [सं. काष्ठ]

**काडू** पु. गांडूळ; गांडवळ; पावसाळ्यात उत्पन्न होणारा एक जीव; दानवे - दानवा.

**काडू** पु. सुताराचे एक हत्यार.

**काडेखार** पु. पापडखार.

**काडेचिराईत** न. चिराईत नावाच्या लहान झाडाच्या वाळलेल्या फांद्या. याचा रंग काळसर असून चव कडू असते. याचा ज्वरावरील काढ्यात उपयोग करतात.

**काड्या** स्त्री. १. काडी या शब्दाचे अनेकवचन. २. विडा इ. टोचण्याकरता हाताच्या बोटासारखी टोके असलेले चांदीचे झाड.

**काड्या निवडुंग, काड्याहुरा** पु. काडाशेर; चिकाडा; काडी असलेला शेर.

**काढ** पु. जंगलातून ओढून आणलेला लाकडाचा ओंडका.

**काढ** स्त्री. काटाकाट; काटकसर; कमी करणे.

**काढकुसुंबा** एक प्रकारची खाण्यायोग्य रानभाजी.

**काढणी** स्त्री. कापणी; कापून घेणे (जोंधळा, बाजरी वगैरे पीक); द्विदल धान्ये खुडणे; भुईसपाट असलेल्या झुडपावरील अगर वेलीवरील फळे खुडणे, कापून रास करणे. (मर्यादित उपयोग.)

**काढणी** स्त्री. १. विशेषत: सुताचा पक्का दोर; अंबाडी, ताग, रेशीम यांचाही

दोर किंवा दोरी (मर्यादित उपयोग). विहिरीतून पाणी काढण्याकरता; घोड्याला खुंट्याशी बांधण्याकरता किंवा त्याला फेरीवर धरण्याकरता, गोणी, कंठाळ, आखे, बस्ता, मालाचा गठ्ठा वगैरे आवळण्याकरता, तंबू ताणण्याकरता वापरतात. २. सर्वसाधारण औतास वेटक अगर येटक घालण्यासाठी उपयोगात आणण्याची दोरी; वेठण; सोल. (वा.) **काढण्या ओढणे** - दोरीने मारणे. **काढण्या घालणे** - आरोपी इ. ना दोरीने बांधणे; अटक करणे.

**काढणी** स्त्री. १. (दांडपट्टा) वार मारून पायांच्यामधून उडी मारून पायाखालून पट्टा काढून घेण्याची रीत. २. चक्रातून किंवा हातातून शरीर काढून घेण्याची कसरत.

**काढणीया** पु. घोड्याचा लगाम संभाळणारा मोतदार : 'काढणीया घोडा पालाणी।' - लीचपू ७५.

**काढणे** उक्रि. १. आतून बाहेर, वर घेणे; ओढून घेणे : 'दाढी धरून ह्या मेल्याला बाहेर ओढून काढल्याशिवाय हा ताळ्यावर यायचा नाही.' - बाय २.४. २. (ल.) वळवणे; उठवणे (अक्षरे, ओळी, आकृती). ३. मागावर वस्त्र इत्यादी तयार करणे, विणणे. ४. नवीन (तऱ्हा, मार्ग, रीत, पद्धत) शोधणे, जुळवणे, पाडणे. ५. मिळवणे; जुळवणे; उत्पन्न करणे; श्रमाने संपादन करणे. ६. कर्ज घेणे, उसनवारी घेणे. (पैसा उपटणे.) ७. वादविवादाचा विषय, भाषण सुरू करणे; ओघास आणणे; मुद्दा पुढे मांडणे; उपस्थित करणे. ८. शोधणे; उजेडात आणणे; छडा लावणे; दाखवणे (दोष, गुणधर्म). ९. कंठणे; सहन करणे; सोसणे; लोटणे; घालवणे (दुःख, आजार, क्लेश, काळ). १०. शिकवणे; वठणीस आणणे; कामाला योग्य असा तयार करणे (पशु). (को.) ११. शुश्रूषा करणे, सेवा करणे (पोराची, दुखणेकऱ्याची). १२. हुडकणे; पत्ता काढणे (रस्ता, पाहिजे असलेली वस्तू) : 'पुढें वाट काढणारी मंडळी होती.' - विवि ८.१.१८. १३. उपटणे (जोंधळ्यांचे पीक). १४. (घोडा, बैल, इ. नी दुखण्यामुळे) चालताना पाय वाकडा टाकणे. १५. उपसणे (तरवार). १६. दूर करणे : 'संसार काढूनियां कांठीं।' - ज्ञा १३. ८६७. १७. कमी करणे; पूर्णपणे बंद करणे : 'लोकु पहीलें भीक्षा घालीति : मग भीक्षा काढली.' - गोप्र ७२. (वा.) **काढते घेणे** -१. स्वतःला सोडवून घेणे, पाय मागे घेणे (भांडण, झगडा, लढाई यांमधून) : 'कृत्तवर्मा बलिभद्र काढिलें। जुंझतजुंझतां।' - शिव ९७६. २. फौज मोडू न देता शिस्तीत माघार घेणे. **काढता पाय घेणे** - प्रसंगातून निसटणे, पळणे : 'नानांनीं प्रसंग पाहून पुण्यातून काढता पाय घेतला.' - अस्तंभा ६. (क्रि. घेणे.)

**काढणे** न. विहिरीतून पाणी काढण्याचे साधन; पोहरा, कळशी, बसकट आकाराचा तांब्याचा लोटा. दोरी बांधण्यासाठी याला एक कडी असते. (को. गो.)

**काढणे** अक्रि. उतरणे, शमणे, थकणे, कमी होणे (पाऊस, ताप, नदीचा पूर) : 'सिंधु एकें आंगे काढे।'- राज्ञा १५.११८.

**काढते** न. (जुगार) पैशाऐवजी ठेवलेली हस्तिदंताची नरद.

**काढदगड** पु. (गवंडी काम) खाणीतून काढलेला बिनघडवलेला दगड; अनघड दगड. पायाच्या भरतीच्या कामी उपयोगी.

**काढत्या कामाचा, रेघेचा** सोपवलेले, सांगितलेले तेवढेच काम करणारा; सांगकाम्या.

**काढवण-न** न. गावातून शेताकडे बैल जोडून औत नेताना वाटेत ते जमिनीवर घासू नये यासाठी त्याच्याखाली घालतात ते एक कोनाकृती लाकूड.

**काढवणी** न. (विहिरीचे वगैरे )काढलेले पाणी.

**काढवाट** स्त्री. मागे पुढे करण्याची क्रिया; सरकासरकी. (व.)

**काढवान** न. बिनचाकाची गाडी.

**काढशह** पहा : **काटशह**

**काढा** पु. १. औषधी वनस्पती उकळून त्याचा अर्क ज्यात उतरला आहे असे पाणी; कषाय; अर्क. २. माळवे, भाजीपाला विकत घेतला असताना त्यावर बोलीपेक्षा अधिक मागून घेतलेला भाजीपाला; वर्ताळा (क्रि. घेणे). ३. उपवास; लंघन. (व.) ४. पळ काढणे; रस्ता सुधारणे; निघून जाणे. [सं. कषाय, क्वाथ] (वा.) ० **काढणे** - १. अधिक काढणे; उपटणे; मिळवणे. २. लोभी बनवणे. ३. पाठलाग करणे. (टोणग्यांची अथवा बैलांची झोंबी लागली म्हणजे एक टोणगा अथवा बैल दुसऱ्या टोणग्याच्या अथवा बैलाच्या मागे धावत जाऊन पाठलाग करतो त्याला व मनुष्याच्या बाबतीतही म्हणतात.) : 'तें देखोनि शैल्यांच्या साबळीं। काढाओ काढिला।' - शिव ९५६. ० **पडणे** - उपास पडणे; खाता न येणे. **काढ्यात कोळणे** - १. काढ्यात एखादे औषध कुसकरणे. २. (ल.) दुःखाने क्षीण होणे : 'पाहून मनाचा खंबीर दुःखे पहा काढी कोळले।' - प्रला १०२. ० **काढ्यावर, काढ्याने काढणे** - एखाद्याला रोख नाण्याने कर्ज देऊन त्याचे धान्यरूपाने व्याज घेणे, देणे व तो व्यवहार. ० **काढणे** - १. झाडून शोध काढणे : 'पुढेही रानाचा काढा काढून गावास उपद्रव होऊ देणार नाही.' - थोमारो २६१. २. पळ काढणे; रस्ता सुधारणे; निघून जाणे : 'सा घटिका दिवसास मातबर लढाई झाली. आपले लोकांनी काढा काढिला.' - पेद ३५.७८. ० **काढवणे** - निकाल करणे; मारून टाकणे.

**काढाऊ** वि. १. काढून, भुरळ घालून, फूस लावून आणलेला (चाकर, बायको इ.) २. मुद्दाम तयार केलेला.

**काढाऊपणा** पु. फुकटात पैसे, वस्तू इ. दुसऱ्याकडून घेणे.

**काढाओढ-ढा** स्त्री. पु. १. अनेकांपासून कर्ज काढण्याची क्रिया. २. पैशाची ओढाताण. (वा.) ० **करणे** - अनेकांकडून कर्ज काढणे: 'काढाओढ करून त्याने लग्न करून घेतले होते.' - तोरण २२२.

**काढाओढी** स्त्री. १. आळेपिळे; २. त्रास. (गो.)

**काढाकाढी** स्त्री. आवरा - आवर करणे; घाईने, गडबडीने काढणे; काढून टाकणे; हिसकणे. यावरून झटपटीने, लगबगीने तयारीला लागणे; उपाययोजना करणे : 'तुका म्हणे आतां करी काढाकाढी। जाती ऐसी घडी पुन्हा न ये।' - तुगा.

क्रिवि. त्वरेने; घाईने; जलदीने; त्वेषाने : 'म्हणशी युद्ध मांडेल कडाडी।

मी उठेन काढाकाढीं।' - एरुस्व ४.३८. (काढणेचे द्वि.)

**काढावा** पु. १. शोध; तपास : 'काढावा काढून येक वीरातें। घेऊनि गेला।' - कालिका पुराण १७.४६. २. पळ; माघार : 'युद्ध थोर जाले। मग त्याहि काढावा काढिला।' - मव ४३. (वा.) ० **काढणे** - माघार घेणे; पळ काढणे; निसटणे : 'सीख पाठमोरे होऊन काढावा काढोन जोहरमल जाटाचे नजिक निघोन आले.' - पेदभा २९.१२६. ० **घालणे** - अंग काढून घेणे; पाय मागे घेणे; पळ काढणे : '.... पानशांचे फौजेने काढावा काढून बाजूस जाले.' - ऐलेसं ६९.६४.

**काढावा** पु. कर्ज घेणे, उसने घेणे.

**काढीव** कि. १. सांगून तयार करवलेले, मुद्दाम बनवलेले; काढाऊ (वस्त्र इ.). २. खोडकर मुलाला व कजाग स्त्रीला - वेश्येला - निंदेने म्हणतात. ३. मुद्दाम काढविलेली, तयार करवलेली (घोड्याची पैदास).

**काढू-ढ्या** वि. दुसऱ्यापासून आर्जव इ. युक्त्या करून कर्ज, द्रव्य इ. काढणारा; पैसे उपटणारा; उंडीबकाल; तुंबड्या: 'तशात कुणबी मायाळू आणि भिडस्त व इतर सर्व काढू पडले.' - गांगा १२१.

**काढून टाकणे** सक्रि. (ग्रंथ) बाद करणे. (ग्रंथालयातून एखादे ज्ञानसाहित्य नाहीसे झाले आणि त्याची जबाबदारी कुणाची हे ठरवणे शक्य नसेल तर अशावेळी हे वाचनसाहित्य बाद केले जाते.)

**काणकूण** स्त्री. १. कुणकुण; गुणगुण; दुसऱ्याला ऐकू न येईल असे भाषण; पुटपुटणे. २. पिरपिर; कुरकुर. ३. टंगळमंगळ; कां कूं करणे; उडवाउडवीची भाषा; धरसोड. [ध्व.]

**काण(न)गी** स्त्री. कानगोष्ट.

**काण(न) गी** स्त्री. देवाचा नैवेद्य : 'काही काणगी नको कराया कानगिला घेउनि।' - राला १९.१५. [क. कणिके = देणगी]

**काणट** स्त्री. सर्पाची एक जात. जळू सारखा रक्तपिपासू प्राणी.

**काणव** वि. यजुर्वेदीय काण्व शाखेचा : 'तेथ काणवां ब्राह्मणाचां ग्रहीं श्रीप्रभु गोसावी गर्भी अवतारु स्वीकारला :' - लीचपू १५; गोप्र १.

**काणवडा** पु. कापडाचा आडोसा : 'काणवडैया आडौनि उदका वीनीयोगु करीति।' - गोप्र १०८.

**काणवण** स्त्री. अनमान; टाळाटाळी; काचकूच : 'कर्नाटकात फौज रवाना करावी परंतु लोक जावया काणवण करितात.' - ऐलेसं २७५.

**काणवरा** वि. सरमिसळ; पंचभेळ खुर्दा : 'सरकारांत द्यावयास मात्र (त्यांस) काणवरा टका मिलत नव्हता.' - ऐलेपाम्युप्र १४९.

**काणस** पहा : **कानस**

**काण(णु)स** वि. हाडकुळा; अशक्त; कृश : '.... माणसांचीं काणसें झालीं आहे.' - ऐलेसं १५६६.

**काणूस** पु. ना माणूस ना पशू : 'लोभासाठी झाला मानसाचा रे कानूस' - बगा १८७.

**काणा** वि. १. ज्याच्या दोन डोळ्यांपैकी एका डोळ्याची शक्ती गेली आहे असा; एका डोळ्याने आंधळा; एकाक्ष; डुचका : 'काणीला जसे सोग्याचे काजळ शोभत नाही.' - कमं ९.३२. २. तिरव्या डोळ्याचा, चकणा; ज्याला बुबुळे तिरकस केल्याशिवाय दिसत नाही असा. हाच अर्थ विशेष रूढ आहे. ३. तिरळा (एका डोळ्याने, दोन्ही डोळ्यांनी.) काणा डोळा, काणे डोळे असे प्रयोग होतात. ४. ज्या देशात पाहिजे असलेला जिन्नस वेळेला मिळत नाही किंवा जेथील भाव एकदा स्वस्त तर एकदा महाग असतात असा देश, शहर, खेडे. ज्या देशात आपण दुष्कर्मादी कृत्ये केल्यामुळे पुन्हा त्या देशात जायला आपल्याला लाज वाटते तो देश, शहर, खेडे इ. ५. एक पेड मोठा व दुसरा बारीक अशा तऱ्हेने विणलेला दोर. तसेच तिढून वाकडी झालेली खाट, माचा, बाज. ६. तिरकस; तिर्यक्; तिरवा; वक्र; वाकडा : 'जाईल काणे वाटारे।' - दावि १५८. [सं. काण=एकाक्ष) (वा.) **काणाडोळा करणे** - (अपराध, चूक इत्यादीकडे) दुर्लक्ष करणे. **काणे होणे**- दुर्लक्ष होणे. **काण्याडोळ्याने पाहणे** - कटाक्ष मारणे.

**काणाडी** स्त्री. कानशील. [सं. कर्णनाडी]

**काणी** स्त्री. खिन्नता; क्लेश: 'जाणोनि अंत:करणें। काणी घेतली॥' - ज्ञा १८.७६.

वि. क्लेशदायक: 'मायबाप, बंधु बहिणी। नोवरी न दिसता वाटे काणी।' - दास २.२.४०.

**काणी** वि. (तराजूची पारडी) तिरपी; असमान असणे.

स्त्री. तराजूची पारडी सारखी करण्यासाठी एकात जे वजन, पासंग घालतात ते. [क. काणि = तराजूतील बेतोल, पासंग]

**काणी** स्त्री. १. बैलाचा कासरा, जनावराच्या गळ्याला बांधायचे चऱ्हाट, दोर. २. लहान दोरी; दाव्याची एका बाजूची दोरी. (कु. माण.) ३. लहान फास केलेली दोरी. (बे.)

**काणी** स्त्री. काजळी; ज्वारी, गहू यावरील एक रोग. ह्यामुळे कणीस, लोंबी काळी पडते.

**काणीट** न. जळूच्या जातीचा लहान प्राणी. हा माणसाच्या त्वचेला चिकटून रक्त ओढून घेतो. पहा : **काणट**

**काणी पेठ** पहा : **काणा** ४; धान्य वगैरेचा साठा नसल्याने दुसऱ्या गावावर अवलंबून राहणारे तसेच भावात वरचेवर चढउतार होत असल्यामुळे जेथील व्यापारी लुच्चेगिरी, नफेबाजी करतात असे शहर.

**काणू, काणूक** न. दैवाला द्यायची देणगी; देवापुढे ठेवतात तो पैसा. काणगी. (गो.) [क. कणिके = देणगी]

**काणे** न. एका जातीचा मासा. हा भाद्रपदात, आश्विनात सापडतो.

**काणेर** पहा : **कांडर**

**काण्णी** स्त्री. काढणी; दोरी. (गो.) पहा : **काणी**

**काणुबाण्णु** न. १. काही तरी; ज्याला कोणी विचारत नाही किंवा ज्याकडे कोणी लक्ष देत नाही अशी वस्तू किंवा औदासिन्यदर्शक शब्द. २. पुरुषाने मृदूपणाने घातलेल्या समजुतीला स्त्रिया हा शब्द लावतात. (क्रि. बोलणे.) ३. परस्त्री अथवा परपुरुष यांच्या परस्परातील अनीतिकारक शृंगारचेष्टा; कुजबुज; गुलगुल गोष्टी. [सं. किम्+नु].

**कात** स्त्री. भाजीपाला व मिरची यांना येणारी फळे; कातरूड. (कु.)

**कात** पु. लाकूड, हस्तिदंत वगैरेंचा कातताना पडलेला भुसा, चुरा, कीस.

**कात** स्त्री. सापाने टाकलेली त्वचा, मेंग. हे एक प्रकारचे कातडेच आहे.

(क्रि. टाकणे.) [सं. कृत्ति = त्वचा] (वा.) ० **टाकणे** – पुन्हा ताजातवाना होणे; नवे रूप धारण करणे : 'दादरचा लेडी जमशेटजी रोड झपाट्याने कात टाकीत होता.' - कलंदर २. **कातीला येणे** - कात टाकायच्या स्थितीला येणे; वृद्ध होणे.

**कात-थ** पु. खैर वगैरे झाडांच्या लाकडापासून उकळून काढलेला एक पदार्थ. हा (खाण्याच्या) विड्यात घालतात. याच्या काळा, पिवळा, व खैरसाल अशा तीन जाती आहेत. [सं. क्काथ] (वा.) **एवढ्याने काय कात होणार ?** - कमीजास्त; उणीव. अतिशय थोडा या अर्थाने वापरतात (एखादा पदार्थ कमी पडल्यास.)

**कात** स्त्री. रेशीम (कातलेले).

**कात(य)कडी-री** पु. १. कात तयार करणारी एक जात व त्यातील व्यक्ती. २. एक गुन्हेगार समजली जाणारी जात. ३. काथोडी. यांच्यात दोन पोटजाती आहेत. घोर कातकरी व सोन कातकरी.

**कात कलकत्ता** चीन देशातून येणारे कातलेले रेशीम.

**कातकाम** न. कातण्याचे काम; लाकूड, धातू इ. यंत्रावर चढवून ती फिरवून हत्याराने त्यांना निरनिराळे आकार देण्याचे काम.

**कातकुतली** स्त्री. खाजकुयली. (गो.)

**कातकुली** स्त्री. गुदगुली; काचकुली; गुदगुलीची क्रिया.

**कात(थ)गोळी** स्त्री. कातामध्ये सुवासिक द्रव्ये घालून केलेली लहान गोळी. ही गोळी विड्यामध्ये घालतात.

**कात(थ)चुली** स्त्री. कात तयार करणाऱ्यांवर बसवलेला सरकारी कर.

**कात टाकणे** मुलांचा स्काउटचा एक खेळ.

**कातडी** स्त्री. १. मनुष्य, पशु (सजीव) इत्यादीच्या अंगावरील कातडे, त्वचा; चर्म; चामडी; पापुद्रा; साल. २. चोळवटलेले, घासलेले लोंबत असणारे कातडे. [सं. कृत्ति] (वा.) ० **बचावणे** – एखाद्या कामापासून बुद्धिपुरस्सर दूर राहणे; कामाची जबाबदारी टाळणे. ० **लोंबवणे, लोळवणे** – अंगाची चामडी निघेपर्यंत मारणे.

**कातडीबचाऊ** वि. स्वतःचे नुकसान होणार नाही अशा तऱ्हेने वागणारा.

**कातडे** न. १. त्वचा; चर्म; चामडी. २. कमवलेले कातडे. [सं. कृत्ति] (वा.) **आपल्या अंगाचे कातडे ओढून जोडा शिवला तरी उपकार फिटणार नाही** – एखाद्याचा अतिशय (न मिटण्यासारखा) उपकार झाला असताना म्हणतात. ० **पांघरणे** – एखादी गोष्ट माहीत असूनसुद्धा माहीत नाही असे ढोंग करणे; ठकवणे; फसवणे: 'परंतु दोघांचा न्याय चालत असता अनाहुत मध्येच तोड घालून त्रयस्थाचे कातडे पांघरून काही घोटाळा करणे अगदी रास्त नाही.' – लोटिकेले ४.१२८. ० **उतरणे** – मेलेल्या जनावराचे कातडे वेगळे करणे: 'मृत पशूंचे कातडे उतरवताना त्यातून रक्त गळत नसते.' - चंद ७२.

**कातण** न. करंज्या वगैरे करताना त्यांच्या कडांचे कातण्याने निघालेले पीठ. [सं. कर्तन]

**कात(ती)ण** स्त्री. कोळ्याच्या वर्गातील एक किडा. ह्याचे पाय लांब व शरीर काळसर असते. माशा पकडण्यासाठीही कोळ्यासारखे हा आपल्या अंगातून तंतू काढतो म्हणून म्हणतात : 'पिसवा गोचिड कांतणी।' - दावि २४४.

**कातणा** पु. सुताराचे एक हत्यार. (कुण.)

**कातणे** उक्रि. १. चाती, रहाट वगैरेवर सूत काढणे. २. चरकावर धरून विशिष्ट गोलाकार देणे. ३. करंज्या वगैरेचे काठ कातण्याने कापणे. ४. (ल.) (खोडी किंवा दुष्कृत्य करण्याबद्दल) शक्कल लढवणे, युक्ती काढणे. ५. छळणे; गांजणे; बेजार करणे; पाठीला लागणे; पिळणे : 'काय कातला भगवंतीं वेळोवेळा।' - ऐपो १४२. ६. नारळ खवणे. (गो.) ७. जुंपणे : 'जेथ गरुडाचिये जावळियेचे। कांतले चाऱ्ही॥' - ज्ञा २.१३८. ८. पिसाळणे: 'कातलेसे श्वान। तैसें दिशा हिंडे मन।' - तुगा २९००. ९. (जरतार) पीळ देणे; वळणे. [सं. कृत्] १०. सुरकुतणे. (वा.) **कातून पिंजणे, काढणे** – पुष्कळ श्रम घेऊन तयार करणे; नावारूपाला आणणे.

**कातणे** अक्रि. १. कांचणे; घर्षणाने झिजणे; कमी होणे. (को.) २. दुखणे, त्रास वगैरेने कावणे; क्षीण होणे. [सं. कृत्]

**कातणे** न. १. करंज्या वगैरेंच्या काठाला काटे आणण्याचे एक साधन. याच्या पातीला दाते असतात व धरायला दांडा असतो. लहानशा पितळी दांड्याला (दाते असलेले) बसवलेले चक्र. २. खवणी; खवला; नारळ खवणण्याचे साधन. (गो.)

**कातणे** सक्रि. कोरणे; पोखरणे : 'भ्रमण रुणझुणकार करिती। ते कांतिती स्तंबाथे।' - क्रिपु ३२८.

**कात दोनतारी** रेशमाची एक जात; पिळाचे रेशीम.

**कातनयंत्र** न. (यंत्र) यावर धातू गोल फिरवून अनेकविध हत्यारांच्या साहाय्याने त्यास आकार आणण्याचे काम चालते असे महत्त्वाचे यंत्र.

**कातनरंधा** पु.(यंत्र.) पृष्ठभागाला सपाटी आणण्यासाठी उपयोगात आणण्याचा लेथ.

**कातनेकड** न. तोरणावर कनेकड फिरत असताना दोन्ही लाकडे घासून झिजू नयेत म्हणून बाजूंना दोन खुंट्या मारून त्यामध्ये कनेकडाखाली व तोरणावर जे लाकूड घालतात ते.

**कातन्याभाजी** स्त्री. एक वनस्पती. पहा : **कात**

**कातबोळ** पु. खैरकात आणि बोळ यांचे मिश्रण. हे औषध बाळंतिणीच्या उपयोगी आहे. याचा रंग काळा असतो.

**कात(थ)भट्टी** स्त्री १. कात तयार करण्याची भट्टी, चुलाण. २. कातचुली; या भट्टीवरील कर.

**कातयर** स्त्री. भय; भीती; कातरता.

**कातयो** स्त्री. कृत्तिका. (गो.)

**का तर** कारण; का की.

**कातर** स्त्री. जिवंत प्राण्याच्या केसावर अथवा लोकरीवर पडणारा एक रोग; कातरी; चई; चाई; उंदरी (क्रि. लागणे.).

**कातर** स्त्री. १. मोठी कात्री; बोटे अडकवण्यासाठी मागे पोलादाची दोन भोके असलेली व एका खिळ्याने सांधलेली व फिरती पाती असलेली. हिने कागद, कापड इत्यादी वस्तू कातरल्या जातात. २. (ल.) दोन नद्या किंवा रस्ते जेथे जुळतात, मिळतात त्यांच्यामधील त्रिकोणाकृती

प्रदेश; वर्तुळाच्या दोन त्रिज्यांमधील भाग; आढे ठेवण्यासाठी दोन वासे जोडून केलेली कैची, त्रिकोण. ३. (ल.) अडचणीची स्थिती; घोटाळा; आपत्ती; पेच; काडे. ४. तळहातावरील विवक्षित दोन रेघांमधील त्रिकोणाकृती भाग व त्या रेषा. या रेषांवरून दुर्भाग्य वर्तवतात. अशा माणसाजवळ पैसा टिकत नाही अशी समजूत आहे. ५. तेल्याच्या घाण्याभोवती फिरणारे कातरीच्या आकाराचे एक लाकूड. ६. कणसे असलेल्या कडब्याच्या पुष्कळ पेंढ्यांची मंडलाकृती रचना. (माण.) ७. अष्टदिशांच्या मधील अंतराळ. ८. ओकतीचे दुबेळके, बेळे. (को.) ९. दांडपट्टा खेळण्याचे एक हत्यार : 'याशिवाय मारू, धोक, कातर इत्यादी नाना प्रकारची उपकरणी मर्दानी खेळास लागतात.' - संव्या ६८. [सं. कृत् - कर्तरी] (वा.) ० **लावणे** - कमी करणे, काटकसर करणे.

**कातर** वि. १. भ्यालेला; भित्रा; भयभीत; भ्याड : 'बहु कातर विदुर सदा वटवट करितो अशीच हा नीच।' - मोसभा ४.९०. २. अंगचोर : 'गुरू दास्या विषयीं कातर।' - विसिं १.५२. [सं.]

**कातरकाम** न. कात्रीने कागद, कापड यांच्या वेगवेगळ्या आकृती करणे : 'रंगीबेरंगी कागदांच्या कातरकामांनी बांबू मढवून होटेलवाल्यांनी मोठा थाट केला होता.' - पलको ७७.

**कातरकुतर** वि. आत बाहेर कापलेले, कातरलेले, करवतीकाठी. स्त्री. कातरलेला चुरा, भुसा.

**कातरखुरा** पु. (चर्म.) नखी खालचा चुरा.

**कातरचुरा** पु. (ओतकाम) जिल्हई देताना खाली पडणारा धातूचा चुरा, भुसा.

**कातरण** सक्रि. कातरणे. (गो.)

**कातरण-णी** स्त्री. कापण्याची व कातरण्याची क्रिया.
न. १. वस्त्र विणल्यावर फणीला राहणारी उभ्या सुताची टोके. २. कातरलेले तुकडे; चुरा.

**कातरण-णी** न. १. कातीण नावाचा किडा. (व.) २. वनस्पतीवरील रोग.

**कातरणे** अक्रि. भिणे; कचरणे; माघार घेणे: 'सुविचारा कातरूं नको।' - अफला ६१.(वा.)**कातरते घेणे** अंग काढून देणे : 'हळूहळू तोफांचे गोळे त्याजवर लागू झाल्यावर कातरते घेऊन तोफांचे गोळे टाकून आपली फौज पोटासी घ्यावी असा मनसबा त्याचा होता.' - ऐलेसं २३९३. [सं. कातर]

**कातरणे** उक्रि. १. कात्रीने कापणे; काटणे. २. चावून, कुरतडून, टोचून कापणे. ३. मेंढीवरील लोकर भादरणे. ४. कमी होणे.(कु.)[सं. कर्तन]

**कातरता** क्रिवि. तिरकस; तिरपा; निसटता; चाटून: 'गोळी मानेस कातरती लागली.' - भाब ५७.

**कातरता** स्त्री. भित्रेपणा. [सं. कातर]

**कातरदात** पु. वस्तूचे तुकडे करणारे, तोडणारे दात: 'त्याचे वरचे व समोरचे चार कातरदात पडले होते.' - पडरे १९.

**कातरपकड** स्त्री. मल्लखांबाला दोन्ही बाजूंनी कातरीसारखे हात धरून मारायची उडी.

**कातरबेल-ली, कातरबेवत-ती** पहा : **कतरबेत-ती**

**कातरमाळा** पु. तिरकस कौलांचे छप्पर असलेल्या घरातील कौलाखालील खोलीवजा माळा.

**कातरविडा, कात्रीविडा** पु. चार पाने घेऊन त्यातील एक एक पान मधल्या शिरेला दुमडून हाताच्या नखांनी डेखापासून ते शेवटपर्यंत सारखे कातर पाडून करण्यात येणारा गोविंदविडा.

**कातरवेळ** स्त्री. ऐन तिन्हीसांज; दिवस व रात्र यांचा संधिकाल : 'या कातरवेळी पाहिजेस तूं जवळी।' - चैत्रबन.

**कातरशितर** वि. काटकसरी; मितव्ययी; सावध; विचारी.

**कातरा** वि. कातरता; तिरका; ओझरता; वाकडा. पहा : **काकरता**

**कातरा** पु. १. कातण्याचे कृत्य; काट; छाट: 'तेणे प्रपंची वर कातरा रे।' - दावि ३.७९. २. कातरलेले तुकडे; भुसा; कीस; चुरा (वस्त्र, लाकूड, कागद, सुपारी, पाने इत्यादीचा). ३. कातरायचा भाग. ४. पाथरीची भाजी. हिची पाने कातरल्याप्रमाणे असतात. ५.फाक; फोड; तुकडा. (क्रि. घेणे.) ६. (स.) दोन सोप्यांच्या जोडाचा संधिभाग. ७. हातापायाला पडणाऱ्या भेगा (क्रि. पडणे.). (राजा.) ८. शाळू किंवा जोंधळ्याच्या पेंढ्यांची गंजी. जेथे शाळू अगर जोंधळा होत नाही तेथे या शब्दाऐवजी ढीग, सुडी हे शब्द वापरतात. (माण.) पहा : **कातर** ६. ९. तिरकस येणारे दोन ओघ, प्रवाह : 'वायोचा कातरा घसवटे। तेणे उष्णे वन्हि पेटे।' - दास ३.३.८. [सं. कृत्]

**कातरा** स्त्री. तीक्ष्ण दृष्टिक्षेप: 'कातरेची अभिनव कुलखणीः जें जुंझता न देखे दुर्जे कोन्ही।' - मुप्र २१७४.

**कातरा** पु. कातकाम करताना निघालेले तुकडे अथवा चुरा.

**कातरावेल** स्त्री. कातरी. हिची पाने कातरनिरगुडीच्या पानासारखी असतात.

**कातरी** स्त्री. १. पहा : **कातर** : 'जे हीं ते वर्ण च्यान्ही। ये जन्ममृत्युची कातरी।' - राज्ञा १८.८२१. २. तेलाच्या घाण्याच्या खाली दोन आडवी लाकडे जेथे मिळतात ती जागा, भाग. ३. केसांना लागणारा एक रोग; चाई; उंदरी. (क्रि. लागणे.) ४. (कुस्ती) एक डाव; आपला एक पाय जोडीदाराने वरती उचलला तर तो पाय जोडीदाराने जितका उचललेला असेल तेथे त्याच्या पोटाला किंवा छातीला टेकून आपला दुसरा पाय जोडीदाराच्या गुडघ्याच्या लवणाजवळ व पंज्ञा जोडीदाराच्या टाचेला टेकून कातरीच्या दोन्ही पात्याप्रमाणे दोन्ही पायाने जोडीदाराला चीत करणे.
वि. कातलेले, छाटलेले, खांडे पाडलेले (काही काही वनस्पती). जसे:- कात्री निर्गुंड - निरगुडी - निरगूड - निवडुंग - पानविडा. [सं. कर्तरी] (वा.) ० **चालवणे** - काटकसर करणे.

**कातरी निर्गुंड** निर्गुंडीतील एक प्रकार.

**कातरे** न. गोमांतकातील प्रेमगीत. उदा. 'भितर माकां मोगा असा पापा घरा। माडा मुळांत बसोन खावया। तन्नी आड सारां।' - चित्रा दिवाळी १९३४.

**कातर्य** न. भित्रेपणा; भ्याडपणा; नेभळेपणा. [सं.]

**कातऱ्या** वि. कापणारा: 'कातऱ्या बाण सोडला, जंगल सार तोडला.' - एहोरा २.१२१.

**कातऱ्या चोर** कातरीने खिसा कापणारा चोर; खिसेकातरू.

**कांतला-ळा** पु. पांढरा शुभ्र घोडा: 'गरुडाचिये जावळिचे। कांतले चाऱ्ही।' - ज्ञा १.१३८.

**कातली-ळी** स्त्री. ओल्या नारळाचे शहाळ्यातले खवलेले खोबरे : 'नवऱ्यानं दिली कातली.' - सह्याद्रीच्या पायथ्याशी ६. (गो. कुण. हेट.) [सं. कृत्]

**कात(थ)वड-डी, कात(थ)कार** पु. कातकरी. (को.)

**कातवण-र** न. उकिरड्यावरील गवत, काड्या वगैरे केरकचरा.

**कातवणे** उक्रि. संतापणे; रागावणे; खेकसणे. [सं. क+तप्]

**कातवळ** वि. खडकाळ (प्रदेश).

**कातवार लमाण** वाणीउदमी; व्यापारी वगैरे लष्कराबरोबरचे बाजारबुणगे : 'वाट अडचणीची. झाडी, डोंगर. समागमे कातवार - लमाण वगैरे भारी.' - ऐलेसं ३०८६.

**कात(थ)वाडी** स्त्री. कातकऱ्यांची वस्ती.

**कात(ता)ळ** पु. न. खडक; प्रस्तर; एकसारखा सलग, दगड, किंवा दगडाळ जमीन: 'सीळा कातळा परवडी।' - दावि २४५.

**कातळ** पु. पापुद्रा; पदर : 'त्याच्या मनाचे कातळ सहानुभूतिमुळे मला हळू हळू मोकळे करतां येऊ लागले.'- उअं.

**कातळकला** स्त्री. (पुरा.) खडकांवर काढलेली रंगचित्रे.

**कातळवट** वि. कातळ असलेली खडकाळ (जमीन, प्रांत).

**कातळा** पु. पातळ फाक, फोड (फळ, मूळ इत्यादींची).(को.)[सं. कृत्]

**कातळा उस** एक प्रकारचा ऊस.

**कातळी** स्त्री. आर्तता : 'चंपकसुमने पूजी कातळीने। धूप दीप मनें मानसिक।' - मुअ २६.

**कातारी** पु. कातकाम करणारा; कातणारा.

**कातावणे** अक्रि. चिरडीला जाऊन तोंड टाकणे; रागावणे; चिडणे : 'ह्यापूर्वी कधीच पैशानं कातावलो नव्हतो.' - कोसला २५१. [त. कत(द)वु]

**काताविणे** उक्रि. त्रासविणे; पीडणे; बेजार करणे; भागवणे. [सं.]

**काति(ती)या** पु. स्त्री. माडाची पोय कापण्याचे, ताडी काढण्याचे एक हत्यार; कोयता : 'आपुलिया पुढिलांचिया। आंगीं घालूनि कातियां।' - ज्ञा १७.१६.

**कातिल** पु. कत्तल करणारा. [फा.]

**काती** स्त्री. १. झुंजीसाठी कोंबड्याच्या पायाला लावलेले पाते. २. बांबू फोडण्याचे साधन. (झाडी)

**का(कां)ती** स्त्री. सुरीसारखे शस्त्र : 'कटिप्रदेशीं मांसभेदिकी काती खोविली होती।' - लीचउ ४५३.

**कातीखुमारी** स्त्री. ज्या माडापासून माडी काढतात त्या माडावरील सरकारी कर.

**कातीण** कोळ्याच्या वर्गातील एक किडा.

**कातीयाळ** पु. शस्त्रधारी : 'मकरतुंडे सोंडा वेटाळिती : कांतीयाळे घोडेयासि रुपति :' - रुस्व २०८२.

**कातीव** वि. १. चरकावर तयार केलेले; चरकी धरलेले; पैलू पाडलेले; कातून सुडौल केलेले. २. लहानसे पण सुबक बनवलेले; नक्षीदार; उठावदार.

**कातुकडी** स्त्री. काथ्याचा तुकडा, दोरी. (राजा.) पहा : **काथकडी**

**कातें** न. काथ्या; सुंभ.

**कातोडे** न. गाठोडे : 'नाई आयकतंत आपल्या करमाचं असं कोन्त कांतोडं नेईल ?' - धग १५.

**कातोर** पु. १. पहा : **कातकरी**. २. तीरकमठ्यासारखे कठीण लाकडाचे, कातड्याने मढवलेले, तीन फूट लांबीचे हत्यार. हे गरगर फिरवून मारले असताना सुमारे ५० यार्ड लांब जाते आणि चांगला मार बसला तर मोठी दुखापत होते.

**कात्या-थ्या** स्त्री. कृत्तिका नक्षत्र. (राजा.) [सं. कृत्तिका]

**कात्यायन** न. ठार मारणे; बडवणे; नुकसान करणे. (क्रि. करणे, काढणे.)

**कात्यायन वीणा** एक वीणा, वाद्य. पहा : **सारमंडळ**

**कात्रण** न. छापील मजकुराचा कापून काढलेला तुकडा : 'वर्तमानपत्रांतील कात्रण....' - लोआ २१.

**कात्रा** पु. लांबट व्रण. पहा : **कातरा**

**कात्री,** स्त्री. कातरी. [क. कत्तरि] (वा.) ० **धरणे** - अडचणीत आणणे. ० **सापडणे** - दोन्ही बाजूंनी अडचणीत येणे : 'आता रीण तरी कुणाचं काढावं आणि सण कसा साजरा करावा ह्या कात्रीत तिचा जीव सापडला होता.' - ऊन १४४.

**कात्रुड** न. भाजीपाला, मिरची इत्यादींना येणारी बारकी बारकी फळे; कात. (कु.)

**कात्रो** पु. सुपारीचा घड. (गो.)

**कात्र्या** पु. उसाच्या चरकामागे फिरणारा.

**काथ** पु. कात : 'अमुकाचि काथु : अमुकेचि उडीद।' - लीचपू ७६.

**काथकडी** स्त्री. काथ्याची काडी.

**काथडी** स्त्री. गोधडी; वाकळ. [सं. कंपा]

**काथवट** पहा : **काटवट** : 'एखादी काथवट कोरीत बसतो.' - जैत ६.

**काथवणे** अक्रि. आंबा बाठ धरण्याच्या दशेला येणे. (राजा.)

**काथंबा** पु. केळीचा मोठा कोंब (केळीला चिकटून उगवलेला किंवा निराळा लावलेला मोना); मोना; पासंबा.

**काथा-थ्या** पु. १. नारळाच्या सोडण्याच्या आतील तंतुमय आवरणाचा जाड थर. हा भिजवून कुटून त्याच्या दोऱ्या वळतात. त्याला सुंभ म्हणतात. २. याचा केलेला दोर, दोरी : 'तो काथ्याने बांधलेला भाला सोडू लागला.' - वळीव ६०. ३. सुरमाडातील तंतू. ४. आंब्याच्या कोयीला, बाठीला असलेले केशर [सं.] (वा.) ० **कुटणे** - (ल.) ज्यापासून काही फलनिष्पत्ती नाही असा पोकळ वादविवाद करणे.

**काथामेथा** पु. आजीबाईंच्या बटव्यातील औषधे, वनस्पती.

**काथी** स्त्री. कढी; कालवण: 'काथी ताथी साथी चरुसह।' - अमृतसुदा ३४. [सं. क्वथ्]

**काथोट** स्त्री. १. पहा : **कथिवट, काटवट.** २. गुरांना होणारा एक

प्रकारचा रोग. (को.)

**काथोट** वि. सोलता न येणारा; बराच काथ्या असलेले (फळ, सुपारी). (गो.)

**काथोडी** पु. कातकरी.

**काथ्याकुटणी, काथ्याकूट** स्त्री : रिकामी चर्चा; निरर्थक वाद. (क्रि. करणे) : 'असल्या शास्त्रार्थात पडून विनाकारण काथ्याकूट तरी करण्याची काय जरूर आहे.' - लोटिकेले ४.११८; 'कोणी पक्ष मोडणार किंवा सोडणार नाहीत, ही गोष्ट सिद्ध मानून ही काथ्याकूटणी बंद करावी.' - आव्हान ८५.

**काथ्याचा नमदा** दरवाजात पाय पुसण्यासाठी ठेवलेले काथ्याचे जाड तरट : 'रस्त्यास लागून काथ्याचे दोन नमदे टाकण्यात यावे.' - ऐराप्रद्रा (बडोदे) ३.१.८२.

**काथ्ल** स्त्री. कढई; काहील. (गो.) [सं. कटाड]

**काद** न. मुलूख : 'पेशवे यांची कुली फौज याची सरद सोडून आपल्या कादास जावे' - ऐकोपुर.

**कादउ** (पु.) चिखल; रगडा : 'तेथ दिसे कादउ कोंडला। मेदमांसाचा।' रुस्व २२७३.

**कादय** पु. तुरुंग. (गो.) [पो. काडेयो]

**कादराई** स्त्री. एक प्रकारचे कापड.

**कादव मासा** मरळ माशाप्रमाणे दिसणारा मासा. दोघांच्या तोंडाच्या आकारात मुख्य भेद असतो. कादव्याचे तोंड त्याच्या आकाराच्या मानाने मोठे व रुंदट असते, तर मरळाचे तोंड लांबट असते.

**कादवा** पु. एका जातीचा दगड: 'क्षीरसाळा: कादवा: मुरबाळा : हत्तैसा :' - लीचउ १८३.

**कादंबरी** स्त्री. १. कल्पित दीर्घ कथा; कल्पनेच्या साहाय्याने रचलेली कथा; सुंदर, मनोरंजक, अद्भुत, रसमय गोष्ट. २. बाणभट्टाने रचलेली एक गोष्ट (बाणभट्टाच्या 'कादंबरी' नावाच्या ग्रंथावरून). २. विशिष्ट कालावधीत घडलेल्या सामाजिक, ऐतिहासिक किंवा व्यक्तिनिष्ठ, वास्तव किंवा काल्पनिक प्रसंगाचे कथारूपाने निवेदन करणारा वाङ्मय प्रकार. (सं.) ० **करणे** - कल्पनेने खरा भासण्यासारखा प्रसंग किंवा हकीगत सजवणे : 'करारनाम्याचे पत्राचा हल्ली नवे कल्पित कादंबरी करून शाहू महाराजांचा काळ जाहल्यापूर्वी २ वर्षाचा कागद केला.' - ऐलेसं ५५५०.

**कादाचित्क** वि. १. कदाचित जे होणारे ते; असंभाव्य तरी शक्य. २. प्रसंगोपात्त येणारे; कारणप्रसंगाने, क्वचित उपस्थित होणारे.[सं. ]

**काद्रव** पु. कद्रुपुत्र; पाताळ लोकातील सर्प, नाग. [सं. काद्रवेय]

**काधया** क्रिवि. काय; कसे : 'तेथें काधया अपघातें।' - गीता २.१४२.

**कान** पु. १. श्रोत्र; कर्णेंद्रिय; श्रवणेंद्रिय; शरीराच्या ज्या अवयवामुळे आपल्याला ध्वनीचे ज्ञान होते, ऐकू येते तो अवयव : 'सर्वांगी निघाले कान।' - ज्ञा १४.६१. २. (ल.) कढई; मोदकपात्र किंवा यासारख्या भांड्याच्या कड्या; सामान्यत: कानाच्या आकाराची वस्तू. ३. दागिने घालण्यासाठी कानाला पाडलेले भोक. ४. बंदुकीचा काना किंवा रंजक; दारू पेटवण्याचे छिद्र; बत्ती लावायची जागा. [सं. कर्ण] (वा.) ० **उघडणे** - केलेल्या मूर्खपणाची कृत्ये (स्वत:ची व दुसऱ्याची) समजणे; डोळे उघडणे; एखादी गोष्ट स्पष्ट करून सांगणे; समजूत पटवणे. ० **उघडून सांगणे** - बजावून सांगणे; स्पष्ट सूचना देणे. ० **उपटणे, धरणे, पिरगाळणे** - शिक्षा करण्यासाठी कान धरून पिळवटणे; ओढणे; शिस्त लावणे : 'त्याला जिवंत पकडून त्याचे कान उपटल्याशिवाय आम्ही राहणार नाही.' - बाय २.२. ० **काढणे**- आगाऊपणा करणे. ० **कापणे,** ० **कापून हातावर देणे** - वरचढ करणे, कडी करणे; मात करणे; वर ताण करणे; फसवणे. ० **किटणे** - एखादी गोष्ट पुन्हा पुन्हा ऐकण्यामुळे वीट, कंटाळा येणे. ० **चावणे** - खोट्यानाट्या गोष्टी सांगून दुसऱ्याचे मन कलुषित करणे. ० **झाकणे, झाकून घेणे** - दुर्लक्ष करणे; मुळीच न ऐकणे. ० **झाडणे** - १. स्पष्ट नाकारणे; ऐकून न घेणे; कानावर येऊ न देणे; निषेध करणे : 'स्वर्गा जाणें हें सांडी। भवविषयीं कान झाडी।' - ज्ञा १३.६१८. ० **टवकारून ऐकणे** - लक्ष देणे; पूर्ण लक्ष देऊन, उत्सुकतेने ऐकणे : 'भाषण करणाऱ म्हटल्याबरोबर त्यांनी कान टवकारून पहावे.' - के २१.५.३०. ० **टोचणे** - १.कानाला भोक पाडणे.२. झाडणे; ताशेरा ओढणे; खरडपट्टी काढणे; योग्य व्यक्तीने कानउघाडणी करणे. ३.(ल.) फूस देणे; चिथावणे; चढवणे ० **धरली शेळी** - पूर्ण आधीन किंवा स्वाधीन : 'आम्ही कान धरली शेळी आहो, हुकमी आहो.'- ऐकोपुर. ० **देणे** - लक्ष देणे. ० **धरणे** - शासन, शिक्षा करणे. ० **धरून, पिळून घेणे** - वादाची वस्तू बळजबरीने ताब्यात घेणे. ० **निवणे, थंड होणे** - ज्या गोष्टीबद्दल फार उत्सुकता लागली आहे ती ऐकून बरे वाटणे, आनंद होणे. ० **पसरून ऐकणे** - पूर्ण लक्ष देऊन ऐकणे (पण कृती न करणे. ) ० **पाडणे** - १. धैर्य सुटणे; निराश होणे. २. आपल्या ताब्याला आळा बसलासे वाटणे; गरीब बनणे; माघार घेणे. ३. ऐकू येत नाही असे सोंग करणे; कानाडोळा करणे; दुर्लक्ष करणे : 'कान पाडुनि बसे धरणीसी।' - किंगवि २.२०. ० **पिळून घेणे** - स्वत:च्या मूर्खपणाचे दुष्परिणाम भोगल्यानंतर पुन्हा तसे न वागण्याबद्दल दृढ निश्चय करणे. **कानपूर ओस करून बसणे** - बहिऱ्याचे सोंग घेणे; ऐकू येत नाही असे भासवणे. ० **फुटणे** - १. (पूर्ण किंवा अर्धवट) बहिरा होणे. २. अतिशहाणपणा दाखवणे. ० **फुंकणे** - १. कानात मंत्र सांगणे; उपदेश देणे. २. (ल.) चुगली करणे; कानात भरवणे; चहाडी, लावालावी करणे. ० **भरणे, भारणे** - चहाड्या करणे; कानात सांगणे; चिथवणे. ३. (वर्तमान) ० **भ्रष्ट होणे** - बाहेर फुटणे; वाच्चता होणे. ० **लांबणे** - १. (लहान मुलासंदर्भात बोलताना) वयाने जसजसे मोठे होत जाईल तसतशी अक्कल कमी होत जाणे. २. गाढव होणे. (गाढवाचे कान लांब असतात त्यावरून.) **काना टाळी पडणे** - ऐकू न येणे; कानात दडे बसणे. **कानाआड-मागे-वरून जाणे** - उपदेश, शिक्षा, ताकीद वगैरेचा एखाद्यावर परिणाम न होणे. ० **चावणे** - खोट्यानाट्या

गोष्टी सांगून दुसऱ्याचे मन कलुषित करणे. **कानाचे कानवले होणे** – कान वाकडे (कानोल्याप्रमाणे) पिळवटलेले होणे. **कानाखाली वाजवणे; लगावणे** – कानफडात मारणे. **कानाचे किडे झाडणे** – १. परनिंदा श्रवणदोषापासून मुक्त करणे; किल्मिष घालवणे; मनातील गैरसमज, अढी दूर करणे. २. (कानात किड्यांचा प्रवेश झाला आहे अशा समजुतीने) बरोबर समजूत पाडणे; हितवाद सांगणे; चांगली खरडपट्टी काढणे. **कानात खुंट्या मारणे** – १. बहिरे होणे. २. पूर्वीचा शिक्षेचा प्रकार : 'कानीं खुंट्या आदळिती। अपानी मेखा मारिती।' - दास २.७.७३. **कानात जपणे** – १. कानात पुटपुटणे; गुप्त रीतीने बोलणे, सुचवणे; कानमंत्र देणे; चहाडी करणे. २. कानात जपून ठेवणे. **कानात तुळशी घालणे, घालून बसणे** – १. ऐकू येत नाही असे भासवणे; सोंग करणे. २. मायापाश झुगारून दिल्याचा आविर्भाव आणणे; उपरती झाल्याचे दाखवणे; विरक्तीचे सोंग आणणे. **कानात तेल घालून निजणे** – अतिशय दुर्लक्ष करणे; पूर्णपणे उदासीन असणे. **कानात भरणे** – चुगल्या करणे, एखाद्याचे वाईट करण्याविषयी भरी भरणे. **कानात भेंड घालणे** – बहिरेपणाचे सोंग घेणे; न ऐकणे. (व.) **कानात मंत्र सांगणे, कानमंत्र देणे** – चिथवणे; चेतवणे.**कानात रस ओतणे** – मंत्रोपदेश करणे. **कानात वारे भरणे** – उच्छृंखल होणे; एखाद्या गोष्टीचा पूर्ण विचार न करता हुरळून जाणे : 'ही गरीब गाय कानात वारे भरल्यामुळे उथळली आणि सैरावैर धावून अखेर चिखलात रुतली.' - सुदे ६१. **(या) कानाने ऐकणे त्या कानाने सोडणे** – मनात मुळीच न ठेवणे, राखणे. **काना(पाठी)मागे टाकणे** – दुर्लक्ष करणे : 'फुकटच्या उपदेशाप्रमाणे त्यांचा निरोप कानापाठीमागे टाकणार नसाल तर सांगतो.' - सुदे १०५. **कानाबाहेर-वेगळा करणे** – दुर्लक्ष करणे; उदासीन राहणे. **कानाला खडा लावणे, लावून घेणे** – मूर्खपणाचे किंवा दुष्टपणाचे काम पुन्हा न करण्याविषयी निश्चय करणे (कानाच्या पाळीच्या मागे खडा लावून दाबण्याचा पूर्वी शिक्षेचा एक प्रकार होता.). **कानावर पडणे** – सहजपणे ऐकणे; विनासायास ऐकायला मिळणे. **कानावर मान ठेवणे** – आळशीपणाने किंवा निष्काळजीपणाने बसणे. **कानावर येणे** – ऐकणे; श्रुत होणे : 'येणार पुढे पुष्कळ आले आतांचि काय काना तें।' - मोभीष्म ७.६. **कानावर हात ठेवणे, कानात बोटे घालणे, कान झाकणे** – १. एखादी गोष्ट मुळीच माहीत नाही अगर त्या गोष्टीत आपला बिलकुल संबंध नाही असे दाखवणे; नाकारणे; नाकबूल करणे. २. एखादी मनाविरुद्ध गोष्ट ऐकवत नाही म्हणून कानात बोटे घालणे : 'तो हा वधिला केले कर्म अमित साधु घातसे मोठें। खोटें हे म्हणतिल शिव शिव कर्णी घालतील बुध बोटे।' - मोस्त्री ४.२६. **कानावरून जाणे** – १. कान चाटून जाणे. २. (ल.) थोडासा तोटा होणे. ३. ऐकलेले असणे. **कानावेगळे टाकणे** – कानाआड करणे, कानाडोळा करणे; दुर्लक्ष करणे : 'पण येथे सांगावे तर कारभारी कानावेगळी टाकतात.' - पुणे अख भावं २.१६३. **कानाशी कान लावणे** – गुप्त रीतीने मिळून मसलत, खलबत करणे. **कानाशी, कानी लागणे** – कानात सांगणे; हळूच बोलणे; गुप्त रीतीने सुचवणे. **कानास कोन न कळू देणे, कानास न लागू देणे** – अतिशय गुप्तपणा राखणे : 'आणि झाल्यावर सुद्धा कानास कोन लागू नये ही तर खबरदारी घेतलीच पाहिजे.' - सुदे १०.८. **कानास खडा लावणे** – कान उघाडणी करणे; वावदंड करणे. **कानास बट्टे, दडे बसणे** – बहिरा होणे. **कानी कपाळी रडणे, ओरडणे** – सदोदित, नेहमी, बुद्धिवाद करत असणे; नेहमी, पुन्हा पुन्हा सांगणे. **कानी कोची बसणे, लागणे** – (चोरून ऐकण्यासाठी) कानाकोपऱ्यात, अडचणीत बसणे, कानोसा घेणे. **कानी मनी नसणे** – एखाद्याची कल्पना नसणे; कधीच न ऐकलेले, मनात नसलेले ऐकणे. **कानी सात बाळ्या असणे** – (लहान मुलांच्या भाषेत ऐकायचेच नाही असा निश्चय दाखवायचा असताना) या कानाचा त्या कानाला कळू न देणे; अतिशय गुप्तपणा ठेवणे.

**कान** स्त्री. खाण. [फा.]

**कानआढा** पु. (बैलगाडी) गाडी उतरणीवर असता किंवा बैल बेफाम असला तर तो ताब्यात राहावा म्हणून कासऱ्याने बैलाच्या कानाला टाकलेला वेढा.

**कानउघाडणी** स्त्री. नको ते केल्याबद्दल, वाईट वागल्याबद्दल खरडपट्टी काढणे, वस्तुस्थितीची जाणीव करून देणे : 'मला मनापासून वाटले की चानीची जाऊन चांगलीच कानउघाडणी करावी.' - गणूराया १४४.

**कानकडी** स्त्री. (लोखंडी काम) कानाच्या आकाराचा पत्रा कापून त्याला जे एक लांबट तोंड ठेवतात ते वळवून त्यात बसवलेली कडी. अशा दोन बाजूंना दोन कड्या असतात.

**कानकली** स्त्री. ज्वारीची एक जात.

**कानकवडा** वासरांच्या कानाला होणारा रोग; कानखवडा.

**कानक(के)स** पु. अव. (नुकत्याच विधवा झालेल्या स्त्रीचे) केशवपन करणे व अलंकार काढून घेणे. (क्रि. करणे.)

**कानकळाशी – सी** स्त्री. (घोडा, बैल इत्यादीच्या) कानाची व डोक्याची ठेवण; आकार: 'अस्सल जरदी घोडी भिवरडी वर बसली चांदणी। कानकळाशी फेरफटक्यामध्ये कोणी तरी दिली आंदणी।' - पला ४.२१.

**कानकात्रा** पु. एक लहान मासा. (गो.)

वि. कान कापलेला; कानफाट्या.

**कानकारी** स्त्री. (वस्त्रोद्योग) ताणा ताणून धरणारी एक धनुकली.

**कानकिरळी, कानकीड, कानकुरटी, कानकुरकुटी** स्त्री. कानाला होणारा एक रोग; कानाची कीड. (को.)

**कानकुडे** न. कानातील कुडे; एक अलंकार.

**कानकुलाय** स्त्री. कान झाकेपर्यंतचा डोक्यावर घालण्याचा निमुळता टोप. (गो.) [सं. कर्ण+कुलाय = घर, झाकण]

**कानकुशी-कूस** स्त्री. कानाचा पुरळ; खरूज.

**कानकुं(कों)डा** वि. १.(आश्रयदाता, उपकारकर्ता; ज्याला आपली

अंडीपिल्ली, दोष माहीत आहेत अशा माणसासमोर) लज्जित; मुग्ध; खजिल; कुंठित; ओशाळा; भयचकित झालेला; मिंधा: 'गुरुज्ञानाचें अंजन नसतां कानकोंडा प्रपंच फोल।' - अमृत १९. २. ऐकू येत नाही असे ढोंग करणारा. ३. दुःखीकष्टी : 'मज वाटे कानकोंडे' - नागा ४९५.

पु. दुर्लक्ष; ऐकू येत नसल्याचे सोंग : 'तुजविषयी कानकोंडा करूं काय मी आतां।' - दावि ८१.

**कानकूण** स्त्री. १. गुणगुण; बाजारगप्प. २. कुजबूज; कुरकुर. ३. तक्रार; कां कूं; अनिश्चित वर्तन.

**कानकूस** स्त्री. अनिश्चितता; कां कूं; चालढकल.

**कानकोचे भाषण** खोचदार, बोचणारे, मर्मभेदी, अपमानकारक भाषण.

**कानकोपरा** पु. वेडावाकडा भाग; कान किंवा कोपरा; पुढे आलेला भाग (शेत, घनपदार्थ इत्यादीचा); चतुरस्र, वर्तुळ असा विविक्षित आकार नसलेला.

**कानको(खो)रणी-णे** स्त्री. न. कानातील मळ काढण्याची, पुढे वाटी असलेली धातूची लहानशी काडी; कानातला मळ काढण्याचे साधन.

**कानकोंडा** पु. कानातील मळ.

**कानकोंडा** वि. दुर्लक्ष करण्याजोगा.

**कानकोंडी, कान(ना)गाडा** स्त्री. बहिरेपणाचे सोंग घेणे; दुर्लक्ष करणे; कां कूं करणे; अळंटळं करणे; ऐकण्या न ऐकण्याबद्दल अनिश्चितता. (क्रि. करणे.) [क. कानुकडि]

**कानकोंडे** वि. लाजिरवाणे : 'ऐसी परस्त्रीची संगत। घडतां जनांत कानकोडें।' - महिकथा २८.१००.

न. १. दुर्लक्ष : 'केली नाहीं चिंता नामीं कानकोंडे। अंती कोण्या तोंडे जात असे।' - रामदास (नवनीत पृ. १५२). (क्रि. होणे) २. भिडस्तपणा : 'कानकोंडे साहो नये।' - दास १४.१.६.

**कानखडी** स्त्री. सूचना; ताकीद.

**कानखवडा** पु. वासरांच्या कानाला होणारा एक रोग. तो नाहीसा होण्यासाठी वासराच्या कानात एक कथळाची बाळी घालतात.

**कानखीळ** स्त्री. १. (बैलगाडी) चाक पडू नये किंवा जागेवरून मागेपुढे सरकू नये म्हणून आसाला घातलेली कडी, कुणी. २. (औत) जेथे दोन शिवळा जोखडाला असतात त्यातील बाहेरील शिवळ.

**कानगच्ची** स्त्री. १. पट्टा अगर वस्त्र यांनी कान झाकणे, बांधणे. (क्रि. करणे, बांधणे.) २. खोट्या, अनिष्ट गोष्टी ऐकू नये म्हणून कानावर हात ठेवणे; आपल्या कानी सातबाळ्या करणे. (क्रि. करणे.) (वा.) **० करणे** - कान फुंकणे, भरणे.

**कानगी** स्त्री. १. तक्रार : 'ते मामलेदारांच्या जुलमाबद्दल, गैरवर्तनाबद्दल दरबारात कानगी करीत.' - कागा ६०. २. (गुप्तपणे) कानात सांगणे; कानगोष्ट; कानमंत्र. (क्रि. करणे, देणे.) ३. ऐकणे; कानोसा. (क्रि. घेणे, घेत बसणे.)

**कानगी** स्त्री. १. खंडणी; वर्गणी : 'घरोघरीं ऐपतीत मिये पैशाची कानगी।' - बगा ८७.२. गिरीच्या व्यंकोबाला देतात ती वार्षिक दक्षिणा; देवापुढील देणगी; नैवेद्य; वर्गणी. पहा : **काणुक** : 'लोक उदंड कानग्या वाहती ।' - दावि ४५. [क. कणिके]

**कानगी** स्त्री. एक मोठे झाड. याच्या बियांचे तेल काढतात. या झाडाचे लाकूड इमारतीला उपयोगी पडते. (को.) [क. कानगु]

**कानगी** स्त्री. १. लबाडी; कपट. २. चूक; दोष : 'राजश्री गंगाधरपंताची काडीमात्र कानगी नाहीं.' - पेद २१.

**कानगो** पु. कुलकर्ण्यासारखा एक ग्रामाधिकारी; जमिनीची, वहिवाटीची, वसुलाची नोंद ठेवून माहिती पुरवणारा; मोजणी करण्यात व धारा ठरवण्यात मदत करणारा; वतनदार मुलकी अधिकारी. कुळांचे मृत्यू, वारसा, स्थानिक वहिवाटी, सार्वजनिक कायदे इ. सर्व गोष्टींची माहिती हा देत असे. याला सारा माफ होता. शिवाय जमिनी व काही बलुती असत. [फा. कानून]

**कानगोई** स्त्री. कानुगोचे काम अगर वतन : 'सर्कार मज्कूर येथील कानगोईचें वतन.' - मइसा १२.१७४.

**कानगोष्ट** स्त्री. १. कानात सांगितलेली गोष्ट; रहस्य. २. हितकारक गोष्ट.

**कानघसणी** स्त्री. १. पहा : **कानगोष्ट**. २. कुजबूज; आळ : 'जाणोनि कानघसणी हरि चालियेला।' - अकक कृष्ण कौतुक ५४.

**कानघुशी, कानघुसणी** स्त्री. (गोट्यांचा खेळ) हाताच्या बोटांनी आपला कान धरून त्याच हाताच्या कोपराने गोटी उडवण्याचा प्रकार.

**कानघोण** स्त्री. गोम नावाचा सरपटणारा किडा; घोण; कर्णजूलिका; कर्णकाटी.

**कानचिट** पु. खेळातील समाईक गडी; राहाट्या.

**कानचिपी** स्त्री. १. कानाचा वरचा भाग पिरगळणे; कानपिचकी (शाळेतील शिक्षेचा अथवा मुलांच्या खेळातील शिक्षेचा एक प्रकार). (क्रि. घेणे.) २. खेळात लबाडी केल्याबद्दल शिक्षा म्हणून स्वतःचा कान पिरगळून घेणे. (क्रि. घालणे.)

**कानचिंबली** (को.) पहा : **कानचिपी**

**कानची** स्त्री. लांब कानाचे वटवाघूळ.

**कानचोर** वि. ऐकून न ऐकलेसे करणारा. (गो.)

**कानझाडणी** स्त्री. कानउघाडणी : 'आपण याची चांगली कानझाडणी करा.' - भदि ५२५.

**कानटाली-ळे-ळ्या, कानठाळ-ळ्या** पहा : **कानठळी**

**कानटिनी** स्त्री. कानपिचकी; थप्पड : 'कृतघ्नपणामुळे कानास कानटिन्या खाव्या लागतात.' - विविध ४.७.१९३७.

**कानटे** न. १. फुरशाच्या जातीचे एक विषारी जनावर; लहान साप : 'विंचू सर्प दंश करिती । कानटें फुर्सी ।'- दास १.१०.५५. (को.) २. जळूच्या जातीचा व जळूप्रमाणेच रक्त शोषून घेणारा प्राणी. हा प्राणी पावसाळ्यात उत्पन्न होतो व पावसाळ्यानंतर मरतो. (गो.) ३. कानटा. (गो.)

**कानठळी** स्त्री. १. (बसणे क्रियापदास जोडून) बधिर होणे; दडे बसणे; कानाचे पडदे बंद होणे; ऐकू न येणे (थंडी, वारा, मोठा आवाज इत्यादीमुळे). २. (उघडणे क्रियापदाला जोडून) बहिरेपणा जाणे; ऐकू

येऊ लागणे. ३. समजण्याला, शिकवण्याला योग्य होणे; डोळे उघडणे; ताळ्यावर येणे. ४. ताळ्यावर आणणे.

**कानडा** पु. संगीतातील एक राग. [ हिं. कान्हडा]

**कानडा-डी** वि. १. कर्नाटकासंबंधी (भाषा, माणूस इ.) : 'या वेगळे नंदुकी, तुरसंदाज, कानडे... यांची संचणी करून हशम मेळविले.' - मराआ ६. २. (ल.) वेडावाकडा; दुर्बोध; तिरपा; एका बाजूस कललेला; कानोडा : 'हें परिसतां जरी कानडें। तरी जाणपा पार्थ उघडें।' - ज्ञा ६.१२०. ३. लबाड : 'तुकयाबंधु स्वामि कानड्या कौसाल्या रे।' - तुगा १४०. [ सं. कर्णाट]

**कानडा** पु. बहिरा. पहा : **कानवडा** : 'कानडा सखा ना येडा नेत रोकडा किं पैलेतिरा' - देप १८.

**कानडी** वि. १. कर्नाटकातील (भाषा, माणूस इ.). २. विचित्र; अगम्य.

**कानडे** पु. अव. (वस्त्रोद्योग) सुताच्या चरख्याच्या चातीजवळचे दोन खुंटे.

**कानदार कुऱ्हाड** (पुरा.) आदिमानवाने दगडाची केलेली कुऱ्हाड. अशा कुऱ्हाडी नदीकाठी किंवा नदीकाठच्या स्तरात सापडतात.

**कानदिशी** क्रिवि. जोर करून (उचलणे).

**कानन** न. अरण्य; रान : 'भरत जननि धाडी कानना राघवासी।' - वामन (भरतभाव) २. [ सं.]

**कानपकड** स्त्री. (मल्लखांब) दोन्ही हातांनी दोन्ही कान धरून व बगलेत मल्लखांब धरून मारायची उडी.

**कानपट** स्त्री. कानशील; कानाजवळील गाल व कपाळ यामधील भाग.

**कानपटणे** अक्रि. थोबाडीत मारणे.

**कानपट्टी** स्त्री. १. कान झाकतील अशा तऱ्हेने डोक्याला गुंडाळणे. २. कानपट; कानशील :'भाल्याची जखम कानपट्टीस लागली.' - भाब ५७.

**कानपणे** अक्रि. १. बंद पडणे; मावळणे; कमी होणे (देवी, गोवर इत्यादींच्या पुळ्या, ताप, ज्वर इ.). २. (ल.) घोटाळणे; लज्जित होणे; लाजणे. ३. हिरमुसणे. ४. गडबडणे; चपापणे :'पाव्हणा घोडा कानपला.' - बनगर १०१.

**कानपा** पु. १. काथोट, काठवट किंवा कढई यांचे धरायचे कान, कड्या. २. तोफेचा गाडीवर टेकणारा भाग; तोफेचा काना.

**कानपाठी** वि. केवळ ऐकून पाठ करणारा. [सं. कर्ण + पठण]

**कानपिचकी** स्त्री. ताकीद; सौम्य शिक्षा; कानाला चिमटा येणे. (क्रि. बसणे.)

**कानपिसा** वि. कानाचा हलका; भोळसर; खोट्या गोष्टीवर विश्वास ठेवणारा. (को.)

**कानपिळा-ळी-ळ्या** पु. (लग्नात) नवऱ्यामुलीचा भाऊ नवरीच्या हातात लाजाहोमाच्या वेळेला लाह्या घालतो व नवऱ्या मुलाचा कान पिळतो, त्याबद्दल त्याला नवऱ्यामुलाकडून कानपिळ्याचे अगर कानपिळणीचे बक्षीस मिळण्याचा मान.

**कानफट-ड** स्त्री. न. कानशील; गालफड; कानाच्या पुढील गालाचा भाग (विशेषत: थोबाडीत मारताना ह्या शब्दाचा उपयोग करतात.) [ सं. कर्ण + फलक ]

**कानफटा, कानफाटा-टी-ट्या** पु. नाथपंथ व त्या पंथातील गोसावी. ह्यांची परंपरा आदिनाथापासून आहे. : 'व्याघ्रांबर गजचर्मांवर परिधान शुद्ध कानपटा।' - प्रला ५. (वा.) ० **नाव पडणे** - अक्रि. दुर्लौकिक होणे; नाव बद्दू होणे. कानफाट्यांच्या वर्तनाबद्दल लोक साशंक असतात, त्यावरून लोकात एकदा शंका उत्पन्न झाली की ती जात नाही. एकदा कानफाट्या नाव पडले म्हणजे जन्मभर ते तसेच राहते, त्यावरून एकदा दुष्कृत्य केले म्हणजे त्याचा कलंक जन्मभर राहतो.

**कानफ(फा)ड** न. कानशील; गालफड. (वा.) ० **देणे, मारणे, सुजवणे** - थोबाडीत मारणे.

**कानफुटी** स्त्री. १. एक औषधी वेल. २. कडधान्यातील एका गवताचे बी. (हेट.)

**कानफुल** न. कानातील एक दागिना. [ सं. कर्णोत्पल ]

**कानफुशी** स्त्री. कानगोष्ट; कानात पुटपुटणे; कुजबूज.

**कानफोडी** स्त्री. तिळवणी; बर्बरा; कजरी; तुंगी; खरपुष्पा; एक वनस्पती; अजगंधा वनस्पती. [ सं. कर्ण + स्फोट]

**कानबाई खालचे लग्न** अहिर लोकात कृष्ण व रुक्मिणी यांच्या मूर्ती बसवून एकदम पाचपाचशे लग्ने होतात, अशा प्रकारचे लग्न.(व.)

**कानभेरा - भायरा** वि. बहिरट; बहिरा.

**कानमंत्र-त्री** पु. स्त्री. कानात सांगितलेली गोष्ट; गुप्त मसलत.

**कानमातणे-ने** कानगोष्ट : 'तुम्हां कानमातणे सांघैल :' - लीचउ २६६.

**कानवटी** स्त्री. पुरी - मांडा इ. पदार्थाचा काठ: 'कानवटी दोनि पुरीया ओळगविलीया।' - लीचपू ५९२.

**कानवडणे** अक्रि. एका कुशीवर निजणे; एका अंगावर असणे : 'कानवडोनि अमृत येऊनि पडे सुखा मार्जी कुंडलिनीच्या।' - स्वानु ९.५.५३.

**कानवडते** क्रिवि. एका कुशीवर; एका कानावर; बाजूवर आडवे. पहा : **कानवडा** [ सं. कर्ण = कान]

**कानवडा** वि. १. एका कुशीवर, बाजूवर निजलेला; आडवा झालेला. (क्रि. निजणे, पडणे, होणे.) : 'ना येणेसी मुख वांकडे। करूनि ठाकाल कानवडे।' - ज्ञा १८.१६८४; वाकडा; तिरपा. २. पराङ्मुख : 'दुर दुर जासी निघून बघुन लगबगुन होसि का कानवडा।' - प्रला १६२. ३. पहा : **कानडा**; अपरिचित : 'वन्हि होउनि ठेला कानवडा। दीपासाठी।।'- ज्ञा १८.५४०.

पु. दाराचे झाकण; वस्त्राचा आडपडदा; आडोशासाठी बांधलेला पडदा.

**कानवला** पु. १. गुळ-साखरेचे पुरण घातलेली मोठी करंजी : 'चिंतामणि गल बालक जो दुर्लभ त्यांसि काय कानवला।' - मोविराट ५७३. २. सपीटाची घडीची पोळी; चिरोटा: ही खिरीशी खातात : 'बहु साधु साधु वदले ते काळाच्या पुढील कानवले।' - मोशल्य १.५९. (व.) ३. (विनोदाने) कानपिरगळा. (क्रि. देणे, घेणे, खाणे, मिळणे.) (वा.) **(हातापायांचा) कानवला होणे** - हातपाय कानवल्याप्रमाणे आखडून जाणे.

**कानवला** पु. एका झाडाचे नाव.

**कानवळ** पु. कानामागे होणारा एक रोग.

**कानवळा** वि. पहा : **कानवडा** (क्रि. असणे, निजणे, पडणे.) पु. (पशूच्या) डाव्या कानाखाली दिलेल्या डागाची रेघ.

**कानवळे** पु. अव. गालावर आलेले कानाच्या बाह्य अंगावरील केस.

**कानवा, कान्हवळा** पु. कानोसा. (क्रि. घेणे, लावणे.)

**कानवा** पु. कानातील मळ.

**कानवाथर** पु. शिरसाळा दगडा भोवतालचा त्याला चिपकून असणारा दगडाचा थर : 'माहात्मा म्हातारीएसि कानवाथरु होउनि लागला असे गा :' - लीचउ १६१. [ सं. कृष्णप्रस्तर ]

**कानवाथरा** वि. ओबडधोबड : 'कर्म कानवाथरा उपळा : तिही टाकी कीजे निर्वाळां :' - ज्ञाप्र ४२५.

**कानविळे** न. कानातील मळ. (कु.)

**कानवेंणी, कानशीलवेणी** स्त्री. लहान मुलांच्या कानावरील केसांची घातलेली वेणी.

**कानशिळी** पहा : **कानठळी** : 'बाराने कानशिळी बसली-' - वामा ७२.

**कानशी (स-सू)ल, कानाड** न. १. कानाच्या जवळचा, गाल व कपाळ यामधील भाग : 'कानसुला भाली। आंगे कूट जाली।'- शिव ९७०. २. गालफड; चेहऱ्याची एक बाजू; कानफट. [सं. कर्णशिरस् ]

**कानस** स्त्री. १. घासणी; लोखंड घासून साफ करण्याचे, कीस काढण्याचे, धार लावण्याचे एक पोलादी हत्यार. २. करवत. [सं.] (वा.) ० **घालणे** - इशारा देणे; जोराने सांगणे, बजावणे; बजावून सांगणे.

**कानसणे-णी** उक्रि. स्त्री. १. कानसण्याची क्रिया करणे; कानशीने घासणे. २. करवतणे; अरकसणे; करवतीने कापणे, चिरणे.

**कानसर** पु. बैलाच्या कान व शिंगांभोवती बांधायची रंगीत सुती दोरी.

**कानसाक्षी** पु. ऐकीव माहिती सांगणारा साक्षीदार.

**कानळ** पु. पर्वताचा लांब गेलेला फाटा, ओळ, भाग.

**काना** पु. झोळीचा बंद किंवा पदर: '(झोळीचा) एकु कांना गुडघा घालिती: एकु डावेनि हांते धरीति:' - लीचउ ४३७.

**काना** पु. १. तोफेच्या दोन्ही अंगाला मुठीने धरण्याजोगे व गाड्यात अडकवण्याजोगे असणारे दोन आडवे खुंट. २. बंदुकीच्री, तोफेची दारू किंवा रंजक शिलगवण्याचे भोक : 'ठोकिले खिळे कानांत।' - संग्राम गीते ७३. ३. अक्षरांची पुढील 'आ' काराना उभी रेघ ( ा ). ४. मोरीचे पाणी वगैरे वाहण्यासाठी पन्हाळीसारखा कोरलेला चिरा किंवा चुन्याची केलेली पन्हाळी. ५. नांगराच्या फाळाने पडलेली रेष, तास. (माण.) [ सं. कर्ण ]

**काना** वि. चकणा; तिरळा, तिरळ्या डोळ्यांचा. [ सं. प्रा. काण]

**काना** पु. कोना; कोपरा: 'मग एरी कानिआं परतली। वैदर्भीते।' - शिव १७५.

**कानाईचा** पु. समुद्रातील काळ्या पांढऱ्या रंगाचा मासा.

**कानाउ, कानाउळ** न. १. टोपराचा कानावरील कसा किंवा बंद: 'स्त्रीमुगुटीं टोपरें: मोकळी कानाउळें :' - लीचउ. ६३२. २. कानाची पाळी.

**कानाकोचा** वि. कानाला कटू, कर्कश, वाईट लागणारे; कर्णकटू (भाषण इ.) : 'आणि कां कार्नेकोचें बोले।' - तुगा २७३५.

**कानाकोचा, कानाकोपरा** पु. १. उंचवटे व भेगा; जागा, वस्तू इ. चा खडबडीत पृष्ठभाग. २. (ल.) एकूण एक भाग. ३. पुढे मागे झालेला भाग; उंचसखल भाग; गट्टू व खड्डा.

**कानाकोपऱ्याचे भाषण** लपूनछपून केलेले बोलणे; कुजबूज; गुप्तपणाचे बोलणे; खाजगी, घरगुती बोलणे.

**कानागाडा** पु. बहिरा असल्याचे सोंग; टंगळमंगळ; दुर्लक्ष; ऐकले न ऐकलेसे करणे : 'तेव्हां राजानें आज्ञा केली की आपली फौज जमा करा. ऐकून कानागाडा केला.' - होकै १५.

**कानाचा आदळ** ज्याच्या पोटात कोणतीही गोष्ट राहत नाही असा; बहकणारा; बडबड करणारा.

**कानाचा कोन** कानाच्या कोपऱ्यात; अगदी जवळ; कोठेही; किंचित (ऐकू न येणे, वाच्यता न करणे).

**कानाचा जड** १. अर्धवट बहिरा; बहिरट. २. (ल.) ज्याला सांगून लवकर समजत नाही असा.

**कानाचा टप्पा** पु. हाकेचे अंतर.

**कानाचा तिखट** वि. तीक्ष्ण श्रवणेंद्रियाचा. अगदी बारीक आवाजसुद्धा ऐकू येईल अशी श्रवणशक्ती असलेला.

**कानाचा पडदा** ध्वनीचा आघात होऊन नाद उत्पन्न होणारे कानातील तंबूर; ध्वनिलहरी ज्यावर आदळल्यामुळे कंप उत्पन्न होऊन ध्वनी ऐकू येतो तो कानातील पातळ पापुद्रा.

**कानाचा हलका** खरी खोटी गोष्ट सांगितली असताना सहज विश्वास ठेवणारा; चहाडखोराचे खरे मानणारा.

**कानाडा** वि. कमी मुदतीचा; लहान; तोकडा.

**कानाडी** क्रिवि. कानापर्यंत; आकर्ण (बाण सोडायच्या वेळी धनुष्याची दोरी कानाच्या टोकापर्यंत ओढतात यावरून) : 'द्रींढ कानाडी भरुंनी नीजभुर्जी।' - उषा १४०४.

**कानाडी** वि. मुक्त; मोकाट: 'तेथ स्त्रीयांचे दर्शन स्पर्शन भाषण करी तेयाची कानाडी मुकाटा जाणाविया.' - आत्मभाष्य.

**कानाडी** स्त्री. १. बाण; बाणांचा भाता: 'तो कोरसीया कानाडी: परिछेदांचे सीर पाडी :'- मुप्र २१५३. २. धनुष्य; कमठा; मेढा.

**कानाडोळा** पु. १. (प्र.) काणाडोळा; एखाद्या अपराधाकडे दुर्लक्ष; मनात न आणणे. २. डोळ्यांनी केलेली खूण; गुप्त खूण. (क्रि. करणे.) ३. उदासीनपणा; दुर्लक्ष; आळस; ढिलाई. [सं. काण + डोळा]

**कानाढेरी** स्त्री. उपेक्षा, टाळाटाळ. (झाडी)

**कानामात्रा** स्त्री. (शुद्धलेखनात) अक्षरावर द्यायची काना, मात्रा, बिंदू इ. चिन्हे.

**कानारी** वि. कोकणी. (गो.)

**कानाली** हत्तीच्या कानावर शोभेसाठी किंवा संरक्षणासाठी घालावयाची धातूची किंवा कापडाची भूषणे.

**कानावर्त** पु. घोड्याच्या कानावरील केसांचा भोवरा. हा अशुभ मानतात.

**कानिट** लहान आकाराची विषारी सापाची जात.

**कानिर्देपण** न. हट्ट; विक्षिप्तपणा; हेका; चिडखोरपणा: 'क्षीणतेचे योगेंकडून कानिर्देपण फार आहे.' - ऐसंसाखं ३. २१२.

**कानिवला** पु. कानातील मळ. (गो.)

**कानी** स्त्री. १. जोंधळ्यावरील एक रोग. पहा : **काणी** २. लोंबी; कणीस.

**कानी** स्त्री. १. गुराच्या दाव्याचा फास; दावे; काढणी; पेंढे (गुरांच्या गळ्यांत अडकवण्याचे अगर त्यालाच जोडलेले दुसरे); दाव्यातील दोन्हींपैकी एका बाजूची दोरी: 'ऐसें सत्य सुखखानीं। जीवासि लावूनि कानी।' - ज्ञा १४. १५८. (को.) २. शिंके व त्याच्या दोऱ्या. ३. लहान दोरी. (कर.) पहा : **काणी** [क. कण्णि - दावे, दोर]

**कानी** वि. तिरपे; वाकडे : 'पढलिये धोंडी। नेणें कानी मुरडी।' - ज्ञा १४.१८६.

**कानीझ** स्त्री. मोलकरीण; दासी. [फा. कनीज़]

**कानीन** वि. १. कुमारिकेला लग्नापूर्वी झालेला पुत्र : 'कुमारीदशे तिच्या उदरी व्यास कानीन जन्मला।' - मुआदि २१.५०. २. मुलीचा मुलगा; दौहित्र. [सं.]

**कानुगो** पहा : **कानगो**

**कानुड** पहा : **कानडी** : 'भाषा कानुड बोबडी वाणी।' - दावि २८९.

**कानुडा** वि. लबाड; लुच्चा; कपटी. पहा : **कानडा**

पु. श्रीकृष्ण : 'कानुड्याने माझे मन मोहिलें।' - अमृत १४. [ सं. कृष्ण, कन्ह - कानु + डा]

**कानू** स्त्री. १. (कायदा) अट; नियम; ठराव. : 'त्यांनी अशी कानू कधी आपणावर चढवून घेतली नाही ते आतां कसे कबूल करितील.' - ऐलेसं २.६१३. २. हक्क; रीत; वहिवाट. ३. बाजारात विक्रीला आलेल्या जिनसांवरील द्यायचा कर, पट्टी : 'हल्ली सालोसाल नजरेची कानू गावगन्नास बसविली ते दूर करावी.' - ऐटि २.४१. ४. नियम; कायदा : 'पूर्वापार यास माफ असतां हाली कानू करावयास कायी गरज.' - मइसा २०.३६०. [फा. कानून]

**कानू** पु. कायदा : 'महमद अलीखान चित्तात कानू पाहून काम करणार.' - इएमपी १११.

**कानूकनात** स्त्री. चाल; रीत; कायदा; हक्क. [अर.]

**कानूकवाइत** स्त्री. कायदेकानू : 'जलतरू पाषाण निधिनिक्षेप कानूकवाईत देखील हक्कदार खोती पुत्रपौत्री वंशपरंपरेने अक्षय देणे दिले.' - दसशिमोइ १३.

**कानूकाननात** स्त्री. अव. कर, पट्टी वगैरे : 'वेठी, जैठा व बाजे कानूकाननातीचा उपसर्ग न देणें.' - मइसा २०.३६०.

**कानूकायदा** पु. (शाव्य.) कायदेकानू, नियम, ठराव वगैरेंना समुच्चयाने योजतात.

**कानूजापता** पु. सरकारी कायदेकानूंचे पुस्तक.

**कानून** न. एक वाद्य. (गो. कान्ना)

**कानूनात** पहा : **कानूकनात**

**कानूबाब** स्त्री. एक कर. पूर्वी मराठी मुलुखात जमीनदार हा कर बसवत.

**कानेकोचे** पु. अव. १. कोन व कोपरे, खाचा - खोचा. २. (ल.)गूढार्थ; आतील खुबी; रहस्य; मर्म. (क्रि. जाणणे, समजणे, पाहणे.)

**कानेटी** स्त्री. कानात जाणारा घोणीच्या वर्गातील एक लहान प्राणी. (कु.)

**कानेदर** पहा : **कांडेचोर**

**काने(न्हे)र** पु. गडबड; त्रास; कटकट (वाद्यांचा आवाज इत्यादींची): 'इंजिनाचा फारसा कानेर होत नाही.' - मोटरटिप्पणी (जगती १.२४.१८) [सं. क्वणितु]

**कानो** पु. वासरासारखे तोंड असलेला मासा. (झाडी)

**कानोकान-नी** क्रिवि. कर्णोपकर्णी; एकाने ऐकून दुसऱ्याला सांगितलेले, ऐकीव : 'फार चांगली तू जर माहीत कळलीस कानोकानाला।' - अफला ७६.

**कानोड-डा** वि. वाकडे; एका कानावर; बाजूवर कललेले; कलते : 'मातीचा कुंभ कानोडा ठेऊन...' - ऐरापु (विवाहविधी) ८१. (व.)

**कानोडणे** पहा : **कानवडणे**

**कानोडी** वि. शरमिंधी : 'वाहीसन झाली कशी तुझी कानोड कानोडी!' - बगा १८४

**कानोबा** पु. १. जन्माष्टमी २. कृष्ण. (झाडी)

**कानोर** (अश्व.) पायाच्या आतील बाजूस आलेले चेसनट फळासारखे हाड.

**कानोसा** पु. आंबोळी. एक खाद्यपदार्थ.

**कानोसा** पु. दूरचा शब्द कान देऊन एकाग्रतेने ऐकण्याची कृती. (क्रि. घेणे, लागणे)

**कान्नी-न्न्या** स्त्री. कांजिण्या; देवींसारखा पण एक सौम्य रोग.

**कान्नूबान्नू** पहा : **काण्णूबाण्णू**

**कान्मात्रे** क्रिवि. ऐकले न ऐकल्यासारखे (गो.)

**कान्वेत** पु. चाकू; सुरी. (गो.)

**कान्सरी** स्त्री. अव. (वस्त्रोद्योग) कापड विणताना ते ताणलेल्या स्थितीत राहावे म्हणून दोन्ही बाजूंना लावलेल्या टाचण्या, टोचलेल्या पट्ट्या. पहा : **काटसरी**

**कान्सुरे** शक्तिहीनाचे भाषण. (गो.)

**कान्हम** स्त्री. एक प्रकारची शेतजमीन.

**कान्हा** पु. पोईचा (नारळीच्या झापाचा, चोडाचा शेवटचा भाग) एक तुकडा. (को.)

**कान्हा-न्हू-न्हो** पु. १. बालपणाचा कृष्ण २. (ल.) तानुले; लहान मूल. [ सं. कृष्ण - कण्ह-कान्हा]

**[कान्हा-न्ही-न्हू, कान्हाडोळा-मात्रा हे शब्द काना, कानू इत्यादी शब्दाखाली पहावेत.]**

**कान्हाई-डे** (लडिवाळपणे) पहा : **कान्हा** २ : 'माझे सावळे कान्हाई।' - हरि १८.८९.

**कान्हाडी** पहा : **कानाडी** : 'कान्हाडी वेढिली आकर्णी।' - वेसीस्व १४.१३५.

**कान्ही** स्त्री. गुरे बांधायची दोरी; लहान दावे. (व.) : 'जीवांसि लाउनि कान्ही।' - राजा १४.१५७. पहा : **कानी**[ क. कण्णि = दावे, दोर]

**कान्ही** स्त्री. १. ज्वारी, गहू यांवर पडणारा एक रोग, यात धान्याचे कणीस किंवा लोंबी काळी पडते, बिनदाण्याचे काळे कणीस : 'कान्हीं पडे पिकासी। घाली शेतासी निंदणे।' - एभा १०.५१४. २. (ढोरधंदा) चामड्याचे केस निघाल्यावर केस आणि वरील त्वचा यांच्या दरम्यान असलेला एक काळा पदार्थ. (क्रि. काढणे.) [सं. कृष्ण = काळा]

**कान्हू** स्त्री. कायदा. पहा : **कानू** : 'बैसविली याणें कान्हू' - देप ८२.

**कान्हेर** पु. कान किटवणारा गोंधळ, कलकलाट, आवाज.

**कान्होला** पु. पोटात पुरण घातलेली मोठी करंजी; कानवला. (व.)

**कान्होला** पु. तान्ह्या मुलाच्या कानातून निघणारा पांढरा मळ, कानवा; कानविळ.

**काप** पु. अव. स्त्रियांच्या कानातील कुड्यांसारखा दागिना. [क. कोप्पु]

**काप** पु. १. कापून निघालेला तुकडा; फाक; फोड; तुकडा (फळाचा). (क्रि. करणे, पाडणे, पडणे.) : 'त्या शांततेचे काप काढल्यासारखा एक विचित्र आवाज ऐकू येई.' - डोह ९५. २. मिठाईच्या वड्या; मिठाई. (कु.) [प्रा. कप्प - काटणे]

**काप** स्त्री. कातळ; कातळासारखी टणक जमीन.

**काप** पु. छावणी; तळ; गोट : 'कापाच्या मैदानात आल्यावर, ...सभा भरली.' - के १०.६.३०. [इं. कँप]

**काप** पु. १. कापणे; थरकाप; लटपट; थरथर : 'विषयीं कैसा, देहीं शिरतां अशयोभयोत्थ कांप रतू।' - मोभीष्म ७.१७. २. भीती; भय : 'मनांत कांप तिच्या।' - मोवन ४.१४५.

**कापकडी सुपारी** कोवळ्या सुपारीचे शिजवून वाळवलेले काप. (राजा.)

**कापखर्डी** स्त्री. पडीक जमीन.

**कापखंड** न. धनुष्य : 'ते चालते धनुकडे। आड वागोनि कापखंडे।' - नरुस्व ७४६.

**कापखंडी** पु. अर्धचंद्राकृती परशू : 'रिपुघसे कापखंडी कुठारा।' - गस्तो ५०.

**कापट-टे** पु. खण (चोळीचा); कापडाचा तुकडा, कपटा. (व. ना.) [सं. कर्पट]

**कापट(ड)णे** उक्रि. भादरणे (मेंढ्या, म्हशी). (को. राजा.)

**कापटा** पु. तुकडा; फाळका (केळीचे पान, कागद, दगड, लाकूड इत्यादीचा.) पहा : **कपटा.** (वा.) **कापटे काढणे** - खून करणे; खूप मारणे, बडवणे. (व.)

**कापटी** स्त्री. १. पातळ, चपटी फोड; फाक; चकती; काचरी (आंबा, टरबूज इत्यादीची) (को.) : 'कोवळ्या येलफळाच्या कापट्या करून त्या सुकवतात.' - फचि १५१. २. ढलपी; तुकडा (लाकडाचा). (गो.)

**कापट्य** न. कपट; फसवणूक; खोटेपणा. [सं.]

**कापड** न. १. वस्त्र; कपडा; लुगडे : 'जी किरवू तरी कापडाचे।' - ज्ञा ११.५४. २. (वस्त्रोद्योग) उभार सुतात आडवण सूत घातले म्हणजे त्याला कापड म्हणतात. (गो.) [सं. कर्पट]

**कापडकरी** पु. कापड विकणारा; बजाज; घाटी.

**कापडगज** पु. कापड मोजण्याचे एक साधन. हा गज साधारण एक मीटरपर्यंत लांबीचा असतो.

**कापडगादी** स्त्री. तलवारीला कापडाच्या घडीने घासण्याची क्रिया.

**कापडचोपड** न. (व्यापक) वस्त्रे व इतर पदार्थ (तूप, तेल इ.); कापड व दुसऱ्या किरकोळ वस्तू. [कापडचे द्वि.]

**कापडचौकी** स्त्री. कापडाचा तंबू : 'राजगिरी मांडविया । सुरंगा कापड चौकिया।' - शिव ५७२.

**कापडणे** उक्रि. कापडाने मढवणे (छत, खांब इ.). (को.)

**कापडणे** पहा : **कापटणे**

**कापडतागा** पु. कापडाचा वीस ते चाळीस वाराचा तुकडा.

**कापडनि(वि)शी** स्त्री. कापडासंबंधी लिहायचे, कापडनिसाचे काम, हुद्दा.

**कापडनीस, कापडनिवीस** पु. फरासखान्यातील अधिकारी; राजाच्या वस्त्रागारावरील अधिकारी.

**कापड भांडारिणी** स्त्री. वस्त्रभांडाराची व्यवस्था पाहणारी दासी : 'दोनि धाया, दोनि गौळनी। दोनि कापडभांडारिणी।' - उह १६४.

**कापडमादनें** न. वस्त्र ओले करून अंग पुसणे; वस्त्रपरिमार्जनः 'एका दिसाआड कापडमादने:' - पूजाव. [सं.]

**कापडलेप** पहा : **मातकापड**

**कापडवति-ती** वि. स्त्री. कापडाने गुंडाळलेली : 'करावेया मूस कापडवती: आणिजे वावरूळीची माती।' - रकौ ९८.

**कापडी** पु. गंगेची कावड खांद्यावर घेऊन रामेश्वराला जाता जाता वाटेत गंगोदक, जपमाळा इ. विकणारे यात्रेकरू. भगवे वस्त्र, भगवी पताका असलेले यात्रिक; तीर्थयात्रा करणारे. (सामा.) यात्रेकरू, प्रवासी, मुशाफर: 'जिये मार्गीचा कापडी। महेशु आझुनी।।' - ज्ञा ६. १५३. [सं. कार्पटिक: ]

**कापडी** वि. कापडाचे बनवलेले.

**कापडीक** पु. यात्रेकरू. पहा : **कापडी** : 'मुक्तीचे कापडीक' -भाए १०३.

**कापडे** पहा : **कापडी** : 'तव परमेश्वरपूरीचीं ऋध्दपुरची कापडीयें (यात्रेकरू) : देवभट : महदाइसे आली :' - लीच ४. ५२.

**कापण-णी** स्त्री. १. श्मश्रू; हजामत. (कु.गो.). २. (विशे.) कापणी; छाटणी (पिकाची); पीक काढणे.

**कापणावळ** स्त्री. कापण्याची, तोडण्याची मजुरी (पीक, शेत, लाकूड इत्यादीची).

**कापणे** उक्रि. १. छाटणे; चिरणे; ठार मारणे; फोडणे; तोडणे; दोन भाग करणे (धारदार शस्त्राने): 'आणि कापौनि एका मारीं।' - राज्ञा ९. १६०. २. (ल.) कपात करणे; कमी करणे; काटाकाट करणे, वळते करून घेणे (पगार, वर्षासन, रोजमुरा इ.). ३. हजामत करणे. (को.) ४. होण्यासारखे, उरकण्यासारखे असणे (काम). ५. खर्च करायला लावणे. [सं.] (वा.) **कापल्या करंगळीवर न मुतणे** - (नकारार्थी) केव्हाही कोणाच्याही उपयोगी न पडणे. [सं. कृप]

**कापणे** अक्रि. हलणे; कंपायमान होणे; घाबरणे; धडधड वाजणे: 'कुरवाळूनि म्हणे तूं गा राजसुता योग्य तू न कांपाला।' - मोविराट ३. ७७. [सं. कंप]

**कापण्या** स्त्री. अव. जनावराच्या काळजामधील मांसापासून तयार केलेला पदार्थ. (खजुरासारखा).

**कापण्या** शंकरपाळी.

**कापता** वि. क्रिवि. तिरकस; कातरता.

**कापन** स्त्री. भातकापणीचे काम. (झाडी)

**कापरवणी** न. कापराच्या वासाचे, कापूर घातलेले पाणी. [सं. कर्पूर + वन = पाणी]

**कापरा-री-रे** पु. न. स्त्री. १. कंप; थडथड; हुडहुडी; कापण्याची विकृती. (क्रि. सुटणे, उठणे, भरणे.): 'हृदयी वाटून भय कांपरा।' - नव १०. ६५. २. (ल.) भीती; भय.
वि. कापणारा; कंपायमान; भीरू. भित्रा : 'केला असेल भीमें व्यूह जसा बाल कांपरा भूतें।' - मोभीष्म ६. ३. [सं. कंप]

**कापला** पहा : **काफला** [ सं. कंप]

**कापशा** वि. १. फोफशा; लठ्ठ; स्थूल; ढमाळ्या. २. हलका; पाणी सुटलेला; कापसासारखा मऊ (मुळा, भोपळा, दोडका). (को.)

**कापशी** स्त्री. कापसाचे झाड; कापूस. याच्या अनेक जाती आहेत. या झाडास येणाऱ्या बोंडापासून कापूस निघतो. कापशीच्या बियांचे (सरक्यांचे) तेल काढतात. [ सं. कर्पास]

**कापसरपळी** स्त्री. कानाच्या पाळीत घालायचा अलंकार. हा कुड्याच्या आकाराचा असतो. कुड्यात व यात फरक हा की याला बाजूला टिकलीच्या आकाराची चिंचोक्याप्रमाणे फुगीर सोन्याची टीक व त्याच्या खालच्या बाजूला मोत्याचे डाले (तबकडी) व सोन्याची सरफळी (साखळी, श्रीमंत लोक साखळीला हिरे-मोती लावतात) असते. साखळीचा आकडा कानाच्या बाजूने गालांवरून वर केसात अडकवतात.

**कापसाखळी** स्त्री. दागिन्याची साखळी; कापाची साखळी.

**कापसाचा नग** कापूस मोजण्याचे माप. धारवाड येथे ४८ मणाला एक नग म्हणत असत व २८ पौंडाचा एक मण असायचा. (धार.)

**कापसाची मोट** (ल.) लठ्ठ, स्थूलदेही माणूस.

**कापसाव (ळ)णे** अक्रि. १. कापसाप्रमाणे तंतुमय जळमट होणे; बिघडणे (काकडी, भोपळा वगैरे फळ); बुरसणे. २. पू घट्ट होणे (गळू वगैरेमधील).

**कापसाळे** न. देवाला वाहण्याकरिता स्त्रिया तयार करतात ते कापसाचे कुंकू लावलेले वस्त्र.

**कापसाळे** न. एका जातीची मासळी. (गो.)

**का(को)पळा** पु. उंडीच्या गराचा काप. (कों.)

**कापा** वि. कापून खाण्यासारखा, टणक व भरलेला (आंबा, फणस, इ. फळ).

**कापा** पु. कापलेला भाग, काप. (झाडी)

**कापाकाप-पी** स्त्री. १. बऱ्याच मोठ्या प्रमाणावर अनेक दिवस चालणारी पिकांची, शेताची कापणी; झाडाझुडपांची तोड; लाकडे कापण्याची क्रिया. २. कत्तल; तोडातोड; छाटाछाट. ३. कपडे शिवण्याकरिता कापड कापणे.

**कापा फणस** ज्याचे गरे मऊ नसून करकरीत असतात असा फणस. हा उत्तम समजतात : 'कवन बहुत उदरामधीं भरलें, फणस जसा मोठा कापा।' - होला १८.

**कापाल** न. नरोटी.
वि. नरोटीप्रमाणे शुष्क : 'मामलीयाचा तो कापाल केलेले !' - पेद ३४.१६९.

**कापालिक** पु. वाममार्गी, शैव - शाक्तपंथी लोक, संप्रदाय. (ह्यांच्या हातात पाणी पिण्यासाठी कवटी असते यावरून).
वि. कपाळासंबंधी; कवटीसंबंधी. [सं.]

**कापिन्नणे** पहा : **कापणे**; घाबरणे; भयाने थरथरणे : 'रंभा कापिन्नली गदगदा।' - मुरंशु ४३९.

**कापी** स्त्री. सोललेल्या सोडणाच्या काथ्याच्या वरचे साल. (कु.)

**कापीताव** पु. कप्तान; नायक. (गो.)

**कापील** पहा : **कापणी** : 'दोन गड्यांना नाय ऐकायची मी कापीलीला अन् बांधीलीला.' - आआशे १२६.

**कापीव** वि. १. कापलेला; तोडलेला; छाटलेला. २. कापायला योग्य. कापा.

**कापीव सुपारी** दुधात शिजवून वाळवलेले सुपारीचे काप, फोडी, तुकडे; कापकडी सुपारी.

**कापुरपाईक** स्त्री. रखवालीच्या कामाबद्दल देसायाला मिळावयाचा हक्क.

**कापुरवानी** पु. कापूर विकणारा : 'कापुरवानीयाचां हाटी : धेइजे पोतासाची पेटी।' - शिव ३२९.

**कापुसणे** अक्रि. १. (एखादा पदार्थ) बुरशीने,पांढऱ्या तंतूंनी आच्छादित होणे; बुरसणे. २. स्थूल, थलथलीत, लठ्ठ होणे.

**कापू** पु. रातवा पक्षी. (झाडी)

**कापूर** पु. एक पांढऱ्या रंगाचे ज्वालाग्राही सुगंधी द्रव्य. बऱ्याच झाडापासून व दालचिनी इत्यादी द्रव्यापासून कापूर बनवतात. भारतात कापूरकेळीपासूनही कापूर निघतो : 'कापुरें तें चांगु मालाथिलें।' - शिव ६२९. [अर.] [सं. कर्पूर]

**कापूरआरती** स्त्री. १. तबकात कापूर पेटवून त्याने देव, गुरु, ब्राह्मण यांना ओवाळण्याची क्रिया. २. कापूर पेटवण्याचे पात्र; हलकारती.

**कापूरकचरा-री** पु. स्त्री. एक सुवासिक कंद. [ सं.]

**कापूरकरदळी** स्त्री. जिच्या गाभ्यातून कापूर निघतो अशी कर्दळ, केळ.

**कापूरकेळ-ळी** स्त्री. एक प्रकारची केळ. पहा : **कापूरकरदळी** : 'वरौनि कापूरकेळी। भ्रमरांची झांक उठिलीं।' - शिव १०५.

**कापूरगौरी** वि. कापरासारखी गोरी; शुभ्र : 'कापूरगौरी चोखट।'-ऋ ८२.

**कापूरचिनी** स्त्री. चिनी कापूर; एक औषधी वनस्पती, द्रव्य. [सं. चीनाक + कर्पूर]

**कापूरपोवळे** न. खोटे, कृत्रिम पोवळे. (हे लाखेचे करतात).

**कापूरबाब** स्त्री. वारसाहक्क.

**कापूरभेंडी** स्त्री. (वन.) डोंगराळ प्रदेशात डोंगरकड्यावर होणारे एक

झाड. याची पाने देवकपाशीच्या पानासारखी असतात. याला पांढरी फुले येतात. याच्या मुळास उत्कृष्ट वास येतो. गंडमाळा वगैरे ग्रंथीरोगात याचे मूळ थंड पाण्यात उगाळून लेप करतात.

**कापूर मोती** खोटे, कृत्रिम मोती (हे पाऱ्याचे बनवतात).

**कापूरवणी** पहा : **कापरवणी**

**कापूरवेल-ली** स्त्री. १. नागवेलीचा एक प्रकार : 'कापूरवेलीची चोखडी। उजळिली परीवडीं।' - ऋ ८४. २. एक फुलवेल.

**कापू(पु)स** पु. १. कपाशीच्या बोंडातील तंतुमय पांढरा पदार्थ. ह्यापासून सूत काढतात व सुताची वस्त्रे करतात. आखूड धाग्याचा व लांब धाग्याचा इ. याचे अनेक प्रकार आहेत. (क्रि. पिंजणे, कातणे, लोढणे, वठणे) रुई, सावरी, कुडा व इतर काही झाडे यांच्यापासूनही असाच पदार्थ निघतो : 'कां पटत्व कापुसा। मातू होय॥' - ज्ञा १४.१६०. २. (ल.) अवाळू, चामखीळ वगैरेमधील पांढरे कापसासारखे फुसफुशीत मांस. ३. केळीच्या कालातील तंतू. ४. तवसे, भोपळा इ. नासल्यामुळे आत होणारा पांढरा पदार्थ. [ सं. कार्पास] (वा.) ० **वठणे** - लोढणे, कापसातील सरकी काढणे. ० **महाग करणे** - (ल.) कृश, अशक्त होणे. (गो.)

**कापूसकांदा** पु. एक वनस्पती. (झाडी)

**काप्टा** पु. चोळीचे कापड. (झाडी) [ सं. कर्पट]

**काफ(फि)र** वि. १. अश्रद्ध; यहुदी, ख्रिस्ती अगर मुसलमान धर्मग्रंथावर श्रद्धा न ठेवणारा; परधर्मी; नास्तिक; पाखंडी : 'प्रथम तूं कोण काफर आहेत तें सांग!' - स्वप १४३. २. (ल.) लुच्चा; लबाड; बदमाश; हरामखोर. ३. हबशी. पहा : **काफरी** [ फा. काफिर]

**काफरशाई** स्त्री. काफराचे राज्य : 'यवनांचे मनांत की काफरशाई जाहली.' - ऐटि १.२८.

**काफरी** पु. १. हबशी; शिद्दी. २. पूर्व आफ्रिकेतील एक जमात; एक आरमारी दर्यावर्दी मुसलमान जात : 'गणातून काफरी पलोन आले.' - पेद ९.३०.

**काफ(फि)ला** पु. १. प्रवाशांचा, लमाणांचा तांडा; प्रवासी यात्रेकरूंचा तांडा; समूह; कारवान : 'किती एक ते काफले लूटताती।' - इमं २४. २. जहाजांचा, गलबतांचा समुदाय; आरमार. (वा.)० **करणे** - लुटणे. [फा. काफिला]

**काफिलासालार** पु. कारवानांचा नायक.

**काफी** पु. (संगीत) १. एक राग, गानसमय मध्यरात्र, तरी पण सार्वकालिकही मानतात. २. एका थाटाचे नाव. याचे सात स्वर असे:- शुद्ध षड्ज, शुद्ध ऋषभ, कोमल गांधार, शुद्ध मध्यम, शुद्ध धैवत व कोमल निषाद.

**काफीकानडा** पु. (संगीत) एक राग : 'आपल्या घराण्यात चारपाच तऱ्हेचे काफीकानडे गायिले जातात.' - थोसं २०४.

**काब** स्त्री. काबू; संधी : 'टिपूशी सलूख करितील अथवा जरबेत आणितील जशी काब पहातील तसे करितील.' - मशियांका ३४४.

**काबजात-ती** स्त्री. ताबा; अम्मल; सत्ता : 'सिद्दीच्या किल्ल्याच्या काबजातीची मुबारकी आँ शहाम्मतपन्हास दिली जाली.' - ऐटि २.९०. [फा. कब्झियत्]

**काबरणे** क्रि. नखाने ओरबाडणे. (झाडी) [सं. खर्जन]

**काबरा** वि. भुरकट; काळा. पहा : **कबरा** [सं. कर्बूर]

**काबरा** पु. भुईसरपट पसरलेले झुडूप (नेपती, आदंड, पंचोबंद इ. झुडपे). [हिं. काब्रा]

**काबरें** क्रिवि. अंगावर ठिपके असलेले : 'दुधवडीचीं करडीं काबरी। रोंदेची सोनेखैरीं। - वह.

**काबली** वि. काबूलसंबंधी (उंट इ.).

स्त्री. भाजलेले पांढरे काबुली हरबरे. हे शुक्रवारी वाटतात. यावरून खारे वाटाणे वाटतात त्यांनाही म्हणतात. ह्यांना तिखट, मीठ व हळद लावलेली असते.

**काबळा-ळो-लो, काबाळ** पु. काथ्या; नारळावरचे तंतू. (गो., कु., को.)

**काबा** पु. उत्तरेकडील लोक; ओखा मंडळातील किंवा गुजरातेतील वाटमारी करणारे चाचे लोक. [गु.]

**काबा** पु. कोवळा, बेचव नारळ. (को.)

**काबा** पु. लांब पायघोळ अंगरखा : 'हिरव्या मखमलीचा रत्नखचित काबा त्याच्या अंगावर होता.' - श्रीयो २.५३४.

**काबा** पु. मक्केला मशिदीत असलेला मोठा काळा दगड : 'काबाच्या दिशेकडे तोंड करून नमाज पढले.' - थोसं १३७. [फा.]

**काबाड, काबाडकष्ट-काम** पहा : **कबाड** : 'मग स्वप्नाचें काबाड। ओपी निद्रा॥' - ज्ञा १८.५४०; 'काबाडकष्ट मुलीच करतात.' - नाकु ३.४२.

**काबाड** वि. निरर्थक (चर्चा).

**काबाडखोत** पु. काबाडाची खोती करणारा; सरकारला सरपण पुरवणारा मक्तेदार. (को.)

**काबाडखोती** स्त्री. सरकारला सरपण पुरविण्याचा मक्ता.

**काबाडी** स्त्री. मालाची गाडी.

पु. मजूर; कष्ट करणारा माणूस; कबाड वाहणारा; ज्याला नाजूक, कुशलतेचे काम करता येत नाही असा माणूस; सामान, ओझे वाहून नेणारा : 'काबाडी वाहती काबाड।' - दास ६.९.६.

**काबाय** स्त्री. झबले. (गो.) [ फा. कबाचा]

**काबासांव** न. तडजोड; निकाल. (गो.)

**काबिला** स्त्री. सुईण.

**काबीज** वि. १. कब्जा घेणारा; सत्ताधीश : 'पुन्हा पाटीलबाबा सल्तनतीत काबीज होईल.' - दिमरा १.२५२. २. आधीन; हस्तगत; ताब्यात आलेली; ताब्यात घेतलेला. (क्रि. करणे, होणे.)

न. त्रास; दगदग. [ फा. काबिझ्]

**काबीजमुतसरिफ** वि. कब्जा व वहिवाट उपभोगणारा : 'हर्गाह की काबीज मुतशरीफ बाहात्तर वर्से नाहीं.' - मइसा २०.४७. [ फा.]

**काबीजात-द** पु. काबीज केलेला प्रांत; ताब्यातील प्रदेश : 'नवीन

काबिजादींतील हिंदू लोकांचा न्यायनियम एक प्रकारच्या कायद्यानें चालत होता.' - गोमांतक रीतीभाती प्रस्तावना. [ फा. काबिझ]

**काबीजाती** स्त्री. ताबा : 'यावरी त्यांची काबीजाती बैसली.'-पेदसमा २१७.

**काबील** वि. १. कर्तृत्ववान; कर्तबगार; हुशार; प्रवीण; लायक : 'एक काबील मनुष्य नजीबखान रोहिला आहे.' - भाव २०. २. मजबूत; बळकट; चिवट. [ फा.]

**काबील** स्त्री. शासनाकडून प्राप्त मिळालेली शेतजमीन. (झाडी)

**काबुची** वि. लुच्चा; धूर्त; फसव्या; युक्तिबाज : 'मोंगल लोक काबुची आहेत.' - मइसा १.५२. [ फा. काबूची = जुलमी, अनिबंध]

**काबुयार-री** पहा : **काबू**

**काबू** स्त्री. १. संधी : 'आपली काबू साधून तेथें न गुंतता महाराजांनीं स्वराज्यांत यावें.' - चित्रगुप्त ८०. (क्रि. करणे, साधणे) २. कब्जा; ताबा; सत्ता; नियंत्रण : 'पातशहाचे मनांत स्वामींचे काबूंत राहावें.' - दिमरा १.११. (क्रि. आणणे, ठेवणे.)

वि. १. बळकट; मजबूत : '(चेनरायदुर्ग) इतका काबू किल्ला असून एकाएकी फत्ते झाला.' - ऐलेसं १२२४. २. धूर्त; कावेबाज; लबाड. [ फा. काबू = सामर्थ्य; सत्ता]

**काबूका(या-व)र** वि. धूर्त; हिकमती; लबाड : 'जाटांत जीव आहे.... मोठा काबूकार आहे.' - मइसा १. १३९; 'काबूवार खरा फिरंगी' - आयाह ३.

**काबूचीपणा** पु. हरामखोरी : 'मुरारराव याचे कुचोद्यात आहेत हेही काबुचीपणास चुकत नाहींत.' - पेद २८.८७.

**काबूतलब** वि. संधी साधणारा : 'इंग्रज बेइमान काबूतलब' - पया ४६४.

**काबूदाबू** पु. पाचपेच : 'त्यात मजकूर हिताहित आंदेशे काबूदाबू निभावणी करून पाठवावे असें होतें.' - मशियांका ७०.

**काबूबाज** वि. कपटी : 'इंग्रज काबूबाज.' - मशियांका १९३.

**काबूयारी** स्त्री. लुच्चेगिरी; धूर्तता.

**काबूवख्त** पु. संधी; योग्य समय : 'खालीं मैदान देखून व काबूवख्त पाहून' - ऐलेसं ३५६७.

**काम** पु. १. मदनविकार; संभोगेच्छा : 'या कारणें कामें। स्त्रीपुरूषयुग्में।' - ज्ञा १६.३१०. २. मदन; कामदेव : 'जाळ गळ्यामधिं माळ कशाला व्याळ काम कोपला।' - राला ८७. ३. इच्छा; स्पृहा; आकांक्षा : 'तुला राम सेवेविणे काम नाहीं।' - वामन भरतभाव २३. ४. धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चार पुरूषार्थांतील तिसरा (विषयोपभोग). ५. (संस्कृत रचनेत) आपल्या मनाप्रमाणे वागणारा. जसे :- कामवाद = वाटेल ते बोलणारा; कामभक्ष = इच्छेप्रमाणे खाणारा; कामचार = आवडेल ते करणारा इ. (संस्कृत रचनेत तुम् प्रत्ययांत रूपापुढे) इच्छिणारा, वांछिणारा, जसे :- गंतुकाम = जाऊ इच्छिणारा; भोक्तुकाम - खाऊ इच्छिणारा इ. ६. इच्छा; लोभ : 'जे स्वर्गकामु मनीं धरिती।' - ज्ञा २.२५०. [सं.]

**काम** न. एक प्रकारचा पाणकोंबडीसारखा पक्षी. हा कोकणात कार्तिकापासून पुढे तळ्यामध्ये आढळतो.

**काम** न. १. गोष्ट; कार्य; व्यापार; कृत्य. २. धंदा; उद्योग; हाती घेतलेला व्यवसाय. ३. क्रिया; कृती करण्याचा व्यापार : 'कर्माचें काम सरे। विरमे मन।।' - ज्ञा ७.१७७. ४. सामान्यतः कोणताही व्यवहार, बाबत. ५. गरज; प्रसंग; प्रयोजन. ६. उपयोग; पात्रता;उपयुक्तता; सोइस्करपणा. [सं. कर्मन्] (वा.) ० **काढणे** - १. सपाटून त्रास देणे; मन मानेल तसे वागवणे, सतावणे, छळणे. २. (ल.) खोड मोडणे; कुंठित करणे; नशा उतरणे; खरडपट्टी काढणे; जेरीला आणणे. ३. ठार मारणेश; नाश करणे; कांडात काढणे : 'सन १८७३ सालीं होन्याकोळ्यानें बंड केलें व मारवाड्यांचे काम काढलें.' - गुजा ५९. ४. काम लांबवणे. ५. रतिसमागम करणे, त्यात दमवणे. (व.) ० **चोरणे** - अंग राखून, कुचराईने, रेंगाळत काम करणे. ० **नसणे** - निरुपयोगी, निष्फळ होणे; (एखाद्या वस्तूची) गरज नसणे. ० **नाजुक लागणे** - काम जोरात सुरू असणे : 'यैसीयासी मुदबखचें काम रोजबरोज नाजूक लागले आहे.' - पेद ७.५. ० **बजावणे** - करणे, पार पाडणे; तडीला नेणे. ० **मनावर घेणे** - १. महत्त्वाचे समजणे; किंमत देणे. २. एखादे काम करण्याची मनापासून इच्छा होणे; कळकळीने झटणे. ० **मांडणे** - कामात रस असणे. ० **साधणे** - वाटेल ते झाले तरी काम तडीला नेणे, संपवणे, पुरे करणे. **कामाचा अजोरा पडणे** - थोड्याशा चुकीमुळे पुन्हा जास्त काम करण्याचा प्रसंग येणे : 'तुमच्या करण्यामुळे विनाकारण कामाचा अजोरा मात्र पडला.' - पेद. **कामात काम करून घेणे, कामात काम उरकणे** - मोठे काम चालले असता त्याच्या साधनांनी त्याच जातीच्या लहानशा प्रकारचे काम साधून घेणे. **कामात पडणे** - १. कामात, धंद्यात, व्यवसायांत भाग घेणे, पत्करणे. २. पराभूत होणे; अयशस्वी होणे (उद्योगात, धंद्यात). **कामात पाणी शिरणे** - व्यवहारात, धंद्यात तोटा होणे. **कामात भर पडणे** - काम बिघडणे. **कामातून जाणे** - निरुपयोगी होणे. **कामा येणे** - उपयोगी पडणे : 'सहदेव मात्र कामा आला करि विक्रम प्रकाम रणीं।' - मोकर्ण ३८.३१. **कामाला येणे** - १. पत्करणे; सहन केले जाणे. २. उपयोगी पडणे : 'कठिण समय येतां कोण कामासि येतो?' - र १०. **कामाला येणे** - लढाईत स्वामी कार्यार्थ मरण येणे. **कामाला वाघ असणे** - कितीही काम झपाट्याने व पूर्णपणे उरकणे : 'माझी आई कामाला वाघ होती' - मापु ३. **कामावर पडणे** - १. उपयोग होणे. २. योग्य होणे; बरोबर असणे (कृती, रीत, काम इ.) **कामी पडणे** - सहन होणे; चालणे : 'जर त्या पोराला आता कोणी विचारलं तर माझ्या नाही हो कामी पडायचं.' - पलको. **कामी येणे** - पहा : **कामाला येणे** : 'गोखल्यांच्या निशाणाभोंवतीं पांचशें वीर कामीं आले.' - विवि १०.१०.२२९. **कामी लावणे** - १. उपयोग करणे. २. वेठीला धरणे. **खांदा देऊन काम करणे** - झटून, मनःपूर्वक काम करणे.

**कामकटक** न. मदनाचे सैन्य : 'कामकटकीचा गजबजाटु : तैसा कोकिळांचा कळकळाटु।' - शिव २५८.

**कामकडवळीया** पु. मदनाचा पुत्र : 'तो कामकडवळीया वहिला : नटला

स्त्रीरूपें :' -रुस्व २६५६.

**कामकर** पु. मदनाचा वेग : 'माया नियंता तो ईश्वर। तो कामकर निवारी।' - एभा २६.१७८.

**कामकराऊ** वि. उद्योगी; काम करणारा : 'सर जितके कामचुकाऊ तितके ते कामकराऊ.' - मी ५१.

**कामकरी** पु. मजूर; हेलकरी; नोकर. [सं. कर्म + कर]

**कामकर्दा** पु. कार्यकर्ता : 'बहुकामकर्दा म्हणवी शहाणा।' - दावि १४७.

**कामकस्तुरी** स्त्री. सब्जाचे झाड. या झाडाच्या बियांना तुकुमराई म्हणतात. [सं.]

**कामकळा** स्त्री. कामशास्त्र; कामाचा आवेग; विषयभोगाचे ज्ञान : 'हास्य विनोद कामकळा। हें ज्ञान नव्हे।' - दास ५.५.२९.

**कामकाज** न. लहानमोठे, कोणतेही काम, धंदा.

**कामकारभार** पु. कोर्ट कचेरीतील किंवा सरकारी कामकाज.

**कामकारण** पु. मंगलकार्य (झाडी). [सं. कर्म + कारण]

**कामकारी** वि. मदनाचा वेग उत्पन्न करणारा : 'नसे अंतरी कामकारी विकारी।' - राम ५०.

**कामकांती** स्त्री. मदनासारखी कांती; सुंदर वर्ण, रूप : 'कीं काम कांति धवलारें। काळरात्रीची।' - शिव ९४६.

**कामकुचरपणा** पहा : **कामचोरपणा**

**कामक्रीडा** स्त्री. स्त्रीपुरुषांचा एकत्र शृंगार; मैथुन.

**कामक्रोधलोभादी** काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर या षड्रिपूंबद्दल योजायचा संक्षेप : 'विकल पडतां प्राक्तन। स्वधर्मी राहाटे कीं मन। कामक्रोध शत्रु संपूर्ण। केले आधीन तुवां की।' - पांप्र १५.१३०.

**कामगत** स्त्री. १. कामगिरी; उद्योग; करायचे काम. २. मजुरांचा मेळा. ३. काम करण्यातली हुशारी; कौशल्य : 'बालगंधर्वांच्या जागा त्यांच्या बोटातून त्याच जातींच्या त्याच कामगतीच्या निघत.' - नटश्रेष्ठ ३१. ४. भानगड : 'अशा कामगती असतात आमच्या.' - आआशे १८०.

**कामगंड** पु. कामवासनांचे विकृत स्वरूप : 'कामगंडाची भावना त्यांनी कृष्णाच्या माथी मारून आत्मतृप्ती करून घेतली.' - परिहरी ९७.

**कामगार** पु. १. सरकारी नोकर (चिटणीस, एखाद्या दर्जाचा अधिकारी) : 'राजसे समस्त सुरवर। ते तंव माझे कामगार।' - कथा ३.४.१९. २. गिरण्या, कारखाना इ. त काम करणारा मजूर. ३. कार्यकर्ता : 'कामगार आणि आंगचोर। येक कैसा।'-दास १२.७.२३. [सं. कर्मकार]

**कामगार संघ, संघटना** कामगारांचे सर्वसाधारण हितसंबंध जपणारी, त्यांचे संरक्षण आणि वाढ यांकडे लक्ष पुरवणारी संघटना.

**कामगा(गि)री** स्त्री. १. कामधंदा; करायचे काम; उरकायचे काम. २. काम उरकणे, करणे; बजावणी. ३. कारागिरी; करामत : 'कामगारी व्हावयाची असल्यास त्याप्रमाणे नायब खानगी कारभारी यास कळवून...' - कलावंतखाते (बडोदे) ४२. ४. विशेष काम.

**कामगृह** न. स्त्रियांचे जननेंद्रिय : 'कामिनी कामगृहासक्ती। प्राणी प्राणातें स्वयें शिणवीती।' - एभा ३.२४२. [सं.]

**कामचलाऊ** वि. तात्पुरता उपयोगी पडणारा; वेळ मारून नेता येण्यासारखा; खपण्यासारखा साधारण.

**कामचंग** वि. कामात तरबेज; कर्तबगार : 'आपाजी मनुष्य कामचंग मोगलाईत वाकीफ आहे.' - मइसा ८.२१४.

**कामचुकार-रू, कामचुकवू-व्या** वि. कामाची टोलवाटोलवी करणारा; सोंगाड्या; कुचराई करणारा; चुकारतट्टू, अंगचोर.

**कामचेष्टा** स्त्री. शृंगारचेष्टा, क्रीडा; कामविकार उत्पन्न करणारे हावभाव, चाळे.

**कामचोरपणा** पु. अंगचोरी : 'त्यांच्यात कामचोरपणा अधिक असता तर ते खात्रीनें अधिक काळ जगले असते.' - विचारविलास १०८.

**कामजिक** वि. काम्य.

**कामजीवन** न. लैंगिक जीवन; स्त्रीपुरुषसंबंध.

**कामजोड** वि. कामात तत्पर; कामात गढलेला.

**कामज्वर** पु. १. मदनाचा आवेग. २. संभोगाच्या तीव्र इच्छेमुळे होणारा त्रास.

**कामझोड्या** वि. सपाटून काम करणारा; ओबडधोबडपणे कसेतरी काम संपवणारा; दडपून काम करणारा.

**कामट** वि. मदनाने व्याप्त : 'शिश्न कामट मातलें।' - गीता २.५०६१.

**कामट-टी-ठी** पहा : **कांबीट** [सं. कमठ]

**कामठ** वि. १. उद्योगी; मेहनती. (राजा.) २. कर्मठ : 'कांमठ पडताळुं जाति' - लीच ३.८०.

**कामठ-ठा** न. स्त्री. १. दुकान; व्यापार : 'तेव्हां कर्ता रिगे कामठां। कर्तृत्वाच्या।।' - ज्ञा १८.३५८. २. कारखाना; यंत्र; टांकसाळ : 'गांवाखातीये औधे मिळोनि कामठा घालिती।' - चसि ८९. ३. सुतारकाम करण्याची शाळा, जागा. (ना.) पहा : **काम**

**कामठा** पु. तीर; बाण.

**कामठी** स्त्री. (कामठी येथे तयार होणारे) पोलादाचा एक प्रकार.

**कामणुक** स्त्री. करमणूक : 'सुनास नाहीं तरि कामणुका।' - सारुह ३.१६.

**कामणे** सक्रि. इच्छा करणे : 'परि न कामितां कामिक। न निफजे जें।।' - राज्ञा १८.१६.

**कामत** न. १. डोंगरी वरकस शेत, मळा, जमीन. २. घरीच मालकाने केलेली जमीन; घराऊ शेती; खंडाने न दिलेली शेती; सरकारी कामगाराला मिळालेली जमीन. (गो.) [सं. कर्म]

**कामतणे** क्रि. बनविणे; तयार करणे : 'कुंभे कळास फळेतरा। कैसे कामतीले अरुवार।' - रुस्व ९३७.

**कामतसेत** पु. स्वतःची अवजारे आणि जनावरे देऊन मोलाने कसवलेले शेत.

**कामती** पु. नोकर; शेतावर काम करणारा मजूर. (वे.)

**कामथ** न. इमानेइतबारे केलेल्या चाकरीबद्दल मिळालेली इनाम जमीन. (माण.) पहा : **कामत**

**कामथाळोरे-रोळे** न. वृषण; अंडकुली : 'कामथाळोरां पुसाटी । घालुनि पडे ।' - एभा १४.३८२.

**कामदा** स्त्री. एक वृत्त. याच्या चरणात दहा अक्षरे असून र, य, ज, ग हे गण येतात. [सं.]

**कामदानी** पु. कशिद्याचे अंगरख्याचे कापड.

**कामदार** पु. सरकारी नोकर; अधिकारी; अंमलदार.

**कामदूषण** वि. कामुक.

**कामधाम** न. कामधंदा; कामकाज; घरात करायची वेगवेगळी कामे : 'मी व इतर शेजारची मंडळी कामधाम आटोपून गप्पा करत बसलो होतो.' - ऐको १.७८. [ कामचे द्वि.]

**कामधेनू** स्त्री. १. (पौराणिक) इच्छिलेली वस्तू तात्काळ देणारी स्वर्गातील एक गाय; सुरभी; सुरधेनू. त्यावरून पुष्कळ दूध देणारी गाय. २. (ल.) नेहमी उपयोगी पडणारा धनी; नानाप्रकारची कामे करणारा हिकमती नोकर; अतिशय उत्पन्न येणारे शेत, झाड; नाना प्रकारचे विषय ज्यात नमूद केले आहेत असे पुस्तक : 'जयातें कामधेनु माये। तयासी अप्राप्य कांहीं आहे।' - ज्ञा १.७९. ३. पुष्कळ ठिकाणी उपयोगी पडणारे वस्त्र, वस्तू, पदार्थ. ४. सर्वांना उपयोगी पडणारा माणूस. ५. (ल.) भिक्षा मागण्याची झोळी. (क्रि. लाभणे.) [सं.]

**कामना** स्त्री. इच्छा; वासना; मनोरथ : 'पैं अवज्ञा आणि कामना।' - ज्ञा १८.२०२. [सं. काम+ना]

**कामनिक** न. मनात काही इच्छा धरून केलेले व्रत. वि. इष्ट; आवडण्यासारखे (कामधंदा). [सं.]

**कामबयरा** वि. कामचुकार. (झाडी) [सं. कर्म बधिर]

**कामबक्षी,ख्शी** स्त्री. इच्छापूर्ती; वासना तृप्त होणे. [ फा.]

**कामबंद संप** कारखान्यात कामाच्या जागी हजर राहून काम न करणे.

**कामबाज** वि. विषयासक्त; स्त्रीलंपट; बाहेरख्याली; रंडीबाज.

**कामबोध** पु. कामोद नावाचा एक राग. पहा : **राग**

**कामभक्ती** स्त्री. मनात इच्छा धरून केलेली भक्ती, उपासना. [ सं.]

**काममगरमिठी** स्त्री. मदनरूपी मगराने घातलेली मिठी; तीव्र संभोगेच्छा.

**कामरमण** वि. स्वेच्छेने विहार करणारा : 'जो सकळ मंगळां मंगळ पूर्ण। जो कां गोकुळीं कामरमण।' - एभा १.२२९.

**कामरंग** पु. विषयसुख.

**कामरानी** स्त्री. प्राप्तकाम होणे; कार्यसफलता. [ फा.]

**कामरूण** पहा : **कांबरूण**

**कामरूप** न. इच्छेप्रमाणे धारण करता येणारे रूप.

**कामरूप-पी** वि. सुंदर.

वि. १. इच्छेप्रमाणे रूप धारण करणारा. २. सुंदर; मनोहर; रमणीय; मदनासारखे रूप असलेला.

**कामला-ळ** स्त्री. कावीळ रोग; हळद्या रोग : 'कवळैली कामलादि दोषीं। दृष्टी न रीगे वर्णविशेषीं।' - ऋ ६७. [ सं. कामला]

**कामलाट्या** वि. कसे तरी करून काम उरकणारा (मजूर).

**कामलेट** न. ब्लँकेट : 'बकऱ्याच्या केसाची कामलेट वगैरे वस्त्रें होतात.' - मपु ३ आ. ४.११९.

**कामवट** न. १. कामकरी; मजूर : 'येक भाणवसीं कामवटें।' - उषा ७.७३. २. कौशल्य : 'कीं विश्वकर्म्याचें कामवट। खांब सोडविले निघोट।' - कालिका पुराण ६.१८.

**कामवटा** पु. बांधकाम : 'जैसे देऊळ रचितां जैसी जैसी भूमि उचवट। तेणेचि आधारें तो कळसोतर कामवटा की।' - विद १३.

**कामवंचक** वि. विषयलंपट.

**कामविणे** सक्रि. १. उपयोगात आणणे; कामात आणणे : 'जे सर्वदोषांचा वसौटा तमचि कामऊनि सुभटा।' - ज्ञा १८.७५२. २. निर्माण करणे, संपविणे; घडविणे, कमावणे; कुशलतेने तयार करणे : 'पांचही कारणें सहेतुकें। कमवीजती गा अनेकें।' - ज्ञा १८.४२१. [सं. कृ - कर्म]

**कामशास्त्र** न. रतिशास्त्र; कोकशास्त्र; स्त्री-पुरुष संभोगाची इतिकर्तव्यता ज्यात सांगितली आहे ते, स्त्रीपुरुषप्रेमविषयक शास्त्र; शृंगारशास्त्र.[ सं.]

**कामसदन, कामस्थान** न. जननेंद्रिय; योनी; उपस्थ.

**कामसाधू** वि. आपमतलबी; स्वार्थी; स्वतःचे तेवढे काम करून घेणारा.

**कामसू** वि. नेहमी काम करणारा; कष्टाळू; काम करण्यात पटाईत; उद्योगी; व्यासंगी.

**कामळ-ळा-ळी-ळें-ळ्या** पहा : **कांबळा** : 'वनीं धेनु चारितो कामळ हाती काठी।' - अफला ८१.

**कामळीफुज्यांव** वि. भ्याड; पळपुटा. (गो.)

**कामंदकी** स्त्री. एक नीतिशास्त्र : 'बोधिला निजवैडुरी उशनसी कामंदकी जीवजा।' - गस्तो ६४.

**कामाऊ-यो, कामाविणे** पहा : **कमाऊ**

**कामाकार** पु. अंकितपणा : 'आणि ज्ञानाचेनि कामाकारें' - ज्ञा १६.६०. वि. विषयी; लंपट.

**कामाख्या** स्त्री. कामातुर स्त्री : 'कामाख्या कामबाणी व्रजयु (व) तिगणीं सांधनी मन्मथाची।' - गरा १९.

**कामाचा** वि. १. उपयुक्त; कामाला उपयोगी पडणारा (पदार्थ, माणूस). २. कामात गुंतलेला (ज्याला कामधंदा आहे असा); उद्योगी; रिकामा नसलेला.

**कामाचा किडा** उद्योगी. (झाडी)

**कामाचा गाडा** १. येईल ते काम करणारा माणूस; मेहनतीचे काम करणारा पुरुष. २. भरपूर काम. (क्रि. ओढणे.)

**कामाचा जड** आळशी; मंद; धिमा; सुस्त.

**कामाचा यार** संधिसाधू; स्वार्थसाधू; आपल्या मुद्द्याच्या गोष्टीकडे पाहणारा : 'पाटीलबाबा बट्टेबाज खिलाडी कोन्हाचाहि नाहीं. कामाचा यार आहे.' - ऐलेपाम्युप्र ८.

**कामाटी** स्त्री. १. व्यापार; काम; कर्म : 'मनें कल्पिली सकळ सृष्टि। मनःकृत इंद्रिय कामाटी।' - एभा २२.४६२. [ सं. कर्म]

**कामाठा** पहा : **कामाठी ३**

**कामाठी** पु. १. तेलंगणातील एक जात व त्यातील व्यक्ती. २. झाडणे, बैठक घालणे वगैरे घरकामाकरितां ठेवलेला नोकर : 'शीघ्र आणोनि कामाठ्यांसी। गर्ती योजिली कूपासरसी।' - नव २४.१७८. ३. लष्करातील डेरे, राहुट्या लावणारे मजूर : 'आली सातपुड्याची

घडी, तोफगाडी, दाटली घोडी वाट पुढें नाहीं कामाठे खादी पर्वत फौज उभी राही ।' - ऐपो ४२४. [क. कामाट, त. कामाट्टि] [ सं.]

**कामाठी** पु. (ल.) खांबाचे उथाळे.

**कामाठी** पहा : **कांबीट, कामटी**

**कामाठी** स्त्री. १.येरझार; व्यापार. २. कष्ट; दगदग; काम : 'तया कांहींच नाहीं कामाठी । जन्ममरणाची ।' - उगी ८३२. [ सं. कृ - कर्म]

**कामाडी** स्त्री. आदिवासींचे एक नृत्य : ' कामाडी, तारपा, ढोल सारी नृत्ये रात्रीला जाग आणतात.' - भाप्र ३३०.

**कामाण** वि. १. इच्छा पूर्ण करणारे : 'जेरूपश्रीएचे मंडन : वेधविद्या कामाण।' - सव. २७१. २. कामनायुक्त; अभिलाषपूर्ण.

न. अलौकिक घटना.

**कामातुर** वि. मैथुनेच्छेने विव्हळ झालेला-ली : 'जाणितला तिहीं कामातुर नारी। कृष्णभोगावरि चित्त ज्यांचें।' - तुगा १२.

**कामाथ(थि)णे** अक्रि. काम विकाराने युक्त होणे : 'कामार्थी करितातिं युद्ध आपुल्या जातीत कामाथिले।' - निमा सुभद्राचंपू ६.४.

**कामानल-ळ** पु. मदनाचा दाह; कामविकाराचा संताप. [ सं.]

**कामार** पु. १. घिसाडी; लोहार. २. कामकरी. (गो.)[ सं. कर्म - कार]

**कामारा-री-रे** पु. स्त्री. कामकरी; सेवक; दास; दासी; चाकर : 'मग माझी होतील कामारीं।' - ज्ञा १६.३५३.

**कामारी** पहा : **कामांतक** : 'त्या प्रभुयशासि मानी अमृताचें पूर्ण ताट कामारी।' - मो परंतु रामायण.

**कामारीपण** न. सेवावृत्ती; दास्यत्व : 'इया कामारिपणें भुक्ति मुक्ति। देती भाविक जनांसि। - स्वानु १०.१०८.

**कामालय** पहा : **कामसदन**

**कामावणे** सक्रि. १. कमवणे; तयार करणे; पढवणे : 'कीं मेरूचा गाभा कामाविला। विश्वकर्मेनी।' - शिव ४५. २. संस्कार करणे; स्वरूप देणे; आकार देणे : 'जेवीं लोह कामावितां जाणा। होय दर्पण सोज्वळ।' - एभा १९.२६२. [सं. कृ, कर्म]

अक्रि. मळणे.

**कामाक्षी** स्त्री. १. एक फुलझाड; कर्दळीचे झाड. २. एक देवी. (कांची-कांजीवरम् येथील.) [सं.]

**कामांतक** वि. जितेंद्रिय.

**कामिक** पहा : **कामीक**

**कामिक** वि. काम्य; इच्छा धरून केलेले : 'परी न कामितां कामिक। न निफजे जें।।' - ज्ञा १८.९७. [ सं. कम् ]

**कामिण** पहा : **कामीण-न** : 'भोवंडीनें पृथ्वी कलथली । कामिणीनें पिवळी जाली।' - दास १४.१०.२०.

**कामिण-णी** स्त्री. कावीळ : 'कुळिक तरळ कामिणी। मुरुमा सुंठरें माळिणी।' - दास ३.६.२५. [ सं.कामता ]

**कामित** न. इच्छित; वांछित : 'कामद मेघश्याम पुरवितो कामित निजदासाचें।' - मो सुदामचरित्र ७६. [ सं.कम्]

**कामिता** वि. इच्छा करणारा : 'नातरी कामतियाचिया इच्छा।' - ज्ञा ४.२१५. [ सं. कम्]

**कामिना-नी-णा-णी** स्त्री. प्रेयसी; सुंदर स्त्री; शृंगारचेष्टा करणारी स्त्री; प्रियतमा : 'बगुन कामिनी तुला नगरच्या पडतिल बीमार।' - मृ १८. [ सं.]

**कामनीहाट** पु. वेश्यांचा बाजार : 'तीय कामिनी हाटीं: ए जाय विळासियांची दाटी' - उगी ३७९.

**कामिया** वि. पु. कामुक : 'सेहाणीव जाणीवेतें उमाणी: कंदर्प कामियांची पुरवी आइणी।' - मप्र २९३०.

**कामिल** वि. काबील, चतुर : 'मुत्सद्दी तर कामिल न अढळला.' - हिंगपेदभा २.३६.

**कामिल** वि. पूर्णता असलेला. [ फा.]

**कामिलाह** वि. पूर्ण. [फा.]

**कामी** वि. १. विषयासक्त; कामुक : 'कामी कोपी लोभी जे संसारांत पावती भ्रमते।' - मोविराट ४.६०. २. इच्छा करणारा; अभिलाषी.

**कामी** वि. १. उपयुक्त; उपयोगी पडणारा (माणूस). २. उद्योगी; तत्पर; नेहमी कामात असणारा : 'कामी निकामी लोकां। बरें पाहे।'- दास १२.१.१९. [ सं. कृ + कर्म]

**कामीक** वि. विषयासक्त : 'कामीक म्हणे परमप्रीति। बैसे मंचकी वल्लभे।' - मुविराट २३.१३५. [ सं. कम् ]

**कामीक-ष्ट** वि. उद्योगी (माणूस). (राजा.) [ सं. कृ + कर्म ]

**कामीट** पहा : **कांबीट**

**कामीठा** पु. दुकान; कारखाना : 'आवघी मिळोनि कामीठा चालवीति :' - दृपा १८.

**कामीण-न** स्त्री. कावीळ. याने डोळे, अंग, नखे इ. पिवळी होतात व त्या माणसाला सर्व वस्तू पिवळ्या दिसतात : 'कामीण होतो नेत्रासि। पीतवर्ण चंद्र भासे त्यासी।' - भवि १३.१०२; 'कामीन जयाच्या जाहाली नेत्रासि। देखे तो चंद्रासी पीतवर्णा' - तुगा २११०.[सं. कामला]

**कामीन** स्त्री. सुंदरी : 'चिंतागत झाली कामीन सखयासाठी।' - ऐपो ३४२. [सं. कामिनी]

**कामील** वि. कमाल; कमाल आकार : 'मौजे कायगाव ज्याची कामील जमा चार हजार पाचशे एकसष्ट हा गाव नारायण भट यास इमान बक्षीस दिले.' - नादीपा ६७.

**कामील** वि. कट्टी; घनघोर : 'सहा महिने कामीलँ लढाई होऊन शेवटी तह ठरला.' - दसकैया २३६.

**कामील** पु. होनाचा एक प्रकार.

**कामुक** वि. १. विषयी; स्त्रीलंपट; कामीक : 'नविये आवडीचेनि भरें। कामुक निजवनिता विसरे।' - ज्ञा १.१८७. २. इच्छा करणारा; फलासक्त; लोभी : 'आचरे कामुकु जैसा। कर्मी भरू होआवा तैसा।' - ज्ञा ३.१६९. (समासात) विद्याकामुक, धनकामुक, पुत्रकामुक. [सं.]

**कामुकी** स्त्री. १. विलासिनी स्त्री. २. स्वैरिणी. [ सं ]

**कामुनी** स्त्री. औषधी वनस्पती. हिची फळे लहान मिच्यासारखी, लाल रंगाची व आंबटगोड असतात.

**कामेरपण** न. शेतकाम.

**कामेरा** स्त्री. कामकरी स्त्री; मोलकरीण; मजुरीण. (गो. कु.)

**कामोखी** स्त्री. लोहाराचा, तांबटाचा चिमटा.

**कामोद** पु. संगीत गायनशास्त्रातील एक राग. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर. [सं.]

**कामोदनट** पु. (संगीत.) कल्याण थाटातील एक राग; कामोद आणि नट या रागांचा जोडराग. गाण्याचा समय रात्र.

**कामोळी** स्त्री. छडी : 'हाति घेउनि कामोळी। पखावो वाजविती चंद्रसूर्यकारा' - उह १०३-१०४.

**काम्दार** पु. व्यवस्थापक. (झाडी)

**काम्य** वि. १. आनंददायक; इष्ट; पसंत पडणारे; सुखदायक. २. पुढे काही फायदा होईल किंवा चांगले होईल अशा इच्छेने केलेले काम; इच्छित कर्म करायला योग्य : 'केलें काम्य कर्म तैसें।' - ज्ञा १८. १०३. ३. हेतू; इच्छा; इच्छित वस्तू; गोष्ट; 'येणें विधि पुर्ष्ये वाहतां। काम्य होय तुम्हा त्वरिता।' - गुच २७. ५८.[सं. कम् = इच्छा करणे]

**काम्यकर्म** न. फलाशापूर्वक कर्म; मनात इच्छा धरून केलेले कर्म : 'आपण शास्त्रास अनुसरून जें कर्म करतों ते काम्यकर्म होय.' - गीर ५५. [सं.]

**काम्यदान** न. १. आनंददायक देणगी. २. मनातील इच्छा पुरी होण्यासाठी केलेले दान; केवळ मनाच्या प्रेरणेने दिलेली देणगी. [सं.]

**काम्यधर्म** न. मनात इच्छा ठेवून केलेला धर्म; इष्ट हेतू साधण्यासाठी केलेले व्रतनियमादी कृत्य.

**काम्यप्रीति-ती** स्त्री. मनातील इच्छा तृप्त होण्याकरिता किंवा मोबदला मिळवण्याकरिता केलेले प्रेम.

**काम्यभक्ति-क्ती** स्त्री. फलप्राप्तीच्या इच्छेने केलेली भक्ती.

**काम्यमरण** न. १. काही इष्ट हेतू सिद्धीला जावा यासाठी पत्करलेला मृत्यू. २. इच्छामरण.

**काम्यव्रत** न. फलप्राप्तीच्या आशेने केलेले व्रत. [सं.]

**काम्र** न. नगरपालिका. (गो.) [पो. कामर]

**काय** पु. देह; शरीर; (विप्र.) काया : 'तैसें मनें वाचा कायें। भलतया दुःख देतु जाये।' - ज्ञा १८. ६५६. [सं.]

**काय** न. पणा (भाववाचक) या अर्थाचा प्रत्यय. जसे : - किरपीनकाय = कृपणपणा. (गो.)

**काय** क्रिवि. प्रश्नार्थक किंवा आश्चर्य उत्पन्न करणारे अव्यय.

**काय** सना. १. कशाचा; कसला; कोणता : 'आनृण्य न जोडावे तरि आम्ही अर्थ जोडिला काय।' - मोभीष्म १२. ६०. २. जे; जे काय. ३. किती मोठा; केवढा : 'दुःखामयेंचि सरलें, सुख काय सांगें।' - वामन स्फुटश्लोक ६९. ४. मुळीच; काहीच; काही सुद्धा : 'पांचा नळांत जेव्हां काय दिसेनाचि भेद लव तीस।' - मोवन ४. ७१. ५. तुच्छतादर्शक : 'हा काय रत्नभोक्ता मारू अनुताप पावुनी हाका।' - मुआदि ३२. १७. ६. एखाद्या समुच्चयातील निरनिराळ्या वस्तू किंवा निरनिराळे प्रकार दाखवणारे सर्वनाम. ७. द्विरुक्ति (काय काय); संख्याविस्तार, भेद याबद्दल आश्चर्य दाखवण्यासाठी. एखाद्या पदार्थाचा विशेषपणा किंवा भिन्नपणा दाखवण्यासाठी.

**कायए(ये)क** काही; किती; कोणी; कित्येक : 'काययेक उपजती मरती।' - तुगा ७२५.

**कायक** वि. काहीएक; कोणते : 'दिनानाथ द्वारकाचीय साह्य जरी तरी कायक न करी।' - राजा ११.

**कायक** न. (वन.) खोड व पाने यांचा संपूर्ण अभाव असलेले व कधी कधी मुळासारखे दिसणारे, साधी उपांगे असलेले, एककोशिक किंवा अनेककोशिक अग्रभेदित शरीर. उदा. शेवाळे, कवक, दगडफूल.

**कायकी** क्रिवि. कोण जाणे; ठाऊक नाही अशा अर्थाचे उत्तर.

**कायकुरवंडी** स्त्री. आत्मदान; स्वयंबलिदान : 'कायकुरवंडीच्या बाबतींत सेनापती बापटांचे म्हणणे असें की' - के २५. ७. १९३९.

**कायकोशिका** स्त्री. (वन.) वनस्पतीतील प्रजोत्पादक अवयवांखेरीज शरीराच्या इतर कोणत्याही भागातील कोशिका.

**कायकोळ** स्त्री. कावीळ. (गो.)

**कायकोळ** स्त्री. कलिंगडाची वेल. (गो.)

**कायखेड** पु. (वै.) गर्भ वाढत असताना उत्पन्न होणारा प्राथमिक शरीरमूलांश. [सं.]

**कायजा** पु. घोड्याचा लगाम. [फा. कायजाइ]

**काय जाणे** उद्गा. कोण जाणतो; कोणाला ठाऊक; कोण सांगेल (काही लोकांत हा प्रयोग रूढ आहे.).

**कायटिन** न. काही सजीवांच्या बहिर्त्वचेतील पांढरा कठीण भाग; बहिर्त्वचेतील कठीण श्वेतद्रव्य.

**कायटी** स्त्री. घालमेल.

**कायडो** पु. कर्तव्यकर्म. (गो.)

**कायणी** स्त्री. कहाणी; गोष्ट. (कु.)

**कायणू(नू)बायणू(नू)** क्रिवि. काहीतरी. पहा : **काणुबाणु**

**कायत-थ-स्छ** पु. कायस्थ; एक हिंदू जात. यांचा धंदा लेखकाचा - विशेषतः विक्रीसाठी काढलेल्या ग्रंथाच्या नकला करण्याचा असे. हे उत्तर हिंदुस्थानाचे रहिवासी आहेत. यांना कायस्थ असे जरी म्हणतात तरी दक्षिणेकडील कायस्थ प्रभूंशी यांचा काही संबंध नाही. कायस्थ प्रभू हे क्षत्रिय आहेत. [सं. कायस्थ]

**कायती** वि. कायत जातिविषयक (लिहिण्याची एक पद्धत).

**काय तो** उद्गा. (तिरस्कारदर्शक) कःपदार्थ; यःकश्चित.

**कायदा** पु. नियम; व्यवहार; धर्मशास्त्र; शिरस्ता; वहिवाट; प्रथा; विधिमंडळाने मान्य केलेला, सर्व नागरिकांना किंवा विशिष्ट नागरिक वर्गाला लागू पडणारा, जो मोडल्यास गुन्हा धरला जाऊन इलाज करण्यात येतो किंवा कोर्टात खटला चालून योग्य ती शिक्षा होऊ शकते असा नियम : 'समाजनियमनाच्या अनेक साहित्यांपैकी कायदा हें एक साहित्य होय.' - ज्ञाकोक २८२.[फा. काइदा] (वा.) **कायद्याने कुरीनिसात करणे** – हात वस्त्राने बांधून मग कुरनिसात किंवा वंदन करण्याची दरबारी रीत : 'निर्मलवाल्याने हात बांधून नबाबाजवळ कायद्याने

कुरनिसात करून उभा राहिला' - नाम २, १३.

**कायदा** पु. लगाम. पहा : **कायजा** : 'अचानक राजांनी कायदा ओढला.' - श्रीयो २. १२७.

**कायदा** पु. (तबला) तालाचा एक प्रकार; ज्यामध्ये अर्धी मात्रा (उदा. ३॥ मात्रा) येते असा ताल : 'तबल्याच्या कायद्यात तासतास सहज घुमणारा हा वस्ताद...' - व्यव ११७.

**कायदे आझम** महात्मा; महानेता. [फा.]

**कायदेकानु** पु. अव. कायदे, नियम इ. बंधनकारक गोष्टी : 'वसूलीची सूट, तहकुबी, तगाई, अतिक्रमण वगैरेसंबंधाने सरकारने कायदेकानू केले आहेत.' - गांगा ५८.

**कायदेकौन्सिल** न. विधिमंडळे; ज्या प्रतिनिधिमंडळात (लोकनियुक्त, सरकारनियुक्त) कायदा मान्य केला जातो ते मंडळ. भारतात प्रत्येक राज्यात राज्यपाल आणि विधिमंडळ असते.

**कायदेपंडित** वि. कायद्यात निष्णात; कायद्याचे उत्तम ज्ञान असणारा.

**कायदेबाज** वि. कायद्यात तरबेज; कायदेपंडित; कायद्याचा उत्तम उपयोग करू शकणारा.

**कायदेभंग** पु. आपल्या विवेकबुद्धीला अयोग्य वाटणारा कायदा पूर्वसूचना देऊन जाहीरपणे मुद्दाम मोडणे : 'इ.स. १९२७ मध्ये गांधीजींनी कायदेभंगाची चळवळ सुरू केली.' - के.

**कायदेभंग** पु. १. कायदा मोडणे. २. भारतीय स्वातंत्र्यलढ्यात या शब्दाला विशेष अर्थ प्राप्त झाला. राजकीय ध्येयप्राप्तीसाठी अहिंसात्मक मार्गाने, कायदा पालन करण्याचे नाकारणे; शांततापूर्ण साधनांनी कायद्याचा प्रतिकार करणे.

**कायदेमंडळ** न. कायदे करणारी संस्था.

**कायदेशीर** क्रिवि. कायद्याप्रमाणे; नियमाप्रमाणे; कायद्याबरहुकूम; ठरावाप्रमाणे; सशास्त्र; न्याय्य (वागणारा).

**कायद्याचा बळी** जुलमी कायदे मोडल्यामुळे शिक्षा मिळालेला माणूस.

**कायनाते** न. मासळी नसलेली कांद्याची आमटी. पहा : **आंब** (गो.)

**कायपत्री** स्त्री. एक प्रकारची साल; जायपत्री; मायपत्री; खोटी, नकली जायपत्री.

**कायपात** पु. आरडाओरडा; आकान्त : 'लोकरीची पॅन्ट असली म्हणून इतका कायपात काही करायला नको.'- कोसला २१५.

**कायपुर-री** न. स्त्री. देह; शरीर : 'कायपुर नगरीचा पाटील.' - आत्मा. [सं.]

**कायपुळी** स्त्री. पाठीवर होणारी काळपुळी.

**कायपोषी** वि. शरीर पुष्ट करणारा; शरीराची वाढ करणारा. [सं.]

**कायफळ** न. १. एक लहान झाड. याचे साल व बी औषधाच्या उपयोगी असते. हे सुगंधी उटण्यात वापरतात. २. रानजायफळ. ३. हरदासी कोटीत जायफळ, मायफळ, कायफळ या तिघांचा संबंध आणून जायफळ = लहान मूल, नुकतेच जन्मलेले मूल (जे जायचे = मरायचे आहे), त्याची माया धरून - मायफळ = कायफळ (= काय लाभ) आहे अशी विनोदी रचना करतात. [सं. कटफल]

**कायम** वि. सततचे; स्थिर; टिकाऊ : 'मुलूख सरंजामास देऊन केली कायम गलिमाई, मनुष्यमात्रादिकांचें माहेर होति पेशवाई.' - ऐपो ४२१. (क्रि. करणे.) [फा. काइम]

**कायमजुबान** वि. एकवचनी; सत्यवक्ता; शब्द मागे न घेणारा : 'फरासीस कायम जुबान व बहादर आहे.' - चिरा २४.

**कायमठशाचे** वि. ठरावीक पद्धतीचे : 'सभेचे ठराव कायमठशाचे झाले आहेत.' - लोटिकेले १. ५३५.

**कायमदायम** वि. निरंतरचे; नेहमीचे; पक्के; टिकाऊ. [फा.]

**कायमधारा पद्धत** ज्यात शेतीसाठी प्रतिवर्षी भरायचा सारा पिकाच्या प्रमाणात कमीजास्त होत नसून निश्चित केलेला आहे अशी पद्धत : 'कार्नवालिसने कायमधारा पद्धत सुरू केल्यावर...' - सोबां ४९.

**कायमनिधी** पु. जिच्यातला पैसा वापरता येत नाही अशी बाजूला ठेवलेली रक्कम : 'त्याशिवाय कायमनिधि म्हणून तीन लाख रूपये' - माविदि ८३

**कायम मकाम** एक अधिकारी गेल्यानंतर त्याच्या जागी नेमण्यात आलेला: 'येक अधिकारी तगीर होऊन त्याचे कामावर दुसरा होणें त्यास कायम मकाम म्हणावें.' - मइसा ७. ९५. [फा.]

**कायममिजाज-स** वि. निश्चयी; करारी; अचंचल; दृढचित्त :'साप्रंत तिकडे कायममिजाज व मजबूत एक नबाब नजबखान आहेत.' - दिमरा३. ८; 'आसाहेबी कायममिजास जाणोन.' - ऐलेसं ३५७५.[फा.]

**कायममिजाजी** स्त्री. करारीपणा; निश्चयीपणा : 'यांचे कायम मिजाजीचा प्रकार म्हणावा तरी मेणाचें नाक यांचा मिजाज आहे.' - दिमरा १. २३८.

**कायमाय** वि. काही. (कु.) [ कायचे द्वि. काही बाही]

**काय(ई) मी** स्त्री. निश्चिती; स्थैर्य; मजबुती : 'कलकत्तेकरांचि लिहिणे रास्त, दुरस्त व कायमीचे.' - ऐलेसं ७. २५६८. [फा.]

**काय म्हणून** कशाकरिता.

**कायर** वि. लाचार; भित्रा : 'ते कायर जाले.' - होकै ३६. [फा. काहिर; सं. कातर]

**कायरस** पु. १. कोणत्याही हिरव्या फळांचे पंचामृत. २. अंगरस; पाणी न वापरता काढलेला रस.

**कायरा** क्रिवि. कोठेतरी; कोठे कोठे; माहीत नसलेल्या जागी; एकीकडे सांधीकोपऱ्यात. हे अव्यय असले तरी याची रूपे सर्वनामाप्रमाणे किंवा विशेषणाप्रमाणे लिंगवचनानुरूप बदलतात. उदा. काय रे (पु. अव.), कायरी (स्त्री. एव), कायर्‍यो (स्त्री. अव.), कायरां (न. ए.), कायरी (न. अव.). (चि.)

**काय रे** उद्गा. समवयस्कांना अथवा लहानांना प्रश्न विचारण्यापूर्वी वापरायचे संबोधनात्मक उद्गारवाचक.

**कायरेसे, कायरासा** क्रिवि. कोठेसे; कोठेतरी. (चि.)

**कायल** पहा : **काईल** (वा.) ० **करणे** - फजीत करणे. (व.)

**कायल** स्त्री. मोठी काहील; कढई. (कु.)

**कायल** वि. निरुत्तर; दीन : '... तें पाहून बापू कायल जाले.' - सव ३८.

**कायलाधो** पु. लोखंडी कलथा. (गो.)

**कायली** स्त्री. काहिली; भडका; लाही : 'ना अन्न ना पाणी, भडका

उडाल्यागत पोटात कायलीच घातली.' - ऊन ७२. (गो. कु.)
**कायले** क्रिवि. कशाला : 'मी कायले खाऊजी महारोग्याईच्या हातचे आंडे? - अगतिका ५३.
**काय(ह्या)ले** क्रिवि. कशाला; कशाकरता; का म्हणून. (ना.)
**कायलोण** न. काहील. (गो.)
**कायलोळी** स्त्री. १. आंबोळी; धिरडे. २. एक प्रकारची पोळी. (गो. कु.)
**कायशी-सी-से** वि. कितीशी; कोणती; कशाची; काय होय; कशाचे; कशाला; क्षुद्रतादर्शक; कःपदार्थ : 'इतरांची शक्ति कायशी ।' - विपू १.५७.
**कायस** पु. कळस; घागर. [सं. कलश] (वा.) **कायसाचे पाणी पडणे** - लग्न झाल्यावर कन्यातले पाणी अंगावर टाकणे; लग्न होणे : 'एक डाव आंगावर का कायसाचं पानी पडलं त कसी दिसते मून.' - वानगी २४२.
**कायसया** क्रिवि. वि. कशाला, कशाचे : 'सांगा कवण तें ब्रह्म। कायसया नाम कर्म।' - ज्ञा ८.२.
**कायसा** वि. १. (अनिश्चितार्थी) एखादी गोष्ट निश्चित न आठवता तिची साधारण आठवण असताना योजतात. २. कशासारखा. ३. कशाचा : 'जर्नी मूर्ख हो बोल कायसा आतां।' - दावि १७८. ४. कशासाठी; कशाकरिता; काय फायद्याचा; काय उपयोग : 'तेथें कायसा या ग्रंथाचा उद्यम।' - विपू ७.१५४. ५. काहीतरी (अनिश्चिततादर्शक.).
**कायसाच** वि. कसाचसा; कसासाच; बरोबर वर्णन करता येत नाही असा, चमत्कारिक; आश्चर्य उत्पन्न करणारा.
**कायसाठी** क्रिवि. कशासाठी. (व.)
**कायसे** न. काहीसे : 'असेंच कायसें तुम्ही म्हणाला होता खरें' -अस्तंभा ६६. क्रिवि. केवढेसे.
**कायसेना-नी-ने** क्रिवि. कशाने; कोणत्या कारणाने : 'कायसेनि पाहुणेरू क्षीरसागरा ।' - ज्ञा १०.११.
**कायसेसे** क्रिवि. काहीतरी एक : 'मुलांसाठी बाईसाहेबानीहि कायसेसें केलें आहे.' - कोरकि १६.
**कायस्थ** पु. १. हिंदूंची एक जात व त्या जातीतील व्यक्ती. प्रभूंच्या दोन (कायस्थ व पाताणे) भेदांपैकी एक भेद. लिहिणे हा त्यांचा व्यवसाय होता : 'जितकी कदर एखाद्या दासावर किंवा कायस्थावर (कारकुनावर) तितकीच कदर आपल्या....मानीत नसत.' - चंद्र १०६. २. कास्त. ३. पहा : **कायत** [सं.]
**काय हो** उद्गा. १. वयाने वडील असलेल्यांना किंवा आदरणीय व्यक्तीला प्रश्न विचारण्यापूर्वी वापरायचे संबोधनात्मक उद्गारवाचक. २. आश्चर्य, नापसंती इ. दर्शविणारा उद्गार.
**काय होय** उद्गा. काय पर्वा आहे; काय उपयोग आहे : 'आंधळ्याला बगीच्या काय होय.' - निमा ५१०.
**काया** स्त्री. देह; शरीर; रूप; आकार; अंग : 'याति वृक्षवल्ली होत्या कोमेलिया। त्यासि कृष्णें काया दिव्य दिली।' - तुगा ५२.[सं. काय] (वा.)० **दाखविणे, दिसणे, पाहणे** - (रोगी व वैद्य, पती-पत्नी अथवा पुनर्विवाहाला अनुकूल असलेली विधवा यांच्या संबंधी प्रयोग करतात) अंग उघडे करणे. ० **झाकणे, उघडी टाकणे, उघडी पडणे** - या वाक्प्रचारात काया शब्दाने शरीराचा जो भाग सभ्याचारानुसार अवश्य झाकला पाहिजे त्याचा बोध होतो. हा शब्दप्रयोग स्त्रियांच्या बोलण्यात येतो. अंग, आंग (देह, शरीर, तनु नव्हे.) या शब्दांनाही वरील वाक्प्रचारात तोच अर्थ निघतो. ० **पडणे** - मरणे. ० **पालटणे, फिरणे, बदलणे** - आजारानंतर शरीर सतेज होणे. **कायावाचामने-करून** - शारीरिक, शाब्दिक, मानसिक यांनी युक्त; शरीराच्या सर्व अवयवांनी, इंद्रियांनी व मनाच्या कल्पनांनी युक्त; सामान्यतः सर्व प्रकारांनी मनःपूर्वक (एखादे कृत्य करणे.).
**कायाकल्प** पु. शरीराला पुन्हा तारुण्य प्राप्त करून देण्याचा प्रयोग. [सं.]
**कायापालट** पु. बाह्य स्वरूपातील बदल; व्यक्ती, वस्तू, संस्था यांच्यात फार मोठ्या प्रमाणावर होणारा बदल : 'कायापालट झालेल्या या पंथाची' - संसाफ ६४.
**कायापूर** पु. देह, शरीर.
**कायाप्रणीत** न. साष्टांग नमस्कार : 'म्हाइंभटीं कायाप्रणीत केले.' - लीचउ १३३.
**कायावाचामानस** न. शरीर, वाणी व मन; देह, वाचा आणि आत्मा.
**कायिक** वि. शारीरिक; देहाविषयीचे प्राकृतिक. [सं.]
**कायिकवृद्धी-व्याज** स्त्री. (शारीरिक श्रमाच्या प्राप्तीला अनुसरून) दररोज अगर मासिक द्यायचे व्याज. याऐवजी कायिकव्याज किंवा कायिक वृद्धी असेही म्हणतात.
**कायिक संवेद्यता** स्त्री. (वै.) शरीराची जाणीव शक्ती; शरीराला होणारी (स्पर्श व गतीची संवेदना धरून.) जाणीव. [सं.]
**कायिसा** क्रिवि. कशाकरिता.
**कायी** न. हिरवे फळ. [क.]
**कायेबद्दल** क्रिवि. काय म्हणून; कशासाठी : 'हवालदार बोलिलें कीं यास काये बदल आणिले?' - शिवसाखं ५.१६४.
**कायेर** वि. घट्ट मनाचा. (झाडी) [सं. कातर]
**कायेसी** वि. कसली; कसची; कितीशी : 'मातेची कृपा कायेसी।' - दास ४.८.२४.
**काये(वे)सी** पेच (क्रि. आणणे) पेचात आणणे : 'माधवरायास कायेसीत आणून पैका मागतात....' - शिंइसाभा १.३१.
**कार** पु. १. मर्म; मुद्दा. २. दंश : '...यशाधिकारी आणखीच (दुसराच कोणीतरी) होईल यांतील कार अुगवून लिहिण्यांत गेले.' - होकै १०९.
**कार** पु. जोंधळ्याची, ज्वारीची एक जात.
**कार** पु. काम : 'त्या मवाफीक कार सुरत-पिजीर होऊन' - पया ३८४. [फा.]
**कार** पु. स्त्री. १. एक प्रकारचा काळा व टणक दगड : 'गोटमालाच्या कारी डोईवर वाहून म्या घर बांधलं.' - पडरे ५१. २.दगडांची खाण : '(सोन्या) बगल देऊन मोकळ्या अंगानं कारीकडं पळाय लागला.' - गोता १७.

**कार** पु. करार; ठराव; वचन. (क्रि. करणे, ठरवणे.) : 'आम्ही त्याचा मोडुनि कार।' - अफला २०. [ फा. करार ]

**कार** पु. कहार; पालखी वाहणारा भोई.

**कार** १. अक्षराच्या पुढे त्याचा निर्देश करण्यासाठी लावला जाणारा एक प्रत्यय. जसे :- अकार, ककार, पकार इ. २. कर्ता; करणारा या अर्थी संस्कृत शब्दापुढे लावण्यात येणारा एक प्रत्यय. जसे :- वस्त्रकार, शस्त्रकार, चर्मकार. [ सं. कृ ]

**कार** पु. खत; राब. (राजा. कु.)

**कार** पु. १. कारण : 'निमित्ताला कार नको म्हणून ती तशीच वाकली.' - ऊन ६४. २. कहार; अतिशय त्रास : 'धाबारा सालं काम करून घेतलेल्या बैलांचा मालकाला कार वाटला.' - गोता ११३. (बे.)[क.]

**कार** पु. माळ्याने आगराच्या - बागेच्या मालकाला द्यायचा आड उत्पन्नाबद्दल खंड. (गो.) [ सं. कर ]

**कार** स्त्री. मुलगी; लेक. (चंद्रपुरी)

**कार** न. सुजलेले नख. (कर.)

**कार** पु. शेवट; अखेर; परिणाम. (व.) (वा.) ० **करणे** - परिणामकारक होणे.

**कार** स्त्री. कोरफड; कुमारी. (व. कारपट्टा)[ सं. कुमारी-कुआरी-कार]

**कार** पु. पूर्वीच्या काळी जहाजावर नेमत असत. असा अधिकारी. याला दूरवर उंच उडणाऱ्या पक्षांची माहिती असे. होकायंत्राचा शोध लागण्यापूर्वी कार व पांजरी असे दोन अधिकारी प्रत्येक जहाजावर असत. (हेट.)

**कारआगाह** कामाची माहिति असलेला; अनुभवी.

**कारक** न. (व्या.) नामाचा क्रियापदाशी असलेला संबंध. ही कारके सहा आहेत - कर्ता, कर्म, करण, संप्रदाय, अपादान व अधिकरण.[ सं.]

**कारक** वि. करणारा; घडवून आणणारा; प्रेरणा देणारा; उत्पन्न करणारा. सामा.शब्द - शांतिकारक, पुष्टिकारक.

**कारक** वि. खतावलेली (जमीन). (राजा.)

**कारक** पु. व्यापाऱ्यांनी द्यायचा कर.

**कारक क्रिया** दुसऱ्या क्रियेला चालना देणारी क्रिया.

**कारक चेतापेशी** (वै.) स्नायू किंवा ग्रंथी यांना पुरवठा करणारी चेतापेशी.

**कारकनिमित्त** न. (तर्क) कारण; साधन; क्रियेची निमित्तभूत वस्तू. [ सं. कृ]

**कारकर्ते, कारकर्दे, कारकरदा** वि. अनुभवी; कार्य केलेला : 'स्थापित कारकर्दे श्रीमंताचे मनोगतांकित जाणून विनंतीपत्र देऊन पाठविले आहे.' - पेद २८.१९०.

**कारकर्दा** पु. कारभारी; मालक.

**कारकवाचा अक्षमता** (वै.) मेंदूतील वाचाकेंद्राला इजा झाल्यामुळे किंवा ते केंद्र नष्ट झाल्यामुळे बोलता न येणे हा दोष.

**कारकवेदन** न. (मानस.) स्नायुवेदन. यात होणाऱ्या वेदनांचा पंचज्ञानेंद्रियांशी संबंध नसतो.

**कारकक्षमता** स्त्री. कार्य करण्याचे सामर्थ्य, शक्ती.

**कारका** स्त्री. गारा; मेघातून पडणारे बर्फाचे तुकडे. पहा : **करक** [ सं. कृ = विकिरणे; करक = गार ]

**कारकारसई** स्त्री. बागेच्या मालकाला द्यावयाचा खंड; जमिनीचा खंड व इतर बाबी वसूल करण्याचा हक्क : 'त्याप्रमाणे तीन विभाग व वेठ बिगार व कारकारसई व फरफरमास तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने अनुभवून सुखरूप राहाणे.' - आठ इति १४९.

**कारकीर्द** स्त्री. अमलाची मुदत, काळ (राजाचा वगैरे राज्य करण्याचा काळ); राजवट; सत्तेचा काळ; अधिकाराचा, व्यवहाराचा काळ. [फा. कार + कर्द ] (वा.) ० **फिरणे** - एक राजवट जाऊन दुसरी येणे; राज्यक्रांति होणे : 'कारण पुण्यांतहि कारकीर्दी फिरल्या.' - पेद ४४.९.

**कारकुती** स्त्री. शहाणपण; अक्कल; कर्तृत्व.

**कारकुनाची मेहुणी** (ल.) कातरायची कातर (कातरी इकडेतिकडे पडते व लवकर सापडत नाही म्हणून विनोदाने म्हणतात).

**कारकुनी** वि. कारकुनासंबंधी.

**कारकुनी कावा-मत** कारकुनाचा धूर्तपणा, लबाडी, डावपेच. यावरून सामान्यतः कपट, लुच्चेगिरी.

**कारकून** पु. १. कामाचा माणूस; लिहिण्याचे काम करणारा; लिखापढी करणारा : 'महालीचे कार्कुनाने इस्कील करून दुम्बाला करीत नाहीत.' - मइसा २०.१५२. २. (ल.) धूर्त मनुष्य; हिशेबी व हुशार माणूस. (गो.)

**कारकुंडा** पु. तिरस्काराने कारकुनास म्हणतात.

**कारकूनीपेशा, कारकूनकी** पु. स्त्री. कारकुनाचे काम, धंदा, नोकरी.

**कारकूर** स्त्री. कुरकर असा आवाज : 'जुत्याची कारकूर बराच वेळ ऐकायला येत होती.' - त्रिशंकू ६.

**कारखानदार** पु. कारखान्याचा मालक. [ फा.]

**कारखानदारी** स्त्री. १. कारखाना चालविण्याचा व्यवसाय. २. यांत्रिक उत्पादन; कच्च्या मालाचा पक्का माल करण्याचा व्यवसाय.

**कारखाननीस** पु. कारखान्यातील मनुष्य; कारखान्याचा हिशेब ठेवणारा अंमलदार; सरकारी धान्याच्या कोठारावरील अधिकारी; आठ दरकदारांपैकी एक. [ फा. ]

**कारखाना** पु. व्याप; पसारा : 'घरचा कारखाना मोठा, त्यामुळे रोज कोणा ना कोणाशी तरी घासाघीस व्हावयाचीच.' - स्मरण ३५७.

**कारखाना** पु. १. जेथे एखाद्याचा व्यवहार चालतो अशी मोठी इमारत. जसे :- गलबते बांधण्याची गोदी; दारूगोळ्याचा कारखाना, यंत्रशाळा वगैरे कोणतेही प्रचंड काम, धंदा वगैरे व तो चालविण्याकरिता ठेवलेला परिवार, खाते : 'तमाम कार्खानिजात चराईस जाण्याचा हुकूम जाला.' - मइसा ७.१६६. २. कोणतीही धंद्याची जागा. ३. संभारगृह.[फा.]

**कारखैर** न. शुभकार्य : 'तुम्ही आपुला भाउवाचा लेक बेटा करून पाहिला त्याचे कारखैर केले.' - शिचसाखं ४.४.

**कारगत** स्त्री. कारकीर्द. (चि.)

**कारगार** (गी) वि. कारेगार; कारेयर; परिणामकारक : 'म्हणजे मोर्चे कारगार करून कार्य सिद्धीते पाववितो.' - वैस १७४२.३०.

**कारगुजरी** स्त्री. बाजारपेठ. [हिं.]

**कारगुजार** वि. कामकाजात हुशार; अनुभविक. [हिं.]

**कार(रं)च(ज)कर, कारजगार** पु. खंजीर इ. शस्त्रे आणि चाकू, सुरे, वस्तरे वगैरे वस्तू तयार करणारा; शस्त्रकार; भांडी करणारा कासार; चिलखत करणारा. [सं. क्रकचकार]

**कारचक्का** पु. बाज पक्षी. [तुर्क.]

**कारचोबी** वि. जरीचे; वेलबुट्टीदार : 'सनगें जरी बादली कारचोबी सोनेरी एकूण.' - समारो ४.७२. पहा : **कार्चोबी**

**कारज** न. काळीज; हृदय. (चंद्रपुरी)

**कारजगार** पु. शिकलगार; कारागीर.

**कारट** पहा : **कारिंट**

**कारट** न. १. अंत्यविधी : 'मेलेया वीजे ते कां करा ना? याचा कारटु करा।' - लीचउ ३७८. २. और्ध्वदेहिक कार्याला कुत्सितार्थी म्हणतात. ३. ती क्रिया करणाऱ्या ब्राह्मणाला दिलेली दक्षिणा. (को.)

**कारटमढ** पु. स्मशानाजवळचे देऊळ : 'कारट मढासि बीजें केले :' - लीचपू २८१.

**कारटा-ट्या, कारटखाऊ** वि. और्ध्वदेहिक क्रिया करणाऱ्या ब्राह्मणाला उपहासाने म्हणतात : 'कीं प्राणी पावल्या मृत्यूसदन। संतोषती कारटे ब्राह्मण।' - मक ४९९.

**कारटाइ** स्त्री. पुस्तक. पहा : **कार्ताइ**

**कारटापोरटा** पु. खोडकर, व्रात्य, द्वाड मूल. [सं. कुमार-कुआर + टा]

**कारड** पु. कागदाचा करंडा; खोका; पेटी : 'साडेबावीस रुपयांच्या (मोमबत्त्या) सुमारे ७३९ कारड सोळा धरून बराबर' - पेद १६५. [इं. कार्ड बोर्ड]

**कारडोल** न. काजूच्या बियांचे तेल.

**कारण** न. १. कोणत्याही दुसऱ्या गोष्टीवर अवलंबून नसलेले, कार्य घडवण्यास आवश्यक, जे कार्योत्पादक ते; निमित्त; कार्यप्रवर्तक; प्रमाण; आधार; ज्यामुळे एखादी गोष्ट घडते ते. ही कारणे तीन आहेत - समवायी, असमवायी व निमित्त (अंतस्थ किंवा अविभाज्य, दूरस्थ किंवा अप्रत्यक्ष, साधनभूत किंवा आकस्मिक; कारण याचा प्रथमार्थी कर्तृत्व, हेतु, अपेक्षा, प्रेरणा, उद्देश, आधार इतक्या अर्थी प्रयोग होतो): 'तयाही बोधा कारण। जाणता मीचि॥' - ज्ञा १५. ४३८. २. प्रयोजन; हेतू. ३. गरज, काम, प्रसंग. ४. मुंज किंवा लग्नासारखा कोणताही समारंभ. ५. साधन; उपकरण; घटक; मूलतत्त्व; आद्यद्रव्य. ६. (न्याय) नियतपूर्व; दुसऱ्या कोणत्याही गोष्टीवर अवलंबून नसणारे. ७. मसलत: 'हाता चढे धन। ऐसें रचिले कारण।' - तुगा १८४०. ८. कार्य : 'जाऊं दे सावित्री, मज करूं दे कारण।' - वसा ६७. ९. इच्छित वस्तू; सृष्टीचे आद्य तत्त्व : 'तेथ इच्छा आणि बुद्धि। घडवी अहंकारेंसी आधी। मग तिया लाविती वेधीं। कारणाच्या॥' - ज्ञा १३. ९६९. १०. साध्य : 'तें परब्रह्म निर्वाण। जें आत्मविदांचे कारण।' - ज्ञा ५. १४९. ११. (वेदांत) महत्तत्त्व, अहंकार व सूक्ष्म पंचमहाभूते (आनंदगिरीचे मत); पंचज्ञानेंद्रिये, त्यांचे पाच विषय मन, बुद्धी व अहंकार इ. (शांकरमत भगवद्गीता १३. २०. बहाणा; सबब. [सं. कृ = करणे] (वा.) **कारणी लावणे** - कामाला, उपयोगाला लावणे, आणणे (देह, द्रव्य, सामर्थ्य, आयुष्य, जन्म इ.) : 'कारणीं लावोनि करील सार्थक।' - दावि ३९१. **० पडणे** - गरज पडणे.

**कारणत्व** न. १. कारण असणे; कारणरूप असणे. २. (तत्त्व.) कारणाचा धर्म; कार्यकारणातील अथवा सामान्यतः एकमेकींशी संबंधित घटनातील संबंध. [सं.]

**कारणदेह; कारणशरीर** पु. न. देहचतुष्टयांपैकी तिसरा देह. याला अविद्येचे किंवा अज्ञानाचे अधिष्ठान आहे. [सं.]

**कारणपरत्वे** क्रिवि. कारण पडल्यास; जरूर लागल्यास : 'कोंडोभटाबरोबर मात्र ती कारणपरत्वे बोलत होती.' - स्वप २१४.

**कारणपरंपरा** स्त्री. एखादी गोष्ट घडण्यासाठी कारणीभूत होणाऱ्या घटनांची आनुषंगिक साखळी : 'जर आपण प्रत्येक कृत्यामागे असलेली कारणपरंपरा पाहू लागलो तर प्रत्येक कृत्याचे स्पष्टीकरण होते.' - ब्राह्मण ४८.

**कारणवादी** पु. (कायदा) वादी; फिर्यादी. [सं.]

**कारणव्यापार** पु. (तत्त्व.) कार्य-कारण संबंधातून घटना घटित होण्याची प्रक्रिया. [सं.]

**कारणा** स्त्री. १. (अशिष्ट) करुणा; दया; कृपा. २. गयावया; काकळूत; विनवणी. (क्रि. भाकणे.)

**कारणि(णी)क** वि. १. उपयुक्त; जरुरीपुरते : 'कारणिक लढाऊ लोक मात्र किल्ल्यात ठेविले.' - भाब ३६. २. घडवून आणणारा; व्यवस्था ठेवणारा. ३. कारणपरत्वे घडलेला; निमित्तपूर्वक बनलेला : 'गौळीयाचे घरीं देखा। कृष्ण उपजला कारणिका।' - गुच ८. ५४.

**कारणि(णी)क** पु. राज्याचा मुख्यमंत्री किंवा सावकारी जहाजावरील मुख्य गुमास्ता; कारभारी; व्यवस्थापक : 'इतर कारणी भले लोळविले।' - ऐपो २०९. [सं.]

**कारणी-णे** शअ. १. चतुर्थी विभक्तीचे लक्षण; स्तव; साठी; करिता; मुळे. २. ठिकाणी : 'देवकारणीं लाजाळू।' - दास २. ५. ३०. ३. कडे : 'तेव्हां त्या तेलिणीनें। पाहिलें विक्रमाकारणें।' - शनि २८७.

**कारणीभूत** वि. कारण झालेला; जबाबदार : 'हे व्यसन बोकाळायला द्रव्यदृष्टीही बरीच कारणीभूत होते.' - भासं १३८.

**कारणोत्तर** न. (कायदा) विशिष्ट मुद्दा कबूल न करता वादीचे म्हणणे कबूल करणे; विशेष हरकत घेणे. [सं.]

**कार(ड)तुस** न. बंदुकीतून उडवायची दारू व शिशाची गोळी असलेले कवच. [इं. कार्टरिज]

**कारनीस** न. गलथा; कंगोरा; कंगणी : 'भिंतीच्या माथ्यासभोवती लाकडी कारनीस बसवावे.' - मॅरट ७७. [इं. कार्निस]

**कारनेकी** स्त्री. खुशाली; कुशल; क्षेत्र.

**कारपदाझी** पहा : **कारपर्दाझी**

**कारपरदाज** पु. कार्यकर्ता; मुत्सद्दी; कारभारी : 'नबाबाकडून पत्रे यास आली जे, कारपरदाज यांनी शिंदे यांच्या हातून इंग्रजांचा सलूख केला.'

- मशियांका २२१.

**कारपरदार** पु. कारभारी : 'बाबासाहेबांस पद मोठे मिळावे याजकरतां महाराजांचे कारपरदार मोठमोठी माणसें' - नामोका २.

**कारपर्दाझी** स्त्री. कामात गढणे. [फा.]

**कारपुरी** रूपयाचा एक प्रकार.

**कारबेल** पु. एखादा लाकडी सर वगैरे ठेवण्याकरिता भिंतीतून पुढे काढलेले दगडी किंवा लाकडी ठोकळे : 'दगडाच्या ठोकळ्याऐवजी कारबेल्स भिंतीत घालावे.' - मॅरट ६०. [इं. कार्बेल]

**कारभार** पु. १. राज्य, सावकारी किंवा एखादा धंदा अंगावर घेऊन त्यासाठी करायची सर्व तऱ्हेची खटपट, व्यवस्था, उद्योगधंदा; काम; कार्य. (क्रि. हाकणे, चालवणे, टाकणे.) २. नको तेथे केलेली लुडबूड. [सं. कार्यभार]

**कारभारी** पु. १. व्यवस्थापक; कारभार करणारा; मोठा धंदा चालविणारा; राजाचा मुख्यमंत्री किंवा दिवाण. २. (सामा.) व्यवस्था पाहणारा कोणीही प्रतिष्ठित गृहस्थ (मग तो स्वतःच्या घराची किंवा मालकाच्या घराची किंवा धंद्याची व्यवस्था पाहत असला तरी.) ३. बायकोने नवऱ्याचा उल्लेख करताना योजायचा शब्द. (को. खा. कुण.) ४. (ल.) उठाठेवी करणारा माणूस.

**कारभारीण** स्त्री. १. कारभाऱ्याची बायको किंवा एखाद्या कामाची स्वतः व्यवस्था पाहणारी स्त्री. २. नवऱ्याने बायकोचा उल्लेख करताना योजायचा शब्द. (को. खा. कुण.)

**कारभारी मंडळ** सरकारी किंवा एखाद्या संस्थेच्या अधिकाऱ्यांची मंडळी; व्यवस्थापक मंडळी; राजाचे मंत्रिमंडळ.

**कारभारी मुखत्यार** १. राज्याचा मुख्य प्रधान. २. मुख्य व्यवस्थापक किंवा मुख्य चालक.

**कारमान्य** न. १. पीडा देणारे जादूचे कृत्य; जारणमारण; चेटूक. २. खोटा व्यवहार; कचाट; खटले; कवटाळ. (क्रि. करणे, रचणे, योजणे, मांडणे.)

**कारमुलकी** पु. १. अनेक देशांत, प्रांतावर अधिकार असलेला. २. सुमंत. (राजकोश) [फा.]

**कारमोरी** वि. वैशाख महिन्याच्या विणीत जन्मलेले कोकरू (मेंढी वैशाख किंवा कार्तिक महिन्यात विते.). (जुन्नरी)

**कारला** पु. स्त्रियांच्या हातातील कारल्यासारखा बांगड्यांचा एक प्रकार.

**कारली-ले** स्त्री. न. १. एक भाजी व तिचा वेल; कुरेवी. याचे फळ कडू व सुमारे वीतभर लांब असून, अग्निदीपक, अत्युत्तम कफनाशक आहे. पांढरे व हिरवे अशा याच्या दोन जाती आहेत. २. काही लोक करडीच्या झाडालाही म्हणतात. [ सं. कारवेल्ल]

**कारली** स्त्री. शिमग्यातील खेळांपैकी एक प्रकार.

**कारली राजावर्त** बांगड्यांचा एक प्रकार.

**कारले** न. १. कारली वेलीचे फळ. २. कारल्याच्या आकाराचा सोन्याचा दागिना (स्त्रियांच्या गळ्यांतील सुटा किंवा एखाद्या माळेच्या मधोमध असलेला.) : 'भोंवऱ्या कारलें भांगार'-वेसीस्व ११.५. ३. अणकुचीदार खिळे मारलेले लाकडी किंवा लोखंडी मुद्गल (गदा.) हे पूर्वी प्रत्येक किल्ल्यातील बुरुजावर ठेवीत व शत्रू बुरूज किंवा तट चढून येऊ लागला तर त्याच्यावर फेकीत : 'तेथ षोडश महावाक्येसी कारलीं। समविषमतत्त्वें प्रति बुरुजीं ठेविलीं।' - स्वानु १०.२.९. ४. (मल्लविद्या) करेला; मुद्गल. हा निमुळता, लांब, कमरेपर्यंत उंचीचा व पाच शेरापासून दीड मणापर्यंत वजनाचा असतो. ५. मोहरमच्या सणात कारल्याच्या फळाच्या आकाराची एक ताटी करून तिला कागद वगैरे चिकटवून इकडे तिकडे नाचवितात. ६. चाबकाच्या दांडीच्या व वादीच्या मधील कारल्याच्या आकाराचे सुतळीचे किंवा चामड्याचे विणकाम. ७. दोनतीन पायल्या भात मावणारे कणगुले. (मावळी.) [त. कारवल्लि]

**कारल्या** वि. कारल्याच्या आकाराचा एका जातीचा आंबा.

**कारव** स्त्री. एक झाड. त्याचे कांडे, फोक. हे झाड पाचसहा हात उंच व बारीक असते. याचे फोक कुंपणाला, कुडाला व ओमणाला घराच्या छपरावर आडव्या रचलेल्या कामट्यांसाठी वापरतात. [सं. करीर]

**कारव(वा)ई** स्त्री. १. चातुर्याची व्यवस्था; हुशारीचा कारभार. २. काटकसर. ३. गुप्त मसलत. पहा : **कारस्थान** [ सं. कार्य]

**कारवट** न. कारवीचे रान : 'कारवटात घुसलेल्या गुरांच्या अंगाला कारवीचा सुगंधी मध लागला होता.' - सराई २३.

**कारवणे** अक्रि १. खतावणे (शेत वगैरे). (राजा. कु.) २. खत घातल्याने फोफावणे (भाजीपाला वगैरे); जोराने वर येणे. ३. नासणे; कुजणे (फणसातील गरा वगैरे). ४. शिजताना बिघडल्यामुळे, बेचव, पचपचीत होणे (भाजीपाला). ५. जळका वास येणे (दूध, खीर, भात वगैरेंना).

**कारवल** न. एक प्रकारचे गलबत.

**कारवा** पु. (नृत्य) स्त्रीचा वेष घेऊन डोक्याला पागोटे व कमरेला तलवार लावणारा सोंगाड्या किंवा पुरुषाचा वेष घेतलेल्या स्त्रीचे सोंग; असे सोंग घेणारी व्यक्ती; अशा सोंगाड्याचा नाच. (क्रि. होणे, नाचणे, नाचविणे.) [ हिं. कहारवा; काहार = पालखीवाला, भोई यावरून]

**कारवां** पु. गटाने पण एकामागून एक येणाऱ्या बैलगाड्या, होड्या, उंट इ. चा तांडा.

**कारवाई** स्त्री. उपाययोजना; एखादा हेतू साध्य करण्यासाठी किंवा काम पार पाडण्यासाठी केलेली व्यवस्था : 'मुक्तिवाहिनीस आपली कारवाई उग्र करणे भाग पडले.' - असा आहे १७. [फा. कार्वाई]

**कारवाद** पु. कारस्थानीपणा; युक्ती; शक्कल; कट (विशेषतः वाईट गोष्टीविषयी) करण्यातील चातुर्य. [ सं. कृ]

**कारवादी** वि. मसलती; गुप्त कट करणारा; कारस्थानी; फसव्या; लबाड (कुटिल कृत्यांत).

**कारवान** न. घोडे विकणाऱ्या अरबांचा तांडा; टोळी; तळ; अशा तळातील व्यक्ती : 'याप्रमाणें सांगोन त्यानें आम्हांस निरोप दिला. तेथून कारवानांत आलों.' - ऐलेसं ३६४२. [फा.]

**कारवानी** स्त्री. कारवानाचा धंदा.

वि. १. कारवानासंबंधी (घोडा, माणूस वगैरे). २. (ल.) धूर्त; चलाख; खोल (देवघेवीमध्ये).

**कारविणे** अक्रि. करवतीने कापणे. (को.)

**कारवी** पहा : **कारव**

**कारस(सा)ई, कारसाज-द** १. रयतेला दिलेली तगाई. ही सुगीच्या वेळी धान्याच्या रूपाने परत करण्याच्या बोलीवर देतात. २. किल्ल्याच्या घेरातील (टापूतील) खेड्यातील लोकांकडून किल्ल्यावर असलेल्या सरकारी इमारतींच्या शाकारणीसाठी चूड व इरली करण्यासाठी बसविलेला सरकारी कर. पहा : **खोतवेठ** : 'कारसाई किल्ले रायेगड येथील शाकारणीबद्दल वगैरे गांवगना नेमणूक आहे ते.' - मसाप २.२.१५१. ३. गुप्त कट; उलाढाली; कारस्थाने. (क्रि. करणे, चालवणे.)

**कारसकाऱ्या** पु. मुलींचा एक खेळ. या खेळाच्या आरंभीचे शब्द.

**कारसाजी** स्त्री. भागीदारी.

**कारस्थाई** वि. कपटी; लबाड.

**कारस्थान** न. १. काटकसर; मितव्यय. २. कट; गुप्त मसलत. ३. राज्य किंवा कुटुंब यातील व्यवस्था; बंदोबस्त. [सं. कार्य + स्थान]

**कारस्थानी** स्त्री. जोर; भर; मुख्य लक्ष : 'श्रीमंत राव यांनी हल्लीं कारस्थानी हिशेबावर धरिली आहे.' - ऐलेसं १०३९.

**कारस्थानी** वि. १. खोल मसलत्या; धूर्त. २. काटकसरीचा; मितव्ययी. ३. कर्तबगार.

**कारळा, कारळा तीळ** पु. एक गळिताचे धान्य. याचे तेल जाळण्यासाठी व खाण्यासाठी उपयोगी आहे. पेंड गुरांना घालतात.

**कारळे** न. कडू जिरे. हे औषधी आहे. [का. करि = काळे]

**कारंजे** न. हौदामध्ये पाणी कृत्रिम दाबाखाली आणून, छिद्रे असलेल्या नळीवाटे त्याचे तुषार उंच व वेगवेगळ्या आकारात उडावेत अशा पद्धतीने केलेली योजना. बागेत किंवा घरातही शोभेसाठी याची रचना केलेली असते : 'न रंजे कारंजे निरखुनि फणी ते फणफणी।' - र ३२.

**कारंडव** पु. बदकाच्या जातीचा एक पक्षी; करडुवा करढोक. याच्या मादीला कारंडवी म्हणतात : 'कारंडवाचा आकार कोंबड्याएवढा असतो.' - पक्षी १३. [सं.]

**कारंडा** पु. ओंडका; ठोकळा. पहा : **करंडा**

**कारं(रिं)दा** पु. एक वेल, त्याचे फळ व कंद. पहा : **करां(रिं)दा**

**कारंदा** पु. कारभारी, कारवाई करणारा मनुष्य; कर्ता; कारस्थानी. (व.) [फा. कारंदाज]

**कारंदाज** १. कर्तृत्ववान; कर्तबगार; हुशार; प्रवीण. २. मजबूत, बळकट. ३. कारस्थानी. [फा.]

**कारंदाजी** स्त्री. कारस्थानीपणा, शहाणपणा; मुत्सद्देगिरी : 'कारंदाजीची मस्लत सांगितली ते न ऐकिली जे.' - जोरा ३६. [फा.]

**कारंब** न. एक फुलझाड. आबोलीची, कोरांटीची निळी जात. (गो.)

**कारा** स्त्री. १. तुरुंग; कारागृह; कारागार; बंदिशाळा : 'काय दिसे न तुम्हांस्तव रिपुनीं उघडून ठेविली कारा।' - विक ६६. २. (ल.) त्रासदायक धंदा, काम, संसार. [सं.]

**कारा, कारकीट-घोर** वि. काळा; खूप काळा. (झाडी.)

**कारागार** न. पहा : **कारागीर** : 'तोफांनीं कोटांत मार धरला तो आत चहुंकडे कारागार होऊन बहुत गर्दी उडाली.' - ऐलेसं १७००.

**कारा(रि)गिरी** स्त्री. कारागिरीचे कौशल्य; चतुराई; कसब; कामाची उत्कृष्ट उठावणी; करामत. (वा.) ० **होणे** - कारागर होणे; सिद्धीला जाणे; साध्य होणे : 'खंडोजी मानकर वेसावेयावरी थडकले, परत काम कारागिरी नव्हे.' - पेद १६. २३.

**कारागीर** पहा : **कारिगर**

**कारागीर** पु. कारभारी : 'अर्जुन तिथें कारागिरी।' - मसाप २.१.२३. (को.)

**कारागीर** वि. लागू; सफल : 'वार केला तो कारागीर होऊन.' - ज्ञाको ३२.४०. पहा : **कारिगर**

**कारागीर** पु. न्हावी : 'मुंडनाचे पुण्य तो लोकांच्या पदरी टाकून शिवाय गोड गोड बोलण्याचें कसब त्याच्याजवळ असते म्हणून त्यास कारागीर म्हणतात.' - भूम ५५.

**कारागृह** न. तुरुंग; बंदिशाळा : 'कारागृही अवतरले। श्रीकृष्ण गोकुळी वाढिन्नले।' - दशावतार भूपाळी ९. [सं.]

**काराणी** पु. कामगार; खलाशी : 'त्यावरील काराणी वगैरे माणसें अटकेस ठेऊन...' - समारो ८. २२६.

**कारात** न. पहा : **कॅरट**; सुमारे दोन रतीचे वजन. हिऱ्याचे वजन करण्यासाठी वापरतात : 'हा हिरा १६८० कारात वजन आहे.' - मराठी ६ वे पुस्तक, पृ. ११४ आवृ. २ री. [इं. कॅरट]

**कारातेल्का** पु. एक वृक्ष. (झाडी.)

**काराथे** न. कार्ले; कारेते. (गो.)

**काराफूल** न. स्त्रियांच्या कानातील कुडी, लवंग. (कु. गो.)

**काराब** न. कानातील मोत्यांचा एक दागिना. (गो.)

**कारा बाड्डा** पु. काळे बदक. (झाडी.)

**कारायज** न. नियमित उत्पन्न : 'श्रीरवळनाथ देवासि दतः ग वरिषा कारायज - शिला १.१.८.

**कारायंत्रणा** स्त्री. (वन.) परागकणांचे वहन करणाऱ्या कीटकांना काहीवेळ आपल्यामध्ये बंदिस्त ठेवून त्यांच्याकडून परागकणांचे कार्य करवून घेणारी फुलातील रचना - यंत्रणा.

**कारावणे** सक्रि. १. घासाघीस करणे. २. पाण्याच्या पाटातील गाळ काढणे. (कु.)

**कारावास** पु. तुरुंगात राहण्याची शिक्षा.

**काराविणे** पहा : **कारविणे**

**कारिका** स्त्री. १. सूत्राचे स्पष्टीकरण करणारा श्लोक. हा ३२ अक्षरी असतो : 'अखंड वेदांतिक कारिकांचें।' - सारुह ५.१४. २. टीका; व्याख्या. ३. टीकारूप श्लोकांची मालिका.

**कारिगर, कारि(रे)गार** पु. १. उत्तम काम करणारा; कसबी माणूस : 'बहुत दिवस नगास लागले त्यास इकडे दंगा कारीगर न मिळे।' - मइसा ३. १६८. २. चांगला कसबी सुतार, गवंडी, चितारी, सोनार, न्हावी : 'मिळेल तितका उत्तम कारागीर बोलवावा.' - आगर २.५. वि. उपयोगी; कामी पडणारे; प्रभावी; गुणकारी; उत्तम : 'तिने बगा

कसं कारागीर काम केल तें !' - मदम ५५. [फा.]

**कारिटखावू** पहा : **कारटखाऊ** : 'ओठांच्या काठावर आहे कवटीमधला कारिटखावू।' - धृपद ५०.

**कारिटा** पु. स्मशान.

**कारिवणा-ना** पु. ब्राह्मी वनस्पती.

**कारिवृद्धी-व्याज** स्त्री. (कायदा) ऋणकोने किंवा कुळाने ठरविलेले व्याज.

**कारिष्य** न. कृशपणा : 'जेयाचां मनिं आलस्य । देहिं अतिकारिष्य।' - राज्ञा १३. ५१६.

**कारि(री)सवाणा-न-ना** वि. केविलवाणा; दीनवाणा : 'धर्म बैसविला कारिसवाणा ।' - उगी १०९. [सं. कृश]

**कारिस्थानी** स्त्री. १. कारस्थानीपणा. २. कर्तबगारी : 'या उभयेताप्रमाणे करिस्थानी कोठे पाहण्यात न आली .' - पेद २०.१०५.

**कारिंगणा** स्त्री. ब्राह्मी वनस्पती. (गो.)

**कारिं(री)ट** स्त्री. न. एक वेल व तिचे फळ. हे काकडीसारखे लहान पण कडू असते.

**कारिंदा** पु. कारंदा वेल व तिचे फळ; करांदा. याचे दोन प्रकार आहेत - गोडा व कडवा. [सं. करमई]

**कारी** विशेषणात्मक प्रत्यय. करणारा; घडविणारा; बनविणारा. जसे : - कफकारी, नाशकारी इ. कारक सारखाच हा शब्द असून याची पुष्कळ प्रकारची विशेषणे बनतात. [सं.]

**कारी** स्त्री. (नाविक) राळ (गलबत, नाव इ.च्या खाली लावतात); तेलात चेंदरुस कढवून तयार करतात.

**कारी** स्त्री. मुलगी.

उद्गा. 'का ग?' या अर्थी मुलीस हाक मारताना योजायचे संबोधन : 'करें सखेचा कर घेय कारी।' - सारुह ८. ४४. (व.)

**कारी** स्त्री. घडा : 'हाती कुमरु कडिये कारी।' - एवाका २०८.

**कारीकमो** स्त्री. भाताची सुवासिक जात.

**कारी पहाट** स्त्री. अगदी पहाट. (झाडी.)

**कारी(रीं)व** वि. खत घालून तयार केलेली (जमीन). (राजा.)

**कारु** आसळ; सड.

**कारुक** पु. चितारी; कलाकार; कारागीर : 'परम रुचिर चित्रे कारुकीं काढियेलीं।' - सारुह ६. १३. [सं.]

**कारुक** पु. स्थानिक वस्तूंवरील कर : 'दुसरा कर कारुक स्थानिक कारागिरांनी तयार केलेल्या वस्तूंवर आकारला जाई.' - मसं ९८.

**कारुखारु** पु. कामकारी आणि कोळी : 'कारुवाखारुवाचेया सारिखे वस्त्र होआवे।' - लीचउ ६१०.

**कारुणा** पु. ब्राह्मी. (बे.) पहा : **करिवाणा**

**कारुणिक** वि. दयाळू; कृपाळू. [सं. करुणा]

**कारुण्य** न. दया; कृपा; करुणा : 'जाणूनि जीव सानुले। तेथ कारुण्यामांजी पाऊलें। लपवूनि चाले।' - ज्ञा १३. २४९. [सं.]

**कारुण्यवृत्ति-त्ती** स्त्री. दयाळूपणा : 'आपल्या अंगात कारुण्यवृत्ति जागृत झाली' - गीर ८१. [सं.]

**कारुना** पहा : **कारिवणा-ना** (हेट.)

**कारुनारु** पु. अलुतेदार व बलुतेदार : 'गावांतील कारुनारु हे देशकसत्तेच्या संघटनेत सक्रिय भाग घेणारे कर्मचारी असत.' - शासौ ५०.

**कारू** पु. १. कसबी; कारागीर; शिल्पकार; कलेवर निर्वाह करणारा माणूस : 'कुणब्याच्या सरकारी खाजगी व्यवहारातला अवश्य असा धंदा करणारा तो कारु.' - गांगा ९. २. समुच्चयाने बारा बलुतेदार; कारुनारु. पहा : नारुकारू [क. कारु] [वै.सं.कृ = कारु]

**कारे** न. १. एक काटेरी वनस्पती. २. समुद्रात टाकायच्या बुरीच्या जाळ्याला लावलेले हलके व तरते लाकूड.

**कारेगार** वि. पहा : **कारिगर होणे** : 'काम कारेगार होताच जयाजी सिंदे चौरंगारून खाले जमिनीस आले.' - भाब १३.

**कारेती** स्त्री. कारल्याचा वेल.

**कारेतें-तां** न. कारले. (को.कु.)

**कारेवारे** पु.अव. (एकवचन कारावारा. परंतु हा शब्द बहुतेक एकवचनी उपयोगात आणीत नाहीत. केर आणि वारा यांपासून) धूळधाण; फडशा; सत्यानाश (पैसा, नशीब वगैरेचा). (क्रि. करणे.)

**कारेळ-ळा, कारेळा तीळ, कारेळे** पहा : **कारळा तीळ**

**कारो** पु. काजऱ्याचे झाड; काजरा; कुचला. (गो.)

**कारोट** पु. वाताहत; विनाश; उच्छेद (शील, धान्य, गाव, घर इ. चा). (को.) [क. कार = ओकणे]

**कारोनी** स्त्री. १. प्रार्थना; विनंती; गयावया : 'जसे करती कारोन्या, होऊ दे रे आबादानी.' - बगा ३६. २. करुण कथा : 'माझ्या जिवाची करोनी.' - बगा.

**कार्कीर्द, कार्कुनी, कार्खाना** पहा : **कारकीर्द इ.**

**कार्कीर** स्त्री. कुरबूर; भांडण. (झाडी)

**कार्गरी** स्त्री. इष्ट परिणाम; सफलता; यशस्विता : 'परंतु अडचण व पर्जन्य फार यास्तव कार्गरी जाहली नाहीं.' - मइसा १४. ३५. पहा : **कारीगर**

**कार्चोबी** वि. वेलबुट्टीदार : 'खिलत पाच पारचे कार्चोबी दिला.' - मइसा ७. ७०. [फा.]

**कार्चोबु** पु. १. भरतकाम २. जरतारीचे, बेलबुट्टीचे काम करणारा. [फा. कार्चोबु]

**कार्टा-र्टी-र्टे** पहा : **कारटा** : 'एखादे वेळी ही थोरांची द्वाड कार्टी प्रसंगी विसरून जाऊन' - रत्न ५. ३.

**कार्ड** न. १. लिहिण्याचे कोरे पत्र; गंजिफा, पत्त्यातील एक पान. २. स्वतःचे नाव व पत्ता लिहिलेली चिठ्ठी. [इं.]

**कार्त** पु. पाव रत्तल वजन. (गो.) [इं. क्वार्टर]

**कार्तकाढप** पु. १. राजरोस परवाना मिळविणे (धंद्यासाठी). २. (ल.) धरबंद सोडणे. (गो.)

**कार्तवीर्य** पु. पुराणप्रसिद्ध सहस्रार्जुन. याला परशुरामाने मारले. हरवलेली वस्तू याच्या स्मरणाने सापडते असा भाविक लोकांचा समज आहे व त्यासाठी पुढील श्लोक रूढ आहे - 'कार्तवीर्यार्जुनो नाम राजा बाहु

सहस्रवान। यस्य स्मरणमात्रेण गतं नष्टं च लभ्यते।।' [सं.]

**कार्तिक** पु. खाटिक; मांस विक्रय करणारी एक जात.[सं. कृत = कापणे]

**कार्तिक** पु. ज्या महिन्यात पौर्णिमेच्या दिवशी कृत्तिका नक्षत्री चंद्र असतो तो महिना; चांद्रमासातील आठवा महिना; नोव्हेंबर महिन्याच्या सुमाराला येणारा महिना. [सं. कृत्तिका]

**कार्तिकस्नान** न. अश्विनी पौर्णिमेपासून कार्तिकी पौणिमेपर्यंत कृत्तिका नक्षत्र मावळण्यापूर्वी पहाटेला करायचे स्नान, अंघोळ. हे राधादामोदराप्रीत्यर्थ करतात.

**कार्तिकस्वामीचा हिमायती, कार्तिकस्वामीच्या भिडेचा** केवळ ब्राह्मण जातीत उत्पन्न होऊन ब्राह्मकर्मादी विधी न करणाऱ्याला उपहासाने म्हणत असत.

**कार्तिकाचे दिवे** कार्तिक महिन्यात लावण्यात येणारे आकाशदिवे : 'हिरंभटीं स्नान केले अग्निसेवें। कार्तिकाचे दिवे आकाशात।' - ब १५.

**कार्तिकी-का** स्त्री. कार्तिक महिन्यातील एकादशी; प्रबोधिनी : 'आषाढी-कार्तिकी भक्तजन येती।' - विठ्ठलाची आरती.

वि. कार्तिक महिन्यासंबंधी. (सोमवार, एकादशी, पौर्णिमा इ.)

**कार्दानी** स्त्री. कार्यज्ञातृत्व; अनुभव; कौशल्य. [फा.]

**कार्निक** वि. उपयुक्त; आवश्यक. (झाडी) [सं. कारणिक]

**कार्प** पु. गोड्या पाण्यातील नित्याच्या खाण्यातील मासा.

**कार्पटिक** पु. तीर्थवासी; यात्रेकरू. पहा : **कापडी** [सं.]

**कार्प(र्पि)ण्य** न. कृपणपणा; चिक्कूपणा; कंजूषपणा : 'हल्रु हल्रु थोर कार्पण्य जाले' - गोप्र ७२.

**कार्पर्दाज** पु. कार्यकर्ता; मुत्सद्दी : 'परंतु कार्पर्दाज यांचा अर्ज आपल्यास मान्य पडून' - मइसा ५. ३०. [फा. कार्पर्दाझ]

**कार्पास** पु. कापसाचे झाड व कापूस.

वि. कापसासंबंधी. [सं.]

**कार्पासवस्त्र** न. १. कापसापासून बनविलेले कापड. २. कापसाची गेजमाळ, गोजावस्त्र.

**कार्बन** पहा : **कर्ब**

**कार्मीक** पु. १. काम करणारे : 'कार्मिक पळती ते पाहुनी ।' - नागेशलीला. २. कर्मकुशल; कर्मकांडी गृहस्थ.

**कार्मुक** पु. धनुष्य : 'वीरीं कार्मुकें वाहिलीं।' - एरुस्व ८. २६. [सं.]

**कार्य** न. १. काम; उद्योग; कर्तव्य; कृती; क्रिया : 'तया नांव धनंजया। कार्य पैं गा।।' - ज्ञा १३. ९७०. २. परिणाम; क्रिया; योग : 'चुन्यावर आसिडाचे कार्य झाल्यास कार्बानिक आसिड वायु बाहेर पडतो.' - पदाव ११. ३. समारंभ; उत्सव. उदा. लग्नकार्य. ४. (व्या.) विभक्तीची रूपे; विकार. ५. फिर्याद; खटला; मुकदमा. ६. (वेदांत) शरीर (पंच ज्ञानेंद्रिये, त्यांचे पाच विषय, मन, बुद्धी व अहंकार). (वा.) ० **उठणे** - काम पार पडणे : 'असे झाले असतां... किती कार्ये उठणारी आहेत पहा।'- निमा ४४०. ० **उभे राहणे** - घरी लग्न, मुंज इ. सारखा समारंभ ठरणे. ० **उरकणे** - १. काम पार पाडणे २. (ल.) रतिसंभोग करणे. **कार्यावर दृष्टी देणे** - आपल्या ध्येयाचा ध्यास घेणे; आपला उद्देश सिद्ध करण्याकडे लक्ष देणे; काम साधणे. **कार्यास लावणे** - योग्य कामी उपयोग करणे.

वि. करण्यास योग्य.

**कार्यअनेकतादोष** पु. (तत्त्व.) कोणतेही कार्य अनेक कारणांमुळे एकसमयावच्छेदे करून घडून येते असे मत; जे लोक कोणतेही कार्य एकाच कारणामुळे किंवा कारणघटकांच्या एकाच संघातामुळे घडून येते असे म्हणतात. त्यांच्या मतानुसार एखादी घटना (कार्य) अनेक कारणांमुळे घटित होते असे मानणे सदोष आहे.

**कार्यकर्ता** वि. १. संस्था, पक्ष, समाज इत्यादीसाठी कर्तव्यबुद्धीने काम करणारा; सेवक. २. स्वतःच्या हिमतीवर काम तडीला नेणारा.

**कार्यकर्ती** स्त्री. समाजकार्य करणारी स्त्री; सामाजिक, राजकीय क्षेत्रात काम करणारी स्त्री.

**कार्यकारणन्याय** पु. हेतू व परिणाम यांच्या संबंधाचा नियम. [सं.]

**कार्यकारणभाव** पु. फल व तदुत्पादक क्रिया यांचा संबंध : 'ज्या दोन गोष्टींचे आनुचर्य दुसऱ्या कोणत्याही गोष्टीवर अवलंबून नसते त्या दोहोंत कार्यकारणभाव असतो.' - न्याप ३४.

**कार्यकारणसंबंध** पु. कार्य व कारण एकमेकांशी ज्या प्रकारे जोडले गेले आहेत तो प्रकार.

**कार्यकारणसंबंधसिद्धांत** पु. (तत्त्व.) कारण व कार्य यांच्यात अपरिहार्य व अपरिवर्तनीय संबंध असतो हे तत्त्व. [सं.]

**कार्यकारिणी** स्त्री. कार्यकारी सभासदांचे मंडळ; कार्यकारी मंडळ, समिती.

**कार्यकारी** वि. प्रत्यक्ष काम करणारा; व्यापार करणारा; तटस्थ नसणारा.

**कार्यकुशल** वि. धंद्यामध्ये चतुर, कल्पक.

**कार्यक्रम** पु. सभा, संमेलन, परिषद इत्यादीमध्ये होणाऱ्या कामाची रूपरेषा, स्वरूप.

**कार्यक्रमपत्रिका** स्त्री. सभा, संमेलन वगैरेमधील कामांची रूपरेषा दाखविणारे पत्रक.

**कार्यतंत्र** न. (यंत्र, अवयव, शरीर यांच्या) हालचालींची पद्धत, क्रिया, यंत्रणा.

**कार्यतः** क्रिवि. काही कारणासाठी; उद्देशामुळे.

**कार्यदर्शक दिशा** (यंत्र) प्रेरणा ज्या दिशेत कार्य करते ती दिशा.

**कार्यदर्शक बिंदू** (यंत्र) प्रेरणेचे कार्य ज्या बिंदूस्थळी होते तो बिंदू.

**कार्यद्रव्य** न. (शाप.) रासायनिक विक्रियेतील ज्यावर विक्रिया होते तो प्रारंभिक पदार्थ. [सं.]

**कार्यनिपुणता** स्त्री. एखाद्या कामात एखाद्या व्यक्तीची दिसणारी कुशलता, पारंगतता, प्रावीण्य.

**कार्यनिष्ठा** स्त्री. एखादी गोष्ट करण्यासाठी आपण बांधलेले आहोत ही भावना, बांधिलकी.

**कार्यपर** पु. काम करणारा; काम शोधणारा; गरजू : 'कार्यपरें सर्वथा न लागावे।' - मोवन नव २७६.

**कार्यप्रकाशक चिन्हे** नअव. गणितीय चिन्हे. (मशाप स १८६४)

**कार्यप्रयोजन** न. १. विवाह, मुंज वगैरे समारंभ किंवा सण यांना व्यापक संज्ञा. २. कार्यकारण.

**कार्यप्रवण** वि. कामाला उन्मुख झालेला, कार्यतत्पर : 'गुप्तदहशतवादी संघटना अधिक कार्यप्रवण बनल्या.' - पम ४.

**कार्यप्रस्त** न. लग्न समारंभ, देवधर्म इ. कार्ये विधी.

**कार्यभाग** पु. १. पत्करलेले, अंगावर घेतलेले कार्य; काम; करावयाचे काम; साधायचा उद्देश. (क्रि. करणे, होणे, उरकणे, उचलणे, लोटणे.) २. कामाचा अंश, भाग.

**कार्यभार** पु. १. अंगावर घेतलेले कामाचे ओझे; जबाबदारी; जोखीम. २. काम; व्यवस्था; कारभार. [सं.]

**कार्यमादिनी** वि. कार्य बिघडवणारी.

**कार्यलोभी** वि. कार्यसाधू; काम साधून येणारा : 'न घालिन भिडेस मी जरिहि कार्यलोभी तिला।' - केका १०.

**कार्यवाद-दी-दू-धू** वि. कोणीकडून तरी आपले कार्य साधण्यासाठी गोड बोलणारा.

**कार्यवाह** पु. व्यवस्थापक; जबाबदारीने कार्य करणारा; संस्थेचा चिटणीस वगैरे.

**कार्यवाहक** वि. (शाव्य.) काही विशिष्ट कार्यक्रम डोळ्यांसमोर ठेवून काम करणारा; कार्यक्रमाची अंमलबजावणी करणारा; कार्यालयातील, पक्षातील काम करणारा (माणूस).

**कार्यवाही** स्त्री. कार्याला प्रत्यक्ष चालना देणे; कार्य चालू करणे; अंमलबजावणी : 'केंद्र सरकारची रचना, त्याने हाती घेतलेले अधिकार व त्यांची योग्य कार्यवाही...' - सैस्वा ९५. (वा.) **कार्यवाहीत आणणे** - (ठराव, नियम इत्यादीप्रमाणे) प्रत्यक्ष वागणे; अंमलबजावणी करणे. **कार्यवाहीत येणे** - ठरल्याप्रमाणे एखादे काम केले जाणे : 'पाणीपुरवठ्याची योजना कार्यवाहीत आली होती.' - मसं ३०७.

**कार्यव्यग्र, कार्यव्याकूळ, कार्यव्यावृत** वि. हातात घेतलेल्या कामात गढून गेलेला, मग्न झालेला.

**कार्यशरीर** न. कारण शरीराच्या अनुषंगाने योजायचा शब्द; स्थूल शरीर.

**कार्यशाळा** स्त्री. (शाप.) १. यांत्रिक वाहनांची दुरुस्ती करण्याची जागा; यंत्रसाहाय्याने वस्तू बनविण्याची जागा. २. एखाद्या विषयाच्या अभ्यासक्रमाचा तपशील ठरवून रूपरेषा निश्चित करण्यासाठी आयोजित केलेले - तज्ज्ञांचे, अभ्यासकांचे चर्चाशिबिर.

**कार्यसमिती** स्त्री. (शाव्य.) कामाचे स्वरूप व त्याची अंमलबजावणी यांचा विचार करणारा गट; एखाद्या कारखान्याच्या कामासंबंधी, धोरणासंबंधी विचारविनिमय करण्यासाठी मालक व कामगार यांची संयुक्त समिती.

**कार्यसंपादन, कार्यसाधन** न. कामाचा उरक; काम तडीला नेणे; काम साधणे, सफल करणे.

**कार्यसाधक** वि. कार्य साधणारा (घटक, माणूस, साधने).

**कार्यसिद्धि-द्धी** स्त्री. शेवटाला नेलेले काम; फलसिद्धी; कामाची पूर्णता. [सं.]

**कार्यक्षम** वि. काम करण्यात हुशार, निपुण, प्रवीण; कामाला प्रसंगी उपयोगी पडणारा; काम करायला समर्थ, योग्य. [सं.]

**कार्याकारण** वि. आवश्यक कार्याच्या निर्वाहापुरता, जरुरीपुरता, प्रसंगापुरता : 'नेणे भूतदया शांतीचे लक्षण। कार्याकारण बोलतसे।' - नागा १८५०. [सं.]

**कार्यात्मक** वि. कर्तव्यासंबंधी; क्रियेविषयी. [सं.]

**कार्यात्मक गणित** अंकगणित.

**कार्यानुमेय** वि. परिणामावरून, फलावरून अनुमान करायला योग्य. [सं.]

**कार्यान्वयन** न. कार्यक्रम, नियम यांची अंमलबजावणी; आखलेला कार्यक्रम व्यवस्थित पार पाडण्याचे काम.

**कार्यान्वित** क्रि.वि. कार्यरत: 'एखादे मशीन कार्यान्वित आहे' - टेलि ७०.

**कार्याविसे** वि. कार्यमग्न; काम करण्यास उत्सुक : 'तरि मेघवर्णा (द्रौपदी) कार्याविसे।' - पंचो १०७.११.

**कार्यार्थी** वि. १. आपले कार्य धिम्मेपणाने सिद्धीला नेणारा; कार्यसिद्धीकडे लक्ष देणारा; हेतू सफल करून घेणारा. २. स्वार्थसाधू. [सं. कार्य + अर्थिन्]

**कार्श्य** पु. कृशता; रोडपणा : 'जयाचे मनीं आलस्य। देही अतिकार्श्य।' - ज्ञा १३.५१८.

**कार्षापण** वि. प्राचीन भारतातील चांदीचे (कचित सोन्याचे) नाणे : 'आपण कोणापासून एक कार्षापणहि दक्षिणा म्हणून घेऊ इच्छित नाहीं.' - चंद्र ३९. [सं.]

**काऱ्हळ-ळा, काऱ्हेळ, काऱ्हैळा तीळ** पहा : **कारळा तीळ**

**काऱ्होड** स्त्री. गाईचे वासरू. (व. ना.) पहा : **कालवड**

**काल** पु. १. वेळ; समय (ज्याचे मोजमाप दिवस, प्रहर इत्यादींनी होते तो). २. हंगाम; मोसम; योग्य वेळ. ३.निर्वाह; उपजीविका. ४. संकटाची वेळ. ५. यमराज; सर्वसंहारक काळ; मृत्यू; जिवाला धोका वाटणारी वस्तू; प्राणी (साप,वाघ इ.); एखादे संकट; मृत्यू; नाश; मृत्यूसमय. ६. चांगले किंवा वाईट व्हायला कारणीभूत अशी परमेश्वराची इच्छा. ७. भूत, भविष्य, वर्तमान इत्यादींचा समय. ८. (गायन) ताल-कालाची तालोपयोगी प्रमाणे - अणु, द्रुत, लघु, गुरू, प्लुत. [सं. काल] (वा.) **कालकला होणे** - ठार होणे; मृत्यू पावणे; विपर्यास होणे. **कालदेशतारतम्य करणे, कालदेश पाहून करणे, कालदेश पाहून वर्तणे** - काल, स्थल, परिस्थिती पाहून वागणे. **कालबाह्य गोष्टी सांगणे** - काढकाढू निष्फळ गोष्टी सांगणे. ० **साधणे** - अचूक, योग्य संधी गाठणे; योग्य काळी एखादी गोष्ट घडवून आणणे.

**काल** स्त्री. पैज; होड : 'हा पोरा : (नारळ) न फुटेचि : काल करितासि। - लीचउ २२५.

**काल** पु. (संगीत) ताल-गीत, वाद्य, नृत्य यांच्या गतीचे नियमित प्रमाण करणाऱ्या तालाच्या महत्त्वाच्या १० गोष्टींपैकी 'काल' ही पहिली. ताल देण्याच्या क्रियेमध्ये टाळीनंतर हात दूर सारण्याच्या क्रियेला 'काल' किंवा 'खाली' म्हणतात.

**काल** क्रिवि. १. उद्या. (खा.) २. चालू दिवसाच्या मागील, अधला दिवस. [ सं. कल्प-कल्ल-काल]

**काल** वि. काळा.

**काल** न. केळीचा गाभा. पहा : **काले**

**कालकलन** न. काळाचा ग्रास करणे : 'जें सृष्टिसंचाराचेनि ओघे । चढत कालकलनेचि वेगें।' - ज्ञा ७.६८.

**कालकलना** स्त्री. आयुष्याचा शेवट; जीवितावधी; जीवनान्त; मृत्यू : 'खड्गे वाजती खणखणा काळकलना मांडिली।' - एरुस्व ८.४०. [सं. कल = गणणे, मोजणे]

**कालक(का)ला** क्रिवि. भविष्यकाळी; पुढे; कालांतराने : 'रुपयाची निशा यैसी घेत नाहीं. कालकला जोखम होईल.' - पेद १४.४९.

**कालकल्ला** पु. वेळ; प्रसंग; संधी वगैरे.

क्रिवि. दुःखाच्या दिवसांत; वेळप्रसंगी (भविष्यकालीन प्रसंग); संकटाच्या दिवसांत; अडचणीच्या दिवशी. पहा : **वेळ-अवेळ** [कालचे द्वि.]

**कालकंटक** पहा : **काळकंटक**

**कालकाला** क्रिवि. कालेकरून; पुढेमागे : 'केव्हांतरी आपले पारिपत्य श्रीमंत कालकाला करितील हा निश्चये समजोन मातुश्री व राजाराम आहेतच.' - पेद ६.१९०.

**कालकूट** न. १. देवदैत्यांनी अमृताच्या प्राप्तीसाठी समुद्रमंथन करताना निघालेले, त्रैलोक्य जाळणारे विष : 'तैसें तें घनदाट। उठावलें एकवाट। जैसें उसळले काळकूट। धरी कवण॥' - ज्ञा १.८९. २. सामान्यतः विष. ३. (ल.) द्वेष; मत्सर.

**कालकृत** वि. (कायदा) मुदतबंद गहाण; गहाण ठेवण्याचा एक प्रकार. यात विशिष्ट मुदतीच्या आत गहाण सोडवून नेण्याची सवलत असते. [ सं.]

**कालक्रम** पु. घटना ज्या काळी आणि ज्या क्रमाने घडल्या ते दाखविणारी मांडणी. [ सं.]

**कालक्रमण-णा** न. स्त्री. करमणूक; वेळ घालवणे (ख्यालीखुशालीत, चैनीत). (क्रि. करणे.) [ सं.]

**कालक्रमवार** क्रिवि. घडलेल्या क्रमाने : 'समाजजीवनाची स्पष्ट, सुसंगत आणि कालक्रमवार माहिती देणे हा इतिहासाचा हेतू असतो.' - भाइभू

**कालखड्ग** न. खड्गाचा एक प्रकार. [सं.]

**कालखंड** पु. काळाचे विभाग; इतिहासाचे वैशिष्ट्यानुसार पाडलेले भाग; युग. [ सं.]

**कालगत** स्त्री. ढिलाई; दिरंगाई; उशीर : 'कोल्हापूरच्या वारसाची योजना झाली नसून कालगत होत आहे.' - के ५.८.१९४१.

क्रिवि. कालबाह्य.

**कालगति-ती** स्त्री. दैवाची गती; काळवेळ लोटणे, जाणे; बरेवाईट होण्याची काळाची रीत; ओघ; काळाचा प्रभाव. [ सं.] (वा.) ० **विजातीय होणे** - काळ फिरणे; काळ विचित्र होणे : 'परंतु कालगती विजातीय जाहली आहे.' - ऐलेसं ५२६४.

**कालगती अभ्यास** विशिष्ट कामाच्या कृतीमधील वेगवेगळ्या टप्प्यांचे पद्धतशीर निरीक्षण, विश्लेषण व मापन करून त्या प्रत्येक टप्प्यासाठी लागणारा प्रमाणित वेळ शोधून काढणे.

**कालगंध** पु. साक्षगंध. - पूर्वविदर्भातील विवाह १८२३.

**कालगिरी** पु. खड्गाचा एक प्रकार. [ सं.]

**कालगुजराण, कालगुद्राण** स्त्री. पु. संकटात काळ घालविणे; हरहुन्नर करून काळ कंठणे; कसे तरी करून तात्पुरता उदरनिर्वाह करणे. [ सं. काल + फा. गुजरान् = जीवन]

**कालगुणक** पु. (ग.) काळ व अंतर (दिक्) हे परस्परसापेक्ष असतात. काल हा अंतराच्या साहाय्याने व अंतर हे कालाच्या साहाय्याने मोजले जाते. म्हणून काल व अंतराचे हे गुणोत्तर कालगुणक होय. [ सं.]

**कालगुंत** स्त्री. भोके पाडलेली लोखंडी पट्टी (सोनार, लोहार इ. ना उपयोगी). पहा : **कालगूत**

**कालगूत** न. १. कला; कल्पनेची योजना; चतुराईची योजना; गूढ योजनेतील रहस्य. २. अशा तऱ्हेची रचना किंवा रीत. ३. यंत्रातील गूढ रचना, किल्ली व त्या रचनेने युक्त असे यंत्र. [ सं. कला + गति]

**कालग्रस्त** वि. मरणोन्मुख; अतिशय संकटाने त्रस्त झालेला, घेरलेला; विपत्तीत सापडलेला.

**कालघन** पु. मृत्युरूपी ढग; प्रलयमेघ; सृष्टीचा नाश होण्याच्या वेळी वृष्टी करून सृष्टी बुडविणारे मेघ.

**कालचक्र** न. १. कालाची राहाटी व त्याचा प्रभाव; नशिबाचा फेरा; दैवगती; आयुष्यातील बरी - वाईट घडामोड. (क्रि. घडणे, उलटणे, पालटणे.) २. विशिष्ट कालघटकांची आवृत्ती. उदा. ६० संवत्सरांचा फेरा; ऋतूंचे आवर्तन वगैरे. ३. काळाचा किंवा वेळाचा विशिष्ट अंश, भाग; मुदत; विशिष्ट कालखंड; कालाचे ठरावीक परिमाण.

**कालचरित्र** न. नशिबाचा खेळ; दैवाची लीला.

**कालण-न** न. कालवण : 'खारी घारिया : अमृतफळे कालण दुधदही अपार आणिलें:' - लीचउ ८३. (राजा. कुण.)

**कालणे** अक्रि. कालवणे; मिसळणे; मिश्रित करणे.

**कालत्रय, कालत्रितय** न. भूत, भविष्य, वर्तमान हे तीन काळ.

**कालत्रयी** क्रिवि. (नास्तिपक्षी) तीनही काळी (कधीही नाही या अर्थाने).

**कालथा** पु. उलथणे. पहा : **कलथा**

**कालदशा** स्त्री. १. बरीवाईट दैवगती; परिस्थिती. २. सत्ता घालविणारा काळ, दिवस. (क्रि. फिरणे, पालटणे, बदलणे, वाईट असणे.)

**कालदंड** पु. १. यमाने दिलेली शिक्षा. २. मृत्यू; मरण.

**कालधर्म** पु. कालमहिमा; (मनुष्याच्या दैवावर अधिकार चालणारी, घडविणारी) कालाची सत्ता, अधिकार, सामर्थ्य, प्रभाव.

**कालनिर्णय** पु. (एखादी ऐतिहासिक व्यक्ती, घटना केव्हा होऊन गेली, ग्रंथ केव्हा लिहिला इ. बाबतीत) काळ निश्चित करणे. जसे :- कालिदासाचा कालनिर्णय, भारतीय युद्धाचा कालनिर्णय. [ सं.]

**कालनिर्वाह** पु. १. रोजच्या चरितार्थाला लागणाऱ्या वस्तूंचा पुरवठा. २. काळ घालविणे.

**कालनेमीची मूर्ती** कपटी माणूस (कालनेमि या नावाचा एक कपटी राक्षस होता त्यावरून).

**कालपट** पु. ऐतिहासिक घटना आणि व्यक्ती यांच्या कालानुक्रमाने केलेल्या नोंदी. [सं.]

**कालपरत्वे** क्रिवि. काळाच्या अनुरोधाने; प्रसंग विशेषी; योग्य काळी; कधी कधी; केव्हा केव्हा; नशिबामुळे. [सं.]

**कालपरवा** क्रिवि. अगदी अलीकडच्या काळात. जसे :- कालपरवाची गोष्ट.

**कालपराभव** पु. संकटकाळी काळाशी झगडून यशस्वी होणे; काळावर विजय; बिकट परिस्थितीतून मार्ग काढणे, पार पडणे.

**कालपरिच्छेदविरहित** वि. तिन्ही कालांच्या पलीकडील म्हणजे सतत नित्य (परब्रह्म).

**कालपर्याय** पु. कालविपर्यय; विपरीत काल : 'कालपर्यायेंकडून अशी बुद्धी त्यास निर्माण झाली !' - ऐलेसं ६६४३.

**कालपाश** पु. मृत्यूचा फास; मरण.

**कालपी साखर** उत्तर हिंदुस्थानातील काल्पी गावी तयार झालेली साखर. (खडीसाखर, पिठीसाखर या दोन्ही. विशेषत: खडीसाखर.)

**कालपुरुष** पु. १. यम; यमाचा सेवक; यमदूत. २. ब्राह्मणाला दान देण्याकरिता केलेली लोखंडाची, आतून पोकळ असून त्यात द्रव्य भरलेली यमाची प्रतिमा. ३. (ल.) कोणताही भयंकर पुरुष; शत्रू; क्रूर मनुष्य.

**कालप्रवाह** पु. काळाचे एकसारखे पुढे जात राहणे. [सं.]

**कालबंध** पु. (समीक्षा) कालानुक्रम लक्षात घेऊन केलेली घटनांची मांडणी.

**कालबाह्य** वि. आजच्या काळात लागू न पडणारा; निरुपयोगी. [सं.]

**कालबेल** स्त्री. १. भविष्य सांगणे; शकुन वगैरे सांगणे. २. कालबेला गोसाव्याचे काम.

**कालबेला-ल्या** पु. गोसाव्यांचा एक पंथ व त्यातील व्यक्ती.

वि. १. गोसाव्यांच्या एका पंथातील; जो कालबेल करतो तो. २. कालबेलासंबंधी.

**कालबोलिया, कालबोल्या** वि. वेळ पडेल तसे बोलणारा; काळ वेळ पाहून वाटेल ते मान्य करून पुढे त्या प्रमाणे न वागणारा; तोंडावर गोड बोलणारा : 'कालबोलिया आहे. चित्त मेळलियास हर एक संधी पाहून घात करील.' - मइसा १०.१०२. [सं. काल + म. बोलणे]

**कालमर्यादा** स्त्री. एखादी घटना सुरू झाल्यापासून संपेपर्यंतचा वेळ; कालावधी; विनिर्दिष्ट कालखंड; आखून दिलेला काळ.

**कालमहिमा-माहात्म्य** पहा : **कालचक्र १**

**कालमान** न. १. कालाचे परिमाण; वेळमापन. २. वेळामापक यंत्र. ३. हंगाम; रागरंग; कोणताही काल (चांगला-वाईट). (क्रि. फिरवणे, बदलणे, उलटणे, पालटणे.) ४. परिस्थिती.

**कालमानयंत्र** न. घटिकायंत्र. - मराठी ज्ञानप्रजु १८५७.

**कालमापक** न. १. घड्याळ. २. अचूक वेळ दर्शविणारे उपकरण. याच्या मदतीने समुद्रावरील जहाजास आपण कोठे - कोणत्या रेखांशावर - आहोत हे जाणता येते.

**कालमिती** स्त्री. काल मोजण्याचे शास्त्र. [सं.]

**कालमी(मे-मै)ल** स्त्री. तगमग; अस्वस्थता; तळमळ (दु:ख, ताप यांपासून होणारी).

**कालमुख** न. (ग्रंथ.) सूक्ष्म पद्धतीने ग्रंथ, इ. चे वर्गीकरण करताना त्यात कालाचा निर्णय करण्यासाठी वापरले जाणारे चिन्ह.

**कालमूर्ति-र्ती** पु. १. भयंकर क्रूर माणूस. २. यम. [सं.]

**कालमेलणे** अक्रि. तळमळणे; तडफडणे (ताप, दु:ख यामुळे).

**कालमेह** पु. काळ्या रंगाची लघ्वी (लघवी) होणे. पहा : **प्रमेह** [सं.]

**कालयातना** स्त्री. यमयातना; अत्यंत दारुण क्लेश. [सं.]

**कालरहितता** स्त्री. सातत्य; सर्व परिवर्तने बाजूला सारल्यावर व थांबल्यावर उरणारे अखंड आणि अविनाशी अस्तित्व.

**कालरा** पु. पटकी; महामारी; अजीर्णामुळे शरीरात वातदोष होऊन सुया टोचल्याप्रमाणे पीडा करणारा रोग; कुळीक; विषूचिका; वाखा; जरीमरी.

**कालरात्री** स्त्री. १. प्रत्येक ७७ व्या वर्षाच्या सातव्या महिन्याची सातवी रात्र. २. कालीदेवीचा जन्मदिवस. काहींच्या मते हा दिवस आश्विन शुद्ध अष्टमी व काहींच्या मते श्रावण वद्य अष्टमीची रात्र. ३. कल्पाची शेवटची रात्र. ४. (सामा.) अंधारी काळीकुट्ट रात्र; भयंकर रात्र; मरण येण्याच्या वेळची रात्र.

**काललवण** न. एक कृत्रिम व रेचक मीठ; पादेलोण; गंधबीज. पहा : **बीडलवण** [सं.]

**कालव** न. शिंपात असणारा समुद्रातील एक प्राणी; कालू व त्याचा शिंपला. या प्राण्याला डोके नसते. हा समुद्र किनाऱ्यावरील खडकातही सापडतो : 'मिटलेल्या शिंपल्यातून कालव नावाचा लिबलिबीत प्राणी दिसेल.' - महासागर ९०.

**कालव(व्ह)ड-डी** स्त्री. गायीचे लहान वासरू, पाडी.

**कालवखे** न. काळोख : 'वाती पुढां जैसे। पलों लागे कालवखें।' - राज्ञा १४.२०८.

**कालवण** न. १. भात, भाकरी इ. कोरडे पदार्थ ज्याच्याशी खातात असे दही, दूध, आमटी, सांबारे, कढी, पातळ भाजी, शिकरण इ. वगैरे पदार्थ (व.); पातळ तोंडी लावणे; कोरड्यास : 'दहि दुधें तक्रें। कढिया कालवणे विचित्रे।' - ऋ ८४. २. मिश्रण. [सं. किंचित् + लवण]

**कालवणे** उक्रि. १. दोन पदार्थांचे एकत्र मिश्रण करणे : 'जैशी जवळिकेंचीं सरोवरें। उचंबळलिया कालवती परस्परें।' - ज्ञा १०. १२१. २. पित्तादिविकारामुळे पोटात ढवळल्यासारखे होणे. [क. कलसु]

**कालवणे** अक्रि. बेचैन होणे : 'आज आठवण आली तरी मन कालवतं.' - श्रीया १. २८४.

**कालवणे** सक्रि. गुंतवणे; गोवणे : भानू गुरकून म्हणाला, 'साहेब, आपल्याला त्यात कालवू नको हो.' - कोसला ९५.

**कालवश** क्रिवि. काळाच्या अधीन; मृत.

**कालवंचन-ना** न. स्त्री. १. कालक्रमण; वेळ घालविणे. २. मृत्यूची फसवणूक; गुदरलेल्या कठीण काळात कसा तरी निर्वाह करणे.

३. कालहरण; वेळ काढणे : 'कालवंचना करावी, गंगथडीस असावे.' - पेद २०. ८२.

**कालवंडणे** अक्रि. काळे पडणे : 'तेथ गेले आंधारें। कालवंडिजे।।' - राज्ञा १६. ४१४.

**कालवा** पु. १. भात, भाकरी इ. चा कालवणाशी कुसकरून बनविलेला काला. २. (ल.) आक्रोश; गर्दी; आरडाओरडा; झुंबड : 'सोडली पुण्याची जागा तोडिल्या धागा भडकल्या पागा कालवा झाला.' - ऐपो ४३३. (क्रि. उठणे, उसळणे, करणे.)

**कालवा** पु. नदी, तलाव इ. चे पाणी नेणारा मोठा पाट : 'कर्ण म्हणे तुज सागर भासे, मज भीम कालवा राया।' - मोकर्ण ३२. २५.[सं. कुल्या]

**कालवा** पु. बेचैनी; चलबिचल : 'कालवा होत असलेले काळीज आवरून...' - माचू ३२.

**कालवाकालव** स्त्री. १. परस्परविरुद्ध वस्तूंची मिसळ; भेसळ. २. ढवळाढवळ; विचका. ३. घोटाळ्याचा वाद. ४. पोटातील अस्वस्थता. ५. कोणताही मनोविकार प्रबल झाल्याने मन अस्थिर होणे; चलबिचल : 'रोम शहर जुलमी पोपच्या व फ्रेंच राजाच्या ताब्यांत गेलेलें पाहून गॅरिबॉल्डीचें मनांत कालवाकालव होऊन जात असे.' - ग्यारिबॉल्डीचें चरित्र.

**कालवाने** वि. काळ्या वर्णाचे : 'तें बहू दिसतसे कालवानें। वासरुआंसि।' - वह २८३.

**कालविपर्यय** पु. (ऐतिहासिक घटनांच्या) कालानुक्रमाची चूक; कालानुक्रमाचा विपर्यास.

**कालसत्ता** पहा : **कालचक्र १**

**कालसमाप्त होणे** मृत्यू येणे : 'तुरुकताजखान त्यास अत्यावस्त अवस्था होऊन छ ५ रमजानी प्रहर दिवसा कालसमाप्त त्याचा जाहला.' - ईएमपी १७.

**कालसर्पयोग** कुंडलीत सर्व ग्रह राहू-केतूच्या मध्ये असण्याचा योग.

**कालसंकेत** पु. रोमन आकड्यांमध्ये लिहिलेला दिनांक.

**कालसाधन** न. १. वेळ समजण्याचे यंत्र (घड्याळ); छायायंत्र. २. स्नानसंध्या वगैरे कर्माला जो काळ सांगितला आहे त्यावेळी करायचे ते ते अनुष्ठान. ३. वेळाचे घेतलेले माप.

**कालसांव** स्त्री. विजार. (गो.) [पोर्तु.]

**कालसीमा उपयोग** (यंत्र) उपकरण ठरावीक काळ सुरू राहून नंतर आपोआप बंद होण्यासाठी केलेली विशिष्ट यांत्रिक रचना.

**कालसूत्र** न. नशिबाचा, दैवाचा धागा, रेषा.

**कालहरण** न. १. कालक्रमण; वेळ घालविणे. २. दिवस मारून नेणे; त्या दिवसाची साधनसामग्री मिळविणे; दिवस काढणे.

**काल(ला)ळ** पु. कलाल; दारू गाळणारा : 'सामान्य स्त्रीया : कालळें तीयें रायासि विडा मागावेया एति :' - लीचउ १७६.

**कालक्षेप** पु. १. कालव्यय; कालक्रमण; कालहरण; कालातिक्रमण; आयुष्याचे दिवस कंठणे. २. निर्वाह.

**कालक्षेपाचे दिवस** सुखाने कालक्रमणा करण्यासारखी परिस्थिती : 'हे दिवस कालक्षेपाचे आहेत यैस नाहीत.' - चंचूद ७६.

**काला** पु. १. मिश्रण : 'तेयां दोन्हींचा काला कीजे।' - शिव ७६. २. दहीकाला; (संक्षेपाने) गोपाळकाला : 'प्रेमें काला पूर्ण मांडियेला।' - दावि ३८. ३. तिखट, मीठ इ. घालून (सांडग्यांसाठी) करतात तो कोहळा, भोपळा यांचा कीस. ४. पोळ्यांचा चुरा. (अहिराणी) ५. बार मारण्याचा एक प्रकार. (गो.) ६. चिखल : 'नीलोत्पलाचिये माळें। दीन्हलें कस्तुरिएचें कालें।' - शिव ३७७. ७. पूट; रंगाचा पुन्हा पुन्हा द्यायचा हात : 'ईश्वरध्यानाचिया चोळा। मना काले दिजती वेळोंवेळा।' - भाए ६८६.

**कालाकथला** पु. भानगड; उलाढाल. (ना.)

**कालाकित्ता** पु. १. निरनिराळ्या जिन्नसांचा किंवा वस्तूंचा संग्रह, जमाव, ढीग. (क्रि. भरणे). २. (समुच्चयाने) नानाप्रकारच्या धान्यांची पिके किंवा बाजारात विक्रीला आणलेले निरनिराळे धान्य. (क्रि. नासणे, पिकणे, बुडणे, येणे, भरणे.) ३. शेतात उसाच्या फडात, सुपारीच्या आगरात निरनिराळ्या प्रकारचे पेरलेले मोगण; दुय्यम प्रतीचे पीक.

**कालाकित्ता** पु. (वासुदेव) लग्नात मुलीच्या बापाला द्यायचे धान्य (दाणे, गहू, तांदूळ इ.).

**कालाखट्टा** पु. जांभळाचा रस, जांभळाचे सरबत.

**कालातीत** वि. ज्याला काळाचे बंधन नाही असा; ज्याच्यावर काळाचा परिणाम होऊ शकत नाही असा. [सं.]

**कालापकर्ष** पु. काळाचा अपव्यय. [सं.]

**कालापगम** पु. (तत्त्व.) काळाची अशाश्वतता. आताचा वर्तमान व पुढचा भविष्यकाळ क्षणाक्षणांनी भूतकाळात जमा होत असतो, हे काळाचे स्वरूप. [सं.]

**कालापव्यय** पु. वेळेचा दुरुपयोग. [सं.]

**कालापाक** न. प्रत्येक श्लोकात अर्थ पुरा करण्याऐवजी क्रियापदाच्या कारकबुद्धीने जोडलेल्या चार श्लोकांचा समुच्चय; युग्मीविशेषक. पहा : कुलक [सं.]

**कालाबुल-ला-ली** स्त्री. (ताप, पित्त, भूक वगैरेंनी आलेली, झालेली) कासाविसी; तळमळ; तगमग; अस्वस्थता : 'मग कालाबुली हाका देते वेळे। होतोसी परि डोळे नुघडिसी।' - तुगा ४०८२.

**कालाभुला-ली** वि. अस्वस्थ; कासावीस : 'जो तियेचिया ग्लानी होये। कालाभुला।' - ज्ञा १६. १४१.

**कालायस** न. पोलाद. [सं. काल + आयस]

**कालावधि-धी** स्त्री. विशिष्ट वेळेची मर्यादा; काही काळ; काही वेळ : 'विचार बदलण्याला कालावधीची आवश्यकता मुळीच नसते.' - भा ११०. [सं.]

**कालाष्टक** न. आषाढ वद्य प्रतिपदा ते अष्टमीपर्यंतचा काळ. या काळात काळभैरवाचे भक्त त्याची पूजा करतात, उपवास पाळतात व आठ ब्राह्मणांना जेवण घालतात. [सं.]

**कालाष्टमी** स्त्री. कार्तिक वद्य अष्टमी; प्रत्येक महिन्याची वद्य अष्टमी; (विरू.) कालाष्टकातील शेवटचा दिवस. या अष्टमीच्या दिवशी

काळभैरवाची पूजा करतात. [सं.]

**कालासणे** सक्रि. बांधणे : 'कालासला खुंटी। फलभोगाचां॥' - राज्ञा ५. ७२.

**कालाळ** न. गायक : 'मग गार्णे: भाटें : थोटीं : सीमूरें : रांधवणे : सैामान्य स्त्रिया : कालाळे :' - दृपा ८.

**कालाळ** पु. कलाल : 'तीयां कालाळातें उठविलें :' - लीचउ २४१.

**कालांतर** न. पुढचा काळ.

**कालि** क्रिवि. काल : 'हें काइं वा मुनिदया : कालि बीढारा न याचि :' - लीच २. १.

**कालिक** वि. काळासंबंधी; कालखंडाप्रमाणे असणारा; मुदतीचा. न. (ग्रंथ.) विशिष्ट कालावधीत प्रकाशित होणारे दैनिक, साप्ताहिक, मासिक वगैरे.

**कालिक** स्त्री. काळेपणा; कलंक : 'सांघे पितलेची गंधकालिका। फीटली होये नि:शेषा' - राज्ञा ४. ६३.

**कालिकवृद्धि-द्धी** स्त्री. ठरलेल्या मुदतीचे व्याज. पहा : **कायिकवृद्धी**

**कालिपास** पु. (शाप.) गोलाकार वस्तूंचा आतील व बाहेरील व्यास मोजण्याचा वाटोळा कंपास. [इं. कॅलिपर्स]

**कालिमा** स्त्री. पु. १. काळेपणा : 'कालिमा सांडील कोलिसा।' - राज्ञा १६. २८३. २. (ल.) डाग; कलंक (दोष, पाप इत्यादीमुळे आयुष्याला, चारित्र्याला लागणारा). ३. लाज; शरम (अपराधी माणसाची). ४. काळवंडलेपणा; निस्तेजता; प्रेतकळा (रोग, अतिश्रम इत्यादीमुळे येणारी.). ५. शरीराचा काळेपणा (अतिशय उन्हामुळे आलेला). [सं.]

**कालि(ळि)याण-णा-ना** पु. काळा सर्प : 'कां कालियाणा धुंधुवांतु।' - राज्ञा १८.७०९.

**कालिंग** न. १. (गो.) पहा : **कलिंगड** २. द्रव्याचा संचय.

**कालिंगडा** पु. (संगीत) संगीतातील एक राग. गानसमय रात्रीचा चौथा प्रहर.

**काली** स्त्री. १. पार्वती. २. एक वनस्पती : 'मेथिका, घातकी, काली, उपलसरी, बाजपूरक यांचा पिंड तेजाची वृद्धि कुरणारा होय.' - अश्वप २.८.

**कालीचा** वि. काळचा : 'कालीचा जगदानि तो आझुंइं न ए :'- लीच १.१०.

**कालीन** विशेषणवाचक प्रत्यय. कालविषयक; काळासंबंधी; काळाचा. (सामा.) एतत्कालीन, तत्कालीन; समकालीन.

**कालीमूर** न. (वै.) बारा क्षारांपैकी एक. आमांश, सर्दी, बहिरेपणा, त्वचारोग, प्रहर इ. वरील औषध.

**कालीय** पु. कालिया सर्प : 'गरुडीं कालीय तसा ज्यावरि तूं कोपगरळ वमशील।' - मोकर्ण ३०.११.

**कालुग** वि. काळ : 'भली एकें चि कालुगेनि पोलें।' - राज्ञा १३.४०.

**कालुष्य** न. १. भ्रष्टाचार; कलंक. २. मतभेद; भांडण.

**कालू** न. कालव.

**कालू** पु. स्त्री. एक वाद्य; सनई; चौघड्यातील टिमक्यांसही म्हणतात : 'कालू कर्णे वाजती पुढे भाग्याची चढती। पाहुन जीव माझे तडफडती।' - प्रला १३४.

**काले** न. केळीचा गाभा; केळीच्या मध्यातून एक दांडा वर पानापर्यंत येऊन तेथून त्या दांड्याला केळीचा लोंगर (केळ्यांचा घड) येतो. या दांड्याला (केळीच्या पोटात असणाऱ्या भागाला, बाहेर आलेल्या नव्हे) काले म्हणतात. (वा.) **काल्यासारखा थंड** - केळीच्या गाभ्यासारखे थंडगार (अंग).

**काले** पु. अव. टोचणी, आठवण.

**कालेत** स्त्री. प्रकृती. (गो.)

**कालेवेले** न. वाईट; विश्वासघातकी काम; मार्ग; काळेबेरे; प्रच्छन्न कृत्य. पहा : **कालबेल**

**कालैक्य** न. घटनांचा कालिक एकसंघपणा.

**कालो** पहा : **काला**

**कालोवा** पु. मेळ; मिलाफ; एकत्र; ऐक्य : 'जाला भृत्युभज्य कालोवा। भक्तिच्या घरीं।' - अमृ ९.३०.

**काल्पनिक** वि. मनाने किंवा कल्पनेने शोधून काढलेले; कल्पित; नकली; बनावट; जुळविलेले; अवास्तविक. [सं. क्लृप्]

**काल्लं** न. कालव; समुद्रातील शिंपल्यात असणारे जीव. (गो.)

**काल्हवड** पहा : **कालवड**

**काल्हवली** स्त्री. कालवडी : 'पवार यानें काल्हवली महिनें तीनची गाईखालील, पाणी प्यावयासी नेत होता.' - ऐसंसाखं १.१७८.

**काव** स्त्री. १. त्रास; कंटाळा. २. कावा; कपट : 'एक बटीक काव करूनि जात होती धुणें घेउनी.' - ऐपो ३५५. ३. ताप; कोप; राग (बे.). (वा.) ० **आणणे** - सतावून सोडणे. ० **येणे** - वैतागणे; त्रासणे.

**काव** स्त्री. गेरू; एक प्रकारची तांबडी माती; हिचे लोखंडी काव व सोनकाव असे दोन प्रकार आहेत. [ते. क. कावि = तांबडा]

**कावकाव** स्त्री. १. कावळ्यांचे ओरडणे. २. (ल.) कर्जदार, भिकारी यांचा मागणीचा, तगाद्याचा एक कल्लोळ, गोंगाट, आरडाओरड; एका विरुद्ध अनेकांनी केलेला आरडाओरडा, गिल्ला. (क्रि. करणे.) [ध्व.]

**कावकिक-च** पु. कंटाळा; तिटकारा; वैताग : 'पुऱ्या जिनगानीचाच मला कावकिच यिऊन गेला.' - रैत १२२.

**कावड** न. (कवाड अप.) दार; दाराची एक फळी. (खा. व.) [सं. कपाट = कवाड]

**कावड-डी** स्त्री. पाण्याच्या घागरी अथवा एखादा जड पदार्थ नेण्यासाठी बांबूच्या दोन टोकांना शिंक्याच्या रचनेप्रमाणे दोऱ्या बांधून त्यात घागरी घालून नेण्याचे साधन : 'सांडूनिया रजतमाची कावडी।' - ज्ञा १६.७७. [सं. कार्पट]

**कावड-डी** स्त्री. विटीदांडूच्या खेळात ठरवलेली गुणांची कमाल मर्यादा व तिची पूर्तता न झाल्यास त्या पक्षाच्या खेळाडूंनी भोगायची शिक्षा. (वा.) ० **काढणे** - फजिती करणे.

**कावडता(था)वड** स्त्री. १. (चमत्कारिक शब्दरचना) गिऱ्हाईक व

दुकानदार यांच्यात पदार्थांच्या भावाविषयी चढउताराची घासाघीस होऊन शेवटी ठरलेली किंमत, रक्कम, भाव; अडचणीत आलेल्या व्यापाऱ्याशी त्याच्या सावकारांनी केलेली कर्जाची तडजोड अगर तोंडमिळवणी; सरासरीची विभागणी, प्रमाणशीर वाटणी; अदलाबदल (वस्तू, धंदा, काम इत्यादीची); एकदम दिलेली ठोक रक्कम. २. लुच्चेगिरीने, धूर्तपणाने काम साधणे. ३. कामातील शक्कल; कावा; खुबी. ४. खाजणीभाजणी.

**कावडल** स्त्री. पहा : **कवंडल**

**कावडली** स्त्री. काकांगी; काकनासिका; एक वनस्पती.

**कावडी** पु. पहा : **कापडी**

**कावड्या** वि. कावड वाहणारा.

**काव(वा)ण** न. १. लग्न इ. समारंभाचा स्वयंपाक वगैरे कामासाठी घराबाहेर बांधलेली झोपडी किंवा झावळ्यांचा मांडव; तात्पुरता मांडव; गुऱ्हाळाकरिता घातलेला कुडाचा मांडव : 'अण्णा खोत झाडपाल्याच्या कावणात डोके धरून बसला होता.' - तोरण ११८. २. पशूंचा गोठा (उन्हाळ्यातील); कोंडवाडा; छप्पर. (को.) [क. कावण्ण]

**कावणे** अक्रि. १. फार संतापणे; रागावणे; रागावून तोंड सोडणे : 'तेथ कायसी सेवकांची गोठी। कावली पोटीं स्त्रीपुत्रें।' - एभा २३. ९५. २. कंटाळणे; त्रासणे; वैतागणे (रागाने, दुःखाने) : 'दीनता ल्याली; दुःखानें कावली।' - विक ८. ३. पिसाळणे (कुत्रे). ४. कंटाळून आतल्या आत तडफडणे; तळमळणे : 'संकटीं मनुष्य कावे।' - दावि ४५५. ५. भयाने गांगरून जाणे.

**कावती** स्त्री. पोफळीचे रोप. (राजा.) पहा : **कवाता**

**कावदाळणे** अक्रि. भरून येणे : 'सारं आभाळ कावदाळलं.' - खळाळ ११०.

**काव(वा)र** न. १. पाचर, खुंटी (भिंतीतील); खुंटा (जात्याचा) ढिला झाल्यास त्यात बसविण्याची पाचर किंवा लाकडी चीप. (को.) २. कावल; अतिशय झिजलेले भांडे. (व.) ३. (योगशास्त्र) गुदस्थानी टाच जोडणे, गुद व शिश्न यांच्यामधील शिवण : 'अपान रंध्रद्वया-। माझारीं धनंजया। पार्ष्णी पिडूनियां। कांवरु मूळ।।' - ज्ञा १८. १०३६. ४. (नाविक) फळीच्या वाद्रीत दुसरी फळी गच्च बसती करणारी लाकडी पाचर. ही कावर खालच्या व वरच्या दोन्ही फळ्यांना चार अंगुळे अंतरावर दोन दोन भोके पाडून त्यात मस्तूर भरून नंतर ठोकतात. हिचे पुढचे टोक निमुळते व रुंदट असून वरचा माथा गोल व सपाट असतो.

**कावरखे** न. झाडावरचे बांडगूळ. पहा : **कावरुख** (व.)

**कावरणे** अक्रि. पिसाळणे. पहा : **कावणे**

**कावरा** पु. (बैलगाडी) जुवावर मधोमध बसविण्याची एक पितळी वस्तू. हिची नागासारखी आकृती असते व दोन्ही बाजूंना मधोमध लहान आरशी असते. या नागाच्या तोंडातून बैलांचा कासराही घेतात. (व.ना.)

**कावरा** वि. गोंधळलेला : 'कुधनु। कावरा' - कला ८.

**कावरा, कावराबावरा** वि. भयभीत; फार गोंधळलेला; भय, आश्चर्य, राग यांनी चकित झालेला; घाबरलेला; बुजलेला. [क. कावु = ताप, शेक + बेवरू = घाम]

**कावरा कोकोडा** पु. कावळा. (झाडी.)

**कावरुख** न. झाडावरचे बांडगूळ : 'संसार हें कावरुखें। झाड तैसें।।' - ज्ञा १५. ५२.

**कावरुख** वि. (ल.) क्षणभंगुर; आश्चर्यकारक.

**काव(वि)रे** न. वेड; भ्रम : 'लाविलें कावरें। प्रल्हादासी म्हैसासुरें।' - तुगा २८१.

वि. वेडे; पिसाळलेले; भ्रमात्मक; आभासात्मक; आश्चर्यकारक : 'परी तें असो हें ऐसें। कावरें झाड उससे।' - ज्ञा १५. १०९.

**कावरेजणे** क्रि. पिसाळणे; रागावणे. (झाडी)

**कावल-ली-ल्या** न. १. फार जुने झालेले, झिजून पातळ झालेले किंवा नवे असून अतिशय हलके असलेले भांडे. (को. गो.) २. किडकी, जीर्ण झालेली तुळई, लाकूड. ३. खापराचे फुटके भांडे : 'नरदेह खोंकर जैसें फुटके कावल।' - स्वादि ६. ४. ७६.

वि. १. झिजलेले; मोडीचे; निरुपयोगी (भांडे इ.). २. किडका; मोडका; किरकोळ (खांब, तुळई); कीडखाद (भाजी). [सं. कोमल]

**कावल(ळ)काठी** स्त्री. हलकी काठी; किरकोळ लाकूड; झिलपी; निरुपयोगी लाकडाचा तुकडा.

**कावला** पु. चर; पाण्याचा पाट. पहा : **कालवा**

**कावली** स्त्री. १. पाटलीचा हूक (खीळ). २. इरल्याचा सांगाडा. (झाडी.)

**कावली** पु. पाच सहा इंच लांब व बराच रुंद, छातीवर व पाठीवर दोन दोन कल्ले असणारा एक मासा; फेकिन.

**कावशी-सी** स्त्री. किळस; अन्नद्वेष; वीट; अनिच्छा; उबग; घृणा : 'पहिल्यानं गरवार । बसे अन्नासि कावशी ।' - वलो १००. (व.) [सं. क्लेश]

**कावळपात्री** वि. दूध, ताक इ. ओतण्यासाठी कावळ्याच्या चोचीसारखे टोक असणारे भांडे : 'नुसतं एखादं कावळपात्री भांडं मोलकरणीनं हरवलं तर कोण चुटपुट लागते जिवाला.' - टेपी १५७.

**कावळा** पु. १. काळ्या रंगाचा, लांबट व बळकट चोचीचा, मांस, किडे, गोचीड वगैरे खाणारा, कावकाव असा कर्कश शब्द करणारा एक पक्षी; काक. २. अगस्त्याच्या फुलातील कावळ्याच्या आकाराची काडी. ३. केळफुलाच्या दात्यांतील एक न शिजणारा निबर तंतू. हा काढून नंतर दात्यांची भाजी करतात. ४. आमटी वाढण्याचे कावळ्यासारखी चोच असलेले एक पात्र. ५. (जरतार) कावळ्याच्या चोचीच्या आकाराचा एक चिमटा. ६. (ल.) दुसऱ्याचे मर्म वा न्यून हुडकून घाव घालणारा. [सं. काक] (वा.) ० **शिवणे** - १. मृताच्या दहाव्या दिवशी त्याच्या नावाने केलेल्या पिंडाला कावळ्याने स्पर्श करणे. २. स्त्री अस्पर्श झाली असताना लहान मुलांच्या समजुतीकरिता हा शब्द वापरतात. (कावळा शिवला म्हणजे पाप लागते अशी समजूत) : 'मद्विक्रम तुच्छ नरा, शिवला हा जेविं काक डाग मला।' - मोवन १२. ३७. **कावळ्याचे आयुष्य असणे** - शंभर वर्षे म्हणजे दीर्घायुष्य असणे (कावळा दीर्घायुषी असतो त्यावरून). **पांढरे कावळे जिकडे असतील तिकडे जाणे** - देशत्याग करणे. **कावळे कोकलणे,**

**ओरडणे** - फार भूक लागणे. **कावळे म्हातारे जावप** - पुष्कळ काळ लोटणे. (गो.) **कावळे सोडणे** - भय दाखविणे : 'त्यांणीं कावळे सोडून लिहीलें आहे.' - ऐलेसं १६७. **कावळ्याच्या गळ्यात पडणे** - नालायक माणसाशी लग्न होणे.

**कावळा** पु. १. कावळी नावाच्या वेलीचे फळ. २. गाडीवानाच्या चाबकाच्या टोकाला असलेला गोंडा. ३. नारळीच्या झाडाच्या शेंड्यावरील कोवळ्या पानांचा झुबका. (को.)

**कावळाड** स्त्री. रुंद तोंडाची मातीची घागर. (कु.)

**कावळामोर** पु. मुलांचा स्काउटचा एक खेळ.

**कावळी** स्त्री. १. कावळ्याची मादी. २. गोव्याकडे कुंपणात उगवणारे पुरुष - दीड पुरुष उंचीचे, चिंचेच्या पानांसारखी पाने असलेले व वाटाण्याएवढी जांभळ्या रंगाची फळे येणारे एक झाड. याची फळे मुले खातात. ३. एक औषधी वनस्पती. (गो.) ४. ज्वारीचा, जोंधळ्याचा एक प्रकार. ५. (सोनारी) विस्तवातील मूस उचलण्याचा वाकड्या टोकाचा चिमटा; सांडसी. ६. लांबट घडीची टोपी. हिला मागे जाड शेपूट असते. ही लहान मुले घालतात. नावेची टोपी.

**कावळी** स्त्री. खेळातील पराभव; हार. (कु.)

**कावळी पांढरी** (वन.) एक प्रकारची औषधी वेल. या वेलीची पाने द्विदल असून त्याला कात्रे असतात. वेलीचा रंग प्रथम तांबूस नंतर पांढरा होतो.

**कावळे** (वन.) गोव्याकडे होणारे एक झाड. पहा : **कावळी**

**कावळेबुक** न. पत्रे, पावत्या बिले इ. चिकटवून ठेवण्याकरिता शिवणीपासून दोन बोटे रुंदीच्या कागदाच्या पट्ट्या कापून शिवून तयार केलेले चिकटबुक.

**कावळ्या आवय** सारखी हिंडणारी व इकडची बातमी तिकडे करणारी बाई. (गो.)

**कावळ्याचा डोळा** १.एका वनस्पतीचे फूल. (राजा.) २. (ल.) फार पातळ ताक.

**कावळ्याची छत्री** पहा : **कुत्र्याचे छत्र**

**कावळ्याचे गोत** एखाद्याच्या घरी काही निमित्ताने जमलेला गोतावळा; अनेक नात्यागोत्याच्या माणसांची गर्दी, झुंड वगैरे.

**कावा** पु. १. घोड्याची रग जिरवण्याकरिता त्याला घ्यायला लावलेले फेरे; मंडळे, घिरटी; घेर; घोडा भरधाव पळतांना त्याला वाटेल तसा वळविणे; फिरविणे; मंडळावर धरणे, पुढे मागे भरधाव सोडणे (क्रि. देणे.): 'कर्णाभवतें बहु उरगाभवतें जेवि गरुड कावे घे।' - मोद्रोण १५.२०. २. लुच्चेगिरी; ठकबाजी; कपट. ३. गुप्त कट; मसलत; लुच्चेगिरीची योजना; कारस्थान. ( क्रि करणे, बांधणे.) ४. हुलकावणी : 'गनीम यांनीं कावे देत देत अंतर्वेदप्रांतीं गेले. -भाब ११०.५. पिछेहाट : 'वीरीं घेतला रणकावों। देखोनि धाविन्नला शाल्वो। - एरुस्व १०.६२. [ का. काव् = खणणे, तपासणे]

**कावाकावी** स्त्री. धुसफूस; चिडाचीड: 'उगच आणि कावाकावी नको.' - ऊन १५९.

**कावाड** न. कवाड; दार; फाटक. [सं. कपाट = कवाड]

**कावाडावा** पु. कावादावा: 'हैदर सडा होऊन सिगंटाळूरावर आहे. काव्याडाव्यांत आहे.' - ऐलेसं ३१४५.

**कावादावा** पु. १. लुच्चेगिरी; सोदेपणा; भेद. (क्रि. बांधणे, करणे.) २. गनिमीकावा: 'मुलूख काव्यादाव्याने सर करून' - पाब १७. ३. तावडी; हकटक; गव : 'काव्यादाव्यांत गनीम सापडला'- पेद ३३.२४. [कावाचे द्वि.]

**काविजा** पु. खड्या; लोखंडी कामाच्या कारखान्यातील डाक लावण्याचे हातोड्यासारखे साधन.

**कावित्र** न. लबाडी; धूर्तता; कावा; युक्ती; कपट; कसब; कवटाळ; कारस्थान: 'रामजी पाटलानें काय कावित्र केले असेल तें ते जाणत.' -मार्शियांका ८४३.

**काविरडा** वि. दुखणे वगैरेमुळे चिडखोर बनलेला; त्रासिक; कावलेला. (को.)

**काविरे** न. १. वेड; भ्रम; धुंदी; भ्रांती : 'त्यांचें अज्ञान काविरें नुरे।' - विउ ११.११८. २. काहूर; अंधारी; काळोख.
वि. वेडगळ.

**काविलथा** पु. कलथा; उलथने.

**कावीड** स्त्री. (सोनारी) शेवटी वाटोळी केलेली लोखंडी तार.

**कावीण-ळ** पहा : **कामीण** : 'कावीळ झाली म्हणजे सगळें जग जसें पिवळेंच दिसतें.' - लोटिकेले ४.४.१८९४. [ सं. कामला]

**कावील** स्त्री. उसाच्या रसाची मोठी काहील.

**कावीळ** स्त्री. यकृताला सूज आल्याने होणारा रोग; कामीण.

**कावेखोर-दार-बाज** वि. युक्तिबाज; धूर्त; आतल्या गाठीचा; लबाड; वस्ताद; गुप्त कट करणारा; कारस्थानी : 'असली कावेबाज वकिली करण्यास... दुसरें स्थळच नव्हतें काय?' - लोटिकेले ४.४.५१.

**कावेजिणे** क्रि. घोडा आवरण्यासाठी लगामाला हिसके देणे.

**कावेडी** स्त्री. स्त्रियांच्या हातातील दागिने गळून पडू नयेत म्हणून दागिन्यांच्या सांध्याला लावलेले एक साधन. (ना.)

**कावेशी** स्त्री. तावडी; आटोका; पकड; पेच : 'अशी मराठी कावेशी लढविल्यावाचून ते मनुष्य हवालदील होणार नाही.' - शिवदि २०९. (वा.) **कावेशीत आणणे** - गोत्यात आणणे; अडचणीत आणणे : 'आता कावेशीत आणायास्तव (असें) बोलताव.' - पुरंदभा ३.१७३.

**कावो** पु. गोळा.

**कावो** पु. पिछेहाट; कंटाळा; त्रास.

**काव्य** कविता; कवितेचे एखादे कडवे, भाग, पद्यरचना : 'माझी प्रज्ञावेली वेल्हाळ। काव्ये होय सफळ।' - ज्ञा १४.२१. [ सं.]

**काव्यकथा** स्त्री. पद्यात्मक कथा; गोष्ट. हा शब्द मुख्यत: रामायणाबद्दल योजतात; कथाकाव्य. [ सं.]

**काव्यकला** स्त्री. काव्य करण्याचे चातुर्य; काव्यकौशल्य; कवित्वशक्ती.

**काव्यचो(चौ)र** वि. दुसऱ्याचे लिखाण चोरून आपल्या नावावर प्रसिद्ध करणारा.

**काव्यपठक** पु. भाट; कविता पाठ म्हणणारा : 'हे काव्यपठक कोणी कोणी स्वत:हि काव्यें रचीत.' - नि ४०.

**काव्यमय** वि. कविकल्पनेतील; काल्पनिक; तर्कदुष्ट; अवाजवी : 'स्त्रियांच्या ठिकाणीं सद्गुणांची कल्पना करणे हे केवळ काव्यमय आहे.' - के ११.४.३६. [सं.]

**काव्यशास्त्र** न. (समीक्षा) साहित्यनिर्मितीची क्रिया कशी होते हे सांगून साहित्याचा आस्वाद कसा घ्यावा हे सांगणारे शास्त्र.

**काव्यसमस्यापूरण** न. दुसऱ्याने दिलेला अपूर्ण श्लोक पुरा करणे; दिलेल्या एका चरणाला अनुरूप असे नवीन तीन चरण रचणे.

**काव्यानुभूती** स्त्री. (समीक्षा) काव्यात प्रकट झालेला, व्यक्त झालेला रस किंवा भावना यांची रसिकाला होणारी जाणीव.

**काव्हळा-ळी** स्त्री. आरडाओरडा; गडबड; कांगावा; गोंगाट. (व.) [सं. कोलाहल]

**काश** पु. कासे गवत. याची वाढ जोराची असते. याचा शाकारणीसाठी उपयोग करतात. देठापासून दोर करतात. हे गवत म्हशींना जास्त आवडते. [सं. काश]

**काश** पु. कासोटा : 'परब्रह्म उदाशा: घालितां काश: सुंदर्ये आनीती वास: पाहों नेदी।' - ऋव ५६६.

**काशणे** अक्रि. कंबर बांधणे; तयार होणे : 'पव्हणारु आइता। काशि जेवि॥' - राज्ञा १३.५४४.

**काशश्वास** पु. श्रमयुक्त श्वासोच्छ्वास; धापा; उसासा. [सं.]

**काशा, कासाड, काशिया** स्त्री. अव. १. कुंदा गवताच्या लहान मुळ्या; दुर्वांच्या मुळ्या : 'हातीयेरां दुकाळ पडला। मग यासी नांगर सापडला। सैन्य नांगरावयां आला। वीर काशिया काढित।' - एरुस्व १०.७४. (व.) २. कडब्याचे बुडखे. यांचा उपयोग सरपणासाठी होतो. (एकवचन काशी - क्वचित् उपयोग.) [सं. काश] (वा.) ० **भरडणे** - बरळणे; बडबडणे; शिव्या देणे; शिव्याशाप हासडणे.

**काशानशी** क्रिवि. कशासाठी : 'वादावाद समर्थांशी काशानशीं करावा।' - तुगा १३८३.

**काशि(शिं)दा** पु. एक वनस्पती.

**काशिवडा** पु. एक पावसाळी तण.

**काशी** स्त्री. देवदारी रिकामा खोका. (गो.) पहा : **काश्याव**

**काशी** स्त्री. १. भात कापल्यानंतर जमिनीत राहिलेला त्याचा बुडखा. (बे.) २. पहा : **काशा**

**काशी** स्त्री. वाराणसी; बनारस; हिंदूचे एक पवित्र क्षेत्र. (वा.) ० **असणे** - आश्रय असणे; आश्रयाने राहणे. ० **करणे** - वाटोळे करणे; वाताहात लावणे (अहि). **काशीची वाट दाखविणे** - लहान मुलांना कानांशी हाताने दाबून धरून वर उचलणे व सूर्याची पिल्ले दाखवणे. ० **रामेश्वराचे अंतर** - फारच मोठे अंतर. **काशीस गंगा नेणे** - गंगेच्या पाण्यानेच गंगेचे तर्पण करणे; निरुपयोगी गोष्ट करणे.

**काशी** स्त्री. १. वाफा : 'माझी चाळीस आळ्यांची काशी तयार झाली.' - आआशे २८८. २. कलिंगड, टरबूज इ. लावण्याचा मळा, जागा; ते पीक; वेल.

**काशीकर** पु. १. काशीचा रहिवासी. २. काशीयात्रा केलेला. ३. (ल.) अत्यंत लुच्चा माणूस, काशीकर गुंड. त्याच्यापेक्षा नाशिककर शंभरपटीने लुच्चा असतो यावरून असे म्हणत असत. उदा. शंभर काशीकर एक नाशिककर.

**काशीकापडी** पु. काशीफळाचे म्हणजे भोपळ्याचे भिक्षापात्र घेऊन फिरणारा भिकारी. हे भिकारी सतत तीर्थोतीर्थी यात्रा करीत, भीक मागत फिरतात : 'वडील स्त्रीस बहुत दिवस संतान नव्हतें तिने मल्हारी या नावाचे काशीकापड्याची सेवा त्याचे आजारीपणात केली.' - केळकर संग्रह चास जो दप्तर.

**काशीकापड्या** पु. मोठ्या गोल डब्यात ठेवलेली चित्रांची गुंडाळी उलगडून वर्णन करत करत मुलांना दाखवणारा; चित्रकथी : 'काशीकापडे येतात, चित्रे दाखवतात आणि जुनीपानी कापडे बळकावतात.' - काआ ६.

**काशी कुवाशी** शत्रूला अडथळा करण्यासाठी किल्ल्याभोवती चौफेर खुली जागा सोडून पलीकडे पुन्हा चौफेर मैल अर्धा मैल निवडुंग, चिलारी किंवा बांबू यांचे कायमचे राखलेले जंगल.

**काशीगोत** न. सबंध जात; जातगंगा (एखाद्या निर्णयार्थ भरलेली.).पूर्वीच्या लोकांची वागण्याची रीत.

**काशीचा कोतवाल** काशी येथील काळभैरव. काशीत केलेल्या पापाबद्दल हा शिक्षा करतो अशी समजूत.

**काशीचा पट** काशी येथे तयार होणारे व ज्यात रामायणातील प्रसंगाची चित्रे काढली आहेत असे वस्त्र, पट, कापड. वि. (ल.) लांबलचक; कंटाळवाणे; त्रासदायक (गोष्ट, भाषण, आर्जव, चरित्र.). (क्रि. काढणे, आणणे.)

**काशीचा सोदा** बदमाश; अट्टल लुच्चा : 'अशा वेषधारी गुरूबरोबर जे चेले असतात तेहि काशीचे सोदे असतात.' - व्यनि ५०.

**काशी(स)द** पु. नेहमीचा पत्रे पोचविणारा दूत; जासूद; हरकारा. [फा. कासिद]

**काशीफळ** न. १. काळा-तांबडा भोपळा; गंगाफळ; चक्की. हा भोपळा बसकट व करवेदार असून रंग हिरवा, पांढरा, शेंदरी असतो. वेलाची वाढ कमी; दुसऱ्या भोपळ्यापेक्षा याची भाजी कमी गोड असते. २. एक वेल : 'काशीफळ ही एक अमेरिकन वेली शेकडो वर्षांपूर्वी भारतात रूढ झाली आहे.' - वनश्री ५९८.

**काशीमाल** पु. मोहर. -(तंजा.)

**काशीयात्रा** स्त्री. १. काशीची तीर्थयात्रा. २. (सोंगट्यांचा खेळ) कवड्यांचे दान. दहा किंवा पंचवीस तीन वेळा लागोपाठ पडले असता ते फुकट जाते त्यावेळेस म्हणतात. ३. (बायकी) अल्पवयी वधूवर एकमेकांना भेटली किंवा जवळ आली असताना थट्टेने म्हणतात.

**काशीशिक्का** पु. काशीच्या टांकसाळीत पाडलेला रुपया.

**काश्मि(श्मी)र-रा-री** स्त्री. १. केशर : 'पैं काश्मिरीचा रवा। कुंकुमावरि पांडवा' - ज्ञा १५.३१७. २. स्फटिक; शुभ्र संगमरवरी दगड : 'मग काश्मिरीचें स्वयंभा कां रत्नबीजा निघाले कोंभा' - ज्ञा ६.२५३.

**काश्मिरी** स्त्री. १. वाग्देवता; सरस्वती : 'प्रभु काश्मिरीं मुकें। नुपजे हें काय कौतुकें।' - ज्ञा १३.११६८. २. काश्मिरी विद्या; शैव तत्त्वज्ञान.

**काश्मीर** न. लोकरीच्या कापडाचा एक प्रकार; काश्मिरा.

**काश्यांव** पु. मोठी पेटी; शव वाहण्याची पेटी. [पो. काश्याओ]

**काश्योत** न. लहान पेटी; डबी.

**काषल** न. गाईची कास; गो-धन : 'काषल घडिअले।'-वेळा शिला १.४.

**काषाय** वि. तांबडे; भगव्या रंगाचे (वस्त्र) : 'कीं बाह्याभ्यंतरे अरागें रातैलीं। तेसीं काषायें पांगुरैलीं। - ऋ २१. [सं.]

**काष्टक** न. (शाप.) कचकडा; सेल्युकोच.

**काष्टकुट-ट्ट** पु. सुतारपक्षी : 'चीडी आणि काष्टकुट पक्षी।' - पंचो ५२.१.

**काष्टडोणी** स्त्री. लाकडाची होडी. [सं.]

**काष्टा** पु. धोतर; लुगडे यांचा पाठीमागे खोवण्यात येणारा सोगा; कासोटा. (क्रि. घालणे, फेडणे.) [सं.कच्छ + पट = कच्छट] [क. कासि-से](वा.) **काष्ट्याचा बळकट** - एकपत्नीव्रतस्थ; अव्यभिचारी २. काष्ट्याची बळकट पतिव्रता.

**काष्टा** पु. मोठी कास. [सं. कच्छ]

**काष्टामल** न. (शाप.) लाकडापासून निघणारे आम्ल.

**काष्टि-ष्टी-स्टी** स्त्री. लंगोटी (उपहासाने म्हणतात). (कु. गो.) पहा : **कासोटी**

**काष्टी, काष्टीभूत** स्त्री. समाधी अवस्था; समाधी; समाधीस्थित : 'पाहाति तवं काष्टी लागली: असे :' - लीचउ २३८.

**काष्ठ-ष्ट** न. लाकूड.

पु. (ल.) उंच व लुकडा माणूस. [सं. काष्ठ] (वा.) ० **वळणे, होणे** - अशक्त होणे; कृश होणे. ० **खाणे** - अग्निकाष्ठ भक्षण करणे; चितेत उडी टाकून मरणे : 'तुजसारिखा असतां पिता। आम्हा वैधव्य आलें आतां। तरी काष्ठें खाऊं आतां तुज देखतां।' - कथा २.२.४९.

**काष्ठकाया** स्त्री. वात सरकवण्याची लाकडी काडी.

**काष्ठकोरणी मुद्रक** चित्रांचे कोरीव ठोकळे करणारा.

**काष्ठघंटा** स्त्री. ओढाळ गुराच्या गळ्यात बांधायचे लाकडी ओढणे, लोढणे. [सं.]

**काष्ठ जीवाश्म** काष्ठाच्या रूपात आढळणारा एखाद्या वनस्पतीचा भाग; प्राचीन कालातील वनस्पतीकाष्ठांचा दगडावरील ठसा.

**काष्ठतक्षणकारी** स्त्री. लाकडावर कोरीव काम करण्याची कला.

**काष्ठतंतु-तू** पु. १. (शाप.) कचकडा. २. लाकडातील तंतू. [सं.]

**काष्ठनक्काश** पु. लाकडावर कोरीव काम करणारा.

**काष्ठपात** न. लाकडी आसन.

**काष्ठपापुद्रा** पु. जाड ओंडक्यातून वाफ व यंत्राच्या साहाय्याने काढलेले सलग पातळ थर.

**काष्ठपुतळा-ळी** पु. स्त्री. लाकडाची कळसूत्री बाहुली : 'सूत्रधार न हालवितां। काष्ठपुतळा नाचेना।' - हरि १.६५.

**काष्ठबंध** पु. (पुरा.) लाकडी मानखोडा. अपराधी माणसाला शिक्षा म्हणून त्याची मान व हात यात हा खोडा अडकवण्यात येत असे.

**काष्ठमाळा** स्त्री. तुळशीच्या काष्ठांची माळा : 'काष्ठमाळा गंधमाळा।' - दास १३.१०.२.

**काष्ठयंत्र** न. अपराधी मनुष्याच्या हातापायात घालायचा खोडा. [सं.]

**काष्ठयुद्ध** न. बुद्धिबळाचा डाव : 'काष्ठयुद्धांत... सरशी होणे हें जसें खेळणाऱ्यांच्या पटाईतपणावर नेहमी असतें' - निमा ९७१.

**काष्ठवेदिका** स्त्री. लाकडी चौरंग; पाट; लाकडाचे उंच आसन : 'पायन्यांची काष्ठवेदिका तयार करण्यात येऊन...' - ऐरापुप्र (बडोदे) ५.२९०. [सं.]

**काष्ठस्वार्थ** पु. लाकडे विकण्याचे काम : 'येक काष्ठस्वार्थ करिती। येक शुभा येकवाटिती।' - दास ६.९.७.

**काष्ठा** स्त्री. १. वेळेचे माप; अठरा निमिषांचा काल; कलेचा एक-तिसांशावा भाग. २. दिशा : 'नादें काष्ठा घुमती।' - दे कृष्णजन्म ६८. ३. मर्यादा : 'देखोन पुंडलिकाची निष्ठा। नेणों चांगली पूर्ण काष्ठा।' - ४६६. [सं.]

**काष्ठिका** स्त्री. काठी : 'धन्य तीं गोधनें कांबळी काष्ठिका।' - तुगा २०८.

**काष्ठौषध-धि-धी** न. स्त्री. औषधोपयोगी वनस्पती; त्यांची मुळे, पाने, फुले वगैरे. [सं.]

**कास** स्त्री. गाय, म्हैस वगैरे पशूंची दुधाची ओटी : 'सुरभीच्या कासेंसी सुज्ञें होऊनि वत्स लागावें।' - मो. (वा.) ० **घालणे** - गाय, म्हैस वगैरे गाभण असताना जसजसे दिवस भरत येतात व विण्याची वेळ जवळ येते तसतशी ओटी मोठी होत असते. त्याला कास घालणे असे म्हणतात. ० **चोरणे** - गाय किंवा म्हैस यांनी पान्हा बाहेर न येऊ देणे; पान्हा थांबवणे.

**कास** स्त्री. १. धोतर, लुगडे याचा कासोटा; लंगोटी; काचा. (क्रि. घालणे, खोचणे, फेडणे.) : 'तुळशीहार गळां। कासें पीतांबर।' - तुगा २. २. (ल.) आश्रय; आधार: 'कामक्रोधलोभांची कास। न सोडीच पाळिली भाष।' - ज्ञा १६.४४८. [सं. कच्छ] (वा.) ० **कसणे, घालणे, बांधणे** - १. कासोटा घालणे २. (ल.) काम करण्याला तयार असणे; कंबर बांधून काम करायला तयार असणे; संकल्प करणे : 'आणि होय येवढी कास। कासिली जेणें।' - अमृ ७.१२९. **कासे घालणे** पाठी घालणे : 'मार्कंडेयाते कासे घालुनि घेउनि या :' - लीचउ ४८.४५. **कासेस लागणे,** ० **धरणे** - एखाद्या बलिष्ठ माणसाच्या आश्रयाला जाणे : 'तरी आम्हीं तुझी धरियेली कास।' - तुगा १६०७. **कासेस लावणे** - आश्रय देणे; आधार देणे : 'आमुचें चाळकपण कृष्णासि आलें। कासें लाविलें जनार्दनीं।' - एरुस्व १६.१६५. ० **सोडणे** - आधार टाकून देणे : 'तर्काची कास सोडता कामा नये.' - चित्र १२४.

**कास** पु. खोकला : 'साखरलिंबू कास, त्रिदोष दूर करते.' - फचि १२०. [सं. कास]

**कास** स्त्री. कंबर.

**कास** काळजी (अहिराणी).

**कास** न. शिकार. (गो.)

**कास** स्त्री. वर्ग, प्रत; वळ : 'लोहार, सुतार, महार व मांग यांस पहिली किंवा थोरली कास असें नाव आहे.' - ज्ञाको अ ५२७. [सं. कक्षा]

**कास** न. कुरण (गवताचे). (को.) [ सं. काश = गवत]

**कास** स्त्री. हलकी किंवा भारी जमीन. ही बागाईत किंवा जिराईत करण्यासाठी रयतेस दिलेली असते. या जमिनीचे लहान लहान भाग पाडून ते लागवडीला आणतात, तथापि सरकारसारा मात्र त्या भागांवर किंवा त्यांत उत्पन्न होणाऱ्या सरसनिरस पिकांवर न बसविता सबंध जमिनीवर बसविलेला असतो. केव्हा केव्हा निव्वळ बागाईत किंवा जिराईत जमिनीलाही कास म्हणतात. पहा : **कासबंदी, कासजमीन** २. खाचराचा एक लहान भाग. खत वगैरे साठविण्यासाठी राखलेला खाचराचाच भाग. (को.) ३. दुसरीकडे पुरवणीसाठी किंवा भरीसाठी बक्षीस दिलेली जमीन. (माण.)

पु. १. डोंगरावरील वरकस भागांत मशागत केलेली म्हणजे धान्य पेरण्यास योग्य केलेली जमीन. २. रेताड जमिनीचे मोठे खाचर. (कु.) [ सं. कृष् = कसणे]

**कास** नाण्याचा एक प्रकार.

**कास** वि.क्रिवि. १. (शिंपी.) सरळ. २. सरळ कापलेले कापड.

**कासई** स्त्री. एक वनस्पती : 'दर्भाची मुळे, कासईची मुळे यांच्या काढ्यात तयार केलेले दूध.' - निऔ ७७.

**कासई** न. १. (स्त्रियांचे) काळ्या रंगाचे पातळ. (व.) २. सीमान्त पूजनाच्या वेळी स्त्रियांना द्यायची मानाची लुगडी.

**कासकवळी** स्त्री. कंबरेची मिठी : 'दोघे आले कासकवळी।' - कथा ३.१३.६५.

**कासकुशा** स्त्री.अव. थंडीचे कापरे; कापणे; कुडकुडणे; हुडहुडी. (क्रि. येणे, देणे.) [ कूसचे द्वि.]

**कासकूस** स्त्री. काचकूच; टंगळमंगळ; अळंटळं; धरसोड.

**कास(ज)गी** स्त्री. ज्याची दोरी घोड्याच्या पाठीवरून शेपटीखालून गेलेली असते असा लगाम.

**कास जमीन** प्रतवारी न लावलेली सरसकट जमीन. पहा : **कासबंदी**

**कासणी-नी** स्त्री. एक वनस्पती; एका झाडाचे पांढरे बी; चिकरी. [हिं.]

**कासणे** उक्रि. १. काचणे; झिजणे. २. आवळून बांधणे; कसणे (कास, कासोटा) : 'कासे काशिली निजभक्ती ।' - रास ४.३६. ३. कमर धरणे; कासेस लागणे : 'पोहणारा आइता। कासे जेवीं।' - ज्ञा १३.५४६.

**कासफोड** पहा : **कासेफोड**

**कासबंदी** स्त्री. निरनिराळ्या प्रतीच्या जमिनीचे प्रतवार निरनिराळे तुकडे करण्याची पद्धत. एकंदर जमिनीचा मगदूर पाहून त्यावरून प्रत्येक तुकड्यावर प्रतवार उत्पन्नाप्रमाणे सारा बसविण्याची रीत. पहा : **कास**

**कासबिघा** पु. कासबंदी गावातील जमिनीच्या निरनिराळ्या तुकड्यांचे प्रतवार सारा बसविण्याकरिता धरायचे एक परिमाण; साऱ्यासंबंधी किंमत काढण्याचे एक माप.

**कासया** क्रिवि. कशाला; का; कशाबद्दल; कशाकरिता : 'नाना साधनीं साक्षपें। कासया सिणावें।' - दास ४.६.२३.

**कासरा** पु. १. बैलांना बांधलेली लगामासारखी दोरी. (ही वेसणीतून ओवतात); बैलांच्या शिंगांना बांधलेली दोरी. २. आसूड; चाबूक. [सं. कश-कशा = दोरी, चाबूक] (वा.) **कासराभर दिवस, सूर्य येणे, कासराभर दिवस, सूर्य राहणे, दोन कासरे दिवस, सूर्य येणे; दोन कासरे दिवस, सूर्य राहणे** - क्षितिजापासून कासऱ्याच्या लांबीइतका सूर्य उगवल्यानंतर वर येतो किंवा मावळताना राहतो ती वेळ. ग्रामीण भागात प्रचलित. सकाळचा सातआठ वाजण्याचा किंवा संध्याकाळचा पाचसहा वाजण्याचा सुमार.

**कासरी** स्त्री. भाजी किंवा फळे यांची कापून वाळवलेली फोड; काचरी.

**कासलाठी** पु. कलथा. (कु.)

**कासली** स्त्री. एक वनस्पती. हिने सापाचे विष उतरते असे म्हणतात. हिच्या फळाला मुद्रा म्हणतात. मुंगुस वनस्पती.

**कासव** पु. न. १. पाण्यातील एक प्राणी. याची पाठ अतिशय कठीण असून पोट फार मृदू असते. काही कासवे जमिनीवर फिरणारीही असतात; कूर्म. २. हाताला किंवा पायाला होणारा, आत पाणी असलेला एक फोड; काश्याफोड. हा फोड काटा वगैरे टोचल्याने होतो. ३. रांगोळीची कासवासारखी काढलेली आकृती. [ सं. कच्छप]

**कासव अढी** स्त्री. (मल्लखांब) पाठीमागून दोन्ही पायातून वेताचा मल्लखांब काढून घेऊन मारावयाची अढी - व्याज्ञा ३.२४५.

**कासवट** वि. काळसर.

**कासवटा-टी** पु. कासोटा : 'नारदा दिधली कासवटी।' - नागा १९६७.

**कासवदृष्टी** स्त्री. दयादृष्टी; कृपादृष्टी; कूर्मदृष्टी.

**कासव फुगडी** मुलींचा एक खेळ.

**कासवळ** पु. तिळाची एक जात.

**कासवाचे तूप** न. असंभवनीय गोष्ट; मिथ्या कथा (सशाच्या शिंगाप्रमाणे).

**कासवी इरले** कासवाच्या पाठीसारखे केलेले एक प्रकारचे गोल इरले. हे फक्त डोक्यावर घेतात. (मावळी.)

**कासव्या रोग** १. बस्तिप्रदेश ताणला जाऊन त्याच्या अंगी जे काठिण्य येते तो रोग. २. जनावरांचा एक रोग.

**कासश्वास** पु. कफ व दमा; श्वासावरोध. [ सं.]

**कासळ** पु. किळस येणे; कंटाळणे : 'मग इंद्रियार्थी अखंडित। कासळा ये तयाचे चीत।' - ज्ञाप्र ७१२.

**कासळणे** अक्रि. धापा टाकणे; दम लागणे; ऊर्ध्व लागणे (चढण चढण्याने, धावण्याने). (को.) [ सं. कास]

**कासळव** न. एक झाड : 'उन्हाचा त्रास होऊ नये म्हणून कासळवाची पानं त्यानं डोक्यावर धरली होती.' - कलंदर ३१०.

**कासं(सां)डी** स्त्री. दूध काढण्यासाठी वापरण्यात येणारे एक प्रकारचे भांडे (धातूचे); चरवी; गुंडी. [ त.काशंडि] [ सं. कास्य + हंडी]

**कासं(शिं)दा** पु. एक झुडुप. याला पिवळी फुले येतात. शेंगा दाभणीसारख्या जाड असतात.

**कासा** पु. भोजनपात्र; ताट (वा.) ० **देणे** - उदरनिर्वाहासाठी देणे;

पोटगीसाठी देणे : 'मौजे खांबवदा हा गांव सदाशिव बल्लाळ यासी कासा महाराव हाडे यानी दिल्हा असे.' - शिशाइसांभा १.१४३.

**कासा** पु. कासव.

**कासाई** स्त्री. पहा : **कासइ**

**कासाकुळी** स्त्री. कासाविशी; तळमळ; व्याकुळता; तगमग; घाबरगुंडी : 'येरांशि लाटाच्या कल्लोळी। कासाकुळी करीतसे।' - एभा ८.४६.

**कासाची लागवड** वांग्याच्या लागवडीचा एक प्रकार. (को.)

**कासार** पु. एक जात व त्या जातीतील व्यक्ती; पितळ, तांबे, कासे वगैरेंची भांडी घडविणारा व विकणारा : 'चार शेर तांब्याला कां भ्याला म्हणे कासार देत आधेली.' - ऐपो ३७०२. [सं. कास्यकार]

**कासार** पु. (मूळ कांचार), बांगड्या करणारा; भरणारा. [ सं. काचकर]

**कासार** न. सरोवर; तलाव; डोह : 'म्यां तुज अमृताब्धिपुढें मिरवावें स्वयश काय कासारें।' - मोभीष्म १२.५४. [ सं.]

**कासारथळ** न. बांगडीवाले, भांडीवाले कासार आणि पटवेकरी यांच्यावरील कर.

**कासारभट्टी** स्त्री. बांगडीवाले, भांडीवाले यांच्या भट्टीवरील सरकारी कर.

**कासारभात** पु. जाड्याभरड्या व अर्धवट सडलेल्या तांदळांचा फडफडीत शिजलेला भात. (राजा.)

**कासारभांडे** न. तांब्यापितळेचे भांडे. (व.)

**कासारभुंगा** पु. तांब्याची व पितळेची भांडी घडविणारा.

**कासावणे** पहा : **कासळणे**

**कासावयले भूत** न. काजऱ्यावरचे भूत; पिंपळावरचा मुंजा. (गो.)

**कासाविसी** स्त्री. व्याकुळता; घाबरगुंडी; त्रास; तळमळ; अतिशय अस्वस्थता : 'तेही कीजती कासाविसी।' - ज्ञा २. ३१२.

**कासावीस** वि. व्याकूळ; अतिशय अस्वस्थ; घाबरा; बेचैन; फार क्षुब्ध; धडपडणारा; तळमळणारा (दु:खाने किंवा तहानेने वगैरे) : 'बहु कासावीस झाला भक्तांसाठीं।' - तुगा १०३.[ सं. कास = खोकला, श्वास] (वा.) ० **होणे** - धापा टाकणे; दम लागणे; जलद श्वास चालणे; जीव घाबरणे.

**कासाळ -ळे** न. झांज; टाल; झांजरी; झंपा : 'त्यांतील वाद्ये अशी दोन टोल एक मोठे कासाळे.' - अआगो १२५. [ सं.]

**कासांडी** पहा : **कासंडी**

**कासिनी** पहा : **कासणी**

**कासियेणे** क्रि. कंबर कसणे.

**कासिंबर** पु. (अप.) काश्मीर : 'आले द्राविड गौड कौंकण कळा कोल्हार कासिंबरी।' - रामसुतात्मज द्रौपदीवस्त्रहरण २०२.

**कासी** स्त्री. तण : 'मग नांगरीजे : दुनीजे : कासीया केडीजंति :' - दृपा १२-१४.

**कासी कोहोरा** कोहळ्याची एक जात. (झाडी)

**कासीणे** सक्रि. परजणे (शस्त्र) : 'ते रतिरायाचे मार कासी।' - उगी ४४५. [ सं. काश् = प्रकाशणे]

**कासीद** पु. जासूद. पहा : **काशीद**

**कासी(सो)द** पु. उंच पिवळ्या फुलांचा, सावली देणारा वृक्ष : '(कासोदा) हा वृक्ष अलीकडे छायावृक्ष म्हणून रूढ होत चालला आहे.' - वनश्री ३४८.

**कासीस** न. मोर्चूद; हिराकस. [ सं.]

**कासुर** न. एक प्रकारचे गलबत.

**कासू** स्त्री. काश नावाच्या गवताची केरसुणी : 'कासुनि भूमि सारविती।' - वसा २१. [ सं. काश]

**कासे** न. घंटेचा धातू; जस्त व तांबे यांचा मिश्र धातू; कथील चार भाग व शिसे एक भाग यांचा मिश्र धातू. [ सं. कास्य]

**कासेफोड** पु. पायाचा किंवा हाताचा तळवा यांना होणारा मोठा व पाण्याने भरलेला पांढरा फोड. हा गुरांच्या पायालाही होतो. पहा : **कासव**

**कासोटा** पु. धोतर, लुगडे यांचा पाठीमागे खोवण्यात येणारा पुढील सोगा किंवा टोक; काष्टा. (क्रि. घालणे, मारणे, खोचणे, सोडणे.)(वा.) कसोटा सोडून देणे - निर्लज्ज बनणे; उद्दाम होणे. **कासोट्याचा खबरदार, बळकट, कासोट्याचे पाणी प्यावयाजोगा** - ज्याच्या हातून व्यभिचार कधीही झाला नाही असा. चारित्र्यसंपन्न. **कासोट्याचा हलका असणे**- विषयी, जारकर्मी असणे. [ सं. कच्छ + पट]

**कासोटी** स्त्री. १. कच्छ; कासोटा : 'मग रुद्र धावे पाठोपाठीं। तेणें सहज सुटली कांसोटी।' - कथा २.५.६६. २. लंगोटी.

**कासोटेकार** वि. लंगोट्या; लंगोटबंद : 'कैसी कासोटेकारा भगवंता। वरिघडी जालिओ।' - शिव २११.

**कासोडा** पु. कौपीन; लंगोट : 'लांब कासोडे : मिरविती आबुलीयां पुढे।' - शिव ८९०.

**कासोदा** पु. एक झुडुप; कासवदा; कासुंदा.

**कास्तकार** पु. शेतकरी. [ फा. काश्त + कार] [ सं. कृष् + कृ]

**कास्तकारवर्ग** पु. शेतमजूर.

**कास्थी** स्त्री. (वै.) लवचिक अस्थिकूर्चा; शरीराच्या सांध्यात असणारे मृदू अस्थीचे वेष्टन; तरुणास्थी; मृद्वास्थी.

**कास्यपाषाणयुग** न. (पुरा.) कासे आणि पाषाणाची हत्यारे ज्या युगात वापरली जात होती ते युग.

**कास्यसंस्कृति-ती** स्त्री. (पुरा.) ब्रांझपासून कास्य धातूपासून बनवलेली हत्यारे आणि वस्तू वापरणाऱ्या लोकांची संस्कृती. [ सं.]

**कास्ला** पु. एकदाणी घडविण्याचे साधन. (झाडी)

**कास्वट** स्त्री. उष्टे हात धुण्याची जागा. (झाडी)

**काह** सना. कोण?

**काहड** न. लाकडे; जंगलातील उत्पन्न : 'काहड चालेल तसे करू आणि पोट भरू.' - समारो ६.१०७.

**काहडणे** पहा : **काढणे**: 'पाऊल मागें काहडीत तेथून।' - दावि १४१.

**काहली** पहा : **काहिली**

**काहली** वि. आजारी; अस्वस्थ; बिघडलेली : 'च्यार दिवस स्वस्थता व च्यार दिवस काहली प्रकृती असती.' - पुणे अख २.१५.

**काह(हि)ली** स्त्री. आळस; सुस्ती. [फा. कहल = आळस]

**काहवणे** अक्रि. त्रासणे. पहा : **कावणे** : 'कामक्रोध दीर फारच जीव माझा काहवला।' - पला १२.

**काहवा** पु. गोंधळ; कोलाहल; आरडाओरड : 'येती गोकुळिंच्या समस्त युवती ऐकोनि तो काहवा।' - आनंदतनय, नवरसचरित्र ४१.३१८. [ध्व.]

**काहवा** पु. कॉफी. पहा : **कव्हा**

**काहळ-ळा** पहा : **काहाळ** : 'शृंगें डिमडिमी काहळ मोहरी। झल्लरी मृदंग ताल नानापरी।' - जै १८.३८.

**काहा** सना. १. कोणी एक : 'तेथ काहाचेनि अंतष्करणें। प्रणउ स्मरावा।।' - राज्ञा ८.१२०. २. कशाला. (झाडी)

**काहाकी** स्त्री. काकवी.

**काहाड वाहाड** क्रिवि. अस्वस्थ. (झाडी)

**काहातणे** अक्रि. हपापणे. (व.) पहा : **कहातला**

**काहाणी** स्त्री. १. कथा; गोष्ट. २. विचार.

**काहार** पु. भोई; कोळी. पहा : **कहार** : 'काहारीं मग जाळियांत धरिला तो मत्स्यही चांगला।' - अकक कृष्णकौतुक २.२६.

**काहार** पहा : **कार.** जेथे पाण्याचा मार विशेष होतो (पूल वगैरे जागा) तेथे हा दगड उपयोगात आणतात.

**काहार** पु. फार त्रास; ताप. पहा : **कहर** : 'पोटें पिटिलें काहारें।' - तुगा ६५४.

**काहारी- काहिली** वि. सामर्थ्यशाली; त्रास देणारी; बलिष्ठ.

**काहाली** स्त्री. मोठी कढई; काहील; कहाळ : 'उसाचा रसु काढी : काहालीए घाली :' - दृपा ३४. [सं. कहाट]

**काहाले** क्रिवि. कशाला. (खा.)

**काहावणे** अक्रि. कष्टी होणे; त्रासणे. पहा : **कावणे**

**काहावा** पु. गोंगाट. (झाडी) [सं. कलह]

**काहाळ-ळी** स्त्री. एक चर्मवाद्य; ढोल; नगारा; भेरी; शिंगासही म्हणतात : 'तेथ वाजती शंख काहाळा।' - शिव १०२६.

**काहाळिया** पु. काहाळ वाजविणारा : 'काहाळिया: वंशकरू:' - लीचपू १२१.

**काहाळेकांड** न. देहरूपी वाद्य.

**काहिणी** स्त्री. जोंधळ्यावरील एक रोग. पहा : **काहाणी**

**काहिरह, काहिरा** वि. सामर्थ्यवान. [फा.]

**काहिरा** वि. यशस्वी. [फा. कहार = बलिष्ठ, विजयी]

**काहिल-ली, काहली** स्त्री. तापाने किंवा उन्हामुळे अंगाची होणारी तगमग. तळमळ, त्रास. (क्रि. होणे.) (वा.) ० **उडणे** – भडका होणे; अतिशय संताप येणे : 'ती बातमी ऐकून राजांच्या अंगाची काहिली उडाली.' - श्रीयो २. ८१. ० **होणे** – आग होणे, भाजल्यासरखे होणे. **काहिले होणे** – घाबरे होणे.

**काहिली** स्त्री. १. छोटी गोल होडी : 'काहिलीत चार उतारू होते.' - सीपो. २. मोठी कढई.

**काही** वि. १. किंचित; थोडे; अल्प; लहान (संख्या किंवा परिमाण); थोडेसे (वस्तू किंवा व्यक्तींपैकी). २. विवक्षित समुदायांतून अंश, अंशमात्र; थोडा किंवा काही भाग; कित्येक; थोडा किंवा पुष्कळ; कमी किंवा जास्त. ३. एखादी अनिश्चित गोष्ट किंवा काम वगैरे.

क्रिवि. १. अवर्णनीय प्रकारचे, तऱ्हेचे; ज्याची फोड करता येत नाही अशा तऱ्हेचे. २. अर्थ स्पष्ट समजण्याकरिता. ३. (निषेधपर) मुळीच नाही; केव्हाही नाही. ४. भलतेच; मनात नसलेले; अकल्पित. ५. कोणतीही युक्ती; शक्कल. [सं. किम् , किम् + हि]

**काहीएक** वि. १. थोडेसे; कित्येक (मनुष्य, वस्तू). २. (निषेधपर) एकही; मुळीच; तिळभरही नाही.

**काही काही** १. येथे थोडे तेथे थोडे; साऱ्या समुदायांपैकी काही व्यक्ती. २. (अतिरेक, बाहुल्य दाखविणाऱ्या शब्दाशी जोडून) अवर्णनीयप्रकारे; अतिशय कमालीचा.

**काही केल्या** कितीही प्रयत्न केले तरी.

**काहीच** वि. १. कोणताही. २. थोडाही; जरासुद्धा.

**काहीच्याबाही, काहीच्याबाहीच** वि. अगदीच भलते; भलतेसलते; अवास्तव; बेताल; बाष्कळपणाचे; गैरलागू; अमर्याद; अप्रासंगिक; काहीतरी विसंगत; अनपेक्षित : 'एकदां जें आमचे भांडण जुंपलें तें कांहींच्या बाहींच!' - पकोघे.

**काहीतरी** वि. १. वाटेल ते; हवे ते; वाह्यात; असंबद्ध. २. आपल्याला जी ठाऊक नाही, परंतु जी आहे असे आपल्याला वाटते अशा गोष्टीबद्दल वापरण्यात येणारे विशेषण; कोणता तरी; एखादा.

सना. १. थोडेतरी : 'दिसामाजीं काहीतरीं तें लिहावें।' - रामदास. २. अनिश्चितता दर्शक सर्वनाम.

**काहीतरीच** सना. नको ते; वाटेल ते.

क्रिवि. नको त्या प्रकारे; असंबद्धपणे; न शोभेल अशा प्रकारे.

**काहीन** वि. (जरतार) मध्यम तऱ्हेचे.

**काहीबाही** वि. थोडा अंश; थोडेसे : 'आळु आला तो गेलिया। कांहीं बाहीं जें उरे।।' - ज्ञा १८.४१२.

क्रिवि. भलतेच; अवास्तविक; अनियमित; असंबद्ध : 'काहींबाहीं बोलतां मंदवचनी।' - मराठी ६ वे पुस्तक १७३. [काहीचे द्वि.]

**काहीर** वि. थकलेला; भागलेला; निःशक्त; विकल. [फा. कहल, काहिली]

**काहील** वि. निरुत्तर; कुंठित. [फा. काईल]

**काहील** स्त्री. १. पहा : **काहाली-काहिली.** २. धिरडे किंवा आंबोळ्या करण्याचा लोखंडी थाळा, तवा. [क. कावलि]

**काहील** वि. लाचार; निरुत्तर; दीनदुबळा : 'तेव्हां त्यानें काहील होऊन जाबसाल केला की' - थोमारो ७.१३८. [फा.]

**काहीसा** वि. जाणीव होण्यासारखा; दिसण्यासारखा; भासमान.

क्रिवि. १. काही अंशाने; थोडासा; किंचित; अंशमात्र; अल्पसे (नामे व विशेषणे यांच्या अर्थाचे नियमन करण्यासाठी हा शब्द योजतात). २. अनिश्चितपणे; नीट माहिती नसताना; अनिर्णितपणे.

**काहुरबाहूर** वि. कावराबावरा. [फा. कहर]

**काहुरा** पु. अंधारी; दाट काळोख.
**काहून** क्रिवि. काय म्हणून; का. (व. ना.)
**काहूर** न. १. दाट काळोख; सामान्यत: अंधारी (विशेषत: दाट व काळेकुट्ट ढग आभाळात आले असताना पडलेली.) (क्रि. येणे, उठणे.). २. (ल.) काळा डाग; कलंक; काळिमा; मळ. (क्रि. आणणे.) ३. (ल.) मोठे संकट; कचाटी; आपत्ती. (क्रि. येणे, गुजरणे, आणणे.) ४. कुभांड; आळ. ५. निंदा व टीका यांचा भडिमार : 'पुण्यास आमच्यावर काय झालं आहे काहूर' - पलको ३४९. कहर या अर्थी चुकीने वापरतात. (वा.) ० **माजणे** - अनेक गोष्टी एकत्र येऊन गोंधळ होणे : 'मनात विचारांचे काहूर माजले होते.' - श्रीयो १. २३२. ० **माजविणे** - वादळ निर्माण करणे, वाद उपस्थित करणे.
**काहूल** स्त्री. आरडाओरडा; गोंधळ (माणसे किंवा पशू यांचा).
**काहो** पु. घोष; नाद; छंद : 'तृष्णेचा तो काहो काहवितो।' - तुगा ३८३३.
**काहोर** न. एक वनस्पती.
**काह्य(ह्या)चा** वि. कशाचा : 'तया बंधु कोण काह्याचा।' - ज्ञा ६.९५.
**काळ** पु. लहान मुले खेळात सुपाऱ्या, चिंचोके वगैरे घेतात त्यास म्हणतात. (धारवाडी)
**काळ** पु. उडीद किंवा मूग याचे जाडेभरडे भूस; कळण. (व.)
**काळ** पु. १. वेळ; प्रसंग; समय. २. दुष्काळ; कठीण प्रसंग. ३. दैव; नशीब; परिस्थिती : 'हल्ली आमचा काळ फिरला आहे.' - विवि १०.५-७.१२६.४. (व्या.) क्रियापदाच्या रूपविशेषावरून ती क्रिया अमक्या वेळी घडली असा होणारा बोध. [ सं. काल] (वा.) ० **अनुकूल होणे** - नशीब उदयाला येणे. ० **कंठणे** - व्यर्थ काल दवडणे; वेळ घालविणे; दिवस काढणे. ० **विन्मुख होणे, फिरणे, काळाने घेरणे, काळाने वेढा घालणे** - नशीब किंवा दैव वाकडे होणे; वाईट दिवस येणे. **काळाची गांड मारणे** - काळावर मात करणे. **काळाने ओढणे, बोलावणे** - नशिबाने संकटात किंवा मृत्युमुखी पडणे. **काळाने घेरणे** - मृत्यू येणे : 'चिमणा बापूस लौकरच काळाने घेरले.' - विवि ८.७.१२८; **काळाने मागे पाहणे** - नशीब किंवा परिस्थिती प्रतिकूल होणे. **काळाने हाती धरणे** - नशीब किंवा परिस्थिती अनुकूल होणे. **काळावर दृष्टी ठेवणे, देणे** - नशिबावर किंवा पुढे येणाऱ्या परिस्थितीवर, भविष्यावर अवलंबून राहणे; परिस्थिती पाहून वागणे. **चालता काळ** - भरभराटीचे दिवस, आयुष्य; हाती घेतलेल्या कामात ज्यावेळी सारखे यश येत असते असे दिवस : 'बा तुझा चालता काळ; खायाला मिळती सकळा' - अमृत ११८. **काळो काळ भविष्यति** (सं. काले काले भविष्यति) - केव्हा तरी होणे या अर्थी.
**काळ** स्त्री. शिंग : 'अवचित काळ वाजिवली।' - क्रिपु १८.३६. पहा : **काहाळ**
**काळ** पु. कावळा : 'काळु करकरिला।' - श्रीकृष्ण २ (३).
**काळ** पु. पहा : **काल** १. यम; मृत्यू : 'काळ करीत बैसला लेखा गा।' - तुगा ४१४७. २. (काळ = मृत्यू यावरून ल.) अतिशय नाश करणारा, फडशा पाडणारा माणूस किंवा वस्तू : 'अग्निहोत्राचा सुकाळ। वडापिंपळासी काळ।' - एकनाथ. ३. नाश; मृत्यू; अंत; शेवट : 'जर आलेल्या सावकाराचा खचित काळ होणार असला तर कौल दे.' - विवि ८.१.१७. ४. दुष्काळ; अवर्षण. [ सं. काल] (वा.) ० **होणे** - मरणे : 'महाराजांचा काळ झाल्या दिवसापासून....' - केस्व १. **काळाच्या तोंडी घालणे, जाणे, पडणे, येणे, सापडणे, काळाच्या दाढेत जाणे, देणे** - स्मशान दाखविणे, पाहणे; मारणे; मरणे; अतिमोठ्या संकटात, धोक्यात घालणे; आणणे; पडणे इ.
**काळकटवा** पु. काळा तीळ.
**काळकष्ट** पु. प्राक्तन व यातायात; दैव व दगदग; भाग्य व प्रयत्न. साधारणपणे षष्ठी विभक्तीत प्रयोग. जसे : - काळकष्टाचा पैका - मिळकत इ.
**काळकंटक** पु. १. मोठे संकट; अनर्थ, कचाट. २. फार भांडखोर; कळ लावणारा; त्रासदायक माणूस. [ सं. कालिका]
**काळकंद** वि. काळाचा नाश करणारा.
**काळकाढू** वि. काम न करता वेळ घालवणारा; चालढकल करणारा : 'दोघेही निष्कारण काळकाढूपणा करीत होते.' - निसं १७०.
**काळकाम** पु. दम.
**काळकाळ** क्रिवि. प्राचीन काळापासून; पौराणिक काळापासून.
**काळकूट सारखे 'काळ' पासून होणारे सामासिक शब्द खाली न मिळाल्यास 'काल'मध्ये पहा.**
**काळकूट** पहा : **कालकूट** : 'तुमचे मनांत बहुत काळकूट असल्यास त्याचे (बादशहाचे) उत्थापन करून' - होकै ९७.
**काळकेतू** पु. मृत्यूचा अग्रदूत : 'कीं संहार करावेया आतंकु : कृतांतरूप काळकेतू निशंकु' - नरुस्व १९९३.
**काळकौळू** वि. काळाला (यमाला) कवळणारा, खाणारा. [सं. काल + कवल]
**काळक्रदांत** पु. यम; मृत्यूदेवता : 'सोमवंशासि ग्रासावेया। पावले काळक्रदांत' - उह १५२५. [सं.]
**काळखर्ग** पु. यमाचे खड्ग, तरवार. [सं. काळ + खड्ग]
**काळखंडा** पु. १. खूप काळ जगलेला दुर्जन माणूस; ज्याने काळाचेही खंडन केले असा माणूस. २. कोडगा; निगरगट्ट.
**काळगई** स्त्री. १. मिश्र पीक. २. नांगरट. (बे.)
**काळगणित** न. आयुष्यमान : 'ताजवा काळगणिताचा : काटाळां तुकिता नित्यतेचा' - ज्ञाप्र ५८६.
**काळगत** स्त्री. १. काळगती; दिवसगत. २. ठरावीक काळाच्या पुढे गेलेली वेळ; वेळेचा अपव्यय (या अर्थी दिवसगत हा शब्द अधिक रूढ आहे). [सं.]
**काळगती** स्त्री. वाईट काळ; शेवट.
**काळगस्ती** स्त्री. काळासंबंधी सावधपणा बाळगणे.
**काळगाठ** स्त्री. मृत्यूचा पाश.
**काळगुळणी** स्त्री. मरणाच्या वेळची रक्ताची उलटी : 'अहो, ही

काळगुळणी कुठून आलीं?' - पलको ५५३.

**काळगेला** वि. काळसर; काळेला.

**काळचो** पु. नीच मनुष्य. (गो.)

**काळजाचा पासून सुरू होणारे शब्द काळीज मध्ये पहा.**

**काळजिभ्या** वि. १. शिवराळ तोंडाचा; अनिष्ट बोलणारा; निमदल; शिव्याशाप देणारा; अचकट विचकट बोलणारा. २. ज्याचे वाईट बोलणे खरे होते असा.

**काळजिरी** स्त्री. कृष्णजीरक; बडिशोपेची एक जात.

**काळजी** स्त्री. १. चिंता; आस्था; कळकळ; अंत:करणाला होणारी व्यथा; फिकीर. (वा.) ० **बुडणे** - काळजी संपणे. ० **वाहणे** - भीति बाळगणे : 'काळू काळजी वाहे ज्या अतिबळ तो शिशुपाळु वरू' - गरा ८०. २. मनातील भाव.

**काळजीकाटा** पु. चिंता.

**काळजीचा धगड** अत्यंत निष्काळजी; बेगुमान (माणूस).

**काळज्वर** पु. विषमज्वरासारखा मुदतीचा ताप : 'जया काळज्वरु आंगीं बाणे।'-राज्ञा ४. १९८.

**काळझोप** स्त्री. १. मृत्यूच्या वेळची झोप; शेवटची झोप. २. (ल.) प्रत्यक्ष मृत्यू : 'मलाहि कधीं तरी या... रंगमहालांत काळझोंप घ्यावी लागणार.' - भा ११६. ३. अति गाढ झोप; तंद्री; मूर्च्छा. ४. ज्या झोपेत असताना काही संकट, अरिष्ट गुदरते अशी झोप. ५. (ल.) ओढवलेले संकट न कळण्याइतकी अतिशय गाढ झोप लागणे. (वा.) ० लागणे - मरणे.

**काळटिक्या** वि. काळे ठिपके असलेला (घोडा इ.). घोड्याच्या ७२ अशुभ चिन्हांपैकी हे एक आहे.

**काळटोला** पु. मृत्यू : 'झोला निरसेल काळटोला रे।' - आप २४.

**काळडंक** पु. १. जो चावल्याने मृत्यू येतो असा साप : 'तिया भारणिया घूमेति दाटिका। कामकाळडंकाचे।' - रुस्व ६८. २. सर्पदंश.

**काळण** पु. धान्याची दारू बनवणारा; दारू विकणारा : 'निम्मे भात कोयाच्या दारूकरिता काळणाच्या घरी जाणार.' - सनई ३६.

**काळतिथि-थी** स्त्री. पुण्यतिथी; मृत्युतिथी. (क्रि. येणे, भरणे.)

**काळतोंडा** पु. माकड.

**काळतोंड्या** वि. १. दुर्दैवी; अपशकुनी. २. दुष्ट. ३. लज्जित झालेला; गांगरलेला; खजिल : 'स्नेह कैसा सांडिला ध्रुवा आजी। काळतोंडा जाहलो जगामाजी।' - चिंतामणिकवि ध्रुवाख्यान. ४. ओठावर काळे केस असलेले (जनावर).

**काळदंड** पु. यमदंड : 'क्षोभे रोहिणीनंदनू खवळला, हा काळदंडे जमु' - गरा १४८.

**काळदात्या** वि. १. काळे दात असलेला (कर्मविपाकावरून असला माणूस पूर्वजन्मी मांग होता अशी समजूत होती). २. (ल.) अशुभकारक; अनिष्टदर्शक; अपशकुनी (माणूस). ३. (ल.) शिव्याशाप देणारा; शिवराळ; निंदक.

**काळदुपाऱ्या** वि. (निंदाव्यंजक) मध्यान्ह उलटल्यावर जेवणारा.

**काळधर्म** पु. अंत; मृत्यू : 'महादाइसे काळधर्मा गेली' - इप्र १. ११.[सं.]

**काळधाड** स्त्री. आकस्मिक व सर्व बाजूंनी घेरणारा, अनिवार्य असा कहर, अनर्थ (आग किंवा चोर यांचा); संकटाचा आकस्मिक हल्ला.

**काळधात** स्त्री. जगाच्या बऱ्यावाईटपणाला कारणीभूत असलेली काळाची शक्ती; काळवेळ.

**काळनाथ** पु. यम : 'इक्षुदंड घाणां जैसा भरी माळी। तैसा तो कवळी काळनाथ' - जना ३३.

**काळनिद्रा** स्त्री. काळझोप; चिरनिद्रा; मृत्यू.

**काळपात** स्त्री. पराकाष्ठेची विनवणी; काकळूत; मनधरणी. (खा.)

**काळपुरुष, काळपुत्र** पु. मृत्यू. १. यम किंवा त्याच्यासारखा त्याचा क्रूर दूत. २. भयंकर आडदांड मनुष्य. ३. (ल.) पोलीस शिपाई : 'येवल्याच्या काळपुरुषाचें कृत्य उघडकीस आलें नव्हतें.' - लोटिकिले १. १. ३६९.

**काळपुळी-फोड-पुई** स्त्री. पु. अग्निरोहिणी; चाळपुळी; काखेच्या आसपास किंवा पाठीच्या कण्यावर मांस विदारण करणारा फोड. याने आत दाह होऊन वेदना व ज्वर ही लक्षणे होऊन विस्तवाने भाजल्याप्रमाणे आग होते. हा रोग प्राणघातक आहे. गुरांनाही अशाच तऱ्हेचा एक रोग होतो. विष्णुक्रांत व करंडीचे मूळ कांजीत वाटून त्याचा लेप केला म्हणजे काळपुळी जाते : 'वोखटें वर्ण काळफोड।' - दास ३.६. १७.

**काळपेरी** वि. नाचणीचा एक प्रकार.

**काळप्रसंग** पु. वेळप्रसंग, संधिसमय यांसाठी वापरतात.

**काळबुं(बों)डी जोंधळा** जोंधळ्याची एक जात. याचे बोंड काळे असते.

**काळबोटा** वि. चोरीचे न समजता द्रव्य संपादणारा; मालकाचे चोरून मालकाला परत देणारा; चोरलेले परत करणारा : 'हे घ्या या तुमच्या काळबोटेयाचे कवडे.' - उच ७७.

**काळबोळ** पु. बाळंतबोळ; एका झाडाचा वाळलेला चीक. हा मुलांच्या पोटदुखीवर उपयोगी आहे.

**काळभुजंग** पहा : **काळसर्प** : 'जैसा हानितिला मस्तकीं। काळभुजंग खवळला' - उह ११५३.

**काळभैरव** पु. काशी येथील ग्रामसंरक्षक देवता; काशीचा कोतवाल; शंकराचा एक अवतार.

**काळभैरवाचा सोटा** पोलिसाचे, कोतवालीचे काम : 'तुझें माझें रक्षण करण्याकरितां काळभैरवाचा सोटा कोणाच्या हातीं आला आहे? - भाऊ २२.

**काळमांजर** पु. न. कांडेचोर; ऊद.

**काळमुख** न. मृत्यू; मृत्यूचे तोंड : 'जिवा कर्मयोगें जनीं जन्म जाला। परी सेवटी काळमूखीं निमाला।' - राम १४.

**काळमुखी** वि. १. काळ्या तोंडाचा; तोंडावर काळे केस असलेला (घोडा.). हा अशुभकारक समजतात. २. सामान्यत: काळ्या तोंडाचा. ३. दुष्ट; भयंकर; राक्षसी. ४. मृत्यू पावणारा.

**काळमुखी गुंज** काळा ठिपका असलेली गुंज.

**काळमुख्या** वि. दुर्दैवी; अभागी; अधम; नीच.

**काळमृत्यू** पु. आकस्मिक, पूर्ण आयुष्य भरण्यापूर्वी आलेले मरण; आकस्मिक मृत्यू : 'काळमृत्यू न बाधे जाणा' - गुच १४. २७.

**काळम्मा** स्त्री. एखाद्या स्त्रीला उद्देशून वापरला जाणारा अपशब्द.

**काळरजनी** स्त्री. एक रात्रिंचर, रात्री हिंडणारी देवता : 'वेताळ मुंज्या काळरजनी।' - हरि १३. ६८.

**काळरात्र** स्त्री. भयंकर किंवा प्रलयकाळाची रात्र; संहाराची रात्र : 'काळरात्रीचीं कटकें। उठावलीं जैसीं॥' - ज्ञा ११. १९९.

**काळरूप-पी, काळ स्वरूप** वि. यमासारखा भयंकर अक्राळ-विक्राळ; भयानक किळसवाण्या रूपाचा (माणूस); मरणप्राय.

**काळरोग** पु. असाध्य, प्राणनाशक रोग.

**काळलोह** न. काळे लोखंड; पोलाद; कालायस : 'काळलोहे डंवचिलें। वज्रवाटीं बांधिले' - शिव ५०९.

**काळव(वं)ख-खा-खे** पु. न. १. काळोख; अंधार (काही ठिकाणी चुकीने (वं.) काळवसा असा शब्द वापरलेला आहे): 'निद्रेचें शोधिलें। काळवखें॥' - ज्ञा १२.४९. २. काळेपणा; डाग.

**काळवट** वि. १. काळसर; काळी (जमीन). २. काळा.

**काळवटणे, काळवंडणे** अक्रि. १. काळे पडणे; मलिन होणे (ऊन वगैरे लागल्यामुळे शरीर इ.); अपराध, भीती यांनी चेहरा काळाठिक्कर पडणे; काळानिळा पडणे; हिरवानिळा होणे. २. शेतातील पिकाचा फिकटपणा जाऊन ते टवटवीत होणे; निसवण्याच्या स्थितीस येणे. 'चंद्रबिंब विटाळलें। गुरुद्रोहें काळवंडलें।' - कथा १. २. १५०.

**काळवटी-ण** स्त्री. कालिमा; डाग; कलंक; दोष.

**काळवत्री, काळवथरी** स्त्री. सह्याद्रीतील दखनमधील अग्निगर्भ काळा खडक. बेसॉल्ट हा ज्वालामुखीच्या रसाच्या थरातील उष्णता विसर्जन पावल्यामुळे आला आहे.

**काळवदन** पहा : **काळमुखी**

**काळवशे** क्रिवि. कालांतराने; कालानुसार; योग्य काळ आल्यावर.

**काळवंचना** स्त्री. १. कालाचा अपव्यय. २. मृत्यूला फसवणे (योगी लोक ब्रह्मांडी प्राण नेऊन मृत्यूपासून वाचतात अशी समजूत आहे). (क्रि. करणे.) : 'भये काळवंचना करूः' - लीच १. २५.

**काळवंडी** स्त्री. काळवटणे. पहा : **काळवंडणे** (को.)

**काळवंडी** स्त्री. सर्वांनी मिळून केलेला हल्ला; धाड.

**काळवार** पु. अशुभ दिवस; घातवार.

**काळविद्रे** पहा : **काळुंद्रा**

**काळवी(विं-वं)ट** पु. काळ्या पाठीचा हरिण; हरणातील नर.

**काळवीट** पु. चढ्या भावाने विकण्यासाठी रोखे विकत घेणारे सट्टेवाले.

**काळवे** न. संध्याकाळची काळोखी. (राजा. कुण.)

**काळवेला-ळा** स्त्री. १. शिवालिखित ग्रंथामधील अशुभ वेळ. पहा : **वेळ**. २. वेळप्रसंग. पहा : **कालप्रसंग** ३. मृत्यूची वेळ : 'या परि ते काळवेळा। रायें राखिली तये वेळां।' - कथा १. २. १२१.

**काळवेळ** स्त्री. १. वाईट किंवा संकटाचे दिवस. पहा : **कालकल्ला** २. वेळ प्रसंग; योग्य वेळ, संधी. ३. सामान्यतः वाईट किंवा अशुभ वेळ; मरणाची वेळ. [सं. काल + वेला]

**काळशुद्धी** स्त्री. शुभ वेळ; पवित्र वेळ : 'काळशुद्धि त्रिकाळीं। जीवदशा धूप जाळी।' - ज्ञा १२. २८९. [सं. काल + शुद्धी]

**काळसर** वि. काळवट; किंचित काळ्या रंगाचा.

**काळसरणे** अक्रि. काळवटणे; काळे पडणे. पहा : **काळवंडणे**

**काळसर्प** पु. १. यम; मृत्यू. २. वेळ (सर्वभक्षक, काळरूपी सर्प).

**काळसा** पु. नाकतोडे, टोळ, गोचीड इ. खाणारा एक पक्षी.

**काळसूत्र** न. काळ.

**काळस्फोट** पु. पहा : **काळपुळी**

**काळंदरा** वि. (तुच्छतेने) फार काळा.

**काळंबन, काळमन** स्त्री. न. अंधारलेली, सर्द हवा; पाऊस, थंडी यांनी युक्त, वांबाळी हवा. [सं. कादंबिनी]

**काळंबी-बे** न. मधमाशाचे पोळे; मोहोळ: 'त्याजवर काळंबी बसोन मध होतो' - नाना रोज १. २५२.

**काळंबे माशी, कोळंबी** मधाने भरलेल्या मधमाशांच्या पोळ्यातील माशी.

**काळा** पु. १. (सांकेतिक) बिब्बा; भिलावा. २. श्रीकृष्ण; विठोबा : 'अपयशाचे खापर... त्या काळ्याच्या टाळक्यावर फुटलें.' - नामना १३. ३. काळसर्प : 'जागविलां पुच्छीं त्वां देवुनि पद बहु सपूर्वफट काळा।' - मोउद्योग १२. २१.

वि. १. कृष्णवर्ण; श्याम; काजळाच्या रंगासारखा; तशा रंगाने युक्त असलेला. २. कपटी : 'कृष्ण बाहेर काळा तसाच आंतहि काळा आहे.' - परिभी २५. (वा) **काळ्या दगडावरची रेघ** - टिकाऊ, अक्षय, अबाधित अशी गोष्ट, उक्ती; न बदलणारी गोष्ट : 'ही आपली माझी काळ्या दगडावरची रेघ.' - तोबं १७९. **काळ्याचे पांढरे होणे** - एखाद्याचे काळे केस पांढरे होणे; म्हातारपण येणे. **काळ्या रानी होणे** - असाहाय्य होणे; संकटात पडणे : 'मोगल एकीकडे जाहलीयावर हे काळ्या रानात होतील.' - ऐलेसं ३३८.

**काळा अबलख** पांढऱ्या अंगावर काळे ठिपके असणारा (घोडा.).

**काळा अभ्रक** भूगर्भात आढळणारा अभ्रकाचा एक प्रकार. त्यात असलेल्या इतर धातूंच्या अस्तित्वामुळे तो काळा दिसतो.

**काळा आजार** (आसाम व मद्रास भागात आढळणारा) एक भयंकर रोग. याने यकृत व प्लीहा फार वाढतात आणि रोज ताप येतो.

**काळाई** स्त्री. काळी जमीन (शेतकरी लोकांत रूढ). पहा : **काळवंडी** [सं.कालिका]

**काळा उन्हाळा** १. अत्यंत कडकडीत उन्हाळा. यामुळे सर्व सृष्ट पदार्थ रखरखीत भासतात. २. कठीण, आणीबाणीची, टंचाईची वेळ; आयुष्याच्या भरभराटीच्या साधनांचा अभाव. ३. चैत्र व वैशाख हे दोन महिने.

**काळा उंबर** उंबराच्या झाडाची एक जात.

**काळा कटवां** काळा तीळ.

**काळाकभिन्न-भीन** वि. अत्यंत काळा; लोखंडासारखा काळा.

**काळाकरडा** वि. पांढरट काळा : 'त्याच्या मिशातले केस काळेकरडे होऊन धुरकटल्यासारखे दिसत होते.' - बनगर ५०.

**काळाकरजत, काळाकरंद** वि. काळाकभिन्न.

**काळाकंच-किच्च-किट्ट-कुट्ट-कीट** वि. काळाभोर; अतिशय काळा: (किट्ट, कुट्ट वगैरे शब्द जोर दाखवितात); लोखंडासारखा किंवा कोळशासारखा काळा. 'इतका दाट काळाकंच काळोख...' - सनई १८३०; 'हा अमावस्येचा काळाकुट्ट अंधार।' - चंद्रग्र २.

**काळा कुजवा** (कृषि.) कोबीच्या पिकाला सूक्ष्म जंतूंमुळे होणारा रोग. या रोगामुळे कोबीच्या पानातील शिरा काळ्या पडतात व काही वेळेला पाने कुजतात.

**काळाकुडा** पु. कुड्याच्या झाडातील एक जात. [सं. कुटज]

**काळाकुमाईत** वि. काळ्या रंगात तेल्या रंगाची झाक असलेला (घोडा).

**काळाक्रूम** पु. (चर्म.) विशिष्ट पद्धतीने कमावलेले काळे कातडे.

**काळाखापर** वि. खापरासारखा काळा.

**काळागरू** पु. काळ्या रंगाचा अगरू, धूप : 'तत्काळ काळागरू धूप दावी।' - सारुह ८. ७९.

**काळागवर** पु. एक शक्तिवर्धक वनस्पती.

**काळागहिरा** वि. काळाकुट्ट.

**काळागुगळी** पु. गुगळासारखा काळा मासा.

**काळागोरा** वि. १. काळा व गोरा. २. (ल.) खराखोटा; शुद्धाशुद्ध.

**काळाचा काकडा** दणकट, बळकट म्हातारा; निरोगी, खडस, टणक म्हातारा; भयंकर धोक्यातून निभावलेला माणूस.

**काळाचा काळ** जो मृत्यूलाही भीत नाही असा; अतिशय भयंकर; भुतासारखा (माणूस).

**काळा चाफा** चाफ्याच्या झाडाचा एक प्रकार.

**काळाचा फेरा** यमाची फेरी; काहीतरी अपरिहार्य किंवा भयंकर अनर्थ; रोगाची साथ.

**काळा चित्रक** चित्रक; एक औषधी; झाडाची एक जात.

**काळाजहर-काळाठिक्कर-काळाढोण** वि. काळाकभिन्न. (वा.) ० **पडणे** - आपली लबाडी बाहेर आलेली पाहून चेहरा काळवंडणे.

**काळाडोंब** वि. काळाकुळकुळीत.

**काळातित्तर** पु. रंगीबेरंगी तितर पक्षी.

**काळातीळ** पहा : **कारळा तीळ**

**काळातून ओढलेला** दुष्काळातून जेमतेम वाचलेला; अतिशय लुकडा; जरत्कारू.

**काळादाणा** पु. एक वेल. हिचे कांडे व शाखा यांवर बारीक कुसे असून पाने कपाशीसारखी असतात. फुले फिकट, निळ्या रंगाची, घंटेच्या आकाराची व मोठी असतात. फळ नरम असून आत तीन पुडे व त्यात काळे बी असते. याचा औषधासाठी उपयोग करतात.

**काळाधूम** वि. काळाकभिन्न.

**काळानिळा** वि. काळा व निळसर (विषप्रयोगामुळे, श्वास अडल्यामुळे चेहऱ्याचा होणारा रंग).

**काळापात** पु. १. लुच्चेगिरी; अफरातफर; दडपादडपी; दुरुपयोग. २. फसवून, ठकबाजी करून फरारी होणे. ३. संकटात असल्याची बतावणी करण्यासाठी केलेली ओरड. [सं. काल + आपत्ती]

**काळापिसा** वि. अतिशय काळा आणि वेड्यासारखा भयंकर : 'काळीपिशी रात्र आ वासून त्याच्यामागे धावते आहे.' - काजवा २.

**काळा पैसा** (लाच, चोरटा व्यापार वगैरे) अवैध, बेकायदेशीर मार्गाने मिळवलेला पैसा; आपले उत्पन्न दाखवताना दडवून ठेवलेला पैसा.

**काळा फत्तर** १. काळवथरी दगड. २. (ल.) अत्यंत मूर्ख; अडाणी माणूस.

**काळाबाजार** पु. (अर्थ.) दुर्मिळ वस्तूंच्या बाबतीत - नियंत्रित किमतीपेक्षा जादा किमतीला, अवैध रीतीने, चोरट्या रितीने होत असलेला खरेदी विक्रीचा व्यवहार.

**काळाबाळा, काळाबाह(हा)ळा** वि. फिकट काळे किंवा काळे व पांढरे पट्टे अंगावर असलेला (पशू).

**काळाबेरा** वि. काळाबेंदरा (अंगाचा वर्ण, स्वरूप, कपडालत्ता वगैरे). पु. पाप; कपट; वाईट हेतू.

**काळाबेंदरा-बेंद्रा** वि. काळा व हेंगाडा; विद्रूप : 'मी चांगट फाकडी रूपाने तू काळा बेंदरा।' - पला ५.

**काळा बोळ** पु. बाळंतबोळ, एक औषधी जिन्नस; एका झाडाचा वाढलेला चीक. हा मुलांच्या पोटदुखीवर उपयोगी आहे.

**काळा भिल्ल-भील-मांग-वीख** पु. काळाकभिन्न.

**काळाभेरा** वि. दुष्ट; पापी : 'काहीतरी काळाभेरा, पायरीला कळे गुन्हा.' - धृपद ६४.

**काळा भोपळा** भोपळ्याची एक जात; अन्य प्रकारात तांबडा भोपळा; गंगाफळ. इ.

**काळाभोर** वि. अतिशय काळा; गडद काळा.

**काळामाजा, काळामाजूफळ** पु. मायफळ; माजूफळ.

**काळामासी** पु. पित्तपापडा.

**काळामिट्ट** पहा : **काळाकुट्ट** : 'बाहेर काळामिट्ट अंधार होता.' - राऊ १२२.

**काळामीटका** वि. अतिशय काळा; काळामिट्ट; काळाकुट्ट : 'कैसी आहे : आहे काळीमीटकी.' - लीचउ ११७.

**काळामोरा** वि. **गोरामोरा**; काळजीने काळवंडलेला : 'झाला काळा-मोरा उलटला माघारा।' - ऐपोकेखं २. १७६.

**काळारीस** वि. पहा : **काळाकुट्ट** : 'बटक्या एकजात काळ्यारीस.' - राऊ २०२.

**काळारोम** वि. काळा कुळकुळीत : 'एक बळकट बांध्याचा काळारोम मनुष्य येऊन बसला.' - पिंपेर १३६.

**काळावीख** वि. काळाकभिन्न; काळाजहर.

**काळाशार** वि. गडद काळा : 'काळ्याशार आकाशात वीज लखखन चमकून गेली होती.' - माणूस ३.

**काळाशेंगळ** पु. काळ्या रंगाचा एक मासा.

**काळाष्टक** न. १. पहा : **कालाष्टक**. २. काळभैरवाप्रीत्यर्थ आठ दांपत्ये

(जोडपी) भोजनासाठी सांगणे.

**काळास** न. कलाकुशलता : 'नाचतां घराचिये जती। काळासांचा उचिती।' - उगी ४६२.

**काळासावळा** वि. केवळ काळाही नाही व केवळ गोराही नाही असा (रंग, रंगाचा); साधारण काळा. [सं. काल + श्यामल]

**काळासावा** पु. साव्याची काळी जात.

**काळासुरमा** पु. डोळ्यात घालायचे एक अंजन.

**काळाक्षर** न. लिखित शब्द : 'काळाक्षरीं वेधु : बोधु नाही' - स्मृस्थ २०७.

**काळांचणी** स्त्री. अत्यंत काळजी; जाचणी; काचणी; आच.

**काळांचरे-ळे** न. जांभळ्या रंगाचे एक रानफूल.

**काळांजनी** वि. एकरंगी असून डाव्या काखेच्या जवळ किंवा छातीवर काळा ठिपका असलेला (घोडा). यामुळे धन्याला मृत्यू येतो अशी समजूत आहे. - अश्वप ९६.

**काळांतर** न. १. व्याज. (गो.)२. दीर्घकाळ. [सं. कालांतर]

**काळांतरी** क्रिवि. १. (नास्त्यर्थी) भविष्यकाळीही नाही; केव्हाही नाही. २. थोडे दिवस गेल्यावर; काही काळाने.

**काळिक** स्त्री. काळसरपणा; किटण : 'सांगे पितळेची गंधि काळिका' - ज्ञा ४. ६४. [सं. काल]

**काळिमा** पु. १. पहा : **कालिमा** : 'परिसाची निवारी जडत्व काळिमा।' - एरुस्व ३. १५. २. काजळ. ३. काळोख; अंधार : 'कीं येरीही दिशां तियेचि काळीं। काळिमा नाहीं।।' - ज्ञा ५. ८६. ४. किटण; काळसरपणा. ५. अंधत्व. [सं. कालिमन]

**काळिंग, काळिंगण** न. पहा : **कलिंगड**

**काळिंग असणे** द्रव्यसंग्रह असणे. (गो.)

**काळी** वि. रंगाने काळी ( स्त्री, मादी वगैरे).
स्त्री. म्हैस. (कारण ती रंगाने काळी असते)

**काळी** स्त्री. (विठ्ठलाची) काळी मूर्ती : 'पैल ते पंढरी। पांढरीवरी काळी वसविली' - नाम ४१९.

**काळी** पहा : **कालिका**

**काळी** स्त्री. १. शेतीची जमीन (देशावरील शेतजमीन बहुतेक काळ्या रंगाची असते यावरून). जसे :- काळी पिकली म्हणून पांढर वाचली. २. लागवड करण्यासारखी जमीन. ३. (ल.) शेतकरी वर्ग : 'ही गोष्ट काळी पांढरीला माहीत.' - गांगा २. ४. काडी. [सं. काल = काळे]

**काळी** स्त्री. हार्मोनियमच्या पट्ट्यांपैकी काळ्या रंगाची पट्टी.

**काळी काठी** एक औषधी झुडूप.

**काळीकचरी** स्त्री. भाताची एक जात.

**काळीकाबार** स्त्री. पक्षीविशेष. सर्वांग काळे, पाठीवर शुभ्र, शेपटी उभारलेली आणि आकार चिमणीएवढा. घायल; मागपाई; बुलबुल.

**काळीकाळी** क्रिवि. योग्य वेळी; जेव्हा जेव्हा पाहिजे असेल त्या त्या वेळी : 'पर्जन्य तोही उपकारार्थ। काळीं काळीं वृष्टि करिता' - निमा १. ९८. [सं. काले काले]

**काळी कांब** १. काळ्याकुट्ट ढगांची रांग. (क्रि. येणे, जमणे, उठणे, विरणे, फाकणे) २. (ल.) काळ्या रंगाच्या कुणब्यांची (जेवण वगैरेंस बसलेली) पंगत.

**काळी खजुरी, खजूर, खारीक** एक औषधोपयोगी रानखारीक. ही कडू अग्निदीपक व ज्वरनाशक आहे.

**काळी गुळी** काळा रंग तयार करण्याच्या कामी येणारी नीळ.

**काळी घेटूळ-घेंटोळी** घेटूळचीच एक काळी जात.

**काळी चंद्रकळा** स्त्री. काळे लुगडे. हिचा उभार व अडवण काळे व किनार कोणत्याही तऱ्हेची असते.

**काळीचा वसूल-पैका, काळीचे उत्पन्न काळीजमा** शेतसारा; जमीन महसूल. याच्याहून मोहतर्फा वसूल निराळा.

**काळी चुण(न)करी** चुनखडीवरची काळी जमीन. ही नापीक असते.

**काळीज** न १. मूळ यकृत; पित्ताशय (परंतु रूढ हृदय). रुधिराभिसारक इंद्रिय : 'भेदोनि काळिजाला गेला लोकापवाद शर...' - मोभारतीय रामायण. २. (ल.) अंतःकरण; मर्म; हृदयातील नाजूक भाग : 'खोंचोनि बोले कौरवरावो। काळिजीं घालिसी कां घावो।' - मुसभा १७. ५०. [हिं. कलिजाह] (वा.) ० **उडून जाणे, कापणे, थरथरणे, थरारणे, धडकणे, धडधडणे** - छाती थरथरणे, कापणे, धडधड उडणे (भीती, दुःख वगैरेमुळे). ० **काढून टाकले तरी विश्वास न येणे** - अविश्वासाची परमावधी. ० **काढून देणे** - आपली अत्यंत प्रिय अशी वस्तू देणे; स्वतःचे अंतःकरण देणे. ० **खाणे, फोडणे** - १. छळणे; गांजणे; बेजार करणे; मर्मभेदक बोलणे. २. पश्चात्तापास, शोकास कारण होणे. ० **नसणे** - प्रेम, दया, वात्सल्य इ. कोमल भावना नसणे; मन कठोर असणे. ० **पाठीमागे असणे, टाकणे** - बेफिकीर असणे; निर्भय असणे. ० **फाटणे, दो जागा होणे** - भयाने, दुःखाने विव्हळ होणे. ० **फुटणे** - धीर सोडणे किंवा ठाव सोडणे. ० **काळजाचा घड असणे** - जिवाचा कलिजा; प्राणप्रिय माणूस. **काळजाचा बोका** - काळजाचे मांस; यकृत; पित्ताशय (खाटिक व्यवसायात वापर.). **काळजाचे काळीज असणे** - अत्यंत प्रिय; जिव्हाळ्याचे : 'बाई तुम्ही माझे काळजाचे काळीज !' - राखं ३.१०६. **काळजाला भोक पडणे, घरे पडणे, झोंबणे** - भयाने, आश्चर्याने, दुःखाने धाबे दणाणणे; धक्का बसणे; हृदयाला झोंबणे. **काळजावर घाव घालणे** - डाग देणे; अंतःकरणास धक्का बसेलसे करणे; मर्मावर आघात करणे. **काळजास केस येणे** - अतिशय तडफेने किंवा उत्कंठेने गुंतणे; फार परिश्रम करून थकणे. **काळजी काटा करणे, काळजी काटा धरणे, साता काळजाच्या पलीकडे ठेवणे** - अतिशय प्रिय होणे; अति मूल्यवान समजणे; कोठे ठेवू कोठे न ठेवू असे होणे; अतिशय काळजी घेणे : 'काळजाचें पलीकडे त्याला ठेव.' - नामना ११२. **काळजी लागणे, काळजाला लागणे** - अंतःकरणात शिरणे; दुःख, वेदना उत्पन्न करीत जिव्हारी खोचणे, बोचणे; आत भिनणे (औषध, विष, वस्तू, अन्न, निंदा, अपशब्द, काम वगैरे) या अर्थी किंवा आस्थेने लक्षात ठेवणे या अर्थी उपयोग.

**काळीज कठीण** (संस्कृतच्या अनुकरणावरून अशुद्ध समास) कठीण काळजाचा; निष्ठुर; कृपण; धाडसी; बेडर (माणूस).

**काळी जिरी** कडू कारळी.

**काळी तेरी** काळ्या रंगाचे अळू. हे मूळव्याधनाशक, अग्निदीपक आहे. यामुळे शौचाला साफ होते.

**काळी धार** १. दृश्य क्षितिज; समुद्रात पाहत असताना ज्यापुढे दृष्टी पोचत नाही तो मर्यादा प्रदेश : 'त्याची हद्द काळेधारेशीं लागलेली आहे.' - बाळ २. ११८. २. हृदय.

**काळी पानवेल** काळ्या रंगाच्या विड्यांच्या पानांची वेल. हिचे पान स्वादिष्ट परंतु तिखट असते.

**काळी पांडे** काळ्या जमिनीचा पांड्या, पटवारी; ग्रामाधिकारी.

**काळी प्रजा** १. मजूरवर्ग. २. बडोदे संस्थानातील भिल्लासारखी एक जात.

**काळी भिंत** उत्तरेकडील सीमा, अखेरची हद्द.

**काळी माशी** एका जातीचे गवत.

**काळी माळी** स्त्री. चाळा : 'लहान मुले जशी काळ्यामाळ्या करतात तसे त्यांचे (चिमण्यांचे) सांडपाण्यात आंघोळ करताना चाललेले असते.' - घरदार ३७.

**काळी मिरची** १. काळ्या मिरच्या येणारी मिरचांची एक विशिष्ट जात. २. काळी मिरी.

**काळी मुष्टी** जारणमारणातील मूठ (मारण्याची) : 'काळीमुष्टीची बाधा होतां।' - नव ६. १५२.

**काळी मुसळी** एक औषधी वनस्पती व मुळी; मुसळीची काळी जात.

**काळी मृत्तिका, कृष्ण मृत्तिका**; बंदुका - तोफांची दारू : 'काळ्या मृत्तिकेचा तोटा आम्हांजवळी झाला. तोफाहि थोडक्या.' - ऐलेसं १६९८.

**काळी मैना** १. पोपटाची मादी. २. साळुंकी ३. एक गाणारा पक्षी : 'सांप्रत जिला काळी मैना म्हणतात तीच सारिका होय.' - पक्षी २. ४. (ल.) करवंदांना काळ्या रंगावरून म्हणतात.

**काळी यादी** ज्यांच्यापासून समाज-जीवनास, शांततेस आणि सुव्यवस्थेस धोका आहे अशा लोकांची यादी; समाजकंटकांची शासनाने केलेली यादी.

**काळी रात्र, काळीशिळी रात्र** १. भयंकर रात्र; भयाण रात्र. २. अरिष्टसूचक रात्र. अमावस्या, मध्यरात्र, अशुभ भाषण, भूतपिशाच्चाचे आगमन वगैरे संबंधानेही सामान्य रात्रीला हा शब्द लावतात. हा शब्द क्रियाविशेषणासारखा सप्तम्यंत करूनही योजतात. [सं. काळ + रात्र]

**काळीरेघ** स्त्री. समुद्राचा पृष्ठभाग व आकाश ज्या ठिकाणी मिळालेले दिसतात त्या ठिकाणी समुद्राचे पाणी काळेशार दिसते, यावरून त्या भागाला म्हणतात; क्षितिज; काळीधार : 'महाराज आपण सांगितल्याप्रमाणे समुद्रात काळ्या रेघेपाशी बुडविला (प्रल्हादास).' - दशावतार, मसाप १४.

**काळीवट** न. काळसरपणा : 'सुनील नभाचेनि काळीवटें। अंगोळिया गे माय' - ज्ञागा २२३.

**काळीवसू** स्त्री. एक औषधी वनस्पती.

**काळी विथ(ध?) वा** स्त्री. कोळीण किडा : एक विषारी कीटक. (मनोहर आ १९३७).

**काळी वेल** (वन.) कुंपणावर वाढणारी औषधी वेल. हिच्या पानांचा आकार काहीसा एरंडाच्या पानांसारखा पण थोडा लांबट असतो. गुरांच्या रोगावर गुणकारी.

**काळीशार** वि. काळीभोर; काळीकुट्ट.

**काळी साळ** काळ्या रंगाची साळ किंवा भात; भाताची एक जात.

**काळुकळाइ** स्त्री. काळाचे कार्य; मृत्यू : 'मुळस्थानी भीडु बांधो हो जोइ : जेवि ना काळुकळाई' - लीचउ ४२६.

**काळुकी, काळुंखी** स्त्री. १. काळोखी; अंधार : 'काळुकी दाटली अपार महीसी ।' - नव १३. १५९. २. काळेपणा. ३. डाग; कलंक; काळिमा.

**काळुकी, काळुंखी रात्र** अंधारी रात्र; चंद्रदर्शन न होणारी रात्र.

**काळुगा** पु. १. दांडगा; धिप्पाड. २. काळ : 'रचुनि महत्तत्त्वाचे खळें। मर्ळी एकें काळुगेनि पोळें।' - ज्ञा १३. ३९.

**काळुंदरा, काळुंद्रा** वि. (शिवी) काळ्या उंदरासारखा काळा कुळकुळीत.

**काळुंदरा, काळुंद्रा-द्री** पु. स्त्री. काळ्या रंगाचा लहान मासा. (कु.गो.)

**काळे** न. डाग; कलंक; काळिमा; अपकीर्ती. (वा.) ० **करणे** - तोंड काळे करणे; तोंड लपवून जाणे; दृष्टिआड होणे; फरारी होणे (दोष, अपराध वगैरेमुळे) : 'जा कर काळें।' - कमं २. ० **तोंड घेऊन जाणे** - पळून जाणे; पोबारा करणे.

**काळे अळू** पहा : **काळी तेरी**

**काळे अक्षर** कागदावर लिहिलेले मनोगत, अक्षरे, लेख, पत्र इ; यच्चयावत् अक्षरमात्र.

**काळे उडीद** एक द्विदल धान्य.

**काळे कमळ** एक प्रकारचे कमळ. हे हिमालय पर्वतावर बर्फात उत्पन्न होते. याला एक हजार पाकळ्या असून त्यांचा घेर एक हातभर असतो.

**काळेकरून** क्रिवि. थोड्या वेळात; काही काळाने; योग्य वेळी; थोड्या वेळाने : 'काळें करूनि सुख जोंवरी होय लेखी।' - र २७.

**काळे कृत्य** कृष्णकारस्थान; अन्याय; दुष्टपणाचे, गुप्तपणाने केलेले काम.

**काळे केस** (ल.) तारुण्याचा काळ.

**काळे खापर** (ल.) अतिशय काळा माणूस; अपकीर्त, बदनाम झालेला, पराभव झालेला, आजाराने कृश, अशक्त झालेला माणूस.

**काळे गडी** कर्नाटकी पायदळ शिपाई : 'किल्ल्यातच सातशे लोक होते ते काळे गडी प्यादे होते.' - ऐलेसं १५८४.

**काळेची** क्रिवि. तत्काळ : 'जे विटोनि विकारी होता। तें अपुनीत काळेंचि।' - एभा २१. ११७.

**काळे ढवळे** संशय; शंका; अनिष्ट कल्पना; अंदेशा. पहा : **काळेबेरे**

**काळे तोंड** १. स्वत:पासून पुढील पाचवा वंशज (आपल्या पणतूचा मुलगा). २. लाजिरवाणी कृत्ये केल्याने कलंकित झालेले तोंड.

**काळे थर** काळ्या रंगाचा थर; कार दगड किंवा काळवथरी धोंडा.

**काळे पाणी** १. महासागर. २. अकाली किंवा अतिशय पडलेल्या

पावसाच्या पाण्याचा दोष घालविण्यासाठी बागेला दिलेले विहिरीचे पाणी. ३. (ल.) हद्दपारीची शिक्षा व ती जिथे भोगायची ते ठिकाण; तुरुंग. ही शिक्षा झालेल्या इसमाला हिंदुस्थानाबाहेर अंदमानात ठेवत असत : 'अखेरीस जाल काळ्या पाण्यावर चांगले.' - भा १०४.

**काळे बुबुळ** डोळ्याचा काळा भाग (बाहुली व कनीनिका).

**काळेबेरे, काळेभेरे-ळे** न. १. अनिष्ट संशय; वाईट आकांक्षा; अनिष्ट कल्पना; कुशंका; कपट. (क्रि. येणे.) : 'हें काळेंबेरें तुझ्या मनांत कोठून आलें?' - गीर ६१२. २. लुच्चेगिरी; डावपेच; कारस्थान; गिळंकृत करणे; दडपादडपी.

**काळे भिवरी** पहा : **काळवथरी**

**काळेमाळे** पु. चाळे : 'करी काळेमाळें निरखित भूपाळेंद्रनगरीं ।' - दस्व १४.

**काळे मांजर** कांडेचोर; ऊद.

**काळे मीठ** १. पादेलोण. २. खाऱ्या मातीपासून तयार केलेले मीठ.

**काळेरूळे** न. अंधार :'ब्राबा काळ्यारूळ्यातच परतायचे.' - माजी २०.

**काळेरे** न. कडू कारले.

**काळेली** स्त्री. काठळी. पहा : **काळा सावा**

**काळो** पु. बिब्बा. (कु.)

**काळोकाळ** क्रिवि. १. खूप प्राचीन काळापासून; अनादिकालापासून. २. पुन्हा पुन्हा (नकारार्थी).

**काळोख** पु. अंधार; तिमिर; प्रकाशाचा अभाव. (वा.) ० **नेऊन दिवसास वाळत घालणे** - अघटित घटनेसाठी झटणे; असंभाव्य गोष्टीसाठी प्रयत्न करणे. पहा : **खपुष्प**

**काळोख पाख** महिन्याचा कृष्ण पक्ष; अंधाऱ्या रात्रीचा पंधरवडा.

**काळोखमेट** स्त्री. अतिशय काळोख; दाट काळोख; काळोख मिट्ट.

**काळोखी** स्त्री. १. ढगांनी, अभ्रांनी आलेली अंधारी; अस्तमानाची अंधारी; थोडासा अंधार. २. पित्तादिकाने डोळ्यांपुढे आलेली अंधारी. ३. (ल.) कलंक; डाग; अपकीर्ती. ४. काळवंडी. (वा.) ० **आणणे, फासणे** बेअब्रू करून घेणे. ० **येणे** - दिसेनासे होणे; अंधारून येणे. **काळोखून येणे** - अंधार पडणे : 'आणि एकाएकी काळोखून येत.' - सुलतान.

**काळोखी** स्त्री. काळेसर नावाची वनस्पती.

वि. काळ्या रंगाची.

**काळोखे** न. काळोख; कृष्णपक्ष.

**काळोजी-बा** पु. (ल.) यमदेव : 'तुझ्या शरीराला काळोबा खाईल.' - नामना ४०.

**काळोटा** पु. १. काळ्या रंगाचे कबूतर. २. काळ्या रंगाचे व दोनच पांढरे ठिपके असलेले पाखरू.

**काळोतरी, काळोत्री, काळोथरी** पहा : **काळवथरी दगड**

**काळोवेळो** पु. भाताची एक जात. (कु.)

**काळोसा** पु. काळोख; अंधार : 'उभ्या काळोशाचे आड। सातापांचा एक भीडा' - तुगा १५५.

**काळोंदरा, काळोद्रां** पहा : **काळुंदरा**

**काळ्या डोईचे मनुष्य** जेव्हा इतर जीवांपेक्षा (प्राण्यांपेक्षा) माणसाची अद्भुत शक्ती वर्णावयाची असते अशा वेळी हा शब्द माणसाला लावतात.

**काळ्यामाळ्या** पु. १. स्वतःच्या अंगाभोवती, दोन्ही बाजूंना आपले हात ताठ करून एकसारखे फिरण्याचा मुलांचा एक खेळ. (क्रि. घालणे) (कर.) २. हा खेळ खेळणे. ३. तेथल्या तेथेच घुटमळणे.[क.कुळ्येमुळ्ये]

**कांकई** स्त्री. १. कवच असलेला एक प्रकारचा मासा. २. त्याची कवची.

**कांकड** न. एक मोठा वृक्ष. त्याची पाने साधारण मोठी व लांबट असतात. कांकड हे फळ आवळ्याएवढे दिसते. परंतु त्यात आवळ्यासारखी मोठी आठी नसते. याचे लोणचे चांगले होते. [सं. कर्कटक]

**कांकड** पु. १. खडा; कंकर. २. कुचर; चाड.

वि. पुरतेपणी न शिजलेला, कच्चा (भात, चाड); कडधान्यांतील जे दाणे भिजत किंवा शिजत नाहीत व कठीण राहतात ते : 'सगळें शिजवितां अवघड। काकड करिती कडकड। समभावें भरडी दृढ। होतील गोड परिपाकें।' - एरुस्व १८.४९. (राजा.) [सं. कर्कर]

**कांकडे** न. कोवळे शहाळे; अडसर. (को.)

**कांकर-रू** न. कातड्याची वादी : 'साधें हो : ते बळियाडे : ते येथ कांकरू सीरिति : आणि : नेतिः' - लीचउ १०४.

**कांकाण, काकाण्णो** न. बांगडी. पहा : **कंकण** (कु.गो.) [सं. कंकण]

**कांकाळणे** अक्रि. कचरणे; डगमगणे. पहा : **कांकरणे** (कु.)

**कांकांवचे** क्रि. कोंबड्याचे ओरडणे. (गो.)

**कांकी** (कां = काय + की = असे, का, असे जर विचारले तर त्याचे कारण असे) कारण की; सबब; म्हणून; का तर : 'नवीन मराठी ग्रंथ वाचावे, कां कीं नवीन शब्दांच्या भाषापद्धतीचे अवलोकन करावे.' - विवि ८.८.१४२. [ सं. किं. किं]

**कांकीट** वि. सडपातळ बांध्याचा; बारीक; पातळ; किडकिडीत. [ फा. काक् = वाळका, सडपातळ]

**कां कू** क्रिवि. अनमान, अळंटळं, टंगळमंगळ (करीत.).

स्त्री. १. टंगळमंगळ; धरसोड; अळंटळं;- कुचराई; कुरकूर. (क्रि. करणे.) : 'सारें एकपंचमांश आयुष्यदेखील लोकहिताकडे देण्यांत लोकांनी कां कू करावी ना ?' - लोटिकेले ४.१४८. २. कण्हणे (ताप वगैरे मध्ये); हळू व अस्पष्ट शब्द करणे (मार बसला असताना). (क्रि. करणे, म्हणणे.) ३. होय किंवा नाही या विषयी अनिश्चय; एकमत नसणे; उभयविध भाषण. [ ध्व.]

**कांकूस** पु. शौचास बसण्याची खुली जागा. (गो.)

**कांकोरा** पु. ओरखडा; बोचकारा. पहा : **कांकर** (प्रां.)

**कांक्रीट** न. चुना, वाळू, सिमेंट, खडी यांचे एकत्र केलेले मिश्रण. याचा उपयोग बांधकामात करतात. [ इं. काँक्रीट]

**कांग** पु. राळा; एक धान्य; वरईतील एक प्रकार. परंतु वरईत व या धान्यात पुष्कळ फरक आहे. वरईवरील साल पातळ व रंग पिवळा असतो. परंतु कांगाचे साल जाड असून तांबूस, पिवळे, काळसर अशा तीन-चार रंगांचे असते. कांगाचा भात, पेज, लाह्या, भाकरी इत्यादी करतात.

कांगाचे रोप दोन अडीच हात उंच होऊन त्याला जे कणीस येते ते बाजरीच्या कणसाप्रमाणे लांब व बारीक असते. [ सं. कंगु]

**कांगची-णी** पहा : **कांगुणी**

**कांगच्यो** स्त्री. कांगण्या, कांजिण्या रोग. (कु.)

**कांगण** न. कांगुणीचे फळ : 'रानात कांगणे आणि कोडले तांबडीबुंद झाली.' - तोरण २९१. पहा : **कांगुणी** २.

**कांग(गो)णेल** न. कांगुणीचे तेल.

**कांगरघाई** स्त्री. कांघाई; कांगावा. (व.)

**कांगरा** पु. कासार : 'कांगाऱ्याच्या पोरीची नथ सरजाची गेली ।'

**कांगरी** स्त्री. काश्मिर प्रांतात वापरण्यात येणारी लहान शेगडी. [हिं. कांगडी]

**कांगल** पहा : **कांगुणी**

**कांगली** स्त्री. एक प्रकारचे फळ. (बे.)

**कांगा** न. एक लहान मुलांचा (तिकट्यांचा) खेळ. (गो.)

**कांगाई** पहा : **कांगावा**

**कांगातांदूळ** पु. पहा : **कांग** (गो.)

**कांगारू** न. ऑस्ट्रेलियातील एक सस्तन प्राणी. याला लांब शेपूट असते व याचे मागील पाय पुढील पायांपेक्षा मोठे असतात. मादीच्या पोटाला एक पिशवी असते व त्या पिशवीत ती आपली पिल्ले ठेवते. [इं.]

**कांगाव-वा** पु. (थोडेसे नुकसान) फुगवून सांगणे; उगीच ओरडणे; अन्यायाचा खोटा डांगोरा पिटणे; खोटी तक्रार करणे : 'तिनें जो एक रट्टा सुंदरीचे पाठींत दिला, त्यानें ती पोर कळवळली, पण तें लक्षांत न घेतां ती आपल्या डोक्याला लागल्याबद्दल कांगावा करूं लागली.' - पकोधे

**कांगावखोर** वि. कांगावा करणारा; लटकी तक्रार करणारा.

**कांगावे** पहा : **कांघावे**

**कांगु(गो)णी** स्त्री. १. एक उपधान्य. पहा : **कांग**. २. एक औषधी वनस्पती आणि तिचे फळ. (हिं.) मालकांगनी. (सं.) ज्योतिष्मती. ही झाडे पावसाळ्यात उगवतात. याच्या पानांच्या रसाने कागदावर लिहिलेले अक्षर हिरव्या रंगाच्या शाईप्रमाणे दिसते. [ सं. कंगुणी]

**कांगू** पहा : **कांग**

**कांघाई, कांघाव-वे** पहा : **कांगाव-वा**

**कांघाईखोर** वि. कांगावा करणारा; उगीच आरडाओरडा करणारा; खोटी तक्रार करणारा.

**कांचका** पु. एक मासा. (को.)

**कांचन** पु. १. एक फूलझाड; काचनार. पाने आपट्याच्या पानासारखी असतात. : 'कांचन फुलले श्वेत पीत। तेणें सैन्यांत अति शोभा।' - भारा किष्किंधा ९.४१. २. डोंगरी टेंभुर्णी. [ सं. कांचनार]

**कांचन** न. सोने; सुवर्ण : 'एकें लसत्कांचनसम पिंवळे।' - ज्ञा ११.१३५. [ सं. कांच् - प्रकाशणे]

**कांचन** पु. गंजिफाच्या खेळातील एक रंग.

**कांचनभट** पु. (शारदा नाटकातील एक पात्र. याने द्रव्यलोभाने शारदा नावाची आपली अल्पवयी मुलगी श्रीमंत पण जरठ मनुष्याला देण्याचा बेत केला होता यावरून). (ल.) द्रव्याच्या लोभाने म्हाताऱ्याला मुलगी देणारा, अतिलोभी माणूस.

**कांचनमृग** पु. एका जातीचे हरिण. 'त्यांनी आम्हांला राजस्तानातून कांचनमृग आणायला सांगितला होता.'- राऊ १७७.

**कांचनार** पु. डोंगरी टेंभुर्णी. [सं.]

**कांच(नि)नीक** वि. द्रव्यार्थी; द्रव्यलोभी; सकाम. (श्री नाम शब्दार्थ).

**कांची** वि. करवतीकाठी (धोतर, लुगडे). - (तंजा.)

**कांची** स्त्री. कमरपट्टा (सोन्याचा, चांदीचा); कमरेची साखळी, पट्टा. [ सं. कांच् = बांधणे]

**कांचुलिया** पु. घटकंचुकी विधी आचरणारा हिंदू शाक्तांचा एक पंथ. पहा : **कांचोली पंथ** [ सं. कंचुली = काचोळी]

**कांजणी** स्त्री. (क.) कानाच्या बाजूने चेहऱ्यावर येणारे केस.

**कांजणी** स्त्री. लग्नामधील बोहल्याच्या भोवतालची भांड्यांची किंवा मडक्यांची उतरंड; वही. (गो.)

**कांजणी** स्त्री. कांजी; भाताच्या पेजेला पीठ व मीठ, मिरची लावून तयार केलेली पेज. (कु. गो.)

**कांज(जि)णी** स्त्री. (अव. कांजण्या) १. एक प्रकारचा देवीसारखा संसर्गजन्य रोग व त्याचा फोड. देवीपेक्षा हे फोड लहान असतात. यांचा उद्भवकाल तेरा दिवसांचा असतो. हा आजार विशेषकरून लहान मुलांना होतो. (क्रि. येणे, निघणे, उगवणे.)

**कांजयाळी** पहा : **कांजळी** : 'दुभत्याच्या, खरवसाच्या, कांजयाळीच्या गोष्टी बोलू लागलो.' - तोरण १४१.

**कांजल, कांदळ-ळे** न. प्राणप्रतिष्ठा करण्यापूर्वीची देवतेची मूर्ती. [ सं. कंदरस्य इदम्]

**कांजळ-ळा** पु. खाडीच्या काठी उगवणारे व सरपणाच्या उपयोगी असे झाड. याला बकुळीच्या फुलासारखी लहान व सुवासिक फुले येतात.

**कांजळी** स्त्री. गाय, म्हैस इत्यादिकांचे व्याल्यानंतर काढलेले दूध; चीक. [ फा. कंज्]

**कांजी** स्त्री. १. कढ काढलेले पाणी; आंबलेली पेज; कांजवणी; कण्हेरी : 'जो अमृतासि ठी ठेवी। तो जैसा कांजी न सेवी।' - ज्ञा २.३६४. २. खळ. ३. ताकाची स्वच्छ निवळी : 'कां मथिलिया लोणी। कांजी नेदी।।' - ज्ञा १६.१२५. [ सं. काजिका]

**कांजी** न. त्रिफळे, तांदळाची पेज, कोथिंबीर यांची कढी. (कु.)

**कांजी कोठडी** अंधारकोठडी; कांजी देण्याची शिक्षा झालेल्या कैद्याला ज्या कोठडीत ठेवण्यात येते ती कोठडी.

**कांजीण** स्त्री. मगज. (गो.)

**कांजीवडे** पु. १. हिंगाची धुरी दिलेल्या मातीच्या भांड्यात स्वच्छ पाणी भरून त्यात मीठ, मोहऱ्या वगैरे मसाल्याचे पदार्थ घालून त्यात तळलेले उडदाचे वडे घालतात व भांड्याचे तोंड तीन दिवस बांधून ठेवून मग काढतात. या वड्यांना कांजीवडे म्हणतात. २. हरभऱ्याची भिजलेली डाळ वाटून, फोडणीच्या ताकात कालवून नंतर त्यापासून तयार केलेले वडे. (व.)

**कांजीहाऊस** न. १. (लष्करी) लष्करातील शिपायाला शिक्षा देण्याचा

एक प्रकार. शिपायाला खूप काम करायला देऊन फक्त कांजी प्यायला देतात. २. कोंडवाडा. (व. ना.)

**कांटारा** पु. काटा. (राजा. कु.)

**कांटाळणे** अक्रि. घाबरणे; अंगावर काटा येणे : 'आणि माहादाइसे कांटाळली:' - गोप्र ८५.

**कांटाळणे** अक्रि. कंटाळणे : 'जो कांटाळे रोगमरणीं। तो एक कुपुत्र दुरात्मा।' - मुसभा ५.८८.

**कांटाळवाणी** वि. कंटाळवाणी : 'अमुप लवथविती कातडी। कांटाळवाणी।' - दास ३.१.४१९.

**कांटाळा** पु. १. रोमांच : 'सर्वांगा कांटाळा आला।' - ज्ञा १.१९७. २. ताजवा, तराजू : 'जें नित्यानंदाचेनि मानें। उपमेचा कांटाळां न दिसे सानें।' - ज्ञा ८.२६३. ३. काटा; कंटक. ४. भय; त्रास : 'जेवीं मोतियांची कंठमाळा। भ्रमें सर्प भासली डोळां। ते भ्रमांती घालिती गळां। न बाधी कांटाळा सर्पभयाचा।' - एभा २४.६८. ५. आभंड, धडा, समतोल करण्याकरता घातलेला पदार्थ : 'म्हणोनि शिवेंसी कांटाळा। गुरुत्वें तूंचि आगळा।' - ज्ञा १७.३. [सं. कंटक]

**कांटाळी** स्त्री. १. भर; अधिक वजन : 'जयाचिया यशाची थोरी। चोजवीता चंद्र न पवे सरी। जऱ्ही कांटाळी घातली वरी। नक्षेत्रांची।' - रुस्व ६३. २. तराजू; ताजवा.

**कांटाळे** न. १. ताजवा; तोलण्याचे साधन; तराजू. पहा : **कांटाळा** : 'नातरी पृथ्वीचेनि पाडें। कांटाळें जरी जोडे।' - ज्ञा ४.१८०. २. उपमेय; तुल्य वस्तू; सारख्या वजनाचा पदार्थ : 'म्हणौनि इये आत्मलीले। नाहीं आन कांटाळें।' - अमृ ७.२६६. ३. वजन : 'संवतुकी कांटाळें। माझें जाले।।' - ज्ञा १४.५१.

**कांटियडे** न. काटेकुटे : 'तेया तोंडि कांटियडें। आंतु नुसर्दि हाडे।' - राज्ञा १२.६७७.

**कांटी, काटी** स्त्री. १. काटेरी झुडूप, शेताच्या कुंपणातील असलेली एक फांदी; काटेरी झाड किंवा झुडूप; वईतील त्याची एक फांदी : 'धोंडे मळ्यावर टाकले त्यावरतीं कांटी टाकली.' - विवि ८. ४. ६६. २. (आट्यापाट्या) प्रत्येक बाजूची उभी मर्यादरेषा (या दोघांना जोडणारी मधली आडवी पाटी). ३. बाभळीचे लहान झाड. ४. काटेरी कुंपण : 'बाहेरी यमनियमांची कांटी लाविली।' - ज्ञा ९. २१३. (वा.) **० आपल्या पोटावर घासणे** - (खाण्यापिण्यात) नसती काटकसर करणे. **० लागणे** - ओस पडणे; उजाड पडणे. **० लावणे** - (घर, संसार, व्यवहार, रोजगार) मोडणे, नाश करणे, सोडणे, विध्वंस करणे. **० आपल्या पोटावर ओढणे** - भुकेने मरण्यापेक्षा काटे खायला तयार होणे, अधाशी, स्वार्थपरायण होणे. **काट्याचे कोल्हे करणे** - क्षुल्लक गोष्टीचा बाऊ करणे. **काट्याने काटी झाडणे** - काट्याने काटा काढणे : 'काटीनें काटी झाडावी।' - दास १९.९.१२.

**कांटील** स्त्री. रानकरटोली व तिचे फळ.

**कांटीवट-ड** न. काटा, कंटक : 'तया तोंडीं कांटिवडें। आंतु नुसती हाडें।' - ज्ञा १३. ६७९.

**कांठाळ** स्त्री. जनावराच्या पाठीवर दोहों बाजूंस सारखी बसेल अशी सामानाची पिशवी: 'जवळ कांठाळ ठेविली : बैलु बांधला:' - लीच २. ९०.

**कांठाळी** स्त्री. कानठळी; कानाचे टाळे, पडदा. (क्रि. बसणे.) : 'अगदींच बसली मग कांठाळी।' - ऐपो २२४.

**कांठाळी** स्त्री. १. कापडाचा काठ; पदर. २. मासे पकडण्याचे वस्त्रासारखे एक लांब जाळे. (को.)

**कांठि(ठ)ळी** स्त्री. एक हलके धान्य.

**कांड** न. गलबताचे शीड उभारण्याचा दोर; परभाणास अडकवलेली जाडी दोरी; परभाण, डोलकाठी यांना ज्या दोरखंडाने बांधलेले असते तो दोर. हा खालीवर सरकतो.

**कांड** न. मातीच्या भिंतीचा एक थर. (व.)

**कांड** न. ज्ञान : 'येणेशी कांड गुंडा कण्हणी घेना।' - उगी ५२०.

**कांड** न. १. कमरेला घालण्याचा चांदीचा गोफ. (गो.) २. (सोनारी) सरीचा आतील भाग.

**कांड** न. १. दोन सांध्यांमधील भाग, पेरे. २. झाडाचे खोड; सोट; बुंधा. ३. वेदाच्या त्रिकांडांपैकी प्रत्येक कांड. (उपासनाकांड, कर्मकांड, ज्ञानकांड); अध्याय; प्रकरण; अंक; परिच्छेद; विभाग : 'एवं हिंसाचि अहिंसा। कर्मकांडी हा ऐसा।' - ज्ञा १३. २३७. ४. बाण; तीर : 'थोरू कांडांचा घाई मातला।' - शिव ४३९. ५. गहू, नाचणी, हरभरा इत्यादींचे कांड, ताट (दाणा काढल्यानंतरचे). ६. माडाचा सोट; खोड. (को.) ७. संधी; सांधा. (वा.) **० काढणे** - खारीच्या आत ज्या पाट्या (जमिनीचे लहान लहान तुकडे) पाडतात त्यांच्या बांधाला मातीची भर देणे. हे काम वैशाखात करतात.

**कांडक** न. १. वेळूचे पेर. (व.) २. मातीच्या भिंतीचा एक थर.

**कां(कों)डका** पु. १. लाकडाचा ओंडका, ठोकळा. २. जाड काठी : 'म्हातारी उसळली. लाकडाचा कांडका कुत्र्याच्या पाठीत हाणून म्हणाली...' - गागो ११०.

**कांडकुसुंबा** पहा : **काडकुसुंबा**

**कांडकूट, कांडणकुटण** स्त्री. न. कांडणे; कुटणे; पाखडणे इ. धान्य साफ करण्याच्या सर्व क्रिया.

**कांडके** न. १. पहा : **कांडक** २. २. पहा : **कां(कों)डका** : 'कांडकें डवचितां कृष्णसर्प।' - मुवन १२. २१. ३. उंच; धिप्पाड; लठ्ठ; अगडबंब; ठोंब्या (मनुष्य). ४. कुडे : 'कांडके मोठें म्हणजे जाड व लांब असावे.' - मुंव्या २०७. (वा.) **० तुटणे, पडणे** - वाद मिटणे; तडजोड होणे : 'पंधरा रुपयावर कांडकं तुटलं.' - भुज २२. **० तोडणे, पाडणे** - वाद मिटवणे; निकाल लावणे; तडजोड करणे.

**कांडकोंडा** वि. ओशाळलेला : 'मले त मोठं कांडकोंड्यासारखं वाटून राह्यलं बापूनी.' - माणूस २५७.

**कांडगुंडा** पु. १. भांडण : 'हा काळु उभडा। जगीं वैराडा। येणेसीं कांडगुंडा। कव्हणी घे ना।' - उगी ५२०. २. वजनदार, वाटोळा दगड.

**कांडण** न. १. तांदूळ वगैरे सडणे ( त्याच्यावरील तूस काढण्यासाठी) : 'आकाश उजळें कांडणी। सांडि काळिमा।' - ग्रंथराज ८१.

२. सडण्यासाठी घेतलेली धान्याची रास. ३. कांडणावळ; सडणावळ; सडण्याची मजुरी. ४. नाचणी, उडदाची काड. [सं. कंडन]

**कांडण, कापण** न. मुसळ. (गो.)

**कांडणसाळ, कांडसाळ** स्त्री. दळणकांडणाचा घरातील एक सोपा.

**कांडणावळ, कांडाई** स्त्री. कांडणाबद्दलची मजुरी.

**कांडणी** स्त्री. कांडण; कांडण्याची क्रिया.

**कांडणे** उक्रि. भात इ. धान्यावरील तूस काढण्याकरता उखळीत सडणे; कुटणे (मुसळाने) : 'एऱ्हवी कणा आणि भूसा। कांडिताही सोसु सरिसा।' - ज्ञा. १८. ९३९. [क. कोट्टणं] [सं. कंडन]

**कांडत्रय** न. वेदांची तीन कांडे. पहा : **कांड ३** [सं.]

**कांडथुवर** फड्या निवडुंग.

**कांडप** न. कांडण; कांडण्याचे काम : 'भात भरडणे, कांडप ही कामे दोनतीन महिन्यांनी एकदा करावयाची असल्याने' - माआ ५०. (राजा.) (वा.) ० **काढणे** - १. मारणे; झोडणे; बदडणे. (कु.) २. शक्तीच्या बाहेर काम करून घेणे : 'आता मी ह्या पोरांचा कांडप काढतंय.' - तोरण १६४.

**कांडपा** पु. मुसळ. (गो.) (वा.) **कांडपाक कोंब फुटणे** - मुसळाला अंकुर फुटणे (अशक्य गोष्ट).

**कांडपी, कांडपीण** पु. स्त्री. कांडपाचा धंदा करणारा पुरुष व स्त्री. (राजा.) 'कांडपिणींचा प्रश्न सोडविणें किती अवघड आहे !'- विचारविलास १३३.

**कांडबीटी** स्त्री. बाण व धनुष्य : 'तेणेंसी मेळवी कांडबीटी। ऐसा कव्हणी' - मूप्र १०२३.

**कांडय** स्त्री. एका जातीचा मासा : 'तो वर उमटला तो एक हात दीड हात लांब कांडय घेऊनच.' - शेलूक ९६.

**कांड(डा-डे)र, कांडरे** न. सापाची एक जात. हा चावला असताना तो भाग कुजू लागून तो माणूस मरतो. याचे काटे पायाला लागले तरीही पाय कुजतो.

**कांड(डा)रणे** अक्रि. कांडी करणे; कुरतडणे; कातरणे : 'वानरानं मकेचं कणीस दातरावं तसा नानांचा हात दातरला, कांडरला.' - व्यंमाक ८६. (माण.)

**कांडरू** न. १. बोटांची पेरे व अग्रे यांना होणारे उठाणू. २. तीनचार पेरांचे उसाचे कांडे.

**कांड (डा)विणे** उक्रि. १. खाज शमवण्यासाठी नखांनी खाजवणे. २. (ल.) चेतवणे; चिडवणे; डिवचणे.(वा.) **कांडात काढणे** - खूप ठोकणे; बेदम मारणे : 'आई मारायच्या आधीच मी तुझं कांडात काढीन.' - विचारविलास २०३. [सं. कंडूय् = खाजवणे]

**कांडवेल** स्त्री. निवडुंगासारखी दिसणारी एक बारीक औषधी वेल; वई. त्रिधारी, चौधारी अशा हिच्या दोन जाती आहेत. हिला पेरे असतात. त्रिधारी कांडवेलीला हाडसंधी असेही म्हणतात. [सं. कांडवल्लि]

**कांडशेर** पु. शेराभोवती आढळणारी लांब नाजूक पेरापेरांची एक वेल.

**कांडसावरी** स्त्री. एक वनस्पती : 'उंचावर कांडसावरीचं रोप उगवलं होतं. - जैत १३२.

**कांडसोट** पु. सहा मुठी सोन्याच्या एका सुतावर मधील भागाच्याच सुमारे २॥ - ३ मुठीच्या भागावर दुसरे एक सोन्याचे सूत पिळून पहिल्या सुताच्या एका टोकाला वाटोळा फासा व दुसऱ्या टोकाला नागफासा करून गजरे बेटण्यापूर्वी जो सरीचा भाग तयार होतो तो.

**कांडळणे** अक्रि. घासून घासून झिजणे, कमी होणे. [सं. कांड]

**कांड(डो)ळणे** उक्रि. खाजवणे; चोळून खाज नाहीशी करणे. [ सं. कंडूय = खाजवणे]

**कांडा** पु. कांडे; बोटाचा तिसरा भाग.

**कांडाई** स्त्री. कांडणावळ.

**कांडाउर** न. तुकडा; खांडोळे : 'तेया वृसभांची कांडाउरे करोनि।' - क्रिपु २८२.

**कांडाकुरकुचा** पु. करकोच्यासारखा एक पक्षी.

**कांडाकुं(कों)डा** पु. बारीकसारीक पदार्थ; भाजीभाकर; गरिबीचे जेवण : 'काहीतरी कांडाकुंडा करून भागवायचं झालं.' - मळणी १५०.

**कांडादळा** पु. दळणकांडण : 'पुढें आई व आम्ही तिघे मुले लहान. यांचे कांडादळा करून पोट आई भरीत होती.' - ऐसंसाखं ३.२११.

**कांडानुसमय** पु. विशिष्ट समुदायातील प्रत्येक व्यक्तीला एक वस्तू अगर वस्तूंचा संच - जोड देण्याचा अनुक्रम; प्रतिसमुच्चय, प्रतिसंघ (देणे).

**कांडार** पु. न. कळ, वेदना : 'दोहता दोही हातां कांडार एति' - लीचपू ६०.

**कांडारणे** उक्रि. जोराचा कोंब फुटणे, फोफावणे. कांड, खोड मजबूत भक्कम होणे. (ऊस, जोंधळा-क्वचित मुलांची वाढ.)

**कांडारणे** अक्रि. कोरून काढणे.

**कांडारा-रे-रो** पु. बांबू, केळ, ऊस इ. चा उभा चिरलेला तुकडा, फांक. (गो.) [सं. कांड]

**कांडारी** पु. सुकाणू धरणारा; नावाडी.

**कांडारीव** वि. १. खोदीव : 'पुढा मोहटीया सोठवीलिया चौपसी। कांडारीवा बाहलीवा अतिमयसी।' - नरुस्व १०३. २. कोरीव : 'दारवंठा दारसंका कांडारीन ।' - रुस्व ५३.

**कांडारो** पु. कांडण्याने निराळा झालेला कोंडा; तूस.

**कांडाळ** स्त्री. मासे धरण्याचे लहान जाळे. याच्या टोकाला लाकडाचे लहान तुकडे लावतात.

**कांडाळणे** अक्रि. १. लांब व बळकट अशी पेरे येणे; वेगाने व जोमाने वाढणे (जोंधळा, बाजरी इ.). २. (ल.) मूल सपाटून वाढीला लागणे. ३. जोंधळा, बाजरी, ऊस पेराशी काळा पडणे. (नाशिक). ४. (ल.) रक्तपिती होणे. [सं. कांड]

**कांडाळणे** सक्रि. पहा : **कांडारणे, करांडणे**; १. घासून झिजवणे. २. खाज सुटणे; कंड खाणे.

उक्रि. खाजवणे. [सं. कंडूय्]

**कांडाळी-ळो** स्त्री. मासे धरण्याचे मध्यम प्रतीचे जाळे.

**कांडाळे** न. धनुष्य; बाणांचा वर्षाव; चाप : 'अर्जुनाचेनि कांडाळें। बहुत माणुख रणां आलें।' - शिव ८८२.

**कांडिवणे** उक्रि. खाजवणे; घासणे; चोळणे. (को.) [सं. कंडूय्]

**कांडी** स्त्री. १. वेखंड, सुंठ, आले, हळद इत्यादींची मुळे व तुकडा; मोड; अंकुर; ऊस वगैरेची पेरे. २. त्या आकाराचा धातूचा तुकडा. ३. (वस्त्रोद्योग) वस्त्र विणण्यासाठी ज्या काठीला सूत गुंडाळलेले असते ती काठी. ४. (वस्त्रोद्योग) धोट्याच्या आतील दोऱ्याचे गुंडाळे, बाबीण; धोट्यामध्ये बसेल अशा लाकडी अगर बोरूच्या तुकड्यावर भरलेल्या सुताची गुंडाळी. ५. लसणीचा गड्डा. ६. चंदनाचे खोड. (गो.) ७. (नाविक) दोन्ही रोजांना सांधणारे व दोन्ही रोजांसहित भागाचे लाकूड. हा गलबताचा पाया होय. या लाकडाच्या वरच्या अंगाला दोन्ही बाजूंना खाचा पाडून त्यात फळ्या बसवतात. (को.) ८. (छापखाना) फर्मा ठोकताना पान (पेज) व सामान (फर्निचर) हे चौकटीला आवळून बसण्याकरता ठोकायचा लाकडाचा तुकडा. ९. ओळ; चरण : 'ब्राह्मणु एकु कांडि म्हणतु होता।' - गोप्र ४५.[सं. कांड] (वा.) **० चिरगाळणे, ० फिरवणे** - गारुड्याने आपल्या हातातील लाकडाची लहान काठी आपल्या हाताभौवती अथवा अंगाभोवती फिरवणे. (यक्षिणीची) **० फिरवणे** - चमत्कार घडवून आणणे, अवचित एखादी गोष्ट घडवून पूर्वी घडलेल्या कृत्याच्या उलट होणे.

**कांडी** स्त्री. हत्तीच्या पायाला होणारा एक आजार.

**कांडीकोळसा** पु. कोळशाची खर व इतर ज्वलनक्षम पदार्थ विशिष्ट प्रक्रियेने एकत्र करून त्याचे गोळे तयार करतात व सुकवतात. याला कांडीकोळसा किंवा बदामी कोळसा म्हणतात. घरगुती जळण म्हणून याचा उपयोग होतो.

**कांडीखार** पु. (रसा.) एक विषारी, त्वचेला खाज उत्पन्न करणारा, स्फटिकमय विद्राव्य क्षार. नायट्रिक ॲसिडची चांदीवर प्रक्रिया करून हा क्षार बनतो. सेंद्रीय पदार्थांच्या सान्निध्याने हा काळा बनतो. छायाचित्रांच्या छपाईसाठी वापरण्यात येणारा रासायनिक पदार्थ. आरशाला पारा बसवणे, पुसली न जाणारी शाई, केसांचा कलप बनवणे यांमध्ये याचा उपयोग होतो.

**कांडुरचे** सक्रि. नखांनी कुरतडणे; खाजवणे. (गो.) [सं. कंडूय्]

**कांडुळणे** अक्रि. तुकडे तुकडे पडणे (दोरा, सूत, धागा इत्यादीचे). [सं. कांड]

**कांडुळणे** उक्रि. खाजवणे. (को.) [ सं. कंडूय्]

**कांडे** न. १. पेर; पर्व; सांधा. २. दोन पेरांतील भाग, तुकडा. ३. ऊस, बांबू इ.चा तीन चार पेरांचा तुकडा, भाग, टिपरे. ४. झाडाचे सबंध खोड, विशेषत: फांद्या फुटायच्या आधीचे. ५. (ल.) लांबी मोजण्याचे एक माप (काडी, दोरा इ.) अशा रीतीने वाटेल त्या लांबीचे घेतलेले माप, यावरून (लांब भिंतीचा, ओट्याच्या, विहिरीचा, पाण्याच्या पाटाचा, इमारत कामाचा) एक किंवा विशिष्ट भाग. ६. जुनी वाळलेली, वठलेली टणक वेल. ७. एकदा मळणी केलेली किंवा झोडपलेली धान्याची ताटे, कणसे (फेकून दिलेली किंवा दुसऱ्यांदा मळणी करण्यासाठी, झोडपण्यासाठी ठेवलेली). ८. भात, नाचणी, वरई इ.ची लावणी करायला योग्य असलेली दाढ. ९. बोटांच्या सांध्याला होणारा एक रोग. १०. बाण; तीर : 'कांडे मोकलीसी चांगें।' - उषा १५२६. पहा : **कांड**. ११. बोरू. (ना.) [सं. कांड] (वा.) **अडीच कांड्यावर येणे** - १. (गव्हाच्या ताटाला ओंबी फुटते तेव्हा अडीच पेरे असतात यावरून) ओंबी बाहेर पडण्याच्या बेताला येणे. २. चिडण्याच्या परमावधीला पोचणे (माणूस). **० पेरे घेणे** - मोजमाप घेणे. **० चिरणे** - (आट्यापाट्या) सूर धरणाऱ्याने पहिली टाळी देऊन पहिल्या पाटीला पाय लावून पुन्हा परत येऊन दुसरी टाळी देणे. **० पेरे पाहणे** - (गुरे विकत घेताना) त्यांचे सांधे व हाडपेर, अंगकाठी वगैरे पाहणे. **० पेरे मिळणे किंवा कमीजास्त होणे** - वरील प्रकारात बरोबर जुळणे किंवा न जुळणे. **० पेरे लावणे, पेरे लावून पहाणे** - वहिमी, खुनी मनुष्याच्या, चोराच्या पायांचे मोजमाप सापडलेल्या भागाच्या पायाशी ताडून पाहणे.

**कांडेकरी** पु. १. (गुन्हाळ) कवळ्याने आणून दिलेली उसाची कांडी चरकात घालणारा. २. सुतार. (कर.)

**कांडेचोर** पु. ऊद; काळमांजर; कलिंदर; कानेदर; वनेर.

**कांडेछेद** पु. १. परस्परांसमोर उभे राहून परस्परांच्या प्रकोष्ठावर आघात करणे. २. (आट्यापाट्या) पहा : **कांडे चिरणे**.

**कांडेर** पहा : **कांडर** : 'मी कांडेर, कांबळा वगैरे सापांची नावे सांगू लागलो.' - आआशे २८४.

**कांडेश्व(स)र** पु. लांब मानेचा बगळा; 'गीध घारी कांडेसरें।' - दावि २४४.

**कांडेसावर** न. निवडुंगाची एक जात; त्रिधारी किंवा चौधारी निवडुंग.

**कांडेहुरा** पु. काडाशेर; चिकाडा; कांडी असलेला शेर. (को.)

**कांडोकांड** क्रिवि. बोटाच्या प्रत्येक पेरावर : 'किती कांडोकांड मिरवाल मुद्या।' - अमृत ११७. [कांडचे द्वि.]

**कांडोरी-रे** स्त्री. न. पहा : **कांडे १, २, ३**; तुकडा, खांडोळे, खांडोळी : 'सहस्रभुजांचीं कांडोरी करी।' - रमा ४. २४९. [सं. कांड]

**कांडोवाड** न. १. पेर. २. दोन पेरांमधला सांधा.

**कांडोळ-ळी** पु. स्त्री. सारढोळ, एक मोठा वृक्ष. याचा रंग पांढरा असून याला वसंत ऋतूत फळे येतात. फळाचा आकार बदामासारखा व फुलें लाल असतात. झाडाला पांढरा डिंक यैतो. त्याला कथल्या गोंद म्हणतात.

**कांडोळणे** उक्रि. बोटांनी गोंजारणे; खाजवणे : 'पायें पाये कांडोळी। सेवा करी हीन कुळीं। तो येक मूर्ख।' - दास २. १. ६४. [सं. कंडूय्]

**कांडोळणे** क्रि. तुकडे करणे.

**कांडोळी** स्त्री. न. शेतामध्ये पाणी अडवण्यासाठी घातलेले मातीचे बांध, ताल. पहा : **कांड काढणे** (को.)

**कांडोळे** न. लहान मुलांच्या पायातील रुप्याचा वाळा; विडी; धातूचे कडे. [सं. कांड + वलय]

**कांडोळे** न. अधिकाऱ्याने आपल्या येथील कार्याकरिता वसूल केलेला जादा कर.

**कांढळ** न. एका जातीचे गवत. याच्या काड्या जाड असून त्या विणण्यासाठी उपयोगी पडतात.

**कांणोबाणे** क्रि. काहीच्या बाहीच बोलणे.
**कांत** पु. १. (लोहकांत याचा संक्षेप) चुंबक; चुंबक व त्याचे भस्म : 'जैसा कांत अवच्छिन्न। जड लोहातें अचेष्टून।' - विउ ४. ४९. २. कढई वगैरेचे लोखंड. [सं. कांत]
**कांत** पु. नवरा; पती; प्रियकर : 'तिया कांतु मिनलिया न राहवें । हृदय जेवीं ॥' - ज्ञा ११. ५७७. [सं. कम् - कांत]
**कांत** पु. कडा. (काठ याचा अपभ्रंश). (को.) [सं.]
**कांत** स्त्री. १. तेज; लकाकी; पाणी; सौंदर्य. २. (ल.) टवटवी; निर्मळपणा; निरोगीपणा (चेहरा, मुद्रा किंवा शरीराचा वर्ण यांवरील).
वि. सुंदर; तेजस्वी.
**कांत** पु. लाकूड, हस्तदंत वगैरेचा कातताना पडलेला भुसा; चुरा; कीस [कांतणे]
**कांतर** वि. खारवट शेतजमीन. (गो.)
**कांतलोह** न. पोलाद; तीक्ष्णायस; रूक्मलोह. [सं.]
**कांतळा** वि. कांतिमान; तेजस्वी; श्वेत : 'तो कैसा दिसताए कांतळा। जैसा अमृतरसाचा ओतिला।' - शिव ९९४. [सं. कांति]
**कांता** स्त्री. १. सुंदर स्त्री; आवडती स्त्री. २. पत्नी; लग्नाची बायको : 'परी प्रियापुढें कांता। रिगे जैसेनि।।' - ज्ञा १७. २७५. [सं.]
**कांतादृष्टी** स्त्री. (नृत्य.) चित्त प्रसन्न व संतुष्ट असे असताना खोट्या रागाचा आव आणून शृंगारसूचक भ्रूक्षेप व कटाक्ष दाखवणे. हा अभिनय शृंगाररसाच्या वेळी करतात. [सं.]
**कांतार** न. १. अरण्य; वन. २. कठीण व बिकट वाट. [सं.]
**कांति-ती** स्त्री. सापाची कात; मेंग. [सं. कृत्ति.]
**कांति-ती** स्त्री. १. तेज; सौंदर्य; शोभा; प्रकाश : 'अवयवकांतीची भांब। तैसी दिसे।।' - ज्ञा ६. २५३. २. देह; काया : 'काय सांगों सुख झालें आर्लिगनें। निवाली दर्शनें कांति माझी।' - तुगा ६१७. ३. कातडी; त्वचा : 'वांकलिया सातां ठाइं। भोखारिला फाटकिया कांती' - उगी ७६०. [सं.] (वा.) ० **करणे** - शंकराच्या पिंडीच्या वर तजेलदार लेप लावणे. (बे.); निर्वाळणे.
**कांतिऊ** वि. रेखीव; कोरीव; कांतीव : 'वैराग्याचा कांतिउ।' - उगी २५१.
**कांतिपुंज** पु. तेजाचा पुंजका : 'त्यावर कांहीं ठिकाणीं कांतिपुंज असावेत असा भास होतो.' - सूर्यावरील ठिपके (आगरकर.).
**कांतिमान** वि. ज्याच्या अंगी तेज, पाणी आहे असा; तेजस्वी; सतेज; सुंदर; तेजःपुंज. [सं.]
**कांतिया** पु. एक प्रकारचे वस्त्र : 'फाळिले आतां कांतिया नेस :' - लीचउ १९.
**कांतिलोह** पु. खड्गाचा एक प्रकार. पहा : **कांतलोह**; काळे लोखंड.
**कांतेला** वि. पिसाळलेला : 'कांतेलेसे श्वान। तैसे दिशा हिंडे मन।' - तुगा २०४५.
**कांतौणा** पु. पिंजारी; कातणारा. (गो.) [सं. कृत्]
**कांत्रवथर** पु. कातीव खडकाचा थर.
**कांदपणे** पहा : **कानपणे**
**कांदर** पहा : **कांदल**
**कांदरी** स्त्री. कांद्याला फुटणारे लहान लहान कांदे. (राजा.) [सं. कंद]
**कांदल-ळ-ळी** पु. स्त्री. खाडीच्या काठी किंवा खाऱ्या पाण्याच्या दलदलीत (खाजणात) उत्पन्न होणारे एक झाड : 'चानी काठावरच्या कांदळीच्या झाडाखाली स्तब्ध उभी होती.' - गणूराया ११६. (राजा.)
**कांदल्या** न. कमळाचे कंद. (हेट.)
**कांदळ** पु. एक प्रकारचा दगड.
**कांदा** पु. १. एक कंद; पलांडू. २. मुख्य भाग; गड्डा; मूळ; कंद (कोबी, नवलकोल इत्यादीचा. सामान्यत: कोणत्याही पदार्थाचा महत्त्वाचा किंवा मूळ भाग) : 'अगा विषाचे कांदे वाढुनी।' - ज्ञा ९. ४९८. ३. (ल.) जिभेचा मूळ भाग. ४. मधाच्या पोळ्यातील मध असलेला भाग. ५. सरकारी जागेत लावलेल्या कांद्यावरील कर. ६. वनगाईचा केसांसह शेपटीचा भाग. ७. (उप.) मूर्ख.
**कांदाचिर** पु. लहान मुलांचा एक खेळ : 'लहानपणीं आम्ही खूप खेळायचो. आबाधुबी, ऐसपैस, कांदाचिर' - उअं १७.
**कांदा चौरीचा** दांड्यावर बसवायचा चौरीचा गुच्छ.
**कांदापात** वि. कांद्याच्या पातीप्रमाणे नक्षीदार.
**कांदापोथी** स्त्री. बारीकसारीक, सटरफटर कामे. (व.)
**कांदाळ** न. कोळ्याचे मासे पकडण्याचे एक जाळे. (को. कोळी)
**कांदि-दी** स्त्री. कातडीवरील काळानिळा वण : 'जी जी। आम्ही आपूलेया गोसावीयांसि। कांदि वोळखौति।' - लिचउ २२७.
**कांधान** वि. अतिआंबट.
**कांधानणे** अक्रि. अतिआंबट होणे; कळकणे (दही इ.).
**कांना** पु. झोळीचा बंद किंवा पदर : '(झोळीचा) एकु कांना गुडघा घलिती' - लीचउ ४३७.
**कांब** स्त्री. १. बांबू वगैरेचे उभे लांबट भेतुक, चिरफळी, कामटी. २. लोखंड अगर इतर धातूंचा चापट, लांबट तुकडा, गज. ३. कोपरापासून मनगटापर्यंतचा हात; त्या भागाचे हाड : 'त्याच्या मनगटाची कांब रुंद व जाडी होती.' - कोरकि ९१. ४. (कुस्ती) जोडीदाराच्या मानेला घातलेला विळखा, मिठी. (को.) ५. रीप; लाकडाची पट्टी. (कु.) ६. पंधरा तसू लांबीची काठी (जमीन मोजण्याची). ७. (वस्त्रोद्योग) लगा तणून झाल्यावर त्याची परामणी करतेवेळी सांधीत घालण्यासाठी वेळूच्या कामटीचे केलेले लांबट तुकडे. ८. तार. - (तंजा.) [क. कंबि] (वा.) ० **मोठी असणे** - मनगट जोरदार, भरभक्कम असणे; हाडपेर बळकट असणे; सशक्त असणे.
न. कृशता; हडकुळेपणा.
**कांबट-टी** स्त्री. १. पहा : **कांबीट** : २. पत्रावळी लावण्यासाठी नारळीच्या झावळीच्या दांड्याच्या पाठीचे काढलेले लांबट तुकडे, चोय, चोयटी. [सं. कमठ = वेळु]
**कांबडी** पु. कांबड गाणे म्हणणारी वारली व्यक्ती. (आहि.)
**कांबडी** स्त्री. (कुंभारी) (कांबिट चार बोटे लांब व दोन बोटे रुंद). ही मडके घासायला घेतात. (खा.)

**कांबरणे** सक्रि. पांघरणे (वर्णव्यत्यासाने) : 'अंगावर घोंगड कांबरून घ्यावं.'- गोता ८७.

**कांब(भ)रूण** न. पांघरूण : 'मुलानं कांबरूण गच्च लपेटून घ्यावं तसं...' - शेलूक १४२. (राजा. कु.)

**कांबरे** न. डोळ्यातील वाळलेला मळ; चिपड. (को.)

**कांबळ-ळा-ळी-ळे** स्त्री. पु. स्त्री. न. १. घोंगडी; मेंढीच्या लोकरीचे वस्त्र : 'अकीर्तिच असो रुचे तुज कशी व्रजीं कांबळी।' - केका ७८; 'कांबळा घेई काळा।' - होला १६. २. लोकरीच्या दोन घोंगड्यांची शिवून केलेली मोठी घोंगडी. ३. गाईबैलाची मानेखालची पोळी : 'गळ्याखालीं गाईस जशी कांबळ असते...' - तीप्र ९४. [सं. कंबल] (वा.) **भिजत कांबळें जड होणे** - १. एखाद्या संकटाची उपेक्षा केल्याने ते जास्तच वाढत जाणे. २. एखादे काम लोंबकळत पडणे. **कांबळ्यावर काढणे** - मरणाच्या वेळी मनुष्याला गादीवरून घोंगडीवर ठेवतात, त्यावरून मरणाची शेवटची घटका; आसन्न मृत्यू : 'तुम्हांला कांबळ्यावर काढले होते.' - नामना १२३.

**कांबळा** पहा : **कांबळो** : 'मी कांडेर, कांबळा वगैरे सापांची नावे सांगू लागलो.' - आआशे २८४.

**कांबळीट** न. घोंगडी; ब्लँकेट.

**कांबळो-ळ्या घोणस** एका जातीचा साप. याला पट्टे असतात.

**कांबळ्या** वि. १. कांबळे वापरणारा. २. (ल.) मजूर.

**कांबाटणे** उक्रि. गाय वगैरेच्या निरणात विषयुक्त कांब घालून ठार मारणे.

**कांबी** स्त्री. १. धनुष्याची कमान, कांबीट; धनुर्दंड; कमठा : 'कांबी वाजे काळाची।' - विउ ८. १. २. छडी; काठी; फणी : 'तयाच्या माथां कांबि वाजे।' - उगी ६३९.

**कांबी** स्त्री. सुताला पाजण करण्याकरिता फुलीच्या आकाराच्या केलेल्या काठ्या.

**कांबी आयाळ** घोड्याच्या डोळ्यांवरून खाली लोंबणारी आयाळ व खालपर्यंत लोंबणाऱ्या केसांची शेपटी. अशा प्रकारचा घोडा शुभदायक समजला जातो. - अश्वप १. ९१.

**कांबीकार** पु. सेवक; दंडधारी सेवक : 'रावो म्हणे कांबीकारा। उखेपुढील मांदी वोसारा' - उह १८१.

**कांबीट** स्त्री. न. १. कांबटी; बांबूचा तुकडा; भेतुक; वेळूची लांब फाक : 'तेथें या कांबिटाचा गरिब गुण किती प्रौढिहि कोण येणें।' - आसी ३२. २. (ल.) मनगटाची कांब; हाड; जनावरांच्या पुढच्या तंगडीचे हाड. ३. तिरकमठा; धनुष्याची काठी; दंड : 'मग पांचशतें। कांबिटें वोढी। वोढोनियां बोटें।' - कथा २. १४. २. [सं. कमठ = वेळु]

**कांबी तासप** पळून जाणे. (गो.)

**कांबीया** पहा : **कांबीकार**

**कांबीर** न. पांघरूण; आच्छादन : 'घाली फुलांचं कांबीर.' - जसा ६३१.

**कांबील** स्त्री. कामीन; कावीळ. [सं. कामला]

**कांबेरू** न. साप अडचणीच्या जागी असताना त्याला धरून ठेवण्यासाठी टोकाला लोखंडी अणकुचीदार काटे बसवलेली काठी. (को.)

**कांब्या शेंदूर** कांबेसारखा, लांब तुकड्याचा शेंदूर. हा औषधी आहे.

**कांभिरा** पहा : **कांभेरा** : 'कांभिऱ्याला बाशिंगे बांधली आहेत.' - जोफु २३८.

**कांभे(बे)रा** पु. आढे किंवा पाखाड्या यांना तुळईपासून दिलेला लाकडी धिरा.

**कांवजौचे** अक्रि. पाण्यात फार वेळ राहिल्याने अंग आखडणे. (गो.)

**कांश्या** पु. लोखंडाची फळी. (गो.) [सं. कास्य]

**कांस** पु. कळ; आवेग; तिडीक; यातना. (गो.)

**कांस** स्त्री. फुत्कार. (गो.) [ध्व.]

**कांस** स्त्री. (नाविक) काठीचा बुंधा खाली दबण्यासाठी दुरमीणास व काठीस अडकवावी लागणारी दोरी. (वाकाच्या दुरमीणास एक टोक अडकवून दुसरे टोक काठीच्या बुंध्याला फेरा देऊन दुसऱ्या दुरमीणास दुसऱ्या बोडताला अडकवून ठेवतात.) [सं. कृष् = ओढणे]

**कांसा** पु. १. समुद्रात असलेला उघडा व सपाट खडक. हा कधी कधी पाण्याच्या आतही असतो. (गो.) २. डेऱ्याचा मध्यभाग.

**कांसाळ** स्त्री. काशाची मोठी झांज. ही नौबतीबरोबर वाजवीत असत. वि. टाळकुट्या. [सं. कांस्य]

**कांसाळवत, कांसाळू** न. मोठ्या पानाचे अळू. याच्या काळे, पांढरे अशा दोन जाती आहेत. याच्या देठाची भाजी करतात.

**कांसुल-ला-ले** न. स्वयंपाकाची लहान पळी. (कु. गो.)

**कांसों** न. कासवाच्या आकाराचे, पसरट चिनी मातीचे किंवा लोखंडाचे, तोंड धुण्याचे तस्त किंवा लघवीचे भांडे.

**कांक्षणे** अक्रि. इच्छिणे; इच्छा, अपेक्षा करणे. [सं. कांक्षा]

**कांक्षया** स्त्री. कांक्षा; इच्छा; अपेक्षा : 'न धरीं चित्तीं कांक्षया।' - वेसीस्व १.२३. [सं. कांक्षा]

क्रिवि. इच्छेने.

**कांक्षा** स्त्री. १. इच्छा; अपेक्षा. २. घेतलेली शंका; केलेला प्रश्न. ३. अंदेशा; संशय; शंका : 'कांक्षे नेघ सपक्ष ही क्षितिपती त्वत्क्षात्र सरंक्षणे।' - आराम २१. ४. कल्पना; विचार; विचित्र कल्पना किंवा मत. [सं.]

**कांक्षावणे** अक्रि. संशय, अंदेशा घेणे; कुतर्क किंवा शंका धरणे.

**कांक्षित** वि. इच्छित किंवा वांच्छित; ज्याची आवड धरतो आहे असे.

**कांक्षी(क्षे)खोर** वि. १. आढेवेढे घेणारा. २. मनात कुतर्क, संशय घेऊन हरकत घेणारा; संशयी; अंदेशखोर. ३. तऱ्हेवाईक; एककल्ली; हुकीबाज; भ्रमिष्ट.

**किकरं** न. १. (सुतारी) विंधणे; लाकडाला भोक पाडण्याचे सुताराचे एक हत्यार; उळी : 'बाजूचा एकजण खरपावर किकऱ्याला घासून धार देत होता.' - अगतिका १४८. २. एक खेळणे; किरकिरे; फिरकी. (बे.)

**किकसा** न. हळदीचे उटणे : 'कौतिकनं आरतीं आणली. तीत किकसा होता.' - धग ४१.

**किकाट** पु. हत्तीचा चित्कार.

**किकिदिवी** पु. एक पक्षी. [सं.]

**किकी** स्त्री. केतकी; केवडा : 'किकीचं पान बाई कीकी । सांगड मासा सूं सूं ।' - लोकशब्द. ६४

**किक्क** पु. कंटाळा; वीट : 'रोज ही कोरव्याची पिऊन किक्क आलाय.' - फगो ३८.

**किक्रा** पु. किंकरा; सुताराचे हत्यार. (झाडी)

**किख** वि. अतिशय थंड. (गो.)

**किच** अ. हिरवी कच्ची भाजी खाताना, बारीक हिरवी डहाळी मोडताना होणारा नाजूक आवाज. [ ध्व.]

**किच** न. अल्प अंश; थोडेसे. (कु.) [ सं. किंचित्]

**किचकट-काड** वि. १. बारीक; रोड; पातळ (शरीर, वासा, खांब वगैरे) : 'हें स्थित्यंतर युद्धकलेत अलीकडे झाल्यामुळे... उंचापुरा जवान आणि किचकट पोरहि सारखेच.' - निमा ९७१. २. किरटे; वाचायला कठीण; गिचमीड (अक्षर, लेख). ३. फार बारीक; चिरचिरे (लेखणीचे टोक). ४. (सामान्यत:) पहा : **किचर, किचरट.** ५. गुंतागुंतीचे; भानगडीचे : 'श्री सिद्धारूढस्वामींच्या मिळकती संबंधाने असला किचरट वाद उपस्थित झाल्याचें प्रसिद्धच आहे.' - सासं २.४१०. [ सं. कृच्छ्]

**किचकाट** न. गर्दी; गचडी. (कु.)

**किचकिच** स्त्री. चिकटण; चिकटाई; चिकचिकाट. [ ध्व. चिकचिक वर्णव्यत्यास]

**किचकिच** स्त्री. कुरकुर; हलक्या आवाजात एकसारखी चालू असलेली तक्रार.

**किचकिच-चा** क्रिवि. रेव, बारीक खडा इ. पदार्थ दाताखाली सापडले असताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे. (क्रि. लागणे.) [ध्व.]

**किचकिचणे** अक्रि. १. वानराने दात चावून शब्द करणे. २. (पिंगळ्याने) शब्द काढणे.

**किचकिचावणे** अक्रि. सक्रि. १. हिणवणे; टाकून बोलणे. (गो.) २. दात चावणे. (कु.)

**किचकिचीत** वि. १. किचकिच आवाज करणारा. (कच्चा माल, रेवाळ वस्तू.) २. चिकट.

**किचकिचो** वि. १. अपक्व; अर्धवट शिजलेला (भात वगैरे). (चि.) २. कटकट करणारा; किरकिरा. [ ध्व.]

**किचड** न. पु. चिखल; रेंदा; राड; गारा. [ हिं.]

**किचडा** पहा : **खिचडा** : 'मी सगळ्या ढोरास्नी बचकभर किचडा चारला.' - गोता ८५.

**किचणे** अक्रि. कुरकुरणे : 'मग किचायला काय झालं तुला?' - जाण ३२१.

**किचबिड, किचबिडीत** पहा : **किजबिड, किजबिडीत**

**किचम** स्त्री. खाज; कंडू. (गो.) [ क. किच्च - आग]

**किचमणी** स्त्री. कटकट; घासाघीस; दिरंगाई; किचकटपणा; चेंगटपणा. (गो.)

**किचमणे** वि. त्रास देणारे; कुचंबणा करणारे. (गो.)
न. त्रास.

**किचमिचकाला** पु. घाण; चिवडाचिवड. [ ध्व.]

**किचमिड** पहा : **किजबिड**

**किचमुचे** अक्रि. खाजवणे. (गो.)

**किचर, किचरट** वि. वाईट; त्रासदायक; पीडा देणारे; छळणारे; त्रासदायक गोष्टींनी परिपूर्ण. (काम, धंदा, न वाचता येणारे अक्षर, दूरान्वयाचा व घोटाळ्याचा श्लोक, फार महत्त्वाची नाही अशी परंतु घोटाळ्याची व त्रासदायक (गोष्ट, काम.).

**किचवटणे, किचवं(विं)दणे** उक्रि. १. अस्ताव्यस्त फेकणे; विसकटणे; नासणे; २. टोचून, ओरखडून, चोळवटून कालवणे; चोळवटणे; चिवडणे.

**किचाट** न. संकट; कारस्थान; तुफान : 'जानोबानें व जाउबानें हे किचरट केले म्हणवून त्यास तोंड दाखविता नयें ऐसे होऊन देशांतरें गेले.' - शिचसाखं ५.२२५.

**कि(की)चाट** पु. खटला : 'ठाणदार.... अफजतनगरास माइणीचे जत्रेस कीचाटाबद्दल आला होता.' - शिवसाखं ५.१६६.
वि. वेळखाऊ.

**किचाट-टी-ट्या-ड** पु. १. कचाट; किटाळ; आरोप. २. गलबला; दंगा; गडबड : 'रांड पोर किचाट करते।' - ऐपो ३२. [ सं. कृत्या]

**किचाटी** स्त्री. गर्दी; दाटी. [ सं. कृच्छ्]

**किचीर** वि. किचर; त्रासदायक. [क. किच्च]

**किचीविची** स्त्री. पिंगळ्याच्या चार आवाजांपैकी एक. पहा : **की २.**

**किच्च** पु. १. त्रास. २. आग; शेकोटी. (बे.) [ क. किच्च]

**किच्चं, किचतं** क्रिवि. किती, कितीसे. (क. कुण.) [ सं. कियत्]

**किजणे** सक्रि. करणे या धातूचे जुन्या मराठीतील कर्मणी प्रयोगाचे रूप : 'काय कीजतसे येरएरी।' - राज्ञा १.८७. [ सं. क्रिय]

**किजबिज** स्त्री. किलबिल; चिवचिव; किलबिलाट; किलकिलाट. (पोपट, चिमणी, मैना, पिंगळा वगैरे पक्ष्यांचा. [ध्व.]

**किजबिजणे** अक्रि. किलबिलणे; चिवचिवणे.

**किजबिड, किजबिडीत** वि. १. खरडलेले; गिचमिडीत; न समजेल असे लिहिलेले (अक्षर, लेख). २. ओबडधोबड; बोजड; विशोभित; वेडेवाकडे (कोरीव काम).

**किजिलादोर** वि. भांडखोर. (गो.)

**किजील, किजित्यांसांव** न. भांडण. (गो.) [ पो. क्विसिल्ह]

**किट** न. नुकत्याच व्यालेल्या जनावराचे पहिल्या चार दिवसांतील दूध; चीक. (गो.)

**किटकिट** स्त्री. किरकिर; कुरकुर; भुणभुण (क्रि. करणे.) : 'खुशाल तासचे तास किटकिट लावीत बसावं!' - फाटक - नाट्यछटा १. [ध्व.]

**किटकिट-टो** पु. जोराचा हशा. (गो.) [ ध्व.]

**किटकिटणे** अक्रि. १. कानात गळू किंवा फोड झाला असताना त्यात पू होण्याच्या सुमाराला कळा लागणे. २. घड्याळ वगैरेचा बारीक ध्वनी होणे. [ ध्व.]

**किटकिटप** अक्रि. खिदळणे. (गो.) [ ध्व.]

**किटकिटांवचे** अक्रि. आदल्या दिवशी शिजवलेले पोहे न बिघडावे म्हणून फिरून शिजविणे. (गो.) [ ध्व.]

**किटकिटो** वि. किटकिट करणारा; पिरपिर लावणारा; त्रासदायक. (चि.) [ ध्व.]

**किटकिट्या** वि. किटकिट करणारा.

**किटकूर-ल** पु. न. लहानसा किडा. (व.)

**किटण** न. १. मळाचा थर, घाण (कुजलेले शेण, गवत, काटक्या इ.); जुन्या लोखंडावर गंज चढून राहिलेला अवशिष्ट भाग; लोखंड गाळताना अगर नंतर त्याला चढणारी जळ; सामान्यतः धातूवरील कलंक, मळ, गंज, तेलाची चिकटी; भांड्याला लागून राहिलेला जळका अन्नांश; दातांवर जमलेला मळ. २. वीट, कौल इ. जास्त भाजल्यामुळे त्यावर येणारे दगडासारखे काळे गोळे; खंगर. ३. तापलेले लोखंड घणाने ठोकत असताना उडणारे जळके कण; ठिणग्या. [ सं. किट्टम्]

**किटणे** अक्रि. १. मळाने खराब बनणे. २. गंज चढणे (धातू वगैरेवर) : 'फार दिवस किटलेलीं जुनीं पानीं हत्यारें' - फाटक नाट्यछटा ७. ३. त्रासणे; विटणे; नकोसे होणे. विशेषतः कान, हात, क्वचित दात यांच्या संदर्भात उपयोग.

**किटना** पु. वाघूर लावण्यासाठी खुंट ठोकण्याचा मोठा लाकडी हातोडा; मोगर. (जुन्नरी).

**किटली** स्त्री. चहादाणी; तयार झालेला चहा इ. ज्यात ठेवतात असे तोटी असणारे धातूचे किंवा चिनीमातीचे भांडे. [ इं. केटल]

**किटळ** न. किटाळ. (को.)

**किटा** पु. फोडलेली जळाऊ लाकडे.

**किटाड-ण** पहा : **किटण**

**किटाणाची जमीन** दलदलीची, पाणथळ जमीन.

**किटा(ट)ळ** न. १. विस्तवाची ठिणगी; फुणगी (गवत, काटक्या जळत असताना उडणारी) : 'मधून मधून विस्तवाच्या ठिणग्या व किटाळें निघत.' - पाव्ह ५७. २. आळ; दोषारोप; संकट; अरिष्ट; हिणकसपणा : 'ह्यानें हें आमच्यावर उगाच किटाळ आणलें आहे.' - स्वप १४८. ३. मळ. [ क. किडि = ठिणगी]

**किटांबर** पु. बुलबुल पक्षी. (गो.)

**किटु(टू)र-रू** न. लहान पाखरू, पक्षी. (गो.)

**किटेला कोमेला** वि. मळकटलेला; कोमेजलेला; मलिन व निस्तेज; मलूल व अवठरलेला (म्हातारी माणसे, जुनाट झाडे, फळे यांना म्हणतात.).

**किट्ट** न. १. मळ; किटण; कीट; घाण; बुरशी; गंज : 'काजळून किट्ट झालेल्या कंदिलाच्या काचेतून....' - गणूराया १५१. २. पचनानंतर उरलेला शरीराला निरुपयोगी असा भाग.

वि. दाट : 'काळोख किट्ट होता.' - बनगर ७२.

**किट्टव** न. लहान चिमणी. (गो.)

**किट्टांव** स्त्री. मोठी गोचीड. (गो.)

**किट्टी** स्त्री. तांब; गंज. (गो.)

**किट्टी** स्त्री. जनावरांवर पडणारी तांबडी लहान गोचीड.

**किट्ली** स्त्री. ठिणगी. (बे.)

**किडकले** न. किड्रूक. [सं. कीटक]

**किडका-खाद** वि. कीड लागलेला; किड्याने खाल्लेले (फळ, पान) : 'उत्तम भूमि शोधिली शुद्ध। तेथें बीज पेरिलें किडखाद।' - दास ५.३.३. [सं. कीटक + खाद्]

**किडकाले, किडलू** न. १. किडा; कृमी; कीटक. २. लहान सरपटणारा प्राणी; साप इ.; किरडू. [सं. कीटक]

**किडकिडणे** अक्रि. खिळखिळे होणे : 'अस्थियंत्र किडकिडी।' - उगी २०४. [ ध्व.]

**किडकिडविणे** सक्रि. कढविणे : 'लोणियाचा कवडा किडकिडविला।' - लीचपू ४७७.

**किडकिडीत** वि. सडपातळ; रोड; किरकोळ; काटकुळा; कृश.

**किडकूल, किडके** न. सापाचे बारीक पिल्लू; किरडू. [सं. कीटक]

**किडकोळ** वि. १. किड्यांनी खाण्यासारखा (लाकूड, फळ). २. किड्यांनी खाल्लेला. ३. (ल.) खरजुला. [ सं. कीटक]

**किडडी** स्त्री. तिरडी; ताटी : 'तुझीये किडडीये बांधे घागरा' - लीचपू १८२.

**किड(डे)णे** अक्रि. कीड लागणे; किडखाद होणे; किड्याने खाणे.

**किडबिडीत, किडबिड** पहा : **किजबिड, किजबिडीत**

**किडबिड्या** पहा : **कुडबुड्या**

**किडमाकडा** वि. चिक्कू; कद्रू.

क्रिवि. चिक्कूपणाने; कंजूषपणाने.

**किडमिडा** वि. १. वेडावाकडा; कुरूप : 'हुट्टागत किडमिडा होऊन जगत होता.' - गोता १२६. २. अस्पष्ट; संदिग्ध (भाषण).

**किडमिडीत** वि. हडकुळा : 'त्यांचे किडमिडीत काळे आणि रडवे पोर' हपा ७७.

**किडमिडे** न. पिंगळ्याच्या (कुडबुड्या जोशी) हातातील वा माकडाचा खेळ करणाऱ्याच्या हातांतील कुडबुड वाजणारे एक वाद्य; किडमुडे. [ ध्व.]

**किडयाळे** वि. वाकडेतिकडे; किचबीड. (गो.)

**किडरुव, किडरू** न. साप : 'देखा एको कुसीमाजी किडरुवें। सामाविलि कीं। - दाव १०४.

**किडला** क्रिवि. कशाला. (राजा. कुण.)

**किडवल-ळ** स्त्री. इसब, गजकर्ण. (को.) [ सं. कीट + आवली]

**किडवळ** वि. किडलेले.

**किडवळणे** अक्रि. १. किड्याने खाणे; किडके होणे (फळ वगैरे). (को.) २. शिजण्यात बिघडणे; कमीजास्त शिजणे (भात वगैरे).

**किडळ** स्त्री. घाण; मलिन; कुश्चल; हीन. [सं. कीटक]

**किडा** पु. एक क्षुद्र जंतू; क्षुल्लक, बारीक प्राणी, जीव. [ सं. कीट] (वा.) ० **मुंगी खाणे** – काहीतरी खाणे; किरकोळ खाद्य; कोरडे खाणे (पोहे, लाडू वगैरे). **किडे पडणे** – कुजून कृमी पडणे; नासणे; अपवित्र

होणे; भ्रष्ट होणे. (वा.) **किड्यांचा पुंजा** - (किड्यांनी खाल्लेला भुशाचा ढीग यावरून) रोगग्रस्त माणूस; किड्यांनी खाल्लेले कापड, धान्य वगैरे.

**किडामाकोडा** पु. क्षुद्र जीवजंतू; किडे, आळ्या वगैरे.

**किडामार** पु. एक वनस्पती.

**किडामुंगी** स्त्री. क्षुद्र प्राणी.

**किडाल-ळ** न. १. (विरू.) आगीच्या ठिणग्या. पहा : **किटाळ** १. २. कुभांड; अरिष्ट; अपवाद; दुर्लौकिक. पहा : **किटाळ २** : 'इये संग्रामीं शस्त्र न धरीं। हें किडाळ बहुतीं परी। दिसतसे॥' - ज्ञा १.२३३.

**किडाल-ळ** न. १. लोखंडाचे कीट किंवा हिणकस लोखंड : 'कीं अग्निमुखें किडाळ। तोडोनियां चोखाळ।' - ज्ञा २.१२८. २. दोष; कलंक.
वि. १. डाकलग; हिणकस; वाईट; निंद्य. २. खोटे (आल प्रत्यय). [ सं. कीट - किडाल ]

**किडाळणे** अक्रि. आजारी होणे.

**किडिविडी** स्त्री. तिरडी : 'तंव जवळीं जाऊनि वैकुंठनाथु। किडिविडिये लाविला हस्तु।' - क्रिपु २९.२७.

**किडी** पु. खडा.

**किडुकमिडुक** न. बारीकसारीक दागिने, वस्तू; मोडतोड; चाराचुरा; किरकोळ जिनसा; दागिन्यांचे सुटे भाग. [ कुडूकचे द्विव. ]

**किडूक** न. १. लहानसा किडा, प्राणी. २. लहान मुलांचा डूल; एक दागिना. [ सं. कीटक]

**किडे** न. जिवाणू; एक लहानसा साप. (को.)

**किडेचाबू** वि. कृपण; चिक्कू.

**किडेमारी-रू-ऱ्या,** वि. चिक्कू, कद्रू; कंजूष (माणूस).

**किडेला** वि. किडका; किडलेला : 'किडेल्या खांबाचा तरु करुनि तोही फुलविला।' - दत्तपदें ध्यानाष्टक १.

**किड्डी** स्त्री. तिरडी; किर्डी : 'मी सौभाग्याचे आंगदे बांधेन: कीड्डी करीन.' - लीचपू १८.

**किण-णे,-ण्हा** पु. न. स्त्री. घट्टा; घट्टे पडलेली चामडी; घर्षणाने शरीराच्या चामडीवर पडलेला वण : 'नमस्कार करितां ते अवसरीं। किण पडली चरणी तेणें।' - राविं ७.१०७; [ सं. किण]

**किण** न. लाकूड खाणारा किडा.

**किणक** न. १. परिकाष्ठाच्या छिद्रयुक्त नलिकेतील आडव्या पडद्यावर (चाळणीवर) हिवाळ्यात बसणारा किणमय पदार्थांचा थर. २. (वै.) जखमेभोवती असलेल्या निकोप व जिवंत कोशिकांपासून जखमेवर बसणारा रसाळ, नरम कोशिकांचा थर. यापासून पुढे त्वचाकोशिका तयार होऊन जखमेचे संरक्षण होते.

**किणकिण** स्त्री. एकसारखा होणारा (किण) हा आवाज : 'पण ही किणकिण! हे झुंबराचं हास्य!' - मुखवटे १४१. [ क. किणिकिणि]

**किणकिणणे** अक्रि. घुंगराचा आवाज होणे.

**किणकिणाट** पु. मोठ्या प्रमाणावर होणारी किणकिण.

**किणकिणी** स्त्री. कारंजाचा तुषार; पाण्याचा कण; फवारा.

**किणकिणी** स्त्री. (विरू.) कणकणी; तापाची शिरशिरी; कणकण; हुडहुडी; काटा. (को.)

**किणभिण** स्त्री. सूक्ष्म आवाज : 'पण असल्या निर्जनस्थळी तिथल्या किणभिणीचे जे अनामिक भय वाटते' - ययाती १२९.

**किणा** पु. १. घट्टा. पहा : **किण**. २. क्षत; व्रण.
वि. कीड पडलेले; क्षत पडलेले.

**किणा(ण्हा)ला** क्रिवि. कशाला; कशासाठी. (चि.) [सं. किम्]

**किणी-णे-ण्हे** वि. घट्टे पडलेले 'दावी रडोनि झाले जे गंध उगाळितां स्वहात किणी।' - मोविराट १.१०६.

**किणीकिणी** अ. कंकणाचा आवाज. [ ध्व.]

**किणेवचे** अक्रि. मार बसलेल्या जागेचे रक्त एकवटून ती जागा निळसर दिसणे; रक्त साखळणे; घट्टा पडणे. (गो.)

**किणॉ** वि. बारीक आवाजाचा (मनुष्य). (गो.)

**किण्ण** क्रिवि. १. किणकिण आवाजाचे. २. रातकिड्यांच्या किण्ण आवाजाप्रमाणे.

**किण्व** न. कुजण्याची क्रिया करणारी एक वनस्पती; पदार्थ आंबवून त्यातून मद्यार्क काढण्यासाठी उपयोगी पडणारे द्रव्य : 'विषापासून सुरेख किण्वे (एन्झाइन्स) म्हणजेच आंबवणे काढता येतात.'-भासं ८. [इं. यीस्ट]

**किण्वद्रव्य** न. (वन.) किण्वात (व इतर काही कवकांत) आढळणारा क्रियाशील कार्बनी निदेशक (वितंचक) पदार्थ.

**किण्वन** न. आंबवण; मिश्रण. [ सं.]

**किण्वावस्था** स्त्री. (वन.) तंतूसारख्या शरीराची पुनः पुनः विभागणी होऊन अनेक कोशिकांची माळ तयार होणे किंवा त्या सुट्या होऊन राहणे. त्यांची साखरेच्या विद्रवात किण्वाप्रमाणे मद्य बनवण्याची प्रक्रिया होते.

**कितका** वि. केवढा.

**कितकावा** वि. कितव्या संख्येचा; कोणत्या क्रमांकाचा; कितव्या पायरीचा. (कितवा याचे क्रमवाचक)

**कितकितलॉ** पु. हशा. (गो.) [ ध्व.]

**कितपत** क्रिवि. कितीसे; कोणत्या प्रमाणाने परिमित; कोठपर्यंत. [ सं. कियत + परिमित]

**कितला-लो-ले** वि. केवढा; किती. (खा. गो.)

**कितव** पु. १. जुगार खेळणारा; जुगारी; जुवेबाज : 'स्वाश्रयसह नरकांतचि बुडतो स्त्री-बंधुवर्ग कितवाचा।' - मोकर्ण ४२.४१. २. (नाट्य) नायिकेशी विश्वासू नसून दुसऱ्याच स्त्रीवर अनुरक्त असणारा नायक. ३. ठक; धूर्त माणूस.
वि. लुच्चा; कपटी; धूर्त. [सं.]

**कितवा** वि. कोणत्या क्रमाचा, क्रमांकाचा पहा : **कितकावा**

**कितवेपणाचा** पहा : **कितवा**

**किताब** पु. पदवी; सन्मानदर्शक संज्ञा; राजा, सरकार इ. कडून मिळालेले नावाबरोबर लावायचे सन्मानदर्शक चिन्ह; सन्मानदर्शक मायना : 'श्रीमंतानी स्वारीतून 'राजश्रिया विराजित' लिहावयाचा किताब दिल्हा...' - बागोपले १३.

**किताब** पु. स्त्री. पुस्तक; लेख. [फा.]

**किताब, किताबजोड** स्त्री. उंटाच्या सरंजामापैकी एक वस्तू : 'सालगुदस्त किले जिवधन फते केली तेव्हा वरत्या किताब सापडल्या.' - इएमपी ८१.

**किताबखाना** पु. पुस्तकालय; ग्रंथालय. [फा.]

**किताबत** स्त्री. पत्र; लेख : 'ऐसेच हरवक्ती किताबत पाठऊन दिल् आराम होये ते केले पाहिजे.' - पेद.

**किताबत-ती** स्त्री. पदवी : 'त्यांस हंबीरराव नांव - किताबती देऊन' - सभा ६२. [अर.]

**किताबत-ती** स्त्री. १. गोष्ट; बखर : 'राजेरजवाड्यांच्या किताबती। दामाजीपंताच्या बखरा वाचिती।' - अफला ९. २. पत्रव्यवहारातील शेवटचे औपचारिक 'हे विनंती' या अर्थी वापरायचा शब्द.

**किताबती रेघ** (कारकुनी व्यवहार) बंदाच्या साऱ्या जिल्ह्यावर (कोऱ्या भागाच्या निम्म्यावर) जी रेघ काढतात ती. यापासून किताबती - लिहिणे - प्रकार - रीती इ. = जिल्ह्याच्या सर्व रुंदीवर लिहून मग दुसरीकडे वळणे. पहा : **रेघ**

**किताबवाला** पु. पदवीधर : 'युनिवर्सीटीचें किताबवालें तिच्या भजकांत किती सांपडतील ?' - नि ३. [फा. किताब]

**किताबी** वि. पुस्तकी; अनुभव नसलेला : 'पण अलिकडच्या किताबी विद्वानास देशभाषेचा स्वप्नातही विटाळ सोसत नाही.' - मवाइ १७१.

**किताबर** स्त्री. साध्या भाषेत सांगितलेली हकीगत.

**कितिए(ये)क, किती, किती(ते-त्ये)क** वि. कोणत्या संख्येने किंवा प्रमाणाने परिमित; कितीसे; काही; केवढे; थोडेसे; थोडे : 'मत्सारिखीं हे कितियेक वेडीं।' - सारुह १.१३. [सं. कियत्] (वा.) **किती केले तरी** - १. काहीही केलेतरी. २. खरे पाहिले तर. **किती झाले तरी, किती म्हटले तरी** - अनेक गोष्टी महत्त्वाच्या असल्या तरी एक महत्त्वाची गोष्ट अनुकूल आहे हे दाखविताना करायचा प्रयोग.

**कितीतरी** वि. पुष्कळ; अनेक.

**किती(तीं)दा** क्रिवि. किती वेळा; पुष्कळ वेळा; अनेकदा.

**कितीशी-सी-सो** स.ना. किती. (चि.)

**कितीशी(स-सा)क** क्रिवि. किती वेळा; अदमासे किती; कितीसा (प्रश्नार्थक व नकारात्मक रचना). (कुण.)

**कितुके** वि. किती : 'पुढे दुःख कितुकें कळेना।'-अफला १. [सं. कियत्]

**कितुल** प्रश्नार्थक सर्व.

वि. कितवे : 'द्वादशी असे कितुलें दिवसी?' - उह २५८.

**कितुला** वि. केवढा; किती : 'गंधर्वांचा कितुला केवा।' - मुविराट ४.१७. [सं. कियत्]

**कितेतर** क्रिवि. काहीतरी.

**कितेब** पहा : **किताबत** : 'हिशेबकितेब' - मइसा १५.२५४.

**कितेबी** हिशेब; हिशेबाचे कागद.

**कितें** क्रिवि. काय. (गो.)

**कित्ता** पु. लहानसा मळा : 'उसाचे कित्त्यास गुळाची भेली १ व सेवसबजी वगैरे मुकदमीसंबंधीचे हक्क सुदामत आहेत' - पेठे दप्तर १.१९.

**किताँ** क्रिवि. काय (राजा, कुण.).

**कित्ता** पु. १. आदर्शभूत म्हणून पुढे ठेवायचा, वळणदार अक्षरे काढलेला कागद; वळण : 'कादरचं अक्षर म्हणजे कित्ता होता.' - एल्गार १४. २. हा शब्द एकाच सदराखाली मोडणाऱ्या निरनिराळ्या बाबींच्या पुढे लावतात. त्यावरून या बाबी एकाच सदरात येणाऱ्या आहेत असे समजायचे. ज्यांची खाती किंवा ठोकळ नामनिर्देश एके ठिकाणी केला असून बाकीचा विशेष तपशील किंवा माहिती दुसरीकडे लिहिलेली असते अशा बाबी किंवा गोष्टी. ३. बाब; रक्कम; कलम; खाते. ४. (ल.) नमुना; ज्याचे अनुकरण करायचे असा मनुष्य; आचरण, तऱ्हा. (क्रि. येणे, उचलणे, गिरवणे.) : 'कर वळविला अजे जें विष्णुधृत स्त्रीस्वरूप कित्ता तें।' - मोआदि ३३.१६. ५. चिठ्ठी.

वि. क्रिवि. सदरहू; उपर्युक्त; पूर्वी सांगितलेला (ग्रंथ, उतारा इ.); संदर्भ देताना एखाद्या ग्रंथाचे नाव एकदा आल्यावर लागलीच पुढच्या वेळी त्या ग्रंथाचे नाव लिहिण्याऐवजी वापरायचा शब्द. [फा. कितअः] (वा.) **० घालून देणे** - अमुक गोष्ट अमुक एका विशिष्ट प्रकारे करावी म्हणून लेखाद्वारा किंवा स्वतःच्या आचरणाने सांगणे, पुढे मांडणे. **० वळवणे, गिरवणे** - नक्कल करणे; गिरविणे. **कित्त्यावर घालणे** - लिहिण्यास शिकवणे : 'आपल्या इकडे मुलाला कित्त्यावर घालतात.' - ग्यारिबाल्डी केळकरकृत. **कित्त्यावर बसवणे** - लिहायला शिकविण्याची सुरुवात करणे : 'मला कित्त्यावर बसवला तेव्हा दप्तराची पूजा करून पुस्ती लिहायला लागलो.' - माजी २७.

**कित्ता** वि. शअ. खेरीज; याशिवाय; इतर : 'सर्व वर्तमान दुसरे पत्री लिहिले आहे त्याजवरून कळेल. कित्ता वर्तमान तपशील.' - ऐलेसं ४५१४.

**कित्ता** पु. लहानसा मळा.

**कित्ताइस(सा)म** पु. १. उपर्युक्त मनुष्य.

**कित्ताखर्च** पु. १ किरकोळ, बिनतपशिली खर्च. २. (हिशेबात) स्वतंत्र; किरकोळ स्वरूपाची बाब; कोणत्याही सदरात न येणारी बाब.

**कित्ताबाब** स्त्री. १. अनियमित बाबी. २. काही विशेष कारण नसताना बसविलेला कर.

**कित्तावाटणी** स्त्री. १. किरकोळ खर्चासाठी बसवलेला कर; निरनिराळ्या प्रकारची तूट भरून काढण्याकरिता बसवलेला कर. २. हिशेबातून काढून टाकलेली सरकारी वसुलातील एक बाब. (वांटणीची टक्केवारी कमी करण्यासाठी.)

**कित्ती, कित्तेक** पहा : **किती, कितेक**

**कित्याक** क्रिवि. का; कशाला (कु. कुण. गो. चि.)

**कित्यावा** वि. कितीकावा, कितवा.

**कित्येक** वि. कितीएक; काही; थोडे.

**कित्त्या** क्रिवि. का. (गो.) [सं. किम्, कियत्]

**कित्त्या, कित्त्याचे पत्र** एखाद्या मुद्द्याच्या खुलाशासाठी स्वतंत्रपणे लिहिलेले पत्र : 'आपण चार कित्त्यांची पत्रे जोडीसमागमें पाठविलीं तीं प्रविष्ट झाली.' - ऐलेसं ११८३.

**कित्लो** वि. किती. (गो.)

**किदर** उपकार; कृतज्ञता. (अहि.)

**किदरणे** अक्रि. त्रासणे : 'किदरलेले जीव' - भास २६२.

**किदरसाळ** स्त्री. भाताची एक जात. (बे.)

**किदरी रेघ** (कारकुनी व्यवहार) बंदाचे (अर्धा कागद) घड्या घातल्यामुळे जे चार भाग होतात त्यांपैकी पहिल्या घराच्या मध्यापासून काढलेली रेघ. पहा : **रेघ**

**किदवाळा** क्रिवि. केव्हा; कोणत्या वेळी. (कु.) [ सं. कियत + वेला]

**किदी** क्रिवि. कधी : 'आय किदीहि मोडो वेहे।' -भि ३५.(भि.)[सं. कदा]

**किदे** वि. काही (गो.).

**किनई, किनी** क्रिवि. (बायकी) की नाही; किमानपक्षी; निदान तरी; कमीत कमी : 'मनुष्यानें किनई कांहीं तरी धीर धरला पाहिजे हों।' - रजपुतकुमारी तारा ४६९. [ सं. किम् + न + हि]

**किनकिन्या** वि. रडका. (झाडी)

**किनखाप-ब, किन्खाब** पु. सोनेरी, रुपेरी जरीच्या वेलबुट्टीचे काम केलेले रेशमी कापड : 'अंगीं किनखाप घातले।' - ऐपो ३२. [ फा. किमखाब]

**किनखापी** वि. किनखाबाचे : 'आंगडें टोपडें किनखापी त्याला।' - पाळणेसंग्रह ९. [ क. कित्तानारू]

**किनतान** न. एक प्रकारचे तागाचे, सणाचे कापड. पहा : **कतान १**

**किनतोक** पु. संताप; राग. (व.)

**किनन** न. (शाप.) मंगलद्विप्राणिद आणि पातळ गंधकाम्ल यांच्या योगाने गंधिलद्विअमिनाचे प्राणिदीकरण होऊन किनन तयार होते. [इं. किनोन]

**किनरा-रो** वि. १. बारीक व उंच (आवाज). २. नाकातून येणारा आवाज (बोलणे). ३. नाकात बोलणारा : 'गायिकेचा किनरा आवाज आम्हाला वेडावत होता.' - पालखी ५९.

**किनरी** स्त्री. १. गाण्यामधील टिपेचे सूर; वाद्याचा किणकिण आवाज. २. एक तंतुवाद्य. [ सं. किन्नर]

**किनला, केंडला** क्रिवि. कशाला. (चि.)

**किनवट** स्त्री. कमरेला होणारा एक रोग. (गो.) पहा : **कनवट** [ सं. कटि]

**किनट्टया** पु. मळ. (व.)

**किनळ** स्त्री. एक झाड. (कु.) पहा : **किंजळ**

**किना-ने-न्हे** पु. न. घट्टा; वण पडलेले कातडे; वण; किवण; किवन. पहा : **किण** (क्रि. पडणे.)

वि. बधिर; स्पर्शज्ञानरहित; किडे पडलेले; ज्याला क्षत पडले आहे असा. पहा : **किवन्या** [ सं. किण]

**किना** वि. बधिर; स्पर्शाची जाणीव न होणारा.

**किना** पु. मायाळूपणा.

**किनार-री** स्त्री. १. काठ; कोर; पट्टी; बारीक काठ (रंगीत किंवा साधा, रेशमी वगैरे वस्त्राचा). २. (वस्त्रोद्योग) रेशीम उकलून तनसळीवर तनतनतात व गुंडाळून काढतात त्याला किनार किंवा वधी म्हणतात. [फा. किनार]

**किनारसांधण** न. (यंत्र.) एका समपातळीत दोन तुकडे ठेवून जोडणे.

**किनारा** पु. तीर; काठ; बाजू; गोट (समुद्र, नदी, शेत, पर्वत इ.चा). [फा.] (वा.) **० खेचणे** - १. अंग ओढून घेणे; अंग काढून घेणे : 'हे समजताच उचलन किनार खेचून टिपू राहिला.' - ऐलेसं ४३५६. २. मागे घेणे; पदर मागे ओढणे : 'फौजेचे आवाईने सोडून किनारा घेतला तर तूर्त शह तुटला हे काम जाले.' - ऐलेसं १९०९. **० घेऊन असणे** - दूर कडेला असणे; एखाद्या गोष्टीत प्रत्यक्ष भाग न घेणे : 'हरीपंत फडके किनारा घेऊन होते (म्हणून वाचले).' - सब ४०. **० पिच्छाडीचा करणे** - माघार घेणे; पराङ्मुख होणे : '....त्यांणी दुवाई सरकारची घातली म्हणोन आम्ही किनारा पिच्छाडीचा केला.' - ऐलेसं ५१३३.

**किनास** पु. अनर्थ; कहर : '...बदअमल गरतीशी केले येसे किनास केला.' - ऐसंसाखं ३.२०७.

**किनीट** स्त्री. काळोख : 'म्हशीची धार घेऊन किनीट पडताना घराकडे गेलो.' - गोता ४.

**किने** पहा : **किना**

**किनी(नो)लाख** स्त्री. लाखेचा एक प्रकार.

**किन्न** वि. बधिर : 'समदा आवाजच कान किन्न करणारा.' - गोता १३४.

**किन्नर** पु. १. स्वर्गातील एक गायक जात; एक उपदेव; एक देवयोनी. याचे तोंड घोड्यासारखे असते अशी समजूत आहे : 'येर सुर नर सिद्ध किन्नर।' - ज्ञा ११.५०६. २. गाण्याबजावण्याची कला जोपासणारी एक जात : 'नामा म्हणे नाही तुझ्या रूपा पार। तेथे मी किन्नर काय वानू?' - नामदेव. [ सं.]

**किन्नर** पु. (मोटर) मोटरगाडी साफसूफ करणारा. [इं. क्लीनर]

**किन्नरकी** स्त्री. मोटार साफ करण्याचे काम : 'किन्नरकीत मुरलेले पोर मोटारच्या टपावर कडमडत होते.' - काआ ७.

**किन्नरवाला** पु. बासरीवादक.

**किन्नरी** स्त्री. १. किन्नर उपदेवाची स्त्री. २. एक वाद्य. पहा : **किनरी**[सं.]

**किन्ना** पु. पतंगाला उडवण्याकरिता बांधलेला दुशाखी दोरा. (वा.) **किन्नी खाणे** - पतंग झुकणे.

**किन्निमित्त** क्रिवि. कोणत्या कारणास्तव; कशासाठी.[सं. किम् + निमित्त]

**किन्हई** स्त्री. (वन.) एक मोठे वाढणारे झाड. याची पाने टाकळ्याच्या पानांसारखी असतात.

**किन्ही** स्त्री. जोंधळ्यावर पडणारा एक रोग. पहा : **काणी**

**किन्ही** स्त्री. खुणा; चिन्हे : 'हात धुऊन पाख केला. हातची किन्ही लिहिली.' - ज्यू २६८.

**किन्ह्या** वि. १. उंच टिपेचा (आवाज, सूर, आलाप). २. नाकातील; अनुनासिकयुक्त (भाषण). पहा : **किनरा**

**किन्ह्या** पु. वांग्याच्या वर्गातील एक वनस्पती.

**किपळा-ळी** पु. स्त्री. कपचा; ढलपी; टवका; कपरी; (दगड वगैरेची) उडालेली चीप. (को.)

**किफाइ(य)ती, किफाईतदार, किफायतवार-शीर** वि. नफ्याचा; फायदेशीर; लाभदायक. [फा. किफायत]

**किफाई(य)त** स्त्री. नफा; फायदा; लाभ : 'त्यापासून त्यास मोठी किफायत झाली.' - नि ६१४. [फा. किफायत]

**किफाईतसर्फा** पु. फायदा.

**किफाईत सर्फेवार** फायदेशीर.

**किबलगा** पहा : **किब्लेगाह** : 'त्यानंतर आमचे किबलगा नवाब अबदुल हकीमखाँ यांचे कारकीर्दीत' - इसंपेदसपभा २३४.

**किबला, कबिला** पु. कुटुंब; परिवार : 'भावसिंग राऊ याचा किबला कन्हेयास होता' - पेद १०. ३६. [फा. कबिला]

**किबलेकाबे** वि. वडील; पूज्य : 'त्यासी किबलेकाबे जाणावे.' - पेद १५.८०. [फा.]

**किबीन** स्त्री. (नाविक) गलबताचा सुकाणूकडील (मागील) भाग. हा काहीसा कमानीसारखा गोल असून बाकीचा भिंतीसारखा उभा असतो. [इं. केबिन]

**किबीर** स्त्री. किळस; घृणा. (झाडी)

**किबीर** स्त्री. फिकीर; पर्वा. (व.)

**किबुझ** (कृषी.) इस्त्राइलमधील सहकारी तत्त्वावर चालणारी शेती अथवा वसाहत.

**किबोकी** पु. पाणघोडा; हिपोपोटेमस. [स्वाहिली]

**किब्लगाही** वि. वंद्य; नामदार : 'किब्लगाही खान' - भाषसंवृ १३५. [फा. किब्लागाह]

**किब्लह** वि. पवित्र; मोठा. [फा.]

**किब्लेगाह** वि. १. मूळ अर्थ - प्रार्थनेकरिता ज्या दिशेकडे तोंड करायचे ती दिशा. २. वंद्य : 'किब्लेगाह नारायणराव साहेब' - ऐलेसं ७. ६५६५. [फा. किब्लागाह]

**किब्लेनुमा** न. होकायंत्र; दिशादर्शक यंत्र. [फा.]

**किमखाप** पहा : **किनखाब**

**किमती** वि. मूल्यवान; बहुमोल. [फ.]

**किमपि** क्रिवि. (नकारार्थी प्रयोग) मुळीच; बिलकुल; काहीच; थोडेसुद्धा; किंचितमात्र. [सं.]

**किम(मि)या** स्त्री. १. प्राचीन रसायनशास्त्र. २. (रसा.) हीन धातूचे (विशेषतः तांबे) सुवर्ण बनविण्याची गूढ विद्या : 'निधी दैवे लाभल्या हातीं। किमर्थ शोधाव्या किमयायुक्ती।' - नव२३. ९०. ३. (ल.) ज्यापासून फार मोठा लाभ होतो असा धंदा, व्यापार, यंत्र. ४. दीर्घायुष्य देणारे औषध शोधून काढण्याची गुप्त विद्या. ५. जादू; युक्ती; कौशल्य. [फा. किमिया]

**किमयाग(गा)र** पु. १. किमया, जादू, चमत्कार करणारा. [फा.] २. (रसा.) धातू परिवर्तन विद्या जाणणारा शास्त्रज्ञ.

**किमरू** न. चिलट; मच्छर. पहा : **किंबरू** (गो.)

**किमर्थ** क्रिवि. का; काय म्हणून; कोणत्या कारणाकरता; कशासाठी. [सं.]

**किमसान** न. पिवळे अगर सोनेरी रंगाचे कमावलेले कातडे, चामडे (जोडे, छत, पडदे यांसाठी).

**किमान, किमानपक्ष-क्षी** क्रिवि. निदान; कमीत कमी; थोड्यात थोडे; कनिष्ठ पक्षी; काही नाही तरी. 'किमान पक्षी तीन पायांचं का होईना, घोडं लागतं.' - विभूत - ४. [सं.]

**किमान संकेत** (मानस.) बरेच अध्ययन झाल्यानंतर मूळ उद्दीपकाचा लहान किंवा अपूर्ण भाग दिल्यास अनुक्रिया निर्माण होऊ शकते हे अध्ययनातले तत्त्व.

**किमानील** वि. (वन.) समुद्राच्या पाण्यासारख्या हिरवट रंगाचे; निळसर हिरवे.

**किमाम** पु. विड्याच्या पानाबरोबर खायचा तंबाखूचा एक सुगंधी प्रकार.

**किमू(मे)स** न. मच्छर; कीटक. पहा : **किंबरू** (गो.)

**किमोनो** पु. जपानी लांब अंगरखा.

**किमॉष** पु. जरीची टोपी : 'मस्तकी किमॉष, अंगात अंगरखा.' - श्रीयो १. ४८३.

**कियत्** वि. किती; कितीसे.

**कियाम** वि. शाश्वत. [फा.]

**कियामत** स्त्री. शाश्वतता. [फा.]

**किर-रु-रू** क्रिवि. खरोखर; खचित; खात्रीपूर्वक : 'इएचा किरू प्राणेश्वरू। फुण ऐसा नाहीं योगेश्वरू।' - शिव ८४७. [सं. किल]

**किर** उद्गा. पराजयदर्शक उद्गार : 'बहिणी घाली वार। अवघ्या म्हणविते किर।' - ब ५९३. [ध्व.] (वा.) ० **खाणे** - टेकीला येणे; जिकरीला येणे. (व.)

**किर** पु. दार घासल्यामुळे होणारा किंवा रातकिड्याने केलेला कर्कश आवाज.

**किर** उद्गा. पुरे; बस्स.

**किरकणे** अक्रि. १. किंकाळी फोडणे (हत्तीने). २. दया येईल अशा प्रकारे गयावया करणे; रडणे; (भिकारी, मूल वगैरेंनी) किरकिरणे. ३. त्रासणे; कुरकुर करणे : 'भिक्षा मागतां किरकों नये।' - दास १४. २. १८. [ध्व.]

**किरकाडा** वि. काटकुळा; रोड; अशक्त.

**किरकिटणे** अक्रि. खरकटे वगैरेनी हात किंवा स्वयंपाकाची भांडी करवडणे; बरबटणे; हाताला अथवा भांड्याला (कणिक, भात वगैरे) चिकटणे.

**किरकि(की)र** स्त्री. १. पिरपिर; पुष्कळ वेळपर्यंत चाललेला, त्रास उत्पन्न करणारा शब्द, आवाज (मूल, भिकारी इ.चा); कटकट. (क्रि. करणे, लावणे, मांडणे.) २. कानस घासल्यामुळे होणारा आवाज.
क्रिवि. कुरकुरत; मुळमुळ. (क्रि. वाजणे, रडणे, करणे.) [ध्व.]

**किरकिरणे** अक्रि. कुरकुर करणे. पहा : **किरकिर**

**किरकिरा** वि. किरकिर करणारा; वाजणारा; कुरकुऱ्या : 'नेहमीं आईच्या कडेवर वागणारे पोर जसें किचकट व किरकिरें होत जाते.' - निमा ४२९.

**किरकिरीत** वि. पिरपिरे; खट्याळ; चिडखोर (मूल).

**किरकिरे** न. १. मुलांचे एक करकर आवाज करणारे लाकडी खेळणे. २. गोफणीमध्ये दगड ठेवायची मधली जागा.

**किरकिरॉ-रो** पु. १. पाकोळा नावाचा मासे खाणारा पक्षी. (गो.) २. किरकिर करणारा मनुष्य.

**किरकिसा** पु. किडलेल्या लाकडाचा भुसा, पीठ. लाकडाला कीड लागल्यास त्यातून बाहेर येणारा खसखशीसारखा पदार्थ.

**किरकी** स्त्री. १. नक्षीचा सोन्याचा आकडा, फासा. २. बुगडीचे मळसूत्र. ३. कठड्यामधील मळसूत्राचा आकार कोरलेला लाकडी गज.

**किरकीट-ठ** स्त्री. दात खाणे. [ध्व.]

**किरकीदार** वि. किरकीप्रमाणे पट्ट्या किंवा वेढे असलेले (पागोटे).

**किरकू(को)ळ** वि. १. रोडका; काटकुळा; बारीक; लहानसा; छोटेखानी; पाहिजे त्यापेक्षा कमी. २. फुटकळ अथवा लहान प्रमाणात विकत घेतलेला किंवा दिलेला माल, धान्य; त्याचप्रमाणे असलेला व्यवहार. ३. चिल्लर; मोघम; अनिश्चित स्वरूपाचे; कमी महत्त्वाचे (जिन्नस, प्राप्ती, खर्च, बाब, गोष्ट). ४. बारीक (आवाज, स्वर). 'या शहरात मालाची किरकोळ खरेदी कधीहि लिहू नये.' - मुंव्या ५०. [क.]

**किरकोळ नाणे** खुर्दा; चिल्लर; मोड.

**किरकोळ वसूल** अवांतर प्राप्ती; सरकारात जमा केलेला पैसा, धान्य इ.

**किरकोळ शिरकोळ** चिल्लर; किरकोळ चिरकोळ : '...पुढेंहि किरकोळ शिरकोळ साधेल तें उरकावे.' - ऐलेसं ११७३.

**किरकोळी** स्त्री. किरकोळ वस्तूंचा ढीग.

**किरकोळीने** क्रिवि. फुटकळ; थोड्या प्रमाणात (विकत घेणे इ.).

**किरकॉंब्डे** वि. वाकडेतिकडे. (गो.)

**किरखाद** वि. किराने, पोपटाने किंवा कोणत्याही पक्ष्याने खाल्लेला. (को.)

**किरगी, किरगुणी** स्त्री. साडी; चिरडी (बे.)[सं. चीर. क. किर = लहान]

**किरगे** स्त्री. मूग, धान्य. (गो. ख्रि.)

**किरच** स्त्री. तरवारीचा एक प्रकार.

**किरचण** स्त्री. बारीक चुरा; फोडी. (चि.)

**किरचंड** वि. १. प्रचंड. २. किचकट; गुंतागुंतीचे; भानगडीचे : 'त्यासी काम किरचंड बहुत परंतु स्वामीआज्ञेवरून रात्रीचा दिवस करून आटोपिलें.' - पेद २५. ६१७.

**किरट** न. गोचीड. (गो.)

**किरटा** वि. १. कृपण; कंजूष. २. बारीक टाकाची लेखणी. ३. अशा लेखणीने लिहिलेले गिचमिड, दुर्बोध (अक्षर). (निंदेने म्हणतात.) ४. कृश; गरीब; भिकार; किरकोळ (इमारत लाकूड). ५. कमजोर; लहान; किनरा (आवाज, उच्चार). ६. लहान, खुरटे, निःसत्त्व (फळे वगैरे). ७. अशक्त, कमजोर (दात, चेहरा) : 'त्याचा चेहरा लांबट व किरटा होता.' - हाकांध २०८. ८. काटकुळा; ठेंगणा (माणूस). ९. (सामान्यपणे) नष्टवीर्य; नष्टसत्त्व. [क. किर = लहान]

**किरड-डू** न. १. कीटक. २. लहान साप : 'जी किरडूं तरी कापडाचे। परी लहरी येत होतिया साचे।' - ज्ञा ११. ५४. [क. किर = लहान]

**किरडरू** पहा : **किरडू** : 'देखा एकि कुसिमाजि किरडरुए।' - वह १०४.

**किरडा** पु.किडा : 'मज जसा रगडशिल किरडा.'- रामजोशी (मला) ११०.

**किरडावणे** अक्रि. साप चावणे. (बे.)

**किरडी** स्त्री. प्रेताची तिरडी; ताटी. (वा.) ० **पाजळणे** - एक शिवी; तिरडी जाळणे; मढे गाडणे : 'त्या मेल्या सत्यनारायणाची किरडी पाजळली.' - जोफु २३९. ० **बसवणे** - (एक शिवी) मढे बसविणे. ० **बांधणे** - (एक शिवी) तिरडी तयार करणे. ० **मोडणे** - (एक शिवी) प्रेत नेताना तिरडी मध्येच मोडून अपशकुन होणे. पहा : **तिरडी**

**किरडुव** न. किडा : 'अविवेक किरडवें तत्त्वतां। अविद्या भ्रांति जलदेवता' - रावि १५.४.

**किरडू** न. लहान मूल : 'तो मरून गेला. मी ही किरडं वाढवायला मागं राहिले.' - चंद २८.

**किरडूं** न. सूतासारखा लांब किडा.

**किरण** न. उडी; नेम. पहा : **किराण**. (वा.) ० **साधणे** - बरोबर, नेमकी उडी मारणे; बरोबर नेम मारणे; हल्ला : 'कुत्र्याने भुरींच्या (सुसरीच्या) किरणातून निसटावे ही गोष्ट' - डोह १४४. (को.)

**किरण** पु. न. १. सूर्य, चंद्र इत्यादी तेजस्वी पदार्थांपासून निघालेली प्रकाशशलाका; प्रकाशाची रेघ. २. सूर्याचे ऊन : 'किरणें कैचीं नुगवतां अर्का' - रावि १. ४२. [सं.]

**किरणचक्र** न. किरण मंडळ (सूर्याभोवतालचे); सूर्याची अंशुमाला. [सं.]

**किरणन** न. प्रकाश देण्याची, बाहेर फेकण्याची क्रिया. [सं.]

**किरणपरावर्तक दुर्बिण** जिच्यात आकाशातील पदार्थांच्या किरणांचे परावर्तन होऊन तो आपणास दिसतो ती दुर्बिण.

**किरणपरीक्षा** शरीरातील अवयवांच्या स्थितीबद्दल किरणांच्या साहाय्याने चिकित्सा.

**किरणपुष्पक** न. (वन.) गुच्छासारख्या फुलोऱ्यावरचे परिघातील फूल. उदा. सूर्यफूल, शेवंती. [सं.]

**किरणमाली** पु. सूर्य.

**किरणवक्रीभवन** न. प्रकाशाचे किरण एका माध्यमातून दुसऱ्या द्रव किंवा अर्धद्रव पदार्थातून जातात तेव्हा त्यांचे वक्रीभवन होते. याला प्रकाशवक्रीभवन किंवा किरणवक्रीभवन म्हणतात.

**किरणशलाका** स्त्री. किरणांची रेघ, स्तम्भ, ओळ.

**किरणे** सक्रि. पसरणे; विसकटणे : 'जिकडे तिकडे अपुल्या वदनांतिल उग्र गरल ते किरती।' - कुअक ७७. [सं. कृ = विसकटणे, पसरणे]

**किरणोत्सर्ग** पु. काही द्रव्यांतून अदृश्य किरण बाहेर फेकले जाणे; रेडियमसारख्या भारी मूलद्रव्यांच्या अणूंचे स्वाभाविक विभाजन. [सं.]

**किरणोत्सर्गी** वि. अतिशय गतिमान अदृश्य किरण बाहेर फेकणारा : 'रेडियम, थोरियम, युरेनियम ही किरणोत्सर्गी द्रव्ये होत.' - भाअशि ९४.

**किरणोत्सर्गी उपचार** किरणोत्सर्गी प्रारणांच्या सजीवनाशक गुणधर्मांचा नियंत्रित वापर करणारी उपचार पद्धती.

**किरणोत्सर्गी कालनिर्धारण** (पुरा.) 'क्ष' किरणांच्या साहाय्याने केलेली कालनिश्चिती.

**किरणोत्सर्जन** न. आंतरिक प्रतिक्रियेमुळे किरणोत्सर्गी पदार्थापासून बाहेर पडणाऱ्या शक्तीचे उत्सर्जन (म्हणजे किरणोत्सर्जन). पहा : **किरणोत्सर्ग** [सं.]

**किरणोत्सर्जी** वि. आंतरिक प्रतिक्रियेमुळे किरणोत्सर्गी पदार्थापासून बाहेर

पडणाऱ्या शक्तीचे उत्सर्जन करणारा.

**किरणोत्सार** पहा : **किरणोत्सर्ग**

**किरणोत्सार चित्रण** (पुरा.) 'क्ष' किरणांच्या साहाय्याने केलेले चित्रण, घेतलेला लेख.

**किरणोत्सारी** वि. (शाप.) एक किंवा अनेक प्रकारचे अदृश्य किरण (अल्फा, बीटा, गामा) बाहेर फेकणारी (वस्तू); किरणोत्सर्गी. [ सं.]

**किरणोत्सारी क्ष किरणलेख** किरणोत्सारी पदार्थातून निघणाऱ्या किरणांच्या साहाय्याने एखाद्या पदार्थाची छायाचित्राच्या फिल्मवर घेतलेली प्रतिमा.

**किरदार** न. हिशेब वगैरे पुरवणीबंदाच्या माथ्याला लिहिलेला महिना आणि वर्ष अथवा थोडेसे शब्द; पूर्वीच्या भरलेल्या बंदाचा विषय पुढे चालविण्याकरिता मिळवून आणलेला कागद; जमाखर्चाच्या वहीत मागच्या पानाचा संदर्भ जुळण्यासाठी पुढच्या पानावर मागील पानावरील आकडे, महिना, तारीख इ. उतरवून घेतलेला भाग. [ फा.]

**किरप** पु. बारीक माशांचा जमाव. [सं. कृमि]

**किरप(पा)ण-न** वि. लहान; बारीक; अशक्त : 'दामू उघडाच, त्यामुळे त्याची काया किरपान दिसत होती.' - बाब ६३१. (राजा. कुण.)

**किरप(पी)ण, किपण** पु. कृपण, कंजूष माणूस. (गो.) [ सं. कृपण]

**किरपाण** न. कृपाण; खड्ग; शीख मनुष्य धर्माज्ञा म्हणून जवळ बाळगतो ते शस्त्र. [ सं. कृपाण]

**किरम-मा** पु. जंत : 'परिणामी मला किरमे मात्र झाले.' - माजी ११. (व.) [सं. कृमि.]

**किरमाड-डा-डी-डे, किरमांड** वि. कृपण; चिक्कू; कद्रु : 'परवाच्या समेटभंगाचे खापर किरमाड व्हाइसरायाचे डोक्यावर फुटणारें असो कीं, हावऱ्या काँग्रेसच्या डोक्यावर फुटणारें असो.' - के २०.९.३०.

**किरमाणी ओ(वो)वा** चोर ओवा. हा इराण देशात पिकतो. याची चव कडवट असते.

**किरमि(मी-मे)जी** वि. एक प्रकारचा रंग. हा रंग विशिष्ट प्रकारच्या किड्यांपासून तयार होतो. लाल रंगातील एक छटा. [फा. किरमिझ]

**किरमिडा** वि. किडकिडीत : 'त्यो तसा किरमिड्या अंगाचा.'- रैत १०९.

**किरमिष्टाण** वि. कुरूप; बेढब (स्त्री, वस्तू) : 'मेली आपण किरमिष्टाण आणि दुसऱ्याला नावं ठेवायचं अनुष्ठान.' - आईची माया १३.

**किरमी(मे)ज** न. ज्यापासून किरमिजी रंग तयार करण्याचा पदार्थ मिळतो असा एक प्रकारचा किडा. [ सं. कृमिज]

**किरमे, किर्म्या** न. पडसे; शेंबूड. (कु. गो.) [ सं. कृमि]

**किरम्या बोळ** लहान मुलांच्या जंतविकारावरील एक औषध.

**किरली** स्त्री. हात अगर पाय यात काटा गेल्यामुळे पडलेला घट्टा, घर, भोवरी. (कु.)

**किरली-ळी** स्त्री. नुकती दिसू लागलेली बारीक लहान काकडी : 'येलाला तर एकबी किरळी न भिंड न्हाईना.' - गोता ११९.

**किरव** पु. खरजेतील एक जंतू. [सं.]

**किरवट** स्त्री. कणवट. (कु.)

**किरवण** न. १. नक्षीचे किंवा वेलबुट्टीचे कोरीव काम; चित्रकाम; चित्राचे कसब : 'किरवणभूचंगा विस्मयोत्कर्ष सारंगा।' - राला ३७. २. पोपट, मोर इ. पक्ष्यांची चित्रे. [सं. कृ = करणे]

**किरव(वि)णे** उक्रि. लाकूड, धातू, माती वगैरेवर चित्र, आकृती वगैरे कोरणे.

**किरवंत** पु. १. सावंतवाडीकडे राहणारी ब्राह्मणांतील एक पोटजात व त्या जातीतील व्यक्ती. २. माणसाच्या मृत्यूनंतरच्या दिवसांचे क्रियाकर्म करणारे. [सं. कृमवंत]

**किरवा-वे** पु. न. १. डोंगरात किंवा सपाटीवर आढळणारा एक खेकडा. याचा रंग काळसर पांढरा असतो. २. गाठ, फास.

**किरवि(व्या)जणे** अक्रि. भात, भाजी वगैरे बरोबर न शिजल्यामुळे नासणे, खराब होणे; अर्धे कच्चे भाजणे.

**किरवितणे** सक्रि. १. (दात) वाजविणे; किरकिर आवाज करणे. २. (ल.) मागणे; तोंड वेंगाडणे : 'आणि पव्हेसाठीं सुदामयाप्रति। दांत किरवितसां कैसे।' - स्वानु ३.३.४३. [ध्व.]

**किरविल** पु. सर्प; किरडू : 'किरविल जैसा पसरला।' - वेसीस्व ४.९९.

**किरवे** न. १. लाकूड वगैरे घासण्यासाठी तयार केलेले माशाच्या खरखरीत पाठीचे हाड. (को.) २. खेकडा : 'येकांगी करूनि किरवें धरूनि आणिलें।' - दावि ३५६. ३. पहा : **किरिरें**

**किरसाण-न, किसाण** पु. शेतकरी : 'रयत, किरसान याजवर महाराजांची दया' - विक्षिप्त २.११९. [हिं.] [ सं. कृष-कृषाण]

**किरळ-ळी** न. स्त्री. १. नवीन कोंब फुटलेली हरळी. २. अंकुर, ज्वानी; जोमदारपणा : 'नातु कोंवळें किरळ।' - यथादी १.२९१. ३. जोंधळ्याच्या कोवळ्या सुरव्यांत उत्पन्न होणारा एक विषारी किडा. हा किडा खाल्ला असता जनावर मरते. त्यामुळे गुराला होणाऱ्या रोगाला म्हणतात. (क्रि. लागणे.) : 'अरे सख्यारे हा मदन अनिवार। ज्यार फार करी किरळा।' - प्रला ९४. ४. जोंधळा, बाजरी यांची कापणी झाल्यावर शेतात राहिलेले त्यांचे धस, सड. ५. नेसीचे झाड व तिचे फळ. (कर.) ६. भरत येणाऱ्या जखमेचा आतील भाग. (क्रि. बांधणे, येणे, धरणे, फुटणे.) (कर.)

**किरळा** वि. किरटा (आवाज) : 'मांगीण किरळ्या आवाजात पोराला शिवीगाळ घालत होती.' - पंवा ९६.

**किरळी** स्त्री. पायाचा एक रोग; भोवरी. पहा : **किरली**

**किरळी** स्त्री. किरकोळ; बारीक; लहानपणची अवस्था : 'कवळी किरळी नव्हती तुमची पाहिली पंचविशी।' - पला १०४.

**किरंगळी** पहा : **करंगळी**

**किरंव** पु. खरजेच्या पुळीतील सुईच्या अग्रापेक्षाही लहान जंतू. (कु.)

**किराईत, किराईत कोडशी** न. काडेचिराईत. याच्या काडेचिराईत व पालेचिराईत अशा दोन जाती आहेत. याची वाळलेली पाने, फुले, फळे, मुळे, काष्ठें ही पौष्टिक, ज्वरनाशक व सारक आहेत. आम्लपित्तावर याचा काढा करून त्यात मध घालून देतात. [ सं. किरात, चिराटिका]

**किराईत फुलकी** चिराइताची लहान जात.

**किराची** स्त्री. कट्यार; बरची : 'तितक्यात पुन्हा त्या स्वाराने राणीसाहेबांच्या छातीत किराचीची हूण मारली.' - राणी लक्ष्मीबाई २४०.

**किराटणे** अक्रि. किर्र असा आवाज करणे : 'रातकिडे किराटत होते.' - अजून १३१.

**किराण** न. १. उडी; उड्डाण. पहा : **किलाण**. (काहींच्या मते खाली डोके वर पाय करून मारलेली उडी.) (क्रि. मारणे, टाकणे, साधणे.) : 'उड्डाणें किराणें घेती गगनीं।' - मुवन १५.१५७. २. संधान; निशाण; नेम. (क्रि. साधणे, बांधणे, चुकणे.) ३. शुभग्रह युती; संधी; योग्य समय. [सं. किल - खेळणे]

**किराण** पु. उगवत्या अगर मावळत्या सूर्याचे मंद किरण. (क्रि. पडणे, राहणे.) (कुण.)

**किराणा-ना** पु. लवंग, मिरी, मिरच्या, गूळ, तूप, साखर इ. माल; वाणसामान. [सं. क्रि = विकत घेणे, क्रयण]

**किराणा** पु. संगीतक्षेत्रातील एक घराणे. सुराला महत्त्व देणे हे या घराण्याचे वैशिष्ट्य आहे.

**किरात** पु. १. एक अरण्यवासी जात; भिल्ल. ही जात शिकारीवर निर्वाह करते : 'तो भेटला गुहक नाम किरात वाटे।' - वाभभा ५०. २. पहा : **किराइत**. ३. किरातवेषी शंकर.

**किराती** स्त्री. १. भिल्लाची बायको; भिल्लीण : 'आलिंगिली पुनरपी प्रमदा किराती।' - आश १९. २. चवरी घेणारी स्त्री. ३. भिल्लीणीचा वेष घेतलेली पार्वती. ४. स्वर्गंगा.

**किराया** पु. भाडे : 'दोन नावा तीनशें रुपयांची किराया करून पटण्यास आलो.' - पदमव ७३. [अर.]

**किरावणे** अक्रि. पोपटासारखे बोलणे. (गो.) [सं. किर]

**किराळ** पहा : **किरळ**

**किराळचें** अक्रि. कावळ्यासारखा कर्कश आवाज काढून ओरडणे; कर्कश आवाज काढणे; किंकाळणे. (को.) [ध्व.]

**किराळी** स्त्री. किंचाळी; कर्कश आरोळी; हत्तीची किंकाळी. (को.) [ध्व.]

**किरांची** स्त्री. तोफेच्या मागची दारूगोळ्याची पेटी.

**किरांटी** स्त्री. लहान पोपटाची जात. (गो.) [सं. कीर]

**किरांमोरां** न. पोपट, मोर वगैरे पक्षी किंवा त्यांची चित्रे. (गो.)

**किरांव** न. (वाघ वगैरेची) उडी; घाला. पहा : **किरण** (गो.)

**किरिरे** न. शिक्यावर भांडे घट्ट बसावे म्हणून शिक्याला वर बांधतात तो फास. (को.)

**किरिस्ताव** पु. ख्रिस्ती जात व त्या जातीतील व्यक्ती. (गो.) [पो. क्रिस्ताओ]

**किरी** स्त्री. १. क्षयरोग. २. (ल.) कीड : 'मज संसारीं कैंचें चिंतेनें लागतां किरी टिकणे।' - मोसभा ३.२९.

**किरी** स्त्री. लसणाची कळी. (झाडी) [सं. कलिका]

**किरीट** पु. न. डोक्यावरचा मुकुट.

**किरीट** पु. सूर्याभोवती असणारे लखलखीत प्रकाशाचे वलय : '(सूर्याच्या) दीप्तिगोलाबाहेर जे कवच आहे त्याला वर्णगोल म्हणतात. वर्णगोलाबाहेर जे कवच किंवा आवरण आहे त्याला किरीट म्हणतात.' - निप्र १०३. [सं.]

**किरीटकुंडले** न. मुकुट व कानांतील भूषणे; पौराणिक नाटकातील देवांची व राक्षसांची शिरोभूषणे. [सं.]

**किरीटी** पु. अर्जुन : 'हा तर्कांचिये दिठी। गोचर नोहे किरीटी।' - ज्ञा २.१४८. [सं. किरीट]

**किरीम, किर्म** पु. जंतू; किडा (फळ, पोट, क्षत यांतील). (को. कुण.) [सं. कृमि]

**किरीम वाताळे, किर्म वाताळे** कृमीपासून उत्पन्न होणारा पेटका; उन्मादवायू. (को. कुण.)

**किरू** क्रिवि. १. निश्चये करून; खात्रीने : 'इअेचा किरू प्राणेंश्वरू।' - शिव ८४७. २. खरोखर. [सं. किल]

**किरे** न. पोपट. [सं. कीर]

**किरेवारे होणे** हाल होणे.

**किरोंटा** पु. १. रानटी पोपट; कंठ न फुटलेला राघू. २. करंटा. (को.) [सं. कीर ]

**किर्डुंचें** सक्रि. दात खाणे. (गो.)

**कि(की)र्द** स्त्री. १. रोजनिशी. २. रोजचा जमाखर्च लिहिण्याची वही.

**कि(की)र्द** स्त्री. १. लावणी (जमिनीची) : 'पावसाळा, कौल देऊन आज्ञा केली तर रयत उमेद धरून किर्दी करितील.' - मइसा ६.१४८. २. लागवड केलेली जमीन. [ फा. कर्द् = काम]

**किर्द आबादानी, महामुरी, मामुरी** लावणी संचणी; लागवड; वसाहत : 'त्यांणीं तेथें किर्द महामुरी केली.' - मइसा १५.२०२. [फा. कर्द + अर. मअमुर = आबाद]

**किर्द(र्दा)वा** पु. पीक; लागवडीचे उत्पन्न. [ फा. कर्द]

**किर्दसार** वि. लागवडीखालील, लागवड योग्य (जमीन). [फा. कर्द + सार]

**किर्दार** पु. काम. [ फा.]

**किर्निस्ट** वि. कंजूष.

**किर्माडी** पु. कृपण. (तंजा.)

**किर्मीजी** पहा : **किरमिजी**

**किर्मीर** वि. चित्रविचित्र : 'अत्यंत किर्मिरित कांति झाली।' - सारुह ६.२६. [ सं.]

**किर्मुंचे** सक्रि. १. अंकुर तोडणे. २. नखाने खरूज खाजवणे. (गो.)

**किर्मूज** स्त्री. लालसर रंग. पहां : **किरमिजी** (गो.)

**किर्यास** पु. वाडा.

**किर्र, किर्रर** वि. १. कर्कश; शहारे उत्पन्न करणारे (रातकिड्यांचा, पक्ष्यांचा आवाज) यावरून. २. निबिड अरण्य अथवा दाट झाडी या अर्थाने योजतात. कारण तेथे नेहमी रातकिड्यांचा, पक्ष्यांचा आवाज व झाडांचा करकर आवाज होत असतो : 'मोठमोठे वृक्ष वाढून किर्र झाडी झाली आहे.' - पाव्ह ९. ३. थकून गेलेला; भागलेला. [ध्व.]

**किर्ल-ल्ल** पु. बांबूच्या मुळाला फुटलेले नवीन अंकुर. यांची भाजी करतात. (गो.)

**किर्लकातने** न. झाडावरील फळे, पाला काढण्यासाठी टोकाला कोयती लावलेली कांब, काठी, बांबू; आकडी. (गो.)

**किर्ली** स्त्री. १. पायात काटा जाऊन झालेला जाड दडदडीत भाग; घट्टा; भोवरी. (कर.) २. मोड; अंकुर. (गो.)

**किर्लुं(ल्लुं)चे** अक्रि. मोड येणे. (गो.)

**किर्व(र्वं)ट** स्त्री. कनवटी. (गो.)

**किल** पु. लहान पक्ष्याने काढलेला सौम्य व गोड असा आवाज. [ध्व.]

**किलअह** पहा : **किल्ला**

**किलकाटा** पु. यंत्रसामग्री.

**किलकारण** न. ओरडा; गोंधळ : 'गाईम्हशींची करति वासरे उडून किलकारण।' - ऐपो २८३.

**किलकारी** स्त्री. आरडाओरडा : 'सेनेने व गाववाल्या लोकांनी एक होऊन एकच किलकारी करून दिली.' - श्रीयो १. २४७.

**किलकिल, किलकिलाट, किल्किलाट** पु. स्त्री. १. पक्ष्यांची चिवचिव. २. गडबड गोंगाट (माणसांचा) : 'कोठें नेणों हा फावला एकांत। सदा किलकिल भोवती बहुत।' - तुगा १११; 'अभ्रीं संभ्रम किल्किलाट करिती, शोभा दिसे फार ते।' - आसेतु १०. [ध्व.]

**किलकिलणे** अक्रि. किलकिल आवाज करणे; गोंगाट करणे; चिवचिवणे (पक्ष्यांचे). [ध्व.]

**किलकिलणे** उक्रि. थोडेसे उघडणे; किंचित उघडणे (डोळे, दार इ.) : किलकिले होणे, करणे. (को.): 'पांघरुण किलकिललं' - बाविबु २८०

**किलकिला-ले, किलकिलीत** वि. अर्धोन्मीलित (डोळे, दार, कळी इ.); अर्धे उघडलेले; किंचित उघडलेले. (क्रि. होणे, करणे.)

**किल(ली)च** स्त्री. १. कडीपाटाच्या फटींमधून बसवलेल्या लाकडी झिलप्या, ढलप्या : 'गरुडपाचूच्या किलचापाट।' - मुसभा २. २८. २. तुकड्यांचा कडीपाट करण्याकरिता एका कडीपासून दुसऱ्या कडीपर्यंत घातलेले फळीचे आडवे तुकडे (जास्त लांब अधिक चांगल्या फळ्यांच्या ऐवजी.). ३. हिऱ्याचा लांब तुकडा. ४. कापसामधील गवताची काडी, घाण इ.

**किलचबंदी** स्त्री. किलचांची तक्तपोशी; २. तख्तपोशी; याप्रमाणे केलेला कडीपाट.

वि. किलचांचा केलेला (कडीपाट).

**किलची, किलचण** स्त्री. १. पहा : **किलच** १ : 'शुद्ध पाचूंच्या किलच्या वरी । अभेद जोडिल्या कळाकुसरी ।' - हरि २. १९. २. किलचांचा ढीग.

**किलट्या-प्या** स्त्री. अव. थपडा; चापट्या.

**किल(ल्ल)त** स्त्री. टंचाई; उणीव; चणचण; दुर्मिळता; तूट : 'परंतु चाऱ्याची किलत फार व गल्ल्याची गिराणी आज हाद बेस्तर.' - भारतवर्ष. अखबार दिनचर्या १४. [फा. किल्लत]

**किलतान** पहा : **किनतान** : 'बाळूनं एका किलतानाच्या पिशवीतला कुऱ्हाडीचा दांडा दादाच्या हातात दिला.' - वळीव ६०.

**किलपी** स्त्री. थप्पड. (क्रि. देणे.) : 'क्रोध आला हकीमाला किलप्या द्यायचा हुकुम गड्यारे।' - राजुगा.

**किलबिल** स्त्री. पक्ष्यांची चिवचिव. पहा : **किलकिल**

**किलबिलण, किलबिलाट** पहा : **किलकिल, किलकिलणे**

**किलबिलणे** अक्रि. चलबिचल होणे; अस्थिर होणे; अधीर होणे : 'गडावर गडकरी किलबिललेसे दिसतात.' - पेद ६. १२७. [ध्व.]

**किलवणे** सक्रि. हलविणे (जमिनीत गाडलेला वासा वगैरे). [सं. कल]

**किल(ला)वर** पु. खेळण्याच्या पत्त्यातील त्रिदळाची काळी आकृती असणारा पत्ता. [सं. कोन]

**किलवर** स्त्री. वाटाण्याच्या जातीची वेल.

**किलवाणा-णी-णे** वि. १. दीनवाणा; रड्या (स्वर, भाषण, माणूस) : 'हे नरभूषण दायक अन्य दरिद्र फिरें जरि तो किलवाणें। - किंशुक ३८; २. हलका; लहान; क्षुल्लक; कुरूप (कपडा, दागिना, इमारत) ३. दुर्दैवी; कृपण; नीच (मनुष्य, त्याची वागणूक, कृती). पहा : **केविलवाणा**

**किलागॉ** पु. बारीक मासा. (गो.)

**किलाटन** न. (वै.) शरीरातील ऊतींचे 'चीज'सारख्या पदार्थात रूपांतर होणे. विशेषतः क्षयरोगात जी क्षते पडतात त्यात ही प्रक्रिया दिसून येते. [सं.]

**किलाण** न. १. उडी; उड्डाण; झडप. (क्रि. मारणे, टाकणे, घालणे, साधणे.) २. उड्या मारणे; खिदळणे; धिंगाणा घालणे (लहान मुलांचे). (क्रि. मांडणे, माजवणे). पहा : **किराण** [ सं. किल = खेळणे]

**किलाप** पु. दोष : 'नाही येथे किलाप कल्पनेचा' - निगा १८०.

**किलाफ-फा** पु. संशय, वैर; कपट; वैषम्य; विरोध; किल्मिष : 'हर प्रयत्न करून जनकोजी शिंदे यांस भेटून त्यांचे चित्तांतील किलाफ काढून त्यांचे हातीं मूल द्यावें.' - भाब ३७. [ फा. खिलाफ]

**किलारी** स्त्री. आरोळी; हंबरडा. (झाडी)

**किलावणे** सक्रि. हलविणे.

**किलावा** पु. माहुताला पाय अडकवण्यासाठी हत्तीच्या गंडस्थळावरून खाली सोडलेली दोरीची रिकीब; हतीचा गळपट्टा. पहा : **कलावा** : 'पायावरती चढोन किलाव्यांत बसले.' - आयाह ११. [हिं.] [फा. कलावा]

**किलिचा पाट** पु. तक्तपोशी : 'दांडिया शोभती प्रवाळें। किलिचा पाट वज्राचे।' - मुआदि ३१. १५.

**किलिसात** पु. किल्ली. -(तंजा.)

**किली** पहा : **किल्ली** : 'हातास न येतां किली । सर्वही अप्राप्त ।' - दास ७. २. १३.

**किली** स्त्री. धडक, टकर देणे : ' रात्रंदिवस तटासी किली घेतात.' - इएमपी १८०.

**किलेमाणी** वि. जात्याच्या खालच्या तळीच्या खुंट्याभोवती फिरण्यासाठी वरच्या तळीत ज्याला वेढी बसवली आहे असे जाते. (क्रि. करणे, बसवणे.)

**किलो** पु. एक हजार (१०००) ही संख्या. [फ्रें.]

**किलोंड-डी** स्त्री. १. मांजरांची झोंबी, लढत. २. झोंबाझोंबी; बाचाबाची; भांडण : 'मैनामिठूची किलोंडी थांबली.' - बाविबु २६. (व.)

**किल्कारी** स्त्री. चीत्कार; हर्षाची आरोळी; गर्जना. [ध्व.]

**किल्कील्या** पु. खंड्यापक्षी. (झाडी)

**किल्बि(ल्मि)ष** न. १. पाप; दोष : 'ऐशा किल्बिषापासूनी। सुटे यज्ञशेष तें भक्षूनी।' - यथादी ३. २२३. २. (ल.) घाण; मळ. [सं.]

**किल्ल** पु. कोंब (झाडांचा वगैरे). (गो.) पहा : **किरळ**

**किल्ला** पु. गिल्ला; तक्रार : 'तोच किल्ला लिहित्यातं येत असतो.' - मर्शियांका ८५०.

**किल्ला** पु. गड; दुर्ग; कोट; भोवताली चर, तट, बुरूज इ. करून राहण्यासाठी तयार केलेले सुरक्षित स्थळ; गढी. [फा. किला = कोट] (वा.) ० **नेसविणे** -किल्ल्याभोवतीचे रान पेटविणे. **किल्ल्यावर चढविणे** - डोंगरी किल्ल्यात कैदेत ठेवणे : 'किल्ल्यावर चढवा आनंदीबाईला।' - ऐपो १६५. ० **बांधणे** - जमावाची पद्धतशीर, बळकट आवळून रचना करणे: 'जानसाहेब पलटणचा किल्ला बांधून होते त्यावर घोडे घालून जानसाहेब दस्त केलें.' - होकै १३९. **किल्लेबंद होणे** - किल्ल्यात अडकून कोंडी होऊन पडणे : 'निर्मलवाला किलेबंद जाहला.' - नाग २. ६.

**किल्लाजात** क्रिवि. सर्व किल्ले : 'किल्लेजातचा बंदोबस्त...' - वाडसमा ३. १६. [अर. किल्ला = जात]

**किल्लाण** पु. पक्ष्यांचा किंवा मुलांचा कलकलाट; गोंधळ. [ध्व.]

**किल्ली** स्त्री. १. चावी; कळ : 'झाला हुकूम तोफखान्याला किल्ली जिवबादादाचे हातीं।' - ऐपो २३५. २. एखाद्या कठीण गोष्टीचे स्पष्टीकरण किंवा उलगडा; एखाद्या शास्त्राचा सारभूत प्रास्ताविक भाग. ३. (ल.) हिकमत; कळ; युक्ती; मेख : 'पेशवाई चालविण्याची किल्ली नानासाहेबाखेरीज इतरांस सांपडली नाहीं.'-अस्तंभा ४. [ क. कीलि] ४. (छापखाना) फार्म आवळण्याचे साधन. [सं. कील] (वा.) ० **फिरविणे** - कावेबाज युक्ती काढून मथविणे, चिथविणे; गुप्तपणे बंदोबस्त करून ठेवणे. ० **देणे** - १. घड्याळाची किल्ली फिरविणे. २. एखादी गोष्ट सुरू होईल असे करणे.

**किल्ली** स्त्री. काटा रुतून पायाच्या तळव्याला होणारा फोड; भोवरी. (गो.) पहा : **किरली**

**किल्लीबिल्ली** स्त्री. मुलांचा एक खेळ. [ध्व.]

**किल्लु** १. सापाचे लहान पिल्लू. २. शेतातील एक वनस्पती. (अहि.)

**किल्लेकोट** पु. १. साधारणरित्या किल्ले, यांसारखी मजबूत ठिकाणे. २. किल्ल्याची बंदिस्त भिंत.

**किल्लेदार** पु. दुर्गाधिपती; किल्लेकरी; गडकरी. याची नेमणूक राजधानीतून मुख्य सरकारकडून होई व त्याला पगार तेथून मिळे. किल्ल्यावरील शिबंदी त्याच्या दिमतीस असे. [फा.]

**किल्लेनशीन** वि. किल्ल्यावरील; किल्ल्यावर असलेला; किल्ल्यावर कैद झालेला : 'मनसबदार किल्लेनशीन वसन्तगड...'-मइसा १५.९५.

**किल्लेफोड-हल्ला** स्त्री. मुलांचा एक खेळ.

**किल्लेबंद** वि. किल्ल्याला वेढा पडल्यामुळे अडकलेला : 'किल्लेबंद झालें असता परिणाम नाहीं.' - मराचिथोशा ३७.

**किल्लेवर्ताळा** पु. किल्ल्यावर शिबंदीसाठी धान्यपुरवठा करणाऱ्या शेतकऱ्यांवर धान्याऐवजी बसवलेली पट्टी.

**किल्हाण** न. उड्डाण. पहा : **किराण, किलाण**

**किल** न. सर्पाचे पिल्लू. (व.) पहा : **किरडु**

**किवखा** स्त्री. निंदा. (व.)
वि. निंद्य.

**किवचणे** अक्रि. वाकडे करणे : 'गुरत्यानं आपलं तोंडच कसंतरी किवचल्यागत केलं.' - फक्कड ३८.

**किवट** पु. ओहोळाला दांडके, पाने, चिखल व दगड लावून मासे मारण्याकरिता केलेला बांध : 'वेळ पडल्यास लावलेल्या किवटातून ते मासे चोरून आणीत.' - आआशे १७३.

**किवटा** वि. कृपण; चिक्कू; (बालभाषेत) किवण.

**किवड** पु. (सांकेतिक) पोलीस शिपाई.

**किवडा-ड्ड, किवळ्या** वि. बहिरा. -(तंजा.) [का. किवी= कान, कीव्ह = बहिरा]

**किवण** स्त्री. कीव; करुणा; दया.

**किवण-न** न. १. पशूच्या अंगावरील जखम, व्रण. २. ज्या मंत्राने ही जखम बरी होते तो मंत्र. [सं. कृमि = व्रण]

**किवण्या-न्या** वि. किंवण पडलेला; क्षत पडलेला.

**किवंचणे** उक्रि. १. इकडे तिकडे फेकून, टोचून, बोटे घालून चिवडणे; विसकटणे; नासणे; कुसकरणे. (का.) २. चाचपणे. (कर.)

**किवंडा** पहा : **किंवडा** : 'तरी ती गप्पच किवंड्या माणसागत,' - रैत १२४.

**किवा** स्त्री. कुवत; मातब्बरी. (झाडी.)

**किवान, किवोण** न. किव्येण पहा : **किंवण-न**

**किवारा-ऱ्या** पु. एखाद्याबद्दल आस्था कणव असणारा पुरुष. (अहि.)

**किवांटो** पु. संताप; जळफळाट. (गो.)

**किवि-वी** स्त्री. कीड; आळी : 'कीविया भरलें असें।'-दृष्टांत. [सं.कृमि]

**किविलवाणा** वि. केविलवाणा; दीन; बापडा : 'कां गा किविलवाणा केलों दीनाचा दीन।' - तुगा ४५४.

**किशमिश** पहा : **किसमिस**

**किशी** स्त्री. नारळाची शेंडी. (कु.)

**किशोर-री** पु. स्त्री. बाल; लहान मूल; पंधरा वर्षांच्या आतील मुलगा व मुलगी कायद्याच्या दृष्टीने अज्ञान मूल. नऊपासून अठरा वर्षांपर्यंत किशोर अवस्था म्हणतात : 'तूं तों तरुण किशोर। पांचा वरुषांचा पोर।' - वामन नृसिंह दर्पण ९६. [सं.]

**किश्त** पहा : **किस्त**

**किश्तकार** पु. शेतकरी. [फा.]

**किश्तगारी, किश्तेबंदी** स्त्री. १. हप्तेबंदी. २. शेतीचे काम.

**किष्कु** पु. एक प्राचीन मापनाचे परिमाण. हे २४.२ इंचांचे होते.
**किसकिस** स्त्री. दुखणे; कळा निघणे; पोटात चावणे. (गो.) [ध्व.]
**किसकिसौ** पु. झाडे पोखरून खाणारा एक किडा. (गो.)
**किसकूट तिसकूट, किस्कूट** वि. १. एकलकोंडा. २. चिडखोर; त्रासिक; लवकर रागावणारा. (चि.)
**किसगणती** स्त्री. गणना; गुमान; पर्वा; चाड; फिकीर (मनुष्य, वस्तू, काम, पैसा यांसंबंधी); खातरजमा. २. क:पदार्थ (नास्त्यर्थी प्रयोग).
**किसणकाम** न. १. कीस काढण्याचे काम. २. (ल.) बारीक, नाजूक, कंटाळवाणे काम.
**किसणी** स्त्री. १. कीस काढण्याची क्रिया अथवा कीस. २. कीस काढण्याचे साधन; चार पाय असलेले व त्यावर भोके पाडलेला पितळेचा किंवा इतर धातूचा पत्रा बसवलेले एक उपकरण.
**किसणे** उक्रि. १. कीस काढणे. २. किसणीवर खवणे (खोबरे, काकडी इ.). [सं. कृप = ओढणे, घासणे]
**किसपट** न. कसपट; बारीक कण (लाकडाची, गवताची काडी); केसपट, झिलपीचा बारीक तुकडा; कुसळ. [सं. कृश]
**किसपणे** न. साफ करणे; पॉलीश करणे. (गो.)
**किसबत** स्त्री. भिस्ती लोक मसकेच्या खाली वापरतात ते कातडे.[हिं.]
**किसमिस** स्त्री. बेदाणा; खिसमिस. [अर. किशमिश]
**किसमिस** स्त्री. त्रासदायक आणि कंटाळवाणे भाषण; कुरकुर; भांडणाचे बोलणे.
**किसमू(मो)र** स्त्री. कोशिंबीर. (गो.)
**किसर** न. १. केसर; किसपट. (को.) २. माल इ. धान्याचे कुसळ.
**किसर** पु. छावा; बच्चा : 'कीं पंचाननाचा किसरु म्हणो मार्गपरु.' - ऋव.
**किसलय** पु. १. कोवळा अंकुर. २. पालवी.
**किसवंती** स्त्री. आंब्याच्या किसाचे लोणचे.
**किसळचे** अक्रि. बिनसणे. (गो.)
**किसा-स्सा** पु. १. गोष्ट; हकीगत; इतिहास; बखर : 'याप्रमाणे किसेकिनई सांगतो.' - ऐलेसं ४३५४. २. तंटा : 'याप्रमाणें किस्सानिर्गत होऊन स्वारी माघारी फिरली.' - होकै ४. ३. मजेदार घटना; विनोदी चुटका. ४. कपट; लटपट; शोधून काढलेली सबब. [फा. किस्सा]
**किसान** पु. १. शेतकरी; खेडवळ माणूस. २. हलक्या प्रतीचा माणूस; सामान्य प्रतीचा माणूस : 'तेथें अफजल तूं किसान मजला दृष्टीपुढें दीसतों।' - चित्रगुप्त २६. [सं. कृष - कृषाण]
**किसानकाम** न. १. शेतकी; शेतकाम. २. (ल.) कमी दर्जाचे काम; किरकोळ काम; हलक्या प्रतीचा धंदा.
**किसार** न. शल्य; कसपट.
**किसार** न. तळे; तलाव; तडाग. [सं. कासार.]
**किसास** सक्रि. सूड घेणे. [फा.]
**किसूर किडा** अंगावर काटे असणारा किडा : 'गवतावर लई किसूर किडं झाल्यात.' - जाण २९१.
**किसूळ** स्त्री. लाकूड साफ करण्याचा रंधा.
**किसूळ** पु. बारीक आणि किरकोळ ताटे, देठ, पाती (कोवळे किंवा रोगट गवत, भाजीपाला वगैरे). [सं. कृष]
**किस्कनड** स्त्री. भानगड; तिस्कनड. (गो.)
**किस्कूट** न. रंधा; सुतारी हत्यार. (कर.) पहा : **किसूळ**
**किस्त-स्ती** स्त्री. १. कर्जफेडीचा हफ्ता : 'बाकी बत्तीस लक्ष रुपये राहिले ते सावकारी किस्ती करून द्यावी.' - ऐलेसं ४. १८६५. २. शेतीची मशागत. [फा. किस्त]
**किस्तक** न. शर्टचा मागचा व पुढचा भाग जेथे मिळतो तेथे सांध्यावर खालच्या बाजूला जोडण्यात येणारे त्रिकोणी तुकडे.
**किस्तकार** पु. शेतकरी.
**किस्तगारी-बंदी** स्त्री. १. हप्तेबंदी; हप्तेबंदीने देण्याची फेड : 'याप्रमाणें किस्तबंदीचा ठराव जाला.' - मइसा ७.३४. २. शेतकाम, जमीनकसणी.
**किस्ता** पु. भांडण; तक्रार; मुद्दा : 'असले किरकोळ किस्त्यांचा बयाण फार होता.' - होकै ६४.
**किस्ताक** स्त्री. घट्ट बसणारी लांग : 'किस्ताक कसून डोंबारी येतात.' - काआ ६.
**किस्ती** स्त्री. होडी; नौका; लहान नाव : 'येथून एक किस्ती भाड्यानें साठ रुपये करार करून निघालो.' - पदमव ८०. [फा. कस्ती.]
**किस्पाट** न. किसपट. (कु.)
**किस्मत** स्त्री. नशीब; भाग्य; दैव : 'जागें नशीब इंग्रजांची किस्मत शाबूत.' - होपो १६. [फा. किस्मत]
**किस्वत** पु. कपडा. [फा.]
**किहीड** पु. कुकू पक्षी. (झाडी)
**किळकांटा** पु. सामानसुमान, हत्यारेपात्यारे : 'सामायन किळकांटा जंगी।' - ऐपो २१७. [सं. कील + कंटक]
**किळकिळी** स्त्री. याचनेकरिता किंवा दुःख झाले असताना विवळणे, कण्हणे; काकुळत; दीनवाणा स्वर (भिकारी, दुखावलेला कुत्रा यांचा). (क्रि. देणे, मारणे.) [ध्व.]
**किळकिळीत** वि. कळकळीत; पचपचीत; पाण्यासारखे (ताक, दूध); बेचव; नीरस. (गो.)
**किळच** स्त्री. किंकाळी. (गो.)
**किळदकार** पु. सूत्रचालक; किल्ली फिरवणारा : '... नाना फडणीस व यांचे कीळदकार किंवा गुरू हरीबल्लाळ उभयता वितरक्त तिसरा कोण्ही नाहीं.' - पुणे अखबार २. १८५.
**किळवा-वो** पु. बारीक, निरुपयोगी कुळीथ.
**किळवे** न. अर्धा छटांक किंवा एकबत्तीसांश शेराचे एक माप; अर्धे निळवे.
**किळशा, किळोशी** वि. रोगट; सतत रोगी असलेला. (राजा.)
**किळ(ळी)स** पु. स्त्री. १. कंटाळा; तिटकारा; शिसारी : 'तुका म्हणे गेला आळस किळसा।' - तुगा १८५२. २. ज्वरादि दुखण्याने पीडित स्थिती; अशा स्थितीचे निदर्शक चिन्ह; अवलक्षण (अंगावर उवा पडणे वगैरे). (क्रि. येणे.) (को.) [सं. क्लेश]

**किळसखोर** वि. कंटाळखोर; उबगवाणा.

**किळसणे** उक्रि. कंटाळणे; विटणे.

**किळसवाणा** वि. जो पाहून घृणा उत्पन्न होते असा.

**किळा** पहा : **कीळ**

**किळा** वि. चांगला.(आवाज).

**किळावा** पु. तेज : 'रत्नीं किळावो जैसा।'-ज्ञा १४. ३७३. [सं. कील]

**किळांच** पु. बारीक, निरुपयोगी. (कु.)

**किं** सना. १. कोण, कोणचा, काय. हा शब्द बहुव्रीही समासात नेहमी येतो. २. किंवा; अथवा : 'नातरि रसेंवीणु वाणी। किं चंद्रेवीणु रजनी।' - शिव ५३९. [सं. किम्]

**किंक** स्त्री. किंकाळी; आरोळी. (क्रि. फोडणे, मोकळणे.) (को.)[ध्व.]

**किंकट** पु. एका किंवा अनेक हत्तींचा चीत्कार, आरोळी. [सं.]

**किंकट, किकट** वि. (कीकट = बिहार देश यावरून) रानटी; ओसाड; नापीक (देश).

**किंकणी** स्त्री. १. लहान घंटा; क्षुद्र घंटा (बैलाच्या गळ्यातील); पट्ट्यांमधील किंवा स्त्रियांचा कमरपट्टा अथवा इतर दागिने यांमधील घुंगुरु, घागऱ्या. २. किंकाळी (क्रि. फोडणे, मोकलणे.) ३. पिलू या फळाचे बी. [सं. किंकिणी]

**किंकणे(ने)ल** न. पिलू झाडाच्या फळाचे तेल; एक औषधी तेल : 'रोज किंकणेल तिवसाच्या फळाचे तेल घ्यावे.' - निऔ ४५; 'किंकनेल तेल म्हणून आमचे संग्रही आहे, ते वातास लावल्यास गुण येतो. - ब्रच २५६.

**किंकर** पु. १. चाकर; सेवक; दास : 'नाम साराचेंही सार। शरणागत यमकिंकर।' - तुगा २५३२. [सं.]

**किंकर-री** स्त्री. देवबाभळीचे किंवा वेड्या बाभळीचे झाड. याची फुले सुवासिक असून याच्यापासून गोंद व इतर पदार्थ होतात.

**किंकरे** न. (सुतारी) लाकडास भोक पाडण्याचे उपकरण; उळी; पटाशी; विंधणे.

**किंकर्तव्यमूढ** वि. काय करावे हे समजेनासे झाले आहे असा. [सं.]

**किंक(का)ळ(ट)णे** अक्रि. १. हत्तीने चीत्कार करणे : 'मस्त हस्त किंकाटती।' - दावि ४९६. २. आरोळी मारणे : 'मग पाहतां ते कृष्णउपासक। हरिनामें किंकाटती।' - हरि ३३. ११७. [सं. किंक]

**किंक(का)ळी** स्त्री. हत्तीचा चीत्कार, (त्यावरून सामान्यतः) आरोळी. (क्रि. फोडणे, मोकलणे.)

**किंकाट** पु. हत्ती किंवा घोडा यांचा आवाज, शब्द : 'हत्ती किंकाट करिताती ।' - दावि २४४; किंकाळी. [ध्व.]

**किंकार** पु. मोराचा टाहो : 'मयोर नाचती किंकारी।' - मुसभा २. २४.

**किंकार** वि. चक्राकार.

**किंकिणी** स्त्री. कमरपट्ट्याची घागरी; घुंगुर; किणकिण आवाज करणाऱ्या कोणत्याही दागिन्याचे घुंगरू. पहा : **किंकणी** : 'मधुर शब्दाचिया किंकिणी । गोडपणें वाजती ।' - एरुस्व १५. ७६.

**किंक्रांत** स्त्री. मकर व कर्क संक्रांतीची कर (संक्रांतीच्या पुढील दिवस). ही अशुभ समजतात. [संक्रांतचे द्वि.]

**किंग** पु. कीड; रोग. (व.)

**किंगण नाम संवत्सरे** (ल.) जीर्णपणाची कमाल झालेला; अत्यंत जुना; प्राचीन काळचा.

**किंगरी** स्त्री. एक प्रकारचे शिंग; किनरी (नाथपंथी गोसाव्याचे वाद्य).

**किंगायसी** स्त्री. कुचराई; कंजूषपणा : 'त्याची तोडमोड देणियावीसी किंगायसीनें होऊ लागली.' - नाग २. १२७.

**किंच** क्रिवि. पुन्हा एकदा; आणखी एकदा; आणि; शिवाय : 'त्रिभुवनपूज्यतम प्रभु सत्यचि हें किंच तो असे व्याही।' - मोउद्योग ७.१६. [सं. किम् + च]

**किंच(चा)ळणे** अक्रि. किंकाळी फोडणे; आरोळी मारणे; चूं चूं, चिव चिव, कुई कुई करणे. [त. कीच्चु] [ध्व.]

**किंचाळी** पहा : **किंकाळी** : 'त्यानं फोडलेली किंचाळी तिला पुन्हा ऐकू आली.' - रथ ५१.

**किंचित** क्रिवि. ईषत; काहीसे; थोडे; अल्प. [सं.]

**किंचितदान** न. चातुर्मासात रोज आठ मुठी तांदूळ व एक पैसा असे ब्राह्मणाला द्यायचे दान. [सं.]

**किंचितज्ञ** वि. अल्प ज्ञानी; तुटपुंज्या ज्ञानाचा. [सं.]

**किंचितज्ञान** न. तुरळक माहिती; तुटपुंजे ज्ञान; अल्पज्ञान; अल्प समजूत; कोती बुद्धी. [सं.]

**किंजदल** न. (वन.) स्त्रीकेसर; फुलातील सर्वात आतील (केंद्रवर्ती) व स्त्रीगंतुके निर्माण करणारे पुष्पदल. तळाशी किंजपुट, मध्ये किंजदल व टोकास किंजल्क असे याचे तीन क्रमवार भाग असून किंजपुटात बीजके असतात.

**किंजल, किंजल्क** पु. फुलातील केसर किंवा तंतू. [सं.]

**किंज(जा)ळ** पु. एक मोठा वृक्ष; किंदळ. याची पाने लांब असून लाकूड इमारतकामासाठी व शेतीच्या औतासाठी उपयोगी असते : 'ते पाईरहि खैर किंजळ तिथे आईनही वाढती।' - केक १२९.

स्त्री. साळीतील एक भेद.

न. काटेरी झाडी : 'वागाट्याचं याल पसरलेलं किंजाळ लागलं.' - गोता ४७.

**किंजळणे** अक्रि. कर्कश ओरडणे; किंचाळणे : 'मडमेची नक्कल करणाऱ्या देशी दाईप्रमाणे किंजळून बोलत असे.' - संबा ८८.

**किंत-तु-तू** पु. १. संशय; विपरीत भावना; किंतु; आशंका; डळमळीतपणा; शंका : 'नाना किंत निवारिले। नाना संशयो छेदिले।' - दास १.१.१२. २. कंटाळा. [सं. किंतु]

**किंत(ता)न** पहा : **किनतान, कतान १**

**किंतारा** स्त्री. प्रचंड प्रमाणात उर्जा उत्सर्जित करणारी अशी अतिदूर असणारी तारकासदृश वस्तू.

**किंतोक** क्रिवि. मनात किंतु आणून; संताप करून. (व.)

**किंदळ** पहा : **किंजळ**

**किंपुरुष** पु. १. देवातील एक गायकवर्ग : 'मुखाभासे दिसती पुरुष। शरीर

पाहता श्वापद वेष। ऐसे जे वानर रामदास। त्यांसि किंपुरुष बोलिजे।' - एभा १४.५०. २. (उपहासाने) हलका; कवडीमोल; क्षुद्र मनुष्य. [सं. किम् + पुरुष]

**किंबरू-रे, किमरू-रे** न. पु. घुंगरटे, मच्छर. काहींच्या मताप्रमाणे किमरे. किमरे हे अनेकवचन आहे.

**किंबहुना** क्रिवि. इतकेच नव्हे; फार तर काय पण; फार काय सांगावे; फार कशाला; थोडक्यात सांगायचे तर : 'किंबहुना भगदत्तें अत्युग्रा शक्ति सोडिली होती।' - मोभीष्म ९.५१.

**किंभाव** वि. काय किमतीचा; काय महत्त्वाचा; कोणत्या सत्त्वाचा. [सं.]

**किंमत** स्त्री. १. मोल; मूल्य; बदल द्रव्य; भाव; दर. २. (शब्दशः) योग्यता; महत्त्व; पर्वा : 'फिर्यादीची आम्ही कांही एक किंमत समजत नाही.' - विक्षिप्त ३.१६५. [अर. कीमत] ० **चुकवणे** - मोल चुकते करणे; देणे भागवणे. ० **देणे** - महत्त्व देणे किंमत असणे महत्त्व असणे. (अ.) ० **नसणे** - (वि). महत्त्व नसणे. ० **पडणे** - किंमत द्यावी लागणे.

**किंमतकापणी** स्त्री. दुसऱ्यापेक्षा आपण स्वस्त देतो असे एका व्यापाऱ्याने दुसऱ्यासंबंधाने सांगणे; भाव बिघडविणे.

**किंमतदार** वि. मौल्यवान : 'शालू, चांदणी किंमतदार' - ब्रप १२८.

**किंमतवान** पहा : **किमती**

**किंमतवार** वि. क्रिवि. १. क्रमाने प्रत्येक जिनसेची किंमत दाखल केलेली (यादी, टिपण, हिशोब.). २. किमतीमागून किंमत (कलमवार वगैरे यादी). [फा. कीमत + वार]

**किंमात्र** वि. क्षुल्लक; कःपदार्थ : 'वरकड किंमात्रे आहेत काय ?' - हिंगणे दभा २.२९.

**किंव** स्त्री. हुक्की; तलफ. (गो.)

**किंव, किंव काकळून** स्त्री. कीव; करुणा; दया. पहा : **काकळूत**

**किंवडा-डू-ड्या** पु. बहिरा. (तंजा.) [क. किवी = कान, किवड =बहिरा]

**किंवण-न** १. न. पशूंच्या अंगावरील किडे पडलेले क्षत; व्रण. हा रोग गुरांच्या पायांच्या गेळ्यात किंवा कानात होतो. २. ते बरे करण्याचा मंत्र. (राजा.) [सं. कृमि + व्रण]

**किंवण उचकवप** घाण उघडी करून दाखवणे. (गो.)

**किंवदन्ती** स्त्री. उडत बातमी; बाजारगप्पा; अफवा. [सं. किम् + वदन्ति]

**किंवा** उभ. अ. वा; अथवा. [सं. किम् + वा]

**किंशुक** पु. पळसाचे झाड : 'वसंती जैसे किंशुक फुले। तैसे शोभले दोघेहि।' - जै १९.८.

**किंस्तुघ्न** न. (ज्यो.) ११ करणांपैकी एक स्थिरकरण. प्रत्येक चांद्रमासाच्या शुक्लप्रतिपदेला पूर्वार्धात असते.

**की** अ. उभ. १. एक उभयान्वयी अव्यय (स्वरूपबोधक, विकल्पबोधक, परिणामबोधक किंवा संकेतबोधक; जे; असे. २. म्हणून : 'स्वामींचाच प्रताप होता की (म्हणून) काम नाश न पावले.' - मइसा ८.२०५. ३. काय : 'पुढे आपले कुमकेस येऊं कीं?'- इएमूपी १६३. ४. कारण : 'मारगिरी होत नाही की (कारण) किल्ल्याचा मार जबरदस्त होतो.' - ऐकोपुर.

**की** उभ. अ. १. अथवा; किंवा; संशयबोधक अव्यय : 'कीं प्रेम पीयुष मयंकु। परीपूर्ण जे।' - ऋ २७. २. प्रश्नावर जोर देण्याकरिता प्रश्नाच्या शेवटी पुष्कळदा योजतात. निश्चय दाखवण्यासाठी किंवा आश्चर्य दाखवण्यासाठी योजतात : 'म्हणे अधिक द्याच कीं अखिल याचकीं हावरा।' - केका १२. याला पुष्कळदा रे जोडतात. जसे : - आलो की रे, जातो की रे, बसतो की रे. ३. काय : 'पाठ वृतबंध कीजे। हे कीं वैराग्य देवाचें।'- शिव ७००. ४. खरोखर : 'तो वेढितेयाचिया दिठी। कापड जाला कीं' - ज्ञा ९.७५. [सं. किल]

**की** न. पिंगळ्या(पक्षी)च्या कू, की, किलबिल, किचीबिची या चार स्वरांपैकी दुसरा स्वर. [ध्व.]

**कीक, कीकस** पु. वीट; शिसारी : 'मेली मेंढरे सुरवातीसुरवातीला महारापोरांनी नेली, पण मग त्यांनासुद्धा कीक आला.' - बनगर १६१.

**कीक(का)ट** पु. आवाज; ओरडणे; चीत्कार : 'आणि कीकाट गजांचे।' - वेसीस्व ४.२३. [ध्व.]

**कीकस** पु. चुरा; भुगा; कीस : 'हातिएरांचेनि खडाडें : खांडां कीकसु पडे' - शिव ९५४.

**कीकस** न. हाड : 'त्वत्तोयी जरि स्वल्प कीकस पडे पापी कृती तो घडे। तो देवेंद्रपदा चढे सुरवधूसंभोग त्यातें घडे।' - निमा (भागीरथीस्तोत्र) १.१७.

**कीकस** पु. ठिणगी; स्फुल्लिंग : 'लोहित देश मंडळाचा। सेनाधिपु दीव्य प्रशस्तिचा। जयातें कीकसू पडे हातिएराचा। मिषें प्रळयाग्निचेनि।।' - नरुस्व २२०.

**कीकळी** स्त्री. किंकाळी : 'कोल्हाळी तेथ : कीकळी बळि बळी हाकाहुका बोंबटा' - गरा २१३.

**कीच** स्त्री. दुःखाची आरडाओरड. [ध्व.]

**कीचक** पु. वेळू; बांबू. [सं.]

**कीचू** स्त्री. किळस; घृणा. (झाडी) [सं. किलीश.]

**कीट** न. १. घाणीचा थर; किटण (गुडगुडीच्या नळीतील, शरीरावरील, वस्त्रावरील) चिकटा; खळ. पहा : **किटण.** २. हिणकस सोने : 'आत्मानात्मकिटा। पुटें देउनी।।' - ज्ञा १३.१०२७. ३. जळलेला धातू; जळके लोखंड. [सं. किट्ट]

**कीट** न. १. मातीचे मोठे आणि कठीण ढेकूळ (जमीन नांगरताना निघालेले). २. ठिणगी; किटाळ. (राजा.)

**कीट** क्रिवि. काळा या शब्दाचे आधिक्य दाखवण्यासाठी त्याच्या पुढे किंवा मागे योजतात. जसे :- काळाकीट : 'वरी अंतराळें नभीं कीट काळें' - दावि २५४.

**कीट** पु. कृपण; कंजूष मनुष्य. (व.)

**कीट** न. सुपारी शिजवलेले पाणी; पुटी. (गो.) पहा : **कट**

**कीट** न. लहान मूल. (कु.)

**कीट** पु. कीटक; किडा : 'वाढौं वाढौं होति। कोशकीट' - ज्ञा १६.३३६.

**कीटक** पु. किडा. [सं.]

**कीटकाज** न. रेशीम.

**कीटकपरागण** न. कीटकांद्वारे घडून येणारे परागण.
**कीटकयोनि-नी** स्त्री. किड्यांचा वर्ग, जात; जीवजंतू. [सं.]
**कीटकरक्षित** पु. कीटकांमुळे विनाश न होण्याचा गुणधर्म.
**कीटक लाख** लाखेचे किडे आपल्या शरीराभोवती जे संरक्षक कवच तयार करतात, तो कवचपदार्थ.
**कीटण** पहा : **किटण**
**कीटस्थिति-ती** स्त्री. अंडस्थितीनंतरची कीटकावस्था : 'अंड्यातून सुरवंटासारखा लहानसा किडा बाहेर पडतो. तो जलद वाढतो व वाढताना अनेक वेळा कात टाकतो. या स्थितीला कीटस्थिती म्हणतात.' - प्राणिमो १००.
**कीटाहारी कवक** (कृषि.) एक प्रकारचे कवक. हे कीटकांच्या शरीरात प्रवेश करून त्यातील अन्नद्रव्य खाते त्यामुळे कीटक मरतात. या अन्नद्रव्यावर या कवकांची वाढ होते.
**कीटी, कीटकी** स्त्री. अळी; किडा : 'भृंगी जड कीटी मूढा' - एभा ७.३६; 'चिंतितां कीटकी भिंगुरटी। तेचि ते होऊनि उठी।' - एभा ७.९९. [सं. कीटक]
**कीड** वि. खोटे; वाईट : 'तैसें शुद्ध सत्त्वाआड। आहे रजतमाचें कवाड। तें भेदणेंयातें कीड। म्हणावे कां॥' - ज्ञा १७.३१२.
स्त्री. मळ; गंज : 'कीड झाडावया दृष्टीं। रज देऊनि पाटीं पोटीं। सुवर्ण घालितां पुटीं। झळकत उठी निजतेजें। - एभा १०.६३. [सं. कीट]
न. हिणकस (सोने) : 'पन्हरें कीडासि मिळत। काइ सावो नव्हे?' - ज्ञा. ८.३७.
**कीड** स्त्री. १. सामान्यत: कीटक. २. लहान किडा; वाळवी. [सं. कीट] (वा.) ० **लागणे** - १. किड्याने खाऊन पोकळ, खराब करणे (धान्य, फळ वगैरे). २. (ल.) उतरती कळा लागणे; क्षय पावणे : 'देशाचा विचार करणारी माणसे निपजली नव्हती तोपर्यंत देशास कोठे कीड लागली आहे हे समजणे कठिण होते.' - टिव्या.
**कीडखाद** वि. किडलेले; किड्यांनी खाल्लेले.
**कीडडी** स्त्री. तिरडी : 'गोसावियांची लेकि आली: किडडी देखीली : आणि धडकरि आंग टाकीलें.' - गोच १०८.
**कीडभांग(गा)र** वि. १. अन्य धातुमिश्रित सोने. (गो.) २. कीट.
**कीडमुंगी** स्त्री. कृमी; कीटक; किडा; वाळवी (सामान्यत: कोणताही किडा).
**कीडरू** न. साप. पहा : **किरुडव, किडरू** : 'जी कीडरु तरि कापडाचें।' - राज्ञा ११.५४.
**कीडाळ** न. १. दोष; घाण. २. किटाळ; खोटा आरोप : 'परि तो अस्तवे हें कीडाळ।' - राज्ञा ९.२०३.
**कीडिकीडणे** अक्रि. कडकड असा आवाज होणे : 'अस्थियंत्र कीडिकीडी: संधिकळासु कडकडी' - उगी २०४.
**कीण** न. कोयनेल. (गो.) [इं. किनाइन]
**कीण** पु. घोड्याच्या खुराचा मध्यभाग - अश्वप १.६३.
**कीत** न. झाप. - (तंजा.)
**कीत-ट** पु. विकल्प; द्वेष; गैरसमज; खुन्नस; डूख : 'महालींचे सुभेदार अंताजी सबाजी मनीं कीत धरिला.' - शिचसांखं ५.२९६.; 'दोन तीन भेटी जाहाल्या परस्परें चित्तांत कीट वाढला होता.' - ऐसंसाखं ६.१३.
**कीदृश** वि. कशासारखा; कोणासारखा; कशाप्रकारचा. [सं.]
**कीन** स्त्री. पांढऱ्या खोडाचा वृक्ष. (झाडी)
**कीनमशना** स्त्री. किल्मिष : 'याउपरि कीनमशना नाही यैसे अंगारे सिवोन मानाजीबावास जेवावयास केले.' - ऐसंसाखं १.२४.
**कीनाश** पु. यम; मृत्यू : 'वपु न बहुत पोसावें यशचि सदा खाय ज्या न कीनाश।' - मोभीष्म ७.४५. [सं.]
**कीर** स्त्री. रेघ; ओळ : 'तोंडाला एक रंगाची कीर लावून घेतली.' - मिख १४६.
**कीर** पु. १. पोपट; रावा; राघू : 'समसुत मयूरमुखी वसनामा वससि जेविं कीरांच्या।' - मोस्फुटआर्या (नवनीत पृ. १५६). २. पाणकोंबड्यासारखा पक्षी. (राजा.) [सं.]
**कीर** उद्गा. पराजयदर्शक शब्द. पहा : **किर** : 'अझुनी कां थीर। पोरा न म्हणसी कीर।' - तुगा १६३. (वा.) ० **करणे** - त्रासून सोडणे. (व.)
**कीर-रू** क्रिवि. निश्चयेकरून; खात्रीने; खचित; खरोखर : 'कीरू तुम्हीं वीरुचि धाकडा' - शिव ४८५; [सं. किल]
**कीरकीर** क्रिवि. वानराचा चित्कार : '(हनुमंत) कीरकीर बोबाइले' - श्रीकृच ५३.
**कीरखाद** वि. पोपटाने खाल्लेले.
**कीरट** पु. जनावराच्या अंगावरील मोठी ऊ. (को.)
**कीरमुख** वि. पोपटाच्या तोंडासारख्या तोंडाचा (घोडा.) हे अशुभ लक्षण समजतात.
**कीरमोर** पु. पशुपक्ष्यांची नक्षी. 'भिंती सारविल्या वर काढिली कीरमोरा।' - लोकशब्द ६६.
**कीर्र** स्त्री. १. कटकट. २. पोपटपंची.
**कीरवर-ल, कीरवाल** न. खेकडा : 'तें एका कीरवलें देखिले।' - पंच ४.९. [सं. कुलीरक]
**कीरवा** पु. डुक्कर : 'किरव्या नावडे कस्तुरी।' - तुगा ३१.४९.
**कीरवाणी** स्त्री. कुंकवाचा लालसर रंग : 'शाखाद्वये धरूनि कुंकुम कीरवाणी।' - दस्व ७९.
**कीरवाणी** पु. (संगीत.) आसावरी थाटाचा एक दाक्षिणात्य राग. दाक्षिणात्य ग्रंथात थाटही कीरवाणीच. गानसमय रात्र.
**कीरीचील** पु. खेकडा : 'तंव तेथे येकु कीरीचीलु आला' - पंचो २४.४.
**कीर्ण** वि. विखुरलेला; पसरलेला. [सं.]
**कीर्णा** स्त्री. एक प्रकारचा लगाम. - अश्वप १८५.
**कीर्त-र्त्त** स्त्री. कीर्ती; प्रसिद्धी; ख्याती. [सं. कीर्ति]
**कीर्तणे** उक्रि. वर्णन करणे; गुण गाणे; स्तुती करणे; वाखाणणे : 'कवित्तीं तो सुबहु कीर्तिला भरता।' - मोआदि ११.८९. [सं. कृत]
**कीर्तन** न. १. गाण्या-बजावण्यासह ईश्वराचे केलेले गुणवर्णन; पौराणिक देवादिकांचे कथानक घेऊन ते भक्तिरसाने साक्या; दिंड्या यांच्या

साहाय्याने सांगणे : 'सगुण कथा या नाव कीर्तन।' - दास ४.२.२३. २. ईश्वर नामोच्चार करणे. [ सं.] ३. (संगीत.) दाक्षिणात्य संगीतज्ज्ञ कीर्तन गातात. हे हिंदुस्थानी (उत्तर) संगीतातील ध्रुवपदासारखे आहे. यात स्थायी आणि अंतरा असे दोन भाग असतात. ही कीर्तनें दाक्षिणात्य रागतालात गातात.

**कीर्तन** न. देवालय : 'कीर्तनजीर्णोधारू' - भांडक शिला १-४-५.

**कीर्तन** वि. व्यापारी विक्रीचा, किरकोळ जिन्नस : 'कालीकोटाहून बेपारे यांचा कीर्तन जिन्नस भरून जंजिरेस येत होता.' - आंघइ ४१०. पहा : **किरचण**

**कीर्तनकार** पु. कीर्तन करणारा. [सं.]

**कीर्तनभक्ति-क्ती** स्त्री. देवाची स्तुती नेहमी करावी अशा आशयाची भक्ती. नवविधा भक्तीतील एक प्रकार. [सं.]

**कीर्तनरंगण** न. कथेची बैठक : 'कीर्तनरंगणी ठाकले।' - दावि २८०.

**कीर्तनी** पु. कीर्तन करणारा; चालचलाऊ हरिदास. (गो.)

**कीर्तवडा** पु. अपकीर्ती; कुप्रसिद्धी; बोभाट. सं. कृत्]

**कीर्ति-ती** स्त्री. लौकिक; ख्याती; प्रसिद्धी; नाव स्तुती : 'हे असतीये कीर्तीसी नाशु । आणि परत्रिकासि अपभ्रंशु।' - ज्ञा २.२०. [सं. कृत् - वर्णन करणे]

**कीर्तिकठिया** पु. स्वतःच्या कीर्तीसाठी देवपूजाअर्चा करणारा गुरव : 'कीर्तिकठियाचा दृष्टांत' - दृपा ९५.

**कीर्तित** वि. प्रख्यात; विख्यात; वाखाणलेला; प्रशंसिलेला. [सं.]

**कीर्तिमान-मत-वान-वंत** वि. प्रख्यात; विख्यात. [सं.]

**कीर्तिमुख** न. १. दोन शिंगे असलेल्या राक्षसाचे देवळाच्या उंबरठ्यावर कोरलेले मस्तक. प्रथम याचे दर्शन घेऊन मग देवळात जाण्याची रीत आहे. २. वरील आकाराचा दंडावर बांधायचा एक दागिना, अलंकार : 'बाहुदंडी कीर्तिमुखें। हस्तकंकणे दिव्य सुरेखें।' - हरि ३.१६२. (वा.) **कीर्तिमुखत्व करणे** - १. सामोरे होणे : 'तें अज्ञान ज्ञानीं बुडालिया। ज्ञानें कीर्तिमुखत्व केलिया।' - ज्ञा १५.५२. २. नाहीसे होणे; मागे राहणे.

**कीर्तिवाड** वि. कीर्ती वाढवणारा : 'कवित्व असावे कीर्तीवाढ।' - दास १४.३.३८.

**कीर्तिस्तंभ** पु. जय मिळाल्यावर त्याच्या स्मरणार्थ बांधलेला मनोरा : 'मदनाचे कीर्तिस्तंभ पाण्हैले।' - शिव ६१७.

**कीर्त्य** वि. कीर्तण्यास, वर्णन करण्यास योग्य. [सं.]

**कीर्द** स्त्री. रोजचा जमाखर्च लिहायची चोपडी.

**कीर्द** शेती. [फा.]

**कीर्द चौकी** गीर्दचौकी; चौफेर; सर्व बाजूंनी : 'आसपास कीर्दचौकी दिली आहे.' - ऐलेसं ३५१५.

**कीर्दसार, कीर्दावा, कीर्दी** वि. लागवडीला योग्य. पहा : किर्द (क्रि. करणे)

**कीर्म** पु. १. व्रणात होणारे जंतू. २. पोटातील जंत.

**कीर्म वाताळे** न. जंतविकाराने येणारी भोवळ, बेशुद्धी.

**कीर्यविकीर्य** पु. क्रयविक्रय.

**कील-ला** स्त्री. अग्निशिखा; ज्वाला : 'नयनाग्निकील नीलंग्रीवाचा मीनकेतु वरि जैसा।' - मोकर्ण नव ३४५; 'ती बहु तीस दटावी कार्पासा काय दापिना कीला।' - मोद्रोण नव २८१. [सं.]

**कील** पहा : **कीळ** : 'कीलेवरि माणिकें। लोपिजे काइ।' - राज्ञा १४.१२२.

**कील** पु. १. मेख; खिळा; पाचर; अडसर. बहुधा जात्याच्या खुंट्याला म्हणतात. २. गुडगुडीत साचलेला मळ; मशेरी. ३. शंकु (छायायंत्रावर सावली पाडणारा). ३. (वै.) पावलातील एक लहान अस्थी. ४. मेद. [सं.]

**कील** स्त्री. खिड.

**कील** न. १. डांबर. २. वंगण. - (तंजा.)

**कील** न. बिजागरी. - (तंजा.)

**कीलक** पु. न. जात्याचा खुंटा; खुंटा; खिळा; पाचर वगैरे. [सं.]

**कीलक** पु. साठ संवत्सरांपैकी बेचाळिसावे संवत्सर.

**कीलकशीर्ष लिखाण** (पुरा.) इजिप्तमध्ये उत्कीर्णलेखात आढळलेली लिपी.

**कीलखाना** पु. किरकोळ जिनसांची रास व ती ठेवण्याची जागा; अडगळीची खोली. [हिं.]

**कीलनप्रक्रिया** स्त्री. (यंत्र.) दोन बाजूंनी डोके काढून एकत्र जोडलेल्या दोन पट्ट्या रिबेटनी जोडण्याची क्रिया.

**कीलना** स्त्री. निश्चय : 'मननांतरें आणि कीलना। हीं उपक्रम लिंगे जाणा।' - महिकथा १६.३०. [सं.]

**कीलबंदी** स्त्री. (स्थापत्य.) खिळे मारून फळी वगैरे घट्ट बसवणे.

**कीलवाणा-णी** वि. केविलवाणा-णी.

**कीव** स्त्री. कष्ट; दुःख.

**कीव** स्त्री. १. रडगाणे; केविलवाणी प्रार्थना; करुणा भाकणे. (क्रि. करणे, दाखविणे, भाकणे, घेणे.) २. दया; कृपा. [सं. कृपा] (वा.) **० करणे, येणे** - एखाद्याचे रडगाणे ऐकून दया येणे. **० दाखवणे** (दुर्बलता, अशक्तपणा इ. पाहून.) दया दाखवणे. **० कीवी रडणे** - केविलवाणे ओरडणे : 'साईकाळी गाय येताच कीवी रडोन मेली।' - पुरंदभा इ. १३६.

**कीव-वे** स्त्री. न. कृमी; कीड : 'उमाई अंवकसां गेली होती तेयासी कींव पडिली।' - लीच ३.१२. [सं. कृमि]

**कीवकाकळूत, कीवकाकुलती** स्त्री. करुणेची याचना; दया; करुणा. पहा : **काकळूत**

**कीवची कानू** एकदा दया दाखवून उपकार केला असता सतत उपकार करावा अशी अपेक्षा असते तेथे योजतात. जीवर आपला हक्क नाही अशी वस्तू हक्काने मागणे.

**कीश** न. माकड : 'कोण कीश तव नांव कथी ।' - निमा १.४. [सं.]

**कीशाली** स्त्री. वानरांचा समुदाय : 'कीशाली ढग ढीगसे जलदसे भल्लूक भल्लावली।' - आसेतु १०. [सं. कीश + आवली]

**कीस** पु. १. किसणीने किंवा खवणीने खवलेला चुरा, भुगा. २. (रसा.) कानशीने घासून निघालेला चुरा. (वा.) **० पाडणे, काढणे, काढीत असणे, निघणे** - बारकाईने चर्चा करणे; त्याच त्याच गोष्टी फिरून बोलणे.

**कीस** स्त्री. नारळाची शेंडी. (कु.) [ सं. केश]
**कीस बाई कीस** मुलींचा एक खेळ.
**कीसार** न. शल्य.
**कीळ** न. तेज; चमक (रत्नांची); किरण; प्रभा : 'रत्नखचित मुगुटीं झळाळ। नाना सुरंग फांकती कीळ।' - मइसा १.२.१४.[ सं. किला = ज्योत]
**कीळ** स्त्री. अंबर. (गो.)
**कु** उपसर्ग. वाईटपणा दाखविणारे, अपकर्ष सुचविणारे अव्यय. हे समासात नामांच्या पूर्वी योजतात : 'आणि कुकर्मी संगति न व्हावी।' - ज्ञा २.२६६.[सं.]
**कु** स्त्री. पृथ्वी. (समासात) कुगती = पृथ्वीची गती, कुज्या = पृथ्वीच्या परिघ खंडाची ज्या. [सं.]
**कुआ** पु. विहीर. [हिं.]
**कुआड** स्त्री. (ताल) कोणत्याही तालाच्या आडीची केलेली दीडपट : 'आड, कुआड इत्यादी लयीचे अनेक प्रकार' -मानु २१८.
**कुआडा** पु. वैर; भांडण : 'विज्ञानबळें उगविती कुआडे।' - रुस्व ११७.
**कुआर** पहा : **कुवार**
**कुइजट** वि. कुजलेले : 'बहुत दिवसांचें पात्रसाधन। झालें होतें कुइजटपण।' - नव २४. २५.
**कुइटार** न. १. गवताच्या, माडाच्या वगैरे शाकारणीसाठी विणलेल्या झावळ्या. २. जुने छप्पर.
वि. वरील झावळ्यांनी शाकारलेले. (को.)
**कुइरा-री** पु. स्त्री. कोवळा फणस; कैरी; कोवळा-कच्चा आंबा. (को.)
**कुइरी-रे** स्त्री. १. खाज उत्पन्न करणारी एक वनस्पती व तिची शेंग. हिच्या खाजरी व गोडी अशा दोन जाती आहेत.
**कुइरी** स्त्री. शिरपेचाची कलगी.
**कुइला** पु. १. खाजकुयली. हिची शेंग गाई, म्हशी यांच्या वासरांना जंतावर उपयोगी आहे. शेंगेवरील कुसे गुळात घालून माणसांनाही जंतावर औषध म्हणून देतात. २. लहान मुलांच्या गळ्यातील एक दागिना.
**कुइली** स्त्री. १. पहा : **कुइरी** २. २. एक रानभाजी.
**कुई** स्त्री. १. कोल्ह्याची हुकी; कोल्ह्याची आरडाओरड; कोल्हेकुई. २. माणसांची आरोळी, आरडाओरड; कर्कश आवाज. (क्रि. घालणे.) : 'गनीम आला रे आला अशी एकच कुई होऊन जो तो घाबरेपणाने आपली हत्यारें व पोशाक गोळा करू लागला.' - पप. ३. ससा, खार यांचा आवाज.[ध्व.] (वा.) **कुईकुई करणे** - १. कर्कश गलबला करणे; आरोळी मारणे. २. मुलांचे आनंदाने ओरडणे. ३. कुत्र्याने कुई कुई असा केविलवाणा आवाज करणे. (कु.)
**कुईक** स्त्री. दृष्ट (क्रि. लागणे). (अहि.)
**कुईट** न. १. नारळाच्या विणलेल्या झावळ्या; गवत. (को.) २. वेत.
**कुईट** वि. १. खोबरे किंवा धान्य सरदल्यामुळे किंवा कुजल्याने त्याला येणारी घाण; अजीर्णाची घाण. २. (ल.) एखाद्याचा दोष मनात ठेवून तो प्रसंगी काढायचा अशा कुत्सित स्वभावाचा (माणूस); कुत्सित व मर्मभेदक (भाषण). [सं. कुथ् = कुजणे]
**कुउडी** स्त्री. घार. (भि.)

**कुक, कुंक** स्त्री. कोंबड्याचे आरवणे. [ध्व.]
**कुक(कु)डसॉ** पु. कोंबड्याच्या अंगावरील एक किडा. (गो.) [सं. कुक्कुट]
**कुकडा** पु. कोंबडा. [सं. कुक्कुट]
**कुकडी** स्त्री. १. जनावरांचे ढुंगण. २. महारांचा एक हक्क. पहा : **थिवकुकडी**
**कुकडी-डे** स्त्री. चातीवरील सुताची गुंडी. [ क. कुक्कडि]
**कुकडी माकडी** कुंभारीण माशीएवढी एक हिरव्या रंगाची माशी.
**कुकडे** क्रिवि. कोणीकडे. (खा. व.)
**कुकडे** न. जनावरांच्या तोंडाला होणारा रोग. या रोगात जिभेला मोठा फोड येतो.
**कुकडेकु** न. १. लहान मुलांच्या खेळातील शब्द; लपंडावात सर्व मुले लपल्यावर ज्यावर हार असेल त्याला सूचनेकरिता करायचा शब्द. २. कोंबड्याचे आरवणे. ३. (ल.) पोकळ बढाई. [ध्व.]
**कु(कुं)कणे** अक्रि. १. कोंबड्याचे आरवणे; केकाटणे : 'वृक जंबुक नगरा आत। दिवसां चौंबारा कुंकात।' - एभा ६. २८४. २. डुकराचे ओरडणे. [ध्व.]
**कुकर, कुक्कुर** पु. कुत्रा : 'म्हणें मी कुकर म्हणोनि भुंके।' - एभा २१. २२५. [सं. कुक्कुर]
**कुकर** पु. एका वेळी एक किंवा त्यापेक्षा अधिक पदार्थ वाफेच्या दाबाने शिजवण्यासाठी असलेले स्वयंपाकाचे साधन. [इं.]
**कुकरचाल** स्त्री. घोडा किंवा कुत्रा यांची दुडकी चाल. [हिं.]
**कुकरणे** सक्रि. निंदा करणे. [सं. कु + कृ]
**कुकरी** स्त्री. नेपाळातील गुरख्यांचे लहान तरवारीसारखे एक हत्यार. [हिं. कुकरी]
**कुकर्म** न. चोरी, चहाडी, व्यभिचार इ. वाईट काम; पाप; अपराध.[सं.]
**कुकवाकू** पु. मोर (पक्षी). [सं. कुकवाकू]
**कुकसा** पु. लाखेच्या देठाचे चूर्ण. (झाडी) [सं. कुकूल]
**कुका** पु. १. (बायकी) गर्भाधानाच्या दिवशी जिचे गर्भाधान व्हायचे तिच्याकडून भोवतालच्या स्त्रिया भर्त्याची पूजा करणे, विड्या तोडणे इ. क्रिया करवून घेतात त्यास कुका म्हणतात. (को.) २. वयाने मोठा पण पोरकट माणूस (राजा.)
**कुकाट** न. कोंबडा. (कु.)
**कु(कुं)काणे** अक्रि. कोकलणे; ओरडणे : 'आडवाचि उडे मग कुकाता।' - निगा ३०; 'भुंकती गाढव कुंकाति डुकर।' - दावि ३५८. [ध्व.]
**कुकाम** न. कुंकू. (कु.)
**कुकारणे** उक्रि. मोठ्याने ओरडणे; हाका मारणे; हाका मारून बोलाविणे; हाकारणे; कोकलणे. [ध्व.]
**कुकारा** पु. आरोळी; ओरड; साद; ललकारी (क्रि. करणे, मारणे, घालणे): 'घाला घाला रे कुकारे।' - तुगा २३१. (कु. कुकारो). [ध्व.]
**कुकुकु, कुकुचकू** पु. कोंबड्याचे ओरडणे. [ध्व.]
**कुकुची** स्त्री. दूधमोगरा म्हणून ओळखला जाणारा एक प्रकारचा जोंधळा,

ज्वारी, कुचकुची.

**कुकुचीकाई** स्त्री. लहान मुलांचा एक खेळ. (कर.)

**कुकुट** पु. कोंबडा. [सं. कुकुट]

**कुकुटकुंभा, कुकुडकुं(कों)भा, कुक्कु (ट)डकुंभा** पु. भारद्वाज पक्षी; देवकावळा; सोनकावळा. हा रंगाने काळा असून याचे पंख तांबूस काळ्या रंगाचे असतात : 'कुकडकुंभा (भारद्वाज पक्षी) आपल्या खड्या स्वराने तेथील एकतानतेचा भंग करीत होता.' - पडघ १९.

**कुकु(क्कु)टाग्नि-ग्नी** पु. अत्यंत प्रखर जठराग्नी. (कोंबडा चुनखडीचे खडे खाऊन पचवितो यावरून.) [सं.]

**कुकुडा** पु. कोंबडा.

**कुकुत-ड** स्त्री. बैलाचे वशिंड. [सं. ककुद]

**कुकुथा** नृत्याचे बोल.

**कुकुथारी** स्त्री. गळ्यातील घंटा.

**कुकुबाळ** पु. न. १. लहान मूल. २. पहा : **कुका** २

**कुकुभ** पु. (संगीत) गायनशास्त्रातील बिलावलाचा एक प्रकार; एक राग, गानसमय दिवसाचा पहिला प्रहर.

**कुकुरडा** पु. कोंबड्याच्या अंगावर पिसवा पडून होणारा रोग. (कु.)

**कुकुला-ली-ले** वि. लहान बाळ; छकुला, छकुली, छकुले.

**कुकूडरांजी** स्त्री. एक झुडूप. (झाडी)

**कुकूणक** पु. दुधाच्या दोषामुळे मुलांच्या डोळ्यांना होणारा एक रोग. याने डोळे खाजतात व त्यांतून पाणी येते, डोळे उघडता येत नाहीत. [सं.]

**कुकूम** न. कुंकू. (गो.)

**कुकूसकोंडा** पु. क्षुल्लक साहित्य. (झाडी)

**कुकोबा** पु. बायक्या; पोरकट माणूस; मेषपात्र; भोलानाथ; अजागळ.

**कुक्कुट** पु. कोंबडा (पाळलेला अथवा रानटी). [सं.]

**कुक्कुटासन** न. १. योगशास्त्रातील एक आसन. २. (मल्लखांब) दोन्ही हात बोंडावर ठेवून पाय वर उचलून केलेले आसन.

**कुखावर्त** वि. दोन्ही कुशीवर केसांचे भोवरे असणारा (घोडा). हे शुभ लक्षण समजतात. - अश्वप १. ९४. [सं. कुक्षि + आवर्त]

**कुखी** स्त्री. कुस. 'भाऊ नि बहीन एका भाकरीना काला। दोनीना जलम एका कुखीमधी जाला।' - लोकशब्द ६६.

**कुगणे** अक्रि. ओरडणे; कुकारा घालणे; हाक मारणे : 'त्याबरोबरच कुगतही होते.' - वारी १३०. (बे.) [ ध्व.]

**कुगला** पु. कोवळा फणस.

**कु(कुं)गार** न. भिक्षेकऱ्यांचा तांडा, जमाव.

वि. गरीब; कंगाल; क्षुद्र (माणूस, गाव); लढाईला निरुपयोगी असा : 'बदसुरत कुगार असिल्या तरी घरिच्या पोरग्या द्यावयासी कोणी रजाबंद होत नाही.' - पेद ८. ३६. [कु = वाईट + कार-गार]

**कुगाडी** स्त्री. (लहान मुलांचा शब्द) आगगाडी.

**कुग्राम** पु. आडगाव; खेडे; वाटसरूंची जेथे गरज भागत नाही व जेथे अग्निहोत्री, वैद्य, सावकार, नदीही नाहीत असे खेडे : 'ग्राम कुग्राम पुऱ्या अग्रहारे।' - आपू १०. [सं.]

**कुग्रामवस्ती-वास** स्त्री. पु. आडगावामध्ये राहणे; (स्थायिक) होणे. कुभोजन, कुलहीनसेवा, क्रोधमुखी भार्या व कुग्रामवस्ती या चार वाईट गोष्टी समजतात. (क्रि. करणे, काढणे, कंठणे, सोडणे) [सं.]

**कुच** पु. मोरपिसांचा कुंचला : 'चालती कुंचासी गाढिका दुकवळा मयोरांचा' - नरूस्व ७४७.

**कुच** पु. स्त्रीचा स्तन; पयोधर; थान : 'कटा रे मियां चाटिला। कुचस्वेदु॥' - ज्ञा १३. ५३९. [सं. कुच = संकोच पावणे]

**कुच** पु. नवरा; भ्रतार; कोम; मर्द : 'म्हाळसाबाई कुच मल्हार रघुनाथ आत्रे' - चंचूद १४.

**कुच** पु. अगदी बारीक अस्पष्ट आवाज. [ध्व.]

**कुच** वि. निरर्थक; निरुपयोगी. जसे :- कुचकामाचे.

**कुचकट, कुचका** पहा : **कुजका**

**कुचकणे** सक्रि. टोचणे; भोसकणे (व.).

**कुचकसणी** वि. चोळी : 'वसन आणि कुचकसणी फेडूनि।' - अमृत २४.

**कुचकामाचा, कुचकामी** वि. अगदी निरुपयोगी (निषेधार्थी षष्ठ्यंत प्रयोग); टाकाऊ : 'प्रणयी जीवनाची कल्पना प्रत्यक्ष व्यवहारात कुचकामाची असते.' - लपव ६३.

**कुचकु(कू)च** स्त्री. १. कुजबुज; हलक्या स्वराचे भाषण; अप्रगट भुमका : 'कुचकुच सखयांची अन्यथा देखियेली।' - सारुह ३. ६१. २. बाजारगप्प; अफवा. [ध्व.]

**कुचकुचणे** अक्रि. कुजबूज करणे.

**कुचकुची** स्त्री. पहा : **कुकुची**

**कुचकुचीत** वि. फार; पुष्कळ; गर्द. (गो.)

**कुचकुली** स्त्री. गुदगुली. (क्रि. करणे, होणे.) (राजा.)

**कुचडी** स्त्री. घाणेरडा बोळ, गल्ली; अडचणीची जागा; बेपट (व. ना.) [फा. कुचह् = बोळ]

**कुचणी** स्त्री. डुकराच्या केसांची कुंचली; कुंचला; कोष्ट्याची कुंचली.

**कुचणी** स्त्री. हातभर लांबीची पहार; सबल.

**कुचणे** अक्रि. आदळणे : 'दाताची पकड सुटून कुत्रा मुंडीवर कुचून उलटा झाला.' - बनगर ६५.

**कुचनिंद** वि. कुचाळ.

**कुचनिंदा-दी, कुचि(चुं)दी** स्त्री. कुचेष्टा; कुचाळ्या; व्यंगोक्ती; वाईट आरोप करणे. (क्रि. करणे.) उखाळ्यापाखाळ्या, व्यंग काढणे. कुचविधी. पहा : **कुचिंदी, कुचविंधी.** या शब्दांचा एकमेकाऐवजी जरी उपयोग करतात तरी ते अगदी समानार्थक मानलेले नाहीत. [सं. कुत्स = निंदा करणे]

**कुचबंदीचे मेढे** शत्रूच्या चालीस अडथळा आणण्याकरता उभारण्यात आलेले तात्पुरते अडथळे.

**कुचमण** स्त्री. कुचंबणा. पहा : **कुचंबण, कुचंमण-णी.** (गो.)

**कुचमणे** अक्रि. १. हालात दिवस काढणे; कसेतरी दिवस काढणे : 'कुचमत जगण्यापेक्षा मेलेलं परवडलं.' - जाण १०. २. एकदम थांबणे : 'यावर दोघाचं बोलणं कुचमलं, जिभा अवघडल्या.' - वळीव ३६.

**कुचमुचे** सक्रि. कुचंबायला लावणे. (गो.) पहा : **कुचंबणे**
अक्रि. पोटात गुरगुरणे. (गो.)
**कुचर** वि. १. कामचुकार; कपटी; बुद्धया एखादे काम वाईट रीतीने करणारा; अंगचोर : 'जैसे कां कुचर घोडे। बरें दिसे परी आडवी अडे।' - एभा १३. १३४. २. (ल.) दुर्मुखलेला; द्वेषी; खुनशी. ३. त्रास देणारा; लुच्चा; वाईट. ४. खडतर, खडकाळ. खचरट मार्ग; ५. दुर्बोध (लिखाण); गिचमिड (पुस्तक). [सं. कु + चर]
**कुचर** पु. न. चाड; धान्यातील न शिजणारा, न कांडता येणारा दाणा.
**कुचर** पु. बटाटा जमिनीत तयार होत असताना त्यावरील माती निघून तो उघडा पडल्यामुळे हिरवा होणे.
**कुचराई** स्त्री. अंगचोरपणा; अप्रामाणिकपणा; टंगळमंगळ; अळंटळं; (काम, धंदा, व्यापार, यत्न यांमध्ये) कसबचोरपणा.
**कुचलणे** उक्रि. १. ओबडधोबड रीतीने पीठ करणे; भरडा करणे; फोडणे; चिरडणे. २. मारणे; ठोकणे; ठेचणे; चेचणे; सडकणे.
**कुचला** पु. संधला : 'विरलेल्या फकीच्या चुन्यात समभाग विटेची पूड घालून कुचला तयार करावा.' - मॅरट ११३०.
**कुचला** पु. काजरा; कोकणात होणारे एक मोठे झाड. याच्या बिया कडू असून विषारी असतात. 'त्यजुनि सहकार पिकला पिक लाजेना वरावया कुचला।' - मोसभा २. ४९.
**कुचलिन** न. स्ट्रिक्नीन; एक महत्त्वाचे अल्कलाइड; कुचल्याचा अर्क.
**कुचली** स्त्री. कुचल्याची बी.
**कुचले** पु. अव. वाजंत्री लोक : 'तो भोग कुचले म्हणजे वाजंत्री लोक वाटून घेतात.' - मातीर्थ २. ७७.
**कुचविंधी-ध्या, कुचविद्या कुचिंदी-धा** स्त्री. चीड येण्याजोग्या भाषणाने काढलेली खरडपट्टी; उपहास; टवाळी; टर; हेटाळणी; व्यंग काढणे (क्रि. करणे). पहा : **कुचंदी, कुचनिंदा**
**कुचंडा** वि. चिक्कू; कृपण. (माण.)
**कुचंदन** न. रक्तचंदन.
**कुचंदा** पु. कारस्थान; गुप्त मसलत. [हिं.]
**कुचंद्या** स्त्री. अव. खोड्या; कळ. (व.)
**कुचंबण-णा-न, कुचंमण-णी** स्त्री. १. रोग इ. कारणांनी आलेली कष्टप्रद अवस्था; दुःखाची व पराधीनतेची स्थिती : 'ते परिमळ पालवी साहे कुचंबनें। श्रीचक्रधरांचे।' - शिव ६९०. २. त्रासदायक स्थिती; खोळंबा; अटकाव; पंचाईत. [सं. कुच = संकोच पावणे]
**कुचंबणा** स्त्री. गैरसोय; मोकळेपणाने वागता न येणे; पंचाईत.
**कुचंबणे, कुचमणे** अक्रि. १. दुःखात किंवा पराधीन स्थितीत तळमळणे; संकोचणे. २. त्रासदायक अडचणीत पडणे, येणे; लादलेला त्रास, अटकाव यापासून दुःख होणे; त्रास, खोटी होणे; आडकाठी येणे; अडचणीतून सुटका न होता दुःखात काही काळ काढावा लागणे. ३. कोमेजणे. ४. चुरडणे; चुरगळणे : 'कां कमळांवरी भ्रमर। पाय ठेवती हळुवार। कुचंबैल केसर। इया शंका॥' - ज्ञा १३. २४८. ५. थबकणे; थांबून राहणे : 'लाजलेले राजे क्षणभर कुचंबले.' - श्रीयो १. ११९. ६. अडचणीतून बाहेर पडता न येणे; अगतिक होणे; काय करावे ते न सुचणे : 'पण या परिस्थितीच्या त्रासानं, शनीच्या फेऱ्यानं तो देखील कुचंबला होता.' - व्यंमाक ७४. ७. खुपणे; बोचणे : 'कैसें सुकुमार रूपडे : पांतां दिठी कुचंबैल फुडे.' - नरुस्व ९९.
**कुचा** पु. १ खराब झालेली जरतार. २. चोथा.
**कुचा-च्या** पु. १. खोचा; पोचा; किंचित खळगा; लहान भोक (भोवरे खेळताना भोवऱ्यांनी पाडलेले.) (क्रि. मारणे). २. अंगठ्याजवळच्या बोटाने मारलेला टचका. (वा.) **कुचे मारणे** – वादविवादात टोमणा मारणे.
**कुचाडन** पु. फजिती (झाडी.). [सं. कुच्छापनम]
**कुचाला** पु. कारस्थान; ढवळाढवळ; वाईट शिकवण.
**कुचाळ, कुचाळका** वि. कुचाळी करणारा.
**कुचाळकी, कुचाळा-ळी** स्त्री. पु. स्त्री. टवाळकी; थट्टा. पहा : **कुचविंधी** : 'करूनि कुचाळा कोप तसा।' - आगो २३.[सं. कुचाल]
**कुचाळखोर** वि. कुचेष्टा करणारा; खोडकर; खट्याळ; त्रासदायक; निंदक; टवाळी करणारा. [सं. कुचाल]
**कुचाळॉ** पु. निंदा; मस्करी; खोडी. (गो.)
वि. कुचाळी, निंदा करणारा. (गो.)
**कुचाळ्या** वि. वाईट आचरणाचा,चालीचा : 'तिचा तो महिपती मोठा कुचाळ्या आहे.' - सरु ४८.
**कुचि** पहा : **कुची**
**कुचित** न. कुचोद्योग; फितुरी; कारस्थान : 'सारांश कुचितास कोणी चुकत नाहींत व सुमंताचा विश्वास नाहीं.' - पेद १०.८३.
**कुचित** वि. कुश्चित; वाईट : 'ते (बायको) कुचिता वासना आली :' - लीचउ ४२२.
**कुचितखोर-पात्र** वि. कुचेष्टेखोर. पहा : **कुचिंद** [सं. कुत्सित]
**कुचिद-दा-द्या, कुचिदखोर, कुचनिंद** वि. कुचाळी करणारा; निंदक; खोडकर; बेअब्रू करणारा; टवाळ.
**कुचिदी, कुचुंदी** स्त्री. आळ; निंदा; बदनामी; उखाळ्यापाखाळ्या.
**कुचि(चिं)द्या** स्त्री. हेटाळणी; टवाळी; आळ (विशेषंतः लहान मुलांत रूढ).
**कुचिधा** पु. १. फंद; फितूर. २. भानगड : 'त्या कुचिधात पडत नाही.' - पेद ८. ८४.
**कुचिपुडी** न. एक प्रकारचे दक्षिण भारतीय नृत्य.
**कुचिळ** न. मळके वस्त्र : 'विरालीं कुचिळें।' - उगी १९२.
**कुचिंदर** न. अडगळ; गर्दी; अस्ताव्यस्त पडलेल्या वस्तू.
**कुचिंधन** वि. कुश्चळ; घाणेरडा; मलिन : 'पाखरुं, राजहंसा पिता पाणी निचंतीनं कावळ्या कुचिंधन। दिलें तळं टहूळून।' - वलो ११९. (व.)
**कुची** स्त्री. किल्ली : 'मुक्तीचा दारवठा। उघडावेआं कुचिआ बकटा।' - शिव ४२०. [हिं. कुंजि]
**कुची** स्त्री. कपट; लबाडी; गडबड; चेष्टा; खोटी, दिखाऊ कुचेष्टा : '...

त्यांस लिहोन त्यांचा अमल चाले आणि नालीस कुची न करीत ते गोष्टी करणे.' - पेद १८. १८.(वा.)० **भरणे** - ठोकणे; मारणे. (व.)[ध्व.]

**कुची** स्त्री. कुंची. (व.)

**कुची** स्त्री. झाडू : 'कुची हाती घेउनि झाडितु आसे' - पंचो १३.१०.

**कुचीत** वि. विपरीत; वाईट; पापी : 'तीये कुचीत वासना आली।' - लीचउ २१९.

**कुचुडना** पु. अरुंद जागा. (झाडी) [सं. कुच, फा. कुचाह.]

**कुचुंबणे** अक्रि. कोमजणे : 'कीं शिरसफूल अरुवार क्षणमात्रें कुचुंबी।' - हरि २. १३५. [सं. कुच = संकोच पावणे]

**कुचुंबणे** उक्रि. चुरगळणे; चिरडणे : 'कुचुंबैल केसर। इया शंका॥' - ज्ञा १३. २४८.

**कुचूमुचू** स्त्री. १. कंजूषपणा. २. टाळाटाळ. ३. गर्दी. (झाडी)

**कुचेदा, कुचैद** पु. कारस्थान; मसलत. [हिं.]

**कुचेदार** वि. लबाड; कपटी; शठ; ठक; फसवे : 'शामळ लोक परम कुचेदार, किल्ल्याचा बंदोबस्त ठेवून महाराजाचे लोकांशी तोंड न देतां मुलूखास फार तसदी दिल्ही.' - शामव भारतवर्ष ५९.

**कुचेष्ट(ष्टे)खोर, कुचिष्ट** वि. टवाळखोर; कुचेष्टा करणारा; कुटाळकी करणारा. [सं. कु + चेष्ट]

**कुचेष्टा, कुचोदी** स्त्री. टवाळी; टिंगल; कुचाळी; विडंबन; निंदा; थट्टा. [सं. कुचेष्टा]

**कुचो** पु. झाडाचा शेंडा. (गो.) पहा : **कुंचा**

**कुचोद** न. फितुरी; कारस्थान : 'सर्व कुचोद विठ्ठल सिवदेऊ याचे.' - पेद ४०. १३.

**कुचोद्य** न. १. भेदे; फितुरी : 'घरांत बाहेर कुचोद्य फार याजमुळे नेट लागून कार्यसिधी लौकर होत नाही.' - ऐसंसाखं ७. १६. २. कुचेष्टा. (क्रि. करणे.) ३. विकल्प; कुकल्पना; वाईट विचार. (क्रि. काढणे.) ४. कुभांडी स्वभाव; कुटिल वृत्ती. ५. कपट; कुकर्म; कारस्थान.(वा.)**कुच्चे खात जाऊ देणे** - उडत जाऊ देणे; पर्वा नसणे : 'नाहीं मिळालं तर जाऊ दे कुच्चे खात.' - पेरणी २७.

**कुचोद्याचे पाखरू** कुचेष्टेखोर.

**कुचोद्योग** पु. वायफळ उद्योग; नको त्या उचापती, भानगडी इ.

**कुच्चा** पहा : **कुचा**

**कुच्चा** पु. चोथा : 'नंतर तो कुच्चा भांड्यात घालून...' - फचि ३०.

**कुच्चा-च्ची** पु. स्त्री. विणकऱ्यांचा कुंचला : (कर.) : 'सनगर लोकास्नी पाजणी करायला कुच्चे लागतात ते करतो आमी.' - वामा ६६.

**कुच्ची** स्त्री. पायाची ढोणशीर.

**कुच्ची** स्त्री. किल्ली.

**कुच्छ रोटी, कुच्छ लंगोटी** काही तरी अन्न आहे, काही तरी वस्त्र आहे अशी स्थिती; अतिशय बिकट परिस्थिती; दारिद्र्यावस्था. [हिं.]

**कुच्डी** स्त्री. अरुंद बोळ. (झाडी) [फा. कुचाह]

**कुच्या** स्त्री. १. (पाडणे या क्रियापदाशी जोडून) तुकडे करणे; खांडोळी करणे. २. जबर शिक्षा करणे; यथेच्छ कुटणे, या अर्थाने कुच्या ढिल्या करणे. ३. (तोडणे क्रियापदास जोडून) (घोड्याच्या) मांडीच्या किंवा घोट्याच्या शिरा तोडणे. ४. ठोका; ठोसा : 'तुका म्हणे आतां लाज धरी बुच्या। टांचराच्या कुच्या मारा वेगीं॥' - तुका २९५१.

**कुच्यानिंद्या** स्त्री. चहाळी; निंदा; चेष्टा. (झाडी) [सं. कुत्सनिंदा]

**कुज** न. क्षितिज. [सं.]

**कुज** पु. मंगळ (ग्रह). [सं.]

**कुजकट, कुजट, कुईट** वि. नासकट; वाशेरा; घुरट; नासलेला (पदार्थ).

**कुजकटाण, कुजटाण** स्त्री. कुजलेल्या पदार्थाची दमट घाण, दुर्गंधी.

**कुज(च)का** वि. १. कुजलेला; सडका; नासका. २. (ल.) विश्वासघातकी; खोटा; कुत्सित; कपटी. [सं कुथ = कुजणे]

**कुजका कवंडळ** (ल.) कुजक्या मनाचा; तिरसट; मत्सरी; खुनशी.

**कुजकानासका** वि. घाणेरडा; निरुपयोगी; खराब झालेला.

**कुजटे** वि. कुजलेले; शक्तिहीन.

**कुजडा** वि. मनाचा कुजकट; मत्सरी; खुनशी.

**कुजडा** पु. बागवान : '... कुजडे म्हणजे बागवान याजपाशी पैशाची वांगी घेतली।' - मदरू १. ५६.

**कुजण** न. कुजणे : 'कुजण म्हणजे झाडपाला आणि शवे कुजून फुसफुशीत झालेली माती.' - वनश्री ३१.

**कुजणे** अक्रि. १. खराब होणे; सडणे; नासणे. २. (सोंगट्यांचा डाव) जूग न उठल्यामुळे, सही न झाल्यामुळे व कच्च्या फिरून आल्यामुळे पडलेले दान सोंगट्यांना लावता येत नाही अशी स्थिती. ३. बुद्धिमत्ता, गुण इ. चांगल्या गोष्टी जवळ असतानाही योग्य संधीच्या अभावी त्या व्यर्थ किंवा फुकट जाणे. पहा : **कुजी** [सं. कुथ]

**कुजन** पु. वाईट स्वभावाचा माणूस; दुर्जन; नीच मनुष्य : 'न निश्चय कधी ढळो कुजनविघ्न बाधा टळो।' - केका ११९. [सं.]

**कुजपंचमी** स्त्री. शुद्ध पक्षात मंगळवारी आलेली पंचमी. ही अशुभ मानतात. [सं.]

**कुजबुज** स्त्री. कुणकुण; हळूहळू बोलणे; अफवा; कंडी. [कुजचे द्वि.]

**कुजबुजणे** अक्रि. हळूहळू बोलणे; कुचकुचणे; पुटपुटणे.

**कुजरसार** स्त्री. ख्रिश्चन धर्माची दीक्षा देताना-पाणी शिंपडण्याची क्रिया : '... कुजरसार करून बाटवीत नाहीत.' - इसंपेदसपमा २६२.

**कुजवार** पु. कुज्यवार; मंगळवार. कु म्हणजे पृथ्वी. तिच्यापासून जन्मलेला.

**कुजष्टाण** स्त्री. कुजकट घाण; सडलेल्या पदार्थाची घाण.

**कुजस्तंभ** पु. १. (अप. कुचस्तंभ) मंगळाची आपल्या कक्षेतील एखाद्या नक्षत्रात स्थिरता. या अवस्थेत मंगळाचे बल कमी प्रतीचे असते. २. ज्योतिषविषयातील एक उपयुक्त योग. (लौकिकदर्शक.) [सं.]

**कुजं(जां)त्र** न. १. प्राणघातक यंत्र : 'मग पांता घातैली कुजांत्रें।' - शिव ८०१. २. चेटूक; कौटाळ : 'वैरियाचेया कुजंत्रा हवना तव उदेला' - वैवसं २४.

**कुजा-ज्या** पु. खुजा; पाण्याचे मातीचे भांडे; सुरई. [फा. कुजाह]

**कुजांतर-रू** न. कुयाडे; चेटूक; जादू. पहा : **कुजंत्र** : 'कुजांतरू नाहीं ऐसें। जेणें या पुसे यांची दांतिखिळी बैसे।'-शिव ८४४. [सं. कु + यंत्र]

**कुजी** स्त्री. १. (बुद्धिबळाचा खेळ) राजास प्रतिपक्षीय मोहऱ्याचा प्रत्यक्ष शह तर नाही,पण शहावाचून मोकळ्या जागी खेळावे म्हटले तर तसे घर मोकळे नाही, अशी बिनतोड आपत्ती येऊन डाव अडणे. या डावास बरोबरी मानतात. २. (सोंगट्यांचा खेळ) सोंगटी खेळायला जागा नाहीशी होणे.

**कुज्या** स्त्री.(ज्यो.) ताऱ्याचा क्रांतिवृत्ताशी जो कोन होतो त्याची ज्या. [सं.]

**कुझामिसरी साखर** खडीसाखरेचा एक प्रकार.

**कुट** पु. बारीक काडी इ. मोडताना होणारा आवाज : 'त्याची हाडे कुटकुट वाजली.' - वर्षा १०४. [ध्व.]

**कुट** पु. एक झाड (कुटकी, कुडा) : 'मंजरामल बकुल बिल्व कुट अशोक चंदन जाती।' - नगंन ४३२.

**कुट** न. धान्यरूपाने द्यायचा हुंडा. (को.)

**कुट** स्त्री. हळकुंड; खुंटली; कुडे. (गो.)

**कुट** पु. बिझिक खेळातील ४ एक्के, ४ राजे इ. मार्कांचे संच.

**कुटकथा** स्त्री. (धर्मप्रतिबंधक गोष्टी) वाईट गोष्ट : 'त्रिकूटकुटकथा नाहि देहीं कहींचि' - गरा २४८.

**कुटकरणे** सक्रि. तुकडे तुकडे करणे : 'हे वस्त्र दगडावरी कुटकरूनि रोवा' - गोप्र ३५.

**कुटका-की** पु. तुकडा; मोडलेला कटका (काठी, भाकर, नारळ, दोरी इ.चा) : 'कां पाषाणाचिया माथां। हांडी फुटली पार्था। जीवीं तैसे सर्वथा। कुटके जाले॥' - ज्ञा १६. ३६८. (वा.) ० **तोडून देणे** - स्पष्ट नाही म्हणून सांगणे; निक्षून नाकारणे.

**कुटकाभर** वि. लहान : 'पण कुटकाभर लेकरू आहे तुमच्यामागे.' - बाविबु १०.

**कुटकी** स्त्री. हिमालयावर ९ ते १५ हजार फूट उंचीवर वाढणारी एक औषधी वनस्पती. [सं. कटुका]

**कुटकी** स्त्री. लाकडी ढलपी; तुकडा; काटकी. (को.) [सं. कुट्ट = कापणे]

**कुटकी बैठक** बैठक मारून एक पाय क्रमाने वर मग दुसरा असे करून पायांची अदलाबदल करणे.

**कुटकुट** न. अपचन झाले असताना पोटात होणारा आवाज. [ध्व.]

**कुटकुटीत** वि. १. पूर्ण न शिजलेला. २. बारीक पण सुदृढ शरीरयष्टीचा. (गो.)

**कुटके** वि. १. तुटलेले. २. कुजके : 'सिळें वाळलें कुटकें (अन्न)' - चोखा (स.) १११.

**कुटज** न. कुड्याचे झाड : 'हें मोठें नवल अहो लाजविला पारिजात कीं कुटजें।' - मोआदि ३२.७. [सं.]

**कुटण** न. (ल.) ठोक; मार; हग्या मार. (क्रि. काढणे, निघणे.) [सं. कुट्ट = कुटणे]

**कुटणी** स्त्री. 'इतर बायकोस इतर पुरुषासी गांठे घालणारी.' (तंजा.) पहा कुंटण

**कुटणे** अक्रि. दुःख मानणे; कुढणे : 'हर्षे द्रोण न कोपे पुत्रोत्कर्षे कुटे न कुटिताहि।' - मोद्रोण. [सं. कूट]

**कुटणे** उक्रि. १. चेचणे; चेचून बारीक करणे; पूड करणे : 'दांभिकता ही हळदी कुटा।' - मुआदि १. ६५. काढणे; सोडणे. २. (ल.) ठोकणे; पिटणे; मार देणे : 'कुटिल प्रजाहि जो गोपीडक तो ब्राह्मणा न कां कुटिल।' - मोविराट २. ५. ३. (ल.) एखाद्या विषयाची सूक्ष्म छाननी करणे; अतिशय चर्चा करणे. ४. (टाळ) वाजविणे : 'तूं कुटतोस कीं नाहीं रोज टाळ।' - नामना ६६. ५. (ल.) बलात्काराने संभोग करणे. [क. कुटुक] [सं. कुट्ट = कुटणे]

**कुटणे** सक्रि. (तबला, पेटी इ.) जोरजोराने वाजविणे; (पत्ते इ.) एकसारखे खेळणे.

**कुटणो** पु. लोखंडी बत्ता (कुटण्याचा). (कु.)

**कुट-कुटरा तांदूळ** पु. अव. सडताना कण्या होणारे तांदूळ; कण्या.

**कुटतुम** पु. काटकोन; गुण्या. (कु.)

**कुटन** न. दोन चऱ्हाटांच्या जोडावर बांधलेले लाकूड. (व.)

**कुटन** स्त्री. १. मध्यस्थ. २. कुंटीण. ३. दोराचा सांधा. ४. चिलमीचा खडा. ५. पाण्याचा बांध. (झाडी)

**कुटला** पु. भाकरी करण्यासाठी तांदूळाचे पीठ करण्याकरिता केलेल्या कण्या, कुंडा. (राजा.)

**कुटलेश्वर** पु. कुटलाचा, अंगठ्याच्या पेराचा फटका. (गो.)

**कुटस्त-स्थ** वि. गुप्त; ब्रह्मस्वरूप : 'कुटस्थ म्हणिपे अक्षर : कैवल्यरूप' - वह ४२७.

**कुटळ** वि. ठोकळ. (व.)

**कुटा** पु. १. लाह्याचे पीठ. २. वाळलेल्या मासळीच्या कुटीचा भुगा. ३. फणसाच्या आठळीत मीठ, तिखट घालून केलेला भुगा, पूड. (राजा.) ४. पूड; भुकटी. ५.कारळे-तिळांची कुटून केलेली चटणी.

**कुटा** वि. खोटा; कृत्रिम.

**कुटाई** स्त्री. १. कुटण्याबद्दलची मजुरी. २. कुटण्याची क्रिया.

**कुटाकुटी, कुटाकूट** स्त्री. १. ठोकाठोकी; मारामारी; लठ्ठालठ्ठी : 'मीपणा होऊन कुटाकुटी।' - दावि २८८. २. वादविवाद; काथ्याकूट; बाचाबाची. ३. (सोंगट्या) मन लावून खेळणे; एकसारखे खेळणे; त्यात दंग होणे (उपहासाने).

**कुटाणा** पु. त्रासदायक खटाटोप; अनेक उद्योगांचा एकदम अंगावर पडलेला बोजा; त्रास. (को., कर.)

**कुटार** न. १. धान्य काढलेल्या कणसांचा चुरलेला भाग (यात शेंगांची टरफले, झाडांचा पाला, वेलाचे तुकडे मिसळलेले असतात.); कूट. (खा. व.) २. पीक काढून झाल्यावर शेतात उरणारा पाला-पाचोळा.

**कुटारे** न. कट्यार.

**कुटासी** स्त्री. मळणीतील अवशिष्ट गवत. (झाडी)

**कुटाळ, कुटाळखोर** वि. १. कुटाळकी करणारा; निंदक; बेअब्रू करणारा; उपहास, टवाळी करणारा; कुचेष्टेखोर. २. हीन : 'काढले कुटाळ वासना बरळ' - सोपान १४.

**कुटाळकी, कुटाळी** स्त्री. कुचाळी; कुचेष्टा; बेअब्रू.

**कुटाळखोरी, कुटाळगिरी** स्त्री. कुटाळकी. (कुण.)

**कुटि, कुटिका** स्त्री. झोपडी : 'आल्या मोडकळीला कुटिका तुरळक

कुठें कुठें असती ।' - उगी ६१३. [सं. कुटी]

**कुटिल** वि. १. वाकडे; वक्र. २. (ल.) दुष्ट; निंदक. (समासात) कुटिलदृष्टी, कुटिलभाषण, कुटिलस्वभाव : 'तूं मलिन कुटिल नीरस जडहि पुनर्भवपणेहि कच साचा' - मोकचोपाख्यान ५७. ३. अपकारी; द्वेषी; खोडकर; मत्सरी; हीन. ४. कुरळे (केस) : 'आइकें कुटिलालमस्तका । धनुर्वेद त्र्यंबका ।' - ज्ञा १०. २१५. [सं.]

**कुटिलदेह** पु. वाकडे शरीर; काही खोड, व्यंग असलेले दोषयुक्त शरीर.

**कुटिलनीति-ती** स्त्री. लबाडीचे धोरण; बाहेरून मैत्री दाखविण्याचे राजकारण. [सं.]

**कुटी** स्त्री. झोपडी; (सामा.) पर्णकुटी, लताकुटी : 'आणि मनसर्पाची कुटी।' - ज्ञा १६. २४३.

**कुटी** स्त्री. १. वाळलेल्या मासळीची पूड. २. कूट; चुरा. ३. (ल.) (विनोदाने) ठोकणे; मारणे (विद्यार्थ्यांत रूढ). (क्रि. करणे.).

**कुटी** स्त्री. निंदेचे भाषण; निंदा; आळ; दोषारोप : 'तर अंगा ये कुटी कवणाचिया।' - उगी ६१३.

वि. कपटी; कृत्रिम : 'तों कुटी खगतनू जडावली।' - आशिवि ३२. [सं. कुट = वाकडे होणे]

**कुटी** स्त्री. १. खोटी खोटी गोष्ट; भास : 'तरि ते आंगा ये कुटि कवणाचेया।' - उगी ६१३. २. लोकापवाद. [सं. कूट]

**कुटीच** वि. ज्ञान नसणारा; ध्यान न करणारा; कर्माचा त्याग करून केवळ अन्नासाठी गावात राहणारा.

**कुटीचक** पु. संन्यासी : 'कर्म त्यागोनि झाला संन्यासी। ज्ञानध्यान नाहीं मानसीं। अन्नालागीं स्वग्रामवासीं। कुटीचक तयासी बोलिजे।' - एभा १८. १७७. [सं. कुटी = झोपडी]

**कुटीचे बोट** निंदेचा डाग : 'रूपसा उदयलें कुष्ट। संभावितां कुटीचें बोट।' - ज्ञा १६. १७८.

**कुटीमेटी** स्त्री. घरदार : 'अंतरली कुटीमेटी । भय धरूनियां पोटी ।' - तुगा १२१९.

**कुटीर** न. झोपडी; लहान घर. [सं.]

**कुटीर उद्योग** पु. खेड्यात लहान प्रमाणावर घरीच करता येण्यासारखा धंदा. (कोंबड्या पाळणे, मधमाशा पाळणे, सूत कातणे इ.)

**कुटीरक** न. खड्गाचा एक प्रकार. [सं.]

**कुटीशास्त्र** न. पेशिकाविज्ञान (सायटॉलॉजी) (वैद्यक डि. १९३५)

**कुटुबी** वि. जाडेभरडे : 'पुढे ठेवोनिया पान। वाढी कुटुबी ते अन्न।' - सोबागा १.

**कुटुऱ्याची चोळी** विशिष्ट प्रकारची, घट्ट बसणारी, उठावदार तंग चोळी. (गो.)

**कुटुंब** न. १. घरातील माणसे; परिवार; खटलेः 'जैसें स्वप्निं परिव्राजे। आपणापेयां कुटुंब होइजे ।' - राज्ञा १५.३२१. २. घरधनीण. ३. सामान्यत:, पत्नी, बायको. [सं.]

**कुटुंबक(का)बाडी** वि. १. कुटुंबाचा भारवाहक; चाकरासारखा राबणारा; २. घरचा कर्ता, मिळविता : 'ईश्वरी कानकोंडा जाला। कुटुंब काबाडी।' - दास ३-४-४७.

**कुटुंबकलह** पु. भाऊबंदकी; गृहकलह.

**कुटुंबकल्याण** न. १. आईचे व मुलांचे आरोग्य नीट राहावे आणि त्यांचे योग्य संगोपन व्हावे, यासाठी पाळणा लांबविण्यासारखे उपाय योजणे. २. कुटुंबाचे सौख्य.

**कुटुंबण** न. महसूल ठरवून दिलेली जमीन. (गो.)

**कुटुंबनियोजन** न. कृत्रिम साधनांचा वापर करून संततीचे नियमन करणे; अपत्यांची संख्या मर्यादित ठेवणे.

**कुटुंबवत्सल, कुटुंबवाला-ळा** वि. १. स्त्रीपुत्रांवर फार प्रेम करणारा. २. बायको, मुलेबाळे असलेला. [सं.]

**कुटुंबव्यवस्था** स्त्री. (समाज) कुटुंबाची वडील-आई-मुले ही मांडणी; कुटुंबपद्धती; कुटुंबाचे विभक्त - अविभक्त या प्रकारचे स्वरूप.

**कुटुंबसमाजशास्त्र** न. कुटुंबातील संबंधाचा समाजावर होणाऱ्या परिणामांचा विचार करणारे शास्त्र.

**कुटुंबारी** वि. कुटुंबवत्सल : 'एका जीवा बरी। होतो दोन्ही कुटुंबारी।' - तुगा. ४०९०.

**कुटुंबाळी** स्त्री. कुटुंबातील माणसे : 'कन्यापुत्र कुटुंबाळी : असे सुखः' - क्रम ४४९.

**कुटुंबी** पु. १. गृहस्थाश्रमी; कुटुंबवत्सल; घरभारी २. दूरचा(चे) नातेवाईक; आप्त; चारपाच पिढ्यांचे अंतर गेले आहे असा सपिंड, सगोत्र, नातेवाईक. (को.) [सं. कुटुंब]

**कुटुंबीया** पु. पालनकर्ता : 'हा मायेबापु प्रजांचा। कुटुंबीया देशाचा।' - रुस्व ७०७.

**कुटुंबॉ** पु. एक पक्षी. (गो.)

**कुटूर** पु. कवड्याचा (पक्ष्यांचा) शब्द. [ध्व.]

**कुटूरचे** अक्रि. कवड्याचे (पक्ष्यांचे) ओरडणे. (गो.)

**कुटे** वि. कुबडे; लंगडे. [सं. कुट्ट - वाकडे होणे]

**कुटो-ट्टा** पु. मासळीचे खत. पहा : **कुटी** (कु.)

**कुट्ट** वि. दाट; गडद : 'कुट्ट पिवळ्या पहाटी, अरवतो दैनंदिन, भोंगा.' - मक ७०.

**कुट्टक** वि. कुटाळ. (व.)

**कुट्टक करण** (नृत्य) उजवा हात उजव्या खांद्यावर व डावा हात डाव्या खांद्यावर ठेवून बोटे खांद्याला टेकणे व दोन्ही पायांची बोटे जमिनीवर हळूहळू आपटणे. [सं.]

**कुट्टक गणित** हिशोब. (पुस्तक १८८०)

**कुट्टण** न. १. पीठ; चूर्ण. २. कुट्टा; कुंदी; ठोक; मार; मारझोड; पदार्थांची कुटाकूट, चेचाचेच (क्रि. काढणे, निघणे.). [सं. कुट्टन]

**कुट्टत चिबुक** (नृत्य) दात एकमेकांशी घासणे (भय वाटणे, थंडी वाजणे, रोग झाला आहे असे दाखविणे - यांचा द्योतक अभिनय). [सं.]

**कुट्टमित** न. सीत्कारादिक चिन्ह कपटाने करणे : 'कपटें सीत्कारादिक चिन्ह जया त्यास कुट्टमित नांव।'- अककगंर २.१३४

**कुट्टरे, कुडतरे** न. केसांच्या अंबाड्याखाली लोंबकळत ठेवण्याचा दागिना. (गो.)

**कुट्टरे मांजर** कुरकुर आवाज करणारे, काळे रानमांजर; उद; कांडेचोर. (गो.)

**कुट्टा-ट्या** पु. १. लाह्यांचे पीठ; तिळांची कुटून केलेली चटणी; पूड; चूर्ण. २. ठोक; मार; कुंदी (क्रि. काढणे, निघणे.) : 'बापाने मला यथास्थित कुट्टा काढून हाकून बाहेर लावले असते.' - बाळ २.२४८. ३. घोकंपट्टी (क्रि. मारणे.) : 'घोकंपट्टीची किंवा कुट्ट्या मारण्याची रीति तयार होते.' - ब्राह्मण व त्यांची विद्या. ४. (ल.) नीरस, गायनवादन : 'हा तुमचा भजनाचा कुट्टा चाललाय.....' - सोपिं.

**कुट्टिम वीट** (स्था.) फरसबंदीसाठी वापरायची वीट.

**कुट्टी** स्त्री. सुताराचे एक लाकडी हत्यार; मोगरी; ठोकणी. पटाशी वगैरे ठोकण्यासाठी याचा उपयोग होतो. (गो.)

**कुट्टी** स्त्री. पहा : **कुटी.** जनावरांना खायला सोयीचे जावे म्हणून केलेले कडब्याचे किंवा गवताचे बारीक बारीक तुकडे. त्यात पोषक अन्न मिसळतात.

**कुट्टी माती** स्त्री. कागदाच्या लगद्यात व्हायटिंग पावडर टाकून तयार केलेला पदार्थ. (व्यामको)

**कुट्टू** पु. उपवासाला खाण्यायोग्य एक पदार्थ. (माळवी)

**कुट्ट्याकुट्या** क्रिवि. हळूहळू; जेमतेम. (व.)

**कुट्या(ट्ये)ल** न. यथेच्छ चोपणे; बडवणे. (क्रि. काढणे, निघणे) (को. कु.)

**कुठचा-ला, कुठील** वि. कोणत्या ठिकाणचा, गावाचा, जागेसंबंधी.

**कुठते** न. आवरण : 'त्यांनी पाण्यात अंग भिजवून आपल्याभोवती मढवलेली सालांची कुठती फाडली होती.' - आआशे २५१

**कुठपर्यंत-पावेतो, कुठवर** क्रिवि. किती लांब, दूर; कोणत्या मजलेपर्यंत, अंशापर्यंत, पायरीपर्यंत, प्रमाणापर्यंत; कोणत्या काळापर्यंत.

**कुठं** क्रिवि. स्थानवाचक प्रश्नार्थक अव्यय. यापासून कुठपर्यंत, कुठंपावेतो, कुठवर, कुठून, कुठे ही अव्यये आणि कुठचा, कुठला ही विशेषणे मिळतात.

**कुठंबुटं** क्रिवि. अधूनमधून.

**कुठार** पु. कुऱ्हाड; परशु; लाकडे फोडायचे एक हत्यार : 'देत्यें हात चला जी घेत्ये फळभाजना कुठारा या।'- मोवन १३.८९. [सं.]

**कुठार** पहा: **कुटार**

**कुठाराय नखी** (पुरा.) करवतीसारखे दाते असलेले कुऱ्हाडीचे पाते.

**कुठावा** पु. रक्षण : 'तुका म्हणे देवा माझा करावा कुठावा।' - तुगा १. ३२२.

**कुठाविणे** पहा : **कोठाविणे**

**कुठू(ठो)न** क्रिवि. कोणता देश, काल, प्रमाण, विषय यापासून. [सं. कुत्र]

**कुठे** क्रिवि. १. कोणत्या जागी, स्थळी : 'कुठें जाशी भोगा तर तुझ्या पाठीशीं उभा।' - मसाप ४.४.२७२. २. (मुख्यत्वे जोराने उच्चारले असता) कोठूनही; कोठेही. [सं. कुत्र]

**कुठेतरी** क्रिवि. १. अनिश्चित स्थलनिर्देश करणारे अव्यय. २. नकारवाचक उत्तराची अपेक्षा असणाऱ्या प्रश्नात वापरले जाणारे अव्यय.

**कुठोरा** पु. कोठीवाला; कोठारी : 'चोर कुठोरी एकेचि ठायीं। वेगळे पाहावे न लगे कांहीं।' - तुगा २७२.

**कुठोरी** क्रिवि. कोठवर; कोठपर्यंत.

**कुड** पु. १. काटक्याकुटक्या व माती यांनी घातलेली भिंत (बांबू, कारवी, इत्यादींची) : 'ठाव नाहीं बुड। घरे बसविसी कुड।' - तुगा १३९३. २. (नाविक) गलबतावरील मालाच्या रक्षणाकरिता व सावलीसाठी डोलकाठीच्या मागे असलेली झावळ्यांची झोपडी. [सं. कुड्य = भिंत]

**कुड** वि. वाईट; हीन : 'विठ्ठलें कुडे केले.' - ज्ञागा ३७७. [सं. कूट]

**कुड** स्त्री. ज्याच्या अंगात देव येतो तो माणूस अथवा त्याचे शरीर. पहा : **कुडी** (कु.)

**कुड-डी** वि. खोटे; वाईट; कपटी : 'तुम्ही चालिजे हें मत कुड। अपाडू कीं।' - शिव ६८५.

न. कुकर्म; पाप.

**कुड** उद्गा. कोंबड्या वगैरे पक्ष्यांना हाकून लावण्याकरिता उच्चारायचे शब्द. [ध्व.]

**कुडई** न. एक प्रकारचे लवकर तयार होणारे भात.

**कुडक** न. ठिसूळ लाकडाचे एक झाड : 'कुडकावर बसून पाऊस सुरू झाला तरी घरटी बांधली नाहीत.' - आआशे २७०.

**कु(कुं)डका** पु. तुकडा (कापड, फळ, लाकूड इत्यादींचा.). (गो.)

**कुडकी** स्त्री.पुरुषाच्या कानांतील एक दागिना. हा चार मोत्यांचा चौफुलीसारखा असतो. कुड्या. एक मर्दानी कर्णभूषण. (पुरुष व स्त्रियाही घालतात. खानदेशातं पुरुष घालतात.) खाली बाळी व वर त्याला माळ असून ती कानाच्या टोकावर जाते. नुसती बाळीही घालतात. बेळगाव, खानदेश, वऱ्हाड या भागात मोत्यांऐवजी फक्त सोन्याची बाळीच असते. : 'मुक्ताफळांच्या कुडक्या तयासी।' - शशिसेना.

**कुडकी** स्त्री. जप्ती; कुरकी. (व.)

**कुडकुड** स्त्री. १. दाताखाली कडक पदार्थ सापडला असताना होणारा कडक असा आवाज. २. थंडीने दात कुडकुडत असता होणारा आवाज. २. कुरकुर; पुटपुट; चिरचिर; धिरधिर : 'धिक्कारिता करित कुडकुड।' - दावि ६५.

क्रिवि. अतिशय थंडी वाजत असेल तर तिचे वर्णन करण्यासाठी हा शब्द वापरतात.

**कुडकुडणे** अक्रि. १. कुरकुरणे; रागावणे; पुटपुटणे; खुटखुटणे; पोटात गुरगुरणे; २. थंडीने हुडहुडी भरणे; थंडी वाजणे.

**कुडकुडवाणा-णी** वि. दुर्मुखलेला; खिन्न; रडतोंड्या; मुखरोगी; मुखदुर्बळ; दुःखी कष्टी, घुम्या. [ध्व., सं. कुड् = विकल होणे]

**कुडकुडा-डी** पु. स्त्री. थंडीने अंग कापणे; थंडीची कुडकुडी; कापरे. (क्रि. भरणे.) (को.)

**कुडकुडा-डी-ड्या** वि. १. कुरकुर करणारा; गुरगुर करणारा; कष्टी : 'कुडकुडा झाला कपोता।' - उगी २१६. २. संकोचयुक्त; लज्जित

'तैसा मी कुडकुडा होतो केशीराजा। सेवा न घडे लाजा म्हणऊनि।' - तुगा १५३८. ३. दुःखी; कष्टी : 'होताती सर्वस्वें कुडकुडी। तितुकेंच कार्य त्यांचें।' - दास २.२.३८.

**कुडकुडी** पु. थंडीचा ताप; हिवताप. (कु.)

**कुडकुडीत** वि. कुरकुरीत; कुरकुर आवाज होणारा. (पापड, धान्य.)

**कुडकुडे** क्रिवि. लपतछपत.

**कुडकॉको** पु. तुकडा (कापड वगैरेचा). (गो.)

**कुडगा** पु. (शेती) भात लावण्यासाठी तयार केलेला जमिनीचा तुकडा. (कु.)

**कुडगी** स्त्री. पुरुषांच्या कानातील मोत्याचा एक अलंकार : 'कुडगिया साखळीया देसभांडारे देऊनिया विप्रु पाठविला.' - मधपू २९. पहा : **कुडकी**

**कुडघई** स्त्री. लहान व बारीक, दुबेळक्यासारखी कुडात घालण्याची मेढ. (को.)

**कुडचा** पु. एका हाताची ओंजळ; पसा.

**कुडचाफॉ** पु. खुरचाफ्याचे झाड. (गो.)

**कुडची** स्त्री. सदरा; पैरण; कुडते. (खा.)

**कुडची, कुट्टी** स्त्री. लाकडी घण; मोगरी. (गो.)

**कुडण** न. १. कुंपण; वई : 'दूतीं याच्या मुखा केलेंसे कुडण। वाचे नारायण येऊं नेदी।'- तुगा ३५७. २. आवाड; वाडगे; परसू; परडे. ३. कुंपण, वई घालण्याची क्रिया. [सं. कुड्य = भिंत]

**कुडणावळ** स्त्री. कुंपण घालण्याची क्रिया व तिची मजुरी.

**कुडणे** उक्रि. १. कुंपण घालणे; भिंतीसारखा कूड घालणे. २. बंद करणे; बुजविणे (रस्ता, मार्ग). ३. कैदेत टाकणे; बंदीत टाकणे, घालणे. ४. अडथळा, आडकाठी, अवरोध करणे. ५. (ल.) दाबणे; ओशाळणे. ६. मनात कुढणे; तळमळणे; खेद मानणे; खिन्न होणे. ७. अवटरणे; दुखणे; ताठणे (पुष्कळ वेळ एके ठिकाणी बसल्याने शरीर, अवयव इ.) [सं. कुण्ड् = रक्षण करणे; कुड्य = भिंत]

**कुडत(ता) न** न. छत्तीस अथवा बेचाळीस कवळ्यांचा विड्याच्या पानांचा गठ्ठा (पाचशे पानांची एक कवळी.) [फा. कुर्ता]

**कुडतर** न. रानकोंबड्याची एक जात.

**कुडता** पु. १. कुटका; तुकडा. २. पहा : **कुडचा** : 'या मास्तरांच्याबद्दल कुणाच्या जिव्हारात कुडताभरही माया नाही.' - काआ ४७.

**कुडता-ती-ते कुडताण** पु. सदरा; पैरण.

**कुडतान** न. कुडते; कोट : 'श्रीमंतापुढें टोप्या, कुडतानें घालून माणसे पुढें बसविली होती.' - ऐलेसं २४८४.

**कुडताळ-ळा-ळे** न. पु. संकुचित, अरुंद जागा.

वि. अरुंद; संकुचित. (जमिनीचा तुकडा.) (वा.) **कुडताळ्यात येणे** - संपुष्टात येणे. (व्यापार, धंदा)

**कुडती** स्त्री. १. परटाची मोगरी. ही लाकडी असते. २. (सुतारधंदा) किंकऱ्याची ठोकणी. (कु.) ३. चौरस लाकडी ठोकळा. जाते इ.ला उपयोगी. (को.) पहा : **कुट्टी** [सं. कुट्ट = कुटणे.]

**कुडती** स्त्री. उंची; जाडी. (क्षेत्रफळासंबंधी.)

क्रिवि. उंचीच्या व जाडीच्या अनुरोधाने कडीपाटाची कडी वगैरे (वस्तू). (क्रि. लावणे, बसवणे, ठेवणे.)

**कुडतुडणे** सक्रि. कुरतडणे.

**कुडतूम** पु. गुण्या; काटकोन (सुताराचा.). (कु.)

**कुडत्रिम** कृत्रिम; कपट; कारस्थान : 'खंडोजी भोसले याचे कुडत्रिमात महादजी लष्करी बहुत जे करणे ते याणेच केले.' - ऐकोपुर.

**कुडथळ** स्त्री. जिला पाटाच्या पाण्याची सोय नाही अशी जमीन.

न. (शेतजमीन) अपुरी जमीन; ठिके; दळे नोंदणी केलेल्या प्रमाणात कमी येणारी जमीन.

**कुडथळी बिघा** लहान बिघा; पूर्ण बिघ्यापेक्षा थोडा कमी बिघा. (सामान्य बिघा वीस पांडांचा.)

**कुडनाड्या** वि. भूत, समंध इत्यादींना कोपविणारा व शमविणारा (मांत्रिक). (माण.) [सं. कुट + नाडी]

**कुडपण-णे** न. लहान, जाड काठी; दांडू; लाकूड; हात दीड हात लांब व मनगटाइतका जाड लाकडाचा तुकडा. कुटका.

**कुडपणे** अक्रि. १. अवठरणे; मुरडणे (पाने. इ.) २. टाकणे; सोडणे: 'कुडपीयैला देश आतां येऊं नेदी दुसरी।' - तुगा २९८. [सं. कुट्]

**कुडबुड-डा-ढा** क्रिवि. कुडबुड्याच्या आवाजासारखा (आवाज). [ध्व.]

**कुडबुडणे** अक्रि. १. कुडबुड आवाज करणे. (कुडबुड्याचा) २. (ल.) अस्पष्ट रीतीने बोलणे; कुरबुरणे. [ध्व] [सं. कुर् + ब्रू]

**कुडबुडा-ड्या, कुडमुडा-ड्या जोशी** हातात कुडबुडे घेऊन भविष्य सांगून भीक मागणाऱ्या गोसावींची (अब्राह्मण) एक जात व त्या जातीतील व्यक्ती : 'कुडबुडे जोशी हे अशा प्रकारच्या लोकज्योतिषांपैकीच होत.'- लोक्षि २९७.

**कुडबुडे** न. डौराहून लहान वाद्य; जिच्या टोकाला चिकण मातीची किंवा मेणाची गोळी बसविलेली आहे अशी दोरी मध्यभागी बांधलेली असते, असे एक चर्मवाद्य. हे वाद्य सरवदे, कुडबुडे जोशी, पांगुळ, भिक्षेकरी हातात घेऊन वाजवीत भिक्षा मागतात. [ क. गिडिबिडि] [ध्व]

**कुडमित्र** पु. कपट कारस्थान; कट; गुप्तमैत्री : '-खंडोजी भोसले यांचे कुडमित्रात महादजी लष्करी बहुत.' - नाग १.३२३.

**कुडमुड** स्त्री. काकडीची किंवा मुळ्याची कोशिंबीर. (ना.)

**कुडमुळी** स्त्री. कमळ. [सं. कुड्मल]

**कुडय** स्त्री. एक जातीचे भात. (कु.)

**कुडरू** न. समुद्रकाठच्या डोंगरातील कुरण.

**कुडलोरी दगड** (पुरा.) कुरुंदाचा दगड. हा भारताच्या पूर्वकिनाऱ्यावर सापडतो.

**कुडव** न. धान्य ठेवण्याची बांबूची गोलाकार टोपली.

**कुडव-वा** पु. १. सामान्यतः आठ शेर अथवा दोन पायलीचे माप. देशावर आठ पायली धान्याचे माप; राजापुराकडे चार पायली. २. एक प्रस्थाचा एक चतुर्थांश; एक पक्का पावशेर; पातळ औषधे मापण्याकरता

मातीचे, कळकाचे, लाकडाचे किंवा लोखंडाचे, विस्ताराने व उंचीने चार अंगळांचे भांडे : 'तो निजबोधाचें कुडवाकारीं। भरील वखारी श्रवणाच्या।' - एभा ३.८७२.[सं.] (वा.) ० **भरणे** - १. माप भरणे, २. पूर्ण होणे; ३. मरण ओढवणे. (कु.)

**कुडवणे** सक्रि. नांगरणे: 'चार पैसे घेऊन जमीन कुडवील तर'- देव्य १५३.

**कुडवली** स्त्री. १. भात शिजवण्याचे मडके. (हेट.) (कु.) [सं. कुंड]

**कुडवळ** पु. एक पक्षी. (गो.)

**कुडवळीण** स्त्री. कुडवाडीण : 'कुडवळीण खरी पण धरती व धरतीची बाई अशी.' - माआवा ८९.

**कुडवा** पु. भिंतीच्या तळाचा कंगोरा; निराळ्या रंगाने दाखविलेला वीतभर उंचीचा भाग. (क्रि. घेणे, ठेवणे) (वा.) ० **घेणे** - जमीन सारवतांना जमिनीपासून काही उंचीपर्यंत भिंत सारवणे.

**कुडवाळी** पु. कुळवाडी अप : 'ठिकठिकाणी दिसणारे कुडवाळ्यांचे समाधानी व साधेभोळे चेहरे..' - सह्याद्रीच्या पायथ्याशी १२०. (गो.)

**कुडवी** पहा : **कुडव**

**कुडवी भारा** झोडले असता कुडवभर भात निघेल अशी पेंढी.

**कुडसर** स्त्री. नाचणी. (धान्य.) (को.)

**कुडसारो** पु. कापणीनंतर राहिलेले भाताचे सड; धस. (कु.)

**कुडा** पु. एक रानझाड. हे सहा - सात हात उंच असून, पान बदामाच्या पानासारखे लांबट असते. याच्या विड्या करतात. [सं. कुटज]

**कुडा** पु. आश्रयस्थान: 'हा कपटाचा कुडा: एकाधें कुवाडें करील आवघडा' - रुस्व १७६१.

**कुडा** पु. भाताची एक जात.

**कुडा** पु. स्त्रियांच्या कानातील एक दागिना; कुडे.

**कुडा** वि. १. दुष्ट; शबल; कपटी; विश्वासघातकी : 'विवेकें कुडी कल्पना पालटीजे।' - राम ४०. २. वाईट; खोटा (पैसा): 'कुडा आपुला दाम अस्ता पराशी। वृथा भांडणे ख्यात हे गोष्ट कैशी।' - हरिराज मुद्गलाचार्यांचे भाषांतर ४७. (अकक.) ३. मिथ्या; अशुद्ध; खोटा; वाईट, नुकसानकारक, चुकीचा : 'नृपाते कुडा मंत्रें योजावयातें।' - वामनविराट ७.१३०. ४. नपुंसक; ओंगळ. [सं. कूट]

**कुडाक** न. कानातील कुडे (सोन्याचे अगर हिऱ्यामोत्यांचे). (गो.)

**कुंडाकुडे** न. एक कर्णभूषण.

**कुडाण** न. कुडण; कुंपण; गुरांचा उन्हाळी गोठा; कुडलेली जागा. (को.) (वा.) ० **करणे** - कुंपण घालणे; झाकणे (कु.)

**कुडाण** न. ढोल वाजविणे. (कु.)

**कुडाभाव** पु. द्वेष; मत्सर; अविश्वास; संशय; कपट; दुष्ट कल्पना; विकल्प.

**कुडामंत्र** पु. बदसल्ला : 'नाना प्रकारचे कुडेमंत्र भासवून त्यापासोन बोलवितात.'- पेद २०.१३२.

**कुडामेढीचा** वि. कुड व मेढी यांचे; चंद्रमौळी; मोडकेतोडके (खोपट, झोपडी, वाडा).

**कुडावा** पु. १. कुड; कार्वी, झिलप्या वगैरेवर माती लिंपून केलेली भिंत. २. (ल.) रक्षण; थारा; पाठपुरावा : 'करी संकटीं सेवकाचा कुडावा।' - राम ६७ [सं. कुण्ड = रक्षण करणे]

**कुडावा** पु. एक खाद्य पक्षी. (कु.)

**कुडावेडा** वि. दुष्ट हेतूने वेड पांघरणारा.

**कुडिया, कुड्या** पु. जनावरांना होणारा एक रोग; मानमोडी; फेपशा. (ना.)

**कुडी** स्त्री. (झोपडी या अर्थावरून) देह; शरीर; आत्म्याचे घर; (रागाने किंवा निंदेने) कलेवर; प्रेत : 'कुडी वाढे कुबुद्धी वाढे।' - दास १५.९.७ (वा.) **कुडीत जीव धरून राहणे** - १. मरणोन्मुख होणे. २. कसे तरी जगणे. [सं. कुटी; कुडी = देह]

**कुडी** स्त्री. एक प्रकारची पाभर.

**कुडी** स्त्री १. लाकडाची झिलपी, ढलपी. २. वनस्पतीच्या मुळाचा लहानसा तुकडा. अंकुर (सुंठ, गाजर, लसूण, हळद, आले यांच्या कांद्याचा). ३. भाताचे काड; काडकुटी.

**कुडी** स्त्री. कोडी; वीस संख्या.

**कुडी-डौ** स्त्री. कुडव : आठ पायल्यांचे माप : 'हाती कुडौ : वारवारी मोजीत होते.' - लीचउ ६०३.

**कुडी** स्त्री. पालवी. (बे.)

**कुडी** स्त्री. गवताची गंजी. (कु.)

**कुडी** पहा : **कुडाक**

**कुडीपणे** अक्रि. न थांबता पडणे: 'पड बाबा! कुडीप! थांबू नका, म्हापूर याला पाहिजे.' - आभाळ १६.

**कुडीवसती** स्त्री. एक रात्र व दोन दिवस मुक्काम.

**कुडु(डू)क** पु. न. १. सोन्याच्या तारेत मोती गुंफून केलेला कानातील एक दागिना. २. (ल.) एक झाड व त्याचे फळ.

**कुडुकुडा** पु. दगदग; कष्ट: 'तयाते प्रतिपाळिता। कुडुकुडा जाला कपोता।' - उगी ३१६.

**कुडुके** न. धान्य साठविण्याचे लहान कणगुले. (माण.)

**कुडुपणे** न. १. पुराणे; दांडके; होलपाटा सोडगे. २. ठेंगणा व मजबूत धट्टाकट्टा, काटक माणूस.

**कुडूक, कुडुकवाणा** वि. खिन्न; खट्टू; रडतोंड्या; असंतुष्ट; मलूल.

**कुडे** न. कुडा. पहा : **कुडाक, कुडुक**

**कुडे** न. १. द्वेष; मत्सर; संशय; अविश्वास. २. कपट; दुष्ट व्यूह; वाईट कचाट; कुलंगडे : 'ज्यांचे कुडें त्याजपुढेंच राहे।' - सारुह ८.४८. ३. (ल.) संकट : 'निर्दाळावा तरी कैसें रीतीं। तयाच्या भक्तीस मैनावती। आडे तरी राजयाप्रती। निवेदावें कुडें भावें।' - नव १४.१५०. वि. खोटे : 'जैसें कां कुडें नाणें। खऱ्याचे नि सारखेपणे।' - ज्ञा ४.८६.

**कुडेकपट** पहा : **कुडेपावडे**

**कुडेपण** न. वाईटपणा, खोटेपणा : 'कवणेपरी न फिटे कुडेपण।' - नागा १६९९.

**कुडेपाक** पु. कुड्याच्या पाळाचा तयार केलेला पाक. हा औषधोपयोगी आहे.

**कुडेपावडे** न. १. दुष्ट विचार; अंतस्थ बेत; कारस्थान : 'नावडींची साखर आळणी आसे काही कुडेपावडे।' - सला ७५.३ २. जादूटोणा; मंत्रतंत्र; जादू; चेटूक; कुवेडे. ३. छक्केपंजे; दुष्ट कारस्थान; कावा. [कुडेचे द्वि.]

**कुडेशहाणपण** न कावेबाजपणा; कुटिल धूर्तता.

**कुड्डा - कुड्डो, कुरडो** पु. आंधळा. (गो.)

**कुड्डा-ड्डो, कुरडो** पु. (शोभेची दारू) खापरी पेरे; शोभेच्या दारूचे झाड वगैरेला असलेले दारू भरलेले खापरी नळकांडे.

**कुड्डी** स्त्री. (सोंगट्यांचा खेळ) उडतपगडे या डावात फाशांच्या एका दानाला हे नाव देतात. (बे.)

**कुड्डी** स्त्री. कुंड; भिंत.

**कुर्डुबके** न. बगळ्याच्या जातीचा एक पक्षी. (गो.)

**कुड्डूक** स्त्री. एक प्रकारची भाजी. (गो.)

**कुड्मळ-मुळ** पु. फुलाची कळी; उमलणारी कळी; कमळ : 'ऐक्यभावाची अंजुळी। सर्वेंद्रिय कुड्मुळीं।'-ज्ञा १५.२. [सं.कुड्मल]

**कुड्या-ढ्या** वि. कुढणारा; मनातल्या मनात जळणारा; घुम्या.

**कुड्याकळस** पु. अव. बुगड्या : 'लग्नाच्या वेळी नाकात नथ आणि कानात कुड्याकळस म्हणजे बुगड्या असल्या पाहिजेत.' - सांज ११८.

**कुड्याठ, कुर्याट** न. डोंगराच्या उतरणीवरील भातशेतीची खाचरे. ही सुमारे १०-१५ हात रुंद व १५-२० हात लांबीची असतात. ह्यात भात वगैरे पीके करतात. (को. राजा.)

**कुढणे** अक्रि. मनातल्या मनात त्रासणे; खेद पावणे; घुमेपणाने रागावणे; कष्टी होणे : 'परी या कृपेच्या वोरसें। कुढावयाचेचि पिसे।' - तुगा १९०२. [सं. क्रुष्ट]

**कुढवीणे** क्रि. १. संतापणे; २. भिंतीत ठेचून मारणे.

**कुढंग** पु. लुच्चेगिरी; खोडी; चाळा; टवाळी.

**कुढा-ढ्या** वि. मनाचा कुढा; कपटी; खोटा; खिन्न; कुरठा; मत्सरी.

**कुढाण** स्त्री. कुजकट घाण.

**कुढापा** पु. १. मत्सर; द्वेष; संताप; चुरस. (क्रि. धरणे, ठेवणे, करणे) २. मनातल्या मनातील जळफळ, तळमळ, (क्रि. धरणे, करणे)

**कुढाव** पु. माघार : 'श्रीकृष्ण बळभद्रदेवासहितु कुढावा काढुनि चालिला।' - श्रीकृष्ण ३९.

**कुढावणी** स्त्री. विवेचन; स्पष्टीकरण : 'आपुलिया स्वरूपाची कुढावणी। करिते झाले स्वानंदे।' - स्वानु १२.४.८५.

**कुढावणे** सक्रि. रक्षण करणे. [सं. कुण्ड = रक्षण करणे]

**कुढावा** पु. संरक्षण; साहाय्य : 'तुका म्हणजे देवा। माझा करावा कुढावा।' - तुगा ११८८.

**कुढेपणा** पु. मोकळेपणाचा अभाव : 'माझ्या बोलण्यात कुढेपणा असतो.' - कलंदर ६६.

**कुढे पावटे-डे : कुढे कपट; कुढे शहाणपण** पहा : **कुड पावडे**

**कुण** उद्गा. सूक्ष्म आवाज दाखवणारा शब्द. [ध्व.]

**कुणकुण** स्त्री. १. हळू आवाजात बोलणे; गुणगुणणे; पुटपुट; गयावया करणे. २. अफवा; उडत बातमी. (वा.) ० **कानावर येणे** - काही प्रमाणात एखादी बातमी कळणे.

**कुणकुणणे** अक्रि. कुजबुज करणे; गयावया करणे.

**कुणकुणि(णी)त** क्रिवि. कुडकुडत 'ते एकाधा वेळ उदीयाचि गोसांवीयांपासीं कुणकुणीत बैसती:' - लीचउ १२७.

**कुणकुण्या** वि. कुरकुर करणारा; गुणगुण करणारा; गयावया करणारा.

**कुणगा** पु. कुटुंबातील एकाद्या व्यक्तीने अन्य हक्कदारांना समजू न देता चोरून साठविलेला पैसा, द्रव्य; गुप्तधन : 'आजपर्यंत चाललं होतं कसंबसं ताईच्या कमाईवर, तिच्या कुणग्यावर.' - व्यंमाक ३७. [क. कुंगु = शांतता]

**कुणगा** पु. धोतराचा सोगा; कासोटा.

**कुणगा** पु. भोवती बांध घातलेला भातशेताचा एक भाग. (को.) शेतातील वाफा. (बे.)

**कुणगी** स्त्री. बांबूनी विणलेली, माती व शेण यांनी लिंपलेली, धान्य साठविण्याची कणिग : 'जोंधळ्यांनी भरलेल्या कुणग्या.' - डोह ७३.

**कुणगी-गो** स्त्री. शेताचा एक भाग, तुकडा. (कु. गो.).

**कुणगेकरी-दार** पु. ज्याने कुणगा केला आहे असा माणूस. पहा : **कुणगा**

**कुणट** न. फोल पोह्यातील बारीक कण; तूस. (को.) [सं. कण]

**कुणप** न. १. प्रेत : 'तिचे आलिंगून कुणप। रुरु करी दीर्घ विलाप।' - पांप्र १.१५८. २. शरीर, देह : 'हे कुणप त्रिधा(तु) क।' - ऋव ३३०. [सं.]

**कुणबट** पु. १. कुणबी या शब्दाचे निंदाव्यंजक रूप. २. शेतकरी; 'बळिभद्र हा कुणबट। केली चोखट रणभूमी।' - एरुस्व १०.७६. ३. अडाणी : 'कुणबट कुळवाडी। तैसा आन आन देवमांडी।' - ज्ञा १३.८१२.

**कुणबाऊ** वि. कुणब्याला योग्य; कुणब्याप्रमाणे ओबडधोबड; ग्राम्य; खेडवळ (रीत); हलके; भिकार; दरिद्री. (कपडा, पोषाख इ.)

**कुणबाया** पहा : **कुणबावा** : 'आठबैली कुणबाया ओढणारा.' - जोफु २२०.

**कुणबाव-वा** पु. १. कुणब्याचे काम; शेती; शेतकी : 'कुणबाव निर्मिला देवांनीं।' - दावि ३४७. २. सरकारला ठरावीक रक्कम - सारा देण्याचे कबूल करून वंशपरंपरा जिंदगीप्रमाणे धारण केलेली वतनी जमीन; अशा तऱ्हेची पद्धत; अशा जमिनीचा द्यावयाचा धारा. ३. पीक.

**कुणबावेदार** वि. कुणबावा करणारा.

**कुणबी** पु. १. कुणबावा करणारा; शेती करणाऱ्या जातींपैकी एक; शेतकरी; शेतीचा धंदा करणारा. २. अडाणी; बिनलढाऊ. [सं. कुलपति]

**कुणबीक** स्त्री. कुणब्याचे काम; शेतकाम : 'जातिधर्म, आनुवांशिक संस्कार यांचे जोरावर कुणब्याने निरक्षर असताहि कुणबीक पूर्वत्वाला नेली.' - गांगा १८६.

**कुणबीण** स्त्री. १. कुणब्याची बायको. २. दासी; मोलकरीण.

**कुणबीदोक** वि. (शूद्रोदक या संस्कृत शब्दाच्या अनुरोधाने बनविलेला शब्द.) कुणब्याने आणलेले, स्पर्श केलेले, उपयोग केलेले. (पाणी, भांडे कोणतीही वस्तू.)

**कुणबीहिशेब** पु. कुणबाऊ हिशेब; खेडवळ, हेंगाडा, ठोकळ पद्धतीने

केलेला हिशेब (खड्यांनी, बोटे घालून इ. केलेला).

**कुणभवा - भावा - भवेदार,** पहा : **कुणबावा**

**कुणार** वि. भिकार, दरिद्री : 'पलीकडची रयत गरीब कुणार त्यास तसदी नसावी.' - ऐकोपुर.

**कुणी, कुण्णी** सना. १. एखादी व्यक्ती. २. 'काही माणसे' या अर्थी. ३. नकारार्थी शब्दाबरोबर माणसांचा पूर्ण अभाव दाखवला जातो. कोणीही : 'कोणाला न पुसे कुणी।' - विक २२.

**कुणी** न. द्विदल धान्यातील हलका दाणा. (राजा.)

**कुणी** स्त्री. १. लाकडाची मेख; खुंटी; पाचर; चाकाच्या आसाची खीळ; शेतकऱ्यांच्या अनेक उपकरणांतील खुंटी. २. डहाळी.

**कुणी** स्त्री. जमिनीत लहानसा खळगा करून त्यात काही अंतरावरून सागरगोटे, सुपाऱ्या, चिंचोके, दिडक्या वगैरे टाकून खेळतात तो खळगा; गल. (बे.)

**कुणीकडच्या कुणीकडे** १. फार लांब. २. मुद्दा सोडून भलतीकडेच.

**कुणीकुणी** प्रश्नवाचक सर्वनाम.

**कुणीतरी** सना. १. नकारवाचक उत्तराची अपेक्षा असणाऱ्या प्रश्नात वापरले जाणारे सर्वनाम. २. अनिश्चित व्यक्तिदर्शक उपयोग.

**कुणे(ण्ये)ट** पहा : **कुणट** (को.)

**कुणॉ** पु. कोंडा. (गो.)

**कुण्णाटी, कुण्णाटॉ** वि. हेवेखोर. (गो.)

**कुण्णाठाय** पु. हेवा. (गो.)

**कुत** न. दुःख : 'काय कुत असलं तर सांगा.' - ऊन ११९.

**कुत** न. भिंग. (गो.)

**कुतका** पु. १. भांग घोटण्याचा वगैरे बत्ता. २. (ल.) धक्का; दबका; ठोसा; तडाखा. ३. सोटा : 'तमाम पागे पतके बेरोजगारी घेऊनि कुतके।' - ऐपो २५२.

**कुतकुल्या** स्त्री. अव. गुदगुल्या. (कु.)

**कुतडा-डे** पु. न. ज्वरादिकामुळे काम करायला असमर्थ अशा माणसाला निंदेने म्हणतात; जिवावर आलेली गोष्ट (राजा. व.) (वा.) ० **भरणे** - चुकारतट्टूपणा करणे; दुखण्याचे नाटक करून काम चुकवणे.

**कुतनी** स्त्री. गभरेशमी व पट्टे असलेले कापड : 'कुतनी कनकाचळ गुर्जरिचे कटिबंध सुशी तिवटे पटणी।' - किंशुक २८. [फा. खुत्न.]

**कुत(तू)प** पु. सूर्योदयापासून आठवा मुहूर्त; मध्यान्हकाळ; पितृयज्ञ करायला योग्य वेळ. [सं. कुतप]

**कुतप** न. वृंदसंगीत.

**कुतपणे** सक्रि. राक्षसी विधी किंवा आचार करणे : 'तूं रे वृष्णि जिनावया कुतपसी।' - गरा १५०.

**कुतरओ(वो)ढ-तोड** स्त्री. (निरनिराळी कामे किंवा कर्ज यांच्या भारामुळे झालेला) त्रास, दगदग, तारांबळ, तिरपीट, त्रेधा.

**कुतरघाई** स्त्री. १ तातडी; लगबग; पराकाष्ठेची घाई. (क्रि. करणे, लावणे, मांडणे) २. उतावळी; गर्दी; धांदल. (क्रि. करणे, होणे.)

**कुतरझाड-मूत** न. कुतर या शब्दाच्या समासाबद्दल, पहा : **कुत्र्याचा-ची-चे**

**कुतरणे** क्रि. शक्ती नसणे.

**कुतरभोक** स्त्री. कुत्र्याचे भुंकणे (ल.) भांडण; तंटा; कलह : 'परिणामीं विलक्षण असे वाग्युद्ध व कुतरभोक मात्र जुंपते.' - विद्याभिवृद्धी २८.

**कुतर्क** पु. वाईट क्लृप्ती, बेत, विचार; मूर्खपणाची कल्पना, मसलत, युक्ती. [सं.]

**कुतर्की** वि. कुतर्क लढविणारा, कुफरांडी.

**कुतर्ल** न. कापलेले पीक ठेवण्याची जागा. (गो.)

**कुतं(तुं)गळ-ळू** न. (ल.) षंढ; क्लिब; नपुंसक.

वि. १. नाजूक; अशक्त; दुर्बल (मनुष्य, पशु) : 'पण ज्याचे राखण कमी किंवा कुतंगळ, त्याचे शेत गतकुळीं असा प्रकार आहे.' - गांगा ७१. २. आळशी. (माण.)

**कुताब** स्त्री. मशिदीस जोडलेली शाळा. [अर.]

**कुतांव** पु. बंडी; कोट (गो.) [पो.]

**कुतिष्ट** न. उखाळीपाखाळी काढून बोलणे : 'कुतिष्ट मागिले उक्त उखाळी म्हणियेतया' - ऐकोपुर.

**कुती** स्त्री. पेटी; करंडी; पेटारी : 'अंगुराची कुती' - दिमरा २.१०१. [फा. कुती]

**कुतुक** न. कौतुक : 'जे कांहीं करिन कुतुक ते देखावें दुरूनि नयनांही।' - मोभीष्म १०.३७. [सं.]

**कुतूहल** न. जिज्ञासा; नवल; कौतुक; क्रीडा; करमणूक. [सं.]

**कुतूहलजनक** वि. कौतुक, जिज्ञासा उत्पन्न करणारा.

**कुत्त** न. संकट. (बे) [क.]

**कुत्तरचाल** स्त्री. कुत्र्यासारखे जवळ जवळ पाय टाकून जलदीने चालणे.

**कुतूहलजनक** वि. कौतुक, जिज्ञासा उत्पन्न करणारा.

**कुत्त** न. संकट (बे.) [क.]

**कुत्तरगाडी** स्त्री. कुत्रे पकडणारी गाडी: 'त्या भागात म्युनिसिपालिटीची कुत्तरगाडी वरचेवर फेऱ्या टाकी.' - मारवा. १०८.

**कुत्ता** पु. कुत्रा : 'कुत्ता जाने चमडा जाने.' - धर्माजी १६४ [हिं]

**कुत्तेखसाई** स्त्री. १. कुत्र्याप्रमाणे एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी वणवण फिरणे, पायपिटी. २. हिडीसफिडीस केले असतानाही पुन्हा त्याच ठिकाणी जाण्याचा लाचारपणा : 'तसी कुत्तेखसाई माझ्याने होणार नाही.' - ऐलेसं ६४०९.

**कुत्तेखानी-शी-सी; कुत्तेघशी-घाशी** स्त्री. १. हां जी हां जी; लांगूलचालन. २. हलक्या दर्जाचे काम; काबाडकष्ट; थोड्या लाभासाठी केलेली निकृष्ट चाकरी. [हिं.]

**कुत्तेबाज** पु. कुत्र्यांवर देखरेख करणारा; कुत्र्यांना शिकवणारा; कुत्र्यांवरील अधिकारी : 'स्वामीचीं कुतरी पुण्यात उत्तम पील झाले आहेत. ते राजश्री स्वामीचे कुत्तेबाजानी पाहिले.' - पेद ८.१५.

**कुत्तेमल्हार** न. बेसुमार गाणे. वाईट गाण्याला हा शब्द लावतात. [हिं.]

**कुत्तेवाघूट** न. तरस; कुत्र्याचा वाघ (कारण तो कुत्रे लांबवतो.).

**कुत्तेवान** पु. १. श्वानाध्यक्ष; कुत्र्यांची व्यवस्था पाहणारा अधिकारी. २. शिकारी: 'कुत्तेवान चित्तेवान। साकरवानी पहिलवान।' - नव ११.६८. [हिं.]

**कुत्बखाना** पु. ग्रंथशाला; ग्रंथसंग्रह. [फा.]

**कुत्रा** पु. १.भिन्न भिन्न प्रकारांत आढळणारा एक चतुष्पाद प्राणी. हा जंगली किंवा माणसाळलेला दोन्ही प्रकारात मोडतो. श्वान; सारमेय; कुकर. सर्व चतुष्पाद प्राण्यांमध्ये कुत्रा हे मनुष्याशी संबंध असलेले एक महत्त्वाचे जनावर आहे. २. (ल.) वाईट, हलकट माणूस. (वा.) ० **कोलटेकणी बसणे** - पुढील दोन पाय उभे करून मागे ढुंगण टेकून बसणे. (माण.) ० **हाल खाईना** - अतिशय वाईट स्थिती येणे. ० **होऊन राहणे,** ० **पडणे,** - आर्जवाने, खुशामतीने नोकरी करणे. ० **मारीत फिरणे** - रिकामटेकडे भटकणे. ० **शिवणे** - (बायकी) स्त्री विटाळशी होणे. (लहान मुलांच्या भाषेत). **कुत्र्याची वळवळ** - कुत्र्यासारखी चळवळ. **कुत्र्याचे पाय मांजरावर आणि मांजराचे पाय कुत्र्यावर घालणे** - भलभलत्या लटपटी करणे. (आपले काम साधण्यासाठी, केवळ गमतीसाठी.) **कुत्र्याच्या मौतीने मरणे** - हालहाल होऊन मृत्यू येणे. **कुत्र्याला तोंडी लावला तर डोक्यावर चढणे** - हलकट मनुष्याशी स्नेह ठेवला तर तो डोईजड बनणे. **कुत्र्यासारखे फिरणे, हिंडणे** - रिकामटेकडा भटकणे.

**कुत्रा** पु. १. गाड्याच्या चाकाचा खिळा. २. तार काढण्याचा ठिय्या. (झाडी)

**कुत्रा** पु. चितारू नावाचा एक मासा.

**कुत्राचक्र** न. (यंत्र) सुटण्याची किंवा अडकवण्याची क्रिया करण्यासाठी वापरण्यात येणारे, ठरावीक प्रकारचे दाते असलेले चक्र.

**कुत्रापि** कोठेही; जेथे कोठे. [सं.]

**कुत्री** स्त्री. कुत्र्याची मादी. शुनी, सारमेथी (वा.) ० **वाफेला येणे** - कुत्री माजावर येणे; संभोगोत्सुक होणे. (माण.) ० **सारखी होणे** - रोड होणे. (व.)

**कुत्री** स्त्री. एक औषध वनस्पती व तिचे बोंड. हिच्या फुलाला व पानाला वाईट वास येतो. काहींच्या मते लोखंडी नावाची वनस्पती.

**कुत्रे** न. १. कुत्रा, कुत्री. २ (ल.) भांडखोर व शिवराळ माणूस.

**कुत्रे** न. १. रहाट थांबविण्यासाठी दोन पट्ट्यांच्या केलेली योजना. यातील एक चपटी असून तिचे एक टोक रहाटाच्या विरुद्ध बाजूला फिरू नये यासाठी केलेले एक अडकवण. खाचा रहाटात टाकला की गती बंद होते. २. दार, झडप लावले असताना उघडू नये म्हणून अडविण्याचे एक अडकवण; अडसर; चक्राचे दात उलट फिरू नयेत म्हणून दात्यात अडकविण्याचा धातूचा तुकडा. ३. रेडकू म्हशीला किंवा वासरू गाईला पिऊ नये म्हणून त्याच्या तोंडावर बांधण्यात येणारे कांबट्यांचे टोकदार साधन. ४. (वरील कुत्र्याच्या साम्यावरून) कोपरा, खांदा, मनगट, गुडघा, घोटा कंबरेचा खवाटा यांचा सांधा. ५. घड्याळातील चाकाची गती नियंत्रित करण्यासाठी असलेली योजना.

**कुत्रे** न. १. गवताचा एक प्रकार व त्याचे फूल, तुरा, बोंड. हे वस्त्राला लागले तर चिकटून बसते. २. लहान कुसळयुक्त रानटी वनस्पतीचे बी.

**कुत्र्याचा पाय** रानतेरड्याचे फूल.

**कुत्र्याची चार** एक प्रकारचे गवत.

**कुत्र्याची झोप** अत्यंत सावध झोप.

**कुत्र्याचे छत्र** कुत्र्याचे मूत, छत्री; अळंबे.

**कुत्र्याचे जिणे** दैन्यावस्था; हीन स्थिती; निकृष्ट स्थिती.

**कुत्र्याचे झाड** एक काटेरी झुडूप. याचे फळ चकचकीत, तांबडे व रसाळ असते.

**कुत्र्याचे तोंड** (ल.) फटकळ माणूस; निंदा करणारा, अश्लील भाषण करणारा माणूस.

**कुत्र्याचे दात** (मुलांच्या भाषेत) दुध्या भोपळ्याच्या बिया.

**कुत्र्याचे मांजराचे पाय** चिडबिडीत, गिचमीड अक्षर.

**कुत्र्याचे भोकभर, भोकावर** कुत्र्याचे भुंकणे ऐकू जाईल एवढ्या मजलीवर, अंतरावर (गाव इ.).

**कुत्र्याचे मूत** १. कुत्र्याचे छत्र; अळंबे. २. (ल.) एककल्ली; दुसऱ्याच्या अंगावर बसकन येणारा तुसडा, चिरडखोर, सदा चिडचिड करणारा माणूस.

**कुत्र्याचे विष** पिसाळलेल्या कुत्र्याच्या लाळेत असणारे जंतू. हा कुत्रा चावला असता या जंतुमुळे मनुष्य भांबावल्यासारखा करतो, त्याला ज्वर येतो. डोळे व लघवी पिवळी होते. कालांतराने उन्माद येऊन कुत्र्याप्रमाणे भुंकतो व चावतो. वेळीच इंजेक्शनसारखे उपाय न केल्यास माणूस दगावतो.

**कुत्र्याचे शेपूट** कुत्र्याची शेपटी. (हे नेहमी वाकडे असते, सरळ राहत नाही यावरून लक्षणेने) सुधारण्याचा कितीही यत्न केला तरी व्यर्थ जाऊन पूर्वीच्या वळणावर जाणारा, लतकोडगा, दुष्ट, द्वेषी माणूस.

**कुत्सा** स्त्री. अपकीर्ती; निंदा. [सं. कुत्स = निंदा करणे]

**कुत्सित** वि. १. गर्हित; निंदित; नीच. २. कपटी; लबाड ३. दुर्गंधियुक्त; कुजलेला.

**कु(कुं)थणे** अक्रि. १. जोराने ठोकताना, शौचास बसताना, मोठे वजन उचलताना मोठ्याने कण्हणे. २. आरंभिलेले कार्य विरुद्ध झाल्यामुळे खेद करणे. ३. बळाने कार्यसिद्धी करायचा यत्न करणे; जंगजंग पछाडणे; गुरगुरणे. [सं. कुन्थ = क्लेश भोगणे.]

**कुथवणे** पहा : **कुथाडणे**

**कुथंगळी** वि. रोगट; अशक्त : 'ती प्रकृतीने कुथंगळी असून मनाने दुबळी झालेली होती.' - पवा १९९.

**कुथा** स्त्री. झूल.

**कुथाडणे** सक्रि. कुथविणे; चोपून काम करून घेणे; बडविणे; ठोकणे. (खा. न.)

**कुथितमृदा** न. जमिनीवर पडणारे सेंद्रिय पदार्थ कुजून त्याच्या सूक्ष्म कणांची होणारी पूड. ही जमिनीचा कस वाढविते; खत.

**कुथिली** स्त्री. मर्कटी; एक वनस्पती.

**कुदई** स्त्री. कुदळी; टिकाव. (खा.) [सं. कुद्दाल]

**कुदकणे** सक्रि. यथेच्छ कुदलणे; मारणे; ठोकणे; लाथाबुक्क्यांनी तुडवणे.

**कुदणे** अक्रि. १. उडी मारणे. २. खेळणे (कु.) [हिं. कूदना]

**कुदणे** न. १. पिशाच्चाशी बोलत असताना धाडी करतो ते अंगविक्षेप.

(गो.) २. अवसर येणे; अंगात येणे. (गो.) [हिं. कूदना.]

**कुदबा** पु. आदर्शभूत पुढारी : 'कुद्बा उमराय नम्रत निशान.' - इम ६५. [फा. कद्वा]

**कुदबा** पु. त्रास; दंगा. (खा.)

**कुदर** स्त्री. कुदळ. (झाडी) [सं. कुदार.]

**कुदरत** स्त्री. सामर्थ्य; ईश्वरी शक्ती; प्रकृती; निसर्ग. [फा. कुदरत]

**कुदरती** वि. नैसर्गिक; स्वाभाविक.

**कुदरापादरा** पहा : **खुदरापादरा**

**कुदलणे** उक्रि. १. धसफस; निष्काळजीपणाने, भुसडा पडेल असे वागविणे, वापरणे (जनावर किंवा वस्तू). २. बडविणे. (खा. व.)

**कुदला-ळा** पु. छोटी राहुटी. ही डेऱ्यातच निराळी खोली केल्यासारखी उभी करीत असत: 'श्रीमंत स्नान करून धोतरें नेसत होते, धोतरें नेसून कुदल्यात जाऊन संध्येस बसले.' - ऐलेसं ४८५६.

**कुदळ-ळी-ळे** स्त्री. १ खणण्याचे एक हत्यार; टिकाव. याला एका बाजूला लोखंडी टोक व दुसरीकडे दांडा बसविण्याचे छिद्र असते. हिचे पानकुदळ, सुंबकुदळ, तोंडकुदळ, बेडगे असे चार प्रकार आहेत. २. (ल.) दांडगा; भांडखोर. [क. गुद्दलि, हिं. कुंदालि]

**कुदळ-ळी-ळे** स्त्री. धीमा, संथ गतीने काम करणारा माणूस. (व.)

**कुदळणे** उक्रि. कुदळीने खणणे.

**कुदळणी** स्त्री. कुदाळीने तोडणे व साफ करणे.

**कुदळपक्षी** पु. करकोचा पक्षी. हा साधारण माणसाच्या कमरेइतका उंच असतो. समुद्राजवळ एकलकोंडा राहतो. ह्याचे मांस एखाद्या लहान बकऱ्याइतके निघते. ते खातात.

**कुदळभारती** वि. ऐदी. (व.)

**कुदळा** पु. मोठी कुदळ. याच्या तोंडाला विळत किंवा पळीव असून दांडा कोनाकृती असतो. (को.)

**कुदंड-डी-ड्या कुंदडखोर** पहा : **कुंभाड, कुभांडखोर.**

**कुदंबक** पु. फुलझाड : 'पारिजातादि कुदंबक।' - मुआवि २८.८. [सं. कदंबक]

**कुदाईम** वि. कदीम; प्राचीन; पुरातन; जुने. [फा.]

**कुदाळणे** क्रि. पळविणे: 'कसे बैल कुदाळता आदाबादीची आवड' - बगा २१६.

**कुदाण्या** वि. फलाण्या; अमक्या : 'कुवाण्या तालुक्यांत धान्य बहुत आहेत.' - ऐलेसं १६१०.

**कुदांड** पहा : **कुभांड**

वि. दांडगा; भांडखोर; आडदांड; धसमुसळा : 'तुका शेंडे कुदांडपणाने बोलला.' - भेटी १४०.

**कुदांडा** वि. उच्छृंखल; आडदांड : 'कुदांडा मेघराज त्यांना रोज गुलांड्या दाखवत होता.' - भेटी ७५.

**कुदांडी** स्त्री. उद्धटपणा; दांडगाई.

वि. कुदांड्या; कुंभांडखोर; कुदांडखोर.

**कुदांड्या** वि. कुंभाड रचणारा.

**कुदिन** पु. पृथ्वीच्या दैनंदिन भ्रमणाचा काल. [सं. कु = पृथ्वी + दीन = दिवस]

**कुदी** स्त्री. उडी. (क्रि. मारणे, खाणे) (खा. ना.) [हिं] (वा.) **कुदून पडणे** - उडी घालून जाणे; तुटून पडणे : 'बापू होळकर इर्षेने पाय उतारा होऊन कुदून पडले.' - होकै ९३.

**कुद्दा** पु. काठीचा ठोसा. (व.) (वा.) **कुद्दावून भरणे** - गच्च भरणे, दाबून भरणे.

**कुद्दू** पु. एक मासा. (झाडी)

**कुद्रंपाद्रं** वि. कुजकट; लागण्यासारखे (बोलणे.)

**कुद्री** स्त्री. कुदळ. (झाडी) [सं. कुदार]

**कुद्रु, कुंद्रू** पु. कुरडू नावाची रानभाजी; कुंजीर.

**कुध(धा)ण-न** वि. संशयी; मत्सरी; खुनशी; चुरशी; हिरवट; विषण्ण; आतल्या गाठीचा.

**कुधाण-न काकडा** मत्सरी; संशयी; खुनशी (माणूस).

**कुधाणकी** स्त्री. कुधणाची अवस्था; मत्सर; द्वेष.

**कुधाणी** स्त्री. कुधाणपणा.

**कुधान्य** न. ज्यां धान्याचा देवाला नैवेद्य, वैश्वदेव करीत नाहीत ते. उदा. हरीक, उडीद, मसूर, लाख, चवळी, बाजरी इ. [सं.]

**कुधाक्ष** वि. वाईट वर्तणुकीचा.

**कुधांड-डी-ड्या, कुधांडखोर** पहा : **कुंभाड**

**कुन** स्त्री. नांगराचा दांडा घट्ट बसविणारी पाचर. पहा : **कुणी** (गो.)

**कुनकुणा** वि. कोमट.

**कुनबाईकी** स्त्री. १. मान्यता. २. शहाणपण : 'लांडी, लबाडी, अनुदारापणा हीं कुणबाईकीला शोभत नाहींत.' - संशोधन ७.१.२.

**कुनी** स्त्री. अंजिराचे लहान कलम.

**कुनीति-ती** स्त्री. १. अनीतीची वागणूक, वर्तणूक; पापाचरण. २. बेबंद राज्यव्यवस्था; अव्यवस्था; बेकायदेशीर अंमल. ३. अयोग्य कायदे; अहितकारक नियमपद्धती. [सं.]

**कुन्हा** पु. १. मर्म; खोड; दोष; मत्सर; चुरस; तेढ : 'त्याचे कुन्हे ध्यानात येण्याकरितां अलाहिदा पुरवणी तुम्ही लिहिली.' - मइसा ७. २. कुपथ्य. (क्रि. धरणे, ठेवणे.) ३.संशय; किल्मिष. [अ. कुन्ह]

**कुन्हारणे** सक्रि. मारणे; ठोकणे. (व.)

**कुन्हेबाज, कुन्हेवाईक** वि. खुनशी; आकसखोर.

**कुप** न. ढग : 'कुपें विस्तारलीं गघनीं।' - क्रिपु ७६.

**कुप** पु. ढीग; रास; जंगलातील लाकडाचे ढीग. [ते. कुप्प = ढीग; क. कोप्पे = रास]

**कुप** पहा : **कूप** : 'जन्मावरी दरिद्रें पीडिला त्यासि धान्याचा कुप सापडला।' - हरि २.९२.

**कुप, कुंपण** पहा : **कुंप** : 'होतें निर्भय आश्रित अवलंबुनि तुज जसे कुपा सरडे।' - मोसौप्तिक २.३६

**कुपट** स्त्री. १. शेत वगैरेची हद्द; काठ; बाजू. २. शेकोटी; पावटे, वर्णे, भुईमुग, चवळी यांच्या शेंगा भाजण्यासाठी केलेला विस्तव. (को.)

**कुपटे** न. लहान बाटली : 'रामाने चुटदिशी जाऊन कुपटे आणले.' - आआशे १८७.

**कुपण** न. पहा : **कुंपण**

**कुपण-णा** न. पु. दस्ता; बंदुकीचा हातात धरायचा भाग : 'सर्जेरावाच्या मुसक्या बांधून बाजारातून बंदूकीच्या कुंपण्यानें मारीत पलटणींत निघून गेले.' - दुर्दैवी मोहरे.

**कुपणकाठी** स्त्री. कुंपणाला लागणारे सामान : 'शेताची कुपणकाठी फुकटात होते.' - आआशे २८७.

**कुप(पं)थ** पु. १. आडवार; भलताच रस्ता. २. (ल.) पाखंड मार्ग.

**कुपथ्य** न. रोग्याला जे पदार्थ खाल्ले असताना अपाय होण्याचा संभव असतो अशा पदार्थांचे सेवन; अपथ्य; वावड्या पदार्थांचे सेवन : 'जैसा ज्वरित कुपथ्य मदें। सांडी जीवा।' - कथा २.७.१४८. [सं.]

**कुपराण** पहा : **कुफरांडी**

**कुपरी** स्त्री. वाईट संगत. [सं.]

**कुपरी** स्त्री. (तेलीधंदा) तेलाच्या घाण्यात लाटेवर असलेल्या आडव्या लाकडास (ढोक) अडकविलेली जाणारी काटकोनी खुंटी.

**कुपरी** स्त्री. आच्छादन : 'साहुनि साकारपणाची कुपरीं : मजलागी साहिली थोरी' - मुप्र ७६.

**कुपा** पु. १. विशेष प्रकारची बाटली; मोठी कुपी; शिसा. २. गारेसारखा एक दगड. याची रांगोळी करतात. [सं. कुतुप]

**कुपाकुपा** क्रिवि. कुंपणाजवळून. (झाडी)

**कुपाटी** स्त्री. कुंपण : 'गुरंढोरं चरत भोंताली, म्हणून आजेमामंजीनी कुपाटी घातली होती' - पडघ ४७ [व.]

**कुपातर** पु. पूड होण्याजोगा दगड. पहा : **कुप्पा** (गो.)

**कुपिका** स्त्री. कुपी; बाटली-: 'तंव इथें शब्द कुपिकेतळीं।' - ज्ञा ७. १८५ [सं. कंपू]

**कुपिट** वि. कुटिल.

**कुपित** वि. रागावलेला; कोपलेला; क्रुद्ध; क्रोधाविष्ट; संतापलेला. [सं. कूप् = रागावणे]

**कुपित-त्त-थ्य** न. १. अपचन. २. पोटातील न पचलेले अन्न. ३. आतड्यांत राहिलेल्या मळाच्या गाठी. ४. पोटात असलेला द्वेष, कपट. [सं.]

**कुपिया** वि. गुप्त; अंतस्थ : 'कुपियाने कांहीं करायचे नाहीं.' - पेद २०.२५६. पहा : **कुफिया**.

**कुपी-प्पी** स्त्री. १. बाटली (काचेची); शिसी : 'मद्यासक्त नरें अशी नच कधीं कांते कुपी झोकिली।' - केक १२. २. लहान भांडे. ३. कुपिनी, बुधली (झाडी). [सं.कुतुप]

**कुपीण-त-न** स्त्री. लंगोटी; काचा; कौपीन. (क्रि. नेसणे)(वा.) ० **लावणे** - कौपीन धारण करणे. : '.... रागे भरून सिरवा तोडली आणि धोत्रा फाडून कुपीत लाविला.' - ज्यू १३७. [सं. कौपीन]

**कुपीन** पु. लंगोटी : 'कासे धरी तरी कुपीनु नाही.' - लीचउ ४२.

**कुपे (पें)च** पु. अडचण; संकट; कचाटा : 'परंतु आवघडोन कुपेंची पडले आहेत' - पेद ५.६०.

**कुपेथर** वि. पांढरट, नरम, ठिसूळ भाग असलेला, कुप्प्या दगडासारख्या थरांचा (दगड, धोंडा).

**कुप्पा** पु. १. मोठी बाटली. २. गारेसारखा एक ठिसूळ दगड. याची रांगोळी करतात.
वि. दांडगा धिप्पाड.

**कुप्पा** पु. केर; कचरा; धूळ. (तंजा.) [त. कुप्पे]

**कुप्य** न. हीन धातू; हलका धातू; सोने, रुपे याखेरीज जस्त, कथिल इ. धातू. [सं.]

**कुप्रदक्षिणा** स्त्री. पृथ्वीला फेरी घालणे; पृथ्वीपर्यटन.

**कुफर** पु. स्वामिद्रोह; निमकहरामी : 'त्यांणी सर्कारलक्षे काही एक कुफर न करितां चालावयाचा तहनामा ठरविला.' - मराचिथोशा ६७. (वा.) **० तोडणे** - फितुर लोकांचा निकाल करणे, लावणे : 'रात्रंदिवस मेहनत जुने भांडणे कायल करणें, कुफर तोडणें हे करून तमाम खालील बंदोबस्त करून राहिलो.' - पुरंदभा ३.८५ [फा. कुफ्र]

**कुफराणदार, कुफरांडदार, कुफरांड-राण-णा, कुफ्राण** न. १. तोहमत; आळ; कुभांड : 'त्यावरि अजि कशीं कुफराणें।' - आकृ ३२. २. अधर्म; काफरशाही; लबाडी : 'पुढे धर्म उच्छिन्न होऊन तेरावे सद्दींत कुफ्राण माजेल.' - ऐस्फुले ६५. (क्रि. येणे, उठणे, घालणे, करणे) [अर. कुफ्र - कुफर]

**कुफरांडी-ड्या, फराणा-णी-ण्या** वि. आळ घेणारा; तोहमत्या; कुभांडखोर : 'नामदेवासी बोलिला काय। गातोसी काय कुफराणा।' - भवि १०.१७६; 'हा सोम ठाकूर कुफराणदार.' - मब ४६. [अर. कुफ्राण]

**कुफार** पु. लुच्चा, हरामखोर, बखेडखोर माणूस : 'जकार नामक म्हैसकर हस्तगत करावा सगळा कुफार तो आहे.' - ऐलेसं ५२०२ [फा. कुफ्फार]

**कुफिया** वि. अंतस्थ; गुप्त : 'परंतु कुफिया वर्तमान सांगितले की आम्हा रघोजी भोसले यांचा फार भरंवसा होता.' - पेद ६.१९ [फा.]

**कुफ्तगारी** स्त्री. एक प्रकारचे नक्षीकाम.

**कुफ्रान** न. कृतघ्नता.

**कुबजिका मार्ग** पु. खाचखळग्यांनी भरलेली वाट : 'तुं निगै कुबजिका मार्गे।' - ऋम २०७.

**कुबट** वि. १. कुजकट; सडका; बासट; बुरसट २. (ल.) निंदक; कुजक्या मनाचा. [क. कुमुट्]

**कुबटणे** अक्रि. उष्णतेमुळे, उबेमुळे आंबणे; आंबून नासणे (अन्न, फळे इ.); निस्तेज होणे (ज्वरामुळे).

**कुबटाची कढी** माशाची आमटी. मच्छीमार लोकातील शब्द.

**कुबड-णे** न. पाठीवरील आवाळू, गळू; वार्धक्याने आलेले पोक; पाठीच्या कण्याचे बूड. भारामुळे वाकणे (क्रि. निघणे, काढणे). [सं. कुब्ज]

**कुबडा-ड्या** वि. १. कुबड निघालेला (माणूस.). २. (थट्टेने) कुबडाभाई. (वा.) **कुबडी काढणे** - काही वाकडेपणा, व्यंग काढणे. [सं. कुब्ज]

**कुबडी** स्त्री. १ बैराग्यांची हात टेकण्याची किंवा खाकोटीला घेण्याची दुबेळक्याची काठी; अर्धगोलाकृती, काखेखाली धरता येईल अशी वरची बाजू असलेली. लंगडा, दुबळा इत्यादींनी वापरायची काठी.
**कुबडी** स्त्री. एक प्रकारची पाणगोगलगाय; खुबडी. [सं. कुब्ज]
**कुबणे** अक्रि. कुजकट वास येणे; बुरसटणे.
**कुबरा** वि. थोर. [फा.]
**कुब(ब्ब)ल** वि. १. कठीण; अडचणीचे. २. बळकट; भक्कम : 'कुबलगड भीरिका कुर्दुगडाचें चांगुलपण।' - ऐपो ८. (व.) ३. वाईट (आसक्ती) [फा. कुबाल = बांधणारा].
**कुबल** वि. सीमेपरता; निस्सीम; निकराचा : 'तेव्हा आतील पठाणांनीही भार कुबल दिला' - भाकै ११.
**कुबल** वि. नेभळट; बेशरम (झाडी). [सं. कूबर]
**कुबलणे** उक्रि. ठोकणे; मारणे; बदडणे. [क. कुबुलु]
**कुबा** पु. खुबा. पहा : **कुबडी १.**
**कुबीन** न. रेशमाची एक जात.
**कुबुज** वि. कुबड असलेला: 'देखे अक्षमे कुबुजें। किं विपलावों लागे फुंजे।' - राज्ञा १३.७५९. [सं. कुब्ज]
**कुबुद्धि-द्धी** स्त्री. वाईट इच्छा, विचार, बुद्धीचा दुष्टपणा. वि. वाईट विचाराचा, बुद्धीचा.
**कुबेकाठी** स्त्री. वल्हे : 'आत्मयाची करूनि कुबेकाठी। वारा लागतो जगजेठी।' - नागा २०७३.
**कुबेदमाल** वि. निरर्थक; पोकळ : 'कुबेदमाल गोष्टी बोलून आपले घरास यावे ही चाल येथील पडली आहे.' - मशियांका ५७१.
**कुबेर** पु. १. देवांचा भांडारी २. (ल.) श्रीमंत माणूस.
**कुब्ज, कुब्जक** वि. कुबडा : 'आणि आपुली माये। कुब्ज जरी आहे' - ज्ञा १८.९२० [सं.]
**कु(कुं)ब्या** पु. बडवलेला, खच्ची केलेला बैल.
**कुब्रा** वि. थोर. [का.]
**कुभडळी** स्त्री. कवंडळ झाड (गो.).
**कुभाव** पु. १. वाईट स्वभाव; संशयी वृत्ती; अविश्वासी स्वभाव. २. मत्सर; द्वेष; खोटी बुद्धी; वरवरचा कुडा भाव.
**कुभांड, कुभांड-आभांड** न. १. तोहमत; आळ; खोटा आरोप; लबाडीची टाळाटाळ. (क्रि. आणणे, घालणे, रचणे, रचविणे, करणे, उठविणे.) २. कारस्थान; कट; वाकडी व छळदायक मसलत; बनावट पुराव्याचा डोलारा : 'त्याने निराळेंच कुभांड रचून बादशहाच्या मनात भरवून दिले.' - उषःकाल. [सं.]
**कुभांडखोर, कुभांडी-ड्या, कुभांडी(ड्या) - आभांडी(ड्या)** वि. १. कुभांड रचणारा. २. तोहमत आणणारा; कपटाचे कारस्थान करणारा.
**कुभे** स्त्री. दोष : 'म्हणजे यात हुस्न - कुभेह कोणती आहे ती ध्यानात येईल.' - मइसा ५.८४. [फा. कुब्ह]
**कुमक** स्त्री. मदत; उपराळा; साहाय्य (सैन्य, पैसा इत्यादीचे); मदतीस आलेले सैन्य, द्रव्य इ. रसद : 'इंग्रज़ांस कुमकेस प्रसंगी बरोबर घेउनिया।' - ऐपो २९६. [फा. कुमक्]
**कुमकणे** सक्रि. ठोकणे; चोपणे; बुकलणे; बदडणे : 'त्याला गोधडीत गुंडाळून कुमकून कुमकून मारले.' - शेलूक ३५.
**कुमकपत्र** न. शिफारसपत्र पहा : **पत्र.**
**कुमका** पु. ठोसा; तडाखा; बुकीने केलेला प्रहार. (को.)
**कुमकुम** स्त्री. तक्रार : 'गंगा भेटायला जायची, घरातली कुमकुम सांगायची.' - गांधारी २१.
**कुमकुमा** पु. पातळ काचेचा, गुलाल भरलेला गोळा; गुलालगोटा. होळी अगर इतर समारंभांत हा एकमेकांच्या अंगावर फेकत असत. [फा.]
**कुमकुमीत** वि. गुबगुबीत; लठ्ठ (कु.).
**कुमटका, कुमटपिका** पहा : **कुमेटका** (राजा. कु.)
**कुमती-ति** स्त्री. वाईट बुद्धी; दुष्ट बुद्धी; वि. वाईट बुद्धीचा; दुरात्मा. [सं.]
**कुमदान** पु. पलटणीवरचा मुख्य अधिकारी : 'हैदर नाईक यांचे लष्करात मुसा इंगल कुमदान आहे.' - ऐलेसं १४५०.
**कुमनदान** पु. (कमांडंटचा अपभ्रंश) विशिष्ट संख्येच्या सेनाविभागाचा प्रमुख अधिकारी : 'येक दोघे कुमनदान सरदार, पाडाऊ खान मजकुराचे फौजेत आले.' - पुणे अखबार भा. १.१६२.
**कुमरा - कुमार** पु. मुलगा (सामान्यपणे) बारा वर्षांखालील मुलगा. २. राजपुत्र (विशेषतः युवराज) ३. कार्तिकेय : 'ज्याच्या भये होय कुमार जोगी।' - सारुह ३.१२८. [सं.]
**कुमरावळी** स्त्री. उद्भव; परंपरा : 'कुमरावळी ते दीन्हली ऐसी.' - शिव ९८.
**कुम(मा)री, कुमारिका** स्त्री. अविवाहित - विवाहयोग्य मुलगी: 'कुमारी लीळाविनोदें खेळीनली।' - उह १२.१४
**कुमरी** स्त्री. (कृषि.) स्थलांतरित शेती. आदिवासींची शेती करण्याची पद्धत. ते जंगलतोड करून शेती करतात. २-२ वर्षांनी धूप होऊन ती जमीन नापीक झाली की इतरत्र शेतीसाठी जातात. २. जमिनीचा एक प्रकार. पहा : **कुंबरी**
**कुमरी** स्त्री. घोड्याचा एक रोग. - अश्वप १.२४८.
**कुमलणे** पहा : **कुमकणे**
**कुमळे** न. १. मिराशीने धारण केलेल्या जमिनीचा खंड, भाडे (कु.) २. नारळ सोलण्याचे भाल्यासारखे, हत्यार; उत्कड. (गो.) २. एक प्रकारची मापाची पद्धत.
**कुमाइ(य)त** वि. सारंग रंगाचा; दांडी, आयाळ, गुडघे, पाय, कान हे काळे असून बाकीचे शरीर तांबूस असणारा (घोडा) : 'परम रागीट कुमाईत। बदकश्याम स्थिर चालत।' - हरि २२.४५. [फा. कुमैत]
**कुमाईत अबलक** अर्धे शरीर तांबडे व अर्धे पांढरे असा (घोडा.)
**कुमाट** स्त्री. कंबर.
**कुमा(बा)न्न** स्त्री. कुंभारीण माशी. (सपक्ष कीटक) (गो.)
**कुमार** पु. कुंभार (गो.)
**कुमारि(री)का, कुमारी** स्त्री. अविवाहित मुलगी; तरुण मुलगी.

**कुमारिका, कुमारी** स्त्री. कोरफड.
**कुमारी** स्त्री. पाखराने खाल्लेली कोवळी सुपारी. (कु.) पहा : **कुंभारी.**
**कुमाव** पु. पायखाना; संडास. (गो.) [पो.]
**कुमुद** न. पांढरे कमळ; चंद्रविकासी कमळ : 'कुमददळाचेनि ताटे।' - ज्ञा ५.१०७. [सं.]
**कुमुदबांधव** पु. चंद्र.
**कुमुदिनी** स्त्री. १. कमलिनी; श्वेतकमल. २. कमळाची वेल. ३. श्वेतकमळ असलेले तळे. [सं.]
**कुमुव्दती** स्त्री. (संगीत) दुसऱ्या श्रुतीचे नाव. [सं.]
**कुमेटका** वि. अर्धवट पिकलेला; पिकण्याच्या मध्यमावस्थेतील (आंबा, फणस इ.). (राजा. कु.)
**कुमेत-द** पहा : **कुमाईत** : 'हुजूरच्या कुमेद नरमाद्या हिंसती।' - प्रला १२३.
**कुमेर** स्त्री. पावसात पेरण्यासारखी जागा; बरड जमीन भाजून कडधान्य पेरणे. पहा : **कुंबरी, कुमरी** (गो.)
**कुमैत** वि. १. पहा : **कुमाईत** २. (ल.) संशयी; हुशार : 'परंतु ती आटोकाट कुमैत तिजला कोणाचा विश्वास नाही.' - ऐलेसं १.३१२. [फा.]
**कुमोदकमळ** न. चंद्रविकासी कमळ: 'तेथे उपलवत चंद्रसूर्यांऐसी : कुमोदकमळें' - रुस्व ८६४.
**कुय** स्त्री. आरडाओरड; रडारड; कीच; बोंबाबोंब. पहा : **कुई** [ध्व.]
**कुयटारू** वि. कुईटाने शाकारलेले. (को.)
**कुयरा-री-रे** 'कुइ' मध्ये पहा.
**कुया** स्त्री. पावसाळ्यात पाण्यात राहिल्यामुळे पायांच्या बोटांची बेचके कुजणे. बोटामध्ये होणाऱ्या चिखल्या. [सं. कुहू = कुजणे]
**कुयाडे** न. १. पहा : **कुवेडे**. २. पिकलेले आंबे उकडून त्यांचा बाठासकट रस काढून त्याला मीठ, तिखट, मोहरी इ. लावून फोडणी देऊन तयार केलेले तोंडी लावणे. (को.)
**कुये** न. बैल बडविण्याची क्रिया. ० **काढणे** - सक्रि. ठोकणे, मारणे, कडवळणे.
**कुयँ** न. पेजेतील शीत. (कु.गो.)
**कुयोगिया** पु. दुराचरण करणारा : 'कुयोगिया द्रव्ययंत्रसेवेतंवं धर्मापासीनि जाए:' - लीचउ ३८७.
**कुर** पु. कोरडे लाकूड घासल्याने, दार वगैरेच्या बिजागरीत तेल न घातल्याने होणारा आवाज. [ध्व.]
**कुरई** स्त्री. एक दालद्यासारखी आरमारी जात : 'यैशासी कुरई व दालदी लोक जंजिरा श्रीमंत मातुश्री बाईसाहेबाचे भेटीस गेले.' - पेद ३३.८१.
**कुरकुट** पु. कुकुडकुंभा; भारद्वाज : 'कुरकुट चंडोल काग घेती फार लाहो।' - प्रला १२.
**कुरकुट(ड)णे** उक्रि. १. कुरतडणे; दाताने तोडणे. २. खुडणे; नखाने तोडणे.
**कुरकुटांवचे** सक्रि. अपहार करणे. (गो.)
**कुरकुटी** स्त्री. शिरशिरी (तापाची); शहारे; हुडहुडी. (को.) [ध्व.]
**कुरकुर** उद्गा. १. कुत्र्याच्या पिल्लांना बोलावण्यासाठी लहान मुले म्हणतात. २. मुक्या माणसाला चिडविण्यासाठी नाकावर हात ठेवून केलेला शब्द. [सं. कुर् = शब्द करणे.]
स्त्री. १. चिरचिर; पिरपिर; तक्रार (क्रि. करणे, लावणे) २. कटकट; धुसफूस.
क्रिवि. कुरकुरीने; धुसफुशीने. [सं. कुर्]
**कुरकुरणे** अक्रि. १. कुरकुर करणे; सौम्यपणे तक्रार करणे; नापसंती व्यक्त करणे. २. चिरचिर; पिरपिर करणे. ३. पोटात गुरगुरणे. ४. डुकराचा आवाज करणे : 'जो सूकरांमधे कुरकुरितो।' - दास २१.१.२३ [सं. कुर् = शब्द करणे.]
**कुरकुरा** स्त्री. पोटातील घुरघुर. [ध्व.]
**कुरकुरी** स्त्री. घोड्याच्या पोटात होणारा एक रोग. (व.)
**कुरकुरीत** वि. चुरचुरीत; चुरडताना कुरकुर आवाज होणारा; कुडकुडीत; खुसखुशीत. [सं. कुर् = शब्द करणे]
**कुरकुला** पु. हा एक चिखलात, सर्व जमिनीत येणारा रोपा आहे. याची भाजी अळवासारखी पण बुळबुळीत होते. [सं. कर्करि]
**कुरकुला-ली-ले, कुरकूल** पु. स्त्री. न. नाना प्रकारचे जिन्नस ठेवण्यासाठी कळकाच्या कांबीची केलेली दुरडी, पाटी, टोपले, करंडी, पेटारा, पात्रे, साधने. ही लहान मोठी असतात (खेळण्यासाठी, भाजी धुण्यासाठी वगैरे).
**कुरकुंचा** पु. करकोचा.
**कुरकुंची** स्त्री. करकोचीण; करकोचा [सं. क्रौंच.]
**कुरगई** स्त्री. गाडीचा एक भाग. (बे.).
**कुरगत** न. पीराचे स्थान : 'कुरगताच्या साक्षी लावूनी।' - एहोरा १.८९.
**कुरगी** स्त्री. शेतीचा औत.
**कुरगोट्या** स्त्री. अव (गोट्या) ज्यामध्ये जिंकलेल्याच्या पाठीवर बसायला मिळते असा गोट्यांचा डाव; ढोपरगोट्या; अगळगोट्या. पहा : **कोंडडाव**
**कुरघोडी** स्त्री. १. दुसऱ्याला पाठीवर घेण्यासाठी ओणवे होणे. २. (ल.) छी थू करणे; पायाखाली तुडविणे; मात करणे; वरचढपणा गाजविणे : 'स्वार्थ साधण्याकरिता ते दोघे एकमेकांवर कुरघोडी करण्याच्या विचारात होते.' - स्वप. ३. एकापुढे एक पाच सहाजण ओणवे उभे राहून अगदी मागच्याने पुढच्यांच्या पाठीवर थाप मारून जाऊन बसण्याचा खेळ. (क्रि. करणे) : 'शिवाय कुरघोड्या वेगळ्या.' - अफला २५. ४. (चेंडू.) एका बाजूचे गडी ओणवे राहून दुसऱ्या बाजूचे त्यांच्या पाठीवर बसतात व आपल्यापैकी एकाकडून चेंडू वर उडवतात. नंतर तो चेंडू ज्या बाजूचे गडी जिंकतील त्यांना डाव आला असे समजून त्यांना दुसऱ्या बाजूच्या गड्यांच्या पाठीवर बसायला मिळते.
**कुरचणे** उक्रि. कुरतडणे. (राजा.) पहा : **कुरकुटणे**
**कुरचा** पु. बोचकुरा; ओरखडा. (क्रि. काढणे, घेणे) (राजा.)
**कुरचा** पु. पंजात पकडणे.

**कुरचूक** वि. ठिसूळ; ढिसूळ (काच, लाकूड इ.) : 'ते झाड फार कुरचूक त्यामुळे फांदी मोडून कोसळेल' - माजी ११.

**कुरड्या** पहा : **इया, इया, इया.** बैल, घोडा यांना हाकताना उच्चारायचा शब्द.

**कुरटा-ठा** वि. १. खुरटा; खुजा २. मनात कुढणारा: 'कुरटें कुचल नाठाळ।' - दास २.३.२३.

**कुरटा-ठा** पु. १. घरटे (पक्ष्याचे) : 'तृष्णापक्षिणीचा कुरठा मोडिला।' - विपू १. १०१. २. कोठा; कोठी; घर : 'ना तो अनंगाचा कुरठा।' - शिव ४६.

**कुरटेल** वि. खुजा. (व.)

**कुरठणे** पहा : **कुढणे** : 'तो आपल्याशीच कुरठून बसतो.' - वज्रा २१६.

**कुरडई** स्त्री. गव्हाच्या चिकापासून करायचा शेवेसारखा गोलाकार पदार्थ. हा वाळवून व तळून खातात. हा तांदळाच्या उकडीचा किंवा साबुदाणाच्या पिठाचाही बनवतात. कुरवाडी. (तंजा.) [ध्व.]

**कुरडणे** सक्रि. उपटणे; तोडणे : 'खुरट्या मिशा नखांनी कुरडत' - माण ३२.

**कुरडा** पु. १. संकुचित, बारीक डोळा. (राजा. कु.) वि. अशा डोळ्याचा (माणूस). [क. कुरुड = आंधळा]

**कुरडुके, कुरडूके** पहा : **कोरडिके**

**कुरडू** पु. स्त्रियांच्या कानातील एक दागिना व तो घालण्याची जागा. [सं. भूरुंडी]

**कुरडू** स्त्री. एक रानझुडूप. पांढऱ्या माठाच्या जातीची भाजी.

**कुरडेपणा** न. आंधळेपणा. (गो.)

**कुरण** न. १. गवतासाठी राखलेली जमीन; गायरान. २. (ल.) चरण्याची, भक्ष्य मिळण्याची जागा; लाभदायक वस्तू; भरपूर लाच, फायदा इ. मिळण्याचे ठिकाण, नोकरी. [सं. कु + अरण्य]

**कुरणे-ण्या** पु. कुरणावर देखरेख ठेवणारा अधिकारी.

**कुरणेकरी** पु. फार दिवसांच्या दुखण्याने अशक्त झालेला माणूस.

**कुरणो** पु. अर्धा कापा व अर्धा बरका फणस. (कु.)

**कुरतडणीयंत्र** न. शेती कामात वापरले जाणारे तंतुमय वस्तूंचा भुगा करणारे यंत्र.

**कुरत(तु)डणे** उक्रि. दातांनी किंवा नखांनी बारीक तुकडे करणे. [ध्व.]

**कुरदी** स्त्री. पिठाची चक्की. (व.)

**कुरनिसा(शा)त** स्त्री. नम्रपणाने केलेले अभिवादन; सलाम; प्रणिपात; मुजरा : 'कुरनिसां करति जन वाड्यामध्ये जाउनी।'- ऐपो २०१. [तु. कोर्निशात]

**कुरपण, कुरपाणा-णी** न. पाटी किंवा टोपलीला दोऱ्या बांधून करतात ते. शिंके; शिंकाळी. यात भांडी वगैरे ठेवतात. आंबे उतरवण्यासाठी टोपलीला दोऱ्या बांधून करतात ते शिंके; परडी. (को. गो.)

**कुरपणे** अक्रि. कमी होणे: 'त्यामुळे कुरपत जाणाऱ्या भांडणाचा पुन्हा भडका होईल.' - धग १३६.

**कुरपे** न. खुपऱ्या (डोळ्यातील). (खा.)

**कुरबक** कोरांटी. (सुष्टिज्ञान ए १९४९)

**कुरबाण-न** न. देवाला दिलेला बळी; बलिदान उतारा : 'मी तुझ्या एका शब्दाकरिता हा माझा देह कुरबाण करीन.' - स्वप ४३०. (क्रि. करणे.) [फा. कुर्बान]

**कुरबानी** स्त्री. बलिदान; ओवाळणी; बळी देण्याची क्रिया, उतारा. [फा.]

**कुरबु(बू)र** स्त्री. १. फुणफुण; पुटपुट; कुटकुट; रागाची गुरगुर; कटकट (क्रि. करणे, लावणे. होणे) २. तंटा; कलह; धुसफूस : 'वसाहतवाल्यांची व इंग्रजांची करांच्या बाबतीत कुरबुर होऊन....' - निमा ७३१. [ध्व.]

**कुरबुर** पु. धनगर (बे.). [त., क. कुरुब = धनगर]

**कुरबु(मु)रणे** अक्रि. १. धुसफुसणे; रागावणे; चरफडणे. २. पोटात कुटकुटणे, कुरमुरणे. [ध्व.]

**कुरमणे** क्रि. १. धुमसणे. २. (ल.) क्रोधादिकाने धुसफुसणे. ३. पोटात कुरबुरणे.

**कुरमा-मे** पु. न. १. अंगात विकार मुरल्यामुळे येणारा थकवा. २. मुरलेले पडसे. (चि.)

**कुरमाईत** क्रिवि. थोडे थोडे; हळूहळू (व.).

**कुरमुड-डे** न. कोशिंबीर. (व. ना.).

**कुरमुर** स्त्री. १. पहा : **कुरबुर**: 'सलगी धरी पयोधर। सहातें कुरमुर सर्वे।' - तुगा १२७. २. पोटातील गुरगुर. (क्रि. उठणे, निघणे, राहणे.)[ध्व.]

**कुरमुरा-री-रे** पु. स्त्री. भाजलेले पोहे; चुरमुरे; मुरमुरे; उबजे तांदूळ इ. भाजून केलेला कुरकुरीत पदार्थ. [ध्व.] (वा.) ० **खात बसणे** - (ल.) इच्छेविरुद्ध गोष्ट झाली असता निरुपायाने मनातल्या मनात चडफडणे.

**कुरर-री** स्त्री. १. टिटवी. २. टिटवीचा शब्द : 'कुरर बोलिजे टिटवा।' - एभा ९.४०. [सं.]

**कुरला-ले-लो-ल्ली** स्त्री. न. लहान खेकडा; कर्कट. हा मृगाच्या पावसात उत्पन्न होतो. 'नदीत जाऊन कुरले तरी काड.' - शेलुक २५. [सं. कुलीरक]

**कुरली** स्त्री. हाताचा एक रोग; हातावरील गळू. याने बोट सुजून आखडते. ह्यावर खेकड्याच्या बिळातील मातीचा लेप देतात. [सं. कुलीरक]

**कुरव** पु. एक समुद्रपक्षी. हे पक्षी जमावाने मधून मधून समुद्राच्या पाण्यात पोहतातही. हे युरोपातून हिंदुस्थानात आलेले आहेत.

**कुरव** पु. ज्या स्वरात लयबद्धता नसते असा कर्कश आवाज.

**कुरव(वं)डी, कुरोडी** पहा : **कुरडई** : 'तिया ग्वाढिती कुरवंडिया। पर्पटेसी।' - ऋ ८२.

**कुरवंडणे** उक्रि. कुरवंडी करणे; ओवाळणे; ओवाळून टाकणे. अरिष्ट विनाशार्थ देवाची मूर्ती वा माणूस (बालक, नववर - वधू इ.) यांच्या भोवती तांदूळ - मीठ इ. ओवाळून टाकणे: 'संपत्तिमदु सांडिजे। कुरवंडी करूनी।' - ज्ञा ९.३८९.

**कुरवंडा** वि. उथळ; थोडे पाणी राहणारे (भाताचे उंचट खाचर). (को.)

**कुरवा** पु. मातीचा पेला, भांडे; कुल्हड : 'काशीस गेल्यावर दही वगैरे वस्तू मातीच्या कुरव्यांतून देण्याची वहिवाट आहे.' - आनंद, मार्च १९३४.

**कुरवा** स्त्री. अव. (नाविक) गलबताच्या पुढील खांद्याला आतील बाजूस घालावी लागणारी (V) अशा आकाराची लाकडे.

**कुरवाडी** पहा : **कुळवाडी** : 'रानातून परतलेल्या कुरवाड्याच्या बायकांनी घाईघाईने चुली पेटवल्या होत्या.' - व्यंमाक ९.

**कुर(रु)वाळणे** उक्रि. ममतेने लहान मुले वगैरेंच्या अंगावर हात फिरविणे; गोंजारणे : [क. कूर = प्रेम करणे]

**कुरवाळा** पु. कुरवाळण्याची क्रिया : 'नावेक केला कुरवाळा।' - कथा १.८.३५.

**कुरशी** स्त्री. पिढी.

**कुरसता** स्त्री. कुन्हा; द्वेष; खुनस.

**कुरसाकुरस** स्त्री. कुरबुर; स्पर्धा; तेढ; मत्सर: 'याची त्याची अन्तरंग कुरसाकुरस वाढली.' - पेद २८.१५७. [ध्व.]

**कु(खु)रसी** स्त्री. १. खुर्ची. २. खांबाचे उथळे. [फा.]

**कुरसीनसी** वि. फाइलावर घेणे; रुजू करून घेणे. काम चालू करणे : 'बहुताप्रकारें बोध करून काम कुरसिनसी करून जाब लिहून द्या अशी आम्ही सूचना केली....' - पेद १५.३०-३१.

**कुरसी व दरकुरसी** वंशपरंपरा; पिढीदरपिढी : 'बुनियाद कुरसी व दरकुरसी पिढी व दरपिढी पदरजाती....' - पेद २१.४५.

**कुरळ** न. केस : 'नखें सरिसीं केलीं कुरळें।' - रुस्व

**कुरळ-ळीत** वि. वेटाळलेले; वाकडे; मोकळे सुटले असता ज्यांचे वेटोळे होते असे; सुशोभित (केश). [सं. कुरुल - कुरूल]

**कुर(रू)ळी** स्त्री. दशा; धोतरजोडा, पंचाजोडी यांच्यामध्ये दोन भाग करण्याच्या ठिकाणी किंवा लुगडे वगैरे मध्ये शेवटी पदराच्या ठिकाणी आडवी सुते न भरता निवळ उभी सुते (ताणा) असतात ती जागा. पहा : **करळी**

**कुर(रु)ळी** स्त्री. खिजणी; चेष्टा (क्रि. करणे); चेतवणी (हत्ती, घोडे इ. ना त्यांची शक्ती दाखविण्याकरिता.).

**कुर(रु)ळी** स्त्री. एखादी गोष्ट छडा लावून शोधणे (एखाद्या माणसाच्या आयुष्यातील - त्यावर आरोप करण्यासाठी आधार म्हणून). (क्रि. काढणे) [सं. कुरूल]

**कुरंग** स्त्री. एक प्रकारचे गवत. (बे.)

**कुरंग** पु. हरिण; काळवीट; कस्तुरी मृग. [सं.]

**कुरंगनयना-नी, कुरंग नैना-नी** स्त्री. हरणासारखे काळेभोर डोळे असलेली स्त्री. (सौंदर्याचे एक लक्षण) : 'यावरी बोले कुरंगनयनी।' महिपति (नवनीत २४४)

**कुरंगिणी** स्त्री. हरिणी : 'आळवितों जैसें पाडस कुरंगिणी। पीडिलीया वनीं तहानभूकें।' - तुगा १६०५. २. हरिणासारखी चपळ स्त्री.

**कुरंटक** पु. कोरांटीचे फूल.

**कुरंड** पु. पित्तदोषामुळे मुलांच्या अंडामध्ये होणारा रोग. त्यासाठी त्या मुलाच्या कानावर वेध करतात. कुरंड उजवीकडे असल्यास डावीकडे, व डावीकडे असल्यास उजवीकडे वेध करावा. - योर २. २४१[सं.]

**कुरंद-दी** पहा : **कुरुंद -दी**

**कुरं(रूं)दी-थी** स्त्री. लहान कोयती; खराळी. (को.) [क. कुरचिगे]

**कुरंधन** न. एक रानटी फळ : 'मुर्खी पीळीलीं कुरंधनें।' - मुप्र. २९८५.

**कुरा** पु. कुर्रा; नखरा; भानगड : 'तुरा शोभतो कुरा जयाची मोठी दहशत।' - ऐपो. २. २६७. पहा : **कुरी**

**कुरा** स्त्री. (उचले) भाजी - दाकोपु.

**कुराईत** वि. थोडे थोडे. (ना.)

**कुराटीवाले** पु. अव. कुऱ्हाडीवाले; परशूवाले : '.... दुराटीवाले कुराटीवाले तिरंदाज व पठाण वगैरे मिळून....' - मदरु १.३१.

**कुराड** स्त्री. कुऱ्हाड : 'गवतं, कुडवं .... कुराडी, काय गावल ते शेगलं.' खळाळ १६. [सं. कुठार]

**कुराडी लगाम** लगामाचा एक प्रकार : '१ लगाम कुराडी जुना २ खरारा व १ तंगाची कढी.' - ऐलेसं ४१६४.

**कुराडा** पु. सायक; शस्त्र; बाण; अस्त्र. पहा : **कुऱ्हाड, कुऱ्हाडा** : 'धनुषी योजिले कुराडें। वज्रातुल्य तेजस्वी।' - मुआदि २२.२०

**कुराड्या** वि. निर्जन. (झाडी)

**कुराड्या** वि. तोडायचा (दात) : 'मुखामध्ये कुराडे व उखळे वगैरे दातांनी बारीक चावलेले पदार्थास....' - जोफु १७१.

**कुराण-न** न. मुसलमानांचा पवित्र धर्मग्रंथ (वा.) **० करणे, ० दरम्यान करणे** - कुराणाची शपथ घेणे : 'आमचे तर्फेने वसवास असिला तरी आम्ही कुराण आपले करितो...' - पेदमा २७.१६९ 'पातशहाचा व नवाबाचा शपथपूर्वक स्नेह झाला. कुराण दर्म्यान दिल्हे.'-पेद १५.५१ (वा.) **कुराणावर मोहोर करणे** - शपथप्रमाण करण्याचा मुसलमानांतील एक प्रकार : 'मिर्झा सफीखान (वगैरेंनी) कुराणावर मोहरा करून दिधल्या की आम्ही हजरतीशी अंतर करणार नाही.' - राजवाडे स १२.२८.

**कुरापत** स्त्री. १. गुप्त दोष; व्यंग. २. खोडी; कुचेष्टा; कुचाळी. ३. जखमेवर टोचणे (क्रि. करणे). ४. भांडण उकरून काढण्याला शोधलेले निमित्त; कळ काढणे. (क्रि. काढणे, करणे.) [अर. खुराफत]

**कुरापती** वि. कुरापत काढणारा; दोष, भांडण उकरून काढणारा.

**कुरांकुल** पु. क्रौंच पक्षी.

**कुरी** स्त्री. १. भूत, रोग इ. चा उपद्रव न व्हावा म्हणून अमुक एका वेळी अमुक एक उपाय करावा असे जे नियम ठरविलेले असतात ते; तो उपाय करण्याची वेळ; त्या वेळी द्यायचा बळी; त्या वेळची क्रिया : 'म्हसोबाची कुरी वेळच्या वेळेवर न पोहोचली....' - नाता १३४. २. (सामान्यत:) ठरावीक वेळ. कुरीवर बसवणे- जाग्यावर आणणे. (वा.) [क. कुरी = मेंढी]

**कुरी** स्त्री. पाभर; धान्य पेरण्याचे अवजार (चाडे व नळ्याविरहित); कुरगी [क. कुरिगे]

**कुरी** स्त्री. अर्धा बिघा (जमीन मोजण्याचे माप).

**कुरी** स्त्री. दलदलीत राहणारा एक पक्षी.

**कुरी** स्त्री. १. मृग : 'कुरीचे नक्षत्र वर चढत होते.' - वारी १२.२. कला -चंद्राची.

**कुरु** पु. भात : 'मेलयावरि कुरु कैसा खाल :' - गोप्र २६.

**कुरुकुली** स्त्री. लहान टोपली : 'श्रीकरीं कुरुकुली घेवूनी केजी घेति।' - गोप्र ११

**कुरुचीमुरुची** क्रिवि. १ पर्यायाने; ठोकळ मानाने; आडमार्गाने; अत्राप; अडपझडप; अवांतर रीतीने (मिळविणे, संपादन करणे.) २. काटकसरीने; बेताबेताने (खर्च.) ३. हळूहळू; थोडेफार (पोट दुखणे, ताप येणे). [ध्व.]

**कुरुठा** पहा : **कुरटा-ठा** १, २ : 'यांचा पहिला कुरुठा इंद्रियें।' - ज्ञा ३.२६८.
वि. शहाणा .

**कुरु(रू)प** न. अडचण; सांदकोंध खाचखळगे : 'बसवाडा जागा भारी कुरुपाची होती.' - पेद २१.१७७.

**कुरु(रू)पणे** अक्रि. खवळणे; क्षोभणे; वाढणे; चढणे : 'मग वोसंडलोनि दर्पे। कामा हि पित्त कुरूपे।' - ज्ञा १६.३९४.

**कुरु(रू)पदार** वि. १. लौकिकवान. २. अभिमानी (माणूस) : 'कुरूपदार माणसास ह्याच गोष्टी योग्य आहेत.' - भाइसंत्रैव ८ अं. १, २.८९.

**कुरुम** न. पाणी; तेज: 'हय कुरुम डोळ्यामधि भरपूर।' - एपोकेखं २.१७७.

**कुरुवालणे** पहा : **कुरवाळणे** : 'या लागि आंग न कुरुवाली।' - राज्ञा १२.२८५.

**कुरुवाळा** पु. कुरवाळणे; एकमेकांना खाजवणे : 'तेथ कुरुवाळा करिते।' - उगी ३१९.

**कुरुविंद** न. माणिक : 'अभिनव कुरुविंदे रंजल्या अंजलींसी।'-दस्व ३१. [सं.]

**कुरुष** पु. रोष; आठी; कुढावा : 'निजाम अल्ली खानाचे चित्तात अद्यापि कुरुष आहे.' - विंचूइ ५२.

**कुरुस** पु. उभ्या रेषेला आडव्या रेषेचा छेद देऊन होणारी, ख्रिस्ताचा ज्याच्यावर वध झाला त्या स्तंभाची आकृती : '(इगर्जीवरचा) कुरुस कळसाच्या दुपटीन वर गेला होता.' - काशभट ८१. (इं. क्रॉस)

**कुरुस** न. शत्रुत्व : '..... मोहिद्दीखानासी कुरुस राखोन आम्हांसी येखलासी (स्नेह) करावी....' - हिंदखं १.४२

**कुरुळ** पहा : कुरळ

**कुरुक्षेत्र** न. १. जेथे कौरवपांडवांचे महायुद्ध झाले ते रणक्षेत्र. २. (ल.) फार मोठी रणधुमाळी, वादविवाद. (वा.) **कुरुक्षेत्रीचे वृद्धीने व्याज** - चक्रवाढव्याज : 'जर ठेविलेंस तर कुरुक्षेत्रीचे वृद्धीने जन्मजन्मी वाढते.' - ब्रच २९८.

**कुरुंग** वि. हरिणाच्या रंगाचे : 'कुरुंग कवडे निवडीले।' - लीचपू २८.

**कुरुंग** पु. डोळ्याच्या कोपऱ्यात असणारा तांबडेपणा. हे निर्धनतेचे एक लक्षण समजले जाते. पहा : **कुरुंद, कुरुम**

**कुरुंज** पु. जनावरांच्या पोटातील रोग. (गो.)

**कुरुंद** पु. १. एक प्रकारचा तांबूस रंगाचा, जाते, निसणा यांच्या उपयोगी पडणारा दगड. हा हिंदुस्थानात फार सापडतो. हे हिऱ्याच्या खालोखाल कठीण द्रव्य आहे. शुद्ध कुरुंद अल्युमिना मातीचा बनलेला असून त्यात चुना व सिकता यांचे अंश असतात. माणिक, नीळ ही प्रसिद्ध रत्ने कुरुंदाची आहेत. २. डोळ्याच्या पांढऱ्या भागावरील तांबडा ठिपका. पहा : **कुरुंग** [क.] [इं. कोरंडम] [सं. कुरुविंद]

**कुरुंद-दी** वि. कुरुंद दगडाचा.

**कुरू** स्त्री. खूण. (गो.) [क. कुरुपु = चिन्ह, खूण]

**कुरू** पु. राग, क्रोध.

**कुरूठा** वि. १. शहाणा २. गाठाळ.

**कुरूड** कानात घालायचा दागिना : 'मग चौफुले, कुरूड.....' - गेलेते १८.

**कुरूड** पु. गुरांचे रक्त पिणारा किडा. (झाडी)

**कुरूप** पु. व्यंग असलेला चेहरा.
वि. नकटेपणा, व्यंग इ. दोषांमुळे वाईट दिसणारे माणसाचे रूप, चर्या; विरूप; बावळट. [सं.]

**कुरूप** न. पु. खडा अगर काटा टोचून (हातापायाला) आत झालेले क्षत, घर; भोवरी; घट्ट्यासारखे कठीण आवाळू. [सं. क. कुरुबे]

**कुरूपणे** अक्रि. खवळणे; क्षोभणे.

**कुरूम** पु. डोळ्याच्या पांढऱ्या भागावर येणारे मांस. पहा : **कुरुंग**
न. जहाजाच्या नांगराचा दोर, साखळदंड. २. पहा: **कुरूप**

**कुरूळ** पहा : **कुरळ**

**कुरे** क्रिवि. निश्चयाने.

**कुरों(रौं)डी** पहा : **कुरवंडी** : 'साकरेची कीजे कुरौंडी।' - शिव १८.

**कुर्क** पु. वेढा; घेरा घालणे. (क्रि. करणे)

**कुर्कुट** पु. कोंबडा : 'काक कुर्कुट जंबुक मार्जर।' - दास ८.७.२६. [सं. कुकुट]

**कुर्कुटी** स्त्री. बारीक हलका ताप; थंडीचा काटा येऊन भरणारा ताप. [ध्व.]

**कुर्कुरी** स्त्री. तळ्याकाठची पालेभाजी. (झाडी)

**कुर्कूट** न. कोनाडा, फडताळ. (गो.)

**कुर्च** न. दाढी : 'तैसें कुर्च मनोहर।' - मुप्र ७१५.

**कुर्चा-र्चो** पु. चिमटा; कातडी चिमटणे.

**कुर्टा-र्ठा, कुर्टे-र्ठे** पहा : **कुरटा-ठा २** : 'कठीण कर्कश कुर्टे सांडावे।' - दास १४.४.१

**कुर्टेल** वि. खुरटलेला; खुजा. (व.)

**कुर्डा** वि. आंधळा : 'तुमका जवळची व्हकाल कुर्डी.' - शेलूक ५४.

**कुर्डाईल** न. क्रूडआईल, अशुद्ध तेल : 'तिथं जळक्या कुर्डाईलचं तीन डबं कसाबानं चरबी भरलेल्या डब्यागत दिसत हुतं.' - खळाळ १६३.

**कुर्ड** पु. पांढरा माठ : 'कुर्डच्या तुऱ्यांमधून बी धरलं.' - जैत १५. पहा : कुरडू

**कुर्डबाळ्या** पु. अव. बायकांच्या कानातील एक दागिना : 'कुर्डबाळ्या मंडवीबाळ्या चाले छबीदार।' - अफला ५५.

**कुर्डू** पहा : **कुरडू २**

**कुर्डेकापू** पु. घुबड. (कु.)
**कुर्ता** स्त्री. कुळीथ. (झाडी)
**कुर्ती** स्त्री. माशाची एक जात. हे मासे अश्विन - कार्तिकात पकडतात. (को.)
**कुर्द** वि. क्रुद्ध (अप.); रागावलेला; क्रोधाविष्ट : 'त्रिंबकराव कुर्दसेन झाला।' - ऐपो ८८.
**कुर्नि(र्नी)स(सा-सी), कुर्नि(र्नी)सात** पहा : **कुरनिसात** : 'ह्याला कुर्निसात करायला सांग.' - स्वप १३९. [तु. कुर्निश]
**कुर्पण** पहा : **कुरपण**
**कुर्ब** पु. सान्निध्य; जवळ असणे. [फा.]
**कुर्बान करणे** पहा : **कुरबान करणे** : 'आम्ही आमची सर्व सुखे हसत हसत कुर्बान करण्यास तयार आहोत.' - जीसे ५०७.
**कुर्बानी** पहा : **कुरबानी** : 'आमच्या शब्दाखातर ज्यानी राज्याच्या पायी कुर्बानी केली.' - श्रीयो २.४७८.
**कुर्मकवटी** स्त्री. कासवाच्या पाठीचे कवच : 'तेणें वळली कुर्मकवटी। शेषें पाए सूदले पोटी।' - उह ९७०.
**कुर्मा, कर्में** पु. न. बारीक ताप; जीर्ण ज्वर. (चि.)
**कुर्माकरी** वि. तापकरी; रोगी.
**कुर्मी** स्त्री. कासवी : 'करी जेवि निरीक्षण। कुर्मीचे।' - ज्ञा १३.१४०
**कुऱ्यात** न. घराच्या भोवतालचे परडे (पेरलेले). (को.)
**कुर्र** उद्गा. गोट्यांच्या खेळातील एक शब्द. पहा : **कुरगोट्या**
**कुर्रजांवचे** अक्रि. राग येणे. (गो.)
**कुर्रह** पु. थंडपणा. [फा.]
**कुर्रा** पु. १. अभिमान; ताठा; तोरा; अक्कड; गुर्मी; गर्विष्ठपणा: 'शिवाय माझ्याजवळ कुर्रा काय थोडका होता.' - पलको १५१. २. मत्सर; द्वेष; चुरस; कुऱ्हा. (क्रि. धरणे, ठेवणे) [अर.]
**कुर्रेदार-बाज** वि. १. नखरेबाज; घमेंडखोर; अकडबाज; बुद्धिमान, हुशार : 'मनुष्य कुर्रेबाज, हा येथे असल्यास मारवाडचे सरदार लगामी लाविल.' - इसंजोरा १०. २. सोंगट्या खेळणारा.
**कुर्ला** पु. पाण्याची चूळ; गुळणा. (झाडी)
**कुर्वी-र्वे** पु. न. काटकोनाजवळ विशाल कोन करणाऱ्या आकाराचे लाकूड. उभा खांब डळमळू नये म्हणून हे बसवतात. (चि.)
**कुर्सली** टोकदार गवत.
**कुऱ्हय** स्त्री. टपाल. (गो.)
**कुऱ्हा-ऱ्हे** वि. कुबडा; वाकडा : 'आणि आपुली माये। कुब्ज जरी आहे। तरी जीजे तें नोहे। स्नेह कुऱ्हें कीं॥' - ज्ञा १८.९२७. [सं. कुब्ज]
**कुऱ्हा, कुऱ्हाबाज - दार** पहा : **कुर्रा** : '..... पाटलाचा कुऱ्हा हे सर्व त्याच्या मस्तकातून हालता हलत नव्हते.' - फकिरा १४०.
**कुऱ्हाड** स्त्री. १. लाकडे फोडण्याचे एक लोखंडी हत्यार; परशु; फरशु. २. कुऱ्हाडीच्या आकाराचा बाण. ३. (ल.) संकट : 'अग्निमुखबाण सोडी कुऱ्हाड।' - जै ४३.२७. [सं. कुठार] (वा.) ० **चालवणे** - एखादी गोष्ट निर्दयपणे, अविचारीपणे नष्ट करणे. ० **पाजविणे** - कुऱ्हाडीला धार लावणे. **आकाशाची कुऱ्हाड पडणे** - महासंकट; दैवी आपत्ती. (क्रि. कोसळणे.)
**कुऱ्हाडा** पु. कुऱ्हाडीच्या आकाराच्या टोकाचा बाण : 'आतां कृपेचा कुऱ्हाडा घेऊनि कवण मारील?' - उगी १०६.
**कुऱ्हाडी खिळा** १. बांधकामात वापरला जाणारा कुऱ्हाडीसारखा आकार असणारा जाड, घडीव, चौकोनी घेराचा खिळा. २. पेचाचा खिळा फिरविण्याचे साधन.
**कुऱ्हाडी जमीन** १. कुऱ्हाडीने साफसूफ केलेली जमीन (शेतीची). २. जागोजाग झाडांची मूळखंडे व बुडखे पसरल्यामुळे नांगरटीला कठीण अशी जमीन.
**कुऱ्हाड्या लगाम** कुऱ्हाडीच्या आकाराचे दाते असलेला उंच लगाम. (हा माजलेल्या घोड्याला घालतात.)
**कुऱ्हाक्कर** पु. कुऱ्हा आणि बकर; दबाव, वजन : 'त्याचा कुऱ्हाक्कर राणीयाजवळ कैसा आहे.' - पेदभा १०.५८.
**कुऱ्हे** वि. कबरे; चित्रविचित्र (वस्त्र) : 'गोगें कुऱ्हे पोफळे.' - प्रभा ७.
**कुऱ्हे** वि. वाकडे : 'तें स्नेह कुऱ्हे नोहे कीं।' - ज्ञा १८.९२३
न. पाठीवरचे कुबड.
**कुल** न. १. वंश; गोत्र; कुळ; ज्ञाती; कुटुंब; पुत्रपौत्रादी वंशपरंपरा : 'शुद्ध करीत दोन्हीं कुळां। जेवी प्रवाह गंगाजळा।' - एरुस्व १४.२५. २. सजातीय समुदाय, थवा, कळप. [सं. कुल]
**कुल** न. किनारा; थडी; तट.
**कुल** वि. सर्व; साग्र : 'कुलवजिरांला खबर दिली।' - ऐपो १०. समासात :- कुलजमा खर्च - वसूल - इनाम - कानूबान. [फा.]
**कुलअक(ख)त्यार** पु. अव. सर्व सत्ता : 'फौजेमध्ये कुलअकत्यार।' - ऐपो १०६ [फा. कुल् + अखतियार]
**कुलअखत्यारी** पु. सर्वाधिकारी.
वि. सर्व सत्ता असलेला.
**कुलअधिकार** पु. अव. सर्व सत्ता : 'पाटलांना गावापुरते, मुलकी, दिवाणी, फौजदारी वगैरे कुल-अधिकार असतात.' - गांगा ४६.
**कुलक** न. एकान्वयी जे अनेक श्लोक असतात त्यांचा समुदाय; एकच अर्थ पूर्णपणे व्यक्त करणाऱ्या चारांपेक्षा अधिक श्लोकांचा समूह, गट. पहा : **कालापाक, युग्म, विशेषक** [सं.]
**कुलकज्जल** पु. आपल्या कुटुंबाला काळोखी फासणारा मनुष्य. [सं.]
**कुलकट** न. कुळकट; कूळकट; कुळाची वंशावळ : 'आता या कुळकटावरून राजऋषी पूर्वीचे कुलकर्णी भाराईत होते असे दिसते.' - पुनसंवृ खं. २.१२७.
**कुलकर्णी** स्त्री. निपुणता; कौशल्य : 'जूझती कुलकर्णी जाणति। कळे कीर्तिसी जीति।' - ज्ञा १.११३.
**कुलकर्णी** पु. गावच्या सरकारी वसुलाचा हिशोब ठेवणे, गावच्या जमिनीच्या क्षेत्रफळाची नोंद ठेवणे आणि अन्य सरकारी कामकाज व कामकाजाचे दप्तर सांभाळणे इ. कामे करणारा जुन्या गावगाड्यातील एक वतनदार. यास वेतन वा इनाम जमिनी असत. [क. कुलकरणि]

**कुलकलंक** पु. कुलकज्जल; आपल्या कुलावरील लांछन; डाग. [सं.]
**कुलकला-ल्ला** पु. सर्वाधिकारी : 'तो कुलकला पंचवीसतीस लाखाचा खाविंद जाहला.' - इएमपी १२३. 'कुलकल्ला त्रिबंकजी डेंगूळ अगदिं राहिले दिड बोट.' - अफला ४१. [फा. कुलकुल्ला -न]
**कुलकंटक** वि. आपल्या कुटुंबाला पीडा देणारा. [सं.]
**कुलकाळी** स्त्री. सर्व शेतजमीन : 'हिच्या अन्वये कुलकाळी सरकारची ठरवून तिच्या तीन प्रती लाविल्या.' - गांगा ६.
**कुलकुठार** वि. आपल्या कुटुंबाचा नाश करणारा.
**कुलकुठी** स्त्री. कुलकथा; कुळकट; कुळाची माहिती, परंपरा, इतिहास.
**कुलकुल, कुलकुलाट** स्त्री. पु. (शाळेतील, खेळण्यातील, भांडणातील, मुलांचा) कलकलाट; गोंगाट; पक्ष्यांची चिवचिव; किलबिल; चिलबिल, कावळ्याची किरकिर; कावकाव. [ध्व.]
**कुलकुलणे** अक्रि. १. कलकलाट करणे (पक्ष्यांनी किंवा मुलांनी) २. आनंदाने बेहोश होणे. ३. हळूहळू बोलणे, कुजबुजणे : 'मुली एकमेकींच्या कानात कुलकुलत होत्या.' - तचां
**कुलकुला** पु. सर्वाधिकारी : 'कुलकुला नारोजी व माणकोपंत आहेत.' - पेद ६.८६.
**कुलकुली** स्त्री. १. घोडा किंवा घोडी यांना परस्परांबद्दल होणारी तीव्र कामेच्छा; माज. २. आनंदातिशय (क्रि. येणे, होणे.)
**कुलकुली** पु. हिवताप. (गो.)
**कुलकेणी** स्त्री. कुशलता : 'जूझती कुलकेणी जाणति।' - राज्ञा १.११३.
**कुलक्रम** पु. कुलाचार; कुटुंबातील रूढी; वंशपरंपरा: 'एवं मीचि कुलक्रमु। शब्दब्रह्माचा॥' - ज्ञा ९. २७७. [सं.]
**कुलख** न. घाण पाण्याचे डबके : 'न रिगावें तिये रिगे कुलखीं।' - ज्ञाप्र १४७.
**कुलगुरु-रू** पु. १. विद्यापीठाचा मुख्य अधिकारी. २. कुलपरंपरेचा उपाध्याय; कुलोपाध्याय. [सं.]
**कुलघातक, कुलघ्न** वि. आपल्या कुलाचा नाश करणारा. [सं.]
**कुलचा** पु. एक प्रकारची रोटी : 'सीरमाल, खमीरी, कुलचे वगैरे नावाचे रोट्यांचे प्रकार असतात.' - गृशि २.१६ [फा.]
**कुलचिन्हपट्ट** पु. (पुरा.) कुलसन्मानद्योतक पट्टा किंवा ढाल.
**कुलज** वि. चांगल्या कुळात जन्मलेला; मोठ्या कुळातील; अभिजात; कुलीन. [सं.]
**कुलटा** स्त्री. व्यभिचारिणी स्त्री. [सं.]
**कुलडा-ल्डा** पु. मातीचे पात्र, पेला. यात पेय पदार्थ घालून विकतात; पाणी पिण्याचे मातीचे भांडे [हिं., काशी]
**कुलडौल** पु. सर्व मुलूख; सर्व प्रांत : 'तुमच्या कुलडौलाची दिवाणगिरी रा. अच्युतराव गणेश यांस सांगितली.' - थोमा १.४६.
**कुलतारक-ण** वि. कुळाचा उद्धार करणारा. [सं.]
**कुलतिलक** वि. स्वतःच्या कुळाला ललामभूत असा; कुलभूषण. [सं.]
**कुलथा** पु. कुळीथ; हुलगे. (व.)
**कुलदिवा, कुलदीपक** पु. स्वतःच्या कुळाला भूषणभूत माणूस; कुळाला मान्यता, कीर्ती मिळवून देणारा माणूस : 'जो यादवकुळींचा कुळदिवा।' - ज्ञा ८.२७० [सं.]
**कुलदेवता - दैवत-त्य** स्त्री. न. कुलपरंपरेने पूर्वज ज्या देवाची पूजा करीत आले ती देवता; कुलस्वामिनी; कुळस्वामी. [सं.]
**कुलधर्म** पु. कुळात पूर्वीपासून चालत आलेले ठरावीक दिवशी करायचे ठरावीक प्रकारचे धार्मिक विधी, आचार. [सं.]
**कुलध्वंस** पु. कुळाचा नाश, वाताहात; धूळधाण. [सं.]
**कुलनारी** स्त्री. कुलीन स्त्री; कुलांगना; कुलवधू; उत्तम कुळात उत्पन्न होऊन तदनुरूप सदाचारादी गुणांनी संपन्न असलेली स्त्री. [सं.]
**कुलनाश** पु. कुळबुडव्या; निसवलेला धर्मबाह्य मुलगा. [सं.]
**कुलपणे** अक्रि. लंगडणे; लंगडत चालणे.
**कुलपति-ती** पु. १. कुळाचा मुख्य; मूळ पुरुष. २. विद्यापीठाचा सर्वोच्च अधिकारी. सामान्यतः त्या त्या राज्याच्या राज्यपालाकडे हे अधिकार असतात. : 'विद्यापीठाचे कुलपतीहि हीच भाषा वापरतात.' - केले १.३३९. [सं.]
**कुलपरंपरा** स्त्री. पिता, आजा, पणजा किंवा पुत्र, नातू, पणतू याप्रमाणे वंशपरंपरा; वंशावळी;पिढी. [सं.]
**कुलपरिपाटी-ठी** स्त्री. कुलपरंपरागत आचार, चाल. [सं.]
**कुलपर्वत** पहा : **कुलाचल, सप्तपर्वत**
**कुलपा** पु. गृहरक्षक; गृहस्पती
**कुलपाद** वि. जायबंदी; जखमी. (गो.)
**कुलपार** पु. एक साप : 'निर्विष भूचर गटात अजगर, कुलपार, नागीण इ. सर्व येतात.' - भास ७६.
**कुलपारपत्य** न. सर्वाधिकारी; सर्व सत्ता; अंमल : 'शहरांतील कुलपारपत्य त्यांचे स्वाधीन केलें.' - भाप ९१.
**कुलपालक** वि. कुलाचे संरक्षण करणारा, कुळातील कर्ता पुरुष. [सं.]
**कुलपिता** पहा : **कुलप्रमुख**
**कुलपी, कुल्पी-ल्फी** वि. बंदिस्त, कळ केलेले. (मळसूत्र इ.) स्त्री. तसराळ्यासारखे चिनी मातीचे एक भांडे : 'कुल्फ्या झाकणीसुद्धा...' - मइसा २३.१११.
**कुलपी गोळा** (लष्करी) बाँब; दारू; खिळे, चाकूची पाती इ. पोटात घातलेला तोफेचा स्फोटक गोळा: '.....त्याजवर गर्नाळा चढवून कुलपी गोळे आत मारतात.' - ऐलेसं २५०.
**कुलपी, कुल्पी चुडा** खिळीची बांगडी : 'हातामधि घाल करकरीत कुलपी चुडे।' - पला ७८.
**कुलपी विडा** सुपारी, वेलदोडे इ. सामान घातलेला, केळीच्या पानात गुंडाळलेला व चोयीने टाचलेला १०-१२ विड्याच्या पानांचा, समारंभात आलेल्या पाहुण्यांना देण्यासाठी तयार केलेला विडा : 'नेउन द्या तयासी कुलपी विडे।' - प्रला २१२.
**कुलपुरुष** पु. पूर्वज; वाडवडिलांपैकी एक. [सं.]
**कुलपुरोहित** पहा : **कुलगुरू** : 'गणेशाच्या प्रतिष्ठेसाठी कुलपुरोहिताला बोलविण्याची रूढि आता पूर्ण मोडली होती.' - मराठी कथा १९६०. १३८.

**कुलप्रमुख** पु. (समाज.) कुटुंबचालक; एखाद्या जमातीचा प्रमुख; कुटुंबातील पिता - कुटुंब चालवणारा, कुटुंबाचे नेतृत्व करणारा पुरुष.
**कुलफा** स्त्री. घोळाची भाजी. (माळवी)
**कुलबाब-कान** स्त्री. पु. सर्व कर आणि पट्ट्या आणि बाजाराचे सर्व वसूल घेण्याचे अधिकार (अथवा सर्व बाबी आणि सर्व कायदेकानू व रिवाज) दिले आहेत अशा अर्थाचा (इनामदाराच्या) सनदेत आणि सरकारी कागदपत्रात येणारा शब्द.
**कुलभूषण-मंडण** पहा : **कुलतिलक**
**कुलमर्यादा** स्त्री. कुलाचा संप्रदाय, शिष्टाचार, मान; घराण्याच्या अब्रूचे रक्षण. [सं.]
**कुलमाता** स्त्री. मातृप्रधान कुटुंबातील प्रमुख स्त्री. [सं.]
**कुलमुखत्यारपत्र** न. एखाद्याने स्वतःच्या सर्व हक्कविदित अंमल-बजावणीची कामे कोर्टात व इतरत्र करण्याकरिता दुसऱ्या व्यक्तीला दिलेले अधिकारपत्र.
**कुलरीत-ति-ती** स्त्री. कुलाचार; कुलीन घराण्यातील आचारविचार; रीतभात : 'दुःख परासि न द्यावें सत्य वदावें क्षमा न सोडावी। जोडावी कीर्ति असी कुळरीति तुम्ही कधी न मोडावी।' - मोउद्योग ८.६ [सं.]
**कुलवणे** सक्रि. कोलवणे; उडविणे; भिरकावणे (विटी.). (कर.)
**कुलवधू, कुलस्त्री** स्त्री. १. पहा : **कुलनारी**. २. चांगल्या गुणांनी आपल्या कुलास भूषणभूत झालेली स्त्री : 'दिनत्रय सत्य जाण। होईन तुमची कुळस्त्री।' - गुच ३३.६९. [सं.]
**कुलवरा** पु. प्रत्येक कुळाकडून येण्याची रक्कम : 'तेथें हक उत्पन्न कुलवरा येईल तो तिघीजणी वाटून घेणें.' - मदरू ३.३८.
**कुलवाडी** स्त्री. शेताची लागवड; शेती; शेताचा मालक व खंडकरी यांचा संबंध, व्यापार : 'तैं वाढती कुलवाडि खांचे।' - राज्ञा १८.२५६.
**कुलवान-वंत** पहा : **कुलज** : 'गर्द हिरव्या रंगाचा शालू एखाद्या कुलवंताच्या बाईप्रमाणे मस्तानी नेसली होती.' - राऊ १४५.
**कुलवृद्ध** पु. कुलाचा संस्थापक, मूळ पुरुष. [सं.]
**कुलवैर** न. हाडवैर; एका कुळातील माणसाने दुसऱ्या कुळातील माणसाचा खून केल्यामुळे निर्माण होणारी शत्रुत्वाची परंपरा.
**कुलसचिव** पु. विद्यापीठाचा मुख्य प्रशासकीय अधिकारी. [सं.]
**कुलसंप्रदाय** पु. कुलपरंपरागत आचारविचार, रिवाज, संप्रदाय. [सं.]
**कुलस्वामी, कुलस्वामिनी** पु.स्त्री. १. पहा : **कुलदेवता**. २. **कुलगुरू**. [सं.]
**कुलहत्या** पहा : **कुलध्वंस**
**कुलहीन** वि. हलक्या कुळात उत्पन्न झालेला; हीनकुळी; कमजात; कमअस्सल. [सं.]
**कुलहीनसेवा** स्त्री. हलक्या कुळात जन्मलेल्याची चाकरी.
**कुलक्षण** न. अशुभदायक चिन्ह, स्वरूप, खोड, खूण; व्यंग. [सं.] वि. दुर्जन; वाईट चालीचा.
**कुलक्षय** पु. सर्व कुळाचा नाश; वंशनिर्मूलन. [सं.]
**कुलंग** पु. लिंगायत संप्रदायातील एक आश्रम व त्या आश्रमातील व्यक्ती.
**कुलं(लां)गडे** न. १. भानगड; घोटाळा; अडचण; कचाट; झेंगट. (क्रि. घेणे, करून घेणे.) : 'श्रीमंतांची कुलंगडी जनहितासाठी बाहेर काढणारे निर्भीड पत्रकार' - अक्षर १५९. २. कुटिल कारस्थान; हिकमत. ३. (यंत्रातील) चतुराईची व गुंतागुंतीची रचना; (मसलत किंवा बेत यांमधील) चातुर्य किंवा शहाणपणाची योजना, युक्ती. (क्रि. करणे)
**कुलं(लुं)गा-गे** वि. १. लहान आणि गुबगुबीत (कुत्रे, घोडा) २. ठेंगणा व मजबूत; वाटोळ्या अंगाचा (माणूस) : 'पप्पांनी एक कुलंगी कुत्री पाळली होती.' - पपा ७३. [फा. कुलंग]
**कुलंच-ज कुलुंच** वि. शेपूटखळ्या; रेंगाळणारा; धीरेधीरे चालणारा (घोडा); चालताना ज्याचे मागील पाय एकमेकांना घासतात, असा स्वारी करण्यास वाईट (घोडा). - अश्वप १.१०३.
**कुलंज** न. एक प्रकारचे धान्य.
**कुलंजन** पहा : **कोळंजन**
**कुला-ल्ला** पु. नितंब; टिरी; ढुंगण. (वा.) ० **बाहेर पडणे** - गुदभ्रंश (अगेरू) होणे; अंग बाहेर पडणे. **कुल्ले थोपटणे** - फुशारकीने टिऱ्या बडविणे. **कुल्ल्याला पाय लावणे** - पळून जाणे; सूं बाल्या करणे. **कुल्ल्यावर कुल्ला येणे** - लठ्ठ होणे.
**कुलागत** वि. कुलापासून मिळालेले, आलेले. (गुणधर्म, सवयी इ.)
**कुला(ळा)गर** न. पोफळीची बाग. (गो.) [सं. कुल + आकर]
**कुलाचल** पु. पुराणप्रसिद्ध सात पर्वत. पहा : **सप्तपर्वत** [सं.]
**कुलाप** पहा : **कुलूप** (कु.)
**कुलाब** पु. टोप; आच्छादन : 'टोपीस हिरा मोती मानीकाचे कुलाब घालोन.'-इम १३. [फा. कुलाब् = ससाण्याची टोपी, पेट्यातील टोपी]
**कुलाबा** पु. मनसुबा; कारस्थान; कट; डाव : 'हा कुलाबा योजिला आहे.'- पेद ३३.२१०. [फा. कुलाब = पकड]
**कुलाबा(पा)** पु. १. बिजागरीप्रमाणे उपयोगी पडणारी कडी. २. लोंबणारी कडी; हलगी (पाळण्याची) ३. करवतीची वाकडी लाकडी पकड, मूठ. [फा. कुलाब = आकडा]
**कुलाबा-पा** पु. समुद्रात गेलेली जमिनीची दांडी, चिरटी; भूशिर. (अशी दांडी मुंबईला व आंग्रांच्या कुलाबा किल्ल्याच्या जागी आहे.)
**कुलाबी** वि. आंग्रांच्या कुलाब्यासंबंधी (रुपया वगैरे).
**कुलाबेदार** वि. दस्ती; हातात धरण्याजोगी कडी वगैरे असलेले : 'वरती झाकणी कुलाबेदार कुल्फी मज्बूत।' - राला २२.३५ [फा. कुलाब = पकड]
**कुलाय** न. प्राण्याचे किंवा पक्ष्याचे घरटे.
**कुलायिका** स्त्री. पक्षी ठेवण्याची बंदिस्त जागा; पक्षिशाळा. [सं.]
**कुलारग** स्त्री. सर्व कुळे पहा : **कुळारग**
**कुलाल(ळ)-ल्लाळ** पु. कुंभार : 'परि ते कुलालमतीचे गर्भ। उमटले कीं॥' - ज्ञा ९.७४. [सं. कुलाल]
**कुलावतंस** पु. कुळाचे, जातीचे भूषण, अलंकार. [सं.]
**कुलास** पु.कलमी आंब्याची एक जात. ह्याचा आकार लांबट असतो. (गो.)
**कुलाहपोष** वि. टोपीवाले; टोप घालणारे (युरोपियन) : 'ते कुलाहपोषाची

फौजेवरही कित्येक फौज पाठवून....' - मइसा १०.१८६. [फा.]
**कुलां(ळां)गना** स्त्री. १. कुलीन स्त्री. २. आपल्या उत्तम गुणांनी कुलाला भूषविणारी स्त्री : 'माकडाच्या गळी रत्न कुळांगना।' - तुगा ३१२२.
**कुलांगार** पु. गृहकलह पेटवून किंवा घराची अब्रू गमावणारी कृत्ये करून कुळाला डाग लावणारा पुरुष; कुळबुडव्या माणूस : 'असेच कुलांगार बनून बायकोच्या नावाने अधिक अधिक सुधारणा करा.'- पलको २८७.
**कुलित्थ** पु. कुळीथ; हुलगे; द्विदल धान्यातील एक धान्य. [सं.]
**कुलियात** क्रिवि. तमाम; सर्व; सर्वथा; पूर्णपणे : 'दोही दौलती कुलियात तुम्ही आम्ही मिळवून सांभाळावी.' - मइसा ५.२२.[फा. कुल्लियात]
**कुलिवेल** स्त्री. झुडूप.
**कुलिश** न. वज्र : 'कुलिश होई इंद्रार्धे।' - जै २८.६४. [सं.]
**कुलिंजन** पहा : **कोळंजन**
**कुलिंद** पु. एक मऊ दगड.
**कुली** पु. मजूर; बिगारी; हमाल; गुलाम. [तु.]
**कुली** स्त्री. सोनाराची घडणावळ किंवा मजुरी. - ऐकोपुर.
**कुली-ल्ली** सर्व; झाडून सर्व : 'तिकडे येक मोर्चा काईम जाइलियाने कुली आमदरफ्त बंद होईल.' - पेद १६.१०५.
**कुलीटान** न. एका प्रकारचे कापड.
**कुलीन-ण** वि. चांगल्या कुळातील; खानदानीचा; श्रेष्ठ कुळात जन्मलेला व तदनुरूप सत्क्रिया आचरणारा. [सं. कुल- कुलीन]
**कुलुकलू** अक्रि. मोठ्याने ओरडणे. (गो.) [ध्व.]
**कुलु(लो)ली** स्त्री. १. पहा : **कुलकुली** : 'असं कुलुलीला आलेल्या येडक्यांवानी काय करतायसा ?' - तोबं ९४. २. खाज; आवेग. [सं. कल्लोळ]
**कुलु(लो)ली** स्त्री. १. आरडाओरडा; आरोळ्या मारणे. २. बोंब करणे; ओरडणे. ३. कोल्ह्याची हुकी, कुई (क्रि. ठोकणे, करणे). ४. बेभान करणारा आनंद. [सं. कल्लोल]
**कुलुलु** क्रिवि. कुत्र्याला 'यू यू' म्हणून बोलावण्याचा शब्द. [ध्व.]
**कुलुंगा** पहा : **कुलंगा**
**कुलुंज** पहा : **कुलंच**
**कुलुंजी** न. कांद्याचे बी.
**कुलुप-फ** न. ताळे; टाळे; दरवाजा किंवा पेटी इ. बंद करण्याचे साधन : 'काबाडकुलुफाचे करूं बंधन।' - दावि १४३. [अर. कुफ्ल] (वा.)
**तोंडाला कुलूप घालणे** - गप्प राहणे; अजिबात न बोलणे.
**कुलूकाटी** स्त्री. कडी कुलूप. (झाडी)
**कुलूपकिल्ली** स्त्री. मुलींचा एक खेळ.
**कुलूपबंदी** स्त्री. तेढ; पेचप्रसंग; कोंडी: 'काँग्रेस व सरकार यांमध्ये सध्या कुलूपबंदी निर्माण झाली आहे.' - के १०-१२ -१९२९.
**कुलेत** स्त्री. बंडी; जाकीट. (गो.)
**कुलैवा** पु. कुलदीपक : 'जो यादवकुलिचा कुलैवा।' - राज्ञा ८.२६८.
**कुलो** पु. ढुंगण, कुल्ला.
**कुलोच्छेद** पु. १. पहा : **कुलध्वंस**. २. तळपट; सत्यानाश. [सं.]
**कुलोद्धार** पु. कुळाचे रक्षण, तारण.
वि. कुळाचा किंवा जातीचा उद्धार करणारा. [सं.]
**कुल्कुल्ला** पहा : **कुल** (सर्व या अर्थी)
**कुल्फत** स्त्री. त्रास.
**कुल्फीगोळा** पु. पहा : **कुलपीगोळा**
**कुल्फीमलाई** स्त्री. कोनाकृती नळकांड्यात साखर मिश्रित दूध घालून अशी नळकांडी बर्फ व मीठ यात ठेवून दूध गोठवून तयार केलेला खाण्याचा पदार्थ; एक प्रकारचे आईस्क्रीम; हिमदुग्ध.
**कुल्या** स्त्री. नदीचा पाट; कालवा; शेतीकरता काढलेला पाट; नाला; चर.
**कुल्स** पहा : **कुलंच-ज**
**कुल्ला** पु. उभी टोपी; फेट्याच्या आत घालतात ती जरीची टोपी. [फा. कुलाह = टोप.]
**कुल्ला(ल्हा)णा** पहा : **कुला**
**कुल्लाल-ळ** पहा : **कुलाल** : 'आणि कर्तृत्व कुल्लालाचे।' - राज्ञा १८.३०९.
**कुल्ली** पु. खेकडा.(गो.) [सं. कुलीरक]
**कुल्हडा** पु. मातीचे लहान पात्र. पहा : **कुलडा**
**कुल्हा** पु. शिरस्त्राण; टोपी.
**कुल्हार** न. १. गुहा २. भांडार; कोठार : 'जे भूलिचे कुल्हार।' - राज्ञा १२.११५.
**कुल्हाळ** पु. कोलाहल; आरडाओरडा : 'घरोघरीं कुल्हाळ। स्त्रिया बाळकांचे ॥' - क्रिपु ७.७०. [सं. कोलाहल]
**कुवणे** स्त्री. सडणे. (झाडी) [सं. कुथ् = कुजणे.]
**कुवत** स्त्री. सामर्थ्य; शक्ती; बळ; जोर; क्षमता : 'हुजुरात वगैरे असता त्याची काय कुवत आहे?' - ऐलेसं १२१. [फा. कुवत्]
**कुवती** स्त्री. हिरव्या रंगाचा लहान मासा. (गो.)
**कुवलो** पु. कोवळा फणस. (गो.) पहा ! **कुंवरा, कुंवरी**
**कुव(वा)सा** पु. आश्रय : 'अर्जुन मैत्रियेचा कुवासा।' - ज्ञा ६.१२५. [सं. कु + वस = राहणे]
**कुवळणे** उक्रि. चिंचा, भात, गूळ वगैरे पाण्यात कुसकरून एकजीव करणे, कोळणे; गुरगुट करणे. (राजा.)
**कुवळावचे** सक्रि. मऊ करणे; पिकवणे. (गो.)
**कुवंली** धान्य मोजण्याचे एक परिमाण.
**कुवा** पु. विहीर; आड. [हिं.]
**कुवा** पु. पाण्यात कुजलेला झाडांचा पाला. (को.) [सं कुथ् = कुजणे]
**कुवा-वो** पु. १. नागिणीचे झाड, लाकूड. हे कठीण व सरळ असते. म्हणून याचा तारवाच्या डोलकाठीसाठी उपयोग करतात. याची फळे नागाच्या फणीसारखी तांबडी लाल असतात. (गो.) २. डोलकाठी.
**कुवाड** स्त्री. कुऱ्हाड : 'लाकडें रोंडतां रोंडतां तिया कुवाड पायांम् पोडी.' 'लाकडे तोडता तोडता त्याची कुऱ्हाड पाण्यात पडली.' - भि १५ (भि.) [सं. कुठार]

**कुवाड-डे** न. १. कोडे; कूट प्रश्न : 'बोलितां देवासि कुवाड।' - विपू २.३९; 'हे अर्जुना सकळ कुवाडे।' - ज्ञा ४.१४१. २. कुलेडे; मंत्रतंत्र; चेटूक. वि. दुर्घट; गूढ, अनाकलनीय; अवघड. [सं.]

**कुवाडेपोवाडे** पु. अव. चुगल्या, चहाड्या. (क्रि. सांगणे) [सं.]

**कुवाद** पु. उलटा अथवा निरर्थक वाद; घासाघीस; तक्रार. (क्रि. धरणे, करणे, घेणे) [सं. कु + वाद]

**कु(कुं)वार** वि. दहा ते बारा वर्षांच्या खालचा अविवाहित : 'तुला काही कुंवार राहण्याचा प्रसंग येत नाही.' - धनुर्भंग नाटिका २१. [सं. कुमार]

**कुवारका** कुवारी मुलगी. (अहि.)

**कुवारकांडे, कुंवारी** न. स्त्री. कोरफड. [सं. कुमारी]

**कुवारखांब** पु. आढे तोलून धरणारा उभा खांब; धारण. (बे.)

**कुवारणे** क्रि. मोठ्याने हाका मारून बोलावणे : 'यासि उसीरू लागे : म्यां यातें कुवारीति :' - लीचपू ४१.

**कुवारवासीण** स्त्री. देवतांच्या पूजेनिमित्ताने जिला जेवायला बोलावून तिची पूजा इ. करून दक्षिणा देतात ती; कुमारिका. (को.)

**कुवारा** वि. कोवळा : 'चंदनाची आणवि कुंवारी।' - रुस्व ३४४.

**कुवारी** स्त्री. १. तीव्र गंधाचे रानफुलाचे झुडूप. २. (ल.) फूल.

**कुवारी-ण** स्त्री. लग्न न झालेली मुलगी; कुमारी; कुवार : 'कुंवारी करती विभाव । तोचि मनीं हर्ख होय।' - वसा १६. [सं. कुमारी]

**कुवा(वां)सा** पु. १. आश्रय. पहा : **कुंवसा** : 'शुचित्वें तीर्था कुवासा।' - ज्ञा १२.१७८.२. कैवारी: 'परतो भक्तीचा कुवासा। भवग्राहिकया आशा। बांधतसे धिवसां। स्तुती लागी।' - ज्ञाप्र ४८.

**कुवांडा** पु. कोडे : 'असा कुवांडा घातल्यागत बोलू नको.' - तोरण ४१.

**कुविकास** पु. काही कारणांमुळे (रोग, आहारातील कमतरता इ.) शरीराची, मेंदूची अपूर्ण अथवा विकृत वाढ होणे. (बे.) [सं.]

**कुविद्या** स्त्री. कपट; लपंडाव; लबाडी : 'दिल्लीस राहून स्वामींच्या कार्यास कांहीं कुविद्या करूं लागला तर' - पेद २.१९४. [सं.]

**कुवीट** वि. घुरट; वात्रट; खवट. पहा : **कुईट**

**कुवृत्त** न. पृथ्वीचा परिघ. [सं.]

**कुवें-व्यें** न. १. वासराला सडी म्हणून जो रोग होतो त्यावर उपाय म्हणून त्याच्या तोंडावर डाग देणे. (क्रि. काढणे). २. एखाद्याला बडविण्याची क्रिया. पहा : **कुट्याल**

**कुवेडे** न. १. दृष्टिदोषादी निरसनार्थ मंत्रावाचून सांगितलेली इतर क्रिया. उपचार, तोडगा, टाणाटोणा, चेटूक. २. (ल.) वाकड्या मार्गाने काढलेली युक्ती, मसलत. २. कोडे; गूढ. (क्रि. घालणे, उघडणे) [सं. कु + विद्या.]

**कुवेभाग** स्त्री. कुरीती; वाईट चाल; प्रथा.

**कुवेळ** स्त्री. पु. अशुभ काळ, अवेळ, अकाळ. [सं. कु + वेळा]

**कुवेंकाठी** न. डोलकाठी

**कुव्यास** पु. पृथ्वीचा व्यास. [सं.]

**कुश** पु. न. होमहवन, यज्ञयाग, श्राद्धकर्म वगैरेच्या कामी उपयोगी पडणारे दर्भ. [सं.]

**कुश** पु. बहिरी ससाणा.

**कुशल-ळ** न. क्षेम; कल्याण. [सं.]

**कुशल, कुशलक्षेम** वि. सुखरूप; खुशाल; कल्याणकारक (रोग, दारिद्र्य वगैरे विरहित).[सं. कुश् = प्रकाशणे] २. बुद्धिवान; चतुर; पटु; वाकबगार. [सं. कुश् = प्रकाशणे]

**कुशल** न. चेटूक (क्रि. करणे.)

**कुशलपट्टी** स्त्री. राजपुत्राच्या जन्मासारख्या प्रसंगी पाटील वगैरे गावकामगारांवर बसवीत असत ती पट्टी.

**कुशलप्रश्न** पु. वंदन; अभिवादन; क्षेमकुशल, खुशाली विचारणे. [सं.]

**कुशलबुद्धि-द्धी** पहा : **कुशल २** [सं.]

**कुशलार्थ** पु. क्षेमसमाचार. हा शब्द फक्त पत्रात येतो. [सं.]

**कुशसार** न. दर्भोदक : 'गोमूत्र गोमय क्षीर। दधिघृत कुशसार।' - गुच २८.११७. [सं.]

**कुशा-सा** पु. १. नांगराचा लोखंडी अणकुचीदार फाळ. (खा.) २. खणावयाची चापट व लहान पहार. हिचा दांडा गोल नसतो. [सं. कुश.]

**कुशाग्रबुद्धि-द्धी, कुशाग्रमति-ती** स्त्री. दर्भाच्या टोकाइतकी अत्यंत तीक्ष्ण बुद्धी.
वि. तीक्ष्ण बुद्धीचा. [सं.]

**कुशाद** वि. १. विस्तीर्ण; प्रशस्त; मोकळे (स्थळ, जागा) : 'रान मैदान जागा कुशाद पाहून ....' - ऐलेसं ४.१८४३. २. (ल.) स्वच्छ व मोकळे (लिखाण). [फा.]

**कुशान** न. औतास चिकटणारा काडीकचरा. (व.) [सं. कुथ् - कुथित + तृण]

**कुशावर्त** पु. घोड्याचा एका कुशीवरील भोवरा. हे अशुभ लक्षण मानतात. [सं. कुक्षि + आवर्त]

**कुशावर्त** न. गंगेच्या उगमाजवळचे एक तीर्थ. [सं.]

**कुशासन** न. दर्भासन. [सं.]

**कुशिल्लॉ** वि. कुजलेला. (गो.) [सं. कुथ् = कुजणे; म. कुसणे]

**कुशिंग रोग** (वै.) अधिवृक्क बाह्यांगाचे कार्य व्यवस्थित सुरू न राहिल्याने होणारा रोग. मान, गळा, चेहरा यांना सूज येणे, पोटावरील त्वचेवर पिंगट ठिपके उठणे, स्नायू अशक्त होणे ही याची लक्षणे आहेत.

**कुशी** स्त्री. कूस; शरीराची एक बाजू; पोट : 'तरी आझुनी प्रतीती। कुशी न निघे।' - ज्ञा १४.४०. (वा.) ० **खाजविणे, ० कांडुळणे** - रिकामे बसणे; निरुद्योगी बसणे; माशा मारीत बसणे : 'आम्ही कुशी खाजवितो तुम्ही तेथें आमचें नांवें तरी मजल प्रकृतीस कलून (सांभाळून) करा.' - कुद १.२६०. [सं. कुसि]

**कुशीचा** वि. वावग्या किंवा चोरट्या रीतीने फायदा मिळवून देणारा (धंदा).

**कुशून** पु. १. सैन्यविभाग; पथक; तुकडी; टोळी : 'त्याजवर टिपूने कुशून पायेदल बारा व दोन रिसाले संधीकरिता रवाना केले होते.' - मइसा ७.१२८. २. लष्करी ठाणे चौकी. ३. जमाव; जमात. [फा. कशून = सैन्यविभाग, तुकडी]

**कुश्चल, कुश्चीळ** वि. १. वाईट; खोटे; बेढंग; गैरचाल; अमंगल; अपवित्र; मलिन : 'तुका म्हणे कुश्चळ मनीं। विटंबपणी पडलीं ती।' - तुगा ३२२४. २. कुत्सित; तिरस्कारार्ह; द्वेष्य; ओंगळ; घाणेरडे; किळसवाणे; भ्रष्ट (माणूस, स्थळ, वस्तू) : 'तुंदा या मतिमंदा त्यजुनी निंदा कुश्चळ धंदा हो।' - आप ३२. ३. विचारी. [सं.]

**कुष्किका** स्त्री. घोड्याचा एक अवयव; खुरांचा मध्यभाग - अश्वप १.६२. [सं.]

**कुष्ट-ष्ठ, कुष्टी-ष्ठी** न. १. कोड; रक्तपिती; महारोग; पांढरे कोड. वि. रक्तपित्या; कोड्या; कोड झालेला. २. कोष्टकोळंजन. [सं.]

**कुष्टणे** क्रि. पिरगळणे; पीळणे.

**कुष्टाण** स्त्री. कुजलेल्या, नासलेल्या पदार्थांची घाण; कुजकट वास.

**कुष्टाळे-य** न. कुलूप. (खा.)

**कुष्टेपिष्टे** न. अव. व्यंगे; दोष; उणिवा. (क्रि. काढणे, बोलणे, सांगणे) केव्हा केव्हा कुष्टपिष्ट असाही एकवचनी प्रयोग करतात.

**कुष्मांड** पु. कोहळा. [सं. कुष्मांड]

**कुष्मांड** न. १. रचलेली गोष्ट; खोटा आरोप; कुरापत; कुभांड (फसविण्याकरिता, नाश करण्याकरिता) (क्रि. करणे, काढणे, उठवणे, योजणे, रचणे) : 'संशयाची कुष्मांडे। उचलीतसे पाखांडे।' - सिसं ४.१६२. २. भूत किंवा पिशाच्च. [कुभांड अप.]

**कुष्मांडनवमी** स्त्री. कार्तिक वद्य नवमी. या दिवशी ब्राह्मणाला दक्षिणेसहित कोहळ्याचे दान करतात.

**कुष्मांडपाक** पु. कोहळेपाक; एक शक्तिवर्धक आयुर्वेदिक औषध.

**कुष्मांड्या** वि. खोटा आळ घेणारा; कुभांड्या.

**कुस** वि. थोडे; चिमूटभर. (गो.) [सं. कूश]

**कुसक** वि. कुजणे. (गो.)

**कुसकट, कुसका** वि. कुजकट. पहा : **कुजका**

**कुसकटा** पु. १. चुरा : 'अबैसा प्रसादाचा कुसकटा दीधला :' - लीचपू ५७५. २. भुसा. (हेट.)

**कुसक(कू)र-रा** पु. (पोळीचा) १. बारीक चुरा; बारीक चुरा करण्याची क्रिया. (भाकर, पोळी वगैरे).

**कुसक(कु)रणे** सक्रि. भुगा करणे; चुरणे; चेंदारणे; तुडविणे. (हाताने, पायाने, खाद्यवस्तू); तुकडे करणे (फुले वगैरेचे); ओरबाडणे आणि चुरगळणे. [सं. कुश + कृ]

**कुसकी साळ**(ल.) गचाळ माणूस. (गो.)

**कुसकुट** वि. अगदी थोडा (पदार्थ वगैरे). (गो.)

**कुसकुरां** पु. (लुगडे वगैरेवरील) कशिदा. (गो.)

**कुसकुरी, कुसकुयरी** स्त्री. कुजून काळा झालेला कोवळा फणस, कुयरी.

**कुसकुशीत** वि. जीर्ण. (गो.)

**कुसकुसे** वि. खुसखुशीत : 'तुआं गोकुळीचां भानवसीं। दैत्यांची मोरांडी कुसकुसीं।' - शिव ४३५.

**कुसगोम** वि. कुशीवर गोम असणारा (घोडा).

**कुसडा-डी घोणस** घोणस; सापातील एक जात. याच्या दंशाने झालेली जखम हळूहळू कुजत जाते. (को.)

**कुसडा-डी** वि. १. कुजका; सडका. (राजा.) २. तुसडा. (गो.)

**कुसधुणा, कुसधुवणा** पु. शेवटचे अपत्य; ज्यामुळे कुक्षी धुतली जाते तो. (कर.)

**कुसपट** न. १. खुसपट; क्षुद्र दोष. २. भांडणाचे मूळ कारण (वा.)
**० काढणे** - दुसऱ्याच्या मनाला त्रास होणारी गोष्ट हुडकून काढून त्यावरून त्यास त्रास देणे.

**कुसबांडा-डी** वि. दोन्ही बगलेवर पांढरे ठिपके असलेली (मेंढा, मेंढी). [सं. कुक्षि + पांडु]

**कुसभोवरा** पहा : **कुशावर्त**

**कुसमडणे, कुसम(मा)रणे** सक्रि. कुसकरणे; दाबणे; चुरडणे (फुले, वस्त्र).

**कुस(च)मी** स्त्री. खिसगणती. (व.)

**कुसमी** न. चुकीचे नियोजन.

**कुसमी** पु. बारीक केर. (गो.)

**कुसमुड** पापडाचा चुरा. (अहि.)

**कुसमुस** स्त्री. धुसफूस; मुसमुस; कुरकुर; जळफळ : 'ऐसा आनंद च्यारी दिवस। सर्वेचि मांडिली कुसमुस।' - दास ३.४.२४. २. व्यर्थ श्रम; फुकट तळमळ : 'खवडव जेथे नाही समजावीस। तेथें अवघी कुसमुस।' - दास ८.५६. [ध्व.]
वि. अस्वस्थ; बेचैन.

**कुसमुसणे** अक्रि. १. कुरकुर करणे; आतल्याआत जळफळणे. २. फुंदणे, हुंदके देणे; हिरमुसणे : 'कळता घरच्यास कुसमुसिती।' - दावि २५०. [ध्व.]

**कुसर-री** स्त्री. १. कौशल्य : 'नाना प्रमेयांची परी। निपुणपणें पातां कुसरि।' - राज्ञा १.८. २. कपट. [सं. कुशल]

**कुसर-री** स्त्री. कस्तुरमोगरा; मधुमाधवी नावाची वेल. हिची पाने मोठी असून फुले जाईच्या फुलापेक्षा मोठी व पांढरी असतात.

**कुसर** पु. एक गवत, कुसळ. (झाडी) [सं. कुश]

**कुस(सू)र** पु. सूड (क्रि. करणे); दंश; डाव; द्वेष; (क्रि. करणे). [फा. कुसूर]

**कुसरखोर** वि. आकसखोर; सूड उगविणारा (माणूस).

**कुसरी** स्त्री. जंगली जास्वंद; बट मोगरी; नवमालिका.

**कुसरी** स्त्री. श्रेष्ठत्व; सुरेखपणा; सौंदर्य.

**कुसरी** स्त्री. १. चतुर शहाणी स्त्री; सुगरण. २. कुटिल स्त्री; चेटकीण; जादुगारीण.
वि. १. कुशल २. कपटी : 'तो महा दुष्ट दुराचारी। चतुर्भुज जाहला कुसरी।' - कथा २.२.९८.

**कुसरीचे काम** नाजूक, सुरेख, सुबक असे नक्षीचे काम.

**कुसरीण-रूड, कुसिरडा** स्त्री. पु. (केसाळ) सुरवंट; घुला: 'कुसरूड हे कोशवासी होण्यापूर्वी आपली बाह्यत्वचा सात वेळ टाकितात.' - मराठी सहावे पुस्तक पु. २५२ (१८७५). [सं. कुश]

**कुसरीण** स्त्री. चेटकीण.

**कुसरूडणे** अक्रि. सुरवंटाचे केस अंगाला लागल्याने अंगाची आग होणे, विकृती होणे.

**कुसल** पहा : **कुसळ** : 'कुसले कोरडी। वारेनि जांति बरडी।' - राज्ञा १३.५६५.

**कुसली** स्त्री. तिफणीच्या दात्यास लावलेले मध्ये भोक असलेले, लोखंडी अणकुचीदार पाते; शेतकीचे अवजार. (व.)

**कुसव(वा)ण** न. मासळीचे खत. (कु.)

**कुसवळ** न. अतिशय पावसाने किंवा जमिनीतील ओलीने झालेला पिकांचा नाश. (क्रि. पडणे.)

**कुसवळ** स्त्री. कुसे असलेले एक प्रकारचे गवत; कुसळी गवत. (बे.)

**कुस(सा)वा** पु. गर्भाशय; कूस (मातेची). मूल चांगले किंवा वाईट निपजले असता मुलाच्या आई - संबंधाने वापरतात : 'महाराष्ट्रभूने ज्या वीरकन्यांना जन्म दिला तिचा कुसवा आज वांझ झाला काय?' - के २१.६.३० [सं. कुक्षि]

**कुसवा** पु. गर्भ : 'चवथ्या मासी कुसवा घडे।' - वासुदेव गीते, मसाप ६.४६.

**कुसहा** वि. तिखट. (ना.)

**कुसळ** न. १. धान्याचे वा गवताचे कूस; धस; टोक. २. केरकचऱ्याचा कण (क्रि. बोचणे, लागणे, अडकणे, मोडणे) : 'कुसळें कोरडी। वारेनि जाति बरडी।' - ज्ञा १३.५६७. ३. (ल.) सूक्ष्म दोष. [सं.]

**कुसळ-ळी, कुसळण** स्त्री. १. चेटकीण; लबाड बाई, स्त्री; मंत्रविद्येने दुसऱ्याच्या घरचे लोणी इ. आणणारी स्त्री. २. सुगरण स्त्री; चतुर स्त्री. [सं. कुशल]

**कुसळी** वि. कुस असलेले; ज्याच्यापुढे बारीक अणकुचीदार धस असतात असे (भात, गवत).

**कुसंगीचाल** स्त्री. बदचाल; बेरोख: 'तदोत्तर खानाची चाल कुसंगी जाणून येथून पाचशे स्वार सुभेदाराकडे रवाना केले.' - नाग २.५८.

**कुसंबी** स्त्री. लाल रंगाची एक पालेभाजी : 'कुसंबीए तिखीएचें ढेसे : कुसंबीए तिखीएचा घांसु घेति :' - लीचपू ५७२.

**कुसुंबीर-री** स्त्री. कोशिंबीर: 'दोही विभागी कुसंबरी पत्रशाकें।' - ऋ ८३.

**कुसा** पहा : **कुसवा**

**कुसा** पहा : **कुशा** (व. खा.)

**कुसा** पु. १. ढेकळे (नांगरट जमिनीतील) उलथीपालथी करण्याचे लोखंडी अवजार. २. या अवजाराचा लोखंडी भाग. ३. खोदण्याचे एक हत्यार; लहान पहार. (खा.)

**कुसा** पु. करडा रंग. (को.) पहा : **कुसुंबा**

**कुसाड** पहा : **कूस** : 'बंड्या काज्याच्या कुसाडावर ढोसण्या मारून' - सराई ८४.

**कुसासन** न. गवताचे आसन : 'मग गोसावीयांसि कुसासन बैसों घातलें' - लीचपू २३.

**कु(कुं)सी** स्त्री. १. कूस; उदर; गर्भाशय. २. बाजू : 'तियेचिये कुसीवरि लाहानी। वाळु घाला।' - रकौ १०१.

**कुसीद** न. ऋण; कर्ज; उसनी वस्तू : 'कुसीद घ्यावे पाहोन।' - जै ८.२४. [सं.]

**कुसुम** न. फूल; पुष्प : 'तिर्थे मुगुटीं कुसुमें सुगंधें।' - ज्ञा १.१८.[सं.]

**कुसुम** न. स्त्रीरज; विटाळ. [सं.]

**कुसुमचाप, शर, बाण** पु. मदन; पंचबाण; पुष्पधन्वा.

**कुसुमाकर** पु. १. फुलांची खाण; आगर. २. वसंत ऋतु: 'ऋतूंमाजीं कुसुमाकरु। वसंतु तो मी॥' - ज्ञा १०.२८३. [सं.]

**कुसुरडा** पु. कुसरुड; घुला; सुरवंट. [सं.]

**कुसुंडी** स्त्री. केळ्याची एक जात. (गो.)

**कुसुंब-बा** पु. १. करडईची वाळलेली फुले. २. त्यांच्यापासून केलेला रंग. पहा : **करडई**
वि. पहा : **कुसुंबी** [सं. कुसुंभ]

**कुसुंबकरडई, कुसुंब(बे)करडी** स्त्री. करडा रंग. पहा : **कुसुंब-बा**

**कुसुंबा** पु. १. अफूच्या अर्काचा काढा; बोंडाचा अर्क. हा प्यायला असता कैफ येतो. २. भांगेत मिरे इ. घालून वाटून जे करतात ते पेय.

**कुसुंबा-बी** वि. कुसुंब्यासंबंधी (रंग व रंगवलेली वस्त्रे); कुसुंब्याच्या रंगाचे (पागोटे, पदर इ.) : 'आपण जरी कुसुंबा शेला नेसुनि कडिये घे हेरंबा।' - अमृत १०१. [सं. कुसुंभ]

**कुसुंबी** वि. १. केशरी, २. मादक : 'राजस्थान अद्याप मध्ययुगीन क्षात्रधर्माच्या कुसुंबी सुखस्वप्नात दंग आहे.' - सह्याद्रि २७.

**कुसुंभ-भा** पु. करडई; पहा : **कुसुंब** : 'कुसुंभ अतसी सर्वपा।' - मोआदि १४.११३.

**कुसू** न. सांधा करायचा असता एका लाकडाचा दुसऱ्या लाकडात भरण्याकरिता तासून तयार करतात तो भाग; चौकटीच्या उखळीत बसण्याकरिता दाराच्या लाकडाला पुढे आणलेले टोक; उथळ्यात बसण्याकरिता खांबाला खाली ठेवतात ते टोक. [सं. कुस् = जोडणे]

**कुसू** न. घर, बाग, खेडेगाव इ. च्या भोवतालची आवाराची भिंत, तट. [सं. कुस् = वेढणे]

**कुसू** न. धान्याचे, दाण्याचे कुसळ. (को.) [सं. कुश]

**कुसूम, कुशून** पु. टिपूची कवायत पलटण : 'मापिल्यांनी दोन कुशून व दोन रिसाले टिपूकडील लढाई करून गारत केले.' - मइसा ७.१२८. [फा. कुशून]

**कुसुर-री** स्त्री. १. भांडणे; द्वेष; अढी : 'पाटलामध्ये व आम्हांमध्ये कुसूर पडून....' - मइसा १५.३३. २. चूक; दोष; अपराध; उणीव. पहा : **कसूर** [फा. कुसूर = चुकी]

**कुसूर, कसुरी** स्त्री. रानजाई; एक झाड. (राजा.)

**कुसूर** वि. कमी : 'हल्लीं कुसूर देतो म्हणून कळों आले.' - मासपमा १६१.

**कुसृष्टि-ष्टी** स्त्री. दुष्ट किंवा वाईट कल्पना, युक्ती, मसलत, विचार. [सं.]

**कुसेरी** स्त्री. १. मातीची तवली. २. तांदूळ ठेवायचे टोपले. (झाडी).

**कुस्करणे** पहा : **कुसकरणे** : 'मज हृदयीं धरूनि समस्त। कुस्करिती निजबळें।' - हरि ७.१५. [क. कुस्कु]

**कुस्करा** पु. स्त्री. पोळीचा चुरा करून त्याला फोडणी देऊन तयार केलेला खाद्यपदार्थ, फोडणीची पोळी.

**कुस्करी** स्त्री. (यमक साधण्याकरिता आणि विरुद्ध अर्थ दाखविण्याकरिता मस्करीपासून साधलेले रूप) भांडण; तंटा.

**कुस्का(स्कु)ट** न. सुके व निरुपयोगी गवत; कूस असलेले गवत; कस्पट; कुस्करलेले किंवा सहज भुगा होणारे गवत. (गो., कु.)

**कुस्कुरांव** न. एक प्रकारची पोळी. (गो.)

**कुस्केपणा** पु. कुत्सितपणा; तुसडेपणा : 'आतापर्यंत ती कुस्केपणानं वागत आली.' - रथ

**कुस्टमिस्ट** न. १. कुश्चल; भानगड; उपद्रव : 'वरचीलाहि गावगना कोठे कुस्टमिस्ट ये प्रसंगी मनास न आणावे.' - पेद १२.८.
वि. कडूगोड. [सं. कु + दृष्टचे द्वि.]

**कुस्त** वि. थकलेले; शीण झाल्यामुळे दुखणारे (शरीर) : 'मार खाऊन अंग कुस्त झालें.'-मदमं १८६.[फा. कुस्त = ठार करणे, कत्तल करणे]

**कुस्तमकुस्ता** पु. झोंबाझोंबी; झुंज. (ना.) [फा. कुश्ती]

**कुस्ती, कुस्त** स्त्री. झोंबी; मल्लयुद्ध; अंगयुद्ध; बाहुयुद्ध. [फा. कुश्ती]
(वा.) **कुस्ती खाणे** - डाव, पेच अंगावर उलटणे.

**कुस्तुमसांव** थंडी. (गो.) [पो.]

**कुस्पट** पहा : **खुसपट**

**कुस्पृ(स्पि)ष्ट** न. खोड; वर्म; न्यून; उणे; चूक; दोष. (क्रि. काढणे, निघणे.) [सं. कु + स्पर्श - स्पृष्ट]

**कुस्मड** न. खोटा आरोप; आळ; कुभांड. पहा : **कुस्मांड (माण.)**

**कुस्मस्थळ** न. १. कुंभ (गो.) २. मर्मस्थान.

**कुस्मां(स्पां)ड** न. (प्र.) कुष्मांड, कुंभाड; कुफरांड; आळ (क्रि. काढणे, करणे, रचणे, उठवणे). [सं. कुस्म = दोष ठेवण्यासारखे हसणे].

**कुहक** वि. लबाड; कपटी; ठक; दांभिक : 'म्हणोनि अंगा ये कुहका। कपटिया मनमोहका।' - रास ३.३२०. [सं.]

**कुहक** पु. कोकबाण; लढाईतील आगीच्या बाणांचा एक प्रकार.

**कुहक** न. माया.

**कुहकणे** अक्रि. पक्ष्याने आवाज करणे : 'घरट्यात माझी कुहकणारी मादी होती.' - सीपो २२.

**कुहकेश्वर** पु. ईश्वर; शक्तिपती.

**कुहजक** वि. कुजलेले. पहा : **कुहिजक**

**कुहडे** न. कोडे; कूट. पहा : **कुवेडे** [सं. कुह]

**कुहणे** अक्रि. कुजणे; घाण, वाईट होणे : 'कुहिलें पिशित जैसें। श्वानाचें॥' - राज्ञा १३.४२०

**कुहना** स्त्री. दंभ; ढोंग; भक्तीचे, पवित्रतेचे अवडंबर; बोकेसंन्यास. [सं.]

**कुहर** न. १. गुहा; २. (ल.) विवर; खाच; खळी : 'तैसी अंतःकरण कुहरीं उपजली। जेयाची प्रतीतिगंगा मज मीनली' - ज्ञा ७.१२५. ३. कोठार; आगर; भांडार : 'जें भुलीचे कुहर। वायुतत्त्वाचें अंतर।' - ज्ञा १३. ११५.

**कुहर** न. धुके : 'अरुणोदयीं दाटे कुहर। निबिड पडे अंधकार।' - एभा १९.५३७. [सं. कुहा]

**कुहरीयुक्त खडक** (भुशा.) ज्वालामुखीच्या उद्रेकानंतर लाव्हारस थंड होताना त्यातील वायू बुडबुड्याच्या रूपाने निघून गेल्याने तयार झालेला अनेक छोट्या छोट्या पोकळ्या असलेला ज्वालामुखीजन्य खडक.

**कुहा** पु. विहीर; कुवा: 'दुपाउलीं अविचितीं। कुडामाजीं पडियेला।' - ज्ञा ८.७०. [हिं. कुवा]

**कुहा** पु. थंडी; दमटपणा; सर्दी. (हवा, जमीन इ. ची) [सं. कुहा]

**कुहाड-डा** पु. वेदना.

**कुहार** न. कोठार. पहा : **कुहरड** [सं. कुहर]

**कुहाळो, कोवाळो** पहा : **कोहळा (गो.)**

**कुहिजक** वि. कुजके; कुजलेले. पहा : **कुजका** : 'बहुकाळ ठेविले सुवर्ण। त्यासि म्हणे कोण कुहिजकु।' - एभा १३.७७०.

**कुहिजट** पहा : **कुजट**

**कुहिजणे** अक्रि. पहा : **सडणे; कुजणे** : 'तरी कुहिलें उष्टें खातां।' - ज्ञा १७.१५४. (ल.) कंटाळणे : 'डोळे कुहिजले वाट्ट पांतां।' - शिव १०४. [सं. कुथ्]

**कुहि(ही)ट** वि. वासट; नासके; कुजट; बुरसट (पदार्थ) : 'दृश्याची जुनी जर्जरी। कुहिट जाली।' - दास १.९.१७. २. (ल.व.) वाईट स्वभावाचा; कुरठा; खुनशी.

**कुहिटखोबरे** न. १. कुढ्या, खुनशी माणूस. २. खवट खोबरे. [सं. कुथ्]

**कुहिटला** वि. कुहिजला; कुजलेला; नासका; घाणेरडा. (ना.)

**कुहिटार** न. १. गवत किंवा विणलेले झाप (छपराकरिता); केंबळ; झावळ्या. २. जुने केंबळ.
वि. केंबळी; गवती छपराचे. [सं. कुष]

**कुहिटी** स्त्री. सडलेले अन्न.

**कुहिना, कुहीन** वि. संशयी; मत्सरी; कुरठा. पहा : **कुथाण** [सं. कुहन]

**कुहिरा-री-रे-ला-ली** पहा : **कुइरी, कुइली** : 'काळें तेचि धवळें। देखणें तेंचि आंधळें। अर्धे तेंचि सगळें। कुहिऱ्या केळें केंवीं होती।' - एभा १०.७३९.

**कुहिला** पु. नासका, सडलेला: 'ऐसा कुहिला विरवो : परि तो ही न संडे:' - लीचउ ५०६.

**कुही** पहा : **कुई**

**कुही** वि. डोंगरी : 'सर्कारांत कुही शेळीचें प्रयोजन आहे.' - समारो १.९७. [फा. कोह = पर्वत]

**कुही, कोही** पु. बहिरी ससाणा.

**कुहीट** स्त्री. कुजलेले गवत : 'कुहीटि आळा :' - गोप्र ७.

**कुडीटुळी** स्त्री. आतड्यातील कुजकी घाण: 'बाळपणींची कुडीटुळी। बाहेर घाली।' - ज्ञा ६.२१६.

**कुहु** क्रिवि कोकिळेचा शब्द; त्याचे अनुकरण. [ध्व.]

**कुहू** स्त्री. प्रतिप्रदायुक्त अमावस्या : 'तें राहु गिळी सूर्यासी। सूर्यचंद्रासी कुहू करी।' - एभा २३.८२८. [सं. कुहु = अमावास्या]

**कुहूणे** क्रि. नासणे; सडणे. (झाडी) [सं. कुह]

**कुहेडे** न. कोडे; कूट प्रश्न. पहा : **कुहडे** [सं. कुह् = चकित करणे]

**कुह्या** स्त्री; अव. पावसाळ्यात हातापायांच्या बोटांच्या सांध्यातून पडणाऱ्या भेगा, क्षते, कुहे. [सं. कुथ्]

**कुळ** न. समूह : 'भूत प्रेतकुळे मैळीं। श्मशानी संध्याकाळीं। पूजिती जे।' - ज्ञा १७.७९.

**कुळ** पहा : **कुल** : 'जो यादवकुळींचा कुळदिवा।' - ज्ञा ८.२७०.

**कुळ** पु. १. शेताचा खंडकरी; कूळ. तेलगूत २. कुलदेवता; कुडाळदेशकर ब्राह्मणांच्या प्रत्येक गोत्राच्या घराण्याची पाटावर पुजलेली कुलदेवता. (कु.) ३. कैदेतील माणूस. [सं. कुल]

**कुळई** स्त्री. १. रानात सर्वत्र होणारी एक पालेभाजी; फोडशी. २. ज्येष्ठाच्या शेवटी पडणाऱ्या पावसाने उगवणारी भाजी. हिचे कंद पांढरे व जमिनीत असतात; ही भाजी गवतासारखी असते.

**कुळक** न. इच्छा; हेतू : 'म्यां देखिलें नाहीं पुत्रमुख। हेचि राहिलें असे कुळक।' - कथा ६.१५.५४.

**कुळक** स्त्री. कुळीक; कॉलरा; पटकीचा एक प्रकार; मोडशी फार झाल्यामुळे ओक, हगवण याप्रकारची होणारी विकृती. (राजा.)

**कुळकट-त** न. स्त्री. कुळाची किंवा आपली स्वत:ची आद्यंत हकीगत (मुख्यत: पापाची, गुन्ह्याची, मूर्खपणाची); वंशवृत्त. [सं. कुल + कथा]

**कुळकणी** स्त्री. १. कुशलता; चातुर्य : 'झुंजती कुळकणी जाणती।' - ज्ञा १.११३. २. कुळाचा धर्म.

**कुळकणे** अक्रि. कुळक, पटकीचा आजार होणे.

**कुळकथा** स्त्री. १. कुळाची कहाणी. २. (ल.) कर्मकहाणी. [सं. कुल + कथा]

**कुळकर** पु. कुलदेवतेची पूजा करणारा; मुख्य पुजारी. (कु.) [सं. कुल]

**कुळकरण** न. १. कुलकर्ण्याचे काम, अधिकार. २. (थट्टेने) कुल्ला, ढुंगण. (कुल्लावरून). [सं. कुल + करण]

**कुळकरणी** पहा : **कुलकर्णी**

**कुळकुळणे** अक्रि. १. जळजळीत होणे. २. व्याकूळ होणे; (भूक) भडकणे.

**कुळकुळणे** अक्रि. घाबरणे; भिणे. (गो.)

**कुळकुळीत** वि. १. काळ्या रंगाचे आधिक्य दाखविण्यासाठी योजलेला शब्द. जसे : - काळा कुळकुळीत. २. मातलेला; लठ्ठ. (गो.)

**कुळकेणी** स्त्री. निपुणता, कौशल्य : 'जूझति कुळकेणी जाणति।' - ज्ञा १.११३.

**कुळकोटी** स्त्री. कुळकथा (वाईट अर्थाने). पहा : **कुळकट** : 'अवघी कुळकोटी आहे मज ठावी। विश्वास गोंसावी कोण शोभा।' - ब ५२९.

**कुळखणी** स्त्री. निपुणता; कौशल्य.

**कुळगती** स्त्री. गोत्र, वंश यांची परंपरा, अनुक्रम; वंशवेल विस्तार.

**कुळघडणी** स्त्री. कुलकर्ण्याने गावातील प्रत्येक कुळाचा ठेवलेला हिशेब; हकीगतीचा तक्ता. यावरून वार्षिक रयतवार जंत्री तयार करतात. [सं. कुल + घट्]

**कुळचा** पु. चुळका; ओंजळ. [चुळका वर्णविपर्यास]

**कुळझाडा** पु. कुळांची साऱ्यानुसार यादी

**कुळडा(ढा)ळ** न. शेतकरी, कुळे वगैरे : 'मृताच्या सर्व नोकर लोकांस व कुळाढाळांस मेजवानी देतात.' - आगर ३.१५९. [कुळचे द्वि.]

**कुळणी** स्त्री. विशेष प्रकारचे धातूचे, मातीचे भांडे.

**कुळणे** न. मातीची काहील; धान्य भाजण्याचे मडके. (गो.)

**कुळती** स्त्री. कुळीथ : 'सकाळला पेंड, सांजला कुळतीचा भरडा.' - रैत २५.

**कुळधवणी** न. कुळताचे पाणी : 'वरि कुळधवणिये सींपे :' - दृपा १४.

**कुळदिवा-दीप** पु. कुळदीपक; कुळाचा लौकिक वाढवणारा; कुळाची अभिवृद्धी करणारा : 'जो यादवकुळींचा कुळदिवा।' - ज्ञा ८.२७०; 'तैसा वंशीं कुळदीप नसतां।' - संवि २६.३०.

**कुळपट** न. १. गुप्त दोष; वर्म; व्यंग; खोडी. २. दोष; चूक; गुन्हा. (क्रि. काढणे, निघणे.)

**कुळपटा-पाट-पुटा-पुटी** पु. स्त्री ढलपी; कपटा; चीप; तुकडा.

**कुळपट्या** वि. कुळपटे, वर्म, खोडी, व्यंगे वगैरे काढणारा; गुह्य फोडणारा.

**कुळबाऊ** पहा : **कुणबाऊ**

**कुळबावा** पहा : **कुणबावा**

**कुळबांगडी** स्त्री. मल्लयुद्धातील एक प्रकार: 'कळविकळ कुळबांगडी। अंगुठा कोपर चरण ओढी।' - कथा २.११.२१७.

**कुळभरण** न. जमिनीत, शेतात कुळे भरणे; वसाहत; लागवड.

**कुळभाऊ** पु. नात्या गोत्यातला माणूस.

**कुळमूर्ती** स्त्री. कुळाचा प्रमुख.

**कुळव** पु. नांगरलेली जमीन सपाट करण्याचे शेतकीचे एक अवजार. याने जमीन भुसभुशीत करतात व गवत इ. काढतात : 'नांगर, कुळव, पाभर चालविताना तहान लागली की, प्यावयाचे पाणी या ठिकाणचेच.' - खेया ७. [क. कुळ-ळु] [सं. कुल]

**कुळवण-णी** स्त्री. जमीन साफ करण्याचे काम : 'कर्म कुळवणी। न लगे धर्मपाळी दोन्ही।' - तुगा २६०. [सं. कुल]

**कुळवती** स्त्री. कुळवंत, कुलीन, कुलवान स्त्री; कुलवती : 'मदें तारुण्याचा कुळवति अहंकार न करीं।' - सारुह ७.१५२.

**कुळवमोड्या** पु. कुळव हाकणारा.

**कुळवल्ली** स्त्री. कुळातील लोक.

**कुळवहिवाट** स्त्री. शेतावरील कुळाचा वहिवाटीचा हक्क.

**कुळवंत,वान** वि. श्रेष्ठ कुळात जन्मलेला; कुलीन घराण्यातील. [सं. कुल]

**कुळवाड** स्त्री. उदीम; शेतकी; पहा : **कुळवाडी**

**कुळवाडपण** न. क्षुद्रपणा.

**कुळवाडवाडा** पु. गावात कुळवाड राहतात तो भाग : 'मी जायची हे कळलं तशी सगळा कुळवाडवाडा धावला.' - पडघ ६४८.

**कुळवाडसमजा(ज)व(वि)णी, कुळवाडसमजूत** स्त्री. अडाणी किंवा शेतकरी लोकांना समजेल अशा रितीने त्यांच्याच भाषेत समजावून सांगणे.

**कुळवाडहिशोब** पु. कुणबी हिशेब.

**कुळवाडी** पु. स्त्री. १. कुणबी; शेतकरी : 'गाणगापुरीचा कुळवाडी। मार्गी उभा कर जोडी।' - दत्तपदे - १३०. २. पांढरपेशा नव्हे असा; हलक्या जातीचा. ३. शेतकी उदीम; कुणबावा. ४. रोजगार; व्यापार; व्यवसाय : 'पुंडलिक पाटील केली कुळवाडी।' - तुगा २४७. ५. देखरेख : 'कुळवाडियाचिया आशा। चाळीत असे।' - ज्ञा १३.२४६.

**कुळवाडीकर** वि. शेतकी करणारा : 'आणि मना ऐसा आवरी। कुळवाडीकरू।' - ज्ञा १२.२८.

**कुळवारी** पहा : **कूळवार**

**कुळविणे** सक्रि. कुळवाने जमीन साफ करणे; कुळवणी करणे.

**कुळवृत्ती** स्त्री. कुलाचार.

**कुळवे** न. रान तोडून प्रथमच पीक काढलेले नाचणीचे शेत. (राजा.) [सं. कुल]

**कुळंजन** पहा : **कोळंजन**

**कुळंबट** पहा : **कुणबट**

**कुळंबीण** स्त्री. कुणब्याची बायको.

**कुळा(ळां)कु(कू)ड** न. वाईट लाकूड : 'तुका म्हणे काचे राहे कुळाकुड। अवगुण तो नाड ज्याचा तया।' - तुगा ३४०१.

**कुळागत** न. खेड्यातील स्थायिक अथवा वतनदार घराणे. (समासात) कुळागत आचार - धर्म - व्यवहार - संप्रदाय. [सं. कुल + आगत]

**कुळागर** न. १. पोफळीचा बाग. (गो.) २. घराजवळचा बाग; परसू : 'त्याच्या सभोवतीं घनदाट भाटांनीं व कुळागरांनीं वेढलेलीं लहान लहान घरें....' - सह्याद्रीच्या पायथ्याशी ८९. [सं. कुल + आगर]

**कुळार** न. माहेर. (गो.)

**कुळारग** पु. १. खेड्यातील जमीनदार, वतनदार (समुच्चयाने); शेतसारा देणारी कुळे; वतनदार कुळांचा वर्ग, समुदाय. २. देणेदारांची यादी, जंत्री. (गो.)

स्त्री. १. कुळांपासून येणे असलेली रक्कम. २. कुळांना आगाऊ दिलेला पैसा. ३. त्यांना आगाऊ पैसे देणे, पैसे वसूल करणे. इ. व्यवहार प्रकार. कुळारगी असेही रूप आढळते. ४. कुळाकडे विशिष्ट हक्काने असलेली जमीन. (कर.) पहा : **कुळारगवार, वर्ग**

वि. सरकारच्या अधिकाराखाली शेतकऱ्यांनी, कुळांनी बसविलेला (गाव). खोतीची नव्हे अशी कुळाकडे असलेली (जमीन). (राजा.) [सं. कुल + आकार]

**कुळारग पट्टी** स्त्री. कुळवारपट्टी.

**कुळारगवार-वर्ग** क्रिवि. प्रत्येक कुळामागे, दर कुळागणीक (खेड्यातील शेतकऱ्यांच्या). (याद करणे, वसूल करणे-घेणे; पट्टी, बांधा, हिशेब, बाकी, शेते इ. शी जोडला जाणारा शब्द.)

**कुळारगी, कुळांरगी गाव** वि. ज्यातील सर्व जमीन भाडेपट्ट्याने दिली असून वा ज्या गावातील सर्व जमिनी कौलदाराने धारण केलेल्या असून, ज्याची वहिवाट वा कारभार गावकऱ्यांच्या सहकार्याने गावाचा अधिकारी वर्ग चालवतो असे. (गाव.)

**कुळावा** पु. लग्न जमविणारा मध्यस्थ (कु.); म्हाला (हेट.) [सं. कुल]

**कुळावी** पु. कुळदेवतेचा भक्त. (गो.) [सं. कुल]

**कुळाक्षरी** पु. सर्वाधिकारी; कुलाखत्यारी : 'धाकले नाना कुळाक्षरी त्याच्या मोहरले फुलशहर.' - ऐपो १२२. [फा. कुल + अख्त्यार]

**कुळि(ळी)क** स्त्री. १. मोडशी; कॉलरा; पटकी. पहा : **कुळक** : 'कुळिक तरळ कामिणी।' - दास ३.५.१५. २. (ल.) अजीर्ण; तिटकारा : 'शांभवेची कुळिक।' - उगी १७६.

**कुळिपु** वि. कुलवंत; कूळ पावन करणारा : 'हा नोहेचि कुळिपु। ययां नाहीं माए बापु।' - शिव ८६१. [सं. कुल + पू]

**कुळिप्त** वि. माहीत; विदित : 'तुम्हांस सर्वाविसी कुळिप्त आहे.' - हिंदखं १.१५.

**कुळिया** पु. कुळदिवा; कुळदेवतेपुढील दिवा : 'भेरगुंडे कुळिया चहुंकडे।' - उगी ४४२.

**कुळिंजग** पहा : **कोळंजन**

**कुळी** स्त्री. गुळणी; चूळ. (राजा.)

**कुळी** स्त्री. कुल; वंश; गोत्र; जात; घराणे. या शब्दाचा उपयोग मर्यादित करतात. लग्नकार्याच्या वेळी जातीचा कुलीनपणा, थोरपणा पाहण्यासाठी कुळीचा विचार करतात. [सं. कुल]

**कुळीक** स्त्री. खोड. (बे.)

**कुळीण** पहा : **कुलीन** : 'ताई कुळीण म्हणूनच इतके दिवस तुम्ही घरात बाजारबायका आणल्या.' - मी २०७.

**कुळीत** न. रयतेवाचून किंवा कुळापासून यायचा पैसा (खंड वगैरे).

**कुळीत-थ-द** पु. हुलगा; कुळथी; एक द्विदल धान्य. हे हलक्या जमिनीत पिकते. याला गरिबांचे धान्य म्हणतात. [सं. कुलित्थ]

**कुळीमुळी** स्त्री. उत्पत्ती; इतिहास : 'गोंधळाची कुळीमुळी श्री. ढेरे यांनी दिलेली आहे.' - लोक्षि १३.

**कुळुक** स्त्री. गंडांतर; अनिष्ट योग.

**कुळूमसुपारी** स्त्री. सुपारीचे काप, कत्रण, खांडे.

**कुळेवारी** पहा : **कुळवारी** : 'गावोगाव एकेक भट कामगार पाठवून, बाकी राहिलेल्या शूद्रांची कुळेवारी करून.' - जोफु ८२.

**कुळैवा** पु. १. कुळ भूषविणारा दिवा. २. दिवा : 'नगरीं उजळैले कुळैवे : ठाई ठाई अखंड लाखेवे :' - रुस्व ४८२.

**कुळोधारणी** वि. कुलोद्धारक; कुलाचा उद्धार करणारा; कुलाची कीर्ती वाढवणारा; कुलाला ऊर्जित दशेला आणणारा : 'त्याजवरून त्यांचे मातोश्रीने उत्तर केले कीं, बाई तुम्ही आमची कुळोधारणी ऋणी आहात, तुमच्या योगानीं हे जीव वाचले.' - शामब, भारवर्षा १३.

**कुक्षि-क्षी** पु. स्त्री. १. बाजू; कुक्ष; काखेच्या खालचा आणि कमरेच्या वरचा भाग (आतला किंवा बाहेरचा) : 'करुनि सडासंमार्जन गोपी कुंभ घेउनि कुक्षीं।' - होला १६. २. पोट; पोटाची खळगी. ३. गर्भाशय. ४. (तलवारीचे) म्यान. पहा : **कुसवा** [सं.]

**कुक्षिभरि-री** वि. अधाशी; खादाड; बराडी. [सं.]

**कुक्षिवात** पु. कुशीत उठणारा वायगोळा; पेटका; वायू (पेटका उत्पन्न करणारा). [सं. कुलि]

**कुंकड** पु. कोंबडा. [सं. कुक्कुट]
**कुंकड** न. पिंजाऱ्याचे कापूस पिंजण्याचे साधन.
**कुंकडकुंभा** पहा : **कुंकटकुंभा** (खा.)
**कुंकवाचा(ला)धनी** नामधारी, सामर्थ्यहीन नवरा, मालक : 'इंदु - मला कुंकवाला धनी पाहिजे.' - भावं ९०.
**कुंकुम** पु. १. केशर : 'मोतियांचे घोषें। रांविलें कुंकुमरसे।' - शिव १७. २. कुंकू; पिंजर. ३. पुन्नाग वृक्ष; कमळ; शेंदरी. याच्यापासून कुंकुमचूर्ण तयार करतात. कपड्याला नारिंगी रंग देण्यासाठी या चूर्णाचा उपयोग होतो. (को.) (एका जातीचा वृक्ष) : 'कुंकुम-केसरीजवली : कर्पुरकर्दलीचिया ओली' - वह १५७.
**कुंकुमकेशर** न. १. रासतुरा; सोनमोहोर, गुलमोहोर; एक झाड व त्याचे फूल. (को.) २. कुंकू. ३. केशर [सं.]
**कुंकुमतिलक** पु. कुंकवाचा टिळा. हिंदू स्त्रिया सौभाग्यचिन्ह म्हणून कपाळावर लावतात तो कुंकवाचा टिळा. [सं.]
**कुंकमपत्र, पत्रिका** न. स्त्री. मुंज, लग्न अथवा इतर मंगलप्रसंगीची निमंत्रणपत्रिका; हिच्यावर शुभचिन्हदर्शक कुंकुम शिंपडतात. [सं.]
**कुंकुमपिंजरी** स्त्री. केशराची पूड : 'कापूर कस्तुरी परिमळ द्रव्ये चांग : अक्षता कुंकुमपिंजरी' - रुस्व २८१०.
**कुंकुमरेखा-षा** स्त्री. कपाळावर ओढलेली कुंकवाची रेघ, चिरी. [सं.]
**कुंकुमागर-रू** पु. तांबडा चंदन; रक्तचंदन. [सं.]
**कुंकू** न. हळदीच्या कुड्याला लिंबू, टाकणखार इत्यादीची पुटे देऊन रंगवून त्याची केलेली लाल पूड. हे कुंकू स्त्रिया आपल्या कपाळाला लावतात. : 'बायकांना जसें कुंकू तसें पुरुषांना स्वातंत्र्य.' - द्रौ ५६ [सं. कुंकुम] (वा.) ० **अधिक होणे, ० वाढणे** - कुंकू कमी होणे, संपणे, पुसटणे. ० **जाणे, पुसणे** - १. वैधव्य येणे. २. (ल.) भरभराट, कीर्ती, उत्कर्ष यांना ओहोटी लागणे (धंदा व्यापार इ.) ० **पुसून शेण लावणे** - सधवेने नवऱ्याला सोडचिठ्ठी देऊन पाट लावणे; विधवेने दुसरे लग्न करणे. (कुण.) ० **बळकट होणे, असणे** - पुष्कळ दिवस सौभाग्य टिकणे; नवऱ्याला दीर्घायुष्य लाभणे. ० **लावणे** - वधू पाहण्याच्या वेळी मुलाच्या बापाने अगर दुसऱ्या वडील माणसाने वधूला साखरपुडा देणे. ० **सरसे होणे, करणे** - सौभाग्य कायम राहणे, टिकणे. **कुंकवाची उठाठेव करणे** - आपला संबंध नाही अशा भानगडीत पडणे.
**कुंकू** न. मुलींचा एक खेळ.
**कुंकूगोपचंदन** न. १. (ल.) मिश्र विवाहाची संतती. २. (ल.) चांगला न शिजलेला, गोळा झालेला भात.
**कुंकोत्री** पहा : **कुंकमपत्र**
**कुंगफू** स्त्री. मूळची चीनमधील 'कराटे' सारखी निःशस्त्र असताना शत्रूशी लढण्याची कला.
**कुंगार** वि. बेतर्तूद; गलथान.
**कुंग्रा** वि. हलकट; दरिद्री; कवडीचुंबक (माणूस). (व.)
**कुंचड-डे, कुचण** न. १. लहान मुलांचे किंवा बायकांचे (बाळंतपणातील) डोक्याला घालायचे टोपडे; लहान कुंची. २. (ल.) संकुचित व गैरसोयीचे घर. ३. शिरस्त्राण. [सं. कुचू = संकोच पावणे]
**कुं(कु)चणी** स्त्री. डुकराच्या केसांची कुंचली; कोष्ट्याची कुंचली. पहा : **कुंची** २.
**कुंचणे, कुंचलणे** उक्रि. कुंचलीने साफ करणे; झाडणे.
**कुंचला** पु. रंग देण्याची मोठी कुंचली अथवा ब्रश; डुकराच्या मानेवरील केसांची बांधलेली कुंचली (दागिने स्वच्छ करण्याची). [सं. कूर्च]
**कुंचळणे** अक्रि. (मोराला) पूर्ण पिसारा येणे, फुटणे.
**कुंचा** पु. १. मोराच्या पिसांचा कुंचला, मोर्चल : 'उभिला जैसा देउळीं। जाणोनि कुंचा॥' - ज्ञा १३.६५९. २. मोळगवत, डुकराचे केस, ताड व इतर झाडांची पाने यांची केरसुणी. ३. विणकरांचा सुताला खळ लावण्याचा कुंचला. हा झाडाच्या बारीक मुळ्यांचा केलेला असतो. सुताला पांजण केल्यावर ह्याने सूत साफ करतात. सामान्यतः चिताऱ्यांच्या कुंचल्यासही म्हणतात. [सं. कुर्च]
**कुंचा** वि. कोणता : 'देवीमाशी कुंच्या पोळ्यात ऱ्हाती ?' - जैत १०८.
**कुंचाळणे** उक्रि. कुंचल्याने साफ करणे; उजळा, जिल्हई देणे.
**कुंचितकपोल** न. (नृत्य) नृत्यात थंडी वाजणे, ताप आला असे दाखविणे, भय वाटणे वगैरे प्रसंगी गाल आक्रसल्यासारखे दाखविणे. [सं.]
**कुंचितकरण** न. (नृत्य) उजवा पाय पुष्कळ खाली करणे व उजवा हात कुंचित करून डाव्या बाजूला उताणा करून ठेवणे. [सं.]
**कुंचितदृष्टि-ष्टी** स्त्री. (नृत्य) बाहुल्या व नेत्रप्रांत आकुंचित करणे. हा अभिनय अनिष्ट गोष्टी पाहण्याचे टाळण्याकरिता व डोळे दुखू लागलेले दाखवायचे असताना करतात. [सं]
**कुंचितपाद** पु. (नृत्य) नृत्यास उभे असताना एक पाय वर उचलून पावलाचा मधला भाग व बोटे आवळून घेणे. [सं.]
**कुंचितपुट** न. (नृत्य) नृत्यामध्ये खालच्या व वरच्या पापण्या एकमेकींजवळ आणून आकुंचित करणे; घाण व अप्रिय वस्तूचा स्पर्श, अनिष्ट वस्तुदर्शन यावेळी हा अभिनय करतात. [सं.]
**कुंचितमान** स्त्री. (नृत्य) नृत्यामध्ये चवडे उचलून टाचांवर उभे राहिले असताना सर्व शरीराचा भार खाली दाबला जातो. अशा वेळी डोक्याने मान खाली दाबली जाते ती मानेची स्थिती.
**कुंची** स्त्री. लहान मुलांचे लहान, लांब टोपडे; घुगी. [क. कुंचिगे] [सं. कुचू = संकोच पावणे]
**कुंची** स्त्री. १. रंगाऱ्यांचा, चिताऱ्यांचा, डुकराच्या केसांचा मोठा कुंचला. २. विणकऱ्यांचा सुतास पाजण करण्याचा मोठा कुंचला. [सं. कुंच् = संकोच पावणे]
**कुंज** पु. लतागृह; गुंफा; वेली वगैरेंनी आच्छादित जाळी; लतामंडप. [सं.]
**कुंज** पु. १. छपराच्या दोन पाख्यानी झालेला आढ्याचा कोपरा; चौकटीचा, रस्त्याचा, नदीचा कोपरा. २. छपराच्या कोपऱ्याच्या बाजूने लावलेली गवताची झडी. [फा. कुंज = कोपरा]
**कुंज** न. गुणगुण.

**कुंजकावीस** स्त्री. कपट; लपवालपवी : 'सोबतीच्या कारकुनासी मनामधें कुंजकावीस न करावी.' - चंचूद ११४.

**कुंजडा-रा** पु. भाजीपाला विकणारी एक जात व त्या जातीतील व्यक्ती; केवटा.

**कुंजडा** पु. १. कृपण; कंजूष. २. हलका, क्षुद्र, कपटी, कुत्सित माणूस. [हिं.]

**कुंजणे** अक्रि. पक्षांनी शब्द करणे; गाणे: 'कोकिळा कृष्णवर्ण कुंजती।' - एरुस्व ३.९. [सं. कुज् = शब्द करणे]

**कुंजण्या** स्त्री. (सांकेतिक) गोफण.

**कुंजन** न. कूजन; पक्ष्यांचे गाणे : 'निन्हा कर्णरसायेने : वरि होति विहींगमांची कुंजने'- ऋव ७६.

**कुंजप्पा** स्त्री. (सांकेतिक) गोफण.

**कुंजभुवन, कुंजस्थान** न. लतामंडप (क्रीडा वगैरे करण्यासाठी उपयोगी). [सं.]

**कुंजर-रा** स्त्री. १. एक प्रकारची रानभाजी. ही जोंधळ्याच्या शेतात व बांधावर उगवते. कोवळी पाने व शेंडा यांची भाजी करतात. २. गवताचा एक प्रकार.

**कुंजर** पु. १. हत्ती : 'कां जालें आंगधुणें। कुंजराचें॥' - ज्ञा १२.२३३. २. (समासात) श्रेष्ठ. जसे : - पुरुषकुंजर. ३. पक्षी; पिंगळा. [सं.]

**कुंजरडा** पहा : **कुंजडा २**

**कुंजरभार** पु. गजदळ; हत्तींचे सैन्य.

**कुंजरशौच** न. गजस्नान; निष्फळ श्रम. [सं.]

**कुंजरी** स्त्री. १. हत्तीण : 'कां लवणाची कुंजरी।' - ज्ञा १५.३१८. २. गजदळ; हत्तीचे सैन्य. [सं.]

**कुंजवन** न. कुंजभुवन. २. गोकुळातील श्रीकृष्णाचे क्रीडास्थान, शृंगारस्थान : 'हे कुंजवन अशी कल्पना कर.' - रासक्रीडा ३.

**कुंजावरी** वि. भाजीपाल्याचे; केवट्याचे : 'पूर्वेस कुंजावरी अमय दुकानें होतीं.' - थोमारो २.१७२.

**कुंजी** पु. म्होरका; पुढारी. (व.) [सं. कुंजर]

**कुंजी, कुंजिका** स्त्री. किल्ली; चावी : 'हवालदारास कैद करून कुंज्या हिरोन घेणे.' - पेद. [हिं.]

**कुंजीची उडी** उजव्या हाताच्या बोटांनी डाव्या हाताची बोटे धरून मारायची उडी.

**कुंजीर, कुंज(जु)र** पु. पहा : **कुंजर-रू.** एक वेलभाजी. हिला पावसाळ्यात बारीक फळांचे घोस येतात.

**कुंटका** पु. तुकडा : 'तंव मर्जिलेआ मछयाचा कुंटका।' - क्रिपु ५५.२९.

**कुंटण** स्त्री. कुंटीण; मध्यस्थ स्त्री; जार व जारिणी यांचा योग घडवून आणणारी स्त्री. [सं.]

**कुंटणकी** स्त्री. १. कुंटणीचे काम २. कुटाळकी; चुगली; चहाडी. [सं.]

**कुंटणखाना** पु. वेश्याव्यवसाय करण्यासाठी वापरली जाणारी जागा; वेश्यागृह. [सं.]

**कुंटणगिरी** स्त्री. भडवेपणा; वेश्यांना त्यांच्या धंद्यात मदत करणे व त्यावर निर्वाह करणे; वेश्यांसाठी करण्यात येणारी दलाली.

**कुंटणमावशी** स्त्री. चहाड्या सांगून नसत्या कलागती उत्पन्न करणारी स्त्री.

**कुंटणु** पु. वेश्या व्यवसायातील दलाल : 'मातुगा। कुंटणु। भेडु। कांपिरा।' - कला ८.

**कुंटणे** अक्रि. १. लंगडणे : '(श्रीचरणी कांटा मोडला होता) तेणे करूनि गोसावी कुंटीत चालेती' - गोप्र ११. २. अडथळणे; कुंठणे : 'मग संतुष्टींचा ठाइं। कुंटे साहाजे।' - ज्ञा ३.४९.

**कुंटा** वि. लंगडा : 'काणाकुंटा व्याधिव्याप्त।' - एभा १२.२०६. [सं. कुण्ठ = लंगडे असणे]

**कुंटी** स्त्री. लहान कुळव (बे.). २.खुंटी; कापड गुंडाळण्यासाठी केलेला लाकडी ठोकळा.

**कुंटीण** पहा : **कुंटण**

**कुंटेपणे** क्रिवि. अडखळत; लंगडत : 'तरि आणिकिं ही कुंटेपणे। चालावें लागे। - राज्ञा २८.१८६९२.

**कुंठ** स्त्री. गोणी : 'तेही चणेयांचीया कुंठा भरलिया होतीया।' - लीचउ ३३.

**कुंठचे, कुटचे** अक्रि. लंगडणे. (गो.)

**कुंठणे** अक्रि. थांबणे; कुंठित होणे; खोळंबणे; अवरोध होणे, केला जाणे; बंद होणे : 'पाहा पां असमसाहास। जेथ कुंठले निर्देश।' - ऋ १.२४७. [सं. कुण्ठ = लंगडे असणे]

**कुंठणे-ने** क्रिवि. कोठून; कोठपासून.

**कुंठता** स्त्री. अटकाव; प्रतिरोध; प्रतिबंध. [सं. कुंठ]

**कुंठव(वि)णे** सक्रि. अडथळा आणणे, करणे : 'कां राजाज्ञा अव्यवहारु। कुंठवी जेवीं॥' - ज्ञा १८.७३३. [सं. कुण्ठ]

**कुंठित** वि. १. थांबलेले; अडविलेले; खोळंबविलेले; खुंटलेले. २. घोटाळलेला; निरुत्तर; किंकर्तव्यतामूढ; मौन. ३. (वन) अक्षाची मर्यादित वाढ होण्याचा प्रकार; पुष्पबंधाच्या (फुलोऱ्याच्या) अक्षाची वाढ फूल टोकास आल्यावर थांबणे. [सं.]

**कुंठितपत्र** न. १. ज्यात लिहिलेला मजकूर लबाडीचा, फसवाफसवीचा असतो असे पत्र. २. वाद हरल्याचे कबुलीपत्र.

**कुंठी** स्त्री. दोरा, कसणी : 'अशोकाची कोडकी कोवळी : कुंठी कमळनळाची' - रुस्व ४५६.

**कुंड** पु. नवरा असताना जारापासून झालेला पुत्र : 'पांडवांचे कुळ शोधितां निर्मळ। कुंडजार गोळे बुद्धिकांची।' - नागा ८९२.

**कुंड** पहा : **कुंडगोलक**

**कुंड** न. १. पाण्याची विहीर; झरा; तळी (पवित्र); (चारी बाजूंनी दगडांनी बांधलेला) हौद; टाके; पुष्करणी. २. भांडे; घट; घडा. ३. कामटीचे तयार केलेले व हरमुजी रोगण इ. लावून घट्ट व टिकाऊ बनविलेले भांडे. (व.) ४. कुंडी (फुलझाडांची) : 'दवण्याचे कुंड घालोनि।' - ऐपो १५.५. घाण पाण्यात निचरा करण्यासाठी असलेले स्वयंपाकाच्या ओट्याला लावलेले भांडे. [सं.]

**कुंड** न. पवित्र अग्नी ठेवण्यासाठी केलेले माती वा धातूचे चौरस काठाचे

बनविलेले पात्र, खळगा; यज्ञाची वेदी : 'हवन केलें कुंडीं। इंद्रियाग्नीच्या॥' - ज्ञा ४.१२९. [सं.]

**कुंडगोलक** पु. सधवेचा जारज पुत्र.

**कुंडजार** पु. ब्राह्मण स्त्रीस जारापासून झालेला पुत्र. पहा : **कुंडगोलक**

**कुंडमंडप** पु. यज्ञ वगैरे विधी करायचा असताना जी विशिष्ट मोजमापाची कुंडे करायची असतात व विशिष्ट आकाराचा व मापाचा मंडप बांधायचा असतो तो कसा करायचा यासंबंधीचे ज्ञान व ते प्राप्त होण्यापर्यंतचे अध्ययन : '(ते) सुत्रवृत्ति भाष्यांत निष्णात असून कुंडमंडपापर्यंत गति होती.' - भीप्र २.

**कुंडय, कोंडय** स्त्री. शिंपी (जात). (गो.)

**कुंडल** न. १. कानातील एक दागिना. २. वलय; कडे (धातूचे). [सं.]

**कुंडला** पु. १. तपकीर घोटण्याचा दगडी अथवा मातीचा खल. २. मातीचे भांडे (कु.) [सं.]

**कुंडलित्त मृद्भांडी** (पुरा.) मातीच्या वेटोळ्यांचे थर एकावर एक ठेवून बनवलेली भांडी.

**कुंडलिनी-णी** स्त्री. (योगशास्त्र) शरीरातील मणिपूर चक्राच्या ठिकाणी सर्पाच्या आकृतिरूपाने राहणारी प्राणरूप शक्ती : 'शक्ति करी उजगरा।' कुंडलिनीते॥' - ज्ञा ६.२२१. [सं.]

**कुंडली-ळी** स्त्री. १. सूर्य, ग्रह, नक्षत्र यांची दशा दाखविण्याकरिता चौरस, त्रिकोनी अथवा वर्तुळाकार भाग पाडलेली, व्यक्तीच्या जन्माच्या वेळेची ग्रहस्थिती दर्शविणारी आकृती; राशीचक्र. २. प्रक्षिप्त वाक्य दाखविण्यासाठी काढलेला कंस व इतर रेषा. ३. पहा : **कुंडलिनी** : 'हे असो ते कुंडली। हृदयां आंतु आली।' - ज्ञा. ६.२७४. [सं.]

**कुंडली-ळी** स्त्री. १. लहान कुंडी. (गो.) २. वर्तुळाकार व मध्ये भोक असलेली चापट चक्की (भोक पाडण्यासाठी). (खा.)

**कुंडली** पु. १. सर्प : 'त्या मणि प्रकाशीत वारुळीं। बैसले किती थोर कुंडली।' - नवनीत ४२१. २. कडी, वर्तुळ, वेटोळे व यांसारख्या इतर अनेक वस्तू. ३. पुरुषांच्या कानातील एक दागिना.
वि. ज्याच्या कानात कुंडले आहेत असा. [सं.]

**कुंडलीकरण** न. (पुरा.) चिखलाच्या वळ्या एकावर एक रचून मडके बनविण्याची पद्धत.

**कुंडवेदिका, कुंडवेदी** स्त्री. यज्ञ, होम, हवन करण्याकरिता केलेली वेदी, कुंड. [सं. कुण्ड = जाळणे]

**कुंडा** पु. १. मोठी कुंडी (फुलझाडाची, चांभाराची कातडे भिजत घालण्याची, रंगाऱ्याची); उसाच्या रसाचे मांदण; भांग; तपकीर इ. तयार करण्याचे पात्र : 'जवळच वटवृक्षाची डहाळी लावलेला कुंडा ठेवला असतो.' - ऐराुप्र ८.४४५. २. माडी काढण्यासाठी माडाला बांधलेला भोपळा. [सं. कुंड]

**कुंडा** पु. धान्याचा कोंडा; भूस. (गो. हेट.)

**कुंडाले** न. पातेल्यासारखे मातीचे भांडे. (माण.) [सं. कुंड]

**कुंडिका** स्त्री. पाणी भरण्याचा लाकडी माठ.

**कुंडिया** पु. दुध्या भोपळ्याचा एक प्रकार. ज्याला कमंडलूच्या आकाराचे फळ येते असा भोपळा.

**कुंडी** स्त्री. १. भांग, तपकीर घोटण्याचे भांडे, पात्र. २. फुलझाडे लावण्याचे मातीचे भांडे. ३. स्नानाकरिता, धुण्याकरिता पाणी साठविण्याची दगडाची अगर लाकडाची मोठी डोणी. ४. (सोनारी) पाणी ठेवण्याचे भांडे, पातेली. (को.) [सं. कुंड]

**कुंडी** पहा : **कोंडी**

**कुंडी** स्त्री. चौघडा. (ना., गोंडी) [सं. कुंड]

**कुंडेपास्ट** वि. कोंड्यापेक्षा कमी दर्जाचा. (गो.)

**कुंडो** पु. कोंडा. (कु.)

**कुंड्या** पु. कुंडा; मोठी कुंडी.

**कुंत** पु. भाला : 'करी घेऊनियां कुंत। म्लेंच्छ संहारीन सत्य।' - हरि ७. २२३. [सं.]

**कुंतल** पु. अव. १. केस; केसांचा झुपका. २. कानाच्या पाळीचा एक भाग. [सं.]

**कुंतलन** न. (यंत्र) कुरळा आकार देण्याची क्रिया. उदा. सरळ पत्र्याचे नळीच्या पत्र्यांत रूपांतर करणे.

**कुंती** पु. भाला धारण करणारा योद्धा; भालाईत : 'जीस असुख सह्य गमे दे जें भेदूनि हृदय कुंती तें।' - मोउद्योग ७.४१

**कुंथ** पु. कुंथणे : 'कुंथ हुंकार एका' - गरा ५०.

**कुंथणे** पहा : **कुथणे** : 'हे जे मिळोनियां मेळे। कुंथती वीर वृत्तीचेनि बळें।' - ज्ञा ११.४५९.

**कुंथाकुंथी** स्त्री. श्रम; खटपट : 'आता कायसी कुंथाकुथी।' - ज्ञा १५.२४७.

**कुंद** पु. १. चमेलीच्या वेलासारखा वेल व त्याचे फूल. यास आश्विन - कार्तिकात फुले येतात. ही फुले रानमोगरीच्या फुलांसारखी किंचित लांबट असतात : 'कुंद, मोगरा, जाईजुई, चमेली इ. वेली सुवासिक फुलांकरता प्रसिद्ध आहेत.' -वनश्री ५.३४. २. एक प्रकारचे गवत. ३. रुमाल किंवा शालजोडी इ. च्या कोपऱ्यात काढलेली झाडाची नक्षी, वेलबुट्टी.

**कुंद** पु. १. छपराची दोन पाखी ज्या ठिकाणी मिळतात त्या ठिकाणी होणारा कोन. २. रस्त्याचा कोपरा, कातरा.

**कुंद** पु. गुरांचा क्षयरोगासारखा एक रोग.

**कुंद** पु. कवड्या ऊद.

**कुंद** वि. १. चोंदलेले; बुजलेले (नळ, गुडगुडीची नळी इ.); कोंदट; थांबलेली; थबकलेली; स्थिर झालेली (हवा, वारा); (त्यावरून) चोंदल्यामुळे बद किंवा बेसूर वाजणारा (वाद्य, गळा, स्वर, हवा.). २. हवालदिल; हताश. [फा. कुंद]

**कुंदम-र** पु. डिंक.

**कुंदळणे** पहा : **खुंदळणे**

**कुंदा** पु. १. एक प्रकारचे गवत. हे हरळीसारखे पण जाड मुळ्यांचे असून ते काढण्यास फार त्रास पडतो : 'कुंदा गोगडी हराळी।' - गीता २.५२८६. २. एक फुलझाड. [सं. कुंदर, कुंदरु] (वा.) ० **काढणे** -

१. गवत खणून काढणे. २. ठेचणे; मारणे; चोपणे.

**कुंदा** पु. कुंडा; भांग इ. घोटण्याचे दगडी किंवा मातीचे भांडे : 'शांभवी आलासे घेऊन। कुंदा कुल्का सिद्ध करून। आसनावरी बैसला।' - नव २२.१४६.

**कुंदा** पु. कोयंडा. (माळवी)

**कुंदा** पु. बंदुकीचा दस्ता : 'कुंद्याचे बूड रुप्यानें मढले असे.' - ऐसंसाखं ३.२२० [फा. कुन्द]

**कुंदा** पु. ठेचा.

**कुंदा** पु. (कुस्ती) गळखोडा; आपला एक पाय जोडीदाराच्या मानेवरून, बगलेतून घालून आपल्या दुसऱ्या पायाच्या गुडघ्याच्या लवणीत पायाचा पंजा धरून हाताने जोडीदाराला मानेवरून घातलेल्या पायाने चीत करणे.

**कुंदा** पु. खवा; खव्यापासून बनवलेली मिठाई.

**कुंदा** पु. (ढोर) कातड्याचे केस काढण्याची लाकडी फळी.

**कुंदावा** पु. वायू कोंडणे; गुबारा; अवष्टंभ. (व.)

**कुंदी** स्त्री. १. (धोबी) कपड्याच्या घड्या घट्ट बसण्यासाठी मोगरीने ठोकण्याची क्रिया. २. कपडे धुताना मर्दणे, घासणे, बडवणे वगैरे क्रिया. ३. (ल.) खूप मार; कुट्टा; दुर्दशा. (क्रि. करणे, निघणे, काढणे, गाजवणे.) : 'कुंदी करिल रविपुत्र कसे।' - देवनाथ कटिबंध ६. [ध्व.]

**कुंदीपाक** पु. ठोकाठोकी; बुक्काबुक्की.

**कुंदुस** स्त्री. तोंडली; तुंडिकेरी; रक्तफला. - दाकोपु

**कुंदेणे** अक्रि. कुंद नावाच्या रोगाने पछाडणे (जनावरे). (राजा.)

**कुंदोल** न. कमळ : 'कुंदोलांचे हार तुटले.' - शिव ७१६.

**कुंधा** पु. गवत; काशा. पहा : **कुंदा** (वा.) ० **काढणे** - (ल.) मार देणे.

**कुंप** पु. कुंपण; वई; वडांग : 'मग तयाचिया बुडुखा। कुंप कीजे॥' - ज्ञा १३.२१८ (ना.)

**कुंपकाटी** स्त्री. काटेरी कुंपण : '(वटरोपासि) कुंपकांटी करी' - लीच ५९५.

**कुंपण** न. सीमानिश्चितीसाठी केलेली तटबंदी; जागा बंदिस्त करण्याकरिता लावलेले काटे किंवा घातलेले कूड वगैरे; सर्व बाजूंनी काटे लावून अगर कूड घालून बंदिस्त गेलेली जागा; आवार; [सं. कूंप]

**कुंपणी सरकार** ईस्ट इंडिया कंपनी (इंग्रजांची). ही कंपनी हिंदुस्थानात व्यापारी सनद घेऊन १६०४ मध्ये आली. पुढे हिने हिंदुस्थानाचे राज्य कमावल्यावर तिला कुंपणी सरकार असे नाव पडले. [इं. कंपनी]

**कुंपी** स्त्री. खुंटी : 'कुंपीचा वीखोरा घेतला :' - गोप्र ५९.

**कुंफळ** न. कुंभा नावाच्या झाडाचे फळ. (को.)

**कुंब** स्त्री. बाजरी. [तमीळ]

**कुंब** वि. अडाणी. (बे.)

**कुंबया-यो** पु. कुंभा नावाचे एक रानझाड. (को.कु.)

**कुंबरी, कुंबरी जमीन, कुंबरी रान** स्त्री. लहान टेकड्यांच्या पायथ्याची नापीक, बरड जमीन. ह्या जमिनीतील माती धुपून जाऊ नये म्हणून हिला आडवे बांध घालतात. ह्या जमिनीतील लागवडीला कुंबरीची लागवड म्हणतात. पहा : **कुमरी**

**कुंबलणे** पहा : **कुबलणे** : 'खाटल्याच्या खाली गेली तेव्हा पायाला धरून ओढून काढली. आणि कुंबलली.' - सीए ९५.

**कुंबळ** न. एक काटेरी रानझाड. ह्याच्या फांद्या कुंपणाला लावतात. याची फळे खातात : 'कुंबळ, गेळा, तोरण, चिमट व घाणेरी या काटेरी झुडुपाखेरीज.' - खेया ३३. (को.)

**कुंबळ** न. आमटी. (कु.)

**कुंबळ** (पत्यांचा डाव) लालबदाम. (कु.)

**कुंबा** पु. कुंभा नावाचे झाड : 'अंजन, कुंबा, हेल वगैरे इमारतीच्या उपयोगी झाडे.' - खेया ४४.

**कुंबेटणे** अक्रि. पाडास येणे. (बे.)

**कुंबेटा** वि. पाडाचा. (बे.)

**कुंभ** पु. १. घागर, घडा : 'दैवे अमृतकुंभ जोडला।' - ज्ञा २.२५२. २. (ज्यो.) कुंभराशी (अकरावी राशी). ३. कुंभीपाक नावाचा नरक : 'काळदंड कुंभ यातना थोरा।' - तुगा ७०२.४. धान्य मोजण्याचे एक माप; वीस द्रोण म्हणजे एक कुंभ. ५. वीस खंडीचे माप. (गो.) ० **गळ्यास लागणे** - संकटात सापडणे (कु.) [सं.]

**कुंभ, कुंभस्थळ** पु. हत्तीचे गंडस्थळ : 'भवेभकुंभभंजना।' - ज्ञा १०.५.

**कुंभई** स्त्री. खांब ज्या दगडावर बसवतात तो दगड : 'तोडीली कुंभई बांधीली मुंबई.' - एहोरा ३३.

**कुंभक** पु. (प्राणायाम) पूरकाने आत घेतलेला वायू रेचक होईपर्यंत कोंडून धरणे : 'प्राण व अपान या दोहोंचाही निरोध झाला म्हणजे तोच प्राणायाम कुंभक होय.' - गीर ६७८. [सं.]

**कुंभकर्ण** पु. (ल.) अत्यंत झोपाळू माणूस; गाढ व पुष्कळ वेळपर्यंतच्या झोपेला कुंभकर्णी झोप म्हणतात.

**कुंभकामला** स्त्री. काविळीची शेवटची अवस्था. [सं.]

**कुंभकार** पु. कुंभार. [सं.]

**कुंभचास** पु. भरघोस पीक असलेली पेरणीची ओळ : 'जरि तें पिकों नेणे कुंभचासें। सुक्षेत्र नव्हे।' - मुप्र १७६१.

**कुंभणे** सक्रि. रोधणे; कोंडणे : 'इडेनि करावा प्राण पूर्ण। तो कुंभूनि राखावा जाण।' - एभा १४.४२०. [सं. कुंभ]

**कुंभध्वनि-नी** पु. स्त्री. १. भुमका; अफवा; वार्ता : 'काही कुंभध्वनि नाटवडेकर मोकाशि याचि विषाली होति.' - मइसा २१.२४१.

२. आतल्या आत, आपसात, तांब्यात तोंड घालून केलेल्या उच्चारासारखे ध्वनी : 'ऐसे कुंभध्वनी तुमचे देशामध्ये समस्तहि लोक बोलताती.' - शिचसा पृ. २.२१९. [सं.]

**कुंभपर्णी** स्त्री. एक वनस्पती : 'पानांना कलशरूप येते. उदाहरणार्थ कुंभपर्णी.' - वनश्री ४२.

**कुंभपाक** पु. एक नरक. पहा : **कुंभ ३** : 'कुंभपाक लागे तयासि भोगणे।' - तुगा २८.

**कुंभपुट** न. आयुर्वेदातील एक प्रक्रिया. एका मातीच्या घागरीला चाळीस भोके पाडून ती अर्धी कोळशाने भरतात व वर औषध ठेवतात. तोंडावर

एक परळ झाकून मातकापड करून तोंड लिंपतात व सावलीत वाळवतात. मग घागर चुलीवर ठेवून परळात निखारे घालून जाळ लावतात. तीन दिवसांनी औषध काढून घेतात.

**कुंभमेळा** पु. कुंभ राशीला गुरू येतो तेव्हा हरिद्वारला वर्षभर भरणारी जत्रा.

**कुंभविवाह** पु. मुलीच्या जन्मकाळी तिला वैधव्य प्राप्त होण्यासारखे अनिष्ट ग्रह असतील तर अरिष्टनिरसनार्थ, खऱ्या लग्नापूर्वी तिचा घटाशी करतात तो विवाह.

**कुंभस्थ** वि. कुंभ राशीत असलेला (ग्रह). या राशीची मर्यादा ३०९° पासून ३३०° पर्यंत आहे.

**कुंभा** पु. १. एक रानझाड. याच्या पानांचे इरले व सालीचे दोरखंड करतात. हे झाड मोठे होते व फळ बेलफळासारखे गोड असते. २. धोतरा; एक औषधी झुडूप. याची फुले शंकराला वाहतात. पाने औषधोपयोगी आहेत. याला दुधाणी, शेतवड, शेताड ही नावे आहेत. [सं. कुंभ]

**कुंभातर** पु. एक पक्षी. (गो.)

**कुंभार** पु. मातीची भांडी घडवून त्यावर उपजीविका करणारी एक जात व त्या जातीतील व्यक्ती.

**कुंभारकावळा** पु. भारद्वाज : 'समोर कुंभारकावळाच पैला नदरं पडला.' - भेटी ११६.

**कुंभारकुकुड - डा-डे** पु. भारद्वाज पक्षी पहा : **कुकुडकुंभा**

**कुंभारक्रिया** स्त्री. शूद्र मेला असताना कुंभाराने चालवायची उत्तरक्रिया.

**कुंभारखण** कुंभार वापरतो त्या मातीवरील कर.

**कुंभारखाणी** स्त्री. कुंभार जिथली माती कामासाठी वापरतो ती खाण.

**कुंभारगवंडी** पु. गवंडीकाम करणारा कुंभार.

**कुंभारघाणी** स्त्री. १. कुंभाराने मळून तयार केलेली माती. २. उसाच्या चिपाडाचा राहिलेला रस काढण्याकरिता उपयोगात आणलेल्या कुंभाराच्या घाणीवरील कर. ३. कुंभाराच्या घाणीसाठी दिलेली उसाची चिपाडे.

**कुंभार(रू)वाडा** पु. कुंभाराची आळी; कुंभाराची वस्ती.

**कुंभाराच्या देवी, माता** टोचलेल्या देवी; गोस्तनी देवी.

**कुंभारी** स्त्री. कुंभारीण माशी.

वि. १. कुंभाराने बनविलेली (चूल, मूर्ती इ.). २. कुंभारासंबंधी; कुंभारकामासंबंधी.

**कुंभारी** वि. जिचा आकार, रंग पिकल्याप्रमाणे झाला आहे, परंतु जी खरोखर पिकली नाही अशी (सुपारी). पहा : **कुमारी**

**कुंभारी** स्त्री. गवताची गंजी.

**कुंभारीण** स्त्री. १. कुंभाराची बायको. २. कुंभारीण नावाची माशी. ही माशी मातीचे घर बांधून त्यात किडा ठेवते आणि त्याला टोचते.

**कुंभिका** स्त्री. (पुरा.) दोन्ही बाजूला कान व निमुळते बूड असलेली मातीची सुरई. प्राचीन काळचे लोक याचा उपयोग मद्य किंवा तेल ठेवण्यास करीत असत.

**कुंभिनी** स्त्री. पृथ्वी : 'श्रमे श्रांतला कुंभिनीवर।' - मुक्तेश्वर नवनीत.

**कुंभी - भ्या-ब्या** पहा : **कुंभा २.**

**कुंभी** स्त्री. उथळें; खुर्ची (खांबाच्या खालची); तळखडा. हा दगड चौकोनी असतो. (खा.) [सं. कुंभ]

**कुंभीनी** स्त्री. हृदयात वायू कोंडून ठेवण्यास ज्या नाडीचा उपयोग होतो ती नाडी.

**कुंभीपाक** पु. पुराणात वर्णन केलेल्या अठ्ठावीस नरकांपैकी एक नरक. पहा : **कुंभपाक** : 'त्यासी कैचा परलोक। अंती होय कुंभीपाक।' - गुच १६.१२६.

**कुंभीर** पु. लांब नाकाचा मगर; सुसर. [सं.]

**कुंभेर - री** स्त्री. १. गवताची किंवा धान्याची पेंडी. (को.). २. कुंभारीण माशी.

**कुंमडा** पु. तांबडा भोपळा. (ना.) [हिं. कुम्हडा]

**कुंवया** पु. नारळाचे सोडणे वेचताना खाली पडणारा भुगा. (कु.)

**कुंवर** पु. १. बारा वर्षाखालील मुलगा; कुमार. २. युवराज; राजपुत्र (हिं.) ३. दासीपुत्र. [सं. कुमार]

**कुंव(वा)रकांडे** न. काटेकुवर; कोरफड. (को.) [सं. कुमारिका]

**कुंवरा - री- ला-ली** पु. स्त्री. कोवळा फणस. (कु. राजा). पहा : **कुइर**

**कुंवला-ली** स्त्री. पु. १. कुयलीचा वेल व तिची शेंग. हिच्या खाजरी व गोडी अशा दोन जाती आहेत. (राजा.) २. लहान मुलांच्या गळ्यातील सोन्याचा एक दागिना.

**कुंवली** स्त्री. अंब्याची कैरी. पहा : **कुइरी**

**कुंवळ** पु. दोष; व्यंग; न्यून. (क्रि. काढणे.)

**कुंवळ** पु. १. कोळ; चिंचा, भात वगैरे कुसकरून तयार केलेले पाणी, मिश्रण. (राजा.) २. सरबरीत ताकभात. ३. साधी आमटी. (कु.) ४. ओली चटणी (गो.)

**कुंवळा** पु. कांटेकुवळा नांवाचे एक झाड.

**कुंवाक - की-कू** स्त्री. पाणकोंबडा-डी. (कु.)

**कुंवा(हा)ळो** पु. कोहळा. (कु. गो.)

**कू** न. पिंगळ्याचा एक स्वर. पहा : **की**

**कूआ** पहा : **कूवा**

**कूक** स्त्री. बांग; साद; आरव (कोंबडा इत्यादींची). [ध्व.]

**कूकणे** अक्रि. आरवणे; ओरडणे; शब्द करणे : 'जो नारायणु नाभीकमळीं कूके।' - दाव २६८.

**कूकू** न. कुत्र्यास बोलवण्याचा शब्द; यूयू. [ध्व.]

**कूच** पु. चर. जमिनीतून चर खणून वर आच्छादन घालून पुढे सरकत जाण्याचा मोर्चाचा एक प्रकार : 'दोन चार दिवसांमध्ये इकडून कूच खणोन मोर्चेपुढे चालविले.' - पेद ३०.१६७.

**कू(कु)च** न. १. प्रयाण; मजल (सैन्याची); तळाची उठावणी; तळ हलविणे : 'हल्ली हैद्राबादेहून नबाबाची चार कुचें टिपूच्या मोकाबल्यावर जाहली.' - ऐलेसं ८.४३२५; २. (सामा.) प्रयाण; गमन; प्रस्थान; निघून जाणे. (क्रि. करणे) : 'हेळापट्टण लक्षुनियां पंथ। कूच मुक्काम

साधीतसे।' - नव १६.१०२. ३. (ल.) मृत्यू. [फा. कुच्] (वा.) **कुचाचा नगारा वाजविणे** - पळणे; कूच करण्याची, तळ उठण्याची सूचना देणे.

**कूच** वि. निरर्थक; निरुपयोगी. उदा. **कुचकामाचे-चा** [हिं.]

**कूचट** क्रिवि. मजल दर मजल : 'सोडितो दखन कूचट आले नीट काम मोठे जबरा केलें।' - ऐपो ४३५. [फा. कुच्]

**कूच दरकूच, कूचबकूच** मजल दर मजल; सारख्या मजला करीत : 'आम्ही आपले दोस्तीवर नजर देऊन कूच - बकूच रवाना होऊन गेलो असो.' - पया ४८६.

**कूज** स्त्री. नाश; विलय; कुजणे.

**कूजणे** उक्रि. मंजुळ ध्वनी करणे : 'जे कूजती कोकिल वनीं।' - ज्ञा ६.४५०.

**कूजन-कू** न. कोकिळेचे गाणे; पक्ष्याने केलेला गोड आवाज. [सं.]

**कूट** न. १. कोडे; अंकगणितातील अवघड प्रश्न; गूढार्थ; गूढ श्लोक; उखाणा. २. गुप्त मंडळ; कट; जूट; एकमताने केलेली मसलत; एकोपा; (समासात) त्रिकूट.

**कूट** न. वधूवरांच्या पत्रिकेचा विचार करताना वर्ण, वश्य, योनी, खेचर, गण, कूट, नाडी वगैरे ज्या ३६ गुणांचा विचार करायचा असतो यांपैकी एक. [सं.]

**कूट** न. १. मिरपूड, जिरे, मोहऱ्या, मेथ्या इत्यादी कुटून केलेली पूड (लोणचे वगैरेकरिता). २. सडलेल्या तांदळातील बारीक कंण, भूस, चूर्ण. ३. (ल.) नाश; पीठ; नायनाट : 'कानसुलां भालीं। आंगें कूट जालीं।' - शिव ९७०. (वा.) ० **काढणे** - यथेच्छ बडविणे, ठोकणे. ० **करणे** - डोके खाजविणे; उत्तर शोधणे : 'याचा अंदाज घेण्यासाठी वामननं बरंच डोकं कूट केलं.' - बाविबु १०.

**कूट** न. माशाचा तुकडा. (कु.)

**कूट** न. अर्धवट पातळ भाजी; रस्सा. (तंजा.) [क. कुट्टु]

**कूट** स्त्री. लबाडी; कपट; निंदा : 'न साहावे तुम्हां या जनाची कूट।' - तुगा ३१२. [सं. कूट] (वा.) ० **खाणे, - फुटणे** - निंदा, चुगली करणे : 'कूट खाती मागें पुढें। जाती निरयगांवा पुढें।' - तुगा ९९९.

**कूट** न. पर्वत शिखर; मलयकूट : 'कूटतुल्य ही बर्फ पाझरे।'-नवनीत ४२१. [सं.]

**कूट** न. धान्याची रास. [सं.]

**कूट** न. हळकुंड; हळकुंडाचा तुकडा. (गो.)

**कूटक** न. (वै.) स्तन्य प्राण्यांच्या गर्भाशयात वाढणाऱ्या डिंबपेशींच्या भोवती असणारा व त्यांना धरून ठेवणारा कणीपेशींचा समूह. [सं.]

**कूटतान** स्त्री. (संगीत) स्वरक्रमात फेर करून तयार केलेली तान.

**कूटद्वार** न. (वन.) आतल्या बाजूस उघडणारी व नंतर कीटकांना कोंडण्यासाठी बंद राहणारी झडप. उदा. कीटकभक्षक वनस्पतींपैकी गेळ्याची वनस्पती.

**कूटप्रश्न** पु. कोडे; गूढ (धार्मिक, वेदांत इ. विषयक). [सं.]

**कूटबाजी** स्त्री. लबाडी; कपट : 'सजावारूद्दौलांनी शैपन्नास घोडीं आणिली होतीं तीं त्यांनीं कूटबाजी करून घोडी सोडवून नेलीं.' - मइसा ५.२१२.

**कूटयोग** पु. (ज्यो.) कुंडलीतील ४ थ्या स्थानापासून १० व्या स्थानापर्यंत सर्व ग्रह असतील तर हा योग होतो. या योगामुळे माणूस क्रूर, सुखहीन, वारंवार प्रवास करणारा, जन्मभूमीबाहेर अन्यत्र उपजीविका करणारा असा होतो.

**कूटलेखन** न. सांकेतिक लिपीत लिहिलेला मजकूर.

**कूटशासन** न. बनावट हुकूम, आज्ञापत्र, सनद. [सं.]

**कूटसाक्ष्य** न. खोटी साक्ष. [सं.]

**कूटस्त** वि. गहन.

**कूटस्थ** वि. १. विस्कळित झालेल्या कुटुंबाचे, घराण्याचे मूळ. (पुरुष, स्त्री वगैरे.) २. (कायदा) प्रत्येक वंशाचा पहिला ज्ञात असलेला. (पुरुष.) [सं.]

**कूटस्थ** वि. १. एकसारखा; सर्वत्र आणि सदोदित एकच एक असणारा; अविनाशी; निर्विकार. (ईश्वर, आत्मा, आकाश). २. देहाविछिन्न (ब्रह्माचा कल्पित) भाग : 'येचि देहीं कूटस्थ।' - एभा १०.३२८. ३. मायेच्या संगतीने असणारे चैतन्य, आत्मा : 'आणि कूटस्थु जो अक्षरु। दाविला पुरुषप्रकारु।' - ज्ञा १६.४३. ४. सर्व भूतांच्या मुळाशी असणारे प्रकृतिरूप अव्यक्त तत्त्व (त्याला अक्षर असे म्हणतात). अविनाशी; निर्विकार. [सं.]

**कूटी** स्त्री. निंदा; खोटेपणा; अपवाद. पहा : **कूट** : 'तान्ह्यातें पाशी करावे। जाणतयाते अलग धरावे। ऐसें जर माया घेतले जावे। तर कूटी पावें।' - ज्ञाप्र ११०६. [सं. कूट]

**कूड** न. खोटे; कपट; लबाडी; कूट : 'नेणें कूड कदापि मी।'-आकू २०. वि. लबाड; खोटा; विश्वासघातकी; कावेबाज; आतल्या गाठीचा. (को.) [सं. कूट]

**कूड** पु. १. बांबूच्या कामट्या, कारवी , रिफाड, तट्ट्या इत्यादींवर चिखल लिंपून तयार केलेली भिंत. (क्रि. घालणे.) : 'तो तृणाचें कूड घातले।' - हरि १६.१००. २. कुंपण; वई. (कुट्यांचे, झाडांचे) [सं. कुड्य]

**कूड** स्त्री. शरीर; देह; प्रेत. (आत्म्यापासून भिन्नता दाखविण्याच्या वेळी किंवा रागाने अथवा निंदेने उपयोग करताना) : 'त्या थोर कलावंताने आपली अभिनयचतुर कूड या मातीतच ठेवून दिली.' - वावारू १३८. [सं. कडि.] (वा).० **धरणे** (कोणाच्या तरी) अंगात येणे : 'मग ते सभागृह प्रार्थना करू लागले... माते कौल दे. माते कूड धर.' - गणू १५४.

**कूड** अंधार

**कूड** स्त्री. खोली. (गो.) [सं. कुटि]

**कूड** वि. क्रुद्ध : 'धाकटे बाईची मर्जी माणिकगडावरून कूड आहे.' - पुरंदभा १.११७.

**कूडी** पहा : **कुडी** : 'जे पडिलें सकूडी।' - राज्ञा १३.५८७.

**कूत** पु. १. भर; जोर; आवेश (रोग, खरूज, पाऊस, वारा, ऊन, भांडण, यांचा) २. (ल.) एखाद्या कामाविषयी उतावीळ; तीव्र इच्छा; घाई; जोराची उत्कंठा. उकळी, खाज; (समासात) घायकूत. (क्रि. येणे, होणे, जिरणे, मुरणे) [सं. कू. = आवाज करणे - आकूत]

**कूप** पु. १. खणलेला खड्डा. २. (सामा.) बिनपायऱ्यांची विहीर; आड. (समासात) अंधकूप, जलकूप, धान्यकूप, शौचकूप : 'वापी कूप आराम। अग्रहारें हन महाग्राम।' - ज्ञा १८.९९. [सं.]

**कूप** न. १. दगडाची पूड; शिरगोळ्याची पूड; रांगोळी. (गो.) २. ढग.

**कू(कूं)प** पु. कुंपण (आवाराचे); कुडण; वई : 'तेया सोनेकेतकीचें कूंप। चहूंकडें।'- शिव २५२.

**कूपकच्छप** पु. १. (शब्दश:) विहिरीतील कासव किंवा बेडूक (यावरून) २. (ल.) घरकोंबडा; आपले घर हेच जग समजणारा; बाह्य जगाविषयी अज्ञानी; आकुंचित दृष्टीचा माणूस. [सं.]

**कूपकाटी** क्रिवि. काट्याच्या झुडपात; कुंपणात; काट्यात वगैरे.

**कूप क्रमलेख** (भूशा.) विशेषत: तेलासाठी वेधन करून किंवा खनिजपदार्थांच्या साठ्यासाठी खोदलेल्या विहिरीमध्ये सापडणाऱ्या थरांची अथवा त्या थरांच्या भौतिक गुणधर्मांची खोलीनुसार केलेली यादी. त्या अनुषंगाने काढलेला आलेख.

**कूपनलिका** स्त्री. जमिनीला छिद्र पाडून त्यात नळी बसवून भूगर्भातील यंत्राद्वारे वर खेचण्याची केलेली सोय; नलिकारूपी विहीर. [सं.]

**कूपपटाशी** स्त्री. (यंत्र) अर्ध गोलाकार धार असलेली पटाशी.

**कूपमंडूक न्याय** पु. विहिरीतील कासवाचे किंवा बेडकाचे जग म्हणजे त्या विहिरीतीलच संकुचित भाग, जागा. तिच्या बाहेर काय आहे याची त्याला मुळीच कल्पना नसते. त्याप्रमाणेच जो मनुष्य आपला गाव किंवा आपला देश सोडून कधी बाहेर गेला नाही त्याला आपलाच गाव किंवा देश चांगला असे वाटते व इतर गाव किंवा देश यांना तो तुच्छ लेखतो; संकुचित दृष्टी, व्यापक दृष्टिकोनाचा अभाव असणे : 'असे प्रतिपादन करणे म्हणजे हिंदुधर्माच्या स्वरूपाबद्दल कूपमंडूक न्यायाने आपले अज्ञान प्रदर्शित करणे होय.' - लोटिकेले ४.३८८. [सं.]

**कूपमंडूकवृत्ति - त्ती** स्त्री. आपल्याला दिसते तेवढेच जग असे मानण्याची बुद्धी; दुसऱ्याचे अस्तित्व, गरजा, विचार, लक्षात न घेण्याची बुद्धी; अतिशय संकुचित वृत्ती. [सल.]

**कूपयंत्रघटिका** स्त्री. रहाटगाडगे. [सं.]

**कूपयंत्रघटिका न्याय** रहाटगाडग्याच्या पोहऱ्यांची सदोदित पालटणारी स्थिती. रहाटगाडगी फिरू लागली म्हणजे रिकामे पोहरे घालून पाण्याने भरून येतात, त्यातील पाणी ओतले जाते व ती रिकामी होऊन पुन्हा खाली जातात आणि पुन्हा भरून वर येतात. अशीच माणसाची स्थिती (सुखातून दु:खात व दु:खातून सुखात) पालटली जाते. चक्रनेमिक्रम; उत्कर्षामागून अपकर्षाचा क्रम. [सं.]

**कूपरी** स्त्री. आळ; दोष; आरोप : 'आपणयावरील साकारपणाची कूपरी।' - भाए ६१७.

**कूपिका** स्त्री. कूपी; बाटली; सुरई : 'तिची वर्णिता रुपरेखा। ती सौंदर्याची कूपिका।' - कथा १.३.३७. [सं. कूप]

**कूय** स्त्री. हुकी; कोल्ह्याचे ओरडणे. कोल्ह्याची कुई. (गो.) [ध्व.]

**कूर** पु. रास; ढीग. (तंजा.) [सं. कूट]

**कूर** वि. तीक्ष्ण धार असलेले. (तंजा.) [सं. क्रूर]

**कूर्च** पु. १. घोड्याच्या खुराचा वरचा भाग. - अश्वप १.६३. २. दाढीचे केस : 'भंवते इंद्रनीळ विरुढती सानट। तर ते कूर्च वरवंट। उपमीजते।' - ज्ञाप्र ४६५. ३. पैतृक कर्मांत पितरांना व देवांना उदक देण्यासाठी व इतर धार्मिक विधींत दर्भांची विशिष्ट आकाराची मुष्टी करतात तो विधी. ४. पहा : **कूर्चा** [सं.]

**कूर्च** पु. गुच्छ; जुडगा. [सं.]

**कूर्चा** स्त्री. (शाप.) मृदू अस्थी; मृदू अस्थींचे वेष्टण : 'हाडांच्या शेवटी कूर्चेचें म्हणजे अस्थींचे वेष्टण असते.' - मराठी ६ वे पुस्तक (१८७५) २५४. [सं. कूर्च]

**कूर्चिका** स्त्री. घोड्याच्या कूर्चाचा मागील भाग. - अश्वप १.६२. [सं. कूर्च]

**कूर्निश** पहा : **कुरनिसात**

**कूर्परधर** न. (यंत्र) यंत्रात ज्या दांड्यामुळे अनेक चात्या अथवा दांडे फिरतात ते बसविलेली पट्टी.

**कूर्पास** पु. बायकांच्या अंगातील चोळी; बंडी : 'कूर्पासका आड दडोन धार्के।' - सारुह ७.१३५.

**कूर्म, कूर्मक** पु. १. कासव : 'कां कूर्म जियापरि। उवाइला अवेव पसरी।' - ज्ञा २.३०१. २. विष्णूच्या (दशावतारातील दुसरा अवतार : 'शेष कूर्म वाऱ्हाव जाले।' - दास २०.८.२२. [सं.]

**कूर्म** पु. १. पंच उपप्राणांपैकीं एक : 'नाग कूर्म कृकल देवदत्त। पांचवा धनंजय जाण तेथ। यांची वस्ती शरीरांत। ऐक निश्चितू सांगेन।' - एभा १२.३२१. २. जांभईच्या वेळेच्या वायूच्या विशिष्ट स्थितीचे नाव : 'आणि जांभई शिंक ढेकर। ऐसैसा होतसे व्यापर। नाग कूर्म कृकर। इत्यादि होय॥' - ज्ञा १८.२४.१. [सं.]

**कूर्म** पु. डोळ्यामधील तांबडा ठिपका. पहा : **कुमरी** [सं.]

**कूर्मगति-ती** स्त्री. सावकाश चालणे; मंद चाल : 'शिक्षणाची प्रगती कूर्मगतीने चालू आहे.' - माप्र ४३३. [सं.]

**कूर्मदुग्ध** न. कासविणीचे दूध; असंभाव्य गोष्टी (ख - पुष्पाप्रमाणे). [सं.]

**कूर्मदृष्टि-ष्टी** स्त्री. कृपा; कृपादृष्टी; मेहेरबानी (कारण कासविणीस आचळे नसल्याने तिच्या नुसत्या मायेच्या दृष्टीनेच तिची पिले वाढतात.) वि. कृपादृष्टी दाखविणारा. [सं.]

**कूर्मपृष्ठाकार** वि. बहिर्गोल (भिंग वगैरे). [सं.]

**कूर्मलोम** न. कासवाचे केस; अशक्य गोष्ट. [सं.]

**कूर्मासन** न. १. (योग) योगशास्त्रात सांगितलेले एक आसन. याचे चार प्रकार आहेत. २. (मल्लखांब) मल्लखांबावर आढी मारून हातांनी पायाचे अंगठे धरून केलेले आसन. [सं.]

**कूल** न. वंश; जात; देवक इ. अर्थी. पहा : **कुल** [सं. कुल]

**कूल** न. तीर; काठ : 'श्रीगोदावरीच्या कूलीं।' - ज्ञा १८.१८०३. [सं.]

**कूल** न. सोनाराची घडणावळ : 'दागिन्यांना चांगला घाट येऊ द्या हो. कुलीसाठी दोन रुपये जाजती पडले तरी चिंता नाही.' - मासंवा १८५. (गो.) [क. कूलि]

**कूल** न. लाकडात भोक पाडून त्यात बसविण्यासाठी तयार केलेले लाकडाचे

टोक, खुंटी, कुसू. [कर्ना.]

**कूलर** पु. (हवा, पाणी, वगैरे) थंड करणारे यंत्र. [इं.]

**कूली सरोवर** (भूशा.) लाव्हा रसाच्या प्रवाहाने तयार झालेले सरोवर.

**कूलोम** न. विद्युतभाराचे परिमाण.

**कूशार** वि. स्वच्छः मोकळे.

**कूस** स्त्री. १. शरीराची एक बाजू; बरगडीची, काखेखालची बाजू. २. जठर, गर्भाशय : 'तो तू देवकीकूंसीचा सेजारीं.' - शिव ११२. ३. (ल.) जागा; अवकाश (खोटे बोलण्यास, फसवण्यास, लबाडीस, गैरमिळकतीस). (सामा.) जागा किंवा अवकाश असा अर्थ. ४. भरलेली जागा; साधलेली संधी (खोटे हिशेब करून खऱ्या खर्चापेक्षा जास्त रक्कम खर्ची टाकून, माल जमा करून, दुसऱ्याची व्यवस्था करताना काही रक्कम गिळंकृत करून इ.); घेतलेले माप किंवा केलेले हिशेब यात फारशी लबाडी अंगी न लागता थोडासा कमी - अधिकपणा करणे; थोडी कसर; वर्तावळा. ५. गुरे इ. प्रसवल्यानंतर त्यांच्या योनिद्वारे निघणारा कुजका अंश. [सं.कुक्षि.] (वा.) ० **उजवणे** - मूल होणे. ० **घालणे** - खेळातील नियम मोडल्याबद्दल खेळगड्याला बाहेर टाकणे. (कु.) ० **ठेवणे** - सवलत देणे : 'पण टिळकांपुरती त्यांनी सार्वजनिक सभेची कूस ठेवण्याची तयारी दाखवली.' - आभासा २५७. ० **फावणे** - संधी मिळणे.; सबब सापडणे : 'तिच्या योगाने मुसलमानांना आपल्या मागण्या वाढविण्याला कूस फावली.'' - आभासे ३८१. ० **फुटप** - पहा : **कूस उजवणे** (गो.) ० **भरणे** - : एखाद्या पदार्थाने पोट भरणे. २. गर्भ राहणे . **कुशीस होणे** - एका अंगावर निजणे.

**कूस** न. १. कुसळ; टोक : 'आपली लेखणी ते किती नम्रपणाने चालवितात व तिचे कूसहि कोणास बोचू नये या विषयी ते किती जपत असत.' - निमा ९०९ २.(ल.) अशिष्ट शब्द. [सं. कुश]

**कूस** स्त्री. कामचुकारपणा : 'खरी मेहनत व कूस किती याची खडानूखडा माहिती असल्यामुळे.' - गांगा १४.

**कूस** स्त्री. सोंड : '(भुंगा) अंगावर आदळून कूस मारायचा.' - तीम१४३.

**कूसगोम, कूसभोवरा** स्त्री. घोड्याच्या कुशीवर असलेली गोम, भोवरा. हा अशुभ मानतात.

**कूसनिकुरणीचा, कूसनिखवणा, कुसधुणीचा-धुवणा, कु(कू)सधुणा** पु. स्त्रीच्या अनेक मुलांपैकी शेवटचा मुलगा; मूल.

**कूहरी** स्त्री. कैरीसारखा सोन्याचा अलंकार. पहा : **कुइरी** : 'ल्याली राकडि मूद बोरकळि ते शोभे तळीं कूहरी ।' - अक अनंत - सीता-. स्वयंवर ४५.

**कूळ** न. १. कौलदार; खंडकरी; पट्ट्याने जमीन धारण करणारा (सरकारची किंवा शेतमालकाची) २. धनकोचा (सावकाराचा) ऋणको; आरोपीचा जामीन; वैद्याचा रोगी; वकिलाचा पक्षकार; आश्रयदात्याचा पोष्य; ज्याने द्रव्यादी देणे द्यायचे आहे तो; आश्रित (म्हणजे ऋणको, जामीन, रोगी इ.) २. सामान्यतः सरकारला सारा देणारा असामी, असाम्या. ४. गिऱ्हाईक; इसम; व्यक्ती. (गो.) ५. शेतकरी इतर अर्थ व सामासिक शब्द पहा : **कुळ** [क. कुळ = कर देणारी व्यक्ती]

**कूळ** न. १. गोत्र; वंश; जात; कुटुंब. २. लग्नात ठेवायचे देवक (मराठा समाजात रूढ). प्रत्येकाच्या कुळात चाल असेल त्याप्रमाणे कळंब, मारवेल, वड इ. झाडाची फांदी आणून ती तुळशीवृंदावनात लावतात व तिची पूजा करतात.) [सं. कुल] (वा.) ० **उद्धरणे** - १. कुळाची कीर्ती वाढविणे. २. (उप.) कुळातील माणसांना (विशेषत: जवळच्या नातलगांवरून) शिव्याशाप देणे. ० **ठेवणे**- (काही जातीत) देवकप्रतिष्ठा, देवदेवक बसवणे (गो.)

**कूळ** स्त्री. नारळीच्या हीरांचे केलेले जाळे. (गो.)

**कूळकट - त-था, कूळकहाणी** न. स्त्री. १. कुळाची कथा किंवा गोष्टी. कूळकट हा शब्द मुख्यत्वे वाईट अर्थाने योजतात. कुळकथा म्हणजे कुळाची कहाणी, कैफियत, इतिहास. २. (ल.) कंटाळवाणी, कटकटीची हकीगत माहिती. (वा.) ० **सांगणे** - एखाद्याच्या वंशातील (मागची किंवा चालू) बिंगे, दोष काढणे, सांगणे.

**कूळकरंटा** वि. कुळातील हतभागी; भद्र्या; कुळाचे नाव घालविणारा; मुख्यत्वे चिक्कू.

**कूळकायदा** पु. जमीनमालकांपासून कुळांना न्याय मिळावा, त्यांच्या आर्थिक हक्कांचे संरक्षण व्हावे म्हणून करण्यात आलेला कायदा.

**कूळघडणी** स्त्री. प्रत्येक कुळाची जमीन, साधनसामग्री, लाग - लागवड व सारा इ. चे दर्शक, कुळकर्ण्याने तयार केलेले सरकारी पत्रक, तक्ता.

**कूळजमा** स्त्री. १. गाव किंवा जिल्ह्यातील कुळांपासून येणाऱ्या साऱ्याची रक्कम. २. सावकाराने कुळाला किंवा शेतकऱ्याला कर्जाऊ दिलेली रक्कम.

**कूळझाडा** पु. गावातील खंडकरी किंवा कौलदार यांचा तक्ता.

**कूळटिळक, तिलक** पु. वंशाचे भूषण; कुळाला भूषणभूत अशी व्यक्ती. [सं. कुलतिलक]

**कूळपट-ट्टा** पु. कौलनामा; खंडपत्र.

**कूळपर्वत** पहा : **कुलाचल, सप्तपर्वत**

**कूळपैसा** पहा : **कुळजमा २**

**कूळबुडव्या** वि. स्वतःच्या कुटुंबाचा नाश करणारा; कुलकलंक.

**कूळभरणा** पु. (व्यापक) शेतकरी किंवा कुळे. याच्या उलट अडाणकबाड.

**कूळरुजुवात** स्त्री. १. कुळाने सरकारी खजिन्यात भरलेल्या पैशाची चौकशी करून रुजुवात घालणे. २. अशा रीतीने रुजुवातीस मिळालेली पुष्टी.

**कूळवर्ग** पु. कुळघडणीच्या अनुरोधाने कुळे अथवा रयत यांच्या जमीनजुमल्यासंबंधीचे किंवा त्यांच्याकडून येणे असलेल्या पैशाबद्दलचे वर्गीकरण दाखविणारे वार्षिक पत्रक-तक्ता. (समासात) कुळवर्गपट्टी - जमाबंदी - वसूलबाकी इ. पहा : **कुळारग.**

**कूळवंत** वि. कुलीन; अभिजात; कुलवंत; चांगल्या कुळात जन्मलेला.

**कूळवार** क्रिवि. कुळाच्या अनुक्रमाप्रमाणे दर किंवा दर कुळागणिक. कुळवार पत्रक - झाडा. (समासात) कुळवार पावत्या - पाहणी - फाजील - वसूल - बाकी - रुजुवात.

**कूळवारी** स्त्री. कुळीचा तक्ता.

**कूळशील** न. कूल आणि शील; वाडवडिलांची परंपरा व व्यक्तीची दानत; कुलातील आचारविचार, चालरीत, स्थितिरीती. लग्न जुळविताना ज्या बाबी पाहायच्या त्यातील एक यावरून.

**कूं, कूं** अ. एखादी व्यथा झाली असताना मनुष्याच्या तोंडून निघणारा दुःखोद्गार (चं, हू, इस्, उस्, हुश् याप्रमाणे). (क्रि. म्हणणे, करणे) पहा : **हाय** [ध्व.]

**कूंचा** पहा : **कुंचा** : 'ब्रह्मतेजाचा कूंचा ढळें। मुगुटावरी।' - शिव १११.

**कूंजणे** अक्रि. शब्द करणे (पक्षी वगैरेंनी) : 'जे कूंजते कोकिल वनीं।' - ज्ञा ६.४५. [सं. कूजन्]

**कूंजद** स्त्री. दोन्ही बाजूंना तीळ लावून तयार केलेली पोळी.

**कूंस** पहा : **कुसूं १,२,३** (को.)

**कृक** पु. घाटी; गळा; घसा; कंठनाल. [सं.]

**कृकर-ल** पु. १. ढेकराच्या वेळचा वायू. पंच उपप्राणांपैकी एक. पहा : **कूर्म** : 'आणि जांभई शिंक ढेंकर। ऐसैसा होतसे व्यापार। नाग कूर्म कृकर। इत्यादी होय॥' - ज्ञा १८.३४१ [सं.]

**कृकलास** पु. सरडा : 'दान देता नहुषां कूपी जाहला कृकलास।' - एभा ६.९५. [सं.]

**कृच्छ्र** न. १. एक प्रायश्चित्त; २. शारीरिक दुःख; कष्ट; तपः 'माझे नि उद्देशें संपूर्ण। तपसाधन कृच्छ्रादिक।' - एभा १७.४२०. ३. पाप. ४. पहिल्या दिवशी एकदा जेवण, दुसऱ्या दिवशी सायंकाळी जेवण, तिसऱ्या दिवशी न मागता आपोआप मिळेल ते खावे व चौथे दिवशी उपोषण याप्रमाणे क्रमाने १२ दिवस करण्याचे व्रत : 'अथवा एकांतरा कृच्छ्रीं।' - ज्ञा १७.३३४. [सं.]

**कृच्छ्र** न. मूत्रकृच्छ्र; मूत्रावरोध.

**कृच्छ्रचांद्रायण** न. चंद्रकलेप्रमाणे चढउताराने जेवणातील घास खाण्याचे कृच्छ्र. प्रायश्चितः 'कृच्छ्रचांद्रायणें झालीं वेडीं।' - एभा १२.२७. [सं.]

**कृच्छ्रेंकरून** क्रिवि. नाखुशीने, कष्टाने (येणे, करणे इ.).

**कृत** न. कृत, त्रेता, द्वापार व कली या युगांपैकी पहिले; सत्ययुग. [सं.]

**कृत** वि. ज्याने केलेले आहे या अर्थाने समासाच्या पूर्वी जोडतात. उदा. कृतभोजन-ज्याने जेवण केलेले आहे असा.

**कृत, कृतार्थ** वि. उप. कृतकृत्य; ज्याने आपला हेतू साध्य केला आहे असा; ज्याला काही करायचे उरले नाही असा; तृप्त.

**कृतक** वि. (उंदीर, ससा, खार इत्यादीप्रमाणे) कुरतडणारा.

**कृतक** वि. मानलेला; दिखाऊ; नाटकी; लटका. [सं.]

**कृतकपुत्र** पु. (कायदा) मानलेला, पाळलेला मुलगा; विकत घेतलेला मुलगा. [सं.]

**कृतकर्मा** वि. निपुण; कुशल; हुशार. [सं.]

**कृतकार्य** वि. ज्याने आपले काम संपविले आहे असा; यशस्वी; विजयी; कृतार्थ; प्राप्तयश. पहा : **कृतकृत्य** [सं.]

**कृतकाल** वि. १. निश्चित, ठरावीक काळाचा; मुदतीचा; मुदतबंद (गहाण, निक्षेप यांच्या संबंधाने.). २. अमुक मुदतीपर्यंत चाकरी करायला जो आपणास बांधून घेतो असा (चाकर). [सं.]

**कृतकृत्य** वि. १. कृतकार्य; ज्याने संसारासंबंधी सर्व कृत्ये पार पाडून त्यापासून मिळणारे सुख अनुभवले आहे असा; पुण्यकृत्याने ज्याचा जन्म सार्थकी लागला आहे असा. २. आरंभिलेले दुर्घट काम ज्याने तडीला नेऊन समाधान प्राप्त करून घेतले आहे असा; ज्याला आपल्या श्रमाचे फळ मिळाले आहे असाः 'म्हणे कृतकृत्य झालों देवदर्शनें।' - संवि २६.२८.

न. अशक्य, अपूर्व कृत्य; अगदी अचाट कृत्य; मोठ्या बुद्धिमत्तेचे काम.

**कृतकृत्यता** स्त्री. कृतार्थपणा; यशस्वितेचा अभिमानः 'त्याच्यात सुस्ती, कृतकृत्यताबुद्धी, पंडितमन्यता वगैरे दोष अखंड बसल्यामुळे....' - निमा ३. [सं.]

**कृतघटस्फोट** वि. घटस्फोट करून जातीबाहेर टाकलेला. [सं.]

**कृतघ्न** वि. १. निमकहराम; उपकार न जाणणारा; बेइमान; हरामखोर. २. केलेली कृत्ये किंवा उपाय व्यर्थ पाडणारा; कार्यविध्वंसक. [सं.]

**कृतघ्नता** स्त्री उपकाराची जाणीव नसणे; निमकहरामी; बेइमानी.

**कृतनिश्चय - संकल्प** पु. दृढनिश्चय, निग्रह, निर्धार.

वि. दृढनिश्चयी; ज्याने निश्चय केला आहे असा. [सं.]

**कृतपुंख** वि. १. सोडला जाण्याच्या बेतात असलेला (बाण). २. (ल.) निघण्याच्या बेतात आहे असा. [सं.]

**कृतबुद्धी** वि. निश्चयी : 'ऐसे हट निग्रही कृतबुद्धी।'-दास १.१०.११. [सं.]

**कृतयुग** न. पहा : **कृत**

**कृतसंस्कार** वि. जो संस्काराने पावन झालेला आहे किंवा ज्याच्यावर विशेष संस्कार झाला आहे असा. [सं.]

**कृतसाक्षी** पु. (कायदा) साक्ष देण्याकरिता नेमलेला. पहाः **साक्षी** [सं.]

**कृतज्ञ** वि. उपकार जाणणारा; निमक-नमकहलाल; इमानी. [सं.]

**कृतज्ञता** स्त्री. उपकाराची जाणीव. [सं.]

**कृताकृत** वि. १. बेपर्वा; उदासीन; आवश्यकही नव्हे व अयोग्यही नव्हे असा (केल्या तरी चालतील, न केल्या तरी चालतील अशा गोष्टीसंबंधी); वैकल्पिक. २. निष्काळजीपणाने, अनास्थेने केलेले किंवा अजिबात गाळलेले; अर्धवट; अपूर्ण.

न. केवळ संभवनीय स्थिती; घडण्याची किंवा न घडण्याची संभवनीयता ज्यात सारखी आहे अशी स्थिती. अल्पस्वल्प सत्त्व, अस्तित्व. [सं.]

**कृतान्न** न. शिजविलेले अन्न, (विशेषतः) भात. [सं.]

**कृतापराध** पु. १. केलेला गुन्हा. २. गुन्हा केला आहे अशी व्यक्ती. [सं.]

**कृतार्थ** वि. १. ज्याने आयुष्यातील साध्य किंवा हेतू साधला आहे असा; ज्याला काही करायचे उरले नाही असा. २. कृतकृत्य; तृप्त; धन्य; समाधान पावलेला; संशय फेडलेला (धर्मशास्त्र इ. संबंधी). [सं.]

**कृतावस्था** स्त्री. आपला हेतू तडीला नेल्याची स्थिती ; आपल्याकडून आटोकाट प्रयत्न केल्याची स्थिती.

क्रिवि. आटोकाट; शेवटपर्यंत; कमीत कमी, जास्तीत जास्त. [सं.]

**कृतांजलि-ली** वि. हाताची ओंजळ पसरलेला; ज्याने दोन्ही हात जोडले आहेत असा; अगदी नम्र; आज्ञाशील. [सं.]

**कृतांत** पु. १. मृत्यू; यम; काळ : 'जैसें महाप्रलयीं पसरलें। कृतांतमुख॥' - ज्ञा १.८८. २. दैव; नशीब. ३. सिद्ध केलेला निर्णय, सिद्धांत. [सं.]

**कृति-ती** स्त्री. १. कर्म; काम; कृत्य; काही कार्य करण्याचा व्यापार. २. क्रिया; रीत; पद्धत; युक्ती; प्रकार (उद्योग, धंदा इत्यादींचा) : 'देशी धंद्यांच्या कृतीत व यंत्रात काही एक सुधारणा कोणास सुचवितां आली नाहीं.' - सेंपू १.१०. ३. केलेले काम; साधलेली गोष्ट, कार्य. ४. ख्याती; पराक्रम : 'शाण्णव कुळीचे भूप मिळाले सांगाया झाल्या कृती।' - ऐपो १७८.

वि. कुशल; हुषार : 'व्यसनीं सहाय होउनि आप्ताला होय जो परासु कृती।' - मोद्रोण ११.१५. [सं.]

**कृति - ती** स्त्री. (ग.) संख्येचा वर्ग; द्विघात. [सं.]

**कृतिअंक** पु. (ग्रंथ.) साहित्याचे वर्गीकरण करताना लेखकाच्या कलाकृतीचा दिलेला क्रमांक.

**कृतिचातुर्य** न. अडचणीच्या प्रसंगात मार्ग सुचणे; हुषारी.

**कृतिप्रधान** वि. ज्यात घटनांना, कृतीला प्राधान्य दिले आहे अशी (साहित्यकृती).

**कृतिसमर्पण** (ग्रंथ) पहा : **अर्पणपत्रिका**

**कृतिस्वाम्य** न. साहित्य, कला, संगीत, नाट्य यांसारखी कलाकृती प्रकाशित करण्याचा, विशिष्ट काळापुरता एखाद्या व्यक्तीला किंवा संस्थेला कायद्याने दिलेला अधिकार.

**कृतीचा** वि. कृत्रिम; करणीचा; बनावट: 'कृतीची आयाळें जडवुनि गळा, पुष्ट करुनी।' - सिंहान्योक्ति, मराठी ६ वे पुस्तक पृ. १२५ (१८९६).

**कृतोपकार** पु. केलेला मोठा उपकार; कृपा; मेहेरबानी. [सं.]

**कृत्त** वि. कापलेला. [सं.]

**कृत्ति - त्ती** न. १. चामडे; कातडे; मृगचर्म. २. कात. [सं.]

**कृत्तिका** स्त्री. सत्तावीस नक्षत्रांपैकी तिसरे. ह्या नक्षत्रपुंजात सात तारे आहेत. त्यांची आकृती देशी वस्तऱ्यासारखी दिसते. [सं.]

**कृत्य** न. काम; कृती; कार्य. [सं. कृ = करणे]

**कृत्य** न. (ग.) भूमितीत करायला सांगितलेली रचना; कृतिसापेक्ष सिद्धांत; वस्तुपाठ. [सं. कृ = करणे]

**कृत्यपण** न. करण्याची योग्यता: 'मग कृत्यपणें खरें निगे। तें तुवां - ज्ञा १६.४६४

**कृत्या** स्त्री. १. विनाशक हेतूंसाठी आणि मंत्रतंत्र सिद्धीसाठी बळी देऊन प्रसन्न करून घेतात अशी स्त्री देवता; उग्र देवता; राक्षसी : 'सर्वांहि चमू प्रेषी राजा भीमक्षयार्थ कृत्यासी।' - मोभीष्म ५.३२. २. (ल.) भांडखोर, कज्जे दलाल, कैदाशीण स्त्री. [सं.]

**कृत्याकृत्य** न. चांगले व वाईट काम; योग्यायोग्य कर्म; कार्याकार्य. [सं.]

**कृत्याकृत्य** वि. धन्य. पहा : **कृतकृत्य** : 'देवाचा : भाग्याचा : मी कृत्याकृत्य केला' - लीच ३.८६.

**कृत्यैक्य** न. नाटकाच्या कृतींमधील अपेक्षित एकात्मता.

**कृत्रिम** न. खोटेपणा; लबाडी; कपट; कावा : 'कृत्रिम अवघेचि खुंटले।' - दास १९.९.५.

वि. १. बनावट, करणीचे, कृतीचे. समासात - कृत्रिमवेष - रूप इ. २. मनुष्याने केलेले; नैसर्गिक नव्हे असे; अनैसर्गिक. [सं.]

**कृत्रिम गर्भधारणा** स्त्री. नर व मादी यांच्या प्रत्यक्ष संभोगाशिवाय मादीला गर्भवती करणे (नरप्राण्याचे रेत मादीच्या योनिमार्गातून गर्भाशयात घालून).

**कृत्रिम तंतू** काही रसायने एकत्रित करून बनवलेला (संश्लेषित) धागा. रेशमी, सुती किंवा तागाचा - अशा नैसर्गिक साधनांपासून बनवलेल्या धाग्यांपेक्षा वेगळा धागा. उदा. नायलॉन, रेयॉन इ.

**कृत्रिम लोणी** न. मार्गारिन. (शेतकीशेतकरी न १९३७)

**कृत्रिमतावाद** पु. (मानस.) नैसर्गिक घटनांवर हेत्वारोप करण्याची मुलांमध्ये असणारी प्रवृत्ती. उदा. ढग का हलतात ? - त्यांना हलावयाचे किंवा फिरावयाचे आहे म्हणून.

**कृत्रिम नाणे** खोटे नाणे; कमी किमतीचे नाणे : 'असलें कृत्रिम नाणें करून शेतकऱ्यांचे व नेटिव्ह व्यापाऱ्यांचे म्हणजे आपल्या बहुतेक सर्व प्रजेचे नुकसान करण्यास कोणत्याही दुसऱ्या देशातील सरकार तयार झालें असतें असें आम्हांस वाटत नाहीं.' - लोटिकेले १.१५१.

**कृत्रिम निवड** एका जातीतील अनेक वनस्पतींतून किंवा प्राण्यांतून मनुष्याच्या आवडीप्रमाणे (गरजेप्रमाणे) विशिष्ट गुणयुक्त प्रकारांची (प्राण्यांची) पैदाशीकरता किंवा संकर घडवून आणण्याकरिता केलेली निवड. कित्येक खाद्यवनस्पती किंवा पाळीव प्राणी माणसाने शेकडो वर्षे केलेल्या निवडीतूनच उगम पावले आहेत.

**कृत्रिम पुत्र** पु. मानलेला मुलगा; दत्तक मुलगा. हा आपल्या मातापितरांचे और्ध्वदेहिक करणारा, बारा वारसदारांपैकी एक आहे. [सं.]

**कृत्रिमपुत्रिका** स्त्री. मुलींच्या खेळातील बाहुली : 'आणा चिरें सरस कृत्रिमपुत्रिकांशी।' - वामनविराट ५.१३३.

**कृत्रिम बाहुली** (वै.) डोळ्यात शिरणारा प्रकाश कमी करण्याकरिता वापरण्यात येणारा सूक्ष्म छिद्र असणारा पडदा.

**कृत्रिम युद्ध** १. डावपेचाचे युद्ध; गनिमी कावा. २. लटकी लढाई.

**कृत्रिम रुपया** १. खोटा रुपया; बनावट रुपया. २. ज्यात सोळा आण्याची चांदी निघत नव्हती पण जो सरकारी कायद्याने सोळा आणे किमतीचा मानला जात असे असा रुपया : 'हिंदुस्थानांत हल्ली कृत्रिम रुपयाचा प्रसार आहे.' - भाच ९३.

**कृत्रिम रेतन केंद्र** न. (कृषि) जेथे माजावर आलेल्या गायी, म्हशी इ. प्राण्यांना कृत्रिम रीतीने गर्भधारणा करवली जाते ते ठिकाण.

**कृत्रिम शत्रू** १. आपल्या कृत्यांनी तयार केलेला शत्रू. २. वरून शत्रुत्व पण आतून मित्रत्व असा माणूस.

**कृत्रिमी** वि. १. खोटा; कावेबाज; बेईमानी; ढोंगी : 'मी काहीं लबाड कृत्रिमी नव्हे.' - बाळ २.६८. २. बनावट; मुद्दाम केलेला; काल्पनिक; करणीचा. पहा : **कृत्रिम**

स्त्री. लबाडी; खोटी वागणूक.

**कृत्स्न** वि. १. झाडून सर्व; सगळे. २. पूर्ण; पुरेपूर; भरपूर; संपूर्ण. [सं.]

**कृदंत** न. (व्या.) धातूवरून अथवा क्रियापदावरून साधलेला शब्द; धातुसाधित. काळ किंवा पुरुष यांचा बोध न होणारे असे धातूचे रूप.

**कृदंतकाळ** पु. कृतांतकाळ. पहा : **करदनकाळ, कृतांत** [ सं. कृतांत + काळ ]

**कृदांत** पु. कृतांत (अप.) : 'न बाधे काळकृदांतक्षोभ।' - दावि २१६. [ सं. कृतांत ]

**कृपण** वि. १. कंजूष; चिक्कू; कवडीचुंबक : 'शरीरभोगाकडे। पाहातां कृपणु आवडे।'-ज्ञा १३.२०९. २. गरीब; दरिद्री; दीनवाणा; केविलवाणा (मुद्रा, चेहरा, भाषण). ३. क्षुद्र; संकुचित मनाचा.[सं.]

**कृपा** स्त्री. १. दया; मेहेरबानी; करुणा. २. दाखविलेली दया; केलेला अनुग्रह. ३. अनुकूल वृत्ती; अनुग्रह बुद्धी; सद्भाव. ४. (भक्ती) ईश्वरी कृपा; अनुग्रह : 'अंबे तुझी कृपा जोडे। तरी मुकाही वेदशास्त्र पढे।' - हरि १.२७. कृपामृत, कृपारस, कृपावृष्टी असे कृपापूर्वपदघटित समास पुष्कळ आहेत. [ सं. ] (वा.) ० **करणे** - दुसऱ्याचे भले करणे; एखाद्याला हवे ते देणे.

**कृपाकटाक्ष, कृपादृष्टि-ष्टी** पु. स्त्री. १. दयादृष्टी; दयेने, अनुकंपेने पाहणे. २. कृपा, मेहेरबानी दाखविणे, करणे : 'कृपादृष्टी दासाकडे पाहे।' - दत्ताची आरती. [ सं. ]

**कृपाक्लिन्न** वि. दयेने पाझर फुटलेला; दयार्द्र; कृपाळू. [ सं. ]

**कृपाण** न. १ तरवार; खड्ग; खंजीर. २. शीख धर्माचा माणूस जवळ बाळगतो ते शस्त्र.

**कृपाणिकास्थि-स्थी** पु. (प्राणि.) तरवारीसारखा ज्यांच्या हाडांचा सांगाडा आहे असे प्राणी. [सं.]

**कृपाणी** स्त्री. लहान तरवार. [सं. कृपाण]

**कृपानिधि-धी** पु. अत्यंत कृपाळू; कृपेचा ठेवा; कृपासागर. [सं.]

**कृपापांग** पु. कृपाप्रसाद.

**कृपाबोध** पु. दयाळूपणा.

**कृपावलोकन** न. मेहेरनजर; दया.

वि. कृपेने पाहणारा; कृपादृष्टी; सहानुभूती दर्शविणारा. [सं.]

**कृपावंत, कृपाळ-ळा-ळू-लू** वि. १. दयाळू; मायाळू, उपकारी, अनुग्रही. २. ज्याला दया आली आहे असा.

**कृपाळुपण** न. दया; कीव: 'येणे संग्रामाचेनि अवसरें। येथ कृपाळुपण नुपकरे।' - ज्ञा २.२३.

**कृमि-मी** पु. १. किडा; अळी; कीटक; लहान जंतू : 'जै त्रैविध्य आदी ब्रह्मा। अंतीं कृमी।' - ज्ञा १८.५२५. या वर्गातील प्राण्यांचे शरीर वेटोळ्यांचे असते. हे सरपटणारे असून नारू, जंत, अळी या प्रकारातले आहेत. २. (अव.) जंत (पोटातील). [ सं. ]

**कृमिघ्न, कृमिनाशक-घातक-हारक, कृमिहर** वि. कृमींचा नाश करणारे, पोटातील कृमी नष्ट करणारे (जंत पाडण्याचे औषध, जंताचे औषध.). [ सं. ]

**कृमिछिद्र** न. किड्यांच्या हालचालीमुळे पडलेले लहान भोक.

**कृमिवाताळे** न. पोटात जंतामुळे होणारी वातविकृती.

**कृमिशूल** पु. एक रोग; जंतामुळे पोट दुखणे : 'कृमिशूळें तळमळी तें। तयावरितें।' - गीता १३.२४९६ [ सं. ]

**कृमी** पु. किरमिजी रंग; कोचिनील. [ सं. ]

**कृमी** वि. ज्याला जंतविकार झाला आहे असा. [ सं. ]

**कृश** वि. १. रोडका; लुकडा; दुबळा; सडपातळ; बारीक. २. नाजूक; पातळ (वस्तू). [ सं. ]

**कृशर, कृशरान्न** न. खिचडी. [ सं. कृसर ]

**कृशान-नु-नू, कृशानन,** न. पु. अग्नी; विस्तव : 'खालीं चेतविती महा कृशानन।' - रावि १.१३०. [ सं. ]

**कृशांग-गी** वि. रोडक्या शरीराचा, किडकिडीत; सडपातळ बांध्याची. : 'पोरें सदैव रडती क्षुधिते कृशांगे।' - वामन, नवनीत १४०; [ सं. ]

**कृष(षि)क, कृषिजीवि-वी, कृषीवल-ळ** वि. पु. शेतकरी; कुणबी; शेत कसणारा : 'नाना कृषीवळु आपुलें। पांघुरवी पेरिलें।' - ज्ञा १३.२०७. [ सं. ]

**कृषकशास्त्र** न. वनस्पतींची लागवड, जोपासना, संग्रह, पशूंची निपज व त्यांची वाढ, त्यांचा उपयोग इ. विषयांचे विवेचन करणारे शास्त्र; शेतकीचे शास्त्र.

**कृषि-षी** स्त्री. शेती; शेतकी; शेतकाम : 'किंबहुना कृषी जिणें'। - ज्ञा १८.८८१. [सं. कृष]

**कृषिक्रांती** (कृषी) शेत जमिनीची प्रत सुधारणे, जमिनीचे समाजाभिमुख रीतीने केलेले वाटप, सुधारित तंत्रज्ञान, संकरित बी-बियाणे, पर्यावरणानुरूप पिकांची निवड यांसारख्या बदलांमुळे होणारी कृषिउत्पादनातील प्रचंड वाढ.

**कृषिकर्म** न. शेतनांगरणी; नांगरट; जमीन कसणे. [ सं. ]

**कृषिवर्त** पु. पोर्तुगीज पूर्वकालीन सरकारला ग्रामसंस्थांकडून मिळणारा कर. (गो.) [ सं. ]

**कृषिविभाग** पु. (कृषि.) हवामान, पिके, जमिनीचा कस इत्यादीबाबत समान स्थिती असलेला भूभाग.

**कृषिशास्त्र** न. शेतकी, पिकांची लागवड, पशुधन इ. चा अभ्यास करणारे व त्यांच्या विकासाचा विचार करणारे शास्त्र. [सं.]

**कृष्ट, कुष्ट** वि. कडवी; क्रुद्ध; नाखूष.

**कृष्ण** वि. १. काळा; पाण्याने भरलेल्या मेघासारखा; सावळा. २. कपटी; दुष्ट.[ सं. ] (वा.) ० **करणे** – काळे करणे; तोंड फिरविणे; नाहीसे होणे. **कृष्णवर्ण होणे** - काळे होणे; एखादी वस्तू, मरणाने किंवा अन्य तऱ्हेने दृष्टिआड होणे. (एखाद्याचा अत्यंत तिरस्कार आला असता उपयोगात आणतात.)

**कृष्णअनुशीतन** न. (यंत्र) लोखंड ९००° से. पर्यंत तापवून हळू हळू थंड करणे. त्यामुळे त्याचा रंग काळसर बनतो.

**कृष्णकनक** पु. काळा धोत्रा. [ सं. ]

**कृष्णकमळ** न. एक वेल व त्यावरील फूल. हे निळसर रंगाचे असते.

**कृष्णकारस्थान** न. गुप्तपणाने केलेला दुष्टपणाचा कट.

**कृष्णकावळा** पु. सोनकावळा; ज्याची मान पांढरी असते असा कावळा. (श्रीकृष्णाने या कावळ्याच्या मानेला दही फासले अशी दंतकथा आहे यावरून.)

**कृष्णकृत्य** न. वाईट, कपटी, नीच, काळेबेरे कृत्य. [ सं. ]
**कृष्णगुजरी** स्त्री. लुगड्याची एक जात.
**कृष्णग्रंथि-थी** स्त्री. सोडण्यास कठीण अशी गाठ (श्रीकृष्णाने गोकुळात एका गवळ्याच्या दाढीची आणि त्याच्या बायकोच्या वेणीची गाठ बांधली होती, त्यावरून.) [ सं. ]
**कृष्णता(टा)लू - ळू,** वि. ज्याची टाळू काळी आहे असा (घोडा). हे अशुभचिन्ह मानतात.
**कृष्णपक्ष** पु. १. काळोख्या रात्रीचा पंधरवडा; वद्य पक्ष; ज्यामध्ये चंद्राच्या कला उत्तरोत्तर कमी होत जातात तो पक्ष. २. (ल.) उतरती कळा, वय; ऱ्हास. ३. ज्याच्याकडे दोष आहे असा पक्ष, बाजू : 'आस्तिक व नास्तिक, शुक्लपक्ष व कृष्णपक्ष अशा जोडप्यांतील तंटे एक तर स्वल्पजीवि असतात....' - आगर ३.२०२. [ सं. ]
**कृष्णपक्ष-शुक्लपक्ष** १. घट आणि वाढ; क्षय आणि वृद्धी. २. खोटेपणा व खरेपणा; वाईट आणि चांगले. [ सं. ]
**कृष्णपक्षी** वि. विदुर जातीचे लोक. (ना.)
**कृष्णमणी** पु. विवाहित स्त्रियांनी घालायचा काळ्या मण्यांचा गळेसर.[सं.]
**कृष्णमूर्ति-र्ती** स्त्री. अतिशय काळा, काळाकुळकुळीत माणूस. [सं.]
**कृष्णमृग-कृष्णसार** पु. काळवीट : 'शरभापुढें टिकेना सिंहहि मग काय कृष्णसार थिरे।' - मोद्रोण ११.६७. [ सं. ]
**कृष्णमृत्तिका** स्त्री. बंदुकीची दारू. [ सं. ]
**कृष्णमेचु** १. काळा संगमर्मर; सिरसाळ पाषाण: 'ऐसी कृष्णमेचुची उगवनी । सुदेवो देखताय नयनी ।' - नरुस्व १०३. २. काळे रत्न : 'तो उचश्रवेयाचिये जावळीचा: तैसा स्वेत वर्ण कृष्णमेचुचा -' नरूस्व २७४०.
**कृष्णरक्तउष्णता** (यंत्र.) अंदाजे ६००° सें. तापमानापर्यंत दिलेली उष्णता.
**कृष्णवर्णधारी पेशी** (वै.) काळे किंवा गडद तपकिरी रंगद्रव्य असलेल्या पेशी. केस, त्वचा यांचा रंग या पेशींच्या कमी-जास्त प्रमाणावर अवलंबून असतो.
**कृष्णविलास, कृष्णक्रीडा** पु. स्त्री. १. श्रीकृष्णाच्या गोकुळातील क्रीडा, खोड्या, लीला, पुंडावा. २. (ल.) अर्वाच्य खोड्या, खेळ. ३. (ल.) व्यभिचार; सुरत विलास. [ सं. ]
**कृष्णसट** वि. मानेवरील केस काळे, आवाज मेघनगाऱ्याप्रमाणे गंभीर, श्वास कृष्णसर्पासारखा, गती उत्तम आणि धाडसी असा (घोडा). - अश्वप १.२३.
**कृष्णागर-रु** पु. चंदनाचे एक प्रकारचे झाड : 'कृष्णागर मलयागर परिमळ। देवदार वृक्ष तेथें।' - हरि २३.१००.[ सं. कृष्ण + अगरु ]
**कृष्णाची गाय** इंद्रगोप, पावसाळ्यात आढळणारा, लहान, तांबड्या रंगाचा, पुष्कळ पायांचा किडा. हे किडे समुदायाने राहतात.
**कृष्णाजिन** न. काळविटाचे किंवा सामान्यत: हरिणाचे कातडे; मृगाजिन : 'नाहीं नाहीं चर्माआतु। कृष्णाजिन व्याघ्रांबर।' - तुगा ३४२.[ सं.]
**कृष्णार्पण** न. १. कृष्णभक्तीने ब्राह्मणाला अगर देवळाला जमीन दान देणे. २. स्वत्व न ठेवता केलेले दान. (क्रि. करणे). [सं. ]
**कृष्णावर्त** वि. शरीरावर एखाद्या ठिकाणी शंखाप्रमाणे भोवरा असलेला (घोडा). हे शुभचिन्ह मानतात. - अश्वप १.९१. [ सं. ]
**कृष्णावळ** पु. कांद्याला विनोदाने म्हणतात. कारण तो उभा चिरला म्हणजे शंखाकृती आणि आडवा चिरला म्हणजे चक्राकृती दिसतो आणि शंख, चक्र ही कृष्णाची आयुधे आहेत : 'आगस्तीचें मूत्र गळा लावुनि म्हणती कृष्णावळ।' - तुगा २८२४. [ सं. कृष्ण + वलय = कृष्णावळ ]
**कृष्णावळा** पु. घोड्याच्या पायाच्या आतील बाजूस होणारे आवाळू.
**कृस्य** वि. कृश: 'तै देह कृस्य होते की' - लीचपू ५७४.
**कृंतक** पु. (वै.) पुढचा दात; चौकडीचा-छेदक-दात. [ सं. ] वि. करांडणारे; कुरतडणारे. [ सं. कृत् - कृंत् = कुरतडणे]
**कृंतकप्राणी** पु. एक प्राणिवर्ग. हे प्राणी पालेभाज्या गवत कुरतडून खातात. उदा. ससा, उंदीर, खार इ.
**कृंतन** न. १. कापणी. २. नखाने, दातांनी कुरतडणे. [ सं. कृत् - कृंत् = कुरतडणे ]
**क्लृप्त** वि. १. शोधून काढलेले; नवीन निर्माण केलेले; रचलेले, बनविलेले. २. निपुण; शहाणा; हुषार; तरबेज : 'न तुजविना आत्ममतें क्लृप्त तुज असे।' - आप १७. [सं. क्लृप्]
**क्लृप्ति-प्ती** स्त्री. १. युक्ती; कला; चातुर्य; शोध; शक्कल; कल्पना; हेतू साधण्याची चतुराईची योजना : 'कोणी रासायनिक शोध लाविले किंवा कोणी क्लृप्ति काढल्या ....' - सेंपू २. (प्रस्तावना) ११. २. कल्पना; मसलत; युक्ती; उपाय; तजवीज; तोड (मनामधील). ३. (गूढ, गुंतागुंतीच्या यंत्राची) कळ; रचना; ते चालविण्याची रीत; त्याचा उपयोग करण्याची हिकमत. [ सं. ]
**के, कें** क्रिवि. कोठे : 'तये वेळीं तूं कवणें कें। देखावासी॥' - ज्ञा १.२२९. [ सं. क्व ]
**के, कें** क्रिवि. कसे :'परदैवा कें नांदणें।आपुलेनि आंगें।'-ऋ ४२. [सं. कथ ]
**के, कें** सना. काय : 'तंव कें नारदु भणे।'-शिव १२६.[सं. किम् = काय]
**केउता - ती-ते** क्रिवि. १. कोठे : 'चैतन्य गेलें नेणो केउतीं।' - शिव ८२८; २. कोठला; कोठील : 'तेथ केउता प्रसंगु। मोक्षाचा तो॥' - ज्ञा १६.४५३.[ सं. कुत्र ] ३. कशाला : 'केउता कल्पतरूवरी फुलोरा।' - ज्ञा १०.११. ४. कसा; कशी : 'मज सांडूनि केउती। गोवळाप्रती जातेसी।' - एभा १२.१०१; 'प्रळयानळा देता खेंव। पतंग वांचे केउता।' - मुविराट ६.५४. ५. कोणता; कसला : 'अनंगा केउता हाथिएरू ।' - शिव २६५. ६. केव्हा. [ सं. कियत् + उत ]
**केउलवाणा-णी-णे** वि. दीनवाणा. पहा : **केविलवाणा** : 'येती शरण तुला जे केउलवाणे न ते जना दिसती।' - मोभीष्म १.४५.
**केऊं** उद्गा. कुत्र्याचे केकाटणे; क्यंव : 'चोरटें सुनें मारिलें टाळें। केऊं करी परि न संडी चाळे।' - तुगा ८८६. (क्रि. करणे)
**केकट** न. कुत्रे : 'आवो कैंकट खाइल म्हणे :' - गोप्र १९.
**केकटणे, केकणे, केकावणे** अक्रि १. दु:खाने ओरडणे; आर्त स्वर काढणे; भुंकणे (कुत्रे, पोर इ.नी) : 'तें कोल्हें केकटून केकटून उड्या मारून मारून ...'-नाकु ३.२४. ३. किंकाळणे; मोठ्याने रडणे.[ध्व.]

**केकट्टां** वि. अर्धे पिकलेले (भात). (गो.)

**केकत-ती, कंकताट-ड** न. स्त्री घायपातीचे फूल व झाड; हे उष्ण प्रदेशात होते. हे कुंपणाला लावतात. याच्या पातींचे उभे व सरळ तंतू निघतात. त्यांची टिकाऊ वस्त्रे विणतात. याच्यापासून दोरखंडेही करतात. [ सं. केतक ]

**केकत-ती** पहा : **केतक-की**

**केकतडाचे सळ** (चांभारी) दोर; चामड्याची पिशवी शिवण्यासाठी कातड्याऐवजी उपयोगात आणतात ते; घायपाताचे दोर; तोडा; पन्हळी.

**केकया-यी** स्त्री. १. कैकेयी; भरताची आई. २. (ल.) भांडखोर, कैदाशीण, कजाग स्त्री. [ सं. ]

**केकरा-री-रु** पु. स्त्री. न. मेंढीचे पोर. पहा : **कोकरा-री-रू**

**केकरे** न. फावडे, खोरे, कैंगरे. (राजा.)

**केकसणे** अक्रि. खेकसणे; वसकन अंगावर जाणे. [ ध्व. ]

**केकसा, केकसा मावशी** स्त्री. १. पहा : **केकया, केकयी** २. कर्कशा; कजाग स्त्री. २. भेसूर, किळसवाणी स्त्री. [सं. कैकस राक्षस ]

**केका** स्त्री. १. मोराचे ओरडणे, टाहो, ध्वनी. २. मोरोपंत कवींनी केलेल्या केकावली रचनेतील आर्या. [ सं. ]

**केकाटणे** अक्रि. १. ओरडणे; मोठ्याने हाक मारणे. २. हेल काढून रडणे. ३. कर्कश ओरडणे : 'रेल्वेची मालगाडी मोठ्याने केकाट, केकाट केकाटून थांबली.' - हाचिं ५१. ४. दुःखाने किंवा वेदनेने मोठ्याने ओरडणे. ३ भुंकणे. 'तें (सुनें) केकाटले' - लीचउ ५०.

**केकाण** न. समुदाय : 'घेऊनि इंद्रियांची केकाणे।' - ज्ञा १८.४६४.

**केकाणे** न. १. केकाण नावाच्या देशातील घोडा; घोड्याचा एक प्रकार : 'जालौरीचे केंकाणे थोरू।' - शिव ९३७. २. एक देश. ३. दौड; धाव.

**केकाणे** न. दोरखंड.

**केकार** पु. मोराचे ओरडणे : 'मयोर गर्जती केकारे'। - मुआदि १५.७२ [ सं. केका + रव ]

**केकी** पु. मोर. [ सं. ]

**केकी कोळसा** (भुशा) ऊर्ध्वपतनानंतर कोकमध्ये रूपांतरित होणारा दगडी कोळशाचा प्रकार.

**केकें** उद्गा. केकटणे; केकणे. (क्रि. करणे.) [ ध्व. ]

**केग(घ)ई** स्त्री. भांडकुदळ, भांडखोर, दुष्ट स्त्री; हट्टी स्त्री.

**केग(गा)द-दी** स्त्री. केवडा. पहा : **केतक-की** [ सं. केतक ]

**केगया, केगामती** पहा : **केकया-यी**

**केगरे** न. फावडे; खोरे.

**केचित** वि. काही; काही लोक. [ सं. कश्चित् (अव.) ]

**केचिन्मत** न. सर्वांना मान्य नसणारे मत; काही लोकांचे मत.

**केज-जी-जे** न. मालाच्या मोबदल्याचे धान्य, नारळ इ. पदार्थ; विनिमयार्थ दिलेली वस्तू. उदा. माळणीकडून भाजी घेऊन धान्यरूपाने दिलेली किंमत. (क्रि. घालणे.) (माण. व.) : 'आदरासी मोल नये लावू केजें।' - तुगा ३४०४. २. मोबदला; मालाची देवघेव. [ सं. क्रेय ] (वा.) **केज्यास कापूर होणे** - भारी किमतीचा पदार्थ हलक्या किमतीला विकला जाणे.

**केजणे** उक्रि. नारळ, धान्य इ. देऊन त्याबदल्यात मासळीचा कुट्टा अगर भाजीपाला घेणे. (को.)

**केटर** वि. अंगाने किरकोळ (जनावर). (व.)

**केटा** वि. किडका; कुजका; सुमार (माल).(माण.)[क. केटट्‌ = वाईट]

**केड** वि. कद्रू; कृपण; चिक्कू.

**केड** नासणे; नास. (बे.) [क. केडिसु = नाश करणे]

**केडगा** वि. कळ, भांडण लावणारा. (कर.) [ क. केडिसु ]

**केडणार** वि. अवहेलना करणारा. (गो.)

**केडला** क्रिवि. केव्हा. (चि.) [ सं. कियत + वेला ]

**केडलावणे** वेडावणे. (कु.) [सं. कटु]

**केडशी** स्त्री. बुरशी; बुरा. [ क. केडु = नासणे ]

**केडू(डो)ळ** क्रिवि. एवढा वेळ; कितीतरी वेळ; फार वेळ.[सं. कियत्वेला]

**केढवळ, केढोळ** पु. पुष्कळ वेळ; किती वेळ; फार वेळ.

**केढवळचा, केढोळचा** वि. किती वेळचा; केव्हाचा; बऱ्याच वेळापासून.

**केणा-केणी** पु. स्त्री. केना नावाची शेतात उगवणारी भाजी. याची फुले निळी-जांभळी असतात. ह्याला कातरपाने येतात.

**केणाकुरडुची भाजी, केण्याकुंजऱ्याची भाजी** केणा आणि कुंजरा या दोन हलक्या पालेभाज्या आहेत. त्यावरून भिकार अन्न. पहा : **कळणाकोंडा** : 'घागरी मडक्यात कांही दाणे पहा, दळून त्याची भाकरी कर, केणी कुरडूची भाजी कर.'-संपत शनिवारची कहाणी ३२.

**केणी-णे** पु. न. १. विक्रीचा माल; मालाचे गाठोडे : 'तरी तैसी एथ कांहीं। सावियाची केणी नाहीं।' - ज्ञा ६.३४१. २. वस्तू; प्रकार. ३. बाजारात विकायला आलेल्या जिनसांवर (माल, वस्तूंवर) देशमुख-देशपांडे वगैरे वतनदारांचा कर. सरकारी कर. ४. व्यापारविषयक पदार्थ (विशेषतः धान्य, फळे, भाजी इ.) : 'इया पाटणीं जें केणे उघटे ।'-पाटणचा शीलालेख. ५. वर्तावळा, वर लावणे. ६. पैसा, डबोले. (मावळी).

**केणी** स्त्री. कमतरता; अडचण : 'उपायाची नाहि। केणि येथें॥' - राज्ञा ९.४६७.

**केणे** न. दुकान :'नातरि जालंधाच्या पाटणीं। जेवि केणें लावण्याचें'- उगी ६२५.

**केणे** न. बासनाभोवती बांधायची सुताची किंवा रेशमाची दोरी; बंधन. पहा : **केवणे** : 'तया ध्वनितातें केणें सोडूनि।' - ज्ञा ६.२९२. (वा.) **केण्याची समाधी घेणे** - रेशमी दोरीचा गळफास लावून घेणे : 'तेथेंच केण्याची समाधी पुंडलिकाच्या देवालयाच्या सन्निध घेऊन मृत्यु पावले.' - चिटणीस बखर म रि ४.४२.

**केण्या** क्रिवि. कोठून; कोणत्या वाटेने, मार्गाने. (चि.)

**केत** पु. केतू; ध्वज.

**केत** पु. इच्छा; हौस:'श्वशुरप्रमुख सासू कृष्ण आराधि केते।'-मंराधा ७८.

**केत** पु. १. झाडाचा नार, गाभा. (राजा.) २. झाडातील जून लाकूड.

**केतक** न. १ केवडा; केवड्याचे कणीस. २. कणसाचे एक पान, पात. ३. डोक्यातील सोन्याचा एक दागिना. [ सं. ]

**केतकट** स्त्री. केतकीचे झाड; केवडा. (को.)

न. केतकीचे लाकूड.

**केतकपान** पहा : **केतक ३**

**केतकी** स्त्री. केवड्याचे झाड. पहा : **केतक** [ सं. ]

वि. केतकीच्या पानासारख्या रंग.

**केतकी** स्त्री. एक प्रकारचा पक्षी; चांभारीण पक्षी. (को.)

**केतकी वज्र** खड्गाचा एक प्रकार. [ सं. ]

**केतके** न. गूळ उकरण्याचे उलथणे. (बे.) [ क. कित्तु = उपटणे ]

**केतन** न. ध्वज; पताका; निशाण; चिन्ह. [ सं. ]

**केती** वि. किती : 'हें येकेक केती सांघावे।' - राज्ञा ७.५१.

**केतुक** अवि. किती : 'भटो, अटनीं कोणा गावीं केतुका काळ असावे ?' - स्मृस्थ २१४.

**केतुका-की-के, केतुला-ली-ले** वि. केवढा; किती; कसला; कितीसे : 'ते सैन्यु सांगी केतुलें।' - शिव १०३१; 'हें औट हात मोटकें। कीं केवढें पां केतुकें।' - ज्ञा १३.१२; 'तक्षकविषाचा केतुला केवा।' - मुआदि ८.१९. [ सं. कियत् + क ]

**केतु-तू** पु. १. (ज्यो.) नवग्रहांतील काल्पनिक नववा ग्रह. २. एक दैत्य. याचे शिर विष्णूने मोहिनीरूप घेऊन उडवले. पहा : **राहू**. ३. धूमकेतु; शेंडे नक्षत्र : 'उदैजणे केतूचे जैसें।' - ज्ञा १६.३१९. [ सं. ]

**केतु-तू** पु. निशाण. [ सं. ]

**केतुल** वि. केवढे: 'कवण केतुला। कवणाचा कैं जन्मला।'-ज्ञा १०.६६.

**केते-पान** न. चंनकांचनी गंजिफाच्या खेळात चारी हुकूम एकाला आल्याने होणारी जीत.

**केथवर** क्रिवि. कोठवर; कोठपर्यंत; किती लांब.

**केथेमेथे** किरकोळ : 'केथे मेथें मागत होतो.' - वच ३०२.

**केदवळ, क(के)दोळ** क्रिवि. किती वेळ; केवढा वेळ. (कु.)

**केदार** न. पु. १. शेत. २. मळा. ३. पाटाचा बांध : 'वाटेस फुटतां केदार।' - पांप्र १.६६. ४. केदारेश्वराचे स्थान; बद्रिकेदार. [ सं. ]

**केदार** पु. एक वृक्ष.

**केदारखंड** पु. शेतबांध; पाणी अडविण्यासाठी बांधलेला बंधारा : 'केदारखंड - बंधन आज्ञापुनि धाडिला तुम्ही म्हणती।'-मोआदि २.१९.

**केदारनाट** पु. (संगीत) बिलावल थाटाचा राग. केदार आणि नट या रागांचा जोडराग. गानसमय रात्र.

**केदारयोग** पु. (ज्यो.) पत्रिकेत सातही ग्रह चार स्थानांमध्ये किंवा एकसारख्या चारी स्थानांमध्ये असतील तर हा योग होतो. या योगावर माणूस श्रीमंत, आळशी, बुद्धिमान, आप्तांवर उपकार करणारा असा असतो.

**केदारी** स्त्री. नैवेद्य : 'पिराचे केदारीस तांदूळ, केळी.' - बाबारो २.१०१.

**केदो** वि. केवढा. (गो. कु.)

**केद्वा, केधवा** क्रिवि. केव्हा; कधी; कोणत्या वेळी : 'तुका म्हणे धीर नाहीं माझ्या जीवा। भेटसी केधवा पांडुरंगा॥'-तुगा ८४६. [सं. कदा]

**केन** आऊत; नांगर.

**केनशी** स्त्री. १. बुरशी; बुरा. (को.) पहा : **केंडशी** २. लोणा.

**केनसावणे** अक्रि. (अन्न इत्यादी पदार्थ) बुरसणे; बुरशी येणे. (को.)

**केना** पहा : **केणा** (वाई)

**केनाइट** न. (भूशा.) खनिज क्षारांपैकी एक.

**केनाळ** न. एक प्रकारचे भाताचे बी; करगुंट; कोळपा. (गो.)

**केनी** पहा : **केना, केणी**

**केनी** पहा : **केनशी**

**केप** स्त्री. १. बंदुकीच्या घोड्याचा ज्यावर आघात होऊन बार उडतो ती तांब्याची लहान टोपी. २. दिवाळीत मुलांच्या पिस्तुलात घालायची दारू भरलेली कागदी चकती. [ इं. कॅप ]

**केपगुजबरी** स्त्री. एक फळझाड; ढोलांबा. [ इं. ]

**केबरा** पु. १. शेतातून कोठारात भात नेत असताना येणारी तूट भरून निघावी म्हणून दिलेली सूट, भत्ता. २. विक्रीसाठी साठवलेल्या सरासरी पिकाची नुकसानभरपाई करण्यासाठी बसवलेली पट्टी.

**केबल** स्त्री. १. तारांच्या जुडग्यांचा दोर; तारेचा जाड मजबूत दोर. २. समुद्रपार तारेने पाठवलेला संदेश. [ इं. ]

**केबल** उपग्रहाद्वारे संदेश पोहोचविणारी यंत्रणा.

**केबिन** स्त्री. १. आगबोटीतील प्रवाशांची खोली. २. कार्यालयात वरिष्ठ अधिकाऱ्यासाठी असलेली स्वतंत्र लहान खोली. [ इं. ]

**केम** न. (भूशा.) हिमनदी वितळल्यामुळे तिच्या पाण्याबरोबर वाहून आलेला गाळ, रेती इत्यादींनी बनलेले लांबट टेकाड. [ इं. ]

**केम** न. यंत्राच्या विशिष्ट प्रकारच्या गतीचे दुसऱ्या प्रकारच्या गतीत रूपांतर (वाटोळ्या गतीचे मागे पुढे होणाऱ्या गतीत) करायचे साधन. [डच कॅम]

**केमटा** वि. हेमटा; चिक्कू; कृपण; पहा : **केड**

**केमण** स्त्री. काव; हुरमुंज; गेरू. (बे.)

**केमर** पहा : **केंबरे** : 'डबक्यातून आणि हिरवळीतून आसरा घेणाऱ्या केमरांनी (घुंगुरट्यांनी) तो आसरा सोडला.' - माचू ३२१.

**केमशी** स्त्री. बुरशी. पहा : **केंडशी**

**केमसा-शी** पु. स्त्री. पुरुष अथवा स्त्रीला बायका देतात ती एक शिवी.

**केयूर** न. १. दंडामधील कडे, वळे; बाजूबंद : 'जैसा केयुरादिकीं कसु। सुवर्णाचा॥' - ज्ञा १३.१०६५. २. कंकण.

**केर** पु. न. १. कचरा; गवताच्या काड्या; धुरळा; शेण, माती, गवत, पाने इत्यादींचा वाईटसाईट अंश. २. गाळ; रेंदा; निरुपयोगी पदार्थ; अवशिष्ट भाग. ३. बारीक कण; गवतकाडी, कसपट, तुकडा इ. (साखरेतील, धान्यातील, कापसातील.) (को.) [क.किर,केर] (वा.) ० **फिटणे**- कचऱ्याप्रमाणे उडून जाणे; नाश होणे : 'तेथ भेडांची कवण मातु। कांचया केर फिटतु।' - ज्ञा १३४. ० **फेडणे** - नाश करणे. **केरवारा करणे** – घरातील निरनिराळी कामे करणे. १. (ल.) धसफस करून

काम बिघडवणे; नासणे; खराब करणे. २. तिरस्काराने नाकारणे. (उपदेश वगैरे.)

**केर** पु. अभ्र; ढग : 'जैसा केरु फीटलेया अभाली। दीठि रिगे सूर्यमंडलीं।' - राज्ञा १०.७४. २. संशय.

**केर** स्त्री. दोन डोंगरांमधील लांबट शेतजमीन; पावसाळी हंगामाची शेतजमीन. (गो.)

**केर** पु. मासळी. (गो.)

**केर** पु. मोठा, उंच रथ. उदा. म्हाळसेचा केर.

**केरकचरा** पु. केर व इतर निरुपयोगी वस्तूंना उद्देशून वापरण्याचा शब्द.

**केरकतवार, केरकारत, केरकुध्वित** पु. अडगळ; गाळसाळ; केरकचरा. [केरचे द्वि.]

**केरकसपट, केरकस्तान** न. केरकचरा; गवतकाडी; गाळसाळ.

**केरकार-रू** पु. झाडलोट करणारा.

**केरकोंडा** पु. केर व कोंडा; घराची झाडलोट करणे वगैरेसारखी हलकी नोकरी. (निर्वाहाचे साधन म्हणून केलेली.)

**केरडोक** न. छपरापासून लोंबणारे जाळे; कोळिष्टके; गवताच्या काड्या;

**केरणे** अक्रि. खाणे.

**केरपट्टी** स्त्री. केरनेणावळ; केर काढण्यासाठी जे झाडूवाले नेमतात त्यांचा खर्च भागवण्यासाठी बसवलेला कर.

**केरपाणी, केरपोतेरे** न. झाडलोट, पाणी भरणे, सारवणे, सडासंमार्जन वगैरे बायकांची रोजची कामे..

**केरली** स्त्री. खगोलविद्या; नक्षत्रज्ञान.

**केरपातेर** न. केरकचरा.

**केरपुंजा** पु. केराचा ढीग.

**केरवळ्या (कोणाच्या)** पुअव. कोणफळाचा केलेला एक खाद्यपदार्थ.

**केरवा** पु. चिनी मातीचे एक भांडे:'केरवा नांवाचे चिनी मातीचें पात्र आहे त्यांत एक मुंबईमण गुलाबपाणी असतें.'-मुंब्या ११९. [फा. कहरुवा]

**केरवा** पु. तबल्याचा एक बोल. याच्या चार मात्रा असतात.

**केरवा** पु. केरवा नाच. पहा : **कारवा**

**केरवा** पु. १. बांगड्यांचा एक प्रकार. २. पिवळा दृष्टमणी; तृणमणी : 'आंबर नावाचे एक खनिज आहे. केरवा मणी त्याचा केलेला असतो.' - वनश्री १०७. [फा. कहरुवा]

**केरवारा** पु. झाडलोट : 'सर्व वाड्याचा केरवारा सणावारी झाला म्हणजे फार झाले.' - भदि ५१.

**केरवाऱ्यात-निशी** १. केरात, घाणीत. २. (ल.) केरवाऱ्यावर उडून गेलेला.

**केरसु(सो)णी** स्त्री. १. केर झाडण्यासाठी शिंदीच्या पातींची अगर नारळीच्या हिरांची केलेली झाडणी; वाढवण; सळाथी. २. ऐदी स्त्री; आळशी स्त्री.

वि. नेहमी बाजूला शेपटी वळवलेला (घोडा); पहा : **उघडगांड्या**

**केरसुणीकार-रु** पु. झाडलोट करणारा नोकर : 'तंव गोरंभकु नामें केरसुणीकारु।' - पंच १.२६.

**केरा** वि. १. तिरप्या नजरेचा; चकणा. २. वाकडा.[सं. केकर = तिरवा.]

**केरावणे** अक्रि. धान्य वगैरेमध्ये केरकचरा मिसळणे. (को.)

**केरावारी, केरासमान** वि. टाकाऊ; कवडी किमतीचा (माल).

**केरी** स्त्री १. केर; काड्या (नांगराने उपटून निघालेल्या); केरकचरा (पाण्याच्या ओघाबरोबर आलेला, भरतीबरोबर आलेला.) २. जमीन भाजल्यावर राहिलेले कवळ वगैरे; शेतातील धस, खुंट; पिकाबरोबर वाढलेले तण, पाचोळा. ३. माडाच्या पात्यांची विणलेली पाटी. (को.)

**केरी** स्त्री. विहिरीतील एक प्रकारचा मासा.

**केरोसीन** न. घासलेट.

**केल** न. १. काठीचे दुबेळके, डोके, भाग. २. दुबेळे, दुबेळक्याचा काटा. ३. मोडलेल्या फांदीचा, झाडाच्या खोडावर राहिलेला भाग. ४. काठीला लावलेली आकडी.

**केल(ळ-य) टे-डे, केल्डे** न. माकडाचे पिल्लू; माकड. (को.गो.) [ पो. केल्दन ]

**केलडे** न. (नाविक) कप्पीसारखे पण साधारण लांबट चाक.

**केलमल** पु. रुपयांना सांकेतिक शब्द. (कैकाडी)

**केलाडु** न. लहान मूल; लेकरू. (को.)

**केलि-ली** स्त्री. खेळ; करमणूक; क्रीडा; विलास; विहार : 'जगदुन्मीलनाविरल। केलिप्रिय॥' - ज्ञा १८.४. [ सं. ]

**केलिकलह** पु. प्रीतिकलह; लाडझगडा; खेळातील विनोदी भांडण.[सं.]

**केले** न. कर्म; कृत्य : 'न देखे आपुलें केलें। परापवाद स्वयें बोले।'-एभा - २३.२७४. [सं.कृ] (वा.) **केले न केलेसे करणे** - निष्काळजीपणाने, कुचराईने एखादे काम करणे.(वा.) **केले केले न केले न केलेसे करणे** – (एखादे काम) निष्काळजीपणाने करणे; कसेतरी तडीला लावणे.

**केलेपण** न. काही केल्याची भावना; कर्तृत्व : 'परि केलेपण शरीरीं। उरों नेदी '- ज्ञा १३.५२३.

**केव** स्त्री. करुणा; याचना; दया. पहा : **कीव**

**केवट, केवटपण** न. किरकोळीचा व्यापार; किरकोळ विक्री - व्यवहार. [ सं. क्री = विकत घेणे ]

**केवटळ** स्त्री. जी जमीन ओढा किंवा नदी यांच्या काठी असते व ज्या जमिनीत डोंगराच्या वरच्या प्रदेशातून गाळ वाहत येऊन बसतो अशी जमीन; घडवा मळई.

**केवटा** पु. १. पिवळसर रंगाची माती. २. गाळाने बनलेली जमीन; बारीक गाळ, माती: 'ही जमीन नदीच्या केवट्याची असावी.'-बागेची माहिती.

**केवटा-टी-ट्या** वि. १. मोठ्या दुकानातून खरेदी करून किरकोळ भावाने जिन्नस विकणारा; किरकोळ, लहान व्यापारी; घाऊक खरेदी करणारा. वि. अति कृपण; चिक्कू, चिकट.

**केवड, केव(व्ह)डा-ढा** (क्रिवि.) पुष्कळ; किती प्रमाणाने, अंशाने (प्रश्नार्थाने किंवा मोघम रीतीने उपयोग) पहा. **एव्हाडा** [सं. कियत् + दा]

वि. किती मोठा, मोठे : 'निहाळा पां केवडा। पसरूनिया चवडा।

करितसे माजिवडा। आकारगजु॥'-ज्ञा १३.६५.

**केवडा** पु. १. केतकीचे झाड व त्याचा तुरा, कणीस. हिंदुस्थानात पाणथळ जागी केवडा येतो. पांढऱ्या जातीला केवडा व पिवळ्या जातीला केतकी म्हणतात. केतकीला फार सुवास येतो. त्याचे तेल व अत्तर काढतात. २. बायकांच्या वेणीतील लांबट चौकोनी सोन्याचे फूल. ३. अंगरख्याची काखेतील कळी. ४. वेणीचा एक प्रकार. (क्रि. घालणे, काढणे, उतरणे.) ५. जोंधळ्यावरील एक रोग. [सं. केतकी ]

**केवडी** स्त्री. केतकी. पहा : **केवडा**

**केवड्याचा खाप** सुस्वरूप चेहऱ्यासाठी ही उपमा वापरतात.

**केवढातरी** क्रिवि. फार; अतिशय.

**केवढाला** वि. किती; कितीतरी.

**केवढासा** वि. केवढा.

**केवढ्याचा** वि. किती किमतीचा; कितव्याचा; कितव्याने. पहा : **कितकावा**

**केव(व्ह)ढ्यानदा, केवढ्यांदा, केवढ्यांनी** क्रिवि. केवढ्या मोठ्या आवाजाने.

**केवण** स्त्री. मुरुडशेंगेचे झाड. साधारणपणे हे पुरुषभर उंच असते. याची पाने मोठी नसतात. शेंगा मुरड घातल्याप्रमाणे असतात. झाडाच्या सालीची दोरखंडे करतात. हे औषधी आहे.

**केवणे** न. १. कापडाचा गठ्ठा बांधण्याची दोरी (रेशमी अगर सुती). पहा : **केणे** २. साठा; संग्रह; संचय; पुंजी. पहा : **केवा**

**केवन्या-न्यो** स्त्री. न्यून; उखाळ्यापाखाळ्या. (कु. गो.)

**केवल-ळ** वि. १. शुद्ध; स्वच्छ; मिश्रण नसलेले : 'जेथ परमानंदु केवल। महासुखाचा॥' - राज्ञा १. १४. २. ज्याला दुसऱ्या कोणाचेही साहाय्य नाही असा; एकटा; फक्त; मात्र. ३. निव्वळ; नुसता; शुद्ध.
क्रिवि. १. बरोबर रीतीने; नियमित रीतीने; नियमाने; निश्चितपणे. २. अगदी; हुबेहूब; सादृश्यामुळे तद्रूप दिसणारे. ३. बिलकूल; मुळीच : 'दक्षिणेत केवळ असामी नाहीं दुसरा।' - ऐपो २३६. [सं. ]
वि. निश्चळ; अकर्ता : 'तो पुरुष स्वतंत्र असून निसर्गत: केवळ म्हणजे अकर्ता आहे.' - गीर १६२. [सं. ]

**केवल अपलक्ष्यांक** (शाप.) साधनांच्या कमतरतेमुळे किंवा मानवी मर्यादांमुळे राहणारी चूक.

**केवल उष्णमान** न. मूल शून्यांशापासूनची उष्णतेची तीव्रता. [सं. ]

**केवल एकक** (शाप.) विद्युत चुंबकीय सी.जी.एस. पद्धतीचा घटक असलेले मोजमापाचे एकक. युनिट.

**केवल गणनसिद्धांतदोष** (तत्त्व.) केवळ एकाच प्रकारची अनेक उदाहरणे एकत्र करून काढलेला सामान्याचा निष्कर्ष. अशा तऱ्हेने सामान्याची निष्कर्ष काढणे सदोष आहे असे मानले जाते. [सं. ]

**केवल त्वरण** (भौतिक) एखाद्या स्थिर बिंदूच्या संदर्भात दुसऱ्या वस्तूचे त्वरण.

**केवलध्वनी** पु. (प्रचलित भाषेतील अक्षराच्या उच्चाराचा) मूलध्वनी.

**केवलपरिमाण केवलमहत्ता** न. (ज्यो.) एखाद्या ताऱ्याचे, तो पृथ्वीपासून ३२.६ प्रकाशवर्षे इतक्या अंतरावर असतानाचे आकारमान.

**केवलप्रयोगी** वि. (व्या.) उद्गारवाचक (अव्यय). जी वापरली असताना त्यावरून वक्त्याचे अथवा सांगणाराचे हर्षशोकादी जे मानसिक विकार अथवा उद्गार यांचा बोध होतो. या शब्दांचा वाक्यातील इतर शब्दांशी व्याकरणदृष्ट्या संबंध नसतो. उदा. अरेच्या !; अरेरे; अबब इ. [सं.]

**केवलमूल्य** न. (ग.) संख्येची चिन्हनिरपेक्ष किंमत.

**केवल रेषा** स्त्री. (भूमिती) दोन बिंदूंनी मर्यादित एकमितीय (रुंदी नसलेली फक्त लांबी असलेली) आकृती. ही काल्पनिक किंवा आदर्श रेषा आहे.

**केवलवनी** वि. केवळ म्हणजे शुद्ध वाणाचा, एकनिष्ठ, सच्चा : 'येथें वजिरे आजम केवलवनी' - ऐलेपाम्यु १९६.

**केव(वि-वु)लवाणा-णी** वि. दीन; ज्यांच्याबद्दल कीव, दया उत्पन्न होईल असा; बापुडा; विव्हळणारा (स्वर, मुद्रा इ.) : 'बघुं नको मजकडे केविलवाणा' - एकच प्याला. [सं. कृपालु ]

**केवलवेदन** न. (मानस.) यालाच शुद्धवेदन असे म्हणतात. यात वेदन होते. पण अर्थाची जाणीव अभिप्रेत नसते.

**केवलव्यतिरेकी** वि. (न्याय) केवळ नास्तिपक्षाने संबद्ध असलेला; अभावाचा संबंध असणारा. पहा : **अन्वयव्याप्ति** [सं.]

**केवलशब्द** पु. (भाषा.) एकच घटकावयव असलेला शब्द.

**केवलसत्तावाद** पु. ब्रह्मवाद.

**केवलसाक्षी** वि. (तत्त्व.) फक्त, नुसते पाहणारा (ईश्वर); शुद्ध साक्षी; नि:शेषत: अलिप्त असलेला.

**केवला** पु. (गवंडी) भिंतीचा पुढील अगर मागील भाग, टोक; चांदईचा शेवट. (बे.)

**केवला** वि. एक ही संख्या (इसम, रुपया इ.). (नंद भाषा)

**केवलान्वयी अनुमान** (तत्त्व.) ज्या अनुमानातील साध्य सर्वव्यापी असल्यामुळे जेथे साध्य नाही असे ठिकाणच (विपक्ष) उपलब्ध नसते त्यास 'केवलान्वयी' अनुमान असे म्हणतात.

**केवलेश्वरवादी** वि. फक्त ईश्वराचे अस्तित्व मानून धर्म हा ईश्वरप्रणीत आहे हे मत न मानणारा.

**केवल्यो बावल्यो** स्त्री. चेष्टा; टिवल्याबावल्या. (कु.)

**केवशीन** क्रिवि. कोठून. (गो.)

**केवळ** पहा : **केवल**

**केवा** पु. १. साठा; संग्रह; पुंजी; डबोले. २. रोख रक्कम; रोकड. (नंदभाषा, कर.) [सं. क्री - क्रय ]

**केवा** पु. महत्त्व; सामर्थ्य; प्रौढी; पाड (निषेधार्थी प्रयोग.). पहा: **किंमत:** 'संतभजनी माझा सद्भावो। केवा कोण पाहा भक्तीचा।' - एभा ११.९५५३. [क. केव ]

**केवालु** स्त्री. बारीक रेती : 'रत्नकुटाचि केवालु मौआल' - वह १७७.

**केवि-वी** क्रिवि. कसे; कोणत्या रीतीने; कशासारखे; कोणत्या प्रकाराने : 'तो केवि मार्गी इथें। क्षेमी होए।' - ऋ ७. [सं. कथम् ]

**केवी** पहा : **केवा** १, २ (को. गो.)

**केवी** पु. उपऱ्या शेतकरी; परगावचे कूळ.

**केवूं** क्रिवि. कसा; कशी. पहा : **केवी** : 'प्राणेश्वरा त्यजूनी केवूं। वाचूं म्हणतसे ते नारी।' - गुच ३०.९०.

**केव्हडा** पहा : **केवढा**

**केव्हळा-ळि** प्रश्नार्थक अव्यय. केव्हा ? केव्हाही; कधीही : 'वाटा केव्हळी न वचति। क्रोधाचिये।' - ज्ञा ४.५९.

**केव्हा** क्रिवि. १. (प्रश्नार्थक) कोणत्या वेळी, कोणत्या प्रसंगी, समयाला. २. (जोराने उच्चारला असता) कोणत्याही वेळी; कधीही (निषेधार्थी प्रयोग.) ३. केव्हा केव्हा. ४. किती काल झाला असताना. केव्हा व कधी याच्यामध्ये भेद आहे. केव्हा याने नुकत्याच होऊन गेलेल्या काळाचा बोध होतो व कधी याने बऱ्याच पूर्वीच्या काळाचा बोध होतो.

**केव्हा कधी केव्हाकेव्हा, केव्हाकेव्हाना, केव्हा नाही केव्हा, केव्हातरी** क्रिवि. कधीकधी; मधूनमधून; वेळेनुसार.

**केव्हाच** क्रिवि. १. अगदी त्याच क्षणी; लगेच (मागल्या काळाबद्दल, गत कृत्याकडे संबंध.) २. कधीच नाही या अर्थी उपयोग.

**केव्हाचा** वि. १. पुष्कळ काळपर्यंत; किती वेळचा (गेलेल्या, असलेल्या, बसलेल्या, वाट पाहणाऱ्या माणसाबद्दल योजतात.) २. (प्रश्नवाचक) केव्हापासून.

**केव्हाना** क्रिवि. अचानक; कल्पना नसताना : 'मग एके दिवशी ती (म्हातारी) केव्हाना मरून गेली.' - घरदार ८०.

**केव्हापासून** क्रिवि. १.(प्रश्नवाचक) किती वेळापासून. २. बऱ्याच वेळापासून.

**केव्हाशी(स-सा)क** क्रि.वि. १. केव्हाही (निषेधार्थी). २. केव्हाच. (कु.)

**केव्हासा** क्रिवि. कोणत्या वेळेच्या सुमाराला. (व.)

**केव्हेळी** क्रिवि. केव्हातरी.

**केश** पु. केस; रोम; लव. [ सं. ] (वा.) ० **काढणे** - श्मश्रू करणे (विशेषत: विधवा स्त्रीची). ० **देणे** - विधवेने केशवपनास मान्यता देणे. पहा : **गळा**

**केशकलाप** पु. भरपूर केस. दाट सुंदर केस.

**केशट्यो** पु. झिपऱ्या (लघुत्वदर्शक). (गो.)

**केशपाश-जाल** पु. केसांच्या जटा; बांधलेले केस; पुष्कळ केस. [सं.]

**केशबंध** पु. (नृत्य) (संयुक्त हस्त) पताकहस्त करून ठेवणे. [ सं. ]

**केशभूषा** स्त्री. केसांची वेगवेगळ्या प्रकारे रचना, सजावट करणे. केसांची शोभिवंत बांधणी करणे. [ सं. ]

**केशर** न. १. जाफरा, काश्मीर या भागात होणारे एक तंतुमय, सुगंधी, खाद्य पदार्थात वापरण्याचे द्रव्य. २. एक झाड. याचा रंगासाठी उपयोग करतात. पहा : **कपिला** [ सं. ]

**केशरा** पु. मरेन किंवा मारीन या पूर्वनिश्चयाचे चिन्ह म्हणून लढाऊ शिपाई जो केशरी रंगाचा पोशाख अंगावर घालत असत तो. विशेषत: रजपूत योद्धे केशरा घालीत. (क्रि. करणे, घेणे.) [ सं. केशर ]

**केशरी** वि. १. केशरासंबंधी; केशरयुक्त; केशरी रंगाने रंगवलेले; (केशरी बर्फी, केशरी पातळ इ.) केशरी वस्त्र परिधान केलेले २. केशरी पोशाख करून जिवावर उदार झालेला (योद्धा). (वा.) ० **करणे** - जोहार करणे. पूर्वी रजपुतात अखेरच्या संग्रामाकरिता निघायच्या वेळी स्त्रियांना अग्नीत लोटून, केशरी पोषाख करून बाहेर पडत यावरून : 'त्यानें आपल्या बायकांची केशरी करून तानाजीशी लढण्यास आला.' - मातीर्थ ४.४६१. ० **वागे करणे** - केशरी पोषाख करणे. हा पोषाख निर्वाणीच्या हल्ल्याच्या वेळी केला जात असे. केशरी पोषाख केल्यानंतर रजपूर वीर रणांगणातून परत फिरत नसत : 'एक दिवस रजपुतांनी केशरी वागे करून लढाईचा प्रसंग घातला.' - पेद १२.५. स्त्री. १. केशराची उटी. २. केशरमिश्रित पक्वान्न, पदार्थ (केशरी भात, मिठाई इ.). ३. एक फुलझाड.

**केशरी** पु. सिंह. पहा : **केसरी**

**केशऱ्या** वि. रेषा असलेला (आंबा).

**केशवकरणी** स्त्री. पद्यातील एका जातिवृत्ताचे नाव. रामजोशाच्या 'केशवकरणी अद्‌भुतलीला नारायण तो कसा। तयाचा सकल जनांवर ठसा।' या काव्यावरून हे नाव पडले. याच्या पहिल्या चरणात २७ व दुसऱ्या चरणात १६ मात्रा असतात. केव्हा केव्हा २१ मात्रांचा अंतरा असतो.

**केशवपन** न. केसांची श्मश्रू करणे; केस काढणे; हजामत (विशेषत: विधवांच्या बाबतीत योजतात.) : 'विधवांनी केशवपन केलें नाहीं तर त्यानें या राजकीय प्रश्नाचा उलगडा होण्यास यत्किंचितही मदत होण्याचा संभव नाही.' - लोटिकेले ४.१८६. [ सं. ]

**केशवमाधव** पु. १. विष्णूच्या चोवीस नावांपैकी पहिले व तिसरे नाव; कृष्णाची नावे. २. (ल.) बुरसलेल्या पदार्थातील बारीक किडे; अशुद्ध पाण्यातील किडे.

**केशवाहिनी** स्त्री. (प्राणि.) केसासारखी सूक्ष्म नलिका. [ सं. ]

**केशवीचुरा** पु. केस विंचरणारा; शृंगार करणारा : 'प्रदेष्टाः केशवीचुराः हातसाहाना' - पंचो ८३.६.

**केशसंवाहन** न. केस धुऊनपुसून साफ करणे. [ सं.]

**केशाकर्षण** न. (शाप.) अत्यंत बारीक छिद्राच्या नळीतून द्रव पदार्थांचे होणारे आकर्षण. [ सं. ]

**केशाकार वाहिनी** (वै.) अगदी केसासारखी बारीक रक्तवाहिनी. स्नायु आणि ऊतींमध्ये रक्त व प्राणवायू यांचा पुरवठा करण्याचे कार्य या वाहिन्या करतात.

**केशाकेशी** पहा : **केशधरणी** : 'तुम्हीं ही शब्दांची केशाकेशी चालविली आहे.' - नाकु २०३.

**केशांत** पु. घोड्याच्या कपाळावरचा भाग. - अश्वप १.६१.

**केशिका** वि. केसासारखी, अगदी बारीक (वेज) असलेली नळी; केसासारखी सूक्ष्म नळी (विशेषत: रक्तवाहिनी). [ सं. ]

**केस** पहा : **केश**. (वा.) ० **काढणे** - श्मश्रू करणे; दाढी-मिशा काढणे. ० **नखलणे** - केसातून नखे (बोटे) फिरवून (फणीप्रमाणे) केंस व्यवस्थित करणे; जटा काढणे : 'वेणी विंचरली केस नखलुन। अलंकार चढविले हिऱ्याचे कळस काप कुंचलुन।' - प्रला २२०. **केसांच्या**

अंबाड्या होणे - केस पांढरे होणे; वृद्धावस्था येणे. **केसात माती घालणे** - अतिशय दुःख होणे. **केसाने गळा कापणे** - विश्वासघात करणे; गोडगोड बोलून फसवणे : 'चांडाळांनों, हरामखोरांनो दगा करून आमचा सर्वांचा केसाने गळा कापलात।' - कांचनगड. **केसाने चरण झाडणे** - सेवा करण्याचा कळस करणे; अगदी हलकी सेवा करणे : 'पाहिन क्षणभरी। चरण झाडीन केशीं।' - धावा, नवनीत पृ. ४४९. **केसाला टका, धक्का लागू न देणे, न लावणे** - उत्तम प्रकारे संरक्षण करणे; उपद्रव होऊ न देणे : 'तुझिया टका न लागो साधुपिपीलिकचमूगुडा केशा।' - मोकर्ण ५०.३. **केसालाही धक्का न लागणे, केस वाकडा न होणे.** - जरासुद्धा नुकसान किंवा दुखापत न होणे.

**केस** स्त्री. १. रुग्ण, आजारी मनुष्य. २. मृत्यू; विशिष्ट रोगाने आलेले मरण. [ इं. ]

**केस** स्त्री. (कायदा) ज्याची चौकशी चालू आहे असे प्रकरण किंवा घटना. कज्जा; खटला (वा.) ० **फाईल करणे** - एखाद्या गोष्टीची चौकशी थांबवणे.

**केसउ** पु. पळस; वृक्षविशेष: 'जैसा केसउ फुलला। तैसा अशुद्धें वोहळला।' - उह ६३१.

**केसक** न. किंशुक; पळसाचे फूल : 'करतळें रंगें कालौनि केसके। रांविती सुगंधें उदकें।' - नरुस्व ८४५. [ सं. किंशुक ]

**केसकरीण** स्त्री. सकेशा विधवा.

**केसटी** स्त्री. १. घाणेरड्या, विसकटलेल्या केसांच्या झिपऱ्या. २. (तिरस्कारार्थी प्रयोग) केस. पहा : **केशट्यो**

**केसटोपी** स्त्री. ज्याच्यावर केस (फर) आहेत अशी चामड्याची टोपी.

**केसणा-णी-ना-नी** क्रिवि. किती; केवढा; कसा; कशाप्रकारचा : 'परमाणुची केसनी थोरीं।' - दाव २८८; 'विरडियां पाड तो केसणा। तूं देखणा निजदृष्टी।' - एरुस्व १६.७५.

**केसतूड** पहा : **केसतोडा** : 'केसतूड होऊन मांडी विलक्षण ठसठसत रहावी तशी ती केंसानं गळा कापणारी बातमी.' - उअ २१.

**केसतोड-डा** पु. केस उपटला गेल्यामुळे होणारा फोड.

**केसधरणी** स्त्री. केसांची झोंबाझोंबी : 'तेथ जाली केशधरणी' - शिव १०४५.

**केसन** अ. केवढे:'तीयेचे फळ मोक्षासमान: ते शक्ति केसनी' - मूप्र ६९२.

**केसपट** न. केर; बारीक कण. पहा : **कसपट**

**केसपिक्या** वि. म्हातारा : 'हा केसपिक्या सयाजीरावांचा वडील भाऊ.' - विवि ८.२.३०.

**केसपुळी** स्त्री. करट (गो.)

**केसभर** क्रिवि. थोडेसुद्धा : 'मग एवढी जड पारडी उचलली असतां खांदा केसभरहि इकडे की तिकडे कलत नाहीं.' - नि.

**केसर** न. केशर.

**केसर** पु. १. फुलातील तंतू; पराग : 'कां कमळावरी भ्रमर। पाय ठेविती हळुवार। कुचुंबेल केसर। इया शंका।' - ज्ञा १३.२४८. २. आंब्याच्या कोयीला असणाऱ्या शिरा.

**केसर** न. १. भाताचे लोंगर, कणीस, लोंबी. २. मंजिरी, मोहोर (तुळस, आंबा इत्यादीचा)

**केसर** न. कसपट; केर; बारीक कण; केसपट.

**केसर** न. सिंहाची, घोड्याची आयाळ. - अश्वप १.६२.

**केसरकी** स्त्री. पुढील सालच्या पिकाकरिता नांगरून ठेवलेली जमीन. [ सं. कृषि ]

**केसरणे** अक्रि. मोहोर येणे.

**केसरबोंडी, केसरी बोंड-डी** स्त्री.न. केसर; एक प्रकारचे झाड. याच्या बोंडात केशरी रंगाचा गर व बिया असतात.

**केसरमंडल** न. (वन.) परागकण बनवणाऱ्या एक किंवा अनेक अवयवांचा (केसरदलांचा) संच.

**केसरहीन** वि. (वन.) केसरदले नसलेले (फूल). उदा. पोपईची स्त्रीपुष्पे, सूर्यफुलाची किरणपुष्पके.

**केसरिया** पहा : **केशरा**

**केसरी** स्त्री. १. पाचेचे झाड व त्याचे फूल. २. भाताचे लोंगर, घोस.

**केसरी** पु. सिंह.

**केसरी-ऱ्या** वि. १. केशरी वस्त्रांनी आच्छादलेले; केशरी रंगाचा पोशाख घातलेला. पहा : **केशरी, केशरा**. २.रेषा असलेला (आंबा.).

**केस(सा)री - ळी** स्त्री. १. दृष्ट लागू नये म्हणून (अस्वलाच्या) केसांची केलेली दोरी. ही जनावरांच्या गळ्यात बांधतात. २. केसांची दोरी.

**केसरी डाळ** एक प्रकारचे केशरी रंगाचे द्विदल धान्य : 'मध्य प्रदेशात 'केसरी डाळ' किंवा 'लाखी डाळ' खाण्याचा प्रघात असून -' आआआ ४७.

**केसारीण** स्त्री. केसांच्या दोरीचा गळफास लावून माणसाला मारणारी स्त्री. (अशा स्त्रिया असतात अशी दंतकथा आहे.)

**केसाळ-ळा-ळू** वि. अंगावर पुष्कळ केस असलेला.

**केसा(सो)ळी** स्त्री. आगवळ; वेणी घालताना वेणीच्या टोकाला बांधतात ती. लहान दोरी पहा : **केसरी, केसाळी**

**केसाळीण** स्त्री. सकेशा विधवा स्त्री. (तंजा.)

**केसीन** न. दुधातील एक प्रथीन. [ इं. ]

**केसुरडी** पहा : **केसटी**

**केसू** न. पळसाचे फूल : 'डोइये केसूवाची माळ बांधिली' - नरुस्व २५२४.

**केसोमासी** क्रिवि. संपूर्णत; अंगप्रत्यंग. (व.)

**केस्तांव** न. भांडणतंटा. (गो.)

**केहरवा** पु. १. केरवा. पहा : **कारवा**. २.(ताल) याला चार मात्रा व दोन विभाग असतात.

**केही** क्रिवि. कोठे : 'दुरी केंही न वचावें।'-ज्ञा ३.८९. [सं. क + हि ]

**केहेठी** क्रिवि. कोठून : 'तुम्ही केहेठीं आलेत ?'-लोक २.६१. (चि. राजा.)

**केळ** स्त्री. १. केळीचे झाड. हे पुष्कळ दिवस टिकणारे, कंदरूप आहे. ह्याला मोठी पाने येतात. ह्याच्या अनेक जाती आहेत. २. केळीचे

फळ. ३. ब्राह्मणी पागोट्यावरील कपाळपट्टीवरचा भाग, बिनी. ४. स्त्रिया लुगड्याच्या निऱ्यां पोटाजवळ खोवताना केळ्याच्या आकाराचा भाग करतात तो. [ सं. कदली ] (वा.) **केळे खाणे - साखर खाणे** - (ल.) खोटे बोलणे, मूर्खासारखी बडबड करणे (वगैरेला औपरोधिक शब्द.)

**केळ** पु. पिंपळाच्या जातीचे एक झाड. (गो.)

**केळ-ळी** स्त्री. धातूचा किंवा मातीचा घडा; कळशी : 'धट्ट्याकट्ट्या बाया डोक्यावर केळी घेऊन झऱ्याला पाण्याला निघालेल्या...' - हपा १४.

**केळखंड** न. न भरणारे केळे; वांझ केळे. याची भाजी करतात.

**केळचे** क्रि. थट्टा करणे. (गो.)

**केळडे** पहा : **केलडे** : 'वाघ पडला बावी केळडे गांड दावी.' - लोक २.७३.

**केळफूल-बोंड-कमळ** न. केळीच्या कोक्यापासून निघालेले फूल. हे कडू, तुरट, अग्निदीपक, उष्ण, वीर्य व कफनाशक आहे. याची भाजी करतात.

**केळबंड-डी** स्त्री. केळ्यांचा लोंगर.

**केळव(वा)ण** : पहा **गडगनेर** : 'लोणवाण केळवाण मूळ न्हाणेयाची आइति करीति।' - दृपा ७४. [ त. केळवन्]

**केळवण** न. काळजी; काळजीपूर्वक सांभाळणे. [ राजा.]

**केळवणी** स्त्री. प्रियकरीण.

**केळ(ळा)वणे** १. केळवण करणे; गडगनेर करणे : 'कन्या नेली निज मंडपासी। हृषीकेशी केळवला।' - एरुस्व १४.५१; 'केळावला वर असे शिशुपाळ राजा।' - अक कृष्णकौतुक ३०. २. वाङ्‌निश्चय करणे. अक्रि. (ल.) सजणे; नटणे; शोभिवंत दिसणे; मिरवणे : 'भीमाकरी जे केळवली। गदा नोवरी सगुणाथिली।' - मुसभा १५.११२.

**केळवणे** फसला जाणे.

**केळवत्तर निरी** परवंट्याची सर्वात वरची निरी : 'केळवत्तर निरी झळकैली।' - शिव ४२.

**केळवली** स्त्री. पिकलेल्या केळ्यांपासून तयार करण्यात येणारे एक पक्वान्न.

**केळ(ळा)वली** वि. स्त्री. १. केळवलेली, केळवण झालेली नवरी : 'नातरी केळवली नोवरी।' - ज्ञा १३.५५२. २. (ल.) सुखी स्त्री.

**केळवंड-डी, केळावली** स्त्री. केळ्यांचा घड, लोंगर; त्यांच्या देठांचा झुबका : 'बारा महिने नेहमी केळवंडी पिकत.' - पाव्ह ११.

**केळवा** पहा : **केळंबा, केळंभा** (को.)

**केळवाण** पहा : **केळवण**. शुभ समारंभाच्या आधीची जेवणावळ: 'लोणवाण केळवाण मूळ न्हाणेयाची आईती करीति :' - दृपा ७४.

**केळंबा-भा** पु. १. केळीचे पोर; पासंबा; नवीन फुटलेला कोंब; केळीचे रोप. (क्रि. फुटणे.) २. रानकेळीचा पोगा; पोगाडा; काल.

**केळा** पु. कऱ्हा; मडके; मातीची घागर. [ सं. कलश ]

**केळा** पु. बंदुकीची दारू ठेवण्याची पिशवी.

**केळांबा, केळ्या आंबा** पु. १. आंब्याची एक जात. या झाडाला केळीच्या फळासारखे लांबट फळ येते. २. या झाडाचे फळ.

**केळी** स्त्री. जोंधळ्याची-ज्वारीची एक जात.

**केळी** स्त्री. केळीचे झाड. पहा : **केळ**

**केळीकदंब** स्त्री. कदंबाची एक जात.

**केळीक्रीडा** स्त्री. १. परमेश्वरावताराने जड वस्तूशी केलेली क्रीडा : 'या श्री प्रभूचीया केळीक्रीडा' - लीचपू १६६. २. शृंगारक्रीडा : 'श्रीकृष्णचक्रवर्ति केळीक्रीडा करीति' - श्रीकृष्णच २८.

**केळीचा कांदा** केळीचा गड्डा. हा वातनाशक व स्त्रियांच्या प्रदर रोगावर औषधी आहे.

**केळे** न. अर्धवट पिकलेली, गाभुळलेली चिंच. (कु.)

**केळ्याचा हलवा** राजोळी केळ्यांपासून तयार केलेला एक गोड पदार्थ.

**कॅकरे** न. फावडे; खोरे; केगरे. (राजा.)

**केंकावणे** पहा : **केकटणे** : '(कुत्रा) दुःखाने शब्द करतो त्यास केंकावणे म्हणतात.' - मराठी ३ रे पु (१८७३) पृ. १२१. [ध्व.]

**केंजणे** अक्रि. विनवणे; 'हां जी हां जी करणे.' - (तंजा.)

**केंजळ** पहा : **किंजळ** १.

**केंड** न. हरिकातील फोल; धान्यावरील आवरण.

**केंड** पु. निकृष्ट माशाची एक जात. हा मासा वाटोळा असतो.

**केंड** पु. १. जळालेल्या गवऱ्यांचा ढीग. २. ज्वाळा. (गो.) [ क.केंड = जळता निखारा. ]

**केंड** पु. कुत्र्याच्या ओरडण्याचा आवाज.

**केंडणी** स्त्री. अवहेलना.

**केंडणे** उक्रि. १. अडवणे; रोधणे; अडथळा करणे. २. (सर्व अर्थी) कोंडणे. उदा. अडवून ठेवणे, बांधून टाकणे, खिळून ठेवणे. ३. खुंटणे; बरोबर वाढ न होणे. (व.) [ क. केडिसु, केडु ]

**केंडणे** उक्रि १. दोषारोप ठेवणे; दूषण देणे; तुच्छ लेखणे; टोचून बोलणे : 'कोणाही केंडावें हा आम्हां अधर्म।' - तुगा ४२४५. २. धुडकावून देणे; हिडीसफिडीस करणे; अव्हेर करणे; लाथाडणे : 'जरि केंडिला तरी हिरा स्तविलाचि शिरीं चढे न शिरगोळा।' - मोआदि २७.४४.

**केंडशी** स्त्री. बुरा; बुरशी.

**केंडावणे** अक्रि. वेडावणे; खट्टू करणे.

**केंडूस** वि. बुरसलेले; केंडशी आलेले.

**केंडूसणे** अक्रि. बुरसणे.

**केंदरावणे** अक्रि. वेडावणे. (कु.)

**केंदाळ** न. पाण्यात वाढणारी एक वनस्पती; एक प्रकारचे गवत. (कर.)

**केंद्र** न. (शाप.) १. दीर्घवर्तुळातील ज्या दोन बिंदूंपासून परीघावरील कोणत्याही बिंदूपर्यंत अंतरांची बेरीज सारखी येते अशा बिंदूंपैकी प्रत्येक. २. वर्तुळाचा मध्यबिंदू; ३. नाभी. ४. (ज्यो.) ग्रहाच्या कक्षेच्या प्रथमबिंदूपासून त्याचे चवथ्या, सातव्या अथवा दहाव्या अंशापर्यंतचे अंतर. ५. समीकरणविषय. ६. मध्यवर्ती महत्त्वाचा भाग.

**केंद्र** न. भारतीय घटनेनुसार सर्व भारताचे मिळून असणारे एक मध्यवर्ती सरकार. [ सं. ]

**केंद्रक** न. केंद्रस्थान; कोणत्याही वस्तूचा मध्यभाग; विशेषतः अणूचे केंद्रस्थान; अणुगर्भ. [ सं. ]

**केंद्रक द्रव्य** पेशींच्या केंद्रामध्ये असलेले एकजातीय पेशीद्रव्य. [ सं. ]

**केंद्रकील** पु. हलणाऱ्या भागाचा आस ज्यात बसवलेला असतो तो भाग.

**केंद्रगामी** वि. वेगवेगळ्या ठिकाणांहून एका बिंदूकडे येणारा. [ सं. ]

**केंद्रच्युति-ती** स्त्री. (ज्यो.) केंद्रापासूनचे अंतर; दीर्घवर्तुळाच्या मध्यापासून एका केंद्राच्या अंतराला बृहदक्षाच्या अर्ध्याने भागले असता येणारे गुणोत्तर. [ सं. ]

**केंद्रबिंदू** पु. १. मध्यबिंदू. २. ज्या ठिकाणी उद्योगधंदे, व्यापार, संस्कृती, शिक्षण इ. गोष्टी प्रामुख्याने एकवटल्या आहेत असे ठिकाण : 'मुंबई शहर हे उद्योगधंद्यांचा केंद्रबिंदू आहे.' - खाअ ९१. [ सं. ]

**केंद्रयोजन** न. (स्था.) सिमेंट काँक्रिटची घरे बांधताना खांब, तुळया व जमिनी यांसाठी तयार केलेले लाकडी साचे. [ सं. ]

**केंद्रशासन - सरकार** न. (राज्य.) कोणत्याही स्वतंत्र देशातील राज्यशासन-व्यवस्थेमधील मध्यवर्ती सरकार; भारताच्या संघ राज्यात केंद्रस्थानी असलेले सरकार. अनेक राज्ये किंवा स्वायत्त घटक असणाऱ्या देशातील विशेष अधिकार असलेली मध्यवर्ती शासनव्यवस्था.

**केंद्रशासित** वि. केंद्राच्या प्रत्यक्ष प्रशासनाखालील (प्रदेश); ज्याला स्वायत्त राज्याचा दर्जा नाही असा (प्रदेश). [ सं. ]

**केंद्रावरण** न. केंद्राभोवती असलेले आच्छादक द्रव्य.

**केंद्रांकनी** स्त्री. (यंत्र.) धातूवर अथवा लाकडावर बिंदूत्मक ठोका देण्यासाठी वापरात येणारा कठिणाग्र दांडा.

**केंद्रित** वि. केंद्राला मिळालेला; एकत्र आलेला. (वा.) **० करणे** - (मन) स्थिर करणे. [ सं. ]

**केंद्रीकरण-भवन** न. १. एकाच मध्यवर्ती बिंदूकडे आकर्षिले जाणे. २. सर्व सत्ता एकाच ठिकाणी, एकाच व्यक्तीकडे येणे. एकवटणे. ३. एकीकरण; ऐक्य : 'लोकमताचे केंद्रीकरण करण्याकरिता राष्ट्रीय सभा आहे.' - लोटिकेले ३.९५. [ सं. ]

**केंद्रीकृत वाहतूक नियंत्रण** (यंत्र.) प्रत्येक चौकातील नियंत्रण एकमेकांशी संबंधित ठेवण्याची योजना.

**केंद्रीभूत** वि. एकाग्र; एकाच गोष्टींवर स्थिर झालेले : 'त्याचे विचार माधव ज्यूलियनच्या काव्यावर केंद्रीभूत झाले.' - ब्राह्मण ५६. [ सं.]

**केंद्रीय** वि. केंद्र सरकारातला; मध्यवर्ती. [ सं. ]

**केंद्रीय द्रव** पु. केंद्रस्थानीचा प्रवाही पदार्थ.

**केंद्रीय धमन्या** (वै.) सजीवांच्या शरीरात हृदयातून बाहेर पडून रक्तपुरवठा करणाऱ्या मुख्य धमन्या, रक्तवाहिन्या.

**केंद्रीय बधिरण** (वै.) केंद्रस्थानातून झालेले संमोहन.

**केंद्रीय वाचाघात** (वै.) मेंदूतील बोलण्याच्या केंद्रास धक्का बसल्याने बोलण्याची क्रिया थांबणे.

**केंद्रोत्सारक** वि. मध्यबिंदूपासून दूर जाणारे (किरण, शक्ती).

**केंद्रोत्सारगति-ती** स्त्री. केंद्रापासून दूर जाणारी किंवा एखाद्या पदार्थाला दूर नेणारी गती. [ सं. ]

**केंद्रोत्सारी** वि. केंद्रापासून दूर जाणारा. [ सं. ]

**केंधूळचा** क्रिवि. बऱ्याच वेळापासूनचा : 'केंधूळचा भात शिजून पडला.' - जैत १६.

**केंप-पू** वि. लाल (गो.). [ क. केंपू = लाल रंग ]

**केंबरे-री, केमरे-री, केंबू(मू)र** न. घुंघुरटे; चिलट. या एक जातीच्या माशा असून नेहमी डोळ्यांजवळ उडतात. त्यामुळे डोळे येतात. (को.)

**केंबळ, केमळ** न. १. भिंतीवर अथवा छपरावर लोंबणारी, होणारी कोळिष्टके, जाळी (धूर, धुरळ्यापासून). २. बायकी शिवी. ३. (ल.) खोकड, अशक्त, म्हातारी बाई.

**केंबळ-ळा-ळी, केमळ-ळा** पु. स्त्री. न. १. छपरावरचे जुने गवत; शाकार; नवीन शाकाराखाली केव्हा केव्हा हे घालतात. एका पावसानंतर कुजून निकामी होणारे घरावरील गवत किंवा पेंढा. २. उसाचा जुना पाला अगर खपलीचे जुने शाकार, काड. (माण.) ३. लाल रंगाचे गवत; तांबोळी; तांबेटी.

**केंबळगती, केंबळी** वि. कुजलेल्या पेंढ्यांचा; गवताने शाकारलेला : 'उकिरड्याला लागूनच एक केंबळगती छप्पार.' - रैत ७४.

**केंबळ्याघुडा-ड्या** वि. घुडा जातीचे भात.

**केंबूळ** स्त्री. निकामी पेंढा; शाकारायचे गवत : 'बायकांनी छपराची केंबूळ ओढली.' - आआशे १३०.

**केंवेळी** क्रिवि. केव्हाही : 'वाटा केंवेळी न वचती।' - ज्ञा ४.६०. [ सं. कियत् + वेला ]

**केंसार** पु. बगळ्याच्या जातीचा एक पक्षी. (गो.)

**कॅम्बोज** पु. (कृषी) सह्याद्री परिसरात सदाहरित जंगलात वाढणारा एक वृक्ष. [ इं. ]

**कॅरट** पु. १. हिरे वगैरे तोलण्याचे वजन, परिमाण. एक कॅरट = एक रती किंवा एक आणा. पूर्वी हा ३.३३ ग्रेन बरोबर असे, पण हल्ली ३.२ ग्रेनबरोबर मानतात. २. सोन्याच्या शुद्धतेचे परिमाण. [ इं. ]

**कॅरम** पु. टिकल्यांचा एक बैठा खेळ. [ इं. ]

**कॅरमबोर्ड** पु. टिकल्यांचा खेळ खेळण्याचा चार पॉकेट्सचा लाकडी बोर्ड.

**कॅरोटीन** न. भाजीपाल्यातून मिळणारे 'अ' जीवनसत्त्व. पालेभाज्या खाणाऱ्या प्राण्यांच्या शरीरात ह्याचे रूपांतर 'अ' जीवनसत्त्वात होते. गाजर, कोथिंबीर इ. मध्ये हे असते. [ इं. ]

**कॅलरी** स्त्री. उष्णतेचा एकम; उष्णतेचे एकक (युनिट). उष्णता मोजण्याचे माप. [ इं. ]

**कॅल्शिअम** न. (रसा.) एक धात्विक मूलद्रव्य.

**कॅल्सीमाला** स्त्री. (भूशा.) कल्शिअम जास्त प्रमाणात असणाऱ्या अग्निजन्य खडकांचा समूह.

**कॅसेट** स्त्री. १. एक्स रे फिल्मसाठी किंवा कोणत्याही छायाचित्रणाच्या फिल्मसाठी असलेले प्रकाशबंद धारकपात्र. २. ध्वनिफीत ठेवण्याची डबी; आवरण. [ इं. ]

**कँकर रोग** (कृषी) कागदी लिंबाच्या पानावर, कांद्यांवर तसेच फळांवर सूक्ष्म जंतूंमुळे पडणारे वाटोळे, बारीक, तपकिरी रंगाचे डाग.

**कँटन** पु. (भूगोल.) स्वित्झर्लंड व फ्रान्समधील लहान प्रादेशिक विभाग. ह्याच शब्दावरून लष्करी वसाहत या अर्थाचा कँटोनमेंट हा शब्द तयार झाला आहे. [इं.]

**कँडलशक्ती** स्त्री. प्रकाश मोजण्याची पट्टी. २. कँडलशक्ती म्हणजे एका मेणबत्तीचा पडणारा प्रकाश.

**कँडेला** स्त्री. प्रकाशशक्तीचे माप.

**कै. कैं** वि. कित्येक; अनेक.

क्रिवि. १. केव्हा; कधी. पहा : **कई** : 'आता कर्मठां कै वारी। मोक्षाची हे॥' - ज्ञा १८.६८. [सं. कदा]

**कै, कैं** कोठे : 'तरि मागिला जुंझी राणे। कै गेलें होते।' - शिव ९१५. [सं. क]

**कैक** वि. पुष्कळ; कित्येक. [सं. कतिपय + एक]

**कैकट-टा-ड** पहा : **कीकट** : 'आणि देख कैकट फटकाळा।' - यथादी १७.२३५.

वि. १. भयंकर; रानटी; वाईट; दरिद्री; किड्यांचा (देश). २. मगध देशासंबंधी. (मगधामध्ये म्लेंछांचे ठाणे असल्यामुळे तो धर्मकृत्याला अयोग्य असा मानला गेला आहे) : 'मग म्लेंच्छाचे वसौटे। दांगाणे हन कैकटे।' - ज्ञा १७.२९४. [सं. कीकट]

**कैकाट** न. कैकाडी लोकांचा समूह; एक जात.

**कैकाड** वि. भांडखोर.

**कैकाडी** पु. एका जातीचे नाव. त्या जातीतील माणूस. या जातीतील लोक बुरड्या, टोपल्या इ. विकून उदरनिर्वाह करतात. महाराष्ट्रात यांच्या चार पोटजाती आहेत. [सं. कीकट]

**कैकाडीण** स्त्री. १. कैकाड्याची, कैकाडी जातीची स्त्री : 'प्रथमचि मी तव दादा कैकाडीण झालें।' - भज ४०. २. कैदाशीण; भांडखोर स्त्री. ३. (प्रेमाने) गबाळ, केस पिंजारलेल्या मुलीला म्हणतात.

**कैकायी-ई** पहा : **कैकाडीण** : 'कैकायी कैकायी दुरील माझा देश।' - भज ४०.

**कैकाळ** पहा : **कळिकाळ** : 'कैकाळाचें धाक नाहीं अवघीं विघ्नें नीवारी।' - ऐपो.३५०.

**कैकेय** पु. इराणी लोक.

**कैकेयी, कैके** स्त्री. १. दशरथ राजाची पत्नी : 'कैकेयी आनंदली थोर।' - रावि ३.९५. २.(ल.) शिरजोर, दुष्ट, कजाग, हट्टी स्त्री. [सं. केकय]

**कैच** अ. कोठील? कोठून: 'तैसे हृदय प्रसन्न होये। तरि दुःख कैचें के आहे।' - ज्ञा २.३४०.

**कैचण** न. काडी कचरा; पाचोळा (विस्तव पेटवण्याकरिता); केरकचरा. पहा : **किलचण** (व. ना.)

**कैची** स्त्री. १. कातर. २. (वास्तु.) आधार देण्यासाठी एकमेकांना तिरपे दोन वासे जोडून केलेली रचना. ३. तुळया इ. घरावर चढविण्याकरिता दोन वाशांना दोरी बांधून केलेली कातरीसारखी रचना. ४. जास्त वजनाचे पदार्थ तोलण्याच्या काट्यासाठी लाकडाच्या तीन दांड्यांची केलेली तिकटी. ५. घराच्या आढ्याच्या खांबाचे लाकूड. ६. पेचप्रसंग : 'अशी ही कैची हाय.' - रैत १३२. [का.] (वा.) **कैचीत धरणे, पकडणे-** पेचात धरणे; अडचणीत गाठणे. **कैंचीत सापडणे -** सर्व बाजूंनी अडचणीत येणे; काय करावे ते न कळणे; एक नीट करायला जाता दुसरे बिघडणे : 'ताराबाई विलक्षण कैचीत सापडली होती.' - अजून १५.

**कैची** स्त्री. १. दारू भरलेल्या बाणांची जुडी; दारूच्या बाणांचा समुदाय : 'पन्नास हजार फौज सातशे कैची बाण।' - ऐपो २५५. २. थैली : 'समागमे शंभर उंट. बाणांच्या कैच्या' - भाब ९.

**कैची गुणाकार** (ग.) (अपूर्णांकाचे समीकरण सोडवताना) एका अपूर्णांकाच्या छेदाने दुसऱ्या अपूर्णांकाच्या अंशाला गुणण्याची क्रिया.

**कैछा** पु. हलवायाचे उपकरण. पहा : **करछा**

**कैत(द)क** स्त्री. फार जाड व लांब नळी असलेल्या बंदुकीचा एक प्रकार.

**कैतव** न. कपट; लुच्चेगिरी; लबाडी : 'त्याचे कसें कैतव साहसी गे।' - सारुह ७.१२५. [सं.]

**कैतान** क्रिवि. जोराने : 'ढोलं वाजत कैतान मध्यान रातीला.' - एहोरा २.१३५.

**कैताले** न. ताडाच्या झाडावर चढताना हातात् धरण्याकरिता घेतात ती दोरी. हिला एका बाजूला लाकडी मूठ व टोकाला पितळी कडी असते.

**कैताळ** न. करताळ; झांज.

**कैद** स्त्री. १. बंदी; नियंत्रण; बंधन; तुरुंगवास. २. शिस्त; कदर; अंमल; ताबा. ३. मर्यादा; नियंत्रण (सरकारचे धार्मिक, सामाजिक चालीरीतीचे). ४. निर्भत्सणे; धमकावणे; एकसारखे दोष पाहणे. (क्रि. करणे.) (को.)

वि. बंदिस्त; कैदेत पडलेला (चोर). [फा.]

**कैदकानू** स्त्री. १. सरकारी कायदे, हुकूम यांना संज्ञा. २. बंदोबस्त; अंमल : 'दिल्ली म्हणजे बादशाही तख्ताची जागा. तेथील अमर्यादा करून फौज दरवर्षी पाठवून कैदकानू तुम्ही आपली वसविली.' -पाब १५०. [फा.]

**कैदकाल-ळू** वि. निष्ठुर. (व.)

**कैदखाना** पु. बंदिशाळा; तुरुंग; कारागृह. [फा.]

**कैदखोर** वि. तिरसट; टोचून बोलणारा; काचात ठेवणारा; कमालीचा शिस्तप्रिय; नियम वगैरे कडकपणाने लागू करणारा. (को.) [फा.]

**कैददगा** पु. फसवणूक; फसवेगिरी : 'मग यास का कैददगा म्हणावा तरी इंग्रज हठऊन तंग करून बडोद्यास घालविले.' -मइसा १९.८४. [फा.]

**कैदवार** क्रिवि. शिस्तवार; हुकमानुसार; नम्रपणे; नियम पाळून शिस्तीने.

वि. शिस्तबद्ध; नियमित; व्यवस्थित : 'ब्राह्मणीराज्य कैदवार एकापेक्षां एक मसलती.' - ऐपो २३१.

**कैदा** स्त्री. नियमबंदी; शिस्त.

**कैदाशिणीचे कोडे** कधीही न सुटणारे कोडे.

**कैदाशी(सी)ण** स्त्री. कैकाडीण; कजाग, नाठाळ, भांडखोर स्त्री.

**कैदी** वि. १. बंदिवान; तुरुंगात असलेला. २. परतंत्र; ताब्यात असणारा.

३. कैदखोर; खट्याळ; खाष्ट; चिडखोर; तिरसट. (को.) [ फा. कैद]

**कैपख** पहा : **कैपक्ष** : 'ऐसें कां कैंपखें। बोलिलासी॥' - ज्ञा १७.३५.

**कैपत** स्त्री. एक प्रकारचा पितळी दिवा. पहा : **कैपंजी**

**कैपत** स्त्री. दुष्ट, खट्याळपणाची योजना; गुप्त कट; खोडसाळपणाचा कट, मसलत, कारस्थान. (क्रि. करणे, रचणे, काढणे, चालवणे, मांडणे.) [ फा. कैफियत ]

**कैपतखोर, कैपती** वि. दुष्ट प्रकारचे कारस्थान करणारा; कुभांडी; कपटी; कारस्थानी.

**कैप(फ)ती** पहा : **कैपत** : 'यास जो कोणी हाली कैफती व कथला करील तो दिवाणीचा गुन्हेगार.' - शिचसाखं २.२९४.

**कैपक्ष** पु. १. कैवार; पक्षपात : 'म्हणती एकाचा कैपक्ष करीं।' - ज्ञा ९.१६८. २. बाजू; पक्ष : 'विरक्तें वोढावा कैपक्ष। परमार्थाचा।' - दास २.९.१४. [ सं. ]

**कैपक्षी** वि. कैवारी : 'कैपक्षी रघुनाथ माझा।' - दावि ५३.

**कैपंजी** स्त्री. हाताने धरायची पणती. पहा : **कयपंजी** (गो.) [ क. कै = हात + पंजी = पणती ]

**कैफ** पु. १. धुंदी; उन्माद; गुंगी; नशा : 'इंग्रजी विद्येच्या अव्वल कैफात आमच्या विद्वानांनी सुधारणेच्या नव्या दिशा काढल्या.' - लोटिकेले ४.१८३. २. मादक अंमली पदार्थ, द्रव्य (भांग, गांजा इ.) ३. मादक गुण; झिंग आणण्याची शक्ती, प्रमाण. (क्रि. करणे, चढणे.).४. व्यंग; खोड. [ फा. ]

**कैफत** स्त्री. १. कलह; तंटा; भांडण : 'दरम्यानें रंभाजी नाईकवाडी कैफती करितो.' - पेद ३१.१७. २. तक्रार; अडथळा. [ फा. कफालत ]

**कैफियत, कैफ(फे)त, कैफयेत,** स्त्री. १. वर्णन; हकीगत; करिणा; लेखी जबानी; खटल्याचा तपशील. २. काम; खटला; उद्योग; व्यवहार; मुकदमा. ३. (कायदा) दावा लावल्यावर विरुद्ध पक्षाच्या दाव्याबद्दल जे लेखी म्हणणे कोर्टात दाखल करतात ते. ४. खरा दस्तऐवज, लेख; अधिकारपत्र; लेखी हुकूम. [ फा. कैफीयत ]

**कैफी** वि. १. मादक पदार्थांचे सेवन करणारा (माणूस); गांजेकस; दारूबाज. २. गुंगी आणणारे; मादक (पेय). [ फा. ]

**कैफीन** स्त्री. (वै.) त्वचेला उत्तेजन देणारे औषध.

**कैमर्थ्य** न. अनुपयुक्ततेचा, वैयर्थ्यतेचा, अनुचिततेचा दोष (वादविवादात, धंद्यात, कामात इ.) निरुपयोग. [ सं. किं + अर्थ = उपयोग ]

**कैमुतिकन्याय** पु. अर्थन्याय; एखादी दुष्कर गोष्ट करता येते तर सोपी गोष्ट होईलच होईल असा अर्थ असला म्हणजे त्याला म्हणतात. जसे : - कुऱ्हाडीने लाकूड तुटते, मग गवत सहजच तोडता येईल. [ सं.]

**कैरव, कैरविणी** न. स्त्री. चंद्रविकासी पांढरे कमळ : 'सार्थक पार्थ करी ती कैरविणी तो सुधांशु गौरविती' - नवनीत. [ सं.]

**कै(खै)रा** वि. १. कैरेडोळ्या; मांजऱ्या; घाऱ्या डोळ्याचा (घोडा). कैराडोळा असणे हे अशुभचिन्ह आहे. २. ज्याचे बुबुळ घारे आहे असा (डोळा). ३. घाऱ्या, करड्या रंगाचा : 'चितार भिंगारे खैरें। मोरें सेवरें आणि कैरें।' - हरि १.१९२ [हिं. ]

**कैरा** वि. १. तिरळा; चकणा (डोळा) : 'तारसें घुलें काणें कैरे' - दास ३.६.४२. २. चकणा डोळा असलेला. [ सं. केकर = तिरवा ]

**कैरी** स्त्री. १. कच्चा आंबा; लहान आंबा; कुयरी. २. कपाशीचे हिरवे बोंड. (ना.) (वा.) ० **पिकणे** - (मुलगी) वयात येणे : 'पुढे तिची कैरी पिकली.' - वासू ३२. [ तुल. का. काई = हिरवे, कच्चे + री ]

**कैल** न. शेतातील धान्याचे मान, माप ; वाटण्यापूर्वीची पिकाची मोजणी. पहा : **कैली** [ फा. ]

**कैलास** पु. कुबेर, शंकर यांचे निवासस्थान असलेला पर्वत. हा हिमालयात आहे. महादेवाचा लोक. (वा.) ० **येणे, मिळणे, उतरणे, प्राप्त होणे** - काही तरी मोठा लाभ होणे. **कैलासाला डोके लागणे** - आकाश ठेंगणे होणे; गर्वाने अतिशय फुगून जाणे. [ सं. ]

**कैलासवासी** वि. (मृत्यू पावलेल्या माणसाची कागदोपत्री विशेषतः तो शिवभक्त असल्यास - उल्लेख करताना योजतात.) परलोकवासी; मृत.

**कैली** वि. मापी आकार; खंडी, पायली, शेर इ. धान्ये वगैरे मोजण्याच्या प्रमाणदर्शक शब्दामागे हा शब्द लावतात : 'तांदूळ कैली कोठीमापें पाच मण' - मइसा १५.२२४. [ फा. कैल् = माप ]

**कैली** स्त्री. फुटक्या मडक्याचा तुकडा; खापर. (गो.) [का. केले = मडके]

**कैली कोठी** वजनी मापाने मोजलेले; खंडी पायली, शेर इ. धान्ये मोजण्याचा परिमाणदर्शक शब्द.

**कैली माप-पी** मापाने मोजून घ्यायचे परिमाण.

**कैवजा** क्रिवि. किती, अनेक प्रकारे : 'येथें आलियानें रुक्नुद्दौला यास वस्वास येईल म्हणोन कैवजा लिहिले.' - मईसा १.५३.

**कैवर्त, कैवर्तक** पु. १. कोळी; मासेमाऱ्या. २. भिस्ती; पाणक्या : 'किरात कैवर्तक दुष्ट भारी।' - वामन (नवनीत) १३६. [सं.]

**कैवल्य** न. १. सायुज्य मुक्ती; मोक्ष; जीवात्मा व परमात्मा यांचे ऐक्य : 'तें कैवल्य पर तत्त्वता। पातलें जगीं॥' - ज्ञा ३.१५१. २. केवळपणा; एकटेपणा : 'कैवल्य म्हणजे केवळपणा, एकटेपणा किंवा प्रकृतीशीं संयोग नसणें असा असून...' - गीर १६२. [ सं. ] (वा.) ० **वाटणे** - कौतुक वाटणे. (व.)

**कैवल्यदानी** पु. (मोक्ष देणारा) ईश्वर; गुरू; ईश्वराचें एक अभिधान : 'सुखानंद आनंद कैवल्यदानी।' - राम ३६.

**कैवल्यनिधान, कैवल्यधाम** न. १. मुक्तिसदन; मोक्ष : 'मुमुक्षूस कैवल्यधाम।' - यथादी १.४६. २. मोक्षाचे स्थान जो परमेश्वर तो : 'हुंबरती गाय तयांकडे कान। कैवल्यनिधान देउनि ठाके' - तुगा २४१. [ सं. ]

**कैवल्यपद** न. सायुज्य मुक्ती; कैवल्यधाम. [ सं. ] (वा.) ० **येणे, प्राप्त होणे**-अलभ्य लाभ होणे; फार चांगली गोष्ट मिळणे.

**कैवल्यरस** पु. मोक्षाचा आनंद. [ सं. ]

**कैवाड-डू** न. गुप्त कट; कारस्थान; हिकमत; मसलत; खोल विचार (विशेषतः दुष्टपणाचा); कुभांड; थोतांड. (क्रि. रचणे, घेणे, खाणे.): 'ज्या कर्मांचेनि कैवाडें। यश श्री उदंड जोडे।' - एभा २५.२२३. [सं. कैतव]

**कैवाड** न. पु. एका पक्षाचे समर्थन, कैवार, अभिमान. कैवारबद्दल योजतात : 'एकाच्या कैवाडें। उगवे बहुतांचें कोडे।' - तुगा २७४. [ क. कैवार]

**कैवाडा** पु. मदतनीस : 'तुम्ही यादव सर्व कपट। दैत्यवधा कैवाडे' - उह १४४०.

**कैवाडी** वि. १. धूर्त; शहाणा. २. गुप्त मसलती. ३. कैवारी.

**कैवार** पु. १. दयेमुळे केलेला पक्षपात; एखाद्याची बाजू घेऊन शेवटपर्यंत त्याला सांभाळून घेणे; साहाय्य, मदत करणे; पक्ष उचलणे; कड, बाजू घेणे. पहा : **कैवाड** (क्रि. घेणे, धरणे, करणे) : 'ते वेळीं आपुल्याचेनि कैवारें।' - ज्ञा ४.५१.

**कैवा(व)र** पु. न. १. वर्तुळ काढण्याचे साधन; २. वर्तुळ (कंपासाने काढलेले.) ३. परिघाची रेषा. ४. व्यास मापण्याचे साधन. [ क. ]

**कैवारिया, कैवारी** वि. कैवार घेणारा; साहाय्यकर्ता. पु. (ख्रि.) १. सत्याचा आत्मा. २. पवित्र आत्मा (त्रिविधैक्य देवांतील एक). संबोधक (नवा करार). 'मी न गेलों तर कैवारी तुम्हाकडे येणार नाही.' - योहा १६.१७.

**कैवाह** पु. अडचण : 'ते गुति कैवाड सोडवुनि' - नागाव शिला १.१५.

**कैसरचांदणी** स्त्री. घोड्याला होणाऱ्या चांदणी नावाच्या रोगाचा एक प्रकार. - अश्वप २.१०४.

**कैसा, कैसिआं-या** वि. क्रिवि. कोणत्या जातीचा; किती; कसा; कसला : 'तरि माझिया वैरिणी। तिआं कैसिआं।' - शिव ८१९. [ सं. कीदृश]

**कैसेन-नी** क्रिवि. कसे; कशाच्या योगाने; कशाने : 'तो देव कैसेनि म्हणावा।' - विपू ५.२५.

**कैंगटणे, कैंगटीला येणे** क्रि. मेटाकुटीला, जेरीला, जिकिरीला येणे : 'पोटात काय न्हाई. बैलं कैंगटून गेल्यात.' - गोता ४५. (कर.)

**कैंची-ची** वि. १. कोणता, २. कोठचा; कोठील; कसला : 'कैंचा धर्म कैंचे दान। कैंचा जप कैंचे ध्यान।' - दास २.५.११.

**कोइटारू** वि. कोइटाने शाकारलेले; कोइटाचे छप्पर असलेले. (को.)

**कोइनाथिले** वि. ज्याला दुसरे कोणी नाही असे; असहाय: 'भणौनि अनाथ : कोइनाथिले' - ज्ञाप्र ११११२. [ सं. कोऽपि न अस्ति ]

**कोइ(ई)ल** स्त्री. भिंगरी; हाताने फिरवायचा भोवरा.

**कोइंडा** पु. चाबकाचा लाकडी दांडा, मूठ. पहा : **कोयंडा** (माण.)

**कोई** स्त्री. आंब्याची बी; बाठी. पहा : **कोय**

**कोई** स्त्री. १. कोबीची भाजी. २. कमळ.

**कोईकमळ** न. पांढरे कमळ.

**कोई कोई** भीतीने फोडलेली किंकाळी; कुईकुई (क्रि. करणे, होणे). [ध्व.]

**कोईट** न. शाकारणीचे गवत. पहा : **कुईट** (को.)

**कोईन** स्त्री. नदीच्या प्रवाहात मासे पकडण्यासाठी बांबू, टाळे, दगड यांचा बांध घालून त्याला लावलेल्या टोपल्या. पहा : **खोईण**

**कोईल** स्त्री. विटीदांडू खेळताना जमिनीत खणतात ती खळगी; गल; गल्ली. (को.)

**कोईलडाव** पु. विटी मारण्याची पाळी; कोलण्याची पाळी.

**कोक, कोकशात्र** न. कामशास्त्र; रतिरहस्यशास्त्र. हा ग्रंथ कोक नावाच्या कवीने केल्यामुळे या ग्रंथाला कोकशास्त्र हे नाव पडले.

**कोक** पु. चक्रवाक पक्षी : 'मी कोक झालों निका।'-आसेतु २६. [ सं.]

**कोक** न. १. भोक; छिद्र; बीळ; (ना.) २. खोक; जखम. (गो.)

**कोक** पु. लड्डा (तोबा) चा खेळ; वर्तुळाकार बसलेल्या गड्यांच्या मागे नकळत लड्ड ठेवून खेळतात तो खेळ. (बे.) [ध्व.]

**कोक** न. १. कुबडा. २. कुबड; पोक. ३. (ल.) फुगीर उंचवटा; फुगा : 'बुचड्याचा आधीं झोंक, त्यामधीं ठेवी कोक नोक, झोकें भर पुरली' - प्रला १११ [ क. कोक्किकोकुं ]

**कोक** पु. दगडी कोळशातील धूर उण्णता देऊन काढून टाकल्यावर राहणारा भाग. [ इं. ]

**कोकटहोळी** स्त्री. होळीच्या आदल्या दिवशीची खेळातील होळी.

**कोकड, कोंकड** स्त्री. न. पहा : **खोकड**

**कोकड** वि. वाकडा; वाकलेला; कुबडा. (व.)

**कोकण** न. महाराष्ट्र राज्याच्या समुद्र किनाऱ्यालगतचा भाग; सह्याद्रीच्या पश्चिमेकडील प्रदेश. (वा.) **बैल कोकणात जाणे** - १. शक्तिहीन होणे. २. वयपरत्वे दुर्बल, अशक्त होणे. ३. नपुंसक होणे. [ सं. कोंकण]

**कोकणघार** स्त्री. करकोची पक्षीण.

**कोकणदुधी** पु. दुध्या भोपळा. (गो.)

**कोकणपट्टी** स्त्री. कोकणकिनारा. पहा : **कोकण**

**कोकणस्थी** वि. १. चित्पावन ब्राह्मण जातीसंबंधी; कोकणस्थांचा (बेत, व्यवहार, कारभार इ.). २. (ल.) काटकसरीचा; बेतास बात; कंजूषपणाचा; चिक्कूपणाचा.

**कोकणा-णी** पु. खानदेशात व नाशिक जिल्ह्याच्या उत्तरेला ज्यांची वस्ती आहे अशी एक जात व त्या जातीचा मनुष्य.

**कोकणी-ण्या** वि. १. कोकणसंबंधी. २. कोकणचा राहणारा.

**कोकणे** अक्रि. १. ओरडणे; भुंकणे (कुत्रा). २. आरवणे (कोंबडा); ओरडणे; किंचाळणे (पोपट, कावळा) : 'कोंबडा कोंकतो, पैसा मागतो।' - भिकारी गाणे. [ ध्व. ]

**कोकणे** न. एका रानवेलीचे फळ.

**कोक(ग)दम्या येणे** अक्रि. श्रमामुळे बेजार होणे; कासावीस होणे; थकून जाणे; दमछाक होणे : 'घोडी कोकदम्याला आली होती.' - फकिरा १७४.

**कोकनद** न. तांबडे कमळ : 'नेणति हे परलोक, विलोक न कोकनदासम पाणिपदें।' - आविश्वा २२. [ सं. ]

**कोकबाण** पु. लढाईतील आगीच्या बाणाचा एक प्रकार. [ कहकबाण ]

**कोकमार्ग** पु. कोकशास्त्र पाळणारा एक पंथ.

**कोकर** न. माशांची एक जात; विशिष्ट मासळी. हे मासे दिवाळीच्या सुमाराला पकडतात.

**कोकर** स्त्री. गळून पडणाऱ्या कच्च्या लवंगा : 'ह्या कच्च्या गळतीला कोकर म्हणतात.' - के ४.४.३९.

**कोकरचाल** स्त्री. कोकरासारखी चाल, गती (घोड्याला योजतात.) पहा : **कुकरचाल**

**कोकरा-रू** पु. करडू; मेंढीचे (नर जातीचे) पिलू.

**कोकलणे** अक्रि. १. ओरडणे; भोकाड पसरणे; उपाय फसल्यामुळे हाका मारीत बसणे. २. तक्रार करणे; एखाद्याच्या नावाने हाका मारणे. उक्रि. तुडविणे; बदडणे; रडायला; कोको करायला लावणे. [ ध्व. सं. को + कल् ]

**कोकशाळा** स्त्री. नाटकशाळा : 'कोकशाला नाटकशाला दासी यांचा घ्याल मुका।' - राला ८५.

**कोकस्थान** न. वैराण जंगली मुलूख; जेथे केवळ पारवे घुमतात असे स्थान : 'डोंगर धामणा संमत हवेली त्याचे माथा जमीन वैराण, कोकस्थान आहे.' - मासपमा १६०.

**कोकंब-बी, कोकम** पु. रातंबा; आमसोलाचे झाड. हे झाड कोकणात सर्वत्र आढळते.

**कोकंबेल** न. कोकंबाच्या बियांचे तेल. हे पोटातही घेतात व अंगाला बाहेरून चोळतात.

**कोका** पु. मोना; केळीच्या गाभ्यातून केळफुलासह बाहेर पडणारा कोंब; केळफूल; पोफळीचा मोहोर अथवा फुले ज्यातून बाहेर पडतात तो भाग. पोफळीच्या कोक्यांपासून कागद तयार करतात. [ सं. कोक ]

**कोका** पु. कानफाटे गोसावी वाजवतात ती किनरी; लहान एकतारी.

**कोका** पु. बगळा; कंक.

**कोका** पु. एक प्रकारचा शिंपीतील प्राणी; कालव : 'बळीने बघता बघता एक कोका घेतला.' - शेलूक ९६.

**कोका** पु. एक झाड. याच्या एकंदर पन्नास जाती असून हिंदुस्थानात त्यांपैकी सहा आढळतात.

**कोका-की** स्त्री. १. पागोट्याच्या वरील चोच (कोकी). पागोट्याच्या (पगडीच्या) कमळाच्या वर असलेला हा भाग कागदाचा करून त्यावर कापडी पट्ट्या शिवतात. २. पागोटे, इरले इत्यादीवरील वाकडे टोक, चोच, राघू, कोंब : 'मी एक पुणेरी, लाल, ब्राह्मणी कोकीची, जरीच्या झिरमिळ्यांची पगडी विकत घेतो.' - माआ २२४.
पु. १. आतला भाग : 'कानाच्या कोक्यात शिरलेल्या गोमाशा झाडू लागलं.' - गागो १०३.२.[ फा. कूका ] (वा.) ० **करणे**- गुंडाळणे; एकत्र करणे : 'कसंतरी कोका करून झोपलो.' - उअं ८.

**कोका** पु. चवडा : 'पायाचं कोकं पाण्यात ठेवताच तिला पाणी गार गार लागलं.' - खळाळ ३.

**कोका** पु. कंदिलाची काच : 'कुणाकडे कंदील होता पण त्याचा कोका फुटला होता.' - जांदि १७.

**कोकाट** पु. १. कोळीण पक्ष्याचा शब्द. २. (न.) कलकलाट; गोंगाट; गलका. [ ध्व. ]

**कोकाटी** स्त्री. हस्तिदंताचा भोवरा. याला भोक असल्याने याचा गुंगुं असा आवाज होतो. पहा : **कोकाट**

**कोकाटी** स्त्री. एक पक्षी : 'कोकाट्या नळावर भांडणाऱ्या बायकांसारखा कालवा करीत होत्या.' - व्यंमाक ९०. पहा : **कोकाट**

**कोकाटी** स्त्री. केळफुलांच्या पाऱ्यांवरील आच्छादन.

**कोकाट्या** वि. कोकाट करण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा; गोंगाट करणारा. [ ध्व. ]

**कोकात्री** पु. कोंबड्यासारखा तांबूस रंगाच्या एक पक्षी. मांसाहारी लोक याचे मांस खातात. (जुन्नरी). [ ध्व. ]

**कोकादर, कोंकतारी** स्त्री. पाणकोंबडी. (गो.) [ ध्व. ]

**कोकापकड** स्त्री. (मल्लखांब) मल्लखांबाला दोन्ही बाजूंनी तळहातांनी धरून मारायची उडी.

**कोकाबेरी** नीलकमल.

**कोकारणी** स्त्री. कोंबड्याची आरव. (गो.) [ ध्व. ]

**कोकारा** पु. आरोळी; मोठ्याने मारलेली हाक. (राजा.)

**कोकारा** पु. लहान मासा. (गो.)

**कोकावणे** अक्रि. १. सूं गुं इ. आवाज होणे (बाण, भोवरा इत्यादिकांचा). २. भुंकणे; केकाटणे (कुत्र्याचे). ३. केकावणे (केका) : 'मोर कोकावती ते।' - अक रसकल्लोळ. ४. कोकलणे : 'पोटात कावळे कोकावयास लागले.' - पलको १३. [ ध्व. ]

**कोकिल-ला-ळ, कोकीळ** पु. स्त्री. मंजूळ शब्द करणारा एक पक्षी. ह्याचा आवाज फार मधुर असतो. मादी आपली अंडी कावळ्याच्या घरट्यात उबवून घेते अशा समजुतीवरून याला संस्कृतात परभृत, अन्यभृत म्हणतात. कोकिल वसंत ऋतूतच फक्त गातो.

**कोकिलाव्रत** न. अधिक आषाढात कोकिळेचा शब्द ऐकल्यानंतर जेवण्याचे बायकांचे एक व्रत.

**कोकिलासन** न. (मल्लखांब) मल्लखांबाच्या तोंडावर पुढे वाकून बसणे.

**कोकिळ कोंबडा** स्काउटच्या मुलांचा एक खेळ.

**कोकीदार** वि. कोकी असलेले (इरले, पागोटे).पहा : **कोका**

**कोकी** स्त्री. डोळ्यातील फूल.

**कोके** न. दमा. (गो.) [ ध्व. ]

**कोकेन** न. गुंगी आणणारा मादक पदार्थ; बधिरीकरणासाठी वापरले जाणारे औषध.

**कोको** पु. (वन.) एक प्रकारचे झाड. ह्याच्या शेंगातील बियांपासून एक उत्तेजक स्वादिष्ट पेय बनवले जाते. [ पोर्तु. ]

**कोगव** स्त्री. कोकम : 'देवळाचे दारी कोगवीवर कोगवां दाटली वो दाटली वो।' - एहोरा ३२.

**कोगी** स्त्री. खड्गाचा एक प्रकार. [इं.]

**कोगूळ** स्त्री. कोकिळ. (कु.गो.)

**कोच** पु. चार चाकी घोडागाडी; बग्गी; [इं.]

**कोच** पु. आंबेहळदीचा कांदा, गड्डा. (को.)

**कोच** पु. आरामात ऐसपैस बसता येईल अशी, पाठीशी व खाली मऊ गादी असलेली कमी उंचीची खुर्ची, ऐषारामी बैठक, आसन; बसावयाचा पलंग. [इं.]

**कोच** स्त्री. १. खोक; एखाद्या अणकुचीदार पदार्थाने झालेली जखम; खोच. २. अणकुचीदार टोक. [हिं. कोचना]

**कोच** स्त्री. पगडी, इरले इत्यादींचे टोक. पहा : **कोका-की**

**कोच** न. जांभ्या दगडात कातळावर उगवणारे व काट्याप्रमाणे टोचणारे बारीक गवत, वेल. [सं. कूर्च]

**कोचक (का) ई** स्त्री. मोठे व जून झालेले आवळे उकडून तयार करण्यात येणाऱ्या वड्या. [क. कोच्चु = तुकडे करणे, पूड, चूर्ण + काई = फळ]

**कोचकणे** स्त्री. टोचणे; डिवचणे : 'आपल्या कल्पनेने निर्माण केलेल्या सोज्वळ कुटुंबवत्सल माणसाला त्याने कोचकले.' - काजवा १४१.

**कोचका** पु. कोपरा. (व.)

**कोचकार्द** आवळकाठी.

**कोचीकंदर** न. १. अडगळीची जागा. घाणेरड्या गर्दीच्या जागेबद्दल योजतात. (को.) २. गळाठा; अडगळ. ३. अडचणीची, संकोचाची अवस्था, स्थिती, गर्दी, गोंधळ असणे.

**कोचकी** स्त्री. १. (वास्तु.) कोपरा; कोन (घरातील, खोलीचा इ.). २. दिखाऊ चांदई.

**कोचकी** स्त्री. १. पहा : **कोकी १,** २. पागोटे : 'मुदुतर थिरमे त्या कोचक्या कोरदारा।' - सारूह ३.४०.

**कोचकीदार** स्त्री. कोचकी असलेले (पागोटे इ.).

**कोचकील** वि. अरुंद, कोंदट, चिंचोळी (जागा).

**कोचट, कोचा** वि. संकुचित; कोंदट; अपुरी (खोली); अरुंद; लहान तोंडाचे (भांडे, वस्तू). [सं. कुच्]

**कोचणे** उक्रि १. कुरतडणे; तोडणे (नखे, दात, चोच इत्यादींनी). (राजा.) २. जोराने दाबणे. (व.) ३. खिळ्यांनी बोचणे (बे.). ४. भाजी चिरणे. (बे.) [क. कोच्चु = कापणे]

**कोचणे** स्त्री. भोवऱ्याच्या खेळात आपला भोवरा दुसऱ्याच्या फिरत्या भोवऱ्यावर मारणे.

**कोचम (मी) न, कोचमि (मे) ल** पु. गाडीवान; गाडीहाक्या; सारथी; सूत : 'कोचमीन (महाराजांचा) मराठे जातीचा ... होता.' - विक्षिप्त २. ११८. [इं.]

**कोचर** स्त्री. आखूड शिंगाची म्हैस. (व.)

**कोचवण** स्त्री. जाच; तगादा; तसदी; टोचणी : 'मजला देणेदाराची कोचवण किती आहे.' - होकै २४.

**कोचवणी** स्त्री. काच; अडचण : 'तुम्ही खर्चाचे कोचवणीत येऊन डेऱ्याचे दांडे होतीलना ?' - इसंहोकै १७.

**कोच (चा) ळा-ळे** पु. न. पक्ष्याचे घरटे. (व. ना.) पहा : **कोंचाळे**

**कोचंबणे** अक्रि. कुचंबणा होणे; संकोचणे; विरमणे; लाजणे. (व.ना.)

**कोचा** स्त्री. हळद.

**कोचाळे** न. १. वर्तुळ; कोंडाळे (बसलेल्या लोकांचे) (क्रि. घालणे, घालून बसणे, उठणे, मोडणे, काढणे.) २. भोवऱ्यासारखे एक खेळणे.

**कोचाळे** पहा : **कचोळे**

**कोचिन (नी) ल** पु. एक किडा. हा मूळचा मेक्सिको व पेरू या देशातील असून त्याची उपजीविका मुख्यत: फड्या निवडुंगावर होते. याच्या रूपेरी व काळा अशा दोन जाती आहेत. यापासून किरमिजी रंग करतात.

**कोचिंदर** न. घरातील अगदी लहान जागा; अडचणीची जागा; ज्या जागेत वस्तू अस्ताव्यस्त पडल्यामुळे अडचण झाली आहे अशी जागा. पहा : **कुचिंदर**

**कोचिंदा** पु. एक वनस्पती, हिला पाती येतात. त्यांची भाजी (पोटातील) जंतुनाशक आहे.

**कोची** स्त्री. अणकुची; टोक. पहा : **कोच**

**कोची** स्त्री. काचोळी; चोळी. (नंद भाषा) (कर.)

**कोचोक** पु. केर; उकिरडा. (गो.)

**कोच्या** पु. ठोसा; गुद्दा; हुर्री. (वा.) ० **होणे** - फजिती होणे.

**कोजळणे** अक्रि. १. काजळीने आच्छादले जाणे; काळ्या किटाने भरणे. (नारळ, फळ इ.) २. काजळी धरणे (दिव्याच्या वातीने).

**कोजळी** स्त्री. १. जळत्या वातीचा शेष; कोळी; काजळी. २. जळणाऱ्या पदार्थाची ठिणगी. ३. राख (गवत, काटक्या इत्यादींची). ४. धुरामुळे होणारे जाळे, जळमट (छपरावर वगैरे). ५. (ल.) चिंता; हृदयरोग. [सं. कज्जल]

**कोजागर-री** पु. स्त्री. आश्विनी पोर्णिमा. [सं.]

**कोट** पु. १. किल्ला; गढी : 'किल्ले गड कोट। दवलत खानाच्या हवाला।' - ऐपो १३. २. गावाचा अगर किल्ल्याचा तट. ३. सैन्याचा व्यूह : 'कोट बांधून पिंजरा केला।' - ऐपो १३. ४. (पत्ते) हुकूम बोललेल्या भिडूने स्वत:च ओळीने सात (हात) करणे. (क्रि. देणे, करणे.)

**कोट** पु. १. सदऱ्याच्या वरून घालण्यासाठी थोड्या जाड कापडाचा शिवलेला (पोशाखाचा) एक प्रकार. २. आच्छादन (पीकपाणी). [इं.]

**कोट** पहा : **कोटी**

**कोटकल्याण** न. १. भरपूर, पूर्ण कल्याण; पराकाष्ठेचा लाभ : 'असें केल्यास माझें कोटकल्याण करण्याविषयीं जी तिची इच्छा आहे ती कमी होईल.' - पाव्ह ८८. २. पराकाष्ठेची तृप्तता; समृद्धी.

**कोट (टि) गा** वि. कोडगा; निर्लज्ज; निर्ढावलेला : 'सबळा प्रति जो कोटगा।' - ग्रंथराज ३.१०७. [क. कोट्टि = निर्लज्ज]

**कोटगा** पु. १. दोरीने फिरवायचा भोवरा. २. वाघे लोकांचा कोटंबा.

**कोटागिरी** स्त्री. वेढा : 'असता खेड्या महार (तर) फोडता दळव्याची कोटगिरी.' - ऐपो ६९.

**कोट घुंघट** (पुरा.) मुख्य दुर्गद्वाराच्या भिंतीत ठेवले जात असलेले सहायक दुर्गद्वार.

**कोटचक्र** न. किल्ला हाती येईल की नाही हे पाहण्याचे कागदावर काढलेले यंत्र : 'कोटचक्र घालून पहावे.' - ऐलेसं १५२६.

**कोटर** क्र. १ (वन.) वनस्पतीतील किंवा तिच्या लहानमोठ्या अवयवांतील पोकळी; झाडाची ढोली : 'लोटेतो तरुकोंटरी लपुनियां कोठें तरीही

रहा ।' - मराठी ६ वे पुस्तक पृ. १२४ (१८९६). २. विवर; बीळ : 'कूपामाझारि उदका जवळी कोटर असे.' - पंचो ११९.५.

**कोटर कुऱ्हाड** (पुरा.) मध्ये पोकळी असलेली कुऱ्हाड. [सं.]

**कोटरान** न. निर्जन प्रदेश; भयाण रान. (ना.)

**कोटव** पु. एक लहान मासा. (को.)

**कोटसा** वि. कोठेसा; कोणत्या जागी.

**कोटं (टुं) बा** पु. १. खंडोबाच्या वाघ्यांचे लाकडी चौकोनी भिक्षापात्र. खंडोबाचे भक्त ह्याची पूजा करतात : 'हृदय कोटंबा सांगातें । घोळ वाजवूं अनुहातें।' - तुगा ४४४६. २. लाकडी डोणी; कोटंबी; काथवट (लांबट, चौकोनी व खोलगट); जनावरांना चूण, भूस वगैरे खाणे घालण्याचे लाकडी पात्र.

**कोटंबी** स्त्री. लहान कोटंबा, डोणी, काथवट.

**कोटंबे** न. कोळंबे; रहाटगाडग्याचे पाणी ज्या डोणग्यात पडते ते डोणगे.

**कोटा** पु. वाटून द्यायच्या पदार्थाचे प्रमाण. [इं.]

**कोटार** क्रिवि. भलतीकडे : 'आरब व सिद्दी पुढे होऊन कोटार गेले.' - ऐकोपुर.

**कोटि-टी संख्या** वि. शंभर लक्ष; एक करोड; कोट; असंख्य : 'जागजागीं आहेत वीर कोटी' - र १०. [सं.] (वा.) **कोटिध्वज लावणे, उभारणे** - अफाट संपत्तीचा देखावा करणे; कोट्यधीश, नवकोट नारायण होणे.

**कोटि-टी** स्त्री. १. (वन.) सजीवांच्या वर्गीकरणात प्राणी किंवा वनस्पती यापैकी कोणत्याही एका प्रकारातील जातीचा सर्वात मोठा संच दाखवणारी संज्ञा; विशिष्ट वर्ग : 'रजोगुणाची कोटी । लोभिष्ट पोटी स्त्री पुत्रां ।' - एभा १३.४५; भेद. २. जात. ३. दर्जा; प्रत.

**कोटि-टी** स्त्री. १. (वादविवादात) निरुत्तर करण्यासारखे खुबीदार उत्तर; भाषणाची मोठ्या युक्तीने रचना; खुबीचे भाषण. २. शब्दांत, वाक्यांत काही फरक करून किंवा एकाच उच्चाराचे पण भिन्न अर्थाचे शब्द घेऊन, अर्थाच्या गमती करून अलंकारचमत्कार दाखविणे. हे एक भाषा कौशल्य समजले जाते. पहा : **श्लेष** : 'अहो विद्वत्ताप्रचुर कोट्यांची गुंतवळें गेली दहापांच घशांत.' - नाकु ३.३४.

**कोटि-टी** स्त्री. काटकोन त्रिकोणाची उभी बाजू; लंब रेषा; कर्णाखेरीज एक बाजू. [सं.]

**कोटि-टी** स्त्री. थोर योग्यता, दर्जा; श्रेष्ठपणा; शौर्य, सद्गुण, विद्या यांमध्ये अतिशय प्रवीण असलेल्यासाठी सन्मानदर्शक संज्ञा. [सं.]

**कोटि-टी** स्त्री. धनुष्याचे टोक; चंद्रकलेची टोके. [सं.]

**कोटि-टी** स्त्री. कल्पना; विचारसरणी : 'परंतु ही कोटी इतिहासदृष्ट्या टिकेल असे आम्हांस वाटत नाही.' - लोटिकेले ४.११६. [सं.]

**कोटि-टी** स्त्री. पराकाष्ठा : कळस : उच्च शिखर. जसे : - पराकोटी. [ सं.] (वा.) ० **उभवणे** - ध्वज उभारणे : 'तरी यशाची उभऊनि कोटी ।' - नव १९.१७७.

**कोटिक्रम** पु. १. युक्तिवाद; शक्कल; खुबीदार विवेचनपद्धती; तर्कवाद; श्लेषात्मक भाषण : 'हाच कोटिक्रम स्वीकारलेला आहे.' - गीर १५७. (क्रि. करणे) २. पेच. [सं.] (वा.) ० **लढवणे** - तोड काढणे; उपाय योजना करणे; मध्यमार्ग काढणे.

**कोटिज्या** स्त्री. (त्रिकोणमिती) कोभुजज्या. काटकोन त्रिकोणातील लघुकोनाच्या लगतची बाजू व कर्ण यांचे गुणोत्तर. कोटिज्या आणि भुजज्या यांच्या वर्गांची बेरीज १ भरते. [सं.]

**कोटिभोज** वि. कोट्याधीश : 'धनेश्वर नामें कोणियेक ब्राह्मण। तो वस्तुवित्तेसि संपूर्ण। कोटिभोज पै।' - कथा २.१५.६

**कोटिशः-शा** वि. कोट्यावधी. [सं.]

**कोटिस्पर्शज्या** स्त्री. (त्रिकोणमिती) कोटिज्या व भुजज्या यांचे गुणोत्तर; कोस्पर्शज्या. [सं.]

**कोटी** स्त्री. टोळी; जमाव; कोठा : 'दोहींकडे राऊत व माणसाची कोटी व मध्ये समुद्रतटाकासही पाईची माणसे ठेवून खबरदार राहिलो.' - पेद ३४.१५९.

**कोटीर** पु. डोक्यावरचा मुकुट : 'मस्तकीं कोटीर झळकता।' - जै १४.५६. [ सं. कोटिर, कोटर]

**कोटी सहसंबंध** दर्जाप्रमाणे एकमेकांशी असलेला संबंध.

**कोटे** न. १. पक्ष्याचे घरटे; कोठे : 'पोटाखाली अंडी घेऊन कोट्यात बसलेल्या व्हल्यांनी आपल्या गोल डोळ्यांची उघडझाप केली.' - व्यंमाक ५४. २. रेशमी किड्यांचा कोशेटा. [सं. कोट्ट, कोट]

**कोट्य(ट्या)धीश** कि. नवकोट नारायण; श्रीमंत; करोडपती. [सं.]

**कोट्य(ट्या)वधी** वि. कोटीच्या मापाने मोजण्यासारखा; अपार; अगणित; अनंत. [सं.]

**कोट्यंश** वि. अत्यंत अल्प.

**कोट्यानकोटी** वि. अगणित; अतोनात : 'जळत हृदय माझें जन्म कोट्यानकोटी ।' - रामदास करुणाष्टक [ सं. कोटि + अनुकोटि ]

**कोठ** पु. १. किल्ला. २. किल्ल्याचा तट. पहा : **कोट.** ३. पहा : **कोठी** [ सं. कोष्ठ]

**कोठ** पु. १. मोठी व वाटोळी चकंदळे पडणारी रक्तपिती. २. गजकर्ण; नायटा. [ सं. कुष्ठ]

**कोठचा** वि. १. कोठल्या गावचा, ठिकाणाचा. पहा : **कुठचा.** २. कोणता, कसचा.

**कोठडी** स्त्री. १. घरातील खोली; (विशेषत:) सामान ठेवण्याची कोठी; दालन : 'हरिविजयग्रंथ भांडार। छत्तीस कोठड्यांचे परिकर ।' - हरि ३६.२१६. २. कपाट ; फडताळ. (व.) ३. तुरुंगाची कोठी.[सं. कोष्ठ]

**कोठणे** स्त्री. (प्र.) कोठून; कोणत्या ठिकाणाहून.

**कोठदार** वि. (चर्मकार.) विशिष्ट प्रकारचा मारवाडी जोडा. हा मारवाडी कुणबी घालतात.

**कोठनीस** पु. कोठावळा; कोठीवाला; कोठीवरील अधिकारी.

**कोठपर्यंत-पावेतो, कोठवर** क्रि.वि. कुठवर; कोणत्या ठिकाणापर्यंत; कोणत्या मुद्यापर्यंत; कोणत्या पल्ल्यापर्यंत; कोणत्या मजलेपर्यंत (स्थळ किंवा वेळ यासंबंधी).

**कोठपो** पु. भाताची पेज गाळण्याचा लांबट, चौकोनी कोटंबा, भांडे

(कु.); काथवट. पहा : **कोटंबा**

**कोठयॉ-वा** पु. कोठ्या; एक परदेशी गलबत. हे गुजराथेकडील खारवी मुसलमान वापरतात. याच्या व दक्षिणी गलबताच्या बांधणीत फरक म्हणजे. याचे धाकटे शीड व कलमी लहान असतात. [सं. कोष्ठ]

**कोठला** पु. कोठी; खोली : 'सानिये कोठला ठेविजे दीपु' - विद ३.

**कोठला** वि. कुठला. पहा : **कोठचा**

**कोठली** स्त्री. पोटातील आतडे; आतड्यातील मळ : 'बालपणिचिं कोठलीं। बाहिरी घाली।' - ज्ञा ६.२१६.

**कोठलेले** वि. बरेच दिवस साठ्यात पडून राहिले असल्यामुळे जुने झालेले (कापड). (कु.)

**कोठ (ठा-ठि) वळा** : पहा : **कोठनीस** : 'दाटी पुढील दारीं मागिल दारीं आहे कोठिमध्यें कोठवळा ।' - प्रला २६७.

**कोठंबा, कोठ्या** पहा : **कोटंबा**

**कोठंबी, कोठमी** स्त्री. पाण्याची डोणी; हंडा.

**कोठा** पु. १. कोठार; संग्रहालय; वखार; आगर; साठवण (धान्य, पाणी इत्यादीची). २. पोट; पक्वाशय : 'कोठ्यामाजी संचरे।' - ज्ञा ६.२१७. ३. (शिवणकाम) छातीपोटाचा भाग (शिवायच्या कपड्याचा). ४. बंदुकीतील दारू, कारंजाचे पाणी इत्यादीचा साठवणीचा कप्पा, साठा. ५. पक्ष्याचे घरटे. ६. गुरांचा गोठा : 'बैलु वीकूनि कोठा।' - राज्ञा १३.२२३. (व.ना.) ७. हुंडीच्या ज्या घरात रकमेचा आकडा लिहितात ते घर. ८. निळीचा रंग तयार करताना निळीची झाडे ज्यात भिजत टाकतात तो हौद. ९. पानाच्या डब्यातील पाने ठेवण्याचे पूड; खण, कप्पा. १०. कोष्टक; सदर; स्तंभ; रकाना. ११. (जंबिया) जंबियाच्या खेळात आपल्या हातातील जंबियाने जोडीदाराच्या बरगडीच्या खड्यांतून (शिंपीतून) बेंबीकडे फाडत येणे. [सं. कोष्ठ]

**कोठा** पहा : **कोटा** : 'त्यांना तालुक्याचे ठिकाणाहून कोठाच कमी मिळतो...' - गांगा २.

**कोठा** पु. बांबूच्या काठीच्या खेळामधील बरगडीवरचा मार.

**कोठा, कोठिवा** पु. गलबताचा एक प्रकार.

**कोठार-री** न. १. धान्यागार; कोठडी; खोलीतील किंवा भिंतीतील बळद; वखार; साठवणीची जागा : 'कीं विश्वबीजाचें कोठार -' ऋ ३८. २. पक्ष्यांचे घरटे. [त. कोट्टगारम] [सं. कोष्ठागार]

**कोठारली** स्त्री. घोणीच्या वर्गातील एक लहान प्राणी. (कु.)

**कोठारी** पहा : **कोठनीस**

**कोठारे** न. १. पहा : **कोठार**. २. भूस बाहेर जाऊ नये म्हणून त्यावर लावलेल्या कडब्याच्या पेंड्या.

**कोठाव (वि) गणे** उक्रि. कोठे जाता किंवा कोठून आलात असे विचारणे.

**कोठिंबर** न. (वन.) गोडे कारिंट. ही गुजराथेत पुष्कळ होतात. यांची भाजी करतात.

**कोठिंबा-बी-बे** पहा : **कोटंबा**

**कोठी** स्त्री. १. धान्यागार; संग्रहालय; वखार; खजिना; हौद; रांजण : 'पाण्याची कोठी एक मातीची' - ऐरापु, विवि. २९७. २. कारखाना; पेढी; दुकान; खोली. ३. कोठीवरचा कामगार; कोठीवाला : 'तरी स्वामींनी कोठी लवकर पाठवून तांदूल नेले पाहिजे.' - पेद २७.१३०. ४. सैन्याची दाणागोट्याची बेगमी. ५. नळाचे पाणी साठवून किंवा बंदुकीतील बाराची दारू साठवून ठेवायची जागा. ६. शरीरातील भाग (हे ७२ आहेत) : 'आता बाहत्तर कोठ्यांतील शुद्धि पिंडामध्यें' - मोल्स्व. ७. (गौरीपूजन) धड; गौरीचा मुखवटा ज्यावर बसवतात तो भाग : 'कनिष्ठेच्या कोठीवर नीट मुखवटा बसवून दिला.' - मुखवटे १७५.८. साळी वगैरे ठेवण्याकरिता केलेली बांबूची लांबट व मोठी कणगी; लोखंडी पत्र्याची पाटी, पिंप. ९. मिठागरातील चौकोन, खाचर. १०. एक प्रकारचे गलबत. ११. गुरांचा गोठा : 'वासरुवांची कोठी' - स्थापो ७५. १२. धान्यादी सामग्री घेऊन येणाऱ्या बैलांचा तांडा किंवा पठारा. [क.]

**कोठी** स्त्री. (संगीत) भोपळा. (वीणा, सतार, तंबोरा इ. साठी वापरण्यात येणारा.)

**कोठी** स्त्री. १. सरकारी वाडा, घर; मोठ्या सरदार जहागीरदाराचा इमला; कचेरी : 'साहेबांनीं महाराजांस देवासकरांचे कोठीवर तुम्ही कां गेला होता - म्हणून विचारले.' - विक्षिप्त ३.१७१. २. नाचगाणे करणाऱ्या स्त्रियांचे राहण्याचे ठिकाण.

**कोठी** स्त्री. चिलखताचा एक प्रकार.

**कोठी खांबपद्धती** (भूशा.) खाणीतून चौकोनी खोल्या व आधारभूत खांब खोदून कोळसा काढण्याची पद्धत.

**कोठीकरा** पु. वखारीतील तांदळाच्या नासधुशीबद्दल अजमास करून जास्त वसूल केलेले धान्य.

**कोठीभाडे** न. १. रयतेने किल्ल्यावर धान्य नेऊन देण्याऐवजी त्यांच्यावर बसवलेला कर. २. धान्य किल्ल्यावर स्वतः पोचवण्याऐवजी दिलेली नेणावळ.

**कोठीमहाल** पु. सरकारी धान्याची वखार, कोठार.

**कोठील** वि. कोणत्या ठिकाणचा; कोठचा. [सं. क्व]

**कोठीवाला** : पु. १. पहा : **कोठवळा**. २. पेढीवाला; सावकार; व्यापारी.

**कोठीवाले गवई** परंपरेने चालत आलेल्या तेवढ्याच चिजा म्हणणारे गवई. (कु.)

**कोटू (ठो) न** क्रिवि. कोणत्या ठिकाणा - स्थळा - वेळेपासून; कुठून.

**कोठे** न. पक्ष्याचे घरटे; पहा : **कोटे** : 'कातणीनें जाळें केलें पाकोळीने कोठे बांधले.' - ज्योफु ३८५. (को.)

**कोठे** क्रिवि. १. कोणत्या ठिकाणी. २. (जोर दिला असता) कोणत्याही स्थळी; कोणीकडेही; कोठेही : 'आणि नसतां पोटीं । कोठे काष्ट असे सृष्टी' - राज्ञा १८.६००. ३. (चुकीने) कधी; केव्हा. [सं. कुत्र]

**कोठे कोठे, कोठे मोठे** काही काही ठिकाणी. [कोठेचे द्वि.]

**कोठेजणे** अक्रि. वाळणे:'(नाटकूट वोषधी) कोठेजौनि जाति-' विद १७.

**कोठ्या** पहा : **कोठी ७, कोठा**

**कोड** न. १. कौतुक; लळा; लाड; कुरवाळणे (मूल, देव, प्रिय, वस्तू इ.); आवड; मौज; नाजूक रीतीने वागविणे; काळजीने जपणे. कौतुक शब्दाबरोबर योजतात : 'जयातें अव्यक्त म्हणों ये कोडें।' - ज्ञा ८.१७९.

२. हौस; उत्कट इच्छा; हाव; उत्कंठा (ह्यात हेकेखोरपणा, हट्ट, तऱ्हेवाईकपणा गर्भित असतो.) ३. खेळाडूपणा; चैनी स्वभाव; आनंदीपणा; मजा; गंमत. ४. आश्चर्य, आनंद, नवल उत्पन्न करणारी गोष्ट : 'ज्याच्या शरीरबळाचें कोड। एकला लक्षांवरी दे झड।' - एभा १७.१३९. (वा.) ० **पुरविणे** - कौतुकाने हौस पुरविणे; लाड पुरविणे; पाहिजे असलेली वस्तू देऊन आनंदित करणे : 'आवडी धरूनि करूं गेलों लाड। भक्तिप्रेम कोड न पुरेचि।' - तुगा ८७६.

**कोड** न. १. कोडे; कूट; प्रश्न; गूढ. २. (ल.) संकट; कष्ट : 'कोडें थोडें तो करी नीर गोळा।' - अहमु ३०.

**कोड** स्त्री. २१ नग; कोडी; कोटी (वास्तविक २०); खंडी. [सं. कोटी]

**कोड** पु.न. १. महारोग; रक्तपिती. २. कातडीचा नैसर्गिक रंग जाऊन पांढरे डाग पडणे. [सं. कुष्ठ]

**कोड** न. कायदेपुस्तक; कायद्यांचा, नियमांचा संग्रह : 'लष्करी कोड कुणालाच नाकबूल नाहीं.' - के २२ । ७ । १९३०. [इं.]

**कोडकी** स्त्री. उडीचा एक प्रकार व खेळ. या खेळाचे तीन चार प्रकार आहेत. (ठाकरी)

**कोडगा** पु. लाथा, बुक्क्या इ. चा मार; हग्या मार. (क्रि. देणे.) वि. १. मार खाल्लेला; मारलेला; लतखोर. २. निर्लज्ज; निसुग; निसवलेला; कोटगा; निगरगट्ट. [ क. कोट्टि = बेशरम ]

**कोडगा** पु. भोवरा. पहा : **कोटगा**

**कोडगेखाऊ** वि. नेहमी हग्या मार खाऊनही दुर्गुण सोडीत नाही असा.

**कोडगेला** वि. काहीसा कोडगा; हट्टी.

**कोडत** न. न्याय देण्याची जागा; न्यायालय; कोर्ट : 'कोडतांतूनहि मराठी भाषा काढण्याचा सरकार यत्न चालवीत आहे हें अगदीं गैर आहे.' - निमा ४. [इं. कोर्ट]

**कोडतसांव** पु. पैलू. (गो.)

**कोडता-ते** पु. न. १. (शेती) हातांनी हेटे (ढेकळे) फोडण्याचे हत्यार. २. (सुतारी) लाकडी ठोकणी; हातोडा. (बे.) [क. कोडिता]

**कोडपणे** अक्रि. मारणे; शिक्षा करणे. (ना.)

**कोडपा** पु. कोपरा; आडबाजू : 'एका कोडप्यातल्या खेडेगावात त्यांनी दिवस कसे कंठावेत ?' - आआशे २६९.

**कोडपारधी** स्त्री. खेळ म्हणून केलेली हरणादिकांची शिकार : 'कोडपारधी हरणांरोहियां चितळांची' - लीचपू २१०.

**कोडबा** वि. कोडबी वल्हवणारा.

**कोडबाड** स्त्री. कोंडी; वेढा; गराडा : ' फिरंगी लोकांस कोडबाड झाली.' - ऐपो २.५३.

**कोडबी** स्त्री. उलंडी असलेली मोठी होडी. (को.)

**कोडबु (बो) ळे** न. १. भाजणीच्या पिठाचा तेलात तळून केलेला लांबट वर्तुळाकार खाद्यपदार्थ. २. संकीर्ण जातीचे; भेसळ जातीचे; जातिभ्रष्ट. (ग्रा.) [ क. कोड = शिंग + बळ्ळी = बेली]

**कोडबो-वो** पु. भात (धान्य) ठेवण्याचे होडीसारखे लाकडी पात्र. पहा : **कोटंबा**

**कोडबॉ** पु. नदीकिनाऱ्यावर उगवणारे गवत. (गो.)

**कोडम** न. कोनाकार लाकूड; गाड्याच्या धुऱ्याला बांधलेले लाकूड. (व.)

**कोडमा** पु. लाड; फाजील लोभ. (व.)

**कोडव** पु. कुंपण : 'चांपाटीयाचे कोडव कीजति' - शिव ३१२.

**कोडवळी** न. कडबोळे.

**कोडवादि (दी) ने** क्रिवि. प्रत्येक वस्तूची किंमत न ठरविता सरसकट कोडीची किंमत ठरवून (देणे, घेणे).

**कोडवाव** स्त्री. कोरडी, कोरडवाहू जमीन; केवळ पावसाच्या पाण्यावर अवलंबून असलेली जमीन; पाणथळ किंवा बागाईत नसलेली जमीन.

**कोडवाळ** स्त्री. कडू मासळी; कडुवाळ. (गो.)

**कोडवॅलॉ** वि. कडू. (गो.)

**कोडिया** पु. कुष्ठरोगी : 'कोडिया न दिसे चंदनबरवा' - नाम १८४७.

**कोडिवरी, कोडीवारी संख्या** वि. कोट्यवधी : 'तियें कोडिवरी सगळीं। घेताति शस्त्रें' - ज्ञा ११.३९१.

**कोडिसवाणा-णी-णे** वि. सुंदर; मनोहर; कौतुकवाणे; लहान; गोजिरवाणे : 'ऐसी मूर्ति कोडिसवाणी कृपा। करूनि होसी ना विश्वरूपा।' - ज्ञा ११.२९१. [सं. कूटसम]

**कोडी** स्त्री. १. विसांची संख्या; खंडी (कापड, लोखंडी पत्रे, बांगड्या इ. मोजताना योजितात) : 'इंगरेजी तरवारा उत्तम कोडी' - पेद ८.५२. २. कोटी; शंभर लक्ष : 'जे वर्षशतांचिया कोडी।' - ज्ञा ६.४६५. पहा : **कोटि** ३. अनेक पंक्ती : 'आनंदें डोलति कोडी। विमानाचिया।' - ऋ ३६. ४. प्रकार; तऱ्हा : 'कोडीअे असंख्यातु कळसु। जेथें मिर्वती गगना।' - धवळे १५. [सं. कोटी]

**कोडी** स्त्री. (भूमिती) उंची; खोली. [सं. कोटी]

**कोडी** वि. रक्तपित्या; कोड झालेला; महारोगी. [सं. कुष्ठ]

**कोडीमोडी** स्त्री. खोडीमोडी; अवयव आखडणे : 'ते... वाये कोडीमोडी करूनि घातले असति' - लीचपू ४३९.

**कोडुळे, कडुवळे** न. कडबुळे. पहा : **कोडबोळे** (व.)

**कोडू** पु. कात. (बे.)

**कोडू** स्त्री. चिरीमिरी; वानगी. (गो.)

**कोडे** न. १. अडचण; कोंडमारा; पेच; संकट : 'कोडें सांकडें संकटा। नाना संसार खटपटा।' - दास ४.३.६. २. कूटस्थळ; गूढ प्रश्न; सांकेतिक भाषेतील प्रश्न; उखाणा : 'आजि फिटले माझें कोडें।' - तुगा २२४०. ३. कुवेडे; करणी; जादूटोणा. ४. रहस्य; न कळणारी गोष्ट : 'कृष्णाताई हे एक कोडं होतं.' - रथ २३१. [ सं. कूट] ० **करणे** - दुसऱ्यावर भुतेखेते वगैरेसारख्या वाममार्गाने अभिचार करणे : '...तेव्हा शिंद्यांकडील लोक कांही कोडें केलें म्हणून आळ घेऊन कटकटीस आले.' - ऐलेसं ५१२८. ० **घालणे** - कठीण प्रश्न विचारणे; अडचणीत टाकणे. ० **पडणे** - काय करावे हे न सुचणे; अडचणीत सापडणे. **कोड्यात टाकणे** - काय करावे ते दुसऱ्याला न सुचेल असे करणे : 'विरुबाईनी त्यांना कोड्यात टाकलं होतं.' - राऊ ३३४. **कोड्यात पडणे** -काय करावे ते न सुचणे; प्रश्न पडणे.

**कोडे** न. प्रेम.

**कोडे** न. १. पणती (मातीची); दिवे लावणे. २. डाक लावण्याच्या वेळी

उपयोगात आणायचा समईवजा दिवा. [सं. कूट = मडके]

**कोडेल** वि. कोड आल्यासारखे अधूनमधून, तुटकतुटक, एकसारखे नसणारे. (व.)

**कोडेवर्म** न. कपट वृत्ती; कूट कर्म : 'कासया करावें कोडेंवर्म। सत्यधर्म लपवूनी।' - भवि १४.१४.

**को (कों) डोळे** न. १. पातेल्यात किंवा कढईत केलेले थालीपीठ (भाजणीचे). २. पहा : **कोंडाळे**

**कोड्या-ढ्या-ढी** वि. कुष्ठरोगी; महारोगी : 'जैसा कोढी आपुला हाती। वारंवार लक्षिता' - मुरंशु २६०. [सं. कुष्ठ]

**कोढळे** न. भांडे : 'बाइसीं : कोढळे पाहिलें :' - लीचउ ६.

**कोढी** वि. हट्टी; दुराग्रही. (ना.) (वा) ० **पडणे** - कोंडी होणे; कोंडमारा होणे : 'यामुळे संस्थानासी कोढी पडोन कांही ताखद नाहीसारखी झाली.' - पेद २८.२०४.

**कोढुले** पहा : **कोंढाळे** : ' कोढुले आणिलें : तवं तेल नाही' - लीचउ ८.

**कोण** सना. १. प्रश्नार्थक सर्वनाम. अज्ञात माणसासंबंधाने विचारताना योजतात. २. कोणती; किती : 'तेथें या कांबिटाचा गरिब गुण किती ? प्रौढिही कोण येणें ?।' - आसी ३२. ३. किती तरी; फार; अतोनात. ४. काय. [सं. कः पुनः]

**कोण, कोणटा** पु. कोपरा; कोन : 'तुझ्या स्वरूपाच्या निजस्थानीं आकाश लोपलें एके कोणीं।' - भारा बाल ११.१७० [सं.]

**कोण, कोन-नी** पु. प्रसूती : 'रुक्मिणीसी जाला कोणु। जन्म पावला मदनु' - उह ३७२. २. मुलगा : 'तेही आपुलेया कोणातें (लेकाते) गोसावीयांते पाहावेया पाठवीले :' - लीचउ २९९. (वा.) **कोणी नीगणे** - बाळंत होणे : 'तवं तीए कोणीं नीगाली' - लीचउ २०२.

**कोण** पु. (ज्यो.) लग्न, पंचम व नवम स्थान. [सं.]

**कोणएक** सना. १. कोणीतरी एक. २. विशिष्ट किंवा एखादा माहीत असलेला मनुष्य, वस्तू.

**कोणकोणटे** अ. कोपऱ्याकोपऱ्यातून : 'कोणकोणटें चौक झाडिला' - गोप्र १९३.

**कोणकोष्टक** न. (ग्रंथ). कोलन वर्गीकरणात वापरले जाणारे संकेतचिन्ह, चौकोनी कंस.

**कोणगे** न. पहा : **कोनगे**

**कोणचा** वि. १. दोन वस्तूंपैकी कोठला. २. जो तो; विवक्षित.

**कोण जाणे** कोणास ठाऊक, माहीत; न कळे बुवा.

**कोणताका-चाका** सना. हवा तो; पाहिजे तो; कोणताही. (एकवचनी व अनेकवचनी प्रयोग)

**कोणत्या तोंडाने, नाकाने** क्रिवि. न शरमता; न लाजता, उघडपणे, उजळमाथ्याने; कसा (प्रश्नार्थक).

**कोणत्यासी** कोणास :'येणें कोणत्यासी रोख दिलें।' - ब ५०३.

**कोणदंड** पु. खांबाचा वाटोळा दांडा.

**कोणप** न. १. कुणप; प्रेत. २. (ल.) तुच्छ, गलिच्छ वस्तू : 'वरीते कश्मला कोणपा या।' - आसी २८. [सं. कुणप = प्रेत]

**कोणपदार्थ** वि. य:कश्चित; निंद्य; त्याज्य; क्षुद्र : 'कोणपदार्थ स्त्रियांच्या जाती। अपवित्रा दुष्टिणी। पति असतां व्यभिचारिणी।' - पला ४३.

**कोणपा** पु. कोपरा; कोना. (बे.)

**कोणपिका** वि. कोपऱ्यात अगर घरात पिकलेला (आंबा, फणस इ.).

**कोणबिंदु-दू** पु. कोनाच्या दोन बाजू ज्यात मिळतात तो बिंदू. [सं.]

**कोणय** सना. कोणीही.

क्रिवि. कसाही. (गो.)

**कोणव** सना. कोणीतरी; कोणीहीं.

**कोणसा** वि. कोणीतरी; फलाणा; बोलणाऱ्याला माहीत नसलेला.

**कोणाइत** वि. पु. कोपऱ्यामधील; कोनाश्रित: 'कोणाइत मार्कंडे उत्तरे वाडी' - स्थापो ११.

**कोणाक** सना. कोणाला. (कु.)

**कोणाचा कोण** सना. (अज्ञात माणसासंबंधी, त्यांच्या नात्यागोत्यासंबंधी माहिती विचारताना) लांबचा नातेवाईक; बळेबळे संबंध जोडलेला. (य:कश्चित, फालतू माणसासंबंधी योजतात.)

**कोणाच्या केरवळ्या** एक खाद्य; कोणफळ सोलून व उकडून त्यात मीठ घालून वाटून त्याच्या लाट्यात खोबऱ्याचा कीस, भुईमुगाचे दाणे यांचे पुरण भरून तळून काढतात.

**कोणाश्म** पु. (भुशा.) दीर्घकालीन खडकांचे अनेक कोचदार खंड नैसर्गिक लुकणक्रियेने एकत्र सांधले जाऊन बनणारा एकसंध खडक.

**कोणिष्ठी** पु. कोष्टी; विणकाम करणारा : 'दसिण दिसें कोणिष्ठिआचि वाडी' - नागावशीला १.२१.

**कोणी** प्र. सना. १. कुणी; कोणी एक; कोणीतरी; कोणीही : 'नये ज्वाळ वीशाळ सन्नीध कोणी।' - राम १२१. नकारवाचक विधानात पूर्ण अभावदर्शन. २. कोणतीही : 'हातीचा बाण जाई तव कोणी तजवीज ?' - ऐकोपुर.

वि. कोणी एखादा; वाटेल तो; हवा तो.

**कोणीकडणे-कडून** क्रिवि. १. कोणत्या ठिकाणाहून - दिशेहून - बाजूकडून. २. कसेही; कोणत्याही प्रकारे.

**कोणीकडे** क्रिवि. कोणत्या बाजूला, दिशेला, ठिकाणी.

**कोणीका** सना. १. हवा तो; पाहिजे तो. २. भिकार; य:कश्चित; उपेक्षणीय.

**कोणीतरी** सना. १. कोणीही; कुणीतरी. २. य:कश्चित; नालायक; भिकार.

**कोणीही** सना. १. वाटेल तो, त्याने. २. पहा : **कोणीच**

**कोणे** न. खोली; अंतर्गृह. [क.]

**कोणे** न. गुरांच्या कानात होणारा एक रोग. यामुळे गुरांच्या कानातून पाण्यासारखा पू वाहत असतो.

**कोणेकवजा** वि. कोणत्याही प्रकारचा.

**कोणेकोणी** क्रिवि. प्रत्येक कोपऱ्यात; अडचणीत. पहा : **कोनी**

**कोण्या** प्र. सना. कवण्या; कोणत्या : 'विरक्तें असावें कोण्या गुणें।-' दास ६.९.१.(वा.) **कोण्या, कोणत्या झाडाचा पाला असणे** - कस्पटाप्रमाणे लेखणे : 'नवरा म्हणजे कोणत्या झाडाचा पाला?-' खु २५.

**कोत** पु. १. भाला; त्याचे पाते : 'घायीं कोंत न जिरे।' - ज्ञा १३.५३८. २. वेळूचा, बांबूचा कोंब. (बे.).

न. १. माडाच्या किंवा ताडाच्या पोयीचे अग्र; गाभ्याचे टोक (टोक

कापून नंतर त्यातून रस काढण्यासाठी तेथे मडके लावतात.) २. अणकुचीदार टोक. [को.]

**कोत** स्त्री. कुवत; शक्ती. (कु.) [फा. कुव्वत]

**कोतकार** पु. भालाईत.

**कोतकांती** स्त्री. भाला; एक शस्त्र : 'लांगूल सागर कटारें। कोतकांती ईट तोमरें। - कथा २.११.१४.

**कोतमीर** पहा : **कोथिंबीर** (कुण.)

**कोतरखळ्या** स्त्री. घळी; भेगा : '.... यमुनेच्या संगमीं दीस धरून रहावे, तरी ते जागा जबून. कोतरखळ्या फार.' - ब्रच २३.

**कोत(ता)रा** पु. नदीच्या किनाऱ्याला प्रवाहामुळे पडलेले खोल खड्डे.

**कोतल** वि. १. रिकामे; राखीव. (व.) २. जरुरीपेक्षा जास्त.

**कोतल** पु. कोतवाली घोडा; शृंगारलेला घोडा (मिरवणुकीचा) : 'कोतल नर कोतवाल वारण मगनमस्त किस्त करित।' - ऐपो २००. [ हिं.]

**कोतल अंदीशी** अदूरदर्शित्व.

**कोतवार** पहा : **कोतवाल ३**

**कोतवाल** पु. १. मराठी साम्राज्यातील नगररक्षकांचा मुख्याधिकारी; शहराचा मुख्य संरक्षक अधिकारी; फौजदार; पोलिस अधिकारी; कोकणात पोलिस-उपनिरीक्षकाला कोतवाल म्हणत असत. मराठी राज्यात याला कज्जे तोडणे, बाजारातील वस्तूंचे भाव ठरविणे, खरेदी विक्रीचे दस्त ऐवज नोंदणे इ. कामे असत. २. गावात जेवणाचे अथवा इतर समारंभाचे आमंत्रण करणारा अधिकारी; बोलावणेकरी : '-निमंत्रणे करण्यास कोतवालास द्यावी.' - ऐरापुत्र ९.४५९ (बडोदे-काशी). सरकारी काम करणारा गावमहार. (व.) ३. (ल.) कायद्याचा बडगा : 'पुढाऱ्यांनीं त्यांच्यावर कोतवाल फिरवल्यानंतर' - के ६.२.१९४०. [ फा.]

**कोतवाल** पु. नित्योपयोगापेक्षा जास्त संग्रह केलेला पदार्थ. [हिं.]

**कोतवाल** पु. पोपटाएवढा एक काळा पक्षी. याला कोळसा असेही म्हणतात. याची शेपटी दुभागलेली असते. हा पक्षी लहान असून कावळा, घार वगैरे पक्ष्यांनाही हाकून देतो.

**कोतवालघोडा** पु. १. मिरवणुकीपुढे शृंगारून चालविलेला घोडा : 'कोतवालतेजी धावा घेती।' - ऐपो. पहा : **कोतल.** २. (ल.) शोभेसाठी वापरावयाचे अलंकार, ठेवणीतील कपडे इ.

**कोतवाली** स्त्री. १. कोतवाल कचेरी; कोतवालाचा कारभार, खाते. २. शहर जकात; बाजारपट्टी. ३. पोलिसचौकी; नाके; चावडी : 'सहा महिने पायात बिड्या ठोकून एकेक महिना एकएक कोतवालीवर त्यास बसविला-' - विक्षिप्त १.८८. (बा.) ४. कोतवालाचा खर्च भागविण्यासाठी बसविलेले कर.

वि. कोतवालासंबंधी; फौजदारी.

**कोतवालीचा पोषाख** सणासुदीला घालायचा उंची, ठेवणीतील पोषाख.

**कोतवाली पिंजरा** कैदखाना; तुरुंग: 'कोणास बेशुद्ध होईपर्यंत मार देण्यांत आला व कोतवाली पिंजऱ्याची भरती करण्यांत आली' - विक्षिप्त १.७३.

**कोतळे** आतडे; कोथळा : 'घाई वाटती कोंतळी।' - उह १४०६.

**कोता** वि. जरुरीपेक्षा आखूड; अपुरा; लांडा; त्रोटक; लहान; तुटका; कमती; तुटपुंजे; संकुचित : 'आमचें ज्ञान किती कोतें आहे पहा.' - गीर २४६. [फा.]

**कोताई-ही** स्त्री. आखूडपणा; अपुरेपणा; कमताई; कोतेपणा : 'वसूल घेण्यास सख्ती करिता कोताही केली नाही.' - ऐटि ५.११. [फा.]

**कोतान्देसी; कोते अंदेशा** वि. अदूरदृष्टी; अविचारी : 'परंतु रांगडे कोतांदेसी आहेत.' - पेदभा २९.१६९.

**कोतायरक** न. कोते हत्यार; आखूड पल्ल्याचे हत्यार. (क.) **कोते हतेरा पोचणे** - प्रत्यक्ष हाताला हात भिडवून लढाई होणे : 'दोन वेला पठाण चालोन कोते हातेरास पोहोचले.' - हिंदखं १.४१.

**कोतार** न. वैर; भांडण. (कु.)

**कोतासिला** पु. तरवार, भाल्यासारखे आखूड पल्ल्याचे हत्यार.

**कोतिक** कौतुक : 'देवने कोतिक पुरीन।' - कला १५.

**कोतियाळ** वि. कोयता (शस्त्र) घेतलेला (वीर) : 'येक धावती आगळें। लोहागळे कोतियाळ। फरशधर।' - कालिका २२.७.

**कोती** स्त्री. वरईची एक जात. हिचा दाणा पांढरा असतो; एक तृणधान्य.

**कोती अंदेशा** अदूरदृष्टीपणा; अविचार : 'कोती अंदेशा करून तुम्ही निजाम हस्तीखान यांस जाऊन भेटला.' - पेद २०.१३३.

**कोतेक(का)र** पु. भालाईत. पहा : **कोतकारू** : 'पैले कोतेकारा। जवळिके चाला ।' - शिव ५६४; 'सेले साबळे कोतेकर। धनुर्धर पायाचे।' - एरुस्व ८.१३. [ सं. कुंत + कार]

**कोतो** पु. पाणी काढण्याच्या लाठीचा कोळंबे अडकविण्याचा बांबू. (कु.) [ क. कोट्ट = बांबूची नळी]

**कोत्त** पु. जुडगा; घोस. (तंजा.) [ क. कोत्तु]

**कोत्ता** पु. गवंडी. (तंजा.) [ त. कोलुतुकार]

**कोत्फ, कोत्फगारी** न. स्त्री. बंदुकीच्या नळीवर किंवा दस्त्यावर केलेले नक्षीकाम किंवा मिन्याचे काम.

**कोथ** पु. अरबी समुद्रात मिळणारा एक मासा : 'ह्यातील काही जाती म्हणजे कोथ, घोळ... ह्या होत.' - महासागर १५३.

**कोथ** न. (शाप.) सडणे; कुजणे. [सं. कुथ् = कुजणे]

पु. (वै.) शरीरावयव कुजणे, सडणे. [सं.]

**कोथरा** पहा : **कोतरा** : 'महीकाठी कोथरे भारी आणि अवघड ठिकाण पाहून वाटा रोवून बसले आहेत.' - पेद ३६.२५५.

**कोथळ** पु. शरीर, डोके नसलेले धड : 'बाण लागोनिया चरणीं। कोथळ उलंडति धरणी।' - मुआदि ३२.५३.

**कोथळा** पु. १. मोठे पोते; थैला (धान्याचा, दारूचा) : 'माझ्या हातांतली चूड इथल्या कोथळ्याला लावली कीं पुरे !' - सूर्योदय १७६. २. मोठा माणग्याचा कणगा, पालटे (धान्य ठेवण्याचे); मध्ये रुंद व वर निमुळते, सामान्यत: एका प्रकारच्या बरणीसारखे, धान्य वगैरे ठेवण्यासाठी केलेले मातीचे भांडे : 'जैसें धान्यें कोथळेयामध्यें साटविती।' - ऋ ७५. ३. पोट (पक्वाशय); पोटातील कोठा; पोटातील कोठ्याभोवतालचे मांसाचे आवरण. ४. शरीरातील कोणतीही पिशवी; कोश. जसे :- अन्नाचा कोथळा; मूत्राचा कोथळा. ५. भोत; (उशीची) खोळ; अभ्रा.

६. जनावरे विताना बाहेर पडणारी आतडी, गुह्यभाग.

**कोथळी** स्त्री. १. (मुंबई) ६ मणाची गोणी; ६७२० सुरती भारांचे वजन. २. थैली.

**कोथळी** स्त्री. १. लहान कोथळा; रांजण; मातीची कणगी; लहान पोते. इतर बहुतेक अर्थ कोथळ्याप्रमाणे. २. हावरी अथवा तिळाच्या झाडांची गंजी (व.) ३. महालक्ष्मीचा मुखवटा बसविण्याकरिता केलेली मातीची वाटोळी व पोकळ उंच बैठक; खापराचे धड. (व.ना.)

**कोथळे** शस्त्रसमूह : 'माथे भरत्यांति कोथळी। घाई लहुडिचां।' - शिव ९६९.

**कोथं (थि) बरी- बिरी-बीर, कोथमीर-रीब, कोथुंबिरी-बुरी** स्त्री १. धन्याचे रोप. हे उगवून कोथिंबीर व्हायला १५ दिवस लागतात. कोथिंबीर कोवळी असताना तिची पाने व देठ भाजीपाल्यात घालतात. याचा एक विशेष स्वाद असतो. धने मसाल्याच्या उपयोगी आहेत. २. धने : 'लसुण मिरची कोथुंबिरी । अवघा माझा जाला हरी ।' - सावता -३५ [ सं. कुस्तुंबरी ]

**कोथंबरी देवी** देवीच्या रोगाचा एक प्रकार.

**कोथंबरीबाळी** स्त्री. कानात घालायच्या बाळ्यांचा एक प्रकार. याला कोथिंबिरीच्या दाण्याच्या आकाराचे मोत्यांचे घोस जोडलेले असतात : 'कोथिंबिरी टोपण घोंसबाळ्या।' - सारुह ६.२४.

**कोथंबरी भात** भाता (साळी)ची एक जात. (को.कु.)

**कोथा** पु. पाणी काढण्याच्या लाठीच्या कोळंब्याची काठी; ओकतीची काठी (कु.) पहा : **कोतो**

**कोथामेथा** पु. १. पहा : **कोथेमेथे**. २. समुच्चयार्थी किरकोळ धान्य.

**कोथि(थे)रे** न. एक प्रकारचे गवत : 'आकाशात तारे कोथिराच्या आणि पोह्याच्या तुऱ्याप्रमाणे चमकू लागले.' - सराई ६२.

**कोथी** स्त्री. लाकडी कुदळ. (ठा.)

**कोथेमेथे** न. धने, हिंग, मेथी इ. जिन्नसांचा समुच्चय. (को.)

**कोद** पु. तीळगूळ.

**कोदया** पु. कुंड (भांडे). (व.)

**कोदरणे** स्त्री. उकरणे. (बे.) [सं. कु. = पृथ्वी + दृ = विदारणे.]

**कोदरा** वि. चोरटा. (नंद)

**कोदरू** पहा : **कोद्रव** : 'कोंबड्याने लवकर आरवू नये म्हणून त्याला कोदरू खायला घालू लागली.' - ओदे ६०.

**कोदवा** पु. एक प्रकारचा दगड : 'सीरसाळा : कोदवा : मुरुंबाळा' - लीचउ ३३५.

**कोदळे** न. थालीपीठ. पहा : **कोडोळे**

**कोदंड** न. १. धनुष्य : 'आतां कोदंड घेऊनि हातीं। आरूढ पां इयें रथीं ।' - ज्ञा ३.१८९. २. (ल.) भुवई. ३. (ल.) मोठे संकट (रावणाच्या छातीवर शिवकोदंड पडल्याने तो कासावीस झाला त्यावरून). पहा : **रामकोदंड** [ सं.]

**कोदंड** वि. उद्धट; दांडगा; भांडखोर; बेपर्वा.

**कोदा** पु. हलके व घाणीचे काम; काबाडकष्टाचे काम; कुत्तेघाशी. बहुधा अव. प्रयोग - कोदे (क्रि. करणे, निपटणे, उपसणे, पडणे.).

**कोदा(द)वणे, कोदुणे** अक्रि. गुदप्रक्षालन करणे; ढुंगण धुणे. २. कोदा उचलणे, करणे. (कु. राजा.) पहा : **कोदा**

**कोदील** वि. ठिसूळ.

**कोदे-दो** न. एक धान्य : 'कोदेया भातेया (उड्या) पडतील.' -लीचउ ४४८.

**कोदेभाते** पु. अव. हलकीसलकी, कष्टाची कामे : 'रायाचीया राणिया कोदेभाते पडतील.' - लीचउ १८९.

**कोद्रव, कोद्रू** पु. एक प्रकारचे हलके धान्य; हरीक. सर्व धान्यातील हे हलके धान्य असून गरिबांशिवाय ते दुसरे कोणी खात नाहीत. कितीही निकस जमिनीत हे पिकते. [सं. कोद्रव]

**कोद्रा** पु. एक विषारी तृणधान्य : 'खल्यातले विषारी हरीक (कोद्रा या नांवाचे धान्य) त्याच्या गाढवांनी खाल्ले नि त्यातली दोन गाढवें..... मेली.' - सोबत ११७.

**कोद्री** लहान खडा. (पूर्वविदर्भातील विवाह १८२३)

**कोधळे** न. भांडे : 'मग इंद्रभटासरिसे एक तुपाचें कोधळे घेउनि एत होते:' - लीचउ ८९.

**कोन-ण** पु. १. (भूमिती) दोन रेषा तिरकस येऊन एका बिंदूत एकत्र होतात ती आकृती. याचे लघुकोन, काटकोन, विशालकोन असे प्रकार आहेत. २. कोपरा. ३. पागोट्याचा एक प्रकार : 'कोन पाठविला आहे. घेणे.' - ब्रच २९. ४. जागा; जमिनीचा लहान तुकडा; 'कान द्यावा पण कोन देऊ नये.' - एहोरा ९.२९. ५. प्रसूती, बाळंतपण (ह्या प्रसंगी स्त्री घराच्या कोपऱ्यात - बाजूला जाते यावरून) ६. बाळंतिणीची वस्त्रे, खाटले, भांडीकुंडी इ. सामान; बाळंते. ७. ठेवण्याची राहण्याची जागा. उदा. देवाचा कोन = देवघर (बे.) [सं. कोण] (व.) ० **होणे, निघणे** - बाळंत होणे, प्रसूत होणे. (वि.प्र.) **कोनी निघणे, कोन येणे** - बाळंत होणे. हे प्रयोग सर्वमान्य आहेत. : 'मग ते गरोदर होऊनि कोनी निघाली' - पंच ३.

**कोन** पहा : **कोंडा** (व.)

**कोन** पु. एक कंद व त्याची वेल. हा कांदा गोराडूसारखा असतो : '(गोराडूचे कंदास) कोकणात कोनफळ व नारमिगे म्हणतात.' - फचि ८४.

**कोनक(का) र** पहा : **कोतकर**

**कोन(ना)कोपरा** पु. १. सांधीकोंदी; एका कडेची बाजू; अडगळ; सहज लक्षात न येणारी जागा. २. टेंगूळ; पुढे आलेला फुगीर भाग.

**कोनकोपरा** पु. आवडनिवड : 'तैसा कोनकोपरा । नेणे जीउ ।' - ज्ञा १३.३६.

**कोन खिळण** (यंत्र) सरळ आणि लांब कोनातील बाजू तपासणीचा मापक.

**कोनगे** न. दरीतील तुटलेल्या कड्याला वा मोठ्या फांदीला लागलेले मधाचे पोळे; कोंगे; मधाच्या पोळ्याची एक जात; कोणगे. (गो.)

**कोनट, कोना-न्या** पु. कुणब्यासाठी वापरला जाणारा निंदाव्यंजक शब्द. (को.)

**कोन(ण)टा** पु. १. कोपरा. २. घरातील अंधारी जागा : 'देऊळाची दक्षिण कोनटा आसन' - स्थापो ३८. (व.ना.)

**कोनटोपर** न. कानटोपी; कान्होळे. (व.)

**कोन (ना) डा-डे** पु. न. सामान ठेवण्याकरिता भिंतीत केलेली जागा;

देवळी; गोखला.

**कोनपट** न. (कोनचे हीनत्वदर्शक रूप.) १. कोपरा. २. (ल.) एकीकडची, एकान्ताची जागा; आड बाजू.

**कोनपडा** पहा : **कोनपट**

**कोनपालट** पु. १. दुखणेकऱ्यास आराम पडण्यासाठी निजण्याची जागा बदलणे. २. व्यालेल्या मांजरीने आपल्या पिलांचे स्थलांतर करणे. (क्रि. करणे.)

**कोनफळी** स्त्री. दोन भिंतींच्या कोपऱ्यात बसविलेली फळी : 'घरातल्या अंधाऱ्या कोनफळीवरचा डबा काढताना' - काजवा ४. (को.)

**कोनबिंदु-दू** पु. (भूमिती) त्रिकोणाचा शिरोबिंदू. पहा : **कोणबिंदु-दू**

**कोनमापक** पु. (भूमिती) कोन मोजण्याचे उपकरण. हे आकृत्या काढणे आणि जमिनीचे भाग पाडणे यासाठी उपयोगात येते.

**कोनमापी** पु. (भूशा.) स्फटिकाच्या कोणत्याही दोन बाजूंमधील कोन मोजण्यासाठी वापरण्यात येणारे उपकरण. भूमितीत वापरल्या जाणाऱ्या कोनमापकापेक्षा हे वेगळे असते. याचे अनेकविध प्रकार असतात.

**कोनवासा** पु. घराच्या दोन पाख्यांच्या सांध्यावर आढ्यापासून छपराच्या कोपऱ्यापर्यंत घातलेला मोठा वासा : 'कोनवाशाचा कठीण सर त्याने ताकदीने नि कसबाने बसवला.' - तोरण ३६५. (को.)

**कोनवृत्त** न. (ज्यो.) ईशान्य किंवा वायव्य वेधवलय किंवा वेधवृत्त.

**कोनशिला** स्त्री. १. इमारतीच्या बांधकामाला आरंभ करण्यापूर्वी तिच्या जागेवर समारंभपूर्वक ठेवलेला पहिला दगड; पायाचा दगड. (वा.) ० **बसवणे** - समारंभपूर्वक इमारतीच्या पायाचा दगड बसवणे. २. महत्त्वाचे तत्त्व; आधारभूत तत्त्व. उदा. मूलभूत हक्क आणि मार्गदर्शक तत्त्वे ही भारतीय घटनेची कोनशिला आहे.

**कोनसो** पु. कोपरा; कोन. (गो.)

**कोना** पु. १. कोनशिला. २. कोपऱ्याचा घडीव दगड. ३. कोपरा : 'गोसावी... कोनेसी दडले' - गोप्र २८०. ४. घराच्या आढ्यावर किंवा कोनवाशावर घालण्याचे चापट कौल. ५. कोनवासा. [सं. कोण]

**कोना** पु. (यंत्र.) बोथटीकरण; कुठलीही कड लागू नये म्हणून बोथट करण्याची क्रिया.

**कोना** वि. एक प्रकारचा झंझावात : 'हवाई भागात दक्षिणेकडून वाहणारे झंझावाती वारे आहेत. त्यांना कोना वारे असे म्हणतात.' -महासागर ४५.

**कोनाइड** वि. (ग.) शंकूच्या आकाराचा (पदार्थ, आकृती).

**कोनात्मक** वि. कोनासंबंधी; कोनाचे.

**कोनात्मक अंतर, कोनाचे अंतर** वर्तुळाच्या भागामध्ये मोजायचे अंतर; वर्तुलखंड.

**कोनासन** न. आसनाचा एक प्रकार. उभे राहून दोन पायांमध्ये अंतर ठेवणे. उजवा हात वर करून डाव्या पायाच्या अंगठ्याला लावणे तसेच या उलट करणे. [सं. कोण + आसन]

**कोनांक** पु. (ज्यो.) सूर्य, तारे किंवा इतर ग्रह हे क्षितिजाच्या ज्या बिंदूत उगवतात किंवा मावळतात तो बिंदू आणि क्षितिजावरील पूर्व किंवा पश्चिम बिंदू ह्यांच्यामध्ये सापडणारा कंस; दिगंश.

**कोनिता** स्त्री. १. सकोन असण्याची स्थिती, कोनीयता. २. (भूशा.) संशकली खडकातील कणांच्या पृष्ठभागाची गोलाई किंवा खडबडीतपणा दर्शवणारी संज्ञा.

**कोनी** स्त्री. मासे धरण्याकरिता निमुळती विणलेली बांबूची नळकांडी. (ही कोनासारखी असते म्हणून.) [सं. कोण]

**कोनी वालुकाश्म** बारीक, काटेरी, टोचणारी वाळू.

**कोनीय संदेश** (ग.) चक्रीय गतीची तीव्रता मोजण्याचे चलनत्रिज्या परिमाण.

**कोने** न. हत्ती, उंट, म्हैस, गाय इ. जनावरांच्या पायांना, कानाला किंवा एखाद्या सांध्यात होणारा एक रोग. पहा : **कोणे** [सं. कोण]

**कोने** न. अंबाडीच्या काड्यांची जुडगी, बिंडे (माण.) [क. कोने = झाडाची फांदी, काटकी]

**कोनेपिछाने** पु. कोनेकोपरे : 'कोनेपिछाने देखील तो अक्षरशः वाचून पाहिला.' - ऐलेसं १७५२.

**कोनोलिथ** पु. (भूशा.) सापेक्षतः लहान पण आकारहीन अंतर्वेशी अग्निज खडक.

**कोन्टा** पु. कोपरा. (ना.) पहा : **कोनटा**

**कोन्याकोपऱ्याचा** वि. १. सांधीकोंदीतला; कोठला तरी. २. (ल.) क्षुद्र; हलका.

**कोन्हे** न. मधाचे पोळे. पहा : **कोनगे**

**कोन्हेक** कोणी एक : 'कोन्हेकें वानरें फळे खाउं लागली.' - पंचो ४.२२.

**कोप** पु. १. दुसऱ्याच्या अपराधामुळे आपल्या अंतःकरणाची होणारी रागीट वृत्ती; राग; क्रोध : 'तुमच्या कोपें कोठें जावें।' - तुगा ११६५. २. पहा : **प्रकोप.** (वा.) **कोपास चढणे** - रागावणे; कोप येणे; संतापणे : 'गांगेय कोपा चढला कसा रे।' - वामन भीष्मप्रतिज्ञा १०.

**कोप** पु. न. १. कुजलेली, गंजलेली, किडलेली व्रणाची जागा (फळ, काष्ठ, पाषाण इत्यादीची). २. (सामा.) दोष; विकार; व्यंग. [सं. कुप्]

**कोप-पी, कोपट** स्त्री. न. १. झोपडे (शेतातील गवत, पानांचे); वृक्षाची ढोली; खोपटी; कुटी; मांडव; मंडपी : 'तैशी जीवेंसी कोंपटी। धरूनि ठाके।।' - ज्ञा १३.७८६. २. (ल.) घर : 'लावि आंत ठाऊनि कोपट।' - अमं ४.४ : 'म्हणौनि मठाचे दारिं कोंपि करुनि असावें।' - पंच १.२८. ३. (ल.) शरीर : 'काय करू उपचार। कोंप मोडकी जर्जर।।' - तुगा ६८२. [क. कोप्प = खोपटी, खेडे]

**कोपट** वि. कोपिष्ट; रागीट; चिडखोर. [सं. कोप]

**कोपणे** अक्रि. रागावणे. [सं. कोप]

**कोपर** पु. भुजा आणि हात यांच्या मधल्या सांध्याचे मागील टोक. [सं. कूर्पुर] (वा.) **कोपराढोपराने करणे** - (बायकी) कसे तरी करून कष्टाने, आयासाने (घरकाम) करणे. **कोपराढोपराने चालणे, जाणे** - मोठ्या नेटाने संकटातून तरून जाणे, कसेबसे काम पुरे पाडणे. (कमजोरी, अशक्तता असताना). **कोपराने खणणे** - सवलतीचा प्रमाणाबाहेर फायदा घेणे; अतिरेक करणे. **कोपरापासून हात जोडणे** - अति कळवळ्याने विनवणे. **कोपरापासून नमस्कार** - १. वरील अर्थ. २. यापुढे संबंध नसेल तर बरे अशा अर्थी.

**कोपर-रा-री, कोहोपरा** १. स्त्री. भाकरीचे पीठ मळायची मोठी परात (तांब्या-पितळेची); थाळी; सनकी; पितळी. लहान कोपराला कोपरी म्हणतात. (कु.) २. हंडा; रुंद तोंडाचे भांडे. लहान लोखंडी कढई (व.ना.) [सं. खर्पर]

**कोपरकात्री** स्त्री. उपयोगात येणारी वाकड्या पात्याची कात्री.

**कोपरख(खि)ळी** स्त्री. १. कोपराने मारलेली ढुसणी, ढुसकणी. (क्रि. मारणे, देणे.) २. कोपराने पाडलेला खळगा. (हा गुराख्यांचा खेळ असतो. अशा खळग्यात ती पोरे गोट्यांनी खेळतात.) (क्रि. पाडणे.) ३. (ल.) लेखात, भाषणात उगाच दुसऱ्यावर घेतलेले तोंडसुख; जाता जाता, सहजासहजी एखाद्याविरुद्ध बोलणे; ताशेरा.

**कोपरदुटी** स्त्री. कोपरे आणि गुडघे पोटाशी धरून झाकण्यापुरते वस्त्र : 'स्नानकुंडली कां कोपरदुटी पांगुरावी :' - लीचउ १३७.

**कोपरघुसणी** स्त्री. (गोट्यांच्या खेळातील एक शब्द) कोपराने गोटी गलीत घालणे. पहा : **कानघुसणी**

**कोपरबरास, कोपरबास** न. १. तांबे व पितळ यांचा मिश्र धातू. २. टीनचा धातू. कोपरबरासचा डबा = केरोसिनचा (टिनचा) डबा (कु.) ३. जर्मन सिल्व्हर. [इं. कॉपर + ब्रास]

**कोपरमोड** वि. कोपरासारखी मोडलेली (जागा). (व.)

**कोपरवाळी** स्त्री. बाजूबंद; एक दागिना. (व.)

**कोपरा** पु. १. कोन; उपदिशा. २. (वास्तु.) दोन भिंतीच्या सांध्यातील, दर्शनी काटकोनातील चौरस दगड. [सं. कूर्पर] (वा.) ० **धरणे** - १. रुसणे. २. विटाळशी असणे.

**कोपरी** स्त्री. १. तळहातापासून कोपरापर्यंत ४० अगर जास्त वेढे देऊन सुंभासारख्या दोरीची केलेली गुंडाळी : 'त्या दिवशी सुंभाची कोपरी आणून छपराची डागडुजी करीत होता.' - रथ २५५. २. गोट्यांच्या खेळातील एक संज्ञा. - डाव लागला म्हणजे नियमित स्थळापासून गोटी कोपराकोपराने उडवीत गल्लीमध्ये आणून टाकणे. ३. कोपराजवळ येणारी सूज; एक रोग. ४. कोपरापर्यंत बाह्या असलेली बंडी, अंगरखा : 'अंगांत रेशमी कोपरी.' - हाकांध २११. [सं.]

**कोपरी** स्त्री. नखुरडे. [सं.]

**कोप (फ) ल** न. एक प्रकारचे तेल, वार्निश : 'रोगणाचा उपयोग करणें झाल्यास कोपल रोगणाचा उपयोग करावा.' - मॅरट २५.

**कोपळी, कोपी** स्त्री. काटेरी झुडूप. (व.)

**कोपळे** न. कोपळी तोडण्याचे हत्यार. (व.)

**कोपान्नल** पु. क्रोधाग्नी.

**कोपायमान** वि. रागवलेला; संतप्त. [सं. कुप्यमान]

**कोपिष्ट, कोपी** वि. ज्याला लवकर राग येतो असा; शीघ्र संतापी.

**कोपी** स्त्री. १. शेतातील झोपडे; खोपट. पहा : **कोप, कोपट** : 'आश्रमासी स्थान कोपी गुहा।' - तुगा २७२५. २. वृक्षाची ढोली : 'अन्न कोपीसी ठेवी.' - गोप्र ७७.

**कोपीण-न** न. स्त्री. लंगोटी. (क्रि. नेसणे.) : 'नेसोनि कोपीन शुभ्रवस्त्र जाण।' - तुगा २८३०. [सं.कोपीन]

**कोफता** पु. गोळा (स्वयंपाकातील) : 'खेम्याचे कोफते म्हणजे गोळे करून...' - गृशि २.२१०. [फा. कोफ्ता = कुटलेला गोळा (मांसाचा)]

**कोफेहाट** पु. एकप्रकाचे दुकान, बाजार : 'कोफेहाट... धनगरहाट' - स्थापो ८१.

**कोबरी** पु. मातीचे एक भांडे. (कु.) [सं. खर्पर]

**कोबले** न. आंबे काढण्याकरिता काठीला बांधले जाणारे जाळे; घळ; झील; झेलगे; झेला.

**कोबलेबारक, कोबरब्राक** न. टिन. पहा : **कोपरबरास**

**कोबा** : पु. (वास्तु.) चुना, माती, कांक्रीट, सिमेंट, शेळीच्या लेंड्या इ. चे मिश्रण. ह्याने जमीन, गच्ची तयार करतात.

**कोबाया** स्त्री. कलकल करणाऱ्या बाया, स्त्रिया. (व.)

**कोबाळ** पु. १. फारसे काम न करणारा मुलगा, म्हातारा इ. निरुपयोगी लोकांचा समुदाय (चि.). २. सटरफटर वस्तू.

**कोबी-ब** स्त्री. पानांचा एक गड्डा; भाजी. ही युरोपीय लोकांनी आणलेली असून हिचे तीन-चार प्रकार आहेत. ही थंडीच्या दिवसात व चांगल्या जमिनीत तयार होते. कोबू. (गो.) [इं. कॅबेज]

**कोबीट** न. फाळ नसून बोंडशी असलेला बाण, तीर.

**कोबीफ्लॉवर** पु. कोबीच्या वर्गातील एक भाजी.

**कोबेणे, कोबेवणे** अक्रि. कोंब येणे; अंकुर फुटणे. (राजा. गो.) पहा : **कोंबणे**

**कोम** स्त्री. १. स्त्रियांच्या नावापुढे अमक्याची पत्नी असे दाखविण्याकरिता हा शब्द योजतात. २. जात. [फा. कोम् = जात, कुटुंब]

**कोम या अक्षरांनी आरंभ होणारे शब्द कोंब खाली पहा.**

**कोम(मे)जणे** अक्रि. सुकणे; वाळणे (फूल); झडणे; अशक्त, क्षीण होणे.

**कोमट** पहा : **कोंबट**

**कोमटा** पु. खाऱ्या पाण्यातील एक मासा : 'फुटलेल्या बांधाचे दुःख विसरून तो कोमटा घेऊन घराकडे धावला.' - इंधन २५.

**कोमटी** पु. १. कर्नाटकातील वैश्य जात व त्या जातीतील माणूस; व्यापार उदीम करणारी एक जात. २. (ल.) सोवळे-ओवळे नसणारा; अधार्मिक; नास्तिक. [क.]

**कोमणे, कोमाई (य) णे** पहा : **कोमजणे** : 'कोमुन जातां तरी मला तूं फेंकून दिधलें असतें।' - टिक ३९; 'म्हणोनी कृपा आकळिला। दिसतसे अति कोमाइला।' - ज्ञा २.४. [सं. कु + म्लान]

**कोमल-ळ** वि. १. मृदू; सुकुमार; नाजूक; सुंदर. २. गरीब; सौम्य; हळव्या मनाचा. ३. मधुर; रमणीय, प्रसादयुक्त. (शब्द, नाव, आवाज) : 'सकोमल सरिसे।' - राज्ञा ६.१८३. ४. अपरिपक्व (ज्ञान). ५. बेअक्कल. [सं.]

**कोमलणे, कोमाय (व) णे, कोमेजणे** अक्रि. १. कोमणे; कोमाइणे; सुकणे; निस्तेज होणे : 'ब्रह्मादिसुखें कोमाये।' - भाए १७५. २. द्रवणे; सद्गदित होणे : 'माझें तोंड उतरलेले पाहून हा फारच कोमावला.' - बाळ २.१८. ३. कमी होणे; ओसरणे : 'कॉलेजमध्ये गेल्यावर त्याला अर्धांगवायु झाला आणि त्याची सर्व महत्त्वाकांक्षा कोमेजून गेली.' - स्मरण ४०. [सं. कोमल]

**कोमलभाव** पु. वत्सलभाव; मृदुभाव.
**कोमलस्वर** पु. (संगीत) शुद्ध स्वरांपेक्षा ध्वनीने नीच स्वर. हल्लीच्या संगीत पद्धतीत कोमल स्वर पाच मानतात. (कोमल) ऋषभ, गांधार, मध्यम, धैवत, निषाद.
**कोमलॉ** पु. कोंबडा. (गो.)
**कोमळ** पु. आरंभीच्या अवस्थेतील साधक : 'की द्रिढावया कोमळाची स्वस्तता: देवें बोधशक्ति पाठविली मज पांता :' - मूप्र ११६.
**कोमाइणे, कोमाणे** अक्रि. सुकणे; कोमेजणे : 'जेवी कर्दळी कोमाती चंडवातें।' - जांस्व २५४. पहा : **कोमणे**
**कोमार** न. १. तरुणपण; कौमार्य. २. उत्साह; हौस. [सं. कौमार्य] (वा.) ० **काडप** - हौस उत्पन्न करणे (गो.) ० **काढणे** - कोणत्याही गोष्टीला प्रवृत्त होणे. (कु.)
**कोमाळणे, कोम्हाय(ळ)णे** प्रेमाने अंगावरून हात फिरवणे; कुरवाळणे; गोंजारणे. (व.) : 'कोम्हायता फुटे पान्हा' - बगा १. [सं. कोमल]
**कोमेणे** पहा : **कोमणे, कोमजणे** : 'वदनेंदु कोमेला कळाहीन वाटे सुखसंपत्ती।' - पला ४४.
**कोमेतुला** पु. १. समुद्रातील एक प्राणी. २. सपक्ष, सकेश तारा.
**कोय** स्त्री. १. आंब्याच्या फळातील बाठ, आठी, अठळी; बीज. २. बाठीतील गर; बाठांच्या पोटी असणारा दोन अवयवरूपी अंश. ३. (ल.) अंडकुली. ४. ताडफळाच्या गिरावरील कवची. ५. आंब्याच्या अर्ध्या बाठीची भिंगरी. [क. काई]
**कोय** पु. डोंगर. (आगरी) [फा. कोह = पर्वत]
**कोयकमळ** न. श्वेतकमळ; कुवलय. [सं. कुवलय]
**कोयका** पु. गुन्हेगार जातीतील पोलीस या अर्थाचा शब्द.
**कोयकानाई** पु. पोलीस शिपाई.
**को (कों) यको (कों) य** स्त्री. कुत्र्याचे किंवा त्याच्या पिल्लांचे भुंकणे; ओरडणे; क्यांव-क्यांव करणे.
**कोयडे** पहा : **कुवेडे**
**कोयडेबार** न. विटीदांडूचा खेळ. (गो.)
**कोयतट** न. आंब्यातील कोयीला तिरस्कारार्थी म्हणतात.
**कोयतपट्टी** स्त्री. जी जमीन नांगरटीस करायला योग्य नसल्याने हातांनीच कसतात, अशा जमिनीवर कोयतांच्या संख्येनुसार बसविण्यात येणारी पट्टी.
**कोयता** पु. १. लाकूड तोडण्याचे एक हत्यार. कोयतो : 'मी हिवाने मेलो घे माझो कोयतो.' - भज ८ (गो.) २. केस काढण्याचे हत्यार. (ढोर) [क. कोयित = विळा]
**कोयताड** न. कोयतीसारखे मोठे कणीस; मोठी आकडेदार चिंच वगैरे.
**कोयताल** न. शेताच्या कडेची जमीन. (बे.)
**कोयती** स्त्री. लहान कोयता; कोकणात भात कापण्याच्या कोयतीला करवतीसारखे दाते असतात. तिला दाती कोयती असेही म्हणतात.
**कोयते, कोयतूल** न. लहान कोयता, कोयती. (राजा)
**कोयतेवाल** पु. कोयतीच्या आकाराच्या शेंगा असणारे वाल; खरसांबळ.
**कोयतो** एक अलंकार.

**कोयनळ, कोळिंदर** पु. दोन रुखांवर खुंट्या मारून त्यावर एक आडवे लाकूड मारतात त्यास कोयनळ म्हणतात. कोयनळावर कोळंब्याची एक बाजू टेकलेली असते. (को.)
**कोयनाटकी** स्त्री. कोयीची केलेली भिंगरी, पिपाणी; कोकाटी; कोय. वि. (कोयीने संतुष्ट होणारा) कंजूष, कृपण.
**कोयनेल** न. हीवतापावरचे एक औषध; सिंकोना सालीचे सत्त्व : '५ ग्रेन कोयनेल दिवसातून ३-४ वेळा घ्यावे.' - निऔ २२. [इं. क्वीनीन]
**कोयपाणी** न. गुठळ्या व पाणी झालेले (शितड्या पाण्याचे) दही.
**कोय मारणूक कोया** : मुलांचा एक खेळ.
**कोयमे** न. ताक करायचे मडके. (खा.) पहा : **कोळंबे**
**कोयर** पु. केर; उकिरडा. (गो.)
**कोयरसिताडो** पु. शेणपोतेरे. (गो.)
**कोयरी** स्त्री. १. चांदीच्या पत्र्याची, सपाट अगर पसरट आकाराची, साधी अगर नक्षी केलेली डबी. ही मधोमध कापलेल्या आंब्याच्या छेदासारखी दिसते. हिच्यात हळदीकुंकू ठेवण्यासाठी दोन-तीन पुडे असतात; हळदीकुंकवाची डबी; कुयरी. २. झीग व टिकली यांचे कोयरीच्या आकाराचे विणकाम. ३. आंबेघाटी कोयरीच्या आकाराची टोपणे, मणी, घागऱ्या जिच्यात ओवल्या आहेत असा दागिना, कमरपट्टा, माळ इ.
**कोयरीची माळ** स्त्री. चांदीच्या कोयरीच्या आकाराच्या मण्यांची माळ; घोड्याचा दागिना.
**कोयल** न. नांगरताना चुकलेली जागा. (बे.)
**कोय (ई) ल, कोयाळ** स्त्री. कोकिळा : 'मंजूल शब्द जशि टाहो करिति कोयाळ।-' अफला ५४. [सं. कोकिल]
**कोयंडा** पु. १. दाराची कडी अडकविण्याचे गोलाकार अडकण; वाकवून दुहेरी केलेला खिळा. २. कडीत घालायचा खिळा; अडसर; आकडा. ३. लांब आसुडाचा लाकडी दांडा. (कर.) ४. फासा (नथ, डूल इत्यादीचा). ५. कोलदांडा (मनुष्याला किंवा गुरांना घालण्याचा) हाताला बांधून त्यामध्ये घातलेला. ६. एका खेळातील वाकडी काठी. गुराखी हा खेळ खेळतात. (कु.)
**कोयंडा** पु. आंब्यातील कोय. (राजा.)
**कोयंडी** स्त्री. १. गुराने दावे चावून तोडू नये व मारक्या गुराने एकदम वळून हल्ला करू नये म्हणून एका लांब काठीला दोन कान्या लावून वेसणीत बांधण्याची केलेली व्यवस्था. २. शिक्षा म्हणून हात वगैरेंना कळ लागण्यासाठी लावण्यात येणाऱ्या टिपऱ्या.
**कोयंडी-डो** स्त्री. पु. विहिरीच्या दोराचा फास. (गो.)
**कोयंडो, कोयडो** पु. दांडू. (गो. कर.)
**कोया** पु. १. एक पक्षी. २. या पक्षाचे केविलवाणे ओरडणे, ध्वनी, शब्द. [ध्व.] (वा.) ० **करणे, ० करीत हिंडणे** - १. कीव येण्याजोगी याचना, विनवणी करणे (अन्न इ. करिता). २. कंगाल होऊन भटकत फिरणे.
**कोयाड** न. मंत्रतंत्र, जादूटोणा : 'त्या काळात तरी हा कोयाडाचाच प्रकार' - बहु २८.

**कोयाडे** न. पिकलेले, पाडाचे व आंबट आंबे उकडून गीर काढून त्यात पाणी, गूळ व मसाला वगैरे घालून केलेला पदार्थ; आंब्याचे तोंडी लावणे.

**कोयार** पु. बेलफळ कोरून केलेला भोवरा. (व.)

**कोयाळ** स्त्री. १. कोयीचे केलेले वाद्य; पुंगी; पिपाणी. २. आंब्याच्या कोयीची भिंगरी; कोकाटी.

**कोयाळ** वि. कोय अथवा बाठा धरलेला आंबा.

**कोयाळ** वि. मंजूळ : 'पाटच्या पारामंदी कर्णा वाजतो कोयाळ.' - जसा ४६१.

**कोयाळणे** अक्रि. (आंब्याने) बाठा धरणे; आंबा कोयीने युक्त होणे. (को.)

**कोयी** स्त्री. डोक्यातील केर काढण्यासाठी आंब्याच्या कोयीला दाते पाडून केली जाणारी फणी.

**कोर** स्त्री. पु. १. कडा; धार; कडेची रेषा; किनारा; पदार्थाच्या कडेचा सूक्ष्म व एकसारखा धाराकार अवयव; मर्यादा. २. (वस्त्राचा) काठ; काठाची पट्टी; (जरीची) किनार; फीत इ. ३. (भाकरी-पोळीचा) तुकडा, चतकोर (चंद्रकोरेप्रमाणे चतकोराला कड असते यावरून). ४. नखाच्या मुळाशी असलेल्या चंद्राच्या कोरीसारख्या रेषा व तेथे होणारे नखुरडे. ५. (शिंपी) काखेत लावण्याचा त्रिकोनी तुकडा; ठुशी. ६. हजामतीचा एक प्रकार. ७. हद्द; मर्यादा : 'तैसे जी न बडबडी। पदाची कोर न सांडी।' - ज्ञा १२.८५४. ८. गोवरीचा तुकडा; गोवरी; शेणी. (वा.) [क. कोरू = भाग] ० **धरणे** - कपाळावरील केस चंद्राच्या कोरीप्रमाणे ठेवणे, राखणे; तशी हजामत करणे.

**कोर** स्त्री. मत्सर; द्वेष; बरकस.[फा. कुऱ्हा] (वा.) ० **धरणे, लावणे** - द्वेष करणे : 'मानकऱ्याने कोर धरली।' - ऐपो २८७. ० **चालविणे** - वैर धरणे : ' परंतु हिसायेब मोहिद्दीनखानासी पठाणानी थोर्डेच दिवसांत कोर चालवून दक्षण आपण आटोपावी या तलाशास लागले.' - हिंदखं १.४२.

**कोर** स्त्री. शिपायांची तुकडी, रांग. [इं. कोअर]

**कोरक** न. एक भाजी.

**कोरका** पु. (पुरा.) पाषाणाची, हाडाची, धातूची बनवलेली आरी, टोचा.

**कोरका** पु. हुंडी; वही; कागद. (नंद.)

**कोरका** पु. (भाकरीचा) तुकडा, कोर : 'मग गोसावीं दोन्ही कोरके एकवट मेळवली' - गोप्र ६१.

**कोरकापी** स्त्री. सुताराचे नक्षीकामाचे एक हत्यार. (को.)

**कोरकांगु (गो) णी** स्त्री. एक प्रकारचे धान्य. पहा : **कांगुणी**

**कोरकांडे** न. कोरफड. घृतकुमारी; कन्याकुमारी. (को.) [सं. कुमारी + कांड]

**कोरके** न. कोरडे अन्न : 'तळणवळण केलें : कोरकें सिद्ध जाले :' - सारुह ६.७२.

**कोरखडी** स्त्री. एक प्रकारचा खडू. शिंपी लोक हा खडू कापडावर खुणा करण्यासाठी वापरतात.

**कोरखांड** न. भाकरी किंवा पोळीचा तुकडा : 'या अवघेयां कोरखांड आले' - लीचउ १३१.

**कोरगिरी** पहा : **कोरबंदी**

**कोरगू** पु. खेड्यातील एक बलुत्या. प्रवाशांची बडदास्त ठेवण्याचे काम याच्याकडे असे.

**कोरट** स्त्री. कातलेले पण कच्चे (न उकळलेले) रेशीम. [हिं. कोरा = साधे रेशीम]

**कोरटाण** स्त्री. कोरेपणाची घाण, वास (कपडे, मडकी वगैरेस येणारी).

**कोरटे** पु. कारळे तीळ.

**कोरड** वि. निष्ठुर, ज्याचे अंतःकरण द्रवत नाही असा : 'एक कोरडे कणवाळु : विश्वासघातकी.' - मुप्र २७६.

**कोरड** स्त्री. १. तोंड अथवा घसा याला पडलेला शोष (आजार, उपास, भय वगैरे प्रसंगी); तोंड वाळणे; कंठशोष. (क्रि. पडणे, येणे.) २. (सामा.) शुष्कपणा; ओलेपणा नसणे. (क्रि. पडणे.) ३. निश्चिंत : 'मग आपण एथ कोरडी एति' - लीचपू ३९७. [क. कोरगु = वाळणे, शुष्क होणे] (वा.) ० **वळणे, वाळणे** - क्षुधेने व्याकुळ होणे.

**कोरड** स्त्री. अंगण; घरापुढील उघडा ओटा. (तंजा.)

**कोरडक** न. घराच्या आढ्याला वा भिंतीला लोंबणारे कोळिष्टक, जळमट. (को.)

**कोरडणे** अक्रि. कोरडे पडणे, वाळणे : 'बोलायाचे पुष्कळ शक्ति न कोरडले ओंठ।' - अनंततनयकृत माझे कुंडल (हृदय तरंग २).

**कोरडणे** न. ओझे आवळताना दोरी ज्यावरून ओढून घेऊन बांधतात तो लोखंडी मणी; पुली. (बे.) पहा : **कोरडिके** [क. कोरडु = लाकडाचा तुकडा]

**कोरडवट** स्त्री. १. जिराईत, कोरडवाहू जमीन; सुकी जागा. २. जमीन; भूमी (नदी, समुद्र, सरोवर यांच्या विरोधी शब्द). (व.)

**कोरडवाव-वू-ही-हू** वि. विहीर किंवा पाटबंधाऱ्याच्या पाण्याविरहित फक्त पावसाच्या पाण्यावर पिकणारी जमीन; जिराईत; कोरडवट.

**कोरडवाहतूक** स्त्री. शुष्कता; कफल्लकपणा.

**कोरडा-डे-डी** वि. १. अनार्द्र; शुष्क; जलरहित; आर्द्रताविरहित; पाण्याचा थोडासुद्धा अंश नसलेला : 'ते रडे भरतही तसा रडे जोंवरी नयन होति कोरडे।' - वामन भरतभाव १६. २. नुसते; बरोबर कोरड्यास नसलेले; दूध, दही वगैरे पातळ पदार्थांचे कालवण नसलेले (अन्न). ३. नक्त (जेवणाशिवाय मजुरी); उक्ते. ४. (ल) औपचारिक, शुष्क, पोकळ, वरकांती, निष्फळ, बिनहशिलाचा, बिनफायद्याचा, निरर्थक. ५. व्यर्थ; फुकट : 'हिंडणवारा कोरडा। तैसा जया।।' - ज्ञा १३.६९०. ६. (ल.) वांझ. ७. व्याकूळ. [क.] (वा.) **कोरड्या अंगी तिडका** - १. प्रसूतिवेदनांचे ढोंग. २. ढोंग; भोंदूपणा.

**कोरडा** पु. १. कातडी चाबूक; आसूड. २. तडाखा, फटकारा. (वा.) ० **ओढणे** - चाबूक लगावणे, मारणे. २. (ल.) कडक टीका करणे. [फा.कोर]

**कोरडा अधिकार** १. नुसता पोकळ, नावाचा अधिकार. (क.) २. बिनपगारी अम्मल, हुद्दा; विनावेतन काम.

**कोरडा खडक** अतिशय कठीण, टणक खडक. पहा : **खडक**. २. (ल.)

अडाणी. ३. पहा : **कोरडा पाषाण**

**कोरडाटा (ठा) क** वि. १. मुळीच पाणी नसलेला; कोरडा ठणठणीत : 'गंगेच्या कोरड्याठाक पात्रात ...' - पुत्र १३. २. (ल.) निर्विकार; घुम्या : 'त्यांचा चेहरा तर कोरडाठाक होता.' - देव ९०.

**कोरडा चंदा** आतबट्ट्याचा किंवा बिननफ्याचा उद्योग.

**कोरडा पाषाण** १. कठीण, ठणठणीत दगड. २. (ल.) उपदेशाप्रमाणे आचरण न करणारा माणूस.

**कोरडा प्रदेश** जेथे मद्य निर्मितीस वा पिण्यास बंदी आहे असा प्रदेश.

**कोरडा ब्रह्मज्ञानी** पु. भोंदू; ढोंगी; स्वतः ब्रह्मज्ञानाचा अनुभव नसलेला पण लोकांना त्याचा उपदेश करणारा मनुष्य.

**कोरडिके-डीक-डुके-डूक, कोरुडके-गे, कोडके, काडका-के** न. १. अडसर; अडचण (गज, दाराचे कुत्रे, कुसे, तसेच कुळव, पाभर यांचे एले किंवा कोयंडा याचे कुसू). २. अर्धगोल किंवा अंतर्गोल लाकडी मणी, पुली. (यातून दोर ओढून घेऊन शेतकीची अवजारे बांधतात.) दोर तुटू नये म्हणून ही बांधतात. ३. सूत काढण्याच्या रहाटाला बसविलेले (कण्याच्या शेवटी) एक लाकडी चाक. या चाकाला एक बोट जाईल असे भोक असून त्यात बोट घालून ते फिरविले असता रहाट फिरतो. ४. सनगर लोकांचे बिनचाकाचे सूत उलवण्याचे साधन; कोरीटक. (को.)

**कोरडी आग** स्त्री. भयंकर मोठी आग.

**कोरडी ओकारी-खाकरी** स्त्री. १. घशात बोटे घालून मुद्दाम काढलेली ओकारी. सकाळी तोंड धुताना घशात बोटे घालून काढलेले खाकरे. (क्रि. देणे, काढणे.) २. ओकारी येतेसे वाटणे; (क्रि. येणे.). पोटात ढवळल्याप्रमाणे होऊन मळमळ सुटते आणि थुंकी पडते, हृदयात पीडा होते, ओकारी येते परंतु अन्न पडत नाही अशा वेळी म्हणतात.

**कोरडीक** स्त्री. बैलाला बांधलेला दोर. पहा : **बैला, बैली, कोरडिके ४**

**कोरडी किटाळ** स्त्री. १. (शब्दशः) कोरडी ठिणगी. २. (ल.) तोहमत; आळ. (क्रि. घालणे, उठवणे, घेणे.)

**कोरडी किरकिर** स्त्री. विनाकारण त्रास, कटकट, तक्रार, पिरपिर, भुणभुण.

**कोरडी जागा** स्त्री. वरकड कमाई नसणारी अधिकाराची जागा.

**कोरडी जांभई-ळी** स्त्री. श्रमामुळे आलेली (झोपेमुळे नव्हे) जांभई.

**कोरडी दारू** वायबाराची दारू; वायबार.

**कोरडी पद्धत** स्त्री. (कृषी.) केवळ पावसाच्या पाण्यावर केलेली शेती.

**कोरडी भिक्षा** तांदूळ, गहू वगैरे धान्याची भिक्षा.

**कोरडी मेजवानी** स्त्री. अन्नाशिवाय मेवामिठाईची आणि तळणावळणाची मेजवानी; उपाहार.

**कोरडी सवाशीण** स्त्री. जेवणाखेरीज ओटी भरून कुंकू लावून जिची बोळवण करतात अशी सवाष्ण. ब्राह्मणेतरांच्या घरी ब्राह्मण सवाष्ण बोलावतात तेव्हा तिचा याप्रकारे सत्कार करतात.

**कोरडे अंग** वांझपणा; वांझ कूस.

**कोरडे कष्ट-श्रम** पुअव. विनाफायदा, निरर्थक श्रम; व्यर्थ मेहनत.

**कोरडे काम** न. १. विटाळशेपणी व पाचव्या दिवशी न्हाऊन शुद्ध होण्यापूर्वी करायचे काम. २. वेळ घालविण्याकरिता केलेले सटरफटर काम.

**कोरडे तप** न. श्रद्धाहीन, भक्तिहीन तपश्चर्या, आराधना.

**कोरडे बोलणे-भाषण** न. वरकांती, मनापासून नव्हे असे भाषण, बडबड.

**कोरडे ब्रह्मज्ञान** न. आचरण नसताना सांगितलेला वेदांत, परमार्थविद्या; बकध्यान; भोंदूपणा, ढोंग.

**कोरडे वैर** न. निराधार द्वेष, मत्सर.

**कोरडे सुख** न. उपभोगाशिवाय सुख; नाममात्र आनंद.

**कोरड्या गाथा** स्त्रीअव. बनावट बातम्या; भुमका; कंड्या.

**कोरड्या टाकाचा हिशे (शो-सा) ब** ज्यात यत्किंचितही फेरबदल करण्यासाठी लेखणी शाईत बुडविली गेली नाही असा स्वच्छ, बिनचूक लिहिलेला जमाखर्च; तक्ता; चोख हिशोब. (क्रि. देणे, करणे.)

**कोरड्यास** न. भात, भाकरी इत्यादींच्या जोडीला खायचा कालवणा-सारखा पदार्थ; कालवण : 'चूल पेटली, वांग्याचे कोरड्यास गाडग्यात रटरटू लागले.' - हपा २१.

**कोरण-णे** न. कोरान्न; कोरडी भिक्षा : 'कोरणें मागुन झोळी भरली।' - भज ४२

**कोरण** स्त्री. खोबण; खाच; (खिडकीच्या झडपांच्या खालच्या पट्टीतील) कोरून काढलेला भाग.

**कोरण** न. १. (रसा.) द्रावककोरण; रासायनिक क्रियेमुळे होणारे कोरण, खड्डा. २. धातूच्या पत्र्यावर आम्लाने नक्षी किंवा अक्षरे कोरणे.

**कोरणचिन्ह** न. (भूशा.) विशिष्ट द्रावणाने विशिष्ट जातीच्या स्फटिकावर उमटणाऱ्या खुणा.

**कोरणछिन्नी** स्त्री. (स्था.) दगड कोरण्याचे हत्यार.

**कोरणमुद्रक** पु. कोरणारा; कोरीव काम करणारा.

**कोरणी** स्त्री. (स्था.) कोरीव कामासाठी वापरले जाणारे हत्यार.

**कोरणी-णे** स्त्री. न. १. कोरणेपासून धातुसाधित नाम. कोरण्याची क्रिया; खोदणी. २. कोरण्याचे साधन; शस्त्र (मूर्ती, कान, नालबंदी करताना घोड्याचे खूर) कोरण्याच्या कामी उपयोगी; मातीच्या चित्राच्या कामी लागणारी करणी. ही पितळी, लोखंडी किंवा लाकडाची असून गुळगुळीत, सभोवार चपटी व निमुळती गोलटे मारलेली असते. चुनाळ्याची कोरणी त्याला साखळीने अडकवलेली असते. ती काडीसारखी पण तोंडाला चापट असते. ३. दुकानाच्या फळ्या काढघाल करण्यासाठी खालच्या व वरच्या उंबरठ्याला खोबण पाडलेली असते ती सर्व रचना.

**कोरणे** उक्रि. १. एखाद्या पदार्थावरील थोडा थोडा अंश नाजूक रीतीने काढणे; पोखरणे; खोदणे; नकसणे (आकार देण्यासाठी किंवा आतील भाग काढण्यासाठी) : 'तो कार्ष्ठे कोरूं धांवे।' - ज्ञा १८.७१९. २. कान, दात यातील मळ काढणे. ३. एखाद्याचे द्रव्य त्याच्या नकळत थोडे थोडे युक्तिप्रयुक्तीने बळकावण्याचा व्यापार, उद्योग. [ क. कोरे = खोदणे, भोक पाडणे] (वा.) **दात कोरून पोट भरणे** - अतिशय कंजूषपणा करणे.

**कोरदार** वि. कंगणीदार : 'मृदुतर थिरमे त्या कोंचक्या कोरदारा।' - सारुह ३.४०.

**कोरदृष्टी** स्त्री. तिरपी नजर; चोराची नजर; चोरून पाहणे; न्याहाळणे :

'कोरदृष्टीने असावें पहाता' - कथा १.६.१९६.

**कोरनगटी** पहा : **कोरनाड** : 'पीतवसन परिधान कोरनगटी त्यावर भरजरी।' - मला २३५.

**कोरनाड** वि. या पेठेच्या साड्या व लुगडी (रेशमी, जरीची). (तंजा.) [ क. कोरे = लग्नप्रसंगीचे वस्त्र; भारी वस्त्र + नाड = देश, पेठ]

**कोरनितकोर** वि. भाकरी, पोळीचा लहानसा तुकडा; अगदी थोडासा : 'कुणी कोरनितकोर (भाकरी) दिली ती घेऊन ओढ्याकाठी गेला.' - गागो ४७.

**कोरप** न. गोवऱ्यांची आगटी; झगरे. (को.)

**कोरप** न. बंदुकीचा काना.

**कोरपट्टी** स्त्री. वेलबुट्टी व कशिदा काढलेला काठ. ही कापडाला स्वतंत्रपणे जोडतात.

**कोरपणा** स्त्री. रुखरुख. (कर.)

**कोरपा** वि. वाळून शुष्क झालेला (पदार्थ). (व.)

**कोरफड** स्त्री. कडू गर असलेल्या जाड, कडेला काटे असलेल्या पातीची औषधी वनस्पती. ही वनस्पती पाण्याशिवाय वाढते. जुन्या पात्या सुकल्या म्हणजे नव्या पात्या फुटून ही वनस्पती नेहमी ताजी राहते. म्हणून हिला कुवारी, कुमारी, कुवारकांडे म्हणतात. हिच्या रसापासून कडू (काळा) बोळ तयार करतात.

न. कोरफडीपासून तयार केलेला पदार्थ : औषध : 'कोरफडीच्या पानाचे औषधी उपयोग पुष्कळ आहेत.' - वनश्री ४००. [सं. कुमारी]

**कोरबंद** वि. चिडखोर; त्रासिक.

**कोरबंदी** स्त्री. बरकस; द्वेष.

**कोरबंदी** स्त्री. एका ओळीत सैन्याची रचना करणे : 'त्या बाबा फडक्याची कोरबंदी न्यारी ।' - ऐपो २८१.

**कोरबी** स्त्री. झिंगा; एक प्रकारचा मासा. (को.) [ क. कोरव]

**कोरबू-भू** पु. गावातील एक बलुतेदार. ही धनगर जात आहे. कोरबूची कामे पुष्कळ आहेत. पैकी प्रवाशांची बडदास्त ठेवणे, त्यांची ओझी वाहणे, रयतेपासूंन सरकार देणे-घेणे वसूल करणे इ. : 'मंगळवेढेकर कोरबूचे कांहीं खटले होते...' - हरिवंब ११.

**कोरभारण** न. (स्था.) चंद्रकोरीच्या आकाराचे घातलेले भरवण.

**कोरम** वि. पहा : **कोरंब**. १. (लाकूड किड्याने पोखरून पोकळ केले म्हणजे त्याला कोरम म्हणतात. त्यावरून लक्षणेने) पोकळ; पोखरलेले : 'आतून जीर्ण व कोरम झालेले हें जुनें खोड.' - महादजी चरित्र १. २. क्षीण; दुर्बल; निःसत्व : 'वाढत्या खर्चाची धोंड आधींच कोरम झालेल्या शेतकऱ्यांवर पडता कामा नये.' - के ७.१.१९४१. [सं. कृमि]

**कोरम** पु. न. सभेस आरंभ करण्यासाठी अवश्य ठरवलेली सभासदांची संख्या; गणपूर्ती. [इं.]

**कोरमा** पु. एक मांसयुक्त खाद्य.

**कोरमेनचे** क्रि. पोखरणे. (गो.)

**कोरला** पु. कांचनाच्या जातीचा एक रानटी वृक्ष. याची भाजी चवदार असते. गंडमाळा व अदची रोगात सालीचा काढा गुग्गुळाबरोबर देतात.

**कोरवट** वि. नव्यासारखे; कोरे. पहा : **कोरवाण**

**कोरवडा** पु. कोहळ्याचा कीस घालून केलेला उडदाच्या पिठाचा वडा. (व.) : 'सहित पापडे कथिकवडे, आणिक कोरवडे।'-अमृतसुदाम १४.

**कोरवण** न. घर शाकारणीचे गवत.

**कोरवाण-न** न. १. अगदी नवे कोरे दिसणारे कापड. २. हलक्या प्रतीचे कापड.

वि. १. (वस्त्रोद्योग) मागावरून काढलेले परंतु पांजणी न केलेले (वस्त्र अगर तागा). हा अर्थ कोमटी लोकांत रूढ आहे. २. (सामा.) अगदी कोरे करकरीत; ताजे; नवे (कापड, मोती, भांडी, दागिने वगैरे).

**कोरवान** वि. कपाळावर केसांची कोर ठेवली आहे किंवा ठेवण्याचे वय झाले आहे असे. (दहा बारा महिन्यांचे मूल). पहा : **कोर धरणे**

**कोरसी** वि. वक्रदृष्टी : 'तो कोरसीया कोनाडी : परिछेदाचे सीर पाडी.' - मूप्र २१५३.

**कोरष्टा(सा) ण** : पहा : **कोरटाण**

**कोरळ** पु. एक झाड. पिवळा कांचन. [क. करले]

**कोरळा** पु. समुद्राच्या कडेला मासे खाऊन राहणारा, पिवळ्या पायाचा व चोचीचा, पांढऱ्या रंगाचा एक पक्षी. (कुलाबा)

**कोरंटी** स्त्री. एक काटेरी, फुलांचे झाड

**कोरंब**; वि. झडलेला; झिजलेला; खंगलेला; जीर्ण; अशक्त; जर्जर (काष्ठ, शरीर इ.). (राजा.) [ क. कोरे = झडणे, कमी होणे]

**कोरा** वि. १. ताजा; नवा; नवीन; नुकताच केलेला; न धुतलेला; न उपभोगलेला; न वापरलेला (कागद, भांडे, वस्त्र, इमारत, दुकान इ.). २. (ल.) ज्याला सराव किंवा अभ्यास नाही असा नवशिका (माणूस); अनुभव नसलेला. ३. न सुधारलेला, बदललेला; काही परिणाम ज्यावर होत नाही असा; संस्कारहीन (शिक्षण, शिस्त वगैरेनी). ४.कमी-जास्तपणा, वाढ किंवा काही परिणाम झाला नाही असा (व्यवहार, व्यापार, माल). ५. ज्याच्यावर काहीच लिहिलेले नाही असा. (कागद इ.) ६. रोख. (वा.) **कोरा घेणे** - दिव्य स्वीकारणे. [फा. कोऱ्हा]

**कोरा** रुपयाचा एक प्रकार.

**कोरान-न्न** न. न शिजविलेल्या तांदूळ, गहू इत्यादी धान्यांची भिक्षा. पहा : **कोरडी भिक्षा**. (क्रि. करणे, मागणे.) : 'काय समर्थाची कांता। कोरान्न मागे ॥' - ज्ञा १२.८५.

**कोरान्नकर-री-रीण** पु. स्त्री. कोरान्नाची भिक्षा मागणारा पुरुष किंवा स्त्री : 'दारा न ये कोरान्नकर।' - एभा २३.९३.

**कोराल** न. (पशु.) पाळीव जनावराच्या संरक्षणासाठी घातलेले कुंपण.

**कोराळ-ळे** न. १. डोंगरातील कडा, खडक : 'एरव्ही फोडी कोऱ्हाळें। पाणी जैसे॥' - ज्ञा १६.११७. २. डोंगरातील कोरीव लेणी. ३. दगड; खडकाळ जमीन. [क.]

**कोराळ जमीन** (डांग प्रांतातील) तांबडसर अशी निकस जमीन. ही टेकड्यांच्या पायथ्याशी असते. पहा : **कोराळे**

**कोरां (ऱ्हां) टा-टी, कोऱ्हांटकी** पु. स्त्री. एक फुलझाड. याला पांढरी, तांबडी, पिवळी, निळी, पारवी या रंगाची फुले येतात. झाड २/४ हात

उंच असते. सर्वांगाला काटे असून फुलाला वास येत नाही. या फुलात मध फार असतो : 'गुलाबाची फुलें रम्यें दिसे तैशीच कोन्हांटी।' - टिक २७२. [सं. कुरंटक]

**कोरांटकी** : पहा : **कोरांटी**

**कोरिका** पु. खाद्य पदार्थ : 'नाना कोरिके विस्तीर्ण, रुक्मिणी वाढीतसे।' - नागा ९९५.

**कोरी** स्त्री. नापीक जमीन. ही दुसऱ्या जमिनीबरोबर कसली असता त्या जमिनीवर सरकारसारा बसत नाही. पहा : **कोराळ जमीन**

**कोरीटक** पहा : **कोरडिके ४**

**कोरीव** वि. १. कोरलेले; खोदलेले; पोखरलेले. २. खवलेला, मगज बाहेर काढलेला (नारळ इ.). 'घडीला कां कोरीवा। परि जैसा।' - अमृ ९.७.

**कोरीवकातीव** वि. कोरलेले व कातलेले. (ल.) सुबक; सुरेख; सुंदर; चांगल्या आकाराचे.

**कोरीव ठोकळा** चित्रे छापण्याचा ठसा.

**कोरीव लेख** (ग्रंथ) दगडाच्या अथवा अन्य पृष्ठभागावर कोरून काढलेली अक्षरे, चिन्हे, लेख इत्यादी.

**कोरी सवाशीण** स्त्री. विवाहित परंतु ऋतू प्राप्त न झालेली सवाष्ण.

**कोरे** वि. बिनचुन्याचे; कच्चे : 'दिवसगती लागेल याकरिता कोरे काम करावे यैसे आमचा विचार आहे.' - पेद १६.३७. [फा. कोन्हा]

**कोरोडा, कोन्ह (न्हो) डा** : पहा : **कोरवडा**

**कोरोलँ** न. शेतातील तण. (गो.) पहा : **कोरळ** [क. करले]

**कोर्ट** न. १. न्याय देणारी सभा; न्याय कचेरी; सरकार दरबार. २. न्यायाधीश. ३. सर्व न्यायाधीश आणि मुलकी अधिकारी तसेच लवादपंच यांच्याशिवाय ज्यांना पुरावा घेण्याचा कायद्यानुसार अधिकार आहे अशा सर्व व्यक्ती. [इं.] (वा.) **कोर्टकचेरी-कोर्टदरबार करणे** - एखाद्या गोष्टीच्या निकालासाठी कोर्टात किंवा अधिकाऱ्याकडे तक्रार करणे : 'गुजा, व्यंकू, अरे आता कोर्टदरबार का करणार आहात?' - पडघ ११५.

**कोर्ट** न. खेळण्याकरता तयार केलेली बंदिस्त जागा, जसे :- टेनिस कोर्ट.

**कोर्टमार्शल** न. लष्करातील गुन्हेगारांसाठीचे लष्करी न्यायालय : 'त्याचा इन्साफ कोर्ट मार्शलकडून करवावा.' - के १७.५.३०.

**कोऱ्हेर-री** वि. लाकूड इत्यादीतून कोरून तयार केलेला; कोरीव. (बाहुली इ.)

**कोल, कौल** पु. अभय. किल्ला शरण आला म्हणजे त्याने कौल घेतला असे म्हणत : 'ठाणेकरी काही अद्यापि कोलाची बोली बोलत नाही.' - इएमपी ३६.

**कोल** पु. १. दंड; काठी. २. तिळाची कळी : 'झाडिलीचि कोळे झाडी।' - राज्ञा १३.५८६.

**कोल, कोलण-णी** स्त्री. विटीदांडूच्या अगर गोट्यांच्या खेळातील गली. पहा : **कोली**

**कोल** न. कर्जफेडीकरिता जप्त केलेले उत्पन्न, मालमत्ता; शेतातील पीक इ. जप्तीचा माल; कबज. (क्रि. धरून ठेवणे, सोडणे.) [फा. कौल = करार]

**कोल** वि. गरीब; अशक्त; दुबळा (द्रव्याने, शरीराने, चालण्याने, बुद्धीने); असमर्थ (को.) [क. कोळे = वाळणे, झिजणे]

**कोल** पु. डुक्कर. [सं.]

**कोलकर-री** पु. सेवेकरी; शिपाई; तराळ. (माण.) [क. कोतुकार = शिपाई]

**कोलकाठी** स्त्री. एक खेळ; दांडपट्टा : 'देवेंसि कोलकाठी धरूं। आखाडा झोंबीलोंबी करूं' - ज्ञा ११.५४८. [क. कोलु = काठी]

**कोलके** न. वजन.

**कोलखंड** न. मोठे पोट. (गो.)

**कोलगे** न. कुत्री. (गो.) पहा : **कोली**

**कोलडे** न. १. एक प्रकारच्या गवताचे बी. कबुतरे हे बी खातात. २. एक प्रकारचे बारीक धान्य.

**कोलणे, कोलवणे** उक्रि. १. (विटीदांडू) गलीवरची विटी दांडूने उडविणे : 'रावबानें प्रथम कोलर्ले व त्याची विटी झेलली गेली.' - सुदे ६. २. आपणावरची जबाबदारी दुसऱ्यावर टाकणे. (कामाची, देण्याघेण्याची इ.) : 'निकड कार्य करणें आल्या दुसऱ्यावर कोलत्यें।' - प्रला १७०. ३. लोटणे; झिडकारणे; दूर फेकणे; नाकारणे; हडहड करणे; उडविणे. ४. पराजित करणे (वादविवादात). [क. कोलु = काठी] (वा.) **कोलून मारणे** - १. लाथेने झुगारून देणे; उडवून फेकणे, वर करणे; उचकणे. २. एका अंगावरून दुसऱ्या अंगावर वळविणे.

**कोलता** पु. निखारा. पहा : **कोलित**

**कोलती, कोलेता** स्त्री. १. मशाल; कोलीत जळता निखारा; पेटलेले लहान लाकूड : 'पैं कोलिताही कोपे ऐसें। द्राक्षांचे हिरवेपण असे।' - ज्ञा १८.७९०. २. (ल.) द्वेष - मत्सर - दुष्ट बुद्धीने रचलेले कुभांड; खोटा आरोप. (क्रि. वर ठेवणे.) (वा.) ० **लावणे** - (ल.) कुभांड रचणे; दुष्ट आरोप करणे; कलागत लावणे : 'लावूनि कोलिता माझा करितील घात।' - तुगा १००७.

**कोलदं (दां) डा-दांड** पु. १. द्वाड कुत्र्याच्या गळ्याला बांधतात ते दांडके अगर गज. (क्रि. बांधणे.) २. (शिक्षेचा प्रकार) उकिडवे बसवल्यानंतर हातामध्ये पाय अडकवून व हात बांधून कोपरे व गुडघे यांच्या मधून घातलेला दांडा : 'जावाई हाचि कोलदांडा। काळें घातलासे वितंडा।' - स्वादि २.३.३८. ३. विघ्न; अडथळा : 'साम्यवादी पक्षाच्या कोलदांड्यामुळे जर्मनीतील समाजवादी पक्ष अधिकार ग्रहण करू शकला नाही.' - लोस ४० (ल) पेच; अडचण; कोडे : 'म्हणून आदि पुरुष कर्तृक म्हणजे ईश्वरकर्तृक असा कोलदांडा पडतो.' - के २५.१०.१९४०. [क. कोलु = काठी + दंड] (वा.) ० **घालणे** - अडथळा आणणे; दुसऱ्याचे काम यशस्वी होऊ न देणे : 'नाना प्रकारचे कोलदांडे घालून...' - ज्योफु १२७.

**कोलदेव** पु. करकोचा किंवा कुदळपक्षी. (कुलाबा)

**कोलन** न. (भूशा.) वनस्पतिजन्य पदार्थांचे कोळशामध्ये रूपांतर होण्याची क्रिया.

**कोलन** पु. अगदी लहान खड्डा. (व.) [क. कोळ = डबके, तळे]

**कोलन वर्गीकरण** (ग्रंथ.) रंगनाथन यांनी रूढ केलेली वर्गीकरणपद्धती;

द्विबिंदू वर्गीकरणपद्धती.

**कोलनाडॉ, कोन्नाडॉ** पहा : **कोलदांडा** (गो.)

**कोलबोल** पु. कौल; संरक्षण : 'मुलखास कोलबोल देऊन बंदोबस्त करणें.' - ऐच ८९.

**कोलभांड** वि. भांडकुदळ; भांडणात पटाईत.

**कोलम** न. १. तांबडे जाडे शाकारणीचे गवत. २. एक प्रकारचे भात; तांदूळ.

**कोलम** पु. पोहरा; पाणी पाजण्यासाठी किंवा आंबोण ठेवण्यासाठी उपयोगी असणारे मातीचे रुंद तोंडाचे भांडे : 'म्हस्के धनगर याने राखीचा कोलम चोरिला सबब...' - पेसा ३८.

**कोलम(मा)डणे** उक्रि. १. अडखळणे; ठेचकळणे; मागे ओढणे; दुसऱ्या बाजूवर पडणे, उलटणे. २. खाली कोसळून पडणे; पाडणे (सोसाट्याच्या वाऱ्याने झाड इ.). [ क. कोला + माड = आडकाठी]

**कोलमाडा** पु. १. एका बाजूवरून दुसऱ्या बाजूवर जाणे; एका कुशीवरून दुसऱ्या कुशीला वळणे. (क्रि. देणे.) २. उलटणे; ठेचाळणे; अडखळणे; कोलांटी खाणे; मागे ओढणे; कलाटणी. (क्रि. देणे). ३. (ल.) लांबणीवर टाकणे; टाळाटाळ; दिरंगाई. (क्रि. देणे.)[क. कोले +माडु]

**कोलवा** पु. घरावर घालायचा गवताचा जुना शाकार; सुपारी, नारळ इ.चा चूड. (राजा. गो.)

**कोलवाकोलव, कोलाकोल-ली** स्त्री. १. टोलवाटोलवी; एकमेकांवर टाकणे(धंदा इ.); इकडून तिकडे असे. (क्रि. मारणे, उडविणे.) २. चुकवाचुकव; अनास्था; टाळाटाळ. [ कोलणेचे द्वि.]

**कोलवे** न. अगदी लहान खोली, कोचके. [ हिं. कोल, कौल]

**कोलंगी** स्त्री. अग्नीची ठिणगी : 'एक लालचुटुक कोलंगी त्या जागी उमटली.' - पेरणी ११७. (क्रि. उडणे.) [ क. कोळ्ळि = कोलित]

**कोलंबी** स्त्री. खाऱ्या किंवा गोड्या पाण्यातला एक कवचधारी चवदार मासा : 'ही संगीत कोलंबी तडतड नाचती पांई' - संगीत घोटाळा ६.

**कोला** पु. कुत्रा. (बे.)

**कोला** पु. जळता निखारा. (व.) [ क. कोळ्ळा]

**कोलाटी-यिटी** पहा : **कोल्हाटी**[क.कोलु=काठी+अटिग = खेळणारा]

**कोलाडा** पु. हरळीसारखे गवत. (वाई)

**कोलावण** स्त्री. जहाजावरील जकात; संरक्षणाबद्दलचा, राज्यातून सुरक्षितपणे जाऊ देण्याबद्दलचा कर : 'इंग्रजांस कोलावण माफ करून त्यांशी सख्य संपादावें.' - ब्रच ५२.

**कोलाहल-ळ** पु. १. मोठा गलबला; गोंगाट; कलकलाट; ओरडा; गोंधळ; संमिश्र आवाज : '(त्या) कोलाहलात एवढी एकच गोष्ट न विसरण्याचा आपण प्रयत्न करू या.' - भाआसं ३०. २. अनेक विचारांचा गोंधळ : 'मनात खूप कोलाहल चालला होता.' - निअ ३६७. [सं.]

**कोलांटी** स्त्री. एक विशेष प्रकारची उडी; खाली डोके करून उलटी उडी मारणे. (वि. प्र.) कोलांटी उडी. [क.] (वा.) ० **उडी मारणे** - राजकारणात वा अन्यत्र सोयीनुसार आपली मूळ भूमिका बदलणे, टोपी फिरवणे.

**कोलिता** वि. रक्षणकर्ता. [सं. कुल = आप्तप्रमाणे वागणे]

**कोलिसा** पु. कोळसा: 'कोलिसा कालेपणें घडिला जैसा।' -राज्ञा १८.७४६.

**कोलिसे** न. १. रेशमासारखे पांढऱ्या अंगाचे कोळी वगैरे किड्यांनी बनविलेले जाळे किंवा घरटे. याचे बंदुकीसाठी वेष्टन करतात. २. तोड्याच्या बंदुकीला रेशमाचे दिलेले वेष्टन.

**कोलिस्त** न. सूक्ष्म शेष; तालीमखाना; इक्षुगंधा; कोकिलाक्ष; इक्षुर.

**कोली कोलूक** स्त्री. कुत्री; कोलगे. (गो.बे.)

**कोली** स्त्री. विटीदांडू, गोट्या इ. खेळण्यास करतात ती खळी, गल. पहा : **कोल**

**कोली** पु. कोळी : 'तेणें कोलियें त्रिजगती । एकावट केली ॥' - राज्ञा १८.१७०.

**कोलीत** न. पहा **कोलती**

**कोलीत काकण** न. आलातचक्र; पेटते लाकूड गरगरा फिरवले असता दिसणारी कंकणाकृती आकृती.

**कोलीस** न. कुंडीत वाढणारी एक वनस्पती.

**कोलू** पु. १. घाणा. २. पहा : **कोलदांडा** [क.] ३. विटी.

**कोलू** पु. घरावरचे जुने शाकार (चुडते, गवत इ.). (गो. कु.) पहा : **कोलवा**

**कोलेती** स्त्री. खाजकुयली नावाची वनस्पती.

**कोलो** पु. कोल्हा. (खा. को.)

**कोल्ल** स्त्री. विटी. (गो.)

**कोल्लबार** पु. विटीदांडू. (गो.)

**कोल्लमशक** पु. हा शक ख्रिस्ती शकाच्या आठशे चोविसाव्या वर्षी सुरू झाला. हा मलबारात चालू आहे.

**कोल्लाळ** पु. आरडाओरड; कोल्हाळ : 'कोल्लाळ करिती माया बहिणी।' - नागा १८०७.

**कोल्ली** वि. १. रागीट (गो.). २. नादी; लहरी. [सं. क्रोधिन्]

**कोल्हरी** स्त्री. सोंग; मिष; बतावणी. पहा : **ओडंबरी, कोल्हारी**

**कोल्हा** पु. सुरवंट. (व.)

**कोल्हा-ल्हे** पु. न. १. कुत्र्याच्या वर्गातील प्राणी. हा भुऱ्या वर्णाचा व मऊ केसांचा असून रात्रीचा हिंडतो : 'कीं कोल्हेया चांदणीं। आवडी उपजें॥' - ज्ञा ४.२३. २. (ल.) लबाड, धूर्त, चोरटा माणूस. (वा.) ० **कोल्हीचे लग्न** - ऊन असताना पडणारा पाऊस. **कोल्ह्याचे तोंड बघणे, नागवे कोल्हे भेटणे** - शुभशकुन घडणे; मोठा अकल्पित लाभ होणे. **कोल्ह्याचे शिंग** - अशक्य गोष्ट; (गो.) (ल.) १. अशक्य गोष्ट साध्य होणे; २. वशीकरण कला अवगत असणे.

**कोल्हा (ल्हां) ट, कोल्हा(ल्हां)ट अड** न. कोल्हाट्यांचा खेळ; डोके खाली करून एक चक्कर मारून पुन्हा पायावर उभे राहण्याची उडी. पहा : **कोलांटी**

**कोल्हाटी, कोल्हाटीण-टिन** पु. स्त्री. दोरीवर कसरत करणारी एक भटकी जमात; भोरपी, नाडेभोरपी, डोंबारी : 'जीवनोपावो कां जैसा। कोल्हाटियांचा॥' - ज्ञा १८.६०६ : 'आली कोल्हाटीन खेळाया। सगुण गुण माया।' - भज ३५. २. कोल्हाट; कोलांटी; कसरतीचा खेळ;

नाच. [ क. कोलु = काठी + अटिग = खेळ्या]

**कोल्हार** पु. कुंभार.

**कोल्हार** न. कुल्हार; मायघर; गुहा; कपाट : 'ब्रह्मविद्येचें कोल्हार :' - भाए ६६२. [ क. कोल्हार = खिंड, बिकट मार्ग]

**कोल्हारा** पु. रानभाजीचे एक झाड. पहा : **कोरळ** [ क. कोळर]

**कोल्हा (ल्हे) री** वि. कुंभारी (मातीची चित्रे); कृत्रिम; बनावट : 'अथवा कोल्हेरीचे असिवार।' - ज्ञा ९.१७३. [सं. कुलाल]

**कोल्हारी वे (वै) ताळ** न. शेतातील बुजगावणे; भुताचे चित्र : 'आतां कोल्हारिचे वेताळ। तैसे निर्जीव हे आहाती॥' - ज्ञा ११.४६६.

**कोल्हाळ-ळ** पु. गलका. पहा : **कोलाहल** : 'आणि भयासुर रणकोल्हाळ। सुभटांचे॥' - ज्ञा १.१२२.

**कोल्ही** स्त्री. कोल्ह्याची मादी.

वि. कोल्ह्याच्या रंगाची (तोंड, पोट, पाय काळे बाकी सर्व पांढरे असलेली) मेंढी.

**कोल्ही** स्त्री. जोंधळ्यांची एक जात. याचा दाणा वर दिसून येत नाही.

**कोल्हू** पु. उसाचा चरक; तेल्याचा घाणा. [हिं.]

**कोल्हे, कोल्हेल** न. भोपळ्याच्या आकाराचा, बियाणे ठेवण्याचा भाताण्याचा (पेंढ्याचा) मुडा, भांडे. [क. कोळवी = तेल इ. ठेवण्याचा नळा]

**कोल्हेकुई** स्त्री. १. कोल्ह्यांची आरडाओरड; हुकी. २. (ल.) क्षुद्र लोकांची एखाद्याच्या विरुद्ध निरर्थक बडबड; क्षुद्र अडथळा : 'जगाची कर्कश कोल्हेकुई कोण ऐकत बसणार?' - प्रेमसंन्यास.

**कोल्हेखोक** स्त्री. डांग्या खोकला. (आयुर्वेद आश १८५४)

**कोल्हेटेकण-णे** न. मावळण्यास येणे (सूर्य, दिवस). कोल्हा मागच्या पायावर बसला म्हणजे जमिनीपासून जितक्या उंचीवर असतो तितक्या उंचीवर सूर्य मावळताना क्षितिजापासून असला म्हणजे म्हणतात. विशेषत: चतुर्थी विभक्तीत बसणे किंवा येणे बरोबर उपयोग. (वा.) **कोल्हे टेकण्यास बसणे** - कोल्ह्याप्रमाणे दबकून बसणे. **कोल्हे टेकण्यास येणे** - वयामुळे अशक्तपणा येणे.

**कोल्हेबुद्धी** स्त्री. हलकी बुद्धी; लबाडी : '...अशा कोल्हेबुद्धीची गोष्ट करीत असतील' - ऐलेसं ५१६.

**कोल्हेभूं (भों) क** स्त्री. १. कोल्ह्याची हुकी, ओरडा; कोल्हेकुई. २. मोठी पहाट; प्रभात.

**कोल्हेर** न. लाकूड.

**कोल्हेशाही-ई** स्त्री. लुच्चेगिरी : 'असला कोल्हेशाई प्रश्न कशाला?' - लोटिकेले १.२६.

**कोल्हेहूक** स्त्री. १. कोल्ह्याची हुकी; कोल्हेकुई. २. (ल.) मोठमोठ्याने ओरडून हल्ला करणे.

**कोल्हौर** न. भुयारातील देऊळ : ' - किं शृंघार कोल्हौरीची महाकाळी।' - उगी ४२३.

**कोल्हौरी** स्त्री. मातीचे चित्र; पुतळा : 'देखौनि स्थानी कोल्हौरीचि जाली।' - रुस्व १०९.

**कोवणे** उक्रि. १. जुने होणे; (मडके इ.ची वाईट अथवा कोरेपणाची) घाण नाहीशी होणे; कोरेपणा जाणे. २. (ल.) रुळणे; सरावणे; निर्ढावणे (वाईट गोष्टीत).

**कोवरी** स्त्री. १. फणसाची कुयरी. २. फणसाची बी; आठळी.

**कोवला-ली-ले** वि. कोमल; ताजा; नाजूक; मृदुभाव असलेला : 'विरुढे कोवलां अंकुरीं तैसे। रोमांच आले॥' - राज्ञा ११.२४३.

**कोवसप** अक्रि. मुरणे. पहा : **कोवणे**

**कोवसा** पु. १. आधार; आश्रय. (क्रि. देणे, करणे.) २. कैवारी; आश्रयदाता. पहा : **कंशा** : 'जो भक्तांचा कोंवसा।' - दास २.७.४. ३. रेशमी किडा. [ क. वस = आच्छादणे]

**कोवळणे** अक्रि. आलिंगणे. पहा : **कवळणे**

**कोवळलूस** वि. अतिशय कोवळा; मऊ : 'कोवळलूस गवत...' -जैत ३१४.

**कोवळसर** वि. १. जरा कोवळा (नारळ, सुपारी इ.) २. लहानसर; अपक्व; नाजूक.

**कोवळा** वि. १. लहान; कच्चा; अपक्व; हिरवा. २. ताजा. ३. (ल.) नाजूक; सौम्य (सकाळ, सूर्यकिरण, ऊन). ४. कच्ची; अडाणी; अप्रगल्भ (ग्रहणशक्ती, समजूत). ५. अर्धवट; कोता; अप्रौढ; अपूर्ण (सल्लामसलत, विचार). ६. कमी बळकट; नाजूक; कोमल. ७. ज्याची नुकतीच सुरुवात झाली आहे असा. [सं. कोमल]

**कोवळा** पु. भोपळा; कोहळा : 'काही बेसनाची, काही मुगाची, काही कोवळ्याची अशी गोडखारी भजी घेतली.' - वानगी २२५.

**कोवळा किरळा** वि. लहान आणि नाजूक (अंकुर फुटलेला).

**कोवळीक** स्त्री. १. कोवळेपणा; (अप्रौढतेतील) नाजूकपणा, अशक्तपणा. २. तारुण्याचा बहर; नवेपणा; टवटवीतपणा. ३. मृदुपणा : 'आणि महाबोधीं कोंवळीक। दुणावली॥ - ज्ञा १.३४.

वि. कोवळी.

**कोवा** पु. कोका; किनरी (कानफाट्याची); एकतारी. [क. कोवा]

**कोवा** स्त्री. (भिक्षुक लोकात सांकेतिक) विधवा.

**कोवाडी** वि. जादूगार.

**कोवारी** वि. कोवळी : 'चंदनाची आवघी कोवारी : बाणें कापली राहे वरिचां वरी :' - रुस्व ३४४.

**कोवारीण** स्त्री. पहा : **कुवारीण.** (बायकी) जिला बोडणात अगर देवीच्या पूजेला (नवरात्रात) बसवितात व जेवायला घालतात अशी लग्न न झालेली आठ अगर त्याहून कमी वयाची मुलगी. (वा.) **० जाणे** - पूजा, उत्सव इ. प्रसंगी कुमारिका म्हणून जेवायला जाणे.

**कोवासा** पु. कोवसा; कैवारी : 'ऐसा देवो माहाबळी। भक्तांचा कोवासा।' - क्रिपु १७.५१.

**कोवा(व्हा-हा) ळी** पु. कोहळा. (चि.कु.)

**कोविद** वि. विद्वान; पंडित; ज्ञाता; सूज्ञ; कुशल : 'सांगी काय तुज तुझ्या पौत्रांचें युद्ध कोविदा राया।' - मोभीष्म ३.४९. [सं.]

**कोविदार** पु. एका जातीचे झाड; कोरल; कांचन; शिसू : 'तुळसी करवीर कोविदारा।' - हरि १०.१५९. [सं.]

**कोवी** स्त्री. पोखरलेला नारळ; बेले. (को.)[ क. कोवि = पोकळ नळी]

**कोव्हरी** क्रिवि. कुठवर; किती वेळपर्यंत; कोठपर्यंत. (ना.)

**कोव्हाळा-ळे** पु. कोहाळा. याची भाजी, सांडगे इ. करतात. याचा पाकही करतात. तो पौष्टिक असतो. पहा : **कोहळा** (वा.) ० **रासणे** - देवीप्रीत्यर्थ कोहळा कापणे. पाठारे प्रभू लोकांत देवक स्थापनेच्या वेळी कोहळा कापतात.

**कोव्हाळी** स्त्री. कोहळ्याचा वेल.

**कोव्हाळे** न. तांबडा भोपळा.

**कोश** पु. १. खजिना; साठा; संग्रह; तिजोरी; खाण; वखार. २. जीवाचे अन्न-प्राण-मन-विज्ञान-आनंदमय असे जे कोश आहेत त्यांपैकी प्रत्येक; आत्म्याचे आवरण. ३. (ग्रंथ.) ज्यात वर्णानुक्रमे शब्दांची रचना करून त्यांची माहिती दिली आहे असा ग्रंथ. ४. आवरण; पटल; पापुद्रा; अस्तर. ५. म्यान (तरवारीचे). ६. कोळीकीटक अंड स्थितीतून कीट स्थितीत येऊन शरीराभोवती रेशमासारखे मऊ आवरण करतो तो; कोशेटा. ७. कळी : 'अंतरीं फांकें। हृदयकोशु।।' - ज्ञा ६.२०९.

**कोश** पु. दिव्य करून लावलेला निकाल; न्यायदानातील दिव्य (अग्नी, पाणी, विष, वजनाचा काटा, उकळणारे तेल, कुलदेवतेवर पाणी घालणे इ.); शपथ; प्रतिज्ञा (वा.) ० **पिणे** - शपथ घेणे : 'पियालीं कृतनिश्चयाचा कोश।' - ज्ञा १३.६०५. [सं]

**कोशकल्प** पु. (वन.) कोश असलेला संवर्त; कोश असलेला पुष्पमुकुट; कोशाप्रमाणे कार्यक्षम अवयव.

**कोशकार** पु. १. रेशमाचा किडा; कोळ्याच्या वर्गातील प्राणी. २. कोशस्थितीत असलेला, कोशवासी किडा किंवा फुलपाखरू. [सं.]

**कोशकार** पु. शब्दार्थ कोश रचणारा, कोश तयार करणारा संपादक. [सं.]

**कोशकीट, कोशकीटक** पु. पहा : **कोशकार** १. कोशकिडा हा आपल्याभोवती कोशेटा करून आपल्यालाच कोंडून घेतो : 'एरव्ही कोशकीटकाचिया परी। तो आपण या आपण वैरी।' - ज्ञा ६.७२.[सं.]

**कोशगृह** न. भांडार : 'कीं कोशगृहीं प्रवेशोनी।' - रावि १.७१. [सं.]

**कोशपद** कोशातील शब्दनोंद.

**कोशपान** न. देवाचे तीर्थ पिणे; दिव्याचा एक प्रकार; शपथ घेणे.

**कोशमय वीट** (स्था.) वजनाला हलकी व उष्णतारोधक सच्छिद्र वीट.

**कोशरा-रे, कोशेरे** न. जाडेभरडे रेशीम. 'बंदुखानचे बंदा बद्दल कोशरे सुमारे ५००० हजार पाठविणे.' - पेद ४५.१००. [सं. कोश]

**कोशल** न. खलबत : '...खंडोपंत व सदाशिव माणकेश्वर यांस बोलावून कोशल अर्ध रात्रीपर्यंत जालें.' - ऐलेसं ७८८१.

**कोशलगा (दा) र** पु. सल्लागार.

**कोशशुद्धि-द्धी** स्त्री. दिव्याने निरपराधित्व सिद्ध करण्याची क्रिया. [सं.]

**कोशसिद्धांत** पु. (तत्त्व.) अन्नरसमय आत्म्याच्या आत प्राणमय आत्मा, त्याच्या आत मनोमय आत्मा, त्याच्या आत विज्ञानमय आत्मा व त्याच्याही आत आनंदमय आत्मा राहतो. हे आत्म्याचे कोश आहेत. याचे विवरण करणारा सिद्धांत. त्याला कोशसिद्धांत किंवा पंचकोशसिद्धांत असे म्हणतात. [सं.]

**कोशा** वि. काळसर रंगाची (गाय, बैल).

**कोशा** पु. डोक्याला बांधायचा रेशमी रुमाल, फेटा (कोशेट्याच्या रेशमाचा). [सं. कौशेय:]

**कोशा(षा)गार** पु. तिजोरी; जामदारखाना; भांडारगृह; खजिना. [सं.]

**कोशा(षा)ध्यक्ष** पु. खजिनदार; निधी ज्याच्याकडे असतो तो पदाधिकारी; द्रव्यसंग्रहावरील अधिकारी. [सं. कोश + अध्यक्ष]

**कोशासक्ती** स्त्री. बंधित असण्याची इच्छा.

**कोशिक-का** न. किड्याचे घर. पहा : **कोशेटा** : 'कीटक करी स्वभुवना कोशिके जैसें।' - कथा ५.७.८. [सं. कौशिक]

**कोशिकाजनन** न. (वन.) कोशिकांचा उगम आणि विकास.

**कोशिका पेशीद्रव्य** (वन.) कोशिकेतील प्रकल, प्राकलकणु किंवा विशिष्ट कोशिकांगके सोडून इतर सजीव व अर्धघन कलिल द्रव्य. [सं.]

**कोशिका सिद्धांत** सर्व सजीव कोशिकामय असून त्यांची वाढ व उत्पत्ती कोशिका विभाजनामुळेच शक्य होते हा सिद्धांत.

**कोशिया** पु. काळा, लहानसा, चकचकीत पक्षी.

**कोशिश** स्त्री. प्रयत्न. [फा.]

**कोशिंदा** पु. कोचिंदा वनस्पती.

**कोशिंब** पु. एक मोठे झाड. याच्या बियांचे तेल निघते. तसेच याच्या फांद्यांपासून लाख तयार केली जाते. याच्या बियांना कोशिंबी म्हणतात. [सं. कोशी + आम्र, कोशाम्र]

**कोशिंबरे** न. तांदळाचा एक प्रकार; कोथिंबरे भात.

**कोशिंबीर-बरी, कोशिंबिरिका** स्त्री. कच्च्या फळांचे दह्यात कालवून केलेले कालवण, रायते, तोंडी लावणे : 'या कोशिंबिरिका अनेक रचिल्या देवी तुला तोषदा।' - निमा १.१४; 'कोशिंबिरी आंबेरायता' - नव ९.११८. [क. को (गो) सुंबरी] [सं. कुस्तुंबरू]

**कोशिंबेल** न. कोशिंबीचे तेल.

**कोशीस** स्त्री. प्रयत्न; मेहनत. (क्रि. करणे.) : 'इकडील दौलतीविषयी कोशीस करीत जावी।' - मइसा ८.५. [फा. कोशिश]

**कोशेटा-टी-रा** पु. स्त्री. १. फणस व इतर फळांतील आठळीचे टरफल. २. व्रणाची खपली, साल, कातडे. ३. कोळी व इतर काही किड्यांचे जाळे; कोश; किड्याचे घर. ४. थर.

**कोष** पु. पहा : **कोश.** समासात अंडकोष, बीजकोष इ. [सं.]

**कोषवृद्धि-द्धी** स्त्री. अंतर्गळाचा रोग; अंडवृद्धी. [सं.]

**कोषावस्था** स्त्री. कोषात किंवा कवचात राहण्याची अवस्था, काळ; फुलपाखराच्या ३ अवस्थांपैकी एक. [सं.]

**कोष्ट(ष्ठ)क** पु. १. स्तंभ; तक्ता; रकाना. २. किंमत, वजन, मापे इ. परिमाणदर्शक संज्ञांचे परस्परप्रमाण दाखविणारी यादी. [सं.]

**कोष्टकीकरण** न. (ग.) संख्या, आकडे किंवा कोणतीही माहिती तक्ता किंवा कोष्टक यामध्ये बसवणे.

**कोष्टकी गुणाकार** गुण्य राशींचे जितके अंक तितक्या कोष्टकांचा गुणकांक. समसंख्यांक पंक्ती करून गुणण्याचा प्रकार. धावरा गुणाकार, बैठा गुणाकार. पहा : **कपटसिंधु**

**कोष्टम** न. झेंगट; लफडे; खेंकटे. (व.)

**कोष्टसंख्या** स्त्री. आराखडा : 'मराठी व्याकरणाची कोष्टसंख्या म्हणजे आराखडा आंग्लभाषेस अनुसरून असावा.' - के १.१.१९३७.

**कोष्टा** पु. कोष्टी; कोळी.

**कोष्टाऊ** वि. हातमागाचा : 'तुम्ही स्वतःला कोष्टाऊ लुगडी घ्या.'- माजी.

**कोष्टी** पु. १. एक विणकर जात. ह्यांचा धंदा सूत कातणे व विणणे. साळ्यापेक्षा यांची जात निराळी. २. (ल.) कोळी, किडा. हा तंतू काढून जाळे विणतो. ३. एक पक्षी. [सं. कोश]

**कोष्टी** स्त्री. (बकऱ्याची, डुकराची इ.) मानाची सागुती; सागुतीची पुडी. (गो.कु.)

**कोष्ठ, कोष्ठकोळं (ळां-ळि) जन** न. एक औषधी वनस्पती. ही काश्मीरकडे होते. हिच्या मुळ्या औषधी आहेत. शिवाय त्यापासून अत्तर व केसांचा कलप तयार करतात.

**कोष्ठ** न. कोड (एक त्वचेचा रोग). [सं. कुष्ठ]

**कोष्ठ-ष्ट** पु. १. पोट; कोठा. २. धान्याचे कोठार; कोठी. ३. खोली; दिवाणखाना. ४. आम, रुधिर, मूत्र इ. देहातील स्थाने. जसे : - आमकोष्ठ, इ.

**कोष्ठ** न. (स्था.) खाच; खळगा; खड्डा. इतर बांधकामापेक्षा खालच्या पातळीवर बांधलेली जागा. [सं.]

**कोष्ठक** न. (वै.) लहान कोशांपैकी एक. यामध्ये वाहिनीचे प्रशाखन होण्याची क्रिया संपते. तिचे गुच्छभ ग्रंथीमध्ये परिवर्तन होते. या ग्रंथी स्रावी पेशींनी भरून जातात. या कोशमय ग्रंथींपैकी प्रत्येक. [सं.]

**कोष्ठबंधक** वि. मलावरोध करणारे; स्तंभक. [सं.]

**कोष्ठशुद्धि-द्धी** स्त्री. शौचाला साफ होणे; कोठा शुद्ध होणे (पुष्कळ रेच झाल्यानंतर). [सं.]

**कोष्ठागार** पहा : **कोठार**

**कोष्ठीकरण** न. (मानस.) कल्पना, मूल्ये किंवा अभिवृत्ती दडवून ठेवणे.

**कोष्ण** वि. किंचित उष्ण; कोंबट; कुबट. [सं.]

**कोस** पु. अंतर दाखविणारे रस्ता मोजणीचे माप; साधारणतः दोन मैल. एक चतुर्थांश योजन. याचे निरनिराळ्या ठिकाणी गजाच्या लांबीप्रमाणे अंतर निरनिराळे असते. साधारणपणे चार हजार हातांचा कोस धरतात. [सं. क्रोश]

**कोस** स्त्री. १. कूस; फायद्याची मर्यादा : 'कोणत्या कापडांत किती कोस आहे हें पाहून तसलें कापड येथें तयार करण्याची धडपड...' - जप्रशि १०२. २. कापडाचा तिरकेपणा.

**कोस** स्त्री. सापाची कात. (व.) [सं. कोश]

**कोस** पु. चतुष्कोण, त्रिकोण इ. विवक्षित आकार तंतोतंत नसून त्यात वाकडेपणा आल्यामुळे होणारा न्यूनाधिक भाव; कोच (ताणलेले कापड, हातरुमाल, शेत, भिंत, रस्ता, कुंपण इ. ना येणारा); आधिक्य; वाढ (क्रि. येणे, असणे, होणे, जाणे, निघणे, काढणे, जिरणे, जिरविणे.) [क. कोशे = वाकण, वळण]

**कोस** पु. दिव्य; पहा : **कोश** (क्रि. घेणे, पिणे.)

**कोसकसी** स्त्री. गावागावातील अंतरे कोसात दाखविणारे टिपण : 'परगणे वाई कोसकसी संमत मुरें देहें ४७.' - पराग अंक ३ वर्ष १. ९/१०.

**कोसपेणी** स्त्री. कोसांची मोजदाद.

**कोसम** पहा : **कोशिंब**

**कोसम्यौंचे** सक्रि. पाण्यामुळे (लाकूड) कुजून जाणे. (गो.)

**कोसरा** पु. कोळी; किडा. पहा : **कोसला** : 'गगनीं लागला कोंसरा। कोण पुरवी तेथे चारा।' - तुगा ३३०९.

**कोसला, कोसा** पु. १. रेशमाचा किडा : 'जैसा स्वयें बांधीन कोसला मृत्यु पावें।' - दास ८.७९. २. रेशमाचा किडा किंवा कोळी यांचा कोश किंवा कोशिटा. ३. ह्या कोशेट्याचा तोंड्याच्या बंदुकीच्या भोवती असलेला वेढा.

(वि.) १. काळसर : 'गणा पाटलाचा खोंड.. रंगानं कोसला.' - गागो १००. २. पिवळसर. [सं. कोश + ल]

**कोसला** पु. चकमकीवरून उडवलेली ठिणगी ज्याच्यावर पाडतात तो कापूस.

**कोसली** स्त्री. मकरसंक्रांतीच्या दिवशी तिळगूळ वा साखर इ. घालून तयार केलेली करंजी, मिष्ट पदार्थ. कोसल्या उकडून वा तळून करतात. (ना.)

**कोसळणे** उक्रि. १. एकदम पडणे; तुटून, मोडून पडणे; ढासळणे; विस्कळणे (भिंत, विहीर, रास इ.) : 'बाजी एकदम जागच्या जागींच कोसळला.' - स्वप ८८. २. पडून तुकडे होणे (यंत्र इ.) ३. (ल.) वेगाने खाली येणे, पडणे (पाऊस). ४. आधार सुटून, वियुक्त होऊन, सपाटून भरभर खाली पडणे. (वाऱ्याने फळे, फुले). ५. फिसकटणे; प्रतिकूल होणे; निष्फळ होणे (बेत, मसलत). [क. कोसरु = आधार सुटणे]

**कोसंब** पहा : **कोशिंब** : 'कोसंब अंजीर खैराड।' - कालिका २२.१५.

**कोसाई** स्त्री. घोड्याचा एक रोग. याने त्याच्या दोन्ही मांड्याखाली गाठी येतात. - अश्वप २.२८३.

**कोसिटा** पु. कोष्टी, विणकर : 'शैव विप्र चाटे। सोवनी अपार कोसिटे।' - उह २१६४.

**कोसीस** पहा : **कोशीस**

**कोसे** वि. भुरट्या रंगाचे : 'कोसी कनकवणे.' - वह २८२.

**कोसेरा** पु. कोळ्याचे घर.

**कोस्टी** स्त्री. शिकार करून मारलेल्या सावजाचे घातलेले वाटे. [कु.]

**कोस्त** पु. कलमी आंब्याची एक जात. (गो.) [पो. कोस्ता]

**कोह (हं) क** न. कुहर; विवर; गुहा; डोंगर; पर्वत; भुयारीमार्ग : 'कोहकी वसती।' - ऋ ७९; 'कोणें एके नगराबाहेरी कोहंकी। चंडरव नामे कोल्हा असे।' - पंच १.३७. [सं. कुहर]

**कोहकणे** अक्रि. वाळणे; सुकणे; रोडावणे. (व.) [सं. कोय]

**कोहटळी** स्त्री. कुजकी घाण; घाणीची जागा : 'मग बाळपणीची कोहटळी। धुंडूनि घेतसे।' - स्वानु ९.४.७३. [सं. कोथ]

**कोह (हे) डे** पहा : **कुहडे**

**कोहरटे** पु. अव. वृक्षाचे शाखाविहीन बुंधे.

**कोहल** अल्कोहोल- भिषग्विलास जा १९४२

**कोहशिकन** पु. तोफेचे एक नाव; डोंगर सपाट करणारी तोफ. [फा.]

**कोह (हा-हो) ळा-ळी-ळे** पु. स्त्री. न. १. कोव्हाळा, कोव्हाळी, कोव्हाळे. एक प्रकारचा भोपळा; फळ आणि वेल.

**कोहळी-ळे** स्त्री. न. १. कोथळी; २. करंडा : 'रांझण कोहळीं घागरी बहुवसा।' - दास ४.७.९.

**कोह (हा-हो) ळे** न. बैलाचे वशिंड. [सं. कुष्मांड]

**कोहं** उद्गा. पु. 'मी कोण', 'मी कोण' अशा अर्थाचा ध्वनी; मूल जन्मल्यानंतर ते प्रथम जो आवाज करते तो. [सं. कः + अहम्]

**कोहा** पु. पायाला पडणारी भेग. (ठा.) पहा : **कुया** [फा.]

**कोहार** पु. पालख्या वाहण्याचा भोयांचा धंदा करणारी एक जात : 'नायकाने प्रतिवर्षी रुपये ५ घासी नाइक कोहार यास द्यावे... म्हणून आज्ञापत्र.' - शारी १९९.

**कोहारतरश** पु. तीराचा एक प्रकार.

**कोहिस्तान** न. जंगली डोंगराळ प्रदेश : '...बेहिमतीनें विजयगडास कोहिस्तान व मवाश्यांत गेला म्हणोन सावकारी बातमी आली.' - अखभा २.१०८. [फा.]

**कोहोपरी** स्त्री. परात; थाळी. पहा : **कोपरी**

**कोळ** पु. १. रानडुक्कर. २. कुत्रा : 'या ग्रामकोळाचां ठाइं। जैसा मिळणीं ठाओ नाही।' - ज्ञा १३. ६७९

वि. मस्त माजलेला. [सं. कोल]

**कोळ** न. तिळाच्या झाडांची तीळ झाडून घेतल्यानंतरची लहान पेंडी : 'झाडिलीचि कोळे झाडी। तया न फळें जेवीं बोंडी।' - ज्ञा १३.५८६.

**कोळ** पु. १. (पाण्यात वा ताकात) चिंच, आंबे, भात इ. कालवून केले जाणारे दाट पाणी; कुवळ; कोळलेले पाणी. २. चिंच कोळल्यानंतर तिचा टाकाऊ भाग, चोथा. (वा.) **कोळून पिणे** - पचवणे; आत्मसात करणे.

**कोळ** पु. १. जळलेला पदार्थ. (क्रि. होणे) कोळसा. २. राख; वाळलेली, करपलेली अवस्था : 'डाहाळी जळून कोळ जाती गळून पडे भिंतीवर आंबा।' - सला ५७.[क. कोळ्ळि = कोलित] (वा.) **वाळून कोळ होणे** - अगदी वाळून शुष्क होणे; झडणे (वनस्पती, पाने); कोमेजणे; आक्रसणे; करपणे (वनस्पती, जनावरे).

**कोळ** पु. गहाण; कर्जाची फेड न केल्यामुळे कर्जाइतकी जिंदगी (कर्जदारापासून अगर दुसऱ्या कोणापासून) घेऊन अडकवून ठेवणे; गहाण माल. (क्रि. पाडणे.) [फा. कौल = करार]

**कोळ** पु. खाडीचा फाटा; पोहडी; ओहर (को.). [क. कोळ्ळ = खोल जागा; भगदाड, दरी]

**कोळऊ** स्त्री. कोळ उवा; अंगावरील ऊ (म्हैस, डुक्कर इत्यादींच्या). पहा : **कोळवू**

**कोळउंदीर, कोळकुंदूर** पु. घूस. [सं. कोल]

**कोळकांदा** पु. एक जंगली औषधी कांदा. (गो.)

**कोळख** स्त्री. ऐरणीचे लाकूड. (गो.)

**कोळखण** स्त्री. सोनाराचे सामान ठेवण्याचे लाकडी पात्र. (गो.)

**कोळखंड-खांदा** न. बैलाचे वशिंड. (को.)

**कोळगंड** पु. (कोळी जातीला) तुच्छतेने म्हणतात.

**कोळ (ळि) गा** पु. भ्रमर : 'उदैजेति परबिंबीं कळि कोळिगा राहिला कोंभीं।' - ऋ ९०. [सं. कुलिंग]

**कोळगे** न. तांब्याचे किंवा पितळेचे पिंप. हे लहान मोठ्या आकाराचे असते. (बे.) [ क. कोळगा]

**कोळणे** १. सक्रि. कालवणे; कुस्करून सार काढून घेणे : 'जाड कोंडा वापरणे शक्य नसेल तर तो पाण्यात तास - दोन तास घालून कोळावा.' - पाक ६२.

उक्रि. कुसकरणे; (पाण्यात) हाताने चुरडणे; गर काढणे; पिळणे (चिंच, आंबा); सार, सत्त्व काढून घेणे.

**कोळदांडा** पहा : **कोलदांडा**

**कोळपणी-णे** स्त्री. कोळप्याने बेणणे; पेरलेल्या जमिनीतील तण काढणे; खुरपणी.

**कोळपणे** अक्रि. करपणे; काळवंडणे; वरवर जळून काळे होणे; उन्हाने काळे पडणे (झाड, शरीर); चुलीत पेटलेले निखारे राखेने झाकले जाणे; जाळ न होता लाकूड काळे पडणे; धुमसणे; जळणे : 'करीना शांत कांत ही कांत म्हणुन कोळपत्यें।' - प्रला २१८. [क. कोळ्ळि]

**कोळपाट** पु. पोळपाट. (तंजा.)

**को(क)ळपुटी** स्त्री. माशांच्या डोक्याच्या तुकड्यांचे केलेले पक्वान्न, पदार्थ. (गो.)

**कोळपुरुख** पु. कुलदैवत : 'मज कोळपुरुखु : उधारूनि देयावा'- लीचपू १४५.

**कोळपे-कोळप** न. पु. वीतभर पीक उभे असताना उपयोगात आणायचे अवजार. याने पिकांच्या दोन ओळींमधील जमीन हलविणे, भुसभुशीत करणे, आतील तण काढणे, पिकाला मातीची भर देणे ही कामे होतात. शेतीचे एक अवजार. [क. कोळ = फाळ, दात]

**कोळमसणे** अक्रि. कोळपणे : 'मला हिरवा करायचा बेत केला हुता, त्यो असा कोळमसून चालला होता.' - खळाळ १६०. [क.]

**कोळमाटणे** अक्रि. पहा : **कोळपणे** : 'येल कोळमाटून जावी' - रैत ४३.

**कोळमुटचे** अक्रि. कल्हई नसलेल्या भांड्यात पदार्थ ठेवल्याने त्याला कलंक येणे; पदार्थ कळकणे. (गो.)

**कोळमूळ** न. उभट व वाटोळे भांडे (कढी, ताक वाढण्यासाठी उपयोगी. काही भांड्यांना मागे मूठ असते); पाळे. (गो.कु.)

**कोळम-म्यां** न. लहान कोळंबी (गो. कु.). पहा : **कोळंबे**

**कोळयो** पु. भाताचे बी. (गो.)

**कोळवण** न. वसई व कल्याण यांच्या उत्तरेकडील प्रदेश; उत्तर कोंकण. यात विशेषत: कोळी लोकांची वस्ती आहे.

**कोळवण** न. कोळ्यांचा दंगा, पुंडावा : 'महीकाठी कोळवण जाले आहे.' - पेद ३६.२११.

**कोळवा** पु. वाळवून ठेवलेल्या पालेभाज्या. (व.)

**कोळवाड-डा** स्त्री. पु. गावातील कोळी लोकांची वस्ती, वाडी.

**कोळविणे** उक्रि. पहा : **कोळणे**

**कोळवीजु** स्त्री. अकाळ वीज : 'जैसी उगवली कोळवीजुची पुटी।' -

रुस्व १३.१५३९.

**कोळवू** स्त्री. (बैल किंवा रेडा इ.) जनावरांच्या अंगावरील गोचीड किंवा गोमाशी; कोळऊ.

**कोळवे** न. शेराचा एक अष्टमांश भाग अथवा चिपट्याचा एक द्वितीयांश भाग; अदपावाचे माप : '- कधि ऐकली चिपटीं कधि निपट कोळवीं चोळवी कधीं पाहिलीं।' - राला १०९. [सं. कुडव = पावशेर]

**कोळवे** न. १. ठेंगण्या घराला आत जाताना वर डोके लागू नये म्हणून कमानीसारखा आकार आणून उंच वाढविलेला पाख्याचा भाग. २. चांधईला लागून काढलेली खोली; घराची पडवी. हिचा उपयोग भांड्यांची खोली, स्वयंपाक घर, न्हाणीघर वगैरेसाठी होतो. (कु. को.)

**कोळवे-कोळे** न. बैलाचे वशिंड. (को.)

**कोळशी** स्त्री. १. काजळी (जळत्या वातीची किंवा मशालीची); कोजळी; जळकी वात. २. जोंधळ्यावरील रोग. याने दाणे काळे पडतात. ३. नाचणीची एक गरवी जात. हिचे दाणे काळे असतात. [क. कोळ्‌लि]

**कोळशीट-शेटे-ष्टक, कोळिष्टक** न. कोळ्यांचे जाळे.

**कोळशी (सी) ण** स्त्री. एक प्रकारचे लहान औषधी झुडूप. अंगाखाली कोळी चुरडला असताना याच्या पाल्याचा रस लावतात.

**कोळशी सड** पिकांचा एक रोग. जमिनीलगत कवकामुळे हा रोग काही पिकांच्या रोपांना होतो. यामुळे स्तंभ काळा पडतो. काही वेळेला रोगपीडित काळा स्तंभ लिबलिबीत होतो.

**कोळसणे** अक्रि. कोळशासारखे काळे होणे.

**कोळसन-सुना-सून, कोळसिंदा, कोळसुंदा, कोळिण्णा कोळिस्ता-से** न. पु. कोल्ह्याकुत्र्यासारखे एक जंगली जनावर. आपला शत्रू जवळ आल्यास त्याच्या तोंडावर आपले मूत शिंपडून त्याला हा आंधळे करतो व मग खातो असे म्हणतात. (मावळ) .

**कोळसंडणे** अक्रि. धुमसणे; बाहेरून जळून अगदी काळे होणे (परंतु आतून न जळणे).

**कोळसा** पु. कोतवाल पक्षी.

**कोळसा** पु. १. अतिप्राचीन काळी, पृथ्वीवरील नैसर्गिक उत्पातामुळे झाडेझुडे भूगर्भात कुजून तयार झालेला काळ्याभुऱ्या रंगाचा कार्बनयुक्त पदार्थ. भूगर्भात खडकांच्या रूपात याचे थर आढळतात. याला दगडी कोळसा किंवा खाणीतील कोळसा असे म्हणतात. भट्टी लावून लाकडापासूनही कोळसा तयार करतात. जळणासाठी व ऊर्जानिर्मितीसाठी कोळशाचा उपयोग होतो. २. विझलेला निखारा : 'तरि वरि तसाच आंतहि उगाळितां कोळसा प्रयास करा।' - संशयरत्नमाला २० (नवनीत ३५०). [क. कोळ्ळी]

**कोळसां** न. ज्याचा फाळ झिजला आहे असा नांगर. (कु.) पहा : **कोळसे**

**कोळसुंदा, कोळ (ळि) सा** पु. कोरांटीतील एक जात. शेताच्या कडेला किंवा ओहोळाच्या काठी येणारे झुडूप. याची उंची दोन-अडीच फूट असते. याच्या कोवळ्या पानांची भाजी करतात. पाने लांबट असून त्यांना खाली एक काटा असतो. याच्या बियांना तालीमखाना म्हणतात.

**कोळसुंदा** पु. बंदुकीची माशी, मोहरी. हिच्याकडे बघून गोळीचा नेम धरतात.

**कोळसे** न. नांगराचा फाळ बनविण्याचा लाकडी ठोकळा. (कु.)

**कोळसेमुडे** न. कोळसे वाहण्याकरता केलेला भात्येणाचा मुडा.

**कोळसॉ - सो** पु. चोवीस शेरांचे माप. (गो.)

**कोळंगा** पु. जळजळीत निखारा. [क. कोळ्ळि]

**कोळंगी** स्त्री. ठिणगी; गूल; काजळी.

**कोळंजणे** अक्रि. जळून राख होणे (विस्तवातून काढलेले कोलीत, निखारा); उन्हाने करपून काळे होणे, पडणे. पहा : **कोळपणे**

**कोळं (ळां-लिं-ळिं) जन** न. (वन.) भारतात सर्वत्र आढळणारी वनस्पती. कोष्ठ कोलंजन; आंबेहळदीसारखे झाड. पानांचा वास मधुर, मुळ्यांचा रंग पांढरा, चव तिखट, गड्डे व फळ औषधी. हे वेखंडाच्या ऐवजी वापरतात, तसेच सर्दीत मिऱ्याबरोबर देतात. दातदुखी थांबविण्यासाठी चूर्ण दातावर चोळतात. ही वनस्पती मज्जातंतूसाठी पौष्टिक व कामोद्दीपक आहे. [सं. कुलिंजन]

**कोळंब** पु. कोंडवाडा. (गो.)

**कोळंब-बा** न. पु. शाकारणीचे तांबडे, जाडे गवत; तांबट; तांबेट.

**कोळंब-ब्या** पु. एक प्रकारचे भात. (कुलाबा, कु.)

**कोळंबा** पु. पाणी भरण्याचा पोहरा; खापरी भांडे; मडके. पहा : **कोळंबे** [ क. कोळबि = पोकळ नळी]

**कोळंबी** स्त्री. झिंगा मासा. (को.)

**कोळंबी** स्त्री. १. गुरांना पाणी पाजण्याच्या उपयोगाची दगडी किंवा लाकडी कुंडी. हिचा उपयोग कपडे धुण्यासाठीही करतात. (गो.) (सामा.) लाकडी पात्र. पहा : **कोळंबे**

**कोळंबे** न. १. मातीचे रुंद तोंडाचे भांडे. फुलझाडांच्या कुंड्यांसाठी, जनावरांना पाणी पाजण्यासाठी व अंबोण ठेवण्यास याचा उपयोग करतात. (को. गो. कु.) २. रहाटाच्या लोट्याचे पाणी ज्यात पडते असे रहाटाच्यामध्ये असलेले लाकडी पात्र, डोणी. या डोणीची दोन्ही तोंडे बंद असून एका तोंडाजवळ खालच्या बाजूला भोक असते व त्यातून पाणी आडनळीत पडते. ३. विहिरीतून ओकतीने पाणी काढण्याकरता सुरमाडाच्या बुडख्याचे किंवा धातूचे केलेले पात्र; पोहरा. ४. कुंडीतील अथवा पाटातील पाणी बाहेर फेकण्याकरिता सुपाच्या किंवा पावड्याच्या आकाराचे भांडे; शेलणे. ५. (चर्मकार) चामडे भिजविण्याचें चांभाराचे खापरी अथवा दगडी पात्र; कुंडी; कोटमी.

**कोळा** पु. मोठा डास.

**कोळा** पु. जळता कोळसा : 'सर्वांगी बांधौनि कोळे : लाविजति यके वेळे' - ज्ञाप्र २९८.

**कोळावे** न. कोळी लोकांचा दरोडा, धाड. [क. कोळते = लुटालुट; दरोडा]

**कोळिक** पु. कोळी; कोळी जातीचा; वाटमारी करणारा : 'वाटपाडा कोळिकु (वाल्मिकी).' - ज्ञागा १२०.

**कोळिगा** पु. भ्रमर; भुंगा : 'उदैजत पराबिंबीं। कळिकोळिगा राहिला कोंभी।' - ऋव ५६९.

**कोळिता** पहा : **कोळसुंदा**

**कोळिश्रय, कोळिस्रा, कोळिसरा** पु. १. रेशमाचा एक किडा : 'जैसा कोळिश्रयाचा बंध। तो तयांसचि करी बद्ध।' - कथा १.५. २. रेशमाच्या किड्याचे कोशीट, कोश. हा किडा औषधी असतो.

**कोळिष्णा** पहा : **कोळसन**

**कोळिसणे** सक्रि. विझणे; कोळपणे : 'की विरहाग्नि मनीं कोळिसैला।' - नवि १३५.

**कोळिसरा, कोळिसा-से** पु. न. एक प्रकारचा झुरळासारखा प्राणी.

**कोळिसरी** स्त्री. एक झुडूप; गवताचा एक प्रकार. पहा : **कोळसुंदा**

**कोळी** पु. जळत्या किंवा जळलेल्या वातीची काजळी. [क. कोळ्ळी]

**कोळी** पु. १. एक जात व त्या जातीचा माणूस. मासे पकडणे, विकणे व नावाड्याचा व्यवसाय करणारी जात. याच जातीतील काही लोक डोंगरात, अरण्यात राहून, शिकार करून उदरनिर्वाह करतात. प्राचीन ग्रामसंस्थेत कोळ्याकडे पाणी पुरविण्याचे काम असे. धीवर ही एक गुन्हेगार जात समजली जात होती. पण यांच्यापैकी फक्त महादेव कोळी (राजकोळी) व गुजराथकोळी याच दोन पोटजाती गुन्हे करत असत. २. कोळी नावाचा किडा. हा आपल्या अंगातून धागा काढतो व त्याचे जाळे बनवितो. ३. पाण्यात राहणारा एक पक्षी. [सं. कौल, कौलिक]

**कोळीण** स्त्री. १. कोळी जातीतील बाई. २. कोळी किड्याची मादी. ३. शिमग्याच्या सणात कोळणीचे सोंग काढून नाचणारा पुरुष. ४. नायकीण. (नाशिक) ५. कोळी पक्ष्याची मादी. ६. रानडुकराची मादी : 'कोळीण आपल्या पिलांसह वसवसत बाहेर पडली होती.' - श्रीयो १.३०२.

**कोळीलाकडी** स्त्री. जंगलातून तोडून आणलेल्या लाकडावरील कर, दस्तुरी.

**कोळीष्टक** न. कोळशीट; कोश.

**कोळीसर** पहा : **कोळिसरा** : 'झुडुपांवरचा काळा कोळीसर भुर्रकन फडफडत येऊन म्हाताऱ्याच्या गाईच्या ढोपरावर बसत होता.' - बाब ४८.

**कोळुसांटा** पु. एक प्रकारची वनस्पती. (बे.)

**कोळे** न. गवताचा लंबवर्तुळाकार (अंडाकृती) मुडा किंवा पुडा. यांत भात किंवा भाताचे बियाणे ठेवतात. गवताची पुरचुंडी (पावटे इ. ठेवण्याची). [सं.]

**कोळे** न. वाळलेल्या काटक्या व पाचोळा : 'एकाधा एकु तयावरि कोळें जाळो :' - दृपा १४.

**कोळेरोग** पु. सुपारीवरील एक रोग.

**कोळो** पु. मोठी माशी. (चि. कु.)

**कोळो** पु. लांबवर उडणारा निखारा (जळती गंजी अथवा घर यांचा).

**कोळ्याचे सूत** १. लांब सूत. २. (ल.) लांबच लांब, नीरस व कंटाळवाणे भाषण.

**कोंकणा** पु. सर्वसाधारण गोमंतकातील हिंदू लोकांना उद्देशून ख्रिस्ती लोक हा वापरतात तो शब्द. (गो.)

**कोंकतर-तारी** स्त्री. पाणकोंबडा. (गो.) [सं. कोक]

**कोंकारचे** अक्रि. कोंबड्याचे आरवणे. (गो.) [ध्व.]

**कोंकारी** स्त्री. १. पाणकोंबडा. २. एक मासा. (गो.कु.) [ध्व.]

**कोंकेणे** अक्रि. ओरडणे; आरवणे. (राजा.)

**कोंकेर** न. पाथरवटाचे हत्यार (दगड काढण्याचे). (गो.)

**कोंकेरी** स्त्री. एक पक्षी; पाणकोंबडा : 'काळी कोंकेरी भातात लपून...' - आआशे १६९. पहा : **कोंकारी**

**कोंग-थ** न. १. ढोंग; सोंग (दारिद्र्य, दुःख, वेड इ.चे). (क्रि. घेणे, करणे, लावणे.) : 'जो न्यायासनावर चढला कीं दुष्यंत राजाप्रमाणें त्या गांवचाच नाहीं असें बळानें कोंग मात्र करतो...' - निमा ६२५.[क.]

**कोंग** न. कुबड; कुबड्या. पहा : **कोक** [क.]

**कोंगटे** न. वस्त्र; पांघरूण : 'तेयावरी पासौडी पांगुरले : वरि जाडीचे कोंगटें:' - लीच २.७८.

**कोंगते** न. घुंगट; बुरखा : 'उजवेया हाता सोरठिस जाडीचे कोंगते घालुनि...' - स्थापो २८.

**कोंगल्ल** वि. वाकडेतिकडे; कोंग. (गो.) [ क. कोंक - ग.]

**कोंगळी** स्त्री. विळा; कोयती; गवत कापण्याची कात्री. [क. कोंग = वाकडी विळी]

**कोंगा** पु. १. पाणथळ शेतात राहून भाताची नासाडी करणारा प्राणी. (गो.) २. एक लहान मासा. [ध्व.]

**कोंगा, कोंगाडा-डी** पु. (ल.) मूर्ख माणूस. वि. रोंग्या; रोगी; कुबडा. [क. कोग]

**कोंगाटी** वि. अव्यवस्थित राहणारा : 'माणसानं कोंगाट्यासारखं राहावं असं आहे की काय?' - ल्व्हाळी २६१.

**कोंगाडी, कोंगी-ग्या** वि. सोंगाड्या; ढोंगी; बहुरूपी; कोंग सोंग करणारा : 'कोंडाण्यास कोंगाड्याचे सोंग घेऊन...' - सूर्य ५६. [क.]

**कोंगाळा** वि. लांब, वाकडे आकडे ज्या झाडास येतात असे (चिंचेचे झाड).

**कोंगाळे** न. लांबट, वाकडी चिंच (फळ व झाड); कोंगाळी चिंच; चिंचेचा आकडा. (को.) [क. कोंग = वाकडे]

**कोंगे** न. मधाचे लांबट पोळे. [क. कोंगे = आकडी]

**कोंच कोंच** थोडे, थोडे. (व.) [ सं. कुच् = थोडा होणे, करणे]

**कोंजट** पहा : **कोंझट, कोंझा**

**कोंजळी** स्त्री. ओंजळ; पसा (दोन हातांचा).

**कोंजा-झा, कोंझट** १. खोल डोळ्याचा (माणूस.) २. खोल गेलेला व बारीक (डोळा). ३. (ल.) तुसडा; तिरसट. ४. संकुचित. [सं. कुचित]

**कोंटा** : पु. कोपरा. (हैद्रा.)

**कोट्टा** पु. बी; कोय; बाठा. (तंजा.) [क.कोट्टे]

**कोंड** पु. १. गोल कुंपण; वई; गावकूस : 'इंद्रियग्रामींचें कोंडा' - ज्ञा २.२४२. (को.) २. शपथ घेणाऱ्याच्या भोवती काढलेले वर्तुळ.

३. गोटीकरिता केलेले वर्तुळ; गल. ४. वर्तुळाकार वस्ती; खेड्यातील एक स्वतंत्र वस्ती (ही एकाच जातीची असते); आळी; वाडी. ५. एकाच्या वहिवाटीतील जमीन, शेत. ६. नदीतील डोह (राजा. कु.) डबके; फोंड; कुंड. (गो.) ७. कोंडमारा; गुदमरा : 'बहू पाहतां अंतरी कोंड होतो।' - राम करुणाष्टके ७.

**कोंड** स्त्री. कोंडी; बंद केलेली जागा किंवा घर; तुरुंग. [सं. कुंड] (वा.) ० **पडणे** - संकट येणे. ० **होणे** – कोंडमारा होणे; कोंडले जाणे.

**कोंड** स्त्री. नदीतील डोह, डबके. [क.]

**कोंड** पु. एक खेळ. वर्तुळातील खेळ्यांना बाहेरचे गडी बाहेर काढू पाहतात (वाघ - मेंढीप्रमाणे.) (ठा.)

**कोंडका** पु. लाकडाचा ओंडका, गाठ. पहा : **कोंडके**

**कोंडकी** स्त्री. १. बगीच्यात पाणी साठवण्याकरिता केलेला लहानसा खड्डा, हौद. २. मिठागर. ३. भाताचे खाचर (बांध घालून तयार केलेले.). पहा : **कोंडके**

**कोंडके** न. १. डोंगरातील आडवळणाची जागा; गुहा; दरी : 'पर्वताच्या कोंडक्यांत गाव असल्यामुळें...' - खेया ३७. (को.) २. बांध घातलेला वाफा (पाणी राखून ठेवण्यासाठी). ३. पहा : **कोंडकी.** ४. दाराची खिटी; कुत्रे. पहा : **कोरडिके.** ५. (ओतकाम) भांडे चरकावर धरण्यासाठी लावण्याचा लाकडी ठोकळा.

**कोंडडाव** पु. (गोट्या) कोंडीचा डाव. यात निरनिराळी घरे व रेघा आखून खेळ खेळतात.

**कोंडण** स्त्री. कोंडण्याची जागा; गोठा; कोंडवाडा : 'ऐशा विचाराचे घालून कोंडणीं। काय चक्रपाणी निजलेती।' - तुगा १.१५४२.

**कोंडणी** स्त्री. कोंडलेली अवस्था; गुंतून, अडकवून पडलेली, बंदिस्त स्थिती; गुंतून, बांधून पडणे (शब्दशः व लक्षणेने).

**कोंडणे** उक्रि. १. चोहीकडून बंदिस्त करणे; अडकवून ठेवणे; अडविणे; बंद करणे (माणूस खोलीत घालून, नदीला बांध घालून इ.). २. (ल.) घोटाळ्यात घालणे, आणणे, गांगरविणे; कुंठित करणे; निरुपाय करणे (वाद इ. मध्ये). ३. गुंतणे; अडकून पडणे : 'न कोंडे रसनेचिया चाडा। न पडे क्षुधेचा पांगडा।' - एभा ११.९३६.

**कोंडपाणी** न. (भूगोल) १. गुंफित प्रवाहांच्या परिसरातील साचलेले पाणी. २. अत्यंत अरुंद नागमोडी वळणाच्या व चंद्रकोराकृती सरोवरांच्या परिसरात अधूनमधून साचणारे पाणी. ३. नद्यांवरील धरणांच्या उगमस्थानाकडील भागात अडवलेले, कृत्रिम जलाशयातील पाणी.

**कोंडबार** पु. कुंचबणा; कोंडमारा : 'कुमारां कीजे कोंडबार।' - उगी ६१४.

**कोंडमार-रा** पु. १. कोंडून ठेवून मारणे; लहान खोलीत घालून गुदमरविणे. २. भांडणात, वादात, चढाओढीत प्रतिपक्षीयाने केलेली अडवणूक, कोंडी, ३. संकटात, अडचणीत आणून नकोसे करणे. ४. चहूकडून कोंडल्यामुळे होणारी अवस्था; अगतिकत्व; कुचंबणा.

**कोंडली** स्त्री. गाडगे; मडके. (चंद्रपुरी)

**कोंडले** न. पातळ पदार्थ राहण्यासाठी सभोवार भात इ. पदार्थ लावून जे ताटात (जेवताना) करतात ते अळे; कुंड (कु.) [सं. कुंड]

**कोंडवरा** वि. खोल; खोलगट (भांडे इ.). (राजा.) [क.कोडे]

**कोंडवाड-डा** न. स्त्री. पु. गुरांचा गोठा. (को.) गुरे कोंडण्यासाठी केलेली कोंडी; गावात अगर शेतात शिरून नासाडी करणारी गुरे कोंडून ठेवण्याची सरकारी जागा; गधेघाट. ह्यांच्या सुटकेसाठी मालकाला रोजचा त्याचा खर्च व दंड भरावा लागतो.

**कोंडळी** स्त्री. लाकडी फावडे; धान्य मळताना पातीतून उडून गेलेली कणसे गोळा करण्याचे साधन.

**कोंडळे** न. कडे; वर्तुळ; कोंडाळे : 'मग जमदग्नीनें विचारिलें। मृत्तिकेचे कोंडळें केलें।' - कालिकापुराण २२.२६.

**कोंडा** पु. १. धान्याचे मूळ, सालपट, तूस इ. : 'देवा कळणा अथवा कोंडा।' - तुकाराम(नवनीत ४४८). २. (ल.) ताप निवाल्यानंतर अंगावरून निघणारा एक प्रकारचा भुसासारखा पदार्थ, सालपटे, मळ (क्रि. जाणे.) २. खपली, पापुद्रा. (वा.) **कोंड्याचा मांडा करणे** - १. सुगरणपणा अंगी असणे. २. अगदी निकृष्ट परिस्थितीतही चांगले कार्य करून दाखविणे; साध्या गोष्टीच्या मदतीनेही चांगल्या गोष्टी करणे. ३. (ल.) अडून न बसणे; गोड करून घेणे; समाधानी राहणे.

**कोंडा** पु. चिवा; एक प्रकारचा लहान बांबू. [क.]

**कोंडा** पु. १. पहा : **कोयंडा.** २. मल्याळी तऱ्हेची वेणी व तिचा साज. (तंजा.)

**कोंडाउर** पु. एका जातीचा साप.

**कोंडा पाऊस** पावसाची बुरबुर, रिपरिप; तुषारयुक्त पाऊस.

**कोंडापाणी** न. अन्नपाणी : 'नका देऊ तिळमात्र कोंडापाणी।' - ऐपो २३५.

**कोंडाभोंडा** पु. १. कोंडा, भूस इ. पदार्थ. २. (ल.) कोरडे, नीरस, वाळलेले अन्न; कदान्न.

**कोंडामांडा** पु. कोंडा, भूस यांसारखे बारीकसारीक पदार्थ : 'माशांना खाऊ घालायचा कोंडामांडा भरलेला असे.' - किरिस्ताव १२.

**कोंडाळणे** अक्रि. १. गरगर फिरणे; सैरावैरा धावणे; कोंडलेल्या जागेत इकडे तिकडे फिरणे; वाहणे (वारा). २. घिरट्या घेत जाणे; वाताहात होणे; उधळणे (गवताच्या काड्या, धूळ). ३. भोवरे करीत वाहणे; गिरक्या घेत जाणे (नदी). ४. घोटाळणे; गांगरणे (मन). ५. पुढेमागे जाणे; सैरावैरा धावणे (निबिड अरण्यातल्याप्रमाणे.) ६. कोंदणे; गुदमरणे. (ना.)

**कोंडाळे** न. १. वर्तुळ; वेटोळे; वाटोळी जागा; आळे. २. माणसांनी वर्तुळाकृती बसणे; भोवती बसणे. ३. थालीपीठ; कोंडोळे. ४. आळे (क्रि. करणे.) (गो.) ५. गट; टोळके.

**कोंडी** पु. खोंडा; दोन ओढ्यातील जमिनीचा भाग. [सं. कुंड]

**कोंडी** स्त्री. १. जिच्यात काही व्यवहार होऊ शकत नाही अशी परिस्थिती : 'एका धनाढ्य व्यापाऱ्याने बाजारात कोंडी निर्माण केली.' - विजी १५. २. जाच; बंधन; कडक शिस्त : 'जातींची संख्या व कोंडी बेसुमार वाढली.' - गांगा १७. ३. कोंडलेली जागा; कोंडवाडा. ४. ब्राह्मणांना दक्षिणा देण्याच्या वेळी त्यांना बसण्याकरिता केलेले आवार; रमणा.

३. (आट्यापाट्या) गडी जेथे दोन्हीकडून अडवून धरतात ती पाटी (पाटीवरचा गडी व मुरदुंग्या यांनी अडविलेली.) ४. नदीच्या बंधाऱ्याची जागा. ५. मीठ बनविण्याची लहान मिठागरे. (को.) ६. अडचणीची परिस्थिती. (वा.) ० **करणे** - कोंडणे; वेष्टणे; घेरणे : 'पहिल्या बाजीरावाने भोपाळवर कोंडी करून निजामाच्या घोड्यांना पळसाचा पाला खाण्याची पाळी आणली.' - के १९.३.१९४०. ० **फुटणे** - अडचणीची परिस्थिती संपणे; संकटातून बाहेर पडण्याचा मार्ग किंवा उपाय सापडणे : 'ही कोंडी फुटणार कशी तेच मला कळत नव्हते.' - पिंपेर २५. ० **फोडणे** - अडचणीतून बाहेर पडणे. ० **येणे** - कोंडून ठेवणे. **कोंडीत पकडणे** - पेचात धरणे; अडचणीत आणणे : 'एकट्याला कोंडीत पकडून त्याच्याकडून त्यांनी होकार मिळविला.' - रथ १३५.

**कोंडी** स्त्री. (सोनार) सरीचा अथवा ठुशीचा भाग. (बे.)

**कोंडीव** वि. १. कोंडलेले; बंद केलेले (पाणी, वारा, जागा). २. बंदीत ठेवलेला (माणूस, प्राणी).

**कोंडुली** स्त्री. दही विरजण्याचे लहान मडके : 'सदानंदाची लहान कोंडुली धुतली.' - शाआ १११.

**कोंडुळे** पहा : **कोडुळे**

**कोंडे** न. पणती; चिकोरी; पणतोली.

**कोंडे** न. पाणसाप (बेडूक खाणारा). (को.)

**कोंडेकड** न. नवीन तांदळाच्या कोंड्याचे लहान पापड केळीच्या सोपटाच्या किंवा कोहळ्याच्या पाण्यात याचे पीठ भिजवतात. (कुलाबा)

**कोंडो** पु. १. बांबू. २. जमीन मोजण्याचे माप. (गो.) पहा : **कोंडा**

**कोंड्या-ढ्या** पु. माडी, ताडी ठेवायचा भोपळा. हा ताडीच्या झाडाला टांगून ठेवतात. २. एक झाड.

**कोंड्यामुरूम** पु. भुसभुशीत, ठिसूळ मुरूम.

**कोंढ** न. कुंपण; गावकुसू : 'इंद्रियग्रामीचे कोंढ। - राज्ञा २.२३७.

**कोंढ** न. १. कोंदण. २. (ल.) खोल : 'डोळे कोंढनी जाती।' - ज्ञाप्र ८२३.

**कोंढ** पु. कुंड.

**कोंढाण** न. कोंदण; डोळ्यांची खोबण.

**कोंढाळे** पहा : **कोंडाळे**

**कोंढी** स्त्री. १. मिठागर; खाचर. २. पहा : **कुंडी, कोंडी**

**कोंता** वि. कोणता; काय : 'याच्यात बाईचाभी कोंता कसूर आहे?' - अजून १३.

**कोंद** स्त्री. भाजलेले तीळ कुटून त्यात गूळ घालून तयार केलेले पुरण, लाडू इ. : 'तिळाच्या कोंदेंची पोळी.' - पाक ५४.

**कोंद** पु. तांदळाचा कोंडा. (व.)

**कोंद(दा)ट** वि. चोहोकडून हवा येण्याला प्रतिबंध असलेली; आडोशाची; कोंडमाऱ्याची (खोली, जागा).

**कोंदटणे** पहा : **कोंदणे** : 'अचानक आकाश कोंदटले.' - स्मृचापा १६१.

**कोंदण** न. १. अलंकारावर रत्ने बसविण्यासाठी केलेले घर, बैठक, जेडा : 'सौंदर्य हे साधुवृत्तीच्या कोंदणांत अधिकच सुंदर दिसतें.' - नीति ८६. [क. कुंदन = सोने]

**कोंदणपट्टी** स्त्री. रत्ने बसविण्याकरिता तयार केलेली सोन्याची तारपट्टी, पत्रा.

**कोंदणे** उक्रि. १. जोराने आत भरणे, दाबणे, कोंबणे; खच्चून, ठासून भरणे. (धुराने घर, मेघांच्या गडगडाटाने आकाश, आनंदातिशयाने मनुष्य इ.) : 'इहीं दोहींचि परि संसारू। कोंदला असे॥' - ज्ञा १५.४७६. २. बंद होणे; छिद्र, भोक बुजणे.

**कोंदाकोंदी** स्त्री. दाटी; खेचाखेच; भीड; गर्दी : 'माझारीचि कोंदाकोंदी।' - ज्ञा १५.१५६.

**कोंदाट** स्त्री. विपुलता; पूर्णता; दाटी : 'कर्पूरकर्दळीची गर्भपुटें। उकलतां कापुराचेनि कोंदाटें।' - ज्ञा ११.२५०.

वि. पहा : **कोंदट**

**कोंदाटणे** उक्रि. गच्च भरणे; एके ठिकाणी गर्दी करणे; ठासून भरणे; कोंबणे : 'तेजें कोंदाटलिया दिसा। जयाचेनि॥' - ज्ञा १.१३९.

अक्रि. पहा : **कोंदणे**

**कोंदी** स्त्री. कोन; भिंतीची सांध किंवा जोड. बहुधा सांधीकोंदी असा जोडशब्द येतो.

**कोंधाट** पहा : **कोंदाट** : 'कर्पूरकदलिचीं गर्भपूटें। उकलति कर्पुराचेनि कोंधाटे।' - राज्ञा ११.२४६.

**कोंधाटणे** अक्रि. कोंदाटणे, कोंदणे : 'तेजें कोंधाटलिया दिशा। जेयाचेनि॥' - राज्ञा १.१३९.

**कोंना-नी-ने** पु. स्त्री. न. पेरे; हातापायांच्या नखात मळ वगैरे शिरून तो भाग कुजल्यासारखा होतो, सुजतो व ठणका लागतो तो विकार. (चि.) [सं. कोण]

**कोंब** पु. १. कोम; झाडाचा धुमारा (केळीच्या कांद्यापासून निघणारा पासंबा) : 'बाळार्क कंदा निघाले कोंब। तैसे रत्नमणींचे खांब।' - मुसभा २.८. २. अंकुर; मोड : 'विपरीत ज्ञानाचा कोंब फुटे।' - विउ ३.७. ३. पालखीचा वाकलेला दांडा : 'एकीकडे दांडीयाचा कोंबु तेणें खांदी घेतला :' - गोप्र ८२. (गो.) [सं.कंबी] (वा.) ० **फुटणे** - १. कोंब येणे. २. (ल.) आशा उत्पन्न होणे.

**कोंबट** वि. कोमट; उबट; किंचित उष्ण; साधारण ऊन. (शरीर, वस्तू इ.स लावतात. हवेच्या संदर्भात हा शब्द वापरत नाहीत.) [सं. कोण]

**कोंबडका** पु. कुक्कुटपालनाचा व्यवसाय करणारा. (शेतकी शेतकरी १९३७)

**कोंबडकी** स्त्री. कुक्कुटपालन. (शेतकी शेतकरी १९३७)

**कोंबडखाना** पु. कोंबड्या ठेवायची जागा; एकंदर कोंबड्या : 'सगळा कोंबडखाना विकून झिपऱ्याकरिता चांदीचा करगोटा आणणार होती.' - आआशे ३१.

**कोंबडतुरा** : पु. तांबडा देठ व तुरा असणारे एकप्रकारचे तण.

**कोंबडनखी** स्त्री. एक प्रकारची औषधी मुळी.

**कोंबडबाउल** पु. अंडी विकत घेणारा : 'मघाशी कोंबडबाउल आला होता.' - सराई २२.

**कोंबडसाद** स्त्री. कोंबडा आरवण्याची वेळ; पहाट.

**कोंबडा** पु. १. एक पाळीव पक्षी; कुक्कुट. याचा रंग चित्रविचित्र असून डोक्याला तुरा असतो व गळ्याला कल्ले असतात. याचे मांस खातात. २. फुगडीचा एक प्रकार; मुलींचा एक खेळ. ३. (ल.) केसांचा फुगा. ४. चंद्राभोवती पडलेले खळे. ५. राजगिऱ्याच्या वर्गातले एक फुलझाड.

**कोंबडी** वि. आकड्याच्या जुगारातील परिभाषा : 'आंगठा म्हणजे एक, कोंबडी दोन.' - मक १९६१.३१.

**कोंबडे** न. १. कोंबड्याचे लहान पिल्लू. २. ढगातील तांबूस पट्टे; पाऊस पडण्याचे चिन्ह. (वा.) **दाणे टाकून कोंबडे झुंजविणे** - मुद्दाम पदरचे खर्चून भांडणे लावणे. ० **आरणे** - पहाटेची वेळ होणे.

**कोंबणे** उक्रि. १. ठासून भरणे; गच्च भरणे. ठासणे. २. बदडणे; कुबलणे.

**कोंबणे** अक्रि. कोमेजणे; वाळणे; निस्तेज होणे.

**कोंबणे** अक्रि. कोंब, अंकुर फुटणे, मोड येणे.

**कोंब(बा)रा, कों(को)बरी** पु. कोंब; अंकुर : 'मुळीं सुवासना निघती आरा। घेऊनी फुटती कोंबारा।' - ज्ञा १५.१८४. 'पारूच्या जिवाला कोंबार फुटल्यागत झालं.' - खळाळ ९०.

**कोंबा** पु. कोंबडा. (गो.को.)

**कोंबाकोंबी** स्त्री. थोड्या जागेत पुष्कळ भरणे; थोड्या वेळात पुष्कळ करणे : 'सगळ्या अभ्यासाची कोंबाकोंबी सुरू झाली.' - कोसला २०९.

**कोंबी** स्त्री. लहान कोंब. पहा : **कोंब**

**कोंबू** न. एक वाद्य.

**कोंबो** पु. कोंबा. (को.) पहा : **कोंबडा**

**कोंभ, कोम** पु. अंकुर. पहा : **कोंब** : कां रत्नबीजा निघाले कोंभ।' - ज्ञा ६.२५३.

**कोंभ** पु. स्तंभ, खांब : 'डोळे फिरवी गरगरां दांत खाया करकरा कोंभाचि कचकावळा।' - भज १२८.

**कोंभ** पु. डांग; वन; अरण्य; एकांत जागा; सांधी कुंदी : 'उदैजेति परबिंबीं। कळि कोळिगा राहिला कोंभीं।' - ऋ ९०.

**कोंभणे** अक्रि. अंकुर येणे; कोंब येणे; कोबेणे; उत्पन्न होणे : 'तव दोर्दंडी कां जैसें। आकाश कोंभैलें।' - ज्ञा ११.२६६.

**कोंभ(भा)रा** पहा : **कोंब**

**कोंभा** पु. ठोसा; गुद्दा; कोपरखळी; प्रहार : 'गुडग्याच्या कोंभ्यानं दाराच्या फळ्या आत लोटल्या.' - शिळान १. (व.ना.)

**कोंभा** पु. माडाचा रोपा. (को.)

**कोंभाळा** पु. एक प्रकारचा वेल : 'झाडावर कोंभाळ्याचा वेल चढला होता.' - जैत ६५.

**कौकव** पु. तारा. [फा.]

**कौकवित, कौटल, कौटळ, कौटाल कौटाळ, कौटाल्या, कौटाळणे, कौटाळी, कौवटाळीण, कौटील, कौठ, कौठी, कौडळ, कौडा, कौडागहू, कौडी, कौडीचुंबक, कौडीटंक, कौडीपूत, कौड्या घोणस, कौड्या साप** हे शब्द 'कव' खाली पहा.

**कौटाल्यविद्या** स्त्री. कौटाळ; जादू; जारणमारण; चेटूक. (कुण.)

**कौटिल्य** न. १. वाकडेपणा; वक्रता. २. (ल.) कपट; दुष्टपणा; कवटाळ; ठकबाजी : 'राणीचें आनंदीबाईच्या सवाई निष्ठुराचरण व कौटिल्य; खंडूजीचा मत्सरी स्वभाव...' - नि ५४४. ३. चाणाक्षपणा; धूर्तता ४. चाणक्य ऋषी - चंद्रगुप्त मौर्य या राजाचा मंत्री. याचा अर्थशास्त्रावरील ग्रंथ प्रसिद्ध आहे.

**कौटुंबिक** वि. कुटुंबाचा; कुटुंबाशी संबंध असलेला. जसे :- कौटुंबिक सुख.

**कौठीचाफा** पु. एक सुगंधी फुलझाड; त्याचे फूल.

**कौति (तु) क** न. १. आश्चर्य; कुतूहल; जिज्ञासा; नवल; विस्मय; आश्चर्य उत्पन्न करणारी कोणतीही गोष्ट (मनुष्य, वस्तू, कृत्य, गोष्ट, देखावा इ.). २. प्रेम; ममतेने, आनंदाने धरणे; लाड करणे; कुरवाळणे (मूल किंवा वस्तू); अतिशय प्रीती, अभिमान धरणे; लालनपालन; नाजूक रीतीने वागविणे; फार काळजी घेणे. (क्रि. (कौतुकाने) राखणे, ठेवणे, करणे, असणे.) ३. मौज; खेळ; विनोद; प्रदर्शन; गाणे, नाचणे इ. : 'उत्तर निज तुरगांतें द्याया अरुणासी कौतुक पिटाळी।' - मोविराट ४.८१. ४. मनोरंजन; करमणूक; ख्यालीखुशाली. [सं.]

**कौतुकास्पद** वि. कौतुक करावे असे वाटण्यासारखा; आनंदमिश्रित अभिमान वाटावा असा.

**कौतुकी** वि. खेळ्या; मौज करणारा; आनंदी; उल्हासी.

**कौतूहल** पहा : **कौतुक १, २, ३, कुतूहल** [सं.]

**कौदरी** स्त्री. चवेणीचे झाड : 'मोह, साग, कौदरी, पळस... वगैरे झाडे गर्द लागली असून...' - मंजु १२७.

**कौन** वि. (दलाली) नऊ ही संख्या.

**कौनट** पु. कोपरा :'म्हणोनि माहालक्षमिचा कौनटावरि आले'- लीचउ १२.

**कौनबौ** वि. १. चमत्कारिक; भीतिदायक; भयंकर; हिडिस परंतु अगम्य व अनिश्चित असा (पदार्थ, माणूस वगैरे). २. पहा : **काण्णूबाण्णू**

**कौनी** पु. (कुस्ती) दस्त उतारावरील तोड. प्रतिपक्षाचा आपल्या मानेवरील हात आपल्या डाव्या हाताने खाली दाबून मान उचलणे.

**कौपीन** न. स्त्री. १. लंगोटी; छाटी; (क्रि. नेसणे.) : 'मुळीं मुंडले मुंडन। बंदी बंदाची कौपीन।' - तुगा ४०२०. २. कफनी : 'माझ्या खोलीत दुसरी एक कौपीन आहे ती घालून इकडे ये.' - सूर्योदय १५९. [सं.] (वा.) ० **करणे** - लंगोट बंद होणे.

**कौबेरी** स्त्री. उत्तर दिशा. [सं. कुबेर]

**कौम** स्त्री. रूढी; प्रथा : 'नवीनच कौम पैदा होत आहे.' - विजी १६६.

**कौम** स्त्री. वंश; जात; जमात; लोक. [फा.]

**कौमारत्व** न. बालपण; पाच ते दहा पर्यंतचे वय; कुमारपण : 'एथ कौमारत्व दिसे।' - ज्ञा २.१०९. [सं.]

**कौमुदी** स्त्री. चांदणे; चंद्रप्रकाश. [सं.]

**कौर** पु. मोसंबी; नारिंग.

**कौल** न. घराच्या छपरावर आच्छादनासाठी घातलेले मातीचे पन्हळ (चपटे,

नळीवजा, मंगलोरी).[सं. कोलक] (वा.) **घरावर कौल राहू न देणे** - एखादे कुटुंब समूळ नष्ट करणे.

**कौल** पु. १. वचन; आश्वासन; अभय; संरक्षणाची हमी : 'मी तुला कौल देतो, सरदारकी देतो.' - श्रीयो १.४२२. २. जमिनीची लागवड करण्यासाठी किंवा व्यापार करणाऱ्याला सरकार जे अभयपत्र, करार, कबुलायतीचा कागद देते तो. सरकारी करारनामा; कबुलायत; कौलनामा : 'तुम्हांस चि. रा. माधवराव नारायण याचा कौल.' - मइसा १२.१३७. ३.जहाजांना सर्व समुद्रातून फिरण्याचा मुख्य सत्तेने दिलेला परवाना. ४. परवाना; अभयपत्र. (शत्रूला आपल्या प्रांतातून जाण्यासाठी दिलेले); माफी देणे; सूट देणे : 'दंगेखोर गनीम आपण जेर झालों असें जाणून दगाबाजीनें कौल घेतो, म्हणून जवळ बोलावूं नये.' - मराआ ३६. ५. ईश्वरी वचन; ईश्वराची आज्ञा मिळविणे; प्रश्न; साक्ष; प्रसाद; देवाजवळ गाऱ्हाणे सांगून त्यावर अमुक उपाय करावा किंवा नाही हे विचारताना देवाच्या अंगाला लावायचे तांदूळ, सुपाऱ्या, फूल इ.; देवाची संमती : 'इंद्रियांचे पेटे भला कौल देती।' - तुगा ४०८. ६. अभिप्राय; मत; कल (क्रि. मागणे, देणे.) [फा.] (वा.) **कौलास येणे** - शरण येणे; तह करायला कबूल होणे : 'झालें मोंगल बेजार मरूं लागले आले कौलाला।' - ऐपो २३६.

**कौलअहद** पु. वचन; कौल : 'त्यावरून म्यां त्याजला कौलअहद दिधला.' - मइसा ६.५७०. [ का. कोल + अहद]

**कौलकरार** पु. लेखी करारमदार; कबुली; ठराव; वचन; आश्वासन; अटींना संमती. [फा.]

**कौलकरारदाद** पु. वचन : 'हज़्रतसाहेबाचा तरी कौलकरारदाद आपल्यास आहे कीं तुमचे जागीरपैकीं एक चावर कसोदगी करणें नाहीं.'-इमं ६७.

**कौलगी** पु. कर्नाटकातील पाळेगारांच्या पदरचा फडणीस. असे कौलगी त्या त्या पाळेगारांच्या मुलखात कर्णिक - कुलकर्ण्यासारखे नेमलेले असत.

**कौलनामा** पु. १. सरकारने शेतकऱ्याला करून दिलेले करारपत्र; लेखी करार; कबुलायत. २. (कायदा) भाडेपट्टा.

**कौलपत्रक** न. गावातील कमी साऱ्याच्या जमिनींचा हिशेब असलेले पत्रक.

**कौलप्रसाद** पु. १. गुरवाने देवतेचे अनुमोदन मिळविण्याकरिता अंगाला लावलेले कळे, फुले वगैरे खाली पडून प्रश्न विचारणाऱ्याला दिलेले उत्तर अथवा प्रसाद. (को.) २. कौल मागताना लावलेली फुले वगैरे. (क्रि. लावणे, लागणे). पहा : **कौल ५**

**कौलव** न. (ज्यो.) एका करणाचे नाव. प्रत्येक चांद्रमासात ६, १३, २० २७ या तिथींच्या पूर्वार्धात हे करण असते. तसेच २, ९, १६, २३ या तिथींच्या उत्तरार्धात हे करण असते. करणाचा स्वामी मित्र. याचे फल शुभ आहे.

**कौला** पु. एक भाजी. कौल्याची भाजी कोकणात प्रसिद्ध आहे. हे झुडूप वीतभर उंच वाढत असून रानात पावसाळ्यात उगवते. याची भाजी श्रावण सोमवारी अवश्य खावी असे म्हणतात.

**कौला-ले** पु. न. एक मोठ्या जातीचे नारिंग. याची साल आतील फोडीयुक्त भागापासून, गरापासून सुटी निघते. सालीला कडवट वास येतो. [हिं.]

**कौलागम** न. मंत्रशास्त्र. [सं. कौल = शाक्तपंथ + आगम]

**कौलाफोक** वि. कोवळा आणि सरळ (झाड, वनस्पती, रोपटा); तरुण व ताठ (मनुष्य, सौंदर्यलक्षण).

**कौलार-रु** न. कौले घातलेले छप्पर.

**कौला लसलसीत** कोवळा लुसलुशीत; नाजूक; नवीन; ताजा; कोवळा; जोमदार आणि टवटवीत (झुडूप, फळ). [सं. कोमल + लस् = लसित]

**कौलावण** स्त्री. १. सरकारी कौल; परवाना मिळविण्यासाठी द्यायची पट्टी, किंमत, फी. २. (नाविक) गलबताचा नोर; गलबतातून जाण्यायेण्यासाठी पडणारे मूल्य.

**कौलासणे** सक्रि. विसर्जन करणे : 'गणपती मुहूर्ती होत होत्या त्या देवालये पुस्करणीस कौलासावयास जात होत्या.' - आंपव्य ३.

**कौलिक** वि. वंशपरंपरागत; वडिलोपार्जित; वारसाने आलेले. [सं. कुल]

**कौलिक** पु. वि. १. शाक्त पंथातील एक व्यक्ती अथवा तो पंथ. २. (सामा.) मांत्रिक; वाममार्गी; चेटक्या. ३. कपट. [सं.]

**कौलिक** पु. व्याध; जाळे वापरून सावज पकडणारा; पारधी : 'एके दिनीं कौलिक पारधीतें।' - वामन व्याधाख्यान १. [सं. कौल]

**कौली** स्त्री. सरकारकडून कौल घेऊन प्रथमतः लागवडीला आणलेली जमीन. वि. सरकारातून ज्याचा कौल घेतला आहे असे (शेत, झाड इ.).

**कौली** पु. १. एक प्रकारची आखूड व दाट उगवणारी वनस्पती. ही बहुधा मळे जमिनीत फार होते. (चि.कु.)

**कौलीप्रक्षेप** पु. (स्था.) पाणी वाहून जाण्यासाठी भिंतीच्या पुढे आलेला कौलारू छपराचा भाग.

**कौलीमक्तेदार** पु. कौलाने शेत करणारा.

**कौलू** स्त्री. जुनाट पाणथरी; लघ्वांतर त्वचा ग्रंथी कठीण होणे.

**कौशबर्दार** दरबारात जाताना बाहेर काढून ठेवलेले जोडे सांभाळणारा नोकर.

**कौशल-ल्य** न. १. कुशलता; तरबेजपणा; चातुर्य; पारंगतता; हातोटी; हुन्नर. २. सुख; कल्याण; सुरक्षितता; निश्चितता. [सं.]

**कौशा** पु. १. रक्षक; रक्षणकर्ता; पाठीराखा; वाली; कड घेणारा. २. सूड उगवणारा.

**कौशिक कानडा, कौशी(सी)कानडा** पु. (संगीत) गायनशास्त्रातील एक राग. गानसमय रात्रीचा तिसरा प्रहर. हा कानड्याचा एक प्रकार आहे.

**कौशेय** वि. रेशमी (वस्त्र, सूत). [सं.]

**कौस (सा) ल** न. गुप्त मसलत; कट; अनिष्ट कारस्थान; कपटी योजना; कवटाळ; कवसाळ. (क्रि. करणे.) : 'म्हणे काय कौंसाल केलें सतीनें।' - रामसुतात्मज (द्रौपदीवस्त्रहरण १९२).

वि. १. कसबी; कुशल (माणूस, योजना इ.): 'नाना कौसाल रचना। केली धर्मांचिया स्थापना।' - कालिकापुराण १६.६६. २. कपटी; कुभांडखोर : 'तुकयाबंधु स्वामि कानड्या कौसाल्या रे।' - तुगा १४०. [सं. कौशल्य]

**कौसाल-ल्य** पु. कौशल्य; कुशलता : 'तीयेतें स्वीकरी श्रीचक्रपाणी हे कौसाल्य कृपेचे।' - मुप्र १४९६.

**कौसाळ** वि. कुशल; चतुर: 'तूं माय जननी कांसवी कौसाळा।'-नागा. ६०९.

**कौसुंभ** वि. १. कुसुंब्याच्या रंगाने रंगलेला. २. कुसुंब्यासंबंधी. [सं.]

**कौस्तुभ** पु. समुद्रमंथनातील चौदा रत्नांपैकी एक; श्रीविष्णूच्या कंठातील मणी; अलंकार : 'कंठीं कौस्तुभमणि विराजित।' - तुगा १. [सं.]

**कौस्तुभी-की** स्त्री. घोड्याच्या गळ्याखाली लोंबणारी पोळी. - अश्वप १.९९. [सं. कौस्तुभ]

**कौळमार्गी** वि. वाममार्गी; मांत्रिक.

**कौळिक** स्त्री. कावीळ. हा रोग झाल्यास डोळे पिवळे पडतात आणि सर्वत्र पिवळे दिसते. : 'जाणिजे कौळिका।' - भाए ७४६.

**कौळिक** पु. कोळी; भिल्ल; व्याध; निषाद : 'मातीयेचा द्रोण केला। तो कौळिका भावो फळला।' - एभा १.४३. [सं. कोल]

**कौळिकाचारू** पु. मांत्रिकाचे कृत्य; जादूटोणा : 'उपदेशूनि कौळिकाचार। केंवि मातें करविसी।' - मुआदि २७.११६.

**कौळी** स्त्री. एक झुडूप; कावळी. [सं. काकनासा]

**कौक्ष** वि. ओटीपोटासंबंधी; पोटासंबंधी; कुक्षीसंबंधी. [सं. कुक्षि]

**कौक्षेपक** न. खड्गाचा एक प्रकार. [सं.]

**कौंतिक** पु. भालेकरी. [सं. कुंत = भाला]

**कौंती** स्त्री. भाला; एक हत्यार. [सं. कुंत]

**कौंदा** पु. भुस्सा.

**कौंभणे** अक्रि. पहा : **कोंभणे** : 'कैवल्यद्रुम कौंभिला।' - भाए ३.

**कौंस** पु. वर्तुळाच्या परिघाचा कोणताही भाग. [फा. कौस = धनुष्य]

**कौंस** न. दर्भ.

**क्याच** न. लाकडाचा मधला भाग, गाभा. (बे.) [ क.कच्चु]

**क्याट** न. एक प्रकारचे रेशीम (लुगड्यांच्या व्यापारात रूढ). (कर.)

**क्याटी** न. बावन तोळ्यांचे वजन : 'क्याटीचे वजन बावन तोळे असते.' - मुंव्या ११९.

**क्यातखुरपे** न. दाते व पाठीकडे धार असलेला कोयता, खुरपे (बे.) [क. कत्ति = कोयता]

**क्यारी** स्त्री. गर्जना : 'जिंतले रे जिंतले भणौनि देयारी क्यारी।' - मुप्र २५०२.

**क्यारी, क्यारडी** स्त्री. १. भातजमीन; खाचर; भोवती उंच कडा असलेला वाफा. २. पुष्पवाटिका; वाफा (बागेतील फुलांचा). [गु.] [सं. केदार]

**क्याल** न. केळीचे काल, गाभा (कु.). पहा : **काल** [ सं. कदल]

**क्युसेक** पु. (एका मिनिटाला एक घनफूट एवढ्या) प्रवाहाच्या आकारमानाचे एकक, युनिट.

**क्युरीबिंदू** पु. (भौ.) ज्या तापमानाला चुंबकीय गुणधर्म बदलतात तो बिंदू. उंदा. ७६८° से. या तपमानाला लोखंडाचे चुंबकत्व नष्ट होते.

**क्रउ** पु. खरेदी, खरेदीची किंमत.

**क्रकच** पु. न. करवत. [सं.]

**क्रकचमक्षिका** स्त्री. (प्राणि.) झाडाच्या पानाला व फांदीला भोके पाडून पानावर अंडी घालणारी माशी. [सं.]

**क्रकचयोग** पु. एक अशुभ योग : 'तिथीचा अंक आणि वाराचा अंक यांची बेरीज १३ होते तेव्हा अशुभ क्रकचयोग होतो.' - सुज्यो २४७. [सं.]

**क्रण** न. करण; साधन (योगमार्गातील) : 'चाऱ्ही क्रणें प्रगटली' - लीचपू २०६.

**क्रतु-तू** पु. १. यज्ञ : 'म्हणौनि समूळ हा उचितु। स्वधर्मरूप क्रतु।' - ज्ञा ३.१३९. २. (प्रामुख्याने) अश्वमेध यज्ञ. ३. सप्तऋर्षींपैकी एक ऋषी. [सं.]

**क्रदंत** पहा : **कृतांत**

**क्रम** पु. १. वर्ग; अनुक्रम. २. व्यवस्था; मांडणी; पद्धत; काही नियमानुसार चालणे; मोड. ३. प्रगती; पुढे जाणे; क्रमण. ४. धार्मिक विधी; नियम. ५. (संगीत) स्वरांचा आरोह. ६. परंपरा; सरणी; संप्रदाय. [सं.]

**क्रमआग (या) त** वि. क्रमप्राप्त; वारसाने मिळालेला (वाटा).

**क्रमगामी शिक्षा, दंडादेश** स्त्री. पु. (विधि.) एकूण शिक्षा, दंड.

**क्रमचय** (ग.) वस्तूंचा संच किंवा त्या संचातील काही घटकांची क्रमिक तऱ्हेने केली जाणारी मांडणी.

**क्रमचित्र** न. औद्योगिक प्रक्रियेतील साधनसामग्री वा कामाची प्रणाली यांचा अनुक्रम वा आनुपूर्वी दाखवणारा आलेख.

**क्रमण** न. गती; गमन; पुढे जाणे; पुढे पुढे सरणे; चालणे; प्रगती. [सं.]

**क्रमणे** अक्रि. १. (वेळ, काळ) आनंदात काढणे, घालविणे, करमणे. २. आक्रमण करणे, पुढे जाणे, चालणे; ओलांडणे; पलीकडे जाणे; उल्लंघणे : 'क्रमी ध्यानाचें चवरें। सांपडे तंव।।' - ज्ञा ६.५८. ३. मरणे : 'संवसारें जालों अतिदु:खे दु:खी। मायबापें सेखीं क्रमिलिया।' - तुगा ६५३. [सं. क्रम् = जाणे]

**क्रमत्रैराशिक** पु. न. सरळ त्रैराशिक. [सं. क्रम = जाणे]

**क्रमपाठी** वि. वेदसंहितेतील दोन दोन पदांचा अनुक्रम धरून एक वाक्य तयार करून पठण करणे व पठण करताना मागील पद पुढील पदाला जोडणे, याप्रमाणे अध्ययन करणारा. उदा. 'अग्निमीळे। ईळे पुरोहितम्। पुरोहितयज्ञस्य।' इ. ह्याप्रमाणे जटापाठी, घनपाठी, शाखापाठी असे अध्ययन करणाऱ्यांचे दुसरे वर्ग आहेत. [सं.]

**क्रमप्राप्त** पहा : **क्रमागत**

**क्रममार्ग** पु. रुळलेला, नेहमीचा मार्ग, धोपट मार्ग, सनदशीर मार्ग : 'क्रांतिमार्ग क्रममार्गापेक्षां नेहमींच वाईट असतो असें नाहीं, पण बहुधा तो वाईट असतो.' - सुदे १११.

**क्रममुक्ति-क्ती** स्त्री. (तत्त्व.) मानवलोक, पितृलोक, गंधर्वलोक व ब्रह्मलोक या क्रमाने आत्म्याला होणारा साक्षात्कार व शेवटी मुक्ती; देवयान मार्गाने मिळणारा मोक्ष. [सं.]

**क्रमयोग** पु. क्रमाक्रमाने आत्मविकास साधणे.

**क्रमयोगी** पु. क्रमाक्रमाने ब्रह्मप्राप्ती करून घेणारा योगी : 'हे मज मिळतिये वेळे। तयां क्रमयोगियां फळें।' - ज्ञा १८.११३४.

**क्रमरचना** स्त्री. (विधि.) क्रम ठरवून केलेली रचना.

**क्रमवाचक चिन्ह** (ग्रंथ.) वर्गीकरणामध्ये विषय क्रम दाखवणारे चिन्ह.

**क्रमवाचक संख्याविशेषण** न. संख्येचा अनुक्रम दाखवणारे विशेषण.

**क्रमवाद** पु. विवक्षित उद्दिष्ट हळूहळू टप्प्याटप्प्यांनी गाठणे हे तत्त्व किंवा मतप्रणाली. [सं.]

**क्रमवार** क्रिवि. क्रमाला धरून : 'विभाग, उपविभाग, तुकड्या, पथके इत्यादींची क्रमवार नियुक्ती करणे...' - युजि ७८.

**क्रमशः** क्रिवि. ठरावीक पद्धतीने; क्रमाने; व्यवस्थितपणे; एकामागून एक अशाप्रकारे. [सं.]

**क्रमसमता** स्त्री. (भूशा.) भूवैज्ञानिक इतिहासात एकाच कालखंडात निर्माण झालेल्या खडकांचे नाते सुचविणारी संज्ञा.

**क्रमाग (या) त** वि. क्रमाने प्राप्त झालेला, असलेला; वंशक्रमाने, वारसाने मिळालेला (वाटा, जिंदगी); एकामागून एक अशा क्रमाने येणाऱ्या संख्या. [सं.]

**क्रमान्वित अध्ययन** (शिक्षण) विषयघटकांचे निश्चित केलेल्या टप्प्यांनी घेतलेले स्वयंशिक्षण.

**क्रमिक** वि. १. क्रम असणारा. २. इयत्तावार नेमलेले; अभ्यासासाठी लावलेले (पुस्तक इ.) : 'शिकविल्या गेलेल्या क्रमिक पुस्तकांची यादी मिळत नाहीं.' - केले १.१४३. पहा : **क्रमागत** [सं.]

**क्रमिकता** स्त्री. १. प्रवणक. २. ठरावीक पायऱ्या किंवा अंशानी कमी होणारा उतार.

**क्रमिक समंक** (ग्रंथ.) वर्गीकरणपद्धतीत वाचनसाहित्याला वर्गीकरणातील चिन्हांचा उपयोग करून दिलेला क्रमांक. या क्रमांकाखाली वाचनसाहित्याची नोंद करावी लागते.

**क्रमुक** पु. सुपारीचे झाड. [सं.]

**क्रमोत्क्रम** पु. व्यवस्था आणि अव्यवस्था; योग्य व अयोग्य रचना, जुळणी.
क्रिवि. सुलट्या व उलट्या क्रमाने. [सं. क्रम + उत्क्रम (व्युत्क्रम)]

**क्रय** पु. १. खरेदी; पदार्थ विकत घेणे; विकत घेताना दिलेले पैसे. २. विक्री; घेतलेले पैसे.
न. विकून आलेली किंमत. (गो.) [सं. क्री = विकत घेणे]

**क्रयविक्रय** पु. देवघेव; खरेदीविक्री; सौदा; व्यापार.

**क्रयविवाह** पु. (समाज.) मुलीच्या वडिलांस पैसे देऊन केलेला विवाह.

**क्रयशक्ति-क्ती** स्त्री. (अर्थ.) १. माल खरीदण्याची क्षमता. २. ठरावीक चलन व त्याच्या बदल्यात मिळणारा माल यांचा परस्पर संबंध. [सं.]

**क्रय्य** वि. खरेदीविक्रीला योग्य; विकण्यासाठी बाजारात आलेला; विकण्यासाठी काढलेला (पदार्थ). [सं.]

**क्रव्य** न. कच्चे मांस. [सं.]

**क्रव्याद** वि. १. कच्चे मांस खाणारे (वाघ, सिंह इ.); राक्षस, पशू वगैरे मांसभक्षक. २. दुष्ट; राक्षस-वृत्तीचा : 'तुझी क्रव्यादा आई' - निक ८२. (व.)

**क्रंदन** न. रडणे. पहा : **आक्रंदन** [सं.]

**क्रांत** क्रिवि. १. व्याप्त; उल्लंघलेला; आक्रमिलेला. २. (समासात) चालून गेलेला; हल्ला केलेला. जसे :- चोरक्रांत, टोळक्रांत, राजक्रांत इ. पहा : **आक्रांत**. ३. व्याकूळ; विव्हळ; व्याप्त (दुःख इ.नी) : 'एकें तियें बहुदुःखें। क्रांत भूतें॥' - ज्ञा १५.४१२.
स्त्री. (क्रांतीचे संक्षिप्त रूप) चाल; हल्ला; धाड (मुख्यत्वे चोर, शत्रू, टोळ यांची). [सं. क्रांति]

**क्रांतणे** उक्रि. १. पादाक्रांत करणे; चालून जाणे; आक्रमणे (देश, रस्ता इ.) २. व्याकूळ होणे (भूक, दुःख, श्रम, झोप, कर्ज, दारिद्र्य यांमुळे).

**क्रांतदर्शित्व** न. भूत व भविष्य पाहण्याची शक्ती; द्रष्टेपणा. [सं.]

**क्रांतदर्शी** वि. त्रिकालज्ञ; दीर्घदर्शी; ज्ञानी; त्रिकालदर्शी; वर्तमानकालाच्या मर्यादा ओलांडून भूत किंवा भविष्य पाहू शकणारा : 'एथ मोहले गा क्रांतदर्शी।' - ज्ञा ४.८८. [सं.]

**क्रांतमति-ती** वि. ज्ञानी: 'तऱ्हीं गा क्रांतमती। कारण हें॥'-राज्ञा १३.४५०.

**क्रांति-ती** १. विषुववृत्तापासून खस्थ पदार्थाचे अंतर (हे याम्योत्तर वृत्तावर मोजले जाते); अपम. २. सूर्याचा गमनमार्ग (क्रांतिवृत्तावरून). ३. क्रमण; मर्यादा ओलांडून पलीकडे जाणे; प्रगती. ४. राजकीय, सामाजिक, आर्थिक इ. क्षेत्रांत घडून येणारे, जुनी व्यवस्था पार बदलून टाकणारे परिवर्तन. जसे :- हरितक्रांती, सामाजिक क्रांती; शस्त्रबलाने चालू सत्ता उलथून टाकणे, बंड. [सं.]

**क्रांतिक** वि. सीमादर्शी. [सं.]

**क्रांतिक कोन** (भौ.) प्रकाशकिरण एका माध्यमातून दुसऱ्या माध्यमात जाताना जेव्हा पूर्ण परावर्तित होतात तेव्हा त्या किरणांचा होणारा आपात लघुतम कोन.

**क्रांतिक गुणोत्तर** (शाप.) कोणत्याही दोन सांख्यिकी मूल्यांमधील फरक महत्त्वाचा आहे किंवा नाही हे ठरविण्याकरिता काढण्यात येणारे गुणोत्तर.

**क्रांतिकक्ष** पु. क्रांतिवृत्त. [सं.]

**क्रांतिकारक** पु. वि. १. चळवळ्या; बंडखोर; प्रस्थापित सत्ता (सामान्यतः शस्त्रबळाने) उलथून पाडण्याची चळवळ करणारा माणूस, गोष्ट : 'पुण्यातील क्रांतिकारक तरुणांनीं त्यांना मुख्य नेमलें.' - इंप ९३. २. समाजव्यवस्थेत महत्त्वाचे बदल घडवून आणू पाहणारा. [सं.]

**क्रांतिपात** पु. विषुववृत्ताला क्रांतिवृत्त जेथे छेदते तेथील बिंदू; संपात बिंदू. [सं.]

**क्रांतिपातगति-ती** स्त्री. अयनचलन; अयनगती; विषुवायन. [सं.]

**क्रांतिबिंदु-दू** पु. आणीबाणीची वेळ; जिथून परिस्थितीला कलाटणी मिळते तो क्षण, तो बिंदू. [सं.]

**क्रांतिमंडळ-वलय, क्रांतिवृत्त** न. सूर्याच्या गमनमार्गाचे वृत्त, कक्षा; सूर्याची भूमध्यरेषेच्या उत्तरेकडील २३॥ अंश व दक्षिणेकडील २३॥ अंश जाण्याची मर्यादा. त्यामधील बिंदू साधले म्हणजे होणारे वृत्त : 'ज्या गमनमार्गांतून वार्षिक गतीनें भूगोल सूर्याभोंवतीं फिरतो किंवा सूर्य भूगोलाभोवतीं समोरच्या राशीतून फिरतोसें दिसते त्या गमनमार्गास क्रांतिवृत्त म्हणतात.' - सूर्य १२. [सं.]

**क्रांतिमार्ग** पु. बंडखोरीचा मार्ग; आमूल परिवर्तनाचा मार्ग; राज्यक्रांतिकारक चळवळ : 'क्रांतिमार्ग क्रममार्गापेक्षां नेहमीच वाईट असतो असे नाहीं. पण बहुधा तो वाईट असतो.' - सुदे १३१. [सं.]

**क्रांतिसूत्र** न. याम्योत्तर वृत्ताची रेषा. [सं.]

**क्रिडाछेदी** वि. खेळाडू.

**क्रिप्त, क्रिप्तन** पु. (शाप.) हवेत अतिसूक्ष्म प्रमाणात असणारा एक वायू. [इं. क्रिप्टॉन]

**क्रिमि-मी** पु. जंतु; किडा; कीटक. [ सं. कृमि]

**क्रियमाण** क्रिवि. १. चालू क्रिया (जी केली जात आहे अशी); हातातील काम, गोष्ट : 'प्रारब्धाचे शिळे दही व क्रियमाणाची दूधसाय...' - एवाका २७४. २. पुढील, भावी कार्य (जे व्हायचे ते); ज्याचा आरंभ करायचा ते कार्य. ३. पूर्व जन्मीचे जे संचित असते त्याचे या जन्मी भोगावे लागणारे बरेवाईट फळ किंवा पुढील प्रारब्धाचे कारणरूप अशी चालू जन्मातील बरीवाईट कृती; क्रियमाण प्रारब्ध. [सं.]

**क्रिया** स्त्री. १. कर्म; काम; कृत्य; करणी; कृती : 'असेल माझी क्रिया बरी।' - वेसीस्व ३.६४. २. और्ध्वदेहिक कर्म; प्रेतसंस्कार विधी; उत्तरकार्य; क्रियाकर्मांतर. (क्रि. करणे.) : 'करुनि क्रिया पित्याची गेला तो श्रितभवाब्धिसेतुकडे।' - मोवन १०.८३. ३. धार्मिक विधी. ४. कोणत्याही धंद्याचे, कामाचे विशिष्ट मुद्दे, गोष्टी; इतिकर्तव्यता. ५. (शपथ, दिव्य, साक्षी, कागदपत्र इत्यादिकांवरून) खरे ठरविणे; सिद्ध करणे; शपथ; दिव्य; साक्ष; प्रमाण; पुरावा : 'क्रिया करी तुम्हां न वजे पासुनि।' - तुगा १८. ६. (वै.) औषधोपचार. ७. (व्या.) क्रियापद; धातूंचे अर्थ स्पष्ट करणारा व्यापार. ८. (संगीत) ताल धरण्याचा प्रकार. ह्यात दोन प्रकार आहेत. सशब्द व नि:शब्द. ९. (सामा.) परिणाम. जसे :- रासायनिक क्रिया. [सं. कृ = करणे] (वा.) ० **असणे, जागणे, धरणे** - एखाद्याचे उपकार आठवणे : ' - आईच्या दुधाची क्रिया असलीच पाहिजे.' - संन्यास ६०. ० **टाकणे, सोडणे, सांडणे, विसरणे** - एखाद्याचा उपकार विसरणे; कृतघ्न होणे.

**क्रिया अनुसंधान** न. क्रियाकर्म; एकानंतर दुसरी क्रिया, त्याचा संबंध.

**क्रियाअक्षमता** स्त्री. (वै.) अर्धांगवायू झालेला नसताही इंद्रिये किंवा गात्रे काम न करू शकणे - ही अवस्था. [सं.]

**क्रियाकरण, कियाकर्म, क्रियाधर्म** न. आचरण.

**क्रियाकर्म** पहा : **क्रिया ३** [सं. क्रिया + कर्मन्]

**क्रियाकर्मांतर** पहा : **क्रिया २** [सं.]

**क्रियाकलाप** पहा : **क्रिया ४** : 'परि क्रियाकलापु आघवा। आचरतु दीसे बरवा।' - राज्ञा ४.९४. [सं.]

**क्रियाकांड** न. कर्मकांड; ठरावीक नियमांना धरून वागणे. [सं.]

**क्रियाकौशल्य** न. क्रिया करण्याची हातोटी; कामातील कुशलता; वाकबगारी. [सं.]

**क्रियागुणांक** पु. (मानस.) व्यक्तीचे भाषण किंवा लिखाण यांमधील क्रियावाचक शब्द (क्रियापद) आणि विशेषण यांचे गुणोत्तर.

**क्रियाचक्र** न. ठरावीक कालमर्यादेत होणारे क्रियेचे वर्तुळ.

**क्रियादेशधानी** स्त्री. लायब्ररी (संगणक).

**क्रियाद्वेषी** वि. (कायदा) खटल्यात ज्याची साक्ष अपायकारक होते असा (साक्षीदारांच्या पाच प्रकारांपैकी एक).

**क्रियानष्ट** वि. १. कृतघ्न. २. स्वत:चे वचन न पाळणारा; खोटा : 'नव्हे क्रियानष्ट तुम्हां ऐसा।' - तुगा १९११.

**क्रियापद** न. ज्याच्यापासून पुरुष, लिंग, वचन, काळ यांचा बोध होतो असे धातूला प्रत्यय लागून बनलेले वाक्यातले रूप.

**क्रियापरता** स्त्री. (संगीत) अभ्यासतत्परता. [सं.]

**क्रियापंजर** पु. प्राण्यांच्या सामान्य अनुक्रियांची नोंद करण्याची व्यवस्था असलेला पिंजरा.

**क्रियापार** पु. मृत्यूनंतरचे धार्मिक विधी पुरे करणे; अंत्यविधी : 'तेयाचे क्रियापारु करितां उसीरु लागैल :' - लीचपू ८५.

**क्रियाप्रचोदन** न. (मानस.) केवळ वर्तन करण्याची प्रेरणा.

**क्रियाबंध** पु. (मानस.) प्रतिक्षेपसदृशक्रिया; परिणामांचा विचार न करता फक्त वर्तनाच्या दृष्टिकोनातून पाहिलेला क्रियेचा दुवा; वर्तनसंधान.

**क्रियाबंध** पु. (भाषा) वाक्यातील क्रिया व्यक्त करणारा एक शब्द वा अनेक शब्दांचा समुदाय.

**क्रियाबाल** वि. १. (कायदा) अज्ञान; अप्रौढ (माणूस); देणे, घेणे इ. व्यवहार करायला ज्याला कायद्याने प्रौढत्व प्राप्त झाले नाही असा. २. असमर्थ; नालायक (माणूस-देवघेवीत).

**क्रियाभ्रष्ट** वि. १. वचनभ्रष्ट; वचन, शपथ न पाळणारा. २. कृतघ्न; उपकार न जाणणारा. ३. नित्यनैमित्तिक कर्मे न करणारा; धर्मभ्रष्ट.

**क्रियारूप** न. (व्या.) क्रियापदाचे वचन, पुरुष, काल इ. भेदाने होणारे रूप.

**क्रियारोधी (काच)** (शा.) अनेकविध द्रव्यांचा सहजासहजी परिणाम न होणारी (काच).

**क्रियायोग** पु. तप, स्वाध्याय व ईश्वराची ध्यानधारणा.

**क्रियावाद** पु. क्रिया, विकार इ. गोष्टी आत्म्यावर आपली छाप बसवितात असे प्रतिपादणारे एक मत; वैशेषिक व जैन तत्त्वज्ञान यातून हा वाद सापडतो. हा वेदांत, सांख्य, योग, बौद्धमत यातून दिसतो.

**क्रियावान-वंत** वि. शास्त्राप्रमाणे विहित आचरण करणारा; नित्य - नैमित्तिक नियम पाळणारा : 'जो वेदार्थ करणार पंडित। त्याहून अनुष्ठानी क्रियावंत। शतगुणें आगळा।' - ह ३४.१००. [सं.]

**क्रियाविधिवाद** पु. (तत्त्व.) अमुक एका पद्धतीने नियमबद्ध कर्म करण्याची रीत म्हणजेच कर्मकांड; आचार, कर्मकांड यावर भर असणारा वाद, मत. [सं.]

**क्रियाविभव** न. (मानस.) मज्जा किंवा स्नायू यांच्या कार्याशी संबंधित होणारा विद्युतविभव.

**क्रियाविशेषण** न. ज्या शब्दाच्या योगाने क्रियेच्या गुणाचा अथवा प्रकाराचा, किंवा अमुक एका विशिष्ट अवस्थेचा बोध होतो तो शब्द. जसे :- तो हळू चालतो. काही क्रियाविशेषणे मूळ नामांची विभक्त्यंत रूपे असतात. उदा. बुद्ध्या. [सं.]

**क्रियाविज्ञान** न. शरीरांतर्गत चयापचयातील (पचन, शोषण, अभिसरण इ.) अनेक क्रियाविक्रियांसंबंधीची माहिती.

**क्रियाशील** वि. १. धार्मिक नियम पाळणारा; तत्त्वाला धरून वागणारा. २. प्रत्यक्ष कार्य करणारा कोणत्याही संस्थेचा सदस्य; उद्योगी. जसे :- क्रियाशील कार्यकर्ता. [सं.]

**क्रियाशील किरण** (भौ.) उत्सर्जनक्षम किरण.

**क्रियाशील थर** (भूशा.) ज्या थरामध्ये किरणोत्सर्गदृष्ट्या क्रियाशील खनिजे आहेत असा खडकाचा थर.

**क्रियाशील प्रारण** (भौतिक, रसा.) दृश्य किंवा अदृश्य परंतु रासायनिक बदल घडवण्याचे सामर्थ्य असलेले विशेषतः अदृश्य प्रारण. [सं.]

**क्रियाशील भांडवल** (अर्थ.) उत्पादनासाठी प्रत्यक्ष वापरात असलेले भांडवल.

**क्रियाशून्य** वि. निष्क्रिय. [सं.]

**क्रियाश्रय** पु. (व्या.) कर्ता (क्रियापदाचा); क्रियेचे प्रधान कारक. [सं.]

**क्रियासंस्था** स्त्री. प्रतिक्रियेशी संबंधित मज्जा, स्नायू व ग्रंथिसमूह.

**क्रियांगराग** पु. (संगीत) शास्त्रातील नियम कायम ठेवून विचित्रतेसाठी विवादी स्वरांचा उपयोग ज्या रागात केला जातो असा राग. [सं.]

**क्रियोपन्यास** पु. प्रमाणांचे प्रतिपादन; पुरावा दाखविणे. [सं.]

**क्रिंतन** स्त्री. (सं.) मुरकी.

**क्रीड** न. ध्येय; अंतिम हेतु; आद्यतत्त्व : 'जुन्या पक्षानें राष्ट्रीय सभेचे अंतिम हेतु किंवा क्रीड कायम ठरवून...' - लोटिकेले ३.२६३. [इं.]

**क्रीडणे** अक्रि. खेळणे; मौज करणे; विलास करणे : 'धन्य धन्य तें नंदाचे आंगण। जेथे क्रीडे मनमोहन।' - हरि ५.१७७. [सं. क्रीडा]

**क्रीडन, क्रीडा** न. स्त्री. १. खेळ; मौज; विलास; लीला; मनोरंजन; करमणूक. २. परमार्थाखेरीजचा व्यवहार. ३. मैथुन; सुरत : 'क्रीडा करो तुजसवें ललना पलंगीं।' - र ३.

**क्रीडनकोप, क्रीडाकोप** पु. प्रणयकोप; खोटा राग. [सं.]

**क्रीडनकौतुक, क्रीडाकौतुक** न. चित्तविनोद; करमणूक; गंमत. [सं.]

**क्रीडनपाश, क्रीडापाश** पु. फासा; अक्ष (खेळण्याचा).

**क्रीडनमार्ग** पु. खेळातून शिक्षण. (प्राथमिक शिक्षण आ १९४८)

**क्रीडनमृग, क्रीडामृग** पु. १. करमणुकीसाठी बाळगलेले जनावर (हरिण, वानर) : 'पढविलें पाखरूं ऐसें न बोले। यापरी क्रीडामृगही तैसा चले।' - ज्ञा ११.१७०. २. (ल.) काठीचा घोडा; खेळवणा. ३. दुसऱ्याच्या कह्यात वागणारा माणूस; ताटाखालचे मांजर; लाळघोट्या माणूस. [सं.]

**क्रीडाउपचार** पु. (मानस.) मुलांच्या मानसशास्त्रातील एक प्रकिया. मुलांच्या खेळांच्या विषयावरून त्यांच्या मानसिक परिस्थितीचा अंदाज बांधण्याची पद्धत.

**क्रीडावृत्ति** स्त्री. (मा.शा.) खेळण्याची उपजतबुद्धी, सहजप्रवृत्ती, स्वभाव.

**क्रीडांगण, क्रीडास्थान** न. ज्या ठिकाणी क्रिकेट, खो खो, कबड्डी इ. मोठे उघड्यावरचे खेळ खेळले जातात असे मैदान किंवा मोठी मोकळी जागा. [सं.]

**क्रीत** स्त्री. क्रिया; कृती. [कृति अप.]

**क्रीत** पु. १. विकत घेतलेला मुलगा; बारा वारसांपैकी एक. २. दासांतील एक भेद.

वि. विकत घेतलेले; खरेदी केलेले. २. विकलेले. [सं.]

**क्रीतानुशय** पु. विकत घेतलेली वस्तू विकणाऱ्याला परत करणे; पसंत न पडलेल्या खरेदीचा व्यवहार. [सं.]

**क्रील** न. (वस्त्रोद्योग) सुताने भरलेल्या बॉबिन्स बसविण्याची चौकट.

**क्रुद्ध** वि. रागावलेला; कुपित : 'एकें उदारें अतिबद्धें। क्रुद्धे एकें॥' - ज्ञा ११.१२६. [सं.]

**क्रुद्धदृष्टि-ष्टी** स्त्री. (नृत्य) दृष्टीमध्ये कठोरता व निश्चलता (पापण्या आणि बुबुळे निश्चल ठेवून) दाखविणे. क्रोधाचा भाव दाखविण्यासाठी या अभिनयाचा उपयोग करतात. [सं.]

**क्रुम** न. १. (शाप.) एक मूळ धातू, द्रव्य. २. (चर्मकार) गाय, म्हैस यांचे पांढऱ्या रंगावर कमावलेले कातडे. ३. एका विशिष्ट प्रकाराने कमावलेले उंची कातडे. [इं. क्रीम]

**क्रुमाम्ल** न. (शाप.) एक अम्ल. हा हिरव्या रंगाचा घन पदार्थ आहे.

**क्रूझर** न. एक लढाऊ गलबत. आपल्या युद्धनौकांचे संरक्षणार्थ व शत्रूच्या युद्धनौकांच्या नाशार्थ युद्धकालात अशी गलबते ठेवतात. [इं.]

**क्रूर** वि. १. निर्दय; कठोर; कृपाहीन; निष्ठुर : 'परी क्रूरग्रहांची जैसी। मांदी मिळे एकेचि राशी।' - ज्ञा १६.२५७. २. भयंकर; उग्र; भीतिदायक. ३. प्रचंड; धडाक्याने जाणारी, वाढणारी (आग इ.). ४. अमानुष; फाजील; रानटी (वर्तन, कृत्य). ५. हिंसक; हिंस्र (प्राणी). [सं.]

**क्रूस** पु. १. वधस्तंभ. या खांबावर प्रभू येशूख्रिस्ताला खिळून मारले : 'येशूला जेथें क्रूसावर खिळलें होतें तें ठिकाण शहराच्या जवळच होतें.' - योहा १९.२०. २. येशूख्रिस्ताचे मृत्युसूचक चिन्ह ✝. ख्रिस्ती धर्मचिन्ह. ३. आत्मयज्ञाची तयारी. ४. ख्रिस्ताबरोबर व ख्रिस्ताकरता दुःख सहन करणे.

**क्रेतव्य, क्रेय** वि. १. विकत घेण्यास योग्य. २. विकायला योग्य. [सं.]

**क्रेता** वि. १. विकत घेणारा. २. विकणारा. [सं.]

**क्रेन** स्त्री. जड वजन उचलण्याची यारी. [इं.]

**क्रेप** न. एक प्रकारचे रेशमी कापड.

वि. कुरुळे, चुण्या, आढ्या असलेले.

**क्रोड** पु. स्त्री. एक कोटी संख्या. [सं. कोटि]

**क्रोड** न. पु. छाती; ऊर. [सं.]

**क्रोड** न. पु. डुक्कर; वराह : 'तया क्रोडरूपें हिरण्याक्ष मेला।' - वामन नृसिंह दर्पण १५. [सं.]

**क्रोड, क्रोडपत्र** न. पु. ग्रंथामध्ये असलेली न्यूनता, दोष (अर्थ इत्यादीची) ग्रंथाखेरीजच्या दर कागदावर लिहून ठेवतात ते कागद; शुद्धिपत्र;

पुरवणीदुरुस्ती. [सं.]

**क्रोड कुन्हाड** १. (पुरा.) कठीण मध्यभाग असणारी कुन्हाड; मूळ दगडाला कुन्हाडीसारखा आकार देऊन केलेली कुन्हाड. अशा तऱ्हेच्या कुन्हाडी आद्यअश्मयुगात सापडतात.

**क्रोडीकरण** न. १. आलिंगन. २. समावेश; विषयीकरण. [सं.]

**क्रोडोपति-ती** पु. कोट्यधीश. [सं.]

**क्रोध** पु. राग; कोप; संताप; त्वेष. [सं.]

**क्रोधणे, क्रोधावणे** अक्रि. रागावणे; कोपणे; संतापणे. [सं. क्रोध]

**क्रोधा** वि. (संगीत) नवव्या श्रुतीचे नाव. [सं.]

**क्रोधाग्नि-ग्नी** पु. भयंकर संताप; कोपानल. [सं.] (वा.) ० **शिखा टाकणे** - बेफामपणे बोलणे.

**क्रोधायमान** वि. रागावलेला; क्रुद्ध. [सं.]

**क्रोधिष्ठ-ष्ट, क्रोधी** वि. रागीट; शीघ्रकोपी; कोपिष्ट.

**क्रोश** पु. कोस (अंतर) : 'अनादि पंचक्रोशक्षेत्र।' - ज्ञा १८.१८०४.[सं.]

**क्रोशाची सुई** स्त्री. दोरा विणून त्याचे रुमाल, पिशवी इ. करण्याची टोकापाशी वाकडी असणारी सुई.

**क्रोष्ट** पु. कोल्हा; जंबूक : 'घे पंचानन पांच क्रोष्टा दे मानवेल शितिकंठ।' - मोसभा ४.१९. [सं.]

**क्रौन** वि. १. (मुद्रण) वीस गुणिले पंधरा इंची आकाराचा (छापण्याचा कागद). २. लोखंडाचा एक प्रकार : 'कमानीसाठी ताणाच्या सळ्या, क्रौन, बोलिंग... लोखंडाच्या असाव्या.' - मॅरट २१. [इं.]

**क्रौर्य** न. क्रूरता; निर्दयपणा; निष्ठुरपणा; दुष्टपणा; पाषाणहृदयता. [सं.]

**क्रौंच** पु. करकोचा पक्षी. [सं.]

**क्लब** पु. मंडळ; संघ; मेळा; क्रीडास्थान; बैठकीची जागा. (अप.) कलप, कलब. २. (पत्ते) किलावर, फुलावर रंग. [इं.]

**क्लम** पु. थकवा.

**क्लावर** पु. हिरा; माणिक. (तंजा.).

**क्लांत** वि. दमलेला; थकलेला; भागलेला; कोमेजलेला. [सं.]

**क्लांति-ती** स्त्री. थकवा; ग्लानी. [सं.]

**क्लिन्न** वि. १. ओले झालेले; भिजलेले. २. विरलेले (पाण्यात). [सं.]

**क्लिष्ट** : वि. १. अवघड; दुर्बोध; कठीण; बेजार करणारे (काम, पुस्तक, विषय, मार्ग) : 'काव्य दुर्बोध व क्लिष्ट होणे...' - सासं ११३. २. ओढूनताणून आणलेला; कष्टाने जुळवलेला (अर्थ, विचार, योजना, स्पष्टीकरण). [सं.]

**क्लीनर** वि. साफसूफ करणारा; (विशेषतः) मोटार धुऊनपुसून साफ करणारा. पहा : **किन्नर** [इं.]

**क्लीब** पु. १. नपुंसक; षंढ : 'न भजति सुयशस्काम क्लीबा आरोग्यकाम चिबुडाला।' - मोभीष्म १.६४. २. (ल.) पौरुषहीन; बायकी; भ्याड. २. खोजा; जनानखान्यावरील नोकर. [सं.]

**क्लेद** पु. १. घाम. २. आर्द्रता; ओलावा. [सं.]

**क्लेदन** न. १. ओले होणे; दमटणे; भिजणे. २. वितळणे; विरणे. ३. द्रवामुळे होणारी संयोगशिथिल अशी अवस्था; मऊ, सरबरीत होणे. पहा : **सस्नोपचार** [सं.]

**क्लेश** पु. त्रास; दुःख; श्रम; काच; यातना; व्यथा (सामान्यतः अनेकवचनी प्रयोग) : 'झोंबती तरी क्लेशा। पात्र होती।।' - ज्ञा १२.७४. [सं.]

**क्लेशणे** उक्रि. त्रासणे; दुःखी होणे; छळणे; पीडणे : 'अन्य क्लेशें क्लेशत जाये। तो येक धन्य संसारीं।' - मुआदि २.६५. [सं. क्लिश्.]

**क्लेशदान** न. आजारी माणसाचे पुष्कळ दिवसांचे दुखणे (पाप) जावे म्हणून उडीद, तेल इ. चे दिलेले दान. [सं.]

**क्लेशी, क्लेशित** वि. दुःखी; पीडित; कष्टी; व्यग्र : 'बहुक्लेशी झाल्या श्रवणिं पडतां हें द्विजसत्या।' - वामन यज्ञपत्न्याख्यान ५०. [सं.]

**क्लैब्य** न. १. नपुंसकत्व; हिजडेपणा. २. (ल.) भीरुता; अपौरुष. [सं.]

**क्लोरिन** न. पाणी निर्जंतुक करण्यासाठी वापरण्यात येणारे औषध.[इं.] पु. (रसा.) अधातुरूप मूलद्रव्य. यापासून निर्माण होणारा वायू हिरवट पिवळ्या रंगाचा व तीक्ष्ण वासाचा असून विषारी असतो. विरंजक म्हणून उपयोग.

**क्लोरोफार्म** पु. (वै.) रोग्यावर शस्त्रक्रिया करताना गुंगी आणण्यासाठी उपयोगात आणले जाणारे द्रवरूप औषध.

**क्वचित** क्रिवि. कोठे तरी; तुरळक; विरळा; सर्वत्र नाही असे. [सं.]

**क्वणत-न** वि. मधुर आवाज करणारी (किंकिणी, नुपूर इ.) : 'केयूरें भुज पारिजात फुलले, माजी क्वणत् किंकणी।'- र (गजेन्द्रमोक्ष) ६३. [सं.]

**क्वणित** न. किणकिण; मधुर आवाज (नुपूर, पैंजण यांचा). [सं.]

**क्वथन** न. कढणे; काढा. [सं.]

**क्वाडका** १. अडसर, अडकण. २. अर्धगोल, अंतरगोल मणी-पुली. ३. सूत काढण्यासाठी रहाटास बसविलेले लाकडी चाक.

**क्वाथ** पु. १. औषधांचा काढा; कढविलेला पदार्थ. २. कात. [सं.]

**क्वापि** क्रिवि. कोठेही. [सं.]

**क्वार-री** स्त्री. कुवारी. पहा : **कुमारी** : 'तेव्हां ते मातेनें सकरुणकरें क्वारि धरली।' - सारुह ७.१७३. [सं. कुमारी]

**क्वारंटी** न. नैसर्गिक साथीच्या रोगाने दूषित असलेल्या ठिकाणचा मनुष्य गावाबाहेर काही दिवस ठेवण्याची व्यवस्था : 'बसले क्वारंटी। परगांवीं जाण्यास पाहिजे, सुभेसाहेबाची पासचिठ्ठी।' - गापो ११३.

**क्वार्टर** राहण्याचे सरकारी घर; लष्कराची बराक. (गो.) [पोर्तु.]

**क्विनाईन, क्विनिन** पहा : **कोयनेल**

**क्विंटल** १००० कि.ग्रॅ. वजन.

■ ■



**ख** मराठी वर्णमालेतील सतरावे अक्षर आणि दुसरे व्यंजन.

**ख** न. १. आकाश; (समासात) खगोल, खग्रास. २. स्वर्ग; शून्य; पोकळी : 'तैसा मी गीता वाखाणी। हे खपुष्पाची तुरंबणी।' - ज्ञा १६.३९. ३. इंद्रिय. २. देहछिद्रे (तोंड, नाक, डोळे, नाकपुड्या इ.) [सं.]

**खइणे** अक्रि. खोवणे; खोचणे.

**खईं** क्रिवि. कोठे. (कु.)

**खउ – ऊ ने प्रारंभ होणारे शब्द येथे न आढळल्यास खौ-खवमध्ये पाहावेत.**

**खकडे** क्रिवि. कोठे. (कु.)

**खकरनिखर** वि. चांगले वाईट. [निखरचे द्वि.]

**खकाण-न** वि. १. घाणेरडी; अस्वच्छ (जागा, पदार्थ, इमारत, जमीन इ.). २. वाईट; खराब; दरिद्री; गचाळ. [अर. खाक = धूळ]

**खकाण-णा-ना** न. पु. १. केर; (पुस्तकांवर, लाकडी सामानावर साचलेली) धूळ. (क्रि. बसणे, येणे, उडणे, उधळणे.) २. (तंबाखूची, तपकिरीची, मिरच्यांची) पूड. (क्रि. उधळणे.) ३. गाळसाळ; केरकचरा; धुरळा. (माप करताना मालातील धुरळा वजा करतात त्याबद्दल हा शब्द वापरतात.) ४. क्षुल्लक; क्षुद्र : 'म्हणून रॉय तेवढे चांगले, बाकीचा खकाणा असे त्यांच्याबाबत कोणी म्हणेल काय?' - आआआ ९५. [अर. खाक = धूळ]

**खकाण** वि. नापीक; ओसाड : 'पृथ्वीचा एक कोपरा पिकला आणि तीन खकाण राहिले म्हणजे सगळ्या भोरड्या पिकलेल्या भागावर आदळतात.' - गांगा १२१

**खकाया** वि. अधाशी. (झाडी.)

**खकावला** वि. अतृप्त. (झाडी.)

**खग** पु. १. पक्षी : 'आतां मोडूनि ठेलीं दुर्गें। कां वळित धरिलें खगें।' - ज्ञा १२.५८४. २. आकाशातील ज्योती (सूर्य, नक्षत्र, ग्रह इ.). [सं. ख = आकाश. ग = गमन करणारा.]

**खगनायक, खगपति-ती** पु. पक्ष्यांचा राजा; गरुड; विष्णूचे वाहन : 'ध्वजस्तंभीं ज्याचे खगपति सदा राहत असे।' - सारुह ८.१२०. [सं.]

**खगा** पु. वळवाचा पाऊस.

**खगान्तक** पु. ससाणा.

**खगोल** पु. १. नक्षत्रखचित अंतरीक्ष; भूगोलाच्या भोवतालचे तारे ज्या गोलाच्या अंतर्वक्र पृष्ठाला चिकटवले आहेत असे वाटते ती पोकळी; आकाशातील गोल (ग्रह, तारे इ.). २. ज्योतिष (शास्त्र). ३. (ल.) ग्रहादी जाणण्यासाठी केलेले गोलाकार यंत्र.

**खगोल गतिशास्त्र - विज्ञान** (ज्यो.) ग्रहगोलांच्या गतीचा त्यांच्या एकमेकांच्या गतीवर होणाऱ्या परिणामांचा अभ्यास करणारे शास्त्र.

**खगोलदर्शनागार** न. (भौ.) ग्रह आणि नक्षत्रे यांच्या गती व कक्षा दाखवणारे संयंत्र ठेवलेली इमारत. [सं.]

**खगोलीय** वि. (भूशा.) अवकाशातील ग्रह, तारे, नक्षत्रे इत्यादींविषयी.

**खग्राशा-स्या** वि. १. उसनवारी घेतलेले पैसे, विश्वासाने स्वाधीन केलेला माल खाऊन फस्त करणारा; लुच्चा; ठक; लुबाडणारा; हरामखोर. २. खादाड; अधाशी; अतिशय उधळ्या. ३. तोटा येणारे (काम); बुडीत (धंदा).

**खग्रास** पु. ग्रहणामुळे झालेला पूर्ण ग्रास (चंद्र, सूर्य, शुक्रास्त इ.) २. (ल.) नायनाट; स्वाहाकार; गिळंकृत; फस्त. (क्रि. करणे, होणे.) वि. पूर्णपणे ग्रासलेले, तावडीत सापडलेले. [सं. ख + ग्रास]

**खच** पु. ढीग; दाट थर; रास; सडा (फळे, फुले, केरकचरा इत्यादींचा). स्त्री. गर्दी; दाटी.

**खचका** पु. सणसणीत रपाटा, सपाटा. पहा : **कचका** [ध्व.]

**खचखूच** वि. पडका; जुनाट : 'माहेरची खचखूच झालेली कौलारू घरं ....' - अजून ७१.

**खचखोल-ळ** न. मोडक्या तोडक्या वस्तूंचा संग्रह. पहा : **कचकोल**

**खचणी** पहा : **खंचणी** : 'मी सांगितल्यापरमानं झाडाला खचणी घाटलिया न्हवं?' - वारी ११९. (वा.)० **करणे** - उद्‌ध्वस्त करणे : 'मोगल आले बहु दुरुनी। निद्दलशाही केली खचणी।' - ऐपो २.२१.

**खचणे** उक्रि. १. (रत्ने वगैरे दागिन्यांत) बसविणे; जडणे; जडविणे; कोंदणात बसविणे २. (दागिने, भूषणे वगैरे रत्नांनी) जडविणे; मढविणे; रत्ने बसविणे; दागिने जडावाचे करणे : 'जैसा ब्रह्मकटाह खचिलें माणिकीं।' - ज्ञा ११.१३३. ३. एके ठिकाणी कोंबून घट्ट भरणे; ठासणे; ठेचणे; वरून ठोकून घट्ट बसविणे; कोंबणे; चिणून बसविणे. [सं. खच]

**खचणे** अक्रि. १. खाली जाणे, बसणे, धसणे (नरम, भुसभुशीत जमिनीत इमारत, पाया इ.) : 'दीर्घकाल खचली होती पारतंत्र्यभारीं।' - विक ६. २. कोसळून पडणे; खाली येणे; ढासळणे; अधोगतीला जाणे; विनाश होणे : 'गगनीहूनि खचलें बिंब।' - मुआदि २०.५. ३. (ल.) समूळ नाहीसे होणे; गळणे; सुटणे (धैर्य, आशा, उमेद इ.). ४. (ल.) फसणे; फिसकटणे; काहीच्या काहीच होणे; विफल होणे (मसलत, विचार इ.) ५. मरणे : 'शाहूमहाराज शिव झाला। अवतार खचला।' - ऐपो ९५. ६. हिंमत हारणे; अवसान गळणे; भीतीने माघार घेणे. ७. मूर्च्छित होणे : 'दारुण - शरप्रहारें एका काळींच वीर ते खचले।' - मोकर्ण १०.१८. [सं. खच]

**खचता पाया** पु. १. खाली जाणारा पाया. २. (ल.) पिछेहाट; माघार; उतरती कळा; क्षय; ऱ्हास; अपकर्ष (कीर्ती, वैभव, संपत्ती इ.चा.)

**खचर** पहा : **खेचर**

**खचरट** वि. त्रासदायक; कंटाळवाणे; पीडाकारक; खडतर. (खडकाळ, चिखलाचा रस्ता, नापीक देश, घोटाळ्याचे काम, दुर्बोध लेख, गूढ अर्थाचा ग्रंथ इत्यादींसंबंधी योजतात.)

**खचरटाण** स्त्री. वाईट घाण (विष्ठा इत्यादिकांची).

**खचरण** स्त्री. १. (तेलंगणात) ताडपत्रावर लिहिण्याची लोखंडी अणकुचीदार लेखणी; चरे पाडण्याचे, कोरण्याचे हत्यार.

२. खाचखळग्यांचा, वेडावाकडा रस्ता. ३. अरुंद पात्याचा रंधा; खतावणी; फावडी. ४. खाच; खोबण. [सं. खच्]

**खचरवान** पु. खेचरे सांभाळणारा नोकर : 'खचरवान हुजुरात' - पेद २४८.

**खचरा** पु. १. लाकडाला खाच पाडण्याचे सुताराचे हत्यार; अरुंद पात्याचा रंधा; खतावणी; फावडी. २. खाच; खोबण.

**खचळणे** पहा : **खचणे**

**खचाखच** क्रिवि. खच्चून : 'गाडी खचाखच भरली होती.'-जात्यांदे ३८.

**खचाटणे** उक्रि. १. (गवत कापताना होणाऱ्या 'खचखच' आवाजावरून, किंवा मनुष्याला फार श्रम झाल्यावर तो आवाज करतो त्यावरून) तोडणे; साकटणे; सटदिशी कापणे; सपासपा तोडणे. २. वेगाने, आवेशाने धसफस करून खेचणे; ओढणे; पकडणे; बांधणे; ओरडणे; (सामा.) मोठ्या आवेशाने किंवा धसफसीने काही करणे (याचा उपयोग अनिबंध करतात). ३. उत्सुकता, तडकाफडकी, आवेश, नेट, वेग इत्यादींचा बोध या शब्दावरून होतो. या शब्दाचा उपयोग कचकाविणे, रगडविणे, रपाटणे, दपटणे इ. शब्दांच्या अर्थाशी जुळण्यासारखा करतात.

**खचा(च्चा)टून** क्रिवि. जोराने; दाबून; खच्चून.

**खचाळा** पु. गर्दी; खच : 'इतर दिवशी होताच की तो माणसांचा खचाळा!' -सगज १.

**खचाळी** स्त्री. उखाळीपाखाळी. (वा.) **खचाळ्या काढणे** - कुरापत काढणे; खोडी काढणे : 'तुला खचाळ्या काढायची हुक्की आली की फारच विधायक कल्पना सुचतात.' - माप्रे ९५.

**खचित** वि. जडित; जडलेला; बसविलेला. (समासात) रत्नखचित, मणिखचित, मौक्तिकखचित : 'रत्नखचित मुगुट शोभतो बरा।' - गणपतीची आरती. [सं.]

**खचि(ची)त** क्रिवि. निश्चितपणे; खरोखर; खात्रीपूर्वक. [सं. कच्चित्]

**खचितार्थ** पु. (अग्राह्य समास) प्रस्थापित निष्कर्ष; पक्का निकाल, संशोधनाचा निष्कर्ष; पडताळून पाहिलेली गोष्ट; निश्चित गोष्ट.

**खचिती** स्त्री. (क्व.) पक्केपणा; निश्चिती; निश्चितार्थ; ठरलेली गोष्ट.

**खचिलिसा** क्रिवि. खवचट; खवचटपणे : 'नानांनी बापाचा पक्ष केला पाहिजे असे काहीसें खचिलीसा बोलत होता.' - पुरंद ३. १६१.

**खची-च्ची** स्त्री. कापणी; छाटणी; बडवणी. (वा.) **० करणे** - १. बडवणे (पशूंचे अंड). २. कापणे; तोडणे (वृक्ष इ.). ३. (ल.) कमकुवत करणे : 'राष्ट्रास परकी भाषेंत शिक्षण देणे म्हणजे त्याची खच्ची करण्यासारखेच आहे.' - टिव्या ९७. ४. वाढ होऊ न देणे; नष्ट करणे : 'त्या प्रसंगाने डॉक्टर होण्याची त्याची इच्छा... खच्ची केली.' - पाषाण ६५. **० होणे** - निरुपयोगी होणे : 'अॅडॅम स्मिथने कारखानदारीपासून माणसे कशी खच्ची होतात याचे हुबेहूब चित्र काढले आहे.' - कॅपिटल ५९. [अर. खसी]

वि. १. अंड बडवलेला (पशू). २. (पुन्हा चांगला फुटावा म्हणून) छाटलेला, कापलेला. (वृक्ष) [अर. खसी]

**खच्च** वि. दाट भरलेला : 'आभाळ ढगांनी खच्च असतं.'- शिळान ४४.

**खच्च, खच्चून** क्रिवि. गच्च; दाटीने; कोंबून; खेचून (माणसांची गर्दी, कोंबलेल्या वस्तू इ. संबंधी योजतात).

**खच्चीकरण** न. (प्राणि.) प्राण्याची पुनरुत्पादनक्षमता नष्ट करणे.

**खच्चीकरण गंड** (मानस.) जननेंद्रिय गमावल्याची भीती. मनोविश्लेषण-सिद्धांताने दाखवलेला लहान मुलामुलींत सार्वत्रिक आढळणारा गंड.

**खच्चून** क्रिवि. १. चिक्कार; अतिशय जास्त प्रमाणात; जितक्या प्रमाणात भरता येईल तितका : 'बहुतेक मित्रमंडळी खच्चून दारू पिऊन बेहोष झाली असावीत.' - कथाही ६५. २. जोराने; त्वेषाने : 'कावळ्यानं त्येला खच्चून टोच मारली.' - गोता ६७.

**खजबज** स्त्री. दबलेला आवाज.

**खजबजणे** अक्रि. खसपस आवाज करणे : 'अंधारात काहीतरी खजबजत होते.' - वेज १०२.

**खजमत** स्त्री. खिजमत; मेहनत; चाकरी; नोकरी; काम; कार्य : 'राजे यानी रावसाहेब आजलग खोटी करून ठेविले ते यखादि खजमत सांगावी म्हणोनच ठेविले आहे.' - पेद २५.२८.

**खजानची-जी** पु. कोषाध्यक्ष; खजिनदार; तिजोरीवरील अधिकारी : 'धाकट्यास खजानचीचें काम...' - मइसा ५. ४२. [तु. खझान्ची]

**खजानचीगिरी** स्त्री. कोषाध्यक्षाचे काम, हुद्दा; खजिनदारी.

**खजाननीस** पहा : **खजिनदार**

**खजानपूर** वि. ज्याची गंगाजळी सदोदित भरलेली आहे असा; समृद्ध; श्रीमान. खाजानपूर असाही शब्द आढळतो : 'खजानपूर आहों तें कळतच आहे.' - मइसा १२.७०. [अर. खिझाना + फा. पूर]

**खजाना** पु. तलवारीच्या पात्याच्या मुठीजवळील रुंद भाग. [फा.]

**खजा(जि)ना** पु. १. भांडार; तिजोरी; कोष; द्रव्यनिधी : 'खजानाहि पूर्ववतप्रमाणें नाहीं.' - दिमरा १. १६५. २. सरकारी जमा; राज्याचे उत्पन्न; दौलत; सरकारी उत्पन्न. ३. संग्रह; निधी; साठा; खाण : 'विज्ञानस्थितीचा भरिला खजाना।' - स्वानु १०.२.२५. ४. कारंजाला पाण्याचा पुरवठा करणारा त्याजवळचा बांधलेला हौद : 'कारंजाचे हौद खजीने धुऊन करा निर्मळ स्वकरीं।' - होला ८०. ११७. ५. मिठागरासाठी राखलेला पाण्याचा साठा. ६. (सामा.) पाणीपुरवठा करण्यासाठी उंचावर बांधलेली टाकी. ७. बंदुकीची कोठी, कोठा, पेट; कान्याजवळचा भाग. यात दारू राहते. खेळण्यातील दारू उडवण्याची, बार उडवण्याची उखळी; एक तऱ्हेचा गरनाळ. ८. खिसा; कप्पा: 'खाशा चिलखतास रुप्याच्या कड्या व खजीने व वाद्या व गुंड्या तयार करून पाठविणे.' - पेद १८.१६. [फा. खजाना]

**खजानेदाखल (करणे)** पोते जमा (करणे); खजिन्यात जमा (करणे) : 'ऐवज सत्वर खजानेदाखल करणे.' - जोरा ७.

**खजाळ, खज्जा(जे)ळी** वि. १. नेहमी भांडणारा; भांडखोर; व्रात्य; खवचट; कलहप्रिय; कज्जेखोर : 'पण त्याला बायको मिळाली खजाळ.' - बाब १६. २. विषयलंपट; कामुक.

**खजाळी** स्त्री. कुचाळी; खोडी; चेष्टा; कुरापत;. कुचोद्यपणा.

**खजाळ्या** वि. खोड काढणारा; चिडवणारा : 'श्रीधरपंतासारखा धीमा परंतु खजाळ्या पुरुष...' - यख ६९.

**खजि(जी)न(ने)दार** पु. कोषाध्यक्ष; खजिन्याचा अधिकारी; संस्था, राज्य इत्यादीचा पैसा ज्याच्या ताब्यात असतो असा माणूस. [फा.]
**खजील** वि. लज्जित; ओशाळा; खेदयुक्त; शरमिंदा. [फा. खजल्]
**खजुरा** पु. शंकरपाळे. (व.) [हिं.]
**खजुरा-री दोरा** अनेक पेडांचा किंवा पदरांचा वळून केलेला जाड दोरा.
**खजुरिया** पु. उसाची एक जात. खजुरासारखा रंग असलेली उसाची एक जात. [सं.खर्जूर]
**खजुरी** स्त्री. १. खजुरीचे झाड. हे शिंदीच्या झाडाप्रमाणे वाढते. याची वाळलेली फळे म्हणजेच खारका. २. खजुराचे रानटी झाड.
**खजुरी** स्त्री. 'दोनि पदरी वळलेला'- (तंजा.)
**खजूर** पु. खजुरीच्या झाडाचे फळ; खजुरीची बी. [सं. खुर्जर.]
**खजूरछडी** स्त्री. रेशमी वस्त्रावर काढलेली खजुराच्या पानासारखी आकृती, वेलपत्ती, नक्षी.
**खजूरी बोऱ्या** जिच्यात खजूर बांधून येतो ती हातरी; चटई; बारदान. यातील खजूर काढून घेतल्यावर ते नुसते टाकाऊ बनते व त्यावर माशा घोंघावतात. यावरून पोकळ डोलारा; फट फजिती : 'त्यांचा तेथें कसा खजुरी बोऱ्या उडाला याची ज्यांना माहिती होती...' - विछ १२७.
**खजेली** स्त्री. कळ; खुसपट; कुरापत. पहा : **खजाळी** (कु.)
**खजेलो** पु. खजेली करणारा; कुरापत काढणारा. (कु.)
**खजोरी** पहा : **खजूरछडी** : 'सोडिला दिंड काढिली बोभाटाची खजोरी डाळिंबी काळी चंद्रकळा झळझळी.' - लोसामा ५/३१.
**खज्जाळी** वि. उठवळ; हलकट. (बे.)
**खँञ** क्रिवि. कोठे. (राजा.) [सं. क्व.]
**खँयचो** कोठला. (राजा.)
**खट** पु. (संगीत) आसावरी थाटातील राग. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर.
**खट** न. क्षत; जखम; व्रण; वण; गळू; फोड.
स्त्री. घट्टा; वण : 'पाणी वाहतां खटी पडल्या खांदी कावड डुल्लतसे।' - अफला ७७. [सं. क्षत = जखम]
**खट** स्त्री. १. कुंधा झालेली शेतजमीन; वखरण्यात न आलेली जमीन. (व.) २. अंगावर, पदार्थावर चढलेले घाणीचे कीट; मळ; केरकचरा. (क्रि. पडणे, जमणे.) (वा.) **०काढणे** - १. सपाटून, जोराने मारणे. २. खरडपट्टी काढणे. **खटी खापरी लागणे, जाणे** - १. अंग घाणेरडे, खरबरीत होणे. २. (ल.) संपुष्टात येणे; नष्ट होणे (धंदा, कारखाना, काम); उधळणे; नाहीसे होणे; धुळीला मिळणे (दौलत); नेस्तनाबूत, जमीनदोस्त होणे (इमारत इ.). [सं. खट = गवत, घाण]
**खट** स्त्री. १. (विटीदांडू) विटीला दांडूने टोला मारताना दांडू जमिनीला लागला तर 'खट' असे म्हणतात. २. (खटखट) आवाज; खट्‌ असा ध्वनी : 'कोण दाराभोंवतीं खटखट करितें.' - कफा १६. [ध्व.]
**खट** न. रसायनशास्त्रातील एक मूलद्रव्य. [इं. कॅल्शिअम]
**खट** वि. खट्याळ; खोडकर; द्वाड; नष्ट; दुष्ट : 'ठस ठोंबस खट नट।' - दास २.३.३२. २. निर्लज्ज; हलकट. (माण.) ३. ब्याद : 'ही खट एकदां युरोपातून निघाली असता बरी.' - नि ९२८. ४. पिशाच्च. ५. दुर्जन : 'तुका म्हणे बेट्या। भांडवल नलगे खट्या।' - तुगा २९७४. (गो.) [सं. शठ]
**खटकखटक** क्रिवि. कटकट असा आवाज. [ध्व.]
**खटकण-न-रे-रि** क्रिवि. खटकन; झटकन; सटकन; त्वरित.
**खटकणारा** वि. पसंत नसणारा; मनाला त्रास देणारा : 'एक खटकणारी गोष्ट बोलावी का नको...' - राऊ २४३.
**खटकणे** अक्रि. टोचणे; बोचणे : 'ही गोष्ट विनोदिनीच्या मनांत कांट्याप्रमाणें खटकली.' - पप्रे ६५. [ध्व.]
**खटकर्म** न. षटकर्म; निर्वाहाची सहा कर्मे. [सं. षट्‌ + कर्म]
**खटकर्म** न. त्रासदायक; चेंगट; रेंगाळत चालणारे, तिरस्कार वाटणारे काम [सं. षट्‌ + कर्म]
**खटका** पु. १. काठीचा, चाबकाचा 'फट्‌' असा आवाज. २. भांडण; तंटा; झगडा. (क्रि. उडणे.) ३. (वाद्य) कोणताही स्वर वाजवीत असता त्याच्या मागच्या अगर पुढच्या स्वरास झटका देऊन त्या दोन स्वरांपासून उत्पन्न केलेला मिश्र स्वर. ४. अडकण; कुत्रे; कोयंडा वगैरे बसवताना खट्‌ असा आवाज करणारे मळसूत्र, अडकवण; त्याचा होणारा 'खट्ट' असा आवाज, नाद, ध्वनी. [सं. क्षत]
**खटका** पु. १. मनात ठेवलेला, आलेला संशय, अंदेशा, विकार. (क्रि. येणे, मनात राहणे.) २. वितुष्ट आल्याने होणारे भांडण. (क्रि. उडणे)
**खटका** पु. बारकावा : 'मला पुणेरी भाषेचे खटके जमायला लागले होते.' - कोसला ६२.
**खटका** पु. (संगीत) कंसात लिहिलेला स्वर दोन वेळा अति द्रुत लयीत म्हणणे.
**खटका-के** पु. न. (जेजुरी) खंडोबाच्या पूजेचे गंध उगाळणे, पाणी देणे इ. कामे करणारा धनगर.
**खटकामुख हस्त** (नृत्य) करंगळी व अनामिका ही बोटे तळहाताकडे वाकविणे, अंगठा उभा ठेवून त्यास तर्जनी व मधले बोट चिकटविणे.
**खटकावणे** सक्रि. रागावणे; खरडपट्टी काढणे.
**खटकूळ** न. १. कर्ज फेडण्याला अगर सारा देण्याला जिगजिग करणारे, कटकटीवाचून ऋण देत नाही असे कूळ, असामी, खंडकरी, ऋणको. २. खर्चाला मागे घेणारा माणूस; चिक्कू.
**खटके** न. खड्ग.
**खटक्याचे घड्याळ** अचूक कालमापनासाठी ज्या घड्याळातील काटा इच्छेनुसार थांबविता अथवा सुरू करता येतो असे घड्याळ.
**खटखट, खटखटी** एक झाड, याची फळे गोड असतात. 'खटखटाचे: झाड दोनतीन पुरुष उंच वाढते.' - फचि ७४.
**खटखट-टा** स्त्री. १. कटकट; त्रास; कंटाळा; कंटाळवाणे काम. २. मोठ्याने चाललेले भांडण, कज्जा : 'धंदा खटखट आणि लटपट।' - दास २.३.७. ३. बडबड, बोलण्याची पिरपिर.
**खटखटाळणे** सक्रि. आग्रह करणे; मागे लागणे.

**खटखटीत** वि. १. कोरडा; वाळलेला; खडखडीत; वाळल्यामुळे कडकडीत झालेली (एखादी ओली वस्तू.) २. स्पष्ट; निर्भीड; निस्पृह (भाषण, वक्ता). पहा : **खडखडीत**

**खटखटे** न. १. शेतातील पक्षी इ. उडून जावे म्हणून केलेले खटखट आवाज करणारे यंत्र. २. (ल.) निर्वाहासाठी लागणारा रोजगार, साधन, धंदा; मजुरी इत्यादी. ३. गुळाचा किंवा गूळ-खोबरे यांचा अति टणक असा हलवा, चिकी; गुडदाणी. (गो.) [ध्व.]

**खटखट्या** वि. कटकट लावणारा; भांडण करणारा; भांडखोर.

**खटंगुळ** वि. १. खोडकर; नाठाळ (पशू). २. पहा : **खचरट**

**खटणे** अक्रि. १. थांबणे; खुंटणे; अडणे; अडथळा होणे (काम, धंदा इत्यादींमध्ये); रुसून बसणे (माणूस). २. (ल.) थकणे; तहकूब होणे. ३. (ल.) हट्टाला पेटून कोणाचे न ऐकणे; मागे राहणे; घट्ट उभे राहणे. ४. खलेल असणे; अडणे. (घोडा.) [सं. खट्]

**खटणे** अक्रि. मेहनत करणे : 'अर्धपोटी राहून मजुरांनी खटावं का?' - धाधो ३४६.

**खटनट** स्त्री. १. काळजी; त्रास; उपद्व्याप (अन्नवस्त्र, पालन-पोषणा इ. चा). (क्रि. काढणे, सोडणे.) २. कटकट; भांडणतंटा.
वि. १. टाकाऊ; नासलेला; वाईटसाईट; ओंगळसोंगळ; नासका. २. लुच्चा; ठक; लबाड; दुष्ट : 'खटनट येकवटिले। चोरटे पापी।' - दास १९.३.८.

**खटनट्या** वि. भांडखोर; घासाघीस करणारा.

**खटना-री** क्रिवि. तात्काळ. (झाडी.)

**खटपट** स्त्री. १. धडपड; परिश्रम; उद्योग. २. त्रास; दगदग; मेहनत; यातायात; उलाढाल; घालमेल; नाना तऱ्हेची लहानमोठी कामे : 'या व्यर्थ खटपटा। करित आहे॥' - राज्ञा १२.१२१. (क्रि. करणे, घालणे.) ३. भांडणतंटा; किरकिर. ४. वाद; चर्चा. [सं. घटपट]

**खटपटणे** अक्रि. भांडणे; कज्जा करणे : 'ऐसीं शास्त्रें खटपटती। एकाचें एक न मानिती।' - ह २७.३५. [ध्व.]

**खटपटे** न. खटपटीच्या कामाबद्दलचे वर्षासन, नेमणूक : 'धारपांच्या वंशाकडे असलेले दरसाल दहा रुपयाचें खटपटे कर्वे यांच्या वंशाकडे सुरू केलें.' - आत्मवृत्त ४६.

**खटपट्या-टी** पु. स्वयंपाक्याच्या हाताखाली इतर कामे करणारा माणूस.
वि. १. मेहनती; उद्योगी; बारीकसारीक, मोठ्या कामात उत्सुकतेने झटणारा; सर्वत्र खटपट करण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा. २. धाडसी; कल्पक; कुशल; छातीचा; धडाडीचा; उलाढाल्या.

**खट-प्रपिंड** पु. (वै.) कॅलशियमचे क्षार निर्माण करणारी ग्रंथी.

**खटबावली** स्त्री. कळसूत्री बाहुली. (झाडी.)

**खटमट** स्त्री. पूर्ण परत फेड.

**खटमल** पु. ढेकूण. [हिं.]

**खटमार** पु. अपानद्वारी किंवा कानांत लाकडी खुंट्या ठोकण्याची शिक्षा.

**खटर** पु. बैलगाडी इत्यादींचे चाक वाजताना होणारा आवाज.

**खटर(रा)क** पहा : **खटराग**

**खटरपटर** स्त्री. सटरफटर, चिल्लर जिनसांची रास, समूह.

**खटराग** वि. त्रासदायक; न पटणारा; क्लेशदायक (माणूस, धंदा, काम.)
स्त्री. १. ब्याद; पीडा; लचांड; लटांबर. (क्रि. लागणे, मागे लागणे, घालविणे.) २. घरातील जड-बोजड वस्तू; घोड्याचे सामान; बाडबिछाईत (जेव्हा अवजड, त्रासदायक असेल तेव्हा म्हणतात.)

**खटला-ले** पु. न. १. जमीनजुमला; घरदार; गुरेढोरे; जिंदगी. २. परिवार; इतमाम; लवाजमा; बाडबिछाईत; प्रवासी सामानसुमान : 'नागोपंतानें आपलें सर्व खटलें रवाना केलें होतें.' - विक्षिप्त १.३०. ३. कुटुंब; पत्नी, कारभारीण. ४. पोट भरण्याचा उद्योग; व्यापारधंदा. (वा.) ० **ओढणे** - संसार व्यवस्थित चालवणे. ० **तुटणे** - संबंध सुटणे.

**खटला** पु. १. (कायदा) फिर्याद; न्याय मिळविण्याकरिता न्यायालयात केलेला दावा; कज्जा : 'हायकोर्टाचे जज्जसुद्धा त्यांचे समोर चाललेल्या खटल्यांत इतकें लक्ष घालीत नसतील.' - नाकु ३.१. २. त्रासदायक काम; भानगडीचे; गुंतागुंतीचे काम, मुद्दा, प्रकरण, बाब; लचांड. [क. कटले = फिर्याद, परंपरा, पद्धत.] [सं. कलत्र]

**खटलाखोकला** पु. संसार, व्याधी; व्यथा; प्रकृती इ. : 'वय उताराला लागले म्हणजे खटल्याखोकल्याचे बोलत चावडीत....' - घरदार ५४.

**खटलेखोर** वि. १. भांडखोर; कज्जेदलाल : 'खटलेखोर तो मश्रुन्मुलूख।' - ऐपो २६९. २. कुशल; धाडसी; हिकमती; योजक. (कर.)

**खटलेवाईक** वि. कुटुंबवत्सल; जमीनजुमला, परिवार असलेला; संसारी

**खटवणी** न. मिरी, मीठ वगैरे असलेले भाजीचे पाणी. पहा : **कट**

**खटवणे** सक्रि. खर्च करणे : 'चांगला दीड रूपया खटवला मी.' - वासू ७५.

**खटवांगपाणी** वि. हातात सोटा घेतलेला.

**खटवे** न. १. स्त्रियांच्या पायांतील लहान जोडवे. २. पायांच्या बोटांत घालण्याचे दोन वेढ्यांचे चांदीचे वळे; जोडव्यांची अडवण.

**खटंग** न. खाट; बाज. [सं. खट्वांग]

**खटंगनटंग** वि. बरावाईट; कसातरी. (व.)

**खटंगळी** खोडी, कुरापत (क्रि. काढणे).

**खटा** पु. पोलादाचा एक प्रकार.

**खटा-टे** वि. खट्ट; नाराज; नाखूष : 'तथापि ते आले याजमुळें मल्हारबा आमळसे खटे आहेत.' - पेद २.३६. (वा.) ० **करणे** - नाराज करणे. 'लोक तो फारसे खटे केले होते.' - पेद ३३.३०१.

**खटाई** स्त्री. कलह; भांडण : 'आम्ही लोक खटाई (आहे) सिलहे नाहीं त्या स्थलीं सिलह करून उभयेता येकचित्त करून सोडावे.' - इएमपी ९९.

**खटाई** स्त्री. १. आंबटपणा; आंबटाई. २. आंबट रस; आंबटपणा असणारा पदार्थ (खाद्य किंवा रासायनिक पदार्थातील); चिंच किंवा आंबट पदार्थाचे पाणी (भांडी स्वच्छतेसाठी), ३. आंब्याच्या वाळलेल्या फोडी. [हिं. खट्टा = अम्ल.]

**खटाई** स्त्री. कापणी. पहा : **कटाई** (वा.) ० **काढणे** - खोड मोडणे; खरडपट्टी काढणे; खटी मोडणे. (व.ना.)

**खटाखट-टा** क्रिवि. फटफट, चटचट, खटखट आवाज होऊन (रुपये

देताना, चापट मारताना, तोंडात, मुस्कटात देताना). [ध्व.]

**खटाटोप** पु. १. मोठे अवडंबर, तयारी, बेत, चळवळी. २. मोठा डौल (पवित्रपणा, विद्या इत्यादींचा.). ३. गोंगाट; गोंधळ व गडबड : 'दमनकातें खटाटोपें येतां देखिला।' - पंच १.१६. ४. थाट; देखावा. ५. पसारा; उलाढाल (कामांची, धंद्याची); उद्योगाचा उपद्व्याप. ६. (सामा.) मेहनत; व्याप; यातायात; दगदग. 'विधवे लागीं कुंकूम ठेव। खटाटोप कायसा।' - नव २०.१७९.

**खटाटोप** पु. सर्पाच्या फणेचा पसर; उभार : 'जालीया दोनि सहस्रभुजा सहस्र एकु खटाटोप' - उह १७९२ [घटाटोपः]

**खटाटोपी-प्या** वि. १. मेहनती; उद्योगी. २. पोकळ प्रदर्शन करणारा, करण्याची इच्छा धरणारा; खटाटोप करणारा.

**खटाड** वि. कुंध्याच्या, पड्याळाच्या गवताने व्यापलेले शेत. (व.) [सं. खट]

**खटाय** स्त्री. खटाई; वेडेपणा. (गो.) [सं. शठ]

**खटार(व)णे** अक्रि. मरणे (सांकेतिक भाषेत रूढ).

उक्रि. नाश करणे; उद्ध्वस्त करणे (देश, गाव वगैरे). [सं. खट्‌वा]

**खटारा** पु. १. वाहनाचा जीर्ण सांगाडा; कवच; सामानाशिवाय भाग; सरंजामाखेरीज जिन्नस (घर, गाडी, पालखी, जहाज या गोष्टी सामान, बैल, दोरखंड इ.च्या शिवाय असता). २. धूड; अवजड वस्तू; निरुपयोगी, वापरण्यालायक नसलेली वस्तू, यंत्र. ३. मोठा गाडा; बैलगाडा; छकडा; पालखी; मेणा. ४. बैल रहाटाला चालत नसेल तर त्याला शिकवण्यासाठी एक लाकूड पुरून त्याला जोडलेले जोखड. [सं. क्षत्ता]

**खटारा-ऱ्या** वि. (ल.) म्हातारा; रोडावलेला; अशक्त; निरुपयोगी (माणूस, जनावर).

**खटारा** पु. गलबताचा एक प्रकार : 'चार खटारे जाया होते तरी दहा नवे केले जाते.' - पेद ३३.२२.

**खटाल(ळ)णे** उक्रि. १. आग्रह करणे; निकड, तगादा लावणे; खनपटीला बसणे. २. सूचना करून आठवण देणे; उद्बोधन करणे. ३. पुढे ढकलणे; लांबणीवर टाकणे.

**खटाला** पहा : **खटला, खटले** ३ : 'बापानं दिली लेक कामाच्या खटाल्यात।' - जामामा २८५.

**खटास** स्त्री. आंबटपणा (फळ वगैरेचा). [हिं.]

**खटासणे** सक्रि. खाऊन टाकणे.

**खटाळभर** वि. पुष्कळ; अतिशय. (को.)

**खटाळे** न. निकड : 'लेकुरवाळीयेच्या कामाचं खटाळं।' - लोले २३१.

**खटांबा** पु. (क.) १. आंबट आंबा. २. रानआंबा.

**खटी** स्त्री. खोड. (क्रि. मोडणे.) (गो.)

वि. द्वाड; खाष्ट. पहा : **खट**

**खटू** पहा : **खटवे**

**खटे-बट्टे** वि. गोड नव्हे ते; खारट, आंबट वगैरे. [सं. क्षार, क्षारट.]

**खटेली** पु. जमिनीचा मालक. (कु.)

**खटोखटो** क्रिवि. जलद.

**खटोली** स्त्री. लहान खाट; पलंगडी. (व.) [हिं. खटोला]

**खट्टर** वि. खडतर. (गो.)

**खट्टा** वि. १. आंबट (फळ). २. (ल.) असंतुष्ट; त्रासलेला. (क्रि. पडणे.) ३. उतरलेला; कमी झालेला; निस्तेज; फिक्का (रंग). ४. निरुत्साही; उमेद नसलेला. [हिं.]

**खट्टा** पु. १. कमरेचा सांधा; पाठीचा शेवटचा मणका; कमरेचे हाड (जड ओझे वाहिल्याने किंवा बराच वेळ ताठ बसून लिहिण्याने जे दुःख किंवा ताठरपणा येतो त्याला अनुलक्षून याचा उपयोग करतात). २. (व्यापक) अति ताठरपणा; स्वतःची शक्ती किंवा महत्त्व याविषयी घमेंड. (क्रि. मोडणे, मोकळा करणे, तोडणे, जिरविणे, उतरविणे, पुरविणे.)

**खट्टा** पु. खटारा. (खा.) [हिं.]

**खट्टा अनार** एका जातीचे डाळिंब. हे औषधी आहे.

**खट्टाबार** पु. फळाचा, पिकाचा दुसरा बहर; आंबट बहर.

**खट्टा मिट्ठा** आंबट गोड.

**खट्टू, खटू** वि. नाराज; असंतुष्ट; त्रासलेला; नाखूष.

**खट्टेर** न. पोलादाचा एक प्रकार.

**खट्या** वि. १. गळाठलेला. २. कृश.

**खट्याव(वि)णे** पु. म्हातारा बैल. (व.) अक्रि. १. मरणे. २. निरुत्साही, निराश, उदास होणे. ३. पिच्छा पुरवणे; निकड-तगादा लावणे.

**खट्याळ, खट्याळनाठ्याळ** वि. १. खट; तुसडा; तिरसट; द्वाड; दुश्चित्त; वाईट; उपद्व्यापी (स्वभाव, वागणूक) : 'कळों आलें खट्याळसें। शिवों नयें लिपों दोषें।' - तुगा २७५४. २. खोडकर; बेरकी; नाठाळ; हट्टी; छप्पन्न टिकल्यांचा (घोडा, गाय). [सं. शठ]

**खट्याळणे** उक्रि. १. चेतवणे; भरीला घालणे; धडकवणे; क्षोभविणे. २. (ल.) आठवण देणे (वचनाची); स्मरण देणे. पहा : **खटाल(ळ)णे**

**खट्वामरण** न. खाटेवर आलेले मरण. मरणकाळी माणसाला कांबळ्यावर उतरवण्याची चाल आहे. पण एखादा मनुष्य खाटेवरच मेला तर ते हिंदुधर्मशास्त्राप्रमाणे निषिद्ध मानतात.

**खट्वांग** न. खाटेचा पाय; शंकराचे एक आयुध : 'तुझे हातींचे खट्वांग। करी जीवाचा जीवभंग।' - एभा १९.३.

**खट्वांग** वि. हटवादी. (गो.)

**खड** स्त्री. एक प्रकारचे कोवळे गवत. [सं. खट]

**खड** स्त्री. १. पाऊस पडल्यानंतर उगवलेले कोवळे गवत. (राजा.) २. गाय, म्हैस इ. ना खाण्यासाठी ठेवलेला दाणा, कडबा, चारा, वैरण इ. ३. खाणे (पुष्टिकारक). (चि.) ४. (ल.) दाढी; तोंडावरचे केस : 'खड भरित परिपूर्ण। मोवळ पिंगट वर्ण।' - ख्रिपु २. १९. ३९. [सं. खट]

**खड** पु. वाटा; हिस्सा.

**खडक** पु. १. प्रस्तरमय थर, भूपृष्ठ; कातळ; धोंड; खडपा; पाषाण : 'ज्वालामुखीतून जळजळीत रस बाहेर येऊन.... त्याचे थरावर थर बसतात. या थरांतील उष्णता निघून गेली म्हणजे त्यांचेच खडकाचे थर बनतात.' - सृष्टी (खगोल) ३८. २. कातळ, शिला. ३. मोठा खडक;

४. (ल.) कठोर अंत:करणाचा, पाषाणहृदयी माणूस. [सं. क्षटक].
वि. १. वाळून कोरडा ठणठणीत झालेला; खडखडीत (धुतलेले कापड, काष्ठ). २. अगदी कोरडी, आटलेली (विहीर, तळे, गाईम्हशींची कास किंवा स्त्रीचे स्तन.) ३. लख्ख; चकचकीत (प्रभात, उषा). ४. तीव्र, कडक (ऊन, भूक). कित्येक वेळी 'कडक' शब्दाबद्दलही योजतात. (वा.) ० **लागणे** - नफा किंवा सुपरिणामाची आशा धरली असता निष्फळ होणे. **खडकावर पोट भरणे** - कोठेही पोट भरणे.

**खडकण-न-र** पहा : **खटकन**

**खडकणे** अक्रि. वाळणे; वाळून कडकडीत होणे (कापड, सरपण).

**खडकणे** अक्रि. संकटात पडून मती कुंठित होणे : 'हिमोदकें आकंठें। खडकिलां सेविजति तटें।' - राज्ञा १७. २५७.

**खडकत** स्त्री. खडकाळ जागा.
वि. खडकाळ.

**खडकपाटली-पात्र** स्त्री. मुलामा चढविलेली पाटली : 'तिच्या पाटल्या तांब्याच्या पाटलीवर सोन्याचा पत्रा मढवून केलेल्या होत्या. त्या पाटल्यांना खडकपाटल्या म्हणतात.' - आंटा ५१.

**खडकपात्र** न. गेंड्याच्या नाकावरील शिंग : 'पाऱ्याची गोळी खडकपात्राच्या संपुष्टात घालून रामभट द्रवीड यांनीं देवदेवेश्वरी नजर केली होती.' - पेद १८. १००.

**खडकलाट** पु. वि. ठं ठं गोपाळ; काही न मिळणे; ठणठणाट. लाट म्हणजे समृद्धी याच्या उलट.

**खडकळ, खडकाळ-ळी** स्त्री. १. दगडाळ; खडकाचा किंवा कठीण पृष्ठभाग; पाषाणयुक्त जमीन; कातळमय पृष्ठभाग. २. दगडाळ काळी जमीन. ही नेहमीच्या काळ्या चिकण जमिनीपेक्षा कमी सुपीक असते. हिच्यात ओलावा चांगला राहतो व कसण्याला जड जात नाही. ३. (ल.) गोंधळाचा मुद्दा; कठीण गोष्ट; शंकास्थान; कठीण भाग.
वि. दगडाळ; खडाळ.

**खडका** पु. १. घोर; काळजी. २. पायरव; जवळ येणाऱ्याची चाहूल; हालचालीचा आवाज, ध्वनी. ३. खडाजंगी; भांडण; खटका. ४. खूप खाणे; खाण्यावर तडाखा. (व.) (वा.) ० **घेणे, काढणे** - कानोसा घेणे (जवळ येणाऱ्या माणसाचा, वस्तूचा). [ध्व.]

**खडकाधडका** पु. भांडाभांडी; खडाजंगी; कलागत.

**खडकावणे** सक्रि. जोराने खडखड आवाज होईल असे वाजवणे : 'वेड्याने दार खडकावले.' - पड रे ४०.

**खडकाव(वि)णे** उक्रि. मध्येच थांबवणे, स्तब्ध करणे. पहा : **खडकणे**

**खडकाव(वि)णे** उक्रि. रागे भरणे; कान उपटणे; कान उघाडणी करणे; खरड काढणे. पहा : **कडकाविणे**

**खडकी मीठ** सैंधव; शेंदेलोण.

**खडकुती** स्त्री. सूर्याच्या खडतर उन्हाने पदार्थ करपून जाण्याची अवस्था; जळून जाणे : 'आम्र लागला सेती। धान्यें बणब्या आणी खडकुती।' - दास ३.७.४२.

**खडकू-क्या** पु. निजामशाहीतील तांब्याचा पैसा; रुपयाचा सातवा अंश : 'खडकू दुदंडी ही नाणी। चालत होती वऱ्हाड प्रांती।' - श्रीगजानन विजय. (व.)
वि. (ल.) लहान; बारीक; क्षुद्र.

**खडकूत** पु. जनावरांच्या खुरांना होणारा एक रोग, खुरकूत.

**खडक्या** वि. १. धसमुसळ्या; २. स्पष्टवक्ता; तोंडावर स्पष्ट बोलणारा.

**खडखड-डा** क्रिवि. १. बैलगाड्या वगैरेंचा खडकाळ रस्त्यावरून जाताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे; कोरे कापड, कागद इ. हलवले असताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे. २. स्पष्टपणे; साफ; तडकाफडकी; तोंडावर (बोलणे, उत्तर देणे). ३. भराभरा; झपाझप;(धावणे, जाणे). [ध्व.]

**खडखडणे** अक्रि. १. खडखड आवाज होणे; तडतडणे; फडफडणे; खरखरणे; चरचरणे; वाजणे इ. २. (ल). संपणे; पदार्थ शिल्लक न राहणे. [सं. खंड]

**खडखडविणे** उक्रि. १. मोठ्याने सांगणे; खरडपट्टी काढणे; रागे भरणे. २. खडखड वाजविणे; आवाज करणे.

**खडखडाट** पु. १. मोठ्याने खडखडणे, कटकटणे, तडतडणे. २. (ल.) (रिकाम्या भांड्याच्या आवाजावरून) दुर्भिक्ष, दुष्काळ; शुकशुकाट; आत्यंतिक अभाव (पैशाची पिशवी, धान्याचे कोठार, विहीर यातील - पैसा, धान्य, पाणी इत्यादीचा); चणचण. [ध्व.]

**खडखडीत** वि. १. कोरडा व ठणठणीत; वाळून कडक, शुष्क झालेला (भिजलेली पण नंतर वाळलेली वस्तू, पदार्थ); कडकडीत (धुतलेले कापड); कडकड, सळसळ वाजणारे (कापड). २. जोमदार; निरोगी; उत्साही; मजबूत; टणटणीत (विशेषत: आजारातून उठलेला, आजारातून पूर्ण बरा झालेला); पुन्हा सशक्त; आरोग्यसंपन्न. ३. धसमुसळा; स्पष्टवक्ता; चोख व्यवहार करणारा. ४. धोपट; खरे; उघडउघड (भाषण, व्यवहार, चौकशी). ५. नाजूक नसणारे; खडखडीत. (कु.) पहा : **खरखरीत** [ध्व.]

**खडखड्या** स्त्री. अव. दरवाजातील पट्ट्यापट्ट्यांचे कलमदान : 'खडखड्या गोलची केलेल्या उभ्या गजांस... पितळी बिजागिऱ्यांनीं जोडाव्या.' - मॅरट ७२. [ध्व.]

**खडखांबुल** पु. खांबांना हात लावून खेळायचा एक खेळ : 'खडखांबलां खेळु।' - स्थान २१.

**खडग(गू)ळ** वि. १. खडकाळ; दगडाळ. २. (ल.) खडंगूळ; कठीण; त्रासदायक; खडतर; खचरट. ३. नाठाळ; द्वाड; खट्याळ (गाय, पशु). ४. तिरसट; हिरवट; कुरठा; तुसडा; तिडतिडा.

**खडगुत** न. दाणा; चारा; वैरण. (व.)

**खंड(डी)ण** वि. १. त्रासदायक; ओढाळ; नाठाळ; खट्याळ (जनावर इ.) २. दूध काढताना फार त्रास देणारी (गाय, म्हैस); वांझ.

**खडणे** अक्रि. पडणे; गळणे; झडणे (झाडाची पाने) : 'स्वराज्याच्या कोंदणांतील एक एक तेजस्वी हिरा कसा खडत चालला आहे पहा.' - स्वप १२४.
न. पाने गळालेले झाड.

**खडणे** अक्रि. ठेवणे.

**खडतर** न. जुना, कुजका झाप (नारळीचा). (को.)

**खडतर** वि. कठीण; त्रासदायक; भयावह; संकटग्रस्त; वाईट; दुर्घट; उग्र (माणूस, देश, मार्ग, ग्रंथ इ.) : 'झाली दडपणीं खडतर देवता। संचारली आतां निघों नये॥' - तुगा २०१. [सं. खरतर]

**खडतर** वि. कडक : 'सुर्यू खडतरीं कीर्णीं तपों लागला.' - गोप्र ८८. [सं. खरतर]

**खडतर अमावस्या** आश्विन, पौष व फाल्गुन अमावास्या. या दिवशी चोरी करायला मुहूर्त चांगला असतो अशी समजूत आहे. हे दिवस चोरांना शुभ असतात. अर्थात इतर लोकांना ते कष्टकर असतात यावरून.

**खडतर औषध** तीव्र, अमोघ, रामबाण औषध.

**खडतरणे** अक्रि. १. खडखड आवाज होणे (दगडावरून, खडकावरून गाडी गेली असता). २. खडबडून उठणे : 'तेणें सुखनिद्रेचिये सदनीं। जागरोनी खडतरला।' - मुसभा १५. १६४. ३. मोठा आवाज होईल अशा तऱ्हेने लागणे, आपटणे, बोचणे, रुतणे, खोचणे, भेदणे (बाण, दगड, बंदुकीची गोळी इ.) : 'कृपवाक्शर काळजांत खडतरले।' - मोआदि २६.४७. ४. खचरट होणे; खडतर होणे.

**खडतरता** स्त्री. कठोरपणा; उग्रता; तेज : 'सूर्यास खडतरता चढे। धडधडायमान।' - दास १०.५.१६.

**खडतर बीज** १. वाईट बी, मूळ; वाईट कूळ; हीन कूळ. २. (ल.) तिरसट, दुष्ट, खराब माणूस.

**खडदूर** न. किरकोळ सामान; अडगळ; निकामी जनावरे, सामान वगैरे : 'नेहमीं वोझीं शंभर व हजीर बेगारीची तीस व उंटेंतटें वगैरे खडदूर शेंपन्नास आहे.' - मइसा १०. १६७.

**खडनिगुत** स्त्री. कटकट : 'फालतुची खडनिगुत नोका करत बसू. चाला मन्लं त चाला लवकर.' - धग ५९.

**खडप** पु. १. खडक; खडकाळ पृष्ठभाग; खडकाचा थर, रास. २. (ल.) भाकऱ्यांचा ढीग; खरकट्या भांड्यांचा ढीग.

न. मूठभर काडसरांची, ताटांची पेंढी. पहा : **कडप**

**खडपडणे** अक्रि. तीव्र इच्छेने धडपड करणे : 'धेनु खडपडौनि मोहें उठी।' - राज्ञा ११. ४०. [सं. खट्]

**खडपडणे** अक्रि. खडखड असा आवाज करणे : 'गोरूं खडपडी बाहिरि।' - उगी ३८४.

**खडपा-पी** पु. १. मोठा खडक. २. खडकाचा सुटलेला कडा, भाग, सुळका; खडकाळ चढण; टेकाड; दरड : 'कितीही अवघड खडपे असले तरी त्यांवर तीं (बकरीं) सहज चढून जातात.' - मपु ३-११७

**खडफडीत** क्रिवि. चापून चोपून : 'मीं जगन्नाथाचेनि प्रसादें खडफडीत नेसैन :' - लीचउ २०५.

**खडबड** स्त्री. १. विशिष्ट आवाज (उंदीर गवतात-मडक्यात गेल्यावर करतो तो). २. खडखडीतपणा (जमीन वगैरेचा). गडबड या अर्थानेही हा शब्द क्वचित वापरला जातो. [ध्व.]

**खडबडखुंटा** पु. रिकाम्या भांड्यात पळी घातली असता होणारा खडखड असा आवाज, त्यावरून अत्यंत अभाव; रिक्तता (विहीर, फडताळ, कोठार यांची).

**खडबडणे** अक्रि. १. खडबड आवाज करणे. २. गांगरणे; गोंधळणे.

**खडबडाट** पु. खडबड असा मोठा आवाज; गोंधळ.

**खडबडीत** वि. अतिशय खरखरीत; खरबरीत; खाचखळगे असलेली; ओबडधोबड; बटबटीत; असमान.

**खडबडून** क्रिवि. दचकून; एकदम; गडबडून; खडबड आवाज ऐकून : 'ती खडबडून जागी होते आणि उठून बसते.' - मोर ८३२.

**खडबुडणे** अक्रि. १. भेदरणे; अतिशय गोंधळणे. २. खळबळणे; सळसळणे. [ध्व.]

**खडवण** न. १. खडकाळ, दगड गोटे असलेली जमीन. २. कडा; तुटलेला खडक; सुळकेदार चढण. (राजा.) ३. बारीक खडे.

**खडवा** पहा : **खोडवा**

**खडवा** पु. डोंगर; खडक : 'परिसाचा खडवाचि जोडला।' - ज्ञा ११. ५३९.

**खडविणे** उक्रि. औताला बैल जोडणे, जुंपणे.

**खडवे** न. डोंगरावरची, वळणांची नागमोडी वाट; घाटाचा टप्पा. पहा : **खडवा** (राजा.)

**खडवे** न. जोडवे. पहा : **खटवे**

**खडशिंग** न. खडशिंगीचे फळ.

**खडशिंग, खडशेरणी** स्त्री. सागवानाच्या जातीचा एक मोठा वृक्ष. ह्याचे लाकूड तांबूस रंगावर, बळकट व इमारतीच्या उपयोगी असते.

**खडशेंग** स्त्री. आबईची शेंग. (व.)

**खडस-सा** वि. खणखणीत; दणकट; धट्टाकट्टा (म्हातारा माणूस).

**खडस** पु. गाठोडे, गट्ठा : 'खडस सोडिले अपार : पाटोळे निवडिले पीतांबर।' - रुस्व २८०६.

**खडस, खडसपट्टी** स्त्री. खरडपट्टी; धमकावणी; खडकावणी; खरड (एखाद्याच्या गर्वाची, अहंकाराची, तोऱ्याची). (क्रि. काढणे.)

**खडसणी** स्त्री. १. तोडणे; छाटणे; काटाकाट करणे (वृक्ष). २. (ल.) तासडपट्टी; खरडपट्टी. (क्रि. काढणे.)

**खडसणे** उक्रि. १. फांद्या तोडणे. २. ओबडधोबड रीतीने कसे तरी तोडणे. ३. (ल.) कठोरपणे बोलणे; जोराने, खोचदार, ठसेलसे बोलणे; कानउघाडणी करणे; ताकीद देणे; खरड काढणे. ४. बजावून सांगणे. [क. कीडसु = कापणे] [सं. खद्]

**खडसपट्टी** स्त्री. डोंगराळ प्रदेश. (व.)

**खडसमुळी** पहा : **खडसंबळी १** : 'कुहिरि आवई खडसमुळी।' - अमृत ६२.

**खडसर** वि. खडकाळ.

**खडसं(सां)बळ-ळी** स्त्री. १. आबईची वेल; ब्राह्मीचा वेल. पहा : **कोयतेवाल, खरसांबळी, खडसमुळी.** (तंजा.) २. महाबळेश्वराच्या आसपास सापडणारी एक वनस्पती. हिच्या मुळ्या खातात.

**खडसा** पु. नांगराचा मुख्य भाग; नांगरखुंट; जेथे फाळ बसवतात तो भाग. (राजा.)

**खडसावणे** उक्रि. १. तासडपट्टी काढणे; कानउघाडणी करणे. २. ताकीद

देणे; बजावणे.

**खडस्तन** वि. मोठे; बडे; जाडे. (गो.)

**खडळ** पु. खडा : 'आणि घांसाआंतिल हरळु। फेडितां लागे वेळु। तें दूषण नव्हें खडळु। सांडावा कीं॥' - ज्ञा १३.३३६.

**खडंग** क्रिवि. खडखडीत वाळणे या अर्थाच्या क्रियापदांबरोबर (धान्य, कापड इत्यादीसंबंधी) योजतात. (क्रि. वाळणे, सुकणे.)

**खडंगूळ** वि. खडतर; त्रासदायक; कठीण.

**खडंजा** पु. उभ्या विटांचा थर.

**खडा** वि. १. ताठ; उभा; सरळ वर गेलेला. २. कायमचा; सततचा. ३. पोटी तपशिलाच्या रकमा न लावता लिहिलेला, पुरा न केलेला (हिशेब). ४. अनिश्चित ठेवलेला; पडून राहिलेला; जो स्वीकारला नाही किंवा परतही केला नाही असा (चेक वगैरे). [हिं.]

**खडा** पु. १. लहान दगड; गोटी; गोटा; धोंड्याचा बारीक तुकडा; दगडाचा लहान खंड. २. कळी (चुन्याची); तुकडा (गोंद, हिंग, कात, खडीसाखर इत्यादीचा); अलंकारातील, अंगठीतील मणी, रत्न : 'एकेक खडा निवडक हातीं लागला.' - विवि १०.५७.१२७. ३. मळाचा लहान पण कठीण गोळा; (सामा.) गड्डा; गोळा; पिंड. ४. गुळाची लहान ढेप. [सं. खंड] (वा.) ० **उडणे** - १. (गुडगुडी ओढताना तिच्यातील खडा वर उडतो त्यावरून) सर्वस्वी संपणे; खर्च होणे (द्रव्य, वस्तू). २. आजाराने बेजार होणे; काम करून थकून जाणे. ० **टाकून ठाव घेणे,** ० **टाकून पाहणे** - (पाण्याची खोली ठोकळमानाने खडा टाकून पाहतात यावरून) अंदाज घेणे; सहजपणे एखादा शब्द टाकून कामाची माहिती काढणे; आपले काम होईल की नाही याचा अजमास पाहणे. **खडा न खडा माहिती असणे** - एखाद्या कामातील बारीकसारीक सर्व गोष्टी माहीत असणे. ० **होणे** - खड्यासारखे घट्ट परसाकडे होणे. ० पहारा देणे - सतर्कपणे, सावधपणे लक्ष देणे, (विशेषत: सुरक्षिततेसाठी.)० **फुटणे** - खडक फुटून पाण्याचा ओघ सपाटून बाहेर येणे. **खडे खाणे** - खस्ता खाणे; कष्ट करणे; त्रास सहन करणे (दगदगीच्या कामात.) **खडे खावविणे, चारणे** - पराभव करणे; त्रास देणे; सतावणे; बेजार करणे. **खडे घासणे, फोडणे** - १. एखाद्याची निंदा करणे; तक्रार करणे. २. (नावाशिवाय) खूप कष्ट करणे; दगदग करणे. **खडे मोजणे** - खडे मांडून हिशोब करणे (कागदावर लिहिता येत नसल्यामुळे). **खड्याखड्यांनी डोके फुटणे** - अनेक बारीकसारीक गोष्टींमुळे दिवाळखोर बनणे, भिकेला लागणे (एकाच गोष्टीमुळे नव्हे.) **खड्यासारखा निवडणे, बाजूला करणे, टाकणे, सारणे** - १. एखाद्याला कुचकामाचा म्हणून बाजूला सारणे, करणे; निरुपयोगी ठरविणे. २. चटकन वेगळा काढणे, ओळखणे : 'राहतां राहतां सुशिक्षितांचा वर्ग राहिला व त्यांस मोर्ले यांनीं शत्रू म्हणून खड्यासारखें निवडून काढलें आहे.' - टिव्या ५.

**खडा** पु. छत्रीच्या सांगाड्याची काडीवजा कांब. [सं. खंड]

**खडा** पु. १. मळईची (जाळ्याची) बांबूची काडी. (कातोडी) २. लेपाटी (पाखरे मारण्याचे साधन) यातील टोकदार बांबूची काठी.

**खडाइणे** अक्रि. लग्न करून प्रपंच चालविणे : 'एणे कोळिणी घरवात खडाइली तरि काइ।' - लीचउ १.

**खडाखड** क्रिवि. १. खडखड; फटफट; तडतड इ. आवाज करून. २. न अडखळता; फाडकन; फाडफाड (वाचन, भाषण.). [ध्व.]

**खडाखड-डी** क्रिवि. १. जागच्याजागी; तत्क्षणी; उभ्याउभ्या. २. ताबडतोब; झटकन; तडकाफडकीने (येणे, देणे, खर्चणे, उत्तर देणे) : 'ऐक्य जालें खडाखडी।' - दावि १११.

**खडागुंडा** पु. रत्न; हिरकणी.

**खडा घाट** १. उभी चढण; छातीवर येणारा, उभट घाट (डोंगराचा रस्ता). २. अपुरा ओबडधोबड घाट (भांड्याचा आकार), डौल, ठेवण.

**खडाचट-ढ** पु. पोटात विष्ठेचा खडा बनून होणारे दु:ख : 'खडाचढाचेनि श्रमे। या नाव आध्यात्मिक।' - दास ३.६.२९.

**खडाचौफेर** पु. घोड्याची एक चाल.

**खडाजंगी, खडेजंगी** स्त्री. जोराचे, कडाक्याचे भांडण; बोलाचाली. (वा.) ० **मचणे, उडणे** - भांडण जुंपणे. (व.)[फा. खानह् - जंगी]

**खडाटी** वि. खडकाळ; दगडाळ (जमीन, शेत). (गो.)

**खडाड** पहा : **खडखडाट, खडाखड**

**खडाडणे** अक्रि. १. मोठा गंभीर आवाज करणे; खडखडणे; गडगडणे; करकरणे; खरखरणे. २. (वानरांनी) केलेले आवाज. [ध्व. खडाड]

**खडाड(डि)ता** स्त्री. खळबळ; गडबड; क्षोभ : 'एऱ्हवीं आयुष्याचें सूत्र बिघडतां। भूतांची उमटे खडाडता।' - ज्ञा ७. १८२. [ध्व.]

**खडाडा** पु. वि. रिकामा, व्यर्थ : 'काळु जातु असे खडाडा : कळीविन' - शिव १२१.

**खडाडिणे** क्रि. आवेशाने युद्ध करणे.

**खडाण** वि. १. हुशार; चलाख; खमक्या. २. नाठाळ; त्रासदायक; लाथाळ (जनावर.) पहा : **खडण** : 'खडाणे आला पान्हा।' - ज्ञा. १३.२०५. [सं. कठिन, खट्टन]

**खडाणा** वि. लाथा मारणारी (गाय).

**खडाना** वि. खोडकर.

**खडाप** पु. खडक. पहा : **खडपा** (कु.)

**खडापानी** न. चारापाणी : 'इकडे नेओं तरि गुरवा खडापाणीया मिळती' - लीचपू ४५९.

**खडा मसाला** आख्खा मसाला : 'न वाटतां फडक्यात बांधून.... जसाच्या तसा जो टाकतात त्याला खडा मसाला म्हणतात.' - गृशि २.५२.

**खडाल** क्रिवि. फडाफड; भडाभड; स्पष्ट. (व.)

**खडावण** न. पहा : **खडवण**

**खडावा** स्त्री.अव. खडाव; खडाय; लाकडाच्या पादुका. लाकडी तळावर कापडी किंवा कातड्याची पट्टी ठोकून केलेले पायताण. साधारणत: संन्यासी, स्वामी इ. खडावा वापरतात. [सं. काष्ठ + वह] (वा.) ० **पायाला असणे** - तळपाय चापट नसून चवडा व टाच यांच्यामधील भाग जमिनीला टेकत नाही असा पोकळ असणे. हे शुभचिन्ह मानतात.

**खडाष्टक** न. १. अतिशय द्वेष; हाडवैर. (क्रि. बाळगणे, धरणे.) २. (ज्यो.)

षडाष्टक; वधुवरांपैकी एकाच्या राशीपासून दुसऱ्याची रास सहावी व दुसऱ्याच्या राशीपासून पहिल्याची रास आठवी आली म्हणजे त्या दोघांत खडाष्टक येते. यावरून वैर हा अर्थ. [सं. षडाष्टक]

**खडाळ** वि. दगडाळ. पहा : **खडाटी**

**खडाळी** स्त्री. खार; चानी; खडी; खडोळी (ना.).

**खडांगा** स्त्री. भिंतीतील उभी वीट. भिंत रचताना बहुतेक विटा आडव्या रचतात, पण मध्येच एक थर उभ्या विटांचा देतात. त्यांतील वीट.

**खडिया** पु. उसाची एक जात. हा टणक असतो.

**खडिया** पु. एक प्रकारचे विष : 'च्याऱ्ही विखें मिळवीली असति : बचनाग : काळकूट : मेणा : खडिया : तथा : रगतसिंगी :' - लीच २.२६.

**खडिल** न. गढूळ पाणी.

**खडी** स्त्री. एक प्रकारचा खेळ : 'विटी दांडू चेंडू लगोऱ्या वाघोडी चंपे पेंड खडी एकीबेकी।' - तुगा २.३०८१.

**खडी** पहा : **खडीसाखर**

**खडी** स्त्री. १. लिहिण्याच्या धूळपाटीवर घासण्यासाठी अथवा भिंतीला रंग देण्यासाठी अथवा भिंतीसाठी लागणारी माती; चिकणमाती, पांढरट दगड; खडीचा दगड; खडूची माती. २. कापडावर नक्षी काढण्यासाठी केलेले मिश्रण (गोंद, अभ्रक); एक चिकट रंग. ३. या मिश्रणाने काढलेली नक्षी, आकृती. खणांवर, चंद्रकळांवर खडी काढून घेतात. (क्रि. काढणे.) [सं. ख(खा)टिका.]

**खडी, खडीखपार, खडीखाप** स्त्री. खार; चानी. (खा.) [सं. खण्ड]

**खडी** स्त्री. माणसाचे दुखणे पिशाच्चबाधेपासून आहे किंवा काय हे ठरवण्यासाठी करायचा विधी. देवभक्त, पिशाच्च पाहण्यासाठी गहू, तांदूळ, यांचे एकीबेकी करून पाहतात, ती समसंख्या आल्यास बाधा आहे व विषम आल्यास नाही असे समजतात. (वा.) **खडीखापरी लागणे** - १. आजारामुळे अंग सरबरीत होणे. २. (ल.) संपुष्टात येणे; नष्ट होणे.

**खडी** स्त्री. १. लहान दगड; सडकेवर घालण्याची गिट्टी. रस्त्यावर घालण्यासाठी मोठे दगड बारीक फोडून केलेली खडी. २. लाकडी तुळईखाली बसवलेला दगड. (कु.) (वा.) ० **फोडणे** - १. दगड किंवा खडक फोडून खडी करणे (शिक्षेचा एक प्रकार). २. (ल.) तुरुंगात जाणे : 'आज बोलणारा बांका व्यंकू होता म्हणून निभलं. नाहीतर आल्ती खडी फोडायची पाळी.' - पडघ १२६. [सं. खाटिका]

**खडी** स्त्री. १. उंचवटा; टेकडी. २. खालाटी; सह्याद्रीच्या पश्चिम बाजूची पायथ्याची डोंगराळ जमीन; घाटाखालील डोंगरवट जमीन.

**खडी** वि. पहा : **खडा**. १. उभा-भी-भे. २. खरा-री- खरे. ३. स्पष्ट; सडेतोड.

**खडी किंमत** स्थिर, ठोक किंमत.

**खडीकुस्ती** स्त्री. गुडघे न टेकता पुरी होणारी कुस्ती; उभ्याउभ्यानेच खेळलेली कुस्ती.

**खडीखट** वि. स्पष्ट; सडेतोड. (माण.)

**खडीखडी** वि. पोलादाचा एक प्रकार.

**खडीखाप** वि. (लपंडावातील एक संज्ञा, त्यावरून) फरारी; लपलेला (नोकर, बायको, चोर).

**खडी गंमत** दंडारीचा एक प्रकार.

**खडीचा दगड** अभ्रकाच्या जातीचा मऊ खडक. याचे पेले, बशा, नक्षीकाम, मूर्ती वगैरे करतात. पहा : **खडी**

**खडीचोट** क्रिवि. त्याच जागी; त्याच क्षणी; खडाखडी.

**खडीण** पहा : **खडण** [सं. खड्ग.]

**खडी तहसील** कर्ज देण्याबद्दल सक्त तगादा : 'कोल्हापुरांतील सावकारापासून खडी तहसील लाविलें आहे.' - ऐलेसं ३२४२.

**खडी तालीम** सन्माननीय पाहुण्यांचे उभे राहून स्वागत करणे : 'गुरुजीस पाहून व त्यास खडी तालीम दिल्यानंतर....' - परिभौ ४७.

**खडी फौज** सतत तयार - नोकरीत असलेली फौज; युद्धासाठी केव्हाही तयार असलेली फौज.

**खडी रेघ** मोडी लेखनातील एक प्रकार. पहा : **खडे**

**खडीवाची पासौडी (बैसो घालणे)** प्रेमयुक्त भाषण (करणे) : 'तो खडीवाची पासोडी बैसों घाली:' - दृपा ३०.

**खडीसाखर** स्त्री. खड्यांच्या आकारात असलेली साखर; मिश्री; साखरेचे स्फटिकासारखे खडे. हिचे दोन प्रकार आहेत - पत्री व साधी.[सं. खंड]

**खडी हुंडी** न वटवलेली, न स्वीकारलेली हुंडी. (वा.) ० **राखणे** - हुंडीचा स्वीकार न करता किंवा खोटी न म्हणता ती वेगळी राखणे.

**खडुकर्म** न. षट्कर्म : 'परि माझे खडुकर्म (षट्कर्म) राहात असे :' - लीच ४.३७.

**खडुपाणी** गढूळ पाणी. पहा : **खडू** : 'तोडिजे खडु पाणी। ते पारकेयां॥' - राज्ञा १६.८८.

**खडुले** पहा : **खडुळ**

**खडुवा, खडवा** पु. पर्वत; खडक : 'परिसाचा खडंवाचि जोडला।' - ज्ञा ११.५३९.

**खडु(ड्र)ळ** न. गढूळ पाणी : 'सरिता घेऊन येती खडुळें।' - ज्ञा ११.५५७. वि. १. गढूळ; डहूळ : 'नंदनवनींचें खडुळ। मानससरोवरींचें महूंचळ।'- शिव ६४४. २. आरक्त; लाल (डोळा).

**खडुळणे** उक्रि. १. गढूळ होणे. २. गढूळ करणे; लाल करणे (डोळे). ३. अंगावर येणे; बेफाम होणे; खवळणे. (गो.)

**खडू** स्त्री. १. एक प्रकारची चिकण माती; शाडू; पांढरी माती. २. फळ्यावर लिहिण्याची पांढरी कांडी. पहा : **खडी** [सं. खटी] पु. एक प्रकारचा खनिज दगड; चुना व कॅर्बानिक ॲसिडवायू यांच्या कृत्रिम रासायनिक संयोगाने खडू बनतो. तसेच पृथ्वीवरील चुनखडीचा हवेतील कॅर्बानिक ॲसिडवायूशी संयोग होऊन त्यापासून खडू होतो. वि. गढूळ. पहा : **खडूळ** : 'तोडिजे खडुपाणी। ते पारकेयां॥' - राज्ञा १६.८८. [सं. खटी]

**खडू** स्त्री. आजूबाजूचा भाग तासून काढल्यामुळे राहिलेला लाकडाचा अथवा दगडाचा पुढे आलेला भाग (जोखड, दाराच्या झडपा, पुतळा,

नक्षीकाम इ. तील उठावदार भाग.).
वि. दाढी, मिशा, कल्ले नसलेला; खाडू.
**खडूली** स्त्री. अंगण. (गो.)
**खडूस** वि. माणूसघाणा; तुसडा; वाकडे वागणारा : 'खडूस... खिडकीमध्ये उभी राहते.' - वासू १९.
**खडूळ** वि. गढूळ : 'खडूळ पान्यामंदी मगरमाशाचा बंगला।' - राके ५८२.
**खडे** स्त्री. (हिशेब) बंदावरील पहिला डाव्या हाताकडील एक रकाना सोडून पुढील उजव्या हाताकडील तीन रकानेभर ओढलेली रेघ.
**खडे** क्रिवि. कोठे. (कु.)
**खडेकंकर** पु.अव. रत्न, हिरे वगैरेंना व्यापक, मोघम संज्ञा.
**खडेखडे** क्रिवि. उभ्या उभ्या; हातासरशी. (ना.) त्वरित; लगेच.[हिं.]
**खडेखुपटे** पु.अव.दगड आणि खडे : 'आंतुल खडे खुपटे आहाच देखे.' - लीचपू ५४१.
**खडे घाट** १. नदीवरील कपडे वगैरे धुण्याचा व ते धुणे वाळविण्याचा घाट; धोबीघाट. २. (ल.) अतिशय स्वच्छता; धुतलेल्या कापडाप्रमाणे स्वच्छता. वि. (खड्या घाटाचा) अतिशय निर्मळ, स्वच्छ; तेजस्वी; चकचकीत.
**खडेढोस** पु. रत्नांचा गुच्छ.
**खडे दम** उभ्या उभ्याच : 'तुम्हीं कूच करून चला. खडेदम लुटून घेतो.' - होकै ८९.
**खडे दोनप्रहर** ऐन दुपार; मध्यान्ह.
**खडेबंद** पु. रोजखर्डा; कच्चाखर्डा; कच्चा जमाखर्च.
**खडे रान** ओसाड, खडकाळ प्रदेश.
**खडोखड** क्रिवि. स्पष्टपणे; साफ.
**खडोखडी** क्रिवि. तडकाफडकी.
**खडोळी** स्त्री. खार; चानी; खडाळी (व.)
**खड्ग** न. तरवार. [सं.]
**खड्गपात्र** न. सोन्याचा मुलामा दिलेली चांदीची, पितळेची अथवा तांब्याची बांगडी - कंकण. [सं.]
**खड्गपात्र** न. गेंड्याच्या हाडापासून, शिंगापासून केलेले भांडे. [सं.]
**खड्गमृग** पु. गेंडा : 'खड्गमृगें कस्तुरमृगें। गोळागुळें अनेकरंगें।' - मुआदि ११५.६०.
**खड्गलता** स्त्री. तरवार : 'आत्मज्ञानाचिया खड्गलता। छेदुनियां भवाश्वत्था।' - ज्ञा १५.२६६. [सं.]
**खड्गहस्त** वि. १. ज्याच्या हातात तलवार आहे असा. २. (ल.) रक्षणकर्ता : 'महाराष्ट्र हा भारताचा खड्गहस्त आहे.' - सावरकर साहित्य. [सं.]
**खड्गांगशाई** वि. खट्वांगशाई; बाजेवर निजलेले : 'रथाजी पाटील यांस दुखणें.... अद्यापि खड्गांगशाईच आहेत.' - मर्शियांका ४०२.
**खड्गूळ** वि. खोडकर. (व.)
**खड्गोदक** न. सहा प्रकारचे रस; षड्रस : 'गांठिवना मालती मृणाळें। असोख बावनें बकुळें। खड्गोदक मकरंद जळें। देतां मुखीं पोळत॥' - नरुस्व ५४१. [सं. षट् + उदक]
**खड्डा** पु. खळगा; खाच; गर्ता; खणलेली खोल जागा. [सं. कर्त, गर्त]
**खड्डा** पु. पुठ्ठा; पुष्टिपत्र; कार्डबोर्ड. (ना.)
**खड्डी** स्त्री. पांढरी मिरी. (गो.)
**खड्डी** स्त्री. डोके; मानगूट. (गो.)
**खड्ड(ड्ड)ल, खड्डस** वि. टकल्या. (गो.)
**खड्पसुख** न. त्रास; दगदग. (गो.)
वि. त्रासिक; श्रमी.
**खड्या** पु. झाळण्याचे, डाग देण्याचे एक हत्यार.
**खड्या** पु. समुद्रातील एक मोठा तांबडा मासा.
**खड्या** पहा : **खडिया** : 'विहिरीवर लोक खड्या ऊस (वारे ऊस) करीत.' - माआ २९.
**खड्याखार** पु. टाकणखार; टाकणखाराचा एक प्रकार.
**खड्यानाग** पु. १. बचनागासारखी एक विषारी वनस्पती. २. नागाची एक जात. याच्या अंगावर वर्तुळे असतात.
**खड्या वाघ** चित्ता. याच्या अंगावर ठिपके असतात.
**खड्ली** वि. पांढऱ्या अंगावर काळे ठिपके असलेली मेंढी. (माण.)
**खण** पु. १. खणाळ्यातील एका चोळीपुरता तुकडा. हा दीड हात लांबीचा असतो. २. खोलीचा, जागेचा एक भाग; दोन खांबांमधील अथवा दोन तुळ्यांमधील अंतर. ३. चष्मा; पडवी; सोपा. ४. होडीतील दोन आडव्या बसण्याच्या फळ्यांमधील जागा. ५. पेटीतील, कपाटातील, टेबलातील एक भाग, कप्पा. ६. इमारतीचा, घराचा मजला. पहा : **खणोखाण**. ७. (नाविक) माल ठेवण्याची जागा. ८. कोठार; तळघर : 'मस्त हुडे दुर्गाचे खण।' - ऐपो ९. ९. (छापखाना) खिळे ठेवण्याच्या चौकटीतील कप्पा. १०. 'माडीवर माडी बांधिल्यां त्या त्या माडीच्या भोईस खण मणावें.' - (तंजा.)[सं. खंड, क. अंकण]
**खण** पु. स्थान; भूमी : 'जेथ निरंतरासि खण।' - ऋ ४२.
**खण** पु. एखादा खाद्यपदार्थ न खाण्याचा नियम (पोळीचा, खिरीचा, भाताचा खण); एखाद्या देवतेप्रीत्यर्थ धरलेला निर्बंध. [सं. खंड]
**खण** पु. खाण. (राजा.) [सं. खनि]
**खण** पु. मकर संक्रांतीला कुंकू लावून वाटायची पाच सुगडी.
**खण** पु. क्षण. [सं. क्षण]
**खण** पु. भांडी, तरवारी इ. एकमेकांवर आपटून होणारा आवाज. [ध्व.]
**खणकत** स्त्री. कुळकट; कुळकथा; स्वतःच्या घरच्या अथवा पूर्वजांसंबंधी गोष्टी; कथा. (राजा.)
**खणकपाट** न. (ग्रंथ.) तालिकापत्रे ठेवण्याचे, अनेक कप्पे असलेले कपाट.
**खणकरी** पु. खणण्याचे काम करणारा : 'तंव विदुरें धाडिला खणकरी।' - कथा ५.१२.४.
**खणका** पु. १. खणदिशी होणारा आवाज; खडाजंगी; भांडण; गोंधळ; आरडाओरड; गलबला (पुढील प्रकारचा) - तोफेची सरबत्ती, मेघगर्जना, हत्यारांचा खणखणाट, रागाचा झपाटा, रागाने पाय आपटणे, खडसावणे. २. पहा : **कणका, कनका** [ध्व.]
**खणकादणका** पु. खडाजंगीचे भांडण.

**खणकाविणे** उक्रि. जोराने बोलणे; दरडावणे; रागाने बोलणे; शिव्या हासडणे; धमकावणे.

**खणकी** स्त्री. हलक्या दर्जाचे कापड. पहा : **खंडकी**

**खणकुदळ** स्त्री. १. अतिशय टोचणी, तगादा, जाचणी; जोराचा आग्रह; पाठीस लागणे; जाच करणे (क्रि. घेणे.) २. निश्चयाचा, निर्धाराचा बेत; निग्रह; हट्ट; जबरदस्त व्यासंग (एखादा विषय साध्य करण्याचा, कोडे सोडवण्याचा) (क्रि. घेणे.)

**खणके** न. खणखणाट; खडाजंगी (शस्त्रांची). पहा : **खणका** : 'झालें मोठेचि त्या रणीं खणकें ' - मोकर्ण ३१.५१. [ध्व.]

**खणक्या** वि. १. खमक्या; कणक्या; खणखणीत; रोखठोक्या; दांडगा. २. झपाट्याचा; आवेशी; उत्साही.

**खणखण-णा** क्रिवि. घणघणा; दणदणा; खणखण आवाजाने; घंटा, चर्मवाद्य इत्यादिकांचा आवाज करून : 'खण खण खण खण वाजे ढोल रे।' - दावि ४३१; [सं. खणखणाय / ध्व.]

**खणखणणे** अक्रि. खणखण शब्द होईल असे वाजणे, आवाज होणे; दणदणाट होणे.

**खणखणाट** पु. मोठा, खणखण आवाज; दणदणाट, घणघणाट अशासारखा मोठा ध्वनी : 'आकाशीं खणखणाट होत असंभाव्य।' - कथा १.१३.१३१. [ध्व.]

**खणखणीत** वि. १. मोठी गर्जना करणारे (आवाज, घंटा); खणखण वाजणारे. २. निरोगी; धडधाकट (म्हातारा). ३. स्पष्टवक्ता; उघडउघड; प्रामाणिक (भाषण, व्यवहार). ४. खडखडीत वाळलेला (धुतलेला कपडा); कडकड वाजणारे; सळसळणारे (कोरे कापड). [ध्व.]

**खणखापडी** पहा : **खणपट**

**खणणे** उक्रि. १. खोदणे; उकरणे. २. गंजणे; खाणे; जळणे (धातू वगैरे); चरणे; आतून चावणे; झोंबणे (गळू वगैरे). ३. (ल.) (भांडण) उकरून काढणे; ओघास आणणे; तोडून काढणे (मतप्रदर्शन, शाबासकी वगैरे). ४. पोखरणे (पाण्याने भिंतीचा पाया). ५. उकळणे; जुलमाने काढणे; खणून काढणे (पैसा, गुह्य). ६. जोरजोराने काढणे (ओकाऱ्या, खोकला वगैरे). (वा.) **खणून काढणे** - १. (ओकारी, रडे इ. येईल असे) जबरदस्तीने करणे. २. खोलवर चौकशी करून माहिती काढणे. ३. नेस्तनाबूत करणे; समूळ नष्ट करणे. [सं. खन्]

**खणणे** उक्रि. दूर करणे; नष्ट करणे : 'गर्भदुःखाचे खणोनि खत। मरणाचा घात मी करीन।' - एभा २३.४५९. [सं. खन]

**खणणे** सक्रि. त्रास देणे. [सं. क्षण, खन् ]

**खणती** स्त्री. १. खणण्याची क्रिया; खोदणे; उकरणे (क्रि. लावणे, करणे.) २. ठुसठुसणे; झोंबणे; जळजळणे; कुरतडणे; आग होणे (जखम वगैरेची). ३. (ल.) टोचणी; जाचणी; ससेमिरा; सततचे टुमणे लावणे; मागे लागणे (क्रि. घेणे.) ४. जोराचा, निश्चयाचा दृढ व्यासंग, हव्यास (अभ्यासाचा). ५. शोषण; ओढ (क्रि. लावणे.)

**खणते, खणतोड** न. कुदळ, हत्यार, पहार वगैरे जमीन खोदण्याचे, जमिनीत भोक पाडण्याचे साधन. [सं. खनित्र]

**खण(न)पट** स्त्री. निग्रहाने, निश्चयाने पिच्छा पुरवणे; आग्रह; हट्ट; निग्रह. (रूकार मिळण्यासाठी, लहान मुलांचा) हट्ट, रुसवा, एखाद्या गोष्टीचा, अभ्यासाचा पिच्छा. [सं. क्षणपट] (वा.) **खणपटीस लागणे, बसणे, येणे** - पिच्छा पुरविणे; शेवटास नेणे.

**खणपट** न. तरवारीस, किरकोळ दागिन्यास वगैरे निंदाव्यंजक शब्द.

**खणपडे** न. ओल्या जमिनीतील ढेकळे काढण्याचा लाकडी औत. [सं. खन् + पत्र]

**खणपी** वि. खणणारा. (गो.)

**खणपूट-स** न. १. टोक; झिलपी; सल; धस; ज्याने फाटले जाईल असा पुढे आलेला भाग. (क्रि. भरणे, जाणे, शिरणे, लागणे.) २. झाडाचा खुंट; ओंडका; यावरून मूठ (तरवार, चाकू, भाला, झाडू वगैरेची); चौरंगाच्या पायाचा खुंट. ३. (सामा.) एखाद्या जिन्नसाचा अवशेष.

**खणमाती** स्त्री. खणून काढलेली माती.

**खणाखण-णा** क्रिवि. खणखण आवाज करून, होऊन. पहा : **खणखण**

**खणाखणी-जंगी** स्त्री. खडाजंगी कज्जा; हातघाईची लढाई; जोराचे भांडण; तंटा : 'मोठी होती खणाखणी।' - ऐपो ८५. [ध्व.]

**खणाण** पु. खणखणाट; विशिष्ट आवाज. [ध्व.]

**खणाणणे** अक्रि. खणखण असा आवाज होणे, करणे; खणखणणे.

**खणाणता** वि. मोठ्या आवाजातला; जोरदार : 'खणाणत्या शब्दांचा उपयोगही मी नाण्याइतकाच बेताने, हात राखून करतो, हे तुला ठाऊक आहे.' - काआ ९.

**खणाणा** क्रिवि. खणखण आवाज करून; खणदिशी खोचून : 'लागतां हृदयिं बाण खणाणा।' - आता १६.

**खणाळे, खणेरे** न. बायकांच्या चोळ्यांच्या खणाचा एक तागा; तीनचार खण होतील एवढा कापडाचा तुकडा.

**खणिया** स्त्री. पटांगण : 'तेथ खणियांची सोवानी। कांई सांघो।' - शिव ६४६.

**खणीक** वि. हट्टी; खोड्याळ : 'मोठा, खणीक दधिवटा प्राशीत घटघटा।' - अमृत ४६.

**खणील** स्त्री. आवण काढणी; उपटणें (भाताचे रोप दुसरीकडे लावण्यासाठी); खणती.

**खणुवाल-ळ-ळा** वि. १. खरबरीत; खण असलेला; खडखडीत : 'अप्रवृत्तींचे खणुवाळे। कोंभ निघती सरळे।' - ज्ञा १५.१६५. २. कठीण; निष्ठुर : 'तैसा कर्मएेल शेवटु। खणुवाळा होय॥' - ज्ञा १८.१८६.

**खणू** पु. शत्रू; विरोधक : 'आटकेपासून रामेश्वरपर्यंत येकछत्री राज्य जाहालें. हिंदुस्थानात एक नजीबखान मात्र खणू राहिला आहे.' - भाव ४०.

**खणोखणी** क्रिवि. जागोजाग : 'जैसी रत्नें खणोखणीं। वस्त्रांसि रायाचेना।' - क्रिपु २.४९.

**खणोखण** खण किंवा मजला असलेली : 'खणोखणींचीं मंदिरें उभविलीं रायें।' - खिपु १.८.२०.

**खत** न. गंज : 'हे आवघी खतेनि खादली असे.' - दृपा १८.

**खत** न. पत्र ; हस्तलिखित लेख; दस्तऐवज; कर्जरोखा; कर्जखत; गहाणखत. खरेदी विक्री कागद. पहा : **फरोक्तखत** [फा.] (वा.) ० **फाडणे** - संबंध तोडणे : 'जन्ममरणाचे उठवी धरणें। खत फाडणें विषयांचे।' - एभा ११. १४९२.

**खत** न. १. काढलेली रेघ; लेखणीचा फटकारा. २. (सुतार धंदा) लाकडावर आखण्याकरिता केलेली आखणी. [सं. क्षत]

**खत** पहा : **खंत** [सं. खिद्]

**खत** स्त्री. खोड (चांगल्या अर्थाने); सवय : 'मला लागली खत आईच्या तोंडणी।' - तीसा १०८.

**खत** न. व्रण; डाग; जखम : 'यांतुनि एकेंचि इतर होता तत्काळ बा परासु खतें।' - मोशांति ७. २८. [सं. क्षत]

**खत** न. उत्तम पीक यावे म्हणून शेतात घालावयाचे केरकचरा - शेण वगैरेचे कुजलेले मिश्रण; राब. खताचे सेंद्रिय व रासायनिक असे दोन प्रकार आहेत.[सं. खत] (वा.) **खतपाणी घालणे** - पोसणे; उत्तेजन देणे; जोराने फोफावेल असे करणे : 'मुस्लिमांच्या जात्यंधतेला ते खतपाणीच घालत राहिले.' - इशा २१४.

**खत** पु. डोळ्यावर लेप देण्यासाठी तव्यावर लोखंडी बत्त्याने खलून अनेक औषधांचे तयार केलेले मिश्रण. पहा : **खत्ता**

**खत** न. न्हावी काढतो ते दाढीचे केस. [फा. खत्त = दाढी, मिशा]

**खतकिताबत** स्त्री. पत्र, पत्रव्यवहार : 'खतकिताबतीनें खबर्गिरी करावयासही याद होत नाहीं.' - मइसा ३.९०.

**खतखत** पु. १. पदार्थ चुलीवर शिजताना होणारा आवाज. २. (ल.) (बोलण्याची, मारामारीची वगैरे) उत्पन्न झालेली उबळ, चेव : 'खतखत मनिं होती।' - अहमु ४८. ३. डाचत राहणारी गोष्ट.

**खतखता** क्रिवि. खदखद आवाज करून; आवाजाने. [ध्व. खद्खद]

**खतखतणे** अक्रि. १. शिजताना, उकळताना वगैरे खदखद असा आवाज होणे, करणे (चुन्यात पाणी टाकले असता, पाणी उकळत असता.) २. उकडणे; तलखी होणे. ३. उत्कंठित होणे; अधीर बनणे.

**खतखतूत** न. अव. कागदपत्रे. [फा. खुतूत]

**खतखते, खतखतले** न. दोनचार भाज्यांची एकत्र केलेली पातळ भाजी; सर्व प्रकारच्या भाज्यांची मिसळ. (कु.गो.)

**खतखते, खताखता भात** न. पु. आले, मिरची, लसूण लावून ताकात पुन्हा शिजवलेला शिळा भात. (कु.)

**खतखशी** स्त्री. रेघ; आकृती.

**खतखूत** न. खतपत्रे. पहा : **खतखतूत** : 'विश्वासू ठेवो घेऊनि जात। खतखतूत हारपलें।' - एभा २३.१२८.

**खतखोडी** स्त्री. उणीव; दोष; व्यंगे; न्यून : 'राहावयास गेलें कीं जागेतील खतखोडी कळून येतात.' - ज्योत्स्ना, सप्टें. १९३७.

**खतगिरी** स्त्री. खते करणे; उत्तम मसुदे तयार करणे : 'भवानी नागनाथही पोक्त मनुष्य आहेत. खतगिरी व प्रसंगोपात्त बोलण्यास योग्य आहेत.' - नाग १.२६५.

**खतणे** अक्रि. १. खत मिसळलेला होणे : '(शेळ्यांच्या) लेंड्यांच्या वासानं पाणी खतलेलं...' - खळाळ ८६. २. मलिन होणे; खराब होणे; साचणे : 'जो नुच्चारी हरि नामासी। पाप त्यापाशीं खतेलें।' - एभा ५८९. ३. रोगी होणे; निस्तेज होणे; मलिन होणे : 'कीं आंधारें खतेले अंबर।' - ज्ञा १६.२७. [सं. क्षत]

**खतबुटी** वि. कापडाचा एक प्रकार : 'सेनाबहाद्दर व सेनासाहेबसुभा यास सेले पागोटे वाळापुरी, गुलाबी, खतबुटी, ब्रह्मणपुरीसारखे ऐसे दिल्हे.' - नाग २.१७५.

**खतबेजा** स्त्री. वचनचिठ्ठी; परमेश्वरी; प्रॉमिसरी नोट : 'त्यापैकीं तुम्ही आपणांस खत-बेजा दोनशें दिधले, बाकी सेंभर होन उरले.' - मइसा १५.५७. [फा. खत् + वजा - ऐवजी]

**खतम** वि. समाप्त; पूर्ण; खलास : 'लढाई खतम झाली.' - होकै ८४. (क्रि. होणे, करणे.) [फा. खत्म]

**खतमुताचा** वि. खत घातलेले (शेत वगैरे).

**खतमूत** न. राब. (वा.) ० **एक असणे** - एकाच कुलातील, वंशातील असणे (जनावर वगैरे). ०**ओळखणे** - दुधावरून गाय-म्हैस ओळखणे.

**खतरा** पु. १. भय; धोका; संकट. २. शंका; संशय; घोटाळा. [फा.]

**खतरी** स्त्री. पहा : **खत्री** [सं. क्षत्रिय]

**खतरूड** वि. हीन वृत्तीचा.

**खतवड-डी** न. स्त्री. पाथरवटाचा लघुकोनी गुण्या.

**खतवड, खताड** न. १. उकिरडा. २. गू; मल.

वि. १. मलमूत्राची, उकिरड्याची (जागा). २. खतमूत घातलेले (शेत.)

**खतव(वि)णे** सक्रि. जमीन खत घालून तयार करणे : 'पाय दुखस्तवर चरत हिंडायचं नि माळ खतवायचा.' - गोता ११७.

**खता** स्त्री. १. संकटाची धास्ती, चिंता. २. तोटा; नुकसान. ३. दोष; अपराध; उल्लंघन : 'वतन्दार खरा, कोणे गोष्टीस खता नाहीं.' - मइसा ८.४४. ४. संशय; किल्मिष; किंतू; मळ : 'मग निःशेष खता फिटे। मानसींचा।' - ज्ञा ४.२०७. [फा. खता = चूक, दोष]

**खता** पु. लेप. पहा : **खत्ता**

**खता** पु. डाग; दोष : 'लागे माहा पातकाचा खता। करिन ऐसें।' - क्रिपु ४.६४.

**खताईण** स्त्री. मोलकरीण. (छत्तीसगड)

**खताखानत** स्त्री. लबाडी : 'कांहीं खताखानत जाली नाहीं, खामगांवकर खरे जाले.' - मइसा ६.१११. [फा. खता + खियानत]

**खताख्यानत** स्त्री. भावी गोष्टीची जबाबदारी : 'नेमाप्रमाणें वादी पार पडल्यास गांवचा विभाग आम्ही देऊं. खताख्यानत जातीकडे दुसरियाकडे जाबसाल नाहीं.' - आठइति १४७.[फा. खता = चूक, अपराध, दोष, गुन्हा. खियानत = विश्वासघात; अफरातफर]

**खताख्यानती** स्त्री. आवाडाव; अडथळा; गैरचाल; लबाडी : 'खताख्यानती तरी आपण केली नाही; जरी करू तरी पातशाही गुनेगार.' - शिचसा २.२०३.

**खताडी** वि. खत घातलेला; सुपीक : 'त्यात साखरपट्टी म्हणजे नंबर एकचे खताडी शेत.' - आआशे २१६.

**खताभाजी** पहा : **खतखतावणे**

**खताम** न. घोड्याच्या गुडघ्याचा एक रोग. - अश्वप २.२८८.[सं. क्षत]

**खतारी** पहा : **खतरी** : 'खताऱ्या गल्या गो बाय कनाला।' - लोसाभा ४.८८.

**खताली** पु. रायपुराकडील मजुरी करणारे लोक. (व.) स्त्री. पहा : **खताईण**

**खतावणी** स्त्री. १. रोजकीर्दीतील निरनिराळ्या रकमा खातेवार ज्या वहीत नोंदतात ती वही. २. रोजचा जमाखर्च खातेवार मांडण्याची क्रिया. [अर. खत्त] (वा.) **खतावणीवर घालणे** - (कारकून लोकात) कठीण कामावर लावणे.

**खतावणी** स्त्री. सुताराचे लाकडावर रेघा मारण्याचे हत्यार. [सं. क्षत = ओरखडा]

**खताव(वि)णे** अक्रि. उकिरड्यासारखा होणे; कुजणे; घाण येऊ लागणे. सक्रि. शेत किंवा जमीन खत घालून तयार करणे.

**खताव(वि)णे, खताऊन ठेवणे** सक्रि. कीर्दीतील रक्कम खतावणीत बार झाल्याबद्दल रोजखर्ड्यावर खात्यांची नावे नोंदणे. उदा. स्वारी राजमंडळ, शिलकबंद खासगत इ. खातेवार करणे; खात्यात घालणे : 'रोजकीर्दी जमा धरुनी सकळ। खताविला काळ वरावरी।' - तुगा १८९४.

**खताव(वि)णे** उक्रि. भिंतीवर रेघा, आकृती काढणे.

**खताशी** स्त्री. सुताराचे रेघा कोरण्याचे हत्यार; कावडी. [सं. क्षत]

**खतीब** पु. मशिदीत खुदबा पढणारा; प्रवचनकार; धर्मप्रचारक. [फा.]

**खतू** वि. फारच अशक्त; दुर्बल. (व.)

**खतूत** पु. अव. पत्रे : 'दिल्लीहून खतूत पाठविलीं.' - समारो १.२१९. [फा.]

**खतें** न. वतनी शेत. (को.) [सं. क्षेत्र]

**खतेला-ली-ले** वि. १. भरलेला; खतलेला; लिप्त; व्याप्त; साचलेला : 'कीं आंधारें खतेलें अंबर।' - ज्ञा १६.२७. २. मळलेले; घाणेरडे : 'पहा दर्पण खतेलें।' - दावि ४४९.

**खतोड** वि. भरपूर खत घातलेले (शेत वगैरे). पहा : **खतवड**

**खतोड** १. एक प्रकारची पहार. २. पहा : **खतवड** [सं. क्षत]

**खतोडे** न. खत वाहण्याकरिता गाडीला बांधलेले तुऱ्हाट्यांचे साधन, कुरकुल वगैरे. (व.)

**खत्ता** पु. अफू, तुरटी, हळद, लिंबाचा रस इत्यादी एकत्र करून तांब्याच्या भांड्यात खलून केलेले मिश्रण, लेप. हे डोळे आले असताना डोळ्यांच्या पापण्यांवर व डोके दुखत असल्यास डोक्यास लावतात.

**खत्ता** स्त्री. नुकसानी; हानी; फितुरी; हरामखोरी : 'श्रीमंतांची दया थोडी आणि खत्ता रोकडी.' - ऐलेसं १२७०.

**खत्ता** स्त्री. तोडणे; कमी करणे; कमीपणा आणणे; नुकसान; अपाय. (क्रि. करणे) : 'त्याचे इज्जतीस खत्ता न करतां निरोप देऊं.' - मइसा ६.३६२.
वि. भग्न; नष्ट (वा.) : ० **होणे** - नाश होणे, पावणे : 'अवधान अगदीं खत्ता जाहलें.' - पाब ४१. [फा.]

**खत्रड** न. स्त्री. जेथे घाण पडली आहे, कुजके पदार्थ पडले आहेत अशी जागा; कुजके, नासके पदार्थ; घाण.

**खत्र(त्र्)ड** वि. १. कृश; रोड; रोडका; मरतुकडा; पाप्याचे पितर; बुळा; नामर्द; अजागळ (मनुष्य, पशू). २. खट्याळ; कोडगा; ओंगळ; हट्टी; नादान; कुचकामाचा; दुष्ट; त्रासदायक. पहा : **खडतर, खचरट** ३. कंजूष; चिकट [सं. क्षुद्रः]

**खत्रप** न. खत (शेताचे). (प्रां.)

**खत्रा** पु. १. धोका; भीती : 'मार्गाचें खत्र्यामुळें पाठविली नाहीं.' - दिमरा २.१९४. २. शंका; घोटाळा; कुतर्क; संशय. (क्रि. बाळगणे.) : 'ज्याच्या वंशांत खत्रा असेल त्याचें कळेना; एक बाप असेल त्याजकडून तरी दुसरी गोष्ट घडणार नाही.' - मइसा १०.५२. ३. अडथळा; हरकत. [फा.]

**खत्री** पु. एक हिंदू जात; या जातीचा माणूस. हे पीतांबर, मश्रू इ. विणण्याचे काम करतात. [सं. क्षत्रिय]

**खत्रो** पु. खतरूड. पहा : **खातेरे** [चि. कु.]

**खद** पु. शिजत ठेवलेला पदार्थ, मोठ्याने हसणे इ.चा आवाज. [ध्व.]

**खदका** पु. १. खदखद अशी उकळी, कढ. (क्रि. येणे.) २. (ल.) उमाळा (प्रीतीचा, ममतेचा); हुंदका; आवेग (रडण्याचा, हसण्याचा); उबळ; झटका (दमा, खोकला इ.चा); जोराने उभरणे (खरूज इ.चे). (क्रि. येणे.) [ध्व.]

**खदखद** स्त्री. १. खतखत; उकळणाऱ्या पदार्थांचा आवाज. २. (ल.) आवेश; चेतना. ३. असंतोष; छुपा राग : 'आजच्या सामाजिक खदखदीला पुनरुत्थान म्हणणेही शक्य होणार नाही.' - भाप्र १९४. [ध्व.]

**खदखद-दा** क्रिवि. १. मोठ्याने हसण्याचा प्रकार : 'येक खदखदां हांसती। सावकास।' - दास १८.९.१३. २. उकळणाऱ्या पदार्थांचा आवाज होतो तसा आवाज करून. ३. रडण्याचा आवाज.

**खदखदणे** अक्रि. १. खदखद असे उकळणे, शिजणे; खदखद आवाज होणे : 'फेंस खदखदून पांच - पांच, सहा-सहा हात उंच होई.' - पाव्ह ११२. २. धुमसणे; आतून संतापणे. पहा : **खतखतणे** : 'तू कॉटवर भिंतीकडे तोंड करून पडली होतीस - अवाक पण खदखदत' - दिअहो ४७३. [ध्व.] [क. कुतकुतकुदियु]

**खदखदाट** पु. जोराचा आवाज : 'मग हसण्याचा खदखदाट जिरवून त्यानं माझे खिसे चाचपले.' - व्यंमाक ९०. [ध्वं.]

**खदखदून** क्रिवि. मनापासून; खदखदा : 'पाटणकर खदखदून हसले.' - तूच मां १७.

**खदचिली** वि. खटलेखोर; उपद्व्यापी : '-तुमचे चिरंजीव तो खदचिलीच आहेत.' - ऐलेसं १८५४.

**खदडणे** सक्रि. ताबडणे; तांगडणे; ओढून नेणे : 'हिंडताना कौतिक आपल्या लेकरांना सोबत खदडायची.' - धग ५६.

**खदणा** स्त्री. खोदणी : 'तेंथुसें अरिराए खदणी। विक्रमसेनु।' - शिव १०३६. [सं. खन्]

**खदणी** पहा : **खोदणी**

**खदबदणे** पहा : **खदखदणे** : 'चुलीवर चहा खदबदू लागला.' - माणूस २१९.

**खदरा-री** वि. काळ्यापांढऱ्या रंगाचा, रंगाची (मेंढा, मेंढी इ.). (जुन्नर, धनगरी) [सं. खदिर]

**खदल(ला)बदल-ला-ली, खदलामुबादला** स्त्री. पु. १. अदलाबदल; बदलाबदल; देवघेव. (सामा.) व्यापार. २. बदली देणे (सैन्य, चाकर.) : 'चुड्यायाच्या नादा खदलाबदली झाली।' - एहोरा धनगर १५३. ३. 'अर्गजा जालेले' - (तंजा.) [बदलचे द्वि.]

**खदवा** पु. कटारीची जात : 'कटार खदवा बाबत दुप परज साधा.' - बाबारो ३.१७.

**खदान** स्त्री. खाण : 'कायाच्या अन् गोऱ्याच्या खदानी थोड्याच आये?' - वानगी २३२. (व.) [सं. खनि]

**खदि(दी)र** पु. १. खैर; खैराचे झाड. २. कात. [सं.]

**खदिरसार** पु. कात : 'सर्व सारांचे शुद्ध सार। तो मी होईन खदिरसार।' - एभा १२. ५५१. [सं.]

**खदिरांगार** पु. खैराचा निखारा : 'अथवा निधान हें प्रगटलें। म्हणौनि खदिरांगार खोळे भरिले।' - ज्ञा ९.१४९.

वि. खैराच्या निखाऱ्यासारखे लालभडक.

**खदुळणे, खदूळ** पहा : **गढुळणे, गढूळ**

**खद्दक** वि. खराब. (व.)

**खद्दीरी** क्रिवि. खदखदून हसतात तसा : 'वाघ खद्दीरी हसला.' - एहोरा दिवाळी ८०.

**खद्योत** पु. काजवा; शेपटीमध्ये प्रकाश असणारा किडा : 'येऱ्हवीं भानुतेजीं काय खद्योता। शोभा आथी॥' - ज्ञा १.६७.

**खद्रूड** पहा : **खत्रड, खत्रूड**

**खनक** स्त्री. शोभा; भपका : 'इंग्रेजास गोशमाली करून सलतनीच्या कामास खनक (प्रकाश) व (जेब) अलंकार द्यावी हे दिलापासून मंजूर.' - हिंगणेदभा २.७८.

**खनखंडाळा** पु. कापडचोपड : 'देवा सोयरीक पास झाली त खनखंडाळा देजभोज आटले आठ घेऊन टाकावा.' - आलो ४८.

**खनतोडा** पु. फूटभर लांबीचा लोखंडी बत्ता. याच्या टोकास टाकीसारखे हत्यार असते. हे घरफोडीचे हत्यार आहे. पहा : **खतोड**

**खनन** न. १. खणणे; खोदणे. २. पुरणे (प्रेत). [सं.]

**खनपट** पु. क्षुद्र अलंकार; दागिना (तिरस्कारसूचक). (व.)

**खनपट** स्त्री. १. थोबाड. पहा : **कानफट** (व.)

**खनपट** स्त्री. एकसारखा आग्रह; तगादा. (वा.) **खनपटीला बसणे** - एकसारखा आग्रह करणे; आपली मागणी मान्य होईपर्यंत न थांबणे; पिच्छा पुरवणे : 'आज त्येच्या खनपटीस बसून शिवून घ्याचंच.' - रैत १५१.

**खनपट** न. खुंट; खुंटी : 'दुपारच्या बांधल्या भाकरी झाडाच्या खनपटाला अडकवलेल्या दिसत होत्या.' - बाब ४८.

**खनपूस** पहा : **खणपूट-स**

**खनवादी** वि. मांत्रिक; मंत्रतंत्र करणारा : 'कीं मोक्षनिधी धांडोळिते उघडे। खनवादी जे।' - ऋ २४.

**खनाख्यानत** स्त्री. भावी आपत्तीची जबाबदारी. खताख्यानत या शब्दाबद्दल चुकीने वापरतात.

**खनाळ** न. गुहा; कडेपाट; एकांतस्थळ : 'खनाळामधें जाऊन राहे। तेथें कोणीच न पाहे।' - दास १५.२.२३. [सं. खनि + आलय]

**खनाळ** न. तागा : 'चतुर बंधुजीनं उभं खनाळ फाडीलं।' - जामो २४०.

**खनि** स्त्री. खाण. २. (ल.) कोठार; साठा; आगर. जसे :- सुखखनी = सुखाची खाण; सौंदर्यखनी = सौंदर्याची खाण. [सं. खनि, खन्]

**खनिज** न. १. खाणीतील पदार्थ. धातू, खडू, गार, रत्ने, चिकणमाती, स्लेट, टाकणखार इ. पदार्थ खनिज होत : 'वनस्पतीचा अगर प्राण्याचा एखादा अंश खडकात गुरफटलेला असला म्हणजे त्याला खनिज म्हणतात.' - भू ५४. २. (भूशा.) पृथ्वीच्या कवचातील खडकात आढळणारा, ठरावीक रासायनिक संघटन असणारा घटक.

वि. खाणीत असणारा; खाणीतून खणून काढलेला.

**खनिजकोटी** स्त्री. खाणीतून काढलेल्या पदार्थांचा वर्ग.

**खनिजडांबर** न. पेट्रोलियम उघड्या हवेत ठेवल्यावर तयार होणारा पदार्थ.

**खनित्र-व** न. खोरे; फावडे; खणण्याचे कोणतेही हत्यार.[सं. खनित्र]

**खनुवाळा** पहा : **खणुवाल**

**खप** पु. १. विक्री; उठाव; व्यय; खर्च; वासलात; वाटेस लावणे; खपविणे (जिन्नस, माल); खाद्य; उपभोग्य पदार्थांचा विक्री आदीकरून विनियोग. २. काबाडकष्ट; मेहनत; श्रम; खपणे. ३. बूड (तंजा.)

**खप** पु. खत (फळझाडासाठी).

**खपक्या** वि. खमक्या; हुशार; चलाख; जोरदार.

**खपखप** स्त्री. धडकी. (गो.)

**खपट** न. १. माशाचा खवला. २. त्यासारखा रुप्याचा अगर सोन्याचा दागिना. ३. कणकेचा गाखर, आरोळी. ४. डोळ्यावरचे कातडे. ५. नेत्र- गोलकाचा आजार.

**खपटी** स्त्री. गुळाची किंवा दुसऱ्या वस्तूची कढवून खाण्यासाठी केलेली वडी.

**खपणे** अक्रि. १. काम करणे; मेहनत, कष्ट करणे : 'इंग्लंडसारख्या देशांत सार्वजनिक कामासाठीं अहोरात्र मोठमोठे लोक खपतात ते ह्या करितांच.' - लोटिकेले ४.५४८. २. विकले जाणे; खप होणे; विकत जाणे; गिऱ्हाईक मिळणे (माल इ. ला) ३. खर्चणे; व्यय होणे; संपणे. ४. सामावणे; अडथळा न होता मिसळले जाणे. ५. वाटेस लागणे; मरणे : 'दुसरे दिवशीं हरिच्या दृष्टिपुढें अर्जुनाशुगें खपला।' - मोकर्ण १.२. ६. आवडणे; सोसणे : 'ती सवत तुला खपणार नाहीं-' - कोरकि २९ [सं. क्षप्] **खपवून घेणे** - सहन करणे; चालवून घेणे.

**खपता** वि. भयंकर; तापट; क्रूर.

**खपती** वि. १. निश्चयी; निर्धारी; आग्रही; आपला उद्देश शेवटास नेणारा; चिकट. २. खंदा; चलाख; हुशार; जोमदार (कामाला) ३. तापट बुद्धीचा; तलख; पाणीदार. ४. रागीट; तामसी; चिडखोर; दीर्घद्वेषी. ५. वेडा.

**खपन** पहा : **कफन** [फा. कफन्]
**खपनखायरा** वि. प्रेतावर टाकलेले सामान खाणारा.
**खपनफुटो** वि. प्रेतावरील वस्त्र नेणारा. (गो.)
**खपरल** न. पहा : **खपरेल** (व.)
**खपरवचे** धडकी भरणे. (गो.)
**खपरी** स्त्री. १. अणकुचीदार, धारेच्या दगडाचा तुकडा, चीप, कपरा (टाकीने पाडलेला). २. खापर; फुटलेल्या भिंगाचा तुकडा, ठिकरी; खापरी. (क्रि. निघणे, जाणे, उडणे.)
**खपरेल** न. १. दोन्ही बाजूंना वळविलेले चपटे कौल. २. अशी कौले घातलेले छप्पर, घर : 'घराच्या अगदीं वरच्या भागावर घर झांकण्याकरितां खपरेल करावें लागतें.' - मपु. ३.६२ (१८७३). [हिं.]
**खपला-ली** पु. १. निराळा झालेला तुकडा; कपरा (साल, कातडे, कवच इ.चा); सालपट; कपची; खरपुडी; पापुद्रा; खवला. (वा.) ० **काढणे** - जुने भांडण उकरून काढणे.
**खपली, खपल्याण** स्त्री. गव्हाचा एक प्रकार : 'खपली उगवल्याली, कापाय आल्याली.' - रैत १७.
**खपवा** पु. बाहीचे मागील तोंड. [फा. कफ = हात]
**खपवा** पु. खंजिराचा एक प्रकार. यालाच 'खप्पा' असेही म्हणतात.
**खपा-प्पा** वि. १. नाखूष; रुष्ट; रागावलेला : 'याजमुळें नबाबाची मर्जी खप्पा.' - मइसा ५.२०४. २. नावड उत्पन्न झालेला; विन्मुख (एखाद्या विषयापासून); कंटाळलेला; रुष्ट. [फा. खफा = रागावलेला]
**खपाखपा** क्रिवि. जलद गतीने; मोठ्या प्रमाणात : 'हे कुरूंदीचं जातं चांगल हाय, खपाखपा घास खातं.' - पडरे २३.
**खपाट-टा-टी-री** न. पु. स्त्री. १. रिकामे पोट. २. खबडड; पोकळ भाग; खळगा; भोक; भेग; बळद; बीळ. (वा.) ० **खपाटे, खपाट, खपाट्या बसणे** - उपास इ. मुळे पोटाला खळगा पडणे, पोट बखळ होणे. ० **वळणे** - पोट खाली जाणे : 'कोणाचीं अन्नाविणें खपाटें वळलीं आहेत.' - निबंध ५१०. ० **जाणे** - रिकामे होणे; सपाट होणे : 'कारण त्यांच्या दुकानातील बहुतेक सारी पोती अन् डबे खपाटी गेले होते.' - बाविबु.
**खपाटणे** उक्रि. १. पुष्कळ जेवणे; जेवणावर हात मारणे. २. मारणे; बडवणे. ३. मरणे.
**खपाटणे** उक्रि. मरणे.
**खपाटा** पु. (नाविक) किनाऱ्यापर्यंत आगबोटीतील माणसे किंवा माल घेऊन जाणारा - येणारा पडाव, होडी. ही होडी त्या त्या आगबोट कंपनीची असते.
**खपाटा** पहा : **खणपट**
**खपाटून** क्रिवि. सपाटून; अतिशय जोराने; सर्व सामर्थ्यानिशी. पहा : **कचकावून**
**खपाटे** न. अव. गालफडे; कानशिले इत्यादी. (चि.)
**खपाटो** पु. एक प्रकारचा मासा. (कु.)
**खपाटो** पु. फार मोठी पेटी; हडपा. [सं. कपाट]
**खपाट्या-त्या** वि. काम साध्य करण्याची चिकाटी असलेला; पिच्छा पुरविणारा; हाती घेतलेल्या कामाचा निश्चयपूर्वक शेवट करणारा; वादविवादात दुसऱ्यास चकविण्याचे सामर्थ्य बाळगणारा.
**खपाट्या** पु. घोड्याच्या लगामाचा एक प्रकार : 'त्याहीमध्ये त्यास खपाट्या लगाम म्हणून थोडा वोढितो.' - पेद ८.१५.
**खपामर्जी** स्त्री. इतराजी; रुष्ट होणे; नाराजी; गैरमर्जी.
**खपी-प्पी, खप्पीदास** वि. १. रागीट; तामसी; कडक. २. उद्योगी; मेहनती; नेहमी कामात चूर असणारा. ३. काम करण्यात हुशार; चलाख; तडफदार. ४. धूर्त; पक्का; बिलंदर. ५. खमंग; न लाजणारा किंवा न भिणारा; वस्ताद.
**खपीप, खफीफ** वि. १. लाजलेला; ओशाळा झालेला; फजित; श्रमी; मानखंडित : 'चेरीसाहेबांचें साल - जाबमध्यें तोंड उतरून गेलें व खफीफ बहुत जाहलें.' - पदमव १०५. २. रुष्ट; नाखूष केलेला; उतरून गेलेले : 'गोसावी अनुपगीर सर्वांसी दुश्मन जाले व खपीप जाले.' - दिमरा १.८५. [फा.]
**खपीप** पहा : **खफीफ** [फा.]
**खपुष्प** न. १.आकाशाचे फूल २. (ल.) भूत, भविष्य, वर्तमान या तिन्ही काळात न घडणारी, अशक्य गोष्ट : 'होआवें मग तोडावें। खपुष्प कीं॥' - ज्ञा १५.२१५.[सं. ख + पुष्प] (वा.) ० **तोडणे** - अशक्य गोष्ट शक्य करून दाखविणे.
**खपेटोणपे** पहा : **खबेटोणपे** (क्रि. खाणे.)
**खपेला** पु. मजूर; हमाल; हेलकरी; खपणारा : 'तथापि खपेंल्यास एक वेळ हिसका देऊन साहेबास पुसावयास पाठविले की.' - शादवे १७४.
**खपेल्या तोंडाचा** वि. अवलक्षणी.
**खप्ता** गहाळ; गुप्त : 'येक कासीद दोन दिवस खप्ता जाहला होता.' - नाग १.१२३.
**खप्ती** वि. पिसाट; वेडगळ; चक्रम; खुळचट. (ना.)[फा. खप्ती = वेडा]
**खप्पड** वि. सुरकुत्या पडलेला; चिंबलेला (गाल किंवा चेहरा); क्षीण; म्हातारा. [सं. कर्बर]
**खप्पा** पु. (कुस्ती) एक पेच; गळखोडा; हातांच्या किंवा पायांच्या अढीत प्रतिपक्षाची मान धरून खालीवर हिसके मारून ताण भरणे व कंठमणी दाबणे; मानेवरचा कमरखोडा.
**खप्पा** पहा : **खपा**
**खप्पी** वि. चिवट; खनपटीला बसणारा : 'त्यांचे काही मित्र असे खप्पी होते की ते त्यांच्याकडून ह्या न त्या सबबीखाली पुस्तके मागून नेत.' - आषाढस्य २७८.
**खप्पी** वि. निराश : 'अतीरती कुल खप्पी झालें।' - अनंतफंदी, मला १३७. पहा : **खपी**
**खप्प्याची पट्टी** (कुस्ती) कुस्तीतील एक डाव; आपला हात जोडीदाराच्या गालफडावरून घेऊन त्याच्या गळ्याची घाटी हाताच्या पोटरीने दाबून त्यास घुसमटवून चीत करणे; गळ्याची टांग.
**खप्या** वि. १. खपणारा; अतिशय मेहनत करणारा; सर्व काल कामात

कंठणारा. २. सदा कामात गुंतलेला; उद्योगी; व्यासंगी.

**खफगी** स्त्री. १. नाराजी : 'नबाबाचे चित्तांत सर्दाराविषयीं रुष्टता व खफगी आहे.' - मइसा ५.१८१. २. रोष : 'होळकरावर हे नौबत गुजरली सबब खफगीस जागा.' - मइसा ७. [फा.]

**खफा** पहा : **खप्पा**

**खफीद** वि. फजित; ओशाळलेला; खजील. : 'बालाजीरायाचे वकिलांनी मजला हुजरांत खफीद केलें.' - पेद २.१३. [फा. खफीफ = लज्जित]

**खफीफ** वि. हलका; बिनमहत्त्वाचा; नीच. [फा.]

**खब** पहा : **खबखबणे**

**खबखबणे** अक्रि. १. खबाखब असा आवाज करणे (कुजक्या नारळाचा आवाज होतो तसा.) २. कफाने किंवा शेंबडाने दाटणे (गळा, नाक); बदबदणे. [ध्व.]

**खबखबीत** वि. बदबद, खबखब असा आवाज करणारा. [ध्व.]

**खबदड-डी, खबदाड** स्त्री. न. १. ओबडधोबड पोखर अथवा खळगी; कपार; दरी. २. घळीतील अथवा ओघळीतील खोल खळगी. ३. भगदाड (भिंतीतील); ओबडधोबड आकृतीचे मोठे भोक (खडक, झाड, फळी यांमधील); भुयार; बीळ.

**खबदडी** वि. उंचसखल व खाचखळगे असलेली; खडबडीत (जमीन).

**खबदाटी** पहा : **खपाटी** : 'खबदाटी आलेल्या पोटाच्या विकारानं....' - मक १९६१.१४८.

**खबर** स्त्री. १. बातमी; संदेश; वार्ता. २. समाचार; माहिती (परगावची). ३. गप्पासप्पा; वृथा गोष्टी; निरर्थक भाषण. [फा.] (वा.) १. ० **उडणे** - वार्ता उठणे : 'कोंडनाकमहार तिकडे सापडला आहे की काय? इकडे मारला म्हणून खबर उडाली आहे.' - पेद ३.१७३. २. ० **उडविणे** - बातमी उठविणे : 'लटकी खबर उडवितात, श्रीमंताशीं आपला सलुख जाहला.' - इसंतराघ ८०. ३. ० **करणे** - वर्दी देणे : 'तेव्हा अंताजीपंत दि॥ पेशवे बरोबर होता. त्याने खबर केली.' - इसंपेद समा ६. ४. ० **घेणे** - सूड घेणे; शिक्षा करणे.

**खबर** बि. क्रिवि. सावध; खबरदार; हुशार; खबरदारीने : 'सारे माणसांस सांगणें जे बहुत खबर राहाणें.' - पेद २५.२७३. [फा.]

**खबरअ(ए)क(ख)बार** स्त्री. बातमीपत्र : 'जयपुराकडील खबरएक्बार पादशाहासी आली...' - दिमरा १.१८२. [फा.]

**खबरगीर** पु. १. बातमी देणारे हेर; चार. २. पालनकर्ता; आश्रयदाता.

**खबरगिरी** पहा : **खबर्गिरी**

**खबरदार** स्त्री. संरक्षण; मजबुती : 'तरी तुम्ही किल्ले झांशी वगैरे जागांची खबरदार मजबुतीनें उत्तम प्रकारें करणें.' - मइसा ३.२१३. पहा : **खबरदारी**

वि. १. चतुर; तरबेज; कुशल; निष्णात; फरडा. २. खाऊनपिऊन सुखी; संपन्न; समर्थ. ३. मजबूत; धडधाकट; चांगल्या स्थितीतला. ४. सावध; दक्ष; हुशार : 'नाना फडनवीस म्हणती भाऊला तुम्ही मोर्चाला खबरदार.' - ऐपो १८१.

- उद्गा. लक्षात ठेव! ध्यानात धर! सावध रहा (नाही तर संकटात पडशील.) [फा.]

**खबरदारी, खबर्दारी** स्त्री. १. काळजी; सांभाळ; चांगल्या स्थितीत ठेवणे; बंदोबस्त; सावधगिरी; हुशारी : 'पंधरा हजार मावळे किल्ल्याचे खबरदारीस नेमून....' - मराचिस ५. २. निश्चय; खंबीरपणा (मनाचा.) ३. मजबुती; कणखरपणा; टिकाऊपणा (लाकूड, कापड, वस्तू इ. चा) : 'त्या लांकडाची खबरदारी या लांकडांत नाहीं.' - शास्त्रीको.

**खबरनेस्त** वि. अव्यवस्थित वागणारा.

**खबरबखर** पहा : **खबरबात**

**खबरबात** स्त्री. बातमी; समाचार; वार्ता; वर्तमान : 'आमची खबरबात घेत जावी.' - ऐलेसं २.८९७. (वा.) ० **घेणे** - कुशल विचारणे; चौकशी करणे.

वि. ऐकीव बातमीनुसार, लोकांच्या बोलण्याप्रमाणे : 'दोन पाचशे खंडीचे कच्छी व एक खबरबात दीडसे खंडीचा' - पेद ३४. १३१.

**खबररसाई** स्त्री. बातम्या पोचविणे; बातमीदाराचे काम : 'फिदवीची नोकरी व वोहदा खबररसाईचा याकरितां जुरत करून अर्ज केला आहे.' - पुणे अखबार भा १.१२९.

**खबरा** पु. भातपिकातील भेसळ. (झाडी.)

**खबरा** वि. कबरा : 'मधी पांढरा, आत खबरा बांडा....' - एहोरा ६.८५.

**खबरी-ऱ्या** वि. पोलिसांना माहिती पुरवणारा; बातमी देणारा २. गप्पा मारणारा : 'अशा खबरी लोकांवर फारसा विश्वास ठेवू नकोस.' - गुमा ५३.

**खबरी** स्त्री. निंदा. (क्रि. करणे) (गो.)

**खबर्गिरी** स्त्री. परामर्श; विचारपूस : 'खबर्गिरी करावयासही याद होत नाहीं.' - मइसा ३.९०.

**खबलणे** पहा : **खबालणे**

**खबळ** स्त्री. खळगा; खोल खड्डा; एकीकडची जागा; खबदाड; गुहा.

**खबा** पु. खांब. [सं. स्तम्भ]

**खबाडे** न. खबदाड. पाणी साचते अशी जागा; खड्डा : 'डोहो डबकें खबाडीं टाकीं।' - दास १६.४.१०.

**खबाना** पु. खण : 'उजव्या डाव्या हातास फळ्या लावून केलेले खबाने लागतात.' - महाशारदा, नोव्हें. १९३६.

**खबा(ब)लणे, खवलणे** उक्रि. १. अधाशीपणाने खाणे; गिळणे. २. (ल.) निरर्थक खर्च करणे; उधळणे; [अर. किबाल □ समृद्धी.] (वा.) **गोष्टी खबाळणे, बाता खबालणे** - गप्पा, बाता झोकणे; बडबडणे.

**खबाला** वि. ऐसपैस; मोठे; टोलेजंग. [अर. किंबाल]

**खबाला** पु. १. अधाशीपणाने खाणे. २. (ल.) उधळेपणाचा खर्च, व्यय (अन्न, पैसा, वस्तू इ. चा). ३. व्यापारातील मोठी बूड; तोटा; ठोकर. ४. तुकडे; फूटतूट; मोडतोड (बांगडी, बाटली, मडके इ.ची) ५. (सामा.) धूळधाण; नाश.

**खबाला-ल्या** वि. १. गप्पीदास; बडबड्या. (समासात) बाता-गोष्टी

खबाल्या. २. खादाड; आधाशी.

**खबाळणे** अक्रि. खवळणे; अनावर होणे; त्रास देणे. (व.)

**खबुतरखाना** पु. १. पहा : **कबुतरखाना**. २. (ल.) (कबुतरांचे खुराडे कधी कधी गच्च भरलेले व कधी कधी रिकामे असते यावरून) कधी फायदा कधी तोटा होणारा धंदा, व्यवसाय, उद्योग.

**खबुतरबाज** वि. शिकवलेली कबुतरे बाळगणारा.

**खबू-ब्बू** वि. म्हातारा; बुड्ढा (उपहासार्थी). (खा.)

**खबूक** वि. अगडबंब; लठ्ठ; धिप्पाड (माणूस). पहा : **खंबीर**

**खबूस** पु. कणिक आंबवून भट्टीत भाजून केलेली भाकरी. [फा.]

**खबूस** पु. गलबतावरील भटारखाना. पहा : **कबूस**

**खबेटोणपे** पु. अव. दुसऱ्याच्या मर्जीचे रक्षण व्हावे, आपल्याला मोठेपणा मिळावा किंवा एखादे अंगीकृत कार्य पुढे चालावे यासाठी सोसायची अनेक प्रकारची दुःखे, धक्के - चपाटे, टक्केटोणपे, आघात, अडचणी, निंदा, कुचेष्टा. (क्रि. खाणे, घेणे, सोसणे.)

**खबेड** वि. १. मनधरणी करण्यास कठीण; मन वळविण्यास कठीण; हट्टी; हेकेखोर; पाषाणहृदयी. २. खडबडीत; कठीण; अप्रिय; खडतर. पहा : **खचरट**

**खब्बा** पु. खबदड; ओबडधोबड बीळ, विवर.

**खब्बू** पहा : **खबू**

**खम** पु. १. खांब २. ठाण; मुक्काम : 'या बानीवर ठोका मग खम.' - वानगी १९३. (क्रि. ठोकणे.)

**खम** स्त्री. मांडी. (झाडी.)

**खमका** वि. संकट, धमकी इ. ने दबला न जाणारा; टणक; धूर्त.

**खमका(खा)विणे** उक्रि. १. खडकावणे; धमकावणे; दरडावणे; दरडावून सांगणे; कानउघाडणी करणे. २. जोराने ओढणे; बांधणे, धरणे, आवळणे. मुख्यत्वे खमकावून असा प्रयोग येतो व तो पाहिजे त्या क्रियापदाबरोबर योजतात. जसे :- खमकावून ओढणे, बांधणे, धरणे, तासणे, चालणे. पहा : **कचकून, कचकावून**

**खमको** वि. १. बळकट; मजबूत; दमदार; नेटदार; न डगमगणारा २.सपाटून जेवणारा. (चि.कु.)

**खमक्या-शा** वि. हुशार; चलाख; जोरदार; आवेशी; तल्लख; पाणीदार; जहाल; तोडीस तोड. पहा : **खपाट्या** [फा. खम्]

**खमखम** पहा : **खुमखुम**

**खमखमीत, खमंक-ग** वि. १. मसालेदार; स्वादिष्ट; चमचमीत; चवदार (भाजी, खाद्यपदार्थ, वास इ.) २. (ल.) वस्ताद; धूर्त; पक्का. [सं.]

**खमगाई** पु. वासयुक्त गोड पदार्थ. (तंजा.)

**खमण** वि. खमंग.

**खमणे** अक्रि. गडप होणे; नाहीसे होणे; जिरणे. [सं. शम्]

**खमणे** अक्रि. धैर्याने, निमूटपणे सोसणे किंवा सहन करणे (दुःख, अपराध). [सं. क्षम]

**खमणे** अक्रि. गमणे; करमणे; चैन पडणे : 'इजला त्याखेरीज खमेना, त्याजलाहि खमेना.' - मइसा ६.३१. [सं. क्षम]

**खमध्य** पु. १. याम्योत्तरवृत्त. २. खस्वस्तिक; शिरोबिंदू; क्वचित अधःस्वस्तिक, अधोबिंदू. [सं.]

**खमयसी** स्त्री. (नाविक) पावडा किंवा रोयली टांगण्याची दोरी. (हेट.)

**खमशेड** वि. बळकट; जोरदार. (व.)

**खम(म्म)स** वि. पाच ही संख्या. [फा. खम्स]

**खमसी(सै)न** वि. पन्नास; ५० ही संख्या. [फा.]

**खमसीन, खमसेन** पु. मिसर देशात वाहणारा उष्ण वारा.

**खमंग काकडी** कोवळ्या काकडीच्या बारीक फोडी करून त्यात मीठ, नारळाची खव आणि दाण्यांचे कूट मिसळून बनवलेले एक तोंडी लावणे.

**खमंगाई** स्त्री. स्वादिष्टता; चमचमीतपणा; झणझणीतपणा (मसाल्याचा).

**खमंगी** स्त्री. स्वाद; रुची : 'रक्त वाया गेल्यामुळे मांसात असावी तशी चव आणि खमंगी राहत नाही.' - जोफु २०४.

**खमंचा** पु. एक खाद्यपदार्थ. भाजलेले पोहे, शेंगदाणे, फुटाणे, खोबऱ्याच्या चकत्या इ. पदार्थांचे मिश्रण करून केलेला पदार्थ.

**खमाज** पु. (संगीत) खमाज थाटाचा आश्रयराग. यात ठुमरी इत्यादी ललित प्रकार जास्त मधुर लागतात.

**खमाज-स** पु. (संगीत) एक राग. गानसमय - रात्रीचा दुसरा प्रहर.

**खमाजथाट** पु. (संगीत) एका थाटाचे नाव. यात पुढील सात स्वर असतात - शुद्ध षड्ज, शुद्ध वृषभ, शुद्ध गांधार, शुद्ध मध्यम, शुद्ध पंचम, शुद्ध धैवत, कोमल निषाद.

**खमाटणे** उक्रि. गच्च ओढून बांधणे. (सामा.) खमाटून असा प्रयोग येतो. ओढणे-बांधणे-ताणणे-खेचणे-आवळणे या क्रियापदांशी योजतात. सक्रि. हडप करणे.

**खमाटून** क्रिवि. सपाटून; भरपूर. (क्रि. जेवणे, खाणे.)

**खमाट्या** वि. १. आडमुठा; दांडगा; कचक्या. २. राकट; दणकट; धिप्पाड; धटिंगण.

**खमाविशी** स्त्री. सरकारच्या नजरेखाली कसलेली जमीन. [कर्ना.]

**खमाविशीदार** पु. सरकारी जमिनीवर देखरेख करणारा अधिकारी. पहा : **कमाविशी**

**खमाविसदार** पहा : **कमाविसदार**

**खमीद** पु. वाकडेपणा; वक्रता; तेढ; आडमार्ग : 'हा खमीद आहे.' - मइसा ५. १७६. [फा.]

**खमीर** भरवसा; खात्री.

**खमीर** न. १. आंबवण; ताडी किंवा तसले फसफसणारे पदार्थ. २. किण्व, यीस्ट. ३. आंबवण किंवा सुरामंड तयार करणे; फुगवण. [फा.]

**खमीस** पु. एक प्रकारचा सदरा; शर्ट; कुडते; झब्बा. [पोर्तु. कॅमिसा]

**खमीस** स्त्री. गुरुवारची रात्र.

**खमुरी** स्त्री. खजिना; संपत्ती : 'खमुरीच त आनून ठुली तुमी मायाजवय.' - शिळान ४७.

**खमोरा** पु. स्त्रीधन; कुणगा.

**खय-य्यो** पु. १. क्षय. २. फन्ना; फडशा; निकाल. (चि. कु.) [सं. क्षय]

**खय** स्त्री. १. गर्व; ताठा; अभिमान. (क्रि. मोडणे, जिरवणे.)

२. अडेलपणा; रग.

**खय** न. शेतातील धान्याचे खळे. (खा.)

**खयचून** क्रिवि. खच्चून; जोराने : 'तथापि म्हाताऱ्याचं चिलीम भरभरून पुन्हा पुन्हा खयचून दम मारण्याचं सत्र सुरूच.' - माणूस ७२.

**खयर** पु. खैराचे झाड. पहा : **खैर**

**खयरा** वि. तपकिरी.

**खयेसना** क्रि. मारणे. (झाडी)

**खय्या** पु. रिवाज; रीत; प्रघात. (व.)

**खर** पु. गाढव : 'खरी टेंकों नेदी उडे। लातौनि फोडी नाकाडें।' - ज्ञा १३. ७०६. [सं.]

**खर** स्त्री. १. कचरा; घाण; अनेक प्रकारचा मळ. २. श्वेत प्रदरातील पांढरा साका; लघवीतून पडणारे वीर्याचे कण. ३. जमीन भाजण्याकरिता टाकलेल्या टहाळांवरील जुने गवत, पाने, काटक्या, शेणकूट इ. चा कचरा; राब. ४. मुरूम किंवा बारीक खडी. ५. विहिरीतून खणून काढलेली माती; गाळ इ. ६. रस करताना राखेत अथवा मातीत पडलेले सोन्या-रुप्याचे कण. ७. नदीच्या तळची वाळू; पाण्यातील गाळ, घाण; पाण्याचा तळ. (गो.) ८. (सोनारी) कोळशाची बारीक पूड. ही पाण्यात घोटून तिचा थर मुशीच्या आतून देतात. [सं. क्षर]

**खर** स्त्री. १. आकाशातील पांढरे, कापसासारखे ढग; पातळ पसरलेले अभ्र. २. आकाशातील संध्याकाळचा रंग, आरक्त रंग. ३. दव. (व.)

**खर** स्त्री. (नाविक) माल भिजू नये म्हणून बाकावर पसरलेली लाकडे.

**खर** वि. १. तीव्र; तिखट; कडक; प्रखर; कढत (मिरी, ऊन, थंडी). २. झोंबणारे; बोचणारे; कडक (भाषण, शब्द) : 'खर दुर्वाक्यशरशतें भेदित होतासि जेधवा मर्म।' - मोकर्ण ४९.९. ३. जास्त (वजन किंवा माप). ४. ज्याची पाणढाळ फारच उतरती आहे असे (घर, वाडा वगैरे); उभट (नांगर इ.) (को.) ५. कठोर, निर्दय. [सं.]

**खर** न. खैराचे लाकूड : 'खरी कातल्ये खरी कातल्ये खराचे केले दरवाजे गे।' - थालो ४५. (को. गो.)

**खर** पु. चिंता : 'त्यामुळे जिवाला खर नाही.' - विभूत १८.

**खर** पु. स्त्री. गुळगुळीतपणा नसलेल्या पदार्थांशी संबंधित असा जलद घर्षणाने होणारा आवाज; वाढलेली दाढी, लोकर इ. ची बारीक टोके टोचून होणारी संवेदना. [ध्व.]

**खरकट, खरकटव(वा)ड-डा, खरकट(टा)वळ** स्त्री. पु. १. ज्या जागी जेवण झाले आहे त्या जागेचे अवशिष्ट, उष्टी पाने, घाण इ. पहा : **खरकटे**. २. (ल.) तुंबलेले काम.

**खरकटणे** उक्रि. १. ओबडधोबड लिहिणे; कुत्र्या-मांजराचे पाय लिहिणे; रेघोट्या ओढणे; घाईघाईने लिहिणे; भरकटून लिहिणे. २. घाईने चोळणे, पुसणे, झाडणे, सारवणे. ३. रांगणे; खरडत जाणे.

**खरकटणे** अक्रि. १. खरकटे होणे (अन्न, भांडी, हात इ.). २. (व्यापक) भरणे; लेपाटले जाणे; गदळ होणे; लिडबिडीत होणे : 'कामक्रोधलोभें खरकटलें।' - हरि १९. ५.

**खरकटणे** सक्रि. चटणी, मसाला इ. पाट्यावर जाडाभरडा वाटणे.

**खरकटणे** अक्रि. भुईत जाणे; खुजटणे.

**खरकटनिशी** क्रिवि. झाडून; तुंबलेल्या कामासह; बाकी राहू न देता : 'त्यास हुजुर त्याचे हातें खरकटनिशी काम काज घेत जावें.' - पेद १९.९२.

**खरकटवाडा** पु. (पुरा.) प्रागैतिहासिक मानवी वास्तव्याचे द्योतक, स्थलदर्शक ठिकाण.

**खरकटा** वि. (स्वच्छ व अस्वच्छ यांतील औपचारिक भेद दर्शविणारा शब्द). १. शिजवलेले, पकविलेले किंवा शिजवल्याशिवाय, पकविल्याशिवाय पाण्याशी मिसळलेले (तांदूळ, भाकरी, पीठ दुधाशी किंवा एखाद्या फळाच्या रसाशी मिसळले तरी ते खरकटे होत नाही). २. ज्याला असले खरकटे अन्न लागले आहे, चिकटले आहे अथवा ज्याचा स्पर्श झाला आहे असे (हात, स्वयंपाकाची भांडी, जागा).

**खरकटे** न. १. खरकट्या अन्नाचा शेष; शिजविलेल्या अन्नाचा (भाकरी, भात इ. चा) कण, चाराचुरा. मात्र हे शिजवलेले अन्न पाण्यात मिसळण्यापूर्वी तळलेले किंवा भाजलेले नसले पाहिजे, त्याचप्रमाणे शिजविण्यापूर्वी ज्या अन्नात पाणी, मीठ अथवा नुसते पाणी मिसळलेले आहे असल्या अन्नाच्या अवशेषालाही खरकटेच म्हणतात. २. न भाजलेल्या पदार्थाचा स्वयंपाक, निर्लेप नसणारे अन्न. ३. (ल.) अपुरा व्यवहार, देवघेव (पैशाची); बिनहिशेबी धंदा; लडथड; भिजत घोंगडे. ४. अपूर्ण राहिलेली व त्रासदायक गोष्ट, काम. पहा : **लांझा**. (वा.) ० **सावडणे** - खरकटे गोळा करणे; खरकटे काढणे; अपूर्ण राहिलेली त्रासदायक गोष्ट पूर्ण करणे.

**खरकटेल** वि. ज्याला खरकटे (शिजलेले अन्न, भात, कणीक, पीठ इ.) लागलेले आहे असे (कापड, भांडे, हात इ.).

**खरकट्या दगड** तुकडे पडणाऱ्या, ठिसूळ दगडाची एक जात.

**खरकणे** अक्रि. १. खर असा आवाज होऊन घसरणे, निसरणे; घसरत जाणे; जोराने खाली सरणे, जाणे. २. ढुंगणाने सरकत जाणे, घसरत-घसरत जाणे; खुरडणे. ३. झपाट्याने व मोठ्या आवाजाने वाहत जाणे (नदी, पूर); पाठीमागे जाणे; कमी होणे; ओहोटीस लागणे (समुद्र); झटकन नाहीसे होणे (वाऱ्याने ढग); झडणे (मांस, शरीर); उतरणे; म्लान होणे; पडणे (तोंड, चेहरा, माणूस); एकदम दबणे; खाली बसणे (सूज). ४. भिणे; घाबरणे; चरकणे; धास्ती धरणे.

**खरकन-र, खरदिशी** क्रिवि. १. खर अशा आवाजाने युक्त. २. चटकन; एका क्षणात, निमिषात.

**खरकबाण, खरकबाण मेहेरबान** वि. (विनोदाने) अकिंचन; अत्यंत दरिद्री, कफल्लक.

**खरकशा** पहा : **खरखशा**

**खरकंकम** पु. कोकण किनाऱ्याकडचे मासे खाऊन राहणारे खळ.

**खरकंदाज** दातकोरणे : 'विनायकभट खरकंदाज व चिमटा व गोपाळभट आस्तावा.' - पेद १८. १०४.

**खरका** पु. १. कातडीची खडबडीत आणि फुटीर स्थिती (थंडीच्या दिवसांत); खरबरीतपणा. २. कोरडेपणा व खपल्या पडलेली स्थिती

(बरा झालेला गोवर, देवी इ. ची). (क्रि. उठणे, येणे.). ३. दुःखकारक मानसिक स्थिती; दुखावलेल्या भावना; मनाला बसणारा धक्का (रागात खडसावल्यामुळे). (क्रि. बसणे.). ४. आकस्मिक व जबर कंडू, खाज. जसे :- खरजेचा खरका, देवीचा खरका, गजकर्णाचा खरका. (क्रि. सुटणे.) ५. खाजविण्याचा जबर झटका, आवेग, लहर. (क्रि. लावणे.)

**खरका** पु. १. ठोकर; तोटा; गोता (व्यापारात). २. पिकाचे नुकसान; नासाडी. (क्रि. बसणे, होणे.).

**खरका** पु. १. खडाडत जाणे; मोठ्या आवाजाने खडखडत जाणे (गाडा). २. (ल.) चलती; झपाटा; भरभराट (व्यापारधंद्याची). (वा.) ० **देणे** - खरडपट्टी काढणे; खडसावणे; जोराने धमकावणे; ताकीद देणे.

**खरका** पु. शंका; संशय; भीतीची अथवा दुःखदायक शंकेची आकस्मिक कल्पना; घोर. (क्रि. येणे, बसणे, राहणे, उडणे.)

**खरकाटणे** पहा : **खरकटणे**

**खरकाविणे** उक्रि. १. चमकावणे; खडसावणे; खरडपट्टी काढणे; खमकावणे. २. खरखर आवाज होईल असे ओढीत नेणे (ओढणे या क्रियापदाशी जोडून अगर स्वतंत्रपणे योजतात). ३. ढकलणे; पुढे ओढीत नेणे (एखादा जड व आवाज होणारा पदार्थ).

**खरकुटणे** अक्रि. खरकटा होणे : पहा : **खरकटणे**

**खरकोटी** स्त्री. खरकटे : 'एकु दी नाथोबास जेविले मग खरकोटिया पन्हिवां दाटिलिया।' - लीचउ ११२.

**खरखटे** न. 'म्हराट्यांनी मकरसंक्रांतीस अंग धुताना आंगास लावणेस तीळ तांदुळ वोली हळदही मिळउन वाटिला लादा. (तंजा); उटणे.

**खरखटणे** अक्रि. मलिन होणे. पहा : **खरकटणे**

**खरखर** स्त्री. १. डोळे आले असताना होणारी वेदना, ठणका; डोळ्याचा एक रोग. २. (ल.) पश्चात्ताप; पस्तावा; अनुताप. ३. दुःखदायक विचार; काळजी; चुटपुट (क्रि. लागणे.) ४. घशात होणारा घरघर आवाज (कफामुळे). (क्रि. लागणे, सुटणे.) ५. कंड; खाज; खाजविण्याचा झटका. (क्रि.लागणे, येणे.) [ध्व., सं.]

**खरखर-रा** क्रिवि. १. फरफरा ओढल्या जाणाऱ्या पदार्थांसारखा आवाज करून, होऊन. (क्रि. ओढणे, चालणे, जाणे.). २. घशातील घरघर आवाजाने, आवाज करून. (क्रि. वाजणे.) ३. कठीण; राकट; खरबरीत (स्पर्श). (क्रि. लागणे.) [ध्व.सं.]

**खरखरणे** अक्रि. १. खडखड असा आवाज होईल असे ओढले जाणे (जहाज वाळूवरून, फांद्यासह झाड रस्त्यावरून); खरखर आवाज करणे; खडाडणे; खरारणे किंवा वाजणे. २. घरघरणे (कफाने घसा). ३. ठसठसणे; ठणकणे; दुखणे (डोळे).

**खरखरमुंडा-ढा** पु. १. मुसलमान जातीतील भिक्षेकऱ्यांचा एक वर्ग, व्यक्ती. हे, लोकांनी भिक्षा द्यावी म्हणून आपल्या छातीवर, हातावर, डोक्यावर, दंडावर जखम करून लोकांकडून आपली कीव करवून घेऊन भिक्षा मिळवतात : 'मलंग भडंग कलंदर। खरखरमुंडे।' - दावि ४७४. २. भिक्षा मागणाऱ्या हिजड्याबरोबरचा एक सोबती. पहा : **मुंडा.** ३. (ल.) निष्कांचन, अनाथ, कफल्लक माणूस. ४. (ल.) आक्रस्ताळेपणा, दुराग्रह करून आपले म्हणणे खरे करू पाहणारा.

**खरखरा** पु. पहा : **खरखर.** १. कसोटीचा खरखरीत दगड. २. डोळ्यांचा ठणका. ३. तळमळ; चुटपुट; घोर; काळजी; हुरहुर. (क्रि. फिटणे, जाणे, फेडणे.) : 'लागे स्मरूनि अनाहत विदुरवचन मानसा खरखरा हो।' - मोशल्य ४. ५३. ४. असंतोष; रुसवा; नाखुषी. ५. चडफड; तळमळ; तडफडणे; उसासणे (रागावलेल्या अथवा महत्त्वाकांक्षी माणसाने). (क्रि. येणे, लागणे, राहणे.) ६. कंडू; खाज; खाजेचा उमाळा. (क्रि. सुटणे, होणे, लागणे.) ७. घशात दाटलेला कफ. ८. (क.) घरघर वाजणे. (क्रि. होणे, लागणे.) ९. धास्ती; भीती; धक्का. (क्रि. बसणे.) [ध्व.]

**खरखराट** पु. खरखर असा अतिशय मोठा व कर्कश आवाज; खडखडणे; खरखरणे इ.

**खरखरी** वि. खरबडीत; निसरडी नव्हे अशी; खरखरीत : 'दरवाजापुढील रेवणी खरखरी करवावी.' - पेद २९. १५१. [ध्व.]

**खरखविणे** (क्रि.) काळजी करणे.

**खरखरी** दुरुस्त; घासूनपुसून सज्ज.

**खरखरीत** वि. खरबरीत; ओबडधोबड; वाळलेले; शुष्क; राकट; मृदुता किंवा गुळगुळीतपणा नाही असे (लाकूड, दगड, वस्त्र इ.) [ध्व.]

**खरखशा** पु. कलह; तंटा; भांडण : 'राजे माधोसिंग यासीं खरखशा प्रथम जाटानें केला.' - पेद २९. १६२. [फा. खरखिशा]

**खरखस्ता** स्त्री. उपद्रव; त्रास : 'त्या गावासी खरखस्ता न करणे परंतु न आइकिले.' - पेद २१. १६६.

**खरखा** पु. अंगावरील पुरळ; अंगाला सुटणारी कंड. पहा : **खरका**

**खरग** न. शेतातील पीक न उगवलेला भाग; मोकळी जागा. (व.)

**खर(रं)गणे** उक्रि. चांगले तळणे; खमंग होईपर्यंत तळणे; खरपूस भाजणे. अक्रि. उन्हाने लाल होणे, सुजणे (डोळे, गाल, तोंड इ.).

**खरगा, खरगाड** पु. दोन दरवाजे असलेला व उघडता-मिटता येणारा तंबू. मुसलमान बादशाहांच्या मोठ्या डेऱ्यात असे छोटे तंबू उभे करून डेऱ्यात वेगळी- वेगळी दालने किंवा खोल्या करून घेत. [फा.]

**खरगोश-स, खर्गोश-स** पु. ससा : 'तेथें खर्गोस निघाला, त्याचे पाठीं कुत्रें लागलें.' - ऐस्फुले २१. [फा.]

**खरच-ची, खरचणे, खरच वेच,** पहा : **खर्च**

**खरचटणे** अक्रि. चोळवटणे; खरंगटणे; घासणे; कातडी निघणे. [सं.]

**खरचटा** पु. धक्का : 'तेवढ्यात मागून आलेल्या मोटारनं एका गाडीला जोराचा खरचटा दिलाच.' - बाविबु १४६.

**खरचणे** अक्रि. मरणे : 'काय कुणी खरचलं का?' - बाब ८९.

**खरचर** वि. तीक्ष्ण.

**खरचाणी** स्त्री. लहान व रुचकर माशाची एक जात.

**खरचिंब** न. आत दाणा नसलेली भाताची लोंबी, लोंगर; पळिंज; पोल; बिनदाण्याचे कणीस. (राजा.)

**खरज** पु.१.(संगीत) नीच स्वर; घोगरा आवाज. २.खर्ज स्वर वाजविण्याजोगा वीणा इ. वाद्यांना लावलेला घोर.पहा : **खर्ज** [सं. षड्ज]

**खरजाई** स्त्री. खरजेची देवता. हिचा अंगारा लावला म्हणजे खरूज जाते अशी समजूत आहे.

**खरजुडा-ला** वि. खरजेने भरलेला; ज्यास खूप खरूज आली आहे असा (माणूस). [सं. खर्जु]

**खरजुवप** सक्रि. खाजविणे. (गो.)

**खरजू** स्त्री. खाज. (गो.) [सं. खर्जु]

**खरट** पु. १. वाळू; खडी. २. खडा लागून होणारे क्षत (माणसाच्या, जनावराच्या पायाला, तळव्याला). पहा : **करट**(प्रां.)

**खरटणे** अक्रि. वाढ खुंटणे. पहा : **खुरटणे**

**खरटणे** पहा : **खरडणे**

**खरटिवाळा** पु. एक रणवाद्य : 'तेथ वाजती शंख काहाळा। तुररिआं तोंडी खरटिवाळा।' - शिव १०२६.

**खरड** स्त्री. १. घाईघाईने लिहिलेला कागद अथवा लेख, आकृती, खर्डा, आराखडा. २. रेघोट्या; चिरखुड्या. ३. खरडपट्टी; पाणउतारा; निर्भर्त्सना. (क्रि. काढणे, निघणे.) ४. धातू शुद्ध करताना तिच्याभोवती जमणारी राख व माती (ही धातूपासून खरडून काढलेली असते म्हणून हा शब्द); खरडून काढलेला भाग. ५. टक्कल. (गो.) ६. केसात साचणारा मळ. (गो.) [सं. क्षर]

**खरड** स्त्री. दुसऱ्याचे म्हणणे चुकीचे आहे असे दाखवणे; खोडून काढणे : 'एखाद्या पक्षाचे खंडन म्हणजे त्यांची मुळासकट खरड...' - लोक्षि १० (प्र).

**खरड** पु. १. खाणीत नैसर्गिक स्थितीत सापडणारे रत्न. २. ओबडधोबड खडा. पहा : **खरट**

**खरड(डे)घाशा** वि. १. (उपहासार्थी) सरासरी लेखन जाणणारा, परंतु त्यातील मर्म न जाणणारा (कारकून). २. अकुशल; बिनकसबी (लेखक, न्हावी, सुतार).

**खरडघाशी** पहा : **खरडेघाशी, खर्डेघाशी** : 'एका पस्तीस रुपड्यांसाठी सकाळपासून संध्याकाळपर्यंत खरडघाशी करावी लागते.' - आजच ५५.

**खरडणे** उक्रि. १. ओरखडणे; ओरबडणे; खरखरीतपणे चोळून काढणे; घासटणे. २. खुरपणे; उपटणे (गवत, तण इ. खुरप्याने). ३. निष्काळजीपणाने, खरखरीतपणे (खरखर वाजत); हजामत करणे, भादरणे, तासणे. ४. ओबडधोबड रीतीने, कसे तरी, कच्चे, घाईने लिहिणे, टिपणे : 'जन्माच्या कर्मी कुठें कोटी आठवली ती सुद्धां शिळी, पण तिच्या जिवावर चार पानें खरडलीं.' - नाकु ३.४५. ५. संक्षिप्त टाचण करणे; सारांश, मुद्दे लिहून काढणे. ६. धसाफशीने ओढणे, नांगरणे, दळणे इ. ७. चेचणे; चुरणे; ठेचणे. पहा : **खरंगटणे**. ८. खरड काढणे; पाणउतारा करणे. ९. (ल.) समूळ उच्छेद करणे; खरडून काढणे. (वा.) **खरडून काढणे** - हाकलून लावणे; निपटून काढणे : 'कासीबंदराकडून पांच गलबतें भरून आली त्यांनीं मार केला व आमचे लोक खरडून काहाडले.' - पेद ३३. १००.

अक्रि. (प्राणी) ढुंगणावर सरकणे, चालणे; रखडणे; फरफटणे; सरपटणे; पाय ओढीत चालणे.

**खरडणे** अक्रि. खुरटणे; भुईत जाणे; वाढ खुंटणे.

**खरडत** क्रिवि. ढुंगणाने सरपटत; ढुंगण घासत.

**खरडनिशी** स्त्री. १. गिचमिड, वेडेवाकडे लिखाण, लेखन. २. खर्डेघाशी.

**खरडनीस, खरडनिशा** वि. १. खर्डेघाशी करणारा. २. निष्काळजीपणाने लिहिणारा; वाईट लेखक.

**खरडपट्टी** स्त्री. १. पहा : **खरड**. कठोर निर्भर्त्सना; दटावणी; जोराची चापणी; बोडंती; भोसडपट्टी; दोष किंवा अपराध दाखवून रागाने झाडलेला ताशेरा. (क्रि. काढणे, निघणे.) २. तोटा, नुकसान सोसावयास लावणे. (क्रि. काढणे, निघणे.)

**खरडबरड** वि. दगडाळ; नापीक (जमीन).

**खरडवही** स्त्री. वेगवेगळ्या विषयांची टिपणे झटपट घेण्याची वही.

**खरडा, खर्डा** पु. १. खरडून काढलेले अन्न, खरकटे (स्वयंपाकाच्या भांड्यांतून). २. भरडलेल्या, भाजलेल्या, मिरी, मेथ्या इत्यादिकांचा चुरा; तिखट (ओल्या मिरच्यांचे); ठेचा; हिरव्या मिरच्या तव्यावर परतून केलेला पदार्थ.

**खरडा-डे, खर्डा** पु. १. गिचमिड लिहिलेला कागद; अक्षर घटविण्याकरिता लिहिलेला बंद; खरडे. २. आराखडा; कच्चे टाचण; कच्चा मसुदा; टाचणवही; चोपडी. (वा.) **खरडे घासणे** - १. लिहिण्याचे कष्टदायक काम करणे. २. (निष्काळजी-पणाने) लिहिणे; खरडणे; भरकटणे.

**खरडा, खर्डा** पु. ओबडधोबड, खेंगडेमेंगडे मोती; गोलबंद नसणारे मोती; हलक्या मोत्याचा दाणा.

**खरडा** पु. खरबुजाची एक जात.

**खरडा** पु. देवी व गोवर यांमुळे आलेली पोटातील कडकी, उष्णता.

**खरडा-ड्या** पु. चित्ता; बिब्या वाघ : 'होती कोंबडी ती खाल्ली खरड्यानें.' - मसाप १. १. २.

**खरडा** पु. १. भाताच्या लहान भरलेल्या ओंब्या; साळीच्या लहान, भरदार कणसांचा समुदाय. (को.) २. गुरांनी खरडून खाण्याजोगे म्हणजे फक्त खुरपता येण्यासारखे आखूड गवत.

**खरडा** पु. तुपात तळलेले (जायफळ, बडिशेप, मुरुडशेंग यांचे) चूर्ण. हे रेच बंद होण्याकरिता घेतात.

**खरडा** पु. तुटवडा; कमीपणा; टंचाई (खरडावे लागेल इतके). (क्रि. लागणे, पडणे.) उदा. पाण्याचा खरडा लागला अथवा पडला = विहिरीचे पाणी इतके थोडे उरले आहे की, ते (नरोटीने) खरडले पाहिजे. तसेच धान्याला खरडा लागला = पिकाचा तुटवडा पडला.

**खरडा** पु. पुठ्ठा; पुष्टीपत्र (कार्डबोर्ड). (ना.)

**खरडा** पु. (सोनारी) चांदीच्या सुताच्या एका टोकास दिव्यावर धरून रवा किंवा गोलाकार करतात ती काडी. ही झुब्याच्या कामी उपयोगी पडते.

**खरडा** पु. खिसा. (तंजा.)

**खरडी** स्त्री. १. जोराची खरडपट्टी; निर्भर्त्सना. (क्रि. काढणे, निघणे.)

**खरडी** स्त्री. एक चर्मवाद्य; एक प्रकारची टिमकी.

**खरडी** स्त्री. काथ्याचा एक धागा; माडाच्या चुडतीचा बारीक दोरा; काथवडी.

**खरडी** स्त्री. पुस्ती; कित्ता गिरविणे : 'रोज अर्धा तास खरडी (बालबोध आणि मोडी)...' - माजी ७०.

**खरडी** स्त्री. पुन्नाग झाडाचे कोवळे किंवा सुकलेले फळ; उंडी. (कु.)

**खरडी** स्त्री. बैलगाडीचा वेग कमी करण्यासाठी चाकाच्या मागे लावलेला दांडा किंवा अडणा. (कु.)

**खरडी** स्त्री. सोललेली पण न तासलेली सुपारी. (कु.)

**खरडी** स्त्री. मृदंग इ. वाद्यांस लावलेली कणीक खरडण्याचे साधन. (कर.)

**खरडू** न. ऊचे पोर; बारीक ऊ. (कु.)

**खरडे** पहा : **खरडा**

**खरडेघाशी, खर्डेघाशी** स्त्री. निव्वळ कारकुनी.

**खरडेवजा, खरड्याचे मोती** हलके मोती. पहा : **खरडा**

**खरड्या** वि. १. गचाळपणाने लिहिणारा; ओबडधोबड हजामत करणारा. २. निव्वळ खरडेघाशा, कारकुंडा; न्हावडा.

**खरणी** स्त्री. घोड्याला होणारा एक रोग. यात घोड्याच्या दोन्ही नाकपुड्यांतून वाफा निघतात, दुर्गंधी सुटते, नाकपुड्या ताणल्या जातात, घोडा पाणी पीत नाही व अगदी कृश होतो. - अश्वप २. १३७. [सं. क्षरण]

**खरणे** अक्रि. १. लघवीतून खर जाणे. २. वीर्यस्खलन होणे (मनुष्य, पशू इ. चे). [सं. क्षरण]

**खरतड** वि. १. पहा : **खडतर.** २. स्पष्ट; निर्भीड.

**खरतडणे** अक्रि. १. पहा : **खडतरणे.** २. शरीरास लागणे, जखम होणे.

**खरतड बोहणी** लाभदायक बोहणी. (ना.)

**खरतर** वि. तीक्ष्णतर : 'अन्योन्यासि विदारिति ते खरतर। नरहर सिंह शावकसे।' - मोभीष्म ३. ५१. [सं.]

**खरतुडी** स्त्री. पांढरी फुले आणि खाण्याजोगी मुळे असणारी एक वनस्पती. ही पावसाळ्याच्या आरंभी महाबळेश्वरकडे आढळते.

**खरदडला** वि. खडबडीत. (ना.)

**खरदळणे** सक्रि. खंडविखंड करणे; तुकडे तुकडे करणे; खंडळणे : 'तुमतें खाणौनि काढैनु तरीं। ऐसें खरदळितुसें।' - शिव १००३.

**खरनखर** क्रिवि. सरतेशेवटी. पहा : **अखरनखर**

**खरप** स्त्री. भांड्याच्या तळाची जळ; मस; काजळ. [सं. खर्परी]

**खरप** पु. शस्त्रे पाजळण्याचा एक दगड, निसणा : 'तो त्याला (भाल्याला) आठवड्यातून एकदा तरी खरपावर घासत असतोच.' - वानगी ८०. (ना.) [सं. क्षर]

**खरपट-ड** न. १. (रिकाम्या विहिरीच्या बाजूला अथवा तळाला भांडे आपटल्याने होणारा आवाज, त्यावरून) अडचणीची, दुःखाची, हालाची ओरड, हाकाटी (अवर्षणामुळे आणि त्यामुळे पडलेल्या दुष्काळामुळे, तसेच तळी, विहिरी यांच्या कोरडेपणामुळे). २. दुष्काळ; अवर्षण. (क्रि. पडणे.) : 'एखादे सालीं खरपड पडलें... म्हणजे तितक्यानेच त्यांची नुकसानी होते.' - बाळ २. १२८.

**खरपट-ड** न. १. खडपा; मुख्यतः जे भाजल्यासारखे दिसतात ते पर्वताचे मोठे खडक २. मुरूम, दगड यांनी बनलेली जमीन; कातळवट जमीन. ३. डोंगरावरील सपाटी. ४. फोड. (क्रि. येणे, उठणे.) ५. नापीक, खडकाळ जमीन : 'मला चांगलं तरी शेत द्यावं. तर माझ्या गळ्यात खरपट बांधलं.' - सराई २५.

वि. मुरूम व दगड यांनी कठीण झालेली (जमीन).

**खरपड-डी** स्त्री. टोळांची एक जात. पहा : **खरपुडा**

**खरपडी** पहा : **खरपुडी**

**खरपण** न. खरवड; भांड्याच्या तळाला लागलेला थर : 'सायीच्या ऐवजी चरवीच्या बुडाचे खरपणहि मिळे' - स्मरण ६२. [क.]

**खरपणे** अक्रि. खरडून, ओरखडून, जोराने काढणे; खरवडणे.[सं. क्षर]

**खरपर** वि. खाष्ट; कडक : 'येथिल दैवत रे बहू खरपरे कर्तृत्व खूणा अशा।' - आमहाबळ ४४.

**खरपवप** सक्रि. खाजवणे. (गो.)

**खरपळ** पहा : **खरपुडी**

**खरप(पु)ळी** स्त्री. खरपुडी; सालपट; थापटी (वाळलेला चिखल, गवरी इत्यादीची).

**खरपा** पु. बारीक सूत ओढण्याची पट्टी.

**खरपाडणे** न. (सुतारी) लाकूड तासण्याचा रंधा. (बे.)

**खरपी** स्त्री. १. भाजून दळलेल्या अगर वाटलेल्या धान्याचा एक पदार्थ. २. जळक्या भांड्याच्या बुडाची खरवड; मस. [सं. खर्परी]

**खरपुट** न. जनावराच्या पायाचा खूर : 'पुढिलें खरपुटें ठेवी कुंभस्छळी दिग्गजांचां।' - शिव १००७. [सं. क्षरपुट]

**खरपुडा** पु. बारीक टोळांची एक जात. हे जमिनीवर व कोवळ्या पिकांवर पडतात.

**खरपु(पो)डी** स्त्री. १. वेगळा झालेला, सुटलेला तुकडा (झाड, भिंत, त्वचा इत्यादींचा); खपली (जखमेची); पोपडा; साल; जळक्या भाताचा भांड्याला लागलेला लेप. २. पहा : **खरपुडा.** ३. पहा : **खरतुडी** [सं. क्षर, पुट]

**खरपु(पो)डी** स्त्री. बगळा; करकोचा.

**खरपुंचे, खोर्पुंचे** सक्रि. खरपणे; ओरपणे; ओरखडणे; खाजवणे. (गो.)

**खरपूस** वि. १. खमंग; पिवळसर व पिंगट रंग येईपर्यंत व खुसखुशीत, रुचकर होईपर्यंत भाजलेला; तळलेला (पदार्थ). २. (ल.) खडखडीत; स्पष्ट; खसखशीत; निर्भीड; दणदणीत (हुकूम); निक्षून केलेले (भाषण); ठाम; खणखणीत (हुकूम). ३. कडक; खरमरीत (उपाय, योजना) : 'व्रतें आचरे खरपुसें।' - ज्ञा १६. ९२. (वा.) ० **ताकीद करणे** - निक्षून सांगणे; बजावणे. ० **समाचार घेणे** - १. यथायोग्य पारिपत्य करणे; उट्टे काढणे. २. बेदम ठोकणे; बदडणे. ३. परिपक्व (मसलत, विचार). ४. बोचणारा; झोंबणारा; तीक्ष्ण : 'पावोनि तो स्पर्शु। मळ्यानिलु खरपुसु। येर्णे मानें पशु। कुरवाळणें॥' - ज्ञा १३. २९०. [सं.]

क्रिवि. फार; अतिशयितपणे (जोर देण्यासाठी योजतात).

**खरपूस** वि. चलाख; हुशार; साहसी (माणूस, स्वभाव).

**खरपे** न. मातीचे ढेकूळ, डिखळ : 'जे सात्विकाचेनि वडपें। गेलें

आध्यात्मिक खरपें।' - ज्ञा ६. ४९०.

**खरब** न. खडकाळ जमीन. (व.) पहा : **खरबड, खराब** [फा. खराब]

**खरबट्ठर** वि. मन वळविण्यास कठीण. (व.)

**खरबड** वि. १. खडबडीत; चढउताराची (जमीन). २. काही पदार्थ चिकटून, लडबडून खडबडीत झालेले (भांडे, हात, अंग इ.).

**खरबडणे** अक्रि. (अन्न, कणीक, भात इत्यादींनी) गदळ होणे; बरबटणे. पहा : **करवडणे**

**खरबडी(री)त, खरबडा, खरबुडीत** वि. ओबडधोबड; उखीरवाखीर.

**खरबा** स्त्री. डोक्यावरील मेलेली त्वचा. (कु.)

**खरबा-बी** पु. स्त्री. गोड्या पाण्यातील एक मासा. (कु.)

**खरबुजी** स्त्री. खरबुजाचा वेल. पहा : **खरबूज**

वि. खरबुजाच्या आकाराची (तपकिरीची डबी, मणी, चुनाळे इ.).

**खरबुजी चेहरा** देवीच्या वणांनी भरलेला असा चेहरा; ओबडधोबड, कुरूप चेहरा.

**खरबूज** न. खरबुजाची वेल व त्याचे फळ. कलिंगडाप्रमाणे याचा वेल वाढतो. याचे फळ वाटोळे, तांबूस रंगावर असते. 'तयापाशीं होतीं खरबुजे दोन। ती केलीं गुरूसी अर्पण।' - शनि २८०. [फा.]

**खरमरा-ऱ्या** वि. १. कठोर; खरबरीत; कठीण. २. प्रखर; रखरखीत : 'तेथ उन्हाळा आगी खरमरा।' - ज्ञा १६. ३९५. ३. हुशार; चलाख; खणखणीत. [ध्व.]

**खरमरी** वि. लढण्यासाठी उत्सुक.

**खरमरीत** वि. १. तीक्ष्ण; तिखट; झणझणीत; सडेतोड (भाषण, टीका); तडफदार; परिणामकारक; प्रभावी (उपाय, साधन); स्पष्ट; खडखडीत (बोलणारा माणूस).

**खरमस्त** वि. १. पाणीदार; चलाख; तापट (घोडा). २. घमेंडखोर; गर्विष्ठ; हवेत उड्या मारणारा. [फा.]

**खरमस्ती** स्त्री. १. माज; मद; मस्ती; रग (घोड्याची). २. गर्व; घमेंड; दिमाख; डौल. (क्रि. मोडणे, जिरवणे, पुरवणे.)

**खरमंजरी** स्त्री. अघाडा; अपामार्ग झाड. [सं.]

**खरमा(म)टी** स्त्री. एक झाड. हे उंच व बारीक असते. ओमणाच्या उपयोगी पडते.

**खरमाल** स्त्री. (नाविक) शिडाची दोरी टांगून ठेवण्याची जागा. (हेट.)

**खरलखोचल** वि. चढउताराची; अडचणीची : 'डोंगर अडसर, खरलखोचल खडकदेखील नदीनाले मोजले.' - मइसा ६.२७.

**खरव(वा)ई** स्त्री. (तांबट, सोनार) भांड्यांना विशिष्ट आकार देण्याचा किंवा भांडी ज्याच्यावर ठोकतात असा लांबट व चौरस गज, पहार. याला टोकाशी वळण देऊन उभट ऐरणीप्रमाणे सोय केलेली असते.

**खरवट** वि. खडबडीत; खरबरीत; खरवती

**खरवड** स्त्री. खोडून काढणे : 'खऱ्यांच्या आक्षेपाची ही खरवड आहे.' - सको ९१.

**खरवड-डी** स्त्री. १. पदार्थ शिजत अगर आटत असता तळाला कठीण झालेला आणि भांड्यांना चिकटून राहिलेला खरडा, जळकट भाग (भाताचा, तुपाचा, दुधाचा); खरपुडी : 'भ्रतारासी करी झगडा। तया घाली खरवडी कोंडा।' - कथा ५. २४९. २. अशा रीतीने चिकटून राहिलेला आणि खरडून निघण्याजोगा भात. ३. (ल.) खरडपट्टी; निर्भर्त्सना; ताशेरा; बोडंती. (क्रि. काढणे.) ४. (ल.) संपत्तीचा शेष; किडुकमिडूक; गडगंज जाऊन उरलेला अवशेष. ५. निकृष्टता दाखवण्यासाठी उपहासाने योजतात. ६. (निंदाव्यंजक) अर्क; गाळ; अतिशय खोडसाळ, त्रासदायक माणूस. ७.नारळाची खव, खरड. (कु.) [सं. खरवृत्त]

**खरवड** पु. अति लहान मासा, मासळी. (कु.गो.)

**खरवडणी** पहा : **खरवड १**

**खरवडणे** न. पदार्थ खरडून काढायची वस्तू (शिंप, कलथा इ.).

उक्रि. खरडून काढणे; घासणे; साफ करणे; निरपणे; खवणे (शिंप, खवणी, नख इत्यादिकांनी).

**खरवड्या न्हावी** वाईट हजामत करणारा हजाम; अकुशल कारागीर.

**खरवत-ती** स्त्री. १. एक खरखरीत पानांचे झाड. २. (सुताराची) करवत; अरकस. (गो.कु.)

**खरवशिंगाळा** पु. समुद्रातील शिंगाळा माशाची एक जात.

**खरवस, खरस** पु. स्त्री. जनावरांचे कोवळे (व्याल्यानंतरचे) दूध तापवून त्यात गूळ घालून तयार केलेले खाद्य. [सं. क्षार + रस]

**खरवस, खरस** पु. स्त्री. तहानेमुळे अथवा फार बोलण्यामुळे तोंडाच्या कोपऱ्याकोपऱ्यात जमणारा पांढरा फेस; चिकटा. [सं. क्षर - क्षार + रस] (वा.) ० **तोंडी येणे** - अतिशय दमणे; श्रांत होणे : 'विस्मरणाची खरस तोंडी।' - एरुस्व ११. ५५.

**खरविखर** वि. चढउतार असलेले; उंचसखल. (प्रां.)

**खरविणे** उक्रि. खोल व भरपूर खोदणे; पूर्ण साफसूफ करणे; उपसा काढणे (विहीर, डबके, गटार यांचा). (को.)

**खरशिंग, खरशिंगळ, खरशिंगूळ-समुळी, खरसांबळी-ळे** स्त्री. एक वेल; मेंढशिंगी. ही मोठी व गाठाळ असून पाने कडुनिंबाच्या पानासारखी असतात. शेंगा पाऊण हात लांबीच्या असून खाण्याच्या (भाजीच्या) उपयोगी असतात. हिच्या लाकडाचे मृदंग व तबले करतात. शेंगेला खरशेंग म्हणतात.

**खरशी** स्त्री. गोड्या पाण्यातील एक मासा.

**खरशी-सी** पहा : **खरवस, खरस** : 'हातपाय जाहले गोळा, मुखा खरशी आलीसें।' - कथा ६. १५. ५१.

**खरस** पु. पहा : **खरवस, खरस**

स्त्री. धाप; दमा. (गो.)

**खरसणे** अक्रि. धाप लागणे : 'स्वामी मार्गी भ्रमला खरसुनि।' - क्रिपु २. २४. १७.

**खरसांबळी** स्त्री. एक वेल; आबई; कोयते वाल.

**खरसिंग** न. एका प्रकारचे शिंगाचे वाद्य : 'खिनखिनतीं तुररिआं। खरसिंगेसी।' - शिव ५२४.

**खरसुंचे** अक्रि. खरस येणे; दम लागणे. (गो.)

**खरसुंडी** पु. बैलाची एक जात : 'जवारी, हानम, खरसुंडी अशा बैलाच्या अनेक जाती समजतात.' - भेटीगाठी ६६.

**खरळ** न. कडा, दरड : 'साठ हात चिरेबंदी परठाणा होता तेव्हां खरल कोसळलें ते घरावरी पडिले.' - ऐलेसाखं ४. ६५.

**खरळखोचर** पु. १. छिद्र; खाच खळगा. २. (ल.) दोष.
वि. खाचखळग्यांची; लहान लहान खळग्यांनी युक्त. (को.)

**खरळा** पु. बोथट व जाड धारेचा विळा.

**खरंगटणे, खरंगणे** उक्रि. १. ओबडधोबड रीतीने भरडणे, वाटणे (दोन दगडांमध्ये दाबून, कुटून). २. चेचणे; चिरडणे (मिरी, मिरच्या इ.).

**खरंटा** पहा : **खराटा**

**खरंप** स्त्री. १. आतड्यातील तिडीक, वेदना. (राजा.) २. आमांशामुळे झालेला मुरडा.

**खरंपणे** अक्रि. खरंप (आतड्याचा) रोग होणे. (राजा.)

**खरंवटी** पहा : **खरमाटी**

**खरा** पु. १. एखाद्या आम्लात भिजत घालून तांबडा केलेला किंवा कुंकू तयार करण्याकरिता सालपट काढलेला हळदीचा तुकडा, कुडे; गंधाचा रवा. जसे :- हळकुंडाचा खरा, कुंकवाचा खरा, खडा. २. पुटकुळी; कातरा; उष्णतेमुळे तोंडात येणारा फोड. ३. कोइली वगैरे शस्त्रांचे दाते. ४. खडा : 'निश्चयाचा खरा। गांठीं बांध वीरा।' - ज्ञा १४. १२८.

**खरा** वि. १. सत्य; खोटे नव्हे असे. २. अस्सल; अकृत्रिम; बनावट नसलेले; शुद्ध. ३. चांगले; हिणकस नसलेले; बिनभेसळीचे (नाणे, मौल्यवान वस्तू). ४. सच्चा; विश्वासू; प्रामाणिक; निष्पाप; लबाड नसलेला. ५. बरोबर; सरळ; दोरीसूत (तयार केलेला, बसलेला खांब, तुळई). ६. संपूर्ण; बरोबर; पुरेपूर; चालीला अनुसरून; वर्तावळ्यासह किंवा वाढीसह. ७. ठाम; निश्चित; कायम (करार इ.). (क्रि. करणे.) ८. न्यूनतारहित; पुरेपूर (वजन, परिमाण).
क्रिवि. बरे तर; निदान एवढे तरी असू दे; निदानी. (वा.) ० **करणे** - अमलात आणणे. कृती व शब्द यांत मेळ बसविणे. ० **करून देणे** - खरा व अस्सल आहे म्हणून सिद्ध करणे; चांगलेपणा पटवून देणे. [क.] [सं. खलु]

**खराई** स्त्री. १. सत्यता; खरेपणा; वास्तविकता. २. प्रामाणिकपणा; इमान; नेकी. ३. शुद्धता; अस्सलपणा. ४. नीटनेटकेपणा; व्यवस्थितपणा.

**खराई** स्त्री. वीर्यांश; धातुरोगात जाणारी वीर्याची खर. पहा : **खर २**

**खराखर-रा** क्रिवि. ओढलेल्या, फरफटत नेलेल्या वस्तूचा आवाज होऊन, आवाज करून. पहा : **खरखरा**

**खराखु(खो)रा** वि. निश्चयेकरून जो खोटा नव्हे तो; खरोखर खरा; अगदी वास्तविक; सत्य; न्याय्य; विश्वासू. पहा : **खरोखर**

**खरागणे** अक्रि. १. ऊन होणे : 'नातरी खरागलेया पाये। डोळ्यांची दृष्टी जाये।' - ज्ञाप्र २१९. २. करपणे. (कु.)

**खरागलेपण** न. रुक्षता; खरख : 'देही खरागलपनें पदार्थ सेवनाची वासना उपजे' - आचारभाष्य [सं. खर = रुक्ष]

**खराच-चा** पु. (सांकेतिक) घरफोडीचे एक हत्यार.

**खराट** न. राडेरोडे; गाळसाळ; अवशिष्ट सामान.
वि. १. नापीक; अनुत्पादक (जमीन, प्रदेश). २. पर्णहीन; खराटलेले; बोडके (झाड, झुडूप). ३. पडलेल्या इमारतीचे, गाळसाळ, उरलेले (सामान = विटकरीचे, कौलांचे, चुन्याचे तुकडे, राडेरोडे, माती इ. इमारत बांधल्यावर उरलेले).

**खराटणे** अक्रि. खराटा होणे; पाने झडणे, गळणे (झाडाझुडपांची).

**खराटा** पु. १. नारळी, पोफळी, तूर इ. च्या हिरांची अगर बांबूच्या पात्यांची किंवा तुकड्यांची केलेली केरसुणी : 'तुआं खांडेआं खरांटेनी। दानवप्रतापु केरू फोडौनि।' - शिव १५८. २. झिजलेली (नुसता बुडखा राहिलेली) हिरांची केरसुणी. ३. पाने गळलेले, वठलेले झाड. ४. (ल.) दुष्काळ; पूर्ण अभाव; लूट; तोटा : 'तैसें आपणपें नाहीं दिठे। जयातें स्वसुखाचे सदा खरांटे।' - ज्ञा ५.११२. [सं. क्षर] (वा.) ० **फिरणे** - सर्वनाश होणे; विध्वंस होणे. ० **फिरविणे** - नांगर फिरविणे; विध्वंस करणे; सत्यानाश करणे (देश, ग्राम, संपत्ती इत्यादींचा).

**खराटे** न. गुरांच्या पायांनी झालेला चिखल.

**खराड** पु. जोराने फाटणे; कडाडणे; गडगडणे.

**खराड** न. (स्था.) वस्तू फिरवून त्यांना आकार देण्याचे यंत्र.

**खराडा** पु. गुरांची प्रसूतीपासून सुटका करणारा गावठी वैद्य. (कु.)

**खराडी** स्त्री. खार; चानी. (व.)

**खराडी** स्त्री. १. अंबाडीच्या वाखाचा दोर वळण्याचे साधन. २. विहिरीतून पाणी वर काढण्याकरिता बसवलेली कप्पी. (खा.)

**खराणा** वि. गरम; उष्ण (दिवस, महिना या शब्दांना जोडून अव. प्रयोग). जसे :- खराणे दिवस = उष्णकाळचे दिवस. (को.) [सं. खर]

**खराती** स्त्री. कातण्याचे यंत्र.

**खरादणे** सक्रि. कातरणे : 'एक तोळा खरादलेली अगर कातरलेली श्रीवर्धनी सुपारी.' - ऐरापु २. ३९. [फा. खराद = कातकामाचे यंत्र]

**खरादी** पु. कातीव काम करणारा; अरकसी. [फा.]

**खराब** वि. १. नापीक; उद्ध्वस्त; ओसाड (जमीन, प्रदेश) : 'इकडे गुदस्तांच दंग्यामुळें खेडीं खराब होतीं.' - ऐलेसं २. ८५०. २. दुर्गुणी; विकृत; बिघडलेला; वाईट (वस्तू, माणूस). [फा.] (वा.) ० **करणे** - (रुपये - पैका - पैसा) व्यर्थ उधळणे. ० **वाटणे** - न आवडणे; वाईट वाटणे.

**खराब - हाल** वि. दुर्दशाग्रस्त; विपन्न : 'येथें आम्ही खराब-हाल आहों.' - जोरा ४.

**खराबा** पु. १. नापीक, टाकाऊ जमिनीचा, शेताचा तुकडा; रेताड, ओसाड जमीन. २. (नाविक) पाण्याच्या तळाशी असलेला खडकांचा थर; समुद्रातील खडक. हा गलबतांना नडतो. ३. नुकसान; तोटा : 'फार दिवस लष्करास ताकीद केल्यानें खराबा होईल.' - मइसा ६. ५९१. ४. बागायतीच्या जागेतच खातेदाराला घर बांधण्यासाठी दिलेली जागा. (कुलाबा) [फा. खराब]

**खराबी** स्त्री.१. नुकसानी; तोटा; हानी; दुर्दशा; हलाखी : 'तुमच्या लष्करची खराबी इराणीस कळली.' - पाब ३२.२. खेळखंडोबा [फा.] (वा.) **खराबीस येणे** – नुकसान होणे : उभय पक्षांची समजूत पडत नाही. दोघेही खराबीस येतात.' - लोश २२८. **खराबीस मिळवणे** – खराब करणे; दुर्दशा करणे : 'गांव खराबीस मैलवून उफराटी आमचीच नालीस हुजूर लेहून पाठविली.' - पेद ३०. १८१. [फा.]

**खराराणे** अक्रि. खरखर आवाज करणे; जोराने फाटणे. पहा : **खरखरणे, खराड** [ध्व.]

**खरारा** पु. १. घोड्याला खाजवण्याचे, त्याचे अंग साफ करण्याचे एक साधन. २. घोड्याला खरारा, मालिश करणे. [हिं.] (वा.) ० **खाजवीत नगारा वाजवीत** – काही तरी करीत (येतो, फिरतो). [ध्व.]
क्रिवि. खडखडत; ओरखडत; खरारा वाजविल्याप्रमाणे आवाज करून. पहा : **खराड, खराराणे**

**खरारोकडा, खऱ्यारोकड्याचा** वि. खरा आणि खात्रीचा; सच्चा आणि अस्सल; प्रामाणिक आणि मोकळ्या मनाचा; खरा आणि वास्तविक (माणूस, वस्तू, वर्तन).

**खराली-ळ-ळी** स्त्री. पु. लहान कोयती; गवत कापण्याचा लहान विळा. (को.)

**खराव** पु. १. (क.) खांबाची उंची वाढविण्यासाठी खाली अगर वर लावलेला तुकडा. २. ही खराव देण्याची क्रिया. ३. ह्या खराव देण्यामुळे वाढलेली (खांब इत्यादींची) उंची.

**खरावणे** सक्रि. (व्यवहार, सौदा इ.) पक्का करणे.
अक्रि. कायम, स्थिर, निश्चित होणे; वाढणे; टिकणे (वारा, उष्णता, पाऊस इ.) पहा : **खराविणे**

**खरावणे** अक्रि. आरक्त, लाल होणे (डोळे).

**खराविणे** उक्रि. एखादी गोष्ट पुनःपुन्हा समजावून सांगणे; निक्षून, जोराने बजावणे; खरमरीत ताकीद करणे; बारकाईने चौकशी करणे.

**खराविणे** उक्रि. चांगला साफ करणे; भरपूर खोल करणे (पाण्याचा पाट, विहीर, तळे वगैरे). (राजा.) [सं. क्षर]

**खरासली** स्त्री. पिवळ्या फुलांचे झुडूप. (झाडी.)

**खराळणे** अक्रि. गडगडणे; खरखरणे; आवाज करणे; वाजणे. पहा : **खराराणे** (व.)

**खराळा** पु. १. खरारा. २. गाडी वगैरे वाहनांचा दुरून ऐकू येणारा आवाज. (व. ना.)

**खरां(रा)ट टक्कल.** पहा : **खरड** (कु.)

**खरांटे** पु. बारीक कोका. (तंजा.)

**खरिदी** स्त्री. १. विकत घेण्याची क्रिया. २. विकत घेतलेला माल.

**खरिपी** वि. १. खरीप पिकासंबंधी. २. खरीप पीक येणारी (जमीन, प्रदेश).

**खरी** स्त्री. कातळावर माती टाकून बनवलेली शेतजमीन. (को.)

**खरी** वि. भयंकर; तीव्र : 'भयकरी तोंडी खरी गाजना' - गद्य १०२.
स्त्री. गाढवी : 'खरी टेकों नेदी उडे। लातौनि फोडी नाकाडें।' - ज्ञा १३. ७०४.

**खरी(रे)द-दी** स्त्री. विकत घेणे; विकत घेतलेली वस्तू. पहा : **खरिदी** : 'त्याला बाजारांतून कांही जिन्नस खरेदी करावयाचे होते.' - कोरकि ९२. [फा.]
वि. विकत घेतलेले; क्रीत. [फा.]

**खरी(रे)दखत-पत्र, खरेदीखत, खरेदीपत्र** न. विक्रेत्यापासून विकत घेणाराने मालकीहक्कासंबंधी लिहून घेतलेला कागद; विकत दिल्याबद्दलचा लेख.

**खरीदणे** उक्रि. खरेदी करणे; विकत घेणे.

**खरी(रे)द(दी)दार** वि. विकत घेणारा : 'परंतु त्या घरास कोणी खरीददार होत नाही.' - मइसा १२. १८२.

**खरीदफरोक्त-क्ती** पु. स्त्री. क्रयविक्रय; विकत घेणे - विकणे : 'माल घेऊन यात्रेस येऊन खरीदीफरोख्ती करणे.' - मइसा ७.१०६.

**खरीप** न. १. राडेरोडे, गोटे इ. भर घालण्यासाठी वापरतात ते; खडी, लहान दगड वगैरे २. पडलेल्या इमारतीचे लहानसहान दगड, विटा, कौले, माती इ. सामान, विहीर, खड्डा यांतून खणून काढलेला वरच्यासारखा माल, डबर. ३. उथळ जमीन; सपाट जमीन. (को.)
स्त्री. पडित जमिनीची लागवड. पहा : **खरी**

**खरीप-फ** पु. १. कार्तिकात तयार होणारे पीक; पहिले पीक; पावसावरील पीक : 'अश्विन मासी गारा पडल्या, खरीफ बुडालें.' - मइसा ३. १६४. २. खरीपाच्या हंगामातील धान्य; पूर्वधान्य (मूग, मटकी, बाजरी इ.) [फा.खर्फ]

**खरी हुंडी** पहा : **खडी हुंडी** : 'ते समयीं पांच हजाराची खरी हुंडी लिहून दिली आणि नवसे रुपये हुंडणावळ घेतली.' - वै ४ ल १७८. २५.

**खरुखरा** क्रिवि. खरोखर : 'मनमुराद धन खरुखरा।' - अमृत ५३.

**खरुत, खरोती** स्त्री. खरखरीत पानांचे एक झाड : 'खरुती म्हणून एक वनस्पती आहे तिची पानेंदेखील अशी असतात की, लोखंडावर जरी घांसली तरी त्याचा खीस निघतो.' - प्रति आत्म ३१४.

**खरूज** स्त्री. १. कंडू, खाज सुटून होणारा रोग; एक त्वचेचा रोग. या रोगात फार खाज सुटते व खाजवून खाजवून तेथे लहान लहान फोड येतात. खरूज हा सांसर्गिक रोग आहे. २. (ल.) द्वाड. [सं. खर्ज] [अर. खुराज] (वा.) **खाजवून खरूज काढणे** – आपल्यावर संकट अथवा अनर्थ ओढवून घेणे; भांडण उपस्थित करणे; शत्रूला जागे करणे.

**खरूस** पु. कुणबी स्त्रियांच्या डोक्यातील चांदीचा राखडीसारखा दागिना.

**खरूस** पु. खरवस (कोवळ्या, नव्या दुधाचा); चीक.

**खरे** पु. अव. १. उष्णतेमुळे जिभेवर येणारे काटे, पुरळ. पहा : **खरा** : 'खरे पडसा आणि खोकला। या नाव आध्यात्मिक।' - दास ३. ६. ३३. २. कोयती किंवा खराळी हिचे दाते.

**खरे** उद्गा. गप्प रहा. (कु. हेट.)

**खरे** वि. दाट; घट्ट. (व.)

**खरे-खोटे कसोटी** (शिक्षण) ज्या कसोटीतील प्रत्येक विधानापुढे 'खरे' किंवा 'खोटे' यांपैकी एकच शब्द त्या विधानाचा नीट विचार करून ठेवायचा असतो अशी कसोटी.

**खरेच** क्रिवि. खरोखर; अर्थात; बरोबर.

**खरेचा** वि. खरोखरचा; खरा; वास्तविक.

**खरेदार** वि. कडक; धारदार : 'खरेदार आवाजात बापुसाबानं विचारलं, का यिऊ नोका?' - मळणी ५९.

**खरेपण** न. तीव्रता : 'जयाचेया किरणांचेनि खरेपणें। नक्षत्रांचे होती फुटाणें।' - ज्ञा ११. २१२.

**खरोखर-री-रे, खरूखर** क्रिवि. निश्चितपणे; निःसंशय; वस्तुतः निखालस; खात्रीने; प्रत्यक्षात.

**खरोखरा** वि. (खरा याच्या अर्थाला जोर देण्यासाठी द्वि.) अगदी खरा; न्याय्य; आधारभूत. पहा : **खराखुरा**

**खरोटा** पु. एक खवल्या मासा. (कातवडी)

**खरोड** पहा : **खरवड**

**खरोडा** पु. १. पोटात पडलेली आग (उपास, ताप यामुळे). (क्रि. पडणे.) २. (खरवडण्याची जरुरी भासते अशी स्थिती) दुष्काळ; खडखडाट; खरड; संपुष्टात येणे. (क्रि. लागणे.) ३. खरवड (भांडी इत्यादिकांची). ४. खरचटून, घासून निघालेली कातडी. (क्रि. काढणे, निघणे.)

**खरोष्ठी** स्त्री. ख्रिस्तपूर्व काळात वायव्य भारतात आढळणारी, उजवीकडून डावीकडे लिहिली जाणारी एक लिपी.

**खरोष्ण** वि. १. अतिशय उष्ण. २. जहाल; तीव्र, तीक्ष्ण. [सं.]

**खरोस** पहा : **खरवस**

**खर्कणे** सक्रि. खर्च करणे : 'आनि तीयेसी खर्कुं नेदी' - पंचो १५९. २५.

**खर्क(र्ख)णॉ** पु. सुपाऱ्या गोळा करण्याचे पात्र; बांबूच्या सऱ्यांचे गोलाकृती पात्र. (गो.)

**खर्कशा** पु. तंटा; कलह; गर्गशा : 'तुळाजी आंग्रे हमेश मुंबईकरांशीं खर्कशा व मुखालिफत करूं लागले.' - ऐलेसं ७. ३५६५.[फा. कर्कशा]

**खर्खर-रा** स्त्री. पु. १. खुरखुर; खंत; हुरहुर; उत्कंठा : 'म्हणून हृदयास वाटे खर्खरा॥' - प्रभा १०१. पहा : **खरखरा.** २. मनातील शंका : 'खर्खर खुर्खुर खुंटलें।' - दास १४. ४. ३१. [ध्व.]

**खर्खरीत** वि. खडबडीत. पहा : **खरखरीत**

**खर्ग** न. तरवार. पहा : **खड्ग** : 'पाणिग्रहण ब्राह्मणांसी। खर्गलग्न क्षत्रियांसीं।' - एरुस्व ४. ४३. [सं. खड्ग]

**खर्च** पु. १. व्यय; वेच; उपभोग; विनियोग; विनियोग केल्यामुळे संपण्याची क्रिया. २. उपयोगी लावलेला, वेचलेला पैका, सामुग्री, सामान. ३. (कायदा) दाव्याला लागलेली रक्कम; पदरमोड. ४. (हिशेब) दुसऱ्याकडे रोख अगर अन्य रूपाने गेलेली रक्कम; जमेच्या उलट बाजू; जावक रक्कम. ५. (ल.) लढाईत पडणे; मृत्यू येणे : 'चांर पुरुष खर्च झाले.' - मइसा ३. ५१७. [फा.](वा.) **खर्चाला शेंडी फुटणे** – ठरवलेल्या अंदाजाबाहेर खर्चाची रक्कम जाणे; खर्च वाढणे. **खर्चावर कात्री चालवणे, खर्चाला कात्री लावणे** – खर्च कमी करणे; काटकसर करणे. **खर्ची पाडणे, घालणे** – खर्च झालेला दाखविणे : 'बिलें मुदतशीर करून त्याचा खर्च पाडून रक्कम आदा करणें' - ऐरापुविवि २३९. **खर्ची पाडणे** – आपल्याला पाहिजे तसे दुसऱ्याकडून वदवून घेणे.

**खर्च(ची)क** वि. १. उदार; सढळपणे खर्च करण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा; दाता. २. फाजील खर्च करण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा; उधळ्या. [फा. खर्ची.]

**खर्चणे** उक्रि. १. खरचणे; वेचणे; व्यय करणे; घालविणे. २. पैसा देणे; खर्च होईल असे करणे. ३. उपयोगी लावणे, चालविणे (बुद्धी, शहाणपणा). ४. हरण करणे; घेणे : 'मूर्च्छित करि भीमा ते इतरांचे तो पळें असुं खरचिता।' - मोकर्ण ४५.४. ५. मरणे; मृत्यू पावणे. ६. काढून टाकणे : 'आंगीचे शृंगारवस्त्रादिके खर्ची' - पंचो १६४.

**खर्चता** वि. खर्च करणारा.

**खर्च दरबार** दरबार खर्च; काम करून घेण्यासाठी दिलेली अंतस्थ लाच : '... जो काय खर्च-दरबार (दरबार-खर्च) तो कबूल करून लिहिणें सरंजाम पाठऊन देतो.' - इएमपी ११९.

**खर्चपट्टी** स्त्री. १. सरकारी कामगारांचा किंवा मोठ्या लोकांचा गावात मुक्काम असताना त्यांचा खर्च भागवण्यासाठी बसवलेला कर. २. गोसावी लोकांची टोळी आली असताना किंवा एखादी नैमित्तिक गोष्ट घडली असता ती भागवण्यासाठी बसवलेली वर्गणी.

**खर्चपोते** न. व्ययस्थान; खर्चाची बाब.

**खर्चबुडीत** पु. ज्याचा मोबदला मिळत नाही असा. उदा. भोजनखर्च.

**खर्चवर्ख** पु. व्ययपत्र; खर्चाची पट्टी, यादी.

**खर्चवेच** पु. १. एकंदर खर्चाला सामान्यपणे संज्ञा; खर्च वगैरे. २. मालाची मूळ किंमत व त्यावर झालेला इतर खर्च. [क. खर्चुवेच्चु]

**खर्चशिल्लक** स्त्री. खर्च झाल्यानंतर राहिलेली बाकी; हातात शिल्लक.

**खर्चशीर्ष** न. खर्चखात्याचे नाव.

**खर्चा** पु. वाटखर्च. पहा : **खर्ची** (ना.)

**खर्चाळ-ळू** वि. १. ज्याला फार खर्च येतो, ज्यात अतिशय खर्च होतो असा : 'फार खर्चाळ पोषाख करणे झेपणार तरी कोठून?' - माजी १२२. २. खर्चिक; खर्च करण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा.

**खर्चाटी-डी** स्त्री. कमी खर्च. (गो.)

**खर्ची** वि. कागदाचा एक प्रकार (सामान्य प्रतीचा) : 'येथें कागद खर्ची व खासा मिळत नाहीं.' - ऐलेसं ५६४७.

**खर्ची** स्त्री. १. योजलेल्या कामासाठी घेतलेला आगाऊ पैका; वाटखर्च : 'गंगु हैबती म्हणे स्वार पीटावा। ल्याहा कागद खर्ची बटावा॥' - प्रला १४०. २. खर्चण्यासाठी लागणारा पैसा : 'ही दर मुकामीं खर्ची धाडी शिंद्याला।' - ऐपो ४३३. ३. कामगारांना आगाऊ दिलेली रक्कम. ४. वेश्येला संभोगाकरिता द्यायचे द्रव्य. ५. पोटगी; उपजीविकेसाठी रक्कम, तरतूद.

वि. १. रोजच्या उपयोगी किंवा चालू कार्यापुरता उपयोगी; सामान्य; खाजगी; साधारण. खाशांच्या उलट : 'खासे व खर्ची मुदपाकाकरितां चुली.' - स्वारीनियम (बडोदे) ७४. २. (ल.) खर्चलेला, लढाईत पडलेला. ३. खर्चाने पिळून निघालेला; खर्चाच्या अडचणीत सापडलेला. [फा.] (वा.) ० **खाणे** - घरचेच शिल्लक असलेले धन

खर्चून राहणे; रिकामे राहणे; खाऊनपिऊन स्वस्थ असणे : 'प्रधान हे सर्व राजे खर्ची खात बसले आहेत.' - दशावतार मसाप २९. ० **पडणे** - १. खर्च होणे. २. (युद्धात) कामास येणे; मरणे. ० **पाडणे** - खर्च करायला, द्यायला लावणे; खर्चात टाकणे.

**खर्ची** स्त्री. चोप; मार. (ना.)

**खर्ची** स्त्री. मासळीची एक जात. हा मासा रेतीत फिरणारा, हिंडणारा, पांढऱ्या रंगाचा असून याचे तेल जखमेवर वापरतात. (गो.कु.)

**खर्चीक** वि. ज्याच्यासाठी फार पैसा खर्च करावा लागतो असा : 'सूचना खर्चीक असल्यामुळे...' - मिसे ३७.

**खर्ची संतती** अनौरस संतती; लेकावळे.

**खर्ज** पु. (संगीत) १. गायनातील एका सप्तकाचे - सुराचे नाव. पहा : **खरज** : 'खर्जास मागें ध्वनि एक सारी।' - अर्वाचीन २३४. २. घोगरा आवाज. (वा.) **खर्ज लागणे** - १. गाताना अगदी खालचा आवाज लागणे. २. घोगऱ्या आवाजात बोलणे. [सं. षड्ज.]

**खर्जुबाळों** वि. खर्जुडा.

**खर्जू, खोरजू** पु. खरूज; कंडू. (गो.) [सं.]

**खर्जूर** पु. खजुरीचे झाड व तिचे फळ. पहा : **खजूर** [सं.]

**खर्जूरी** स्त्री. खजूरी; खर्जूर. [सं.]

**खर्टी** स्त्री. फोडावरील आवरण.

**खर्डा** पु. कच्चे टिपण; मसुदा १. पहा : **खरडा** : 'या ग्रंथाचा खर्डा मंडालेच्या तुरुंगांत प्रथम लिहून काढला.' - गीर ८६. २. कार्डबोर्ड; पुठ्ठा.

**खर्डाचा खर्डा** वि. लांबलचक (ना.)

**खर्डूल** स्त्री. टक्कल पडलेली स्त्री. (गो.)

**खर्डेघाशी** स्त्री. निव्वळ कारकुनी; नकला करण्याचे काम.

**खर्ण-र्ने** न. ईश्वरी कोप. (गो.) [सं. क्षरण]

**खर्त(र्ता-र्दा)ड,** वि. तापट.

**खर्दड** वि. खडबडीत.

**खर्ना** क्रिवि. चटकन.

**खर्नाक्या** वि. नाकाचे छिद्र मोठे झालेला (बैल.).

**खर्पड** न. दुर्भिक्ष; अन्न दुर्मिळ होणे : 'तेणेंकरून दुष्काळ किंवा खर्पड पडते, त्या वेळेस हजारो लोक केवळ अन्नावाचून मरतात.' - अर्थप ३४९.

**खर्पर** पु. १. मातीचा परळ. २. खापर; माठाच्या खालचा भाग; भिक्षापात्र किंवा शेगडीप्रमाणे उपयोगी पडणारे खापर. [सं.]

**खर्परसूत्र** न. एक कृत्रिम धातू. [सं.]

**खर्पा, खर्बा बांगडा, खुर्बी** पु. एक लहान मासा.

**खर्बरफली** स्त्री. (वन.) खडबडीत फळ असलेली वनस्पती.

**खर्बूस** वि. खडबडीत.

**खर्मती** स्त्री. रानातील खारी माती.

**खर्मवर्म** न. व्यंग; वर्म; दोष; चूक; दुष्कृत्य; बिंग. (सामान्यतः अव. प्रयोग, खर्मेवर्मे.) (क्रि. काढणे, सांगणे, बोलणे.) [सं. कर्मवर्म]

**खर्मस्ती** स्त्री. अति हट्ट; दांडगाई (गो.).

**खऱ्याचे खांड** खोटे बोलणारा मनुष्य.

**खर्यान** पु. १. मळणीचे खळे. २. चंद्रावरील खळे. ३. कपड्याची खळ. ४. खळ्यावरील दान. (ल.)

**खर्रकन** क्रिवि.पहा : **खरकन**

**खर्रा** पु. १. कानउघाडणीचे पत्र. २. पानाचा मसाला.

**खर्व** वि. १. खुजा; बुटका; ठेंगणा. २. (ल.) अगदी बालक; अडाणी; अजाण : 'खर्व मी दास, कीं सर्व चिंतालया।' - आसेतु ३१. [सं.]

**खर्व** वि. घोड्याचा एक रंग; खिसमिससारखा रंग. - अश्वप १.३०.

**खर्व** वि. एक हजार कोटी; दहा अब्ज ही संख्या. [सं]

**खर्वट** न. बाजार भरत असलेले गाव : 'खेट, खर्वट, ग्रामीं, पुरीं। भिक्षा करावी यथाप्राप्त।' - एभा २३.४९७. [सं.]

**खर्वड** न. खरवडून काढलेला, तासून काढलेला भाग; खरवडण्यास योग्य असा भाग; खवळ. (गो.)

**खल** पु. १. चूर्ण करण्याचे धातूचे किंवा दगडाचे पात्र : 'चूर्ण करील तुम्हांला धर्म बता भंगदेश हा खल हो।' - मोभीष्म १.२१. २. सोनाराची पाणी ठेवण्याची दगडी कुंडी. (खा.) ३. खलात चूर्ण करणे, कुटणे. ४. (ल.) चर्चा; खोलवर चर्चा : 'काय कथानक निवडावे याचा थोडासा खल झाला.' - नटश्रेष्ठ ११. (क्रि. करणे.) [सं. खल्ल]

**खल** वि. दुष्ट; दुर्जन; नीच; पापी; हलका : 'जें खलांची वांकुडे मोडे।' - राज्ञा १८.१७७३.

**खल** पु. धान्य मळण्याचे खळे. [सं.]

**खलअत** खिलत; सन्मानाचा पोषाख : 'राजे याही बकारपूर्वकास खलअत व कर्नाटकच्या सनदा देऊन रुखसत केले.' - पेद २५.४५. [फा. खिलअत]

**खलक** वि. १. प्रस्थ. २. लचांड. (गो.) ३. चण. ४. दुष्ट.

**खल(ळ)क** वि. १. फितुरी; कारस्थानी : 'कित्येक खलक उगवावें। राजकारणांमधें॥' - दास १९.९.१८ : 'खळक समजों जास्ती (=शिक्षा) केल्यावेगळ सोडणार नाहीं.' - मइसा ८.२५. २. नीच जातीचा; गैरमातबर : 'गोरगरीब खलक चीजवस्त घेऊन सोडून दिले.' - मराचिथोशा ७२. [फा. खल्क]

**खलकत** न. जमाव; मंडळी (व.) [अर. खिलकत = लोक, जग]

**खल्क(ळ)क** पु. १. लोक : 'उदमी खळक कुल बारदेशाकडे जातील.' - मइसा ८.२२. २. झुंड; थवा. (गो.) [फा. खल्क]

**खल(ळ)कदुनिया** स्त्री. सारे जग; विश्व; तमाम जग. [फा.]

**खलकलोक** सामान्य प्रजा : 'पेंढारी, आडहत्यारी व खलकलोक वीस हजार.' - शिराब.

**खलकुल** न. सर्व जग, सर्व लोक; अलम दुनिया : 'इतिफाकानें उमदीं कामें व्हावीं खलकुलास आराम व्हावा.' - मइसा ५.१९५.[फा. खल्क]

**खलखल** स्त्री. कटकट, खडखड : 'त्याची प्रत्येक खलखल वामनच्या नाजूक अपेक्षेला स्पर्श करून जागी करीत होती.' - बाविबु २९०.

**खलखल-ला** क्रिवि. जोरजोराने; मागेपुढे : 'लोणच्याची बरणी हलवावी तसा वामन सूर्याला खलखला हलवू लागला.' - बाविबु १६१.

**खलखलणे** अक्रि. चडफडणे; तडफडणे; चिडणे. [हिं. खलखलाना]

**खलखलवणे** सक्रि. खडखडवणे : 'त्याचं दार खरोखरच खलखलवलं जात होतं.' - बाविबु २९०.

**खलखला** वि. त्रासलेला; चिडलेला. [ध्व.]

**खलखलाविणे** उक्रि. खोड्या इ. करून त्रास देणे; सळो का पळो करून सोडणे; त्रासविणे.

**खलखंदा** पु. १. कुटुंब, अनुयायी, जमिनी, घरे, गुरे वगैरे; आश्रित; मालमत्ता; (सामा.) संसाराचा मोठा खटला. २. फौजेबरोबर असणारे बाजारबुणगे, सामान खाते. ३. (ल.) अडगळ; सामानाचे अव्यवस्थित ढीग; अडगळीची खोली. [फा.]

**खलखंदा, खलखाना** पहा : **खेलखाना**

**खलणे** अक्रि. १. खलात घालून मळणे, चूर्ण करणे; बारीक करणे; घोटणे. २. (ल.) विचाराचा विषय मनात घोळून घोळून दृढ करणे.

**खलदल** न. भांडण; कथला : 'संभाजी आंग्रे म्हणतात की, तुम्ही चौथाईस घेणे नाहींतर तुम्हाआम्हांस खलदल होईल.' - पेद ३३.२१७.

**खलन** न. बंद पडणे : 'खलन जालें ये मती।' - राज्ञा ३.५६.

**खलनायक, खलपुरुष** पु. नायक-नायिकांच्या प्रेमसंबंधात किंवा इतर चांगल्या कार्यात अडथळा आणणारे नाटक, कथा, कादंबरी, चित्रपट इ. मधील दुष्ट स्वभावाचे पात्र.

**खलफ, खल्फ** पु. मुलगा; वारस. [फा.]

**खलबत, खल्बत** न. स्त्री. एकांत; गुप्त मसलत; कारस्थान; दुसऱ्याशी एकांतात केलेला विचार; बेत; डाव. (क्रि. करणे.) : 'वाड्यात सुभ्यांची खलबत.' - ऐपो २३१; 'दोन घडीपावतों खल्बत केली.' - पद्यव ७४. [अर. खलबत = गुप्तता, एकांत]

**खलबतखाना, खल्बतखाना** पु. १. एकांताची खोली. २. गुप्तपणे चर्चा करण्याची जागा : 'गडाची विवेकसभा, खलबतखाना दररोज रंगत होता.' - श्रीयो २६३.

**खलबता-त्ता** पु. घोळणे, उखळी आणि दस्ता. [क.कल्बत्तु]

**खलबल** स्त्री. १. खळबळ; गलबल; आरडाओरड. २. दंगा; बंडाळी. ३. मनाचा क्षोभ; उद्वेग. [ध्व.]

**खलबलणे** अक्रि. आरडाओरड, दंगा करणे. २. मन भडकणे, क्षुब्ध होणे.

**खलयज्ञ** पु. (शेतकऱ्यांचा विनोदी शब्द) धान्य मळायच्या वेळी खळ्यावर घालायचे जेवण. या जेवणासाठी कोंबडी, बकरी इ. मारतात.

**खलल** पहा : **खलेल**

**खलवडे** न. दोन तीन शेतांच्या दरम्यानची मोकळी जागा : 'तेथून खालता उभा बांद सेंधी ४ खिला १ खलवडे १ खिला खलवडिया खालता उभा बांद दगडाचा.' - मइसा १८.१.

**खलवणे** सक्रि. नमवणे; खाली करणे : 'तेया माथा न खलवी।' - राज्ञा १७.३०१.

**खलवणे** उक्रि. खलात घोटणे.

**खलवाद** पु. वाद; भांडण : 'याचा आपला मूळ पुरुष एक नव्हे म्हणतो. खलवाद करितो.' - ज्यू २८२.

**खलवी** वि. खलून तयार केलेले; खलात घोटलेले (औषध इ.).[सं. खल]

**खलश** पु. १. खंड; अंतर : 'आमची दोस्ती आणि इतेहाद पूर्वीपासून जो आहे त्यांत खलश न यावा.' - मइसा ५.३०. २. संशय; किल्मिष. [फा. खलिश]

**खलष-स** पु. त्रास; अडथळा; इजा; हानी; संशय : 'तर्फेनचे जहाजांस दर्यातून येण्याजाण्याविषयीं परस्परें खलष न पोंहचावा.' - समारो ६.२५; 'यास्तव दिसता प्रकार यैसा दिसतो की, फिरून खलसाची जड कायेम होते.' - पेद २.१०३. [फा. खलिश]

**खला** अ. कोण? (बे.)

**खला** पु. एकान्त.

**खला** भानगड : 'या खल्या अगोदर वीर खलील तेथें पाठविला होता.' - पेद २०.२८७.

**खलाटी-ठी** स्त्री. १. गावाखाली असलेली शेतजमीन, भातजमीन; शिवार. २. खालाठी; सखल जमीन. ३. समुद्रकिनाऱ्याजवळचा सखल प्रदेश : 'उतेकर पेडामकर व पलांडे वगैरे खलाटीचे लोक आहेत.' - पेद ३.१५.

**खलाब** चिखल.

**खलामला** पु. खरी मैत्री; स्नेह. [फा.]

**खलायक** १. मनुष्य. २. दृष्टी.

**खलारणे** क्रि. घुसळणे (झाडी.).

**खलाल** पु. १. खळखळ आवाज; असा आवाज करणारा प्रवाह : 'रजोगुणाचेनि खलालें। स्वर्गु गाजे॥' - राज्ञा ७.७६. २. नदीतील पाणी फार खोल नसलेली उताराची जागा : 'तेथें खलाल भागीरथीस होता.' - भाब ५२.

**खलाली** स्त्री. (नाविक) १. समुद्रातील उथळ पाण्याच्या तळाशी असलेला खडकाळ भाग. २. खडकावर समुद्राचे पाणी आपटल्यामुळे होणारा आवाज; पाण्याची ओढ. (कु.)

**खलाशी-सी** पु. १. नावाडी; नाखवा; गलबतावरील तांडेल सोडून इतर नोकर; जहाजावरील मजूर. २. तोफखान्यात तोफा ओढण्यासाठी ठेवलेला नोकर, गोलंदाज : 'तीन हजार खलाशी संगं राव पगार खाई।' - ऐपो ४६४. [फा.]

**खलाशी** खालसा करणे; जप्त करणे.

**खलाशी** स्त्री. मोकळीक; मुक्तता; स्वतंत्रता.

**खलास** वि. १. सरलेला; खर्चल्याने नाहीसा झालेला; वेचलेला. २. शेवटास गेलेला; संपलेला; पूर्ण झालेला; समाप्त. ३. मुक्त; सुटलेले; मोकळे झालेले : 'बहुत खुश्वक्त जाले कीं जबर्दस्ताच्या चुगालांपासून गरिबाचें वतन खलास जालें'-मइसा २०.४९. [फा.](वा.) ०**करणे**-ठार मारणे.

**खलि(रि)ता** पु. १. थैली; लहान पिशवी : 'साखर खलिते दोन शेर.' - मइसा ३.३२८. २. जिच्यात अमीरउमरावांना पाठविलेली पत्रे बंद करीत असत ती रेशमी पिशवी. ३. पत्र; राजपत्र; आज्ञापत्र : 'आँ मुकदम्याविषयीं पार्शी पत्रें खरिता तयार झाला म्हणजे पाठवून देऊं.'

- मइसा ५.३८. ४.लिफाफा [फा.]

**खलिता** पु. अनेक औषधांचा लेप.

**खलिता पोचविणे** मुलांचा एक खेळ.

**खलिपत** स्त्री. खिलाफत; खलिफाचे काम व हुद्दा. [फा. खिलाफत]

**खलिपा** पहा : **खलिफा**

**खलिफा** पु. १. महंमद पैगंबरांच्या गादीवर येणारा धार्मिक, राजकीय इ. सर्व अधिकार असलेला (विशेषत:) सुन्नी पंथाचा मुसलमान राजा; मुसलमान धर्मगुरू; ज्ञानी. २. वस्ताद; तालीम मास्तर. ३. वाजंत्र्यांचा मुख्य. ४. (ल.) आचारी; शिंपी इ. [फा. खलीफ]

**खली** स्त्री. खोलवा; पोकळी : 'आधिली चि परि होये। गगनखलिचें॥' - राज्ञा ६.२६७.

**खली-ल्ली** स्त्री. ढेप; पेंड. [सं. खल]

**खलीकडे** क्रिवि. कोठे. (बे.)

**खलीत** वि. खंडित; थांबलेला; तहकूब केलेला; खळलेला. [सं. स्खलित]

**खलीन** पु. लगाम : 'आस्तिक शपथ अहीचें कीं हरिचें आवरी बल खलीन।' - मोविराट १.६९.

**खलीप** वि. खलित; स्खलित; ढासळलेला; ठिसूळ : 'किल्ला बहुत खलीप...' - पेद

**खलीफ** पहा : **खलिफा**

**खलील** जप्त : 'कोणाचे सरंजाम जहागिरीस खलील केल्या होत्या त्यांस वचन दिले की....' - भाब ९७.

**खले** न. खळे; मळणीचे आवार : 'रचूनु महत्तत्त्वाचें खलें। मली एकें चि कालुगेनि पोलें।' - राज्ञा १३.४०.

**खलेत** पहा : **खलअत** : 'चार वस्त्रे व येक तरवार खलेत दिली.' - पेद १४.४६.

**खलेती** स्त्री. पत्राची पिशवी. पहा : **खलिता** : 'दामाजीपंताच्या नांवें अर्जदास्त। लिहून खलेती मुद्रा केली।' - तुगा ४४३६.

**खलेल-ली** स्त्री. १. खंड. २. प्रतिरोध; व्यत्यय; अडथळा; हरकत : 'तुम्ही मुताबीक होऊन अंमलास खलेल कराल तरी न करणें.' - मइसा ८.१८०. ३. दांडगाई; उद्धट, उनाड वर्तणूक. ४. स्वैरता; हट्टीपणा; अडेलपणा (मूल, चाकर, घोडा यांचा.) ५. तुसडेपणा; खाष्टपणा; द्राष्टपणा.

वि. १. दांडगा; उर्मट; उद्दाम; भांडखोर. २. खाष्ट; द्राष्ट; तुसडा; दोष काढणारा; निंदा करणारा. ३. हट्टी; दुराग्रही; स्वैर; खळखळ करणारा (मूल, चाकर); अडणारा (घोडा) : 'खलेल घोडे उडती टणाटण।' - ऐपो २२३ [फा. खलल]

**खलौर, खलुरिका** न. स्त्री. रणांगण; युद्धभूमी : 'अनंगाचिआं खलौरी।' - शिव ५५४.

**खल्ल उदर** (नृत्य) चवड्यावर उभे राहून श्वास रोधून पोटाला भकाळी पाडणे (रोग, भूक लागलेली इ. दाखविताना.). [सं. खल्ल = खळगा]

**खल्लक** वि. १. निष्कांचन; दरिद्री : 'हल्लक झाले खल्लक माल मवाशानें सुगडे।' - पला ४.३७. २. कृश; रोड; हडकुळा.

**खल्लड** वि. क्षीण; खप्पड; सुरकुतलेली (मुद्रा, चेहरा) : 'कांग पाठि लागसी हरी तुला खल्लड म्हणत।' - पारिभौ ३०.

**खल्लाळ** पु. १. पाण्याचा खळखळाट. २. खळखळणारा प्रवाह; लाट : 'मिळती काष्ठें लोटतां पूर। आदळे दूर होती खल्लाळीं।' - तुगा ७१३. २. (ल.) मनोविकारांचा क्षोभ. [ध्व.]

**खल्ली** स्त्री. ढेप; पेंड.

**खल्ली** स्त्री. पाय, पिंढऱ्या व हाताचा सांधा यांना लुळे पाडणारी वातविकृती. [सं.]

**खल्वाट** न. १. टक्कल; टकलेपणा. २. टक्कल पडलेले मस्तक, डोके : 'खल्वाट चंडकिरणें अति तप्त झाला।' - वामन स्फुट (नवनीत) १३६. वि. टकल्या; टक्कल पडलेला; डोईस केस नसलेला. [सं.]

**खव** न. खवणीने नारळाचा खवून काढलेला कीस.

**खव** स्त्री. मिरचीचा दर्प. (झाडी.) [सं. क्षव]

**खवखव** स्त्री. गडबड; बंडाळी; दंगाधोपा : 'आवंदा याच्या मनात मालव्यात खवखव करावयाची फार आहे.' - पेद १०.२७.

**खवखव** स्त्री. १. अळू, सुरण इ. पदार्थ खाल्ल्याने तोंडाला किंवा जिभेला सुटणारी खाज किंवा चुरचुर; खाजण्याची विकृती. २. (ल.) भुकेमुळे पोटात तोडणे. ३. पश्चात्तापाची बोचणी.

**खवखव** स्त्री. १. तीव्र इच्छा; वासना (विशेषत: सुरताची) : 'इंद्रियाची खवखव सतत वाढत्या प्रमाणावर असल्यामुळें कधींहि तृप्त होत नाहीं.' - गीर १०५. २. लोभ; हावरटपणा. ३. मस्ती; सुरसुरी; खुमखुमी (वादविवादाची, लढण्याची). ४. उत्कंठा; उत्सुकता; चेतना; उद्बोधन; जागृती (सामग्री, सन्निधान इ. कारणांमुळे होणारी). ५. (विस्तवाची) धगधग.

**खवखवणे** अक्रि १. धगधगीत, धडाडून पेटणे (विस्तव). २. चेतणे; उद्दीपित होणे; उन्माद येणे; उतावीळ, अधीर होणे (विषयवासना, लोभ, स्पर्धा यांनी). ३. मनात जळणे; डाचणे; आग होणे; पश्चात्तापाची बोचणी लागणे. ४. इच्छा करणे; आशाळभूतपणे वाट पाहणे; छंद घेणे; लोलुपणे.

सक्रि. १. आळू इत्यादी खाल्ल्याने तोंडाला खाज सुटणे; खवखव करणे; डाचत असणे. २. स्फूर्ती येणे. (गो.) [सं.]

**खवखवीत** वि. धगधगीत : 'चुलि खवखवीत इंगळ भरीला होती.' - गोप्र ४४.

**खवखवून** क्रिवि. कडकडून : 'दिवसातून दोनदा खवखवून भूक लागली असे क्वचितच घडे.' - नीसे १३६.

**खवचट-ड** वि. १. खवट; खाजरा; काहीसे खवखव आणणारे; दुर्गंधयुक्त; नासके. २. (ल.) तुसडा; एकांड्या; कडू; कुत्सित; नष्ट; कुजका (माणूस, भाषण इ.). पहा : **खवट**

**खवट** वि. १. उग्र वासाचा, रुचीचा; घुरट; पोटात जाताना घसा जाळणारा (तेलकट, तळलेला पदार्थ). २. नासका; कुजका (नारळ इ.)३. कडू; मनास बोचणारी, झोंबणारी (भाषा, मनुष्य). ४. (रसा.) अपघटन झाल्यामुळे दुर्गंध येणारा (खाद्यपदार्थ, विशेषत: तेल वगैरे). [क.कवुट्]

**खवटखोबरे** न. (ल.) तुसडा, द्राष्ट, कुजकट, क्षुद्र मनाचा मनुष्य.

**खवटाण** स्त्री. खवट, उग्रट वास, घाण.

**खवटान्या** वि. भांडखोर, तुसड्या. (झाडी.)

**खवटेल** वि. खवटाण; वाशाळ; वासट; घुरट. पहा : **खवट**

**खवट्चे, खवटेवप** क्रि. तळलेल्या पदार्थांना खराबीने वास लागणे. (गो.); तळलेला पदार्थ वाईट होणे.

**खवडव** स्त्री. १. चिडवणे; वेडावणे; खिजवणे; खोड्या करणे. (क्रि. करणे.) २. एखाद्याच्या पश्चात त्याची केलेली निंदा. ३. उचापत; भानगड; खोडी : 'त्या मास्तराने गावात काही खवडव केली म्हणून त्याला मार बसला.' - बनगर १८.

**खवडवी** वि. खवडव करणारा; चिडवणारा; गांजणारा; त्रास देणारा; खिजवणारा; खोडकर.

**खवडा** पु. १. डोक्यातील फोड (खरजेसारखा); डोक्यात होणारी खाज; चाई; उंदरी रोग. या रोगामुळे डोक्यात एक प्रकारचे सूक्ष्म व्रण होतात, त्यांना बारीक अशी पुष्कळ छिद्रे असतात. त्यातून लस वाहते. त्यांना खवडे म्हणतात. २. गुरांच्या अंगावरील खरुज, कथलीचा खवला. ३. खवडे नाहीसे होण्याकरिता गुरांच्या विशिष्ट अवयवावर (ढुंगणावर किंवा गालावर) दिलेला डाग; डागणे. (वा.) ० **उडणे, उडवणे, करणे, करून टाकणे** - १. नासवणे; बिघडवणे; भंगवणे; निष्फळ करून टाकणे. २. फजिती करणे; टर उडवणे; अपमान करणे; खरड काढणे. ० **जिरवणे,** ० **पाडणे** - ताठा उतरवणे; रग मोडणे; फजिती करणे. [सं.]

**खवडे** न. नासलेल्या दुधाचे चोथापाणी.

**खवड्या** पु. (कृषी) झाडांना होणारा रोग. उदा. काही पेरूच्या जातीच्या फळांवर खरजेसारखे चट्टे पडतात. त्यामुळे त्याची प्रत कमी होते. हे चट्टे कवकामुळे होतात.

**खवड्या** वि. खवट; तुसडेपणाने वागणारा : 'पण तिचा बाप एकदम खवड्या पडला नं!' - वासू ८२.

**खवण** न. १. आकाश. २. पडसाद; प्रतिशब्द.

**खवणणे** उक्रि. खरवडणे; खवणे; कीस काढणे; पोखरणे (नारळ, खरबूज). (को.)

**खवणणे** अक्रि. खवळणे; क्षुब्ध होणे : 'जाला जैसा वरिषाकालु। खवणलें मेघां॥' - राज्ञा १८. १७३९.

**खवणले** न. कंडू; उत्कंठा.

**खवणा** पु. १. (जैन) नग्न, दिगंबर जैन यती : 'एन्हवीं तरी खवणेयांच्या गांवीं। पाटाउवें काय करावीं।' - ज्ञा ४. २२. २. पिशाच्च; भूत : 'खवणियाच्या अंगा। जेणें केला वळघा। तो न करितांचि उगा। घरीं होता।' - अमृ ६. ५९. [सं.क्षपणक]

**खवणा** पु. नारळ इ. खवण्याचे साधन. याची बैठक लाकडी असून टोकास दाते पाडलेली एक लोखंडी चकती असते. खवला.

**खवणा** वि. तीक्ष्ण; (माणूस) घाण्या; द्राष्ट; बोचणारा (माणूस, भाषण).

**खवणी** स्त्री. खवणीप्रमाणे दाते असलेला विशिष्ट प्रकारच्या लुगड्याचा (पदर) : 'भावज गुजरी तिचा पदर खवणीचा।' - लोसामा २ संलो २५.

**खवणी** स्त्री. खरवडणे; खरवडण्याचे साधन. पहा : **खवणा**

**खवणे** उक्रि. १. (नारळातील खोबरे, गीर) खरवडणे. २. तोंड किंवा जीभ खवखवणे, चुरचुरणे, मिरमिरणे (अळू, सुरण इ. पदार्थांमुळे). [सं. क्षव]

**खवदव** स्त्री. १. त्रास; काळजी; श्रम; चिंता. २. दगदग; खटपट; उपद्व्याप. ३. धावपळ; गडबड; धामधूम. ४. पहा : **खवडव**

**खवदवणे** अक्रि. सहन न होणे; जाचणे. (को.) पहा : **खवखवणे**

**खवदवणे** अक्रि. गडबड, खटपट करणे; त्रास घेणे.

**खवदव्या** वि. उलाढाल्या; गडबड करणारा; लहानसहान कामे झपाट्याने उरकणारा; खटपट्या.

**खवदळ** पु. १. गोंधळ; गलगा. पहा : **खवदव** ३. २. उलथापालथ. (गो.)

**खव(वं)दळणे** उक्रि. १. (समुद्र, वारा इ.) ढवळणे; क्षुब्ध होणे; गढूळ करणे (द्रव पदार्थ) : 'ती जमीन समुद्रासारखी खवंदळून दोन्ही बाजूंनी ज्वलित कुंडात पाणी पडे.' - घाको १५२. २. हिंदळणे; हिसके बसणे; हादरणे. ३. (ल.) खिजविणे; चेतविणे; राग आणणे; क्षुब्ध करणे. अक्रि. १. रागावणे, खवळणे. २. पोटात ढवळणे; डाचणे; डवचणे; कालवणे. [सं.]

**खवदोळ** वि. गढूळ. (गो.)

**खवन** स्त्री. सवय. (झाडी.)

**खवना** पहा : **खवणा**

**खवय्या** वि. चवीने खाणारा; खाण्याचा शौकी; चोखंदळ : 'शिरापुरीचे सदा खवय्ये।' - ऐपो २६६. २. चवणेबाज; खादाड. [सं. खाद]

**खवरट, खवरा** वि. थोडासा तिखट व खवखव करणारा (अळू, सुरण); खाजरा.

**खवला-ले** न. पु. न. १. सीताफळावरील फुगीर गोल आकार; वरील खडबडीत भाग. २. (माशाच्या, सापाच्या अंगावरील) खरखरीत पृष्ठभाग; कवच; बुट्टी. ३. खपली; खवंद (क्षतावरील) : 'बाहेरि भूतांचीं पांचही खवले। नेणतांचि पडिलीं॥' - ज्ञा ८.६२. ४. कापसासारख्या ढगाचा वेगळा तुकडा; लहान ढग. ५. नांगरींची ढेप. (झाडी.) ६. खवले पाडण्याचे हत्यार (मातीच्या सापावर). ७. ठोका; घाव; डाग. ८. खवंद; खपली. ९. तुकडा.

**खवला** पु. दही इ. स्निग्ध पदार्थांचा गोळा; कवडी. (ना.)

**खवला-ली** पु. स्त्री. खवणी (नारळाची).

**खवला-ली** पु. स्त्री. मासे धरण्याचे एक प्रकारचे जाळे.

**खवला-ळा** पु. खवले असलेला रुपेरी रंगाचा एक मासा. (कु.)

**खवले मांजर-मार्जार, खवळ्या मांजर-मार्जार** पु. न. एक रानटी जनावर; रानमांजर. हे मुंग्या खाते. याच्या अंगावर खवले असतात. हे डोंगरात बिळात राहते.

**खवस-से** वि. निरुपयोगी; हलके; कमी प्रतीचे. (गो.)

**खवसणे, खवसुचे** अक्रि. मरणे. (कु.गो.) [सं. क्षपू]

**खवसान** स्त्री. नाकातील वळवळ; ठसका. (व.) पहा : **खवटाण**

**खवसेला** वि. १. घाणेरडा; ओवळा; अशुची. (व.) २. बुभुक्षित; खवखवलेला. पहा : **खवटेल**

**खवळ** न. १. माशाच्या अंगावरील कवच; खवला. (कु. गो.) २. फोडावरील खपली. (गो.) ३. सारवलेल्या जमिनीवरील शेणाचा पोपडा.
स्त्री. नारळ खवल्यानंतर करवंटीस चिकटलेला पातळ पापुद्रा; कातळी. (कु.) पहा : **खवल**

**खवळ** स्त्री. जमिनीत किंवा भिंतीत पडलेली खोल भेग; तडा; चरा. [सं. खल्ल = खळगा]

**खवळ(ल)णे** अक्रि.क्षुब्ध होणे; रागावणे; संतापाने माथे फिरणे; चवताळणे; खवदळणे : 'पुच्छछेदें अहिसा चापच्छेदेंकरूनि बहु खवळे।' - मोभीष्म ६.५४. २. हालचाल करणे; उठणे (पित्त.) ३. चेतना येणे; संवेदना होणे; जागे होणे (इंद्रिय).

**खवळनी** स्त्री. उत्तेजन. (व.)

**खवळा** पु. माड, सुपारी, ताड इत्यादिकांना जेथून झाप, झावळ्या इत्यादी फुटतात ती जागा; शेंडा. (को.)

**खवळाढवळ** स्त्री. भानगड; उपद्व्याप : 'वाटंत कुनाला खवळाढवळ करीत बसू नकूस.' - पेरणी ९५.

**खवळी** स्त्री. लहान खपली; सालपट; कवंदी. पहा : **खवल**

**खवंडाळणे** उक्रि. १. उठवणे; क्षोभवणे; चेतवणे; खिजवणे. २. फाजील खोड्या, चेष्टा करणे; टवाळी करणे. ३. भांडण वाढणे; चिडवणे.

**खवंडाळी** स्त्री. १. खिजवणी; चेतावणी; उठावणी; खोडी. (क्रि. करणे.) २. त्रास; चीड; क्षोभ. ३. दोष; बिंग; कुरापत. (क्रि. काढणे.)

**खवंडाळी** स्त्री. लाकडी पळी : 'कढत कढत आंबिली खवंडाळीया आमचां हातीं घातली' - लीचपू ३६.

**खवंद, खवंदल** न. १. व्रण; क्षत; मुख्यत्वे खाजविण्यापासून झालेले क्षत : 'धका खवंदासी लागतसे।' - तुगा २९६४. २. फोडाची खपली; खरपुडी. ३. खवडा; खांदूक.

**खवंदळी** स्त्री. खोडी; कुरापत : 'ऐशियास अर्काटवर गेले म्हणजे त्रिचिनापल्लाशीं खवंदळी करतील.' - शारो १.२४३. पहा : **खवंडळी**

**खवा** पु. दूध आटवून तयार केलेला घट्ट पदार्थ; मावा. [हिं.]

**खवा** पु. (गंगथडी) हट्टीपणाची लहर; दुराग्रह. (क्रि. घेणे.)

**खवा, खवाट-टा** न. पु. १. खांद्याचा व हाताचा सांधा. २. खांदा : 'पहारे पहा उभी कंचुकी फाटली। पाठ खवे छातीमध्यें दाटली।' - प्रला १८६.

**खवाकीन** पु. अव. राजे; सुलतान. [फा. आकान]

**खवाजखुरी** (व.) पहा : **खाजकुइरी**

**खवायश** स्त्री. ख्वाइश; लोभ; इच्छा : 'या लढाईत ज्यानेची (जीवाची) खवायश न ठेवितां तीर्थरूपांनीं घोडीं घातलीं.' - ऐलेसं ७३४७.

**खवार** वि. दरिद्री; निष्कांचन. (व.) [फा. ख्वार]

**खवारी** स्त्री. १. अप्रतिष्ठा; बेअब्रू. २. अवकृपा; अवज्ञा : 'मनस्वी लोकांच्या बुद्धी ऐकोन त्याचें निदर्शन जें खवारी जाली.' - मइसा ८.१२८. ३. स्वारी. [फा. ख्वारी]

**खवाशी-सा** स्त्री. पु. हत्तीवरील अंबारी किंवा हौदा यांचे मागील मानकरी, खिजमतगार बसण्याची जागा; खवासखाना : 'बैसोनि गुरुआज्ञे खवासित।' - दावि ३६२; 'आपाबळवंतराव खवाशित चौरी मिजाजित वारीत।' - ऐपो २००. [फा. खवासी]

**खवास** पु. १. उमराव; मानकरी; राजाजवळचा मोठ्या घराण्यातील मनुष्य. हा बहुधा मालकाच्या विश्वासातला किंवा आवडता असे. २. हुजऱ्या; सेवक; खिजमतगार ३. गुलाम; बंदा नोकर. [फा.]

**खवासखाना** पहा : **खवाशी**

**खवासनिशस्त** वि. खवासखान्यात बसलेला : 'तेव्हां खवासनिशस्त यांनीं जोडगोळी मारली.' - वाड कैफि २३. [फा.]

**खवासा** स्त्री. १. खाशा स्त्रिया. २. नाटकशाळा : 'खेमे वगैरे सरंजाम नवाबाणी सापत्नमाये व महालांतील कोन्ह कोन्ही खवासा आनविल्या आहेत....' - इएमपी २११.

**खवासीण** स्त्री. खासे चाकरीची स्त्री; रक्षा : 'आपले बापांनी खवासीण ठेविली होती, तिजपासून खानजया जाला.' - नाना पेश रोज १.२६.

**खवाळ** न. माशाच्या अंगावरील खवला. (कु.) पहा : **खवल, खवळ**

**खविरडा** पहा : **खवरट, खवरा**

**खवीस** पु. १. मुसलमानाचे भूत, पिशाच्च. २. (ल.) रागीट; द्राष्ट. ३. (ल.) दुष्ट, माथेफिरू, द्वाड, खुनशी, दीर्घद्वेषी माणूस. [फा. खवीस]

**खवे** वि. कमी किमतीचे; हलके; स्वस्त. (नंदभाषा)

**खश** पु. आसामातील लोक.

**खश** दम देणे; दमदाटी (क्रि.)

**खशाफ(ब-म)शा** वि. डौलदार, सुवाच्य नव्हे असे (अक्षर); अव्यवस्थित; फरकटत धसफस लिहिलेले, केलेले. २. असे वाईट अक्षर ज्यावर आहे असा (कागद, पुस्तक, पदार्थ).
क्रिवि. अव्यवस्थितपणे; गिचमिड; कसेतरी. [ध्व.]

**खशी** पहा : **खसी**

**खष्ट** वि. १. खाष्ट; द्राष्ट; कुरकुऱ्या; खडवड्या; सदा खडसावणारा. २. वाईट; त्रासदायक; जिकिरीचा. ३. वाईट; खट; खडतर (नशीब, दैव). ४. बेबंद; गैरशिस्त; स्वैर (वर्तणूक, वर्तन).

**ख(खं)ष्ट** न. एक प्रकारचे झाड व त्याचे फळ. याच्या तेलास खंष्टेल म्हणतात. हे खरजेवर फार गुणकारी असते. (गो.)

**खस** पु. १. वाळा. एक प्रकारचे सुगंधी गवत. याच्या मुळांचे उन्हाळ्यासाठी पडदे करतात. यापासून अत्तर काढतात. २. वाळ्याचे अत्तर. [फा.]

**खस** पु. १. ढीग; रास; डोंगर (पडलेली पाने, धुरळा, केरकचरा इ.चा). २. (ल.) वैपुल्य; रेलचेल; लयलूट; विपुलता.

**खसक,खस्क** पु. घोडेस्वारांचा हल्ला थोपविण्याकरिता त्यांच्या मार्गात पसरतात ते पोलादी सराटे किंवा खिळे.

**खसकन-र, खसदिनी-शी** क्रिवि. खस असा आवाज होईल असे; धसमुसळेपणाने. (क्रि. ओढणे, खेचणे, तोडणे, धरणे.) [ध्व.]

**खसक(का)विणे, खसकावून, खसकून** पहा : **कचकाविणे, कचकावून**

**खसका** पु. मध्यम प्रतीच्या गवताची एक जात.

**खसका** पु. आवाज होणारा प्रहार; धबका. पहा : **कचका** [ध्व.]

**खसकुदडा** पहा : **खसपुदडा**

**खसखशी** कापडाचा एक प्रकार.

**खसखशीचे फूल, बोंड** अफूच्या झाडाचे फूल, बोंड.

**खसखशी(सी)त** वि. १. खडबडीत; स्पष्ट; निखालस; भीडभाड न धरता केलेली; खरपूस; साफ; धडधडीत (सूचना, ताकीद, भाषण). २. निश्चित; ठाम; धडाडीचे; उत्साहपूर्वक (वर्तन, उपाय). ३. धोपटमार्गी; सरळ व्यवहारी; खडखडीत बोलणारा (माणूस.) ४. खरखरीत; भरड; खडबडीत; मऊ, विसविशीत नव्हे असा (कागद, वस्त्र).

क्रिवि. जोराने (घासणे इ.); खसाखसा; चोळूनमोळून.

**खसखशी शेला** खसखशी काठ असलेला शेला : 'देशमुख; देशपांडे यांनी मिळोन खसखशी शेला दिल्हा असे.' - मइसा ६.३२.

**खसखस** स्त्री. अफूचे बी. हे मोहरीपेक्षा बारीक असते. खसखस मादक नसून उलट चवदार असते. हिचे तेल काढतात. पेंड गोड व पौष्टिक असते. [फा. खशखश]

**खसखस-सा** क्रिवि. खसखस असा आवाज होईल अशा रीतीने (गवत कापणे, लिहिणे घासणे इ.). [ध्व.] (वा.) ० **पिकणे** - (खसखस अशा आवाजाने) मोठ्याने व पुष्कळ हसणे; हसू फुटणे.

**खसखस काठ** एक प्रकारची किनार. धोतरजोडी, उपरणी, लुगडी वगैरेंना अशा तऱ्हेचे काठ असतात.

**खसखसणे** अक्रि. खसखस आवाज करणे (साप, जनावर इ. नी). [ध्व.]

**खसखसमांडा** पु. खसखस लावून तयार केलेला मांडा, अनरसा. (बे.)

**खसखसाट** पु. मोठ्याने खसखस आवाज (गवत कापण्याचा.)

**खसखसाट** पु. अभाव; तोटा; दुष्काळ.

**खसखसावून, खसखसून** क्रिवि. १. जोराने आवळून; बळ लावून. २. पहा : **कचकावून**. (क्रि. घासणे, चोळणे, धुणे इ.) ३. चपलतेने; झट्दशी; जलदी.

**खसणे** पहा : **खचणे**

**खसणे** अक्रि. **खोकणे** [हिं. खास]

**खसनारी** क्रिवि. तात्काळ. (झाडी).

**खसपसणे** पहा : **खसखसणे**

**खसपसाट** पु. खसखस असा जोराचा आवाज : 'मोठा खसपसाट करीत एक मुलगा बाहेर पडला.' - वारी ११२.

**खसपीडा** स्त्री. कटकट. (झाडी).

**खसपुदडा** वि. १. घाणेरडा; नेभळा; गचाळ (माणूस). २. वाईट; भिकार; घाणेरडा (जिन्नस).

**खसफस** पहा : **खसखस**

**खसबस-सा** क्रिवि. विशिष्ट आवाजाने (कुजबुजणे, गवतात सळसळणे, अंधारात चाचपडणे अशा वेळी होणाऱ्या आवाजाप्रमाणे).

**खसबसाट** पु. सामान्य कुजबूज; सळसळ; खसखस; फसफस. [ध्व.]

**खसरा** पु. जमाबंदीचा कागद. (व.) [फा.]

**खस(सा)लत** स्त्री. प्रकृती; सवय; स्वभाव (विशेषतः कठोर, द्वाड, उग्र); वैशिष्ट्य. (वा.) ० **काढणे**, ० **भोगणे**, ० **सोसणे** - त्रास, कष्ट सोसणे, काढणे (तुसड्या माणसाचा). [फा. खस्लत]

**खस(सा)वस-सा** क्रिवि. कठोरपणे; तिटकाऱ्याने; चुरशीने (बोलणे, करणे); खेकसणे. [ध्व.]

**खसवा** पु. नदीतील बारीक वाळू.

**खसाई** स्त्री. शीगकबाब; मांसाचा एक खाद्यपदार्थ.

**खसाखस-सा, खसासा** क्रिवि. (खसाखसचा आत्यंतिक भाव) विशिष्ट आवाजाने; खसखसा (गवत कापणे इ.चा आवाज होऊन); जोरजोराने.

**खसाटणे** उक्रि. १. जोराने खसखस आवाज होईल असे कापणे. पहा : **खचाटणे**. २. फरफटत नेणे, ओढणे. (व.) ३. खरचटणे. ४. खरड काढणे. (व.)

**खसार** वि. ठिसूळ. (व.)

**खसारा** पु. हिस्सा; वाटा. पहा : **खिसारा** : 'लढाईचा प्रसंग असल्यास, आम्हांस फौजेचा खसारा पडेल याची काय वाट?' - मइसा ५.७.

**खसासणे** अक्रि. खेकसणे : 'काल पाटील खसासला.' - आआशे ६.

**खसासत** स्त्री. दुष्टपणा; नीचपणा.

**खसासित** वि. कठोर; खाष्ट; स्पष्ट. पहा : **खसखशी(सी)त** : 'ऐसें सबाह्य खसासित। जयाचें गा॥' - ज्ञा १६.२४४. [सं. खष्]

**खसी** स्त्री. १. खच्ची करण्याची क्रिया. २. तोडण्याची क्रिया; तोड.

वि. १. खच्ची केलेले. २. तोडलेले. [फा.]

**खसीब** वि. सुपीक.

**खसू** पु. त्रास : 'फुन खसु न धरे।' - शिव ६६६.

**खसूचिता-त्व** न. अडाणीपणा; मूर्खपणा; अज्ञत्व : 'कांहीं पुस्तकें चाळावीं लागतात, कीं खसूचित्व प्रगट करून तब्येत लागेल तशी लेखणी चालविण्याबद्दल वाग्देवीच्या दरबाराचा आम्हांस एखादा चांद मिळाला आहे.' - नि ८८७. [सं.]

**खसूस** वि. निश्चित; खचित; निखालस; निःसंशय : 'अशी खसुसू खात्री होईल तरच दिला पाहिजे.' - खाअंबडोदे १३७. [फा. खुसूस]

**खसूसीयत** वि. स्नेहपूर्ण; स्नेहांकित. (एक मायना, पदवी) : 'खसूसीयत दस्तगाह लक्ष्मण आप्पाजी...' - मइसा १२.११२. [अर. खसूसीयत् = मैत्री]

**खस्त** वि. १. कत्तल केलेले; नाश केलेले; तुकडे केलेले; धूळधाण केलेले; भग्न, जमीनदोस्त : 'वीरां खस्त करीतसें।' - एरुस्व ९.४०. २. (ल.) भग्न; नाउमेद; गोंधळलेला. नष्ट; खराब : 'तुम्ही आम्ही मिळून इंग्रजास खस्त करोन टाकूं.' - पया १९८. [फा.] (वा.) ० **होणे, मरून खस्त होणे** - लढाई इ. त मरून केरकचऱ्याप्रमाणे होणे; मातीला मिळणे : 'मरून खस्त होईन परंतु दास होणार नाहीं.' - सूर्यग्र १८६.

न. १. घाण; दाट चिखल (गटार, नाला यांमधील); रेंदा; गाळ. २. नुकसान; तोटा; खराबी. (क्रि. खाणे.) [फा.]

**खस्त** स्त्री. त्रास; कष्ट; मेहनत. पहा : **खस्ता** : 'आपण स्वतः क्षात्रकर्मास

प्रवर्तल्याप्रमाणे खस्त बहुत केलें.' - ऐलेसं २५०३.

**खस्त(स्ता)व(वे)स्त** वि. ओढूनताणून केलेले; बाष्कळ : 'अनुमानाचें खस्तवेस्त। बोलोंचि नये।' - दास १९.२.४. [खस्तचे द्वि.]

**खस्ता** स्त्री. अव. १. काळजी; चिंता. २. श्रम; त्रास; खवडव; उपद्व्याप (मुले, दुखणेकरी यांचा). (क्रि. काढणे, खाणे, भोगणे, सोसणे.) : 'त्याला तिच्या फार खस्ता खाव्या लागत.' - चंद्र ८. [फा. खस्त]

**खस्तापुरी** स्त्री. पुरीचा एक प्रकार.

**खस्ती** स्त्री. किश्ती; पोशाख वगैरे ज्यातून अर्पण करायचा ते सूप किंवा बुट्टी : '....उभयतां बायांस ५ हत्ती, जवाहीर पोषाख याप्रमाणें दोन खस्ती पोषाख दिला.' - ऐलेसं ७७४८.

**खस्ती** वि. खस्त असलेली, चिखली, गदळ, गाळ साठलेली; खारी; जिच्यावर समुद्राच्या लाटा मधून-मधून येऊन आपटतात किंवा जिच्यावर गावातील घाण, कचरा टाकतात अथवा जिच्यावर पावसाने घाण वाहून येते ती जमीन.

**खस्थपदार्थ** पु. आकाशातील वस्तू; पदार्थ, तेजस्वी गोल इ. [सं.]

**खस्वस्तिक** न. (ज्यो.) आकाशातील आपल्या डोक्यावरचा बिंदू. क्षितिजावरची लंब किंवा उभी रेषा आकाशाच्या दृश्य गोलार्धाला ज्या बिंदूत छेदते तो बिंदू. [सं.]

**खहर** पु. (ग.) ज्याचा छेद शून्य आहे असा अपूर्णांक; अनंत संख्या. [सं.]

**खळ** स्त्री. १. बटाट्याचे सत्त्व, गहू, तांदूळ, उडीद, साबुदाण्याचे पीठ इ. पासून डकवण्यासाठी, वस्त्रास ताठपणा यावा म्हणून किंवा कागद चिकटविण्यासाठी तयार केलेली पेज, चिकी, राप, कोळ, गोंद. २. (कोष्टी) कपडा विणण्यापूर्वी सुताला बळकटी येण्यासाठी तांदूळ, ज्वारी, मका किंवा बाजरी यांचे पीठ शिजवून, त्याची करतात ती लापशी. ही सुतास कुंचल्याने लावतात अथवा तिच्यात सूत बुडवून काढतात. ३. घारगे करण्यासाठी गुळवण्यात शिजवलेले पीठ. ४. आम्लयुक्त खारट पाणी; खार (लोणच्याचा.) (गो.) ५. चिंचोके वाटून केलेली अंबील. [सं.]

**खळ** पु. १. तहकुबी; खंड (कामाचा). (क्रि. पडणे.) २. उशीर; खोटी. [सं. खल] (वा.) ० **करणे** – १. टाळणे; मागेपुढे करणे : 'मी उठायला खळ करीत होतो.' - आआशे ५४. २. बंड, दंगा करणे.

**खळ** स्त्री. पक्का हट्ट; आग्रह; छंद; नाद; हट्टीपणाची लहर. (क्रि. करणे, घेणे.) : 'आणिलां ही रूपा बळें। करूनि खळें हरिदासीं।' - तुगा २२०१.

**खळ** वि. दुर्जन; नष्ट; वाईट; नीच; दुष्ट. पहा : **खल** : 'जे खळांची व्यंकटी सांडो।' - ज्ञा १८.१७९५. [सं. खल]

**खळ** न. पहा : **खळे** : १. शेतातील धान्य मळणीची जागा. २. अंगण; उघडी जागा. (को.) [वैसं. खलम्]

**खळ** पु. पाण्याच्या प्रवाहाच्या अडथळ्यामुळे होणारा आवाज. [ध्व.]

**खळई** पहा : **खळे** : 'माझ्या मागल्या खळईतून मला घोड्यांच्या टापा ऐकू आल्या.' - पडरे १.

**खळउडगल** न. खळे झाडणे. [क.]

**खळक** पु. चिंच, आमसोल इ. चे अतिशय आंबट पाणी (निंदार्थी शब्द). (राजा) पहा : **खळगट**

**खळकन, खळदिनी** क्रिवि. खळखळ, घळघळ, झुळझुळ; छणछण, झणझण, खणखण अशा आवाजाने (बांगड्या, किल्ल्या इ. चा आवाज.) [ध्व.]

**खळका** पु. १. बांगड्या, मडकी, बाटल्या इ. चे तुकडे. २. खळखळाट; मोठ्याने खळखळणे (पाण्याचे). ३. (ल.) भांडण; तंटा; कचकच; गलगा; गोंगाट; कोलाहल. [ध्व. खळ]

**खळकेवळके** पु. अव. भांडणतंटे; कचाकची.

**खळखळ** स्त्री. झुळझुळ, घुळघुळ असा आवाज (ओढ्याचे पाणी इ.चा) : 'नदीचा खळखळ शब्द न जुमानता पलीकडे जाऊं लागला.' - पाव्ह २७. २. छन्छन्, खणखण, झणझण असा आवाज (बांगड्यांचा); खडखड, डबडब, खटखट असा आवाज (वाळल्या नारळाचा.)

**खळखळ** स्त्री. १. कटकट; खटखट; वाद; तक्रार; बाचाबाची : 'खळखळ खळांसीं न करावी ।' - दास १४.४; आढेवेढे. २. वटवट; खवखव. ३. दगदग; उपद्व्याप; त्रास; कष्ट; श्रम. ४. गडबड; घालमेल : 'नाना प्रसंगीं खळखळ ।' - दास १७.४.१२. ५. हास्यकल्लोळ. [सं. स्खल्] (वा.) ० **करणे** – एखाद्या गोष्टीबद्दल विरोध, नाखुषी दाखवून ती न करण्याचा हट्ट करणे, किंवा ती गोष्ट करण्यास आढेवेढे घेणे : 'एखादे दिवशीं यशवंतरावानें एखाद्या गोष्टीबद्दल फार खळखळ केली तर तिला कसेकर्सेच होऊन.....' - यशख.

**खळखळ(ळा)** क्रिवि. खळखळ आवाजाने : 'जे तद्रक्त वहातचि होतें वर्षांबुसें खळखळां तें ।' - मोभीष्म २.१२[ध्व.] (वा.) ० **रडणे** – ढसढसा रडणे : 'स्मरला विदुरकविवचन शतदा तो रडुनियां खळखळां तें ।' - मोशल्य ४.२६.

**खळखळगी** स्त्री. खळखळणे पासून धातुसाधित नाम. पहा : **खळखळणे**

**खळखळणे** अक्रि. १. खळखळ आवाज करणे; बांगड्या, तोरड्या इ. नी खळखळ ध्वनी होईल असे वाजणे. २. जोराने वाहणे (ओढा, नदी) ३. (अकर्तृक क्रि.) पोटात खळखळ आवाज होणे. [ध्व.]

**खळखळणे, खळखळाविणे** उक्रि. १. आवाज होईल अशा रीतीने धुणे, घासणे, खंगाळणे, विसळणे. २. खळखळ ओतणे (रुपये); खणखण, खळखळ करण्यास लावणे (नाणे); खुळखुळणे. [ध्व.]

**खळखळवणे** उक्रि. जोराने, स्वच्छ होईल अशा तऱ्हेने धुणे.

**खळखळाट** पु. १. (खळखळचा अतिशय) मोठ्या खळखळ आवाज करणाऱ्या दोन वस्तू एकमेकींवर आपटल्याने होणारा आवाज. २. ओहोळ; ओढा : 'अशुद्ध नदीचे खळखळाट । पुसती सागराची वाट।' - मुआदि ३२.५५. [ध्व.]

**खळखळी** स्त्री. ओढ्याचा खळखळ आवाज. (दगडगोट्यांवरून वाहत जाताना होणारा.) (को.)

**खळखळीत** वि. १. खळखळणारा; आवाजदार; खळखळ आवाज काढणारा. २. फडफडीत; कोरडा; ज्यातील शीत न शीत मोकळे झाले आहे असा (भात); वाळलेली (द्विदल धान्याची शेंग.) ३. स्वच्छ; साफ; मळ किंवा घाण नसलेले. (चांगले धुतलेले कापड, भांडे, समुद्राच्या पाण्याने धुतलेला खडक यांच्याबद्दल योजतात.) ४. डुळडुळीत; गळगळीत (कालवण, ताक.).

**खळखळून** क्रिवि. मनापासून, मोठ्याने (हसणे).

**खळखळून** क्रिवि. जोराने चूळ भरून (तोंड धुणे).

**खळगट** न. १. (निंदाव्यंजक) पातळ व भिकार कालवण (पीठ, भाजीपाला, चिंच इ. मिसळलेले). २. (ल.) कोणतेही अतिशय पातळ व आंबट, खारट कालवण, आमटी; सांबारे.

**खळगा** पु. खाच; खड्डा; भोक; गर्ता; खोलगट जागा. [सं. खल्ल]

**खळगा** पु. पाण्याच्या जवळचा अर्धवट वाळलेला चिखलाचा थर.

**खळगा** पु. १. धाब्याच्या उपयोगी माती; पिवळी, कुंभारी माती. २. (चांभारकाम) चिकणमाती. खळीच्याऐवजी हिचा उपयोग करतात. [सं. खल = माती,जमीन]

**खळगा** पु. १. कळगा; फुटलेल्या कडगुल्याचा अथवा बांगडीचा तुकडा; काच. २. (ल.) डिखळलेली, भेगाळलेली माती (नदीच्या काठची); मातीची वीट; डिखळ.

**खळगी** स्त्री. लहान खळगा; खाच; बीळ.

**खळगुट** न. आंबट पाणी; खळक : 'नुसतं आमटीचं खळगुट आणि भाताचं ढेकूळ.' - स्मगा ३८७.

**खळचे** अक्रि. थांबणे; चुकणे; खळ पडणे. (गो.)

**खळण** न. आळे; बांध : 'सगळ्यांस्नी खळणं करून परत खोपटाकडे गेलाव.' - गोता ८४.

**खळण** जमाव : 'किल्लेवारी गोलंदाज ऐसे मारितो कीं, दहा पाच चांगले खळण पांघरूण पाहिले म्हणजे गोळा मारिलाच.' - ऐलेसं २५१५.

**खळणा** वि. खळ लावलेला; कोरा; नवा : 'पोराठोरात कुणी खळणं धडोतं घातलं, पटक्याला कोच काढला....' - व्यंमाक ९२.

**खळणी** स्त्री. खळ; खंड. (गो.) [सं. स्खलन]

**खळणे** उक्रि. खळ लावणे, देणे (कपड्यांना); बुडविणे (कागद, तुरटीच्या पाण्यात.)

**खळणे** अक्रि. १. मध्येच थांबणे (वारा, पाऊस, उद्योग, कामधंदा इ.); खंडित होणे : 'मनुष्याच्या शरीरांतले व्यापार जसे कधीं खळत नाहींत....' - नि ५८. २. गतीला अटकाव होणे; मार्ग खुंटणे (प्रवाहाचा) : 'बारा वर्षांत तिच्या डोळ्याचे पाणी खळलें नाहीं.' - इंप ५६. ३. हात आखडणे; थोपवणे; काही वेळपर्यंत राहणे, थांबणे (माणूस.).

**खळणे** अक्रि. वीर्यपात होणे (माणूस, पशू यांचा). [सं. स्खलन]

**खळपाटणे** १. जुने, मोडके, गंजलेले हत्यार. २. मोड हत्यार.

**खळपुंजी** स्त्री. खळ्यावरचे धान्य मापताना प्रत्येक मोठ्या राशीतून घेतलेले लहान ढीग. मराठा अमदानीत ही सरकारी दस्तुरी समजली जाई.

**खळबळ** स्त्री. पहा : **खलबळ**. गडबड; दंगा; त्रास : 'जेथ विपुल जल खळबळ तिळहि नसे.' - मोकर्ण २६.१५ [सं. स्खल्]

**खळबळणे** उक्रि. १. पाण्यात घालून जोराने हलविणे (धुताना, कपडे इ.); एकदोनदा पाण्यात बुडविणे, पिळणे. २. जोराने धुणे (भांड्यात हात घालून जोराने पाणी टाकून, चोळून); पुष्कळ पाण्याने धुणे. ३. (ल.) क्षुब्ध, अस्वस्थ, व्यग्र होणे; उत्तेजित होणे. [सं. खलम्] अक्रि. १. मोठ्याने आवाज होईल अशी हालचाल करणे. (उसळणारे, आदळणारे, डचमळणारे पाणी करते तशी). २. अस्वस्थ, बैचेन, क्षुब्धावस्थेत असणे; भडकणे (देश, एखाद्याचे मन, जीव). प्रज्वलित होणे; धगधगणे : 'इंधनाचां आंगीं। खळबळोनि आगी ।' - अमृ ४०९. ३. पोटात खळखळ होणे; आवाज होणे. ४. खळबळाट होणे; गडबड होणे : 'हाकेसरिसे नगरांतु खळबळिलें :' - लीचउ २००. (अकर्तृक क्रि.) पोटात कालवणे; दयेने मन कळवळणे.

**खळबळा** पु. गडबड; अस्वस्थता (पोटातील). २. लोकांचा दंगा; बंड; धुमश्चक्री. ३. हालचाल; वादळ; उसळी (समुद्राची, भांड्यातील पाण्याची.) पहा : **खळबळणे**

**खळबळाट, खळबळी** पु. स्त्री. १. उसळणाऱ्या, आपटणाऱ्या, डुचमळणाऱ्या पाण्याचा आवाज. २. गडबड; धुमश्चक्री. [ध्व.]

**खळबळीत** वि. मोकळ्या मनाचे; घरगुती; अघळपघळ; साधे; सविस्तर (भाषण, दळणवळण, माणूस.).

**खळ(ळे)भट** पु. १. धान्याच्या खळ्यावर मळणी चालू असता तेथे भिक्षा मागून निर्वाह करणारा ब्राह्मण; निरक्षर ब्राह्मण; विद्येचा पोकळ डौल दाखविणारा माणूस; ग्रामपंडित. २. हट्टी, दुराग्रही माणूस. ३. चिकट व फार त्रास देणारा भिकारी.

**खळमट** न. घाण; कचरा : 'तळाशी साचलेला गाळ खळमटासह घुसळून....' - अहिल्या १०.

**खळमळ** स्त्री. १. द्वेष : चीड : 'मनात उचंबळत असलेली खळमळ ओकण्यास अवेळी सुरवात केली आहे.' - लोटि केले ३६. २. मळमळ; ज्यामुळे उलटी किंवा उलटीची भावना होते अशी पोटातील घाण : 'जे काही खळमळ होते ते सारे बाहेर पडले.' - पलको २१३.

पु. १. नवीन कापडाची खळ, मळ इ. २. (मळाची द्वि.) घाण; रेंदा; गाळसाळ; केरकचरा.

**खळयज्ञ** पहा : **खलयज्ञ**

**खळव** पु. १ कामामध्ये, गतीमध्ये खंड; खळ. २. झऱ्याचे, पाटाचे, वाहते पाणी वर बंद केले असतानाही थोडा प्रवाह पुढे वाहणारा.

**खळवट** स्त्री. न. १. खळ्यावर धान्य मळून किंवा झोडून झाल्यावर त्याची केलेली रास. २. शेतमाल तयार होऊन खळ्यावर धान्याच्या राशी पडू लागतात तो हंगाम. हिला रासमाथा, सुगी किंवा सरई असेही म्हणतात.

**खळवटचे** सक्रि. नाक फेंदारणे. (गो.)

**खळवटणी** स्त्री. खळ्यामध्ये धान्य मळणे, झोडणे, वारवणे, रास करणे वगैरे सर्व कामे; मळणीकरिता धान्याच्या पेंड्या एकत्र जमा करणे.

**खळवटणे** उक्रि. १. एकत्र करणे; जमा करणे; गोळा करणे (विशेषत: भांड्यात) ; (घराच्या) सर्व सांदीकोपऱ्यांतून खरडून काढून एके ठिकाणी

आणणे. २. एखाद्या पदार्थाच्या प्राप्तीसाठी सर्व स्थळे शोधणे, धुंडाळणे; चाळाचाळ करणे. ३. वेचणे; गोळा करणे (फळे). ४. (ल.) प्राण गोळा होणे, व्याकूळ होणे. (राजा)

**खळवटणे** सक्रि. पहा : **खळखळणे**

अक्रि. १. बंद राहणे; थांबणे. २. बांध घातला जाणे (ओढा वगैरेला); पाण्याचा पाट तुंबल्यामुळे पाण्याचा प्रवाह बंद पडणे. [सं. खल्]

**खळवळ** न. रास काढून नेल्यानंतर खळ्यावर इकडे तिकडे पडलेले धान्य. हे नेण्याचा गावच्या महाराचा हक्क असे.

**खळ(ळे)वाटी-डी** स्त्री. खळ्यांचा समुदाय; अनेक शेतकऱ्यांची एकत्र खळी असलेली गावाच्या बाहेरची कुंपण घातलेली जागा; खळ्यांचा समुदाय : 'खळवाडेकडे गेला निघोनि ।' - दावि २८.

**खळवाद** पु. हट्टीपणाचा, रिकामटेकडा वाद; वितंडवाद; काथ्याकूट (क्रि. करणे, घेणे, सांगणे.).

**खळवादी-द्या** पु. वि. १. वितंडवादी; छळवादी; दुराग्रही. २. हेकट; हटवादी; तंटेखोर.

**खळविणे** उक्रि. १. थांबविणे; थोपविणे; तहकूब करणे. २. अडथळा आणणे.

**खळा** पहा : **खळगट**

**खळा** पु. गरीब लोकांचा फारसा झणझणीत नसणारा मसाला.

**खळाखळ** क्रिवि. खळखळ करून; खळखळ अशा मोठ्या आवाजाने. पहा : **खळखळ-ळा**

**खळाळ** पु. (खळखळचा अतिशय) १. गर्जना; घोष; मोठा ध्वनी (खडकावर फुटणाऱ्या लाटांचा); नाद निघणाऱ्या दोन वस्तूंचा एकमेकांवर आदळताना होणारा आवाज; घणघण; खणखण; छनछन इ. २. ओढ्याच्या, नदीच्या पाण्याचा खळखळाट : 'शुष्क जळाचे चळाळ । धारा धबाबे खळाळ ।' - दास ११.७.४. ३. खळखळणारा ओढा, प्रवाह : 'खळाळाच्या लगबगीं । फेडूनि खळाळाच्या भार्गीं।' - ज्ञा १५.३८६. ४. खळबळ : 'रजोगुणाचेनि खळाळें । स्वर्गु गाजे॥' - ज्ञा ७.७८.५. वेग. [ध्व.]

**खळाळ-ळा** क्रिवि. १. मोठ्याने गर्जून; खळखळाटाने (लाटा, धबधबा). २. ढळढळा; खळखळा; सळसळा (अश्रू वाहणे.).

**खळाळणे** अक्रि. खळखळणे; मोठा गंभीर आवाज करणे; दीर्घ आवाज काढणे; गर्जना करणे; ओरडणे; आदळणे; सडकणे इ. [ध्व.]

**खळाळा** पु. हाहाकार; खळबळ : 'देवळि जमा होणें म्हणून हुकूम केला त्याजवर मुलकात खळाळा पडला.' - साब ३३. [ध्व.]

**खळाळी** स्त्री. १. खळाळ; खडकावरून प्रवाह चालला असता होणारा आवाज. २. वरीलप्रकारे आवाज करणारा ओढा : 'आथवा खळाळीं पडिलें ।' - दास ३.७.१०. ३. (ल.) खळबळ; क्षोभ : 'पाखांडाचा खळाळी ।' - भाए ११०.

**खळाळून** पहा : **खळखळून**

**खळी** स्त्री. १. खड्डा; खाच; खळगी; खोलवा; पोचा; हसताना वगैरे गालावर पडणारी खळगी. : 'मधुस्मिताची खळी कपोलीं उलट तिच्या पडली ।' - विक ४१ (क्रि. पडणे.) २. खळग्यासारखा सखल प्रदेश; निरुंद घळ; खळ्याखोचर : 'मही नदीच्या खळ्या भाला दोन भाले खोल एकामागून एकानें जावे अशी अडचणीची वाट.' - ऐलेसं २२८४. (वा.) **खळी खणणे** - १. पायाने जमीन उकरणे. २. (कोणत्याही गोष्टीसाठी) हटून बसणे. **खळीला येणे** - हट्टाला पेटणे. **खळीस येणे** - त्वेष चढणे; इरेस पडणे; कडक तगादा लावणे : 'डुक्कर खळीस येतो तैसे इरेस पडून मारामार केली.' - भाब ४२. **खळ्या खांदीत बसणे** - (डोईफोडे किंवा इतर भिकारी यांचा खोळंबा केल्यास, भिक्षा न दिल्यास ते आपल्या साखळदंडाने जमीन उकरतात त्यावरून) हटवादीपणा, दुराग्रह करणे; खनपटीस बसणे; तगादा करणे.

**खळी** स्त्री. १. तुरटी. २. कापडाला लावण्याची खळ. [सं. खल्ल = खाच]

**खळी** स्त्री. लहान ओढा; पाट; गटार. (गो.) [सं. खल्ल = खाच]

**खळे** न. १. रणभूमी : 'कुरुक्षेत्रिंचा खळां । हाचि प्रस्तु पूर्वी अर्जुनें केला।' - उगी ६९४. २. स्मशान. [सं. खल्ल, क्षय]

**खळे** न. १. धान्याची कणसे झोडण्यासाठी, मळण्यासाठी केलेली जागा (शेतात अगर अंगणात) : 'झोडा भारे, खळें भरेल । भाताची मग रास पडेल ॥' - म पु १. ५० (१९३२); शेतातून माल कापून आणल्यावर तो साठवून ठेवण्याची जागा. तळवे. (खा.) २. (ल.) (बायकी) लहान मुलांनी अन्न वगैरे खाताना केलेला अन्नाचा लगदा, काला, गिचमिड. ३. सूर्य, चंद्र यांच्याभोवती पडलेले अभ्राचे कडे. कधी एकात एक अशी दोन अगर तीन खळी पडतात. ४. अंगण (घरापुढील). (राजा) [सं. खल]

**खळेदान** न. शेताच्या खळ्यावर दिलेले धान्याचे दान : 'केशव खळेदान देता । नामा जालासे मागता ।' - नाम १६. ५८.

**खळेवेसकर** पु. खळ्यावर काम करणारा महार.

**खळोती** स्त्री. खळ्यावर शेतकऱ्यांकडून धान्य घेण्याचा बलुतेदारांचा हक्क.

**खळ्या** वि. हट्टी; दुराग्रही. पहा : **खळभट**

**खळ्या खोचरे** न.अव. खाचखळगे : 'खळ्या काय, खोचरे काय, उष्णाचे दिवस, चोरांचे भय, इतके असता....' - पेद १५.३४.

**खळ्याची मेढ** तिवडा; खळ्याच्या मध्यावर रोवलेला खांब.

**खंक-ख** वि. १. दरिद्री; द्रव्यहीन; निर्धन; निष्कांचन : 'नाना तेवढ्यानें खंक झाला नाहीं.' - अस्तंभा ७१. (क्रि. होणे.) २. द्वाड; क्रूर; निर्दय; रानटी; द्राष्ट. ३. कृपण; चिक्कू; ४. तापट; तडफदार (घोडा). ५. अशक्त; दुर्बल. ६. खडा. [सं. क्षी]

**खंकर** पु. रत्न; गोटी; खडा. पहा : **कंकर** [सं. कंकर]

**खंकर** पु. १. कृपण; कद्रू. २. क्रूर; निष्ठुर अंत:करणाचा, कठोर हृदयाचा निर्दय माणूस.

**खंकर** पु. विस्तवावर भाजलेले कणकीचे गोळे; गाकर.

**खंकशास्त्र** न. समाजशाही; समाजसत्ता. (बोलोविझम याला प्रतिशब्द.) हा शब्द उपरोधाने वापरला जात असे.

**खंकारणे** उक्रि. १. खोकणे; खाकरणे; घशातील कफ, बेडका काढणे. २. पहा : **खिंकाळणे**. ३. खाकरून लक्ष वेधणे. [ध्व.]

**खंकाळ-ळा-ळ्या** वि. १. दुष्ट; उग्र : 'वेताळ खंकाळ लागला । ब्रह्मगिन्हो संचारला ।' - दास ३.२.२८. २. तिरसट; कुरठा; रागीट; द्वाड. ३. पाणीदार; चलाख; तापट (घोडा, तट्टू.). पहा : **खंक**

**खंका(खा)ळणे** अक्रि. घोड्याचे ओरडणे. पहा : **खिंकाळणे**

**खंकाळतट्टू** वि. अडेलतट्टू; माजोरी.

**खंकाळभवानी** स्त्री. भांडकुदळ बाई; अवदसा : 'आलीच ही खंकाळभवानी.' - सु २१.

**खंक्या, खणक्या** वि. बेपर्वा; उद्धट; बेदरकार; ताडफाड करणारा; दांडगा; खणखणीत.

**खंखणपाळ, खणखणपाळ** वि. दरिद्री. (गो.) पहा : **ठणठणपाळ**

**खंग** स्त्री. क्षय; झीज; क्षयरोग : 'मधराची व ज्वराची वेथा जाली. खंग लागली.' - मइसा ६.१४.

वि. अशक्त; रोगाने खंगलेला.

**खंग** पु. भिकारी; निष्कांचन; कोरडा : 'दोघ्या नारींचा पुरुष । वाळून खंग जोगी । एकली राजभोगी ।' - वलो ३४. (व.) [सं. ख = शून्य]

**खंग** पु. १. न्यूनता; कमीपणा. २. खंड; व्यत्यय; अडथळा : 'म्हणौनि अभेदें जो भक्तियोगु । तेथ शंका नाहीं नये खंगु ।' - ज्ञा १०.११०.

**खंगणे** अक्रि. क्षीण, अशक्त होणे; वाळणे; झिजून जाणे; कृश होणे (श्रम, रोग इ. मुळे) २. (ल.) दरिद्री होणे : 'कृपीवलें खंगलीं भणंगे।' - मुसभा ३.१०८. [सं. क्षयण]

**खंग(गा)र** पु. पक्की भाजलेली वीट; करपलेली वीट.

**खंगर** पु. (भूशा.) धातू शुद्ध करतेवेळी धातुरसाच्या पृष्ठभागावर जमणारा अशुद्ध पदार्थाचा थर.

**खंगर** पु. अग्नी; ऊन; निखारा : 'ऐशा जन्मल्या चार गायत्र्या.... एक जन्मली खंगरीं ।' - बदला ७४.

**खंग(गा)र** पु. कंगोरा; तटबंदी.

**खंगार** पु. (ल.) लाचारी. आपली हलाखी दाखविण्यासाठी प्रतीक म्हणून अशी वीट पाठविण्याची चाल होती : 'येथील माळी रडत आला व गांवकरी यांनीहि खंगार पाठविला.' - पेद २९.२०९.

वि. (ल.) खंगरी विटेप्रमाणे बळकट, दृढ निश्चयाचा : 'येथे माहीतगार माणूस नाहीं तरी दहा माणसे खंगार मेवाती पाठऊन द्यावे.' - पेद

**खंगार-ळ** वि. १. अशक्त; दुर्बल; जाया झालेला; वयोमानाने क्षीण झालेला. (माणूस, प्राणी, झाड.) २. वाईट; नापीक; फलहीन (देश, शेत, पीक वगैरे.).

**खंगारक** पु. (भूशा.) कोळसा जळाल्यानंतर शिल्लक राहिलेला त्याचा ज्वलनशील नसलेला तुकडा; कोळपलेला, कळंजलेला कोळसा.

**खंगा(ग)ळणे** अक्रि. १. धुणी पाण्यात खळबळणे, जोराने हालवणे, स्वच्छ करणे. २. भांडी विसळणे. [हिं. खंगालना]

**खंचणी** स्त्री. खाच; खोबण; पन्हळी. [सं. खच् = जडवणे]

**खंचणे** अक्रि. खचणे; कच खाणे; कमी होणे; ऱ्हास होणे : 'तेथ ही दोनि गुण खंचति । मग एकु धरी उन्नती ।' - राज्ञा १७.५७.

**खंचणे** सक्रि. अगदी जवळ जवळ, घट्ट लावणे : 'अंगड्याटोपड्याला मोती खंचलेले.' - जसा ३५८.

**खंची, खैंची** वि. कुठचा; कोठील. (गो.) [सं. क]

**खंज** वि. लंगडा; लंगडत चालणारा : 'जयांपुढे खंजन खंज जालें ।' - सारुह ५.१०९ [सं.]

**खंजन, खंजरीट** पु. एक पक्षी; काळी चिमणी. ही सारखी शेपूट हालवीत असते : 'तथापि ते निंदित खंजनाला ।' - सारुह २.९६. [सं.]

**खंजर** पहा : **खंजीर**

**खंज(जि-जे)री** स्त्री. टिमकी; लहान डफडी. घुंगरु लावलेला लहान डफ. जंगम, गोसावी इ. लोक गाणी म्हणतांना ताल धरण्यासाठी हिचा उपयोग करतात. : 'श्रीहरी वाजवी खंजरी ।' - रासक्रीडा २१; 'सुरताल पखवाज खंजिरी मंजरींत वासरीं ।' - राला ३१. [फा.]

**खंजरीट नयना** सुंदर डोळे असलेली स्त्री : 'कामकुरंगी खंजरीट - नयना ये उभि राहे ।' - देप ८५. [सं.]

**खंजवायू** पु. ज्यामुळे शरीराचे अवयव वेडेवाकडे उडू लागतात तो वायू.

**खंजिरी** स्त्री. रेशमावर छापण्याचा एक प्रकार. [फा. खंजरी]

**खंजिरी** स्त्री. घुंगरू लावलेली टिमकी.

**खंजिरीचा गरबा** गुजरातेतील गरब्याचा एक प्रकार.

**खंजीर, खंजर** पु. स्त्री. एक शस्त्र; लहान कट्यार. [फा. खंजर.]

**खंजीर, खंजर** पु. समई.

**खंजुरीचा मासा** नदीतील एक प्रकारचा मासा.

**खंटणे** उक्रि. खणणे (ग्रामीण).

**खंड** पु. १. तुकडा; भाग : 'मग तळवे तळहात शोधी । उर्ध्वींचे खंड भेदी।' - ज्ञा ६.२३२. २. विषयाचा, ग्रंथाचा भाग; अध्याय; प्रकरण. ३. (ग्रंथ.) ग्रंथाचे वेगवेगळे मुखपृष्ठ, नाव, पृष्ठांकन असलेले भाग. मासिकाचा वर्षाचा अथवा विशिष्ट कालावधीचा एकत्र बांधलेला भाग; स्वतंत्रपणे नोंदलेले कोणतेही पुस्तक. ४. जंबुद्वीपातील नवखंडांपैकी एक खंड; पहा : **नवखंड**; पृथ्वीवरील प्रदेशाचा एक मोठा भाग; अनेक देशांचा समुदाय. उदा. आशिया खंड. ५. प्रदेश; प्रांत; जिल्हा. उदा. बुंदेलखंड. ६. लांबी, रुंदी, उंची असलेला तुकडा. ७. द्विदल धान्य चाळताना खाली पडणारे धान्याचे बारीक कण; निरुपयोगी धान्याचा अंश. (बे.) [सं.] (वा.)

**खंडेखंडे करून टाकणे, खंडविखंड करून टाकणे** - तुकडे करणे; मोडणे; तोडणे; फोडणे.

**खंड** पु. खळ; अडथळा (काम, काळ, धंदा यामध्ये); व्यत्यय. [सं.]

**खंड** पु. १. (नृत्य) अनेक करणांचा समुदाय. २. (संगीत) ज्यामध्ये पहिला विभाग नियमाने पाच मात्रांचा असतो असा एक दक्षिणेकडील तालप्रकार. [सं.]

**खंड** पु. १. दंड; चढाई करून आलेल्या शत्रूने गावांवर बसविलेली पट्टी; खंडणी : 'खंड काय मला मागतो ।' - ऐपो १४. २. लढाईत कैद केलेल्या शिपायांबद्दल त्यांच्या सुटकेसाठी द्यायचा पैसा. ३. कामाचा ठराव (ठरविलेली रक्कम); मक्ता; कराराने ठरलेली रक्कम; अमुक कार्यात अमुक द्रव्यादिक असा ठराव. ४. धान्यरूपाने अगर पैशाच्या रूपाने मालकी हक्काबद्दल घेतलेला कर, फाळा, सारा (सरकारी खोती).

५. ठराव; निवाडा : 'तुका म्हणे केला खंड दोघांचा विठ्ठला ।' - तुगा १४२८. [क. कंडणे. खंडपत्र]

**खंड** पु. (शिक्षण.) नियत वेळेसाठी ठरविलेला अभ्यासक्रमाचा किंवा पाठ्यपुस्तकाचा भाग.

**खंडक, खंडखंडक** पु. (नृत्य) चार करणांचा समुदाय.

**खंडकमाविशी-वीस** स्त्री. गावच्या इनामदाराला दंड करण्याचा व तो वसूल करण्याचा मिळालेला अधिकार.

**खंडकरी** पु. कूळ; खंडाने शेत करणारा.

**खंडकाम** न. अमुक द्रव्य व अमुक काम अशा रीतीने ठरवून घेतलेले काम; कंत्राटाने घेतलेले काम; नेमून घेतलेले काम.

**खंडकाव्य** न. एकाच विषयाला धरून केलेली प्रदीर्घ काव्यरचना.

**खंडकी** स्त्री. एक प्रकारचे हलके वस्त्र. (विशेषतः तांबड्या रंगाचे.)

**खंडकुली** स्त्री. जलाशय.

**खंडखुरई** पहा : **खंडगुन्हेगारी**

**खंडखोती** स्त्री. इजारा.

**खंडगुणन** न. (ग.) गुणकाच्या अवयवांनी गुणणे.

**खंडगुदका** पु. शेतावर बसवलेला खंड, सारा : 'झांशीकडील मामलतपैकीं खंडगुदका पैका हिस्सेमुळें मुबलग होता...' - ऐलेसं १२६८.

**खंडगुन्हेगारी** स्त्री. (गुन्हेगारांपासून घेतलेला) दंड; जप्ती; धरपकड वगैरेला सामान्य संज्ञा.

**खंडचिठ्ठी** स्त्री. मक्तेपत्र; भाडेचिठ्ठी.

**खंडछाया** स्त्री. (ज्यो.) मुख्य छायेच्या सभोवती असणारा फिका किंवा पांढऱ्या रंगाचा भाग.

**खंडण-न-णा-ना** न. स्त्री. १. मोडणे; तोडणे. २. निरुत्तर करणे; खोडून काढणे. ३. शेवट; भंग : 'या पोटाकारणें गा झालों पांगिला जना । न सरेची मायबाप भीक नाहीं खंडणा ।' - तुगा २४९. ४. खंड पडणे; थांबणे : 'मही लोटला आरक्ताचा पाट । खंडणा नोहे परम अचाट ।' - नव ९.१५६. [सं.]

**खंडणा** स्त्री. रचना; व्यवस्था : 'क्रिस्तु स्वामी संसारीं येईल । नवी खंडणा करिल । म्हणि नवे शास्त्र देईल ।' - क्रिपु ३४.१६०.

**खंडणी** स्त्री. १. करभार (मांडलिकांनी सार्वभौमाला द्यावयाचा); दुसऱ्याने आपणास उपद्रव न करावा किंवा अनुकूल असावे म्हणून देण्यात येणारे द्रव्य; विजयी सैन्याने मागितलेला दंड; रक्कम. २. दंड; बसविलेली वर्गणी; जबरीने घेतलेला पैसा, वस्तू. ३. ठरविल्यानंतरचा चालू सालचा वसूल, सारा, कर. ४. खंड; फाळा; धान्यरूपाने मालकाला सारा देणे. ५. (खंडणे याचे धातुसाधित नाम) मक्ता करणे; किंमत, अटी ठरविणे.

**खंडणी तश्रीफ** पु. धारा नक्की घेतल्यानंतर गावकामगाराला दिलेले इनाम; पाटलाचे वेतन.

**खंडणीदंडणी** स्त्री. खंडणी, कारभार वगैरे : 'श्री दर्शन घेऊन मागती श्रीरंगपटण प्रांती येतील इकडून श्रीमंतहि जातील. ते समई खंडणी दंडणी ठराव होणे तो होईल.' - पेद ३७.२.१९. [खंडणीचे द्वि.]

**खंडणीदार** वि. खंडणी देणारा; खंडकरी.

**खंडणूक** स्त्री. १. कामाचे कंत्राट; कामाचा मक्ता; विशिष्ट कामाबद्दल विशिष्ट मोबदला मिळण्याबद्दलचा ठराव, बोली वगैरे. २. (क.) मक्ता; इजारा (सारा, जकात इ. चा.) ३. किंमत, अटी ठरविणे.

**खंडणे** उक्रि. १. तुकडे करणे; तोडणे; मोडणे; तुटणे. हे क्रियापद निश्चित अर्थाचें नाही. तोडणे, मोडणे यांतील बारीक भेद या क्रियापदाने दर्शविला जात नाही : 'तें आदि नाहीं खंडलें । समुद्रीं तरी असे मिनलें ।' - ज्ञा २.१५४. २. नाश करणे, नाश पावणे : 'काय हे खंडईल कर्म ।' - तुगा ६९८. ३. खोडून टाकणे; निरुत्तर करणे; कुंठित करणे (वादात) : 'कीं न्यायें बौद्ध खंडिले कविनें ।' - मोकर्ण ८.३२. [सं. खंडन]

**खंडणे** क्रि. खणणे.

**खंडणे** उक्रि. १. मक्ता करणे; करार करणे; ठरावीक पैसा घेऊन ठरावीक काम पार पाडणे; इजाऱ्याने काही एक काम पत्करणे, दुसऱ्यास देणे. २. किंमत निश्चित करणे; अटी व किंमत ठरविणे (विकत, भाड्याने घ्यायच्या वस्तूची.) ३. फिटणे; फेडणे (कर्ज); अटी पूर्ण करणे; स्वतःवरची जबाबदारी पार पाडणे; फल भोगणे : 'तुझें कर्म खंडेल गहन ।' - रावि ४०.१००. ४. ठरविणे; निश्चित करणे : 'येका मळेयाचा येकांतस्थानीं । लोसेन ठावो करूं खंडुनी । तेथें मंदिर बांधोनी । वासु केला ।' - ख्रिपु २.१२.८०. ५. खंडणी बसविणे; वसूल करणे.

**खंडणे** अक्रि. झाडाची पाने गळून पडणे : 'हे बेलाचे झाड आता अगदी खंडले.' - सश ४५५.

**खंडणेदंड** पु. दंड; जप्ती. पहा : **खंडगुन्हेगारी**

**खंडदालदी** स्त्री. पाण्यात कोळ्याने काठ्या रोवण्याच्या हक्कासाठी दिलेला पैसा. [दालदी = कोळी]

**खंडन** न. १. तोडणे; तुकडे करणे; नाश करणे. पहा : **खंडण**. २. (ल.) अडथळा करणे; अडविणे. ३. (ल.) कुंठित करणे; खोडून काढणे. (समासात) वादखंडन, मतखंडन, इ. (क्रि. करणे.) [सं.]

**खंडन चिबुक** (नृत्य) दात एकमेकांवर आपटणे; संतापदर्शक अभिनय.

**खंडनमंडन** न. सिद्धासिद्ध करणे; खोडून काढणे व स्थापणे; बाजूने व विरुद्ध बोलणे. [सं.]

**खंडना** स्त्री. तूट; वियोग. [सं.]

**खंडपत्कुरा** पु. जबाबदारी; पत्कर : 'मी का ह्या तसरीचा खंड पत्कुरा घेतलाय राखणीसाठी?' - खळाळ ४५.

**खंडपद** न. (ग.) मूळगत; करणीगत पद. [सं.]

**खंडपला** पायथळ जमीन.

**खंडपलीरोई** स्त्री. उत्पन्नाची एक बाब : 'परगणे मजकूर येथील आईना व सायेर व खंडपलीरोई या बाबेपैकीं निमे.' - समारो १२१.

**खंडपुरोही-पुरोही** पहा : **खंडगुन्हेगारी** : 'याखेरीज ६ हजार होन खंडपुरोहीबद्दल यावे.' - ऐलेसं ३००७.

**खंडफडशी** स्त्री. सरकारच्या वतीने वसूल केलेला दंड.

**खंडबकरी** स्त्री. न. घाटावर चरणीस, विक्रीस आलेल्या शेळ्यामेंढ्यांच्या कळपातील एक शेळी - मेंढी सरकारी कर म्हणून घेणे; कळपावरील जकात.

**खंडभट्टी** स्त्री. भट्टीवरील कर.

**खंडमक्ता** पु. कंत्राट; हक्क; इजारा; मक्त्याने दिलेली जमीन. खंड - मक्ता - करार यास व्यापक संज्ञा.

**खंडमंड** स्त्री. फिटंफाट; फिटाफीट. (ना.) [खंडणचे द्वित्व.]

**खंडमंडल** न. वर्तुळाच्या परिघाचा अंश, भाग. [सं.]

**खंडमेरू** पु. ढीग; नियमितपणाने कमी होणारी रास (तोफगोळ्यांची); समप्रमाणात उतरणारी संख्या.

**खंडमेरू** पु. (संगीत) नष्ट व उद्दिष्ट ह्यांतील इच्छित गोष्टी सुलभतेने काढण्याची रीत.

**खंडलेतुटले** न. भागीदारी तुटणे; सरकत मोडणे; लडथडीच्या व्यवहाराची देऊन घेऊन केलेली सोडवणूक, मोकळीक.

**खंडवा** पु. सबंध कोरडे असणारे नदीचे पात्र. [सं.]

**खंडवाटा** पु. मक्ता; खंड : 'जमिनी आपण खंडवाट्याने दिलेल्या आहेत.' - गार ११९.

**खंडवाडा** पु. कामासाठी बैल आणल्यास त्याच्या मालकाला द्यायची रक्कम; धान्य.

**खंडवार्ता** स्त्री. दूरदर्शनवर बातम्या चालू असताना खाली लिहून आलेली महत्त्वाची ठळक बातमी.

**खंडविखंड** पु. तुकडे तुकडे : 'कुशब्द बोलोनिया उदंड । हृदय करी खंडविखंड ।' - मुसभा ५.८७. 'मियां खंड विखंडी जुझावें।' - लीचउ १७४. [सं.]

**खंडशः** क्रिवि. १. तुकडे तुकडे करून. २. भागशः

**खंडशिंदी** स्त्री. ज्यापासून ताडी काढतात त्या ताडीच्या, शिंदीच्या झाडांवरील कर.

**खंडसिद्धांत** पु. (राज्य.) जमीनमालक किंवा घरमालक यांची मालमत्ता वापरल्याबद्दल (उपयोगात आणल्याबद्दल) अनुक्रमे कुळाने वा भाडेकरूने द्यावयाच्या मोबदल्यासंबंधीची तत्त्वे, योजना, कार्यपद्धती इ.

**खंडळमंडळ** न. अधूनमधून, प्रसंगोपात्त घडून येणे (काम, कृती, स्थल, काम इ. संबंधी). (क्रि. करणे, लावणे, मांडणे, चालवणे.) क्रिवि. १. अधूनमधून; केव्हा केव्हा; प्रसंगवशात; टंगळमंगळ करून. २. येथे तेथे; थांबून, अडखळत. ३. संदिग्धपणे; अनिश्चितपणे. वि. तुटक तुटक. (व.) [सं. खंडलचे द्वि.]

**खंडज्ञान** न. १. भागशः, पायरीपायरीने, क्रमाक्रमाने दिलेले, मिळविलेले ज्ञान. २. अर्धवट ज्ञान. ३. नाशिवंत वस्तूचे ज्ञान; जीवात्मा व बद्धात्मा यांच्या ऐक्याबद्दलचे अपुरे ज्ञान. पूर्ण ज्ञान अथवा अभेद ज्ञानाच्या उलट : 'खंडज्ञान उपदेशितो ।' - विपू १.३२. [सं.]

**खंडा** पु. भेंड्या : 'आपण व्यवहार बोलतों आहोंत. काव्यांतले अर्थालंकार हुडकून काढण्याचे खंडे का लावीत आहो एकमेकांवर?' - के ८.१.१९३४.

**खं(खें)डा** पु. हलक्या किमतीचे वस्त्र किंवा शेला : 'एकी दिव्य वस्त्रें नेसल्या परिकर । मज खंडे जर्जर मिळालेसे ।' - नाम.

**खंडा** पु. १. रुंद पात्याची, दुधारी सरळ तलवार; पहा : **खांडा** : 'खंडा पट्टा सुरे तिरकमान कटार लावून ।' - ऐपो १०९. २. (पुरा.) कास्य धातूचे तरवारीपेक्षा बारीक पात्याचे हत्यार. [सं. खड्ग]

**खंडाईत** वि. खड्गधारी; खंडा धारण करणारा.

**खंडाईत, खंडाऊ** वि. १. खंडाने घेतलेली (जमीन); मक्त्याने ठरविलेले (काम.) २. मक्ता घेतलेला; खंडणारा.

**खंडांक** पु. (ग्रंथ.) एका मालेतील अथवा संचातील पुस्तकांना दिलेले वेगवेगळे क्रमांक. [सं.]

**खंडारवाणी-नी, ग्खंडारी** स्त्री. (संगीत) एक गायनपद्धती. ध्रुवपद गाणारा प्रसिद्ध राजा सन्मुखलिंग खंडार गावी राहत असे. म्हणून त्याच्या ध्रुवपदगान पद्धतीस म्हणतात.

**खंडाराणी** स्त्री. राजाच्या गैरहजेरीत त्याच्या खंडाशी (कट्यार, तरवार) जिचे लग्न लागते अशी राणी. (बडोदे)

**खंडारे** न. रीठ; पडके, मोडकळीस आलेले घर. (व.)

**खंडाळणे** अक्रि. खंड पाडणे; सोडून जाणे; खंडित करणे. [सं. खंड]

**खंडाळी** स्त्री. चिडवणूक; गांजवणूक; उपद्रव; सतावणी.

**खंडाळे** न. खणाळे; खणांचा तागा.

**खंडित** वि. खंडाने, मक्त्याने घेतलेले; ठराव करून दिलेले (काम).

**खंडित** वि. १. तुटलेले; मोडलेले; भग्न : 'एके हातीं दंतु । जो स्वभावता खंडितु ।' - ज्ञा १.१२. २. मध्ये अडथळा आणलेले; तहकूब केलेले; खंड पडलेले. ३. उडवलेले; निरुत्तर केलेले. (शंका, प्रश्न इ.)[सं. खंड]

**खंडित** वि. (व्यापार) नक्त; ठोक : '१५ रुपयांचे वर कितीही किमतीपर्यंत मागितल्यास एक रुपया खंडित अडत घेऊ.' - मुंव्या १८४.

**खंडी** स्त्री. १. वजनाचे, जिन्नस मापण्याचे एक प्रमाण; एक कैली माप. निरनिराळ्या प्रांतात निरनिराळी खंडी असे. सामान्यतः ती २० मणांची असे. २. (सामा.) पुष्कळ मोठी रास, प्रमाण याअर्थी. जसे :- खंडीभर पोरे, खंडीभर मेंढ्या, खंडीभर काम, खंडीभर बोलणे : 'याचीं वर्ने विस्तारीं अठरा खंडी प्रकारें काव्य गाईन ।' - वसा ३. ३. जमिनीचे माप - १२० बिघ्यांचे. ४. वीस संख्या (मेंढ्या, बकरी इ. संबंधी.) [क. कंडुग] (वा.) ० **लावणे** - फसविणे; ठकविणे; युक्ती करणे. **खंडीवर पेंढी होणे** - २१ वे मूल होणे.

**खंडीखंडी पंडित** वि. सर्व विषयांतील परंतु अर्धवट ज्ञान असलेला पंडित.

**खंडी(डो)गणती** क्रिवि. १. खंडीखंडीने; खंडीने मोजता येण्याजोगे. २. (ल.) अतिशय; पुष्कळ; अमाप.

**खंडीभवन** न. (वै.) एकाचे दोन, दोहोंचे चार याप्रमाणे पेशींची वाढ होण्याची प्रक्रिया.

**खंडूशाही** वि. खोट्या जरताराची (लड).

**खंडे** न. फाटके वस्त्र.

**खंडे करणे** बोटाने वेडावणे, वेडावून दाखवणे. (कर.)

**खंडे कंकर** हिरेमाणके, जडजवाहीर.

**खंडेराव** पु. १. शंकराचा अवतार; पुष्कळांच्या मते भैरवाचा किंवा स्कंद, कार्तिकेय याचा अवतार; जेजुरीचा खंडोबा. २. (ल.) उत्तेजन देऊन, चढवून भर घालून, काम करण्यास प्रवृत्त झालेला माणूस; घोड्यावर

बसवलेला. [सं. खंडण] (वा.) ० **करणे** - घोड्यावर बसविणे, चढविणे; प्रवृत्त करणे (एखाद्या कार्यास).

**खंडेश्वरी** स्त्री. तरवार.

**खंडोबा** पु. एक देवता; महादेवाचा अवतार. पहा : **खंडेराव** (वा.) **सोळा (अठरा) गुणांचा खंडोबा** - अतिशय खोडकर, दुर्गुणी मनुष्य, पशू. [सं. स्कंद]

**खंडोबाचा कुत्रा** खंडोबाचा वाघ्या, उपासक.

**खंडोबाची काठी** खंडोबाचे निशाण, काठी. ही यात्रेत थाटामाटाने मिरवतात. या काठीला तांबडे व निळे कापड गुंडाळून वर टोकाला मोराची पिसे चवरीसारखी लावलेली असतात.

**खंडोबाची तळी, तळई** गोधळ; खंडे नवमी इ. प्रसंगी नारळ, विड्यांची पाने, भंडारा वगैरे पितळीत ठेवून एळकोट म्हणून उचलतात ती. (क्रि. भरणे) : 'खंडोबाची तळई तरी भरा हो.' - चंद्रग्र ६१.

**खंडोष्ठ** पु. (वै.) अपूर्ण वाढीमुळे वरचा ओठ फाटलेला असणे. ही विकृती गर्भाची वाढ होतानाच झालेली (जन्मजात) असते.

**खंड्या** पु. पाण्यातील माशांवर उपजीविका करणारा एक पक्षी.

**खंणी** स्त्री. 'धारण'-(तंजा.)

**खंत** स्त्री. १. खेद; खिन्नता. (क्रि. येणे.) २. नैतिक किळस; ओकारी; वीट; लाज; चीड; तिटकारा. ३. मानसिक दु:ख; हुरहूर; झुरणी. (क्रि. करणे, वाटणे, होणे, घेणे, देणे, धरणे.) [सं. खिद्]

**खंत** स्त्री. जमीन खोदण्याची कुदळ; खनित्र. [सं. खम्, क्षम्]

**खंतखोड** स्त्री. जनावराचे व्यंग; उणीव; दोष (खंती येण्याजोगा.).

**खंतखोर** वि. नेहमी खंत घेणारा; चवचाल; चोखंदळ; दोषदृष्टी.

**खंतडला** वि. वाईट; दृष्टीपुढे नकोसा वाटणारा. (व.)

**खंतमी** स्त्री. बयाली बीज. - मुंबई व्यापार १५५. [अर.]

**खंतावणे** स्त्री. १. किळस, वीट येणे. २. हुरहूर, खुरखुर लागणे, वाटणे; तळमळणे.

**खंती** स्त्री. १. अस्वस्थता; अशांती. (क्रि. धरणे, घेणे.) २. चिंतायुक्त शंका, उत्कंठा : 'जिवलगांची खंती । जेणें काळें वाटे चित्तीं ।' - दास २.५.१९. २. कंटाळा; तिरस्कार : 'बहु एकांतावरी प्रीति । जया जनपदाची खंती ।' - ज्ञा १३.६१४. ४. खिन्नता : 'म्हणौनि करूं लाहे खंती ।' - ज्ञा १८.८०. पहा : **खंत**

वि. १. हुरहूर लागलेला; अस्वस्थ; खिन्न : 'भोज राजा फारच खंती होऊन माधारा फिरला.' - सिंहासनबत्तिशी १२. २. साशंक; चिंतातुर.

**खंती, खंतोड** पु. पहा : **खणती** वगैरे

**खंतीलवाणा** वि. पु. ईश्वराविषयी रोष बाळगणारा : 'आधीचि देवासि खंतीलवाणा : 'आणि तुम्ही आपुला न म्हणा ।' - सव ५०८.

**खंतोड** पहा : **खणतोड**

**खंतोषला, खंतोसखोर** वि. द्रोही, मत्सरी. (व.)

**खंतोस** पु. मत्सर; हेवा. (व.)

**खंदक** पु. १. किल्ला किंवा गाव यांच्याभोवती खणलेला चर. यात पाणी सोडतात. २. मोठा खळगा; खाई. ३. (ल.) पोकळ; अभावयुक्त; अज्ञानी याअर्थी : 'तुम्ही पक्के अगदींच कसे करंट पॉलिटिक्सचे खंदक आहांत हो !' - नाकु ३.७६. [फा.]

**खंदणे** अक्रि. अपमान करणे; अवमानणे. पहा : **खंदोस**

**खंदल** न. एक वन्य फळ. (गो.)

**खंदस्त** वि. १. चलाख; हुशार; जोमदार. २. कडक; निश्चयी; निर्भय. २. तापट; पाणीदार (माणूस, जनावर). [फा. खंदा]

**खंदस्त-स्ती** स्त्री. वैर; शत्रुत्व; स्पर्धा : 'बहु कृपण बहु खंदस्ती ।' - दास ५.७.३५.

**खंदळणे** अक्रि. बेफाम होणे.

**खंदळाखंदळ** स्त्री. तुडवातुडव; गडबड; धांगडधिंगा : 'आत खंदळाखंदळ क्षणभर बहुतच केली.' - भाब १५३.

**खंदा** पु. उसाचे पाचट. (बे.)

**खंदा** वि. १. ज्ञानी; शहाणा; शूर; सामर्थ्यवान; कडवा; कसलेला (माणूस.) २. अतिशय पाणीदार; तल्लख; तापट (घोडा.) ३. साहसी; धाडसी; रानवट; स्वैर. ४. धष्टपुष्ट; भक्कम; तडफदार : 'खंदे बैल दिले.' - भासं १६५. [फा. खन्दा]

**खंदा** पु. स्त्री. मत्सर; द्वेष; आकस. (क्रि. लावणे, करणे.) पहा : **खंदोस**

**खंदाटी** स्त्री. झाडाची मोठी फांदी.

**खंदाड-डी-डे** स्त्री. १. मोठी फांदी. २. जाड खांदा.

**खंदाड** पु. घरजावई.

**खंदातट्ट** पु. आवेशी; धाडसी (मनुष्य, मूल).

**खंदारा-री** वि. १. (संगीत) खंदारी वाणी (गायनातील एक तऱ्हेची वाणी) गाणारा. पहा : **खंडारवाणी, खंडारी**

**खंदारी** वि. कंदाहारी; कंदाहारचा (उत्तम घोडा इ.).

**खंदाळ** पु. धांगडधिंगा; गडबड.

**खंदिणे** क्रि. खरेदी करणे; विकत घेणे.

**खंदील** पहा : **कंदील**

**खंदूस** पु. गोंधळ. (क्रि. घालणे.) : 'मिरीनं खंदूस घातला तेव्हा आई चिडली.' - सीताराम १३८.

**खंदोस** पु. १. शत्रुत्व; वैर; मत्सर; चुरस; हेवा. २. मत्सरयुक्त स्पर्धा. (क्रि. बांधणे, धरणे, बाळगणे, करणे, लावणे, चालविणे.) [सं. स्कंद = बाहेर पडणे, गळणे.]

**खंन्या** उद्‌गा. तुच्छतादर्शक शब्द. (व.)

**खंब** पु. व्यापारी; कारागीर.

**खंब** वि. ठाम; स्थिर : 'खंब ठाकोनिया राहे पुढे उभा ।' - नाम १९१ (वा.) ० **ठोकणे** - खम ठोकणे; आव्हान देणे : 'आरंभीच चीत झालेल्या दीनावर खंब ठोकणे यामध्ये मोठासा पुरुषार्थ आहे असे नाही.' - जोफु ६४.

**खंबरखुंट** पहा : **खंबीरखुंट**

**खंबऱ्या** वि. चतुर; चलाख; हुशार; शहाणा; तत्पर; उत्साही.

**खंबऱ्या** वि. मजबूत बांध्याचा; धट्टाकट्टा; राकट; दणकट; बळकट.

**खंबा** पु. खांब. [सं. स्तंभ.]

**खंबाई(य)त(ती)** वि. खंबायत गावासंबंधी; खंबायत येथील (लुगडी) : 'नेसलि खंबाइत जरतारी ।' - अमृत १०२; (सामा.) उंची वस्त्र : 'सुप्रसन्ना देवी खंबायत नेसविती ।' - वसा ५३.

**खंबारा** पु. नुसती खांबावर छप्पर घालून केलेली उंच इमारत; हत्तीचा गोठा; हत्तीखाना : 'हत्ती दररोज काय खातो, त्याच्यासाठी खंबारा बांधण्याकरिता किती खर्च लागेल....' - स्मरण १३४.

**खंबारी** स्त्री. शिवण नावाचे एक झाड; शिवणी.

**खंबावती** पु. गायन शास्त्रातील एक राग. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर.

**खंबाळे** न. उंची वस्त्र; खंबायती वस्त्र (जरीचे) : 'मिळोत कां खंबाळें। अथवा भगवींही नेसावीं ।' - अमृ ११५.

**खंबिरी** स्त्री. १. मजबुती; बळकटी; भक्कमपणा (इमारतीचा). २. बंदोबस्त. ३. कायमपणा; निश्चिती (वचनाची).

**खंबीर** पु. निश्चितता; निखालसता.
वि. १. मजबूत; भक्कम; दणकट; बळकट (इमारत, पदार्थ) : 'माहाभूतांचा खंबीर केला । आत्मा घालून पुतळा जाला ।'- दास २०.७.१८. २. (ल.) धिम्मा; निग्रही; दृढ निश्चयाचा (मनुष्य); निखालस; ठाम (भाषण); कायम (हुद्दा) ३. (व्यापक) मोठे; वजनदार; अवजड (बोजा.). [फा. खम = गाठ, ठाण]

**खंबीर** न. (प्र.) आंबवण; फुगवण; आंबवण्याची क्रिया. [खमीर अप.]

**खंबीरखुंट** वि. १. अढळ; कायम; ठरावीक; निश्चित (माणूस, हुद्दा, धंदा.) २. दणकट; मजबूत.

**खंबेरे** न. कासाळू.

**खंबोखणे** सक्रि. सांत्वन करणे; समजूत घालणे : 'उधवदेवासि तेयाते खंबोखितां सा मास लागले' - श्रीकृच ९.

**खंब्या** स्त्री. अव. (विणकाम) सूत खालीवर करून त्यास पेच (सांध) पाडण्याकरिता उपयोगात आणलेल्या लाकडी बारीक व सरळ काठ्या. विणताना या जागजागी ताण्यात सरकविलेल्या असतात.

**खंमाल, खम्माल** पहा : **खंबीर**. १. बळकट; मजबूत; भक्कम (इमारत, पदार्थ). २. जंगी; अवजड; भक्कम (ओझे, गठ्ठा.).

**खंवटाण** स्त्री. खवट; उग्र वास; घाण. [सं. खंवट + घाण]

**खंवरट, खंवरा, खंविरडा** वि. थोडासा तिखट व खवखव करणारा; खाजरा (अळू, सुरण इ.).

**खंवसणे** क्रि. मरणे. (कु. गो.) [सं. क्षपू.]

**खाइदवार** वि. कैदवार; शिस्तीचा; आज्ञाधारक. (कर.) [कैदवार अप.]

**खाइर-रा** वि. खाणारा : 'नेणें मांसखाइरु । काळें गोरें ॥' - ज्ञा १८.५५४.

**खाई** स्त्री. १. सती जाण्यासाठी केलेली खाच, चिता; निखाऱ्याने भरलेली खळी : 'ओंवऱ्याची करीन शिळा उंबऱ्याची करीन खाई।' - वसा ६८. २. खाच; खंदक; चर; दरी; खड्डा : 'तीन महिने खाई खोदून मुकाम केला.' - होकै २९. (वा.) **खाईत लोटणे** - संकटात घालणे : 'आपण आपल्या वडिलांस खाईत लोटले.' - भदि ४०९. [सं. खात]

**खाई** स्त्री. नाश; क्षय; ऱ्हास : 'परी ऐलीकडिले मुखीं खाई । हों सरली जगाची ॥' - ज्ञा ११.४४०.

**खाई** स्त्री. १. खाऊ; गोड पदार्थ. २. स्तन; आमा. (को.)

**खाई(ए)गिळी** स्त्री. खाऊ का गिळू करणे : 'खाईगिळी करितें भूतें ।' - शिव ९०१.

**खाई न खाई** काही झाले तरी; निश्चयेंकरून; जरुर; खचित; हमखास : 'आम्ही श्रावणमासीं खाईनखाई येतों.' - मइसा ३.१४१. [फा. खॉही-न-खॉही]

**खाईम** क्रिवि. कायम : 'न्हाईतर त्यो (ताप) खाईमच अंगात हाय.' - व्हीटी ३१.

**खाईलेणे** खाऊन घेणे : '.. बोडखी गायनी खाईलिथ..' - एहोरा भलरी ६३. (अहि.)

**खाई(ही)श** स्त्री. मागणी; इच्छा : 'रघोजी येथें यावा हे खाईश आम्हांस नव्हती.' - मइसा १.२२. [फा. ख्वाहिश]

**खाऊ** पु. १. खाण्याचा गोड पदार्थ; खाद्य; मिठाई : 'खाऊ मजला आणीत होता ।' - नव २४.१७३. २. लाच; बक्षीस. [सं. खांदुक]
वि. १. (समासात तिरस्कारार्थी) खाणारा; खादाड; खाबू. २. (ल.) घेणारा; सोसणारा; भोगणारा. (समासात) शेणखाऊ, लाचखाऊ, खेटरखाऊ वगैरे. [सं. खाद्] (वा.) **खाऊची गोष्ट** - नशीब उघडणे; नफा; फायदा (व्यापार, धंदा यात.).

**खाऊइतमाम** पु. मुलीच्या खाजगी खर्चासाठी मुलूख तोडून देणे.

**खाऊ का ठेऊ** उतावीळपणा. (झाडी.)

**खाऊखादाड** वि. अधाशी; अतिशय खाणारा.

**खाऊगिळू, खाऊडाऊ** स्त्री. एकसारखी, फार, सतत जाचणी, गांजणूक. (क्रि. करणे, लावणे.)

**खाऊघेवडी** स्त्री. अतिअधाशी, खादाड बाई.

**खाउडाल** वि. त्रास; गांजवणूक.

**खाऊन** स्त्री. कंबक्तीची वेळ. (क्रि. येणे.)

**खाऊनिंदक** वि. खाल्ल्या घरचे वासे मोजणारा; कृतघ्न.

**खाऊपासरी** वि. १. अधाशी; खाबूनंदन. २. फक्त खाण्याला तयार, इतर कामी निरुपयोगी; उदरपरायण.

**खाक** वि. जळून राख झालेला; धुळीस मिळालेला; पूर्णपणे नष्ट झालेला : 'परशत्रू होईना खाक....' - ऐपो ४१७.
स्त्री. राख; धूळ; माती : 'गवताची जळून खाक होते.' - पाव्ह ५५. [अर. फा. खाक् = माती]

**खाक** पहा : **काख** : 'खाकेस घेऊनियां श्वान ।' - यथादी ३.८०३. [सं. कक्षा]

**खा(खां)क** स्त्री. खोकला. (गो.) [ध्व.]

**खाकअढी** स्त्री. (मल्लखांब) मल्लखांब काखेत धरून मारायची उडी.

**खाकट-टा** पु. माड, पेरू इ. वृक्षांचे कोवळे फळ. (को.)

**खाकटणे** उक्रि. दांडगाईने ओरबडणे, मोडणे, खेचणे, छाटणे (झाडापासून त्याच्या फांद्या, पाने इ.).

**खाक(कु)डचे** अक्रि. चाचरणे. (गो.)

**खाकतोदा** पु. तिरंदाजीचा सराव करण्यासाठी जे लक्ष्य म्हणून तयार

करतात त्याचा एक विशिष्ट प्रकार; दोन पक्क्या दगडी भिंतींच्या चौकटीत एका विशिष्ट चिकणमातीचे लुकण भरून तयार केलेली फ्रेम किंवा चौकट : 'तिरंदाजीचा सराव करणारे जुन्या काळचे सरदार किंवा शिपाई अशा खाकतोद्यावर धनुष्यानें बाण मारून नेमबाजीचा सराव करीत असत.' - आयर्विन.

**खाकर** पु. १. सागाच्या वाशाचे निमुळते टोक. २. वासा. (ना.)

**खाकर** स्त्री. फाटे असलेला वेळू. (झाडी.)

**खाकर** न. घोड्याचा खरारा करण्याचे साधन.

**खाक(का)र** पु. ओरखडा; जखम. (राजा.)

**खाकर** वि. वयाने जीर्ण झालेला (प्राणी, वनस्पती); शुष्क; क्षीण : 'खांकर झाले वृक्ष सर्व ।' - एभा १२.३.
न. वठलेले झाड; वांझ फळझाड : 'भग्न भाजनवृक्ष खांकर । स्मशानभूमि अकाळ मेघ निर्धार ।' - पांप्र २२.२९.

**खाकर-रा** पु. गाखर; बट्टी; गोवऱ्यांच्या झगऱ्यावर भाजलेले कणकेचे जाड रोट.

**खाकर-रा** पु. घोड्यास चाल शिकविताना वाजविला जाणारा खुळखुळा; खुळखुळ्याची काठी : 'जैसा वारू उपलाणी । तरट खांकर झणाणी।' - एभा (पाठभेद) २.२१६.

**खाकरखिरा** पु. चौधारी जाड खिळा. (झाडी.)

**खाकरणे** अक्रि. खाकर होणे; जीर्ण होणे; निःसत्त्व होणे; शुष्क होणे : 'वृक्ष खांकरले फळीं पानीं । आश्रमीं कोणी असेना।' - भारा बाल १४.१७.

**खाक(के)रणे** १. घसा साफ करणे; कफ वर आणण्यासाठी खाकरा काढणे; बेडका काढणे : 'ना शास्त्राचेनि कीर नांवें । खाकरोंही नेणती जीवें ।' - ज्ञा १७.९३. [सं. खात्करोति.]
अक्रि. १. खंकारणे; आवाज करणे; खोकणे; घशातील कफ बाहेर आणण्यासाठी प्रयत्न करणे. २. नानू, कांकू करणे. [ध्व.]

**खाकरव(वा)सा** पु. खडसावणे; खरडपट्टी; ताशेरा (जोराचा). (क्रि. घालणे, सारणे, करणे, काढणे.)

**खाकरवासा** पु. (वाळलेला व उंच वासा) १. वठलेले उंच झाड, वनस्पती. २. (ल.) वार्धक्याने, अशक्तपणाने बाहेर निघालेला पाठीचा कणा.

**खाक(के)रा** पु. १. कफाचा बेडका (खाकरून काढलेला); खाकरण्याने सुटलेला कफ. (क्रि. काढणे, टाकणे.) (वा.) **खाकराखोकरा देणे** - कुत्सितपणे खाकरणे : 'या गावातील कुजकी माणसे तिला पाहून खाकरेखोकरे देतील.' - काआ ५१. [क.केकरिके] [ध्व.]

**खाकरी** स्त्री. दाणे काढून घेतलेली कणसे. (विशेषतः बाजरीची)

**खाकरी** स्त्री. चिलमीत ओढण्याची तमाखूची भुकटी. पूड. (व.)

**खाक(का)री** स्त्री. बेडका, कफ काढण्याची क्रिया; घसा साफ करणे; ओकारी (कफ काढण्याची). (क्रि. काढणे.)

**खाकरे(रै)जणे** अक्रि. तयार होणे; फुटणे; उद्भवणे : 'तेथ प्रवृत्तीचेनि वृद्धिलोभें । खांकरेजती शुभाशुभें ।' - ज्ञा १५.१५९.

**खाकशा** पु. राखरांगोळी; खाक : 'वीस हजार फौज आणीक नवी ठेऊन बंगाल प्रांत जाळून खाकशा करा.' - नाग १.६८.

**खाकस** पहा : **खसखस** : 'मन एव्हढं एव्हढं जसा खाकसाचा दाणा।' - बगा २२.

**खाकस(सा)र** पु. अल्लामा मश्रिकी याने स्थापन केलेली मुसलमानी स्वयंसेवकाची एक संघटना. हे बेलचा म्हणजे फावड्यासारखे हत्यार वापरत असत. [फा.]

**खाका** पु. १. भिंतीवर, जमिनीवर काढायच्या आकृती; चित्रे वगैरे पहिल्याने ज्या कागदावर काढतात तो कागद. २. कच्चा मसुदा; आराखडा; खर्डा. [फा.]

**खाका** पु. बाणा; तऱ्हा; वृत्ती. पहा : **खाक्या** [फा.]

**खाका** वि. नारळाच्या सबंध पानाच्या दांड्यांपैकी ज्या दांड्यावर पाने नसतात तो. (को.)

**खाकावणे** अक्रि. गरजणे; ओरडणे. [ध्व.]

**खाकी** स्त्री. तंबाखू भरलेली बिडी : 'ओठात खाकीचे थोटूक सदैव असावयाचे.' - सीपो १.

**खाकी** वि. मळकट पिवळा रंग. [फा. खाक् = धूळ,माती.]

**खाकीगोसावी, खाकीसाधू** पु. अंगाला राख फासणाऱ्या गोसाव्याचा एक पंथ; त्या पंथातील व्यक्ती. हे कृत्रिम गंगाजळाच्या (पाण्यात गोपीचंदन कालवले म्हणजे ते गंगेच्या पाण्यासारखे दिसते.) कावडी घेऊन हिंडतात. २. (ल.) तापट, रागीट, डोक्यात राख घातलेला माणूस. [अर्. फा. खाक = राख]

**खाकुड** वि. गांगरट. (गो.)

**खाको(खो)टा** पहा : **खाकट-टा**

**खाको(खो)टी** पहा : **काखोटी** : 'आजोबांना आपल्या पुस्तकांचे गठ्ठे खाकोटीला बांधून धनिकांचे उंबरठे झिजवावे लागले.' - गण २३२.

**खाकोरणे** उक्रि. ओरखडणे; ओरबाडणे.

**खाकोरा** पु. ओरबाडा; ओरखाडा; बोचकारा.

**खाको(खो)ळे** न. मस्तकावरचा अर्धा भाग; कवटी; खोपडी; डोके (दगड, काठी याने मारण्याच्या, फोडण्याच्या, रक्त वाहण्याच्या संबंधाने अथवा तिरस्कारार्थी योजतात.) (क्रि. फोडणे, फुटणे.) पहा : **खोकाळे.**

**खाक्या** पु. १. विशेष ढब; लकब; ऐट. २. प्रघात; रीत; पद्धत; बाणा; ठरावीक वर्तनक्रम, स्वरूप; युक्ती : 'असा नेहमींचा खाक्या असे.' - सूर्योदय १३९. [फा. खाका = आराखडा, खर्डा]

**खाक्रेज** किल्ल्याच्या तटाच्या पायाचे, शत्रूच्या तोफापासून संरक्षण करण्याकरिता, तटबंदीच्या पायाला पुरवणीदाखल खंदकापर्यंत बांधलेली उतरती भिंत.

**खाख(खे)रणे, खाखकरा, खाखेरा** पहा : **खाकरणे, खाकरा**

**खाखा** स्त्री. १. अनावर क्षुधा; पोटातील भुकेची आग. (क्रि. करणे, लागणे, सुटणे.) २. अधाशीपणा; हावरटपणा.

**खाखा** पु. मौक्तिक भस्माला लागणारे बारीक मोती; गाळ.

**खाखाई** स्त्री. खाखा; खवखव; सडकून लागलेली भूक. (क्रि. सुटणे, होणे.) [खाणेचे द्वि.]

**खाखाइणे** अक्रि. वाजणे; कर्कश वाजणे : 'निशाण त्राहाटिल्या भेरी । खाखाइल्या रणमोहरी ।' - एरुस्व ८.२०.

**खाखात** वि. खा खा करीत उठलेला : 'खांखातें प्रेतें । खाएं गिळी करिते।' - शिव ९०२. [खाणेचे द्वि.]

**खाखात** वि. कर्कश : 'भयानकें खाखातें । महाप्रळयो जेथें ।' - ज्ञा १.१३१.

**खाखावणे** अक्रि. सपाटून भूक लागणे; खाखा सुटणे. [खाणेचे द्वि.]

**खाखुंडी** स्त्री. काख; बगल; खांद्याखालील हात व बरगडी यांमधील खोलगट जागा, काखोटी : '....विणा तो खाखुंडी शोभे सदा ।' - स्त्रीजी २.४०.

**खागडा** पु. (सांकेतिक) छप्परबंद जातीच्या टोळीचा नाईक.

**खागे** न. संकेत स्थळ; चोराचे गुप्त निवास; एकान्त स्थळ; [सं. क्षी]

**खागे** न. घरटे; अंतिम स्थळ, ठिकाण; शेवटची जागा : 'अगा मी एकुलाणीचें खागें ।' - ज्ञा ९.४७०.

**खागे** न. खाद्य; खाजे; भातुके : 'हे कथा कैसी सांगे । हो काज ब्रह्मविद्येचे खागे ।' - ज्ञाप्र १९.

**खागे** न. खळे; मंडल.

**खाच** स्त्री. बाणाचा टप्पा, पल्ला; शरपात.

**खाच** स्त्री. वाफा; बाग : 'पायवाटेपासून काही अंतरावर पालेभाज्यांची खाच होती.' - कलंदर ५६.

**खाच** स्त्री. १. खड्डा; खळगा; खोचा. २. (ल.) व्यापारातील नुकसान, बूड, तोटा. (क्रि. येणे, होणे, पडणे, बसणे.) [क. कच्चु = खोचा, खळी] (वा.) **(डोळ्याच्या) खाचा होणे** - आंधळेपणा येणे. ३. उमाट. (तंजा.)

**खाचखव(ब)ळ, खाचखळगा, खोबळा** स्त्री. पु. खाचखड्डा; खाचखळी; खोल बिळे (व्यापक रीतीने.) (सामा.) खाच.

**खाचखळगा** पु. १. खाचखड्डा. २. (ल.) धोक्याची जागा; अडचण.

**खाचखुचर** पहा : **खाचखवळ**

**खाचखोच** स्त्री. १. चढउतार; उंचसखल; असमानता (भिंत, जमीन यांची). २. वाढ व घट; न्यूनाधिक्य; कमजास्तपणा; बारीकसारीक दोष (हिशेब, नक्कल, मसुदा यांत.) ३. गायनातील खटके; आवाजात चढउतार; उच्चनीच स्वर. ४. बारकावा; सूक्ष्मज्ञान; मर्म; वर्म; बिंग. ५. भाषणात, लेखनात चढउतार ज्यामुळे साधतो ती शब्दयोजना. ६. खुपणारी जागा, शब्द इ.

**खाचट-ण** न. खड्डा; खोलगट जागा; खिंडार : 'पुढें येऊन आंब्याचे झाडांत खाचट आहे तेथें दबा धरिला.' - ऐलेपांम्युप्र २.

**खाचण** न. फुलांची वेणी बुचड्यावर घट्ट रहावी म्हणून आधी खोवली जाणारी फुले व पानाची घडी. (गो.)

**खाचण** न. चौकट : 'दरवाजास दगडाचे खाचण होते.' - निसं १६९.

**खाचणी** स्त्री. खोबण; कोरणी. पहा : **खचणी**

**खाचणे** उक्रि. १. कमी करणे; काट मारणे : 'तैसा दानपुण्यें खांची । गोत्रकुटुंबा वंची । परी गारी भरी स्त्रियेची । उणी हों नेदी ॥' - ज्ञा १३.७९५. २. खंडण करणे; विंधणे; शस्त्राने वार करणे : 'म्हणौनि ते बुद्धि रचूं । मतवाद हे खांचूं ।' - ज्ञा १३.१०५०. ३. श्रमणे; दमणे; थकणे; 'उच्चैःश्रवा खांचे। खोळणिये।' - ज्ञा. ९.३२६. ४. संकटात राहावयास लावणे.

**खाचणे** अक्रि. कमी होणे; श्रमणे; दमणे; थकणे : 'उच्चैःश्रवा खांचे । खोळणिये ॥' - ज्ञा ९.३२६. [सं. क्षि]

**खाचणे** अक्रि. हल्ला करणे : 'मान्यतेवरी खांचिती धाडी' - मूप्र १०१६.

**खाचणे** पहा : **खचणे ३**

**खाचना** वि. तुच्छ; कमी प्रतीचा; हलक्या दर्जाचा : 'प्रबंधिचा झळके परिमळु । तेथ खांचना होय मळयानिळु । सराउदे पदाचा टाळु । कामिनी कटाक्षांसी ।' - नरुस्व २३.

**खाचर** न. एक प्रकारची बैलगाडी. (व.)

**खाचर** न. १. खळगा; खाच; खळी; खड्डा. २. पाण्याच्या जोरदार प्रवाहामुळे जमीन धुपून पडलेला नाला, घळ; ओहोळ. ३. डोंगराच्या बाजूवर अथवा पायथ्याशी तसेच कातळावर तयार केलेला शेतजमिनीचा तुकडा. (को.) ४. अळू, भाजी इ. लावलेली आहे अशी पाण्याची खोलवट जमीन, खाचरी; उसाचा मळा. ५. (सामा.) भातजमीन.

**खाचर** न. खडबडीत, जाडेभरडे वस्त्र, धोतर, लुगडे.

**खाचविणे** उक्रि. खोबण पाडणे; खोबणीत बसविणे.

**खाचा** पु. खांड; कंगोरा; खोबण; खाच; खाप; खोंगा (खुंटी, काठी, झाड, विहिरीची बाजू यांना पाडतात तो.). (क्रि. घेणे, पाडणे, काढणे, करणे.).

**खाचाड** न. (खाच याचा अतिशय) वाकडातिकडा व मोठा खड्डा.

**खाची** स्त्री. खाच; झाडावर चढताना पाय ठेवण्याची जागा; बेळका : 'पाय घसरुनी पडेल । अथवा खांची उपटी उपढेल ।' - निगा ४४.

**खाचेभर-री** वि. क्रिवि. खंडीभर; पुष्कळ प्रमाणात; विपुल : 'लेक सखान साखळी खाचेभरी गोवताळा ।' - राके १४२.

**खाज** स्त्री. १. कंडू, कंड; चिणचिण; हुळहुळ. (क्रि. सुटणे, निघणे.) २. सुरसुरी; खुमखुमी; प्रबळ इच्छा; उत्कंठा (एखाद्या गोष्टीची.)(क्रि. जिरवणे) [सं. खर्जु]

**खाज** स्त्री. १. खाद; कसर (कारभारी, मुनीम इ. ची.). २. अधाशीपणा. (कु.) [सं. खर्जु]

**खाज** न. करंज्या, मोदक इत्यादींत घालतात ते खोबऱ्याचा कीस, खसखस व साखर यांचे मिश्रण; करंज्यांचे सारण. (व.) [सं. खाद्य] स्त्री. १. चुरमा; चुरमी लाडू. (गो.) २. खाणे : 'हे सदान्‌कदा खाजीला चटावलेलं कार्टं.' - धाधो ९३.

**खाज** स्त्री. चीड; रुसवा.

**खाजकुइ(य)री(ली), खाजकुयहिरी-खाजकोयरी-कुवली-कोलती, खाजकुहिरी** पहा : **खाजरी कुइरी**

**खाजगत, खाजगी, खाजगीवाला** पहा : **खासगत, खासगी**

**खाजगी** स्त्री. राजा, सरदार इत्यादींची स्वतःची संपत्ती, मालमत्ता.

**खाजगी** स्त्री. पेशवाईतील एक कारखाना.

**खाजगी** वि. सार्वजनिक नसलेला; संस्था, शासन इ. चा संबंध नसलेला; व्यक्तीचा स्वत:चा : 'या क्षेत्रात खाजगी भांडवलदाराच्या प्रयत्नाने उत्पादन होत असते.' - आविप्र ५७.

**खाजगी** वि. दोन व्यक्तींमधला; व्यक्तिगत; कुटुंबामधला; लोकांत जाहीर न करायचा.

**खाज(स)गीवाले** पु. संस्थानात खाजगीकडील रोकड ठेवणारे अधिकारी. खाजगीकडचा मुख्य अंमलदार, खानगीवाले.

**खाजगी शिकवणी** (शिक्षण.) १. शाळेच्या नियमित कामाव्यतिरिक्त स्वतंत्र शुल्क आकारून शिक्षकाने घेतलेले अध्यापनाचे काम. २. शाळेव्यतिरिक्त बाहेर शिकण्यासाठी विद्यार्थ्यांनी लावलेला वर्ग.

**खाजगी क्षेत्र** न. व्यक्तिगत बाब.

**खाजण** न. १. खाऱ्या खाडीच्या पात्रात, जेथे ओहोटीच्या वेळी फारसे पाणी राहत नाही व बारीक रेव व चिखल असतो अशी जागा. (को.) २. अशा क्षेत्राच्या (एका बाजूला डोंगरपायथा असल्यामुळे ती बाजू खेरीज करून बाकीच्या) तीन बाजूंकडे मजबूत बांध घालून तयार केलेली भातजमीन; खारी शेतवाडी. ३. मीठ तयार करण्याचा वाफा. ४. नदीतील गाळाने बनलेली जमीन. (कु.) ५. (सामा.) खारी, दलदलीची जमीन.

**खाजणकोंबडा** पु. खाजणात आढळणारा एक पक्षी. (को.)

**खाजणी** वि. खाजणामध्ये काढलेले किंवा खाजणासंबंधी (पीक, जमीन.).

**खाजणी** स्त्री. हिशोबाचे एक नाव

**खाजणी भाजणी** स्त्री. बेरीज व वजाबाकी.

**खाजणे** उक्रि. खाज उत्पन्न करणे, सुटणे; खवखवणे; कंडू सुटणे; खाज आणणे (खाज सुटणाऱ्या सुरण, अळू इ. पदार्थांमुळे). अक्रि. अंगाला खाज सुटणे; खाजवावेसे वाटणे. [सं. खर्जन]

**खाजदार-री** पहा : **खासदार-री**

**खाजबोडा** वि. खादाड. (कु.)

**खाजरा-रे** वि. खाज उत्पन्न करणारा; खवखवणारा; खंवरा (अळू, सुरण इ.)

**खाजरी कुइरी-ली** हे लहानसर झाड असून पाने मोठी व काळसर असतात. झाडांना शेंगा येतात. पाने व शेंगा यांना कुसे असतात व ती अंगास लागल्यास अंगाची आग होते. याला संस्कृत नाव आत्मगुप्ता अगर कपिकच्छ असे आहे.

**खाजलॅ** न. खाद्य; खाणे. (गो.)

**खाजंव** स्त्री. खाज; कंडू. (क्रि. सुटणे, येणे, होणे, मोडणे.)

**खाजवाखाजव** स्त्री. १. परस्पर खाजवणे; सर्वत्र खाजविण्याचा व्यापार. २. त्रास, चीड उत्पन्न करणे; चेतवणे; भांडण उपस्थित होण्यासाठी मुद्दाम केलेली चेष्टा; लावालावी.

**खाजविणे** उक्रि. १. कंडू घालविण्यासाठी अंग चोळणे, खरडणे : 'प्रेमें वृकांनीं मृग खाजवावे । जेथें, अशा टाकुनि काय जावें ।' - नरहरी गंगारत्नमाला (नवनीत पृ. ४१७.) २. त्रास, चीड, क्षोभ आणणे; कलह उत्पन्न करणे; आग लावणे; डिचवणे; चिडवणे. [सं. खर्जन]

(वा.) **खाजवून खरुज काढणे** - मिटलेले वाद पुन्हा उकरून काढणे; बळेच कलह उत्पन्न करणे.

**खाजा** पहा : **खाजी-जे**

**खाजा करंजी** पहा : **खाजी करंजी** : 'सगर्भ शुभ्र खाजा करंजा ।' - जै ९४.५६.

**खाजा खस्कुला** पु. खाऊ. (झाडी.)

**खाजाळा-ळू** वि. १. भांडखोर; कळीचा नारद. पहा : **खजाळ.** २. विषयी; कामुक. ३. खाज उत्पन्न करणारा. पहा : **खाजरा.** ४. नेहमी अंग खाजविणारा; खाजाळो. (गो.)

**खाजाळू** न. खाजरे अळू.

**खाजाळू** वि. रग असलेला; हौशी; रंगेल; खाज असलेला.

**खाजिवरा** पहा : **खाजरा**

**खाजी** स्त्री. एक मिठाई, पकान्न; खाजीकरंजी. [सं. खाद्य]

**खाजीकरंजी** स्त्री. करंजीचा एक प्रकार. खाली एक व वर एक अशा दोन पापड्यांमध्ये करंजांचेच सारण घालून सभोवती मुरड घालतात व तुपात तळतात : 'फेण्या खाजी करंजी मृदुतर लुचया शर्करेमाजि घोळी।' - किंसुदाम ३४.

**खाजुकली** पहा : **खाजरीकुइरी** (बे.)

**खाजुके-गे** न. खाऊ; भक्ष्य. पहा : **खाजी, खाजे**

**खाजुळी** स्त्री. बचनागासारखी एक वेल.

**खाजूर** पु. खजूर. (गो. राजा.) [सं: खर्जूर]

**खाजूरमाड** पु. खजुरीचे झाड. (गो.)

**खाजे** न. १. पंचखाजे. खारीक, खोबरे, खसखस, खिसमिस, खडीसाखर हे 'ख' ने आरंभ होणारे पाच पदार्थ. पहा : **पंचखाद्य** : 'होळीमध्यें खाजें आहे । तें तूं विचारुनी पाहे ।' - रामदास होळीपंचक. २. वाणसौदा; वाण्याकडील सामान. ३. खाजी नावाची मिठाई : 'घ्या घास मुहूर्त येथें वाढिलें खाज्या ।'- प्रला १९४. ४. हरभऱ्याच्या पिठाच्या लांबट गोळ्या तळून गुळाच्या पाकात टाकून करतात तो पदार्थ (खाज्या.) (कु.) ५. एखाद्याच्या आवडीचे खाणे, खाद्य. उदा. मेंढरू हे लांडग्याचे खाजे, उंदीर मांजराचे खाजे : 'आणि तो हिमांशुचि जेविं खाजें । चकोराचें ॥' - ज्ञा ६.२९. ६. लहान मुलांचा खाऊ; भातुके; मिठाई. ७. (ल.) एखाद्याला खूष करण्यासाठी द्यावी लागणारी वस्तू, लाच, चिरीमिरी : 'पण त्या अगोदर तुला त्या धनाला खाजं द्यावं लागेल.' - गागो ५०. वि. चमचमीत; आवडते; सुग्रास (भोजन) : 'नहो एंची जुंझ भांडण। तऱ्हीं तु नाहीं खाजें जेवण ।' - शिव १२०. [सं. खाद्य]

**खाजे** न. 'सोमाशांत घालायाचि बाकर' - (तंजा.)

**खाजे** न. ज्याचा उपयोग करून घेता येईल असा माणूस : 'सोकरजींना हे नवें खाजें सापडल्याबरोबर त्यांनी ऑलबॉश साहेबाकडे त्याची उत्तम शिफारस करून त्यालाही एक जागा देवविली.' - भदि ४२.

**खाजे** न. पिकाला घालायचे मासळीचे खत, कुटी. [सं. खाद्य]

**खाजेकरू** वि. हलवाई; खाजे करणारा : 'भांडारी खाजेकरू ।' - शिव ३५४. (गो.)

**खाजोळा** वि. खादाड. (कु.) [सं. खाद्य]

**खाजोळा** वि. खाजरा; अंगास खाज आणणारा. (कु.)

**खाट** वि. १. खाष्ट; द्राष्ट; तिरसट; रानवट (मनुष्य प्राणी.) २. कठीण, कठोर, निष्ठुर, करडे (वर्तन, भाषण.).

**खाट** पु. ठसका; भपकारा; खकाणा (मिरच्या इ. उधळणाऱ्या पदार्थांचा) : 'मिरची घरांत ठेविली तर कांहींच होत नाहीं पण तीच अग्नींत पडल्यास तिचा खाट उठण्यास आरंभ होतो.' - दयानंद सरस्वती १५६. [क.गा(घा)ट्टु.]

**खाट** स्त्री. चारपाई; बाज; बाजले; खाटले; काथ्याने विणलेला पलंग. [सं. खट्वा] (वा.) **खाटेवर घालणे** - धिंड काढणे. उंटावर खाट टाकून त्यावर गुन्हेगाराला बांधत असत, यावरून : 'तोतयास रविवारीं पुण्यांत खाटेवर घालून मग पारिपत्य करणार.' - ऐलेसं २७२०. **खाटेवर चढणे** - पूज्य माणसाविरुद्ध किंवा उपकारकर्त्याविरुद्ध उलटणे; कृतघ्न बनणे.

**खाटक-की** पु. १. पशूंना मारून त्यांचे मास विकणारी जात; बकरी, मेंढरे यांची सागुती विकणारी एक जात व त्या जातीतील व्यक्ती; कसाई. २. (ल.) निर्दय पुरुष. [सं. खट्टिक]

**खाटकी माल** न. स्त्री. मांस; सागुती.

**खाटखटले, खाटखडबड** न. स्त्री (व्यापक) बाडबिछायत; सामानसुमान; चंबूगबाळे; प्रपंच.

**खाटखिट** स्त्री. भांडण; वाद. (झाडी.)

**खाटखिळ्या** वि. खाटेला, बिछान्यास खिळलेला; सदोदित आजारी असलेला.

**खाटखोली** स्त्री. (खाट आणि खोली न सोडणे) खाटखिळ्या होणे. (क्रि. करणे.)

**खाटदांडी** स्त्री.डोली; मेणा : 'बाईसाचें देह तुटलें : तें चालवेना : तें खाट दांडि केली :' - लीचउ २१४.

**खाटपसारा** पु. फापट पसारा; पखळण; (सामान्यत: वस्तूंचा) अस्ताव्यस्त कारभार; गोंधळ. (क्रि. करणे, मांडणे, घालणे, होणे, पडणे.)

**खाटमार** पु. खाटेला बांधून फटक्यांचा दिलेला मार : 'खाटमार ऐकिलात कोठें ।' - अफला ६५.

**खाटले** न. १. लहान बाज; खाट. २. बैलगाडी. ३. बाडबिछाना. ४. सप्तऋषी. (वा.) **खाटल्यावर जाणे** - १. मातृगमन करणे. २.पहा : **खाटेवर चढणे, खाटल्यावर टाकणे** - आजारी पडणे. (ना.)

**खाटलेबाजले** न. १. सप्तऋषी (आकाशातील तारकापुंज, त्यांच्या आकृतीवरून). (कुण.) २. बायकांच्या लुगड्यांवरील समविषम चौकटीची नक्षी.

**खाटलेवाईक, खाटवाईक** वि. खाटले कुजवणारा. वि. अंथरुणाला खिळलेला. पहा : **खाटखिळ्या** [सं. खट्वा]

**खाटवा** पु. खाट; बाज.

**खाटवाक(ख)ळ** स्त्री. १. खाटखिळ्याचे घेतलेले सोंग; आजारीपणाचे ढोंग. (क्रि. घेणे, निजणे, निजून राहणे.) २. (ल.) उपेक्षेने, बेपर्वाईने, निष्काळजीपणाने वागविणे.

**खाटवावडी** स्त्री. एक प्रकारचा पतंग, वावडी.

**खाटसरी** स्त्री. (विणकाम) वस्त्राचा विणलेला भाग ताठ राहण्यासाठी केलेली काठ्या वगैरेची हातमागातील योजना; कटतर. पहा : **काटसरी, काटोस्त्री**

**खाटा** वि. १. पुढच्या पेरणीसाठी नांगरून व मशागत करून पडिक ठेविलेली (जमीन.) (ही हवेत उघडी राहिली म्हणजे हिच्यात आंब अथवा क्षार जमतो यावरून.) २. अशा जमिनीत उत्पन्न केलेले (धान्य, दाणा इ.). (माण.) ३ आंबट. [हिं.][सं. क्षत्ता]

**खाटारा** पु. प्रेताची तिरडी. (ठा.)

**खाटिक** पु. १. टोळ, किडे, सरडा खाणारा पक्षी. २. कसाई. [सं. खट्टिक]

**खाटी** वि. १. आंबटढाण (विशिष्ट फळझाडे, फळे इ.). २. हलका; वाईट. (को.) [हिं. खट्टा]

**खाटीक** पु. कसाई; पशूंना मारून त्यांचे मास विकणारी जात. पहा : **खाटक** : 'सांग, मकरंदाप्रमाणं वेषांतर करूं.... कां दुष्यंताप्रमाणे मृगबालकांचा खाटीक बनूं?' - भा ५०.

**खाटीडाळ** स्त्री. आंबट वरण; आमटी. (गु.)

**खाटी मेजवानी** मांसाहारी भोजन.

**खाटुमखुटुमचे जेवण** मांसाहारी जेवण : 'खाटुमखुटुमचे जेवण कधी चुकत नसल्यामुळे....' - मिरास २३.

**खाटू, खाटू(टो)ळ** वि. आंबलेले; नासलेले (अन्न, फळ). (कु.)

**खाटे** न. आमटी : 'गीताबाईच्या खाट्याचा (आमटीचा) वास आला की मला घरी जाणे अगदी जिवावर येई.' - माप्रे ४५.

**खाट्या** वि. १. आंबट; आंबटतुरट (विशिष्ट फळे व फळझाडे.) २. आंबट (स्वयंपाक, पदार्थ).

**खाड** पहा : **खाडी**

**खाड** क्रिवि. कठीण पदार्थ आपटल्याने होणारा आवाज. [ध्व.]

**खाड** स्त्री. १. तूट; अभाव. २. संकट, ३. नाट. (व.)

**खा(खां)ड** न. दाढी व कल्ले (तिरस्कारार्थी) : 'मग आपुले करकमळें। ब्रह्मयानें खांड सोडविलें ।' - कथा ५.४.१८.; 'वक्त्यांचें खाड हाले।' - गीता २.१३९८. २. दाढीचे केस काढून टाकणे; दाढी : 'अर्ध खाड अर्ध श्मश्रु । मुंडण करून टाकिलें ।' - मुविराट ६.१४१. [सं. खंड; अर. खड = गाल]

**खाडकन-र, खाडदिनी-शी** क्रिवि. (खाड! असा आवाज होऊन मोडणाऱ्या, पडणाऱ्या झाडाच्या आवाजाच्या अनुकरणावरून) विशिष्ट आवाज होऊन. (क्रि. मोडणे, वाजणे, पडणे, थोबाडीत मारणे.)

**खाडकी** स्त्री. १. दाढी. (गो.) २. हनुवटी. (कु.)

**खाडखडबड** स्त्री. खसखस, फसफस आवाज. (भांड्यात उंदराचा, पालापाचोळ्यात कीटकांचा.) [ध्व.]

**खाडखाड** क्रिवि. १. खाड खाड अशा आवाजाने युक्त : 'खाड खाड उठती टापा ।' - संग्रामगीते ५.१७. २. अस्खलितपणे; न थांबता. [ध्व.]

**खाडगी-नी** पु. कसाई; खाटीक. (कु.)

**खाडदिवस** पु. १. रिकामा दिवस. २. शुभ दिवस : 'प्राप्त जालिया खाडदिवस । क्लेश सर्वही नासती ।' - मुआदि ३५.१०७.

**खाडवा** पु. लग्न, मुंज इ. समारंभात पान सुपारी देण्यासाठी विडे, सुपारी इ. ज्या झोळीत घालतात ती झोळी.

**खाडवे** न. ताडामाडावर चढताना पायात अडकवण्याचा दोरीचा फास; पायंडा.

**खाडा** पु. खळगा; खळगी; खाच; खोलगा; खाली गेलेली किंवा दबलेली जागा. [सं. खात किंवा खंड]

**खाडा** पु. १. खंड; खळ (कामात, गतीत). (क्रि. करणे, घालणे, धरणे.) २. अनुपस्थितीचा, गैरहजेरीचा एक दिवस. एक पाळी; रिकामा वेळ. ३. (ल.) खडखडाट; अभाव (खाद्य, पाणी, पाऊस यांचा). ४. तहकुबी (वा.) **खाड्यात उतरणे, घालणे, पाडणे, टाकणे (माणसास)** - दारिद्र्यात, तोट्यात, हलाखीत घालणे. **खाड्यात घालणे (पैशास, दागिन्यांस, गहाणास)** - लबाडीने आत्मसात करणे; गिळणे, दाबणे. **खाड्यात पडणे** - तोटा येणे; नाश होणे.

**खाडाखोड** स्त्री. कागदपत्रांमध्ये अनधिकृत बदल करणे.

**खाडाण** वि. दूध न देणारी, नाठाळ (गाय). पहा : **खडण, खडाण**

**खा(खां)डी** स्त्री. दाढी.

**खाडी** स्त्री. नदीत जेथवर समुद्राच्या भरतीचे पाणी येते तेथवरचा भाग, वाकण, ओहोळ; समुद्राचे जमिनीत शिरलेले पाणी. [सं. स्खल-खल = खोलगट जागा.]

**खाडुक** न. फोड : 'एका खतें खाडुकें होताति :' - गोप्र ३८.

**खाडू** न. खाडवे; दोराचे अगर वेलीचे वेटोळे. याचा उपयोग माडावर चढण्यासाठी करतात. पहा : **खाडवे**

**खाडू** वि. १. खट्याळ; नष्ट (घोडा, माणूस); दुष्ट. २. (सांकेतिक, औपरोधिक) पावणेआठ; नपुंसक; षंढ. ३. वृद्ध कपी; निखाडू. (व.) ४. (निंदाव्यंजक) परीक्षेत अनेकदा नापास झालेला (विद्यार्थी); ढ. (व.) [क. कड्ड = मठ्ठ]

**खाडू** वि. मिशा, दाढी नसलेला.

**खाडूस** न. १. आडकाठी; अडथळा; प्रतिबंध; व्यत्यय; बाध; अड; नड; लोढणे; व्याधी; उपाधी; त्रास. २. (ल.) अडथळा करणारा, जाचणारा, त्रास देणारा, व्यत्यय आणणारा माणूस, मुद्दा, विषय.

**खाडे** न. खड्ग; तरवार : 'खाडे भुइस लागले. खाडे मोडून गेले.' - पाक्षज्ञाइखं १.१८.

**खाडोली** उपद्रव; हस्तक्षेप.

**खाड्याखार** पु. काडीखार; पापडखार.

**खाड्यॉ, खाडियॉ** वि. दाढीवाला. (गो.)

**खाण** स्त्री. १. खोल खड्डा; खळी; बळद. २. भूगर्भात सलग सापडणारा कोळसा, धातू, रत्ने इ. काढण्याकरिता खोलवर खणलेले विवर, खड्डा. ३. घर; निवासस्थान (मुंग्या, इतर किडे यांचे). ४. (ल.) मूळ; उगम; थळ; उत्पत्तीचे ठिकाण; जात; झरा. ५. आगर; निधी; साठा; समृद्धिस्थान; भांडार. [सं. खनि]

**खाण** स्त्री. अंडज, जारज, स्वेदज, उद्भिज या चार प्रकारची सृष्टी : 'तीन या गुणाला चार या खाणीला । ये रे बा विठ्ठला ।'-एहोरा धनगर १३२.

**खाण** न. तोटा.

**खाण** स्त्री. उथळ पाण्याचे मोठे डबके : 'भूशिर आणि किनारा यांच्या दरम्यान सुमद्राचे खारे पाणी साठलेले असते. त्यास उथळ पाण्याचे मोठे डबके वा 'खाण' असे संबोधतात.' - महा ९७.

**खाण** न. १. (क्र.) खाणे; अन्न. २. जेवण या शब्दाला (जेवणखाण) जोडूनही वापरतात. [सं. खादन]

**खाणकरी** पु. खाणीत खणणारा; खाणकामगार : 'ज्यांस अझून खाणकऱ्यांनीं हात लाविला नाहीं अशा डोंगरांच्या पोटांतून सोनें व संगमरवरी दगड निघतील.' - मराठी ६ वे पुस्तक ८२. (१८७५.) १.

**खाणखूण** स्त्री. चाहूल.

**खाणगत** स्त्री. खाणीपासून सरकारला मिळणारे उत्पन्न.

**खाणचोर** पु. खणून घर फोडणारा चोर. पहा : **खानचोर**

**खाणणे** उक्रि. १. खणून काढणे; हत्याराच्या साहाय्याने उकरणे. पहा : **खणणे** : 'किल्ला खाणून यमुनेंत टाकीन.' - भाब ३०. २. अजिबात नाहीसा करणे; निर्मूलन करणे : 'रामराम जप जपोनि दोष खाणिला।' - आप ८. [सं. खन्]

**खाणपद** न. घुमट नावाच्या वाद्यातील एक चीज. (गो.)

**खाणपाठ, खाणवट** स्त्री. चोळीची पाठ.

**खाण(णे)पोस** पहा : **खान(णे)पोश, खानपोश**

**खाणवट** स्त्री. कुळी; वंश; जातगोत. पहा : **खानवटा**

**खाणवे** न. जमिनीवर पीठ सांडू नये म्हणून जात्याखाली घालायची बाबूंची चटई. (गो.)

**खाणाजंगी** पहा : **खानाजंगी**

**खाणावळ** स्त्री. १. आहारकेंद्र; भोजनालय. २. तेथील जेवणाबद्दलचे पैसे.

**खाणावळी** पु. पैसे देऊन खाणावळीत जेवणारा.

**खाणिका** स्त्री. खनिज बाहेर काढण्यासाठी खणलेले चर.

**खाणी** स्त्री. (खाण याचे लघुत्व) पहा : **खाण २,** ४. १. योनी; जन्म : 'बहु या प्रपंचें भोगविल्या खाणी ।' - तुगा १५४५. २. उत्पत्तिस्थान; उगम : 'तैसी कर्मजातांची हे खाणी ।' - ज्ञा १८.३५२. (समासात) पाप - पुण्य - गुण - ज्ञान - धर्म - खाणी.

**खाणी** स्त्री. खण; कप्पा : 'पाच खाणी उथळ दिसती ।' - नाम १३२.

**खाणीचा, खानदानीचा** वि. चांगल्या कुळीचा, बीजाचा, वंशाचा, पैदाशीचा; कुलवंत.

**खाणीपुरळ** स्त्री. गुजराथेतील काळसर शेतजमीन. पाऊस पडल्याबरोबर अशा जमिनीत सर्वत्र छिद्रे पडतात.

**खाणीव** वि. खणलेले; खाणीतले; खणून काढलेले : 'खाणीवा खुडिवा तोडीवा । त्रिगुण गुणांच्या सोलिवा ।' - एरुस्व १४.१०४. [सं. खन]

**खाणे** उक्रि. १. भक्षण करणे. २. गिळंकृत करणे; लाच खाणे; हरामखोरीने किंवा लबाडीने हडप करणे. ३. गिळणे; गट्टट करणे; ग्रासणे; चट्ट करणे; ग्रासून टाकणे, पूर्णपणे वश करणे (औषध, मनुष्य). ४. संपवणे;

फस्त करणे. ५. गाळणे, टाकणे, सोडणे (बोलण्यात अथवा लिहिण्यात अक्षरे.) ६. चावणे; डसणे. उदा. 'साप खाई पोट रितें' - दुसऱ्याला चावल्याने सापाचे पोट भरत नाही. कुत्री, विषारी किडे, जिवाणू यांच्या चावण्यालाही लावतात. तसेच शारीरिक अस्वच्छतेबद्दल योजतात. जसे :- मळ खातो, उवा खातात, पिसवा खातात = उवा, पिसवा ह्या माझे डोके खातात म्हणजे चावतात, त्रास देतात. ७. तोडणे; टोचणे; मनाला बोचणे (पाप, गुन्हा, मन, पापबुद्धी) : ८. (ल.) कुरतडणे; डिचवणे; तोडणे (वाईट अन्न, पित्त, मानहानीचे भाषण.) ९. एखाद्या जोखमीच्या कामाने एखाद्याचा नाश करणे. १०. मारणे; बळकावणे. ११. भोगणे; सेवणे (विसावा, चैन) १२. सोसणे; सहन करणे. (मार, उष्णता, थंडी) १३. आत घेणे. (हवा.) [सं. खादन] १४. घेणे (शपथ). १५. पराभव होणे.[सं.] १६. खर्च करणे. [सं.] [सं. खादन] (वा.) **खा खा करणे, लागणे, सुटणे, खाईन खाईन करणे** - अधाशीपणा करणे; खाण्यासाठी धाधावलेला असणे. **खाऊन ढेकर देणे** - दुसऱ्याच्या वस्तूचा अभिलाष धरून ती हडप करणे, गिळंकृत करणे. **खाण्या तुटणे** - क्षुधा किंवा पचनशक्ती कमी होणे. **खाण्यापिण्याचे, खायाप्यायाचे दिवस** - तारुण्यातील आनंदाचे व उल्हासाचे दिवस; आयुष्यातील सुखाचे दिवस. **जीव, प्राण, डोके खाणे** - दुसऱ्याला फार त्रास देणे. **खाऊ की गिळू करणे, दात ओठ खाणे** - अतिशय रागावणे. **खायला उठणे** - एखाद्यावर हल्ला करणे. **खाल्ल्या घरचे वासे मोजणे** - कृतघ्न होणे; उपकारकर्त्याचे ऋण विसरणे.

**खाणे** न. खाद्य; अन्न; खाण्याची वस्तू.

**खाणेजेवणे** न. १. (सरसकट) खाद्यपदार्थ; खायचा माल; अन्न. २. खाण्याची क्रिया; भोजन.

**खाणेपिणे** न. १. पहा : **खाणे जेवणे**. २. सुखाने असणे.

**खाणोरा, खाणो(णौ)री, खाणोरीचोर** पु. दरोडेखोर; चोर; घर फोडणारा; काळीजखाऊ : 'मज निद्रिस्थातें खाणोरियें । लुसीनि नेति।' - ऋ ५५. पहा : **खानचोर**

**खाणोरा-री** वि. १. अधाशी; खादाड; पोटबाबू : 'पुत्र पत्नि बंधु सोयरीं खाणोरीं ।' - तुगा १५८९. २. चोखंदळ; चवीने खाणारा.

**खाणोरीचोरी** पहा : **खानचोरी**

**खाण्णी, खाण्णीभाण्णी** पहा : **खाजणी**

**खाण्याचा सोडा** (रसा.) सोडियम बायकार्बोनेट. हा खाद्यपदार्थ हलका होण्यासाठी वापरतात.

**खात** न. १. शेतात घालायचे खत : 'खात मूत भस्म मिळोन । पुन्हा पृथ्वी।' - दास १५.४.८. २. केरकचरा (खतासाठी उपयोगी); गाळसाळ; उकिरडा; मळ; चिखल. (कु.)

**खात** न. खड्डा; खळी; खाच; बीळ : 'त्या मृत्यूचें खणोनि खात ।' - एभा २९.२२२. [सं. खन्] (वा.) **खात खणणे** - मूठमाती देणे.

**खातकाम** न. लोहारकाम-धंदा. (व.)

**खातकुलांवचे** सक्रि. गुदगुल्या करणे. (गो.)

**खातकुली** स्त्री. १. गुदगुली. २. खाजकुइरी. (गो.)

**खातकोंडा** न. तळघर : 'कारागृहा आंतु घातला । खातकोंडीं ।' - क्रि २९.१२५.

**खातड-ण-र** स्त्री. १. चिखल; पाणी जमिनीवर ओतलेली जागा. २. उकिरडा. (कु. गो.)

**खातड(ण-र)वासी** वि. उकिरडद्यात राहणारा : 'तुका म्हणे खातडवासी। अमृतासी नोळखे ।' - तुगा ३४८५.

**खातडांवचे** अक्रि. सुक्या जमिनीवर ती फुगेपर्यंत पाणी ओतणे. (गो.)

**खातमा** पु. शेवट; निकाल. (वा.) **खातमा करणे** - ठार मारणे; निकाल लावणे. [अर.]

**खातर** स्त्री. १. गुमान; पर्वा; विचार; चिंता (सामान्यत: निषेधार्थी.) २. खात्री; विश्वास; भरवसा. ३. पसंती; मर्जी; मन. ४. (ल.) मनस्वी त्रास; खोडमोड (ना.)[फा. खातिर] (वा.) ० **करणे** - खात्री करणे; पटविणे; आश्वासन देणे. ० **पटणे, खातरेस येणे** - आवडणे, पसंत पडणे.

शअ. करिता; साठी : 'त्या खातरहि तें मला कर्तव्यच आहे.' - तोबं २२.

**खातर** स्त्री. (प्रा.) भोक; भगदाड (भिंत, कुंपण यातील). [सं. खात = भोक]

**खात(ति)र** स्त्री. १. विचार : 'स्वामीची खातर जरूर जाणून....' - मइसा १.१३२. २. आस्था : 'त्यांतही श्रीमंताचे सरकारांत या संस्थानची यास खातर अधिक.' - मइसा ७.३७. ३. सत्कार; आदरातिथ्य. ४. आश्वासन. [फा. खातिर] (वा.) ० **होणे** - स्वागत, आदरातिथ्य होणे : 'आल्यागेल्या पै-पाव्हण्याची इथे मोठ्या उमदेपणाने खातिर होते.' - गणगोत ११३.

**खातर** शअ. साठी; करिता. [फा. खातिर]

**खात(ती)रखा** स्त्री. आदरसत्कार : 'बहुत खातरखा केली.' - मइसा १०.२६५. [फा. खातिरख्वाहा]

**खात(ती)रखा** वि. १. स्नेहाचा; चांगले इच्छिणारा; हितेच्छू (केवळ पत्रव्यवहारात.). २. यशस्वी : 'कित्येक उमूद उमूदे मनसुबे खातीरख्वाह् होतील.' - मइसा १.५३.

क्रिवि. १. इच्छेप्रमाणे : 'इंग्रेज पल्टणें पुण्यासमीप् आली त्यांचें पारिपत्य खातर्खा न जालें.' - दिमरा १.४०. २. यथास्थित : 'बंदोबस्त ही खातरखा आमचे स्वामी करितील.' - मइसा १.१३२. [फा. खातिरख्वाह]

**खातर्खू** वि. समाधानी; संतुष्ट : 'येसाजीपंतास खातर्खू करून चाकर ठेवावा.' - ऐसंसाखं ७.११.

**खातरजमा** स्त्री. १. खात्री; विश्वास; संशय, संदेह निराकरण. (क्रि. होणे, करणे, देणे) : 'एवंच दादासाहेब खातरजमेशीं जात नाहींत.' - भाब ८४. वि. नि:शंक; स्वस्थ : 'तुम्ही खातरजमा असणें.' - मइसा १५.२१. [फा.]

**खातरजामीन** पहा : **खातर (री) दार**

**खातरतसल्ली** स्त्री. समाधान : 'सर्वांची खातरतसल्ली होऊन जमाव जालाच

असेल.' - दिमरा १.३१. [फा. तसल्ली = समाधान]

**खातर(री)दार** वि. जामीन; खात्री देणारा; विश्वासूपणाबद्दल शिफारस करतो, पण कोणत्याही प्रकारची जबाबदारी घेत नाही असा.

**खातरदारी** स्त्री. १. खात्री; हमी (माणूस, चिन्ह यांची.) २. आदरातिथ्य; सन्मान. [फा. खातिरदारी]

**खातरदास्त** स्त्री. खातरजमा; इच्छा : 'त्यांची खातरदास्त पुरेल तेथें जावें.' - ऐलेसं ९.४९६५.

**खातरनशीन** वि. हृदयंगम. [फा.]

**खातरनिशा** स्त्री. मनाचे समाधान; संदेहनिवृत्ती : 'अशी माझी खातरनिशा झाली.' - बाळ २.१६.

**खातरपत्र** न. हमीपत्र; शिफारसपत्र; प्रशंसापत्र.

**खातरलायक** वि. विश्वसनीय.

**खातरा** पु. पहा : **खातरजमा** : 'त्यांत स्वारी समागमें कार्यभागी यांचा खातरा श्रीमंतांनी पुरविला' - ऐलेसं. २.८१५.[फा. खातिर = विचार]

**खातरा** पु. १. खत. २. खाचरा; खळगा; खड्डा. पहा : **खातर**

**खातरी** जामीनकी; हमी; खातरदारी; खातरीपत्र.

**खातरीचा** वि. १. पसंत पडलेला; मनाला आवडलेला. २. विश्वासाचा.

**खातऱ्या** वि. खातर खणणारा अथवा त्यातून शिरणारा; घरफोड्या; खाणोरी; भगदाड पाडणारा; भगदाडातून शिरणारा.

**खातवट-ड** न. उकिरडा : 'रांधवणी चुलीपुढें । पन्हे उन्मादती खातवडे।' - ज्ञा १३.५६३.

वि. १. पुष्कळ दिवस खतावलेली (जमीन.) २. खत घातलेले (शेत).

**खातवणा** वि. १. खादाड; पोटबाबू. २. चोखंदळ (निंदार्थी). ३. पान, सुपारी, तंबाखू, भांग इ. सेवन करणारा.(राजा.)

**खातसाल** न. दुष्काळ.

**खातळ** स्त्री. ओली, ओलसर जमीन, शेत : 'हाऽत जातों ना काळे खातळील ।' - आलो ८०.

**खाता** वि. खाणारा; भक्षणारा.

**खाताजेवता, खातापिता** वि. खाऊनपिऊन सुखी; खाण्याची ददात नाही असा; सुखवस्तू. (वा.) **खाताजेवता, खातापिता मरणे** - खाण्यापिण्याची ददात न पडता अथवा रोगाने खितपत न पडता मरणे; सुखात, ऐषआरामात मरण येणे. **खाती पिती होणे** - न्हाण येणे; वयात येणे.(व.)

**खाताड-डे** न. १. गावाबाहेरील उकिरड्याची जागा; उकिरडा; खातवड. २. खरकटे. ३. नासके पाणी साठल्यामुळे झालेले दुर्गंधीमय डबके : 'रांधवण वोलि पुढें । पन्हिवे वाहाति खाताडें ।' - राज्ञा १३.५६१.

वि. पहा : **खातवड**

**खाताडी** वि. खत मिसळलेला; घाणेरडा : 'तेथें सर्व ठिकाणीं खाताडी, पांढरी, चिकणी माती दृष्टीस पडली.' - देव्य ११५.

**खातावना** वि. खाणारा : 'माजा पानंबी खातावना पान यिळाची किती खातो....' - राके २८६.

**खातिका** स्त्री. गर्त; लांबट पन्हळीसारखा भाग.

**खातिम** स्त्री. अंगठी; सीलची अंगठी. [फा.]

**खातिर** स्त्री. मन; कल; इच्छा; निवड. [फा.]

**खातिरजमाई** स्त्री. मनातून आनंद, संतोष; समाधान; खात्री. [फा.]

**खाती** पु. लोहार; घिसाडी : 'गांवा खातीचे औघे मिळौनि कामठा घालीति।' - चक्रधर, सिद्धांतसूत्रे ८९. (व. ना.)

**खातीर** स्त्री. १. दिलासा; खातरजमा; खात्री. पहा : **खातर** : 'मिर्जाची बहुत खातीर केली.' - दिमरा २.४०. २. समजूत : 'पाटील बाबांनीं खातीर करून सांप्रत ठेवून घेतलें आहे.' - दिमरा २.३७. (क्रि. करणे.) पहा : **खातर**

शअ. साठी; स्तव; कारणे; करिता. (गो.) [फा. खातिर]

**खातून** स्त्री. कुलीन स्त्री; बेगम. [फा.]

**खातूस** वि. खताचा वास मारणारी (भाजी).

**खातूस** वि. आंबट (तोंड इ.). (गो.)

**खाते** न. १. शासनाचा विशिष्ट विभाग. जसे : - पोलिसखाते, महसूलखाते, गृहखाते. २. रोजकीर्दीवरून तयार केलेला, खतावणीवर दिसणारा किंवा खतावणीवरून काढलेला आणि केलेला हिशोब. (व्यक्तीचा किंवा काम, धंदा यांत घातलेल्या भांडवलाचा); जमाखर्चाची नोंद. ३. असा स्वतंत्र हिशोब दाखवणारा कागद, वही; ४. (ल.) टप्पा; पोहोच; आटोका; आवाका; प्रांत; हद्द (सत्ता, अंमल, शासन यांची) ५. प्रांत; कार्यक्षेत्र; कचेरी; काम; प्रकरण. ६. खातेदाराने धारण केलेला जमिनीचा तुकडा. ७. उधारीचा जमाखर्च; देणेघेणे.[सं. क्षत्रम्] (वा.) ० **ठेवणे** - देण्याघेण्याचा व्यवहार चालू ठेवणे.

**खाते** न. किनखाप किंवा इतर रेशमी कापडाच्या तुकड्याभोवती गुंडाळायची दोरी, नाडी.

**खाते** न. कोनाडा; देवळी : 'तेथ पटिसाळेचां पूर्वीली सीरा खांतें । तेथ गणेसु ।' - ऋ १०६. [सं. खात]

**खातेउतारा** पु. संबंधित जमाखर्चाचा उतारा; महसूल नोंदवहीतील खातेदाराच्या जमिनीचा वगैरे उतारा; खात्याचे टिपण : '.... हिंदुस्थान सरकार यांच्या हिशेबाचा खातेउतारा असे हल्लीचे त्याचे (बजेटाचे) स्वरूप आहे.' - लोटिके १.१९६.

**खातेगोते** वि. भोजनभाऊ; आश्रित : 'आम्हांसारख्या उदंड मिळतिल भंवताले खातेगोते ।' - सला ६.

**खाते घर** खातेपिते घर; सधन कुटुंब : 'मला का दे जो खात्या घरीं ।' - जामामा ११४.

**खातेड** पहा : **खातड**

**खातेतोंड** खाणारे तोंड; पोसावे लागणारे माणूस (स्त्री, मूल, चाकर).

**खातेदार** पु. १. कूळ खेरीज करून दुमाला नसणारी जमीन प्रत्यक्ष धारण करणारा. २. व्यापाऱ्याकडे, वाण्याकडे खाते असणारा.

**खातेदिगर** स्त्री. लेखी व्यवहार : 'घरेदारे, जमीनजुमला यांची मुलांत बरोबर वाटणी करून ज्याच्या त्याच्या नावे खातेदिगरहि केली.' - माआ ३४९.

**खातेपोते** न. (विकत देण्याघेण्याचा) व्यवहार; काम; जमाखर्च. (वा.) ० **बरोबर होणे** - १. जमा व खर्च, नफा व तोटा बरोबर होणे;

तोंड-मिळवणी होणे; रमारमी होणे. ३. मालमत्तेच्या किंवा मुलाबाळांच्या जंजाळातून मुक्त होणे (चोरांनी मालमत्ता चोरल्याने व मृत्यूने मुलेबाळे हरण केल्याने.).

**खातेबाकी** स्त्री. परस्परांच्या खात्यावरून हिशेब होऊन देण्याघेण्याचा राहिलेला शेषांश; हिशेबाच्या वहीतील अखेरची शिल्लक (जमेकडील किंवा नावेकडील.).

**खातेमिळवणी** स्त्री. (ताळेबंदी काढताना केलेली) खात्यांची मिळवणी; सदर मिळवणी करण्यासाठी दाखल केलेली बाब.

**खातेरे** न. खातर, खाचर. १. घाण, केरकचरा, खत इत्यादींची रास; गाळ; घाण. २. उकिरडा; केराची खाच. ३. (ल.) लाजिरवाणे, निरुपयोगी जगणे : 'या खातेऱ्यातून सुटका होते ती एकापरीनं चांगली आहे.' - रथ ८९.

**खातेवाईक** वि. दुकानदाराकडे ज्याचे खाते आहे असा.

**खातोर** शअ. करिता; साठी; म्हणून. (भिल्ली) पहा : **खातर**

**खातोंड** न. घाण पाणी साठलेली जागा, कुंडी, डबके. (गो.) पहा : **खातड, खाताड** (गो.)

**खात्रड** स्त्री. दलदल; ओल; चिखल झालेली जागा. (कु.) पहा : **खातड**

**खात्री** स्त्री. १. निश्चितता; खूणगाठ विश्वास. २. जामीनकी; हमी; खातरदारी; खात्रीपत्र. (जामीन देणाऱ्या मनुष्याला अथवा वस्तूला लावतात.) [फा. खातीर] (वा.) ० **घालणे** - जामीनदार म्हणून सही करणे : 'याच्याखाली सही करा. खात्री घाला.' - चाक १२०. **खात्रीत नसणे** - खिजगणतीत नसणे; किंमत न देणे : 'तुला मी खात्रीतच नाहीं.' - कर्मयोग २८३.

**खात्रीचा** वि. १. विश्वास ठेवण्यालायक (माणूस); भरवशाचा; उत्तम प्रकारचा; पसंत पडलेला (माल.)

**खात्रीदार** वि. जामीन. हा खात्री देतो, विश्वासूपणाबद्दल शिफारस करतो पण कोणत्याही प्रकारची जबाबदारी घेत नाही.

**खात्रीपत्र, खातरीपत्र** न. हमीपत्र; शिफारसपत्र; प्रशंसापत्र; प्रमाणपत्र.

**खात्रीलायक, खातीरीलायक** वि. विश्वसनीय.

**खात्साण** स्त्री. घाण. (गो.)

**खाद** स्त्री. १. खाद्य; अन्न; खाणे; भक्ष्य; आहार. २. चांगले खाणेपिणे, पौष्टिक अन्न. ३. कुरतडणे (उंदरांचे); (पक्ष्यांनी फळे) चोचावणे, टोचे मारणे. ४. (शेताच्या पिकावर धाड घालणाऱ्या गुरांचे) आधाशीपणाचे खाणे. ५. उकळणे, लुटणे; लाच खाणे. ६. कुरतडलेला जिन्नस, चोचवलेले फळ, खाण्याचे पीक, उकळलेला पैका, माल इ. ७. जळ (आटविताना विस्तवाने खाणे). [सं. खाद्य]

**खाद** पु. चाल; रूढी : 'पंचांग सांगावयाचा खाद आहे.' - आंपव्य २१.

**खाद** स्त्री. खाज; कंडू. (क्रि. सुटणे.)

**खादगी** स्त्री. १. लाच. (क्रि. खाणे.) २. पहा : **खाद** २ ते ६. ३. माणूस पशू यांचा नेहमीचा - रोजचा आहार; शेर; खाण्याकरिता दिलेली नेमणूक; धान्य, पैसा या रूपाची पोटगी. ४. खाण्याचा सपाटा. (व.) [सं. खाद्य]

**खादडवादी** वि. खादाड; अधाशी : 'बधिरा कुबडा पंगु आरडा खादडवादी बाहेरछंदी ।' - अमृत ८.

**खादणे** उक्रि. खाणे : 'मागां बाळपणीं येणें श्रीपती । जैं एकवेळ खादली होती माती ।' - ज्ञा ११.१८२.

**खाददळवी** पु. खादाडांचा म्होरक्या : 'खाददळवी वाचले.' - ऐलेसं २७११.

वि. पुष्कळ खाणारा; अधाशी.

**खादनिंदक** पहा : **खायनिंदक**

**खादम** पु. सेवक : 'आपल्याकडील जासूद अथवा खादमाबरोबर अर्जीचा लिफाफा पाठवावा.' - पुणे अखभा १.११९. [फा. खादिम]

**खादमस्ती** स्त्री. ऐतखाऊपणाची मस्ती. (झाडी.)

**खादर** न. तराईच्या दक्षिणेला असलेले नदीतून वाहून येणाऱ्या गाळाचे मैदान.

**खादरा** वि. १. खाणारा. २. (ल.) सोसणारा; भोगणारा. (समासात) (कुत्सितार्थाने प्रयोग) अफीम - भांग - लाच - खेटर - मार खादरा.

**खादाखाद** स्त्री. परस्पर कटकट, घासाघीस; एकमेकांना चावणे, खाणे. [खादचे द्वि.]

**खादाखादी** स्त्री. जोराची वाटाघाट : 'तिथेही हो ना झाले, खादाखादी झाली.' - पडरे ३३१.

**खादाड** वि. अधाशी; पुष्कळ खाणारा; हावरा.

**खादाड कुरकुला, खादाडभावसा** पु. खूप खाणारा माणूस.

**खादाडघूस** स्त्री. घुशीसारखी खाणारी; अतिशय खाणारी.

**खादाडी** स्त्री. यथेच्छ खाणे.

**खादिम** पु. नोकर; चाकर. [फा.]

**खादी** स्त्री. १. चांगले खाणे; पौष्टिक अन्न. २. (ल.) पैसे खाणे; लाच घेणे : 'बाळासाहेब अगदीं जरुरीपुरतेंच इनामदारीचें काम पहात, त्यामुळें नेमलेल्या लोकांत खादी फार चाले.' - हाकांध ११५.

वि. धष्टपुष्ट; खादीचा.

**खादी** स्त्री. १. हाताने कातलेल्या सुताचे व हातमागावर विणलेले कापड : 'परम पवित्र खादी हीच स्वदेशाला संपन्न करील.' - के १६.४.२०. २. (सामा.) साधे, जाडेभरडे कापड. [हिं. खद्दर] [सं. कृत्ति]

**खादीरभाई** पु. ऐतखाऊ; खाऊन नुसता फिरणारा.

**खादू** वि. १. खादाड; खाबू; पोटबाबू; पोटपुजारी. २. लाच खाणारा; हरामखोरी करणारा.

**खादूनंदन** पु. खादाड माणूस.

**खाद्य** न. खाण्याच्या उपयोगी पदार्थ; अन्न; खाण्याचा जिन्नस; भक्ष्य, भोज्य पदार्थ.

वि. खाण्याला योग्य; भक्ष्य; भोज्य; खाण्याचा (पदार्थ) : 'तयाचिपरी खाद्याखाद्य । न म्हणे निंद्यानिंद्य ।' - ज्ञा १८.५६०. [सं.]

**खाद्यपराग** पु. (वन.) कीटकास आकर्षक असे खाद्य परागकण; वांझ परागकण.

**खाद्या** वि. खाणारा; सोसणारा; भोगणारा. पहा : **खादरा**

**खाद्रम्मा** वि. खादाड; अधाशी. (को.)

**खान** न. १. खणती : 'ईश्वरीं खान घेतलें ।' - गीता २.३४२५. २. खणतीची चोरी; खाणचोरी; घरफोडी : 'मी माझें करीत होतो जतन। भीतरिल्या चोरें घेतलें खान ।' - तुगा ३७०. पहा : **खाणोरी, खानचोर.** [सं. खन्] (वा.) ० **घालणे** - दरोडा घालणे : 'खान-घालिताति घरोघरी । माहा चोरी प्रवर्तली ।' - क्रिपु ४.२.४९.

**खान** न. १. खाणे; खाद्य; अन्न : 'खान पराचें पान पराचें ।' - विक ५. २. ताट; थाळा : 'मेजवानी मिठाईचे खाने ।' - मइसा ७.२११.

**खान** पु. १. सरदार; अमीर; राजा. २. मुसलमानी पदवी. मुसलमान सरदाराला विशेषत: पठाणी वंशातील लोकांना ही पदवी असे. उदा. मीरखान, याकुबखान इ. [फा.]

**खान** पु. धर्मशाळा : 'एक सारासन पद्धतीचा खान आहे.' - ज्ञाको अ ८१. [फा. खानह = घर, जागा, वास्तु]

**खानका** पु. मुसलमान साधूसाठी राहण्याची जागा किंवा मठ : 'खानका नांवाच्या धार्मिक संस्था मुसलमानांच्या असतात.' - घका ८२. [फा. खान्काड]

**खानखानान** पु. १. खानांचा खान. २. एक पदवी.

**खानगी** स्त्री. दासी; वेश्या; नायकीण : 'सलाबतजंग .... दोन जनाने, हत्ती व कांही खानग्या घेऊन गेले होते.' - मइसा १.१९७. [फा.]

**खानगी** स्त्री. भोजनाची नेमणूक; शिधा, अन्न वगैरे; उपजीविका; वृत्ती. पहा : **खादगी २.**

**खानगी** वि. खाजगी; खाजगत; राजाचे स्वत:चे. [फा. खान् (घर)+र्गा.]

**खानगी** स्त्री. (चुकीने) पहा : **खानदान.** वंश; कूळ. विशेषत: पिढीजात आचरण अथवा स्वभावाविषयी योजतात.

**खानगी कामदार, कारभारी** खाजगी खात्याचा कारभारी.

**खानचोर** वि. १. अट्टल; बिलंदर (चोर.) २. घरफोड्या करणारा चोर; गुपचुप घर फोडून चोरी करण्याकरिता आत शिरणारा. ३. घराची भिंत खणून आत शिरणारा. पहा : **खानोरीचोर**

**खानचोरी** स्त्री. घर खणून केलेली चोरी. पहा : **खाणचोर**

**खानजाद, खानजादीचा** पहा : **खानदान, खानदानी**

**खानडोह** पहा : **खांड डोह**

**खानदान** न. थोर कुल; कुलीन वंश; कुलवान घराणे. वि. १. कुलीन; थोर घराण्यातील, कुलातील : 'निदान खानदान मनुष्य याप्रमाणें कामास येतें.' - भाब १०९. २. (ल.) हुशार; चतुर; चाणाक्ष (कारकून, शिपाई).

**खानदानवर्ग** पु. (समाज.) पिढीजात बडे लोक; अमीर उमराव; अभिजन.

**खानदानवर्गसत्ता** स्त्री. (समाज.) खानदानी वर्गाचा अंमल, सत्ता; अभिजनांची सत्ता.

**खानदानी रक्त** (समाज.) राजघराण्यासारख्या उच्च कुळातला असणे.

**खानदेशी** वि. खानदेशासंबंधी : 'वऱ्हाडी कऱ्हाडी बहू खानदेशी ।' - सारुह ६.४१.

**खाननीस** पु. खाजगीकडील कारभारी, चिटणीस. [फा. खाना = घर + नवीस]

**खानपान** न. खाणेपिणे; रोटीव्यवहार : 'समाजव्यवहाराची जी इतर म्हणजे खानपान, संस्कार सोहाळे, देवधर्म अनेक अंगे...' - सासंअभा १.४४५.

**खान(णे)पोश** पु. तबकावरचे आच्छादन, वस्त्र, रुमाल : 'खानपोश् जदोजी जवाहारजडीत मोत्याची झालरचे आणून ठेविले.' - पदमव ९७. [फा. ख्वानपोश]

**खानलोण** पु. खुराक : 'हा घोडा घोडीएसि लागला । ...यासि बोल्हावण करी : दुणा खानलोण दे' - दृपा ३९.

**खानवटा** पु. कुल; वंश; कुळी.

**खानवटा** पु. खांद्याचा सांधा.

**खान(नि)वटा-ठा** पु. १. उन्हाळ्यात गुरे बांधण्यासाठी वर टाळे किंवा गवत घालून तयार केलेली जागा. २. कोंडण; गोठा; कावण. ह्यात आजारी गुरे वगैरे बांधतात. [फा. खान् (= घर) + वट = ओटा]

**खानसा** पु. सवय; सराव. पहा : **खांदसा**

**खानसामा** पु. आचारी; स्वयंपाकी; भोजनव्यवस्थापक; बबर्जी. [फा.]

**खाना** पु. १. जागा; स्थान; घर. (समासात) तोफखाना, दारूखाना, किताबखाना इ. २. लहान पेटीतील कप्पा, खण. ३. घराणे; कुल. ४. खाते. [फा. खान]

**खाना** पु. इष्टमित्र वगैरेंना दिलेली मेजवानी. [हिं.]

**खानाखराब-बा** पु. सत्यानाश : 'बहुवा दिल्ही कीं या दोघांचा खाना खराब.' - मदरु १.११८.

**खाना(ने)जंगी** स्त्री. १. खडाजंगी; भांडण; खणाखाणी. २. बोलाचाली; बाचाबाची. ३. गृहकलह; यादवी : 'हे सर्व आपसची खानाजंगी करून...' - दिमरा १.८८; 'सादतखान तर खानेजंगीत जखमी होऊन दुसरे दिवशीं मृत्यू पावले.' - ऐच २२. [फा.]

**खानाजाद** वि. दासीपुत्र; लेकावळा : 'फुलाजीचा खानजाद तुलाजी.' - मइसा १७.४. [फा. खाना + झाद]

**खानेखराबी** स्त्री. संपूर्ण नाश; वाटोळे : 'अनेक राजे राजवाड्यांची खानेखराबी होऊन ते वाया गेले.' - जोफु ३७४. [फा.]

**खानेतलाशी** स्त्री. झडती. [फा. खानातलाशी]

**खानेनिसीन** वि. घरी बसणे; निवृत्त होणे : 'याकरिता रावजी नाखूष होऊन पुण्यात खानेनिसीन जाहले.' - पुणेअखभा १.१०२.

**खानेसुमार-री** स्त्री. १. जनगणना; गावातील माणसांची, घरांची, इतर गोष्टींची गणती, मोजणी; शिरगणती. (क्रि. करणे.). ही गणती साधारणत: दर दहा वर्षांनी होते. या वेळी सांस्कृतिक पाहणीच्या अनेक गोष्टी नमूद करण्यात येतात. २. गणतीचा आकडा, नोंद; शिरगणतीचा तक्ता, नोंद. ३. शेतीसंबंधी (गुराढोरांची) गणती. ४. सरकारी नोंद (घरे, माणसे इत्यादींची.). [फा. खाना + शुमारी]

**खानोटा** पु. घराणे; कुल. पहा : **खानवटा**

**खानोरी, खानोरीचोर** पु. १. घरफोड्या. पहा : **खानचोर.** २. (काहींच्या मते हा शब्द 'खाणे' यापासून झालेला, यावरून) खाण्यापिण्याच्या पदार्थांची चोरी करणारा; किरकोळ चोऱ्या करणारा.

**खान्नी, खान्नीभान्नी** पहा : **खांजणी, खांजणीभांजणी**

**खाप** स्त्री. १. रास; ढीग; जुडी (तंबाखूची किंवा विड्याच्या पानांची). २. माडाच्या किंवा तसल्या इतर झाडावर चढण्यासाठी त्याच्या खोडाला पाडलेली खाच; खालवट. ३. फोड; काप; फाक (फळाची.) ४. खांड; लहान तुकडा (सुपारीचा.) ५. घट्ट गोळा (साखळलेल्या रक्ताचा, ओल्या खजुराचा, दही किंवा दूध यांचा.) ६. लहान ढलपी; तुकडा; खपला. ७. कणसे ठेवण्याच्या उपयोगी पडणारा खळगा. (गो.) ८. ओरखडा.

**खाप, खापटी** स्त्री. लहान चपटा, काटेदार मासा. (गो.)

**खापकडी** स्त्री. सुपारीची शिजवलेली खांडे, खापा, काचऱ्या.

**खापटी, खपटी** स्त्री. १. गुळाची थापटी, लहान पोळी; कान्हवला. २. (सामा.) एखाद्या पदार्थाची थापटी, वडी.

**खापटूल** न. लहान खापटी. (गो.)

**खापणी** स्त्री. १. सरकार सारा, दंड, खंड, पट्टी, गावखर्च इत्यादीसंबंधी जो पैशाचा ठराव त्याची कुळांवर केलेली हिस्सेवारीची वाटणी. २. त्या वाटणीचा वाटा. ३. खोडावर खाचा पाडणे, करणे. पहा : **खाप** २

**खापणे** उक्रि. १. खापणी करणे. २. वरून दडपण ठेवून दाबणे (कापसाचे गठ्ठे, गवताचे भारे, पेंढ्या इ. दबला जाणारा माल). ३. (क.) उभ्या तोडणे; निमुळती करणे; तासणे (टेकडीच्या कडा, बाजू); खरडणे.

**खापणे** सक्रि. सरकारचे देणे कुळांवर प्रमाणशीर विभागून लावणे.

**खापर** न. १. धान्य भाजण्यासाठी, भाकरी, खापरपोळी करण्यासाठी उपयोगात आणायचे, रुंद, उतरते किंवा चपटे मातीचे ताट, परळ इ. २. मडक्याचे खालचे अर्ध (भिक्षेसाठी, शेगडीसाठी) : 'नाचतया पुण्यगिरी । चिद्‌भैरवाच्या खापरीं ।' - ज्ञा १८.१०४०. ३. (प्रसंगीविशेषी सामा.) कोणतेही भांडे (धातूचे, मातीचे - घागर, मडके वगैरे.) ४. श्राद्धातील पिंडदानासंबंधी सामानाने भरलेले टोपले : 'पिंडदान साहित्याचें टोपलें घ्यावें लागतें... त्यास खापर म्हणतात.' तीप्र १३०. (प्रां.) ५. मडक्याचा एक तुकडा : 'येमपुरी नागवी केली। खांडां खापरां सकट ।' - शिव १६१. ६. कौल. (घरावर घालण्याचे). (व.) ७. (बायकी) (ल.) नापसंत व्यक्ती; बिनकिमतीचा माणूस (कित्येक वेळा हा शब्द निरर्थकपणेही उपयोगात आणतात.) ८. डोक्याची कवटी. ९. (ल.) अपयश. [सं. खर्पर] (वा.) ० **डोक्यावर, डोईवर, शिरावर फोडणे** - दुसऱ्यावर अपराध, आळ घालणे; एखाद्या निरपराध्यावर दोष लादणे. ० **डोक्यावर फुटणे** - विनाकारण अपराधी ठरणे, दोष येणे. ० **डोक्यावर येणे** - संकटात येणे. ० **होऊन राहणे** - १. प्रतिष्ठाशून्य होणे; निष्कांचन होणे : 'मुजफरखान यांणीं फकीरी घेतली आहे. खापर होऊन राहिले आहे.' - पेद २८.१६२. **खापरात मुतून तोंड पहा** - फजिती झाली असतानाही फुशारकी मारणाऱ्याला म्हणतात.

**खापर** वि. (ल.) निरुपयोगी.

**खापरखांड, खापरखु(खुं)टी** न. स्त्री. फुटलेल्या मडक्याचा तुकडा.

**खापरतोंड** न. निपणतूचा मुलगा; मूळ पुरुषापासून सहावी पिढी (निंदार्थी प्रयोग.) त्यावरून दुर्दैवी; दळभद्र्या; पांढऱ्या पायाचा; काळतोंड्या.

**खापरपणजा** पु. पणजाचा आजा; निपणजाचा बाप; चालू पिढीपूर्वीचा सहावा पुरुष.

**खापरपणतू, खापरपणतों(त्वं)ड** पु. न. निपणतूचा मुलगा; पणतूचा नातू.

**खापरपोळी** स्त्री. तांदळाच्या पिठाची, खापरावर भाजलेली पोळी; घिरडे.

**खापरपोळे** न. पोळी करण्याचे खापर.

**खापरसूत** न. (सुवर्ण) १. एक धातू; २. जस्त ; ३. एक काल्पनिक धातू : 'तांबें आणि खापरसूत । येकवटली असे धात । तयाचा वृत्तांत । पितळ होय॥' - कालिका पुराण २८.२१

**खापराळ** स्त्री. केळीची एक जात. (को.)

**खापरी** स्त्री. १. मडक्याचा तुकडा. पहा : **खापर** ४ : 'परिस स्वर्णत्व तें न दे खापरिस ।' - मोकृष्ण ४७.९१. २. (ल.) पांथरीचा चापट कठीणपणा. ३. चैत्री पौर्णिमेला मातीच्या पात्रात तेलात भिजवलेल्या चिंध्या पेटवून देवीला ओवाळण्यासाठी उपयोगात आणले जाणारे पात्र; खापरी ओवाळण्याचा विधी. (ना.)

**खापरी** पु. (निंदाव्यंजक) निग्रो; काफरी : 'आफ्रिकेंत खापऱ्यांनी सुरू केलेलें बंड.' - सह्याद्री १६२. (गो.) [पोर्तु. काफ्रे]

**खापरी** स्त्री. एक भाजी; घेटोळी.

**खापरी कौले** अव. हाताने थापून केलेली कौले; थापट कौले. ही कौले नळीची नसतात.

**खापरी(ऱ्या)चोर** वि. १. अट्टल चोर; बिलंदर चोर. (को.) २. हलक्या चोऱ्या करणारा; बारीकसारीक वस्तू (खापरीसारख्या) चोरणारा, खिशात टाकणारा. पहा : **खानोरीचोर**

**खापरेपण** न. निष्ठुरपणा; निर्दयपणा. (गो.)

**खापरेला** वि. १. कुरूप. २. एक शिवी.

**खापऱ्या** वि. १. दुर्दैवी; भद्रकपाळ्या. क्षुद्र अशा अर्थाने योजतात : २. शिद्दी माणसाचे पिशाच. (कु.) पहा : **खापरी**

**खापऱ्या काळजाचा** चांडाळ वृत्तीचा. (गो.)

**खापऱ्या नारळ** पातळ दळाचा, खोबऱ्याचा नारळ.

**खापलणे** उक्रि. १. तोडणे; छाटणे; जोराने छेदणे; शस्त्राने तोडणे. २. सप्पा उडवणे; कापून काढणे. (सैन्य.)

**खापा** पु. घट्ट गोळा : 'उगवला नारायण लाल शेंदराचा खापा।'- जसा ४०.

**खापी** स्त्री. सरंग्यासारखी एक लहान जातीची पांढरी मासळी. (गो.)

**खापुल्ले** न. खापरीण (निग्रो) स्त्री. (गो.)

**खापेकड** न. रहाटगाडग्याच्या माळेमध्ये लोटे बांधण्यासाठी सुमारे दीड वीत लांबीचे जे लाकडाचे तुकडे घालतात ते. ह्याला दोन बाजूला दोन व मध्ये सारख्या अंतरावर दोन अशा चार खापा असतात. बाजूच्या खाचा खापेकडे माळेत अडकविण्यासाठी व मधल्या शिकारी अडकविण्यासाठी असतात. बहुधा खापेकडे सागाची करतात. (को.)

**खाबगा** पु. शय्यागृह; निजण्याची खोली : 'वाडें सुंदर खाबगे नवगजा

सिद्धाच होत्या घरीं ।' - सारुह ३.४५. [फा. ख्वाब्गाह]
**खाबड** वि. खडबडीत; उंचसखल. [हिं.]
**खाबडखुबड** वि. खाचखळग्याची, चढउताराची (जमीन.).
**खाबरी** स्त्री. दुभत्यासाठी वापरायचे मातीचे मडके. (व.)
**खाबान** न. बागेतील फुलांचा ताटवा; वाफा. [फा. खायबान]
**खाबीखुबी** स्त्री. खाचखोच; मर्म : 'रंगभूमीच्या खाब्याखुब्या जाणून...' - सासं ६४.
**खाबू** वि. १. पोटबाबू; खाखा करणारा; खादाड; अधाशी; खाणोरी. २. पैसे खाणारा; लाच घेणारा.
**खाबूगिरी** स्त्री. पैसे खाण्याचा प्रकार.
**खाम** पु. १. केळीचे झाड, २. खांब.
**खाम(मा)खा, खाम(मा)खाम-य-स, खामोखाम-य** क्रिवि. १. व्यर्थ; उगाच; विनाकारण. २. खचित; नक्की; खात्रीने; निश्चयाने; काही झाले तरी; इच्छा असो नसो; जरूर; मुद्दाम; हटकून; (चुकीने) हमखास : 'जो स्नेहकार्य - मन्सुबा बन्धुत्व संपादणें तें कार्य खामखा करावेंच करावे.- मइसा ८.१७५. [फा. ख्वामख्वाह]
**खामटवणे** अक्रि. घुसवणे; ढकलणे.
**खामतमा** स्त्री. फाजील हाव. [फा.]
**खामन-नी** न. स्त्री. ठाणवई; लहानसा खांब : '....ह्या चिमण्या पोरांनी ओसरीवरच्या खामनीवर ठेवलेल्या....' - सावा भांगतुरा ५.
**खामन(ण)खुजा** वि. बुटका; खुजा; ठेंगणा. [सं. क्षाम]
**खामपट्टी** स्त्री. एकंदर गावातील शेतजमिनीवर सरकारने बसविलेल्या ठोकळ शेतसाऱ्याची वाटणी; कुळवार वाटणी.
**खामसा** पु. जार. (गो.)
**खामी** स्त्री. १. तोटा; नुकसान; घस; उणीव (व्यापार इत्यादींमध्ये) : 'आज सतरा वर्षे खुदावंत त्याची खामी करवितात तरी मोडत नाहींत.' - मराचिथोशा ७६. २. दोष; व्यंग; अपराध. ३. लाज; शरम; कमीपणा : 'अतःपर पादशाहीस खामी आली.' - चित्रगुप्त ३४. ४. वाईट अवस्था; डबघाई; ऱ्हास; उतरती कळा : 'विन्मुख होऊन श्रीमंत आणिले चहुकडून खामीस ।' - ऐपो ३९८. [फा.]
**खामोश** क्रिवि. स्तब्ध; शांत; अचल : 'नबाब निजाम अल्लीखां व भोसले ताहाल (अद्यापपर्यंत) खामोश ह्याचा सबब काय न कळे.' - मइसा १०.१८२.[फा.] **० करणे** – गप्प बसवणे; शांत करणे; शांती राखणे : 'तेसमयीं बाजीराव यांणीं खामोश करून आपले खाजगत डेऱ्यांत गेले.' - होकै ३.
**खामोशी** स्त्री. स्तब्धता; शांतता. [फा.]
**खाय** स्त्री. १. खाई; खड्डा; खाच. २. अलावा. [सं. खाति]
**खायखाय** स्त्री. खादाडपणा; वखवख; खाखा होणे. (क्रि. सुटणे, येणे, मोडणे, होणे.) २.(ल.) खोडकी; खोड (खा.)
**खायखूय करणे** वरखाली करणे.
**खायनिंदक** वि. कृतघ्न; खाल्ल्या घरचे वासे मोजणारा; बेइमान.
**खायरा, खायिर** वि. खाणारा : 'रामा । ते कपि सत्त्वहीन असतां पालाफळें खायरीं ।' - निमा १.५० [सं. खाद]
**खायला-लो** वि. खालचा; तळचा; बुडाचा. (राजा. कु.)
**खायलाटी-ठी** स्त्री. खलाटी. (राजा.)
**खायी** स्त्री. खाच; खंदक. पहा : **खाय.** (वा.) **खायीत उडी टाकणे** – संकट ओढवून घेणे.
**खायेष** स्त्री. इच्छा : '.... त्यांच्या सरदारांचे नुकसान व्हावें असी कंपणी सरकारची खायेष नाहीं.' - पेद ४४.५६. [फा. ख्वाइश]
**खार** स्त्री. एक प्राणी; चानी; खडी; खडुळी.
**खार** पु. १. लवण, मीठ (खनिज अथवा वनस्पतिजन्य, स्वाभाविक अथवा कृत्रिम.); संचळ, सैंधव, सवागी, तुरटी इ. क्षार. २. आघाडा; माठ, पोकळा इ. वनस्पती जाळल्यावर राहिलेली राख शिजवून ते खारवणी गाळून त्यांची वाफ करून काढलेला अशुद्ध क्षार. ३. खारटपणा. ४. लोणच्यातील द्रवरूप पदार्थ : 'झोंबतो व्रणिं जसा बहु खार ।' - कमं २.५६. ५. (ल.) खराबी; नुकसान; तोटा. [सं. क्षार]
**खार** स्त्री. १. ज्यामुळे आंब्याचा मोहोर, वालाची फुले इ. जळून जातात असे अभ्रांतून पडणारे दव; खारी धुई. (क्रि. येणे, पडणे.) २. हवेतील अतिशय गारवा; धुई; ढगाळ हवा. (क्रि. सुटणे, पडणे, होणे). खार ही वांबळीहून भिन्न आहे, वांबळ हिवाळा व पावसाळा यांमध्ये मोठा पाऊस पडल्यानंतर पडते आणि खार फक्त हिवाळ्यातच पडते. ३. क्षारामुळे येणारा ओलसरपणा, दमटपणा, लोणा (भिंतीवर, जमिनीवर). ४. खर; पावसाच्या शेवटी संध्याकाळी दिसणारे तांबडे ढग.
**खार** स्त्री. १. समुद्र हटवून, हद्रून मिळालेली जमीन; खाजण. २. खारी दलदल, भाताची खारी जमीन. ३. (ल.) तोटा; नुकसान. [सं. क्षार]
**खार** न. १. सुकवलेले खारे मासे. २. शेताला खत मिळण्यासाठी समुद्राचे किंवा खाडीचे शेतात साठवलेले पाणी. (गो.) [सं. क्षार] वि. खारट; क्षारयुक्त. (वा.) **० खाणे** – द्वेष करणे; पाण्यात पाहणे. **० पाडणे** – समुद्राच्या भरतीखालील जमिनी शेतीच्या उपयोगी करणे. (को.) **० लागणे, ० लावून घेणे, ० पडणे** – १. नुकसान होणे; संकट येणे; फटका बसणे. २. काळिमा येणे; शिंतोडा उडणे. **० लावणे** – नुकसानीत आणणे.
**खार** पु. सापाची एक जात.
**खार** स्त्री. लहान मुलांच्या दस्तापिंजर या खेळातील एक संज्ञा; तीन अंक.
**खारकच्छ** न. खाजण; समुद्रकाठ.
**खारकट** वि. १. खारट; क्षारयुक्त. २. (ल.) खुनशी; मत्सरी; आकसखोर.
**खारकांड** न. मांस; मटन.
**खारकी बोर** खारकेएवढे बोर; नागपुरी, पेवंदी बोर.
**खारकुंडी** स्त्री. लहान खार.
**खारखंडा** पु. (उपहासाने) खाजणातील शेती करणारा वर्ग.
**खारगे** न. मीठ.
**खार(री)ज** वि. बाहेर; हद्दपार. [फा.]
**खारजवारी** स्त्री. दुर्दशा; नष्टप्राय स्थिती : 'सर्व प्रकारीं दौलत खारजवारीस यावयास तोच (कारण).' - ऐलेसं १०२.

**खारट** वि. क्षारयुक्त.
न. खाजण.
**खारटघोट** वि. अतिशय खारट.
**खारटतुरट** वि. १. थोडेसे खारट व थोडेसे तुरट; चवदार; रुचकर; स्वादिष्ट (खाद्य.) २. (ल.) थट्टेचे, विनोदपर; चुरचुरीत (भाषण, निबंध).
**खारटाई** स्त्री. खारटपणा.
**खारटाण** वि. खारट जमीन.
न. समुद्राच्या पाण्याचा उग्र वास.
**खारडे** न. (चांभारी) करडाचे कातडे.
**खारणी** स्त्री. (सोनारी) क्षाराच्या साहाय्याने तयार केलेले, चांदीत मिसळायचे हीण. (कर.)
**खारणे** अक्रि. क्षारयुक्त होणे; क्षाराने विकृत होणे (जमीन, शेत); लोणचे इत्यादी पदार्थांच्या अंगी मीठ इत्यादी मुरल्यामुळे क्षाररसविशिष्ट होणे.
सक्रि. क्षारयुक्त करणे.
**खारफुटी** स्त्री. (वन.) खाऱ्या दलदलीत वाढणारी वनस्पती.
**खारवट** स्त्री. खारी जमीन; खाजण.
वि. खारट (जमीन, शेत).
**खारवट** वि. खुनशी; मत्सर करणारा.
**खारवडा** पु. कुरडया घालून राहिलेल्या चीकाचे घातलेले सांडगे, वड्या; कुरडयांसाठी गव्हाचे सत्त्व काढल्यावर उरलेल्या गव्हाच्या चोथ्याच्या मीठ घालून केलेल्या वड्या.
**खारवड्या** स्त्री. अव. बाजरी भिजवून, सडून, शिजवून त्याच्या उन्हात वाळवलेल्या लहान वड्या, सांडगे. या तळून किंवा तशाच खातात.
**खारवणी** न. खारट पाणी.
**खारवणे** सक्रि. खारट करणे; मीठ लावून फळे, भाज्या इ. वाळवून ठेवणे : 'जाड कातडी सोलून मग मासाचे तुकडे कापून ते खारवायला ठेवले.' - एको ४.
**खारवा** पु. गुजराथेत होणारे, गडद लाल रंगाचे कापड, खादी. (गादी, उशी इ. करण्यासाठी उपयोग) [हिं. खारुआ]
**खारवा-वी** पु. स्त्री. नावाडी. हे नावाड्याचे, घरे शाकारण्याचे, आगरे करण्याचे इ. कामे करतात. २. कोळी; गाबीत. (गो.) [फा. खार्वा]
**खारवांगी** स्त्री. खाजणात होणारे वांग्याचे झाड; त्याचे फळ.
**खारवी** वि. खारव्या कापडासंबंधी; खारव्या रंगासंबंधी.
**खारवीण** स्त्री. पिलु, रिठा, रिंगे, रिंगीण.
**खारवीणशी झगडप** मासळीवालीसारखे लाजलज्जा सोडून मोठ्याने भांडणे. (गो.)
**खारवे** न. खारव्या रंगाचे लुगडे; अलवण.
**खारसळई, खारसोळी** स्त्री. खारसंघ; घोटण्याचा दगड; डाग देण्यासाठी टाकणखार उगाळण्याची सहाण.
**खारसंध** पु. (सोनारी) धातूंना द्यायचा डाग; क्षारमिश्रित कस्तूर.
**खारसान** न. खारटपणा. (गो.)
**खारस्ता-स्ती** वि. खाष्ट; तुसडा; निंदक. [फा. खारिश्त]

**खारा** पु. लोणचे ठेवण्याचे विशिष्ट आकाराचे मडके. (खा.)
वि. १. खारट. २. खाजणात तयार होणारे (भात.) ३. खारट पाण्यात जगणारा (मासा.) ४. खाडीवरून, खाजणावरून वाहणारा (वारा.) ५. जड, क्षारयुक्त (पाणी).
**खाराईत** पु. स्त्री. गुजराथी रंगाऱ्यांची एक जात व त्या जातीतील व्यक्ती; खारवा करणारा : 'गुर्जर रंगारी खाराईत ।' - भवि ४०.६४.
**खाराऊ-व** न. शेंदरी किंवा तांबडे हलक्या किमतीचे, सुती लुगडे-कापड. पहा : **खारवा**
**खाराखीर-खिरी-खेर-खोर** स्त्री. १. बारीक तपास, छडा, पाहणी; बारीक चौकशी; सामान्यतः रिकामपणाची, वाईट हेतूने केलेली चौकशी; रिकामी उठाठेव. २ क्षुल्लक गोष्टीबद्दल दुराग्रह; तक्रार; घासाघीस; ओढाताण; बारीक कीस काढत केलेला वादविवाद; विनाकारण दोष काढणे; छेडणे; खोचून बोलणे; तुसडेपणाने बोलणे; आडफाटे फोडणे. ३. असमाधानामुळे होणारी चडफड; काहीही पसंत न पडणे; मर्जीस येण्यास कठीण. ४. चोळणे, उडवणे इ. कारणाने मालाची होणारी दुर्दशा.
**खाराण** न. उन्हाळ्यात विहिरीतील पाणी आटल्यावर हातरहाटाचा पोहरा भरून येण्यासाठी विहिरीत पाडलेले डबके. (गो.) [सं. क्षर]
**खाराणी** स्त्री. मुतेरे; मुतलेले वस्त्र : 'कव्हणी एक निजला असे : तो आंतुर्णी मुती : मग स्वप्नाचेनि भ्रमे म्हणे मी दारांगेला.... चइला तव लटके : खाराणी ती साच : तें धुतलियावीण न फिटे :' - चक्रधर सिद्धांतसूत्रें ५३.
**खारावणे** अक्रि. १. क्षारयुक्त करणे; खारे होणे. २. खाडी, खाजण यांवरून वाहणाऱ्या वाऱ्यामुळे डोळे तांबडे होणे.
**खारावलेला** वि. १. मीठ लावून वाळवलेला, भाजलेला. (मासा, भुईमूग शेंगा इ.) २. मुरलेला; अनुभवी; पक्का.
**खारा वारा** दिवसा समुद्राकडून जमिनीकडे वाहणारा वारा.
**खारिज** शअ. शिवाय.
**खारी** स्त्री. एक कैली माप; १६ द्रोण; खंडी. [सं.]
**खारी** स्त्री. १. अभ्रे; मळभ; हवेतील गारवा; थंडाई; सर्दी. (क्रि. सुटणे, पडणे, येणे.) २. धाब्यावर टाकण्यासाठी वापरायची पिवळट माती; चिकणमाती. हिच्यामुळे घरात पावसाचे पाणी गळत नाही. ३. गावाच्या जवळचे शेत; खारी जमीन. (व.) ४. दुसऱ्यांदा केलेली पेरणी. ५. चितेची रक्षा.
**खारी** स्त्री. गुरांचा एक रोग; पायखुरी; लाळ. (नेमाडप्रांत)
**खारी** स्त्री. थाळा. (बाग.)
**खारी** स्त्री. (गुऱ्हाळ) रस कढविताना तो हलविण्याचे लाकडी अगर लोखंडी कलथ्यासारखे साधन. (बे.)
**खारी** स्त्री. खाडी : 'समुद्र दाटी भरितें । तैं समुद्रचि करी खारियांतें ।' - ज्ञा १३.३०६.
**खारीक** स्त्री. १. अपक्व स्थितीत वाळलेला खजूर. ह्याची झाडे रुक्ष व थंड प्रदेशात (अफगाणिस्तान, अरबस्थान येथे) होतात. फळ वाळले म्हणजे खारीक होते. वरील कवच गोड व पौष्टिक असते. बी

औषधी असते. २. रानटी खजुरी. [फा. खारक] (वा.) **खारका उडविणे** - हाताच्या बोटाच्या पेरांनी डोक्यावर मारणे : 'ते कधीं कधीं शास्त्रीबोवांच्या डोक्यावर खारका उडवीत.' - ह. ना. आपटे चरित्र.

**खारीक** पु. खाजणात धान्य पिकवणारी आगरी जात व त्या जातीतील व्यक्ती. पहा : **खारखंडा**

**खारीज** वि. काढून टाकलेला; बडतर्फ; फेटाळलेला; बहिष्कृत; नष्ट. (क्रि. करणे.) : 'अबदालीस खारीज केलें आहे.'-दिमरा २७७. [फा.]

**खारीज** पु. कालवा; मोठा पाट. (गो.)

**खारी धुई** खाऱ्या धुक्याचा थेंब; दव; जड क्षारयुक्त पाणी.

**खारी पुरी** १. तिखटमिठाची पुरी. २. मेवेदार सलोनी; मांसाच्या पुरीचा एक प्रकार.

**खारी माती** १. समुद्रकिनाऱ्यावरची, खाजणातील माती. २. लोणा आलेली जमीन. ३. क्षारयुक्त म्हणून नापीक झालेली शेतजमीन. ४. शाडू; धाब्यावर घालायची माती; बरण्या वगैरे चिनीमातीची भांडी ज्यापासून करतात ती माती.

**खारी माती** १. लिलाव केलेला जिन्नस (याचा एकदा लिलाव झाल्यावर तो हलक्या किमतीचा असला तरी परत घेतला जात नाही यावरून.). २. समुद्रात फुटलेल्या गलबतातील वाहत आलेला माल, जिन्नस.

**खारीव** वि. १. खारलेले (लोणचे, जमीन इ.) २. क्षारयुक्त; खारट.

**खारू** वि. क्षारयुक्त; घामाने मळलेला : 'कारुवा खारुवा सारिखे वस्त्र होआवे.' - लीचउ ६१०.

**खारू, खारेडी** स्त्री. खार; खारोटी; चानी.

**खारे** न. १. खारावलेली मासळी. (कु. गो.) २. शेताचा कस वाढण्यासाठी त्याला बांध घालून त्यात खत म्हणून घालतात ते समुद्राचे पाणी.

**खारेपणा** पु. मिठासारख्या क्षाराने युक्त असणे (विशेषतः पाणी.).

**खारेपाट** पु. समुद्रकाठची खारवट जमीन; खाजण. (को.)

**खारे मीठ** खाणीत सापडलेले मीठ; खनिज मीठ. हे समुद्राच्या पाण्यापासून तयार होणाऱ्या मिठाहून वेगळे असते.

**खारे सरोवर** (भूशा.) पाण्यात क्षार व लवणांचे प्रमाण बरेच जास्त असणारा नैसर्गिक पाण्याचा साठा.

**खारोटी** स्त्री. खार (प्राणी) : 'ती स्वयंपाकघरात जिवंत खारोट्या किंवा उंदीर धरून आणीत असे.' - समक १.४.

**खारोड्या** स्त्री. अव. पहा : खाखड्या (व.)

**खारोणी** न. खारे पाणी.
वि. खारे; खारट.

**खाल** स्त्री. १. चामडे; अंगाचे कातडे; साल. (मारणे, छडीने मारणे यासंबंधात योजतात). (क्रि. काढणे.) : 'वैराग्याची खाल काढिली।' - ज्ञा ३.२५२. २. जनावरांचे कातडे. [सं. खल्ल]

**खाल** स्त्री. भोत; खोळ : 'इया शृंगारूनियां खाला । मांडिलियां पैं ।' - ११.४६५.

**खाल** क्रिवि. खाली; अधोभागी. (राजा.) (वा.) **खालच्या मानेने चालणे, पाहणे** - नम्र, विनयशील, मर्यादेने वागणे; लाजेने खाली मान घालून चालणे : 'ती खालच्या मानेची बायको.' - निचं ९३. **खालच्या वाऱ्याला लागणे** - म्हातारपणामुळे थकणे : 'आपले वडील आता खालच्या वाऱ्याला लागले अशी भावना होऊन मन उदास झाले.' - वावटळ १०७.

**खालचा-ला** वि. १. तळासंबंधी; तळचा; बुडाचा. २. हाताखालचा; ताबेदार; आज्ञांकित; कमी दर्जाचा. ३. पूर्वेकडील. पहा : **गंगमोहरा**

**खालचा थर, वर्ग.** १. आर्थिक दृष्ट्या दुर्बल वर्ग; कमी प्रतीची, दर्जाची वस्तू. २. (ल.) अशिक्षित वर्ग : 'पूर्वीसारखी ही चळवळ वरच्या वर्गांत (सुशिक्षितांत)च राहिली नसून चळवळीचीं पाळेंमुळें अगदीं खालच्या थरापर्यंत जाऊन भिडलीं आहेत.' - के १६.९.३०.

**खालची मांडी** नडगी. (घोड्याची) - अश्वप १.७४.

**खालचे-ले पोट** ओटीपोट; बस्तिप्रदेश.

**खालट - खालपट** वि. खालसर; निम्न; ठेंगणा; बसकट; बदखल; थबकट (वस्तू.) २. काहीसा खालती, उतरता, उताराचा. ३. चढ उताराची (जमीन).

**खालणे-ने** क्रिवि. खालून; खालच्या भागातून; बुडापासून.

**खालतड** क्रिवि. पूर्वेकडील. (व.)

**खालता** क्रिवि. १. खाली; खालती; खालच्या बाजूला : 'धरून केशीं मग खालता हा ।' - सारुह १.८३. २. पूर्वेकडे. पहा : **गंगमोहरा**

**खालती** स्त्री. पूर्वदिशा. (व.)

**खालती-ते** क्रिवि. खाली. (वा.) ० **येणे** - तोटा येणे; कमी पडणे; बूड येणे.

**खालदार** वि. पांढऱ्या रंगाचा असून त्यात काळे केस मिश्र असलेला (घोडा). हा अशुभ समजला जातो. - अश्वप १.१०४.

**खालपटणे** अक्रि. खाली जाणे : 'भुकेने खालपटलेल्या पोटावर....' - रापा १५५.

**खालमान्या-मुंड्या** वि. गायतोंड्या; दृष्टीला दृष्टी न भिडविणारा पण हळूच खोड्या करणारा; आतून डाव करणारा.

**खालमेली** १. दिरंगाई. २. टवाळी, तंटा.

**खाल(ला)वणे** अक्रि. १. नम्र होणे; खाली होणे; वाकणे : 'तैसें जीवमात्रां अशेखां । खालावती ते ॥' - ज्ञा ९.२२५. २. दुर्दशा होणे; गरिबी येणे. उक्रि. नाश करणे : 'सूर्यकुळीं अवतार धरी रिपू खालवी।' - लहुकुशाख्यान मराठी ५ वे पुस्तक १६४. (१८८५.)

**खालनूगारा** एक वाद्य; घोड्याच्या पाठीवरून वाजविण्याचे वाद्य.

**खालविणे** सक्रि. १. खाली करणे, २. रिकामे करणे. पहा : **खालाविणे** : 'जेथ खालविजे सीबिका ।' - ऋ २१.

**खालस(सा)वणे** अक्रि. पडणे; बसणे; बुडणे; ढासळणे; आत येणे (परिस्थितीमध्ये); नक्षा उतरणे (गर्वात, अभिमानात.).

**खाल(लि)सा** पु. १. थेट सरकारकडून मिळालेली अथवा जिच्या वसुलाचे सरकार एकटेच मालक आहे अशी जमीन, गाव अथवा भाग. २. खोताच्या अभावी सरकारने वहिवाटलेल्या जमिनी; जहागीर किंवा इनाम नसलेली जमीन. ३. सरकारजप्त जमीन, गाव : 'नैबानें कुल

बिसादी लुटून खालसा केली.' - मइसा १५.१३. ४. संस्थानाच्या अंमलातील नसून इंग्रजी सरकारच्या अमलाखालील प्रदेश : 'मोगल अंमलांत सापडलेला महाराष्ट्र, खालसा महाराष्ट्रापेक्षां अधिक दुर्दैवी.' - के १७.५.१९३०. ५. मिरासी खेरीज सरकारच्या वहिवाटीला असलेली कीर्दसार जमीन. ६. मुसलमानी अमदानीतील जमाबंदी खाते. वि. १. खास सरकारी (जमीन, सैन्य, तोफखाना इ.). २. संस्थानी नव्हे असा (प्रांत, जमीन इ.) ३. सरकारजमा, जप्त. [फा.] (वा.) ० **करणे** - सरकारजमा करणे; जप्त करणे.

**खालसा** पु. शीख संप्रदायातील एक पंथ.

**खालस्ती** वि. आकसखोर; खुनशी; द्वेषी. [फा. खलश.]

**खालहाट** पु. खालच्या बाजूचा बाजार.

**खाला** स्त्री. १. बाहुली; खेळणे. २. आईची बहीण; मावशी. [फा.]

**खालाट-टी-ठी** न. स्त्री. १. सखल प्रदेश; सह्याद्रीच्या पायथ्यापासून पश्चिमेकडे समुद्राच्या किनाऱ्याकडे जाणारा उतरता प्रदेश. २. अगदी समुद्रकिनाऱ्यावरील जमीन; किनाऱ्याच्या आतील आणि घाटाकडे चढत जाणाऱ्या जमिनीला वलाटा म्हणतात. (को.) ३. स्वराच्या, या उकारी खुणा (या अक्षरांच्या खाली जोडतात म्हणून.).

**खालाट(टी-ठी)कर** वि. खालाटीचा रहिवासी.

**खालाटणे** क्रि. डाग लावून बंद करणे : 'कुपीयांची तोंडे खालाटिलीं होती' - लीचउ ४१७.

**खालाट(टी-ठी) वेलाटी** स्त्री. उताराचा व चढावाचा प्रदेश.

**खालाडीभात** न. नुकत्याच लागवडीला आणलेल्या जमिनीमध्ये केलेले भात. (को.)

**खालारा** शअ. खाली; खालती.

क्रिवि. खाली; खालती; उतरणीकडे : 'जैसें खालारां धांवें पाणी।' - ज्ञा १८.४८१.

**खालावणे** अक्रि. १. कमी होणे, पडणे; हलके होणे; उतरती कळा लागणे (वारा, पाऊस, उन्ह, संपत्ती इत्यादीला.). २. बिघडणे (प्रकृती); खालच्या किंवा खराब स्थितीप्रत जाणे; खाली येणे. पहा : **खालवणे**.

**खालाव(वि)णे** उक्रि.१. खाली आणणे; खाली करणे; नम्र करणे. २. खाली ठेवणे : 'तळेयाचीय दक्षीणीली पाळी दांडी खालावीली:' - गोप्र ७७.

**खालाळी** स्त्री. खालचा भाग : 'ते नेउनि खालाळीए - खालि घोडेयापासि घातलें :' - गोप्र १८.

**खालिली** वि. नंतरच्या : 'अधर्मातव खालिली युगी जन्म।'-श्रीचक्रसि १.३

**खाली** वि. १. रिकामा; रिता : 'गडकरी यार्णी राजमंदिर म्हणून खाली न ठेवावें.' - मराआ ३२. २. वृथा; वाया : 'एक गोळा खाली न जाय असा मारितो.' - ऐलेसं ६.२५१५. ३. रिकामा; न गुंतलेला; न अडकविलेला; बिनउद्योगाचा : 'खाली घरीं बसून बंदोबस्त होणें ही गोष्ट निराळीच आहे.' - ऐलेसं ६.२०४६. ४. मोकळे : 'सावनूर खाली पडतें.' - ऐलेसं ८००.[हिं.] (वा.) (शब्द) ० **पडू न देणे** - व्यर्थ होऊ न देणे.

**खाली-ले** शअ. क्रिवि. १. खालती; अधोभागी; तळाशी; बुडाशी. २. (ल.) खालच्या दर्जात, पदवीत, ताबेदारीत, हुकमतीत. ३. आटोक्यात; टप्प्यात. (समासात) कामा - खेळा - कष्टा - मस्करी खाली = काम इ. करीत असताना. जसे : - कामाखाली दिवस जातो. ४. काही एका प्रतिष्ठित किंवा अप्रतिष्ठित नावाखाली. (क्रि. विकणे, मोडणे.) (वा.) ० **पडणे** - १. सवय लागणे; वहिवाटीत, राबत्यात पडणे. २. रद्द होणे; निरुपयोगी होणे. ३. शांत होणे. ० **येणे** - कमी होणे : 'चांदीचा भाव खालीं आला.' - के १०.६.३०. ० **राहणे** - बाकी शिल्लक राहणे.(जीव) **खालीवर होणे** - अतिशय काळजी लागणे. **एकाखाली एक** - एकाखालती दुसरे; खालोखाल; एका बरोबर दुसरे (चांगल्याबरोबर वाईट या अर्थी). **खाली बसणे** - खचणे; धीर सुटणे.

**खाली** पु. (संगीत) तालाच्या संदर्भात ज्याला काल म्हणतात तो. तालाच्या आवर्तनात टाळीनंतर हात दूर करण्याची क्रिया. तालाच्या मात्रासंख्येत विवक्षित मात्रेला 'काल' किंवा सर्वसाधारण भाषेत 'खाली' असे म्हणतात.

**खाली खटला** बाजारबुणगे; सामानसुमान इ. बाडबिछाईत, वस्त्रपात्र, चीजवस्तू (सैन्याचे.).

**खालीचिठी** स्त्री. (नाविक) गलबतात सामान भरण्याचा किंवा रिकामे करण्याचा परवाना.

**खालीपण** न. रिकामपण; फुरसत. (व.)

**खालीपिली** वि. क्रिवि. निष्कारण; निराधार; व्यर्थ; रिकामा; पोकळ; उगीचच्या उगीच.

**खालीबार** पु. वायबार. (क्रि. मारणे, टाकणे.)

**खालील** वि. १. तळासंबंधी; अधोभागासंबंधी. २. ताबेदार; आज्ञांकित; हाताखालचा. २. हलक्या दर्जाचे; निकृष्ट.

**खालीलाकडे** क्रिवि. पूर्वेकडे. पहा : **गंगमोहरा**

**खालीवर** क्रिवि. १. उलथापालथा; उफराटा सुफराटा; खालतीवरती, खाली व वर. २. अडखळत, ३. डमळीत. (वा.) ० **आंथरणे**, ० **घालून निजणे**, ० **पांघरणे** - एकच अंथरुण अर्धे अंगावर घेऊन निजणे.

**खालोखाल** क्रिवि. काही अंशी कमी; किंचित न्यून; योग्यतेने किंचित कमी (खूण, वय, आकार यात). [खालीचे द्वि.]

**खालौता-ती** क्रिवि. खालती; खाली : 'मुखें करुनि खालौतिं ।' - रास १.६७५.

**खाल्ला, खाल्लेला** खाणे या क्रियापदाचे भूतकाळवाचक रूप. (वा.) **खाल्ल्या घरचे वासे मोजणे** - कृतघ्नपणा करणे; कृतघ्न होणे. (ज्याचे अन्न खावे, त्याला जर वाईट स्थिति आली आणि त्याला घर विकण्याचा प्रसंग आला, तर घराची किती किंमत येईल हे पाहण्याच्या दृष्टीने त्याचे वासे मोजणे म्हणजे त्याचे वाईट चिंतणे) : 'शिवाजीस माणसाची परिक्षा चांगली होती. त्यामुळें त्यानें हातीं धरलेल्या माणसाच्या पुत्रपौत्राकडूनहि.... खाल्ल्याघरचे वासे मोजण्याचें नीच कृत्य घडलेलें नाहीं.' - निबंधचंद्रिका.

**खाल्लाकडन** क्रिवि. सपाटीच्या बाजूने; सखल भागाकडून. (माण.)
**खाल्लापिल्ला** वि. मिंधा.
**खाल्लेधाले** वि. संतुष्ट : 'मन सदां खाल्लेंधालें आहे.' - बाळ २.१८१.
**खाल्ल्या** पहा : **खाली** (बाग.)
**खावगॉ** वि. अधाशी; खा खा करणारा. (गो.)
**खावचे** सक्रि. १. खाणे. २. (ल.) नागविणे. (गो.)
**खावट-खावाड** वि. १. अधाशी; खादाड; २. लाचखाऊ.
**खावटी** स्त्री. १. जेवणखाण; भोजन; खाणेपिणे. २. पोटगी; अन्नवस्त्र; खाण्याबद्दलचे पैसे. ३. अन्नसंग्रह; खाद्यपदार्थांचा साठा. ४. (शाव्य.) आहारभत्ता; रोजच्या खाण्यापिण्यासाठी दिलेला भत्ता; निर्वाहासाठी दिलेला पैसा.
**खावटे** न. खाऱ्या शेताचा समुद्राकडील तुटलेला बांध; फुटलेल्या बांधाची मधली कड, फूट, भेग. (गो. कु.)
**खावड** स्त्री. खरडपट्टी. (क्रि. काढणे.)
**खावड** स्त्री. (गुरांचे) खाणे; खाद्य. (गो.)
**खावडे** न. १. नांगरलेल्या किंवा पेरलेल्या शेतातील बिननांगरलेली अथवा बिनपेरलेली जागा; लागवडीच्या शेतातील ओसाड जागा. २. लेखातील न लिहिलेली, कोरी जागा. ३. (सामा.) रिकामी जागा, तुकडा, भाग. ४. चालू कृत्यात खंड (पावसाची सर इत्यादींमध्ये). [सं. खंड.]
**खावणी-नी** स्त्री. १. मनोधर्म; मनोगत : 'कीं जाणतुसि खावनी । वल्लभाची ।' - ऋ ३४. २. हेतू; उद्देश; इच्छा : 'आतां यांचें सिंपनेयांची खावणियां । माते पुसा पां ।' - शिव ६९५.
**खावणे** उक्रि. गमावणे; दवडणे. (व.)
**खावन** पु. नर. (झाडी.)
**खाव(ऊ)निंदक** वि. कृतघ्न; खाल्ल्याघरचे वासे मोजणारा.
**खावराडिवरा** वि. १. आड येईल त्याची व्यवस्था लावणारा; खाण्यास, फस्त करण्यास सदा तयार. २. चलाख; हुषार; तल्लख; आवेशी; साहसी; उत्साही. ३. (चुकीने) खावराबावरा. ४. मारकुटा; रागीट; तापट; कडक. (व.)
**खावराबावरा** वि. भय, राग अथवा आश्चर्य यांनी गांगरलेला. पहा : **कावराबावरा**
**खावं(विं)द** पु. १. यजमान; सरकार; महाराज; स्वामी; शास्ता : 'आम्हीं जो जाबसाल सांगतों तों खावंदाचे मर्जीस येत नाहीं.' - भाब ६. २. मालक; धनी : 'बाबाजी पाटील निमे मोकदमीचा खावंद.' - चंद्रचूड दप्तर १.२०. [फा.]
**खावंदड** स्त्री. दुखापत. (व.)
**खावं(विं)दी, खावं(विं)दीगिरी** स्त्री. स्वामित्व; खावंदगिरी; धनीपणा; साहेबी : 'इंग्रजांचे दौलतीवरदेखील मालकीयत व खाविंदी राहील.' - दिमरा १.२०७. 'खावंदगिरी कशी असते व सेवा कशी हें पुर्ते ठाऊक नाहीं.' - मइसा १४.४३. [फा.]
**खावान** वि. खाण्याचे; खाण्यालायक (वस्तू, पदार्थ इ.). (खा.)
**खावास** पु. ब्रह्मराक्षस : 'पिंपळेश्वरीं खावासा दर्शन ।' - स्थापो १८.

**खाशत-द** स्त्री. सवय; स्वभावदोष. (व. ना.) [फा. खासियत]
**खाशा** वि. १. औरस; सख्खा. (गो.) २. उच्च वर्गाचे; प्रतिष्ठित. निवडक. ३. यजमान व त्यांचे कुटुंब.
**खाशानिशा** सना. स्वतः; जातीने.
**खाशानिशी** क्रिवि. (खासचा प्रयोग.) जातीने; खुद्द; स्वतः : 'मग भाऊसाहेबांनीं निश्चय केला कीं, या उपरि गिलचा खाशानिशीं मारीन.' - भाब २१६. [फा. खास]
**खाशी** उद्गा. शाबास; सुरेख; वाहवा; छान; उत्तम; नामी. [फा. खासा]
**खाशी** वि. पुरेपूर; निवडक. पहा : **खास** [फा.]
**खाशी स्वारी** स्त्री. १. यजमान; धनी; राजा. २. खाशा लोकांची मिरवणूक ३. (थट्टेने) स्वत; मी. [फा. खास]
**खाष्ट-ष्टी** वि. १. द्वाड; दुष्ट; तामसी; त्रासदायक; कजाग. २. कुरकुऱ्या; सदोदित निंदा करणारा (माणूस, स्वभाव). ३. कठीण; अवघड (काम, अभ्यास).
**खाष्टायन** वि. खाचखळग्यांनी युक्त; संकटात नेणारी : 'भद्रजाती मदमछर। खाष्टायन ।' - ज्ञाप्र २६८.
**खाष्टे** न. खाच; वेडावाकडा खळगा; खड्डा.
**खास** क्रिवि. १. खचित; निखालस; खात्रीने; निश्चयपूर्वक. २. बरोबर; तंतोतंत. ३. खुद्द; स्वतः; जातीने. ४. मुलखावेगळा; अपवादात्मक. वि. १. राजा किंवा राज्यासंबंधी; सरकारी. २. स्वतःचे; खाजगी. (समासात) खासपथक, खासपागा. ३. शुद्ध; अस्सल; खरा; चांगला. ४. विशेष; विशिष्ट. ५. निवडक; थोरथोर; उच्च. सामान्य सामासिक शब्द राजकीय अथवा सरकारी या अर्थाचे व काही स्वतःचे किंवा जातीचे या अर्थाचे खासकोठी - खास - खजाना - सरंजाम- जामीन - नेमणूक इ. [फा.]
**खास, खासखोस, खासणी-र-री** हे शब्द **'खाच, खाचखोच'** इ. शब्दांऐवजी योजिले जातात.
**खास-सी** स्त्री. ढास; खोकला. [सं. कास]
**खास आमदानी** नियमित पीक, उत्पन्न. याच्या उलट शिवाई आमदानी = जादा पीक. ऐन आमदानी हा शब्दही कधीकधी या अर्थाने योजतात.
**खास खबर** १. विशेष वार्ता; खात्रीलायक बातमी. २. सरकारी बातमी.
**खासखेल** वि. सेनाखासखेल; सेनापती : 'एक सेनापती जन्मला । खासखेल सयन ।' - ऐपो ७९.
**खास(ज)गत** वि. १. स्वतःचा; आपला; खाजगी. क्रिवि. जातीने; खुद्द.
**खासगत राजश्री** (जमाखर्च) मालकाच्या नावामागे लावतात.
**खास(ज)गी** स्त्री. राजाची किंवा एखाद्या गृहस्थाची स्वतःची जिंदगी; व्यवहार (राज्याचा, संस्थेचा नव्हे असा.). वि. व्यक्तिगत; स्वतःचा. [फा. खाजगी]
**खासगीचा** वि. स्वतःचा; खासगत (पैका, कारकून, खर्च इ.) (वा.) ० **उतार पोषाख देणे** - स्वतःच्या अंगावरील पोषाख उतरून तो देणे. हा मोठ्यातला मोठा बहुमान मानला जात असे : 'तुम्ही चाकरी चांगली

केलीत. सबब तुम्हांस बहुमान खासगीचा उतार पोषाख व अंगठी पाठविली आहे.' - ऐलेसं ४२००.

**खास जमीन** १. जमीनदार खुद्द करीत असलेली जमीन. २. जिचा वसूल प्रत्यक्ष सरकार वसूल करते अशी जमीन.

**खासडणे** सक्रि. कडकपणे बोलणे; दम देणे; जोडे मारणे : 'गंप्याला खासडला तेव्हा म्हणू लागला आपण असं काही बोललो नाही.' - लव्हाळी २४.

**खासडा** पु. १. जोडा; पायपोस (जोडा मारण्याच्या प्रसंगी योजतात). २. प्रहार; आघात; मार (मुख्यत्वे भाल्याचा.) (क्रि. मारणे, बसणे.)

**खासडेमार** पु. फाल्गुन वद्य प्रतिपदेची (धुळवडीची) जोडाजोडी, खेटराखेटरी.

**खासणे** अक्रि. १. खोकणे; ढास लागणे. २. वानराचे ओरडणे. (व.) [हिं. खासना]

**खासदार** पु. संसदसदस्य; लोकसभेचा किंवा राज्यसभेचा सभासद.

**खास(ज)दार** पु. १. मोतद्दार; घोडेवाला, पाग्या : 'पांडवघरचा खासदार हा, ती कंसाघरची दासी।' - राला ४३. २. शरीरसंरक्षक; हुजरातीतील एक असामी. ३. पूर्णपणे अंकित किंवा अधीन म्हणून मानलेल्या माणसाला थट्टेने किंवा सलगीने म्हणतात. (चाकर, बायको, सोबती, भक्ताधीन देव इ.) [फा.]

**खासनिशी** स्त्री. खाजगी कारभाऱ्याचे काम : 'बाजी मुरार यांचे नातू हे खासनिशी करून.... राहिले.' - मराचिसं १.

**खासनीस, खासनवीस** पु. खासगी कारभारी; सरकारी हिशेबनीस.

**खासबंदी** स्त्री. खेड्यांतील काही घराण्यांत वाटून दिलेली जमीन व प्रत्येकीचा काही ठोकळमानाने ठरविलेला सारा.

**खास बाल** स्त्री. वाळू, चिकटमाती यांच्या मिश्रणाने बनलेली जमीन. ही खतावल्यास चांगले पीक देते.

**खास बिघा** पु. खासबंदी गावातील कुळांच्या जमिनीचा धारा ठरविण्याचे माप; मोजणीमाप.

**खास(च)र** न. ओझी वाहण्याचा मोठा गाडा. खटारा. (व. ना.)

**खासह-खल** पु. खाशाचा घोडा; एक किताब.

**खासा** वि. १. चांगला; नामी; उत्कृष्ट; शेलका; उंची; अभिजात; नामांकित; श्रेष्ठ : 'पांडव म्हणती तुज खासा ।' - दत्तपदें ४१. २. राजा, अमीरउमराव, सरदार यासंबंधी : 'खासियाचे पलंग।' - ऐपो १५. ३. मुख्य; प्रधान; श्रेष्ठ; नायक : 'अहो खासा राहे यदुतिलक अंबापरिसरीं।' - सारुह ७.८८. ४. औरस; कायदेशीर; उच्चकुलीन; सख्खा. (गो.) पु. १. मोठ्या व्यक्तीचे प्रत्यक्ष नाव न घेता, संकेताने सुचविताना, नोकरलोक धन्याला उद्देशून वापरतात (अनेकवचनी.) जसे :- खासे कोठे आहेत? २. पती; नवरा : 'हंसाबाई! तुमच्या खाशांची शिस्तच मोठी कडक !' - स्वप ४६. [फा. खास]

**खासाड** न. (प्र.) खाचाड. वेडेवाकडे, मोठे भगदाड, खड्डा.

**खासियत** स्त्री. गुण; धर्म; स्वभाव; वैशिष्ट्य.

**खास्त** क्रिवि. १. निखालस; खात्रीने; २. बरोबर; तंतोतंत. पहा : **खास**

**खास्त** स्त्री. आकस; खुनशीपणा; द्वेष; छळवाद. (क्रि. धरणे, करणे.) [फा. खिस्सत = दुष्टपणा] (वा.) **खास्तीला लागणे, पेटणे** - त्रास देणे.

**खास्त-स्ती** स्त्री. १. खंत; झुरणी. (क्रि. घेणे, धरणे, करणे.) २. मनात अढी धरून दोष काढणे; सतत तिरस्काराने निंदा करणे; रागे भरणे. (क्रि. करणे, लावणे, मांडणे, बांधणे, चालवणे.) [फा. खिस्सत]

**खास्त-स्ती, खास्त(स्ती)खोर** वि. खाष्ट; द्राष्ट; तुसडा; निंदक; सदोदित चिडून कुरकूर करणारा. २. आकसखोर; खुनशी; दावा धरणारा; मत्सरी. [फा. खिस्सत]

**खास्त-स्ती** स्त्री. बाणाचा किंवा तोफेच्या माऱ्याचा टप्पा : 'श्रीमन्महाराज उभयतां बाणाचे खास्तीवरी उभे राहून...' - पया ३९३; 'खासा मालोजी शिंदे बाणाची खास्त निघाले होते.' - भाब ६३. [फा. खास्तन = उभे राहणे, उठणे.]

**खाळ** पु. गटार; मोरी; पाण्याचा स्वाभाविक किंवा कृत्रिम पाट; कालवा; नळ; खाच; खाई.

**खाळकुवा** पु. घाण पाण्याचे टाके; डबके; तारदखाना : 'मोऱ्यांतील खाळकुव्यांतील पाण्यांत चुना घातल्यानें जंतू मरतात.' - सेंपू १.१९७. पहा : **खोळ** (को.)

**खाळणे** न. नकसगाराचे एक हत्यार.

**खाळा** पु. गलबला; गोंगाट; गडबड. (क्रि. मचविणे.)

**खांकचे** क्रि. खोकणे. (गो.)

**खांचना** वि. तुच्छ; कमी प्रतीचा; हलक्या दर्जाचा.

**खांचरी** स्त्री. १. लावणीसाठी तयार करायची भाताच्या रोपांची खोलगट जमीन; मोठे खाचर. २. उसाचा लहान मळा. (गो.)

**खांजणी** स्त्री. पाढे इत्यादींचा मिळवणीचा एक प्रकार; एक प्रकारची बेरीज. ही पूर्वी शाळेत शिकवीत. [सं. खंडन]

**खांजणीभांजणी** स्त्री. १. बेरीज आणि वजाबाकी; गुणाकार आणि भागाकार (अनेकवचनी प्रयोग.) २. (ल.) देवघेवीमध्ये नफातोटा सोसून एकमेकांच्या विचारें केलेली सरासरी तोड. ३. अडचणीत सापडलेल्या गिऱ्हाइकाकडून येणाऱ्या रकमेत दिलेली सूट. ४. (ल.) क्षयवृद्धी; उत्पत्ति-संहार : 'खांजणीभांजणीचे समजावें। मूळ तैसें ।' - दास १५.४.१८.

**खांजळणे** सक्रि. खाजवणे : 'सारी डोकी खांजळत होती.' - बारी ४१.

**खांटयाँ** पु. सोनाराचा लहान घण, हातोडा. (गो.)

**खांटोळी, खांडपोळी** स्त्री. तांदळाच्या रव्याचे केलेले एक पकान्न; खांडव्याच्या वड्या. (हेट.)

**खांड** पु. लहान दगडी पूल; सांडवा. (गो.)

**खांड** स्त्री. १. ताली, बंधारा, भिंत यांतील भेग, तडा, चीर, भोक. २. कातरा; सड; दाता; खरा (तरवार, विळा यांच्या धारेवरील). ३. दातांमधील फट.

वि. भंगलेले : 'असावें का खांड देउळीं ।' - भाए ४९३. [सं. खंड.]

**खांड** न. टोळी; दाटी; कळप (बकरी, मेंढ्या यांचा).

**खांड** न. १. भक्कम व चौरस किंवा साधी तुळई, तुळवट. २. एखाद्या वस्तूचा तुकडा (सुपारी, बिब्बा, हळकुंड, चंदन, गोवरी इ.) : 'ऐसें हे

सेंड्या कडिल खांड ।' - दास २०.३.४. ३. झाडाचा ठोकळा, भाग. ४. शेताचा तुकडा. ५. धान्याचा चुरा; कळण.

**खांड** स्त्री. खांडसरी साखर; पिवळसर व भरड गुळी साखर. ही थोडी आंबूस असते : 'खाये खीर खांड ।' - तुगा ४२९.

**खांड** न. अवयव; तुकडा : 'यांचे लांब खांड तें मुहुरी एव्हडें करावें.' - दृपा ६.

**खांड** पु. तरवार. पहा : **खांडा**

**खांडक** न. अंगावरील फोड; गळू.

**खांडक** न. दगडाचा तुकडा : 'बाईच्या गर्भाशयात खांडकासारखा गोळा झाला आहे.' - माआ ९.

**खांडक(ग)ळी, खांडगाळी** स्त्री. सुवासिनी स्त्रीला रांड, बोडकी या अर्थाची शिवी.

**खांडकापी सुपारी** स्त्री. कचरी, काचरी सुपारी. सुपारी कोवळी असता शिजवून व राप (सुपारीच्या काचऱ्या शिजविलेले पाणी) शिंपडून उन्हात वाळवितात व काचऱ्या काढतात.

**खांडकी** स्त्री. दगडाचा फोडलेला मोठा तुकडा; चीप; कळपा; फाडी. इमारतकामातील खांडकीची पुढील चौरस बाजू घडीव असून मागील उतरती व अणकुचीदार असते.

**खांडके** न. उसाचे कांडे; तुकडा : 'तुझी खांडकी करवीन.' - वज्रा २६.

**खांडकेला** वि. गळू, गाठ, खवडे इ. झालेला.

**खांडक्या** वि. (गुऱ्हाळ) उसाचे तुकडे करणारा; पेरुळ्या.

**खांडखापर** न. वस्त्राचा तुकडा आणि खापराचे भांडे; संसार; प्रपंच : 'तो खांडखापरा मुचला ऐसे जाणावे :' - लीचपू १.

**खांडचोर** पहा : **खाणचोर-री**

**खांडडोह** पु. १. उन्हाळ्यात नदीचा प्रवाह आटल्यामुळे प्रवाहाला मध्ये मध्ये पडलेले खंड; खंडित डोह; खांडवा. २. (चुकीने) पाण्याच्या प्रवाहातील खोल जागा (कोठली तरी). सामान्यत: अनेकवचनी प्रयोग. (क्रि. पडणे.)

**खांडणावळ** स्त्री. खणणावळ; खणण्याची मजुरी.

**खांडणे** उक्रि. १. मोडणे; जोराने तोडणे; छेदणे; छाटणे; खापणे; काटणे; खंडणे : 'समिधा तो खांडुं लागला।' - वसा ६१. २. खणणे; खोदणे : 'उपनिषदर्थाची माळी । मार्जी खांडिलीं॥' - ज्ञा १८.३५. ३. (ल.) कुरतडणे; चावणे. ४. जेवण्याचे पान अथवा द्रोण करण्यासाठी पोफळीच्या झाडाची पोय, विरी, पाने कातरणे, छाटणे. (राजा.) ५. खांडवीच्या, बर्फीच्या वगैरे वड्या, खापा पाडणे. ६. (ल.) निरास करणे : 'मा तर्काचें खुरपें । खांडे कोणा ।' - अमृ ६.२४. ७. (ल.) अडविणे : 'सर्पें वाट खांडिली ।' - वसा ५९. ८. वेगळे करणे; पृथक् करणे : 'कां चांचूचेनि सांडसें । खांडिजे पय पाणी राजहंसें ।' - ज्ञा ९.४४. [सं. खंडन] (वा.) **सडा खांडणे** - (वासरू किंवा करडू यांनी) सड, थान किंचित कुरतडणे, चावणे.

**खांडतुळई** स्त्री. तुळवट.

**खांडतोळी** स्त्री. तांदळाच्या कण्यांचे एक पक्वान्न; खांडवी. (राजा.)

**खांडदोर** पु. बैलास बांधायचा दोर. (व.)

**खांडपाट** पु. पाटाचा बांध : 'उसाच्या पाल्याची पर्वा न करता खांडपाटानं आडवीतिडवी पळत होती.' - गोता ४६.

**खांडपासोळा** पु. खुनशी, आकसखोर मनुष्य.

**खांडपोळी** पहा : **खांटोळी** : 'तुम्ही ह्या कण्यांची खांडपोळी करा.' - सचित्रे १.५१.

**खांडफाडोळी** वि. एका बाजूला फासळी कमी असलेले (जनावर). (व.)

**खांडबच्ची-बाकी** स्त्री. मेंढरांच्या चरण्याबद्दलचा कर किंवा पट्टी. मेंढरांच्या चरण्याबद्दल त्या धनगराला एक मेंढरू जमीनमालकाला देणगीकर म्हणून द्यावे लागत असे, त्यालाही खांडबच्ची म्हणत.

**खांडमिशा** स्त्री. अव. १. दाढी व मिशा. २. चाई लागलेल्या, अर्धवट काढलेल्या, जागजागी खंड पडलेल्या, ओठाच्या खळग्यात खंड पडलेल्या मिशा : 'युद्धीं खांडमिशा बोडी । हे आपरवडी त्वां केली।' - एरुस्व १३.११.

**खांडरागखांडव** पु. एक प्रकारचा मोरंबा.

**खांडव** न. वठार; आळी; पाट; गावाचा भाग. [सं खंड]

**खांडव** पु. (संगीत) अवरोह. (क्रि. करणे.)

**खांडव** पु. लग्नात विडे, सुपारी वाटण्यासाठी केलेली कापडाची (खणाची) झोळी.

**खांडव-वा** पु. १. नदीच्या प्रवाहात पडलेली भाटी; खांडडोह. २. नदीचे शुष्क पात्र, डोह.

**खांडवा** पु. कळप : 'हरणांचा एक खांडवा चौखूर उधळत आला.' - शिस २९.

**खांडवी** स्त्री. वाळवलेल्या खाऱ्या मासळीचा तुकडा.

**खांडवी-वे, खांडवीपो(बो)ळी** स्त्री. न. पु. १. तांदळाचा रवा काढून त्यात गूळ, खोबरे, लवंगा, वेलदोडे इ. घालून त्याच्या वाफेवर शिजवलेल्या वड्या. या तुपाबरोबर खातात. (को.) २. गूळ, पीठ, नारळाचे दूध एकत्र करून शिजवून करतात ते पक्वान्न.

**खांडसरी साखर** स्त्री. साफ न केलेली, शुभ्र न केलेली साखर; अर्धवट मळी काढून टाकलेली साखर; गुळीसाखर.

**खांडसाखर** स्त्री. १. एक प्रकारची गुळी साखर. २. खडीसाखर.

**खांडा** पु. १. शस्त्राच्या, हत्याराच्या धारेला पडलेली खाच, खरा, कातरा, दात. २. खबदाड; बळ; चर; ओहळ. [सं. खंड.]

**खांडा-डे** पु. १. रुंद पात्याची, दुधारी, सरळ व वाटोळ्या टोकाची तरवार. पहा : **खंडा** : 'वोडन खांडें घेतलें करीं ।' - एरुस्व १२.१२६.

**खांडा(डे)ईत** वि. खांडा बाळगणारा; खांडेकरी (शिपाई).

**खांडादांडा** पु. तुळई, वासे इ. : 'चिमण्यापाकोळ्यांची घरटी जागजागी खांडेदांड्या होती.' - बाब ८५.

**खांडार** न. (खांड याचा अतिशय) मोठे भगदाड; भेग; चीर; खिंडार.

**खांडाराणी** स्त्री. (पूर्वी रजपूत राजे वगैरे आपल्या तलवारीशी स्त्रियांचे लग्न लावून त्यांना आपल्या स्त्रिया मानीत, यावरून) उपस्त्री; उपराज्ञी : 'हरकबाई ही मल्हाररावाची खांडाराणी 'मावशीबाई' या नांवानें

आहिल्याबाईजवळ राहत असे.' - मरिगु २.१८.

**खांडावा** पु. खंड; तुकडा : 'याणीं मध्यें बेलाशक घोडी घालून अगदीं खांडावा तोडला.' - भाब १३९.

**खांडिवा** पु. एक खाद्य पदार्थ (खांडोळे) : 'खीरी घारिया : अमृतफळे : खांडिवे : कालण दुधदही अपार आणिले :' - लीचउ ८३.

**खांडी** स्त्री. १. खिंड. २. शरीरावरील खवंद, व्रण, क्षत. ३. दातातील फट : 'तैसें खांडीहूनि लाळे । पडती पूर ।' - ज्ञा १३.५६८.

**खांडी** स्त्री. खांडा; तरवार : 'लखलखितें खांडीं ।' - शिव १०३८.

**खांडी** स्त्री. १.नदीच्या कोरड्या पात्रातील पायवाट : 'गोसावी भोगवतीचीए खांडीहुनि बीजे करिताति :' - लीचपू १०५.२. गावाची वेस, वेशीचे दार : 'पारके आले म्हणौनि चाऱ्ही खांडी पडिलिया :' - लीचपू ३६८.३. धान्य मोजण्याचे एक माप : 'खांडीएचे उंडीए कां एइल?' - लीचपू ४३७.

**खांडु(ड)केला** वि. खांडकांनी ग्रस्त, व्याप्त; गळवांनी पिडलेला.

**खांडुवा** पु. भिक्षेची झोळी : 'आढाभरि यां आपुलां खांडुवा धुवविला:' - लीचउ ८२.

**खांडुळे** पहा : **खांडोळे**

**खांडूक** न. १. गळू; गलंड; गाठ : 'खांडुक जाल्या किडे पडती ।' - दास १.१०.५२. २. फुटलेले गळू; वाहणारे क्षत. ३. हाडावरील उटंगळ; उठाणू. ४. खवडा; डोईतील फोड.

**खांडे** न. नदीच्या पात्रातील कोरडी जागा; खांडडोह.

**खांडेकर-री** पु. तरवार बाळगणारा शिपाई; खांडाईत : 'तीन शत उभे खांडेकर ।' - कथा ४.६.१७५.

**खांडेधुआवन** न. एक प्रकारचा कर; खंडणी : 'खांडेधुआवन मागे अंतराळीं ।' - शिव १६२.

**खांडेनवमी** स्त्री. नवरात्र उत्सवातील शेवटचा दिवस. या दिवशी शस्त्रांची पूजा करतात व कोंबडी, बकरी यांचा बळी देतात.

**खांडे भडाड** खणखणाट; तलवारीवर तलवार आपटल्याने होणारा आवाज : 'एक खांडे भडाड केवळा पुरुषार्थिलें ॥' - नरुस्व १०५७.

**खांडेश्री** स्त्री. खड्गरूपी लक्ष्मी : 'जया जगी खांडेश्री गाजे ।' - शिव ३५७.

**खांडोरे** (खांडचे लघुत्व) पहा : **खांड १, २, ३.**

**खांडोवा** पु. वस्त्राचा तुकडा : 'इया आपुला खांडोवा धुवविला.' - लीचपू १५५.

**खांडोळी** स्त्री. एक पक्वान्न. पहा : **खांडवी, खांडव**

**खांडोळे** न. १. खंड; तुकडा; भाग. २. छाटलेला तुकडा; खंड (जिवंत साप, किडा, प्राणी यांचा). [सं. खंडल] (वा.) **खांडोळी करणे** - तुकडे तुकडे करणे.

**खांते** न. कोनाडा; देवळी : 'तेथ परिसाळेचां पूर्वीली सीर खांते । तेथ गणेशु ।' - ऋ १०६. [सं. खन् = खणणे]

**खांद** स्त्री. झाडाची मोठी फांदी. (को.कु.)

**खांद** पु. स्पर्धा; चढाओढ.

**खांद** पु. १. खांदा; बाहुटा; (मनुष्य, पशू यांच्या) पाठीचा वरचा, मानेच्या पाठीमागचा भाग. हा ओझे वाहण्यासाठी उपयोगात आणतात. २. (ल.) सरावाने, अभ्यासाने झालेला राबता, परिचय किंवा सवय (पाहुण्यांच्या उपद्रवाची.) (क्रि. पडणे.) : 'आल्यागेल्याचा खांद नेहमींचा.' - खरादे २०१. ३. शेतीच्या तात्पुरत्या कामासाठी आणलेला बैल; टोणग्याच्या मेहनतीबद्दल द्यायचे धान्य, कडबा, भाडे. ४. ओझे वाहण्यामुळे खांद्याला पडलेला व्रण, घट्टा किंवा तशी स्थिती. (क्रि. पडणे, येणे.) ५. (ल.) आधार; आश्रय : 'खांदु मांडिजे धृती । त्रिविधा जया ॥' - ज्ञा १८.७३१. [सं. स्कंध] (वा.) ० **आवळणे** - (चर्म.) चामडे टांगल्यावर उलटे करावे लागते त्यावेळी साल व हिरडा मधल्या भागात राहावा म्हणून कातड्याच्या मानेजवळ दोरीने आवळणे. ० **चोरणे** - जुवाखाली खांदा न देणे, चुकारपणा करणे. ० **पाडणे** - सवय लावणे. **एखाद्याशी खांद बांधणे, करणे** - बरोबरी करणे, टक्कर देणे, मारणे; स्पर्धा चालविणे. ० **शिवणे** - (चर्म.) चामडे उलटे केल्यावर त्याचे एक तोंड उघडे असते, ते शिवणे. ० **सोडणे** - (चर्म.) खांद शिवल्यावर दोरी सोडून टाकणे.

**खांद अढी** (मल्लखांब) मल्लखांबाला खांदा लावून मारायची उडी.

**खांदकरी** वि. १. तिरडी अथवा प्रेत खांद्यावर वाहून नेणारा. २. (क.) ओझेकरी; खांद्यावरून सामान नेणारा.

**खांदकार** वि. पालखी, प्रेत इत्यादींना खांदा देणारा. (गो.)

**खांदकुवा-हा** पु. १. खांद्यावर भोवरा असलेला घोडा. २. खांद्यावरचा भोवरा, घोड्याचे एक अशुभ लक्षण.

**खांदखोड** पु. कानाच्या मागच्या बाजूला असणारा एकच भोवरा. (माण.)

**खांदचोर, खांदयेकर** पु. घर फोडणारा चोर. पहा : **खाणचोर**

**खांदजोड-डी-ड्या** स्त्री. ज्याचा खांदा दुसऱ्याशी जुळतो असा माणूस, जनावर इ.; खांद्याचा मेळ.

**खांदडणे** उक्रि. खांद्यावर घेणे. पहा : **खांदाडणे**

**खांदणी** स्त्री. खणण्याचे काम : 'खांदणीसाठी होते त्या गड्यात एक यल्लापा महार होता.' - व्यंमाक १४२.

**खांदणीबांधणी** स्त्री. (खोदणे व बांधणे) जुने वरंबे फोडून त्यातील माती उसाला चढवणे. यामुळे उसाला आधार मिळतो.

**खांदणे** उक्रि. खणणे; खोदणे. [सं. खन्]

**खांदत** स्त्री. खणण्याचे काम : 'पावात विहीर सुरू झाली. सुरू झाली म्हणजे खांदत सुरू झाली.' - व्यंमाक १४२.

**खांदल(ळ)णे** सक्रि. डोक्याला विश्रांती देण्यासाठी डोक्यावरचे ओझे खांद्यावरून नेणे.

**खांदला** पहा : **खांदा** : 'मी का त्याच्या खांदल्यावर बसून गेलो असतो?' - पडघ ८९.

**खांदव(प)खाल** स्त्री. खांद्यावरची पखाल : 'सांधीजेती चंद्राचा खांदवखालीं ।' - शिव ३०६. [सं. स्कंध]

**खांदवटा** पु. १. खांदा व त्या लगतचा भाग. २. खांद्याची ताकद.

**खांदवडा** पु. शेतीसाठी तात्पुरत्या आणलेल्या बैल वगैरेच्या मेहनतीबद्दलचा मोबदला. पहा : **खांद** ३. (क्रि. करणे.)

**खांदसा** स्त्री. ओझे वगैरे वाहण्याची किंवा काही सहन करण्याची सवय, अभ्यास, सराव.

**खांदा** पु. १. बाहुटा (बाहुमूलापासून ग्रीवामूलापर्यंत.). २. जू ठेवण्याची जनावराच्या मानेवरील जागा. ३. फांद्या फुटतात तो झाडाच्या खोडाचा भाग. ४. खांद्याचे काम; घाव (खांदकरी लोकांत रूढ). ५. ओझे वाहून नेण्याची पाठीच्या वरची अगर खांद्याची जागा. ६. परिचय; सवयीने आलेली गोष्ट; झालेला अभ्यास; राबता; सराव. (क्रि. पडणे.) ७. लांब फांदी (झाडाची). (कु.) ८. (नाविक) गलबताचा विस्तार करण्यासाठी रोजाच्या पुढील टोकाला जोडतात ती लाकडे. पट्टण व खांदे यांच्यावर फळ्या जोडतात. [सं. स्कंध] (वा.) ० **टाकणे** – जुवाला जनावर जुंपल्यानंतर जू न ओढता जनावराने खाली बसणे. (बे.) ० **देणे** – प्रेताला खांद्यावरून वाहून नेणे. ० **पडणे** – रुळणे; सवय होणे. **खांदामेखा देऊन काम करणे** – अंग मोडून झटून काम करणे. ० **येणे** – अति श्रमाने बैलाची मान सुजणे. **खांद्याखाली पदर टाकणे** – स्त्रीने निर्लज्जपणाने वागणे. **खांद्याला खांदा भिडविणे** – एकजूट करणे. **खांद्यावर घेणे** – मस्तकी धारण करणे. **खांद्यावर मेखा, गाठोडे देणे** – नोकरीवरून, कामावरून बडतर्फ करणे; चंबूगबाळ्यानिशी घालविणे. **डोक्यावरचे खांद्यावर येणे** – दुस्सह ओझे (कर्ज इत्यादीचे) दिल्याघेतल्यामुळे हलके होणे. **खांद्यास लागणे** – तिरडीला खांदा देणे.

**खांदा** पु. हस्ता; तुकडा. (व.) [सं. खंड.]

**खांदाखांद** पु. स्त्री (खांद्याशी खांदा) स्पर्धा; बरोबरी; तोलासतोल; तोडीसतोड.

**खांदाज-जी** पहा : **खानदान**

**खांदाड** न. १. मोठा खांदा. २. मोठी फांदी.

**खांदाडकरी** पु. खांद्यावरून माल वाहून नेणारे : 'खांदाडकरी बाजारात जातील त्यास हासील जकातीचा न घेणें.' - पुरंदभा ३.१००.

**खांदाडणे** सक्रि. १. खांद्यावर ओझे घेणे. २. (ल.) एखादे काम अगर जबाबदारी अंगावर घेणे; भांडणतंटा उकरून काढणे, पत्करणे.

**खांदाडा** पु. झाडाची मोठी फांदी. (राजा.)

**खांदाडी** स्त्री. १. अर्धे पुढे व अर्धे मागे असे खांद्यावर वाहून नेण्याचे पडशीसारखे ओझे; खांद्यावर घेण्याच्या दृष्टीने बांधलेले ओझे. २. ओझे घेताना हा शब्दप्रयोग खांद्यालाच लावतात : 'हजारों जुने पंडित आपापले ग्रंथ खांदाडीस मारून दूरदूर देशीं पळाले.' - नि १०३३. (वा.) ० **घालून नेणे** – खांद्यावर वाहून नेणे. **खांदाडीस मेखा देणे** – चंबूगबाळे आटोपणे.

**खांदाडीभर** वि. खांद्यावर मावेल एवढे (ओझे) : 'खंडोबाचा उदो गाजवून कुटबी एकांदा हात मारील उडता, तर खांदाडीभर सोन्याचं डाग आणील.' - हपा २५.

**खांदी** स्त्री. चोरी. (गो.)

**खांदी** स्त्री. १. झाडाची फांदी; डहाळी; शाखा. २. पहा : **खांदा** [सं. स्कंध] (वा.) ० **देणे** – बैल अगर रेडा नांगरटीच्या कामासाठी मोबदला घेऊन देणे.

**खांदीगुंदी** क्रिवि. खोदून खोदून (विचारणे).

**खांदी झिम्मा** मुलींचा एक खेळ.

**खांदेकरी, खांदेवाईक** पु. १. खांद्यावरून ओझे नेणारा, वाहणारा; हमाल. २. प्रेत वाहणारा; खांदा देणारा.

**खांदेपालट, खांदेबदल** पु. १. खांदा बदलणे; ओझे एका खांद्यावरून दुसऱ्या खांद्यावर घेणे. २. एकमेकांना साहाय्य करणे, देणे. ३. एक अधिकारी जाऊन त्याच्या जागी दुसरा येणे; अधिकारपदांची अदला-बदल; पालट : 'राज्यकर्त्यांचे वारंवार होणारे खांदेबदल...' - पेद

**खांदेभेट** स्त्री. उराउरी भेटणे; खांद्याला खांदा लावून भेटणे : 'उभयतांची खांदेभेट झाली.' - राऊ १५३.

**खांदेला-ली** वि. १. खांद झालेला; ओझे वाहिल्यामुळे खांद्याला घट्टा अगर व्रण पडलेला (पशू, माणूस). २. खांदा देणारा; प्रेतवाहक.

**खांदोडा-डी** पहा : **खांदवडा** : 'कर्ज मिळण्याइतकी पत नसली किंवा कर्ज न काढतां निभण्यासारखें असलें तर ते दुसऱ्या कुणब्याशीं खांदोडी करतात.' - गांगा १४५.

**खांदोर** पु. एक प्रकारचे गाणे.

**खांदोल** स्त्री. खांदा देणाऱ्या माणसांची किंवा जनावरांची उंची सारखी असणे.

**खांदोली** वि. ज्याचा खांदा दुसऱ्याच्या खांद्याशी जमतो असा (बैल, भारवाहक).

**खांदोसा** पु. सहवास; साहचर्य; सांगड : 'या पौरोहित्याचा चक्रवर्तित्वाशीं सदा कांहींसा खांदोसा चालत आलेला आहे.' - विद्याभिवृद्धि १७०.

**खांदॉ-दो** पु. लग्नानंतर पंधराव्या दिवशी सासरी व तिसाव्या दिवशी माहेरी करण्यात येणारा लग्नविषयक विधी. (गो.)

**खांद्या** वि. १. खांद्यावर वाहून नेणारा. २. ओझे वाहणाऱ्याचा, विशेषतः प्रेतवाहकाचा सहसोबती. ३. प्रेतवाहक.

**खांद्याचा बैल** पु. ओझे वाहणारा बैल.

**खांपरोळी** स्त्री. खापरपोळी. (हेट. कु.)

**खांपॉ** वि. १. धाडसी; निष्णात. २. नावाजलेला. ३. बिलंदर; पूर्णतेला पोचलेला. (गो.)

**खांब** पु. १. इमारतीचा भार सहन करणारे, उथळ्यावर उभे केलेले अगर जमिनीत पुरलेले लाकूड; स्थूणा; सोट; स्तंभ; धिरा; आधार. २. (ल.) केळीचा खुंट. ३. (ल.) घरातील किंवा समाजाचा नेता; कर्ता पुरुष; आधारभूत गोष्ट : 'अवघ्या लोकांनीं हिंमत टाकिली खांब बुडाला दौलतीचा ।' - ऐपो १३४. (समासात) घुसळखांब - मल्लखांब. ४. (ओतकाम) समईचा मधला भाग. ५. (बीडकाम) चरकाच्या दोन्ही बाजूचे धिरे. [सं. स्तंभ] (वा.) **खांबाला डीक पाहणे** – खांबापासून डिंकाची अपेक्षा करणे; अशक्य गोष्टीची अपेक्षा करणे. उदा. कद्रू माणसापासून द्रव्याची अपेक्षा करणे; गारगोटीपासून दुधाची इच्छा करणे.

**खांब** वि. कायम; ठोकळ; स्थूल : 'रुजू होऊन खांब वसूलाची मुकासबाब व जकाती....' - बाबारो ३.१७१.

**खांबखांबाळ्या, खांबखांबोळी** स्त्री. मुलांचा एक खेळ. ह्यात सर्व

मुले एक एक खांब धरून राहतात व पुढे एकमेक आपापला खांब सोडून दुसरा पकडतात, ह्या वेळी मध्येच, चोर झालेल्या गड्याने दुसऱ्याला पकडले तर तो (पकडला गेलेला गडी) चोर होतो.

**खांबट** न. लहानसा खांब; किरकोळ, भक्कम नव्हे असा खांब, वासा.

**खांबटका** पु. खांबावरील चिन्हांकित ध्वज : 'खंबाटके आंदोलत। पडवळ काठिया डोलत।' - उह ६७.२८.

**खांबडी** वि. विशिष्ट प्रकारचा (भात); तांदळाची एक जात.

**खांबणी-ला-ली, खांबुला, खांबा** स्त्री. पु. १. घर इत्यादीचे पोटमांडणीचे लहान खांब; दुबेळके; कांभेरा. २. आखूड पुरलेला खुंट : 'खपरेल करावयास खांबण्या... ओमण इतकें सामान लागतें.' - मराठी ३ रे पुस्तक ६२ (१८७३). (राजा.)

**खांबला** पु. १. लहान खांब. २.(विणकाम) पातळाच्या काठाच्या गोमीच्या मध्ये जे तांबडे अगर हिरवे तार असतात ते.

**खांबली** स्त्री. १. लहान खांब. २. (गुऱ्हाळ) वाईनसळातून जमिनीत निघून गेलेल्या व वाईनसळास हालू न देणाऱ्या खुंट्या, मेखा; चरकाचे दालन व काथवट यांना जोडणारा भाग.

**खांबसूत्र** न. खांबसूत्राचा खेळ; कळसूत्री बाहुल्यांचा खेळ : 'संसार म्हणजे खांबसूत्र । चौऱ्यांशी लक्ष पुतळ्या विचित्र । त्यांचा सूत्रधारी ईश्वर । त्याचिया इच्छे वर्तिजे ।' - एरुस्व १२.३४.

**खांबाटणे** सक्रि. खांबाला बांधून टोचणे; एका जागी खिळवून टोचणे : 'आणियाळिया दिठी । ते मुनीमनाते खांबाटी ।' - उगी ४३.३६५.

**खांबारी** स्त्री. शिवणीचे झाड; श्रीपर्णी; भद्रपर्णी.

**खांबी** वि. खांदा मारणारा, देणारा. (गो.)

**खांबो** पु. खळ्यातील मळणीचा खांब; तिवडा. (गो.)

**खांबोटी** स्त्री. लहान खांब. पहा : **खांबट**

**खांबोल-ळी-ळे** न. स्त्री. १. भिंतीतील खांबासाठी ठेवलेली जागा. २. उत्सव वगैरे समारंभाच्या मंडपातील खांबाला आच्छादायचे वस्त्र. ३. तुळईखालच्या खांबाच्या टोकावर दोन आडव्या लाकडी तुकड्यांची अशी मांडणी; टिटवे.

**खांब्या** वि. खळ्यावर मळणी करीत असणाऱ्या बैलांपैकी तिवड्या-जवळचा, पहिलाच (बैल.).

**खांब्याखुरान** वि. हाडापेराने. (गो.)

**खांवक** न. खाऊ; खाण्याचा पदार्थ.

**खांवची** वि. खावयाची; खाण्याची (वस्तू, पाने इ.).

**खांसाड** न. वेडेवाकडे, मोठे भगदाड; खांचाड.

**खिउदा** स्त्री. भूक : 'म्हणे मज खिउदा लागली मोटी ।' - क्रिपु १२.८०. [सं. क्षुधा]

**खिओबणे** अक्रि. खवळणे : 'मग अब्राहावोंथें खिओबले ।' - क्रिपु ८.७७. [सं. क्षोभ]

**खिक्** दाबलेले हसू बाहेर पडताना होणारा आवाज. [ध्व.]

**खिकी** स्त्री. चेष्टा; टवाळी. (क्रि. करणे.)

**खिक्या-ख्या** स्त्री. अव. निंदेची, उपहासाची भाषणे, बोलणी; उपहास, चेष्टा करणे. (क्रि. घालणे, करणे.) : 'ऐशा करुनियां खोक्या धि:कारे बोलती ।' - निगा ३१५. [ध्व.]

**खिखियाट** पु. निंदक : 'खिखियाटु परीयटु निवटुनी ।' - गरा ७५.

**खिखी** स्त्री. खदखदा हसणे; ही ही करून हासणे. क्रिवि. खदखदा; फिदीफिदी. [ध्व.]

**खिच** पु. खिचडी : 'जें काळाचा खिच उशिटा ।' - ज्ञा ८.१४४.

**खिच, खींच्च** वि. गच्च. (गो.)

**खिचकट** स्त्री. खेचाखेच. (गो.)

**खिचकटांवचे** सक्रि. गर्दी करणे. (गो.)

**खिचकुला** पु. मुले व मुली मिळून खेळतात तो भातुकलीचा खेळ.

**खिचच्चे** उक्रि. गच्च धरणे. (गो.)

**खिचट-टे** न. खिचडी; मिसळ : 'तेथ सुखदु:खाचें खिचटें । जेविजें एकेचि ताटें ।' - ज्ञा १४.२७३.

**खिचडा** पु. १. करड तांदूळ इ. भरडून, शिजवून गुराला खायला द्यायचे खाद्य. २. सजगुऱ्याचा सडून केलेला भात. ३. तांदूळ व डाळ यांचे शिजवलेले मिश्रण. ४. ताबुताच्या दिवसात फकिराला घालायचे मिश्र धान्य, मिसळ. ५. दाटी; गर्दी.

**खिचडावचे** सक्रि. खिजवणे; चिडवणे. (गो.)

**खिचडी** स्त्री. १. तांदूळ व डाळ एकत्र शिजवून केलेला पदार्थ; साबुदाण्यात भुईमुगाच्या दाण्याचे कूट मिसळून शिजवून केलेला पदार्थ. २. पंचभेळ (निरनिराळी धान्य किंवा भिन्नभिन्न नाणी इ.); सरमिसळ. ३. गोतांबील. ४. (ल.) ज्या गावातील जमिनीचा एक भाग धारेकऱ्याने व एक भाग खोताने धारण केला आहे असा गाव. ५. गर्दी; दाटी. [क. किच(च्च)डी]

**खिचडीबिचडी** स्त्री. अंदाधुंदी; गोंधळ. [खिचडीचे द्वि.]

**खिचडी वांगी** अव. तुरीच्या डाळीचे पीठ, चण्याचे पीठ व वांगी यांची भाजी.

**खिचडे** न. एकत्र शिजवलेल्या, भरडलेल्या तांदळाचे आणि कोंड्याचे जनावरांना घालायचे आंबोण. पहा : **खिचडा १**

**खिचणे** अक्रि. मागे हटणे, सरणे; एका बाजूला अथवा मार्गाबाहेर होणे. २. (ल.) (वचन अथवा उद्देश यांपासून) फिरणे, चळणे. [सं. कृष् = कर्ष]

**खिचपणे** पहा : **खितपणे**

**खिचबिड** वि. खरडलेले; भरकटलेले; गिचमीड. [खिचचे द्वि.]

**खिचबिडणे** सक्रि. खाजवणे; ओरबाडणे. (त्वचा इ.)

**खिचरट** पहा : **खचरट**

**खिचवट(ड)णे** उक्रि. १. वरवर उकरणे (जमीन.) २. खाजवणे. ३. चिडवणे; खिजवणे : 'स्वनाश न कळे कसा खिचवटूनि काळानना?' - मोकृष्ण पू ७७.१०.

**खिची** स्त्री. १. पहा : **खिचडी.** २. चिखल; रेंदा : 'चौमेरीं लोळवितांति धडे । तेथ खिची थोरी जाली ।' - शिव ९५५. ३. पीठ, डाळ इ. घालून केलेली पातळ पालेभाजी. ४. (ल.) दाटी; खच.

**खिच्कट** स्त्री. गर्दी. (गो.) पहा : **किचकट**

**खिच्पेट** स्त्री. अडगळ. (गो.)

**खिज** स्त्री. खिजवणे. (ना.)
**खिजगणती** स्त्री. गणती; मोजदाद; पर्वा (निषेधार्थी प्रयोग.). [हिं. किसगनती] (वा.) **खिजगणतीत नसणे** - पर्वा नसणे; महत्त्व न वाटणे : 'ती झीज त्यांच्या खिजगणतीतही नव्हती.' - जमा ५५.
**खिजणे** अक्रि. १. चिडणे; रागावणे : 'ब्राह्मण देखुनियां खिजतो ।' - देप १८३. २. खजील होणे. [सं. खिद]
**खिजमत, खिजमतगा(दा)र-री** पहा : **खिदमत**
**खिजमती** स्त्री. बायकांच्या हातातील कंकण; एक दागिना. पहा : **खिसमती** : 'गोठ हातसर जवे खिजमत्या मिनेदार करीं चुडे ।' - प्रला ११८.
**खिजरणे, खिजरियणे** अक्रि. चिडणे. (व.)
**खिजवणी** स्त्री. चिडवणे; चेतवणी; खिजवणारी भाषा, हावभाव क्रिया.
**खिज(जा)वणे** सक्रि.चिडवणे; राग आणणे; चेतवणे; त्रास देणे : 'म्हणउनि खिजवीतो रूक्मिणीतें हरी तों ।' - वारूवि. ४. [सं. खिद]
**खिजाणा** वि. हताश; नाखूष; खट्टू; निराश; खजील झालेला; शरमिंदा. पहा : **खिशाण, खिशाणा**
**खिजान** पु. घोड्याचा एक वातरोग : 'खिजान म्हणजे शरीर वाळतें व केंस जातात, रात्रीस नाकांतून श्वास चालतो.' - अश्वप २.१८७.
**खिजीपडन** अक्रि. हट्ट घेणे; खिजणे. (खा.)
**खिटखिट** स्त्री. किटकीट; त्रास; भुणभुण. [सं. खिटचे द्वि.]
**खिटखिटणे** अक्रि. बारीक व कर्कश आवाज करणे; किटकिटणे; टकटकणे. [ध्व.]
**खिटी** पु. १. लाकडाचा तुकडा; ढलपी; उघडून अलग ठेवण्यासाठी किंवा लावून घट्ट बसण्यासाठी दोन वस्तूंमध्ये बसवलेला लाकडी तुकडा, पाचर, खुंटा; कोयंड्यात कडी बसवल्यावर घालण्यात येणारे अडकण; फिरकीची खीळ; अडकवण म्हणून घातलेली चीप; लाकडी दट्ट्या; कठड्याचा लहानसा गज; चाकाची खीळ. २. दाराचा लहानसा लाकडी अडसर, कुत्रे. ३. (ल.) अडथळा; अंतर : 'सरळ स्नेहामधें पडलि खिटी ।' - प्रला १६७. [सं. खिट्] (वा.) **कामात खिटी घालणे** - मध्ये अडथळा, आडकाठी आणणे. ० **मारणे** - तोंड बंद करणे.
**खिडकी** स्त्री. १. गवाक्ष; वातायन; तावदान; जाळी; झरोका; बारी; मागचे दार; दिंडी; फाटक; वेसकट; पक्षद्वार (गुप्तदार); हवा व उजेडाकरिता केलेले लहान दार : 'त्या खिडकीस एक लहानशी दुसरी खिडकी होती.' - धकु ५३. २. (ल.) क्षुल्लक, लंगडी सबब; पळवाट; सुटण्यास जागा, सवड. ३. देवळाच्या गाभाऱ्याच्या दोन्ही बाजूंना गज किंवा गरादे लावून तयार केलेल्या पडव्या. (गो.) [सं. खडक्किका]
**खिडकीदार** वि. चौकडीदार; खिडकीच्या आकाराची वेलपत्ती काढलेले; एकाआड एक रंगाच्या चौकडीचे व जाड सुतांनी स्पष्ट मर्यादा दाखवणारे (कापड.); पोफळी.
**खिडबिडी** स्त्री. प्रेत वाहून नेण्याची शिडी; निसणी; तिरडी. (गो.)
**खिडमा** वि. किडकिडीत : 'काकींच्या जात्याच्या घरघरीने.... आणि त्यांची खिडमी पोरगी शकू या सर्वांच्या झोपा चावळल्या.' - सीए ३२.

**खिडुकमिडुक** न. मोडकेतोडके व बारीकसारीक दागिने. पहा : **किडुकमिडुक**
**खिडे** न. एका प्रकारचे पोलाद.
**खिड्ड टोपल** न. किटण न लावलेले वेळूचे टोपले. (व.)
**खिण** पु. क्षण; थोडा वेळ : 'बारा तास बत्तीस घढ्या खिण एक नाहीं उशीर ।' - ऐपो ३५१. [सं. क्षण]
**खिण** न. चामडीला पडलेला घट्टा. (गो.) [सं. किण]
**खिणखिण** क्रिवि. बारीक व तीव्र आवाजाचा; किटकिटा. [ध्व.]
**खितखित** स्त्री. खंत घेणे (मुलाने); झुरणीला लागणे; आठवण काढून दुःखी होणे. [ध्व.]
**खितखितणे** अक्रि. गदमदणे; उकडणे; चिकचिक वाटणे.
**खितखित्लो** पु. मुलींच्या खेळातील भातुकली; खाऊ. (गो.)
**खितप(पी)ण-णी** स्त्री. झिजणी; क्षीणावस्था; ग्लानीने किंवा दुःखाने क्षीण होणे; खाटेला खिळणे. (क्रि. घेणे अथवा खितपतीस लागणे.)
**खितप(पि)णे, खिदब(व)णे** अक्रि. झिजणीला लागणे; क्षीण होण्याजोगे बरेच दिवस आजारी पडणे; अशक्त होत जाणे : 'मागावें सखि ! तपतां देवा ! देवू नका मृतीस खितपता ।' - मोकृष्ण पू ३९.४०. (वा.) **खितपत पडणे** - १. हाल सोसत पडणे; झिजत राहणे : 'समाज गुलामगिरीत खितपत पडला आहे.' - बंप २१. २. अंगी गुण असूनही संधी नाही अशा परिस्थितीत दिवस काढावे लागणे : 'जन्मभर सरकारी नोकरीत खितपत पडायचे.' - अक्षर ५५.
**खिति-त्ती** स्त्री. पृथ्वी : 'ऐसें पापें दाटली खिती ।' - ख्रिपु १.८.३८. [सं. क्षिति]
**खिदखिद-दा** क्रिवि. फिदीफिदी; खदखदा; खोखो; खिखी; मोठ्याने आवाज करून (हसणे, खिदळणे वगैरे.) [ध्व.]
**खिदखिदणे** अक्रि. १. खदखदून हसणे. २. रट्रट् शिजणे; खदखदणे. [ध्व.]
**खिद(दा)डणे** अक्रि. दंगामस्ती करणे; हुंदडणे; उडणे; बागडणे; दंगल माजवणे; बोकाळणे.
सक्रि. धूम पळायला लावणे; पळवून लावणे; रागे भरणे; खरडपट्टी काढणे. (कर.) [ध्व.] **खिदडून काढणे** - खरडून काढणे; मारून, पिटून काढणे : 'चंदावरची फौज आलियाने जमाव घेऊन त्यांस खिदडून काढावें.'-ऐसंसाखं ६.२५.
**खिद(दा)डा** पु. दंगल; आरडाओरड; नाच; हुतुतू. (क्रि. घालणे.) [ध्व.]
**खिद(ज-स)मत** स्त्री. १. सेवा; चाकरी; कर्तव्य; नोकरी; तैनात : 'माझे आजास व बापास खिजमत होती ते मजकडे सांगावी.' - दिमरा १.१८५. २. खुशामत; आर्जव. [फा. खिदमत]
**खिद(ज-स)मतगा(दा-द्दा)र** पु. मोठ्या माणसाची हलकीसलकी कामे करणारा चाकर (अंग रगडणे, जोडे नेणे, हातावर पाणी घालणे इ.); सेवक; परिचारक; हुजऱ्या : 'तुळाजी खिजमतदार झाला बोलता ।' - ऐपो १७०. [फा.]
**खिदमतगुजार** वि. चाकरी बजावणारा.

**खिद(दा)ळणे** पहा : **खिदडणे**

**खिदक्षण** वि. थकलेला. (व.)

**खिन** पु. क्षण. [सं. क्षण]

**खिनभर** क्रिवि. क्षणभर; थोडा वेळ : 'खिनभर तसाच बघत मी थांबलो.' - रैत २६.

**खिनाटणे** अक्रि. खिन्न होणे : 'येर मारू होते सकळइ। ते खिनाटुनु पळाले।' - क्रिपु २०.१३६.

**खिनानतीर** पु. घोड्याचा एक रोग. अंगावर फोड होणे, सांधे ढळणे, शरीरातून पिवळे पाणी निघणे, नाकातून निळे पाणी येणे, त्यास घाण येणे व माशी बसणे ही लक्षणे होतात. - अश्वप २.१८७.

**खिन्न** वि. दु:खी; त्रस्त; कष्टी; श्रमी; खेदयुक्त; मलूल. [सं. खिद्-खिन्न]

**खिन्नट** वि. अशक्त; कृश; क्षीण. (गो.)

**खिन्नता** स्त्री. निरुत्साह; दु:ख.

**खिन्नावणे** अक्रि. खिन्न होणे; कष्टी होणे : 'तेव्हां त्या सुरसुंदरी अतिशयें खिन्नावती मानसीं ।' - निमा १.४०.

**खिपणी-णे** पहा : **खितपणी, खितपणे**

**खिपत** स्त्री. अपमान; अप्रतिष्ठा; फजिती : 'नवाबास खर्ड्यावर खिपत बसली.' - मइसा ५.१८. [फा. खिफ्फत]

**खिपतण** स्त्री. फतकल; हट्टाने वाटेतच घातलेली बैठक; हट्टी मुलाला वाटेतून एकीकडे करताना किंवा उचलताना त्याने अडून बसणे, भोवती भोवती घोटाळणे, सोडून जायला नाखूष असणे; चिकटणे. (क्रि. घेणे.)

**खिपतणी-णे** पहा : **खितपणी, खितपणे**

**खिपल** न. पापुद्रा : 'जागजागी पोळ्यांची जळकी खिपलं धरून बसलेला....'- बाविबु ४७.

**खिपली** स्त्री. खपली. (ना.)

**खिप्सी** वि. अपमानित; हेवेखोर; द्वेषी : 'श्रीमंत भाऊ यास खिप्सी मुसलमान यानें दरबारांत हुल कटाराची चालविली.' - पेद १.१२. (वा.) ० **देणे** - पराभव, फजिती करणे.

**खिम(म्म-मा)ट** न. कुसकरलेला भात; मऊ केलेला भात; चिकचिकीत शिजवलेला भात; दाट, घट्ट पेज. (को.)

**खिमा** पु. सुरीने अतिशय बारीक केलेले मांस व त्याचा केलेला एक पदार्थ. [फा. कीमा]

**खिमावर्त** पु. घोड्याच्या तंगडी(नेवरा)वर खुराच्यावरील बाजूला असलेला केसांचा भोवरा. [सं.क्षेम + आवर्त]

**खिरकटणे** अक्रि. सरपटणे; भुईसरसे जाणे. [ध्व.]

**खिरकटले** न. (तिरस्काराने) फार पातळ झालेली खीर; तांदळाची खळखळीत खीर.

**खिरखिर-रा** क्रिवि. करकरा; खडखडा; जड वस्तू ओढीत नेताना होणारा आवाज. [ध्व.]

**खिरखिरा** वि. विरळ.

**खिरखिरे** न. लहान मुलांचे खेळणे. पहा : **किरकिरे**

**खिरखिंड** स्त्री. ज्यापासून राळ उत्पन्न होते असे एक भरदार मूळ.

**खिरचे** सक्रि. विरघळणे. (गो.) [सं. क्षर]

**खिरजट** वि. विरलेले : 'खिरजट घोंगडे ।' - ज्ञागा १०३५,३६.

**खिरटणे** अक्रि. रोगादिकांमुळे वा योग्य पोषण न झाल्यामुळे मनुष्य, पशू इत्यादींची वाढ खुंटणे; खुरटणे.

**खिरटा** पु. किडक्या दातात किंवा दाढेत होणाऱ्या कृमींचा एक रोग.

**खिरटा-टे** वि. खुजा; खुजट; वाढ खुंटलेला; ठेंगणा.

**खिरड** न. १. एक मासा. २. गोचीड.

**खिरडणे** सक्रि. खरवडून काढणे : 'तिरस्कार तो चिरडिला । द्वेष खिरडूनि सांडिला ।' - दास ५.९.४९.

**खिरडणे** अक्रि. १. अपमानित होणे; मागे सरणे; हटणे; पराजित होणे; जिंकला जाणे : 'आठवितां मन खिरडे ।' - ज्ञा १६.४२१. २. खुरडत चालणे : 'कैसी सर्वांगें सुंदरी । खिरडली हे ।' - शिव ८३१.

**खिरण** स्त्री. तंबोरीवर काढलेली काळी वर्तुळाकार आकृती.

**खिरणी-नी** स्त्री. १. रांज(य)णीचे झाड. याचे पान बकुळीसारखे व फळ कडुलिंबाच्या निंबोळीसारखे असून आत चीक असतो. फळ मधुर असते. लाकूड कठीण व चिवट असल्यामुळे रंगारी लोक रंगीत कापड बडवण्यासाठी याचे दांडके वापरतात. २. खिरणीचे फळ. ३. खरबुजाची एक जात : 'शेपें शीताफळें हीं खरबुज खिरणी सुंदरें तूत बोरें ।' - सारुह ३.४९.

**खिरणी** स्त्री. खिरापत : 'नारळ फोडून खिरणी वाट.' - जसा १५३.

**खिरणीबाळ्या** स्त्री. अव. बायकांच्या कानातील एक दागिना : 'खिरणीबाळ्या पोवळ्यांच्या बाळ्या ।' - अफला ५५.

**खिरणे** न. चाळणी; गाळणी. [सं. क्षरण]

**खिरणे** सक्रि. १. गाळणे; चाळणे.

अक्रि. गळणे; मधून जाणे; वाहणे; स्रवणे (मुख्यत्वे धातू, वीर्य, किंवा मूत्र यासंबंधी) : 'कोंदलें असत न खिरे । कवणे काळीं ।' - ज्ञा ८.१५. २. झुरणे; झिजणे. ३. वीर्यपात होणे; बेजार होणे. [सं. क्षरण]

**खिरणे** अक्रि. शिरणे.

**खिरतुपडी** स्त्री. (सोंगट्यांचा खेळ) तुप्पी; आपली खेळण्याची पाळी झाली तरी शत्रुपक्षाची सोंगटी मारल्याबद्दल पुन्हा खेळायला मिळालेला डाव. (क्रि. खाणे, खेळणे.) (वा.) ० **खाणे** - चांगला मार मिळणे, खाणे; झोडपले जाणे.

**खिरनी** स्त्री. खीर; गोड लापशी; खिरापत; प्रसाद.

**खिरप(पि-पी)ण-णी-णे** पहा : **खितपणी, खितपणे**

**खिरबिट्या** स्त्री. अव. रेघोट्या; फरकाटे; गिचमीड लिखाण.

**खिरवड** स्त्री. प्रेत वाहण्याची निसण; तिरडी. (गो.)

**खिरवड** स्त्री. कटकट; कंटाळा. (गो.)

**खिरवणे** क्रि. नीटनेटके भरणे; व्यवस्थित ठेवणे.

**खिरसाळ** स्त्री. भाताची एक जात. [सं. क्षीर + शालि]

**खिरंगटणे** अक्रि. खुरटणे; कमी होणे : 'परी तें खिरंगटलें असे जाण । वैराग्येंवीण वाढेना ।' - एभा ११.४२७.

**खिरा** पु. १. काकडीची एक जात. २. एक झाड. ३. घोड्याचा एक रंग - अश्वप १.२८. [फा. खियार = काकडी]

**खिराडी** स्त्री. खार; चानी. (ना. व.)

**खिराडी** स्त्री. विहिरीतून पाणी काढायचे लोखंडी चाक. पहा : **खराडी २**

**खिरादमंद** वि. शहाणा; हुशार.

**खिरापत** स्त्री. १. कथाकीर्तनाच्या शेवटी श्रोत्यांना द्यायचा प्रसाद (पूर्वी पळीभर दूधसाखर देण्याची चाल होती.); भोंडल्याच्या शेवटी मुली खोबऱ्याचा कीस, साखर यांचा किंवा हरभऱ्याच्या डाळीचा जो प्रसाद देतात तो. २. (ल.) सढळ हाताने दिलेली देणगी. ३. (ल.) उधळपट्टी. (क्रि. करणे, होणे.) ४. (ल.) जळू, प्राणी. (गो.) [फा.](वा.) ० **वाटणे** - बेहिशेबी देत सुटणे. ० **काढणे** - हकालपट्टी करणे; सळो की पळो करून सोडणे. (ना.)

**खिरार** न. १. क्षीरसागर. २. आटीव दूध : 'जें कथासाहित्याचे खिरार। नवां रसांचे कन्हेर ।' - रुस्व ५०.

**खिराळे** न. अडसराचे भिंतीतील भोक. (को.) पहा : **खिळोरे**

**खिरी** स्त्री. पोलादाची एक जात. [हिं.]

**खिरीट** पु. एक प्रकारचा मासा. [हिं.]

**खिरीत हिंग, सराटा** चांगल्या मनुष्यांतील वाईट माणूस, समाजातील त्रासदायक माणूस; समाजकंटक; उपाधी; ब्याद; काटा; (बायकी भाषा) विरूप माणूस; चांगल्या, नाजूक वस्तूंतील वाईट व भसाडी वस्तू; समानशील मंडळीतील प्रतिकूल व्यक्ती; वस्तू.

**खिरीपुरी** स्त्री. १. चैनीचे जेवण; राहणी. (क्रि. खाणे.) २. श्रीमंती थाटाने मेजवानी देणे. (क्रि. वाटणे, देणे, वाढणे.)

**खिरोटी** स्त्री. खीळ. (चंद्रपुरी) [सं. कील.]

**खिरौंचे** सक्रि. विरघळवणे. (गो.) [सं. क्षर]

**खिलखिलाट** क्रिवि. खळखळून (हसणे) : 'खूष होऊन सुनेत्रा खिलखिलाट हसते.' - विभूत ५१.

**खिल(ला)त** पु. स्त्री सन्मानाचा पोषाख; राजा खूष होऊन आपल्या हाताने आवडत्या माणसाला जो पोषाख देतो तो. (या पोषाखाबरोबर त्या त्या दर्जाप्रमाणे जवाहीर, घोडा, हत्ती, शस्त्रे इ. देत असत.) : 'बक्षीगिरीचा खिलत.' - दिमरा १.८६. [फा. खिलअत]

**खिलतखाना** पु. सरकारी वस्त्रागार.

**खिल(ला)तफाखरा** पु. बहुमानाचा उंची पोषाख : 'खलाअत फाखरे मुम्ताज होऊन...' - वाड १४०.

**खिल(ला)बत** न. १. खलबत; एकांत; गुप्त बैठक. २. खलबतखाना; खाजगी बैठक. [फा. खल्वत]

**खिलवणे** सक्रि. खायला घालणे; आतिथ्य करणे : 'खातात कमी, पण खिलवतात फार.' - गणगोत २५०.

**खिलाई** स्त्री. खावटी; खुराक; खाद्य. (व.) [हिं.]

**खिलाडी-डू** वि. १. क्रीडापटू; खेळण्यात पटाईत : 'आम्ही हिंदु लोक.... म्हणण्यासारखे खिलाडू होतो किंवा नाहीं याचा बराच संशय आहे.' - आगर ३.१६१. २. खेळकर; आनंदी; उत्साही; हसून खेळून वागणारा. ३. (ल.) थट्टेखोर; गमत्या : 'तऱ्हेबाज ती आधीच खिलाडु नवऱ्याच्या गोष्टी ऐकून ।' - पला ७८. ४. खेळ्या; कारस्थानी. [सं. खेल]

**खिलापट्टी** स्त्री. तोफांसाठी लागणारे आवश्यक सामान : 'खिलापट्टी तयार होऊन गोकाकपर्यंत जाव्या.' - ऐलेसं ७१८९.

**खिलाफ** वि. विरुद्ध; प्रतिकूल; उलट : 'श्रीमंताची खिलाफ मर्जी करून नबाब.... जातील तर गोष्ट दुराग्रहास पडेल.' - मइसा ३.४५६.[फा.]

**खिलाफत** स्त्री. १. खलिपाई; खलिपाची पदवी, काम; महंमद पैगंबराचे प्रतिनिधित्व. २. इस्लामी साम्राज्य. [फा.]

**खिला(ल्ला)र** न. कळप; तांडा (गाई-म्हशींचा) : 'जियें गांवीं खिल्लारें। कामधेनूंचीं ॥' - ज्ञा ९.३२१.

**खिला(ल्ला)री** पु. १. गोप; गवळी; गुराखी; गोबारी : 'मी खिल्लारी नंदाचा ।' - मुसभा ९.५१. २. गुरे विकणारा लमाण.
वि. गाई, बैल यांची एक जात. [त. कीलारि]

**खिलावणे** न. १. खेळ; क्रीडा. २. खेळणे. ३. (ल.) प्रीतिपात्र : 'तुम्ही तर माझें खिलावणें ।' - प्रला १६७. [सं. खेल्]

**खिली** स्त्री. १. चाकाची खुंटी. २. किल्ली. (झाडी) [सं. कील]

**खिली उपड** वि. वात्रट. (झाडी)

**खिलुज** न. खरवस; अगदी कोवळे दूध.

**खिल्लत** स्त्री. पहा : **खिल(ला)त**

**खिल्ला** पु. मुलगा. (झाडी)

**खिल्लारणे** अक्रि. अनेकांनी एकदम ओरडणे : 'पोरं खिल्लारली.' - पुत्र ५९.

**खिल्ली** स्त्री. चेष्टा; टिंगल; फजिती. २. विनोद; थट्टा. (व.) [हिं.]

**खिशाण-णा-णी, खिसाणा** वि. निराश; लज्जित; खिन्न; दुःखी; कष्टी; श्रमी. [सं. खिद]

**खिशी** स्त्री. सांडगे, कुरड्या, पापड्या, वडे इ. पदार्थ तयार करण्याकरिता शिजवलेले पीठ. (क्रि. घेणे, शिजवणे.)

**खिसकणे** अक्रि. रागावणे; रागाने बोलणे. (माण.) [ध्व.]

**खिसका** पु. उटणे : 'तेथे, खिसका, पंचखाजे, पानाचे विडे अर्पण करून...' - जोफु.

**खिसका** पु. सांडगे, कुरड्या इ. चे पीठ : 'खिसका दळी सतीभामा ठिवला भरुनि ।' - घाश्रलो १११.

**खिसकावणे** सक्रि. खेचणे; ओढून काढणे : 'तेवढ्यात कौतिकनं कमरेची पिशवी खिसकावली.' - धग २३.

**खिसखिशा-स** वि. तिडतिडा; तुसडा; चिरडखोर; कुरकुऱ्या. [ध्व.]

**खिसखि(खी)स** स्त्री. जिकीर; कटकट; चिरडखोरपणाचा आक्षेप; निंदा; निर्भर्त्सना; खरडपट्टी.
क्रिवि. खदखदा; खोखो; फिदीफिदी. (क्रि. करणे, हसणे.) [ध्व.]

**खिसखिसणे** अक्रि. १. कचकचणे; दात खाणे (माकडाचे.) २. निंदणे; खडसावणे; खरडपट्टी काढणे. [ध्व.]

**खिसगणती** पहा : **खिजगणतील** [हिं. किसगिनती] (वा.)

**खिसडा** पहा : **खिचडा** : कौतिक काकुळतीनं म्हणाली : 'परवाचा खिसडा आये मून मनत होतीओ!' - धग

**खिसणे** सक्रि. १. किसणे; भाजी, खोबरे वगैरेचे किसणीवर बारीक तुकडे, कीस करणे. २. नांगरणे : 'नांगोर जुंपून सारं रान खिसून काढावं.' - रैत २७.

**खिसणे** अक्रि. १. बाजूला होणे; वाटेतून एकीकडे सरणे; बाजूला सरून जागा करणे. २. दात खाणे (माकड रागाने करते त्यावरून.) ३. रागाने अथवा चिडून अंगावर जाणे. ४. खिजणे; रुसणे. [सं. खिद]

**खिसमत, खिसमतगा(दा)र** पहा : **'खिद' शब्दाखाली**

**खिसमती** स्त्री. स्त्रियांच्या हातातील कंकण. हे दुहेरी असून त्यावर पितळी बेगड चिकटवतात : 'चुडे खिसमत्या मोठ्या.' - स्त्रीगीतमाला ६५.

**खिसमीस** स्त्री. बेदाणा; द्राक्षाची एक लहान बिनबियांची जात. [फा. किश्मिश]

**खिसा** पु. १. कप्पा; कसा; अंगरख्याला असलेला पिशवीसारखा भाग. २. (ल.) पडदा; कूड; खण; गौण, अंतर्भूत गोष्ट अथवा बाब. ३. (ल.) मनात किंवा पोटात ठेवलेली गोष्ट; दाबून किंवा दडवून ठेवलेला मुद्दा (सांगण्यातील). (क्रि. राखणे.) [फा. कीसा] (वा.) ० **कातरणे, कापणे** - भामटेगिरी करणे; लुबाडणे फसवणे. ० **खाली असणे, होणे** - जवळ पैसे नसणे; जवळचे सगळे पैसे खर्च होणे. ० **गरम असणे** - भरपूर पैसे जवळ असणे. ० **गरम करणे** - १. खूप पैसे मिळवणे. २. लाच देणे. **खिशात टाकणे** - १. लांबवणे; चोरणे. २. आधीन करून घेणे. **खिशातली गप्प** - निव्वळ थाप. **खिशाला चाट बसणे** - नको असलेला जादा खर्च करावा लागणे.

**खिसा** पु. १. हिंसाचार; दंगा : 'लोक असलिया खिसा होईल म्हणून गावांतच राहवून दिवाण, लोक व गोत वैसे तिसाचालिसाक जणानसी वेस (वेशीस) जाऊन बसले.' - शिचसाखं २.१६६. २. बोलाचाली; तंटा; उपसर्ग; त्रास : 'तनखेविषयींचा जाब बोलून खिसा झाला.' - होकै २. ३. गत; स्थिती; अवस्था. (व.) पहा : **खिस्सा**[फा. किस्सा]

**खिसाखोकला** पु. भांडणतंटा; वितंडवाद.

**खिसाणा** पु. खदखदा हसणे; खिदखिदणे. (क्रि. करणे, मांडणे, चालणे.)

**खिसारत, खिसारा** स्त्री. पु. १. नुकसान; तोटा : 'यांत ....फौजेचा खिसारा बेमुबूलग होतो.' - मइसा ५.१९८; 'आपण पंधरा सोळा लाखाचे खिसारतेंत आलों.' - मइसा १.१९२. २. कारवाई; फसवणूक : 'असे नाना प्रकारचे खेळ-खिसारे आहेत.' - ऐलेसं ७.३२५८. ३. (ल.) फितूर : 'सर्कारच्या फौजेंत खिसारा फार पडला आहे.' - ऐलेसं ६.३१५०. [अर. खिरासत = नुकसान]

**खिसारा** पु. गुंतागुंत; कंटाळवाणेपणा; लांबलचकपणा (कामाचा, व्यापाराचा). तसेच गुंतागुंतीचे, कंटाळा आणणारे काम. (क्रि. पडणे.)

**खिसारा** पु. भाग; हिस्सा. (कामाचा, खटल्याचा.)

**खिस्डी** स्त्री. १. खिचडी. २. पोतीचा एक प्रकार. (झाडी.)

**खिस्त** स्त्री. १. हप्ता. २. हप्त्यांची किंवा हप्त्यांनी फेड; हप्तेबंदी. ३. हप्त्यांची मुदत, अवधी. ४. (ल.) कामाचा हिस्सा; त्रास, त्रासदायक काम. ५. (ल.) विशिष्ट गोष्ट, बाब, रक्कम, निमित्त; खोटी सबब. [फा. किस्त]

**खिस्तक** न. स्त्री. विजारीची दोन मांड्यांमधील गुह्यभाग झाकणारी पट्टी; विजार. [फा.]

**खिस्त(स्ती)खांदा** पु. १. पहा : **खिस्त** ४. (क्रि. करणे, लावणे, देणे, घेणे, वारणे.) २. खांदवडा; शेतीसाठी तात्पुरत्या आणलेल्या बैल वगैरेच्या मेहनतीबद्दलचा मोबदला.

**खिस्तबंदी** स्त्री. कर्जाची हप्तेबंदी; हप्त्यांनी कर्ज देण्याचा करार.

**खिस्ताई, खिस्ताईचा व्यापार, व्यवहार, धंदा, काम** स्त्री. दररोज किंवा अल्प मुदतीने कर्ज घेण्याचे आणि व्याजासह ते फेडण्याचे काम. पहा : **खिस्त** ४.

**खिस्ती** वि. खिस्तीच्या पद्धतीपैकी कोणत्याही पद्धतीने पैसे कर्जाऊ देणारा; व्याजबट्टा करणारा (सावकार) : 'विठोबा खिस्ती मजकारण।' - भवि १६.३३.

स्त्री. सावकारी; व्याजबट्टा : 'अंगीं ब्रह्मक्रिया खिस्तीचा व्यापार।' - तुगा ३०६१.

**खिस्ती** वि. त्रासदायक; किचकट; खडतर. (गोष्ट.)

**खिस्मतगार** पहा : **खिदमतगार** : 'खिस्मतगारी करणार।' - नव ११.६९.

**खिस्सा** पु. कर्मकहाणी; स्थिती; गोष्ट; गत : 'उगाच खिस्सा लिहिला तो प्रमाण काय.' - वाडसमारो ३.६९. पहा : **किस्सा** [फा. किस्सा]

**खिळ** स्त्री. (नारळाचा) डोळा.

**खिळ** पु. स्त्री. खीळ; प्रतिबंधक वस्तु; खुंटी वगैरे : 'तोंडींचा खिळू नव्हतां दूरी । नारेळजळ न चढे करीं ।' - एभा १३.२९.

**खिळखिळा, खिळखिळणा, खिळखिळीत** वि. ढिला; शिथिल; डगमगणारा (सांधा, सांध्याच्या अधूपणामुळे माणूस, वस्तु). (क्रि. करणे.)

**खिळखिळी** स्त्री. सांध्याचा ढिलेपणा. शिथिलपणा.

वि. नाखळीच्या मागोमाग झालेली (मुलगी.) (गो.) [सं. स्खल्]

**खिळखिळॉ** पु. खुळखुळा; खेळणे. (गो.) [सं. खेल्]

**खिळगा** पु. दगडावर दगड ठेवून केलेली भिंत : 'परसाला पाठभिंतीऐवजी नुसता खिळगा होता.' - घरदार १३.

**खिळण** स्त्री. १. खिळेबंदी; डांबणे; न हलेल असे करणे. २. (ल.) डांबणी; चिकटून राहणे; खिळून राहणे (घर, बिछाना, खुर्ची इत्यादींशी) ३.सांध्यांचा किंवा शिरांचा ताठरपणा (अर्धांगवायूने आलेला); ४.दाराशी घेतलेले धरणे (तगाददार, गळग्रह, भिकारी यांनी); ५.हट्ट; पाठपुरावा; छंद (एखादी गोष्ट करण्याविषयी मुलाचा); ६.हटवाद; दुराग्रह (प्रार्थनेत); हट्टाला पेटणे किंवा बसणे. (क्रि. घेणे, धरणे, खिळणीला येणे.)

**खिळणे** सक्रि. १. खिळेबंदी करणे; डांबणे; न हालेल असे करणे; पक्के करणे; चिकटून राहील असे करणे; जखडून टाकणे : 'काई बाणवरी खिळूं । वारयातें ॥' - ज्ञा ११.४६२. २. खीळ किंवा अडसर लावणे, घालणे. ३. (ल.) रोखणे; अडकवणे. पहा : **खिळण** : 'मंत्रीं महासर्प खिळिती ।' - दास ९.८.३७. ४. चावणे (विशिष्ट लहान कीटकांच्या चावण्याच्या आणि घट्ट धरण्याच्या संबंधी). [सं. कील्]

**खिळणे** सक्रि. पावसाचे थोडेसे शिंतोडे पडणे. (व.)

**खिळणे** सक्रि. उभ्या पिकातील मधली झाडे वाळणे. (व.)

**खिळनी** स्त्री. अटक; अडसर; खिळा; खीळ : 'नातरी शृंगारा खिळनी बांधिली ।' - शिव १८८. (क्रि. बांधणे.) [सं. कीलन]

**खिळपट** पु. शेतातील किंवा रस्त्यातील दगडांचा पोकळ ढीग, वरंडा.

**खिळा** पु. १. खीळ; मेख; लोखंडाची अणकुचीदार वस्तू. २. छापण्याचा ठसा, टाईप. ३. गाडीच्या जोखडातील भोकात (बैलाला दुसरीकडे खांदा वळविता येऊ नये म्हणून) बसवण्याची खुंटी, शिवळ. (माण.) ४. गाय, म्हैस यांच्या आचळातून दूध बाहेर निघण्यास प्रतिबंध करणारा आतील मळ. हा जनावर व्याल्यानंतर काढावा लागतो. ५. रचलेल्या दगडांचा ढीग, वरंडा; एखादी शंकूच्या आकाराची रचना. ६. जमिनीतून नुकताच बाहेर येणारा अंकुर. ७. तीन अथवा चार गावांच्या सीमा एकत्र मिळण्याचे ठिकाण. [सं. कीलक]

**खिळापट्टी** स्त्री. घराचे लोखंडी काम.

**खिळापट्टी** स्त्री. कपाळावर लावलेल्या तांबड्या गंधाच्या दोन ओळी व त्यात सुपारी जाळून तिचा किंवा कस्तुरीचा लावलेला टिळा. (वा.) **खिळेपट्टी करणे** - लोकांच्या घरी जेवणे.

**खिळामाणी** वि. लोखंडी खुंटी व तिच्याभोवती लोखंडी मायणी असणारे (जाते.) पहा : **किलेमाणी**

**खिळामोळा** पु. खिळा किंवा त्यासारखी घरकामाची लोखंडी वस्तू : 'फळ्या, चौकट... खिळेमोळे सुद्धा आणून ठेवले होते.'- घरदार ६.

**खिळारी** पु. छापखान्यात अक्षरांचे खिळे जुळविणारा : 'त्याच्या हाती टाईप देऊन खिळाऱ्याने आपली कैफियत रुजू केली.' - स्मरण ११२.

**खिळारे** पहा : **खिळोरे**

**खिळी** स्त्री. १. (विणकाम) हत्येच्या चौकटीच्या दोन्ही बाजूंच्या दोन खुंट्या; (सामा.) दाराचा अडसर, खिळा, मेख. २. पहा : **खीळ** (खिळी हा शब्द खीळ या शब्दाबद्दल कोकणात वापरतात.) ३. दाराची कडी. (गो.) ४. खिटी; आडणी (कु.) : 'खिळि लाउनि धरला वाडा।' - आप ८६. [सं. कीलक]

**खिळीव** वि. डांबलेला; न हालेल असा केलेला.

**खिळेखुरदा** पु. तोफेत, गोळ्यात भरलेले खिळे, लोखंडी तुकडे, दगड इ.

**खिळेछाप** पु. शिशाच्या अक्षरांचे ठसे, टाईप.

**खिळेठोक** स्त्री. प्रहार : 'दुःखाची खिळेठोक सहन करीत...'-अंधार ४९.

**खिळेपट्टी, खिळेमाणी** पहा : **खिळा**

**खिळेबंद** वि. मोठे खिळे ठोकलेला : 'खिळेबंद बुलंद दिल्लीदरवाजा सताड उघडा होता.' - स्वामी ३.

**खिळोटी** स्त्री. दाराच्या कडीला लावण्याचा खिळा, अडसर. (ना.)

**खिळोट्या** वि. एखाद्याच्या कामात खीळ (अडचण) घालणारा. (व.)

**खिळोरे** न. दरवाजाचा अडसर राहण्यासाठी दोन्ही बाजूच्या भिंतीतील दोन कोनाडे; अडसराचे कुलंगडे. (क्रि. घालणे.) (राजा. को.)

**खिंकाट** वि. प्रचंड : 'करुनि खिंकाट गर्जना ।' - मुआदि ३७.३६.

**खिंकावणे** अक्रि. १. डसणे; चावणे : पहा : **खिंकाळणे** [ध्व.]

**खिंका(खा)ळणे** अक्रि. १. घोड्याचे ओरडणे; हिंसणे. २. मोठ्याने खोखो हसणे; मौजेने हीऽ हीऽ हसणे. [ध्व.]

**खिंड** स्त्री. १. दोन टेकड्यांतील किंवा डोंगरातील चिंचोळी वाट; अरुंद रस्ता; अडचणीचा रस्ता; दरी. २. भोक; वाट; दार; खिंडार; भगदाड (भिंत, कुंपण यातील). ३. गाळलेला भाग. (धड्यातील, ग्रंथातील). ४. (ल.) फट; सवड; पळवाट. ५. खांड (तलवार इत्यादींच्या पात्याच्या धारेवरील). (वा.) **खिंडीत गाठणे** - ऐन अडचणीत पकडणे. [क.किंडि] [सं. खंड]

**खिंडकबाळी** स्त्री. बायकांचा कानातील एक दागिना; खिरणीबाळी.

**खिंड (डु) कुली-ले** स्त्री. न. १. दोन टेकड्यांमधील लहान खिंड. २. भिंत, कुंपण यातील लहान भगदाड, भेग, भोक.

**खिंडगोंडी** स्त्री. अव. गल्ल्या; बोळ; अरुंद रस्ते (घळी).

**खिंडार-रे** न. मोठे भगदाड; भोकसा; भोक; दोन शेतांतील चिंचोळी वाट. २. भग्नावशेष; मोडकेतोडके, पडके घर, गाव वगैरे. वि. मोडकळीला आलेले; जमीनदोस्त झालेले (गाव, इमारत).

**खिंडोर** स्त्री. खिंडार; दरी; भगदाड; मोडकळीला आलेले घर : 'तरी त्या खिंडोरा आंत। सदा दगडमाती राखत।' - एभा १३.१२८.

**खिंव, खेम** स्त्री. आलिंगन. (गो.) [सं. क्षेम]

**खिः** हसण्याचा आवाज. [ध्व.]

**खीच, खीचपुरी** स्त्री. खिचडी : 'मनपवनाची खीचपुरी। वाढूनियां॥' - ज्ञा १८.१०४०. पहा : **खिच**

**खीचल** हस्तक्षेप; ढवळाढवळ.

**खीचि** पु. रगडा : 'तेथ खीचि थोरि जाली।' - शिव ९५४, ९७२.

**खीज** स्त्री. रुसवा; चिरड; चीड; इतराजी. (क्रि. येणे.) [सं. खिद]

**खीट** न. १. गुरांच्या गळ्यात बांधलेली लाकडी घाट. २. लहान लाकडी खुंटी. पहा : **खिटी**

**खीण** पु. क्षण. (कु.) पहा : **खिण** [सं. क्षण]

**खीण** पु. घट्टा; वण. (गो.) पहा : **खिण** [सं. किण]

**खीदाराई** क्रि. भात घालणे.

**खीमा** पु. खिरापतीसारखा किंवा त्याच्याही पेक्षा बारीक किसलेला पदार्थ पहा : **खिमा** [अर. कीमा]

**खीर** स्त्री. १. दुधात गव्हले - शेवया, तांदूळ, साखर इ. घालून आटवून केलेले पक्वान्न. गोमंतकात तांदुळाचे पीठ, गूळ वा रताळ्याचे तुकडे घालून खीर करतात. २. कण्हेरी [सं. क्षीर] (वा.) **खिरीत तूप पडणे** - चांगल्या पदार्थाशी दुसऱ्या चांगल्या पदार्थाचा संयोग होणे.

**खीरम्या** वि. उंची वस्त्र : 'वीतभरि लंगोटी नेदी अतीताला। खीरम्या देतो शाला भोरट्याला।' - तुगा २४८२.

**खीरारी** पु. गवळी : 'खीरारी एकु दाटुनि सीवारू चारीः' - लीच १.२७.

**खीळ** स्त्री. १. दरवाजाला लावण्याचे लोखंडाचे किंवा लाकडाचे केलेले अडकण; अडसर; खुंटी; शंकू. २. शिडीच्या पायऱ्या. ३. लाकडाचा सांधा जोडण्यासाठी मारलेला खिळा. ४. खिळा.[सं. कीलक] (वा.) ० **बसणे, घालणे** - अडथळा आणणे. **दात खीळ बसणे** - दात

एकमेकावर घट्ट बसून वाचा बंद होणे.

**खीळ** स्त्री. हाडांचा सांधा; खुबा. जसे :- कोपराची-ढोपराची-दाताची मनगटाची-पायाची खीळ. [सं. कीलक]

**खीळ** स्त्री. १. स्तनाग्रातील दुधप्रतिबंधक मळ. (क्रि. बसणे, फोडणे.) (वा.) ० **फोडणे** - जनावर व्याल्यानंतर त्याच्या आचळातून दुधाच्या चार धार काढणे. २. गळू अथवा खांडूक यांच्या तोंडावर जमलेली पुवाची गोळी, खडा. (व.) पहा : **खिळा** [सं. कीलक]

**खीळ** स्त्री. शिवळ. [सं. कीलक]

**खींच** वि. गच्च. (गो.)

**खुकारा** पु. कुकारा; जोराची हाक; हळी : 'साळुवे झोंबती पखियांवरि। कोपत घालती खुकारा।' - क्रिपु ३३.१३.

**खुखू** क्रिवि. हास्य; खीखी हसणे. (क्रि. हसणे, करणे.) खीखी करून; खदखदून; फिदीफिदी. [ध्व.]

**खुज, खुजट-ड** वि. काहीसा खुजा; अकाली वाढ खुंटलेला; खुरट; ठेंगणा : 'तूं उभा ना बैठा। दिघडु ना खुजटा।' - ज्ञा ११.२७७; 'वामनरूपातें वानिती खुजड।' - दावि २२९. [सं. कुब्ज]

**खुजट (ड) पण** न. ठेंगणेपण : 'सवेचि खुजटपण सांडिलें।' - एरुस्व २.१६.

**खुजट (ड) हाड** न. लहान मुलाचे हळूहळू वाढणारे हाड.

**खुजबुजणे** पहा : **कुजबुजणे** : 'रानात सागाची पाने खुजबुजत होती.' - सामा १४९.

**खुजस्ते** वि. शुभ; कल्याणकारक. [फा. खुजस्ता]

**खुजस्तेअख्तर** वि. सुदैवी; चांगल्या नशिबाचा, ग्रहांचा.

**खुजस्तेफर्जाम** वि. सद्गतीला पोचलेला.

**खुजा** वि. ठेंगणा; ठेंगू; बुटका; वाढ खुंटलेला : 'नादब्रह्म खुजें।' - ज्ञा १५.१३. [सं. कुब्ज]

**खुजा-जो** पु. १. लांब व निमुळत्या मानेचे, पाणी ठेवण्याचे मातीचे भांडे; सुरई : 'तांबे, जांब, खुजे, प्रशस्त तिवया, तारें नवीं तासकें।'- सारुह ३.४३. २. (सोनारी धंदा) सोने शुद्ध करण्यासाठी लागणारे काचेचे भांडे, मूस. (गो.) [फा. कूझा]

**खुजावड** पहा : **यज्ञवृक्ष**

**खुट** पु. १. एखादी वस्तू हळूच आपटल्यामुळे होणारा बारीक आवाज. २. दाढीचा अर्धवट तुटलेला केस.

**खुट** स्त्री. खूण, चिन्ह.

**खुटकणे** अक्रि. हटकला किंवा थांबविला जाणे. पहा : **खुडकणे**

**खुटखुट** स्त्री. १. विशिष्ट प्रकारचा बारीक आवाज (बीळ किंवा गवत कुरतडणाऱ्या उंदरांचा, एकसारखा आणि हलकेच थाप मारण्याचा किंवा ठोठावण्याचा, कडकड चावण्याचा किंवा तोडण्याचा). २. पोटात होणाऱ्या बारीक वेदना; चावल्यासारखे वाटणे; गुरगुरणे; तिडीक; कळ.

**खुटखुटणे** अक्रि. खुट, खुट असा आवाज होईल असे वाजणे. [ध्व.]

**खुटखुटणे** अक्रि. किंचित दुखणे; ठुसठुसणे (पोट किंवा दुखरे बोट यात); खदखदणे; तडतडणे; उडणे. [ध्व.]

**खुटखुटी** स्त्री. १. (ताठ्याच्या अथवा तल्लख स्वभावाच्या मनुष्याचे) उसासणे; जोराचा श्वास. २. हाव; कंडू; आग; सोस.

**खुटखुटीत** वि. १. सुटसुटीत; आटोपशीर; लहान आणि टुमदार; आटोपता; घट्टसर; लहानसर (घर, शरीर, काम, संसार). २. सुटसुटीत; चुरचुरीत; खरपूस; कुरकुरीत; खुसखुशीत; कडक व वाळलेले.

**खुटण, खुटणभर** न. नांगरणीचा सरासरी पल्ला किंवा प्रमाण; बैलांच्या शक्तीचे प्रमाण. याच अर्थी अऊटभर किंवा औटभर असेही म्हणतात. पहा : **औटभर** [सं. कुट्]

**खु(खुं)टणे** सक्रि. बोटांनी पिळवटून अथवा नखांनी तोडून काढणे; तोडणे; खुडणे (भाजी, द्विदल धान्याची शेंग, कणसे इ.) : 'कणसें खुंटिजेति कृषीवळीं।' - मुआदि ४९.११४. [सं. कुट्]

**खु(खुं)टणे** अक्रि. १. गतीत व्यत्यय येणे, कुंठित होणे, बंद पडणे; थांबविला, अडकविला, रोखला जाणे; स्तंभित होणे; थांबणे; उपयोग न होणे; थबकणे : 'कीं क्षुधातृषादि आर्ति। खुंटलिया॥' - ज्ञा ३.५६. २. (ल.) कुंठित, निरुत्तर, गतिहीन, थक्क होणे; दाबली जाणे; थंडावणे (उत्कंठा, आशा). ३. वारंवार हटून बसणे; दुराग्रहाने खिळणीला येणे; समजुतीला दाद न देणे; अडून बसणे. ४. तुटणे : 'दोर खुटला तो पछि होऊन गेला।' - ऐपो ९७. ५. कमी येणे, होणे; अपुरे पडणे. [सं. कुट् = अडथळा करणे]

**खुटन** न. नांगरताना औत फिरण्याची नेमलेली जागा; पल्ला. (माण.) पहा : **खुटण**

**खुटवळ** पु. रोपाचा वरचा भाग तोडल्यावर जमिनीत राहिलेला खुंट. (कु.)

**खुटवा** पु. (नाविक) आपल्या सागरी हद्दीत येणाऱ्या किंवा बंदरात नांगर टाकणाऱ्या जहाजावरील कर : 'खुटवा व जकात बाछाई अमलात चेऊलाकडे जमा होत होता.' - आंपव्य ४.

**खुटा** पु. खुंटा. (व.)

**खुटाण** न. विडीचे थोटूक. (कु.)

**खुटाला** पु. सुतांची गुंतागुंत सोडविण्याचे एक यंत्र.

**खुटी** स्त्री. खडखड आवाज होणारी, जनावराच्या गळ्यात बांधलेली, लाकडी लोळी; घंटा.

**खुटीउपड** वि. वात्रट. (झाडी)

**खुटुरुटु** क्रिवि. हळूहळू; मंद गतीने; जडपणाने; रडतखडत; रेंगाळत (चालू काम, घोड्याची चाल).

**खुट्ट** न. जलद आणि बद्द आवाज; किंचित आवाज (दोन काठ्या परस्परांवर आपटल्याने झालेला). [ध्व.]

**खुट्टावळी** स्त्री. कानातील दागिना : 'शेर सोनीयाच्या रुकमाईच्या खुट्टावळ्या।' - जसा ५२४.

**खुट्यार दवरप** पर्वा न करणे. (गो.)

**खुड** उद्गा. कोंबड्या, कावळे इत्यादींना हाकलून देताना उच्चारायचा शब्द.

**खुड** स्त्री. छाट; काट (कोवळ्या हरभऱ्याच्या शेंड्याची वगैरे).

**खुडकणे** अक्रि. १. स्नायूंच्या संकोचाने आखडणे; खिळल्याप्रमाणे वाटून ताठ आणि जड होणे (अवयव). २. अडकणे; थांबणे; थबकणे :

'वोढिजती मग खुडके मृगु जैसा॥' - ज्ञा १४.१४८. ३. खुटणे. ४. पळून जाणे. (व.) [सं. खुण्डते]

**खुडका** पु. झिडकारणी; हेडसावणी; खडसावणी. (क्रि. देणे.)

**खुडकाविणे** सक्रि. १. खुड म्हणून पक्ष्यांना हाकलून देणे. २. (ल.) झिडकारणे; हाकलणे; धूत करणे; हेडसाळणे (तिरस्काराने). [ध्व.]

**खुडखुड** स्त्री. १. प्राणांतिक आचका, आसडा, वळवळ. २. लहान पेटीत, डब्यात हात घालून शोधताना किंवा उंदीर इ. वावरताना होणारा आवाज; खुडबूड.

**खुडखुडणे** अक्रि. १. थंडीने कुडकुडणे. २. (पोटात थोडेसे) खुटखुटणे. ३. खुटखुट असा आवाज होणे. [ध्व.] [सं. क्षुद्]

**खुडखुडा** क्रिवि. विशिष्ट प्रकारचा (पोटातील खुटखुटण्याचा, कापण्याचा, थरथरण्याचा, दाताच्या कडकडण्याचा, मरणाऱ्या पक्ष्याच्या फडफडण्याचा, मरणाऱ्या किंवा जखमी मनुष्याच्या धडपडण्याचा इ.) आवाज करून.

**खुडखुडी** स्त्री. हिवतापाची हुडहुडी, कंप, काटा. [ध्व.]

**खुडखुडीत** वि. १. पहा : **खुटखुटीत**. २. हलका व आटोपशीर; सुटसुटीत व लहानसर; चपळ व हलक्या अंगाचा. ३. खडखडीत; टणक आणि मजबूत (म्हातारा); कडक आणि सुकलेला; कडक व कुडकुडीत; चुरचुरीत व कुरकुरीत; पूर्वी ओली असून चांगली वाळलेली (वस्तू). ४. आटोपशीर; टुमदार (घर, शरीर, काम).

**खुडगा-गी** पु. स्त्री. गाडीच्या साटीचा खुंटा; करळी. (को.)

**खुडणी** स्त्री. धान्याच्या कणसांची तोडणी, वेचणी, काटणी.

**खुडणे** सक्रि. खोडून काढणे; चुकीचे आहे असे दाखविणे : 'हे आमचे म्हणणे खुडता न आल्याने...' - ससावा ३.३७३.

**खुडणे** सक्रि. हलक्या हाताने तोडणे : 'जैसी वरिवरि पालवी खुडिजे।' - ज्ञा २.३०५. [सं. कृंतन]

**खुडणे** सक्रि. वाकणे; खुरकटून बसणे : 'भारद्वाज चाष परदुःखानें खुडती।' - ऐपो ३११. पहा : **खुडकणे**

**खुडत(तु)डणे** अक्रि. १. पहा : **खुडणे १**. २. दातांनी कुरतडणे, तोडणे.

**खुडन** स्त्री. पीक तयार झाल्यावर धांड्याची कणसे कापून घेणे. (व.)

**खुडबुड** स्त्री. विशिष्ट आवाज (गवतात किंवा गाडग्यात उंदीर वगैरेच्या खुडबुडीचा). [ध्व.]

**खुडबुडणे** अक्रि. खुडबुड आवाज करणे, होणे.

**खुडबुडाट** पु. मोठी खुडबुड.

**खुडबुळे** न. अशक्त, किरकोळ देहयष्टीचा माणूस : 'ते काय मारतंय खुडबुळं!' - भुज १९.

**खुडमुळ** न. फुलाची कळी. [सं. कुडमल]

**खुडसणी** स्त्री. १. पश्चात्ताप; दुःख; अनुताप; खेद; हुरहुर; रुखरुख (मनाला लागलेली). २. उत्कट इच्छा; डाव. [सं. खुड]

**खुडसणी** स्त्री. १. खुडणी. २. छाटणी. ३. खडसावणी, झिडकारणी.

**खुडसणे** सक्रि. १. नखांनी खुडणे, तोडणे. २. खडसणे; छाटणे (झाडे). (को.) ३. (ल.) खडसावणे; खडकावणे; झिडकारणे.

**खुडा** पु. खंदक; खड्डा : 'ऐसा अज्ञानु अनाथु बापुडा। पडिला भवखुडा।' - ऋ ५५.

**खुडा** पु. शेंडा (रोपट्याचा). (वा.) ० **करणे** – लहान रोपांची शेंड्याची पाने खुडणे.

**खुडा** वि. भांडखोर; दुष्ट.

**खुडा-डे** वि. १. स्नायूंच्या संकोचाने आजारी असलेला; ताठरलेला; आखडलेला; जडपणा आलेला (संधिवात, फार श्रम किंवा बैठक मारून बसल्यामुळे). २. (ल.) उल्लंघनीय; अल्प; तरून जाता येईल असा : 'तया संसारु हा खुडा।' - गीता २.१८६५.

**खुडाणा** पु. खुडण्यास योग्य : 'चणा खुडाणा जाला होता' - लीचपू ३६४.

**खुडी** स्त्री. १. पावसाळ्यासाठी गलबतावर बांधलेले छप्पर. २. गोठा (गुरांचा); खुराडे (पक्ष्यांचे); विशेषतः वासरांचा लहान गोठा, छप्पर. ३. तबेल्यातील घोड्याचे मूत साचविण्याचा खड्डा, मोरी, कुंडी. ४. शौचकूपातील दगडी पायरी. (ना.) [क. कूडरु = बसणे]

**खुडी** स्त्री. वीण; बिजवट (उंटाची).

**खुडी** स्त्री. १. झाडावरून आंबे खाली काढण्याचा लहान झेला. २. कणसे कापून त्यांचा घातलेला ढीग, अडी, अढी.

**खुडी** वि. कजाग; दुष्ट; दांडगी; कुढी (स्त्री). : 'तोंडाळ मोठी खुडी।' - अमृत ९७.

**खुडी पोहरी** गुरांचा गोठा; पक्ष्यांचे खुराडे. (मोंगलाई).

**खुडीव** वि. खुडलेली (भाजी इ.) : 'खाणीवा खुडिवा तोडिवा। ...शाका वाढिली स्वानुभवा।' - एरुस्व १४.१०४.

**खुडुकणे** अक्रि. अडकणे. [क.]

**खुडुस** न. शल्य : 'श्रीमंत दादासाहेब अकस्मात इंदुरास आले त्यास जाऊं द्यावे तरी राज्यात खुडुस रहाते.' - मर्शियांका ५.

**खुडूक** स्त्री. १. कोंबडी आपली अंडी उबवते ती वेळ व तिची कृती. (क्रि. बसणे.) २. सर्व अंडी घालून झाल्यानंतरची अवस्था. यानंतर कोंबडी अंडी घालण्याचे थांबवते. [क.]
क्रिवि. (ल.) पाय पोटाशी घेऊन त्यांना हातांनी मिठी मारून (बसणे.)

**खुडूक** न. सर्व पाने नाहीशी झालेला झाडाचा सोट, बुंधा.

**खुडे** न. खुराडे; कबूतरखाना.

**खुड्डी** स्त्री. शौचाला बसायची जागा : 'धावत धावत बाहेर जाऊन एकदम खुड्डीवरच बसलो.' - स्मगा ३९.

**खुण** पहा : **खूण**. (वा.) ० **मारणे** – संकेत किंवा इशारा करणे : 'मारिती खुण सरज्याच्या लोकांला।' - ऐपो २१.

**खुणखुण** स्त्री. १. किंचित मानसिक अस्वास्थ्य; संताप; खेद; हुरहुर; खंत. २. कुणकुण; कुजबुज; कुरबुर. ३. (अनिश्चित) खुमखुम. [सं.क्वण]

**खुणखुणणे** अक्रि. १. खुणखुण आवाज होईल असे वाजणे (वाद्ये) : 'खणखणती टाळ खुणखुणिती घागरिया।' - दावि १६३. २. क्रोधाने नाकात बोलणे; आतल्या आत चडफडणे; धुसफुसणे.

**खुण (न) स-सी-शी** पहा : **खुनस**

**खुण (णा) विणे** सक्रि. खुणेने, संकेताने दर्शविणे; आज्ञा करणे, सांगणे;

मान हालवून, डोळ्याच्या इशारतीने, दूरच्या उल्लेखाने किंवा सूचनेने कळविणे : 'कौशिक ऐशी ऐकतां मात। खुणावित श्रीरामचंद्रा।' - रावि ८.८७.

**खुणा** स्त्री. १. ओळखण्याचे चिन्ह. (राजा.) २. हाताने, बोटाने किंवा डोळ्याने केलेला संकेत : 'मला इतक्यांत बद्रिनाथानें खुणा केली.' - विवि ८.११.२०७. [क.खूण]

**खुणामुद्रा** स्त्री. खूण; चिन्ह; मुद्रा (ठसा याला व्यापक अर्थाने).

**खुणी** वि. मर्मज्ञ.

**खुतखावणी** स्त्री. धनीण; यजमानीण : 'वाढिताती नवजणी। खुतखावणी जाणोनी।'- एरुस्व १४.१०१. [फा. खुद = स्वतः + खाविंद = मालक]

**खुतखुत** स्त्री. १. खदखद (उकळण्याचा आवाज). २. (ल.) हुरहुर; रुखरुख; मनाची टोचणी. ३. उवांचा बुजबुजाट. (राजा.) ४. गर्दी; दाटी; भीड; पुंजका. (क्रि. पडणे.) (राजा.) [ध्व.]

**खुतखुतणे** अक्रि. (चुन्याची कळी भिजताना किंवा पाणी कढताना) खुत् खुत् असा आवाज होणे; खदखदणे.

**खुतखुतला** पु. मुलांची भातुकली. (कु.)

**खुतखुता भात** ताकात पुन्हा शिजवलेला शिळा भात; खतखत्या भात.

**खुतणी-नी** स्त्री. अर्धरेशमी व अर्धसुती आणि वर पट्टेपट्टे असलेले कापड : 'खुतनीची चोळी खुंटीला.' - राके ३५९. पहा : **कुतनी** [फा. खुतन]

**खु(खुं)तणे** अक्रि. १. हटून बसणे; दुराग्रहपूर्वक चिकटणे; आशंकणे; गुंतणे; ओढते घेणे : 'आता प्रमईं खुंतलें असे।' - ऋ ८७. २. गुंतणे; ध्यान धरून बसणे : 'तेवि तुझे ठायिं नयन। खुंतले त्यासि हाचि निरोधु।' -रास ३.४५४. [सं. कुंठ]

**खुतपुत** स्त्री. १. खुरखुर; हुरहुर. (क्रि. करणे, लागणे.) २. सतावणी; हट्ट; त्रास (लहान मुलांचा). (क्रि. करणे, लावणे, लागणे.) [ध्व.]

**खुत(द)बा, खुत्बा** पु. १. मुसलमानांत दर शुक्रवारी, मशिदीतील नमाजानंतर किंवा राजा गादीवर बसल्यानंतर पाच (महंमद पैगंबर व त्याचे चार उत्तराधिकारी) साधूंची आणि विद्यमान राजाची स्तोत्रे (प्रवचने) म्हणतात ती. त्यावरून २. (ल.) गलबला; कलकल; कचकच. [फा.]

**खुतल** वि. अंतर्भूत; आच्छादित : 'तेजसामग्री वाढवी तरि रत्नाचिये गर्भीचे खुतले रंग देखे' - लीचउ ४१९.

**खुतला** वि. तटस्थ; कुंठित; निश्चय करून बसलेला : 'बकु जैसा खुतला। मासेयासी॥' - ज्ञा १८.६५४.

**खुता** पु. पूड; चूर्ण : 'माय ती माऊली शिकेकाईचा घेते खुता।' - लोले ६८.

**खुती** स्त्री. खोती; मक्ता : 'पानमळ्याची खुती घेतो।' - राके २८६.

**खुतुजिरे** न. लोखंडी कड्याचे चिलखत.

**खुतू** न. शिरस्त्राण : 'अंगांत जिरे खुतु घालून।'- मदरु १.५२.[फा. खुद]

**खुतूत** आत्मीय; खास : 'आपण खुतूत गैरमाकूल सहसा वर्तणार नाही.' राजवाडे ८.१

**खुत्कन, खुदकन** क्रिवि. खुत् अशा आवाजाने एकदम (हसणे).

**खुद, खुद्द** सना. स्वतः

पु. (ल.) (बायकी) पती; नवरा : 'एकदां चेष्टेनें कां होईना, खुद्द दादाला विचारलं दिखील.' - गाढवांचा गोंधळ (प्रफुल्लता १२.७.२४).

वि. १. स्वतःचा; मालकीचा; खासगी; आत्मीय; खासगत. २. (जोर व दुजोरा देण्यासाठी) खास स्वतःचा. ३. (ल.) विशेषतः राजाचा.

क्रिवि. स्वतः; जातीने. [फा.]

**खुद(द्द)अखत्यार, खुद्दयख्तियार** पु. स्वेच्छा : 'हें सल्लाहानें झालें किंवा खुद्दयख्तियारानें?' - मइसा ५.५१. [फा. खुद् + इख्तियारी]

**खुद (द्द) असामी** पु. १. स्वतःच्या नावाने, हिमतीने पुढे येणारा मनुष्य. २. स्वकर्तृत्व.

**खुदकी** स्त्री. घोड्याची दुडकी चाल. [हिं.]

**खुदकुशी** स्त्री. आत्महत्या. [फा.]

**खुद (द्द) खासा** वि. क्रिवि. (मी, तू, तो इ.) स्वतः; जातीने. [फा.]

**खुदखुद** स्त्री. १. (घोड्याची) रग; चमक; खुमखुमी; पाणी. २. उचंबळणे; उत; तृष्णा; आग; हाव; सोस (स्पर्धा, महत्त्वाकांक्षा, अभिमान यांची). ३. हुरहूर; अस्वस्थता.

स्त्री. पु. (येणाराजाणारांची पुष्कळवेळ चाललेली व त्रासदायक) गडबड; गजबज; (लहान मुलांचा) हट्ट; टकळी.

**खुदखुदकरि** वि. खदखदून : 'आन खुदखुदकरि हास्य करिती।' - लीचपू ३.१६६.

**खुदगर्ज** वि. अप्पलपोट्या; स्वार्थी.

**खुदगर्जी** स्त्री. स्वार्थ; अप्पलपोटेपणा : 'खुदगर्जीवर नजर देऊन...' - ऐलेसं ७.३५७०.

**खुदनिसबत** वि. १. स्वतःसंबंधी. २. स्वतःवर अवलंबित.

**खुदपसंती-दी** स्त्री. १. स्वतःची मान्यता. २. (ल.) अहंमन्यता; गर्व : 'बाईचा प्रकार खुदपसंतीचा आहे.' - मदबा १.१८८.

**खुदबळणे** पहा : **खुबळणे**

**खुदरजाबंदी** स्त्री. स्वतःची मर्जी, खुषी : 'धणियांनी खुदरजाबंदीने निरोप दिल्हा तरि उत्तम आहे.' - भाब ८.

**खुदरत** स्त्री. शक्ती; सामर्थ्य; क्षमता (निषेधार्थी प्रयोग). [फा. कुद्रत]

**खुदरती** वि. पिवळ्या रंगाचे, कापसाचे (सूत).

**खुदरापादरा** वि. १. बदफैली; कामुक; बीभत्स; घाणेरडा; अभद्र. २. निंदक; अर्वाच्य; शिवराळ (भाषण किंवा बोलणारा). ३. (व्यापक) वाईट; भिकार; गलथान; निरुपयोगी (जनावर, वस्तू).[पादणेचे द्वि.]

**खुदल (ळ-ड) णे** पहा : **खुंदलणे**

**खुदवा** पु. राग. (झाडी)

**खुदसनद** स्त्री. राजाकडून किंवा मुख्य अधिकाऱ्याकडून मिळालेली सनद.

**खुदा** पु. प्रभु; ईश्वर; अल्ला. [फा.]

**खुदाई** वि. ईश्वरी : 'खुदाई आज्ञेवर मनुष्य विचार करील ऐसें म्हणतां नये.' - ऐटि २.९१.

**खुदाई** स्त्री. १. खोदाई; खोदण्याची क्रिया : 'खाणीच्या खुदाईचें क्षेत्र वाढत जातें त्याप्रमाणें... दुसरा खड्डा... खणतात.' - पदाव १.९२.

२. खणतीची मजुरी. ३. (ल.) चौकशी, शोध.

**खुदा-ए-तआला, खुदा(य)ताला** पु. तेजोमय ईश्वर; परमेश्वर.

**खुदातर्सी** स्त्री. ईश्वराला भिणे; ईश्वरभीरुता : 'खुदातर्सी फकिरी तौरानें राहतात.' - मइसा १.६३. [फा. खुदा + तर्स = भीरु]

**खुदानखास्त** उद्गा. ईश्वर असे न करो! : 'तेव्हां नवाबांनीं बहुत समाधान केलें कीं खुदानखास्त बाशद आपनास राजेश्री पंतप्रधानासी बिगाड सहसा करणे नाहीं.' - पेद १०.२९.

**खुदानगान** पु. ईश्वरी.

**खुदाबंदी** कैलासवास; मृत्यू.

**खुदायवंद, खुदावंत-द** पु. १. प्रभू; खावंद; मालक; धनी. २. (संबोधनार्थी) सरकार; महाराज. [फा.]

**खुदावंत न्यामत** श्रीमंत : 'खुदावंत न्यामत रावसाहेब पंडित प्रधान.' - मइसा १०.१६५. [फा. खुदावंद + इ + निआमत]

**खुदा हाफीज** ईश्वर तुमचे रक्षण करो. गावाला जाताना, निरोप घेताना शुभेच्छादर्शक म्हणून असे म्हणण्याचा मुस्लीम समाजात प्रघात आहे.

**खुदुखुदु** स्त्री. मुक्त, लाघवी, मृदू हास्य. (क्रि. करणे.)

क्रिवि. मौजेने; आनंदाने; प्रेमाने (हसणे); खुदखुद; खदखदा. (क्रि. हसणे.) [ध्व.]

**खुद्द, खुद्दजातीने** पहा : **खुद**

**खुद्दाम** खादिम; चाकर.

**खुद्रकखुद्रक** क्रिवि. दुडक्या चालीने; खुद्रुक असा आवाज होईल अशा-प्रकारे. [ध्व.]

**खुद्रा** पु. १. भाताची एक जात. (बे.) २. माशाची एक जात.

**खुनकी** स्त्री. थंडाई; गार वारा. (व.) [फा.]

**खुनखराबा** पु. मारामारी. [फा. हिं.]

**खुनचा** स्त्री. (साबणाचा कारखाना) साबणाचा घट्ट रस ओतण्यासाठी जस्ताचे कडद्या असलेले भांडे.

**खुन(न्न)स** पु. स्त्री. आकस; चुरस; दंश; द्वेष; सूडबुद्धी; दुष्टावा. (क्रि. धरणे, करणे, बाळगणे.) [अर.खुन्स]

**खुन(न्न)सखोर-रा** वि. खुनशी. (व.)

**खुन(न्न)सवाल, खुनसी-शी** वि. डूख किंवा खुनस धरणारा, आकसखोर; मत्सरी; चुरशी; दुष्ट बुद्धीचा; द्वेष्टा. [अर.खुन्नस]

**खुनी** वि. १. ज्याने खून केला आहे असा; वध करणारा : 'खुन्ये पळून गेले.' - वाडसमा ३.८८. २. घातक; हिंसक; मारेकरी; क्रूर. ३. खुनासंबंधी (मुकद्दमा, चौकशी, साक्ष, कयास इ.) ४. रक्ती (मूळव्याध). [फा. खून]

**खुनी** स्त्री. (पाणरहाट) आऱ्याला कोनाचा मारलेला गोलटा.

**खुने (न्या) रा-री, खुन्या** घातकी; हिंसक; खुनी. [फा. खून]

**खुन्ना** वि. गिड्डा; बुटका; खुजा. (कर.)

**खुपकला** पु. एक सुगंधी द्रव्य.

**खुपट** न. केसांचा खुंट : 'अंधारात न्हावी दाढीला खुपटं ठेवील.' - ब्राबिबु १९१.

**खुपटा** पु. लहान गोटा; गारगोटी : 'तो आंतुल खडे खुपटे आहाच देखे:' - लीचपू ५४१.

**खुपणी** स्त्री. टोचणी; चुरचुर; जाचणी.

**खुपणे** उक्रि. १. टोचणे; बोचणे; दुःख देणे; पीडा करणे (काटा, केस, शल्य यांनी) : 'यथार्थ तरी खुपणें। नाहीं कवणा॥' - ज्ञा १६.१२०. २. दुखावणे; सलणे (डोळा इ.). ३. (ल.) डोळ्यात किंवा मनात काट्याप्रमाणे, शल्याप्रमाणे बोचणे, सलणे : 'अंतरीं मृदु लोणी तैसा। कोणाही सहसा खुपेना॥' - भाराबाल ११.२४६. ४. पश्चात्ताप होणे. ५. मनात डाचणे; मनाला खाणे; अस्वस्थता उत्पन्न करणे : 'परि तुझा बोल होता खुपत। हृदयामाजीं।' - कथा ५.११.१६१. [सं. क्षुभ]

**खुपरा** पु. (डोळे आले किंवा खुपरी झाली असता त्याची) खुपणी; ठणका. (क्रि. येणे, जाणे, होणे, फोडणे).

वि. १. ठणकणारा; खुपणारा (खुपऱ्या झालेला डोळा इ.). २. खुपऱ्या डोळ्याचा (माणूस वा डोळा).

**खुपरी** स्त्री. १. पहा : **खुपरा** (क्रि. भरणे, लागणे). २. डोळ्याचा एक रोग; डोळ्याची पापणी उलटून पाहिली असताना त्यावर दिसणारी बारीक, लाल, दाणेदार पुटकुळी.

**खुपरी** स्त्री. खाऱ्या जमिनीवरचा शिंपल्यांचा थर.

**खुपशा** वि. १. जमाखर्चात एखादी बाब लुच्चेगिरीने घुसडून देणारा; खुपसणारा; घुसडणारा. २. जे जे आपल्या हाताशी येईल ते ते खिशात टाकणारा किंवा अपहार करणारा; भुरटा (चोर). ३. (ल.) बालंट घेणारा; कुभांडी.

**खुपसणे** उक्रि. १. (एखाद्या पदार्थात हात वगैरे) जोराने घालणे; घुसडणे; कोंबणे; भोसकणे; शिरविणे; दडपणे. २. खोचणे; प्रविष्ट करणे; हळूच शिरकविणे; आत घालणे. [सं. क्षुभ् + पृष्]

**खुपसदशमी** स्त्री. जळते लाकूड कणकेत किंवा भाकरीच्या पिठात खुपसून (मग ते निर्लेप समजून) त्याची केलेली दशमी, पोळी.

**खुपसुरती, खुपसुर्ती** स्त्री. सौंदर्य; लावण्य : 'मुखचंद्राची काय वर्णु खुपसुर्ती।' - अक्रूराचा पाळणा (पाळणेसंग्रह) २०.

**खुपिया** पु. गुप्त पोलीस; हेर. (ना.) [फा. खुफिया]

**खुफिया** वि. क्रिवि. गुप्त; अंतस्थ; कुफिया : 'परंतु खुफिया मुनशीबेगास रसद पावती केली.' - दिमरा २.१५. [फा.]

**खुब** पहा : **खूप** : 'बेटाबेटी हातिं नरोटी देतिल हा खुब समज ठिवा।' - रामजोशी (मला ७९).

**खुबचार** पु. डावपेच : 'फसत बालमपेंच खुबचार मार लई होती।' - ऐपो ११०.

**खुबचे** अक्रि. रागाने बुजणे. (गो.)

**खुबट** न. आडवा दांडा : 'मानेला तांग्याचं खुबट रुतल्यानं...' - वानगी १३९.

**खुबड** न. १. सांधा; संधी. २. कुबड; पाठीचे पोक. ३. (संदिग्धपणे) पाठ; कणा; पाठीचा वरचा मणका (ज्यावर ओझे घेतले जाते तो); मानेचा काटा. (राजा. कु.) (वा.) ० **मोडणे** - लटपटविणे; त्रेधा

उडवणे; गोंधळवणे; कुंठित करणे; घाबरगुंडी उडवणे.

**खुबडी** स्त्री. खुराडे.

**खुबडी, खुबा-बी** पाण्यातील गोगलगाय (किंवा एक प्रकारचा मासा, कालव) व तिची शिंप; एक प्रकारचा शंख; लहान मासा. [सं. कूपक]

**खुबलणे** उक्रि. कुबलणे; चोपणे; मारणे; खुदलणे.

**खुबलणे** सक्रि. हलविणे; हदरणे; गचके खाणे. [सं. क्षुभ + वल्]

**खुब(प)सुरत** वि. अतिशय सुंदर; देखणा; लावण्यपूर्ण; मनोहर. [फा.]

**खुबसुरती** पहा : **खुपसुरती**

**खुबळणे** उक्रि. (मांडीवर, हातावर घेऊन) इकडेतिकडे हालवणे; वर फेकणे; झेलणे (मुलाला).

अक्रि. १. (मूल मांडीवर) चळवळणे; वळवळणे. २. गचके खाणे; आंदोळले जाणे (गाडीमध्ये किंवा घोड्यावर); घुसळले जाणे; ठेचाळून निघणे.

**खुबळे** न. खळबळ; दुराग्रह; ठाम नकार.

**खुबा** पु. १. शरीराचा उठून दिसणारा भाग, उंचवटा (खांद्याचा सांधा, कमरेचा खवाटा - गोफा, मनगट, गुडघा इ., मुख्यत्वे पहिले दोन) : 'वाघाच्या पाठीमागच्या खुब्यात शिरला.' - सूर्योदय ४. २. (ल.) उंचवटा; टेंगूळ; बाहेर आलेला टोकदार भाग (जमीन, झाड इत्यादींचा). ३. कोपर. (गो.) [सं. खुब्र, कूपक]

**खुबाट** न. खुबा; कंबर. (राजा.)

**खुबाळ** वि. अडचणीचा; अवघड.

**खुबी** स्त्री. १. रहस्य; तात्पर्य; मर्म; खोच; मख्खी (एखाद्या गोष्टीतील). २. नीटनेटकेपणा; झकपकपणा; अटकळ. ३. वैशिष्ट्य; विशिष्ट गुण; उत्कृष्टता; युक्ती; ध्यानात ठेवण्याजोगे चिन्ह (स्वभावाचे, प्राण्याचे, एखाद्या कारागिराच्या कामाचे). [फा. खूब = सुंदर]

**खुबीखाबी** स्त्री. लबाडी; बारकावा : 'त्यांना (कुणब्यांना) सभाधीटपणा नसतो आणि पुराव्याच्या खुब्याखाब्या व आडाखे माहीत नसतात.' - गांगा ४३.

**खुबीदार** वि. १. सुरेख; नामी; मोहक; छानदार; उमदा; मजेदार. ३. युक्तीप्रयुक्तीचे; कौशल्ययुक्त.

**खुबुट** पु. जमिनीवरचा लहान उंचवटा. (व.)

**खुबेनाळ** स्त्री. (जनावराच्या) खांद्यावरील खवंद, क्षत. (क्रि. पडणे).

**खुम** स्त्री. रीत; चाल; रिवाज. (गो.) [फा. कौम]

**खुमखुम** स्त्री. कुणकुण : 'हा प्रकार काय आहे याची खुमखुम नानासाहेबांना लागली.' - स्मृति ७१.

**खुमखु (खू) म-मी** स्त्री. १. धमक; रग; ताठा; मस्ती (भांडणातील शेरास सव्वाशेर मिळालेल्यांची). २. पुन्हा भांडण, मारामारी सुरू करण्याची वाट पाहणे व त्याकरिता उसळणे. ३. खाज; प्रबळ इच्छा (लढाई, भांडण, सूड, वैभव यांची) : 'हातांला तुझिया जरी खुमखुमी होती तरी ते मुके।' - केक ४२. (क्रि. मोडणे, जिरवणे, येणे, सुटणे.)

**खुमणे** न. १. तोंड; तोंडवळा; चेहरा. (गो.) २. (ल.) नायकीण.

**खुमणॉ** पु. टोमणा. (गो.)

**खुमाच** पु. चंग कांचन गंजीफातील चौथा रंग किंवा उतरत्या बाजवांतील रंगांपैकी पहिला.

स्त्री. १. वस्त्रादिकांची सफाई, सूत, पोत. २. बंगला, घर इ. वस्तूंचा सुरेखपणा, नीटनेटकेपणा, देखणेपणा, घवघवीतपणा, तेज, सौंदर्य (रंग, रंगीत पदार्थांचा).

**खुमारी-ई** स्त्री. १. उत्कृष्टता; नामीपणा; लज्जत; गोडी; स्वाद; चवदारपणा; रुची; उत्तेजक किंवा संतोषदायक गुण (मुख्यत्वे खाद्य व वास यासंबंधी); पहा : **खुमाच** २ : 'या आमच्या साध्या वनभोजनांत कांहीं विशेष खुमारी यावी...' - पाव्ह ४६. २. मौज; मजा; आकर्षक दृश्य; सौंदर्य : 'दाखवी किती थरकाउन गेंद खुमारी।' - प्रला २०७. ३.खुबी; मर्म. ४. ईर्षा. (गो.) [फा. खुमार]

**खुमारीदार** वि. सुरेख; आकर्षक : 'बारीक आणि खुमारीदार दुकूल वस्त्रांनी...' - लोटिले १.१.३४१.

**खुमाशी-सी** पहा : **खुमाच** २

वि. खुमास नावाच्या गंजिफांच्या बाजूसंबंधी. पहा : **खुमाच** १.

**खुमास** पहा : **खुमाच**

स्त्री. १. पहा : **खुमाच** १, २. २. सुंदरपणा; झकपकपणा; गोंडसपणा; सौंदर्य; शोभा (सामान्यतः वस्तू, रूप यांची). पहा : **खुमारी**

**खुमासदार** वि. सुंदर; उत्तम; चटकदार; अतिशय चवदार.

**खुर** पु. टाप; शफ; कित्येक जनावरांच्या पावलावर टणक त्वचा असते तो भाग; (क.) पाय; तंगडी : 'घोडे यांचा खुर विजातां।' - शिव ५५७. पहा : **खूर** [सं.] (वा.) ० **खोडणे** - खुरडत चालणे : 'पांति तवं तो बैलु खुर खोडितु असे.' - लीचउ ३२४.

**खुर** पु. पांढरे कोड; पांढऱ्या कोडाचा चट्टा. (व.) [फा.]

**खुरक(कु)टणे** अक्रि. खरकटणे; भात, पीठ किंवा शिजलेले अन्न किंवा खरकटे यांनी (भांडे, हात) लिडबिडलेला असणे; खरकटा होणे.

**खुरक(कु)टणे** अक्रि. सरपटत जाणे. पहा : **खुरडणे**

**खुरक(कु)ट(टे)ल-ला** वि. १. पहा : **खरकटेल**. २. गदळ; घाणेरडा; ओंगळ (माणूस).

**खुरक(कु-ख-खु)तणे, खुरकुटणे** अक्रि. १. चुरा होणे; मोडणे (नीट न भाजलेली भाकरी). २. खुंटणे (झाडे वगैरे). (कर.)

**खुरका, खुरकणी** पु. स्त्री. तिटकारा; हेटाळणी; झिडकारणी. (क्रि. देणे, बसणे.)

**खुरकाढा** पु. हकालपट्टी. (व.)

**खुरकाविणे** सक्रि. तिटकारणे; झिडकारणे.

**खुरकी** स्त्री. १. खुरातली घाण. २. गाय, म्हैस इ.ची वासरे जन्मल्याबरोबर यांच्या खुरांचा काढून टाकला जाणारा भाग.

**खुरकू(ख)त, खुरगुटी** न. स्त्री. गुरांच्या पायांना होणारा एक रोग. हा खुराच्या बेचक्यात होतो.

**खुरख-खा** पु. तुडवणे; जनावरांच्या टापाखाली होणारा चुराडा : 'वटाचें रोप असे : तें सेळीयां मेंढीयाचा खुरखीं जाए :' - दृपा ३९.

**खुरखु(खू)र-रा-री** पु. स्त्री. १. (आशेने लागणारी) तळमळ; झुरणे;

उत्कंठा; चुटपुट; (अतिशय तोट्यामुळे होणारे) दु:ख; क्षोभ; आवेग. २. उतावीळ; अधीरपणा; उत्कटेच्छा; हुरहुर. ३. धमक; हौस. (गो.) ४. खुमखुमी, ईर्षा.[ध्व.] (वा.) ० **उठणे** - घोड्याच्या पोटात रोग होणे. (माण.)

**खुरखुर** स्त्री. न आवडणारी गोष्ट झाल्यामुळे किंवा करावी लागल्यामुळे मनाला होणारा त्रास : 'ही लार्डसाहेबांच्या मनातील खुरखुर शेकडो पुतळ्यांनी किंवा मानपत्रांच्या भेंडोळ्यांनी नाहीशी व्हावयाची नाही.' - लोटिले १.१.२६४.

**खुरखुरणे** अक्रि. १. (मारण्यासाठी हात, बोलण्यासाठी जीभ) शिवशिवणे; उत्कंठित होणे : 'दुष्ट दैत्यांचे हात पहा खुरखुरती।' - (अक्रूर) पाळणेसंग्रह २१. २. उतावीळ, अधीर होणे (जाण्यास, करण्यास). [ध्व.]

**खुरखुरणे** अक्रि. खुरखुर आवाज करणे.

**खुरखुरमुंडा** वि. त्रास देणारा; खाष्ट.

**खुरखुराट** पु. (खुरखुरचा अतिशय) अतिशय चुटपुट; तळमळ; हुरहुर; हाव; उतावीळ.

**खुरखोडी** वि. लाथाळ : 'ते खुरखोडी (गाइ) नसुधी। पोसी कवण॥' - ज्ञा १३.६३६.

**खुरग(गु)णे,** अक्रि. १. खुजट होणे; वाढ खुरटी होणे; खुरटणे. २. खुरडत चालणे; ढुंगणावर सरपटणे.

**खुरचा** स्त्री. अव. खुर्दा; तुकडे. [फा. खुर्दा] (वा.) ० **पाडणे** - तुकडे तुकडे करणे.

**खुरचापा-फा** पु. १. चाफ्याच्या झाडाचा एक प्रकार; पांढरा चाफा; ढोपरचाफा. २. चाफ्याचे फूल.

**खुरची-शी, र्शी, खुर्ची** - स्त्री. १. चार पायांचे, मागे टेकण्यासाठी पाठ असलेले, लाकडी, लोखंडी उंच आसन : 'थरथर किति कांपती वयस्कर उभे टाकुनी खुरशी।' - ऐपो ३०४. २. खांबाखालील उथळे, कुंभी; ठेप. ३. पहा : **खुरजा.** ४. शाळेतील मुलांना द्यायच्या शिक्षेचा एक प्रकार; भिंतीला पाठ टेकून व अर्धवट उभे राहून (गुडघे मोडून) हात गुडघ्यांवर ठेवणे. (क्रि. देणे.) ५. (ल.) अधिकारपद. [फा. कुर्सी]

**खुरजी, खुर्जी** स्त्री. (सराफाची पैशाची) थैली; कसा; हमीण.

**खुरजी, खुर्जी** स्त्री. विशिष्ट प्रकारचा गालिचा.

**खुर(रं)ट** वि. १. खुजट; ठेंगणा; वाढ खुंटलेला. २. थबकट; बसकट.

**खुर(रं)ट(ड)णे** अक्रि. खुजटणे; वाढ खुंटणे.

**खुरटपाय** पु. गिड्डा; आखूड पाय (धन्यास व इतरास अशुभकारक).

**खुरटा** वि. वाढ न झालेला; खुजट; आखूड : 'आपली खुरटी दाढी कुरवाळीत...' - श्रीयो १.४७५. (वा.) **खुरटे घालून पडणे** - पाय पोटाशी घेऊन, अंग आखडून झोपणे.

**खुरट्या पायाचा, खुरंटपायी, खुरंटपावल्या, खुरडेपायाचा** वि. अभागी; कपाळकरंटा.

**खुरडणे** अक्रि. ढुंगणावर सरपटणे; भुईसरपट जाणे. [ध्व.]

**खुरडिंबी** स्त्री. (कडाक्याच्या वादप्रसंगी) बसण्याची पद्धत; शरीराचा तोल पुढे टाकून गुडघ्यांवर, नळीवर किंवा पायाच्या बोटांवर बसणे.

**खुरडी** स्त्री. करवंटीतून काढलेला खोबऱ्याचा तुकडा.

**खुरत(तु)डणे** उक्रि. (नखे, दात यांनी) कुरतडणे; खुडणे.

**खुरतनावा** घोड्याच्या मागील पायांना ताणून बांधायची दोरी.

**खुरतवणे** सक्रि. जमीन, खळे पाणी मारून चोपणे. बैल तिवड्यास जोडून बैलाकडून जमीन घट्ट करून घेणे.

**खुरतोडी** वि. लाथाळ (गाय) : 'ते खुरतोडी नुसधी। पोषी कवण॥' - ज्ञा १३.६३८.

**खुरद-दा, खुरदेकरी, खुरदेसानक** पहा : **खुर्द, खुर्दा**

**खुरदमा** पु. १. (धक्काबुक्की, ओझे, अतिशय श्रम इ. मुळे) आलेली थकावट; झालेली दुर्दशा; बेजारी. २. खुदडलेली, गुधडलेली, चुरडलेली स्थिती; खुरदा; चक्काचूर (पशु, वस्त्र, गाडी यांचा दणकावून किंवा बेपर्वाईने वापरल्यामुळे झालेला). (क्रि. करणे, घालणे.) [फा. खुर्दा = तुकडा]

**खुरदळणे** क्रि. खुरांनी जमीन तुडवणे.

**खुर(रं-रुं)दळा** पु. १. पहा : **खुरदमा.** २. चक्काचूर (मडक्यांचा); चुरा; भुगा (भाकरीचा). (वा.) ० **होणे** - जमिनीवर जोराने पाऊल पडून माती निघणे; जमीन उखीरवाखीर होणे. (माण.)

**खुरनिसात, खुरनिशी, खुरनीस** : पु. स्त्री. नमन. 'याणें उठोन खुरनीस करोन आर्ज केला की...' - भाब २६. पहा : **कुर्निसात** :

**खुरपट्टी** स्त्री. (चर्म.) खुरे काढण्यासाठी कापलेली पट्टी.

**खुरपण** न. १. खुरपलेले गवत, तण. २. पहा : **खुरपे** (व.)

**खुरपणी** स्त्री. खुरप्याने तण, गवत काढणे; निंदणे. २. खुरप्याने खडबडीत जमीन साफ करणे : 'तुवां खुरपिला स्वहस्तें मळा।'- महिपतिस्तोत्रमाला, पांडुरंगस्तोत्र. ३. कोवळ्या नारळातील खोबरे हातांनी काढणे. [सं. क्षुर]

**खुरपणे** सक्रि. शेतातील तण गवत खुरपण्याने तोडून काढणे.

**खुरपी** स्त्री. १. (तव्यावरील भाकरी, पोळी उलथण्याचे) उलथणे; कलथा. २. दूध, पाक इ. ढवळण्याचा मोठा कलथा. ३. एक प्रकारचे फावडे. हे खुरप्याहून थोडेसे निराळे असते. ४. खुरपे.

**खुरपे-पा** न. पु. १. खुरपण्याचे हत्यार; लहान बाकदार विळा (गवत, तण काढण्याचा). २. (सामा.) शस्त्र : 'मा तर्काचें खुरपें। खांडे कोणा।' - अमृ ६.२४. ३. खोरे; फावडे. ४. (साबण कारखाना) साबणाचा द्रव हलविण्याचा लाकडी दांडा. ५. (चर्म.) चामडे ओढण्याचे किंवा ताणण्याचे हत्यार.[सं. क्षुरप्र] (वा.) ० **लावणे** - फार पैसा ओढणे.

**खुरबाण, खुर्बाण** न. १. आहुती; बलिदान; उतारा; ओवाळणी : 'जीव प्राण तूंवर खुर्बाण।' - प्रला २०४. २. अतिशय आसक्त, अनुरक्त झालेला माणूस, वस्तू. पहा : **कुरबाण** [फा. कुर्बान]

**खुरबुराट** पु. खडबड. पहा : **खुडबुडाट**

**खुरबेटी** स्त्री. १. एक प्रकारचा मासा, कालव. २. गोगलगाय.

**खुरब्या** न. मुंग्यांची एक जात. (कु.)

**खुरमा, खुर्मा** पु. मोठी खारीक. [फा.]

**खुरमांडी** स्त्री. गुडघे मोडून पाय मागे घेऊन पावलांवर बसणे. राजदरबारी

हे आसन घालून बसण्याची रीत होती.

**खुरमुंडी** स्त्री. निरनिराळ्या प्रसंगी शेळ्या, बकरी मारण्याच्या वेळचे संबंधितांचे हक्क.

**खुरमुंडी** स्त्री. पाय आणि डोके एकत्र बांधणे; गुडघ्यात डोके खुपसून बसणे; डोके व पाय एके ठिकाणी आणून निजणे; अंगाचे गाठोडे करून निजणे (माणूस, पशू यांनी). (क्रि. वळणे.) (वा.) ० **करणे,** ० **करून टाकणे** - जेरीस आणणे. ० **वळणे** - अतिशय अशक्तपणा येणे. **खुरमुंडीस येणे,** ० **घालून बसणे** - जेरीस येणे; पराजित होणे; हताश होणे.

**खुरवडा** पु. पक्ष्यांचे खुराडे.

**खुरवत** वि. साफ; तयार. (व.) ० **करणे** - मळणीचे खळे ओले करून त्यावर बैल फिरवून त्याच्या खुरांनी जमीन घट्ट बसवणे. (व.)

**खुरशिंग-शी** स्त्री. एक मोठे झाड.

**खुरष्णी, खुरसणी ओवा, तीळ, हळद** पहा : **खुरासनी**

**खुरसंधि-धी** पु. घोड्याच्या कूर्चिकेच्या खालचा अवयव. - अश्वप १.६३. [सं.]

**खुरसानी कोहळे** तांबडा भोपळा. (व.)

**खुरसीनामा, खुर्शीनामा** पु. वंशावळ; वंशवृक्ष; पिढ्या दाखविणारा नकाशा. लक्षणेने पिढी असाही अर्थ होतो : 'खाली लिहिलेल्या सनदपत्राच्या नकला व खुर्शीनामा मुतालेत आणून...' - दसकैया २३९.

**खुरं(रुं)दळणे** उक्रि. १. तुडविणे; तुडवून खराब करणे. २. (ल.) चिरडणे; कुसकरणे; निष्काळजीपणाने, बेपर्वाईने वापरणे; चोळामोळा करणे; खुंदळणे. [सं. खुर + दलन]

**खुरा-ऱ्या-रे** पु. न. नालबंद, सोनार, घिसाडी इ. चे ठोकण्याचे साधन; एक प्रकारची ऐरण; वटांग; संध. वर्तुळाकार दागिन्याला तोंड बसविण्यासाठी किंवा पैलू पाडण्यासाठी जमिनीत, लाकडात किंवा अन्यत्र उभा करण्याचा इंग्रजी 'टी' आकाराचा पोलादी तुकडा : 'लाटा खुरा ही मायाच आकारही सुवर्णाचे...' - यथा १२.५१३.

**खुरा** पु. १. जोडा, वहाण यांची टाच; टाचेखालचा भाग. २. टाचेखालचे तुकडे. (क्रि. लावणे.)

**खुराक** पु. १. शक्तिवर्धक आहार, खाद्य; गुरे पुष्ट व्हावीत म्हणून त्यांना देण्यात येणारी पेंड इ. २. रतीब; खाणे. [फा.]
स्त्री. १. खाण्याची मात्रा, नेमणूक; शेर; भत्ता (पैसा किंवा अन्न). २. (क.) अन्नाचा प्रकार, प्रमाण.

**खुराग्पानी** पु. बक्षिसी (झाडी).

**खुराट** पु. खुंट; खराटा : 'कुवासना टोळांची पडे उडी। समूळ सर्शेडी खुराट।' - एभा १०.५१८.

**खुराटणे** अक्रि. खुरट होणे, वाढ थांबणे. पहा : **खुरंटणे**

**खुराड-डे** न. १. घरटे; खोप; कबुतरखाना (यात प्रत्येक पक्ष्याला एक एक लाकडी खण असतो). २. गोठा; लहान गोठा (वासरांसाठी). ३. (ल.) लहान घर. ४. (बुरुडी) भाजी ठेवण्याची लहान बुरडी, करंडी. [सं. कुटीर]

**खुरास(सा)णी-नी** स्त्री. खरीपात येणारी तीळ; कारळे इ. पिके.
वि. खोराखान प्रांतातील (ओवा, तीळ, हळद इ.). [फा.]

**खुरी** स्त्री. गुरांची बसण्याची जागा.

**खुरी** स्त्री. एक लहान जंगली झाड.

**खुरी** स्त्री. सुरी : 'तेयाचियां खुरिया घेतलिया :' - लीचउ ९९.

**खुरी** स्त्री. झाडावरून आंबे, फुले काढण्याची लांब दांडीची जाळी; झेलणी.

**खुरी** स्त्री. १. नखीप्रमाणे पुढे येणारा (वासरांच्या इ.) खुराचा पुढील भाग; गेळा. २. गुराचा एक रोग; पायखुरी. हा रोग गुरांच्या खुरास जसा होतो तसा तोंडासही होतो, त्यास तोंडखुरी म्हणतात. (व.) ३. फाकलेल्या खुराचा एक भाग.

**खुरी** स्त्री. पाभर; तिफण.

**खुरीमुंडी** स्त्री. १. (दुखण्यातून माणूस उठल्यावर नवसाप्रीत्यर्थ) देवापुढे बकरे, मेंढी मारून तिचे खूर आणि डोके देवाला वाहण्याचा रिवाज. २. पहा : **खुरमुंडी**

**खुरूप** न. घर करून बसलेल्या काट्याने झालेले उबाणू; भोवरी; काटा बोचण्याने आलेली सूज. पहा : **कुरूप**

**खुरे** न. पायतणाची टाच. पहा : **खुरा, खुऱ्या**

**खुरेटी** स्त्री. गोगलगाय. पहा : **खुरबेटी** (को.)

**खुर्ची-र्शी** पहा : **खुरची**

**खुर्द** वि. १. कनिष्ठ; अधिक लहान. एकाच नावाची दोन गावे असल्यास लहान गावास म्हणतात. २. लहान; छोटा; धाकटा (वयाने). [फा.]

**खुर्दखत** न. खरेदीखत : 'जमिनीची खुर्दखते हरविली जात अथवा गहाळ होत.' - शसी ५१.

**खुर्दबुजरूख** वि. लहानथोर : 'हें सर्व खुर्दबुजरूख यांस माहीत आहे.' - वाडकैफीयत १००. (वा.) ० **करणे** - हस्तक्षेप ढवळाढवळ करणे; घालमेल करणे.

**खुर्द (र्दा) सानक** स्त्री. १. भुक्त अन्न. २. (ल.) परत न मिळणारे इनाम, जमीन, वतन. पहा : **सानक**

**खुर्दसाल** वि. कनिष्ठ; लहान; अप्रौढ; अल्पवयी; अननुभवी : 'ते खुर्दसाल या कामा योग्य नाहीं.' - पेद २५.७९. [फा. खुर्द]

**खुर्दळ** पु. कंदन; खुंदलाखुंदली; तुडवणी : 'रणीरण खुर्दळ मांडला।' - ऐपो ८६. [सं. खुर + दल]

**खुर्दा** पु. १. छोटी, कमी किमतीची नाणी; सुटे पैसे; मोड; चिल्लर. (क्रि. करणे.) २. फुटक्या, छिन्नभिन्न झालेल्या वस्तूचे तुकडे (मडकी, भांडी इ.चे) ३. आंदुळणे, गचके बसणे यांच्या योगाने, अंग रगडून, घुसळून निघाल्याने झालेली अवस्था. पहा : **खुरदमा** १. ४. (ल.) मोठ्या माणसांच्या जमावातील मुलांचा समुदाय. ५. (ल.) नाश. [फा.]

**खुर्दा (र्दु) ळा** पु. मोडतोड; चक्काचूर : '(गाडी) एका दगडावरनं पुढच्या खड्ड्यात पडताना डाव्या बाजूच्या चाकांच्या आऱ्यांचा खुर्दुळा झाला.' - खळाळ १४०.

**खुर्देकरी, खुर्देवाला** पु. मोड देण्याकरिता सुटी नाणी ठेवणारा माणूस.

**खुर्पडना** क्रि. १. तात्पुरती फोडणी देणे. २. घोळणे. (झाडी.)

**खुर्पा** पु. उसाचा रस घोळण्याचा मोठा सराटा, उलथणे.
**खुर्पी** पहा : **खुरपे** (खा.)
**खुर्बाण** एक लढाऊ हत्यार.
**खुर्मसना** क्रि. कुढणे. (झाडी)
**खुर्मारोटी** स्त्री. खारका घातलेली पोळी; रोटीचा एक प्रकार.
**खुर्शीद** पु. सूर्य. [फा.]
**खुर्शीद जुहूर** सूर्याप्रमाणे स्पष्ट. [फा.]
**खुर्संदगी** स्त्री. आनंद; संतोष : 'मजकूर दर्याफ्त जाला व खातरेस बिस्यार बिस्यार खुर्संदगी जाली.' - भाऐपयाव ४६. [फा.]
**खुर्सावेल** स्त्री. सुदर्शन वेल. (गो.)
**खुल** पु. (पाणी, दूध इ. चा) चुळका. (भर याबरोबर उपयोग) : 'खुलभर दूध घेतलं.' - सोमवाराची कहाणी ११. [सं.क्षुल्ल]
**खुलणे** अक्रि. उघडणे. लक्षणेने पुढील काही अर्थ - १. (ल.) फुलणे; उमलणे; प्रसन्न होणे (अंत:करण, स्वभाव). २. उदयास येणे (दैव, नशीब). ३. स्पष्ट, तकतकीत, उठावदार होणे.(रंग,कपडा). ४. उघडणे; थांबणे (पाऊस). ५. बुद्धिगम्य, स्पष्ट, कळेल असा होणे (बेत, इंगित). ६. शोभणे; साजणे, साजरे होणे. ७. पुढे येणे; आपल्या सर्व गुणांनी व बुद्धीने चमकणे. (वा.) ० **खुलून खेळणे** - मोकळ्या मनाने, बेशक लढणे : 'परंतु हे इंग्रेजास फार भितात, खुलून खेळत नाहीत.' - इसदिमरा [सं. क्षुर]
**खुलता भाव** (अर्थ.) रोख्यांच्या भांडवली बाजारात, दिवसाच्या व्यवहाराच्या आरंभी असलेल्या, रोख्याच्या चालू किमती.
**खुलपी** स्त्री. (सोनारी) गोल घुमट व त्या मधोमध उभे शिखर राखून सोन्याच्या अगर चांदीच्या पत्र्याचे ताइताप्रमाणे तोंडाशी बसविण्यासाठी केलेले टोपण.
**खुलवटणे** अक्रि. खूष होणे : 'किंचितशा खुलवटून त्या म्हणाल्या...' - अगतिका ७६.
**खुलवर** स्त्री. न. लाच; लालूच.
स्त्री. १. चोरीच्या किंवा लबाडीने मिळवलेल्या वस्तूंचा गुप्त साठा. २. मालकांपैकी किंवा भागीदारांपैकी एखाद्याने (स्वत:च्या खाजगी उपयोगासाठी) समाईक मालमत्तेचा आपणांसाठी चोरून ठेवलेला भाग (पैसा, जिन्नस यांचा). ३. घरातील कर्त्या माणसांच्या न कळत पुरून ठेविलेले द्रव्य; असल्या प्रकारचा गुप्त साठा करणे : 'केली खुलवर शेवटीं मुक्रर देतील दगा। कर्जाचे डोंगर दावितील करून वर त्या बगा।' - पला ८५. (क्रि. करणे.) (को.)
**खुलस** खुलासा; निर्णय तात्पर्य; कारण; हेतू : 'वरकड तीन मुद्दे सामान्यच, खुलस दोन किल्ले व पाच लाख रुपयांचा मुलुख यावर आला.' - मर्शियाका २८७.
**खुला** वि. १. मोकळा; उघडा; बंदिस्त नसलेला (माल, जागा, गठ्ठा). २. बोडका; अनाच्छादित (अंबारीविरहित हत्ती, खोगिराशिवाय घोडा, पलाणाखेरीज उंट). ३. रिते; खाली; मोकळे (भांडे, घर, जागा). ४. मनमोकळा; कुढा नसलेला. ५. (ल.) अनिश्चित; अनियमित; निरंकुश इ. जसे :- खुली मुदत = अनिश्चित, न ठरवलेली मुदत, खुली चाकरी = हवी तेव्हा सोडता येण्यासारखी चाकरी. ६. स्पष्ट; उघड; खडखडीत; साफ (भाषण). [सं. क्षुर]
**खुला** पु. वाळविलेली फळभाजी; उसऱ्या. (व.)
**खुला** पु. फोड; तुकडा; काप. (चंद्रपुरी)
**खुला** पु. कवडीच्या जातीची मोठी, उंच व पांढरी शिंप.
**खुला घटस्फोट** मुसलमान स्त्रीने आपणहून आपल्या मेहेरपैकी काही भाग अथवा सर्व सोडून देऊन घटस्फोट घेणे.
**खुलाटणे** अक्रि. खुलणे; खूष होणे.
**खुलाड-डे** पहा : **खुराडे**
**खुला पदर** सदाचार; निष्पाप वर्तन (विवाहित स्त्रीच्या बाबतीत).
**खुला प्रश्न** ज्या प्रश्नाचे उत्तर वस्तुनिष्ठ प्रश्नासारखे अगदी निश्चित नसते असा प्रश्न. उदा. वाक्यपूर्ती करण्यास दिलेला प्रश्न किंवा निबंधवजा वा स्पष्टीकरणात्मक प्रश्न.
**खुला बाजार** (अर्थ.) जेथे ग्राहक व विक्रेते यांच्यातील खुल्या स्पर्धेमुळे मागणी पुरवठ्यानुसार वस्तूची किंमत निश्चित होते अशी बाजारपेठ.
**खुला रंगमंच** पहा : **खुले रंगमंदिर**
**खुलावट** स्त्री. सजावट; शोभा; सौंदर्य; उठून दिसणे.
**खुला व्यापार** आयात मालावर जकात नसणे; मुक्त व्यापार.
**खुलाशाचा** वि. १. मोकळा; स्पष्टीकरणात्मक. २. (ल.) आतबाहेर नसलेले; मोकळे (भाषण).
**खुलास** वि. १. मोकळे; प्रशस्त; बंदिस्त नसलेले (प्रदेश, स्थळ). २. मुक्त; अनियंत्रित. ३. अकपट; मनमोकळा; निष्कपटी. [फा.]
**खुलास-सा** पु. १. मनमोकळेपणा : 'खुलासा बळकट झाला.' - पया ३७५. २. शुद्ध भाव : चित्तांतील खुलासा व अहवाल जाहीर व्हावा.' - मइसा ७.९२.
**खुलासा** पु. १. अर्थ; मतलब; उद्देश; आशय; धोरण; अभिप्राय; उकल. (भाषण, लेख याचा). (क्रि. काढणे, निघणे). २. निवाडा; निकाल; निर्णय. ३. स्पष्टीकरण. ४. सार; निष्कर्ष; सारांश : 'त्याचा खुलासा हाच कीं अंतर्वेदींत मऱ्हाटे न आणावे.' - मइसा ६.३०८. [फा.]
**खुलासा** पु. १. निश्चिन्ती : 'खुलासियानें असत जावें.' - ऐलेसं १.१६९. २. पेचमुक्त : 'वरकडांचा सरंजाम खुलासा, यांचा सरंजाम सुटलाच नाहीं.' - ऐलेसं २.८४५. ३. मोकळेपणा; खुलेपणा.
**खुलासेवार** क्रिवि. माहिती देऊन; स्पष्ट करून; समजेल अशा प्रकारे; तपशीलवार.
**खुलीकैद** स्त्री. १. बेड्यांशिवाय कैद. २. नजरकैद; इकडेतिकडे फिरण्यास मोकळीक असलेली कैद. पहा : **खुला**
**खुले** वि. (जरतारी धंदा) रेशमावर विरळ गुंडाळलेली तार असलेले.
**खुले न्यायालय** जनतेला अनिर्बंध प्रवेश असलेले, खटला चालविणारे न्यायालय.
**खुले बंदर** (अर्थ.) ज्या बंदरामध्ये निर्यात करण्यासाठी परदेशातून आलेल्या मालावर जकात आकारली जात नाही असे बंदर. अशा सवलतीमुळे

आधी आयात जकात घेऊन ती पुन्हा परत करण्याचा अकारण व्यवहार टाळला जातो.

**खुले मागणीपत्र** (अर्थ.) उद्योग व्यवसायाला आवश्यक असा माल विशिष्ट उत्पादकाकडून आणण्याची अट नसलेले मागणीपत्रक.

**खुले रंगमंदिर** तात्पुरता किंवा कायमचा रंगमंच बांधून नाटक इ. करण्याची जागा.

**खुलौरी** स्त्री. रंग; शोभा; खुलावट : 'आनंदाची खुलौरी हारतली।' - भाए ९०.

**खुल्द** पु. स्वर्ग. [फा.]

**खुल्दमकान** स्वर्गस्थ; स्वर्गवासी; दिवंगत. [फा.]

**खुल्लमखुल्ला** क्रिवि. मोकळ्या मनाने : 'खुल्लमखुल्ला गोष्टी झाल्या, तर साऱ्ये गैरसमज दूर होऊन जातील.' - श्रीयो १.२२८.

**खुल्ला** वि. सरळ; खुला; मोकळा; उघड : 'तो खुल्ला सवाल टाकतो.' - विभूत ९४.

**खुवा** पु. 'टोप'. - (तंजा.)

**खुश** वि. आनंदित; संतुष्ट; तृप्त; प्रसन्न. [फा.]

**खुशकी-श्की** स्त्री. १. जमीन; भूभाग. २. भूमिमार्ग. ३. जमिनीवरील जकात, स्थलमार्गाने येणाऱ्या मालावरील जकात. ४. कृत्रिम रित्या न भिजवलेली कोरडी जमीन. [फा.]

**खुशखत** न. सुरेख अक्षर; सुंदर लिपी. [फा.]

**खुशखरिदी** स्त्री. आपखुशीने खरेदी; बिनआग्रही व्यापार.

**खुशखुर्मी** स्त्री. आनंद; समाधान : 'ते पोहोंचून खुशखुर्मी हासल जाहली.' - मइसा १०.११८. [फा.]

**खुशतबाई** मर्जीप्रमाणे : 'निव्वळ गाठ पडल्यास कांहीं खुशतबाई जाब आज उद्या असेच होत असते.' - मर्शियांका ३७५.

**खुशबू-बो, खुशबोई-य** स्त्री. सुगंध; सुवास; अत्तर : 'खुशबोई अत्तर लावू राजसा।' - सला ७८. [फा.]

**खुशम** वि. खुशाल.

**खुशमर्जी** स्त्री. १. मान्यता; अनुकूलता; खुशी. २. प्रसन्नचित्त; चांगली वृत्ती; स्नेहभाव; आनंदीपणा : 'नबाबानीं खुशमर्जीनें आम्हांस... पत्रें पाठविलीं.' - ऐलेसं ७.३४५३.

वि. १. मान्य असणारा; कबूल करणारा. २. चांगल्या वृत्तीचा. [फा.]

**खुशमस्करी** स्त्री. खुशामतखोरी; तोंडपुजेपणा; थट्टामस्करी; पुढे पुढे करण्याची वृत्ती.

**खुशमस्क्या** पु. १. थट्टामस्करी करणारा; विनोदी; थट्टेखोर. २. विदूषक; राजाजवळील गमत्या. ३. तोंडपुज्या; खुशामतखोर; स्तुतिपाठक.

**खुशमिजाज** वि. आनंदी. [फा.]

**खुशमौज** स्त्री. क्रीडा; गंमत; खेळ; करमणूक.

**खुशमौजा-जी** वि. गाणेबजावणे, हसणेखिदळणे, थट्टामस्करीत आनंद मानणारा; ख्यालीखुशालीत असणारा; रंगेल. [फा. खुश + मजाह]

**खुशरजावंत-द** वि. रुकार, मान्यता देणारा; राजी; कबूल. [फा.]

**खुशरंग** वि. आनंदी; चैनी; विलासी.

**खुशवख्त-ख्ती** स्त्री. १. उल्हासाचा काळ; आनंददायक प्रसंग; मन प्रसन्न असण्याचा काल. २. सुखावह, समाधानकारक स्थिती, अवस्था.

**खुशा** मौज; चैन; थट्टामस्करी.

**खुशाद** वि. मोकळा; सुटा : 'हात खुशाद होईल ते समयीं मागती लोक ठेवावयास उशीर काय?' - मइसा १.४६३. [फा. कुशाद]

**खुशामत-द** स्त्री. रुचेल असे प्रिय भाषण; स्तुती; हांजी हांजी; आर्जव; थुंकीझेलणी; तोंडपुजेपणा (भाषेचा, क्रियेचा). [फा. खुश + आमद]

**खुशामतखोर, खुशामतगो** वि. खोटी स्तुती करणारा; खुशामत करणारा; तोंडपुजे; स्तुतिपाठक; गोड बोलणारे; हांजीहांजीखोर : 'नवाबाजवळ मुसाहेबांत कोण्ही मातबार नाही. अवघे खुशामतगो आहेत.' - पेद २५.८४. 'सरकारच्या हुकुमाची अंमलबजावणी करणारे भेदरट किंवा खुशामतखोर हिंदू अधिकारी थोडेथोडके नव्हते.' - जीसे ३८२.

**खुशामततलबी** स्त्री. स्तुतिप्रियता : 'पाटीलबाबांची मर्जी खुद्पसंती व खुशामततलबी बहुत.' - दिमरा १.२५९.

**खुशामतदोस्त** वि. स्तुतिप्रिय : 'खुशामतदोस्त असू नये म्हणजे आत्मस्तवावर प्रीती नसावी.' - ऐस्फुले ४८.

**खुशामती-त्या-दी** वि. खुशामत करणारा; तोंडपुज्या : 'खुशामति गुलाब हा चटक चूटक्या वाजवी.' - गाणे (काशीकडील) : 'हिंदुस्थानी माणूस ब्राह्मणापासोन अतिशूद्र व मुसलमान पावेतों दगाबाज, मात्रागमनी, बेइमान, खुशामदी व तत्कालच निर्दय, प्राण घेणार पोटच्या संतानापावेतों...' - ऐस्फुले १०३. [फा.]

**खुशाल** वि. १. सुखी; सुखसंपन्न; संपत्ती व स्वास्थ्य असणारा; आनंदी : 'ह्या फौजा गेल्या म्हणोन इंग्रज व मोंगल फार खुशाल जाहले.' - ऐलेसं ९.४५२६. २. सुखरूप; निरोगी; चांगला; बरा.

क्रिवि. सुखाने; सुखेनैव; बेलाशक; भय, धोका, चिंता, आशंका नसलेला. [फा. खुश + हाल]

**खुशालचंद-चेंडू, खुशालटेकडा** वि. १. निष्काळजी; चैनी; विषयलोलूप; रिकामटेकडा; खुशमौजा. २. रंगेल; गुलहौशी; क्रीडासक्त.

**खुशालणे** अक्रि. आनंदणे; सुखी होणे : 'कां न तो खुशालेल अंतरीं।' - विक ३३.

**खुशालपट्टी** स्त्री. राजाला पुत्रप्राप्ती झाली किंवा असा काही आनंदोत्सव झाला तर गावावर बसवण्यात येणारी पट्टी.

**खुशालसीर** क्रिवि. मजेने; मौजेने; चैनीत; आनंदाने : 'हा कालपर्यंत कांहीं या गोष्टीची चर्चा नाहीं. राजश्री स्वामी खुशालसीर खेळतात.' - पेद ३०.२०७.

**खुशाली** स्त्री. १. संतोष; स्वस्थता; सुख. २. निरोगी व सुखी स्थिती; क्षेम; कुशल; समाधान; आनंद; आनंदितपणा : 'त्याजवरून खुशाली केली.' - मइसा १.५५. ३. मौज; गंमत; क्रीडा.

**खुशाली** स्त्री. चिरीमिरी; बक्षिसी; पोस्त : 'मुक्काम संपण्यापूर्वी खुशाली मागण्यासाठीं महिनाभर श्रांत झालेला भंगी आला.' - माबु ३९६.

**खुशी** स्त्री. १. आनंद; संतोष; समाधान : 'त्यांत खुशीची खबर आहे.' - ऐलेसं ७.३५८६. २. मर्जी; इच्छा. (वा.) **खुशीत गाजरे खाणे**

– अज्ञानात आनंद भोगणे.

वि. १. आनंदित; संतुष्ट; तृप्त. २. तयार. [फा. खुश]

**खुशी-सी** स्त्री. कुशल; खुशाली; प्रकृतिस्वास्थ्य : 'तृतीय प्रहरी बिलिमोर आले होते खुसी पुसोन गेले.' - मदरु २.३७; 'खुशी वगैरे बोलणें जालेनंतर काय मर्जी बोलले.' - मदरु २.३१.

**खुश्क** वि. सुका; वाळलेला : 'खुश्क मेव्याचे खोन.' - मइसा १०.२९६. [फा.]

**खुश्क(ष्क)साली** स्त्री. अवर्षण; अनावृष्टी; दुष्काळ : 'सालमजकुरीं खुश्कसाली आहे.' - मइसा२२.५२.

**खुश्की** स्त्री. १. जमीन. पहा : **खुशकी** : 'खुश्कीचे तमाम सर्दारांनीं इंग्रेजास तंबी करून खुश्कींतून त्याजला खेरीज करावें.' - मइसा १०.१८१. २. अवर्षण; दुष्काळ : 'कपर्दिक खुश्कीमुळें जागिरीपैकीं हातीं लागत नाहीं.' - दिमरा १.८३. [फा.]

**खुश्नमत** वि. मनोहर; आनंददायक; संतोषकारक : 'खत खुश्नमत.' - पया ३८४. [फा. खुशनुमा]

**खुश्नुदी** स्त्री. आनंद : 'मुफाबीजा मर्कूम केला तो पोंहचून खुश्नुदी हासल जाली.' - मइसा १०.१२९. [फा.]

**खुश्नुमा** वि. १. आकर्षक; दिसण्यात चांगले. २. उचित : 'अख्बारनवीस तेथें जाणें जाहिराण्यांत खुश्नुमा दिसत नाहीं.' - मइसा ५.१०४. [फा.]

**खुश्ब (श्बो) ईदार** वि. सुगंधी. पहा : **खुशबो** : 'चिकणी सुपारी नुसती व खुश्बोईदार करून ठेवीत जावी.' - पया २८१. [फा.]

**खुश्बी, खुश्बोई, खुशबई, खुश्मर्जी, खुश्मस्करी, खुश्वख्त** पहा : **खुश** पूर्वपद असलेले शब्द.

**खुष, खुषकी, खुषखत-बोई-मर्जी-रजावंती-वख्त, खुषामद, खुषी, खुष्की** पहा : **खुश** पूर्वपद असलेले शब्द.

**खुषनुमा** वि. सुंदर; उचित; योग्य; गोड : 'आमचे गेल्याचे पेशज चौथाईचे अमलाची मोकळी जाहलिया येथील कारपरदाजास खुषनुमा दिसले'- पुणे अखबार २२६.

**खुषबूदार** वि. सुगंधी : 'डौलदार व खुषबूदार फुल वेलीवर...'- डाली ४२.

**खुषि(षी)रंग** पु. संतोष; आनंद. पहा : **खुशरंग** : 'जिवा होईल खुषिरंग।' - ऐपो १३१.

**खुष्कीचा मार्ग** जमिनीवरून जाण्याचा रस्ता; जलमार्ग व वायूमार्ग यांच्या तुलनेत वापरला जाणारा शब्द.

**खुसकन-कर-दिशी** क्रिवि. पहा : **खुदकन.** हळूच; आनंदाने; रंगेलपणे; मनमोकळेपणाने; गालातल्या गालात (हसून). [ध्व.]

**खुसखुरणे** उक्रि. हाताने कुसकरणे; चुरडणे. पहा : **कुसकरणे**

**खुसखुशी (सी) त** वि. मऊ व कोरडा; चुरचुरीत; कुडकुडीत; खमंग; खरपूस भाजलेला. [ध्व.]

**खुसखुसणे** अक्रि. १. आवाज होणे; खसखसणे; खजबजणे. २. अंगदी हलक्या आवाजात बोलणे; कुजबुजणे. ३. हसू ऐकू येणार नाही अशाप्रकारे हसणे; मंद हसणे. ४. फेसाळणे : 'तिच्या (कासांडीच्या) तोंडावर लोण्यागत पांढरा फेस खुसखुसत होता.' - खळाळ ५०.

**खुसप (पु) ट** न. १. गुप्त दोष; व्यंग; न्यून; चीड येण्याजोगे किंवा अप्रतिष्ठा होण्याजोगे वर्म, चुकी; बारीकसारीक दोष. (क्रि. काढणे.) २. भांडणाला कारण किंवा निमित्त; कळ; कुरापत; खोडी. (क्रि. काढणे, निघणे.) (वा.) ० **रचणे, खुसपटे मांडणे ,काढणे** - (भांडण उकरून काढण्यासाठी) एखाद्याची न कळत झालेली आगळीक, चुका यांचा पाढा वाचणे.

**खुसपट्या** वि. खुसपटे काढणारा; छिद्रान्वेषी; लोकांचे फक्त दोष काढणारा; दोषदर्शी.

**खुसपणे** पहा : **खुपसणे**

**खुसपू(बू)स** स्त्री. कुजबूज; हालचालीचा सूक्ष्म आवाज : 'दाराजवळ कुणाची तरी खुसपूस ऐकल्याबरोबर...' - अजून येतो ३१.

**खुसबुसणे** पहा : **खुसखुसणे** : 'अगबाई! इथं खुसबुसलं काय बरं?' - चंद्रग्र २१.

**खुसबूस** स्त्री. धुसफूस; कुरकुर : 'बायकांच्या कोत्या समजुतीप्रमाणें घरांत नेहमीं खुसबूस चालत असे.' - महादजी चरित्र ५६. [ध्व.]

**खुसूप** न. दृश्य; प्रसंग : 'ऐसीं खुसुपें देखोनि।' - गीता २.२३२२.

**खुसूमत** स्त्री. वैर; हेवादावा : 'आम्हाला कोणाच्या खुसूमतीनें मिरवणूक काढावयाची नाहीं.' - के १३.१२.१९३८. [फा.]

**खुसूस** अ. विशेषत:

**खुळक(ग)ट** वि. वेडा; बावळा; मूर्ख; वेडपट; वेडसर; खुळा.

**खुळकन-र, खुळदिन-शी** क्रिवि. खुळखुळ असा आवाज होऊन. पहा : **खुळखुळ** [ध्व.]

**खुळखुळ-ळा** क्रिवि. खुळखुळ अशा आवाजाने (पायातील घागऱ्यांचा, ओढ्याच्या झुळझुळ वाहणाऱ्या पाण्याचा, वाळलेल्या नारळाचा, चूळ खळखळण्याचा इ.); खुळखुळ आवाज काढीत : 'झोटिंग वायोस्वरूप असती। सवेंच खुळखुळां चालती।' - दास १०.४.२५. [ध्व.]

**खुळखुळणे** अक्रि. १. खुळखुळ आवाज करणे, होणे, वाजणे (खिशातील नाण्यांचा इ.). २. चूळ भरून टाकणे, गुळणा करणे.

**खुळखुळा** पु. १. खुळखुळ वाजणारे मुलांचे एक खेळणे. २. घोड्याला रंगणावर धरताना वाजविण्याचे एक साधन. ३. तागाच्या झाडाप्रमाणे पुरुषभर उंचीचे, तागाप्रमाणे फळे असणारे एक झाड. ही फळे वाळल्यावर खुळखुळ वाजतात. याला 'घाटसर्प' असेही नाव आहे. वि. खुळखुळ आवाज करणारे (काठी, सोटा, ओगराळे इ.).

**खुळखुळा डिगळा** एक झाड. याची फुले जर्द पिवळी असून याच्या शेंगेचा आवाज खुळखुळ असा होतो.

**खुळखुळी** स्त्री. घटी; घंटिका; शणपुष्पिका. एक वनस्पती.

**खुळखुळून** क्रिवि. खुळखुळ आवाज करून : 'चुळा खुळखुळून टाकल्या.' - शिदोरी २५.

**खुळगा, खुळगट** पु. न. रेडा; हेला : 'यमें कवळीला खळ खुळगासा उठिला।' - वामन (कंसवध) २.२. (को.)

**खुळच(स)ट** वि. १. भ्रामक; अज्ञानावर आधारलेला. २. बावळट; मूर्ख; मूर्खपणाचा (धंदा, कृती इ.) : 'हा खुळचट धंदा हिंदुस्थानातला

शहाणा माणूस सहजच करीत नसे.' - राले १५१.

**खुळचट-पट-पट्या** वि. १. खुळा; वेडा. २. वाकड्या हातापायांचा; अपंग. ३. खुरट; वाकडा; खुजट (अवयव).

**खुळचोट-झवा** वि. जडबुद्धीचा; वेडझवा; टोणपा; मंदबुद्धीचा. (ग्राम्य).

**खुळपट-ट्या** पहा : **खुसपट, खुसपट्या**

**खुळबुळ** स्त्री. खुळखुळण्याची क्रिया. (क्रि. करणे.)

**खुळबुळ-ळा** क्रिवि. खुळखुळ असा आवाज करीत.

**खुळबुळणे, खुळबुळाविणे** उक्रि. तोंडात पाण्याची चूळ खळखळ वाजविणे; गुळणा करणे; खुळखुळणे. [ध्व.]

**खुळवणे** अक्रि. १. वेड लागणे; वेड्यासारखे वागणे. २. वेड लावणे.

**खुळा** पु. रेडा. पहा : **खुळगा**

**खुळा-ळे** वि. १. वेडा; बावळा; मूर्ख; बावचळलेला; खुळचट. २. थोटा; अपंग; वाकड्या हातापायाचा : 'येऱ्हवीं असता हातीं खुळा।' - ज्ञा १३.४५७. [सं. क्षुल्ल]

**खुळा** पु. तंबाकूची डिरी. (क्रि. मोडणे).

**खुळा ऊस** उसासारखे औषधी झाड; औषधी ऊस. यालाच 'रानऊस' म्हणतात.

**खुळाचा पाऊस** १. खुशामतीमुळे फुशारून गेलेल्याने केलेली भरमसाट उधळपट्टी, बेसुमार औदार्य. २. कामाची बेपर्वाई; भरमसाट कारभार.

**खुळा पैसा** राजापूर भागात पूर्वी चालणारे एक जुने तांब्याचे नाणे.

**खुळा मधुरा** १. विषमज्वर; वेडा मधुरा. यात माणूस वेड्यासारखी बडबड करतो. २. (ल.) वेडा माणूस.

**खुळावणे** अक्रि. वेडे होणे; मूर्ख बनणे; वेड लागणे.

**खुळी** स्त्री. पायाची टाच. (गो.)

**खुळेपंचांग** न. बावळट माणूस : 'या खुळपंचांगाला कदाचित शर्मिष्ठा आवडेल.' - ययाति २३६.

**खुळॉय** स्त्री. वेड लावणारी गोष्ट, गम्मत इ. (गो.)

**खुंट** पु. १. खाली राहिलेला भाग; खोड; कांड; सोट; बुंधा (झाड, झुडूप, शेपूट, केरसुणी, हजामत झाल्यानंतरचे केस इत्यादींचा) : 'समूळ फोडियेले खुंट।' - एरुस्व १०.७६. २. (मासे मारण्यासाठी समुद्र किंवा नदी यांत) रोवलेला खांब; डांब. ३. ज्यामध्ये फाळ बसवतात ते नांगराचे टोक. ४. (ल.) आधारस्तंभ; आश्रयदाता. ५. (ल.) कुटुंब; घरदार; त्यापैकी एक व्यक्ती; वंशाची शाखा; वंशातील मूल; संतान. ६. मध्यम आकाराचा केळीचा कोंब, खोड, मोना (मोठ्या केळीला चिकटलेला किंवा निराळा काढलेला). [सं. कुठ् - कुंठ् = स्तंभित होणे]

**खुंट** पु. बुगडीचे मळसूत्र ज्यातून जाते तो भाग; बुगडीचा, कुड्यांचा कानातील भाग; दांडा.

**खुंट** पु. १. अंगरख्याच्या बाहीच्या चुण्या जिच्यात एकत्र करतात ती पट्टी अथवा गजासारखी शिवण. २. तुकडा. (को.)

**खुंट** पु. (प्राणि.) अत्यंत आखूड सळ.

**खुंट** पु. काठ; कोपरा : 'खेटितां कुंप कांटी खुंट दरडी न पाहे।' - तुगा ३४६.

**खुंट** पु. स्वारी; उतारू (गाडीमधील).

**खुंट** पु. १. खांब; मेढ : 'मग परमस्नेहाचा खुंट उभवोन। गरके घालिती त्यासवें।' - नव २४.१५५. २. जनावराला बांधण्यासाठी जमिनीत गाडलेला लाकडी खुंटा; दांडके. ३. वाघूर लावण्यासाठी ठोकलेल्या लाकडाच्या मेढी. (वा.) ० **होणे** - हट्ट धरून खुंटासारखे ताठ व स्तब्ध बसणे. **खुंटासारखा उभा राहणे, असणे, खुंटणे** - खुंटाप्रमाणे ताठरणे, ताठ उभा राहणे. **खुटास खुंट घेणे** - जशास तसे करणे; उसने फेडणे.

वि. ताठ; नीट. (गो.)

**खुंट** पु. कुंपणाची काठी. (गो.)

**खुंट** पु. गोफण, जाळे, शिंके करण्याकरिता दोरीचे दोन पदर अथवा पेड तिरकस बाहेर ओढले जातात त्यांपैकी शेवटचे तंतू पुन्हा याच रीतीने बाहेर काढले जाऊन वळले जातात, अशा शेवटच्या तंतूंपैकी प्रत्येकाला खुंट म्हणतात.

**खुंट** पु. १. गाय, म्हैस यांच्या आचळातून दूध येण्यास प्रतिबंध करणारा मळ. २. दूध न देणारा जनावराचा सड; मुका, आंधळा सड.

**खुंट** पु. दणकट शरीराची गाय, म्हैस, जनावर किंवा स्त्री : 'काळवीट खुंट खरे...' - ऐपो २४२.

**खुंट** पु. १. (आंधळ्या कोशिंबिरीच्या खेळात) आंधळ्याचे सोंग घेणाऱ्याचे डोळे झाकणारा मुलगा; भोज्या. २. खोखोच्या खेळातील न हालणारा गडी : 'होऊनिया खुंट बसा जपून।' - मोगऱ्यांची कविता, मराठी ३ रे पुस्तक खेळ ५.४८. (वा.) **खुंटास खुंट उभा राहणे, होणे** - एक जातो तोच त्याच्या जागी दुसरा येणे; गेलेल्याची जागा नवीन येणाऱ्याने भरून काढणे; खंड पडलेली जागा भरून काढणे.

**खुंट** पु. १. पृथ्वीचे कोपरे : 'हिंदू देश कोण खुंट चारी।' - तुगा ११८. २. चार रस्त्यांचा चौक; चौहाट. ३. रस्त्याचे टोक; शेवट.

**खुंटकन-र, खुंटदिनी-शी** क्रिवि. तीव्र व हलक्या आवाजाने; खाडदिशी (दोन लाकडांचा परस्परांना लागून होणारा आवाज). (क्रि. वाजणे). चुटकी, टाळी यांच्या होणाऱ्या आवाजाप्रमाणे.

**खुंटकळी** स्त्री. बगलकळी; अंगरख्याच्या पाठीमागचा त्रिकोणी तुकडा. बगलेतील पेशकळी आणि आगा असे दोन तुकडे व खुंटकळी मिळून अंगरख्याची एक बाजू होते.

**खुंटचे** सक्रि. तोडणे, खुंटणे (नारळ, पाने इ.). (गो.)

**खुंटण** पहा : **खुंट १, २**

**खुंटणावळ** स्त्री. धान्ये, भाजी खुडण्यासाठी लावलेल्या लोकांची मजुरी.

**खुंटणी** स्त्री. बोटांनी किंवा नखांनी हलकेच केलेली काढणी, तोडणी.

**खुंटदावे** न. (ल.) संसार : 'हां गा मुक्तीचिया चाडां : आणि खुंटदावे सांभाळणे :' - लीच ३.४७.

**खुंटपान** न. केळीच्या गाभ्यापासून निघणारे शेवटचे आणि कोक्याच्या पूर्वी येणारे आखूड पान. (राजा.)

**खुंटबावली** स्त्री. १. एक प्रकारची बाहुली. २. उंचीवरचा पदार्थ काढण्यासाठी चवड्यांवर उभे राहणे. (क्रि. करणे.) ३. (निंदेने) काम न करणारी व खुंट्यासारखी तिष्ठत राहणारी स्त्री. (राजा.)

**खुंटबाळी** स्त्री. स्त्रियांचे एक कर्णभूषण : 'खुंटबाळ्या साध्या बाळ्या त्याजवर।' - अफला ५५.

**खुंटभाजी** स्त्री. विशेष विस्तार व्हावा म्हणून पुन्हा पुन्हा शेंडे खुडून राखलेली भाजी; खुंट किंवा मुळ यापासून निघालेला कोंब व त्याची भाजी.

**खुंटरोग** पु. पुष्कळ दिवस खुंटाला बांधून ठेवल्यामुळे पशूंना येणारा रोडकेपणा किंवा होणारा आजार.

**खुंटला** पु. गाडीच्या दोन बाजूंना (आतील सामान बाहेर पडू नये म्हणून) लावलेले खुंट. (व.)

**खुंटवरा** पु. खुंटी. पहा : **खुंटा**

**खुंटविणे** सक्रि. अटकाविणे; अडविणे; रोखणे; थबकविणे; कुंठित करणे; गतीला विरोध करणे. [खुंटणेचे प्रयोजक]

**खुंटळणे** अक्रि. वाल इत्यादीचा एक एक दाणा लावण्यासाठी जमिनीत खुंटीने किंवा काठीने टोचा, भोक पाडणे, टोकणे.

**खुंटा** पु. १. डांब; मेख; दांडके. २. जात्याचा लाकडी दांडा (दळताना हातात धरायचा); जात्याची खीळ; खुंटी : चुलेत; वल्ह्याचा दांडा. ३. (सोगट्यांचा खेळ) दुफाशी खेळात, उभ्या पडलेल्या दोन फाशांपैकी एक फासा. ४. मोठी खुंटी.[सं. कुठ] (वा.) ० **गाडणे** - पाय रोवणे. ० **बळकट असणे,** ० **खबरदार असणे** - बलिष्ठ, भक्कम आश्रयदाता असणे. ० **हलवून बळकट करणे** - अर्धवट ठरलेली गोष्ट पक्की करणे; संदिग्धता नाहीशी करणे. **खुंट्याच्या जोराने दावे ओढणे, उड्या मारणे** - आपला आधार भरभक्कम आहे अशा समजुतीने बेपर्वाईने वागणे.

**खुंटाड** न. तोडलेल्या किंवा वठलेल्या झाडाचा जमिनीच्या वर असलेला भाग; निरुपयोगी खुंट, सोट.

**खुंटाड्या** वि. वैष्णव. हे आपल्या कपाळाला कस्तुरीची उभी रेघ लावतात यावरून त्यांना विनोदाने म्हणतात.

**खुंटापरा, खुंटाप्रा** पु. झाडाचा खुंट; खुंट; ठोंब; उभा सोट.

**खुंटापळी** स्त्री. भक्कम व आखूड काठी.

**खुंटाफळी** स्त्री. गुराखी मुलांचा एक खेळ.

**खुंटाफळी** स्त्री. (तुळजापूर गावी) घोड्यावरील जकात; खुंट्यामागे घ्यायचा कर : 'त्या स्थानीं (तुळजापूर गांवीं) यात्रा येते. तीस कर द्यावा लागतो. त्यास खुंटाफळी म्हणतात.' - तीप्र २०७.

**खुंटारा** पु. १. खुंट. २. पाण्याचा रहाट किंवा तेल्याचा घाणा यांना बैल जुंपून त्याला फिरायला शिकवण्यासाठी खुंटा पुरून करतात ते यंत्र; खटारा. (को.) ३. झिजलेला, खराब व जुना खराटा; खराट्याचा बुडखा. (गो.) (वा.) **खुंटाऱ्याखाली घालणे** - शाळेत डांबणे.

**खुंटारी** पु. विस्तार नसलेला किंवा आखूड तुकडा. (गो.)

**खुंटावणी** स्त्री. मासे धरण्याचा एक प्रकार. (गो.)

**खुंटावणे** उक्रि. १. खिळवून ठेवणे; हालचाल करू न देणे; (भूत इ. चा) उपद्रव कमी करणे. २. भक्कम राहणे.

**खुंटावरी** पु. जुनी वाढवण; झिजलेली केरसुणी. (गो. कु.)

**खुंटावळी, खुंटाळी** स्त्री. मुडा बडविण्याची भक्कम आणि आखूड काठी, दांडके.

**खुंटाविणे** सक्रि. १. जमिनीत घट्ट बसविलेल्या खुंट्याला पायाचा तळवा बळकट बांधून आणि खुंट्याच्या शेवटावर पाचर ठोकून आखडलेला किंवा ताठलेला पाय सरळ करणे. २. (मंत्राने पिशाच्च वगैरे) बांधून टाकणे; त्यांची उपद्रवशक्ती कमी करणे.

**खुंटाळी** स्त्री. (निंदाव्यंजक) वांझ स्त्री.

**खुंटा(ट्या)ळे** न. खुंट्यांचा संच; अनेक खुंट्या बसवलेली पट्टी.

**खुंटाळ्या** पु. न्हावी. २. पहा : **खुंटाड्या**

**खुंटी** स्त्री. १. लाकडी मेख. २. लहान खुंट, सोट; धस; सुळका; सड. (क्रि. भरणे) : 'तीन रात्र खुंटी बांधलीसे।' - ब ५२. ३. शिवेची खूण; खूट; क्षेत्रमर्यादा. (को.) ४. (सुतारी धंदा) दोन लाकडांचा सांधा जोडण्यासाठी मारलेली पाचर. ५. वखराच्या रुमणीची मूठ. (खा.) ६. (छापखाना) फर्मा आवळण्यासाठी ज्या कांड्या ठोकतात, त्या ठोकण्याचे साधन. ७. (खडी काढणे) ठसे उठवण्यासाठी वरून दाबण्याचा लाकडी दांडा. ८. वस्त्रे वगैरे ठेवण्यासाठी भिंतीत बसवलेला लहान खुंटा. ९. इसाडाच्या ज्या टोकात नांगरखुंट व लुमणी घालतात तेथे ती बाहेर पडू नये म्हणून इसाडाला भोक पाडून त्यामध्ये घालायचा लाकडी तुकडा, खिटी. (को.) (वा.) ० **उपटणे** - घालवून देणे; (कामावरून अथवा अधिकारावरून) काढून टाकणे; पदच्युत करणे. ० **आत ठेवणे,** ० **मारणे,** ० **राखणे** - थांबवणे, अटकविणे. ० **पिरगाळणे,** ० **पिळणे,** ० **पिळवटणे, मारणे** - १. प्रयत्नात किंवा बेतात अडथळा आणणे; एखाद्याचे बहुतेक पुरे झालेले काम नासविणे; बेत हाणून पाडणे. २. खिजविणे; भांडण लावणे; भांडण करण्यास उत्तेजन देणे. ३. आपल्या योजनेच्या किंवा आरंभलेल्या कार्याच्या विरुद्ध दुसऱ्या कोणी खटपट केली असताना ती सफळ होऊ नये म्हणून अगोदरच आपण सावधगिरीने तजवीज करून ठेवणे. **खुंटीला अडकणे** - तहकूब होणे; थांबले जाणे, राहणे; भिजत पडणे. **खुंटीला गाठोडे, गबाळे लागणे** - वादविषयक मालमत्तेचा निवाडा न होणे, ती न्यायप्रविष्ट असणे; व्यवस्था लागण्याच्या तयारीत असणे; ती विचाराधीन असणे; प्रवेश होणे; बोट शिरकविणे; केवळ उतारकरू असणे. **पडशी खुंटीवर तयार ठेवणे** - हुद्यावर अद्यापि कायम न होणे; घटकोघटकी बडतर्फीची वाट पाहणे.

**खुंटी कलम** (कृषी) आंब्याच्या झाडांवर केले जाणारे कलम. देशी आंब्याचे झाड बुंध्याजवळ करवतीने अर्धे कापून बुंध्याची साल व आतील काष्ठ यांमधील जागेत चांगल्या आंब्याच्या जातीच्या फांदीचा तुकडा बसवून, ते केळ्याच्या सोपट्याने घट्ट बांधतात.

**खुंटीफलक** पु. (शिक्षण) खुंट्यांनी युक्त असलेला फलक; हस्तकौशल्य चाचणीत याचा उपयोग केला जातो.

**खुंटी सांधा** पु. (वै.) जात्याची वरची तळी खालच्या तळीच्या खुंट्याभोवती ज्याप्रकारे फिरते त्याप्रकारची सांध्याची रचना.

**खुंटे, खुटले** पु. अव. बैलगाडीच्या बाजूच्या घोडक्यांना भोके पाडून बसवलेली उभी लाकडे.

**खुंटे(टी)उप(पा)ड-ट** स्त्री. घोड्याच्या ७२ खोडींपैकी एक खोड. असल्या अपशकुनी घोड्याच्या मालकाला आपल्या कामात अपयश येते. हा दोष म्हणजे गोम (केस) उलट फिरलेली किंवा उजव्या गुडघ्याखालील उलटा भोवरा होय. - अश्वप १.९९.
वि. १. ज्या चाकराच्या पायगुणाने यजमानाचा तोटा (अधिकार जाणे इ.) होतो किंवा काही वाईट होते अशा चाकरासही हा शब्द लावतात. २. उपरा, चार दिवस राहणारा (उतारू, वाटसरू). ३. खुंटेउपट हा दोष असलेला (घोडा).

**खुंटेखळाळ** वि. १. खुंट्याला बांधले असता त्याभोवती खळखळ करणारा, गडबड करणारा (घोडा, बैल). यावरून २. (ल.) रानोमाळ हिंडणारा; भटकणारा; भटक्या.

**खुंटेगाड** वि. १. डाव्या गुडघ्याखाली भोवरा असणारा (घोडा). हे शुभचिन्ह असून यामुळे धन्याची चाकरी स्थिर होते. २. उपद्व्यापी, व्यर्थ खटपट करणारा. (व.)

**खुंटेबाळी** स्त्री. बायकांचे एक कर्णभूषण; खुंटबाळी.

**खुंट्या** स्त्री. अव. (बैलगाडी) पाचरा. करळीची बाहेरील टोके व पाते वगैरे भक्कम करण्यासाठी यांचा उपयोग होतो.

**खुंट्यावरचा, खुंटीवरचा कावळा** १. उपरा; उतारू; वाटसरू. २. कोणीतरी, अनोळखी माणूस. ३. (ल.) अल्प सुख किंवा दुःख; क्षणिक गोष्ट; पाण्यावरचा बुडबुडा.

**खुंट्यावळ, खुंट्याळे** न. खुंटाळे (गो.).

**खुंडकं** न. थोटूक : 'विड्यांचा स्टॉक संपला का खुंडकं पेटवून त्याचा समाचार घ्यायचा.' - माजी १३०.

**खुंडा** पु. झाडांचा शेंडा : '...काही काटेरी झाडांच्या खुंड्यावर गाईच्या शेपटातील केसांचा झुबका अडकून राहिलेला दिसला.' - वाघसिंह ७०.

**खुंडी** स्त्री. एका शेवटास शिवून दुमडलेली खोळ; खोपा; घोंगता; झोळी (बाजारात विकायचे धान्य ठेवण्यासाठी).

**खुंडी** स्त्री जोंधळ्याची एक जात. ही चाऱ्याकरिता लावतात.

**खुंदण** न. तुडवण्याची क्रिया. (ना.) [सं. कंदन]

**खुंदणे** सक्रि. तुडवणे. [सं. कंदन]

**खुंदल (ळ) णी** स्त्री. दांडगाईची वागणूक; हिडीसफिडीस.

**खुंदल (ळ) णे** उक्रि. १. दांडगाईने वागवणे; बुदकणे; कुदलणे; ठोकणे; मारणे; लाथाबुक्क्यांनी मारून जर्जर करणे; ओढाताण करणे; दांडगाईने आणि बेपर्वाईने वापरणे, वहिवाटणे (वस्तू, पशू) : 'मग त्या खुंदळिलें चरणीं।' - कथा ३.१६.८५. २. दामटणे; पिटाळणे; शक्तीबाहेरील काम देणे; खराब करणे; चेंदामेंदा करणे. ३. कुंदलणे; चुरडणे; गुधडणे; तुडवणे; मळणे (कमविण्याचा चुना, चिखल). ४. हलविणे; हांदुळणे; हिसके देणे (खटारा गाडी, घोडा इ.). [सं. कंदन]

**खुंदला-ळा** पु. क्षीणता; शीणभाग. पहा : **खुरदमा**

**खुं (खूं) ब** पु. न. लोक; राष्ट्र; देश; जात; कुल : 'कानुकायदे अठरा खुंब जागे जागे चौथरे नेमून दिले.' - मदरु १.२५. [फा. कौम]

**खूजा** पु. फिरकीचा तांब्या. (तंजा.)

**खू(खूं)ट** पु. १. नांगराचे खोड; फाळ बसवण्याचे लाकूड. २. कोळसा. (को.)

**खूट** स्त्री. खुंट; उसाच्या चरकाच्या मळसूत्री खांबाच्या बुडाचा भाग, जोड.

**खूट** स्त्री. उणीव; तूट; न्यूनता; वजनातील कमीपणा.

**खू (खूं) ट** पु. वेलीचा आधार, खांब. (कु.)

**खूट आगूल** स्त्री. मधली आगूल. नांगराला लावलेल्या बैलजोडीतील मधली जोडी. (व.)

**खूड** न. खुराडे : 'आंधारिये घालवीति चकोर। खूडां पाडवीति सोगौर।' - रुस्व ५९६.

**खूड** स्त्री. झाडाचे (विशेषतः हरबरा) तोडलेले कोवळे शेंडे; शेंडे खुडण्याचे काम : 'हरबऱ्याची खूड घरची बायामाणसे करतात.' - गार ८७. (क्रि. करणे.)

**खूण** स्त्री. १. चिन्ह; ज्यावरून एखादी गोष्ट जाणली जाते किंवा समजली जाते ते लक्षण; ठिपका; निशाणी; व्यंजन; संकेतचिन्ह : 'हळूच खुणें सांगतसे।' - नव १२.१८८. २. (विशेषतः) क्षेत्रसीमाचिन्ह; शीव. ३. संकेत; इशारा (डोके हालवणे, हातवारे, नेत्रसंकेत इ. क्रियेने दिलेला); सूचना; सांकेतिक सूचना; उल्लेख; पर्यायोक्ती (गुप्त रूपाने आपला अभिप्राय दुसऱ्याला समजावा म्हणून केलेला). ४. वर्म; मर्म; लक्षण : 'या खुणा तूं कहीं। चुकों नको।' - ज्ञा ९.१३४.[सं. क्षुण] (वा.) ० **धरणे** - ध्यानात ठेवणे. ० **पाळणे** - आज्ञा पाळणे; मनोगताप्रमाणे वागणे : 'नव्हे तयाची खूण पाळिली।' - ज्ञा १८.९१४. ० **पुरणे** - खूण पटणे.

**खूण-न** स्त्री. मासे पकडण्याचा बांबूच्या कामट्यांचा सापळा. हा मृदंगाच्या आकाराचा असतो. (कु.) पहा : **खोइन**

**खूणखाण** स्त्री. खुणा, संकेत, मनोगत, सूचना, चिन्हे यांसाठी व्यापक शब्द. पहा : **खूण**

**खूणगाठ** स्त्री. १. (एखाद्या गोष्टीची) आठवण ठेवण्यासाठी वस्त्राला किंवा त्याच्या पदराला मारलेली गाठ. २. (ल.) खात्री. (वा.) ० **बांधून ठेवणे, ० मारून ठेवणे** - खात्री बाळगणे; पक्के समजणे.

**खूणचिठ्ठी** स्त्री. (ग्रंथ.) ग्रंथाला, पुस्तकाला खुणेसाठी लावलेली कागदाची, प्लॅस्टिकची पट्टी.

**खूणमुद्रा** स्त्री. इशारा, चिन्ह, निशाणी, मुद्रा, ठसा, अंक इ. मोघम शब्दांबद्दल व्यापक अर्थाने योजतात. एखादी खूण किंवा सर्व खुणा. पहा : **खूण**

**खूद** पु. ताडी ठेवण्याचे अरुंद गळ्याचे मडके.

**खूद** क्रिवि. खुद्द; स्वतः; खासगत इ. पहा : **खुद्द**

**खून** पु. १. मनुष्यवध; हत्या; घात; मनुष्याला ठार मारणे. २. रक्त, रक्तपात (या मूळ अर्थानेही योजतात.). ३. (कायदा) एखाद्या व्यक्तीला योजनापूर्वक कृत्य करून ठार मारणे. [फा.] (वा.) ० **चढणे** - मनुष्यवधामुळे उन्माद चढणे.

**खूनखराबा** पु. रक्तपात व नासधूस; लूट व धूळधाण, जाळपोळ इ.

**खूनमाऱ्या** वि. खुनशी. (गो.)
**खूप** स्त्री. १. ठणका; वेदना. (क्रि. लागणे.) २. खुपरी रोग. (क्रि. होणे.)
**खूप-ब** वि. फार; पुष्कळ; अतिशय.
क्रिवि. चांगल्या रीतीने; नामी रीतीने; सुरेख प्रकारे; घवघवीतपणे; विपुलपणे; उमदेपणाने.
उद्गा. भले; वाहवा. [फा. खूब]
**खूप(ब)तराशी** क्रिवि. उत्कृष्ट रीतीने; डौलाने; शोभा येईल असे; श्रीमंती थाटाने; उत्तम तऱ्हेने.
**खूप(ब)वजा** क्रिवि. उत्तम रीतीने : 'मुसा बुसी यास खूबवजा ताकीद करून रवाना करावें.' - मइसा १.५१.
**खूब** वि. सगळा रंग एकाच प्रकारचा असून एका कानाचा रंग निराळा असलेला (घोडा). - अश्वप १.३२.
**खूबटा** पु. खडा : 'उदकाचें स्वच्छ निर्मळपणे देखौनि आंतुल खडे खूबटे आसळग देखे :' - दृपा ७.
**खूम** पु. १. लोक; राष्ट्र; जात; कुल; समाज : 'तरी कसबेमजकुरीं कुलखूम असतील त्याजवर पट्टी करून रुपये देवविलें.' - वाडबाबा २.२१. २. गावातील प्रतिष्ठित माणूस; ग्रामणी. [फा. कौम]
**खूम** स्त्री. विधी; पद्धत; चाल. पहा : **खुम** (गो.)
**खूमदार** वि. प्रतिष्ठित (मनुष्य).
[फा. कौमदार = कुटुंब किंवा जात असणारा]
**खूमवार** वि. जातवार; लोकवार (कर, पट्टी).
**खूर** पु. पहा : **खुर**. १. टाप; शफ; गेळे; पंचनख पशूवाचून इतर पशूंचे पाऊल. २. गेळ्याचे दोन भाग. ३. पलंगाचा, खाटेचा, खुर्चीचा पाय. ४. चुलीवर भांडे ठेवण्यासाठी असलेले उंचवटे; तुळशीवृदांवनावरील चार उंचवट कोपरे. ५. पहा : **खुरकी** [सं. खुरः]
**खूर** पु. गाय, म्हैस यांचा सड.
**खूल** खूळ; बंडवाले, दंगेखोर : 'त्याजवरून खूल व गावातील पाटील पळून गेले.' - पुणे अख. भाग २ पृ. १६.
**खूल** स्त्री. धूळ : 'महत्त्वाची खूल धरी' - उगी ६०२
**खूश-ष** वि. आनंदित; संतुष्ट; तृप्त. पहा : **खुश** : 'आपण खूश दिल्लीस असावें.' - दिमरा १.२१०. [फा.]
**खूषखरेदी** स्त्री. राजीखुषीने केलेला व पूर्णपणे अनिर्वेध आणि अनिर्बंध असा खरेदीचा व्यवहार : 'सर्व मालमत्ता खूषखरेदी विकत घ्यावयाची आहे.' - सकाळ १७.३.१९४२.
**खूळ** न. वेड; भ्रमिष्टपणा; चळ; छंद; वेडी समजूत. (क्रि. पडणे, लागणे.) [क. कूळ] (वा.) ० **पिकणे** - बंड, खूळ, दंगा वाढत जाणे. ० **लागणे** - १. वेड लागणे. २. (ल.) नाद, व्यसन लागणे.
**खूळ** न. १. (बंडखोर, लुटारू, दरोडेखोर इत्यादींची) टोळी; जमाव. २. गोंधळ व दंगल; जाळपोळ व लुटालूट; दंगल; भांडण; उपद्रव; त्रास. (क्रि. मातणे, माजणे, उभे राहणे, उठणे, मांडणे, घालणे, लावणे, उठवणे.) : 'हिंदुस्थानांत एक नजीबखान मात्र, खूळ राहिलें आहे.' - भाब ४७. ३. अडथळा; आडकाठी; उपाधी; पीडा (माणसे, वस्तू, प्रसंग यांच्यासंबंधी स्वैरपणे योजतात.). (क्रि. पाडणे, पडणे.) ४. (सामा.) बंड. (क्रि. करणे.) : 'किल्ला दिल्यानें खूळ करतील.' - मइसा १२.१६८. **खुळात शिरणे** - बंड करणे; बंडात सामील होणे : 'आनंदराव होळकर यांनी खुळात शिरोन सरकारी महालास उपद्रव दिला.' - होइसा पत्र खं. १.१३४.
**खेउ-ओ** क्रिवि. लगेच; क्षणी; वेळी. पहा : **खेवो** : 'मातें देखत खेओ पळती कैसी।' - शिव ८८९. [सं. क्षण]
**खेओ** मिठी; अलिंगन : 'खेओ देओ जाइजे तरि आकळे। दोंचि भुजीं।' - ज्ञा ११.२८५.
**खेओवणे** अक्रि. नाराज होणे; क्षोभणे : 'रायांवरि मन खेओवलें।' - क्रिपु १३.८.
**खेकटे** न. १. उलाढाल; बेत; मसलत; युक्ती; उपाय; उपद्व्याप. २. अडचण; अड; नड; लचांड; कचाट; कुलंगडे; उपाधी; व्याधी; पीडा (कुटुंब, कारखाना, मनुष्य यांची). ३. तुफान; आळ; बालंट. ४. गोंधळ; गुंतागुंत; घोटाळा (कामाचा). (क्रि. करणे, होणे, उलगडणे, निस्तरणे.) [सं. किखि]
**खेकटे** न. रोगाची साथ; पीडा; उपसर्ग.
**खेकटेखोर, खेकट्या** वि. हिकमती; उलाढाल्या; (पोटासाठी) खेकटी करणारा.
**खेकड-डा** वि. वयस्क; जख्ख; खोकड; जीर्ण.
**खेकड-डा** वि. तुसडा; खाष्ट; हिरवट.
**खेकड(डा)चाल्या** वि. खेकड्याप्रमाणे चालणारा; तिरप्या चालीचा.
**खेकड(डा)मेकडा** वि. १. अव्यवस्थित; वेडावाकडा; गदळ; ओंगळ; नेभळा. २. कुरूप; बेडौल; वाईट (मनुष्य, वस्तू). [खेकडाचे द्वि.]
**खेकडा-डे** पु. न. दशपादवर्गातील एक प्राणी; किरवे; चिमेरा; चिमोरे; चिमोरी; कर्क; कर्कट. [सं. कर्कटक]
**खेकडी** स्त्री. १. कोल्ह्याची एक लहान जात. २. खेकड्याची मादी.
**खेकणे** अक्रि. १. दात खाऊन कचकचणे; वेडावणे (रागावलेल्या माकडाने). २. फुर्र करणे ३. (ल.) रागाने, चिरडीने वस्सकन अंगावर जाणे, बोलणे; कातावणे, चिडणे. ४. खोकणे. [ध्व.]
**खेकर** स्त्री. रोगाची साथ.
**खेकसणे, खेकावणे** अक्रि. रागावणे; चिडणे; अंगावर येणे. पहा : **खेकणे** ३
**खेकाटणे** अक्रि. १. पहा : **खेकणे** १. २. खेखे करणे; रडणे; केकाटणे (मूल). [ध्व.]
**खेकाट्या** वि. खेकटणारा.
**खेका धावणे** पहा : **खेकणे** ३; धाक, भीती दाखवणे. (व.)
**खेका(खा)ळणे** अक्रि. १. खंकाळणे. पहा : **खिंकाळणे**. २. (निंदेने) फिदीफिदी हसणे; मोठ्याने हसणे. ३. आनंदाने खुदुखुदु हसणे. [ध्व.]
**खेखे** स्त्री. १. वस्कन अंगावर येणे. पहा : **खेकणे** ३. २. आनंदाने आवाज करणे (लहान मूल).
क्रिवि. रागाने वसकन अंगावर जाऊन; खिंकाळत; फिदीफिदी हसत.

(क्रि. करणे, हासणे.) [ध्व.]

**खेच** स्त्री. लाठी, फरीगदगा, भाला वगैरेमध्ये खोच मारल्यानंतर हत्यार मागे ओढून घेण्याची क्रियां.

**खेच** स्त्री. ताण; ओढ : 'त्यानं... दोरखंड जरा बाजूला सरकावला आणि खांद्याचा नेट देऊन माशाच्या खेचीचा सावचित अंदाज घेतला.' - एको ६०.

**खेच** स्त्री. दाटी; गर्दी : 'थिएटरांत माणसांची नुसती खेच उडाली होती.' - दुर्दम्य २७.

**खे(खें)चकट** न. गर्दी; गचडी; घणाई. (कु.)

**खे(खें)चकाम** न. (मुद्रण) खिळे सरळ जुळविण्याचे काम.

**खे(खें)चणी** स्त्री. १. घट्ट ओढणी. (क्रि. करणे, देणे.); जोराची, दांडगाईची ओढ. (क्रि. देणे, करणे.) २. (जरतार) परडी फिरविण्याचा वीतभर लांबीचा लाकडी दांडा.

**खेचणे** उक्रि. ओढणे; जोराने ओढणे, ओढून नेणे; फार ताणणे, आवळणे, बांधणे.[सं. कृष्] (वा.) **खेचून घेणे** - वेधून घेणे; आकर्षित करणे : 'सर्वांचे लक्ष आपल्याकडे खेचून घेतले.' - निअ ४२. **खेचून धरणे** - १. ओढून धरणे; हट्टाला पेटून किंवा दुराग्रहपूर्वक अडविणे. २. मार्गातून एकीकडे सरायला किंवा जागा द्यायला लावणे.

**खेचपडदा** पु. सरकते झडप; ढापण.

**खेचर** न. १. आकाशात फिरणारे पक्षी, ग्रह, नक्षत्रे. २. योगी; यक्ष; यती. ३. समंध; पिशाच; भूत : 'जैसा जनामाजि खेचरु। असतुचि जना नोहे गोचरु।' - ज्ञा ५.९९. [सं.]

**खेचर** न. गाढवी व घोडा यांची मिश्र संतती. [फा. खच्चर]

**खेचरी मुद्रा** हटयोगातील एक मुद्रा. ही मुद्रा सर्व मुद्रांत श्रेष्ठ आहे : 'जेवी खेचरीयोगिया।' - एरुस्व ९.३२. [सं.]

**खेचाखेच-ची** स्त्री. जोरकस किंवा दांडगाईची ओढाताण, रेटारेट; गर्दी.

**खेचाताण** स्त्री. १. दांडगाईने ओढणे; ओढाताण. २. अनेक बाजूंनी ओढले जाणे; संघर्ष : 'अंतर्गत कलहात, खेचाताणीत, उधळमाधळीत शक्ती जळून जाते.' - आआआ ७७.

**खेच्कणी, खेचणी** स्त्री. हिणविणे. (गो.)

**खेट** स्त्री. पाचर; खुंटी (गच्च बसवण्यासाठी).

**खेट** स्त्री. १. दाटी; जमाव. २. जमण्याची नियमित जागा किंवा अड्डा, वेळ : 'फुलबागेची थेट खेट केली।' - पला ४.२२ (क्रि. पाळणे, संभाळणे, ठरणे, ठरवणे). ३. भेट : 'तो घडवील तेव्हां जगजेठी। तेव्हांच खेटी होतील।' - अफला ५.६. पहा : **खेटा** १, २

**खेट** न. खेडेगाव; खेडे. [सं.]

**खेटक** न. ढाल : 'खेटकाआड असुर दडती।'-रावि २५.१४९.[सं. खेट]

**खेटखर्वट** न. बाजार भरणारे खेडेगाव : 'खेट खर्वट ग्रामीं पुरीं।' - एभा २३.४९७.

**खेटण** स्त्री. दाटी; गर्दी.

**खेटणी** स्त्री. १. (विणकाम) कापड विणताना बाण्याची सुते खेटून बसवण्याची क्रिया. २. वीण; पोत. ३. ओलांडणी.

**खेटणे** सक्रि. हाकणे : 'तो घाणा खेटीत होता' - लीच १.१६

**खेटणे** अक्रि. कष्टी होणे; दबला जाणे : 'कुलवाडि जैसी खेटली।' - राज्ञा १३.५६४.

**खेटणे** सक्रि. १. ओलांडणे; उल्लंघणे; मजल मारणे (जागा) : 'खेटितां कुंप कांटी खुंट दरडी न पाहे।' - तुगा ३४९. २. रस्त्यातून एकीकडे सारणे; बाजूला ढकलणे; जागा द्यायला लावणे. [सं. किट] अक्रि. १. भिडणे; शिवणे : २. अगदी जवळ जाऊन बसणे; चिकटणे. ३. जाताना घसटा देऊन जाणे; झगटणे. ४. एके ठिकाणी दाटी, गर्दी करणे; जवळजवळ, चिकटून बसणे. ५. जवळ येऊन ठेपणे, पोहोचणे, भिडणे. ६. लुटणे. (गांगा)

**खेटनी** स्त्री. तगादा; टुमणे. (व.)

**खेटर** न. १. जोडा; वहाण; पादत्राण; पायपोस (निंदाव्यंजक). २. पाय; लाथ. ३. (ल.) अत्यंत क्षुद्र वस्तु; तिरस्करणीय पदार्थ. (वा.) ० **अडलेले नसणे** - पर्वा नसणे; काही नुकसान न होणे; काहीही अडून न राहणे. ० **खाणे** - शिव्या ऐकून घेणे; अपमान करून घेणे. ० **मारणे** - शिव्या देणे; रागावणे; अपमान करणे : 'आधीं खेटरं मारीत जावी आणखी मग पाया पडावं.' - पलको २०५. **खेटराची सर नसणे** - तुलनेने अगदी क्षुद्र असणे; जरासुद्धा बरोबरी किंवा साम्य नसणे. **खेटरासारखे तोंड करणे** - दुर्मुखला होणे; थोबाडात मारल्याप्रमाणे चेहरा करणे : 'खेटरासारखं तोंड करून इथं बसू नको.' - रथ २२८.

**खेटरखाऊ** वि. (निंदार्थी) खेटराने बडवला जाणारा; कोडगा; निर्लज्ज.

**खेट(टा)रणे** सक्रि. जोड्याने मारणे; रागाने बोलणे; शिवीगाळ करणे : 'इकती खेटारते तरी चोंबडेपणा काय सुटत नाय.' - आआशे ११९.

**खेटरधन्या** वि. खेटर धरण्याचीसुद्धा लायकी नसलेला; क्षुद्र : 'खेटरधन्या हातात हात घालून न्यायला असेल तर की नाही कोणी!' - पलको ४८३.

**खेटराखेटरी** स्त्री. १. जोडाजोडी; जुतेपैजार; जोड्यांनी एकमेकांना केलेली मारहाण : 'त्याची न् आमची एकदा खेटराखेटरी व्हायची आहे.' - तीप्र ५. २. (ल.) कडाक्याचे, अपशब्द वापरून केलेले भांडण.

**खेटा** पु. १. क्षेत्र किंवा देवस्थान येथे जाण्याची नियमित खेप; वारी; फेरा. (क्रि. करणे, घालणे.) यावरून (खेटे अव. योजून) एकसारख्या येरझारा, खेपा किंवा निष्फळ ये-जा. (क्रि. घालणे, करणे). २. गर्दी; दाटी; खेचाखेच : 'शरीरीं नाडींचा खेटा।' - दास १३.९.११. (राजा.) (वा.) **खेट्या घालणे** - खेटे घालणे; एकाच कामासाठी परत परत जाणे : 'कोर्टात सारख्या खेट्या घालाव्या लागत होत्या.' दुर्दम्य २.१२४-२५.

**खेटा** पु. धक्काबुक्की; मारामारी : '... किल्ल्यावरून व पेठेजवळून शें-पनास गोळे मारावे, याप्रमाणें खेटे जाले.' - ऐलेसं ४३८०. (वा.) ० **करणे** - कटकट करणे; उपसर्ग देणे.

**खेटाक** न. १. खेकटे; कटकट : 'चालायचं काय खेटाक काढू नका हं!' - फगो ३. २. कष्टाचे काम : 'मुद्दाम हा मुहूर्त साधून मळणीचं खेटाक काढलं.' - आआशे ७४.

**खेटाखेट** स्त्री. १. दाटी; ढकलाढकली; धक्काबुक्की; गर्दी. २. अंगाशी

अंग लावण्याजोगा परस्परांचा संबंध; घसट.

**खेटी** स्त्री. १. गर्दी; लगट : 'मागें पुढें रिघे पोटी। साहे खेटी करी ते।' - तुगा १६७६. (क्रि. करणे.)

**खेटो** पु. येरझारा; अडथळा. (गो.)

**खेट्टमखेट्टा** पु. जोडाजोडी; मारामारी : 'नाई त करान थ्या रोजच्यावानी खेट्टमखेट्टा.' - वानगी १९८.

**खेट्या (टे) घाल्या** वि. १. एखाद्या कामासाठी फेऱ्या घालणारा; येरझार करणारा; उंबरठा झिजवणारा. २. (उप.) वारकरी.

**खेड** स्त्री. १. मिसळ; मिश्रण; मिसळलेली अवस्था; मिसळलेले किंवा मिसळीचे द्रव्य (मुख्यत्वे धान्य, दाणे). २. (शेती) चिखल. ३. फणसाच्या आठोळ्यांची दाणे घातलेली सुकी भाजी. (राजा.)

**खेड, खेडाव** पु. १. भूत किंवा समंध; पिशाच : 'खेडाव झाडाच्या अंगीं येऊन सांगतो कीं तुम्ही येथें राहिल्यानें पागेची घोडी मारीन.' - पेद. २. (ल.) चमत्कारिक, विलक्षण, तऱ्हेवाईक माणूस.

**खेड-डे** न. लहान गाव; आडगाव. [सं. खेट्ट]

**खेडकचेरी** स्त्री. चावडी.

**खेडकर** वि. मिसळलेले (धान्य).

**खेडकी** स्त्री. बागेतील पाण्याचा लहान पाट : 'खेडकीच्या चाफेकळी।' - घाश्रलो ९६.

**खे(खें)डकुली-ळी** स्त्री. १. बागेतील पाण्याचा लहान पाट : 'खेंडकुलिया आराम। त्यामाजीं दोघां समागम।' - एभा ७.५६३. २. वाकणे (वळणे) घेत जाणारी नदी; खेड्यातील ओढा : 'साहित्याचियां खेडकुळिया।' - शिव २६.
[सं. क्ष्वेड = वक्र + कुल्या = पाट, कालवा, ओढा]

**खे(खें)डकुली** स्त्री. खेडवळ स्त्री.

**खेडगणती** स्त्री. सरसकट मोजणी.

**खेडणी** स्त्री. (नाविक) गलबताच्या गतीला वारा अनुकूल नसून तिरकस असेल तेव्हा तिरकस गतीने गलबत नेण्यासाठी ते लांबवर नेऊन व माथण मारून (शीड फिरवून) इष्ट स्थळी जाण्याची योजना.

**खेडणे** पहा : **खेटणे**

**खेडणे** सक्रि. जमीन कसणे; नांगरणे.

**खेडमा-म्या** पु. १. म्हातारडा; थेरडा; वृद्धकपी. (ना.) २. कुरूप, वेडाविद्रा. [सं. क्ष्वेड = वक्र]

**खेडमी** स्त्री. थेरडी, कुरूप स्त्री. [सं. क्ष्वेड = वक्र]

**खेडली जमीन** लागवडीस आणलेली, जिच्यातून पीक निघते अशी जमीन : '... तेव्हां मुऱ्हा बोलले आम्ही खेडली जमीनीचाच वसूल घेऊ.' - पाक्षझाइखं १.२४.

**खेड(डा)व(वा)ळ, खेडाऊ-ळ-ळू** वि. १. गावंढळ; अशिक्षित; खेड्यात राहणारा; २. गावरानी; गावठी; गावासंबंधी (भाषण, धान्य, कारागिरीचा पदार्थ). [सं. क्षेत्रवल]

**खेडवळ** न. खिडकी. [सं. क्षेत्रकुल्या]

**खेडहक्क** पु. जमीन कसण्याचा हक्क : 'प्रत्यक्ष राजापासून आपली जमीन खेडहक्कानें उपभोगणाऱ्या या कुळानें...' - पार्ल ५.

**खेडी झोपडी** वाड्या वगैरे : 'वरकड खेडीझोंपडी रखवालीस कोन्ही कोन्ही येऊन रुजू होते.' - पेदभा २७. पत्र २.

**खेडु(डू)त, खेडू** पु. १. शेतकरी. खेड्यात राहणारा माणूस (गु.) २. मक्त्याने किंवा बटाईने शेत करणारा; जमीन कसणारा. (व.)

**खेडे, खेडेगाव** न. लहान गाव; खेडूंची वस्ती. [त. काडु]

**खेडे** न. १. पोलाद. २. ढाल : 'नघे भाला खेडें।' - भाए ४५०. पहा : **खिडे, खेंड** [सं. खेट = ढाल]

**खेडेकरी** पु. खेडेगावचा माणूस : 'त्यामुळे खेडेकऱ्या शेतकऱ्यांत जाऊन व्याख्याने वगैरे देण्यास सवड नव्हती.' - मी ४४३.

**खेडेपाडे** न. खेडे. [खेडेचे द्वि.]

**खेडेयेडे** न. एक छोटेसे खेडे : 'पंढरी म्हनू शार दुरून दिसतं खेडंयेडं।' - जसा ६२९.

**खेडोपाडी** क्रिवि. खेड्यात आणि अगदी लहान वस्तीच्या गावात; देशाच्या सर्व भागांत.

**खेढा** पु. १. खेडे. २. खरखरीत, ओबडधोबड वस्त्र. ३. प्रेतावरील वस्त्र.

**खेण** पु. क्षण : 'तेथ खेणु एक वनमाली उभा राहिला।' - वह १५७. [सं. क्षण]

**खेणी** क्रिवि. कशाने. (कु.)

**खेणे** पु. खेळणे; खेळ.

**खेत** न. १. शेत. २. रणक्षेत्र. ३. (ल.) युद्ध : 'घोडे सोडून खेत केलें.' - पया ४५४. ४. मैदान; मोकळी जागा. ५. पुण्यक्षेत्र. [सं. क्षेत्र] (वा.)

**खेतास येणे, पडणे** - लढाईत ठार होणे; मरण पावणे : 'कितेक गाडदी खेतास आले.' - भाब १५.

**खेतम** स्त्री. (पुरा.) इजिप्तची मुद्रा, नाणे.

**खेती** स्त्री. रणक्षेत्र : 'खेती म्हणजे रण सोडून गोळीची खास्त निघाले तरी नामोहरम जाले.' - भाब १३. [सं. क्षेत्र.]

**खेती-त्र-त्री** स्त्री. न. स्त्री. शेती; शेतकी; शेतीचा व्यवहार. [सं. क्षेत्र]

**खेती-त्रा** पु. शेती करणारा; शेतकरी. [सं. क्षेत्रिन]

**खेतूर** क्रिवि. कशात? (कु.)

**खेते-तो** न. पु. माकड. (गो.)

**खेत्र** न. शेत; क्षेत्र.

**खेत्रखाते** शेतातील मेवा.

**खेत्रपति** क्षेत्राचा अधिष्ठाता. 'सेवक विठ्ठलदेवा खेत्रपति सदैवु।' - शिव ३.१.१२.

**खेत्री** पु. १. क्षत्रिय. २. रणशूर, पराक्रमी पुरुष : 'खेत्री हाणा म्हणती रणशूरा।' - ऐपो १२६. [सं. क्षत्रिय]

**खेत्री** पु. (क्षेत्रात राहणारे) पिशाच. (गो.)

**खेद** पु. १. इष्ट पदार्थाचा वियोग किंवा अनिष्ट पदार्थाची प्राप्ती झाल्याने अंत:करणाला होणारी व्यथा; दु:ख; मनस्ताप. २. पश्चात्ताप; अनुताप. ३. त्रास; पीडा : 'जीवमात्रांस देणें खेद।' - दास २.६.१९. ४. कंटाळा : 'जया पुरुषाच्या ठायीं। कर्माचा तरी खेदु नाहीं।' - ज्ञा

४.१०३. [सं. खिद = त्रास होणे] (वा.) ० **मानणे** - दुःख करणे; मनाला लावून घेणे : 'तूं जरी हें ऐसें मानिसी। तरी खेदु कां करिसी?।' - ज्ञा २.१६२. ० **होणे** - वाईट वाटणे.

**खेदखीन्न** वि. दुःखी : 'जयाचा देखोनि उमाळा। खेदखीन्न होये माहादोषाचा पाळा।' - रुस्व ११००.

**खेदजनक** वि. वाईट वाटेल असे; दुःख वाटण्याजोगे.

**खेदडा** पु. म्हैसूर भागातील हत्ती पकडण्याची पद्धत.

**खेदणे, खेदविणे** सक्रि. १. दुखविणे; त्रासविणे : 'जिवलगांस खेदूं नये।' - दास २.२.१०. २. (ल.) हाकणे; हाकलून लावणे; घालवणे (पशू इ.). (ना.)

**खेदक्षीण** वि. दुःखी : 'बहु जालों खेदक्षीण।' - तुगा १०२६.

**खेदा** पु. पिच्छा; पाठलाग. (ना.)

**खेदाडणे** सक्रि. खिदडणे; मारून, पिटून लावणे : 'नासरजंग मारले गेलेवरी पन्नास स्वारवाले हजारा स्वारास मारून खेदाडताती.' - इएमपी ९९.

**खेदारू** पु. एक प्रकारचा गूळ.

**खेदित** वि. दुःखित; कष्टी; खिन्न.

**खेनणे** क्रि. बोलावणे : 'श्राद्धासाठी ब्राह्मण खेनिले होते.' - गोप्र ८२.

**खेन्नकरप** सक्रि. बकरी इ. बळी देणे. (गो.)

**खेप** स्त्री. १. जा ये; येरझार; हेलपाटा. (क्रि. करणे.) २. देशात राहून आणलेला मालाचा किंवा धान्याचा (बैल, गलबते इ. वरून केलेला) एका वेळचा पुरवठा, भरणा, फेरी; माल तयार करणाराकडून एका वेळी आलेला माल. ३. एक वेळ किंवा प्रसंग; पाळी; वारी; एखाद्या प्रसंगाचे उदाहरण. जसे :- तिच्या बाळंतपणाची ही पाचवी खेप. ४. एखाद्या क्रियेची सर्व मुदत; एक कृत्य किंवा त्या कृत्याने व्यापलेला काळ. ५. निष्फळ येरझार; हेलपाटा. (क्रि. घालणे.) ६. रोगाच्या साथीचा काल. (क्रि. येणे.) (वा.) ० **टाकणे** - जाऊन येणे; येऊन जाणे : 'आसपासची माणसं औषधाकरिता खेपा टाकीत होती.' - रथ २६२. [क.खेपु] [सं. क्षिप]

**खेपखेपांतर** जन्म मरणाच्या खेपा : 'खेपखेपांतर अनेक सोशिले।' - ज्ञागा १८७.

**खेपचे** सक्रि. शिव्या हासडणे. (गो.) [सं. क्षिप]

**खेपणे** सक्रि. कोंदणे; खोडा घालणे; बुजवणे; बंद करणे; लोटणे; अडकवणे; त्रास देणे; अडवणे.

अक्रि. अडकणे; बंद होणे. [सं. क्षिप]

**खेपाट** पु. खनपटीस बसणे; पिच्छा पुरवणे : 'जैसे माळवेचे हिंदुस्थानचे बंदबस्तीस लागोपाठ दहा-पांच वरुष खेपाट घेतला...' - इएमपी १२३. (क्रि. घेणे.)

**खेपाटा** पु. १. कंटाळवाणी, निष्फळ येरझार; हेलपाटा. (क्रि. घालणे.) २. त्रासदायक विनंती, दुराग्रह, माथाकूट; डोकेफोड. (क्रि. करणे.)

**खेपाटी** स्त्री. काख; बकोटी; बगल. पहा : **खपाटी**

**खेपेसरसा, खेपेने** क्रिवि. हातासरसा; हातातील कामाबरोबरच; चालू काम न थांबवता.

**खेप्या** वि. १. एकसारख्या खेपा, हेलपाटे, येरझारा घालणारा, करणारा. २. रोकड वगैरे वाहण्याच्या खेपा करून त्यावर उपजीविका करणारा. ३. डाकेची (टपालाची) ने-आण करणारा : 'नववे रोजीं उज्जनीहून खेप्या पुण्यास जातो.' - मराठी रियासत उत्तर विभाग २.४२२.

**खेब** पु. अनर्थ. (गो.)

**खे(खें)बडा, खेंबुडला** वि. १. बेडौल; कुरूप : 'कोठें होती रांड खेबडी।' - राला ७६. २. वाकडातिकडा; अव्यवस्थित (दात, दाताची कवळी). [सं. क्ष्वेड = वक्र]

**खेबडालेबडा** वि. १. गदळ; घाणेरडा; ओबडधोबड; हिडीस; नापसंत (मनुष्य, प्राणी, चेहरा, नाक इतर अवयव, इमारत, चित्र, लिखाण, वस्तू इ.). २. अव्यवस्थित (दात इ.).

**खेबरडी** वि. थेरडी.

**खेबाळणी** स्त्री. निष्काळजीपणाने वापरणे, वापर. (राजा)

**खेबाळणे** सक्रि. कचकावून, वाटेल तसे वापरणे; हिसकाहिसकी करणे; ओढाताण करणे; जोराने फेकणे, हलवणे. (राजा.)

**खेभणे** अक्रि. रागावणे. [सं. षिभ]

**खेम** न. मिठी; विळखा; खेव; आलिंगन : 'पवनासि देतां खेम। अपान ऐसें पावला नाम।' - सिसं २.२०७. (क्रि. मारणे, देणे, घेणे.) [सं. क्षेम] (वा.) **खेमवेंगेस येणे** - एखाद्याच्या कबजात येणे.

**खेम** न. कल्याण; सुख; खुशाली; क्षेम. [सं. क्षेम.]

**खेमटणे** सक्रि. दाबून धरणे; घट्ट धरणे : 'नागडीउघडी पोरं कडेवर खेमटून पोरी त्या गोन्ह्याकडे पाहत उभ्या होत्या.' - पर्धो १६१.

**खेमटा** पु. (ताल.) एक ताल. याच्या बारा मात्रा व चार विभाग आहेत.

**खेमडा** वि. अशक्त; लुकडा; विद्रूप.

**खेमा** स्त्री. क्षमा : 'आपला अपरादु न पाहांतां। खेमा करोनि न मागतां।' - क्रिपु ५.४१.

**खेमा** पु. डेरा; तंबू : 'पातशाही खेम्याची वगैरे तयारीची मात्र आज्ञा केली आहे.' - दिमरा १.१९. [फा. खीमा = तंबू]

**खेमा** पु. १. चेंदामेंदा. २. मांसाचा बारीक चुरा, तुकडे. [फा. कीमा]

**खेमेज्यात** डेरे, राहुटी इ. सामान.

**खेमेठोक** वि. जबरदस्त (मनुष्य). (वै.)

**खेमेदाखल** क्रिवि. लढाईवर निघताना गाव सोडून सैन्याचा तळ जिथे आहे अशा ठिकाणी येणे; डेरेदाखल : 'तूं बाहेर खेमेदाखल होऊन...' - मइसा ५.७८.

**खेमेदोज** पु. राहुट्या वगैरे शिवणारा, दुरुस्त करणारा शिंपी : 'यंदा श्रावणमासी फुलाजी खेमेदोज यास दिले येक हजार.' - वै ३.४८.

**खेर** स्त्री. १. घाण; गाळ; गदळ; केर; टाकलेला भाग; उरलेला भाग. २. एकत्र मिसळल्याने झालेली नासाडी.

वि. गाळसाळीचा; निरुपयोगी; केराचा. [क. केडिसु]

**खेर** स्त्री. खड्ू. (गो.)

**खेरखुवाह** वि. हितचिंतक; हितेच्छु : 'आपण श्रीमंताचे दौलतीचे

खेरखुवाह. आपण वेगळें बोलणें बोलतां हें अप्रशस्त.' - देवी श्रीअहिल्याबाई १११. पहा : **खैरख्वाह** [फा. खैरख्वाह]

**खेरखैरात** स्त्री. खुशाली. [फा. खैरखैरियत]

**खेरमाती** स्त्री. नासाडी (काम, माल, वस्तूंची). (क्रि. करणे.)

**खेरमेर** स्त्री. कचरा; घाण. [खेरचे द्वि]

**खेरीज** वि. १. जादा; अधिक; वेगळा; निराळा; भिन्न. २. वगळलेला; अवांतर; निराळा काढून ठेवलेला : 'जाती खेरीज करून.' - वाडसमा ३.२५१. शअ. १. शिवाय. २. वाचून; विना. ३. बाहेर; वेगळे : 'इंग्रजांस तंबी करून खुष्कींतून त्याजला खेरीज करावें.' - मइसा १०.१८१. (क्रि. करणे, वगळणे.) [फा. खारिज]

**खेरीजकलम** न. निराळे किंवा जास्त सदर, बाब, परिच्छेद, वस्तू.

**खेरीजजमा, वसूल, दस्त** स्त्री. पु. शेतसाऱ्याशिवाय घेतलेला कर; जादा सारा, पट्टी; चिल्लर बाबी.

**खेरीजमक्ता** पु. सरकारनेच सरळ मक्त्याने दिलेल्या जमिनी; इजाऱ्याने किंवा खोतीने दिलेल्या जमिनी; रयतवारी.

**खेरीज मिळकत** अवांतर प्राप्ती, मिळकत, फायदे.

**खेरीज मुशारा, मुशाहिरा, मक्ता, खेरजी मुशारा** (सरकारी नोकरांना दिलेल्या पगाराशिवाय) भत्ता, बक्षिसे इ. नैमित्तिक खर्च (मेजवान्या, धर्मादाय इत्यादींचा).

**खेल** पु. विभाग; हिस्सा; पक्ष. (व.) [फा. खैल = सैन्य - विभाग]

**खेलखसाला** पु. व्याप; पसारा : 'एवढ्या थोरल्या खेलखसाल्यात काही पोरीला देऊ नये.' - पलको १४५.

**खेलखाना** पु. १. सैन्याचे सामान व बाजारबुणगे; फौजेतील बाजार व सामानखाते. त्यावरून २. (ल.) अडगळ; अव्यवस्थितपणे राशी घातलेल्या वस्तू इ.; अव्यवस्थित प्रकार; स्थिती. ३. अडगळीची खोली. [फा. खैलखाना]

**खेलनवाला** पु. खेळगडी; सोबती; मित्र : '...मौजे मजकुरीची पाटीलकी साहेबाची होती ती साहेबाचा खेलनवाला गज्यालीखान याजला दिली.' - पेद ३१.२.

**खेला** पु. लबाड; अविश्वासू. पहा : **खेळ, खेळिया**

**खेलाडी** वि. खिलाड्; चतुर; हुशार. [सं. खेल्]

**खेल्खाना** १. खान्दान. २. क्रीडांगण. ३. क्रीडासोबती.

**खेव-वा** न. पु. १. मिठी; आलिंगन; खेम : 'स्नेहें मीनल्या खेंवकवळी।' - मुआदि ४५.११९. (क्रि. देणे.) २. खेटणे; चाटून जाणे. [सं. क्षेम]

**खेव** पु. क्षण.

**खेव-वी** पु. अरिष्ट; दुर्दैवाने आलेले विघ्न; अपकार; त्रास; खोडी; घात; उतरती कळा; नाश. (क्रि. येणे.) : 'आपासाहेबाच्या राज्याला आला खेव।' - गापो ८६. [सं. क्षय] (वा.) ० **आणणे** - सतावून सोडणे; त्रास देणे. (व.)

**खेव-वी** स्त्री. मासे मारण्याची जागा.

**खेवण-णे** न. १. कोंदण : 'पदपद्धती खेवणें। प्रमेय रत्नांचीं।' - ज्ञा १.५. २. जडित अलंकार; भूषण; जडाव. ३. शोभा. [सं. क्षेपणम्]

**खेवणणे** सक्रि. जडित करणे; जडवणे; कोंदणात बसवणे : 'रविचंद्र तारा लोककुसरी। खेवणोनियां तयावरीं।' - एभा २४.१८९.

**खेवणी-नी-नु** स्त्री. जडाव; जडणी; खोवणी; खोचणी : 'माजी गुंजाची खेवनी।' - दाव २४२.

वि. जडित. [सं. क्षेपणम्]

**खेवणे** उक्रि. पच्चीकाम करणे; जडणे : 'खेवलें अंतरीं पालटेना।' - तुगा ३९८६.

**खेवदा** स्त्री. (अशिष्ट) भूक. (क्रि. लागणे, सुटणे). [सं. क्षुधा]

**खेवय्या** पु. वल्हविणारा माणूस; नावाडी. (काशी)

**खे(खें)वा** पु. वल्हे. (क्रि. मारणे.)

**खेवी-वो** शअ. तत्क्षणी; त्याच वेळी : 'हा बोलु आइकत खेवीं।' - ज्ञा १७.३२६. जसे :- जातखेवो = जाताक्षणी, भेटतखेवो = भेटताक्षणी, 'नातरी नीद जातखेंवों।' - अमृ १.६२. [सं. क्षण]

**खेश** वि. नातलग; सोयरा : 'खेश सोइरे.' - मइसा १८.८७. [फा.]

**खे(खें)स** न. पु. १. एक प्रकारचे कापड (सुती, लोकरी, रेशमी)[फा. खिस].२. उग्र वास (फोडणी किंवा मिरच्या इत्यादींचा). (ना.)

**खेस** पु. १. घसा वाजणारा खोकला, दमा (गुरांचा). [सं. कास]

**खेसणे** अक्रि. १. दात खाऊन खेकसणे, फिसकारणे (रागावलेल्या माकडाने). २. (ल.) रागावून, चिडून वस्सकन अंगावर जाणे. ३. घसा वाजेल असे खोकणे. ४. खिंकाळणे (घोडा). ५. खाकरणे; खोकलणे. (व.) [ध्व.]

**खेसर** स्त्री. थट्टा; मस्करी; चेष्टा (खा. व.)

**खेळ** पु. १. करमणूक; क्रीडा; मौज (चित्तविनोदार्थ केलेली). २. खेळणे, खेळणी; खेळण्याची वस्तू (बुद्धिबळे, सोंगट्या, भोवरा, गोट्या इ.). ३. तमाशा; देखावा; प्रदर्शन. ४. अभ्यास; विलास (बुद्धीचा, इंद्रियांचा); व्यापार; क्रिया; चलनवलन (यंत्राचे). ५. खेळण्याची पाळी (एखाद्या खेळात). ६. सिनेमा, सर्कस, नाटक इ. चा प्रयोग. ७. लीला; कृपा. ८. (ल.) लढाई; युद्ध : 'उलटेल जरी हा खेळ।' - संग्रामगीते ४७. ९. विशेषत: जुगाराचा खेळ; जुगार. (गो.) [सं. खेल] (वा.) ० **आटोपणे, खलास होणे** - मरणे; संपणे : 'दोन आठवड्यात त्याचा खेळच आटोपला होता.' - मक १९५९.११६. ० **करणे, लावणे** - उडवणे; उधळणे; बेपर्वा खर्च करणे; घोटाळा, अव्यवस्था करणे; नासणे; बिघडवणे. ० **करणे, खेळणे, मांडणे** - चांगला खेळ किंवा काम करणे; एखादी हुषारीची किंवा शिताफीची गोष्ट साधणे. ० **लावणे, मांडणे** - एखाद्या कटाचा किंवा वाईट मसलतीचा पाया घालणे. ० **येणे** - पसंत पडणे; बरे वाटणे : 'मनाला खेळ आला तर ठीक, नाहीतर जानवे तोडून चालला देशांतराला.' - घरदार ९३.

**खेळ** पु. १. अन्य कोणत्याही बाह्य हेतूची किंवा भविष्यकालीन सुखाची अपेक्षा नसलेली, आत्मतृप्तीसाठी करण्यात आलेली सुखद कृती. अशा कृतीलाच 'क्रीडा' असेही म्हणतात. २. ज्यास नियम इ. आहेत असा खेळण्याचा प्रकार. उदा. हुतुतू, टेनिस इ.

**खेळ** पु. चाळा; कृती; खावडाव; वाईट कृत्य : 'म्हणे वांसरा घात झाला

असारे। तुझे माउलीचेचि हे खेळ सारे।' - वामन भरतभाव १७.

**खेळकटी** वि. चैनी; आराम करणारा : 'या चहाचटी व खेळकटी मंडळींच्या तैनातीत वेळ घालवावा.' - माबा ७३.

**खेळकर** वि. १. खेळणारा; खेळात रमणारा; खेळण्याच्या वयात आलेला. २. खेळाडू; आनंदी. ३.(उप.)आगलाव्या; कळलाव्या; खेळी करणारा.

**खेळकरी** पु. तमासगीर; चित्रे दाखवणारा; मोठ्या लोकांची सोंगे आणणारा; बहुरूपी; दशावतारी.

**खेळकुडी** स्त्री. १. माकडचेष्टा. २. चाळा; क्रीडा; युक्ती; गंमत; थट्टा.

**खेळकुली-ळी** स्त्री. उपवनातील पाण्याचे लहान लहान पाट : 'रत्नबद्धा खेळकुळिआं जवळी।' - दाव १५९; 'चित्रविचित्र खेळकुलिया।' - मुआदि २९.५०.

**खेळकू, खेळगड-र** वि. १. खेळाडू; गमत्या. २. मौज करणारा; नकल्या; विनोदी; विदूषक. ३. खेळण्याचे वय झालेले (मूल).

**खेळके** न. चेटूक उठविणे; भूत घालणे; घोरपड घालणे.

**खेळखंडोबा** पु. नाश; सर्वस्वी बिघाड; पूर्ण सत्यानाश; धूळधाण (खंडोबा ज्याच्या अंगात येतो त्याला रानोमाळ नाचायला व गडबडा लोळायला लावतो या समजुतीवरून). (क्रि. होणे, करणे.)

**खेळखाना** पु. १. खेळघर; खेळण्याचा अड्डा; क्रीडास्थान; क्लब : 'वयोवृद्ध कामगार सकाळसंध्याकाळ... दरबारांत, खेळखान्यांत... जसा वीरमंत्र देतील...' - लोटिकेले १.४१९. २. (ल.) निरुपयोगी लोक : 'कारणिक लढाऊ लोक मात्र किल्ल्यात ठेविले, बाकीचा खेळखाना काढिला.' - भाब ३१.

**खेळखांब** पु. आधारस्तंभ : 'चौगी आमी लेकी चारा गावांचं खेळखांब.' - तीसा १९.

**खेळखिसारा** पु. कपट; लपंडाव; अडवणूक : 'असे नानाप्रकारचे खेळखिसारे आहेत.' - ऐलेसं ३२५८.

**खेळगडी** पु. स्त्री. खेळातील जोडीदार, भिडू.

**खेळगड्या** वि. खेळात किंवा गंमतीत व्यर्थ वेळ घालवणारा; उडाणटप्पू; आळशी; छचोर. (राजा)

**खेळघर** न. थिएटर; नाटक, सिनेमा, तमाशा इ. चे प्रयोग जेथे होतात ती जागा : 'प्रेक्षक मुंग्यांसारखे खेळघरातून बाहेर पडतात.' - छांदसी ३.

**खेळणी** स्त्री. १. खेळणे, क्रीडा करणे. २. खेळाचा दिवस; सुटीचा काल.

**खेळणी** स्त्री. उचकी. (गो.)

**खेळणी-णे** न. १. खेळण्याची वस्तू. २. लहान मुलांसाठी कागद, माती, लाकूड, कचकडे यांपासून बनवलेल्या वस्तू. जसे:- पशू, पक्षी, गाड्या वगैरे. ३. सहज प्राप्त होणारी वस्तू : 'आम्हां केलें परब्रह्म खेळणें।' - एभा १८.३९५.

**खेळणे** अक्रि. १. क्रीडा, मौज करणे; स्वत:ला रमविणे. २. गमणे; अळंटळं करणें; माशा मारीत बसणे. ३. एखादा खेळ खेळणे. ४. वाद्य वाजवणे. ५. (भूतसंचारामुळे) इकडेतिकडे उड्या मारणे. ६. हळू हळू हलणे; झुळझुळणे (एखादी वस्तू वाऱ्यामध्ये किंवा सूर्यकिरणे पाण्यामध्ये). ७. चालणे; चालत असणे; चलनवलन करणे (यंत्र). [सं. खेलय]

**खेळणे-रांगणे, खेळते-रांगते** न. मकरसंक्रांतीच्या वेळचे एक व्रत, वसा. एका स्त्रीने दोन नारळ घेऊन 'खेळते घ्या रांगते घ्या' असे म्हणून दुसऱ्या स्त्रीला ते नारळ द्यायचे व नंतर दुसरीनेही असेच म्हणून दोन नारळ पहिलीला द्यायचे.

**खेळतारांगता** वि. १. खेळण्याच्या व रांगण्याच्या वयात आलेला (मुलगा). २. शरीराला मोकळी हालचाल करता येईल असा; अघळपघळ (वस्त्र, दागिना). ३. खेळता येईल असा नेमस्त, हलका, बेताचा (ताप, देवी, गोवर, कांजिण्या).

**खेळते भांडवल** (अर्थ.) उद्योगधंद्यात कच्चा माल, कामगारांचे वेतन अशा कामांसाठी वापरण्यात येत असलेले भांडवल.

**खेळते वारे** देव किंवा भूत यांचा संचार, अवसर (याने भविष्य किंवा शकून समजतो अशी समजूत आहे); अंगात येणे.

**खेळपट्टी** स्त्री. क्रिकेटच्या खेळात ज्या मर्यादित जागेवर गोलंदाजी होते व धावा काढल्या जातात ती जागा; धावपट्टी.

**खेळवणा** वि. खेळासाठी किंवा चेष्टामस्करीसाठी ठेवलेला; बगलबिल्ली; खुषमस्कऱ्या; विदूषक (माणूस, प्राणी, वस्तू, खेळणे, क्रीडामृग इ.)

**खेळवणी** स्त्री. प्रिया; मैना; लाडकी स्त्री; विलासी स्त्री; नानाप्रकारचे खेळ खेळून पुरुषाला भुलवणारी स्त्री; स्त्रीसाठी लडिवाळ शब्द.

**खेळवणे** सक्रि. १. खेळते ठेवणे; सक्रिय ठेवणे; चालवणे; हलवणे : 'स्वमायेचें आडवस्त्र। लावूनि एकला खेळवी सूत्र।' - ज्ञा १८.१३०३. २. नाचविणे; आपल्या मर्जीप्रमाणे वागायला लावणे; 'जो ब्रह्मादिकां खेळवी अर्णेगीं परी।' - शिव १. ३. काम सुरू ठेवणे (यंत्र, वाफेचे यंत्र, हत्यार इत्यादींचे). ४. रमविणे.

**खेळशेपणा** पु. आळशीपणा; अळंटळं; रेंगाळण्याची किंवा गमण्याची प्रवृत्ती; खेळगडीपणा. (राजा.)

**खेळा-ळ्या** वि. १. शिमग्यात देवाच्या पालखीबरोबर जाणारे (यांचे कापडखेळे व डफखेळे असे दोन प्रकार आहेत); सोंगाड्या : 'पूर्वी खेळे बहुत जाहले सृष्टीं।' - ह १३.४६. २. लग्नात खेळ खेळणारा : 'तो वीरराज जयांचा खेळा।' - शिव ९९८. ३. नेहमी भलत्यासलत्या कामात किंवा अन्यायाच्या कृत्यात गुंतलेला; आगलाव्या; कळलाव्या; चुगलखोर. ४. फंदफितुरी करणारा. ५. खेळाडू. [को. राजा.]

**खेळा** पु. कोंडी; बाजारातील एखादा जिन्नस सर्वच्या सर्व खरेदी करून अडवून ठेवून वाढीव किमतीला विकणे : 'उमरा जानेवारी वायद्यांत खेळा ऊर्फ कॉर्नर होणार.' - के २.१२.१९४१.

**खेळाडू** पु. खेळ खेळणारा.

**खेळाडूवृत्ती** स्त्री. हारजीत ही दोन्ही सारखीच मानण्याची दृष्टी; प्रसन्न, आनंदी स्वभाव.

**खेळिया** पु. हिकमती, मसलती मनुष्य; धूर्त, कावेबाज, गुप्त कारवाया करणारा, आतून सूत्रे हलवणारा; खेळवणारा.

**खेळी** स्त्री. १. खेळ; मौज. २. खेळण्याचा दिवस; सुटीचा काल. ३. खेळण्याची पाळी (बुद्धिबळे); मोहऱ्याने एका वेळी केलेली हालचाल किंवा गती. ४. (ल.) डाव; व्यूहरचना; पवित्रा. ५. पहा : **खेळा**

वि. खेळणारी; मौज मारणारी; चवचाल (स्त्री) : 'माझी सासु मोठी खेळी।' - भज ५५.

**खेळीमेळी** स्त्री. १. दाट परिचय; घसट; सलगी; मोकळेपणा; निस्संकोचपणा. २. मौज; क्रीडा; थट्टामस्करी; रंगेल चेष्टा; गंमत.

**खेळीमेळी, खेळेमेळे** क्रिवि. मौजेत; हास्यविनोदात किंवा खेळात; करमणुकीत (काळ घालवणे) : 'आतां जाऊं खेळीमेळीं। गाई चारावया।' - तुगा २३०; मौजेने; विनोदाने, परिहासबुद्धीने (बोलणे, करणे).

**खेळीमेळीचा, खेळ्यामेळ्या** वि. दाट परिचयाचा, सलगीचा; मोकळेपणाचे, विनासंकोचाचे (वातावरण).

**खेळुगा** वि. खेळाडू.

**खेळुगेपण** न. खेळकरपणा : 'तेथ मनाचें खेळुगेपण। कुमारअवस्था बाणली जाण।' - एभा १२.३२९.

**खेंक** स्त्री. खोकला; ढास. (क्रि. लागणे.) (को.)

**खेंकचे** अक्रि. ओशाळणे. (गो.)

**खेंगट** न. अतिशय संताप : 'करे आदय आपट। आलं अंगात खेंगट।' - बगा १२८.

**खेंगट** न. बोंबील, कोळंबी, झिंगे इ. माशांचा एकत्र केलेला ढीग.

**खेंगटे, खेंगटेखोर** पहा : **खेकटे, खेकटेखोर**

**खेंगस** पु. पाणलावा.

**खेंगस ढाक** पु. लहान सांबर.

**खेंगाळा** पु. तांबड्या जातीचा एक मासा.

**खेंड** स्त्री. गोल टोकाची व जड तरवार. पहा : **खांड**

**खेंड** न. गोवरीचा किंवा लाकडाचा पेटलेला तुकडा; निखारा : 'एकाच डोळ्यात दारू भरलेलं इस्त्याचं खेंड.' - गोता २६. (माण.) [सं. खंड]

**खेंड, खेंडगोंडी, खेंडुकली-ले** पहा : **खिंडगोंडी, खिंडकुली, खिंडार**

**खेंडा-डे** पु. न. १. भरड किंवा विरळ पोताचे व हलक्या किमतीचे कापड; उणाख शेला. २. प्रेतावरील वस्त्र : 'खेंड्यावर फुलें घालून तिरडी तयार केली.' - पाव्ह ११८.

**खेंडी** हलक्या तऱ्हेची वस्त्रे : 'आठ रुपये खेंडी सुमार ८.' - ऐलेसं २७६३.

**खेंडी** स्त्री. पर्वतातील खिंड : 'मोठे उंच पर्वत आंतल्याआंत खचून जाऊन त्यांत खेंडी पडल्या.' - मराठी ६ वे पुस्तक आ. २. ४५ (१८७५).

**खेंद(दा)डा** पु. (अशिष्ट) मूर्ख; गधडा; खेंबडा.

वि. १. खेद देणारा; नाठाळ; अडणारा; तापट; त्रासदायक; खट्याळ (घोडा). त्यावरून २. खाष्ट; द्राष्ट (माणूस); उनाड; कजाग (मूल, स्त्री); स्वच्छंदी; दुष्ट; द्वाड; कुरूप; नेभळा; अव्यवस्थित (मूल, स्त्री यांना रागाने). [सं. खिद्]

**खॅत्रपाळ** पु. क्षेत्रपाळ; विशिष्ट स्थानाचे रक्षक दैवत. (गो.)[सं. क्षेत्रपाल]

**खॅबाड** न. लचांड. (गो.)

**खॅयणॅं** न. खेळणे; खेळण्याची वस्तू. (गो.)

**खँञ** क्रि. वि. कोठे.

**खै** स्त्री. १. अहंता; अभिमान; ताठा. (क्रि. मोडणे, जिरवणे.) २. नाठाळपणा; चढेलपणा; मस्ती (ठाणबंद पशूची). (क्रि. मोडणे, जिरवणे). ३. शिक्षा; शिस्त. ४. क्षत्रिय.

**खैण** वि. खारट. (गो.)

**खैणाडॉ** पु. शेत, आगर यात सारे पाणी जाऊ न देण्यासाठी घातलेला बांध. (गो.)

**खैताळ** पु. मोठ्या झांजा : 'अष्टगावीच्या माळावरी ढ्वाल खैताळ वाजताती।' - जसा ८०.

**खैदान** न. बकाल वस्तीची जागा : 'त्यामुळे खेडी ओसाड होतात आणि मुंबईचे खैदान होते.' - अम १०७.

**खैदानमैदान** न. गोंधळ; अव्यवस्थित अशी जागा.

**खैन** पु. रेंगाळणारा खोकला. [ध्व.]

**खैनी-न्या** वि. १. खोकलेकरी. २. तिरसट; खाष्ट; चिडखोर.

**खैमाना** पु. वाटोळे; सत्यानाश : 'काय कामाची वाटनी। झाला गावाचा खैमाना।' - बगा ८०.

**खैर** स्त्री. ठीक आहे; काही हरकत नाही; बरे. (या अर्थाने.) [फा.]

**खैर** पु. एक काटेरी झाड. याची पाने शमीसारखी तर लाकूड इमारतीच्या उपयोगी पडणारे. याच्यापासून कात व गोंद होतो. [सं. खदिर]

**खैर** स्त्री. १. क्षेम; कुशल; कल्याण. २. चांगली स्थिती; आबादी; खुशाली. ३. ईश्वरी कृपा; मेहरबानी; उपकार : 'ते खैर होऊन निघाले पुनर्जन्म झाला.' - मराचिथोरा ६०. [फा.] (वा.) ० **असणे** - सर्व चांगले, ठाकठीक असणे. ० **करणे** - मेहरबानी करणे; दया करणे : 'परंतु युरोपियन माजिस्ट्रेटाने सारासार विचार पाहून खैर केली व भटजीचे चौथ्या प्रहरी धिंडवडे झाले नाहीत.' - गांगा १९. ० **होणे** - आलेला वाईट प्रसंग टळणे; उपकार होणे.

**खैर, खैरत** स्त्री. १. चांगली गोष्ट : 'एक जरा तस्वीस दिलिया खैरत नाहीं.' - मइसा १५.१३७. २. भलाई : 'त्यांतच तुमची आमची सर्वांची खैरत असे.' - मइसा ६.६१८. [फा.]

**खैर अंदीश** हितेच्छू; मित्र; हितचिंतक. [फा.]

**खैरआफीयत** स्त्री. क्षेम; खुशाली : 'आपणाकडील खैर आफियतेचा खबर मालुम होत नाहीं.' - मइसा १०.११८.

**खैरखवा-ख्वा-खाह** वि. कल्याण इच्छिणारा; हितेच्छू : 'ते मानसें बिलकुल राजेसाहेबाचे सरकारचे खैरख्वा नाहींत.' - मइसा १०.२५१; 'ईश्वर हे फत्तेची खबर सर्व खैरखवा लोकांस मुबारक करो.' - पेद १.८४.

**खैरखाही** स्त्री. शुभचिंतन. [फा. खैर + ख्वाही]

**खैरखुशी** स्त्री. क्षेमकुशल.

**खैरखैरात** स्त्री. दानधर्म : 'खैर खैरात केली.' - मदबा १.२०१. [फा.]

**खैरभट** पु. १. या नावाचा एक ब्राह्मण. हा शक्ती व पराक्रमाबद्दल प्रसिद्ध होता. एकदा त्याला चोरांनी अकस्मात गाठून त्याच्यावर हल्ला केला असता त्याने जवळचे एक खैराचे झाड उपटून त्यांना चोपून पिटाळून लाविले अशी गोष्ट आहे. त्यावरून अचाट शक्तीचा माणूस; भीम. २. (उप.) अशिक्षित, निरक्षर किंवा निव्वळ दगडधोंडे किंवा झाडे यांना शिकविण्याच्या योग्यतेचा ब्राह्मण.

**खैरशादमानी** स्त्री. खुशाली : 'आपली खैर शादमानी हमेशा कलमी करावी.' - मइसा २२.८६. [फा.]
**खैरसला-ल्ला** स्त्री. १. सुखशांती; क्षेमकुशल (मुख्यत: पत्रव्यवहारांत योजना) : 'आपली खैरसल्ला दर्वक्त लिहीत जाणें.' - मइसा १५.२५०. २. स्नेह; मित्रत्व; सख्य.
**खैरसागर** पु. खैरापासून केलेले एक औषध.
**खैरा** पु. शेणखळीच्या तळाशी बसलेले मातीत मिसळलेले कुजलेले शेण अगर शेणाचा भुगा.
**खैरा** पु. जोंधळ्यावर किंवा बाजरीवर पडणारा एक रोग.
**खैरा** वि. १. घनसावळा; कपिश. २. करडा; पांढऱ्यावर तांबडे किंवा तांबड्यावर पांढरे ठिपके असणारा : 'चितार भिंगारें खैरें। ...अवघीं वासरें आपण जाहला।' - ह १०.१९२. ३. निरनिराळ्या रंगाचा (डोळा); निरनिराळ्या रंगाचे डोळे असलेला (माणूस, पशू). पहा : **कैरा**. ४. मिश्र रंगाचा; चित्रविचित्र; मिश्र.
**खैरा कबुतर** न. लालभडक किंवा काळसर तांबट रंगाचे कबुतर.
**खैराट** न. खैराचे लाकूड.
**खैराड** न. खैराचे झाड : 'कोसंब अंजीर खैराड।' - कालिकापुराण २२.१५.
**खैरात-ति** स्त्री. १. दानधर्म; भिक्षा; देकार. २. मशिदीच्या खर्चासाठी किंवा फकिरांना दानधर्म देण्याच्या खर्चासाठी दिलेली बिनसाऱ्याची इनाम जमीन किंवा गाव. ३. (ल.) कुरवंडी : 'सखे खैरात करीन तुजवरून।' - पला ४.१८. [फा.] (वा.) ० **करणे** - १. उदारपणे देणे; भरपूर प्रमाणात देणे; वर्षाव करणे : 'पारितोषिकांची खैरात करावी लागली.' - निअ ४४०. २. ओवाळून टाकणे.
**खैराती** वि. (ल.) कमी योग्यतेचा; सामान्य; क्षुद्र; भिकार; टाकाऊ (माणूस, वस्तू, पशू - कारण दान द्यावयाच्या वस्तू बहुधा क्षुद्र, भिकार असतात) : 'खैराती सामान मात्र नसावें.' - ऐलेसं ४.१६०९.
**खैराबांडा** वि. पांढऱ्यावर काळे किंवा काळ्यावर पांढरे ठिपके असलेला.
**खैरि(री)यत, खैर्यत** स्त्री. क्षेम; खुशाली; सुख; हित; मन:स्वास्थ्य; चांगली स्थिती; भरभराट : 'त्याचे लेकीचे खैरीयतीचें वर्तमान पुशिलें आहे.' - मइसा १.१८१. [फा.]
**खैरी** स्त्री. अहंभाव; गर्व; मीपणा.
**खैरी** स्त्री. बांधीव नसलेल्या विहिरीवरील रहाटाच्या आधाराचे खांब. बहुधा हे खैराच्या लाकडाचे असतात.
वि. खैराच्या लाकडाचा केलेला.
**खैरी** स्त्री. शेतजमिनीचा एक लहानसा भाग; वाफा. (कर.)
**खैरीशैरी** वि. हलक्या किमतीचा; कवडीमोल; क्षुद्र.
**खैलाटी-ठी** पहा : **खालाटी**
**खैवंग** वि. बळकट; मजबूत : 'देहधर्माच्या खैवंगी। अधिष्ठिलें आंगीं।' - ज्ञा १३.१०७. [सं. क्षेमांग]
**खैशा** वि. खैस, खवीस याच्यासारखा स्वभाव असलेला; कुलक्षणी; अमंगळ; पिशाच्चासारखा द्वाड; राक्षस (निंदार्थी).
**खैस** पहा : **खवीस**
**खैं** क्रिवि. कोठे. (गो.) [सं. कुत्र]
**खैंचणे** क्रि. जोराने ओढणे. पहा : **खेचणे**
**खैंचा** वि. कोणता-कोणचा. (गो.)
**खैंच्यो** वि. कुठल्या. (गो.)
**खैंसर** क्रिवि. कोठे. (गो.)
**खैंसून** क्रिवि. कोठून. (गो.)
**खो** पु. १. (खोखोचा खेळ) डाव आलेला पकडणारा गडी रांगेतील गड्याला उठायला लावून त्याच्या जागी बसताना उच्चारतो तो शब्द. [सं. स्कुंभ] (वा.) ० **घालणे, देणे** - कामावरून घालवून देणे; (मर्जीतून) उखडणे; उच्चाटन करणे; युक्तीने जागा ताब्यात घेणे; (कामात) बिब्बा घालणे. ० **मिळणे** - उच्चाटन होणे; नाहीसा होणे : 'पाखराजनावरांसंबंधानेही ज्या भोळसट धर्मसमजुती आहेत, त्यांना खो मिळाला पाहिजे.' - गांगा १८१. ० **येणे** - अडथळा उत्पन्न होणे; अयशस्वी होणे : 'जो बेत चालला आहे त्याला विनाकारण खो येईल.' - वज्रा ९९.
**खो** पु. १. विपत्तिकाल; उत्पात; अडथळा. २. (ल.) नाश; तोटा; खीळ; छाट.
**खो** स्त्री. डोंगर; गुहा : 'निरनिराळ्या खोमध्यें त्यांनीं वाघाच्या शिकारीसाठी कायमची व्यवस्था करून ठेविली होती.' - एशिआ ३५६. [फा. कोह]
**खो, खोखो** स्त्री. १. खदखदा हसणे; खोकणे; ढास. (क्रि. लागणे, करणे, लावणे, चालणे.) : 'छातीचें मडकें होई। खोखोचें मजरे घेई।' - सन्मित्रसमाज मेळा पद ४. पृ. ९ (१९२९).
क्रिवि. १. सपाटून; मोठमोठ्याने; खोखो असा आवाज काढीत. (क्रि. हसणे, खोकणे). २. तडा गेलेल्या मडक्यावर वाजविले असता होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन. (क्रि. वाजणे).
**खोईण** स्त्री. मासे पकडण्यासाठी पाण्याच्या प्रवाहात ठेवलेली एक निमुळती वाटोळी बांबूची विणलेली नळी. हिला कोयनी असेही म्हणतात. पहा : **खूण** (को.)
**खोक** स्त्री. क्षणिक खोकला; घशात काही अडकल्यामुळे उत्पन्न होणारी तात्पुरती ढास. (क्रि. येणे.) [ध्व.]
**खोक** स्त्री. (दगड इ. च्या) प्रहारामुळे डोक्याला झालेली जखम; कोच.
**खोक** स्त्री. हुंडीचे पैसे दिल्यानंतर रद्द झालेली हुंडी.
**खोकट** पहा : **खोकड** : 'ढाप्या खाली पडल्यावर आतली खोकटांची पिल्लं बाहीर आली.' - गोता १३३.
**खोकड** न. १. कोल्ह्याच्या जातीचे एक जनावर. हे मोठे काबेबाज व धूर्त असून मोठमोठ्या शिकाऱ्यांना व शिकारी कुत्र्यांना पुरेपूरे करून सोडते. याचे शेपूट झुपकेदार गोंड्याचे असते. हे ओढ्याच्या दरडीतील बिळात राहते. २. (ल.) म्हातारा, जखखड, कुरूप, अशक्त, रोगी माणूस किंवा पशू. ३. (ल.) नापीक, रूक्ष, खडकाळ जमीन. (को.)
**खोकडा** वि. अशक्त, रोगी व कुरूप.
**खोकडी** स्त्री. तोंडाची, चेहऱ्याची एक बाजू. पहा : **खोकाड** [ध्व.] (वा.) ० **गुंगवणे, ० रंगवणे**- १. जोराने, फाडदिशी तोंडात

भडकाविणे. यावरून २. (ल.) नासणे; चालेनासे करणे; घोटाळा माजविणे; घात करणे.

**खोकणे** अक्रि. खासणे; ढासणे; खोकल्यामुळे कंठातून खोखो असा आवाज येणे. [ध्व.]

**खोकत-ल, ले-करी** वि. नेहमी खोकत राहणारा; खोकल्याचा विकार असणारा : 'गल्लीत क्षयरोग्यांचे प्रमाण बरेच आहे. बरेच खोकतकरी दिसतात.' - व्यंमाक २८४.

**खोकन-र, खोदिन-शी** क्रिवि. खो असा आवाज होऊन.

**खो (खों)कर-ड, खोंकरे** वि. १. फुटके; तडकलेले; नाशवंत : 'जें आकारीं इयें खोकरें।' - ज्ञा ८.१५; मोडकळीस आलेले : 'रिता वाडा खोंकर।' - तुगा २०५५. २. वयातीत; जख्ख. [क. कोंके] [सं. क्षयकर]

**खोकरणे** अक्रि. १. क्षय पावणे; फुटणे. २. ओसरणे; कमी होणे : 'आयुष्यजळ खोकरे।' - गीता २.४३१. ३. खोकणे.

**खोकरपण** न. नाशिवंतपणा; क्षणभंगुरता; क्षणिकत्व : 'तेणें खोकरपणें घडे। क्षर हें नाम॥' - ज्ञा १५.५००.

**खोकलणे** पहा : **खोकणे**

**खोक(ख)ला, खोक** पु. घशाच्या किंवा छातीच्या विकाराने तोंडातून बाहेर पडणारा खो खो असा आवाज; ढास. खाल्लेले अन्न श्वासमार्गात गेल्यानेही खोकला उद्‌भवतो : 'खोकलें खरूज अत्यंत।' - गीता १३.२४९७. (राजा) (वा.) ० **विकत घेणे** - स्वतःच्या पायावर धोंडा पाडून घेणे; नसते लचांड अंगावर ओढून घेणे.

**खोकला** पु. भांडण : 'लग्नामध्यें कांहीं खटखट खोकला जाला नाहीं.' - नाग २.१३८.

**खोकली** स्त्री. एक मोठे झाड. याची पाने हिरड्याच्या पानासारखी असतात. साल तेजबळासारखी जाड व पिवळी असते. फळे हरभऱ्याएवढी असून झाडास सावरीप्रमाणे काटे असतात.

**खोक(ख)स** न. धान्यातील फोल व तूस; भुसकट.

**खोका-खा** पु. १. पैसा देऊन निकालात काढलेली हुंडी. २. दिलेल्या हुंडीच्या संबंधी सूचनापत्र. [क. कोंके]

**खोका-खा** पु. १. सुटका. २. हकालपट्टी. (अधिकारावरून किंवा जागेवरून.)

**खोका-खा** पु. झाकण नसलेली पेटी (विशेषतः देवदारी).

**खोका-खा** पु. म्हातारा, जख्ख माणूस. (कु.)

**खोका-खा** पु. १. भिजून, फुगून खारकेसारखा सुकणारा, पिवळा व हिरवी झाक असणारा उत्तम प्रकारचा हिरडा. २. राशीतून चांगली सुपारी निवडून राहिलेला खराब माल; पोकळ, हलकी सुपारी.

**खोकाट** पु. जोराचा खो खो असा आवाज : 'हसण्याचा खोकाट चाललेला.' - माजी १०.

**खोकाड** न. तोंड, गाल यांची एक बाजू; थोराडपणा, कुरूपता, गदळपणा, सुजेमुळे आलेली विरूपता यांसाठी किंवा तोंडात भडकविणे या अर्थाने पण निंदार्थी वापरतात. पहा : **खोकडी**

**खोका(खा)वणे** अक्रि. खो असा आवाज होईल असे पडणे, फुटणे, वाजणे (पाऊस, जड वस्तू इ.).

**खोकाळा** पु. हसण्याचा मोठा आवाज; गलबला : 'हपीसच्या तंबूत खूप खोकाळा चालला होता.' - उअं १२०.

**खोकाळे** न. टाळू. पहा : **खाकोळे**

**खोक्खा** पु. वानराच्या ओरडण्याचा आवाज. [ध्व.]

**खोखर** वि. जीर्ण. पहा : **खोकर** : 'खोखर वृक्ष असलियावरी। आणि वसंत बोळला तयावरी।' - महिकथा १.३६.

**खोखर** पु. (संगीत) एक राग : 'द्रौपदींत (नाटकात) खोखर (बिहागडा प्रकार) आहे.' - विशा २.३२६-३२७.

**खोखो** पु. एक भारतीय मैदानी खेळ. पहा : **खो**

**खोगराळ** न. डोणी : 'घागर दगडी खोगराळात रिती केली.' - श्रीयो २.२५३.

**खोगळ** पहा : **खोंगळी**

**खोगीर** वि. एक शिवी. (झाडी.) [फा.]

**खोगीर** न. पलाण; घोड्यावर घालायचे (कापडी, चामडी) जीन. [फा.] (वा.) ० **लादणे,** ० **बसविणे,** ० **ठेवणे** - १. घोड्यावर जीन ठेवणे, कसणे. २. एखाद्यावर दोष लादणे; ठपका देणे. ० **चढवणे** - विशिष्ट पोषाख, गणवेश इ. कामावर जातानाचा पोशाख करणे.

**खोगीरभरती** स्त्री. १. (पूर्वी स्वारांच्या गणतीच्या वेळी खरे शिपाई जेव्हा एखाद्या सरंजामी सरदाराजवळ नसत, तेव्हा तो घोड्यांच्याऐवजी खोगीर दाखवून वेळ मारून नेत असे. त्यावरून किंवा खोगिराच्या पोटात चिंध्या इत्यादी निरुपयोगी वस्तूच फार असतात यावरून) अवजड व कुचकिमतीच्या वस्तू; क्षुद्र माणसे व निरुपयोगी पशू; निव्वळ जागा भरून काढण्यासाठी ठेवलेल्या वस्तू, प्राणी; बाजारबुणगे. २. चुकीने किंवा लबाडीने एकत्र केलेल्या घोड्यांचा जमाव. (मोठे व लहान, मजबूत व लुकडे घोडे अथवा प्राणी.)

**खोच** स्त्री. १. ठोका; घाव; खोक; बोच. २. खंड, खाच. ३. पुढे आलेले टोक; काटा; अणकुची; खोचाटा. ४. (ल.) व्यापारातील तोटा; नुकसान; धक्का. ५. रोष; असंतोष. ६. व्यंगोक्ती; व्याजोक्ती; उपरोध. ७. बाणांचा टप्पा : 'पुढें बाणाच्या खोचेचे तफावतीनें उभे राहिले.' - इमं २८९. [सं. कुच] (वा.) ० **मारणे** - मर्मभेदक टीका करणे : 'मोठमोठ्या इंग्रेजी ग्रंथकारांची कोणास खोंचा मारण्याची रीत किती संभावितपणाची व रामबाण असते हें ठाऊक असेलच.' - नि ९.

**खोच** स्त्री. १. गाण्यातील स्वरभेद, खुबी. २. खुबी, मर्म, तात्पर्य (गोष्ट, बनाव, प्रसंग, भाषण यांतील).

**खोच** स्त्री. लाठी, फरीगदगा, भाला, पट्टा वगैरेमध्ये पुढे टोचण्यासाठी प्रतिपक्षावर करायचा वार.

**खोच** वि. हलक्या किमतीचा; स्वस्त. (नंदभाषा)

**खोच** न. खोपट : 'मी बापूजीबोवाच्या खोचात जाऊन गुपचिप बसून राहिलो.' - आआशे ३४४.

**खोचक** वि. मनाला लागेल असे (बोलणे, लिहिणे); प्रत्यक्ष उल्लेख न

करता मर्मभेदी उल्लेख, टीका. (करणे)

**खोचकील** वि. संकुचित; अडचणीचे; कोंदट.

**खोचखाच** पहा : **खाचखोच** (वर्णव्यत्यास).

**खोचट** स्त्री. १. काटा; अणकुची; पुढे आलेले टोक; खोचाटा; कुसळ. (क्रि. लागणे.) २. व्यापारातील ठोकर; तोटा. (क्रि. लागणे, बसणे, येणे.)

**खोचटणे** सक्रि. खुपसणे; आत ढकलणे : 'चुलीत काटक्या खोचटल्या.' - जाण २०.

**खोचटणे** अक्रि. अडकून फाटणे; खोच लागणे; धसावर किंवा टोकावर अडकणे; टरकणे.

**खोचडे** न. कातडीचा खरचटलेला भाग. (ना.)

**खोचण** स्त्री. बायकांच्या लुगड्याचे ओचे; कमरेभोवती दुमडलेली बाजू किंवा भाग; खोवलेला भाग. (राजा)

**खोचणी** स्त्री. १. खोचणे; खोवणे. २. खुपसणी; टोचणी : 'आंगवणा करावेआं खोचणी।' - शिव १०३५.

**खोचणे, खोचरणे** उक्रि. १.बळेच शिरकवणे; जोराने आत घालणे; खुपसणे; दडपणे. २. खोसणे; खोवणे. ३. लावणे; पुरणे; रोवणे. ४. (ल.) टोचणे; भग्नोत्साह होणे; मनाला लागणे; वरमणे; विरमणे, अतिशय दुःख होणे : 'नरपतिरमणी ते खोचलीसे जिव्हारीं ।' - सारुह ३.५७. ५. संकोच वाटणे; संकट वाटणे : 'तुका म्हणे देवा, कां गा खोंचलासी जीवा।' - तुगा ६२९. ६. रुपणे; टोचणे : 'हें असो पर्वताचिये हृदयींचें। जेविं पर्जन्यधारास्तव न खोंचें।' - ज्ञा ९.१२६. ७. भोसकणे; जखमी करणे : 'तो देवें पाचारौनि खोचिला।' - शिव १०६७. [सं. कुच्]

**खोचदार** वि. तीक्ष्ण.

**खोचबोच** स्त्री. न आवडेल असे बोलणे; मनाला बोचेल अशी गोष्ट : 'त्यांच्या युक्तिवादात खोचबोच नसते.' - लोक्षि (प्र.) ९.

**खो(खों)च(चा)र-रा** पु. खोचण्याचे, भोसकण्याचे एक शस्त्र; भाला, बरची इ. : 'सुणीं ससाणें चिकाटी खोंचारा। घेऊनि निघती डोंगरा। पारधी जैसें।' - ज्ञा १६.३४५.

**खोचर(ल)णे** सक्रि. १. दात कोरणे (को.) २. पोचा पडणे; खोमलणे. पहा : **खोचणे**

**खोचरा** पु. भाताची एक जात. (कु.) पहा : **खॉचरॉ**

**खोचा** पु. १. धोतराचा ओचा, सोगा, खोवण्याचा भाग. २. पोचा; खोमा; धस लागून फाटणे. ३. (मांसात शिरलेले) टोक; शल्य. ४. सड पीत असताना वासराने गाईला मारलेली ढुसणी, हुंदडा. ५. (गाईचे दूध पिता येऊ नये म्हणून वासराच्या तोंडास बांधलेली) भाळी; लाकडी चौकट. ६. खुंटाळे.

**खोचा** पु. दुकान : 'तिथं येताच पहिल्यांदा बुदलखंड्यांच्या खोचाकडं वळली.' - वानगी २२५.

**खोचाटा** पु. खिंड; अरुंद वाट.

**खोचाटा** पु. अणकुची; टोक; धस; काटा. (क्रि. लागणे.)

**खोचार-ड** न. खिंड; घळ; दरी; अडचणीची, बंदिस्त, कोंदट जागा. वि. अडचणीची, अरुंद (जागा.)

**खोची** स्त्री. १. (सपाट पृष्ठभागावरील लहानशी) खोच; खांड (फळी, शेत इ. मधील). २. (ल.) लहानशी खाडी; खाडीचा फाटा; खाडीच्या वर असलेली खिंड; खिंडार; खळी. ३. समुद्राचे किंवा नदीचे पाणी खेळवण्याकरिता खोदलेली जमीन, चर. (कु.) ४. (नाविक) जहाज लावण्याची सोइस्कर जागा. (कु.) : 'लहान होडकी सातआठ होतीं ते खोचीतच पश्चिमेच्या आहेत.' पेद १६.५०.

**खोची** स्त्री. तोंड; तोंडाचे बोळके; तोंडाची खाच : 'वार्धक्य केवळ पाप। तेणें सर्वांगीं उठे कंप। भेणें खोंची हले लपलप। शब्दाचा पोचट प्रताप होय।' - भाराबाल ९.६९.

**खोचीचे कलम** न. खुंटीचे कलम.

**खोचून घेवप** क्रि. दसऱ्याला वगैरे अंगात देवाचा संचार झाल्यावेळी डोक्यावर तलवारीने घाव करून घेणे. (गो.)

**खो(खों)चेरा** पु. बिळातून साप बाहेर ओढून काढण्याचे दुटोकी हत्यार; चिमटा.

**खोज** स्त्री. शोध; तपास; चौकशी. (ना. व.) [हिं.]

**खोजगिरी** दूषण; क्षुद्र भाषा; दुरुत्तर.

**खोजणे** क्रि. आत शिरणे.

**खोजलाग** पु. खोज; शोध; थांग.

**खोजा** पु. १.मोठी थाळी. २.मातीची सुरई. पहा : **खुजा** [फा. ख्वांचा.]

**खोजा** पु. पाऊलखुणा.

**खोजा** पु. १. एक मुसलमान जात. २. प्रतिष्ठित मुसलमान. [फा. ख्वाजा]

**खोजा-ज्या** पु. षंढ; जनानखान्यातील हिजडा; नपुंसक : 'बसवंतराव आपा कासुरडे खोज्या होण्याचें कारण हेंच.' - मदरु १.१२२.

**खोजेबाजी** स्त्री. लवंडेबाजी; अनैसर्गिक मैथुन : 'आंतून गुप्त रूपानें त्यांच्या दारूच्या आणि रंडीबाजी व खोजेबाजीच्या व्यसनासंबंधानें त्यानें रिपोर्ट केले.' - प्रतिआत्मच १५१.

**खोट** स्त्री. १. धातूचा गोळा; लगड; वीट (बिनघडलेल्या किंवा रस केलेल्या धातूची) : 'आसुरी संपत्ती हा खोटु।' - ज्ञा १६.२१६. २. (ल.) गोळा; लगदा (कफ, रक्त, दही, खवा इ. चा); गुठळी.

**खोट** स्त्री. १. टाच. २. लाथ. (गो.)

**खोट** स्त्री. तोटा; नुकसान (व्यापार व्यवहारात). [सं. कूट] (वा.) ० **बसणे,** ० **खाणे** - तोटा येणे; बूड येणे; नुकसान होणे.

**खोट** स्त्री. १. खोटे; असत्य; खरेपणा, प्रामाणिकपणा, विश्वासूपणा इ. चा अभाव. २. दोष; वैगुण्य; कमताई (व.) [सं. कूट]

**खोटचाल** वि. १. गैरशिस्त; बदफैली; वाईट चालीचा, सवयीचा. २. संप्रदायविरोधी वर्तनाचा.

**खोट(ड)पत्र** न. (कायदा, ग्रामपंचायत) अपराध्यापासून त्याच्या खोटेपणाची किंवा अपराधाची घेतलेली लेखी कबुलायत; वादात हरलेल्या माणसाकडून घेतलेले जितपत्र.

**खोटपन** पु. १. अपमान. २. दोष. (झाडी.)

**खोटबावली** पहा : **खुंटबावली**

**खोटर** न. १. ज्यातून पाभरीच्या दिंडाकडे एले नेतात तो कप्पा. २. बैल, वासरू यांच्या गळ्यात बांधायचा दीड हात लांबीचा वारतीचा तुकडा. (व.)

**खोटलो-ली** पु. १. बांबूची टोपली. (गो.) २. धान्य बांधून ठेवलेला गवताचा मुडा. (कु.)

**खोटवणे** अक्रि. अडखळणे; अडून राहणे; खोटी होणे : 'तरि न जावे देखुन। खोटवला।' - क्रिपु ४७.२२.

**खोटवाद** पु. खोटेपणा; लबाडीचा आरोप. [क्रि. घेणे.]

**खोटवाद** पु. टाचबंद (वहाणेचा).

**खोटवेरा** पु. सरकारी वसुलातील तूट भरून काढण्यासाठी बसविलेला जादा कर, आकारणी.

**खोटसाळ** वि. १. हीण; हिणकस; खोटी (धातू). २. अप्रामाणिक; खोटा; वाईट चालीचा; दुर्वर्तनी : 'अमुच्या आशांनीं भीतीला खोटसाळ हो म्हटलें।' - केक २. ३. कृत्रिम; बनावट. ४. गैरभरवशाचा; लुच्चा; खोडकर; दुष्ट. पहा : **खोडसाळ**

**खोटा** पु. उसाचा तुकडा. (झाडी.)

**खोटा** वि. १. असत्य; खरा किंवा वास्तविक नव्हे असा. २. विश्वासघातकी; बेइमानी; लबाड. ३. कृत्रिम; बनावट; नकली; मिश्र. ४. हिणकस; अशुद्ध; मिसळीचा; वाईट (पैसा, नाणे). ५. पापी, अधार्मिक (माणूस): 'मांड्या मोडुनि वधिला, तुज दावि वामअंक जो खोटा।' - मोऐषिक ३.२५. ६. त्याज्य; टाकाऊ; वाईट : 'बहू खेळ खोटाचि आलस्य खोटा।' - मराठी तिसरे पुस्तक १६ (१९३३). ७. हलका; कमी प्रतीचा. [सं. कूट]

**खोटाई** स्त्री. खरेपणाचा, वास्तविकपणाचा अभाव; लबाडी; खोटेपणा : 'कां करिसी खोटाई।' - दावि २४१.

**खोटानाटा** वि. वाईट; खोटा; हीण (व्यापारी जिन्नस, पैसा, मौल्यवान धातू). [खोटाचे द्वि.]

**खोटारडा** वि. खोटे बोलणारा : 'ही माणसं दुष्ट आहेत, खोटारडी आहेत, वाईट आहेत.' - गणूराया १३६.

**खोटारा** वि. खोटा; खोडसाळ. (को.)

**खोटारेपणा** पु. खोटेपणा; लबाडी : 'काय हा खोटारेपणा!' - रोमियो ज्यूलियट ५.

**खोटावचे** अक्रि. लाथ मारणे.

**खोटावणे** अक्रि. थांबून राहणे; अडून राहणे; खोटी होणे : 'कवण हालोंचालों न सके। खोटावले सकळ।' - क्रिपु १७.२२.

**खोटिल** पु. खानदेशातील सपाटीवर राहणारा भिल्ल.

**खोटी** स्त्री. गोळा; आकृती : 'जननी जठरीं रुधिरयुक्त। मुसावोनि खोटी होत।' - एभा २२.५१३.

**खोटी** स्त्री. खोळंबा; उशीर; विलंब; अडथळा किंवा अडथळ्याची स्थिति; दिरंगाई. [सं. कुंद]
वि. खोळंबा, उशीर, अडथळा केलेला. (क्रि. करणे.) : 'मोहिबास येइतलग त्यास खोटी करावे.' - पेद ३.५९.

**खोटी** वि. दुष्ट; खट्याळ : 'वहिनी माझी खोटी पायानं पिढं लोटी।' - जामो ४६६. [सं. कूट]

**खोटी** स्त्री. लगड; गोळा (धातूंचा). पहा : **खोट** : 'आटलेपण ते खोटी म्हणिपे।' - ज्ञा ८.१७३.

**खोटीचा** वि. लगडीचा बनवलेला, केलेला.

**खोटे** न. माणसांना व वास्तूंना (घरांना) पछाडणारे एक पिशाच. हे पिशाच खरा नावाच्या देवतेच्या उलट आहे म्हणून खोटे. (राजा.)

**खोटे** वि. पहा : **खोटा**. १. असत्य. २. दुष्ट; वाईट : 'चारुनि विषान्न भीमा सर्प डसविले नृपें, असें खोटें।' - मोकर्ण ४९.६. ३. त्याज्य; वाईट : 'दुसऱ्याच्या आज्ञेत वागणें हें बहुत खोटें आहे.' - बाळ १.७०-८० (आवृत्ति १) [सं. कूट]

**खोटेपण** न. १. खरेपणा नसणे; असत्यपणा. २. दोष; अपराध : 'त्यजी मदपराध हें मजकडेचि खोटेंपण।' - केका १८.

**खोड** न. खोगिराची चौकट, कमान. [सं. स्कंध]

**खोड** न. १. शेंडा व फांद्या छाटून टाकलेले झाड; ओंडका; खुंट; सोट; बुंधा; फांद्यांच्या खालचा भाग : 'तिन्ही लोकीं तुझें नाम वृक्ष पल्लव शाखा। वेंघलों वरि खोडा धरुनि भाव टेंका॥' - तुगा ३५४. २. सुगंधी द्रव्याचा खडा, लाकडाचा तुकडा (चंदनाचा, इतर सुगंधी झाडाचा). ३. (सामान्यत:) झाड. ४. फळे, फुले न येणारे जुनाट झाड; (ल.) म्हातारी व न विणारी किंवा गाभण राहण्यास अयोग्य गाय, म्हैस; वृद्ध मनुष्य. ५. भोपळ्याशिवाय दांडी, सांगाडा (सतार, वीणा यांचा); तबला, मृदंग करण्यासाठी तयार केलेला व पोखरलेला लाकडी ठोकळा. हा एक किंवा दुतोंडी असून शिसू किंवा खैराचा असतो; मृदंग. (मावळी) ६. लोखंडी घडकामाची चौरस पहार टेकविण्याचा लाकडी ठोकळा. [त. क. ते.कोड्डु]

**खोड** न. खडे जडवलेले तन्मण्याच्या मधले पदक : 'त्यांच्या गळ्यात मोत्याचं तनमणीचं खोड होतं.' - स्वामी २०.

**खोड** न. मासोळीचे घरटे. (झाडी.)

**खोड** न. लाकडी पसरट पाळे; पोहे कांडण्याची उखळी. (गो.)

**खोड** स्त्री. वाईट प्रवृत्ती, कल; वाईट सवय, चाल; अवगुण; लहर; तबियत; रग. [सं. कोडी] (वा.) ० **ठेवणे** - दोष ठेवणे किंवा शोधणे; नावे ठेवणे; छिद्रे बाहेर काढणे किंवा बघणे. ० **मोडणे** - ताठा, गर्व कमी करणे; खोडकी जिरवणे; एखाद्याच्या वाईट प्रवृत्ती, सवयी, ओढी त्याला टाकायला लावणे, सोडविणे, घालविणे किंवा त्यासाठी कडक शिक्षा करणे.

**खोड** स्त्री. १.अयब; व्यंग; दोष; गोम (घोडा इ. जनावराची). घोड्याच्या बहात्तर खोड्या सांगितलेल्या आहेत. २. दोष; बिंग; चूक; अशुद्धता (भाषण, बोलणे यांतील); गोम; तडा; फूट (जिन्नसांतील). ३. चोखंदळपणा; लहर; तबियत; मिजाज. ५. कलंक; डाग; कालिमा. [सं. कूट] (वा.) ० **करणे** - लहानसहान उपद्रव देणे; खाजविणे; चेतविणे; चिडविणे; राग आणणे. ० **काढणे** - १. खिजविणे; चेतविणे; बाहेर काढणे (गुप्त वैर, दुष्टपणा). २. वाटेस जाणे; खोडी

करणे. ३. दोष काढून टाकणे. [सं. कूट]

**खोड** न. १. शरीर; देह.२. लंगडा, अंगावरून वारे गेलेला माणूस. (क्रि. होऊन पडणे, होणे.) [सं. खोड]

**खोडक** न. खोड; झाड; रोप : '...पाचवी माझी ववी तुळशीच्या खोडका।' - जसा ३५.

**खोडकर** वि. १. चेष्टेखोर; टवाळ; खोड्यांनी परिपूर्ण. २. वाईट सवयी, चाली, व्यंगे, दोष असणारा. ३. मिजासखोर; लहरी; तबियती.

**खोडका** पु. वाळून शुष्क झालेले झाड; खोड : 'जळणास रुपाया एक लहान खोडका।' - राला ११०. (व.)

**खोडकी** स्त्री. खोड; दोष; मिजास; ताठा. (क्रि. जिरवणे, मोडणे.)

**खोडकी** स्त्री. बिनआरीचा, गावठी भोवरा. (व.)

**खोडखत** स्त्री. दोष व वंश; अवगुण; आचारकुळी. (क्रि. पाहणे, विचारणे, पुसणे).

**खोडखत** पु. चाबूकस्वार किंवा गुरेढोरे विकणारा.

**खोडखुडुक** न. म्हातारेकोतारे : 'असली खोडखुडकं घरात, तिला इच्छा कशी व्हावी?' - पलको २७५.

**खोड्गुणी** वि. खोडी करणारा.

**खोडणे** उक्रि. १. डागणे; दूषित करणे; कलंकित करणे. २. नावे ठेवणे; व्यंगे, बिंगे बाहेर काढणे.

अक्रि. वाईट सवयी, खोडी लावून घेणे.

**खोडणे** अक्रि. १. रद्द करणे (खरडून, पुसून, मधून एक रेष ओढून). २. पेटके देत आखडणे; अवटारणे (अवयव). (वा.) **हातपाय खोडणे** – मरणकाळी हातपाय झाडणे : 'विधातियाची मान रगडी। विरंची बहुत हातपाय खोडी।' - महिकथा २.१४८. **खोडून काढणे** – चुकीचा ठरवणे; सदोष आहे असे दाखवून देणे.

**खोडप** स्त्री. चुडतांच्या कुडाची खोली. (क्रि. करणे.) (गो.)

**खोडपा** पु. लाकडाचा ओंडका.

**खोडबावली** पहा : **खुंटबावली**

**खोडभक्ती** स्त्री. उलट तपासणी.

**खोडरबर** पु. लिहिलेला मजकूर खोडून टाकण्याचे रबर.

**खोडव** न. १. दौतीचे कलमदान किंवा ठोकळा. २. गोडे तेल ठेवण्याचे दगडी भांडे. ३. लाकडी मोगा.

**खोडव** न. १. उसाचा बुडखा. २. जुनाट झाड. (व.)

**खोडवन** न. जमिनीतील पिकाचे नुकसान भरून निघण्याकरिता दुसऱ्याच्या मालकीच्या, त्या जमिनीत असलेल्या झाडांच्या पिकांतून घेतलेला हिस्सा. (व.)

**खोडवळणे** अक्रि. १. खिळून राहणे : 'ते उठिति ना: खोडवळले असति :' - लीचउ १५६. २. मरण पावणे.

**खोडवा-वे** पु. न. मडके; १. मातीचे मोरव्यापेक्षा मोठे भांडे. (माण.) २. बरणीच्या आकाराचे लाकडी किंवा पितळी भांडे. (तंजा.)

**खोड(डा)वा-वे** पु. १. उसाचे दुसरे पीक; तोड झाल्यावर राखलेल्या बुडख्यापासून पुन्हा फुटलेला ऊस; पुन्हा फुटण्याकरिता जमिनीत राखून ठेवलेले बुडखे. २. मागची फूट; पहिल्या काढणीनंतर राहिलेली मुळे किंवा बुडखे (मिरच्या, वांगी, शाळू, तंबाखू यांचे). ३. (ल.) मुळ्या किंवा बुडखे ठेवलेले शेत अथवा मळा. (घाटी.) ४. लागवडीसाठी वापरण्यात येणारा केळीचा सोट.

**खोडसर-साळ** वि. खोडकर. पहा : **खोटसाळ**

**खोडसा** पु. सापाची एक जात : 'परड, खोडसे, महाडुळे। शुद्ध नाग सोनसळे।' - कथा ४.४.३१.

**खोडसाळ** वि. १. खोटा; अप्रामाणिक. २. दुष्ट बुद्धीने केलेला (आरोप इ.); धूर्त; कावेबाज; खुनशी; खोड्याळ.

**खोडसे** न. (जरतार) दोन्ही बाजूंना खिळे ठोकलेली व मध्ये वेजपट्टी लावलेली लाकडी घडवंची; पाड, कुंदा.

**खोडंग** पु. कोंडवाडा. (ना.)

**खोडा** पु. १. अपराध्याचे हातपाय अडकवून शिक्षा करण्याचे एक लाकडी यंत्र, सापळा : 'तेथ चंदनाचेही खोडे। न लेचि तो॥' - ज्ञा १८.८९८. २. उनाड जनावराच्या गळ्यातील लोढणे; मानखुंट. ३. (ल.) त्रासदायक, अडविणारे, पेचात आणणारे काम, लचांड, लटांबर. ४. संधिवाताची अवस्था (शरीर, अवयव यांची). ५. कुंठितावस्था. अडकून पडणे. [सं. खोड] (वा.) ० **चढविणे** – १. (मल्लविद्या) प्रतिपक्षाच्या पायांभोवती (किंवा मानेभोवती) आपले पाय विशिष्ट तऱ्हेने अडकविणे. २. (ल.) अडथळा करणे. ० **घालणे** - अडथळा आणणे : 'काही - सुधारणांना त्याने - 'असा काही खोडा घातला होता...' - मुंदि ५. ० **पायात अडकवणे** – काही करता येणार नाही अशी अवस्था करणे; असाहाय्य करून टाकणे : 'हा कसा खोडा देवानं माझ्या पायात अडकवला !' - काच १७. **खोड्यात पडणे, सापडणे** – काही करता येत नाही अशी अवस्था होणे. **खोड्यात पाडणे, खोड्यात टाकणे** – अडचणीत टाकणे.

**खोडाखोड-डी** स्त्री. १. लिहिलेले काढून टाकणे; लिहिलेल्या मजकुरावर रेघोट्या मारलेल्या असणे; बदलणे; दोन ओळींमध्ये लिहिणे (दुरुस्त्या.) २. चितारलेली, खोडून टाकलेली कागदाची स्थिती; काढून टाकलेल्या भागामुळे मूळ मजकुरात झालेला बदल.

**खोडाणे, खोडायणे** सक्रि. (आदिवासी) खोड्या घालणे; खोडा घालून शिकार करणे; फास टाकणे; पकडणे : 'चला जावं ससूरली खोऽ डायलें।' - आलो ७६.

**खोडाबिडी-बेडी-मोडा.** स्त्री. पु. १. वारे गेलेली अर्धांगरोगाची स्थिती. २. खोडा (शिक्षेचा प्रकार).

**खोडावणे** अक्रि. पक्षाघाताने, अर्धांगवायूने आजारी पडणे, लुळे किंवा खुडे होणे : 'वेठीऐसें वाटे निर्फळ कारण। शीतळ होऊन खोडावलों।' - तुगा ८७६. [सं. खोड = लंगडा]

**खोडा(ड्या)ळ, खोडी(डे)ल, खोड्या, खोड्यारा** पहा : **खोडकर**

**खोडाळमावसा** वि. खोडकर, चेष्टेखोर. (ना.)

**खोडाळी** स्त्री. १. चेष्टा; खोडी. २. चाळा; छंद.

**खोडी** स्त्री. १. सामर्थ्य : 'तुझिया प्रभावाची ऐसी खोडी। जे दुजेपणाचें

मूळ तोडी।' - एभा १६.४. २. कुरापत; आगळीक; उचापत.

**खोडी** वि. खोडकर; खोड्या करणारा : 'भलता वातरट नि खोडी.' - सावा ५३. (व.)

**खोडी** पहा : **खोड १-३** : 'खोडी न ठेवावी चतुरीं। ग्रंथ निर्धारी न पाहतां।' - एरुस्व १८.६६. (क्रि. करणे, काढणे, ठेवणे.)

**खोडील** वि. प्रत्येक गोष्टीत दोष काढणारा; छिद्रान्वेषी : 'स्त्रियांची जात फार खोडील असते.' - पांका ११४.

**खोडील** वि. व्यंग असणारा; दोष असणारा : 'एखादं जनावर दिसतंय इंद्राच्या ऐरावतासारखं पण असतंय खोडील.' - शिदोरी ५.

**खोडीव** वि. १. पुसलेले; खोडलेले; रेघोट्या मारलेले. २. रद्द केलेले; टाकाऊ.

**खोडे** झाडाचे वाळलेले खोड : 'अदीचि तुझे हातपाय वळले खोडेंचि दूलांकुडा।' - गरा १५१.

**खोणे** उक्रि. १. खोवणे; जोराने आत खुपसणे; खोचणे. २. हलकेच आत शिरकविणे, घालणे.

**खोणे** अक्रि. गमावणे : 'क्षणार्धात (ती) स्वत:वरचा ताबा खोऊन बसली.' - अगतिका ३०. [हिं. खोना]

**खोत** पु. १. गाव साऱ्याने घेणारा अधिकारी; गावाचा सारा भरणारा वतनदार; वसुलाचा, जकातीचा इजारदार. (सामा.) मक्तेदार. २. (काही ठिकाणी) सरकारसाठी गावचा वसूल जमा करणारा पिढीजाद कामदार; या कामासाठी तात्पुरता नेमलेला कामदार.

**खोतकरी** पु. जमिनीचा किंवा जमिनीच्या उत्पन्नाचा मक्तेदार किंवा इजारदार, खोत.

**खोतकी-गी** स्त्री. खोताचे काम, हुद्दा.

**खोतखराबा** पु. १. गावच्या खराब जमिनी काही एक रक्कम ठरवून कसायला देणे. २. अशा खराब जमिनी.

**खोतधारा** पु. कुळांकडून खोताला जमिनीबद्दल मिळायचा खंड.

**खोतपट्टा** पु. खोतीवतनाबद्दलचा दाखला.

**खोतपट्टी** स्त्री. खोताच्या नफ्याकरिता बसवलेला फाळा, कर.

**खोतवार** वि. खोताकडे लावून दिलेला (गांव).

**खोतवेठ** स्त्री. खोताने मजुरी न देता कुळापासून घेतलेली चाकरी, वेठ किंवा जिन्नस.

**खोतसजा-ज्जा** पु. खोताकडून साऱ्याने, भाडेपट्ट्याने घेतलेल्या जमिनी.

**खोती** स्त्री. १. खोताचा व्यवहार, काम, अधिकार. २. इजाऱ्याने, खंडाने, मक्त्याने देणे घेणे. पहा : **इजारा**. ३. उभ्या पिकाचा जंगलातील लाकडाचा, बागाइती उत्पन्नाचा मक्ता. ४. वाढीदिढीने शेतकऱ्यास पेरण्यासाठी वगैरे आगाऊ धान्य देण्याचा धंदा. ५. गावची मुखत्यारी; मिरास.

**खोदकला-काम** स्त्री. न. मूर्तिकला; नक्षीकाम; कोरीव काम. [सं. क्षोद]

**खोदगिरी** स्त्री. १. (दगड, लाकूड, धातू यावर) खोदणे; नक्षी कोरणे. २. मूर्तिशिल्प; नकसकाम; खोदलेले, कोरलेले काम; नक्षीकाम.

**खोदणाई,खोदणावळ,खोदणी** स्त्री. खोदण्याची, खोदकामाची मजुरी.कोरीव कामाची मजुरी.

**खोदणी** स्त्री. १. खणणे; कोरणे; खणती; कोरणी; कोरीव काम; नकस काम. २. खोदण्याचे, कोरण्याचे एक हत्यार; कोरणी. ३. (ल.) खनपटीला बसून पैसे काढणे; उकळणी. (क्रि. लावणे, मांडणे.) ४. सोनाराचे खाळणे; नकस कामाचे हत्यार.

**खोदणे** उक्रि. १. खणणे; उकरणे. २. कोरणे. ३. उघडणे. (को) ४. उकरून भांडण उपस्थित करणे. [सं. क्षुद्र] (वा.) **खोदखोदून विचारणे, पुसणे** - (गुप्त गोष्ट समजावून घेण्यासाठी) बारकाईने, आग्रहाने, डावपेच घालून, युक्तिप्रयुक्तीने विचारणे.

**खोदरा, खोद्रा** पु. चर; खोबण; खड्डा. (ना. व.) [सं. क्षोद]

**खोदाई** स्त्री. १. खणण्याची किंवा कोरण्याची मजुरी; किंमत; खोदणावळ. २. खोदण्याचे काम : 'रस्त्याची खोदाई चालली होती.' - भोवरा १३७.

**खोदीव** वि. १. खणलेले; खोदलेले; कोरलेले. २. कोरीव; नक्षीदार.

**खोदे** क्रिवि. क्षुब्ध होऊन : 'खोदें म्हणितलें नीकें।' - राज्ञा १३.५९.

**खोन** स्त्री. नजराण्याची वस्तू ठेवण्याची सुपली, टोपली : 'नंतर तात्यांनी त्याजला पाच खोन वस्त्रें व कंठी एक, सीरपेंच एक व जागा दिल्हा.' - ऐसंसाखं ३.१४.

**खोन** स्त्री. मासे धरण्याचे साधन.

**खोप** स्त्री. १. वीण; वेत. २. बिजवट; खाण. ३. पिढी. (व.) ४. पशूंचा विण्याचा (जननाचा) मोसम. (व.)

**खोप** स्त्री. एखाद्या साथीचा भर, व्याप्ती. जसे : - देवीची - तापाची - गोवराची - खोकल्याची खोप. (क्रि. येणे, चालणे, चालू होणे.)

**खोप - पी** स्त्री. १. झोपडी; खोपटी : 'नातरी आकाशाचे खोंपे।' - ज्ञा ९.१०३. हरिणीविण खोपी पडियेली वोस' - नाम १०८५. २. पक्ष्याचे घरटे. ३. (ल.) पोट; उदर : 'असो यावरी सोमवंशी जगद्रूपे। वसुदेव देवकीया खोपें। विश्वदुरितदहनार्थ कृष्णरूपें। आदिनारायणें।' - स्वानु ९.१.१७ ४. दरी; गुहा : 'सिंहखोपें केवि गजप्रवेश।' - कथा ४.१६.१८६. ५. पोकळी; ढोली. [क. कोप्प]

**खोप** स्त्री. १. केसांचा झुपका; वेणीचा खोपा : 'खोप वळूनिया कुरळी।' - कथा १.१.२९. २. वेष; आच्छादन : 'की कुमारीपणाची घेतली खोप।' - रुस्व १४०.

**खोप** स्त्री. आघाताने झालेली खोच; जखम; खोक. (कु.)

**खोप(पा)ट-टी-ड-डी** न. स्त्री. १. लहान घर; खोप; झोपडी.

**खोपडा-डी** पु. ठाणबंद गुरांपुढे खाण्यासाठी हिरव्या गवताची (विशेषत: झाडांच्या डहाळ्यांची) टांगून ठेवलेली पेंढी : 'खोपडी आनोनी धांड्याची दुपटा लावा त्यासी हो।' - एहोरा जडाव १५८.

**खोपडी-री** स्त्री. १. डोके. २. डोक्याची कवटी, कवची, कपाळ. ३. (उप.) बुद्धी; अक्कल : 'तुझी खोपडी म्हणजे जबाब नाही!' - वासू १५७. (वा.) ० **साफ करणे** - डोके फोडून टाकणे : 'आमाला शाणपणा शिकवायला लागलास तर तुझी खोपडी साफ करून टाकीन.' - वासू १७.

**खोपडी** स्त्री. एक प्रकारचे गावठी मद्य.

**खोपा** पु. (बायकी) १. वेणीचा विशिष्ट आकार, घाट; वेणी घातल्यावर

त्याची डोक्यावर केलेली विशिष्ट रचना; वेणीत फुले गुंफून केलेली केशरचना : 'तोडूनि गगनाची पुष्पें। गुंफूनि भरली खोपें। वंध्यापुत्र वधूचे।' - स्वानु ११.६.५९. २. फुलांची गुंफलेली वेणी; वेणीत गुंफलेली फुले. [क. कोप्पु]

**खोपा** पु. १. पक्ष्याचे घरटे : 'उफराटा पिंपळ त्यावरी येका कावळीनें केला खोपा रे।' - मध्वमुनीश्वरांची कविता ११०. २. झाडातील ढोली. ३. दरी; कपार; गुहा. ४. (सागवान इ. च्या) रोपांवर छाया राहण्यासाठी पानांचे नागफडीच्या आकाराचे केलेले आच्छादन. ५. घोंगता ६. पागोट्याच्या पुढील भागातील लहान खळगी. ७. निवांत जागा. ८. शेतातील गवताची झोपडी. [क. कोप्पे = खोल]

**खोपाड** न. दरी; गुहा; पोकळी.

**खोपाडे** पहा : **खोपाड** : 'वाडीसारख्या डोंगराच्या खोपाड्यात आडवळणी वाळीत टाकल्यावाणी...' - आपा ६६.

**खोपी** स्त्री. परंपरा; तालीम : 'बाळकृष्णबुवा पूर्वीच्या खोपींत तयार झाले होते.' - संशाक ८३.

**खोपीस** न. काळीज; छाती : 'उघड्या दर्याच्या अफाट मैदानावर वावरणाऱ्या कोळ्याचं खोपीस किती मजबूत असतं याची धुरानं करपणाऱ्या गिरणबाबूंना कल्पना होत नाही.' - धाधो १७.

**खोबजणे** अक्रि. संभ्रमणे; गोंधळणे : 'खोबजती युवती अति लाजती।' - वामन, कात्यायनीव्रत १६. [सं. क्षोम]

**खोबट** वि. खोलगट : 'गाल आत गेलेला, खोबट डोळ्यांचा चेहरा.' - मुंदि ४०.

**खोबडा-ळा** पु. पट्ट्याची मूठ.

**खोबडी** स्त्री. पशू रवंथ करण्यासाठी ज्या पोकळीत चारा साठवून ठेवतात ती जागा.

**खोबडी** स्त्री. (कुंभारी) खापरी कुंडी. ही परळापेक्षा मोठी असते.

**खोबण-णी** स्त्री. १. कुसू बसविण्याचे छिद्र, थर. २. पन्हाळी; खाप; खाचणी; भिंतीतील सरा, बहाल ठेवण्याची जागा, दर, भोक. ३. अडसराचे अडकण. ४. लाकूड इ. मध्ये पाडलेली खाच. (क्रि. पाडणे.) ५. सांधा बसविण्याचा खोलगट भाग; सांध्याचा प्रकार. ६. दोन फांद्या एकत्र येतात तो कोपरा : 'वडाच्या शेंड्याशी अशी एक खोबण होती.' - डोह १०.

**खोबण** स्त्री. डोळ्याभोवतीचा हाडामांसाचा लंबवर्तुळ भाग : 'खोबणीत गेलेले डोळे...' - श्रीयो १.१३.

**खोबण(णी)दाते** पु. अव. लाकडी सांध्याचा एक प्रकार; एका लाकडाला खोबण पाडायची व दुसऱ्या लाकडाला दाता पाडून तो त्या खोबणीत अडकवायचा ही पद्धत.

**खोबणे** अक्रि. उत्तेजित होणे. 'निर्मालु डोइये खोविला : आणि ऐसी फुरकटैजे : आणि ऐसी खोबैजे : - लीचपू ५२३

**खोबरजडी** स्त्री. एक मुळी. (झाडी.)

**खोबरवेल** पु. अनंतमुळाचा वेल; अनंतमूळ. (ना.)

**खोबरी** स्त्री. दूध तापविण्याचे, दही ठेवण्याचे मडके. (ना.)

**खोबरी-ऱ्या** वि. खोबऱ्याचा; खोबऱ्यासारखा.

**खोबरे** न. १. नारळातील मगज, गाभा, दळ. २. सुपारीच्या मधोमध असलेला पांढरा मगज, दळ, अंश. (राजा) ३. झेंडूच्या फुलात देठाच्या टोकाला असणारा पांढुरका भाग. ४. सुके खोबरे. (वा.) **खोबरा करणे** - वाटोळे करणे; धुव्वा उडवणे; पूर्ण पराभव करणे : 'माजे पाडे तुज्या बैलांचा खोबरा करून टाकतील.' - तोरण १६६: 'तालुक्यात अब्रूचं खोबरं केलंत.' - रथ २७२. [क. कोब(ब्ब)रि]

**खोबरे** न. नाश, दुर्मिळता. [क. खोब्बरी]

**खोबरेल** न. खोबऱ्यापासून काढलेले तेल.

**खोबऱ्याचा वाळा** खोबऱ्याच्या वाटीची कापलेली वाटोळी कड.

**खोबऱ्याची आई** नारळाची करवंटी; नरोटी.

**खोबला-ले** न. पु. १. झाडावरील फळे काढण्याची जाळे बांधलेली वेळूची लांब काठी; आंबे काढण्याचा झेला, घळ. २. गुरांच्या तोंडाला बांधण्याची जाळी. (कु.)

**खोबळपट्टी** स्त्री. (बैलगाडी) गाडीचा लोखंडी आख बसविण्याची जाड, लाकडी फळी. ही खोबळा व आख ह्यांच्यामध्ये असते.

**खोबळा** पु. १. पट्टा या शस्त्राची पोकळ मूठ. ही कोपरापासून पुढील सर्व हाताचे रक्षण करते. २. अभ्यासासाठी, शिकण्यासाठी केलेला लाकडी पट्टा (हत्यार). ३. गाडीच्या आखाची पेटी. ४. कुसवाचे घर. ५. जमिनीतील ओबडधोबड खाच, खळगा; भोक, खळी, खळगा (भिंत, ताल, दगड, फळी यांतील). ६. (विणकाम) ज्यामध्ये नक्षीचे दोरे (तार) ओवलेले असतात व ज्याला चाळले म्हणजे नक्षी उमटते तो; चाळा. ७. (सोनारी) खोबऱ्याच्या वाटीसारखा पण लांबट चांदीच्या.जरासारखे सूत ओढण्यासाठी केलेला व बारीक भोके असलेला द्रोण. ८. फरा; खुबा; बाहुटा. ९. तुकडा; पापुद्रा; झिलपी. (व.) १०. टोपण; अस्तर; बुजवण : 'घालूनि नखाचे खोबळे। अग्रीं अग्रबळें बूजिले।' - एभा ८.२३४.

**खोबळाखाचा** पु. (बैलगाडी) आखरीला पाडलेली खोबण.

**खोबळी, खोबी** स्त्री. १. लहान भोक; छिद्र; खळी. २. खाच; पोकळी. (क्रि. पाडणे.)

**खोबळे** न. खाच : 'गालाचं खोबळं झालं होतं.' - हात ८१.

**खोबा** पु. खळगा. 'तुम्ही खोबा करूं जाणाल :' - लीचउ ४२१.

**खोबी** स्त्री. तेलाच्या घाण्याच्या तळातील खळगा; पोकळी.

**खोबी पोतेरे** १. खोबीतील तेल पुसून काढायचे पोतेरे, फडके. २. घाण्यातील खळग्यात साठलेले व पोतेऱ्यासारख्या कपड्याने टिपून काढलेले तेल.

**खोबे** पु. सुरूंग.

**खोभणे** अक्रि. क्षुब्ध होणे; राग येणे : 'सींहु प्रतिबिंब पांतां खोभे।' - राज्ञा १५.४५४.

**खोमट, खोमटाण** पहा : **खवट, खवटाण**

**खोमण** वि. तोंडाचे बोळके झाल्याने नाक व हनुवटी जवळ जवळ आलेला; वाकडा; वक्र.

**खोमणकाकडी** पहा : **खमंगकाकडी**

**खोमणा** पु. पोचा : 'आईने टोमणा मारून खोमणा पाडला.' - आआशे

**खोमणे** न. १. नारळ इ. खवण्याची किसणी; खवणी. २. खळगा; खोच; दबका. ३. (ल.) वाकडेपणा; कमीपणा; न्यूनता : 'जयाचिये अनुस्यूतीं। खोमणें नाहीं॥' - ज्ञा १३.९१७. [सं. क्षुम्]

**खोमणे** उक्रि. १. जोराने आत घालणे; खोचणे; खुपसणे. २. रोपणे; रोवणे; गाडणे (खांब, इ.). पहा : **खोवणे**

**खोमणे** अक्रि. १. खोमा येणे; पोचा येणे; खपली वगैरे पडणे. २. भंगणे : 'देवता खोमली असे' - आचार भाष्य.

**खोमणे** अक्रि. कमी होणे; क्षीण होणे; निष्क्रिय होणे; कमीपणा येणे : 'चाळितांही न खोमें। गुणातीतता॥' - ज्ञा १४.२८५. [सं. स्कुभ्]

**खोमण्या** वि. १. कडक; ज्याचा दरारा आहे असा; अधिकारयुक्त; ज्याचा आज्ञाभंग न होईल असा. २. खमक्या; खमशा; खबेड.

**खोमलणे** उक्रि. १. भांडे वगैरेस ठोके पाडणे. २. (ल.) भुसकट पडणे; फार दमणे (अतिशय श्रम, कष्ट केल्यामुळे).

**खोमसणे** उक्रि. भोकात माती ठासणे, घालणे. पहा : **खुपसणे**

**खोमा** पु. १. खोचा; पोचा; चरा (भांडे आदळल्याने, आपटल्याने पडणारा). २. जमिनीवरील खळगी; लहान खड्डा; खाच. (क्रि. घेणे, पाडणे.)

**खोमेटी** स्त्री. फेक (दगडाची).

**खोय** स्त्री. १. स्वभाव; प्रकृती; रागरंग. २. खोड; आदत. (व.) [फा.खो]

**खोय** स्त्री. घाम.

**खोय** स्त्री. पांढरी पासोडी; तिची खोळ. (खा.)

**खोयबोय** स्त्री. मन; वृत्ती; भाव; प्रकृती; तबियत. (क्रि. घेणे, काढणे, पाडणे.)

**खोर** न. पु. दरी; खोंडा. (राजा) पहा : **खोरे**

**खोर** न. एक फारशी प्रत्यय (खुर्दन् = खाणे या क्रियापदापासून). हा मराठीत रूढ झाला आहे. जसे : - चहाडखोर, भांडखोर, हेकेखोर.

**खोर** न. ज्यावर निखारे ठेवले आहेत असा झारा.

**खोरडण** न. गुरांच्या पायाखालचा, भोवतालचा, शिलकी, वाईट चारा, गवत, बुचाड, केरकचरा. (को.)

**खोरडा** पु. कोंबड्यांचे खुराडे. (व.)

**खोरण** स्त्री. मोठे खोरे; घळ; दरा (दोन डोंगरांतील); खोंडा.

**खोरण-णे** न. भिंतीतील पोकळ जागा; कोनाडा; खोबण; भगदाड; बळद : 'अंधारातील खोरणात या दोन बाटल्या बाबानें ठेवून दिलेल्या असत.' - तोरण १५६. (कु.)

**खोरण** न. निखाऱ्यांची रास. (को.)

**खोरण-णी-णे** न. स्त्री. १. कचरा काढण्याचे एक प्रकारचे फावडे. २. उचटणे (पोळ्या, तळण्याचे पदार्थ, निखारे इ. वरखाली करण्याचे). लाकडी सरळ चाटू; उलथणे; कलथा : 'पळी असता खोरणें। कासयाला पाहिजे।' - अफला ३. (व.). ३. राख ठेवण्याची लहान खोबडी. (हेट) ४. निखारे चाळविण्याचा दांडा; काठी. [सं. क्षुर] (वा.) ० **लावणे** - मागण्या लावणे; तगादा करणे (एखाद्याच्या खर्चिक स्वभावाचा फायदा घेऊन); खोऱ्याने पैसा ओढणे.

**खोरण** स्त्री. शिंपांचा चुना करण्याची भट्टी.

**खोदणी मार** पु. भिंतीत कोंबून दिला जाणारा मार.

**खोरणे** अक्रि. तुंबणे; थकणे; तटणे; गुंतणे; अडून राहणे : 'ऐसा ऐवज चोकडील खोरला आहे.' - पेद १७.२९.

**खोरणे** अक्रि. उकरणे; खुरपणे. [सं. क्षुर]

**खोरणे** उक्रि. १. (चूल, निखारे) चाळविणे; ढोसणे; (जमीन, माती) पोखरणे; उकरणे; (फावडे) लावणे.

**खोरनिशा** स्त्री. पक्की हमी : 'जे करारमदार ठरला आहे तेणेप्रमाणे खोरनिशा करून देणे...' - ऐलेपाम्युप्र १५७.

**खोरपणे** अक्रि. नासाडी करणे; लुटणे; नागवणे; तोडणे. (प्रां.)

**खोरली** स्त्री. माडाच्या चुडताचे लहानसे खोरे. (कु.)

**खोरसणी** स्त्री. खोदखोदून विचारणे; बारकाईची चौकशी; कसून केलेली उलटतपासणी. (क्रि. घेणे.)

**खोरा-री** पु. स्त्री. कोणत्याही पानाचा केलेला एकटाकी द्रोण; डोणा; डोणी. २. पावसाळ्यासाठी माडाच्या झावळीची झाप विणून त्याची वळवून केलेली खोळ; इरले; इरल्यासारखी सरळ घोंगडीची खोळ. (को.) ३. खोंड; दरा; खोरे.

**खोरा-री** पु. स्त्री. खोरे; फावडे. [सं. क्षुर]

**खोराडे** न. पक्ष्यांचे खुराडे.

**खोरी** स्त्री. व्यापारातील तोटा, नुकसान, बूड : 'नवनीत शेलकें हेरी। आणिलें खोरी।' - राला ६६. [सं. क्षुर] (वा.) ० **येणे**, ० **होणे**, **खोरीस येणे** - १. (द्रव्याने अथवा पैशाने) नुकसानीत येणे; भिकेला लागणे. २. (अंगाने, शरीराने) अशक्त होणे; रोडावणे. ३. (अब्रूने) हलक्या पदवीस येणे; नामुष्की होणे. ४. (प्रयत्नांनी, उपायांनी) मती कुंठित होणे; शहाणपण खुंटणे; जिकीरीस येणे : 'केले टाणे टोणे सारी। पहिले करून झाले खोरी।' - पला ९०. [सं. क्षुर.]

**खोरी** स्त्री. दोहो बाजूच्या डोंगरांच्या ओळीमधून वाहणाऱ्या नदीच्या काठची वस्ती

**खोरू** स्त्री. लहान मासळी. (गो.)

**खोरूज** पहा : **खरूज**

**खोरे** न. शेण, केरकचरा ओढण्याचे फावडे; खोरा, खोरी. [सं. खनित्र] (वा.) ० **लावणे** - पहा : **खोरणे लावणे. खोऱ्याने माती आपल्याकडे उपसणे** - केवळ स्वार्थासाठी झटणे, आपल्या पोळीवर तूप ओढणे. **खोऱ्याने पैसा ओढणे** - खूप पैसा मिळवणे.

**खोरे** न. १. ज्यातून एखाद्या नदीला ओढे, नाले येऊन मिळतात आणि जिथल्या पावसाचे पाणी तिच्या प्रवाहात जाते असा नदीला लागून असलेला भूभाग. जसे :- गंगेचे खोरे, कृष्णेचे खोरे. २. अरुंद, लहान दरी; खोंड. [सं. कुहर]

**खोरेणे** अक्रि. थंडीने अंग काकडून बसणे. (कु.)

**खोरेती** स्त्री. खरवती झाड. याच्या पानावर करवतीसारखे खरखरीत काटे असल्याने कोकणात हे पान लाकडी वस्तू साफसूफ व गुळगुळीत करावयास सुतार लोक वापरतात.

**खोरेवाला** पु. लुटारू; वाटमाऱ्या; खिंड खोऱ्यातील लोक : 'वाटा चालत नाहीं. खोरेवाले धडका माणसे मारितात.' - पेद २०.३४.

**खोऱ्याळ-ळी** स्त्री. चुका; अपराध; दोष; व्यंग; न्यून (उघडकीस आणलेले). (क्रि. काढणे.)

**खोल** वि. १. ओंड; गंभीर; २. उथळ अथवा सखल नसलेले. ३. (ल.) आतल्या गाठीचा : 'अती खोल तो बोल बोलेल कैचा।' - दावि १५१. ४. शहाणा; धूर्त; धोरणी; विद्वान. ५. गहन; गूढ; सूक्ष्म; दुर्बोध; उथळ, दिखाऊ नसलेला : 'कारण पाहूं जातां फार खोल आहे असें नाहीं.' - नि ७१. ६. (उतार दाखवणाऱ्या शब्दाबरोबर योजना) उभा; सुळाचा. ७. कठीण; दुर्लभ : 'वेचितां फुकाचे बोल। केवढें खोल अभागियां।' - तुगा ७०१. [सं. कुहर] (वा.) ० **पाण्यात शिरणे** - जास्त तपशिलात जाणे; बारकाईने शोध घेणे; एखाद्या व्यवहारात फार मन घालणे; एखाद्या विचाराच्या दुर्बोध भागाचे ज्ञान करून घेण्याचा प्रयत्न करणे; आपल्या पलीकडे जाणे. **खोलात शिरणे** - फाजील चौकशा करणे; अतिशय बारीक तपशील मिळविण्याचा प्रयत्न करणे.

**खोल** न. केळीचा गाभा : 'खोल विकणारे श्रीधरांनीही कोठूनसे पोहे आणून प्रभूंना भेट अर्पण केले.' - गोप्रचउ २४.

**खोल** स्त्री. खड्डा; विहीर : 'कमरभर खडक फोडुन गंगातीर्थात खोल करावी.' - पेद ४०.१२९.

**खोलक(ग)ट**, वि. १. किंचित खोल. २. सखल; दबलेली (जमीन).

**खोलगडणे** अक्रि. दडपून जाणे; चेपले जाणे; अगदी खोल जाणे : 'सर्वभूत द्रव्यांची अनित्यता व त्यांचा नाशिवंत धर्म यांच्या विचारानें जर कोणाचें मन खोलगडून विभिन्न झालें असेल...' - विद्याभिवृद्धि १६६.

**खोलगा** पु. खळगा; खाच; खड्डा; दबलेला भाग; खळण.

**खोलटणे, खोलगटणे** अक्रि. १. खोलगट होणे; खाचखळगे पडणे; दबणे (पावसाने जमीन इ.) २. खोल जाणे; आत जाणे; ओढले जाणे (डोळे, गाल, पोट). ३. आकडे मोडणे; शेपखळी पडणे; ढुंगणाच्या बाजूला खळ्या पडणे; प्रसूतिचिन्हांनी युक्त होणे (गाय, म्हैस यांनी विण्याच्या पूर्वी).

**खोलणी** स्त्री. पुढे जाणे; पुढे चालणे : 'उच्चैःश्रवा खांचे। खोळणिये॥' - ज्ञा ९.३२६.

वि. पुढे चालणारा; मिरवणुकीत धन्याच्या पुढे चालणारा : 'इयावरी खोलणीयें। अठराजण बंदिये।'-स्वानु ७.५.४६. [सं. खोल् = लंगडणे.]

**खोलणी-ण्या** पु. १. (सोनारी) चांदीच्या पत्र्यास खोलावा आणून भांड्याचा आकार आणण्याचा हातोडा. २. (कासारी) पत्रा खोलण्याचे साधन. ३. हवाबंद डब्याचे झाकण काढण्याचे साधन.

**खोलणे** अक्रि. १. चालून जाणे : 'ते वोडण-खांडे (ढाल-तलवार) घेउनि पुढा खोलीत निगाले :' - लीच ३.६९-७०. २. खाली जाणे वाकणे : 'खोलती भक्तिजन अवघे' - ऋव २०४. [सं. क्षुद]

**खोलणे** उक्रि. १. जास्त खोल करणे (विहीर, खड्डा). २. स्पष्ट करणे; फोड करणे; खुले करणे; उघडणे. ३. पुढे चालणे : 'दिहा खोलणें रात्रीं जागोवा।' - ज्ञा १६.३४०.

**खोलता** पु. १. वाटाड्या; पुढे चालणारा : 'स्वामीपुढें खोलता। होईन मी॥' - ज्ञा १३.४१८. २. (ल.) मशालजी; दिवट्या.

**खोलती** स्त्री. दासी; वाटाडी : 'दृष्टी पुढां कुशळता : खोलती' - लीच.

**खोलपडा-डे, खोलपुढे** वि. क्रिवि. १. खोलगट आकाराचे (भांडे वगैरे); खोलपुडे. २. उपडे; खाली तोंड करून (निजणे). (चि.)

**खोलपा-पी** पु. स्त्री. १. थोडेसे जिन्नस ज्यात घालून देतात ती वाण्याने केलेली कागदाची शंकाकृती सुरळी; पुडा. २. पानांचा एकटाकी द्रोण. (कु.) ३. पानाची पण खालचे टोक दुमडलेली (ताक वगैरे पातळ पदार्थ त्यात घेऊन पिण्यासाठी केलेली) पोकळ घडी. (चि.)

**खोलपी** स्त्री. खोलगट भाग; खड्डा : 'काळोखात इकडेतिकडे विखुरलेले कांदेबटाटे वेचून तिनं पदराच्या खोलपीत टाकले.' - चक्र १११.

**खोलबुद्धीचा** वि. फार शहाणा; अत्यंत मुत्सद्दी, धोरणी, मसलतीचा; जो विषय घेतला त्यात तरबेज; त्यातील एकूण एक मखखी जाणणारा.

**खोलबंदी** स्त्री. घोड्याचे नाल काढून, खूर तपासून पुन्हा ते बसविणे; नालबंदी; खूरबंदी. [हिं.]

**खोलव(वा)ट** वि. १. किंचित खोल. २. सखल (जमीन); बदखल (जागा, खंदक, खोल, चर, घळ).

**खोलवटा** पु. खोलपणा; खोली.

**खोलवणा** पहा : **खोलणी**

**खोल(ला)वणे** उक्रि. (सोनारी) खोलगट आकार देणे; खोल करणे, जाणे : 'तें चौपासि घेऊनि आगारें खोलावती॥' - ज्ञा १५.९२

**खोलवत** न. सामता; आरी; गिरमिट.

**खोलवा** पु. खळगा; दबका; लहान भोक; आत दबलेली जागा.

**खोलविणे** अक्रि. खोल करणे; एखाद्या धातूच्या गोळ्याचा पाहिजे तसा खोलवा बनविणे; भोक पाडणे. २. खोल बसेल असे लावणे : 'पंचाग्नीची दडगी। खोलवीजती शरीरालागीं।' - ज्ञा १७.२५५.

**खोलविणे** १. क्षीण करणे. २. खाली करणे : 'गोसावी श्रीमुगुटु खोलविती :' - लीचपू २०.

**खोला-ल्या** पु. १. एकटाकी द्रोण. पहा : **खोलपा** २. २. ओबडधोबड, चांगले टाके नसलेली पत्रावळ (मधुकरी लोक कढी, आमटी किंवा इतर अन्न घेण्याकरिता झोळीत ठेवतात ती). ३. अर्धगोल तळाचे व उघड्या तोंडाचे भांडे. हे कोळंब्यापेक्षा लहान असते. फुलाची परडी. ४. कोणत्याही झाडाचे पान. (कु.)

**खोलावा** पु. ओंडी; खोली; खोलपणा; दबका.

**खोलिजणे** अक्रि. चालणे; चालता येणे. पहा : **खोलणे** : 'कां गगनामाजीं पाईं। खोलिजतु असे।' - ज्ञा १५.७१.

**खोली** स्त्री. १. खोलपणा; ओंडपणा : 'भेटे अस्त्रतति तया जशि पाहे सागरा शिला खोली।' - मोविराट १५.९२. २. कोठडी; अंतर्गृह; आडोश्याची जागा. ३. अंत; ठाव; परमावधी : 'प्रभुची जाणेल कसा बाहुबळें तोचि एकला खोली।' - मोवन ३.१६. [सं. कुहर]

**खोली** स्त्री. पत्रावळीच्या उपयोगाचे फणसाचे पान; खोलपी. (गो.) पहा : **खोला**

**खोलींव** स्त्री. खड्डा; खोलावा : 'उभयांचा कटक प्रदेश बुडे। इतुकी खोलींव जाली।' - कृमुरा ३१.६८.

**खोलून** क्रिवि. खुलेपणाने; मोकळेपणाने : 'महावतजंगास खोलून लिहावे की रघोजीस सहसा येऊं देत नाहीं.' - पेद २.१०.

**खोलेरी खाट** स्त्री. (क.) खाटेस खिळून बसणे; बिछाना धरून बसणे; मूस मारून निजणे.

**खोलो** पु. केळीचे किंवा त्या जातीचे मोठे पान; पानाचा तुकडा. (गो.)

**खोल्पी** स्त्री. फणसाच्या पानांचा पेज पिण्याच्या उपयोगी चमचा. (गो.)

**खोवखोव, खो(व)खोवणे** पहा : **खवखव, खवखवणे.**

**खोवजोवणे** पहा : **खवखवणे**

**खोवणी** स्त्री. १. खाप. (को.) २. जेवणाच्या ताटाला खालून दिलेला टेकू. (को.) ३. लोखंडी दंतुर वर्तुळाकार तुकडे एकात एक बसवून त्याला पितळी मूठ लावून लाकडी बैठकीवर, एका खांबावर बसवतात ते उपकरण; खवण्याचे साधन. पहा : **खवणी**

**खोवणे** उक्रि. १. खोसणे; जोराने आत घालणे; खुपसणे; खोचणे. २. हलकेच आत शिरकविणे; खुपसून देणे. ३. (ल.) वाईट गोष्ट सुचविणे. ४. पेरणे : 'जें बीज भुईं खोविलें। तेचि वरी रुख जाहलें।' - ज्ञा १३.२९७. ५. रोवणे; ठाम उभें राहणे : 'मृत्युपुढें अभिमानें तोही खोवील पाय काशाला।' - मोकर्ण ३६.४९. ६. फुकट दवडणे; घालविणे : 'वृथाच परि खोविलें बाळपण मुलासवें खेळीं।' - देप ४३. [सं. क्षिप् - क्षेपण]

**खोवा** पु. खवा; आटवून घट्ट केलेले साधे किंवा नारळाचे दूध.

**खोवाड** पु. अकाली पडणारा पाऊस; वळीव. (झाडी.)

**खोसड** न. खरचटून निघालेले कातडे. (व.)

**खोसड** वि. खोचून, टोचून, कुजके बोलणारा. (व.)

**खोसडखाऊ** वि. कोडगा; खेटरखाऊ; बेअब्रूचा; निगरगट्ट; अत्यंत मूर्ख.

**खोसडा** पु. भोसका; खोच; ढुशी; गुद्दा (भाला, मूठ यांचा).

**खोसडा** पु. जोडा; वहाण. पहा : **खासडा**

**खोसणे** सक्रि. खोचणे; शिरकावणे. पहा : **खोवणे:** 'विंचू नांगीं विष धरी। खोसडेवरी मृत्यू त्या।' - निगा २७४. [सं. क्षुद्]

**खोसर** वि. जीर्ण; फुटका. पहा : **खोकर**

**खोसा** पु. खोचा (वस्त्राला धस लागून पडलेला); खोच. (ना. व.)

**खोसी** स्त्री. खुशी; मर्जी. (गो.)

**खोसे** वि. अपमानित : 'मिसीया तोडुनि करी खोसें।' - मूप्र.

**खोळ** स्त्री. पु. १. अभ्रा; पोकळ पिशवी (गादी, उशी, रजई, अंगरखा यांची - आत कापूस भरण्यासाठी) : 'जें ऐहेंही परी विरुळें। इये विज्ञानाचियें खोळे। हालवलेंहि न गळे। तें परब्रह्म॥' - ज्ञा ८.१७. २. (ल.) खळगा; खळी : 'अहो आकाशाचिये खोळे। दिसतीं ग्रहगणांचीं कुळें।' - ज्ञा ११.२५८. ३. पावसापासून रक्षण होण्याकरिता केलेली (खांद्यावरील कपडा किंवा घोंगडे यांची) घुगी; झूल : 'कीं काळपुरुषाची कांबळी। कीं गजावरी खोळ घातली।' - रावि ३१.१८. ४. मुलांची कुंची; घुगी. ५. ज्याने गर्भ वेष्टिलेला असतो ती वार; जार; गर्भवेष्टन; गर्भाशय : 'एकी त्वचेची खोळ। काढोनि दिधली स्वहस्तकीं।' - मुआदि ११.१४८. ६. तोंडावरून पायापर्यंत घेतलेले पांघरूण. ७. बायकांची वस्त्राची ओटी : 'वाढविली न्हाणी खोळी भरली सुईणी।' - वसा ६२. ८. गवसणी : 'भरौनि आणै खोळ। उन्मेषांचेआ।' - ऋ २८२. ९. पिशवी; झोळी : 'तो बागुलाचें मारु। प्रतिबिंब खोळेभर।' - अमृ ६.५१. १०. जाजमासारखे पांघरावयाचे एक वस्त्र. (व. ना.) ११. देवाच्या मूर्तीवर शेंदराचे चढलेले जाड पूट; कवच. १२. आच्छादन; सापाची कात : 'सांडूनि आंगींची खोळी। सर्प रिगालिया पाताळीं।' - ज्ञा १४.३१२. १३. (ल.) अडचण; सांदीकोंदी : 'वैरीं खोळे घातला।' - गीता १.६७९. १४. गुहा. १५. बाणांचा भाता. [सं. खोलि]

**खोळ** स्त्री. खोलगट भाग; पात्र : 'भरली चंद्रभागा पानी माईना खोळात।' - जसा ८३९. (को.)

**खोळ** पु. पखवाजासारखे एक चर्मवाद्य; नाळ : 'भजनी मंडळात तल्लीन होऊन खोळ वाजवायचा.' - ज्ञासौं ५९.

**खोळ-ळी** स्त्री. १. मृत पशूचे चामडे. २. मृत देह; मढे : 'हरिणीविण खोळी पडलीसे वोस। दशदिशा पाडस भ्रमताती॥' - नामगा

**खोळ** न. 'नसत मीस'. - (तंजा.)

**खोळकर** वि. सुरकुत्या, चिरण्या असलेली (ठिगळ दिलेली, शिवलेली जागा, शिवण.)

**खोळणे** अक्रि. हालचाल करणे : 'त्वचेविण गर्भ खोळे।' - दास २.१.३१.

**खोळ(ल)बुंथ** स्त्री. घुंगट; अंगावर घेण्याचे जाड वस्त्र : 'स्याळे दीस तरी खोळबुंथ घालीति :' - पूजावसर

**खोळबेला** पु. खुशाली.

**खोळंबणे** अक्रि. १. थांबणे; वाट पाहणे; तिष्ठणे; उभे राहणे; मार्गप्रतीक्षा करीत राहणे. २. थांबणे; अडणे; खोटी होणे (काम, व्यवहार यांची) : 'जातो त्याविण आमुचाही तरि तो खोळंबतो काय हो?।' - मोकृष्णपू १९.६५.

**खोळंबा** पु. खोटी; थांबविलेली स्थिती; विलंब; उशीर. २. मोडता; अडवणूक. (क्रि. करणे).

वि. अक्रिय, काही न देणारा : 'देव खोळंबा देव खोळंबा। मज झळंबा म्हणु कोंडी।' - तुगा ३६७९.

**खोळा-ळी** पु. स्त्री. १. पहा : **खोळ** १, २, ३ : 'लेवोनि खोळि पंचभूतांची।' - परमा ४.१४. २.कात (सापाची) : 'सांडूनि आंगींची खोळी। सर्प रिगालिया पाताळीं।' - ज्ञा १४.३१२.

**खोळेंरे इरले** पाठीखाली न मोडता सरळ खाली जाणारे इरले.

**खोंग** स्त्री. लहान खड्डा : 'त्याच भिवईवर कपाळात मोठी खोंग' - गांधारी ११.

**खोंगयी** स्त्री. झरा; झिरप; पाट; चर : 'माह्या घरामागे पान्याची खोंगयी।' - दपा २.४. (व.)

**खोंगळ-ळा-ळी** पु. स्त्री. १. खोदलेला पाट, कालवा; खंदक.

२. पाण्याच्या लोंढ्याने केलेली घळ, ओघळ, चर : 'मेलेले जनावर ओढून नेतात आणि जवळच नाल्यात अगर खोंगळीत टाकतात.' - गांगा ६५.

**खोंगा** पु. तळहाताचा पसा, पोकळी.

**खोंगी** स्त्री. गुडघे व छाती यात डोके घालून बसण्याची क्रिया. (क्रि. करणे, घालणे, घालून बसणे). [क. कोंके]

**खोंच** वि. हलक्या किमतीचा; स्वस्त. (नंदभाषा)

**खोंचा** पु. भातखाचराचा ताल घातलेला भाग; लहान खाचर. (को.)

**खोंड** पु. १. तरुण बैल; गोऱ्हा; पाडा; सांड; पोळ; न बडवलेला बैल. २. बैलाचे वशिंड (व.) [क. कन्दु]

**खोंड-डा-डी-डे** पु. जोंधळ्याची एक जात.

**खोंड** पु. डोंगरावरील जनावरांची पाऊलवाट. (को.) पहा : **खोंडा**

**खोंड, खोडकुल** पु. खड्डा. (गो.) [सं. कुंड]

**खोंडरू** न. (तुच्छतादर्शक) कांबळ्याची घुगी; खोळ.

**खोंडा** पु. १. एका टोकाची खोळ केलेला कांबळा. २. दोन डोंगरांमधील चिंचोळा प्रदेश; घळ; दरी; अंधाराची व आडवळणाची जागा.

**खोंडाळ** वि. नुसते खोंड विणारी (गाय). (माण.)

**खोंडी** स्त्री. खोंडा, धान्य, भूस इ. वाहून नेण्यासाठी केलेली कांबळ्याची तात्पुरती खोळ. पहा : **खुंडी**

**खोंडेकोंडे** पु. अव. भुसकट; कोंडा : 'मग कां खावे खोंडेकोंडे।' - अफला २.

**खोंड्या** पु. भाताची एक जात.

**खोंड्या** वि. वशिंड असलेला (बैल). (व.) पहा : **खोंड**

**खोंद** न. १. पाठीवरील कुबड; पोक; खोंड. २. उंचवटा; वाकण; फुगीर भाग (भिंत, कुंपण, रस्ता यांचा).

**खोंदटणे** अक्रि. रागाने किंवा हट्टाने गुडघ्यात डोके खुपसून बसणे.

**खोंदळणे** उक्रि. १. क्षुब्ध होणे; खवळणे; २. ढवळणे; गढूळ करणे.

**खोंबकर** वि. क्षोभकर; उत्तेजक : 'नागरां देवां खोंबकरू' - शिव १५२. [सं. क्षोभ]

**खोंबरणे** सक्रि. खरवडणे; ठेचणे : 'चाण्या नुसत्या शिंगांनी सोन्याची मान खोंबराय बघत होता.' - गोता ३०.

**खोंबा** वि. खचलेला : 'खोंब्या पायांनी...' - माताजी ३१७.

**खोंबारा** पु. १. झाडाचे किंवा इतर वस्तूंचे पुढे आलेले टोक : 'आणि विरलेलं कापड खोंबारा लागत्यागत टरकन कुठंतरी फाटलं.' - ऊन २३. २. (ल.) मनाला लागलेली बोचणी, टोचणी : 'मालकाच्या काळजाला जरासा खोंबारा लागलाच.' - रैत १०.

**खॉजना** पु. एक जाड लोखंडी नळी; त्या नळीत दारू भरून काढलेला बार.

**खॉजॉ** वि. नपुंसक (गो.).

**खॉटला** पु. करंडी टोपली.

**खॉटावचे** क्रि. लाथा मारणे. (गो.)

**खॉ(खाँ)डप** न. चुडतांच्या किंवा कुडाच्या भिंतीची केलेली खोली. (गो.)

**खॉडॉ** पु. खोडा; बंधन. (गो.)

**खॉपॉ** पु. खोपा; आगवळ. (गो.)

**खॉलासणी, खालासी** स्त्री. सुताराचे वाकसासारखे तासण्याचे एक लहान हत्यार. हे एका हाताने वापरतात. (गो.)

**खॉलॉ** पु. पान; पानाचा तुकडा. (गो.)

**खॉळ** स्त्री. घोंगडीची खोळ. (गो.)

**खाँज** न. दांडू लगावण्याचा एक प्रकार.

**खाँट** स्त्री. लाथ; टाच. (गो.)

**खाँचण** न. फुलांची वेणी बुचड्यावर घट्ट राहावी म्हणून आधी खोवतात ती फुले किंवा पानाची घडी. (गो.)

**खौ** पहा : **खवणे**

**खौंट** पहा : **खवट** : 'दधि मंथून काढिजे लोणी। तें ठेवितां घरी खौंट घाणी।' - भारा बाल १०.९३.

**खौंडा, खौंडाळणे, खौंडाळी, खौद** पहा : **'खव'मध्ये**

**खौर** पु. क्षौर : 'बाप जिवंत असताना प्रभाकराने केलेला खौर त्यांना मोठा विस्मयकारक वाटे.' - उअं ३५.

**खौस** पु. नोकर; खिजमतगार : 'पोटासाठीं खौसा। वंदिती मलिंच्छाच्या।' - तुगा ४१४९.

**खौरदार** पु. दरबारातील मानकरी.

**ख्याख्या** उद्गा. १. खोकला आला असताना होणारा आवाज. (क्रि. करणे, खोकणे.) २. चिडल्यासारखा किंवा खेकसल्यासारखा आवाज करून. (क्रि. बोलणे, करणे). ३. खेकणे; खोकणे. [ध्व.]

**ख्याट** न. खूळ : 'रातचं गाडी जुपायचं तुझंच ख्याट.' - गोता २९.

**ख्यात-ख्याति-ती** स्त्री. पराक्रम; कीर्ती. पहा : **ख्याति-ती** : 'सांगेन मर्दाची ख्यात।' - ऐपो ६५.

वि. १. प्रसिद्ध; नामांकित; नावलौकिकाला चढलेला; प्रख्यात : 'येक भक्त जाले ख्यात।' - दास १.१०.६. २. जगजाहीर; ज्याचा दांडोरा किंवा डंका वाजलेला आहे असा; महशूर.[सं.] (वा.) ० **लावणे** - पराक्रम करणे, करून दाखवणे : 'चैद्यादिक पक्षपाती। त्यांसी रणीं लावीन ख्याती।' - एरुस्व ५.४. [सं.]

**ख्यातनाम** वि. प्रसिद्ध. [सं.]

**ख्यातिवाद** पु. (तत्त्व) ज्ञानाच्या सत्यासत्यतेसंबंधी आणि ग्राह्याग्राह्यतेसंबंधीची मतमतांतरे जसे :- असतख्याती, अख्याती, अन्यथाख्याती वगैरे.

**ख्याति-ती** स्त्री. १. गोष्ट; हकीगत. २. (वेदान्त) प्रतीती; कथनरूप व्यवहार. या ख्याती पाच आहेत त्या अनुक्रमे असत्ख्याती, आत्मख्याती, अन्यथाख्याती, अख्यातिख्याती आणि अनिर्वचनीय ख्याती या होत : 'आख्याति अन्यथाख्याती। शून्यख्याती सत्ख्याती। अनिर्वचनीय जे ख्याती। तो वादू निश्चिती मी उद्धवा।' - एभा १६.२०७. [सं.]

**ख्याति-ती** स्त्री. १. प्रसिद्धी; कीर्ती : डंका; दांडोरा : 'त्रिकुटाचळी ख्याति उदंड जाली।' - राक भा १.४६. [सं.]

**ख्यातिस्व** न. पत

**ख्याल** पु. आठवण. [हिं. खयाल]

**ख्याल** पु. (संगीत) भारतीय शास्त्रीय संगीतातील गायनाचा एक प्रकार; खियाल; चीजेचा एक प्रकार. यात शृंगाररस प्रधान असून ऋतुवर्णन, उत्सवप्रसंग इ. विषय येतात. तिलवाडा, त्रिताल, झूमरा इ. तालांत ही चीज म्हणतात. [फा. खयाल]

**ख्याल** पु. १. अव. चेष्टा; चाळे; चार; विलास; प्रेम; खेळ; गमती; मौजा : 'मांडिलें विंदान ख्याल सुखाचें संधान।' - तुगा १३३. २. नाद; छंद : 'पडूं ना दुसऱ्याच्या ख्यालिं ग।' - प्रला १७४. [फा. खयाल]

**ख्याल** पु. विचार; मत; कल्पना : 'तान्हाल हा ख्याल दिलांत न आणिला.' - ऐलेसं ७.३५७५. [फा. खयाल] (वा.) **ख्याली असणे, लागणे, पडणे** - १. निरंतर विचारात, छंदात असणे; इच्छेने अथवा चिंतेने ग्रासले जाणे. २. आसक्तिपूर्वक पिच्छा पुरवणे; मागे असणे.

**ख्यालतमाशा** पु. गाणे, नाचणे इ. चैन; विलास : 'तऱ्हेतऱ्हेचे ख्यालतमाशे बहुत होती दळभारांत।' - ऐपो १९८.

**ख्यालिया** वि. १. ख्याल गाण्यासंबंधी; ख्यालाच्या उपयोगी. २. ख्याल म्हणणारा; ख्याल म्हणण्यात कसबी.

**ख्याली** वि. ख्याल या गीतासंबंधी; ख्यालप्रधान (गाणे); ख्यालिया. [फा. खयाल]

**ख्याली** वि. चार, चाळे, चोज, विलास यांनी परिपूर्ण; विलासी; रंगेल; विनोदी; खेळकर. [फा. ख्याल]

**ख्यालीखुशाली** स्त्री. क्रीडा; मौज; चैन; चित्त रमविण्यासाठी केलेले गाणेबजावणे, खेळणे, नाचणे इ. [फा. खयाल + खुशहाल]

**ख्यालोरा** वि. खेळकर; नाना प्रकारच्या लीला करणारा; ख्याली : 'आवस् ख्यालोरी। हेचो बापूस जटयाळो। भयणनाय हेका। पोरगो शिवल्याचो।' - (मालवणी) गणपतीची आरती. (कु.)

**ख्यास** पु. १. न्यायनिवाडा इ. पहा : **कयास, कयासनामा**. २. विचार; तर्क (निश्चित निर्णय घेण्यासाठी केलेला). (क्रि. करणे.) [फा. कयास]

**ख्यास्त** स्त्री. बेअब्रूची शिक्षा. (गो.)

**ख्यास्ती** स्त्री. त्रास; खस्त. पहा : **खास्त** (गो.)

**ख्यांती** स्त्री. चिंता; पर्वा; खंत. (व.) पहा : **खंती**

**ख्यांव, ख्यांव ख्यांव** स्त्री. केकावणे; खेकसणे. (क्रि. करणे.) उद्गा. दुखावलेल्या रागावलेल्या कुत्र्याचा आवाज; क्यांव क्यांव;

क्रिवि. (ल.) खेकसून; रागावून; चिडून; कुत्र्याप्रमाणे अंगावर तुटून पडून किंवा येऊन. [ध्व.]

**ख्रिश्चन, ख्रिस्ती** वि. ख्रिस्ती धर्मविषयक.

पु. ख्रिस्ताचे अनुयायी; किरिस्ताव माणूस; ख्रिस्तानुयायी.

**ख्रिस्त** पु. १. येशूचे नाव. २. ख्रिस्ताचे वचन व धर्मसिद्धान्त.

वि. १. अभिषिक्त. २. येशूची एक पदवी. [इं. ख्राइस्ट]

**ख्रिस्ती दीक्षित** ख्रिस्ती धर्माप्रमाणे ज्याचा बाप्तिस्मा झाला आहे असा.

**ख्रिस्मस** पु. ख्रिस्ती लोकांचा नाताळाचा सण. हा प्रतिवर्षी २५ डिसे. ला असतो.

**ख्वाजा** पु. थोर, पवित्र मनुष्य; धनी. [फा.]

**ख्वाबगाह** पु. शयनगृह. पहा : **खाबगा** : 'येक दिवाणखानेयाचा व खलबतखाना ख्याबगाह मिळोन डेरा यैसे दोन डेरे उभे केले.' - पेद २५-५७. [फा.]

**ख्वार** पु. हलाखी : 'लोक यांचा फार ख्वार जाहला।' - जोरा ४५. [फा.]

**ख्वारी** स्त्री. दुर्दशा; नासाडी; दाणादाण.

**ख्वाहीश-शी** स्त्री. इच्छा; मागणी. [फा.]

■ ■



**ग** पु. मराठी वर्णमालेतील अठरावे अक्षर आणि तिसरे व्यंजन.

**ग** पु. गर्व; अहंमन्यता; वृथाभिमान. गर्व शब्दाचा संक्षेप. (वा.) **'०' ची बाधा, पीडा होणे** - गर्वाचा ताठा; गर्व : 'श्रीची प्राप्ति झाली म्हणजे 'ग' ची बाधा व्हावयाचीच.' - गुप्तमंजूष.

**ग** वि. (समासात) १. गमन करणारा, जाणारा. जसे :- उरग-उराने, पोटाने जाणारा, सरपटणारा. २. पोचला आहे, दाखल झाला आहे असा; समाविष्ट; अंतर्वर्ती. जसे :- भूमिग, बुद्धिग, खग, जलग. [सं. गम्]

**ग** स्त्रीला उद्देशून वापरले जाणारे संबोधन. (अगे, गे याचे संक्षिप्त रूप.)

**गइ** वि. १. दुर्बळ. २. अनास्था.

**गइमेढके** न. गईचा खांब.

**गइ(ई)सर-रा** पु. गइमेढक्यावरील आडवा लांब वासा.

**गई** स्त्री. १. (अपराधाबद्दल) गय ; दयाबुद्धीने केलेला कानाडोळा; माफी; क्षमा. २. उपेक्षा; दुर्लक्ष; हयगय : 'नका गई करूं आईकाल ज्या कानीं।'- तुगा २९२. [सं. गत]

**गई** स्त्री. १. खालचा इंद्रकट; गईसरा; घराच्या पायथ्याच्या शेवटी आश्रयार्थ उभारलेल्या मेढीवर घालतात ते आडवे लाकूड; आढ्याला जोडलेले फाटे घराच्या चारी भिंतीवरील ज्या तुळईवर ठेवण्यात येतात ती तुळई. २. तुळईजवळची छपराची जागा. (ना.)

**गई** स्त्री. गाय : 'जनाई दासी गरिब बिचारी गई ।' - नामना ८८. (मावळी)

**गईक** वि. दंश करणारा.

**गईगुदर** स्त्री. दिरंगाई; वेळ मारून नेणे; अळंटळं ; टाळाटाळ : 'वजीर पैका द्यावयाची गईगुदर करितात.' - मइसा ६.६.३२.

**गईगोळा** पु. पावसाळ्यात गईसऱ्यास चिकटवून वाळवलेली गोवरी, शेणगोळा. (को.)

**गईब-प, गयब** वि. १. अदृश्य; हरवलेला; नाहीसा झालेला; गहाळ; मागमूस नसलेले. २. मृत; मेलेला : 'राजा गईब जाहला ...' - सभासद ४२. (क्रि. होणे.) [फा. गाइब]

**गईबत** १. ईर्षा २. पराक्रम.

**गउ** स्त्री. गाय : 'दहा छिद्राचे एक चिटके । कचकोल ते पात्र ओमण निके। अंगावरी घेतले हरिखे । चर्म कवतुके गउचे ।' - नाली. [सं. गो]

**गऊपोत** स्त्री. गव्हाच्या दाण्यासारख्या मण्यांची पोत.

**गगन** न. आकाश; अंतरीक्ष; नभ; आभाळ : 'गगन मुठीं सुवावें । मशकें केविं॥'- ज्ञा १.७४. [सं.] (वा.) **० कापणे, थरारणे** - आकाश दणाणणे; भयंकर कृत्य करणे. **गगनबावडा दाखविणे** - ताणणे; दमवणे (कोल्हापूर भागात गगनबावडा हे गाव आहे यावरून). (कर.) **गगनात भरणे** - आकाशात भरारी मारणे; 'दुसरा गरुड उपजता भरला गगनीं न मंदिरीं राहे ।' - मोआदि ४.३४. **गगनाशी गाठ बांधणे, लावणे** - (उंच उडणे) महत्कृत्य करणे; अचाट पराक्रम करणे. **गगनाशी दिवस भांडणे** - १. उन्हाळ्यात दिवस मोठा होणे. २. दिवस कमी कमी व्हायला प्रारंभ होणे. **गगनाशी भांडणे** - आकाशाशी बरोबरी करणे (उंच वृक्ष किंवा गर्विष्ठ माणूस यासंबंधी योजतात.) **गगनीची वीज कोसळणे** - आकाशाची कुऱ्हाड पडणे; भयंकर संकट येणे : 'गगनींची वीज जाणो कोसळली त्यावर ।' - विक २०. **गगनी दिवा लावणे** - प्रख्यात होणे; पुष्कळ प्रसिद्धीस येणे.

**गगनकाळी** स्त्री. आकाशरूपी कालिकादेवी : 'कीं भूगोळकांचां देऊळीं : रती अनंगे पूजिली गगनकाळी'- रुस्व ४७५.

**गगनगज** पु. ऐरावत; दिग्गज : 'गगनगजाचे शुंडादंड । तैसे सरळ बाहुदंड।'- एरुस्व १.४४.

**गगनगतवाणी** स्त्री. आकाशवाणी : 'ऐशी गगनगतवाणी ब्रह्मेनि आइकिली' - श्रीकृष्णच २.

**गगनगर्ती** वि. आकाशाला पोचेल अशी (राक्षसी). (गो.)

**गगनगर्भ** पु. आकाशाची पोकळी; अंतराळ. [सं.]

**गगनगाठा** पु. तुपात तळून वर साखर पेरलेले रव्याचे गाठे.

**गगनचुंबित, गगनचुंबी** वि. आकाशाला पोचण्याइतके उंच; आकाशाशी स्पर्धा करणारा (इमारत, झाड इ.).

**गगनदीप** पु. सूर्य : 'तो झांकिला गगनदीप तरी झळाळी ।' - र ३२.

**गगनमणि-णी** पु. सूर्य : 'गगनमणिकरींच्या तम केव्हां तरि काय हो शिवे कमला ।'- मोविराट १.१६. [सं.]

**गच** वि. घट्ट. पहा : **गच्च**

पु. दाटीवाटीने एकत्रित असलेला जमाव किंवा वस्तु : 'आम्ही जागा पाहून तोफा सुरू मोगलाच्या गचावर फौजेच्या केल्या.' - पेद १.१.

**गच** पु. ठोका; टोल : 'काळोखी रात्र अंधारी दुसरे प्रहरीं । वाजतो गच अखराचा राजदरबारीं ।'- होला ९५. [ध्व.]

**गचक** पु. गाडीरस्त्यावरील खड्डा. (व.) [ध्व.]

**गचक** स्त्री. १. विपुलता; गर्दी. २.चैनबाजी; चंगळ; ऐषाराम.

क्रिवि. १. विपुलतेने; दाटीने; चेंगराचेंगरीने; रगडून; कचकावून; भरपूर (पाऊस, पीक, पैका, चांगल्या वस्तू) २. प्रशस्तपणे; बेलाशक; निर्धोक (मेजवानी, धुमाळी).

**गचकण-न-र, गचदिशी** क्रिवि. मऊ वस्तूमध्ये दुसरा पदार्थ शिरताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे; गच जसा आवाज होऊन (घशात पाणी येणे, चिखलात पाय जाणे इ.).

**गचकणी** स्त्री १. हिसका; झटका. २. पहा : **गचकी**

**गचकणे** अक्रि. १. हिसका बसणे; आचकणे; हबकणे; आचका बसणे (खळग्यात किंवा पुरता न टेकलेल्या दगडावर अवचित पाय पडून). २. (ल.) मरणे; गचणे; परीक्षेत नापास होणे. [सं. गम्]

**गचकळणे** अक्रि. १. गचका खाणे (व्यापारात निभाव न लागल्याने). २. नदी इ. मध्ये नाकातोंडात पाणी जाऊन घाबरे होऊन खालीवर होणे. ३. (ल.) हालअपेष्टांशी झगडणे; संकटांत खितपत राहणे.

**गचकळी, गचंगळी** स्त्री. १. गटंगळी; डुबकी (बुडत्या माणसाची). २. (ल.) निकराचा झगडा, प्रयत्न; सर्व प्रकारे खटपट; धडपड.

३. आरंभिलेल्या कार्यात भयादिकांमुळे कुंठित होण्याची अवस्था. [ध्व.] (वा.) **गचकळ्या खाणे, गचंगळ्या खाणे** - १. अडखळत, चाचरत बोलणे किंवा वाचणे. २. डुबक्या खाणे (पाण्यात).

**गचका** पु. १. अकस्मात बसणारा हिसका, झटका, धक्का, आचका; गोता (क्रि. बसणे.) २. (ल.) खड्डा, दगड इ. हिसका बसण्याची जागा (ज्यामुळे गचका बसतो अशी). ३. (ल.) दुर्दैवाचा घाला, तडाखा, ठोकर; व्यवहारातील तोटा. ४. (ल.) फास; जाळे; चोरखळी; सापळा; खड्डा. ५. एखाद्या लेखातील दुर्बोध स्थळ, मेख, कोडे. ६. मऊ व आवाज होणाऱ्या पदार्थात मारलेला गुद्दा, ठोसा. [ध्व. गच्.] (वा.) **० खाणे** - नापास होणे; अयशस्वी होणे : 'एस. एस. सी. परीक्षेत गचके खाल्याने..' - लटिके १.०५. - **० देणे** - जोराची उचकी येणे : 'ते दोनतीनदा गचकं देऊन गप झालं बघ.' - विभूत ८४.

**गचकी** स्त्री १. पहा : **गचका** १, २, ४. २. बारीक, लहान ढेकर किंवा उचकी. (क्रि. देणे.)

**गचक्या** वि. खाचखड्ड्याचा; विषम; सपाट नसणारा.

**गचगच** स्त्री : १. चिखलात होणारा वस्तूचा आवाज. २. (ल.) रेंदाड; चिखल. ३. ढिलाई. ४. अडगळ; गळाठा. पहा : **गचपण** : 'न कळतां करीं कार्य जें तें । तें काम तत्काळचि होतें । गचगचेंत पडतां तें। चमत्कारें नव्हे ॥' - दास १९.९.१३. ५. गोंधळ.

**गचगच** क्रिवि. घाईघाईने खाताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन; मचामचा. (क्रि. खाणे, जेवणे.)

**गचगचीत** वि. १. गजगजीत; लबलबीत; बुळबुळीत; चिकण (चिखल). २. (ल.) भरपूर; विपुल; रगड; दाट (पीक, पैसा, आयात जिन्नस, मेजवानी, उधळपट्टी). ३. गजबजीत; तत्पर; चूर; उद्योगी; कामसू; गोंगाटाचे (गाव, घर). [ध्व.]

**गचगिरी** स्त्री. १. चुनेगच्ची. २. चुनेगच्चीची क्रिया; चुनेगच्ची करणे.

**गचणे** अक्रि. चिखलासारख्या पदार्थात रुतणे. पहा : **गचकणे** [ध्व. गच]

**गचपच** स्त्री. रेंदा; चिखल, राड. पहा : **गचकण**

**गचपच** वि. दाटीचा; गर्दीचा; गडगंज भरलेला : 'भरल्या बाजारांत । मोठं दुकान कोणाचं । गचपच पसाऱ्याचं । किल्ली कुलुप सोन्याचं ।' - वलो ४१. (व.) [ध्व.]

**गचपड** पहा : **गचपण** ३

**गचपण** न. १. कचरा; पडझड; गळाठा; अडगळ. २. पसाऱ्याची किंवा अडगळीची स्थिती. ३. गवत, लव्हाळा इ. रानटी झाडे उगवलेली जागा; ऐतण; ऐचण.

**गचबुच** वि. गप्प; शांत : 'अभिमानी जिजा तोंडाने काही बोलत नव्हती. गचबुच होती.' - आआशे १३५.

**गचमुड्डी** स्त्री. चिकार गर्दी. (गो.)

**गचवटा** पु. गालाला घेतलेला चिमटा; गालगुच्चा : 'त्याचा (मुलाचा) गचवटा घेऊन तिनं विचारलं...' - ऊन ४६.

**गचं(चां)दा, गचोंदा, गचं(चां)दी,** स्त्री. १. हिसका; धक्का; आचका (सजीव प्राण्याला बसलेला). (क्रि. देणे, मारणे.) २. पहा : **गचांडी**

**गचा** पु. दाटी; गर्दी; समुदाय.

**गचागच-चा** क्रिवि. १. ढसाढसा; मटामटा; गटागटा. (क्रि. पिणे, खाणे, गिळणे.) उतावीळपणाने गिळताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे. २. झोपेची झापड येण्याच्या स्थितीप्रमाणे. एकसारखी क्रिया असताना योजतात. ३. पहा : **गचकण-न** [ध्व. गच्]

**गचाटी, गचां(चों)डी, गचोरा** स्त्री. पु. हाताचा पंजा मानेवर ठेवून दिलेला धक्का; अर्धचंद्र. (क्रि. देणे, मारणे.) २. (धरण्याच्या वेळी) मान; गळा. (क्रि. धरणे). 'शिवराम्या, गचांडी सोडून माझे छातीवरून ऊठ.' - बाळ २.१४४.

**गचाड** न. १. झाडे, गवत इत्यादींचे दाट रान. (को.) २. निबिडपणा, घनता; अभेद्यता (अरण्य, झाडीझुडूप यांची).
वि. पुष्कळ; भरपूर. (व.)

**गचापिची** स्त्री. एकमेकांची गच्ची (मानगुटी) पिचकण्यापर्यंत झालेले भांडण. (व)

**गचाबीच** क्रिवि. दाटीने; गर्दीने; खेटून. [ध्व.]

**गचाबोचा** पु. मान व ढुंगण; फरा व ढुंगण (जनावराचे). (वा.) **० एक असणे** - फार लठ्ठ असणे; गबदुल होणे (अतिशय लठ्ठ बैल, थलथलीत किंवा पुष्ट माणूस यासंबंधी वापरतात.)

**गचाबोची** स्त्री. खेचाखेच, चेंगराचेंगरी; फार दाटी. (ध्व.)

**गचावणी** स्त्री. गटंगळी; गचकळी.

**गचावणे** अक्रि. १. गचकळणे; गटंगळ्या खाणे; खालीवर बुचकळ्या खाणे (बुडणाऱ्या माणसाने). २. उद्योगधंद्यात नुकसान येणे. ३. अडखळणे; बोबडी वळणे; धैर्य सुटणे. ४. खुंटणे; तूट पडणे. ५. मरणे. (कु.)

**गचाळ-ळी-ळ्या, गचाळखोर** वि. १. गलिच्छ; घाणेरडा २. बकबक करणारा; चेष्टेखोर; वाचाळ. ३. गबाळ; भोंगळ; गैदी; अव्यवस्थित (माणूस, वर्तणूक, कृत्य.). ४. नेभळट. [क. गयाळ = अव्यवस्थित]

**गचाळकी, गचाळी** स्त्री. १. गप्पाटप्पा; निरर्थक सांगणे किंवा बोलणे. २. गबाळपणा; वाईट, घाणेरडे चाळे.

**गची** स्त्री. १. गळा; मान : 'तो गचिये धरुनि माघारा । आंतु घाली ॥' - राज्ञा ६.२३६. २. गचांडी; अर्धचंद्र : 'म्हणे आता यासिं गचि देऊन दवडा ।' - पंच ४.४.

**गचुंडे** न. गचांडी; मान.

**गचेंडा** वि. मोठा; धट्टाकट्टा; दांडगा; गबदुल; लठ्ठनिरंजन. (को.)

**गचोटा** पु. (गालाला घेतलेला) चिमटा. (क्रि. घेणे) (माण.)

**गचोटा** पु. 'हिडमिसी'. - (तंजा.)

**गचोरा** पु. धान्याची कणसे निसवणे; कणसे येणे.

**गचोरा** पु. मुठीने मारलेला गुद्दा, ठोसा, धक्का.

**गच्च** क्रिवि. ताणून; घट्ट; आवळून; मजबुतीने; बळकट; खेटून; दाटीने; खच्चून; ठेचून (बांधणे, आवळणे, कोंडणे इ.)
वि. १. आवळ; घट्ट (गाठ, पदार्थ इ.) २. निबिड; घन (दाटी, झाडी). [ध्व. गच] [फा. गच = ठासून भरलेला चुना]

**गच्च** पु. १. चुना : 'स्वल्पमात्र दरज असेल तरी गच्च लावून पाझर न फुटे असें करावें.' - मराआ ३२. २. चुनेगच्ची : 'तळघरांत गच्च करावा.' - मराआ ३२. [फा. गच]

**गच्च** वि. गुपचूप; गप्प; स्वस्थ : 'उरलेल्या वेळात तंबाखूची गुळणी तोंडात धरून कुठेतरी गच्च बसलेला असे.' - भुज ३०.

**गच्चगार** क्रिवि. हालचाल किंवा आवाज न करता : 'झाडं गच्चगार उभी होती.' - पेरणी १११.

**गच्चबुच्च** क्रिवि. न बोलता; गप्प : 'सर्वजण गच्चबुच्च बसले.' - आआशे २०६.

**गच्चा** पु. १. चांगले भरदार कणीस (धान्याचे) (नाशिक). २. भरगच्च कणीस असण्याची स्थिती. ३. (निंदार्थी) लठ्ठ, फुगीर गाल; गालांचा फुगीरपणा. (वा.) ० **धरणे** - भरीव, पुष्ट होणे.

**गच्चा** पु. मध्य; मधला भाग. (व.)

**गच्चाबुच्चा** पु. कांकू करणे; अळंटळं. (क्रि. खाणे, येणे, लावणे.) क्रिवि. अडखळत; अळंटळं करीत. (क्रि. बोलणे, करणे.) [ध्व.]

**गच्ची** स्त्री. १. चुन्याची केलेली भुई; आगाशी; चुना बसवून केलेली जमीन. पहा : **गच्च.** २. छत. [फा. गचू = चुना, फा. गची = चुन्याचे बांधकाम]

**गच्ची** स्त्री. गर्दी; चेंगराचेंगरी; दामटी वळण्याची स्थिती.

**गच्ची** स्त्री. (नाविक) डोलकाठीला आडवी टांगलेली काठी सुरक्षित ठेवण्यासाठी वापरलेले बंद आणि दाताळी.

**गच्ची** स्त्री. मानेला दिलेली ढोसणी; गचांडी; मानेचा काटा; नरडी; मानगुटी.

**गच्ची** स्त्री. गाल; गालफड. (चिमटा घेणे, चपराक देणे इ. वेळी वापरतात.)

**गच्चू** पु. टाळा; हकालपट्टी. (क्रि. देणे.) पहा : **डच्चू** (कर) [ध्व.]

**गच्छ** पु. गणित किंवा भूमितिश्रेणीतील पदसंख्या. [सं.]

**गच्छ** पु. **१.** समुदाय; संघात. **२.** जैनांतील पंथ, शाखा. उदा. तपागच्छ.

**गच्छ, गच्छंती** न. स्त्री. गमन; दूर पळणे; पळ; तोंड काळे करणे; काढता पाय घेणे. (क्रि. करणे, म्हणणे.) : 'केलें गच्छ भाद्रपद वद्यातिल षष्ठीस।'- ऐपो ३९७. [सं. गम् ] (वा.) ० **काढणे** - पळ काढणे : 'फारसेच काही अंगावर प्रकरण येईल असे धोरण दिसले तर आपला गांठोड्याला रामराम ठोकून गच्छ काढिलें म्हणजे झालें.' - मोचन २८.

**गच्छणे** अक्रि. जाणे. (भूतकाळी प्रयोग) : 'ऐशीं तो कठणोत्तरें वदुनियां मातेसवें गच्छला ।'- बस्वलिंग, गजगौरीव्रत १६. [क.]

**गच्छंती** स्त्री. १. समाप्ती; नाश; मृत्यू : 'इंग्लंडात तर दोघांची गच्छंती झाल्याचे वर्तमानसुद्धा पत्रांतून जाहीर झालें होतें.'- नि ७३२. (क्रि. करणे, होणे.) २. पराभव; सामर्थ्यभंग.

**गच्यागोदड** पु. १. गुंतागुंत. २. विचका. (झाडी.)

**गज** पु. १. लोखंडी सळई किंवा तिचा लांब तुकडा (जाळी, खिडकी, कठडा यांतील.) २. (पाणरहाट) पोहऱ्याच्या काठाशी बसवलेला लोखंडी तुकडा. ३. बंदुकीत दारू ठासण्याची लोखंडी सळई. ४. (विणकाम) वशारन्यांच्या गाठी देताना तंग ठेवणारी लोखंडी सळई. ५. सारंगी इ. तंतुवाद्ये वाजविण्यासाठी वाकवलेल्या लाकडी काठीला दोन्ही टोकांना घोड्याचे केस बांधून तयार केलेली धनुकली. ६. लांबीचे एक परिमाण; २४ तसू किंवा २ फूट लांबीचे कापड, शेतजमीन मोजण्याचे लोखंडी किंवा लाकडी पट्टीचे एक माप; वार (सरासरी ३ फूट); कापड मापण्याचे साधन (इंग्रजी यार्डाबरोबर याचे प्रमाण धरतात.) ७. वरील मापाच्या लांबीची पट्टी : 'त्यास तट, गजाप्रमाणे नेमून द्यावे.' - चित्रगुप्त ३५. ८. वरील मापाने मापलेले परिमाण (कापड इत्यादीचे); गजाने परिमित वस्त्रादी पदार्थ. ९. सामर्थ्य; प्रमाण; शक्ती. १०. विहीर इत्यादिकांच्या बंदिस्तीस गजांचे प्रमाण भरले असता जे चिन्ह दाखवतात त्या चिन्हापर्यंतचे बंदिस्तीचे अंग, काम. [फा. गझ]

**गज** पु. तळे, विहीर यांची पाळ, बरवंडी, काठ.

**गज** पु. हत्ती. [सं.](वा.) **गजस्कंधी बसणे** -मिळालेल्या वैभवात जुनी पहिली ओळख विसरणे; गर्वाने फुगणे. आढ्यतेखोर होणे.

**गज** पु. अडकण; कांब; नाग; वारण.

**गजकर्ण** न. अतिशय खाजणारा व पसरत जाणारा एक त्वचारोग. [सं.]

**गजकर्णी** स्त्री. अपानवायूला ऊर्ध्व करून कंठाशी आणून पोटातील दूषित पदार्थ ओकून टाकण्याची क्रिया.

**गजकर्णी** स्त्री. गजकर्ण हा रोग बरा करणारी वनस्पती.

**गजका** पु. हुंदका. [ध्व.]

**गजकाठ्या** स्त्री. अव. न्हाणवलीच्या मखरांचे खांब.

**गजकिंकरी** स्त्री. गोखरू; सराटा. (व.) [सं.]

**गजकुटी** वि. गजपुटाने सिद्ध केलेले (औषध).

**गजकुंडी** स्त्री. बारुत फोडण्याचे साधन.

**गजकुंत-कोंत** पु. हत्तीला टोचण्याचा भाला. [सं.]

**गजकुंभ** न. हत्तीचे गंडस्थळ : 'स्वर्गातें गजकुंभ भेदुनि कीं सत्कीर्ति ही धाडिली ।' - वैराग्यशतक श्लोक ४३. [सं.]

**गजकोंत** पु. हत्तीची झूल : 'सांबळी झेलितां । गजकोंती गुसळितां ।' - शिव १०४५. [सं.]

**गजक्रीडित-करण** न. (नृत्य) डावा हात अंचित करून कमरेवर ठेवणे, उजवा हात लताहस्त करणे व उजवा पाय दोलित करणे.

**गजगज** स्त्री. १. गलबला; गजबज; गोंगाट (गर्दीतील माणसांचा); गडबड : 'सुखसमयाची गजगज ।'- वेसीस्व ३.२४. २. चिवचिव; किलबिल (चिमण्यांची). [सं.गज्= ओरडणे]

**गजगज** वि. भरपूर; पोटभर : 'समर्थ जेविले गजगजा ।' - सप्र १५.३५.

**गजगज** पु. उष्मा; उकाडा. (गो.)

**गजगजणे** अक्रि. १. गजबजणे; उद्योग व्यवसायामुळे भरलेले असणे (घर, गाव). २. भरून येणे : 'रायां गहिंवर गजगजे ।' - वेसीस्व २.८ [ध्व.]

**गजगजाट** पु. गजबजाट; धोशा; गडबड; गाजावाजा (कृत्यांचा); गर्दी; कलकलाट (माणसांचा); किलबिलाट; चिवचिव; गुंजारव; गुणगुण; गोंगाट (माशा, पक्षी यांचा). [ध्व.]

**गजगजीत** वि. १. गलबललेले; गजबजलेले; गोंगाटाने, आवाजाने भरलेले (घर, गाव इ.) २. गडबड्या (माणूस). [ध्व.]

**गजगति-ती** स्त्री. गंभीर व रुबाबदार चाल; डौलदार गती; डौलदार चालणे; ठुमकत जाणे; ऐश्वर्यवान ठुमका, तोरा; संथ गती : 'गजगती जगती

प्रति दाविते ।'- वासीस्व ५९

वि. रुबाबदार चालीचा; गजगतीचे वैशिष्ट्य असलेला. [सं.]

**गजगमा, गजगामिनी** स्त्री. गजगतीने, ऐटीने चालणारी स्त्री; [सं.]

**गजगा** पु. सागरगोटा; गजरगोटीचे, एका काटेरी वेलाचे फळ. [क. गजुगे]

**गजगाजला** पु. बोलबाला : 'हल्ली लिहिण्यावाचण्याचा गजगाजला आहे.'- लो. टिळकांचे पन्नास वर्षांचे चरित्र. १.७.

**गजगोटा** पु. समारंभात बार काढण्यासाठी दारू भरलेला व मोठा बार होणारा एक गोटा. (ना.) [ध्व.]

**गजगोटी** स्त्री. सागरगोटा.

**गजगौरीव्रत** न. १. भाद्रपदातील स्त्रियांचे एक व्रत; हस्त नक्षत्रात सूर्यप्रवेश होण्याच्या वेळचे व्रत. यात शंकर, पार्वती व गणपती यांच्या सोन्याच्या मूर्ती करून त्या सोन्याच्या हत्तीवर बसवून ब्राह्मणाला दान देतात. २. हत्तीवर बसविलेल्या पार्वतीचे पूजन. [सं.]

**गजघटा-घंटा** स्त्री. हत्तींचा कळप, समुदाय : 'जैसे न गणिजे पंचाननें। गजघंटेतें ॥' - ज्ञा १.९२. [सं. घटा-कळप]

**गजघंटा, गजघाट** स्त्री. १. हत्तीच्या गळ्यातील घाट. २. (ल.) वाचाळ, कर्कश, कजाग स्त्री; (विशेषत:) मोठ्याने भाषण करणारी स्त्री. ३. गुप्त गोष्ट फोडणारा मनुष्य; ज्याच्या पोटात काही राहत नाही असा.

**गजचर्म** न. १. हत्तीचे कातडे. २. घोड्याचा एक रोग. यात अंग वारंवार झाडणे, अंगावर चट्टे पडणे व हत्तीच्या अंगाप्रमाणे अंग खरखरीत होणे ही लक्षणे होतात. - अश्वप २.२५२. [सं.]

**गजचर्या** स्त्री. हत्तीवर बसण्याची विद्या; हत्ती चालवण्याचे कौशल्य : 'कुस्तीशिवायचे खेळ व कसरतीचे प्रकार म्हणजे रथचर्या, गजचर्या, अश्वचर्या, तलवारीचे युद्ध व गदायुद्ध होत.'- व्याज्ञा १.३६ [सं.]

**गजछाया, गजछायापर्व** स्त्री. न. भाद्रपदी अमावास्येला सूर्य व चंद्र हस्तनक्षत्री येणे; या योगाची पर्वणी. हस्तनक्षत्री सूर्य असताना मघानक्षत्रयुक्त त्रयोदशी येणे. [सं.]

**गजझंपा** पु. (संगीत) मृदंग, पखवाज यावर वाजविला जाणारा एक ताल. याच्या मात्रा पंधरा व विभाग चार असतात. [सं.]

**गजढाल-ला-ळा** स्त्री. हत्तीवरील मोठा ध्वज; निशाण : 'गजढाला आंदोळती ।'- जै ६७.४८.

पु. निशाणाचा हत्ती : 'लाविला गजढाळा ।'- ऐपो १४.

**गजढाल** पहा : **ढालगज** : 'त्यावरुन आईसाहेब बोलली की, मी बायको गजढाल असे लोक म्हणतात.' - भारतवर्ष आमात्य बावडेकर कैफियत १८.

**गजणे** अक्रि. **१**. शरीरात जिरले जाण्याइतपत मर्दन करणे; चोळणे (तूप, उटी इ.). **२**. चोळणे; रगडणे, घासणे.

**गजणे** अक्रि. (प्रा.) मागे टाकणे, वरचढ होणे.

**गजतजरीज** गजाच्या मापाने : 'जमिनीची गजतजरीज लांबी पूर्व-पश्चिम गज इमारतीशिवाय पाये दिवाल गज ४२'- पेठे दप्तर २.१.

**गजताल** पु. (संगीत.) पखवाजावर वाजविला जाणारा एक ताल. मात्रा सोळा, चार समभागांत. [सं.]

**गजदंत** पु. १. (हत्तीचा दात) हस्तिदंत. २. घोड्याचा हत्तीसारखा बाहेर आलेला दात, सुळा. असा घोडा अशुभकारक मानतात. ३.(संयुक्त हस्त नृत्य) खांद्याच्या सरळ रेषेत दोन्ही हातांची कोपरे उंच करणे व डोक्याच्या प्रत्येक बाजूला हाताची बोटे एकमेकांना चिकटवून, उंच करून त्यांना थोडा खळगा पाडणे. [सं.]

**गज(झ)नी** स्त्री. अर्धसुती व अर्धरेशमी, एका बाजूने रंगीत व वर पट्टे किंवा रेषा असलेले कापड; गजनी येथे तयार होणारे उंची कापड.

वि. वरील कापडाची (चोळी, परकर इ.). 'काढिली गझनी चोळी'- आआशे २२४. [फा. गिझनी]

**गजनी** स्त्री. गजर; आळवणी, जयघोष : 'त्या सुळीचं झालं पानी। हरिनामाची गजनी ।' - लोसामा ५.१८.

**गजनेत्र, गजनेत्री** वि. १. हत्तीच्या डोळ्यांप्रमाणे डोळे असणारा; बारीक, मिचमिच्या डोळ्यांचा. २. अर्ध-दृष्टीचा, उलट्या बाहुल्या असलेला.

**गजपण** पहा : **गचपण**

**गजपति-ती** पु. १. हत्तींचा धनी, हत्ती बाळगणारा ऐश्वर्यवान माणूस. २. गजदळाचा सेनापती. ३. (विनोदार्थी) धोतराऐवजी गजा (पंचा) नेसलेला. ४. ऐरावत : 'का मांदुरी लोकांचा घोडा । गजपतिही मानी थोडा ।' - ज्ञा १६.२२५ ५. ओरिसा येथील राजांचे बिरुद. (सं.)

**गजपिंपळी** स्त्री. १. एक औषधी झाड, मिरवेल. २. मिरवेलीवर आलेल्या शेंगा (औषधी).

**गजपूट-ठ-ठी** न. औषध तयार करण्याची क्रिया. एक गज औरसचौरस व खोल खळगा खणून त्यात गोवऱ्या, बकरीच्या लेंड्या, इ. जळण खालीवर घालून त्यामध्ये रसायन किंवा औषधी द्रव्य ठेवून त्याला केलेला अग्निसंस्कार. (क्रि. देणे, करणे.)

**गजब** पु. १. गहजब, कडक जाचणूक; कहर; जुलूम. (क्रि. करणे, मांडणे, चालवणे) : 'पर्वर्दिगार मोठा गजब जहाला.' - चित्रगुप्त ४५. २. जोरांचे, दबावाचे भाषण; गालिप्रदान; शिव्या देणे; मारणे; चवताळून अंगावर जाणे. (क्रि. करणे.) ३. दु:सह तडाखा, दैवाचा जबर घाला; अवसान खचण्याजोगे संकट; दुःखप्रद दैवी घटना. (क्रि. होणे, गुदरणे.) ४. हद्द, परिसीमा, कमाल. (फा.)

**गजबज** स्त्री. १. गडबड; गलबला; गोंगाट (अनेक माणसांच्या बोलण्याचा) : 'गजबज ऐकोनि थोर । उपरीवरी चढला उषावर ।' कथा १.७.२४. २. खळबळ, मनातील अस्वस्थता : 'तेथ मनीं गजबज जाहाली ।' - ज्ञा १.१८५. ३. गडबड, गोंधळ (दु:खदायक कृत्याचा) : 'गजबंज बहु झाली माय धांवोनि आली ।'- मइसा ३३. [ध्व.]

**गजबजणे** अक्रि. १. गलबल, गडबड, धामधूम, गजगज असणे, भरलेले असणे, उद्योगात असणे (घर, गाव.) २. विस्मय पावणे; घाबरणे; गोंधळणे; खडबडणे; धैर्य सुटून घाबरे होणे. 'ऐसी उदास वाक्यें ऐकोनी। मनीं गजबजली त्रिभुवन जननी ।'- ह २७.१०१. ३. दाटणे, कोंदलेले, भरलेले असणे; कोंदणे : 'नाना रंगीं गजबजे । जैसें इंद्रधनुष्य देखिजे ।'- ज्ञा १५.२४०. ४. (अकर्तृक) खळबळ उडणे, हाहाकार होणे : 'तंव गजबजिलें अंबरीं । देवतांगणु ।'- दाव १११. [ध्व.]

**गजबजाट** पु. मोठा गोंगाट. [क. गिजगुट्ट]

**गजबजीत** वि. १. गजबजलेले; गजगजीत; गलबलीत; उद्योगाने, गजबजीने भरलेले (घर, गाव.) २. गडबड्या (मनुष्य).

**गजबा** गहजब; अवकृपा; राग.

**गजबाक** पु. अंकुश.

**गजबार** पु. गलबला : 'पालक पाळईना चिमण्याबाईंचा गजबार ।' - वा १६४.

**गजबार** पु. हार : 'झेंडु फुलांच्या माळा गळ्यामधि फुलांचा गजबार ।'- एहोरा १.८५.

वि. टवटवीत : 'मळा माणसात आणला. हिरवा गजबार करून टाकला.'- रैत ६५.

**गजबारणे** अक्रि. टवटवीत होणे : 'परिस्थितीच्या चटक्यांनी चरकून गेलेलं तिच्या तारुण्याचं फूल गजबारून उठलं.' - चिताक १०६.

**गजबाव** स्त्री. चुन्यात बांधलेली विहीर; पायऱ्या असलेली विहीर.

**गजबीड** पु. (कुस्ती) कुस्तीतील एक डाव. प्रतिपक्षाच्या पाठीवर असताना दुसरा पट पायाने स्थानभ्रष्ट करणे.

**गजबू** पु. गोंधळ; गजबज, गोंगाट : 'तंव यादवां गजबु जाला ।' - उषा १३७१.

**गजभार** पु. १. गजदळाचा समावेश असलेले सैन्य. २. हत्तींचा कळप, झुंड.

**गजभोंगळी** स्त्री. छपराच्या मोहोटीच्या पानाच्या वर चार बोटे उंचीच्या खिट्या मारून त्यावर बसवलेला लोखंडी लांब तुकडा (कौले घसरू नयेत म्हणून). दोन खिट्यांमधील अंतर साधारण पाच पन्हाळींचे असते.

**गजमुष्ठी** स्त्री. गर्दी, दाटी, (गो.) पहा : **गचमुष्ठी**

**गजर** पु. १. अनेक वाद्यांचा एकत्रित नाद, घोष : 'गजराची भिक्षावळ मिरविली ।'- ऐपो २१०. २. प्रहराप्रहराच्या शेवटी तास वाजविणे; तासांचे टोल; घड्याळाच्या घंटेचा आवाज. (क्रि. लावणे.) ३. कथेत होणारा जयघोष; कीर्तनात ईश्वरनामाचा जयजयकार; नामस्मरणाची टाळी. ४. (ल.) मोठा आवाज; उंच स्वराची आरोळी, ५. डांगोरा; दवंडी. ६. लौकिक, धिंडवडा. (क्रि. करणे.) ७.जुलमाचा कहर. [सं. गज् = नाद करणे.]

**गजर** पु. चांदीच्या सळईवर बारीक सूत गुंडाळून केलेला एक दागिना : 'रामलक्ष्मण दोन्ही काठाचे पदर । सावळी सीताबाई मर्धी ठुशीचा गजर ।' - लोसामा ५.६.

**गजरगोटा, गजरपटा** पु. सागर - गजरगोटीचे बी. हा खडा मुली खेळायला घेतात. (हेट).

**गजरगोटी, गजरी** स्त्री. १. सागरगोट्यांचे झाड. २. सागरगोटा.

**गजरा** पु. १. सागरगोटा. २. लाखगोटी (लहान मुलांच्या खेळांतील).

**गजरा** पु. १. फुले दोऱ्यात गुंफून करतात ती माळ. हा केसात, हातात घालतात. २. मोती इ. चे काकण, बांगडी. ३. (सोनारी) दाभणाच्या जाडीच्या एका घोट्याच्या मापाच्या व दोन्ही टोकांना फासे केलेल्या अशा चांदीच्या सळईवर एक बारीक सूत गुंडाळून तयार केलेला दागिना. [हिं.]

**गजरा** पु. आवली.

**गजरा** पु. (संगीत) मृदंग, तबला यांच्या दोन्ही वाद्यांच्या पुडाच्या काठावर वादीची गुंफलेली वेणी.

**गजरा-रो** पु. ज्यांचे मांस खाण्यायोग्य आहे असा एक पक्षी. (कु.)

**गजरेदार** वि. गजऱ्याच्या आकाराचा (अंगरखा) इ. : 'गजरेदार आंगरखे जाऊन पोकळ आंगरख्यांची भर पडली.' - नि २८.

**गज(झ)ल** पु. स्त्री. एक फारसी वृत्त प्रकार व गायन प्रकार. प्रियकर आणि प्रेयसी यांच्यामधील प्रेम हा या काव्यप्रकाराचा प्रमुख विषय असतो. ईश्वराला प्रियकर समजूनही अशी गीते रचली जातात. एका गझलात सामान्यत: ५ ते ७ शेर (श्लोक) असतात. प्रत्येक शेराची दुसरी पंक्ती सयमक असते. प्रत्येक शेरात वेगवेगळा विषय असतो. पहिल्या शेराला 'मतला' व शेवटच्या शेराला 'मक्ता' असे नाव आहे. [फा.]

**गजलगोष्टी** स्त्री. अव. गप्पागोष्टी, बोलणे, संभाषण, पहा : **गजाल**

**गजवज्र** न. खड्ग, तलवारीचा एक प्रकार. [सं.]

**गजवा-वे** पु. न. पैशाची थैली, पिशवी; पैशाचा कसा; खिसा. [फा. गझावा = हत्तीच्या किंवा उंटाच्या पाठीवरील पिशवी ]

**गजवार** वि. गजाने मोजून दिलेले : 'वाटिलें ठाण कुणाला गजवार ।'- ऐपो २००.

**गजविभाड** पु. हत्तीचे निर्दालन करणारा : 'जेवि सिंह होऊनि गजविभाडु : परि लोकांतु नसे'- ज्ञाप्र ७८२.

**गजवेल** स्त्री. आंबेमोहोर तांदळाची एक जात.

**गजशावा** न. हत्तीचे पिल्लू.

**गजश्रद्धा** स्त्री. प्रारंभी मोठा डौल किंवा गाजावाजा दाखवणारे व परिणामी अगदीच क्षुद्र ठरणारे काम किंवा त्याचा प्रकार. भपकेदार व विस्तृत पण निरर्थक काम, डोंगर पोखरून उंदीर काढणे.

**गजस्कंध** स्त्री. हत्तीची अंबारी. [सं.]

**गजस्नान** न. (हत्तीला स्नान घातल्यावर किंवा त्याने स्वत: सोंडेने स्नान केल्यावर तो आपल्या अंगावर पुन्हा धूळ, चिखल उडवतो त्यावरुन) निष्फळ प्रयत्न; विपरीत फळ मिळालेला प्रयत्न; बरे होण्याकरिता योजले असता उलट रोग वाढवणारे उपाय. [सं.]

**गजक्षेओ** न. हत्तीचे पिल्लू.

**गजंब** पु. गर्दी; दाटी.

**गजा-जे** पु. न. नेसायचा फार लहान पंचा.

**गजागजधूर** पु. सर्वश्रेष्ठ : 'किं वर्णो महिमा गजागजधुरा'- वेळापूर शिला ४.१.१४.

**गजानन** पु. कापूस तोलून घेताना वजनाच्या बाजूला लावतात तो साधारण एक किलो वजनाचा दगड.

**गजानंद** वि. (विनोदाने) गजाने (पंचाने) आनंद पावणारा, अल्पसंतुष्ट.

**गजानृत्य** पहा : **गजी** : 'गजानृत्य हे धनगरांचे खास नृत्य होय.'- मस ३६२.

**गजाल** स्त्री. १. गोष्ट; निरर्थक गप्पा; गजलगोष्टी. (क्रि. सांगणे, करणे.)

(कु.) २. आरडाओरड; कोलाहल, गडबड. (राजा. गो.) [ध्व.]

**गजांकुश** पु. सराट्यांची एक जात.

**गजांत लक्ष्मी** १. दाराशी हत्ती झुलण्याइतकी म्हणजे हत्ती पोसण्याइतकी श्रीमंती, अतोनात श्रीमंती, वैभव. २. (विनोदाने) अतिशय दारिद्रय; धोतर विकत घेण्यासाठी पैसे नसल्याने गजा (पंचा) विकत घेण्याची पाळी येणे. ३. (विनोदाने) अंगावरील गजकर्ण, नायटे.

**गजिवेल** स्त्री. करवतीसारखे दाते असलेली तलवार. ही तलवार शत्रूच्या चिलखताला अडकवून त्याला ताब्यात घेता येत असे.

**गजी** स्त्री. धनगरांचा नाच : 'धनगरांची कसबी पोरे गोळा होऊन गजी नाचू लागली.' - धनगर ६२.

**गजी** स्त्री. हत्तीण : 'गजी गजशावै नेणों किती । काढी रुतीबाहेरी ।' - एभा १७.४४७. [सं. गज]

**गजी** स्त्री. तासून चौरस केलेली लाकडाची कडी; लांब व बारीक सुळक्याचे लाकूड.

**गजी** स्त्री. लांब, अरुंद व भरड पोताचे कापड, जाळे; गजवे. [फा. गझी = एक जाडेभरडे कापड]

**गजीव** वि. चुनेगच्ची, बांधीव (विहीर, इ.). [फा. गच् = चुना]

**गजेकौतुक** पु. १. महदाश्चर्य. २. बढाई (कु.).

**गजेरी** स्त्री. १. नदी, समुद्र, खाडी इ. च्या भरतीने, पुराने वाहून, आलेला गाळ, मळी. २. त्या गाळाने बनलेली जमीन, पुळण.

**गजेंदर** वि. १. प्रचंड, अवाढव्य, मोठी, विस्तृत, अफाट (इमारत, धंदा, कारखाना, खाते, गोष्ट, थाटमाट, खर्च). २. विशाल; मोठा (देश, उद्ध्वस्त प्रांत, अरण्ये, पीक, सैन्य, संपत्ती इ.). [सं. गज+इंद्र]

**गज्जल** पहा : **गजल** : 'आपल्या त्या गज्जलसारख्या मधुर शब्दांनी मला जायला सांग.' - रूरा ९७.

**गझी** पहा : **गजी**

**गट** पु. १. विशिष्ट उद्दिष्टाने वा विचाराने एकत्र आलेल्या व्यक्तींचा समूह; मंडळी; टोळी; जमाव; समुदाय; एका कटातील किंवा जमावातील मंडळी; मेळा : 'कौन्सिलांत कांहीं गट असतात.' - के १४.६.३०. २. भरगच्च टोळी, जमाव (सैन्य, जनावरे यांचा); कंपू, जथा. ३. वीट, दगड (सोने, रूपे इ. ची) : 'तो त्याजवळ सुमारें दोन हजार रुपयांचे चांदीचे गट अनामत ठेवून परत आपल्या गांवीं गेला.' - मराठी तिसरें पुस्तक २ (१८७३). ४. (किराणा दुकान) वजनांचा संच. ५. रास; ढीग; काही विशिष्ट संख्यांचा समुदाय. ६. विभाग. (क्रि. पाडणे). ७. अंश; तट; गण; तुकडी; दल. [क. गट्टि]

**गट-गट** एखादा पदार्थ त्वरेने गिळतांना होणारा आवाज.

**गटकन-र-दिनी-दिशी** क्रिवि. भरभर; एकदम (खाणे, पिणे याचा वाचक); गटगटा; ढसढसा; मटमटा; गट्ट आवाज होईल असे.

**गटकळी, गटकळणे** पहा : **गचकळी, गचकळणे**

**गटकावणे** पहा : **गट्ट करणे**

**गटकी** स्त्री. गंडा; चट्टा : 'चार उपद्व्यापी माणसें लोकांना गटकी घालून आपल्या मनाची हौस पुरवून घेतात.' - गोत्या १४६.

**गटगट-टा** क्रिवि. १. पहा : **गटकन** (क्रि. पिणे.) : 'फळें खातीं गटगटां ।' - भारा किष्किंधा १५.१११. २. उकळणे, कढणे या वेळी होणाऱ्या आवाजाप्रमाणे. (क्रि. शिजणे, वाजणे.)

**गटगटणे, गटगटावणे** अक्रि. १. गटकन गिळणे, ढसढस पिणे, मटमट खाणे. २. गदगद उकळणे, कढणे (तांदूळ, डाळ, भाजी इ.).

**गटगटणे** अक्रि. गरगरीत, वाटोळी बसणे, तंग बसणे, 'जरिकांठ कंचुकी ताठ गांठ गटगटली ।'- प्रला २३८. [सं. ग्रंथि]

**गटगटीत** वि. टपोरे, मोठे व सुंदर, वाटोळे व भरदार (डोळे).

**गटगटीत** वि. ढिले; खिळखिळीत; सैल; डगमगीत; गट्गट् करणारे; हलणारे (यंत्र).

**गटगटे** न. बोंबील; काड्या (मासा). (अलिबाग)

**गटगट्या** पु. ओला बोंबील.

**गटगिळ्या, गटगीळ** वि. दुसऱ्यांचा पैसा खाणारा; हरामखोर.

**गटगोळा, गटंगोळा** पु. बकाणा; गटाणा; तोंडभर मोठा घास खाणे; कोंबणे (क्रि. करणे, करून टाकणे.)

**गटगोळा** वि. भेदरलेला, थिजल्यासारखा, घाबराघुबरा, : 'भावाच्या बोलण्यानं भिऊन गटगोळा झाला होता.' - सीए ६७.

**गटचर्चा** स्त्री. एखाद्या वर्गाचे किंवा समूहाचे अनेक छोट्या समुहात विभाजन होऊन त्या विभाजित गटात स्वतंत्ररीत्या पूर्वनिर्देशित सूचनांप्रमाणे विशिष्ट बाबींवर करण्यात येणारी चर्चा.

**गटण** न. स्त्री. (संगीत) ताल; मात्रा; काळ. पहा : **गठण**

**गटणे** अक्रि. ठासून उभे राहणे; गटाने उभे राहणे : 'विर सारे नटले, लढु लढु गटले, नाहीं कुणि हटले ।'- ऐपो २४०.

**गटणे** अक्रि. फसणे; पेचात येणे.

**गटपट** स्त्री. दाट परिचय; गाढ मैत्री, दोस्ती. [गु.]

**गटपट** स्त्री. सटपट, गडबड. (व.) पहा : **लटपट**

**गटपट, गटंपटं,** न. १. फुशारकी किंवा डौल मिरविण्याचे भाषण. २. अप्रासंगिक किंवा चुकवाचुकवीचे भाषण; ठकबाजीची किंवा मूर्खपणाची सबब. ३. गडबडगुंडा. ४. सतरापंधरा बाता. (क्रि. लावणे, मांडणे, चालविणे, लागणे, चालणे.) [सं. गट्]

**गटपटणे** अक्रि. गोंधळणे, भांबावणे, लटपटणे. (ना.)

**गटबाजी** स्त्री. १. (समाज) समान राजकीय अथवा सामाजिक हितसंबंध असलेल्या समूहाने, समाजगटाने आखलेले धोरण, केलेली कृती. २. स्वार्थासाठी एकत्र येणे; फायदा होईल अशा पक्षात किंवा समूहात सामील होणे : 'ग्रामीण भागात सर्वत्र आढळणारी भांडणे व गटबाजी येथेही आहे.' - चंद ३.; तट.

**गट(टा)र** न. १. रस्त्याच्या बाजूचे घाण पाणी वाहून नेणारी मोरी, नाली. २. (मुद्रण) फर्मा ठोकताना दोन पृष्ठांमधील सोडलेले अंतर. [इं.]

**गटरगावंज्या** वि. वाटेल तो पदार्थ (खायला) व वाटेल ती परिस्थिती ज्याला चालते असा, बिनतक्रारी (माणूस). (व.)

**गटरफटर** न. सटरफटर , क्षुद्र गोष्टी; हलक्यासलक्या वस्तूंचा संग्रह; अनेक किरकोळ वस्तूंचा एकत्र साठा.

**गटरे** न. गठडे, साठवलेला पैसा : 'कुप्पात आपल्या बाचं गटरं पुरल्यावानी हुडकाय लागलाईसा ते ?' - रैत १४९.

**गटवणे** सक्रि. १. जाळ्यात ओढणे; वश करून घेणे : 'हरिकाका अन् मी-आमचं काम गिऱ्हाईक गटवण्याचं.'- व्यव ५३. २. फसवणे.

**गट विमा** (अर्थ.) अनेक व्यक्तींचा समावेश असलेल्या गटाने सामूहिक रीत्या उतरविलेला विमा. या पद्धतीत विम्याचा हप्ता कमी बसतो.

**गटगळी** पहा : **गटांगळी**

**गटागट-टा, गटाट-टा** क्रिवि. भराभर, ढसढसा. [क. गुटुगुटन]

**गटाणा** पु. बकाणा; मोठा घास. (क्रि. करणे.)

**गटाणा** पहा : **घाटा, घाटाणा**. (वा.) ० **होणे**- तिळपापड होणे, जळफळाट होणे : 'खळ्यावरून भाताच्या गाड्यांची रांग आली तेव्हा बनूताईचा गटाणा झाला.'- आआशे ३८१.

**गटापर्चा** पु. मलाया द्वीपकल्पातील एक झाड, याचा रस आटवून त्याचा केलेला रांधा. हा पाण्यात शिजवला म्हणजे लवचीक बनतो व वाळवल्यावर पुन्हा कठीण होतो. याच्या चाकूच्या, काट्यांच्या मुठी, ठसे वगैरे करतात. [मलाया-गटा = गोंद, पर्चा = झाड.]

**गटारगप्पा, गटारबातमी** स्त्री. १. गावातील खऱ्याखोट्या गोष्टींसंबंधी चविष्टपणे निष्फळ बोलणे. २. अफवा, अविश्वासार्ह बातमी : 'न्हाव्याने ही गटारगप्पा ठरवली.' - काआ ११३.

**गटारगंगा** स्त्री. १. घाणेरड्या पाण्याचा प्रवाह. २. (ल.) घाणेरड्या गप्पा.

**गटारयंत्र** न. १. निराधार, खोट्या अफवा उत्पन्न करणारा. २. गावातील कुटाळ लोकांची चकाट्या पिटण्याची चव्हाट्यावरील जागा. (पूर्वी पुण्यात संध्याकाळच्या वेळी गटारावरील फरशांवर बसून लोक गप्पा मारीत त्यावरून.)

**गटाळणी, गटाळी** स्त्री. भटकंती. (वा.) **गटाळण्या, गटाळ्या घालणे** - भटकंती करणे; रिकामटेकडे हिंडणे; उंडारणे : 'बजाची ही सून पोराला पाळण्यात टाकते आणि गटाळण्या घालीत गावभर फिरते.' - गागो १. 'त्याच्याच जिवावर भाकरतुकडा खात होता आणि दिवसभर गावात गटाळ्या घालीत हिंडत होता.'- भुज १३२.

**गटांगळी** स्त्री. डुबकी (बुडत्या माणसाची). नाकातोंडात पाणी जाणे. (वा.) ० **खाणे** - १. पाण्यात बुडणे, नाकातोंडात पाणी जाणे. २. (ल.) नापास होणे : 'मी मॅट्रीकला दोन गटांगळ्या खाल्या.' - लटिके ६.

**गटी** स्त्री. मैत्री, सलगी, जूट : 'काजी दाउतखान गटीत असतो.' - पेद ३४.१९ पहा : **गट्टी**

**गटुणा-ना, गटुंगा** वि. ठेंगणा पण मजबूत, लहान आकाराचा पण सुदृढ.

**गटोळा** वि. वाटोळा, गोलाकार.

**गट्ट** पहा : **गट** (वा.) ० **करणे** - १. दुसऱ्याच्या द्रव्याचा अपहार करणे. २. उधळपट्टीने फस्त करणे. ३. मटकावणे; एका घासात खाणे, गिळणे.

**गट्ट** पहा : **गटुणा**

**गट्टगोळा होणे** जागच्याजागी खिळल्यासारखे होणे : 'पाटील घाबरून गट्टगोळा झाला.' - गागो ७४.[क. गट्टि = गोळा, सामर्थ्य, काठिन्य]

**गट्टण** स्त्री. गट्टी, गाठ : 'आपले व आमचे स्नेहाची प्रेममयतेची गट्टण आहे ही सर्वांस वाईट आहे.' - नाग १.३२

**गट्टा** पु. (संगीत) स्वरमिळवणीत बारीक बारीक दुरुस्त्या करण्यासाठी मृदंगाच्या वादीच्या खाली घालतात ते, सुताच्या रिळासारखे लाकडाचे साधारण दोन इंच लांबीचे व एक इंच जाडीचे तुकडे.

**गट्टा** पु. १. पहा : **गट** १, २. २. गठ्ठा. ३. (क्व.) पहा : **गड्डा**

**गट्टाण** न. गठडी, नाश. (गो.)

**गट्टी** स्त्री. १. दाट मैत्री; सलगी; परिचय. २. निकट संबंध; एकी; एकत्रपणा; संघ; समुच्चय; पहा : **गट** १. (क्रि. करणे, मोडणे,) [क. गट्टी]

**गट्टीचो(सो)ड्या** पु. एक शिवी : 'अरं तो गट्टीचोड्या कशाला न्हातोय' -वळीव ७१. [क. गंटुकळ्ळ]

**गट्टीफू** स्त्री. अबोला; मैत्री न ठेवणे; कट्टी करणे. (क्रि. करणे.)

**गट्टू** पु. भिंतीत, दारात बसवलेला लाकडाचा तुकडा : 'दरवाजा उघडण्याकरिता पकडावयाचा त्याच्यावरील गट्टू तुला दिसतो का ?' - अभिनय ७१.

**गट्टू** पु. १. गड्डू; अंदाजे अर्धा लिटर पाणी मावेल असे पितळी भांडे. (खा.)

**गट्टू** पु. (बिडाचे काम) उसाच्या चरकातील मादीच्या डोक्यावरील टोपणीखिळा.

**गट्टू** वि. ठेंगणाठुसका पण मजबूत, पुष्ट, गोल अंगाचा, गुटगुटीत.

**गट्याळ** वि. खडबडीत; खराब : 'गट्याळ वाटेवरचे गचके सोशीत मंजुळा छकड्यात बसली होती.'- वारी १११.

**गठडी** स्त्री. १. गुंज. २. जमाव.

**ग(गं)ठडी-डे, गठडी-डे** स्त्री. न. १. गाठोडे; लहान मोट; गठ्ठा (कापडचोपड, चिरगूट पांघरूण इ. चा). २. लहान गाठोडे; पुरचुंडी (एखाद्या वस्त्राच्या पदरात थोडेसे रुपये, धान्य, गोटे, चुनखडी, साखर इ. बांधलेली.). ३. (ल.) गुप्त द्रव्य; मालमत्ता; भांडवल; पुंजी; संग्रह. ४. (ल.) दारूच्या अंमलात किंवा भूतबाधेने किंवा इतर प्रसंगी हातपाय पोटाशी घेऊन निश्चेष्ट, गाठोड्याप्रमाणे पडलेला माणूस. ५. गठ्ठा, बांधलेली वस्तू, पार्सल. [सं. ग्रंथ, क. गंटु] (वा.) ० **उपटणे, उचलणे, पार करणे, लांबवणे** - दुसऱ्याची मालमत्ता घेऊन पळणे, अपहार करणे. ० **करणे, बांधणे** (हातापायांची) - १. हातपाय पोटाशी घेऊन पडणे, पाडणे. २. एखाद्याचे हातपाय एकत्र करणे, मोट बांधणे. ३. मंत्राने एखाद्याच्या हातातील शस्त्रे काढून घेऊन त्याला हतबल करणे, बांधणे, शक्तिहीन करणे. ४. गोंधळविणे, निरुत्तर करणे, कुंठित करणे, पराभव करणे. (वादविवादात) ० **पुरणे** - द्रव्य पुरणे. ० **होणे, वळणे** - १. गुंडाळले जाऊन गठ्ठा होणे, हातपाय एकत्र बांधले जाणे. २. शक्तिहीन, निराश्रित होणे, लोळत पडणे, कुजणे (ताप इ. मध्ये) ३. मरणे. ४. वठणीवर आणणे, सरळ करणे.

**गठण** स्त्री. न. (संगीत) मृदंग वाजवण्यातील एक प्रकार, ताल.[सं. ग्रंथन]

**गठण** न. उद्देश. (वा.) ० **गाठणे, गठणास आणणे** - आपल्या उद्देशांशी अथवा विचारांशी मिळते करणे, जमविणे. **गठणास येणे** - उद्देश, विचार, परिणाम यांच्याशी मेळ पडणे, पाडणे, पटवून घेणे.

**गठणे** उक्रि. वेढणे, गुंडाळणे. (बे.) (वा.) **गठून येणे** - एकत्र होऊन

येणे, जुळून येणे : 'येसाजी शिंदे यांनी ४००० फौज व २ हत्ती ऐसें गठूनच आले'. - ऐलेसं २५७५.

**गठणे** अक्रि. फसणे.

**गठळ** वि. अव्यवस्थित, गबाळ. पहा : **गढळ**

**गठळी** स्त्री. १. गुंडी. २. सुरकुती (सुतामधील). ३. (रक्त इ. ची सुकून झालेली) बारीक गोळी; न विरघळलेली बारीक गोळी; गुठळी.

**गठाण** स्त्री. मोठी गाठ, गाठोडे, आवळलेला बोजा. (व.) [सं. ग्रंथन]

**गठाण** न. गठ्ठा, (कापसाची) गाठ.

**गठाण्या** पु. हमाल; सामान बांधून त्याची ने आण करणारा.

**ग(गं)ठीछोड** वि. १. (गाठोडे सोडणारा) गाठोडे सोडून चोऱ्या करणारा, भामटा; गुप्त ठेवा चोरणारा; बिलंदर; अट्टल (चोर) : 'गठीछोडे द्रव्य सोडिती । नाना आळंकार काढिती ।' - दास ३.७.५० २. (उप.) कृपण; कद्रू; जो आपला पैसा, मालमत्ता फार जपून ठेवतो तो. [हिं.]

**गठुडे** पहा : **गाठोडे** : 'हालकडीचं गठुडं काढलं.' - मळणी ३४.

**गठोळी** स्त्री. १. पुरचुंडी; लहान गाठोडे (कपडे इ. चे).

**गठ्ठ** वि. १. घट्ट; गट्टू; बांधेसूद (शरीर). २. मांसल, गोंडस (अवयव).

**गठ्ठा** पु. जून झालेली चवारी सुपारी.

**गठ्ठा** पु. १. बिंडा, दिंड, बांधलेला मोठा बोजा (कापड इ. चा); भारा (लाकडे, पाने यांचा); (सामा.) घट्ट आवळलेले ओझे. २. (क्व.) गट : 'अकस्मात भलतेकडून पांच दाहाशें दोनशें असे गठ्ठ्यांनी शिरून शत्रूस दुभंग करावें.' - मराचिथोरा ५५. ३. लबका; घट्ट गोळा; लगदा (मुरंबा, दही यांचा). ४. (ल.) भांडवल; पुंजी; द्रव्य; मालमत्ता. ५. **गठ्ठा** स्त्री. जुडी; मोटकुळी; मोळी; पुडका; बोचके; दप्तर. [सं. ग्रंथ] [क. गट्टी = गोळा]

**गठ्ठा** पु. पखवाज किंवा तबला आवळण्याचा वादीत घातलेला लहान लाकडी ठोकळा. हे ठोकळे तीन इंच लांब व दीड इंच गोल असून सुमारे आठ असतात. हे खाली वर केल्यामुळे तबल्याच्या स्वरात चढउतार होतो. गट्टू.

**गठ्ठी, गठ्ठू** पहा : **गट्टी, गट्टू**

**गठ्ठीचोर, गठ्ठूचोर** वि. अट्टल चोर. पहा : **गठीछोड १**

**गठ्ठीजोड, गठ्ठूजोड** वि. (गाठीशी गाठ घालणारा) कद्रू; पैसे राखणारा. पहा : **गठीछोड २**

**गठ्ठ्यांचा खेळ** चवारी सुपाऱ्यांनी खेळला जाणारा खेळ : 'आमचे आवडीचे खेळ म्हणजे गठ्ठे व आट्यापाट्या.' - आत्मवृत्त ७२.

**गठ्या** पु. १. कवड्यांच्या खेळातील फेकण्याची मोठी कवडी, कवडा, पैसा. २. पहा : **गठ्ठा**

**गठ्या** पु. (अशिष्ट) शिस्न; पुरुषांचे जननेंद्रिय.

**गठ्यागोंधळ** पु. १. (अशिष्ट) बदफैली प्रकार, जातींमध्ये किंवा स्त्रीपुरुषांमध्ये अनिर्बंध व्यभिचार; अगम्यागमन; गोत्रगमन. २. (ल.) घोटाळा, गोंधळ, सावळागोंधळ, सबगोलंकार.

**गड** पु. गायवाडा, गोठा (व.).

**गड** पु. लोखंडी त्रिशूळ. या त्रिशूळाचा वापर हत्तीची देखभाल करणारा भोई जातीचा कामगार करीत असे.

**गड** पु. १. किल्ला, दुर्ग (मुख्यत्वे डोंगरावरचा) : 'ढेंकणासी बाज गड उतरचढ केवढी ॥' - तुगा ३२६४. २. उभ्या चढाचा डोंगर, पहाड. (वा.) ० **पावणे** - एखादी गोष्ट बळकाविणे.

**गड** स्त्री. अडचण; घोळ; उपद्रव; संकट; अत्यवस्था; निकड; आणीबाणीची वेळ. (क्रि. येणे, लागणे, पडणे, वारणे, टळणे, चुकणे, सरणे, टाळणे, चुकवणे, संभाळणे, सारणे.) [सं. गड = अडथळा]

**गडक** पहा : **गरक**

**गडकरी** पु. १ किल्यातील नोकर, शिपाई. २. गडाचा बंदोबस्त करणारा, गडावरील अधिकारी. ३. (कर.) माहुताच्या हाताखालचा माणूस.

**गडका, गडखा, गडखी** पु. स्त्री. १. (राजा.) फळे, फुले तोडण्याची लाकडी आकडी. (राजा) पहा : **गरखी** २. (उप.) उंच सडसडीत स्त्री. वि. गिऱ्हाइकाला चातुर्याने आपल्या दुकानी ओढणारा (वाणी इ.).

**गडकी** पु. गडकरी; गडावरील लोक : 'गडकी गलादाणा गडावर नेतात.' - ऐसंसाखं ७.१८.

**गडकोट** पु. किल्लेकोट, (सामा.) गड, किल्ले : 'गडकोटविरहित जें राज्य त्या राज्याची स्थिती म्हणजे अभ्रपटल न्याय होय.'- मराआ २६.

**गडकोन** पु. पुढे आलेली टेकडी.

**गडखळ** न. पेच; लचांड; उपद्रव; अडचण.
वि. वर्चस्व किंवा प्रावीण्य मिळण्यास कठीण (एखादी गोष्ट); अजिंक्य (किल्ला); कडा तुटलेला; धोक्याचा; उभट; बिकट (रस्ता); घोटाळ्याचा; गोंधळाचा; भ्रांतिदायक; क्लिष्ट; गूढ (पुस्तकातील विषय, वाक्य).(राजा)

**गडखाप** स्त्री. अडचण; संकट; गंडांतर (ना.).

**गडखोल** पु. घोड्याचा गळा.

**गडखोला** पु. घोड्याच्या गळ्यातील दोरीचे वळे.

**गडगच्च** वि. दाट; पुष्कळ; विपुल.

**गडगच्चा** पु. चेपाचेपी; दाटी; (लोक, अभ्रे, धूळ, वस्तू वगैरेची). (क्रि. जमणे, मिळणे, येणे, मोडणे, विरणे.). पहा : **गरगशा**

**गडगड-डा** क्रिवि. धडधड, करकर इ. आवाज होऊन (मेघगर्जना, गाडी-खटारा इ. चा.); पोटात वाजणाऱ्या आवाजाप्रमाणे : 'कडकड शब्द उडाला, गडगड गगनांत खांब जों चिरला ।' - रामबडवे - मोरोपंत चरित्र (प्रस्तावना). [ध्व.]

**गडगड-डी** स्त्री. गुरगुर; खरखर; घडघड; गडगडाट; गर्जना.

**गडगडणे** अक्रि. १. गडगड आवाज होणे; धडधडणे; गुरगुरणे; कडाडणे (मेघ, गाडी इ.). २. मोठी गर्जना करणे, ओरडणे (वन्य पशू इ. नी). ३. गडगड आवाज करीत खाली पडणे; गडगडत खाली येणे. ४. (ल.) मरणे. ५. (ल.) अधिकारच्युत होणे : 'फडणीस अधिकारावरुन गडगडले होते.' - अस्तंभा ३५. ६. (अकर्तृक) पोटात गुरगुर आवाज होणे.

**गडगडा** पहा : **गडगा** : 'रस्त्याचे बाजूने गडगडावजा भिंत घालून ..' - गार १०१.

**गडगडा** पु. १. विहिरीवरचा पाणी काढण्याचा रहाट. २. सडकेवरून गडगड जसा आवाज करीत जाणारा गाडा.

**गडगडा** वि. ओलेचिंब.

**गडगडाट** पु. मोठी गर्जना; खडखडाट; गुरगुर; गडगड आवाज. [ध्व.]

**गडगडा धोंडा** गोलाकार, ओबडधोबड दगड; गडगडत जाईल असा दगड.

**गडगड्डांवचे** सक्रि. १. मूग, चणे वगैरे पाटावरून खाली तिरकस लोटून निवडणे. २. नारळाचा कीस बारीक करणे. (गो.)

**गडगडी** स्त्री. पाणी काढायचे लोखंडी चाक; खराडी; पुली. (बडोदा)

**गडगडीत** पु. कोरडा आणि खडकाळ : 'तव गडगडीत कूप उदके वोसंडला'- नाम ९२१.

**गडगडेप** न. गडगडाट. (गो.) [ध्व.]

**गड(डं)गणे(ने)र** न. केळवण; लग्न, मुंज यापूर्वी होणारा एक समारंभ; (वधू किंवा वर यांच्या स्वत:च्या) घरी थाटाने मेजवानी करून आप्तेष्टांना जेवायला घालणे; तसेच हे आप्तेष्ट (वराला किंवा वधूला) आपापल्या घरी मेजवानी देतात ती. यात भोजनोत्तर घरचा आहेर देतात. [क. गडू+नीर = पाण्याचा तांब्या व पाणी. पाहुण्यास द्यायची मेजवानी]

**गडगप, गडगप्प** क्रिवि. हरवलेल्या, गैरविल्हे लागलेल्या, गहाळ झालेल्या, गिळंकृत केलेल्या, दडपलेल्या, खाल्लेल्या स्थितीत.

**गडगर्ज** पु. मोठी गर्जना : 'मेघ गर्जती आकाशीं । तैसा गजांसी गडगर्ज ।'- एरुस्व ८१८.

वि. प्रसिद्ध : 'गडगर्जे बंधमोक्ष पाही ।' - एभा १८.१२७.

**गडगर्जना** न. गडगडाट; मोठी गर्जना : 'येऊनि नाना मेघपटळें । गडगर्जनें गगन झाकोळे ।' - एभा ११.४०९.

**गड(डं)गळ-ळी** वि. ओबडधोबड व गोलसर; खडबडीत व भोपळसुती; कसाबसा, ओबडधोबड तोडलेला, फोडलेला (दगड, खडक.).

**गडगंच, गडगच्च-च्चा** क्रिवि. दाटीने, चेंगराचेंगरीने, पुरेपूर; विपुलतेने.

**गडगंच, गडगंज** स्त्री. अतिशय वैपुल्य; रेलचेल; दाटी, गर्दी (वस्तूंची).

वि. १. गच्च, दाट लोकवस्तीचे; (धनधान्यादिकांचा) भरपूर पुरवठा असलेले; चांगले पोसले जाणारे; सुखवस्तू (गाव, घर). २. पुष्कळ; रगड; भरपूर (वस्तू, पदार्थ). अलोट; पुरून उरण्याइतके. ३. पूर्ण; समग्र; भरपूर; वाढता (सरंजाम, स्वारी, आटाळा). ४. ऐवजदार; श्रीमंत; ऐपतदार (व्यापारी). ५. गंभीर; गाढ (झोप). ६. (सामा.) अलोट, पुष्कळ, पुरून उरण्याजोगे. [क. गड = पुष्कळ, खात्रीचा, गंज = रास]

**गडगंज** वि. फट न ठेवता गच्च सांधलेला (सांधा).

**गडगंजा** पु. घोटाळा; अव्यवस्था; गर्दी. (व.) पहा : **गडगंच, गडगंज**

**गडगा-घा-घे** पु. न. १. दगडांची ओबडधोबड रचलेली ताल, भिंत, ढीग. २. बांध, बंधारा. (को.) ३. पार, चौथरा. (अलिबाग)

**गडगा, गरगा** पु. खड्डा; बीळ; खाच. (प्रां)

**गडगिळ्या, गडगीळ** वि. गिळंकृत करणारा; गटगिळ्या. पहा : **गटगीळ**

**गडगूप** पु. बुंध्याला अनेक ताटे फुटणारी जोंधळ्याची एक जात.

**गडघेणा** वि. (किल्ला सर करण्याइतके) कठीण; असाध्य; दुर्घट.

**गडचीप** वि. गप्प; गुपचूप. 'आपण आपलं गडचीप असावं ते बरं.'- जैत १२७.

**गडजाती** स्त्री. किल्लेकोट; किल्लेजात; विविध किल्ले : 'सेनाधुरंधर प्रांतांतील गडजाती पाहून हुताशनी करावयासी नागपुरास येतील.'- नाग १.२०.८.

**गडण-णी** स्त्री. मैत्रीण, सखी : 'न लगा गडणी आम्हां तैश्या ।'- तुगा ३२१.

**गडणे** अक्रि. १. आत शिरून पुरला जाणे; गाडला जाऊन आच्छादित असणे. २. तंग, घट्ट बसणे (वस्त्र). ३.(ल.) मग्न, चूर असणे; ग्रासलेला असणे. ३. कायम होणे, चिकटणे (कचेरीत, कामधंद्यात.). [सं. गाढ]

**गडणे** अक्रि. १. परिचय, ओळख होणे. २. (मुलांचा खेळ) एका बाजूकडे असणे; खेळगडी होणे; [सं. गाढ.]

**गडत-द** न. गर्द काळोखी; दाट अंधारी. (क्रि. पडणे, येणे.) : 'डोळ्या गडद पडे भारी ।'- परमा १०.९४.

क्रिवि. १. दाट, घोर, निबिड, किट्ट (काळोख). २. गाढ; चूर; घोर (झोप, अभ्यास, अंमल, धुंदी, कामकाज). ३. घन, गर्द, दाट, निबिड (जंगल, अरण्य). ४. एकसारखा, संततधार, मोठा, जोराचा (पाऊस) ५. काळाकुट्ट (ढग). ६. भडक; गहिरा (रंग). [फा. गर्द = धूळ]

**गडत-ता, गडद-दा** पु. बंदुकीचा प्रकार : 'गडताचा मार सोसवत नाही.'- साब ४६.

**गडत, गडद** वि. मृतप्राय; नष्टप्राय; मालवलेला; हरवलेला; अदृश्य; अगदी नाहीसा झालेला; बुडालेला; पुरलेला; गिळंकृत; दडपलेला; लयास गेलेला; कत्तल केलेला. [फा. गरत]

**गडद** स्त्री. अंधारकोठडी; भुयार : 'किल्ले लोहगड पायनाळ्यास सरकारचे कोठीची गडद आहे.'- बाबारो ३. [सं. गर्ता]

**गडद** न. दाट काळोख : 'जें अज्ञानाचे गडदें पडे ।'-राज्ञा ४.२०३.

**गडद** न. अंबार, पेव, साठ्याचे ठिकाण : 'कडबा गवत नेऊन शिवनेरीच्या गडदात सांठवितो.'- पेद १०.३५.

**गडद** स्त्री न. खाण; पोखरण; खड्डा; खाच; खळगा. [सं. गंड = खंदक]

**गडदणे** उक्रि. जमिनीत पुरून, लपवून ठेवणे; (वस्तू, पैसा इ.) [हिं. गाडना]

**गडदणे** अक्रि. १. एक होणे, मिसळला जाणे : 'फांद्यांचा पालापाचोळा पण मातीत गडदून बसला होता.'- आंआशे ३८९. २. पुरणे; झाकणे. [सं. गड=खंदक]

**गडदन** न. गरदन, गर्दन; गळा. [फा. गर्दन]

**गडदर-रा, गडधर-रा** स्त्री. पु. १. (प्रां.) ओबडधोबड व मोठा खळगा, खाच : 'गारीं आणी गडधरां ।' - दास ५.१.३७. २. आड, विहीर.

**गडदर** पु. लोल. - (तंजा.)

**गडदा** पु. किरवी (खेकडे) पकडण्यासाठी बांबूचा केलेला नळा.

**गडदू-धू** पु. १. दाबण्याकरिता ठेवलेले वजन; जड ओझे; बोजा. २. (ल.) बोजा, आवश्यक कर्तव्य; जबाबदारी; आपल्या वाडवडिलांच्या किंवा आपणांपूर्वी होऊन गेलेल्या अधिकाऱ्यांच्या मागील उदाहरणाप्रमाणे पाळण्यासारख्या वहिवाटी, संस्कार, नेमणुकी.

वि. १. बळकट; घटमूठ; लडदू; धडधाकट; धिप्पाड; धष्टपुष्ट (माणूस, जनावर). २. मोठाड; दांडगा; रपाट; भरभक्कम (वजन, ओझे वस्तू).

**गडदू** पु. दगड, धोंडा : 'गांवचे उत्तरेस गडदू.....'- आत्मवृत्त १४. (वा.)

(उरावर) **गडदू रचून ठेवणे** - एखादे मोठे संकट उपस्थित करणे.

**गडधा** वि. आळशी; संथ.

**गडनिविसी, गडनिसी** स्त्री. गडनीस यांचे काम किंवा हुद्दा.

**गडनीस** पु. किल्ल्यावरील हिशेबनीस.

**गडप-ब** वि. बेपत्ता; नष्ट; अदृश्य; गिळंकृत; अंतरलेल्या स्थितीत; सापडायची नाही किंवा केव्हाही बातमी लागायची नाही अशा स्थितीत अथवा जागेत; ठावठिकाण लागणार नाही अशा प्रकारे. [फा. घर्ब = गुप्त होणे] (वा.) ० **करणे** - दडपून टाकणे; लाटणे; दाबणे; गिळंकृत करणे : 'कां पाठवितों, कळले जरि करिल व्यूहनद गडप यातें ।'- मोद्रोण ११.५६ ० **होणे** - नाहीसा होणे, दृष्टीला न पडणे.

**गडपति-ती** पु. किल्लेदार; किल्ल्यावरील मुख्य अधिकारी. हा गडावरील चौकी, पहारा इ. च्या बंदोबस्ताचेही काम पाहत असे.

**गडबड** स्त्री. १. धांदल; दंगल; धामधूम; घोटाळा. २. हुल्लड; दंगा; कोलाहल; कल्ला; गलबला. ३. घालमेल; अव्यवस्था; मिसळ; भेसळ; बिघाड. चोरीमारी. ४. चलबिचल; एकाग्रता नसणे; व्यग्रता (मनाची). ५. धांदल; तिरपिट; तारांबळ; उतावीळ; घाई; गर्दी. ६. (ल.) बंड; दंगा. ७. (ल). दबावाचे, घाबरून सोडणारे भाषण किंवा व्यवहार. [क. गडबडि] (वा.) ० **करणे,** ० **सडबड करणे** - (काम चांगले होते किंवा वाईट होते इकडे लक्ष न देता) घाईने, गडबडीने कसेतरी उरकणे.

**गडबड** स्त्री. (हमाली) खाचखळग्याची, उंचसखल, खडबडीत जमीन.

**गडबडगुंडा** पु. १. (एखादा संस्कार किंवा काम) उतावळीने व अव्यवस्थितपणे करणे. २. महानुभावपंथातील लग्नाला हा शब्द लावतात : 'भक्ति आणि भावार्थाचा गडबडगुंडा केला । एकाजनार्दन पायीं मानभाव झाला ।'- भज ४१. ३. पुन्हा पुन्हा जमिनीवर लोळण घेणे; गडबडा लोळणे (लहान मुलाने रडताना). ४. लोळण्याचा एक खेळ. ५. गुप्त व गूढ प्रकाराने घात करणे; पैसा खाणे, लाटणे, दाबणे. ६. घोटाळा, घालमेल करणे; विस्कळितपणे विवरण करणे; अव्यवस्थितपणे आणि घाईघाईने उरकलेले काम. ७. सावळागोंधळ. (व.) ८. (ल.) व्यभिचार : 'याणें केला गडबडगुंडा ।'- राला ७४.

**गडबडणे** : अक्रि. १. गडबड होणे; गोंधळणे; घाबरून, गोंधळून जाणे; घोटाळा, गलबल, धांदल, उतावीळ, तारांबळ, आवेश यांनी युक्त होणे. पहा : **गडबड** : 'गडबडले सुर गेले सत्याच्या नायका पुसायातें ।'- मोमंत्र ३.५९. २. गमावणे; हरवणे. ३. गैरविल्हे लागणे; अव्यवस्थित होणे; विस्कटणे. ४. गडगडत, ठणठणत, खडखड आवाजाने खाली येणे; उलथेपालथे होणे; कोसळणे; ढासळणे : 'घाय गडबडती धोंडे ।'- ज्ञा ७.८०.५. गडबडा लोळणे; लोटांगण घालणे : 'देखोनि राघवपदाब्जरजास वाटे । लोटांगणीं गडबडीं सुख फार वाटे ।'- वामन, भरतभाव ६०. ६. चित्त व्यग्र होणे; भ्रमणे. ७. ठरल्याप्रमाणे काम न होता बिघडून भलतेच होणे. ८. (ल.) मरायच्या बेतात येणे. [क.अडबडिसु]

**गडबडा** क्रिवि. शोकातिरेकाने, अस्ताव्यस्तपणे, दुःखाने, गडबड असा आवाज होईल असे जोराने, झपाट्याने (लोळणे) : 'गडबडां धरणीवरि लोळते । वदवती न कवीसहि लोळ ते ।'- वामन भामाविलास ४.

**गडबडाट** पु. अतिशय गडबड गोंधळ; कमालीचा घोटाळा; आरडाओरड.

**गडबडाध्याय** पु. गोंधळ; घालमेल; ब्रह्मघोटाळा.

**गडबडी** स्त्री. गडबड; धांदल; घाई; धावपळ; घोळ; दंगा.

**गडबड्या** वि. १. धांदरट; घालमेल्या; उतावळ्या. २. अस्थिर चित्ताचा; चंचल; ३. उद्योगी; खटपट्या. ४. अजागळ.

**गडबेडी** अंदूप्रमाणेच एकप्रकारची पायातली साखळी.

**गडलगप** वि. क्रिवि. १. हरवलेला; गेलेला; अदृश्य. २. हरवण्याच्या, खाऊन फस्त करण्याच्या, गहाळ होण्याच्या स्थितीत असलेले.

**गडवई** पु. गडकरी; गडाच्या कामाला योग्य अधिकारी : 'एका घरचे भाऊबंद एक, दोन तीन आहेत आणि इतकेही गडवई त्यांस किल्लेचे मामले ..... सांगावेच लागतात.' - मराआ २८.

**गडवा** पु. १. विशिष्ट आकाराचे धातूचे भांडे; खालीवर चिंचोळा व मध्ये फुगीर असा तांब्या, गडू. २. तांब्याच्या आकाराचे मडके; (उत्तर हिंदुस्थान) रंगपंचमीला गाणाऱ्या व नाचणाऱ्या स्त्रिया डोक्यावर जो पाण्याचा कलश घेतात तो. (व.) [क. गडू]

**गडवीपण** न. गडकरी या पदाचा कारभार.

**गडवीपणा** पु. गडावरील कामकाजाचे ज्ञान असणे : 'यास्तव तुकोजी साळोंकी यांसी आपणाकडे पाठविले आहेत. गडवीपणाच्या कारभारास योग्य आहेत.'- पेद १७.१२१.

**गडसंद-ध** स्त्री. १. निकडीचा प्रसंग; जरुरीची वेळ किंवा हंगाम. २. निकड; तातडी; ताण; नेट; झेंगट (एखादे काम, गोष्ट यांचे). (क्रि. होणे, पडणे, येणे, लागणे.) ३. अत्यंत समयोचित प्रसंग; अत्यंत जरुरीचा, उपयोग होईल असा निकडीचा हंगाम किंवा वेळ : 'हा तों गडसंदीचा ठाव ।'- तुगा २२७८. ४. (व्यापक) अडचण; संकट; कचाट. ५. अडचणीची व धोक्याची जागा. ६. आणीबाणीची जूट; संकटाच्या वेळची एकी : 'ते गडसंधीचे येती समस्त । संग्रामासी ।'- ख्रिपु १.१७.११०. गडसंद असेही रूप आढळते.

**गडसंधी** स्त्री. १. रचना; ठेवण; व्यूह; स्थिती; मांडणी; स्थापना : 'रतबाचे आमचे दरम्यान येमाजीपंत येसी गडसंधि आहे.' - पेद २६.७६. २. अवधी; अवसर.

**गडसा** पु. कोयता.

**गडंगज** वि. फट न ठेवता गच्च सांधलेला (सांधा). (गो.)

**गडंत** वि. गाडलेले. (व.)

**गडा** स्त्री. सीमा, मर्यादा. [का. गडी = मर्यादा]

**गडा** स्त्री. झाडावरील पाने, फुले काढायची आकडी. पहा : **गडका-खा**

**गडाड** पु. १. मोठा गडगडाट, गर्जना, घडघडाट, गलबला इ. २. आवेश, उत्साह : 'अभ्यासाच्या गडाडीं। प्राण खवळल्या कडाडीं ।'- एभा १४.४३०.

वि. १. अतिशय चढीचा, उभट, मोठ्या उतरणीचा (उतार). २. खोल : 'ये नदिचें पाणि गडाड ।' - पंच ४.९. [ध्व.]

**गडाडणे** अक्रि. १. गडगडणे; घडघडणे; गरजणे; गाजणे; गुरगुरणे; घुमणे (मेघनाद, गाडा, जनावर, पोट). [ध्व.]

**गडाडणे** अक्रि. सांकेतिक मरणे; कामावरून बडतर्फ होणे; फसणे; मोडणे; ढासळणे (बेत, कट).

**गडाला** पु. १. ओबडधोबड खड्डा, भोक, खाच. २. (ल.) अवघड जिकिरीचे कार्य; घोटाळ्याचे प्रकरण. (प्रां.) [सं. गड = खंदक, अडथळा.]

**गडालोही** कडेलोट.

**गडाविणे** उक्रि. मित्रभाव दाखवून वळवणे; लाडीगोडी लावणे; भुरळ घालणे; फूस लावणे; गटवणे (नेहमी वाईट अर्थी प्रयोग).

**गडि (डी) ण-णी** स्त्री. गडणी; सोबतीण; सखी; मैत्रीण : 'गडिण वडिल भोळी सावळी रम्य लीला ।'- हमुविरा ८२; 'मग बोलाऊन आपल्या गडिणी ।'- भवि २२.४८.

**गडियागडणी** स्त्री. मैत्रिणी; कुमारिका; सोबतिणी; सख्या.

**गडियांगडी** क्रिवि. दर, प्रति, प्रत्येक गड्याला, माणसाला.

**गडी** पु. १. मनुष्य : 'आम्ही ज्ञानी सुज्ञ गडी ।' - विक ९५. २. हाताखालचा माणूस; हस्तक; बगल्या; आडकाम्या माणूस; मुलगा; छोकरा; मोलकरी; मजूर; चाकर इ. ३. सहचर, सोबती (सहाध्यायी, गुरुबंधू, वर्गबंधू, खेळगडी, एका धंद्यातील सहकारी); मित्र : 'मला माझा तूं हंस गडी राया ।' - र १८. ४. (धंदेवाचक शब्दाच्या पुढे) व्यक्ती; असामी; माणूस, जसे :- ब्राह्मण-भट्ट -मुशाफीर - शिपाई गडी : 'येतांचि विक्रम लवे श्रीहरिचा दयितदास वीर गडी ।' - मोविराट ४.८९. ५. खेळातील भागीदार; भाग घेणारी मंडळी. ६. (सोंगटी इ. खेळ) भिडू; जोडीदार. (क्रि. धरणे, मिटणे, तोडणे, फुंकणे). : 'पुरे पुरे तुझी कान्हो गडी रे ।'- मध्व १७३. [क. गडी] (वा.) **गड्याने गडी साधणे** - आधी एक नंतर त्याच्या सहाय्याने दुसरा अशी साखळी बांधणे; सुताला सूत जोडणे : 'गड्यानें गडी बांधून कर्नाटक आपले करावें' - पेदभा २८ पत्र ८४.

**गडी** स्त्री. १. गढी; लहानसा भुईकोट (गड याचे अल्पत्व) : 'आली उंच उज्जनीची गडी ।' - ऐपो ४३४. २. पहा : **गट्टी**

**गडी-ड्डी** स्त्री. पेंढी; जुडी (भाजी, गवत, काठ्या). [क. गड्डे]

**गडी-ड्डी** स्त्री. (सोनारी) चौकोनी दोन इंची घन किंवा सुमारे ४० ते ६० भारांचा ठोकळा. याला वाट्यांसारखे लहान लहान खळगे असून त्यात मण्यांचे अर्धे गोल भाग ठोकून तयार करतात. (खा.)

**गडीखेच** स्त्री. मुलांचा स्काउटचा एक खेळ.

**गडीगंज** पहा : **गडगंज**

**गडीगुप्प** वि. शांत; गप्प; 'सगळीकडे कसे गडीगुप्प होते.'- भुज १२९.

**गडी फू** फारकत; ताटातूट; कट्टी; पृथकत्व : 'राजकारण व वाङ्मय यांची अजीबात गडीफू कशी होऊं शकेल ? '- प्रतिभा ४.६.

**गडीबापई** पु. नोकरचाकर : 'म्हातारीकोतारी, पोरंबाळं, गडीबापई आणि बाया....' - काआ ९२.

**गडीमाणूस** पु. (सामा.) १. मजूर; घरकाम्या नोकर; चाकर. २. पुरुष.

**गडीलेप** पु. मुलांचा एक खेळ.

**गडीवान** पु. गढेवान; हत्तीची चाकरी करणारा नोकर.

**गडीसीडी** क्रिवि. कानाकोपऱ्यात; एकांतात : 'गडीसीडी असावे ।'- सूत्रपाठ ३५.

**गडु-डू** पु. गंडमाळा, गलंड रोग.

**गडुवा** पहा : **गडवा**

**गडू** पु. पाणी पिण्याचे लहान उभट भांडे; लहान तांब्या; बुटकुली.

**गडे** स्त्री. मुदत; मर्यादा : 'मियां दिन्हली सातां दिवसांची गडे ।' - उगी ६७.

**गडे** उद्गा. संबो. १. लाडक्या माणसाला - विशेषत: मैत्रिणीला - हाक मारताना, काही सांगताना स्त्रिया वापरतात : 'गडे अनुसूये. सांग सांग कीं बाई !' - शाकुंतल. २. नवऱ्याशी लडिवाळपणे बोलतानाही वापरतात. जसे :- 'मला सांगायचं गडे !'

**गडे** न. असम राहिलेली शेष संख्या, दोहोंनी भागल्यास शेष उरते अशी (३, ५, ७ इ.) संख्या, एकीबेकी खेळण्यातील विषम (एकी) संख्या. (गो.)

**गडेकरी** वि. हत्तीच्या पुढील भालाईत (माणूस). हत्ती बिथरला असताना हे लोक आपल्या भाल्यांनी त्याला टोचून टोचून ताळ्यावर आणतात. त्यांच्याजवळ काट्यांचे चिमटे ही असतात व ते वरील प्रसंगी हत्तीच्या पायांत अडकवतात. पहा : **गडकरी** ३ : 'हरकामे, गडेकरी, साठमार व बारनिशी कारकून यांनी आपआपलीं कामें करावीत.' - ऐरापुप्र ११.६३२. [सं. गड्ड = भाला]

**गडेगडप** शिमगी पौर्णिमेला (शोकगीताप्रमाणे) एक ताली ढोल वाजवून अंगात एक प्रकारचा अवसर आणणे. हे अवसर आलेले लोक रात्रभर भटकून दुसरे दिवशी ठरावीक वेळी शुद्धीवर येतात. (गो.)

**गडेफाडे** न. दोहोंनी भागल्यास शेष उरत नाही अशी (२,४,६,८) संख्या; सम संख्या, (चिंचोक्यांच्या खेळातील) बेकी. (गो.)

**गडेल** वि. जाड, खडे असलेला.

**गडेश्वर** वि. डोंगरावरील तपस्वी.

**गडोबा** पु. गुराखी, सोबती : 'गाईचा गडोबा गोठणीला उभा ।' - बा १८.

**गडॉ** पु. गडी; सोबती (शाळेतील). (गो.)

**गडॉ** पु. गोटी. (गो.)

**गड्डर** स्त्री. गड्डी; चळत; उतरंड. (व.)

**गड्डा** पु. कानाची लोंबणारी पाळ : 'तिच्यां कानाचा गड्डा धरुन तिला खाली वाकवत म्हणाला ...'- आभाळ ९१-९२.

**गड्डा** पु. १. भाजीपाल्याचा दळदार कांदा (कोबी, नवलकोल इ.). २. ढेप, डिखळ, गोळा, लगदा, कांदा. (कमळकांदा, मुरंब्याचा लगदा, नारळात कधी कधी होणारा गड्डा, एके ठिकाणाहून उपटून दुसऱ्या ठिकाणी लावण्यासाठी न्यायच्या रोपट्याच्या किंवा हुंडीच्या मातीचा घट्ट गोळा ज्याला चिकटला आहे अशा मुळ्या.) ३. बटाटा. (बे.) ४. (ल.) साठा, संग्रह, कंद. उदा. शहाणपणाचा गड्डा. [क. गड्डे]

**गड्डा** पु. नदीतील लहान लहान खांडवी; कोरडी जागा.

**गड्डा** पु. गळू, फोड, नारू, मूळव्याध इ. चा मूलभूत अंश. - (तंजा.)

**गड्डा** पु. खड्डा. (व.) [सं. गर्त]

**गड्डा** पु. गर्व; अभिमान. (व.)

**गड्डा** पु. चाकाचे आरे ज्यात बसवतात तो चाकाचा मधला भाग, तुंबा. (कर. गो.)

**गड्डासणे** अक्रि. नाहीसे करणे; लपविणे. (गो.)

**गड्डालिका** स्त्री. १. लांबलचक गद्य वाक्य; गद्य लेखाचा लांब भाग किंवा अशा भागांची मालिका. २. श्रमाने साधलेली गद्यरूप कविता, गाथा, चूर्णिका; रम्य, सुंदर गद्याचा छोटासा भाग; अलंकारिक रूपकांची वाक्यपरंपरा. ३. (ल.) कंटाळवाणी गोष्ट; चर्पटपंजरी (प्रपंचादी संबंधी). (क्रि. लावणे.)

**गड्डी** स्त्री.(कागदाच्या) दहा दस्त्यांचा जुडगा, गठ्ठा. [क. गड्डे]

**गड्डी** स्त्री. गढी; भुईकोट किल्ला.

**गड्डू** वि. ठेंगणा पण मजबूत; घट्टमूठ व खंबीर; मजबूत पण आटोपसर.

**गड्याळ-ळी** वि. १. घाणेरडा; अव्यवस्थित; बेशिस्त; माभळभटी (मनुष्य, व्यवहार, भाषण). पहा : **गदळ**

**गड्याळी, गड्याळकी** स्त्री. अव्यवस्थितपणा; गैदीपणा; घोटाळा.

**गड्येकार** पु. गाडीवाला. (गो.)

**गढणे** अक्रि. १. तल्लीन होणे. पहा : **गडणे** [सं. गाह्]

**गढणे** क्रि.१. झपाटले जाणे. २. बुडून जाणे.

**गढळ** वि. १. वोखट; विद्रूप; निरुपयोगी; जीर्ण; गदळ. २. भिकार; नादान; नालायक; वाईट. ३. अमंगळ, घाणेरडा, द्वाड, कुचकामाचा; गदळ (माणूस, पशू, जमीन, वस्तू).

**गढा, गढी** स्त्री. १. लहान भुईकोट किल्ला; गावचा मातीचा किल्ला. देशमुख, देशपांडे, पाटील यांना राहण्यासाठी पूर्वी गढ्या असत : 'किल्ले व गढिया बळकावून आम्हांशीं बेदिल !'- भाब ३५. २. पांढऱ्या मातीची किंवा विटांची अतिशय अरुंद भिंत. (व.) ३. सोनाराचे एक हत्यार. [क. गडि]

**गढीबंद** वि. १. ज्याच्या मालकीची गढी आहे असा (जमीनदार). २. जो गढीत अडकून पडला आहे असा.

**गढुळणे** उक्रि. १. गढूळ होणे, करणे; गदळणे; रेंदाडणे; मळकट करणे; दूषित होणे. २. (ल.) क्षोभविणे; चवताळविणे; दंगल, गडबड माजविणे.

**गढूळ** वि. १. खडूळ; गदळ; रेंदाड; मातीने युक्त; राड; शबल; अस्वच्छ : 'किंवा गढूळ झालें असतां उदक । स्थीरावल्या दावी पवित्र मुख ।'- नव २४.१४९. २. तांबडसर (डोळा). ३. (ल.) क्षुब्ध; अस्वस्थ; व्यग्र; कलुषित; विकारवश (राग, दुःख, क्लेश, संशय, हेवा इ. मनोधर्मामुळे.). ४. दूषित; पूर्वग्रहयुक्त. ५. अशुद्ध; गोंधळाचा; लबाडीचा; खोडसाळ (हिशेब). ६. अंदाधुंदी, बंडाळीने व्याप्त (राज्य, देश.). ७. आचारभ्रष्ट, धर्मभ्रष्ट (जात, वर्ण व्यक्ती).

**गढूळ वळण** अतिशय नफा घेणाऱ्या व्यापाऱ्याची लोभी वृत्ती.

**गढेकरी** पु. किल्ल्यातील शिपाई, नोकर. पहा : **गडकरी**

**गढेकोट** पु. गढी : 'गढेकोट रचलेला होता.' -जैत ४.

**गढ्ढा** पु. खळगा, खड्डा : 'समोर भयानक गढ्ढा आहे.' - पेआ १८९. [सं. गर्ता]

**गण** पु. १. जमाव; संख्या; समुदाय; मेळा; समूह : 'या स्वधर्मपूजा पूजितां। देवतागणां समस्तां ।'- ज्ञा ३.९६. २. पंथ; जाती; वर्ग; विभाग; वर्ण. ३. तीन गुल्म सैन्य (२७ रथ, २७ हत्ती, ८१ घोडे, १३५ पायदळ.). ४. गणपतीदेवाच्या हाताखालचा क्षुद्र देवतावर्ग, प्रमथादी शिवगण, शंकराचे सेवक. ५. पंथ, संप्रदाय (न्यायशास्त्र, धर्म यांतील). ६. जमाव; समुदाय; राशी; पुंज; संघ. समासात - अहर्गण, मासगण, वर्षगण इ. = दिवस, महिने, वर्षे, तारे यांचा समूह. ७. सेवक, भक्त यांचा समूह. ८. (ल.) देवाच्या उत्सवातील चोपदार, चवरी वारणारा, पालखी उचलणारा इ. प्रत्येक माणूस, व्यक्ती. [सं.]

**गण** पु. (ज्यो.) फलज्योतिषातील एक संज्ञा. हे गण तीन असून देवगण, मनुष्यगण व राक्षसगण अशी त्यांची नांवे आहेत.

**गण** पु. मंगल प्रसंगी जेवायला किंवा समारंभाला बोलावलेल्या मंडळीतील एक पुरुष. याच्या उलट सुवासिनी. पहा : **गणसवाशीण** [सं.]

**गण** पु. (ग.) १. संख्या; रक्कम; बेरीज; जमा. २. गुण्यांक व गुणकांक एक कल्पून केलेला गुणाकार; वर्ग. [सं. गण् = मोजणे]

**गण** पु. (व्या.) धातूचे रूपाख्यात, धातुपाठातील भ्वादी, अदादी गण. [सं.]

**गण** पु. (शाप.) कोटी; वर्ग; प्रत. [सं. गण् = मोजणे]

**गण** पु. मानस; अभिप्राय; हेतू; खरा उद्देश.

**गण** पु. अक्षरांच्या गुरुलघुत्वावरून दिलेली संज्ञा. गण तीन अक्षरांचा होतो. हे गण आठ असून म, य, र, स, त, ज, भ, न अशी त्यांची नांवे आहेत.

**गण** पु. तमाशातील ईश्वरस्तुतिपर प्रारंभीचे गीत (बहुधा गणपतीचे) : 'माझें नमन आधीं गणा ।' - ऐपो ७. [सं.]

**गण** पु. खेळातील डाव. (ना.)

**गण** पु. गणपती देवता, गजानन. [सं.] (वा.) **० नमणे, ० नेमणे** - १. गणपतीची आराधना करणे, आराधनेसाठी गणपतीची स्थापना करणे. २. धंद्याला लागणे, एखाद्या कार्याला विधिपूर्वक आरंभ करणे. **० देणे, पुजणे** - १. ठोक देणे, मारणे, २. डाव (खेळातील) देणे किंवा घेणे. (व.) **गणचौथ पुजणे** - मारणे; चोप देणे. (ना.)

**गण** पु. (सांकेतिक) राघोबादादा पेशवे यांचे शागीर्द : 'श्रीमंतांचे तेथें गणांचा कारखाना.'- ऐलेसं १२७८.

**गणक** पु. १. कुंडली मांडणारा, पंचांग पाहणारा ज्योतिषी, जोशी; पंचांग करणारा ज्योतिषी : 'ब्राह्मण बोलाविले गणक जोशी ।' - ह २३. ६६. २. मोजणारा, हिशेब करणारा. [सं.]

**गणक, गणंग** पु. १. भाताप्रमाणे शेतात उगवणारे गवत. २. रानभात. (बे.)

**गणक पद्धती** १. मते मोजण्याची पद्धती. २. (अर्थ.) बँकेत पैशाचा भरणा करण्याकरिता किंवा पैसे काढून घेण्याकरिता उपयोगात आणली जाणारी पद्धती.

**गणकयंत्र** न. कमीतकमी वेळात माहिती व ज्ञान, सुसूत्रपणे, हवे त्या स्वरूपात मांडणारे यंत्र, संगणक.

**गणकेतन, गणचिन्ह** न. कुलचिन्ह; देवक; एका गणाचे दुसऱ्या गणापासून वेगळेपण दाखविणारे चिन्ह. आदिवासी जमातीत प्रत्येक जमात आपले कुलचिन्ह पूजनीय मानते.

**गणगटा** पु. कणीस काढलेले जोंधळ्याचे ताट : 'गणगट्याला चिंच्चचा

गोळा लावून तो तोंडात रवी फिरवल्यागत फिरवत राहावा.'- वळीव ४१.

**गणगण, गणगणणे, गणगणा, गणगणीत, गणगणाट, गणगण्या** पहा : **गिणगिण** इ.

**गणगणभोवरी** स्त्री. मुलांचा एक खेळ; अंगाऱ्या भिंगोऱ्या.

**गणगणी** शअ. प्रत्येकी; प्रत्येकाकडून; दर; हर. पहा : **गणीक** (को.) [गणचे द्वि.]

**गणगर** स्त्री. काटेकणगी. पहा : **कणगर** (गो.)

**गणगी** स्त्री. (बुरडी) उदबत्त्या वगैरे करण्यासाठी केलेली जाड चोय.

**गणगूट** न. निकण पाखडल्यानंतर निघालेली कणी, फोलकट, पहा : **मदन**

**गणगोत** न. कुटुंब, घराणे, नातलग, संबंध, सोयरेधायरे, भाऊबंद इ. व्यापक अर्थी : 'गणगोत मित्र तूं माझें जीवन।'- तुगा ७६९.

**गणगौर** स्त्री. बायकांनी चैत्र महिन्यात काढलेली गौरीची-मिरवणूक.

**गणगौळण** स्त्री. तमाशातील सुरुवातीची प्रार्थना आणि वग सुरू होण्यापूर्वीचा कृष्ण व गोपी यांच्यातला संवाद.

**गणणे** उक्रि. १. मोजणे; हिशेब करणे; अजमास करणे. २. (ल.) समजणे; लेखणे; पर्वा करणे; मानणे; महत्त्व देणे : 'जैसे नगणिजे पंचाननें । गजघटांतें ॥'- ज्ञा १.९२. [सं. गण्, गणन = मोजणे]

**गणतगर** स्त्री. न. तगरी या फुलझाडाची एक जात व तिचे फूल.

**गणतंत्र, गणराज्य** न. (राज्य.) ज्यात सर्वोच्च सत्ता मतदानाचा अधिकार असलेल्या नागरिकांच्या हाती असून त्यांना जबाबदार असणाऱ्या प्रतिनिधींच्या आणि अधिकाऱ्यांच्या मार्फत कायद्यानुसार सत्ता राबविली जाते असे लोकनियुक्त सरकार, राष्ट्र.

**गणतंत्रवाद, गणराज्यवाद** पु. प्रजासत्ताक राज्यासंबंधीचा विचार; गणराज्याची रचना व कार्यपद्धती यासंबंधीचा विचार, तत्त्व, सिद्धांत.

**गणता** वि. मोजणारा, हिशेब करणारा : 'वरी एकपणें गणिजे । तें गणतेंनसीं दुजें ।'- अमृ ५.३४.

**गणती** स्त्री. १. मोजणी; मोजदाद; हिशेब; अजमास; संख्या : 'हरि ! हरि ! हरि - हरिणांतचि त्यांची केलीच त्या जनें गणती ।' - मोसभा ५.९२. २. (ल.) गणना; मान; योग्यता; गुमान; किंमत; खिजगणती. समासात - वर्षो- सालो- महिनो - खंडो - गणती = वर्षांनी इ. गणणे. ३. सीमा; अखेर (गो.) (क्रि. करणे). (वा.) ० **नसणे** - निश्चित संख्या सांगता न येणे, मर्यादा नसणे. ० **लागणे** - नोंद होणे; येऊन मिळणे : 'नित्य नवे गणतीस लागती एकांडे देशावरले।' - ऐपो २१६.

**गणदीक्षा** स्त्री. १. जमावात (किंवा शिष्यमंडळीत) दाखल होण्याचा संस्कार; मंत्रोपदेश. २. पुष्कळ लोकांकरिता व्रताचरण; धार्मिक विधी. ३. ज्यात गणपती देव मुख्य आहे असा विशेष प्रकारचा संस्कार.

**गणदीक्षी** पु. १. अनेक जातींचा उपाध्याय; वर्णगुरू; आचार्य; पुरोहित. २. गणेशपूजेची दीक्षा घेतलेला पुरुष.

**गणद्रव्य** न. सार्वजनिक मालमत्ता; सामायिक ठेव; सार्वजनिक किंवा सर्वसाधारण भांडवल : 'गणद्रव्यचोरी करी ।'- गुच २८.५६.

**गणन** न. १. मोजदाद, संख्या मोजणे. पहा : **गणना**. २. रक्कम; बेरीज; एकूण संख्या.

**गणना** स्त्री. १. गणन; मोजणी अथवा हिशेब करणे; गणती; हिशेब. २. (ल.) मान; योग्यता; दर्जा; प्रतिष्ठा. ३. अंतर्भाव; समावेश; [सं. गण्]

**गणनीय** वि. १. मोजला किंवा गणला जाण्यास योग्य; मोजण्यालायक; अजमास करण्याजोगा. २. (ल.) लक्ष्य; विचारार्ह; वर्णनीय; सन्माननीय; मोलवान; लक्षणीय; महत्त्वपूर्ण.

**गणपत** पु. सापसुरळी.

**गणपति-ती** पु. १. गणेश देव, गजानन. २. (ल.) गणोबा; ढेरपोट्या माणूस. ३. (गुऱ्हाळ) कढईतून गूळ बाहेर ओतताना गजाननाच्या नावाने एकीकडे थोडासा काढून ठेवलेला गूळ. यावर गुरवाचा हक्क असतो. ४. (ल.) गूळ खरेदी करताना वजनाच्या पारड्यात टाकायचा दगड. [सं.] (वा.) **गणपतीचे करणे** - स्त्रीने गर्भार होणे. **गणपतीचे नाव घेणे** - प्रारंभ करणे.

**गणपतिपूजन** न. १. कार्यारंभी करायची गणेशपूजा. २. (ल.) कार्यारंभ.

**गणपंचायतन** न. गणपती, शिव, नारायण, रवी व देवी अशा पाच देवता. यांत गणपती प्रमुख असतो.

**गणपूर्ति-र्ती, संख्या** स्त्री. कोणत्याही सभेचे कामकाज कायदेशीर होण्याच्या दृष्टीने आवश्यक असणारी किमान उपस्थित सभासदसंख्या; आवश्यक किमान उपस्थिती. जनसंख्या पूर्ण होणे.

**गणभरती** पहा : **गणपूर्ती** : 'सरकारपक्षाच्या लोकांनीं संगनमत करून दडी दिली असती तर योग्य गणभरती (कोरम) नाही म्हणून अध्यक्षांना सभा बरखास्त करावी लागली असती.'- सासं २.९९.

**गणब(म)णणे** अक्रि. गडबडणे; कां कूं करणे; घाबरलेले अगर गोंधळलेले असणे; शंकित होणे; माघार घेणे; भय पावणे (निषेधार्थी). [ध्व.]

**गणमणचे** अक्रि. दाद घेणे; सांगितलेले ऐकणे. (गो.)

**गणमध्य** पु. पत्रिका अथवा जन्मकुंडलीतील ऐक्य आणि शत्रुत्व या दोहोंहून भिन्न (गणमैत्री किंवा गणवैर नसणे), नवरा व बायको, धनी व चाकर इ.च्या गणांचा भेद. जसे :- एकाचा देवगण तर दुसऱ्याचा मनुष्यगण.

**गणमंडळी** स्त्री. नेमलेली, स्थापना केलेली मंडळी; जूट; तुकडी; टोळी; गट; समूह; टोळके इ.

**गणमैत्री** स्त्री. जन्मपत्रिकेतील गणांमधील मैत्री; एक गण असणे; बहुतेक दोघांचा (नवरा, नवरी; धनी, चाकर) गण एक आला म्हणजे त्यास गणमैत्री म्हणतात. पहा : **गण** ३

**गणवेष** पु. विशिष्ट क्षेत्रातील व्यक्तींना (लष्कर, पोलिस, विद्यार्थी, पोष्ट इ.) ठरवून दिलेला विशिष्ट पोशाख : 'नुसत्या हिरव्या रंगानें ते गणवेष इतके खुलून दिसले नसते.'- सासं २.२१३.

**गणवैर** न. जन्मपत्रिकेतील गणांची प्रतिकूलता, वैर, शत्रुत्व. जसे : - राक्षसगण आणि मनुष्यगण.

**गणशः** क्रिवि. जमाती-वर्ग-टोळी-मंडळीकडून.

**गणसरी, गणसुरी, गणसूर** स्त्री. जिच्या पानांच्या रसाने सूज उतरते अशी वनस्पती; एक औषधी झाड.

**गणसवाशीण** स्त्री. १. गावाचा मेहतर, पाटील किंवा चौगुला याची

बायको; मेजवानी किंवा इतर समारंभातील एक हक्कदार व्यक्ती. गावातील स्त्रियांच्या गावभोजनात हिला पहिल्याने आमंत्रण द्यावे लागते. उत्तरेकडे पाटील किंवा त्या जागेवरील अथवा तत्संबंधीच्या माणसाला गण म्हणतात व त्याच्या बायकोला (किंवा इतर स्त्रीलाही) सवाशीण म्हणतात. २. समारंभातील भोजनप्रसंगी बोलावलेले मेहूण.

**गणसुरंग** स्त्री. एक औषधी वनस्पती.

**गणंग, गणगट** पु. न. १. धान्यातील न शिजणारा दाणा; भिजत घालूनही मऊ न होणारा व शिजवल्यानंतरही टणक राहणारा दाणा; जोंधळा इ. धान्याच्या लाह्या केल्या असता त्यातला न फुटलेला दाणा. २. (ल.) मूर्ख, टोणपा, अक्षरशत्रू, ठोंब्या, मतिमंद माणूस.

**गणा** पु. १. जोंधळा किंवा बाजरीच्या ताटाचा शेंडा अथवा शेंड्याचा भाग. २. साळ्या-कोष्ट्यांची चाकावरील सूत गुंडाळण्याची बोरूची किंवा वेताची कांडी, कांडीकरिता घेतलेला ताटाचा तुकडा.

**गणा** पु. तेल लावून करतात ती भाकरी.

**गणा** पहा : **गणगूट**

**गणागणपा** पहा : **गण्यागंप्या** : 'कुणा गणागणपांची पोरे...' - मक १९५९.

**गणान्न** न. १. अनेकांच्या मालकीचे (भात अथवा इतर) धान्य; सगळ्यांनी करून ठेवलेला धान्याचा पुरवठा, बेगमी. २. समाराधनेसाठी तयार केलेला स्वयंपाक; अनेकांचा एकत्र स्वयंपाक. [सं.]

**गणावचे** अक्रि. रेंगाळणे. (गो.)

**गणांत** पहा : **गळंत**

**गणिक-त** शअ. १. बरोबर, सह, मागे, ला : 'ओ देत होतो दर हांके गणिक।' - तोबं १३. समासात - माणसागणिक, मुलागणिक इ. २. दर; प्रत्येक (समासात) उदा. वृक्षा-खिडकी-गृहा-खेपेगणिक इ.

**गणिका** स्त्री. वेश्या; कलावंतीण; कसबीण : 'भिक्षा मागुनि दारोदारीं फेडिन ऋण गणिकेचें ।' - मृच्छ ३५. [सं.]

**गणिकारिका** स्त्री. अरणी नावाचे लहान झाड. [सं.]

**गणित** न. १. अवकाश आणि आकडे ह्यासंबंधीचे शास्त्र. अंकगणित, बीजगणित व भूमिती ह्या गणिताच्या तीन प्रमुख शाखा आहेत. व्यक्तीला आपल्या दैनंदिन जीवनात उपयोगी पडणाऱ्या मूलभूत गणिताला व्यावहारिक गणित असे म्हटले जाते. २. हिशेब; गणनक्रिया; मोजदाद; आकडेमोड व आकडेमोडीने सिद्ध केलेले फल. (सामा.) बेरीज. ३. गणती; संख्या; माप : 'ह्याशिवाय झमकती पागा नाहीं गणित ।' - ऐपो १४०. ४. प्रश्न; ज्योतिष. (गो.) (वा.) **गणीत बोलणे** - भविष्य सांगणे.

वि. मोजलेले, गणलेले, हिशेब केलेले. [सं.]

**गणितशास्त्र** न. व्यक्त किंवा अंकगणित आणि अव्यक्त किंवा बीजगणित असे प्रकार ज्यात अंतर्भूत होतात असे शास्त्र. आधुनिक गणितशास्त्रात वरील प्रकारांखेरीज भूमिती, त्रिकोणमिती, स्थितिगतिशास्त्र, जलगतिशास्त्र, ज्योतिर्गणित, कलन इ. दुसरे अनेक प्रकार आहेत.

**गणितश्रेढी-धी, गणितप्रमाणश्रेढी-धी** स्त्री. एकाच नियमित अंकाने (अंतराने) कमी होत जाणाऱ्या अगर वाढत जाणाऱ्या संख्यांची मालिका. उदा. ५,८,११,१४ इ. किंवा १२,१०,८,६ इ. [सं.]

**गणिती** वि. गणित जाणणारा; गणित्या; गणितज्ञ.

**गणित्र** न. मोजणी करणारे, मापन करणारे यंत्र.

**गणिमी** स्त्री. १. गनिमी; द्वेष; शत्रुत्व; वैर. (क्रि. करणे, मांडणे, चालवणे.) २. क्षोभ, बंडाळी, दंगा, (सामा.) दंगा माजविणारी कृत्ये; दंगाफिसाद.

**गणिया** पु. एका गणेशस्तोत्रातील पहिला शब्द; विद्यार्थ्यांनी आपले धडे पाठ झाल्यानंतर सूर्यास्ताच्या वेळी म्हणायचे गणेशस्तोत्र. (क्रि. म्हणणे.)

**गणी** स्त्री. १. वाटणी. २. गणती : 'उरला ऐवज दामाशाही गणीप्रमाणे घ्यावा.' - धापइसा ३.१२.

**गणेय, गणितव्य** वि. गणन, हिशोब करण्यायोग्य; मोजण्याजोगे. [सं.]

**गणेरी** स्त्री. सोनसांवर.

**गणेशकंद-कांदा** पु. बांडगुळाच्या जातीची एक वनस्पती.

**गणेशगोमा** पु. (विरु.) गोमागणेश. लांडा कारभारी, लुडबुड्या माणूस, लटपट्या पुरुष.

**गणेशटेबल** पु. (उप.) पोलीस शिपाई (कॉन्स्टेबल), विशेषतः गोरा सार्जंट : 'या सर्वांनी एका यःकश्चित गणेशटेबलाच्या म्हणण्यावरून प्रथम अशा ढोबळ चुका कराव्या ....' - लोटिकेले १.३९५.

**गणेशटोपी** स्त्री. (मुलांच्या खेळातील किंवा क्षेत्रातील शब्द) एखाद्याला बडविण्यापूर्वी कोणी मारले हे त्याला न समजावे म्हणून त्याच्या डोक्यावर घातलेले वस्त्राचे घुंगट, असे घुंगट एखाद्याला घालण्याची क्रिया. (क्रि. घालणे.) (वा.)० **घालणे** - १. मूर्ख बनवणे, चेष्टा करणे. २. फसवणे, लुबाडणे, टोपी घालणे.

**गणेशथापटी** स्त्री. होळीच्या सणातील एक खेळ. एखाद्याला गणेशटोपी घालून डोक्यावर थापट्या मारणे किंवा धोतराच्या तोब्याने चोपणे. चोपणाऱ्याला ओळखले म्हणजे ज्याला चोपले त्याच्यावरील डाव जातो.

**गणेशधौती** स्त्री. एरंडेलांचे बोट गुदद्वारात फिरवून मळ काढणे.

**गणेशपट्टी** स्त्री. पुढील दरवाजाच्या वरची आडवी पट्टी; दाराच्या चौकटीचा वरचा भाग. हिच्यावर मधोमध गणपतीची मूर्ती कोरलेली असते.

**गणेशपूजा** पु. १. गणपतीचे पूजन. २. कथा इ. समारंभात वाटलेली खिरापत.

**गणेशवात** न. कापसाची २१ सुतांची चार बोटे रुंदीची वात. या वाती गणेशचतुर्थीपासून दररोज २ याप्रमाणे वर्षभर लावतात किंवा एकदम लक्ष वाती लावतात.

**गणेशवेल** स्त्री. आकाशवेल. या वेलीला फक्त पावसाळ्यात चांदण्यांसारखी छोटी तांबडी फुले येतात.

**गणेशिया** न. कोळी लोकांचे घरफोडीच्या हत्याराचे सांकेतिक नाव.

**गणैक्य** न. वधूवरांच्या लग्नकुंडल्यांची मैत्री. पहा : **गणमैत्री** [सं.]

**गण्णाठे** न. पायलीचा बत्तिसावा भाग (गो.).

**गण्य** पहा : **गणनीय**

**गण्या** पु. १. खंड्या; पाणकावळा; ढिसा; मासे खाणारा एक पक्षी. २. गणा कोष्ट्याची सूत गुंडाळण्याची कांडी.

**गण्यागंप्या** वि. सोम्यागोम्या, सर्वसामान्य माणूस.

**गत** वि. १. गेलेला; नष्ट; निघून गेलेला; जुना; मागचा. समासात - गत - इतिहास - काल इ. २. कडे, आत जाणे, आत स्थिरावणे किंवा बसणे. उदा. अतंर्गत, मध्यगत, हस्तगत, (वा.) ० **होणे** - १. लोटणे; गुजरणे; जाणे; घालवणे (वेळ, काळ). २. निघून गेलेला असणे (या जगातून); नष्ट होणे; मरणे.

**गत** शअ. साठी; करिता.

**गत** स्त्री. १. वाद्यात वाजविण्यासाठी कोणत्याही रागातील स्वरांची तालबद्ध रचना. ताल; ठेका; वाद्य वाजविण्याचा प्रकार. रीत, तान, मिलाफ. २. (संगीत) फिरक, फिरकी; झील; कंप. (क्रि. घेणे.) [सं. गति]

**गत** स्त्री. १. बरे होण्याचा उपाय, तोड, युक्ती. २. आश्रय. [सं. गति]

**गत** स्त्री. ताकद. पहा : **गती** (बे.) [सं. गति]

**गत** स्त्री. १. स्थिती; अवस्था; दशा; पूर्वावस्था जाऊन आलेली दुसरी अवस्था; अवस्थांतर (वाईट अर्थाने). २. भूत, पिशाच्च यांनी बाधा करायची सोडून घेतलेली मुक्ती. (क्रि. घेणे.) ३. शेवट; परिणाम; निकाल. ४. मार्ग; प्रकार; तऱ्हा (समान, सारखा, सदृश असे दाखविताना) : 'खरेंच बाई, अगदीं नाटकागत सगळें वाटत आहे.'- वेबा. [सं. गति] (वा.) ० **लावणे** - निकाल लावणे; काम करून देणे : 'अगोदर तिची (कुसात्याची) गत लावायला हवी.'- पडघ १४३.

**गत** भूधावि. (ज्यो.) अस्त; मधून गेलेले (ग्रहांच्या संक्रमणात नक्षत्र, राशी).

**गतक** न. मिष; ढोंग; बहाणा; सोंग (दारिद्र्य, वेड, दुखापत, वेदना यांचे), किंचित असता फार करणे. (क्रि. घेणे, करणे.)

**गतक** न. १. गद्यपद्याचा छोटासा व रसभरित चुटका; मजेदार विनोदी कवन (भाट, बंदीजन, भिक्षेकरी यांनी गाइलेले); न्यायप्रचुर वचन अथवा म्हण. २. मनोरंजक, हास्यकारक गोष्ट. (को.) ३. लांबलचक भाकडकथा; कंटाळवाणी गोष्ट. (क्रि. लावणे, लागणे.) ४. दुसऱ्याने घाबरे व्हावे किंवा चमत्कार वाटून हसे यावे, असे भाषण किंवा भाषणाची नक्कल.

**गत(द)का** पु. १. घामाघूम स्थिती; घामाची चिकचिक; उबणे; गदगद. २. उकाडा; उबारा; गरमी. ३. उकळणे; शिजणे; खदखद; उकळी; कढ. (क्रि. येणे.) ४. पिकणे (ताठरलेले व विकोपास गेलेले गलांड, गळू); आग, तळमळ (खरजेची). ५. उमाळा, आवेश, हुंदका, उकळी, क्षोभ (ममता, इच्छा, रडे, हास्य यांचा) (क्रि. येणे.) ६. सोटा.

**गतकाळा-ळ्या** वि. कांगावा, अकांडतांडव करणारा, थोडेसे मारले असता जीव तोडून ओरडणारा; श्रीमंत असून दारिद्र्याचा बहाणा करणारा; वेड्यांचे सोंग आणणारा; ढोंगी : 'गावातनं मिरवनी काढतोय काय त्यो गतकाळीचा !'- रैत ७५.

**गतकाळा** पु. समुदाय.

**गतकुळी-ळ** स्त्री. न. पूर्वज.

**गतकुळी, गतकूळ** वि. १. माणूस वा शेतकऱ्याच्या ग्रामत्यागाने पडून राहिलेली (जमीन, शेत, वतन, मिरास). २. मालक किंवा कोणाचा वंशपरंपरेचा हक्क नसलेली (जमीन इ.) अशी जमीन गावच्या मालकीची समजून तिची विल्हेवाट लावीत किंवा सरकार ती इनाम देत असे.

**गतकेडी** वि. निर्लज्ज. (बे.)

**गतक्या** वि. १. पहा : **गतकाळा**. २. विनोदी; नकल्या; गोष्टीवेल्हाळ.

**गतणे** अक्रि. १. काही एक गोष्ट होऊन जाणे. २. (ल.) मरणे. पहा : **गतला** [सं. गम्-गत]

**गतधवा** स्त्री. विधवा; जिचा नवरा मेला आहे अशी स्त्री : 'नगरिगतधवा ते आणि निर्वीर्य योद्धे ।'- वामन भरतभाव ३. [सं.]

**गतप्राण** वि. १. मृत; मेलेला. २. (ल.) भ्रांतचित्त; भयभीत; बेशुद्ध. [सं.]

**गतभरणा** पु. मृदंग आदी वाजविण्याच्या रीती; तान, सूर, राग, रागिणी यांचा साठा, संग्रह.

**गतभर्तृका** स्त्री. विधवा. पहा : **गतधवा** [सं.]

**गतमत** स्त्री. (मुलांच्या बोलीत) एकोपा; सल्ला; गुप्त विचार किंवा उद्देश.

**गतयेडा** पु. वेडाचे सोंग घेतलेला शहाणा माणूस. (अहि)

**गतवीर्य** वि. १. पुरुषत्वहीन; षंढ. २. (ल.) नेभळा; हताश; दुर्बल. [सं.]

**गतश्री** वि. दरिद्री; दैवहीन; अभागी; वैभव, संपत्ती नष्ट झालेला. [सं.]

**गतसत्त्व** वि. निर्जीव; निर्वीर्य; दुर्बळ. [सं.]

**गतागत** न. वारंवार हालचाल जा-ये करणे; पुनरपि चलनवलन; अस्तोदय : 'नेणे सूर्याचें गतागत । केला भ्रांत कंदर्पे ।'- एभा २६.८५. [सं.]

**गताड** न. अजस्र, अगडबंब जनावर (गाय, म्हैस). (राजा.)

**गताडी** स्त्री. गवाणी; गव्हाण. (कु.)

**गताड्या** वि. वेंधळा. (अहि.)

**गतानुगतिक** वि. १. पुढे गेलेल्यांच्या मागून (पूर्ण विचार न करता) डोळे मिटून जाणारा; अज्ञानाने परंपरागत चालणारा किंवा वागणारा. २. (ल.) अडाणी; मूर्ख; बुद्धीचा उपयोग न करणारा. ३. परंपरेने चालत आलेले (आचरण, गोष्ट); ठोकळेबाज.

**गतायु-यू, गतायुषी-ष्य** वि. १. अत्यंत वृद्ध; म्हातारा. २. ज्याचे आयुष्य संपले आहे असा; मृत : 'जैसें गतायुषी शरीरीं । चैतन्य वासु न करी ।' - ज्ञा ३.१०९; 'पैं घातयाही पायां पडतां । नुठी गतायु पंडुसुता ।' - ज्ञा १६.१२९. [सं.]

**गतार्थ** वि. १. समजलेला; दर्शविलेला; अभिप्रेत; अध्याहृत; सूचित केलेला. २. साधलेला; तडीस नेलेला; संपादलेला. ३. दरिद्री झालेला.

**गताल(ळ)का** वि. केशविहीन स्त्री; वपन केलेली स्त्री; विधवा : 'गतालकाही अंगीकारी ।'- एभा २३.२७९. [सं.]

**गतावणे** अक्रि. जाणे; शेवट होणे; मरणे. [सं. गत]

**गति-ती** स्त्री. १. जा ये; चळवळ; हालचाल; गमन; धाव; प्रयाण; चाल; प्रगती : 'रथाची गती ॥' - ज्ञा १७.३८९. २. वर्तन; वागणूक; चाल; पद्धती : 'परी ते गती समस्तां । न मनेल ययां ॥' - ज्ञा २.२०३. ३. आकाशस्थ गोलांचे एकंदर परिभ्रमण, फेरी. ४. ग्रहाची आपल्या कक्षेतील दैनिक फेरी. [सं.] (वा.) ० **करणे** - पुढे जाणे; प्रगती करणे : 'इंग्रजी भाषेत बरीच गति केली होती.' - आत्मवृत्त ६. ० **नसणे** - एखादा विषय समजण्याची स्वाभाविक बुद्धी नसणे. ० **होणे** - प्रवेश होणे; समजणे : 'त्यांची संस्कृतात गती झाली होती.' - कोरकि ४२९. **गतीवर येणे, गतीस येणे** - १. कृत्रिम (वेष, मुखवटा)

टाकून मुळावर येणे. २. ताळ्यावर येणे; पूर्वीचे वर्तन टाकणे; सुधारणे.

**गति-ती** स्त्री. १. स्थिती; दशा (मुख्यत्वे वाईट अर्थी) : 'पुसति बापाजी झाली हे कां गती ।' - मोअभंग सीतागीत (नवनीत २५९.) २. प्रारब्ध; दैव; घटित; नशिबाचा फेरा. ३. आयुष्यातील बाल - तरुण - वृद्ध अवस्था. ४. प्रकार; अवस्था. ५. मोक्ष; सद्गती; मुक्ती;, उत्तम लोक : 'उत्तम साधन आइका कोण गति अवगति ।' - तुगा ४२८. ६. गत; पर्यवसान; शेवट : 'अखेर संग्रामाच्या गति ।' - ऐपो २२. ० करणे - गत करणे; ठार मारणे. ७. इलाज; उपाय. (वा.) **गतिवर घातलेला, पडलेला** - मरणोन्मुख झालेला; मरावयास टेकलेला. ० **मिळणे** - मुक्ती मिळणे. **गती करणे** - ठार मारणे.

**गति-ती** स्त्री. १. आश्रय; कृपास्थान : 'गति तूंचि आमुची वा आश्रय आम्हासि तूंचि मावासा ।' - मोकर्ण ४२.७. २. इलाज; उपाय : 'तसें केल्यावाचून व्यापाऱ्यांस गतीच नाही.' - विक्षिप्त १.९९. ३. खरे स्वरूप; खरा अर्थ; मर्म : 'अगा गति कळावी कर्माची.... गहन कर्माची गति म्हणोनि।' - यथा ४.४२०. ४. आवाका; पोहोच; आटोप; टप्पा; प्रसार. (समासात) कल्पना - कौशल्य - चातुर्य - शौर्य - गती वगैरे. ५. चढती पायरी; भरभराट; सुस्थिती; आबादानी; प्रगती.

**गति-ती** स्त्री. वाजविण्यातील एक प्रकार, रीत : 'गति ग पखवाजावर झडती ।' - प्रला १३४.

**गतिकी** स्त्री. (भौ.) पदार्थांच्या गतीवर परिणाम करणाऱ्या किंवा त्यात बदल घडवून आणणाऱ्या शक्तींशी संबंधित असलेली भौतिकशास्त्राची शाखा. २. (शिक्षण) एखाद्या घटनेच्या कारणात अंतर्भूत असणारे गतिशील कार्यात्मक संबंध. यामध्ये प्रामुख्याने वर्तनामागील भावनात्मक घटकांचा समावेश केला जातो. ३. अवकाशातील पदार्थांच्या गतीचे विज्ञान.

**गतिगती** क्रिवि. हळूहळू. (व.)

**गतिचक्र** न. (यंत्र) यंत्र चालू करणारे मोठे चाक. [सं.]

**गतिज ऊर्जा** (भौ.) पदार्थाला त्याच्या गतीमुळे प्राप्त होणारी ऊर्जा, कार्यशक्ती.

**गतिज सिद्धांत** (भौ.) द्रव्यातील कण एकसारखे यदृच्छेने हालचाली करीत असतात या मूलभूत कल्पनेवर आधारलेला, द्रव्याच्या गुणधर्मांचे स्पष्टीकरण करणारा सिद्धांत.

**गतिदाता** वि. (इहलोकापासून, विभक्तपणापासून किंवा जन्ममरणापासून) बंधमुक्त करणारा; मुक्तिदाता; ईश्वर. [सं.]

**गतिफल** न. दोन ग्रहांच्या परिभ्रमणांतील वेळांचे अंतर. [सं.]

**गतिबोधनशास्त्र** न. (शिक्षण) स्पर्शज्ञान व लिहिता येण्यास आवश्यक असलेली स्नायूंची हालचाल ह्यांचा अंतर्भाव असणाऱ्या गिरवण्याच्या किंवा लिहिण्याच्या द्वारा शब्दज्ञान करून घेण्याचे शास्त्र. मूकबधिर मुलांना किंवा माँटेसरीच्या शिक्षणपद्धतीत लहान मुलांना लेखन-वाचन शिकविताना या शास्त्राचे उपयोजन केल्याचे आढळून येते.

**गतिभंग** पु. अवरोध; प्रतिबंध; अडथळा. [सं.]

**गतिभ्रंश** पु. खोळंबा; आडकाठी; खळ; खोटी (कोणतेही गमन किंवा चाल यामध्ये). [सं.]

**गतिमंडल अंगहार** (नृत्य) आखंडल स्थान करून हात रेचित करणे व उजवा पाय उद्घटित करून मत्तल्ली, आक्षिप्त, उरोमंडल व कटिछिन्न ही क्रमाने करणे.

**गतिमति** स्त्री. चाल आणि बुद्धी : 'तेयांचि गतिमति क्षाळली.' - लीचपू १९८.

**गतिमान** वि. १. चालणारा, हलणारा, गतिशील, गतीत असणारा; सारखा पुढे पुढे जाणारा. २. सुसाट, झंझावाती; तडाखेबंद. [सं.]

**गतिमानता** स्त्री. वेग; सतत वाढण्याची, पुढे पुढे जाण्याची क्रिया : 'दारिद्र्याची गतिमानता किंवा प्राप्तीमधला चढउतार गुन्हेगारीला विशेषेकरून कारणीभूत होतो.' - चंद २०. [सं.]

**गतिमापक** पु. (भौ.) शक्तीचे मापन करणारे उपकरण. [सं.]

**गतिविलास** पु. चालण्यातील कौशल्य : 'मुग्धा गतिविलासाचा सराउ देती.' - शिव ३४१.

**गतिशास्त्र** न. वस्तूंच्या गतीशी अथवा स्थितीशी संबंधित शक्तीचा अभ्यास करणारी अभियांत्रिकीची शाखा; ज्या नियमांनी पदार्थाला गती मिळते त्यांचा विचार करणारे शास्त्र.

**गतिशील** वि. १. गती, चेतना किंवा कृती इत्यादींनी युक्त; गतिमान. उदा. गतिशील समूह, गतिशील विचारसरणी, गतिशील प्रक्रिया. २. जंगम.

**गतिहीन** वि. १. आश्रय, आधार किंवा उपाय नसलेले; अनाथ. २. हालचालरहित; स्थिर; कुंठितगती. [सं.]

**गत्य** स्त्री. गत; अवस्था : 'गोमाजीपंताची गत्य व्हावयाची.' - ऐसंसाखं ११.१३.

**गत्यंतर** न.अन्य मार्ग, इलाज, विकल्प; पर्याय; उपाय. (नसणे.) [सं.]

**गत्या** क्रिवि. अनुसरून; रीतीने; योगे; मार्गाने; सहित. (समासात) स्वभाव, दैव - कर्म - प्रारब्ध - वस्तू - आत्म - भेद - गत्या.

**गथागोवा-वी-व** पु. स्त्री. १. घोटाळा; गुंतागुंत; घालमेल; पेच; गोंधळ. (लक्षणेने व शब्दशः उपयोग) : 'जन्म हेचि अकारण । गथागोवी ।' - दास ३.१.४. २. घालमेली इ. चे काम, धंदा.

**गद** पु. रोग; आजार : 'शरीरीं गद देतिल धडका ।' - राला ९२. [सं.]

**गद** स्त्री. खड्डा; चर : 'तेव्हा तिथे कुणी नसले तरी खोदलेल्या सहा गदी दिसत.' - व्यंमाक १३५.

**गदक** पु. मंत्र म्हणणारा : 'गदक भिषक आणि तपी। प्रतिज्ञा करोनि बैसले जपीं ।' - मोआदि ८.५० [सं.]

**गदक** पु. १. खदखद; कढ किंवा त्याचा आवाज. (क्रि. येणे.) २. उकळत्या वस्तूचा फेस; ऊत.

**गदका** पहा : **गतका**

**गदगद** स्त्री. १. खाज; कंड (क्रि. सुटणे) २. उब; उकाडा. ३. कढ; उकळी; कढ - उकळीचा आवाज. ४. हसणे; हसण्याचा आवाज. [सं. गद्गद]

**गदगद-दा** क्रिवि. शिजण्याचा किंवा उकळीचा खदखद असा होणारा आवाज. २. खुलेपणाने, मोकळेपणाने, आनंदाने (हसणे); 'मम अभिलाष धरूनी। गदगदां हांससी पापिणी ॥' - नव २०.२४. ३. ओक्साबोक्शी, जोराने हुंदके देऊन (रडणे.)

**गदगदणे** अक्रि. खदखदणे (आधणातील पदार्थ).
अकर्तृक क्रि. १. उकडणे; गदमदणे. २. उकाड्याने, गुदमऱ्याने घामाघूम होणे. ३. गदगदून येणे, जबरदस्त क्षोभ किंवा मनोवृत्तीने कंठ दाटून येणे, गहिवरणे. [ध्व. सं. गद्गद]

**गद(दा)गदा** क्रिवि. जोराने मागेपुढे होईल अशा प्रकारे : 'जांभळांनी लहडलेली एक फांदी मी गदगदा हलवली.' - व्यंमाक ११५.

**गदगदाट** पु. हसण्याचा ध्वनी : 'थोर हासे गदगदाटें ।' - मुसभा १४.४०. पहा : **गदगद** [ध्व.]

**गदगदून** क्रिवि. १. जोराने : 'गुत्त्यात गदगदून गदगदून हसणारा घात्रू.....' - किरिस्ताव ४२. २. हुंदके देत; गळा दाटून येऊन : 'ती गदगदून रडू लागली.' - पूपु

**गदगा, गदगी** पु. स्त्री. चामड्याने मढविलेली काठी, सोटा; तलवारीचे हात शिकण्याचे एक हत्यार. त्याबरोबरच चामड्याची एक लहान ढाल (फरी) असते. [क. गुदिगे] [सं. गदा]

**गदगी, गजगी** स्त्री. खांबाखालचा दगड; खुर्ची; उथळे; तळखडा. (कर.)

**गदबळणे** १. अक्रि. गोंधळणे; गडबडणे; घोटाळ्यात पडणे; २. सापडेनासे होणे. [ध्व.]

**गदम** वि. पावसाळा संपल्यानंतर ज्या ठिकाणी फार दिवस ओल राहते असे स्थळ; पाणथळ; चिबड, दलदलीचे (शेत, जमीन). (राजा.)

**गदम** न. गलबत थोड्या पाण्यात असताना त्याला दिलेला टेका. पहा : **गदाम** (कु.)

**गदमणे, गदमदणे** अकर्तुक क्रि. उकडणे; उष्मा होणे.[सं. गज् + मद]

**गदमद** स्त्री. १. गुदमरा; उकाडा. २. अतिशय गदगदणे; तलखी; घामाघुमी.

**गदमळणे** अकर्तुक क्रि. मळमळणे; ढवळणे.

**गदर-री** स्त्री. न. १. बंड; गर्दी : 'महादजी पाटिलावरी आपण चालोन गदर केली.' - मइसा १५.३३. २. वैर; विश्वासघात; खोटा आरोप ३. दंगा; हल्ला; तुफान (वा.) ० **करणे** - (एखाद्याभोवती) गर्दी करणे; (एखाद्यावर) चालून जाणे. [फा.]

**गदर** पहा : **गजर**

**गदरणे** अक्रि. १. फुगून पिकण्याच्या स्थितीला येणे (फळ, गळू). २. घामाघूम होणे.

**गदरा, गदरेल** वि. परिपक्वतेस आलेले (विड्याचे पान, फळ). [हिं.]

**गदल** वि. गढूळ : 'शंकेचेनि गदलपणें । जें शुद्ध प्रमेय मैलणें ।' - राज्ञा १३.३२३. [क. गदलु]

**गदळ, गदळपण** न. १. घाण; गढूळपणा, रेंदा, राड (प्रवाही पदार्थातील). २. गाळ; कचरा; मळ. ३. केर; धूळ; तूस; भूस (धान्यातील). ४. (सामा.) एखाद्या वस्तूतील निरुपयोगी भाग. ५. गाळसाळ; हेंदळ; धुरळा. ६. माजलेले व घाणेरडे गवत; रान.
वि. १. घाणेरडे; मळकट; मलीन; गढूळ; भिकार; क्षुल्लक; कवडीमोल; ओंगळ; हिडीस (पाणी, माणूस, वस्तू, गोष्ट). २. क्षुब्ध (मनोविकार इ. च्या प्राबल्यामुळे). [क. गदलु]

**गदळ** पु. अव्यवस्था; गोंधळ; घोटाळा; धांदल. (वस्तू, कामकाज यांतील.)
वि. घोटाळ्याचे; गडबडीचे; घालमेली; गबाळी (कृत्य, पुस्तक.).

**गदळणे** उक्रि. १. मळकट, गढूळ करणे : 'नभ पृथ्वीरजें न गदळे ।' - एभा ७.४४८. २. घालमेल करणे; विसकटणे; दुर्दशा करणे.
अक्रि. गवत, रान भाजून खराब होणे. (पीक, शेत)

**गदळप्रीति** स्त्री. भयगंड.

**गदळांवचे** सक्रि. गोंधळात टाकणे. (गो.)

**गदा** स्त्री. १. लांब दांड्याचे व टोकाला मोठा गोल जोडलेले एक प्राचीन आयुध; लोखंडी अर्गळा. २. कांब. ३. (ल.) घाला; हल्ला; धाड. (क्रि. येणे, आणणे.) : 'मूळ व्यापारावर इंग्रजांनी गदा आणली.' - के १७.६.३० [सं.]

**गदा** पु. १. भिकारी. २. भीक; मधुकरी : 'तुका म्हणे वृत्ती सांडुनि । गदा मागत जाती ॥' - तुगा ४१२. [फा.]

**गदाई** स्त्री. एक भिक्षेकरी जात; मेढे जोशांच्या पाटलाची कुळी. - गांगा ३० [फा.]

**गदाकवक** न. (वन.) गदाबीजुके निर्माण करणारा एक कवकगट.

**गदाणा** पु. कंदमय वनस्पती.

**गदादणे** अकर्तुक क्रि. १. उकडणे; गुदमरणे; लाही लाही होणे : 'गदादीत काया समुद्रांत घाली ।' - राक खं. १.९. २. उकाड्याने उबणे; घामाघूम होणे.

**गदाधर** पु. पाणी पिण्याचे विशिष्ट भांडे. [सं.]

**गदाम** न. (नाविक) गलबते चोपडण्यास लावतेवेळी ती तराजूसारखी राहण्यासाठी दोन्ही बोडतांना, पाण्यात लाकडे उभी करून त्यांना बांधतात त्या आडव्या दांड्या. (हेट)

**गदारणे** क्रि. १. तृप्त होणे. २. उकडणे.

**गदा(द)रोळ, गदा(द)रोळी** पु. स्त्री. १. मोठा गोंगाट; गजर; ओरडणे : 'सभोंवते मिळोनि गोपाळ । गदरोळ करिताती ।' - ह १३.४५; 'करूं गदारोळी हरिकथा ॥' - तुगा १८११. २. (ल.) मोठे पांडित्य; निरूपण : 'निजमंडपीं शिशुपाळ । करीत होता गदारोळ ।' - एरुस्व १२.१. ३. लढाईतील वीरांच्या आरोळ्या. ४. लढाई; लढाईतील धुमश्चक्री : 'सांडीनि गदारोळु । मज एने घातला आळु ।' - शिव १९२. ५. खटाटोप; प्रयत्न : 'तेणें करविला हा गदारोळ । ग्रंथरचनेचा॥' -विवेकसिंधू. [सं. गद् + आरोळ]

**गदाळणे** अक्रि. थकणे : 'भोलूबाई नृत्यकारणाने गदाळून गेल्यामुळे....' - एहोरा २१.

**गदाळा** पु. १.घाण; अनेक प्रकारच्या घाणीची राड : 'जनावरांचे शेण व गदाळा बाहेर नेऊन टाकीत.' - माआ ३०. २. गवत : 'बारका गदाळा बांधायचं जाळं घ्यावं नि कोंबड्याला धरावं.' - गोता २२३.

**गदाळ्या** वि. धांदरट; खुळचट.

**गदिनागांठा** पु. बाळी-बुगडी; जडावाचे दागिने.

**गदी** वि. रोगी; आजारी : 'अमृतहि पितां न स्वास्थ्यांला वरील गदी क्षण।' - मोअंबरीष (नवनीत) पु. ३६९. [सं. गदिन्]

**गदी** स्त्री. गाढवी : 'गदी मारगी लावली ।' - एहोरा कोकणी ३६.

**गदी** स्त्री. गोट्या खेळण्याचा किंवा विटी दांडूतली विटी आडवी ठेवून उडवण्याचा लहान खड्डा; गल, गली.

**गदी** हौदा (हत्तीचा).

**गदीन** वि. गदायुद्धनिपुण; गदाप्रवीण : 'श्रीकृष्ण म्हणे हा रे भीमा जरि तूं महाभुज गदीन ।' - मोउद्योग ६.१८.

**गदुल्या** स्त्री. उनाडक्या; थट्टा.

**गदेपदे, गद्देपद्दे** पु. अव. १. टाळाटाळी; अळंटळं; चालढकल; बहाणे; सबबी; लबाडीची चुकवाचुकवी. २. (सामा.) छक्केपंजे; पाचपेच; डावपेच. [सं. गद्यपद्य]

**गदेरा** पु. गदळ; घाण. (बे.)

**गदेला** पु. १. मोठी गादी; सभागृहात पुष्कळ मंडळी बसतील अशी केलेली बरीच लांबरुंद पातळ गादी : २. हत्तीच्या मानेवर घातलेली उशी. (बसणाऱ्यास दोर टोचू नये म्हणून.) [हिं. गद्दी]

**गदेला** पु. निरनिराळे आकार द्यायची ऐरण.

**गदोगदो, गद्ना, गदनारी** क्रिवि. भरभर. [क्रि. चालणे.]

**गद्गद्, गद्गदध्वनि-नी, गद्गद्वाणी** पु. स्त्री. अंत:करण उचंबळून आल्यामुळे तोंडातून निघणारा अडखळता किंवा अस्पष्ट आवाज, उमासा; जोराचा हुंदका; दाबलेले रडणे. [सं.]

**गद्दा** पु. गदेला; मोठी गादी. (ना.) [हिं. गद्दी = गादी]

**गद्दा** स्त्री. भात : 'सव्वा मण गद्दा वो, गद्दा दिली खात्या व.....' - एहोरा २.१२२.

**गद्दार** वि. बंडखोर; विश्वासघात करणारा; द्रोह करणारा. [फा.]

**गद्दारी** स्त्री. बंडखोरी; बेइमानी; धर्मद्रोह; देशद्रोह : '१९४७ साली आम्ही हिंदुस्थानशी गद्दारी केली.' - सोबा १५.

**गद्दी, गद्दी जमीन** स्त्री. नदी किंवा तलाव यांच्या काठची मळईची जमीन, मळई; मळी. २. अव्वल प्रतीची भातजमीन.

**गद्धा** पु. गाढव. (ल.) मूर्ख. [सं. गर्दभ]

**गद्धागद्धी** स्त्री. मुलांचा एक खेळ.

**गद्धारा** पु. तलवारीचा एक प्रकार.

**गद्धेकोट** पु. पत्त्यांचा एक खेळ : 'निदान गद्धेकोट खेळू.' - आआशे ५९.

**गद्धेपंचविशी** स्त्री. ज्या काळात मनुष्य मूर्खपणाने, अविचाराने वागतो असा पंचविशीच्या आसपासचा ऐन तारुण्याचा काळ.

**गद्धेमल्हार** पु. (निंदार्थी) १. गाढवांच्या ओरडण्याचा मिलाफ. २. (ल.) वाईट, कर्कश गाणे इ. ३. (ल.) मूर्ख माणूस. [हिं.]

**गद्य** न. १. सामान्यत: आपण जसे बोलतो किंवा लिहितो ते भाषेचे रूप; छंदोचरण इ. चे नियम न लावता वापरली जाणारी सामान्य व्यवहारातील भाषा; (सामा.) छंदोरहित प्रबंध, लेखन, भाषा. २. साधी वाक्यरचना. ३. (ल.) अरसिक, बेचव, कंटाळवाणे विवेचन, नीरस लेखन.

**गद्यकाव्य** न. काव्यमय विचारांची व कल्पनांची गद्यमय मांडणी. [सं.]

**गद्यगीत** न. गद्यरूपात केलेला भावनाविष्कार. [सं.]

**गद्यपद्य** न. १. छंदोरहित व छंदोबद्ध रचना. २. (ल.) छक्केपंजे; डावपेच; कपट; कारस्थान; कावा; कुलंगडे; दगा. पहा : **गदेपदे** [सं.]

**गद्याण-न** न. ४८ गुंजा वजनाचे प्राचीन काळात वापरले जाणारे सोन्याचे नाणे : 'या लेखात गद्यान नावाच्या सुवर्णनाण्याचा उल्लेख आहे.' - पंवि २८.

**गधडा** पु. १. गाढव (तिरस्कारार्थी वापरतात.). २. अजाण. [हिं. गद्धा]

**गधुळणे, गधूळ** उक्रि. गढुळणे. पहा : **गढूळ**

**गधेघाट** पु. ढोरांचा कोंडवाडा. [व.]

**गधेलोट** पु. (कुस्ती) (गाढवे भांडतात त्यावेळच्या कृतीवरून) कुस्तीतील एक डाव. आपल्याला कोणी खाली धरले तर आपला हात जोडीदाराच्या दोन्ही पायांच्या आतून घालून जोडीदाराची मांडी आपल्या पंजाने धरून त्याच बाजूने आपण फिरून जोडीदाराला चीत करण्याचा डाव.

**गध्यागाढव** पु. गावाच्या शिवेचा दगड. (नाशिक)

**गनगन** १. गोलगोल, रिकाम्या फेऱ्या. (क्रि. मारणे) २. अंघोळ.

**गनमेटल** न. तांबे, जस्त व कथील यांच्या मिश्रणाने बनलेला धातू.

**गना** पु. (विणकाम) कापड विणताना आडवे घालायचे सूत धोट्यातील ज्या कांडीवर गुंडाळतात ती कांडी; गणा.

**गनिमत** न. दु:खात सुखाची गोष्ट. [फा.]

**गनिम(मा)त** स्त्री. लूट; मिळकत; बरकत; विपुलता. [फा.]

**गनिमाई** स्त्री. १. शत्रूची धाड, लूट; हल्ला. २. गनिमी कावा; गनिमी लढाई : 'शत्रूचें सामान भारी आल्यास बुणगें एकीकडे लावून द्यावें, आणि खडी फौज करून आज या ठाण्याजवळ, उद्या दुसऱ्या ठाण्याजवळ याप्रमाणे गनिमाई करावी.' - ऐलेसं ६.२७९६.

**गनिमात** स्त्री. १. ईश्वरी कृपा; आशीर्वाद; दया. २. चांगली गोष्ट, कृत्य. [फा. गनीमत]

**गनिमी कावा, गनिमी लढाई** १. पळपुटी लढाई; कजाखी. अगोदर भ्यालो असे दाखवून शत्रूला पाठीवर घ्यायचे व तो अडचणीच्या जागेत आला असे पाहून त्याच्यावर जोराने उलटून हल्ला करायचा व त्याचा फन्ना उडवायचा. समोरासमोर लढाई न करता युक्तीने, आडमार्गाने शत्रूला जेर करणे. शत्रूंशी लढताना मराठे या रीतीचा अवलंब करीत : 'आम्ही गनीमी काव्यानें राहतो....' - भाब ५८. २. (ल.) लबाडीची युक्ती; लपंडाव; कपट प्रयोग.

वि. कपटी.

**गनी(ली)म** पु. १. शत्रू; वैरी : 'गनीमाच्या देखतां फौजा । रणशरांच्या फुर्फरिती भुजा ।' - दास १९.९.२५. २. चोर; लुटारू: 'सेख निजाम गनीम संगमेश्वरास आला.' - इऐ ५.५०. ३. (सांकेतिक) मराठ्यांना मुसलमानांनी दिलेले नाव : 'गनीमांनी मसुरास वेढा घातला.' - इमं ३७. [फा.]

**गनूदन** डुलकी. (क्रि. घेणे.).

**गन्जूर** पु. वखार; खजिनायुक्त जागा.

**गन्या** वि. बावळट.

**गन्यागंप्या** वि. अजागळ. (अहि.)

**गन्ला** वि. अभिमंत्रित.

**गन्सी** स्त्री. समशीतोष्ण कटिबंधात आढळणारी दुधाळ गायींची एक जात.

**गप-प्प** वि. स्तब्ध; चूप; शांत; निश्चल.

क्रिवि. गडप; ठावठिकाणा न लागेल अशा प्रकारे. [ध्व.] (वा.) ० **करणे**-१. गट्ट करणे; मटकावणे. २. गडप करणे; नाहीसे करणे. ३. चूप करणे; गप्प बसवणे.

**गप-प्प** स्त्री. १. सामान्य बोलवा; उडत बातमी; अफवा; वार्ता; आवई. २. निरर्थक बोलणे, भाषण, बकवास; रिकामी वटवट; बाता. ३. खोटी बनावट हकीगत; मिथ्या गोष्ट.[फा. गोफतन, गप्] (वा.) ० **उठवणे** - अफवा पसरविणे. ० **छाटणे, तासणे, झोकणे** - एखाद्या बातमीची चर्चा चालवणे; रिकाम्या बातम्या पसरवणे : 'आम्ही कवी कवीना रीति नव्हें छाटितोंचि लाख गपा ।' - मोरोपंत. ० **मारणे** - (बोलण्यातली) थाप मारणे.

**गपई** स्त्री. सूत गुंडाळण्याची पट्टी.

**गपकन-र, गपदिशी** क्रिवि. अकस्मात; तडकाफडकी; एकदम; एकाएकी झालेल्या गोष्टींच्या आवाजासारखे. (क्रि. धरणे, बसणे, गिळणे, खाणे, मारणे, पाहणे, उचलणे.)

**गपका** पु. १. आवाज होऊन गट्ट केलेला घास; गटंगुळा; मटका. (क्रि. मारणे.) २. (ल.) हात मारणे; लाच. (क्रि. मारणे.) ३. हलका ढुस्सा, गुद्दा. (क्रि. मारणे.) [ध्व.]

**गपगप-पा, गपागप, गपापा-पून** क्रिवि. उतावीळपणे मटकावताना, गिळताना होणाऱ्या आवाजासारखे. [क.गपगपतिन्नु]

**गपगार** वि. शांत; स्तब्ध; आवाज न करता; हालचाल न करता : 'गाव गपगार होतं.' - गागो ४८.

**गपगिरी** स्त्री. वार्ता; माहिती; कुणकुण; आवई; सुगावा : '..... शास्त्रीबाबाचा (गंगाधरशास्त्र्याच्या खुनाचा) प्रकार जाला याची गपगिरी गायकवाड सरकारास तशी आम्हासहि बहुत....'- शादवे १६६.

**गपच(ची)प** न. सायीमध्ये कणीक मळून तळलेले पकान्न.

**गपचीप-चूप; गप्पचीप-चूप** क्रिवि. निवांतपणे; निश्चलपणे; मुकाट्याने; न बोलता.

**गपछप-शप-सप** स्त्री. रिकामटेकड्या गप्पा; चकाट्या. [फा.]

**गपा-प्पा-प्फा** स्त्री. अव. रिकाम्या बाता; बडबडी; चकाट्या : 'न सार्थक लटक्या साऱ्या गपा ।' - राला ८७. पहा : **गप.** (वा.) ० **छाटणे, मारणे** - अनेक लहानमोठ्या विषयावर फार गंभीर न होता मोकळेपणाने बोलणे : 'समोरच्या चाळीत गप्पा छाटीत बसायची त्याची एकदोन ठिकाणं वासूला ठाऊक होती.' - शिदोरी ३५.

**गपाटा** पु. थाप; गप्प; बात (क्रि. मारणे.) : 'कृष्णराव नांवाच्या मुंबईकरानें महाराजांच्या मुलाखतींत बरेच गपाटे मारले.' - विक्षिप्त २.५३.[हिं.]

**गपाणा** पु. बकाणा; मोठा घास (भाजलेले दाणे, कोरडे खाणे याचा.).

**गपापणे** अक्रि. वटवट, बडबड करणे.

**गपाऱ्या** वि. वटवट्या; बडबड्या; बरळणारा; बाताड्या.

**गपांडा** पु. फार मोठा घास; बकाणा : 'आंबटगोड मोहर ओरबाडून (संदिपान) त्यांचे गपागप गपांडे मारीत होता.' - हपा ११६.

**गप्पागोष्टी** स्त्री. अव. १. गोष्टी; कथा; हकीगती; खबरबखर. २. बकवा; बाता; रिकामी वटवट. ३. शिळोप्याच्या गोष्टी; रिकामपणचे बोलणे. (क्रि. करणे, हाकणे.)

**गप्पाघोळ** पु. अडगळ.

**गप्पाटप्पा** पहा : **गप्पागोष्टी** : 'गप्पाटप्पात वेळ घालवायचा त्यांचा नाद काही सुटला नव्हता.' - दुर्दम्य १.४२.

**गप्पाड्या** वि. थापा मारणारा; न घडलेल्या गोष्टी घडल्या आहेत अशा प्रकारे बोलणारा; खोटार्डा : 'पण त्यांची नावे या गप्पाड्या ग्रंथकारास कशी समजली?' - जोफु ६९.

**गप्पाबहाद्दर** वि. खूप गप्पा मारणारा; गोष्टीवेल्हाळ; गप्पीष्ट : 'आम्ही पोरेही लवकरच गप्पाबहाद्दर बनलो.' - मिरास ३३१.

**गप्पाष्टक** न. वटवट; बडबड; रिकामपणाच्या गोष्टी. (क्रि. करणे, मारणे.)

**गप्पाष्टक्या, गप्प्या, गपोडा, गपोड्या, गप्पिष्ट, गप्पी, गप्पीस्त, गप्पीदास, गप्पीनाथ** वि. बाता झोकणारा; वटवट्या; गोष्टीवेल्हाळ; थापाड्या; बाताड्या.

**गफलत** स्त्री. १. निष्काळजीपणा; बेसावधपणा; हयगय; दुर्लक्ष; गैरसावधपणा; अविचार; चूक; दोष; गलती : 'करारांत दोघांच्या झाली कांहीं किंचित गफलत ।' - ऐपो ३९५. २. हयगयीमुळे वस्तू हरवल्याची स्थिती; निष्काळजीपणाने नाहीसे होणे, न सापडणे. ३. अव्यवस्था; गोंधळ; घालमेल; (पदार्थ, वस्तू यांची) [फा. गफ्लत]

**गफलतणे** उक्रि. १. गैरसावधपणाने गमावणे, पाडणे, गळणे, हरवणे. २. अव्यवस्थितपणे भेसळ करणे; स्थानभ्रष्ट करणे; ढवळाढवळ करणे; गोंधळ करणे; विस्कटणे.

**गफलती-त्या** वि. १. नेहमी वस्तू हरविणारा, नेहमी भलत्या ठिकाणी वस्तू ठेवणारा; विसराळू; गैरसावध; हलगर्जी. २. लबाड, अविश्वासू.

**गबकन, गबकर, गबगब, गबागब, गबगबा, गबा, गबाबा, गबाबून** पहा : **गपकन इ.**

**गबका** पहा : **गपका**

**गबगबणे** अक्रि. १. अतिशय पडशाने किंवा खोकल्याने पिडणे. २. अश्रूंनी डोळे भरून येणे. [ध्व.]

**गबगबणे** अक्रि. १. गबगुबीत, लठ्ठ होणे. याचा व्युत्क्रमानेही उपयोग करतात. २. भरगच्च दिसणे, होणे; प्रफुल्लित दिसणे. [सं. गर्भ.]

**गबगबीत** वि. क्रिवि. १. गुबगुबीत; तुंद; लठ्ठ; मांसल. २. भरदार; दळदार; रसभरित (फळे). ३. मसालेदार पदार्थांनी पूर्ण भरलेली (पोळी, करंजी इ.) ४. भरपूर; भरगच्च : 'तेणें पात्रें भरली गबगबीत ।' - महिकथा ३३.१९९.

**गबदुल** पहा : **गुबदुल**

**गबदुल्ला, गबदू, गबदूल** वि. ठेंगू व बळकट; घटमूठ बांध्याचा; लठ्ठ व मजबूत; वाटोळ्या अंगाचा; गलेलठ्ठ. [हिं. गबदल]

**गनबा** पु. जुन्या सुती कापडाचे शिवून फुले वगैरे काढून केलेले जाजम.

**गबर, गब्बर** स्त्री. पु. १. सोन्याचे एक नाणे. २. (ल.) अशी नाणी ज्याच्यापाशी पुष्कळ आहेत असा माणूस; श्रीमंत व्यक्ती.

वि. श्रीमंत; द्रव्यसंपन्न; धनवान : 'श्रीमान् पुरुष आणि दरोडेखोर यांमध्यें वास्तविक वाटतो तितका फरक नाहीं. दोघेही दुसऱ्याच्या वित्तावरच गबर होतात.' - सहचारिणी ६०. [हिं.]

**गबरगंड** वि. पैसेवाला; श्रीमंत : 'बघता बघता दिडकीला महाग असलेला नाना चांगला गबरगंड झाला.' - व्यंमाक ७५.

**गबरू** पु. १. रूपवान व सशक्त माणूस. २. (ल.) श्रीमंत व्यक्ती; मातबर किंवा मालमत्ता असलेला माणूस. पहा : **गब्रू**

**गबागबा** क्रिवि. झरझर; भरभर; घाईगर्दीने : 'अंबाडीची भाजी मी येचिती गबागबा ।' - तीसा २७५.

**गबान** वि. सुपीक; फायदेशीर; नफा देणारी. (जमीन, देश, व्यापार इ.) (राजा.)

**गबान, गबानी** न. स्त्री. किफायत; नफा; फायदा; लाभ. (राजा.)

**गबारा** पु. तलावाचा मध्यभाग.

**गबाळ** वि. निरूपयोगी; टाकाऊ : 'भोंवते मेळवूनि गबाळ ।' - तुगा १८१६. पहा : **गाबाळ**

**गबाळ** वि. पाणथळ. (गो.)

**गबाळ, गबाळग्रंथ, गबाळणे, गबाळी, गबाळ्या** पहा : **गाबाळ**

**गबाळग्रंथी** वि. वेंधळा; गोंधळ्या; गरीब : 'महाराष्ट्र साधा आणि गबाळग्रंथी आहे.' - इंप ९२.

**गबेले** न. घमेले; कोळंबे; लाकडाची पाटी (चिखल, चुना इ. वाहून नेण्याची). (को.)

**गबॉ-ब्बा-बा, गब्बोटा** पु. केळीच्या खुंटाची सोपटे. (गो. बे)

**गब्बू** वि. लठ्ठ व ठेंगणा; गुबगुबीत. पहा : **गबदूल**. २. (ल.) ऐपतदार; श्रीमंत; गबरू. ३. भरभराटीचे; श्रीमंत (शहर इ.). [सं. गर्भ]

**गब्रा** स्त्री. पिकावरील कीड. (ज्वारी, मका, ऊस इ. च्या गाभ्यातील.) [सं. गर्भ]

**गब्रू** वि. १. पठ्ठा; बहाद्दूर. पराक्रमी. २. सुंदर; तरुण. ३. गर्विष्ठ; खोटा; विद्वान; विद्वत्तेचा आव आणणारा. पहा : **गबरू** [हिं]

**गभर** स्त्री. तोफेचा एक प्रकार.

**गभस्ति-स्ती** पु. सूर्य : 'जैसा प्रगटलिया गभस्ती । अशेषही मार्ग दिसती ।' - ज्ञा २.२६१. [सं.]

**ग(गं)भीर** वि. १. खोल; अगाध (समुद्र, नदी) : 'विमल हृदय तुझें पोत गंभीर वारा ।' - मुरामा अयोध्या ५७. (हा शब्द बहुधा लाक्षणिक अर्थाने वापरतात.) २. शांत; सोशीक; भारदस्त; धीराचा. ३. विचारशील; विवेकी. ४. आतल्या गाठीचा; खोल मनाचा किंवा विचाराचा. ५. घन; भरदार; उद्दाम (मेष, सिंह, प्रवाह इ. चा ध्वनी.) ६. भयकारक; काळजी करण्यासारखी. [सं.]

**गभीरतामापी** पु. सागरतळाची खोली मोजण्याचे उपकरण.

**गम** पु. (क.) रोख; कटाक्ष; झोक; कल; अभिप्राय; पेच; धोरण; आशय (भाषण इ. चा).

**गम** पु. स्त्री. १. संयमन; कानाडोळा; क्षमा; दुर्लक्ष (अपराधाकडे). (क्रि. करणे, खाणे, येणे.) २. विराम; थोडे थांबणे; अवसान. (क्रि. खाणे.) [फा. गम = दुःख] (वा.) ० **खाणे** - धीर धरणे; क्षमा करणे; सोसणे; शांत राहणे.

**गम** पु. १. एक मलम; गमपलास. २. चिकटविण्याचा द्रव. [इं.]

**गमक** न. १. दाखला; पुरावा; कारण. २. आश्वासन; आश्रय; अंगीकार केल्याचा पुरावा; साक्ष; मंजुरी; आधार; प्रमाण; कसोटी. ३. खूप. वि. सूचक. [सं.]

**गमक** स्त्री. (संगीत) तान; ऐकणाऱ्याला आनंद वाटेल अशा तऱ्हेने स्वराला कंप देणे. [सं.]

**गमक-का** पु. १. तोरा; मिजास; चाळा; नखरा; डौल : 'नयनाचे हाणी भाले, चाले करीत गमके ।' - प्रला ११२. २. गर्व : 'इंद्रधनुष्याचा गमक । तृणतुच्छ म्यां केला ।' - वेसीस्व ४.९४.

**गमकचाळिती** वि. स्त्री. आलाप घेणारी : 'सर्व गमकचाळिती गानी : सरस्वती' - रुस्वन १०५.

**गमखोरी** स्त्री. १. गम खाणे; शांत राहणे; क्षमा करणे; सोसणे. २. गुन्हा; गुन्हेगारी : 'तथापि इकडून गमखोरी कोणे प्रकारे जहाली आहे हे तुम्हांस ठावकेच आहे.' - पेद २५.६

**गमगिनी, गम्गीनी** स्त्री. दुःख : 'हें ऐकून दिलास बहुत गम्गीनी व खपगी जाली.' - पया ४६७.

**गमगीन** वि. दुःखी; उदास : 'संध्याकाळचा ओझरता प्रकाश गमगीन आणि गंभीर असतो.' - स्मरण २५१.

**गमजा, गम्जा** पु. १. तोरा; ऐट; मिजास; अक्कड; गर्व; ताठा : 'संज्ञानीं सत्करूणेवांचुनि मतिचे न चालती गमजे ।' - मोविराट ६.१२०. २. थाटमाट; शृंगारिक नेत्रकटाक्ष; नखरेबाजी; मुरका; चोचला; तिरप्या दृष्टीने पाहणे; हावभाव; नटणे; फुगणे (छानछुकीचे); कामविकाराचे कृत्रिम प्रदर्शन; चाळे : 'तेहि ठाके ठुमके बहुतांपरि । गमजा उत्तम तियेचा ।' - स्वादि २.३.१७. ३. दिमाख; दांडगेपणा; चावटपणा; धिटाई; अमर्यादा (बायकोची नवऱ्याशी, मुलाची बापाशी, चाकराची धन्याशी इ.) बहुधा अनेकवचनी प्रयोग. ४. (सामा.) चोचले; चाळे; चेष्टा. [फा.] (वा.) ० **करणे** - १. दिमाख दाखविणे; गर्व करणे. २. मजेत असणे. (माण) ३. उच्छृंखलपणाने वागणे; चाळे करणे : 'गमजा करितां मनिं उमजाना, हें सुख न पुढे पडेल वजा ।' - राला ८५. ० **चालणे** - अमर्याद वर्तन खपवून घेणे. ० **न चालणे**, ० **न चालू देणे** - चाळ्यांना अवसर न देणे, नियंत्रण असणे.

**गमजा** स्त्री. आळस.

**गमणूक** स्त्री. रिकामे चाळे; खेळ.

**गमणे** अक्रि. १. आळसाने काम करणे; सुस्तपणाने किंवा हळूहळू काम करणे; निरुत्साहाने, रेंगाळत जाणे; खेळणे; घुटमळणे; रखडणे; रमत रमत फिरणे. २. मजेने वाटेल तसा वेळ घालवणे. [सं. गम् = जाणे]

**गमणे** अक्रि. १. शोभणे; पसंत पडणे; आवडणे : 'तशी न यमुना गमे जशि गमे निर्लिपापगा ।' - केका १०८. २. दिसणे; वाटणे; आढळणे : 'कर्णवध क्षितिपाच्या चित्तास गमे क्षणक्षणी लटिका ।' - मोकर्ण ६.१. काव्यात गमिजे असे रूप आढळते : 'ज्ञानें ज्ञेय गमिजे।' - ज्ञा ४.१४१. ३. बरे वाटणे; चैन पडणे; करमणे : 'म्हणे कृष्णाविण कैसें तुम्हां गमे।' - तुगा २३. ४. काळ काढणे; राहवणे; कंठणे. [सं.]

**ग(गं)मत** स्त्री. १. सुखासमाधानाचे कालक्रमण; चैन. २. करमणुकीची, चैनीची वस्तू, विषय, व्यापार, साधन. [सं.]

**गमत** न. गाबड्यावाटे किंवा गलबताच्या तळच्या फळ्यांच्या सांध्यातून आत (गमताडात) आलेले पाणी. (को.) पहा : **घमत** (को.)

**गमत-डी; गमताड-डी** स्त्री. १. गमत साचण्याची गलबतातील जागा. २. गमत; गलबतातील गाळ पाणी.

**गमतरमत** क्रिवि. आळसत खेळत; रखडत; रेंगाळत; घुटमळत; गुंगत;

हळू हळू (जाणे, येणे, खाणे, काम करणे.). (प्र.) रमतगमत.

**गमती-त्या** वि. करमणूक, मनोरंजन करणारा; विनोदी; दुसऱ्याचा काळ सुखाने जाईल असा हास्यविनोद करणारा. (माणूस, व्यक्ती, प्रसंग.)

**गमतीदार** वि. मजेदार; विनोदी.

**गमदसडा, गमदासडा, गमदासरा** वि. खेळणारा; खेळ्या; चाळे करणारा; रेंगाळणारा; रखडणारा; आळसाने, सुस्तपणाने काम करणारा.

**गमन** न. जाणे; हलणे; जाण्याची क्रिया; प्रयाण. [सं.]

**गमनयोग्यता** स्त्री. (शाप.) गति प्राप्त होण्याचा धर्म.

**गमनागमन** न. जा-ये; येरझार; वारंवार जाणे - येणे. [सं.]

**गमनी** वि. १. (शिवी) लुच्चा; सोदा; गुलाम; हरामखोर; दगलबाज. २. मात्रागमनी; आईच्या खाटल्यावर जाणारा. [सं.]

**गमनीपण** न. मात्रागमनीपणा; कपटीपणा; नीचपणा : 'वोडसेकर राजे हाटेसिंग सरदारांनी स्थापिले होते. यास अष्ट भया याचे भाऊबंद यांणी गमनीपण करून राज्यात न दबता....' - पेद २९.२३०.

**गमनीय** वि. १. जायला, पोचायला योग्य, गम्य; जायला सुलभ. २. आक्रमण्याजोगे. ३. सुघड; सुगम; साधण्याजोगे; प्राप्य; संपादनीय.

**गमला** स्त्री. फुलझाडाची कुंडी. (काशी)

**गमवड** बरे न वाटणे; न करमणे. (व. घाटी)

**गमविणे, गमावणे, गमाविणे** अक्रि. (ल.) नायनाट होणे; मरणे. उक्रि. हरविणे; पाडणे; हरपणे; सांडणे; उधळणे; घालवणे. (वस्तू, वेळ, प्रकृती) : 'स्वयं बोधा क्रीडावेळु । गमवीतु असे ।' - ऋ ७७; 'कां रे गमाविल्या गाई ।' - तुगा १८८. [सं. गम् = जाणे]

**गमावा** वि. चालून जाण्याचा, आक्रमण करण्याचा (मार्ग) : 'नाना उदितें दिवाकरें । गमावा मार्गु दिठी भरे ।' - ज्ञा १७.१७८. [सं. गम्]

**गमावू-ऊ** वि. घालविणारा; हरविणारा : 'आलें हें नांव गमाऊं ।' - संग्रामगीतें ८२.

**गमासीस** पु. (फळझाडात-पपनस, मोसंबी) डिंक येण्याचा रोग.

**गमी** स्त्री. १. शोक; दुःख : 'गमी करून कोणास न बोलतां दाखल जाले.' - मइसा ७.१४२. २. दुखवटा : 'वस्त्रें गमीचीं..' - मइसा ७. [फा. गम]

**गमेल** न. घमेले; पाटी; पहा : **गबेले**

**गम्य** वि. १. गमनीय; जाण्याजोगे किंवा जाण्यायोग्य; सुलभ : 'तेथ आम्हा नेईं सामर्थ्ये तुज खगा असे गम्य ।' - मोआदि ४.९५. २. (शब्दशः व ल.) मिळण्याजोगा. ३. प्राप्य : 'ऐसें अगाध माहात्म्य । जें सकळमार्गीकगम्य ।' - ज्ञा ११.७३. ४. जाणण्यासारखा; समजण्यासारखा; सुलभ. समासात – अनुमानगम्य, अभ्यासगम्य, म्हणजे अनुमान, अभ्यास इ. नी समजण्यास योग्य (आहे किंवा होते.). न. प्रवेश; परिज्ञान; परिचय; ज्ञान; माहिती. (क्रि. असणे.)

**गम्यमान** वि. ज्ञेय; जाणण्याजोगे.

**गय** स्त्री. १. माफी; क्षमा. २. उपेक्षा; दुर्लक्ष; हयगय. (वा.) ० **करणे** - १. चूक, अपराध माहीत असूनही दुर्लक्ष करणे; क्षमा करणे; दया दाखवणे : 'पोराबाळांचे नाव काढलेस म्हणूनच एक वेळ गय केली.' - भावं ६२. २. सूट देणे : 'इतके दिवसाची मला गय करा म्हणजे झालं.' - मस्थि २३९. ३. झोपी जाणे.

**गयगोळा** पहा : **गईगोळा**

**गयतमयत, गयामयत, गयामत** वि. मेले गेलेले; नाहीसे झालेले : 'दरम्यान सरंजामदार लोक गयतमयत होत गेले.' - इनाम ३६. [सं. गत + मृत]

**गयफ** वि. गैब; गुप्त : 'भाऊसाहेब व जनकोजी शिंदे यांची गत कैसी जाली.... गयफ जाले किंवा अकस्मात गेले....' - भाब १२०. पहा : **गायब** [अर. गइब]

**गयबान्या** वि. बावळट. [व.]

**गयरव, गहिवर** पु. विवाहातील निरोपाचा समारंभ.

**गयवडा** पु. दैन्य; दीनवाणी स्थिती : 'मागा तो यदुरावडा गयवडा नाशील त्या आवडा ।' - आसु ५.

**गया** पु. गळा : 'मायबाई मना संसार घटना । गयाना चंद्रहार एक दागिना ग मना ।' - शके ३०१.

**गयाराम** पु. एक राजकीय पक्ष सोडून स्वार्थ, भांडण इ. कारणांनी दुसऱ्या पक्षात जाणारा.

**गयाल-ळ-ळी** वि. १. बिनवारस. २. पडीक; सोडलेली; टाकलेली (मिरास, वतन, जमीन, घर) : 'गांव गयाळी पडलें.' - थोमारो २.१६५. ३. परागंदा; देशोधडी झालेला (मनुष्य, कुटुंब). (राजा) ४. बेपर्वा; भिकार; नालायक. ५. अजागळ; गचाळ; बावळा; गाईसारखा भित्रा; गरीब; गबाळ : 'गयाळाचें काम हिताचा आवारा ।' - तुगा ३१२८. ६. ज्याला स्वतःला ज्ञान नाही व सांगितलेले समजत नाही असा; मूर्ख; गैदी; खुळा; भोंगळसुती; अव्यवस्थित; गोबरागणेश (मनुष्य). ७. अयोग्य; घाण; फुसकी; वाईट (वस्तू.). [सं.]

**गयाली** वि. गाव सोडून गेलेले - बदलापूर ३८७.

**गयावया** स्त्री. क्षमेची याचना; विनवणी; प्रार्थना; आराधना; काकुळती; करुणा भाकणे. (क्रि. करणे.)

क्रिवि. अति लीनतेने; करुणास्पद रीतीने; अजीजीने; दीनवाणीपणाने.

**गयावर्जन** न. (अप.) गयावर्दन, गयावर्धन; गयेला जाऊन करायचे पिंडप्रदान व तीर्थश्राद्ध : 'पितर उद्धरावे आपण । गयावर्जन करोनियां।' - एभा २३. ३७८. [सं.]

**गयावळ** पु. १. यात्रेकरूंची तीर्थयात्रा करविणारा भिक्षुक, पंड्या; पुजारी : 'गयावळ ते गंगेचे । गंगापुतें ।' - दावि ४७४. २. (ल.) आचारविचारहीन, भ्रष्ट माणूस; धर्मशास्त्राप्रमाणे न चालणारा; मलिन; आचारहीन भिक्षुक, भट. ३. निष्ठुर माणूस. (गो.) ४. (ल.) लोचट.

**गयावळ, गयापुत्र** पु. १. चिक्कू; घालवेडा, वेड पांघरलेला मनुष्य. २. बावळट. पहा : **गयाळी**

**गयाळ** बालक.

**गयेंदी** स्त्री. चिखलामध्ये असणारी टोकदार तोंडाची मासोळी.

**गय्या** वि. मूर्ख; अडाणी. पहा : **गयाल** ६ (गो.)

**गर** पु. गाभा; दळ; गीर; मगज (फळातील). [सं. गृ, गर्भ]

**गर** पु. भिरकुंड; खोबरे; भेंड; सत्त्व.

**गर** अ. फारसी प्रत्यय. कर, कार, करणारा या अर्थी. उदा. सिकलगर, बाजीगर. [फा.]

**गर** पु. न. (ज्यो.) अकरा करणांतील पाचवे करण.

**गर** पु. न. विष; हलाहल. [सं.]

**गर** स्त्री. १. घोड्याच्या छातीतील, घशातील किंवा मानेवरील एक रोग अथवा खाज. (क्रि. भरणे.) २. खरारा न केल्यामुळे घोड्याच्या अंगावर जमलेला मळ.

**गरऊ** पु. गर्व; ताठा : 'वैकुंठा गरऊ खांडविला ।' - शिव ३१७.

**गरक्** पु. गळ.

**गर(ड)क** वि. १. गर्क; मग्न; विमग्न; बुडालेले (जलादिकामध्ये). २. चिंतनात निमग्न; गढलेला; गुंतलेला; विचारात चूर. ३. (ल.) निमग्न झालेला; तल्लीन; ग्रस्त; आसक्त; वाहिलेला. ४. गाढ; गडद; घोर (झोप). ५. हरवलेला; अदृश्य; नाहीसा झालेला; गडप; नायनाट झालेला; नष्ट; मृत. [फा. गर्क्] (वा.) ० **करणे** - खाणे; गिळणे; दगलबाजीने अपहार करणे. (ठेव इ.)

**गरकणे** अक्रि. १. लवकर मुरणे; भिनणे; आत शिरणे. २. दचकणे; बुजणे; घाबरणे; गोंधळणे.

**गरकन-र, गरदिशी, गरकंडा, गरकांडा-डी, गरकी, गरगंडा** पहा : **गिरकन इ.**

**गरका** पु. १. घेर; वेढा; परीघ. २. घेरणे; वेढा घालणे; गराडा. ३. वाटोळा, मंडलाकार फेरा; गरगरा फिरकी; गिरकांडी; चक्कर; घिरटी; प्रदक्षिणा. (क्रि. घालणे, घेणे, मारणे, बसणे.) : 'मग परमस्नेहाचा खुंट उभवोन। गरके घालिती त्यासवें ।' - नव २४.१५५. ४. (ल.) घोटाळा; गुरफटा; गूढ; घोळ. ५. शेंडीभोवतालचा घेरा. ६. शेतातील नादुरुस्त, पडीत, वाटोळा जमिनीचा तुकडा. [अर. गर्क्]

**गरकी** स्त्री. गरगर फिरणे; गिरकी : 'त्या गरक्यांच्या झपाट्यात त्यांची वसंतमाधवावर नजर ठरेनाशी होऊन....' - मंजु ५६.

**गरकू-खी** स्त्री. कांबीला लहान लाकडाचा तुकडा बांधून करतात ती आकडीसारखी काठी (फळे इत्यादी काढण्याची). (को.)

**गरकी** पु. दाटी; गर्दी. (कु.)

**गरको** पु. स्त्री. एका जातीचा लसूण. याला दर्प कमी असतो.

**गरगच्चा** पु. गलबला; गोंगाट. (सामा.) आरडाओरडा; गवगवा. पहा : **गरगशा.** [ध्व.]

**गरगट-ड-टा-डे** पु. न. १. एकत्र वाटलेल्या किंवा उगाळलेल्या अथवा कढवलेल्या पुष्कळ प्रकारच्या औषधांचे सरबरीत मिश्रण; बाळंतिणीचा काढा; दाट मिश्रण. २. भाकरीसाठी दाट आमटी इ.; भाजीपाला, डाळ, पीठ यांचे सरबरीत मिश्रण; कालवण. ३. (थट्टेने) अतिशय पाणी राहून पचपचीत बनलेला भात किंवा इतर खाद्यपदार्थ. ४. खाली उरलासुरला सरबरीत गाळसाळ (औषध, काढा, इत्यादिकांचा). ५. तंबाखूवर पडणारा एक रोग. ६. औषधी, मसाला इ. वाटण्याचा, खलण्याचा दगडी खल; उखळ.

**गरगटणे** उक्रि. १. (दगडी खलात) खलणे; घोटणे; उगाळणे; चूर्ण करणे; वाटणे. २. गरगटाने (शेण, माती व पाणी यांच्या मिश्रणाने) सारवणे; पोतेरे घालणे; शेणमाती इ. नी. लेपाटणे. ३. चुलीवर शिजत असलेला पदार्थ ढवळणे; आटविणे; घाटणे. (माण.)

**गरगटा** पु. आरडाओरडा; गोंगाट : 'कुत्री चाहूल घेत आणि भुंकून गरगटा करीत.' - काआ ५४.

**गरगडा** पु. १. गोंधळ; घोटाळा; गर्दी; गडबड; अव्यवस्था; अंदाधुंदी (स्वयंपाक, लग्न, देणेदार, काम इ. ची). २. पहा : **गरगट १**

**गरगर** क्रिवि. १. चक्रासारखे सभोवती; मंडलाकार होईल असे; गिरकीत; फेरात (फिरणे, भोवंडणे) : 'चित्र गदा महोग्रा गरगर फिरवूनि सोडिली जे गा ।' - मोकर्ण ९.२६. २. अति त्वरेने; उठाउठी; भराभरा (मूल किंवा रोप यांची वाढ). [सं. गरगर]

**गरगरणे** अक्रि. १. गिरकांड्या घेणे; भोवती फिरणे. २. घेरी, भोवंड येणे. (मस्तकात). ३. झपाट्याने, गच्च, उफाड्याने वाढणे; फोफावणे (झाड).

**गरगरा** पु. १. गिरकांडी; भिरकांडी; भोवरा; गोल - गोल २. (ल.) कामाचा घोटाळा; गोंधळ. (क्रि. करणे, घालणे, पडणे.)

**गरगराट** पु. जोराची गिरकांडी; घेरी; फेरा : 'फांसे फिरती गरगराटे ।' - मुसभा १४.४०.

**गरगरीत** वि. (याच्या मागे किंवा पुढे वाटोळा हा शब्द जोडून अतिशयत्व दर्शवितात.) १. अगदी वाटोळा; भरीव व वाटोळा. २. मोठे गोल व सुंदर (डोळे); टपोरे.

**गरगशा** पु. १. गोंधळ; आरडाओरडा; कल्ला; गर्जना करून हल्ला करणे किंवा भोवती गर्दी करणे. २. त्रासदायक किंवा घोटाळा करणारा गलका, गवगवा; ओरड. ३. त्रास; उपद्रव; अव्यवस्था; त्यामुळे झालेला घोटाळा. (क्रि. घालणे, पडणे, होणे.) : 'मसलतीच्या प्रसंगाचा गरगशा आहे.' - पया ८५. ४. अव्यवस्थित कामकाज, धंदा; घोटाळ्याचा कारभार. पहा : **गडगच्चा**

न. तंटा; भांडण : 'तुरकाचे कांहीं गरगशा जहाले नव्हते.' - अभिं ६. [फा.]

**गरगस्त-स्ती** स्त्री. संकट; दुर्दशा. (व.)

**गरगा** पु. खाच; खड्डा; खळगा.

**गरगूट** न. भाताची एक जात. (गो.)

**गरगोट** न. चिंचेचा दाट पदार्थ. पहा : **गरगट** (व.)

**गरगो(गु)टी** स्त्री. मान; मानगुटी. (धरणे, आवळणे, दाबणे, बसणे इ. क्रियापदांबरोबर योजतात.)

**गरज** पु. मोत्यातील नर दाणा.

**गरज** स्त्री. १. पर्वा. २. जरुरी; आवश्यकता : (कोणत्याही वस्तूची इ.) उणीव; अडचण; चणचण. ३. ओढ; ताण; निकडीची आवश्यकता; जरूरीचा प्रसंग किंवा इच्छा. ४. हक्क; प्रयोजन : 'सुंदरतुकदेव यास कवळा करावया गरज काय?' - मइसा १५.७१. [फा.] (वा.) ० **करणे** - १. चालवून घेणे; गुजराण करणे; कसातरी निर्वाह करणे. २. हेळसांड, चालढकल करणे; कसेतरी रेटणे. ३. एखाद्याची अपेक्षा, निकड, उणीव पुरविणे. ४. (आपली साधने, शक्ती) हात राखून खर्चणे, शिल्लक टाकणे; बचत करणे; आपल्या आटोक्यात, ऐपतीत आटोपणे.

**गरज** १. छाती. २. हिंमत,संधी.

**गरजगी-गो** वि. स्वार्थाने प्रेरित होऊन बोलणारा; गरजेपुरता हांजीहांजीखोर; मतलबी : 'गरजगी लोकांनीं मनास येईल तसें नबाबास

समजाविलें.' - मइसा ६.३५७. [फा.]

**गरजणी** स्त्री. गर्जना; गरजण्याची क्रिया. [सं. गर्जना]

**गरजणे** अक्रि. १. जरूर असणे; अपेक्षा, अडचण, कारण असणे.

**गरजणे** अक्रि. अकर्तुक. १. गर्जना करणे; गडगडणे; धडधडणे. २. (ल.) गर्जना करणे; मोठ्याने ओरडणे; डुरकणे; आरोळी मारणे. (तोफ, वन्य पशु यांनी) : 'गरजला गजराज घनारवें ।' - र ५७. ३. गाजणे; दुमदुमणे; घुमणे; प्रतिध्वनी करणे, होणे. [सं. गर्ज]

**गरजणे** अक्रि. खर्च करणे. (गो.)

**गरजमतलबी** वि. स्वार्थसाधू : 'आम्ही उत्तर चांगले करून दाखवूं, याप्रमाणे वल्गना करितात, गरजमतलबी मोठे आहेत.' - नाग १.२०२.

**गरजवंत** वि. अडलेला; जरूरी असलेला; गरजू.

**गरजसाधू** वि. आपले हेतू साधण्याविषयी तत्पर; आपली गरज झाली की पुरे असा; स्वार्थी; अप्पलपोट्या.

**गरजिणे** सक्रि. गरज भागविणे, जिरविणे. (गो.)

**गरजी-जू** पु. १. पहा : **गरजवंत.** २. आपले श्रम वाचवणारा, वर वर किंवा उपराटपरी काम करणारा; बेताबेताने श्रम करणारा; अंगचोर. वि. ज्याला जरूरी आहे असा.

**गरजेचा-ची** वि. फक्त गरज भागवणारा; जरूरीपुरती; कामचलाऊ; कशीबशी : 'गडाची इमारत गरजेची करूं नये.' - मराआ ३०.

**गरड** पु. मोठ्याने केलेला आक्रोश. (गो.)

**गरडगप** क्रिवि. पुरल्या जाण्याच्या - गिळल्या जाण्याच्या - हरवल्या जाण्याच्या - चुकल्या जाण्याच्या स्थितीतील; गडप. [सं.]

**गरडणे** क्रि. नाहीसे करणे.

**गरडा** पु. १. हलकी ढेकर; गरढई. २. घरघर; श्वास (मरणोन्मुख प्राण्याचा).

**गरढई, गरडई** स्त्री. अजीर्णामुळे पोटातील वायू ऊर्ध्वगत होऊन घशाशी येणारा जलांश; घशाशी येणे; उचकी. (क्रि. येणे, लागणे.)

**गरत, गरती** स्त्री. संभावित, मर्यादशील, कुलीन स्त्री (सवाष्ण किंवा विधवा); अव्यभिचारी, पतिव्रता स्त्री. 'ऐका बाई लाज नाहीं आणिकां त्या गरतीची ।' - तुगा २९६. [सं. गृहरत, गृहवती] [क. गरति]

**गरता-दा** स्त्री. १. गर्ता; खड्डा; खाच. २. (ल.) पोट (क्रि. भरणे.).

**गरतावा** पु. घरंदाजपणा; कुलीनता; मर्यादशीलता : 'गरतीचा गरतावा चुलीप पारखावा ।' - लोसामा २ संलो २२. [सं. गृहरत, गृहवती]

**गरद** वि. दाट; गर्द. पहा : **गडद**

**गरद** न. धुरळा; गरदा : 'गरद बहुत उठला.' - मइसा १.६४. [फा. गर्द]

**गरद** न. एक प्रकारचे रेशमी कापड.

**गरदट, गरधट** वि. मनस्वी; अविचारी; बेपर्वा. पहा : **गळदट**

**गरदणे** क्रि. भयभीत होणे; गांगरणे; भ्रांती पडणे.

**गरदन, गर्दन** स्त्री. मान; गळा. [फा.

**गरदा** पु. १. गर्दी; दाटी. २. धूळ; धुरळा. (व.) [फा. गर्द]

**गरदा, गर्दा** पु. १. वाळलेली व चुरलेली तंबाखूची पत्ती; जर्दा; गांजा इ. २. गांजाच्या काढ्याचा उरलेला भाग, गाळसाळ.

**गरदुड, गरदोडा** पु. खड्डा; खाच. (व.) [सं. गर्ता]

**गरनळा, गरनाळ-ल** पु. स्त्री. मोठी तोफ; कुलपी गोळ्यांची तोफ. हिचा आकार लाकडी उखळीसारखा असतो : 'गरनाळा भर गोळ्यांचा भार।' - ऐपो ११३. [हिं.]

**गरनाळी** स्त्री. फार मोठे गोळे टाकणारी तोफ : 'दक्षिणेकडील अंगानें गरनाळी तोफ चालू झाली.' - माप्र ७२.

**गरपीडित** वि. कृत्रिम विषाची बाधा झालेला.

**गरफळ** न. कठीण कवचाचे फळ.

**गरब** पु. फळातील मगज. (कु.)

**गरब** पु. लाकडाचा किंवा तलावाचा अंतर्भाग.

**गरबखिळी** स्त्री. (नाविक) जांगीत उभे केलेले नाडवळ अढळ होण्यासाठी जांगीतून व नाडवळाच्या नेढ्यातून पार नेलेला लोखंडी खिळा.

**गरबगीळ** क्रिवि. गर्भगळित; घाबरी; हताश : '..... या दोघींच्या दामदाटीनं ती गरबगीळ होऊन बसली.' - जामो ५२५.

**गरबरणे** अक्रि. पोटात गुरगुरणे; गुडगुडणे; पित्तादिकाने वांती होण्याजोगे ढवळणे. [ध्व.]

**गरबा** पहा : **गर्भा**

**गरबीण** स्त्री. (सुतारी) सरळ रेष काढण्याचे हत्यार.

**गरबीन** वि. गरोदर : 'पईल्यानं गरबीन खाऊ वाटली पपई ।' - राके २९४.

**गरम** वि. १. उष्ण; ऊन. (शब्दशः व ल.) २. कडक; तिखट; रागीट. ३. लोकरीचे उबदार (कापड इ.). ४. दाट. (बातमी इ.) : 'डेरेदाखल होतात म्हणून आवई गरम होती.' - मइसा १.५४. ५. रुष्ट; संतप्त. ६. तेजीचा (बाजार). ७. पैशाची ऊब असणे; जवळ पैसा असणे. [फा. गर्म] (वा.) ० **होणे** - रागावणे; संतापणे.

**गरम** गाठ; ग्रंथी; घट्टा.

**गरमणे** अक्रि. गरम होणे; राग येणे : 'पंडिताबाईंचे तें त्राग्याचे स्वरूप पाहताच भाऊसाहेबांची वृत्ति थोडी गरमली....' - कर्मयोग १५८.

**गरमनरम** वि. १. फार ऊन किंवा थंड नाही असे. (वस्तू इ.) २. (ल.) कडक व सौम्य; निष्ठुर व दयाळू; कधी कडक व कधी शांत (मनुष्य, स्वभाव, भाषण.). ३. नवे जुने; उत्तम मध्यम; चांगले व सामान्य.

**गरमबाजारी** स्त्री. १. फार मागणी; भारी किंमत; व्यापारातील तेजी. २. श्रीमंत होण्याची संधी साधणे : 'मध्यस्थ लोकांनीं गरमबाजारी करून....' - दिमरा २.२८२. [फा.]

**गरममसाला** पु. १. भाजीला घालण्याचा धने, हळकुंड, दालचिनी, हिंग इ. चा कच्चा मसाला. २. उष्ण व शक्तिवर्धक औषध, मसाले. [हिं]

**गरमर-ल** न. माईनमूळ. यांचे झाड दोन फूट उंच असून पानांना मसाल्यासारखा तिखट वास व रुची असते. मूळ लोणच्यात घालतात.

**गरमा** पु. उकाडा; उष्मा; कहाली; तलखी. पहा : **गरमी** [फा. गर्मा]

**गरमाई** स्त्री. वितुष्ट; तंटा : 'भिन्न इतिहासांच्या लोकांत केव्हां केव्हां थोडीबहुत गरमाई उत्पन्न झाली तर....' - आगर ३.१८५.

**गरमाई** स्त्री. उकाडा : 'हवेचा वाढलेला दाब व गरमाई अंगाचे पाणी पाणी करीत होती.' - पडरे १.

**गरमागरम** वि. १. फार उष्ण; ऊनऊन; कढत. २. (ल.) जोरदार; चिडून केलेली (चर्चा.)

**गरमागरमी** स्त्री. १. उष्णता; संताप; राग; क्षोभ. २. (ल.) जोराचे भांडण.

**गरमी** स्त्री. १. उष्णता; ऊब; उकाडा : 'दाटली दिव्याची गरमी सदनांतरी.' - प्रला १००. २. (ल.) अंगाची तलखी; काहिली; आग; ताप; रोगाची उष्णता. ३. राग; क्षोभ. ४. उपदंश; फिरंग रोग; गर्मी. [फा. गर्मी]

**गरमी** स्त्री. ईर्षा; महत्त्वाकांक्षा.

**गररर** क्रिवि. जोराने गरगर फिरणाऱ्या वस्तूच्या आवाजाप्रमाणे. [ध्व.]

**गरल** न. काळकूट; हलाहल.

**गरवणे** सक्रि. गळ टाकून मासे पकडणे; वेचणे. (को.कु.)

**गरवस, गरवा** वि. १. उशीराने पिकणारा; मागस (धान्य, पीक). (को.) २. महान. [सं. गुरू, गरीयस्]

**गरवा, गेरवा** पु. पिकांवर पडणारा एक रोग.

**गरवार, गरव्हार** वि. गरोदर; गर्भार : 'झालों गुरूदर जशा अत्यासन्नाप्रसूति गरवारी ।' - मोवन ८.३७. [सं. गर्भार]

**गरवारशी हळकुंड** बाजूला लहान कुडी अथवा कोंब फुटलेले हळकुंड.

**गरवी अंबणी, गरवी शेत गौरी** नाचणीची एक जात.

**गरशी** पहा : **गरम**

**गरस** स्त्री. मोठे, कठीण, टणक व तोंड नसलेले गळू, गाठ : 'दोन्ही खांद्याला दोन्ही घट्टे बांधल्या गरशी ।' - पला ८० : 'उरी उसासले गेंद लहान गरसा ।' - सला ७.

**गरसळी, गरसुळी, गरसोळी** स्त्री. १. गळसरी; गळ्यातील एक दागिना; काचेचे किंवा सोन्याचे मणी व मध्ये पुतळी असलेली माळ : 'तोडून गरसुळी फोडून हातचीं कांकणे ।' - ऐपो ११६. २. मंगळसूत्र : 'मंगलराज गरसळी ।' - वेसीस्व १०.८४. - (तंजा)

**गरळ** स्त्री. १. आस्था. २. छंद; नाद.

**गरळ-ल** न. विष; जहर; हलाहल : 'गरळा जें वमी मुखें ।' - ज्ञा ६.२४१.

स्त्री. १. साप, पाल इत्यादींच्या तोंडाचा विषारी फेस (गवतावर पडणारा). २. लाळ; तोंडाला सुटलेले पाणी. (क्रि. येणे.) [सं.] (वा.) ० **ओकणे** – द्वेषपूर्ण बोलणे किंवा लिहिणे : 'वृत्तपत्रांच्याद्वारे गरळ ओकले जात होते.' - निज २२८.

**गरळा** पु. १. काही औषधी किंवा वनस्पती विड्यात घालून चावून त्यांचा काढलेला रस (तान्ह्या मुलाला खोकला, हगवण इ. प्रसंगी आई देते तो) : 'ते माय देते गरळा तयाला ।' - सारुह १.५४ (क्रि. घालणे.) २. (ल.) लाच; मूठदाबी. (क्रि. देणे.)

**गरळा** पु. भात, वरी इत्यादिकांच्या लोंबीच्या देठाजवळचा भाग. (को.)

**गरळी** स्त्री. अजीर्णाने पोटातून घशात येणारे पाणी, अन्न इ.; घशाशी येणे. (क्रि. येणे, आणणे.) (वा.) **जेवू घालून गरळ्या आणणे** – अति आग्रह करणे; एखाद्या गोष्टीचा अतिरेक करणे.

**गरंगाटा** पु. पट्यापट्याचा, करकऱ्यासारखा एक मासा (गो.).[सं. गर्गाटा]

**गरंगील** वि. लाजरा; गायतोंड्या; भेकड; गरीब; गोगलगाय. (राजा.)

**गरंडेल** पु. एक प्रकारचा फटाका (आतषबाजीतील). (कु.)

**गरा** वि. गरवस. पहा : **गरवा** [सं. गुरू]

**गरा** पु. १. फळाचा गर असलेला फणसातील भाग; आठळी भोवतालचा विशिष्ट खाण्याचा अंश. 'जसे बरे गरे बहु कपी भट ।' - मोसीतागीत १४१. २. दाणेदार कणीक, रवा. ३. उसाचा करवा; गंडेरी. (कर.) [सं. गृ, गर्भ]

**गरा, गराठी** पु. मासे धरण्याचा मळ; गरी : 'जैसा धिवरू मिनाचेआं मुखांतु । ऐंस मांशे घाली आंतु । गरेआ झोंबता वोडोनि घेंतु । प्राणु तेयाचा ।' - क्रिपु ५३५.

**गरागर-रा** क्रिवि. वाटोळे, गिरकीत, वर्तुळात (फिरणे, गुंडाळणे.). पहा : **गरगरा**

**गरागर्धा** पु. गोंधळ; गर्गशा; कटकट : 'दाभाडीकडील गरागर्धा पडला आहे.' - पेद ३३.१७५.

**गराज** पु. लोखंडी किंवा लाकडी गज; कांब; कठडा (जाळी, खिडकीतील). पहा : **गराद-दा**

**गराज** न. गॅरेज; मोटर, गाडी इ. ठेवण्यासाठी केलेली स्वतंत्र खोली : 'एका कोपऱ्यात गराज आहे.' - स्वगत १४. [इं. गॅरेज]

**गराटा** पु. दरारा; दपका; बाण वेगाने जात असताना होणारा आवाज : 'त्या बाणांच्या गराट्याने 'मल्हार आया' या दहशतीनें पुरुषमात्रानें बायको सोडून दिल्लीचा रस्ता धरला.' - होकै १९.

**गराठी** स्त्री. गरखी; आकडी (दुबेळक्याची, शेवटाला आकडा असलेली, फळे तोडण्याची). (को.)

**गराड** न. जोराची वावटळ; झंझावात; वादळ. (व.)[हिं. गिर्द, गिर्दबाद]

**गराडगप** पहा : **गरडगप**

**गराडणे** अक्रि. झाडे इत्यादी तोडणे. (व.)

**गराडा** पु. १. घेरा; वेढा; सैन्याची टोळी (वेढा घालणारी). २. वेढा घालून बसणे. (क्रि. घालणे, देणे, पडणे.) ३. सभोवती झालेली गर्दी. ४. कुंपण; आवाराची गोलाकार भिंत; तट : 'त्या टेकाडावर रचलेला गराडा ढासळला होता.' - वारी २१४. ५. कोंडमारा.

**गराडा** पु. विहिरीतून पाणी काढण्याची गोल तरफ.

**गराडा** पहा : **गरादा, गराज**

**गराडी** स्त्री. १. (रस्त्यावर पडलेली गाडीची) चाकोरी : 'चेंडू गाडीच्या अरुंद गराडींत असला म्हणजे....' - कुबडीचेंडू (बडोदे) १३. २. चुन्याच्या घाणीचे चाक फिरण्यासाठी केलेला गोल खड्डा; घाणी.

**गराडी** स्त्री. १. झाड. २. टेंभुर्णीची काठी.

**गराद-दा** स्त्री. पु. गज; कांब : 'ती एक भल्या मोठ्या गरादा लाविलेली खिडकी होती.' - सूर्योदय १०२. पहा : **गराज** [पोर्तु. ग्राद]

**गरादी** स्त्री. चुना तयार करण्याची घाणी.

**गराना** पु. व्यर्थ वटवट; तक्रार.

**गरारणे** अक्रि. मोठा आवाज करून भोवताली फिरणे; गिरक्या घेणे.

**गरारणे** अक्रि. जलदीने भिजणे, मुरणे, जिरणे.

**गरारणे** अक्रि. १. उफाड्याने, जोराने अंकुर फुटणे, फोफावणे. (पीक, झाड); जोमात किंवा ज्वानीत येणे; रसरसणे (फळ, तरुण स्त्री) : 'गोल शरीर चहुंकडून तसें दिसंदिवस बाई गरारतें ।' - प्रला १४२. २. गोलदार, वाटोळे होणे.

**गरारणे** अक्रि. एकाएकी, सपाटून घाबरणे.

**गरारा** क्रिवि. गरगरा; वाटोळे; चक्राकार (फिरणे, गुंडाळणे, लोळणे.).

**गराळ** वि. गर असलेले : 'ऋतूद्भव गराळ फळेंहि खावी.' - पुरु. नोव्हें ३९.

**गरांडी** स्त्री. करपट ढेकर; उचकी. पहा : **गरळी**

**गरांव** पु. अर्धगुंज (वजनी माप). (गो.) [इं. ग्रेन]

**गरिबगैबती** वि. गरीबगुरीब : 'पहाता जाई दिपुन गरिबगैबती ।' - ऐपो २९०.

**गरिबाई** स्त्री. १. गरिबी; कंगाली; लाचारी; पराधीनता; दैन्य. २. शांतपणा; सात्त्विकपणा; थंडपणा (स्वभावाचा). [फा.]

**गरिबी** स्त्री. १. दारिद्र्य; पैशाची कमतरता. २. रंकपण; नादारी. ३. (ल.) सात्त्विक वृत्ती; नम्रता; शांत स्वभाव; गरीबपणा. [फा.]

**गरिबीहरिपी** स्त्री. १. दारिद्र्य व श्रीमंती. २. नीचता व मोठेपणा.

**गरिमा** पु. १. भारदस्तपणा; गुरुत्व; गांभीर्य. २. मान्यता; थोरवी; श्रेष्ठत्व; मोठेपणा : 'गरिमेतें अंगाकडे । येवोंचि नेदी ॥' - ज्ञा १३.१८८. ३. (ल.) पुष्टपणा. ४. अणिमादी अष्टसिद्धीतील तिसरी सिद्धी; शरीर वाटेल तेवढे मोठे करण्याची सिद्धी. ५. मोठेपणा; प्रचंडता : 'प्रतापगरिमा पाहे माझा ।' - भारा किष्किंधा ३.६५. [सं.]

**गरिमान** पु. मोठेपणा : 'ईच्या नितंबा गरिमान यावा ।' - सारुह २.५४. पहा : **गरिमा**

**गरिष्ठ** वि. १. फार किंवा अतिशय जड; अवजड. २. भव्य; अपरिमित; जबरदस्त; अति वजनदार. ३. प्रौढ; प्रतिष्ठित; संभावित. [सं.]

**गरी** पहा : **गरा, गराठी**

**गरी** स्त्री. फणसातील लहान गरा. (को.)

**गरी** स्त्री. कडब्याच्या पंचाहत्तर ते ऐंशी पेंढ्या उभ्या केलेली गंज. (व.)

**गरी** वि. भाजी वगैरेंची उशीरा येणारी जात; गरवी.

**गरीतोड** क्रिवि. ताबडतोब; लवकर; एकदम.

**गरीफदारी** स्त्री. गुंता; बंधन; अडचण : 'या गरीफदारीत सा महिने गेले आणखी किती दिवस जातील पहावें.' - पेद १८.८९.

**गरीब** वि. १. दरिद्री; कंगाल; द्रव्यहीन. २. शांत; निरुपद्रवी; सात्त्विक; थंडा; पामर; बापडा; केविलवाणा; सालस. ३. दीन; लाचार. [फा.]

**गरीबखाना** पु. (स्वतःच्या घराचा एक उपचार म्हणून विनयाने असा उल्लेख करतात.) गरिबाचे घर; झोपडी : 'माझ्या गरीबखान्यात रामूभय्यांचे पहिले स्वागत झाले ते असे.' - गणगोत १९७.

**गरीबगाय** वि. अगदी निरुपद्रवी; दीन; लाचार (मनुष्य.).

**गरीबगुरीब, गरीबगुरबा** पु. अव. वि. गोरगरीब; गरीब लोक (समुच्चयार्थी) : 'गरीबगुरबांचीं घरें बहुतेक वाहून गेली.'- मइसा ७.७०.

**गरीबगोर** वि. हीन; अनाथ; गरीबगुरीब; निराश्रित; असाहाय्य : 'औरंगाबाद सभोवते चोर राउतांनी उपद्रव फार मांडिला आहे. गरीबगोर मारले जातें.' - पेद २२.१०.

**गरीबदारी** स्त्री. चिंता; काळजी; विपन्नावस्था : 'सरदारी बहुत गरीबदारींत आहे.' - ऐलेसं ८११३.

**गरीबनवाज, गरीबपरवर** वि. दीनदयाळ; अनाथनाथ; गरिबांचा कनवाळू; गरीबांचा पालनकर्ता : 'गरिबनवाज माधवजीची दुरुनि द्वारावती देखियली ।' - अमृत ३०. धनी, मोठे लोक यांना अर्जदारांकडून ही पदवी लावण्यात येत असे. [फा.]

**गरीबसार** वि. लाचार; कंगाल; बापुडवाणा.

**गरीर** वि. उर्मट : 'थोरली बायको काहार गरीर असता....' - पेसाप ९५.

**गरुइ** वि. मोठी; श्रेष्ठ : 'अर्जुना हे गरुइ भक्ति । सांधितली तुज प्रति ।' - राज्ञा ९.२२७.

**गरुग** पहा : **गरग**

**गरुड** पु. १. एक पक्षिविशेष; हा चपळ, भव्य, सुंदर व पिंगट पिसाऱ्याचा, निर्भय, तीव्रदृष्टी व वेगवान असतो. म्हणून याला पक्ष्यांचा राजा (खगेंद्र) म्हणतात. २. गिधाडाची मोठी जात. [सं.] (वा.) ० **करणे** - बनवणे; फसवणे. (कु.)

**गरुड** पु. आखाडा; तालीमखाना : 'कीं गगन चित्रें गरुडीं घातलीं कर्पुर - चुरी चोखडी । सरावो द्यावया चहुबुडी ।' - नरुस्व ४९.५.

**गरुड उडी** लांबून धावत येऊन मारायची उडी.

**गरुडघुबड** न. अति मोठे घुबड. हे टर्की पक्ष्याएवढे असते.

**गरुडझेप** स्त्री. १. अचानक उडी; आकस्मित उड्डाण; गरुड जसा आकाशातून एकदम झेप घालतो त्याप्रमाणे आक्रमण : 'हिंदुत्वनिष्ठांच्या पक्षासारखा नवा पक्ष पुढे येण्यास अशीच गरुडझेप घ्यावयास पाहिजे होती.'-के १२.१२.१९३९. २. प्रगती.

**गरुडनीळ** वि. पाचूच्या वर्णाची.

**गरुडपक्ष** वि. दोन्ही कुशींवर दोन भोवरे असणारा (घोडा.) हा शुभदायक आहे. - अश्वप १.९१.

**गरुडपक्षक** (नृत्य) त्रिपताक हस्त एकमेकांत गुंतवून तळहात खाली नेणे.

**गरुडपक्षी** वि. दोन्ही बाजूंनी फासोळी कमी असलेले (जनावर). (व.)

**गरुडपाच-चू; गरूडोद्गार** पु. स्त्री. पाच नावाचे रत्न; राजनीळ : 'गरुडपाचूंच्या ज्योती पूर्ण । प्रभामय विराजती ।' - ह २.१६. [सं. गारुत्मत मणी]

**गरुडयंत्र** न. गरुडाच्या आकाराचे वाहन : 'तुज गरुडयंत्र करूनि देईन.' - पंचो ३०.११.

**गरुडवेल** स्त्री. गरुळ; गरोळ. पहा : **गुळवेल** [सं. गडुची]

**गरुडारे** न. गरुडाचे देऊळ.

**गरुडासन** न. १. (मल्लखांब) मल्लखांबाच्या बोंडावर एक पाय टेकून दुसरा पाय त्यावर आडवा घेऊन हात जोडून उभे राहणे. २. (हठयोग) याचे चार प्रकार - उभ्याचे दोन व ओणव्याचे दोन.

**गरुत्मा** पु. गरुड.

**गरुरी** पहा : **गरुर-री**

**गरुवती** स्त्री. श्रेष्ठता; गुरुत्व : 'म्हणौनि हा काव्यां रावो । ग्रंथ गरुवतीचा ठावो ।' - ज्ञा १.३३.

**गरुवा** वि. श्रेष्ठ; म्हातारा; मोठा : 'पिंड गरुवा माकडु । होईल हा ॥' - ज्ञा १३.५६९. [सं. गुरुवत्]

**गरुवा** पु. गर्व; ताठा; मगरुरी. [सं. गर्व]

**गरुवार** वि. गरोदर.

**गरुस्ती** स्त्री. दरोड्यातील वस्तू ठेवण्याची पिशवी. (कु.)

**गरूर, गरूरी** पु. स्त्री. गर्व; मगरुरी : 'टिपूही आतां मस्नद नसीन जाहला तो गरूरीच्या पहाडावर चढला.' - ऐलेसं ८.४३५५ : 'मग नवाब

म्हणो लागले गरूर प्रधान पंतांत फार जाहला आहे.' - पेद १०.६६. [फा. गुरुर]

**गरुळ, गरोळ** पहा : **गुळवेल**

**गरोज-झ** स्त्री. पक्ष्याची शीळ. (गो.) [पोर्तु.]

**गरोडा** पु. कापसावरील रोग.

**गरोदर** वि. गर्भार; गर्भवती. (क्रि. होणे, येणे.) [सं. गुरु + उदर]

**गरों** पु. गळ; आमिष. पहा : **गरी** (गो.)

**गरौणी** स्त्री. आमिष दाखविण्याचा प्रकार. (गो.)

**गर्क** वि. १. पहा : **गरक**. २. गडप; मृत : 'ज्या ठिकाणीं भाऊसाहेब गेले आणि गर्क जहाले तें ठिकाण आपण दृष्टीनें पाहूं नये.' - भाब ४७.

**गर्क, गर्ग** वि. घोड्याचा एक रंग. - अश्वप १.२८.

**गर्का** पु. कुंकवाच्या जागी मेणाने चिकटवून लावण्याची नक्षीदार टिकली.

**गर्का** पु. झपाटा : 'फौजेचा एक गर्का ।' - ऐपो १८.

**गर्गट** पहा : **गरगट** : 'आला पाला वाटूनि गर्गट घेतां पोट भरे रे ।' - अमृत ११९.

**गर्गशा** पु. भांडण; गोंधळ; गडबड. पहा : **गरगशा** : 'या उभयतांमध्यें कसबे मसूरचे पटेलगीचा गर्गशा देणियाबद्दल लागला होता.' - मइसा १५.३२.

वि. भांडखोर; कजाग. [फा. गर्घशा]

**गर्गाचार्याचा मुहूर्त** सूर्योदयापूर्वीच्या पाचव्या घटकेपासून तिसऱ्या घटकेपर्यंतचा काल किंवा सूर्योदयापर्यंतची वेळ. हा शुभ मुहूर्त असून गमनास योग्य मानतात; उषःकाल; प्रभात : 'गर्गमुहूर्ते प्रयाण रामा श्रुतिवर्गिनें गाइन मी ।' - आप ७२.

**गर्गोड** पहा : **गरगट** : 'नाना वल्लीचे रस । काडे गर्गोड कर्कश ।' - दास ३.७.३२

**गर्जणे** पहा : **गरजणे** : 'ते वेळीं जयजयकार शब्दीं । गर्जीनिले समस्त ।' - मुआदि ४५.१४७.

**गर्जन, गर्जना, गर्जित** न. स्त्री. १. मेघनाद; ढगांचा गडगडाट : 'हें ना घनगर्जनासरिसा ।' - ज्ञा २८.४८४. २. आरोळी; डुरकणी; प्रचंड आवाज (वन्य पशू किंवा तोफ यांचा.).

वि. गर्जना करणारा : 'गर्जिलें निःशब्दें ।' - ज्ञा ११.१२७.[सं. गर्ज]

**गर्जी** वि. चाहता; शौकीन : 'माझ्या घरच्यांची कठोर मर्जी हो । याला नुमजे हा बायकांचा गर्जी हो ॥' - राम जोशी ४१.

**गर्जेल** पु. एक धान्यविशेष; ज्वारी, बाजरी, नाचणी इ. : 'गर्जेलाची न्याहरी तुला बाळा रे नेनं त्याला ।' - बा ८७.

**गर्झरू** पु. गजर; गर्जना : 'गर्झरू उठिला अद्‌भुतु कांपिली मेदिणी ।' - क्रिपु ७.६२.

**गर्डर** पु. मोठ्या लांबीचा लोखंडाचा आडवा खांब.

**गर्ता** स्त्री. १. खळगा : 'एवं तमाचिये पडिले गर्ते ।' - ज्ञा ९.१८५. पहा : **गरता**. २. डोळ्यांची खाच; डोळे चांगले असून न दिसणे; डोळ्याचा एक रोग : 'फुलें वडस आणि पडळें । कीड गर्ता रातांधळे ।' - दास ३.६.४०. [सं.]

**गर्तिका** स्त्री. सुरईसारखी, विशिष्ट प्रकारची बीजुके निर्माण करणारी पोकळी.

**गर्ती, गर्तिणी** पहा : **गरती** : 'पतिव्रताधर्म ऐका गे साजणी । धन्य त्या गर्तिणी पुण्यशील ।' - ब ४६७.

**गर्तीण** पहा : **गरती**

**गर्द** पु. हेराईन या मादक द्रव्याची भेसळ करून केलेली पिंगट भुकटी. ही 'ब्राऊन शुगर' म्हणून ओळखली जाते.

**गर्द** स्त्री. गरद, गडद धूळ; धुराळा; छाया; काळोखी : 'मनांत संशयाची गर्द आली असेल ती काढून टाकली म्हणजे साफ. कांहींच खत्रा रहात नाहीं.' - मइसा ५.१६६.

वि. १. दाट (छाया). २. धूलीभूत; गडद; निबिड (झाडी.) ३. गारद; नष्ट : 'टिपूचे संस्थान गर्द जालें हें सरकारचे दौलतीस चांगलें नाहीं.' - ऐलेसं ११.६०५६.[फा.] (वा.) **गर्देस मिळवणे** - धुळीस मिळवणे; नायनाट करणे : 'उपेक्षा केलियाने अन्यायाची बुद्धी होणार असे होते त्यांस मारून गर्देस मिळविले.' - मराआ ५.

**गर्दन** स्त्री. मान; ग्रीवा. पहा : **गरदन** [फा.] (वा.) ० **मारणे** - ठार करणे.

**गर्दनखेच** पु. मुलांचा स्काउटचा एक खेळ.

**गर्दनबाजी** स्त्री. तळहातावर शीर घेऊन, जिवावर उदार होऊन लढणे.

**गर्दनस्वारी** स्त्री. (कुस्ती) प्रतिपक्षाच्या मानेला विळखा घालणे.

**गर्दपोस** पु. पलंगपोस; धुरळा बसू नये म्हणून (बिछाना इ. वरील) घालायचा अभ्रा, चादर, रुमाल : 'गर्दपोस काढून करू द्या नीट तकये पलंगावरले ।' - होला ९५. [फा. गिर्दपोश]

**गर्द(र्दा)बाज** वि. १. घोर; निबिड; दाट; घन; किर्र. (झाडी) २. भरदार; पानाफुलांनी भरगच्च (झुडूप, वनस्पती). ३. गहिरा; गाढ; काळाकुट्ट (पाऊस, अंधारी, छाया).

**गर्दबाजी, गर्दाबाजी** स्त्री. निबिडपणा; गर्दी; दाटी. पहा : **गर्दबाज**

**गर्दभ-ब** पु. गाढव; खर. [सं.]

**गर्दम** पु. घोड्याच्या पायाचा एक रोग. - अश्वप २.३८.

**गर्दा** पु. १. भांगेची पूड. २. गर्दी; दाटी; धूळ; धुरळा : 'पंढरपूरामध्ये गर्दा कशाचा उठला ।' - लोसामा २ नलो ३८. [फा.]

**गर्दावा** पु. गर्दी; जमाव : 'त्या गर्दाव्यात बाबा दिसेनासे झाले.' - स्मगा २२८.

**गर्दास** वि. घोड्याचा एक रंग; शेंडीपासून नाकापर्यंत असलेली पांढरी लकेर. - अश्वप १.२७.

**गर्दी-र्द्दी** स्त्री. १. फार दाटी; भरगच्ची (धूळ, चूर्ण, सुगंधी बुकणी, धूर इत्यादीची). २. (ल.) दाटी; चेपाचेपी; चेंगराचेंगरी. ३. अतिशय विपुलता; रेलचेल (पाऊस, पीक, हंगामातील उत्पन्न, जेवणातील पदार्थ यांची.) ४. मोठा गोंगाट; आरडाओरड. [फा. गर्द]

**गर्दी** स्त्री. घाई : 'त्याने (रुपमतीसाठी) एक वीर मनात योजिलाहि होता. परंतु लग्नाची गर्दी केली नाही.' - रूरा ७.

**गर्दी-र्द्दी** स्त्री. १. उत्पात; नासधूस (लुटारूंनी केलेली). २. दाणादाण; धूळदाण (सैन्याची). ३. (सामा.) अंदाधुंदी; अव्यवस्था; सैन्याचा हल्ला : 'गर्दी झाली त्यावरती ।' - ऐपो ३५८. ४. अकस्मात हुद्दा नाहीसा होणे; बडतर्फ होणे; अब्रू जाणे (मुत्सद्दी, सरदार, अधिकारी

यांची.) (वा.) ० **उडणे** - भंबेरी उडणे : 'एका टिप्पिऱ्यातच त्याची गर्दी उडाली होती.' - ऊन ३५. ० **करणे** - (कायदा) गैरकायदा मंडळीने किंवा त्यापैकी काही जणांनी बळजोरी किंवा जुलूम करणे; दंगल माजवणे. **गर्दीस मिळवणे** - ठार मारणे : 'त्यांस पानपती कोणी गर्दीस मिळविले.' - संउ ३५०.

**गर्दोव(ग)र्दी** क्रिवि. चारी बाजूंना; सभोवार; आसमंतात; आवतीभोवती. [फा. गिर्दागिर्द]

**गर्धव** पु. गाढव : 'शाप वदल्या दुर्धरा । गर्धव होसि म्हणोनी ।' - मब १९. [सं. गर्दभ]

**गर्नेल-ल** गरनाळ; गरनाळा

**गर्बी-र्भी** स्त्री. दोन भिंतींच्या मधील अंतर. (गो.) [सं. गर्भ]

**गर्भ** पु. १. जन्मास येणारा उदरातील जीव; पुरुषवीर्य व स्त्रीरज यांपासून तयार झालेला व स्त्रीच्या गर्भाशयात असणारा पिंड. २. मगज; गीर; मेंदू; काळजाचा कंद; (सामा.) आतील भाग. ३. (ल.) तत्त्व; कस; तात्पर्य; हाशील; सारांश; ऐवज : 'त्याजवरून येथील गर्भ सर्व अवगत जाहलाच असेल.' - पेद १.४४. ४. व्यापलेली जागा; क्षेत्रफळ. ५. मध्य; मध्यबिंदू. ६. अर्थ; भाव. ७. आतील प्रदेश, बाजू. ८. गर्भाशय; पोट : 'नाना भरतें सिंधुगर्भी ।' - ज्ञा ११.६५०. ९. आतील खोली; बाळंतिणीची खोली. १०. देवळाचा गाभारा. [सं.] (वा.) ० **कोसळणे** - भेदरून जाणे; **गर्भगळित होणे** - फार घाबरणे : 'गर्भगाळ कोसळला ।' - ऐपो ५८. ० **करणे, गर्भाचे होणे** - चैनीचे जेवणे; पोटपूजा करणे; आपल्या पिशव्या भरणे.

**गर्भकर, कर्ता, कारक, जनक** वि. गर्भधारणेस कारणीभूत होणारा; गर्भस्थापना करणारा. [सं.]

**गर्भकांडे** न. गर्भगोल; गर्भपिंड : 'जठराग्नीच्या तोंडी घालूनि गर्भाची उंडी। उकडउकडूनि पिंडी । गर्भकांडी घडिजेति ।' - एभा ७.

**गर्भकुडी** स्त्री. गाभारा : 'देवळाच्या गर्भकुडींत....' - अदेशी १८.

**गर्भकोश** पु. गर्भाशय; पोटातील गर्भ राहण्याचे ठिकाण. [सं.]

**गर्भगळीत, गर्भगिळीत, गर्भगीळ** वि. १. जिने गर्भ टाकला आहे किंवा जिचा गर्भ गळाला आहे अशी. २. (ल.) ज्याची पाचावर धारण बसली आहे असा; घाबरा; भ्यालेला.

**गर्भगुडी** स्त्री. गाणारा.

**गर्भगुल्म** न. गर्भ वाढीशी आनुषंगिक अशी मांसग्रंथीची वृद्धी. [सं.]

**गर्भगृह** न. गाभारा; माजघर. [सं.]

**गर्भगोळ** पु. गर्भातील मूल : 'जैसा गर्भगोळु उद्यमातें । कोणाही नेणें ॥' - ज्ञा ९.३३५.

**गर्भग्रहण** न. गर्भधारण; गाभ धरणे. [सं.]

**गर्भघा(पा)ती** वि. ज्याने गर्भ घात होतो तो; गर्भाचा घात करणारा. [सं.]

**गर्भचलन** न. गर्भाशयातील गर्भाची हालचाल, चळवळ किंवा त्यात प्राणशक्ती येणे. [सं.]

**गर्भच्युत** वि. गाभ पडलेली; धुपावलेली. [सं.]

**गर्भच्युति-ती** स्त्री. गाभ पडणे; धुपावणे. [सं.]

**गर्भछाट** पु. १. गर्भाशयात गर्भाचा नाश. २. समूळ नाश; संहार; गर्भाशयातील मूलसुद्धा कापणे.

**गर्भछाट** पु. निवड; वेचणी; टिपणी; निवडलेला भाग.

**गर्भछाट** पु. स्त्री. कुलुपी गोळ्यांचा स्फोट, धडाका.

वि. गोळ्या, छरे, खिळे, दगड इ. नी भरलेला (कुलुपी, गोळा, तोफ). स्त्री. १. कुलुपी गोळा; २. गरनाळी तोफ.

**गर्भछाया** स्त्री. गर्भधारणा झाल्याची सूचक खूण, चिन्ह, दर्शन (मुखावरील टवटवी इ.) : 'तत्काळ आली तिस गर्भछाया ।' - सारुह २.२७. [सं.]

**गर्भदास, गर्भदासी** पु. स्त्री. जन्मापासून एखाद्याची बटीक, दासी, कुणबीण; तिचे मूल, लेकवळा (मुलगा, मुलगी); दासदासीचा पुत्र किंवा कन्या; दासीपुत्र - पुत्री. [सं.]

**गर्भधनी** वि. गर्भार : 'हरणी एकटी वनीं । असें रे गर्भधनी । पारधी आला।' - मनोरंजन, जुलै १९३२.

**गर्भधारण** न. गर्भ राहणे; गाभण होणे; गरोदर होणे. [सं.]

**गर्भधारणा** स्त्री. (वै.) स्त्रीबीज आणि पुरुषबीज यांचे मीलन होऊन गर्भबीज बनते. हे गर्भबीज गर्भाशयात स्थिर होऊन तेथे वाढू लागले म्हणजे गर्भधारणा झाली असे समजले जाते.

**गर्भनाडी** स्त्री. नाळ; वार. [सं.]

**गर्भपटल** न. (वै.) गर्भाशयातील गर्भाला लपेटणारा पातळ पडदा.

**गर्भपत्र** न. गाभ्यातून निघणारे कोवळे पान : 'तियें अंगवसां गर्भपत्रें ।' - ज्ञा १५.९९. [सं.]

**गर्भपंडित** पु. १. गर्भात असतानाच विद्वान झालेला पुरुष. २. (ल.) अतिशय मूर्ख, अक्षरशत्रू मनुष्य. [सं.]

**गर्भपुट** न. गाभ्याचा पडदा; ज्यातून सुयर बाहेर येतो तो भाग : 'कर्पूरकर्दळीचीं गर्भपुटें ।' - ज्ञा ११.२५०. [सं.]

**गर्भभाव** पु. तात्पर्य; गोषवारा : 'त्या कथेचा गर्भभावो । सांगा मज ॥' - कथा १.२.२८. [सं.]

**गर्भरेशमी** वि. १. काठाशिवाय अंगात रेशमाचे धागे असलेले (वस्त्र). २. तलम (वस्त्र).

**गर्भरोजमुरा** पु. जन्माला येणाऱ्या मुलीची पोटगी, तरतूद वगैरे.

**गर्भवती** स्त्री. १. गर्भार, गर्भारशी स्त्री; २. नवशिकी; पहिलटकरीण [सं.]

**गर्भवायु-यू** पु. गर्भाचा किंवा गुल्माचा वात. [सं.]

**गर्भवास** पु. १. गर्भाशयात, पोटात राहणे. २. जन्माचा फेरा; मुक्ती नसणे : 'तुका म्हणे गर्भवासीं । सुखें घालावें आम्हासीं ।' - तुगा ११९३. [सं.]

**गर्भवोवरा** पु. गर्भ; गर्भात असलेला जीव : 'देवकीचा गर्भ वोवरा । माझा अवताररूप होय ।' - ह ३.२५.

**गर्भशंकु-कू** पु. मृत गर्भ बाहेर काढण्याचे शस्त्र. [सं.]

**गर्भश्रीमंत, गर्भश्रीमान, गर्भसुखी** वि. जन्मापासून श्रीमंत; वाडवडिलांपासून ज्याच्या घरी संपत्ती आहे असा पिढीजात श्रीमान. [सं.]

**गर्भसंभव** पु. गर्भ राहणे; गर्भधारणा. [सं.]

**गर्भसुती** वि. ताणा (उभे सूत) सुताचा व बाणा (आडवे सूत) रेशमाचा असे (वस्त्र).

**गर्भसूत्र** न. १. मध्यरेषा; मध्यापासूनची रेषा. २. (ज्यो.) भूमध्यापासून ओढलेली रेघ. ३. केंद्रातून जाणारी कोणतीही रेघ. [सं.]

**गर्भस्तुति** स्त्री. व्याजस्तुती.

**गर्भस्थ** वि. १. गर्भाशयात असलेला. २. मध्यवर्ती; आतील; आत किंवा मध्यात बसलेला. ३. गर्भार : 'तिघी राण्या झाल्या गर्भस्था ।' - राचि ४.२७. [सं.]

**गर्भस्पंदन** न. (वै.) गर्भाशयात होणारी गर्भाची हालचाल. [सं.]

**गर्भस्राव, गर्भश्राव** पु. (वै.) गर्भाची पूर्ण वाढ होण्याआधी तो मातेच्या शरीरातून बाहेर टाकला जाणे.

**गर्भज्ञानी** वि. गर्भपंडित; जन्मत: ज्ञानी, विद्वान असलेला.

**गर्भा** पु. १. रासक्रीडेसंबंधी हिंदी किंवा गुजराती गाणे. नवरात्रात देवीसमोर गर्भे गातात. २. गर्भारशी किंवा गर्भार होऊ इच्छिणाऱ्या स्त्रियांची एक क्रीडा. यात देवीची पूजा करतात व वर्तुळाकार फेर धरून गाणी म्हणतात. हा संस्कार आश्विनी शु. दशमीपासून पौर्णिमेपर्यंत करतात. या वेळच्या गाण्यांनाही गर्भा म्हणतात. आश्विनी नवरात्र किंवा सर्व शुक्लपक्ष यांमध्येही हा कार्यक्रम होतो. [गु.] [सं. गर्भ]

**गर्भागार** पु. देवळाचा गाभारा. [सं.]

**गर्भादा(धा)न** न. १. गर्भधारण; गर्भ राहणे. २. त्रैवर्णिकांच्या सोळा संस्कारांपैकी एक संस्कार; गर्भस्थानाची शुद्धी होऊन गर्भधारणा सुलभ व्हावी म्हणून प्रथम रजोदर्शनानंतर जो संस्कार करतात तो. हा संस्कारविधी रजोदर्शनापासून सोळा दिवसांच्या आत करतात. [सं.]

**गर्भार, गर्भारशी** वि. स्त्री. गरोदर स्त्री; गर्भवती.

**गर्भार्थ** पु. फलितार्थ; गर्भितार्थ; ध्वनितार्थ. [सं.]

**गर्भावधि-धी** पु. फलित अंड्यापासून, मातेच्या शरीरात गर्भाची पूर्ण वाढ होऊन त्याचा बाह्यजगात प्रवेश होण्यास लागणारा वेळ.

**गर्भावस्था** स्त्री. १. गर्भ असलेली अवस्था. २. (ल.) एखादी गोष्ट प्रत्यक्षात येण्यापूर्वी असलेले तिचे स्वरूप.

**गर्भाशय** पु. १. (वै.) स्त्रीशरीरातील कटिगुहेत मूत्राशय आणि मलाशय यांचे दरम्यान असणारा महत्त्वाचा अवयव. यालाच बाजूने बीजनलिका जोडलेल्या असतात. २. गर्भशय्या; गर्भस्थान; कूस. ३. गर्भाची खोळ; वार; गर्भवेष्टन. [सं.]

**गर्भासन** न. १. योगशास्त्रातील ८४ आसनांपैकी एक आसन. २. (मल्लखांब) मल्लखांबाला हाताची गोफण बांधून दोन्ही पाय लावून केलेले आसन. [सं.]

**गर्भांकुर** पु. अव. (वै.) गर्भातील निरनिराळे अविकसित भाग. ह्या भागांचा नंतर विकास होऊन त्यापासून वेगवेगळे अवयव तयार होतात.

**गर्भिण** स्त्री. समांतर रेषा काढण्याचे सुताराचे एक हत्यार. (कु.) पहा : **गरबीण**

**गर्भिणी** स्त्री. १. गर्भार स्त्री. २. फळ देण्याच्या बेतात आलेली वनस्पती : 'एकें गर्भिणी उकडविली । पुटामाजीं ॥' - ज्ञा १३.२२८.

**गर्भित** वि. १. ध्वनित; फलित; आकलित; बांधित; समाविष्ट. २. छुपी; सूचक; अप्रकट. ३. व्यंग्य; व्यंजक.

**गर्भी** स्त्री. १. व्यापलेली जागा; क्षेत्रफळ. पहा : **गर्भ** ४. २. घेरा; वेढा (इमारत, लाकूड यांचा). ३. मध्य; केंद्र. ४. मधला भाग; अंश. ५. सुपारीच्या कोवळ्या घोसावरील, लोंगरावरील कोश, आवरण. (कु.) [सं. गर्भ]

**गर्भी** क्रिवि. पोटात असताना; जन्मापासून; जन्माला येण्यापूर्वी. समासात - गर्भी आंधळा - रोगी.

**गर्भीण** वि. गरोदर : 'गर्भीण नारईची पिवळी तिची काया ।' - राके १९६.

**गर्भीभवन** न. (वै.) फलित अंड्याचे गर्भात रूपांतर.

**गर्मरू** वि. तप्तमुख; तप्त चेहरा असलेला.

**गर्मा, गर्मी, गर्मिणा** पु. स्त्री. १. गरमा, गरमी; उकाडा; तलखी. पहा : **गरमा** : 'दोनी मंडप बुलंदीस कमी, याजमुळें गर्मिणी भारी....' - ऐलेसं १०. ५४४५. २. उपदंश रोग. या रोगाचा कौशिक सूत्रात ग्राम्य असा उल्लेख आहे. ग्राम्य = मैथुन; ग्राम्य व्याधी = मैथुन - संयोगापासून होणारी व्याधी. [फा.]

**गर्मी** स्त्री. १. उद्धटपणा; मग्रुरी; गुर्मी : 'इकडील मोंगलांची गर्मी राहिलीच नाहीं.' - मइसा १.२६२. २. जरब : 'गर्मी दाखवून जें मिळेल तें मेळवावें.' - पया ३२७. (क्रि. दाखवणे.) [फा.]

**गर्मेजणे** अक्रि. ऊन किंवा कोंबट होणे. (व.) [हिं.]

**गर्रा** क्रिवि. एकत्रित.

**गर्ला** वि. गलितगात्र.

**गर्व** पु. अभिमान; ताठा; तोरा; डौल; दिमाख; अहंकार; मान (क्रि. वाहणे, होणे, फुगणे.) : 'इंग्लिश लोक आपल्या उत्कृष्ट भाषेचा साऱ्या भूमंडलावर प्रसार होत चालला आहे याचा अतिशय गर्व वाहतात.' - नि ५. [सं.]

**गर्वस** वि. मागाहून पिकणारे (धान्य). पहा : **गरवा, गरवस**

**गर्वहत** वि. अहंकार दुखावलेला; भानभंग झालेला; तोरा गेलेला.

**गर्वहरण** न. अभिमान किंवा ताठा नाहीसा करणे. (क्रि. करणे.) : 'शिवाजीनें शाहिस्तेखानाचे गर्वहरण केल्यावर....' - मालआ ४.

**गर्वा** पहा : **गरवा** : 'फुलावर आलेले गर्वे भात दूध घेत होते.' - सराई २.

**गर्विक , गर्वित, गर्विष्ठ, गर्वी** वि. अभिमानी; दिमाखखोर; मगरूर.

**गर्वेल** न. गरवस; गर्वे भात. (को.)

**गर्वोक्ति-क्ती** स्त्री. अभिमानाचे, आढ्यतेचे भाषण; (सामा.) गर्व; शेखी : 'गर्वोक्ति फाल्गुन वदे जगदेकराया ।' - वामन, भीष्मयुद्ध ७. [सं.]

**गऱ्हवार, गर्व्हार, गर्व्हारशी** स्त्री. गरोदर स्त्री. पहा : **गर्भारशी** : 'गऱ्हवारे हा विधि । पोट वाढविले चिंधीं ।' - तुगा ६२५.

**गऱ्हण** पहा : **गर्हणीय**

**गऱ्हणीय, गर्हणीय** वि. निंद्य; तिरस्करणीय; आक्षेपार्ह; ठपका ठेवण्यास योग्य; दूषणीय; गैर; त्याज्य;, अयोग्य. [सं. गर्ह = निंदा करणे.]

**गर्हा** स्त्री. १. निंदा; दोष; ठपका; तक्रार : 'देवज्ञांची करूं नको गर्हा ।' - मो. २. निंदा करणे; ठपका ठेवणे. [सं.]

**गऱ्हाणे** पहा : **गाऱ्हाणे**

**गर्हित** वि. दोष दिलेला; निंदा केलेला; कुटाळी किंवा कागाळी केलेला; निंदित. [सं.]

**गर्ह्य** वि. निंद्य. पहा : **गर्हणीय** [सं.]

**गल** स्त्री. विटीदांडू, गोट्या इ. खेळण्यासाठी जमिनीत केलेला खळगा. [क. अगळु] [सं. गद]

**गल** पु. १. गाल. २. कल्ले. (गो. गलें) [सं. गल्ल]

**गल** पु. १. गळा; मान. २. (वै.) घसा; ग्रसनिका.

**गल** पु. गळ; लोखंडी आकडा; आमिष; साखळ; नांगर : 'गलु न पाहतां गीली । उंडी मीनू ॥' - राज्ञा १३.७३८.

**गलकल्ला, गलगुच्छ** पु. गालावरचा केसांचा झुपका; कल्ला.

**गलकंबल** पु. बैलाच्या मानेखालची पोळी. [सं.]

**गलका** पु. गलबला; गोंगाट; कल्ला; गडबड; गवगवा. [सं. कल् = कलका] [क. गलगु = मोठ्याने वटवट]

**गलगचा-ची** स्त्री. गाल व मान. (मावळी)

**गलगल** स्त्री. कलकल; बडबड. पहा : **गलका** [सं. कलकल]

**गलगल** पु. १. काही वनस्पतींचा चीक; भोकर इ. फळांचा चीक. २. देवमाशाची चरबी; समुद्रातील जार. [सं. गल् = गळणे.]

**गलगलणे** अक्रि. १. गडबडणे; अस्वस्थ होणे; चक्कर येणे. २. गोंगाट करणे; बडबड करणे; घोंगावणे; गुणगुणणे. [सं. कल् = कलकल]

**गलगलणे** अक्रि.(एखादे ठिकाण) जलमय किंवा दलदलीचे होणे; पाणथळीचे होणे. [सं. गल्]

**गलगला** पु. घोसाळे; गिलके. (ना.)

**गलगलाट** पु. कलकलाट; मोठी गलबल; मोठा गलबला; आरडाओरडा; मोठ्याने घोंगावणे.

**गलगली** स्त्री. १. दलदल; रेवण. २. थलथलीतपणा; रबरबीतपणा. [सं. गल्चे द्वि.]

**गलगलीत** वि. १. थलथलीत; बिलबिलीत (फार परिपक्व फळ, भात, गरा). २. मृदू व चिकट (चीक, गाळ, जार.) ३. चिकचिकीत (घाम.) (गो.)

**गलगंड** पु. गंडमाळा रोग.

**गलगंडिका** स्त्री. गळ्याच्या जवळील चेतापेशी समूह. (बे.)

**गलगा** पु. गवत, वाळलेली पाने इ. चा अस्ताव्यस्त पडलेला केरकचरा.

**गलग्रह** पु. गचांडी; गळचेपी. (क्रि. करणे.)

**गलग्रह** पु. १. प्रतिपदा, चतुर्थी, षष्ठी, सप्तमी, अष्टमी, नवमी, त्रयोदशी, चतुर्दशी, पौर्णिमा व अमावस्या या तिथी. (या तिथींना मुंज करीत नाहीत.) २. अनध्यायाचा दिवस.

**गलग्रह** पु. ज्याच्या अन्नवस्त्राचा भार त्याच्या इच्छेविरुद्ध दुसऱ्यावर पडलेला असतो तो; खायला काळ व भुईला भार असा माणूस. [सं.]

**गलग्रह** पु. घटसर्प; घाटसर्प.

**गलघाटी** पहा : **गळघाटी**

**गलची** स्त्री. गळा; मानगुटी : 'बारगीरानें झटपट करून गलची धरून कटार स्कंधावर उभा चालवून वरून भार घालून दाबला' - मर्शियांका ८८२.

**गलच्छ कंठच्छ, गलस्य कंठस्य, गलस्थ कंठस्थ** वि. जीवश्च कंठश्च; अतिशय दाट; गहन (मैत्री.).

**गलजोड** पु. (स्था) एकावर एक असलेला सांधा.

स्त्री. मैत्री.

**गलणे** अक्रि. झरणे; पाझरणे; गळून पडणे; सुटणे; नाहीसे होणे : 'हालवलें हीं न गलें । तें परब्रह्म ॥' - राज्ञा ८.१६.

**गलत** वि. १. अव्यवस्थित; घोटाळ्याचे; गोंधळाचे (कृत्य, वस्तू.) अनुचित; सदोष. २. बेशिस्त; गफलत्या; वेंधळा (माणूस). ३. बेपत्ता; हरवलेली. (क्रि. होणे) : 'दो मोती गलत....' - पेशव्यांची बखर. क्रिवि. १. वाट चुकून; आडवाटेने; आडरानी; गहाळ किंवा गडबडलेल्या स्थितीत. २. बाहेर किंवा आड बाजूला फेकलेला; जास्त झालेला किंवा निरुपयोगी म्हणून टाकलेला. [सं. गलित]

**गलत** वि. १. रद्द : 'सरदेशमुखीचा परवाना पहिले जाला होता तो गलत करून....' - इमं १७४. २. खोटे : 'पेंढारी यांची आवई उठली होती परंतु ते गलत वर्तमान.' - मइसा १०.२९९. ३. चुकीचे. [फा.]

**गलत, गलत(ता)न** स्त्री. १. अस्ताव्यस्त व गफलतीची भेसळ (पुस्तके, कागद यांची). २. चिवडाचिवड; अव्यवस्था; बिघडलेली स्थिती; चूक. ३. (पत्ते - गंजिफाचा खेळ) घोळ; गल्लत; पिसणी. (क्रि. करणे.) ४. नाश : वाटोळे; वाताहत. (कामकाज, उद्योगधंदा यांची.) [फा.]

**गलतन, गलथन** वि. संततीशिवाय मरणारा.

**गलतनी** स्त्री. तरवार म्यानाला अडकविण्याचा गोफ. [फा. गलता = तलवारीचे कातडी म्यान.]

**गलतपत्र** पहा : **गलितपत्र**

**गलतान** वि. १. आजारी. (व.) २. नालायक; निरर्थक; अयोग्य; अशक्त; मूर्ख; गयाळ (मनुष्य). ३. लेचापेचा; फुसका; कुचकामाची (वस्तू.).

**गलतान** वि. बेसूर; कर्कश; कर्णकठोर (गाणारा, गाणे, आवाज इ.).

**गलती** स्त्री. चूक; दोष; अपराध : 'नोकराच्या हातून गलती होण्याचा फार संभव.' - वज्राघात ११९. [फा.]

**गलत्कुष्ठ** न. ज्यात रोग्याचे अवयव हळूहळू क्षीण होऊन गळून पडतात असा महारोग; रक्तपिती. [सं.]

**गलत्या** वि. गाफील; गबाळ्या; विसराळू; नेहमी वस्तू हरवणारा; गलथान.

**गलथकरी** पु. गंजिफा खेळणारा.

**गलथा** पु. ओझे; सामान ठेवण्याची पिशवी; गठ्ठा; गड्डी : 'त्यांच्या कारकुनांनीं याचे दोन गलथे घेतले आहेत, तें देत नाहींत.' - पेद ८.२५.

**गलथा** पु. १. (स्था.) गुळगुळीत किंवा वक्र कड, कोर (पायऱ्या, कंगोरा, पुढे आलेला भाग, खुर्ची - टेबल इत्यादीचा); सांधलेला तुकडा; दर्शनी भाग; वर्तुळ केलेला, उलटलेला, मुरडलेला भाग (भिंत इत्यादीचा); शेवटास दिलेला गोल निमुळता आकार. २. (ल.) उत्तम ठेवणीची आणि वर्तुळाकार केलेली फरसबंदी. रस्ता.

**गलथा** पु. गचांडी; अर्धचंद्र. (क्रि. देणे.) - (तंजा.) [सं. गलहस्त]

**गलथान** जबडा.

**गलथान** वि. गबाळा; अव्यवस्थित; वेंधळा; निष्काळजी; गाफील.

**गलथानपणा** पु. गबाळेपणा; अव्यवस्थितपणा; बेसावधपणा; निष्काळजीपणा : 'नाटकाचा धंदा गलथानपणे केला की यासारखा पाताळांत नेणारा दुसरा नाहीं.' - मापु.

**गलथेदार** वि. गलथ्याच्या आकाराचा; गलथा केलेला (चौरंग, पाट इ.).

**गलद(ध)ट** पहा : **गळद(ध)ट**

**गलदूम** स्त्री. वर पाय करून हातावर चालणे. (क्रि. करणे, टाकणे, चालणे.)

**गलन** न. १. वितळणी; आटणी. २. गळती; द्रव; पाझर; स्राव. [सं.]

**गलनाल** पु. घशातून जठरापर्यंत अन्न, पाणी इत्यादी नेण्यासाठी असलेली मांसल नळी; अन्ननलिका. (बे.)

**गलनीय** वि. आटण्याजोगे; प्रवाही करण्यास किंवा द्रवण्यास योग्य; द्राव्य.

**गलप** पु. आक्रमण; मोठा दंगा [फा. गलब, इं. गॅलप] (वाक.) **गलप ठोकणे** - १. धावून, दौडत जाऊन हल्ला करणे. २. घेरून टाकणे : 'दरमजल सावनुरास जाऊन फुरद्यावर छापा घालून गलप ठोकला....' - मदरू २.५.

**गलपट्टा** पहा : **गलाबन**

**गलपाणी** पु. मुलांचा गोट्यांचा एक खेळ : 'मुले गलपाणी खेळू लागली आहेत.' - गार १२७.

**गलपोजी** पु. खेडवळ नाटकातील सूत्रधार. (बे.)

**गलफ** न. अभ्रा; आच्छादन. पहा : **गलेफ** (वा.) ० **होणे** - अंमल बसणे; वर्चस्व प्रस्थापित होणे : 'सारांश, चहूंकडे चहूं राज्यावर इंग्रजांचा गलफ जाला!' - ऐलेसं ७२९५.

**गलफ(फा)टणे** अक्रि. १. गैरविल्हे लागणे; हरवणे; थांग न लागणे; सांडणे. (वस्तू.) २. रस्ता चुकणे, आडरानात जाणे; बहकणे. ३. सुचेनासे होणे; गोंधळणे (संकटादी कारणांमुळे). केव्हा केव्हा सकर्मकही उपयोग करतात. [सं. ग्लै.]

**गलफ(फा)टा, गलफ(फा)डा** पु. घोटाळा; धांदल; घोळ; तारांबळ; घालमेल; घोळंकार; बहकण्याची, हरवण्याची, गहाळ होण्याची परिस्थिती (मनुष्य, प्राणी, वस्तू यांची.) (वा.) **गलफाट्यात पडणे** - गोंधळून जाणे.

**गलबत** न. जलमार्गाने प्रवास करण्याचे साधन; नौका; तारू; जहाज; पडाव, मचवा. डोलकाठी असलेले कोणतेही जहाज. (क्रि. हाकारणे.) [पोर्तु.] (वा.) ० **धड्यावर घेणे** - पावसाळ्याआधी गलबते काठावर ओढून त्यांना तेलपाणी देऊन, आच्छादन घालून ती नारळीपौर्णिमेपर्यंत ठेवणे: 'गुराब गलबतें धड्यावरी घेणे, इत्यादिक कार्ये पर्जन्या आलाकडेस (पर्जन्य पडावयाच्या आंत) समुद्रास तुफान जाहाले नाही तों अगोदर करावे.' - पेद ३३.७.

**गलबल-ला** स्त्री. पु. १. गलका; गडबड; आरडाओरडा : 'स्नानदान देवपूजा गलबलित अगदीच अंतरली ।' - ऐपो ३०८. २. घाबरेपणा (भयादिकामुळे). ३. गफलत; गोंधळ; घालमेल (काम, हिशेब यांची). ४. हुल्लड; दंगल. [ध्व.]

**गलबलणे** अक्रि. १. घाबरणे; भिणे. २. तारांबळीत, गोंधळात, गडबडीत असणे. ३. गडबडणे; घोटाळणे. ४. घाबरणे; बेचैन होणे; अस्वस्थ होणे; हादरणे; जीव कालवणे. [सं. गद्, वद्]

**गलबला** पु. कोलाहल; आरडाओरडा; गोंधळ; गडबड : 'करू नका गलबला अगदी । लागली झोप मम बाळा ।' - वाग्वैजयंती.

**गलबलाट** पु. १. मोठी गलबल; आरडाओरड. २. घोटाळा.

**गलबलीत** वि. विस्कळीत; अव्यवस्थित : 'तिचा (कवितावधूचा) ओंचा पदर फार टेकटेकीचा नसतो किंबहुना गलबलीत असतो.' - आ प्रस्तावना ८.

**गलबल्या** वि. १. बोभाट्या; गडबड माजविणारा. २. गोंधळ्या; अव्यवस्थित; भ्रमिष्ट; गफलती.

**गलबा** पु. १. गलका; गोंगाट; आरडा; गवगवा; कलकलाट. २. हल्ला : 'गलबला उठेल.' - मइसा ८.४३५६. ३. जोर; धामधूम : 'शिखांचा गलबा भारी.' - दिमरा.

स्त्री. गडबड : 'तयारीची गलबा दाखविली म्हणजे येणेकडून श्रीमंत संतोष मानितील.' - मइसा २.१०.८१. [फा.]

**गलमिशा-शी, गलमुची-च्छी, गलमूच्छ, गलबूच्छ, गलशप** स्त्री. अव. कल्लेमिशा. पहा : **गलकल्ला**

**गलमुगीर** वि. उद्धट; बेमुर्वत; आग्रही : 'वरातदार गलमुगीर जाले तर बेमुलाहिजा बाहेर घालणें....' - पेद ३.४९.

**गलमुच्छा** वि. मिशांची जाड टोके गालांवर वळवलेला.

**गलरोटी** स्त्री. नीलगाय.

**गलशुंडिका** स्त्री. १. अन्नमार्ग; गळा; अन्नाची नळी; गळघाटी. २. पडजीभ; लोळा; घशातील शुंडाकृती गाठ; घशात मधोमध लोंबणारा मांसल अवयव. [सं.]

**गलसल** वि. निरुपयोगी; कुचकामी : 'लोकांचा जमाव तेथें पावलिया उपरी तेथें फौज आहे त्यापैकीं गलसल सबर.... जे कोणी येतील त्यास निरोप देऊन खासे दोनशे स्वारानसी राहाणें.' - पेद ३३.१६६.

**गलंगती, गलंत्ती, गलंतकी** स्त्री. कांबळा, घोंगडी किंवा इतर वस्त्र याला धावरे टाके घालून व मुरडून बनविलेली कामचलाऊ थैली, पोते, पडशी. [सं. गलंतिका]

**गलंगा** पु. गळती; गळणे.

**गलंड** न. गळू; केसतूड; आवाळू; गाठ; बेंड : 'चामखिळ गलंडें मसें ।' - दास ३.६.५०. [सं. गलगंड]

**गलंडणे** उक्रि. कलंडणे; लवंडणे. (व.)

**गलंभ** पु. स्त्रियांचे स्तन : 'कोरिलिया पुतळियांचे गलंभ ।' - रंयोवा १०.८८३.

**गलाई** स्त्री. वितळण्याचे काम.

**गलागोटा** पु. गल्लागोटा; दाणागोटा : 'तुम्ही कोणाच्या आधारें न बैसता, गुरेंढोरें गलागोटा असेल तो घेऊन जाणें.' - पेद २६.१८५.

**गलगोला** धान्य व दारूगोळा.

**गलाटा** पु. गोंधळ; बिघाड; अस्ताव्यस्तपणा. पहा : **गल्हाटा** : 'येथील विसंच फौजेचा गलाटा....' - पेद ५.६०.

**गलाफ, गॉलफ, गॉलाफ** पु. हंडी; झुंबर. (गो.) [पोर्तु.]

**गलाफ** पहा : **गलेफ** : 'उरुसातील प्रमुख वैशिष्ट्य म्हणजे कबरीला गंधाचा लेप लावून तिच्यावर गलाफ चढविणे हे होय.' - जीसे ३८३.

**गलाबन** पु. लोकरी गळपट्टा.

**गलाला** पु. घोट : 'बहु मृगजल देखौनि डोलां । थूंकिला अमृताचा गीलितां

गलाला ।' - राज्ञा ९.६०.

**गलास** पु. १. काचेचा पेला. २. (ल.) पेटलेली वात आत ठेवलेले काचेचे पेले : 'चवतर्फा लाविले गलांसे जिकडे तिकडे उजाले ।' - पला ४.२७. ३. फुलपात्र; पेला : 'सोन्याचा गलास ठेऊन....' - ऐरापुप्र २.१४९. [इं. ग्लास]

**गलांकुर** पु. घशातील गाठी मोठ्या होणे, सुजणे. [सं.]

**गलांड** पहा : **गलंड** : 'तेथ गलांडें राहावें।' - जै ४९.१०१.

**गलांड(डा)वात** पु. गळू उद्भवण्यास कारण होणारा वात.

**गलांब** न. लहान गलबत. (हेट.)

**गलि(ल)च्छ, गलीच** वि. घाणेरडा; मलीन; ओंगळ. [फा. गलीज]

**गलित** वि. १. पडलेला; सांडलेला; फेकलेला; गळलेला : 'भक्षोनिया शुष्क गलीत पाला।' - नगर ५६. २. वितळवलेले, पाघळविलेले; पातळ (रस) केलेले. ३. (ल.) खंगलेला; सुकलेला; क्षयी; ऱ्हास किंवा खराब झालेला; नि:शक्त [सं. गल्]

**गलितकुष्ट** न. पु. वाहणारे कोड; रक्तपिती : [सं.]

**गलित-चक्षु-क्षू** पु. अश्रू (आसवे) पाझरणारा, वाहणारा डोळा. [सं.]

**गलितपत्र** न. १. झाडाचे गळलेले पान. २. (ल.) फार वार्धक्याने किंवा रोगाने नि:शक्त झालेला माणूस. ३. (ल.) पदभ्रष्ट, अधिकारच्युत, सत्ताहीन माणूस. [सं.]

**गलितपात्र** पहा : **गलितपत्र** ३

**गलितयौवन** वि. तारुण्य संपून गेलेला; उतारवयाचा; म्हातारा. [सं.]

**गलितेंद्रिय** वि. इंद्रिये किंवा ज्ञानेंद्रिय काम देत नाहीत असा. [सं.]

**गलि(ली)म, गलिमाई** पहा : **गनीम, गनिमाई** : 'मुलुख सरंजामास देऊन केली कायम गलिमाई।' - ऐपो ४२१.

**गली** स्त्री. १. पहा : **गल्ली**. २. पहा : **गल**. ३. खळी; खाच : 'आज एकादशवर्षेपर्यंत। गरत गलींत पिचला योगीनाथ।' - नव १७.७४.

**गलीब** पु. गनीम; शत्रू : 'तुम्ही आमची जमीन वाहावी मुल्कात गलीब येईल तो आम्ही मारू.' - पाक्षज्ञाइ खं १.२८.

**गलीम** वि. शूर; धाडसी : 'चिमण्या दिसतात गरीब पण खरोखर असतात गलीम.' - सोबत १०५.

**गलु(लो)ते** न. पाठीवर झालरीवजा कापड सोडलेले बंदांचे लहान मुलांचे टोपरे; एक प्रकारची कुंची.

**गलुंगा** वि. गुबगुबीत : 'गलुंगे गेंद तयारीत...' - प्रभाकर (मला १५५).

**गलूफी** वि. बनावट : 'कागदपत्र दाखविला तो गलूफी दिसून आला.' - बाबारो २.१५. [फा. गिलाफ = झाकण, खोळ]

**गलू(लो)ल** स्त्री. खडे मारायची कमान; गोफण : 'केवळ कुणी मदनाचे गलोले प्राणपक्षि विंधिती।' - प्रला २३६. [फा. गलूल]

**गलू(लो)ल,** आगीच्या ज्वालांचा समूह. [फा. गलील]

**गलू(लो)ल** स्त्री. लोंबता अवयव, अंग (बकरीच्या गलस्तनासारखा). [फा. गलील]

**गलेपटी-ट्टी, गल्लेपटी,** स्त्री. १. कर; सरकारी पागांकरिता भुसार धान्यावर बसविलेली पट्टी; धान्यवसुलीवरील कर : 'गलेपट्टी दर खंडीस रुपये ४ प्रमाणें.' - मसाप २.१७८.

**गलेफ** पु. १. गवसणी; पिशवी; अभ्रा; खोळ (रजई, उशी, खुर्ची, कोच, पुस्तक इत्यादींची) : 'वर गलेफ हिरवा जरतार।' - होला १६०. २. पिराच्या कबरेवर घालण्याचे, झालर लावलेले वस्त्र; प्रेताचे वस्त्र : 'तंटा सुरू झाल्यावर त्याच्यावरील गलेफ उचलून पहातात तो त्याखाली फुलांचा ढीग !' - हिंदुमुसलमानांच्या ऐक्याचे प्रयत्न. [फा. गिलाफ]

**गलेलठ्ठ** वि. १. अतिशय लठ्ठ; अवजड; फार मोठा; स्थूल (पोळ, बैल). २. लठ्ठंभारती; दांडगा, धष्टपुष्ट पण अक्षरशत्रू (माणूस).

**गलेलोट** वि. गल्ल्याकुच्या फिरल्यामुळे पुष्कळ अन्न मिळून लठ्ठ बनलेला. (माण.) पहा : **गलेलठ्ठ**

**गलोब** पु. गळाठा; दुर्दशा : 'ते समई नाश जाला... तेव्हां फार गलोब जाला.' - बोधले बखर ३.३५४.

**गलोरा** पु. गालगुच्चा; गालाला घेतलेला चिमटा; गालोरा. (क्रि. घेणे, धरणे, उपटणे.) [सं. गल = गाल]

**गलोल** पु. जमाव; सैन्य; समुदाय : 'सभोती फौज पन्नास हजारांचा गलोल घेऊन मध्यभागीं इराणीसमूर परम आवेशें उभे राहिले.' - पाणि बख २९.

**गलोला** पु. तोफेचा गोळा : 'अग्निचा गलोला दत्ताजीराव जाधव चालिला।' - ऐपो २.२३. [सं. गोल]

**गलौघ** पु. घटसर्प. [सं.]

**गल्गला** पु. चोपडा दोडका. (झाडी)

**गल्गला, गल्गाल्ता** वि. ओलेचिंब.

**गल्बला** पु. गलबला; कोलाहल; जोराचा वादविवाद : 'ज्ञान गोष्टीचा गल्बला।' - दास ६.१०.५४.

**गल्याढा** स्त्री. गलांडा; गंडमाळा :'ती. राजश्री शेवरावजीच्या गळ्यास गल्याढा जाला तेणेंकरून दोन मास हैराण जाले.' - पेद ४२.३२.

**गल्ल** स्त्री. गोट्या, विटीदांडू इ. खेळातील गल, खाच. पहा : **गल**

**गल्ल** पु. गाल : 'ओले गल्ल प्राज्य प्रेमाश्रु भरें करुनिया डोले।' - मोभीष्म १०.९८. [सं.]

**गल्ल** पु. व्याघ्रादी क्रूर पशूंच्या गळ्याभोवतालचे केस. (गो.)

**गल्लचूर्ण** न. गालाला लावण्याची पूड, पावडर : 'कमांडर इन् चीफच्या तुऱ्यानें व मडमांच्या गल्लचूर्णनें... ख्रिस्ती धर्मास अपूर्व शोभा येऊन...' - नि ३४७.

**गल्लत** स्त्री. भेसळ; अयोग्य रीतीने केलेली सरमिसळ. पहा : **गलत** : 'म्हणुनी फिरून नानांनी उलटी मारूनी केली गल्लत।' - ऐपो २९५.

**गल्लशष्प** पु. गालमुच्छ; गालमिशी. [सं.]

**गल्ला** पु. १. धान्य; दाणागोटा; प्रत्येक प्रकारचे धान्य. २. धान्याचा साठा (मण, खंडी या प्रमाणात). ३. पीक; उत्पन्न. पूर्वी शेतसारा किंवा त्याचा काही भाग गल्ल्याच्या (धान्याच्या) स्वरूपात भरत असत. [फा.] [द्रा. गल्ले]

**गल्ला** पु. १. व्यापारी, सराफ यांची पैसे ठेवण्याची पेटी किंवा लहानसा खळगा. २. पैसे ठेवण्याचे भांडे. ३. रोकड; रक्कम; साठलेले पैसे;

रोजच्या विक्रीचे पैसे. ४. मजुरांना वाटायचा पैसा.

**गल्ला** पु. घोड्याच्या पायाचा (सुंभावरचा) रोग. - अश्वप २.२७३.

**गल्ला** पु. गलका : 'एकच गल्ला उडाला.' - श्रीयो २.७३.

**गल्लाकदुबाण** धान्याच्या स्वरूपातील महसूल.

**गल्लाखरीदी** स्त्री. गावाने विकत घेतलेल्या सर्व धान्यावरील पट्टी, कर.

**गल्लाभरू** वि. कला इ. बाबतीत हिणकस पण ज्यामुळे निश्चित प्राप्ती होते असा (चित्रपट, नाटक, धंदा इ.).

**गल्ली** स्त्री. बोळ; आळी; लहान रस्ता : 'अमंगळ गल्लीकुश्चळ।' - नव १६.१२०. [हिं. गली]

**गल्ली** पहा : **गल, गल्ल**

**गल्लीकुची** स्त्री. १. आळी, बोळ, बिदी यांना व्यापक संज्ञा. २. आडगल्ली. [हिं. गल्ली + फा. कुचाह]

**गल्लीकुचीचा** वि. फारसा प्रसिद्ध नसलेला; गावंढळ; अडाणी; असभ्य (मनुष्य, काम, गोष्ट, वस्तू).

**गल्लूखडा** पु. गोफणीचा दगड; गलोलीने मारायचा दगड : 'येईल माझा भिल्ल नि मारील गल्लूखडा।' - जसा १२४.

**गल्लेकरी** पु. भुसारी; वाणी; मोदी.

**गल्वा** पु. गालगुंड.

**गल्हाटणे** अक्रि. १. रोग वगैरेंनी अशक्त होणे; गळाठणे. २. सावकारीत तोटा आल्याने दारिद्र्य येणे. पहा : **गलवटणे, गळहाटणे**

**गल्हाटा** पु. गळाठा; अस्ताव्यस्त समुदाय, अव्यवस्था इत्यादी कारणांनी झालेली दुर्दशा. पहा : **गळहाटा**

**गल्हेरी** स्त्री. गॅलरी; सज्जा : 'आजूबाजूच्या खोल्यातील लोकांस किंवा पुढच्या गल्हेरीतून हिंडणारांपैकी कोणासही माझ्या हाका का ऐकू येऊ नयेत?' - मी १६.

**गव** स्त्री. १. पकड; चिमटा; अडकण (पक्ष्याच्या पंजाची, नखे-बोटे यांची). २. हाताची कव; वेंघ; मिठी. ३. ताकद; आटोका.[सं. कव]

**गव** स्त्री. १. ऐन वेळ; योग्य प्रसंग, काळवेळ, संधी. २. फुरसत; अवसर; रिकामी किंवा सोयीची वेळ. ३. भरती ओहोटीची वेळ. ४.काही व्यापाऱ्यांची सांकेतिक खूण.

**गव** स्त्री. पत; अब्रू; विश्वास (व्यापारात).

**गव** स्त्री. १. गुप्तपणा : 'तयाहि साक्षित्वाची गंव। सांपडे केंवी।' - सिसं १.९४. २. मतलब. (को.) (वा.) ० **गाठणे** - मुद्दास हात घालणे; मर्म हाती घेणे : 'जरी हे गंव गाठतील तर यांचे ते पातशह आहेतच.' - हिंद खंड १.६७. ० **लावणे** - फायद्याची वस्तू सापडणे; अदृश्य निधी सापडणे.

**गव** स्त्री. वळसा; सभोवती चक्कर : 'तत्राप फौजेस गव घालून हरिपंत तात्या दादासाहेबांचे मार्गे लागले.' - भारतवर्ष पंतप्रधान दुसरी शकावली ६३.

**गव** पु. गहू. (गो.)

**गव** स्त्री. महत्त्व. (व.)

**गवई** पु. गायक; गाणारा; गवय्या.

**गवख-खे** न. (प्र.) गवाक्ष. खिडकी; छिद्र; गुहा : 'जळतया गिरीच्या गवखा। माजीं घापती पतंगाचिया झाका।' - ज्ञा ११.४२५. [सं. गवाक्ष]

**गवगव** स्त्री. आरडाओरडा; गलबल; गडबड; कलकल. [ध्व.]

**गवगव** ओढ; जरुरी; अपेक्षा; चणचण.

**गवगव** स्त्री. खाज; कंडू.

**गवगवचे** अक्रि. भुकेने व्याकूळ होणे. (गो.)

**गवगवणे** अक्रि. कुजबुजणे; हलक्या आवाजात अनेकांनी एकदम बोलणे : 'या त्यांच्या संबंधात जिकडेतिकडे गवगवणाऱ्या आरोपांचा त्यांनी विचार करावा.' - आमासे १००.

**गवगवा** पु. १. पहा : **गबगब.** २. गडबड : 'असो ऐकोनि गवगवा। द्वारी आली शांभवा।' - कथा २.१०.९३. ३. बोभाटा; परिस्फोट; हाकाटी; डंका; प्रसिद्धी. (क्रि. होणे.) (वा.) ० **करणे** - (एखादी गोष्ट) सगळीकडे बोलत सुटणे; बभ्रा करणे.

**गवग्वशी** वि. भरलेला - बदलापूर ४०.

**गवछा** पु. अंगोच्छा; अंगपुसणे. (प्रयाग)

**गवठ** पु. अंगलट; अंगाची ठेवण : 'दोहीमध्यें मुलीचा गवठ आणि सगूण हेच.' - पेद २०.२२.

**गवठ्या** पु. पाटील; खेडेगावात राहणारा. (छत्तीसगडी)

**गवठ्या महाजन** मठ्ठ; मूर्ख. (व.)

**गवण** स्त्री. गव्हाण; गोठ्यातील गुरांना चारा टाकण्याची जागा; गोठ्याचा मध्यभाग. (गो.)

**गवणे** सक्रि. प्राप्त होणे; लाभणे; सापडणे; आटोक्यात येणे : 'ना गवे देखोनि गृध्रावो। इंद्र इच्छी मित्रभावो।' - मुआदि ६.१०.१.

**गवत** न. १. तृण. याचे पुष्कळ प्रकार आहेत. पवनी, गोंडवळ, कुसळ, मारवेल, वरवेल, सुरी, कुंधा, काशा, काऊस, तिखाडी, कर्डू, शिपी इ. २. घास; चारा; ज्या वनस्पतीच्या मुळ्या व पाने सर्व प्रकारची जनावरे खातात ती वनस्पती. [सं. गौअत्त]

**गवतकटाई** स्त्री. १. गवत कापण्यास परवानगी मिळण्याची पट्टी, कर. २. सरकारी पागाकरिता गवतखरेदीचा खर्च भागविण्यासाठी बसवलेला कर. ३. गवत कापण्याची मजुरी. ४. (सामा.) गवतकापणी.

**गवतकापी** वि. (निंदार्थी) लोणीकापी, धार नसलेला (तलवार, वस्तरा यांची धार बोथट असल्यास त्याला म्हणतात.).

**गवतकाप्या** पु. अडाणी न्हावी, शिपाई, कामकरी व त्याचे हत्यार, शस्त्र.

**गवतचराई** स्त्री. कुरणातील चरणावळ; चरण्याचे भाडे.

**गवतर** न. गोमूत्र : 'गाईच्या गवतराची अंगनी झाली गंगा।' - जामामा ८२.

**गवतशी** स्त्री. पेंढ्याची एक काडी. (को.)

**गवत(ता)ळणे** अक्रि. (को.) १. गवताने आच्छादित होणे (नवीन केलेली पाळ, शेत, गवताची हुंडी). २. गवत किंवा रानझाडाने गुदमरणे, खुरटणे (पिकांची वाढ).

**गवताचा उंट** गवत्या टोळ; नाकतोडा. याचे पंख सरळ असून हा काळोख्या रात्री झिग झिग करीत हिंडतो.

**गवतारू** वि. गवताने शाकारलेले : 'एक गवतारू खोप रहायातें।' - केक १५.

**गवताळ** वि. सपाटून गवत उत्पन्न होणारी; विपुल गवत असलेली (जमीन).
**गवती चहा** पातीचा चहा. हा हिरवा व खरखरीत असून यांचे सुवासिक तेल काढतात. हा तापात घाम येण्यासाठी देतात. पाती कढीत घालतात.
**गवती जमीन** गायरान; गवताची जागा.
**गवतुरी** स्त्री. १. हरळी. २. एक खेळ.
**गवत्या** वि. १. गवताविषयी. २. गवतकाप्या; अडाणी.
**गवत्या गोमाजी** (तिरस्कारार्थी. एक कल्पित विशेषनाम) अलबत्या-गलबत्या माणूस; कोणीतरी अप्रसिद्ध, गल्लीकुचीतील माणूस; भलतासलता, अनोळखी, क्षुद्र, गफलती; गवतकाप्या मनुष्य; गवत्या.
**गवनसार** क्रिवि. सोयीस्कर; किफायतशीर; गवसार.
**गवना** पु. गर्भाधानाचा विधी. (व.) [हिं.]
**गवय** पु. गवा; रानबैलाची एक जात : 'गवय, मंडप, हस्ती, शूकर, रेडा, सरूप इ. जनावरांस अनूपवासी म्हणतात.' - अश्वप २.७.[सं. गो.]
**गवय्या** पहा : **गवई**
**गवर,गवराई, गवरणी** स्त्री. गौरी; गौर. (गो.व.)
**गवर, गवरी** पहा : **गोवरी**. (वा.) **गवऱ्या मसणात जाणे** - मृत्युकाल जवळ आलेला असणे.
**गवरणे** अक्रि. गहिवरणे; आठवण काढून रडणे. (व., तंजा.)
**गवरव** पु. वरमातेचा आहेर.
**गवराई** स्त्री. १. बायको. २. स्त्री.
**गवला** पु. एक सुगंधी वनस्पती; कापूरचिनी; कोशफल. पहा : **गव्हला**
**गवली** स्त्री. तार ओढून काढण्याची सोनाराची पकड, चिमटा. (खा.)
**गवल्यो** पहा : **गव्हला**
**गवशा** वि. फुकट सापडलेला; उचललेला; खर्च केल्यावाचून किंवा प्रयत्नावाचून मिळालेले.
**गवशा** वि. १. ठेवलेला (लग्नाशिवाय राखलेला पुरुष किंवा स्त्री); जार; रखेली. २. मिळालेला; हाती आलेला (पोरका, बाप नसलेला पोर.).
**गवशा** वि. काहीतरी मिळवावे या अपेक्षेने आलेला; लाभेच्छू.
**गवस** पु. १. (क्र) शोध; तपास; ठाव; चौकशी. (क्रि. लागणे, लावणे.) २. संधी : 'आला दिवस किती करू नवस गवसेना गवस।' - प्रला २०४. [सं. गवेषण]
**गवसगाढव** पु. टोणपा; मूर्ख माणूस.
**गवसणी-नी** स्त्री. १. खोळ; अस्तर; वेष्टण; आच्छादन; झाकणी; आच्छादनाची पिशवी (तरवार, ढाल, तबला, सतार, पालखी इत्यादीची) : 'जयांचें चित्त गवसणी। व्यापका मज॥' - ज्ञा ९.१९३. २. व्याप्ती; समावेश. [क. गवसणिगे = झाकण, खोळ इ.] (वा.) ० **करणे** - (राज्यास) आपल्या आवरशक्तीत ठेवणे. ० **घालणे** - १. ताब्यात आणणे; आटोक्यात आणणे; कह्यात आणणे. २. झाकण घालणे : 'घालितु आला लोडाची गवसनी।' - शिव ९७९.
**गवसणी पोळी, गवसणीची पोळी** उकडपुरणाची केलेली कणकेची पोळी; तांदळाची उकड पुरणासारखी भरून केलेली कणकेची पोळी. ही आमरसाबरोबर खातात. (को.)
**गवसणे** अक्रि. १. सापडणे; मिळणे; आढळणे : 'इच्छी आलिंगाया कर्णातें अन्य कांत गवसेना।' - मोकर्ण ७.६. २. मनात येण्याजोगे, धरण्याजोगे असणे. ३. एखाद्याच्या कचाटीत सापडणे, हाती लागणे : 'गवसलाच असा खग भासला।' - र २१.
उक्रि. १. शोधणे; धुंडाळणे; २. गोळा करणे; गुंडाळणे; आवरणे; एकत्र करणे (एखाद्या वस्तूचे सर्व भाग).(वा.) **गवसाळा करणे** पकडीत घेणे; छाप पाडणे : 'पादशहानजीक गाठोळीच्या बळें व गवसाळा करून साकल्ये जाहीर करावे...' मइसा ८.४३.[सं. गवेषण]
**गवसणे** उक्रि. १. आच्छादन घालणे; कवटाळणे : 'कीं संध्यारागें गवसलें।' - ऋ २१. २. आश्रयाखाली आणणे : 'आतां याचेनि बळें गवसलें। हें दुर्ग जैसे पन्नासिलें।' - ज्ञा १.११६. २. व्यापणे : 'कांतेचे मुख रम्य जें गवशिलें कोपाश्रु बिंदूत्करें।' - वैराग्यशतक श्लो. ९३. [का. गवसणिगे = खोळ]
**गवसना** क्रि. दांडा मुठीत धरता येणे. (झाडी.)
**गवसविणे** उक्रि. १. शस्त्र म्यानाबाहेर, गवसणीतून काढणे. २. (ल.) सरसावून घेणे : 'ऐसे बोलोनि पापमती। खड्ग गवसवूनि आपुलें हातीं।' - ह २५.२२.
**गवसार** क्रिवि. १. (वेळेच्या दृष्टीने) फायदेशीरपणे. पहा : **गव**. २. (सामा.) नफ्याने; फायदेशीर.
**गवळ** पु. दुपाखी घर; मांगर. (गो.)
**गवळट** पु. (तिरस्कारार्थी) गवळी.
**गवळण** स्त्री. गवळ्याची बायको; गवळ्याचा धंदा करणारी स्त्री. [क. गोल्लति] (वा.) **गवळण घालणे** - दिवाळीत शेणाच्या बाहुल्या तयार करणे : 'खेड्यातील मुली दिवाळीत आपल्या घरापुढे गवळणी घालीत.' - माआ ८९.
**गवळण** स्त्री. १. कोष्टी पक्षी. हा धान्य खातो. २. कोळी किड्यासारखा एक किडा. [क. गवुळि = पाल]
**गवळणकालो** पु. कलावंतिणीकडून देवळात दाखविले जाणारे श्रीकृष्णाचे नाटक. (गो.)
**गवळदा** पु. शेतातील देवांना दाखविलेला नैवेद्य. (कु.)
**गवळदेव** पु. गुरे व गुराखी यांची संरक्षण देवता. (कु.)
**गवळवाडा** पु. गावातील गवळी वस्तीचा भाग; गवळी आळी.
**गवळहाट** पु. गवळ्यांच्या वस्तीचा भाग. पहा : **गवळवाडा**
**गवळा** पु. सोवळे नेसणारा पुजारी, भगत : 'अग मी बायाचा गवळा पिवळी शेवती बायांना।' - घाश्रलो १४५.
**गवळा** वि. पांढरे ठिपके अंगावर असणारा (बैल). पहा : **गव्हळा**
**गवळी** पु. १. गुराखी, खिल्लारी यांची एक जात व त्या जातीतील व्यक्ती. हे गायी, म्हशी पाळून दूधदुभत्याचा धंदा करतात : 'सहसा व्रजांत गाठुनि बहु ताडुनि करूनि बद्ध-भुज गवळी।' - मोविराट ३.२. २. गावठी, साधाभोळा माणूस. (गो.) [क. गौळिग] [सं. गोपाल]
**गवळीक** स्त्री. गवळ्याचा धंदा : 'आनेलु गवळिक करितु। मेंडुरुवांची।' - क्रिपु ६६.

**गवळे** पु. अव. दैवज्ञ ब्राह्मणातील मुंज झालेली लहान मुले.

**गवंड-डी** पु. न. स्त्री. गोवंड; डोंगरावर चरणाऱ्या गुरांचा रस्ता; गुरांच्या पायांनी मळलेली वाट; नदीची दरड (रस्ता असलेली); जंगल किंवा टेकडीवरील चरण्याची जागा. (को.) दोन्ही बाजूंना कुंपणे असून मधून गेलेला गुरांचा रस्ता; पांदण. (व.)

**गवंडा** पु. गव्हाचा भुस्सा. पहा : **गव्हांडा**

**गवंडी-ड्या** पु. दगड, विटा, चुना, माती, सिमेंट वगैरे साधनांनी बांधकाम करणारा, घर बांधणारा कारागीर; विटा रचणारा.

**गवंद** स्त्री. १. रानोमाळ उगवणारी एक वनस्पती; गवत. २. गर्दी; दाटी.

**गवा** पु. रानटी बैल; रानरेडा. याचे कपाळ रुंद, अवयव लांब व भरदार, डौलदार वशिंड, बाकदार व आखूड शिंगे व सशक्त स्नायू असतात. याच्या शिंगाच्या नक्षीदार वस्तू होतात. [सं. गवयः]

**गवा** पु. ठसा, शिक्का किंवा छाप याला शाई लावण्याचा कापडी चेंडू, बोळा. [फा.]

**गवा** पु. गुहा, घळ.

**गवाण** पु. झरोका; साणे. (माण.)

**गवाण** पहा : **गव्हाण** : 'सकाळी गवाणीतील गवत नू आगरातील झाप यांची शेकोटी करून आम्ही बसत असू.' - एल्गार ५.

**गवाणी** स्त्री. गाताडी; गुरांना खाण्यासाठी जेथे चारा घालतात ती जागा. पहा : **गव्हाण** (कु.)

**गवादी** स्त्री. गव्याचे शिंग. याच्या टोकाला गायमुख बसवून त्यातून शंकरावर अभिषेक करतात.

**गवादी, गवांदी** स्त्री. १. अन्नछत्र : 'कृष्णउद्धव संवादीं। होईल परब्रह्म गवादी।' - एभा ५.५६७; 'जयाने घातली मुक्तीची गवांदी।' - तुगा ५४२. २. मेळवण : 'निंदास्तुतीची होय गवादी।' - भाए १८५.

**गवान** पु. सरळ व सुरेख केस. (गो.)

**गवाय** स्त्री. साक्ष. (गो.)

पु. साक्षीदार. [फा. गवाह]

**गवार-री** स्त्री. एक प्रकारची शेंगभाजी; बावच्या. या झाडाच्या शेंगांची भाजी करतात. त्या वाळल्या म्हणजे आतील दाणे जनावरांना घालतात. पहा : **गोवारी**

**गवार** वि. गावंढळ; खेडवळ; मूर्ख. पहा : **गव्हार** [हिं.]

**गवारनिवार** न. १. सैन्याबरोबर बाळगलेले लुटारू पेंढाऱ्यासारखे लोक. २. कचरा; बाजारबुणगे. ३. असमर्थ; लढाईला निरुपयोगी : 'गवारनिवार त्यासही निरोप दिला पाहिजे.' - ऐलेसं ३२४९.

**गवारपाट** पु. जाड पानांची केतकी.

**गवारी** पु. गुराखी; गुरे हाकणारा, राखणारा : 'गाईचा गवारी म्हशीचा खिल्लारी।' - बा ९३.

**गवालंभन** न. मधुपर्काच्या किंवा आतिथ्याच्या वेळचा एक विधी : 'यज्ञदान गवालंभन।' - गुच १२.९४.

**गवावणे** सक्रि. गमावणे : 'तैसे नरदेह पावोनी गवाविलें।' - स्वादि ६.४.६८.

**गवासणे** सक्रि. सापडणे. (को.) पहा : **गवसणे**

**गवाही** पु. साक्षीदार. [फा.]

**गवाळा** पु. पोथ्यापत्रांचा गळाठा; गबाळ. पहा : **गाबाळ**

**गवाळी** स्त्री. भिंत व वळचण यामधील मोकळी जागा. (व.)

**गवाळी आसन** न. लोकरीचे आसन.

**गवाळे** न. १. सोवळे, उपकरणी, देव ठेवण्याचे लोकरीचे वस्त्र किंवा पिशवी; बासन : 'माळा गवाळीं आसनें।' - दास २.७.८२. चंबूगबाळे असाही शब्द येतो. २. बोचके; सामानसुमान (गो.). (वा.) ० **आटोपणे, आवरणे** - १. पळ काढणे; निसटून जाणे. २. कामावरून काढला जाणे; स्थानभ्रष्ट होणे. ३. मरणे. **गवाळ्यात घालणे, टाकणे** - ताब्यात घेणे; थैलीत टाकणे; मुठीत ठेवणे.

**गवाळेचवाळे** न. (व्यापक रीतीने) सामानसुमान; चीजवस्तू; बोचके.

**गवाळ्या** वि. १. गवाळे नेणारा. २. ज्याच्यापाशी गवाळे आहे तो.

**गवाक्ष** पु. न. १. वारा व प्रकाश येण्यासाठी घराला ठेवलेले भोक; लहान खिडकी; जंगी; धारे; झरोका; साणे : 'मग माहार्णवगवाक्षें। रिघोनि ठेला॥' - ज्ञा ११.६१. २. बैलासारखे डोळे असणारे एक माकड. ३. (ल.) गव्याचे शिंग : 'गवाक्ष नव्हे हाड।' - तुगा ३४२. [सं.]

**गवाक्षजाल** न. जाळीदार खिडकी; जाळी.

**गवाक्षप्रसाधन** न. गिऱ्हाईक आकर्षित करण्यासाठी दुकानाच्या दर्शनी भागात केलेली वस्तूंची आकर्षण मांडणी.

**गवांद** स्त्री. भागी; भागीदारी. (खा.)

**गवांदी** स्त्री. हेटाळणी.

**गवांदी** स्त्री. मिश्रण : 'मीळे मुनीची मांदी। तरि निंदास्तुतिची होय गवांदि।' - उगी १८५.

**गवांदी** स्त्री. भागीदारी.

**गवांद्या** वि. भागीदार; वाटेकरी; सोबती; भिडू. (खा.)

**गवी** स्त्री. १. लोहाराचा चिमटा; सांडस इ. पहा : **गावी-वी** २. दरोडा घालण्याची कुऱ्हाड व कंगट्टी (घरफोडीचे एक हत्यार). दरोडा घालण्यापूर्वी यांची पूजा करतात. (कैकाडी)

**गवी** स्त्री. सरकारी अधिकाऱ्यांनी केलेली जमाबंदी किंवा सोडलेले हुकूम मान्य न करणाऱ्या गावकऱ्याची जूट.

**गवी** स्त्री. गव; हातांची कव; मिठी; पकड; खेव; झेप : 'समय पाहून त्वरित धाऊन येऊनया गवीं गवून स्वधनु घेऊन जाई हो।' - होला २२. (वा.) **गवेस येणे** - तावडीत सापडणे : 'सेवकांचे गवेस आलियावर कार्य करावयासी चुकत नाहीं.' - पेद २२.२८१.

**गवी** स्त्री. १. गुहा : 'मग चंद्रगिरीगवींत हरुषत।' - दावि १०१. २. आतून पोकळ असलेली धान्याची गरी, उडवी. (माण.) ३. डोंगरातील गायरान. [क.]

**गवेची** स्त्री. खड्डा.

**गवेषण-णा** न. स्त्री. गवसणी; शोध; तपास; चौकशी; तलास अन्वेषण: 'ते तुमतें न देखोन। करितील वो गवेषण।' - रास १.५४९. 'येऊनि नरदेहाप्रती। कर्त्याची गवेषणा जे करिती।' - एभा ७.२४९. [सं.]

**गवेंडा** पु. शिताफळासारखे एक रानटी झुडूप.

**गव्य** वि. गाईसंबंधी; गाईपासून झालेले (दूध, दही, तूप इ.) जसे :- पंचगव्य. न. गोरस. [सं.]

**गव्हर** वि. गावंढळ; अडाणी. पहा : **गवार**

**गव्हर** न. १. गुहा; दरी; कंदरा; गुंफा; विवर : 'जैसा सिंह उफाळला हिमगिरीच्या गव्हरापासुनी।' - आसी ६३. २. (ल.) हृदगत; गूढ अर्थ; अभिप्राय; अंतरंग : 'वेदाचें गव्हर न कळे पाठकां। अधिकार लोकां नाहीं येरा।' - तुगा २५१४. [सं.]

**गव्हर-रू** पु.गहिवर : 'जो अें दुःखाचा पुरूं। तों सांगितां गव्हरू। सावरेना॥' - शिव १०३.

**गव्हरणे** अक्रि. विवरण करणे; गूढार्थ सांगणे : 'पंचमीं गव्हरिलें। योगतत्त्व॥' - ज्ञा १०.२५.

**गव्हला** पु. एक सुगंधित द्रव्य; प्रियंगू; यांचे झाड लहान असून सुवासिक तेले, उटणे, उदबत्ती वगैरेसाठी उपयोगी असते. हा तुरट व शीतल असून वांती, दाह व पित्त यांचा नाशक आहे. [सं. गंधकला]

**गव्हला** पु. १. बोटवा; दुधात भिजविलेल्या गव्हाच्या पिठाची किंवा सपिटाची दोन बोटात वळून केलेली लांबट वळी. याची खीर करतात. २. गव्हाच्या रुचीचे एक फळ. [क. गवुलि] [सं. गोधूम वलयम्]

**गव्ह(व्हा)ळा-ळ्या** वि. १. गव्हाच्या रंगाचा. २. गव्हासारखे ठिपके असलेला (साप, जनावर) : 'वय नूतन हार्ती निऱ्या चालणें चपळ जशी नागीण गव्हळी।' - होला ८७. ३. गव्हाच्या पिकास योग्य (शेत जमीन). ४. गदरलेले; पक्व दशेस आलेले; पिवळे जर्द (फळ.) [सं. गोधूम]

**गव्हा, गव्हाई** स्त्री. साक्ष; साक्षीदार. पहा : **गवाय** (व.) [फा. गवाह]

**गव्हाई** स्त्री. पळापळ; पांगापांग : 'त्यावरी विलायती गव्हाई झाली.' - फडतरे चऱ्होलीकर महजर.

**गव्हाई** वर्षभराच्या सेवेपोटी हंगामात द्यावयाचे धान्य. (अहि.)

**गव्हाची माळ** स्त्रियांच्या गळ्यातील गव्हासारख्या आकाराच्या मण्यांची माळ; एक अलंकार. - (तंजा.)

**गव्हाण-णी** स्त्री. १. गाताडी; गुरांना चारा घालण्यासाठी केलेली जागा. २. गोठ्यात गुरे उभी राहण्याची जागा व भिंत यांच्या दरम्यान घातलेले आडवे लाकूड, किंवा तुराट्याचे कूड. यामुळे वैरण गुरांच्या पायांखाली येत नाही. (व.) [सं. गवादनी]

**गव्हाण-न** न. पांगळ्याच्या हातातील टेकण.

**गव्हान** न. आश्रयस्थान : 'हिंडतां गव्हानें गा शिणलों येरझारी।' - तुगा ३४९. [सं. गव्हार]

**गव्हार-रू** वि. मूर्ख; अडाणी. पहा : **गवार** : 'गव्हारू निद्रासुखें। घर जळत असे तें न देखे-' - ज्ञा १३.७४२.

**गव्हार** वि. दंगेखोर; लुटारू : 'झाशीहून कूच करोन पुढें जावें तों बातमी आली की, १०-१२ कोसांवर गव्हार २-३ हजार जमा झाले आहेत...' - ऐलेसं २७८७.

**गव्हार** न. अंतरीचे गूज; अंतर्गत हेतू : 'त्याचे गव्हार स्वामीनी चित्तांत आणून अंगिकार करावा निमित्त की पूर्वापार स्वामीचे पदरीचे आहेत.' - पेद.

**गव्हार** न.पु. गुरांचा कळप. (अहि.)

**गव्हारी** पु. गुराखी : 'गव्हाऱ्यांनी बाप्पाजींच्या राखीव खपांत चारणीस घातलेली जनावरें रानाच्या आडोशाला नेली.' - सराई ५.

**गव्हारी** पु. (ठाकूर लोकात) नवरा मुलगा लग्नमंडपात शिरण्यापूर्वी हातात काठी धरून उभे राहणारे दोन मुलगे. - बदलापूर १४८.

**गव्हाळ-ळी** वि. पहा : **गव्हळा** २,३ : 'गव्हाळे तैसेचि शंखपाळ। विषधर सारखेचि व्याळ।' - गीता १.३६९.

**गव्हांडा** पु. गव्हाचे कूट, कुटार. पहा : **गवडा** (व.)

**गव्ह्या** वि. गव्हाच्या पोळीचा पाहुणचार करण्यास योग्य (पाहुणा).

**गस्त, गस्ती** स्त्री. १. रात्री संरक्षणार्थ काढलेली फेरी; रखवाली; जागल; फिरता पहारा : 'देती गस्तीवर गस्ती।' - ऐपो १६९. २. जागल करीत फिरणे; पहारा करणे. ३. जागल करणारे शिपाई किंवा पहारेकरी : 'फिरे काळ गस्ती।' - दावि २१६. [फा. गस्त]

**गस्त** न. १. दोन खांबं किंवा तुळवटे यामधील जागा; खण; सोपा. २. गावातील एका भागाची व्याप्ती; पेठ; वॉर्ड. (को.) [फा. गश्त]

**गस्त** भोवळ; चक्कर; घेरी. (व.)

**गस्तकरी** पु. गस्त घालणारा शिपाई; पहारेकरी.

**गस्तंगर, गस्तगिरी** न. स्त्री. फेरी; व्यापाऱ्याची फेरी; उत्पन्न पाहून दरदाम इ. समजून घेण्याकरिता गावोगावी किंवा बाजारात घातलेली फेरी; व्यापार पाहण्यासाठी फिरती.

**गस्तंगीर** पु. गस्तंगर करणारा, फिरता व्यापारी.

**गहजब** पु. १. कडेलोट; हद्द; परमावधी. (क्रि. होणे.) २. टीका; निंदा : 'वर्तमानपत्रांतून गहजब चालला होता.' - दुर्दम्य. ३. आरडाओरडा : 'आकाश कोसळले असा गहजब वयातीतांकडून पूर्वापार करण्यात येत असे.' - नकावा ९९. ४. जुलूम; हाल. ५. कठीण प्रसंग; संकट. [अर. घझब] (वा.) ० **ओढवणे, गुदरणे, येणे** - संकट कोसळणे; भयंकर परिस्थिती निर्माण होणे. ० **करणे, मांडणे** - जुलूम करणे; हैदोस घालणे.

**गहजर** पहा : **गजर**

**गहजरी** स्त्री. जोराचा तडाखा; महत्संकट; जिवावरची पीडा. गजब शब्दाबद्दलही योजतात. (क्रि. गुदरणे, होणे.)

**गहजोरी** स्त्री. मस्ती; बदमस्ती; जबरदस्ती; मूठमर्दाई; दंगा : '... पारगाऊकरी यैसी गहजोरी केली.' - शिचसाखं २.११७.

**गहदम** क्रिवि. वेळोवेळी; एकसारखा; सतत.

**गहन** वि. १. बिकट मार्गाचा, वाटेचा; जाण्यास, पोचण्यास अवघड; दुर्गम (नदी, रस्ता, अरण्य, डोंगर). २. दुर्ज्ञेय; जाणण्यास अवघड; समजायला कठीण (शास्त्र, ग्रंथ, काव्य) : त्यांचा अर्थ न कळे गहन। अज्ञान जनां कलियुगीं।' - भवि २.१. ३. गाढा; जाडा : '(जोतीराव) हे कवी आहेत, इतिहासज्ञ आहेत, मोठे गहन भाषापंडित आहेत.' - नि ४५८. ४. दुर्घट; दुष्कर : 'तें याग अथवा दानें। तपादिकें ही गहनें।'

- ज्ञा १७.४०६. ५. थोर; श्रेष्ठ : 'परमगहन अति सुशील, सत्य उपाय, सत्य अंतरीं। सूर्यवंशीचा राव जसा हरिश्चंद्र अयोध्यापुरीं।' - ऐपो २१९. ६. अमानवी. [सं.]

**गहन** न. १. संकट : 'मा पडिलिया गहन कवण तयाचें।' - ज्ञा ८.६३. २. अरण्य. [सं.]

**गहनगति-ती** वि. गूढ; अगम्य; खोल; गुप्त मार्गाचे.
स्त्री. गूढ व्यवहार, रस्ता, मार्ग; अगाध लीला. [सं.]

**गहनबुद्धि-द्धी** वि. खोल, गाढ बुद्धीचा, कल्पनेचा. [सं.]

**गहना, गहिना, गहनागाठा** पु. १. किडूकमिडूक; दागिने; अलंकार (व्यापक अर्थी). २. (सामा.) दागिना; भूषण; अलंकार : 'खुशालिनें घातला ग अंगावर फार गहिना।' - प्रला १४३. [हिं. गहना]

**गहरेपणा** पु. दृढता; सांद्रता : 'तुमच्या दृष्टींत मला प्रेमळपणाचा ओलावा दिसे, पण विचारी गहरेपणा कधींच दिसला नाहीं.' - काढा.

**गहवर** न. रहस्य; गूढ : 'तेथचे कृपागहवर। कवणा कळे।' - ज्ञाप्र ३०.

**गहं** पु. गहू. (गो.)

**गहाण** न. १. तारण; कर्ज देताना ते वसूल होईल किंवा नाही यासाठी विश्वासार्थ जो माल (दागिना, घर, जमीन) घ्यायचा तो. २. (कायदा) कर्ज फेडले जाईल किंवा दिलेले वचन पुरे होईल अशाकरिता माल तारण देणे : 'कर्जानें घेतलेली रक्कम फेडण्यासाठी किंवा इतर आर्थिक जबाबदारी पार पाडण्यासाठीं तारण म्हणून जेव्हां स्थावर मिळकतीवरील एखादा मालकी किंवा इतर हक्कसंबंध (इंटरेस्ट) मालक दुसऱ्या इसमाला तबदील करून देतो तेव्हां त्या व्यवहारास गहाण अशी संज्ञा आहे.' - घका २९. [हिं. गहना] (वा.) ० **डुलणे** - कराराप्रमाणे फेड न झाल्यामुळे गहाण ठेवलेली वस्तू सावकाराच्या मालकीची होणे : 'जेष्ठअखेर रुपये देऊ यैसा वायेदा करतात, नाहीं तर गहाण डुले, याप्रमाणें करार आहे.' - वै ३.८. ० **लहाण करणे** - कर्जाची रक्कम व्याज धरून तारण ठेवलेल्या मालमत्तेपेक्षा जास्त झाली तर गहाणदाराला ती मालमत्ता देऊन व्यवहार संपवणे.

**गहाणखत-चिठ्ठी-पत्र-रोखा** न. स्त्री. पु. १. ज्या पत्राने गहाण टाकलेल्या मिळकतीचा कबजा सावकाराला देण्यात येतो ते. २. विद्यमान किंवा पुढील कर्जाबद्दल एक मनुष्य स्वतःच्या मिळकतीवर दुसऱ्याला काही हक्क उत्पन्न करून देतो असा लेख; ऋणको व धनको या दोघांमध्ये झालेला, पैसे व त्याबद्दल गहाण पावल्याचे कबुलीचा लेख.

**गहाणदार** वि. तात्पुरते गहाण धारण करणारा; ज्याच्याकडे गहाण आहे तो (इसम).

**गहाणवट** क्रिवि. गहाणात; गहाणासारखी.
वि. गहाण ठेवलेली (वस्तू).

**गहाणाचा व्यापार, रोजगार** गहाणावर पैसे कर्जाऊ देण्याचा धंदा; सावकारी.

**गहाळ, गाहा(ह)ळ** वि. १. नष्ट; हरवलेला; गैरविल्हे लागलेला; गमावलेला; चुकलेली (वस्तू, प्राणी). २. गफलती; गोंधळी; अव्यवस्थित; विसराळू (मनुष्य, काम). (क्रि. होणे.)[सं. गाह् = लपणे]

**गहि** स्त्री. १. पहा : **गई**. २. गईच्या समीपचा प्रदेश. ३. सोनाराचे एक हत्यार. ४. क्षमा.

**गहिगट** न. कुसुंब्याचा खाली उतरलेला गाळ, रेंदा; गरगट. (वा.) ० **काढणे** - जबर मार देणे; भीतीने लेंड्या गाळायला लावणे. ० **जमणे** - परस्परांशी, एकमेकांशी दृढ मैत्री जमणे.

**गहि(ही)न-ण** वि. गरीब; दीन; सात्त्विक; थंड; धिम्मा; शांत; सौम्य; दयाळू सालस; क्षमाशील (माणूस). [सं. गहन]

**गहि(ही)र** वि. गंभीर : 'निनादें अति गहिरे।' - ज्ञा १.१४६.

**गहिरणे** अक्रि. गहिवरणे; दुःखी होणे : 'माहा जीव गेला। कशी गहरे साऱ्या रात भरजरीचा पदर। भिजला सवा हात।' - वलो ६८. (व.)

**गहिरा** वि. १. गडद; दाट; पक्का; जबर; चांगला खुललेला (रंग). २. खोल; दाट; निबिड; गाढ (पाणी, पीक, जंगल, छाया, झोप). ३. गर्द रंगाने रंगविलेले (वस्त्र). ४. मोठा; उंच; कडाक्याचा (आवाज, स्वर) : 'भाट गर्जती गहिरावचनीं।' - भारा बाल ७.५५.[सं. गभीर]

**गहिरी नजर** मनात भरणारी, हृदयाला चटका लावणारी नजर, दृष्टी.

**गहिल** वि. गहिवरलेले; सद्गदित : 'किती आगय घालू माझ्या गहिल मनाले।' - दपा १.१५. (व.)

**गहिला, गहिल(रा)दा** वि. वेडा; गैरशिस्त; अज्ञानी; अडाणी. [सं. गहिल]

**गहिल्ले** वि. घेतले : 'दिण्णले गहिल्ले उल्लविरे तत्थ मरहट्टे-' काव्यालय १५३.१०.

**गहि(हिं)वर** पु. प्रेम, शोक-दुःखादी विकारांच्या अतिरेकाने रडे येण्यापूर्वी कंठ दाटून येण्याची अवस्था; कंठ दाटणे; हुंदका; मनोविकारांचा उमाळा : 'मग अत्यंत उद्वेगला। न धरत गहिंवरू आला।' - ज्ञा १.२६९. [सं. गव्हर] (वा.) ० **करणे** - शोक करणे : 'त्यास दैवहीन आम्ही दुःख देण्याकरिता जन्मास आलो, असा गहिवर केला.' - शिप्रब १११. ० **घालणे** - शोक करणे; छाती पिटून रडणे : 'त्यो काय मेलाय व्हय गहिवर घालायला?' - बनगर ७३.

**गहिवरणे** अक्रि. गहिवर येणे; कंठ दाटून येणे; सद्गदित होणे (आनंद, दुःखादिकांमुळे) : 'पडुनि गळां गहिवरल्या सीतेच्या कन्यका तशा गमल्या।' - मोरा १.४६१.

**गहिवरी** वि. रडे आणणारे : 'गाई करून गहीवरी कवन।' - प्रला ११.

**गहिस** वि. १. जड; भारी : 'जें हळुवट ना गहिंस। जें चिवळ ना सपोस।' - एभा ३.६७९. २. प्रचंड : 'प्रळयकाळीं अति गहिसू। अगाध उथळे जळोल्हासू।' - एभा ३.१७४.

**गहिसपण** न. मूर्खपण : 'आणि मेलिया तरी रडती। परि असतें जात न गणिती। गहिंसपणें॥' - ज्ञा ९.५१३. [सं. गर्विष्ठ, ग्रामकरः]

**गहिसर, गहिसरा** पहा : **गइसरा**

**गहिसास** वि. अडाणी; अज्ञानी; मंद : 'जें कां कडाडां आणि गहिंसासा। नीच नवा तूं किं॥' - राज्ञा ११.९७.

**गही-ह्या** स्त्री. पु. समुद्राची मोठी लाट.

**गहीं** स्त्री. छपराची खालची बाजू; वळचणीची गळी; पागोळी : 'माहा जीव गेला। जन बैसले कहीचे। वाट पाहातां कोणाची। वेळू उपसा गहीचे।' - वलो ६८. (व.)

**गहीन** वि. गहन; कठीण : 'आणा घालती गहीन तात्याबाची बहीण…' घाश्रलो १३६.

**गहीन** न. १. अरण्य. २. संकट : 'वडीलपन्नाला किती चालू मी गहीन।' - जामामा २१९.

**गहुला, गहुळा** पहा : **गव्हला**

**गहू** पहा : **गवा** (पशू)

**गहू** पु. एक धान्य. हे धान्य फार पौष्टिक आहे. [सं. गोधूम] (वा.) **गव्हाची कणीक करणे** - श्रम कमी करण्याच्या प्रयत्नात श्रमाची वृद्धी करणे (कुणब्याने उलटून फसविल्याची वेताळाची एक जुनी कथा आहे तिजवरून).

**गहू** पु. तळहातावरचे एक शुभ मानले गेलेले गव्हाच्या आकाराचे चिन्ह : 'या पोरीच्या हातावर गहू नाही. हिला कांहीं कोणत्या गोष्टीत यश यायचं नाही.' - पलको ८३. [सं. गोधूम]

**गहूगिळ्या** वि. मुकस्तंभ; मूगगिळ्या.

**गहार** पु. गहिवर : 'तरि दुखे दाटत असे गह्यरू' - उगी १४६.

**गहारा** वि. खूप, भरपूर : 'बरं ताई, मले गह्यरी कामं आहे.' - कंदील. (अहि.)

**गह्याटणे** अक्रि. थकणे; क्षीण होणे; गळाठणे; 'बुढा वजर गह्याटला… बेमार होता का?' - धग २१०.

**गळ** पु. १. मासे धरण्याचा लोखंडी आकडा; गरी : 'परी तयामाजीं गळु आहे। जो प्राणातें घेऊनि जाये।' - ज्ञा २.२१४. २. विहिरीत पडलेली वस्तू वर काढण्यासाठी एका लोखंडी कडीला पाचसहा आकडे (हूक) अडकवलेले असतात ती कडी. ३. नवस फेडण्याच्या बगाडाचा आकडा. हा वाघ्या, मुरळी किंवा नवस फेडणारा हे आपल्या पाठीत अडकवून घेतात : 'केले गळाचे नवस।' - दास २.६.२९. ४. फाशीचा फास; आकडा. [सं. गल = दोरी] (वा.) ० **काढणे** - (चर्मकार) जोड्याच्या सगळ्याचे तुकडे करणे. ० **घालणे** - १. भीड घालणे; अत्याग्रह करणे. २. जबरदस्ती करणे. ० **घेणे** - ओलकंबणे. ० **टाकणे** - लालूच दाखवणे. ० **टाकून पाहणे** - १. उद्योग, प्रयत्न करणे; ठाव घेणे. २. अंदाज घेणे; अजमास घेणे. ० **टाकून बसणे** - लालूच दाखवून एखादी व्यक्ती केव्हा वश होते याची वाट पाहत राहणे. ० **टोचणे** - शरीरात लोखंडी हूक अडकवून देवाचा नवस पूर्ण करणे. **गळाला, गळी लागणे** - १. कोंडमारा होणे; फास लागणे (दाव्याच्या आवळण्याने वासराला). २. (ल.) यातनेत पडणे, गुंतणे; फासात अडकणे (अपेक्षा, आशा, लालूच इत्यादींच्या). ३. न झेपेल इतक्या मोठ्याने ओरडण्यामुळे त्रास होणे. **गळास, गळी देणे** - १. फाशी देणे (माणसाला). 'कोड्याळचा किल्लेदार महमंदअली कुमदान यास टिपू यांनी गळास दिले.' - दिमरा ३७१९. २. (ल.) मोठ्या संकटात, क्लेशात घालणे.

**गळ** स्त्री. विनवणी : 'तिच्यादेखत एकदा त्याचं लग्न झालं पाहिजे म्हणून त्यांची एवढी गळ.' - पलको ४५.

**गळ** न. दमेकऱ्याची धाप; कण्हणे; कुंथणे; दमा. (राजा.)

**गळ** स्त्री. स्राव; पाझर; सतत प्रवाह (दुखऱ्या डोळ्यातील पाण्याचा, क्षतातील पुवाचा); पडझड; गळती (जोराच्या वादळाने फळे किंवा मोहोर यांची). [सं. गल] (वा.) ० **लागणे** - एकसारखे पडत राहणे.

**गळ** स्त्री. गोट्या खेळण्याची गली, खाच. पहा : **गल** [सं. गर्ता]

**गळ** पु. शिमग्याच्या दुसऱ्या दिवशी भरणारी जत्रा, उत्सव. (ना.)

**गळ** पु. गळा. पहा : **गल** [सं. गल्ल]

**गळकघटक** क्रिवि. गटागट : 'गळकघटक पाणी गिळल्याचे…' विभूत ११४.

**गळकंथा** पु. गळ्यात घालण्याची कफनी.

**गळका** वि. गळणारा; पाझरणारा; फुटका.

**गळखंड** पु. गळाच्या ज्या भागाला आमिष लावतात तो भाग : 'जैसा गळखंडाचिये भेदीं। न शके मीन आपण।' - कथा ४.१५.४०.

**गळखुटी** स्त्री. नाठाळ जनावराच्या एका पायाला व गळ्याला बांधायची दोरी. (व.)

**गळखोडा** पु. (कुस्ती) प्रतिपक्षाच्या गळ्याभोवती पायांचा विळखा घालण्याचा डाव.

**गळगट** न. अंगावरून लपेटून, गळ्यामागे गाठ बांधण्याचा धोतराचा भाग.

**गळगनेर** न. लग्नाआधी नवऱ्या मुलाला किंवा नवऱ्या मुलीला बोलावून देतात तो उपाहार; केळवण : 'गळगनेर बाई करते माही माय।' - राके ८१.

**गळगळ** क्रिवि. उतावळीने खाताना किंवा पिताना होणाऱ्या आवाजासारखा; गटागटा; ढसाढसा. [ध्व.]

**गळगळघाशी** वि. खाण्याला पुढे पण कामाच्या वेळी अंगचुकारपणा करणारा; भोजनभाऊ; ऐतखाऊ.

**गळगळा** क्रिवि. रडकुंडीस, काकुळतीस येऊन; गयावया करून (प्रार्थिणे, मागणे.). (क्रि. येणे.)

**गळगळाट** पु. रेलचेल, भरपूर; तुडुंब. [गळणेचे द्वि.]

**गळगळी** स्त्री. काकुळत; गयावया : 'गळगळीचा स्वर.' - श्रुति गु ८८.[ध्व.]

**गळगळीत** वि. १. पचपचीत; बेचव; पाणचट (पक्वान्न). २. पुळपुळीत; निरर्थक; अर्थबोध न होणारे. ३. (सामा.) गुळगुळीत, मऊ व तजेलदार. ४. सैल; विस्कळीत. (गो.)

**गळगळीत** वि. काठोकांठ; भरपूर; तुडुंब.

**गळगळॉ** पु. गुटी; काढा, अर्क. (गो.)

**गळगंड** न. गंडमाळा; गळ्याच्या मांसग्रंथींची वाढ (आवाळू, वाळूक इ.). [सं. गलगंड]

**गळगा** पु. गळती.

**गळगुं(गूं)ड** न. १. गाय किंवा बैल यांची मानेखालची पोळी. २. अजागलस्तन. ३. गळ्याखालची गाठ; गलांड.

**गळगोटी** पहा : **गळगुंड १**

**गळग्रह** पु. पहा : **गलग्रह.** १. मानगुटी धरणारा पुरुष; डोईजड माणूस. २. (ल.) फार त्रास देणारा; विनवणी किंवा बळजबरी करून पाठ पुरविणारा माणूस; जिगजिग लावणारा भिकारी; तगादेदार; धरणेकरी; वेठीला धरून कामे करून घेणारा. ३. (नियमितपणाच्या अभावी, अविश्वासाने) थांबविणारा, अडथळा आणणारा, हरकत किंवा प्रतिबंध करणारा, खोळंबविणारा माणूस. ४. लोढणे; खोडा; प्रतिबंध; फास. ५. आग्रह; जबरी. (क्रि. घालणे.) ६. गळ्याला येणारी सूज; गळा धरणे. ७. एक प्रकारचा चिमटा (तापलेली भांडी उतरवण्याचा). ८. (ज्यो.) एक दुष्ट ग्रह. [सं. गलग्रह]

**गळघाटी** स्त्री. १. गळ्यापुढचे हाड; घाटी; मणका; घसा. (गळा श्वासनलिका व अन्नमार्ग यांच्यासह) २. बैलाच्या गळ्यातील घंटा.

**गळचढाव** पु. न. फाशी : 'अपाजीराव यांस गळचढाव केले.' - ऐलेसं ३९६९.

**गळचं(चो)डी** स्त्री. १. मान. (क्रि. धरणे.) २. गचांडी; अर्धचंद्र (क्रि. देणे.).

**गळचिपी** स्त्री. १. मानगुटी धरणे; गळा दाबणे. २. (ल.) खोटी; तहकुबी; आशेत लोंबकळत ठेवणे. ३. पिच्छा; अति आग्रह; तगादा; खणपटी; पाठपुरावा. (क्रि. धरणे, आवळणे, करणे, लावणे.)

**गळचुटी-ट्या, गळेचट्या, गळचोट्या** स्त्री. १. गळघाटीची सूज. (क्रि. बसणे, येणे, फुगणे, होणे.) २. (निंदार्थी किंवा सूचकतेने) श्वास किंवा अन्ननलिका. (क्रि. भरणे, धरणे, चेपणे, फोडणे.) ३. अजागलस्तन. ४. (क.) बैलाच्या मानेखालची पोळी.

**गळचुबा** पु. (बडोदे) बायकांच्या चिंचपेटीप्रमाणे पुरुषांच्या गळ्यातील एक अलंकार.

**गळचेपी** स्त्री. १. पहा : **गळचिपी.** २. कोंडमारा; दडपणे; न जुमानणे; फेटाळणे : 'सरकार लोकांच्या हक्कांची गळचेपी करते.' - के. २७.५.३०. ३. जे करावेसे वाटते ते करू न देणे; स्वातंत्र्य दडपून टाकणे; अन्याय, दुःख, तक्रारी इ. व्यक्त करण्यास मनाई; मुस्कटदाबी : 'सरकारचे नवे नवे कायदे लोकांची अधिकाधिक गळचेपी मात्र करीत आहेत.' - दुर्दम्य २.५.

वि. गळ्याला दोन भोवरे असलेला. हे अशुभचिन्ह समजतात. (माण.)

**गळछडी** पहा : **गळदांडी** : 'मी गळछडी घेऊन मासे मारण्याचे निमित्त करून बसू लागलो.' - आआशे २१९-२०.

**गळजोट-ड** पु. जीवश्चकंठश्च मैत्री : 'बाह्य इंद्रियांची चडफड। शमेसि करावा गळजोड।' - एभा २५.५४.

**गळण** न. गरळ; सापाचे विष. (गो.) [सं. गलन]

**गळणी** स्त्री. १. गळती; पाझर; स्राव. २. चाळण; गाळणे; नरसाळे.

**गळणे** अक्रि. १. झरणे; पडणे; ढळणे (सुटून, उकलून, मोठा होऊन); वरून खाली पडणे. (फळे, फुले भिंतीचा गिलावा). २. ठिबकणे; पाझरणे; वाहणे (पाणी, दाणे इ. जिन्नस). ३. वाहणे; पाझरणे (भांडे, नाव इ.). ४. निचरणे; लस वाहणे (बरबरीत व्रण, क्षत); वाहणे; झिरपणे (पू). ५. क्षीण होणे; अशक्त होणे : 'हिंडे वनोवनीं तो अन्नावांचूनि बहु गळाला हो।' - मोवन ४.१०४. ६. रोडावणे; हाडकणे. ७. गमावणे; खचणे; नाश पावणे. ८. नाहीसे होणे; अंतर्धान पावणे; मालवणे : 'सुर असुर तई मी बैसवी वेगळाले। सहजरिपु तरी ते भाव त्यांचे गळाले।' - वामन, बालक्रीडा ५१. ९. घालविले जाणे; नापसंत होणे. १०. कमी होणे; उणावणे. ११. खचणे; गमावणे; तुटणे; मृतप्राय होणे (धैर्य, विश्वास, आशा) : 'त्यावरि पांडुसुतांतें दूरुनि पाहुनि भये गळाले हो।' - मोशल्य ३.७३. १२. थकणे : 'एक स्वव्यसनीं सहाय हय जो होता सखा तो गळे।' - मोकृष्ण २३.५७. १३. ढळणे; चळणे : 'निज व्रतापासुनि त्या गळाल्या।' - सारुह १.६९. १४. वितळणे (धातू इ.). १५. कचरणे; कांकू करणे (माणसाने). १६. सुटणे; विसरणे (विषय, मुद्दा.) १७. रेतस्खलन होणे; खळणे. १८. फाटणे; जीर्ण होणे; न्यूनता असणे (पुस्तकात पानांची). [सं. गलन]

**गळतंतू** पु. गळसरी; जानवे : 'गळतंतुवत भजन हो।' - दावि १७७.

**गळती** स्त्री. १. अभिषेकपात्र; देवावर अभिषेक करण्याचे, तळाशी छिद्र असलेले धातूचे किंवा मातीचे भांडे : 'कीं त्या भूलिंगास निर्मळा। गळत्या लाविल्या अधोपंथी।' -पांप्र ४.१२३; ज्यातून पाणी गळत असते असे कोणतेही पात्र. २. देवावरील पाण्याची संतत धार; अभिषेक. ३. ठिबकणी; पाझरणी; पाघळणी : 'तापातींची गळती जी पासुनि अमृतबिंदु शीतल गळती।' - मोरा १.३४२. ४. गळ (डोळ्याला लागणारी). ५. पहा : **गळते.** (वा.) ० **लागणे** - १. पाणी गळणे. २. संख्या कमी होत जाणे. 'राष्ट्रीय शाळेलाही गळती लागली.' - माजी २३२. ६. झुरणी; निचरा; स्खलन; पतन.

**गळती** स्त्री. (जोराच्या वाऱ्याने झाडावरून) फळे पडत राहणे. [सं. गल्]

**गळती** स्त्री. गठ्ठे वजन करण्यासाठी ज्यात लोंबकळवितात तो सरफास (दोरीचा इ.). [सं. गल्]

**गळते** न. गळण; पाझरण; ठिबक; बुळकी; भोक; ज्यातून गळते ते छिद्र. (वा.) ० **काढणे** - गळणे बंद करणे; भोक बुजविणे.

**गळदगे** वि. ओढायला कडक असलेली (विडी).

**गळद(ध)ट** वि. १. कोडगा. २. छांदिष्ट; बेफाम व गाफिल.

**गळदंड** पु. गळ्यातील साखळी, हार : 'रिते कुंजर गळदंडीं।' - एरुस्व ७.५६.

**गळदं(दां)डी** स्त्री. जिला गळाची दोरी बांधली आहे अशी काठी : 'गळदांडीने नदीचे मासे मारण्याचा...' - पांका ९७. 'तो त्या तळ्याला, त्यातील माशांना, हातातील गळदंडीला शिव्या घालीत बसे.' - गणूराया ४३.

**गळपट** स्त्री. गफलत; नजरचूक; भूल; भ्रम; दृष्टिदोष.

क्रिवि. १. बळकट; घट्ट; गच्च. (क्रि. बांधणे, आवळणे, धरणे.) २. ठासून; चेंदून; कचकावून. (क्रि. भरणे.)

**गळपट** स्त्री. गळा; मान : 'थोरल्या बहिणीचा नवरा आला नि त्याची गळपट पकडून ओरडला...' - चिताक ३४.

**गळपटणे** अक्रि. गहाळ होणे; अनेक वस्तूंत एखादी वस्तू मिसळल्याने ती सापडेनाशी होणे : 'नटश्रेष्ठचे मूळ हस्तलिखित सामानातच कुठे गळपटले होते.' - नटश्रेष्ठ ३.

**गळपट्टा** पु. १. चारसहा बोटे रुंद व तीन हात लांब विणलेले, गळ्याभोवती बांधायचे लोकरीचे वस्त्र. २. कुत्र्याला साखळी बांधण्यासाठी त्याच्या गळ्याभोवती घातलेला चामड्याचा पट्टा.

**गळपट्टी** स्त्री. १. कॉलर : 'ज्या बहाद्दरांनी इंग्रजी पाटलून... इंग्रजी गळपट्टी वगैरे सुधारणेची सामग्री आपलीशी करून टाकली.' - नि ९१३. २. (कुस्ती) जोडीदाराच्या गालफडाच्या खालून आपल्या हाताच्या पुढील भागाने त्याच्या गळ्यावर पट्टी बांधून (दाब देऊन) त्याला चीत करणे.

**गळपत्तर** वि. गळून गेलेला; थकलेला. (व.)

**गळपाते** न. मोटेचे जू. (व.)

**गळपेंडे-ढे** न. खुंट्याला बांधलेल्या जनावराच्या दाव्याला जोडलेला गळबंद. हा चामड्याचाही असतो.

**गळफटणे-विणे, गळफाटणे** उक्रि. १. गुंतागुंत करणे; घोटाळा माजवून एकमेकांत गुरफटविणे (दोरा किंवा त्याच्या जाळ्यात एखादी वस्तू); गोवणे; गुंतविणे; घोटाळ्यात घालणे. २. (ल.) हरविणे; सांडणे; गमावणे; पाडणे. [फा. गफलत]

**गळफ (फा) टा** पु. गुंतागुंत; घोटाळा; अव्यवस्थित किंवा गुरफटलेली स्थिती (वस्तू, प्राणी, माणसे यांची).

**गळफटा** पु. १. गळफास; २. संकट; अडचण : 'गाफलीनें (गाफिलीनें) गळफट्यांत आल्यास कामीं पडणार नाहीं.' - होकै १६४.

**गळफाशा** वि. हट्टी; अत्याग्रही (भिकारी).

**गळफास** पु. १. सरफास; गळ्याला घातलेला फास; फाशी देण्याचा फास. २. जीव जावयाजोगा दोरीचा वेढा (गुरे इ. च्या गळ्याला). (क्रि. देणे, घालणे.) ३. एक डाव. डाव्या हाताने मान धरून उजव्या हाताच्या बोटांनी प्रतिपक्षाचे नरडे दाबणे. [सं. गल+पाश] (वा.) गळफास **घेणे** – स्वतःच्या मानेला फास लावून लोंबकळणे; मरणे; जीव देणे; आत्महत्या करणे. गळफास **देणे** – दुसऱ्याच्या गळ्यास फास लावणे; मारणे.

**गळफासणे** अक्रि. गळ्याला फास लावणे, लागणे.

**गळबटणे** पहा : **गळपटणे** : 'कुठं गळबटलं असेल पसाऱ्यात.' - गागो ४०.

**गळबळीत** वि. १. मनाचा मोकळा; सरळ बुद्धीचा, सलगीचा; भला; निष्कपट (मनुष्य इ.). २. ढिला; सैल; भोंगळ; गैदी; गबाळ (मनुष्य, पोषाख, कृत्य, कार्य इ.).

**गळबळीतपात्र** न. गबाळ माणूस.

**गळबंद** पु. १. खोगिराचा पुढील बंद. २. दोर (गुराला दावणीला बांधायचा). पहा : **गळपेंडे.** ३. गळ्याभोवती विशिष्ट तऱ्हेने बांधायची पट्टी; नेकटाय : 'मोजे, बूट, गळबंद इत्यादिकांसंबंधीही विशिष्ट पद्धत ठरली असल्याने...' - सासं २.२१२.

**गळमोडी** स्त्री. मान मोडणे 'आवर्तू गळमोडी मारुनि बका धात्री घडी पूजिली.' - गस्तो ७७.

**गळवट-णा-णी, गळवंड** वि. क्रिवि. गळ्यापर्यंत भरलेले; काठोकाठ भरलेले (भांडे); तोंडोतोंड; भरपूर; तुडुंब.

**गळवटी, गळवडशी** स्त्री. मानेखालची पोळी. पहा : **गळगोटी**

**गळवणी** न. गाळलेले, गळलेले, झिरपलेले पाणी.

**गळवळ** स्त्री. फूस; हालचाल; खळबळ.

**गळवज्ञा येणे** काकुळतीला येणे; गयावया करणे : 'गळवज्ञा येऊन आजीच विचारीत होती.' - किरिस्ताव ७१.

**गळवाहा** गळाठा; दुर्दशा.

**गळश्चकंठश्च, गळस्यकंठस्य** न. जिवलग मैत्री; दृढ स्नेह; जीवश्चकंठश्च.

**गळस** वि. मांसल.

**गळसट** न. कफ अथवा श्लेष्म्याची तार, चिकटा.

**गळसर-री** पु. स्त्री. १. गळ्यात बांधायचा मणी. २. चार ते आठ पदरी काचेच्या किंवा सोन्याच्या मण्यांचा हार; एक दागिना. ३. एकपदरी हार : 'गळसरी दुसरी न धरी गळां।' - वामन, रुक्मिणीविलास १३. ४. सौभाग्यालंकार; मंगळसूत्र; काळ्या पोतीचा सर : 'सुगंधामाजी कस्तुरी। कीं अलंकारांत गळसरी।' - भवि २.२०७. ५. एक दागिना. यात धागऱ्याचे मंगळसूत्र, पदक इ. असून दोन बाजूंना गिन्या किंवा पुतळ्या ओवतात. तसेच बिलोरी, काळ्या-हिरव्या पोतेचे सर असतात. हा दागिना फक्त सौभाग्यवती स्त्रिया घालतात. (कु.) ६. (ल.) वेढा; वेष्टन : 'असो त्या सिंधूच्या पैलपारीं। कुशद्वीपाची गळसरी।' - कथा ६.३.६९. [सं. गल + स] (वा.) ० **बांधणे** – लग्न लावणे; सौभाग्यचिन्हांकित करणे : 'कीं माझा पिता दिनकर। तो हा जाणे विवाहविचार। त्याचे विचारें गळसर। बांधीन तुमचा॥' - कथा ५.१३.१५७.

**गळसरणे** अक्रि. उलणे; तडकणे; भेगा पडणे (ओल किंवा थंडीपासून पायांची बोटे इ.).

**गळसा** पु. गळफास.

**गळसुजी** स्त्री. गुरांचा एक स्पर्शजन्य रोग.

**गळसु(सो)री,** स्त्री. गळघाटीची सूज. पहा : **गळचुट्या** (क्रि. बसणे, येणे, फुगणे, होणे.) : 'गळसुट्या गंडमाळा मुरूम।' - स्वानु २.५.७; 'गळसोट्या आणि जीभ झडे।' - दास ३.६.३६.

**गळसूत्र** न. (विनोदाने) १. गळघाटी. २. गळ्यातील दोरा.

**गळहाटणे** अक्रि. गळफटणे; गलित होणे; कंठात प्राण येणे. पहा : **गळहाटणे**

**गळहोड-डी** स्त्री. गळ्याची शपथ : 'तुम्ही सप्त पूर्वजाचे सुकुर्त स्मरौन बोला म्हनौनु सेपथ वा गळहोड देवाचे घातले...' - मइसा २०.२१८.

**गळंगा** पु. १. गवत, कडब्याची ताटे, पाने इत्यादींचा अस्ताव्यस्त पडलेला कचरा; अडगळ; गळाठा; पसारा (कागद, वस्त्रप्रावरण इ.चा); गाळसाळ; चोथा. (क्रि. पडणे, होणे.) २. (ल.) गोंधळ; घोटाळा : 'प्रत्ययाविण गळंगा होये। अनुमानज्ञानें॥' - दास १०.१०.९. ३. (ल.) खरेखोटे. [सं. गल्]

**गळंगा** वि. ढिला; सैल; खिळखिळा; सैल बांधलेले, आवळलेले, जखडलेले. [सं. गल्]

**गळंगा** पु. १. मडके. २. (ल.) मनुष्यदेह : 'गळंग्यामधील जगज्ज्योति।

चेतेल कोठे?' - दास १९.२.५.

**गळंत** न. १. एखाद्या अक्षराचा, शब्दाचा किंवा वाक्याचा संक्षेप करतेवेळी त्याचे पहिले अक्षर लिहून पुढे पूज्य लिहितात ते. (क्रि. घालणे). २. ज्याकरिता पूज्य घातलेले आहे ते गाळलेले वाक्य, शब्द इ. वि. संक्षेपाने सोडलेले; गाळलेले; वर्ज्य केलेले; गहाळ; नष्ट (वाक्यातील शब्द, शब्दातील अक्षरे). (वा.) ० **करणे** - गिळणे; गट्ट करणे.

**गळा** पु. १. घसा; कंठ; मानेचा पुढील भाग व आतील मार्ग. २. (गायन) सूर; आवाज; कंठ. ३. घागर, बाटली, मडके इ. चा. काठ; मान; तोंड व पोट यांच्यामधील आकुंचित भाग. ४. (सतार) दांडीचे आरंभस्थान. [सं. गल्] ० **उघडा असणे** - गळ्यात कोणताही अलंकार (विशेषत: मंगळसूत्र) नसणे. ० **ओरडून पडणे** - मोठ्याने शोक करून कंठाला मिठी मारणे. ० **कफणी घालणे** - आपल्यासारखा निकाल लावून घेईपर्यंत वैतागाने फकिरासारखे राहणे : 'त्यावरी तुम्ही वतनाची खबर ऐकोन वतनाकरिता गळा कफणी घालून दरबारास गेलेती.' - राखं ३.५५. ० **काढणे** - मोठ्याने रडणे. ० **कापणे** - १. फसविणे; ठकविणे; विश्वासघात करणे. २. उमेद खचवून नाश करणे. ३. ० **कापणे** - (शिंपी) गळ्याचे कापड बेतणे. **(केसाने) गळा कापणे** - वरून मैत्री दाखवून आतून विश्वासघात करून नुकसान करणे. ० **गुंतणे, अडकणे** - अडविले, बांधले जाणे; एखाद्या अडचणीत गोवले जाणे. ० **गोवणे** - १. प्रतिबंध करणे; अडकविणे; एखाद्याचे हातपाय बांधणे (जुलमाने, वचन इ. घेऊन). ० **गुंतविणे** - अडकविणे (त्रासदायक कामकाजात). ० **घालणे** - (चर्मकार) जोड्यावर रेशीम भरणे (रेशीम भरण्याचा एक प्रकार). ० **घोटणे** - जीव घेणे; मारून टाकणे. ० **जाणे** - फाशी जाणे. ० **ताणून, तांगडून बोलणे** - फाडफाड, खरडून, मोठ्याने बोलणे. ० **तापणे, सुटणे** - कंठातील कफ इ. जाऊन टिपेला जाण्याइतका स्वर मोकळा होणे. ० **दाटणे** - गहिवरणे; उमाळ्याने घसा दाटणे (दु:ख, माया इ. मुळे) : 'तथ्यप्रभूक्त परिसुनि धर्माचा गहिवरे गळा दाटे।' - मोशांति ६.४२. ० **धरणे** - १. घसा बसणे (रोग, आंबट, तिखट, खवट इ. पदार्थामुळे). २. थांबविणे; खोटी करणे; हरकत आणणे (बोली, करार यात बेमानपणाने वागून).३. वाचा बसणे; आवाज नष्ट होणे; निरुत्तर होणे. ४. ताब्यात घेणे : 'त्वदगुणकीर्तन करितां लज्जा हे पापिणी धरू न गळा।' - भक्तमयूरकेका ५८. ० **निवळणे** - (गायन) फुटलेला आवाज चांगला होणे. ० **पडणे** - आळ घेणे : 'गळां मोतीं असोन निवाडें। लोकांचिया गळां पडे।' - ह २१.२२९. ० **पडणे, फुटणे, बसणे** - आवाज घोगरा होणे, चिरकणे. **गळा, गळी पडणे** - १. मानेला मिठी मारणे : 'गेलों गृहासि माता धांवुनियां माझिया गळां पडली।' - मोअनु ६.६८. आलिंगन देणे. २. गळ घालणे; निकड लावणे; तगादा लावणे; सक्तीने पाठ पुरविणे. ३. अन्यायाने दोषारोप करणे. ४. शिव्या देत अंगावर तुटून पडणे. ५. एखाद्याच्या अंगावर भार घालणे; लोढणे होणे; फार भीड घालणे; विघ्नासारखे होणे. ६. वाईट सवय, खोड लागणे. ० **पिंजणे** - गळा सोलवटणे; आवाज चिरकणे (वांती होऊन किंवा गाताना). ० **बसणे** - १. आवाज नीट न उमटणे, न सुटणे. २. मानेत बसणे; थबकट किंवा चपटा होणे (भांडे). ० **बांधणे** - आळा घालणे; हातपाय बांधणे, अडकविणे. **गळा, गळी बांधणे** - १. सक्ती करणे; घेण्यास भाग पाडणे. २. अन्यायाने दोषारोप करणे; आळ घेणे; कलंक लावणे. ० **भरणे, भरून येणे** - गहिवरणे (मनोविकारांमुळे) व त्यामुळे आवाज कंपित होणे; गुदमरणे; श्वास कोंडणे : 'असुहृदुदासीनाचे भरले भरतिल न अन्य काय गळे।' - मोमीष्म ११.११९. ० **मढणे** - गळ्यात बांधणे; एखाद्याच्या अंगावर जबाबदारी टाकणे : 'बाकीचे वायेदे मुदत लेहून घ्यावी, रुपये त्याच्या गळा मढावे, निशा करून घ्यावी.' - हिंगणे दप्तर २.१३. ० **मोठा करून रडणे** - भोकाड पसरणे; मोठ्याने रडणे. ० **लागणे** - (संगीत) आवाज चांगला लागणे; सूर लागणे. ० **सुटणे** - १. संकटमुक्त होणे. २. आवाज मोकळा होणे. ३. पाठ पुरविणे; हट्ट घेणे (मूल, तगादेदार, काम घेणारा.) ४. मोठ्याने ओरडणे, डरकणे. ० **सोडविणे** - (खाटीक). १. धडापासून मान वेगळी करणे, कापणे : 'केली हल्ला मर्धी शिरला सोडवी गळा कानड्याचा।' - ऐपो ३९२. २. एखाद्याला पेचातून मुक्त करणे. **गळे कापून नेणे** - मुंडकी कापून नेणे : 'काही गळे कापून नेले म्हणोन वर्तमान आहे.' - ऐलेसं ३०१२. **गळ्याखाली उतरणे** - १. गट्ट करणे (लाच, लुच्चेगिरीचा पैसा इ.). २. स्वाधीन होणे; पदरात पडणे. **गळ्याचा लाखोटा होणे** - घसा बंद होणे, कोंदणे; गुदमरणे. **गळ्याची आण, शपथ, गळ्याचेण** - गळ्याची शपथ वाहणे, घेणे. **गळ्याची फुंकणी होणे** - घसा घोगरा होणे, बसणे. **गळ्यात असणे** - भार पडणे (काळजी, काम, खटपटी इ.चा); अवलंबून असणे. **गळ्यात गळा घालणे** - सलगीने वागणे; दुसऱ्याच्या कंठाला मिठी मारणे. **गळ्यात गोणी येणे** - १. अडचण, दु:ख यांचे असमंजस उपायांनी निरसन करीत असता उलट जास्त अडचणीत येणे. (जसे : - एखाद्या बैलाने पाठीवरील ओझे लोटून देण्याचा प्रयत्न केला असता ते मानेवर येऊन जास्त ओझे होणे.). २. नुकसानी, तूटबूड अंगावर ओढून घेणे. **गळ्यात घालणे** - एखाद्याच्या इच्छेविरुद्ध जबाबदारी त्याच्या अंगावर टाकणे; माथी मारणे : 'जेव्हा तुम्ही हे माझ्या गळ्यातच घातले तेव्हा माझा बेइलाज.' - मासंवा २.१८२. **गळ्यात घोंगडे, लचाड येणे** - (डोईवरचे घोंगडे घसरत घसरत गळ्यात आले म्हणजे जीव गुदमरतो त्यावरून) संकट गुदरणे. **गळ्यात टाकणे** - पहा : **गळ्यात घालणे**. **गळ्यात तंगड्या घालणे** - एखाद्याची लबाडी ओळखून त्याचीच फजिती होईल असे करणे. **गळ्यात तंगड्या, पाय येणे** - सुटण्यास कठीण अशा अडचणीत जास्त गुरफटले जाणे. **गळ्यात धनुष्य घालणे** - (प्राचीन पद्धत) पराभव करणे व पराभव केल्याची खूण : 'घालुनि धनुष्य कंठीं धरिला धरि गारुडी जसा अहितें।' - मोकर्ण १४.६७. **गळ्यात धोतर घालणे** - स्वत:चे म्हणणे सिद्ध करण्यासाठी एखाद्यावर सक्ती करणे. **गळ्यात पडणे** - हिताहिताची, रक्षणाची,

पोसण्याची, कर बजावणीची, निस्तरण्याची इ. जबाबदारी अंगावर येणे. **गळ्यात बांधणे** – आग्रहाने देणे; स्वीकारण्यास भाग पाडणे. गळ्यात मारणे. पहा : **गळ्यात घालणे. गळ्यात माळ असणे, घालणे, गळ्यात माळखंड घालणे** – १. शिस्त दाखवून काम सोपविणे, हवाली करणे; व्यवहार गळ्यात टाकणे. २. वराने वधू किंवा वधूने वर पसंत करणे, वरणे (माळेचा उपयोग लग्नात होतो यावरून). ३. वारकरी संप्रदायाची खूण आणि विठ्ठलाचा प्रसाद म्हणून तुळशीची माळ गळ्यात घालणे; वारकरी होणे. **गळ्यात येणे** – अंगावर येणे, बेतणे (धंदा, कारभार, काळजीचे कार्य). **गळ्यातला ताईत, तन्मणी** – अत्यंत लाडका, प्रिय. (क्रि. करणे, मानणे, मोजणे, बाळगणे, बनणे, होणे.) : 'तूं नवऱ्याच्या गळ्यातला ताईत.' - विवि ८.२.३०. **गळ्यात लोढणे अडकविणे, बांधणे, घालणे, गळ्यात धोंड बांधणे** – अडचणीत आणणे; कठीण काम करण्याचा प्रसंग आणणे : 'राष्ट्रीय पक्ष हा कांहीं जुन्या पक्षाच्या गळ्यांत लोढणें बांधण्यासाठीं निर्माण झालेला नाहीं.' - लोटिकेले. नको असलेले काम करायला सांगणे; एखाद्याच्या मुक्त संचारावर बंधने येतील अशी बाब त्याच्या माथी मारणे. **गळ्यात हात घालणे, टाकणे** – १. आलिंगन देणे. २. मन अनुकूल करणे, वळविणे; दादा-बाबा करणे. लाडी गोडी लावणे. **गळ्यापर्यंत येणे** – सहनशक्तीची परमावधी होणे (कष्ट, पीडा, दुःख यात). **गळ्याला दोरी, फास, रसायण, तात लागणे** – एखाद्या कार्याकडे ओढ लागणे, त्याविषयी अतिशय चिंता लागणे; पेचात असणे; संकटात पडणे : 'आग्रह करूनि लावू कोणेकाच्या गळ्यां कशी तात।' - भक्तमयूरकेका २. **गळ्याला लागणे** – एखादे काम केलेच पाहिजे अशा अवस्थेला येणे : 'गळ्याला लागलेली पोर एकदाची कशीतरी उजवावी.' - परिहरि १७. **गळ्यावर, गळ्यात गाणे म्हणणे** – सुरेलपणे शास्त्रीय पद्धतीने व मनमोकळेपणाने गाणे. **गळ्यावर बोलणे** – वरवर बोलणे; विचार न करता भाषण करणे. **गळ्यावर सुरी ठेवणे, गळ्याला नख लावणे** – जीव घेण्याची भीती घालणे; अत्यंत संकटात घालणे : 'कां नख न लाविलें जननी।' - मोउद्योग ११.२३. **गळ्याशी गळा मिळविणे** – १. (गायन) दुसऱ्याच्या सुराशी आपला सूर मिळविणे. २. गळ्यात गळा घालणे. **गळ्याशी येणे, गळ्याशी पाणी लागणे** – नुकसानीची बाब होणे, परमावधीला पोहोचणे. **गळ्यातील कफनी काढणे** – मनासारखा निकाल होईपर्यंत त्राग्याने दीनवेष धारण केलेला असेल (पागोटे बांधण्याचे सोडून देणे, श्मश्रू न करता दाढीडोई वाढविणे इ.) तो सोडणे : 'आपण बादशाहीवर नजर देऊन आमचे गळ्यांतील कफनी काढावी.' - ऐलेसं ७४८८.

**गळाकाटू** वि. १. गळ्याच्या एका बाजूवर भोवरा असलेला (घोडा). २. गळेकाटू; गळेकापू.

**गळागोठा** पु. घोळका; गर्दी; दाटी (भांडण इत्यादींच्या वेळची).

**गळाट** वि. गळ्याबरोबर. (व.)

**गळाठणे** अक्रि. १. अतिशय थकवा येणे; गलितगात्र होणे. २. पुढे सरकू न शकणे; थांबणे : 'बाकीचे सगळे मध्येच कोठे ना कोठे गळाठले.' - स्मया ३७६. ३. गोठणे; बंद पडणे : 'गळाठली होती तुमची चळवळ.' - आआशे. ४. भेदरून जाणे; शक्ती नाहीशी होणे : 'बापलेकांचे पायच गळाठले.' - ऊन १२१. ५. गोंधळणे; गडबडणे : 'गाडदी इतके गळाठून गेले की त्यांच्या हातून कसलीच कृती व हालचाल होईना.' - निसं १७५.

**गळाठा** पु. १. गोळा; चोळामोळा; गोंधळ; गाळसाळ. (वा.) ० **होणे** – निकाल लागणे; शक्ती क्षीण होणे; कर्तृत्व नाहीसे होणे : 'इतर ब्रह्मचाऱ्यांचा या वयात अगदी गळाठा झालेला आढळून येतो.' - आप्रदि ४३२. २. गठ्ठा; ढीग : 'नुसता विळा फिरवून खरडला तर एक मोठा गळाठा जमून येतो.' - आआशे २८१. ३. तांडा; जमाव; गर्दी : 'त्यांच्या जागी जो गळाठा काँग्रेसमध्यें शिरला...' - जुआ ८२. ४. पसारा : 'सर्वांचे जेवून झाले म्हणजे त्याच गळाठ्यात ती जेवणार.' - माचू ५४२. ५. गवत, कडबा इ. चा कचरा : 'परंतु फार काळापासून खेड्यात तळावर गळाठा राहत आला आहे.' - गांगा १४९.

**गळाठी** स्त्री. १. गुंतागुंत; भानगड; अडचण. (को.) २. भानगडीची परिस्थिती.

**गळाणी** स्त्री. गडबड.

**गळाबंद** वि. गळ्यापर्यंत बटने असलेला (कोट, शर्ट इ.).

**गळाळ** न. (फळांचा) रस.

**गळाळा** पु. १. मधुर रसाची धारा : 'कृष्णदास मुद्गलासी श्रीरामरसें गळाळे येती।' - सप्र. १६.३०. २. घोट; घास : 'निवालिया विषोदकाचा गळाळा।' - ज्ञा ८.१४७.

**गळांड-डा** न. पु. गळू. पहा : **गलांड**

**गळांत** पहा : **गळंत**

**गळित** वि. गाळलेले; दुर्लक्ष केलेले; मागे टाकलेले : 'सारांश हे दोन्ही मतलब आमचे गळित करून दिल्हे.' - मइसा १०.१०३.

**गळित** वि. पु. ब्रह्मचर्यापासून ढळलेला.

**गळीतकुष्ट** न. झडविणारे, घटविणारे, वाहणारे कोड; महारोग. पहा : **गलितकुष्ट, गलत्कुष्ट**

**गळी** स्त्री. टीप; किनरी, तिपदरी गळा; बारीक स्वरांचा गळा (आवाज). वि. खड्या सुराचा; टिपेचा; तिपदरी; तिप्पट उंच चढण्यास योग्य.

**गळीत** न. १. तेल निघणारे धान्य; ज्यापासून तेल निघते असा पदार्थ; तेलकट (आत तेल असणारा) पदार्थ. २. रस निघणारी वस्तू (ऊस वगैरे). वि. १. गळलेले; पडलेले; सांडलेले. २. ज्याची पाने गळाली आहेत असे (झाड). ३. फाटलेले; खराब झालेले (पुस्तक). ४. गाळलेला; पाझरलेला; ठिबकलेला (प्रवाही पदार्थ). [सं. गलित]

**गळीव** वि. गळलेला; पडलेला; झिरपलेला. पहा : **गळणे**

**गळीवसुकड-खड, गळीसुकड-खड** स्त्री. पूर्ण पिकून माडावरून खाली गळलेला नारळ.

**गळुंगा** पु. कचरा; गळाठा. पहा : **गळंगा**

**गळू** पु. बेळगावकडील एका जातीचा हलका बांबू. [क. गळे]

**गळू** न. मोठा फोड; करट; गलांड; केस्तूड; बेंड; उठाणू.

अवधाण; आवाळू; फिसके. [सं. गल् = गळणे]

**गळूबंद** पु. बायकांचा ठुशीसारखा गळ्यातील एक दागिना. (बडोदे)

**गळेकापू, काप्या, काटू** वि. गळा कापणारा; विश्वासघातकी; दगलबाज. (ल.) कसाई.

**गळेकापू स्पर्धा** तीव्र स्पर्धा; शेंडी तुटो वा पारंबी तुटो अशी चढाओढ.

**गळेपडू** वि. १. स्वतःचे काम करून घेण्यासाठी बळेच दुसऱ्याच्या खनपटीस बसणारा; छळवादी (भिकारी, धरणेकरी). २. दुसऱ्यावर खोटा आळ घेणारा; असा माणूस करीत असलेला (धंदा). ३. कुंभाडी; बालंटी (भाषण). ४. गळ्यात पडणारे; अटळ (काम, व्यवहार).

**गळेफोड** स्त्री. घसाफोड; त्रासदायक व निष्फळ आरडाओरड; खरडपट्टी, उपदेश, विवरण, शिक्षण इ.

**गळेबंद** पु. गळोटी; नेकटाय.

**गळेबाज** वि. सुरेल, मधुर कंठाचा, सुराचा (गवई).

**गळेलठ** वि. पहा : **गलेलठ्ठ**. १. लठ्ठ गर्दन, मान असणारा. २. आडवातिडवा सुटलेला; गबदूल पण मूर्ख (माणूस).

**गळोगदी** स्त्री. बगाड; गळवगदी; नवसाचा गळ. पहा : **बगाड**

**गळोटी-ठी** स्त्री. गळपट्टी; नेकटाय. पहा : **गळेबंद**

**गळोष्टी** स्त्री. मुठीच्या (खोगराच्या) उराठीपासून मानेवर जाणारा कासरा, दोर (बैलाचा). चढणीच्या वेळी मूट बळकट करण्याकरिता हा बांधतात.

**गळ्या** पहा : **गळीवसुकड**

**गळ्हाटणे** उक्रि. १. गळाठा, अव्यवस्थितपणा, गोंधळ होणे. २. हरवणे; गमावणे. ३. (आजारीपणामुळे) झिजणे; क्षीण होणे; थकणे; दमणे : 'मुख्य हुजुरात... ते अगदी गळ्हाटोन हुजुरात असे नावमात्र अवशिष्ट राहिले होते.' - मराआ ५.

**गळ्हाटा-ठा** पु. १. गवत, कडबा इ.चा गळंगा; पाचोळा. २. पदार्थ किंवा कामकाजाचा घोटाळा, घालमेल, गोंधळ. ३. दुर्दशा; चिवडाचिवड; रेंदा. ४. थकवा; अशक्तता. (माळवी) ५. दीर्घ परिश्रमाचे व तुंबलेले काम. (ना.) ६. अफाट, अवजड, अनावर खाते, तांडा, स्वारी.

**गळ्हांग(घ)ती** स्त्री. गळ्यातील घोंगडी किंवा पासोडी काखेखालून आणून तिची केलेली खोळ. (क्रि. घालणे, बांधणे.)

**गंगकड** क्रिवि. दक्षिणेकडे. (व.)

**गंगकोनी** वि. गंगेकडून; गोदावरी नदीच्या बाजूने; उत्तरेकडून : 'वारं सुटयेल सुटलं गंगकोनी।' - लोले ३८.

**गंगथड-डी** स्त्री. गोदावरीच्या काठचा प्रदेश किंवा तीर. [सं. गंगातट]

**गंगमुखी** वि. गोदावरी नदीकडे तोंड केलेले; उत्तरेकडे तोंड केलेले.

**गंगमोहरा-री**, क्रिवि. गोदावरीकडे, उत्तरेकडे (गोदा व कृष्णा यामधील). याचप्रमाणे पुढील दिशावाचक शब्द रूढ आहेत - राखेसमोहरा = (राक्षसांच्या दिशेकडे) = दक्षिणेकडे. खाली-खालता-खाललाकडे = पूर्वेकडे, वर-वरता - वरलाकडे = पश्चिमेकडे इ.

**गंगरणे** अक्रि. चढून जाणे; गर्व होणे. (कु.)

**गंगलेय** सोनसांवर.

**गंगा** स्त्री. १. गंगा (भागीरथी) नदी; तिचा दैवी अवतार (देवी); नदी देवता. २. गोदावरी नदी : 'गंगातीरास येऊन रहावे.' - ऐलेसं २६२३. ३. (सामा.) पवित्र नदी : 'भवताली एक गंगा झुळझुळ वाहे।' - देप ९८. ४. पवित्र कार्याकरिता घेतलेले पवित्र नदी, झरा, कुंड यातील पाणी. [सं.] (वा.) ० **घेणे, उचलणे** - गंगेची शपथ घेणे. ० **मनाला घालणे** - मन निर्मळ करणे; रुखरुख घालवून टाकणे; केलेला अपराध कबूल करून विवेकाची टोचणी बंद करणे. ० **यमुना वाहणे** - रडे येणे; डोळ्यातून पाणी येणे. (दोन्ही डोळ्यातील अश्रुधारा वाहून गंगा-यमुना नद्यांप्रमाणे एकत्र मिळतात यावरून). **आळशावर गंगा लोटणे, येणे** - आपोआप फायदा होण्याची संधी येणे. **वाहत्या गंगेत हात धुणे** - दुसरा मनुष्य एखादे पुण्यकृत्य करीत असताना त्याला थोडासा हातभार लावून त्याच्या पुण्यात वाटेकरी होणे; कोणाचे नुकसान न करता सहजगत्या होण्यासारखा आपला फायदा करून घेणे; संधीचा फायदा घेणे. **गंगेतील पाणी गंगेत सोडणे** - ज्या ठिकाणाहून घ्यायचे त्याच ठिकाणाला नम्रभावाने अर्पण करणे. उपकार फेडताना हा वाक्प्रचार योजतात. **गंगेस-त घोडे नाहणे** - आरंभलेले महत्कृत्य शेवटास जाणे; भगीरथ प्रयत्न करून कृतकृत्य होणे (महाराष्ट्रातील घोड्यांना पेशव्यांनी गंगेच्या म्हणजे भागीरथीच्या आसपासचा प्रांत जिंकून तिचे पाणी पाजले व मराठी साम्राज्य स्थापिले यावरून) : 'एकदाचा हा कोश संपविला म्हणजे गंगेस घोडे न्हायले.' - शास्त्रीको.

**गंगागोत** न. ग्रामपंचायत; जातगंगा (वादाच्या निकालासाठी जमलेली).

**गंगाजम्नी** वि. १. ज्याचा एक बाजूचा काठ एका रंगाचा व दुसऱ्या बाजूचा दुसऱ्या रंगाचा असतो असे (धोतर इ.). २. भिन्न व विसदृश वस्तूंचा समागम किंवा संयोग; मिश्र; संकरज : 'परस्परविरोधी असे - इंग्रजी मराठी विचार एकत्र करून गंगाजम्नी पुस्तक करण्यापेक्षा... नवीनच पुस्तक लिहिणे बरे.' - विकारविलसित.

**गंगाजळी** स्त्री. १. गंगा किंवा दुसऱ्या पवित्र नदीचे पाणी ठेवण्याचे पात्र. २. मोठा खजिना; कायम शिलकीचा खजिना; ज्या शिलकीला कधी हात लावायचा नाही ती शिल्लक (शिंदे सरकारच्या खजिन्याला गंगाजळी असे नाव आहे) : 'पैशानें गच्च भरलेली गंगाजळी हातीं लागली.' - संभाजी. ३. चलनी नोटा वटविण्याकरिता वेळेवर उपयोगी पडावा म्हणून ठेवलेला रोकड किंवा सोने यांचा साठा. ४. भविष्यकालीन खर्चासाठी किंवा नुकसानभरपाईसाठी स्वतंत्रपणे ठेवलेली रक्कम.

**गंगाजळी** स्त्री. शपथक्रिया; हातावर गंगोदक घेऊन शपथ घेणे : 'बाजीराव साहेबांची आणि राजश्री नानांची गंगाजळी फाल्गुन शु. २ स जाहली.' - ऐलेसं ४८७५.

**गंगाद्वार** न. १. त्र्यंबकेश्वरी असलेले गंगा प्रगट होण्याचे ठिकाण; गोदावरीचे उगमस्थान. २. हरद्वार (या ठिकाणी गंगा हिमालयावरून सपाट प्रदेशावर खाली उतरली आहे.).

**गंगापाट-ठ** पु. घोड्याच्या छातीवरील लांब केसांची गोम. ही शुभ मानतात. हिची काही लक्षणे वाईट असतात.

**गंगापुत्र** पु. (गंगेमुळे यांची उपजीविका होते म्हणून) १. काशी क्षेत्रातील पंड्या; गंगेवरील अधिकारी ब्राह्मण. २. एक हलकी ब्राह्मण जात. हे आपल्याला कनोजी म्हणवतात. हे गंगातीरावर पंड्येगिरी किंवा शेती करून राहतात.

**गंगापूजन** न. १. काशीयात्रा करून गावी आल्यावर बरोबर आणलेल्या गंगेचे पूजन करून ते तीर्थ आप्तेष्टांना देण्याचा विधी. २. सिंहस्थ-कन्यागतात श्राद्धविधीनंतर गोदावरी-कृष्णा नदीचे केलेले पूजन.

**गंगाप्रदक्षिणा** स्त्री. त्र्यंबकेश्वरी गोदावरीला उजवी घातलेली प्रदक्षिणा; गोदावरी-प्रदक्षिणा.

**गंगाप्रवाह** पु. १. गंगेचा प्रवाह, ओघ. २. गंगेच्या ओघात सोडणे (मृताच्या अस्थी, राख किंवा देवावरचे निर्माल्य).

**गंगाभागीरथी** स्त्री. वयस्क विधवा स्त्रीला पत्रात लिहिण्याचा मायना.

**गंगाभेट** स्त्री. तीर्थक्षेत्री गेल्यावर तीर्थाचे प्रथम दर्शन घेण्याचा विधी.

**गंगामाती, गंगामृत्तिका** स्त्री. गोपीचंदनासारखी गंगाकाठची पांढरी माती.

**गंगालय** पहा : **गंगाळ** : 'गंगालयें उष्णोदकानें भरून ठेवीत आहेत.' - मंजु ८.

**गंगावणे** अक्रि. आवाज करणे; गुंगूं करणे; गोंगावणे. [सं. ङु]

**गंगावतरण** न. ज्याप्रमाणे हिमालयातून गंगा भरतखंडात मोठ्या प्रयासाने आली त्याप्रमाणे अत्यंत परिश्रमाने घडून येणारी गोष्ट; दुस्साध्य गोष्ट : 'हिंदुस्थानच्या लष्करीकरणाचे गंगावतरण लो. टिळकांच्या प्रयत्नामुळे आज हिंदुस्थानावर येत आहे.' - के १०.६.१९४१. [सं.]

**गंगावती** स्त्री. निरगुडी वनस्पती; निरगुडीचा पाला : 'म्हणौनि बोल जऱ्ही गंगावती। तऱ्ही स्वीकाराल कीं॥' - ज्ञा ९.१४.

**गंगावन** न. तार्तरी किंवा नेपाळ देशातील वनगाईच्या शेपटीचे काळे केस; कृत्रिम केस. स्त्रियांचे केस तोटके असले तर हे केस लावतात.

**गंगावनी सडका** हत्तीच्या कानांपासून पायापर्यंत लोंबणाऱ्या लांब माळा. (बडोदे)

**गंगावळ** पहा : **गयावळ**

**गंगावार** वि. गंगानदीच्या अलीकडे : 'अहमदखान बंगशाचा मुलुक गंगापार नाहीं, गंगावार आहे.' - पेद २७.२४०. [सं.]

**गंगासागरी** वि. रंगीत (काळे, तांबडे) काठाचे (धोतर, पातळ इ.).

**गंगाहोर** गंगेच्या पुरातील पाण्याने वाहून आलेली माती, गाळ इ.

**गंगाळ** न. घंगाळ; गोलाकार तोंड असलेले स्नानाचे, धुण्याचे किंवा पाणी ठेवण्याचे, धरण्यासाठी कड्या असलेले धातूचे पात्र. [सं. गंगालय]

**गंगाळटोप** पु. शिरस्त्राण : 'दुसरे बाणें सीरिचा गंगाळटोप पाडिला।' - मग ३९.

**गंगाळपोते** न. बराच ढगळ व मोठा अंगरखा; ऐसपैस कपडा.

**गंगिरी** स्त्री. नागवेल.

**गंगेरी पान** विड्याच्या पानांची एक जात. ही पाने काळसर असतात : 'तबकीं भरोन गंगेरी पानें।' - नव २०.१०१.

**गंगोत्री** स्त्री. १. गंगेचे उगमस्थान. हे गढवालमध्ये आहे. २ (ल.) कोणत्याही मोठ्या चळवळीची, विचाराची सुरवात, उगम.

**गंगोत्री** स्त्री. वीत, दीडवीत उंचीचे व तांबूस फुलांचे एक झुडूप. ताप आला असता याचा रस अंगाला चोळतात.

**गंगोत्साह** पु. गंगेच्या आराधनेसाठी पुराण, कीर्तन, ब्राह्मणभोजन इ. करणे; उत्सव करणे; गंगेचा उत्सव. [सं.]

**गंज** पु. स्त्री. ढीग; रास; उडवे; ढिगारा; गंजी; संचय (धान्य, गवत, लाकूड, गठ्ठा इत्यादीचा) : 'दिल्लीत माईना मुडदा गंज पडला।' - ऐपो ११३. [सं. गञ्ज]

**गंज** वि. पुष्कळ; फार; गडगंज. (व.) [फा.]

**गंज** पु. १. पेटी; पूड; धोकटी; वेष्टन; नळकांडे (गणिताची यंत्रे, लेखनसाहित्य, फण्या, कुंचे, वस्तरे, पान, पात, मळसूत्र, वाटे इ. ठेवण्याची पेटी. पान, सुपारी, चुना इ. ठेवण्याचे पुडे). २. हत्यारे, सामान ठेवण्याची पेटी.

**गंज** पु. पेठ; हाट; बाजार. सामान्यत: हा शब्द दुसऱ्या एखाद्या शब्दाशी जोडून येतो. जसे :- दारागंज, पहाडगंज, प्रतापगंज इ.

**गंज** पु. (सोनारी) घुंगरू, कर्णफुले इत्यादींच्या ठशांची पट्टी. (खा.)

**गंज** पु. १. पाणी साठविण्याचा तांब्याचा मोठा हंडा. २. एक उभट भांडे. ३. पातेले; बोगुणे (उभट). (व.)

**गंज** पु. १. तांब; जंग (लोखंडावर चढणारा); कीट. २. (ल.) कलंक; डाग. [सं. गंजन]

**गंज** पु. एकत्र आणलेला जमाव : 'सरकारच्या तोफा येऊन पोचल्या. शत्रूचा गंज होता तेथे लागू झाल्या.' - ऐलेसं १७८१.

**गंजज** वि. खूप; पुष्कळ. (अहि.)

**गंजणे** अक्रि. १. (शाप.) ऑक्सिजनच्या प्रभावामुळे धातूच्या (सामान्यत: लोखंड) पृष्ठभागावर ऑक्साइडचा थर जमण्याची क्रिया; गंज चढणे; कीट चढणे.

**गंजन** न. नाश.

**गंजनी** स्त्री. एक प्रकारचे गवत. (कर.) [क.]

**गंजा** पु. टकल पडण्याचा रोग. [हिं.]

वि. टकल्या. [हिं.]

**गंजाड** वि. गडगंज; पुष्कळ; भरपूर. (व.)

**गंजाड** वि. गांजेकस; विचित्र वागणारा; भंगड.

**गंजाडा** वि. गांजाचे व्यसन असणारा : 'गंजाडा बाप चिलमीच्या गुंगीत गावात फिरे.' - बाब ५३.

**गंजाण** न. एक प्रकारचे गवत. पहा : **गंजनी** (बे.)

**गंजि(जी)फा** स्त्री. अव. खेळण्याच्या (विशेषत: दशावतारी, वाटोळ्या १२०) पत्त्यांचा जोड. (क्रि. खेळणे.) : 'गंजीफा सतरंज चोपड नवें तें नर्दही सांग जे।' - सारुह. [का.]

**गंजिफिया, गंजीफा** पु. दारूगोळा : 'पन्नास तोफा व पंचवीस गंजिफियाच्या गाड्या...' - भाब ९. [फा. गंजीफा = दारूचे कोठार]

**गंजी** स्त्री. लहान रास; गंज; ढीग (गवत इत्यादीचा).

**गंजी** पहा : **चौघडा**

**गंजी** स्त्री. एकत्र, समाईक वहिवाट, उद्योगधंदा; भागी. (व.)

**गंजी** स्त्री. अंधारकोठडी : 'सत्याग्रहींना गंजीमध्ये ठेवण्यात आले.' - के ९.३.१९३९.
**गंजी** स्त्री. कांजी; भाताची पेज. (बे.गो.)
**गंजी** पहा : **गंज**
**गंजी** स्त्री. दुकान : 'साट्याच्या गंजीवर धावे काशीची नजर।' - वलो ११२.
**गंजीकोट** वि. १. गंजीकोट (जिंजी) गावचा (पैसा). २. प्रचंड; विशाल; असंख्य; विपुल; प्रशस्त.
**गंजीखाना** पु. १. (कडबा, गवत इत्यादीच्या) अनेक गंजी ठेवण्याची जागा, आवार. २. (ल.) अडगळीची खोली; रोज न लागणारे सामान ठेवण्याची जागा.
**गंजीफ** स्त्री. गंजिफांच्या डावातील एक पत्ता. [फा. गंजीफा]
**गंजीफरास-फ्राक** पु. बाह्यांचा किंवा बिनबाह्यांचा, अंगाबरोबर बसणारा, सदऱ्याच्या आत घालायचा कपडा; बनियन. [इं.]
**गंजीवटकन-ण** न. आढ्यता; दिमाख; मग्रुरी; ताठा; गर्व; वृथाभिमान. (क्रि. काढणे, मोडणे.)
**गंजु(जो)ली** स्त्री. लहान पातेले.
**गंजूर** पु. वखार; खजिना असलेली जागा. [फा.]
**गंजेटी-डी** वि. गांजेकस; गांजा ओढणारा. (ना.)
**गंज्वल** स्त्री. गांधील माशी.
**गंठण** न. सोन्यात गाठवलेले मंगळसूत्र; गाठवलेला दागिना.
**गंठवा** पु. १. सोन्याचा मणी. २. गंडा, हळकुंड व घोंगडीची दशी बांधलेले कच्चे सूत. [सं. ग्रंथी]
**गंठीछोड्या** पहा : **गठीछोड**
**गंड** पु. (मानस). १. तीव्र भावनाबंधामुळे एकत्रित आलेल्या व निरोधनामुळे अबोध झालेल्या कल्पनांचा समूह. २. पाहिजे तसे वागता न आल्यामुळे मनात सुप्तावस्थेत असणारी आणि माणसाच्या वागण्यात जिचा प्रभाव दिसून येतो अशी तीव्र भावना : 'घरात आईवडिलांचे न जमणे, सावत्रआई किंवा सावत्रबाप असणे अशा परिस्थितीतही मुलांच्यात वेगवेगळे गंड निर्माण होतात.' - शोमा ६१. जसे :- न्यूनगंड, अहंगंड.
**गंड** पु. १. तोंडाची कानशिलासह एक बाजू; गालफड; गाल : 'श्रीकुंडलमंडित गंडललित बाहुरम्य सरळ।'- रामजन्म कटिबंध २ (शिवरामकविकृत). २. हत्तीचे गंडस्थल. ३. (ल.) जोर; उग्रता; वेग; आवेग; झपाटा (रोग, पाऊस, वादळ, खरूज यांचा). ४. (ल.) गर्व; आढ्यता; अहंकार; फुशारकी. (क्रि. मोडणे, जिरवणे.) [सं.]
**गंड** पु. (ज्यो.) विष्कंभादी सत्तावीस योगांतील दहावा योग. [सं.]
**गंड** पु. १. पुरुष. २. मुख्य नायक; वीर, समर्थ पुरुष. [सं. गण्ड, क. गंड = पुरुष]
**गंड** पु. काही विशिष्ट धंदेवाइकांस तिरस्कारार्थी त्यांच्या नावाच्या शेवटी जोडायचा प्रत्यय. जसे :- न्हावगंड, तेलगंड, बाणगंड इ.
**गंड** न.पु. गळू; केसतूड : 'तुझें माथा शृंग पूर्ण तीक्ष्ण। तुज ऋष्यशृंग अभिधान। आमुचे हृदयीं गंडें तीक्ष्ण। गंडऋषि जाण आम्हांसि म्हणती।' - भारा बाल २.३०. [सं.]
**गंड** वि. उनाड; द्वाड : 'दोन गंड पोर हाईत.' - खळाळ २८.
**गंड** न. गंडांतर; मृत्युभय : 'षोडश वर्षांतिक गंड समजोनि।' - आमा ३४.
**गंडकी** स्त्री. १. नेपाळात उगम पावणारी एक पवित्र नदी. २. गंडकी नदीतील शिळा; शाळिग्राम, मूर्ती; सोने पारखण्याची कसोटी : 'रत्नपारखियांच्या गांवीं। जाईल गंडकी तरि सोडावी।' - ज्ञा १३.३२०.
**गंडखोल** पु. घोड्याचा गळा; गडखोल.
**गंडगूळ** पहा : **गळगुंड**
**गंडगोपाळ** पु. दांडगट माणूस; गुंड : 'एऱ्हवी गर्वाने गरजणारे गंडगोपाळ...' - पोत १०६.
**गंडगोळ** स्त्री. १. उखळी तोफ; गरनाळ. २. लाकडी गाठाळ ओंडा. ३. (ल.) गिड्डा व धट्टाकट्टा माणूस; बेडौल व जाड आणि मोठी वस्तू.
**गंडजोग्या** वि. आळशी; मद्दड; बशा.
**गंडणे** उक्रि. फसणे; बनवला जाणे. 'लोकांनी त्याला जन्मभर गंडवलं आणि तो गंडला.' - गाबा १३.
**गंडभेर, भैरव, भैरी** पु. १. एक प्रकारचा काल्पनिक पक्षी. २. गेंडा.
**गंडमंडल** न. चेहऱ्याची एक एक बाजू मिळून होणारे मंडल.
**गंडमाळ-ळा** स्त्री. अव. गळ्याला गाठी होण्याचा एक रोग; कफ, मेद हे दूषित होऊन काख, खांदा, मान, गळा व अंडसंधी या ठिकाणी सावकाश पिकणाऱ्या गाठी होतात. [क. गंडमाले]
**गंडमृग** पु. गेंडा.
**गंडरामी** स्त्री. नेहमी पुरुषात वागणारी, पुरुषी कारभार करणारी स्त्री. [क.]
**गंडरी** स्त्री. तिरपीट; त्रेधा; गडबड; हबेलंडी. (गो.)
**गंड(डे)री** स्त्री. १. सोललेल्या उसाचे (जोंधळ्याचेही) पेरे, कांडे, तुकडा, करवा (तोंडात मावण्याइतका). २. लुगडे इ. वस्त्राच्या पदरावरील तीन चार पट्टे किंवा फुल्या अगर अशा तऱ्हेचा काठ. ३. लहान तुकडा; झिलपी (लाकडाची, धातूच्या कांबीची).
**गंडवर्ध** फुगणे; सुजणे.
**गंडस** वि. (अशिष्ट) १. अनैसर्गिक कृत्य, विपरीत संभोग करवून घेणारा. २. (ल.) दुबळा; निर्बळ; गांडू.
**गंडस** पहा : **गोंडस**
**गंडसगोळा** पु. टेंगूळ; उठाणू; अवाळू; गाठ; गोळा (शरीरावरील किंवा कापूस भरलेल्या रजई इ. वरील).
**गंडसूचीकरण** न. (नृत्य) पाय सूची करून त्याच पायाच्या बाजूचा भाग उंच करणे, उजवा हात वक्षःस्थलावर ठेवणे व डावा हात वक्षःस्थलाच्या बाजूला वाकडा करणे.
**गंडस्थळ** न. गाल किंवा मस्तक (हत्तीचे) : 'गंडस्थळीचें तेज अधिका लखलखीत दोन्हीं भागीं।' - व्यं ६५.
**गंडस्फाटन** न. कपाळमोक्ष; कपाळ फुटणे : 'आमची पाचाची धारण बसली; गंडस्फाटनच जाले' - पेद ३२.१९३.
**गंडा** पु. १. चौकडी; चारांचे परिमाण (कवड्या, पैसे यातील). चार कवड्यांचा एक गंडा होतो. गंडा हे पूर्वी चलन होते व हिशोबात त्याचा

उपयोग करीत. २. (मंडई) चौपट संख्या.

**गंडा** पु. घोड्याच्या स्वारीचे सामान; खोगिराचे एक उपकरण.

**गंडा** पु. १. वस्ताद, गुरू (गायन, नृत्य, मंत्र, जादू यांचे) शिक्षणारंभी आपल्या चेल्याच्या किंवा शिष्याच्या उजव्या हाताच्या मनगटाला (किंवा बोटाला, गळ्याला) जो दोरा बांधतात तो. (क्रि. घालणे, करणे, बांधणे). २. घोडा, बैल इ. च्या गळ्यात बांधलेली काळ्या सुताची (तिच्यात आणखी काही वस्तू किंवा अलंकार घातलेली) दोरी. ३. भूतबाधा, रोग इ. नाहीसे करण्यासाठी मनगटाला किंवा पायाच्या घोट्याला बांधायची अभिमंत्रित दोरी. ४. काशीच्या काळभैरवाचा, प्रसादाचा, काळ्या रेशमाचा मनगटात बांधायचा दोरा. (वा.) ० **घालणे, चढविणे** – १. भारविणे, भुलविणे, फूस लावणे; मोह किंवा भुरळ घालणे. २. (सामा.) ठकविणे; फसविणे; झुलविणे; पैसे काढणे. ० **बसणे** – नुकसान होणे; फटका बसणे : 'आता बसला का न्हाई गंडा ?' - भुज ४१.

**गंडानाडा, गंडादोरा** पहा : **गंडा** ३.

**गंडापट्टा** पु. घोड्याच्या डोक्यावरील व गळ्यातील अलंकार : 'गंडापट्टा गेंदजोड्या रेशमी फुंदणी लाऊन तिला।' - पला ४.२१.

**गंडार** स्त्री. सोंगाचे भजन; लळित. (व.)

**गंडारणे** अक्रि. (तारुण्याचा) उन्माद येणे. (कु.)
[क. गंडा = शक्ती, बल; नवरा, समर्थ पुरुष]

**गंडारणे** पहा : **गंडा घालणे**

**गंडासा** पु. अश्मयुगात वापरात असलेले दगडाचे एक हत्यार.

**गंडांत** पु. (ज्यो.) अनिष्ट काल; ग्रहदशा; कुयोग.

**गंडांतर** न. अपमृत्यू; जिवावरचे दुखणे; भयंकर धोका; अघोर अरिष्ट; निकट आलेले संकट; अशुभसूचक भावी घटना; भयदायक दशा; आपले अस्तित्वच नाहीसे होते की काय अशी भीती उत्पन्न करणारे संकट. (क्रि. येणे, जाणे, चुकणे, टळणे, वारणे, निवारणे, उडणे) : 'तंव द्वादशवर्षी मृत्युचिन्ह। गंडांतर थोर होतें।' - शिली ११.१५७.

**गंडिका** स्त्री. (वै.) चेतापेशीचा गुठळीसारखा समूह.

**गंडिया, गंड्या** पु. १. षंढ; हिजडा; नपुंसक. २. गांड्या; एक शिवी. ३. (निंदेने) अपराक्रमी, दुर्बळ माणूस.

**गंडियेरी** स्त्री. गंडेरी; उसाचा करवा. पहा : **गंडरी** : 'ले रे संगीत गुलाब गंडियेरी।' - संगीत घोटाळा ८.

**गंडी** स्त्री. लहान चंबू. पहा : **गिंडी**

**गंडी** स्त्री. कसोटीचा दगड : 'रत्नपारिखियाचां गार्वी। जाईल गंडी तरि सोडावी।' - राज्ञा १३.३११.

**गंडू** पु. दर्प; गर्व.

**गंडूष** पु. १. चूळ; घोट: गळणा. (क्रि घेणे.) २. चूळ खुळखुळणे. (क्रि. करणे.) [सं.]

**गंडूषपात्र** न. तस्त; पिंकदाणी. [सं.]

**गंडे** न. बियाणे : 'हळदीचे निघालेलं गंडे म्हणजे बेणे घरी आणून...' - गार १२५.

**गंडेरी, गंडोर, गंडोरी** पहा : **गंडरी**

**गंडेरी गोफ** फुल्यांच्या आकाराचा गोफ : 'लाल पदर आम्हीं हातीं धरितो। गंडेरी गोफातें विणितो।' - मसाप २.३०.

**गंडेरीदार** वि. गंडेरी नक्षी (काठ, पदर) असलेला.

**गंडेरी पदर** जरीच्या आडव्या दोन पट्ट्या आहेत असा पदर, गंडेरी पट्टी.

**गंडोरी** पु. (माळी) खाली, वर पाने व इतर फुले आणि मध्ये गुलाबाचे फूल असलेला हाराचा भाग. अशा हाराला गंडोरी हार म्हणतात.

**गंडोरी** पु. (ओतकाम) समईच्या खांबाच्या वरचा व खालचा भाग.

**गंडोरी हसळी** स्त्री. (सोनारी) गळ्यात घालायच्या साध्या हसळीप्रमाणेच परंतु जिच्या मधल्या मूठभर जाड भागावर खांची पाडून अष्टपैलू आकाराच्या मण्यासारखी रांग केलेली असते अशी हसळी.

**गंढारणे** अक्रि. सर्वच्या सर्व उलथून पडणे; ढासळणे; कोसळणे (विहिरीच्या बाजू, इमारत, खाण).

**गंढार(ळ)णे** अक्रि. १. नासाडी होणे; बुडणे (पीक, उत्पन्न, धंदा). २. फसणे; नाश पावणे; बिनसणे; मोडणे; चुराडा होणे; ढासळले जाणे (मनुष्य, मसलत, बेत). ३. अंग झडणे; रोडावणे; चोपणे (वार्धक्याने, रोगाने). ४. माघार घेणे; भीतीने काढते घेणे (वादात); बोबडी वळणे; कचरणे; खचणे; दुर्बलावस्था येणे. ५. (वादादिकांत) थकणे.

**गंतव्य** न. १. जाणे; पळणे; गमन; पळ : 'दोघांविरहित सर्व जनीं। शीघ्र गंतव्य करावें॥' - जे १०.३४. (क्रि. करणे). [सं. गम् = जाणे] २. जाण्याचे ठिकाण.

**गंतीचा** वि. क्षुल्लक.

**गंताड्या** वि. १. अव्यवस्थित. २. घाणेरडा.

**गंतुक** न. (वन.) लैंगिक प्रजोत्पादक कोशिका.

**गंतुकाम** वि. १. गमन करण्याची इच्छा झालेला; जाऊ इच्छिणारा; गमनेच्छू. २. (ल.) आसन्नमरण : 'विश्वासराव गोळीचे जखमेनें कार्य होऊन गंतुकाम...' - होकै २७. [सं.]

**गंथडी** पहा : **गंगथडी**

**गंथड्या** वि. नाचणीच्या गुणविशेषांनी युक्त.

**गंदकी** स्त्री. १. घाण; कचरा. २. (ल.) घोटाळा : 'एकदां मागील गंदकी वारून पुढें ठीक करून टाकून घेणें आहे.' - मइसा ३.१४१. [फा. गंदगी]

**गंदलकी, गंदवल** स्त्री. न. १. बसावयाच्या पाटाच्या खालच्या टेकण्याच्या दोन पट्ट्या; खूर. २. दरवाजा, झडप इत्यादींच्या फळ्या जोडल्यानंतर मजबुतीसाठी त्यांना आडव्या ठोकलेल्या पट्ट्या, दांडकी.

**गंदि-दी** स्त्री. दुर्गंध; घाण : 'तंव भाजिलेया मनुष्याची गंदि। भेदली तेयां।' - क्रिपु ४२.१०५.

**गंदवल** एकमेकांना छेदणारे पाय असणारी तिवई.

**गंध** पु. १. वास (चांगला, वाईट); सुवास किंवा घाण : 'मी पृथ्वीच्या ठायीं गंधु।' - ज्ञा ७.३४. २. सुवास; परिमळ; परिमळद्रव्य. ३. चंदनकाष्ठ; खोड. [सं.] (वा.) ० **नसणे** – (वासदेखील नसणे) अगदी अस्तित्व नसणे, काही ज्ञान नसणे (एखाद्या गोष्टीचे) : 'तिच्या

माहेरी इंग्रजीचा कीं नवीन कसला गंधदेखील नाहीं.' - पकोघे.
न. १. (चंदन, रवा, अगरू, केशर इत्यादीचा) कपाळावर किंवा शरीरावर लावलेला टिळा किंवा उटी. २. उगाळलेल्या चंदनाचा देवपूजेत वापरायचा लेप. (वा.) **गंधफूल करणे** - १. पूजा करणे. २. (ल.) फजिती करणे, खरडपट्टी काढणे.
पु. अंगराग उटी : 'गंध आर्द्रचि असो अनुसूया। दे असा वर न जीस असूया।' - वामन लोपामुद्रा संवाद १८.

**गंधक** पु. १. एक खनिज द्रव्य, उपरस; अधातुरूप ज्वालाग्राही रासायनिक मूलद्रव्य; धातुवैरी. २. एक विशेष मिश्रण (औषधीसंबंधी). [सं.]

**गंधकाचे फूल** गंधकाला आच देऊन त्याची केलेली भुकटी.

**गंधकाडी** स्त्री. गंधक लावलेली काडी, आगकाडी.

**गंधका(ना)म्ल** न. गंधकाचा तेजाब; सल्फ्युरिक ॲसिड. सर्व रासायनिक क्रियाकारकांत फार उपयोगी. हे फार दाहक आहे.

**गंधकाष्ठ** न. सुवासिक लाकूड; चंदनाचे खोड.

**गंधकिसल** न. उपयुक्त व गुंगी आणणारे द्रव्य.

**गंधग्राही** वि. (वै.) नाकातील अगर तत्सम वास जाणणाऱ्या (पेशी व पेशीसमूह).

**गंधन** न. सल्फोन; गंधक ज्यामध्ये आहे अशा रसायनांचा वर्ग. यातील काही रसायने महारोग व क्षयरोग यांच्या उपचारपद्धतीत वापरतात.[इं.]

**गंधप्रतिमा** स्त्री. (शिक्षण) वास घेण्याशी संबंधित असलेली प्रतिमा.

**गंधफुल्ली** स्त्री. सुगंधी कळी.

**गंधबीड-वीड** न. पादेलोण; काळे मीठ; बीडलवण.

**गंधमार्जार** न. जवादी मांजर. [सं.]

**गंधमोरी** स्त्री. घाण पाण्याची मोरी, गटार : 'मग गल्लीकुची गंधमोरी। जाऊनी तेथें वस्ती करी॥' - नव १३.६०.

**गंधरस** पु. विशिष्ट झाडापासून निघणारा औषधी चीक; रक्त्याबोळ; हिराबोळ. [सं.]

**गंधराघोळ** पु. धिंगाणा; गोंधळ. (कर.)

**गंधराज** पु. एक फुलझाड; शेवंती. [सं.]

**गंधर्व** पु. १. एक उपदेव; स्वर्गातील गायक; सुरगायक. हे स्वर्गात राहून प्रमुख देवांच्या सभेत गायन करतात : 'धनपति सभेत गुह्यक, राक्षस, गंधर्व, अप्सरा, त्र्यक्ष।' - मोसभा १.४२. २. (ल.) गानवादनपटू. ३. अदृश्य पुरुष. [सं.]

**गंधर्वगायन, गंधर्वगान** न. १. गंधर्वांचे गाणे. २. स्वर्गीय गाणे. ३. अत्यंत मधुर व आलापदारीचे गाणे. [सं.]

**गंधर्वनगर** न. १. गंधर्वांचे शहर; दिसते न दिसते व एकाएकी अदृश्य होते किंवा असंभाव्य स्थानी आढळते असे अंतरिक्षस्थ किंवा मांत्रिक शहर : 'गगनीं गंधर्वनगर जैसें।' - विपू ३.४४. २. हवेत प्रकाशकिरणांच्या वक्रगतीने उत्पन्न झालेला. भूलोकावरील शहरे, बागा वगैरेंचा देखावा; आकाशातील ढगाच्या आकृतीवर होणारा नगरादिकांचा भास : 'गंधर्वनगरींचीं ठाणीं। घेतली देऊनि चिंतामणी।' - एभा २.२२६. ३. (ल.) छाया; आभास; मिथ्याभास; काल्पनिक अथवा मिथ्या गोष्ट : 'कीं गंधर्वनगरींचे सैन्य।' - ह १३.२६.

**गंधर्वपूजा** स्त्री. सन्मानाने एखाद्यास बोलावून आणून मग त्याची भोसडपट्टी काढून त्याला मार देणे. [सं.]

**गंधर्वभुवन** पहा : **गंधर्वनगर** : 'न रचिता गंधर्वभुवन। उठी जैसे॥' - ज्ञा १८.४२९.

**गंधर्वविद्या-वेद** स्त्री. पु. संगीतविद्या; गायनकला; गाण्या-बजावण्याची कला.

**गंधलकी, गंधवल** स्त्री. पहा : **गंदलकी**

**गंधलोलक** पु. (मानस.) सहा प्राथमिक गंध दाखवणारी लोलकाकृती.

**गंधवादी** पु. सुगंधी द्रव्यांचा व्यापारी; गंधी : 'गंधवादी : धूपी : मागतेयांसि देति' - लीचपू २८.

**गंधवान** वि. सुवासिक; चांगल्या वासाचे. [सं.]

**गंधवार्ता** स्त्री. (वासाने बातमी) यत्किंचित ज्ञान; मागमूस. (क्रि. नसणे.) : 'याची मला गंधवार्तासुद्धा नाहीं.' - चंद्र १७८. (वा.) ० **लागू न देणे** - १. कळणार नाही अशी व्यवस्था करणे. २. कानावर जाऊ न देणे.

**गंधशस्य** न. एक उपरत्न, याचा रंग पांढरा, लाल किंवा लालसर पांढरा असतो. हे रत्न प्रचारात नाही.

**गंधा** वि. घाणेरडे; दुर्गंधी; वासट. हा शब्द समासात येतो. [फा. गंदा = वासट]

**गंधाकाडी** स्त्री. १. चंदनाचा तुकडा; चंदन. २. उदबत्ती. (गो.)

**गंधानिळ** पु. सुगंधी वारा : 'उठिला मदगंधानिळीं।' - ज्ञा १७.६.

**गंधाबिरुजा-बेरोजा** पु. राळ; सुरूच्या झाडाचा चीक; एक वनस्पतीद्रव्य. याला उग्र व कडू वास असून औषधे व रोगण यांच्या कामी हा उपयोगी आहे. [फा. गंधाबीरोझा]

**गंधार- गांधार** पु. (संगीत) मूलभूत सप्तस्वरातील तिसरा स्वर; सा रे ग म प ध नी या स्वरांपैकी ग हा स्वर. [सं. गांधार]

**गंधाली** स्त्री. अत्तराची पेटी : 'कर्नाटकातून बुक्केफरोज आला होता. त्याच्याकडून ही गंधाली विकत घेतली.' - श्रीयो २.२८१.

**गंधाक्षत-ता** स्त्री. १. धार्मिक कृत्याच्या प्रारंभी यजमानाने उपाध्यायाच्या कपाळी लावायचे गंध व अक्षता. २. (शुद्ध व पवित्र लोक यांचा उपयोग नेहमी करतात त्यावरून) शुद्ध व पवित्र सहवास, संबंध.

**गंधाक्षतवर्जन** न. मिलाफ, एकजूट, बरोबरीचे दळणवळण यास प्रतिबंध, अडथळा.

**गंधाक्षतवर्ज्य** वि. प्रतिबंध इ. करायला योग्य.

**गंधा:पान्तु** पु. (ल.) मार; ठोक.

**गंधिकाळिक** स्त्री. गंज व काळेपणा : 'सांगे पितळेची गंधिकाळिक। जें फिटली होय निशेख।' - ज्ञा ४.६४.

**गंधी** स्त्री.पु. १. सुगंधी द्रव्यें विकणारा; आतारी. २. औषधे विकणारा; गांधी.

**गंधी कर्बिल** कॅर्बालिकाम्ल व गंधकित यांच्या संयोगाने तयार झालेले द्रव्य, हे विषावर गुणकारी आहे.

**गंधे** पु. अत्तराचा व्यापार करणारा.

**गंधेल** न. चंदनी अत्तर, तेल. (गो.)

**गंध्या** वि. १. पहा : **गंधी २.** २. घाणेरडा; घाण्या; ज्याच्या अंगास घाण येते असा (माणूस). [सं. गंध]

**गंपा** पु. टोपले.

**गंबार** पहा : **गवर १** : 'सुवर्णनाणी म्हणून गंबार, मोहरा...' - श्रीयो ४९२.

**गंबेरी** स्त्री. विड्याची पाने किंवा फुले ठेवण्याची करंडी.

**गंभारी** शिवणझाड.

**गंभीर** वि. ज्याचा परिणाम अत्यंत अनिष्ट होईल असा (बनाव, घटना इ.).

**गंभीर** वि. मोठा; प्रतिष्ठित; घरंदाज : 'नवरी साजती गंभीराची।' - राके ११४. [सं.]

**गंभीर** वि. १. खोल, अगाध (समुद्र, नदी). २. शांत, सोशीक, भारदस्त; जरबी; धीरांचा. ३. विचारशील; विवेकी. ४. आतल्या गाठीचा. ५. घन, घौस, उद्दाम.

**गंभेरी** स्त्री. निंब वृक्षाची जात : 'फणस गंभेरी।' - वह १३६.

**गंमत, गंमतजंमत** स्त्री. १. सुखासमाधानाचे कालक्रमण; मौज; चैन. २. करमणुकीची, चैनीची वस्तू, विषय, व्यापार, साधन. ३. चेष्टा; थट्टा. [सं. गम् = जाणे]

**गंमत** स्त्री. दंडारीतील प्रसंग. [फा.]

**गंवईचे लोक** पु. अव. खेडवळ, गावंढळ लोक. (काशी)

**गा** संबोधन (बहुधा काव्यात) अरे! अग : 'चाला, गा राउत हो भणतिले।' - शिव ५६१. [सं. 'अगा'चे संक्षिप्त रूप]

**गाइजणे** उक्रि. गाणे; म्हणणे : 'तुझीं लीलां नामें गाइजेसी।' - दाव ४२५ [सं. गै]

**गाई-गाऊ** स्त्री. अंगाई; जो जो. (वा.) ० **करणे** - (लहान मुलाच्या भाषेत) झोपणे.

**गाईगुजी** स्त्री. अव. गुरेढोरे : 'गाईगुजी जोगवू लागल्या आहेत.' - जैत २९.

**गाईघाटा** पु. सर्व लहानथोर जनावरे : 'दिवाळसनादिशीं मी का ओवाळी गाईघाटा।' - जामामा २४४.

**गाईचा गोहोरा** कृतघ्न; खाल्ल्याघरचे वासे मोजणारा.

**गाईर** स्त्री. १. गारभीच्या शेंगेतील बी (कागद इ. घासायला व मऊ करण्यास उपयोगी). (राजा). २. (ल.) गळवातील गाठ किंवा कठीण भाग. ३. प्रौढ कुमारिकेच्या स्तनातील काठिण्य किंवा गाठ; स्तनात प्रथम येणारी गाठ. ४. अंड्यातील पिवळा बलक.

**गाईर** स्त्री. शेणखळी; शेण साठवण्याची खाच.

**गाउ** पु. चार कोसांचे अंतर : 'रीधपुर प्रांती दीढा गाउवा कांटसरे।' - गोच १. [सं. ग्राम]

**गाउ(ऊ)ली** : स्त्री. लडिवाळपणे गायीला म्हणतात (माय-माउलीप्रमाणे रूप) : 'गुरूचि शिष्यवांसुरांसि कामधेनु गाउली।' - निमा १.३६.

**गाऊडी** वि. गावंढळ.

**गाऊल** न. १. नफा; फायदा; किफायत; कमाई. २. श्रमविरहित किंवा अकल्पित फायदा; भूमिगत धनाचा लाभ; घबाड. (क्रि. सापडणे, लागणे.)

**गाक(ख)र, गागरा** पु. बट्टी; उखरी; निखाऱ्यावर भाजलेली - गव्हाच्या कणकेची - जाड दामटी. (क्रि. घालणे, पाडणे, करणे.) पहा : **खाकर** [हिं. गाकर]

**गाकरी** स्त्री. तांदळाच्या पिठीची किंवा कणकेची दामटी.

**गाखर** पु. फुफाटा; निखारा.

**गागजणे** पहा : **गागणे**

**गागणे** अक्रि. १. ओरडणे; मोठ्याने बोलणे; गर्जना करणे : 'हळुच तिस म्हणे हे गागसी कां गव्हारे।' - सारुह ४.७२. २. मोठ्याने बोलावणे; हाक मारणे. ३. त्रासणे. [सं. गर्ज]

**गागर्यो** वि. तोतरा. (गो.) [पोर्तु.]

**गागर** स्त्री. घागर; मातीचा घडा.

वि. ढेरपोट्या. (व.)

**गागरा** पु. धूळ; कचरा; धुरळा. (व.)

**गागाचार्य-दीक्षित-भट्ट** पु. (मूळचा गागाभट्ट हा अति विद्वान पंडित असून त्याने शिवाजीमहाराजांना राज्याभिषेक केला होता त्यावरून). (ल.) दिखाऊ, ढोंगी विद्वान; अकटो-विकट पंडित.

**गागाभट्टी** स्त्री. १. गागाभट्टाने लिहिलेला धर्मशास्त्रावरील ग्रंथ. २. (ल.) विद्येचे अवडंबर; अकटोविकट पांडित्य; पोकळ पांडित्य. ३. गप्पीदास.

**गागावणे** अक्रि. रागाने आरडाओरड करणे; खेकसणे. पहा : **गागणे**

**गागाळी** स्त्री. गाऱ्हाणे; तक्रार; फिर्याद; कागाळी. (को.)

**गागी-गूगे धनिष्ठा** (जोशाला कुंडली दाखवल्यास तो काहीतरी बडबड करीत जातक पाहतो त्यावरून) काहीतरी बोलून दुसऱ्याला घाबरवणे; स्वत: गोंधळणे, गांगरणे. (क्रि. करणे)

**गाज** पु. गाजावाजा; भयंकर आवाज; ओरड. (गो.) [सं. गर्ज]

**गाजणे** अक्रि. १. वाजणे; आवाज होणे; गर्जना करणे; गरजणे; गागणे (मेघ, पडघम, नगारा) : 'तो गाजत असे अद्भुत।' - ज्ञा १.१२६. २. दुमदुमणे; घुमघुमणे; प्रतिध्वनी होणे; नाद निघणे (वाद्ये इत्यादींचा) : 'आम्ही गाजत वाजत गेलों शिबिरासि विजय साधूनी।' - मोभीष्म १०.११८. ३. जगजाहीर होणे; प्रसिद्ध असणे; सर्वांना माहीत असणे. ४. डौल मिरविणे : 'कां रुपेंवयसा माजा। आथिलेपणें कां गाजा।' - ज्ञा ९.४३२. [सं. गर्जन]

**गाजतवाजत** क्रिवि. वाजंत्री वाजवत; समारंभाने : 'गाजतवाजत मिरवणूक मोटारीतून चालली.' - ऐको १.१०६.

**गाजने** न. गर्जना; गडगडाट; मोठा आवाज : 'हों काज विजूसि वाजतुसे दांतोरा। मिसें गाजनेयाचेनि।' - रुस्व ४३८.

**गाजर** न. एक कंद; हा लांबट, निमुळता, तांबूस रंगाचा असतो. हा खाद्य म्हणून वापरतात. [सं. गृंजर] (वा.) **गाजरासारखा होणे** - रागाने तांबडालाल होणे. **खुषीत गाजरे खाणे** - मनात मांडे खाणे; शेखमहंमदी करणे; मूर्खपणाने आनंद मानणे; मनोराज्य करणे.

**गाजरपारखी-ख्या** पु. गाजराची परीक्षा करणारा; अकलेचा खंदक; शुंभ; दीडशहाणा माणूस; मूर्ख; खरी परीक्षा नसणारा मनुष्य (कुत्सितार्थी) : 'आम्हा पुरुषांची जात अशी गाजरपारखी आहे.' - कीचकवध.

**गाजरमुटके** पु. अव. गाजरांच्या कीसात मसाला घालून तो डाळीच्या पिठात मिसळून तळलेले गोळे.

**गाजरसुंब** स्त्री. नरम, नाजूक खूर (घोड्याचा).

**गाजरा** वि. गाजरासारखा तांबूस व नरम (घोड्याचा खूर).

**गाजरा तीळ** पु. १. कारळा तीळ (गाजराच्या पदार्थात याचा मसाला घालतात म्हणून). २. गाजराच्या रंगाचा तीळ (शरीरावरील).

**गाजविणे** उक्रि. १. वाजविणे; गर्जना करणे; आरोळी मारणे; डरकाळी फोडणे. २. प्रसिद्ध करणे; डांगोरा पिटणे. ३. (विशिष्ट नामांशी संयोग होऊन) मोठी, प्रतापी, कीर्तिमान कृत्ये करणे; प्रसिद्धीला आणणे. (वा.) **गाजवून वाजवून करणे** – एखादे कृत्य उघडपणे व प्रसिद्धपणे करणे.

**गाजा** पु. १. आरडाओरड. (राजा) २. ढग (बालभाषा).

**गाजावज्य** न. गजबज; गडबड; गोंधळ : 'गाजावज्यही न धरावें।' – ज्ञा ४.३१.

**गाजावाज-जा-जी** पु. स्त्री. १. गाणे; गायनवादन. २. (ल.) कीर्ति; प्रसिद्धी. ३. गवगवा; बोभाटा. बभ्रा; अगाजा; अवडंबर.(वा.) **गाजावाजा होणे** – बोलबाला होणे; लोकांच्या कानावर जाणे.

**गाजी** पु. लावा पक्ष्यांची किंवा लाहूर पक्ष्याची एक जात.

**गाजी-झी** वि. १. धर्मवीर; धर्मसंरक्षक. २. शूर; योद्धा; पराक्रमी; महत्कृत्ये करणारा : 'एखादा आढळे गाजी।' – दास १९.८.५. [फा.]

**गाजीनणे** अक्रि. पहा : **गाजणे** : 'गगनु गाजीनिले।' – दाव ७०.

**गाजीमर्द** पु. १. शूर; वीर इ. २. (कौतुकाने) घोडा. [फा.]

**गाज्या** पु. तरवारीच्या पात्याच्या एका विशिष्ट भागाचे नाव : 'बोलण्यामध्यें कज्या होऊन आबास गाज्याची व पुतळीची अशा दोन जखमा तलवारीच्या लागल्या.' – ऐलेसं ५८८४.

**गाझा** पहा : **गरजा**

**गाट** उकिरडा; शेणखड्डे. (अहि.)

**गाटा** पु. हत्ती.

**गाटा** पु. १.पाणी धरून ठेवणारे, चिखल होणारे शेत. २.चिखल; गारा. (व.)

**गाटा-टी-ट्या** वि. हट्टी; दुराग्रही; खोड्या करणारा; हेकड; हटेल.

**गाटे** क्रिवि. हटवादाने; हट्ट धरून.

**गाटेगीळ** वि. कधी न चिडणारा; शांत; मुखस्तंभ. (व.)

**गाटेगोटे** पु. अव. १. दगडगोटे. २. (ल.) मूर्ख, अडाणी लोक : 'फार माजले गाटेगोटे।' – अफला ६५. [गोटाचे द्वि.]

**गाठ** स्त्री. १. तिढा; अढी; गुंडाळा; वेटोळे; गुंतागुंत इत्यादी. २. झाडाचे टेंगूळ; लाकडातील गठ्ठा, गुलुंब. ३. बोरू, ऊस यांच्या दोन पेऱ्यांमधील सांधा. ४. (ल.) शरीराचा गोल मांसल भाग; पोटरीतील बेडकी. ५. बिनतोंडाचे (आंधळे) गळू; केसतूड; सूज; अवधाणा; बेंड (प्लेगच्या आजारात बहुधा सांध्यात गाठ येते). ६. (अव.) कपाळावरील आठ्या. ७. बेंबीभोवतालची ग्रंथी किंवा काठिण्य. ही प्राण व अपान या दोन वायूंच्या संयोगाने बनते असे म्हणतात. ८. पैशाचा कसा, थैली (मूळात पैसे ठेवून वस्त्राला मारलेली गाठ). ९. (ल.) बंधन; आळा; बेडी; अर्गळा. १०. अढी; पूर्वग्रह : 'त्याजविषयीं जर आपल्या मनांत गांठ आहे तर.' – नि १४९. ११. फास; सरकफास. [सं. ग्रंथि] (वा.) ० **घालणे, ठेवणे** – १. लक्ष ठेवणे; दृष्टी पुरविणे; मनावर घेणे. ० **घालणे** – १. भेटणे; एकत्र येणे; समोरासमोर येणे. २. चढाई करून जाणे; सामना घेणे : 'घालीन गांठि त्यातें, मी कीं मारील तो मला आजी।' – मोकर्ण २०.२१. ० **घेणे** – भेटणे. ० **तोडणे** – दूर जाणे; अंतर पाडणे : 'त्यांची गाठ पडली, तेव्हा सोशीत (शत्रूचा गोळीबार सोशीत) गाठ तोडीत तीन कोस लष्करपावेतो आले.' – ऐलेसं ३१२०. ० **पडणे** – १. खरे काय ते पक्के करणे. 'आता देतो म्हणाला, आता नाही म्हणता; तेव्हा आम्हास गाठ पडत नाहीं.' – ऐलेसं २६८८. २. भेट घेणे. ० **सुटणे** – भांडवल कमी होणे. **गाठीस करणे** – साठविणे; राखणे; शिल्लक ठेवणे. **जन्माची गाठ** – विवाहसंबंध; हिंदू लोकात एकदा लग्न झाले म्हणजे ते मृत्यूपर्यंत टिकते असे समजले जात असे. **सात गाठी देऊन ठेवणे, सात गाठीपलीकडे ठेवणे** – केव्हाही खर्च न करण्याच्या उद्देशाने साठविणे. ० **देणे,** ० **मारणे** – गाठ तयार होईल असे करणे. **गाठीला असणे** – साठवलेला पैसा जवळ असणे. **गाठीला लावणे** – पैशाला पैसा जोडणे; पैसा साठवणे. **गाठीस असणे** – १. हुकमात किंवा ताब्यात असणे; जवळ असणे. २. शिलकीस ठेवलेला असणे; संग्रही असणे (पैका इ.).

**गाठ** स्त्री. तिसऱ्या महिन्याचा गर्भ.

**गाठ** स्त्री. सामना; भेट; मुलाखत; दृष्टादृष्ट; उत्तरप्रत्युत्तर.

**गाठ** स्त्री. १. कामकाजाचा संबंध; व्यवहार; प्रसंग. (क्रि. घालणे, असणे, होणे.) २. परिणामाचा भविष्याशी बसलेला ताळा, मेळ; गोष्टींचा मेळ, कालैक्य; समकालिकत्व. ३. एकवाक्यता; संगती; संबंध; मेळ. ४. सोय; सवड.

**गाठ** स्त्री. नेहमीच्या सवयीचे अन्न खाण्याची तीव्र इच्छा. (क्रि. लागणे.)

**गाठचा-ची-चे** वि. जवळचा; स्वत:च्या कशातील, थैलीतील; पदरचा, कडोसरीचा. (वा.) ० **वाहणे** – स्वत:चा पैसा (शिलकी) खर्च करणे.

**गाठडी** स्त्री. गाठोडे. पहा : **गठडी**

**गाठण** स्त्री. १. गुंतवणी; वीण (कुंपणाच्या काट्यांची, बांबूचा तट्ट्या, साट, ताटी इ. ची०); छपराच्या ओमण, रिफाड इत्यादींची बांधणी (कृती व काम दोन्हीही). २. गाठ मारलेली स्थिती किंवा गाठीचे काम. (क्रि. देणे, मारणे, बांधणे, सोडणे, सुटणे, तुटणे इ.)[सं. ग्रंथन]

**गाठणे** उक्रि. १. ऐन वेळी जाणे; अवचित धरणे किंवा अडविणे; ऐन संधी साधणे व पकडणे. २. (ल.) आकळणे; वश करून घेणे; वठणीवर आणणे; कह्यात आणणे. (वा.) **गाठून बसणे** – डांबून बसणे; वेढून बसणे; ठाम बसणे : 'यास्तव गोवलचे कोटात गाठून बसलो.' – पेद ३.१५.

**गाठणे** उक्रि. १. मिळविणे; संपादणे : 'सर्वत्र तू यशस्वी त्वद्दासें यश सुखेचि गाठावें।' – मोसभा १.६८. २. संपविणे; साधणे; पोहोचणे (प्रवास, मजल, मुक्काम, गाव). मुक्कामाला पोचणे; भरभर जाऊन

पुढे गेलेला माणूस, वाहन इ. जवळ पोचणे. ३. ताब्यात आणणे; कबजा घेणे (देश, प्रांत यांचा). ४. भेटणे; भिडणे; सन्मुख होणे.

**गाठदाम, गाठसोडवण** पु. स्त्री. लग्नात वधूवरांच्या पदरांची गाठ सोडविण्यासाठी वधूच्या बहिणीला दिलेले बक्षीस; करवलीचा मान.

**गाठभेट** स्त्री. भेट : 'दोघांच्या गाठीभेटी होत राहिल्या.' - पडछाया १४६.

**गाठलणे** अक्रि. गाठी मारून पक्का करणे : 'दावी गाठलून (बैलाला) मांडवात गच्च बांधला.' - गोता १३५.

**गाठले** न. १. मुले किंवा स्त्रिया यांच्या गळ्यातील पुतळ्यांची, रत्नांची किंवा मण्यांची साधी माळ; एक अलंकार. यात पुतळ्या, वाघनखे, पदके इ. ओवलेली असतात. २. मंगळसूत्र; गंठण; डोर्ले. (व.) ३. साखरेची गाठी; साखरेच्या पुतळ्यांची माळ. (कु.) [सं. ग्रंथिल]

**गाठलेमाठले** न. ब्राह्मणात प्रसूतीनंतर तिसऱ्या दिवशी कच्च्या सुताला हळद लावून पिवळे करून त्याला काळ्या घोंगडीची दशी व निर्गुडीचा पाला बांधून तो दोरा मुलाच्या गळ्यात बांधण्याचा प्रकार, विधी.

**गाठव(वे)ल** न. देवाचा नवस फेडताना एकमेकांच्या पदरांना गाठ मारून पूजा करणारे जोडपे; वोहर. हा प्रकार जत्रेच्या वेळी दृष्टीस पडतो. (गो.)

**गाठविणे** उक्रि. १. गाठीने सांधणे; जोडणे; गाठ देणे; गाठ मारणे; गाठळणे (दोरी, सूत इ. नी.). २. गाठीने बंद किंवा सुरक्षित करणे; दोरीत ओवून हालेनासे करणे (माळेतील मणी इ.). ३. एखादा दागिना वगैरे रेशमाने पटविणे (पटवेकरी). [सं. ग्रथन]

**गाठसर्पळी** स्त्री. गाठी गाठी असलेली सोन्याची साखळी. (गो.)

**गाठ (ठा) (ठे) ळ** वि. १. गाठी असलेले; गाठीचे (लाकूड). २. (ल.) मांसल; धष्टपुष्ट.

**गाठळगुंजट-ठळ** वि. गाठीगाठींचा.

**गाठळणे** अक्रि. फुगून घट्ट होणे : 'हातापायांवरच्या शिरा फुगल्या होत्या, जागजागी गाठळल्या होत्या.' - बनगर ९.

**गाठा** एकी.

**गाठा** पु. १. खंडोबाच्या भक्ताच्या गळ्यातील रूप्याची हसळी किंवा कडे : 'गळा गाठा हिंडे द्वारीं.' - तुगा ४१६. २. सोन्याची साखळी असलेला कानातील एक अलंकार. (कु.) ३. (ल.) पिंजरा : 'पुंसा लावोनि बांधिजे गांठा।' - ज्ञा १३.२३४. ४. गोल तळीव पदार्थ. [सं. ग्रंथि] (वा.) ० **फोडणे** - वाघ्यामुरळ्यांच्या लग्नात गुरव एक कवड्याची माळ मुलीच्या गळ्यात घालतो तो विधी.

**गाठागाठ** स्त्री. तडजोड; समजूत : 'यावरून फरासीस यांतून फुटून इंग्रजास मिळाले असतील तर थोडके मुद्यावर गाठागाठ करून घ्यावी असें असेल.' - मशियांका २८७.

**गाठाळलेपणा** पु. संकुचित वृत्ती; जुने संस्कार.

**गाठिवन** पु. नागरमोथा : 'गाठिवना मालती मृणाळें। असोख वा बनें बकुळें।' - रुस्व ५४१.

**गाठी** स्त्री. भेट; एकरूप होणे : 'ते गुरुशिष्याची गोठी। पदपिंडाची गांठी।' - ज्ञा ३.२७२.

**गाठी** स्त्री. १. पहा : **गाठले** २. कातकरणीच्या गळ्यातील पोत. ३. खारीक, खोबरे, लवंगा, जायफळ इ. ची माळ; गाठले (मुलांचे). ४. होळीच्या सणातील गळ्यात घालायची साखरेच्या पदकांची माळ. ही होळी-पाडव्याला मुलांना देतात.

**गाठी** स्त्री. १. अळवाच्या पानांची सुपारीएवढ्या गाठींची दह्यातील भाजी; अळूवडी. (राजा.) २. दाण्यांची भाजी. (गो.) ३. मूग इ. कडदणांची पातळ भाजी. (गो.) ४. फरसाणमधील हरभरा डाळीचा एक पदार्थ.

**गाठी** स्त्री. १. बंधन. २. गुज. ३. भेट; मेळ. ४. अढी : 'वारेयानि वालुवे गांठि। केहिं आहे।' - राज्ञा १३.१०९२.

**गाठी** स्त्री. अहंकार; आढ्यता.

वि. हट्टी. [सं. ग्रंथि]

**गाठीकि(चि)राईत, गाठेकि(चि)राईत,** न. एक प्रकारचे चिराईत.

**गाठीचा ताप** (वै.) खाकेत वा जांघेत गाठ होऊन येणारा ताप; ग्रांथिक सन्निपात; उंदराच्या अंगावरील दूषित पिसवांमुळे येणारा ताप; प्लेग.

**गाठीचा दाम-मान** पहा : **गाठदाम, गाठसोडवण**

**गाठीव** वि. गाठलेले; गाठींनी कायम केलेले.

**गादुलीमादुली** स्त्री. अव. (बायकी) बाळंतिणीच्या ५ व्या दिवशी सुईण व बारशाच्या दिवशी घरच्या स्त्रिया मुलाच्या हातापायांना व कमरेला जे दोरे बांधतात ते. पहा : **गाठलेमाठले** [गाठलेचे द्वि.]

**गादूर** पु. घोड्याचा एक रोग; टाचरू. - अश्वप २.२६०.

**गाठे-ठी** न. स्त्री. कानातील अलंकार. पहा : **गाठा** २. (गो.कु.)

**गाठेविटप** अक्रि. कंटाळा, वीट येणे.

**गाठोडी-ळी** स्त्री. लहान गाठोडे; गठडी.

**गाठोडे-ळे** न. १. गाठ; गट्ठा; बोजा; बोचके (गाठ मारलेले, वस्त्रात बांधलेले कापड इ. चे). २. (ल.) पुंजी; भांडवल; मालमत्ता; संपत्ती; डबोले; ऐवज; द्रव्य; गुप्त धन. ३. नागपंचमीच्या दिवशी केलेले उकडीचे दिंड (एक पकान्न). [सं. ग्रंथ् = रचणे] (वा.) ० **आटोपणे,** ० **गुंडाळणे,** ० **बांधणे** - १. आवरणे; आखडणे; बंद करणे (व्यापार, धंदा, कामकाज). २. पळून जाणे; निघून जाणे. ३. मरणे. ० **होणे,** ० **जमणे** - लठ्ठ, गबर, श्रीमंत होणे.

**गाठ्या** पु. १. पहा : **गाठा** १, २. २. भाजीकरिता केलेली अळवाच्या पानाची गाठ. ३. सुमारे नऊ इंच लांबीच्या कांडसर वेलीचे (ताण्याचे) नाव. ४. सुमारे तीन इंच उंचीची एक वेल.

**गाठ्याळ** वि. १. गाठाळ; गाठळ : 'गांठ्याळ वेळू वेळुजाती।' - मुआदि १७.१०४. २. (ल.) आतल्या गाठीचा; खोल मनाचा : 'कपटी कुटिळ गाठ्याळ।' - दास २.३.२३. [सं. ग्रंथिल]

**गाड** न. फट. (व.)

**गाड** स्त्री. रोष; गैरमर्जी : 'आपणावरी फारसी गाड आहे.' - पेद २११.

**गाड(डी)उतार** पु. नदीतून गाडी जाण्याचा रस्ता.

**गाडग-गे-ला-ले** पु. न. लहान मडके : 'तंव गरळ वमिले उरगीं। ते पडिले गौळणीचें गाडगीं।' - कथा २.१५.४१. [सं. घट]

**गाडगाड** पु. गडगडा.

**गाडगुलांव** वि. लठ्ठ व ठेंगू. (गो.)

**गाडगूड** स्त्री. न. १. (तोफा, बंदुका, मेघ यांचा) गडगडाट; धडधडाट. २. पोटातील गुरगुर, कुरकुर. ३. (ल.) काळजी; चिंता; धस्स होणे (पोटात या शब्दाशी जोडून योजना). [ध्व.]

**गाडगूल** न. लहान गाडगे, मडके. (गो.)

**गाडगे** न. सुगड; सुरई.

**गाडग्यालवंड पाऊस** घरातील गाडगीमडकी वाहून जातील असा मुसळधार पाऊस : 'ते दिवशीं पाऊस मनस्वी लागला. कोण्हाचे मडकें मडक्यांत राहू पावलें नाहीं, गाडग्यालवंड पाऊस.' - पेद.

**गाडण** न. चिखल; दलदल. (ना.) [सं.गाढ]

**गाडणे** उक्रि. १. (खड्ड्यात) पुरणे; मातीआड, भूमिगत करणे. २. मूठमाती देणे. ३. (ल.) (न भिता एका जागेवर) पाय रोवणे; ठाकणे : 'म्हणून गाडून उभे राहिले.' - भाब ८०. [सं. गर्त]

**गाडतक हानाव** (नाविक) पहिल्याने काहीसा तिरपा नंतर सरळ व पुन्हा तिरपा असा सांधा जोडणे. हा हानाव फार मजबूत असतो. (को.)

**गाडद** पु. पहारा; चौकी : 'मामा यांजकडील गाडद आहे.' - ऐलेसं ४९७८.

**गाडदी** पु. शिपाई; पायदळातील शिपाई; विशेषत: शरीरसंरक्षक शिपाई; पहारेकरी. पेशवे, इतर सरदार व राजे यांच्याजवळ असे गाडदी असत. यात परदेशीय व मुसलमान यांचा विशेष भरणा होता. [पोर्तु. गार्दा]

**गाडली** पु. वि. संरक्षक; राखणदार; पहारेकरी : 'सबब माणसे गाडली ठेविली. कालपासून इकडे पेंढारी नि॥ शिंदे याची आवई दाट उठली.' - मइसा १०.५१६.

**गाडली-ले** स्त्री. न. लहान गाडी. (प्रां.)

**गाडवन** बैलगाड्यांचा समूह. (अहि.)

**गाडवाट** स्त्री. गाडीचा रस्ता; गाडीवाट.

**गाडहत्यारी** वि. मोठे धारकरी; शूर; मर्द; तरवार (भाला) वगैरे शस्त्रांनी जवळून लढणारे : 'आधीच गनीम यांचे कच्चे दील; गाडहत्यारी निढवले तरि झाडास बांधले तरि झाड घेऊन जातील.' - भाब ९.

**गाडा** पु. १. ओझे नेण्याची गाडी; पेटी किंवा चौकटीखेरीज गाडी : 'म्हणे मी गाढा जुंपिलों होतो।' - पंच १.२६. २. चाकाचा घेर; रहाटाचा वृत्ताकार अंश. ३. कडे, वेढे, सांगाडा, वलय (ढोल, तंबूर, डफ, चाळण, नथ इ. चा). ४. चाक. - (तंजा.) ५. धमनी; शकट; सारवट गाडी. (वा.) **चालत्या गाड्याला खीळ घालणे** - चालू काम बंद पाडणे, अडविणे. **गाड्यावर नाव नावेवर गाडा** (कधी नाव गाड्यावर घालून नेतात तर कधी गाडा नावेवर घालून नेतात त्यावरून) १. कामाची अलटापालट; अदलाबदल; चक्रनेमिक्रम. २. दैवाची उलटापालट किंवा फेरा; हलकटाची भरभराट व सज्जनांची पडती वेळ. **संसाराचा गाडा** - आयुष्यातील एकंदर व्याप; कामकाज; खटाटोप; आटापीट; संसारासंबंधी खटला; प्रपंच, पसारा. (ओढणे)

**गाडा** पु. समूह : 'सिंधूची सीव न मोडे। पाणीपणा सळु न पडे। जरि मोडून गाडे। तरंगाचे॥' -अमृ ७.२६१.

**गाडानाडा** पु. व्याप, संसार, प्रपंच, पसारा. पहा : **गाडा** [गाडाचे द्वि.]

**गाडाभर** वि. १. गाड्याच्या भरतीचे (ओझे). २. (ल.) पुष्कळ (सामान); अफाट. (वा.) **गाडाभर अब्रू वाहणे** - अब्रू मुळीच नसणे.

**गाडी** स्त्री. १. माणसे बसायचा व साटा किंवा पेटी असलेला लहान गाडा; धमनी; रथ; शकट; वाहन. २. (मोटेच्या विहिरीची) लाट, चाक. ३. कप्पा; कप्पी; कप्पीतील चाक, फिरकी. (राजा.) ४. नथ, डफ, इ. चे कडे, सांगाडा. ४. गाडीभर माती. (क्रि. घालणे) (व.) पहा : ५. **गाडा** ३. ६. (ल.) आगगाडी, सायकल, मोटार. (वा.) ० **सुटणे** - सपाट्याने तोंडपाठ म्हणणे.

**गाडीउतार** पहा : **गाडउतार**

**गाडीचकार** स्त्री. गाडीचा रस्ता : 'पावसाळ्यात गाडीचकार बंद असते.' - आआशे २०३.

**गाडीचे चाक** (हे उलटसुलट फिरते यावरून) दोन डगरींवर हात ठेवणारा; विशेषत: आपल्या चाकराच्या कोणत्याही कामात दोष काढणारा धनी.

**गाडीतळ** पु. बाजाराच्या वाटेवर, प्रवासाच्या मुक्कामात गाड्या सोडण्याची मोकळी जागा : 'शेदोनशे बैलगाड्या येतील... त्यांच्यासाठी कुठं गाडीतळ आखून द्यायला हवा.' - स्मगा २५२.

**गाडीभराई** स्त्री. गाडीत माल भरण्याची मजुरी.

**गाडीवान, गाडेकरी** पु. गाडी हाकणारा.

**गाडु** पु. लहान मडके; गड्डू; बोळके; गुणगी : 'जमेदार याजकडे संक्रांतीचे खण व मडकी व घट गाडु...' - मसाप २.१७५.

**गाडुली** स्त्री. पांगुळगाडा.

**गाडे** न. पैज; हौड; पण (सोंगट्या, जुवा या खेळात).

**गाडे** न. १. लहान गाडा, गाडी. २. व्यवहार; काम; घडामोड : 'व्यापाराचे गाडे। मोडतांही अपाडे।' - अमृ ९.२१. ३. माळका एकामागून एक येणे, जाणे; चक्र. (वा.) ० **चालणे** - निर्वाह होणे : 'माझे गाडे कसेही चालेल.' - माजी ५०९.

**गाडेकारू** पु. डेरे देण्याचे काम करणारा फरास : 'भणओनि ते गाडेकारू होंडी।' - शिव ५६८.

**गाडे गाडे भिंगोरे - भिंगोऱ्या, गाड्या गाड्या भिंगोऱ्या** अंगाभोवती गिरक्या मारण्याचा मुलांचा एक खेळ.

**गाडेबगाड** न. गळ टोचून घेऊन गाड्यावरील खांबाला लोंबकळत फिरण्याचा नवस फेडण्याचा एक प्रकार.

**गाडेराव** पु. अव्यवस्थित, घरातील, स्वत:च्या कारभाराची दाद नसणारा, वेंधळा माणूस.

**गाडेसोनाऱ्या** पु. एक प्रकारचा वाघ; ढोऱ्या, बिबट्या हे आणखी दोन प्रकार. (बे.)

**गाडोरा-रे गांडोरा, गाडोरा-रे, गांडोरा-रे** पु. न. इमारतीचा पाया, पायातील भर किंवा पायशोधनी : 'जळां शोधुनि गाडोरें।' - भाए ४८९; 'कीं फोडोनि आम्ही गांडोरा घातला.' - ज्ञा ११. [सं. गड्]

**गाड्डी** पु. पहा : **गारुडी** (गो.)

**गाड्या** वि. गाडणारा; पुरणारा.

**गाड्याला जुंपलेला** कामाचा रगाडा पाठीमागे असणारा; नेहमी कामात गुंतलेला.

**गाढ** वि. १. गडद; स्वस्थ; भरपूर (झोप). २. निबिड; घन (काळोख). ३. अत्यंत; दाट; घोर (अज्ञान). ४. गर्द; दाट; घनघोर (जंगल). ५. घट्ट; मजबूत; दृढ; गच्च; भरपूर : 'रसें गाढीं वरी ढिलीं।' - ज्ञा १७.१२८. ६. आवळ; तंग; बळकट : 'शस्त्रें सुटतील गाढीं।' - एरुस्व ७.७४. [सं.]

**गाढ** वि. १. मोठा; पुष्कळ. २. शूर; पराक्रमी; खंबीर : 'मानवी वीर गाढा।' - मुवन १०.४९. ३. उत्कृष्ट; अप्रतिम : 'तुझें सौंदर्य देखोनि गाढें।' - ह १.३०. [सं.]

**गाढणे** सक्रि. कसणे; घट्ट करणे : 'तैसें नितंबावरी गाढिलें। पीतांबरू झळके॥' - ज्ञा ११.२२१.

**गाढमूढ** वि. अतिशय गडद; घोर; स्वस्थ; प्रशांत (झोप) : 'येक ते गाढमुढीं पडिले। सुषुप्तिमधें।' - दास १८.९.१९. [सं.]

**गाढव** पु. उकिरड्यावरील एक पांढरा किडा; कसर; वाळवी.

**गाढव** पु. न. १. घोड्याच्या वर्गातील एक लहान प्राणी; रासभ; खर; गद्धा. २. (ल.) मूर्ख मनुष्य.

**गाढवलोळ** धुळवड.

**गाढवाचा खरारा** पु. मूर्ख, टोणपा मनुष्य. [सं. गर्दभ] (वा.) **गाढवाचा नांगर फिरविणे** - एखाद्याच्या घरादाराचे किंवा वतनवाडीचे वाटोळे करणे. एक जुना शिक्षेचा प्रकार. गुन्हेगाराचे घर जमीनदोस्त करून त्याचे शेत करीत.

**गाढवी दगड, धोंडा** ओबडधोबड दगड.

**गाढहत्यारी** वि. मोठे धारकरी; शूर; मर्द; तरवार, भाला इ. शस्त्रांनी लढणारे.

**गाढा-डा** वि. १. गाढ; घट्ट; दाट (पातळ पदार्थ). २. दांडगा; मजबूत; बळकट; घटमूट (शरीर) : 'तैसा भुजोनि जो गाढा। परिग्रहो।' - ज्ञा १८.१०६२. ३. गर्द. [सं. गाध, गाढ]

**गाढा** वि. १. शूर; पराक्रमी : 'रूपें कर्कशें कोपला वीर गाढा।' - राक १.१५. २. प्रवीण; तरबेज; सखोल; पक्का; बाका; निष्णात; पटाईत. २. थोरवी; विपुलता : 'दंतीं म्यां देवदंती धरूनि मुरडिला शैल कैलास गाढा।' - आसी ३२. ४. खोल मनाचा; गुपित न फोडणारा.

**गाढिका** स्त्री. १. प्रौढी; ऐट; पुरुषार्थ; बढाई; पराक्रम : 'कोकिळा मंगळ-रागु कवतिके गाति गाढिकासी।'- नरुस्व ७५१. २. थोरवी; विपुलता. ३. दृढता; बळकटपणा : 'म्हणोनि आसनाचिया गाढिका।' - ज्ञा ६.३६४. ४. प्रिय मैत्रिण : 'विश्वास विकार गाढिका। सर्वे चालताती।' - नरुस्व ३८५. ५. गाथण; पुतळ्यांची, रत्नांची किंवा मण्यांची साधी माळ : 'पाराची गाढी तुटली व्ह माय...'-लोसामा ४.११. [सं. गाध]

**गाढे** वि. भक्तिपूर्वक केलेले; कळकळीचे; दृढभावदर्शक : 'ऐसें करितां स्तवन गाढे।' - मुआदि २.१३३. पहा : **गाढा**

**गाण** स्त्री. डोंगरातील पाण्याची जागा; उथळ विहीर; डबके; पोखरण.

**गाण-णी** पु. १. गवई; बंदा (जात); देवळी; गायक. (गो.) २. नायकिणीचा साजिंदा. (को.) [सं. गान]

**गाणपत्य** वि. गणपतीचे उपासक; गणपतीचा भक्त : 'गाणपत्य म्हणती गणेश। तो जाण द्वारकाधीश।' - ह ३४.१७८. [सं.]

**गाणावाणा** पु. गाणे व वानणे; गानवर्णन : 'घेऊनि गीतार्थ उगाणा। ज्ञानिये जें विचक्षणा। ठाकती तें गाणावाणा। गीतेचा तो लाहे॥' - ज्ञा १८.१५२७.

**गाणी** वि. गाणारीण; गायिका; गानी : 'जेथें सरस्वतीसारखी गाणी।' - कालिका ४.९.

**गाणीक** वि. गायक; गाणारा.

**गाणीक - व** न. १. गायनचातुर्य : 'गाणीव जाणीव शहाणीव। वोंवाळूनि सांडावी सर्व।' - एभा ११.७३८. २. गाणे : 'बहिरीयापुढें हृषीकेशा। गाणीव करा॥' - ज्ञा ११.१५७.

**गाणे** उक्रि. १. काव्य गळ्यावर म्हणणे. २. कवन, गायन करणे; काव्यात वाखाणणी, गुणवर्णन करणे. ३. प्रशंसा करणे; वाखाणणे; स्तवणे : ४. (ल.) एकच एक सूर लावणे; जपमाळ घेणे; पिरपीर चालविणे, लावणे : 'जें प्रथम गात होता गाणें अद्यापि तेंचि खळ गातो।' - मोशल्य ३.७४. [सं. गे = गान]

**गाणे** न. १. गायन; गीत (ध्रुपद, ख्याल इ.) म्हणणे. २. तत्संबंधी ध्रुपद इ. पद, कवन. ३. (ल.) (पोरासोरांची) पिरपीर; टुरटूर; भुणभूण. ४. लांबच लांब, कंटाळा येण्याजोगे कृत्य, कहाणी; कथा; रडगाणे. (क्रि. गाणे, गात बसणे.) ५. (ल.) काम, कारभार, व्यवहार, देणेघेणे इ. चे खटले, प्रकरण. ६. घडून आलेली गोष्ट, प्रसंग, वेळ. [सं. गे = गान] (वा.) ० **लावणे** - एकसारखी पिरपिर करणे.

**गाणेबजावणे** न. गाणे म्हणणे, वाद्य वाजविणे; गायनवादन; (सामा.) संगीत.

**गात-ते** न. खाट, पलंग यांच्या चौकटीची चार लाकडे : 'तेव्हां पलंगाचें तडतडी गात।' - अफला ७७. [सं. गात्र] (वा.) **आडवे गात न उभे गात** - अनिश्चित व असंदिग्ध कृत्य, भाषण, वर्तन.

**गात(ता)डी** स्त्री. १. गव्हाणी; गव्हाणीचा दांडा, फळी. २. गाभाऱ्या (देवाच्या मूर्ती) पुढील लाट, आडवे लाकूड; अडवण. ३. (ल.) गर्द ढगांची रांग, ओळ. (क्रि. जमणे, धरणे, करणे, मोडणे, विरणे). ४. हातमागावरील लाकडी लग.

**गाता** वि. गाणारा; गायक : 'पोवाडा गात्याला उद्राण ऐकत्याला घडी पुण्य।' - ऐपो ६३. [सं. गातु]

**गाताडा** वि. १. स्वच्छंदी; अडेल; दुराग्रही. २. मूर्ख; मंदधी; जडबुद्धी.

**गाताडी-ड्या** स्त्री. लाकूड; दांडा : 'राजावळीचे गांवांतून गाताड्या आणून त्याचा ताफा बांधाला.' - वसमो. [सं.]

**गात्र** न. १. अवयव; अंग : 'नाडीतें सोडवी। गात्रांतें बिघडवी।' - ज्ञा ६.२१९. २. (शाप.) काटा; सोंड; शिंग (गोगलगाय इ. प्राण्यांना स्पर्शज्ञान होण्यासाठी असणारा अवयव). [सं.]

**गात्रभंग** पु. गात्राला आलेली अशक्तता; अवयवाची बधिरता; विकलता : 'नको जाऊ देऊं भंगा। गात्रें माझीं पांडुरंगा।' - तुगा ११९८. [सं.]

**गात्रीयंत्र** न. ब्रह्मवीणा; गायनयंत्र : 'गात्रीयंत्राची मिळनी। सप्तें स्वरां गुंफितु वेणी।' - शिव ४४.

**गा (गां) थन** स्त्री. विशेषत: काजू किंवा मासे यांची माळ. (गो. कु.) [सं. ग्रथन]

**गाथा** स्त्री. १. कविता; धार्मिक काव्य; काव्यसंग्रह. २. प्राकृत; छंदरहित रचना; साधे गद्य. ३. पूर्ण वाक्य. ४. गप्पा; भाकड कथा; गटारगप्पा. (क्रि. सांगणे, कुटणे). ५. हकीगत : 'सांग तो मज सविस्तर गाथा।' - आपू २. ६. आर्या : 'गाथा म्हणजे आर्या गीति तियेहुन विशेष नादवती।' - छंर १२४. [सं. गै = गाणे]

**गाथा** पु. १. गुंतागुंत; घालमेल; गोंधळ. २. सुरकुतलेली, चुरगळलेली स्थिती; जपणूक, निगा नसणे : 'विषयाचा काय गाथा। अनुचित कीं सखया।' - राला ४४.

**गाथा** पु. अभिमान.

**गाथागोवा-वी** पु. स्त्री. १. घोटाळा; घालमेल; गुंतागुंत. २. (विशेषत:) धांदल; तारांबळ; गडबड : 'जन्म हेंचि अकारण। गाथागोवी।' - दास ३.१.४.
वि. व्यर्थ.

**गाथिक** वि. १. कथा, कहाणी, चरित्रे, गोष्टी इ. सांगणारा. २. गाथा किंवा गद्य रचणारा.

**गाद** स्त्री. १. भातावरील रोग. २. तळ्यातील लव्हाळे. ३. गादमाशी.

**गादचे** क्रि. भुकेने घेरी येणे. (गो.)

**गादणे** अक्रि. जमणे : 'तुंब वाहतां गादलें उदका तो जाहला क्षीर समुद्र।' - नरुस्व ८२७.

**गादणे** अक्रि. १. गढूळ, मलिन होणे; पीडणे; माखणे : 'महामळें मन होतें जें गादलें। शुद्ध चोखाळलें स्फटिक जैसें।।' - तुगा २०७२. २. शेत तणाने खराब होणे. (व.) [सं. कर्द]

**गादणे, गांदणे** उक्रि. गांजणे; पीडा देणे.
अक्रि. रोगाने पछाडणे; पीडा पावणे; पीडित होणे : 'जे अवृष्टीचेनि उपद्रवें। गादलें विश्व आघवें।' - ज्ञा १३.२२२. [सं. गद]

**गादयेकार** पु. गुत्तेवाला; गुतेकार. (गो.)

**गादरगुदर** वि. मांसल; गुटगुटीत. (ना.)

**गादला-ली** वि. मलिन; मळकट.

**गादा-धा, गादारेडा** पु. समुद्रातील देवमाशाच्या जातीचा एक मोठा मासा. 'त्याने काकाला पाण्यात फिरणारा गादारेडा दाखवला.' - शेलूक १४५.

**गादा** पु. राड; चिखल; रेंदा; खळमळ (बहुतेक गढूळ दाट द्रवपदार्थासंबंधी; माती मिसळलेले पाणी, तूप इ.). [हिं.]

**गादा** पु. भातजमिनीचा तुकडा. (बे.)

**गादा** पु. फळातील गर.

**गादाड** वि. दलदलीची (जमीन). (गो.) पहा : **गादा**

**गादाडा** पु. भांड्याच्या तळास लागलेली घाण.

**गादापादा** पु. चोळामोळा; सुरकुतलेली स्थिती (कागद, कापड यांची). [गादाचे द्वि.]

**गादावणे** अक्रि. अजीर्ण होणे; पोट बिघडणे.

**गादिजणे** अक्रि. लिप्त होणे; गुंतून पडणे. पहा : **गादणे** : 'अगा आकाश के नाही। हें न रिघेचि कवणे ठायीं। परि कायिसेनी कहीं। गादिजेना ।।' - ज्ञा १३.११२०.

**गादी** स्त्री. १. कापूस इ. भरून शिवून झोपण्यासाठी तयार केलेली खोळ, पिशवी. २. जनावराच्या पाठीवरील खोगीर. ३. मऊ भाग (हाताचा, जोड्याचा); ढुशा, टिका यांचा तळचा रेशमी विणलेला भाग. [क.गादि]

**गादी** स्त्री. प्रख्यात पुरुषाचे आसन, स्थान, दर्जा, अधिकार, पद, राज्य, संस्थान, सिंहासन. [क.गद्दिगे] (वा.) ० **चालवणे** - पूर्वीचेच धोरण, धंदा चालू ठेवणे. **गादीला पाय लावणे** - १. राजाविरुद्ध बंड करणे; राजद्रोह करणे. २. वरिष्ठांशी उद्धटपणे वागणे, उपमर्द करणे.
**गादीवर गोष्टी सांगणे** - गर्विष्ठपणे भाषण करणे.

**गादी** स्त्री. कागदाचे दहा दस्ते; गड्डी.

**गादी** स्त्री. १. दारूचे दुकान. २. पानाचा ठेला. (गो.)

**गादीची चाकरी, नोकरी** राज्याची (राजाची नव्हे) सेवा.

**गादीची दौलत** राज्याचा (राजाचा नव्हे) खजिना.

**गादीतंबाकू** स्त्री भुसारी, वाणी व किरकोळ व्यापारी याचे दुकान. (राजा.)

**गादीहुजूर** क्रिवि. सिंहासनासमोर, राजासमोर.

**गाद्याळ** वि. तणाने खराब झालेले (शेत.). (व.)

**गान** न. गाणे; गायन (कला किंवा गाण्याची क्रिया). [सं. गै]

**गानलिपी** स्त्री. (संगीत) गाण्यातील चीज, स्वर व ताल वगैरे लिहिण्यासाठी तयार केलेली चिन्हमालिका.

**गानवी** स्त्री. बोलणे; भाषण.

**गानश्रेढी** स्त्री. १. (संगीत) गायनासंबंधी स्वरमालिका, स्वरमेलनाच्या चढउतारासंबंधी अक्षरपंक्ती. २. (गणित) पहा : **गायनश्रेढी** [सं.]

**गानी** स्त्री. गाणारीण; गायिका : 'आळती गानी सरस्वती।' - शिव ५१. [सं.]

**गापटी** स्त्री. (नाविक) पसरलेला कातळ; खडक.

**गाफल-ली** वि. १. बेसावध; बेभान. २. जड; सुस्त; मूर्ख; निशाखोर; झिंगट; दारूने धुंद झालेला. ३. निष्काळजी; आळशी; बेफिकीर. [फा.]

**गाफलाई** स्त्री. बेसावधपणा : 'गाफलाई जाहली.' - मदरू २.९.८.

**गाफली, गापली** स्त्री. मेलेल्या किंवा फरार मालकाची जमीन.

**गाफिली, गाफीलगिरी** स्त्री. गैरसावधपणा; गाफलाई : 'हे गाफिली कार्कुनापासून जाहली.' - वाड-बावा २.८६; 'शिपाई लोकांचे व घोड्यांचे सामान सरंजाम कसे आहेत ते वरचेवर पहात जाऊन दुरुस्त ठेवण्यास कदापि गाफीलगिरी करीत जाऊ नये.' - ऐस्फुले ५४.

**गाब, गाभ** पु. १. गर्भ. (गो.) २. अतिशय कोवळे फळ. (कु.)[सं. गर्भ]

**गाब(भ)डी, गाब(भ)डे** स्त्री. न. १. भोक, खड्डा, चीर बुजविण्या-आच्छादण्यासाठी लावलेला तुकडा, पुस्ती, जोड, ठिगळ. २. (नाविक) झिरपे; भोक; छिद्र. [क. गब्बरिसु]

**गाबडी शेट** अडाणी; अनभिज्ञ.

**गाबडे** न. एक शिवी (मूळ अर्थ गर्भपात) : 'आयला गाबडं झोप बी येऊ देत न्हाई.' - पेरणी ७२.

**गाबणे** सक्रि. मासे धरणे. (गो.)

**गाबणॉ** वि. (ल.) श्रीमंत; पैसेवाला; गाभणा. (गो.) [सं. गर्भ]

**गाबती-दी, गाबीत-द** पु. महाराष्ट्रातील मासेमारी करणारी दर्यावर्दी जात.

**गाब(बा)ळणे** उक्रि. १. गमावणे; सांडणे; गळफटणे; हरवणे; गैरविल्हे लागणे. २. भेसळ करणे, होणे; अव्यवस्थित ठेवणे (कागद, वस्तू); गोंधळ होणे; गुरफटणे.

**गाबळणे** अक्रि. डागळणे; डाग पडणे. (कर.)

**गाबागाब** वि. गप्प; चिडीचिप : 'पोरं सारी भिऊन गाबागाब झाली होती.' - ऊन ३७.

**गाबागुबी** स्त्री. १. (सामान्य किंवा परस्पर) बुकलाबुकली; धक्काबुक्की; कुटाकुटी; कुंदाकुंदी. (क्रि. करणे, होणे.) २. (ल.) लाचलुचपत; दाबादाबी; हरामखोरी; दगलबाजी. [ध्व.]

**गाबाळ** वि. बावळट; अडाणी : 'तुका म्हणे तेथें पाहिजे जातीचे। येरा गाबाळाचे नोव्हे काम।' - तुगा.

**गाबाळ** न. पु. १. गळाठा; चोथा; घाण; केरकचरा; गाळ : 'आणिक नका कांहीं गाबाळाचे भरी। पडों येते थोरी नागवण।' - तुगा २७१६. २. जुनाट, फाटक्यातुटक्या, निरुपयोगी वस्तूंचा ढीग, रास (रद्दी, कसरीने खाल्लेल्या कागदांची, पुस्तकांची). ३. उसाचा वाळलेला पाचोळा; चोयट्या. ४. बिनलढाऊ लोक : 'पेंढार वगैरे गाबाळ झाडून देशास लावून द्यावें.' - ऐलेसं २९९०.

**गाबाळ** पु. नारळाच्या शेंड्यापासून फुटलेले तंतू, शेंडी. (को.)

**गाबाळ** न. खोटेनाटे : 'सत्य आम्हा मनीं। नव्हों गाबाळाचे धनी।' - तुगा २९०७.

**गाबाळगुबाळ** पहा : **गाबाळ**

**गाबाळग्रंथ** पु. १. फाटकातुटका कसर लागलेला ग्रंथ, पुस्तक. २. अनेक पुस्तकातून घेतलेल्या पानांचे बांधीव पुस्तक; रद्दी कागदाचा ढीग; वेच्यांचे पुस्तक; खर्ड्याचे पुस्तक : 'ज्या लक्षावधी लोकांस बायबल हे केवळ गाबाळ ग्रंथ वाटतें...' - नि ४२०.

**गाबाळ मुद्रा** अजागळ किंवा मूर्ख चर्या, चेहरा; भोंगळ मुद्रा, सुरत.

**गाबा(भ)ळी** स्त्री. माशाच्या पोटातील अंड्यांची जाळी. (कु.)

**गाबाळी-ळ्या** वि. अव्यवस्थित; निष्काळजी; गैदी; अजागळ : 'रामदास म्हणे अवघेची गाबाळी।' - रामदास, स्फुट अभंग ५.

**गाबाळो** वि. १. जुनाट व उरला सुरला; जीर्ण व फाटका; चिरलेला व विदारलेला इ. २. निरर्थक.

**गाबी** पहा : **गाभी**

**गाभ** स्त्री. दोन टेकड्यातील मोठी खिंड. (राजा.)

**गाभ** पु. १. गर्भ (विशेषतः पशूंचा). २. मध्य; गाभा. [सं. गर्भ] (वा.) ० **सांडणे, टाकणे** - १. विणे; गर्भ पडणे. २. पूर्ण काल होण्यापूर्वी विणे.

**गाभट (ड) णे** अक्रि. गाभ सांडणे; गर्भपात होणे.

**गाभडा** वि. पूर्णत्वास आलेले; दळदार; गाभुळलेला; पाडाचा; पिकण्यास आलेला; गुरंभा (आंबा, चिंच).

**गाभण-णा-णी** वि. १. गर्भार; गर्भिणी; गर्भाने युक्त (घोडीशिवाय इतर पशू). २. उघड न केलेली, मोघम ठेवलेली (गोष्ट). (क्रि. ठेवणे). [सं. गर्भिणी] (वा.) (एखाद्याच्या पुढे) ० **गाभ टाकील** - उग्र; भयानक; जाज्वल्य अशा पुरुषाविषयी योजितात.

**गाभणे** अक्रि. गाभण होणे (गाय, म्हैस इ.).
न. (ल.) गुप्त गोष्ट; मोघम ठेवलेला मजकूर.

**गाभरू** पु. उनाड पोर. (व.)

**गाभसांड** पु. गर्भपात (जनावरासंबंधी योजतात). (क्रि. करणे, होणे).

**गाभळणे** पहा : **गाभुळणे**

**गाभळी** स्त्री. माशांच्या अंड्यांचा समुदाय. (गो.)

**गाभा** पु. १. मगज; गर; गर्भ; नार; पोटातील अंश (लाकूड, ताटे, मुळे यांच्या). २. मोना; कोका; ताडक (ताडवृक्षाचा अथवा केळीचा). ३. बोखा; शेंडा (ताड, नारळी यांचा). ४. पागोट्यातील बताणा, आतील भाग; पागोट्याच्या आतील लहान पागोटे; फडके. ५. (ल.) मर्म; रहस्य; मतलब; सार : 'बुद्धीचिया जिभा। बोलाचा ना चाखतां गाभा।' - ज्ञा ७.२०७. ६. मध्य; गर्भागार (देऊळ इ. चा). [सं. गर्भ]

**गाभागोभा** पु. हरकत; प्रतिबंध; अडथळा : 'जैसी जळींची प्रतिमा। जळनाशीं बिंबा। येतां गाभागोभा। कांहीं आहे।' - ज्ञा १८.१३६५.

**गाभाटणे** अक्रि. १. गाभटणे; अकाली प्रसवणे (पशूंचे). २. अपूर्ण राहणे.

**गाभार-रा** पु. १. ज्यात मूर्ती असते तो देवळाचा आतील भाग. २. माजघर; अंतर्गृह : 'जो संतोषाचा गाभारां।' - ज्ञा ४.१०७. ३. (ल.) मनोगत ; 'तैसें जया अखरा। भेटती गाभारां।' - अमृ १०.२८. [सं. गर्भागार]

**गाभारणे** अक्रि. अपूर्ण राहणे.

**गाभाळ, गाभाळणे** पहा : **गाबाळ, गाबाळणे**

**गाभिण** स्त्री. सगर्भ जीव : 'गाभिणी उकढलीं। पुटां माझि॥' - राज्ञा १३.२२७.

**गाभि(भी)ण** पहा : **गाभण-णी** : 'कर्म कर्ता काय ऐशी। त्रिपुटी असे ते जैसी। गाभिणी मारिली॥' - ज्ञा १८.९७१. [सं. गर्भिणी]

**गाभिणे-ले** वि. १. फदफदलेले; किडे पडलेले : 'शुष्क अथवा सडलें। गाभिणेंही हो॥' - ज्ञा १७.१५९. २. फुगलेले.

**गाभी** स्त्री. गाभ; गर्भावस्था.

**गाभी** पहा : **गाबडी**

**गाभुट(ड)णे, गाभोट(ड)णे** अक्रि. १. पहा : **गाभटणे**. २. पाडास येणे; गुरंभळणे. पहा : **गाभुळणे**

**गाभुटा** पु. (चर्मकारी) तळाच्या बाहेरच्या बाजूला बसविलेल्या सागळेच्या तुकडास दिलेला जोड. (क्रि. धरणे.)

**गाभुडणे** क्रि. गर्भपात झालेल्या स्थितीत असणे.

**गाभुळणे, गाभोळणे** अक्रि. १. पाडाला लागणे; मगज भरून परिपक्व होण्याच्या स्थितीला येणे; गुरंभळणे (फळ). २. उमळणे; उतणे; सडीला लागणे (आंबा इ.). ३. जनावराचा गर्भपात होणे. (व.)

**गाभूळ, गाभोळ** वि. दळदार; भरदार; मगजाचे (पाडाचे फळ).

**गाभैवन** न. सूक्ष्म अंकुर; गर्भातील पान : 'कां गाभेवनें वटु गिंवसवे।' - ज्ञा १०.७०. [सं. गर्भपर्ण]

**गाभोळी** स्त्री. १. धान्याचे भरीव कणीस. २. माशाच्या पोटातील गर्भ. (कु.)

**गामचाल** स्त्री. घोड्याची गती, चाल; सरळ व एकसारखी (सात्रक) चाल; डौलदार, छानदार, दिखाऊ तुर्की चालीचा एक प्रकार. याला संस्कृतमध्ये धौरितक म्हणतात.

**गामच्छोडा** पु. पेशवाई व आंग्लाई यांच्या दरम्यानच्या काळात प्रवाशांना लुटणारी एक जात.

**गामा किरण** (भो.) किरणोत्सारी मूलद्रव्याच्या अणुगर्भातून उत्सारित होणारे अतिशय लघु तरंगलांबीचे व अतिभेदक किरण.

**गामायगौराय** स्त्री. सोम्यागोम्या; फालतू माणूस; कोणीतरी : 'अरे मी चवदा चवकड्याचा राजा रावण, मला कसें नाहीं पत्र पाठविलेंस? आणि गामायगौराय इत्यादिकांना पत्रें पाठवून मला कसें नाहीं पाठविलेंस?' - दशावतार मसाप २७.

**गामी** वि. जाणारा; गमन करणारा. (समासात) आकाशगामी, पाताळगामी. [सं. गामिन्]

**गाय** स्त्री. १. धेनु; दूध देणारा, माणसाळलेला, चार पायांचा एक सस्तन प्राणी. २. (ल.) गरीब. ३. (ल.) स्वभावाने गरीब, सात्त्विक, अनाथ, दीन माणूस. [सं. गो.] (वा.) ० **गोवणे** - आक्षेपित, अयोग्य स्थळी मुलगी देणे. ० **चिखलात अडकणे** - अडचणीत, पेचात सापडणे. **गायवाना करणे** - काकळूत करणे. (व.) पहा : **गयावया करणे**. ० **होणे** - दीन, दुबळा होणे; (दुर्दैवाने, दुखण्याने) रंजीस येणे : 'उगिच अबोला धरिला। कांहीं भिउन असावें हरिला। झालें मी गाय।' - प्रभाकर. **गायी पाण्यावर आणणे** - रडू आणणे. **गायी पाण्यावर येणे** - डोळे पाण्याने भरणे : 'गाइ पाण्यावर काय म्हणुनि आल्या?' - बी कवी. **गायीचा खूर तिखट** - अनाथाचा वाली ईश्वर. **गायीने माणीक गिळणे** - जेथे फार मोठा तोटा सोसल्यावाचून किंवा पाप केल्यावाचून बूड भरून येत नाही तेथे योजतात. **गायीवासराची ताडातोड करणे** - नातेवाइकांत भेद करणे; त्यांचा संबंध तोडणे (विशेषतः मायलेकरांची ताटातूट). **गायीवासराची भेट करणे** - जवळचे आप्त, स्नेही, नातेवाईक भेटविणे; त्यांना एकत्र आणणे. **गायीसारखा हंबरडा फोडणे** - मोठ्याने कळवळून आक्रोश करणे (मुलाने, बाईने) **गायेदू(धू)म पिटणे** - गुरासारखे उधळणे; पिटीत नेणे.

**गाय** स्त्री. १. एका जातीचे काळ्या रंगाचे झुरळ; २. एक पक्षी.

**गाय** पहा : **पारी**

**गाय** स्त्री. एक वनस्पती; लहान इंद्रावण; कडूवृंदावन. [सं. गो]

**गायक** वि. गाणारा; विशेषतः व्यावसायिक गवई. [सं. गै = गाणे]

**गायकगण**, पु. गाणाऱ्यांचा समूह; गाणारी मंडळी.

**गायकी** स्त्री. १. गुरूपासून मिळवलेले निरनिराळ्या रागांतील चिजा म्हणण्याचे ज्ञान; संपादन केलेल्या गाण्यात जास्त भर घालून वाढवलेले ज्ञान; गाण्याचे कसब. २. गाण्याची पद्धत. ३. गायनाचा व्यवसाय.

**गायकी-क्या** वि. गुरे राखणारा; गुराखी : 'उगड गायक्या गाईना वाडा।' - एहोरा ३२.

**गायगुजी** स्त्री. गाय किंवा तसेच एखादे जनावर : 'कोणी गायगुजी दारी उभी राहिली, तर तिच्या डोक्यात काठी घालतात...' - स्मगा ३३४.

**गायचाळा** पु. लहान मुलांचा एक खेळ.

**गायणा-णी-नी** स्त्री. गाणारा, गाणारीण. पहा : **गानी**

**गायतुरी** स्त्री. गायत्री. (गो.)

**गायतोंड्या-डा** वि. लाजाळू; भित्रा.

**गायत्री** स्त्री. गाय : 'गायत्री विकोनी पोट जे जाळती। तयां होय गती यमलोकीं।' - तुगा २४२४.

वि. गाईसारखा गरीब; निरुपद्रवी; साधा. [सं.]

**गायत्री, गायत्री मंत्र** स्त्री. १. वेदातील एक मंत्र. ॐ भूः भुवः स्वः तत्सवितुवरेण्यं भर्गो देवस्य धीमहि। धियो यो नः प्रचोदयात्। - सूर्य स्तुतीच्या या मंत्राचे महत्त्व व प्रभाव मोठा मानतात. २. एक वैदिक छंद, वृत्त. या वृत्ताची प्रत्येक चरणात आठ अशी २४ अक्षरे व ३ चरण असतात : 'गायत्रीछंद जे म्हणिजे।' - ज्ञा १०.२८२.

**गायदंड** स्त्री. कोबीचा गड्डा.

**गायदुम** स्त्री. हातावर शरीराचा तोल संभाळून पाय डोकीवर आणून हातावर चालत जाण्याची कसरत.

**गायदूम** वि. गोपुच्छासारखा निमुळता.

**गायन** न. मानवनिर्मित ध्वनीतून केलेली सुरांची आकर्षक मांडणी; पद, गाणे, अभंग इ. तालासुरावर म्हणण्याची क्रिया. [सं. गै = गाणे]

**गायनश्रेढी** स्त्री. (गणित) ज्या श्रेढीतील जवळजवळची तीन पदे घेतली असता पहिल्या व दुसऱ्या पदातील अंतर आणि दुसऱ्या व तिसऱ्या पदातील अंतर या दोन अंतरांचे जे गुणोत्तर तेच गुणोत्तर पहिल्या व तिसऱ्या पदाचे असते ती श्रेढी. उदा. १२, १५, २० ही तीन पदे. यात तीनपंचमांश हे गुणोत्तर सारखे आढळेल.

**गायनाखे** वि. १. निर्लज्ज. (गो.) २. अर्धकच्चे.

**गायपारख** स्त्री. गुरांची परीक्षा किंवा वैद्यकी.

**गायपारखी** पु. गुरांचा परीक्षक किंवा वैद्य.

**गायब** वि. गईब; हरवलेला; नष्ट, गत, गुप्त. (क्रि. होणे.) [फा. गैब]

**गायबाना** क्रिवि. परस्पर; अपरोक्ष. [फा.]

**गायमुख** न. पाणी वाहून नेण्यासाठी लाकडाचे किंवा दगडाचे केलेले गाईच्या तोंडाच्या आकाराचे साधन.

**गायर** पु. शेण साठविण्याचा खड्डा; गार. (कु. गो.)

**गायरट** न. (निंदार्थी) गाय.

**गायरा** पु. गुराखी.

**गायरान** न. १. गोचार; गुरेचराई; कुरण. २. नापीक, माळ जमीन.

**गायरू** न. १ (निंदार्थी किंवा लडिवाळपणे) गाय. पहा : **गायरट**. २. (ल.) सौम्य, गरीब, निरुपद्रवी माणूस. ३. वयात आलेली गाय. (गो.) ४. अगदी लहान जातीची कोकणी गाय. (बे.)

**गायवट** न. (चर्मकारी) गौचर्म; गाईचे कातडे.

**गायवाडा** पु. गोठा.

**गायवाणा** वि. केविलवाणा : '(त्यांचा) गायवाणा चेहरा पाहून...' - सामा (सराई) १५०.

**गायवान** वि. बावळट : 'सत्या, मेल्या तू असाच गायवान.' - पडरे १२४.

**गायंडोळ** पहा : **गांडमांडूळ** (गो.)

**गायंडोळी** स्त्री. आतडी. (गो.)

**गाया** पु. खड्डा; घरटे : 'रानडुकरांनीं गणेशचतुर्थीच्या दिवशीं चंद्रदर्शन होऊं नये म्हणून तोंडे खुपसून बसण्यासाठी गाये केलेले आहेत.' - बलवंत ९.९.१९३५.

**गायीचा गोरा, गोहरा, पुत्र, बाळ, मूल, बाप** १. वासरू; बैल. २. (ल.) मूर्ख,टोणपा, ढ मनुष्य. ३. (ल.) कृतघ्न माणूस. ४. (ल.) गांगरलेला माणूस; वेडा.

**गार** स्त्री. १. एक कठीण पांढरा दगड; गारगोटी : 'कां रत्नें म्हणौनि गारा। वेंचि जेवीं॥' - ज्ञा ९.१४८. २. आभाळातून पाणी गोठून पडणारा खडा. ३. (ल.) जडजवाहीर, रत्न इ. [सं. ग्रावन्]

**गार** स्त्री. १. खड्डा; खाच : 'गारींत निघाले जीवें जीत।' - रावि १९.१२१. २. (ल.) पोट. ३. (विणकाम) माग उभा केला असेल त्या जागी चाळाच्या पावड्या दाबण्यासाठी व पाय खाली सोडण्यासाठी केलेला खड्डा. ४. झाडाचे जाळे : 'पूर्वाभिमुख गारिसि कोहळी धाइ घालणे।' - ऋ १२६. [सं. गर्ता]

**गार** वि. १. थंड; फार थंड (पाणी इ.). थंड शब्दाबरोबर उपयोग : थंडगार = अतिशय गार : 'आणि भावार्थु पडे गार।' - ज्ञा ६.१३४. २. अतिशयत्व दाखविण्यासाठी हिरवा या शब्दाबरोबर उपयोग. जसे : - हिरवागार = दाट, गडद हिरवा. (वा.) ० **करणे** - पराभूत करणे; एकदम चकित करून सोडणे. ० **पडणे** - शरीराचे उष्णतामान कमी होणे. ० **बसणे** - शांत व थंड बसणे (वाईट किंवा भलतेसलते काम केल्यावर). ० **होणे** - १. संतुष्ट होणे; तृप्त होणे (हेतू सिद्ध झाल्यानंतर). २. निरुपायास्तव स्वस्थ राहणे. ३. अतिशय आश्चर्य वाटणे. ४. पराभूत होणे, खजील होणे.

**गार** स्त्री. १. अंड्यातील बलक; २. अंडकोष.

**गार** स्त्री. घोरपड. (गो.)

**गार** अ. कर्ता, करणारा या अर्थी फारसी प्रत्यय. हा समासात येतो. जसे :- खिदमतगार; कामगार. [फा.]

**गारगोट-टी** पु. स्त्री. गार; पांढरा वाटोळा दगड; चकमकीचा धोंडा.

**गारट** वि. १. थोडासा गार, थंड (हवा, पाणी, वस्तू). २. केवळ गार (कमी किंवा जास्त नव्हे - खारट, आंबट, तुरट यासारखा प्रयोग). ३. फारच थंड.

**गारट(ठ)णे** अक्रि. १. थंडीने गोठणे; थिजणे (वस्तू). २. थंडीने किंवा इतर कारणाने बधिर, जड होणे; बहिरावणे (शरीर, अवयव). ३. दडस, निबर, कठीण होणे (थंडीमुळे न पिकलेला आंबा किंवा गळू). ४. नरम येणे; उत्साह नाहीसा होणे.

**गारटे** न. खड्डा; खळगा.

**गारठणक** वि. अतिशय गार : 'विसापूरच्या तलावावरून येणाऱ्या गारठणक वाऱ्यामुळे...' - डाली ५६.

**गारठा** पु. १ कडाक्याची थंडी; हवेतील अति गारवा. (क्रि. पडणे.) २. अतिशय थंडपणा, गारवा (पाणी इ. चा).

**गारढोण** वि. अतिशय थंड : 'पाणी थंडीत गारढोण व्हायचं.' - अदेशी १२.

**गारणे** अक्रि. थंड पडणे; शांत होणे : 'सभामंडपाचे देखोनि बर्वेपण। कैलासु गारैला आपण।' - नरुस्व १०२४.

**गारती** स्त्री. नाश : 'सदाशिवराव कार्यकर्ते, लेकीन गरूर मोठा या सबबाने गारती जाहली.' - ऐटि ३.१७.

**गारद** क्रिवि. वि. १. पुरलेल्या, बुडलेल्या, ग्रासलेल्या स्थितीत. २. नष्ट; समूळ नाहीसा झालेला; उद्ध्वस्त; फस्त; ठार : 'जनकोजी शिंदे गारद जाले.' - इमं २९६. [फा. गारत] (वा.) ० **करणे** - १. ठार मारणे : 'माणसं गारद करायला मृत्यूला सोपं झालं.' - फकिरा १२०. २. (एखाद्याचा) काही जोर चालणार नाही असे करणे; निरुत्तर करणे. ० **होणे** - १. ठार होणे; मरणे. २. किंमत न राहणे; प्रतिष्ठा खलास होणे.

**गारद** पु. गारदी; कवायती फौज : 'दहा हजार अरब व गारद असे जमा करून आपण व गायकवाड असे मिळोन श्रीमंतांनीं महीचा घांट धरिला.' - ऐलेसं २२८३.

**गारदाई** स्त्री. १. गारद्यांचा दंगा, बंड. २. (ल.) गोंधळ; दंगा; गलका; गर्दी; धिंगामस्ती. ३. नाश; नुकसान; खराबा; बिघाड.

**गारदी** पहा : **गाडदी** : 'ते गारदी निष्ठूर, त्यांजला दया कोठून? इच्छारामपंत गाईच्या आड पडला असतां, गाईसुद्धा गारद्यांनीं इच्छारामपंतास ठार केलें.' - पेब ९१.

**गारप** न. कलमी आंब्याचे झाड.

**गारपगार-री-ऱ्या** पु. १. मंत्रतंत्राने गारांचा पाऊस पाडणारी किंवा गारापासून संरक्षण करणारी एक जात : 'थंडीनें मेले लोक उठविले गारपगाऱ्यांनीं भुत।' - ऐपो ४०१. पिकांना नुकसानी पोहचू नये म्हणून काही खेड्यातून गारपगारी ठेवलेला असे. २. (ल.) ढोंगी; लबाड; ठक; 'हरि ऐसा गारपगारी मर्दुनया काल खगारी।' - प्रला १६. ३. वाममार्गी; मांत्रिक.

**गारपीट** स्त्री. गारांचा वर्षाव; गारांचा पाऊस : 'सुरगुजा येथें गारपीट होऊन ३४ इसम ठार झाले.' - के ७.४.१९३९.

**गारपेटी** स्त्री. शीतपेटीयंत्र, शीतपेटी; रेफ्रिजरेटर.

**गारफी** वि. कलमी : 'एखाद्या गारफी आंब्याला मोहर कमी आला तर...' - सोबत ७५.

**गारबी, गारंबी, गारभी** स्त्री. १. एक वेल. २. तिचे बी.

**गारभांड-डे** न. चापाची बंदूक; गारेच्या चापाची बंदूक. 'गंजिफियाच्या वगैरे गारभांडी व बंदुकांचा मार ऐसा जाला कीं...' - भाब ६३.

**गारमणी** स्त्री. गारगोटी.

**गारवट** पहा : **गारट**

**गारवट, गारवंठा-डा, गारिवठा-डा** पु. थंडपणा; गारठा. (हवा, पाणी इ. चा). (क्रि. पडणे.) पहा : **गारठा**

**गारवा** पहा : **गारठा**

**गारवेल** स्त्री. निळसर फुलांची सदैव हिरवी पाने असणारी वेल : 'ही वेल

(गारवेल) मांडवावर किंवा कुंपणावर सोडण्यास फार सोयीची...' - वनश्री ९४९.

**गारशेल** वि. काहीसा दळदार व पिकलेला; गदरलेला (आंबा, फळ).

**गारसणे** अक्रि. १. गारांनी नासाडी होणे. २. थंड होणे (वस्तू, पाणी). [सं. कार, कारियस]

**गारसणे** अक्रि. गदरणे; पिकू लागणे (फळ); गाभुळणे.

**गारसा** वि. गारोळा; घारा (डोळा इ.). (व.)

**गारा** पु. १. गिलावा; चिखल; सरबरीत मिश्रण (गिलाव्यासाठी केलेले पाणी, माती, गवत, चुना, शेण इ. चे). २. खड्डा. (ल.) पातळ व घट्ट अन्नाचे बरबट.

**गारा** पु. अंगावरचे मांस; चरबी.

**गारा** पु. रानात वाघ आहे की नाही हे पाहण्यासाठी एखादे जनावर बांधणे.

**गारा** पु. गाडा.

**गारा** पु. (संगीत) एक राग. गायनाची वेळ सार्वकालिक.

**गाराणे** पहा : **गाऱ्हाणे** : 'प्रधान प्रजा तें अवसरीं । मज सांगती गाराणीं।' - एरुस्व १.७९. [सं. गर्हणा]

**गाराफ, गार्फ** न. कलमी आंब्याचे झाड. (कु. गो.) [इं. ग्राफ्ट]

**गारीगडदल-र** पु. खाचखळगा; खड्डा; उंचसखल भाग : 'जैसें आंधळें चांचरोन पडे। गारीं आणि गडधरीं।' - दास १.३७. - (तंजा.)

**गारी(रे)गार** वि. १. थंड; तृप्त; समाधानी : 'माणसाचा आत्मा गारीगार होतो.' - आआशे १४. २. थंडगार, गारेगार. (वा.) ० **करून टाकणे** - दुसऱ्याला आवडेल असे बोलून, वागून त्याला अतिशय खूष करणे.

**गारुड** न. सर्पाच्या विषावरील उताराचा मंत्र. पहा : **गारूड** [सं.]

**गारु(रो)डी** पु. १. सापाचे विष उतरवणारा मांत्रिक; सर्प बाळगून त्यावर पोट भरणारा : 'हें जाणोनि ऐसी प्रौढी। जो दृष्टिसवेंचि विष फेडी। तो धांवया श्रीहरी गारुडी। पातला कीं॥' - ज्ञा २.७२. २. जादूगार; नजरबंद करणारा : 'गारुडी नाहीं ऐसा एकू जो भारीं जाणें पूर्वडंकू' - शिव ८१०. [सं. गारुड]

**गारुळा, गारो(ऱ्हो)ळा** वि. घाऱ्या डोळ्यांचा : 'मिशाचे आकडे, गारुळे डोळे...' - एहोरा ८०.

**गारुंडा, गारोठा-डा** पु. अतिशय गारवा, गारठा (हवा, पाणी इत्यादीचा).

**गारूड** न. १. जादू; इंद्रजाल; नजरबंदी. २. कपट; लपंडाव; डावपेच; छक्केपंजे; जादूटोणा. [सं. गारुड]

**गारो** पु. भारताच्या उत्तर व ईशान्य प्रदेशांतील आदिवासींची जमात.

**गार्जप** अक्रि. १. कीर्ती पसरणे. (गो.) २. मोठा नाद होणे. [सं. गर्ज्]

**गार्टर** पु. मोजेबंद; पायमोज्याचा बंद; पायमोजा बांधायची पट्टी. [इं.]

**गार्ड** पु. १. आगगाडीवरचा मुख्य अधिकारी. २. रखवालदार; रक्षक; शिपाई. [इं.]

**गार्फेली** वि. कलमी आंबे लावणारा.

**गाऱ्या गाऱ्याभिंगोऱ्या** पहा : **गाडे गाडेभिंगोऱ्या**

**गार्हपत्य** पु. श्रौतकर्मातील एक प्रमुख अग्नी. पहा : **पंचाग्नी** [सं.]

**गाऱ्हाणे** न. १. काग़ाळी; तक्रार; दुसऱ्याचा अपराध सांगणे. (क्रि. सांगणे, करणे, गाणे, देणे.) २. प्रार्थना; दुःख निवेदन; विनंती; विनवणी (देवाची, मूर्तीची). (क्रि. घालणे, करणे.) [सं. गर्हणा] (वा.) ० **बोलणे** - शत्रूचा नाश व्हावा म्हणून देवाला करण्यात येणारा नवस.

**गाल** पु. कपोल; तोंडाच्या दोन्ही बाजूंचे मांसल भाग. [सं. गल्ल] (वा.) ० **घडणे** - (उद्धटपणाबद्दल) शिक्षा करणे. ० **निपटणे, ० बसणे** - गाल खोल जाणे; तोंड चापट होणे (दुखणे, उपवास यांनी). ० **फुगणे** - १. राग येणे. २. गर्वाने अंध होणे : 'न तुजपुढेंचि पराचें गर्वभरें गाल वा लवहि फुगती।' - मोशल्य १.६३. ० **फुगविणे** - १. फुरंगटणे; रागावणे; २. फुगणे; शेखी, बढाई मारणे. ० **रंगवणे, गालात बसविणे, गालात देणे** - थोबाडीत मारणे; गाल (मारण्याने) लाल करणे. **गालात बसणे** - थोबाडीत मिळणे. **गालावर गाल चढणे, येणे** - (चांगल्या खाण्यापिण्यामुळे) चेहरा गुबगुबीत होणे.

**गालकल्ला** पु. गालावरील मिशांचा गुच्छ; कल्ला.

**गालकुचा-च्चा** पु. गालावरील खळी.

**गालगुच्चा** पु. गालाला घेतलेला चिमटा; गाल ओढणे. (क्रि. घेणे, धरणे.)

**गालगुडदे, गालगुंड** न. स्त्री. (वै.) गालात लहान गाठी होऊन त्या फुगून होणारा रोग; गालाचा रोग; गालफुगी : 'मी सगळ्यांना उजव्या गालफडाला गालगुडदे झाल्याचे सांगत होतो.' - पोपट २२.

**गालगुंडा** पु. चपराक; थोबाडीत मारणे. (को.)

**गाल गोंजारणी** रागावलेल्याची आर्जवे, सात्वन; मनधरणी. (क्रि. करणे.)

**गालचिंबा** वि. गालफडे बसलेला; खप्पड.

**गालठे** न. अव. (निंदार्थी) गाल.

**गालडी, गालोडी** स्त्री. १. तोंडाच्या कोपऱ्याजवळील गालाची खळी. २. गाल फुगविल्याने पडलेली खळी.

**गालदोडी** स्त्री. १. माकडाच्या गालातील पिशवी (माकड यात खाद्य भरून ठेवते); गालफड. (क्रि. भरणे, फुगविणे). २. पहा : **गालडी** २

**गालन** न. १ वितळविणे. २. संधान; निस्सारण करणे, (दारू) गाळणे. ३. चाळणे; छानणे; गाळून काढणे. [सं.]

**गालप** पहा : **गालब** : 'याजवरील इभ्रत बहुत गालप पडली आहे.' - पेद २४.

**गालपट** न. (रागाने, निंदार्थी) गाल; थोबाड.

**गालफट-ड** न. १. गालाची (बाहेरील) वाटी; गाल असलेली जागा. २. गालपट. ३. गाल फ़ुगवून तोंडात केलेली पोकळी; गालाची आतील जागा : 'वानराचें ठेवणें। गालफडां भरावे चणे।' - भारा किष्किंधा १३.१०६.

**गालफुगा-गी, गालफे** पहा : **गालगुंड**

**गालफुगाऊ** वि. जाडेजाडे शब्द वापरून छाप पाडणारा; प्रतिष्ठित : 'असा आभास काही लोक आजकालच्या शास्त्रातील मोठमोठे गालफुगाऊ शब्द वारंवार उच्चारून उत्पन्न करीत असतात.' - ससावा ३.५२३.

**गाल(ली)ब** वि. वरचढ; जोरदार; शिरजोर : 'इंग्रजांवर टिपू गालब' - ऐलेसं ८.४४०७; 'रात्रीचे ठायीं विषप्रयोग करून अखंड दंडायमान

व्हावें ही शरम गालीब जाली.' - इंम २९२. [फा.]
**गालबता** स्त्री. वर्चस्व; वरचढपणा : 'उभयतांवरील गालबता संपादिली.' - पेद २.१६. [फा. गालिब]
**गालबोट** न. दृष्टीची बाधा होऊ नये म्हणून (मूल, नवरदेव, नवरी इ.च्या) गालांवर काजळ किंवा कुंकू यांची लावलेली टिकली. (वा.) ० **लागणे** -चांगल्या गोष्टीला कमीपणा येणे : 'सुशोभित राजधानीला ठिकठिकाणी वाळत घातलेल्या कपड्यांमुळे गालबोट लागते.' - अशी ही ३५.
**गालमिशी** पहा : **गलमिशी** : 'या सर्वांना शोभून दिसणारे पांढरेशुभ्र केस आणि गालमिशा...' - व्यंमाक ५९.
**गालवाद्य** न. गालांवर बोटे ठेवून डमरूप्रमाणे (शंकरापुढे) आवाज करण्याचा प्रकार : 'जिकडे तिकडे 'शंभो हरहर' शब्दांचा व दक्षप्रजापतीचे गालवाद्यांचा घोष होत आहे.' - मंजुघोषा ५. [सं.]
**गालविंधा** पहा : **गालगुच्चा** (क्रि. घेणे.)
**गाला** पु. दोन खांबातील अंतर.
**गालाचा ढोपर** पुढे आलेले गालाचे हाड.
**गालि-ली** स्त्री. शिवी; अपशब्द. (क्रि. देणे.) [सं.]
**गालिचा** पु. सुती कापडावर मऊ लोकर लावून केलेली मुलायम सतरंजी; चित्रविचित्र रंगीत नक्षीचे उंची आसन; चित्रवर्ण ऊर्णावस्त्र. [फा. कालिचा]
**गालिचा** पु. लिफाफा; पाकीट (पत्राचे).
**गालिच्याचा बूट** देखणा, छानछोकी, पण कामाला निरुपयोगी माणूस; छानछबेला; अलबेला माणूस; (गालिच्यावरचे विणलेले फूल जसे निरुपयोगी त्याप्रमाणे) दिखाऊ, ऐदी माणूस.
**गालिप्रदान, गालिप्रयोग** न. पु.शिवीगाळ; निंदा; अपशब्द.: 'मी त्याजवर गालिप्रयोग करुहि लागलो.' - नि ९७.
**गालीकुपास** पहा : **गाळेकंपास** (कु.)
**गालीगलोची** स्त्री. शिवीगाळ; निंदा (क्रि. करणे). [गालीचे द्वि.]
**गालीब** वि. बळकट; समर्थ : 'स्वामीचे हस्त गालीब आहेत. कोणाच्याने काय होणे आहे?' - पेद ३३.७८.
**गालीब मगलूब** जयअपजय.
**गालुशी** स्त्री. १. गालउशी; लहान गिर्दी. २. (ल.) स्तन : 'तुझ्या वक्षाच्या मऊ मऊ गालुशीवर मस्तक ठेवताच त्यांनी सगळा शीण शोषून घेतला.' - संन्यख ८९.
**गालुंडा** पु. झोडून झालेल्या भाताच्या पेंढ्याची पेंढी, जुडी. (रायगड)
**गालो** पु. दालन. (कु.)
**गालो(ल्हो)रा** पु. गालगुच्चा : 'एक उगेच गालोरे घेती।' - अफला २६.
**गाव** पु. न. १. वस्तीचे ठिकाण; ग्राम; मौजा; खेडे; देहे; पत्तन; कुग्राम. २. (व्यापक) नगर; शहर. ३. गावातील वस्ती; समाज. ४. आश्रय. ५. (दोन गावामधील अंतरावरून) चार कोस; योजन; चार ते नऊ मैल अंतर : 'मारीचातें प्रभु शत गांवें पुंखसमीरें उडवी।' - मोरा १.१९९. (समासात) गावकुलकर्णी, गावचांभार, गावन्हावी, गावभट इ. याप्रमाणे बारा बलुत्यांच्या नावापूर्वी गाव हा शब्द लावून सामासिक शब्द होतात व त्या शब्दावरून त्या त्या बलुतेदाराच्या एक वर्षाच्या कामगिरीवरील हक्काचा बोध होतो. [सं. ग्राम] (वा.) ० **मारणे** - लुटणे; खंडणी बसविणे : 'दौड करून गांव मारूं लागले.' - पया १८८. **त्या गावचा नसणे** - दुसऱ्यावर ढकलणे; टाळणे (काम); त्या कामाशी आपला अर्थाअर्थी काही संबंध नाही असे दर्शविणे. **गावानावाची हरकी देणे, सांगणे** - (तू कोठून आलास, तुझे नाव काय आहे सांग इ.) ज्याच्या अंगात भूतसंचार झाला आहे अशा मनुष्याला (भुताला किंवा झाडाला) विचारतात. यावरून पाहुण्याला आपण कोठून आलात इ. नम्रपणे विचारणे. **गावाला जाणे** - १. जवळ नसणे. २. (ल.) निरुपयोगी असणे. जसे :- माझे हात काही गावाला गेले नाहीत. (जवळच आहेत, वेळ आली तर तुला रट्टा मारतील.) **गावी नसणे** - पूर्ण अभाव असणे; अज्ञानी असणे; दरकार नसणे; खिजगणतीत नसणे.
**गावआकार, आकारणी** पु. स्त्री. गावचा हिशेब; हिशेबाचा तक्ता.
**गावआखरी** क्रिवि. गावालगत, गावाशेवटी, गावालागून. (व.)
**गा(ग)वई** स्त्री. १. सरकारी जुलुमामुळे आपले गाव सोडून दुसऱ्या गावी केलेली वस्ती. २. सरकारी हुकुमाची अमान्यता; सरकारी अटींना प्रतिरोध (साऱ्यात सूट, तहकुबी इ. मिळविण्यासाठी गावचे सर्व लोक हा उपाय अमलात आणीत असत).
**गावकबुलात** स्त्री. १. वहिवाटदार खोताने गावातील जमिनीचा सारा भरण्याबाबत दिलेली कबुली. (को.) २. गावातील गावकऱ्यांनी वहीत किंवा पडित जमीन कोणती ठेवावी याबद्दल केलेला निश्चय, ठराव.
**गावकर** पु. १. गावातील वृत्तिवंत. २. गावच्या शुद्रातील देवस्त्रीच्या मानपानासंबंधातील एक अधिकारी. (राजा). ३. भूतबाधा नाहीशी करणारा, देवकी करणारा माणूस; धाडी. ४. गावचे लोक; रहिवासी; गावात घरदार शेतभात असणारा : 'गावकर म्हणती हो पेटली आग।' - दावि ३५०. ५. पाटील; खोत; पुढारी. (कु. को.) ६. कुणबी-वाड्याचा व्यवस्थापक; कुणबी. (रत्नागिरी)
**गावकरी** पु. १. गावात ज्याचे घरदार आहे असा त्या गावचा रहिवासी; गावात राहणारा. २ शेतकरी.
**गावकंटक** वि. गावगुंड; गावाला त्रास देणारा. [सं. ग्रामकंटक]
**गावकी** स्त्री. १. गावाच्या संबंधीचा हरएक अधिकार (अंमल इ.); गावचा कारभार. २. गावसभा; त्या सभेत झालेले ठराव. ३. गावचा विचार; गावकरी व पुढारी यांनी एकत्र जमून केलेला विचारविनिमय. ४. वतनदारांचा गावाबाबतचा परस्पर संबंध व त्यांचा समाईक अंतर्बाह्य व्यवहार. [सं. ग्रामिक] (वा) ० **घेणे, भरवणे** - गावातल्या लोकांची सभा भरवणे : 'आणि दुसऱ्याच दिवशी देवीच्या देवळाशी गावकी घेतली.' - एल्गार ९; 'ते शमवायला चारी गावांची गावकी भरवायची वेळ येते.' - एल्गार ९.
**गावकुचा(टा)ळ** वि. गावातील निंदक, टवाळ; लोकांची निंदा करणारा.
**गावकुटारी** वि. ज्यामुळे गावाचे नुकसान होईल असा : 'पण गावकुटारी भानगडी मात्र यथामति, यथाशक्ति चालू आहेत.' - गांगा ६०.
**गावकुठार** वि. १. गावातील लोकांवर संकट आणणारा (चहाडी, वाईट कर्म इ. करून); गावभेद्या; कुऱ्हाडीचा दांडा. २. गावातील सामान्य

लोक : 'दिल्लीतील वाणी, बकाल, बायकादेखील गावकुठार (हे) लष्करच्या लोकांस मारूं लागले.' - भाब १६०.

**गावकुंप,गावकूस** पु. न. १. गावाच्या भोवतालचा तट. २. (ल.) वस्त्राचा (रंगीत) काठ (धोतरजोडा, शेला इ. चा रेशमी, कलाबतूचा).

**गावकोस** न. जमीन मोजण्याचे एक जुने स्थूल परिमाण. गाय हंबरली तर तिचे हंबरणे जिथवर ऐकू जाईल तेवढे जमिनीचे अंतर.

**गावक्या** वि. गावंढळ; बावळट : 'गावाला गेला राघू गावक्या होऊं नग।' - लोले २०६.

**गावखर** न. गावाची सीमा, हद्द; सीमाप्रदेश; परिसर.

**गावखर्च** पु. (जमीनमहसुली) गावचा (धार्मिक समारंभ, करमणूक इ. चा) खर्च; पंडित, गोसावी, फकीर इत्यादींना द्रव्य, शिधासामुग्री इ. देतात त्याचा खर्च.

**गावखंडी** स्त्री. खंडणी : 'वसई प्रांतांतून संभाजीला गावखंडी मिळाली.' - वसमो.

**गावखाते** न. १. पोलीस; कुलकर्णी इ. गावकामगार लोक. २. गावचा हिशेब.

**गावखारी** स्त्री. गावालगतची शेती.

**गावखिडकी** स्त्री. गावकुसवाची दिंडी.

**गावखुद-र्द** वि. नष्ट, निष्प्रभ; महत्त्वशून्य : 'हे सर्व गावखुर्द होऊन या प्रसंगीं वृद्धापकाळीं त्यास श्रीमंतांचा ओळंबा आला.' - इसंहोकै १२.

**गावखुरास** क्रिवि. गावानजीक; जवळपास.

**गावगत** स्त्री. गावासंबंधीचे काम; गावचे काम; गावात उत्पन्न होणारे काम : 'त्याजला पेशव्यांनीं पत्र करून दिल्हे कीं, तुझें गावगतीचे काम तुझें तूं कर.' - राद १९.

**गावगन्ना** क्रिवि. दर गावाला; गावोगाव; प्रत्येक गावाकडून - गणिक.

**गावगप्प** स्त्री. गावात उठलेली अफवा.

**गावगरॉ** वि. गावठी. (गो.)

**गावगाई-यी** स्त्री. नगरभवानी; भटकभवानी; स्वैरिणी, आळशी; गविष्ट स्त्री.

**गावगाडा** पु. गावातील सर्व प्रकारचे (तंटे, प्रकरणे, बाबी इ.) कामकाज; गावचा कारभार; गावकी. (क्रि. हाकणे, चालविणे, सांभाळणे.)

**गावगावंढे** न. गावे; खेडी (व्यापक अर्थी).

**गावगिरी** वि. गावात उत्पन्न झालेले; तयार केलेले; गावराणी; गावठी.

**गावगुंड-डा** पु. १. गावचा म्होरक्या. २. विद्वानास आपल्या हुशारीने (वास्तविक विद्या नसता) कुंठित करणारा गावंढळ. ३. जादुगारांची मात्रा चालू न देणारा पंचाक्षरी; गारुड्याला त्याच्याच विद्येने जिंकणारा : 'जेवी गारुडीयाचें चेटक उदंड। क्षणें निवारीत गांवगुंड।' - जै २४.९. ४. गावात रिकाम्या उठाठेवी करणारा, त्रासदायक माणूस; मवाली; सोकाजी; फुकट फौजदार; उडाणटप्पू.

**गावगुंडकी** स्त्री. १. गावगुंडाचा कारभार; गावकी. २. (ल.) फसवेगिरी; लबाडी.

**गावगुंडांचा खेळ** पंचाक्षरी किंवा जादूगार यांच्याशी गावगुंडांचा चढाओढीचा सामना; मुठीचा खेळ.

**गावगुंडी** स्त्री. १. ग्रामदेवतांना नैवेद्य दाखवून सर्व मानकरी व गोरगरीब यांना प्रसाद वाटणे. २. गावात दांडगाईने किंवा जबरदस्तीने वागणे; लोकांना उपद्रव अगर त्रास होईल असे वागणे; नसत्या उठाठेवी करणे.

**गावगोहन** पु. सबंध गावातील गाई एकत्र असलेला कळप. (व.)

**गावगौर** स्त्री. सबंध गावात भटकणारी स्त्री; गावभवानी : 'पोरीबाळीसुद्धा हिणवून पुरेसें करतील कीं, या गावगौरीला हें भिकेचें वाण कुणी वाहिले म्हणून ?' - पुण्यप्रभाव.

**गावघेणी** स्त्री. दरोडा; हल्ला : 'समुद्राचे पाणी सातवा दिसी करील गावघेणी।' - भाए ६९.

**गावचलण-णी-नी** वि. गावात चालणारे (नाणे).

**गावचा डोळा** गावचा वेसकर, महार, जागल्या.

**गावचा लोक** गावातील कोणीतरी; कोणास ठाऊक नसलेला; परका; अनोळखी.

**गावचावडी** स्त्री. १. गावातील सरकारी कामकाजाची जागा; चौकी. २. (ल.) गावातील रिकामटेकड्यांचे कुटाळक्या करण्याचे ठिकाण.

**गावजागा** गावठाण.

**गावजान्या-ण्या** वि. गावदेवतेला वाहिलेले (मूल).

**गावजेवण, जेवणावळ, भोजन** स्त्री. न. १. गावातील सर्व लोकांना घातलेले जेवण. २. गावातील स्वजातीला दिलेली मेजवानी.

**गावजोशी** पु. गावातील वृत्तिवंत जोसपण करणारा; गावपुरोहित.

**गावझाडा** पु. गावातील (शेत इ.) जमिनींचा कुळकर्ण्याने तयार केलेला वर्णनपर तक्ता; कुळकर्णीदप्तर.

**गावझोळ** वि. गावात भटकणारा : 'जा अभ्यासास बैस गावझोळा.' - सनई ७.

**गावझोंड** पु. १. सर्व गावापासून कर्ज काढून नागविणारा. २. गावातील खट्याळ, खाष्ट माणूस; गावाला त्रास देणारा माणूस.

**गावट(ठ)विणे** उक्रि. १. समावेश करणे; अंतर्भूत करणे, होणे. २. धरणे; पकडणे.

**गावठण-ठाण** न. गावातील वस्तीची जागा (अस्तित्वात असलेली किंवा उजाड झालेली); आईपांढर. [सं. ग्राम + स्थान]

**गावठा, था** पु. १. गावचा एक वतनदार. २. खेडवळ; गावंढळ. [सं. ग्राम + स्थ]

**गावठी-ठू** वि. १. गावचे; स्थानिक. २. गावंढळ; खेडवळ. ३. (विशेषतः गावठू) रानटी; खेडवळ (माणूस, चालरीत). [क. गावटि]

**गावडमोट** स्त्री. पाटलाला द्यावयाची मोट (कणसांची). (माण.)

**गावडा** पु. १. मीठ, कात तयार करणारी कोकण, गोव्यातील एक जात व त्यातील व्यक्ती. २ एक क्षुल्लक गावकामदार; धनगरातील एक मुख्य अधिकारी. ३. गोव्यातील एक कुणबी जात. [सं. ग्रामकूट]

**गावडी-डे, गाभाडे** स्त्री. न. १. गाय (लडिवाळपणे किंवा कुत्सितअर्थी). २. गाय (सामान्यपणे). (खा.)

**गावडुक्कर** पु. १. डुकराची एक जात; गावातच राहणारे डुक्कर. २. (ल.)

गावातील अनिष्ट गोष्टीत पुढारीपण करणारा.
**गावडेगजाल** स्त्री. अर्थशून्य बडबड. (कु.)
**गावढळ, गावढे** पहा : **गावंढळ, गावंढे**
**गावणगे** गावचे अधिकारी किंवा सावकार, सधन लोक.
**गावणुकग** पु. गावचा प्रमुख.
**गावणे** अक्रि. १. सापडणे; आढळणे (हरवलेली वस्तू). २. मिळणे; प्राप्त होणे (इच्छित वस्तू, हेतू). ३. भेटणे; गाठ पडणे; मिळणे. ४. पकडला जाणे; हातात सापडणे; कह्यात येणे. [सं. ग्रह = घेणे]
**गावणे** अक्रि. १. गाणे म्हणणे; गाणे. (व.) २. सदासर्वदा म्हणणे; जपमाळ घेणे; घोकत राहणे. (को.) [सं. गै.]
**गावथळ** पहा : **गावठण**
**गावदी** वि. अडाणी; मूर्ख; टोणपा; ढ. [सं. गो]
**गावदेवता-देवी** स्त्री. गावची संरक्षक देवता; ग्रामदेवता. [सं.]
**गावधणे** न. गावची गुरे.
**गावधे** न. १. झोपडी. २. दुसऱ्या गावातले काम.
**गावधोंड** स्त्री. १. गावावर बसविलेली जबरदस्त खंडणी. २. (सामा.) गावावर आलेले संकट, अरिष्ट.
**गावनिसबत इनाम** निरनिराळ्या प्रासंगिक खर्चाकरिता किंवा सरकारी खर्चाकरिता काढलेल्या सार्वजनिक कर्जाच्या फेडीसाठी गावकऱ्यांनी गहाण ठेवलेली जमीन.
**गावनिसबत मिरास** जिचा मालकीहक्क सर्व गावकऱ्याकडे मिळून आहे अशी जमीन.
**गावनेमणूक** स्त्री. गावखर्चाकरिता तोडून दिलेला पैसा.
**गावपडीत** न. गावातील बिन लागवडीची, पडीत जमीन.
**गावपण** न. ग्रामसभा; गावकी : 'गांवपण मांडलिया वायसें।' - सिसं ८.१५७. (गो.)
**गावपाणोठा-था** पु. गावच्या नदीवरील किंवा तळ्यावरील पाणी भरण्याची जागा; पाणी भरण्याचे सार्वजनिक ठिकाण.
**गावपाहणी** स्त्री. गावातील पीक किंवा शेतजमीन यांची पाटलाने केलेली पाहणी, मोजणी; (सामा.) गावाची सर्व दृष्टीने पाहणी.
**गावबलांडा** पु. गावातील बालंट; उचापती; कुरापती; त्रास : 'बेवीस वर्षे चाकरी सेवा कोणी केली चाकरीचे गावबलांडे सोसले.' - मइसा ३७८.
**गावबंदी** वि. गावात वस्ती करून असलेला (फिरस्ता नव्हे.).
**गावबैल** पु. (पोळ्याच्या दिवशी) पाटलाचा बैल. हा सर्व बैलांच्या पुढे असतो. हा पाटलाचा एक मान आहे.
**गावभवानी** स्त्री. भटकभवानी; चवचाल (स्त्री).
**गावमहार** पु. गावच्या चाकरीवर असलेला वतनदार महार.
**गावमामा** पु. १. गावातील शहाणा माणूस. २. गावकऱ्यांच्या जिवावर चरितार्थ चालविणारा व सर्वांशी मिळूनमिसळून असणारा माणूस (उपहासात्मक).
**गावमावशी** स्त्री. गावातील कुंटीण; (सामा.) वयस्क व स्वैरिणी स्त्री.
**गावमुकादम** पु. अव. गावचे सारे श्रेष्ठ वतनदार.
**गावमुकादमी** स्त्री. वतनी ग्रामव्यवस्था.
**गावमुकासे** पुअव.धिंडवडे : 'काढा माझे काय गावमुकासे काढायचे असतील ते.' - गणपत ८९. (क्रि. काढणे)
**गावमेव्हणी** स्त्री. गावातील वेश्या.
**गावम्हसन** न. गावातील स्मशान; मसणवटा.
**गावरस** न. गावातील घाणेरडे पाणी; लेंडी नाला; लेंडे आहोळ : 'हां गा गांवरसें भरलें। पाणी पाठीं पाय देत आलें।' - ज्ञा १६.२५.[सं. ग्रामरस:]
**गावरान** न. १. गाव त्याच्या आसपासचा प्रदेश, जमीन. २. गावची व आसपासची लोकसंख्या. ३. (नाविक) नैर्ऋत्येकडील वारा; गावाकडे येणारा वारा. (कु.)
**गावरान-नी-णी** वि. १. स्थानिक; गावठी; घरगुती; रानवट (भाजी, पदार्थ इ.). २. गावाकडचा; खेडवळ.
**गावली** स्त्री. गाय (लडिवाळपणे माय, माउलीप्रमाणे). पहा : **गावडी -डे** न. उपटलेल्या हरभऱ्याच्या डहाळ्यांची लहान जुडी, पेंढी.
**गाववर्दळ** स्त्री. गायरानाखेरीज गावच्या दिमतीस असलेली इतर जमीन.
**गाववसाहत-वसात** स्त्री. १. गावची वस्ती. २. गावचा वसलेला भाग. ३. गावची लोकसंख्या.
**गाववहीत** न. गावची लागवडीखालची जमीन.
**गाववाला** पु. एकाच गावचा, गावाकडचा माणूस.
**गाववेस** स्त्री. गावाच्या तटाचा मोठा दरवाजा.
**गाववेसकर** पु. गावाच्या वेशीवर पहारा करणारा पाळीचा महार. याच्याकडे गावाचे निकडीचे काम सोपविलेले असे.
**गावशाई** स्त्री. खडबडीत चपटे मोती.
**गावशीव** स्त्री. १. गाव किंवा गावे (यांना सामान्य संज्ञा); नावगाव वगैरे माहिती. २. गावाची सीमा, हद्द. (वा.) ० **माहीत नसणे** - एखादे स्थळ पूर्णपणे अपरिचित असणे.
**गावशीवचा** वि. गाववाला : 'मी म्हटलं गावशीवचा माणूस आहे म्हणून जेऊ घातलं.' - कोसला २७२.
**गावस** पु. क्षत्रियांची एक जात. (गो.)
**गावसई** स्त्री. १. गावच्या भुताखेतांना दरसाल द्यावयाची ओवाळणी, बळी (नारळ, कोंबडे इ.). २. एकूणएक गाववस्ती; गावकरी; अखिल ग्रामस्थ. ३. भगत सांगेल ते सात किंवा नऊ दिवस गावातील यच्चयावत माणसांनी बाहेर जाऊन राहणे.
**गावसमाराधना** पहा : **गावजेवण**
**गावसवाशीण-सवाष्ण** स्त्री. १. (गोंधळ, मोहतुर इ. प्रसंगी) पाटील किंवा चौगुला याच्या बायकोला म्हणतात. २. (ल.) गावची वेश्या.
**गावळ** वि. साधीभोळी : 'कशी फाडूं गावळ गुजरी नवी चंद्रकळा कुसरी।' - गोरबी ८३.
**गावळी** क्रिवि. गावोगाव; सर्व गावातून : 'जेवी निळहारयांची नासे निळी। तो मिथ्यामात उठवी बायकोळी। ते देशीं विस्तारें गावळी। सांचा सारिखी।' - ज्ञाप्र ६२७.
**गावंडा-ढा** वि. अडाणी; खेडवळ.

**गावंढळ-ढाळ-ढ्या, गावंढा** वि. १. खेडवळ; मूर्ख; रानवट; अडाणी : 'खंती करिती कर्माची। ते गावंढे गा।' - ज्ञा ३.१४५. २. खेड्यात राहणारा; शेतकरी.

**गावंढे** न. लहान खेडे, गाव; शेतकऱ्यांची वाडी; शेतवाडी : 'मला माझे गावंढेंच बरें.' - इसापनीती (छत्रे). [सं.]

**गावंढेकर** वि. खेडवळ; गावंढ्या : 'तेथे कोणी गावंढेकर कुणबी बसला होता.' - नि. १४९.

**गावंदर-री** स्त्री. गावालगतची जागा.

**गावंधणे** न. गावची गुरे : 'गोवारी गावंधणे वेटाली.' - राज्ञा १८.१७२.

**गावंधे** न. १. वाडी; खेडे. २. दुसऱ्या खेड्यातील कामकाज.

**गावा** पु. पुन्हा पुन्हा बोलून दाखविलेली इच्छा, ध्यास; एकाच गोष्टीची जपमाळ; अट्टाहास; घोष. (क्रि. गाणे, लागणे, (संपला असल्यास) मोडणे, सरणे, संपणे, आटोपणे.) (को.) [सं. गै]

**गावा** पु. जथा; गट; संघ; घडण : 'माणूस विश्वासूक पुरातन राज्यांतील येका गाव्याचे आहेत याचा संग्रह खामखा असावा.' - पेद ३०.२३५.

**गावा-वी** पु. स्त्री. (कारागिरी) धातूची तार ओढण्याचे हत्यार, चिमटा.

**गावाई** स्त्री. गुंतागुंत; घोटाळा : 'येथ उपदेशामाजि गावाई।' - ज्ञा ३.२१.

**गावार** न. मूर्ख; अजाण. पहा : **गव्हार** : 'परि दर्पणाचेनि आधारें। एकचि करुनि दूसरें। मुख पांति गावारें।' - राज्ञा १५.२४३.

**गावार** न. गावजेवण.

**गावाळी** स्त्री. अफवा; गावगप्पा : 'ते देसीं विस्तारें गांवाळी साचासारिखी।' - ज्ञाप्र ६२६.

**गावी** स्त्री. (नाविक) परभाणाच्या वर डोलकाठीच्या कळशीजवळचे (बहुधा मोठ्या गलबताला लावण्याचे) शीड : 'गावी परबान जाया झालें.' - थोमारो ९.२३६.

**गावीक** वि. सार्वजनिक; गावचे (शेत, पाणी, खर्च, पट्टी इ.). (राजा)

**गावुंडगो** वि. गावात राहणारा. (गो.)

**गाशा** पु. खोगिराचे आच्छादन किंवा बिछायत; वरील अंगास सकलातीचे किंवा बनातीचे निरनिराळ्या रंगाचे तुकडे व आतील अंगास खारवे असे शिवून केलेले दुहेरी वस्त्र; पातळ गादी.[फा.] (वा.) ० **गुंडाळणे** - १. जाण्यासाठी आवराआवर करणे; आपले सामानसुमान गुंडाळून चालते होणे; पळून जाणे : 'पुण्यातले लोक चांगले व्यवहारज्ञ आहेत, ते आपल्या हातीं लागणार नाहींत अशी खात्री होताच स्वामींनीं तेथून आपला गाशा गुंडाळला.' - नि. २. मरणे. ० **टाकणे** - अंथरूण पसरणे (स्वार खोगिरावरचा गाशा निजावयास घेतात त्यावरून) : 'इकडे स्वारांनींही आपापल्या भाकरी खाऊन ते आतां गाशा टाकून विश्रांती घेत उघड्या पटांगणात पडले होते.' - स्वप ९५.

**गास** पु. १. कसू, बांध. २. खाटेचे गात, बाजूची लाकडे. (व.)

**गासडी** स्त्री. गठ्ठा; गाठोडे; मोठा बोजा. पहा : **गठडी, गठाण**

**गासलापूर करणे** सक्रि. (काहीतरी चोरून, उपटून) पळून जाणे.

**गासिबानह** जबरदस्त.

**गाह** जमाव. पहा : **गाहा**

**गाहन** न. बुडी; शिरकाव. [सं. गाहते]

**गाहमापी** पु. खोली अजमावण्याचे उपकरण.

**गाहा** पु. १.जमाव; २. तयारी; स्थान धरणे : 'तुम्ही आपले फौजेनिशी गाहा करून असणें.' - शारो १.५.

**गाही** स्त्री. चिमटा. पहा : **गावी**

**गाही, गाहीदार** पहा : **ग्वाही, ग्वाहीदार** : 'गाही दिधली वेदानें।' - देप ८३.

**गाळ** पु. १. गदळ; मळ; घाण; केरकचरा. २. चिखल; रेंदा; राब; रबडी. ३. एखाद्या पदार्थातून गाळून किंवा निवडून चांगला अंश काढून घेतल्यावर राहिलेला अवशिष्ट भाग; वगळ. ४. साका; तळाशी राहिलेला भाग, अंश. [सं. गल = गळणे]

**गाळ** स्त्री. पठार; मोठे मैदान. (गो.)

**गाळ-ळी** स्त्री. शिवी. पहा : **गाली.** (क्रि. देणे.) : 'ऐसिआं देतां गाळी।' - शिव ८७२. [सं. गालि] (वा.) ० **बसणे** - १. कालिमा लागणे. २. शिव्या खाणे.

**गाळके** न. टिपकागद. (कु.)

**गाळण** न. १. गाळण्याची वस्तू. २. (ल.) थकवा; ग्लानी; दुर्दशा; गलितावस्था (दुखणे, दगदगीचे काम यामुळे आलेली). ३. तुच्छता; तिरस्कार; अव्हेर; अनादर.

**गाळण** न. १. भांबावलेली स्थिती; घाबरेपणा; त्रेधा. २. अस्ताव्यस्तपणा; अव्यवस्था; नासधूस (गैदीपणामुळे कामाची किंवा पदार्थाची). (वा.) ० **उडणे** - घाबरगुंडी होणे; धैर्य नाहीसे होणे; गर्भगळित होणे. ० **होणे** - भीतीने गांगरून जाणे.

**गाळण** न. गाळणे; द्रव पदार्थ ज्यातून गाळतात ते वस्त्र किंवा पात्र.

**गाळणा** स्त्री. (क.) भीतीने उडालेली त्रेधा, गोंधळ; पळ काढण्यासारखी स्थिती; गाळण उडणे.

**गाळणावळ** स्त्री. गाळण्याचाळण्याची मजुरी.

**गाळणी** स्त्री. १. चाळणे; गाळणे; शोधणे. २. स्वच्छ करणे; गाळ काढणे; साफ करणे (विहीर, तळे). ३. (सोनारी) मूस. (कु. गो.) ४. नरसाळे; गळणी. पातळ पदार्थांतील केरकचरा काढून टाकण्याकरिता वापरायचे वस्त्र किंवा छिद्रयुक्त पात्र.

**गाळणे** उक्रि. १. वस्त्रातून किंवा छिद्रयुक्त पात्रातून ओतून चाळणे; स्वच्छ करणे. २. (ल.) रद्द करणे; बाजूला टाकणे; परतविणे; घालविणे; वाटेला लावणे. ३. ढाळणे (अश्रू, केस, पिसे). ४. घालणे (अंडी). ५. वर्जणे; वगळणे; टाकणे (माणूस, वस्तू, गोष्ट). ६. अंग काढून घेणे. ७. शुद्ध करणे; चकचकीत करणे (धातूचे जिन्नस विस्तवात घालून). ८. यंत्रात दाबून पिळून काढणे; तेल, अर्क काढणे (गळिताचे धान्य, बी यांचे). ९. मळ, गाळ काढणे (विहीर, तळे, धरण यातील) : 'प्राज्य प्रीतिद झालें सुहृदांला गाळिलें जसें आज्य।' - मोसभा ७.३. १०. (अवसान हातपाय इ. शब्दास जोडून) धीर सोडणे; कच खाणे; खचणे. ११. रस करणे; वितळविणे; पातळ करणे. [सं. गालय]

**गाळ (ळा) णे** न. चाळणी; गाळणी.

**गाळपेरा** वि. धान्य पेरण्यालायक बनलेल्या गाळाच्या (जमिनी) : 'सरकारी तलावातील गाळपेरा जमीन ३५ एकर लागवडीकरितां खंडाने देणें आहे.' - के ९.९.१९४१.

**गाळवट, गाळवी** वि. रेंदा, दलदल, चिखल असलेली किंवा नदीचा गाळ वाहून आल्यामुळे तयार झालेली (जमीन).

**गाळवंड** न. गाळवट जमीन.

**गाळवी** वि. गाळ सारून बनलेली (जमीन.).

**गाळ (ळी) शिवी** स्त्री. निंदा; शिव्या; शिवीगाळ (क्रि. करणे, देणे).

**गाळसाळ** पु. रेंदा; चिखल; कचरा. [गाळचे द्वि.]

**गाळंकार** पु. दुखण्यामुळे आलेली स्थिती; गाळण. (गो.)

**गाळा** पु. १. मळ; गाळ; रेंदा; गाळल्यानंतर राहिलेला साका. २. नदीला पूर येऊन गेल्यानंतर काठावरील झाडांना अडकून पडलेला पातेरा, केरकचरा; चिखल; मळी. ३. स्वच्छ पिंजलेला कापूस.

**गाळा** पु. १. खण; बहालातील जागा. २. चौकट इ. च्या गर्भाचे प्रमाण. ३. इमारतींच्या दोन भिंतीमधील भाग; खोली; दुकान.

**गाळागाळ** स्त्री. १. वर्जन; वगळणे; टाकणे. २. नाकबुली; नकार. ३. (ल.) वेचणे; निवडणे. [गाळचे द्वि.]

**गाळाची माती** (भूगोल) पुराबरोबर वाहून आलेली माती.

**गाळी (ळि) प्रदान** न. शिव्या देणे : 'समर्थ समर्थांसी (श्रीरामास) गाळिप्रदानें समर्पिती।' - सप्र ३.७.

**गाळीखोर, गाळ्यारा** वि. शिवराळ; शिव्या देणारा.

**गाळीत** न. गाळण्याचे वस्त्र.

**गाळीव** वि. १. गाळलेले; चाळलेले; वेचलेले; स्वच्छ केलेले. २. निवडक; निवडून घेतलेले. ३. (ल.) उत्कृष्ट; चांगले. ४. (ल.) पक्का; बिलंदर; अट्टल; लबाड (लुच्चा, शठ, वेडा). (निंदार्थी).

**गाळीव मूर्ती, वस्तू** सर्व दुर्गुण एकत्र असलेला (माणूस); अट्टल सोदा.

**गाळेकंपास** पु. (सुतारी) गळ्याचे आतून व बाहेरून माप घेण्याचा कंपास; कैवार. (को.)

**गाळेखेरे** न. अव. गोट्या उडविणे व झेलणे (लहान मुलांचा एक खेळ).

**गाळोटी** स्त्री. गाळवंड जमीन. (व.)

**गाळौं** पु. रेशमी पातळ; वधूची रेशमी साडी (दैवज्ञ); वधूवस्त्र. (गो.)

**गांग** न. गंगेचे पाणी : 'कां बोध सांडूनि गांग।' - ज्ञा १४.३५३. वि. गंगेचे; गंगेसंबंधी : 'आतां निर्वाळूनि कनकें । भरिला गांगेंपीयूखें।' - ज्ञा १६.१९७. [सं. गंगा]

**गांगउडा** पु. गर्दी; घोटाळा. पहा : **गांगरडा** (व.)

**गांगरडा, गांगर्डा** पु. आरडाओरडा; कोलाहल; गलबला. [ध्व.]

**गांगरणे, गांगारणे, गांगावणे, गांगणे** अक्रि. भीतीने घाबरणे; गोंधळणे; सुचेनासे होणे; अवधान सुटणे; पेचात पडणे; दिङ्मूढ होणे.

**गांगरपट्टी** स्त्री. गडबड; धांदल; तारांबळ; घोटाळा : 'त्यांची सोळा आणे गांगरपट्टी उडाली व त्यांची पुरी फजिती झाली.' - विद्याभिवृद्धि १६०.

**गांगा** वि. पांढरा; तांबूस छटा असलेला पांढरा; शेपटीखाली व तोंडावर तांबडा बाकी सर्व पांढरा - घोड्याचा रंग : 'शुद्ध श्वेत निर्मळ। त्रया वर्णाचे केवळ। ते गांगे घोडे।' - गीता १.७८४. [सं. गंगा].

**गांगो** पु. गाव व गावातील गुरे यांचे रक्षण करणारी एक देवता; ग्रामदेवता. (राजा.)

**गांज** स्त्री. ओरखडा. (गो.)

**गांजणी, गांजणूक** स्त्री. १. जाचणूक; त्रास; छळ; गांजणे : 'वाटे त्या धरितील तूज तरुणी, होते मला गांजणी।' - आकं ८. २. गांजल्यामुळे होणारे दुःख.

**गांजणीचे गवत** एक प्रकारचे मसाल्याचे गवत.

**गांजणे** उक्रि. १. चैन पडू न देणे; छळणे; जाच करणे; यातना देणे. २. खनपटीला बसणे; निकड लावणे; सक्तीने पाठ पुरविणे. अक्रि. जाच, छळ, त्रास, होणे, सोसणे; गांजणूक काढणे : 'आडले गांजिले पीडिले संसारीं। त्यांचा तूं कैवारी नारायणा।' - तुगा ८८३.

**गांजवा** पु. एक औषधी मूळ; काष्ठौषधी.

**गांज(जि)वा** पु. पिशवीसारखे जाळे (फळे वगैरे नेण्याचे) : 'मोहरी पावा गांजिवा पाटीं।' - निगा १७. पहा : **गजबा**

**गांजा** पु. भांगेच्या झाडाची वाळलेली फुले, शेंडे, मंजिऱ्या, तुरे. [सं. गंजिका]

**गांजा** पहा : **गांजवा, गांझा**

**गांजील, गांजीलमूस** पु. गांधीलमाशी. (गो.)

**गांजूल** न. कुलूप उघडण्याचे (किल्लीशिवाय) एक हत्यार. (गो.) [पोर्तु.]

**गांजेकस** वि. गांजा ओढण्याचे व्यसन असणारा; गंजेटी.

**गांजो-झी** पु. १. पक्ष्याच्या शरीरातील अन्नाची पिशवी, कोठा. २. माणसाच्या पोटावरची कातडी. (गो.) ३.पहा : **गांझा**

**गांज्या** पु. तलवारीच्या मुठीच्या मागे असलेले वाकडे, लांब, शोभेचे टोक.

**गांझा** पु. गांजवा; गांजा; आंबे इ. झेलणीने गोळा केल्यानंतर ते ठेवण्याचे जाळे; हारा; झेला; सारणी. [फा. गझना]

**गांड** स्त्री. १. गुदप्रदेश; ढुंगण. २. मलद्वार; बृहती; बोचा. ३. मागची अथवा खालची बाजू; बूड अथवा तळ (वस्तूचा). [सं. गुद] (वा.) ० **गुडाखू होणे** - भीतीने दबून बसणे; थंडी, पेटके वगैरेंनी आखडले जाणे. ० **जड होणे** - गर्विष्ठ बनणे; शेखी चढणे. **गांडतोंड हाती धरणे** - बाहेरख्यालीस किंवा खाबूपणास प्रवृत्त होणे, सोकावणे; बदफैलीपणा व अविश्वास ह्या दोन्ही गोष्टी करणे. ० **फाटणे** - भीतीने गांगरणे; लेंड्या गाळणे; गर्भगळित होणे. ० **फाडणे** - कडक शब्दात दम देणे; भेदरून जाईल इतका दम देणे. ० **मारणे** - १. गुदमैथुन करणे. २. बृहती तंतरणे. ० **वळणे, गांडीवर रेघ ओढणे** - मागे सरणे; नाकबूल करणे. ० **वाकडी करणे** - नामोहरम होणे; माघार घेणे; तोंड चुकवणे. **गांडीचे गरगट होणे** - पादडले जाणे; भूस पडणे; दमणे; थकणे. **गांडीत सुंठ फुकणे, गांडीत काड्या घालणे** - १. एखाद्याला उत्तेजन देणे; भर, फूस देणे. २. (ल.) शिक्षा, फजिती करणे; पराभव करणे. **गांडीवर घाव घेणे** - कामकाजात फजीत होणे; अपमानाने मागे सरणे; पराभव पावणे. **गांडीस हात पोचणे** - वडील मंडळींच्या ताब्यातून सुटून स्वच्छंदाने वागण्यास मोकळे होणे.

**गांडकणी** स्त्री. गोणीच्या मागचा पट्टा; लेंडी.

**गांडगमाऊ** वि. बेअकली; मूर्ख; नालायक.

**गांडगुडघा-घी, गांडगुंडा** स्त्री. पु. गांडीवर गुडघ्याने मारलेला ठोसा. (क्रि. देणे, मारणे, बसणे.) (वा.) **गांडगुडघी मारणे** - फजिती करणे; ढुंगणावर गुडघे मारणे : 'कोथळा किल्ला फत्ते करून हसमखानास गांडगुडघ्या मारून काढून दिला.' - मसाछोब ४१.

**गांडगुलामी** स्त्री. मानहानीची खुशामती; फार हांजीहांजी.

**गांडगोटा** पु. पाण्याच्या अभावी गांड पुसण्यासाठी वापरला जाणारा दगड.

**गांडचोळणा** पु. चड्डी.

**गांडजोरा** पु. (अशिष्ट) मागून दुजोरा; अनुमोदन; फूस; (क्रि. देणे.)

**गांडपिटकी** स्त्री. १. ढुंगणावर ढुंगण आपटणे. २. खेळीमेळी; दाटमैत्री.

**गांडपुशा** वि. हलकट; नीच; क्षुल्लक; य:कश्चित.

**गांडपोते** न. जाडेभरडे वस्त्र. (कु.)

**गांडबोला** पु. ढुंगणावर आलेले गळू; व्रण; क्षत.

**गांडभरू** वि. (निंदावाचक) संपत्तिमान; द्रव्यवान; धनवान; श्रीमंत.

**गांडमणी** पु. गुह्य गोष्ट : 'राग नको धरूं मनीं। गांडमणी सांगतों॥' - तुगा ३००३.

**गांडमस्ती** स्त्री. श्रीमंतीचा माज.

**गांडमांडूळ-महाडूळ** पु. काडू; लाल रंगाचा, दुतोंडी, पावसाळ्यात उत्पन्न होणारा उरोगामी किडा.

**गांडमैत्री, गांडमैत्रिका** पहा : **गांडपिटकी** २

**गांडमोडी** इरले माणूस वाकले असता दुमडून ढुंगण झाकले जाईल अशा पद्धतीचे इरले.

**गांडमोडी मुंगी** मुंगीची एक जात. ही चालत असता हिचे ढुंगण मोडल्यासारखे दिसते.

**गांडर** स्त्री. एक वनस्पती; वीरण; नीरतर.

**गांडरग** स्त्री. खोटा अभिमान, अहंकार; रिकामा तोरा, ताठा; बढाई.

**गांडर दुर्वा** एक वनस्पती.

**गांडराऊ-वू** पु. गांडू; गांडभरावू; गंड्या.

**गांडवळ** पु. न. काडू. पहा : **गांडमांडूळ** (को.)

**गांडसुकाळ-ळा-ळ्या** पहा : **गांडराऊ-वू**

**गांडा** पु. उसाचा एक प्रकार.

**गांडा** वि. १. खराब; बेढब; वाईट. (व.) २. वेडा; खुळा. [गु.]

**गांडापूर** न. गुदद्वार : 'गांडापूर वाहू लागलें।' - एभारूड.

**गांडाळ** वि. (अशिष्ट) १. मोठे कुल्ले किंवा ढुंगण असलेली; पृथुजघना. २. जारिणी; व्यभिचारी (स्त्री.).

**गांडीखालचे घोडे** उपजीविकेचे साधन (नोकरी, व्यापार, धंदा वगैरे).

**गांडीव** पु. १. अर्जुनाचे धनुष्य : 'तेथ बेंबळ हातु गेला। गांडिवाचा॥' - ज्ञा १.१९७. २. (सामा.) धनुष्य. [सं.]

**गांडू-ड्या** वि. १. (शिवी) गंडस; गांडमराऊ; षंढ; नपुंसक; गांड सुकाळा. २. दुर्दैवी; हतभागी; कुचकामाचा; नीच प्रतीचा; हलका. ३. नामर्द; भित्रा; असमर्थ.

**गांडू(डो)ळ** न. काडू; दानवा. [सं. गण्डोल]

**गांडेचिरी** पु. झांझडा; एक प्रकारचा मासा.

**गांढे** वि. दुर्बल; कमकुवत. पहा : **गांढ्या**

**गांढेपण** न. दुबळेपणा; भित्रेपणा; गांडूपणा : 'काय देवा नेणों आलें गांढेपण।' - तुगा १२९०.

**गांढ्या** वि. (निंदार्थी) गंडिया; गांडू; हतभागी; कपाळकरंटा. पहा : **गांड्या**

**गांढ्याळ** वि. भित्रा; दुर्बल; गांढ्या : 'देव गांढ्याळ देव गांढ्याळ। देखोनियां बळ लपतसे।' - तुगा ३७००.

**गांथण-न** स्त्री. कूड, साट इ. ची बांधणी; गुंफण, वीण; गुंतण (कुंपणाच्या उभ्या काठ्यांची); छपराची ओमण; वीण व कृती दोन्ही. [सं. ग्रथन]

**गांथणे** उक्रि. १. गाथणीने बांधणे; विणणे; गुंफणे; गुंतविणे. २. ओवणे; माळ करणे. (गो.) [सं. ग्रथन]

**गांध** स्त्री. (लहान) फोड; गाठ; टेंगूळ; आवाळू (मुंगी, माशी, गांधील माशी, गोमाशी इ. च्या दंशापासून किंवा पित्तापासून झालेले). (क्रि. उठणे) [सं. गंधाली]

**गांधट, गांधाड** न. मोठी गांध, गाठ (गांध याचे विस्तारित रूप).

**गांधणी** स्त्री. गांधीलमाशी. पहा : **गांधीण**

**गांधर्व** न. गायन; गाणे. [सं.]

**गांधर्व लग्न, विवाह** १. वधूवरांच्या परस्पर संमतीने झालेले लग्न; प्रीतिविवाह. पहा : **अष्टविवाह** : 'विवाह तंव बहुतापरि। पिशाच गांधर्व आसुरी।' - एरुस्व ४.४२. २. (कायदा) स्त्री व पुरुष यांनी परस्परांवर प्रेमाने मोहित होऊन केलेला सांकेतिक विवाह. ३. पाट; म्होतूर.

**गांधिक** वि. गंधकयुक्त.

**गांधी** पु. गंधी; औषधी द्रव्ये विकणारा; औषधविक्या. [सं. गांधिक]

**गांधीटोपी** स्त्री. खादीची घडीची पांढरी टोपी. महात्मा गांधींच्या नावावरून हे नाव पडले.

**गांधीण-ल, गांधीलमाशी** स्त्री. कुंभारीण माशीसारखी दिसणारी माशी. ही चावल्याने गांध उठते. या मधमाशांसारख्या टोळ्यांनी पोळे करून राहतात. यातही नर, माद्या व कामकरी माशा असतात. [सं. गंधोली]

**गांधीवाद** पु. महात्मा गांधींनी सांगितलेले राजकीय व सामाजिक तत्त्वज्ञान : 'गांधीवाद म्हणून एक स्वतंत्र विचारपद्धती आहे.' - विचार.

**गांधेल** न. गांधीलमाशी : 'गांधेले म्हणती आमुचे घर।' - दास १.१०.४२.

**गांभीर्य** न. १. मनाची शांती, स्थैर्य, गंभीरता; भारदस्तपणा. २. खोली; ओंडी (पाणी, आवाज, सूर यांची). ३. भयकारकता; चिंताजनक स्थिती. [सं.]

**गिअर** पु. इंधनाच्या वापरात वाढ न करता वेगामध्ये वाढ करण्यास मदत करणारी स्वयंचलित वाहनातील यंत्रणा.

**गिग्गी** स्त्री. लहान दुबेळके; मेढ. (कर)

**गिचका, गिचगिचीत** वि. मऊ आणि चिकट; चिकचिकीत; मोकळा नव्हे असा (शिजविलेला भात). [ध्व. गिच्]

**गिचगिंदा** पु. एकत्र कालविलेला, सरसरीत, खाण्याचा पदार्थ; काला; बोडण. [क. गिज.]

**गिचमिट-ड** स्त्री. १. किजबिड लिहिलेली अक्षरे, चित्रे, आकडे, आकृती, गोष्ट; न वाचता येणारे लिखाण; खरडणे; कुत्र्यामांजराचे पाय. २. खरडलेला, चिताड कागदाचा तुकडा.
वि. १. ओरबाडलेले; ओरखडलेले; चिडबिड लिहिलेले, ओबडधोबड केलेले (लिखाण, काम). २. गोंधळाचे; भरमसाट; भरकटलेले (भाषण). [क. गीचु = खरडणे, ओरखडा]

**गिचमिडणे** अक्रि. पसारा करणे; इकडेतिकडे वाटेल तसे टाकणे : 'गाद्यांच्या वळकट्या, धोतरे, शर्ट अशा वस्तूंनी ही खोली गिचमिडलेली असते.' - व्यंमाक २५५.

**गिचाड** न. १. गर्द झाडी; दाट अरण्य. २. घनता; दाटी (अरण्य, झाडी इ. ची). पहा : **गचाड**

**गिच्च** क्रिवि. गच्च; दाट; गर्द; खेटून; गर्दीने. (क्रि. होणे, भरणे, घालणे, लावणे, लागणे.) पहा : **गच्च**

**गिच्च** पहा : **गिचगिचीत**

**गिच्चदाटी** स्त्री. निबिडदाटी; गर्द; चेप; गर्दी.

**गिच्ची** स्त्री. (भोवऱ्याचा खेळ) भोवऱ्याच्या खेळात एक भोवरा दुसऱ्या फिरत्या भोवऱ्यावर आपटून तो तसाच फिरत ठेवणे. पहा : **गुच्चा** [क.]

**गिजगड** स्त्री. घासाघीस : 'हैदराचे वकील आपाजीराम श्रीमंतासी गिजगड करीत होते.' - पेठे दभा २.२०.

**गिजगोळा** वि. लगदा; डिचका. (कर.) पहा : **गिचका**
[क. गिजटी = सपक व चिकट चवीचा.]

**गिजबिज** स्त्री. दाटी; गोंधळ. [का. गिजिबिजि]

**गिजबि(वि)जले** न. काचेच्या व सोन्याच्या मण्यांची माळ; गळसरी.

**गिजबिटणे** अक्रि. खरडणे : 'गोप्या पोरानं... बिल गिजबिटलं.' - मक १९६०.९९.

**गिजबिड-मिड** पहा : **गिचमिट**

**गिजरा** वि. घारा. (व.)

**गिजविजले** न. गळ्यातील एक प्रकारची माळ.

**गिटकडी-कारी** स्त्री. (संगीत) गळ्यातील कंप; कोणताही स्वर वाजवीत असता त्याच्या मागच्या व पुढल्या चार स्वरांना झटका देऊन उत्पन्न केलेला मिश्र स्वर.

**गिटकळी, गिटंगळी** पहा : **गटकळी, गटंगळी**

**गिटपिट** स्त्री. दुसऱ्याला न कळेल असे आपसातील हळू हळू बोलणे : 'तुम्ही दोन... अधिकाऱ्यांना सार्वजनिक जागेत गिटपिट करताना ऐकलेत...' - दोहस ६०. (क्रि. करणे)

**गिटार** न. एक तंतुवाद्य.

**गिट्टी** स्त्री. दगडाची बारीक खडी : 'ते चुन्याच्या निर्मितीसाठी आणि रस्त्यावर गिट्टी म्हणून पसरण्यासाठी वापरण्यात येतात.' - भाख ४४.

**गिट्टा** पु. खेळताना मारायची मोठी गोटी वगैरे. पहा : **घट्टा**

**गिडगाप** पु. हलक्या जातीचा जोंधळा : 'जोंधळा उमाप आला होता, पण तो काही नेहमीचा गिडगाप, डुकरी, शाळू असला नव्हता.' - उअं २०.

**गिडगिडिया-आ** पु. वाद्यविशेष : 'सुपरिवारें जय वाद्यें राय गिडगिडिआ गौमुखे भेटी।' - धउ ४७. पहा : **गिडबिडी** [ध्व. गिड]

**गिडगिडी** स्त्री. (सोनारी) करणीसारखे एक हत्यार; याने भांड्याच्या किनारीवर तोड्याच्या आकाराची गोलाई मारतात.

**गिडगि(बि)डी** स्त्री. एक वाद्य : 'मुखवातें सनया रसाळ। गर्जती ढोल गिडबिडी।' - ह २२.२७. [ध्व.]

**गिडगे** न. ससाणा. (गो.)

**गिडबिड** क्रिवि. डवराच्या आवाजाप्रमाणे (आवाज करणे.) [ध्व.]

**गिडबिडणे** अक्रि. खरडणे; ओरखडणे; रेखाटणे. [क. गीचु, गिचबिड]

**गिडबिडीत** वि. गिचमिड; खरडलेले; चिरखोड्या ओढलेले.

**गिडमंग्या** पु. झाडावरील एक प्रकारचा खेळ; सूरपारंब्या (बे.) [क.]

**गिडंगी** स्त्री. दारूचे दुकान. (प्रां.)

**गिडी** स्त्री. खाली रुंद पोट व वर अरुंद मान अशा आकाराचे भांडे; चंबू.

**गिड्ड-ड्डा** वि. ठेंगणा; खुजा. २. ठेंगणा व जाड; थपकट व बळकट. [क.]

**गिड्डबावले** वि. ठेंगू. (गो.)

**गिण** पु. कंपयुक्त, अनुनासिक आवाजदर्शक शब्द. [ध्व.]

**गिणगिण-णा** क्रिवि. १. गुणगुणत; गात; आवाज करीत. २. नाकातील आवाजाने; गोंगावत. [ध्व.]

**गिणगिण** स्त्री. १. नाकात बोलणे. २. गुणगुण; गाण्याचा, वाजण्याचा आवाज. ३. भुणभुण; रडरडून मागणे. [ध्व.]

**गिणगिणणे** अक्रि. १. नाकात बोलणे; गेंगाणा, नाकातील असणे. (शब्द, आवाज). २. गुणगुणने; गाणे; गोंगावणे (चिलट, घुंगुरटे).

**गिणगिणा-णीत** वि. क्रिवि. १. सानुनासिक; नाकातील (उच्चार). २. अस्पष्ट; गुळगुळीत. ३. गात; गुणगुणत (डास).

**गिणगिणाट** पु. (गिणगिणचा अतिशय) १. गुणगुणाट; गोंगाट; सर्वांचा मिळून मोठा आवाज (माशा, मच्छर, भुंगा यांचा). २. खणखणाट; घणघणाट; मोठा गोंगाट. ३. लांबचा व अस्पष्ट गोंगाट (विद्यार्थी किंवा लोकसमूह यांचा). ४. गिल्ला; त्रासदायक बडबड; कलकलाट. ५. लोकांची गुणगुण, कुरकूर.

**गिणगिण्या** वि. गेंगाणा; नाकात बोलणारा. [ध्व.]

**गिणणे** सक्रि. गणणे; मोजणे. [सं. गग्]

**गिणमिणचे, गणमणचे** अक्रि. सांगितलेले ऐकणे; दाद घेणे. (गो.)

**गिण्णाठे** न. पायलीचा ३२ वा भाग; अर्धे चिपटे; कोळवे. (गो.)

**गितस (सा) ई** स्त्री. एक लहान व सरळ वाढणारे झुडूप.

**गि (गी)द-ध** न. गिधाड : 'घारें गिदें बहुतीं येकमेकांथे झोंबती।' - क्रिपु ३३.१५.

**गिद-दा** पु. वजनाचे एक माप.

**गिद(दा)वा** पु. घराच्या धाब्यावर पसरण्याची (विटांच्या भट्टीतील) माती, चुरा; विटकरांची पूड.

**गिदळून** क्रिवि. खदखदून; खिदळून : 'तेव्हा ती गिदळून हसली व म्हणाली...' - आआशे ३१.

**गिदा** वि. फळातील गर. (झाडी.)

**गिदाडा** पु.१. केरकचरा; घाण. (ना. व.) २. अपमान. (झाडी.) वि. घाणेरडा.
**गिदार** न. शिंप्याचे अंगुस्तान. (गो.) [पोर्तु.]
**गिदी** स्त्री. नफ्याचा भाग; हिस्सेरशी.
**गिदीवारी** स्त्री. कागदपत्रांची पाहणी. -(तंजा.)
**गिधण** न. एक औषधी वनस्पती.
**गिधाऊ** पु. डोळ्यातील पू, चिपडे इ. (खा.)
**गिधाड** न. मृत जनावराचे मांस खाणारा पक्षी; गरुडवायले. [सं. गृध]
**गिधाडीमशीन** न. (मुद्रण) छापण्याचे एक यंत्र; कोलंबियन हँडप्रेस.
**गिनती** स्त्री. मोजदाद. [हिं.]
**गिनी** स्त्री. पूर्वी इंग्लंडात चालणारे एक सोन्याचे नाणे. आता हे चलनी नाणे नसून फक्त हिशेबी आहे. याची किंमत २१ शिलिंग ठरलेली आहे. [पोर्तु. गिने]
**गिनीघास** न. उष्ण प्रदेशात वाढणारे एक गवत : 'दीडशे वर्षापूर्वी आफ्रिकेतील उष्ण प्रदेशातून आणून येथे रूढ केलेले हे (गिनीघास) गवत आहे.' - वनश्री ४२४.
**गिन्ना** पु. खरवस; चीक (दुधाचा). (कर.) [क. गिण्ण]
**गिन्ना** क्रि. जुमानणे. (झाडी.)
**गिन्नी** स्त्री. भारतात चालणारे एक जुने धातूचे नाणे. याची किंमत एक आणा होती.
**गिन्यानी** वि. शहाणा; ज्ञानी : 'कोंबडा गिन्यानी उतार पडे याच्या कानी।' - जसा २०.
**गिबत** स्त्री. निंदा; चहाडी. (व.) [फा. गीबत]
**गिम** न. अळवाची एक जात.
**गिमवस** स्त्री. १. उन्हाळ्यात बाहेरून पाणी देऊन तयार केलेले (नाचणी, भात यांचे) शेत. २. अशा तऱ्हेचे पीक, धान्य. [सं. ग्रीष्म]
**गिम(म्ह)वा** पहा : **गिमवस** २
**गिमावणे** अक्रि. उन्हाळ्यातील त्रासाने (चारा, पाणी यांच्या अभावाने) मलूल होणे, सुकणे, रोडावणे (पशू); उन्हाळा बाधणे. (राजा. कु.)
**गिमाळा** पु. उन्हाळा : 'आपदेचा मोडवा भंगला।.आला आनंदु गिमाळा।' - ख्रिपु २.५२.४८. पहा : **गीम**
**गिरकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. गरगरा; गरगर (भोवरा इ. वाटोळे फिरणे). [ध्व.]
**गिरकणे** अक्रि. गोल गोल फिरणे. [क. गिरी = फिरणे]
**गिरका** पु. १. कापसातील सरकी काढण्याचे यंत्र, जीन. २. फेरी; चक्कर; गिरकांडा. पहा : **गरका**
**गिरकावणी** स्त्री. अतिशय वेगाने एका बिंदूभोवती फिरवणे, घुसळणे यासाठी वापरायचे साधन. : 'दुधातले ओषट गिरकावणीने बाजूला काढल्यावर...' - वनश्री ९.
**गिरकांडा-डी, गिरकंडा** पु. स्त्री. १. गरका; चक्कर; भोवरी; वेढा; फेरा; वळसा. (क्रि. देणे, मारणे; घेणे, घालणे.) २. भोवांडा; वाटोळा रस्ता; घेर. (क्रि. खाणे, घेणे, घालणे, (उलट) बसणे, पडणे.) ३. एखाद्या ठिकाणी जाऊन येणे; हेलपाटा. ४. (ल.) द्राविडी प्राणायाम; चर्पटपंजरी. ५. (ल.) गोंधळ; घोटाळा; गळफाटा. (क्रि. पडणे).
**गिरकी** स्त्री. १. पहा : **गिरकांडा** १, २. (क्रि. मारणे, देणे, खाणे, घेणे.) २. भोवंड; घेरी. (क्रि. येणे.) ३. (गाण्यातील) कंप; तान. (क्रि. घेणे.) ४. झपाट्यात गोल फिरण्याची क्रिया.
**गिरके** न. घेरी; घुरे; अपस्मार, फेफरे यांचा झटका. (क्रि. येणे.) पहा : **गिरगिरे**
**गिरगटण** न. दाट सारवणे; गिरगटणे. (व.)
**गिरगटणे** उक्रि. फासणे; सारवणे (भांडी, जमीन). (प्रां.) पहा : **गरगटणे** [क. गीचु = खरडणे, गिरू = ओरखडणे]
**गिरगिटाविणे** पहा : **गिरविणे**
**गिरगिर-रा** क्रिवि. गोलगोल; भोवताली (फिरणे, भोवंडणे). [ध्व.]
**गिरगिरणे** अक्रि. १. सभोवार फिरणे; गोलगोल फिरणे; वाटोळे भोवंडणे. २ गरगरणे; चक्कर, भोवळ येणे; फिरणे (डोके).[क. गिरिगिरितिरगु]
**गिरगिर माथा** एकमेकांचे हात धरून गोल फिरण्याचा मुलांचा खेळ.
**गिरगिर मासा** पु. गोल फिरून खेळण्याचा मुलींचा एक खेळ.
**गिरगिराट** पु. फिरणाऱ्या चाकाचा होणारा आवाज : 'त्याच्या सायकलच्या चाकांचा गिरगिराट वामनरावांच्या कानी आला.' - जांदि ३१.
**गिरगिरी** स्त्री. घेरी; मूर्च्छा; भोवंड. (क्रि. येणे.) : 'तशा संधी हाणी नर शर तयानें गिरगिरी।' - वामन विराट ७.१६९.
**गिरगिरे-री** न. स्त्री. १. खेळणे; लाकडी किरकिरे. २. हवेने फिरणारे कागदी भिरभिरे.
**गिरगिरे** न. एका खांबावर एक लहान लोखंडी कांब गरगर फिरवून खेळण्याचा जुगार. (गो.)
**गिरगिंडा** पु. १. माणसांचा गराडा; पहा : **गरका, गिरकांडा**. २. (ल.) भेसळ; मिसळ; खिचडी; काला (अनेक वेगवेगळ्या वस्तूंचा).
**गिरगोट** पु. उडता पतंग खाली पाडण्याकरता लहान दगडाला दोरा बांधून केलेले एक साधन. (ना.)
**गिरचटणे** उक्रि. जमीन, भांडी खसखसा घासणे; गिरगटणे. (प्रा.)
**गिरजाघर** न. चर्च. [पो. इग्रेजा]
**गिरटी** स्त्री. १. घिरटी; प्रदक्षिणा; वळसा; फेरी (क्रि. घालणे.) २. फेरी; गिरकी; भोवरी. ३. (ल.) घिरट्या; येरझारा; जा ये; फेरे.
**गिरड-प** पु. मगज; गर. (गो.)
**गिरण-णी** स्त्री. कापसाचे सूत काढण्याचा, गट्ठे बांधण्याचा, दळण दळण्याचा इ. कारखाना; सामान्यतः यंत्रावर चालणारा उद्योग.
**गिरणगाव** पु. गिरण्या व कारखाने असलेला शहराचा भाग.
**गिरणूळ** पु. स्त्री. खरजेवर वापरले जाणारे एक वनस्पतीचे मूळ.
**गिरदनी** स्त्री. उशी. (गो.) पहा : **गिरदी**
**गिरदा** स्त्री. खीर : 'आत शोभती गिरदाची वाटी।' - जसा ४९५.
**गिरदा** पु. १. हुक्याच्या खालचा लहान गालिचा, बैठक. २. गिर्दी; उशी. ३. घेरा; गराडा. [फा. गिर्दा]
**गिरदार** वि. मांसल, गर असलेले (फळ).

**गिरदी** स्त्री. १. लहान वाटोळी उशी. २. (ल.) ठेंगणीठुसकी, गुबगुबीत स्त्री. [फा. गिर्दा]

**गिरपथा** पु. घोड्याच्या शिरा आखडणारा एक वायुरोग; वात. - अश्वप २.१८२.

**गिर (रि) फतार-दार, गिरफ्तार** वि. १. अडकलेला; कैदी; बद्ध; बंदी. (क्रि. करणे). २. निमग्न : 'तोपर्यंत याच मनसुब्यांत गिरिफदार आहो.' - मइसा १.९७. ३. विवंचनामग्न; चिंतातुर. [फा.]

**गिर (रि) फतारी-दारी** स्त्री. १. अटक; कैद; बंदी; बंधन. २. विवंचना; काळजी; चिंता : 'आम्हांसारखे आहेत ते गिरफदारींत मग्न असतात.' - ऐलेसं १.३९. [फा.]

**गिरब (बि) डणे** अक्रि. १. माखले जाणे; लडबडणे; बरबटणे, २. खरवडणे.

उक्रि. माखणे; सारविणे (चिखलाने) : 'जैसें बाभुळीचें खोड। गिरबडूनि जाती सरड।' - ज्ञा १३.५६२. (व.)

**गिरबडा** पु. सारवण. (व.)

**गिरबा(वा)ळणे** अक्रि. ओलसर होणे; गारठणे; ओला होणे : 'सकाळच्या पारी हरी कशानं गिरबाळीला।' - जसा ४४९.

**गिरबुजली** वि. खुजी; ठेंगू (मुलगी). (गो.)

**गिरबुजी** स्त्री. पोफळीच्या झाडाच्या गाभ्यातून निघणारा चुरा : 'स्वामियाची अनुग्न्या न्हवे तरि। गिरबुजी पण न पडे भूमीवरि।' - क्रिपु ८.११४.

**गिरबॉ** पु. सामता. (गो.)

**गिरभी** स्त्री. पोफळीच्या किंवा सुपारीच्या झाडाच्या गाभ्यातून निघणारे शिंपूट, तुरा, कणीस. (राजा.) [सं. गर्भ]

**गिरमाळ** वि. डोंगरावरील नापीक, पठाराचा (प्रदेश).

**गिरमि(मी)ट** न. करार; मुदतबंदी (मजुरांची).

**गिरमिटणे** अक्रि.गोल गोल फिरणे : 'एकट्याच्या भोवती रात्र गिरमिटते.' - ध्रुपद ८१.

**गिरमीट, गिर्मिट** न. एक प्रकारचा सामता; भोक पाडण्याचे एक हत्यार.

**गिरव, गिरवी, गिरो** न. गहाण. [फा.]

**गिरवणी** स्त्री. अक्षरवळणी; घोटणी.

**गिरवणे** सक्रि. बाहेर काढणे; पकडणे : 'एक टोळ काटकीच्या शेव्याला बांधून ती बिळात घालून खेकडी गिरवताना ते दिसत.' - आआशे १७३.

**गिरविणे** उक्रि. १. वळविणे; कित्यातील अक्षरांच्या वळणावरून (शाईत न बुडविता) लेखणी फिरवणे; घोटणे. २. (कित्ता) (ल.) सारखे वागणे; बरहुकूम करणे.

**गिरंदार-बार** वि. श्रीमंत व तालेवार (मनुष्य).

**गिरा** पु. १. ग्रह. पहा : **गिऱ्हा**. २. भुतावळ. [सं. ग्रह]

**गिरा-ऱ्हा** पु. १. दीड तसूचे (गजाचा एकचवदांश किंवा एक सोळांश भाग) कापड वगैरे मोजण्याचे साधन : 'तोफ लांबी दहा गज दोन गिरे आली.' - मइसा ७.२६६. २. तुकडा. (व.)

**गिरा** पु. संकट : 'ग्रह उच्चटले शनि पालटले आता दूर येथोनि गिरा।' - ऐपो १९.

**गिरा** स्त्री. वाचा; भाषा; वचन; वाणी. [सं.]

**गिरागोटा** पु. व्याधी. (झाडी.)

**गिराडा** पु. अव. आयुष्य. (झाडी.)

**गिराण** न. ग्रहण. (चंद्र-सूर्य ग्रहण.) [सं. ग्रहण]

**गिराणी** स्त्री. १. संकट; ओझे; दुःख; वाईट दिवस : 'लोकांस खर्चाची गिराणी फार आहे.' - मदबा १.७०. २. रुष्टता : 'मर्जीस गिराणी येईल.' - मइसा १०.२५३. ३. जेरी (क्रि. येणे); मेटाकुटी : 'किल्लेवालेहि गिराणीस आले आहेत.' - मदबा १.२०७. ४. महागाई; दुष्काळ : 'लष्करांत गिराणी फार म्हणून लोक बहुत हैराण...' - दिमरा २.१० [फा. गिरानी]

**गिरामी** वि. श्रेष्ठ; पूज्य; थोर; मोठी; फार. [फा.]

**गिरावण, गिरवाण, गिरेबान** न. अंगरख्याचा खांद्याचा भाग. [फा.]

**गिरावळ** स्त्री. अत्यंत रडके पोर. (राजा).

**गिराशा** पु. लुटारूचा धंदा करणारी एक रजपूत जात : 'तेथें गुजालसिंग म्हणोन गिराशा होता.' - भाब ३७.

**गिराशी-सी** पु. गुजराथेतील एक जमीनधारक जात. यांना मराठे, वाटमारे, लुटारू समजत असत.

स्त्री. गिराशांचा धंदा; वाटमारी. [सं. ग्रास]

**गिराशीचा शिरस्ता** घाटातील गिराशी (भिल्लासारखी वन्य जमात) संस्थानिकांना निर्धोक वाहतूकीसाठी जो कर किंवा पट्टी देतात ती.

**गिरास** पु. गिराशांचा धंदा; लूट. पहा : **गिराशी**

न. गिराशींची टोळधाड, समुदाय, टोळी (लुटण्यास निघालेली).

स्त्री. गिराशी लोकांचे वतन : 'गिरास पूर्वीप्रमाणे आम्ही घेत आलो त्याप्रमाणे महालकरी देत नाहीं.' - दुबारो ५.१६४.

**गिरास** पु. घास : 'देवानी चूळ आंजूळ घेतली. पहिला गिरास घेतला.' - आलो ४५.

**गिरासपण** न. १. लुटालूट. २. (ल.) स्वारी; शिकारी; मोहीम.

**गिरि-री** पु. पर्वत; डोंगर. [सं.]

**गिरिकपाट** न. डोंगरातील गुहा : 'दरेदरकुटें : गिरिकपाटें' - लीचपू १७.

**गिरिकंदर-रा** पु. स्त्री. डोंगर-पर्वतातील गुहा; दरीखोरी; कपार : विवर: 'कपी सांडिती युद्धसंग्राम भूमी। निघाले गिरीकंदरी वृक्ष गुल्मी।' - मुरामायण, युद्ध १६०.

**गिरिगीता** स्त्री. येशूख्रिस्ताचा पर्वतावरील उपदेश.

**गिरिघोटी** स्त्री. १. (मुलांचा खेळ) ओवळ्याभोवळ्या; आळ्यामाळ्या. २. गिर्की; फेरा; हेलपाटा. (क्रि. घालणे, करणे, लागणे.)

**गिरिजन** पु. डोंगराळ प्रदेशातील मूळ रहिवाशाचा वंशज.

**गिरिजाघर** न. चर्च. ख्रिस्ती धर्मीयांचे प्रार्थनामंदिर.

**गिरिपिंड** पु. (भूशा.) चोहोबाजूंनी विभंग अथवा वळी असलेला व मध्ये उठून दिसणारा मोठा डोंगर.

**गिरिफ्तन** मध्येच हिराऊन किंवा पकडून नेलेला.

**गिरिबदार** वि. गरीब; दरिद्री; संकटग्रस्त.

**गिरिभ्रमण** न. प्रवास.

**गिरिरी, गिरी, गिरीगिरी, गिरिविरी** स्त्री. मूर्च्छा; घेरी; चक्कर; भोवंड :

'तेणें घाए गिरिरी आली।' - शिव १०६६; 'आले शहरांतून गरकन झरकन आली पहातां मज गिरी।'. - पला ४.२; 'गिरीविरी आणि अंधारें।' - दास ३.६.२६. [क. गिरी = फिरणे]

**गिरिस्तन** चिताक्रांत : 'श्रीमंत दादासाहेबांची स्वारी या प्रांतीं आली त्यामुळे ते गिरिस्तन.' - ऐलेसं ९५७.

**गिरी** स्त्री. १. गिरकी; फेरा; वेढा; वर्तुळाकार भ्रमण : 'पांचचार गिऱ्या मारीत अगदीं दमून जमिनीवर बसतात.' - विछ १०. २. घेरी; मूर्च्छा.

**गिरी** पु. (दसनाम) गोसावी जातीतील एक शाखा; भेद : 'वाळकेश्वरातसुद्धा गिरी, पुरी, बैरागी लोकांची वस्ती आहे.' - विनाभा ७.

**गिरीघोटी** स्त्री. १. हेलपाटा; खेटा; २. झोका; फिरका.

**गिरीफदार** सचिंत किंवा गर्क.

**गिरीबदारी** स्त्री. चिंता; दीनस्थिती : 'त्याजकडे यास पाठवावे तरी हे आपले गिरीबदारीमध्ये फारच आहेत. यास्तव पाठविले नाहीत.' - पेद.

**गिरीविरी** पु. एक प्रकारचा रोग.

**गिरेबाज** वि. हवेत उडताना गिरक्या मारण्यास शिकवलेले (कबूतर).

**गिरेबान** स्त्री. गळपट्टी. [फा.]

**गिरेस्तकाय** स्त्री. श्रीमंती; ऐश्वर्य. (गो.)

**गिर्कांडा-डी, गिर्की, गिर्गिर, गिर्टी** पहा : **गिरकांडा**

**गिर्गोट** पु. १. सुतांची काटछाट. २. एक खेळ. (झाडी.)

**गिर्द** क्रिवि. भोवती; सभोवार : 'सर्व फौजा दिल्लीचे गिर्द जाऊन रसद बंद करावी.' - दिमरा १.२६६.

स्त्री. १. परिघ; घेर; सभोवतालचा प्रदेश : 'नवशें रुपयांचे जमेचा गाव झांशी गिर्दीत तजवीज करणें.' - ऐटि ३.५७. २. चौकी : 'अल्पिष्टनसाहेब यांणी शहराभोंवतीं गिर्द बसवून...' - मइसा १४.६४. [फा.]

**गिर्दनवाई-ही** स्त्री. १. (किल्लाकोट यांच्या) भोवतालचा प्रदेश; आसमंतातील भाग : 'गिर्दनवाईचे गांव लुटून उद्‌ध्वस्त केले.' - मइसा १४.२०. २. भोवतालच्या प्रदेशाचे संरक्षण. [फा.]

**गिर्दनवाजी** पु. गस्तकरी; किल्लेकरी : 'गिर्दनवाजी गनिमाकडील अंताजी माणकेश्वर आहे त्यास पुसावें.' - भाब २०.

**गिर्दवारी** स्त्री. १. पहा : **गिर्दावरी**. २. मुशाफरी. (व.)

**गिर्दाब** पु. भोवरा. [फा.]

**गिर्दावरी** स्त्री. १. जमवाजमव : 'तूं बाहेर खेमे दाखल होऊन फौजेची गिर्दावरी करावी.' - मइसा ५.७८. २. बंदोबस्त. ३. जकातवसुली; जकात बंदोबस्त. [फा.]

**गिर्दी** स्त्री.१. लहान उशी; गिरदी.२. किल्ल्याच्या घेराचा प्रदेश. ३. गस्त; घरटी; पहारा. [फा. गिर्दा]

**गिर्नी** स्त्री. मूर्च्छा, भोवळ. (झाडी.)

**गिऱ्या** पु. ग्रह : 'तो सायबानं गगनात सोडलेला फिरता गिऱ्या!' - जैत ५४.

**गिर्यारोहक** पु. एक क्रीडा म्हणून पहाड, डोंगरकडे चढणारी व्यक्ती; डोंगर, पहाड चढण्याचा छंद असलेली व्यक्ती.

**गिर्यारोहण** न. डोंगर, पहाड इ. चढण्याचा छंद; एक साहसी क्रीडा. [सं.]

**गिर्रेबाज** वि. १. गिरक्या घेणारा. २. नखरेल; स्वत:कडे लक्ष वेधून घेणारी; तरतरीत व देखणी. [फा. गिरहबाज]

**गिर्वड** स्त्री. कटकट. (गो.)

**गिर्वा-व्हा** पु. ढालीचा एक प्रकार.

**गिर्वीदगी** स्त्री. १. निष्ठा. २. अगत्य; पाहुणचार : 'मर्दमाणूस लोकांस गिर्विदगी करून कित्येकांचे पारिपत्यच केलिया उत्तम आहे.' - ऐटि २.७१. [फा.]

**गिऱ्हवाळ** स्त्री. गिरावळ; गिऱ्हाची पीडा; भुतावळ. पहा : **गिऱ्हा** ३.

**गिऱ्हा** पु. १. जलग्रह; पाण्यातील पिशाच. २. राहू (चंद्राला ग्रासतो म्हणून); ३. ग्रहण. ४. रोडके, भुतासारखे पोर. ५. (ल.) त्रास; कटकट; पीडा (एखाद्याला लागलेली). [सं. ग्रह]

**गिऱ्हाइकी-यकी** स्त्री. १. धंदा; व्यापार; वर्दळ; वहिवाट (माल खरेदी-विक्री करणारांची दुकानावर). २. माल घेणारा वर्ग, लोक.

**गिऱ्हाईक-यीक** पु. न. माल खरेदी करणारा, सामान्यत: माल घेणारा वर्ग. [सं. ग्रह] (वा.) ० **मरणे** - गिऱ्हाईक पटविले जाणे. ० **मारणे** - आपल्याकडे गिऱ्हाईक ओढून घेणे, पटकविणे.

**गिऱ्हाण** न. ग्रहण. [सं. ग्रहण]

**गिऱ्हाद** वि. दारूने झिंगलेला. (गो.)

**गिऱ्हावळ** स्त्री. भुताची पीडा.

**गिऱ्हे** पहा : **गिऱ्हा, ग्रह**

**गिऱ्हेपूजन** न. लग्नाच्या वेळी केलेले ग्रहांचे (सूर्य व इतर ग्रह यांचे) पूजन, ग्रहमख; ग्रहशांती. [सं. ग्रहपूजन]

**गिऱ्ह्या** पु. भूत : 'एक गिऱ्ह्या बाटलीत भरून त्या जागेतल्या उंबराखाली पुरला होता...' - स्मगा २९.

**गिलका** पु गोंगाट; कल्ला; गलका : 'शंकरला बघताच सारे गिलका करून ओरडले.' - माणूस १८५.

**गिलकारी** स्त्री. चिखलमातीचे बांधकाम : 'मध्यें पुरवणीस गिलकारी व धोंडे घालून पुरवणी भरतो.' - वसमो. [फा. गिल = चिखल]

**गिलकी-ची-के** पहा : **घोसाळी, घोसाळे**

**गिलके** न. फाटक; दार; झापा (काठ्या-कामट्यांचा). (खा.)

**गिलगिली** वि. ओलीचिंब. (व.) [सं. गिल]

**गिलगिलीत** वि. १. बिलबिलीत; गलगलीत; थलथलीत (अधिक पिकलेले केळे इ.) २. मऊ आणि दबदबीत (राड, गाळ). पहा : **गिळगिळीत** [सं. गिल]

**गिलचा** पु. पठाणांची एक जात.

**गिलबिले** न. सरीसारखा एक दागिना; गिजबिजले. (गो.)

**गिला** वि. १. ओला. २. थुलथुलीत. ३. पांचट, ओशट. (झाडी.)

**गिला-ल्ला** पु. १. ओरडाओरड; गोंगाट; गडबड; गलबल : 'येथें कांहीं गिल्ला पडणार नाहीं.' - मराचिथोरा ३०. २. तक्रार; गाऱ्हाणे; फिर्याद; निषेध. (क्रि. करणे, सांगणे, येणे, पडणे, होणे.) : 'भटजीनीं नानाप्रकारे इकडील गिला दरबारात लिहिला आहे.' - ऐलेसं २.३२५. ३. हाकाटी;

नालस्ती; निंदा. (क्रि. सांगणे.) ४. रडगाणे (प्रपंचादी संबंधी). ५. दोष; ठपका : 'या गोष्टीचा गिला आम्हांकडे नाहीं.' - मइसा ७. [फा. गिला]

**गिलाणी** स्त्री. आर्जव; विनवणी : 'सावकारार्थेंज जातो नि गिलाण्यो करून दिवाळ्येसर वायदो करून येतो.' - मसाप २.२६९. (राजा. कुण.)

**गिलावस** स्त्री. पाणथळ जमीन : 'जमीन गिलावस व कडधन व सर्दभात येणेंप्रमाणें.' - समारो ४.६०. [फा. गिल = चिखल]

**गिलावा** पु. १. बांधकाम झाल्यावर ते गुळगुळीत व सपाट दिसावे म्हणून त्यावर दिलेला माती, चुना, सिमेंट इ. थर, लेप : 'तिच्या आतल्या भिंती तर गुळगुळीत गिलावा केलेल्या होत्या.' - व्यंमाक १३. २. लिंपण; सारवण; मुलामा (देणे, चढविणे). [फा.]

**गिलाशिक्वा** पु. तक्रार; कागाळी : 'न जाणे, पूर्वी खोजीमकुली खानांहीं गिल्ला-शिक्वाही आमचा काय लिहिला असेल.' - मइसा ६.६०२. [हिं.]

**गिलास** पु. ग्लास; पाणी पिण्याचा पेला (काच, धातू इ. चा).[इं. ग्लास]

**गिलि(ली)ट** न. मुलामा; पाणी (चांदी, पितळ इ. धातूला दिलेले); लेप. [इं. गिल्ट]

**गिलेगुजार, गिळूगिर** वि. १. दुखावलेला. २. रुष्ट : 'हे वृत्त शहाजीस समजल्यावर बहुल गिलेगुजार आहेत.' - दिमरा २.२३. [फा.]

**गिलेगुजारी** स्त्री. १. रुष्टता. २. तक्रार : 'भवानी कुंवर ही दरबारास जाऊन खलबत करितात म्हणून बहुत गिलेगुजारीनें लिहिलें होतें.' - दिमरा २.२३. [फा.]

**गिले(ली)फ** पु. अभ्रा (उशी, लोड, तक्या इत्यादीवरील); आच्छादन. पहा : **गलेफ** [फा. गलेफ]

**गिल्ली** स्त्री. विटी. (व. ना. काशी) [हिं.]

**गिवणे** क्रि. शांत होणे.

**गिवस** पु. शोध : 'कीं संध्यासरोवरीं । सारसिचा गिवसू। करु आला सोनेयाचा सारसू।'- रुस्व ४७०.

**गिळगिळीत** वि. गळगळीत; काठोकाठ; घळघळीत. [सं. गल]

**गिळगिळीत** वि. ओलसर, बुळबुळीत, किळसवाणा स्पर्श असलेला : 'ओलातून वळवळतात त्या जिवाणूसारखा तो गिळगिळीत वाटू लागतो.' - गाणे ४३.

**गिळगिळीत** वि. गळगळीत; बेचव; पाणचट; नीरस. [सं. गल् = गिळणे]

**गिळणे** उक्रि. १. गट्ट करणे; गळ्याखाली उतरवणे. २. (ल.) शोषून घेणे; खाऊन टाकणे (पारा सोने शोषतो, भाकरी तूप शोषून घेते त्याप्रमाणे). ३. (ढग, राहू इत्यादींनी) ग्रासणे; व्यापणे; घेरणे : 'गौतमपत्नी गिळिली होती जे पापतापशापाहीं।' - भक्तमयूर केका ४. ४. लाच खाणे. ५. दाबणे; दडपणे; आत कोंडणे; आतल्या आत चेपणे (अश्रू, राग, दुःख). ६ (अपकार, अपमान, अपराध) सहन करणे; पोटात घालणे; प्रतिकार न करणे. ७. बळकावणे; लाटणे; लुबाडणे. [सं. गल् = गिळणे]

**गिळंकृत** वि. गिळलेले; लुबाडलेले; बळकावलेले (धन, पैसा, ठेव).

**गिळंकृत कन्यादान** १. नवऱ्या मुलाकडून पैसा घेऊन मुलगी देणे. (क्रि. करणे.) २. एखाद्या म्हाताऱ्याला मुलगी देणे (उद्देश हा की म्हातारा जावई वारल्यावर त्याच्याकडून मुलीला विकून घेतलेल्या पैशाखेरीज त्याच्या मालमत्तेवर गबर व्हावे.)

**गिंट** वि. दुहेरी सुताच्या विणीचे; भक्कम (लुगडे, कापड.) (कर.) [क.]

**गिंडी** स्त्री. १. खाली रुंद पोटाचे, लहान गळ्याचे व अरुंद, चंबूसारखे तीर्थ ठेवण्याचे भांडे. २. सतेले. ३. झारी. - (तंजा.) [क.]

**गिंती** स्त्री. गणती; मोजदाद : 'माणसांची गिंती ठेवणें इत्यादि सूचना देण्यांत आल्या.' - वि ४.९.१९३९.

**गिंधी** स्त्री. भूतकाळातील अप्रिय घटना : 'झालं गेलं पार पडीं। नको काढू आता गिंध्या।' - बगा ११२.

**गिंध्यान** स्त्री. गांधीलमाशी. (व.)

**गिंध्यान** स्त्री. एक औषधी वनस्पती. (व.)

**गिंवसण** स्त्री. उशीचा अभ्रा. पहा : **गवसणी** (गो.)

**गिंवसणे** पहा : **गवसणे** : 'जेंयां वेदांची आम्हा आशु। तेयां गिवसितां जाले सायासु।' - शिव ८३.

**गिंवसु** पु. विस्तार.

**गी** स्त्री. वाणी; वाचा; वचन : 'आठां पुत्रांतें दे राज्यें प्रभुवन करि सत्या गी।' - मोरा १.२०६. [सं.]

**गीझर** पु. (वि.) पाणी तापविण्याचे विजेवर, इंधनवायू (गॅस) वर, सौरशक्तीवर चालणारे साधन. [इं.]

**गीडबीड-डे** न. एक वाद्य. पहा : **गिरबिड** : 'दीडीची गीडबीडी दुटाळा।' - कृमुरा ६५.३०.

**गीत** न. १. गेय शब्दरचना : 'गीतभाटीव तो श्रवर्णीं। कर्णजपु॥' - ज्ञा १७.२९७. गीतांचे प्रकार दोन - गांधर्व व गान. २. गाणे; पद : 'सुखगीत नृत्य तेथें मजलाही तोच एक थारा हो।' - मोसभा १.३३. ३. गाणे म्हणणे; पद गाणे. ४. दळताना किंवा लग्नात म्हणतात त्या ओव्या. ५. पदाचा छंद, वृत्त; छंदोबद्ध गाण्यातील एक भेद.
वि. गायिलेले; म्हटलेले. [सं. गै = गाणे] (वा.) **नावे गीत गाणे** - कोणी आपले कल्याण केले असता त्याच्या अपरोक्ष त्याची स्तुती करणे. **गीत गाणे** - १. दुसऱ्याजवळ आपली सर्व हकीगत सांगणे; रडगाणे लावणे. २. तेच तेच सांगणे; एकच धरून बसणे.

**गीतकार** पु. गीते रचणारा; पद्यलेखक; गाणी लिहिणारा.

**गीतमात-न** न. स्त्री. गायनादि कला; गाण्याच्या (संगीतातील) मात्रा, अंतरा, नियम वगैरे.

**गीतरचना** स्त्री. विशेषतः चित्रपट, नाटक, ध्वनिमुद्रिका. इ. साठी चाल लावता येईल अशी गाणी लिहिणे : 'चालीवर गीतरचना करण्याचें हें बंधन...' - प्रभात १७.

**गीतसाळ** स्त्री. गायनशाळा : 'गीतसाळ करी कुडी। किन्नरांची।'-उगी २२.

**गीतसुड** पु. पोवाडा; विजयगान : 'तयाचा गाति गीतसुडु। किन्नर पर्वतीं।' - रुस्व २५८.

**गीतस्वर** पु. मधुर आवाज.

**गीता** स्त्री. तत्त्वविवेचनाचा पद्यात्मक संवादरूप ग्रंथ.

**गीति-ती** स्त्री. १. एक छंद; आर्येचा एक प्रकार; मोरोपंती आर्या. याचे चार चरण असून पहिल्या व तिसऱ्या चरणात प्रत्येकी मात्रा १२ व दुसऱ्यात व चवथ्यात १८ मात्रा असतात. २. गाणे; गीत. [सं.]

**गीतोपयोगी नाद** (संगीत) ज्या नादात अखंडता, स्पष्टता व माधुर्य हे गुण तसेच प्रमाणबद्धता असते तो नाद.

**गीद-ध** पु. १. गिधाड : 'करितां रामनामस्मरण। गीध भक्षण करूं न शके।' - भारा किष्किंधा १६.९०. २. घार. [सं. गृध]

**गीधधार** पु. गिधाडांचा समुदाय.

**गीम-म्ह** पु. उन्हाळा : 'आकाश तर गीमासारखंच तळपत होतं.' - रात्रकाळी २३५. पहा : **गिम** (राजा कु. गो.) [सं. ग्रीष्म]

**गीमदिवस** पु. अव. उन्हाळा : 'गीमदिवसांत मरतुकडी दिसणारी नदी...' - तोरण २७६.

**गीर** स्त्री. रेघ.

**गीर** पु. गर; मगज; दळ; गाभा; सार. पहा : **गर**

**गीर** पु. सोरटी बैल; काठेवाडी गाई बैलांची जात.

**गीर** अ. एक प्रत्यय; काम करणारा, कर्ता या अर्थी नामाला जोडून येणारा प्रत्यय. जसे :- दस्तगीर, तमासगीर. पहा : **गर, गार** [फा.]

**गीर्दपाषाण** पु. घोड्याचा एक रोग. हा पायाला होतो. - अश्वप २.२५८.

**गीर्दपेश** क्रिवि. आसपास; सभोवार : 'मौजे रीयाचे गीर्दपेश दाहा कोसांत पाणी नव्हतें.' - पेद २.१५. [फा.]

**गीर्दवारी** स्त्री. जकातवसुली; जकातबंदोबस्त : 'सबब बागाइतास गीर्दवारी बसविली आहे.' - समारो ६.२२७. [फा.]

**गीर्वाण** पु. देव; देवता.

स्त्री. न. १. भाषा, भाषण, बोलणे : 'बळिराम आणि जगज्जीवन। बोलती स्वर्गीचे गीर्वाण।' - ह १४.१८३. २. दैवी भाषा; देवभाषा; संस्कृत भाषा : 'गीर्वाण शब्द पुष्कळ जनपद भाषाचि देखतां थोडी।' - मोरोपंत स्फुट आर्या (नवनीत पृ. २५४). [सं.]

**गीर्वाण-णी** वि. ईश्वरी; दैवी; स्वर्गीय.

**गीर्वाण** न. अंगरख्याच्या मानेचा (वस्त्राचा) तुकडा. पहा : **गिरावण, गिरवाण**

**गील** पु. गर; मगज; दळ. पहा : **गीर**

**गीळ, गिळ** पु. गळ्याची एक बाजू. (गो.)

**गुइरे** न. गुवाचा कपडा.

**गुखडी, गुखाड-डी** स्त्री. सर्वजण शौचाला जातात ती जागा; हगीनदारी.

**गुगल** न. इंटरनेटच्या जाळ्यात सर्वात जास्त वापरली जाणारी आणि नेमकी माहिती कमीतकमी वेळात शोधून काढणारी यंत्रणा.

**गुगुलिपीड** गुग्गुळाच्या झाडापासून निर्माण होणाऱ्या गोंदापासून निर्माण होणारा पदार्थ. याचा उपयोग रक्तातील मेद कमी करण्यास होतो.

**गुग(गु)ली गोलंदाजी** (क्रिकेट) हळू पण फसवी गोलंदाजी; गिरकीबाज गोलंदाजी : 'गुगुली गोलंदाजीमुळें प्रसिद्धीस आलेले ऑस्ट्रेलियन गोलंदाज...' - के ४.२.१९४१.

**गुगुपंजर** न. एक औषध; डोळ्यात फूल पडल्यास त्यावरील औषध : 'गुगुपंजर लिंबाचे रसांत घालून लावावें.' - अश्वप २.१२१.

**गुगुळनृत्य** न. धनगराचा एक नाच : 'धनगरांचा केवळ नृत्याचाच - गुगुळ नावाचा प्रकार आहे.' - मलो १९.

**गुगोबर** पु. विष्ठा. (झाडी)

**गुग्गल** पु. दक्षिणेत लिंगायतांवर बसवीत असत ते कर.

**गुग्गु(ग)ळ** पु. लिंगायत लोकात विवाहापूर्वी करायचा एक विधी. दोन फुटक्या मडक्यात विस्तव घेऊन मिरवणूक काढतात व नंतर ते फोडून टाकतात. (क्रि. काढणे.) (वा.) **गुगुळ काढणे** - भेद काढणे.

**गुग्गु(गु-गू)ळ** पु. १. एक काटेरी झाड. याच्या चिकाचा धूप करतात. हा सुगंधी असतो. हे झाड औषधी आहे. २. गुगुळाचा चीक; धूप : 'जैं घे फुलागंधाचा गुगुळु।' - ज्ञा १७.२९८. [सं. गुग्गुलु]

**गुग्गुळी** स्त्री. हत्तीवेल.

**गुघाण** पु. १. गुवाची घाण, दुर्गंध; हगीनदारी. २. (ल.) अत्यंत दुर्दशा; अनिष्टावस्था; दैना. ३. घोटाळा; गैरव्यवस्था; गोंधळ (कारभार, संसार, वस्तू इ. चा). ४. नासाडी. (क्रि. होणे.)

**गुचकी** स्त्री. १. उचकी. (राजा.) २. गटांगळी : 'पोहणारचि गुचक्या खातो।' - दास १७.४.४. [ध्व.]

**गुचकुला** वि. लहान व गोंडस; चिमुकला. (को.)

**गुच्चा** पु. १. भोवऱ्यावर भोवरा मारून पडलेला अरीचा खोचा. (क्रि. मारणे.) पहा : **गिच्ची**. २. (ल.) पोचा; खोचा; खोलगा. ३. बुक्का; ठोसा; चिमटा. ४. आट्यापाट्याच्या खेळातील हुलकावणी. [क. गुच्चु]

**गुच्चापाणी** न. मुलांचा एक खेळ.

**गुच्ची-च्छी** पहा : **गुच्चा** १, २, ३.

**गुच्छ, गुच्छक** पु. १. झुबका; गोंडा; घड; घोस; गेंद; तुरा; गोटा (फुले, फळे, पाने वगैरेंचा) : 'झाला धीर परि परिम्लान सखा जातिपुष्पगुच्छक सा।' - मोभीष्म १०.९३. २. माळ; हार; कंठा. ३. जुडी; जुडगा; जमाव. ४. गवताची पेंढी. [सं.]

**गुछली** स्त्री. अंगठा व करंगळी याभोवती वेढून केलेली दोऱ्याची विशिष्ट आकाराची गुंडाळी.

**गुज** न. गुपित; गूढ; गुप्त गोष्ट; रहस्य; मर्म (हित, निज इ. शब्दाबरोबर प्रयोग) : 'हें जीवीचें निज गुज।' - ज्ञा ४.२८. [सं. गुह्य]

**गुज** न. माळ; हार : 'गुजें हीं मोत्यांचीं धरित निजकंठीं सुचतुरा।' - निमा ३.७०.

**गुज** पु. घोड्याचा एक रोग. हा गुडघ्याला होतो. - अश्वप २.२८८.

**गु(गुं)ज** न. संकट; कोडे : 'मातापित्यांवर गुज पडलें।' - वसा ४३. (क्रि. पडणे.) [क. गुंजु = गुंता होणे]

**गुजगुज** न. हळूहळू बोलणे; कुजबुज.

**गुजगुज-जे** न. गुजगुज, बुगबुग वाजणारे एक वाद्य (नंदीबैलासह येणारे पांगुळलोक वाजवितात ते) : 'गुजगुजें झांझ नगारा उपांग।' - स्वादि १०.२.४६. [ध्व.]

**गुजगुज-जा** क्रिवि. कुजबुजत; पुटपुटत.

**गुजगुजीत** वि. गोंडस, सुंदर.

**गुजगोष्ट** स्त्री. गुप्त गोष्ट; मनातील बेत; व्यक्तिगत अनुभूतीवर आधारित प्रसन्न शैलीत वाचकांशी हितगुज करीत लिहिलेला ललित निबंध; लघुनिबंध.

**गुजगौप्य** वि. न. गुपित; रहस्य.

**गुजणे, गुजगुजणे** अक्रि. कुजबुजणे; पुटपुटणे; हळूहळू बोलणे : 'आपणपयांचि गुजावे। दुजेनवीण।' - गीता १.३००१.

**गुजर** स्त्री. गुजरातमधील व्यापार, उदीम करणारी एक जात. [सं. गुर्जर]

**गुजर** पु. कसातरी होणारा उदरनिर्वाह; जोगवण; निर्वाह. पहा : **गुजारा, गुजराण** : 'तीनशे रुपये रोजांत गुजर होत नाहीं.' - दिमरा १.६१३.[फा.]

**गुजरगुंडी** स्त्री. 'खेळकोटा' - (तंजा.)

**गुजर(रा)णी** स्त्री. दागिन्यावर रेंघोतळीने काढलेली बारीक रेघ, नक्षी.

**गुजरणी** स्त्री. नकासदाराचे हत्यार.

**गुजरणे** अक्रि. १. गुदरणे; (दिवस, काळ) कंठणे; घालविणे : 'सहाचार महिनें तियें गुजरले पुण्यास येऊनी।' - ऐपो २७४. २. नाहीसे होणे (वैभव, संपत्ती, सौंदर्य). ३. मरणे. ४. ओढवणे; येऊन बेतणे; कोसळणे. (आपत्ती, संकट). [फा. गुजर]

**गुजरणे** उक्रि. १. ताब्यात देणे; स्वाधीन करणे; दाखल करणे (अर्ज इ.). २. कायम करणे; अधिष्ठित करणे (हुद्दा, जागा). [फा. गुजर]

**गुजरध्वनि** पु. घुमून उठणारा आवाज : 'भटोबासांचा भीक्षा शब्द गुजरध्वनि घोळिला उमटे' - स्मृस्थ २१९.

**गुजरवा** पु. (सोनारी) दोन वाट्या जोडून तयार केलेला भोक पाडण्यापूर्वीचा मणी; भोक नसलेला मणी. (क्रि. उठवणे, करणे.)

**गुजराज** पु. गुह्यांचा, रहस्यांचा राजा : 'गौप्य गुजराज उमजलासे हरि' - निगा १९०.

**गुजराण-णी** स्त्री. १. गुजर; गुजारा; कसातरी उदरनिर्वाह; कष्टप्रद उपजीविका : 'आमची गुजराणी चालेल.' - मइसा १३.९४. २. कालक्षेप. [फा. गुझरान]

**गुजराण-णी** न. स्त्री. नजराणा; भेट : 'शहानशहानीं मेहेरबानगी करून श्रीमंत प्रधानास जवाहीर, घोडें, हस्ती गुजरान केले.' - मइसा ६.५०५. [फा. गुजरान]

**गुजराणणे** सक्रि. प्रविष्ट करणे. पहा : **गुजरणे** : 'अर्जी तजवीज करोन गुजराणिली आहे.' - मइसा ८.२०२.

**गुजरात-थ** पु. गुजराती भाषक बहुसंख्य असलेले भारतातील एक राज्य. (वा.) ० **रीतीने रडणे** – खोटा शोक करणे. गुजराथी बायका छाती पिटून जसा आक्रोश करतात, तसा देखावा करणे.

**गुजराती मेवा** रायणी हे फळ.

**गुजरी** स्त्री तांबडे अंग व पांढरे पट्टे असलेले लुगडे : 'पैठण्यापितांबर गुजऱ्या शालु सजेले।' - प्रला २८.

**गुजरी** स्त्री. पायातील एक दागिना : 'चरणीं वाळे घागरिया। वाकी वर त्या गुजरिया।' - व्यं ५६.

**गुजरी** वि. गुजरासंबंधी (वस्त्र, वेष इ.).

**गुजरी** स्त्री. गुजर स्त्री : 'डुडीवर डुडी। चाले मोकळी गुजरी।' - तुगा २८७३.

**गुजरी** वि. १. गोजिरी. २. (ल.) दुष्ट; वाईट : 'भाऊ ग म्हणीतो घाल बहिणीला दूधभात। भावजय गुजरी म्हणती आज म्हशीने दिली लाथ।' - झोपाळ्यावरची गाणी.

**गुजरी** स्त्री. १. सायंकाळचा बाजार; सराफबाजार. (कर.) २. भाजीबाजार; मंडई : 'सायंकाळ गुजरीचा समय.' - शिदि २५१. [फा. गुज्री]

**गुजरीतोडी** स्त्री. (संगीत) एक राग. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर.

**गुजस्त** वि. गुदस्त; गत; झालेले. [फा.]

**गुजागर** पु. टांकसाळीतील धातू गाळणारा. [फा. गुदाह्]

**गुजायश** स्त्री. जमाव; जमवाजमव : 'स्वारांची गुजायश चहूं महिन्यात नाहीं, हे जाणून तो दसऱ्यापावेतो दोहोकडील अमका जमाव दुवाबांत उतरावयाची सबब हीच.' - ऐलेसं ४३५४.

**गुजार** स्त्री. आदा; सोपवणूक; देणे. (क्रि. करणे) : 'तुम्ही आपले पंचसहस्रीचा जो जमाल कराल तो मशार्निलेसी गुजार करीत जाणें.' - मइसा १५.३७५. [फा.]

**गुजारत-ती** स्त्री. १. मध्यस्थी (माणसाची) : 'तेंही... निळो कृष्ण यांचे गुजारतीनें विदित केलें कीं...' - इमं १३१. २. (सावकारी) कायदेशीर विद्यमानता; समक्षता; साक्ष. ३. (जमाखर्च) खर्डा, कीर्द इ. त अमुकाचे गुजारतीने (कडोन, मार्फत याअर्थी) गुजारत अमुक असे लिहितात.

**गुजारत(ती)वार** क्रिवि. गुजारतीसह; कायदेशीर साक्षीसह. जसे :- गुजारतवार अर्ज्या - पावत्या - तपासणी - वसूल - पट्टी.

**गुजारत(ती)हाय** स्त्री. अव. (सावकारी) कायदेशीर साक्ष.

**गुजारा** पु. १. निर्वाह; कालक्षेप; योगक्षेम. (क्रि. करणे, होणे.) पहा : **गुजराण**. २. गत; हिशेब; पर्वा; पाड. (व.) [फा.]

**गुजास्त** स्त्री. स्वाधीन; सोपवणूक : 'माल गुजास्त करू.' - ऐलेसं ७.३५७२. (क्रि. करणे.) [फा.]

**गुजी** स्त्री. कालवड; वासरी; लहान गाय; गोजी.

**गुझरान, गुझार, गुझारत, गुझरी** पहा : **गुजराण इ**

**गुटकन-र, गुटदिशी, गुटगुट** पहा : **घुटकन्**

**गुटक (कु) ळी** स्त्री. १. गचकळी; बुचकळी; गटंगळी; पाण्यात खालीवर होण्याची स्थिती (बुडणाऱ्याची). (क्रि. खाणे.) २. लहानशी ढेकर; गुचकळी; आवंढा; घशाशी येणे. [ध्व.]

**गुटका** पु. १. साधू, जादूगाराने दिलेली, तोंडात धरायची गोळी; गुटिका. २. लहान गोळी (औषधाची, बंदुकीची). ३. लहानसा घोट; घुटका. [सं. गुटिका]

**गुट(टि)का** पु. स्त्री. लहानसे बांधीव पुस्तक, पोथी.

**गुटकुला, गुटुंगा, गुटुणा** वि. ठेंगणाठुसका; आखूड पण मजबूत; गड्ड.

**गुटगुटीत** वि. १. वाटोळा; गरगरीत. २. लठ्ठ; पुष्ट (मूल, माणूस).

**गुटमळणे, गुटळणे** अक्रि.१. घुटमळणे; अडखळणे; आशंकणे; गोंधळणे. २. गमणे; रेंगाळणे; कुचराई करणे. ३. धरसोड करणे; काकू

करणे. पहा : **गुपटणे**

**गुट(ठ)लांवचे** सक्रि. १. चोरणे; लांबवणे. (गो.) २. गुंडाळणे.

**गुटली** स्त्री. लहान लाडू : 'मुलींना एक एक गुटली व एक एक चहाचा कप आणून दिला.' - स्मृचि ४८.

**गुटली** स्त्री. १. आंब्याची कोय. २. लेंडी. (झाडी.)

**गुटा-ट्या** पु. १. औताचा एक प्रकार. २. बीनफासेचा व बीन जानवळ्यांचा कुळव. (वाई)

**गुटांवचे** सक्रि. कापसातील सरकी काढणे. (गो.)

**गुटिका** स्त्री. १. औषधी गोळी. २. गोटी; बैदूल. पहा : **गुटका २** [सं.]

**गुटिकापात** पु. चिठ्ठ्या टाकणे; नशीब पाहणे. (क्रि. करणे.) [सं.]

**गुटी** स्त्री. लहान मुलांना उगाळून द्यायची घरगुती औषधे. [सं. गुटिका] [क. गुट्टी = मुलांना द्यायचे औषध]

**गुटी** स्त्री. फळ येणारे पण फूल न येणारे एक मोठे झाड.

**गुटे(ठे)ल** न. सुताची गुंजडी; बिंडा. (गो.)

**गुटोळा** वि. गोटोळा; वाटोळा; गोट्यासारखा; गोलाकार.

**गुठण** स्त्री. दोन्ही गुडघ्यांवर आडवा मारलेला वार.

**गुठ(ठो)ळी, गुट(टो)ळी** स्त्री. १. गोळी; गोळा (गोठलेले रक्त, दुधातील-दह्यातील कवडी, आमटीतील पीठ इ. चा). २. गोळा; गाठ (पिंजलेला कापूस, कापड यांची). ३. गाठ; गळू. ४. विष्टेचा खडा. ५. कठीण भाग (पुटकुळी, स्त्रियांच्या स्तनातील). ६. बी; आठोळी. [सं. ग्रंथिल]

**गुठळेबाज** वि. कामचुकार; अंगचोर.

**गुठा-ठे-ठो** न. पु. नांगरलेली शेतजमीन सारखी करण्याचे, डिखळे फोडण्याचे; जमीन साफ करण्याचे शेतीचे अवजार (औत). [क. गुट] (वा.) ० **घालणे** - १. चुरडणे; फोडणे. २. तुडवून मळणे; चुरगळणे (वस्त्र इ.).

**गुठाव(वि)णे** उक्रि. नांगरलेली जमीन गुठ्याने सारखी करणे.

**गुठेणी** स्त्री. गुठा. (कु.)

**गुठेफळी** स्त्री. पहा : **गुठा** (राजा.)

**गुठ्ठी** स्त्री. गड्डी; जुडी : 'छोटीशी गुठ्ठी तिला मुलाबाळांची मिठ्ठी.' - एहोरा कोडी ८४.

**गुड** पु. गूळ. [सं.]

**गुड** पु. १. रास; गंज-गंजी (कडब्याची, गवताची). (व.) २. बंदिस्त ढीग. (खा.) [क. गुड्ड = डोंगर]

**गुडगुड-डा** क्रिवि. गुडगुड, घुडघुड, गुरगुर (पोटातील गडबड, वाळलेल्या नारळातील खोबरे, शेंगेतील दाणा, गुडगुडीतील पाणी याप्रमाणे) आवाज होणारे. [ध्व.]

**गुडगुडणे** अक्रि. गुडगुड असा (क. पोटात) आवाज होणे. [ध्व.]

**गुडगुडा-डे** वि. अंगापासून सुटून गुडगुड असा होणारा (आवाज) पु. न. सुकलेला, आत वाजणारा नारळ; गुडगुडे. (कु.) पिकून वाळल्यानंतर फळांच्या पोटातील अंश, गर. [ध्व.]

**गुडगुडी** स्त्री. धूम्रपान करण्याचे, तंबाखू ओढण्याचे एक साधन; हुक्का : 'गुडगुडीचें पाणी नव्हे मंदाकिनी।' - मध्व ४९९. [ध्व.] (वा.) ० **बंद करणे** - जातीबाहेर टाकणे; वाळीत टाकणे.

**गुडगुडीत** वि. लठ्ठ; फोफशा. पहा : **गुटगुटीत**

**गुडघा** पु. १. पायाच्या मध्यभागावरील सांधा; जानू; ढोपर. २. (ल.) आधार; पाठिंबा; आश्रय. [सं. घोटक] (वा.) ० **देणे** - आतून फूस किंवा पुष्टी देणे; फितूर करणे; अडचण उभी करणे : 'यांनींही बदनजर धरून अष्टभयास गुडघा देऊन बखेडा करितात याप्रकारचे वर्तमान आहे.' - पेदभा २९.१६९. **गुडघे टेकणे** - गुडघे टेकून बसणे; शरण येणे. **गुडघ्यात मान घालणे, गुडघ्यात मान घालून बसणे** - १. हताश, निराश होणे, असणे. २. दुःखी असणे. **गुडघ्यावर हात देणे, येणे** - १. गुडघ्यावर हात देऊन उठणे, चालणे; म्हातारपणामुळे वाकणे. २. दमणे; त्रासणे; मट्ट्यास येणे; मरगळीला येणे.

**गुडघिल्यो** क्रिवि. गुडघ्यावरून अट्टी मारणे. (को.)

**गुडघी-गी** स्त्री. १. गुडघ्यापर्यंतची विजार; चोळणा : 'गुडगी तंग वर कांचा जी।' - सला ३८. २. गुडघ्याला होणारा एक रोग.

**गुडघी** स्त्री. (कुस्ती) एक डाव. प्रतिपक्षाच्या गुडघ्याच्या वाटीवर व मागून गुडघ्याच्या लवणीत आपल्या डाव्या किंवा उजव्या पायाचा जोराने ठोसा मारणे.

**गुडघी(घे)मेट** स्त्री. १. (बैलगाडी) रेताड जमीन फुफाट्याचा रस्ता, चढण इ. ठिकाणी बैल पुढील पायाच्या गुडघ्याने चालतात त्याला म्हणतात. २. थकवा; थकून गुडघ्यावर बसणे : 'पिकलं पिकलं जन बोलत कुठं कुठं नंदी आलेत गुडघीमेटं' - ममा ९३. (क्रि. येणे)

**गुडणे** अक्रि. बेताला येणे; टेकीला येणे; संमुख होणे (मरणाला). (को.)

**गुडणे** पहा : **गुढणे**

**गुडदा** पु. गुर्दा; तरवारीसारखे पाते असलेली लोखंडी गदा [फा. गुर्ज]

**गुडदा** पु. केसांची विशिष्ट रचना. (कर.)

**गुडदा** पु. बकऱ्याच्या पोटातील एक खाण्यालायक मांसाचा गोळा.

**गुडदाणी** स्त्री. एक मासा; तेपडी.

**गुडदा(धा)णी-नी, गुडधान** स्त्री. चिक्की; गुळाच्या पाकात पाकविलेले चुरमुरे, दाणे, राजगिऱ्याच्या लाह्या वगैरेंची मिठाई. [सं. गुड + धाना]

**गुडदावणी** स्त्री. पायाने चेचणे; तुडवणी; धुस्तावणी. (कु. गो.)

**गुडदा(द-धा)विणे** उक्रि. चेचणे; ठेचणे; तुडविणे; अस्ताव्यस्त करणे; सुरकुत्या पाडणे; चिरडणे; चुरडणे. पहा : **गुधडणे**

**गुडदी** स्त्री. बूच; बोळा; दट्ट्या; दडा; झाकण (आतील पदार्थ बाहेर पडू नयेत म्हणून दौत, बाटली इ. च्या तोंडावर बसवितात ते लाकूड, काच इ. चा तुकडा). [का. गुडस = बंद करणे]

**गुडदू** वि. ठेंगणा आणि जाड; गड्डू; गिड्डा व लठ्ठ.

**गुडबुजे** न. एक वाद्य : 'गीडबीडीं सावेरी। गुडबुजीं दुटाळा।' - कृमुरा ७७.२९. [ध्व.]

**गुडरा** पु. झाडाभोवतीचे कुंपण. (झाडी.)

**गुडवे** न. उडवे; गंजी. पहा : **गुड** (गो.) [क. गुडी]

**गुडशस्त्र** वि. मटन खाणारा.

**गुडसी** स्त्री. 'झोपडी' - (तंजा.)

**गुडा** पु. १. गुढीपाडवा. २. गुढीपाडव्याची गुढी. (व.)
**गुडाका** स्त्री. आळस; निद्रा; झोप. [सं.]
**गुडाकू** पहा : **गुडाखू**
**गुडाखू** स्त्री. १. गूळ, केळी इ. मिसळून केलेली तंबाखू. २. रोगट पिकाच्या पानांवर शिंपडायचा तंबाखूचा काढा. ३. (ल.) त्रेधा; तिरपीट; दुःखपूर्ण स्थिती; दुर्दशा. [सं. गुडक] (वा.) ० **काढणे** - खरडपट्टी काढणे. ० **वळणे** - घबराट होणे : 'परंतु त्या बिचाऱ्याची आतल्या आत गुडाखू वळली.' - भदि ३९२.
**गुडार** न. जाजम; झोऱ्या; पालपट्टे; तंबू (लहान). [क.]
**गुडाल** न. केंबळाचे लहान घर; खोपट. [क. गुडलु = केंबळाची झोपडी]
**गुडीगार** पु. चंदनाच्या लाकडावर नक्षीकाम करणारे. (व.)
**गुडीगुडी** वि. गुळमुळीत. [इं. गुड]
**गुडीगुप** वि. कोणाला कळणार नाही असा : 'आमच्या खोलीत तिने एक गुडीगुप अशी दुसरी खोली तयार केली.' - आआशे १८०.
**गुडीगूप** क्रिवि. गुपचूप : '(चिमणी) गुडीगूप पंख मिटून बसली.' - गांधारी ७०.
**गुडीपाडवा** पहा : **गुढीपाडवा**
**गुडु(डू)प** वि. गडद; गर्द; दाट (काळोख) : 'एथें गुडुप अंधार पडला.' - कम ३.९३.
न. अतिशय अंधार. [क. गुडुपु = लोखंडाची कांब] (वा.) ० **निजणे** - डोळ्यांवरून पांघरूण घेऊन स्वस्थ निजणे.
**गुडुंब-बा, गुडूम** न. गळू. पहा : **गुळुंब**
**गुडूची** स्त्री. गुळवेल; गरूळ. [सं.]
**गुडॉ** पु. पाणी उपसण्याचे साधन; तेढा; ओकती. (गो.)
**गुड्डी** स्त्री. बूच; गुडदी. (गो.) [सं. गूड]
**गुड्डी** स्त्री. गुप्त कारस्थान; कूट; कट. (गो.)
**गुड्डी** स्त्री. बाहुली. [हिं.]
**गुड्डुलासाव** न. कारस्थान. (गो.)
**गुड्डु** वि. १. ठेंगणा व जाडजूड; गिड्डा. २. पत्त्याच्या खेळातला गुलाम. [का. गुड्डु = मुलगा, शिष्य, खुजा]
**गुढ** न. मर्यादा; आवरण : 'अधोर्ध्व गुढें काढी।' - ज्ञा १८.७३९.
**गुढ** न. गुडघा.
**गुढगा** पहा : **गुडघा**
**गुढगेमिठी** स्त्री. पाय दुमडून, गुडघे पोटाशी घेऊन त्यांना घातलेला हाताचा विळखा : 'पण अमीन गुढगेमिठी देऊन बसला होता.' - सीए ५१.
**गुढणे, गुंढाळणे** उक्रि. व्याप्त होणे : 'जी भूतीं भूतळ मांडिलें। जैसें नक्षत्रीं गगन गुढलें।' - ज्ञा ११.२८६. झूल पांघरणे; पहा : **गुंडणे, गुंडाळणे** [सं. गुंठन]
**गुढन** न. कापणी केल्यानंतर धांड्यांच्या कणसांसह पेंढ्या बांधणे. (व.) [सं. गुंठन]
**गुढ (ढा) र** न. १. हत्तीचे खोगीर; कवच : 'एक हस्ती गुढर घालीत।' - उषा ८२०. २. हौदा; अंबारी : 'रत्न-चार्के सुवर्ण गुढार। माजी शोभला लक्ष्मीवर।' - मुसभा १.६५. ३. डेरा; राहुटी; पाल : 'जैसें होति गुढरूं अनंगाचे॥' - शिव २९०. [सं. गुड = हत्तीचे कवच]
**गुढा** पु. १. कंबरेभोवती वस्त्र घट्ट राहण्यासाठी खोवतात तो वस्त्राचा भाग; कनवटी. (व.) २. देवकस्थापनेच्या वेळी मंडपाला बांधलेले फडके; मुहूर्तमेढीचे फडके. ३. पताका; झेंडा.
**गुढा** पु. दगड.
**गुढार** न. परचक्राला भिऊन गावकरी लोकांनी केलेले पलायन; दंग्यामुळे पळून आलेला मनुष्यसमुदाय.
**गुढार** न. कोडे; रहस्य; गुह्य गोष्ट : 'तुका म्हणे तूंचि निवडी हें गुढार।' - तुगा ९३७. [सं. गूढ]
**गुढार** न. १. पाल; खोप; झोपडी. पहा : **गुढर.** २. पालपट्टे; हाथरी; जाजम. (कर) [क. गुडार]
**गुढारणे** उक्रि. १. आच्छादणे; झाकणे. २. सज्ज असणे, ठेवणे; सजविणे : 'गाढा वीर गुढारल्या निजरथीं संमूढ आरूढला।' - आविश्वायज्ञ २५. ३. कवच, वस्त्र घालून सजविणे (हत्ती) : 'त्यामागे शमदमादि। मत्तांग गुढारले योगसिद्धी।' - स्वादि १०.२.५७. [सं. गुढ]
**गुढाव** पु. १. गौरव. २. गुह्य.
**गुढी** स्त्री. १. वर्षप्रतिपदेला उभारायचा ध्वज (आंब्याचा मोहोर, लिंबाचा टाहाळा, उंची वस्त्र, गाठी व एक भांडे यासह काठीला बांधून उभारतात तो). (त्यावरून) आनंदप्रदर्शनार्थ उभारलेली ध्वजा, पताका : 'तव आत्मा उभिताओ गुढी। रोमांचमियें।' - शिव ६०. २. देवाला काही प्रश्न वगैरे विचारायचे झाल्यास गोटी, फूल, तांदूळ वगैरे चिकटवतात व प्रसाद किंवा कौल मागतात ती. [क. गुडी] (वा.) ० **उजवी देणे** - विनंती मान्य करणे; अनुकूल कौल देणे. ० **डावी देणे** - विनंती अमान्य करणे; प्रतिकूल कौल देणे. ० **उभारणे** - प्रसिद्धी पावणे; कीर्तिवंत होणे; विजय मिळवणे.
**गुढी** स्त्री. १. देशांतराहून आलेली मृत्यूची बातमी. २. (सामा.) बातमी; वर्तमान; निरोप : 'विजयाची सांगे गुढी।' - ज्ञा १४.४१०.
**गुढी** स्त्री. १. अढी; दुमड; फासा (पिळताना दोरीला पडणारा). (क्रि. पडणे). २. सुरकुती; घडी (वस्त्राला पडणारी). [सं. ग्रंथि]
**गुढी** स्त्री. भगत घुमू लागला म्हणजे त्याच्यापुढे गहू, सुपारी, पैसे ठेवतात ती मांड. (खा.) (वा.) ० **परजावणे** - हातात गहू घेऊन विचारलेल्या प्रश्नांना भगत उत्तरे देतो त्याला म्हणतात.
**गुढी** स्त्री. खोपटी; झोपडी; पाल. पहा : **गुढर, गुढार** : 'गुढ्या घालुनिया वनीं राहू, म्हणा त्यातें।' - प्रला १९.
**गुढीकारू** पु. निरोप्या; जासूद : 'गुढीकारु पुढें पाठविला।' - कालिका १७.२१.
**गुढीपाडवा** पु. वर्षप्रतिपदा; चैत्र शु॥ १; एक सण. या दिवशी गुढी उभारतात. साडेतीन मुहूर्तांपैकी एक दिवस. शालिवाहन शकाचा वर्षारंभ या तिथीपासून होतो.
**गुढे** न. १. गावकऱ्यांनी काढलेला पळ. पहा : **गुढार** न. (क्रि. उठणे, पळणे.) २. आपले घरदार, मालमत्ता सोडून परागंदा होणारा माणूस,

कुटुंब. ३. दुसऱ्या गावी पिके कापण्यासाठी मदत करण्याकरता निघालेली शेतकरी लोकांची टोळी. ४. जमाव. [क. गुडी = जमाव]

**गुढे** न. १. गूड; न मळलेल्या धान्याची पेंढी, सुडी; कवळी; मळायच्या धान्याच्या पेंढ्या. २. कापणी; काढणी. [क. गुड्डे = रास, ढीग] (वा.) **गुढ्या काढणे** – फाल्गुन अमावास्येला बी पेरून, पाडव्याच्या दिवशी ते उकरून काढून त्या वर्षी कोणते पीक चांगले येईल याचा अंदाज घेणे.

**गुढे** न. कोडे; उखाणा. (क्रि. घालणे, सांगणे, उकलणे.) [सं. कूट]

**गुढे** न. (विणकाम) वशारन झाल्यावर शिल्लक राहणारा पांजणीचा भाग.

**गुढे** न. सखल जागेतील पाणी उंच जागी फेकण्याकरता उपयोगात आणली जाणारी त्रिकोणी संबळीच्या आकाराची टोपली. या टोपलीला दोन्ही बाजूंना मागेपुढे दोऱ्या बांधून त्या हातात धरून पाणी वर फेकतात.

**गुढेकरी** पु. पळून जाऊन आश्रयार्थ एके ठिकाणी गोळा झालेला जमाव : 'खंदकावरी गुढेकरी होते त्यांनीं वस्तभाव तों गावांत लावून दिलीच होती.' - पेद २८.२६६.

**गुढ्याचा पाडवा** गुढे झाल्यानंतरचा, पिके कापल्यानंतरचा दुसरा दिवस. ब्राह्मणाच्या तीन मोठ्या भिक्षेच्या दिवसांपैकी एक. दुसरे दोन दिवस म्हणजे दिवाळीचा पाडवा व राखी पाडवा - राखी पौर्णिमेनंतरचा दिवस

**गुण** पु. १. मनोधर्म किंवा पदार्थाचा धर्म; त्यातील बल; तेज; सत्त्व; अंत:स्थित धर्म; विद्या, कला, सत्य, शौर्य इ. धर्म : 'एवं गुणलक्षण।' - ज्ञा १७.१३१. २. (न्यायशास्त्र) रूप, रस, गंध, स्पर्श, संख्या, परिमाण, पृथकत्व, संयोग, विभाग, परत्व, अपरत्व, गुरुत्व, द्रवत्व, स्नेह, शब्द, बुद्धी, सुख, दु:ख, इच्छा, दोष, प्रयत्न, धर्म. ३. उत्कृष्टता; योग्यता; व्यंगापासून अलिप्तता; निर्दोषता. ४. उपयोग; फायदा; नफा; फल; लाभ. ५. निघालेले फल, वस्तू, परिणाम, निपज; उत्पन्न. ६. (ल.) वाईट वळण; वैलक्षण्य. ७. प्रभाव; परिणाम : 'संपत्ति हें एका तऱ्हेचें मद्य आहे, तें आपला गुण केल्याखेरीज बहुधा सोडणार नाही.' - नि ५३. [सं.] (वा.) ० **आठविणे** - (मृत, गैरहजर मनुष्याच्या) चांगल्या गोष्टी स्मरणे, त्यांचा उल्लेख करणे. ० **उधळणे, पसरणे, पाजळणे, पाघळणे** - स्वाभाविक वाईट, दुष्ट स्वभाव बाहेर पडणे; वाईट गुणांचे आविष्करण करणे : 'पत्र पुरते झाल्यावर सदाशिवराव म्हणाले हे आपल्या मातोश्रींनी कसे गुण उधळले पहा!' - रंगराव. ० **घेणे, देणे** - पिशाच्चादी बाधा न व्हावी म्हणून देवादिकांपासून कौल घेणे, देणे. ० **दाखविणे, गुणावर येणे** - खरा स्वभाव दाखवणे. **गुणा येणे** - सगुण होणे : 'गुणा आला विटेवरी। पीतांबरधारी सुंदर जो।' - तुगा ७. ० **येणे, गुणास येणे, पडणे** - १. लागू होणे; फळणे; सुधारणा होणे; इष्ट परिणाम होणे. २. चांगल्या रीतीने वागणे. **गुणाची माती करणे** - सदगुणाचा दुरूपयोग करणे.

**गुण** पु. १. (अंकगणित) गुणून आलेले फळ; गुणाकार. २. (समासात) पट; प्रमाण; गुणाकार. जसे : - अष्टगुण = आठपट; सप्तगुण इ. : 'शतकोटि गुणे तदधिक गमला शर निकर विखरितां पार्थ।' - मोभीष्म ३.५६. ३. (अंकगणित) गुणक. ४. (भूमिती) वर्तुळखंडाची ज्या. ५. परीक्षा उतरण्यासाठी ठरविण्यात आलेले संख्यांक. ६. वधूवरांचे घटित पाहण्याचे अंक. हे ३६ असतात; वधूवरांची पत्रिका किती प्रमाणात जुळते हे पाहण्यासाठी ठरविण्यात आलेले ३६ निकष. [सं.]

**गुण** पु. १. दोरी; रज्जू : 'हें कर्माचें गुणीं गुंथलें।' - ज्ञा १३.११०३. २. प्रत्यंचा; धनुष्याची दोरी : 'गेला लक्ष्मण किष्किंधेतें गुण जोडुनि चापातें।' - मोरामा १.५११. [सं.]

**गुण** पु. (व्याक.) संधी करताना वगैरे स्वराच्या रूपात होणारा फेरफार. (इ चा ए, उ चा ओ, ऋ चा अर्, ऌ चा अल्) [सं.]

**गुण** पु. उतार; कमीपणा (रोगाचा). [सं.]

**गुण** पु. दिव्याची वात : 'पैं गुण ते तुला खाय।' - ज्ञा १३.७२०. [सं.]

**गुण** पु. तोडगा; उपाय : 'अल्लीसाहेब याचें विशेष नाहीं, रानसटवाईचा फेरा आहे. गुण करून देतों म्हणून सांगून गुण करून देऊन गेला होता.' - ऐलेसं ४०७३.

**गुणक, गुणकांक** पु. (गणित) ज्या संख्येने गुणतात ती संख्या.

**गुणक** वि. १. हिशेब ठेवणारा; गणना करणारा. २. मध्य गुणक; विशिष्ट शक्तीचे, गुणाचे मान दाखवणारा वर्ण, जात. [सं.]

**गुणकथा** स्त्री. १. ईश्वराच्या गुणांचे कीर्तन, प्रशंसन. २. (सामा.) गुण, ईश्वरी देणगी, स्वधर्म इ. विषयी स्तुती.

**गुणकप्रमाण** न. (गणित) गुणाकाराने वाढणारे संख्येचे प्रमाण. जसे:- २. ४. ८. १६ इ. प्रमाण.

**गुणकर, गुणकारक, गुणकारी** वि. १. गुणावह; गुण करणारे, देणारे. २. परिणामी; प्रभावी.

**गुणकर** वि. गुणसंपन्न; बुद्धी, सुलक्षण, सद्गुण यांनी युक्त (मूल).

**गुणकला** स्त्री. गुणगान. [सं.]

**गुणकली-ल्ली** स्त्री. पु. (संगीत) एक राग. गानसमय प्रात:काळ. हा एक भैरवप्रकार आहे.

**गुणकारिता** स्त्री. (वै.) उपचार म्हणून परिणामकारक असणे, प्रभावी असणे (औषध इ.).

**गुणकारी** वि. प्रभावी; परिणामकारी.

**गुणकी** स्त्री. गुंडी; बटन; बिर्डे.

**गुणगरुवा** वि. पु. गुणांनी श्रेष्ठ : 'गोविंद गोपाळ गुणगरुवा वो' - ज्ञागा २१

**गुणगहिना** स्त्री. गुणवती व रूपवती स्त्री : 'जेव्हा जिवाला वाटेल तुमच्या आतां पाहिजे गुणगहिना।' - सला ६.

**गुणगंभीर** वि. चांगल्या गुणांनी युक्त. [सं.]

**गुणगान** न. गुणांचे स्तवन, स्तुती, गायन, प्रशंसा, प्रशस्ती; गुणकथा. (क्रि. करणे). [सं.]

**गुणगुण** स्त्री. १. गुंगुं आवाज; गिणगिण (डास, चिलटयांची). २. हळूहळू कोंडल्याप्रमाणे, दबून, अस्पष्ट बोलणे, वाचणे. ३. कुचकुच; कुजबुज. ४. वदंता; बातमी. [ध्व.]

**गुणगुणणे** अक्रि. १. तोंडातल्या तोंडात म्हणणे, गाणे, आलापणे; गुंगुं करणे; मनाशीच म्हणणे. २. ओठातल्या ओठात बोलणे; अस्पष्ट उच्चार करणे; पुटपुटणे. ३. नाकात बोलणे; गेंगाणे भाषण करणे. ४. निश्चित न समजण्याजोगे, मुळमुळीत बोलणे; रोखठोक न सांगणे. [ध्व.]

**गुणगुणा** पु. (प्राणि.) एक छोट्या आकाराचा पक्षी.

**गुणगुणा** पु. नाकाचा पडदा, भाग; घोणा. धक्का लागल्यास यातून रक्त वाहते. [सं. घोणा] (वा.) ० **फुटणे** - नाकातून रक्त वाहणे.

**गुणगुणीत** वि. १. सानुनासिक; नाकातील. २. अस्पष्ट; गुळगुळीत; गुणगुणल्याप्रमाणे (उच्चार).

**गुणगुण्या** वि. १. गुणगुणणारा; हळू, आपल्याशीच गाणारा. २. नाकात बोलणारा. ३. अस्पष्ट आवाज करणारा; पुटपुटणारा. ४. अस्पष्ट; हळू; नाकातला; अनिश्चित (भाषण).

**गुणगुळे** पहा : **गुंडगळे**

**गुणग्रहण** न. गुण ओळखणे; गुणाची पारख; गुणीजनांचा आदर करणे. [सं.]

**गुणग्राम-निधी-पात्र-राशी-सागर; गुणाकर, गुणाची रास, खाण** वि. सर्वगुणसंपन्न; सुलक्षणी; सद्गुणी; अनेककलाकोविद.

**गुणग्राहक, गुणग्राही** वि. गुणांचा भोक्ता, चाहता; गुणांचे चीज करणारा; गुणग्रहण करणारा; दुसऱ्याचे गुण ओळखून संतोष मानणारा. [सं.]

**गुणघाती** वि. गुणदूषक; निंदक; हेटाळणी करणारा. [सं.]

**गुणजावली** स्त्री. आदर्श.

**गुणठेली** स्त्री. अनेक गुण जिच्यात एकवटले आहेत अशी; गुणखनी : 'सुतारुण्यें तारुण्य गुणठेली।' - आपू १०. [सं. गुण + स्था]

**गुणणिका** पहा : **गुण्णिका, गुंडिका**

**गुणणे** उक्रि. १. (ग.) गुण्य आणि गुणक यांचा गुणाकार करणे; संख्येची पट करणे. २. पुन्हा पुन्हा वाचणे व म्हणणे; पाठ करणे; गुंडिका करणे; घोकंपट्टी करणे. [सं. गुणन]

न. भ्रमराचा गुंजारव, गुणगुणणे.

**गुणत:** न. क्रिवि. गुणाप्रमाणे; गुणानुरोधाने. [सं.]

**गुणत्रय** न. सृष्ट पदार्थांचे सत्त्व, रज, तम हे तीन गुण, धर्म. [सं.]

**गुणत्रयविरहित** वि. सत्त्व, रज, तम या तीनही गुणाविरहित असा (ईश्वर); निर्गुण. [सं.]

**गुणदोष** पु. अव. चांगलेवाईट गुणधर्म; सुलक्षणे आणि कुलक्षणे.

**गुणद्रव्य** न. (वै.) रंगसूत्रे व प्रथिने यांच्या संयुक्त रचनेने बनलेला गुणसूत्रांचा घटक.

**गुणधर्म** पु. गुणलक्षण; गुणविशेष; स्वभाव (बरा, वाईट). पहा : **गुण** १

**गुणन** न. गुणाकार; मोजणी; गणना.

**गुणनखंड** पु. (ग.) ज्या संख्येने गुणावयाचे ती संख्या.

**गुणनाम** न. एखाद्या व्यक्तीच्या नावाऐवजी किंवा नावाला जोडून वापरला जाणारा शब्द. उपनाव. जसे :- बालगंधर्व.

**गुणनिधान, गुणनिधी** न. गुणांचा साठा; गुणखनी. पहा : **गुणग्राम** : 'त्याची कन्या चिद्रत्न लावण्यागुणें गुणनिधान।' - एरुस्व ३.४६.

**गुणनियंत्रण** न. एखाद्या तयार वस्तूचा,नमुना वगैरे तपासून त्याचा दर्जा, गुणवत्ता नियंत्रित करणे.

**गुणनीय** वि. गुणण्यास योग्य.

**गुणपत्रिका** स्त्री. गुण नमूद करावयाची पत्रिका.

**गुणपरिणामवाद** पु. त्रिगुणात्मक प्रकृतीतील गुणांच्या विकासाने किंवा परिणामाने व्यक्त सृष्टी निर्माण होते असे मत (सांख्य मत).

**गुणपंचक** न. आधिभौतिक वस्तूंच्या पाच मूलभूत घटकद्रव्यांचा समुदाय (पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश किंवा शब्द, रूप, रस, गंध, स्पर्श).

**गुणप्राहिकता** स्त्री. गुण जाणण्याची वृत्ती.

**गुणभूत** वि. १. गौण; दुय्यम प्रतीचे. २. वरून, पासून निघणारे; अनुकल्पित.

**गुणमाया** स्त्री. त्रिगुणांनी युक्त असलेली माया : 'मुळीं झाली तें मूळ माया। त्रिगुण झाले ते गुणमाया।' - दास ११.१.९.

**गुणवचन-वाचक** न. गुण दाखविणारे वचन, शब्द, विशेषण.

**गुणवत्ता** स्त्री. १. शिक्षण, अभ्यास, अनुभव इ. मुळे प्राप्त झालेला दर्जा; गुणविशेष; श्रेष्ठाश्रेष्ठता ठरवण्याचा निकष. २. लायकी; पात्रता.

**गुणवंत-वान** वि. गुणसंपन्न.

**गुणविशेष** पु. एखाद्या वस्तूच्या किंवा व्यक्तीच्या ठायी असलेला खास गुण; विशेषत्वाने जाणवणारा गुणधर्म.

**गुणविशेषण** न. (व्या.) विशेषणाचा एक प्रकार. हा नामाचे गुण दाखवतो.

**गुणवेल्हाळ-ळी** वि. पु. स्त्री. गुणांनी आकर्षिलेला; मोहित; परितुष्ट.

**गुणवैषम्य** न. गुणत्रयाचे (सत्त्व-रज-तम) विषम मिश्रण.

**गुणसूत्र** न. (वै.) पेशीमधील आनुवंशिकतेशी संबंधित धाग्याप्रमाणे असलेले भाग.

**गुणसूत्रचक्र** न. (वै.) गुणसूत्रांचे पेशीविभाजनातील बदलांचे चक्र.

**गुणसूत्ररचना** स्त्री. (वै.) गुणसूत्रांचे आकारमान, संख्या इत्यादी दर्शविणारा आकृतिबंध.

**गुणतु-ति-ती** स्त्री. गुणांची प्रशंसा. [सं.]

**गुणक्षोभ** पु. सत्त्व, रज, तम या गुणांचे प्रमाण विषम होणे : 'मुर्लीची तुझी अतर्क्य माया। तिसी गुणक्षोभ जाहला साह्या।' - एभा ६.७६.

**गुणक्षोभिणीमाया** स्त्री. माया; त्रिगुणाची साम्यावस्था मोडणारी माया. मूळ मायेतील गुप्त असलेले त्रिगुण जेव्हा स्पष्ट होतात तेव्हा तिला गुणक्षोभिणी म्हणतात : 'स्पष्ट होती संधी चतुरी। जाणावी गुणक्षोभिणी।' - दास ९.६.६.

**गुणज्ञ** वि. गुणग्राहक; गुण किंवा योग्यता जाणणारा; रसज्ञ; मर्मज्ञ; चहाता.

**गुणा** पु. १. गाडीचा कणा, आस. २. सुतार, गवंडी यांचे एक हत्यार; गुण्या; काटकोन कसा साधावा हे बघण्याचे साधन.

**गुणाकार** पु. १. गुणांक; गुणनाचे फळ; गणिताचा एक प्रकार; गुणकांकाने गुण्यांकास गुणणे. याचे काही प्रकार :- कोष्टकी-धावरा-बैठा-विविध-गुणकार इ. २. गुणणे; गुणाकार करणे. [सं. गुण]

**गुणाची वस्तु** अलंकारिक रीतीने किंवा उपरोधिक रीतीने, खेळ्या, कारस्थानी, खोडील : 'आधी चिंतोपंत गुणाची वस्तू! यास्तव बाबास विनंती केली.' - ऐलेपाम्युप्र ८८.

**गुणाढ्य** वि. १. गुणसंपन्न. २. एक प्रसिद्ध कवी. बृहत्कथेचा कर्ता.[सं.]

**गुणातीत** वि. गुणांच्या पलीकडचा; निर्गुण (ईश्वर). [सं.]

**गुणात्मक** वि. १. संख्यात्मक भेदापेक्षा ज्यामध्ये गुणधर्माचा भेद लक्षात

घेतला जातो असा. २. गुणांशी संबंधित; गुणविषयक.

**गुणानुवाद** पु. गुणांची वाखाणणी; गुणकीर्तन; प्रशंसा. [सं.]

**गुणार्थ** पु. (तत्त्व) गुणवाचक अथवा गुणद्योतक अर्थ; सार्थ पदांच्या वस्त्वर्थ आणि गुणार्थ या दोन अर्थांपैकी एक. [सं.]

**गुणावह** वि. गुण देणारे; गुणकारक; परिणामी; प्रभावी (औषधी इ.).[सं.]

**गुणांक** पु. १. गुणाकार; सहगुणक. ५ क्ष यात ५ हा गुणांक आहे. २. (शिक्षण) दोन व्यक्तींमधील किंवा वस्तूंमधील सापेक्ष गुणवत्ता दर्शविणारा संख्यात्मक निर्देशांक.

**गुणांकन** न. (शिक्षण) १. विद्यार्थ्यांच्या प्रगतीची किंवा मिळवलेल्या गुणांची करण्यात आलेली नोंद. २. वस्तूंची वा मालाची गुणाप्रमाणे वर्गवारी करणे.

**गुणांकभागोत्री** स्त्री. १. गुणाकार व भागाकार. २. (व्यापक) अंकगणित; गणित.

**गुणांचे, गुणपात्र लेकरू** (उप.) अट्टल लुच्चा; लबाड; सोदा.

**गुणांबर** न. गुणस्थान; स्वर्ग.

**गुणांश** पु. १. गुणकारीपणा; प्रभाव; सुपरिणाम. २. फळ; यश. [सं.]

**गुणि (णी) जन-लोक** पु. अव. १. गायक, वादक, नर्तक वगैरे लोक (सामुदायिक); कलावंत मंडळी. २. हिंदू कलावंतिणीच्या पोटची संतती; कलावंतिणीचा पुत्र. ३. सरवजा नावाचा लोकगायक.

**गुणित** वि. (ग.) गुणलेले. [सं.]

**गुणिया** वि. गुणसंपन्न : 'तै गुणागुणिया धरावी। सरोभरी कीं॥' - ज्ञा १८.१९.

**गुणिया** पु. १. गारुडी; पंचाक्षरी; मांत्रिक : 'आहे गुणिया देवरसी जाणता।' - सप्र १.३३. २. गुणी; गुणवान.

**गुणी** स्त्री. (कृषी) ठिपरी; नाडा व मोट यांना जोडणारे लाकूड. (बे.)[क.]

**गुणी** वि. १. गुणांनी युक्त; शास्त्र, कला यात पारंगत; निपुण; बुद्धिवान. २. मांत्रिक; गारुडी; पंचाक्षरी : 'तुझिया कपटाची झाडणी। करावया आलों मी गुणी।' - एरुस्व १२.९५. ३. (ल.) खोडकर, द्वाड.[सं.]

**गुणी** स्त्री. गुरांचा मानमोडी रोग.

**गुणीक** वि. गुणयुक्त : 'गुणीक वोजविले असतां।' - गीता १३.१७४.

**गुणे** शअ. गुण शब्दाचे तृतीयेचे रूप. १. मुळे; करिता; साठी : 'तृणाचें बुझवणें। आंदोळें वारेन गुणें।' - ज्ञा १३.५७०. २. आश्रयाने : 'कोठें तरी देउळाच्या गुणें। देव पहा।' - दास १७.१.१२. [सं. गुण]

**गुणेस्त** वि. सद्गुणी. (गो.)

**गुणोत्तर** न. १. (ग.) संख्यांची, दोन परिमाणांची पट, हिस्सा, प्रमाण; दोन संख्यांचा केलेला भागाकार किंवा भागाकाराने केलेली दोन संख्यांची तुलना. २. (ग.) दोन गणिती संख्यांमधील विशिष्ट प्रकारचा संबंध; परिमाण, संख्या अथवा आकार यांच्या बाबतीत दोन अथवा अधिक वस्तूंचा तुलनादर्शक संबंध. [सं.]

**गुण्णिका** स्त्री. आठवण राहण्यासाठी पुन्हा पुन्हा वाचणे, म्हणणे; घोकंपट्टी.

**गुण्य** न. जिला गुणायचे ती संख्या.
वि. गुणण्यास, गणण्यास योग्य. [सं. गुण् = मोजणे]

**गुण्या** पु. काटकोन्या; सुतार, गवंडी यांचे काटकोन बघण्याचे साधन. पहा : **गुणा**

**गुण्यागोविंदे, गुण्यागोविंदाने** क्रिवि. १. शांततेने; भांडणतंटा न करिता; मुकाट्याने; आनंदाने; स्वेच्छेने. २. मोठ्या स्नेहाने, ममतेने : 'गुण्यागोविंदें मला दहा वेळ पलंगावर पालवा।' - प्रला. ३. चांगल्या प्रकाराने, रीतीने.

**गुण्यांक** पु. (ग.) जिला गुणायचे असते ती संख्या. [सं.]

**गुतका** पु. गुंता; अडचण.

**गुतका-गा, गुता** पु. गुत्ता; मक्ता (विक्री, पुरवठा वगैरेचा) (को. गो.) : 'पाच सात हजार रुपये तूर्त... व सत्तावीस हजार.. येथील बाबतीचा गुतका जाला होता.' - पेद १०.५८; सर्व तऱ्हेचे मालकीहक्क.

**गुतकुली** पहा : **गुदगुली** : 'तंवं तंवं गुतकुलियां होती।' - शिव ६६६.

**गुतके(गे)दार** पु. मक्तेदार. (गो.) [क. गुत्तिगे = करार]

**गु(गुं)तणे** अक्रि. १. एकमेकात गुरफटले जाणे (दोरा); अडकणे : 'सूत सूतें गुंतलें।' - ज्ञा १८.१३०६. २. गुरफटणे; गुणफाटणे; अडचणीत सापडणे; मोकळेपणा खुंटणे. ३. गुंग असणे; गढून जाणे; अडकणे (कामात, उद्योगात - मनुष्य, पशु, वस्तू, जागा). ४. फसणे. [सं. ग्रथन] (वा.) **गु(गुं)ता काढणे** - अडचण दूर करणे; प्रश्न सोडवणे : 'एवढा गुता काढलास का मंग झालंच तुजं काम.' - पेरणी १४९.

**गु (गुं) तवळ** स्त्री. १. केस विंचरताना गळालेल्या केसांचा (गुंतवळांचा) गुजडा, समुदाय. २. (अव. प्रयोग) (ल.) तुरळक, थोडे वाढणारे खुंट. पु. १. डोक्याच्या केसातून गळलेला केस; गुंतवळीपैकी केस. २. गुंतागुंत (केस, दोरी इ. ची).

**गुतविणे** उक्रि. (ल. व शब्दशः) गुरफटविणे; गोवणे; अडकविणे.

**गुता** पु. दिवसाचे नेमलेले काम. (झाडी)

**गुतापणे** अक्रि. गुंतणे : 'उद्या आनि ह्याच कामात मला गुतापून पडावं लागलं.' - ऊन ७२. (वा.) **गुतापून जाणे** - एकमेकात मिसळणे; गुंता होणे : 'कोट होते, इजारी होत्या, सगळं होतं. एकमेकात गुतापून गेलं होतं.' - वळीव ४४.

**गुतापा** पु. गुंता : 'एक गुतापा बसावा नि आडकून पडावं...' - रैत ४१.

**गुतामूत** पहा : **गुंतागुंत**

**गु(गुं)ताव, गुंतावा** पु. १. गुंतविण्याचे साधन; बंधन. २. करार.

**गुती** स्त्री. गुंता; तंटा.

**गुत्ता-त्ती** पु. स्त्री. १. मक्ता; ठेका. पहा : **गुतका**. २. अड्डा; ठिकाण. ३. (ल.) (त्यावरून) दारूचे दुकान (मक्त्याने घेतलेले). ४. पहा : **गुता, गुंता** [क. गुत्तिगे = करार]

**गुत्ता, गुत्तापा** पु. गुंता; गुंतवळ : 'कुसुंब्या पागुट्याचा वाऱ्यानं झाला गुत्ता।' - जामो २८२; 'गुत्तापा आनी कसला हुतोय?' - रैत १०.

**गुत्ती** स्त्री. जाळे; सापळा : 'जवाहिऱ्या सरदार सश्याप्रमाणे गुत्तीत पकडला.' - राले २१६.

**गुत्वा** पु. मासे पकडण्याचे जाळे. (झाडी).

**गु(गुं)थणे** अक्रि. (प्रा.) पहा : **गुतणे**. १. ओवणे; गुंफले जाणे : 'देह तंव पांचांचें जालें। हें कर्माचें गुणी गुंथलें।' - ज्ञा १३.११०३.

२. अडकून पडणे; गुंतले जाणे.
उक्रि. ओवणे; माळ करणे; गुंफणे. [सं. ग्रथन]

**गुथवागुथव** स्त्री. (सामा.) गुंतागुंत; गोंधळ; गुंताडा. [गुथणेचे द्वि.]

**गुद** पु. अपानद्वार; पंचकर्मेंद्रियांपैकी पाचवे इंद्रिय; गांड; बोचा; मलद्वार : 'गुदमेंढाआंतौती। चारी अंगुळें निगुर्ती।' - ज्ञा ६.१९५. [सं.]

**गुद, गोद** पु. हाडांच्या नळीतील द्रवपदार्थ, चरबी.

**गुदगसाळ** स्त्री. साळीचा एक प्रकार. (बे.) [क. गुदग = जाड]

**गुदगुद-दा** क्रिवि. खतखता (कढ, ऊत याच्या ध्वनीप्रमाणे). पहा : **गदगद, गदगदा**

**गुदगुद-दी-ली** स्त्री. १. (ल.) संतोषणे; हर्ष; आनंद; सुख; आनंदाची उकळी. २. कंड; आग; खाज (फोड, उष्णता इ. मुळे होणारी). ३. (ल.) फुरफुरी; सुरसुरी; कंडू (लढाई, भांडणतंटा इ. ची). (क्रि. मोडणे, जिरवणे.)

**गुदगुदणे** अक्रि. १. कढ येणे; खदखदणे (पदार्थ कढताना, ऊत येताना). २. कंड, खाज सुटणे (शरीर, अवयव यांस). [ध्व. गुदगुद]

**गुदगुदली** स्त्री. गुदगुली.

**गुदगुली** स्त्री. पोटाला, काखेत वगैरे बोटांनी हळुवार स्पर्श केल्यामुळे येणारे हसू, होणारा आनंद. (क्रि. करणे, येणे, सुटणे, वाटणे). पहा : **गुदगुद.** (वा.) **गुदगुल्या होणे** – मनातून संतोष वाटणे; मनातल्या मनात आनंद होणे.

**गुदड** पु. गाळसाळ, टाकाऊ रेशीम.

**गुदडणे, गुदडा** पहा : **गुधडणे, गुधडा**

**गुदडा** पु. गुडघा.

**गुदद्वार** न. गुद; अपानद्वार.

**गुदभ्रंश** पु. शौचाच्या वेळी अंग बाहेर येणे (अशक्ततेमुळे); एक रोग.

**गुदम(मा-मु)रणे** अक्रि. १. कोंडमारा होणे; दम, श्वास कोंडणे; श्वास बंद झाल्यामुळे घाबरणे; घुसमटणे. २. उबगणे; उकडणे (उन्हाने); गदमदणे; उकाड्याने जीव कासावीस होणे.

**गुदम (मा) रा** पु. कोंडमारा; जीव घाबरा होणे; कासाविसी; श्वासावरोध. (क्रि. करणे, होणे.)

**गुदमस्ती** स्त्री. मग्रूरपणा; शिरजोरी; उद्धटपणा; दांडगाई : 'त्यानें आपल्या गुदमस्तीनें हातची भाकरी घालविली.' - विक्षिप्त ३.९१.

**गुदमैथुन** न. अनैसर्गिक संभोग; गांड मारणे.

**गुदरणे** अक्रि. पहा : **गुजरणे**
उक्रि. प्राप्त होणे; ओढवणे (संकटादी). [सं. गुर्द]

**गुदरणे** सक्रि. १. (फिर्याद, तक्रार इ.) दाखल करणे : 'आगरकरांवर अब्रुनुकसानीची फिर्याद गुदरायची तयारी करू लागली.' - दुर्दम्य २५३. २. हजर करणे : 'जरूर तितके महार कामावर आणून गुदरतात.' - गांगा ३४. [हिं. गुदरना]

**गुदरणे** अक्रि. १. लेपाटणे; बरबटणे; लिडबिडणे. (राजा.) २. (ल.) (दुर्गुणांनी, दुर्वर्तनांनी) कलंकित होणे; काळिमा लागणे. ३. काळजीग्रस्त होणे; गुंतणे; अडकणे (संसारात). [हिं. गुदरना]

**गुदराण-णी** न. स्त्री. पहा : **गुजराण-णी.** उपजीविका; निर्वाह; कालक्षेप : 'आणखी मास-पक्ष गुदराण करायाचे.' - ऐलेसं ७.३६१६. [फा. गुजरान]

**गुदरोग, गुदांकुर, गुदार्श** पु. मूळव्याध.

**गुदलना** क्रि. आंबा मऊ करणे. (झाडी)

**गुदलवला** वि. मऊ केलेला आंबा. (झाडी)

**गुदव्रण** न. भगेंद्र.

**गुदस्त-स्ता** वि. १. मागचे; गत (वेळ, महिना, वर्ष). २. झाली गेलेली; होऊन गेलेली (गोष्ट). [फा. गुजस्ता]

**गुदस्तबाकी** स्त्री. (बंद केलेल्या खात्याची) राहिलेली बाकी.

**गुदाज्गर** पहा : **गुजागर**

**गुदाम** पु. वखार; तळघर; कोठार; माल, अडगळ साठविण्याची जागा. [पोर्तु. गुदांव]

**गुदाम** पु. (शिंपी) गुंडी; बटण.

**गुदारा** पहा : **गुजारा**

**गुदारा** पु. उकिरडा : 'तल्हाते भालि हाणौनि (विषयांचा) गुदारा करी : एरीसवा' - मूप्र २४६७.

**गुदाळी** स्त्री. प्रदक्षिणा; आंदाळी गुंदाळी = स्वत:भोवती गरगर फिरण्याचा मुलांचा एक खेळ. (गो.)

**गुद्दलपेंडी** स्त्री. वज्रमुष्टीचा खेळ.

**गुद्दा** पु. मुष्टिप्रहार; ठोसा; बुक्की. (क्रि. देणे, मारणे, लगावणे.)[क. गुद्दु]

**गुद्दा** पु. खणाळे; खणाचा तागा.

**गुधडणे** उक्रि. १. गुधड्या घालणे; पायाने तुडवणे; चोळामोळा करणे; चिरडणे; उलथापालथ करणे. २. (धसमुसळेपणाने, अव्यवस्थितपणे वापरून) खराब करणे; मळविणे; नासणे (कापड, वस्तू); ३. दामटणे; खुंदळणे; दपटणे (जनावर).
अक्रि. धुडगूस घालणे; दांडगाई करणे. [क. गुद्दु]

**गुधडा, गुधवडा** पु. १. धुडगूस; चोळामोळा, धसफस. २. दांडगाई. (क्रि. करणे, घालणे, मांडणे.). ३. खुंदळणी; दामटणी; (फार कामाने झालेली) खराब स्थिती.

**गुधाडी** स्त्री. उकिरडा; घाण. (व.) पहा : **गुखडी**

**गुना** पु. १. सुरत; चेहरा; रंग. २. भार; जबाबदारी; पुढारीपणा : 'सर्व मसलतीचा गुना तुम्हांवर आला आहे.' - मइसा १२.७९.[फा. गूना]

**गुनिया** पु. गवंड्याचे हत्यार. (झाडी) [फा.]

**गुनागोठी** स्त्री. गुजगोष्टी : 'मग ते गुनागोठी कराय लागलं.' - आलो ४४.

**गुनी** वि. उपयुक्त.

**गुन्यांव** पहा : **गुन्हा** (गो.)

**गुन्यांवकार** वि. गुन्हेगार.

**गुन्हा-ना** पु. अपराध; अन्याय्य वर्तणूक; कायद्याचे उल्लंघन.[फा. गुनाह]

**गुन्हापत्र** न. दंडपत्र.

**गुन्हेगार** वि. अपराधी; दोषी; गुन्हा करणारा. [फा.]

**गुन्हेगारी** स्त्री. १. गुन्हा, अपराध करणे; कायद्याचे उल्लंघन करणे. २. दंड

(अपराधाबद्दल गुन्हेगाराकडून घेण्यात येणारा). ३. दंडापासून सरकारला होणारे उत्पन्न. [फा.]

**गुन्हेगारीशास्त्र** न. (समाज.) गुन्ह्यांचा, गुन्हेगारी वृत्तीचा, वर्तणुकीचा शास्त्रशुद्ध अभ्यास.

**गुप, गुपचिप, गुपचुप-चूप** क्रिवि. १. निमूटपणे; मुकाट्याने; हलकेच; निवांत. २. चोरून; लपून; नकळत. [सं. गुप, गुंफचुप]

**गुपका** पु. मारलेल्या जागेवर फिरेल असा भोवरा फेकणे.

**गुपचीप** न. दुधावरील साईच्या मिठाईचा एक प्रकार.

**गुपचीपच्या वड्या** साखरपाकाच्या वड्या. (व.)

**गुपटणे** अक्रि. १. बोलताना अडखळणे. २. धरसोड; कां कू करणे. ३. घोटाळणे; गोंधळणे; सुचेनासे होणे. [सं. गुप् + पट]

**गुपट(त)मार-रा, गुपट(त)घाला** बाहेर दृष्टोत्पत्तीस न येणारे दुःख; छपलेले, छपवावे लागणारे दुःख.

**गुपित** वि. गुप्त; लपवलेले.

न. गुप्त गोष्ट.

**गुपित घाला - मारा** पहा : **गुप्त घाला - मार**

**गुपिस्त** क्रिवि. गंजिफातील एक संज्ञा.

**गुप्त** वि.क्रि.वि. १. गुपित; अगोचर; दडवलेले; लपवलेले; चोरटे. २. संरक्षित; राखीव. ३. गूढ. (क्रि. ठेवणे, राखणे, होणे.) कोणालाही न कळेल असे. [सं. गुप् = १. रक्षण करणे. २. निष्ठा]

**गुप्तखेचर** पु. गुप्तपणे हिंडणारा.

**गुप्तगोई** स्त्री. गुप्त संभाषण; गुप्त चर्चा : 'दरम्यान गुप्तगोई झाली.' - आंघइ १४. [फा. गुफ्तगो]

**गुप्त घाला-मार-रा** १. गुपित घाला, मार; गुप्तपणे नाश, अपाय, छळ (मंत्र, कलह, मर्मभेद करणारी, चीड आणणारी भाषा इ. नी). २. एकदम, चोरटा घाला-हल्ला करणे (भूत, आजार, चोर, शत्रू यांनी). (क्रि. घालणे, मारणे, करणे, पडणे.)

**गुप्तचर** पु. एखाद्याला कळू न देता त्याच्या हालचालींवर लक्ष ठेवणारा, वेषांतर करून हवी ती माहिती काढणारा; हेर : 'त्याच्या पाठलागावर असणारा तो गुप्तचर होता.' - स्मगा १९.

**गुप्तचर विभाग** आपण पोलिस खात्यातले आहोत हे कळू न देता गुन्हा शोधण्याचे काम करणारा पोलिस खात्याचा विभाग : 'पोलिसांकडून चौकशीचे काम काढून घेऊन गुप्तचर विभागाकडे ते प्रकरण सोपविले गेले आहे.' - ग्रामा १७५.

**गुप्तदूत** पु. हेर; गुप्तपोलीस; गुप्त रूपाने बातमी पुरवणारा; गुप्तचर. [सं.]

**गुप्तधन** न. १. जमिनीत पुरून ठेवलेले द्रव्य. २. (ल.) तप, विद्या, ज्ञान, गुण, चातुर्य, शहाणपणा इ. प्रत्यक्ष न दिसणारे धन.

वि. (ल.) विद्या, ज्ञान, चातुर्य यांनी युक्त (माणूस). [सं.]

**गुप्तभाग** पु. गुह्याग; ढुंगण किंवा पुढला भाग; गुह्य भाग. [सं.]

**गुप्तरोग** पु. (वै.) लैंगिक संबंधामुळे गरमी, परमा यांसारखा जननेंद्रियांना होणारा रोग.

**गुप्तवार्ता केंद्र** शत्रूच्या किंवा समाजद्रोही व्यक्तींच्या हालचालींविषयी हेरामार्फत माहिती गोळा करणारे केंद्र.

**गुप्तहेर** पु. शत्रूची किंवा प्रतिपक्षाची माहिती गुप्तपणे मिळवणारा माणूस.

**गुप्ताऊ** वि.क्रिवि. गुप्त; अप्रकटपणे : 'आन गुप्ताऊ माणूस दरम्यान आहेत त्यासी सांगोन वर्तमान आणवितों.' - पेदभा २७.८३.

**गुप्तिया** पु. हेर : 'मग गुप्तिये धाडू म्हणितले।' - रुस्व १७.

**गुप्ती** स्त्री. एक शस्त्र. हे बहुधा काठी, दंडुका, छत्री, कुबडी यांसारख्या वस्तूत लपवलेले असते. बाह्यरूपावरून आत शस्त्र असल्याचे लक्षात येत नाही : 'गुप्ती भाले असिलता।' - नव १२.१७१. [सं. गुप्त]

**गुप्प** क्रिवि. हळूच; नकळत. पहा : **गुप**

**गु(गुं)फ** स्त्री. गुंतवळ (शेंडी, वेणी, केस इ. ची). [सं.]

**गु(गुं)फ(फा)टणे** पहा : **गोफाटणे**

**गु (गुं) फा** स्त्री. १. लताकुंज; पर्णकुटी; फांद्यांची बनवलेली झोपडी : 'ऋष्यशृंग अति विकळ। आला तत्काळ गुंफेसी।' - भारा बाल २.१२. २. गुहा; दरी.

**गु(गुं)फा** स्त्री. गुंतागुंत : 'आवडीचा मंत्र सांगितला सोपा। जेणें नोहे गुंफा कांहीं कोठें।' - तुगा ४८७.

**गुफेद** पु. हलव्याचा एक प्रकार. (गो.)

**गुफ्तार** स्त्री. गोष्ट; भाषण; बोलण्याची तऱ्हा. [फा.]

**गुबकणे** उक्रि. कुदलणे; थकवणे; कुटणे; मारणे. पहा : **गवका**

**गुबगुबणे** अक्रि. लठ्ठ, जाडजूड होणे; फोपशा होणे. शरीरावरील चरबीची अधिक वाढ होणे. [सं. गुर्व] [का. गुबरु = जाड्य]

**गुबगुबी** स्त्री. गुब गुब असा आवाज करणारे चर्मवाद्य; डमरू : '(नंदीबैलाकडून होरा वदवितात) त्या वेळी ते गुबगुबी व घड्याळ वाजवितात.' - गांगा ८४.

**गुबगुबीत** वि. १. लठ्ठ; जाडजूड; मांसल; गुटगुटीत; गबदूल (माणूस, पशू). २. चांगले; भरदार (फळ). पहा : **गबगबीत** [अर.घबघब]

**गुबडे, गुबी** न. स्त्री. ढुंगण; कंबरडे. (व.)

**गुबदार** वि. भरगच्च; दाट.

**गुबदुल** वि. लठ्ठ; गुबगुबीत : 'पण दिवसेदिवस मांजर सुकू लागले. आणले तेव्हा कसे गुबदुल होते.' - स्मया २४६.

**गुबर** न. भ्रम.

**गुबार** गभर; एक प्रकारची तोफ : 'तोफांची व गरनाळांची गर्भछाट तोफा गुबारा समागमे होत्या त्यांची मार दिल्ही.' - मशियांका ४८०.

**गुबार** पु. १. मळ; धूळ : 'दिलांतील गुबार झाडून निघोन प्रांजळ व्हावें.' - मइसा ५.७५. २. संशय : 'बोलण्यांत कोणत्या गोष्टींचा पडदा व गुबार राहिला नाहीं.' - ऐलेसं ९.४.८४२. [फा.]

**गुबा(भा)र-रा** पु. १. अंतर्दाह; दुःख; तोंड बंद पण आत पू असलेली जखम. २. पोटात वारा धरणे; पोट गब्ब होणे; पोटाचा फुगारा, तटतटी, तणावा, फुगवटी (वायूमुळे). [सं. गुर्ब] [क. गुबरु]

**गुबा(भा)र-रा** पु. १. गुप्त द्वेष; मत्सर; हेवा. २. गुंगारा. (वा.) ० **देणे** - पळून जाणे; गुंगारा देणे : 'त्यांनी मौन स्वीकारले. सोन्याने तर गुबाराच दिला.' - भदि १८०.

**गुबा(भार)र-रा** पु. १. ढगांचा जमाव. २. पाण्याचा संचय. (क्रि. धरणे.)
**गुबा (भार) र-रा** पु. ऊन; उष्णता; ताव; उष्णतेने होणारी स्थिती. (क्रि. देणे, घेणे.)
**गुबारणे** अक्रि. लढणे; कष्ट करणे : 'कोट पठाणाने कबज केला आहे. काही गुबारून मिळाला नाही.' - श्रीयो २.३५३.
**गुबारणे** अक्रि. आतील उष्णतेने कासावीस, घामाघूम होणे; उबगणे; फुगणे.
**गुबारा** पु. १. गोळे उडविण्याची तोफ; गरनाळ; गडगोळ. २. (दारूकाम) आकाशात उडविण्याचा दिवा, कंदील. यात स्पिरिटचा धूर किंवा साधा दिव्याचा धूर कोंडतात. ३. फुगा; वाताने फुगणे. [फा.]
**गुबाल्या काढणे** पिच्छा पुरवणे. (व.)
**गुबी** स्त्री. ढुंगण.
**गुबीपिचकी** स्त्री. औषधी ट्यूब (झाडी).
**गुब्बा** पु. भोवऱ्याच्या खेळात ज्याच्यावर डाव आला असेल त्याच्या भोवऱ्यावर आरीने मारलेला घाव.
**गुब्रा** वि. गुबगुबीत : 'हात तुझा तो गोंडस गुब्रा।' - ध्रुपद ३२.
**गुम** क्रिवि. शांतपणे; स्वस्थपणे; मुकाट्याने. (क्रि. बसणे, असणे.)[फा.]
**गुम** क्रिवि. चुकलेल्या, हरवलेल्या स्थितीत.
वि. नष्ट; हरवलेले; चुकलेले. (क्रि. होणे.) [फा.]
**गुम** न. टेंगूळ; फुगवटा; गुबारा. (व.) [हिं. गूमडा]
**गुमकट** पु. चाकाच्या तुंब्याला बसविलेल्या दोन्ही बाजूंच्या लोखंडी पट्ट्या. (बे.)
**गुमगुम** स्त्री. वदंता; वार्ता; बातमी; कुणकुण. [ध्व.]
**गुमगुमीत** पहा : **गुबगुबीत**
**गुमज-ट-ढ** पु. थडगे; मुकबरा. पहा : **घुमट** : 'नंतर सर्वत्रांनीं जाऊन माती दिली आणि गुमजही बांधिला.' - पया ४००.[फा. गुंबज - द]
**गुमजा** पु. (शोभेची दारू) स्वत:भोवती गरगर फिरणारे दुतोंडी बाण.
**गुमटी** स्त्री. वर घुमट असलेले अगदी छोटे देऊळ.
**गुमठा-डा** पु. पखवाजाच्या, मृदंगाच्या खोडाचा मधला फुगीर भाग. [हिं. गुमडा = उंचवटा]
**गुमणे** उक्रि. हरवणे. (खा.) [हिं. गुमाना]
**गुमनघुसक्या** वि. १. मुखस्तंभ. (माण.) २. (ल.) कपटी.
**गुमर** स्त्री. किल्मिष; किंतू : 'गतवर्षी निखालसता दिसत नाहीं. न कले काये मनांत गुमर आहे.' - पुद १.१३३.
**गुमराइ** स्त्री. गर्व : 'नासरजंग तारुण्य, फौज, तोफा व रिसाला बहूत यांजमुळे गुमराई वसत होती.' - हिंद खंड १.२२.
**गुमशूद** वि. (पत्रव्यवहार) गहाळ; हरवलेले; नष्ट झालेले : 'सनद गुमशूद झाली म्हणौनु इस्कील न करणें.' - मइसा २०.३५५. [फा.]
**गुमा** पु. मक्ता (जमिनीचा). (को.)
**गुमा** पु. एक फळ; तुंबा : 'ह्याला (तुंब्याला) शेतवड, शेतकुंभा व गुमा अशी ही नावे आहेत.' - फचि १०३.
**गुमान** न. १. मौन, मुक्काट : 'आता राखतां गुमान भलें बाई वो।' - तुगा १.३८०. २. घुमेपणा.
**गुमान** क्रिवि. मुकाट्याने; निमुटपणे. (कर.) पहा : **गुम**
**गुमान** वि. तृप्त; थंड; गप्प; शांत.
**गुमान** पु. १. पर्वा; खातर; क्षिती; खिजगणती. (क्रि. नसणे, धरणे, करणे.) : 'एकमेकां गुमान। न धरिती पैं।' - सिसं ३.१०९. २. वहीम; संशय; किंतू : 'श्रीमंताकडील सूत्र आलीजाहाकडे असेल ऐसा गुमान येथें आहे.' - मइसा ५.५३. [फा.] (वा.) **गुमानात ठेवणे, राखणे** - मोघम, अनिश्चित ठेवणे; स्पष्ट न करणे, न सांगणे.
**गुमान** पु. १. गर्व; ताठा : 'उदास वृत्तीच्या गुमानें। उठोन जातो।' - दास १५.२.१८. २. आधिक्य.
**गुमान** पु. विचार; मत.
**गुमानी** वि. १. अहंकारी; गर्विष्ठ; बढाईखोर : 'धरूं धाविला निर्दयत्वें गुमानीं।' - किंद्रौपदी ११. २. बेगुमान; बेपर्वा; बेफिकीर.
**गुमानी** स्त्री. संशय : 'तेव्हां त्यांस सरकारचा आश्रा अशी गुमानी येऊन...' - मदरू २.१३७.
वि. संशयी; संशयित.
**गुमानीत** न. गुह्य. (गो.)
**गुमास्त(स्ते)गिरी** स्त्री. १. गुमास्त्याचे काम; मुतालिकी; एजंटाचे काम. २. प्रतिनिधित्व : 'नामाजी लांडा पुणेहून गुमास्तगिरी देऊन कार्यात मावळास पाठविला.' - इंम ५६.
**गुमास्ता** पु. १. मुनीम; प्रतिनिधी; मुखत्यार; कारभारी; अडत्या; बातमीदार; मुतालीक : 'प्रधान यांचे गुमास्ते व आमात्याचे वगैरे यांणीं काम तूर्त करावें.' - मराचिस ८. २. (कायदा.) कोणत्याही व्यवहारात प्रतिनिधी म्हणून मोबदला देऊन नेमलेला मनुष्य, एजंट. ३. (वतन कायदा) वतनी नोकरीचे काम करण्याकरिता नेमलेला बदली इसम.
वि. पाठविलेला. [फा. गुमाश्ता]
**गुमास्ता कायदा** दुकानातील नोकरवर्गाचे कामाचे तास, वेतन इ. संबंधीचा कायदा.
**गुरकणी** स्त्री. १. गर्जना; गुरगुर; डुरकावणी (हिंस्रपशूंची). २.माणसाने तसा केलेला आवाज. ३. (ल.) धमकी; रागाचे बोलणे. [ध्व.]
**गुरकणे, गुरकाव(वि)णे** उक्रि. १. गर्जना करणे; गरजणे; गुरगुरणे; डरकाळी फोडणे. २. भेडसावणे; धमकावणे; आरडाओरडा करून दबविणे; धाक दाखविणे; डोळे वटारणे. [सं. गृ = शब्दे] [ध्वनि.]
**गुरका** पु. रागाचा झटका; घुस्सा. (क्रि. येणे.)
**गुरका-क्या** वि. गुरकावणारा; अरेराव; दांडगा; मोठ्याने आरडाओरड करणारा; खमक्या; मस्त.
**गुरकावणी** स्त्री. दुसऱ्याने घाबरावे, दबले जावे म्हणून गुरकणे; डोळे वटारणे; धमकावणी; डरकावणी.
**गुरकी, गुरकाई** स्त्री. १. गुरकणी. पहा : **गुरकावणी**. २. डोळे वटारणे; रागाने पाहणे.
**गुरखा** पु. नेपाळचा रहिवासी.
**गुरखी** पु. गुरे राखणारा; गोवारी. पहा : **गुराखी** [सं. गोरक्षक]
**गुरखीटाळा** पु. (चर्मकार) टाळ्याच्या वरच्या चामड्याचा भाग.

**गुरग (गु) टणे, गुरंगुटणे** उक्रि. शरीर अवगुंठित करणे, कपड्याने झाकणे; गुरफटून घेणे; बुरखा घेणे; सर्व अवयव झाकतील असे पांघरूण घेणे.

**गुरगु(गू)ज** पु. १. गदा; लोखंडी सोटा. २. फकिराजवळ असणारी (साखळ्या लावलेली) लहान गदा. हिने तो स्वत:ला मारून घेऊन भिक्षा मिळवितो. [फा. गुर्ज]

**गुरगुटी** स्त्री. गुंडाळी. (क्रि. करणे.)

**गुरगुटीत, गुरगुट्या, गुरगुऱ्या** वि. मऊ (भात) : 'तूपमेतकुटाचा गुरगुटीत भात आपण तिला देत आहोत.' - रथ १३९.

**गुरगुडी, गुर्गुडी** पहा : **गुडगुडी** : 'आधी लागे सवय बिडिची मागुनी गुर्गुडीची ।' - अर्वाचीन ३८८.

**गुरगुर-री** स्त्री. १. आरडाओरडा; दुरदुर; डुरडुर; गुरकणी. २. पोटातील, घशातील घरघर आवाज.

**गुरगुर-रा** क्रिवि. १. गुरगुरत; गुरकावीत. २. दुरदुरत; कुरकुरत.

**गुरगुरण-णी** स्त्री. गुरकणी; घुरघुरणे; गुरगुरणे.

**गुरगुर(रु)णे** अक्रि. १. गुरगुर करणे; घुरघुरणे; गुरकणे; गुरकावणे; अंगावर येणे : 'अपमान असा करितां पाहे तो वीरसिंह गुरुगुरुनी ।' - मोउद्योग १२.६०. २. मांजराप्रमाणे ओरडणे; म्यांव करणे. ३. (पोटात) गुरगुर आवाज होणे. ४. (घशात) घरघर आवाज होणे. ५. क्रोधाविष्ट होणे. अरेरावी करणे. [क. गोर्रु = पोटात होणारा आवाज]

**गुरगुराट** पु. अतिशय मोठा गुरगुर आवाज; एकदम सर्वांची गर्जना.

**गुरगुरावणे** अक्रि. १. गर्जना करणे; अंगावर ओरडणे (माणसाच्या). २. डोळे वटारणे; धमकावणे.

**गुरगुरीत** वि. १. टवकारलेले; वटारलेले; गुरकावणारे (डोळे). २. फुगलेली; वर उचलून आलेली (पुरी, पोळी, भाकरी, गुरोळी). ३. फुगलेले; सुजलेले (शरीरावयव).

**गुरगून, गुरदा** पु. साखळ्या लावलेला सोटा; गदा; भिक्षेकऱ्याचे हत्यार. पहा : **गुरगूज**

**गुरघुस** स्त्री. घूस व मांजर यांची गर्जना; गुरम्यांव. क्रिवि. गाढ; शांतपणे; घोरत (झोप). (क्रि. करणे, निजणे.) [ध्व.]

**गुरचरण** स्त्री. १. गायरान; गुरे चारण्याची जागा; गोपचार. २. त्याबद्दल दिलेले पैसे.

**गुरचराई** स्त्री. चरणावळ, गुरे चरण्याच्या परवानगीबद्दल कुरणाच्या मालकाला दिलेला पैसा.

**गुरज** पु. गुर्ज; गदा. [फा.]

**गुरजी** स्त्री. कुत्र्याची एक जात. [का. गुर्ज = लांडगा]

**गुरठाण** न. गुरे बांधण्याची जागा.

**गुरथळ-ळी** स्त्री. १. चेंदामेंदा; चुरगाळा; गुधडा. पहा : **गुधडणे** २. (सामा.) अव्यवस्था; गोंधळ. (क्रि. घालणे, लावणे, मांडणे.)

**गुरदंड** पु. (चारणीकरिता) डोंगरावरील गुरे जाण्याचा मार्ग.

**गुरदा** पु. गदा; पहा : **गुरगूज** [फा. गुर्ज]

**गुरदा** पु. मूत्रपिंड. [फा. गुर्दा]

**गुरदा** पु. पातळ वाटोळी चपाती, आरोळी.

**गुरप (फ-फा) टणे** उक्रि. १. गुंतागुंत होणे, करणे; गुंतवणे; जाळ्यात सापडणे, अडकणे (दोरा, पदार्थ इ. फेऱ्यात). २. गळफटणे; गोंधळणे; भांबावणे. ३. गहाळ होणे, करणे; गमावणे.[सं. गुर + पट्=विदारणे]

**गुरप (फ-फा) टा** पु. घालमेल; गोंधळ; गळफटा; गुंतागुंत; अव्यवस्थित घालमेलीची, गडबडलेली स्थिती (वस्तू, माणूस इ. ची). (विशेषत: अलंकारार्थी पंचमी विभक्तीत योजतात. जसे :- गुरपट्यात पडणे).

**गुरबी** स्त्री. चिमणी. (बे.) [क. गुब्बी]

**गुरमय** स्त्री. गूळ आणि गरम मसाला घालून केलेली पोळी. 'कर गुरमय रोट्या, लेक बहिनाई आली।' - बगा. (अहि.)

**गुरमळणे** अक्रि. १. गुरगुणणे; मुळमुळणे; पुटपुटणे; चाचरत, अस्पष्ट बोलणे. २. गुटमळणे; गोंधळणे; कांकू, अळंटळं करणे. ३. गमणे; रेंगाळणे; वेळ दवडणे.

**गुरमा-मी, गुरमाई** पु. स्त्री. १. मस्ती; आवेश; ताठा; धुंदी; ऐट कैफ, (तारुण्य, विद्या इ.ची) : 'प्रहर दिसा रविवारीं सर्व आले आरब गुरमीस।' - ऐपो ३९८. २. जेवणानंतर किंवा औषधाने होणारी जळजळ, आग. ३. रागाचा झटका. ४. जागरणाने होणारी डोळ्यांची जळजळ, लाली.

**गुरमाळणे** अक्रि. पेंगुळणे; झोप येणे : 'तोंडातला उष्ण विडा चघळता चघळता त्याचा डोळा गुरमाळला.' - सीए १२४.

**गुरव** पु. एक ब्राह्मणेतर पुजारी जात किंवा त्या जातीतील व्यक्ती; विशेषत: शंकराची पूजा करणारी जात; एक बलुतेदार; गावच्या देवाचा पुजारी. वाजंत्री वाजविणे, द्रोण पत्रावळी लावणे इ. कामेही हा करतो. (निंदार्थी) गुरवडा. [क. गोरव = भिक्षेकरी, धनगराचा उपाध्याय]

**गुरवकी** स्त्री. गुरवाचा धंदा (देवपूजादीकर्म), हक्क, वृत्ती वगैरे.

**गुरवडा** पु. गोड वडा : 'केण्या फुगे गुरवडे...' - निसं २७०.

**गुरव(वा)डा** पु. गुरे बांधण्याची जागा; गोठा.

**गुरवपुंज** पु. शेतकऱ्याकडून गुरवाला देण्यासाठी सरकारने वसूल केलेला - घेतलेला - हक्क; गुरवाचा धान्यातील वाटा, बलुते.

**गुरवळी, गुरळी** स्त्री. १. एक पक्वान्न; गुळाची पोळी; साखरपुरी; गुळवरी : 'अनारसे फेणिया गुरवळिया।' - जै ९४.५२. [गुळवरी वर्णव्यत्यासाने] २. 'तोंडातील अवकाश'-(तंजा.)

**गुरवा-वी** वि. श्रेष्ठ, धीर, मोठा : 'अर्जुना हे गुरवी भक्ती।' - ज्ञा ९.२२८. [सं. गुर्वी]

**गुरवार** वि. गरोदर. (कु. गो.)

**गुरवासय** पु. गुरव लोकांची वस्ती, वाडा. (गो.)

**गुरवी** वि. गुरवासंबंधी (पान, पत्रावळ इ.).

**गुर (रा) ळा-ळी** पु. स्त्री. चूळ; गुळणा : 'उदकांमधें सांडी गुरळी।' - दास २.१.६४. [ध्व.]

**गुरंगुटी** स्त्री. पाय पोटाशी घेऊन झोपण्यासाठी केलेले शरीराचे गाठोडे : 'झोंपले अजून करून गुरंगुटी।' - स्त्रीजी १.६८.

**गुरंजणी** स्त्री. गुरगुरणी; गर्जना. (गो.)

**गुरंजणे** पहा : **गुरगुरणे** (गो.)

**गुरंभळणे** अक्रि. गोडसर होणे; गाभुळणे (पेरू, आंबा इ.); पिकायला येणे.
**गुरंभा-भी** वि. पाडाचे; गदरलेले; गाभुळलेले (फळ).
**गुराखी-ख्या** पु. गोवारी; गुरे राखणारा; गोपाल. [सं. गोरक्षक]
**गुराब-व, गुराबा-वा** स्त्री. १. एक प्रकारची नौका : 'स्वर्वल्लि मंडपींच्या भवसिंधूंतील बा गुराबा ज्या।' - मोउद्योग १३.१७३. २.गलबत ठेवण्याची जागा. [फा.]
**गुराळ** पहा : **गुऱ्हाळ**
**गुरिंदा** पु. बातमी देणारा : 'कमाविसदारानें पुष्कळ गुरिंदे म्हणजे बातमी देणारे हाती धरून शोध चालविला होता.' - दुर्दैर १३१.
**गुरु** फोड, व्रण, करट.
**गुरु** वि. गरोदर : 'संबंधु जाला : गुरुविणी जाली' - दृपा ९४.
**गुरु-रू** पु. १. मंत्रोपदेशक. २. धार्मिक उपाध्याय; धार्मिक संस्कार इ. करणारा. ३. उपनयन संस्कारामध्ये गायत्री मंत्राचा उपदेश करणारा. ४. शास्त्रे इ. शिकविणारा; विद्यादाता : 'सकोप दिसती गुरु क्षणभरीच जे तापले।' - केका ८८.५. (ल. निंदार्थी) फूस, भर, प्रोत्साहन देणारा, वाईट मसलत देणारा माणूस. ६. पिता; बाप; पूज्य, वडील माणूस : 'गाति जनमेजया तव गुरुच्या आश्चर्य मरण जननाचें।' - मोअश्व ४.८०. ७. बृहस्पती; देवांचा गुरु : 'वृत्रारिप्रति वदला गुरु ज्या या भद्रधामनीतीतें।' - मोसभा ६.७०. ८. (सामा.) शिक्षक; मास्तर; आचार्य. [सं.]
**गुरु-रू** पु. सूर्यमालेतील सर्वात मोठा ग्रह. दर तेरा महिन्यांना एक राशी अशी याची गती आहे. याच्या अस्ताचा काल मंगलकार्याला वर्ज्य मानतात. गुरु सिंह राशीत असला म्हणजे सिंहस्थ व कन्याराशीत असला म्हणजे त्यास कन्यागत म्हणतात. [सं.]
**गुरु-रू** वि. १. जड; लठ्ठ; वजनदार. २. मोठा विस्तृत : 'हा गुरु मार्गुय गा।' - गीता १३.२२२. ३. पचण्यास जड (पदार्थ). ४. दीर्घ; द्विमात्र (स्वर). ५. कठीण; अवजड; भारी (वस्तू). ६. आदरणीय; मान्य; पूज्य. [सं.]
**गुरु-रू** पु. (संगीत) दोन मात्रांचा काल. [सं.]
**गुरुकिल्ली** स्त्री. १. खुबी; मखखी; शक्कल; कळ, मर्म (कुलंगड्याचे); गूढ उकलण्याची युक्ती : 'प्रकरण जरा जड आहे, पण तुझ्यापासून तिला नरम करण्याची गुरुकिल्ली आता शिकलोच आहे.' - त्राटिका. २. न समजणारे, खोल, गूढ लिखाण, प्रबंध, मंत्र (गुरूने सांगितल्याखेरीज न समजणारे). ३. (सामा.) गूढ; कठीण गोष्ट, शंका.
**गुरुकुल** न. १. गुरूचे कुटुंब. २. गुरुगृही राहून विद्याध्ययन करण्याची प्राचीन आश्रमपद्धती. [सं.]
**गुरुकुल पद्धती** १. प्राचीन काळी गुरुकुलामध्ये उपयोगात आणली जाणारी शिक्षणपद्धती. २. प्राचीन गुरुकुलपद्धतीला अनुसरणारी शिक्षणपद्धती. उदा. कांगडी येथील विद्यापीठात ह्या पद्धतीचा उपयोग करून शिक्षण देण्यात येते.
**गुरुकोष्ठ** न. मोठ्या आकाराचे कवच.
**गुरुक्रम** पु. गुरुपरंपरागत, अधिकृत शिक्षण. [सं.]
**गुरुखूण** स्त्री. गुरूने दिलेला मंत्र.
**गुरुगम्य** वि. केवळ गुरुपासूनच प्राप्त होणारे; गुरुमुखातूनच कळणारे; जे समजून घेण्यासाठी गुरूची आवश्यकता असते असे; दुर्बोध; गहन (श्लोक, वचन, ग्रंथभाग). पहा : **गम्य** : 'कां गुरुगम्य हन ठाय।' - ज्ञा ६.४५९. [सं.]
**गुरुगुरु** पु. पोटातील आवाज. [का. गोरु]
**गुरुगोडी** स्त्री. गुडगुडी : 'गुरुगोडीची आग पडिली.' - पेद ४०.१०९.
**गुरुघंटाळ** वि. १. मोठा आवाज करणारा; वाचिवीर; ओरडणारा : 'तरी त्यास संकलनकार म्हणून हिणविण्यास हे गुरुघंटाल तयारच.' - प्रतिभा ३.१२. २. अवडंबर माजविणारी. (को.)
**गुरुज-झ** पु. एक तीक्ष्ण हत्यार : 'रफई फकीर गुरुजाने भोसकून घेण्याची किंवा मानेतून सुलतानी घालण्याची जरब देऊन पैसे काढतात.' - गांगा ९३.
**गुरुजबारदार** पु. गुरुज हे हत्यार बाळगणारा सरकारी भालाइतासारखा शिपाई: 'गुरुजबारदार दोघेजण व हजार स्वार दिल्हे आहेत.' - देव १४.४३.
**गुरुजी** पु. १. गुरु; शिक्षक; आचार्य; पुरोहित. २. शिक्षक किंवा त्यासारखी पूज्य व्यक्ती यांना लावण्यात येणारा सन्मानसूचक शब्द. जसे :- सानेगुरुजी.
**गुरुतल्पग, गुरुतल्पी** पु. १. गुरुपत्नीशी गमन करणारा. २. (ल.) मातेसमान स्त्रीशी गमन करणारा; महापापी; नीच. [सं.]
**गुरुत्व** न. १. (भौ.) पृथ्वीच्या मध्याकडे पडण्याचा पदार्थाचा कल. २. जडत्व; वजन. ३. मोठेपणा; थोरपणा : 'तोषेचिना शार्ङ्गधरू। गुरुत्वासीं।' - ज्ञा १६.२६. ४. गुरुपणा.
**गुरुत्वबल** न. (भौ.) (पृथ्वीच्या) गुरुत्वाकर्षणामुळे उत्पन्न होणारे बल.
**गुरुत्वमध्य** पु. गुरुत्वाकर्षणाचा मध्यबिंदू; ज्या बिंदूसभोवती पदार्थाच्या सर्व भागांचे कोणत्याही स्थितीत समतोलन होते तो बिंदू.
**गुरुत्वशून्य** वि. मुळीच वजन नसलेले. [सं.]
**गुरुत्वाकर्षण** न. विश्वातील वस्तूंचे परस्पराकर्षण; एक जड पदार्थ दुसऱ्याला आपणांकडे ओढतो अशी स्थिती; पृथ्वीमध्याकडे ओढण्याची शक्ती. [सं.]
**गुरुदक्षिणा** स्त्री. शिक्षण संपल्यानंतर शिष्याने गुरूस द्यावयाची देणगी, संभावना; शिकण्याचे द्रव्य. [सं.]
**गुरुद्रोह** पु. गुरूचा द्वेष; गुरूचा विश्वासघात. [सं.]
**गुरुद्वार** न. शिखांच्या गुरूंनी स्थापन केलेले मंदिर; (सामा.) शिखांचे मंदिर. [सं.]
**गुरुपकड** स्त्री. (मल्लखांब) मल्लखांबावर उडी मारून दोन्ही पाय मल्लखांबाच्या एका बाजूला नेऊन पोटरीच्या पकडीत मल्लखांब धरून मारायची उडी.
**गुरुपीठ** न. गुरूचे वास्तव्याचे स्थान; गुरूची गादी; गुरूचे अधिष्ठान. [सं.]
**गुरुपुत्र** पु. १. गुरूचा मुलगा. २. साधुसंतांमध्ये वाढलेला व त्यांच्याप्रमाणे वागणारा; सत्पुरुषाने उपदेश केलेला; साधू; शिष्य; गुरूअनुगृहीत. [सं.]
**गुरुपुरुष** पु. नवरा; पती : 'व्रतोपवास करावा। गुरुपुरुष निरोपाने।' - गुच ३५.८७. [सं.]

**गुरुपुष्ययोग, गुरुपुष्यामृतयोग** पु. एक चांगला योग. गुरुवारी पुष्य नक्षत्र आले असता होणारा योग. हा अमृतसिद्धियोग होय. [सं.]

**गुरुपूजा** स्त्री. १. कार्यारंभी राशीला गुरु प्रतिकूल असल्यास करायची बृहस्पतीची पूजा. २. आषाढ शुद्ध पौर्णिमेच्या दिवशी करतात ती आपल्या गुरूची पूजा. [सं.]

**गुरुपौर्णिमा** स्त्री. आषाढी पौर्णिमा. या दिवशी आपला मंत्रोपदेशक गुरु, संन्यासी इ. ची पूजा करतात. [सं.]

**गुरुप्रचीती** स्त्री. १. गुरूची पारख, गुणदोषपरीक्षा. २. गुरूचा अनुभव येणे.

**गुरुप्रसाद** पु. १. गुरूची कृपा. २. गुरूच्या आशीर्वादाचे फल (विद्या, कौशल्य, भरभराट इ.). ३. (ल.) भांग; अफू; तंबाखू. [सं.]

**गुरुबल** न. स्वराशीस गुरू या ग्रहाचे आनुकूल्य असणे. जन्मलग्नकुंडलीत हा ग्रह दोन, पाच, सात, नऊ या स्थानी असलेला शुभ मानतात व या काली गुरुबल आहे असे मानतात. [सं.]

**गुरुबंधू** पु. १. एकाच गुरूचे दोन किंवा अनेक शिष्य, त्यांचे परस्परांशी नाते. २. सहाध्यायी. ३. स्वतःच्या गुरूचा पुत्र. [सं.]

**गुरुमंत्र** पु. १. गुरूने सांगितलेला धार्मिक उपदेश; गुरूने उपदेशिलेला मंत्र. २. (ल.) बरावाईट सल्ला; मसलत; गुप्त शिकवण (बहुतेक वाईट अर्थाने). (क्रि. देणे, शिकविणे, सांगणे, म्हणणे.) [सं.]

**गुरुमार्ग** पु. गुरूने उपदेशिलेल्या मंत्रासंबंधी जपादी विधी; गुरूने दाखवलेला परमार्थाचा मार्ग. [सं.]

**गुरुमुख** न. अध्ययनाच्या प्रसंगी गुरूच्या मुखांतून वाक्य निघणे; प्रत्यक्ष गुरूचा उपदेश, शिकवण. [सं.]

**गुरुमुखी** स्त्री. शिखांच्या धर्मग्रंथाची लिपी. ही देवनागरीवरून बनली आहे.

**गुरुरी** स्त्री. ताठा; गर्व; मस्ती; गुर्मी; जोर : 'जुनरकर मोगलानेंही आपले ठाई गुरुरी आणली आहे.' - पेद ३.१४७. [फा. गुरूर]

**गुरुलघुविचार** पु. १. लिहिण्यात, मुख्यतः पद्यात ऱ्हस्वदीर्घ स्वरांचा काळजीपूर्वक विचार; ऱ्हस्वदीर्घाकडे लक्ष. २. बारीक, खोल विचार; सर्व बाजूंनी विचार.

**गुरुवती** स्त्री. महत्त्व; मोठेपणा; विस्तार : 'ग्रंथ गुरुवतीचा ठावो।' - ज्ञा १.३३.

**गुरूवागवेषणा** स्त्री. गुरूचा शोध.

**गुरुवार-दिन** पु. बृहस्पतीचा वार; (रविवारपासून) आठवड्यातील पाचवा दिवस; बृहस्पतवार.

**गुरुवृत्त** न. मोठे वर्तुळ, मंडल. [सं.]

**गुरुशिक्षा** स्त्री. १. अभ्यासाविषयी गुरूने लावून दिलेले नियम; गुरूची शिकवण. २. नियम वगैरे मोडल्याबद्दल गुरूने दिलेले शासन. [सं.]

**गुरुसंप्रदाय** पु. १. पहा : **गुरुमार्ग.** २. विशिष्ट गुरूच्या शिष्यांचा आचार, परंपरा वगैरे. [सं.]

**गुरुसांडोवा** पु. गुरुत्याग : 'ऐसे गुरुसांडोवा करिती' - तसा ९३५.

**गुरुळा** स्त्री. चूळ; गुळणी : 'मीचि होईन सागळा। करूं सुईन गुरुळा।' - ज्ञा १३.४१९. [ध्व.]

**गुरु(रो)ळी** पहा : **गुरवळी, गुरळी**

**गुरू** न. चतुष्पाद प्राणी; जनावर; गाय; बैल; म्हैस; ढोर. इ. [सं. गोरुप]

**गुरू** पु. १. गोवर, देवी या दुखण्यात वाहणारे फोड. न वाहणाऱ्या फोडांना 'मुकागुरु' म्हणतात. २. फोड; व्रण; करट : 'पायास गुरु जाहला म्हणून ऐकिलें.' - ऐलेसं ३८५६. [का. गुरुळे]

**गुरूची कढाई** शीखांचा लंगर; गुरूद्वारातील भोजनालय.

**गुरूचे सीख** जुन्या ऐतिहासिक पत्रांतून कित्येक वेळा 'गुरूचे शिख' असा शिखांचा उल्लेख केलेला आढळतो. गुरु नानकाच्या पंथाचे ते गुरूचे शीख - शिष्य : 'गुरुचे सीख आपल्या मुलखास गेले.'- पेदभा २९.१०५.

**गुरूढोरू-र** न. गुरू; गवत खाणारे, शिंगे असणारे जनावर.

**गुरूप-ब** वि. गुडुप; गडद; अंधारलेला; दाट (अंधकार). [क. गुडुपु]

**गुरूळ** पु. शेताच्या बांधाला खेकड्याने पाडलेले भोक. यातून शेतातील पाणी वाहून जाते. (को.) [क. गुरुळे = खळी, भोक]

**गुरेढोरे, गुरेवासरे** न. अव. गाई, बैल, म्हशी इ. लहानमोठ्या जनावरांसाठी वापरण्यात येणारी व्यापक संज्ञा.

**गुरोडा** पु. १. जनावरांचा गोठा; गायवाडा. २. (निंदार्थी) गुरू.

**गुरोनी** स्त्री. १. गुळाचे द्रावण. २. चूळ. (झाडी)

**गुर्की** स्त्री. वचक; दाब : 'लांगेलुंगे कवि भेदरले अवघ्यावर त्याची गुर्की।' - होला १८. पहा : **गुरकी**

**गुर्गटा** पु. कोळी; किडा. (गो.)

**गुर्गजा, गुर्गू** स्त्री. पु. गदा; लोखंडी सोटा. [फा. गुर्ज]

**गुर्गलॅत** न. थंड पाण्याचा माठ; मातीची घागर. (गो.) [पोर्तु.]

**गुर्ची** स्त्री. लढण्याचे एक हत्यार : 'रा. पां. न. पटवर्धन यांनी दादासाहेब ओंकार संग्रहातील गुर्ची नावाचे हत्यार दाखविले.' - मं षष्ठ सं. वृ. ५.

**गुर्ज** पु. एक हत्यार : 'त्यांच्या हाती लोखंडी - गुर्ज - एक गदेसारखे हत्यार...' - स्मगा २१७.

**गुर्जर** पु. गुजरात राज्य व त्यातील रहिवासी. पहा : **गुजर** [सं.]

**गुर्जरी** स्त्री. १. गुजराती स्त्री. २. (ल.) सुंदर स्त्री : 'अशि अनंतगुण गुर्जरी।' - राजो (मला) १५१.
वि. गुजराती पद्धतीचे, ढंगाचे.

**गुर्झब** पु. काठी; दंड : 'प्रवेशद्वारावर सोन्याचे गुर्झब हाती घेतलेले गुर्झबदार उभे होते.' - स्वामी २४६. [फा.]

**गुर्झबदार** पु. दरबारातील चोपदार; दंडधारी.

**गुर्दा** पहा : **गुडदा, गदा** : 'बारा हजार गुर्दा।' - ऐपो ४४. [फा. गुर्जा]

**गुर्बत** स्त्री. नम्रता; अजिजी; काकळूत : 'इंग्रेज गुर्बत दाखवून काबू साधण्यास चुकणार नाहीत.' - दिमरा १.५४.

**गुर्मी** पहा : **गुरमी**

**गुर्मोत्या** पु. भाताची एक जात. (झाडी)

**गुर्राविणे** अक्रि. १. चिडणे : 'अन् एका डोळ्यानं (शेठ) वामनकडे गुर्राऊन बघत होता.' - बाविबु ६. २. गुरगुर करून अंगावर येणे. पहा : **गुरकावणे** (व.) [ध्व. गुरु]

**गुर्री** स्त्री. १. राग. २. डूख. (झाडी)

**गुर्रेबाजी** स्त्री. गुर्मी : 'आणि अनावर तांबुसताजी, गौरपणाची गुर्रेबाजी।' - ध्रुपद ५१

**गुर्वचार** पु. गरोदरपण; गर्भारपण. (गो.)

**गुर्वार, गुर्विणी** वि. गरोदर; गर्भार. (गो.) पहा : **गरवार**

**गुर्वी** स्त्री. लेख्यशाला; हस्तलिखित ग्रंथांचे संग्रहालय.

**गुर्सेल** स्त्री. कोहळ्याची खीर. (झाडी)

**गुऱ्हाळ** न. १. ऊस गाळण्याचा चरक; ऊस गाळण्याचे यंत्र. २. चरक असलेली जागा ३. गूळ तयार करण्याचा कारखाना (यंत्र, इमारत इत्यादी सर्व उपकरणांसह). ४. ऊस गाळण्याचा, गूळ करण्याचा धंदा, काम. ५. (ल.) लांबलचक हकीगत, भाषण; कंटाळवाणे भाषण; चऱ्हाट : 'पण श्रीमंतांचे गुऱ्हाळ आवरेना त्याला ते काय करणार।' - ऐलेसं [सं. गुर + आलय] (वा.) **एरंडाचे गुऱ्हाळ** - कंटाळवाणे, निरर्थक बोलणे; ज्यातून काही निषन्न होत नाही असे बोलत राहणे. ० **लावणे** - बडबडत बसणे; चऱ्हाट लावणे : 'मी आपला काहीतरी गुऱ्हाळ लावीत असतो.' - कलंदर ४१०.

**गुल** पु. दंगा; गडबड; आवई; आरडाओरडा : 'दोन प्रहराप्रमाणे जेवणाचा गुल उडाला.' -मस्थि [फा.]

**गुल** क्रिवि. पसार; गायब : 'तेवढ्यात हे गुल.' - ऑक्टोपस १७. (क्रि. करणे, होणे.)

**गुल** पु. फूल. [फा.]

**गुल** पु. १. दिव्याची काजळी; कीट. २. आगकाडीला लावलेले फॉस्फरस व गंधक यांचे पूट. ३. हुक्यातील कोळशाचा गोळा, विस्तव; चिलमीतील जळालेला तंबाखू. (वा.) ० **देणे** - मोठ्या खिळ्याचे डोके तापवून त्याने वाटोळा डाग देणे. 'पोटास गुल दिलें होतें त्यांतून पू निघत असतो.' - ऐलेसं २५५०. [फा.]

**गुलअनार** पु. १. डाळिंबाचे फूल; अनारकली : 'सखे गुलअनार गुलचमन निशिचा रमण तसा गोजिरा तुझा मुखवटा।' - होला १०४. २. डाळिंबी रंग. ३. एक झाड. पहा : **गुलनार**

वि. डाळिंबी रंगाची (शालजोडी, वस्त्र इ.). [फा.]

**गुलकणे** अक्रि. खुषीत रंगेलपणे, मनापासून, मोकळेपणाने हसणे. [ध्व.]

**गुलकंद** पु. एक लेह; गुलाबाच्या फुलांच्या पाकळ्या व खडीसाखर यांचे मिश्रण; गुलाबाचा मुरंबा.

**गुलकाडी** स्त्री. आगकाडी.

**गुलकातरी** स्त्री. दिव्याची काजळी काढण्यासाठी वापरतात ती कातरी.

**गुलकावणी** स्त्री. हुलकावणी; ढोंग; फसवणूक; मायावी भाषण, व्यापार, रोख, झोक, आव. (क्रि. दाखविणे, करणे.)

**गुलकाविणे** उक्रि. १. हुलकावणी दाखविणे; फसविणे. २. आरडाओरड करून दबावणीने घाबरे करणे; गोंधळविणे. ३. (मान शब्दाबरोबर प्रयोग) ओवाळणे; हलविणे; चेष्टेने मान मुरडणे. पहा : **घुलकाविणे**

**गुलकी** स्त्री. स्वच्छंदी, रंगेल हास्य; दयापूर्ण हास्य; सरल हास्य. (क्रि. येणे, टाकणे, मारणे.)

**गुलकेश** पु. कोंबड्याच्या तुऱ्याप्रमाणे असलेले फूल.

**गुलखैरा-रु** पु. एक चिनी-इराणी फुलझाड.

**गुलगलबा** पु. गोंधळ; दंगा; आवई : 'बाजूचे सरदार फौज यांणीं आपलाले मिसळीस चालावे, गुलगलबा कांहीं एक होऊं नये.' - थोशामच ७२.

**गुल(ळ)गुल(ळ)** क्रिवि. हळूहळू; कानाला गोड लागेल अशा प्रकारे; हलक्या स्वरात (प्रेम, रहस्य इ. च्या गोष्टी बोलणे.). [ध्व.]

**गुलगुल** गव्हाच्या पीठाची गोड भजी. (आकाराने मोठी) 'तुझ्या नाकाची ठेवन भज्या गुलगुल्यावानी।' - बगा.

**गुलगुला** पु. भुमका; आवई; 'सेनाखासकेल फौजबंदी करून गुजरात प्रांती जाणार यैसा चहूंकडून गुलगुला उठला आहे.' - हिंदखं १.१२९.

**गुलगुलित** वि. गोड, प्रेमळ, मधुर (आलाप).

**गुलगुलीत** वि. १. जाड; लठ्ठ; गुबगुबीत; गोंडस (शरीर). २. मऊ व दबणारी (उशी, गादी). ३. फुगलेला आणि मऊ (भात). ४. (सामा). फार मऊ (पदार्थ).

**गुलगुलेत** पु. पाण्याचा खुजा. (गो.)

**गुलगेंद** पु. फुलांचा गुच्छ : 'संगीन कुच भरदार, सजिव सजदार, गुलगेंद उसासले।' - प्रला ११३.

**गुलच (चि) नी, गुलाचीन** स्त्री. फुलाची एक जात; गुलदावरी.

**गुलचमन** न. फुलबाग : 'सखे गुलअनार गुलचमन' - होनाजी (मला) १४३.

**गुलचांदणी** स्त्री. एक फूल.

**गुलचिमणी** स्त्री. पिवळ्या पोटाची चिमणी (पक्षी).

**गुलछडी, गुलजाफिरी गुलछबू-ब्बू** स्त्री. पु. एक प्रकारचे फूल; निशिगंध. [फा.]

वि. मोहक चेहेरा असलेला (माणूस); रंगेल. [फा. गुलेशब्बू]

**गुलजार :** वि. १. नाजूक; सुंदर; मोहक; रमणीय. २. टवटवीत; प्रफुल्ल. ३. संपन्न; ऐश्वर्ययुक्त : 'बाच्छाई तक्त गुलजार दिसे रंगबहार पुण्याची वस्ती।' - होला १७८. ४. आबाद : 'महाल उंडणगांव वगैरे महाल गुलजार दिले.' - मइसा ८.२१२. [फा.]

**गुलटोप** पु. एक फुलझाड व त्याचे फूल : 'पर्यातक गुलटोप गुलगुलित जळीं कमळणवावरी।' - प्रला १५५.

**गुलटोप** पु. कबुतराची जात.

**गुलडा** पु. १. (विणकाम) ताण्याच्या अलीकडची शेघटे ज्याला बांधलेली असतात ते बैलीवरील आडवे लाकूड. ताण्याची दुसरी टोके जुंपणी अथवा जुंपणे याला बांधलेली असतात. गुलडा आणि जुंपणी यांनी ताणा ताणला जातो. २. बैलीच्या डोक्यावरील आडवी दांडी. हिच्या प्रत्येक टोकाला एक लांब पेंढके - पेंढ-पेंढी असते. ही सुताऱ्याला (गुलड्याशी समांतर असणाऱ्या काठीला) स्थिर राखते.

**गुलतुरा** पु. शंखासुर नावाचे फुलझाड. याला पिवळ्या व तांबड्या रंगाची झुपकेदार फुले येतात. फुलाला वास नसतो (व.) : 'डवना मरवा गुलतुरा। वाळागीर पडदे आणवा।' - पला ४.२२.

**गुलदस्त** पु. १. फुलांचा गुच्छ; झेला. २. गंजीफांतील एक संज्ञा. चार चार पानांचा एक एक दस्त. पाने वाटताना एक दस्त तसाच न पाहता

ठेवून शेवटी तो लावतात. [फा.]

**गुलदस्ता** पु. १. फुलपात्र; फुले ठेवण्याचे भांडे. (माळवी) २. पुष्पगुच्छ. (वा.) **गुलदस्तात ठेवणे** - १. राखून ठेवणे. २. लपवून ठेवणे; गुप्त राखणे : 'पण तें सध्यां गुलदस्तांतच राहूं देणें बरें.' - नपुक १८.

**गुलदान** न. १. फुले ठेवण्याचे पात्र; फुलदाणी. २. पेटलेला तोडा न विझता ठेवण्याची लोखंडी पेटी. ३. कात्रीने दिव्याची काजळी काढून ठेवण्याचे पात्र.

**गुलदार** वि. फुलांची नक्षी काढलेला : 'नित्य नवा पोषाक रंगी गुलदार...' - भाइसमंत्रै वर्ष २० अंक १.२६.

**गुलदावदी-री-ली** स्त्री. एक फूल व त्याचे झाड : 'शरीर सुकुमार कीं गुलदावरी।' - प्रला ११०.

**गुलनार** पहा : **गुलअनार**

**गुलप (फ) णे** अक्रि. १. कष्टाने उच्चारणे; बोलताना अडखळणे; चाचरणे. (को.) २. पायात पाय अडकतील असे चालणे; पायांना आळेपिळे देत चालणे. ३. पहा : **गुरफटणे**

**गुलपरी, गुल्परी** स्त्री. सुंदर स्त्री.

**गुलफूल** न. गोजिव्हा.

**गुलबकावली** स्त्री. एक पांढरे सुवासिक फूल.

**गुलबदन** वि. गुलाबाच्या फुलासारखा सुंदर देह असणारी (स्त्री.).[फा.]

**गुलबदन** पु. १. तापत्यातील (रेशमी वस्त्र) एक भेद, प्रकार; एक प्रकारचे कापड : 'दाविली कंचुकी गुलबदनी।' - प्रला १४९. २. एक रंग.

**गुलबस-क्षी** स्त्री. सायंकाळी फुलणारे एक फुलझाड. याची फुले पांढरी, तांबडी, जांभळी वगैरे अनेक प्रकारची असतात : 'छर्तें आरशांचीं बशिवलीं रंग गुलबासी।' - प्रला ९२.

न. या झाडाचे फूल.

वि. या फुलाच्या रंगाचे. [फा. गुलेअब्बास]

**गुलमखमल** पु. स्त्री. एक फुलझाड व त्याचे फूल; गेंद.

**गुलमस** पु. रानटी पांढरे फूल व त्याचे झाड.

**गुलमाल** क्रिवि. गायब; बेपत्ता. (क्रि. करणे, पळविणे.)

**गुलमुच्छा** स्त्री. अव. गालमिशा; गालावरील राखलेले केस : 'गुलमुच्छा होत्या त्या वरच्या बाजूस चढविलेल्या.' - सूर्योदय १४७.

**गुलमेख** स्त्री. एक प्रकारचा खिळा; गाठदार खिळा. हा लहान असून याचे डोके पसरट असते. [फा.]

**गुलमे (में) धी, गुलमेहंधी** स्त्री. मेंदीचा एक प्रकार व त्याचे फूल.

**गुलमोहोर** पु. १. एक फुलझाड. २. (शोभेची दारू) दारूच्या झाडाचा एक प्रकार.

**गुलवणे** सक्रि. इकडून तिकडे नेणे; झुलवणे : 'गुलवत गुलवत त्याने प्रेक्षकांचे लक्ष दुरून येणाऱ्या एका मोटरबोटीकडे वेधले.'- जात्यांदे २१९.

**गुलसान** स्त्री. बंदुकीत घालण्याची शिशाची गोळी. (गो.) [फा. गुल = गोळी]

**गुलहवस, गुलहौस** स्त्री. ऐषआरामाची आसक्ती; चैनबाजी. [फा.]

**गुलहंसी, गुलहवसी, गुलहौशी-सी** वि. चैनबाज; ऐषारामी; आंबटशोकी; विषयी; हौशी; आनंदी व खर्चिक. [फा. गुलहवस]

**गुलंकार** (गो.) पहा : **गाळंकार**

**गुलाई** स्त्री. (गवंडी काम) गोलाई; कोपऱ्याच्या बाहेरील भिंतीचा गोल भाग : 'दरजा भरलेले सांधे स्पष्ट दिसून दरजा सारख्या जाडीच्या असून चपट्या गुलाईच्या किंवा घोटणीच्या असाव्या.' - मॅरट ७९. [हिं.]

**गुलाट अढी** (मल्लखांब) मल्लखांबाकडे पाठ करून उभे राहून उलटी मारून पायाने मल्लखांबाला विळखा घालणे.

**गुलाटचक्र** न. एकमेकांच्या अंगावरून चक्राप्रमाणे गुलांच्या मारण्याची कसरत.

**गुलाडी** स्त्री. (विणकाम) करवतीकाठाचे विणकाम करण्याचे यंत्र; चाळा. [फा. गुल = फूल]

**गुलाब** पु. १. एक फुलझाड. हा गुलाबी, पिवळा, पांढरा इ. रंगाचा असतो. फुलांपासून अत्तर काढतात व गुलकंद तयार करतात. २. या झाडाचे फूल. ३. गुलाबपाणी व अत्तर : 'गुलाबशिसे, उत्तमसे तीन चार पाठविलेत तर बरें होतें.' - ब्रच २५३. [फा.]

**गुलाबकंद** पु. गुलकंद : 'गुलाबकंद वजन पक्के एक शेर पाठविला तो घेणे.' - ब्रच १२९.

**गुलाबचक्री, गुलाबछकडी, गुलाबपाक** स्त्री. साखरेच्या पाकातील गुलाबाची मिठाई.

**गुलाबछकडी** स्त्री. १. चटकचांदणी स्त्री. २. एक प्रकारचे गाणे.

**गुलाबछडी** स्त्री. खडीसाखरेची कांडी.

**गुलाबजांब** पु. न. मैद्यामध्ये तूप व खवा मिसळून तुपात तळून नंतर जिलबीसारखी पाकात मुरत टाकून केलेली मिठाई.

**गुलाबदान-णी** न. स्त्री. गुलाबपाणी ठेवण्याची व ते शिंपडण्याची लहान झारी. [फा. गुलाब्दान]

**गुलाबदान** स्त्री. (पांढऱ्या रंगाच्या) द्राक्षाची एक जात.

**गुलाबपाणी** न. गुलाबाच्या फुलापासून तयार केलेले सुगंधी पाणी. हे पानसुपारीच्या वेळी अंगावर शिंपडतात.

**गुलाबपाश** पु. गुलाबदाणी. [फा.]

**गुलाबशकर** स्त्री. रेवडी; गुलाबपाक : 'गुलाब-शकरीच्या वड्या सुमारे पन्नास पाठविल्या त्या पावल्या.' - ऐलेसं १२.६६३६.

**गुलाबशेवते** न. सोन्याचे गुलाबाचे फूल; एक दागिना. (गो.)

**गुलाबाचे फूल** रंगेल व्यक्ती.

**गुलाबी** स्त्री. एक लहान झुडूप.

वि. गुलाबविषयक; गुलाबासारखा (रंग, वास, अत्तर).

**गुलाबी अत्तर** गुलाबाच्या फुलांपासून काढलेले अत्तर.

**गुलाबी चंदन** गुलाबासारख्या वासाचे चंदन; चंदनाची एक जात.

**गुलाबी जांब, जाम** एक फळ; रायजांभूळ. [फा.]

**गुलाबी झोप** पहाटेची, थंड वेळेची झोप.

**गुलाबी थंडी** सौम्य प्रकारची, सुखावह थंड हवा; पहाटेची थंडी.

**गुलाम** पु. १. बटकीचा मुलगा; दासीपुत्र. २. कामासाठी विकत घेतलेला माणूस; दास. ३. (ल.) लुच्चा; वस्ताद; ठक; चोर; हरामखोर; सोदा.

४. पत्त्यातील गुल्ल्या; गुलम्या. ५. (कौतुकाने) हुशार लहान मुलगा. ६. चंगकांचन गंजिफातील सहावा रंग. [फा.]

**गुलामगिरी, गुलामी** स्त्री. १. दास्य; गुलामाप्रमाणे राबणे; गुलामवृत्ती; गुलामाप्रमाणे खुशामत. २. सोदेगिरी; शाठ्य; हरामी; लुच्चेगिरी. ३. गुलामांचा व्यापार. ४. (ल.) हांजी हांजी; खुशामत. ५. पारतंत्र्य, परकीय सत्तेखाली असणे. (क्रि. करणे.)

**गुलामजादा** पु. (शिवीगाळ) हरामखोर; लुच्चा; लबाड.

**गुलामपिच(स)णी** स्त्री. (पत्त्यांचा खेळ) प्रथम पाने वाटताना एक एक उताणे पान टाकून ज्याला प्रथम गुलाम येईल त्याने करायची पिसणी.

**गुलामसत्ती** स्त्री. पत्त्यांच्या खेळातील एक प्रकार.

**गुलार** पु. एक झाड : 'वड, पिंपळ, गुलार... या झाडांचाहि खूप प्रसार या पर्वतप्रांतावर असून...' - रूरा ३१.

**गुलाल** पु. १. एक रंग; तांबडा रंग दिलेले पीठ; बाजरी, नाचणी इ. चे पीठ. २. सुरंजी, पतंगी इ. लाकडाच्या पाण्याने रंगवून तयार केलेली पूड. मंगलप्रसंगी, उत्सवात, देवतांच्या जन्मोत्सवात व जेवणावळीच्या वेळी रांगोळीत व विशेषत: शिमग्यात याचा उपयोग करतात. [हिं.]

**गुलाल** स्त्री. न. एक फुलझाड व त्याचे फूल. पहा : **गुलबासी**

**गुलालगोटा** पु. गुलाल भरलेला गोळा. पातळ काचेच्या, लाखेच्या, अभ्रकाच्या गोळ्यात गुलाल भरून तो अंगावर फेकल्यावर तो गोळा फुटतो व गुलाल पडतो. शिमग्यात असे गोळे अंगावर फेकीत असत : 'गुलालगोटे शिवाय ठिवले निरनिराळे अंबारींत।' - ऐपो १९९.

**गुलाल चिकवे** लुगड्याचा एक प्रकार, वाण.

**गुलालधारी** बायकांच्या हातात घालावयाच्या बांगड्यांचा एक प्रकार.

**गुलालबार** न. कनाती पडद्यासारखे एकप्रकारचे कुंपण किंवा बाड. मुसलमान बादशहाच्या खास डेऱ्यासभोवार असे कुंपण असे.

**गुलाला, गुल्लाला** पु. एक फुलझाड.

**गुलालाटू** पु. (मल्लविद्या) कुस्तीचा एक डाव.

**गुलाली** वि. १. गुलालाच्या, गुलालासारख्या रंगाचे (वस्त्र). २. गुलालाचा, गुलालासारखा (रंग).

**गुलावा** पु. भुलावा; गुंगीचे औषध : 'घरामधीं उंदीर झाले गुलावा देते मी त्याला।' - धाश्रलो ९२.

**गुलांडी** स्त्री. झुकांडी : 'गुलांडी देऊन पळाली.' - गोता ११९.

**गुलिका** स्त्री. (वै.) पुटकुळी; उंचवटा.

**गुलिस्तान** न. बाग. [फा.]

**गुली** स्त्री. तांबडे प्रवाळ. (प्रां.)[हिं. गुली = तांबड्या प्रवाळाची एक जात]

**गुली** स्त्री. हुलकावणी : 'पाऊस कवा पडायचा, कवा न्हाई, अशा नुस्त्या गुल्याच दाखवत हुता.' - रैत १५०.

**गुलुच्छ** पु. (वन.) फुलोऱ्याचा एक प्रकार. सर्वसाधारण फुले कमीजास्त लांबीच्या देठामुळे एकाच पातळीत येतात.

**गुलुंगा** पहा : **कुलंगा, कुलुंगा**

**गुलुली, गुलेल** स्त्री. गलोल; गोफण. (व.) [हिं. गुलेल]

**गुल्फ** पु. 'गलबला' - (तंजा.)

**गुल्फ** पु. पायाचा घोटा : 'गुल्फद्वय धरिजे।' - ज्ञा ६.१९७. [सं.]

**गुल्फसंधि-धी** पु. (वै.) पायातील घोट्याच्या भागातील सांधा.

**गुल्बांग, गुलबांग** पु. भुमका; आवई; बोलणे; कंडी : 'बेदरास येण्याचा गुल्बांग दाट होता.' - मइसा ७.११२. [फा.]

**गुल्म** पु. न. विशिष्ट संख्येचा व रचनेचा सैन्यविभाग, तुकडी; तीन सेनामुखांची तुकडी (सेनामुख = ३ हत्ती, ३ रथ, ९ घोडे व १५ पायदळ). [सं.]

**गुल्म** पु. न. गुंतागुंतीचे व दाट किंवा पसरणारे झुडूप. तृण, वृक्ष, लता व गुल्म हे वनस्पतिक्षेत्रातील मोठे वर्ग आहेत. [सं.]

**गुल्म, गुल्मवात** पु. न. १. प्रकुपित वातादी दोषाने कोठ्यात उत्पन्न होणारा गोळ्यासारखा एक रोग. वायगोळा. कुशी, हृदय, नाभी, बस्ती ही त्याची स्थाने आहेत. २. पाणथरी. ३. ग्रंथी; गाठ. ४. गोळा; गळू; गरस. [सं.]

**गुल्मोदर** पु. उदर रोगाचा एक प्रकार. [सं.]

**गुल्ल** न. अतिशय गुंगी; कैफ. (गो.)
वि. कैफाने उल्लू झालेला; धुंद.

**गुल्ल-गुल्ली** पु. स्त्री. गलबला : 'तत्त्वांचा गल्बला जेथें। निवांत कैचें असेल तेथें। याकारणें गुल्लिपरतें। कोणियेकें असावें।' - दास १३.५.२४. [ध्व.]

**गुल्लडाग** पु. तापवलेल्या खिळ्याने, मुद्रेने दिलेला डाग, चोचा; गुल : 'गुल्लडागांची जांचणी।' - दास ३.७.३४.

**गुल्ला** पु. चुकांडा; झुकांडी (क्रि. मारणे, देणे). (व.)

**गुल्ली** स्त्री. १. (काशी) बिटी; इटी. २. (ओतकाम) धातूचा चूर पुन्हा वितळून त्याची ओतलेली चपटी वाटोळी चकती. [हिं.]

**गुल्ली** स्त्री. लहानसा ढीग, गंज. (व.)

**गुल्ली** स्त्री. हलकल्लोळ; गडबड.

**गुल्ल्या** पु. पत्त्यातील गुलाम. (ग्रामीण.)

**गुल्शन** पु. बाग; उद्यान. [फा.]

**गुल्हेर** वि. शेंदरी; डाळिंबी (रंगाचे).

**गुल्हेर** न. उंबराचे फळ.

**गुवलणे** उक्रि. वापरणे. (व.)

**गुवाड** पहा : **गुखडी** (राजा.)

**गुवाड** पु. घाणेरी. (बे.)
वि.१. घाणेरडा; ओंगळ, गूघाण. (कु. गो.) २. (ल.) कमी किमतीचा.

**गुवेर** न. भुयार : 'गुवेरी पाषाणु चडाविला' - कला १५.

**गुवेरे** न. (लहान मूल किंवा आजारी माणूस यांच्या) विष्टेने भरलेले वस्त्र.

**गुसपणे** अक्रि. गोंधळणे; गुंतणे. (गो.)

**गुसपागोंधळ** पु. गोंधळ; गुंतागुंत. (गो.)

**गुस (सु) ल** स्त्री. आंघोळ. पहा : **घुसळ** : 'आराम होऊन गुसल केली.' - पया ४६७. [फा. गुस्ल]

**गुसलखाना** पु. न्हाणीघर; स्नानघर. [फा.]

**गुसी** स्त्री. खड्ग.

**गुसुलखाना** पु. गुप्त सल्लामसलत करण्याचे किल्ल्यावरील स्थान.

**गुस्सा** पु. राग; क्रोध; कोप. [फा.]

**गुहा** स्त्री दरी; कंदरा; घळ; कपार; डोंगर-पर्वतातील बीळ; गुफा. [सं.]

**गुहाडी** (व.) पहा : **गुधाडी**

**गुहासय** वि. पु. गुहाश्रयी, गुहेत राहणारा : 'भणौनि गुहासय समाधी : मांजि रेंगे' - ज्ञाप्र ८५७.

**गुहिक** पहा : **गुह्यक** : 'हटक देशिचा गुहिकु ' - रुस्व २१४.

**गुहिरा** पु. १. सरड्याच्या जातीचा एक प्राणी. हा इच्छेला येईल त्याप्रमाणे रंग पालटतो : 'कीं गुहिरिया सरडाचे नाना रंग।' - स्वानु १३.२.९७. २. एक विषारी साप. (व.)

**गुहिरा** वि. कुचकट स्वभावाचा. (व.)

**गुहिऱ्या-रा** वि. १. विषारी. २. दाट; घन रंगाचा : 'गोरीला लागे पान। नाग गव्हळ्या गुहिऱ्या। बाऱ्या चालूं द्या दोहिऱ्या॥' - वलो ४८. (व.)

**गुह्य** न. १. गुप्त गोष्ट, वर्तमान; गूढ तत्त्व. २. जननेंद्रिय; उपस्थ; योनी; शिश्न; भग.

वि. १. खाजगी; एकांताची; आडवळणाची (जागा). २. गुप्त; गूढ; प्रच्छन्न (कृत्य, कारभार, गोष्ट). [सं. गुह् = लपविणे. गुह्यम]

**गुह्यक** पु. यक्ष. [सं.]

**गुह्यार** पु. एक प्रकारचा सरडा : 'जैसा जैसा घडे संग। तैसे गुह्याराचे रंग।' - दास १३.७.१७.

**गुळकी-खी-खे** स्त्री. न. १. (शिंपी) गुंडी; बिरडे; बटन. २. (दावे इ. च्या) बिरड्यात अडकविण्याची गाठ. ३. बिरडे व गाठ (एकत्र मिळून). ४. स्त्रियांचे एक शिरोभूषण; वेणीत किंवा अंबाड्याच्या वर घालायचे अग्रफूल. (कु. राजा.) [सं. गोलक]

**गुळखे** न. १. गोंधळ; लचांड. (गो.) २. अपुरे. (गो.) [सं. गोलक]

**गुळगुळथापडी, गुळथापडी** स्त्री. १. (लहान मुलाला निजविण्यासाठी हळू हळू थोपटणे) गोड गोड भाषण, वर्तन; नरमनरम शब्द. २. गुळगुळीत, संदिग्ध किंवा मोघम भाषण; गुळूमुळू बोलणे. ३. समजूत पाडणारे, वळवणारे, अनुकूल करून घेणारे भाषण, वर्तन; युक्तिप्रयुक्ती.

**गुळगुळा** वि. मऊ, सपाट व गोड : 'बचनागी गुळगुळा लागे वोठीं। प्राण नाशी रिघोनी पोटी।' - मुआदि ३४.७९.

**गुळगुळीत** वि. साफ, मऊ व चकचकीत; नितळ; सफाईदार; खाचखळग्यांविरहित; खरखरीत नव्हे असा.[सं. गुल = गोल] (वा.) ० **करणे** - उलटीसुलटी (हजामत, खरडपट्टी) करणे.

**गुळच (ची-म) ट** वि. थोडेसे गोड; गोडसर : 'येक्या संगें तें कडवट। येक्या संगें तें गुळचट।' - दास ११.७.१६.

न. गूळसाखर वगैरे गोड पदार्थ.

**गुळणा-णी** पु. स्त्री. १. (चूळ भरण्यासाठी घेतलेले) तोंडभर पाणी; घोट. (क्रि. घेणे.) २. (पाण्याची, रक्ताची) टाकलेली चूळ. (क्रि. होणे, टाकणे.) ३. तोंडात येणारे पित्त; तोंडातील व्रण. (क्रि. येणे.) ४. तोंड खुळखुळणे, धुणे; चूळ भरणे. (क्रि. करणे.) [ध्व.] (वा.) ० **धरणे** - १. गुप्त ठेवणे. मिठाची गुळणी धरणे असा प्रयोग रूढ आहे. गुळणी धरल्यावर बोलता येत नाही यावरून. २. न बोलणे; तोंड दाबून धरणे. ० **सोडणे** - गुह्य फोडणे. **तुपादुधाच्या गुळण्या टाकणे** - संपत्तीत लोळणे, न्हाणे.

**गुळण्णा** पु. गुळाचा गणपती. (गो.)

**गुळत्र, गुळत्रय** न. गूळ, राब, काकवी यांचा समुदाय : 'मद पारा गुळत्र।' - दास १५.४.१५.

**गुळध (धि-धु) वा, गुळधा** पहा : **गूळधवा**

**गुळब-बा, गुळंभ** पहा : **गुळुंब-भ**

**गुळभात** पु. लग्न ठरल्यावर पाहुणे मंडळींसाठी करावयाचे भोजन. (कुण.)

**गुळभेलीवत** वि. अल्पकाल सुखदायक; क्षणभंगुर; तात्पुरते सुख देणारा.

**गुळमट, गुळंबट** वि. १. पहा : **गुळचट** १. २. आंबटसर. (गो.)

**गुळमट** वि. स्पष्ट, निर्भीड नसलेला; गुळमुळीत : 'कार्यकर्ते गुळमटच अभिप्राय देतील.' - सासिं २६.

**गुळमटणे** अक्रि. १. (आंबा, चिंच इ.) गोडसर होणे. (राजा.) २. अस्पष्ट बोलणे; घुटमळणे.

**गुळमु (म) ळणे** अक्रि. १. गुणगुणणे; तोंडातल्या तोंडात बोलणे. २. बोलण्यात अडखळणे; घुटमळणे; कां कू करणे. [ध्व.]

**गुळमुळीत** वि. मुळमुळीत; असंदिग्ध; अर्धवट; अस्पष्ट; तोंडातल्या तोंडात (भाषण इ.).

**गुळमेख** स्त्री. मोटेच्या खालच्या चाकाची कण्याची अरी.

**गुळवणी, गुळे(ळो)णी,** न. १. गूळमिश्रित पाणी. २. गुळाच्या पाण्याचे कालवण (पुरणाच्या पोळीशी खाण्यासाठी). यात कधी थोडे पीठही घालतात. (कु. व.)

**गुळवणे** सक्रि. गुळाच्या पाकात घोळणे : 'गुळवलेले ते खोबरे खायला फार खमंग लागे.' - मापु.

**गुळवरी, गुळोरी** स्त्री. एक खाद्य, पक्वान्न. पहा : **गुरोळी** : 'मांडा साखरपांडा गुळवरी।' - एभा २७.२९०.

**गुळवा-वी-व्या, गुळावा, गुळ्या, गुळरांध्या, गुळहारी** वि. गूळ तयार करणारा.

**गुळवा** पु. गुळातला एक खाद्यपदार्थ : 'घारगे गुळवे दहिवडे।' - रामदास मापु.

**गुळवेल** स्त्री. एक कडू वेल; गरुडवेल; गरूळवेल. (को.) ही वेल औषधात फार उपयुक्त व महत्त्वाची असून तुरट, कडू, उष्ण, वीर्योद्दीपक व ज्वरनाशक आहे. बहुतेक सर्व रोगांवर ही उपयोगी पडते. [सं. गुडूची]

**गुळशी (शे) ल, गुळशेले** न. तांबडा भोपळा उकडून त्यात दूध व गूळ घालून केलेली खीर. (व.)

**गुळहार, गुळार** पहा : **गुऱ्हाळ**

**गुळ(ळा)ळा** पु. गुळणा; चूळ : 'गुळळा कीजे राउळें। आरोगणांतीं।' - ऋ ८४. [ध्व.]

**गुळंकरी** पु. वेगवेगळ्या ठिकाणांहून गोळा झालेल्या माणसांपैकी एक :

'तो महुद गावी गेला. त्याच्यासारखे बरेच गुळंकरी तेथे जमले होते.' - बनगर १२२.

**गुळंब, गुळम-मा-मी, गुळा (ळी) म** न. पु. वाडगे; पितळेची मोठी वाटी. (गो. कु.) २. न. जेवण्यासाठी वापरात असलेले काशाचे पात्र. (बे. गो.)

**गुळंब-बा** पु. एक पकान्न. गुळाच्या पाकात शिजवलेल्या आंब्याच्या फोडी; गुळाचा मुरंबा.

**गुळाचा गणपती, गणेश** १. आळशी; मंद; गलेलठ्ठ; अचळोजी. २. होयबा; बुळा; दुर्बळ; शेणाचा पो.

**गुळांफो** पु. शिजवलेला, पाणी मुरलेला भात. (कु.)

**गुळी** न. अव. खाडीतील चिखल : 'बांधाची भोकें नजरेस येतांच तेथें गुळीं म्हणजे खाडींतील चिखल व दगड घालून बंद केलीं तर मग त्यात पाणी शिरत नाहीं.' - केळआत्म ५१.

**गुळी** स्त्री. नीळ (झाड व त्यापासून होणारा पदार्थ). [गु. गळी]

**गुळी** स्त्री. १. शौचाच्या वेळी बाहेर येणारा मलाशय. (क्रि. उतरणे.) २. गोळी; गुटिका; लहान लाडू. (गो.कु.) (वा.) ० **होणे** - थरकाप होणे. (गो.)

**गुळी** न. १. वाल इ. द्विदल धान्याच्या मळणीनंतर निघालेले गुरांना घालायचे भूस. २. शेंगांची टरफले, झाडाचा पाला, वेलाचे तुकडे इ. मिळून झालेले गुरांचे खाणे. (को.)

**गुळी, गुळीसाखर** स्त्री. तांबडट, भरड अशी एक प्रकारची साखर; गुळासारखा रंग असणारी एक प्रकारची साखर.

**गुळीतोळ** पु. निळीच्या एक मण उत्पन्नावर घेतला जाणारा एक रुपया कर.

**गुळु** दंगा.

**गुळुळा-ळी** पु. गुळणी.

**गुळुंब-बा, गुळूम** न. पु. १. गरस; गाठ; फोड; गळू. २. झाडास येणारी आवाळूसारखी गाठ. ३. बांडगूळ; परोपजीवी वनस्पती. [सं. गुल्म]

**गुळू** पु. दंगल; कट : 'हर्काबादवाल्यांनीं अकबरपुरच्या जमिनदारास चिठ्या लिहिल्या कीं तुम्ही गुळु करून ठाणें उठवून देणें म्हणजे आम्ही येतो.' - पेद २.१३२. [फा. गुलु = गळा]

**गुळे** न. (क.) दुष्काळामुळे किंवा दंग्यामुळे परागंदा झालेला गाव, वस्ती. (राजा.) पहा : **गुढार, गुढे** [का] (वा.) ० **येणे** - पेंढार येणे. (बे.) **गुळ्यास जाणे** - आश्रयार्थ जाणे : 'शत्रूची फौज आली तेव्हा अनागुंदी प्रांतांत गुळ्यांस कोपळचे लोक गेले...' - ऐलेसं ७६६. **गुळ्यास लावून देणे** - आश्रयार्थ कोठेतरी पाठविणे : 'अनेगुंदी व कनकगिरी संस्थानिक यांनी मुलेंमाणसें गुळ्यास लावून दिली... कनकगिरी अगदीं ओस आहे.'-ऐलेसं ४०९६.

**गुळेकरी** पु. परागंदा; गाव सोडून जाणारी व्यक्ती : 'फिरंग्याच्या हल्ल्याची बातमी अगोदर फुटली असल्यामुळे लोक भीतीनें गुळेकरी बनून पळून गेले.' - वसमो.

**गुळेरस** पु. नारळाचे दूध व गूळ घालून बनवलेले पिठाच्या गोळ्यांचे एक पकान्न. (हेट.)

**गुळ्ये** न. मासे पकडण्याच्या जाळ्याला वजनासाठी लावलेली चपटी कडी. (को.)

**गुळ्ळव्वा** स्त्री. १. आषाढातील मंगळवारी करण्यात येणारी कर्नाटकातील ब्राह्मणेतरांची गौरपूजा. २. (ल.) फलकल मारून बसणारी स्त्री.

**गुंग** वि. १. बेभान; मूढ; धुंद; जड; निपचित (ज्वर, झोप, दुःख, नशा इ.नी.). २. गर्क; तल्लीन; निमग्न (एखाद्या विद्येचा अभ्यास, व्यासंग यात). ३. थक्क; आश्चर्यचकित; मोह पावून परावृत्त; स्तंभित (शास्त्रातील कठीण अंश पुरतेपणी मनात न आल्यामुळे इ.). ४. एखाद्या विषयात एकतानता झाल्यामुळे इतर व्यवसायात अनासक्त, विरक्त [फा. गुंग = तल्लीन, मूक]

**गुंगणी** स्त्री. गुंगी; झापड (झोप, नशा वगैरेची). पहा : **गुंगी**

**गुंगणे** अक्रि. १. गुंग करणे; घुमणे; गुणगुण करणे (गांधीलमाशी, भुंगा, भोवरा, जोराने फेकलेला घोडा, गोळा वगैरेंनी) : 'गुंगल गोळे येती छणाछण।' - ऐपो २२३. २. (ल.) हुं हुं हुं असे हळू गाणे; मोठा आवाज न करता तोंडातल्या तोंडात गाणे म्हणणे. [ध्व.]

**गुंगणे** अक्रि. १. धुंद, जड, मूढ, सुस्त होणे (मूर्च्छा, नशा, झोप यांनी). २. मागे लागणे; भुलणे; वेडावणे. ३. हळूच जाणे; निसटणे; सटकणे. ४. तल्लीन, गर्क होणे; भान विसरणे; निमग्न असणे. ५. गुंग होऊन डुलू लागणे; थक्क होणे.

**गुंगविणे** सक्रि. १. गुंग करणे; मूढ, मुग्ध, जड करणे. २. गुंगु करायला लावणे. ३. (ल.) एखादी वस्तू पळविणे. ४. (मुलांच्या खेळात) जेरीला आणणे. [गुंगणे प्रयोजक]

**गुंगारणे** अक्रि. १. सूं सूं करीत जाणे (गोफणगुंडा). २. फसवून फरारी होणे; पळून जाणे; पसार होणे; लबाडीने नाहीसे होणे (गोफणीच्या दगडाप्रमाणे). ३. गुंगीत, धुंदीत, अमलात असणे (औषध, दारू वगैरेच्या). ४. डोळे जड, सुस्त होणे (औषध, झोप यामुळे).[ध्व.]

**गुंगारा** पु. गुं गुं आवाज; गुणगुण. २. गोफणगुंड्याचा आवाज. [ध्व.]

**गुंगारा** पु. १. फसवून पळणे; फरारी होणें; फसविणे. (क्रि. देणे, मारणे.) २. (सामा.) नजर चुकवून जाणे; निसटणे.

**गुंगावणे पहा : गुंगणे** १, २, ४.

**गुंगी-ग्या** वि. गुंगीत असलेला; गुंगलेला.

**गुंगी** स्त्री. १. सुस्ती; जाड्य; धुंदी; बेहोशी; झापड (झोप, ताप, दुःख, दारू यामुळे आलेली). (क्रि. येणे, चढणे.) २. भूल, बेशुद्धी (औषधाने येणारी).

**गुंगुरडे, घुंगुरडे** न. मच्छर, डास, कीटक वगैरे. [का. गुगड]

**गुंघाटा** पु. गोंगाट; गलबला; आवाज : 'आस्वलें दिवाभीतें सायेळ्या। देती गुंघाटे किंकाळ्या।' - होला ११४. [ध्व.]

**गुंज** पु. १. कट; 'तिला आपल्या गुंजांत घेतां कामां नये.' - विवि १०.९.२१०. २. जमाव : 'मोंगलाची गुंज बळावली म्हणजे भारी पडेल.' - पेद १.५२. [का. गुंजु]

**गुंज** न. स्त्री. बिंडा. पहा : **गुंजडा**

**गुंज** स्त्री. १. एक औषधी वेल, वनस्पती. पाने बारीक व लांबट असतात. गुंजेच्या तांबडी व पांढरी अशा दोन जाती आहेत. तांबडी गुंज विषारी असते. २. गुंजेचे बी. याने सोने वगैरे जोखतात. ३. एक वजन, परिमाण, एका तोळ्याचे ९६ गुंजाभार वजन असते. [सं.] [का. गुंजा]

**गुंज, गुंजट** न. लाकडाला आलेले टेंगूळ; गाठ. [का. गुंजु.]

**गुंज** स्त्री. जमाव; जथा; जूट. (वा.) ० **उखळणे** – जमाव उधळणे : 'कळेल तैसे साहित्य करून तेथून गुंज उखले तो अर्थ केला पाहिजे.' - पेद ३.१४६. ० **फोडणे** – १. संशयनिवृत्ती करणे. २. जमाव फोडणे : 'भेटून गुंज फोडून मग दिल्लीकडे येतो.' - पेदभा २९.२५१. ० **बांधणे** – जमाव करणे : 'हफीज कार्तिकमासी गुंज बांधोन दक्षणियांसी जुजणार.' - हिंगणेदभा २.५४.

**गुंजट-गुंजार** वि. गाठाळ (लाकूड); गुंजाट.

**गुंजडा-डी-डे, गुंजारडी** पु. स्त्री. न. गोळा; बिंडा; रीळ (फीत, दोरा, दोरी इ.चा). [क. गुंजु]

**गुंजडा-डी, गुंजवडा-ला, गुंजाडा** स्त्री. पु. वर गुंजा डकवलेला मेणाचा गोळा, गुंडी, चेंडू.

**गुंजणे** अक्रि. गुं गुं करणे; घोंगावणे (मधमाशी); गुंजारव करणे. [सं. गुंजन]

**गुंजलाडू** पु. गुंजा चिकटवलेला लाडू : 'द्राक्षलाडू गुंजलाडू।' - वेसीस्व ८.११५.

**गुंजवला** पु. १. एक वनस्पती. २. चिबुडाच्या जातीचे वाटोळे फळ.

**गुंजा** स्त्री. अव. पुष्पकोश गळून पडल्यावर राहणारा बीजकोश : 'झाडांना बार फुटतो व मग त्यांच्या गुंजा बाजूनें फळे धरतात.' - पाण.

**गुंजा** पु. १. गुंज. २. मोदकासारखा एक पदार्थ. (झाडी)

**गुंजा** स्त्री. 'बुंदी' - (तंजा.)

**गुंजाइशी, गुंजाईश-ष-स, गुंजाएस** १. उत्पन्न; ऐपत : 'दिवाणाने गुंजाईस अधिक सांगितल्यानें भांडावयास उभे राहतात.' - सभासद २५. २. फायदा. पहा : **गुंजावीस** [फा. गुंजाइश]

**गुंजाइशी, गुंजाईश-ष-स, गुंजावीस, गुंजाएस** स्त्री. १. सवड; जागा. २. अवसर. ३. त्रुटी. (वा.) **गुंजाईस ठेवणे** – लपवून ठेवणे. [फा. गुंजाइश]

**गुंजायश-ष** स्त्री. पहा : **गुंजावीस.** १. उपयोग : 'स्वारांची गुंजायश चहू महिन्यात (बर्सातीच्या) नाहीं.' - मइसा ८.४३५४. २. प्राप्ती; नफा. (व.) [फा. गुंजाइश]

**गुंजारव** पु. १. भुंग्याचा गुं गुं असा आवाज : 'प्रदक्षिणा ते अवघे तिलाहो धरूनि गुंजारव घेति लाहो।' - वामन, वेणुसुधाप्रसंग २, श्लो ३. २. गोड आवाजातले गुणगुणणे : 'मधुकर वन वन फिरत करी गुंजारवाला।' - मानापमान.

**गुंजावणे** अक्रि. लालभडक होणे : 'अन्याबाच्या डोळ्यांतून रक्त भरून ते गुंजावत चालले होते.' - सीपो ३३.

**गुंजावा** पु. बिंडा; गुंडाळी (सूत, दोरा यांची) : 'सुताचा गुंजावा करी शुद्धला।' - वसा ५८. [क. गुंजु = गुंता]

**गुंजावीस** स्त्री. पहा : **गुंजाईस, गुंजायश.** १. दोष; अपुरेपणा; व्यंग कसर. २. चूक; तफावत. ३. व्यत्यय; अंतर; कसूर (चाकरी, उद्योगधंदा, काम इ. मध्ये). ४. कूस; बाकी. ५. खोच.

**गुंजावीस** स्त्री. १. उत्पन्न; नफा; मिळकत; लाभ (धंदा, व्यापार यात). २. बेकायदेशीर नफा; खादगी. ३. उपयोग.

**गुंजासी** वि. लाभकारक; फायद्याचा : 'हसनाबाद व निलगे हे दोन्ही महाल चांगले गुंजासी आहेत.' - पेद २५.२९५. [फा. गुंजाइश]

**गुंजाळ** वि. लालभडक : 'त्या पक्ष्याचा तो पांढरा रंग... बारीक गुंजाळ डोळे...' - गणूराया ९८.

**गुंजाळी** स्त्री. गुंतागुंत.

**गुंजी** (गो.) पहा : **गुंज**

**गुंजुला-ळा** पु. १. गुंजवला. पहा : **गुंजडा**. २. बसलेल्या माणसांचे कोंडाळे, कडे (को.) ३. जमाव; घोटाळा. (गो.) [क. गुंजु]

**गुंज्या** पु. तिळाची करंजी. (झाडी)

**गुंठा** पु. एक चौरस साखळीभर जमीन; जमीन मोजण्याचे एक माप; एक चाळीसांश एकर किंवा १२१ चौरस यार्ड; ३३ फूट लांब-रुंद जमिनीचा तुकडा. [क. गुंटे]

**गुंड** पु. १. वाटोळे भांडे; हंडा; गंज : 'तेव्हां ठेवी चुलीवर गुंड पाण्याचा राही तत्क्षणी।' - अफला ५६. २. (ल.) खरडा; मोत्याचा पुढे आलेला भाग, गाठ. ३. वाटोळा दगड; गुंडा; गोटा. (सामा.) घडीव दगड : 'वरि यमनियमेंसीं गुंड घडिले।' - स्वादि ७.३.५४. ४. गोळा (लोखंडी, दगडी). ५. लाकूड, कोळसा मोजण्याचे ५६ पौंडी वजन. (तंजा. मद्रास) [क.]

**गुंड** पु. तोफेचा बार.- (तंजा.)

**गुंड** पु. (विणकाम) हत्त्या नावाच्या चौकटीखालचे लाकूड.

**गुंड** वि. १. मवाली, समाजकंटक. २. वस्ताद; कावेबाज; धूर्त. ३. चतुरस्त्र; हरहुन्नरी; हुशार; तरबेज.

**गुंडगडगी** स्त्री. लिंगायतांच्या गळ्यातील लिंगाची पेटी. [क.]

**गुंडगळे-गाळे-गुळे, गुंडगे-गी, गुंडगोळे** न. लहान गुंड; गुणगळे; मातीची गुंडगी : 'एक थाळी, लोटा-फुलपात्र, गुंडगोळे ही पितळेची... भांडी...' - चंद ३५. २. (ल.) ठेंगू, ठुसका माणूस.

**गुंडणे** उक्रि. १. बांधणे; गुंडाळणे; वळकटी करणे; लपेटणे : 'तया गुंडलिया प्रकाशा। क्षेत्रज्ञु नाम॥' - ज्ञा १४.७९.

**गुंडणे** अक्रि. गोत्यात येणे; गंडवले जाणे.

**गुंड(डे)री** स्त्री. ब्राह्मीसारखी एक वनस्पती. (गो.)

**गुंडळा** वि. गोल अंगाचा; गुटगुटीत.

**गुंडळी-ळे, गुंडाळे** स्त्री. न. गुंजडी; गुंडाळा; वळकटी; बिंडा; एकावर एक वेढून केलेला गोळा (कागद, कापड, दोरी इत्यादीचा).

**गुंडा** पु. १. वाटोळा, मोठा गोटा, दगड : 'जैसा पर्वतावरौनी वोहटळिं गुंडा लोटित तयांसि तळवटा। यावया वेळ न लगे तैसा।' - चक्रधर, सिद्धांतसूत्रें पू. ५२. २. (ल.) मोठा गुंड; एक भांडे : 'दोंच घागरीचा गुंडा नित्य घ्यावे।' - रामदासी २.३५. ३. (बांधकाम) माठीव चौरस दगड; चिरा; मोठी खांडकी. ४. (कुंभारी) मडक्यांना आकार द्यायचा

दगड. हा मडके घडविताना मडक्याच्या आतील बाजूला धरून बाहेरून लाकडी पट्टीने ठोकतात. ५. जोत्याचा मधला थर; बेंदरीच्यावर पायाशी ओळंब्यात बांधलेले दगडी काम. ६. (कुंभारी) चाकाचा मधला ठोकळा. याच्यावर मातीचा गोळा ठेवून त्याला आकार देतात. ७. बिंडा; गुंडी; गुंजडी (सूतदोऱ्याची). [क. गुंडु]

**गुंडा** वि. १. धूर्त हरहुन्नरी, हरकामी माणूस.अतिशय शहाणा, हुशार : 'पुत्र व्हावा ऐसा गुंडा। ज्याचा तिही लोकीं झेंडा।' - तुगा. २. (वाईट अर्थानेही योजतात) सोदा; ठक. [क. गुंड]

**गुंडाळणी** स्त्री. उसाची पाती उसाभोवती गुंडाळण्याचे काम; ऊसबांधणी.

**गुंडाळणे** उक्रि. १. वळकटी करणे; (दोरी इत्यादीने) लपेटणे; वेष्टणे. २. एकत्र गोळा करणे. ३. आवरणे; आटोपणे; बंद करणे, (उद्योग, कामधंदा). ४. (सामा.) व्याप्ती कमी करणे. ५. आच्छादणे; वेढणे. अक्रि. १. गुंडाळले जाणे. २. (पंचप्राण एकत्र आल्यामुळे) मरणे. [सं. गुंठ = वेष्टणे] (वा.) **गुंडाळून ठेवणे** - न जुमानणे; बाजूला सारणे : 'प्रसंग पडला म्हणजे युक्तिवाद गुंडाळून ठेवणारी सुधारक मंडळी दृष्टीस पडते.' - लोटिकेले ४.१३८.

**गुंडाळणे** उक्रि. १. पराजित करणे; कुंठित करणे; निरुत्तर करणे. २. हाताखाली घालणे; बळकावणे; काबीज करणे (परका देश, माल इ.).

**गुंडाळा-ळी-ळे** पु. स्त्री. न. १. वळकटी; रुळी; भेंडोळे; बिंडा; बंडल (कागद, कापड, दोरा इ.चे). २. गाठोडे; गाठ. ३. (विशेषत: गुंडाळे, निंदार्थी) वेडेवाकडे गुंडाळलेले पागोटे, रुमाल. ४. दोऱ्याची गुंतागुंत व त्याचा गोळा; कसेतरी अस्ताव्यस्तपणे एकत्र बांधणे; सटरफटर मालाचे बोचके : 'ईश्वरें मोठें सूत्र केलें। मनुष्यमात्र गुंतोन राहिले। लोभाचें गुंडाळें केलें। उगवेना ऐसें॥' - दास १७.२.३०. ५. फेरा; भोवती फिरविणे; हात (पट्ट्याचे) : 'पट्ट्याचा गुंडाळा मारिला।' - ऐपो १९. ६. (ल.) गोंधळ; गुंतागुंत.

**गुंडाळी फलक** गुंडाळी करता येण्यासारखा कॅनव्हास कापडाचा फळा.

**गुंडिका** स्त्री. घोकंपट्टी; संथा; पुन्हा पुन्हा वाचणे व म्हणणे; घोकणे; उद्घोष : 'तिनें जशी कांहीं पत्राचीं पाठांतरें किंवा गुंडिकाच केल्या.' - नवलपूरचा संस्थानिक, प्रकरण ५. [सं. गुणनिका]

**गुंडिणे** क्रि. (वस्त्रांनी) सजविणे.

**गुंडी** स्त्री. एक वनस्पती; जाफरीची गुंडी.

**गुंडी** स्त्री. १. लहान गुंड, भांडे; लहान चरवी; कासंडी. [ते. क.] २. बिरड्यात अडकवण्याची गोळी, गाठ; बटन (अंगरखा, कोट यांचे). ३. पेंढी (पेंढा, गवत इ. ची). (को.) ४. बिंडा; गुंडा; गुंडाळा (दोरा, सूत इ. चा). (को.)

**गुंडी** स्त्री. युक्ती : 'तरस मरावा म्हणून मेटकऱ्यांनी ही गुंडी केली.' - वामा ४३. [क. गुंड.] (वा.) **० घालणे, देणे** - म्हशीने पान्हा सोडावा म्हणून तिची शेपटी तिच्या योनीत घालणे.

**गुंडीचा विडा** केळीच्या सोपटाने बांधलेले दोन विडे, पट्ट्या. (बडोदे)

**गुंडीदार** वि. गुंडी असलेला (अंगरखा). पहा : **आंगरखा**

**गुंडूरलावा** पु. होला. (झाडी)

**गुंडे** न. चेंडू; गोळा; बिंडा; पिंडा (सूत, सुंभ, दोरी वगैरेचा). (कु.)

**गुंडेरी** स्त्री. गंडेरी; उसाचे करवे : 'कोणी उसाची गुंडेरी चोखतात.' - सामा २००.

**गुंडो** पु. वरवंटा; दगडधोंडा. पहा : **गुंडा** (कु.)

**गुंडोरा** पु. गुंडाळे. (झाडी)

**गुंढल** स्त्री. गुंडी. (गो.)

**गुंढा** पु. १. दगड. २. मर्यादा : 'कर्मा अकर्माचे गुंढे। घातले दोहिं कडे।' - राज्ञा १३.४८.

**गुं(गु)त** स्त्री. गुंतणे. पहा : **गुंता** : 'या सेताची गुत सिलक असेल त्याची किंमत...' - मसाप २.१७७. [सं. ग्रथित]

**गुंतणु(णू)क** स्त्री. (क्व.) अडवणूक; गुंतागुंत; गोंधळाची, घोटाळ्याची स्थिती.

**गुंतणे** अक्रि. १. अडकणे; अडणे; एकमेकात अडकणे. २. (ल.) एखाद्या व्यक्तीच्या मायेत अडकणे. [सं. गुंत] (वा.) **गुंतत बोलणे** - अडखळत, घुटमळत बोलणे; अडखळणे.

**गुंतले** न. गुंता; गुंतागुंत; गुंताड-डा : 'तूटे बंधमोक्षाचें गुंतलें एथ।' - राज्ञा १८.३१७.

**गुंतवण** स्त्री. बांधला जाणे; एखादे काम, व्यवसाय इत्यादीत अडकणे.

**गुंतवणूक** स्त्री. कारखान्यात, उद्योगधंद्यात पैसा घालणे : 'त्यामुळे भांडवल गुंतवणुकीस पैसा उपलब्ध झाला.' - कर १२.

**गुंतव(वि)णे** सक्रि. मन कामात घालणे; अडकवणे : 'थोरल्या बंधूंच्या बरोबर दौलतीच्या कामात ते आपलं लक्ष गुंतवत होते.' - राऊ १५.

**गुंतवळा** पु. गुंतागुंत : 'अनेक प्रश्नांच्या गुंतवळ्यात...' - ही वाट २२.

**गुं(गु)ता, गुं(गु)ताडा, गुंतोळा** पु. १.अनेक वस्तू एकमेकीतून सहज वेगळ्या करता येणार नाहीत अशा प्रकारे मिसळणे. २. शेंडी, वेणीतील गुंतवळ, ३. गुंतागुंती (केस, दोरा इ.); गुंतलेली स्थिती.

**गुं (गु) ता, गुंतारूता** पु. १. अटकाव; अडथळा; खोटी; प्रतिबंध. २. (ल.) अडचण; हरकत; नड : 'ह्यामधि कांहीं गुंता नाहीं.' - ऐपो ३२. ३. (ल.) सुतक. [क. गुत्त] (वा.) **गुंतुन पडणे** - सुटका न होणे; अडकून राहणे; हातातले काम टाकून जाता न येणे.

**गुं (गु) ता-ड** पु. न. (भात, सावा, हरीक वगैरेचे) मळणीनंतरचे तृण, गवत, कचरा. १. (भात, सावा, हरीक वगैरेचे) मळणीनंतरचे गवत, कचरा. २. शिवऱ्यावरून आयंडा काढला व बुंध्याची दोरी सोडून शेंड्याला बांधून तो हलवला की खाली पडतात त्या भाताच्या बारीक पाती.

**गुं (गु) ता** पु. ब्याद; लचांड. (ना.)

**गुं (गु) ता** पु. लढा; तंटा.

**गुंतागुंत** स्त्री. १. गुंता; गुंताड. २. गळफाटा; घोटाळा; गोंधळ; घोळ.

**गुंतापणे** अक्रि. गुंतणे. (बे.)

**गुंतावळ** स्त्री. सहज न समजणारी गोष्ट; किचकट गोष्ट; गुंतागुंत : 'केवढ्या नात्यांची गुंतावळ...' - लपव १०९.

**गुंताळा** पु. गुंतागुंत.

**गुंती** स्त्री. १. प्रतिबंध; अडचण; गुंता; बंधन : 'ज्ञानदेवा सार सांवळिये मूर्ति निवृत्तीनें गुंति उगविली।' - ज्ञागा १४६. २. गरज. ३. (ल.) ओढा; पाश : 'ज्यांची तुज गुंती। ते तों मोकलिती अंतीं।' - तुगा २६८०. (वा.) ० **पाडणे** - अडचण आणणे; संकटात ढकलणे : 'मग बोले प्रभावती। त्वांचि मंजसी पाडिली गुंती।' - कथा १.५.२१४.

**गुंथाडे** न. गुंतागुंत. पहा : **गुंताडा** : 'तत्त्वांचें गुंथाडें जालें।'- दास ९.७.२१.

**गुंद, गुंदणी** न. स्त्री. भोकर; गोंधण; सेलवट; एक झाड. [गु. गुंदी]

**गुंधाळा** पु. एक प्रकारचे भांडे; गुंडा.

**गुंपणे** पहा : **गुंतणे** : 'गुंपले नुगवे मन चरणीं।' - गीता १.८३.

**गुंपा** पु. बंधन; गुंतागुंत : 'आवडीचा मंत्र सांगितला सोपा। जेणें नव्हे गुंपा कांहीं कोठें।' - तुगा १.३६९.

**गुंपिरे** न. जाळे; सापळा : 'तरि दाहीक हें संसारें। सर्वे मांडिलेंसे जे गुंपिरे।' - राज्ञा १८.९५१.

**गुंफण** स्त्री. वेणी; विणणे; वीण; वळणे.

**गुंफणी** स्त्री. १. गाठण; गाथण; गोवणी; ओवणी. २. वेणी; वीण.

**गुंफणे** सक्रि. १. माळेत एकत्र आणणे; गाठणे; माळ करणे; गोवणे. २. वेणी घालणे; वळणे. ३. जोडणे; जुळणी करणे; रचणे. [सं. गुंफ]

**गुंफणे** अक्रि. घोटाळ्यात पडणे; गुंतणे : 'ऐसें विचारतां विचक्षण। गुंफोनि ठेले॥' - ज्ञा ४.८२.

**गुंफा** स्त्री. १. लताकुंज; पर्णकुटी; फांद्यांची बनवलेली झोपडी : 'ऋष्यशृंग अतिविकळ। आला तत्काळ गुंफेसी।' - भाराबाल २.१२. २. गुहा; दरी. ३. गुंतागुंत : 'आवडीचा मंत्र सांगितला सोपा। जेणें नोहे गुंफा कांहीं कोठें।' - तुगा ४८७. (वा.) **गुंफेत ठेवणे** - मूठमाती देणे; समाधी देणे. [सं. गुहा]

**गुंफा** पु. मुलांचा एक खेळ.

**गुंफाई** सुतापासून, लोकरीपासून वस्त्र विणण्याची पद्धत.

**गुंफाटणे** उक्रि. घाईघाईने उरकणे; बिघडवणे; चालढकल करणे; वरवर करणे. पहा : **गोफाटणे**

**गुंफिरा-रे** पु. न. गुंताडा; गुंतागुंत; जाळे : 'परी चोज हें धनुर्धरा। जे एवढा हा गुंफिरा।' - ज्ञा १४.२८४.

**गुंबज-द** पु. घुमट. [फा. गुंबद]

**गुंसाई** पु. १. गोसाई; गोसावी; साधू; हरिदास. पहा : **गोसावी**. २. देऊळ, मठ इ. चा मुख्य; महंत.

**गू** पु. १. विष्टा (मनुष्याची); हाग. २. धातूचा गंज; मळ. ३. डोळ्यातील पू, मळ. ४. (ल.) दारू. [सं.] (वा.) **गूकाडी करणे** - १. काडीने गू चिवडणे. २ (ल.) एखाद्याचे दोष पुनः पुन्हा उच्चारणे. ३. (ल.) अतिशय त्रास देणे. ४. (ल.) अतिशय अपकीर्ती करणे. ५. (ल.) नासवणे; बिघडवणे; खराब करणे. (वा.) ० **चिवडणे** - वेडे होणे; बावचळणे. ० **जाळणे** - १. अंगातील पिशाच्च जाण्यासाठी अंगात येणाऱ्यापुढे विष्टा जाळण्याचा प्रयोग. २. एखाद्याला अगदी खिजविणारे, अपमानाचे, चिडविणारे कृत्य करणे. ० **जाळून धूर घेणे** - वाईट कृत्य करून त्याचा आनंद मानणे, त्याची मौज करणे, पाहणे. **गुवावरून ओढणे** - अतिशय फजिती, अपमान करणे; छीथू करणे.

**गूघाण** स्त्री. वाईट परिस्थिती. (वा.) ० **करणे** - नासणे; बिघडणे. वि. वाईट; त्याज्य.

**गूज** न. गुप्त गोष्ट; गुह्य. हित, निज या शब्दांशी जोडून उपयोग. पहा : **गुज** : 'बरें पाहतां गूज तेथेचि राहे।' - राम १५५. [सं. गुज]

**गुजबेरी** स्त्री. (वन.) एक प्रकारचे फळ.

**गूड-ढ** न. १. कणसासकट बांधलेली पेंढी, जुडी (जोंधळा, बाजरी वगैरेंची). २. गंजी; ढीग; रास; सुडी. (खा.) ३. कडब्याची वगैरे उंच व देवळाच्या शिखरासारखी रचलेली गंज. (व.) पहा : **गुड** [कर. गुड्ड = डोंगर, गुडी = देऊळ]

**गूढ** न. १. कूट; कोडे. २. ग्रंथातील, लेखातील कठीण स्थळ; मेख. ३. पेच; पंचाईत. ४. गुप्त गोष्ट; गुह्य : 'म्हणौनि आघवींचि गूढें। जें पाऊनि अति उघडें।' - ज्ञा ८.१३५२.
वि. १. गहन; दुर्ज्ञेय; दुर्बोध; अगम्य (विद्या, शास्त्र) : 'तया हा परमार्थ गूढ।' - ज्ञा ३.१७९. २. खोल; गुप्त; अज्ञात (काम, गोष्ट.) [सं.] (वा.) ० **वाटणे, दिसणे, पडणे, गूढात पडणे** - विचारात पडणे; कोडे, पेच पडणे.

**गूढ अर्थ** पु. १. पुरलेला ठेवा; भूमिगत द्रव्य : 'गूढ अर्थसंचयाच्या भ्रमाने कोणी... घरांतील जमीन ठोकठोकून पहावी...' - नि ७९६. २. गुप्त गोष्ट, हेतू, अभिप्राय.

**गूढगुंजन** न. गहन, कूटात्मक पण भावगर्भ असे काव्य; ज्याचा अर्थ फार खोल आहे व ज्यामध्ये अधिक अर्थ गर्भित आहे असे लेखन; कल्पना.

**गूढचार** पु. गुप्त बातमीदार; हेर; गुप्त पोलीस.

**गूढज, गूढपुत्र, गूढोत्पन्न** पु. १. (कायदा) हिंदूधर्मशास्त्राप्रमाणे बारा पुत्रांपैकी चौथा. २. बेबाप्या; बापाचा पत्ता नसलेला.

**गूढजत्रू** वि. फोपशा; लड्डनिरंजन (ज्याच्या खांद्याचे हाड मांसात गुप्त झाले आहे असा). [सं. जत्रु = खांद्याचा सांधा]

**गूढणे** सक्रि. समाविष्ट होणे; व्यापणे : 'दर्पु कामक्रोधीं गूढला।' - ज्ञा १६.३९६.

**गूढणे** अक्रि. गुप्त राहणे : 'जैसें नक्षत्रीं गगन गूढलें।' - राज्ञा ११.२८१.

**गूढलेखन** न. सांकेतिक भाषेतील लेखन.

**गूढवाद** पु. (तत्त्व) गूढवादाच्या धारणा आणि अनुभूती; ईश्वर आणि अंतिम सत्य ह्यांचे ज्ञान, मन आणि इंद्रिये यांच्या पलीकडचे असून ते चिंतनाने किंवा आत्मदृष्टीने प्राप्त होऊ शकते अशी धारणा व शिकवण.

**गूढ विद्या** स्त्री. दुसऱ्याच्या मनातील विचार जाणण्याची विद्या.

**गूढशक्तिवाद** पु. (तत्त्व.) काही गूढशक्तींच्या मदतीने निसर्गाचे नियंत्रण करता येते अशी श्रद्धा.

**गूढसाक्षी** पु. (कायदा) गुप्त साक्षीदार.

**गूढस्थल** स्त्री. कैद; बंदीखाना : 'समक्ष बोलणे व्हावे ते झाले म्हणजे दादासाहेब गूढस्थलीहून निघणार.' - ऐलेसं १७७१.

**गूढस्मृति-ती** स्त्री. (वै.) अल्प स्मृतिभ्रंश; काही वेळाने आठवणे. [सं.]

**गूढार्थ** पु. समजायला कठीण असे ग्रंथ, लेख इत्यादीतील भाग. वि. दुर्ज्ञेय; दुर्बोध. [सं.]

**गूत-थ** १. गुंतागुंत; तिढा; गाठ : 'दीर्घकाळ ग्रथित (मराठी भाषेची) तिची जी गूत ती हाती घेऊन तिचे पदर सोडवून काहीतरी उकलण्याच्या धोरणात आणून बसवावी.' - दामभाव्या प्रस्ता. २१.२. अव्यवस्थितपणे पडलेले, तुडवलेले गवत; गुरांनीच खाण्याजोगे झालेले गवत. (को.) ३. भाताण्याचा पेंढा बांधताना त्यातून खाली पडणारे भाताण्याचे लहान लहान तुकडे. ४. गुंतवळ. [सं. ग्रथित]

**गूत** स्त्री. गाठ, टेंगूळ.

**गूथ** स्त्री. सूज. (व.)

**गूद** पु. १. कंडू; खाज; आग (क्रि. येणे, सुटणे) २. (ल.) जोर; भर; चढ (रोग, साथ, पाऊस इ. चा).

**गून, घून** वि. कुबडा; पोक आलेला. - (तंजा). [क. गूनु = पोक]

**गूम** वि. नष्ट; गहाळ; गुप्त : 'इनामतीच्या सनदा अलाहिदा आपल्यापाशीं आल्या होत्या त्या फित्रतीकरितां गूम जालिया.' - वाडसनदा १४०. स्त्री. गुप्त गोष्ट. (गो.) [फा. गुम]

**गूमसूम** गुपचूप : 'चिंधी तंबाखूची गुळणी तोंडात असल्यासारखी बसून राहिली गूमसूम.' - जैत ७४.

**गूमाणूस** पु. घाणेरडा, अव्यवस्थित माणूस.

**गूल** पु. जरीची वीण. (गो.) [फा. गुल = फूल]

**गूल** स्त्री. १. दंगल; आरडाओरडा; गलगा : 'तीन रोज उपवास लश्करांत गूल एकच जाहाली.' - पेद २०.१७६. २. (ल.) बोभाटा; प्रसिद्धी; जाहीरपणा : 'रात्रींच गूल झाली असती तर फार वाईट होतें.' - बाळ २.१२७. [फा.]

**गूलखिळा** पु. मोठ्या दरवाजात ठोकता येणारा रोंदाचा खिळा.

**गूलगलबा** पु. दंगा; बखेडा : 'खंबायतकर मोगल उगेच सरकारचे महाल खाऊन गूल गलब्याचे वेळेस हे शैत्य होतात.' - ऐटि १.८०.

**गूलडाग** पहा : **गुल्लडाग**

**गूळ** पु. उसाचा रस आटवून केलेला घन पदार्थ; साखरेचा कच्चा प्रकार, अवस्था. [सं. गुड] [क. गुळ] (वा.) ० **करणे** - उपहास, निंदा करणे. ० **देणे, हाती देणे** - १. लालूच दाखवणे; लाच देणे. २. फसवणे; भुरळ घालणे; झुलवणे; तोंडावर हात फिरवणे. **गूळपुऱ्या वाटणे** - हौस पुरवणे.

**गूळकैरी** स्त्री. गूळ घालून केलेले बिनमोहरीचे आंब्याचे लोणचे. (व.)

**गूळखोबरे** न. १. गूळ आणि खोबरे यांचा खाऊ. २. (ल.) निव्वळ फसवणूक; लाच; लालूच : 'गूळखोबरें विलोकुनि भलत्याहि जनासि बाळक वळावा।' - मोउद्योग ७.९. ३. (ल.) पोकळ भाषण, वचन. (वा.) ० **देणे** - लालूच दाखविणे.

**गूळदगड, गूळधोंडा** पु. १. गुळाच्या ढेपेत सापडणारा दगड : 'गुळासारिखा गुळदगड। परी तो कठिण निचाड।' - दास ८.५.४७. २. (ल.) ढोंगी, कपटी मनुष्य.

**गूळध (धा-धि-धु-धे) वा, गूळदेवा, गूळधावी** पु. केवळ तांबडा नव्हे, केवळ पांढरा नव्हे असा मिश्र रंग; गुळी रंग. वि. अशा रंगाचा (मोती इ. पदार्थ.).

**गूळधानी** वि. लालसर; गुळधवा रंगाचा (मोती).

**गूळपापडी** स्त्री. १. एक पकान्न; गुळात पाकवलेल्या रव्याच्या वड्या. २. गुळाच्या पाकात भाजलेली कणीक वगैरे घालून केलेले लाडू. (राजा.) ३. (ल.) एखाद्याने मागे अपराध करून समक्ष गोड गोड, कपटी भाषण करणे; गुळगुळ थापडी. [क. गुळ्वापटि]

**गूळपीठ** न. एकमेकांचा दाट स्नेह; मेतकूट; एकी; सलोखा; एकविचार.

**गूळमारी** स्त्री. उसाच्या प्रत्येक मळ्यापाठीमागे साडेबावीस शेर गूळ असा घेण्यात येत असे तो कर.

**गूंडणे** सक्रि. आच्छादणे; गुंडाळणे : 'गूंडूनि घेतला पटीं। रत्नदीपु॥' - राज्ञा १३.१००५.

**गृध्र** पु. १. गिधाड. २. (उप.) वृद्ध मनुष्य. गिधाडाला फार आयुष्य असते यावरून. [सं.]

**गृध्रव्यूह** पु. गिधाडे आपल्या भक्ष्याभोवती ज्याप्रकारे वेढा घालतात तशी सैन्यरचना : 'गृध्रव्यूह सैन्य रचावे। गृध्रास देखून स्वभावे। गरुड नये त्या स्थळीं।' - जे १२.९३.

**गृध्रावलीनक** न. (नृत्य). पाय थोडा गुडघ्यात वाकवून पाठीमागे पसरणे व दोन्ही हात पुढे पसरणे.

**गृह** न. घर; सदन; आलय; आगर; मंदिर; मकान. [सं.]

**गृहकच्छप** पु. कासवाच्या पाठीच्या आकाराचा दगडी पाटा, खल.

**गृहकलह** पु. भाऊबंदकी; घरगुती तंटा; यादवी; अंतःकलह.

**गृहकार्य** न. (शिक्षण). १. पहा : **गृहपाठ.** २. पालकांनी मुलांवर टाकलेली जबाबदारी व त्यांना करायला सांगितलेले काम.

**गृहकृत्य** न. घरातील दैनंदिन कामे.

**गृहखाते** न. देशातील किंवा राज्यातील अंतर्गत सुव्यवस्था, कायद्याची अंमलबजावणी इ. कारभार पाहणारा सरकारी विभाग.

**गृहछिद्र** न. १. कुटुंबातील दोष, व्यंग, उणेपणा; खाजगी वाईट गोष्टी; वर्मेकर्मे. (क्रि. काढणे, बोलणे.) : 'श्रीमंतांच्या घरोघर दुराचार व गृहच्छिद्रें किती असतात हे जवळजवळच्या लोकांस तरी पूर्णपणें विदित असतें.' - नि २. (ल.) घरातील फूट, भेद, बेबनाव; ज्यामुळे तिऱ्हाइताचा शिरकाव किंवा फायदा होईल अशी घरातील गुप्त, नाजूक गोष्ट.

**गृहजात** पहा : **गृहदास २**

**गृहजीवशास्त्र** न. पाकक्रियादी संसारातील गोष्टींची माहिती.

**गृहदास** पु. १. घरातील चाकर, गुलाम. २. (हिंदुकायदा) दासीपुत्र.

**गृहनौका** स्त्री. शिकारा, हाऊसबोट.

**गृहपाठ** पु. शाळेतील शिक्षकाने विद्यार्थ्यांना घरी करायला दिलेला अभ्यास.

**गृहपाल** पु. खानसामा; कोठावळा; वाकनीस.

**गृहप्रवेश** पु. १. नववधूने सासरी प्रथम प्रवेश करणे. २. नव्याने बांधलेल्या घरात राहायला जाणे.

**गृहभंग** पु. घर, कुटुंब, पेढी, मंडळी इ. ची फूट; वाताहत; नाश; मोड; घरादाराचा सत्यानाश. [सं.]

**गृहभूमि-मी** स्त्री. घराची जागा.

**गृहभेद** पु. १. यादवी. पहा : **गृहकलह.** २. गृहछिद्रे, घरातील बिंगे कळण्यासाठी घरात भांडण लावणे. ३. घरफोडी; दरोडा. [सं.]

**गृहभेदी** वि. १. घरात, कुटुंबात भांडणे लावणारा, उत्पन्न करणारा; घरभेद्या. २. घरातील बिंगे माहीत असणारा. ३. चोर; दरोडेखोर.

**गृहमंडन** न. घराची मांडामांड करणे; घर सुव्यवस्थित राखणे; सुशोभित, अलंकृत, सज्ज ठेवणे.

वि. घरातील कर्ता पुरुष; घराला भूषणभूत असा माणूस; घराचा अलंकार. [सं.]

**गृहमंत्रि-त्री** पु. १. गृहखाते ज्याच्याकडे असते असा मंत्री; देशातील, राज्यातील शांतता आणि सुव्यवस्था यांची जबाबदारी सांभाळणारा मंत्री. २. (ल.) घराची जबाबदारी सांभाळणाऱ्या गृहिणीला थट्टेने म्हणतात. [सं.]

**गृहरत्न** न. (ल.) मुलेबाळे. [सं.]

**गृहलक्ष्मी** स्त्री. घरातील कर्ती सुवासिनी स्त्री.

**गृहविच्छेद** पु. कुटुंब निर्वंश होणे- करणे; वंशक्षय; कुलक्षय. [सं.]

**गृहविज्ञान-शास्त्र** न. गृहिणीस उपयुक्त असलेल्या सर्व गोष्टी शिकविणारे शास्त्र. उदा. पाकशास्त्र, गृहसजावट, गृहव्यवस्थापन इ.

**गृहशांति-ती-शुद्धि-द्धी** स्त्री. घराच्या शुद्धीकरणाचा धार्मिक विधी; वास्तुशांती; भुतेखेते, विटाळ, रोग इ. च्या नाशासाठी केलेला धार्मिक विधी. [सं.]

**गृहसचिव** पु. (राज्य.) गृहखात्याचा चिटणीस.

**गृहसंपत्ति-त्ती** स्त्री. १. गृहसौख्य; घर चांगले असण्याचे सौख्य. २. मोठा घर खटला; मोठे कुटुंब; मोठा परिवार.

**गृहस्थ** पु. १. घरबारी; घरसंसार असणारी व्यक्ती; गृहस्थाश्रमी; चार आश्रमांपैकी दुसऱ्या आश्रमातील व्यक्ती (संन्यासी, अरण्यवासी नव्हे). २. सपत्नीक; सहकुटुंब; कुटुंबवत्सल; प्रापंचिक. ३. कोणताही माणूस, इसम, व्यक्ती. ४. भिक्षुक नव्हे तो. ५. कुलीन; सभ्य; भला.

**गृहस्थगिरी-पणा, गृहस्थाई, गृहस्थी** पु. स्त्री. १. माणुसकी; सभ्यता; भलेपणा. २. गृहस्थवृत्ती; गृहस्थाचे कर्तव्यकर्म, आचरण; घरसंसार.

**गृहस्थधर्म** पु. गृहस्थाश्रम; गृहस्थाची कर्तव्यकर्मे, वर्तन, वागणूक : 'श्रीकृष्ण म्हणे सूता सर्वांत गृहस्थधर्म सन्मत रे।' - मोउद्योग ३.२३.

**गृहस्थाश्रम** पु. चार आश्रमांपैकी दुसरा आश्रम. पहा : **गृहस्थधर्म**

**गृहस्थी** वि. गृहस्थाविषयीची (रीत-भात, वेष, भाषण, डौल, बाणा इ.).

**गृहस्थी अक्षर** सुबोध, ठसठशीत, ऐटबाज अक्षर; व्यवहाराला योग्य असे लेखन.

**गृहस्थी कावा-खर्च** १. घरगुती खर्चाचा बेतबात; टापटीप. २. घराची आर्थिक, पैशासंबंधी नीट व्यवस्था; मितव्यय.

**गृहस्थी बाणा** १. गृहस्थाची वृत्ती; गृहस्थ धर्म. २. टापटिपीची, व्यवस्थितपणाची वागणूक.

**गृहस्थी बेत** पहा : **गृहस्थी बाणा**

**गृहांगना, गृहिणी** स्त्री. धरधनीण; घर मालकीण; पत्नी; बायको.

**गृहीत** वि. १. धरलेले; पकडलेले; घेतलेले. २. मनात धरलेले; समजलेले. (क्रि. धरणे.)

**गृहीत** न. (शिक्षण.) सर्वसामान्यत: स्वीकृत करण्यात आलेला व तर्काला पायाभूत असणारा सिद्धांत अथवा नियम; स्वत: सिद्धतत्त्व.

**गृहीतक** न. (तर्क.) एखादी गोष्ट सिद्ध करण्यासाठी किंवा प्रत्ययाला आणून देण्यासाठी एखादी अन्य गोष्ट सत्य असल्याचा पूर्वदावा; शास्त्रीय, तात्त्विक व्यवस्थेसाठी स्वीकारलेली काही पायाभूत तत्त्वे.

**गृहीतकृत्य** न. १. (तत्त्व). युक्तिवादाकरिता स्वीकारलेला प्रस्ताव; तथ्ये किंवा घटना यांचा संदर्भ देऊन एखादी गोष्ट सिद्ध वा असिद्ध करण्याविषयीची उपपत्ती. २. मानलेले तत्त्व; ज्याला पुरावा नाही पण जे सोयीस्कर म्हणून स्वीकारले आहे असे तत्त्व : 'साऱ्या व्यक्ती समान आहेत हे समाजसुधारणेच्या मुळाशी असलेले गृहीतकृत्य होय.' - चिलेसं (प्र) ३३.

**गृहीततत्त्व** न. (तर्क.) तार्किक प्रणालीतील असिद्ध आधारविधान.

**गृहोद्योग** पु. पापड, लोणची इ. संसारोपयोगी वस्तू तयार करण्याचा व्यवसाय.

**गृह्य** वि. १. घरगुती; खासगी : 'सार्वजनिक गणेशोत्सव वैयक्तिक किंवा गृह्य उत्सव नाहीं.' - के १९.८.४१. २. पाळीव; माणसाळलेले. [सं.]

**गृह्यसूत्र** न. गृहस्थाने करायच्या घरगुती धार्मिक कर्मांची माहिती ज्यात सूत्ररूपाने दिली आहे असा हिंदू धार्मिक वाङ्मयाचा एक भाग. आश्वलायन, कौषितकी व शांखायन ही ऋग्वेदाची गृह्यसूत्रे आहेत.

**गृह्याग्नि-ग्नी** पु. प्रत्येक त्रैवर्णिकाने लग्नानंतर किंवा वेगळे बिऱ्हाड केल्यानंतर निरंतर पाळायचा अग्नी. विवाहानंतर वधूसह गृहप्रवेश करतेवेळी ज्या अग्नीवर होम करायचा असतो तोच अग्नी पुढे निरंतर जतन करून ठेवायचा असतो व त्यावर नित्य सकाळ-संध्याकाळ होम करायचा असतो. [सं.]

**गे** उद्गा. १. 'अगे' या संबोधनाचे संक्षिप्त रूप : 'तो गे ! तोचि राम सर्वत्र पाहे।' - राम २००. २. म्हशीला बोलावण्याचा शब्द. (व.)

**गेचक, गेचकळ** न. १. झाड, खुंट यांचे बेचके, बेळके. २. हात, पाय यांच्या दोन बोटांमधील जागा; बेचकी.

**गेचु(चो)डी** स्त्री. (व.) पहा : **गोचीड**

**गेज** पु. माप; मापण्याचे साधन; (आगगाडीसंबंधी) आगगाडीच्या दोन रुळांमधील कमीजास्त अंतर. [इं.]

**गेज, गेजमाळ** स्त्री. गौरीला, देवाला वाहायची कापसाची माळ; वस्त्र; कापसाळे; सूतपुतळी. यात मध्ये थोडासा कापसाचा पुंजका, नंतर वातीप्रमाणे बारीक, नंतर पुन्हा पुंजका अशा प्रकारे पेळू घेऊन वळतात. मधल्या वातीसारख्या बारीक भागाला हळद-कुंकू लावतात. [क. गेज्जे]

**गेजग्लास** पु. (यंत्र) बॉयलरमधील पाणी व वाफ बरोबर दाखवणारी नळी; गेजचेंबर. [इं.]

**गेट** न. १. दार; फाटक (बंगल्याच्या आवाराचे, बाहेरचे). २. चौकी; देवडी. ३. पोलिसचौकी. [इं.]

**गेट(ठ)ण** न. बैलाच्या गळ्यातील वळलेला दोर, पट्टा. याला ठोकडा किंवा घाट बांधतात. यावरून घाटपट्टा असेही म्हणतात.

**गेटम** पु. न. १. जाडेभरडे लोकरीचे जाजम; रग; ब्लँकेट : 'मांजिष्ट भोजिष्ट धारिवट। गेटम जातीचे पटनिघोट।' - मुसभा १५.२२०. २. सुताचा झोऱ्या; बोऱ्या; तढव; सुताडा. (खा. व.) [हिं. गीटम]

**गेठा** पु. कंबर व पाय यांना (गुडघ्याखाली) उपरणे गुंडाळून बसण्याची पद्धत. (क्रि. मारून बसणे.) पहा : **जेठा**

**गेठा-टा** पु. १. बैलाच्या गळ्यातील रंगीबेरंगी मण्यांची अगर कवड्यांची माळ. २. कानातील एक दागिना. 'कानीं घालुनी गेठे हो।' - मध्व ३९. ३. खंडोबाच्या गळ्यातील चांदीचा एक अलंकार. पहा : **गाठा, गाठ्या** (खा. व.) (सामा.) चांदीचा एक दागिना. हा अलंकार जेवताना कानावर ठेवावा लागतो : 'महार पोरग्याचे गळ्यात गेठे।' - अफला ६६.

**गेठू** पु. लग्न इ. वेळी मांडवाच्या मुहूर्तमेढीला (त्यात सुपारी, हळकुंडे घालून) बांधायचे फडके. (व.)

**गेड** पु. १. जाड लाकडाचा तुकडा. २. उसाचा पेरावयाचा तुकडा.

**गेडना** क्रि. तुकडे करणे. (झाडी.)

**गेडमिळे** न. स्त्री. (विणकाम) मागावरील ताणाच्या खाली (वहीच्यापुढे) असणाऱ्या अडसराची दोन टोके ज्यात बसवतात ते दोन उभे खुंट.

**गेड (डू) र** पु. एक मासा. (को.)

**गेडी** स्त्री. १. पाळ, बंधारा. २. पायांची मांडी. ३. चुंबळ ४. बैठक. (झाडी).

**गेडीवडा** पु. मुलांचा एक खेळ.

**गेडे** वि. विषम संख्या. उदा. १, ३, ५, ७ इ. (कु.).

**गेडेफडे** न. १. लहान मुलांचा एक (एकीबेकीचा) खेळ. २. पहिल्याने मुलगा व मग मुलगी असा जन्मानुक्रम. (कु.)

**गेणा** पु. पायाच्या बोटातील चांदीचा एक अलंकार. (गो.) [क. गणिके = बोटाचे पेर]

**गेणी** स्त्री. एक मासा. याची लांबी पंधरा ते वीस फूट असून याच्यापासून निघणारे तेल गलबताच्या अवजारांच्या टिकाऊपणासाठी लावतात.

**गेणी** स्त्री. कर; शेतसारा; भाडे : 'सोडवीन भकसोनी अपराधू। माझी गेणी देती तरी।' - ख्रिपु २.४२.७७. [का.]

**गेत** न. गेळ. (गो.)

**गेताडपट्टी** स्त्री जोराची चपराक. (ना.)

**गेनमाळ टाकणे** भगतपणाची दीक्षा देणे. गुरुभगत या वेळी शिष्याच्या गळ्यात फुलांची माळ घालतो. (खा.)

**गेना** पु. तांदळात न कुटता राहिलेला भातकणय; भातगोटा.

**गेम** स्त्री. १. खेळ; डाव. २. खेळ पुरा होण्याची मर्यादा. (वा.) ० **करणे** - एखाद्याला दुसऱ्याकरवी मारणे. [इं.]

**गेय** वि. गाण्यासाठी व प्रशंसा करण्यासाठी योग्य.

**गेयपद्य** न. (सं.) गायनास योग्य असे गीत किंवा पद्य. साहित्य आणि संगीत या दोनही गुणांचा मिलाफ असलेले गीत.

**गेयशा** स्त्री. जपानमधील नृत्यगायन करणारी कलावती स्त्री.

**गेर** स्त्री. पु. लोकक्षोभ; बंडाळी; दंगा. (को.)

**गेर** पु. तुकडा; पेरे. (व.)

**गेर** न. अति कोवळी सुपारी. (कु.)

**गेरवट** वि. गेरूच्या रंगाचे; तांबूस : 'ते (धोतर) गेरवट रंगावर येत चाललं होतं.' - बाविबु २५६.

**गेरवा, गेर्वा** पु. १. थंडी वगैरेमुळे धान्यावर पडणारा तांबेरा रोग; गव्हावर पडणारा एक रोग. २. संकट. ३. खेप.

**गेरवा** वि. तांबूस.

**गेरी** अ. जवळ. (गो.)

**गेरी** स्वारी; दंगा; बंडावा.

**गेरुंडी** स्त्री. (सुतार) खुणा करण्याचे, पाणी ठेवण्याचे पात्र; खाचेचा ठोकळा; गेरूचे भांडे.

**गेरू, गेरवा** पु. १. काव; तांबडी माती. २. विटकरीची भुकटी; पाटीवर घालण्याची तांबडी धूळ. ३. (सुतारी) लाकडावर खुणा करण्यासाठी तयार केलेले (कसलेही) तांबडे पाणी. [सं. गैरिक]

**गेल** स्त्री.१. उडी : 'गेल घेतली थोर मर्कटें। लंका दग्ध केली कपटें।' - कृमुरा ३.३.८९. २. चेष्टा.

**गेल** पु. विजय; विजयोन्माद.

**गेला** वि. (जाणे याचा भूतकाळ) १. गेलेला; संपलेला; गत झालेला (काळ, दिवस इ.). २. मेलेला; मृत. (व.) [सं. गत]

**गेला** वि. मोडका.

**गेलाबाजार** क्रिवि. किमानपक्षी; निदान; कमीतकमी.

**गेलामेला** वि. १. मेलागेला; नष्ट. २. काही झाले तरी; केव्हाही, निदान.

**गेशा** पहा: **गेयशा**

**गेह** न. घर; गृह; वस्ती; राहण्याचे ठिकाण : 'प्रभो तुज जसे तसे मतिस गेह भासे वन।' - केका १०५.

**गेहात्यय** पु. घरदार, आप्तसंबंधी यांचा त्याग.

**गेहात्ययदेहात्यय** संन्याशाने केलेला घरादाराचा व शरीराचा त्याग.

**गेहेपटू** वि. घराचा हुशार; घरात फक्त वाकबगार पण बाहेर कुचकामाचा; घरचा देशपांड्या (बाहेर भित्रा.).

**गेहेपंडित** वि. पंडित, शहाणा; अरेराव; घरचा काळ; घरपंडित. [सं.]

**गेहेप्रगल्भ** वि. जेथे विशेष गरजच नाही तेथे धाडस, चपळाई वगैरे दाखवणारा; घरशूर. [सं.]

**गेहेमेही** वि. (घरात मुतणारा) घरबशा; घरकोंबडा. [सं.]

**गेहेशूर** पु. घरात शूर; बायकात शौर्याच्या गप्पा मारणारा पण बाहेर भित्रट, शेंदाडशिपाई. [सं.]

**गेळ** न. १. बेचके; दोन बोटातील भाग. पहा : **गेचक** १. २. दुभागलेल्या खुराचा एक भाग; दोन भागातील अंतर; नांगी.

**गेळ-ळा-ळी, गेळफळ** स्त्री. पु. न. एक झाड व त्याचे फळ. या झाडाला दोन बोटे लांबीचे काटे असतात. याचे फळ सुपारीएवढे असते. याचा गळवावर लेप लावला तर ते पिकते. [सं. गालब.]

**गेळंदी** स्त्री. तांबड्या रंगाची खेकडी. (जुन्नर.)

**गेळा** पु. लहान तोंडाचे वाटोळे भांडे; तेल वगैरे ठेवण्याची किंवा पाणी पिण्याची झारी, खुजा; सुरई.

**गेळी** स्त्री. लहान गेळा.
**गेळी** स्त्री. खुराचा भाग. पहा : **गेळ २**
**गेळी** स्त्री. वेळू, बांबू (को.).
**गेंगडी** स्त्री. वेंगडी; हातपाय लटपटणे; भयग्रस्त स्थिती; घाबरगुंडी. (व.)
**गेंग(गा)णे** अक्रि. नाकातून बोलणे. [सं. ङु.]
**गेंगाणा-ण्या, गेंगणा** वि. १. नाकात बोलणारा (माणूस). २. सानुनासिक, नाकातील (उच्चार).
**गेंगाणेपण** न. नाकातून बोलण्याची सवय.
**गेंगा(ग)रणे** अक्रि. १. पडशामुळे, थंडीमुळे नाकातून बोलणे. २. त्रेधा - तिरपीट उडणे; गांगरणे; अतिशय घाबरणे. [ध्व.]
**गेंजी** स्त्री. कोंबड्याचा तुरा : 'गेंजी नराची ताठ व मादीची पडलेली व डोकें मोठें असतें.' - ज्ञाको क ७६६.
**गें(गे)झट, गें(गे)झा** वि. अतिशय लोचट, हट्टी, दुराग्रही, चेंगट (माणूस).
**गेंडकणे** अक्रि. गदरणे; पाडाला येणे, लागणे (आंबा, फळ).
**गेंडरू, गेंडुर** गांडूळ. [सं. गंडोल]
**गेंड्या** वि. बारीक.
**गेंडा** पु नाकावर शिंग असणारा, जाड व टणक कातडीचा एक वन्य पशू. [सं. गंड]
**गेंडा** पु. जनावराच्या गळ्यातील गोंडेदार दोर. पहा : **गेठण, गेठा** २. (व.)
**गेंडोर** पु. गाणारा किडा. (झाडी.)
**गेंद** पु. १. तुरा; झुबका; गोंडा (फुलांचा). २. पुष्कळशा पाकळ्यांचे फूल (झेंडू, बटमोगरा इ. चे). मात्र अशा फुलाचे नाव गेंद शब्दाच्या पुढे जोडतात. जसे :- गेंदमोगरा, गेंदकाटेशेवंती इ. ३. झेंडूचे फूल. ४. घोड्याच्या लेंडीवरील रेशमाची किंवा चांदीची फुले किंवा मुदा. ५. बायकांच्या पायातील चौथ्या बोटातील मोगऱ्याच्या फुलाच्या आकाराचा चांदीचा दागिना. यात वाळूचे बारीक खडे असल्यामुळे चालताना त्यांचा आवाज होतो. ६. (ल.) गेंदेबाज वस्तू. उदा. स्त्रियांचे स्तन : 'रुंद छातिवर बूंद गेंद जणू गुलाब बहरामधीं फुलती.' - प्रला ११३. ७. गोळा; गोलसर पदार्थ. [सं. गेंदुक = कंदुक]
**गेंद** पु. चेंडू.
**गेंदगेंद शिवागेंद** मुलींचा एक खेळ.
**गेंदजोडी** स्त्री. घोड्याच्या शेपटीवरील गेंदभूषणांचा समूह. पहा : **गेंद** ४ : 'जीन भिडविला घोड्याला गेंदजोड त्याला.' - ऐपो ४३१.
**गॅझि(झे)ट** न. १. वर्तमानपत्र. २. राजपत्र. [इं. गॅझेट]
**गॅमा किरण** (रेडियमसारख्या किरणोत्सारी) मूलद्रव्यांच्या अणुकेंद्रातून फेकले जाणारे, 'क्ष' किरणापेक्षाही कमी तरंगलांबीचे किरण (विद्युतचुंबकीय तरंग).
**गॅरेज** न. १. मोटार ठेवण्याचा तबेला. २. मोटारी दुरुस्त करण्याचे तसेच त्यांची विक्री करण्याचे ठिकाण.
**गॅलन** पु. द्रव पदार्थ मोजण्याचे परिमाण; ४.५५ लिटर धारणक्षमता असलेले माप. [इं.]
**गॅल(ले)री** स्त्री. सज्जा; वरील मजल्याचा किंवा माडीचा भिंतीच्या बाहेर आलेला पुढील स्वतंत्र भाग. [इं.]
**गॅस** पु. १. पदार्थाची घन, द्रव या विरहित एक वायुरूप अवस्था; वायुरूपी पदार्थ. २. इंधन म्हणून वापरला जाणारा खनिज वायू. [इं.]
**गँगरीन** काही कारणाने शरीरातील रक्तपुरवठा खंडित झाल्यास त्या भागातील पेशी निर्जिव होण्याची स्थिती.
**गै, गैगोळा** पहा : **गई, गईगोळा**
**गैगुदर** स्त्री. दुर्लक्ष; चालढकल : 'दाणे मागितले तुम्ही गैगुदर करिता.' - पेसाप ६३.
**गैदी-बी, गैबती-त्या, गैबान्या** वि. १. ढिला; नेभळा; गबाळ्या; अजागळ; बावळा; अव्यवस्थित. २. आळशी; टोणपा. पहा : **गावदी** [फा. गइब]
**गैदीपणा** पु. गचाळपणा; आळस व अस्वच्छपणा.
**गैब-प, गैबत-ती** वि. क्रिवि. १. गुप्त; न दिसणारा; गायब; अदृश्य : 'गैबचि होऊनि जाती.' - दावि २९५; 'त्यातच गैबत जाले. त्यांचा मुर्दा देखिल दृष्टीनें कोणी देखिला नाही.' - भाब ६३. २. नष्ट; गहाळ. [फा. गइब, गइबत]
**गैबत** ईर्षा; पराक्रम.
**गैबति** १. देशाची अवस्था. २. दूर राहून नोकरी.
**गैबती** स्त्री. धूपारतीचा तेलाच्या भांड्यासह बुदलीवजा दिवा. (राजा.)
**गैबती** वि. अलाहिदा; फालतू; कुणीतरी; अपरिचित; भलताच. (गो.)
**गैबती** स्त्री. गैरहुजूर नोकरी; मालकाच्या सन्निध न झालेली, न होणारी नोकरी.
**गैबी** वि. १. गुप्त; गूढ. २. निनावी.
**गैबी आवाज** पु. आकाशवाणी; दैवी, गुप्त संदेश.
**गैबी खबर-वर्तमान-वार्ता-बातमी** गुप्त, गुपित बातमी; चोर बातमी.
**गैबी फकीर** पु. गुप्त सामर्थ्यामुळे चमत्कार करणारा फकीर, गोसावी.
**गैबी माणूस** पु. तोतया.
**गैबी वाद्य** आकाशवाद्य : 'विचित्र गैबीवाद्य वाजीनलीं।' - सप्र २०.६८.
**गैर** अ. निराळेपणा, भिन्नपणा दाखवणारा परंतु सामान्यत: अभाव किंवा अन्यथाभावदर्शक अरबी अव्ययशब्द किंवा प्रत्यय. विशेषत: हिंदी, उर्दू शब्दांबरोबर याचा मनसोक्त उपयोग करतात. या शब्दाचे पुढील काही अर्थ होतात - १. इतर; अन्य : 'गैर पथकें येऊन मोर्चेबंदी केली आहे.' - मइसा १२.१२५. २. अयोग्य; अन्यायाचा; अप्रशस्त : 'हे तुम्ही गैर केलें.' - मदरू १०६. ३. (नामाच्या, विशेषणाच्या प्रारंभी जोडल्यास) अवास्तविक, उलट; विपरीत. ४. विना; वाचून. [फा.]
**गैर** स्त्री. परचक्र, लुटारूंची धाड; प्रजेने असंतोषामुळे केलेला दंगा.
**गैरअदबी** स्त्री. असभ्यता; अपमान; अनादर : 'गैर अदबी बोलला सबब पातशहा यास राग येऊन डोळे काढिले.' - मदरु २.७०.
**गैरअदा** वि. रद्द; न पटलेले : 'शिंदेकडील वरात आली तर मग गैरअदाही व्हावयाची नाहीं.' - ऐलेसं १०.५२.७९.
**गैरअब्रू** स्त्री. अप्रतिष्ठा : 'गैरअब्रू फारशी न करणे.' - वाडबाबा २.७५.

**गैरअमली** वि. परस्वाधीन; दुसऱ्याचे : 'चार लक्षाचे भरतीस अमली महालांपैकी बेरीज कमी आल्यास गैरअमली महाल आहेत त्यांपैकी भरतीस कमाल आकाराचे बेरजेचा महाल लावून देणे.' - मइसा १०.३२१.

**गैरआबादी** वि. उजाड; बेचिराख.

**गैरकारी** स्त्री. भलतेच काम; अयोग्य काम.

**गैरचलन** स्त्री. १. चलनाचा अभाव; चलन नसणे. २. (क.) गैरवर्तन; बदचाल.

**गैरचाकर** वि. बडतर्फ : 'जखमी जहाले त्यांस गैरचाकर करून जागिरा तगीर करविल्या.' - जोरा ७५.

**गैरजप्त** वि. गैरअमल; गैरकबजी; परस्वाधीन : 'गैरजप्त देश साधावे.' - चित्रगुप्त ११०.

**गैरत** स्त्री. १. चहाडीचुगली, तक्रार. २. पराक्रम, शौर्य.

**गैरत** स्त्री. लज्जा; भीड : 'हल्लीचे शिकस्तेची गैरत आणि शरमंदगी नबाबास फार जाली आहे.' - मइसा ५.१९. [फा.]

**गैरदस्त-स्ती** वि. सरकारसाऱ्याची सूट असलेली (जमीन).

**गैरबर्दार** वि. बहार नसलेला; फळहीन : 'पोफळी गैर-बर्दार, शेंडे वाळलेल्या आहेत.' - मइसा ११.७९.

**गैरबूज** स्त्री. दुर्लक्ष; अनास्था : 'जुनीं माणसें ही कणसाला महाग त्यांची गैरबुज रे।' - ऐपो ५१.

**गैरमजुरा** क्रिवि. (हिशेब) मजुरा (वजा) टाकल्याशिवाय, वजावट न करता.

**गैरमर्जी** खप्पा मर्जी.

**गैरमाकूल** वि. १. अयोग्य; अनुचित. २. मूर्ख; अडाणी; गैर; वाईट : 'कार्वारास खलेल करणें हें गैरमाकूल गोष्टी आहे.' - मइसा १८.३३. क्रिवि. मूर्खपणे : 'लोक गैरमाकूल आम्हांस न कळत वर्तले तरी त्याची बद्लामी आपणांवरी न ठेवावी.' - मइसा ८.१०.

**गैरमिराशी** वि. वंशपरंपरा मालकी नसलेला : 'मातकदीम मिरासी खरी जाहली. काणव मजकूर गैर मिरासी मुतालीक ऐसे जाहले.' - इऐ ५.१०२.

**गैररजावंद** वि. नाराज; नाकबूल : 'तो क्रियेस गैररजावंद जाहला.' - वाडशाछ १३२. [फा.]

**गैररहा-रीत** स्त्री. बदचाल; अयोग्य रीत; वाईट आचरण.
वि. बदचालीचा : 'भुजंगराव याची वर्तणूक गैररहा दिसते.' - ऐलेसं ११.५७७६.

**गैरराबता** पु. १. बंदी; मनाई; खंड (मार्ग, मिळणे, येणे-जाणे, वहिवाट, चाल यांमध्ये) : 'नाना फडणीस लष्करातून आल्यापासून गैर - राबता बहुत करूं लागले. कोणाचीच गाठ पडत नाहीं.' - ऐलेसं ८.४१५१. २. वहिवाट, चाल यांमध्ये अनभ्यास; अपरिचय; वळण नसणे.

**गैरवाकब** वि. अडाणी; बिनमाहीतगार : 'गैरवाकब गोऱ्या अधिकाऱ्यांचे रिपोर्टावरून अधिकारी फडाफड बर्तर्फ होतात.' - लोहिवा ७५. [फा. गैरवाकिफ]

**गैरवाका** पु. खोटी किंवा बनावट गोष्ट; गैरसमजूत; लबाडी : 'ऐसा गैरवाका सांगितला.' - मइसा. ८.५२.
वि. वेडावाकडा. [फा.]

**गैरवाजवी** वि. अप्रायोजक.

**गैरविलग** क्रिवि. आडबाजूला; आडवळणी.
वि. (विलगसाठी चुकीने योजलेला) न मिळणारा; न जुळणारा.

**गैरविल्हईस-विल्हे-विल्हेस** क्रिवि. योग्य ठिकाणाच्या विरुद्ध जागी; भलतीकडे. (वा.) **गैरविल्हेस लागणे, पडणे** - १. दुसरीकडे किंवा चुकीच्या ठिकाणी लागणे; क्रमवार नसणे. २. योग्य ठिकाणाहून गहाळ होणे; गमावणे. ३. गोंधळ होणे, अव्यवस्थित असणे.

**गैरसनदी** वि. १. बेसनदशीर; सनदेने अधिकृत नसलेले. २. जादा मंजुरीशिवाय : 'गैर-सनदी खर्च करावयाची सरकारची आज्ञा नाहीं.' - ऐलेसं ५.२३५३.

**गैरसमजूत** स्त्री. उलट, चुकीची समजूत; चूक.

**गैरसाळ** वि. १. खोटसाळ; सरकारी टाकसाळीतून न पाडलेले, इतर ठिकाणचे म्हणजे हिणकस, कमी किंमतीचे (नाणे) : 'गैरसाळ तामगिरी। कोणी नवी मुद्रा करी।' - दास १०.८.१४. (त्यावरून) खोटा; बनावट; लबाडीचा. २. (ल.) बेशिस्त; अनभ्यासी; गावंढळ; अडाणी (माणूस); अयोग्य; अनुचित (वर्तन). ३. अशिष्ट; अड़ाणी; हलका; राकट; बेडौल; गावडी. [फा.]

**गैरहिसा (शे) बी** वि. अव्यवस्थित; बेहिशेबी.
क्रिवि. अन्यायाने.

**गैरहुर्मत** स्त्री. अप्रतिष्ठा; बेअब्रू.

**गैरा-री** वि. १. अशक्त; मंद; मूर्ख; गयाळ; खुळा (माणूस). २. कुचकामाचे; कवडीमोल; क्षुद्र (वस्तू). ३. भलता; अपेक्षेप्रमाणे नसलेला (पदार्थ).

**गैरात** वि. १. गैदी; अव्यवस्थित; बेपर्वा. २. मंद; मूर्ख. पहा : **गैरा-री**

**गैरात** पु. वरकड, इतर लोक. [फा.]

**गैराद** वि. हंगामी; नवे आलेले; इतर; कायम नेमणूक नाही असे : 'याखेरीज गैराद हशम व मवास यांची फौज ४०००, याप्रमाणे फौजेचा कट्टा...' - चित्र १४.

**गैरादा** वि. अप्राप्त; न मिळालेले; वसूल न झालेले : 'बाकी दोन लाख अकरा हजार रुपये राहिले ते हाली सरकारांतून गैरादा करून गायकवाडावर वराता जहाल्या.' - पेद ३९.२७. पहा : **गैरअदा** [फा. गैर + अदा]

**गैरांव** पु. कोळ्याचे जाळे; जळमट; घेरू; घेरोसा. (गो.)

**गैरी** स्त्री. दंगा; लढाई : 'आम्हाकडणे झाली गैरी।' - ऐपो २११.

**गैरी** स्त्री. १. अन्याय. २. गुन्हा; दुर्वर्तन : 'ज्याकडेस गैरी लागेल त्यापैकीं मसाला होनु एक देणें.' - सासंइ ८८. (वा.) ० **करणे** - वाईट वर्तणूक, दुर्वर्तन करणे.

**गैऱ्हा** वि. खूप, भरपूर. (अहि.)

**गैवार** वि. गावंढळ; अडाणी : 'शान्यानं वागोल्या गैवाऱ्यानं हाकलल्या।' - राके ३४३.

**गैशा** पहा : **गेयशा**

**गैसास** स्त्री. १. मिंधेपणा. २. मूर्खपणा : 'परि असतें जींत न गणिति। गैसासे पै।' - राज्ञा ९.५०८.

**गैंब** पु. गुरांनी केलेल्या नासाडीची नुकसानभरपाई करून देणारे खाते. (गो.) [पोर्तु.]

**गो** उद्गार. अगो; अगे. (बंगालीतही हे संबोधन आहे.) : 'असे कायगो करतेस?' - कफा १. (को.)

**गो** स्त्री. १. गाय. २. बैल (पशू). समासात - गाईपासून झालेले; गाईसंबंधी (दूध, चामडे, मांस इ.) : 'अगा गोक्षीर जरी जाहलें। तरी पथ्यासि नाहीं म्हणितलें।' - ज्ञा २.१८४. [सं.]

**गो** पु. इंद्रिय; वाचा.

**गोई** स्त्री. मैत्रीण (झाडी).

**गोईबाई** वि. नामर्द; बुळा; दुर्बळ. (व.) पहा : **गउबाई**

**गोकटी, गोकनळी** स्त्री. (वाघ गोकटीस बसतो त्यावरून) मान; गळा; बोकांडी (क्रि. धरणे, फोडणे, फुटणे, बसणे). (राजा.) (वा.) ० **धरणे** - अडविणे; कुचंबविणे; दुःखद स्थितीत तिष्ठत ठेवणे. **गोकटीस बसणे** - मानगुटीला बसणे; पिच्छा पुरवणे; खनपटीला बसणे. **(शेत) गोकटीस येणे** - पीक पोटरीस येणे; कणसात दाणे भरगच्च भरणे.

**गोकरा** पु. लाकूड-शेणीचा चुरा. (बे.)

**गोकरू** पु. सुकलेले शेण. (झाडी.)

**गोकर्ण-गोक्रण** न. १. मुलाला दूध पाजायचे (गाईच्या कानाच्या आकाराचे) बोंडले. २. एक वेल व तिचे फूल. ३. दांड्याचे सारपात्र; कावळा. याचा आकार गोकर्णासारखा असतो. (तंजा.)
पु. गाईचा कान. (सं.) (वा.) **गोकर्णात येणे** - संपुष्टात, गोकुळात येणे; संपणे; दरिद्री होणे.

**गोकर्णिका, गोकर्णी** स्त्री. एक प्रकारचा लगाम.

**गोकर्णी** स्त्री. निळ्या पांढऱ्या रंगाची; गाईच्या कानासारखी फुले असणारी वेल.

**गोकाकी** वि. तांबूस; कावेचा : 'माझ्या बाळाबाई गोकाकी रंग खासा।' - लोले २२.

**गोकु(कू)ल-ळ** न. १. श्रीकृष्णाचे लहानपणीचे वसतीचे गाव. २. गोकुळाष्टमीला नंद, यशोदा, गोप-गोपी, गाईवासरे वगैरेंची पूजा करण्यासाठी केलेली मातीची चित्रे. ३. (ल.) उत्तान, स्वैर क्रीडा. (क्रि. माजवणे). ४. (ल.) मुलेबाळे; मुलाबाळांनी भरलेले घर : 'माझ्या घराचे गोकुळ भरले आहे.' - कोउ २७. (वा.) **गोकुळात येणे** - १. संकोचित होणे; संपुष्टात येणे; संपणे. २. आटोक्यात येणे (व्यवहार). विश्वव्यापी कृष्णपरमात्मा ज्याप्रमाणे गोकुळाच्या मर्यादेत आला त्याप्रमाणे.

**गोकोश** पु. जमीन मोजण्याचे एक माप; गाईच्या हंबरण्याचा टप्पा; गोरुत; दोन कोसांचे अंतर.

**गोक्क** न. पाटबंधाऱ्यातील भगदाड; भोक. (बे.)

**गोख** न. १. पोट. २. मध्यभाग; मध्यवर्ती लोक : 'कैसा न्हवता प्रलयाचा वेलु। गोखां तूंचि मांडला कालु।' - राज्ञा ११.३८४. पहा : **गोखा.** ३. झरोका. [सं. गवाक्ष]

**गोखडा** पु. १. सज्जा. २. कोनाडा; झरोका; गोखला : 'कंवरणीजी गोखड्यांतुनी। बघा जरा तर हळूंच ढुंकुनी।' - भा. रा. तांबे कविता, भाग २.

**गोखडी** स्त्री. गाई उभ्या राहण्याची जागा; गोठण : 'गिलच्यानीं गोखडींत दहा-पांच बैरागी सत्पुरुष होते तेहि बसले ठिकाणीं लंबे केले.' - भाब २८.

**गोखणे** उक्रि. १. घोकणे; पाठ करणे. २. तेच तेच पुन्हा म्हणणे, सांगणे; गाणे गाणे; रडगाणे लावणे.

**गोखमा** पु. १. गुराखी. २. (ल.) गावंढळ; खेडवळ; नांगऱ्या.

**गोखरू, गोखरूचे झाड** पु. १. जमिनीवर पसरणारी एक वनस्पती व तिचे फळ; सराटा. ही फळे फार औषधी आहेत. २. पालखीच्या इलाख्याच्या (गोंड्याच्या) शेवटी लावलेला लहान गेंद. ३. (चर्मकार) बुटाच्या उंच तळाला लागणारा खिळा. [सं. गोक्षुर]

**गोखरू पाटली-बांगडी** जिच्यावर गोखरूची आकृती आहे अशी स्त्रियांची सोन्याची पाटली वा बांगडी : 'उगीच नाही हातात गोखरू पाटल्या पडत.' - धाधो ९९.

**गोखरे, गोखरेण-ड** न. गुरांनी खाऊन शिल्लक राहिलेले, गुरांच्या पायाखालचे, निरुपयोगी गवत. (को.)

**गोखला** १. कोनाडा. २. गवाक्ष; खिडकी; वातायन; जाळी; झरोका. पहा : **गोख, गोखडा** [सं. गवाक्ष]

**गोखा** क्रिवि. मध्यंतरी; मध्ये : 'कैसा नव्हता प्रळयाचा वेळु। गोखा तूंचि मिनलासि काळु।' - ज्ञा ११.३८९.

**गोखा** स्त्री. झरोका; खिडकी : 'अलीकडे श्रीमंतांची प्रकृत हुशार आहे. छ. १ रोजीं चाफेखणावर दिवाणखान्यांत गोखेंत येऊन बसले होते.' - ऐलेसं ७८८१.

**गोखा-खी** स्त्री. फळे, फुले काढण्याची शेंड्यास आडवी कामठी बांधलेली उंच काठी; शेकाटा; आकडी; गरकू. (कु.)

**गोखातु** अ. मध्येच.

**गोखाना** पु. १. सरकारी किंवा एखाद्या मोठ्या माणसाचा गायवाडा; गुरांचे खाते. २. गायठाण; गोठा.

**गोखी** स्त्री. वेडी; मूर्ख : 'माजु मोडैल वो गोखिए' - शिव ६९१.

**गोगणे** अक्रि. रागाने, दुःखाने धुमसणे; कुरकुरणे.

**गोगलगाय** स्त्री. १. जठरपादवर्गातील एक कीटक. हिचे शरीर मांसल, थंड, नरम असून वर कवच असते. हिला दोन शिंगे असतात व त्यांच्या शेवटी डोळे असतात. २. (ल.) सौम्य; गरीब; कष्टाळू-प्राणी, माणूस. ३. एक प्रकारची खुबडी; पाण्यातील प्राणी.

**गोगा-का** पु. घोटाळा; गोंधळ; गडबड; अस्ताव्यस्त स्थिती : 'त्यासी तेथील प्रकार पाहिला तर सारा गोगा होता म्हणून उठोन आलों.' - पेद २९.४७. [ध्व.]

**गोगो** पु. मुलांचा द्यायचा गोड खाऊ : 'तुला गोगो पाहिजे ना?' - आआशे १२६.

**गोगोपाणी** न. (मुलाशी बोलायच्या भावेत) दारू : 'लहान मुलांना बोंडलेभर गोगोपाणी पाजून झोपवीत असत.' - सांज ४६.

**गोग्दा** पु. खड्डा.

**गोग्रास** पु. १. जेवायला बसण्यापूर्वी गाईसाठी राखून ठेवलेला अन्नाचा नैवेद्य. २. गाईसाठी भिक्षा. [सं.]

**गोघाट** गोंगाट; कल्ला. (अहि.)

**गोच** स्त्री. खोच; खोमा. (क्रि. मारणे) (प्रां.)

**गोचका** पु. १. घसा. (व.) २. पानाचे पूड. ३. उचकी (विशेषत: शेवटची).४. लचका (मांस, मैदा यांचा हाताने, तोंडाने तोडलेला.). (क्रि. तोडणे, घेणे, काढणे.)

**गोचका, गो (गु) चकुला** वि. लहान; चिमुकला, ठेंगू पण सुंदर (मूल).

**गोच (चि-ची) ड-डी** स्त्री. पु. १. अष्टपाद वर्गातील जीव. कुत्रा, गाय, म्हैस यांच्या अंगाला चिकटून राहणारा लहान किडा : 'मग बसल्याबसल्या मी त्याच्या कानातल्या गोचड्या काढी.' - वळीव १३४. २. (ल.) लोचट माणूस.

**गोचमाडणे** अक्रि. भर येणे; गच्च भरणे (पिकाने, फळांनी झाड). (माण.)

**गोचर** वि. १. दृश्य; माहीत; प्रकट; प्रत्यक्ष : 'पैं जीवाचिया बोधा गोचर जो हा धांदा।' - ज्ञा १५.३४६. २. ज्ञानेंद्रियांना समजेल असा; समजणारा; संवेद्य; मूर्त; दिसणारा : 'जैसा जनामाजि खेचरू असतू चि जना नव्हे गोचरु।' - राज्ञा ५.९८. [सं.]

**गोचर** न. (ज्यो.) जन्मराशिपासून द्वादश राशींच्या ठिकाणी सूर्यादी ग्रहांचा वर्तमान संचार. [सं.]

**गोचर** न. गुरांची चरायची जागा.

**गोचरशास्त्र** न. (तत्त्व.) १. ज्ञानेंद्रियांच्याद्वारे वस्तुजात जाणण्याचे, आकलन होण्याचे शास्त्र. (तत्त्वज्ञानातील एका सिद्धांतानुसार मनुष्य ज्ञानेंद्रियांच्याद्वारे वस्तूंचे केवळ व्यक्तरूप जाणू शकतो. तिचे मूलस्वरूप जाणू शकत नाही). २. इंद्रिय-प्रत्ययवाद. [सं.]

**गोचर्म** न. १. गाईचे कातडे. २. (ल.) जमीन मोजण्याचे एक माप. गाईच्या चामड्याइतकी जमीन. (गाईच्या कातड्याची वादी काढून तिने वेष्टिलेली जमीन एका माणसाने राजापासून मागून घेतल्याची एक गोष्ट आहे त्यावरून) तीनशे फूट लांब व दहा फूट रुंद या मापाचे क्षेत्र (यातील धान्य एका माणसाला एक वर्ष असा हिशोब आहे.). [सं.]

**गोची** स्त्री. पंचाईत.

**गोच्या** पु. भृंगराज, एक पक्षी. (झाडी).

**गोज** पु. खटला; प्रकरण; व्यवहार; तंटा. (गो.)

**गो (गों) ज** न. एक प्रकारचे कारल्याचे पंचामृत, तोंडी लावणे. (को.) २. उडदाच्या पिठाचे डांगर. (व.) [क. गोज्जु]

**गोजका, गोजकुला** पहा : **गोचका, गोचकुला**

**गोजडी** स्त्री. गोधडी; कंथा. (गो. कु.)

**गोज (जि) रा-रे, गोजिरवाणा** वि. नाजूक आणि सुंदर; सुकुमार व लहान; सुरेख; देखणा : 'तुका म्हणे गोजिरीया विठोबा। पाया पडो द्या।' - तुगा ५. [क. गुजुरु = लहानपणा]

**गोजरू, गोजी** न. स्त्री. (प्रेमाने किंवा तिरस्कार करतेवेळी योजना) कालवड; वासरी.

**गोजावणे** सुंदर दिसणे : 'आवडीच्या वालभे गोजावले गोजिरे' - ज्ञागा २०७.

**गोजिव्हा** स्त्री. एक वनस्पती; गोजवान पाथरी; दवली. [सं.]

**गोजी** वि. गोजिरवाणी; लाडकी; आवडती : 'आथर बाई खालीं। सवाण सतरंजी। गेली मांडीवर झोंपी। माही सोनुकली गोजी।' - वलो ८०.

**गोजणे** सक्रि. शिंपडणे; शिंतडणे (पाणी वगैरे). (बे.)

**गोझरू** न. वासरू.

**गोट** पु. (फाटू नये, झिजू नये किंवा शोभा यावी म्हणून) वस्त्राच्या बाजूला घातलेली मुरड किंवा लावलेला काठ, किनार (वस्त्राचा, जोड्याचा इ.). [क. गाढ्ढ]

**गोट** पु. जमीन नांगरताना चुकून मध्ये राहिलेला, न नांगरलेला तुकडा; भाग. (खा.)

**गोट, गोटा-टे, गोटेस** शअ. जवळ. (चि.)

**गोट-ठ** पु. हातसर; बायकांच्या हातातील गोल बांगडी; सलकड्यासारखा धातूचा एक दागिना. [का. गोड्ढ = मर्यादा, सीमा]

**गोट-ठ** पु. १. घेरा; वेढा. (क्रि. घालणे, देणे.) २. सैन्याची छावणी, तळ, कंपू; तळाचा एक भाग. ३. एकाच ठिकाणची, एकाच पक्षाची, बाजूची मंडळी जमण्याचे किंवा राहण्याचे ठिकाण. [क. गाड्ढ = मर्यादा, सीमा, आश्रय स्थान.] (वा.) **गोटात घालणे** - मागे हटविणे; छावणीपर्यंत मागे रेटणे : 'त्यास शिकस्त करून बरे वजेन गोटांत घातला.' - हम २७३.

**गोट(ठ)गणती** स्त्री. ठाणबंद घोड्यांची मौजदाद : 'गोट गणतिला तमाम जमले।' - ऐपो २००.

**गोट(ठ)गस्ते** पु. १. लष्कराच्या गोटाची व्यवस्था ठेवणारा अंमलदार. २. राजवाड्यात होणाऱ्या नित्यनैमित्तिक कामगिऱ्यांची सर्व व्यवस्था पाहणारा अधिकारी; दरबार, स्वाऱ्या वगैरेविषयींची व्यवस्था ठेवण्याची कामगिरी याच्याकडे असे. (बडोदे).

**गोटगीळ** वि. आपला अपराध कधीही कबूल न करणारा. (व.)

**गोटदार** वि. शोभेची किनार असलेला : 'खाकी रंगाची गोटदार चंची उघडून...' - पेरणी ३७.

**गोटफोडी** स्त्री. दोन मिशांचा मासा.

**गोटमार-री** पु. स्त्री. १. दगडफेक; गोट्यांचा वर्षाव. (ना.) २. (विनोदाने) इंग्रजी बोलणे. ३. एक खेळ. यात गोट्यांची फेक व पळसाचा झेंडा सर करणे हे प्रकार असतात. (ना.)

**गोटली, गोटी आंबा** स्त्री. लहान जातीचा आंबा.

**गोटा** पु. १. गोलसर, वाटोळा दगड. २. बैदूल (दगड, लाख, लाकूड इ. चा). ३. (ल.) कणसातील धान्याचा दाणा; डाळीचा दाणा. ४. सुका नारळ; पूर्ण वाळलेला व खडबड वाजणारा, करवंटीपासून सुटलेला नारळ. ५. वजनाचा दगड. (व.) ६. निंदा-तिरस्कारवाचक प्रत्यय. उदा.

तेलगोटा, माळगोटा इ. ७. (ल.) मूर्ख मुलगा; ठोंब्या, नर्मद्या; दगड.
**गोटा** वस्तऱ्याने केस काढून गुळगुळीत केलेले डोके. (क्रि. करणे.) [क. गोट्ट = बाठा, कोय] (वा.) ० **मारणे** - (चर्मकार) चामडे घोटणे.
**गोटा** पु. कलाबतू; चांदीची, सोन्याची जर. [हिं.]
**गोटा** पु. फुलांचा लहान गुच्छ. [सं. ग्रंथ]
**गोटा** पु. भिलावा; बिब्बा. (व.)
**गोटा** पु. स्थान; अवस्था.
**गोटागुंता** पु. (गोटा म्हणजे धान्याचा दाणा यावरून) सुतळीचा तोडासुद्धा : '... याउपरी स्थलांतर करणें ढील न करणें. गोटागुंताहि घरा नसो देणें.' - चंचूद १२९.
**गोटाड-ळ, गोटाडी** वि. दगडाळ; खडकाळ (जमीन). (व.)
**गोटाळे** न. दगड; लहान भांडे (तेलासाठी). (व.)
**गोटी** स्त्री. १. लहान गोटा; गोळी. पहा : **गोटा** १, २. २. तालमीतील उचलण्याचा मोठा वाटोळा दगड. ३. देवळातील कौलाचा दगड. पहा : **उचला**. ४. (ल.) मजबूत व बांधेसूद, गुटगुटीत शरीर. ५. रुप्याचा गोळा (जर वितळवून केलेला). ६. वाटोळा व लहान आंबा. ७. खराब झालेली चांदीची तार. ही आटवून चांदी काढतात. ८. मुलांच्या खेळातील काचेची किंवा गारेची गोल वस्तू. [क.गोलि]
**गोटी** स्त्री. अंडकुळी. (वा.) **गोट्या कपाळात जाणे** - १. छातीत धडकी भरणे; भयंकर भीती वाटणे : 'आजूबाजूला सगळी पोलीस कंपनीच! म्हणजे आमच्या गोट्या कपाळातच गेल्या.' - वासू १२५. २. शिरा ताणून आक्रस्ताळेपणाने बोलणे.
**गोटीदार-बंद** वि. गुटगुटीत : 'गोटीदार बांधा...' - नाता १३७.
**गोटुल** न. आदिवासी जमातीतल्या तरुण मुलामुलींचे सामुदायिक शयनगृह.
**गोटु(टो)ळा** वि. १. गोल; गोलसर; गोट्याच्या आकाराचा. २. (ल.) मजबूत व आडव्या अंगाचा; ठेंगणा व पिळदार (माणूस, पशु).
**गोटू** न. तंजावरकडील एक वाघ. - (तंजा.)
**गोटो** पु. शिजलेले (भाताचे) शीत; भातगोटा. (गो.)
**गोठ** पु. निवासस्थान : 'विजयो वसे समुद्राचा गोठीं।' - रुस्व २७८.
**गोठ, गोठगणती** पहा : **गोट, गोटगणती**
**गोठ** स्त्री. गोष्ट. (खा.) [सं. गोष्ठी]
**गोठघोळणी** स्त्री. (सोनारी) गोठ (दागिना) तयार करण्याचे हत्यार.
**गोठ(ठा)ण-णी** न. दुपारी सावलीसाठी पाण्याजवळ झाडाखालती बसण्याची गुरांची आखर, जागा; गोठा : 'पशु पीडती पर्जन्यें। गळती गाईंची गोठणें।' - मुसभा ३.७९. [सं. गोष्ठ, गोस्थान] (वा.) ० **घालून बसणे** - सभेत अस्ताव्यस्त बसणे.
**गोठण** न. द्रवावस्थेतून घनावस्थेत जाणे.
**गोठणबिंदू** पु. (भौ.) ज्या तापमानाखाली एखाद्या द्रव्याचे घनपदार्थात रूपांतर होते ते तापमान. ते वितळणबिंदूएवढे असते.
**गोठणक्षरण** न. (भूशा.) हिमानी क्रियेने होणारी खडकांची झीज व धूप.
**गोठणे** अक्रि. १. दृढ किंवा घट्ट होणे; थिजणे; आटणे (जमीन चोपून, शाई इ. वाळून, दूध इ. उकळून, पातळ पदार्थ थिजून) : 'ज्याच्या भयें गोरस नित्य गोठे।' - सारुह १.६१. २. गोळा होणे; एकत्र होणे : 'तों शिळा गोठल्या सर्वही।' - ह २५.१२३. ३. (भौ.) द्रवपदार्थाचे तापमान कमी झाल्यामुळे त्याचे घनस्थितीत रूपांतर होणे. [सं. गोष्ठ]
**गोठमात** स्त्री. गोष्ट; हितगुज; विचारविनिमय. (व.)
**गोठला** न. एक फूल. (गो.)
**गोठले** न. (शरीररूपी) गाठोळे.
**गोठवण** स्त्री. मांडणी; व्यवस्था. (बडोदे)
**गोठवणे** सक्रि. १. थिजवणे. २. आहे तसाच ठेवणे; बदल होऊ न देणे : '... आपली जी लढावू विमाने आहेत त्यांना घासलेट टाकावे लागते. म्हणून सरकारने ते गोठवले आहे.' - साअसा १००.
**गोठवणे** सक्रि. (भौ.) द्रव पदार्थाचे तपमान कमी करून त्याचे घनस्थितीत रूपांतर करणे.
**गोठवलेली मत्ता** (शाव्य.) ज्या मालमत्तेचा वापर व उपयोग करण्यास कायद्याने बंदी केली आहे अशी मालमत्ता.
**गोठविणे** सक्रि. व्यवस्थित लावणे.
**गोठळी** पहा : **गुठळी**
**गोठा** पु. शेतातले घर : 'अशा प्रकारची शेतात एकदोन घरे असली तर त्यांना ...[क.कोट्टगे] कोठा, गोठा किंवा पडळ म्हणतात.' - गांगा २.
**गोठा** पु. मुलींचा एक खेळ.
**गोठा-ठो** पु. गुरे बांधण्याची जागा; जनावरे ठेवतात ती जागा.[सं. गोष्ठ]
**गोठापाणी** न. सकाळी गोठा झाडणे, गुरांचे शेण, मूत काढणे वगैरे गोठ्यातील व्यवस्थेचे काम (क्रि. करणे.)
**गोठावणे, गोठाव(वि)णे** सक्रि. गोठाणात गुरे एकत्र करणे. गोठ्यात गुरे घालणे.
**गोठी** स्त्री. वासरांचा लहान गोठा. (को.)
**गोठी** स्त्री. १. गोष्ट; कथा : 'गोठी सांघेति श्रीकृष्णाचियां। विरहिणीसी।' - शिव २८५. २. कामकाज; कारभार; विषय; मुद्दा. (क्रि. करणे.) [सं. गोष्ठी]
**गोठुले** न. गाठोडे. पहा : **गठळे, गठडी**
**गोठु(ठो)ळा** पहा : **गोटुळा**
**गोठु(ठो)ळी** स्त्री. १. डिखळ; गोळा, गोळी. पहा : **गुठळी**. २. साखरेच्या पाकातील तिळांचा हलवा; तिळगूळ.
**गोठूल** न. विश्रांतिगृह : 'नाचता नाचता थकल्यावर पहाटे विश्रांती घेण्यासाठी ती दोघे गोठूलमध्ये जाऊन झोपतात.' - राके ६२१.
**गोठोळा** पु. मेंढा : 'जालासी गोठोळा धनगरांसी' - नागा १८५४.
**गोठोळा** वि. कामचुकार.
**गोड** न. १. षडरसांतील मधुर रस. २. मीठ. (व. खा.) ३. (वै.) पथ्याला अनुसरून मधुर किंवा साखरेने युक्त असा पदार्थ.
पु. गूळ. (गो. को.)
वि.१.मधुर; स्वादिष्ट. २. सुवासिक. ३. मंजूळ; सुंदर; साजिरे. ४. मृदू. ५. सौम्य. ६. सुखकारक; संतोषदायक. ७. नीटनेटके; नियमित; योग्य; चांगले; शुद्ध (भ्रष्ट नसलेले) जसे :-गोड-प्रयोग-उदाहरण वाक्य-कवन इ. ८. चांगले; सुरस, चवदार. - (तंजा.) ९. शुभदायक;

मंगलकारक. १०. 'सत्त्वाचा गोड जाहला अंत।' - विक ८. [सं. गुड] (वा.) ० **करून घेणे, मानून घेणे** - कसेही असले तरी गोडीने, चांगल्या हेतूने स्वीकारणे; मान देणे; अव्हेर न करणे. **दिल्हे घेतले गोड** - मिळून मिसळून वागणे चांगले. ० **न वाटणे** - प्रकृती बरी नसणे : 'आज सुतार गावी गेला, उद्या त्याला गोड वाटेनासे झाले...' - घरदार ६.

**गोड** पु. १. तंगडी; पाय. (काशी). २. औरस (लग्नाच्या स्त्रीची) संतती.

**गोडगस्ता** पु. पाटलाच्या हाताखालील एक गावकामगार. गावात कायकाय गोष्टी होतात त्या तो पाटलाला सांगतो. पहा : **गोठगस्ते**

**गोडगस्ती** पु. जकातीकडील एक अंमलदार.

**गोडघाशा-खाऊ** वि. १. सदा गोड खायला पाहिजे असा; गोड गोड खाण्याची आवड असलेला. २. चोखंदळ; मिजासी.

**गोड घास** १. जेवणाच्या शेवटी खाण्यासाठी ठेवलेला आवडत्या पदार्थाचा घास. २. सुग्रास; मिष्ट भोजन. ३. अप्रिय, दुःखद गोष्टीचा शेवट गोड करणारा मुद्दा, प्रकार.

**गोड जेवण, तोंड** १. वधूपक्षाने वरपक्षाला अथवा वरपक्षाने वधूपक्षाला दिलेली मेजवानी. २. मृत माणसाचे सुतक धरणाऱ्या नातेवाइकांना आणि इष्टमित्रांना सुतकाच्या चौदाव्या दिवशी (सुतक फिटल्यावर) मुख्य सुतक धरणाऱ्याने दिलेले जेवण. ३. पक्वान्नाचे जेवण.

**गोड दोडकी** स्त्री. घोसाळी; घोषक यांची पांढऱ्या फुलाची एक जात.

**गोडनिंब** पु. कढीनिंब. (व.)

**गोडरी** वि. आंबट नसलेली. (झाडी.)

**गोडरे** वि. गोड; गोडसर : 'बायकां गोडरें प्रिय अन्न।' - गीता २.१७५.

**गोडली** स्त्री. जनावरांच्या नखीला होणारा रोग.

**गोडवण** पदार्थ गोड करणारी वस्तू.

**गोडवणी** स्त्री. गोडे पाणी : 'हिंग पडतांचि रांजणी। गोडवणी होय हिंगवणी।' - भारा बाल १०.३६.

**गोड (डा) वणे** सक्रि. १. गोड करणे, होणे; खारट, आंबट नाहीसे करणे (जमीन, पाणी, फळे इ.). २. मिठी बसणे (गोड पदार्थ खाल्ल्याने जिभेला). ३. गोडी लागणे; लुब्ध होणे; लालचावणे. ४. पाड लागणे; पिकणे (फळ).

**गोडवा, गोडा** वि. १. सापेक्षतेने गोड; विद्यमान पदार्थात - गोष्टीत अधिक, विशेष गोड. २. (ल.) कोरा; असडा; अस्पष्ट; कोवळा इ. ३. ताजे (पाणी, खारट नव्हे असे); क्षारयुक्त नसणारे; मधुर. ४. बिनखारवट; क्षार, लोणा नसणारी (जमीन). ५. गोडे (तीळ, कारळे यांचे तेल). ६. सात्त्विक; सुस्वभावी; सौम्य (माणूस). ७. जिते; जिवंत (मांस - मुरदाड, मृत नव्हे असे). ८. सौम्य (खाजऱ्या, उष्ण, तिखट नव्हेत अशा सुरण इ. भाज्या). ९. निर्विष (साप.). १०. कोमल; नाजूक; रोगाला बळी पडणारे (शरीर, अवयव). ११. नदीतील, गोड्या पाण्यातील (मासा). १२. खारवणातील नसलेले; गोड्या जमिनीत तयार केलेले (भात). १३. जिव्हाळ्याचे; नाजूक; मर्माचे (अंग, जांघ, बस्ती अंड इ.). १४. खारट नसलेला (दाणा-धान्यातील). १५. शुद्ध; नेकजात; भेसळ रक्ताचा नसलेला (मराठा).

**गोडवा, गोडा** वि. १. बिन काटेरी; किड्यांना प्रिय (झाड, वनस्पती). २. मऊ; नरम (लाकडाचा नारावाचून बाहेरचा भाग). ३. मादक नसणारी (हरीक, खडसांबळी इ. वनस्पतीतील प्रकार).

**गोडवा** पु. १. गोडपणा. २. स्तुती. ३. आकर्षकपणा; निरागसता. (वा.) **गोडवा, गोडवे गाणे** - १. प्रशंसा करणे; अवास्तव स्तुती करणे; नावाजणे. २. (ल.) कुरकुर करणे; निंदा करणे.

**गोडविणे** सक्रि. समुद्राजवळची खारी जमीन चिकण माती टाकून लागवडीसाठी योग्य करणे; क्षार काढून टाकणे.

**गोडवी, गोडी** स्त्री. भूक व तोंडाला रुची असल्याने जेवण्यासंबंधीची इच्छा; रुची.

**गोडवे सामान, गोडी फौज** गोडे सामान; बंदुका, तोफा इत्यादी साधनांनी न लढता तरवार, भाला इत्यादी साधनांनी लढणारी पायदळाची किंवा शिलेदारांची फौज : '... पलटण तोफखान्याचे तोंडावर न येतां बाजूनें गोडवे सामान पाहून डावे बाजूस आंबोजी इंगळे मुकाबल्यावर उठावणी केली.' - ऐको भा २ पा. ५४.

**गोडशे** न. मिठाई. (गो.)

**गोडसाण** स्त्री. गोडी (गो.).

**गोडसाण** वि. सरळ; सुरेख (केस). (गो.)

**गोडं (डां) बी** स्त्री. १. बिब्याची बी (ही शैत्यावर देतात). २. काजू बी.

**गोडा** पहा : **गोडवा**

**गोडाउन** न. गुदाम; माल साठवून ठेवण्याची जागा. [इं.]

**गोडा एरंड** सुरती एरंड.

**गो (गों) डाळी** स्त्री. गोंडाळ गवत : 'कन्हवेलु, मारवेलु गोंडाळी।' - गीता २.५२.८६.

**गोडावणे** क्रि. गोडी लावणे.

**गोडांबा** पु. भरपूर मधुर फळे येणारी आंब्याची एक जात.

**गोडिर-रा-सा** वि. गोड; गोडसर : 'कीं सेवितां चराचरा। माझा स्वामि गोडिरा।' - ऋ ७४; 'निर्गुणा उपजवी। गुण गोडिसे।' - ऋ ७७.

**गोडि (डु) ळणे** अक्रि. गोड, पक्व होणे (फळे, फणस, केळी). (राजा.)

**गोडी** स्त्री. १. गोडपणा; मिष्टता; सुवासिकपणा; मधुरता; चांगुलपणा. २. चव; रुची. ३. नामीपणा; रुचकरपणा (पक्वान्नाचा). ४. सौम्यता; मृदुता; मधुरता (भाषणाची). ५. चटक; लज्जत; आवड : 'नीच दास्यत्वाची गोडी।' - दास २.७.३०. ६. सख्यभाव; मैत्री. ७. कैफ नसलेली (दारू). (गो.) [सं. गुड] (वा.) ० **लागणे** - आवड उत्पन्न होणे; एखादी गोष्ट परत परत करावीशी वाटणे. **गोडीस चढणे** - गोड होत जाणे; पिकणे. **गोडीस पडणे** - मानवणे; पसंत पडणे (औषधी, काम). **गोडीस येणे** - १. पुन्हा सख्य, मैत्री होणे. २. चटक लागणे; शौकी बनणे.

**गोडीगुलाबी** स्त्री. १. मैत्री; रहस्य; भलेपणा. २. मौज; आनंद; खेळीमेळी. ३. सामोपचार; मनमिळाऊपणा. ४. अनुनय.

**गोडी दारू** शोभेची दारू : '... मिरवणुकीत गोडी दारू लावीत जावी.' - लेख १३५.

**गोडील, गोडूस-ळ** वि. १. गोडसर. २. गदरलेले (फळ).
**गोडुर्ली** स्त्री. बारीक वांगी येणारी रानटी वनस्पती. (झाडी).
**गोडे** न. गोड कालवण; गुळवणी (गूळ, नारळ, दूध यांचे).
**गोडे** न. झाडाच्या खोडाच्या गाभ्यावरचा कोवळा भाग; नार सोडून इतर भाग. (वा.) ० **करणे** – रान काढणे. (बे.)
**गोडे काष्ठ** ज्येष्ठमध. (गो.)
**गोडे हत्यार** भाला, तरवार वगैरे : 'गोड्या हत्यारानें लोकांचा टिकाव कसा होईल.' - वसमो.
**गोड्ड** वि. वांझ. (कर.) [का. गोड्ड]
**गोड्या** पु. धान्यातून दारू काढून घेतल्यानंतर राहिलेला चोथा. [का. गोड्ड = नीरस, शुष्क वस्तु]
**गोड्या** वि. १. गोडघाशा; गोडखाऊ. २. पक्वान्नांचा शोकी; मिष्टान्नप्रिय.
**गोड्यादेवी** स्त्री. अव. बळी न घेणाऱ्या देवी; ज्यांना बळी, हत्या लागत नाही अशी देवता.
**गोड्यान** वि. गोडसर (झाडी).
**गोण** स्त्री. १. पोते; कोथळा; थैला; बारदान; बोरी; गोणी (गोणपाटाची केलेली, दाणे साठविण्याची). २. (ल.) ओझे; संकट; भार (काम, काळजी यांचा). [क. गोणी] (वा.) ० **घालून बसणे** – हट्ट धरून बसणे.
**गोणगोठ** गोणी; गाठोडे; ओझे : 'कोठून गोणगोठ येते त्याचा हासील मात्र...' - पेद ३१.९७.
**गोणता** पु. गोणपाटाचा किंवा ताडांच्या पात्यांचा विणलेला, बैलावर लादण्याचा गोण, पोते.
**गोणताट** न. तागाचे, गोणाचे कापड; गोणपट; तरट. पहा : **गोण**
**गोणती** स्त्री. गोणपाटाची लहान पिशवी. (राजा.)
**गोणते-टे** न. गोण; पोते. (खा. व.)
**गोणपट-पाट** पु. न. तरट. पहा : **गोणताट**
**गोणा** पु. १. मोठा गोण; गोणी; मोठा थैला, पिशवी, पोते. २. रस्त्यावरील वाळू, गाळ इ. नेण्यासाठी केलेले ओबडधोबड विणीचे तरट. ३. बांबूची किंवा वाळुंजीची विरळ विणलेली पाटी (कावडीत, बहंगीत नेण्यासाठी). ४. गाढवावरची गोण (दगड, विटा, कौले, माती इ. नेण्याची). ५. तढव; जाड पण पीळ नसणाऱ्या सुताचे दणकट जाजम; सुताडा. (ना.) [का. गोणी]
**गोणापाळणा** पु. नवस फेडताना द्यायच्या पाळणे वगैरे वस्तू : 'याला गोणेपाळणे बांधीते बाळाच्या नवसाचे।' - बा ९८.
**गोणी** स्त्री. १. तरट; गोणपाट. २. पोते; गोण; कंठाळी : 'रचोनी गोण्या कनकपट सकळीं।' - नव २५.६. ३. (ल.) भार; ओझे; संकट. पहा : **गोण** २. [क.] (वा.) ० **गळ्यात येणे, पडणे, मानेवर येणे, मानेवर पडणे** – पहा : **गळा.** ० **दंडावर, मनगटावर देणे** – एखाद्याच्या इच्छेविरुद्ध त्याच्यावर भार, संकट, जिकीर, काम इ. लादणे; भार घालणे; अवघड काम सांगणे : 'मी धर्मस्थापनेसाठीं युगायुगाचे ठिकाणीं संभवत असतो अशा प्रकारचें विधान केलेस, त्या वेळेस तें करण्याविषयी तुझ्या दंडावर कोणी गोणी दिली होती ?' - काळ. ० **पाठीवर घालणे** – एखाद्यावर ओझे, काम बळेच लादणे. ० **मनगटावर येणे, पडणे** – जिकिरीचे काम इ. एखाद्याच्या अंगावर येणे, पडणे.
**गोणी** स्त्री. वजनमापाचे एक परिमाण. गुळाचे सहा रवे; बत्तीस पायली धान्य.
**गोणी लोट** (कुस्ती) एक डाव. प्रतिस्पर्धी पाठीवर असताना त्याला ढुंगणाखालून हात घालून आपल्या अंगावरून मागे फेकून चीत करणे.
**गोणे** पु. अव. गोंडा : 'महालक्ष्मीचे पालख्येक रेसमाचे गोणे।' - धालो ४८. (को.)
**गोत** न. सहायक वर्ग; साथी. [सं. गोत्र]
**गोत, गोतगंगा, गोतप(पा) त, गोतवळ-ळा** न. स्त्री. पु. १. भांडण, बहिष्कार इत्यादींच्या चौकशीसाठी जमलेली जातीची सभा, पंचायत; जातीचे कोर्ट; निवाडाकचेरी. २. (सामुदायिक) एकत्रित झालेली जात; सबंध जातकुल; गोत्रज. ३. (सामुदायिक) नातेवाईक मंडळी; सगेसोयरे; भाऊबंद : 'सांडून सर्वहि गोत।' - दास २.१.९. ४. नाते. ५. आलुतेबलुते. ६. (पेशवाईतील) धार्मिक किंवा सामाजिक अपराधाच्या चौकशीसाठी किंवा दत्तक, वाटणी, वतन इत्यादींचा निर्णय देण्यासाठी भरणारी गावातील सरकारी कामगार, वतनी अधिकारी, आलुतेबलुते व प्रतिष्ठित माणसे यांची न्यायनिवाडा करण्याची सभा. या सभेने दिलेला निवाडा सरकारही सहसा फिरवीत नसे. [सं. गोत्र] (वा.) ० **मिळणे** – १. एकत्र जुळणे, जथणे. २. मिसळणे; संयोग, एकजीव होणे. ३. एकमत होणे; जुळणे (मुद्दे, गोष्टी). ४. सख्य होणे. ५. पूर्वापर गोष्टींचा संबंध जुळणे.
**गोतकाशी** स्त्री. काशीगोत; गोतगंगा; गोतातील पंचमंडळी : '...त्यापासून अंतर पडिलें. आम्ही गोतकाशी आहो.' - ऐसंसाखं ४.६४.
**गोतघोडा** पु. १. अगम्यगमन करणारा माणूस. २. अशिक्षित, अक्षरशत्रू असे मोठे मूल; पोळ; म्हशा. ३. कुटुंबातील शुंभ, ढ माणूस.
**गोतदंड** पु. सर्व जातीला केलेला दंड : 'सदरहु कलमेप्रमाणे गोतदंड असावा.' - आंपव्य १७.
**गोतप (पा-बा) त, गोताई** स्त्री. १. जातिबहिष्कृत, गुन्हेगाराला शुद्ध करून पुन्हा जातीत घेण्याच्या वेळेचा संस्कार; प्रायश्चित्ताचे जातजेवण. २. जातसभा; पतिताला आपल्या पंक्तीला घेऊन जात त्याला पावन करते तो विधी.
**गोतपत्र** न. वंशावळ.
**गोतपुड्या** स्त्री. अव. देवप्रतिष्ठा. (खा.)
**गोतमहजर** पु. गोतसभेने दिलेले निकालपत्र, निकाल; थळपत्र.
**गोतमुख** न. जातीचे पुढारी व प्रतिनिधी यांचे म्हणणे : 'पायरीवर आलेल्यांचा न्याय जिजाबाईंनी गोतमुखाने सोडविलेला पहात होते.' - श्रीयो १.५२.
**गोतर** पु. गव्हाच्या काडांचा भुस्सा.
**गोतरचाटा** पु. नवरीने नवऱ्याच्या गोतातील मंडळींबरोबर केलेला अल्पोपहार. हा विधी वरात निघण्यापूर्वी नवरीच्या घरी होतो. (कु.)

**गोतरणी** पु. स्त्री. गोतसभेची आमंत्रणे करणारा. (कातकरी) पहा : **गोतारणा**

**गोतसभा** स्त्री. जातीतल्या लोकांची सभा : 'गोतसभा बोलावून गोतमुखाने न्याय करीत.' - श्रीयो २.२९७.

**गोता-त** पु. स्त्री. १. आचका; गचका; हिसका; झोका (पतंग, वावडी यांना दिलेला). (क्रि. खाणे, मारणे, देणे.) २. बुचकुळी; बुडी (पक्ष्याने मारलेली). ३. (ल.) संकट; अडचण; विघ्न; पेच. ४. तोटा; नुकसान; धक्का; तोट्याची बाब (क्रि. खाणे, बसणे). ५. थाप; फसवणूक; ठकवणूक. (क्रि. देणे.) ६. व्यर्थ येरझार; हेलपाटा. (क्रि. खाणे, बसणे.) [का.] (वा.) **गोत्यात आणणे** - संकटात किंवा निष्कारण खर्चात आणणे, घालणे. ० **देणे** - धोका देणे, फसवणे. **गोत्यात येणे** - संकटात सापडणे, अडकणे.

**गोताई** स्त्री. जातिभ्रष्ट झालेल्या शूद्राने परत जातीत येण्याचे वेळी करण्याचे प्रायश्चित्त.

**गोताई** स्त्री. १. गोतसभा; ग्रामसभा. २. पहा : **गोतपत १**

**गोतापा** पु. गोता; गुंतावा. (कर.)

**गोतारणा** पु. १. गोत जमविण्याचा हक्क असणारा इसम. (आगरी) २. ठाकरातला प्रमुख. पहा : **गोतरणी**

**गोतावळ-ळा-ळे, गोताळा** स्त्री. न. पु. गोत; गोतसभा; गोतगंगा.

**गोतांबील** स्त्री. १. शरीरसंबंध न होणाऱ्या जातीतील परस्पर शरीरसंबंध झाल्याने होणारा वर्णसंकर; सबगोलंकार; जातीजातींची सरमिसळ. २. सर्वांनी एका पात्रात जेवणे : 'का सर्वे बैसोनि नारी। गोतांबील करी॥'-ज्ञा १७.१६०. ३. (ल.) पंचभेळ; खिचडी; सरभेसळ; गोंधळ.

**गोतिया** पु. गोतावळा; गोत्रज : 'आपले कोणी भाऊबंद दाईज गोतिया उभा राहिलियांने त्यास आपण समजाउनू.' - शिचसाखं ५.१७१.

**गोती** स्त्री. पहा : **गोता**
वि. नात्याचे; गोतासंबंधी. (राजा.)

**गोतीशेरॉ, घोटीशॅरॉ** पु. सहस्रमुळी (एक वनस्पती). (गो.)

**गोत्र** न. १. कुटुंब; जात; कूळ; वंश; घराणे : 'ऐसें गोत्रचि दोहीं दळीं। उदित जालें असे कळीं।' - ज्ञा १.१८४. २. वंश - कुलस्थापक; वंशाचा मूळ ऋषी (अत्री, कौंडिण्य इ.) ३. गोतावळा; नातेवाईक. पहा : **गोत.** (समासात) गोत्र-वध-हत्या-संबंध-विचार-घटित. [सं.] (वा.) ० **उतरणे,** ० **जमणे,** ० **येणे** - लग्न जुळवण्याच्या वेळी परस्पर घराण्यातील गोत्रांचा मेळ बसणे; संबंधास अनुकूल असणे. ० **मिळणे** - १. एकमेकांशी पटणे; जुळणे; जुडणे. २. मिसळणे. **गोत्री लागणे** - १. एखाद्या कुटुंबात दत्तक जाणे. २. (ल.) एखाद्याच्या नादी लागणे; चटावणे. ३. कक्षेत, आटोक्यात येणे (व्यवहार).

**गोत्रकुठार-कुदळ** पु. १. अगम्यागमनी; स्वगोत्रज स्त्रीशी गमन करणारा. पहा : **गोतघोडा** १. २. गोताचा काळ.

**गोत्रकोल्हाळ** पु. वि. गोत्रात, कुळात कल्होळ माजवणारा.

**गोत्रज, गोत्री** वि. १. स्वतःच्या गोत्रातला; संबंध असलेला; नात्याचा : 'हे येर येरें आघवे। गोत्रज आमुचे॥' - ज्ञा १.२०७. २. (समाज.) एकाच गोत्रात जन्मलेले; एकाच ऋषिवंशातले. (सं.)

**गोत्रनाव** न. अभिधान (पर्याय); नामनिर्देश; उल्लेख; अर्थबोध.

**गोत्रपुरुष, गोत्रबंधू** पु. एकाच गोत्रात उत्पन्न झालेला मनुष्य; स्वतःच्या गोत्रातला पण पिढ्या तुटलेला दायाद. (कायद्यात हे शब्द एकाच सामान्य गोत्राच्या दायादांना लावतात). [सं.]

**गोत्रहत्या** स्त्री. १. गोत्रजाचा वध. २. (विनोदाने) आपल्याच भिडूची सोंगटी मारणे. [सं.]

**गोत्रैक्य** न. समान गोत्र. (लग्नाच्या वेळी विचारात घेतात.) [सं.]

**गोथवड** स्त्री. चाळीसारखा गोठा, दावण; ठाण; कोटंबा. (को.)

**गोथा** वि. धुरा धारण करणारा; पुढारी; सेनापती; खासा.

**गोथिक कमान** (स्था.) गोल आकाराची कमान.

**गोद** स्त्री. १. कूस. २. स्त्रीचे ओटीपोट. ३. मांडी. (झाडी).

**गोद-दी** स्त्री. १. बंदराच्या ठिकाणी जहाजे उतरण्यासाठी केलेली सुरक्षित जागा; खाडीचे पाणी आत येईल अशा बेताची गलबते बांधण्याची जागा. ही चारी बाजूंनी बंद असते व उघडझाप करता येईल असे हिला समुद्राच्या बाजूला दार असते. २. साठवण; वखार. ३. धक्का.[हिं.]

**गोदई** स्त्री. गर्भाधानसमयी मुलीला माहेराकडून पलंग, बिछाना, विड्याचे तबक इ. मिळणारे सामान; गर्भाधानाचे साहित्य. (व.)

**गोदई** स्त्री. गोधडी; वाकळ; कापडाचे तुकडे एकत्र करून शिवलेले पांघरूण: 'गाईवरी गोदया लादील्या ग लमानानं।' - जामामा ३०२.

**गोदड** वि. खरबरीत (पित्तातिशयामुळे होणारी); राठ; पुळ्या आलेली (कातडी).

**गोद(ध)ड,** पु. गोसाव्यांच्या १८ पंथांपैकी एक पंथ. हे लोक गोधडी पांघरतात. पहा : **अखाडा**

**गोदडशाई** वि. १. गोदडपंथी. २. ठिगळांचा; तुकड्यांचा; गोधडीसारखा (कपडा). ३. अव्यवस्थित; भोंगळसूत्री (काम, कारखाना).

**गोदडी-ड्या, गोदडपंथी-बावा** वि. गोदड गोसाव्यासंबंधी-सारखा; गोदडशाई.

**गोद(ध)डी** स्त्री. १. थोडासा कापूस आत असलेली किंवा अनेक कापडाचे तुकडे एकावर एक एकत्र शिवलेली पासोडी; वाकळ; रजई. २. (ल.) फाटलेले, ठिगळ दिलेले, लावलेले वस्त्र; बोथरी. ३. गोवर, घामोळे इत्यादीने भरलेले अंग.

**गोदडी आंबा** ज्याची साल गोदडीसारखी जाड असते असा आंबा.

**गोदडी निंबू, लिंबू** चकोत्र्याप्रमाणे असणारे (जाड सालीचे) लिंबू.

**गोद (ध) डे** न. (निंदार्थी) गोधडी.

**गोदण** स्त्री. गव्हाण; गुरांपुढे वैरण टाकण्याची जागा. (बे.)

**गोदन** न. लहान गोठा. (माण.)

**गोदन** पु. १. कार्तिक शु. १. २. दिवाळीतील अंगणीचा शेणाचा ढीग (झाडी). ३. गोंदण.

**गोदरी** समाज, समुदाय.

**गोदरी** स्त्री. १. मोकळी, पडीत जागा : 'बिदी गोदरीया झाडिती' - लीचपू ३. २. मोकळ्या जागेवर भरलेला बाजार : 'गोदरी भरली

देखिली' - लीचपू ३०२.

**गोदवेल** स्त्री. भाताची एक जात.

**गोदंती हरताळ** एक पिवळे विषारी द्रव्य. याचे भस्मही करतात. हे वैद्यकांत उपयुक्त असते : 'गोदंती हरताळाविशी एक दोन रोज शोध केला.' - ऐलेसं ५१५४.

**गोदा** पु. १. खिळा इत्यादीने तापवून दिलेला वाटोळा डाग. २. गादी, लेप यांच्यातून आरपार नेलेल्या दोऱ्याच्या गाठींचा (टाक्यांचा) वरचा भाग, डोके.

**गोदा** पु. काठीने ढोसणे; फटका : 'बैल अगदीच संथ चाललेले पाहून दशानं पराणी काढली नि एकेकाला एकेक गोदा दिला.' - लादि २७.

**गोदा** पु. घरटे. [ते. गोदे]

**गोदान, गोप्रदान** न. ब्राह्मणाला गाईचे दिलेले दान : 'प्राचीन काळीं गाय दान मिळणें सोपें होते, पावली मिळणें कठीण, पण हल्लीं चार आण्यांत गोप्रदान.' - गांगा १४४.

**गोदान** न. सोळा संस्कारांपैकी व समावर्तनाच्या वेळीचा संस्कार. [सं.]

**गोदाम** पहा : **गुदाम**

**गो (गौ) दिव्य** न. गाईचे शेपूट हातात धरून साक्ष देण्याचा एक जुना शपथेचा प्रकार.

**गोदी** स्त्री. (कुस्ती) एक डाव. समोरून अगर मागून प्रतिस्पर्ध्याचा पाय व त्याच बाजूचा हात आपल्या हाताच्या पकडीत घट्ट धरणे.

**गोदी** पहा : **गोद**

**गोद्री, गोदरी** स्त्री. गुखडी; गावाजवळची शौचाची जागा; उकिरडा. (व.)

**गोद्री** स्त्री. १. दोरीचा पाळणा. २. कूस. [फा.]

**गोद्री, गोदरी** स्त्री. गुजरी; मंडई; बाजार. (व.)

**गोध-धू** पु. दोरीने हात सोलटू नये म्हणून धनुर्धाऱ्याने घालायचा हातमोजा.

**गोधड-डी** स्त्री. शेंगा येणारी, दुभत्या जनावरांना उपयुक्त अशी एक वनस्पती. (वाई).

**गोधडी, गोधडी आंबा, गोधडे** पहा : **गोदड**

**गोधडी** स्त्री. दुलई; वाकळ; कंथा; रजई. [हिं. गुद्री]

**गोधन** न. गुरेढोरे किंवा त्यांच्या रूपाने संपत्ती : 'धन्य तीं गोधनें कांबळी काष्ठीका।' - तुगा २०८.

**गोधवड** स्त्री. गुरे बांधण्याकरिता गाताडी वगैरे तयार करून केलेली जागा.

**गोधंता** पु. पळसाच्या फुलांचा रंग. (व.)

**गोधा** स्त्री. घोरपड. [सं.]

**गोधा** पु. धक्का; फटका : 'शेणवलीला जावांचे गोधे खात बसली असती.' - रथ २१५.

**गोधांगुली-ळी, गोधा** स्त्री. धनुर्धाऱ्याचे अंगुस्तान. हे घोरपडीच्या चामड्याचे असून धनुष्याच्या दोरीपासून इजा होऊ नये म्हणून डाव्या हाताला गुंडाळलेले असते : 'जरासंध पाहे हस्त विलोकून। तों देखे गोधांगुलीचिन्ह।' - ह ३३.७५. [सं.]

**गोधुलुक** स्त्री. सांज; संध्याकाळ : 'मग वैराग्याची गोधुलुक।' - राज्ञा १८.१०१९.

**गोधूम** पु.गहू. [सं.]

**गोधूमपाठ** पु. सायंकाळचा पाठ; प्रार्थना.

**गोधूल, गोधूल मुहूर्त** स्त्री. १. सायंकाळचा (गुरे रानातून परत घरी येत असताना त्यांच्या चालण्याने उडालेली धूळ दिसते तेव्हाचा) काळ. २. सूर्यास्तापूर्वीची व नंतरची तीस पळे यामधील काळ. हा लग्नास शुभ मानतात. गोरज मुहूर्त.

**गोधूल-ळ लग्न** १. गोरज मुहूर्तावर लागलेले लग्न. पहा : **गोधूल.** २. सूर्यास्तसमयी उदय पावणारी राशी, लग्न.

**गोधूलिक** वि. गोधूलसंबंधी (कार्य, लग्न-मुहूर्त).

**गोधूळ-ळी** पहा : **गोधूल**

**गोनचवळी** स्त्री. लांब शेंगा येणारी चवळी; ढांग चवळी. (व.)

**गोना** पु. गोणपाट; तरट. (चांदा) पहा : **गोण, गोणा**

**गोन्री** स्त्री. 'बारिक भोकरें, नरवळी'. - (तंजा.)

**गोन्या** पु. खत भरण्याचे गोणपाटाचे झोळ्यासारखे शिवलेले साधन. (अहि)

**गोप** पु. एक प्रकारचे गवत; नागरमोथा.

**गोप** पु. गुराखी, गवळी जात, त्या जातीतील व्यक्ती : 'पूजिति सांग नगा ती रीति। सुखाचीच गोप सांगन गाती।' - मोकृष्ण २४.७. [सं. गो + प]

**गोप (पी) चंदन** न. १. द्वारकेकडील गंधासारखी अंगाला लावायची माती; गोपमाती. या मातीच्या गंधात मुद्रा बुडवून टिळे लावतात. २. (ल.) सर्वस्वी नाश; बेचिराखी; राखरांगोळी (देशाची).

**गोपचार** पु. गायरान; गोचरण.

**गोपचिळी** स्त्री. गप्प राहणे : 'तोंडून कधी चकारशब्द नाही सगळी गोपचिळी.' - कोउ २७.

**गोपटे** न. अव. कुंपणाला पडलेली भगदाडे. (साष्टी.)

**गोपद** न. १. गाईचे पाऊल. २. गाईच्या पावलाचा मार्ग, खूण. ३. आत पाणी भरलेली गोपदाची खूण, डबके.

**गोपद्म** न. रांगोळीने काढली जाणारी गाईची पावले. गोपदचिन्ह. [सं.]

**गोपन** न. १. गुप्त राखणे; लपवणे; छपवणे. २. राखणे; ठेवणे; रक्षणे; संरक्षण. संगोपन हा शब्द रूढ आहे. [सं. गुप् = गुप्त ठेवणे]

**गोपनी** स्त्री. ठेव; ठेवणी; जपणूक; 'लुगडं घेतीयीलं दोनी पदार गोपनीचं।' - राके २४०.

**गोपनीय** वि. छपविण्यास, रक्षण्यास योग्य; गुप्त ठेवण्यास आवश्यक असलेले. हा शब्द सरकारी कागदपत्रे इ. च्या संदर्भात विशेषेकरून वापरण्यात येतो. [सं.]

**गोपनीयता** स्त्री. गुप्तता; फुटणार नाही, उघड होणार नाही असे ठेवणे.

**गोप (पु) र** न. रांगोळीचा एक प्रकार.

**गोपरू** पु. एक प्रकारची बांगडी.

**गोपवाडा** पु. गवळीवाडा : 'जो नांदवी उत्कट गोपवाडे।' - सारुह १.७८.

**गोपा** पु. १. (तान्ह्या मुलाला लडिवाळपणाने म्हणतात) तान्हे मूल (गोप = श्रीकृष्ण यावरून). २. गर्भाधानाच्या दिवशी जिचा गर्भाधान संस्कार असतो त्या स्त्रीच्या हातात मुलाप्रमाणे कुंची वगैरे घालून द्यायचा नारळ किंवा कपड्यांचा गुंडाळा. ३. लग्नात नवरानवरीच्या अंगावर किंवा

इतर प्रसंगी पाहुण्यांच्या अथवा जमलेल्या मंडळींच्या अंगावर मुलाचे मूत म्हणून ज्यातील रंग शिपडतात तो वस्त्राचा गोळा, बदका. (क्रि. मुतवणे.) ४. मुलाचे नाव ठेवताना पाळण्याच्या खालून व वरून बायका कुंची घातलेला वरवंटा अथवा नारळ एकमेकींच्या हातात देतात तो. ५. ज्याला स्वत:ला खेळता येत नाही किंवा हालचाल करता येत नाही, असे मूल; लोळागोळा.

**गोपानशी-सी** स्त्री. सज्जाच्या खांबाखाली येणारा तुळईचा शेवट; छपराचा वासा; छप्पर : 'गोपानशीला अगणीत मोतीं।' - सारुह ५.२०.[सं.]

**गोपायिता** वि. रक्षक; रक्षण करणारा. [सं.]

**गोपाल-ळ** पु. १. गुराखी; गुरे पाळणारा. २. राजा. ३. भगवान श्रीकृष्ण. ४. एक जात व त्या जातीतील व्यक्ती; डोंबारी. हे मनगटाने दगड फोडतात, मोठाली वजने उचलतात व कसरतीचे खेळ खेळतात. हे लोक गावकऱ्यांची गुरे राखोळीला घेतात.

**गोपालवृत्ति-त्ती** स्त्री. पशुपालनाचा धंदा. [सं.]

**गोपाष्टमी** स्त्री. कार्तिक शुद्ध अष्टमी. श्रीकृष्णाचा गाई चारण्यास नेण्याचा पहिला दिवस म्हणून या दिवशी त्यांची व गाईची पूजा करतात.[सं.]

**गोपाळ** पु. खाडीतून येणारे मासे पकडून त्यावर उपजीविका करणारा : 'भरतीच्या वेळी गोपाळ मासे मारण्यासाठी बुड्या घेऊ लागले.' - इंधन ११.

**गोपाळ** पु. महारांच्यामधील साधू.

**गोपाळकाला** पु. गोकुळाष्टमीच्या उत्सवाच्या व श्रीकृष्णाच्या इतर उत्सवाच्या शेवटी करायचे खेळ, द्यायचा प्रसाद, जेवण वगैरे; गोकुळाष्टमीच्या पारण्याच्या दिवशी दहीहंडी फोडून तिच्यातील वाटण्यात येणारा प्रसाद.

**गोपाळी** क्रिवि. गोरजकाळी; गोधूललग्नी.

**गोपिका, गोपी** स्त्री. गोपालस्त्री; गवळण : 'तुझे कथिति गोपिका विविध तीस बोभाट ते।' - केका ८६. [सं.]

**गोपित** वि. (प्र.) गुपित. १. गुप्त; झाकलेले. २. राखलेले; संरक्षण केलेले.

**गोपिपी** पु. एक लहान काळा पक्षी.

**गोपी** स्त्री. एक पक्षी : 'नाचण, बाणघोषा... गोपी यांच्या करमणुकीच्या कार्यक्रमात आवणी आटोपली.' - आआशे ३६५.

**गोपुच्छ** पु. बाणाचा एक प्रकार. [सं.]

**गोपुच्छयति-ती** स्त्री. (संगीत) गायनारंभी विलंबित, मध्ये मध्य व अंती द्रुत अशी लयीची गती असणे. [सं.]

**गोपुर** न. १. गावच्या वेशीवरील, देवळाच्या प्राकारावरील, राजवाड्याच्या महाद्वारावरील मजलेदार, नक्षीदार किंवा मूर्ती वगैरे काढलेली इमारत. ही द्राविडी शिल्पपद्धती दक्षिण हिंदुस्थानात रूढ आहे : 'एक चढले माडिया गोपुरीं।' - एरुस्व ६.१७. २. अशा तऱ्हेची वर इमारत असलेले महाद्वार, वेस इ. ३. (सामा.) महाद्वार; वेस; ४. स्त्रिया चैत्रात भिंतीवर काढतात ती चित्रे. ५. गोपुराकार विशिष्ट रचना. (कर.) [सं.]

**गोपुर** न. नागरमोथा गवत.

**गोप्ता** वि. पु. रक्षक : 'या दोहींचा अभिमानी गोप्ता' - विसिं ४६६.

**गोप्य** वि. १. गोपनीय; लपविण्यास, छपविण्यास योग्य, अवश्य किंवा शक्य अशा बाबी. २. गुप्त : 'तुका म्हणे माझ्या वडिलांचें ठेवणें। गोप्य नारायणें न करावें।' - तुगा १२९८. [सं.]

**गोप्य** न. एक प्रकारचे गहाण (तांब्याची भांडी इ. सांसारिक वस्तू).

**गोप्रदान** न. १. पहा : **गोदान**. २. (थट्टेने) शिव्या.

**गोप्रसव** पु. वाईट नक्षत्रावर जन्मलेले मूल गाईच्या तोंडापुढे धरतात. असे केल्याने ते गाईचे मूल होऊन अशुभापासून मुक्त होते. अशा मुलाला गोप्रसव म्हणतात.

**गोप्रसवशांती-ति** स्त्री. कुयोगी जन्मलेले मूल गाईच्या मुखातून जन्मले अशी भावना धरून कुयोगदोषनार्थ करायची शांती. [सं.]

**गोफ** पु. १. गळ्यात घालायचा किंवा कंबरेला बांधायचा एक दागिना (सोने, चांदी, वळीव रेशीम यांचा). २. विणलेला चाबूक, दोरी, बंद; चांगला वळीव जाड दोरा. ३. कंबरेचा करगोटा. ४. एक खेळ; निरनिराळे दोरीचे पदर घेऊन अनेकजण टिपऱ्या खेळत, त्यांचा विणतात तो गोफ. पौराणिक नाटकातून कृष्णलीलेत असे गोफ गोप-गोपी रंगभूमीवर विणत असत : 'गोपालकृष्णा आतां आपण गोफ खेळूं.' - रासक्रीडा २१. [सं. गुंफ]

**गोफण-णे, गोफीण** स्त्री. न. दगड मारण्यासाठी दोरीचे, चामड्याचे, रबराचे विशिष्ट प्रकारच्या आकृतीचे असलेले साधन; दगड भिरकाविण्याचे साधन; एक हत्यार : 'हातीं घेवोनि गोफणा।' - कथा ६.१९.५३. [सं. गुंफनम]

**गोफण** स्त्री. (मल्लखांब) दोन्ही हातांची बोटे एकमेकात अडकवून लांबून मल्लखांब गोफणीसारखा धरून मारायची उडी.

**गोफणगुंडा-गोटा** पु. १. गोफणीतून मारायचा दगड. २. (ल.) हुशार, चुणचुणीत माणूस.

**गोफणणे** उक्रि. गोफणीने फेकणे, मारणे; गोफण मारणे : 'एकें चिंतामणि गोफणिला। तो येऊन अंगणांत पडिला।' - ह ४.२१.

**गोफणफळ** न. (वन.) आतील स्फोटक यंत्रणेमुळे बिया दूरवर फेकल्या जाण्याची अंतर्गत योजना असलेले फळ.

**गोफा** पु. १. घोटा (पायाचा). २. खोपा; बुचडा (वेणीचा).[सं. गुल्फ]

**गोफा (फा) टणे** सक्रि. १. गुरफटणे; धरणे; पकडणे; गुंतवणे; ओढून घेणे (भाषणात). २. पेचात घालणे; गोंधळविणे : 'अवघ्या मिळोनि गौळणी। गोफाटली नंदराणी।' - ह ७.१५९. ३. भुलविणे; चकविणे; फशी पाडणे. ४. वेठ वारणे; गडबडगुंडा करणे; कसेतरी, अपुरतेपणी करणे (तोकड्या सामग्रीने, पैशाने). (को.) ५. भागविणे; निर्वाह करणे. ६. वेष्टणे; वेढणे.

अक्रि. १. श्वास कोंडणे; दम छाटणे; गुदमरणे. २. घुटमळणे.

**गोफाटणे** सक्रि. झुगारणे. पहा : **गोफणणे**.

**गोफाटा** पु. संकट; पेच; अडचण; घोटाळा; पंचाईत (फक्त सप्तमी विभक्तीत प्रयोग). (क्रि. घालणे, सापडणे, पडणे.)

**गो(गु)फ्तगो** स्त्री. संभाषण; बोलाचाली : 'त्याउपर बहुत गोफ्त-गो जाली.' - मइसा २०.३८. [फा. गुफ्तगू]

**गोबड** न १. गुरांच्या शेणामुताचा राडा; खत. पहा : **गोबर**. २. ब्रह्मघोटाळा; खिचडी.

**गोबडणे** अक्रि. घाणीने, राडीने लिडबिडणे (भांडे, वस्तू, जागा).

**गोब (बो) र** पु. १. राख, गुरांचे शेण इ. (कु. गो.) २. खत.

**गोबर गॅस** मुख्यत: जनावरांच्या शेणामुतावर काही प्रक्रिया करून मिळणारे इंधन, ऊर्जा.

**गोबरहारी (वाणा)** पहा : **गौडारीवाणी**

**गोबरा** वि. १. मोठ्या पोटाचे; बेडौल दिसणारे; फुगीर (भांडे, मडके). २. (निंदेने) बसकट, चापट चेहऱ्याचा; फुगीर चेहऱ्याचा. ३. (व्यापक) विद्रूप; बेडौल; कुरूप (माणूस). ४. एक मोठा मासा. (गो.) पहा : **गोब्रा** [क. गुबरु]

**गोबरागणेश** पु. गुबगुबीत व वाटोळ्या अंगाचा माणूस (गणपतीसारखा).

**गोबरा गुबगुबीत** फुगीर; वर आलेला; वाटोळा : 'बसलेली गालफडे गोबरी गुबगुबीत दिसू लागायची.' - इंधन २०.

**गोबराळ** स्त्री. केळीची एक जात.

**गोबरी** वि. काथाचा प्रकार. (झाडी.)

**गोबरेला** वि. विद्रूप; कुरूप; बेडौल : 'तें कोपऱ्यातील गोबरेल्या चेहऱ्याचें - कार्टे -' - मक १९५९.

**गोबस्तान** वि. गाईसारख्या छातीचा (घोडा). (दिसण्यात खराब परंतु खोडी नाही असा). - अश्वप १.१०४.

**गोबा** पु. गोळा; मोठा घास.

**गोबा** पु. शिंदीला बांधलेले मडके. (झाडी)

**गोबाडणे** सक्रि. १. शेणाने, घाणीने माखणे (भांडे, वस्तू, जागा); सारवणे. २. एकत्र करणे; मिसळणे; गोंधळ उडविणे.

**गोबी-भी** स्त्री. कोबी (भाजी). (माळवी)

**गो (घो) बे** न. अचानक लाभ; घबाड; सापडलेला गुप्त ठेवा; नशिबाची रेषा उमटणे; डबोले. (क्रि. येणे, सापडणे, मिळणे, हातास लागणे).

**गोब्रा** पु. राखी रंगाचा मासा. हे मासे दिवाळीच्या सुमाराला पकडतात. (को.) पहा : **गोबरा**

**गोब्राह्मण** पु. १. गाय आणि ब्राह्मण. २. (ल.) अगदी साधाभोळा, गरीब ब्राह्मण.

**गोभ** न. शिंदी धरण्यासाठी शिंदीच्या झाडाला टांगलेले मडके. (व.)

**गोभी** स्त्री. एक औषधी वनस्पती; पाथरी. [हिं.]

**गोम** स्त्री. १. पुष्कळ पायांचा एक किडा; गोंब; घोण : 'गोमीस पाय बहुत, एक पाय मोडला तरी उणें पडत नाहीं.' - भाब ८२. २. घोड्याच्या बहात्तर खोडींपैकी एक; शेपटीकडे रोख असलेल्या परतलेल्या केसांची रेष, भोवरा. हे अशुभ चिन्ह मानतात. ३. सरळ केसांची गोमाकार रेषा; डोक्याकडे रोख असलेली गोम. ही शुभ मानतात, पण डोक्यावर असेल तर अशुभ. (ल.) दोष; ऐब; व्यंग; खोड; गुणामध्ये एखादी उणीव. ४. किनारीतील गोमेसारखी नक्षी. ५. (ल.) खुबी; मर्म; सार; गुह्य. [का. गोमु = अश्वदोष]

**गोम** पु. गोंद. (गो.) [पोर्तु.]

**गोमकार** पु. घुमाघुम असा आवाज : 'सकाळच्या पारी रविबाईची गोमकार।' - लोले ४६.

**गोमगाटा** पु. गोंधळ; आरडाओरडा : 'येवढ्या गोमगाट्यात त्यो कशाला बाहिर ईल ?' - जाण २९६.

**गोमगाला** पु. दंगा; मस्ती; गडबड; गोंगाट; गलबला. (कर.) [ध्व.]

**गोमचिवळ** पु. न. दोन फाट्यांच्या शेपटीची काळसर चिमणी.

**गोमजी** पहा : **गोमा, गोमाजी**

**गोमटा** पु. विणकामासाठी ओव्या, वह्या तयार करण्यासाठी केलेला पाच पेडी दोरा. पहा : **ओवी**

**गोमटा** वि. १. गोड; सुंदर; चांगले; मनोहर : 'कां जें या जगीं तुजपरतें। गोमटेचि नाहीं।' - रास १.९६५. २. सुरूप; सुंदर (वर्ण, रंग); गोऱ्या वर्णाचा.

**गोमटी** स्त्री. एक प्रकारची काचेची बांगडी.

**गोमटी** स्त्री. मान. (गो.)

**गोमटे** न. १. चांगलेपण; सुरेखपण : 'गोमटें काय शब्दाचें। एकेक वाणूं।' - अमृ ६.११. २. चांगली गोष्ट; सत्कृत्य : 'दुःखरूपता पापमूलता अनित्यता ए तिन्हीं नव्हेति तरि संसारावाचौनि आणिक कांहीं गोमटे असे।' - चसू ३७. (वा.) ० **करणे** - गौरव करणे; परामर्श घेणे; लाड पुरविणे : 'तुम्ही संताजी घोरपडे कैलासवासी याजपासी पूर्वी येकनिष्ठपणे सेवा केली त्याणी लेकपणे तुमचे सर्वस्वें गोमटे करून चालविले.' - पेद ३१.८५.

**गोमपठाडी** स्त्री. १. मोठी गोम. २. (ल.) मोठा दोष; मुख्य मर्म, खुबी.

**गोमय** न. गाईचे शेण. [सं.]

**गो-मसूरिका** स्त्री. गायीच्या सडांना येणाऱ्या देवी. [सं.]

**गोमा** पु. १. इच्छित वस्तूविषयी उदासीनपणाचे किंवा नावडतेपणाचे ढोंग दाखवणे; ज्याविषयी उत्तम माहिती आहे त्याबद्दल अज्ञान असल्याचा बहाणा. (क्रि. करणे, लावणे.) २. मोठेपणाचा डौल; आव. ३. ढोंग; बतावणी.

**गोमागणेश** पु. आढ्यतेखोर माणूस.

**गोमा गणेश पितळी दरवाजा** (मोगली अमलातील एका चतुर भिक्षेकऱ्याच्या गोष्टीवरून. हा पितळी दरवाजा नावाच्या वेशीवर बसून मालावर बेपरवाना जकात घेई) आढ्यतेखोर; अधिकार नसताना बडेजाव सांगणारा.

**गोमागणेशी** वि. बेकायदा; अनधिकृत : 'ते शिरजोर होईपर्यंत राजांनी त्यांच्याकडे कानाडोळा केल्याने तेही कालावधीने गोमागणेशी इनामदार झाले.' - गांगा २७.

**गोमाजी, गोमाजी कापशा** पु. १. उद्धटपणे पृच्छा करणाऱ्याला उत्तरादाखल योजलेले काहीतरी नाव. २. कोणीतरी, अलबत्यागलबत्या, अगदी अप्रसिद्ध, क्षुद्र माणूस; ३. लुडबुड्या; लांडा कारभार करणारा. ४. (सरकारी हिशेब) एखाद्या अब्रूदार पण शेतसारा न भरलेल्या माणसाबद्दल हे टोपणनाव घालतात. या माणसाच्या साऱ्याबद्दल पाटील जबाबदार असतो. ५. पूर्वी एक प्रसिद्ध पुरुष होऊन गेला त्यावरून.

उदा. तुम्ही कोण मोठे गोमाजी कापशे लागून गेला? = तुम्ही कोण मोठे बाजीराव?

**गोमाजी ना तिमाजी** कोणीतरी फालतू; ज्याचे नाव सांगायची गरज नाही असा कोणीतरी.

**गोमाजी सोमाजी** अलबतेगलबते; साळकोजीम्हाळकोजी; वाटेल ते लोक (तिरस्कारार्थी).

**गोमाशी-सी** स्त्री. घोडे, गाई वगैरेंच्या अंगावरील एक मोठी माशी; माशीची एक जात.

**गोमांस** न. गाईचे मांस. शपथेसारखा किंवा निषेध दाखवताना याचा उपयोग करतात. कारण हिंदूंना गोमांस अगदी निषिद्ध आहे. (वा.) ० **खाणे**- अत्यंत निषिद्ध निंद्य-गोष्ट करणे. **गोमांसाप्रमाणे असणे** - अतिशय त्याज्य, निषिद्ध असणे.

**गोमिसळा** पु. एक पक्षी : 'भंवरासारिखे काळे : होति सपक्ष गोमिसळे'- मूप्र १७७३.

**गोमीकाठ** पु. गोमेसारखी वीण असलेला वस्त्राचा काठ.

**गोमीकाठी** वि. गोमीच्या विणीचे काठ असलेले (लुगडे, धोतर इ.).

**गोमीच** न. घोड्याची एक खोडी, व्यंग. घोड्याच्या कपाळावरील एक अशुभ चिन्ह. दोन भोवरे जोडणारी केसांची रेषा, चिमटा, पहा : **चिमूट**

**गोमुख** न. १. तीर्थ वगैरे पवित्र पाणी खाली पडण्यासाठी बांधलेले किंवा बनवलेले दगडी किंवा धातूचे गाईचे तोंड. २. एक प्रकारचे गाईच्या तोंडासारखे फुंकून वाजविण्याचे वाद्य : 'तों वाद्यें शंखभेर्यादी पणवानक गोमुखें।' - वामन गीतासमश्लोकी १.१३. [सं.]

**गोमुखव्याघ्र** पु. १. दिसण्यात गाईसारखा सौम्य पण अतिशय क्रूर असा वाघ. २. गाईचे कातडे पांघरलेला लांडगा. ३. (ल.) वरून गरीब पण आतून लुच्चा माणूस. [सं.]

**गोमुखासन उडी** (मल्लखांब) पाठीवर गोमुखाप्रमाणे मारायची उडी.

**गोमुखी** वि. गरीब; गाईसारखा शांत. [सं. गोमुख]

**गोमुखी** वि. पुढे अरुंद व मागे रुंद होत जाणारी (आकृती) : 'आमचा वाडा पुढे अरुंद व मागे रुंद होत गेलेला होता. म्हणजे गोमुखी होता.' - शंशि ९७.

**गोमुखी** स्त्री. गाईच्या तोंडासारखी काटकोनी जपमाळेची पिशवी. हिच्या आत हात घालून जपाची माळ ओढतात : 'काय मौन धरुनिया गोमुखिला जाळिसी।' - राला ८७.

पु. एक प्रकारच्या नवसात नियम केल्यामुळे हात न लावता तोंडाने अन्न उचलून जेवणारा माणूस. (को.) [सं.]

**गोमूत्र, गोमतेल** न. गाईचे मूत. हे पवित्र मानतात व ते अपवित्र वस्तूंवर शिंपडून त्या पवित्र करतात. [सं.]

**गोमूत्रवायु-यू** पु. एक नत्रयुक्त वायू. [सं.]

**गोमूत्रिका** स्त्री. दोन्ही चरण सारखे असलेला श्लोक. [सं.]

**गोमूत्रिकान्यायगुणाकार** पु. (ज्यो.) गुणाकाराचा एक प्रकार.

**गोमूत्रिकाबंध** पु. काव्याचा एक प्रकार. याच्या द्वितीय चरणात पहिल्या चरणातील बहुतेक अक्षरे येतात.

**गोमेटी-ठी** स्त्री. एक वेल. या वेलीचे फळ तोंडल्यासारखे पण दोडक्या-प्रमाणे कर्वेदार आणि पिकल्यावर मधासारखे गोड असते. (को. गो.)

**गोमेद** पु. न. १. एक रत्न; वैडूर्य. याचा रंग गोमूत्रासारखा असतो. हे रत्न राहूला प्रिय आहे. २. शिवधातू; शिलेमणी. हा चुनखडीचा पोटभेद आहे. हा फार कठीण असल्याने या धातूचे रसायनशाळेतील खलबत्ते, छत्रीच्या मुठी, सुऱ्या इ. वस्तू करतात. यावर रंग देता येतो. [सं.]

**गोमेध** पु. ज्यात गाईची विधिपूर्वक हत्या करण्यात येते असा यज्ञ. [सं.]

**गोयडी** पहा : **गोधडी** (गो.)

**गोयडॉ** पु. दांडू (गो.).

**गोयप** पु. लाकूड कातण्याचे हत्यार. (कु.)

**गोयला** पु. सरपणाची मोळी, आखूड भारा (दोन हात लांबीचा). (को.)

**गोया** उभ.अ. म्हणजे; जणू काय : 'जे ये समयीं आपलें येणें गोया करामत जाली.' - मइसा १.१८८. [फा.]

**गोया** स्त्री. अव. मैत्रिणी.

**गोयाबा** पु. मंद, आळशी; मूर्ख, अडाणी माणूस; गरीब, बावळा माणूस.

**गोयेटी** स्त्री. एक औषधी वनस्पती : 'गोयेटीचे मूळ सहा मासे उगाळून...' - फचि ७४.

**गोयॉ** स्त्री. गुराख्यांचा लांब स्वर, हेल, हरळी. (गो.)

**गोर** पु. गौरव; मान :'अवधिया दिला गोर। मजकरे पाहीना।'- तुगा १.२२६.

**गोर** स्त्री. गळा; मान : 'राहिना घरीं कधीं गोर गोंविली मज गाईचीं।' - पला ८० ब.

**गोर** पहा : **गोवर** (रोग)

**गोर** पु. गुजरातील ब्राह्मणेतरांचा उपाध्याय. [सं. गुरु]

**गोर** पु. प्रेत पुरण्यासाठी केलेला खड्डा. (अहि.)

**गोर कप(फ)ण** (प्र.) गोर कफन; मूठमाती; उत्तरक्रिया; प्रेतसंस्कार : 'गोर - कपणेची साहित्यें करून त्याचीं सार्थकें केलीं.' - भाब १०७.

**गोरख** पु. १. गुराखी; गुरे राखणारा. २. गोरखनाथ; गोरख (कानफाटे) संप्रदायाचा आदिपुरुष. [सं. गोरक्ष]

**गोरखगांजा** पु. तागाच्या किंवा भांगेच्या बुटाप्रमाणे बुटे येणारी औषधी वनस्पती.

**गोरखचाळा, गोरखसाखळी** पु. स्त्री. १. भोवती कड्या असलेला लोखंडी गज. हा गज गोसाव्यांच्या हातात असतो. २. (ल.) संबंधांची गुंतागुंत; परस्परावलंबन (अनेक आंतरविवाहांनी कुटुंबीयात, परस्पर जामीनकीने गावकऱ्यात; कुंपणात, काटेरी झुडपात).

**गोरखचिंच** स्त्री. १. एक प्रकारच्या चिंचेचे झाड व फळ. फळातील गीर पित्तशामक, रुचकर व पथ्यकारक असतो. २. गोरक्षी नावाचे झुडूप.

**गोरखी** पु. गुराखी; गुरे (गाई) पाळणारा : 'कवळाचिया सुखें। परब्रह्म झालें गोरखें।' - तुगा १८१.

**गोरखी** स्त्री. मंडप; मांडव : 'हजरतीनी किल्लाचे दरवाजियानजिक मोठी गोरखी दहा हजार खासा बसावयाची उभी केली.' - शिप्रब ५०.

**गोरगरीब** पु. अव. गरीब व दरिद्री माणसे; गरीब लोक; अनाथ; गरजू;

भणंगभिकारी: तळागाळातील समाज.

**गोरज** पु. गाईची धूळ : 'गोरजें डवरला मुखचंद्र।' - ह १८.६२. पहा : **गोधूल**

**गोरजमुहूर्त** पहा : **गोधूलमुहूर्त**

**गोरजी** पु. जैनांचा ग्रामगुरू. (को.) [सं. गुरु]

**गोरटा** वि. गोरा; गोऱ्या रंगाचा (माणूस); गोरा (रंग); सुंदर; सुरेख.

**गोरटी** स्त्री. १. सुंदर, गोरी स्त्री. २. स्त्री; बाई : 'तों मथुरेच्या गोरटी। ज्यांची केवळ प्रपंचदृष्टी।' - ह २१.२२.

**गोरटेला** वि. साधारण गोरा. [सं. गौर]

**गोरण** स्त्री. गव्हाणी; गुरांना चारा घालण्याची जागा.

**गोरब-बे** न. कंबरेखाली न मुरडलेले, सरळ राहणारे इरले (खोळीच्या आकाराचे). (कु. बे.) [क. गोरबु]

**गोरबंद** पु. घोडा, उंट यांच्या खोगिराचा पुढील बंद.

**गोरव** न. गौरव; मोठेपणा : 'जें निगर्वाचें गोरव। निर्गुणाची जाणिव।' - राज्ञा ८.१९२.

**गोरवीकटगी** स्त्री. (गोरवीची काठी) माकडीच्या (तेलकट) झाडाची मशालीसारखी उपयोगात आणायची फांदी. प्रवासी किंवा जासूद रात्रीच्या वेळी हिचा उपयोग करीत असत. [क.]

**गोरस** पु. गाईच्या दुधापासून होणारे दही, लोणी, तूप इ. पदार्थ. [सं.]

**गोरस** पु. गुरांच्या पोटात क्वचित आढळणारा पदार्थ. (झाडी).

**गोरस (सा) ण-न** न. (चर्मकारी) कातडे मऊ होण्यासाठी व कमाविण्यासाठी चुरडलेल्या एरंड्या, दही, हळद व ताक यांचे मिश्रण. (क्रि. देणे, लावणे, चोळणे.)

**गोरसणे** गाईच्या तुपाने अंग चोळणे : 'तीए (लेकरूवे) तैसीचि गोरसिजती : ते गोरसणे एथ दाखवा' - लीचपू ३८६.

**गोरसणे** अक्रि. साफसूफ करून, खतमूत घालून पेरण्यासाठी तयार करणे (शेतजमीन); मशागत करणे.

**गोरसमया** स्त्री. दूधवाली. (घा.)

**गोरसामली** स्त्री. शेंगा येणारे, गोड गरात काळ्या बिया असणारे मोठे झाड.

**गोरक्ष, गोरक्षक** पु. १. गुराखी. २. गुरांची रक्षक देवता. ३. नाथपंथातील गोरखनाथ नावाची एक प्रसिद्ध व्यक्ती.

**गोरक्षण** न. कसायापासून गाय वाचविणे; गोपालन; गोवंशाची जोपासना.

**गोरक्षवटी** स्त्री. पारद, लोह, ताम्र ही तीन भस्मे समभाग घेऊन त्यांना रिंगणीच्या फळाच्या रसाच्या एकवीस भावना देऊन केलेली मुगाएवढी गोळी.

**गोरा** पु. १. गोरा माणूस. २. साहेब; इंग्रज; युरोपियन माणूस. वि. १. उजळ; गौर (वर्ण); गोऱ्या रंगाचा. २. (क्व.) पांढरा; शुभ्र (तांदूळ, कापड). [सं. गौर]

**गोरा, गोऱ्हा** पु. गाईचा पाडा, खोंड, धांडा, वासरू.

**गोरागोमटा, गोरा पावसा** वि. गोऱ्या रंगाचा व सुंदर रूपाचा; देखणा.

**गोराडू** पु. कोनफळ; जमिनीत उत्पन्न होणारा भाजीचा एक कंद. हा कंद भाजून, उकडून उपासाला खातात.

**गोराडू** वि. लापण (जमीन); दुंबा.

**गोराण-णी** स्त्री. दलदल किंवा खाडीचा किनारा या ठिकाणी होणारे एक झाड. याच्या सालीचा उपयोग कातडी कमावण्यासाठी होतो. या झाडाच्या अर्काचा उपयोग कपड्यांना तपकिरी रंग देण्यासाठी होतो.

**गोराभुरक** वि. गोरा व किंचित भुरका; तांबूस गोरा.

**गोरामाजा** पु. पांढरे मायफळ; मायफळाची एक जात.

**गोरामोरा** वि. चेहरा उतरलेला; चर्या पालटलेला; प्रेताप्रमाणे किंवा कागदाप्रमाणे पांढरा फटफटीत (भय इ. नी). [क. मोरे = तोंड.]

**गोराळ** न. तेल ठेवण्याची दगडी. (चांदा)

**गोरांजन** न. १. पहा : **गोरोचन**. २. ईश्वरप्राप्तीसाठी स्वत:ला अग्नीत जाळून घेणे; अग्निकाष्ठे भक्षण करणे : 'करोत तपादिसाधनें। कोणी साधोत गोरांजनें।' - तुगा २६२१.

**गोरिला** पु. एका जातीचा वानर.

**गोरी** स्त्री. खड्डा : 'एका गोरीत बसतील तितकी मढी गाडली जाऊ लागली.' - फकिरा १२०.

**गोरी** स्त्री. गोवरी; राबाकरिता शेणाचे वाळवलेले डिखळे.

**गोरी** स्त्री. पाडी. (झाडी)

**गोरी** स्त्री. प्रेत; चिता : 'तुम्ही साहेबकामावर खर्च जाला तर देशमुखीचा सिका तुमचे गोरीवर ठेवू हा निशा समजोन तुम्ही खुशाल जाणे.' - शिचसाखं ५.१७.

**गोरी** पु. १. फासेपारधी : 'की गोरियाचें गायन।' - रावि २.२२. २. (ल.) फासेपारध्याचे गाणे : 'कां गोरीचिया भुली। मृग व्याधा दृष्टी न घाली।' - ज्ञा १३.७४०. पहा : **गौरी** [सं. गृ.]

**गोरु-रे** न. ढोर, गुरू : 'गोरू खडबडी बाहिरी।' - भाए ३९४. (राजा. गो.) [सं. गोरूपम]

**गोरूव** न. गोवत्स.

**गोरोचन-ना** न. स्त्री. गोवर्धन. हे द्रव्य पिवळे असून गोमूत्रापासून किंवा कुपित्याच्या रूपाने गाईच्या ओकण्यापासून तयार होते, किंवा गाईच्या डोक्यात उत्पन्न होते. याचा रंग पिवळा असतो. हे रंगकाम, चित्रे, औषधे यात उपयोगी आहे : 'गोरोचनापरिस गौर असे गणावे।' - र ६. वाजीकरण किंवा स्त्रियांना मोहविण्यासाठी गोरोचनाचा उपयोग होतो अशी लोकसमजूत आहे. [सं.]

**गोरोब-प** पु. गर्भ; मगज; नार. (गो.) [सं. गर्भ]

**गोर्वट** वि. कमी वयाचा (बैल).

**गोऱ्हवाडी** स्त्री. गुरांचा गोठा, गुरवाडी.

**गोऱ्हा** पु. चार वर्षे वयाचे गाईचे वासरू; खोंड. (गो.) [सं. गो.]

**गोल** पु. १. गोलक; वर्तुळाकार, वाटोळी, वर्तुळस्तंभाकार, वरवंट्यासारखी वस्तु; गोळा. २. मंडळ; वर्तुळ; परिघिवृत्ताकार आयत. ३. कृत्रिम गोल; वर्तुल. पहा : **खगोल, भूगोल, दृग्गोल**. ४. गोलदार दांडा, वासा; चरकावर केलेला गोलदार दांडा. ५. वर्तुलत्व; लंबवर्तुलत्व. ६. (चेंडू दांडू खेळ) लाकडी चेंडू. ७. सैन्याची एक रचना : 'चौफेर बांधुनी गोल।' - संग्राम ६०. ८. राशिचक्रमंडलाचा एक भाग किंवा

अर्ध. ९. (विणकाम) वशारन्याच्या सांधीच्या कैचीत घालण्यासाठी उपयोगी अशी सागवानी अडीच ते तीन हात लांबीची वाटोळी काठी. १०. गोळा, तोफेचा गोळा. ११. लगदा; लद्दा; खराडी. [सं.] (वा.) ० **बांधणे** - सैन्याची वर्तुलाकार मांडणी करणे : 'भाऊसाहेबांचा व सर्वांचा विचार की दिल्लीच्या रोखे गोल बांधून जावे.' - भाब १२६.

**गोल** पु. फुटबॉलच्या किंवा हॉकीच्या खेळात प्रतिस्पर्धी संघावर मात (गोल) करण्यासाठी हद्दीवरील दोन खांबामधील ज्या रेषेतून चेंडू घालवावा लागतो ती रेषा; डाव. (क्रि. करणे.) [इं.]

**गोल** पु. नक्षीदार काठ, पदर (पागोट्याचा).

**गोल** पु. घोळ; थवा; जमाव; कळप; झुंड.

**गोल** पु. लोंढा; झोल; डोंब (आगीचा).

**गोल** पु. फुलांचा गुच्छ, झुबका, गोटा. पहा : **तुरा**

**गोल** पु. नदीतील एक मासा.

**गोल** स्त्री. लाकडाची नाल. (झाडी)

**गोल** पु. गोफ, करगोटा यांच्या पदराची एक तार (सोने, चांदी यांची).

**गोल (ळ) क** पु. ब्राह्मण विधवांच्या संततीचा वंश, जात; जारजवर्ग. कुंडगोलक व रंडगोलक असे गोलकात दोन भेद आहेत. कुंडगोलक म्हणजे नवरा असलेल्या (मुख्यत्वे ब्राह्मण) स्त्रीची अनौरस संतती व रंडगोलक म्हणजे (ब्राह्मण) विधवेची अनौरस संतती. [सं.]

**गोलक** न. पैसे ठेवण्याची व ते आत टाकण्यासाठी वर भोक असलेली बंद पेटी.

**गोलक** पु. १. गोलाकार घन आकृती. विशेषत: पृथ्वीची प्रतिकृती असलेल्या गोळ्याला हा शब्द वापरतात. एखादी वाटोळी वस्तू; गोळा. २. आतून पोकळ असलेली वस्तू. हा शब्द इंद्रियाला जोडतात. उदा. कर्णगोलक = कानाची पाळी. नासागोलक = बाहेरून दिसणारे नाक; नाकाची बोंडी.

**गोलकल्प** पु. ज्या गोलाच्या समोरासमोरच्या दोन बाजू चपट्या किंवा फुगलेल्या असतात तो.

**गोलचवडशी** स्त्री. (कासार) भांडे घडवताना ठोकठोकून, कमजास्त जाड असेल तेथे सारखे करण्याचा चौरस हातोडा.

**गोलची** स्त्री. १. (सुतारी) खांब वगैरे चौरस लाकडांच्या कोपऱ्याला गोलाकार देण्याचे हत्यार. याला गोलची रोखणही म्हणतात. (क्रि. मारणे.) २. (चर्म.) रेषा मारण्याचे हत्यार.

**गोलजी पिंड** पु. वनस्पती पेशींच्या द्रव्याचा एक घटक.

**गोलटा** पु. (इमारत) जाड, गोल पण आखूड वासा; जाड बुडख्याचा वासा.

**गोलटी गाए** स्त्री. गोगलगाय.

**गोलथा** पु. पोलादाचा एक प्रकार.

**गोलदहा-दाड-दाडा-दोडा** पु. एक मोठा सरळसोट वृक्ष. याचे फळ भाजून खातात. हे औषधी आहे.

**गोलदंड** पु. दंडाचा एक प्रकार. यात साधा जोर काढून हात न उचलता वर्तुळाकार फिरायचे असते.

**गोलदानी** स्त्री. बंदूकवाल्याच्या कंबरेला बांधलेले गोळ्या ठेवण्याचे शिंग.

**गोलदार** कांडपी; धान्य सडणारा.

**गोलदार** वि. १. वर्तुळाकार; वाटोळे. २. आकडेदार (मिशा). ३. मांसल; भरदार (हात, मांडी). ४. नक्षीदार पदराचे; जरीपदरी, लप्फेदार. (पागोटे).

**गोलपरिघ** पु. महावृत्ताचा घेर, मर्यादारेषा.

**गोलबाह्य** वि. (शाप.) गोलाच्या पृष्ठभागाप्रमाणे बाहेरील बाजूने गोल; बहिर्वक्र.

**गोलमापकयंत्र** न. (शाप.) कोणत्याही गोलाची किंवा त्याच्या तुकड्याची त्रिज्या आणि एखाद्या पदार्थाची जाडी काढण्याचे यंत्र.

**गोलमाल** पु. गलबला; गडबड; गोंगाट; गोंधळ; घोटाळा; आरडाओरड. वि. १. गुळगुळीत; मोघम. २. अव्यवस्थित. [हिं.]

**गोलमिंद** न. मासे पकडण्याचे जाळे. (को.)

**गोलमेज परिषद** एखाद्या गंभीर प्रश्नाची चर्चा करण्यासाठी, वाटाघाटीसाठी, सर्व संबंधित पक्षाच्या प्रतिनिधींची सर्वांना सारखेच महत्त्व आहे हे दर्शविण्यासाठी साधारणपणे गोल मेजाभोवती भरणारी सभा : 'लंडनमधील गोलमेज परिषदेने रेखाटलेले भावी स्वराज्याचे चित्र...' - गालेसं ७.

**गोलरक्षक** पु. फुटबॉल, हॉकी इ. खेळात प्रतिपक्षाने चेंडू आपल्या गोलाच्या पार करू नये यासाठी ठेवलेला खेळाडू. गोल राखणारा.

**गोलसर** स्त्री. बकुळीचे झाड. (ना.)

**गोलसर-वट** वि. थोडे गोलाकार; साधारण गोल.

**गोलंकारी** वि. मोघम; गुळगुळीत : 'असे गोलंकारी बोलणे होई.' - खर्डे १०६.

**गोलंदाज** पु. १. तोफ डागणारा; तोफची; गोळा फेकणारा. २. क्रिकेटमध्ये फलंदाजाला बाद करण्यासाठी यष्टीच्या रोखाने चेंडू फेकणारा. [फा.]

**गोलंदाजी** स्त्री. १. तोफ डागण्याचे काम; तोफांची सरबत्ती. २. क्रिकेटमध्ये फलंदाजाला बाद करण्यासाठी यष्टीच्या रोखाने करण्यात येणारी चेंडू फेकण्याची क्रिया.

**गोला** पहा : **गोल्या**

**गोला** पु. बांबूची ताटी.

**गोला** पहा : **गोळा**

**गोला** पु. चंपा, रास्ता व त्यांच्यामध्ये असलेले मुख्य सैन्य या सर्वांना मिळून असलेली संज्ञा.

**गोलाई** स्त्री. १. गोलपणा; स्थूलता; गुबगुबीतपणा : 'माझ्या शरीराला जी गोलाई आली ती आजमितीपर्यंत कायम आहे.' - माभू ७. २. परीघ. [हिं.]

**गोलाकार** वि. गोलसर; वाटोळा.

**गोलाकृति-ती** वि. जिचा आकार गोल आहे अशी (आकृती, वस्तू).

**गोलाची लंब संस्था** विषुववृत्तावरून आढळणारी स्थिती. या ठिकाणी विषुववृत्त व त्याच्याशी समांतर जी वृत्ते आहेत ती क्षितिजावर लंब होतात.

**गोलाची वक्रसंस्था** जेव्हा एक ध्रुव क्षितिजाच्या वर आहे आणि एक क्षितिजाच्या खाली आहे तेव्हा विषुववृत्त व त्याच्याशी समांतर दुसरी

वृत्ते यांचे क्षितिजाशी पडणारे वक्रकोन.

**गोलाटपा** पु. नेमणूक; वसूल; जहागीर : 'त्यास निर्वाहाबद्दल गोलाटपा बेवीस गावचा द्यावा आणि गादी पुढे फत्तेखान, याचेच वंशाकडे चालावी' - शादवे ५५.

**गोलाध्याय** पु. गोलासंबंधी विवरण करणारा गणितशास्त्राचा भाग. भास्कराचार्याच्या सिद्धान्तशिरोमणीचा हा एक भाग आहे.

**गोलाबारुद** पु. दारूगोळा.

**गोलाम** न. फूल.

**गोलाम** न. कापूर : 'कुंकुम कस्तुरी चंदन पालवी। गोलामे परतीनि नवीं। हा लेपु सिर व्यथे लाविता देवी।' - नरुस्व ५४२.

**गोलार्ध** पु. गोलाचा अर्धा भाग. उदा. पूर्व गोलार्ध, पश्चिम गोलार्ध.[सं.]

**गोलां (ळां) गुल-ळ** पु. एका जातीचे वानर; नीळ; काळ्या रंगाचे व गाईच्या शेपटीसारखी शेपटी असलेले वानर, माकड : 'पुढे चालती भार गोलांगुलांचे।' - राक १.५२.[सं. गो = गाय + लांगूल = शेपटी]

**गोलांगुल, गोळांगुळ** वि. दुबळा : 'भ्रतार मानुनि गोळांगुळ। अव्हेरिती सर्वस्वें॥' - मुआदि ९.२२.

**गोलांट-टी-ठ,** न. स्त्री. खाली डोके व वर पाय करून मारलेली उलटी उडी; कोल्हाटी. (क्रि. घेणे, मारणे.)

**गोलांतर** वि. आतून गोल; गगनाकृती; पोकळ गोलाच्या आतील भागाप्रमाणे असलेले; अंतर्वक्र.

**गोली** स्त्री. कोळपे, कुळव किंवा इतर काही आउते यांना लावलेला आकडा, लोखंडी बाकदार गळ.

**गोली, गोल्या** स्त्री. पु. १. मातीची लहान घागर; कळशी. (कु. हेट)

**गोली** पहा : **गोलरक्षक**

**गोलीय अंतर** (भूमिती) गोलावरील दोन बिंदूंमधील अंतर.

**गोले** द्रव पदार्थ मोजण्याचे चार शेरी माप. (गो.)

**गोलेवाला, गोल्या** पु. गोल्याने तांदूळ सडण्याचा व्यवसाय करणारा माणूस.

**गोल्या** पु. खालच्या टोकाला वाटोळा दगड लावलेले मुसळ; दगडी मुसळ.

**गोल्या** स्त्री. सुतारी हत्यार; रोखणीचा एक प्रकार. (कु.)

**गोल्या** पु. १. कोळप्याच्या दात्यावरील आडवी लोखंडी पट्टी; कोळप्याच्या दिंडात बसविलेला भाग. दर दिंडाला असे दोन गोले असतात. २. दोन घडीव बाजूंचा, पायखाना व जिना यांना लावण्यात येणारा अर्धगोलाकार दगड.

**गोल्हाट** पु. १. पहा : **गोलांट.** २. औट पीठावरले योगशास्त्रोक्त स्थान. छातीच्या आतील पोकळीत जो उलटा प्राण आहे, त्यातील ज्ञानवृत्तीला इंद्रियावाचून स्वतःच्या स्वरूपाचा यथार्थ बोध होत नाही. अशा त्या प्राणवायू राहण्याच्या ठिकाणाला गोल्हाट म्हणतात : 'तिसरें जें कां गोल्हाट। तेज तत्त्वाचे मूळपीठ।' - सिसं ७.२६२. पहा : **औट पीठ** : 'औटपीठें गोल्हाट म्हणती।' - बोधवैभव (जगन्नाथ) २०. [सं. गोल + हाट]

**गोल्हाटउल्हाट** स्त्री. उलट्यासुलट्या उड्या; कोलांटी.

**गोल्हार** स्त्री. कळप; लेंढार : '(बायजा) यांना रात्रंदिवस राबविते अन् त्यांची गोल्हार पोसते.' - आआशे ४०.

**गोल्ही** स्त्री. १. दोन फासांचे कोळपे. (व.) २. कोळप्याच्या दातावरली आडवी लोखंडी पट्टी : 'दुसऱ्या कोपऱ्यात नांगराचा फाळ कोळवाच्या फाशी, कोळप्याच्या गोल्ह्या...' - जोफु २३८.

**गोव-वा-वी** स्त्री. पु. १. गुंता; अटकाव; अडथळा; गुंताड. २. (ल.) संकट; घोटाळा; बंधन : 'होती मृगजळें गोवी केली।' - तुगा ७१५. ३. कायम गुंतविणे (एखाद्याला एखाद्या कामी, हुद्यावर).[सं. गोपय्]

**गोवणी** स्त्री. ओवण; गुंथन; जुळणी; जोडणी; गुंफण.

**गोवणे** उक्रि. १. गुंफणे; गुंथणे; ओवणे (मणी, फुले). २. गाठ देणे; गुंतविणे; बांधणे (केस, खुंट्याला पशू) : 'तो गोविला बाळक ऊखळ या।' - सारूह १.७५. ३. **गुंतविणे**; अडकविणे; घालणे (शाळेत मूल किंवा उमेदवारीत, विवाहात, उद्योगात माणूस). ४. अडकविणे; बांधून घेणे (रोखा, वचन यांनी) : 'वचनीं गोवून वायुकुमरा। नाथ मच्छिंद्रातें मागीतलें।' - नव १९.७६. ५. गुरफटविणे; पेचात पाडणे : 'जे थोरथोरांसी गोवी। जाणपणे॥' - दास १.३.२३. ६. भाषणात गुंतविणे, पकडणे. ७. लक्ष वेधणे; गुंतविणे; अवधानात धरून ठेवणे. [सं. गुंफ]

**गोवन** पु. गुरांचा कळप.

**गोवत्स द्वादशी** आश्विन वद्य द्वादशी. गायीच्या पूजेचा दिवस; वसुबारस.

**गोवध** पु. १. गाईची हत्या. २. वाचेची हत्या : 'आखारी तव गोवधु। पुढारा अनृतवादु।' - अमृ ७.२७८.

**गोवपा** स्त्री. गाईच्या आतड्यावरील आवरण. सामान्यतः गाय, बैल यांच्या चरबीला व हाडातील मगजालाही म्हणतात. [सं.]

**गोवर** पु. १. शेणी; न थापलेले वाळलेले शेण, वाळलेल्या शेणाचा चुरा. २. गाईने खाल्ल्यानंतर उरलेला चारा, गळाठा. ३. राब. (को.) ४. उकिरडा. (हेट.) [सं. गोर्वर]

**गोवर-रे** पु. न. अंगावर देवीसारखा पण लहान पुरळ येणारा एक रोग. हा विशेषतः लहान मुलांना होतो. (क्रि. येणे, निघणे, मावळणे, चिरमुटणे, कानपणे, बाहेर पडणे इ.). [सं. गोवर्ण] (वा.) ० **पोटी पडणे** - गोवर बाहेर न पडणे. यामुळे पोटात उष्णता राहते.

**गोवरकोंडा** पु. गोठ्यातील केरकचरा; शेणमूत.

**गोवरा** पु. गोऱ्हा. (वा.) **गुरांचे गोवरे होणे** - हतबल होणे; गांगरून जाणे; दीन होणे : 'परंतु तमाम लोकांची हिंमत हरली. गुरांचे गोवरे जाहाले.' - भाब १३८.

**गोवरी** स्त्री. १. वाळलेल्या शेणाची थापटी; शेणी. पहा : **गोवर** २. शेणखत. (कु.) ३. राब भाजण्यासाठी वाळवलेला शेणगोळा. (वा.) **गोवऱ्या मसणात जाणे**- वृद्धपण येणे; मरण जवळ येणे; वय होणे. **गोवरीची आग** - गोवरी जाळली असताना वर राख दिसते, परंतु आत विस्तव असतो. यावरून गुप्त परंतु भयंकर वैर.

**गोवर्धन** पु. १. मथुरेजवळची टेकडी. इंद्राने पाडलेल्या पावसापासून गोकुळाच्या रक्षणार्थ श्रीकृष्णाने या टेकडीला करंगळीवर धारण केले व हिच्याखाली गोकुळातील सर्व माणसे व पशू सुरक्षित राहिले. २. कार्तिक शुद्ध प्रतिपदेच्या (बलिप्रतिपदेच्या) दिवशी वल्लभसंप्रदायी

लोक भात, शेण, भाजीपाला वगैरेंचा गोवर्धनासारखा पर्वत करून ज्याची पूजा करतात तो. (वा.) **गाईच्या तोंडे गोवर्धन निवडणे** - पंचायत वगैरे प्रकरणी ज्याचा विषय त्याच्याच तोंडाने वदवून निवाडा करणे.

**गोवर्धन** पहा : **गोरोचन**

**गोवर्धनदेवी** स्त्री. गोस्तनदेवी : 'रयत लोकांच्या वगैरे मुलांस गोवर्धनदेवी काढण्याबद्दल अजम सूसराग्रीन साहेब दाक्तर याजकडील कारकून आले आहेत.' - पेद ३१.१५७.

**गोवर्धनी गाय** जिच्या गोमुत्रात, कुपित्याच्या रूपाने ओकारीत किंवा जिच्या डोक्यात पिवळ्या रंगाचे द्रव्य तयार होते - अशी गाय.

**गोवलरू** न. गवळ्याचा मुलगा : 'असंख्याते वासरूएं। तेतुलींचि गोवलरूएं॥' - वह १०४.

**गोवसा** पु. नवस.

**गोवळ, गोवळगोठा** पु. गोशाला; गायवाडा; गोठा. (को.)

**गोवळ-ळा, गोवाळ-ळी** पु. १. गुराखी; गवळी : 'उगला राहे न करी चाळा। तुज किती सांगों रे गोवळा।' - तुगा १२९. २. वयाने मोठा पण पोरकट माणूस; दुधखुळा (निंदार्थी). (राजा.) [सं. गोपाल]

**गोवळगाथा** पु. घोटाळा; भानगड; गोंधळ; घोळ; गबाळग्रंथ.

**गोवळजेणे** क्रि. घुसळणे.

**गोवळे** न. भूत.

**गोवं (व) ड-डी** पु. स्त्री. जंगल किंवा डोंगरावरील जनावरांची चरायला जायची पाऊलवाट; गायवाट. (वा.) **गोवंडास लागणे** - सरळ रस्त्यास लागणे; चालीला लागणे (माणूस, काम).

**गोवाइ** स्त्री. गुंतागुंत. : 'येथ उपदेशामाजि गोवाइ।' - राज्ञा ३.११.

**गोवागुंता** पु. अडचण; गुंता ; 'मातबरहि हुशारीनेच आहेत. गोवागुंता ठेविला नाहीं.' - ऐलेसं ४८५९.

**गोवाड** पु. गुरे कोंडण्याची पटांगणातील जागा. (झाडी).

**गोवार** न. शेण; शेणखळा : 'श्राद्धीं कष्टी होय सांगतां ब्राह्मण। गोवार मागून सावडीतों।' - तुगा ४२९६.

**गोवार** न. गुंतवणूक : 'काय करिसी आणिकां देवांची गोवारे' - ज्ञागा ९९८.

**गोवारी** स्त्री. भाजीची शेंग; गवारी; एक झाड व शेंग.

**गोवारी** पु. गुराखी; गवळी : 'तव गाई आलिया रात्रीं। कच नाहीं आला गोवारी।' - कथा १.५.८२.

**गोवाल** पु. अव. गंगावन; गाईच्या शेपटीचे केस.

**गोविंद** पु. १. गुराखी; २. भगवान श्रीकृष्णाचे एक नाव. [सं.]

**गोविंद** पु. १. कावळीच्या झाडाचे फूल. २. एका जातीचा कावळा. (को.)

**गोविंदफळ, गोविंदे** न. किंकिणी; वाघटे. तोंडात टाकल्यावर हे फळ 'गोविंद, गोविंद' म्हणते अशी कल्पना आहे.

**गोविंदमणी** पु. तांबड्या काचेचा मणी.

**गोविंदविडा** पु. गोंदविडा; खाली चौकोनी बैठक असून चारी बाजूंनी वर निमुळता होत जाऊन वरच्या बाजूला कोन असलेला विडा. हा विडा आठ पानांचा असतो.

**गोविंदी** स्त्री. वाघंटीची वेल.

**गोवी** पु. हेरिंग वर्गाच्या माशासारखा एका जातीचा मासा.

**गोवी** स्त्री. गोता; अडचण; पाश.

**गोवी** स्त्री. गुंतवणूक.
वि. अवघड.

**गोवे** न. १. अर्धवट घट्ट झालेले दूध; अदमुरे दही. २. मृदू, भोळा, सहज वळणारा व उदार धनी.

**गोवे** न. १. चांगल्या मिळकतीचा, बैठा रोजगार. २. श्रमाशिवाय चांगल्या गोष्टी मिळण्याचे साधन. ३. घबाड; ध्यानीमनी नसलेला लाभ, फायदा; मोठा फायदा, नफा (क्रि. सापडणे.) : 'भावें उगवीसी गोवें बोलसि निज भाव।' - देप (आरती)

**गोवे** न. परांची; माळा; मचाण.

**गोवेकरीण** स्त्री. गोव्यातील वेश्याव्यवसाय करणारी स्त्री : 'महाराष्ट्रात गोवेकरीण ह्या शब्दाचा अर्थ विशिष्ट प्रांतातील वेश्या असा आहे.' - राले ९४.

**गोवेगिरी** स्त्री. केळीची एक जात. या जातीचे केळे वनकेळीसारखे असते, परंतु साल जाडीला कमी असते.

**गोवेल** पु. स्त्री. एक वेल. ही वेल गुरांना विषकारक असते असे म्हणतात. भारे बांधण्याच्या कामी हिचा उपयोग होतो.

**गोव्या** वि. निष्काळजी व अव्यवस्थित; ढिला व गयाळी; गोंधळ्या व विसराळू; गबाळी; गैराती. (कु.)

**गोश (ष) पेच** पु. १. कानावरून बांधलेली टापशी; थंडीच्या दिवसात कानावरून बांधतात तो रूमाल, उपरणे; कानपट्टे. २. एक शिरोभूषण : 'चिमणा गोशपेच त्यावरी कलगी झळके फार।' - मध्व ३६. [फा. गोश = कान]

**गोश(ष)माल-ली, गोश्माल-ली, गोस्माल** स्त्री. १. कानउघाडणी; कानपिळणी; शिक्षा : 'आम्ही हराम खोर असें खचित यकीन जालें असल्यास आम्हांस परिच्छिन्न गोशमाली करावी.' - ऐस्फुले ४९. २. चोरटा हल्ला; 'भोवतें हिंडून गोषमाल देऊन त्यांचा मुलूख मारून धुंदी करावी.' - मराचिथोशा ५७. [फा.]

**गोश(ष)वारा, गोशेरा, गोश्वा (ष्वा-स्वा) रा, गोसारा** पु. १. संक्षिप्त टाचण, हकीकत, सूची. २. सारांश; निष्कर्ष; अभिप्राय; तात्पर्य. ३. चिठ्ठ्यांवरून तयार केलेली खेड्यातील जमिनीबाबत थोडक्यात माहिती. [फा. गोश्वारा]

**गोशा-षा-सा** पु. १. धनुष्याचे टोक. २. कातकऱ्याच्या धनुकलीची मूठ. ३. वस्त्राचा शेवट, टोक, पदर. [फा. गोशह]

**गोशा-षा-सा** पु. १. अंत:पुर; पडदपोशी; पडदा; बुरखा. २. आवरण; चिलखत; अंगत्राण. ३. परपुरुषापुढे तोंडावर बुरखा घेतल्याशिवाय स्त्रीने केव्हाही येऊ नये अशी चाल. (वा.) गोश्ता काढणे- घेरा पाडणे.[फा.]

**गोशानि (न) शीन** वि. १. एकांतवासी; निवृत्त. २. गोशा असणारी; पडद्यातील (स्त्री.).

**गोशाला-ळा** स्त्री. गायवाडा; पहा : **गोठा**

**गोशेनशीन** क्रिवि. गुप्तपणे : 'अशीं पत्रें सवाईसिंगांनीं राजास गोशेनशीन

लिहिलीं.' - जोरा १०६. [फा.]

**गोशगुजार** वि. श्रुत; माहीत : 'अन्नाहे दोस्ती तुम्हांस गोशगुजार करून ठेवितों हें निमित्य उलट येईल.' - मइसा ५.१६५. (क्रि. करणे)[फा.]

**गोश्वारा** पु. कर्णकुंडल : 'दोन गोश्वारे.' - दिमाश १.१०५ [फा.]

**गोष** गाईचा खूर.

**गोष-श** न. मांस; गोमांस : 'असिस्टंट बटलरला बाजारांतून गोष, अंडी, लोणी वगैरे आणण्यास त्यानें पाठवून दिलें.' - नपुक ३३. [फा. गोश्त]

**गोषवारा** पु. एखादे पुस्तक, पुस्तिका किंवा लेख ह्यातील मुद्यांचे सारवजा टिपण. [फा.]

**गोषा** पु. अंत:पुर; जनाना.

**गोष्ट** स्त्री. १. कथा; दंतकथा; आख्यान. २. (व्यापक) वाक्य; शब्द; पद; उच्चार; उल्लेख. ३. कृत्य; काम; प्रकरण; मुद्दा; बाब; व्यवहार. ४. वृत्त; वृत्तांत, घडलेला प्रसंग; विषय; घटना. ५. स्थिती; अवस्था; प्रकार. ६. (पुराव्याचा कायदा) ज्याचे ज्ञान इंद्रियांच्या योगाने होते अशी कोणतीही वस्तू किंवा वस्तूची स्थिती अथवा संबंध; मनुष्याच्या मनाची कोणतीही स्थिती. [सं. गोष्ठी] (वा.) **एक्या गोष्टीत** - एकदम; झटक्यास; सपाट्यास; चटकन. **० काढणे** - खोड काढणे; एखाद्या विषयाबद्दल बोलणे. **० जाणे** - एखाद्याकडून चूक होणे, प्रमाद घडणे. **० फोडणे** - गुप्त प्रगट करणे, जाहीर करणे. **० लपणे** - गोष्ट लोपणे. एखाद्यास माहीत न होणे. **गोष्टी खापलणे** - गप्पा छाटणे. **गोष्टी सांगणे** - १. बोलणे; संभाषण करणे; गप्पा छाटणे; वार्ता करणे : 'ठाव्या आहेत मला सांगा यथेष्ठ गोष्टि अन्या या।' - मोउद्योग १३.३७. २. सबबी सांगणे; बयादी लावणे. (खा.)

**गोष्ट** पु. गोट; तळ : 'याप्रमाणें भाषणें होऊन चेतसिंगानें इंग्रजाचा निरोप घेतला व इंग्रजाचे गोष्टाबाहेर निघाला.' - पुअखभा २.३९.

**गोष्टमात** पहा : **गोष्ट १**

**गोष्ट श्राद्ध** न. १. अडचणीमुळे सर्वोपचारयुक्त श्राद्ध करण्यास सवड नसेल तेव्हा अनुकल्पाने केवळ शब्दाने केलेले श्राद्ध. २. (ल.) निव्वळ गप्पाष्टक, बडबड; निरर्थक गोष्टी.

**गोष्टावाल** स्त्री. एक रानटी वेल. (गो.)

**गोष्टीमाता** स्त्री. अव. १. विचारपूस. २. हालचाल (झाडी).

**गोष्ठ** पु. न. गोठा.

**गोष्ठेशूर** वि. घरातील शूर; घरगोहो. [सं.]

**गोष्पद** न. १. गाईचे पाऊल, पावलाचे चिन्ह. २. गोवंडी. ३. गोपदाइतके माप; गाईच्या खुराखाली समावेश होईल इतकी जमीन. ४. चिखलात उमटलेले व पाण्याने भरलेले गाईचे पाऊल : 'गज गोष्पदीं बुडाला हा दैवा सिंधु शोषिला मशकें ।' - मोद्रोण १.२३.

**गोष्पदोपम** वि. गाईच्या पावलाप्रमाणे ओलांडून तरून जाण्यास सुलभ; सहजसुलभ; क्षुद्र; सुगम.

**गोस** पु. नेसलेल्या वस्त्राचा कमरेवरील भाग : 'पीतांबर गोसे खोवियेला' नागा १९१.

**गोस** पु. बकऱ्याचे मांस. [फा. गोश्त]

**गोस** पु. तीन वितींचे माप. (गो.)

**गोसमाल-माळी** स्त्री.१. कान उपटणे. २. घोसबाळी.

**गोसाई-वी** पु. १. पावसाळ्यात दिसणारा एक लहान किडा; मृगातील किडा. याची वरची बाजू लाल मखमलीसारखीअसते. (ना.) २. बाजरीवरील एक किडा.

**गोसामपण** न. गोसाव्याचा धर्म, चाल, रीत.

**गोसावण** स्त्री. एक पक्षी : 'साळुंख्या व गोसावणी यांचे भांडण जुंपे.' - आआशे ३५४.

**गोसावी** पु. समर्थ; स्वामी; मालक; श्रेष्ठ. श्रीकृष्णाला उद्देशून या शब्दाचा वापर करतात : 'परि आणिक एक गोसांविया। मज संशयो असे साविया।' - ज्ञा ६.४३०. [सं. गोस्वामिन्]

**गोसावी-मी-ई** पु. १. ज्याने सांसारिक सुखांचा त्याग केला आहे असा योगी. यांची वस्त्रे भगवी असतात. यांपैकी काही मुंडन करतात. २. (ल.) घरदार, बायकापोरे नसलेला, त्यांचा त्याग केलेला माणूस; फटिंग. ३. हरिदास. ४. बैरागी. [सं. गोस्वामिन्]

**गोसावी-मी-ई** पु. १. (जुना पत्रव्यवहार) सन्मानदर्शक एक पदवी. २. नवरा; घरधनी : 'घरवाते मोटकी दोघें। जैं गोसावी सेजे रिघे। तें स्वामिणी जे।' - अमृ १.१३. [सं. गोस्वामिन्]

**गोसावी-मी-ई** पु. १. शिटीसारखी वाजविता येणारी मातीची चिमणी. २. भुरकट रंगाची चिमणी (पाखरू).

**गोसावी-मी-ई** पु. तव्याला वर राख लावून त्यावर केलेली भाकर, गाकर.

**गोसावीण-विणी** स्त्री. धनीण; मालकीण : 'पैं जीवाचे कर्सी उतरलीं। ते दासी कीं गोसावीण जाली।' - ज्ञा १८.९१२.

**गोसावीपण** न. १. प्रभुत्व. २. मालकी : 'जी जालेनि पाइकें आलें। तें गोसावीपण केवीं बोलें।' - ज्ञा १८.२२. [सं.]

**गोसी** स्त्री. एकमेकांना शोधणे; परस्पर आवड; 'आणि विषयइंद्रियां गोसी। स्वभावें तरि भूतासि।' - राज्ञा १४.९२.

**गोस्टीखपाल्या-दलाल** वि. गोष्टीवेल्हाळ.

**गोस्त** न. मांस. पहा : **गोष** [फा.]

**गोस्तनदेवी** स्त्री. गाईच्या सडातील गाठींच्या संपर्कामुळे दूध काढणाऱ्या माणसाला होणाऱ्या देवी.

**गोस्तनी** स्त्री. द्राक्षे.

**गोह-हा-हो** पु. १. नवरा, पती; घो : 'सुखें वोळंब दावी गोहो। माझें दु:ख नेणो पाहो॥' - तुगा २९५७. २. बाप्या; तरणाताठा, वयात आलेला माणूस; गोखमा. ३. वस्ताद; मारतापीर; मारक. ४. तोडीस तोड; शेरास सव्वाशेर; सवाई. [सं. गोध = पती]

**गोहक** पु. गहू (धान्य). (गोंडी)

**गोहण** स्त्री. गाताडी. पहा : **गव्हाण**

**गोहण्या** पु. गुराखी. (व.)

**गोहन** न. गाईचा कळप. (व.) [सं. गोधन]

**गोहर** पु. १. हुरहुर; काळजी. २. खोडी; चाळा; अवगुण. (ना.)

**गोह (हो) रा** पहा : **गोऱ्हा**

**गोहरी** वि. खोडकर; अवगुणी. (ना.)
**गोहाडी** स्त्री. हगणदारी.
**गोही** स्त्री. १. ग्वाही; साक्ष : 'गोहीवीण जाऊं नये। राजद्वारा।' - दास २.२.२०. २. साक्षीची जबानी. [फा. गुवाही]
**गोहीदार** पु. साक्षीदार : 'गोहीदाराचें जरी मोडूं तरी साहेबास गुन्हेगारी... देऊं.' - मइसा १८.३५.
**गोहीभास** पु. साक्षीपुरावा : 'देवप्रभु यासी घेऊ नेदी म्हणवून बोलिला या उपरी पूर्वपर मनास आणिता गोहीभास होये तोवरी अदबखाना ठेविले.' - शिचसाखं २.२९७.
**गोहो** पु. गलबताचा एक कर : 'दर गलबतास गोहो सुमार ५.' - पेद ३४.१९७.
**गोहोडा** पु. झाड. (झाडी.) [सं. घोटक]
**गोहोत** न. १. दाणा, कोंडा, पेंड वगैरे गुरासाठी शिजवलेले आंबोण, मिश्रण. २. (ल.) घोटाळा; गफलत, गोंधळ. (राजा.)
**गोहोन** पु. गुरांचा कळप.
**गोहोपट** पु. जमाव.
**गोळ** न. १. पहा : **गोल**. २. अंडे.
**गोळ** स्त्री. १. एक भाजी (वेली); घोळ. २. एक झाड. (गो.)
**गोळ** पु. गळ. (गो.)
**गोळ** न. 'पाप'. - (तंजा.)
**गोळक** पु. १. गर्भाचा गोळा. २. विधवेला झालेला मुलगा : 'पांडवांचें कुळ शोधितां निर्मळ। कुंठजार गोळक । बुद्धिकांसी' - नागा ८९२. ३. व्यभिचारातून जन्मलेल्यांची. [क.]
**गोळक** पहा : **गोलक** (वा.) **गोळकाचे सोवळे** - खोटे सोवळे. (गोळकांना सोवळ्याचा अधिकार नाही या समजुतीने).[सं. गोलक]
**गोळकी** वि. घेडगुजरी; गंगाजमनी : 'गोळकी भाषांतर.' - विकार वि.
**गोळगोळ(ळं)की** स्त्री. एक वनस्पती. (बे.) याला पिवळा धोमा म्हणतात. याची बोंडे लांबट असून ती वाळली म्हणजे घुळघुळ असा आवाज होतो. त्यावरून हे नाव पडले असावे.
**गोळबा** वि. आळशी; अजागळ; बावळट. (कु.)
**गोळंकार** पु. दुखण्यामुळे आलेली असहाय्य स्थिती; खोडाबिडी होऊन पडणे. (गो.)
**गोळंकारी** वि. वाकलेला; पोक आलेला (वार्धक्य, वात, अशक्तपणा यांमुळे); खोडाबिडी होऊन पडलेला.
**गोळंबी** स्त्री. पाण्यातील एक लहान प्राणी.
**गोळा** पु. १. गोल; गोलक; चेंडू. २. वर्तुळाकार पदार्थ; पिंड; भेला; डिखळ; रास. ३. जथा; जमाव; मेळा (मनुष्य, पशू, वस्तू यांचा). ४. (ल.) हातपाय नसलेला किंवा ते लुळे झालेला माणूस; पांगळा; निष्क्रिय माणूस. ५. (निंदार्थी) जेवण; भाकरतुकडा; पिंड; घास. ६. गर्भ; ७. नाकातील चांदीची वेसर (मोत्याऐवजी). ८. फळातील विशिष्ट नाव नाही अशा अठी, बी, गर, गर्भांश इ. ना लावतात. ९. लाडू; ढोकळा. (व.) १०. शरीरात येणारी मोठी गाठ. ११. तोफेचा मोठा गोळा. १२. साठा; समूह. १३. गोल आकाराचे भांडे; गुंड; गुंडा. (गो.) [सं. गोलक] (वा.) ० **करणे** - एकत्रित करणे. ० **गिळणे** - (लाच) खाणे. ० **टाकणे** - गर्भपात होणे. ० **देणे** - जेवणे; जेवायला देणे. ० **मारणे** - हडप करणे. ० **होणे** - १. गोळ्याप्रमाणे गात्रे एकत्रित होणे; हालचाल न होणे. २. एकत्र येणे, जमणे. **गोळेगावाला वेढा घालणे, पडणे** - जेवायला बसणे. **गोळ्यावर घालणे** - शिक्षेचा एक प्रकार. निरनिराळ्या वजनांचे तोफेचे गोळे वरखाली करायला लावणे.
**गोळाक दिवप** १. फाशी देणे. २. मुलाला घोडी (शिक्षा) देणे. (गो.)
**गोळाक लावप** हात बांधून टाकणे. (गो.)
**गोळागुळ** पु. एक प्रकारचा वानर. [सं. गोलाड, गूल]
**गोळागोळी, गोळाबारी** स्त्री. परस्पर (बंदुकी-तोफा यांच्या) गोळ्यांचा भडिमार; तोफेचा मोठा भडिमार.
**गोळाफेक** स्त्री. ठरावीक वजनाचा गोळा फेकण्याचा खेळाचा एक प्रकार.
**गोळा (ळी-ळे) बेरीज** स्त्री. १. (अंकगणित) ठोक बेरीज किंवा तेरीज. २. (ल.) तात्पर्य; सारांश; निष्कर्ष; मथितार्थ. (वा.) ० **करणे** - (हिशेब) लबाडीने काही बाबी दाबून किंवा खोट्या लिहून ठोक बेरीज किंवा तेरीज देणे; सरासरी बेरीज करणे; अंदाजे बेरीज करणे.
**गोळाभर** वि. पोटभर; भूक शांत होण्याइतका.
**गोळाभाजी** स्त्री. पीठ लावून किंवा तांदळाच्या कण्या घालून केलेली भाजी.
**गोळामेळाने** क्रिवि. एकत्र; वर्तुळात; गोल : 'कुणी गोळामेळाने बसून पेटवलेली चिलीम फिरवू लागले.' - बाब १२०.
**गोळार मारप** फाशी देणे. (गो.)
**गोळिंब, गोळीम** पहा : **गोळंबी**
**गोळी** स्त्री. १. (सामा.) लहान गोल वस्तू; लहान गोळा; गोलक; गोटी. २. पिस्तूल, बंदूक इ. तून उडविली जाणारी वस्तू. ३. चोळमटलेल्या कपड्यांचा लहान ढीग, रास. ४. बैदूल. (ना.) ५. लहान तांब्या, घागर, बिंदली. (गो.) ६. खाडीतील चिखलाचा वीतभर लांबी-रुंदी-उंचीचा गोळा. या गोळ्याचा बांध टिकाऊ असून त्यावर नाचणी चांगली होते. [सं. गुलिका] (वा.) ० **घालणे, झाडणे, मारणे** - पिस्तूल-बंदुकीची गोळी मारणे. ० **चढविणे** - मादक पदार्थाची गोळी खाणे. **आडून गोळी मारणे** - स्वतः पुढे न होता दुसऱ्याकडून इष्टकार्य घडवून आणणे; अप्रत्यक्षतः काम करून घेणे. ० **लागणे** - १. माशी लागल्यामुळे वांती होणे. २. कार्य नेमके होणे; मात्रा लागू पडणे. ० **लागू पडणे** - काम यशस्वी होणे.
**गोळी(ळ्या)चा टप्पा, गोळीमारणी** बंदुकीच्या किंवा तोफेच्या गोळ्याचा मारा जेथपर्यंत जातो ते अंतर.
**गोळीबंद** वि. गोल : 'वा! आहेत (मोत्यांचे) दाणे नामी गोळीबंद बरं का!' - पलको ८७.
**गोळीबंद** वि. पाण्यात थेंब टाकल्यास ज्याची गोळी बनते असा (पाक).
**गोळीबंद** वि. मुद्देसूद; परिणामकारक : 'ठोस (मथळ्यांची) भाषा जेवढी स्पष्ट, नेमकी आणि गोळीबंद तेवढा वाचकांवरील वृत्तपत्रांचा परिणाम

वाढणार.' - भाअंव्य ६२.

**गोळीबार** पु. बंदुकीच्या गोळ्यांची फैर; बंदूक उडवणे.

**गोळेकरी** पु. गुळ्यातील मनुष्य; शत्रूच्या भयामुळे परागंदा होणाऱ्या टोळीतील मनुष्य : 'आम्ही माहुलीस जाऊन राहिलों. हळूहळू सर्व सामान नांदोशीहून आणलें व गोळेकराप्रमाणें रचून ठेवलें.' - प्रति आत्मच ६५.

**गोळेगणित** न. (ग.) गोळ्यांच्या राशीचे गणित; चढत्या उतरत्या राशीचे गणित. [सं.]

**गोळणा** स्त्री. विटी. (गो.)

**गोळ्या, गोल्या** पु. लहान मडके, घागर. (को.) [सं. गोल]

**गोळ्या** पु. पहा : **गोली-ल्या**

**गोक्षुर** पु. १. गाईचा खूर. २. गाईची पाऊलवाट; गोवंडी. [सं.]

**गोक्षुर** पु. गोखरू; सराटा. [सं.]

**गोंग** स्त्री. खोटी ओरड; खोटा आरोप; तोहमत : 'एखादा महार हाताशीं धरून त्याजकडून खोटीखरी बनावट शिवाशिवीची गोंग करून या पंचावर आणतां येईल.' - के ५.९.१९४१. [ध्व.] (वा.) ० **उठणे** - ओरडा होणे : 'पिंपरणीच्या बुंध्याआड उभा राहिलो आणि आवाज टाकणार तोच गोंग उठली.' - व्यंमाक ६१. ० **करणे** - आरडाओरडा करणे : 'गुराखी पोरांनी गोंग केली.' - आआशे ८८.

**गोंगटा** पु. ओरडा : 'गोंगटा ऐकून ते धावतच आले.' - माजीगा ६४.

**गोंगणे** अक्रि. गुंगु असा आवाज करणे; सणाणणे (तीर, हवाईबाण).[ध्व.]

**गोंगर (रा) ण** न. जेर होईपर्यंत द्यायचा मार; मारठोक, शिव्या वगैरे; बेदम मारहाण.

**गोंगरणे** अक्रि. गांगरणे; धांदरणे; घाबरणे.

**गोंगल्ल** न. गर्द झाडी. (गो.)

**गोंगाट** पु. १. गलका; बडबड; आरडाओरड. २. गो गो असा आवाज (माशी, बाण वगैरेंचा). ३. गुप्त गोष्टीची प्रसिद्धी; बोभाटा.

**गोंगाणी** स्त्री. माशांचा गुणगुण असा आवाज : 'उठली माशांची गोंगाणी।' - एरुस्व १४.६६. [ध्व.]

**गोंगावणे** अक्रि. १. गो गो असा आवाज करणे; घोंघावणे (माशा वगैरे). २. बाण, बंदुकीची गोळी वगैरेंनी विशिष्ट आवाज करणे. ३. बुक्क्यांनी मारले असताना गों गों असा आवाज काढणे. [ध्व.]

**गोंज(जा)रणे** सक्रि. १. अंजारणे-गोंजारणे; अंगावरून प्रेमाने हात फिरविणे (समजाविण्याकरिता, फसविण्याकरिता); कुरवाळणे; समजूत पाडणे. २. माया लावणे. (माण.)

**गोंड** स्त्री. न. १. पाणंद; गल्ली (गाव किंवा कुंपणातील). (को.) २. घोळ; खेंडुलकी; खिंड; अरुंद रस्ता; डोंगरातील गायवाट किंवा जनावरांची पाऊलवाट. [क. गोंदी]

**गोंड** पु. न. १. दाण्यावरचे टरफल; कचोळे; तुरमणे (काही वनस्पतींचे, नागली वगैरेचे). २. वर टरफल असलेले धान्य. (माण.)

**गोंड** न. १. मिऱ्यांचा घड; (राजा). देठासकट घड. (राजा) २. शेवाळ्याप्रमाणे पाण्यावर येणारी झुबकेदार वनस्पती. पहा : **गोंडाळ**

**गोंड** पु. विंध्य पर्वतातील एक वन्य जात व त्या जातीतील व्यक्ती.

**गोंड** पु. गोठण. पहा : **गोवंड**

**गोंडण** न. धान्यावरचे टरफल. पहा : **गोंड**

**गोंडली** न. एक देशी नृत्य : 'हे गोंडली नृत्य म्हणजे आजच्या गोंधळाचेच प्राचीन रूप होय.' - लोक्षि २२.

**गोंडवण-न** (दोन कुंपणांच्या मधली) गल्ली.

**गोंडवळ-ण** पहा : **गोंडाळ**

**गोंडवेल** स्त्री. एक प्रकारची हरळी. (वाई)

**गोंडस** वि. १. सुंदर; आकर्षक; सुरेख; मोहक. २. हत्तीच्या सोंडेप्रमाणे मांसल व निमुळते.

**गोंडा** पु. १. गुच्छाप्रमाणे फूल; झुबका; तुरा (झेंडू इ. फुलांचा). २. घड; पुंजका; गोळा. ३. गेंद; झेला; झुबका; गूल; फुन्ना (पालखी, जनावराची शेपटी इत्यादींना गुच्छसदृश असणारा). ४. झेंडूचे फूल; मखमल. ५. पहा : **गुंडा**. ६. वेणीतील एक अलंकार : 'वेणीस जीचे विलसेत गोंडे।' - सारुह २.३२. [का. गोंडे] (वा.) ० **काढणे** - फसविणे, घात करणे. ० **घोळणे** - काही मिळेल या आशेने पुढे पुढे नाचणे; शेपूट हलविणे; खुशामत करणे; थुंकी झेलणे. ० **फुटणे** - १. (गुळाला, रसाला) कढणाऱ्या रसावर साय येणे. २. सूर्य उगवणे. ० **फोडणे** - १. (सूर्य) पूर्ण उगवणे; वर येणे. २. ठळकपणे प्रख्यात होणे; पुढे येणे (माणूस - बहुधा वाईट अर्थाने). ० **हालणे, झुलणे** - सतत काम चालू ठेवणे (उत्तेजनासाठी किंवा चेष्टेने म्हणतात). (को.)

**गोंडाक वचप** फुकट्यावारी जाणे. (गो.)

**गोंडाळ** न. पहा : **गोंड**. १. शेवाळ; झुबकेदार गवत. २. तळे, विहीर इ.च्या पाण्यावर शेवाळासारखी पसरणारी, पाणी शुद्ध राखणारी झुबकेदार वनस्पती; गोंडाळी : 'गोंडाळ सांडून नीर घेइजे।' - दास ६.५.१३. (को.)

वि. १. भरदार; भरगच्च; ठेचून भरलेले (कणीस). २. गोंडाळ शेवाळाने आच्छादलेली (विहीर इ.). ३. गुबगुबीत; गोंडस : 'दंड पाहून गोंडाळ हस्ती गंडस्थळीं धुळ घालून बसले।' - प्रला १३३.

**गोंडी** स्त्री. जोंधळा, बाजरी यांच्या दाण्यावरील टरफल. पहा : **गोंड** पु. न.

**गोंडी** स्त्री. १. पाणंद; गल्ली. (को.) २. मोठ्या रस्त्याला फुटलेला आडरस्ता; आडवाट. ३. गोवंडी; गायरस्ता. पहा : **गोंड** [क.]

**गोंडी** वि. गोंडा असलेले (फूल, झाड). (गोंडी-तगर-मखमल.)[क. गोंडे]

**गोंडी** स्त्री. पुंडाई; लुटारूपणा; बंडाळी : 'त्यानें देवरी प्रांते गोंडी करून गाव लुटून गांवास आगी देत होता.' - पेद २७.३.

**गोंडीकुहरी-ली, गोंडीकुवली** स्त्री. साधी कुइरी.

**गोंडुरोंडू** वि. सामान्य. (झाडी)

**गोंडू** न. भोक.

**गोंडेरा-री-र** वि. गोंडेदार; झुपकेदार (फूल-जास्वंद, झेंडू, तगर इ. चे).

**गोंताड** पु. तरट.

**गोंद-ध** पु. १. चीक; डिंक. हा बाभळ, खैर इ. झाडांच्या चिकापासून

निघतो. रंग, चिटे छापणे, चित्रे इ. कामी हा उपयोगी आहे. डिंकाचे लाडू फार पौष्टिक असतात. २. सरस; चिकट पदार्थ. [हिं.]

**गोंदण-न-णी, गोधण-णी** स्त्री. १. एक मोठे रानटी झाड. या झाडाला भोकरासारखी बारीक लाल फळे येतात. २. या झाडाचे फळ.

**गोंदण-ले** न. गोंदलेले चिन्ह : 'गालीं गोंदण नवें। जैशी वासंती सजली जाणा।' - धनुर्भंग ७१.

**गोंद (ध) णे** उक्रि. काटा, सुई यांनी टोचून वर पाने चोळून (अलीकडे रासायनिक द्रव्यांचा उपयोग करून) कातडीवर आकृती काढणे; अंगावर नक्षी काढणे (बायकात रूढ).

न. टोचून घेणे - पूर्वी अपराध्यांना गोंदण्याची एक शिक्षाही असे.

**गोंददाणी-नी** स्त्री. गोंद ठेवण्याचे पात्र; डिंकदाणी; डिंकपात्र.

**गोंदरड** स्त्री. गोठ्यातील केरकचरा, घाण. (राजा.)

**गोंदरोग** पु. (वन.) खोडातून अथवा वृक्षातून निघणारा डिंकासारखा स्राव.

**गोंदवण** न. गोंदण्याचे साहित्य व साधने.

**गोंदविडा** पु. नागवेलीच्या पानांचा एक विशिष्ट आकाराचा विडा. पहा : **गोविंदविडा**

**गोंदळ-ळा** पु. समुदाय; मेळा.

**गोंदळी** पु. पिशाच : 'कां साधूतें गोंदळी। संचरोनि सुये मेळीं।' - ज्ञा १३.१००९.

**गोंदा** पु. १. झेंडूचे फूल. २. वेणीतील एक अलंकार. (झाडी)

**गोंदाई** स्त्री. गोंदणीचे फळ : 'बया बया म्हणू बया साखर गोंदाई।' - तीसा ३१.

**गोंदे** पु. अव. चेंडू आपटून दोघांच्यामध्ये खेळायचा खेळ.

**गोंध** स्त्री. १. गुंतवळ. (राजा.) २. (ल.) गोंधळाचे, जिकिरीचे काम; भानगड. ३. अव्यवस्था, अस्ताव्यस्तपणा ४. देवीप्रीत्यर्थ गायन, नृत्य, कथा इ. ज्यात करण्यात येतात असा एक प्रकारचा नवसाचा किंवा पारंपारिक उत्सव.

**गोंधण-णी** स्त्री. एक झाड. पहा : **गोंदण-णी**

**गोंधणे** अक्रि. गुंतणे; गुंताडा होणे. पहा : **गोंधर(व)णे** [क. गोंदण]

**गोंधर (व) णे** अक्रि. १. गुंतले जाणे. २. अव्यवस्थित होणे; गैरविल्हे लागणे (पोथ्यांची पाने इ.). ३. गुरफटणे; घाबरणे; गोंधळणे.

सक्रि. गुंतविणे; अडकविणे.

**गोंधवण** वि. स्त्री. १. गुंतागुंत; गोंदरण. २. गुंतागुंतीचा गोळा; गुंतागुंत; गुंताडा. ३. गुंतलेली स्थिती.

**गोंधळ** पु. १. अव्यवस्था; अस्ताव्यस्तपणा; घालमेल (वस्तू, काम, हिशेब यात). २. अंदाधुंदी; घोटाळा; दगदग; त्रास. ३. धांदल; गडबड; तारांबळ : 'कां उपभोगाचे गोंधळ।' - दास २.५.२६. ४. धावाधाव; धावपळ; धामधूम. ५. देवाच्या कुलधर्मात देवाप्रीत्यर्थ गोंधळी लोकांकडून करायचे गाणे, नाचणे, कीर्तन, देवाचे भजन, स्तुती. घरातील कार्य निर्विघ्न पार पाडल्याबद्दल देवीची स्तुती व पूजा करण्याचा कुलाचार : 'वेदवाचा वरदायिनी। गोंधळ गाती इयेचा।' - मुआदि ४.१२८. ६. गडबडीचा, आरडाओरडीचा प्रकार; कोलाहल; धुडगूस. (क्रि. घालणे).[क. गोंधळो] : 'खर्चापुरतें दिलें असतें फेकून अन् म्हटलें असतें घाला गोंधळ.' - रंगराव.

**गोंधळणे** अक्रि. घाबरणे; त्रेधा उडणे; भांबावणे; घोटाळ्यात पडणे.

**गोंधळलग्न** पहा : **गोधूललग्न**

**गोंधळी** पु. १. देवीचा गोंधळ घालणारी जात व त्या जातीतील व्यक्ती. हे लोक गातात, नाचतात व कोठे कोठे वाद्येही वाजवतात. २. भिक्षेकऱ्याची एक जात. [का.गोंदलिग]

**गोंधळी(ळू)क** वि. गोधूलिक; गोरज (मुहूर्त). (चि. गो.)

न. सांजवेळ; सायंकाळ : 'मग वैराग्याची गोंधळुक । जे ज्ञानाभ्यासाचे वार्धक्य।' - ज्ञा १८.१०८५. [सं. गोधूलिक]

**गोंधळ्या** वि. १. घालमेल्या; धांदल्या; अव्यवस्थित (माणूस). २. धांदरट; गफलती; गोंधळलेला.

**गोंधागोंध** स्त्री. गुंतागुंत; गुंताडा.

**गोंब-बी** स्त्री. गोम; घोण. पहा : **गोम**

**गोंबटा-टी-टे** पहा : **गोमटा-टी-टे**

**गोंयबाबू** पु. गोव्यातील रहिवासी; गोवेकर. (गो.)

**गॉटॉ** पु. शिजलेला दाणा; दाटा. (गो.)

**गॉठणां** स्त्री. गुरांची रानातील दुपारची विश्रांतीची जागा; गोठाण. (गो.)

**गॉड** न. गूळ. (को. गो.)

**गॉडान्न** न. कुणब्यांचे गुळाचे एक पकान्न. (गो.)

**गॉडॉ** पु. कैफ नसलेले मद्य. (गो.) [सं. गोडी]

**गॉत** न. दुखण्याने, रोगाने बिघडलेले रक्त.

**गॉपॉ** पु. माडाची पोय फुटून न जाता सूर निघावी म्हणून तिच्या भोवती बांधायचा दोर. (गो.)

**गॉब्रॉ** पु. राखी रंगाचा एक मासा. (गो.)

**गॉम** न. गोंद; खळ. (गो.) [इं. गम]

**गॉमार करचे** कपडे खळीत घालून इस्त्री करणे.

**गॉमॉ** पु. मासे विकण्याचे माप. (गो.)

**गॉल** न. अंगरख्याचा गळा. (गो.)

**गॉलभर** वि. सैल. (गो.)

**गॉलं** न. पातळ पदार्थ मोजण्याचे ४ शेरी माप. हे मातीचे असते. (गो.)

**गॉल्ल** न. गर्द झाडी. (गो.)

**गॉंधाड** गांधट; मोठी गांध.

**गौ** स्त्री. गाय (पशू). पहा : **गो** [सं.]

**गौकोश** पहा : **गोकोश**

**गौखाना** पहा : **गोखाना**

**गौघाती** पु. गाय कापणारा; खाटिक : 'गो सोडवी पडिलया हाती : गौघाती काळाचीए' - सव ४२०.

**गौड** वि. गुळासंबंधी; गुळाचा. [सं. गुड]

**गौड** वि. गूढ जाणणारा. [सं.]

**गौडबंगाल** न. १. (गौड व बंगाल या भागात पूर्वी गारुडविद्या फार होत्या म्हणून). (ल.) गारुड; तंत्रमंत्र; जादूटोणा. २. (ल.) युक्त्या; मसलती;

हिकमती; लबाडी. ३. (ल.) गूढ; रहस्य; कूटरचना : 'गौडबंगाल रचण्यात त्याने (मोरोपंताने) आपला काळ घालविला.' - नि ७८९. ४. खोल डाव; कट करणे. ५. चमत्कार; अद्‌भुत घटना.

**गौडबंगाली** वि. १. गौडबंगाल, जादूटोणा करणारा. २. गौडबंगाल प्रदेशासंबंधी. ३. गूढ; न कळणारा.

**गौडमल्हार** पु. (संगीत) गायनातील एक राग. गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर.

**गौडविद्या** स्त्री. मंत्रतंत्र; जादूटोणा : 'मनुष्यांची गौडविद्या। राक्षसांची वोडंबरी विद्या।' - दास १०.४.३४.

वि. सारस्वत ब्राह्मणाची जात. पहा : **सारस्वत**

**गौडसारंग** पु. (संगीत) हा राग कल्याण थाटातून उत्पन्न होतो. गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर.

**गौडा** पु. पाटील, गावचा मुख्य अधिकारी. [क.]

**गौडारीवाणी** स्त्री. (संगीत) तानसेन हा गौड ब्राह्मण असल्याने त्याच्या म्हणण्याच्या ध्रुपद-पद्धतीस हे नाव पडले आहे.

**गौडी** स्त्री. गुळापासून काढलेली दारू. [सं. गुड]

**गौडी** स्त्री. (संगीत) एक रागिणी.

**गौडीरीति-ती** स्त्री. एक संस्कृत शैली; मोठमोठे समास असलेली रचना, लेखनशैली. [सं.]

**गौण** न. १. न्यून; अभाव; तुटवडा; कमीपणा. २. अपूर्णत्व; हीनता. वि. १. कमी प्रतीचा; हलक्या प्रतीचा; कमी महत्त्वाचा; अप्रधान. २. आनुकल्पिक; गौणभूत. ३. मुख्य नव्हे ते; दुय्यम : 'मूळबंधाचें लक्षण। वज्रासन गौण। नामयासी॥' - ज्ञा ६.१९९. [सं.]

**गौणकल्प** पु. १. मुख्य किंवा प्रधान नसलेला हेतू किंवा उद्देश. २. दुय्यम ध्येय; विकल्प; अनुकल्प; प्रतिनिधीत्व.

**गौणपक्ष** पु. १. कमजोर, खालच्या दर्जाचा, अप्रधान पक्ष, बाजू (वाद, गोष्टी, प्रमेय यांचा). २. गौण कल्प. ३. (सामा.) हलका पक्ष, बाजी.

**गौणमुखन्याय** पु. तारतम्याचा नियम (मुख्यामुख्य, मौलिक व अलंकारिक, प्रधान व अप्रधान यातील) मुख्य पक्ष संभवत असताना गौण अंगीकारू नये, या अर्थी वापरतात.

**गौतमी** स्त्री. गाय : 'कीं गौतमी देखता पंचानन। भयें कांपत चळचळा।' - भवि ९.१५७.

**गौप्य** वि. १. गोप्य; गूढ; गुप्त : 'परंतु गुज तें जाणावें। गौप्य आहे।' - दास ६.२.२०. २. गुप्त ठेवण्यास लायक; गुप्त गोष्ट, रहस्य. [सं. गोप्य]

**गौप्यस्फोट** पु. गुप्त गोष्ट बाहेर पडणे; एखादी गुप्त गोष्ट जाहीर करणे; रहस्य उघड करणे.

**गौमासी, गौमुखी** पहा : **गोमाशी, गोमुखी** : 'तुम्हां लागीनिलिआं गोमासिया। तरि वारां जा कां।' - शिव २१९.

**गौर** स्त्री. पार्वती; भवानी; देवी; गौरी. [सं. गौरी] गौर आणणे - हा एक कुळाचार असून यात (ज्येष्ठा गौरीची स्थापना करणे. भाद्रपद शुद्ध षष्ठीला किंवा सप्तमीला नदी अगर ओढा यांच्या काठचे पाच किंवा सात खडे पूजेसाठी आणणे. गौर आणणाऱ्या मुलीने घरी येताना तोंडात पाणी घेऊन मागे न पाहता मुक्याने ते खडे (= गौर) देवापाशी आणून ठेवायचे असतात व नंतर चूळ थुंकायची असते.) गाडग्यांची गौर उभी करणे - (तपेले किंवा तसले भांडे घेऊन त्याला नवे लुगडे नेसवून व वर मुखवटा किंवा खापराची वेळणी बसवून व दागिने घालून मूर्ती सजवणे.) गौर उतरविणे - (भाद्रपद शुद्ध षष्ठी - सप्तमीला गौर आणायच्या दिवशी दोरे घ्यायचे असतात. गणपती, कुमारिका व मुंजा मुलगा यांचे दोरे आठपदरी असतात व सवाष्णीचे आणि गौरीचे सोळापदरी असतात. याप्रमाणे दोरे घेऊन आठपदरी दोऱ्याला आठ व सोळापदरी दोऱ्याला सोळा अशा गाठी देऊन त्यात आघाडा, खोबरे, दूर्वा व रेशमी दोरा बांधतात. नंतर ते दोरे हळदीने पिवळे करून गौरीपुढे ठेवतात व त्यांची पूजा करून गळ्यात बांधतात. मग दहीभाताचा नैवेद्य दाखवून गौर (सुगड) एकीकडे ठेवतात.) गौर जागविणे - (गौरीच्या सन्मानार्थ जागरण करणे.) गौर जेवणे - (गौरीनिमित्य सासरहून माहेरी आलेली सवाष्ण जेवू घालणे. यावेळी गुळाची पोळी, गव्हल्याची खीर व करंज्या करतात.) गौर बसविणे (श्रावणाच्या पहिल्या शुक्रवारी एका सुगडात तांदूळ व हळकुंड घालून वर वेळणी झाकतात. मग त्यावर सोवळ्याचा खण किंवा चोळी घालतात.) गौर बोळविणे - ((ज्येष्ठा गौर) दहीभात, करंजी ही शिदोरी व पूजेचे सामान घेऊन, ज्या ठिकाणाहून गौरी (खडे) आणल्या त्या ठिकाणी जाऊन पूजा करून ओटी भरायची असते. त्यानंतर शिदोरी आणि गौरीचे खडे पाण्यात सोडायचे असतात व काठची वाळू घरी आणून ती सर्वत्र टाकायची असते.) गौर लिहिणे - (प्रथम सुगड व मातीची वेळणी यांना काव लावून ती वाळल्यावर चुन्याने नाक, डोळे, कान, तोंड इ. आकृती काढतात. शेवटी सुगडाच्या तोंडावर रंगवलेली वेळणी बसवतात.) इ. विधी प्रचलित आहेत.

**गौर** पु. खोल विचार; चिंतन : 'यांची हर एकविशीं गौर करीत जाणे.' - मइसा ३.२०५. [फा.]

**गौर** वि. मोठा : 'हा मीं गौरु हीनु पुरता।' - राज्ञा १५.७५९.

**गौर** पु. बंडखोर; गवार लोक; पुंड : 'कांहीं जाटाचे स्वार घेऊन गौर इद्रुखीस आले होते.' - पेद २३.२०.

**गौर** वि. १. गोरा; शुभ्र; निर्मळ; स्वच्छ; (माणूस, वर्ण, रंग-शरीराचा) २. तेजस्वी; कांतिमान.

**गौरकाय** पु. १. युरोपियन माणूस. २. गोरी व्यक्ती : 'गौरकाय व सरकार यांविषयींचें त्यांचे पक्षपातित्व लोकांच्या चांगले नजरेस आले.' - अमृ ७.२७१. [सं.]

**गौरखर** पु. रानगाढव.

**गौरपरदास्त** स्त्री. वास्तपुस्त; निगादानी : 'याची गौरपरदास्त करावी, याप्रमाणें नजमुदीखानांनीं सेवकास समागमें नेऊन नसीबयारखानास मिरविलें.' - पेद २८.२१. [फा.]

**गौरफिकर** स्त्री. मोठी काळजी : 'तो सुटेपर्यंत गौरफिकरची जरुरत आहे.' - श्रीयो १.४७६.

**गौरमुख** न. इंग्रज : 'त्याजवर कांहीं गौरमुख येणार असे वर्तमान आहे.'

- ऐलेसं ७०३४.

**गौरव** पु. न. १. मोठेपणा; भारदस्तपणा; मान्यता; सन्मान (काम, मनुष्य यांचा). २. वजन; योग्यता. ३. सत्कार; मान; आदर; पूजा. (क्रि. करणे, ठेवणे, राखणे). ४. डौल; थाटमाट; शोभा; बडेजाव; वैभव : 'काय हा आरंभरंभेचा गौरवु।' - ज्ञा ६.४६२. [सं.]

**गौरव** पु. वजन; गुरुत्व; जडपणा. [सं.]

**गौरवग्रंथ** पु. (ग्रंथ) एखादी व्यक्ती किंवा संस्था हिच्या सन्मानार्थ प्रकाशित करावयाचा ग्रंथ. या ग्रंथात त्या व्यक्तीचे किंवा त्या संस्थेचे कार्यकर्तृत्व यासंबंधीचे लेख प्रसिद्ध केले जातात.

**गौरवण** न. मोठेपणा देणे; सन्मान; सत्कार.

**गौरव(वि)णे** उक्रि. १. मानसन्मान करणे; मोठेपणा देणे; आदराने वागवणे; गौरव करणे. २. (ल.) अंगावर वस्त्र जळणे (जळणे शब्द अशुभ आहे म्हणून त्याऐवजी).

**गौरवचिन्ह** न. मानचिन्ह; बिल्ला; प्रशस्तिमुद्रा.

**गौरववृत्ति** स्त्री. सन्मान वेतन; विद्यावेतन-मानधन.

**गौरवशाली** वि. सन्माननीय; माननीय; आदरणीय; अग्रमानांकित; परमोत्कृष्ट; वैभवशाली.

**गौरवी** वि. गौरवयुक्त; आदरशील; सन्माननीय; सभ्य.

**गौरवी** स्त्री. गौरी.

**गौरशी** स्त्री. १. खोल चौकशी; बारीक तपास; सूक्ष्म परीक्षा : 'आमची गौरशी करून आज्ञा होईल त्याप्रमाणे वर्तणुकेस हजीर आहों.' - ऐस्फुले ५२. २. (चुकीने) ऊर्जित; सर्फराजी; कौतुक; गौरव : 'आम्ही कामकाज केलें हें धनी दृष्टीनें पाहून गौरशी करील म्हणोन आस्था होती.' - पया १००.

**गौरी** पु. (संगीत) एक राग. याचे दोन प्रकार आहेत. औडुव-षाडव. वादी ऋषभ व संवादी पंचम. गानसमय सायंकाळ.

**गौरी** न. गायनाचा एक प्रकार; पारध्याचे गाणे : 'पारधी घाट वाये। साधावया गौरी गाये। तेथ हरिण लुब्ध होये। आइकावया॥' - ज्ञाप्र ७२०. पहा : **गौरी**

**गौरी** स्त्री. १. गौर; पार्वती; देवी; भवानी. २. ऋतू प्राप्त न झालेली अविवाहित मुलगी; कन्या; कुमारी. ३. देवीच्या पूजेचा भाद्रपद शुद्ध पक्षातील जागर व उत्सव. (क्रि. जागविणे.) ४. गौरवर्णाची स्त्री. [सं.]

**गौरी** स्त्री. अशुद्ध रक्तवाहिनी. [सं.]

**गौरी** स्त्री. शेणाची गोवरी, तिचा तुकडा, भुसकट इ. पहा : **गवरी, गोवरी**

**गौरीचा पेंड** भाद्रपदात शेताचे बांध घालण्यासाठी खणलेली माती. ही माती फार चिकट असते. या महिन्यात गौरीचा उत्सव असतो म्हणून हे नाव पडले.

**गौरीचा हळवा** नाचणीची एक जात.

**गौरीचे डोह(हा)ळे** चैत्रात पडणारी पावसाची बुरबुर.

**गौरीच्या फण्या** एक वनौषधी.

**गौरीतृतीया** स्त्री. चैत्र शुद्ध तृतीया.

**गौरीफल** न. एका काटेरी झुडपाचे खाण्यायोग्य फळ : 'गौरीफल नामक शाक किंवा क्षुप...' - वनश्री ७१२.

**गौरीशंकर** पु. १. एकमुखी रुद्राक्ष. २. कंठा; दाणे (मोती). ३. हिमालयाचे एक शिखर.

**गौरीशंकर रुद्राक्ष** जोडरुद्राक्ष.

**गौरीह(हा)र** पु. १. शिवपार्वती. २. वाङ्निश्चय झाल्यावर मंडपात वर येण्यापूर्वी वधूने जिची पूजा करायची ती पार्वती (आणि शंकर). कुंभारी चार बोळकी व एक कळस अशा चार उतरंडी चार बाजूंना व मागच्या बाजूला मधोमध आणखी एक उतरंड मांडायची असते. त्यांच्या मध्ये धुतलेल्या पाटावर धुतलेले तांदूळ ठेवून त्यावर ठेवण्यात येते ती अन्नपूर्णा; गौरीहाराचे साहित्य : 'मांडिला गौरीहार।' - वसा ४६. (वा.) ० **पूजणे** - १. विवाहाच्या आधीचा एक विधी; गौरीहाराच्या वेळी मांडलेल्या देवीची पंचामृती पूजा करणे व लग्न लागेपर्यंत तिला कुंकुममिश्रित अक्षता वाहत राहणे. २. (ल.) शिवासारखा पती मिळावा म्हणून शिव-पार्वतीची आराधना करणे. ० **सुतविणे** - गौरीहाराच्या प्रत्येक मडक्याच्या गळ्याभोवती सुताचे तीन फेरे घेणे.

**गौल** वि. गोड; मधुर : 'वछ तुझे अति आरुष बोल। परि अमृताहूनि दिसती गौल।' - स्वादि ६.१.२९.

**गौल्य, गौलता** स्त्री. १. रुची; गोडी: 'हां गा साकर आणि दूध। हें गौल्य कीर प्रसिद्ध।' - ज्ञा ३.२२६. २. मृदुता; माधुरी; मधुरता (भाषणात) : 'गौल्यता नाहीं वचनाची।' - दास १.५.१५. ३. गोड मिश्रण.

**गौल्यता** स्त्री. सुबकपणा; सुंदरता (आकृती, अक्षर यांची). [सं. गोल, गोलता]

**गौवण** स्त्री. गवसणी; शरीर : 'जे त्वगस्थिगौवण मूढां। स्थूळबुद्धि' - ज्ञा ९.१८२.

**गौश्या** वि. सापडलेले (अर्भक). (माण).

**गौसणी, गौळण, गौळणवाडा, गौळा-ळी** पहा : **'गव'मध्ये**

**गौसायळ** स्त्री. सायळ; अंगावर काटे असणाऱ्या साळूची (जनावराची) एक जात : 'गौसायळ सामर। या नाव आदिभूतिक।' - दास ३.७.८.

**गौसी, गोसी** स्त्री. परस्परसंबंध; साखळी : 'आणि विषयेंद्रियां गौसी। स्वभावें तंव भूतासीं।' - ज्ञा १४.९३.

**गौहर** पु. मोती. [फा.]

**गौळ** न. साठा : 'कीं ज्ञानाचें गौळ : सनादले' - मूप्र ३८५.

**गौळ** न. गुराखी : 'तुज गौळे राखिती हृषीकेशी। शेखीं वां गोकुळासीं रक्षिलें।' - एभा ५.१३.

**गौळण** स्त्री. झाडाच्या फांदीवर गवताचे लोंबते घरटे विणणारा प्राणी : 'गौळणीनें केला खोपा अवघड झाडावरी।' - लोसामा ५.२८४.

**गौळवाडा** पु. गाई, म्हशी सांभाळण्यासाठी बांधलेली जागा.

**गौंड-डी** पु. न. स्त्री. गुरांचा मार्ग. पहा : **गोवंड**

**गौंडरी टोपी** केवळ सलम्याचे, कलाबतूचे भरतकाम असलेली टोपी.

**गौंडा** पु. भिंत बांधणारा कारागीर; गवंडी.

**गौंडुकी** स्त्री. एक प्रकारचा कर. (गो.)

**ग्याज** स्त्री. न. बैलाच्या गळ्यातील घंटा किंवा ठोकडा (मधली लोखंडी

घंटा) जिच्यात बांधलेला असतो ती दोरी; बैलाच्या गळ्यातील घाट.

**ग्यान** पहा : **ज्ञान**

**ग्यान, ग्यानदास** न. गुन्हे करणाऱ्या लोकांचे घरफोडीचे (पळी, बत्ता यासारखे सहापासून अठरा इंच लांबीचे) एक हत्यार.

**ग्यानबा** पु. १. वारकरी लोक ज्ञानदेवांचा भक्तिभावाने उल्लेख करतात ते नाव. २. (ल.) सर्वसामान्य माणूस.

**ग्यानबाची मेख** अतिशय कठीण प्रश्न; मर्म.

**ग्यारमी** स्त्री. मुसलमानांना देण्यात येणारी खिचडी : 'खंडेराव महाराजांनी प्रत्येक मुसलमानास ग्यारमी देण्याची पद्धत सुरू केली.' - ज्ञामं १.१.१९३६.

**ग्यारंटी** स्त्री. हमी; जामीनकी. [इं.]

**ग्यारिसन** पु. फौजबंद ठाणे; सैन्याचे ठाणे; बंदोबस्तासाठी फौज ठेवण्याचे ठिकाण; शिबंदी. [इं. गॅरिसन]

**ग्यालन** पु. पातळ, प्रवाही पदार्थ मापण्याचे एक कैली माप. हे सामान्यतः सहा मोठ्या बाटल्यांएवढे असते. सुमारे साडेचार लिटर. [इं. गॅलन]

**ग्याली** स्त्री. (मुद्रण) मुद्रापाट; ठसेपाट; ग्रथित मुद्रापात्र; स्टिकमध्ये जुळविलेला मजकूर, स्टीक भरल्यानंतर उतरून (काढून) ठेवण्याचे साधन. [इं. गॅली]

**ग्यालीप्रुफ** न. कच्चे मुद्रित; कच्चा छाप; शुद्ध करण्याचा छापील खर्डा; ठसेपाटाचा छाप. [इं. गॅली]

**ग्र(ग्रं)थणे** उक्रि. १. अर्थानुसंधानपूर्वक अनेक वाक्ये एकत्र गुंफणे, बांधणे, जुळवणे, रचणे (पद्य, कविता); ग्रंथरचना करणे; ग्रंथ संपादणे : 'जें मी संजात ग्रंथलों देख। आचार्यें कीं॥' - ज्ञा १८.१७७०; २. गुंफणे; ओवणे (पुष्पादी). ३. एकत्रित करणे; जुळवणे. [सं. ग्रथन]

**ग्र (ग्रं) थन** न. गुंफण; जुडण; बांधणी; रचना : 'आणि माझें तव आघवें। ग्रथन येणेचि भावें।' - ज्ञा १३.३२९. [सं.]

**ग्रथित** वि. ग्रथन केलेले; गुंफलेले; जुळविलेले; रचलेले. [सं.]

**ग्रसणे** उक्रि. गिळणे; घेरणे; आच्छादणे; व्यापणे : 'तो ग्रसिला महामोहें। कालसर्पे॥' - राज्ञा २.७०. पहा : **ग्रासणे**

**ग्रसनी** स्त्री. (वै.) १. घसा. २. इतर प्राण्यात तोंड व अन्ननलिका यांना जोडणारा भाग.

**ग्रसनी गंडिका** (वै.) घशाच्या भागातील चेतापेशीसमूह.

**ग्रसित, ग्रस्त** वि. १. गिळलेले; खाल्लेले. २. अक्षर, पद गाळून उच्चारलेले; गाळलेले. ३. (ल.) गिळंकृत केलेले; घालमेल, अफरातफर केलेले. ४. व्यापलेले. ५. हरवलेला; धरलेला; पीडलेला, त्रस्त झालेला अशा अर्थी समासात योजतात. जसे : - दुष्काळग्रस्त, पूरग्रस्त. [सं. ग्रस् = भक्षण करणे]

**ग्रस्तास्त** पु. ग्रहण असतानाच (ते सुटण्यापूर्वी) सूर्य किंवा चंद्र मावळणे.

**ग्रस्तोदय** पु. ग्रहण असताना सूर्य किंवा चंद्र यांचा होणारा उदय.

**ग्रह** पु. घेणे; स्वीकार; अंगीकार; धरणे. [सं.]

**ग्रह** पु. १. चंद्र किंवा सूर्य यांचे ग्रहण. (राहूकेतूकडून) २. सूर्याभोवती फिरणारा गोल (पृथ्वी, बुध, शुक्र, गुरु, मंगळ इत्यादींचा); ज्योतिषशास्त्राप्रमाणे हे ग्रह (सूर्यासह) नऊ आहेत. (सामा.) केंद्रस्थ, उष्ण व दैदीप्यमान पदार्थाभोवती फिरणारा, कमी उष्णतेचा परप्रकाशित गोल. ३. एक प्रकारचे पिशाच, गिरा : 'जैसा ग्रहातें पंचाक्षरी। अनुमानी कां॥' - ज्ञा २.८५. (यापासून ल.) व्याधी, उपाधी, पीडा इ.; तापदायक माणूस; खनपटीला बसणारा, पाठीला लागणारा इ. [सं.]

**ग्रह** पु. १. कल्पना; भावना; मत. २. उमज; समज; बुद्धी; अर्थग्रहण अर्थबोध; धारणा; समजूत. [सं.]

**ग्रह** पु. चिकाटी.

**ग्रह** पु. १. मगर; २. एक मोठा मासा; ग्राह : 'गज सरोवरीं ग्रहग्रस्त; स्त्रियांपुत्रीं सांडिला जीत।' - एभा १२.८५. [सं.]

**ग्रह** पु. (संगीत) १. तालाच्या आरंभाची मात्रा. अर्थात तालाची सम. २. भरतमुनींनी दिलेल्या जातिलक्षणाप्रमाणे गीतारंभी उठावणीला जो अंशस्वर असतो तो. याचे चार प्रकार आहेत : सम, अतीत, अनागत व विषम. [सं.]

**ग्रहकुंडली** स्त्री. पंचांगातील ग्रहांच्या दशा दाखविणारी आकृती.

**ग्रहगणित** न. ग्रहांच्या गतीविषयीचे गणित.

**ग्रहगति-ती** स्त्री. (ज्यो.) १. ग्रहांची गती. २. ग्रहांचा विशिष्ट परिणाम (मुख्यत्वे माणसाचे भविष्य पाहताना). [सं.]

**ग्रहचार** पु. सूर्य किंवा इतर ग्रह यांची गती, भ्रमण.

**ग्रहजप** पु. ग्रह प्रसन्न होण्यासाठी त्या ग्रहाच्या मंत्राचा करायचा जप.

**ग्रहज्योतिष** न. पत्रिकेतील ग्रहांच्या हालचालींवरून भविष्यकाळात घडणाऱ्या गोष्टी सांगणारे शास्त्र.

**ग्रहण** न. घेणे; स्वीकारणे; अंगीकार; आत्मसात करणे. उदा. विषयग्रहण; स्वादग्रहण इ. (क्रि. करणे). [सं.]

**ग्रहण** न. दोन आकाशस्थ गोलामध्ये तिसरा येऊन एक अदृश्य होणे. सूर्याच्या आड चंद्र आल्यामुळे किंवा चंद्रावर पृथ्वीची छाया पडल्यामुळे जे सूर्य-चंद्र बिंबाचे आच्छादन होते ते; पूर्ण (खग्रास), खंडग्रास व कंकणाकृती असे ग्रहणाचे प्रकार होत. सुमारे १८ वर्षे व १० महिन्यांनी पुन्हा तीच तीच ग्रहणे येतात. (वा.) ० **लागणे** १. चंद्रसूर्याची बिंबे छायेने आच्छादित होणे. २. (ल.) संकटग्रस्त होणे. ० **सुटणे** -१. ग्रहणाची स्थिती संपणे. ३. (ल.) संकटावस्थेतून मुक्त होणे : 'ग्रहण सुटले.' - लोटिकेले २.९८.

**ग्रहणपट** पु. कुंडली; जन्मपत्रिका : 'मग वाचिला ग्रहणपट। सत्यभामेचा॥' - कथा ५.२.१७.

**ग्रहणफळ** न. ग्रहणकालाची फलज्योतिषावरून निघणारी भविष्ये.

**ग्रहणशक्ति-क्ती, ग्रहणक्षमता** स्त्री. विषय आकलन करण्याची शक्ती, पात्रता. [सं.]

**ग्रहणशील** वि. नवीन कल्पना, विचार इ. ग्रहण करण्यास, घेण्यास तत्पर.

**ग्रहणशौच** न. ग्रहणकाळात मानलेली अस्पृश्यता. [सं.]

**ग्रहणी** स्त्री. १. संग्रहणी; रक्तातिसार; रक्ती हगवण. २. लहान आतडे. ३. शरीरातील उष्णताप्रसारक व चैतन्योत्पादक भाग, धमनी.

**ग्रहणीय** वि. घेणे, स्वीकारणे, ताबा घेणे, पकडणे वगैरेंसाठी योग्य; ग्राह्य.

पहा : **ग्रहण** [सं.]

**ग्रहदशा** स्त्री. मनुष्यादिकांना प्राप्त होणारी शुभाशुभ फलसूचक सूर्यादी ग्रहांची दशा, दृष्टी, अवस्था, काल; वाईट काल.

**ग्रहदान** न. नवग्रहांना प्रसन्न करण्यासाठी ब्राह्मणाला द्यायचे दान.

**ग्रहपीठ** न. ग्रहमख करण्यासाठी नवग्रह देवता मांडण्याचा पाट, चौरंग.

**ग्रहपीडा-बाधा** स्त्री. १. प्रतिकूल ग्रह किंवा ग्रहयोग यापासून उत्पन्न होणारे दु:ख, दारिद्र्य आजारीपण इ. २. भूतपिशाचबाधा.

**ग्रहबल** न. विवक्षित राशीला ग्रहांची अनुकूलता (विवाह, उपनयन, मंगल कृत्य करण्याविषयी).

**ग्रहमंडळ** न. ग्रहगोल; सर्व ग्रहांचे चक्र.

**ग्रहमुख-यज्ञ** पु. ग्रहांना अनुकूल करून घेण्यासाठी ग्रहांच्या प्रीत्यर्थ करायचा यज्ञ; ग्रहशांती; नवग्रहांना उद्देशून करायचा होम; हा होम विवाह, मुंज व इतर शांतीच्या प्रसंगी करतात.

**ग्रहमैत्री** स्त्री. ग्रहांची परस्परांशी मैत्री; वधूवरांच्या पत्रिकांचा मेळ; पत्रिका जुळणे, पटणे. राशीचे स्वामी सात असल्याने, ज्या राशीत नवरी जन्मली आणि ज्या राशीत नवरा जन्मला, त्या दोन्ही राशींचा स्वामी एक असणे किंवा एकमेकांना अनुकूल असणे.

**ग्रहमोक्षविचक्षण** वि. (संगीत) ग्रह व न्यास यांचे नियम जाणणारा.

**ग्रहयोग** पु. शुभाशुभदायक ग्रहांचा योग, स्थिती.

**ग्रहवैर** न. १. ग्रहांचे शत्रुत्व. २. पत्रिका न जमणे.

**ग्रहशांति-ती** स्त्री. ग्रहमख; ग्रहयज्ञ; प्रतिकूल ग्रहाने पीडा देऊ नये म्हणून करायचे धार्मिक कृत्य.

**ग्रहसाधन** न. १. (कोष्टक, गणित किंवा दुर्बिण इ. यंत्रे यांच्या साह्याने) ग्रहदशेचा निश्चय; ग्रहांचे स्थळ व गती यांचे शोधन; ग्रहांचे वेध घेणे. २. ग्रहांची आराधना.

**ग्रहसारणी** स्त्री. अमुक ग्रह अमुक ठिकाणी आहे याचा निश्चय करण्याची गणिते किंवा कोष्टके; ग्रहसाधनाचे गणित.

**ग्रहस्त-स्थ** पु. ग्रहावर राहणारा. चुकीने 'गृहस्थ' = कुटुंबवत्सल या अर्थी वापरला जातो. (ग्रह + स्थ = ग्रहावर राहणारा. गृह + स्थ = घरात राहणारा; प्रापंचिक.)

**ग्रहस्वर** पु. (संगीत) प्रत्येक जातिगायनास ज्या विशिष्ट स्वरापासून सुरुवात करावी लागते तो स्वर.

**ग्रहीता** पु. घेणारा; स्वीकारणारा; जो घेतो तो; ज्याला मिळते तो.

**ग्रंथ** पु. १. अर्थपूर्ण वाक्यांची विशिष्ट प्रकारची संगतवार रचना; पोथी, पुस्तक (गद्य किंवा पद्य यांचे). २. (ल. व शब्दश:) गुंफणी; जुळवणी; जोडणी; संपादणी. ३. पुस्तक; भाग; अध्याय; परिच्छेद इ. ४. बत्तीस अक्षरांचे वृत्त किंवा वृत्ताची ओळ : 'व्यासकृत महाभारत लक्षग्रंथ प्रसिद्ध हा भारी।' - मोआदि १.९. (एका अनुष्टुभात ३२ अक्षरे असतात व अनुष्टुभालाही ग्रंथ म्हणतात त्यावरून ३२ ची संख्या). ५. (ल.) योजना; बेत; कट; मसलत : 'बाळोबा आणि भाऊ हा सगळा एक ग्रंथ आहे.' - अस्तंभा ९६. ६. प्रसंग; गोष्ट; हकीगत (व्यवहार इ. संबंधी). ७. पराचा कावळा; एवढ्याचे एवढे करणे; विस्तार. ८. अर्थ; संगती : 'त्यांनी राजीनामा कां दिला याचा ग्रंथ लावणे कठीण.' - के २७.५.३०. ९. अकांडतांडव; कुभांड. १०. स्मरणिका. [सं. ग्रथ् = रचणे] (वा.) ० **आटोपणे** - (काम) संपणे; (कार्य) नाश होणे; (माणूस) मरणे : 'पण आमच्या दुर्दैवानें सर्वच ग्रंथ आटोपला.' - भयंकर दिव्य. ० **करणे** - बाऊ करणे; क्षुल्लक गोष्टीला उगाच महत्त्व देणे. ० **लागणे** - अर्थ समजणे. ० **लावणे** - विशेष प्रसंगाने अथवा विशेषत: चातुर्मासात रामायण, महाभारतासारख्या मोठ्या ग्रंथाचे वाचन करणे; (ल.) एखाद्या विषयाची अनावश्यक दीर्घ चर्चा करणे.

**ग्रंथकर्ता-कार** पु. पुस्तक तयार करणारा, रचणारा कवी; लेखक.

**ग्रंथदिंडी** स्त्री. १. (विशेषत:) साहित्य सम्मेलन प्रसंगी महत्त्वाच्या ग्रंथांची पालखीतून काढलेली शोभा यात्रा. २. दिंडीपताका; प्रभात फेरी; मिरवणूक

**ग्रंथन** न. क्रि. ओवणे; विणणे; जोडणे; गोवणे; गुंफणे.

**ग्रंथपंचक** न. (ख्रि.) पवित्रशास्त्रातील पहिली पाच पुस्तके. ही मोशे याने लिहिल्याचे मानतात.

**ग्रंथपाल** पु. (ग्रंथ.) ग्रंथालयाचा प्रमुख अधिकारी. ग्रंथांची व्यवस्था ठेवणारी व ग्रंथालयाचा कारभार पाहणारी व्यक्ती.

**ग्रंथप्रस्ताव** पु. ग्रंथाचा प्रारंभ.

**ग्रंथप्रामाण्य** न. धार्मिक किंवा कायद्यांच्या ग्रंथात लिहिलेले प्रमाण, आधारभूत किंवा खरे मानणे : 'बुद्धिस्वातंत्र्याच्या ऐवजी ग्रंथप्रामाण्य... हे समाजनियमनाचे आधार होते.' - शिलेसं (प्र.) ३३.

**ग्रंथरूपदर्शन** न. (ग्रंथ.) ग्रंथांची पृष्ठे, चित्रे, नकाशे, आकार. माहिती.

**ग्रंथसाहेब** पु. शिखांचा धर्मग्रंथ.

**ग्रंथसूचिकार** पु. (ग्रंथ.) ग्रंथसूचीचा कर्ता, संकलक, संपादक. ग्रंथांची, वर्णक्रमानुसार यादी तयार करणारी व्यक्ती.

**ग्रंथसूची** स्त्री. पुस्तके, नियतकालिके, अहवाल इत्यादिकांची वर्णक्रमानुसार केलेली यादी.

**ग्रंथायंत** न. ग्रंथाचा मूलभूत हेतू किंवा ध्येय : 'आणि माझे तंव आघवें। ग्रंथायंत एणेचि भावें। जें तुम्ही संती होआवें।' - ज्ञा १३.३२८.

**ग्रंथालय** न. १. ग्रंथ, पुस्तके, नियतकालिके इ. वाचनासाठी किंवा अभ्यासासाठी जेथे ठेवली जातात असे ठिकाण. २. निरनिराळ्या प्रकारच्या पुस्तकांचा संग्रह. ३. चित्रपट, चित्रपट्टी, ध्वनिमुद्रिका, ध्वनिपट्टीका इत्यादींचा संग्रह.

**ग्रंथालयशास्त्र** न. (ग्रंथ.) ग्रंथालयांच्या व्यवस्थापनाचे शास्त्र.

**ग्रंथिक** वि. गाठीचा; ज्यात अंगावर गाठी उठतात असा (रोग).

**ग्रंथिक संन्निपात** ज्या तापात सांध्याच्या जागी गाठ येते असा ताप, ज्वर; प्लेग : 'मुंबईतील भयंकर साथीचा ताप ब्युबानिक फीव्हर किंवा ग्रंथिक सन्निपात...' - लोटिकेले १.१.५७४.

**ग्रंथिका** स्त्री. बरगडीचे हाड : 'मेरु शोभला निजपृष्ठीचा कणा। चौदा लोकेसीं ग्रंथिका जाणा।' - स्वादि ७.४.२०.

**ग्रंथिमोचक** पु. चोर; गाठोड्याची गाठ सोडून माल पसार करणारा.

**ग्रंथिरस** पु. (वै.) अंत:स्रावी ग्रंथीपासून निर्माण होणारे रासायनिक द्रव्य.

**ग्रंथिरोग** पु. अंगावर गाठी गाठी उठणारा रोग.

**ग्रंथी, ग्रंथिका** स्त्री. १. गाठ. २. लाकडावरील गाठ. ३. वेत, बोरू यांची गाठ, संधी, पेरे. ४. (ल.) शरीराचे सांधे. ५. बंधन; संबंध; नाते; लागाबांधा (लग्न इ. चा). ६. (ल.) घोटाळा; गुंतागुंत; गळफाटा; फासटा; गुंतविण्याचे, गोवण्याचे कोणतेही कारण. जसे : - मोह - माया - संशय - अज्ञान - ग्रंथी : 'मा मी विश्वेश्वरु भेटे। आणि जीवग्रंथी न सुटे।' - ज्ञा १८.१४०४. ७. गळू; उठाणू; वाघणा. ८. (वै.) शरीरवाढीसाठी काही विशिष्ट द्रव्य स्राव निर्माण करणारा शरीरातील अवयव. [सं. ग्रथ् = बांधणे]

**ग्रंथी** पु. शिखांच्या धर्मग्रंथावर प्रवचन करणारी व्यक्ती.

**ग्रंथी** स्त्री गंड.

**ग्रंथीवज्र** न. पोलादाचा एक प्रकार.

**ग्रंथोपजीवी** वि. १. ग्रंथ लिहून (रचून) पोट भरणारा. २. ग्रंथ आचरणात आणणारा : 'आणि ग्रंथोपजीविये। विशेषीं लोकीं इयें।' - ज्ञा १८.१८०१. [सं.]

**ग्रा (गॅ) नाईट** पु. एक प्रकारचा दगड. यात स्फटिक, चंद्रकांत व अभ्रक हे भिन्न भिन्न प्रमाणात मिश्रित असतात. हा दगड फार कठीण व टिकाऊ असतो. हिंदुस्थानात पुष्कळ ठिकाणी हा सापडतो. [इं.]

**ग्रा(ग्रॅ)फाइट** न. (भूशा.) कार्बनचा स्फटिकरूपातील अत्यंत मृदू प्रकार.

**ग्राम** पु. १. गाव; खेडे. २. गावातील प्रमुख किंवा माननीय माणूस. ३. अरेराव, कचाट्या, जरब बसविणारा, कचाटीत धरणारा माणूस. ४. जमाव; समुदाय : 'मुतेहिना ऐसा वागे। ग्राम कर्मेंदियांचा।' - यथादि ३.९२. (समासात) इंद्रिय - गुण - पुण्य - भूत - स्वर - ग्राम : 'इंद्रियग्रामावरी येणेंचि नाहीं।' - ज्ञा ५.१०५. [सं.]

**ग्रामकंटक-कुठार** पु. स्त्री. गावगुंड; गावची पीडा, ब्याद; दुष्ट माणूस.

**ग्रामकी** स्त्री. गावजोशी किंवा पाटील इ.चे काम; गावकी.

**ग्रामकेसरी-सिंह** पु. १. गावातील कुत्रे : 'ह्या ग्रामसिंहाचिया ठायीं। - ज्ञा १३.६८१. २. (उप.) भेदरट माणूस; गावात फुशारकी मारणारा.

**ग्रामकोळ** पु. गावडुकर : 'या ग्रामकोळाचा ठाइ। जैसा मिळणी ठाओ नाहीं।' - ज्ञा १३.६७९.

**ग्रामखर्च** पु. १. गावचा खर्च. २. फुकट किंवा विनाकारण खर्च; ज्याचा मोबदला नाही असा खर्च.

**ग्रामचर** वि. असभ्य गोष्टींची आवड असणारा.

**ग्रामजाति** स्त्री. वर्ज्यावर्ज्य स्वरांवरून ठरविलेला रागांचा विभाग : 'श्रुति स्वर ग्रामजाति - गमक।' - रुस्व ३४६.

**ग्रामजोशी-ज्योतिषी** पु. गावचा जोशी. हा पंचांग सांगणे, पत्रिका पाहणे, मुहूर्त काढणे इ. कामे करतो : 'आधीं होता ग्रामजोशी। राज्यपद आलें त्यासी। त्याचें हिंडणें राहीना। मूळ स्वभाव जाईना॥' - तुगा.

**ग्रामज्य** न. शरीरसुख; मैथुन; सुरत क्रीडा : 'ग्रामज्य आठवे चित्तीं।' - दास २.५.२८.

**ग्रामणी** पु. १. पाटील; गावचा मुख्य. २. (लौकिक) गावगुंड, चावट, वाईट, कुटाळ्या, पीडादायक माणूस; ब्याद : 'रामनामें विवर्जित ग्रामणीं बोलिजे तें ग्राम्य गीत।' - एभा ८.१६९. ३. गावचा महार. स्त्री. कुटाळकी; गावकी. पहा : **ग्रामिणी** : 'आनित्य ग्रामणी मस्ती सदा।' - दास २.३.६.

वि. मुख्य; श्रेष्ठ; प्रमुख.

**ग्रामणी** पु. ज्या व्यक्तीवर ग्रामण्य म्हणजे बहिष्कार घातला आहे अशी व्यक्ती : 'ब्राह्मण्य धर्म संस्थापक आपण आहा त्यापेक्षां जे असे ग्रामणी आहेत याची पुरी चौकशी जाहाल्याशिवाय मुक्तपत्र होऊं नये.' - मइसा २१.२२०. [सं. ग्राम]

**ग्रामणीक** न. हरामखोरपणा. पहा : **ग्रामणी, ग्रामिणी** : 'तरी जी पाहतां हेही ग्रामणिक दिसोनि येतसे कीं निष्टक।' - सादि १२.२.१०८.

**ग्रामण्य** न. १. मुख्यत: जातीसंबंधीचा किंवा इतर गावकीचा तंटा, खटला. २. बहिष्कार. ३. जातीच्या खटल्यासंबंधी चौकशीसाठी भरणारी ग्रामसभा; जातगंगा.

**ग्रामत्रय** पु. (संगीत) सप्तस्वरांतील मुख्य तीन अवधी. याचे प्रकार तीन. षड्जग्राम, मध्यमग्राम व गांधारग्राम. सात स्वरांचा समूह.

**ग्रामथिल्लर** न. गावातील लहानसे तळे, डबके.

**ग्रामदान** न. गावातील सर्व जमीन भूमिहीनांना वाटण्यासाठी देणे : 'भूदानानंतर विनोबांनी ग्रामदान चळवळ हाती घेतली.' - नीतेने २४५.

**ग्रामदुर्गा** स्त्री. गावची कुलदेवी, भवानी; ग्रामाधिकारिणी देवता.

**ग्रामदेव-देवता-दैवत** पु. स्त्री. न. १. ग्रामाधिकारी, ग्रामाधिकारिणी; गावचा कुलदेव, कुलदेवी. २. या देवतेच्या खर्चासाठी इनाम दिलेली जमीन, उत्पन्न, ग्रामदेवीची जमीन.

**ग्रामधर्म** पु. गावचे धार्मिक विधी, नियम, चालीरीती इ. परंपरेने चालत आलेला गावचा धर्म.

**ग्रामनेत्र** न. (ल.) महार; गावचा जागल्या.

**ग्रामपशु-शू** पु. माणसाळलेले जनावर. [सं.]

**ग्राम पंचायत-सभा-संस्था** स्त्री. गावची सर्व व्यवस्था पाहणारी संस्था; ग्रामस्वराज्य. राज्यशासनाच्या कायद्यान्वये गावच्या लोकांनी निवडून दिलेली विशिष्ट अधिकार असलेली संस्था.

**ग्रामबिंदुटी** स्त्री. खेड्यातील गल्ली, बिदी : 'तव ते गोधनें ग्रामबिंदुटी। अपार मौळी असती चव्हाटी।' - नव १३.११५.

**ग्रामयाजक** पु. गावचा उपाध्याय; ग्रामोपाध्याय.

**ग्रामराज्य** न. गावाचा कारभार गावानेच करणे : 'आजचे स्वतंत्र भारताचे अर्थकारण... ग्रामराज्य स्थापण्यास अनुकूल नाही.' - विचार १२७.

**ग्रामलेखक** पु. कुळकर्णी : 'ग्रामलेखक ते स्थळीं।' - निमा (आत्मचरित्र १.१०१).

**ग्रामविकास** पु. आधुनिक तंत्रज्ञानाच्या सहाय्याने खेड्यांची सुधारणा.

**ग्रामविखो** पु. गावात सर्वांना उपलब्ध असणारा भोग.

**ग्रामशिक्षण** न. १. खेडेगावामध्ये राहणाऱ्या लोकांची परिस्थिती, गरजा व समस्या लक्षात घेऊन आखलेली शिक्षणपद्धती. २. खेडेगावातील अध्ययन-अध्यापनाची तत्त्वे आणि पद्धती यांचा विचार करणारे शास्त्र.

**ग्रामसभा** स्त्री. गावातील प्रतिष्ठित लोकांची विशेष कारणासाठी झालेली बैठक.

**ग्रामसेवक, सेविका** गावाच्या विकासासाठी शासनाने आखलेल्या योजनेत ग्रामीण स्तरावर काम करणारे स्त्री-पुरुष. यांना योग्य प्रशिक्षण देऊन प्रशिक्षित केले जाते. [सं.]

**ग्रामस्त-स्थ** पु. गावात राहणारा; गावचा रहिवासी; गावकरी.

**ग्रामस्वराज्य** पहा : **ग्रामराज्य**

**ग्रामाचार** पहा : **ग्रामधर्म**

**ग्रामाधिकार-री** पु. गावासंबंधी अधिकार; तो गाजविणारा माणूस, अधिकारी; गावकामगार.

**ग्रामाधिपती-ति-ती** पु. पाटील : 'ग्रामाधिपतिरूपें श्रीरघुवीरें जाण।' - सप्र २.३४. [सं.]

**ग्रामिणी** स्त्री. हरामखोरी; चहाडी इ. पहा : **ग्रामणीक**

**ग्रामीण** वि. खेड्यासंबंधीचा; खेड्यातील जीवनासंबंधीचा.

**ग्रामीण भाषा** खेड्यापाड्यात बोलली जाणारी, प्रमाणभाषेपासून वेगळी पण तिच्याशी संबंधित परंपरागत भाषा.

**ग्रामीण विद्यापीठ** ग्रामीण विभागाचा सर्वांगीण विकास हे ध्येय लक्षात घेऊन आवश्यक त्या ज्ञानशाखांच्या उच्च अभ्यासक्रमांची सोय असलेले ग्रामीण परिसरातील विद्यापीठ.

**ग्रामीण साहित्य** खेड्यातील लोकांच्या जीवनासंबंधीचे तेथील बोलीभाषेत केलेले लेखन.

**ग्रामोद्योग** पु. अव. १. यंत्रयुग येण्यापूर्वी गावातील कारागिरांकडून किंवा सामान्य लोकांकडून केला जाणारा सूतकताई, कापड विणणे यांसारखा धंदा : 'यांत्रिकीकरणाची झळ सर्वांत प्रथम ग्रामोद्योगांना लागली.' - भादा १९. २. ग्रामजीवनाला, तेथील स्थानिक परिसराला, तेथील साधनसामुग्रीला सुसंगत असे उद्योग. ज्या उद्योगाच्या विकासाला तेथे नैसर्गिक अनुकूलता असते असे पूरक वा सहायक होणारे उद्योग.

**ग्रामोपाध्याय** पु. गावचा उपाध्याय; ग्रामजोशी. पहा : **ग्रामयाजक**

**ग्रामोफोन** पु. फोनोग्राफ; ज्यात ध्वनिमुद्रण केलेली तबकडी फिरवून वाजवता येते असे यंत्र.

**ग्राम्य** वि. १. खेड्यात उत्पन्न झालेले किंवा गावासंबंधी. २. गावठी; गावराणी; गावंढळ; खेडवळ. ३. माणसाळलेला (पशू). ४. लागवडीने उत्पन्न केलेले (शेतीचे उत्पन्न). ५. प्राकृत व इतर देशी (भाषा). ६. अश्लील; अशिष्ट; असभ्य. ७. अतिशय विषयासक्त. [सं.]

**ग्राम्यगीत** न. १. अश्लील पद, लावणी, २. खेडवळ गाणे, पवाडा इ. [सं.]

**ग्राम्यधर्म** पु. संभोग.

**ग्राम्यस्त्री** स्त्री. वेश्या; रांड : 'ग्राम्यस्त्रियांचे संगतीं जाणें।' - एभा ८.१३९.

**ग्राम्यालाप** पु. १. खेडवळ गप्पागोष्टी. २. लावणी; शृंगारिक कविता.

**ग्राव** पु. १. धोंडा, दगड : 'मुखें फाडिती ताडिती ग्रावधोंडा।' - मुरामा, युद्धकांड ११४. २. मेघ. ३. पर्वत : 'ग्रावाग्राहुनि भूतलीं उतरली ते स्वर्णदी सत्वरी।' - वैराग्यशतक ६८. [सं. ग्रावन]

**ग्रावस्तोता** पु. सोमवल्ली वाटण्यासाठी वापरण्यात येणाऱ्या दगडाची प्रार्थना करणारा यज्ञातील सोळा ऋत्विजांपैकी एक : 'होता मैत्रावरूण पोता। अछावाक ग्रावस्तोता।' - मुआदि १०.७४. [सं.]

**ग्रावा** पु. दगड. [सं. ग्रावन]

**ग्रास** पु. १. घास; अन्न. २. गट्ट करणे; गिळणे. ३. ग्रहण किंवा ग्रहण लागलेला भाग. ४. राज्य, संस्थान, सरदारी वडील मुलाला मिळते म्हणून धाकट्या मुलाला इतमाम चालविण्यासाठी मिळतो तो ऐवज. ५. नाश : 'ग्रासातेंही ग्रासूनि पुरता।' - ज्ञा १५.५५०. [सं.] (वा.) **तोंडाचा ग्रास नेणे, काढणे** - काम पुरे होत आले असताना त्याचा नाश होणे, करणे; आयत्या वेळी कार्य बिघडणे, बिघाड करणे.

**ग्रासणे** सक्रि. १. गिळणे; गट्ट करणे. २. लाच घेणे; अफरातफर करणे. ३. (ल.) व्यापणे; आच्छादणे (ढगाने आकाश, राहूने चंद्र-सूर्य). ४. (ल.) गंजणे (एखादी धातू); एखाद्या पदार्थाने खाल्ली जाणे; (वाळवीने लाकूड, गंजाने लोखंड इ.); कीट होणे. ५. निरुत्तर करणे; कुंठित करणे; गतिहीन करणे. ६. नाश करणे : 'ना तरी अर्जुना मी काळु। आणि ग्रासिजे तो माझा खेळु।' - ज्ञा ११.४९१. ७. (काहींच्या मते) त्रासविणे; पिडणे; छळणे. [सं. ग्रास, ग्रसन]

**ग्रासनलिका** स्त्री. (वै.) गलनाल; घशापासून जठरापर्यंतची मांसल नलिका.

**ग्राह** पु. १. नक्र; मगर; सुसर. २. पाणहत्ती. ३. (सामा.) समुद्रातील कोणताही मोठा प्राणी, जलचर : 'गज करवडी महाग्राह।' - एरुस्व १०.८०. [सं. ग्रह]

**ग्राह** न. पछाडणारे भूत : 'जैसें ग्राहाते पांचाखरी। अनुमानी कां॥' - राज्ञा २.८५.

**ग्राहक, ग्राही, ग्राहिक** वि. १. धरणारा; घेणारा; स्वीकारणारा. २. (ल.) योग्य गुणग्रहण करणारा; चाहता. ३. ज्ञाता; जाणता. (समासात) गुणग्राहक-रसग्राहक इ. ४. गिऱ्हाईक; माल विकत घेणारा : 'ग्राहीक पातला परमनिका।' - मुआदि १८.१२९.

**ग्राह (हि) की** स्त्री. १. गिऱ्हाइकी. २. खरेदी : 'आतां सुखेसि जीविता। कैंचीं ग्राहिकी कीजेल पंडुसुता।' - ज्ञा १.४९७.

**ग्राही** वि. ग्रहण करणारा.

**ग्राह्य** वि. १. मान्य; कबूल. २. स्वीकारणीय; घेण्याजोगे (क्रि. असणे, धरणे.) ३. पसंत, संमत; उचित.

**ग्राह्यांश** पु. तथ्य; सार; मुख्य भाग; चांगला किंवा उपयोगी पडण्याजोगा अंश; तात्पर्यार्थ; मान्य करण्यासारखा भाग : '(ते) त्यातील ग्राह्यांश शोधून काढीत असत.' - निअ ४८.

**ग्रांथिक** वि. १. ग्रंथासंबंधी; ग्रंथात आढळलेले; लेखी. २. गुंफलेला; ओवलेला; रचलेला. [सं. ग्रंथ, ग्रथ]

**ग्रीदाग्रीदी** क्रिवि. पहाऱ्यापहाऱ्याने : 'राखणाईत ग्रीदाग्रीदी राखत होते।' - गोच ७४.

**ग्रीबा** पु. भोपळा : 'मातुळग्रामीं ग्रीबा खाववर्णे' - स्थापो ९१.

**ग्रीवा** स्त्री. १. गळ्याच्या पाठीमागील बाजू; (सामा.) मान. २. कंठ; गळा : 'उदासीन जातो ग्रिवा दाटताहे।' - राक १९५. [सं.]

**ग्रीवाघंटा** स्त्री. १. गळ्याची घाट, गळ्यावरील डेरा. २. घुमट ठेवण्यासाठी भिंतीवर बांधलेल्या गोल बैठकीचा आकार : 'उपरी सोळावा अध्यावो। तो ग्रीवेघंटेचा आवो।' - ज्ञा १८.४०.

**ग्रीवास्थान** न. खड्ग; तलवारीचा एक प्रकार. [सं.]

**ग्रीष्म, ग्रीष्मर्तु-र्तू** पु. ज्येष्ठ आषाढ असा दोन महिन्यांचा काळ; उन्हाळा : 'नातरी ग्रीष्मकाळीं सरिता। शोषूनि जाती समस्ता।' - ज्ञा २.३५९.

**ग्रूत** न. १. काचा बसविण्याची लांबी. २. पिठाची खळ. (गो.) [इं.]

**ग्रॅम** पु. वस्तुमानाचे एकक; प्रमाणित किलोग्रॅमचा एकहजारांश भाग.

**ग्रोस** पु. बारा डझन; १४४ नग. [इं.]

**ग्लादी** स्त्री. काकुळती; दयेची याचना : 'तेवीचि ग्लादी करी' -लीचउ ५२४.

**ग्लान** वि. ग्लानीने युक्त; श्रांत; थकलेला; खिन्न; क्लांत; श्रमलेला (दुखणे, शोक, श्रम. इ. नी). [सं. ग्ले]

**ग्लानता, ग्लानि-नी** स्त्री. विनवणी; प्रार्थना, आर्जव; अजीजी : 'राघोबा पागे व राजाराम चोपदार यांणीं बहुत ग्लानता केली की, साहेब इचको बचाव करना.' - भाब ७२; 'या प्रसंगीं श्रीमंतांनी बहुत ग्लानी केली.' - होकै.

**ग्लानि-नी** स्त्री. १. घेरी; चक्कर. २. मांद्य; थकवा; शीण; सुस्ती; मांदगी. ३. खिन्नता; खंती : 'आयुष्य निमालें आंतुलियेकडे। ते ग्लानीचि नाहीं॥' - ज्ञा ९.५११. ४. क्लांती; श्रांतपणा. ५. उतरती कळा; दुर्बलता. [सं.] (वा.) ० **होणे** - नष्टांश होणे, कमी होणे.

**ग्लायडर** न. सुकाणूवर चालणारे, इंधन न देता हवेमध्ये उडू शकणारे विमान. [इं.]

**ग्लास** पु. १. पेला (काचेचा, धातूचा). २. (ल.) दारू; मद्य. [इं.]

**ग्लांती** स्त्री. १. नम्रपणाची प्रार्थना; काकुळत; विनवणी : 'ग्लांति लिहिता वेळोवेळां।' - एरुस्व ४.४४. २. दु:ख; आक्रोश; पश्चात्ताप : 'वासना नदी माहांपुरी। प्राणि बुडतां ग्लांती करी।' - दास ५.२.१३.

**ग्लिसरिन** न. एक औषध; पाक. तेले व चरबी यात सापडणारा शर्करांश, शोधन क्रियेने निराळा काढल्यावर हे द्रव्य तयार होते. हे चिकट, चवीला गोड, पातळ व जखमेला आरामकारक, थंडीने अंग फुटण्यावर गुणकारी. तसेच हवेत उडून न जाणारे असे आहे. [इं.]

**ग्लूकोज** न. (वै.) विशिष्ट प्रकारची साखर; द्राक्षजा; द्राक्षे व इतर अनेक फळे, मध इत्यादींमध्ये आढळते. मानवी रक्तातील आवश्यक घटक व ऊर्जेचा स्रोत.

**ग्वड्ड** वि. वांझ (जनावर). [का.]

**ग्वळ्ळी** स्त्री. तुरीचे टरफल. (बे.) [का.]

**ग्वाड** न. १. गूळ. २. गोड. (कु. बे.)

**ग्वाही** स्त्री. गोही; साक्ष; शपथेवर दिलेली जबानी; साक्षीपत्र : 'दुष्ट आचरण ग्वाही माझें मन।' - तुगा १८५७; एखाद्याच्या चांगुलपणाबद्दल खात्री. (क्रि. देणे.)

पु. साक्षीदार. [फा. गुवाही]

**ग्वाहीदार** वि. साक्षीदार.

■ ■



**घ** मराठी वर्णमालेमधील एकोणिसावे अक्षर आणि चौथे व्यंजन.

**घई** पहा : **गई** : 'योग्य जाहला संग म्हणावा काय घई या कैवारासी।' - राला ४३.

**घई** स्त्री. (घराच्या दालनाची) गर्भी; विस्तार; रुंदी; (समासात) दुघई; चौघई इ.

**घऊस** वि. लठ्ठ; धष्टपुष्ट.

स्त्री. घुशीसारखा लठ्ठ माणूस : 'शरिरानें बनली घऊस। तुला निजाया बसायची हौस।' - पला ७७.

**घघाची विद्या, बाराखडी** (घच्या बाराखडीतील) घेणे या क्रियापदापासून झालेला विशिष्ट वाक्प्रचार. घेऊ जाणे पण देऊ न जाणे अशी वृत्ती; दुसऱ्याचे घेण्याचे, लाटण्याचे ज्ञान, स्वभाव; लोभ; हावरेपणा; स्वार्थी वृत्ती; अप्पलपोटेपणा.

**घच्च** पु. 'रुतनेचा अवाजा.' - (तंजा.)

**घजन्फर** पु. १. सिंह. २. (ल.) वीर; योद्धा. [फा.]

**घजन्फरजंग** पु. एक बहुमानाची, युद्धनैपुण्यदर्शक पदवी; युद्धात सिंहाप्रमाणे शूर; रणसिंह. [फा.]

**घट** पु. (भौ.) रासायनिक क्रियेने विद्युतप्रवाह निर्माण करू शकणारे साधन.

**घट** न. सोंगट्या वगैरेच्या पटावरील घर. (गो.)

**घट** पु. १. पाणी इ. ठेवण्याचे भांडे; घडा; घागर (मातीची किंवा धातूची) : 'जैसीं भांडघटशरावीं। तदाकारें असे पृथ्वी।' - ज्ञा १३.८७३. २. नवरात्रात उपास्य देवतेजवळ पाण्याने भरून ठेवलेली मातीची घागर; घडा; कलश; नवरात्र बसणे; विशेष प्रकारची देवीची पूजा. (क्रि. बसणे.) ३. (ल.) विश्व; ईश्वराने निर्माण केलेले यच्चयावत जगत; शरीर इ. सृष्ट जीव, पदार्थ : 'म्हणौनि प्राणिजातांच्या घटीं। करूनि कंदावरी आगिठीं।' - ज्ञा १५.४०७. प्राणी, त्याचे शरीर : 'घटघटाभिमानीए अनुस्युत' - लीच १३३. ४. वाद्यविशेष. दक्षिण हिंदुस्थानात मातीचा माठ पालथा घालून त्याच्या पाठीवर दोन्ही हातांनी तबल्यासारखे वाजवून गायनाची साथ करतात. ५. नवरात्राकरिता कुंभाराकडून मातीची घागर घेण्याचा हक्क. (वा.) **० उठणे**- नवरात्र संपणे; **० घटी बसणे** - १. नवरात्र सुरू होणे; (नवरात्री मध्ये) आराध्य देवता घटावर अधिष्ठित होणे; देवतेची स्थापना होणे. २. घटस्थापना करणारा यजमान अथवा उपाध्याय यांनी घट असेपर्यंत व्रतनियमाने असणे इ. विधी प्रचलित आहेत. ३. (ल.) (आजारामुळे, आळसामुळे किंवा इतर काही कारणामुळे) घरात बसून असणे. ४. (ल.) (स्त्रीने) विटाळशी होणे; अस्पर्शपणामुळे निरुद्योगी बसून असणे. [सं.]

**घट, घटती** स्त्री. १. दागिने तयार करताना, घासताना, कानसताना त्यांचे गोळा न करता येण्यासारखे परमाणू उडाल्याने मूळ वजनात येणारी तूट : 'गाळणींत, घाट करण्यात अगर वहिवाटींत लागलेली घट खर्च घालण्याची मंजूरी देणे.' - (बडोदे) खाजगी खात्यांतील अंमलदारांचे अधिकार १७८. २. धान्य मापताना, तूप इ. पदार्थ तोलताना मूळ मापात-वजनात होणारी तूट, घस : 'आमचा माल निर्मळ असून त्यांत घट फार निघाली अशा प्रकारे पुष्कळ बोभाटे नेहमीं पत्रांतून येतात.' - मुंव्या प्रस्तावना ५. ३. नुकसान (गळती, नास, आटणी इ. मुळे झालेले); तूट (क्रि. येणे, लागणे.) ४. (सामा.) ऱ्हास; उतार; कमी होणे; बटाव. (क्रि. येणे, लागणे.) ५. (मातकाम) घोटकाम करताना किंवा कोरीव काम करताना खाली पडलेली माती.

**घट** (प्र.) घट्ट.

**घटइल** वि. वाळलेले; शुष्क: 'म्हाइंभटासि... घटइलें ऐसें (अन्न) भीक्षेसि घालिती।' - गोप्रच २५०.

**घटक** पु. १. पूर्णाचा एक भाग; अंगभूत अवयव. २. मूलमान; एकक : 'यानंतर गांव सुटून घराणें हा सामाजिक घटक झाला.' - सासं २.४१९.

**घटक** पु. एखादी वस्तू, पदार्थ ज्या ज्या द्रव्यांनी बनलेला असतो त्या त्या द्रव्यांपैकी प्रत्येक; (रसा.) मिश्रणातील कोणतेही स्वतंत्र द्रव्य.

**घटक** पु. १. (ग.) गुणाकाराच्या गुणकांपैकी एक गुणक. २. (संख्या.) संशोधनात विचारासाठी घेतलेला एखादा चल अथवा विशेषक. ३. (संख्या.) चलांच्या गटातील सहसंबंधाचे स्पष्टीकरण करण्यासाठी उपयोगात आणला जाणारा फक्त एकाच चलात दिसून येणारा किंवा अनेक चलात सर्वसामान्य असणारा निर्धारक अथवा कारक.

**घटक** पु. (शिक्षण) १. पाठ्यवस्तूंच्या संदर्भात वापरला जाणारा शब्द; अध्ययन, अध्यापनाचा भाग, अंश; दैनंदिन अध्यापनाच्या दृष्टिकोनातून केलेले पाठ्यवस्तूचे विभाजन. २. चाचणीच्या रचनेतील सर्वात लहान घटक. उदा. खरे खोटे चाचणीतील प्रत्येक विधान.

**घटक** पु. १. मध्यस्थ; मध्यस्थी करणारा; दोन पक्षात तडजोड करणारा (विशेषतः लग्ने जुळविताना.). २. (सामा.) व्यवस्थापक. ३. घडविणारा; कार्यसाधक : 'क्रोधन नामा यत्नें आला नृपकार्यसिद्धिचा घटक।' - मोरा १.७२. ४. ज्योतिषी. ५. कर्ताकरविता (पर्यायाने ईश्वर). [सं.]

**घटककण** पु. अंशभूत, अवयवभूत अणू : 'मांसाच्या घटक - कणास चलनवलनाचे.... इत्यादी कामें नेमलेलीं असतात.' - आरोशा १.४.

**घटकद्रव्य** न. (मिश्र पदार्थातील, धातूंतील) अवयवभूत पदार्थ.

**घटकधातू** पु. मिश्रधातूंतील अवयवभूत मूल धातू : 'पण कांहीं गुणांनीं मिश्रधातू घटक - धातूंहून भिन्न असतो.' - मपु ६. १६८.

**घटक पृथक्करण** (शिक्षण) प्रमाणित चाचणी तयार करताना त्यातील घटकांचे केलेले शास्त्रशुद्ध पृथकरण.

**घटकप्रेरणा** स्त्री. फलित प्रेरणा ज्या भिन्न भिन्न प्रेरणांपासून उत्पन्न झालेली असते त्या प्रेरणांपैकी एक; अवयवभूत प्रेरणा : 'फलित प्रेरणेच्या संबंधाने प्रत्येक प्रेरणेस घटकप्रेरणा म्हणतात.' - यंस्थि ६.

**घटक बाजार** (अर्थ.) भूमी, श्रम, भांडवल ही उत्पादनाची साधने किंवा उत्पादन घटक होत. उद्योजकाला हे घटक त्या साधनांच्या मालकाकडून खरेदी करावे लागतात. उद्योगाचे संयोजन करणारा उद्योजक आणि

साधनांचे मालक यांच्यामधला विनिमय व्यवहार हीच घटकांची बाजारपेठ.

**घटकभाग** पु. फलाचा अंश; रचनेतील मूळ निरनिराळे भाग : 'जेव्हां घटकप्रेरणा एकमेकांशी काटकोन करतात तेव्हां त्यांपैकीं प्रत्येक घटकास मूळ प्रेरणेच्या त्या दिशेतील घटकभाग असें म्हणतात.' - यंस्थि १५.

**घटकभार** पु. (शिक्षण) १. घटक संरचित साच्यांमधील नोंदी. २. घटक काढीत असताना झालेली चाचणीची संपृक्तता. ३. काढण्यात येणाऱ्या घटकाचा विशिष्ट चाचणीशी असणारा सहसंबंध.

**घटकराज्य** न. संघराज्याचा स्वतंत्र भाग असलेले राज्य.

**घटकविश्लेषण** न. (शिक्षण.) १. मूळ साच्यामधील मूल्यांच्या गणांतील सहसंबंधाचे विश्लेषण करण्याची एक पद्धत. २. चाचणी अगर चाचण्यांमधील सहसंबंध ह्यांचे विश्लेषण करण्याची एक पद्धत.

**घटक सप्रमाणता** ज्याच्याशी चाचणी सहसंबंधित असते अशा प्राथमिक घटनांच्या सूचीच्या अथवा त्या घटकांच्या चाचणीतील प्रमाणांच्या साहाय्याने मोजली जाणारी चाचणीची वैधता.

**घटकसारणी** स्त्री. रासायनिक संयुक्त पदार्थ कोणत्या मूलद्रव्यांचा बनलेला आहे, ते मूल पदार्थ कसे निराळे करता येतात. इ. माहिती दर्शविणारी सारणी, आराखडा.

**घटकंचुकी पंथ** पहा : **काचोळी पंथ**

**घटका** स्त्री. तोंड खाली करून वाद्यासारखे वाजवायचे एक भांडे : 'समागमें हत्तीवर घटकाहि वाजत होती.' - भाव ६७.

**घटका** स्त्री. १. साठ पळांचा किंवा चोवीस मिनिटांचा काळ; एक विशिष्ट कालविभाग; कालाचे एक परिमाण; दिवस व रात्र मिळून होणाऱ्या कालाचा साठावा भाग. अडीच घटकांचा एक तास होतो. २. घटिकापात्र [सं. घटिका] (वा.) **एखाद्याची घटका घातलेली असणे** - एखाद्याला अंतकाळच्या वेदना होऊ लागणे; मरणोन्मुख अवस्था, स्थिती असणे; अंतकाल जवळ येणे. ० **घालणे** - १. निश्चित वेळ ठरवणे. २. मरण अगदी जवळ आलेले असणे. ० **भरणे** - १. दिलेली, ठरलेली मुदत संपणे. २. विनाशकाल जवळ येणे; आयुर्मर्यादा पूर्ण होणे, संपणे; आयुष्य संपुष्टात येणे : 'इंग्लिशांच्या सत्तेची घटका आता भरत आली आहे.' - के १०.६.३०.

**घट(टि)कापात्र** न. कालमापनासाठी वापरले जाणारे, तळाशी छिद्र असलेले, धातूचे द्रोणाकृती पात्र. हे पात्र भरून बुडाले की एक घटका होते. लग्नप्रसंगी मुहूर्त साधण्यासाठी या पात्राचा उपयोग करतात.

**घटकाभर** क्रिवि. १. तूर्त; सध्या. २. थोडा वेळ; अंमळ; किंचित्‌काल.

**घटकावेळ** स्त्री. नेमकी वेळ; निश्चित समय.

**घटकेचा गुण** कालमाहात्म्य; वेळेचा गुण, सामर्थ्य; वेळेचा परिणाम; विशिष्ट काली विशिष्ट क्रिया घडल्यामुळे त्या कालाचा त्या क्रियेवर होणारा सामान्यतः वाईट परिणाम.

**घटकेचे घड्याळ** (ल.) क्षणभंगुर जीवित; नश्वर देहाची किंवा अशाश्वत वस्तू इ. टिकण्याची शाश्वती नसते तेव्हा म्हणतात.

**घटक्रिया** पहा : **घटस्फोट** : 'तदनंतर हिंदूरीतीप्रमाणे विधियुक्त घटक्रिया करून....' - राजकार ५. (गो.)

**घटघट-टा** क्रिवि. पाण्याचा घोट गिळताना किंवा पाणी पिताना घशात होणारा आवाज. (क्रि. पिणे, घोटणे.) : 'घटघट त्या स्व- हितासृगुदका पी।' - मोकर्ण ४५.१४; 'मदमुखांचिया घटा। घेतु आहाति घटघटा।' - ज्ञा ११.३८९. [ध्व.]

**घटघटीत** वि. दाट; घट्ट : 'पिंपळाच्या कचातनं घटघटीत चीक बाहीर येऊ लागला.' - गोता १३३.

**घटण-णा** न. स्त्री. १. पहा : **घटन, घटना**. २. भेट; एकी; एकत्र येणे; संघटन : 'महाकार्यार्थ आगमन। होतां झालें आमुचें घटण।' - निमा १.१५०. [सं. घटन]

**घटण** स्त्री. ढाळ; मूस; साज; पोत; वीण; तलम, बनावट, रचना.

**घटणिया** स्त्री. घडण; ठेवण; रचना : 'दोही बाही घटणिया चांगी।' - वसा ३६. [सं. घट्]

**घटणूक** स्त्री. (लग्न इत्यादी संबंधात) रदबदली, मध्यस्थी घडवून आणण्याची खटपट, बेत, सल्लामसलत.

**घटणे** अक्रि. १. घडणे; होणे : 'ऐसेंनिहि प्राणसंकटें। जरी विपायें पां निघणें घटे।' - ज्ञा २. २०५. २. सिद्ध होणे; फलद्रूप होणे : 'त्यांस आम्ही जाबसाल घटे तसा करावा तरी समई नाहीं पेचांत आहो.' - पेद ५.७४. [सं. घट्]

**घटणे** अक्रि. १. (कापड इ.) आकसणे; आखडणे; लहान होणे. २. (धान्य, तेल, तूप, गूळ इ. पदार्थ मापात, वजनात) कमी होणे. ३. शांत होणे; नाहीशी होणे; शमणे. ४. घट्टे पडणे; झिजणे; (शिथिल अवयव) घट्ट होणे : 'कटि खांदे वाहतां घटले।' - मध्वमुनी (नवनीत ४४६.). [सं. घृष्ट, घट्ट.]

**घटणे** अक्रि. (शरीर, अवयव इ.) बळकट होणे; मजबूत होणे; भरदार बनणे; सुदृढ बनणे.

**घटणे** अक्रि. १. (शास्त्राभ्यास, कला इ. व्यासंगाने) घोकून घोकून, घोटून घोटून पक्का होणे; पाठ होणे : 'गांवठी शाळेंतील मुलें अक्षर घटावें म्हणून बखरांच्या नकला करितात.' - विवि ८.८.१४८. २. (शास्त्रात, कलेत, मनुष्याने) तरबेज, निष्णात, कुशल होणे; सरावणे.

**घटणे** अक्रि. योग्य दिसणे; शोभणे; साजणे; सजणे.

**घटणे** क्रि. लोटणे; ढकलणे; कंठणे.- (तंजा.)

**घटती** स्त्री. नुकसान; ऱ्हास; घट; अवनती.

**घटन** पहा : **घटना**

**घटना** स्त्री. १. निरीक्षणास वाव असलेली वस्तुस्थिती, घडलेली स्थिती (गोष्ट) अथवा परिस्थिती. २. (तत्त्व) वास्तविकत्व; वास्तविक अस्तित्वात असलेले काहीतरी; वास्तविक घटित होणे. ३. (तत्त्व.) इंद्रियगोचर; ज्ञानेंद्रियांनी समजण्यासारखे काहीही.

**घटना** स्त्री. (राज्य.) १. संविधान. २. राज्याच्या सभेच्या किंवा संस्थेच्या अंतर्व्यवस्थेच्या कारभाराची नियमावली, कायदेकानू : 'हिंदी स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीच्या घटनेबद्दलचा हा लेख येथें संपवितो.' - केले १.४९.

**घटना** स्त्री. १. घडणे; निर्मिती; घडण; कृती; रचना; विधिघटना; योजना. २. हस्तकौशल्य; कलाकुसरीचे काम. ३. प्रसंग; बनाव; उपस्थिती :

'काननामाजीं पडलें घटन। डोंगरारण्यीं कैचें जीवन।' - दावि २८०. ४. पहा : **घटणूक** : 'येईल शीघ्र घटना करूनी तियेची।'-र ३०.५. कार्याची योजना : 'कोणत्याही एका घटनेचा बिघाड झाला असतां तिच्या जागीं दुसरी घटना करावयाची झाली तर...'-केले १.४१. ६. निर्मिती; बनण्याची क्रिया, पद्धत. ७. (शाप.) संयोगीकरण; समाहार. [सं. घट् - घटना]

**घटनात्मक** वि. १. राज्यघटनेशी, संविधानाशी संबंधित. २. विधायक; रचनात्मक. ३. निर्मिती, घटना याबद्दलचा; घटनेसंबंधी.

**घटनामंडळ** न. (एखाद्या संस्थेची, सभेची, राज्याची) घटना तयार करण्याकरिता नेमलेले मंडळ.

**घटनावाद** पु. (तत्त्व.) आपले ज्ञान दृश्यप्रपंच अथवा दृश्यजगतापुरतेच मर्यादित असते असा दृष्टिकोन. या मतानुसार दृश्यप्रपंचामागे एखादे अदृश्य तत्त्व आहे याचा अस्वीकार तरी केला जातो अथवा अशा तत्त्वासंबंधी अज्ञेयवाद तरी स्वीकारला जातो.

**घटनासमिति-ती** स्त्री. देशाची राज्यरचना कशा प्रकारची असावी हे ठरविण्यासाठी नेमलेले कायदे तज्ज्ञांचे मंडळ.

**घटनासादृश्य** न. समधर्मता; सममूलता; घटनेतील सारखेपणा.

**घटनासापेक्ष** वि. (विधि) आनुषंगिक; प्रसंगोपात्त. [सं.]

**घटपट, घटंपटं** स्त्री. न. न्यायशास्त्रात नेहमी घट (घडा) व पट (वस्त्र) यांची उदाहरणे देण्याची चाल आहे. त्यात घट व पट हे शब्द पुढील अर्थी रूढ आहेत. १. फुशारकीचे - शेखीचे - चढाईचे - पोकळ ऐटीचे भाषण. २. असंबद्ध, टाळाटाळीचे बोलणे. लप्पंछप्पं; थाप. ३. निष्कारण उरस्फोड; वाचाळता; व्यर्थ बडबड; माथाकूट; वितंडवाद; शब्दावडंबर. कवी निरंकुशतेचे भोक्ते असल्यामुळे नैयायिक व वैय्याकरणी यांनी घातलेल्या भाषेवरील व्याकरणविषयक निर्बंधाच्या खटाटोपास घटपट असे हेटाळणीने संबोधतात : 'नलगे व्याकरणाची न्यायाची घटपटादि खटपट ती। वैकुंठ पेठ मोठी नामावरि हीनदीन खट पटती।' - कीर्तन १.३७.

**घटपर्ण** न. (वन.) कीटकभक्षक वनस्पतींच्या रूपांतरित पानाचा टोकाकडील चंबूसारखा भाग.

**घटपर्णी** स्त्री. (वन.) रूपांतरित चंबूसारखी पाने असलेली एक कीटकभक्षक वनस्पती.

**घटपाण** न. शक्ती; सामर्थ्य; बळकटपणा; घट्टपणा. (गो.)

**घटबड** स्त्री. चढउतार. (झाडी)

**घटभंग** पु. घटाचा नाश; घागर फुटणे : 'घटभंगीं घटाकाशें। आकाश जेवीं॥' - ज्ञा १४.५४.

**घटमठ** पु. १. घट आणि मठ. २. (ल.) सर्व सृष्ट वस्तू (ज्यात पोकळ अवकाश आहे अशा) : 'घटमठ नाम मात्र। व्योम व्यापक सर्वत्र।' - ब २६२. घटाकाश आणि मठाकाश असे प्रयोग वेदान्तात आहेत.

**घटमान** वि. १. चालू असलेले; हाती धरलेले, घेतलेले. २. होणारे; घडणारे; घडण्याजोगे; संभवनीय : 'म्हणूनि दुर्घटत्त्व हें भूषण। मायेसी नव्हे दूषण। ती ब्रह्मी असे घटमान। तरी माया नव्हे ती।' - विपु ३. [सं.]

**घटमाळ** स्त्री. नवरात्रात देवीच्या पूजेकरिता स्थापना केलेल्या घटावर सोडलेली फुलांची माळ; देवतांप्रीत्यर्थ बसविलेला माळेसहित घट.

**घटमूट-ठ** वि. १. धडधाकट; सुदृढ; मजबूत बांध्याचा; भक्कम. २. टिकाऊ; मजबूत, घट्ट विणीचे (धोतर, कापड इ.); भरीव : 'गुलमट कलसे, घटमुठ दिसती, हुमनाबादी निपटनिरुंदी, कलबुर्गा हलबुर्ग लूगडें।' - अमृत ४९.

**घटवटना** स्त्री. १. मध्यस्थी; वाटाघाट; चर्चा; रदबदली; जुळवाजुळव (विशेषत: लग्नासंबंधीची). २. विचार; चर्चा : 'जावें न जावें अशी मनाशीं घटवटना करीत तो इकडे आहे.' - वज्राघात १३३.

**घटवध** स्त्री. (वजन-माप-इ.तील) तूट अथवा वाढ; कमजास्तपणा. [गुज.]

**घटवना** क्रि. १. कमी करणे. २. अपमान करणे. (झाडी)

**घटवाई** पु. घाटावरील कर घेणारा. [हिं.]

**घटवाई, घटाई** स्त्री. धडधाकटपणा. पहा : **घट्टाई**

**घटवाटप** न. घरदार, भांडीकुंडी, जमीनजुमला इ.ची कुटुंबियात वाटणी. (को.)

**घटवात** स्त्री. १. नवरात्रात घटाजवळ अखंड दिवा तेवत ठेवणे. २. या हक्काचे वेतन, मान : 'होलीस पोली व घटवात वगैरे मानपान जो घ्यावयाचा तो घेतो.' - मसाप २.१७२.

**घटसर्प** पु. १. घशाला सूज येऊन होणारा एक सांसर्गिक रोग. २. घाटसर्प; गळ्याला विळखा घालणारा साप: 'तो मदनाचा घटसर्पु काढी। तरि मी सत्य होएं।' - शिव १९८.

**घटसान** वि. बळकट; घट्ट; मजबूत. (गो.) [क. घट्टीसु = शक्ती मिळविणे]

**घटस्थापना** स्त्री. घट बसविणे; देवतेची घटावर स्थापना; देवप्रतिष्ठा. आश्विन शुद्ध प्रतिपदेला मातीच्या स्थंडिलावर घट ठेवतात व त्यावर पूर्णपात्र ठेवून त्यात कुलदेवतेची स्थापना करतात. नंतर तिची नऊ दिवस पूजा करतात. दररोज घटावर फुलांची नवी माळ लोंबती बांधतात. अखंड दीप जाळतात. तसेच सप्तशतीचा पाठ इ. कर्मे करतात. या विधीला घटस्थापना म्हणतात.

**घटस्फोट** पु. १. (मृत्यू, फारकत इ. दर्शक) घडा फोडणे : 'जेवीं नष्टलिया, पुत्रासी। पिता घटस्फोटें त्यागी त्यासी।' - एभा २३.४८८. २. नवराबायकोची फारकत; कायदेशीर विवाहविच्छेद; नवराबायकोंनी विवाहाचे बंधन रद्द ठरवून स्वतंत्र होणे; सोडचिठ्ठी; काडीमोड : 'इंग्रज लोकातील घटस्फोटाचे वाईट वाईट खटले कोर्टापुढें येतात....'- लोटिकेले ४.९५. (क्रि. घेणे.) ३. (ल.) पतिताचा जिवंतपणी प्रेतविधी; जो पतित प्रायश्चित्त घेऊ इच्छित नाही त्याला वाळीत टाकण्याकरिता - समाजाच्या दृष्टीने तो मेलेलाच आहे दर्शविण्यासाठी - मातीची घागर फोडणे इ. अशुभ क्रिया, विधी. ४. जातिबहिष्कृत करणे : 'जारकर्मांत विधवा गरोदर सांपडली असतां तिला बहिष्कृत करून तिचा घटस्फोट नामक विधी करतात.' - व्यनि २.

**घटस्फोटित** वि. ज्याने किंवा जिने घटस्फोट घेतला आहे अशी व्यक्ती : 'आठवे एडवर्ड ह्यांनी वालिस सिंपसन ह्या घटस्फोटित अमेरिकन स्त्रीशी लग्न करावयाचे ठरविल्यामुळे....' - हुंदके १७९.

**घटंपटा** स्त्री. खटपट; अवडंबर; लटपट. (व.)

**घटा** स्त्री. १. समुदाय; जमाव; टोळी; कळप : 'जैसे न गणिजे पंचाननें। गजघटांतें॥' - ज्ञा १.९२. २. मेघजल; मेघमंडल; मेघमाला.

**घटा** पु. १. भोपळ्याचे, कलिंगडाचे कोवळे फळ. (को.) २. हरभऱ्याचा टरफलासहित दाणा, शेंग. पहा : **घाटा**

स्त्री. (प्रा.) घडण; घटाव; रचनाविशेष; घाट; तऱ्हा; बांधा : 'शरीरसंपती तरुण तयारिंत गर्द घटा दुसरी.'-प्रला १५४. [सं. घट]

**घटा, घट्टा** पु. घसरण्यामुळे शरीराच्या एखाद्या अवयवावरील भागाचे रक्त साकळल्याने घट्ट झालेली जागा. [सं. घृष्ट]

**घटाई** स्त्री. १. घटवाई. पहा : **घट्टाई**. २. लूट; कमीपणा; घट. [सं.]

**घटाई** स्त्री. बनाव; व्यवस्था. २. निश्चय; दृढता.

**घटाकाश** न. (वेदान्त) घटातील पोकळी; अवकाश; रिती जागा : 'कोणें धरोनियां आकाश। घटीं घातलें सावकाश। तरी घटयोगें घटाकाश। मिथ्या गगनास नांव आलें।' - एभा १३.७३२.

**घटाटोप** पु. १. (गाडी, पालखी, हौदा, पलंग, देव्हारा, अंबारी, रथ इत्यादिकांचा) घुमटाकार चांदवा; मंडपी; छत. २. घुमट; डेरा.

**घटाटोप** पहा : **खटाटोप**

**घटाटोप** पु. पोकळ आवरण; गवसणी: 'मिरजेहून घटाटोप पावल्याचे उत्तर आलें कीं, नाहीं?' - ऐलेसं ५३५६. (वा.) ० **करणे** -जामानिमा करून सज्ज होणे; चिलखत वगैरे घालून शस्त्रसज्ज करणे : 'सदाशिव खिजमतगार यांजला दरवाजाबाहेर चारजण व कोठीकडील माडीवर एक दोन घटाटोप करून बसविले.' - ऐलेसं ६१९१.

**घटाली** स्त्री. एक फुलझाड. (झाडी)

**घटाव** पु. १. (सैन्य इत्यादिकांची) मांडणी; रचना : 'कलम ज्यारीचे घटाव मचले। मोंगलावर मोर्चे रचले।' - ऐपो २१४. २. (सुरू असलेल्या, योजिलेल्या कामाच्या दिग्दर्शनार्थ) मांडणी; थाटमाट; देखावा; डौल (क्रि. घालणे.) : 'गरतिचा अवघा साज करून या घटाव घटून।' - होला १००. ३. (भाषणाचा, कृतीचा) झोक; स्वरूप; ढब; रूपरेखा : 'बाई घटाव खुब स्वारिचा। चाले गोल थटुन बाहारिचा।' - प्रला ११७. ४. मिलाफ; मेळ; संयोग; अनेक पदार्थ एकत्र केल्याने उत्पन्न होणारा गुणविशेष; उत्पन्न होणारा परस्परांचा आनुकूल्य भाव : 'आनंद घटाव ब्रह्म कटाव।' - दावि ३१३. ५. पहा : **घटना** [सं. घट]

**घटावणे** अक्रि. तयार होणे; सराईत होणे : 'भाषणें उतरून ठेवण्याच्या कलेत तो घटावत गेला.' - नि ६९१.

**घटाळणे** सक्रि. गटागट पिणे : 'व्याग्रेस्वराकडे धाव घेतो नि बोंडलीचं तांब्याभर पाणी घटाळतो.' - गाबा ११.

**घटिका** स्त्री. लहान घडा.

**घटिका** स्त्री. साठ पळे; चोवीस मिनिटांचा काल; घटी. पहा : **घटका** : 'म्हणौनि उपजतखेंवो बुडाली। लग्नघटिका।' - ज्ञा ६.४७१.

**घटि(टी)कायंत्र** न. १. कालगणनेसाठी वापरण्यात येणारे, तळाला छिद्र असलेले पात्र. २. रहाटगाडगे : 'उपजे तें नाशे। नाशलें तें पुनरपि दिसे। हें घटिकायंत्र जैसें। परिभ्रमे गा॥' - ज्ञा २.१५९.

**घटिकास्थान** न. घटाच्या आकाराचे लहान देऊळ : 'स्वयंभ घटिकास्थान वटेस्वर देवालय।' - वेळापूर शिला ४.१.७.

**घटिकास्थापन-ना** न. स्त्री. विवाहादी मंगल कार्यात मुहूर्त साधण्यासाठी वेळ मोजता यावा म्हणून सूर्योदय होताक्षणी पाण्यात घटिका (पात्र) टाकण्याचा विधी.

**घटिगोपुर** न. घड्यांचा, मातीच्या कलशांचा मनोरा.

**घटित** न. (विप्र.) घटीत. १. पत्रिकांवरून ठरणारे वधूवरांच्या ग्रहांचे आनुकूल्य; (वधूवरांच्या) ग्रहयोगांची जुळणी; पत्रिका जुळणे. (क्रि. उतरणे, जमणे, काढणे, पाहणे, ठरवणे.) : 'कृष्ण अगुणांचा अरूप। कन्या सगुण आणि स्वरूप। दोहींशीं घटिताचा विकल्प। शून्यसंकल्प सोयरीके॥' - एरुस्व १.९६. २. मैत्री; सख्य; मिलाफ. (क्रि. जुळणे, जमणे, होणे, जुगणे.) ३. दैव; नशीब; संचित; दैवयोग; पूर्वकर्म; भवितव्य : 'शरीर संबंधाचे कारण। घटित आहे मज अधीन।' - एरुस्व २.३४.

**घटित** वि. (समासात) युक्त; बनलेले; रचलेला. जसे : - सुशब्दघटित; अनुस्वारघटित.

**घटितार्थ** पु. १. खल करून, विचारविनिमय करून काढलेला निष्कर्ष. २. दैवयोग; भवितव्य; कर्मगती. ३. (वधूवरांचे) घटित; पत्रिकांचा मेळ, जुळणी : 'ब्राह्मणीं घटितार्थ पाहिलें। गुण छत्तीसही उतरले।' - भवि २.५७. [सं.]

**घटिवत** वि. घड्याळाचे काटे फिरतात त्याप्रमाणे; समोरून पाहताना वरपासून खालपर्यंत उजव्या दिशेने.

**घटी** स्त्री. १. घटका. पहा : **घटिका**. २. घडी; घड्याळ; तासांचे ठोके वाजवण्यासाठीची मिश्र धातूंची वाटोळी व जाड तबकडी; तास. [सं.]

**घटी** स्त्री. लहान घडा, मडके. (समासात) मृद्घटी, सुवर्णघटी : 'कां झांकलिया घटीचा दिवा। नेणिजे काय जाहला केव्हा।' - ज्ञा ८.९८. [सं.]

**घटी** स्त्री. खुबी; कळ; युक्ती. (गो.)

**घटी** स्त्री. गळा. (झाडी) [सं.]

**घटी** वि. कडक; घट्ट; मजबूत; टणक (बोरू, इ.) : 'नाना देशींचे बरू आणावे। घटी बारिक सरले घ्यावे।' - दास १९.१.१६.

**घटीगोत्र** न. पत्रिका आणि गणगोत्र. (क्रि. मिळणे, येणे, जमणे, जुळणे)

**घटी (टि) लग्न** न. गोरज मुहूर्ताखेरीज अन्य शुभ मुहूर्तावर लागणारे लग्न.

**घटीव** वि. १. कमावलेले, सुदृढ, बळकट, कणखर झालेले (शरीर, शरीरावयव). २. घोटलेले; चांगले वळलेले; वळणदार (अक्षर, लेखन, हात). ३. परिशीलनाने, अभ्यासाने पक्की झालेली (कला, विद्या). ४. कसबी; सराईत झालेला; सरावलेला; कुशल बनलेला (मनुष्य). ५. (सराईत हाताने) उत्तम रीतीने केलेले; तडीला नेलेले, उत्कृष्टपणे साधलेले (काम इ.). [सं. घट]

**घटीवरी** क्रिवि. आकंठ. (झाडी)

**घटे** क्रिवि. घट्टपणे; निश्चयेकरून; खात्रीने.

**घटोत्कच** पु. भीमाला हिडिंबा नामक राक्षसीपासून झालेला मुलगा. हा अत्यंत शूर व इंद्रजालविद्येत कुशल होता. [सं.] **घटोत्कचाचा बाजार**

– १. माया; मायावी बाजार. घटोत्कचाने वत्सला - अभिमन्यू यांच्या विवाहाच्या वेळी एक मायावी बाजार तयार केला होता या कथेवरून. २. (ल.) फसवणूक. **घटोत्कचाची माया** – फसवणूक; कपटयुक्ती; जादू; भुरळ : 'आमचे महाजन आतां मात्र याच्या घटोत्कची मायेंत पूर्णपणे सांपडल्यासारखे दिसतात.' - माझी बहीण.

**घट्ट** वि. १. बळकट; मजबूत; भक्कम; घटमूठ (शरीर, मनुष्य, कापड इ.). २. घन; दाट; पाण्याचा अंश कमी असलेले (दही, दूध, पातळ पदार्थ). ३. पक्के आवळलेले; गच्च बसलेले; सैल नसलेले (झाकण, चौकट, पट्टी.). ४. दु:खाला न भिणारे; कठोर; हळुवार नसलेले (मन इ.) : 'मन अंमळ घट्ट केलें पाहिजे.' - रप्र १०६. ५. निलाजरा; निर्लज्ज; बेशरम; कोडगा; निगरगट्ट : 'घट्ट मोठी हो जोगडी जाती।' - दावि ३४७. ६. अचाट; न डळमळणारे : 'पहा धैर्य हें केवढें घट्ट।' - दावि ३९. [क. ग(घ)ट्टी] (वा.) ० **करणे** – पाठ करणे; घोकून मनात पक्के करणे.

**घट्टण, घट्टाण** न. निर्मूलन; नि:संतान. (गो.)

**घट्टमुट्ट** वि. भक्कम; दांडगा : 'दिसायला थोडी घट्टमुट्ट पण अनवाणी, जीर्ण सुडके नेसलेली...' - पुअं ५२.

**घट्टव** न. जमीनदोस्त झालेल्या इमारतीच्या खुणा; पडक्या इमारतीचे अवशेष. (गो.)

**घट्टवणे** सक्रि. जोराने दाबणे : 'जानराव त्याच्या डोळ्यांवर आपले पंजे घट्टवत होता.' - धग २५.

**घट्टा** पु. १. जखमेभोवती तयार होणारा कोशिकांचा थर. २. घर्षणामुळे त्वचा घट्ट, राठ होणे; त्यामुळे त्वचेला पडणारी खूण : 'आम्हा शुद्रांच्या गळ्यातील दासत्वाच्या पट्टयाचा घट्टा कोणासहि जलदी घासून काढवणार नाही.' - जोफु १३४.

**घट्टाई** स्त्री. १. (कापडाचा) घटमूटपणा; विणीचा घट्टपणा. २. (शरीराचा, इमारतीचा) भक्कमपणा; दृढता; मजबूतपणा. ३. आवळपणा; पक्केपणा (बांधलेल्या पट्टीचा, बंधनाचा). ४. (पातळ पदार्थांचा) घट्टपणा; पाण्याचा भाग कमी असल्याची स्थिती; दाटपणा; घनता.

**घट्टी** स्त्री. जात्याची तळी; घरटी. (खा.) [सं. घरट्ट]

**घट्टीकरण** न. (रसा.) द्रवस्थितीतून घनस्थितीत रूपांतर करणे; घनीकरण; विरजणे.

**घट्मूट, घट्टा, घट्टाघोळ** पहा : **घटपट, घटमूट**

**घट्य** वि. जाड : 'घट्य कागद आणावें। ...नानापरी।' - दास १९.१.१४.

**घठार** न. रांजण, मडकी ठेवण्याचे कोठार : 'तेलातूपाचेया घठारा।' - राज्ञा १६.३९३.

**घठ्ठ** पु. काठी; दंडा : 'हातीं घठ्ठ, शरीर घट्ट प्रथमे येकाचि ये सासुरा।' - आ नवरस चरित्र ३२.

**घड** पु. १. (फळांचा) गुच्छ; घोस; फाडा; लोंगर : 'कां येऊनि फळाचा घडु। पारुषवी केळीची वाढु।' - ज्ञा १८.९६८. २. आकार; डौल; घाट : 'बाप विंदानीं हृषीकेश। तेणें घड कळास मेळविला।' - एभा २८.६९६. ३. (ल.) वृषण. ४. चारपाच वाट्या जोडून कोशिंबिरी, चटण्या इ. ठेवण्याचे तबकासारखे केलेले पात्र, संच, पाळे : 'चांदीच्या वाट्यांचा घड मध, तूप व साखर ठेवलेला.' - ऐरापुप्र ८.४१३. ५. टोळी; जमाव; झुंड : ६. जुळणी; मिश्रण; मिलाफ; ऐक्य. (को.) ७. (ल.) सख्यभाव; सलोखा. ८. (सामा.) समुदाय; जुट; जुडगा. [सं. घट्]

**घडई** स्त्री. घडण; घडकाम : 'हातानें घडई पुरी करून भांड्यास सुबकपणा आणावा लागतो.' - पदाव ४८.

**घडका** पहा : **घटका**

**घडकाम** न. १. (धातूंची भांडी वगैरे) घडविण्याचे, बनविण्याचे काम, कला. २. (भांडी वगैरे) घडण्याच्या कामातील कुशलता, कारागिरी. ३. (हातोड्याने घडलेल्या, ठोकून तयार केलेल्या वस्तूंचा) घाट; आकार; घडण; ढाळ.

**घडग(घ)शीळ** न. खडकाळ, ओबडधोबड, उतरण.
वि. खडकाळ; कडा तुटलेला; ओबडधोबड. (राजा.)

**घडघड-डा** क्रिवि. १. (गाडी, रथ इ. चालताना होणारा) घड घड असा आवाज करीत. २. अस्खलित; न अडखळता; मोठ्याने; झरझर : 'हस्तलिखित पोथ्या त्या घडघड वाचू शकत' - कोरकि २२. [ध्व. घडचे द्वित्व]

**घडघडणे** अक्रि. १. गडगडाट होणे, करणे; गर्जना करणे; गडगडणे : 'संहार प्रलअे मेघु घडघडिला। कीं खवळैला महाकाळु डाडाइला।' - शिव १०७७. २. (रथ, गाडी इ. चालताना) घडघड आवाज होणे; कडाडणे; घडघड, खडखड, आवाज करीत (रथ, गाडी इ.) चालणे, खाली पडणे, कोसळणे : 'रथ घडघडिला समीरगतीं।' - ह १८.११८. ३. (बेत, काम, मसलत) ढासळणे; निष्फळ होणे; रसातळाला जाणे. ४. (ल.) मरणे. ५. घरघर आवाज करणे : 'वळे जिभेची बोबडी। कफें कंठ घडघडी।' - दास ३.५.३७.

**घडघडा** पु. गडगडा; पाणी काढण्याचा लाकडी, लोखंडी आखाभोवती फिरणारा ठोकळा; फिरकी : 'विहिरीचें पाणी लोखंडी पोयरा व सांखळी यांनीं रहाटावरून अथवा घडघड्यावरून काढावें.' - आरोशा १.९१.

**घडघडा** क्रिवि. स्वच्छ.

**घडघडाट** पु. घडघड असा मोठा आवाज; गडगडाट; कडकडाट; खडखडाट : 'करुणाकीर्तनाच्या लोटें। कथा करावी घडघडाटें।' - दास ४.२.१२.
क्रिवि. १. घडघडा; अस्खलित; मोठ्याने; जोरात : 'रत्नखचित मांडलासे पाट। त्यावरी बैसविला द्विजश्रेष्ठ। संकल्प म्हणतसे घडघडाट।' - जे ७३.१९. २. (गाड्या, रथ इत्यादिकांच्या) घडघड, खडखड आवाजाने युक्त होत : 'तुका म्हणे वाहे वाट। वैकुंठींची घडघडाट।' - तुगा.

**घडघडे** क्रिवि. पटापट; तडाख्याने. पहा : **घडाघड**

**घडघंच** वि. रगड; विपुल. (कर.) पहा : **गडगंच**

**घडघूप** वि. निबिड; दाट; गुडूप (अंधार) : 'तें देखोनियां विवर। गजबजिले वानरवीर। भीतरीं घडघूप अंधार। रविचंद्र असेना।' - भारा किष्किंधा १४.७६. पहा : **गुडूप**

**घडघोस** पु. घोसाळ्यांचा घड.

**घडघोसाळी** स्त्री. न. घोसाळ्याची एक जात; एक प्रकारच्या घोसाळ्याची वेल. हिला घोसाळ्यांचे घड येतात; सातपुती; सहस्रफळी.

**घडण** स्त्री. १. (घडून केलेल्या वस्तूंचा) घाट, डौल; आकार; ढाळ. २. घडण्याचे कौशल्य, हातोटी. ३. (दागिने, भांडी) घडण्याची, बनविण्याची मजुरी; घडणावळ. ४. घटना; कृती.
पु. वस्तूचा घाट.
न. भांडी घडण्याकरिता कासाराला दिलेला धातूचा पत्रा, मोड इ.

**घडणावळ** स्त्री. १. घडकामाची मजुरी, किंमत. २. घाट; घडण; आकार. ३. (क.) घडण्याची कुशलता; घडकामातील कारागिरी, हातोटी.

**घडणी** स्त्री. १. घडणे; करणे; बनविणे. २. (घडलेल्या दागिन्यांचा, वस्तूंचा) घाट; डौल; ढाळ; ढब. ३. घडण्याचे कौशल्य, कसब, कारागिरी, हातोटी.

**घडणी** स्त्री. १. कुळकर्ण्याने ठेवायचा गावातील कुळवार हिशेबाचा तक्ता. २. जमाबंदीचे वगैरे हिशेब व खतावणी. ३. समुदाय; जमाव : 'येती ऋषीच्या घडणी.' - वसा ४५.

**घडणे, घडून येणे** अक्रि. १. जुळून येणे; होणे; बनणे; अस्तित्वात येणे. २. उत्पन्न होणे : 'हे आंगा तंव घडले। जीवींची आधी जडले।' - ज्ञा ३.२५५. ३. पार पडणे; शेवटास जाणे : 'तेथें वाग्निश्चयो घडे कैचा।' - एरुस्व २.२९. ४. मिळणे; होणे; जुळून येणे; साधणे. ५. (एखाद्याकडून एखादी गोष्ट) सिद्धीला, तडीला जाणे. [सं. घटन]

**घडणे** अक्रि. १. हातोड्याने ठोकून ठोकून, तासून तासून, भट्टीत तापवून, कोरून आकार देणे, बनविणे; तयार करणे; निर्माण करणे; उत्पन्न करणे : 'शब्द कैसा घडिजे। प्रमेयीं कैसें पां चढिजें।' - ज्ञा १८.१७६८. २. (माहिती, हिशेब, जमाखर्च) लिहून काढणे; नमूद करणे; तयार करणे; आकारणे. [सं. घटन]

**घडणे** उक्रि. १. स्पर्श करणे; शिवणे. या क्रियापदाचा प्रयोग करताना कर्त्याची नेहमी प्रथमाच पाहिजे. कर्ता तृतीयेचा नसावा. २. भेटणे : 'नातरीं उद्यानीं माधवी घडे।' - ज्ञा १४३.

**घडता** वि. योग्य; मान्य; जुळणारे : 'तैसें घडतें प्रमेय घेइजे। उणें तें मज देईजे।' - ज्ञा १५.५९६. [सं. घट]

**घडती** पहा : **घटती**

**घडते** न. १. प्राप्ती. २. अनुकूलता : 'म्हणौनि शास्त्राचें घडतें। नोहे प्रकारें बहुतें।' - ज्ञा १७.२९. ३. साधन. (वा.) **घडत्यास पडता** - समयोचित; प्रसंगोपात्त; त्या त्या वेळेला योग्य; प्रसंगाला अनुरूप.

**घडबड** क्रिवि. भांडी इ. एकमेकांना लागल्यामुळे होणाऱ्या घड्घड् आवाजाने. [ध्व. घड्चे द्वित्व]

**घडबडणे** अक्रि. घडबड आवाज होईल अशा तऱ्हेने (भांडी इ. परस्परांस लागल्याने) वाजणे; खडखडणे. [ध्व.]

**घडबड्या** क्रिवि. (प्र.) गडबडा. (क्रि. लोळणे इ.)

**घडमाळ** स्त्री. रहाटगाडग्यावरील लोट्यांची, मडक्यांची एकेरी माळ; रहाटाची माळ. (को.)

**घडमोडणे** अक्रि. घडले, बनवले, मोडले जाणे; उत्पन्न आणि नष्ट होणे.

**घडली, घड्डी, घल्डी, घडळी** स्त्री. लहान घडा; घागर; कळशी (व.खा.) [सं. घटिका]

**घडवट** न. १. घडवलेली वस्तू. २. (ल.) देह. ३. पायघडी : 'वेगीं मंडपासी चला। घडवटें आधीं घाला।' - एरुस्व १५.१२.

**घडवण** पहा : **घडण** (राजा.)

**घडव(वि)णे** उक्रि. १. उत्पन्न करणे; बनविणे : 'तेथ इच्छा आणि बुद्धि। घडवी अहंकारेंसीं आधीं।' - ज्ञा १३.९६९. २. घडवून आणणे; जुळवून आणणे; साधणे; शेवटाला नेणे. ३. तयार करणे; बनविणे : 'तोड्यांचा जोड तुम्हि। कां घडविला कां घडविला।' - मसाप२.१.२७. ४. घडून येणे.

**घडवशी, घडवंची** स्त्री. १. मृदंग ठेवण्याची घडवंची; घोडी. २. लाकडी पाय असलेली बैठक, चौकी. ३. घडोंची; तिवई; लाकडाच्या फळीला तीन किंवा चार पाय बसवून केलेली बैठक, चौकट (घागरी, भांडी, पेट्या इ. सामान ठेवण्याकरिता केलेली); लाकडी चार पायी चौकट; चौकी; शिडी. ४. (भात इ. झोडण्याची) घोडी. (को.) ५.अडणी. [सं. घट + उच्च (?)]

**घडशी-सी** पु. १. वाजंत्र्याचा - गाण्याबजावण्याचा धंदा करणारी कर्नाटकातील एक जात. २. घडशी जातीचा मनुष्य. हे लोक वाद्य वाजवण्याचा धंदा करतात. [का. गड्डे = आवाज (?)]

**घडशी** वि. स्त्री. १. विटाळ झालेली. २. विटाळशी. (राजा.)

**घडसण** स्त्री. १. गर्दी; दाटी; खेचाखेच. २. अडवणूक; अडचण. (व.)

**घडसणे** सक्रि. (अक्षरे इ. पुन्हा पुन्हा काढून) घोटणे; घटवणे : 'ब्राह्मणें बालबोध अक्षर। घडसुनी करावें सुंदर।' - दास १९.१.१.

**घडळ** स्त्री. घडण. (गो.)

**घडा** पु. १. घागर; घट; गाडगे; मडके : 'अवतरली गाडग्यां घडां। पृथ्वी अनोळख जाली मूढां।' - ज्ञा १८.५४३. २. ताडाच्या पोंगीला (ताडी काढण्याकरिता) लावायचे गाडगे. [सं. घट] (वा.) ० **फोडणे** - संकेत, खरे तत्त्व बाहेर सांगणे; गुप्त गोष्ट प्रकट करणे. **(एखाद्याचा) ० भरणे** - अपराधांची परमावधी होऊन शिक्षेला पात्र होणे. **(आयुष्याचा) ० भरणे** - १. अंतकाल जवळ येणे; आयुष्य संपणे. २. (ल.) अधिकाराची मुदत संपण्याच्या बेतात येणे. **(पापाचा) ० भरणे** - (पापपुण्ये साठवण्यासाठी घडे असतात या कल्पनेवरून) दुष्कृत्यांचा कळस होऊन त्यांचे फळ भोगण्याची वेळ येणे. **(कच्च्या) घड्याने पाणी भरणे, वाहणे** - १. निष्फळ काबाडकष्ट करणे; निरर्थक उद्योग, मेहनत करणे. २. अतिशय हाल काढणे, कष्ट करणे.

**घडा** पु. जम; घडी.

**घडाई** स्त्री. १. (दागिने, भांडी इ.) घडण्याची मजुरी. पहा : **घडणावळ १.** २. घडकामाची, घडण्याची, घिसाड कामाची मजुरी. ३. (दागिने, भांडी, दगड इ.) घडण्याचे काम; घडकाम.

**घडाईदार** वि. घडविण्याचा धंदा करणारा. (घिसाडी, शिलावट इ.)

**घडाघड** स्त्री. १. लोहार, तांबट इ.कडे चालणारी ठोकाठोक; घडण्याच्या

कामाने होणारा आवाज. २. घडकाम. [घडणेचे द्वि.]

**घडाघड-डा, घडाडा** क्रिवि. १. पदार्थ एकामागून एक उंचावरून गडगडत, धडाधड पडताना होणाऱ्या धड्धड् आवाजाप्रमाणे; मडक्यांची रास, घर, कोसळल्याने होणाऱ्या घड्घड् आवाजाप्रमाणे. २. न अडखळता; अस्खलित. पहा : **घडघड**

**घडाड** पु. घडघड अशा आवाजाचा अतिरेक; घडघडाट; गडगडाट; घणघणाट इ.

**घडाडणे** अक्रि. कोसळणे. पहा : **घडघडणे**

**घडापड** स्त्री. विटाळ; स्पर्शामुळे येणारी अशुचिता. (राजा.)

**घडाबाजी** स्त्री. दारू उडविण्याचा प्रकार; मडक्यात फटाके, चिचुंद्र्या (उडविण्याच्या दारूचा एक प्रकार) इ. ठासून त्यांचा धडाका करणे. पहा : **घडेबाजी**

**घडामोड** स्त्री. १. घडलेल्या गोष्टी, घटना; फेरफार; उलथापालथ; नवे जुने करणे. २. (भांडी, मडकी, दागिने इ.) घडण्याची आणि मोडण्याची क्रिया; बनवणे व नष्ट करणे. ३. (ल.) देण्याघेण्याचा, खरेदीविक्रीचा, उसने देण्याघेण्याचा व्यवहार; व्यापार. ४. रचना; घाट; बनावट; घडण (यंत्रावयवाची, भागाची इ.). ५. (धंद्यातील, व्यापारातील) भानगडी, गुंतागुंत, गाशा गुंडाळणे, दिवाळे इ. ६. (एखाद्या श्लोकाची, कवितेची, उताऱ्याची) गुंतागुंत; घोटाळा; क्लिष्टता; लपेटी; नाना तऱ्हेच्या युक्त्या. ७. ( नाटकाच्या संविधानकातील) कूट, डावपेच, खुबी, गुंतागुंत. ८. (सामा.) कुशलता; चातुर्य; खुबी; हातोटी; कला (एकत्र मांडणे, विवरण करणे, वागविणे इ. ची.).[सं. घट्‌ + मोट्‌ (द्विधातुसंयोग.)]

**घडारणे** अक्रि. वृक्ष फळांच्या घडांनी, घोसांनी बहरणे, युक्त होणे.(कु.)

**घडाव** स्त्री. घडणावळ. कधी कधी घडण या शब्दाच्या इतर अर्थीही.

**घडावले** न. लहान घड. (गो.)

**घडिक** क्रिवि. एका घटकेत; एका वेळी, क्षणी : 'घडिक म्हणति जाऊ प्राणही हे अमासे।' - सारुह ३.६३.

**घडिघडि, घडीघडी** क्रिवि. प्रत्येक घटकेला; प्रत्येक क्षणी; वारंवार; घटकोघटकी; पदोपदी. [घडीचे द्वि.]

**घडित** वि. घडवलेली: 'श्रीची मूर्ती घडित।' - काटी शिला १.८. [सं. घटित]

**घडितघाट** वि. आयता घडलेला; विक्रीकरिता घडून ठेवलेला; तयार (जिन्नस, दागिना, भांडे इ.). पहा : **घडला घाट**

**घडि(डी)बंद** वि. १. घडी केलेला. २. ज्याची घडी मोडली नाही असा; नवा कोरा (धोतरजोडा इ.).

**घडिया** स्त्री. पात्र; तस्त : 'शुद्धमती देतसे विडिया। पीक धरावया सुवर्णघडिया।' - एरुस्व १६.३३ [सं. घटिका]

**घडियाल-ळ** पहा : **घड्याळ** : 'नफेरी अरु मोरचंग। घडियाल वाजे चंग।' - देवनाथ कृष्णजन्म ७२.

**घडियाळ** पु. सुसर : 'शुशुमार घडियाळ मछमगर।' - मुआदि २९.७७.

**घडिव** वि. हातांनी केलेला; घडवलेला : 'अगराचे उंबरे घडिव।' - रुस्व ४२०.

**घडिवटे** न. १. घटिकापात्र. २. घडा. ३. वेळ दाखविण्यासाठी वाजविण्याचे झेंगट : 'जैसें पाणि पीये घडिवटे।' - उगी ५१०.

**घडी** स्त्री. १. घटका; साठ पळांचा अथवा चोवीस मिनिटांचा अवधी : 'तो अवकाळु मेघु काय घडी। राहात आहे॥' - ज्ञा १७.२५१. २. (ल.) थोडासा वेळ; क्षण : 'पृथ्वीचिया पैसारा। माजीं घडीं न लगतां धनुर्धरा।' - ज्ञा १०.२५०. ३. योग्य संधी; वेळ; काळ : 'ही पुन्हां न ये बा घडी।' - राल ८८. ४. कालमापनाचे साधन; यंत्र; घटका; वाळूचे घड्याळ; घड्याळ इ. ५. (सामा.) तास (इंग्रजी ६० मिनिटांचा); वेळ मोजण्याचे साधारण परिमाण तास हे असल्याने तासाऐवजी चुकीने घडी शब्द वापरतात. ६. वाद्य.[सं घटिका] (वा.) **एखाद्याची घडी भरणे** - १. पहा : **घटका भरणे** : 'आला समजूं पिशाच आपण घडी भराया माझी।' - विक ५५. २. शिक्षा भोगण्याची वेळ येणे; घडा भरणे. **घडीघटकेचा गुण** - एखादी गोष्ट अमुक प्रकारेच का घडली, तशीच का घडली नाही हे सांगता येत नसले म्हणजे या वाक्प्रचाराचा उपयोग करतात. एखादी गोष्ट ज्यावेळी - ज्याक्षणी घडली असेल त्या विवक्षित वेळेचे सामर्थ्य, प्रभाव, गुण.

**घडी** स्त्री. १. एकेरी वस्त्र, कागद इ. दुहेरी, तिहेरी, चौपदरी केले असता होणारी स्थिती, आकार; दुमड; चूण; निरी : 'इयें पदें नव्हतीं फुडिया। गगनाचिया घडिया। येथ आमुची मति बुडालिया। थावो न निघे॥' - ज्ञा ७.१९५. २. दुमडलेली, चुणलेली स्थिती. ३. घडीबंद कापड, वस्त्र इ. उदा. लुगड्याची घडी; कापडाचा, वस्त्राचा सणंग. (क्रि. मोडणे.) ४. (ल.) संच; बस्तान; जम; संघटित स्थिती; ऐक्य; सलोखा. (क्रि. बसणे, जमणे, विस्कटणे, बिघडणे, मोडणे.) : 'घडी जों मानाची बिघडलि असे तोंवरि घडी।' - वामन भामाविलास ११. (नवनीत १००.) [सं. घट्‌ = रचणे] (वा.) ० **फोडणे** - चामड्यास चुना देऊन त्याची घडी घालतात ती दोन-तीन दिवसांनी उलगडणे. ० **बसणे** - १. समज पटणे; समजूत होऊन सलोखा होणे. २. बस्तान, जम बसणे : 'आतां मात्र मनाजोगती घडी बसली.' - विवि ८.९.१७४. ३. योजलेले कार्य यथास्थित जुळणे. ० **बसवणे** - जम बसवणे; सुनियंत्रित करणे : 'बुद्धिमतीने स्वतां बसविली पतिराज्याची घडी।' - विक २८. ० **बिघडणे, विस्कटणे** - १. दोन व्यक्तीत असलेला सलोखा नष्ट होणे; वेबनाव होणे; वितुष्ट येणे. २. (धंद्याची, कारभाराची, राज्याची) भरभराट, सुव्यवस्था, सुस्थिती नाहीशी होणे; विस्कळितपणा येणे; (कार्याचा) सुरळीतपणा नष्ट होणे : 'पुण्याच्या राज्यकारभाराची घडी बिघडली होती.' - इंप १३७.

**घडी** स्त्री. रचना; निर्मिती : 'घडी स्त्रीजातीची घडविलि असे ख्याति सुघडी।'-वामन भामाविलास ११ (नवनीत १००.). [सं. घट्‌ = रचणे]

**घडी** स्त्री. पायघडी; वरून चालण्याकरिता अंथरलेले वस्त्र, कापड इ. : 'एवं द्विधा समाधिचिया। तैसी चालतां नेती घडिया। तळीं उपर जाणविती तया। उपनिषदें।' - विउ ९.७९.

**घडी** स्त्री. १. लहान घागर; लोटी. २. भंडारी लोक दारू काढण्यासाठी माडावर जे मडके लावतात ते. पहा : **घडा**

**घडीकच्** क्रिवि. १. क्षणार्धात. २. एकदा. (झाडी)

**घडीचा** वि. क्षणाचा; क्षणभरसुद्धा; थोडासुद्धा; जरासुद्धा : 'पावसाळ्यात सल्फेटची मागणी सुरू झाली की काही दिवस तरी मला घडीचं रिकामपण नसतं.' - कोसला २८६.

**घडीचे घड्याळ** क्षणभंगुर जीवित, शरीर; पाण्यावरचा बुडबुडा.

**घडीत** न. १. घडण्याकरिता दिलेला धातू, धातूचा पत्रा, तुकडा, मोड इ. २. घडलेला, घडवलेला जिन्नस. ३. घडणावळ; घडण्याची मजुरी. ४. (दागिन्याचा, भांड्याचा) घाट; घडण; ढाळ; रचना.

**घडीत** न. विकून येणारी किंमत. (गो.)

**घडीभर** क्रिवि. घटकाभर; थोडा वेळ.

**घडीभराने** क्रिवि. थोड्या वेळाने; घटकाभराने; एका घटकेनंतर; मागाहून.

**घडीमोड** वि. घडी करता येईल आणि पाहिजे तेव्हा सोडवता येईल असा : 'नाटक मंडळांच्या प्रवासी वृत्तीमुळे त्यांचे देखाव्याचे व इतर सामान घडीमोड (फोल्डिंग) करीत.' - बहुरूपी ३७.

**घडीव** वि. १. घडून, हातोडा इत्यादीने ठोकून ठोकून तयार केलेला (जिन्नस, दागिना, भांडे इ.). याच्या उलट ओतीव. २. हातावर केलेली (पोळी). ३. घोटीव; भक्कम : 'तांब्याच्या कांबीसारखं घडीव...' - विभूत १४५.

**घडीवट** स्त्री. मुहूर्त; घटका : 'बोले इंद्र सुरपती। जालि घडीवटीयांची आईती। नोवरा येऊंद्या झडती। संभ्रमेंसी।' - कालिकापुराण १६.४२.

**घडीव लोखंड** घडलेले लोखंड.

**घडुला** पहा : **घोडुला**

**घडुला-ली-ले** स्त्री. न. लहान मडके, घडा, डेरा : 'थैसी घडुलि तोंडवरि भरिलि।' - पंच ५.९.

**घडुले** न. केळीचा लहान, नुकताच बाहेर पडलेला कोवळा घड; लोंगर. (कु.)

**घडेबाजी** स्त्री. १. मडक्यात फटाके वगैरे भरून त्यांना बत्ती देणे; आतषबाजी; दारूकाम : 'झाडें नानाप्रकारचीं व घडेबाजी... दारू सुटावयाची.' - ऐलेसं ४५८७. (क्रि. उडवणे, करणे, लावणे.) २. (ल.) एकदम होणारा वाद्यांचा गजर; कडकडाट.

**घडेस्त्री** स्त्री. कानउघाडणी. (क्रि. करणे.) (कु.)

**घडोघडी** क्रिवि. वारंवार; पदोपदी; क्षणोक्षणी; हरघडी. [घडीचे द्वि.]

**घडोशी** स्त्री. घडवंची. (को.) पहा : **घडवशी**

**घडौते** न. साधन (कार्य इत्यादीचे); घडवून आणते ते.

**घड्डॉ, घॉड्डॉ** पु. भाजलेल्या तांदळाचे पीठ पाण्यात कालवून तयार केलेले पक्वान्न. (गो.)

**घड्यावरघळ** पु. वरगळ भाताची एक जात.

**घड्याळ** न. १. कालमापनाचे साधन. यात तबकडीवर तास, मिनिटे, सेकंद इ. दाखवणारे आकडे आणि काटे असतात. २. वाळूचे कालमापक यंत्र; वाळूचे घड्याळ. ३. तासाचे ठोके जिच्यावर वाजवतात ती घंटा; तास : 'स्वराज्यात घड्याळ वाजविण्याचा मान सरकारकडून मिळे. स्वारीमध्यें तासे वाजंत्रीप्रमाणें घड्याळहि वाजवीत.' - वाडबाबा २.१२१. ४. काही विशिष्ट वस्तूंचा विनियोग दर्शविणारे मापन यंत्र. उदा. मोटारीतील पेट्रोल, हवा, इंजिनातील वाफ, किटसन् बत्तीतील हवेचा दाब इ. [हिं. घडियाळ] [सं. घट्ट, घटी + आलय]

**घड्याळची-जी** पु. १. तासाचे ठोके वाजवणारा कामगार. २. घड्याळे दुरुस्त करणारा; घड्याळे विकणारा.

**घड्याळटिपरू** न. १. घड्याळ वाजवण्याचा लाकडी हातोडा. २. (ल.) भाकर व मिरची.

**घण** पु. लोखंड, तांबे इ. ठोकण्याचा, घडण्याचा लोखंडी मोठा हातोडा : 'घणाचे घाई पिटे तैसा।'-विउ २.७. [सं. हन्; घन = लोखंडी गदा]

**घण** न. दाट परिचय : 'तरीसुद्धा अप्पाशी तिचे एवढे घण कसे?' - गणूराया ८७.

**घण** न. एक प्रकारचे जाळे. (को.)

**घणकणे** अक्रि. (भोवरा इ. गरगरा फिरताना) घण्ण्ण्ऽऽण् असा आवाज करणे, वाजणे : 'त्रैअवस्था त्रिवेणी संगम घणघणाट घणके भंवरा।' - पला १४. [ध्व.]

**घणकरी** पु. (लोहाराच्या दुकानातील) घण मारणारा मनुष्य, गडी.

**घण (न) कोरा** पहा : **घणाखालचा**

**घणगा** पहा : **गणंग**

**घणघण** स्त्री. १. घंटा इत्यादिकांचा घणघण असा आवाज. २. ठकठक; ठाठू इ. कोणताही आवाज. ३. चिलटाचे गुंगावणे; गुंगू. ४. स्पष्ट व खणखणीत गाणे, म्हणणे, बोलणे. ५. कटकट; किरकिर. (ना.) [ध्व. घण्चे द्वि.]

**घणघण-णा** क्रिवि. १. झण्झण्; छण्छण्; झणत्कार, टणत्कार इत्यादिकांच्या होणाऱ्या घण्घण् अशा आवाजाने. (क्रि. वाजणे, करणे.) २. स्पष्ट व खणखणीत आवाजाने. [ध्व. घण्चे द्वि.]

**घणघणघंटा** स्त्री. नकारघंटा; पूर्ण अभाव; (विहिरी इत्यादिकांचा) ठणठणीत कोरडेपणा.

**घणघणणे** अक्रि. १. घणघण असा (घंटा इत्यादिकांचा) आवाज करणे; छणछणणे; झणझण वाजणे; खणखणणे. २. (मनुष्याचा आवाज, कंठ इ.) खणखणीत, साफ, स्पष्ट असणे.

**घणघणाट** पु. घणघण या आवाजाचा अतिरेक; मोठा घणघण असा आवाज; (घंटा इत्यादिकांचे) मोठ्याने वाजणे; (वाद्यांचा) दणदणाट; खणखणाट; झणत्कार; कडाका.

**घणघणावचे** अक्रि. १. मोठा आवाज काढणे. २. कीर्ती पसरणे. (गो.)

**घणघणीत** वि. ठणठणीत; खणखणीत; स्पष्ट; मोकळा; कानाला वेधणारा; घणघणणारा (आवाज).

**घणघाई** स्त्री. दडपण; मारा : 'ह्या सहभोजनाच्या घणघाईखाली एकदा का रोटीबंदीच्या बेडीचे तुकडे उडाले...' - ससावा २७१.

**घणघाव, घणघावू(उ)क** वि. १. (काही लोकांत रूढ) जाडेभरडे; दणकट; दाट विणीचे (कापड). (राजा.) २. बोजड; अजस्र; जाडाजुडा; मोठाघाटा (दागिना इ.); दांडगा; मजबूत; भक्कम (मनुष्य).

**घण(णा)घोर** पहा : **घनघोर** : 'मौंजीबंधन लग्न रायाचें खूपरायाचें झालें घणघोर।' - ऐपो १७७.

**घणघोष** पु. घणघण असा आवाज, नाद, ध्वनी : 'झळंबाचे घणघोषां।

मिळतां बुंथि घालितांॲ आकाशा।' - शिव १०१८.

**घणणे** अक्रि. घाण येणे; वास मारणे : 'मढं कुजल्याग घणत हुतं.' - खळाळ ३७.

**घणदाट** स्त्री. गर्दी; खेचाखेच; जमाव; समुदाय.
वि. १. अतिशय दाट; संकीर्ण; गडगच्च. २. (सामा.) दाट; घट्ट (द्रवपदार्थ). ३. निबिड; गहन; गर्द (झाडी, अरण्य); भरगच्च; भरीव; ऐवजदार (देणग्या, इनाम इ.); जोराचा (पाऊस).

**घणदाटी** स्त्री. जीवश्चकंठश्च स्नेह; दाट परिचय, मैत्री.

**घणमण (न) णे** अक्रि. घाबरणे; डगमगणे; मागे पुढे पाहणे, फिकिरीत पडणे : 'ज्ञानी हीन स्वनांशीं घणमणीत, न त्या साहवे मानहानी।' - मोकृष्ण ५७.४.

**घणस-सा** पु. सर्पाची एक जात, घोणस. [सं. गोनस]

**घणसकांडे-वेल** न. स्त्री. एक वेल. घोणसकांडे, घोणस वेल असेही म्हणतात. ही घोणसाच्या विषावर उपयुक्त आहे असे मानतात.

**घणसदी-बी** - स्त्री. जबरदस्ती; जोरा : 'घणसबी केले वाचून मुलूक व पैके राहणार नाहीं.' - इएमपी १०२.

**घणसर** स्त्री. केकताड; एक प्रकारची वनस्पती; घायपात. (बे.)

**घणसर** वि. १. दाटसर; बरेच दाट (ताक इ.). २. राकट; कणखर (मनुष्य इ.); जाडाभरडा (कपडा); भक्कम; ऐवजदार; मजबूत; टिकाऊ; भरीव.

**घणसा-से पडवळ** पु. घोणसे; एक आखूड जातीचे पडवळ.

**घणसा** पु. भोपळ्याची एक जात.

**घणसाचे** न. घोणसाचा दंश. (राजा.)

**घणसाबैल** पु. नंदीबैल; पांगूळ बैल.

**घणा** पु. घाणा. (बे.)

**घणा** पु. अतिशय मोठा घण; हातोडा. (वा.) **घण्याघायी नांदणे, असणे** - १. दागिने नेहमी घणाखाली घडवण्यास दिलेले असणे. २. (ल.) श्रीमंत असणे.

**घणा** पु. संपत्ती; घन. [फा. गना]

**घणाखालचा** वि. १. घणकोरा; टांकसाळीतून नुकताच बाहेर निघालेला (रुपया, नाणे इ.). २. कोराकरकरीत (जिन्नस); कारागिराच्या हातून नुकताच तयार झालेला (जिन्नस, दागिना इ.).

**घणाघणा** क्रिवि. घणघण असा मोठा आवाज करत.

**घणाघणा** पु. १. तुंबलेले काम. (व.) २. कटकट; घणघण. [ध्व.]

**घणाघाई** स्त्री. अतिशय घाई; काम त्वरित व्हावे म्हणून वाटणारा अधिरेपणा : 'बायकोची अशा रीतीनं घणाघाई चालू होती.' - एल्गार १०२.
क्रिवि. जोरात : 'कारखाना घणाघाई चाललेला.' - माजी ६३.

**घणाघाती** वि. अत्यंत जोरदार; घायाळ करणारी; शक्तिमान; तीव्र. झोडपून काढणारे; प्रहार करणारे (भाषण, लेखन इ.).

**घणाटी** स्त्री. हेलपाटा.

**घणाट्या** स्त्री. अव. १. निरर्थक, अकारण हेलपाटे, हिसके, फेऱ्या; पायपिटी. २. (सामा.) व्यर्थ शीण; फुकट प्रयत्न. (क्रि. खाणे, घेणे.)

**घणाणघंटा** पहा : **घणघणघंटा**

**घणाणा** पहा : **घणघणा**

**घणानकन** क्रिवि. घण असा एकदाच मोठा आवाज करून : 'देवळातील घंटा कुणीतरी घणानकन वाजवीत होता.' - त्रिशंकू २२.

**घणावणे** अक्रि. दृढ होणे; निश्चित होणे : 'सुषुप्ति बैसे। घणावोनी॥' - ज्ञा १४.१४२. [सं. घन]

**घण्याघायी** क्रिवि. घणाच्या (वीरश्रीयुक्त) आवाजात.

**घतणे** अक्रि. इजा करणे; बाधणे; अपाय होणे; हानिकारक होणे; ठार मारणे : 'रुसला तरि प्राणा घतैल।' - लीचउ ५८५. [सं. घात]

**घतन** न. १. घातुक, अपायकारक, मारक, वस्तू किंवा गोष्ट. २. संकट; धोका; प्राणसंकट. ३. (सामा.) नुकसान; नाश. ४. प्राणनाश. ५. पहा : **घात** : 'रसरसली नवती नुतन। तुजकरितां केली जतन। त्यागितां करिन जिव घतन।' - प्रला १७८.
वि. १. घातुक; अपायकारक; मारक. २. (सामा.) अनर्थकारक; अहितावह. [सं. घात, घातन]

**घन** पु. १. (भौ.) आयतन व आकार निश्चित असणारा पदार्थ. २. (ग.) लांबी, रुंदी व उंची या तिन्ही बाजू सारख्या असणारी वस्तू. ३. (भूमिती) सहा (सम) चौरसांनी मर्यादित अशी घनाकृती.
वि. १. लांबी, रुंदी व जाडी यांनी मर्यादित अशी (पोकळी, आकृती, पदार्थ इ.). २. (ग.) तुल्य तीन अंक परस्पर गुणून जे फल येते ते; संख्येच्या वर्गाला पुन्हा त्या संख्येने गुणणे. उदा. चोहोंचा घन चौसष्ट (४ × ४ × ४ = ६४); पाचाचा घन एकशे पंचवीस (५ × ५ × ५ = १२५) इ.

**घन** पु. मेघ; ढग : 'वर्षावियां गाजे आनंदाचा घनु।' - शिव ६६. [सं.]

**घन** न. १. घाट; तास; पितळेचे, काशाचे वाद्य या अर्थी सर्वसाधारण शब्द; घड्याळ : 'घनाचा घमंड तंत लाविती लया।' - दावि १६३. २. घंटा, करताल, टाळ, झांज, झेंगट इ. सारखे एक वाद्य. पहा : **घनवाद्य**

**घन** पु. लोहाराचा मोठा हातोडा. पहा : **घण** : 'घन सांडस नागफणी। रात हात हातवडे ऐरणी।' - कथा ३.१७.९४. [सं.]

**घन** वि. १. (शाप.) ज्याचा आकार सहज बदलता येत नाही असा, द्रवस्वरूपात किंवा वायूस्वरूपात नसलेला (पदार्थ). २. जाड; जाडेभरडे; घट्ट विणीचे (कापड). ३. भरीव; दाट; फार पातळ नसलेले (ताक इ.). ४. दाट; गर्द; निबिड (छाया, झाडी, पालवी इ.). ५. जाड; बळकट (फळी). ६. घट्ट; अप्रवाही; द्रव, वायुरूप पदार्थांविरहित. ७. दुर्भेद्य (अंधार). ८. गाढ; स्तब्ध (झोप इ.) : 'ना स्वरूप अवस्थान। ते सुषुप्ति कां घन। जैसी होय॥' - ज्ञा १४.७४. ९. मोठा; जोराचा; मोठ्या सरीचा (पाऊस इ.) : 'इंदिराकळत्रा इंद्रे वर्षतां घन घन धारा।' - र ६२. १०. घुमेपणाने स्तब्ध असलेला (मनुष्य). ११. ठेवा. १२. उलट; दृढ. [सं.]

**घनकंद** पु. (वन.) वनस्पतीचे जमिनीखाली राहणारे मांसल, पाती अथवा खवल्यासारख्या पानांनी वेढलेले फुगीर खोड. यात अन्नसंचय केलेला असतो व त्यावर डोळे असतात.

**घनकंदिका** स्त्री. (वन.) मुळातल्या घनकंदापासून बनलेला लहान घनकंद.

**घनगडना** क्रि. गडगडत खाली येणे. (झाडी)

**घनगडा** पु. फोडून वेगळे केलेले मडक्याचे तोंड; मडक्याचा काठ (व.).

**घनगडी** स्त्री. १. लहान लोखंडी कडे. २. जिलेबीची कडी. ३. वेटोळे. (झाडी)

**घनगर्जना** स्त्री. मेघांचा गडगडाट : 'हें ना घनगर्जना सरिसा। मयूर वोवांडे आकाशा।' - ज्ञा १८.४८४.

**घनगार** स्त्री. गारांचा पाऊस पाडण्यासाठी केलेले चेटुक : 'पांढरकवड्यावर रचविल्या घनगारा अद्भुत।' - ऐपो ४०१.

**घनघटा** स्त्री. मेघपटल; मेघडंबर; ढगांची गर्दी : 'चट उठवल्या घनघटा, पडति पटपटा बिंदु कटितटासि बळकट धरा।' - राला ५६.

**घनघन** स्त्री. १. किरकिर. २. कटकट. ३. कुरकुर. (व.) [ध्व.]

**घनघमंडी** स्त्री. घनाचा आवाज; टाळ, करताल, घड्याळ, झांज इत्यादी वाद्यांचा तालबद्ध गजर : 'घनघमंडी उदंड होतसे। तंत भरे भरपूर।' - दावि ४६८.

**घनघोख-फ** पु. मेघ गर्जना. 'जैसा कां घनघोखु । मयोरासि।' - ज्ञा ११८०.

**घन(ना)घोर** वि. १. निबिड; दाट; जोराचा (पाऊस, ढग). २. भयंकर; निकराचे; तुमुल; भीषण; तुंबळ; हातघाईचे (युद्ध, लढाई). ३. भडिमाराची; आवेशाची; जोराची (शिवीगाळ). ४. दाट; निबिड; गर्द (अंधार, झाडी, रान इ.). ५. दाट; गजबजलेला; खेचाखेचीचा; भरगच्च (मनुष्यांचा जमाव, पीक, फळे इ.). ६. गाढ; स्वस्थ. (झोप.) [सं. घन + घोर]

**घनचकर, चक्कर, चक्र** न. पु. स्त्री. १. मेघ; ढग; फिरणाऱ्या ढगांचा समुदाय; ढगांचे चक्र. २. निबिड, दाट असे मेघमंडळ; झंझावात; मेघपटल; मेघजाल; ढगांची गर्दी. वावटळ; चक्रवात. (माळवी) ३. तुंबळ व निकराचे युद्ध; हातघाईची लढाई; रणकंदन; कडाक्याचे भांडण : 'गजावरी गज लोटले। रथाशीं रथ झगटले। एकची घनचक्र मांडिलें। रामकृष्ण पहाती।' - ह २२.९५. ४. थाटमाट; भव्य देखावा; मोठा पसारा; लयलूट; अवडंबर; जलसा; मजा (गाणे, नाच, तमाशा, खेळ इत्यादीचा). ५. (जेवणाची, पोळ्यांची, तुपाची) चंगळ; विपुलता; चमचमाट; रेलचेल. (वरील ४ व ५ अर्थी प्रयोग करताना जेवणाची, गाण्याची घनचक्कर अशी शब्दरचना करतात.) (क्रि. उडणे, उडवणे.) वि. क्रिवि. पहा : **घनघोर.** १. मेघांच्या मंडलांनी युक्त (आकाश इ.); जोराचा, मोठ्या सरींचा (पाऊस). २. निकराची; हातघाईची; तुंबळ (लढाई, युद्ध, भांडण). ३. निबिड; दाट; गर्द (अरण्य, पालवी, अंधार, छाया). ४. विपुल; भरगच्च, दाट (पीक); रेलचेलीचे, चंगळाईचे (जेवण, खाद्यपदार्थ). ५. गाढ; स्वस्थ (झोप). ६. मोठ्या प्रमाणावर चाललेला; जोराचा (धंदा, व्यापार इ.). (वा.) ० **उडणे,** - १. एकदम सर्व बाजूंनी गर्दी उडणे, हलकल्लोळ उडणे. २. खूप रंग येणे. ३. भयानक लढाई होणे.

**घनचक्कर** वि. विचित्र; चक्रम.

**घनचित्र** न. एखाद्या पदार्थाचे, स्थलाचे, इमारतीचे हुबेहूब भरीव चित्र.

**घनजालक** न. (भौ.) मूलभूत एकक घनाकार असेल अशी संरचना (असलेले स्फटिक).

**घनणे** अक्रि. घाणणे; दुर्गंधी येणे. (खा.) पहा : **घणणे**

**घनणे** क्रि. थांबणे; स्थिर होणे : 'ऐसे घनु घनु म्हणत : पातले यादवांचे राउत :' - शिव ९५९.

**घनता** स्त्री. (भौ.) द्रव्याच्या एकक घनफळाचे - आयतनाचे वस्तुमान.

**घनता** स्त्री. १. घट्टपणा; दाटपणा. २. दार्ढ्य; वजनाला घनफळाने भागले असता येणारा भागाकार त्या पदार्थांची घनता होय. ३. विशिष्ट जागेत असू शकणारे पदार्थाचे कमीअधिक प्रमाण; दाटपणा : 'कमी घनता, कठीणपणा आणि ठोकून पत्रे करता येण्याची क्षमता ह्या गुणधर्मांमुळे त्याला (अल्युमिनियमला) फार महत्त्व प्राप्त झाले आहे.' - भाख ७०. [सं.]

**घनतामापक** पु. (भौ.) प्रकाश किंवा क्ष किरण इत्यादींमुळे फोटो काचेवर येणाऱ्या काळेपणाचे मापन करण्याचे उपकरण.

**घनतुरूप** पु. १. तोफखाना : 'विजयादशमीच्या स्वारीला घनतुरूप पागा रिसाला।'-गापो ३५. २. बरोबर तोफखाना बाळगणारी फौज.

**घनत्वबोध** पु. लांबी, रुंदी व जाडी यांचा भास.

**घनथिर** वि. मेघ गंभीर : 'निसानाचेनि नादें घनथिर शबदें।' - गरा ३८.

**घनदाट** वि. १. गर्द; निबिड : 'भरला घनदाट हरि दिसे।' - ज्ञा. हरि. २. घट्ट; पातळ नसलेला (द्रवपदार्थ). ३. (ल.) अतिशय सलगीचा; जिवलग; सलोख्याचा (स्नेहभाव, मैत्री). ४. गजबजलेला; खेचाखेचीचा (जमाव, सभा इ.) : 'ऐसी सभा बैसली घनदाट।' - शनि ८.

**घनदाटणे** अक्रि. गर्दी होणे; खेचाखेची होणे; गच्च भरणे : 'सभा घनदाटली विमानीं।' - देवीची भूपाळी ३०.

**घनदाटी** स्त्री. १. जीवश्चकंठश्च, मैत्री; जिवलग सख्य. २. अतिशय दाटी.

**घनन, घनीकरण-भवन** न. पदार्थाचे द्रवरूपातून घनस्वरूपात रूपांतर.

**घननिलांग** वि. सावळ्या रंगाचा.

**घनपद-मूळ** न. (ग.) एखाद्या संख्येच्या घनापासून काढलेली मूळ संख्या; घनाचे मूळ. उदा. चौसष्टाचे घनपद - मूळ चार होय. [सं. घन + मूल]

**घनपाग** न. मासे पकडण्याचे बारीक भोकांचे जाळे. हे आडपागापेक्षा लहान असते. (राजा.)

**घनपाठ** पु. वेदाचा पाठ करण्याची विशिष्ट पद्धत, रीत. [सं.]

**घनपाठपूर** वि. घनपाठापर्यंत अध्ययन केलेला. [सं.]

**घनपाठी** वि. १. वेदाचा घनपाठ म्हणणारा; घन नावाची वेदाची विकृती पठण करणारा. २. वेदपारंगत; मोठा विद्वान; वैदिक : 'विप्र शोभती वेदघनपाठि।'-दत्तपदे २५. [सं.]

**घनप्रसरण** न. १. (शाप.) घन पदार्थाचे उष्णतेने होणारे प्रसरण; आकारमानात वाढ. २. ढगांचा फैलाव.

**घनफल-ळ** न. (भूमिती) (पदार्थाच्या, पोकळीच्या) लांबी, रुंदी व उंची यांचा गुणाकार करून आलेले फल. उदा. भुज ४, कोटी ५, उंची ३ यांचे घनफळ ६०. कोणत्याही पदार्थाने व्यापलेला अवकाश, पोकळी.

**घनमणणे** अक्रि. पहा : **घणमणणे.** घाबरणे; डगमगणे : 'बरगडी रगडीत

असे सदा। घनमणी न मनींहुनि तो कदां।' - किंगवि ३२.

**घनमाकड** पु. मुलांचा एक खेळ.

**घनमुंडी** वि. भक्कम : 'चांगलं जाडजूड घनमुंडीदार.' - ऊन ३९.

**घनरस** पु. कापूर.

**घनवट** वि. १. मजबूत; जाड; घट्ट विणीचे (कापड इ.). २. सर्वव्यापक; श्रेष्ठ; सर्वव्यापी; सर्वांचा सारभूत. ३. जड; भारी; वजनदार : 'मेरूपासाव घनवटें। जीं हिंसीं जालीं तुकमठें।' - ऋ ३०. ४. भरीव; भरदार : 'कीं भूस बीज एकवट। उपणितां राहे घनवट।' - ज्ञा २.१३०. ५. घट्ट; भरीव; कठीण : 'कां मी येतुली घनवट ऐसें। पृथ्वीचि जाणे ॥' - ज्ञा १०.१७६. [सं. घन + वट (प्रत्यय)]

**घन (ण) वटणे** अक्रि. १. घनदाट, चिक्कार भरणे (सभा इ.); दाटणे; एकवटणे; जमणे : 'सभा घनवटली अपार।' - वेसीस्व १.१७. २. ऐक्य होणे : 'चंचळ निश्चळ घनवटे। हें तों घडेना।' - दास १५.१०.१४. ३. दाटी, गर्दी करणे; खेचाखेच, चेंगराचेंगरी होणे.

**घनवटता, घनवटप** स्त्री. न. भारीपणा; जडपणा; घट्टपणा; भरीवपणा; भरदारपणा : 'कीं अवधान आणि श्रवण। कीं पृथ्वी आणि घनवटपण।' - भवि ४५.१२९.

**घनवटा** स्त्री. (निजण्याची) गादी, गालिचा.

**घनवटुपण** न. काठिण्य; जडत्व : 'तेआतें देखौनि श्रीकृष्ण घनवटुपण अंगीकारलें।' - श्रीकृच ५.

**घनवर्ग** पु. (ग.) एखाद्या संख्येच्या घनाचा वर्ग; समान सहा अंक परस्पर गुणून आलेला गुणाकार हा त्यापैकी प्रत्येक अंकाचा घनवर्ग होय. एखाद्या संख्येचा षड्घात. उदा. तीन या संख्येचा घनवर्ग २७ × २७ = ७२९ होय. [सं.]

**घनत्वबोध** न. लांबी, रुंदी व जाडी यांचा भास.

**घनवर्धनीय-यत्व** वि. न (शाप.) प्रसरणशील; घणाने ठोकल्यामुळे किंवा दाब घातल्याने न मोडता पसरणारे.

**घनवाट** वि. १. असंख्य; २. गजबजलेला.

**घनवाड** वि. निबिड; दाट; गर्द.

**घनवाद्य** न. दोन भागांपैकी एका भागाचे दुसऱ्यावर आघात करून वाजवले जाणारे वाद्य. चिपळ्या, करताल, झांज, मंजरी, तास, घंटा, टिपऱ्या, जलतरंग इ. वाद्ये ह्या प्रकारात येतात.

**घनविद्रव** पु. (भौ.) दोन घनपदार्थांचे एकजिनसी मिश्रण. यात एका पदार्थांचे अणू अथवा रेणू दुसऱ्या पदार्थात इतस्ततः वितरित झालेले असतात.

**घनविरोध** पु. (शाप.) पदार्थाच्या आकारमानामुळे उत्पन्न होणारी प्रतिबंधक शक्ती. [सं.]

**घनविल्हन** वि. घट्ट विणीचे, पण पातळ (वस्त्र) : 'ते पासवडी नावेक घनविल्हन होती।' - लीचउ ६८.

**घनश्याम** वि. मेघाप्रमाणे; कृष्णवर्ण; काळासावळा : 'घनश्याम हा राम लावण्यरूपी।' - राम ६७.

**घनसर** वि. १. दाट; विपुल; ऐवजदार; भरदार : 'पिकें होतां धान्यें घनसर बरीं स्वस्त विकतीं।' - दावि २२५. २. मजबूत; शक्तिसंपन्न. पहा : **घणसर**

**घनसावळा** वि. घनश्याम; मेघासारखा; सावळ्या रंगाचा (कृष्ण, राम) : 'पाहावया घनसांवळा। कृष्ण श्यामता आली बुबुळां।' - एरुस्व ७.२३.

**घना** वि. सोळा. (नंदभाषा)

**घनाकार** पु. भरीव आकार; गोळ्याचा आकार; लगड : 'पुढती तो घनाकारू हारपे। जे वेळीं अलंकार होती॥' - ज्ञा ८.१७३.
वि. ज्याची लांबी, रुंदी व उंची सारखी आहे असा. [सं.]

**घनाकृति-ती** स्त्री. एक किवा अनेक पातळ्यांनी सर्वांगाकडून मर्यादित अशी आकृती, अवकाश. [सं.]

**घनाना** पु. घोटाळा. (व.) [ध्व.]

**घनानी** वि. सदा कुरकुर करणारी. (व.)

**घनान्या** वि. त्रासदायक. (झाडी.)

**घनाभ** वि. घन आकाराचा; सहा चौरस पृष्ठभाग असणाऱ्या आकाराचा.

**घनाभरूप** वि. घनाकृती.

**घनावणे** अक्रि. १. घन होणे; घट्ट बनणे. २. साकार होणे : 'निजानंद घनावला।' - ज्ञागा ४९७.

**घनावणे** अक्रि. (आकाश) ढगांनी युक्त होणे; अभ्राच्छादित होणे.

**घनावली** वि. दृढ झालेली : 'घनावली आवडी। अव्यभिचारें चोखडीं। तियें घालू जोडीं। आंगुळियां।' - ज्ञा १५.५.

**घनाश्रय** पु. वातावरण; अंतराळ.

**घनास्त्र** न. रक्ताची गुठळी. (व.)

**घनाक्षरी** स्त्री. ओवीसारखा सोळा चरणांचा मराठीतील एक छंद, वृत्त. [सं. घन + अक्षर]

**घनांग** न. भूमितिविषयक एक परिमाण.

**घनांधकार** पु. दाट काळोख; घोर अंधार : 'घनांधकारांत दिवा जसा वर्नी।' - मृच्छ.

**घनिष्ठ** वि. अतिशय दाट, दृढ, बळकट : 'आपण व श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचा संबंध घनिष्ठ होण्याचा योग आला.' - साअप (गं. दे. खानोलकरकृत) पत्र ६ वे. [सं.]

**घनिष्ठता** स्त्री. दाट परिचय; सलगी : 'नोकर लोकांबरोबर इतकी घनिष्ठता मला पसंत नसावी हे तिने चटकन ताडले.'-विविध २७.६.१९१४.[सं.]

**घनीकरण** न. (मानस.) स्वप्नातील अनेक सुप्त घटकांचे एकत्रीकरण होऊन एक व्यक्त घटक तयार होणे.

**घनीकरण** न. १. (शाप.) पातळ, वायुरूप पदार्थ घट्ट करणे. २. (शाप.) पातळ, वायुरूप पदार्थ दाट, घट्ट होणे. उदा. पाण्याचे बर्फ बनणे, पातळ मेण थिजून घट्ट होणे. [सं.]

**घनीभूत** वि. गोळ्याच्या, लगडीच्या रूपाने असलेले; घट्ट झालेले; आकार धारण करणारे : 'नानाघनीभूत सुवर्ण। जैसें न्याहाळितां साधारण।' - ज्ञा १.४४. [सं.]

**घनीमत** न. फायदा. [फा. गनीमत]

**घनीय-घन विद्राव्यता** (भौ.) एका घनपदार्थांची दुसऱ्या घन पदार्थात मिश्रित होण्याची क्षमता.

**घनीय संकोचन** (भौ.) द्रवरूप धातूचे घनरूप होऊन नेहमीच्या तपमानाला येईपर्यंत होणारी त्याची घनफळातील घट.

**घनू** वि. पुष्कळ; विपुल; भरपूर. (माण.)

**घनोघनो** स्त्री. १. कटकट. २. कुरबुर. (झाडी)

**घन्कर** पु. चरकात ऊस टाकणारा. (झाडी)

**घनगडा** पु. १. मडक्याचा गोल काठ. २. लोखंडी कडे. ३. वेटोळे. (झाडी)

**घपकन-कर-दिशी-दिनी** क्रिवि. वासाचा, घाणीचा आकस्मिकपणा व विपुलता ध्वनित करणारे क्रियाविशेषण. पहा : **गपकन** [क.]

**घपका** पु. उग्र वास; दर्प : 'जेवणात मसाल्याच्या वासाचा घप्का (घपका)' - मवाइ २४८.

**घपघप-घपा, घपाघप-पा, घपापा** क्रिवि. पदार्थ एकदम गिळताना होणाऱ्या आवाजाने. पहा : **गपगपा** [ध्व. घपूचे द्वित्व]

**घपला** पु. घोटाळा; गुंतागुंत. [अर. गफलत]

**घपा (प्पा) घोळ** पु. १. अनेक वाद्यांचा अव्यवस्थित असा संमिश्र आवाज. २. (ल.) (वस्तूंचा, सामानाचा) पसारा; राडा; चिवडा; संकर. ३. (कामांचा, हिशेबाचा) गोंधळ; घोटाळा; अव्यवस्था. ४. अनेक कार्ये, धंदे एकत्र आल्याने उडणारी तारांबळ, धांदल, ताणाताण. ५. लगबग; धामधूम; घायकूत.

**घबके** न. अवचित होणारा लाभ; अलभ्य, आगंतुक लाभ; घबाड; टाऊक; टावके. (क्रि. लागणे, मिळणे, सापडणे.) पहा : **गबका**

**घबघबीत** पहा : **गबगबीत**

**घबड** स्त्री. पोकळ जागा : 'धबधब्याच्या आतल्या अंगाला एक मोठी घबड होती.' - सराई १२.

**घबदूल** वि. गलेलठ्ठ; धष्टपुष्ट; भक्कम; दांडगा. पहा : **गबदूल**

**घबराट** स्त्री. १. घाबरगुंडी; भयभीत अवस्था. २. (रोग्याचा) जीव घाबरणे; बेचैन वाटणे; काहिली होणे; गलबलणे. ३. (ल.) भीती; धास्ती; दुःख. ४. गोंधळ; घोटाळा. ५. एकाएकी निर्माण झालेली तीव्र (निराधार) भीती.

**घबाड** न. १. एक शुभ मुहूर्त. सूर्यनक्षत्रापासून चंद्रनक्षत्रापर्यंत मोजून येणाऱ्या संख्येला तीन या संख्येने गुणून गुणाकारात चालू तिथी मिळवून आलेल्या संख्येला सातानी भागून बाकी तीन उरल्यास त्या दिवशी हा योग येतो. २. (सामा.) शुभ वेळ; मुहूर्त; सुयोग. ३. (ल.) आकस्मित लाभ; अनायासे झालेली मोठी द्रव्यप्राप्ती; लाट. (क्रि. मिळणे, साधणे.) : 'गाण विहंगमें गेला। घबाड अवचित पावला।' - दावि २७४.

**घबाड** पु. दाराच्या फळीच्या खालच्या टोकाला फिरण्याकरिता जो गट्टू वगैरे बसवतात तो; खालचा वात्या, दाराचे कुसू.

**घबाडचूक** स्त्री. मोठी चूक; घोडचूक.

**घबाडमाप** न. १. बाजारात चालणाऱ्या शिरस्त्याच्या मापापेक्षा, वजनापेक्षा मोठे माप, वजन. २. मोठा आहार असणाऱ्या माणसाचे पोट; कधी तृप्त न होणारा कोठा.

**घबी** स्त्री. आडोशाची पोकळी : 'दरडीला त्यांची घबी असते त्यात ते (मासे) सुरक्षितपणे जाऊन बसतात.' - शिस ४४.

**घबुकेळ** न. आकस्मिक झालेला मोठा लाभ; अकल्पित सापडलेला ठेवा, डब्ोले; मिळालेल्या पुष्कळ देणग्या, बक्षिसे, इनाम इत्यादी. (क्रि. लागणे, मिळणे, सापडणे.)

**घबूक** न. १. अवचित होणारा लाभ. पहा : **घबके** (क्रि. लागणे, मिळणे, सापडणे.) २. विपुलता; समृद्धी; रेलचेल; अतिरेक.

वि. भरपूर; अतिशय; विपुल.

क्रिवि. विपुलतेने; अतिशयपणे.

**घम** क्रिवि. स्तब्धपणे; मुकाट्याने. पहा : **घम्म**

**घम** स्त्री. १. क्षमा; अपराध गिळणे; सहन करणे; सहनशीलता; गय; गई. (क्रि. खाणे, करणे, घेणे, म्हणणे.) २. दम; विश्रांती; विसावा. (क्रि. खाणे) पहा : **गम** [अर. घम् = दुःख, फा. गम]

**घम** पु. ढेपाळे; गुळाच्या ढेपा घालण्याकरिता केलेले भांडे. (बे.) पहा : **घमेले** [सं.]

**घमकर-कन-दिशी** पहा : **घपकर-कन-दिशी**

**घमगी** वि. विषादयुक्त; दुःखी; कष्टी.

**घमघम** पु. (गो.). पहा : **घमघमाट**

क्रिवि. १. आत्यंतिक सुवासाचे निदर्शक क्रियाविशेषण. २. एकदम; भरपूर; सुरळीतपणे; संतोषाने. ३. धडकून; जोराने. [ध्व.]

**घमघमणे** अक्रि. अतिशय सुवास येणे; सुगंधाने, दरवळणाऱ्या वासाने युक्त होणे.

**घमघमाट** पु. वासाची अतिशयता; मधुर व उग्र वासांचा संयोग; सुगंधाचा अतिरेक, दर्प; फार दरवळणारा सुगंध : 'फुलांचा घमघमाट व झऱ्यांचा झुळझुळ आवाज यांपासून मोठा आवाज होई.' -पाव्ह ३७.

**घमघमित** वि. जाडसर.

**घमघमीत** वि. उग्र, मधुर आणि दरवळणारा (सुगंध); घमघम सुवासयुक्त (फोडणी इ. पदार्थ); खमंग.

**घमट गुळवणी** १. पहा : **घमंड गुळवणी**. २. तोंडापुरते लाडीगोडीचे भाषण; गोड थापेबाजी; खुशामत.

**घमत** स्त्री. तारवास भोक पडून त्यातून तारवाच्या तळाच्या भागात साचलेले किंवा झिरपलेले पाणी; गलबतातील गाळ, पाणी. (को.) पहा : **गमत**

**घमतड-डी** स्त्री. जेथे घमत साचते ती जागा; गलबताचे पोट. (राजा.) पहा : **गमतड**

**घमताड** स्त्री. १. घमतड २. गलबतातील गाळपाणी. (को.) पहा : **गमताड**

**घमशण** न. गडबड; धांदल : 'माझा परकरसुद्धा शिवायला झालाय. लक्षात असू द्या. नाहीतर आपल्याच घमशणात...' - रथचक्र.

**घमशा(स्या)न** न. १. (क्रियेचे आधिक्य, जोर किंवा पदार्थांची रेलचेल दाखविण्यासाठी अनियमितपणे या शब्दाचा उपयोग करतात.) धांगडधिंगा; धुमश्चक्री; खिदडा; धुडगूस (क्रि. घालणे, मांडणे.). २. चमचमाट, खाणे, पिणे, गाणे, बजावणे इ. प्रकारांची चैनबाजी; धूमधडाका. ३. (पावसाची, खाद्यपदार्थांची, पिकांची) रेलचेल; चंगळ; लयलूट; समृद्धी; विपुलता : 'साहित संगीत प्रसंग मानें। करावीं कथेचीं घमशानें।' - दास १८.३.१८. ४. दांडगाई; लाथाळी; तुडवणी. ५. पराभव; फडशा; धुव्वा (वाद, शिवीगाळ इ. मध्ये.).

वि. १. धिप्पाड; भक्कम; धटिंगण; दांडगा (मनुष्य). २. भव्य; शोभिवंत; छानदार; नामी (इमारत इ.). ३. भक्कम; दणगट; मजबूत; टिकाऊ (कापड,

दोर इ.). ४. घमंडानंदन; विलासी; चैनबाज; खुशालचंद (मनुष्य).

**घमशाम** वि. भरघोस.

**घमंड-डी** स्त्री. १. विपुलता; प्राचुर्य; अतिशयता; रेलचेल; समृद्धी; अतिरेक. २. (कामाचा, काळजीचा) रगाडा; नेट; कचका; निबिडता : 'अशा ह्या कर्जांचे पेंचाचे घमंडींत तो अद्यापि पडला आहे.' - व्यनि ९०. ३. थाट; बहार; मजा; रंग : 'केलें घमंड कीर्तनीं।' - दावि ४१६. ४. अतिशय उपभोग; चैन; चंगळ : 'त्यावेळेस त्यांचे खाण्यापिण्याची व नाना प्रकारचे मळीण विषयोपभोग घेण्याची मोठी घमंडी उडती.' - व्यनि ४३.

वि. भरपूर; विपुल; समृद्ध; मोठा; मनसोक्त : 'नटोनि घमंड नाचो लाऊं लोकां।' - दावि १४.

**घमंड-डी** स्त्री. घोष; गजर; एकतानता; नादमधुरता : 'ताळमृदांगघमंडी। मिळोनि जातां उठे अधिक आवडी।' - दावि १७५.

वि. कर्णमधुर; सुस्वर; सुश्राव्य : 'भजन कीर्तन घमंड करित।' - दावि १६७.

**घमंड, घमंडी** पहा : **घमेंड**

**घमंड-घमंडखोर, घमंडानंद-दी, घमंडानंदन, घमंडीनाथ** वि. १. प्रौढी मारणारा; बढाईखोर; गर्विष्ठ : 'कां घमंडे हो ठाकिला संसार।' - दावि ३०९; 'पेनिलोप राणीच्या पाणिग्रहणार्थ जमलेल्या राजपुत्रांप्रमाणें घमंडानंदन आहेत.' - ब्रावि ३. २. (जो पोटाशिवाय दुसऱ्या कशाकडेही लक्ष देत नाही अशा माणसाला उपरोधाने लावायचा शब्द) पोटभरू; पोटबाबू. ३. चैनी; खुशालचेंडू; रंगेल; विलासी. [हिं. घमंड = गर्व]

**घमंडगुळवणी** न. लापशी इ. गोडसर पातळ पदार्थ बिघडून बेचव, पाणचट झाले असताना त्यांना तिरस्काराने लावायचा शब्द. गरगट; ढपळवणी; खरकटवणी; घमटगुळवणी.

**घमाघम, घमाघमा** पहा : **घमघम**

**घमामा** क्रिवि. घमाघमा; भरारा; घमघम : 'दोहूं चला रे गाई घमामा।' - दावि ७६९.

**घमासान** वि. घनघोर; जोराचा; तुंबळ : 'ब्रिआन्स्क आणि खार्कोव्ह या दोन्ही शहरांच्या वेशीवर घमासान लढाई सुरू झाली.'-दुम १९५.

**घमेले** न. १. लोखंडी पाटी, टोपली, तगारी. २. आगगाडीच्या रुळाखाली आधार देण्याकरिता पालथी घातलेली लोखंडी जाड तगारी. एका स्लीपरखाली ह्या दोन्ही बाजूला दोन असतात. ३. घम; ढेपाळे. [सं. घर्म (कढई) + आलय]

**घमेंड** स्त्री. पोकळ ऐट; डौल; ताठा; अहंकार; गर्व. [हिं. घमंड]

**घमेंड** स्त्री. ताकद; जोर. (अहि.)

**घमेंडखोर** वि. १. गर्विष्ठ. २. ऐटबाज.

**घमेंडी** पहा : **घमंड, घमेंड** : 'त्याच्या सर्व घरच्या माणसांना घमेंडी चढली आहे.' - दुर्गा ४.

**घमोऱ्या** स्त्री. घामोळ्या. (झाडी) [सं. घर्मावलि]

**घम्म** क्रिवि. स्तब्ध; मुकाट्याने. पहा : **घम** : 'पण मास्तरीणबाई अगदीं घम्म बसल्या, अगदी रामा! शिवा! गोविंदा!' - खरादे ३०.

**घम्मनगोट** वि. खंबीर; घट्ट; पक्का. (माण.)

**घम्माघोर** वि. दाट; घनघोर.

**घर** न. १. राहण्यासाठी बांधलेली जागा; वाडा. २. एका कुटुंबातील (एके ठिकाणी) राहणारी मंडळी; कुटुंब; (सांकेतिक) पुनर्विवाहित स्त्रीला पहिल्या पतीपासून झालेला मुलगा. ३. गृहस्थाश्रमधर्म; संसार; प्रपंच; (ल.) नवरा किंवा बायको. 'हा जिन्नस घरात दाखवून आणतो.' - विवि १०.४.७; 'आमच्या घरांतल्यांनी दादासाहेबांना दारूचें व्यसन लावलें.' - एकच प्याला. ४. एखाद्या व्यवसायात जुटीने काम करणारी माणसे, मंडळी, संस्था; अडतीची जागा. ५. एखादी वस्तू सुरक्षितपणे ठेवण्यासाठी केलेले धातूचे, लाकडाचे आवरण, वेष्टण, कोश. उदा. चष्म्याचे घर. ६. पेटीतील, टाइपाच्या खणातील कप्पा, खण, खाना. ७. सोंगट्यांच्या, बुद्धिबळाच्या पटावरील, पंचांगातील (प्रत्येक) चौक; चौरस; मोहऱ्याचा मूळचा चौरस; मोहऱ्याचा मारा. ८. (ज्यो.) कुंडलीच्या कोष्टकांतील भावदर्शक स्थान. ९. घराणे; वंश; कुळ. १०. (वर्तमानपत्राचा, पत्रकाचा, कोष्टकाचा) रकाना, सदर : 'येऊन जाऊन पत्रप्रकाशकास स्वत:चा असा मजकूर दर खेपेस पराकाष्ठा दोन तीन घरें घालणें येतें.' - नि १५. ११. (मधमाशाचे पोळे वगैरेतील) छिद्र : 'केळीच्या सोपटाचीं घरें ज्यांनीं पाहिली असतील....' - मपु ६.२२५. १२. ठाणे; ठिकाण : 'कुबल, बांकी घरें। शिवराजाच्या हाता आलीं।' - ऐपो ९. [सं. गृह] (वा.) ० **आघाडणे** - घर जळून खाक होणे. (को.) ० **उघडणे** - १. लग्न करून संसार थाटणे. २. एखाद्याचे लग्न करून देऊन त्याचा संसार मांडून देणे. ० **उभारणे,** ० **उभे करणे** - संसारातील अडचणी दूर करून ते सुरळीत चालू करणे. ० **करणे** - १. बिऱ्हाड करणे; राहण्यास जागा घेऊन तीत जेवणखाण इ. गोष्टी करायला लागणे. २. (त्रासदायक वस्तूंनी) ठाणे देणे; राहणे; वास्तव्य करणे : 'माझ्या हृदयांत घर करून बसून त्याने मला घायाळ केलें.' - बाय ३. ३. ० **खाली असणे** - १. घर मोकळे असणे. २. घरातील पुरुषमनुष्य मृत्यू पावणे : 'कासीबा देशपांडे यांचा घर खालीं होता. त्याची बायको तिसी कासीबा देशपांड्या गेला.' - ऐसंसाखं ४.१०७. ० **खाली करणे** - घर सोडून जाणे; घर मोकळे करून देणे. ० **घालणे** - (एखाद्याच्या) घराचा नाश करणे. ० **घेणे** - १. (सामा.) लुबाडणे; लुटणे; नागविणे; बुचाडणे : 'मग रेणुकेनें बोलिलें। अहो जेऊनि कैसें घर घेतलें।' - कापु २३.४०. २. (एखाद्याचा) नाश करणे : 'म्हणती जन्मोनि द्रौपदीनें। आमचें घर घेतलें तिणें।' - जै ७१.९९. ३. (त्रासदायक वस्तू) घर करून बसणे, ठाणे देऊन बसणे. पहा : ० **करणे** २. ० **चालविणे** - प्रपंचाची, संसाराची जबाबदारी वाहणे. ० **जोडणे** - इतर घराण्यांशी, जातींशी, लोकांशी इ. मैत्री, शरीरसंबंध घडवून आणणे; मोठा संबंध, सलोखा उत्पन्न करणे : 'लक्ष्मीपतीचें घर थोर जोडे।' - सारुह २.१. ० **डोक्यावर घेणे** - आरडाओरड करून घर दणाणून सोडणे; घरात दांडगाई, कलकलाट, दंगामस्ती करणे. ० **तुटणे** - मैत्रीचा, नात्याचा संबंध नाहीसा होणे; स्नेहात बिघाड होणे. **दुसऱ्याचे घर दाखवणे** - १. आपल्या घरी कोणी त्रासदायक मनुष्य आला असता काही

युक्तीने त्याला दुसऱ्याच्या घरी लावून देऊन आपला त्रास चुकविणे; (एखाद्याची) ब्याद, पीडा टाळणे. २. घालवून देणे; घराबाहेर काढणे. **० धरणे** - १. घरात बसून राहणे; घराच्या बाहेर न पडणे, संकटाच्या, दंगलीच्या वेळी पळून जाणे, पळ काढणे, गुंगारा देणे. २. (रोग इत्यादींनी शरीरावर) अंमल बसविणे; एखादा आजार पक्केपणाने जडणे. ३. चिकटून राहणे; चंचलपणा न करता एकाच ठिकाणी भिस्त ठेवून असणे. ४. (बुद्धिबळात, सोंगट्यात) सोंगटी एकाच घरात ठेवून घर अडविणे. **० धुणे, ० धुऊन नेणे** - एखाद्याचे असेल नसेल ते लबाडीने गिळंकृत करणे; हिरावून नेणे; नागविणे; बुचाडणे; लुबाडणे; लुटणे; अगदी नंगा करणे : 'शंभर वर्षांनी घर धुऊन नेल्यानंतर ही ओळख आम्हांस पटूं लागली आहे.' - टिव्वा. **० निघणे** - नवऱ्याला सोडून दुसऱ्या मनुष्याबरोबर नांदणे; दुसऱ्याच्या घरात, कुटुंबात निघून जाणे : 'माझें घर निघाली.' - वाडमा २.२०९. **० नेसविणे** - घरावर गवत घालून ते शाकारणे; घर गवत इत्यादिकांनी आच्छादणे; घर शिवणे. **० पाहणे** - १. (एखाद्या) घराकडे वक्रदृष्टी करणे; (रोगाचा, मृत्यूचा) घरावर पगडा बसणे; घरात शिरकाव करणे. २. (बायकी) वधूवरांचे योग्य स्थळ निवडणे : 'सुशील तारेने आपल्या पुण्यबलाच्या साह्याने योग्य घर पाहून....' - रजपूतकुमारी तारा. ३.घरी जाणे, मुलाबाळांत जाणे. **० पालथे घालणे** - हरवलेली वस्तू शोधण्यासाठी घराचा कानाकोपरा धुंडाळणे. **० पुजणे** - १. आपले काम करून घेण्यासाठी एखाद्याच्या घरी आर्जवे, खुशामत करण्यास वारंवार जाणे. २. (घरे पुजणे) आपला उद्योग न करता दुसऱ्यांच्या घरी चकरा मारणे. **० फोडणे** - १. संसार आटोपणे, आवरणे. २. कुटुंबातील माणसांत फूट पाडणे; घरात वितुष्ट आणणे. ३. घराला भोक पाडून आत (चोरी करण्यासाठी) शिरकाव करून घेणे. **० बसणे** - कर्ता मनुष्य नाहीसा झाल्यामुळे, दुर्दैवाच्या घाल्यामुळे कुटुंब विपन्नावस्थेला पोचणे; घरांची वाताहत, दुर्दशा होणे. **० बसविणे** - संसार थाटणे; घर मुलाबाळांनी भरून टाकणे. स्त्रीच्या विवाहोत्तर जीवनात या वाक्प्रचाराचा उपयोग करतात. **० बुडणे** - १. कुटुंबाची नासाडी, दुर्दशा होणे; कुटुंब धुळीला मिळणे. २. संतती नसल्यामुळे वंशाचा लोप होणे. **० बुडविणे** - १. (एखाद्याच्या) कुटुंबाचा विध्वंस करणे; संसाराचा सत्यानाश करणे. २. घराला काळिमा आणणे. **० भरणे** - १. दुसऱ्याला बुडवून, त्यांची उपेक्षा करून आपण श्रीमंत बनणे. २. दुसऱ्याचे घर लुटणे व स्वतः गबर होणे. **० भंगणे** - कुटुंब मोडणे, विस्कळीत होणे; कुटुंबाला उतरती कळा लागणे; कुटुंबाचा नाश होणे; मंडळीत फूट पडणे. **० मारणे** - घर लुटणे. **० मांडणे, थाटणे** - (संसारोपयोगी जिन्नसांनी) घर नीटनेटके करणे; घराची सजावट करणे. **० म्हणून ठेवणे** - एखादी वस्तू, सामान प्रसंगविशेषी उपयोग पडावी म्हणून संग्रही ठेवणे; प्रत्येक वस्तू जतन करून ठेवणे. **० रिघणे** - पहा : **० निघणे**. **० लागणे** - घर भयाण भासणे. (एखाद्याचा मुलगा अथवा पत्नी वारली असता घरातील भयाण स्थिती वर्णन करताना ह्या वाक्प्रचाराचा उपयोग करतात.) **घराचा उंबरठा चढणे** - घरात प्रवेश करणे. **घराचा खांब, घराचे धारण, घराचे पांघरूण** - घरातील कर्ता माणूस; घरातला मुख्य; घरमेढा. **घराचा पायगुण** - घरामुळे घडणाऱ्या शुभाशुभ गोष्टी; घरातील माणसांची वागणूक, वर्तणूक, वर्तन, शिस्त; घराचे पुण्य पाप. **घराचा पायगुणच तसा, घरची खुंटी तशी** - कुटुंबातील माणसाची वागण्याची रीत असेल त्याप्रमाणे; एखाद्या कुटुंबातील माणसांची सर्वसाधारण अशा वाईट व्यसनाला, खोडीला, सवयीला उद्देशून म्हणतात. **घराचा वासा ओढणे** - एखाद्या कामधंद्यासाठी आवश्यक असलेले साधन, वस्तू, गोष्ट नाहीशी करणे; एखाद्या मोठ्या कामातून फार जरुरीचे साधन नाहीसे करणे; अडवणूक करणे. **खाल्ल्या घराचे वासे मोजणे** - कृतघ्न होणे; केलेला उपकार विसरणे. **घरात पैशाचा, सोन्याचा धूर निघणे** - घरची अतिशय श्रीमंती असणे. **घराला रामराम ठोकणे** - घर सोडून जाणे : 'आज या घराला रामराम ठोकण्यापेक्षा घटकाभर जुलमाचा रामराम पत्करला.' - भा ९०. **घरावर काट्या घालणे, गोवरी ठेवणे, निखारा ठेवणे** - एखाद्याच्या कुटुंबाची धूळधाण, बदनामी करणे. **घरावर कुत्रे चढविणे** - (गोव्याकडे घरावर कुत्रे चढल्यास घर सोडावे लागते यावरून) १. एखाद्याच्या घरात कलागती, भांडणे लावून देणे, तंटे उत्पन्न करणे. २. दुष्टावा करणे; अडचणीत आणणे. **घरावर गवत रुजणे** - घर ओसाड, उजाड पडणे. **घरावर तुळशीपत्र ठेवणे** - घरादाराचा त्याग करणे; संसाराबद्दल पूर्णपणे अनासक्त होणे. **घरास आग लावणे** - एखादे दुष्कृत्य करून घराचा नाश करणे. **घरास काटी लागणे** - घर उद्ध्वस्त होणे; घरात कोणी न राहणे. **घरास काटी लावणे** - १. घराच्या भोवती काटे, काटक्या लावून येणे - जाणे बंद करणे. २. घर उजाड, उद्ध्वस्त, ओसाड करणे. **घरास येणे** - अवस्थेप्रत येणे. **घरास हाड बांधणे, घरावर टाहळा टाकणे** - (एखाद्याला) वाळीत टाकणे; समाजातून बहिष्कृत करणे; जातीबाहेर टाकणे. **घरास राखणे** - १. घराचे रक्षण करणारा मनुष्य. २. (ल.) थोडासा संचय, शिल्लक, साठा, संग्रह. **घरी बसणे** - (एखादा मनुष्य) उद्योगधंदा नसल्यामुळे, सोडून दिल्यामुळे घरी रिकामा असणे; बेकार होणे. **घरी पाणी भरणे** - (एखादा मनुष्य, गोष्ट) एखाद्याच्या सेवेत तत्पर असणे; त्याला पूर्णपणे वश असणे. **घरी बसवणे** - अधिकारावरून किंवा कामावरून काढून टाकणे : 'किचनेरलाही घरी बसविण्याचा त्याचा विचार होता.' - पम ४०३. **घरी येणे** - (एखादी स्त्री) विधवा झाल्यामुळे सासरच्या आश्रयाच्या अभावी पितृगृही, माहेरी परत येणे; विधवा होणे : 'कुटुंब मोठे, दोन बहिणी घरी आलेल्या.' - मनोरंजन आगरकर अंक.

**घर** न. १. (उंदीर, चिचुंदरी इ. कांचे) बीळ. २. एखादा पदार्थ शिरकविण्यासाठी केलेला दरा, भोक, खोबण, खाचण. ३. (मालकाच्या इच्छेविरुद्ध बळकावलेले) वस्तीचे ठिकाण. उदा. काट्याने टाचेत घर करणे. [सं. गर्त = खळगा; भोक; अर. घार = जखम]

**घर** न. १. उत्पत्तिस्थान; प्रांत, प्रदेश, ठिकाण, ठाणे (वारा, पाऊस, प्रेम, विकार, रोग इत्यादिकांचे) : 'सर्वज्ञतेचि परी। चिन्मात्राचे तोंडावरी। परी ते आन घरीं। जाणिजेना।' - अमृ ७.१३०. २. रोग इत्यादिकांच्या उत्पत्तीचे कारण, मूळ, उगम. [सं. गृह]

**घर** न. १. वादातील आधारभूत मुद्दा, गमक, प्रमाण. २. शास्त्र, कला, इत्यादिकांतील खुबी, मर्म, रहस्य, मखखी, किल्ली. [सं. गृह]

**घर** न. सामर्थ्य; संपत्ती; ऐपत; आवाका; कुवत. [सं. गृह]

**घर** न. १. सतार इत्यादी वाद्यांतील सुरांचे स्थान; सनईसारख्या वाद्याच्या दोन भोकांमधील अंतर; सतारीच्या दोन पडद्यामधील अंतर. २. मृदंग इत्यादी चर्मवाद्यांचा वादी, दोरी इत्यादींमुळे होणारा प्रत्येक विभाग. ३. (संगीत) तान, सूर यांची हद्द, मर्यादा, क्षेत्र.

**घर** न. (अडचणीच्या, पराभवाच्या वेळी) निसटून जाण्यासाठी करून ठेवलेली योजना; आडपडदा; पळवाट; कवच.

**घर** न. खुद्द; आपण स्वत:; स्वत:चा देह.

**घर** न. वयोमानाचा विभाग; कालमर्यादा : 'हा नवा गृहस्थ पन्नाशीच्या घरांत आला होता.' - कोरकि ३२.२५.

**घर** न. विशिष्ट खुणांनी दर्शविलेले अंतर; टप्पा : 'मिनिट काटा एका तासात ६० घरें चालतो.' - के. [सं. गृह] ३. चौरस : 'घर चौवीस हाथ.' - विजापूर शिला. १.५.६.

**घरअसामी** स्त्री. १. वतनवाडी; जमीनजुमला; मालमत्ता. २. घरकामासंबंधीचा मनुष्य; घराकडचा माणूस.

**घरइतें वरइतें** न. नवरा बायको : 'इथे अनादि घरइतें वरइतें। जे वियालीं ब्रह्मादि प्रपंचातें।' - विसि १३.५.

**घरकज्जा** पु. घरातील तंटा; कौटुंबिक भांडण; गृहकलह.

**घरकरी** पु. पत्नीने नवऱ्याला उद्देशून वापरायचा शब्द; घरधनी; कारभारी; यजमान; घरमालक.

**घरकसबी** पु. आपल्या अक्कलहुशारीने घरगुती जरुरीचे जिन्नस घरच्या घरी तयार करणारा व घरची मोडतोड दुरुस्त करणारा मनुष्य; घरचा कारागीर; बाहेर काम करून उपजीविका न करणारा मनुष्य..

**घरकंद** पु. एक प्रकारचा कंद. (सामा.) कोनफळ; गोराडू.

**घरका** पु. १. काटा इत्यादिकांनी कातडीत, पायात केलेले घर. (कु.) २. वस्त्र, लाकडाची फळी इत्यादिकांना पाडलेले छिद्र, भोक.

**घरकान्न** स्त्री. घरधनीण; बायको; घरकरीण. (गो.)

**घरकार-री** पु. १. नवरा; पती. २. घरचा यजमान; घरधनी; मालक. (गो.कु.)

**घरकारणी** पु. घरचे सर्व काम पाहणारा; दिवाणजी; खाजगी कारभारी.

**घरकी** वि. घरातला; घरासंबंधीचा : 'गावकी व घरकी कामे करणाऱ्या....' - गांगा २७.

**घरकुबडा, घरकुबा-कोंबा-कोंग्या-कोंडा-कुंडा-कोंधा, घरघुबडा** पहा : **घरकोंबडा**

**घरकुरती** पहा : **घरगुती**

**घरकु (कू) ल** न. १. लहान घर; भातुकलीच्या खेळातील मुलींनी केलेले लहानसे घर : 'तिया खेळतां करिती घरकुलीं।' - ज्ञा ९.३७४. २. लहानसे झोपडीवजा घर : 'वस्तीकरितां झावळ्याचे घरकूल करीन.' - पाव्ह २८. ३. घरटे; खोप. (वा.) **घराचे घरकूल होणे** - वाताहत होणे.

**घरकुली** स्त्री. लहान घर; खेळातील घर : 'करूनि ब्रह्मांडाची घरकुली। माजी बैसविली ब्रह्मांडादिक बाहुली।' - जै २९.४५.

**घरकुल्ली** वि. बहुश: घराबाहेर न पडणारी (स्त्री); घरकोंबडी. (गो.)

**घरकुंडा** पु. १. पक्ष्याचे घरटे. भुंग्याचे घर; वाळवीचा निवारा. २. (ल.) आश्रयस्थान (को.) : 'आम्हीं तुझ्या विश्रांतीचा घरकुंडा सोडतांच हे आमचे अद्वैतज्ञानाचे पांख आम्हांस तोलत नाहींसे होऊन आम्ही खालीं पडों लागलों.' - यशोदा पांडुरंगी.

**घरकुंडी** वि. घरातला : 'पोरीतला घरकुंडी खेळ....' - जोफु ९७.

**घरकोल्या** वि. १. लाजाळू. २. आळशी. (झाडी)

**घरकोंबडा** पु. (दुबळ्या व सुस्त माणसाला - प्राण्याला तिरस्काराने लावायचा शब्द) नेहमी घरात राहणारा; एकलकोंड्या; माणुसघाण्या; चारचौघांत उठणे, बसणे, गप्पा मारणे इ. ज्याला आवडत नाही असा, कधी बाहेर न पडणारा मनुष्य; घरबशा.

**घरखटला-ले** पु. न. १. घरचा कामधंदा; गृहकृत्य; प्रपंच, शेतभात इ. घरासंबंधी काम. २. घराची, कुटुंबाची काळजी, जबाबदारी, अडचणी इ. ३. गृहकलह; घरातील भांडण.

**घरखण** न. घर्षण; (ल.) आदळआपट : 'प्रियाप्रियवंसजाली। घरखणें स्नेहदावानलीं।' - वह ४५०.

**घरखण्या** वि. घरातील धुणे, पाणी भरणे इ. सामान्य कामाकरिता ठेवलेला गडी; घरच्या कामाचा माणूस.

**घरखास(न,ज)गी** वि. घरातील मालमत्ता, कामे, कारखाना इ. संबंधी; घरगुती बाबीसंबंधी; घरगुती, खासगी व्यवहाराबाबत.

**घरगणती** स्त्री. १. गावातील घरांची संख्या. २. गावातील घरांची मोजणी, मोजदाद. ३. गावातील घरांच्या मोजणीचा हिशेब, तपशील. (क्रि. करणे, काढणे.)

**घरगाडा** पु. संसाराची एकंदर कामे, जबाबदारी; प्रपंचाची राहाटी; प्रपंच; संसार; घरखटला. (क्रि. रेटणे, हाकणे, चालवणे, सांभाळणे.)

**घरगु(ग)ती, घरघराड** वि. १. घरचा; घरी तयार केलेला (माल, सामान, वस्तू); घरी वाढवलेला, पाळलेला (घोडा, पशू); घरी लावलेला (रोप, झाड इ.). २. घरचा. ३. घराशी संबंध असलेला; खाजगी.

**घरगुती** क्रिवि. १. स्वत:च्या अंगमेहनतीने; कौशल्याने. २. घरच्या माणसांकडून.

**घरगॅरें, घरबॅरें** न. पिरपीर; टुमणे. (गो.)

**घरगोहो** पु. चुलीपाशी, बायकांत, आश्रितात शौर्य दाखवणारा मनुष्य; गेहेशूर; घरातील माणसांवर जरब ठेवणारा पण बाहेर भागुबाईपणा करणारा पुरुष.

**घरघर** स्त्री. १. चरक, रहाट, जाते इ.चा होणारा घर्र् असा आवाज. २. कंठात कफ दाटल्यामुळे होणारा घोगरा, विशिष्ट आवाज (विशेषत: मरणासन्न माणसाचा) : 'मग कशाची जाते घरघर।' - तोबं १४. [ध्व.] (वा.) ० **लागणे** - थोड्याच वेळात मरणार अशा स्थितीत असणे; मरण्याच्या बेताला येणे; धंदा, उद्योग बंद पडण्याच्या स्थितीस येणे.

**घरघर-रा** क्रिवि. जाते, चरक, रहाट इत्यादिकांच्या होणाऱ्या घरघर आवाजाप्रमाणे; तसा आवाज करीत. [ध्व.]

**घरघर-रा-री** पु. स्त्री. मरायला टेकलेल्या माणसाच्या घशातील घरघर आवाज. (क्रि. लागणे, वाजणे.) [ध्व. घरघर]

**घरघरटी** स्त्री. दारोदार हिंडणे; एकसारखी फेरी घालणे. (क्रि. करणे.) : 'चंद्र कथुनि मग महेंद्रगृहीं घरघरटी करित वायां।' - आमहाबळ १९.१.

**घरघरणे** अक्रि. घरघर वाजणे; कंठ कफाने दाटल्यामुळे घरघर आवाज होणे; घरघर असा आवाज करणे.

**घरघराट** पु. घरघर असा मोठा आवाज : 'मोटारीच्या घरघराटातूनही ओरडून बोललेली बोलणी आमच्या कानी येत होती.' -वावटळ २५.

**घरघशा** पहा : **गरगशा**

**घरघाला-ल्या-लू** वि. १. खोडसाळ; फसवाफसवी करणारा; बिलंदर : 'भिजल्या पोरी कशी होरी ग हे घरघाली।' - राला ४०. २. कुळाची अब्रू घालवणारा; घरबुडव्या; दुसऱ्याचे घर बुडवणारा किंवा व्यसनादिकांनी आपले घर बुडवून घेणारा : 'कशी घरघाली रांड बसली आम्हां गिळून।' - राला ४६. ३. सर्वनाश करणारा : 'भयानका क्षिति झाली घरघाली रुद्रविंशति जगिं फांकली।'- ऐपो ३६८.

**घरघुबी** स्त्री. ओलसर जागेत राहणारा एक लहान प्राणी. हा सहसा बाहेर दिसत नाही. नेहमी आपल्या घरात मातीखाली असतो. कोकणात तर याचे दर्शन हे पाहुणे येण्याचे लक्षण समजले जाते.

**घरघुबेपणा** पु. एकलकोंडेपणा; घरघुबडेपणा.

**घरघुशा-सा** वि. सर्व दिवसभर उदासवाणा घरात बसणारा; घरबशा, घरकोंबडा.

**घरघुशी-सी** स्त्री.१. नवऱ्याचे घर सोडून दुसऱ्याच्या घरात नांदणारी; दुसऱ्याचा हात धरून गेलेली विवाहित स्त्री : 'कोण धांगड रांड घरघुशी।' - राला ७८. २. ठाकर वगैरे जातींत लग्न होत नसलेली स्त्री कोणाच्या तरी घरात घुसते व तेथे राहू लागते. पुढे दंड घेऊन जात त्यांचे लग्न लावते. अशी स्त्री. (ठा.)

**घरघेऊ-णा** वि. घराचा, कुटुंबाचा नाश, धुळधाण, करणारा; घरघाला; घरबुडव्या; दुसऱ्याला मोह पाडून, फसवून त्याचे घर बळकावणारा : 'जळो आग लागो रे। तुझि मुरली हे घरघेणी।' - देप ८०.

**घरचा** वि. १. कुटुंबातील; घरातील (माणूस); घरात जन्मलेला, वाढलेला, तयार केलेला इ. २. (ल.) नवरा; पती : 'आम्हांस आतां फार रात्र झाली, घरचीं रागें भरतील.' - रत्न ५.४. ३. स्वतःसिद्ध; स्वसंपन्न; दुसऱ्याची अपेक्षा नसणारा. उदा. घरचा गाणारा, सुतार, विद्वान इ. ४. घरी उत्पन्न केलेले, घरच्या शेतातले (धान्य). (वा.) **घरचा ना घाटचा -** कोण, कुठला, कोणाचा, काय उपयोगाचा इत्यादी ज्यासंबंधी काहीही सांगता येत नाही असा (मनुष्य, पदार्थ, प्राणी); अगदी अनोळखी; परका.

**घर(रा)चार** पु. १. कुटुंबाची रीतभात; घराची चालचालणूक; कौटुंबिक रूढी, वहिवाट. २. गृहस्थधर्म; संसार; प्रपंच : 'दुःखाचा घरचार निर्धन जिणें भोगावरी घालणें।' - किंसुदाम ५०. [सं. गृहाचार]

**घरचारि (री) णी** स्त्री. गृहपत्नी; घरधनीण; यजमानीण; घरमालकीण.

**घरची उतरंड, कूड** दुसऱ्याला निरुत्तर करण्यास किंवा त्याची फजिती करण्याच्या हेतूने वापरण्यात येणारा अशिष्ट शब्दप्रयोग. (ना.)

**घरची विद्या** कुटुंबात चालत आलेली विद्या, धंद्याचे ज्ञान; घरी शिकता येण्यासारखी विद्या.

**घरजमा** स्त्री. घरावरील कर; घरपट्टी.

**घरजावई** पु. बायकोसह सासऱ्याच्या घरी राहणारा जावई; सासऱ्याने आपल्या घरीच ठेवून घेतलेला जावई; सासऱ्याच्या घरी राहून तेथील कारभार पाहणारा जावई : 'तो संसाराचा आपण। घरजांवई झाला जाण। देहाभिमानासि संपूर्ण। एकात्मपण मांडिलें॥' - एभा २२.५९२. (वा.) **० करणे -** १. (एखाद्याला) सर्व संपत्तीसह कन्यादान करणे; जावयाला घरी ठेवून घेणे, त्याला आपली जिंदगी देणे : 'त्याला त्यांनीं घरजावईच केला आहे.' - इंप २७. २. (उप.) एखादी उसनी घेतलेली वस्तू लाटण्याच्या हेतूने, मालकाने परत मिळण्याविषयी तगादा लावीपर्यंत, ठेवून घेणे. **० होऊन बसणे -** आपल्यावर सोपवलेल्या कामाचा किंवा धंद्याचा नफा आपणच घेऊन टाकणे.

**घरजिंदगी, घरजिनगानी** स्त्री. १. घरातील सामानसुमान, उपकरणी, भांडीकुंडी यांसारखी द्रव्याव्यतिरिक्त इतर मालमत्ता; घरातील जंगम चीजवस्तू; मिळकत. २. (सामा.) मिळकत; इस्टेट : 'पादशहाची घरजिनगानी समग्र लुटून....' - ऐलेसं ८.४२२४.

**घरजुगूत, घरजोग(गा)वणी** स्त्री. १. काटकसर, मितव्यय; थोडक्यात घराचा निर्वाह. २. घरातील जरुरीची संपादणी; कसाबसा निर्वाह : 'एक म्हैस आहे तिणें घरजुगूत मात्र होत्ये.' - शास्त्रीको.

**घरट-टा-टी** पु. स्त्री. १. घिरटी; धान्य भरडण्यासाठी, दळण्यासाठी केलेले मोठे जाते : 'हिरे, माणकें, मोतीं सर्व जबरदस्ती घरटाखाली घालून त्यांचा चुरा केला.' - वज्राघात ६६. २. भात भरडण्याचे मोठे जाते. (को.) ३. दळणारा; धान्य इत्यादी दळून पोट भरणारा : 'घरट भुसारी याजवर मोहतर्फा मलिकबरी याचे कारकीर्दीपासून होता तो....' - मसाप २.१६३. ४. (ल.) पहारा; गस्त; घिरटी. [सं. घरट्ट]

**घरट** न. घर; कुटुंब.

**घरटका-क्का** पु. घरपट्टी; घरजमा; घरावरील कर.

**घरटण-णा** १. पहा : **घरठाण**. २. घरबंद. ३. पडलेल्या घराची जागा, जमीन, चौथरा.

**घरटणे** उक्रि. भरडणे; घरटात घालून दळणे.

**घरटा-ठा** पु. १. पक्ष्याचे घरटे; खोपा : 'या लक्षयोजनांबुधि - परतीरीं आमुचा असे घरटा।' - मोकर्ण २८.५७. (को.) २. घर; राहायचे ठिकाण : 'ब्रह्मग्रहो राक्षसु। ग्रामु घरटा पाडी वोसु।' - गीता २.३४१५. ३. आश्रयस्थान; ठिकाण : 'विश्वाचिया अभिलाषा। पायपाखळणिया दोषां। घरटा जाला।' - ज्ञा १८.६५१. ४. पडलेल्या घराची ओसाड जागा, जमीन, चौथरा; घरठाण. ५. काटा इत्यादिकांनी कातडीत केलेले छिद्र, घर; एखादी वस्तू राहील, ठेवता येईल असे भोक. ६. न्हाणीघर.

**घरटाण** न. पडके घर. (कु.) पहा : **घरटण-णा**

**घरटाळे** न. सोनाराची काटा ठेवण्याची पेटी.

**घरटी** स्त्री. १. घिरटी; फेरी; गिरकी : 'सुमनें गुंफिलीं वीरगुंठीं। त्यावरी मधुकरांची घरटी।' - एभा ३.८३६. २. गस्त; पहारा : 'यापरी स्वयें मन। दुर्ग पन्नासी आपण। त्यासी सबाह्य राखण। घरटी जाण स्वयें करी।' - एभा २२.३०६. ३. येरझारा; हेलपाटा; खेप; खेटा; जाणे व परत येणे. इ.ची निष्फळ क्रिया. ४. (ल.) आडकाठी; कैद; प्रतिबंध

: 'जयातें अभ्यासाची घरटी। यमनियमांची ताटी।' - ज्ञा २.३११.

**घरटी** स्त्री. १. प्रत्येक घराचा, कुटुंबाचा वर्गणीतील, वाटणीतील भाग, हिस्सा; घरपट्टी. (को.) २. वर्गणी, पट्टी, दंड, देणग्या देण्याच्या किंवा घेण्याच्या बाबतीत स्वतंत्रपणे मोजलेले प्रत्येक घर.

**घरटी, घरटीस** क्रिवि. प्रत्येक घरागणिक; घरोघर; प्रत्येक घरी; एकही घर न वगळता : 'खोजेवाडीस घरटी काठी चालू आहे इतका नारूचा उपद्रव डोळ्यांनी पाहिला.' - खेया २५.

**घरटीक (का)र** वि. १. गस्त घालणारा; पहारा करणारा; राखणदार; रखवालदार : 'रामाश्रमीं अहोरात्र। जटायु झाला घरटीकार।' - भारा किष्किंधा १६.१३२; 'गांवांत रात्री जागती घरटीकर।' - मक ३४.१००. २. चार; हेर; गुप्त पोलीस. ३. (सामा.) जासूद; बातमीदार : 'तों सभेस घरटीकार सांगत। रावणासन्मुख वर्तलेलें।' - रावि १९.१७३. ४. कोतवाल - (तंजा).

**घरटीखोती** स्त्री. गावचे सगळे दळण दळून देण्याचा मक्ता.

**घरटीप** स्त्री. १. गावातील घरांची गणती. (क्रि. करणे, काढणे.) २. घरमोजणीचा हिशेब, तपशील. पहा : **घरगणती** (वा.) ० **काढणे, करणे, घेणे** - (शोधीत, लुटीत, मोजीत, आमंत्रण देत) गावातील एकही घर न वगळता सर्व घरांची हजेरी घेणे; कोणतीही क्रिया, रोग, प्रादुर्भाव गावातील एकही घर न वगळता होणे.

**घरटीभर-सारा** पु. मराठ्यांच्या अमदानीत जात्यांवर, घरटांवर बसविलेला कर.

**घरटीया** वि. पु. पहारेकरी; घरटी करणारा : 'घोषें गजी घरटीया।' - गरा १२.३.

**घरटे** न. घरटा; प्राणी, पक्षी इत्यादिकांचे घर; राहायचे ठिकाण; बीळ. पहा : **घरटा**

**घरटोळ** स्त्री. प्रत्येक घराचा झाडा, झडती. (को.) पहा : **घरडोळ**

**घरठा(ठ)ण** न. १. घर बांधलेली जागा. २. मोडलेल्या घराचा चौथरा; पडक्या घराची जागा. पहा : **घरवंद** [सं. गृहस्थान]

**घरठाव** पु. १. नवरा; पती; संसार. २. अनीतिकारक आश्रय; रखेलीचा दर्जा; रखेलीला दिलेला आश्रय : 'नीरांजनीला मुंबईत एका गुजराथी धनवानानें चांगला घरठाव दिला होता.' - बहकलेली तरुणी ८.

**घरठाव** पु. विवाह; योग; स्नेह; ऐक्य : 'मुस्लीम लीग व कॉंग्रेस या दोन संस्थांशी घरठाव जमण्याचा योग नसल्यामुळे...' - विविध १.१०.१९३९.

**घरड** पहा : **घरट**

**घरड** स्त्री. मरण्यापूर्वीची घरघर: '...बापू घरड लागेतवसर...' - सीपो ७६.

**घरडई** स्त्री. १. मरणोन्मुख माणसाच्या तोंडाला पडणारी कोरड व घशात होणारी जळजळ. २. (सामा.) अजीर्णामुळे येणारा करपट ढेकर. पहा : **गरढई** (क्रि. लागणे, येणे.) [ध्व.]

**घरडणे** उक्रि. १. घरटात घालून (धान्य इ.) भरडणे. २. (माणसाची, प्राण्याची मान, गळा) नरडी वाकडेतिकडे तोडणे; खांडणे; छिंदणे; खापलणे; चोचावून तोडणे; कापणे. ३. रगडणे; दात रगडणे. -( तंजा.)

**घरडहुळी, घरडोळ-ळी** स्त्री. १. घराचा झाडा, झडती; धांडोळा; बारीक तपास : 'मग थावलि ये बाहटुळी। सैंघ घेऊनि घरडहुळी।'-ज्ञा ६.२१६; 'तया आघवियांचि आंतु। घरडोळी घेऊनि असें पाहतु।' - ज्ञा ११.५८६. २. प्रत्येक घराची केलेली झडती. (क्रि. घेणे.)

**घरडा** पु. १. भरडताना जात्याचा होणारा घरघर आवाज. २. (ल.) गाढ झोपेत, अंतकाळी होणारी घशातील घरघर. (क्रि. लागणे.)

**घरडा** पु. घरटे; विशेषत: ज्यात एखादी वस्तू राहील, ठेवता येईल असे लहानसे भोक, पोकळी. (राजा.)

**घरडुकर** न. १. गावडुकर; पाळीव डुकर. २. (निंदाव्यंजक) कुटुंबातील आळशी, निरुद्योगी स्त्री.

**घरडुळणे** अक्रि. घराचा झाडा घेणे; धुंडाळणे; कानाकोपऱ्यातून शोधणे; घरडोळ.

**घरण-णी** स्त्री. घरधनीण; घरातील मुख्य कारभारीण; गृहिणी, बायको. (राजा. कु.) [सं. गृहिणी]

**घरण** न. घरटका किंवा वाणटका; घरावरील कर.

**घरणी** स्त्री. १. लहर. २. सर्प विषाचा प्रभाव : 'काल भुजंगाचीया घरणी।' - वह ४४९.

**घरत** स्त्री. (प्र.) गरत; कुलीन व सभ्य (विधवा, सधवा) स्त्री; मर्यादशील व अब्रूदार स्त्री. [सं. गृह+रत]

**घरतवरते** न. नवराबायको :'पुडती घरतवरते। वंदिली तिये।'-अमृ ४९.

**घरदार** न. (व्यापक) घरातील माणसे, चीजवस्तू इ. प्रपंचाचा पसारा, खटले. (वा) ० **खाऊन वासे तोंडी लावणे** - सारी धनदौलत नासून, फस्त करून कफल्लक बनणे. **घरादारावर नांगर फिरविणे** - संसार, जीवन उद्ध्वस्त करणे; सत्यानाश करणे.

**घरदेणे** पहा : **घरपट्टी**

**घरधणी-नी** पु. १. यजमान; गृहपती; घरातील कर्ता माणूस : 'निर्वीरा धरणी म्हणे घरधणी गोंवूनी राजे पणीं।' - आसी ५२. २. पती; नवरा; घरकरी : 'मग धरधन्यास्नी पकडूनश्येनी न्ये.' - बाय. २.२.

**घरधसी** स्त्री. रखेली. (झाडी)

**घरधंदा** पु. घरातील कामधाम; गृहकृत्य.

**घरन(नो)ळे** न. म्हशीच्या, रेड्याच्या (काहींच्या मते उंटाच्याही) उरोभागी पुढच्या दोन पायांमध्ये असलेला मांसल भाग, आवाळू.

**घरनिघ(घो)णी** स्त्री. १. पहा : **घरनिघी**. २. (क.) घरभरणी अथवा गृहप्रवेश शब्दाबद्दल वापरतात. केव्हा केव्हा या दोन्हीही शब्दांबद्दल योजतात.

**घरनिघी** स्त्री. वाईट चालीची, दुर्वर्तनी, व्यभिचारिणी; घरातून बाहेर पडलेली, स्वैर स्त्री : 'कीं घरनिघेचें सवाष्णपण।' - नव १८.१७२.

**घरनिघ्या** पु. १. स्वत:चे कुटुंब, घर, जात सोडून दुसऱ्या घरात, जातीत जाणारा; दुर्वर्तनी, व्यभिचारी मनुष्य. २. एखाद्या व्यभिचारिणी स्त्रीने बाळगलेला, राखलेला पुरुष; जार.

**घरप** स्त्री. गऱ्यांची भाजी. (गो.)

**घरपट्टी** स्त्री. १. घरटका; घरदेणे; घरावरील कर : 'पंचाकडे घरपट्टी बसविण्याचा अधिकार आला.' - के १६.४.३०. २. एखाद्या कार्याकरिता प्रत्येक घरावर बसविलेली वर्गणी.

**घरपती** क्रिवि. घरोघर : 'संध्याकाळी काळूने घरपती जाऊन सांगितले.' - बारी १०९. [सं. गृह+प्रती]

**घरपाळी** स्त्री. (सरकारला काही जिन्नस पुरवण्याची, सरकारचा विवक्षित हुकूम बजावण्याची, भिकाऱ्यांना अन्न देण्याची इ.) प्रत्येक घरावर येणारी पाळी, क्रम.

**घरपांग** पु. निराश्रितता; आश्रयराहित्य : 'तंव दरिद्रियासी ठाव तत्त्वतां। कोणीच न देती सर्वथा। जेथें घरपांग पाहतां। बाहेर घालिती पिटोनि॥' - ह २९.३५.

**घरपांड्या** पु. घरातल्याघरात, बायकांत पांडित्य दाखवणारा.

**घरपिसा** वि. ज्याला घराचे वेड लागले आहे असा; घरकोंबडा; घरकुंडा.

**घरपिसी** क्रिवि. प्रत्येक घरात. (झाडी)

**घरपिसे** न. घराचे वेड; घरकुबडेपणा; घर सोडून कधी बाहेर न जाणे.

**घरपोच, घरपोचता** वि. घरी नेऊन पोचवलेला, स्वाधीन केलेला (माल).

**घरप्रवेश** पु. पहा : **गृहप्रवेश**

**घरफुंकी धोरण** शत्रूच्या हाती लागू नये म्हणून स्वतःच सर्व कारखाने, धान्यादी माल वगैरे जाळून राख करण्याचे धोरण; दग्धभू धोरण.

**घरफोड** स्त्री. घरातील माणसांत कली माजवून देणे, कलागती उत्पन्न करणे.

**घरफोडी** स्त्री. १. (कायदा) एखाद्याच्या घरात त्याच्या संमतीवाचून कुलूप-कडी काढून, मोडून किंवा मार्ग नाही अशा ठिकाणी मार्ग करून (चोरी करण्याकरिता) प्रवेश करणे. २. घराची भिंत वगैरे फोडून झालेली चोरी.

**घरफोड्या** वि. १. घरात, राजकीय पक्षात, राज्यात फूट पाडणारा, दुही माजवणारा; घरफूट करणारा. २. घरे फोडून चोरी करणारा.

**घरबशा** वि. (उप.) घरकोंबडा; घरात बसून राहणारा.

**घरबसल्या** क्रिवि. १. घरी बसून; नोकरी, धंदा वगैरे न करता; घरच्याघरी; घर न सोडता. २. (ल.) आयते; श्रमाविना. (क्रि. मिळणे.)

**घरबंद** पु. घरांची वस्ती, संख्या. (को.)

**घरबंद** पु. घराचा बंदोबस्त; घरावरील जप्ती; घर जप्त करणे; घराची रहदारी बंद करविणे; चौकी, पहारा बसविणे : 'ऐकोनि यापरी तुफान गोष्टी। क्रोध संचरला राजयापोटीं। पाहरा धाडूनि घरबंदसाठीं। ठेवितला यासी कारागृहीं।' - दावि ४५६.

**घरबंद** न. पाया : 'त्या घराचे घरबंद (म्हणजे पाया) अजून पडीक अवस्थेत होते.' - सांज १७६.

**घरबंदर** न. जेथून जहाज प्रवासास निघाले ते मूळचे बंदर.

**घरबाई** स्त्री. गृहिणी; घरधनीण : 'घरबाइसी पडदनी दान।'-स्थापो ८४.

**घरबाडी** स्त्री. बेवारशी घरांचे भाडे (ब्रिटिशपूर्व अमदानीत काही शहरांतून सरकार हे वसूल करीत असे.). पहा : **घरवाडी**

**घरबार** न. घरदार; घरातील मंडळी व मालमत्ता; संसार; प्रपंचाचा पसारा : 'तेवि घरबार टाकून गांवीचे जन।' - दावि ४१२. [सं. गृ]

**घरबार** पु. घरचा कारभार; मुखत्यारी.

**घरबारी** पु. १. कुटुंबवत्सल; बायकोपोरांचा धनी; गृहस्थाश्रमी; संसारी : 'भार्या मित्र घरबारिया।' - भुवन १८.७१. २. घरधनी; घरकरी; नवरा; पती : 'कां रुसला गे माझा तो घरबारी।' - होला १४८.

**घरबारीपणा** पु. गृहस्थपणा; कर्तेपणा : 'पुरुषास घरबारीपणा प्राप्त होतो.' - विवि. ८.२.३५.

**घरबुडवेपणा** पु. १. घराचा नाश करण्याचे कर्म. २. देशद्रोह; स्वदेशाशी, स्वदेशीयाशी, स्वराज्याशी बेइमान होणे : 'हा प्रयत्न त्यांचा इतर प्रयत्नांप्रमाणेंच घरबुडवेपणाचा आहे हें आम्ही सांगावयास नकोच.' - लोटिकेले १.५४८.

**घरबुडव्या – बुडाऊ** वि. अत्यंत त्रासदायक; दुसऱ्याच्या नाशाची नेहमी खटपट करणारा; घरघाल्या; स्वतःच्या, दुसऱ्याच्या घरदारांचा नाश करणारा; देशद्रोही; दगाबाज; दिवटा. 'हिच्या जागी मुलगा असता तर तुझ्यासारख्या घरबुडाऊ मुलात आमचं मन कशाला अडकलं असतं?' - कोसला २६५.

**घरबुडी-बूड** स्त्री. १. (एखाद्याच्या) संपत्तीचा, दौलतीचा नाश; सर्वस्वाचा नाश. २. एखादे घर, कुटुंब अजिबात नष्ट होणे; एखाद्या कुळाचे, वंशाचे निसंतान होणे.

**घरबेग(ज)मी** स्त्री. कुटुंबाच्या खर्चाकरिता धान्यादिकांचा केलेला साठा, पुरवठा, संग्रह; प्रपंचासाठी केलेली तरतूद.

**घरबेत्या** पु. घराची आखणी करणारा. (राजा.)

**घरभर-री** क्रिवि. घरात सर्व ठिकाणी, सर्वजागी; घरभर.

**घरभरवण-णी, घरभरणी** स्त्री. पहा : **घररिघणी**. पतीच्या घरी नव वधूचा प्रथम प्रवेश होताना करण्याचा विधी; गृहप्रवेशाचा समारंभ; वरात; घररिघवणी : 'वधूवरें मिरवून। घरभरणी करविली।' - र ४८. (गो. कु.)

**घरभऱ्या** वि. दुसऱ्याचे पैसे, मालमत्ता लुबाडून स्वतःचा फायदा करून घेणारा : 'तरी आपले लोक अजून समजतात की साधूंना किंवा त्यांच्या घरभऱ्या चेल्यांना पुष्कळ कळते.' - गांगा ९५.

**घरभंग** पु. १. घराचा नाश, विध्वंस : 'जिवलगांचा सोडिला संग। अवचिता जाला घरभंग।' - दास ३.२.६०. २. (ल.) कुळाचा, कुटुंबाचा नाश.

**घरभाऊ** पु. कुटुंबातील मनुष्य; नातलग; कुटुंबाच्या मालमत्तेचा, वतनवाडीचा वाटेकरी; हिस्सेदार; दायाद.

**घरभाट** पु. १. घराच्या आजूबाजूची आपल्या मालकीची जागा, जमीन; घरवाडी; विसवाट. (कु.) २. घराजवळचा नारळीचा बाग. (गो.)

**घरभारी** पु. १. पहा : **घरबारी**. २. ब्रह्मचारी, संन्यासी.

**घरभांडवल** न. १. कुटुंबातील मालमत्ता, जिंदगी, इस्टेट. २. एखाद्याचा खाजगी द्रव्यनिधी, ठेव; उसना काढलेला, कर्जाऊ काढलेला पैसा.

**घरभांडवली** वि. घरच्या, स्वतःच्या भांडवलावर व्यापार करणारा.

**घरभेद** पु. कुटुंबातील माणसांचे आपसांतील भांडण, तंटा; फाटाफूट; घरफूट.

**घरभेदी-द्या** वि. १. स्वार्थाने, दुष्टपणाने परक्याला, शत्रूला घरात घेणारा; फितूर; देशद्रोही. २. घरचा, राज्याचा, पक्का माहीतगार; घरची सर्व बिंगे ज्याला अवगत आहेत असा. ३. घरातील, राज्यातील कृत्यें, गुप्त बातम्या बाहेर फोडणारा; घर फोडणारा : 'घरभेद्या होऊनि जेव्हां।' - संग्रामगीते १४०. ४. घरात, कुटुंबात, राज्यात, तंटे किंवा कलह लावणारा.

**घरभोंदू** वि. १. लोकांची घरे (त्यांना फसवून) धुळीस मिळवणारा २. (सामा) ठक; बिलंदर; लफंगा (मनुष्य).

**घरमहार** पु. राबता महार.

**घरमारू-त्या** वि. शेजाऱ्याला उपद्रव देणारा; त्याच्या नाशाविषयी खटपट करणारा.

**घरमेढा-मेढ्या** पु. घरातील कर्ता, मुख्य मनुष्य; कुटुंबाचा आधारस्तंभ.

**घरमेळावा** पु. घरातील माणसे, सेवक इ. : 'आणि तियेतेंचि आघवा। आथि घरमेळावा।'- ज्ञा १३.३७.

**घरमेळी** क्रिवि. आपसांत; घरी; खाजगी रीतीने; आप्तेष्ट मंडळींमध्ये (तंट्याचा निवाडा, तडजोड करणे).

**घरमोड** न. चांभाराने तयार करून दिलेले आभूषण.

**घरमोड** स्त्री. घर मोडून ते विकणे : 'कांहीं दिवसपर्यंत येथें घरमोडीचा व्यापार उत्तम समजला जात होता.' - लोटिकेले १.१६९. २. क्रि. घुरणे; मोडणे. - (तंजा.)

**घरमोड्या** पु. घरमोडीचा व्यापार करणारा : 'त्यास जेव्हा घरमोड्याने घर घेतल्यामुळे घर सोडावे लागले....' - मस्थि ३०१.

**घररहाटी** स्त्री. प्रापंचिक कामकाज : 'मग चालवी घररहाटी।' - नाम २८३.

**घरराखण** स्त्री. १. (प्रां.) घराची पाळत; रक्षण; पहारा. २. घर राखणारा; घरावर पहारा ठेवणारा.

**घररिघणी, घररिघवणी** स्त्री. १. नवीन बांधलेल्या घरात प्रवेश करतेवेळी करायचा धार्मिक विधी. २. घरचा कारभार; घरकाम : 'रचून विविध देहकुटी। तो घररिघवणी परिपाठी।' - विपू ७.१२८.

**घररिघणे** अक्रि. घरात येणे, प्रवेश करणे : 'घररिघे न बाहतां भजकाच्या।' - दावि १६१.

**घररिघी** स्त्री. परपुरुषाच्या घरात घुसणारी : 'घररिघी झालें पट्टराणी बळें।' - तुगा १.९.

**घरलाठा-ठ्या** वि. घरपांड्या; गृहपंडित; घरात प्रौढी मिरवणारा; रांड्याराघोजी : 'ऐसेआं घरलाठेआं बोलां। तो चैद्यु मानवला।' - शिव ८९९.

**घरली** वि. बायको; घरधनीण; स्त्री.

**घरवट-ड** स्त्री. १. एखाद्या कुटुंबाची सर्वसाधारण, सामायिक जिंदगी, मालमत्ता; कुटुंबाचे, संख्येचे सर्वसाधारण काम, प्रकरण (कु. गो.) पहा : **घरोटी.** २. कूळ; कुटुंब; परंपरा. (गो.) ३. आनुवंशिक गुण, रोग, भूतबाधा इ. आनुवंशिक प्रकार.

**घरवण** न. घरपट्टी; घरासंबंधी सरकारी देणे. (को.)

**घरवणी** न. घराच्या छपरावरून पडणारे पावसाचे पाणी.

**घरव (वा)त, घरवरौते** स्त्री. घरसंसारासंबंधीची कथा, गोष्ट. प्रपंचकथा; प्रपंचपसारा; घरकाम. 'घरवातें मोटकीं दोघें। जें गोसावी सेजे रिगे। दंपत्यपणें जागे। स्वामिणी जे॥' - अमृ १.१३. [सं. गृहवार्ता]

**घरवरौते** न. पहा : **घरैतेवरैते**

**घरवसा** पु. १. घराच्या छपराला, न झाडलेल्या भिंतीना लागलेली कोळिष्टके, जाळी, जळमटे; केरडोक. २. वाळवीचे वारूळ.

**घरवसात-द** स्त्री. १. वसती; राहणे; वास; मुक्काम. २. घराची जागा; घराची जागा आणि सभोवतालचे (मालकीचे) आवार, परसू, मोकळी जागा, अंगण.

**घरवंद** पु. घरटणा; पडक्या घराचा चौथरा; पडलेल्या घराची जागा. (राजा.)

**घरवंद** वि. घरंदाज; कुलीन; खानदानीचा : 'शहर पुणें हरहमेष भरलें वाडे बांधिती घरवंदानी।' - ऐपो ४२०.

**घरवा** पु. झाडाचे आळे. (झाडी)

**घरवाघ्या** पु. नवसाच्या फेडीसाठी काही वेळ वाघ्याचा वेष परिधान करून वारी (भिक्षा) मागणारा.

**घरवाडी** स्त्री. घर बांधलेले आवार; वाडी. कोणाच्या अनेक वाड्या असतात, त्यांपैकी जीत धन्याचे घर असते ती वाडी. (को.)

**घरवात** स्त्री. प्रपंच.

**घरवाला** पु. १. घराचा मालक. २. नवरा; घरधनी; पती.

**घरवाली** स्त्री. १. बायको; पत्नी; घरधनीण : 'माझ्या घरवालीने साखर पेरताच त्याने सर्व सांगितले.' - राणी चंद्रावती ५३. २. कुंटणखाना चालवणारी.

**घरवासी** वि. कुटुंबवत्सल; प्रपंचात वागणारा.

**घरवाह** पु. वहिवाट; कारभार : 'वेदमूर्ती देवस्वामी चिंचवड याचा इनाम जमिन घरवाहो करिताती त्याची सरदेसमुखी त्याची त्या खालें पडिली आहे.' - शिचसाखं ५.१८.

**घरविवाद** पु. वि. घराच्या मालकीचा वाद : 'ते दोघे म्हणे तुम्ही घरविवादें जावें।' - पंचो ८६.१२.

**घरवी** स्त्री. घरासाठी काढलेले, घरास लावलेले इमारती लाकूड, गवत, वासे इत्यादी सामान, साहित्य. (कु.)

**घरवेडा** वि. १. घरपिसा. २. बाहेर राहून अतिशय कंटाळल्यामुळे घरी जायला उत्सुक झालेला.

**घरशोधणी** स्त्री. १. स्वतःची खाजगी कामे पाहणे. २. स्वतःच्या साधनसामर्थ्याचा विचार करणे; स्वतःची कुवत अजमावणे.

**घरसणे** अक्रि. अंगावर धावून येणे : 'आली घरांतुनि तदा घरसून नारी।' - आकृ ५. [घसरणेचा वर्णविपर्यास]

**घरसमजूत** स्त्री. घरातल्याघरात, आपसात स्नेहभावाने, सलोख्याने केलेली तंट्याची तडजोड, समजावणी.

**घरसंगणना** स्त्री. (समाज.) लोकसंख्येची मोजणी करण्यासाठी घरोघरी जाऊन करावयाची गणना.

**घरसंजोग** पु. १. एखाद्या कामाला लागणारा घरचा सरंजाम. २. काटकसरीचा प्रपंच; घरव्यवस्था. ३. सुव्यवस्था; घरातील सुखसोयी, समृद्धता.

**घरसंजोगणी** स्त्री. काटकसर; मितव्यय.

**घरसंसार** पु. कुटुंबासंबंधीची कामे; प्रपंच.

**घरसोकील** वि. घरी राहून खायला सोकावलेला; घरी आयते खायला मिळत असल्याने घर सोडून बाहेर जात नाही असा; घराची चटक लागलेला (बैल, रेडा इ. पशू).

**घरसॉ** वि. घारा (डोळा). (गो.)

**घरस्थिति-ती** स्त्री. १. घराची स्थिती. २. गृहस्थाश्रमधर्म; संसार; प्रपंच : 'ऋषीस अर्पिली कन्या शांती। मग मांडिली घरस्थिती।' - कथा ३.३.६३. [सं. गृहस्थिति]

**घरळणे** अक्रि. १. सरपटत, गडगडत जाणे. २. घरंगळणे.

**घरंगळणे** अक्रि. १. गडगडत जाणे; उतरत्या जागेवरून घसरत, गडगडत खाली येणे; घरळणे; उतारावरून खाली घसरणे. २. मुद्दा सोडून भरकटणे : 'नाहीं तर विचारांस खालीं आधार न सांपडल्यामुळे विचार श्रोत्यांकडे घरंगळत जायचे.' - नि ११२. [ध्व.]

**घरंडा** पु. बैलाची एकसारखी पण जलद चाल.

**घरंदाज** वि. १. प्रतिष्ठा असलेला; कुटुंबवत्सल. २. एके ठिकाणी कायमची वस्ती, घरदार करून राहिलेला; कायमचा रहिवासी. ३. कुलीन; अभिजात; स्वसत्तेच्या घरात अब्रूने राहणारा; खानदानीचा; चांगल्या कुळातील.

**घरंब** पहा : **घरवसा**

**घरा** पु. १. (काटा, गळू इत्यादींमुळे अंगाला पडलेले) छिद्र; भोक; लहान घर. (काही जाऊन बसेल असे). २. (सामा.) छिद्र; भोक. पहा : **घर** : 'धरिल कसा सद्रस तो, ज्या कलशाच्या घरा बुडाला च।' - मोअनु ८.३९. ३. जखम; व्रण; क्षत. ० **पाडणे, पडणे** - टोचून बोलणे; एखाद्याचे वर्म काढणे.

**घराऊ** वि. १. घरगुती; घरासंबंधी; कुटुंबासंबंधी. २. घरचे घरीच बोलायची खाजगी (गोष्ट). ३. घरी तयार केलेला (पदार्थ, जिन्नस); घरी वाढलेला, बाळगलेला (पशू); घरी लावून वाढविलेले (झाड इ.). ४. घरचा; स्वपक्षीय.

**घराक** वि. गिऱ्हाईक, ग्राहक.

**घराचार** पु. १. संसार; प्रपंच; गृहस्थाश्रमधर्म : 'परी अभ्यंतरीं घराचार मांडे।' - विपू ७.१३८. २. (ल.) पसारा; व्याप : 'तेथ वासनेचा घराचार। न मांडे पैं।' - सिसं ४.२०७. ३. घरातील मंडळींची राहाटी, रीतभात, आचरण, वागणूक, व्यवहार : 'वंध्यापुत्राचा घराचार। तैसा जीवासि संसार।' - एभा २६.३०.

**घराचारी** वि. १. घरंदाज. २. नवरा; पती; घरकरी; दादला : 'ऐशिया स्त्रियांचे घराचारी। खराच्या घरी नांदती।' - एभा १३.२१४.

**घराडा** पु. पहा : **घरडा**. भरडण्याचा आवाज. [ध्व.]

**घराण** घरटी; फेरा. - (तंजा.)

**घराणा-णे** पु. न. १. कूळ; वंश; कुळी; गोत्र : 'म्हणती पाखिज आमुचा घराणा। गुरुउपदेश नाहीं लाहणा।' - दावि १५०. २. वंशातील माणसे; घराण्यातील मंडळी. ३. ठिकाण; स्थान : 'इये पुनरावृत्तीची घराणीं। आघवीं एकवटती जयाचिया प्रयाणीं।' - ज्ञा ८.२३४. ४. परंपरा; संप्रदाय. [हिं. घराना]

**घराणी** स्त्री. घरधनीण; गृहपत्नी; यजमानीण; गृहिणी. (गो.) पहा : **घरकान्न, घरण** [सं. गृहिणी]

**घराश्रम** पु. गृहस्थाश्रम : 'असे घराश्रमीं, भजे सर्वभूतीं।' - नाम ७६०.

**घरीभरी** वि. विपुल.

**घरू** न. १. कीड लागलेल्या लाकडाचे पीठ, भुसा. २. जळमटे; कोळिष्टके घरंव. (को.) पहा : **घरवसा**

**घरू** वि. घरचे; खाजगी; घरगुती : 'चोरीच्या गुन्ह्याबद्दलचा विचार करतां रुपये २८॥ सरकारी नसून केशव नाथू याचे घरूं होते.' - विक्षिप्त ३.८२.

**घरैतेवरैते, घरौतेवरौते** पु. अव. १. नवराबायको, स्त्रीपुरुष दांपत्य; जोडपे; दंपती. २. घरदार; गणगोत. पहा : **घरवरौत** : 'केवळ घरैतें वरैतें वर्तति तेथ नसावें।' - चक्रसूत्र २९.

**घरोट** पु. दळण्याचे लाकडी जाते : 'कसा घरोट घरोट चाले माझा घरघर।' - लोसामा ५.२२९.

**घरोटा** पु. घरटे : 'जशी रानपक्षीण बांधी घरोटा।' - अर्वाचीन ४९९.

**घरोटी** स्त्री. कुटुंबाची सामायिक मालमत्ता; वडिलोपार्जित मिळकत, इस्टेट. (को.) पहा : **घरवट**

**घरोपाध्या** पु. कुलोपाध्याय; कुलाचा पुरोहित, भटजी.

**घरोबा** पु. १. वस्तुत: एका घरचे नसता मित्रपणामुळे घरच्यासारखा झालेला स्नेहभाव; घरच्या माणसासारखा जिव्हाळ्याचा स्नेहसंबंध; ऐक्यभाव; बंधुभाव; एकमेकांकडे जाणे-येणे; घसट शेजारप्रेम : 'तारुण्य रासभस्त्रियेपासीं। तिचा घरोबा वाहे शिशीं।' - भारा, बाल ९.६२. २. (बायकी) घरकाम; गृहकृत्य; घरातील कारभार : 'त्वां आपला चालवितां घरोबा। धरूं नये किंचितमात्र लोभा।' - सारुह ७.१२०. ३. प्रपंच; संसार; गृहस्थाश्रम : 'घरोबा मांडिला दंडकाधारे; वाढली बाइको उपजलीं पोरें।' - दावि ४०. ४. (ल.) लग्न; विवाह; घरठाव (क्रि. मांडणे, करणे.) : 'बायकोने दुसरा घरोबा सोनाराशीं केला.' - थोमारो २.१५३. ५. ऋणानुबंध. - (तंजा.)

**घरोर** पु. घरजावई : 'घरजावयास घरोर किंवा खंडाड म्हणतात व घरातील माणसे त्यास त्याच नावाने संबोधतात.' - राके ५६१.

**घरोरा खंदाड्या** लग्नामध्ये हुंडा न देता त्या बदल्यात मुलीच्या बापाकडे तीन ते पाच वर्षे काम करून राहणारा मुलगा.

**घरोसा, घेरोसा, घरवसा** पु. १. जळमट. (को.बे.तंजा.) २. पावसाच्या ओलीमुळे भिंतीवर आलेला क्षार; लोणा.

**घरौते** पु. अव. गृहस्थाश्रमी मनुष्य; पुरुष; गृहस्थ.

**घर्कुले** लहान मुले भातुकली खेळताना आपल्या घरासाठी जे घालतात ते भिंताड, भिंत. - (तंजा.)

**घर्डिणे** क्रि. १. ठेचणे २. दाढा खाणे.

**घर्नळा** गळा, घसा. - (तंजा.)

**घर्म** पु. घाम; स्वेद; श्रमामुळे त्वचेला येणारा ओलावा. पहा : **घाम** [सं.]

**घर्मबिंदु-दू** पु. घामाचा थेंब. [सं.]

**घर्मरंध्र** न. घाम ज्यातून बाहेर पडतो असे त्वचेवरील सूक्ष्म छिद्र. [सं.]

**घर्मस्राव** पु. घाम येणे. [सं.]

**घर्व(र्वा)स** पु. घर; घरातील राहणी. (गो.) पहा : **घरवसात**

**घर्षक** वि. घासणारा.

न. घासण्याचे, पुसण्याचे साधन. [सं.]

**घर्षक** पु. (भाषा.) उच्चाराच्या वेळी तोंडाच्या अरुंद फटीतून विशिष्ट आवाज निर्माण करत निघणारा ध्वनी. उदा. मराठीतील 'श' व 'स' हे घर्षक आहेत.

**घर्षण** न. १. घासण्याची क्रिया; पदार्थांचे एकमेकांवर घासले जाणे. २. (शाप.) एका पदार्थाच्या सपाट पृष्ठभागावरून दुसऱ्या पदार्थास ओढू लागलो, तर संलग्न पृष्ठभागांच्या खरबरीतपणामुळे होणाऱ्या प्रतिबंधाला घर्षण म्हणतात. [सं.]

**घर्षण** न. १. (ल.) (एखाद्या गोष्टीचा, विद्येचा) अतिशय व्यासंग, अभ्यास, परिश्रम. २. एखाद्या गोष्टीची वादविवादाने केलेली वाटाघाट, चर्चा, छेडून केलेली पृच्छा, चिकित्सा. ३. भांडण; कलागत; तंटा; कटकट; बखेडा. ४. घसट. [सं.]

**घर्षण कोन** (भौ.) सपाट पृष्ठावर ठेवलेल्या वस्तू गतिमान होण्याच्या अगदी बेतात असताना पृष्ठलंबाशी पृष्ठाची एकूण प्रतिक्रिया जो कोन करते तो.

**घर्षणजन्य** वि. (शाप.) घासण्याने उत्पन्न होणारा.

**घर्षणप्रेरणा** स्त्री. (भौ.) परस्परांना स्पर्श करणाऱ्या दोन पृष्ठभागांमध्ये परस्परसापेक्ष गतीला विरोध करणारी प्रेरणा (बल).

**घर्षणविद्युत** स्त्री. (भौ.) दोन पदार्थ एकमेकांवर घासल्याने निर्माण होणारी स्थिरविद्युत. उदा. कृत्रिम धाग्यांचे कापड घासल्याने निर्माण होणारी वीज.

**घर्षणविरोध** पु. एक पदार्थ दुसऱ्या पदार्थाला घासत गेल्यामुळे होणारा अडथळा.

**घर्षणे** उक्रि. घासणे. [सं. घर्षण]

**घर्षित** वि. घासलेले.

**घल** पु. (पातळ पदार्थाचा) थोडासा दाटपणा, चिकटपणा. (को.)

**घलणे** उक्रि. १. उडी मारणे : 'तरि न घलुनि महापुरीं। न घेपे बुडणयाची सियारी।' - ज्ञा १६.६९. २. घालणे; मारणे (शस्त्र इ.) : 'न घला न घला सस्त्र। राषा आमचे प्राण।' - उषा १७६९.

**घल्डी** स्त्री. कळशी; लहान घागर; घडली (वर्णव्यत्यास). (खा.)

**घल्ला** वि. घडविलेला; तयार. (झाडी)

**घव** पु. गहू : 'मोकेड पेटामंदी आडत्या बसला जोत्याला। नाव घवाच्या पोत्याला।' - राके ३००.

**घवकर** क्रिवि. एकदम; एकाएकी : 'अकस्मात अवचितां। घवकरि सस्वरूप देखतां।' - एभा १३.६७१. [ध्व.]

**घवघव-वा** क्रिवि. १. घोंगावत. २. बेसुमारपणे; अतिशय दाटीने; गजबजून; दाट. ३. घमघम. [ध्व.]

**घवघवणे** अक्रि. १. सर्वत्र सुगंध दरवळणे; सुवासाचा घमघमाट होणे. २. शोभणे; झळकणे; शोभून दिसणे : 'हरितनूच्या आश्रयें पूर्ण। अलंकार घवघविती।' - ह १८.६४. [सं. गह् = निबिड असणे.]

**घवघवणे** अक्रि. १. घूं, घूं असा आवाज करणे. २. रुमझुमणे; छुनछुनणे.

**घवघवी** वि. ठळक; स्पष्ट : 'रामप्रताप आत्यादरें। मात्रुका अर्थ घवघवी।' - वेसीस्व ६.१२. पहा : **घवघवीत**

क्रिवि. थाटाने; थाटामाटाने : 'मुषकारूढ गणेश गोसावी। रायें पूजिला घवघवी।' - वेसीस्व ६.४२.

**घवघवीत** वि. १. पाहताच डोळ्यांना आनंद देणारा; डोळ्यांत भरणारा; भरदार; भव्य. २. गोंडस; गुबगुबीत; धष्टपुष्ट; मोठा आणि देखणा (पुरुष, स्त्री) : 'घवघवीत डोळां पहाताती।' - रामदासी २.१२२. ३. ठळक; ठसठशीत; भरदार; डोळ्यांत भरणारा (दागिना, डोळा). ४. खूप दागिने घालून शोभणारी (स्त्री, मुलगी); तेजस्वी; भव्य; शोभणारा; भरदार (चेहरा, मुख) : 'रत्नभूषणीं घवघवीत।' - मुआदि ५.६. ५. स्पष्ट; मोठा; चांगला ऐकू येणारा : 'घंटाघोष घवघवीत।' - मुवन १३.१०६. ६. चमचमीत; उंची खाद्य पदार्थांनी भरलेले (जेवणाचे ताट, पान) : 'वाढिलेंच असें घवघवीत।' - रामदासी २.८१. ७. दरवळणाऱ्या सुगंधाने युक्त; सुवासाच्या घमघमाटाने युक्त.

**घवस** वि. घवघवीत; ठळक; ठसठशीत : 'लेकाच्या परीस सून करावी घवस।' - राके २५.

**घवसुचे** अक्रि. (गवसणे) मर्म समजणे; खुबी लक्षात येणे. (गो.)

**घवा** पु. खोल खळगा; तळखडकाला मिळणारा खड्डा. (मावळी) [सं. गव्हर]

**घवाळा** पु. चांगला नाग, साप. - तंजा.

**घव्य, घव्यवाणी** वि. तेजस्वी : 'नाना उदास घव्य मूर्ति।' - सप्र ७.३३. 'तंव समर्थमूर्ति घव्यवाणी देखिली।' - सप्र २.२२. [सं. गह्]

**घशा** पु. चुन्यासारखी पांढरी असलेली एक प्रकारची माती. (को.)

**घशिटा-टे, घशीट, घशेट-टा** स्त्री. न. (खोगिराला) तंग घासटू नये म्हणून खोगिराच्या प्रत्येक भागाला लावलेले चामड्याचे अस्तर.

**घष्टणी-नी** स्त्री. १. घासाघाशी : 'घष्टणी घिसणी घस्मरपणे। घसर घसरूं घसारवाणें।' - दास १४.४.४. २. भांडी घासण्याची नोकरी; काबाडकष्टाची नोकरी; दास्य. (गो.) [सं. घृष्]

**घष्ट(स्ट)णे** सक्रि. १. घासणे : 'जो सांपडला काळचपेटीं। पडपडों। पुनरपि होईल कष्टी। थाक न लागे घष्टिला च घष्टी।' -दावि २२८. २. कष्टाने काढणे, व्यतीत करणे, कंठणे (वेळ, काळ) : 'मनीं राम वेष्टी बळें काळ घष्टी।' - दावि २१६. [सं. घृष्ट]

**घष्टा** पु. १. पदार्थ घासताना त्याला दिलेला जोराचा घसडा; पदार्थ घासण्याकरिता त्यावरून हात फिरविण्याची क्रिया. (क्रि. मारणे.) २. एखाद्याच्या शेजारून जाताना जोराने लागलेला धक्का, घसरा. [सं. घृष्ट]

**घष्टे** न. तूप; कढविलेले लोणी. (ग्राम्य)

**घस** स्त्री. झुपका; गुच्छ; घड. पहा : **घोस**

**घस** स्त्री. १. व्यापाराला आलेली तूट; तोटा; नुकसान; बूड; खोट. (क्रि. सोसणे, बसणे, लागणे, येणे). २. (गळल्या, झिरपण्याने, सुकल्याने, घासले गेल्याने) पदार्थाच्या मूळच्या मापात, वजनात येणारी तूट, न्यूनता, झीज, घट. ३. सोने पारखताना कसावर उमटलेली सोन्याची रेघ; सोन्याचा कस. [सं. घृष्]

**घस** स्त्री. १. भांडे, कढई, किटली, मडके इ. सतत चुलीवर ठेवल्याने त्याच्या बुडाला जमणारा मशेरीचा थर; खरप; खरपी; मस; जळ. (कु.) २. लोणी कढविल्यानंतर भांड्याच्या तळाला बसणारी बेरी.

**घस** स्त्री. मुसंडी; जोराने घुसणे : 'मिठ्ठूनं वर्तुळात घस मारली.' - बाविबु २१०.

**घस** वि. एकदम उतरते; उभ्या उतरणीचे (छप्पर इ.). (राजा.)

**घसळ** वि. चिवट; चिकट. (व.)

**घसकन-कर-दिशी** क्रिवि. १. धान्य इ. एकदम पुष्कळ ओतताना होणाऱ्या घस् घस् अशा आवाजाने. २. (ल.) एकदम; एखाद्या कामाचा तडकाफडकी झटपट निकाल दाखवणारा शब्द.

**घसकरणे** क्रि. पायात बळ नसल्यामुळे भिंत बसणे. - (तंजा.)

**घसका** पु. १. रद्दा; धपाटा; बोथट अथवा धारेच्या शस्त्राने दिलेला तडाखा. २. घसरा; ओरखडा. पहा : **घष्टा २**. ३. घसडा; हिसका; हिसडा; गचका; हबका. (वा.) ० **मारणे** – लुबाडणे; न कळेल अशा प्रकारे मोठा डल्ला मारणे.

**घसकाविणे** क्रि. चुकीच्या मार्गाला नेणे.

**घसकाविणे, घसकावून, घसकून** पहा : **कचकाविणे.**

**घसक्या** वि. १. ज्याच्या कामात नाजुकपणा नाही असा; धसमुसळ्या; आडदांड; रानवट; अडाणी; दांडगा (मजूर, कामकरी इत्यादी). २. (ल.) बदफैली; अत्यंत कामुक; विषयलंपट; बाहेरख्याली.

**घसघशा** वि. १. नेहमी कटकट, कुरकुर, धुसफूस, हमरीतुमरी करणारा; घसघस करण्याची सवय ज्याला आहे असा. २. घासाघीस करणारा; करार, खरेदी विक्रीचा व्यवहार करताना घिसघीस करणारा.

**घसघशीत** वि. पहा : **घवघवीत** २, ३, ६.
क्रिवि. १. अघळपघळ; ऐसपैसपणाने; पुरेपूर; भरपूरपणे. २. पहा : **खसखशीत** १-३. ३. विपुलपणे; रेट; रेलचेलीने (वस्तू, क्रिया इ.).

**घसघशीत** वि. साधारण कढत; गरम असलेले (अंग, शरीर). (कु.)

**घसघस** स्त्री. १. घासाघीस; जिकीर; चिणचिण; खाराखीर; (पदार्थ विकत घेताना होणारी) कोरडी तक्रार; निरर्थक ओढाताण. २. (एखाद्याला) सदोदित दोष लावणे आणि रागे भरणे, निंदा करणे. ३. कुरकुर; फुसफुस; कुरबूर; खाजगी, कुटुंबातील कटकट, चडफड, चिणचिण : 'घसघस करितां विटे। सगट लोकु।' - दास १९.७.२१. ४. कडाक्याचा, धडाक्याचा वादविवाद, चर्चा; तंडणे; रिकामा वाद. (क्रि. करणे, लावणे, घालणे, मांडणे.) [सं. घर्ष्]

**घसट, घसटणी, घसणी** स्त्री. घरोबा; संघटण; मैत्री; सलोखा; सलगी; विशेष परिचय; घसरट : 'कोणाशीहि झाली तरी घसट ठेवावी, पण अतिप्रसंग करू नये.' - विकारविलसित १९. (क्रि. करणे.)

**घसटणे** उक्रि. १. चालताना (एखाद्या पदार्थाशी, भिंतीशी) घासून जाणे, घसवटणे, घसटून किंवा चाटून जाणे; ओरखडणे; घासणे. २. एकमेकांना कळण्याजोगा स्पर्श करून, खेटून जाणे. ३. घासणे; चोळणे; चोळवटणे; रगडणे. ४. निष्काळजीपणाने, बेदरकारपणे, लाटालाटीने एखादी गोष्ट, काम रेटून नेणे, दडपणे; फारशी काळजी न घेता (काम) करून टाकणे. ५. फरकटणे. [सं. घृष् = संघर्ष. घृष्ट > घसट किंवा घस्ट]

**घसटी** स्त्री. एखादा पदार्थ दुसऱ्याशी घासून गेल्याची खूण; घष्टा; घसरा; ओरखडा. प्राय: या शब्दाचा अनेकवचनी प्रयोग करतात.

**घसट्या** वि. १. अडाणी; आडमुठा; दांडगा; लाट्या; धसमुसळ्या (मजूर, कामकरी.) पहा : **घसक्या १**. २. सुस्त; मंद; गाफील; टोणपा; झांबऱ्या.

**घसडा** पु. जोराने दिलेला हिसका; हिसडा : 'गुण्यांना घसडे मारीत होत्या.' - बाविबु ५९.

**घसण** स्त्री. १. अति परिचय. पहा : **घसट**. २. संगत; संघटण : 'आणि फळाचिया हांवां। हृदयीं कामा जाला रिगावा। कीं तयाचिये घसणी दिवा। ज्ञानाचा गेला॥' - ज्ञा ७.१३९. ३. संसर्ग; स्पर्श : 'गगन असोनियां जनीं। मैळेना जनघसणीं।' - एभा ७.४४४. [सं. घर्षण]

**घसण** स्त्री. व्यापारातील, धंद्यातील तूट, तोटा, नुकसान, घट, घस. (को.)

**घसण** स्त्री. सवय; सराव. (क्रि. पडणे, पाडणे.)

**घसण-णी** स्त्री. १. बैलांची गाडी उतरणीला लागल्यावर गती कमी करण्याकरिता चाकाला लावायचा लाकडाचा दांडा; खरडी; २. घर्षण.

**घसणी** स्त्री. खर्च; व्यय; नाश; ऱ्हास : 'पतीची शक्ति अल्पवयात अविचारानें घसणीस पडल्यामुळें पुढें उपयोगास पडेल इतकी राहात नाही.' - विवाहविज्ञान ७.

**घसणे** अक्रि. घसरून खाली येणे; निखळणे : 'अशोकवनिं कांतीं निवसे। तारा क्षितिवरि काय घसे।' - निमा १.४.

**घसन** न. निकराचे युद्ध. [सं. घर्षण]

**घसप(म)ट** स्त्री. दृढपरिचय; घसट; घसरट.

**घसपटणे** सक्रि. घासणे : 'या निसण्यावर कुऱ्हाड घसपटायचा' -पंवा ९५.

**घसपटत** क्रिवि. कष्टाने सरपटत.

**घसपस** स्त्री. घिसाडघाई; चिकित्सा.

**घसमर** वि. बळकट; मजबूत. [सं. घस्मर]

**घसमरपण** न. खाकरून खाकरून घसा खरवडण्याची क्रिया. पहा : **घस्मर**

**घसमरपण** न. १. खादाडपणा. २. दुसऱ्याला गिळंकृत करण्याचा गुण.

**घसमस** स्त्री. धुसफूस; कटकट; तंटाबखेडा; बाचाबाच; चिडाचीड; खटका; कचकच; कलागत; धसफस. (को.)

**घसर** पु. जोराची लढाई : 'तैसीं घसरें मिसळेलीं। दोनी दळें।' - शिव १०४२.

**घसर** स्त्री. (दर, भाव, किंमत) उतरणे; कमी होणे; (बाजारात एखाद्या मालाला) मंदी येणे. [सं. घृष् + सृ]

**घसरगाडी** स्त्री. चाक नसलेली गाडी.

**घसरगुंडी** स्त्री. १. (खेळ) घसरून खाली येण्यासाठी उतरत्या फळीचे केलेले साधन. २. (ल.) अधोगती; अवनती; अपकर्ष; ऱ्हास; उतरती कळा; उच्चपदावरून खाली येणे; घसरणे : 'जुन्या शिक्षकांची अशीच घसरगुंडी झालेली आहे.' - ब्रावि १०५.

**घसरट** स्त्री. दाट परिचय, मैत्री. पहा : **घसट**

**घसरट** वि. निसरती; निसरडे असणारी; बुळबुळीत (जागा); घसरता; निसरडा; सुळसुळीत.

**घसर(रं)ड-ण** स्त्री. १. निसरडे असलेली, बुळबुळीत, घसरती जागा.

**घसरडी** वि. निसरडी; बुळबुळीत; घसरट; घसरून पडण्याजोगी.

**घसरडे** न. १. निसरडे; घसरड; घसरण. २. घसरडपणा; बुळबुळीतपणा.

**घसरणी** स्त्री. १. घसरण्याची क्रिया. २. निसरडी जागा; घसरडे.

**घसरणे** अक्रि. १. निसरणे; निसटणे; घरळणे; सुळकणे; उतरणीवरून, घसरड्यावरून घरंगळत जाणे. २. (ल.) एखाद्याच्या अंगावर जोराने, त्वेषाने तुटून पडणे, चाल करून जाणे, चढाई करणे; एखाद्याला रागे भरायला, निंदायला आवेशाने पुढे सरसावणे; एखाद्यावर जोराचा शाब्दिक हल्ला चढविणे; एखाद्याच्या तोंडाला लागणे : 'जोत्याजी त्याच्यावर घसरून पडला.' - स्वप ३१. ३. एखाद्या कामाला आवेशाने, जोराने लागणे, जुंपून घेणे. ४. चुकणे; चळणे; एकदम खालच्या दर्जावर येणे; न शोभण्यासारखे वागणे. ५. अधिकार, हुद्दा, आश्रय इ.पासून च्युत होणे; (नोकरीतून) कमी होणे; बडतर्फ होणे.

६. (शरीर.) क्षीण होणे; झडणे; (शरीरप्रकृती) ढासळणे. ७. मूळ स्वरूप नष्ट होणे, ऱ्हास पावणे; उच्चपदावरून ढळणे; उतरती कळा लागणे; (किंमती) खाली येणे : 'चांदीचा भाव घसरला आहे.' - के १०.६.३०; (व्यवहारात, व्यापारात खोट बसल्याने) खाली येणे; डबघाईला येणे. ८. (धैर्य, आत्मविश्वास) गलित होणे, गारठणे, पार निघून जाणे, नष्ट होणे, ढळणे, डगमगणे, डळमळणे. ९. (मनुष्य) खचणे; डगमगणे; कचरणे; हटणे. १०. पळून जाणे; पोबारा करणे; हातावर तुरी देणे. (व.) [ध्व.]

**घसरती** स्त्री. झपाट्याचा उतार : 'घसरतीवरच्या तिथल्या गवतांनी पाय ओढून तुम्हाला कधी तोंडघशी पाडले आहे का?' - वामा १.

**घसरपट्टी** स्त्री. खरडपट्टी; बेमुर्वतपणे केलेली निर्भर्त्सना; खरड; बोडंती. (क्रि. काढणे, निघणे.)

**घसरपट्टी** स्त्री. जड्याचे, जडावाचे काम करायचे एक हत्यार.

**घसरपट्टी** स्त्री. बर्फावरून घसरण्याचा खेळ खेळताना पायाच्या तळव्याखाली बांधायची लाकडी पट्टी : 'एका माणसाने बर्फावरच्या घसरपट्ट्या पायांना बांधून....' - कोउ ३१.

**घसरवट** वि. निसरडी; घसरडी (जागाक).

**घसरविणे** क्रि. अधःपात करणे.

**घसरंडा** पु. घसरड; घसरण; निसरडी जागा. (ना. व.)

**घसरा** पु. १. घसडा; ओरखडा;(एखाद्या पदार्थाला) जोराने घासून, चाटून जाणे; चाटून गेल्याने पडणारी खूण; हिसडा. (क्रि. बसणे, देणे, मारणे.) २. सपाटा; वेग; जोर : 'तैसीं घसरें मिसळैलीं। दोन्ही दळें।' - शिव १०४२. ३. शेजारून झपाट्याने जाताना दिलेला रेटा; धक्का. ४. रट्टा; तडाखा. ५. (ल.) राग; कोप : 'महादेवाला लवुन तुम्ही जा रे पदर पसरा। कठीण जाचिल त्याचा घसरा।' - प्रला १३५. ६. धमकावणीचा, खडसण्याचा, खणकावण्याचा, दटावणीचा आविर्भाव, भाषण; गुरकावणी; दटावणी. (क्रि. देणे, करणे, घालणे.) ७. तुटून पडणे; हल्ला करणे : 'रा. रा. गुरुजींनीं जागे केल्यावर त्याजवर विनाकारण घसरा करून....' - लोटिकेले २.८१. ८. व्यापारात, धंद्यात आलेली बूड, नुकसान, घस, तूट, तोटा. (क्रि. बसणे.) ९. दुर्दैवाचा घाला, तडाखा; (संकटाचा) धक्का : 'जय अपजय परस्वाधीन बसला घसरा।' - ऐपो २३५. १०. राब; दटावा; दबावा - तंजा.(वा.) ० **देणे** - वाटणे, घासणे, बारीक करणे : 'अशा दोन तीन मिर्च्या लेवुनी। घसरा दिला त्या पाट्यावरी।' - घाश्रलो ८४.

**घसरा** पु. दिवस.

**घसराघसर-री** स्त्री. हिसकाहिसकी; धक्काबुक्की; ओढाओढी; झुंज; झोंबाझोंबी. [घसरणे चे द्वि.]

**घसवट-टा, घसाटा** स्त्री. पु. १. (एखाद्या कामाचा, कलेचा) राबता; सराव. २. परिचय; घसरट; दाट ओळख. ३. वहिवाट. (वा.) **घसटीस पडणे, घसटीखाली पडणे** - १. एखाद्या कामाचा, कलेचा राबता, सराव होणे. २. दाट परिचय होणे; घसट, घसरट होणे.

**घसवटणे** उक्रि. १. घासले जाणे; झांजरणे; खरचटून जाणे; घासटणे, चाटले जाणे; घासल्याने झिजून जाणे : 'अहो आत्मेपणीं न संटों। स्वसंवितीं न घसवटों।' - अमृ ८.४. २. घासणे; घासटणे : 'वायोचा कातरा घसवटे। तेणें उष्णें वन्हि पेटे।' - दास १३.३.८. ३. सराव होणे; अंगी मुरणे, जडणे. ४. (मनुष्य, पशू, वस्तू) चांगली राबती असणे; सारखी उपयोगात आणली जाणे; अभ्यस्त होणे. [सं. घृष्+वट]

**घसवटी** स्त्री. १. पहा : **घसवट.** २. घसरा; खरचटून पडलेला ओरखडा; घष्टा : 'पाषाणघाव घसवटी। अदृश्यपणें मिरवले।' - नव २४.१३०.

**घसा** पु. राब वाहून नेण्याची बिनचाकी गाडी. पहा : **घसे**

**घसा** पु. १. गळ्याच्या आतील भाग; नरडे; अन्ननलिका. २. श्वासनलिका. ३. आवाज; कंठध्वनी. [सं. घस्] (वा.) ० **कोरडा पडणे, करणे** - अतिशय तहानेने घसा सुकणे, घशाला शोष पडणे. फार वेळ बोलत राहणे; घसा कोरडा होईपर्यंत एखाद्याला उपदेश, एखाद्याशी डोकेफोड करणे. ० **खाणे** - घशाशी घुरघुरणे; घशात घरघर आवाज होणे; घसा वाजणे : 'घसर घसरूं घसा खाणें। घुमघुमोंचि घुमणें। योग्य नव्हें॥' - दास १४.४.४. ० **निवणे**- शिरच्छेद करणे. ० **पसरणे** - (एखादी वस्तू खाण्याकरिता, गिळण्याकरिता) आ करणे; तोंड उघडणे; आशाळभूतपणाने पाहणे. ० **फुटणे** - (मुलगा) वयात आल्यामुळे त्याचा आवाज, स्वर बदलणे; आवाजाची कोमलता नष्ट होऊन तो मर्दानी बनणे; घाटी फुटणे. पहा : **घाटी.** ० **बसणे** - (ओरडण्याने, तेलकट इ. पदार्थ खाल्ल्याने) आवाज घोगरा होणे; शब्दाचे उच्चार अस्पष्ट होणे. ० **वाजणे** - घोरणे; (घसा) घरघर वाजणे. ० **येणे** - घशाला सूज येऊन तो दुखणे. **घशाखाली उतरणे** - १. गिळला जाणे; गिळंकृत होणे. २. (ल.) लाच खाल्लेला, लबाडीने लाटलेला पैसा पचवला जाणे. ३. कबजात जाणे : 'पण एतद्देशीय संस्थाने मात्र सरकारच्या घशाखालीं उतरविलीं.' - नि. **घशात घालणे, टाकणे** - बळकावणे; गिळंकृत करणे; (एखाद्या मालमत्तेवर) बळेच हक्क सांगून (ती) बळकावणे : 'दुसऱ्याचे देश घशात घालण्याची असुरी लालसा टिकणार नाहीं.' - के १४.६.३०. : 'सरकारचा विचार इंदूरची इस्टेट घशात टाकण्याचा होता.' - विक्षिप्त ३.१६४. **घशात पीक धरणे, अडकणे** - पाऊस न पडल्यामुळे पिकांची, कणसांची वाढ खुंटणे. **घशातून काढणे** - खाल्लेला, गिळंकृत केलेला पैसा, चोरलेला माल इ. परत द्यायला भाग पाडणे. **घशाबाहेर पडणे** - १. गिळंकृत केलेली वस्तू, पैसा बाहेर ओकून पडणे. २. पीक पोटरीवर येणे; पीक निसवणे, पिकाचे कणीस, लोंगर बाहेर पडणे.

**घसाघस-सा, घसासा** क्रिवि. १. गवत कापताना, पदार्थ चावताना, चर्वण करताना होणाऱ्या घस् घस् अशा आवाजाप्रमाणे; खसाखस. २. उधळपट्टीने; मनसोक्तपणे; मनाला येईल तसे; बेसुमार (पैसा खर्च करणे, खाणे इ.). [ध्व.]

**घसाघसी** स्त्री. तक्रार; भांडण; घासाघीस. (व.)

**घसाघीस** पहा : **घासाघीस** : 'ड्रायव्हरशी घसाघीस करीत वसंत म्हणाला....'- अगतिका ४८.

**घसाटा** पहा : **घसवट**

**घसाटी** वि. न कळणारे अक्षर. (झाडी)

**घसाड** वि. (अशिष्ट भाषेत) विपुल; पुष्कळ; रगड.

**घसाडणे** उक्रि. १. चोळणे; घासणे; उजळा देणे. २. (धान्य इ.) भरडणे.

**घसाडा** पु. जोराचा धक्का. (व.)

**घसाफोड** स्त्री. मोठ्याने ओरडून बोलणे.

**घसारणे** अक्रि. अतिशय दिपविणे. [सं. घंषु]

**घसारत** स्त्री. झपाट्याचा उतार : 'ती घसारत संपल्याच्या जागंला पूल' - रैत १२.

**घसारा** पु. घोळका : 'खंडोजी दाभाडे उभयता महाराजास घेऊन, गवतास पोरगे जात होते, त्यांचा वेष देऊन, घसाऱ्याबरोबर बाहिर निघोन गेले.' - दासब २.

**घसारा** पु. अनेक औषधे उगाळून एकत्र केलेले सरबरीत मिश्रण.

**घसारा** पु. (आसन्नमरण मनुष्याला लागलेली) घरघर; घरडा.

**घसारा** पु. जोराने घासणे; (एखादा पदार्थ दुसऱ्या पदार्थाला लागून गेल्याने पडणारा) ओरखडा; रेघोट्या; घस; घसरा : 'चामड्यास घसारा लागू नये म्हणून त्यावर लांकडी चिपा बसवाव्या.'-स्वारीनियम (बडोदे) ५५.

**घसारा** पु. झीज; इमारत, यंत्रे, सामान वगैरे वापरल्यामुळे त्यांच्या किंमतीत पडणारी तूट, न्यून, उणेपणा; नैसर्गिक व व्यावहारिक कारणांमुळे एखाद्या इमारतीचे, वस्तूचे होणारे अवमूल्यन; [अर. खसार]

**घसारा निधी** घसाऱ्यामुळे वापरण्यास अयोग्य झालेली मालमत्ता बदलून तिच्या जागी नवीन खरेदी करण्यासाठी राखून ठेवलेला निधी.

**घसास-सा** पहा : **घसाघस** : 'वीर तोडिती घसास। सिर फोडिती ठसास। शुळ टोचिती भसास। आपशुद्धी नेणती।' - दावि ४९६.

**घसासित** वि. घसघसणारे; तीक्ष्ण; खडबडीत : 'तें तिखेयाचें करवत। ऐसें सबाह्य घसासित।' - राज्ञा १६.२४२.

**घसिट** पु. स्त्री. (संगीत) इच्छित उंच स्वरापासून ध्वनीमध्ये खंड पडू न देता इच्छित नीच (खालच्या) स्वराकडे जाणे.

न. सतारीच्या तारेवर बोट ठेवून नाद उत्पन्न करण्याची क्रिया.

**घसिटा** पु. १. जोराने घासण्याची, चोळण्याची, पुसण्याची क्रिया; घष्टा; घसडा (क्रि. मारणे). २. (क.) घसरा या शब्दाचे जे इतर अर्थ आहेत त्या अर्थीही उपयोग होतो.

**घसिब, घासिब** वि. बळकविणारा.

**घसी** स्त्री. चिखल : 'जोगिया तो मसीघसी लीतला होआवा की:' - लीचउ ३७५.

**घसीट** स्त्री. (संगीत) वाद्यातून स्वर काढण्याचा एक प्रकार. नखीच्या एका ठोक्यातच झटकन पडद्यावर बोट सरकवून स्वर निर्माण करणे.

**घसीट, घसिटा, घसेटा, घसेटे** पहा : **घशिट**

**घसे** न. भातखाचरात उपयोगी पडणारी एकचाकी हातगाडी; आवणाचे मूठ नेण्यासाठी केलेले गाडीसारखे लाकडी वाहन. पहा : **घसा** (को.)

**घसेल** वि. १. कंजूष; कृपण. २. घासाघीस करणारा. (व.)

**घसोटा** पु. घसट; दाट ओळख : 'जास्त घसोटा नसतानाही खोलीत येताच दिसलेल्या अस्मतला (ती) म्हणाली....' - अगतिक १५८.

**घस्टणी** पहा : **घष्टणी** (गो.)

**घस्टणे** अक्रि. १. घट्टे पडणे. पहा : **घासणे, घष्टणे**. २. (ल.) किटणे (कान) : 'वक्त्याच्या मुखा पाठ पडिलें। श्रोतयाचे श्रवण घस्टोनि गेले।' - दावि २४१.

**घस्टन** स्त्री. दाट ओळख : 'तशी घस्टनीतली नसली तरी एकाच गल्लीतली.' - रैत ४५.

**घस्टुचे** अक्रि. खेटून, धक्के मारून चालणे. (गो.)

**घस्त** स्त्री. १. व्यापारात आलेली घट, बूड, तोटा. २. (पदार्थ सुकल्याने, गळल्याने, त्याच्या मापात, वजनात आलेली) तूट, कमीपणा. पहा : **घस** [सं घृष्ट]

**घस्त** स्त्री. गस्त; घरटी; पहारा. पहा : **गस्त** : ते हंमेशाप्रमाणे छावणीत घस्त घालूं लागले.' - विक्षिप्त ३.२४३. [फा. गश्त]

**घस्ना, घस्नारी** क्रिवि. तात्काळ. (झाडी)

**घस्मर** वि. जाड; दांडगा; घटमूठ; जाडाभरडा; बळकट; मजबूत (कापड, कपडा, भांडे, शरीर).

**घस्मर** वि. १. खादाड; अधाशी; सपाटून जेवणारा; खादूनंदन. २. (ल.) (दुसऱ्याचा) नाश, निःसंतान करणारा; दुसऱ्याला गिळणारा. [सं.]

**घस्मरपण** न. १. (मनाची) बळकटी; धैर्य : 'घ घ घस्मरपणेंचि मायाममता उलंथ।' - दावि २१३. २. नाश. [सं. घस्मर]

**घस्मरपणे** क्रिवि. क्रूरपणे; निर्दयपणे.

**घस्र** न. दिवस : 'तेथें घस्रें कितेकें क्रमुनि पुनरपि श्रीनटेशोपकंठी।' - वीउप २२. [सं.]

**घळ** स्त्री. तंबाखूची गळलेली पाने; घळीचा तंबाखू; अर्धवट पिकून किंवा खुरपण, औतकाम वगैरे करताना गळलेली पाने.

**घळ** स्त्री. (भूशा.) क्षरणाने निर्माण झालेली लहानशी अरुंद दरी.

**घळ** पु. मासे धरण्याचे एक साधन. पहा : **गळ**

**घळ** पु. नियोजित ठिकाणाहून पाणी न जाता, भलत्याच ठिकाणाहून ज्या भोकातून जाते असे भोक.

**घळ** स्त्री. (पाण्याच्या ओघाने धुपून डोंगराच्या दोन्ही दंडांमध्ये पडलेली) भेग; खाचण; ओहळ; लवण; खोलगट जागा; गुहा : 'अरण्यांत गेले पर्वताची घळ।' - रामदासी २.२५.

स्त्री. पु. (घुशींनी भिंतीत पोखरून पाडलेले) भोक, बीळ; (खेकडे, पाणी इ.नी) खडकाला, बंधाऱ्याला पोखरून पाडलेले छिद्र. [ध्व.]

**घळ** पु. १. झाडावरून आंबे वगैरे काढण्याची जाळी लावलेली काठी; झेला; झेली; आखी; आकडी. २. विहिरीत पडलेली घागर, बादली इ. वस्तू काढण्याचा गळ. (राजा.)

**घळ** वि. सैल जिभेचा; भडभड्या; बडबड करणारा (मनुष्य). (गो.)

**घळ अपक्षरण** (भूशा.) अनेक नाले व ओहोळ यांच्या वेगवान प्रवाहामुळे भूपृष्ठावर जागोजागी अरुंद दऱ्या निर्माण होणे.

**घळई** स्त्री. पठार.

**घळईन** न. निथळन; दळताना जात्यात घातलेला शेवटचा घास : 'उगयले नारायन चाकाची घळईन।' - जसा १३.

**घळक** स्त्री. (अशिष्ट) विपुलता; लयलूट; चंगळ; रेलचेल.

वि. १. विपुल; भरपूर. २. फार उत्पन्नाचा, किफायतीचा (धंदा).[ध्व.]

**घळघळ-ळा** क्रिवि. १. घटघटा; आकंठ; पुष्कळ; विपुल : 'आधीं

उदक आणविलें। घळघळां उदंड घेतलें।' - दास १८.१०.१९. २. अश्रूंची व पाण्याच्या प्रवाहाची विपुलता, अनिरुद्धता इत्यादिकांचा वाचक शब्द. ३. डोळ्यांतून खळखळ अश्रू ढाळीत. ४. खळखळ आवाज करीत (पाणी इ. वाहताना). [ध्व.]

**घळघळ-ळा** क्रिवि. सैलसर; अघळपघळपणे, सुटसुटीतपणे (दागिने, कपडे अंगाला होणे, बसणे). [ध्व.]

**घळघळ घंटा** १. घणघण घंटा; पोकळपणा; रितेपणा. २. पूर्ण अभाव; शून्यभाव.

**घळघळणे** अक्रि. १. (शरीर वाळल्यामुळे कपडे, बांगड्या, दागिने इ.) अंगाला सैल, ढिले होणे; (मोत्याचे वेजे, छिद्र मोठे झाल्याने) ढिले, सैल होऊन तारेत, दोऱ्यात हालू, सरकू लागणे. २. आजारीपणामुळे सांधे ढिले पडून अशक्तता वाटणे; गळाठा येणे; (शरीर) गळाल्यासारखे होणे.

**घळघळणे** अक्रि. डोळ्यांतून पाणी येणे; भावनावश होणे : 'म्हातारी माणसे वयोमानामुळे लवकर घळघळतात.' - गणगोत १६५.

**घळघळाट** पु. १. (कपड्यांचा, दागिन्यांचा) फाजील, अवास्तव सैलपणा; घळघळा लोंबत राहण्याची अवस्था; झोल; पोते. २. (अश्रू इत्यादिकांच्या) संतत धारा; सारखा लागलेला ओघ; मोठा प्रवाह, लोट. ३. (सामा.) समृद्धी; विपुलता; लयलूट.

**घळघळाट** क्रिवि. १. घटघटा; भरभर; अधाशीपणे (पाणी इ. पिणे). २. (कपडे, दागिने इ.) अतिशय सैलपणाने लोंबणे. पहा : **घळघळ** ३.

**घळघळीत** वि. १. सैल; ढिला; घळघळ लोंबणारा; घळघळणारा; अघळपघळ (अंगरखा, कपडा, दागिना); घळघळ पोते. २. मोठे झालेले; रुंदावलेले (कानाचे भोक, मोत्याचे वेजे इ.). ३. मोकळा; निष्कपट; खुल्या दिलाचा; संकोचरहित (मनुष्य, स्वभाव, संबंध, व्यवहार इ.). ४. उघड; प्रांजल; अकृत्रिम; मोकळ्या मनाचे; मनमोकळेपणाचे (वर्तन, भाषण इ.).

क्रिवि. १. रगडून; भरपूर; मनमुराद. २. मोकळेपणाने; अघळपघळ; प्रशस्तपणाने. ३. (अशिष्टपणे, अतिलोभाने म्हणताना) पुरेपूर; घसघशीत; भरपूर.

**घळण** न. स्त्री. १. पाण्याच्या प्रवाहाने पडलेली खोबण, खाचण, घळ, ओघळ, नाला : 'त्या खडकांतील भेगा व घळणी पाहून एकंदर.... अनुमान होईल.' - भू ३३. २. पाण्याच्या जोराने घळून घळून झालेली उतरती जागा, निसरडी जागा, जमीन; घसरण.

**घळणे** अक्रि. १. पाण्याच्या प्रवाहाने माती धुपून जाणे (नदीतीर, बांध यांची). २. खडक धुपून जाऊन घळ, ओघळ, चर पडणे. [सं. घृ = प्रसवणे; क्षरणे. गल्.]

**घळणे** अक्रि. १. मोत्याचे वेजे मोठे होणे, दागिन्याच्या वजनाने नाक, कानाचे छिद्र मोठे होणे, सैल होणे. २. (सामा.) हारातून, माळेतून ओवलेले मोती, मणी, फुले निखळणे, ओघळणे, गळून पडणे. पहा : **ओघळणे** [सं. घृ = प्रसरणे; क्षरणे; गल्]

**घळघळीत, घळमळीत** पहा : **घळघळीत** ३,४

**घळम(मे)ळ** स्त्री. १. (प्र.) घालमेल. (एखाद्या कामाची) धांदल; खवदव; दगदग; तारांबळ; उपद्व्याप. २. (बाह्य वस्तूचा, मनाचा) गोंधळ; घोळ; घोटाळा. (क्रि. पडणे, होणे, चालणे.) पहा : **घप्पाघोळ** : 'कोणी आड येईना या चिंदा। अशी घळमळ पडली मदा।' - पला ८६.

**घळय** पहा : **घळण, घळ** (को.)

**घळसणचे** अक्रि. चुकणे; घसरणे. (गो.)

**घळा(ळ)मेळ** स्त्री. मोकळ्या मनाचा, स्नेहभावाचा संबंध, दळणवळण, व्यवहार.

**घळामेळीचा** वि. विशेष सलगीचा; दाट परिचयाचा.

**घळाळ** वि. वेगवान; भरपूर.

**घळाळा** क्रिवि. वेग.

**घळ्या** वि. १. निष्काळजी; बेसावध; अनवधानी; दुर्लक्ष करणारा; हयगय करणारा; विसराळू. २. ओंगळ व गबाळे स्वरूप व वर्तन असलेला.

**घळ्या** वि. दुसऱ्याच्या गळी पडून, आर्जव करून, मर्जी संपादून आपले हित साध्य करून घेणारा (मनुष्य).

**घंगरघोळ** पु. घोटाळा; भानगड : 'असा सगळा घंगरघोळ झाला होता.' - मक (१९६०) २९.

**घंगाट** पु. सोसाटा. पहा : **घोंगाट**

**घंगाळ** न. कडक थंडी; गारठा. (क्रि. पडणे, सुटणे.)

**घंगा(घा)ळ** न. पहा : **गंगाळ** [सं. गंगालय]

**घंगा(घा)ळपोते, घंगा(घा)ळटोपले** पहा : **गंगाळपोते, गंगाळटोपले**

**घंघाट** पु. घणघणाट : 'तुझे गायेन घंघाटाचे : बरवे नव्हे' - पंचो १५४.१८.

**घंघाळ** वि. भयंकर : 'घंघाळ शंखाखें।' - गरा १०३.

**घंघाळी** स्त्री. एका जातीची माशी; गोमाशी. (को.) [ध्व. घं]

**घंटा** स्त्री. १. एक वाद्यविशेष; घाट. ही काशाची केलेली असून ती ओतीव असते. हिचा आकार मोठ्या पेल्यासारखा असून वरच्या बाजूला मोठी दोरी ओवण्यासाठी कडी असते. आतल्या बाजूला पोकळीमध्ये (आवाज, नाद निघण्याकरिता) लोखंडी, लाकडी लोळी लावतात. काहींना वरच्या बाजूला धरण्याकरिता मूठ बसवलेली असते : 'गिडिविडिया दौडका दुटाळा। घुंटा जेंगटें मृदंग।' - कृमुरा ४०.११. २. तास; तासाचे ठोके वाजवण्याकरिता मिश्र धातूंची केलेली वर्तुळाकार तबकडी. (क्रि. देणे, वाजवणे, बडवणे, होणे.); (माणूस, वाहन इ.) आल्याचे किंवा इतर काही सूचना देण्याचे साधन. ३. (ल.) पुरुषाचे जननेंद्रिय; शिस्न. [सं.] (वा.) **० वाजणे, ० हालणे** - (एखादा पदार्थ) संपणे; खलास होणे; फन्ना उडणे.

पु. तास; तासाचा अवधी. (व. खा.)

**घंटा-ट्या** पु. अभाव; नकारघंटा.

**घंटाघोष** पु. १. घंटेचा आवाज. २. (ल.) गाजावाजा; बोभाटा; प्रसिद्धी. ३. कंठशोष; कानीकपाळी ओरडणे : 'इकडील सेवकपणाचा भारीपणें घंटाघोष करून संतोषवर्तमान लेहून पाठविणे.' - इसंग्राम सरदार १७.

**घंटातरंग** पु. निरनिराळ्या सप्तस्वरयुक्त घंटांची माळ करून तिच्यावर जलतरंगाप्रमाणे विशिष्ट राग वाजवणे. [सं.]

**घंटापथ** पु. (ज्यावरून गळ्यात घंटा असलेले बैल येत-जात आहेत असा) हमरस्ता; राजमार्ग; रहदारीचा रस्ता. [सं.]

**घंटापळी** स्त्री. जेवण्याचे पितळेचे भांडे. (माण.)

**घंटापारधी** पु. घंटानादाने हरिणास भुलवून फासात अडकविणारा पारधी : 'घंटापारधी जैसा। मधुर नादें मृगमानसा। भुलवोनियां पाडी फांसा।' - भारा, बाल २.२६.

**घंटाबडव्या** वि. (तुच्छतेने) पुजारी; पूजा करणारा : 'कृष्णरावांच्या पदरीं गोविंदपंत नुसता घंटाबडव्या होता.' - कोरकि ३५.

**घंटाशास्त्र** न. घंटा तयार करण्याचे व वाजविण्याचे शास्त्र.

**घंटिक** (वै.) एक प्रकारची ग्रंथी.

**घंटिका** स्त्री. १. लहान घंटा; घागरी; घुंगरू. २. पडजीभ. ३. गळ्याची घाटी; गळ्याचा अस्थिमणी; कंठमणी; ग्रीवामणी : 'माजि घंटिका लोपे। वरी बंधु जो आरोपे। तो जालंधरू म्हणिपे। पंडुकुमरा॥' - ज्ञा ६.२०८. [सं.]

**घंटी** स्त्री. १. वाघ्यामुरळींचे एक वाद्य. २. लहान घंटा. [सं. घंटिका]

**घंटी** स्त्री. दळण्याचे जाते. पहा : **घट्टी**

**घंटीअप्पा** पु. दोन्ही हातांनी घंटा वाजवीत भीक मागत फिरणारा मनुष्य.

**घंटीचोर** पु. चोरांची एक जात; भामटा; उचल्या. [कर्ना.]

**घंटी परिपथ** (विअ.) विद्युतघंटीचा आराखडा.

**घंटेकाटा** पु. घड्याळातील तासांचा काटा : 'घड्याळांत घंटेकांटाच नाही.' - श्रमसाफल्य २.

**घंसन** न. युद्ध; लढाई; धुमश्चक्री. पहा : **घमशान ४** : 'पुढीली अणीया भाले। जवळीं पांच पांच सेले। आडासनीं दोनी दोनी षर्गे। मोजे घंसनी पातलें॥' - उषा ८२४. [सं. घर्षण]

**घाइ** पु. १. ठोका; वाद्यांचा गजबजाट; संमिश्र ध्वनी; कोलाहल : 'टिपरी गाजती घाई जाली।' - ज्ञागा १०. २. संगीतातील, वादनातील ताल, गती, बोल; विशेषतः द्रुतगती. (को.) [सं. घात, घाति]

**घाइ** पु. प्रहार; घाव : 'दुःखशोकांच्या घाईं। मारिलियाची सेचि नाहीं।' - ज्ञा ७.१०७. [सं. घात]

**घाइटा** पु. घाई; गडबड; त्वरा. (कर.)

**घाइवट** वि. जखमी.

पु. घाव; जखम; वार; शस्त्राचा आघात. (प्र.) घायवटा.

**घाई** स्त्री. १. त्वरा; जलदी; गर्दी. २. तातडी; उतावीळ; धांदल; लगबग; घायकूत. ३. धामधूम; धडाका; गडबड; तडाखा. ४. धुमाळी; धुमाकूळ; धांगडधिंगा; धावपळ; गोंधळ; दंगा. (वा.) **घाईस येणे** - जिकिरीला येणे; त्रस्त होणे; त्रासून जाणे.

**घाईगर्दी** स्त्री. गोंधळ; धावपळ.

**घाईघाईने** क्रिवि. अगदी गडबडीने; गर्दीने; लगबगीने. [घाईचे द्वित्व]

**घाउस** पु. १. घास; लचका : 'जे जे ठाय समांस। तेथ आहाच जोडे घाउस।' - ज्ञा ६.२३१. २. खाणारा; ग्रहण करण्यास उत्सुक. ३. खाण्याची इच्छा. [सं. घस् = खाणे]

**घाऊक** वि. १. ठोकळ; भरीव; मोठी (रक्कम, संख्या, आकडा). २. सगळा; सर्वच्या सर्व; अशेष; उक्ता; उघडा. ३. ठोकविक्रीने; एकठोक; ठोकबंद. ४. मोठ्या प्रमाणावरचा : 'हे दंगे तसे निकराचे किंवा घाऊक नव्हते, किरकोळच असत.' - माजी ४८३.

**घाऊल** न. नफा; फायदा; किफायत. पहा : **गाऊल**

**घाए** पु. घाव; घाय; वार : 'तंव चैद्यु भणें हो हो राहे। माझा घाए साहे॥' - शिव १०७१.

**घाएखंडी** स्त्री. घाव घालणे आणि पेलणे : 'एकु : घाएखंडी दाखविजो की :' - लीचपू २९९.

**घाएवटणे** अक्रि. जखमी होणे; जखमेने जर्जर होणे. पहा : **घायवटणे** : 'कटाक्षीं मन घाएवटें।' - शिव ६६६.

**घाओसणे** अक्रि. गवसणे; प्राप्त होणे : 'प्रिये अव्हेरिले : धिंगतीचें ज्यालें : वियोग घाओसले : जन्मवेन्हीं :' - अभंगपर्व.

**घाग** वि. कंजूष. (व.)

**घाग** स्त्री. भेग. (व.)

**घागर** स्त्री. १. (तांबे, पितळ, माती इत्यादिकांचे) पाणी ठेवण्याचे आवळ गळ्याचे भांडे; घड्यापेक्षा मोठ्या आकाराचे पाणी ठेवण्याचे भांडे; मोठी कळशी; घट : 'अमूप अमृत फल क्षीर घागरी। दध्योदनेसीं वायन करी।' - भारा, बाल. १२.२३. २. (दारूकाम) उडविण्याच्या दारूचे एक झाड. खापराची घागर घेऊन तिच्या बुडाला जाळीदार भोके पाडून त्या प्रत्येक भोकाच्या तोंडाशी बाण ठेवतात व तोंडावर भुईनळा ठेवून नळा दाखवतात. वर झाड उडते व सभोवार तारे व बाण उडतात. (वा.) **० उदवणे** - अश्विन शुद्ध अष्टमीला महालक्ष्मीच्या दिवशी रात्री बायका शेगडीवर ऊद घालून वर घागर धरतात ती क्रिया. **घागरी फुंकणे, ० घुमवणे** - कोकणस्थांकडील एक कुळाचार. अश्विन शुद्ध अष्टमीच्या रात्री महालक्ष्मीची स्थापना करून तिची पूजा करून तिच्यापुढे स्त्रिया घागरीत तोंडाची फुंकर घालून घुमतात ती क्रिया.

**घागरगडचा सुभा** (उप.) पाणी भरण्याची नोकरी; पाणक्याचे काम.

**घागरघोळ** पु. अनेक घुंगरू एकत्र करून केलेले विशेष वाद्य; चाळ : 'वाजवीत वाद्यें खेळत खेळ। शिंगें कहाळा घागरघोळ।' - निगा ४२.

**घागरपटॉ** पु. घागऱ्यांचा केलेला मुलांच्या कंबरेत घालायचा रुप्याचा दागिना; घागऱ्यांचा कमरपट्टा, करगोटा. (गो.)

**घागरमाळ-ळा, घागुरमा-ळा** स्त्री. १. (हत्ती, बैल इ. प्राण्यांच्या गळ्यात घालायची) घुंगरांची माळ; गळघांटी : 'कीं ते कृष्णपक्षींची रजनी। चंद्रशोभा उदेली दशनी। घागरमाळांचे मणी। तारागणें कीं॥' - कथा ४.९.४१. २. (सामा.) घागऱ्यांची मोठी माळ : 'मखरीं लोंबती घागरमाळा।' - अमृतसुदामचरित्र ३४.

**घागरा** पु. गुजराती, मारवाडी स्त्रियांचे परकरासारखे नेसायचे घेरेदार, घोळदार वस्त्र; लेहेंगा. [दे. प्रां. घग्घर, गुज. घाघरो] (वा.) **० फडकी करणे** - वाङ्निश्चय करणे; वाग्दत्त वधूला घागरा फडकी चढवण्याचा विधी : 'घागरा फडकी करनंऽ।' - खावा ९३. **० बांधणे** - रागावून खरडपट्टी काढणे : 'बाइसीं घागरा बांधला' - लीचपू ३३८.

**घागरा** पु. मुलांचा खेळायचा एक प्रकारचा खुळखुळा. [ध्व.]

**घागरा** पु. एक वनस्पतिविशेष. हिचे बी मोठे व भरदार असून वरील कवच मऊ असते. [सं. घर्घरा]

**घागरा-ऱ्या गोचीड** मोठा गोचीड.

**घागराळे** न. प्रवासात खोगिराला घागर अडकवण्याकरिता काठ्यांची व दोऱ्यांची केलेली विशिष्ट रचना, चौकट.

**घागरी** स्त्री. घट. पहा : **घागर** : 'परी तो न सांडीच घागरी। अमृताची॥' - कथा ४.१४.१८८. [सं. गर्गरी]

**घागरी** स्त्री. (लहान मुलाच्या करगोट्याला असलेले, नर्तिकेच्या पायातील चाळ्यांप्रमाणे) घुंगरू; घाटी; क्षुद्रघंटिका; एक अलंकार : 'झुणझुणशब्दा करिति। घागऱ्या तालावरती गाती।' - कमं ४.१०९. [सं. घर्घरी]

**घागरी** स्त्री. घागरा नावाची वनस्पती; तिचे फळ. (को.) [सं. घर्घरी]

**घागरीलावा** पु. एक पक्षी. (झाडी)

**घागरे** न. कणेकडाचे बूड ज्या लाकडाच्या तुकड्यांच्या खोंबणीत बसवलेले असते ते लाकूड; भोवरी.

**घागरेवाली** स्त्री. हायलंडर पलटण. या पलटणीतील शिपाई कमरेला लहंग्यासारखे वस्त्र गुंडाळतात.

**घागऱ्या** वि. घागरीसारखा; मोठा.

**घागऱ्या आंबा** आंब्याची एक मोठी जात; घागरीएवढा आंबा.

**घागऱ्याघोळ** पु. १. मनाची उडालेली त्रेधा, गोंधळ; घाबरगुंडी. २. (कामांची, वस्तूंची, पदार्थांची) अव्यवस्था; गोंधळ; घोटाळा; अस्ताव्यस्त स्थिती.

**घागऱ्यादेवी** स्त्री. देवी रोगाचा एक प्रकार.

**घागऱ्यांची गरसोळी** ठुशी. (व.)

**घागा** क्रिवि. धो धो पाण्याने भरून.

**घागाइणे** अक्रि. ओरडणे.

**घागाणे** सक्रि. ओरडणे; रागाने बोलणे : 'आणि बाइसांवरी घागाइली।' - लीचपू १०६.

**घागुरी** स्त्री. घागरी; घुंगरू : 'तिनें बांधिल्या पायाला घागुऱ्या।' - मसाप १.९.१९. (साष्टीकोळी)

**घाट** स्त्री. १. घसा; घशाचा बाहेरील भाग; घाटी; कंठ, कंठमणी. २. गळा; कंठ; आवाज. [सं. घाट] (वा.) **घाटी फुटणे -** १. (मुलाच्या) आवाजातील कोमलता जाऊन तो मोठा, प्रौढ होणे. हे (मुलगा) वयात येण्याचे लक्षण आहे. २. (गाणाऱ्याचा) आवाज घोगरा होणे; स्वरभेद होणे; स्वर बिघडणे; आवाज चिरकणे, बसणे.

**घाट** स्त्री. १. घंटा; जनावराच्या गळ्यातील घंटा : 'वाजती शंख घांटा। मी जाते वैकुंठा।' - मसाप २.१.२२. २. (उप.) गुप्त गोष्ट सर्वांना सांगत सुटणारा, चोंबडा, चहाडखोर माणूस; बोंबल्यागणेश; जिभेचा, कानाचा हलका; लुतरा; गजघंटा. [सं. घंटिका] (वा.) **घाटेखाली उभे राहणे -** (शपथेचा एक प्रकार) शपथ घेणे.

**घाट** पु. १. प्रदेश एकमेकांपासून भिन्न करणारी पर्वतांची रांग; दोन देशांच्या सरहद्दीवरील पर्वतांची रांग. २. (विशेष अर्थाने) सह्याद्रीची रांग. ३. डोंगर ओलांडून जायचा रस्ता; डोंगरावरील वाट; खिंडीतील रस्ता. उदा. खंडाळ्याचा घाट, कात्रजचा घाट; डोंगरावरील अडचणीची व बिकट वाट. ४. नदी, तलाव इ.च्या काठावर नावेतून उतरण्याकरिता, नावेत बसण्याकरिता बांधलेला धक्का; नदीकाठी बांधलेला धक्का; उतार. ५. पाण्याचा उपयोग चांगला करता यावा म्हणून सोयीची दगडी बांधणी (विशेषतः पायऱ्यांची); नदीवरील पायऱ्या. उदा. ब्राह्मणघाट, धोबीघाट : 'ज्या नांव तीर्थ वरि घाटहिरम्य आहे।' - नगर १५९ (नवनीत ४३३). ६. धरण; बंधारा; धक्का : 'आणि सुटलिया सिंधुजळाचा लोटु। न शके धरूं सैंधवाचा घाटु।' - ज्ञा ९.१२४. ७. सह्याद्रीच्या रांगेच्या पूर्वेकडील प्रदेश; सह्याद्रीचे पठार (ज्याला कोकणसापेक्ष देश हे नाव आहे) : 'आम्ही घांटावरचीं माणसें आहोंत.' - कोरकि ४८३.[सं. घट्ट = घाट] (वा.) **घाटात अडवणे, धरणे, मारणे -** (चोर, लुटारू, डोंगरातील घाटात किंवा अडचणीच्या मार्गात वाटसरूंना गाठून त्यांना लुबाडतात त्यावरून) एखाद्याच्या अडचणीचा फायदा घेणे; एखाद्याला अडचणीच्या वेळी अडवून धरणे.

**घाट** पु. १. (भांडी, दागिने इ.चा) आकार; रचना; आकृती; घडण; डौल; ढब; ठेवण; रचना : 'अति तरल विलोकी घाट ते मेखळांचे।' - सारुह ३.३८. २. (ल.) (बेत, मसलत, हाती घेतलेले काम इ.चे) बाह्य स्वरूप; रागरंग; रंगरूप. ३. (हेतु, योजना इ.चा) आविर्भाव; अवडंबर; उठाव; आव : 'यास्तव त्यानें स्वयंवराचा घाट तिच्या घातला.' - विक ३१. ४. योजना; बनाव; बेत : 'हा घाट जमून आला तर काय बहार होईल !' - अस्तंभा ८९. ५. विशिष्ट घडण; आकृती; बैठक; घटना; साज : 'लावले समयांचे थाट। केले उदबत्त्यांचे घाट।' - मसाप २.१.२३. ६. घटना. [सं. घट् = रचणे, करणे]

**घाट** स्त्री. १. घाटलेले हरभरे, डाळ. २. (मिठाई, मिष्टान्न इत्यादिकरिता) शिजवलेले पीठ. ३. हरभऱ्यावर पडणारा एक रोग. यामुळे हरभऱ्याचा घाटा भरत नाही. (क्रि. पडणे.) पहा : **आटघाट**

**घाट** पु. (नाविक) गलबताच्या बाजूच्या फळ्या जोडणारा खिळा. मालवण - गोमांतकाकडे कबिला किंवा खिळे याऐवजी सुंभाचे दोर लावून फळ्या जोडतात. (को.)

**घाट** स्त्री. पेरणीच्या हरीचे छिद्र. (झाडी) [सं. ग्रास]

**घाट** स्त्री. समूह; कळप : 'दारीं आठा दिग्गजांची घाट।' - रुस्व ८७१.

**घाटकाम** न. १. (बांधकाम) कोनाडे, कमानी यावर केलेले नक्षीकाम. २. (सोनारकाम) सरी, वाकी वगैरे हातांनी करण्याचे व त्यांना आकार देण्याचे काम.

**घाटकार** वि. घंटा ओतणारा शिल्पकार. (गो.)

**घाटकावला** पु. घाट चढून आल्यावर घाटावरील चौकीचा द्यायचा कर : 'घाटकावला खुशकीवर घाटी ऐन जिनस वगैरे येईल किंवा जाईल.... त्यास दरबैलीं घ्यावयाचा शिरस्ता रुपये...' - मसाप २.२.१८४.

**घाटकोर** स्त्री. गळ्याचा भाग; नरडी : 'असें कुभांड करून दांड होऊन भांड धरिसी घाटकोर।' - होला ३७.

**घाटगस्त-स्ती** स्त्री. गस्तीचा एक प्रकार. राजगस्त व घाटगस्त असे किल्ल्याच्या तटावरून गस्त घालण्याचे दोन प्रकार होते. पहिलीत चुडी पेटवून फेरी होई व दुसरीत घाट वाजवीत गस्तीची फेरी होई : 'घाटगस्त पडली, राजगस्तीचीही चुडी पडली, ऐसा कारभार.' - पेद

**घाटघडाव** वि. कमजास्त.

**घाटघोळा** पु. एखादे कार्य पूर्ण न होता, घोटाळ्यात पडून राहणे. - तंजा.

**घाटण** न. १. डाळ शिजवून, ती ठेचून तोंडीलावण्याकरिता केलेले दाट कालवण : 'जुना करार, नवा करार, कुराण, जेंदावेस्ता, वेद या सर्वांचें आपल्या परिपक्व बुद्धीनें घाटण करून आमचे नूतन सामाजिक जसें आपल्या एकेश्वरास भक्तीचें मसालेदार खाद्य देतील तसें आमच्या जुन्या भक्त मंडळीकडून कोठून मिळणार?' - नि ८१८. २. निरनिराळे जिन्नस वाटणे; चेंदामेंदा करणे; ठेचणे; घोटणे; ढवळणे. [सं. घट्टन]

**घाटणा** पु. (खलाचा) बत्ता; घोटा; (उखळीचा) वरवंटा; वाटणागुंडा; रगड्यात डाळ इ. घाटायचा लांबोडा दगड. (कु.) पहा : **घाटू**

**घा(टा)णा, घाटणेरा** पु. (लाह्यांसाठी) खापरात धान्य भाजताना ते ढवळण्यासाठी, वर-खाली करण्यासाठी एका टोकाला चिंध्या बांधून बोंड केलेली काठी, दांडके.

**घाटणी** स्त्री. पदार्थ बारीक करण्याची बत्त्यासारखी वस्तू.

**घाटणूक** स्त्री. (प्रा.) (एखादी गोष्ट - विशेषतः लग्नासंबंधी) जुळवून आणण्यासंबंधीची बोलणी, वाटाघाट; बोलाचाली; घटणूक.

**घाटणे** उक्रि. १. (पळीने, दांड्याने, चमच्याने इ.) ठेचणे, चेचणे, घोटणे; ढवळणे : 'तुज लाविले स्वतेजें म्यांच कढी-भात-वरण घाटाया।' - मोगदा २.१६. २. आघात, प्रहार करणे; घावटणे; बडवणे; ठोकणे; ताडण करणे : 'कीं तयाही पाठीं। जे वेळीं लोह मांसातें घाटी। ते वेळीं विजयश्रियेच्या पाटीं। एकुचि बैसें॥' - ज्ञा ७.१२. ३. (ल.) त्रास देणे; गांजणे; सतावणे; बेजार करणे; जाचणे; कुतरओढ करणे. ४. चर्चा खल, वाटाघाटी करणे. (विषय, गोष्ट) घोळणे. ५. (सामा.) एकजीव करणे; मिळवणे. [सं. घट्ट, घट्टन]

**घाटणे** सक्रि. आहाटून घटवणे; कमी करणे : 'भीतरीले आगीची उकटी। मेदमांसांते घाटी।' - ज्ञाप्र ८.१६.

**घाटणे** अक्रि. घडणे; होणे : 'जीये दीसी माहाप्रलयो घाटें। उदधीचें वळण फुटें॥' - उषा ११२३. [सं. घट्‌ = घडणे]

**घाटणे** न. १. घाटण्याकरिता ज्याचा उपयोग करतात तो दांडू, चमचा, पळी; घाटणा; घाटणेरा; ढवळण्याचे साधन. २. घाटण्याची, घोटण्याची, ढवळण्याची क्रिया. ३. (कुंभारी) मडक्याचे बूड घासण्याचे लाकडी हत्यार, साधन, उपकरण. (खा.)

**घाटदार** वि. सुंदर आकाराचा; डौलदार; पिळदार (शरीर); बांधेसूद; कळाशीदार.

**घाटनाळ** स्त्री. डोंगरामधील अरुंद रस्ता, वाट; खिंडीतील मार्ग.

**घाटपट्टा, घाटपान** पु. न. ज्याला लहान लहान घंटा, घुंगरू अडकवलेले असतात किंवा एकच लोखंडी, पितळी घाट बांधलेली असते असा बैलाच्या गळ्यात बांधण्याचा चामड्याचा, गोणपाटाचा पट्टा.

**घाट(ड)पण** न. (प्र.) घाडीपण; पिशाच, दैवत प्रसन्न करून घेण्यासाठी घाडी (मांत्रिक, जादूगार) जो विधी, मंत्रतंत्र करतात ते. (गो.)

**घाटपाय-या** पु. घाटाचा पायथा.

**घाटपारधी** पु. घंटानादाने हरिणीला फसवून, तिला फासात अडकवणारा पारधी : 'घाटपारधी पाश पसरी। त्यावरी तो मृगांतें धरी।' - एभा २६.२३६.

**घाटपांडे-ड्या** पु. नदीच्या, डोंगराच्या घाटावरील जकात वसूल करणारा अधिकारी; घाटाच्या तोंडाशी जकात घेणारा अधिकारी; जकातदार.

**घाटपेच** पु. डावपेच : 'असें घाटपेच परस्परें लागले आहेत.' - मर्शियांका ४०३.

**घाटबंदी** स्त्री. १. (डोंगरातील) घाटातून कोणी रहदारी करू नये म्हणून केलेला बंदोबस्त. २. (नदीचा, डोंगराचा) घाट बांधण्याकरिता झालेला खर्च वसूल करण्यासाठी बसवलेला कर, पट्टी.

**घाटबारी** स्त्री. घाटबंधारी; घाटातील वाट : 'रास्ते वगैरे फौज सडी पुढें गेली ती घांटबारी उतरोन पलीकडे गेली.' - ऐलेसं २४९६.

**घाटबुडी** स्त्री. घाटाचा पायथा; घाटपाया. (राजा.)

**घाटमाथा** पु. १. डोंगराचा माथा; डोंगरावरील घाटातील सर्वात उंच भाग; पठार. २. (डोंगरातील) खिंडीतून जाणारा अरुंद रस्ता.

**घाटरू** न. १. घाटी; कंठमणी; कंठनाल; नरडे. २. घशातील एक रोग; घटसर्प.

**घाटरू-रे** न. १. (बैलाच्या गळ्यातील) लहान घंटा; लहान ठोकडा. २. (निंदार्थी) घाट; घंटा.

**घाटरोग** पु. गुरांना घशात होणारा एक रोग.

**घाटले** न. १. घाटला; तांदळाच्या कण्या व नारळाच्या चवाचे दूध यांची घणसर खीर; गूळ, खोबरे, पाणी व तांदळाचे पीठ याची बनवलेली खीर; गुळवण्याला पीठ लावून घाटून केलेले (कोकणी) पकान्न, खाद्य. याला गोडे असेही म्हणतात. (राजा.) २. पिठले.

**घाटवळ-ळी** वि. घाटावरचा; सह्याद्रीच्या पूर्वेकडील मुलखातील; देशावरचा (मनुष्य).

**घाटवाईन, वायन, वाहन** न. घाटण्याचे वाइन-उखळ; पुरणाची डाळ किंवा इतर पदार्थ घोटण्यासाठी केलेली लाकडी किंवा दगडी उखळी. ज्याने घोटायचे त्या दगडाला घाटणा, घाटणेरा असे म्हणतात.

**घाटशुद्ध** वि. सुंदर; सुबक घाटाचा, घडणीचा.

**घाटसर** पु. बैलाच्या गळ्यातील लहान लहान घुंगरांची, घंटांची माळ; घुंगुरमाळ ज्यात ओवलेली असते ती दोरी.

**घाटसर-री** स्त्री. पर्वताच्या, रांगेच्या, उतरणीच्या अगदी वरचा प्रदेश; घाटमाथ्याच्या आजूबाजूचा प्रदेश; घाटमाथा.

**घाटा** पु. शिखर; पर्वताचा कडा, माथा : 'कुळाचाराचे घांटे। सुरिजति करपुटें।' - उगी २३१.

**घाटा** पु. घाटपांड्या; प्रदेशाच्या सीमेवर जकात वसूल करणारा अधिकारी.

**घाटा, घाटाणा** पु. ओल्या हरभऱ्याचा टरफलासहित असलेला दाणा : 'घाटा दिसे परी दाणा नाहीं।' - एभा १०.५२७. [सं. ग्रंथ.]

**घाटा** पु. १. पहा : **घाटणा, घाटपेरा.** २. बाजरी, उडीद, मूग इ. शिजवून व वाटून गुरांकरिता केलेले पौष्टिक खाद्य : 'एकाचिया घाट्या टोके। एका फिके उपचार।' - तुगा १८०. ३. जोंधळ्याच्या, बाजरीच्या कण्या शिजवून तयार केलेले खाद्य; भात : 'ज्या भक्षिती केवळ ताक घाटा।' - सारुह ३.१६. ४. मृत जनावर ओढण्यासाठी महारांना देण्यात येणारे धान्य.

**घाटा** पु. १. हातोडा. २. घंटेतील लोलक.

**घाटा** पु. तोटा; घट; बूड; तूट; घस. (व.)

**घाटा** पु. १. तुकडा. २. अन्न. ३. घास. ४. हरभऱ्याचा गुच्छ. (झाडी)

**घाटाघाट** स्त्री. १. (एखाद्या गोष्टीविषयी, कार्याविषयी) बराच वेळ चाललेला खल; वाटाघाट; चर्चा. २. (एखादा पातळ पदार्थ, डाळ इत्यादी) जोराने, घाईने घाटण्याची क्रिया. [घाटणेचे द्वित्व]

**घाटाघुगरी** स्त्री. १. हलक्या तऱ्हेचे अन्न. २. (ल.) गरिबांचे अन्न; मीठभाकर : 'घाटा घुगऱ्या कोरड्या भाकरी।' - निगा १००.

**घाटाणा** पहा : **घाटणे, घाटणा**

**घाटावाट** स्त्री. घाटातील वाट : 'त्यास आज्ञा केली कीं, तुम्ही आम्हास घाटावाट निटोप्याची दाखवून दोन प्रहराचे संधीस त्यांजवर आम्हास नेऊन सोडावे.' - होकै ९.

**घाटांबा** पु. गप्पागोष्टी छाटीत बसण्याची आंब्याखालची जागा, अड्डा.

**घाटी** स्त्री. निमचाच्या म्हणजे तलवारीच्या एका भागाचे नाव : 'गोसावी करजकर यांस सांगून घाटी वगैरे जे पाहिजे ते आणविले पाहिजे.' - पेद १७.२०.

**घाटी** स्त्री. घाट; घडण : 'पहावी स्वरूपाची घाटी।' - प्रभाकर (मला) १४६.

**घाटी** स्त्री. साखरेची गाठी. पहा : **गाठी**

**घाटी** स्त्री. १. कंठ; घसा; गळा : 'पूर्वी तुम्हां नाहीं भेटी। तरि कां येणें धरिली घाटी।' - गीता २.२२६१. २. घाट; कंठमणी; कंठनाल; नरडे : 'तिणे पसरितांचि जाभाडी। हनुमंत सवेग घाली उडी। आकळितां जिव्हा लडबडी। तंव घाटीबुडीं रिघाला।' - भारा किष्किंधा १८.६८. [सं. घाट] (वा.) ० **खाऊन बोलणे** - मोठ्याने बोलणे; ओरडून, खेकसून बोलणे; जीव खरडून, तोडून, खाऊन बोलणे; गळा काढून रडणे, ओरडणे; शिरा ताणून बोलणे; गळेफोड करणे. ० **खाजवणे** - घसा खवखवणे. (व.) ० **पडणे** - आवाज बसणे. (व.) ० **फुटणे, बदलणे** - १. (मुलगा वयात आल्यामुळे) २. (गाण्यात) आवाज बसणे; आवाज घोगरा होणे; कंठ फुटणे. (ना.) ० **वर येणे** - जिवावर येणे; दुष्कर वाटणे. (व.)

**घाटी** स्त्री. लहान घाट; डोंगरातील लहान चढण; डोंगर चढायची बांधलेली वाट : 'आसपासची जमीन डोंगराळ म्हणून अनेक लहान पण दमविणाऱ्या घाट्या चढाव्या व उतराव्या लागत.'-विवि ८.१.७.

**घाटी** स्त्री. वेसण; दोरीचा फास : 'काळिआनां मुखीं घाटी सूदली।' - श्रीकृष्ण २१.

**घाटी** वि. घाटावरचा; देशावरचा; सह्याद्रीवरच्या प्रदेशातील. घाटवळ हा शब्द लोकांसाठी व घाटी हा जनावरे, माल यांसाठी वापरतात. मुंबईत नोकराला घाटी म्हणतात : 'तवांपासून बघा घाटी झालोया.' - संगीत घोटाळा ७.

**घाटी** स्त्री. लहान घंटा (बैल इ. पशूंच्या गळ्यात बांधण्याची); पितळी लहान घाट, घंटा. [सं. घंटा] (वा.) ० **खाली उभे राहणे** - शपथ घेण्याचा एक प्रकार; बेल भंडार उचलणे, देवाचा निर्माल्य उचलणे ह्याप्रमाणेच देवळाच्या घंटेखाली उभे राहून खरे असेल ते सांगावे असा प्रघात आहे : 'घाटीखालीं उभें राहणे, देवावरची बेल-तुळस उचलणे, कृष्णेच्या पाण्यांत उतरणें, हीं साधनें अत्यंत कठीण प्रसंगी व अज्ञात वृत्तांतास्तव जुनीं माणसे अमलांत आणीत.' - खेया २.

**घाटी खंडी** वीस मणांची खंडी; घाटावरील खंडीचे माप.

**घाटीव** वि. १. घावटलेला; बडविलेला; तुडविलेला; चेंदामेंदा केलेला; ठेचलेला; (पळी, चमचा इत्यादींनी) ढवळलेला; घोटलेला. २. त्रासलेला; त्रस्त झालेला; छळलेला; गांजलेला. ३. वाटाघाट, चर्चा, घाटाघाट केलेला.

**घाटू** पु. पळीच्या आकाराचे पण मोठे-लाकडाचे-डाळ इत्यादी घोटण्याचे, ढवळण्याचे उपकरण; लाकडी मोठी पळी; एका टोकाला मोठे टवळे असलेले दांडके.

**घाटूनवाटून** क्रिवि. १. घोटून आणि रगडून; चेंदामेंदा, चेचा करून. २. (ल.) छळून, सतावून, त्रस्त करून. (क्रि. खाणे, पिणे, गिळणे.) (प्र.) वाटून घाटून. पहा : **वाटणे**

**घाटोला-ळी** वि. (उप.) घाटी. घाटवळ या शब्दाचे तुच्छतादर्शक रूप. घाटावरचे; घाटी : 'तेथे घाटोळी लोक रहात असत.' - माजी १४.

**घाटौल** वि. घाटदार : 'पारिजातसें घाटौलें।' - शिव ४२६.

**घाटौले** न. कळी : 'तंव गगनीं नक्षत्रें उमटत। जैसी आकाशीं घाटौलीं फुलत। नातरि मेघ वीणि साधित। मोतियांची॥' - रुस्व ४८६.

**घाट्या** पु. तीर्थाच्या ठिकाणी घाटावर स्नान करणारांना गंध व भस्म पुरवून उपजीविका करणारा ब्राह्मण; (सामा.) घाटावरचा ब्राह्मण.

**घाट्या** स्त्री. अव. रांधलेल्या कण्या.

**घाट्या, घाटिया** पु. लहान हातोडा; नक्षीचे, कलाकुसरीचे काम करायचे सोनाराचे, कासाराचे एक हत्यार; लहान हातोडी.

**घाड** स्त्री. भात्याणाची पेंढी; भाताच्या पेंढ्याची गड्डी, कवळा. [सं. घट]

**घाड** स्त्री. व्रण; क्षत; जखम : 'महाराज, कोळिष्टक कशाला? घाड भरून काढायला?' - रोज्यू २२.

**घाड** पु. (सुतारकाम) एक प्रकारचे चक्र, चाक; जे फिरवून दुसऱ्या चाकाला, यंत्राला गती देता येते ते.

**घाड** पु. (विणकाम) विणायच्या कापडाच्या काठात फुले उठवण्यासाठी चक्रे बसवलेला, मागावर टांगलेला लाकडी साचा, चाळ. (बे.)

**घाड** स्त्री. (सोनारकाम) सोने, चांदी इत्यादी धातूंची तार ओढून बारीक करण्यासाठी लागणारी एक करवतीसारखी आटे असलेली फळी; एक विशिष्ट रचना, योजना.

**घाडकी** स्त्री. घाड्याचे, देवळातील गुरवाचे काम, धंदा, हक्क.

**घाडवस** पु. घाड्याचा, गुरवाचा वंश. (कु.)

**घाडी** पु. १. देवस्कीचा एक अधिकारी; देवळाची झाडलोट, दिवाबत्ती करणारी व्यक्ती. ही गुरवासारखीच असते. 'नंतर घाडी व गुरव घरोघरी येऊन शिंपणें करतात.' - मसाप ४.४.२६१. (राजा.) २. मांत्रिक; जादूटोणा करणारा. डोक्यावर जटा असणारा, अंगात वारे संचारल्यावर भूत-पिशाचासंबंधी विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे सांगणारा. याला भूतपिशाच्चाबरोबर बोलणारा मध्यस्थ समजतात. (गो. हेट.)

**घाडीपण** न. घाडीचा धंदा; कौल, प्रसाद देणे, भुते काढणे इत्यादी.

**घाड्डा** पु. पिठाचा वडा. (झाडी)

**घाण** स्त्री. १. वास; गंध : 'जैसे खालारा धांवे पाणी। भ्रमर पुष्पाचिये घाणीं।' - ज्ञा १८.४८१. २. दुर्गंध; दुर्गंधी; नाकाला न आवडणारा

वास; दर्प. (क्रि. करणे, मारणे.) ३. घ्राणेंद्रियाला, डोळ्यांना न आवडणारी ओंगळ वस्तू; केरकचरा; खेड; रेंदा; राडा. ४. (तिरस्कारार्थी) घाणेरडा; वाशेरा, घाणेरा मनुष्य, पदार्थ. ५. (कामातील, हिशेबातील) घालमेल; घोटाळा; अव्यवस्था; गफलत; गोंधळ; भानगड; (मनुष्यांचा, कामांचा) घप्पाघोळ; हबेलंडी; गळ्हाटा; दुर्दशा; फजिती; (पदार्थांचा, सामानाचा) चिवडा; विचका; वचवच; चवढव : 'कामाची सगळी घाण केलीस.' - विवि १०.५.७.१२९. ६. एखाद्या व्यवहारासंबंधी अवशिष्ट खटले, काम, बाकी. ७. छी: थू:, तिरस्कार, चीड, त्रास, मत्सर यांचा वाचक शब्द. [सं. घ्राण] (वा.) ० **करणे** - एखादे काम बिघडवणे.

**घाण, घाणवट-खत-पत्र** वि. गहाण, गहाणवट. पहा : **गहाणखत, पत्र.**

**घाण** स्त्री. चुन्याची घाणी, घाणा.

**घाणकढा** वि. खवट; वासाळ; घाण मारणारे; योग्य मर्यादेपलीकडे कढवल्याने वास मारणारे (तूप).

**घाणकरी** पु. तेलाचा घाणा चालवणारा.

**घाणघूण** स्त्री. घाणेरड्या वस्तू : 'घाणघूण वाहून गेली.'-आआशे ३६६.

**घाणट, घाणवट** वि. १. दुर्गंधयुक्त; वाईट वास मारणारा; घाणेरा. २. (ल.) बीभत्स; ओंगळ; किळस, तिटकारा, शिसारी आणणारा.

**घाणणे, घाण (णा) वणे** अक्रि. वाईट वास येणे; वास मारणे; उग्र वास, दर्प येणे : 'हरिकथा विरहित जे वदन। तें केवळ मद्यप्याचे भांडे जाण। विषय कृमी परिपूर्ण। निंदा दुर्गंधीने घाणतसे।' - जै ४२.७. [सं. घ्रा]

**घाणमाकड** न. शिमग्याच्या दिवसात जमिनीत एक साधारण उंच खांब रोवून व त्यावर एक आडवा दांडा ठेवून त्या दांड्याच्या दोन टोकांवर मुले अथवा माकडे बसवून फिरविण्यासाठी केलेली रचना. (ना.)

**घाणयारों** पु. दुर्गंधयुक्त पानांची एक वनस्पती; घाणेरी.
वि. घाणेरडा; घाणेरा. (गो.)

**घाणवट, घाणवटा** स्त्री. पु. १. घाणा. २. (तेलाचा) घाणा ज्या जागेवर असतो ती जागा.

**घाणवट** स्त्री. १. (प्रा.) घाणीची, दुर्गंधयुक्त जागा. २. घाण येणारी, घाणेरडी वस्तू, पदार्थ.
वि. पहा : **घापट**

**घाणवड** स्त्री. उसाचा रस साठविण्याचे भांडे ठेवण्याकरिता आणि पिळलेली चिपाडे घेता यावी म्हणून माणसाला बसण्यासाठी केलेले डबरे. (माण.)

**घाणा** पु. १. तीळ, भुईमूग, करडई वगैरेंचे तेल काढण्याचे साधन, यंत्र, साचा; तेलाची गिरणी : 'घाणां गाळिले गुंडे। तेथ तेल ना पेंडी जोडे।' - ज्ञा १७.४१९. २. तेल्याच्या घाण्याची लाट जीत फिरते ती लाकडी कुंडी. ३. उसाचा रस गाळण्याचा चरक : 'रणभूमीचा घाणा करौनी सरिसां। महाकाळु इक्षु गाळीतुसें जैसा।' - शिव १०४३. ४. मकर-संक्रांतीच्या दिवशी ब्राह्मणाला दान देण्याकरिता स्त्रिया उखळावर ठेवतात ती धान्याची रास. ५. कांडण्याचा विधी (देवक बसवण्यापूर्वीचा); लग्न, मुंज इ. मंगलकार्यात दुरडीत तांदूळ घालून सौभाग्यवती स्त्रियांनी मंगलगीते गात तांदूळ कांडण्याचा विधी; मंगलविधीच्या आरंभी कांडण्याचा समारंभ. (क्रि. भरणे, घालणे.) ६. चुना मळण्याची घाणी. ७. दौतीत उगीच लेखणी घालून ठेवली असता होणारी विशिष्ट स्थिती, अवस्था. (ल.) कष्टाचे, कंटाळवाणे काम. [सं. घतनम्, क. गाण] (वा.) ० **करणे** - १. (मनुष्याला, प्राण्याला) छळणे; त्रास देणे; गांजणे; सतावून सोडणे; शक्तीबाहेर काम करायला लावणे. २. (कागद, कापड, कपडे इ.) विसकटून टाकणे, अस्ताव्यस्त करणे, चुरडणे, गुधडणे, सुरकुत्यांनी युक्त करणे; घुसडणे. ० **होणे** - कालवाकालव होणे; गोंधळ होणे : 'यामुळे फौजेचा घाणा होऊन येक प्रहर युद्ध जाहले.' - पेद १५.४३. **घाण्यात घालणे** - (एखाद्याला) मोठ्या संकटात लोटणे; पेचात पाडणे. **घाण्यातून पिळणे, काढणे** - १. चेंगरणे; चिरडणे; पिळून काढणे. २. (एखाद्याच्या) शक्तीबाहेरचे काम करायला लावून, नि:सत्त्व, निर्बल बनविणे; (एखाद्याचा) भुसा पाडणे. **घाण्यावर घालणे** - तुरुंगात तेलाच्या घाण्याला जुंपण्याची एक शिक्षा.

**घाणा** पु. एका वेळी जाते, गिरणी, घाणा इ. मध्ये घालायचा घास; एकवार घालायचे परिमाण; तेल काढण्यासाठी घाण्यात घालायचे तिळाचे, करडईचे एका खेपेचे परिमाण; खापरात भाजण्याच्या, उखळात कांडण्याच्या; तेलात तळण्याच्या पदार्थांचे, धान्याचे, औषधाचे एक वेगळे परिमाण; भर, हप्ता. (वा.) ० **घाटणे** - १. पोह्यांचे भात, लाह्या करायचे दाणे, भाजायचे दाणे वगैरे खापरात किंवा भट्टीत घालून घाटण्याने ढवळून भाजून काढणे, रगडणे किंवा ढवळणे. २. (ल.) शत्रूला चिरडून टाकणे; शत्रूचा नि:पात करणे : 'किती धाडले बहुतची मिरास जसे घाणा घातला।' - ऐपो २.४६.

**घाणा** पु. मुलांचा एक खेळ.

**घाणा आढी** (मल्लखांब) मल्लखांबावर पायांच्या आढ्या घाण्याप्रमाणे फिरवून मारायची उडी.

**घाणाते** वि. घाण येणारे : 'पुहीयांनी घाणातेनि तोंडेसी बाबापासि उपवास सातरीया।' - लीचपू ४६६.

**घाणाळ** वि. लांब नाकाचा. पहा : **घानाळ** [सं. घोणा = नाक]

**घाणी** स्त्री. १. पहा : **घाणा**. २. चुन्याच्या घाणीचे दगडी चाक.

**घाणी** स्त्री. घाण; दुर्गंधी; वाईट वास : 'ऐसेनि कहीं विपायें। सदन्ना वरपडा होये। तरी घाणी सुटे तंव राहे। व्याघ्रु जैसा।' - ज्ञा १७.१५८.

**घाणीचा** वि. १. वास असलेला. २. (ल.) एखाद्याशी दूरचा संबंध असलेला; लांबच्या नात्याचा.

**घाणेकार** पु. १. तेली; तेलविक्या. २. घाणा चालविणारा.

**घाणेरडा, घाणेरा, घाणेल-ला** वि. १. दुर्गंधी, वाईट वास येणारा; वास मारणारा; वाशेरा. २. मलिन; घामट; गलिच्छ; किळसवाणा; ओंगळ; शिसारी, ओकारी, तिटकारा उत्पन्न करणारा कंटाळवाणा; नावडीचा; वाईट (पदार्थ, काम, भाषण, कृती, मनुष्य) : 'पांडव किमपि न वदती तूं वदसि सभेंत शब्द घाणेरे।' - मोसभा ४.८६. ३. खवचट; कुटाळ; कुचाळ (मनुष्य, भाषण). ४. गदळ; लुच्चा; शिटाऊ; फटलंडी; बदफैली (मनुष्य).

**घाणेरी** स्त्री. दुर्गंधी येणारी वनस्पती.
**घाणेरी** - वि. कुशब्द.
**घाणेरे** न. वेखंड. - (तंजा).
**घाणौडी** स्त्री. घाणवडी. घाण्याची भोवरी; घाण्याचा बैल फिरण्याचा वर्तुळाकार मार्ग. पहा : **घानो (नौ) डी**
**घात** पु. १. वध; नाश; ठार मारणे; उच्छेद; संहार : 'पाता त्या उभयांस मी मज विधी घातास योजीतसे।' - र ११. २. आघात करणे; आघात; प्रहार; मारा; घाव; तडाखा : 'धांवोनि हाणिती रथातें। एकेचि घातें शतचूर्ण।' - एरुस्व ८.४६. ३. (कामाचा, धंद्याचा, व्यवहाराचा, मसलतीचा, योजनेचा) बिघाड; चक्काचूर; नाश; नासाडी; विध्वंस; उच्छेद; (एखाद्याचा) नाश; हानी; नुकसान : 'म्हणौनि आपणचि आपणपेया। घातु कीजतु असे धनंजया।' - ज्ञा ६.७०. [सं. हन्]
**घात** पु. (ग.) समान संख्यांचा गुणाकार; एका संख्येला त्याच संख्येने गुणिले असता त्याला त्या संख्येचा घात केला असे म्हणतात. तीन या संख्येचा नऊ हा द्विघात व सत्तावीस हा त्रिघात आहे. [सं. घात = गुणाकार]
**घात** स्त्री. १. (शेती इत्यादिकांच्या कामांची, ऋतुपरत्वे येणाऱ्या, पिकणाऱ्या धान्याची) योग्य वेळ; मोसम; हंगाम. उदा. पेरण्याची घात; कापण्याची घात इ. : 'या दिवसांत उत्तरा व हस्त या पावसाने पेरणीस घात थोडी उशिरां आली आहे.' - खेया १६. २. (ल.) भरभराट; चलती (वा.)
० **घेणे** - (एखाद्या मनुष्याचा, कार्याचा, मसलतीचा) आणीबाणीच्या वेळी नाश करणे, मातेरे करणे; बुडवणे; (एखाद्याला) आलेली संधी घालवून देऊन त्याची निराशा करून त्याला लुबाडणे; (एखाद्या मनुष्याची, कामाची) संधी दवडणे, हुकवणे.
**घात** स्त्री. १. हंगाम. २. रंध्याचे छिद्र. (झाडी)
**घात** वि. अशुभ; अमंगल; अनिष्ट. [सं. घात्य]
**घातक-की** वि. घातुक; हिंसक; मारक; नाशकारक; अनर्थकारक; अपकारक; अपायकारक; दुष्ट; विश्वासघातकी; ठार मारणारा.[सं.]
**घातकरी** वि. १. ठार मारणारा; वध करणारा; मारेकरी; प्राण घेणारा. २. उपद्रव करणारा; नुकसान करणारा; अपायकारक; नाशकारक (वस्तू, मनुष्य, जिंदगी).
**घातघाई** स्त्री. हाणाहाणी : 'घातघाईचे तुरळक सामने होत होते.' - श्रीयो १.८१.
**घातघेणा, घातघेणे-ण्या** वि. अवसानघातकी; आणीबाणीच्या वेळी घात, दगा करणारा : 'जैसा वैद्य दुराचारी। केली सर्वस्वें बोहरी। आणि सेखीं भीड करी। घात घेणा।' - दास ५.२.२६.
**घातचक्र** न. एका संकटामुळे ओढवणारे दुसरे, दुसऱ्यामुळे तिसरे, तिसऱ्यातून पुन्हा पहिले अशी संकटांची परंपरा : 'यातून एक घातचक्र निर्माण झालेले आहे.' - अम ४७३.
**घातचतुर्दशी** स्त्री. भाद्रपद वद्य चतुर्दशी. या दिवशी लढाईत अथवा अपघाताने मेलेल्या पितराचे महालय श्राद्ध करतात. [सं.]
**घातचतुष्ट्य** न. (ज्यो.) घातकारक, अनिष्ट असा चौकडा; घातचंद्र, घाततिथी, घातनक्षत्र व घातवार यांचा समूह.
**घातचंद्र** पु. (ज्यो.) अशुभनक्षत्री आलेला अनिष्टकारक चंद्र. [सं.]
**घातड** स्त्री. (नाविक) घामत (गलबतातील, होडीतील) पाणी काढण्याची जागा. (हेट) पहा : **गमतड**
**घातणे** अक्रि. घात करणे; मारणे; नाश करणे. [सं. घात्]
**घातपात** पु. १. (व्यापक) ठार मारणे; पंगू, लंगडा, अधू करणे; हत्या, अपकार करणे. २. जाळपोळ; नाश; वध; तोटा; इजा; अपकार. ३. गुप्तपणे खून, जाळपोळ, दुसऱ्याचे विशेषतः सरकार, समाज इ. चे नुकसान होईल असे जाणूनबुजून केलेले हिंसक कृत्य; दंगा.
**घातपाती** वि. १. घातपात करण्याचा ज्याचा स्वभाव आहे तो; अपकारी; दुष्ट. २. जाळपोळ, हिंसक कृत्ये करून सरकारला जर्जर करणारा : 'घातपाती चळवळ निजामाच्या राजवटीविरुद्ध मराठवाड्यातही चालू होती.' - माजी ५३३.
**घातप्रकाशक** वि. (ग.) पहा : **घातांक**
**घातमारॉ, घातमारावणॉ** वि. घातकी; दुष्ट. (गो.)
**घातमोड** स्त्री. ठरावीक गोष्ट ठरावीक वेळी न होणे : 'पाऊस रात्रभर पडतच होता.. त्यामुळे घातमोड होऊन शेतीची कामे बंद होती.' - गार ३०.
**घातवाफ** स्त्री. एकदा पर्जन्यवृष्टी होऊन गेल्यानंतर पुन्हा पर्जन्यवृष्टी होईपर्यंतचा (जमिनीतून वाफ इ. निघत असलेला) पेरणीला अत्यंत अनुकूल असा काळ. (क्रि. सांभाळणे, साधणे, जपणे.) : 'क्षेत्र गुणें बीज अंकुरे। तें अनंतधावृत्ती विकारें। घातवाफ ते आदरें। साधूनि घेतली।' - गीता १३.१७६.
**घातवेळ** स्त्री. १. घातुक, अनिष्ट वेळ. २. मरणाचा, घोर संकटाचा, अरिष्टाचा समय; जिवावरचा प्रसंग; प्राणसंकटाची वेळ.
**घातांक** पु. (ग.) एखाद्या संख्येला त्याच संख्येने किती वेळा गुणावे हे दर्शविणारा आणि त्याच संख्येच्या डोक्यावर लिहिलेला अंक. उदा. - $२^{५}$ = २ ला २ ने ५ वेळा गुणावे. २ × २ × २ × २ × २.
**घातांकी वृद्धी** (वै.) घातांकाप्रमाणे (२-४-८-१६) होत जाणारी वाढ. साधारणपणे पेशी व जंतूंची वाढ याप्रमाणे होते.
**घाती** पु. हंता; मारणारा : 'घाती अरिष्टासुरा।' - गरा ७४.
**घातीचे दिवस** १. हंगामाचे दिवस. २. (ल.) सत्तेचा, चलतीचा, भरभराटीचा, उपभोगाचा काळ, दिवस.
**घातीव** न. प्राणघातक शस्त्र : 'कीं अर्थसाधक श्रोता पूर्ण। परी घातीवे घेणार प्राण।' - नव १८.१६९.
**घातुक** वि. १. घातक; हिंसक; ठार मारणारा; प्राणनाशक; क्रूर; नाश करणारा : 'घातुक पक्षी.' - प्राणिमो ६३. २. अपायकारक; अनिष्ट; दुष्ट. पहा : **घातक**
**घानडी** स्त्री. घाणा.
**घानमऊत** स्त्री. १. संकट. २. अपघात. (झाडी)
**घानवत** पु. भुईकोट.
**घाना** पु. १. घाणा. २. चुराडा : 'घाना रिपुचा केला।' - गरा १०७.
**घानाळ** वि. लांब नाकाचा : 'दांतिरें बोचिरें घानाळ। प्राणहीन श्रोत्रहीन बरळ।' - दास ३.६.४३. [सं. घोण = नाक]
**घानोड** स्त्री. ऊस पिळण्याचे गुन्हाळ. (झाडी)
**घानो(नौ)डी** स्त्री. घाण्याचा बैल फिरण्याचा गोल मार्ग; घाण्याची

भोवरी; घाण्याचा मार्ग (सामा.) घाणा : 'कर्मभूमीचिए घानीडि। बांधौनि मिथ्या ज्ञानाची झांपडी। काळें भवंडिलीं बापुडीं। जीव पशुवें॥' - ऋ ३०; 'डोळां अज्ञानें झांपडी। भोवें देहबुद्धि घानोडी।' - दावि ३५४.

**घापणे, घापतणे** उक्रि. १. घालणे; घातले जाणे : 'नाना गगनौलाचिया माळा। वांझेच्या जालया गळां। घापती तो सोहळा। पाविजतसे॥' - अमृ ७.८२. २. घालवून देणे; बाहेर टाकणे; सोडणे : 'जरी आत्मा तूं एकसरा। हेंही म्हणतां दातारा। तरी आंतुल तूं बाहेरा। घापतासी।' - ज्ञा १८.२३. [सं. गृभ्]

**घापी** स्त्री. खलपी; लाकडाचा तुकडा. (झाडी)

**घाब** स्त्री. डोंगराच्या बाजूत, कातळात पडलेले खिंडार, भोक, भगदाड; आत जाता येण्याजोगे डोंगराचे बीळ. (राजा.) [सं. गर्भ]

**घाबरगुंडी** स्त्री. घाबरटपणा; भेदरलेली, घाबरलेली अवस्था.

**घाबरट** वि. भित्रा.

**घाब (बि) रणे, घाभरावणे** अक्रि. १. (दुःख, शोक, वेदना, आकस्मिक क्षोभ, मनोविकार इ. नी) आक्रांत, आकुल होणे. २. बावरणे; भयभीत होणे; गांगरून जाणे; गोंधळणे; काही सुचेनासे होणे. [सं. गव्हर]

**घाब(बि)रा** वि. १. (दुःख, शोक, वेदना, भीती इत्यादिकांनी) व्याकूळ झालेला; घाबरलेला; बावरलेला; भीतीने गोंधळून, गांगरून गेलेला. २. उतावळा : 'म्हणा मज उताविळा गुणचि घेतला घाबरें। असो मन असेंचि बा भजकबर्हिमेघा बरें।' - केका ४५. (वा.) **० पडणे** - भीती वाटणे; काळजी वाटणे : 'अधीमधीच आता काय घोटाळा होतोय का काय, असं वाटून तिला घाबरा पडला होता.' - ऊन १.

**घाबराघुबरा** वि. भेदरलेला; अतिशय घाबरलेला.

**घाबऱ्याघाबऱ्या** क्रिवि. भीतभीत; भीती वाटून : 'चुकतंय का काही? दास्या घाबऱ्या घाबऱ्या बोलला.' - राकाधाका ३.

**घाबाड** पहा : **घबाड**

**घाम** पु. १. ऊन, ज्वर, उष्णता, श्रम इत्यादिकांनी अंगाच्या त्वचेच्या छिद्रांतून येणारे पाणी; घर्म; स्वेद; स्वेदोदक. २. ओले लाकूड जळत असताना त्यातून बाहेर येणारा द्रव. ३. विस्तवावर पाणी असलेले भांडे ठेवून त्यावर झाकण ठेवले असता झाकणाच्या आतल्या बाजूला जमणारे (वाफेच्या) पाण्याचे थेंब. ४. कठोर हृदयाला, पाषाणहृदयाला फुटलेला पाझर; दया; द्रव.[सं. घर्म] (वा.) **० फुटणे, ० सुटणे** - घाबरणे; भीतीने अंगाला दरदरून घाम येणे : 'राघोबादादांना हें भाषण ऐकतांच घाम सुटला.' - इंप ६७. **० गाळणे** - अतिशय श्रम करणे.

**घामगंडा** पु. उष्णतेमुळे उत्पन्न होणारी पुळी. (ना.) [सं. घर्म]

**घाम(मा-मे)घूम** स्त्री. धापा टाकण्याची, गुदमरण्याची, श्रमाने शीण आल्याची, उकडण्याची अवस्था; (श्रमाने, उन्हाने, भीतीने) घामाने डबडबण्याची स्थिती; अंगातून घामाच्या धारा निघून जीव कासावीस झालेली अवस्था.

वि. (श्रमाने, भीतीने, उन्हाने) घाम सुटलेले; घामाने डबडबलेले (अंग, मनुष्य); श्रमाने थकलेला; धापा, सुस्कारे टाकीत असलेला.

**घामट-ड** वि. ओंगळ; अस्वच्छ; घाणेरडा; गैदी; ज्याच्या अंगाला नेहमी घाम येऊन घाण येते असा; मलिन.

**घामटघाण, घामठा(ष्टा, सा)ण** स्त्री. घामाची घाण, दुर्गंध.

**घामटा** पु. १. अतिश्रमामुळे आलेला घाम; निढळाचा घाम. (क्रि. काढणे, निघणे.) २. अतिशय श्रमाची अवस्था; पिट्टा पडणे. (को.)

**घामणे** सक्रि. ठार मारणे; नाश करणे : 'शुंभ निशुंभाचिया घामणारा। मोहनी रूप धरा दैत्यांतका।' - निगा २०९.

**घामत** स्त्री. (नाविक) होडीत, गलबतात पाझरून आलेले समुद्राचे पाणी; घमत. (को. कु. हेट) : 'गलबतास गोळे तीन लागू होऊन फुटले. आंत पाणी भरले. पुढे चालावयाचे राहिले. घामतात लोक बसले.' - पेद ३३.२३७.

**घामल, घामलवामल** वि. घामाने चिंब. (अहि.)

**घामसी** स्त्री. मूर्च्छा. (झाडी)

**घामागार** वि. विपुल : 'वांगी फुलं घामागार सरकार।' - लोसामा ४.९.

**घामाझ्रा(झो)क(को)ळ** वि. घामाने डबडबलेला; घामाघूम. (क्रि. होणे.) (व.)

**घामे (मै) जणे, घामेणे** अक्रि. १. श्रमादिकांमुळे शरीर घामाने भिजणे : 'ऐसा मीचि एक जगीं। जया नाना कर्मांची वज्रांगी। तेणें वियोग दुःखाचिया आगी। तनु घामैजेना॥' - ज्ञाप्र ११३४; 'धाके धाकें घामेजत। दडी देत गुप्तत्वें।' - एभा १०.८. (राजा.) २. श्रमी होणे; श्रमाने थकणे, शिणणे : 'नाना चराचरीं भूतीं। दाटणी नव्हे क्षिती। तैसा नाना द्वंद्वीं प्राप्ती। घामेजेना॥' - ज्ञा १३.३४९. ३. (ल.) द्रवणे; कींव, दया येणे; हृदयाला पाझर फुटणे : 'चित्ती अंध म्हणे सुत शत वधितां, लेशही न घामेला।' - मोआश्रम १.२२.

**घामेल-ला** वि. घामाने डबडबलेला; घाम आलेला : 'ये उठुनिहि घामेला, जनभावी वांचला जरि मघां मेला।' - मोकृष्ण ३६.१०.

**घामोळी** स्त्री. घामाने अंगावर उठणारी पुळी, पुरळ, पुटकुळी.

**घामोळे** न. १. जिच्या योगाने अंगावर काटे उभे राहतात, अंग चुणचुणते अशी उष्णता, ऊन. २. घामाने अंगावर उठणारे पुरळ; घामोळी. ३. घाम शोषून घेण्याचे साधन; अंगरख्याच्या बगलेला, पागोट्याला, आतील बाजूला लावलेला कापडाचा तुकडा, फडके; जोड्याच्या आतल्या बाजूला लावलेला कातड्याचा तुकडा; खोगिराखाली लावलेला, ठेवलेला बुर्णुसाचा तुकडा.

**घाम्यौचें** अक्रि. घाम सुटणे, येणे; घामवणे; घामणे. (गो.)

**घाय** पु. जखम; शस्त्राचा वार, घाव, आघात : 'डोळां हरळ न विरे। पायीं कोत न जिरे।' - ज्ञा १३.५३९. [सं. घात = प्रहार] (वा.) **घायावर घाय लावणे** - जखमेवर मीठ टाकणे; दुःखावर डागण्या देणे; मेलेल्यास मारणे. **घायास येणे** - संकटाच्या, नुकसानीच्या, दुःखाच्या परिस्थितीत पडणे, सापडणे.

**घाय** स्त्री. बाजू; अंग : 'तैं जरासुंद घाया आला।' - शिव ४४०.

**घाय** स्त्री. त्वरा; जलदी; घाई. पहा : **घाई** [सं. गति]

**घायक(खे)टर** वि. कोडगा; निगरगट्ट; लाथाबुक्याखाऊ; निसूक; कितीही मारले, रागावले तरी न सुधारणारा. (राजा.)

**घायकुठार, घायखोर** वि. थोडीशी इजा झाली असता मोठ्याने ओरडून फार इजा झाली आहे असे भासविणारा; कांगावखोर.

**घायकुतेपणा** पु. (मनाची) दम न निघण्यासारखी अवस्था; अस्वस्थता; उतावळेपणा; घायकूत करण्याचा स्वभाव : 'त्याचा उतावळेपणा, घायकुतेपणा, प्रेमळपणा व रागीटपणा हे सर्व गुण अतिरेकामुळे हास्यास्पद होतात.' - सुदे १५१.

**घायकुत्या** वि. घायकूत करण्याचा, घाई करण्याचा, उतावळेपणाचा स्वभाव असणारा; हुलहुल्या; स्वत: घायकूत करणारा किंवा दुसऱ्याला घायकूत करायला लावणारा : 'परंतु बळवंतराव घायकुत्या माणूस नव्हता.' - भयंकर दिव्य.

**घायकू(क)त** स्त्री. न. १. मोठी धांदल; उतावळेपणा; तातडी. (क्रि. येणे.) २. (एखादे काम करण्याबद्दल) दुसऱ्याला लावलेली निकड, तगादा, नेट, आग्रह. (क्रि. लावणे, देणे, करणे, मांडणे.) ३. ताप येण्यापूर्वी होणारी तगमग, काहिली, अस्वस्थता. (क्रि. येणे.) ४. खाजवण्याची अनिवार प्रवृत्ती, अतिशय खांज; खाजेची इसळी. (क्रि. येणे.) [सं. हय् + कुथ्]

**घायखंडी** घाव घालणे आणि पेलणे : 'घायखंडी हानतासि सरिये।' - शिव १०६२.

**घायटा** पु. घाव; प्रहार; तडाखा; घायवटा; घावटा : 'ठेंचा लागती मोडती कांटे। विझती शस्त्रांचे घायटे।' - दास ३.७.४

**घायटा** पु. १. धडाका; गर्दी : 'मी कामाचा नुसता घायटा उसळून सोडला.' - रैत १०९. २.ओरडा. (क्रि. उडवणे.) : 'मेली रं मेली पोरगी, आबांनी घायटा उडवला.' - बेटी १२.

**घायडाय** पु. आणीबाणीचा प्रसंग. पहा : **घावडाव**

**घायतळ** न. १. घेरी; भोवळ; भोवंड; चक्कर. (क्रि. येणे.) २. आघाताने, तडाख्याने येणारा बेशुद्धपणा; मूर्च्छा. (क्रि. येणे.) ३. (ल.) विस्मय; आश्चर्य; अचंबा. ४. पहा : **घायातळ** [सं. घात + तल]

**घायतावणे** उक्रि. घायकुतीस येणे; घाई, उतावीळ करणे; घाबरविणे; गडबड, लगबग करणे, करायला लावणे; दुसरा घाबरेल अशी त्याला घाई करणे. (को.) [सं. घात + तापनम्]

**घायतेल** न. बिबा, राळ, आंबेहळद, गंधक, मोरचूद, रुईचे पान इ. तेलात मिसळून खरूज इत्यादिकांना लावण्याकरिता केलेले मलम. याला भडकतेल असेही म्हणतात.

**घायप(पा)त, घायमार-री** स्त्री. कोरफडीसारखी दिसणारी अतिशय उपयुक्त व औषधी वनस्पती. हिंदुस्थानातील उष्ण व सर्द प्रदेशात ही वनस्पती होते. हिच्यापासून निघणाऱ्या तंतूचे वाखाचे दोर, चटया, कुंचले इ. करतात. [सं. घातपत्र]

**घायभर** पु. जोरदार प्रहार; सपाटून लागलेला वार; जोराचा घाव.

**घायली** स्त्री. झुंजणाऱ्या, लढणाऱ्या दोन जनावरांमध्ये पडणाऱ्या तिसऱ्या जनावराला म्हणतात.

**घायवट** न. १. जखम; व्रण; घाव.

वि. घायाळ; जखमी झालेला : 'अडखळूनि आदळे पोट। म्हणे मी घायवट पडलों कीं।' - एभा २२.६२५.

**घायवटणे** अक्रि. १. घाव लागून, जखम होऊन जर्जर होणे; घायाळ होणे. २. (ल.) मनाला अतिशय अस्वस्थता वाटणे; कसेसेच वाटणे; आजारी असणे, होणे.

**घायवटा** पु. १.घाव; तडाखा; प्रहार. २.जखम; व्रण. ३.अतिशय शीण.

**घायवारा-रे** पु. न. १. जखम; व्रण; शस्त्राचा वार. २. घाव लागण्याची किंवा घाव लागून व्याकूळ झाल्यामुळे उत्पन्न होणारी भीती: 'वीरीं घेतलें घायवारें। म्हणती पळा रे पळा रे।' - एरुस्व १२.१९. (क्रि. घेणे.)

**घाया** नसते मीस (खोटे सोंग). - (तंजा.)

**घायापाया** क्रिवि. तातडीने; घाईने; जलद: 'तो घायाघाया कैवल्य देतु असे।' - लीचउ १९३.

**घायातळ** स्त्री. खालचा भाग. (वा.) **घायातळी आणणे** - खाली, जमिनीवर पाडणे : 'धनुष्य घालोनिया गळां। बोढुनि आणिला घायातळां।' - एरुस्व १२.१३६.

**घायाळ** पहा : **घायपात**

**घायाळ** वि. १. जखमी झालेला; शस्त्राचे वार ज्याच्या अंगावर झाले आहेत असा; शारीरिक वा मानसिक आघाताने, घावाने, व्याकूळ झालेला : 'रण तुंबळ, घुमतें घायाळ, गणती नाहीं मुडद्यांची।' - ऐपो १८५. २. (ल.) (दाव्यात, वादात) चीत, कुंठित, प्रतिहत केलेला; पराजय, कुप्रसिद्धी इ. कारणांमुळे मानखंडना पावलेला. ३. कमजोर झालेला (रोग, शत्रू इ.). ४. (लाजिरवाण्या कृत्यामुळे) मान खाली घालणारा; समाजात (आपले) तोंड लपवणारा. [सं. घात + इल्ल]

**घायाळ चतुर्दशी** पहा : **घात चतुर्दशी**

**घायेवाट** वि. घायाळ. 'घायेवाटे होति सिवनां : तया उपहुडुचि बना :' रुस्व ६६६.

**घायेसुटी** स्त्री. घावांचा वर्षाव : 'होतसे घायेसुटी।' - गरा ५४.

**घार** स्त्री. एक पक्षिविशेष : 'गीध घारी कांडेसरे' - दावि २२४. [सं. गृध्र] (वा.) **घारीसारखी वाट पाहणे** - १. एखाद्याच्या येण्याकडे (घारीप्रमाणे त्यावर हल्ला करण्याकरिता) बारीक लक्ष देऊन टपून बसणे; डोळ्यांत तेल घालून बसणे. प्रतिक्षा करणे; अतिशय वाट पहाणे. २. गिध; गिधाड. - (तंजा).

**घारकू(वी)ट** न. तांदूळ व उडीद एके ठिकाणी दळून केलेले जाडे पीठ.

**घारगा** पु. १. एक खाद्यपदार्थ; पकान्न; तांदळाच्या, गव्हाच्या रव्यात किंवा सोजीत गूळ घालून त्याची धापटी - चांदकी करून ही तुपात तळतात. तांबड्या भोपळ्यात गूळ घालून त्यात कणिक मळून त्याचा गोळा करून त्याच्या थापट्या तुपात तळून काढतात. त्याला भोपळ्याचे घारगे म्हणतात. २. श्राद्धाच्या वेळी केले जाणारे वडे. (घाऱ्या.) - (तंजा.) [गुज. घारी, का. गारिगे]

**घारणे** अक्रि. १. व्यापणे; चढणे; घेरणे : 'नेणें आपुले पारिखे। घारलें तें आपुल्या दु:खें।' - निगा २८३. २. कैफ इत्यादिकांमुळे उन्मत्त होणे, माजणे; झिंगणे. ३. चढणे; घेरणे; बाधा होणे; बाधणे (विष इ.); पसरणे : 'परि तें बुद्धि विषयविखें। घारिली होती॥' - ज्ञा १०.१५८. ४. शिंपडणे; भिजविणे. [सं. घृ]

**घारपट** पु. घारीसारखा केलेला कागदाचा पतंग. (बे.)

**घारपीठ, घारवडा** पु. वड्याचा एक प्रकार; आयतोळा.

**घारमोर** न. लहान मुलांचा आळंचो माळंचोसारखा एक खेळ. (वा.) ०

करणे - लहान मुलाला पायाच्या धुरीवर घेऊन (घारीप्रमाणे) उंच करणे.
**घारवड** स्त्री. लहान घार.
**घारवीट** पहा : **घारकूट**
**घारा** वि. रंगविशेष; १. मांजराच्या डोळ्यांच्या रंगाचा (डोळा). २. घारडोळ्या (माणूस). [सं. गहिर]
**घारी** स्त्री. अव. पुरण घालून तळलेली गव्हाची पुरी; घारगा : 'सफेद फेणिया पदरोपदरीं। शुद्ध शर्करा भरलीं भरीं। अमृत फळें ठेविलीं वरी। अभेद घारी वाढल्या।'-एरुस्व १४.१२०. [सं. घार्ति (कि) का]
**घारीपुरी** स्त्री. घारी; पुरीचा एक प्रकार : 'घाऱ्यापुऱ्या पंच मधुरस। श्रद्धापूर्वक ठेविल्या।' - नव ९.११७.
**घारुड** न. १. घारींचा समुदाय. २. घार. (को.)
**घारे** न. झरोका; गवाक्ष.
**घारेला, घारोळा** वि. १. किंचित, थोडासा घारा (डोळा). २. किंचित, थोडासा घारडोळ्या; गारोळा.
**घाऱ्या** वि. घारोळ्या.
**घाल** स्त्री. १. (एखाद्यावर केलेला) हल्ला; चढाई; घाला; चाल. (क्रि. घालणे, पडणे.) २. (ल.) (आर्थिक) नाश; आघात; खराबी; नुकसानी. (क्रि. घालणे. पाडणे, पडणे) ३. (सामा.) (दैवाने, मनुष्याने, एखाद्यावर आणलेले) महासंकट; अनर्थ; आपत्ती. (क्रि. पडणे.)(वा.)**घाल घालणे** - चहाडी करणे : '(हा नागदेओ) सदाकदा गोसावीयांपुढां माझा घालु घाली।' - लीचउ १८९.
**घालकाढ** स्त्री. (काही जिन्नस, सामान इ. विशिष्ट ठिकाणी) पुन्हा पुन्हा घालण्याची काढण्याची क्रिया, व्यापार; उपासाउपस. उगीच हालवाहालव.
**घालकाढी** स्त्री. आवकजावक; दप्तरातील कागद बाहेर दिले असताना व ते परत आले असताना नोंदण्याची वही.
**घालकाढ्या** पु. घालमेल करणारा; उपद्व्यापी; खेकटी उत्पन्न करणारा.
**घालघसर** स्त्री. १. लांबणीवर टाकणे; टंगळमंगळ; दिरंगाई; ढिलाई; चालढकल. २. रपाटणे; खच्चून भरणे; कोंबणे; ठासणे; कोंदून भरणे. ३. अनास्था; आळसामुळे दुर्लक्ष; हेळसांड. पहा : **घालघुसड**
**घालघसऱ्या** वि. दिरंगाई, टंगळमंगळ, चालढकल करणारा.
**घालघुसड** स्त्री. १. (एखादे काम, धंदा इ.) स्वैरपणाने, मनसोक्तपणे, दपटणे; पुढे चालवणे, ढकलणे. २. दडपून, गडबडगुंडा करून एखादे काम करण्याची क्रिया. ३. (जमाखर्च इत्यादिकांत) निष्काळजीपणाने, लबाडीने बाबी, रकमा घुसडणे. ४. (मूळ ग्रंथात पदरचा भाग) लबाडीने दडपून देणे; घुसडणे. ५. गोंधळ, घोटाळा इत्यादींनी युक्त भाषण, व्यवहार; लबाडीचा व्यवहार : 'मी वचन मोडून कांहीं घालघुसड केली तर मग त्याला काय समजणार आहे - बाल २.१८८.
**घालघोल** पु. वाटाघाट; माथेफोड.
**घालटा** पु. डहळला. - (तंजा.)
**घालण** स्त्री. (अशिष्ट) १. संकट; आपत्ती (क्रि. घालणे) : 'बहू घालणीं घातलें पूर्वपापें।' - दावि १६५. २. मार्गातील अडण्याचे, अडकण्याचे, रुतण्याचे, फसण्याचे ठिकाण; रुतण; दलदल. ३. (ल.) अवघड, दुर्बोध कविता. ४. नुकसानीची बाब; बुडीचा धंदा; आतबट्ट्याचा व्यवहार. ५. चोर, दरोडेखोर, लुटारू इत्यादिकांचा उपद्रव असलेले मार्गावरील ठिकाण, जागा; चोरखिंड; घालणीचे रान : 'चोरें पाळतीलें घालण पाहोनी।' - रामदासी २.१३१. ६. (ल.) फशी, तोंडघशी पडण्याची अवस्था; तोहमत. (वा.) **घालणीस पडणे** - १. मोठ्या व दुःखकारक अशा असहिष्णुतेला, उतावळेपणाला बळी पडणे. २. उतावळेपणाने नको ते करणे.
**घालणी** स्त्री. घाला; छापा; हल्ला : 'मग अवचीती घालूं घालणी। इंद्रिएग्रामी।' - ऋ ५६.
**घालणे** न. हल्ला; घाला; छापा : 'अनुर्धा कारणें। पडलें अवचीतें घालणें।' - उषा ८९९.
**घालणे** सक्रि. १. ठेवणे; राखणे; स्थित करणे. २. सोडणे; टाकणे; फेकणे; : 'उडी घालितो संकटीं स्वामि तैसा।' - राम ३७. ३. उडी टाकणे : 'वणवा मियां आघवा। पांखेंचि पुसोनि घेयावा। पतंगु पां हांवा। घाली जेवीं॥' - ज्ञा १४.१९१. ४. जडविणे; लावणे; तल्लीन करणे : 'स्वरुपीं घातलें मना। यातनेसी केली यातना।' - दास ५.९.५४. ५. मारणे; फेकणे; प्रक्षेपणे : 'अभिमंत्रुनी पंनकासस्त्रें। बाणु घातला ईस्वरें।' - उषा १६९४. ६. ओतणे. ७. पसरणे; बाहेर मांडणे; रचणे; ठेवणे : 'आकाशीं घातीला मंडप।' - मसाप २.२६. ८. (आत) खुपसणे; भोसकणे. ९. (एखाद्या पदार्थात दुसरा पदार्थ) मिसळणे; प्रविष्ट करणे. १०. (एखाद्या कामाला मनुष्य, जनावर) लावणे; जुंपणे; नेमणे; योजणे. ११. (दुकान, शाळा, बाजार इ.) मांडणे; स्थापन करणे; सुरू करणे. १२. (अन्न खाद्यपदार्थ इ.) वाढणे. जसे :- मला भात घाल. १३. (अंगावर धारण करण्याच्या विवक्षित वस्तू) धारण करणे; परिधान करणे; चढवणे. (वा.) **घालून घेणे** - (हट्टाने, जोराने, वेगासरशी) स्वतःचे शरीर, अंगावरून खाली किंवा आत टाकणे, फेकणे; एकदम अंग टाकणे : 'नदी भरतां भरतां घालुनिया घेती।' - रामदास - रामदासी भा १५. पृ. २६४. **घालूनपाडून बोलणे** - वक्रोक्तीने उपरोधिक भाषेत निंदा करणे, दोष देणे; टोमणा मारणे; खोचून बोलणे : 'टोंचून, घालूनपाडून बोलण्याच्या कामात बायका पटाईत असतात.'- संगीत मेनका ११. **एखाद्यावर घालणे** - एखाद्याला दोष देणे, लावणे : 'कष्टी होऊनियां लेखीं। प्रारब्धावरी घालिती।'- दास १२.२.५. [सं. ग्रह्.]
**घालणे** सक्रि. एखाद्यावर अनिष्ट संकट आणणे; गोत्यात आणणे; (एखाद्याच्या) नुकसानीला कारण होणे; गंडा घालणे; (एखाद्याला) बुडवणे.
**घालणे** सक्रि. (मूल) प्रसवणे; (अंडी) टाकणे; गाळणे.
**घालणे** सक्रि. (प्रश्न, उदाहरण, कोडे इ.) सोडवायला देणे, सांगणे; हिशोब सांगणे.
**घालणे** सक्रि. एखाद्याला एखादी गोष्ट करायला अथवा न करायला शपथ इ. देणे; शपथ इत्यादिकांचा जोर; आग्रह करणे; शपथ घालणे.
**घालणे** सक्रि. १. (दरारा, धाक, भीती, भूल इ.) उत्पन्न करणे; उपस्थित करणे; उठवणे; उद्दीपित करणे. २. (वाद, गोंधळ इ.) करणे, माजविणे.
**घालणे** सक्रि. (भिंत, कूड इ.) बांधणे; उभारणे; रचणे.

**घालणे** सक्रि. (भोजन, समाराधना, ब्राह्मण, मित्र इत्यादिकांना) अर्पण करणे, देणे.

**घालणे** सक्रि. १. (एखादे काम) सुरू करणे, आरंभणे. २. (चाल, संप्रदाय) प्रचलित करणे, रूढ करणे.

**घालणे** सक्रि. (सणाच्या दिवशी पुरण इ. खाद्यपदार्थ) खायला, नैवेद्याला सिद्ध करणे; मंगलप्रसंगी ब्राह्मण जेवायला घालणे. घालणे हा धातू काही नामांना जोडूनही वापरतात. उदा. (गोष्ट) कानावर घालणे, (मुलाला) पायावर घालणे इ. या धातूचे अर्थ अनेक आहेत, पण त्या सर्वांचा भावार्थ ठेवणे, स्थापणे, मांडणे, लावणे असा आहे.

**घालन** पु. धोका; संकट.

**घालन घालणे** आरोप करणे; आळ घेणे.

**घालपांड्या** पु. १. बिनदिक्कत (दुसऱ्याचा) घात, नाश करणारा; कळलाव्या, आगलाव्या, घातकी मनुष्य. २. पहा : **घालवेडा**

**घालपिसा** पहा : **घालवेडा**

**घालपिसे** न. वेडाचे ढोंग; बाह्यात्कारी धारण केलेला बावळेपणा, खुळेपणा.

**घालफेड** स्त्री. घालमेल; तळमळ; काहिली; (ताप इत्यादींनी) जीव कासावीस होऊन शरीराची होणारी घालमेल : 'नवकिसलयतल्पीं तीजला नीजवीती। घडिघडि करिते हे भीमकी घालफेडी।' - सारुह ३.६५.

**घालफेल** स्त्री. (आजारी मनुष्याची होणारी) तळमळ; तगमग; कासाविसी; काहिली; तापाच्या काहिलीमुळे आजारी माणसाने इतस्ततः केलेले शरीराचे चलनवलन. (को.)

**घालमिल, घालमेल-ली** स्त्री. १. (ताप इत्यादिकांच्या योगाने होणारी जिवाची) तगमग, तळमळ, कासाविसी, काहिली : 'नारायण नांदे जयाचिये ठायीं। सहज तेथें नाहीं घालमेली।' - तुगा २९. पहा : **घालफेल**. २. तगमगीमुळे (आजारी माणसाने चालवलेली शरीराची) चळवळ, चुळबुळ : 'तिचा जीव घालमेल घालूं लागला.' - चंद्र १४०. ३. पोटातील क्षुब्धता, कालवाकालव. ४. (पित्तक्षोभामुळे उसासणे; उसासा येणे; (उकाड्यामुळे, उबाऱ्यामुळे शरीराचा होणारा) गदका; गदमदणे. पहा : **चबढब** [क. घालुमेलु]

**घालमेल-ली** स्त्री. १. (वस्तूंचा, कामांचा) घोटाळा, अस्ताव्यस्तपणा, अव्यवस्थितपणा, गोंधळ. २. धांदल; गडबड; गर्दी; धामधूम; धुमाळी. ३. सरमिसळ; सर्व एकांत एक मिसळणे; उलथापालथ. ४. (ल.) एकसारखी मसलत, हिकमत, युक्ती, बेत करणे; डावपेच खेळणे; साहसाच्या, धाडसाच्या कामात स्वतःला गुंतवणे; (उपजीविकेसाठी) अनेक उलाढाली करणे; मामलत इ. व्यवहारांची अदलाबदल, घटवटना. ५. (एखादे कार्य जुळवून, घडवून आणण्याची अनेक प्रकारची) खटपट, मसलत, गडबड, धांदल. ६. सुरळीतपणे चाललेल्या कामात, क्रमात झालेला अडथळा, भंग.

**घालमेल-ली** स्त्री. १. व्यवहारातील, हिशोबातील अफरातफर, डावपेच, घोटाळा, गोंधळ, छक्केपंजे, लपंडाव, लुच्चेगिरी. २. भानगड. (गो.)

**घालमेलणे** अक्रि. घालमेल, उलथापालथ, गोंधळ, घोटाळा करणे.

**घालमेली** स्त्री.अव. हेलपाटे; येरझारा. (गो.)

**घालमेल्या-ली** वि. १. घालमेल, चबढब, अव्यवस्था करण्याचा स्वभाव असणारा. २ चळवळ्या; खटपटी, नाना युक्त्या, हिकमती काढणारा, योजणारा; उलाढाली; कारस्थानी.

**घालव(वि)णे** उक्रि. १. विवक्षित स्थळी असलेला (पदार्थ, मनुष्य) दूर करणे; काढून टाकणे; हाकलणे; हाकून देणे : 'यांना एकदा येथून घालवून दिलें होते.' - विक्षिप्त २.४.३. २. धाडणे; पाठविणे; पिटाळणे; निरोप देणे. ३. (आळ, आरोप इत्यादिकांचे) निराकरण, निरसन, निरास करणे; काढून टाकणे; (प्रायश्चित्त इ. नी पाप इ.) क्षालन करणे; नाहीसें करणे; धुवून टाकणे. ४. (पैसा, संपत्ती इ.) उधळणे, उडवणे, बेफामपणे खर्च करणे. ५. (वेळ, आरोग्य, तारुण्य इ. ची) नासाडी करणे, आळसाने दवडणे, नष्ट करणे. ६. काढणे; कंठणे; अतिक्रांत करणे : 'घालवि दिवसा वनांतरी बसुनि।' - विवि ८-६-१२०. ७. (अन्न, पत, संधी, लाभ इ.) गमावणे. ८. (काम, धंदा इ. ची) नासाडी करणे; चुथडा करणे; विघात करणे; मातेरे करणे; धुळीस मिळवणे. ९. (ग.) (एका संख्येतून दुसरी संख्या) वजा, बाद करणे; वगळणे; काढून टाकणे; कमी करणे. १०. (एखाद्या मनुष्याला त्याला जायच्या ठिकाणापर्यंत किंवा मार्गाच्या काही अंतरापर्यंत) पोचविणे; सोबत करणे; निरोप देणे; बोळविणे : 'सासु पती कांता मूल येक करून। गृहासी नेऊन घालविली।' - रामदासी २.१३८. ११. (दिवा इ.) मालविणे; विझविणे : 'रदनिके, घालविलास दिवा ?' - मृ १३. १२. (एखाद्यावर) हल्ला करणे.

**घालवर** स्त्री. घार. (कर, कुण.)

**घालवेड** पहा : **घालपिसे**

**घालवेडा** वि. वेडाची बतावणी करणारा; बाहेरून वेड पांघरणारा परंतु आतून धूर्त, लुच्चा असलेला.

**घाला** पु. १. हल्ला; धाड; चाल; प्रहार; मारा; छापा. (क्रि. येणे, घालणे, पडणे.) : 'थांबोनि घाला घालता कामें।' - एकनाथ - नरनारायणाख्यान. २. (एखाद्यावरील) मोठे संकट; अरिष्ट; आपत्ती; घात. (क्रि. घालणे.): 'सर्वस्व नाश जेणें तो याहुनि कोण वद नवा घाला।' - मोभीष्म ७.३५.

**घाला** प्रमाद, चूक, दोष. - (तंजा.)

**घालाघाली** स्त्री. (कामांचा) गोंधळ, धुडगूस, घालमेल : 'घालाघाली घालिती नित्य सासा। टाकूं बाई नेदिती हा उसासा॥' - सारुह ७.१०६

**घालामेलचे** अक्रि. कासावीस होणे; तगमगणे; व्याकूळ होणे. (गो.)

**घाली फेडी** स्त्री. लावणे-पुसणे : 'घाली फेडी निडळ। कां करुं ए गा।' - ज्ञा १८.२२१.

**घालु-ल्या, घालपाडू** वि. १. लबाडीने, फसवेगिरीने व्यापार, व्यवहार करणारा. २. दुसऱ्याला गोत्यात, पेचात, संकटात आणण्याचा स्वभाव असलेला. ३. कर्ज इ. रूपाने दुसऱ्याचे द्रव्य घेऊन ते बुडविणारा.

**घालेडा** वि. वेडेपणाचे सोंग घेतलेला. - (तंजा.)

**घाव** पु. १. शस्त्र, हत्यार इ. कांनी केलेला प्रहार; वार; तडाखा; आघात : 'म्हणौनी नीसाना घावो दीधला।' - उषा ८१७. २. (शस्त्र, हत्यार इ. कांच्या प्रहाराने झालेली) जखम; व्रण; घाय; क्षत. ३. (ल.) (व्यापारात झालेले) नुकसान, तोटा, बूड; (धंद्यात बसलेला) धक्का; ठोकर. (क्रि. बसणे, लागणे, पडणे, भरणे.) [सं.घात] (वा.) ० **लावणे** -

(बायकी) (एखाद्या पदार्थाला, धान्याला) उखळीत घालून हळूहळू कांडणे. **निशाणी घाव घालणे** - १. युद्धारंभनिदर्शक दुंदुभी वाजवणे; शत्रूवर चढाई करून जाणे : 'घाव तेव्हां घातला निशाणीं। तेणें दुमदुमली अवनी।' - ह २२.२४. २. (कपडे धुताना) आपटणे, चोपणे, धुणे : 'पडदाणीचा घातला घाव।' - मसाप २.२२.

**घावघवित** पहा : **घवघवीत**

**घावट (ळ)णे** उक्रि. १. हळूहळू कांडणे; सडणे; कुटणे; हळूहळू घाव देणे; अर्धेमुर्धे मोडणे; चुरणे. (को.) २. लहानशी जखम करणे; घसटणे; खरचटणे; झाजरणे; ओरखडणे; हळूहळू प्रहार करणे.

**घावटा** पु. १. (शस्त्राने, हत्याराने झालेली) जखम; क्षत; व्रण. २. शस्त्राने झालेल्या जखमेची खूण; जखमेचा व्रण; चट्टा.

**घावटी** पहा : **घाव** १ : 'त्याने समोर उभ्या राहिलेल्या भाव्यावर कुऱ्हाडीची घावटी टाकली.' - हपा ३८.

**घावटॉ** पु. नुकसान; तोटा; बूड. (गो.)

**घावडाव** पु. १. एखादी गोष्ट करण्याला अनुकूल स्थिती, योग्य संधी, काल, प्रसंग : 'काळ घेउं नेदी वाव। आला तो राखें घावडाव।' - तुगा ३३८. २. कचाटी; पकड; तावड; पेच; आवाका; डावपेच; कबजा; अधिकार : 'हातां आला घावडाव। आमुचा मायबाप देव।' - तुगा ६४४. ३. युक्त्या; कपटाच्या शक्कली; लुच्चेगिरीचे उपाय; छक्केपंजे; कावा; डाव. ४. प्रयत्न; खटपटी; बेत; हिकमती. ५. घाव; प्रहार; वार : 'निवडे घावडाव। व्हावा अंगीं।' - तुगा २३०६ (वा.) **घावाडावात सापडणे** - तावडीत येणे.

**घावणी** पहा : **घावन** : 'ह्या पुऱ्या पोळ्या घावण्या तेथें काय उणें।' - अफला ५७.

**घावणे** उक्रि. (विप्र.) गावणे; सापडणे : 'गुरू उदार माऊली प्रशांतिसौख्यसाउली। जया नरासि फावली तयांसि सिद्धि घावली।' - निमा १.३३.

**घावदाव** पहा : **घावडाव** : 'आपल्याकडीलहि घावादावाची लढाई नादरशाहाच्या तुल्या मानतात.' - पेद २.४.

**घावन** न. दगडाची उखळी; उखळ; घाटवाईन. [सं. ग्रावन्]

**घावन-ना** पु. तांदळाच्या पिठाचे केलेले पोळीसारखे एक सच्छिद्र खाद्य; धिरडे; दोसा : 'घावन पातोळ्यांच्या ओळी।' - मसाप २.१.२१. (को. राजा. हेट.)

**घावमारी** स्त्री. घायपात.

**घावरे** न. खोकडाचे, सशाचे बीळ.

**घाशि(शी)रामी** स्त्री. १. (घाशीराम नावाचा पुण्यातील एक जुलमी कोतवाल सवाई माधवरावांच्या कारकीर्दीत होऊन गेला; तो तेलंगी ब्राह्मणांना लहान लहान कोठड्यात अन्नपाण्यावाचून कोंडून ठेवीत असे. त्यावरून) श्वासावरोध होण्याइतकी माणसांची गर्दी; दाटी; कोंडमार. २. घाशिराम कोतवाल याच्या कारकीर्दीसारखा जुलमी अंमल, कारकीर्द; झोटिंगपाच्छाई; करडा अंमल : 'चार दिवस घाशीरामी चालवून घेतलेल्या अर्वाच्य पंडित मंडळीची...' - नि (घाशिराम).

**घाश्या** (माण.) पहा : **गाशा**

**घाष्टी** स्त्री. (अन्नाचा) घास : 'अन्नाचीसुद्धा घाष्टी रांडेच्याक जड झाली.' - तोरण १९.

**घाष्टी** स्त्री. घसा; नरडे : 'आणि कातड्यांचा व्याप करून पैसा मिळवायचा तो कोणाच्या घाष्टीत घालायचा?' - जुम्मन ४.

**घास** पु. १. तोंडात घालून चर्वण करता येईल इतका खाद्य पदार्थाचा अंश, परिमाण; तोंडात मावेल इतका अन्नाचा गोळा; कवळ. २. घाण्यात, जात्यात घालायचा वैरणीचा हप्ता, परिमाण. ३. जात्याच्या भोकात, खळगीत घिरटीपाशी दळले न जाता शिल्लक राहणाऱ्या दाण्यांचा समुदाय. (क्रि. धरणे.) [सं. ग्रास] (वा.) **० उतरणे, काढणे, चिरणे, मोडणे** - शिजवलेल्या अन्नाचा, भाताचा घासाएवढा गोळा घेऊन त्यावर तेल वगैरे घालून व रेघोट्या काढून अन्नाचा वीट आलेल्या माणसावरून उतरून - ओवाळून तो घास अग्नीत किंवा घराच्या बाहेर टाकतात तो प्रकार. परक्या माणसाची दृष्ट अन्नाला लागून खाणारास अन्नाची किळस, वीट येतो तेव्हा हा प्रकार करतात. **० करणे, भरणे** - (एखाद्याला) अतिशय छळणे, सळो का पळो करून सोडणे. **० काढणे** - जात्यात दळले न जाता राहणारे दाणे काढून टाकून जाते साफ करणे. **० देणे** - १. विवाहसमारंभात जेवणाच्या वेळी नवपरिणीत वधूवरांनी उखाणे घेऊन एकमेकांच्या तोंडात घास घालणे. २. भरविणे; जेऊ घालणे : 'घासभर देणे आणि कोसभर नेणें ही अवस्था या लोकांना नकोशी झाली आहे' - खेया. **० होणे** - अपयशी होणे. **घासी गू खाणे** - (अक्षरशः) (अन्न खात असताना त्याबरोबर विष्ठा भक्षण करणे. उदा. एखादी आई जेवीत असताना तिचे मूल तिच्या मांडीवर हगते. न कळत, त्या विष्ठेचा अंश अन्नाबरोबर आईच्या पोटात जातो यावरून) एखाद्यासाठी अतिशय कष्ट करणे, सोसणे; हरप्रयत्न करणे; खस्ता खाणे.

**घास** पु. गवत; वाळलेले गवत; तृण : 'अरिवरि शर जेंवि अग्नयुपरि घास।' - मोकर्ण १४.६१. [सं.घास, हिं]

**घास** स्त्री. मोत्याला छेद पाडण्याने वजनात होणारी घट, घस. [सं.]

**घासकट** न. (लोहार) एखादी वस्तू घट्ट धरण्याचे गावीसारखे एक हत्यार; पकड. (को.)

**घासकटाउ, घासकाटू** वि. (गवत कापण्याचे काम करण्याला लायक) १. अडाणी धटिंगण; धसमुसळ्या. २. (उप.) बिनधारेची, बोथट तरवार, शस्त्र. ३. (उप.) शिपाई; तरवारीने लढणारा.

**घासकाटणी** स्त्री. १. गवताची कापणी. १. सरकारी जमिनीवरील गवत कापण्याबद्दलचा कर. [फा.]

**घासकाडी** स्त्री. गवत, कडबा, वैरण इ.

**घासकाम** न. (सोनारी) दागिने घासून त्यांना झिलई देण्याचे काम.

**घासकुटका** पु. निर्वाहाचे साधन : 'सबंध रोटी एकाला गेली खरी पण इतरांना घासकुटका काहीतरी पाहिजे.' - गांगा २८.

**घासखाऊ** वि. (उप.) आयते खाण्याशिवाय दुसऱ्या कशाकडेही लक्ष न देणारा (कुटुंबातील ऐदी, निरुद्योगी मनुष्य).

**घासगहाण** न. गहाणाचा एक प्रकार. यात व्याजाऐवजी गहाण टाकलेल्या जमिनीचे उत्पन्न धनकोने घ्यायचे असते.

**घासगीस** स्त्री. कटकट : 'कामाचीबी लई घासगीस.' - दुर्गा ३६.

**घासघाई** स्त्री. गडबड; धांदल : 'केतकरांची जेवायची घासघाई सुरु झाली की...' - मीचहे - ५६.

**घासघीस** पहा : **घासाघीस**

**घासटणे** उक्रि. १ घासणे; खरचटणे; खरवडणे; घसटणे. २. (ल.) बुचाडणे; लुबाडणे; बुडवणे; नागवणे.

अक्रि. (घासले जाणे, घसवटणे यावरून) (एखाद्यास व्यापारधंद्यात) बूड येणे; ठोकर बसणे; तोटा होणे. [सं. घृष्]

**घासण** स्त्री. (व्यापारात आलेली) घस; बूड; नुकसानी; तोटा. (क्रि. बसणे, लागणे, येणे.) (को.)

**घासणी** स्त्री. १. घासण्याची, जोराने पुसण्याची, घासटण्याची, उटण्याची, उजाळा देण्याची क्रिया; घासण्याची क्रिया. २. ज्याने घासायचे, उजाळा द्यायचा तो पदार्थ; घासण्याचा पदार्थ. उदा. अंगघासणी; दातघासणी. ३. (भांडी इ. घासण्यास केलेला) गवत, पाने, काथ्या इत्यादिकांचा चोथा. ४. (ल.) कचाकची; घासाघास; जिगजिग; कटकट; भांडाभांडी; चकमक. ५. गांजणूक; जाच; छळ.

**घासणे** उक्रि. १. घर्षण करणे; चोळणे; जोराने पुसणे, साफ करणे; घासटणे. २. खरडणे; चिरडणे; ओरबडणे. ३. रागे भरणे; कानउघाडणी करणे; खरडपट्टी काढणे; खडसणे. ४. वादविवाद, चर्चा, भवति न भवति, काथ्याकूट करणे. ५. (एखाद्याला व्यवहारात) फसविणे; बुडविणे; बुचाडणे. ६. (ल.) पुनःपुन्हा (एखाद्या अभ्यासाची) आवृत्ती करणे; घोकणे; पाठ करणे. ७. पढवून तयार करणे; पढविणे; मेहनतीने अभ्यास करणे, करविणे. ८. उजाळा देणे; गंज घालविणे; आवृत्ती करून (ज्ञान इ.) तयार करणे, ताजे ठेवणे.

उक्रि. १. घासले जाणे. २. (ल.) (एखाद्याशी) भांडणे; झगडणे; चकमक होणे; खेटणे; स्पर्धा करणे. ३. घासाघीस करणे; आग्रह, अट, हट्ट धरणे; ओढून धरणे. [सं. घर्षण] (वा.) **घासून घेणे** - १. (निराशेने, संतापाने, निष्फळ झालेल्या मत्सराने) हात चोळणे, चुरमुळणे; चडफडणे. २. सोसणे; सहन करणे (नुकसान, दुःख). **घासत बसणे** - परत परत तोच मुद्दा सांगणे; उगाळत बसणे.

**घासदाणा** पु. १. सैन्याला गवत व वैरण पुरवण्याच्या खर्चासाठी बसवलेला कर, खंडणी. हा कर मराठे मुलुखगिरीच्या काळात स्वतःच्या लष्करासाठी शत्रूंच्या गावांतून वसूल करीत. हा पैसा, धान्यरूपाने वसूल केला जात असे. याला मेजवानी असेही म्हणत : 'जमीनीच्या उत्पन्नाप्रमाणें दोनपंचमांश हिस्सा घासदाण्याच्या रुपानें वसूल घेण्याचा खुद्द गांवाशीं ठराव केला.' - गांगा ८. २. (सामा.) सरबराई; दाणावैरण; पाहुण्याची बडदास्त.

**घासदाणा** पु. जनावरांना द्यायचे गवत, दाणे इ.

**घासपार्टी** स्त्री. आर्यसमाजातील शाकाहारी पक्ष. : 'लाला मुनशीराम हे घासपार्टीचे' - गुजगो ३१२.

**घासपूस** स्त्री. साफसफाई; संस्कार : 'पराकोटीची अश्रद्धा पेलणे मला शक्य व्हावे अशी माझी घासपूस श्री. कुलकर्णी यांच्या सहवासात झाली.' - माचू २५१.

**घासफळ** न. (वन.) फळांचा एक प्रकार. गवताच्या फळांचा प्रकार.

**घासमुटका** पु. पिशाच्चांचा उपद्रव टाळण्यासाठी, त्यांना संतुष्ट करण्यासाठी बाहेर टाकायचा अन्नाचा गोळा. (क्रि. देणे, टाकणे, उतरणे.)

**घासलकडी** स्त्री. चारा, धान्य व सरपण. अशी घासलकडी मुलखातून सक्तीने गोळा करण्याचा सैन्याचा जुना रिवाज असे : '... लोक येथून बिदा करावें कां की हा प्रांत सरकारचा घासलकडी खाले लोटला जाईल.' - पेद २०.५४.

**घासलेट, घास्टेल, घासतेल** न. केरोसीन तेल; रॉकेल: 'घास्टेल पायजे बाटली भरून.' - मिरास ११८.

**घासाघास** स्त्री. १. पुनःपुन्हा घासणे. २. (ल.) नेहमी खडसावणे; खरडपट्टी काढणे; कानउघाडणी करणे. ३. बाचाबाच; कलागत; कटकट. [घासणेचे द्वि.]

**घासाघीस** स्त्री. १. बोलाचालीत ओढून धरणे; ताणून धरणे; खल; हुज्जत; जिकीर; घिसघीस करणे. २. वादविवाद; चर्चा; काथ्याकूट. ३. (स्पर्धा, मत्सर इत्यादिकांनी होणारी) कचाकची; चकमक; भांडाभांडी. (क्रि. करणे, मांडणे, लावणे.) ४. सैन्याचे किरकोळ हल्ले. [घासणेचे द्वि.]

**घासापुसचे** अक्रि. १. चौकशी करणे. २. घासाघीस करणे. (गो.)

**घासापूस** स्त्री. चौकशी. (गो.)

**घासारी** पु. (सोनारी) घासणारा; मोती वगैरेवरील खरड घासून त्याला आकार व तजेला देणारा.

**घासावणे** अक्रि. (आजाराने अंथरुणावर) खितपत पडणे, अशक्त होत जाणे. (गो.)

**घासी** स्त्री. कष्ट; त्रास; दुःख : 'पापियांची घासी कां लावावी। तो पापाविना असतां।' - क्रिपु २.९.२२. [क.]

**घासी** न. 'रंगविल्या कोरे रेसिमाचे कापड' - (तंजा).

**घासीव** वि. घासलेला; खरडलेला; घासटलेला.

**घाळ** स्त्री. (पाण्याच्या प्रवाहाने, जोराने पडलेला) ओहळ; घळ; चर; खाच. (को.)

**घाळ** वि. १. गहाळ; गाहाळ; अव्यवस्थित; घोटाळ्या; गोंधळ्या; विसराळू (मनुष्य); अस्ताव्यस्त; विस्कळीत; गोंधळयुक्त (काम, धंदा, कागदपत्र इ.). २. गाफील; बेशुद्ध; असंबद्ध. (गो.)

**घाळघोळ** पु. १. (बेत, मसलत, वस्तू, काम इ.चा) गोंधळ; घोटाळा; खिचडी; अव्यवस्था; गोलंकार. २. धांदल; गडबड; हैराणगत.

**घाळण** स्त्री. घळण; (भिंत, बांध, धरण यांतील) भेग; भगदाड; खिंड; खिंडार. (क्रि. पडणे, होणे.) (को.)

**घाळणे** अक्रि. (मोत्याचे वेजे, कानाचे छिद्र) मोठे, सैल होणे; घळणे. [सं. गव्हर]

**घाळणे** सक्रि. गमावणे; हरवणे; भलत्या जागी ठेवणे; गहाळणे.

अक्रि. १. विसरून घोडचूक करणे; गोंधळल्यामुळे चुकणे, घसरणे; बेसावधपणे फसणे. २. आडमार्गाने जाणे; भटकणे; भलतीकडे जाणे.

**घाळाजणे** अक्रि. चुकणे; सांडणे. (गो.)

**घाळापडणे** अक्रि. १. सांडणे; गहाळ होणे. २. ढिले पडणे. (गो.)

**घांग** स्त्री. १. दखलगिरी; सावधानता; जाणीव. (क्रि. ठेवणे, राखणे, धरणे, असणे, राहणे.) : 'त्याला मेजवानीची घांगही नव्हती.' - अस्तंभा १३५. २. आठवण; सई; स्मरण; याद (क्रि. येणे, आठवणे)

दोन्ही अर्थी सामान्यतः अकरणरूपी प्रयोग करतात. (तंजा.)

**घांग** वि. १. काही एका गोष्टीविषयी अंगी सामर्थ्य असून रडण्याचा स्वभाव असलेला (मनुष्य); रड्या; कोणी पैसा मागितला असताना, काम करायला सांगितले असताना नाकारणारा; माघार घेणारा; रडगाणे गाणारा. २. रडवा; थोड्याशा इजेने मोठी आरडाओरड करणारा. (को.)

**घांगचाळे** पु. अव. १. (पैसा देण्याविषयी, काम करण्याविषयी अक्षमतेबद्दल) कुरकुर; पिरपिर; रडगाणे. २. (थोडासा धक्का लागल्याने दुबळ्या, अशक्त प्राण्याचे) केविलवाणे व मोठ्याने आक्रोश करणे; किंकाळी.

**घांगरणे** अक्रि. घाबरून, गांगरून जाणे; भयभीत होणे; घोटाळणे; भांबावणे. [सं. गर्ह > गागर्ह = गांगरणे]

**घांगशा** पु. गोंधळ; कटकट; वाद; घोळ; तंटा; बखेडा : 'घांगशा घालीत आहों. निर्गम आज्ञेप्रमाणे होईल.'-पेद ३३.३७४. [ध्व.]

**घांगा** क्रिवि. धो धो पाण्याने भरून : 'पाणी वरून पडतें जमिनी गेल्या घांगा।' - वलो २१.

**घांगावणे, घागाइणे** अक्रि. भीतीने गांगरून, गोंधळून जाणे; सुचेनासे होणे; भांबावणे; गांगरणे : 'तैशीच घागाइली तियें एकें वेळें।' - भाए ३२२. (व.)

**घांगुसणे** अक्रि. चाचपडणे : 'दृष्टी जाऊनि नि:शेख। अंध जाला घांगुसे।' - मआदि २.४२. [सं. घृष्]

**घांगूड** पु. फुलातील गड्डा, कंद (ज्याला पाकळ्या फुटलेल्या असतात तो); (कमळाच्या) पाकळ्या गळाल्यानंतर राहिलेला गड्डा, दांडा. (को.)

**घांघरणे** पहा : **घांगरणे**

**घांघवसणे** सक्रि. शोध करणे : 'जें मना कलितां कुवाडें। घांघवसिता बुद्धी नातुडे।' - राजा ५.६७.

**घांघु(घो)(गो)सणे** उक्रि. १. घासाघीस करणे. २. बारकाईने शोधणे; चिकित्सापूर्वक छाननी करणे : 'जे मना आकळितां कुवाडें। घांघुसितां बुद्धी नातुडे।' - ज्ञा ५.६७.

**घांची** पु. तेली.

**घांट** स्त्री. घंटा : 'ऐसीया महात्मेयांचां कपाळी घाली घाट.'-लीचउ ५१.

**घांटॉ** पु. पाच हात लांबीचे एक जुने माप. (गो.)

**घांड्डॉ** पु. खाडीचे खारे पाणी शेतात शिरण्यासाठी ठेवलेले दार. (गो.)

**घांश्याल** न. घासलेट; रॉकेल; केरोसीन. (कु.) [इं. गॅस + ऑईल]

**घांसावचे** अक्रि. घास मारणे. (गो.)

**घिउंदे** न. दुधापासून केले जाणारे एक पेय : 'ते आदि कुमारी विनोदें। महाकवी नवरसांचे घिउंदे। पेहे देउनि परियेदे। अनुहति शब्दीं।' - नरुस्व ९.

**घिगावणे** अक्रि. घाबरणे : '... दोगे खालीं मोर्चास ठेविले होते तेच धास्तीने घिगाऊन संभाजी राजे यांचें निशाण घेतलें.' - पेद १०.५०.

**घिगी** स्त्री. तुळया, ओंडके, बडाले इ. उंच चढवण्यासाठी केलेली दोन लाकडांची कैची; वाकलेल्या, कललेल्या झाडाला धीर, आधार देण्याकरिता लावलेली कैची. (राजा.) (वा.) **घिग्या लावणे** - (असमर्थ, नाखूष मनुष्यास एखादे काम करण्याची) उठावणी देणे; चेतविणे; रडतराऊत घोड्यावर बसविणे.

**घिघावणे** अक्रि. दुरवस्था होणे; दुर्दशा होणे; वैतागणे; विपन्न होणे : 'पठाण रोहिल्यात कांहीं अवस्था राहिली नाही. बहूत घिघावले आहेत व अजीजी करून पायां पडतात.' - हिंदखं १.५५.

**घिटकना** क्रि. १. गिळणे. २. खाणे. (झाडी)

**घिट्टी** स्त्री. घिरटी; वेढा; फेरा. (गो.)

**घिणघिण** स्त्री. कटकट; चिरचिर : 'अस्तुरिकां पुरुषाची। रोज घरीं घिणघिण। कोण्या ब्राह्मणानं वेड्या। असं लावलं लगीन।' - वलो ४४. (व.)

**घिनघिन्या** वि. कुरबूर करणारा. (झाडी)

**घिरगीस-सा** पु. कीड लागलेल्या लाकडाचे पीठ. पहा: **किरकिसा**

**घिरघिर** स्त्री. काळजी : 'टिळकांनाही घराची घिरघिर वाटत होतीच.' - स्मृचि ३०.

**घिरघिरचे** अक्रि. १. घेरी येणे, २. फिरत राहणे; गरगर फिरणे. (गो.)

**घिरघिराट** पु. (जाते इ.चा) घरघराट; घर्घर् आवाज. [ध्व. घिरचे द्वि.]

**घिरघिरे** न. लहान मुलांचे खेळणे; भिरभिरे, गिरगिरे. [ध्व.]

**घिरट** न. रडाटगाडगे.

**घिरट** पु. १. भात भरडण्याचे जाते; मोठे जाते. (राजा. कु. गो.) पहा : **घरट**. २. वेढा; फेरा; घेर; गराडा; घिरटी : 'तेथें अलिकुलांचा घिरट।' - कथा १.१.१४. [सं. घरट्ट]

**घिरट-टी** स्त्री. (जातीतील) घरागणिक एकेक माणसाला दिलेले जेवण; मेजवानी. (कर.)

**घिरटणे** सक्रि. घरटात (घिरटात), जात्यात धान्य इ. घालून भरडणे. (राजा.)

**घिरटणे** अक्रि. फिरणे; घुमणे : 'याचाच विचार त्याच्या डोक्यात घिरटत होता.' - वानगी २७.

**घिरटी** स्त्री. १. जाते; घरटी. २. वर्तुळाकार फिरणे; फेरी; गिरकी; गिरकांडा; भ्रमण (क्रि. घालणे.) : 'नाना अवतारांच्या घिरटी। स्वये घेत परमात्मा।' - ह १८.१७२. ३. वळसा; फेरा. (क्रि. घालणे.) ४. हेलपाटा; येरझार; फेरी; (निष्फळ झालेली) खेप. ५. गस्त; (पोलिसाचा) फिरता पहारा. ६. लपत छपत, चोरून, लपून गिरकी घेणे; गिरकी घेत टेहळणे. पहा : **घरटी** [सं. घरट्ट]

**घिरत** न. तूप : 'आत शोभती घिरताची वाटी...'-जसा ६१३.[सं. घृत]

**घिष्टपिष्ट** स्त्री. घासाघीस : 'अशी दोनचार दिवस घिष्टपिष्ट जाली.' - मइसा.

**घिसघिशा** वि. घिसघिस, घासाघीस करण्याचा स्वभाव असलेला.

**घिसघिस, घिसघीस** पहा : **घासाघीस**

**घिसण** न. घासणे; घर्षण; घासणी : 'अग्नी सकळां ठाई आहे। कठीण घिसणीं प्रगट होये।' - दास १६.५.२०.

**घिसणी** स्त्री. १. घासणे : 'वायोचि कठिण घिसणी। तेथे निर्माण झाला वन्ही।' - दास १२.१.२. २. घासाघीस.

**घिसणे** सक्रि. (अशिष्ट) घासणे. [सं. घृष्]

**घिसा, घिसली घिसाडी** पु. लोहारकाम करणारी एक भटकी जात; यह या जातीचा मनुष्य : 'घिसा चतुरु अपार्डेसीं।' - ग्रंथराज २.६०.

**घिसाडकाम** न. घिसाड्याचे काम : 'तांबटकाम अगर घिसाडकाम करून पोट भरणारे निष्पाप ते जोडपे!' - पापू ३८.

**घिसाडघाई** स्त्री. फाजील गडबड; उतावळेपणाची कृती.

**घिसाडा** वि. कठोर; राकट : 'त्याचा घिसाडा झालेला चेहरा .... पाहून लोक पांगले' - पुत्र ११५.

**घिस्सा** पु. (कुस्ती) कुस्तीतील एक डाव. यात आपल्या एका हाताने जोडीदाराच्या बरगडीवरून हात घालून आपल्या जोडीदाराच्या मांडीजवळ लांग धरायची नंतर आपल्या दुसऱ्या हाताने जोडीदाराच्या आपल्या जवळ असलेल्या हाताचे कोपर धरून त्याला ओढून चीत करायचे. या डावाला घिस्सा म्हणतात. याचे घिस्सा चतुरशिंगी, नालमोज्याचा इ. अनेक प्रकार आहेत. [सं. हिंस्]

**घिस्सा** पु. ठोसा : 'त्यानं किशाच्या नाकावर घिस्सा मारला.'- पधों ४४.

**घिस्सी** स्त्री. एका बाजूने फरकटत जाण्यासाठी (गाडीच्या) आखाला चाकाऐवजी बांधलेले तिरपे लाकूड. (व.)

**घी** न. तूप. [हिं.] [सं. घृत]

**घीव** पु. खरेदी करणारा.

**घीवकेणी** पु. तूप विकणारा : 'खोत कुणबी दाणे दाणी। घीव केणी।' - दावि ७०.

**घी(घे)वर** पु. फेसलेल्या रव्याचे तळून, पाकवून केलेले पुरीसारखे पकान्न. [सं. घृतवर]

**घीस** स्त्री. घट; झीज : 'शरीरें घीस साहाणें। दुर्जनासीं मिळोन जाणें। निंदकास उपकार करणें। हा सत्त्वगुण॥' - दास २.७.६९.

**घुई** स्त्री. १. अळवाचा कांदा; अळकुडी. (ना.) २. कोय; अठोळी, बाठी. (ना. व.)

**घुई** स्त्री. रातकिडा. (व.) [ध्व.]

**घुक्क** वि. काळाकुट्ट; घोर; निबिड; घनदाट. (ना.)

**घुगघुगी** स्त्री. गळ्याची घाटी, कंठमणी याच्या खालचा खोलवट भाग.

**घुगरा** पु. (नाविक) चार मोठे जाडे दोर घेऊन त्यांचा एक मोठा नाडा (गलबताच्या उपयोगाचा) करण्याची क्रिया. यासाठी एक लाकडी चौकटीचे यंत्र असते. (राजा.)

**घु (घुं) गरावणे** अक्रि. १. (प्रां.) चिडून, संतापून (एखाद्याच्या) वसकन् अंगावर येणे; (एखाद्यावर) तुटून पडणे. २. धुडकावणे.

**घुगरी** स्त्री. १. न भरडता, सालीसकट भिजवून शिजवलेले (विशेषत: द्विदल धान्य; शिजवलेले हरभरे, कडधान्य; हरभऱ्याची उसळ. २. चणे, तूर, वाटाणे इ. ची उसळ. (व.) ३. धान्याची, पिकाची मळणी झाल्यानंतर कमाविसदार, पाटील, सरकार यांना शेतकरी हक्कादाखल देत असत तो वाटा : 'यावरी पाटील कुलकर्णी याची। काय रीत परभारा नेमणुकीची। घुगरी किंवा बलुत्याची। ते लावणीवर कोणे विधी॥' - पैगाषेंदु ४. (ल.) लभ्यांश; फायदा; स्वार्थ साधेल अशी परिस्थिती : 'जिकडे घुगऱ्या तिकडे उदय.'- जोफु १४२. [क. गुग्गरी] (वा.)**घुगऱ्यांचा न्याय** - घुगऱ्या हातात घेऊन बोलणे; दिव्य करण्याचा एक प्रकार : 'घुगऱ्यांचा न्याय एकीकडे ठेवून आधीं देशपांडे व कुलकर्णी यांचा व खंडेराव याचा न्याय घ्यावा.' - पेम ४८३. **० पाखडणे** - मुलाला देवी येऊन बऱ्या झाल्यावर देवीच्या देवळात करायचा विधी. (वा.) **एखाद्याच्या सटीच्या घुगऱ्या खाणे, खाल्लेल्या असणे** - एखाद्यापेक्षा ज्ञानाने व अनुभवाने अधिक चतुर व प्रौढ असणे; वयाने मोठा असणे. (सटीच्या दिवशी मूल जन्मल्याच्या सहाव्या दिवशी - सटी देवीची पूजा करून तिला घुगऱ्यांचा नैवेद्य दाखवितात, आप्तेष्टांनाही घुगऱ्या वाटतात, त्यावरून) एखाद्याच्या सटीच्या, बारश्याच्या घुगऱ्या खाल्लेला मनुष्य त्या (दुसऱ्या) मनुष्यापेक्षा अनुभवाने, वयाने, ज्ञानाने पुष्कळच अधिक असणार. त्याला लहान माणसाने शिकवू नये.

**घुगरू** पु. मोगऱ्याची एक जात.

**घुगरू** पु. घुंगट; घोंगता.

**घुगा** पु. पूर्णपणे उमललेली कळी; फूल.

**घुगा** पु. छपरावर घातलेल्या भातेणाच्या जुन्या पेंढ्या; घरावरील तृणाची कुजकी पेंढी, गुंडी. (को.)

**घुगी** स्त्री. पाऊस इत्यादिकांपासून संरक्षणार्थ डोक्यावर घालायची बुर्णुसाची, सखलादीची घोंगी, खोळ; बुर्णुसाचे शिरस्त्राण; बनातीची कुंची. [फा.कूकी]

**घुगी** स्त्री. वाऱ्याचा झपाटा; वाऱ्याची वावटळ; भोवरी. (को.)

**घुगी** स्त्री. किंकाळी; कर्कश आरोळी; किंचाळी. (को.)[सं.घु = ओरडणे]

**घुगी, घुगूम** स्त्री. घुबड. (गो.) [सं. घूक]

**घुग्गू** पु. राग; घुस्सा. (व.)

**घुघरी** पहा : **घुगरी**

**घुघु(गु)बाळ** न. अजाणते मूल, लेकरू; कुकूबाळ; लहान मूल.

**घुघू** स्त्री. घुबड, पारवा, होला इत्यादिकांचा आवाज; घूत्कार. [ध्व.]

**घुघू-गू** वि. लहान; चिमुकले; छबकडे; कुकुले (मूल अथवा पोरकटपणा अंगी असलेला मोठा मुलगा किंवा मुलगी).

**घुघू** वि. खुजा; दुबळा (मनुष्य).

**घुट** पु. बहुमताने केलेला ठराव. (गो.)

**घुटकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. १. घुटक्यासरशी; गट्कन; पाणी इ. गिळण्याच्या आवाजाप्रमाणे (क्रि. पिणे). २. एकदम; खुटकन. (क्रि. जाणे.) [ध्व.]

**घुटका** पु. गुटका; पाणी, इ. पातळ पदार्थाचा घोट; आवंढा; चूळ. (क्रि. घेणे.) पहा: **गुटका** [सं. घुट्]

**घुटका** पु. एखादे काम करताना अवयवविशेषाला अलौकिक शक्ती येण्याकरिता योगी, बैरागी लोक तोंडात धरण्याकरिता जी गोळी देतात ती; गुटका; गुटिका; गुटी; ताईत; गुंडी. पहा : **गुटका** : 'काहींना काही प्रयत्न व्हावा। पूर्वज स्नेहस्थु जटिळ बोलावा। घुटका बनवावा की चुटका।' - दावि २६०. [सं. गुटिका]

**घुटघुट-टा** क्रिवि. घटाघट; घटघटा. पहा : **घटघट** [ध्व. घुट्चे द्वि.]

**घुटणे; घुटकणे** अक्रि. सहन करणे; गिळणे : 'नाना नि बयानं माझ्या घुटिलं माझ्यासाठी।' - तीसा २९९; 'चार महिने घेतले घुटकून।' - एहोरा वासुदेव २८.

**घुटना** न. (कुस्ती) कुस्तीतील एक डाव. आपले दोन्ही हात जोडीदाराच्या आपल्या बाजूच्या बगलेतून घालून बाहेरील हात दंड धरून ओढायचा व आपल्या पायाची नळी त्याच्या मानेवर ठेवायची आणि त्याचा धरलेला दंड ओढून व मानेवर पाय देऊन त्याला चीत करायचा. [हिं.]

**घुटम(मु)ळणे** अक्रि. १. रेंगाळणे; अडखळणे; मागे-पुढे करणे. २. गुटमळणे; गुरमळणे. ३. अंतकाळची घरघर लागली असताना प्राण न जाता घोटाळत राहणे; जीव अडकणे. [सं. घुट् + म्लै]

**घुटराण** वि. अतिशय घाणेरडा (वास); दुर्गंधयुक्त. (ना.)

**घुटवळणे** अक्रि. १. अंतकाळच्या वेदनांनी युक्त होणे; आचके देणे; तडफडणे; प्राण जाण्याची पाळी येणे. २. प्राण कंठाशी येणे. ३. (एखाद्या मनुष्याच्या, पदार्थाच्या उत्कंठेमुळे) घाबरे होणे; घायकुतावणे.

**घुटा** पु. गुठा; एक प्रकारचे औत. (बे) पहा: **गुठा, गुठे**

**घुटी** स्त्री. १. गुटी; जायफळ इ. औषधे उगाळून त्यात दूध घालून तान्ह्या मुलाला पाजायचे मिश्रण: 'नाहीं दिधली घुटी स्वहस्तें।' - देकृष्णजन्म (पद) ५३. २. योगी, बैरागी देतात ती अजब शक्तिदायक गुटिका; सिद्धीने मंतरलेली गोळी. पहा: **गुटका, घुटका, गुंटिका** [सं. गुटी = गोळी](वा.) ० **देणे** - भारणे; भोंदणे; भुलवणे; भुरळ घालणे; मोहनी घालणे. ० **बसणे** - (गुटिकेचा) परिणाम होणे; अंमल दिसू लागणे, लागू पडणे.

**घुटी** स्त्री. १. लहान आंबा. २. एक झाड. (झाडी) [सं. गुटी]

**घुटी** स्त्री. उसाचे पेरे, कांडे.

**घुटी** स्त्री. मादक पदार्थ, पेय; मद्य; दारू; नशा; कैफ : 'याच सुमारास खंडेरावांचे घुटी घेणे वाढत चालले...'- देवी श्री अहिल्याबाई ५४.

**घुटू** न. सशाचे पिलू. (माण.)

**घुटूघुटू** क्रिवि. घटाघट.

**घुटे** न. उडदाच्या डाळीचे हिरवी मिरची ठेचून व कोथिंबीर घालून केलेले पातळ कालवण.

**घुट्ट** न. प्राणोत्क्रमण होताना कंठातून निघणारा आवाज. क्रिवि. घुटकन; घुटदिशी. [ध्व.]

**घुट्टा** पु. मुठीत दांडू धरून दांडूच्या करंगळीकडील बाजूला पुढे आणून दांडूवर चिन्नी (विटी) ठेवायची व ती दोनदा उडवून त्याच बाजूने पुन्हा चिन्नी मारायची. याला घुट्टा म्हणतात. (कर.)

**घुट्टा** वि. ठेंगणा; ठेंगू; बुट्टा; गिड्डा. (व.)

**घुड** पु. घुमट. (गो.)

**घुड** न. (कोंबड्या इत्यादींचे) खुराडे : 'घुडात कोंबड्याने आरवायला सुरवात केली.' - तोरण १३७.

**घुडगे** न. घुबड. (राजा.)

**घुडणे** अक्रि. मरणप्राय इजा होणे. [सं. गुड्]

**घुडणे** अक्रि. (प्रवास-निजणे, जेवणे, मरणे इ. करायला) सिद्ध होणे; (प्रवास, अनंतत्वाचा प्रवास करण्याच्या) बेतात असणे. [सं. घट्]

**घुडवो** पु. शेताला पाणी देण्याकरिता दोन्ही बाजूंना दोन दोन दोऱ्या बांधलेली, एक हात लांबीची चपटी टोपली. या टोपलीने दोन इसम डबक्यातील पाणी वर शेतात फेकू शकतात. (कु.)

**घुडा** पु. कळस : 'आई सोनेरी तुजा घुडा।' - घालो ५४. (को.)

**घुडा-ड्या** पु. वरंगळ जातीच्या तांदळातील एक प्रकारचा तांदूळ.

**घुडाघूड** स्त्री. (जाण्याला, काम करण्याला) सिद्ध, तयार होणे; प्रवासाला जाण्याच्या वेळची (माणसाची, पशूची) सिद्धता, तयारी, सज्जीकरण. (राजा.) [घुडणेचे द्वि.]

**घुडा-डी** पु. स्त्री. शेताचा विभाग. (गो.)

**घुडी** स्त्री. कबुतरखाना; खुराडे; पहा : **घुड**

**घुडे-डा** न. पु. आकाराने अर्धवर्तुळाकार व उंच असे शेताला पाणी देण्याचे एक प्रकारचे सूप. पहा : **घुडवो**

**घुड्ड** न. १. (खिन्नता येण्याच्या वेळचा) पोटात होणारा गडगड आवाज. २. मेघगर्जना; विजांचा कडकडाट; गडगडाट. [ध्व.क. गुड्ड]

**घुण** पु. लाकूड कोरणारा एक किडा : 'कै खट्वांग जुनें घुणें लिबडिले हे खड्ग कैचें करीं।' - निमा १.६६. [सं. घुण]

**घुणघुणा** पु. नाकपुड्यातील पडद्याचा खालचा मांसल भाग; नाकातील एक अवयव; गुणगुणा; घोळण; घोणा.

**घुणघुणाट** पु. घों घों असा आवाज : 'घनु वाजे घुण घुणा।' -ज्ञागा २६३.

**घुणा** पु. १. (सोनारी) साखळीचा, दागिन्याचा दुहेरी दुवा; आवळगाठ (याचा आकार ळ सारखा असतो). (क्रि. देणे.) २. बिरडे; गेंद; पेच; बोंडी; मणी (तोडा इ. दागिन्यांचा). ३. दोरांची, साखळ्याची एकात एक गुंतवून (शोभेसाठी) केलेली मोठी गाठ, गोंडा, झुबका. ४. लाकडाशी लाकूड जोडून ती लाकडे तेथे घट्ट राहावीत असा बांधण्याचा प्रकार. ५. (उतरणीवर वेग कमी करण्यासाठी) गाडीच्या चाकांच्या मागे घालायचा लाकडाचा दांडा, काठी, खरडी. (क्रि. घालणे, लावणे.) ६. (ल.) अडथळा; खोळंबा. ७. साखळीची एकटी कडी. - (तंजा.) (वा.) ० **घालणे** - अडथळा करणे; खीळ घालणे; व्यत्यय आणणे. ० **घेणे** - एखादे ओझे घट्ट बांधताना दोराची दुहेरी अढी, दुमड, विळखा (घोणा) घेणे.

**घुणा-ण्या** वि. दुर्मुखलेला; एकलकोंड्या; आतल्या गाठीचा; तोंडाचा जड; घुमा; कपटी. - (तंजा.) पहा : **घुम्या**

**घुणाक्षर** न. १. घुण नावाच्या किड्याने लाकूड कोरल्यावर उमटलेल्या उठलेल्या अक्षराची आकृती; किड्याने कोरलेल्या जागेत अभावितपणे उठलेले अक्षराकार चिन्ह: 'विपायें घुणाक्षर पडे। टाळिये काउळा सांपडे।' - ज्ञा १७.३०१. २. भुंग्याच्या गुंजारवात, गुणगुणण्यात अक्षरासारखे भासते, ऐकायला येते ते. [सं.]

**घुणाक्षरन्याय** पु. (न्याय.) घुणाक्षरावरून बनवलेला न्यायशास्त्रातील एक न्याय. किड्याने सहजगत्या कोरलेल्या आकृतीत एखाद्या अक्षराचे, वस्तूचे, मनुष्याचे, साम्य (चित्र) आढळते. यावरून यदृच्छाघटित अकल्पित गोष्टीला हा न्याय लावतात. सहजासहजी घडणारी गोष्ट; असंकल्पित घटना: 'हा घुणाक्षरन्यायाने या कटकटींतून खरोखरचा नांव विचारण्याचा कानडी प्रश्न उमटला की काय?' - भा ६३.

**घुणे** वि. अज्ञानी.

**घुनी** स्त्री. फार लहान कान असलेली मेंढी. (माण.)

**घुपळा** पु. घोळका : 'घुपळा घुपळा करून बसल्याली लोक एका ठिकाणला जमा व्हाय लागली.' - रैत ७१.

**घुबड** न. १. रात्री घू घू असा आवाज करणारा एक पक्षी; हा दिवसा दडून बसतो (म्हणून याला दिवाभीत असेही म्हणतात.) व रात्री भक्ष्य शोधण्याकरिता बाहेर पडतो. हा उंदरांचा संहार करतो. घुबड व त्याचा

घू घू आवाज ही अशुभ मानली जातात. दिवांध; घूक; डुडूळ २. (निंदार्थी) हिडिस व ओंगळ दिसणारी म्हातारी स्त्री.

**घुबा** पु. कळा; न फुललेली कळी. (को.)

**घुबा** पु. ताडामाडाच्या बुंडताला वेष्टून असलेला कापसासारखा भुगा. चकमकीपासून उत्पन्न होणारी ठिणगी यावर घेतात. चकमकीचा कापूस. (गो.)

**घुबुकेल** न. टावके; गुप्त ठेवा. पहा: **घबुकेळ** (क्रि. लागणे, सापडणे.)

**घुम** स्त्री. गोम; घोण.

**घु(घू)म** पु. कानाच्या मधल्या पाळीत घालण्याची लहान बुगडी; कुई. (गो.कु.)

**घुमकट** न. (बे.) चाकाच्या तुंब्यावरील धावेप्रमाणे असलेली लोखंडी कंगणी, कडे. पहा : **गुमकट**

**घुमकांवचे** सक्रि. गुद्दे मारणे; ठोसे देणे; ढोसणे. (गो. घुमको = गुद्दा)

**घुमकी** स्त्री. (वादन) डाव्या हाताने डग्ग्यावर तळहाताचा मनगटाजवळील भाग टेकून बोटांनी जो गंभीर ध्वनी काढतात तो. [ध्व.]

**घुमको** पु. गुद्दा; ठोसा; ढोसा. (गो.) [ध्व.]

**घुमघुमणे** अक्रि. (तोफ इत्यादिकांचा) घुमघुम आवाज होणे; दुमदुमणे; दणाणणे; दणदणणे; घुमणे: 'घुमघुमिती घोषा। वेदपद्याच्या।' - ज्ञा १५.१८८ [ध्व.]

**घुमघुमी** वि. घुमघुमणारा : 'कां घुमघुमी मंदराचलें। क्षराब्धि जैसा॥' - राज्ञा ११.४७९.

**घुमट** पु. देऊळ इ.च्या कळसाखाली असलेला डेऱ्याच्या आकाराचा बंदिस्त भाग: कळस; अर्धगोलाकृती छप्पर. [फा. गुंबद, हिं. गुम्मट]

**घुम(मा)ट** न. घुमटाच्या आकाराचे एक चर्मवाद्य. हे घुमटाच्या आकाराच्या मातीच्या (मोठ्या) घड्याच्या तोंडाला चामडे लावून तयार करतात : 'थोड्या वेळानें मध्यभागी बसलेल्या तिघां-चौघां इसमांनीं आपापल्या घुमटावर प्रास्ताविक थापा देण्यास सुरवात केली.' - सह्याद्रि ६६.

**घुमटला** वि. घुम्या; एकलकोंडा; मुखस्तंभ. (ना.)

**घुमटा** पु. (विशिष्ट वाद्यांचा) घुमणारा आवाज; गजर.

**घुमटी** स्त्री. १. लहान घुमट. २. देव्हारा. (गो.)

**घुमड** पु. १. घूम; डोळ्यांतील खुपऱ्या. (क्रि. येणे, फोडणे, बसणे.) २. (मुलांच्या भाषेत) पापण्यांचा तांबडा अंतर्भाग (जो भिववण्याकरिता बाहेर काढतात तो).

**घुमडा** पु. पारवा : 'घुमडे घुमघुमिती भारी।' - क्रिपु ३३.१३.

**घुमण** न. घुबड.

**घुमणे** अक्रि. १. पहा : **घुमघुमणे** 'जंव नाशु नाहीं पवना। तंव वाचा आथी गगना। म्हणौनि घुमे।' - ज्ञा ६.२७८. २. (वाद्ये इत्यादिकांनी) आतल्या आत बराच वेळ खोल आवाज काढणे. ३. (वाद, गप्प, आजार, आवाज, खेळ, काम इ.) रेंगाळणे; लांबत जाणे; चिघळणे; रेंगणे. ४. (पिशाच्चसंचारामुळे, थंडीच्या हुडहुडीमुळे, अतिश्रमामुळे, रेंगाळलेल्या दुखण्यामुळे, हरीक इत्यादिकांचा मांद चढल्याने) हूं हूं करणे; धापलणे; उसासणे; लाहक्या देणे; थापा, सुस्कारे टाकणे; कुंथणे : 'तरवारीनें केक मेले कैक घायाळ तिथे घुमती।' - विवि ८.४.८०. ५. (हरीक इ. धान्य पदार्थ) चिवचिवणे; उमळणे; खतखतणे; फसफसणे. ६. (अंगात संचारलेले भूत) चेष्टा करू लागणे; खेळणे; हालचाल करणे. ७. (पारवे इ. पक्ष्यांनी आपला) घूं घूं असा आवाज करणे; (पक्ष्यांनी) तारगंभीर आवाज करणे, गाणे. ८. (एखाद्या गोष्टीचा) बराच काळ बोलवा असणे. ९. (एखादी गोष्ट गुप्तपणे) कर्णोपकर्णी पसरणे;पसरलेली असणे. [सं. घूर्णन]

**घुमपट** पु. गाडीच्या तुंब्यासभोवार असलेला लोखंडी वाळा, कडे. पहा : **घुमकट** (गो.)

**घुमर(रि)णे** अक्रि. १. (पिशाच्चसंचार होऊन) घुमणे; हूं हूं असा आवाज करणे; अंगात येणे. २. (भूतपिशाच्चाने) चेष्टा करणे; खेळणे; वारे शिरणे. (को.) [सं. घूर्ण]

**घुमरा** वि. थोडीशी झिंग, नशा आणणारा.

**घुमरा** पु. आवाज घुमविण्याची क्रिया : 'पण वयपरत्वे त्यांच्या गळ्यातील घुमऱ्याचा जोर व तान-आलापातील कस राहिला नाही' - अस्ताई १०१.

**घुमराई** स्त्री. विपुलता; घुमरी : 'येकच रणवाद्याची घाई। वीरश्रीची घुमराई।' - होला १८८.

**घुमरी** स्त्री. १. गुराख्यांचा एक खेळ. यात तोंडाने घुमण्यासारखा आवाज काढून नाचतात. (क्रि. घालणे.) २. मोठमोठ्याने आरडणे, ओरडणे. (क्रि. घालणे.) : 'घुमरी घालीत जोर बैठक देवळींत व शेतांत देखील फावेल तेव्हां मारावी.' - खेया. ३. एक बासरीसारखे वाद्य : 'घुमऱ्या मोहऱ्या पावे सुस्वर।' - ह १०.१५.

**घुमरी** स्त्री. टेंगूळ. (झाडी) [हिं. गुमडा]

**घुमरी** स्त्री. १. लयलूट; विपुलता; चंगळ; सुकाळ; समृद्धी; भर; उत्कर्ष : 'त्याचिया पिकासी आलिया घुमरी। आल्या गाईवरी अणिक गाई।' - तुगा २९. २. (ल.) पीक; धान्य; दाणा : 'मेघा तोषोनि यावरी। इच्छिल्या ऐसी वृष्टि करी। तेणें पिकती घुमरी। आणि गोधनेंही दुभती॥ - निगा ४६. (क्रि. येणे.) [सं. घस्मर (?)]

वि. भरपूर; विपुल; समृद्ध : 'ऐशिया वोजा परी। बीजें पेरिलिया क्षेत्रीं। पीक पिकेल घुमरी।' - एभा ६.३०७. [ध्व.]

**घुमवणे** सक्रि. फिरवणे; हिंडवणे : 'तिथल्या अनेक गल्लीबोळातून त्यांनी मला घुमवलं.' - गणगोत ११८.

**घुमवणे** सक्रि. ठोक देणे; हैराण करणे : 'विश्यादादाने डाप्याच्या बहिणीचा पदर ओढला. त्यावेळी मामूने त्याला काय घुमवले होते.' - वासू ३.

**घुमशण, घुमशान** न. धांगडधिंगा; मनसोक्त नाच. (गो.) पहा : **घमशान**

**घुमसुला** पु. धिंगाणा. (क्रि. घालणे.) : 'कमरेवर हात ठेवून ती घुमसुला घालू लागली.' - सराई.

**घुमा** पु. (भोवऱ्याच्या खेळात) भोवऱ्याच्या डोक्यावर पाडलेला खोचा; डाव जिंकणाराने हरलेल्याच्या भोवऱ्यावर आपला भोवरा मारणे. [का. गुम्मु = मारणे.]

**घुमा** पु. १. (मनुष्य, पशू वठणीवर आणण्याकरिता, पशू माणसाळविण्याकरिता दिलेला) चोप; दणका; धबका; धपाटा;

कठोरपणाने वागवणे; जरब दाखवणे. (क्रि. घालणे, गाजवणे.) २. (अतिशय काम केल्याने, आजारीपणाने आलेला) शीण; थकवा; निरुत्साह; (छळणुकीमुळे, तगाद्यामुळे आलेला) त्रासिकपणा; हुळहुळेपणा; (बेदम मार मिळाल्याने अंगाचा उडालेला) खुर्दा; चकनाचूर; खुरमा; चक्काचूर. (क्रि. घालणे, गाजवणे, घेणे.) ३. मोडकळी; खुर्दा; चूर.

**घुमा** पु. १. (एखादे काम, धंदा) दिरंगाईवर, लांबणीवर टाकून बसणे; चालढकल झालेली अवस्था. (क्रि. घालणे.) २. (एखाद्या हाती घेतलेल्या कामाची चालवलेली) दिरंगाई; चालढकल; हयगय; अळंटळं; चेंगटाई. (क्रि. घालून बसणे, घेणे.)

**घुमा** पु. एक प्रकारचा नाच, खेळ : 'नाच ग घुमा।'-मसाप २.२३४. [ध्व.]

**घुमा-म्या** वि. १. दुर्मुखलेला; एकलकोंडा; मनमोकळा नसलेला. २. वरून स्तब्ध पण आतल्या आत धुसफुसणारा; आतल्या गाठीचा; खोल मनाचा. ३. मुखस्तंभ; तोंडाचा जड; अबोल्या; मितभाषी. ४. (ल.) ठोंब्या; सुस्त; जड; दगड; टोणगा (मनुष्य). [प्रा. गुम्म = मुग्ध, क. गुम्मन]

**घुमाऊ-व** पु. १. गावकरी, शेतकरी यांजपासून (गाव, शेत याबद्दल) सरकारी वसुलापेक्षा घेतलेला जादा आकार. २. (रत्नागिरी, कोल्हापूर इ. भागात) आंबराई, कुरण, शेतजमीन इत्यादिकांचा मक्ता, कौल. क्रिवि. खंडाने; मक्त्याने; कौलाने. (कर.) [हिं. घुमान. सं. घम्ब्]

**घुमाट** (कु. हेट.) पहा : **घुमट**

**घुमाणघुस्का** वि. आतल्या गाठीचा; घुमा; खोल मनाचा पण कपटी. (व.)

**घुमार** न. आजार, रोगराई. (व.)

**घुमारा** न. घुमण्याचे कार्य, क्रिया. पहा : **घुमारा** : 'मायेचे घुमार सर्वांगी भरलें वारें।' - दावि ५०१.

**घुमारणे** अक्रि. (कैफ, मादक पदार्थ इत्यादिकांच्या) अमलाने, कैफाने युक्त होणे; धुंदी, कैफ चढणे: 'तेणें घुमारिला भीमसेन। परि कपट नेणती धर्मार्जुन। मग निजेला पंडुनंदन। वृकोदर तो॥'-कथा ५.१.२९.

**घुमारणे** अक्रि. फिरणे; थैमान घालणे : 'त्याने माझ्या तोंडामध्ये कशी लगावली नाही याचेच आश्चर्य घुमारू लागले होते.' - वासू २.

**घुमारा** पु. मांत्रिक; पंचाक्षरी : 'कोणी वैद्य घुमारा पहा बाई आसल पुरता।' - पला ९६.

**घुमारा** पु. घुमणारा आवाज, नाद : 'नलगे रवि दंड डेरा। काढुनि दे आतील घुमारा।' - ह ६.११.

**घुमारा-रे** पु. न. (भूत, पिशाचादिकांचा) अंगात संचार होणे; वारे येणे; अवसर; संचार : 'काय आतां घुमारें येईल अंगासी।'- व ३१.

**घुमारी** स्त्री. कैफ; धुंदी : 'जेया लागे मधु घुमारी। तोचि अपवित्रु।' - क्रिपु २२.५२.

**घुमारीन** वि. घुमणारा ; अंगात वारे येणारा (देह, अंग); पछाडले जाईल असे : 'नाहीं येत वारें अंगासी माझीया। घुमारीन काया नव्हे माझी।' - ब ३५.

**घुमाव** पु. (संगीत) कर्णेंद्रियाला अनुभूत होणारा आवाजाचा लहानमोठेपणा.

**घुमावाघ** पु. १. गर्जना न करता सावजावर झडप घालणारा वाघ. २. (ल.) वाच्यता, उगाच वटवट न करता आपले काम साधून घेणारा खोल मनाचा मनुष्य. ३. अतिशय आळशी मनुष्य (आळशी वाघाप्रमाणे).

**घुमिली** वि. धुंद; कैफ चढलेला; तर्र झालेला (डोळा इ.) : 'राधा हरिला पुसती। नेत्र विलासती लाल भासती। उघड दिसती दृष्ट घुमिली।'- होला २२.

**घुमी** स्त्री. घुमण्याचे प्रमाण : 'नगाऱ्यांची आणि ढोलांची विशिष्ट घुमी तज्ज्ञांकडून तपासली जाते.' - अआगो १२५.

**घुमेबाजी** स्त्री. भोवऱ्याचा एक खेळ; भोवऱ्याच्या खेळात डाव जिंकणाराने जिंकलेल्या गड्याच्या भोवऱ्याला खोच देण्याचा प्रकार; घुमा.

**घुम्म** क्रिवि. गप्प; न बोलता.

**घुम्मज** पु. घुमट : 'जगातील सर्वात मोठा असा निळा घुम्मज....' - पडरे ३०७. [फा. गुम्बझ्]

**घुम्मनघुसा** वि. घुमा ; आतल्या गाठीचा : 'माणसानं सदा घुम्मनघुस्यागत असूने.' - रैत ६७.

**घुयऱ्या** वि. घुम्या. (व.)

**घुरकणी** स्त्री. वाघाची डुरकावणी, डरकाळी. (गो.)

**घुरकणे** अक्रि. (वाघ इत्यादीने) ओरडणे; आरोळी ठोकणे. पहा : **गुरकणे** : 'पदतळीं असती दोनी व्याघ्र। घुरकोनि पाहती रूप उग्र।' – दावि ३४४. [हिं. घुरकना] [सं. घुर]

**घुरकी** पहा : **घुमरी** १

**घुरकी** स्त्री. चक्कर; फेरा; धक्का; भोवरा; हिसका; टोला: 'ऐकिल्यास उत्तम नाहीं तर एके घुरकींत हातपाय गळून पडतील.' - मइसा ५.७९. [ध्व.]

**घुरकॉ** वि. डुरकणारा; घुरकणारा; डुरक्या फोडणारा (वाघ इ.). (गो.)

**घुरगडी** स्त्री. एक प्रकारचा हुक्का. (हेट.)

**घुरगुटणे** पहा : **गुरगुटणे**

**घुरघुर, घुरघूर** स्त्री. पहा: **गुरगुर; घरघर** [सं. घुर्]

**घुरघुरणे** अक्रि. १. पहा : **गुरगुरणे**. २. वाजणे: 'तुरतुरिती काहाळां। घुरघुरिर्ती टिवाळा।' - शिव २. [सं. घुर्]

**घुरघुर वात** ज्याच्या योगाने पोटात गुरगुरते व स्नायूंच्या शक्ती क्षीण होतात असा वाताचा विकार.

**घुरघुरा** पु. एक किडा; घोगेरा. [ध्व.]

**घुरघूस** पु. स्त्री. फकिराच्या हातातील एक हत्यार.पहा : **गुरगुज**

**घुरघूस** क्रिवि. गाढ; स्वस्थ; घोरत. पहा: **गुरघुस**. (क्रि. निजणे.) (वा.)

**० मारणे** - पाय पोटाशी घेऊन निजणे; गुरगुटून निजणे.

**घुरट-टा** वि. १. ज्याच्या अंगाला दूध, दही, ताक, लोणी इत्यादिकांचा कुजट व उग्रट वास येतो असा (बकरा, मांजर, वाघ इ.) : 'तुझिये अंगीं घुरट घाणी। बहु खासी दूध तूप लोणी।'- तुगा १२९. २. घामट; घाणेरडी : 'घाणेरी घुरटी तुला तरि कसी ते मानली नाकळे।' - निमा १.६६.

**घुरट** वि. घुमा.

**घुरटा(ष्टा)ण** स्त्री. (मेंढा, मांजर इ. जनावराच्या अंगाची येणारी) उग्रट, कुजट घाण; घुरष्टाण.

**घुरणे** अक्रि. १. घोरणे. २. घुरघुर आवाज करणे (मांजर इ.नी). [सं. घुर]
**घुरणे** अक्रि. जमणे; गोळा होणे: 'कितीतरी कावळे त्याच्याभोवती घुरले होते.' - शेलूक १४७.
**घुरदळणे** अक्रि. जुगार खेळणे, इकडून तिकडे उड्या मारणे; धांगडधिंगा घालणे; धिंगामस्ती करणे; धुडगूस, धिंगाणा घालणे; खिदडणे; धिंगडणे. [सं. खुर्द]
सक्रि. पहा : **गुधडणे**
**घुरदळा-के** पु. न. १. पहा : **गुधडा**. २. खिदडा; धिंगाणा; धांगडधिंगा; धिंगामस्ती. (क्रि. घालणे, मांडणे.)
**घुरदळी-ळ** पहा : **घुरदळा** २. (क्रि. घालणे, मांडणे.)
**घुरम्याउंदीर** पु. १. मोठ्या जातीचा उंदीर; शेतातील उंदीर. २. (ल.) अट्टल, बिलंदर चोर. ३. कावेबाज व कारस्थानी, पाताळयंत्री मनुष्य.
**घुरम** स्त्री. दोन टोकांचे इरले. (गो.)
**घुरमळणे** अक्रि. १. (एखाद्या पदार्थाभोवती) घिरट्या घालणे; घुटमळणे; रेंगाळणे. उदा. पतंग दिव्याभोवती, माशा गोड पदार्थाभोवती घुटमळतात तसे. २. (काही एका आशेने) एखाद्याच्या भोवती असणे, लोचटपणाने पुढे पुढे करणे; लाळ घोटणे. ३. (विझण्यास आलेल्या दिव्याची ज्योत, निघून चाललेला प्राण) घुटमळणे; लिकलिकणे; झिरूमिरू, मरूमरू करणे. ४. कचरणे; कां कूं करणे; आशंकणे; घोटाळणे; गडबडणे. ५. (बोलताना) अडखळणे; चाचरणे; बोबडी वळणे. ६. अस्पष्ट, संदिग्ध बोलणे. ७. चेंगटाई करणे; गोंधळणे; माशा मारीत बसणे. ८. पेंगणे; झोपेला येणे : 'हळूहळू सर्वच जण घुरमळले.'- खरादे ७८.[सं. घूर्ण्.]
**घुरमुळणे** पहा : **घुरमळणे** ३ ते ७.
**घुरम्यांव** न. मांजर पिलाला शोधत असताना जो घुरघुरयुक्त म्यांव म्यांव असा आवाज करते तो. (क्रि. करणे.)
**घुरंगुटा** पु. कोळी, कीटक. (गो.)
**घुराब** न. एक प्रकारचे गलबत. पहा : **गुराब** [फा. गुराव]
**घुराळी** स्त्री. घुरवळी; गुरवळी; गुरळी; गुळाची पोळी; गुळाचे एक पकान्न : 'त्यावर वाढित्या घुराळ्या।'- लोसामा ५.५७
**घुरुघुरू** क्रिवि. घुरघुर असा आवाज करत : 'जिजा घुरूघुरू घोरत होती.' - व्यंमाक ३२.
**घुरूत** पु. पिठाची चिकट कांजी. (गो.)
**घुरे** न. १. एक रोग; अपस्मार; फेफरे. (क्रि. जडणे, लागणे, येणे.) २. घेरी; चक्कर; भोवळ. (क्रि. येणे.) [सं. घूर्ण, घूर्म]
**घुरे** न. एक प्रकारची घाण येणारे झाड, लाकूड : 'कां बावनें आणि घुरे। हा निवाडू तंवचि सरे। जंव न घेपती वैश्वानरें। कवळुनि दोन्ही॥' - ज्ञा १८.१२५३.
**घुर्मिल** स्त्री. एक प्रकारची वेल. (गो.)
**घुर्मी** स्त्री. १. झोपेची तंद्री, झापड, सुस्ती : 'अवघी रात्रीं निद्रा केली। अझुनी घुर्मी कां दाटली।' - दावि २६०३. २. धुंदी : 'विघरोन गेलीसे आतां उर्मी। जिराली घुर्मी नयनांतील।' - दावि ३९६. ३. भोवळ : 'सर्वेचि व्यापिला घुर्मी' - उह १९५७. [फा. गुरमी]
**घुर्रा** पु. १. राग. २. झाडाभोवतीचे कुंपण.
**घुल-ला** स्त्री. एक प्रकारचा मासा. (गो.)
**घुलकावणी** पहा : **गुलकावणी**
**घुलकावणे** सक्रि. पहा : **गुलकावणे**. १. फसविणे; गुलकावणी दाखविणे; हुलकावणी देणे; फूस लावून ठकविणे: 'त्याला विश्वास दाखवून घुलकावून घुलकावून घात तर करणार नाहीत?' - वज्राघात २०५. २. नखऱ्याने, लाडीगोडीने (मान इ.) बेळावणे, हालविणे : 'पुच्छ नाचवी कडोविकडी। मान घुलकावी घडिघडी।' - ह ३१.५६.
**घुलकी** स्त्री. हुलकावणी दाखवणे : '.... अन् नारायीन देव चटकन् घुलकी देऊन तटून पळून गेला.' - आलो ४९.
**घुलघुला** पु. खुळखुळा. (झाडी)
**घुलणे** अक्रि. झुलणे; गरगर फिरणे. [सं. घूर्ण्, घुण्]
**घुलवणे** उक्रि. झुलवणे; थापा देऊन खोटी आशा उत्पन्न करणे.
**घुलविणे** सक्रि. फसवणे; भुलविणे; झुलविणे : 'नंतर ज्या ठिकाणी दाणापाणी नाहीं, असे जागीं निजामास घुलवीत नेऊन अगदी लढून जेर केलें.' - मइसा २ पेश ५६.
**घुला** पु. पिवळसर, तपकिरी रंगाची ठिपकेदार मोठी कवडी; कवडीचा एक प्रकार : 'शीख सिंपी घुला कवडे। आधीं त्याचें घर घडे। किंवा आधीं निर्माण किडे। हे विचारावें॥' - दास ९.७.५.
**घुला-ले** पु. न. सुरवंट; कुसरूड.
**घुला-ले** वि. वाकडी मान करून पाहणारा वाकडमान्या : 'तारसें घुले काणें कैरें।' - दास ३. ६. ४१.
**घुलावणी, घुलकावणी, घुलवणे** स्त्री. फूस लावणे; लुलुपुतु करणे; चाळवणे; चाळवणूक; गुळगुळथापडी; थापा देणे; प्रलोभन, फसवणूक.
**घुले** वि. अरुंद. (ना.)
**घुल्ल** वि. वाकडे (पाहणे) : 'हुल्ल कपाळ ज्याचें। घुल्ल पाहणें ह्याचें।' - दावि ५०.
**घुवा** वि. चिखलाने माखलेला. - (तंजा.)
**घुशा-श्या** वि. घुसणारा; आगंतुक.
**घुशी** स्त्री. १. (मधून, मध्ये) जोरांत घुसणे, शिरणे. (क्रि. मारणे.) २. जोराचा रेटा, धक्का. (क्रि. देणे, मारणे.)
**घुशू** न. (मुलांच्या भाषेत) स्नान; आंघोळ. (गो.)
**घुसखोर** पु. जबरदस्तीने आत शिरणारा; आक्रमक; आगंतुकी; हल्लेखोर.
**घुसखोरी** स्त्री. अनधिकाराने, जबरदस्तीने आत प्रवेश करणे.
**घुसघुसणे** अक्रि. उष्मा भासणे, होणे. [कु.]
**घुसडणी** स्त्री. घुसडण्याची कृती. पहा : **घुसडणे**
**घुसडणे** सक्रि. १. जोराने आत खुपसणे, शिरकावणे, घालणे. २. (ग्रंथात, लिखाणात पदरचा भाग) दडपून देणे : 'हिंदुधर्मातील रीतीभातींनी आमचा पुष्कळ तोटा होत आहे हे अर्जात हलकेंच घुसडून द्यावें.' - लोटिकेले ४.४०. ३. आडदांडपणे, इजा होईल अशा रीतीने वापरणे, उपयोग करणे. ४. (मनुष्य, जनावर इ.ना) दमवणे; भुस्कट पाडणे; (पुस्तके, कागद इ.) चुरगळून, चोळवटून जातील अशा तऱ्हेने वापरणे; चुथडा करणे.
अक्रि. रेटून, जोराने आत शिरणे; (स्वत:ला) जोराने आत ढकलणे.
**घुसडा** पु.१. गुधडा; धिंगाणा; दुर्दशा. (क्रि. मांडणे.) : 'असे

एकसारखे बोलत त्यानें आईच्या अंगाचा घुसडा मांडला.' - यख ५१. २. (वाईट रीतीने वापरलेल्या कपडे, कागद, पुस्तके इत्यादिकांचा) चुथडा; चोळामोळा; दुर्दशा; चेचा; चेंदा; धुडगूस; (मनुष्य, जनावर इत्यादींची) फार काम करून घेतल्याने झालेली दुर्दशा; दामटी वळलेली स्थिती.

**घुसणी** स्त्री. (गोट्यांचा खेळ) गोट्यांच्या खेळात हरलेल्या गड्याला द्यायची एक प्रकारची शिक्षा. हिचे कोपरघुसणी, पेरघुसणी व कानघुसणी असे तीन प्रकार आहेत.

**घुसणी** स्त्री. आत घालण्याची क्रिया; शिरकाव करणे.

**घुसणी** स्त्री. श्वास कोंडणे. (क्रि. होणे) : 'निजसुरी बाळकावरि पडली। तेणें तेया घुसणी जाहाली।' - क्रिपु २६.१६.

**घुसणे** क्रि. गवसणे, नेम धरणे : 'ठणुनि लाथ घातली कंबर घुसून। येवूनी सांगती लेकाला गाऱ्हाणं।' - एहोरा (वासुदेव) २८.

**घुसणे** अक्रि. १. जोराने आत शिरणे; प्रवेश करून घेणे; दपटून शिरकणे; दुर्गम अशा स्थळी, गर्दीत, बळाने, युक्तीने प्रवेश करून घेणे. चंचु प्रवेश करणे. २. (ल.) (हक्क, अधिकार, आमंत्रण नसता जमातीत) आगंतुकाप्रमाणे प्रविष्ट होणे, शिरणे; आगंतुक जाणे. [सं. गवेषण]

**घुसपटणे** पहा : **घुसमटणे**

**घुसपणी** स्त्री. गुंतागुंत; गोंधळ; घोटाळा. (गो.)

**घुसपागोंधळ** पु. गुंतागुंत; घोटाळा.

**घुसपाल** पु. (कान इ.) पिळण्याची, पिरगळण्याची क्रिया; कानाला खडा लावणे; पुन्हा न करण्याचा निश्चय. (गो.)

**घुसपूचे** अक्रि. गुंतणे; गोंधळणे. (गो.)

**घुसमट** स्त्री. १. श्वासनिरोध; जीव कोंडणे. २. पहा : **घुसमड.** ३. धांदल; कोंडमारा; उलघाल; कुचंबणा : 'तेच पेलताना नाकी नऊ येत होते, घुसमट घडत होती !' - गाणे ४.

**घुसमटणी** स्त्री. गुदमरणी; श्वासाचा कोंडमारा. (गो.)

**घुसमटणे** अक्रि. १. दम कोंडल्यासारखे होणे; गुदमरणे; श्वासावरोध होणे. २. (ल.) कोंडमारा झाल्याने, तोंड दाबून बुक्कीचा मार अशी अवस्था झाल्याने अगदी जेरीला येणे; कोंडमारा होणे; अडचणीत सापडणे. ३. घुसडले जाणे; अस्ताव्यस्त होणे; चोळवटून जाणे; चुथडा होणे.

**घुसमटमार** पु. गुदमरणे; कोंडमारा; दम कोंडणे. (गो.)

**घुसमड** स्त्री. १. तुडवणी; गुधडा पाडणे; मर्दन, चोळामोळा. २. धुडगूस; धिंगाणा; धिंगामस्ती; धांगडधिंगा.

**घुसमडणे** अक्रि. घुसणे; शिरणे : 'आईच्या कुशीत घुसमडून त्यांच्या गोजिरवाण्या पिलांनी त्याचे अनुकरण केले.' - व्यंमाक २.

**घुसमडणे** पहा : **घुसमाटणे १**

**घुसमाट(ड)णे** सक्रि. १. (एखाद्याची) रग जिरवणे; (एखाद्याला) जमिनीवर लोळवून त्याची गात्रे शिथिल करणे. (ना.) २. रगडणे; दडपणे : 'मुरगाळीतां कान घुसंमडीत सावधान।' - तुगा ३२०६. ३. कोंडमारा करणे.

**घुसमारा** पु. फेकाफेक.

**घुसमांडणे** सक्रि. कोंडमारा करणे.

**घुसलखाना** पु. १. स्नानगृह; न्हाणीघर. २. खलबतखाना; एकांताची खोली. [अर. घुस्ल = स्नान + फा. खाना =घर.]

**घुसळखांब** पु. (ताक, दही इ.) घुसळण्याची रवी दोरीने ज्या खांबाला अडकवलेली असते तो खांब; घुसळ्व्यासाठी उपयोगी खांब.

**घुसळण** न. घुसळण्यासाठी भांड्योत घातलेले दही, विरजण इ. घुसळण्याची क्रिया : 'उठुनी प्रातकाळीं गौळणी घुसळण घुसळीती।' - भज १०.

**घुसळणे** सक्रि. १. (दही इ. भांड्यात घालून) रवीने जोरात फिरवणे; मंथन करणे; ढवळणे. २. गदगदा जोराने हलवणे; इकडून तिकडे ढकलणे. ३. (एखाद्याला) फार किंवा अवघड कामे सांगून दमवणे, राबवणे, बेजार करणे; जेरीला, जिकिरीला आणणे; घाम काढणे. याच अर्थी हाडे घुसळणे असाही प्रयोग आहे. [सं. घृष्]

**घुसळप** न. १. घुसळण्याची क्रिया. २. घुसळण्याचे विरजण. (कर.) पहा : **घुसळण** १.

**घुसळा** पु. १. घुसळून निघालेला पदार्थ. २. (घुसळून काढलेला) लोण्याचा गोळा, नवनीत.

**घुसळीव** वि. घुसळलेला; मंथन केलेला.

**घुसा, घुस्सा** पु. १. राग; रागाची लहर : 'मोठा घुसा येऊन...' - मदरू १.१७. २. अढी; अवकृपा. [फा. घुस्सा]

**घुसा, घुस्सा** पु. ठोसा; गुद्दा; धपका; धक्का; तडाखा. [हिं. घूसा]

**घुसाडणे** पहा : **घुसमाटणे**

**घुसारा** पु. धडक (क्रि. करणे.) : 'एखाद्या जनावराने जर घुसारा केलाच तर त्याचा पहिला धडका स्टुलावर बसणार.' - वाघसिंह ११३.

**घुसूप** न. झुडूप.

**घुस्तांवचे** सक्रि. पायांनी तुडवणे. (गो.)

**घुस्मारणे** सक्रि. मारणे; घुसमटून मारणे; खुर्दळून ठार करणे : 'येणें गोपाळें चाणूर घुस्मारिला।' - दावि २०.

**घुळघुळ-ळा** क्रिवि. पाझरणाऱ्या, झुळझुळणाऱ्या पाण्याप्रमाणे किंवा किणकिणणाऱ्या घंटांप्रमाणे आवाज करीत; घळाघळा; खळाखळा. [ध्व.]

**घुळघुळणे** अक्रि. १. (पोट, पोटात) गुरगुरणे; गडगडणे; घुळघुळ असा आवाज होणे. २. (झिरपणाऱ्या पाण्याने) घुळघुळ असा आवाज करणे. ३. गडबडत, गडगडत लोळत जाणे; घुळत जाणे.

**घुळणा** पु. नाकातील पडदा; घोणा; घोळ्या.

**घुळणे** अक्रि. लोळणे; गडगडणे; गडगडत जाणे; घरळणे; लोटत जाणे. [सं. घुण्, घूर्ण]

**घुळमडचे** अक्रि. श्वास, दम कोंडल्याने गुदमरणे. (गो.) पहा : **घुसमटणे**

**घुळी** वि. देवी (या रोगाचा) प्रादुर्भाव न झालेला. - (तंजा.)

**घुळी** पु. १. देवाला सोडलेला बैल; पोळ; सांड (हा नेहमी मोकळा फिरत असून ह्याच्याकडून कोणतेही काम करून घेत नाहीत). (क्रि. सोडणे.) : 'तारुण्याच्या मदें न मानी कोणासी। सदा मुसमुसी घुळी जैसा॥' - तुगा ३१७४. २. (ल.) रिकामटेकडा, खाऊनपिऊन माजलेला माणूस; पोळ. [का. गुळी. सं. (गौ) गलि.]

**घळूमुळू (करणे)** काकू (करणे); एखादी गोष्ट करण्याबद्दल निरूत्साह दाखविणे : 'आधी घुळूमुळू घुळूमुळू करतील...' - रैत १२९.

**घुंग** पु. भुंगा; भ्रमर : 'तळ्यांत म्हैस बसली होती. तिच्या शिंगात घुंग होऊन धाकटा मुलगा जाऊन बसला.' - मसाप १.२.२२. [ध्व.][सं. ड्डु]
**घुंग(गु-गू)ट** पु. डोक्यावरून, तोंडावरून आच्छादनार्थ घेतलेले वस्त्र, कपडा; बुरखा. (वा.) **घुंगटमुंडी घालणे** - तोंड झाकणे.[हिं. घुंघट]
**घुंगरटे** न. चिलट; मच्छर; कैंबरे; डास. पहा : **घुंगरूट**
**घुंगरा** पु. एका टोकाला घुंगरू बांधलेली काठी. हिचा ताल धरण्यासाठी उपयोग होतो. (ना.)
**घुंगरू** न. रेशमाची एक जात.
**घुंगरू-र** पु. न. घागरी. हा धातूचा, पोकळ असून आत खडा घातलेला असतो, त्यामुळे आवाज होतो. ह्याचा आकार करवंदाएवढा गोल असतो. याच्या वरच्या बाजूला दोरा ओवण्याजोगी कडी, नाक असते. [हिं. घुंघरू]
**घुंगरूट, घुंगुरटे-गुडे, घुंघुरट-डे, घुंगर्डे** न. १. चिलट; मच्छर; कैंबरे; (लहान) डास : 'घुंगर्डी म्हणती आमुचे घर। निश्चयेंसी॥' - दास १.१०.४१. २. (ल.) लहान मुलगा; अगदी लहान व अशक्त मनुष्य; क्षुद्र माणूस. [क. गुंगुरू = माशी]
**घुंगस** पु. तटबंदी असलेल्या शहराच्या, गावाच्या वेशीबाहेर असणारा कोट, बाह्यकोट.
**घुंगार** पु. कोणताही पदार्थ विशेषत: मांस इ. मऊसर शिजल्यावर खाली उतरून थंड होऊ देतात. थंड झाल्यावर त्याचे कोंडाळे करून त्यात एक निखारा ठेवतात आणि त्यावर तूप ओतून लागलीच भांड्यावर झाकण ठेवतात. या कृतीला घुंगार असे म्हणतात. [क्रि. देणे]
**घुंगुटपट** पु. बुरखा; बुरख्याचे वस्त्र.
**घुंगुर** पहा : **घुंगरू** : 'होती नाद निघे सुमंजु हलती जीं कांचिचीं घुंगुरें।' - कमं २.६८.
**घुंगुरकेश** पु. (अव.) कुरळे केस.
**घुंगुर, घुंगुरुडा, घुंगुरडे, घुंघुरडा, घुंघुरूडा-डे** पहा : **घुंगरटे** : 'घुंगुरडा ऐसे वदन। म्हणे पर्वत सगळा ग्रासीन।' - ह ३५.१०.९.
**घुंगुरवाळा** पु. घुंगरू, घागऱ्या लावलेला (लहान मुलाच्या पायात घालायचा) वाळा : 'वाजवरे बाळा। वेल्हाळा। रुमझुम घुंगुरवाळा।' - वाग्वैजयंती.
**घुंगैरा** पु. काळा, तांबडा भुंगा. (ठा.)
**घुंघरट, घुंघरुट** पहा : **घुंगरटे**
**घुंघाट-टी** पु. स्त्री. घुबडांचा आवाज; घुत्कार : 'दिवाभीतांचे घुंघाट।' - मुआदि ३६.५८; 'क्रूर श्वापदांची दाटी। दिवाभीतांची घुंघाटी।' - भाराबाल १२.६३. [ध्व.]
**घुंघातणे** अक्रि. (घुबड इत्यादिकांनी) आवाज करणे; घूं घूं असा आवाज करणे; गुणगुणणे : 'जैसे सर्व लोक निजलिया। उलूक उठे घुंघातु।' - हंको. [ध्व.] [सं. घु]
**घुंघुर, घुंघुरटे, घुंघुरडे, घुंघुरडा** पहा : **घुंगरू, घुंगरटे**
**घुंघुरदा** पु. घों घों असा आवाज करणारा भुंगा, भ्रमर, भोवरा. [ध्व.]
**घुंघूर** पहा : **घुंगुर, घुंगरु**
**घुंघूर** पु. फुलाचा कांदा; घांगूड.
**घुंची** स्त्री. खोळ : 'सिदूने मेणकापडाची घुंची अंगावर घातली.' - जाण ३२.
**घुंबड** स्त्री. गर्दी; झुंबड. (बे.) [क. गुंपु]
**घुंबरडा** पु. १. कबुतरांचा घूं घूं असा आवाज; कबुतरांचे घुमणे. २. (ल.) गोंगाट; कलकलाट (मुलांचा - खेळण्याच्या वेळेचा). (क्रि. घालणे, करणे.)
**घुंवचे** अक्रि. स्वत:भोवती फिरत राहणे; गरगर फिरणे; झिंगणे. (गो.)
**घुंवळ** स्त्री. भोवळ; घेरी; चक्कर. (गो.)
**घुंवळचे** अक्रि. घेरी, चक्कर येणे; मस्तकात भ्रमण होणे. (गो.)
**घूक** पु. घुबड; दिवाभीत : 'देते परघूकातें सुहृदब्जांचे प्रभाकर दरा जे।' - मोद्रोण १२.२५. [ध्व. सं. घूक]
**घूकदृष्टि-ष्टी** स्त्री. (घूक म्हणजे घुबड हे दिवसा डोळे पूर्ण उघडत नाही व किलकिले करून पाहते यावरून) डोळे अर्धवट मिटून पाहणे. [सं.]
**घूट** पु. घोट. (झाडी)
**घूट(घूं)ट** वि. लठ्ठ व ठेंगू; धष्टपुष्ट आणि बुटका. (को.)
**घूड** पु. १. घोस; पुंज; पुंजका; घड; गुच्छ. २. काप इ. दागिन्यांना लावतात तो मोत्यांचा घोस, झुबका. ३. घुमट; मनोरा; डेरा (गो.) [क. गुड्ड]
**घूड** न. कोंबड्या झाकून ठेवण्याची मातीची घुमटी; कोबड्यांचे खुराडे. (कर.) [क.गुड्ड]
**घूड** न. कणसासकट पेंढ्यांची टोके उभी करून लावलेली रास. (बे.) [क. गुड्ड]
**घूण** पु. लाकूड, धान्य वगैरे पोखरणारा किडा. [सं.]
**घूत्कार** पु. घुबडाचा आवाज. [ध्व.]
**घूम** पु. डोळ्याच्या पापणीच्या आतील बाजूला होणारा रोग; (सामा.) खुपरी घुमड. (क्रि. येणे. फुटणे, होणे.)
**घूम** पु. हरलेल्या गड्याच्या भोवऱ्याला पाडलेला खोचा. [क. गुम्मु = मारणे]
**घूम** पु. घूमपेंढीच्या खेळातील व आट्यापाट्यामधील एक पारिभाषिक शब्द. [क. गुम्मु = मारणे]
**घूम** पु. (कवायत) अर्धचक्कर मारणे. [सं. घूर्ण]
**घूमजाव** पु. १. कवायतीतील एक हुकूम. हा हुकूम मिळाल्यास ज्या दिशेला आपले तोंड असेल तिच्या विरुद्ध दिशेला ते करणे. २.बदल.
**घूय घालणे** मुलांचा एक खेळ. यात एखाद्या मुलाला कोंबल्याखाली झाकून त्याला डहाळ्यांनी झोडपतात. त्यामुळे त्याला राग येऊन तो सवंगड्याला पकडायला धावतो. (कु.)
**घूर** पु. माशाची एक जात. (गो.)
**घूर्ण** वि. १. धुंद; मस्त; माजलेला : 'अहंमहामदें उन्मत्त पूर्ण। देह तारुण्यें अति घूर्ण।' - एभा ३. ५१७. २. भ्रमणारा; घुमणारा. [सं.]
**घूर्णन** न. गरगर फिरणे; परिभ्रमण करणे; फेर, गिरकी घेणे, भोवंडणे.[सं.]
**घूर्णन अक्ष** (भौ.) एखादी वस्तू ज्या भोवती फिरते तो अक्ष, आस.
**घूर्णनकेंद्र** न. (यंत्र.) चक्राकार गतीचा केंद्रबिंदू.
**घूर्णनत्रिज्या** स्त्री. (यंत्र.) गिरक्या घेणाऱ्या वस्तूंचे केंद्रांतर.
**घूर्णना** स्त्री. भ्रमाची अवस्था.
**घूर्णवात** पु. चक्रवात.
**घूर्णित** वि. १. गरगर फिरवलेले; भ्रमविलेले; भ्रमण करायला लावलेले.

२. (ल.) बेसावध; मूर्च्छित; धुंद : 'एकें घूर्णितें सावधें।'-ज्ञा ११.१२६.

**घूर्णितकरण** न. (नृत्य) उजवा हात बाजूला करून वाटोळा फिरवणे, डावा हात दोलित करणे, पायाचे स्वस्तिक करून त्या स्वस्तिकांतून पाय दूर करणे हा प्रकार. [सं.]

**घूल** पु. एक प्रकारचा नरभक्षक वन्य राक्षस : 'तो काहीं घूल किंवा सैतान नव्हता.' - वज्राघात ११०.

**घूल** स्त्री. (गो.) पहा : **घुला**

**घूस** स्त्री. १. उंदराच्या जातीचा पण उंदरापेक्षा मोठा प्राणी : 'कां न सदन बांधावे कीं त्यांत पुढें बिळें करिल घूस।' - मो स्फुट आर्या २ (नवनीत) २५४. २. (उप.) अतिशय काळ्या वर्णाची स्त्री. (वा.) **घुशीचा सापळा** - (ल.) एखाद्याला पेचात आणण्याकरता रचलेला डाव, व्यूह.

**घूस** स्त्री. पाखडताना धान्यातून निघणारे, उडणारे भुसकट; माती इ. (कु.गो.)

**घूसखोर** पहा : **घुसखोर**

**घूं घूं** उद्गा. घुबडाचा आवाज, ओरडणे : 'कुंभकर्णाच्या घरावरी। दिवाभीत घूं घूं करी।' - बाल ७.६.२. भुंगे, माशा इत्यादिकांचा आवाज. [ध्व.]

**घृणा** स्त्री. १. वीट; तिरस्कार. २. दया; करुणा. [सं.]

**घृणास्पद** वि. कंटाळा, वीट येण्यासारखे; किळसवाणे; तिरस्करणीय.

**घृणी** वि. दयाळू; कृपावंत; दयार्द्र; मायाळू; कनवाळू; करुणाशील.[सं.]

**घृत** न. तूप; आज्य : 'अथवा इंद्रियें आणि प्राण हेचि यज्ञोपचारभरण। अज्ञान घृत॥' - ज्ञा ९.२४०. [सं.]

**घृतकुमारी** स्त्री. कोरफड; कुमारी; कुवारकांडे; कुवारी. [सं.]

**घृतकुल्ल्या मधुकुल्ल्या** स्त्री. १. (तुपाचे पाट व मधाचे पाट) तूप व गोड पदार्थ यांची चंगळ, रेलचेल, समृद्धी. २. (ल.) मिष्टान्नाचे सुग्रास व चमचमीत भोजन : 'पुराणांचा शिमगा जेव्हापासून सुरू झाला व भटांच्या घृतकुल्या मधुकुल्या देशांत प्रवृत्त झाल्या तेव्हापासून... कौशल्य चट सारें पार वाहून गेलें.' - नि. [सं.]

**घृतधेनु-नू** स्त्री. तुपाच्या गोळ्याला गाय समजून पूजा करून ब्राह्मणाला दान करायचा गोळा. [सं.]

**घृतबुद्धि-द्धी** स्त्री. बुद्धीचा जडपणा; मंदबुद्धी; जडबुद्धी; बुद्धीची ग्रहणशक्ती तीव्र नसणे. (पाण्यात तुपाचा थेंब थिजतो किंवा फार हळूहळू पसरतो यावरून).

वि. मंदबुद्धीचा; तल्लख बुद्धी, ग्रहणशक्ती नसणारा. [सं.]

**घृतविपाक** पु. (रसा.) तूप खतखतणे, फसफसणे, रासायनिक प्रक्रिया होणे : 'साखरेचा दुग्धविपाक व नंतर घृतविपाक होऊं देऊन...' - सेंपु २.५.४.

**घृतश्राद्ध** न. तीर्थयात्रा करण्याच्या उद्देशाने घराहून निघताना करायचे श्राद्ध. यातील मुख्य द्रव्य घृत (तूप) असते म्हणून याला हे नाव आहे.[सं.]

**घृतस्नानी** वि. पानावर तूप वाढल्यानंतर स्नान करणारा; स्नान केल्याबरोबर खायला बसणारा; जेवण तयार होईपर्यंत स्नान न करणारा.

**घृताम्ल** न. (रसा.) गाईच्या लोण्यात असलेले एक अम्ल. कॉडलिव्हर ऑईल तसेच दुसऱ्या काही प्रकारच्या चरबीत व काही उद्भिज्ज कोटीतही हे सापडते.

**घृष्ट** वि. घासलेले; चोळलेले; घर्षण पावलेले. [सं.]

**घृष्टतल** न. घोड्याच्या पायाला होणारा एक रोग. हा घोड्याच्या खुरांचे तळवे अधिक घासले गेल्याने होतो - अश्वप २.३८.

**घृष्टि-ष्टी** स्त्री. १. घर्षण; घासणे : 'का दोहीं काष्ठाचिये घष्टी। माजीं वन्हि एक उठी।' - ज्ञा १८.११५९. २. (ल.) संसर्ग; स्पर्श; सहवास; संघटन; घसट : 'काय द्विजु अंत्यजघृष्टी। अंत्यजु नोहें॥' - ज्ञा १७.५१. [सं.]

**घृष्णेश्वर** पु. बारा ज्योतिर्लिंगापैकी एक.

वि. (ल.) मंद बुद्धीचा; बथ्थड; दगडोबा. [सं.]

**घेऊघेवडी** स्त्री. लोभी, खादाड स्त्री.

**घेऊ देणे** या शब्दसंहतीचा उपयोग पूर्वकालवाचक धातुसाधितांना जोडून करतात. अशा वेळी त्याचा अर्थ एखाद्याला एखाद्या क्रियेचा विषय, त्या क्रियेच्या अधीन होऊ देणे किंवा एकाद्याने स्वतःकरिता एखादी गोष्ट करणे असा होतो.

**घेऊपाशेरी** स्त्री. १. दुसऱ्यापासून विकत घेताना दुकानदार वापरतात ते पाच शेरांचे माप. हे सर्वसाधारण मापांपेक्षा किंचित मोठे असते. २. (ल.) अयोग्य, अन्याय्य लोभीपणा; अनीतिमूलक लोभ.

वि. दुसऱ्याचे जिन्नस गैरवाजवीपणे, जुलमाने लाटणारा, लाटण्याची इच्छा धरणारा; दुर्वृत्त लोभी.

**घेऊ (ओ) पासरी, घेऊ (ओ) बा** वि. नेहमी दुसऱ्यापासून घेणारा; उसने काढणारा, परंतु दुसऱ्याला कधी देण्याची, उसने देण्याची सवय नसलेला (मनुष्य); अप्पलपोट्या; स्वार्थी.

**घेगा-घा, घेंगा-घा** पु. १. एखाद्याला काही काम करायला प्रवृत्त करण्यासाठी त्याला सर्वांनी मिळून दिलेली उठावणी, उत्तेजन, नेट. (क्रि. करणे.); ढोकणे. २. (एखाद्या विरुद्ध उठलेले) काहूर; गिल्ला; ओरड; गवगवा. (क्रि. करणे.) ३. (एखाद्या कामात, उद्योगात केलेला) जोराचा व निर्धाराचा नेट, प्रयत्न; हल्ला; गर्दी; चढाई. पहा : **एलगार.** ४. (एखाद्या कामाची) तातडी; घाई; निकड. ५. निकराचा हट्ट. (क्रि. होणे.)

**घेगाटणे** अक्रि. रेकत बोलणे; दरडावून बोलणे; घेंगावणे. (व.)

**घेघाट** पु. हाकाहाक; घे घे असे ओरडणे.

**घेघाल** अ. भरपूर. (व.)

**घेघे** स्त्री. १. नेटाचा प्रयत्न; जोराचा, निकराचा हल्ला; घेगा. २. लढाईच्या वेळी हल्ला करताना आवेशाने ('हा वार घे' अशा अर्थी) योद्धे हा शब्द उच्चारतात : 'तोंडानें बोलुनि घे घे।' - संग्रामगीते ७६. [घेणेचे द्वि.]

**घेघेमार** पु. १. निकराचा, नेटाचा, जोराचा एकत्रितपणे प्रयत्न, हल्ला; चोहोकडून अनेकांचा पराकाष्ठेचा प्रयत्न. २. (ल.) हातघाईची लढाई (कारण अशा वेळी घे, घे, मार, मार अशी वीरश्रीची भाषा चालू असते. ३. दाणादाण (क्रि. होणे).

क्रिवि. घाईने; उतावीळपणाने; मागेपुढे न पाहता; विचार न करता.

**घेटा** पु. बोकड; एडका; मेंढा : 'शिकारी संबंधात प्राथमिक व्यवस्था करण्यासाठी पाठवलेल्या अमलदारांस पाडे, घेटे मिळवून देण्यासाठी...'

- सिंहाचे व वाघाचे शिकारीसंबंधी नियम. (बडोदे) [हिं. घे]

**घेटाघेटी** स्त्री. मुलांचा एक खेळ.

**घेटी** स्त्री. बकरी; कोकरू. [गु.]

**घेटु(टो)ळी** स्त्री. (वै.) एक प्रकारची औषधी वनस्पती. हिला पुनर्नवा असे म्हणतात. पांढरी व काळी असे हिचे दोन प्रकार आहेत : 'पोट फुगण्याची व्यथा असणारांनी घेटोळी किंवा खापरीची भाजी खावी.' - निजी ५७.

**घेटो** पु. (राज्य.) १. शहराच्या ज्या भागात ज्यू लोकांना सक्तीने ठेवले जात असे तो भाग किंवा वस्ती. २. कोणत्याही वांशिक किंवा सांस्कृतिक अल्पसंख्याकांना सक्तीने वस्तीसाठी राखून ठेवलेला भाग. [इं.]

**घेणी** स्त्री. १. घेणे; ग्रहण करणे; स्वीकार : 'अहो प्रत्यक्षादि प्रमाणीं। कीजे जयाची घेणी।' - अमृ ७.४२. २. (गंजिफांचा खेळ) दशावतारी गंजिफातील एक पारिभाषिक संज्ञा; ज्या गड्याकडे राजा असून वजीर नसेल त्याचा वजीरवाल्या इसमाकडून डाव घेण्याचा हक्क. ३. (लग्नांत) दुसऱ्या पक्षाकडून घ्यायची रक्कम, जिनसा इ.; करणी, हुंडा. [सं. ग्रह]

**घेणे** सक्रि. १. स्वीकारणे; प्रवेश देणे; अंगीकारणे; आपल्या हातात येईलसा करणे : 'त्यात घेऊं ये तितुकें घ्यावे।' - दास १५.९.३२. २. धरणे; पकडणे; हिसकणे; झोंबाडणे : 'जे घेय हातीं बरवी विपंची।' - सारुह १.२. ३. लागणे बसणे; मिळणे (मार इ.). ४. समाविष्ट, प्रविष्ट, अंतर्भूत करणे; आत येऊ देणे. ५. कवटाळणे; कैवार घेणे; पत्करणे; उचलणे (पक्ष, बाजू, धर्म इ.). ६. कबूल, मान्य करणे; मान्यता, संमती, अनुमोदन देणे; ग्राह्य समजणे. ७. योग्यता, किंमत जाणणे (गुणांची); आदरणे; चांगले लेखणे (गुणांबरोबर उपयोग). ८. हस्तगत करणे; मिळवणे; पैदा करणे; शोधून मिळवून आणणे; संपादन करणे (खबर, बातमी, चाहूल, पायरव). [सं. ग्रह]

**घेणे** सक्रि. १. समजणे; मानणे : 'ये दुजे नाहींचि घेई। सर्वत्र मी गा॥' - ज्ञा १५.४११. २. ऐकणे : 'वाक्य घेऊनि हरुषली आई।'- दावि १६०.

**घेणे** सक्रि. १. मनात आणणे, बाळगणे, ठेवणे (शंका, संशय, तिरस्कार इ.) : 'मागे हांसति गौळणी हरिपुढें ह्या घेतलीसे भ्रमें।' - आकृष्ण ३८. २. आविर्भाव आणणे, पांघरणे; लटके धारण करणे (वेड, सोंग इ.).

**घेणे** सक्रि. १. मुकवणे; हरण करणे; नाश करणे; बुडविणे (प्राण, शील इ.). २. छाटणे; तोडून टाकणे; कापणे.

**घेणे** सक्रि. लागणे; आवश्यकता असणे; खर्ची पाडणे; खपवणे; आटवणे; खाणे (वेळ, स्थळ, शक्ती).

**घेणे** सक्रि. खडकावणे; खडसणे; ठोक देणे; मारणे.

**घेणे** सक्रि. विशिष्ट आचरण, वर्तन, कृती करणे. उदा. शोध, वाद, गाठ, लढाई, माप घेणे.

**घेणे** सक्रि. हाताने देणे; उचलून देणे; जवळ नेणे. ह्या अर्थी नेहमी आज्ञार्थीचा प्रयोग होतो.

**घेणे** सक्रि. जोडणे; मिळविणे; स्वत:वर आणणे; ओढवून घेणे (उपहास, निंदा, मार); विषय होणे (निंदा, मार इ.चा).

**घेणे** सक्रि. पलीकडे जाणे; ओलांडणे (डोंगर, विशिष्ट स्थिती); संपविणे; शेवटास नेणे; सिद्धीस नेणे (प्रवास, मजल इ.).

**घेणे** सक्रि. १. जोडणे; सामील करणे; वाढविणे. २. स्वत:ला जोडणे; जडवून घेणे; लावून घेणे (सवय, खोड, व्यसन).

**घेणे** सक्रि. आणणे; घालणे; माथी मारणे; अंगाला चिकटविणे (आरोप, आळ, बालंट, तुफान).

**घेणे** सक्रि. १. (एखाद्या वस्तूने दुसऱ्या वस्तूचा स्वत:वर) परिणाम होऊ देणे; विकार पावणे; परिणाम लागू करून घेणे. २. जवळ येऊ देणे, पाजणे. (गाईने वासराला)

**घेणे** सक्रि. मारणे; बळी घेणे; नाश करणे.

**घेणे** सक्रि. स्थापणे; ठेवणे; आदराने स्पर्श करणे : 'येऊनि तुजजवळीं। चरण घेतिल तव भाळीं।' - रत्न १७.

**घेणे** अक्रि. जाणे; पळून जाणे; एखाद्याचा आश्रय करणे.

**घेणे** अक्रि. वळणे; कल होणे; एखादी गोष्ट करायला तयार होणे (मन इ. नी) : 'त्यामुळें ह्याचा शब्दश: अर्थ करण्यास आमचे मन घेत नाहीं.' - मसाप २. ११७.

**घेणे** अक्रि. (भय, रोग, मोह इ.कांच्या) ताब्यात जाणे; (ज्वर, भय मोह, दुखणे इ.कांनी) घेरले जाणे; व्यथित होणे : 'आणि तेणें आपुलेपणाचेनि मोहें। तुम्ही संत घेतले असा बहुवें।' - ज्ञा ९. १७.

**घेणे** सक्रि. (बुद्धिबळांचा खेळ) एकाने दुसऱ्याचे मोहरे मारणे. कित्येक वेळी क्रियापदाच्या पुढे घेणे याचे रूप मनसोक्तपणे लावतात. अशा ठिकाणी ते कारक हा क्रियेचा कर्ता आहे असे दाखविते; तर काही ठिकाणी शब्दावर जोर देण्याकरिता त्याचा उपयोग करतात. विशेषत: कर्त्याविषयी जोराने बोलायचे असल्यास क्रियापदाला जोडून घेणे याचा प्रयोग करतात. परंतु सामान्यत: अशा वाक्यरचनेने विशेष अर्थ ध्वनित होत नाही व वाक्य चांगल्या रीतीने पुरे करण्यातच केवळ याचा उपयोग करतात. जसे : - पोराने हात पोळून घेतला. काही वेळा एखादी क्रिया आटोपून, उरकून टाकणे या अर्थी पूर्वकालवाचक धातुसाधितास घेणे हा शब्द जोडतात. उदा. स्नान करून घ्या, मी भात शिजवून घेतो, हे तुम्ही मनावर घ्या. इ.

**घेणे** सक्रि. (घेणे ह्या क्रियापदाचे निरनिराळ्या संबंधात अनेक प्रयोग होतात. उत्पादन-घर-चालीवर-जागा-शेवट-तोंडीवर-त्वरेवर-घाव-परीक्षा-पाठ-रान इ. अनेक शब्दांना जोडून घेणे या क्रियापदाचा होतो. त्याचप्रमाणे देणे, टाकणे, मारणे, घालणे व पाडणे या धातूंप्रमाणे अनेक धातुसाधितांना जोडूनही घेणे शब्दाचा प्रयोग करतात. उदा. आटोपता घेणे, आखडता घेणे, काढता घेणे. श्वास, रजा, सूड इ. शब्दांना जोडूनही घेणे या क्रियापदाचा उपयोग होतो. शिवाय उपयोग करणे, गिळणे, सहन करणे, सोसणे (रोग, व्यसन इ.) जडवून घेणे इ. अनेक अर्थ होतात.

**घेणे** न. लूट : '... तह केला कीं जे घेणे येईल. त्यात पायींच्याचा येक विभाग व स्वारांचे दोन विभाग.' - पे ३३.१३२.

**घेणे** न. उसनी दिलेली, परत यायची रक्कम, प्राप्ती, पहा : **घेणे देणे**

**घेणेकरी-दार** वि. १. सावकार; धनको; कर्जदार. २. काही काम न करता पोटभर खाण्यास मिळण्याचा हक्क सांगणारा (नातलग, आजारी नोकर).

**घे-दे** स्त्री. १. अटी तटीचे भांडण; हातघाई : 'ऐसी घे-दे होताए।' -

लीचउ १२६.२. २. शाब्दिक झटापट : 'पंडित केसोबास... सकाळींचि घे-दे म्हणौनि थोरें जिज्ञासा करी होते.' - स्मृस्थ १२४.

**घेणेदेणे** न. १. उसने देणे व घेणे; देवघेव; परस्पर व्यवहार (एखाद्याशी करण्याचा) : 'मग सुखानुभूतीचीं घेणीं देणीं। मंदावो लागली॥' - ज्ञा १६.१२. २. व्यापार; दळणवळण; उदीम.

**घेतणे** सक्रि. स्वीकारणे; पत्करणे. [सं.ग्रह]

**घेता-धा** वि. घेणारा : 'जे मुकुटचि वृथा नटति घेते।' - मोआश्रम ४.२४.

**घेतादेता** वि. १. नेहमी पैसे उसनवार, कर्जाऊ घेऊन वेळच्या वेळी फेडणारा; कर्जाच्या बाबतीत चोख व्यवहार करणारा; नेहमीचे गिऱ्हाईक. २. (यावरून) शेजारधर्माचे दळणवळण ठेवण्याचा स्वभाव असणारा.

**घेतादेता** क्रिवि. (व्यापारात) शेवटी नक्की ठरवण्याच्या वेळी; देवघेवीच्या रदबदलीच्या शेवटी; प्रत्यक्ष देवघेवीच्या वेळी; किंमत ठरवून खरेदी करायच्या वेळी.

**घेतावणा** वि. घेण्याकडेच प्रवृत्ती असलेला.

**घेते** न. अंत:करण.

**घेपणे** सक्रि. (कर्मणी) घेणे; ग्रहण करणे : 'तंव आपुलिये पळीं हात। घेपतिही।' - अमृ २.१८. [सं. गृभ्] अक्रि.घेतले, ग्रासले जाणे; वेढले जाणे : 'तो कामनामात्रें न घेपे।' - ज्ञा ३.७१.

**घेपाट** पु. (एखाद्या गोष्टीसाठी एखाद्याचा) हट्ट; एकसारखे पाठीस लागणे. (क्रि. घेणे.) (व.)

**घेपु(पो)देपु (पो)** पु. १. ज्यापासून काही लाभ नाही असे उसनवार घेणे - देणे; बिनव्याजाने पैसे देणे : 'सट्टाबट्टा करिसी गड्या रे घेपुदेपु नाना।' - देप २१३. २. (सामा.) फिरून फिरून केलेली व त्रासदायक अशी देवघेव.

**घेमार** पहा : **घेघेमार** : 'घेमार सुरू जे झाली।' - संग्रामगीते १३५.

**घेमारगर्दी** स्त्री. घनचक्कर; अतिशय गडबड : 'पण अशा घेमारगर्दीत तसें करण्यास फारच थोडी सवड सांपडते.' - पार्ल १००.

**घेमारि** स्त्री. 'घे' आणि 'मारी' - या दोन रणगर्जनांचे मीलन : 'घेमारि भूतावळी।' - गरा १०४.

**घेर-रा** पु. १. एखाद्या वस्तूच्या एका बिंदूपासून निघून तिच्याभोवती फिरत पुन्हा त्याच बिंदूला येईपर्यंत होणारे तिचे अंतर. २. परिघ; फेर; वेढा; मंडल. ३. (अंगरखा इ. वस्त्रांचा) घोळ, पालव, झोळ, पदर. ४. शेंडीभोवती राखलेले केसांचे वर्तुळ; संजाब. ५. कुंपण; वई; आवार. ६. विळखा; पकड. [सं.ग्रह, हिं.](वा.) **घेरात घेणे** - जाळ्यात धरणे; भुरळ घालणे : 'त्याच्या घरी राहून अंजीने त्याला घेरात घेतले होते.' - बनगर १०९.

**घेरणी** वि. आकाशात मंडले करणारी, घेरे घालणारी कबुतरांची एक जात: 'पत्रें सादर जाती त्यांत आज्ञा कीं घेरणी खबुतरे खामखा मेलवून पाठविणें.' - पेद २८.२५.

**घेरणी** स्त्री. वेढा; विळखा; घेरा : 'कालभुजगाविआं घेरणी। तैसिआ दिठीं डंकिती कामिनी।' - दाव ४४९.

**घेरणे** उक्रि.१.सर्व बाजूंनी वेढा देणे; वेष्टणे; गराडा घालणे : २. (एखाद्याला) संकटात गोवणे; पेचात आणणे; कचाटीत पकडणे : 'हा कोण घुटमळतो आहे येथे? स्वारीत घेरलें पाहिजे.' - पुण्यप्रभाव. ३. (ताप, भूक, झोप इ.नी) पछाडणे, व्याकूळ करणे, ग्रासणे. [सं. घिर्]

**घेरदार** वि. १. मोठा घेर, परीघ असलेला. २. मोठा घोळ, संजाब, फेर असलेला (अंगरखा इ.) : 'बारा हजारांना केसरी झगा। घेरदार बारा हजार।' - ऐपो ४४. ३. मोठा घेरा असलेली (शेंडी).

**घेरना** पु. भोवरा; आवर्त.

**घेरविणे** सक्रि. (कित्ता, वळण, अक्षरे इ.) कोरड्या लेखणीने गिरविणे; वळविणे; कित्त्यावरून लेखणी फिरविणे.

**घेरा** पु. पहा : **घेर.** १. डोंगरी किल्ल्याच्या भोवतालचा तीन चार कोस घेराचा प्रदेश, प्रांत. २. एक वाद्यविशेष. हे मोठ्या डफासारखे असते. [सं. ग्रह]

**घेरा** पु. पेच; गोता; अडचण; कचाटी.

**घेरा** पु. तीराचा एक प्रकार. याचे पाते रुंद असते.

**घेराओ** पहा : **घेराव**

**घेराघेरी, घेरघर** स्त्री. १. गनिमी लढाई. २. वेढा : 'मोगल फौजा चहूकडून उतरऊन घेराघर केला आहे.'- पेद २०.८६. (क्रि. करणे.) [घेरणेचे द्वि.]

**घेराव** पु. असंतुष्ट कामगार, नोकर, विद्यार्थी इत्यादिकांनी आपल्या तक्रारींचा विचार व्हावा म्हणून अधिकारी, अध्यापक इत्यादींभोवती जमा होऊन त्यांना वेढा घालणे, इकडेतिकडे जाऊ न देणे : 'प्रिन्सिपॉल, व्हाइस चॅन्सेलरला घेराव करा.' - पेआ १६५.

**घेराव** पु. समुदाय; घेर; दाटी : 'चीड व देवदाराच्या भव्य वृक्षांचा घेरावा अनुपम छाया विस्तारीत होता.' - हिप्र ७०.

**घेरी** स्त्री. चक्कर; भोवळ; मूर्च्छा; भोवंड; अंधेरी; झीट. (क्रि. येणे.)

**घेरी** स्त्री. मोठा डफ : 'घेरी वैरिविदारणा।' - गरा १०२.

**घेरू** पु. १. किडलेल्या लाकडातून पडणारे भूस. पहा : **घरू** २. न झाडलेल्या भिंतीवर, छपरावर लागलेली कोळिष्टके, जळमटे; घेरोसा. (को.)

**घेरेदार, घेरेबाज** वि. गोल; मोठा घेर असणारा; मोठा वाटोळा आकार असलेला. 'त्याहून काकणभर अधिक खबरदारी असल्या घेरेबाज पगडीवाल्यास घ्यावी लागते.' - आलेसं २५५.

**घेरोसा** पु. : पहा : **घेरू** २, **घरोसा**

**घेऱ्या** पु. सुतळी तयार करताना तिला पीळ देणारा मनुष्य.

**घेलगटणे** सक्रि. गांगरून टाकणे; गोंधळात टाकणे : 'शंभर जणांनी शंभर प्रश्न विचारून त्याला घेलगटलं.' - वळीव ७४.

**घेलचोद्या** वि. (अशिष्ट) मूर्ख; मठ्ठ; घोडचुका करणारा; अशुद्धाळ; विसराळू; निष्काळजी; वेडझवा. (को.)

**घेलाशेट** पु. (उप.) १. अति हव्यास असलेला मूर्ख, चिवट मनुष्य. २. उलाढाल्या व्यापारी. ३. अर्धवट, बावळट मनुष्य. [सं. गृहीत]

**घेव** पु. (एखाद्यापासून) घ्यायचा, यायचा जिन्नस, पैसा इ. घेणे. (कु.)

**घेव** वि. घेण्याजोगे : 'घेव ये तेंचि घ्यावें। घेव न ये तें सांडावें।' - दास ११.४.२४.

**घेवडा** पु. १. एक वेल. याला वालाचा वेल असेही म्हणतात. २. (सामा.) या वेलाची शेंग. हिला घेवडी, घेंगडी असेही म्हणतात. याच्या पांढरा,

पिवळा, काळा, चवधारी, बोट-घेवडा व गर्वा-घेवडा अशा जाती आहेत. शेंगांची व दाण्यांची भाजी करतात. [सं. गर्वा]

**घेवडी** स्त्री. १. घेवड्याचा वेल; शेंग; दाणा. २. घेवडी मुंगी.

**घेवडे** न. घेवड्याची शेंग. (कु.)

**घेवणी** स्त्री. घेणी; घेणे; येणे. (चि.)

**घेवदेव, घेवादेवा-वी** स्त्री. पु. १ व्यापारधंदा; उदीम. २. देवघेव; घेणे-देणे इ. चा व्यवहार; दळणवळण.

**घेवपत धंदा, व्यापार, व्यवहार, उदीम** नावापुरते भांडवल असून बहुतेक पतीवर चालवलेला धंदा, व्यापार.

**घेवबा** वि. दुसऱ्यापासून नेहमी घेण्याचा स्वभाव असलेला.

**घेवाणनोंद** स्त्री. (ग्रंथ.) वाचकांकडून पुस्तक परत आल्यानंतर त्याची ग्रंथालयाच्या दप्तरात करावयाची नोंद.

**घेवाणदेवाण** स्त्री. (संक्रांतप्रसंगी सुवासिनी स्त्रिया परस्परांना वाण (वायन) देतात-घेतात त्यावरून). १. आपसांतले (उसने) देणे-घेणे; देवघेव. २. पैशाचा व्यवहार. ३. (मेजवानी, लाभ, नुकसानी, भेट, आहेर इत्यादिकांची) परत फेड; परत करणे; प्रतिक्रिया.

**घेवाणे, घेवाई जाणे** क्रि. १. भूतबाधा होणे. २. वश होणे, कह्यात येणे. ३. परिस्थितीने गांजणे.

**घेवारी** पु. १. घाऊक माल घेऊन किरकोळीने विकणारा; केवट्या, डाळपिठ्या, हिंगमिऱ्या वाणी. २. (प्रां.) बागेतील निपज, पैदास, माळवे विकत घेऊन बाजारात किरकोळीने विकणारा व्यापारी.

**घेवासे** क्रिवि. घेता येण्यासारखे. (राजा.)

**घेंगडी-री, घेडी, घेडीमुंगी, घेडा** स्त्री. पु. एका जातीची तांबडी व आकाराने मोठी असलेली चावरी मुंगी; घेवडी, चाचड. या मुंग्या समुदायाने राहतात.

**घेंगशा** पु. गोंधळ; घासाघीस : 'आजपावेतों घेंगशातच काल व्यतीत होतो, काम कांहींच होत नाहीं.' - माशियांका २८८.

**घेंगा** स्त्री. मसाल्याची पातळ भाजी (शेव वा पातवड्या सह). (अहि.)

**घेंगा (घा) वणे** अक्रि. १. (एखाद्यावर) कडकडणे; जळफळणे; तोंड सोडणे; चवताळणे. २. गर्दीमुळे रंजीस येणे; (कामाच्या निकडीमुळे) बेजार होणे.

**घैर(रा)व** पु. घेरू; कोलिष्टक; कोलिंजन; जळमट. (गो. कु. हेट.) पहा : **घेरोसा**

**घैलटचाली** स्त्री. हेकेखोरपणा; वेडगळपणा; घैलटपणा. (को.)

**घैलाट-ड, घैशा-स** वि. मूर्ख व हेकेखोर; हट्टी; अगदी वेडगळ; अजागळ व आळशी; स्वच्छंदी व मठ्ठ. (को.)

**घैसास** वि. वृत्तिदर्शक पदवी.

**घैंचा** पु. तांबड्या देठाची शेवरी.

**घो** वि. घाबरलेला, हुल्ला. - (तंजा.)

**घो, घोऊश, घोव** पु. १. नवरा. २. पुरुष. (राजा. को. बे. गो.) पहा : **गोहो**

**घोईन्द्र** नपु. आक्रोश; धडपड. (व.)

**घोक** पु. १. पाठांतर; घोष; गजर : 'सांगितलें संतीं करा नामाचा घोक।' - निगा २३५. २. घोकणी; चिंता, काळजी. (क्रि. घेणे.)[सं. घोष]

**घोककाम्या** वि. अर्थाकडे लक्ष न देता, संदर्भ लक्षात न घेता घोकंपट्टी करणारा (विद्यार्थी); दुसऱ्याच्या सांगण्याचा हेतू, मर्म लक्षात न घेता सांगण्याप्रमाणे अक्षरशः चालणारा.

**घोकणी-नी** स्त्री १. (एखादी गोष्ट लक्षात राहावी म्हणून) पुनः पुन्हा घोकण्याची क्रिया; आवृत्ती. (क्रि. करणे, घेणे, गाणे.) : 'अजुनि तरि करि ही घोकणी।' - राला ८८. २. त्याच त्याच गोष्टीचा पुनःपुन्हा उच्चार, निदिध्यास; एकच गोष्ट धरून बसणे; आपली इच्छा, हेतू पुन्हा पुन्हा सांगणे. (क्रि. घेणे, लावणे, करणे, लागणे, मांडणे, धरणे.) : 'सुख असल्यावर दिनासारिखे कां भोंति फिरते। घोकण्या करिते।' - सला २०. ३. झुरणी; खंत; खेद. (अहि.) [सं. घुष्]

**घोक (ख) णे,** सक्रि. १. पुनः पुन्हा म्हणून पाठ करणे; घोष करणे; पाठ म्हणणे : 'आम्ही अहर्निशीं नाम घोकूं।' - रामदास स्फुट अभंग ४७ (नवनीत १५४). २. (एखाद्या गोष्टीची) जपमाळ घेणे; घोष लावणे; वारंवार सांगणे, उच्चारणे. [सं. घुष् - घोषण]

**घोकमळ** वि. अतिशय पातळ; पाणचट (सांबार, कॉफी इ.). (गो.)

**घोकरणे** अक्रि. घों घों करणे. [ध्व. सं. घुक्]

**घोकरी** क्रिवि. घोंघों आवाज करीत : 'आणि कृष्णार्जुनांचे बोलणें। घोकरि आलें श्रवणें।' - राज्ञा ९.५२६.

**घोकंपट्टी** स्त्री. घोकण्याची क्रिया. पहा : **घोकणी** १. (क्रि. करणे.) : 'दुसऱ्या इयत्तेत फळ्यावरील शब्द मुलांनी आपल्या वहींत उतरून घेऊं नयेत, कारण या योगानें घोकंपट्टी करण्याची सवय मुलांना लागते.' - अध्यापन ७४. २. अर्थ न समजता केलेले पाठांतर.

**घोकाणी** स्त्री. चिंता : 'घोरि पडली घोकाणि। मनामाजि॥' - क्रिस्त ५.२७.

**घोकीव** वि. १. पाठ केलेला; घोकलेला (धडा इ.). २. स्मरणात, ध्यानात पक्का ठेवलेला; मनात पक्का ठसलेला.

**घोकीव, घोक्या** वि. १. समजून न घेता, ध्यानात न ठेवता निव्वळ घोकंपट्टी करणारा; मंद (विद्यार्थी). २. पोपटपंची करणारा; घोकूनच फक्त ध्यानात ठेवणारा. ३. कोणत्या वेळी काय बोलायचे हे पढविलेला; लाच घेऊन बनावट साक्ष देणारा (साक्षीदार इ.).

**घोके** बुक्या. -(तंजा.)

**घोगन** पु. दृष्टी, डोळे. (झाडी)

**घोगर** न. मोठे घुंगरू. (ना.)

**घोगर** पु. एक वृक्ष. याच्या पानांचे पात्र श्राद्धाला वाढतात. (झाडी)

**घोगरा, घोग्रा** पु. एक प्रकारचा नदीतील मासा.

**घोग(घ)रा** वि. १. फुटक्या मडक्याच्या ध्वनीप्रमाणे, म्हशीच्या ओरडण्यासारखा असलेला (आवाज); बसलेला, फुटलेला, पिचका (आवाज, कंठ). २. फुटलेल्या, पिचक्या, चिरक्या, बसलेल्या आवाजाचा (मनुष्य). ३. भरड; ज्यातला कंप कोरडा, तुटक व अपुरा वाटतो असा (आवाज). [सं. घर्घर]

**घोगरी** स्त्री. घुंगूर : 'पाई घालिती घोगऱ्या।' - जसा १०२.

**घोगला** पु. १. फोड. २. घट्टा. ३. भाजल्याने, देवीने येतो तसा फोड : 'दळणकांडणानें आले हाताला घोगले।' - लोसामा ५.२८७.

**घोगला** वि. पोकळ; पोखरलेला (दाणा इ.).

**घोगली** वि. पोचट; पोकळ : 'पेरण्याकरितां सरकी चांगल्या कापसाची, ज्यात घोगली सरकी कमी आहे अशी घ्यावी.' - महाराष्ट्रकृषीवल २४ ऑगस्ट १९३०.

**घोगवरी, घोगारी** पु.१. कोळी भंडाऱ्यासारखी एक जात. २. मराठ्यांच्या आरमारातील एक लढाऊ जात : 'मराठे व घोगारी व थोडेसे आरब सिद्दी ऐसे आहेत..' - पेद १६.७८.

**घोगा** पु. ओरड; गिल्ला; आरडाओरडा : 'जलद चला ऐसा घोगा करूं लागते.' - मदरू २.२७ [फा.]

**घोगा** वि. मोठा; प्रसिद्ध : 'तुका म्हणे आम्हाजोगें। विठ्ठल घोगे खरे माप।' - तुगा १७९८.

**घोगार, घोगारणे** पहा : **घोंगाड, घोंगाडणे**

**घोगी** पु. नरडे. (अहि.)

**घो(घों)गे-घे, घोघा-वे** क्रिवि. १. घों घों आवाज करीत. २. (ल.) जलदीने; सत्वर : 'पैं सरितेचेनि ओघें। सिंधुजळा मीनलें घोघें।' - ज्ञा ८.८४.

**घोगोला :** पु. एक जलचर; कासव. (झाडी) [हिं.]

**घोग्या** वि. वेडगळ; साधा; सरळ; बावळट; कोणाकडूनही सहज फसविला जाणारा. (व.) [हिं. घोंगा = मूर्ख मनुष्य]

**घो(घों) घाट-ण** पु. १. समुद्र, नदी, वारा इत्यादिकांचा घों घों असा आवाज. पहा : **घोंगाट.** (क्रि. घालणे.) २. भुंगे, माशा इत्यादिकांचा गुणगुणाट. ३. गलबला; गिल्ला; हुल्लड; हाकाटी; कलकलाट. (क्रि. करणे, मांडणे, घालणे.) ४. (ल.) गाजावाजा; गवगवा; परिस्फोट; डंका वाजणे. (क्रि. करणे.)

**घोघावणे, घोघेणे** अक्रि. (समुद्र, वारा इ. कांनी) घों घों असा आवाज करणे, गर्जणे. (राजा.) [ध्व.]

**घोघे** न. १. घबाड; डबोले; आकस्मिक सापडलेला ठेवा, झालेला लाभ: 'तें एक मोठें घोघें सांपडलें.' - विवि १०.५.१२४.
वि. मोठे.

**घो घो** १. समुद्र, वारा, नदीचा प्रवाह, पूर इत्यादिकांचा आवाज, गर्जना : 'घो घो शब्दें पूर चालला।' - नगंर (नवनीत ४२५). २. एखाद्या पदार्थाभोवती जमणाऱ्या माशांच्या थव्याचा आवाज. ३. धवधबा. (गो.) क्रिवि १. प्रचंड लाटा, सोसाट्याचा वारा, मुसळधार पाऊस यांच्या गर्जनेप्रमाणे आवाज करीत, होत. २. (मनुष्यांच्या घोळक्याच्या) गोंगाटाच्या, गलबल्याच्या, गलक्याच्या आवाजाप्रमाणे; खूप खेचाखेचीने; (माणसे इ.कांनी) गजबजत; पेव फुटल्याप्रमाणे घोंगावत. पहा : **घवघवा, घवघव** [ध्व.]

**घोघ्या** वि. घो घो करणारा; घोघावणारा.

**घोट** पु. (पाणी इ. द्रव पदार्थ) गिळण्याचे एक वेळेचे परिमाण; घुटका; चूळ : 'बहु उग्र गमे घेतां गरळाचा जेंवि घोट कामारी।' - मोभीष्म ८.४१ (क्रि. घेणे.) (वा.) **नरडीचा घोट घेणे, करणे, भरणे, काढणे -** (एखाद्याचा घोट करणे, गिळणे) अतिशय छळून, गांजून हैराण करणे; प्राण घेणे; ठार मारणे : 'तें घोंट भरूं धांवसी। देखतांचि घेसी जिवें त्यातें।' - एभा ५.२.

**घोट, घोटक** पुन. १. घोडा, अश्व : 'निजकरें तव स्पंदन घोटकां। धरिन मी करिं शत्रू सघोट कां।' - वामन विराट ६. १११. २. (बुद्धिबळात) घोडा या नावाचे मोहरे. [सं.]

**घोटखोर** पु. १. पाणबुड्या. २. दक्षिणेतील काही मराठा संस्थानात गावचा पाणबुड्या हा एक सरकारी नोकर म्हणून समजला जात असे. विहिरीत, तळ्यात पडलेल्या जिनसा काढून देणे हे ह्याचे काम असे.

**घोटणी** स्त्री. १. घोटण्याची क्रिया. २. (सोनारी) सोन्याचे मणी घोटण्याची, सारखे करण्याची आवटी; घोटण्याचे हत्यार, साधन. ३. कटकट; घासाघीस; जिगजिग. (ना.)

**घोटणे** न. घोटण्याचे उपकरण; घोटणी; घोटा.

**घोटणे** उक्रि. १. गिळणे : 'अगस्ती धांवे समुद्र घोटुं।' - मुसभा ७.१८. २. (ल.) सहन करणे; भोगणे (दुःख, अपमान) : 'मुनि त्या अपमानातें घोटी जेविं त्रिलोचन गरातें।' - मोआदि २२.७.

**घोटणे** उक्रि. १. (कागद इ.) गुळगुळीत करण्याकरिता (कवडा इ.) कठीण व गुळगुळीत पदार्थाने घासणे. २. चुरडणे; खलात घालून बारीक करणे; वाटणे; उगाळून बारीक करणे; गरगटणे. ३. नीट मिश्रण होण्याकरिता हलवणे; ढवळणे; मळणे; खलणे. ४. (श्लोक, धडा इ.) पाठ करून पक्का करणे; घोटवणे; (अक्षरे, वळण) घटवणे, वळवणे. [सं. घृष्]

**घोटणे** अक्रि. बाहेर पडणे; गळ्यातून स्पष्ट होणे (आवाज वगैरे) : 'त्यांचा आवाज त्यांना घोटेना.' - उअं १९.

**घोटभर** वि. एका घोटात मावेलएवढा पातळ पदार्थ (पाणी, दूध वगैरे).

**घोटमाळणे** अक्रि. एकाच जागी थांबणे; घुटमळणे : 'धूर घोटमाळून जेवणघरच धुमसल्यागत झालं होतं.' - चिताक १०.

**घोटर घाटर** क्रिवि. कोरडे - वाटणे. (झाडी)

**घोटवाल** पु. वालाची एक जात. याची शेंग चापट व लहान असून दाणा वाटोळा करवंदासारखा असतो.

**घोट सुपारी** झाडावरच्या झाडावर वाळून तयार झालेली सुपारी.

**घोटा** पु. १. पायाची नळी व चवडा यांच्यामधील सांध्याचे वर आलेले हाड. २. दोन्ही घोट्यांवर मारलेला आडवा वार.

**घोटा** पु. वेलदोडे, बदाम इ. मसाल्याच्या पदार्थांसह घोटून केलेले भांगेचे मादक पेय : 'ब्राह्मणांचें तीर्थ घेतां त्रास मोठा। प्रेमें घेतो घोटा घटाघटां।' - तुगा ४३३४. [सं.घृष्ट]

**घोटा** पु. १. दागिने घोटण्याचे, झिलई देण्याचे एक साधन. हे गार किंवा एखादा दगड मुठीत बसवून केलेले असते. पहा : **घोटणी**. २. लाकडी लाठ्या, मुसळ, बत्ता.

**घोटाळणी** स्त्री. १. इकडेतिकडे भटकणे, भ्रमणे; भटक्या मारणे. २. घिरट्या घालणे; घुटमळणे; घोटाळणे. [सं.घुट्]

**घोटा(ट)ळणे** अक्रि. १. (गुंतागुंतीच्या मार्गात, चक्रव्यूहात) इकडेतिकडे, मागेपुढे फिरणे, भ्रमणे. २. वळणे; तोंड फिरविणे; दिशा बदलत फिरणे; गरगर फिरवणे; घुटमळणे. ३. (गवताच्या काड्या, केरकचरा इ. वाऱ्याच्या झोताबरोबर) इतस्ततः उडणे; गरगर फिरत राहणे. ४. (नदी इ.) वळणावळणांनी वाहत जाणे; भोवरे करीत वाहणे. ५. (मन इ.) गोंधळून जाणे, घोटाळ्यात पडणे; दिङ्मूढ होणे; बावरणे; गडबडून जाणे; गुंतणे.

६. घोटणे : '(नारळ) खडी सारुनि घोटाळिला होता.' - लीचउ ३०९. सक्रि. गोंधळून टाकणे; गुंतवणे; बुचकळ्यात पाडणे; घुटमळायला लावणे : 'जातो परी तव मोहनी। घोटाळीत आहे प्राणालागुनी।' - नव २१.४९.

**घोटाळणे** सक्रि. १. घाटणे; घोटविणे; घोटून गुळगुळीत व टणक करणे (जमीन, भिंत इ.) : 'चीत्र लीहावेयाची आईती केली। नीट भींती कापडीली। घडी सारूनी घोटाळली। वर्ते षडी मेळवीली।' - उषा २८.१३. २. कित्यातील अक्षरांवरून कोरडी लेखणी फिरवून अक्षरे गिरवणे, घटविणे, वळविणे.

**घोटाळा** पु. १. (कामे, हिशेब, वस्तू इत्यादिकांचा) गोंधळ; अस्ताव्यस्त स्थिती; गळ्हाटा; गुंतागुंत; गोलंकार; खिचडी.

**घोटाळा** पु. १. लोळघोळ; अफरातफर. २. (वारा, पाणी, गवताच्या काड्या, धूळ इत्यादिकांची) गिरक्या, घिरट्या, वळणे घेत जाण्याची स्थिती; गरगरा फिरणे; भ्रमण करणे. ३. (मनाची) गोंधळून, बावरून, दिङ्मूढ झालेली अवस्था; मनाचा गोंधळ. ४. नागमोडीची, वेडीवाकडी जागा, स्थळ; गुंतागुंतीचे काम. ५. (वाऱ्याने) दिशा, रोख बदलणे; घोटाळणे. ६. एकंकार; गोलंकार. [सं. घुट्]

**घोटाळा-ळे** पु. न. कागद घोटण्याचा कवडा, घोटा; घोटकवडा : 'सुऱ्या कातऱ्या जागाईत। खळी घोंटाळें तागाईत।' - दास १९.१०.१५.

**घोटी** स्त्री. बोरासारखं पण कठीण फळे येणारे काटेरी झाड. [सं. घोटा]

**घोटी** स्त्री. १. लहान आकाराचा आंबा; गोटी (ना. व.) २. लहान आकाराचा दगड : 'घोटी ऐसी फोडी होती.' - लीचपू ४४६.

**घोटी** स्त्री. घोकंपट्टी. (क्रि. मारणे.)

**घोटी** स्त्री. फणसाच्या गऱ्यातील बी; अठळी : 'मग फणसाच्या उकडलेल्या घोट्यांची रोवळी तिने मध्ये ठेवली.' - चक्र ४३.

**घोटी** स्त्री. गाईची कास.

**घोटी** स्त्री. धोतराचा पदर कनवटीला खोवून किंवा लंगोटाची लोंबती धांदोटी वर करून खोवली असता होणारा घोळ.

**घोटी(ट्र)क** पु. एका जातीचे झाड व ज्याचे फळ. पहा : **घोटी** (गो.)

**घोटीझेला** पु. गोटी, आंबे झाडावरून काढायची झेलणी, आकडी.

**घोटी(टे)र** पु. पक्ष्याचे घरटे.

**घोटीव** वि. १. घोटलेले; घोटून घोटून, घासून गुळगुळीत केलेले. २. उजाळा दिलेले; चकचकीत केलेले : 'पंधरेयाची चोखडी। घोंटीव जैशी॥' - ज्ञा ६.२२४. ३. चांगले वळवलेले, मेहनत घेऊन काढलेले (अक्षर). ४. ठरावीक; ठरीव; विवक्षित; नेहमीच्या प्रचारातील : 'इतर लोक नव्या-जुन्या पद्धतीच्या घोटीव शिव्या देऊन वेळ मारून नेत असतील.' - विक्षिप्त १.५६.

**घोटू** पु. घोटून केलेला पदार्थ; घोटा : 'स्वानंद रसाळ फळ घोटु।' - भारा बाल १.१७.

**घोटे** न. गुरांना औषध इ. पाजण्याचे नळकांडे, नळी. (राजा.).

**घोटेस्नान** न. १. फक्त घोटे, पाय धुणे. २. (ल.) थोडक्यात आवरणारे स्नान.

**घोट्या** पु. १. जड्याचे, दागिने इ. घोटण्याचे उपकरण. पहा : **घोटणी**. २. गवंड्याचे गिलावा गुळगुळीत करण्याचे हत्यार, साधन.

वि. १. अभ्यास घोटणारा, पाठ करणारा; नुसताच पाठांतरावर भर देणारा; मंदबुद्धी; ढोर मेहनती. २. एकसारखे घोकणे; पाठ करणे; मोठ्याने बारंवार म्हणणे.

**घोडकट, घोडके** न. (घोड्याला तिरस्काराने लावायचा हा शब्द) रोडके, अशक्त, मरतुकडे घोडे.

**घोडका** पु. मोतद्दार; घोड्याची काळजी घेणारा; सैस.

**घोडकुदळ** पु. (उप.) मुंजीचे वय झालेले असून मुंज न झालेला मुलगा; घोडमुंजा.

**घोडकुदळ** स्त्री. (उप.) उपवर असून लग्न न झालेली दांडगट, नाचरी मुलगी.

**घोडकूल** न. १. लहान घोडे; तद्ध. (गो.) २. ओट्याच्या खांबावर तिरपा टेकू (करण) देऊन त्यावर कोरलेली घोड्याची आकृती. (खा.)

**घोडके-का** न. १. पु. ज्याच्या भरीला करळ्या व तरसे घालून गाड्याची तक्तपोशी, बैठक तयार करतात अशी चौकटीतील दोन बाजूंची दोन उभी लांब लाकडे. २. तेल्याच्या घाण्याच्या कातरीला खिळलेले व जुवाचा दोर बांधायचे लाकूड.

**घोडके** पु. ढोर जमातीचा गुरू.

**घोडकेळ** न. हलक्या जातीचे एक भसाडे केळ.

**घोडकोस** पु. तीन मैलांचा कोस.

**घोडक्या-का** पु. १. घोड्याचा खिदमतगार; घोड्याची देखभाल करणारा; मोतद्दार : 'घोड्यास शिपाई काय करील घोडका।' - ऐपो ३७२. २. चाबूकस्वार; अश्वशिक्षक.

**घोडगा-गी** पु. स्त्री. (उप.) वयाने प्रौढ पण पोरकटपणा, नाचरेपणा अंगी असलेला मुलगा, मुलगी; मूर्ख व ठोंब्या असा वयस्क मुलगा.

**घोड (डे) गाठ** स्त्री. (बुद्धिबळांचा खेळ) एकमेकांच्या रक्षणासाठी खडी असलेली घोड्याची दुकल.

**घोडचवड** स्त्री. घोडदौड; घोडा चौफेर उडविणे; चवडचाल : 'घोडचवडीखाली नाना पुण्याला आला.' - ऐपो १६२.

**घोडचाल** स्त्री. १. घोड्याची चाल. २. (ल.) जलद चाल.

**घोड(डे)चिलट** न. मोठे चिलट; डास; मच्छर.

**घोडचूक** स्त्री. मोठी व अक्षम्य चूक; ढळढळीत चूक.

**घोडचोट्या** वि. (अश्लील) घोड्याच्या चोटासारखा मोठा चोट असलेला (मनुष्य).

**घोडजावई** पु. (उप.) मोठ्या वयाचा नवरामुलगा; घोडनवरा.

**घोडजाळी** स्त्री. (भोवऱ्यांचा खेळ) विरुद्ध पक्षाच्या भोवऱ्याला खोचा देऊन आपला भोवरा दूर जाऊन फिरत राहील अशा रीतीने भोवरा फेकण्याचा प्रकार.

**घोडतोंड्या** वि. घोड्याच्या तोंडासारखा लांबट चेहरा असलेला; कुरूप; लांबट, ओबडधोबड चेहऱ्याचा.

**घोडदौड** स्त्री. १. घोड्यासारखे पळणे; घोड्याचे धावणे; अतिशय वेगाने जाणे. २. (ल.) अतिशय जलद प्रगती : 'युद्धपरिस्थिती गंभीर. जर्मनांची सर्वत्र घौडदौड.' - लव्हाळी ६७. ३. शर्यतीचे घोडे ज्या वर्तुळाकार मार्गावरून धावतात तो मार्ग : 'मुधोळकडे असताना आम्ही घोडदौडी

(रेसकोर्स) कडे कधीकधी फिरावयास जात असू.' - स्मरण ३३९.

**घोडनट** न. ज्याचे एक तोंड आढ्यावर व एक लगीवर येऊन दरम्यान तिरपे राहते, असे ठोकतात ते लाकूड.

**घोडनवरा** पहा : **घोडजावई.** [क. गुडग = लठ्ठ, होडग = मुलगा.]

**घोड(डे)नवरी, घोडवळ** पहा : **घोडकुदळ** स्त्री. 'हे मोठमोठ्या घोडनवऱ्या घरात बाळगल्याचे परिणाम बरं !'-झांमू. [क.]

**घोडनील** पु. १. नीलगाय. २. एक शिवी. (झाडी)

**घोड(डे)पाळणा** पु. घोड्याला (लाकडी चौकटीला) टांगलेला पाळणा; हलग्यांना न टांगता जमिनीवर घोड्याला अडकवलेला पाळण्याचा एक प्रकार; पाळणा टांगण्यासाठी एका आडव्या लाकडाला चार पाय लावून करतात ती रचना; घोडी.

**घोडपिंपळी** स्त्री. मोठ्या जातीची पिंपळी.

**घोडपुत्र** पु. घोड्याला (विशेषतः बुद्धिबळातील घोड्याला) प्रेमाने किंवा प्रतिष्ठेने संबोधण्याचा शब्द.

**घोडपेटे,घोडे** न. १. दोन भोपळे पुढे व दोन भोपळे मागे असे बांधून केलेला तराफा; रहाटगाडग्याचे कोळवे जिच्यावर ठेवतात ती लाकडी चौकट. २. भोपळ्यावर दोन्ही बाजूंना पाय टाकून, घोड्यावर बसल्यासारखे बसून पाण्यावर तरंगणे.

**घोडबच्य** न. दुबळा घोडा पुष्ट होण्यासाठी एक औषध : 'घोडबच्य पावशेर, राई पावशेर भाजलेली काळीं मिरें पावशेर... मिश्रणापैकीं आतपाव दररोज देत जावें.' - अश्वप १.१७५.

**घोडबाव, घोडविहीर** स्त्री. घोड्यांना पाणी पिता येईल अशा तऱ्हेने बांधलेली विहीर.

**घोडबाही** स्त्री. १. दाराच्या दुहेरी चौकटीच्या आतल्या चौकटीतील दोन्ही बाजूचे खांब. २. खटाऱ्याच्या बैठकीच्या चौकटीच्या दोन बाजूंची लांब लाकडे. पहा : **घोडके, घोडे**

**घोडबाळ** वि. (उप.) पोरकट चाळे करणारा प्रौढ पुरुष, स्त्री; पोरकट माणूस.

**घोडमल्ली, घोड(डे)मात** स्त्री. (बुद्धिबळांचा खेळ) घोड्याने मात करण्याचा प्रकार; घोडमात; प्रतिपक्षाचे घोडे व राजा आणि आपले घोडे, राजा व एकच प्यादे राखून प्यादेमात करणे.

**घोडमा** वि. वयाने मोठा पण पोरकटपणाने वागणारा.

**घोडमाशी** स्त्री. १. मोठ्या आकाराची हिरवी, काळसर माशी. २. (सामा.) मोठी माशी.

**घोडमासा** पु. एक प्रकारचा मासा; सागराश्व. याचे तोंड काहीसे घोड्यासारखे दिसते. याला लांब शेपूट असते. हा उभा पोहतो.

**घोडमुख-ख्या** पु. १. घोड्याचे तोंड असलेले किन्नर नावाच्या देवयोनीतील पुरुष. याचे वर्णन पुराणांतरी सापडते. २. (ल.) अगदी कुरूप घोडतोंड्या माणूस : 'एक मीरवलें भुरळें पींगळें। घोडमुखें॥' - दाव २८५.

**घोडमुंगळा** पु. मोठा व काळा मुंगळा.

**घोडमुंगी** स्त्री. मोठी, काळ्या जातीची मुंगी.

**घोडला** पु. मूल रांगताना त्याची होणारी घोड्यासारखी आकृती.

**घोडलाट** स्त्री. नदीच्या मुखातून समुद्राच्या भरतीचे पाणी आत घुसत असताना येणारी मोठी लाट.

**घोडली** स्त्री. (नाविक) शौचाला बसण्याकरिता वऱ्याला चार दोऱ्यांनी अडकविण्यात येणारी चौकट. (को. हेट.)

**घोडवडी** स्त्री. घोडे बांधण्याची पागा : 'भानवसा मागा दक्षीणिली भीतीसीं घोडवडि॥' - स्थान ४४.

**घोडवळ** स्त्री. १. बांधलेल्या घोड्यांची ओळ, रांग. २. घोड्यांचा तबेला; घोडशाळा; घोडसाळ. ३. लांबलचक, ठेंगणे व बेढब घर; मागरघर दांडसाळ; केवळ तबेल्यासारखे असलेले घर; कोठडी.

**घोडवळ** स्त्री. न झोडपलेल्या, झोडपून दाणे न काढलेल्या धान्याच्या पेंढ्यांची रास, गंजी.

**घोड (डे) वाट** स्त्री. घोड्याकरिता केलेली, फक्त घोड्याला जाता येईल अशी वाट, रस्ता (विशेषतः डोंगर इत्यादीवरून).

**घोडविवाह** पु. वयाने अतिशय मोठ्या पुरुषाचे अगदी लहान मुलीशी होणारे लग्न; विषमविवाह : 'आपली नात शोभेल अशा दहा वर्षाच्या पोरीशीं लग्न लावण्यास तयार असतात व असा घोडविवाह करूनही फिरून समाजांत हिंडण्यास... त्यांस दिक्कत वाटत नाहीं.' - लोटिकेले ४.९६.

**घोडवेल** स्त्री. (सांकेतिक) घोड्याची लीद. औषधात घोड्याच्या लिदीचा उपयोग करायचा असला तर या शब्दाने निर्देश करतात.

**घोडशाळा, घोडसाल** स्त्री. १. घोड्यांचा तबेला. २. प्राणिसंग्रहालय.

**घोडशिष्य** पु. (निंदार्थी) विद्यार्जन करू पाहणारा, मोठ्या वयाचा, विद्या मोठेपणी शिकायला सुरुवात करणारा मनुष्य.

**घोडशी** स्त्री. घडवंची. (राजा. कुण.)

**घोडशीर** स्त्री. १. पायाच्या टाचेच्या वरच्या बाजूला असलेली शीर, नाडी; दवणशीर. पहा : **धोंडशीर.** २. (क्व.) पायाचा किंवा हाताचा स्नायू.

**घोडशेंदणी** स्त्री. एक प्रकारचे रानटी फळ : 'घोड्याच्या पोटात दुखायला लागले म्हणजे हे फळ चारतात.' - व्यंमाक २५.

**घोडसटवी** स्त्री. १. उग्र स्वरूप धारण केलेली देवी. (क्रि. लागणे.) २. घोडी व्याल्यापासून सहाव्या दिवशी करायची सटवीची पूजा. (वा.) **एखादीला घोडसटवी लागणे** – १. घोडसटवीप्रमाणे उग्र व विक्राळ दिसणे. २. घोडसटवीची बाधा होणे.

**घोडसर** पु. घोड्यांची पागा.

**घोडसाहानी** पु. घोडदळाचा अधिकारी : 'घोडसाहानीः खापरिखीः उत्कृष्ट पाइकु' - पंचो ८३.६.

**घोडस्नी** स्त्री. अंथरूण ठेवण्याची घडवंची. (झाडी)

**घोडा** पु. १. खूर असलेला एक चतुष्पाद प्राणी. याचा उपयोग ओझे वाहण्याच्या, गाडी ओढण्याच्या व बसण्याच्या कामी करतात. याच्या अनेक जाती आहेत. लहान घोड्याला तट्टू म्हणतात व घोड्याच्या पिलाला शिंगरू म्हणतात. २. (उप.) मूर्ख व ठोंब्या असा वयस्क मुलगा; वयाने मोठा पण पोरकट मनुष्य. ३. (ल.) शरीर वाहून नेतात म्हणून पायांना (दहाबोटी) घोडा असे म्हणतात. ४. (ल.) घोडेस्वार : 'तीन हजार घोडा पेशव्यांचे तैनातींत ठेवा.' - विवि ८.७.१२९. [सं. घोटक] (वा.) ० **आडवा घालणे** – (एखाद्या कार्यात) अडथळा, विघ्न आणणे : 'आणि म्हणूनच तुम्ही घोडा आडवा घातलांत वाटतं?' - चंद्रग्र ६८. ० **उभा करणे, बांधणे** – (घोडा) थोडा वेळ थांबवणे;

जरासे थांबणे; घाई न करणे (घाईत व धांदलीत असणाऱ्या मनुष्याला उद्देशून या वाक्प्रचाराचा उपयोग करतात.). ० **काढणे, फेकणे** - १. बांधून ठेवलेला घोडा बाहेर काढणे, हाकारणे, जोराने पिटाळणे. २. (एखाद्याने) पळ काढणे, पोबारा करणे, निसटणे. ० **चालविणे** - डोके खाजवणे; युक्ती लढविणे. (कर.) ० **टाकणे** - घोडा फेकणे, उडवणे, अंगावर घालणे : 'आरेरे टाकौनि घोडा। भणती यांचिआं जटें उपडा।' - शिव १४१. ० **मैदान जवळ असणे** - (घोडा धावण्यात कसा काय आहे याची परीक्षा त्याला मैदानात पळवून करता येते यावरून) ज्याची परीक्षा करायची तो पदार्थ, मनुष्य व परीक्षेला लागणारी सामग्री ही दोन्ही जवळ असणे; एखाद्या गोष्टीची निरर्थक चर्चा न करता तिला कसोटीला लावणे, कसोटीची वेळ किंवा सामग्री जवळ असणे; हा सूर्य हा जयद्रथ अशी अवस्था असणे. ० **हाकणे** - पळून जाणे; निघून जाणे; पोबारा करणे. **घोड्याच्या किंवा हत्तीच्या पायांनी येणे व मुंगीच्या पायांनी जाणे** - (आजार, संकट, अडचण इ. च्या संबंधात हा वाक्प्रचार योजतात) जलदीने येणे व धीमेपणाने जाणे. **एखाद्याच्या घोड्याने पेंड (पेण) खाणे** - या वाक्प्रचारात पेण = प्रवासातील टप्पा, मुक्कामाची जागा याऐवजी चुकीने पेंड हा शब्द उपयोगात आणतात. लांबच्या प्रवासात निरनिराळ्या टप्प्यांच्या ठिकाणी घोडी उभी राहत. त्यामुळे टप्प्याचे ठिकाण आले की घोडे तेथे अडून राही, पुढे हलायचे नाही. यावरून एखादे कार्य करताना कोणी अडून बसणे. **घोड्यापुढे धावणे** - जिकिरीचे, दगदगीचे, कष्टाचे काम करणे. एखाद्याची कष्टाची सेवा, चाकरी करणे; (उप.) एखाद्याची ओंगळ खुशामत करणे; अतिशय उत्साह दाखविणे; एखाद्याची थुंकी झेलणे. **घोड्यावर घोडा घालणे** - (लिलाव इत्यादिकात) चढाओढ करणे; एखाद्याने केलेल्या किमतीपेक्षा अधिक किंमत पुकारणे; उडीवर उडी घालणे. **घोड्यावर बसणे** - दारू पिऊन झिंगणे; ताठ्यात असणे. **घोड्यावर बसविणे** - इच्छा नसताना जबाबदारी लादणे. **घोड्यावर बसून येणे** - घाईने येणे; आपले काम तातडीने करण्याबद्दल दुसऱ्याला घाई करणे. **सर घोड्या पाणी खोल, सर घोड्या पाणी पी** - (घोड्या मागे हो, पाणी खोल आहे. तेथूनच पाणी पी) अंदाज घेऊन काम करावे; कोणतीही गोष्ट जपून पुढे पाहून करावी. **घोड्यास हात घालणे** - लगाम खेचून घोडा थांबविणे : 'आतां पळूं नये. व्यर्थ मरूं नये. घोड्यास हात घालावे.' - पेदभा ४१.१८९.

**घोडा** पु. गवतात आढळणारा एक किडा.

**घोडा** पु. १. बुद्धिबळाच्या खेळातील एक मोहरे. हे सर्व बाजूंनी दोन सरळ व एक आडवे अशी अडीच घरे जाते. या मोहऱ्याचा विशेष असा आहे की, हे इतर मोहऱ्यांच्या डोक्यावरून उडून जाते. अशी गती इतर मोहऱ्यांना नसते. २. बंदुकीचा हातोडीच्या आकाराचा भाग. हा दाबला असता ठिणगी उत्पन्न होते व बार उडतो; चाप. ३. (मुलांचा खेळ) दोन पायांत काठी घालून (तिला घोडा मानून) मुले धावतात तो काठीचा घोडा. ४. कपडे ठेवण्यासाठी खुंट्या ठोकलेला खांब; स्नान करणाऱ्या माणसाचे कपडे ठेवण्यासाठी जमिनीत रोवलेली काठी, खांब, स्टँड. ५. पाळणा टांगण्यासाठी एका आडव्या लाकडाला चार पाय लावून करतात ती रचना; घोडी. ६. पालखीचा दांडा ज्याला बसवलेला असतो ते दुबेळके, बेचके; पालखी ठेवण्याच्या जागी ती ज्याच्यावर ठेवतात ती दुबेळके असलेली रचना. ७. गाड्याच्या बैठकीच्या चौकटीची दोन बाजूंनी लांब लाकडे; गाडीच्या दांडक्याला आधार द्यायचे दुबेळके. ८. पहा : **घोडला** (क्रि. करणे.) ९.(दिवे इ. लावण्याची) दोन बाजूंना पायऱ्या असलेली घडवंची; (पिपे, पेट्या ठेवण्याची) लाकडी घडवंची. १०. नारळ सोलण्याचा, शेंड्याला सुरी बसवलेला खांब; नारळ सोलण्याचा एक प्रकारचा साचा. ११. समुद्राच्या भरतीच्या पाण्याचा चढ, फुगोटी, फुगारा; लाटेचा उंच भाग; नद्यांच्या मुखातून वर गेलेले समुद्राच्या भरतीचे पाणी. १२. ओबडधोबड असा आकडा, फासा, पकड. १३. दाराच्या दुहेरी चौकटीच्या वरच्या बाजूचे, परस्परांना जोडणारे दोन लाकडी तुकडे. (त्यांच्याच जोडीच्या खालच्या बाजूच्या तुकड्यांना छिली म्हणतात.) १४. (खाटीक इत्यादिकांचे) साकटणे, सकोटन; खाटकाचा ठोकळा. १५. (मुद्रण) केसी व गॅली ठेवण्यासाठी केलेली घडवंचीवजा चौकट. १६. फळा, चित्रफलक इ. उभा ठेवण्याची लाकडी उभी चौकट. १७. रहाटगाडग्याचे कोळवे ज्यावर ठेवतात ती लाकडी चौकट (को.). १८. पोहण्याचा चार भोपळ्यांचा तराफा. १९. (विटीदांडूचा खेळ) विटी मारण्याचा एक प्रकार. (क्रि. मारणे.) (गो.) (वा.) ० **लागणे** - १. वरच्या स्वाराला यत्किंचितही हिसका न बसेल अशा रीतीने घोड्याने पळणे. २. (शर्यतीत) आपण ज्या विशिष्ट क्रमांकाच्या घोड्याचे तिकीट घेतले असेल तो घोडा निदान पहिल्या तीन क्रमांकात येणे. [सं. घोटक]

**घोडाआढी** स्त्री. (मल्लखांब) उजव्या हाताचा पंजा व डाव्या हाताचा पंजा वरच्या दिशेला मल्लखांबावर दूर अंतरावर धरून मारायची उडी.

**घोडागद्योन्** पु. प्राचीन महाराष्ट्रात वापरात असलेले एक नाणे.

**घोडाघोडा** पु. लहान मुलांचा एक खेळ.

**घोडा घोडा टाळीचा घोडा** मुलींचा एक खेळ.

**घोडाचोळी** स्त्री. गंधक, पारा, हरताळ इ. एकत्र करून केलेली गोळी. हिला संस्कृत भाषेत अश्वकंचुकी असे म्हणतात.

**घोडामैदान** न. घोड्याची परीक्षा करण्यासाठी, त्याची चाल, गती इ. पाहण्यासाठी वापरण्यात येणारे मैदान.

**घोडावज** न. वेखंड.

**घोडी** स्त्री. १. घोडा या जातीच्या प्राण्याची मादी. २. (ल.) वयस्क असून पोरकटपणा करणारी, हुंदडणारी, धांगडधिंगा घालणारी मुलगी; घोड कुदळ. (वा.) ० **काढणे**, ० **भरविणे** - घोडीला घोडा दाखविणे, देणे; घोडी फळविणे. ० **घेणे** - (एखाद्याशी) घासणे; कटकट करणे; मत्सरबुद्धीने दोष काढणे. **घोडी टालेस येणे** - घोडी उलटणे, उफराटी होणे : '... हाताचा झटका आणेनीस (अनीनीस) बसला त्यानें घोडी ठालेस येऊन घोडी अंगावर पडली...' - नाग २.१७७.

**घोडी** स्त्री. १. सतार, तंबोरा इ. तंतुवाद्यांच्या भोपळ्यावर एकदीड इंच उंचीची हस्तिदंती अगर लाकडी पट्टीची बैठक. हिच्यावरून तारा पुढे खुंटीला गुंडाळलेल्या असतात. २. पूर्वी शाळेत मुलांना देण्यात येणारी

एक शिक्षा. वर उंच आढ्याला बांधलेल्या दोरीवर मुलाला लोंबकळत ठेवण्यात येई. अशा प्रकारच्या शिक्षा देण्याच्या प्रकाराला घोडी देणे असे म्हणत असत : 'एखाद्या मुलाशी माझं वाकडं झालं की, रचलंच त्याच्यावर किटाळ आणि दिलीच त्याला पंतोजीकडून घोडी.' - चंद्रग्र ८० (क्रि. घेणे, देणे). ३. उभे राहून पखवाज वाजविता यावा म्हणून तयार केलेली घडवंची : 'इतक्यात देवळाच्या एका कोपऱ्यात मृदंग ठेवावयाची उंच घोडी सुनंदाला दिसली.' - सुदे २५. ४. गवत इ. वाहण्याकरिता खटाऱ्यावर उभारलेला सांगाडा, चौकट. ५. जमिनीपासून फळा उंच ठेवण्याकरिता व त्याला उतार देण्याकरिता केलेली लाकडी चौकट, सांगाडा. ६. (सुतारी) जे लाकूड तासायचे असते ते हलू नये म्हणून त्याला आधार देणारे दुसरे लाकूड, चौकट इ. हे लाकूड एका विशिष्ट तऱ्हेने सोयीस्कररीत्या बसवतात. ७. (विणकामात) सूत उकलण्यासाठी केलेले लाकडी चौकटीसारखे साधन. ८. (सोनारी) पायात घालण्याच्या साखळ्यांच्या कड्या वाकविण्यासाठी असलेला बोटाइतका निमुळता खिळा, मोळा. (हेट. नाविक) ९. छोटे शीड उभे करण्यासाठी असलेले कमानीसारखे लाकूड. १०. बंधाऱ्याच्या मुखाशी (पाणी सोडण्याच्या ठिकाणी) पडद्यासारखी बांधलेली भिंत. या भिंतीवरून पाणी जात असते. ११. गलबताच्या कडेला शौचाला बसण्याकरिता टांगलेली लाकडी चौकट (हेट.). १२. साकटणे; सकोटण. १३. दाराच्या दुहेरी चौकटीच्या वरच्या बाजूचे, परस्परांना जोडणारे दोन लाकडी तुकडे. १४. तीन पायांचे दिवा ठेवण्याचे बुरडी तिकाटणे, तिवई. १५. पाटाला खाली मारतात ते (दोन) आडात. १६. हत्तीवरील हौदा, चौकट : 'साहेब नौबतीकरिता हत्तींवर लाकडी घोडी घालून...' - ऐरा ९.५०६. १७. उभे खुंटाळे; स्टँड : 'तिकोनी खुंट्यांची घोडी आणि रुमाल ठेवावे.' - स्वारीनियम ७०. १८. सामान ठेवण्याचा घोडा. १९. गोट्यांच्या खेळात हरणाराला खेळाच्या शेवटी मिळणारी शिक्षा. [क. कानगुडी = हातपाय बांधणे]

**घोडीकुर** स्त्री. कुरघोडी : 'घोडीवरी होईल स्वार। त्याचा बहुत पडेल भार। भारा खाले निघेल बूर। पोरें म्हणती घोडीकूर।' - मध्व १७७.

**घोडीपिढी** न. अव. घोडी वगैरे सामान : 'परंतु ते आपली घोडीपिढी संभाळावयास गेले.' - पेद १.७८.

**घोडु** पु. घोडा.

**घोडुला** पहा : **घोडला.** (क्रि. करणे.)

**घोडूक** (गो.) पहा : **घोडके**

**घोडे** न. (सामान्यत: लिंगभेद न धरता) घोडा या जातीतील जनावर. (वा.) ० **उभे करणे** - अडथळा आणणे. **एखाद्याचे घोडे थकणे** - एखाद्याने (प्रवास, धंदा, व्यापार, अभ्यास इ.कांत) थकून जाणे; हतबल होणे; पुढे रेटण्याची शक्ती न उरणे. **एखाद्याने आपले घोडे पुढे दामटणे, ढकलणे, हाकणे, घालणे, पुढे रेटणे** - १. इतरांच्या पूर्वी आपला कार्यभाग साधून घेण्याचा घाईने प्रयत्न करणे : 'ब्रिटिश वसाहतींनी आपल्या हक्कांचे घोडें पुढे दामटलें.' - सासं. २. लुब्रेपणाने दुसऱ्यांच्या संभाषणात तोंड घालून त्यांच्यावर आपले विचार लादणे. **एखाद्याचे घोडे मारणे** - एखाद्याचे नुकसान करून त्याला राग आणणे (पूर्वी प्रवासाचे मुख्य साधन घोडे असे. प्रवासाचे घोडे ठार केल्यास त्याचा प्रवास थांबत असे व त्यामुळे त्याचे फार नुकसान होई, यावरून) एखाद्याचे फार नुकसान करणे. **गांडीखालचे घोडे** - संसारादी निर्वाहक मालमत्ता, वाडी इ. आधारभूत मुख्य साधन. **घोडी आडवी घालणे** - १. शत्रूवर तुटून पडून त्याच्या चालीला अडथळा करणे. २. (एखाद्याला त्याच्या कामात संकट, अडथळा, व्यत्यय आणणे : 'जर त्यांणीं आपल्यावर चालून घेतलें तर आम्ही आडवीं घोडीं घालतो.' - ऐलेसं ४२९७. **घोडी घालणे, घोड्यांच्या अनीना उचलणे** - घोडदळातील सर्व स्वारांनी ईर्षेने शत्रूवर एकदम तुटून पडणे.

**घोडे** न. पहा : **घोडा** ६, ७, १७, १८.

**घोडेकातरा** पु. एक औषधी पदार्थ.

**घोडेकार** पु. घोडस्वार : 'हा पैलु घोडेकारू।' - उगी ५९.

**घोडेकुसळी** स्त्री. एक प्रकारचे जाड गवत; घोडेघास : 'तिकांडी घोडेकुसळी।' - गीता २.५३.८६.

**घोडेखाद** स्त्री. १. घोड्यांचे चरणे, हरळी खाणे. २. फक्त घोड्यांना चरता, खाता येईल इतक्या वाढीचे गवत.

**घोडेखोत** पु. घोडे भाड्याने देण्याचा धंदा करणारा; भाड्याच्या घोड्यांचा नाईक.

**घोडेघाटी** स्त्री. एक प्रकारचे रेशमी कापड.

**घोडेघास** न. विलायती गवत; लसूण घास.

**घोडेपाऊल** न. एक वनस्पतिविशेष.

**घोडेबाज्या** पु. घोडेबाजी; घड्यात फटाके घालून उडविण्याचा एक आतषबाजीचा प्रकार : 'आज दिपवाळीचे सायंकाळी घोडेबाज्या वगैरे आतसबाजी झाली.' - ऐलेसं ४७१४.

**घोडेला :** पु. नाकतोड्या. (झाडी) [सं. घोटक]

**घोडेस्वार** पु. मुलांचा स्काऊटचा एक खेळ.

**घोडोंडी** स्त्री. पागा : 'तया रायाचे घोडोंडी येंकु देडिका बांधला होता.' - पंचो १६०-१५.

**घोड्यागोवर** पु. एक प्रकारचा गोवर. याच्या पुटकुळ्या मोठ्या असतात.

**घोड्याचा दाणा** १. (उप.) हरभरा. २. (ल.) बुंदीच्या लाडवाला तुच्छतेने म्हणतात.

**घोड्याचा पूत, लेक** (उप.) मूर्ख; गाढव; गद्धा.

**घोड्याची जीभ** (रा.) एक वनस्पतिविशेष.

**घोड्याची मुंज, घोड्याचे बारसे** एखादा कोठे जायला निघाला असता, फाजील चौकशी करणाऱ्या माणसाने त्याला 'का, कुठे जाता' असे विचारले असताना हा शब्दप्रयोग वापरतात.

**घोड्याचे मूत** १. कुत्र्याचे मूत; अळंबे; भुईछत्री. २. कुजलेल्या लाकडातून फुटलेले आळंबे.

**घोड्याच्या पाठीवर** भरधाव; झरकन; त्वरेने. (क्रि. जाणे, करणे.)

**घोड्याच्या पाठीवरचा कोस** कंटाळवाणा व लांबणीचा कोस; घोड्यावरून गेल्यासच कोसाएवढे व कंटाळवाणे न वाटणारे अंतर.

**घोड्यावर स्वार** चढेल, मग्रूर : 'आता जाफरखान आले ते घोड्यावर स्वार ! रूपये मागू लागले.' - हिंगणे दभा २.३५.

**घोड्यांचे नाटक** सर्कस. (ना.)

**घोण** स्त्री. पुष्कळ पाय असलेला, सरपटणारा एक प्राणी; गोम.

**घोण, घोणवासा** स्त्री. घराची काटकोनात असणारी पाखी जेथे मिळतात तो सांधा; या सांध्यावरील वासा; कोनवासा. याला घोणवासा असेही म्हणतात. (को.)

**घोण** स्त्री. दु:खाने, खिन्न मनाने गुडघ्यात मान घालून बसण्याची अवस्था; खिन्नावस्था : 'ते भीमकी हें मग घोण घाली।' - सारुह २.६९. (को.) ० **घालून बसणे**- दु:खाने, खिन्न मनाने गुडघ्यात मान घालून बसणे; खिन्न असणे. (क्रि. घालणे) ० **घालणे** - लांबणीवर टाकणे; लांबविणे. (व.)

**घोण** स्त्री. घार. (गो.)

**घोणशा** वि. सुस्त; मंद; लठ्ठ व आळशी. (को.)

**घोणस** पु. सर्पाची एक विषारी जात. हा सर्प जाड असून चारपाच फूट लांब असतो. याचा रंग पिवळसर असून पाठीवर मध्यभागी काळ्या मोठ्या ठिपक्यांची उभी रांग असते. पहा : **घणस** : 'जसा नकुळ घोणसां गमला।' - मोउद्योग ११.१२०. (को.) [सं. घोनस]

**घोणसकांडे** न. एक विशिष्ट प्रकारची वनस्पती. ही दिसण्यात घोणसासारखी दिसते. हिची वेटोळीही घोणसाच्या वेटोळ्यासारखी दिसतात. गुरांना घोणस सर्प चावला तर ती गुरे ही वनस्पती जेथे असेल तेथे जातात व ती खातात.

**घोणसे पडवळ** आखूड पडवळाची एक जात.

**घोणा** पु. १. नाक : 'येता तल्पसमीप कांत ललना ते वक्र घोणा करी।' - विरस १७. २. दोन्ही नाकपुड्यांमधील मांसल पडदा; घुळणा; घोळणा; घुणघुणा [सं.घ्राण.] (वा.) ० **फुटणे** - उन्हामुळे, उष्णतेमुळे नाकातून रक्त वाहू लागणे.

**घोणा** पु. लाकूड कोरणारा किडा. (राजा.) [सं.घुण]

**घोणाटणे** सक्रि. मोठ्याने ओरडून, ओरडाओरड करून (गुरे, हरिण, सावज इ.) एके ठिकाणी हाकून आणणे, हाकणे.

अक्रि. १. (माशा, भुंगे इ.) घों घों करीत एकत्र जमणे. २. डरकाळ्या फोडीत, हंबरत हंबरत एकत्र होणे, जमणे (गुरे इ.). ३. कासावीस होणे; घायाळ होणे. (राजा. कु.) [सं. घु]

**घोणाटा** पु. १. (माशा इ.) घोंघावत एकत्र जमणे; घोंघावणे. २. (काम, वस्तू, व्यवहार इ.चा) गोंधळ, गुंतागुंत, घोटाळा, अव्यवस्थितपणा.

**घोण्या** पु. १. पाख्यांचा सांधा; घोणवसा. २. घोणवाशावर, पाटिसावर घालतात ते नळे.

**घोन** पु. मान. (झाडी) [सं. घोण]

**घोन** न. नाक. (व.) [सं.घ्राण]

**घोनता** पु. घोंगता; अंगरखा : 'बंधू माझा नेणता। त्याला शिवला घोनता।' - घाश्रलो ७३. (घा.)

**घोनसी** स्त्री. चांदीचा हार. (झाडी)

**घोनारणे** सक्रि. खाली पडणे; लोळविणे : 'मी अहंकाराते घोनारीं।' - उगी २५.

**घोन्याड** स्त्री. बलिप्रतिपदेला बलिराजा बनविण्याचे गवत. (झाडी)

**घोप** पु. झुबका; गुच्छ; घड; घोस. (को.)

**घोपड** पु. (प्रां.) मोठे, खुजे व पसरट असे अळंबे, कुत्र्याचे मूत.

**घोपाण** स्त्री. मर्दपणा; ताकद; शक्ती. (कु.)

**घोवार** न. भ्रम.

**घोबे** न. १. अकल्पित रीतीने झालेला मोठा लाभ; घबाड; घबूक. (क्रि. येणे, मिळणे, सापडणे, हाताला लागणे.) २. (व्यापार इत्यादिकांत) सट्ट्याने झालेला फायदा. ३. अल्पप्रयासाने संसाराचा निर्वाह होण्याइतके द्रव, धान्य इ. देणारा यजमान किंवा शेत.

**घोय :** पु. पदर; घोळ (व.).

**घोयटीक** स्त्री. सराव; अभ्यास; घसरट. (गो.)

**घोयरा** पु. सरड्याच्या जातीचा एक प्राणी.

**घोयेल** स्त्री. घोरपड. (झाडी)

**घोर** पु. १. वीणा इ. वाद्यांतील खर्ज स्वराची तार; (वाद्यातील) खर्ज स्वर. २. झोपेतले घोरणे. ३. मृत्यूसमयी होणारा घशातील घरघर असा आवाज : 'हा वेदार्थ सागरू। जया निद्रिताचा घोरू। तो स्वयें सर्वेश्वरू। प्रत्यक्ष अनुवादला॥' - ज्ञा १.७२.

**घोर** पु. १. काळजी; धोसरा; मानसिक अस्वस्थता; चिंता. (क्रि. पडणे, घेणे, करणे, लागणे.) : 'त्याचा नित्याचा घोर नाहींसा होऊन त्याची स्वभाववृत्ति प्रबळ झाली.' - नि ७०३. २. अन्य स्थळी गेलेल्या माणसाबद्दल घेतलेली खंत, घोकणी. (क्रि. घेणे.)

**घोर** वि. १. भयंकर; अघोर; भयप्रद; भयानक; क्रूर; विक्राळ (मुद्रा, आवाज, काम, घडणाऱ्या गोष्टी). २. निबिड; दाट; घनदाट; गाढ; भयाण (अंधार, अरण्य इ.) : 'मी राजाच्या सदनि अथवा घोर रानीं शिरेन।' - खरे, जन्मभूमि. ३. घनघोर; तुंबळ; हातघाईचे; निकराचे (युद्ध, लढाई इ.) : 'कलह उत्पादी अतिघोर।' - एभा १.२०४. ४. गाढ, घनघोर (निद्रा).

**घोर** पु. १. हल्ला; विध्वंस : 'केला मर्खी घोर निशाचरांनी।' - अविश्वा २०. २. आक्रोश; आकान्त; रडारड; कोलाहल. ३. आरडाओरडा; गलबला; गिल्ला; गलका; गोंगाट; कल्ला (क्रि. करणे). ४. संकट : 'मान अपमानाचे पडिले। भ्रांतीचे घोरीं।' - दावि २६०.(वा.) ० **करणे** - राग; वैषम्य मानणे; गवगवा करणे : 'त्यांच्या पालख्याचा रोजमरा आपण वजा केला त्यामुळें त्यांनीं फारच घोर केला आहे.' - पेद भाग २० २२९. **घोरात पडणे** - संकटात पडणे, सापडणे.

**घोर** वि. १. अचाट; अवाढव्य; (इमारत). २. अफाट (भरलेली नदी).[सं.]

**घोर** पु. साहस; धाडसी कृत्य : 'कैकईनं केला घोर। रथ घेतला हातावर।' - जसा २०६. [सं.]

**घोर** पु. पैंजण. (झाडी)

**घोरकंड** पु. आरारूटची एक जात.

**घोरचा** पु. जाच; जुलूम: 'आता सुलतानीचा तर घोरचा नाही.' - जोफु ११२.

**घोरड** न. सुस्त, गैदी, नेभळा, अव्यवस्थित, झोपाळू अशा माणसाला तिरस्काराने लावायचा शब्द. (राजा.)

**घोरड** वि. १. योग्य प्रकारे न घोळलेले (मणी). २. न भाजलेले (चणे). (झाडी) [सं. घुर्णा]

**घोरडदेव** पु. १. सर्व पदार्थांच्या शिजलेल्या मिश्रणाचा नैवेद्य ज्याला लागतो असे दैवत. २. (ल.) अनेक पदार्थांचे मिश्रण; खिचडी. (व.)
**घोरणे** अक्रि. झोपेत श्वासोच्छ्वासावेळी घर्र घर्र असा आवाज होणे. [सं. घुर्]
**घोरन** पु. भाजी घट्ट व्हावी म्हणून लावावयाचे पीठ.
**घोरनी** स्त्री. १. रवी, घोळणी. २. मणी घोळण्याचे साधन. (झाडी)
**घोरपड** स्त्री. १. सरड्याच्या जातीचा एक मोठा सरपटणारा प्राणी. हिला उष्ण व ओलाव्याची हवा लागते. हिची चरबी औषधी आहे. ही आपल्या नख्यांनी खडकाला अतिशय घट्ट धरू शकते. २. (ल.) लचांड; लिगाड; त्रासदायक काम, मनुष्य : 'ही घोरपड विश्वामित्राच्या गळ्यांत पडली.' - नाकु ३.९४. ३. (ल.) अरिष्ट; मोठे संकट; आळ; तुफान : 'बाळकृष्णपंतावर कोणती घोरपड येणार हे पाहण्याकरितां टपून आहोत.' - विक्षिप्त १.३७. (वा.) **एखाद्यावर घोरपड आणणे** – एखाद्याला गोत्यात आणणे, संकटात आणणे. **एखाद्यावर घोरपड येणे** – संकटात, पेचात, अडचणीत सापडणे. **० गळ्यात पडणे** – न आवडणारी गोष्ट, बायको स्वीकारावी लागणे : 'ह्या जातीय निवाड्याची ही घोरपड जी एकदा भारतीय राजकारणाच्या गळ्यात पडली.' - निप्र ५. **० गळ्यात बांधणे** – नको असलेल्या, न आवडणाऱ्या, कुरुप स्त्रीशी लग्न लावून देणे.
**घोरपळी** स्त्री. एक प्रकारचा रोग. (खा.)
**घोबे** न. किफायत शीर सौदा.
**घोरबंद** पु. खोगिराचा पुढचा बंद. पहा : **गोरबंद**
**घोरमार** पु. भयंकर आवाज.
**घोरवाणी** वि. अमंगल वाणी.
**घोरवेळ** स्त्री. (ज्यो.) १. अशुभ, अनिष्ट, भयसूचक वेळ. २. (अनिष्टतेच्या ध्वनितार्थावरून) करकरीत तिन्हीसांजा; टळटळीत मध्यान्ह.
**घोरंकार** पु.अव. (एखाद्या कार्याबद्दलचा) पराकाष्ठेचा प्रयत्न; खटाटोप; नेटाचा, आवेशाचा यत्न; अनेक प्रकारची उलाढाल; साहस, हिकमत.
**घोरं(रां)दर** वि. भयंकर : तुंबळ, घनघोर, निकराचे (युद्ध) 'झोटी धरूनि पाडिती अपार। घोरांदर मांडिलें।' - एरुस्व ८.४४; 'युद्ध मांडिलें घोरंदर।' - मुआदि १३.१२. [सं. घोरतर]
**घोरंदर** वि. गाढ; घोर : 'निद्रा आली घोरंदरी।' - क्रिपु २.३४.४.
**घोरासुरांचे आख्यान** (उप.) डाराडूर झोप; घोर झोप : 'घालून ठेवलेले अंथरुण पायानंच उलगडून ही अशशी घोरासुराच्या अख्यानाला सुरवात...' - फाटक नाट्यछटा २.
**घोरांटी** स्त्री. (प्रां.) मरणसमयी लागणारी घरघर; घोर.
**घोरांधर** पहा : **घोरांदर** : 'अमरां असुरांसारिखे घोर। युद्ध माजले घोरांधर।' मुआदि २३.१२७.
न. संकट : 'जो होय निर्धारें रक्षेता: घोरांधरापासौनि-ऋम ४०८.'
**घोरिवडा** पु. गौळवाडा (को.)
**घोरेणी** स्त्री. घोरणे; घरघर. (गो.)
**घोरोप** पु. मगज. (गो.)
**घोल** पु. दोन डोंगरामधील खिंड; दरी; खोल खिंडार. (को.)
**घोल** न. गर्द झाडी असणारी राई. (कु.)
**घोल** स्त्री. १. ढोल; गुहा. २. परसात जाण्याचे दार. (गो.)
**घोल** पु. न. पाणी न घालता घुसळलेले व लोणी न काढलेले दही. [सं.]
**घोल** पु. एक वाद्य : 'सुसंद ताल घोल वात' - उह ८४.
**घोलणे** सक्रि. माखणे; लिप्त करणे : 'मग तैसां चि कां घोलिलीं। परमानंदें॥' - राज्ञा ७.१८३.
**घोलणे** उक्रि. (सुतारकाम) लाकडाला पाडलेली भोके पटाशीने साफ करणे. (खा.)
**घोलमडणे** सक्रि. घोळणे. (माण.)
**घोलमाडणे** सक्रि. १. हिसकाहिसकी करणे. २. त्रास देणे.
**घोलसरी** स्त्री. बकुळीचे झाड. (व.)
**घोलसा** पु. येरझार; ये - जा. (क्रि. घालणे.) (कु.)
**घोला** पु. मचाण : 'हा जवान पोरगा वाघाच्या बालाही उमगून येणार नाही असे घोले शिकाऱ्यासाठी बांधून देतो.' - वामा २.
**घोलाणा** पु. घोळ; गोंधळ.
**घोला (ळा) णा** पहा : **घोळणा**
**घोलाना** पु. डोंगरावरील दरी, खबदाड, घळ, लवण, खोलगट भाग : 'भाजी मिळेना घोलान्यात अंबाबाईच्या न्हानीपाशी।' - जसा ६६.
**घोलारी** स्त्री. आतल्या गाठीची स्त्री. (अहि.)
**घोलावणी** स्त्री. भुलावणी; फुसलावणी; भुरळ.
**घोलावणे** उक्रि. फूस लावणे; भुलविणे; गोंजारणे. पहा : **घुलावणे**
**घोलांकार** पहा : **घोळंकार**
**घोलांट-टी** न. स्त्री. कोलांटी उडी : 'एकनाथाचे ग्रंथ व त्याचे चरित्र यांच्या परिशीलनाने मंडळांतील लोकांच्या घोलांटया उलट्या पडतील अशी शंका स्वप्नीं तरी येणें उचित होईल काय?' - भागवत देशीभाषा १०.
**घोली** स्त्री बाजू; वाट : 'उफराटी घोली करूनि मसुऱ्याला गेला।' - ऐपो ११८.
**घोलू** वि. बावळट. (झाडी)
**घोल्लर** पु. १. बैलाच्या गळ्यातील मोठा घुंगरू. २. पैंजण. (झाडी)
**घोल्लर** वि. सैल. (झाडी)
**घोव** पु. नवरा; पती; प्रेमिक. पहा : **गोहो** [सं.गोघ]
**घोवकरीण** स्त्री. पत्नी; बायको; सौभाग्यवती स्त्री; सवाष्ण. (राजा.)
**घोवकी** स्त्री. पुरुषत्व; मर्दपणा; पौरुष.
**घोवगाडा** पु. नवरा, दीर इ. सासरचे माणूस; पालनकर्ता माणूस.
**घोवदी** पु. पुरुष; बाप्या; गृहस्थ. (राजा.)
**घोवबा** पु. नायकिणीचा मुलगा. (गो.)
**घोवसांडा दिवस** उन्हाळ्यातील दिवस. (कु.)
**घोष** पु. (मोती इत्यादिकांचा) घोस, झुबका : 'मर्गजामणीचें घोषें। कमलकांति होति हसारें।' - शिव ४०९.
**घोष** पु. गवळीवाडा; गवळ्यांची वस्ती : 'गुरुसुत महेंद्र धनु घन शर ते जलवृष्टि सैन्य तो घोष।' - मोकर्ण १३.१२. [सं.]
**घोष** पु. १. (समुद्र, ढग, अध्ययन, पठण इत्यादिकांचा) एकसारखा होणारा मोठा गंभीर आवाज; गर्जना; पुकारा, गजर : 'ते जयजय घोष कलरवें। स्वर्ग गाजविताती आघवे।' - ज्ञा ११.३३६. २. परा वाचा; परा,

पश्यंती, मध्यमा व वैखरी या चार वाणींपैकी परा वाणी; यांनाच अनुक्रमे घोष, ध्वनी, नाद व आकार अशीही नावे आहेत : 'पैं ब्रह्मबीजा जाहला अंकुरू। घोषध्वनीनादाकारू। ' - ज्ञा ९.२७५. ३. घोकणे; पाठ करणे. ४. (आपला उद्देश, इच्छा इत्यादिकांचा) पुनः पुन्हा उच्चार करणे, सांगणे; एकाच गोष्टीचा निदिध्यास. पहा : **घोकणी** २. (क्रि. घेणे, लावणे, लागणे, मांडणे). [सं.घुष्]

**घोष** पु. स्वरनलिकांच्या कंपामुळे ध्वनीत येणारे एक वैशिष्ट्य. 'क' या ध्वनीत घोष नाही, 'ग' मध्ये आहे.

**घोषक** पु. कर्णा.

**घोषण-णा** न. स्त्री. १. मोठ्याने बोलणे, वाजविणे, ऐकविणे. २. प्रसिद्ध करणे; जाहीर करणे; प्रसिद्धी. (क्रि. करणे.) (वा.) ० **देणे** - सर्वांनी मिळून एकच ध्येयवाक्य, घोषवाक्य उच्च स्वरात म्हणणे किंवा जयजयकार करणे.

**घोषणापत्र** न. जाहीर पत्रक; जाहीरनामा : 'डॉ. भाभा यांनी विज्ञानविषयक भारतीय धोरणाचे एक घोषणापत्र तयार केले.' - भाआशे ४२.

**घोषमंदिर** न. गोठा; गुरे बांधण्याची जागा : 'तो राधेची सासू म्हातारी। तीही नसे कदा घरीं। सदा राहे घोषमंदिरीं। दधिमंथना कारणे।' - ह ८.५८.

**घोषयात्रा** स्त्री. गाई, म्हशी इ. पशूंचे अरण्यात चरणे, बागडणे इ. पाहण्याची क्रीडा. [सं.]

**घोषा** पु. गाजावाजा; कीर्ति : 'याच्या किर्तीच्या घोषा दूर गेला।' - ऐपो १११.

**घोषित** न. सूचना; जाहिरात : 'लाउडस्पीकरमधून निनादणारी ती घोषिते...' - खर्डे ११८. (क्रि. करणे.)

वि. अधिकृतपणे प्रकट किंवा जाहीर केलेले.

**घोस** पु. मांस; सागुती : 'अम्बा त्या बाईनें घोस गाईचा पाहिला.' - ऐपो १.५८. [फा. गोश्त]

**घोस** पु. (मोती, फुले इ.कांचा) गुच्छ; झुपका; तुरा; झुमका : 'सन्मुख भेटला राजहंस। मुक्ताफळांचा घोंस मुखीं धरुनी।' - मारा बाल १२.२४. [सं. गुच्छ]

**घोस** वि. मोठा; देखणा; पुरा; लठ्ठ व दिखाऊ; घवघवीत. [सं.गुच्छ]

**घोस** पु. १. (नाविक) शिडाच्या पुढील (नाळीकडील) भाग; परबाणाचे नाळीजवळचे टोक. हे दुसऱ्या टोकापेक्षा जाड असते. शीड दोन्ही टोकांनी परबाणाला बांधलेले असते. हे केव्हाही डोलकाठीच्या मागे जात नाही. वाऱ्याच्या दिशांप्रमाणे शीड बांधण्याचा एक प्रकार व दमाण हा दुसरा प्रकार आहे. (को.) २. शीड बांधण्याची दोरी. ३. वाऱ्याची दिशा. ४. गलबताने प्रवास करणे; विवक्षित स्थळी गलबताने केलेली फेरी; समुद्रावरील सफर.

**घोस** पु. (आवेश, उत्साह, ऐश्वर्य, वैभव इ.कांचा) प्रकर्ष; वैपुल्य; भर; जोस. [सं.घोष्] (वा.) **घोसात असणे** - ऐश्वर्यात दंग असणे, मनोराज्य करणे. **भर घोसाने, घोसानिशी, भरल्या घोसाने** - सर्व शक्ती एकवटून, नेटाने व छातीठोकपणे; भगीरथ प्रयत्नाने.

**घोस** पु. फडा.

**घोसणे** सक्रि. १. शोधणे. २ गवसणे; सापडणे.

**घोसदार** वि. (मोत्यांचा) घोस असलेले (कर्णभूषण इ.); घोस लागलेला; घोसांनी युक्त; भरदार.

**घोसफळ** न. (वन.) एकाच फुलातील सुट्या किंजदलापासून बनलेल्या फळांचा झुबका.

**घोसबाळी** स्त्री. मोत्याचे घोस लावलेली कानात घालायची बाळी : 'कोथिंबिरी, टांपण, घोंसबाळ्या।' - सारुह ६.२४; स्त्रियांचे कर्णभूषण.

**घोसबाळे** पु.अ.व. दागिन्यात बांधायचा लटकता लोलक, ताईत, करण.

**घोसवाला** पु. १. पैलूचा अगर बिनपैलूचा. २. टोकावर छिद्र असलेला, लांबट हिरा.

**घोसळणे** उक्रि. १. जमिनीवर लोळवणे, घोळसणे. २. ढोसळणे; धरून गदगदा हलविणे. (व.) ३. चांगले चोळणे.

**घोसा** पु. फुलांचा गजरा, गुच्छ. (को.)

**घोसा** पु. गोषा : 'अजून घोसा राकून हाय घराणं ते! शिर्क्यांच्या बाईचं नक नदरं पडायचं न्हाई!' - भेटी ३.

**घोसाळ** वि. नाद निर्माण करणारा; घोष, आवाज करणारा : 'चंद्रकांताचेया बाळानेयां वरी। घोंसाळेयां कांकणां चांकरीं।' - शिव ३४०.

**घोसाळ** वि. १. घोसांनी युक्त; घोसांनी, घडांनी लहडलेला. २. (ल.) गुटगुटीत : 'सुनीळु घोंसाळें। निऱ्हां शोभेंति डोळे।' - शिव ४१८.

**घोसाळवेल** स्त्री. तांदळाची एक जात. ह्या जातीचा तांदूळ जाडा असून लवकर तयार होतो.

**घोसाळा** पु. एक कर्णभूषण : 'आकर्णपूर्ण घोसाळे' - पूजा ५४.

**घोसाळी-ळे** स्त्री. न. १. एक प्रकारची वेल; गिलक्यांचा वेल. याची भाजी, भजी करतात. २. घोसाळीचे फळ; गिलके; पारोसे. ३. दोडके. (गो.) ४. (ल.) क्षुद्र पदार्थ; बहुधा शून्य; नास्तिवाचक.

**घोसाळी** स्त्री. एक प्रकारचा दृष्टिक्षेप : 'घोसाळी करी उबारा : गजबजौनि पाडी' - मूप्र २१६५.

**घोसुले** न. घोस; घड.

**घोळ** स्त्री. समुद्रातील तांबडसर पांढऱ्या रंगाचा मासा. (को. गो.)

**घोळ** पु.१. पुनः पुनः हलवणे; घोळणे; फिरवणे; छानणे. २. (ल.) चर्चा; वादविवाद; वाटाघाट; मंथन. ३. गोंधळ; घोटाळा; अडवणूक : 'उगा लोळसा घोळ मोठा करी तो।' - राक १.३६. (क्रि. घालणे.) ४. (वस्तूंचा, सामानाचा, हिशोबाचा, कामांचा) गोंधळ; गळफाटा; घोटाळा; घप्पाघोळ; अस्ताव्यस्तपणा; गुंतागुंत. ५. गडबड; धांदल; तारांबळ; त्रेधा. ६. धामधूम; लगबगीची हालचाल; दीडदीड; धावाधाव : 'दुजी तों मुलीचा म्हणे थांग नाहीं। असा मांडिला घोळ पौराजनांहीं।' - अर्वाचीन १३५. (क्रि. घालणे. मांडणे.) (वा.) **घोळात पडणे** - निकाल न लागणे.

**घोळ, घोळकांठी** पु. स्त्री. १. काठीच्या टोकाला बसवलेल्या कोयंड्यात लोखंडाचे तुकडे घातलेली खुळखुळ असा आवाज करणारी कडी. रात्रीच्या वेळी चालताना सापांना भिवविण्यासाठी हिचा उपयोग करतात. २. (वाघ्या इ. लोकांचे) लोखंडाच्या कांबीला कड्या अडकवलेले वाद्य : 'टाळ घोळ मृदंग कुसरीं। नाना चरित्रें गाती गजरीं।' - एभा ११.१२७४. ३. ढाल.

**घोळ** पु. १. धान्य इ. सुपात, चाळणीत घोळल्यानंतर मागे राहिलेला गाळसाळ, गदळ भाग. (राजा) २. हरभऱ्याचा, तुरीचा कोंडा. (कर.)

**घोळ** पु. तोरडी; पायात घालायचा स्त्रियांचा एक अलंकार. (व.)

**घोळ** पु. १. (अंगरख्याचा) घेर; खालचा परीघ (लुगडे, परकर, धोतर इ.चा); ओचा, सोगा, पदर : 'पीतांबराचा बहु घोळ लोळे।' - सारुह ५.३४. २. मासे अडकण्यासाठी जाळ्याच्या टोकावर बांधलेली पिशवी. (गो.)

**घोळ** स्त्री. डोंगरामधील दरी; कपार; खबदड; घळ.

**घोळ** स्त्री. एक पालेभाजी. हिच्या दोन जाती आहेत.

**घोळ** चुनत. - (तंजा.)

**घोळका** पु. १. (मनुष्यांचा, प्राण्यांचा) अव्यवस्थित समुदाय, जमाव, गर्दी. २. गोंगाट; गलबला; कलकलाट. (क्रि. चालणे, होणे, पडणे, मांडणे, करणे.) ३. (कामे, प्रकरणे इ.चा) घोटाळा, गोंधळ, खिचडी.

**घोळकाकडी** स्त्री. तोंडले.(व.)

**घोळकांवचे** अक्रि. घोटाळणे; घोटाळत राहणे. (गो.)

**घोळकोटंबा, घोळकोटमा** पु. कापडाचा घोळ लावलेला खंडोबाच्या वाघ्याचा भिक्षा मागण्याचा चौकोनी लाकडी कोटांबा. खंडोबाचे भक्त याची पूजा करतात : 'त्या खिरीपैकीं वाघ्या मुरळी यांस त्यांचा घोळकोटंबा भरून खीर द्यावी लागते.' - ऐरा २०३.

**घोळगुलाब** पु. घोळीच्या वनस्पतीवर संस्कार करून तयार केलेली गुलाबाची एक जात.

**घोळघोळून, घोळूनघोळून** क्रिवि. १. आलटूनपालटून; बदल करून; आळीपाळीने; परतपरत; एकामागून एक. (क्रि. करणे, खाणे, घेणे, देणे.) २. वारंवार, पुनः पुनः घोळण्याची क्रिया करून; पुनः पुनः इकडून तिकडे हलवून, ढकलून, घोळसून, चर्चा करून, मनात आणून, उच्चारून, घोळणे याच्या त्या त्या अर्थी द्विरुक्तीने क्रिया करून : 'हा मंत्र लोकांच्या तोंडीं आपोआप येतो व तोच घोळघोळून पाठ होऊन जातो.' - सासं २४०१. [घोळणेचे द्वि.]

**घोळचे** अक्रि. उपयोगी पडणे. (गो.)

**घोळटीक, घोळटीकाय** स्त्री. सराव; ओळख; घरोबा; घसरट. (गो.)

**घोळण** न. १. सुपाने, चाळणीने (धान्य इ.) घोळण्याची क्रिया. २. सुपात, चाळणीत घोळायचा धान्याचा एक वेळचा हप्ता. ३. पोळी लाटताना तिला लावायचे पीठ, पिठी. (व.)

**घोळणा** पु. गुढी पाडव्यास केली जाणारी कडुनिंबाच्या फुलांची चटणी.

**घोळणा** पु. १. धान्य भाजताना ते हलविण्यासाठी एका टोकाला चिंध्याचा चेंडूसारखा बोळा बांधलेली काठी किंवा दांडू; घाटाणा; घाटणा; घाटू. पहा : **घाटणा** : 'घोळण्या नांव लक्षुमण। करितें भर्जन लाह्यांचें।' - निगा २८६. (को.) २. भात चाळायची बारीक वेळूची चाळण. ३. ठसे उठवण्याचे सोनाराचे एक साधन, हत्यार.

**घोळ (ळा) णा** पु. नाकपुड्यांमधील पडद्याचा खालचा, मुळाचा मांसल भाग. पहा : **घोणा** (क्रि. फुटणे.) [सं. घोणा]

**घोळणी** स्त्री १. घोळण्याची क्रिया. पहा : **घोळण** १. २. सोनाराचे एक हत्यार. पहा : **घोळणा** ३.

**घोळणी** स्त्री. प्रदर; धुपणी. (राजा.)

**घोळणीपुनीव** स्त्री. भाद्रपद शुद्ध पौर्णिमा. (व.)

**घोळणे** न. घाटणा; घाटाणा; घाटू. पहा : **घोळणा** १

**घोळणे, घोळविणे** उक्रि. १. (धान्य इ. सुपात घालून हलके, बारीक, जड मोठे इ. दाणे निराळे करण्याकरिता) इकडे तिकडे हलविणे; हिंदळणे; पाखडणे. २. (दाणे किंवा अधिक पदार्थांचे) मिश्रण होण्याकरिता ताट, परात, सूप इत्यादिकांत घालून हलविणे; खुंदलणे; ढवळणे; माखणे; लेपणे : 'ऐक्यें घोळिली बुद्धि कैसी। मानु श्रोत्यांसी वाढविला।' - एभा ९.४६३. ३. जोराने ओढणे व ढकलणे; खुदळणे; अपाय होईल अशा तऱ्हेने ओढाताण, हिसकाहिसकी करणे; घोळसावणे. ४. (गंजिफांचा खेळ) गंजिफांची, पत्त्यांची गल्लत करणे; पिसणे. ५. (एखादी गोष्ट) चिंतनाचा, वादाचा, चर्चेचा विषय करणे; वाटाघाट करणे; वादविवाद करणे; विचार करणे; (एखादी गोष्ट) पुनः पुनः मनात आणून मनन करणे, परत परत म्हणणे : 'निमुटपणें वर पाहू लागली म्हणजे असे वाटे कीं कांहीं तरी तिच्या मनांत घोळत आहे.' - पाव्ह १८. ६. खोदून खोदून विचारणे; उलटसुलट प्रश्न विचारणे. ७. (एखाद्या कामात) सरावणे; वहिवाटणे; राबत्यास पडणे. ८. (एखाद्या गोष्टीशी, गोष्टीचा) नेहमी प्रसंग पडणे; (एखादी वस्तू उदा. रुपये, दागिने इ.) हातात खेळवणे; इकडून तिकडे देणे, इकडून तिकडे ठेवणे. ९. चोळामोळा करणे; वापरणे; वर्दळीत, वापरण्यात येणे, आणणे. १०. चाळवणे; गोंधळात टाकणे; छकविणे; भुलविणे : 'घातकी न देखो तैसा दुसरा। घोळितो नृपाला पेचुनी।'- दावि ४५७. ११. घुमणे 'भटोबासांचा भिक्षाशब्द गुजरध्वनि घोळिला उमटे।' - स्मृस्थ २१९. १२. त्रास देणे; छळणे; जेरीला आणणे; सतावणे; जाचणे; कष्टविणे : 'यालागीं दुकाळा करितों मनन। आम्हाहि घोळिला बहुता परीनें।' - दावि २७. [सं. घुण्-घूर्ण]

**घोळणे, घोळविणे** उक्रि. (सुतार - सोनार काम) तासून, घासून, घोटून गुळगुळीत करणे.

**घोळदार** वि. ज्याचा उत्तम घोळ आहे असे (वस्त्र, काठी इ.).

**घोळनाट** स्त्री. आढ्याचे लाकूड; मोठा खांब. (व.)

**घोळपाट** पु. घोटाळा; गोंधळ. (व.)

**घोळबोटवा** पु. १. एक प्रकारचा गव्हला. २. (ल.) हरकाम्या, हरहुन्नरी, लुडबुड्या मनुष्य; एक ना धड भाराभर चिंध्या अशी ज्याची स्थिती आहे असा मनुष्य.

**घोळमाडणे** उक्रि. १. ओढाताण, हिसडाहिसडी करणे; त्रास देणे. २. छळणे; गांजणे; जांचणे; त्रासविणे; सतावणे. ३. (क्व.) घोळणे इतर अर्थी.

**घोळलेला** वि. मुरलेला; तयार झालेला.

**घोळसणे, घोळसावणे** उक्रि. घोळणे. १. (चूर्ण, द्रव पदार्थ इत्यादीत) ढवळणे. २. (एक पदार्थ दुसऱ्या पदार्थात भिनून जाईल अशा तऱ्हेने) हलविणे; मिसळणे; खालीवर करणे; उलथापालथ करणे. ३. (ल.) कुचलणे; कुट्टा काढणे; खुबलणे; लोळविणे; मारपीट करणे; खुंदळणे : 'देह घोळसितां नरकद्वारीं। तो अणुभरीं कुंथेना।' - एभा

२६.३४०.४. घोळणे; वाटोळे फिरवणे : 'नाचविसी पाय गे घोळसूनि भोय।' - निगा ९२.

**घोळं(ळां)कार, घोळांकार** पु. गोंधळ; घोटाळा; गोलंकार.

**घोळाणा** पु. (क.) गोंधळ; गुंतागुंत; घोटाळा.

**घोळाणा-ना** पु. १. हातावर चोळून मीठ घालून खातात तो हरभऱ्याचा हुळा, ज्वारीचा हुरडा इ. : 'हुरडा ओव्या घोळाणा। तिळगुळेंसि चाखविले सुजाणा।' - एभा ३१.४०१. २. कडुनिंबाची कोवळी पाने, चिंच, बिबे इ.चे मिश्रण करून त्याला फोडणी देऊन तयार केलेला पदार्थ. हा आर्द्रा नक्षत्राच्या सुरुवातीला बदलत्या ऋतुमानाचा शरीरावर होणारा परिणाम टाळण्यासाठी खातात. (व.ना.) ३. कच्ची पालेभाजी कुसकरून तिखट, मीठ, तेल वगैरे घालून केलेला खाद्यपदार्थ; घोळणा.(व.)

**घोळामेळाने** क्रिवि. घोळका करून : 'घोळामेळाने माणसे उभी होती.' - मुंगी १२४.

**घोळांद्रे** न. रंजीस आणणे; सारखे पाठीस लागणे. (व.)

**घोळी** स्त्री. एक प्रकारची भाजी. (बे.)

**घोळीव** वि. १. घोळलेला. २. गुळगुळीत केलेला : 'सर्वांगानें गोल असा घोंळीव हिरा कोणी गिळल्यास त्यापासून इजा होत नाही.' - पदाव १.७०. ३. गाळीव; निवडक. (व.)

**घोळून** क्रिवि. एकदिलाने; श्रमविभागाने. (गो.)

**घोळ्हाटमंडळ** पहा : **गोल्हाट**

**घों** उद्गा. सोसाट्याचा वारा, समुद्राच्या लाटा इ.कांचा मोठा आवाज : 'आणिक श्रीकृष्णांचे बोलणें। घों करी आलें श्रवणें।' - ज्ञा ९.५३१.

**घोंग** न. सोंग; वेष : 'नंदालयीं बाळक घोंग त्याचें। ब्रह्मादिकां दुर्लभ सोंग त्याचें।' - सारुह १.६०.

**घोंग(गा-घ)ट** न. १. तोंडावरून घेतलेले वस्त्र; बुरखा. पहा : **घुंगट.** २. (ल.) भरलेले आभाळ; पाऊस डवरून आलेले आकाश. (क्रि. घालणे.) [सं. गुठ् - गुंठन] (वा.) ० **घालणे -** रुसणे.

**घोंग(गा)ट** न. १. घों घों असा आवाज करणाऱ्या, घोंगावणाऱ्या माशांचा समुदाय; गोंगाट. २. घुंगुरटे : 'मज सिंहासि बळ दाविसी। घोंगटांचे।' - कथा ३.१०.७९. ३. झट; लचांड; झेंगट; शुक्लकाष्ठ.

**घोंगुटी** स्त्री. मान. (झाडी) [सं.घोणा]

**घोंगड** न. कांबळे; घोंगडे. (व.)

**घोंगडगुंची** स्त्री. पाऊस निवारण्यासाठी वापरायची घोंगड्याची खोळ. (बे.)

**घोंगडबाऊ** पु. द्वाड मुलांना भिवविणारा घोंगडे पांघरलेला मनुष्य; बागुलबोवा.

**घोंगडी-डे** स्त्री.न. १. कांबळ्याची एक पट्टी; दोन घोंगड्या उभ्या शिवून जोडल्या असता कांबळा होतो : 'येरे घोंगडीच्या पांघरणारा। गाई वळणारा।' - भज ६३. २. कर्नाटकी कांबळ्यासारखी, पांढरी, भारी, किंमती घोंगडी. [क. गोंगडि]

**घोंगडे** न. १. लचांड; लोढणे; पायखोडाबेडी; दुस्सह, दुर्वाह्य, परंतु करणे अवश्य असलेले काम इ. २. (शिव्या देऊन, धक्के मारून, उपहास करून एखाद्याची केलेली) फजिती; त्रेधा; हबेलंडी; दुर्दशा. (वा.) ० **गळ्यात येणे, पडणे -** एखादे लचांड मागे लागणे. ० **भिजत ठेवणे, पडणे -** एखाद्या प्रश्नाचा निकाल न लावता तो तसाच अनिर्णीत राहू देणे, राहणे. **एखाद्याच्या गळ्यात घोंगडे घालणे -** एखाद्याला काही उपद्रवकारक काम सांगणे; एखाद्यांच्या मागे त्रासदायक कर्तव्य, लचांड लावून देणे.

**घोंगड्या** वि. (ल.) गरीब कामकरी, मजूर.

**घोंगड्या** वि. काळ्या रंगाचा मोठा (सुरवंट).

**घोंगण** न. गुरफटून घेतलेली स्थिती.

**घोंगण** न. गोळा केलेला कचरा; गव्हाटा; राडा; खळमळ; घाण; खिचडी (अशा वस्तूवर माशा घों घों करतात त्यावरून).

**घोंग(गा)णा** पहा : **घोळ(ळा)णा**

**घोंगणे** अक्रि. १. घों घों असा आवाज करणे; गर्जणे (वारा, लाटा इ.नी). २. घोंगावणे; घों घों आवाज करणे (माशा इ. नी). ३. एकत्र जमणें; गर्दी, गिल्ला करणे. [ध्व. घों घों]

**घोंगता-ती-ते** पु. स्त्री. न. १. घोंगडी रुंदीच्या बाजूने दुमडून एका बाजूस शिवून केलेली खोळ. (क्रि. घेणे.) २. (लहान मुलांची) कुंची; एक प्रकारचा झगा. (कु.) पहा : **घोंगशी**

**घोंगत्याकुंवर** पु. पुष्य नक्षत्राचे एक नाव. कारण या नक्षत्राचा पाऊस फार पडत असल्याने घोंगत्याचा खप फार होतो.

**घोंगरट** स्त्री. घोंगडी : 'लक्ष्मीबाई आली पांघरली घोंगरट।'-जसा ९९.

**घोंगशी** स्त्री. १. लहानसे कमानीवजा देऊळ. (व) २. पहा : **घोंगता** (सर्व अर्थी). ३. फाटून भोकसा पडलेल्या वस्त्राला चोहोकडून एकत्र करून शिवले असता येणारा झोळ.

**घोंगस** स्त्री. पहा : **घोंगता.** पावसाकरिता केलेली घोंगडीची खोळ; घुंगी. (व.)

**घोंगसूड** वि. अनाहूत. (झाडी)

**घोंगा** पु. घोंगडबाऊ; बागुलबुवा. (कु.)

**घोंगाट-ण** न. १. तोंडावरून वस्त्र, बुरखा घेतलेली अवस्था; घुंगट. (क्रि. घालणे, मारणे, घेणे.) २. पावसाचे अवडंबर अंधारी; मळभ.

**घोंगाट-ण** न. १. माशांचा, भुंग्यांचा गुणगुणाट. २. माशांचा थवा, समुदाय, घोळका : 'जें का खरकटलें मरकटलें। अत्यंत घोंगाणे घोंगाळिलें।' - हंको. ३. (ल.) लोटालोटी; झोंबाझोंबी; घेघेमार; झोड; झुम; रेटारेटी. उदा. भिकाऱ्यांची भिक्षा मिळविण्यासाठी इ. (क्रि. पडणे, बसणे, जमणे, उडणे.) पहा : **घोंगट.** ४. पहा : **गोंगाट**

**घोंगाडणे** अक्रि. एकत्र जमणे; गोळा होणे (आकाशात ढग इ.).

**घोंगाणा** वि. १. आरडाओरड करणारा; घोंगावणारा. २. ओंगळ; घाणेरडा : 'काय घोंगाणी घाघाणी। ताकामध्यें घाटी लोणी।' - तुगा ६२३.

**घोंगाणी** स्त्री. आरडाओरड करणारी स्त्री.

वि. १. ओंगळ; घाणेरडी. २. अडाणी.

**घोंगाय(व)णे** अक्रि. १. घों घो (माशा इ-कांनी) करणे; (माशा इ. बसल्यामुळे) बुजबुजणे; घाणेरडे होणे : 'हे बहुतांचें उच्छिष्ट ताट। घोंगायलें

विकारीं।' - मुरंशु ४०८. २. मोठ्याने घों घों करीत जाणे, गोळा होणे.

**घोंगेणे** पहा : **घोघेणे**

**घोंगी, घोगी** स्त्री. पावसापासून रक्षण करण्याकरिता, डोक्यावर घेण्यासाठी केलेला घोंगता; खोळ. पहा : **घुगी** १. [हिं. घूघी = पिशवी]

**घोंगेरा, घोंघेरा** पु. मुंग्याच्या जातीचा एक लहान किडा. हा बांबू कोरतो व जमिनीत बीळ करून राहतो; घुरघुरा.

**घोंगो** पु. बागुलबोवा; घोंगडबाऊ. (गो. कु.)

**घोंगोला :** पु. भुंगा. (झाडी) [क. गुंगड]

**घोंघट** पहा : **घोंगट, घोंगाट**

**घोंघाणी माशी** १. गुंगुं करीत येऊन मेवामिठाई इ. खाद्यपदार्थांवर बसणारी (मोठी) माशी. २. (ल.) भोजनभाऊ; पंक्तिपठाण; पंक्तिबारगीर.

**घोंघावणे** पहा : **घोंगावणे**

**घोंची** स्त्री. डोक्यावरून पाठीवर घ्यायचे लहान मुलांचे खोळीसारखे रेशमी पांघरूण : 'अंगडं टोपडं घेतें घोंचीला काळा खण। गोऱ्यापणाला मोडवान।' - बा १५८.

**घोंट** स्त्री. १. एक काटेरी वनस्पतिविशेष. (को.) २. एक जंगली काटेरी वेल. हिच्या कोवळ्या पानांची भाजी करतात. (राजा.)

न. १. सदर वनस्पतीचे फळ. २. झाडावरच पिकून कठीण झालेली सुपारी; घोटसुपारी. (को.)

**घोंटेर, घोटीर** पु. पक्ष्याचे घरटे : 'नेर्ली घेंटेरींचीं पिलं चोरून्नु। पखे नाथिली।' - ख्रिपु १.१४.२. (गो.) [सं.कोटर]

**घोंटोणी** स्त्री. आपोष्णी; आपोशन. (गो.)

**घोंप** पु. झुपका; गुच्छ; फुले; शेंगा, बी इत्यादींना असणारा देठ; घड; घोस. (को.)

**घॉघॉ** पु. पाणलोट; उंचावरून पडणारा पाण्याचा प्रवाह. (गो.) [ध्व.]

**घॉल** वि. दाट झाडी. (गो.)

**घॉळकांवचे** सक्रि. हेलपाटे, खेपा घालायला लावणे; नाचविणे. (गो.)

**घाँगा** पु. (मुलांच्या भाषेत) बागुलबोवा. (गो.)

**घाँटॉ** पु. दाणे, तंबाखू इत्यादिकांत आढळणारा किडा. (गो.)

**घाँशॅ** पु. लहान मुलांच्या पोटात होणारा एक विकार. (गो.)

**घौघा** पु. दंगा; दंगल.

**घौस** वि. १. खणखणीत, टणटणीत; डोर; पहाडी (आवाज, वाद्य). (को.) २. (रूढ) मोठा व देखणा; ठसठशीत; ठसकेबाज; घवघवीत (दागिना इ.).

**घ्न** वि. १. (समासात उत्तरपदी) ठार मारणारा; नाश करणारा. उदा. रोगघ्न = रोग नाहीसा करणारे, वातघ्न = वात नाहीसा करणारे, कफघ्न, दोषघ्न, जंतुघ्न इ. २. न मानणारा. विसरणारा. उदा. कृतघ्न.

**घ्या** उद्गा. पहा ! ऐका ! 'हे घे' या अर्थी.

**घ्येरूसा** वि. १. गेरूसारखा. २. (ल.) कस्पटासमान; केराप्रमाणे : 'धन ग संपदा तुझ्या सांदीचा घ्येरूसा।' - लोले १८०.

**घ्रष्टी** स्त्री. घसट; दाट मैत्री : 'हळुहळु घ्रष्टी पडली।' - लीचउ ४८१.[सं. घृष्टि]

**घ्राण** न. १. नाक; नासिकाज्याने वास कळतो ते इंद्रिय; घ्राणेंद्रिय : 'घ्राणीं लाविजती मुक्ताफळें। तरी तयांचें काय कळे। मोल मान॥' ज्ञा १५.३९५. [सं.]

**घ्राणगर्त** स्त्री. (वै.) वास ग्रहण करणाऱ्या पेशी ज्या खोलगट भागात असतात तो भाग.

**घ्राणस्थाली** स्त्री. (वै.) ज्या पेशीसमूहापासून घ्राणेंद्रिय विकसित होते अशा पेशींचा समूह.

**घ्राणक्षेत्र** न. (वै.) वासाची संवेदना जाणणारा मेंदूतील भाग.

**घ्रात** वि. वास घेतलेले; हुंगलेले. उदा. अनाघ्रात. [सं.]

**घ्राता** वि. वास घेणारा; हुंगणारा : 'वास सुवास सुमन। घ्रेय घ्राता आणि घ्राण। कृष्णमकरंदें जाण। विश्रांति संपूर्ण स्वयें येती॥' - एभा १.२५३. [सं.]



**ङ**

**ङ** मराठी वर्णमालेतील विसावे अक्षर आणि पाचवे व्यंजन. 'वाङ्मय', 'पराङ्मुख', 'वाङ्निश्चय' यासारखे मोजके शब्द सोडून एरवी फक्त कंठ्य व्यंजनापूर्वी येणारे. अशा ठिकाणी त्याचे लेखन त्यापूर्वी येणाऱ्या स्वरावर शिरोबिंदू देऊन होते. 'अंक', 'असंख्य', 'रंग', 'उल्लंघन'. हा वर्ण शब्दारंभी येत नाही.



# संदर्भकोश


| | | |
|---|---|---|
| महाराष्ट्र शब्दकोश | य. रा. दाते, चिं. ग. कर्वे | वरदा प्रकाशन पुणे. |
| मराठी-इंग्रजी शब्दकोश | मोल्स्वर्थ | शुभदा सारस्वत, प्रकाशन पुणे. |
| मराठी शब्दरत्नाकर (विस्तारित) | वा. गो. आपटे, ह. अ. भावे | |
| अभिनव मराठी मराठी शब्दकोश | द. ह. अग्निहोत्री | व्हीनस प्रकाशन, पुणे. |
| सरस्वती शब्दकोश | वि. वा. भिडे, रा. शं. वाळिंबे | चित्रशाळा प्रकाशन, पुणे. |
| व्यावहारिक मराठी शब्दार्थकोश | मो. वि. भाटवडेकर | राजहंस प्रकाशन, पुणे. |
| ऐतिहासिक शब्दकोश (पुरवणीसह) | य. न. केळकर | डायमंड पब्लिकेशन्स, पुणे. |
| पारमार्थिक शब्दकोश | अनुराधा कुलकर्णी, विजय भटकर | डायमंड पब्लिकेशन्स, पुणे. |
| मराठी पर्यायी शब्दांचा कोश | मो. वि. भाटवडेकर | साधना प्रकाशन, पुणे. |
| पर्याय शब्दकोश | वि. शं. ठकार | नितीन प्रकाशन, पुणे. |
| झाडी बोली शब्दकोश | हरिश्चंद्र बोरकर | विजय प्रकाशन, नागपूर. |
| वैदर्भी बोलीचा शब्दकोश | दे. गं. सोटे | सोटे साहित्य प्रकाशन, वर्धा. |
| अहिराणी शब्दकोश | रमेश सूर्यवंशी | अक्षय प्रकाशन, पुणे. |
| अहिराणी वाग्वैभव | अभिमन्यू पाटील | कस्तुरी प्रकाशन, अंमळनेर |
| लोकसाहित्य शब्दकोश | सरोजिनी बाबर | लोकसाहित्य समिती, मुंबई. |
| श्रीनामदेवगाथा शब्दार्थ संदर्भकोश | मु. श्री. कानडे, रा. शं. नगरकर | रामकृष्ण प्रकाशन, पुणे. |
| श्रीतुकारामगाथा शब्दार्थ संदर्भकोश | मु. श्री. कानडे, रा. शं. नगरकर | रामदासी प्रेरणा. प्रसारक समुदाय, पुणे. |
| श्रीसमर्थ-रामदास-वाङ्मय-शब्दार्थ संदर्भकोश | मु. श्री. कानडे रा. शं. नगरकर | रामकृष्ण प्रकाशन, पुणे. |
| एकनाथी भागवत शब्दार्थ संदर्भकोश | मु. श्री. कानडे रा. शं. नगरकर | रामकृष्ण प्रकाशन, पुणे |
| तंजावर कोश | शं. गो. तुळपुळे | पुणे विद्यापीठ |
| प्राचीन मराठी शब्दकोश | तुळपुळे-फिल्डहाऊस | पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. |
| ग्रामीण बोलीचा शब्दकोश | द. ता. भोसले | मेहता प्रकाशन, पुणे. |
| हंसकोश | र. भा. गोडबोले | गोडबोले प्रकाशन, पुणे. |
| गांवगाडा शब्दकोश | रा. वि. मराठे. | |
| राजकोश (राज्य व्यवहार कोश) | अ. द. मराठे | डायमंड पब्लिकेशन्स, पुणे. |

| | | |
|---|---|---|
| अर्थच्छटा कोश | मो. वि. भाटवडेकर | स्नेहवर्धन, पुणे. |
| मराठी लाक्षणिक शब्दकोश | र. ल. उपासनी | साहित्य प्रसारकेंद्र, नागपूर. |
| दखनी भाषा | श्री. रं. कुलकर्णी | राज्य मराठी विकास संस्था, मुंबई. |
| चौभाषी व्यावहारिक शब्दकोश | गणेश ओतुरकर | संताजी प्रकाशन, नाशिक. |
| मराठी शब्दविलास | चंद्रहास जोशी | मेहता प्रकाशन, पुणे. |
| मराठी शब्दाभ्यास कोश | स. ध. झांबरे | साकेत प्रकाशन, औरंगाबाद. |
| शब्दसखे | वसंत उत्पात | स्नेहवर्धन, पुणे. |
| मराठी व्युत्पत्तिकोश (पुरवणीसह) | कृ. पां. कुलकर्णी, श्रीपाद जोशी | शुभदा सारस्वत, पुणे. |
| व्युत्पत्ति प्रदीप | गो. शं. बापट, | १० वी आवृत्ती, १९२५. |
| | गो. कृ. मोडक | |
| मराठीतील एकाक्षरी (शब्दांचा)लघुकोश | श्री. भा. म. गोरे | वरदा बुक्स, प्रकाशन. |
| लेवा-गण-बोली कोश | नि. रा. पाटील | |
| विज्ञान आणि तंत्रज्ञान शब्दकोश | डॉ. अ. पां. देशपांडे, | महाराष्ट्र शासन, मुंबई. |
| | डॉ. बाळ फोंडके | |
| ज्ञानेश्वरीचे शब्दभांडार | रा. ना. वेलिंगकर | मराठी संशोधक मंडळ, मुंबई. |
| फार्शी-मराठी शब्दकोश | मा. त्रिं. पटवर्धन | भा. इ. सं. मंडळ, पुणे. |
| संख्या-संकेत कोश | श्री. शा. हणमंते | प्रसाद प्रकाशन, पुणे. |
| शब्दानंद-त्रिभाषा कोश | सत्त्वशीला सामंत | डायमंड पब्लिकेशन्स, पुणे. |
| भाषा व्यवहार शब्दावली | | भाषा संचलनालय, |
| | | महाराष्ट्र शासन, मुंबई. |

(भाषा संचालनालय, महाराष्ट्र साहित्य संस्कृती मंडळ (महाराष्ट्र शासन) यांनी प्रकाशित केलेले विविध परिभाषा कोश, संज्ञाकोश आणि शब्दकोश)

# महाराष्ट्र राज्य मराठी साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई
## प्रकाशित कोश वाङ्मय

| | |
|---|---|
| १. गुजराती – मराठी शब्दकोश | श्री. भाऊ धर्माधिकारी |
| २. उर्दू – मराठी शब्दकोश | श्री. श्रीपाद जोशी, श्री. एन. एस. गोरेकर |
| ३. कन्नड – मराठी शब्दकोश | श्री. पुंडलिकजी कातगडे |
| ४. तमीळ – मराठी शब्दकोश | सौ. रमाबाई जोशी, श्री. पु. दि. जोशी |
| ५. मराठी – कन्नड शब्दकोश | श्री. गुरुनाथ दिवेकर |
| ६. मराठी – सिंधी शब्दकोश | श्री. लछमन हर्दवाणी |
| ७. मराठी – गुजराती शब्दकोश | श्री. भाऊ धर्माधिकारी |
| ८. पाली – मराठी शब्दकोश | श्री. बाबा भारती |
| ९. मराठी वाङ्मय कोश : खंड – १ | श्री. गं. दे. खानोलकर |
| १०. मराठी वाङ्मय कोश : खंड – २ भाग १ | डॉ. गो. म. कुलकर्णी |
| ११. मराठी वाङ्मय कोश : खंड – ४ | डॉ. विजया राजाध्यक्ष |
| १३. आयुर्वेदीय शब्दकोश भाग १ व २ (संस्कृत–संस्कृत) | पं. वेणीमाधव शास्त्री जोशी, पं. ना. ह. जोशी |
| १४. आयुर्वेदीय शब्दकोश भाग १ व २ (संस्कृत–संस्कृत–मराठी) | श्री. वेणीमाधव शास्त्री जोशी, पं. ना. ह. जोशी |
| १५. इंग्रजी – मराठी स्थापत्य शिल्पकोश | श्री. रा. वि. मराठे |
| १६. ज्ञानोदय लेखन सार सूची : खंड – १ भाग १ | डॉ. गंगाधर ना. मोरजे, प्रा. पद्मा मोरजे |
| १७. ज्ञानोदय लेखन सार सूची : खंड – १ भाग २ | डॉ. गंगाधर ना. मोरजे, डॉ. स. वा. मुळे |
| १८. ज्ञानोदय लेखन सार सूची : खंड – २ भाग १ | डॉ. गंगाधर ना. मोरजे, डॉ. स. वा. मुळे |
| १९. डॉ. माधवराव पटवर्धन – वाङ्मय सूची | श्री. सु. रा. चुनेकर |
| २०. वैज्ञानिक पारिभाषिक संज्ञा गणित शास्त्र, वास्तवशास्त्र, रसायन शास्त्र | डॉ. गो. रा. परांजपे |
| २१. साहित्य संहिता समीक्षा आणि पारिभाषिक संज्ञा | श्री. वसंत दावतर |
| २२. मराठी अनुवाद ग्रंथ सूची | डॉ. वीणा मुळे |
| २३. मराठी शब्दकोश, पहिला खंड | प्राचार्य रामदास डांगे |
| २४. विज्ञान आणि तंत्रज्ञान कोश | डॉ. अ. पां. देशपांडे, डॉ. बाळ फोंडके |

आह्मां घरीं धन शब्दांचीं च रत्नें । शब्दांचीं च शस्त्रें यत्न करूं ।
शब्द चि आमुच्या जीवाचें जीवन । शब्दें वांटूं धन जनलोकां ।
तुका म्हणे पाहा शब्द चि हा देव । शब्दें चि गौरव पूजा करूं ॥

मुद्रणस्थळ : शासकीय फोटोझिंको मुद्रणालय, पुणे - ४११ ००१.